Air'man, *n.* ( ए'अर्-मन् )—aviator. वैमानिक.
Air'plāne, *n.* ( ए'अर्-प्लेन् )—aeroplane. विमान
Air'-pŏcket, *n.* ( ए'अर्-पॉकेट् )—apparent vacuum in air causing aeroplane to drop some distance. हवा असलेली पिशवी किंवा कप्पा.
Air'-pŭmp, *n.* ( ए'अर्-पम्प् )—instrument for pumping out air. हवा काढून घेण्याचें यंत्र.
Air'-raid, *n.* ( ए'अर्-रेड् )—attack by aircraft. विमानांनीं केलेला हल्ला.
Air'shĭp, *n.* ( ए'अर्-शिप् )—flying machine lighter than air. वायुयान.
Air'-tīght, *a.* ( ए'अर्-टाइट् )—so tight as to be impermeable to air. हवा न शिरण्याइतका घट्ट बांधलेला, वायुनिरोधक.
Air'way, *n.* ( ए'अर्-वे )—a passage for air-ventilating passage in mine; route regularly followed by aircraft. खाणींतील हवेचा मार्ग; आकाशांतून विमानें जाण्याचा रस्ता.
Air'ȳ, *a.* ( ए'अरि )—breezy; light, thin; sprightly. हवाशीर; पातळ; चैनी, आनंदी.
Aisle, *n.* ( īl, आइल् )—division of church; passage between rows of pews. चर्चचा एक भाग: सभामंडपाच्या दोहों बाजूचें प्रत्येक दालन. [ L. *ala*, a wing ]
Ajär', *adv.* ( अजा'र् )—slightly open; at variance. अर्धवट उघडा ( दरवाजा ); बेबनावानें.
Akĭm'bō, *adv.* ( अकिं'म्बो )—with hands on hips and elbows turned out. कोंपर वर करून व ढुंगणावर हात ठेवून, कमानदार.
Akĭn', *pred a.* (अकि'न्)—related by blood; of similar or kindred character, of the same properties. आप्त, नातलग; सजातीय.
Ăl'abăster, *n.* ( ॲ'लबास्टर् )—kinds of carbonate or sulphate of lime. एका जातीचा संगमरवरी दगडासारखा पांढरा दगड.
Alăck', *Alack'-a-day, int.* (अलॅ'क्, अलॅ'क्-अ-डे)—( exclamation expressing sorrow ) alas the day! अरेरे! हाय हाय!!
Alăc'rĭtȳ, *n.* ( अलॅ'क्रिटि )—briskness, cheerful readiness. उत्साह, उत्सुकता, धमक, उतावळ.
Alärm', *n.* ( अला'र्म् )—call to arms, warning sound; warning of approaching danger; hubbub. सूचना, गजर; भयाची सूचना; हूल, हुल्लड. To take *alarm* at=धास्ती घेणें, बाचकणें. *v. t.* give the alarm to; disturb, frighten. भयाची सूचना देणें; भिवविणें, भीति दाखविणें. [ L. *ad*, to & *arma*, arms ]
Alarm'ism, *n.* (अला'र्मिझम्)—panic-mongering, fostering a panic. हूल उठवणें.
Alarm'ist, *n.* ( अला'र्मिस्ट् )—a panic-monger. हूल उठवणारा, भय भाकणारा.
Alä'rŭm, *n.* ( अलॅ'रम् )—signal of alarm; an alarm-clock. भयसूचक खूण: गजराचें घड्याळ.
Alăs', *int.* ( अला'स् )—exclamation expressing grief. हाय हाय! अरेरे!!
Ălb, *n.* ( ॲल्ब् )—white vestment reaching to feet, worn by priests, etc. रोमन कॅथॉलिक धर्मोपदेशकाचा पांढरा झगा.
Ăl'bacore, *n.* ( ॲ'ल्बकोअर् )—large sea-fish of the tunny kind. मोठा समुद्रांतील मासा.
Ăl'batrŏs, *n.* ( ॲ'ल्बट्रॉस् )—type of Austrian aeroplane. ऑस्ट्रिआंतील विमान.
Ăl'batrŏss, *n.* (ॲ'ल्बट्रॉस्)—the largest sea-fowl ever known. सर्वांत मोठा समुद्रपक्षी.
Alb'ēit, *conj.* ( awl-, ऑ'ल्-बी-इट् )—although. यद्यपि, जरी, असें आहे तरी.
Ăl'bert, *n.* ( ॲ'ल्बर्ट् )—kind of watch-chain. एका तऱ्हेची घड्याळाची सांखळी, शेढा.
Albēs'cĕnt, *a.* ( आल्बे'सेन्ट् )—growing white. पांढरा होणारा, फिकट रंगाचा.
Ălbī'nō, *n.* ( -bē-, *pl.* -os, ॲल्बी'नो )—person ( or animal ) with white hair and skin and eyes of a pink colour. पांढऱ्या कातडीचा व केसांचा आणि गुलाबी डोळे असलेला मनुष्य किंवा इतर प्राणी. Albi'ness, *n. fem.*
Ăl'bŭm, ( ॲ'ल्बम् )—blank book for autographs, photographs, etc. हस्तलेख, चित्रें वगैरे ठेवण्याचें कोरें पुस्तक, संग्रहपुस्तक.
Ălbū'mĕn, *n.* ( ॲल्ब्यू'मेन् )—white of egg; a white substance found in animal and vegetable bodies. ( अंड्यांतील ) श्वेतकल्क, गर्भपोषक द्रव्य. [ L. *albus*, white ]
Ălbū'mĭnŏid, *a.* (ॲल्ब्यू'मिनॉइड्)—like albumen. श्वेतकल्कासारखा. *n.* one of a class of nitrogenous compounds derived from animal tissues. श्वेतकल्कयुक्त पदार्थ.
Ălbŭrn'ŭm. *n.* ( ॲल्ब'र्नम् )—sapwood. रसाचें लांकूड, कोंवळें लांकूड.
Ăl'chēmĭst, *n.* ( -k-, ॲ'ल्केमिस्ट् )—one that practises alchemy. किमया करणारा, रसायनी.
Ăl'chēmīze, *v. t.* ( -k-, ॲ'ल्केमाइझ् )—change as by alchemy. किमयेच्या योगानें रूपांतर करणें.
Ăl'chēmȳ, *n.* ( -k-, ॲ'ल्केमि )—transmutation of baser metals into gold. किमया, रसायन. हीण धातूचें उच्च धातूंत रूपांतर करणारें शास्त्र.
Ăl'cohŏl, *n.* ( ॲ'ल्को-हॉल् )—pure spirit of wine: any liquor containing alcohol. मद्याचा अर्क: मद्यार्क असलेलें मादक पेय.
Ăl'cohŏlĭc, *a.* ( ॲ'ल्को-हॉलिक् )—of or like alcohol. मद्यार्काचा, मद्यार्कधर्मक.
Ăl'cohŏlĭsm, *n.* ( ॲ'ल्को-हॉलिझम् )—effect of alcohol on human system, condition of habitual drunkards. दारूचे विकार किंवा परिणाम, अतिशय दारू प्याल्यापासून झालेला रोग.
Ăl'cohŏlīze, *v. t.* ( ॲ'ल्को-हॉलाइझ् )—saturate or treat with alcohol. मद्यार्कमिश्रित करणें

Ăl'cōve, *n.* (ॲ'ल्‌-कोव्‌)—a large recess; recess in room, garden etc.; summer-house. मोठी कमान, मोठा कोनाडा; खोलींतील, बागेंतील वगैरे एकांत जागा; उन्हाळ्याकरितां बागेंतील बंगला.

Al'derman, *n.* (awl-, ऑ'ल्डर्‌-मन्‌)—civic dignitary next below mayor. नगराध्यक्ष, मेयरच्या खालच्या दर्जाचा अधिकारी.

Al'dermănic, *a.* (ऑ'ल्डर्‌-मॅनिक्‌)—pompous and portly. थाटमाटाचा, डौली, दबदार.

Āle, *n.* (एल्‌)—malt liquor; beer. सातूची केलेली दारू; एक प्रकारची पिण्याची दारू.

Āle'-house, *n.* (ए'ल्‌-हाउस्‌)—place where ale is retailed. किरकोळ दारू मिळण्याचें ठिकाण.

Alĕm'bĭc, *n.* (अले'म्बिक्‌)—apparatus formerly used in distilling. अर्क काढण्याचें यंत्र.

Alert', *a.* (ॲलं'ट्‌)—watchful, vigilant; nimble. जागरूक, दक्ष; चपळ. On the *alert*=on the look-out. सावधपणानें, टेहळणीवर. Alert'ness, *n.* सावधगिरी, चपळाई.

Ălexăn'drīne, *n.* (ॲलेग्झॅन्‌ड्राइन्‌)—a verse of six iambic feet or twelve syllables. इंग्रजी काव्यांत बारा पदें असलेलें वृत्त.

Alfrĕs'cō, *adv.* & *a.* (ॲल्फ्रे'स्को)—in the open air; open-air उघड्या हवेंत; मोकळ्या हवेंतील.

Al'gae, *n. pl.* (jē, ॲ'ल्जी)—sea-weed. समुद्रजन्य शेवाळ, जलशैवाल.

Al'*gebra*, *n.* (ॲ'ल्जिब्रा)—*investigation* of the properties of numbers by means of general symbols. बीजगणित.

Al'gebrāist, Al'gebrĭst, *nn.* (ॲ'ल्‌-जिब्रइस्ट्‌, ॲ'ल्जिब्रिस्ट्‌)—one skilled in the science of Algebra. बीजगणितज्ञ.

Ā'lias, *adv.* (ए'लि-ॲस्‌)—on other occasions. ऊर्फ. *n. assumed name.* दुसरें नांव, टोपणनांव.

Al'ibī, *n.* (ॲ'लिबाय्‌ *pl.* -is)—plea of being elsewhere. अन्य ठिकाणीं असल्याचें प्रतिपादन. [ L. *alibi*, elsewhere ]

Ā'liĕn, *a.* (ए'लिएन्‌)—not one's own; foreign; out of harmony. परकीय; विदेशी; बेसूर. *n.* stranger, foreigner. परका, परदेशचा मनुष्य.

Ā'liĕnāble, *a.* (ए'लिएनेबल्‌)—*capable* of being transferred to another. दुसऱ्याचे हातीं देण्याजोगा. Ā'lienability, Ā'lienātor, *nn.*

Ā'liĕnāte, *v. t.* (ए'लिएनेट्‌)—estrange; transfer; turn away, divert (*from*). स्नेह तोडणें; दुसऱ्याच्या हातीं देणें; मन फिरविणें.

Āliĕnā'tion, *n.* (एलिएने'शन्‌)—*estrangement*; insanity. परकीय भाव; बुद्धिभ्रंश, मन उठणें.

Āliĕnee', *n.* (ए-लि-एनी') one to whom transfer to property *is made.* मालमत्ता किंवा इस्टेट ज्याचे स्वाधीन केली तो इसम.

Ā'liĕnĭsm, *n.* (ए'लिएनिझम्‌)—*the position of* being a foreigner; study and treatment of mental diseases. परदेशस्थपणा; मानसिक रोगांचा अभ्यास व उपचार.

Ā'liĕnĭst, *n.* (ए'लिएनिस्ट्‌)—mad-doctor, doctor who treats mad men. वेड्यांचा डॉक्टर.

Alight', *v. i.* (-īt, अला'इट्‌)—dismount, descend; come down. (घोड्यावरून किंवा गाडींतून) खालीं उतरणें; खालीं येणें. *a.* on fire, lighted, kindled. जळत असलेलें.

Align', Aline', *v. t.* & *i.* (-īn, अला'इन्‌)—to place or form in a line. रांगेनें उभे करणें, (सैन्याची) रचना करणें.

Align'ment, *n.* (अला'इन्‌-मेन्ट्‌)—arrangement *in a line.* रांगेनें रचणें, रचना.

Alike', *a.* (अला'इक्‌)—similar, like. सारखा, सदृश. *adv.* similarly, in *like manner.* त्यासारखा, त्याचप्रमाणें.

Ăl'imĕnt, *n.* (ॲ'लिमेन्ट्‌)—food. आहार, पोषण, पौष्टिक अन्न. [ L. *alere*, to nourish ]

Ălimen'tal, *a.* (ॲलिमे'न्टल्‌)—supplying food, nourishing. अन्नाचा पुरवठा करणारें, पौष्टिक.

Ălimĕn'tarȳ, *a.* (ॲलिमे'न्टरि)—*nutritious, nourishing*; concerned *with nutrition.* पुष्टिकारक, पौष्टिक, पोषक; भक्ष्यासंबंधी.

Ălimentā'tion, *n.* (ॲलिमेन्टे'शन्‌)—*nourishment,* maintenance. आहार, पोषण, पोषणक्रिया.

Ăl'imonȳ, *n.* (ॲ'लिमनि)—allowance due to a wife for support. विभक्त झालेल्या बायकोच्या अन्नवस्त्राकरितां नवऱ्यास तिला द्यावा लागणारा पैसा.

Ăl'iquŏt, *a.* (ॲ'लिक्वॉट्‌)—that divides without remainder. निःशेषभाजक, जिनें दुसऱ्या रकमेस भागिलें असतां बाकी राहत नाहीं ती (संख्या). [ L. *alius*, other, and *quot*, how many ]

Alīve', *a.* (*अला'इव्‌*)—*living*; *brisk, active*; fully susceptible to. सजीव; जागृत; सतेज, चेतनायुक्त; मर्मज्ञ, गुणग्राहक.

Ăl'kalī, *n.* (ॲ'ल्कलि)—substance that neutralises acids. कल्यात्र, आल्कली, अम्लप्रतियोगी, आंबटपणा घालविणारा क्षार, खार, कालिभस्म.

Ălkalĕs'cĕnt, *a.* (ॲल्कले'सेन्ट्‌)—slightly *alkaline.* थोडासा कल्याचगुणधर्मक. Alkalĕs'cence, *n.* आल्कलीसारखा होण्याचा गुण.

Ălkăl'ifȳ, *v. t.* (ॲल्कॅ'लिफाय्‌)—*to convert into* an alkali. कल्याचाचें रूप देणें.

Ăl'kalīne, *a.* (ॲ'ल्कलाइन्‌)—of the nature of an alkali. आल्कली किंवा कल्याचाच्या गुणाचा.

Ăl'kaloĭd, *n.* (ॲ'ल्कलॉइड्‌)—nitrogenous *basic* substance, substance resembling an alkali. आल्कलीसारखे गुणधर्म असणारे पदार्थ.

All, *n.* (awl, ऑल्‌)—the whole world, everything. सर्व जग, सर्व कांहीं. *a.* the whole *amount, extent or* number. सर्व, सगळा. *pron.* the whole number, every one. सर्व

प्रत्येकजण. *adv.* entirely, quite. पूर्णपणें; अगदीं. *All but*=everything short of ( e. g. all but impossible ). बहुतेक, प्रायः. *All in all*=of paramount or exclusive importance. अत्यंत महत्त्वाचा. *At all*=in any way. कांहींच, अगदीं. *In all*=in total number. एकूण. *One and all, All and sundry*=all individually and collectively. झाडून सर्व, तमाम, यच्चयावत्. *All right, adv.* satisfactorily, as desired. मनाजोगा, इच्छिल्याप्रमाणें. *pred. a.* safe and sound, in good state, satisfactory. सुरक्षित, चांगल्या स्थितींत, समाधानकारक. *All right!*=I consent, all is right. फार उत्तम, ठीक आहे. *All the same*: (1) just the same, without any difference. अगदीं तसाच. ( E. g. It's *all the same* to me whether he goes or not; if it is *all the same* to you=if you don't mind. ) ( 2 ) in spite of, notwithstanding, however. कांहीं झालें तरी, तथापि. ( E. g. *All the same*, I wish you hadn't done it. )

Ăllay', *v. t.* ( अॅले' )—repress, assuage, pacify, quiet. शमविणें, शांत करणें, नरम करणें.

Ăllēgā'tion, *n.* ( ॲलिगे'शन् )—affirmation; plea; assertion ( *esp.* one not proved ), declaration. निश्चित सांगणें; सबब, आरोप.

Allĕge', *v. t.* ( ॲले'ज् )—affirm; state or advance as a fact. निश्चयपूर्वक सांगणें; वस्तुस्थिति म्हणून पुढें मांडणें, पुरावा देणें. [ L. *ad*, to & *legare*, to depute ]

Allē'giance, *n.* ( -jans, ॲली'जन्स् )—duty of subject to sovereign or government; loyalty. राजसेवाधर्म, राजनिष्ठा; निष्ठा, भक्ति.

Ăll'égoric, Ăll'égorĭcal, *aa.* ( ॲ'लिगोरिक्, ॲ'लिगोरिकल् )—in the manner of an allegory; *figurative.* दृष्टांतरूप; लाक्षणिक, अन्योक्तिरूप.

Ăll'égorīze, *v. t.* ( ॲ'लिगोराइझ् )—treat as an allegory; understand figuratively. रूपकानें दर्शविणें; दृष्टान्त म्हणून समजणें. All'egorist, *n.*

Ăllĕgrĕt'to, *adv. & a.* ( ॲलेग्रे'टो )—in somewhat lively time. द्रुत ( गति ).

Ălle'grō, *adv. & a.* ( -lā-, ॲले'ग्रो )—in quick and lively time. द्रुत ( गति ).

Ăllélu'ia, *n.* ( -lōōya, ॲलिलू'या )—song of praise. स्तुतिगीत, स्तुतिस्तोत्र.

Ă'llēgorў, *n.* (ॲ'लिगरि )—narrative describing one subject under the guise of another. रूपक, अन्योक्ति, अप्रस्तुतप्रशंसा. ( Gr. *allos*, other, & *agoreuein*, to speak ]

Allē'vĭāte, *v.t.* ( ॲली'व्हिएट् )—mitigate, lessen. शांत करणें; ( दुःख वगैरे ) कमी करणें.

Allēvĭā'tion, *n.* ( ॲलीव्हिए'शन् )—act of relieving or making light. उपशमन; हलकें करणें. Allēvia'tor, *n.* उपशमन करणारा.

Ăll'ey, *n.* ( ॲ'लि )—narrow street, passage; back lane. गल्ली, अरुंद रस्ता; पाठीमागची आळी. *Blind alley*=an alley closed at end. बाहेर जाण्याला वाट नसलेला बोळ. [ L. *ad*, to & *nare*, to swim ]

All'-fours, *n.* ( ऑ'ल्-फोर्झ् )—one's legs and arms. हातपाय. To go on *all fours*=लहान मुलांप्रमाणें रांगणें. It does not go *all fours*=तें सर्वांशीं जुळत नाहीं.

Allī'ance, *n.* ( अला'यन्स् )—relation of allies, confederation; union by marriage. सख्यसंबंध; शरीरसंबंध, विवाहसंबंध.

Ăll'ĭgātor, *n.* ( ॲ'लिगेटर् )—crocodile, a kind of large lizard. मगर, सुसर. Grasp or seizure of an alligator= मगरमिठी.

Allĭterā'tion, *n.* ( ॲलिटरे'शन् )—commencement of several words in the same sentence with the same letter. प्रास, अनुप्रास, एकामागून एक येणाऱ्या शब्दांचे आरंभीं एकाच अक्षराची पुनरावृत्ति. Alli'teral, *a.* प्रासयुक्त. ( E. g. Round and round the rugged rascal ran. ) [ L. *ad*, to & *litera*, a letter ]

Allĭt'erătĭve, *a.* ( ॲलि'टरेटिव्ह् )—pertaining to alliteration. अनुप्रासासंबंधीं. Allĭt'erāte, *v. i.*

Ăll'ocāte, *v. t.* ( ॲ'लोकेट् )—assign to, set aside, apportion. नेमून देणें, वांटून देणें. [ L. *ad*, to & *locare*, to place ]

Ălloca'tion, *n.* ( ॲलोके'शन् )—allotment. वांटणी.

Allō'dĭal, *a.* ( ॲलो'डिअल् )—not held of a superior, freehold. स्वतःच्या मालकीचा.

Allō'dĭŭm, *n.* ( ॲलो'डिअम् )—estate held in absolute ownership, freehold estate. केवळ स्वतःच्या मालकीची जहागीर, स्वसत्ताक वतन.

Ăllŏp'athў, *n.* ( ॲलॉ'पथि )—treatment of disease by inducing a different tendency. भिन्न अगर उलट स्थिति होईल अशा प्रकारें औषधोपचार करून व्याधिनाश करण्याची पद्धति, व्याधिविपरीत चिकित्सा. Ăllopă'thĭc, *a.* Allopa'thically, *adv.* Ăllo'păthĭst, *n.* [ Gr. *allos*, other & *pathos*, disease ]

Allŏt', *v. t.* ( अलॉ'ट् )—assign, distribute by lot. विभागून देणें, चिठ्या टाकून विभागणें.

Allŏt'ment, *n.* ( अलॉ'ट्-मेन्ट् )—assignment; small plot of land let for cultivation. वांटप, वांटणी, विभागणी; शेती करण्याकरितां भाड्यानें दिलेला जमिनीचा भाग.

Allŏt'tee, *n.* ( अलॉ'टी )—one to whom allotment or assignment is made, a plot-holder. ज्याला कांहीं भाग मिळाला आहे तो.

Allow', *v. t. & i.* ( अला'उ )—admit; own, acknowledge; permit; give periodically;

add, deduct. मान्य करणें; परवानगी देणें; नेमणुकीणें देणें; कमजास्त करणें.

Allow'able, *a.* (अला'उएबल्)—that may be allowed. मान्य करण्याजोगा, योग्य, वाजवी.

Allow'ance, *n.* (अला'उअन्स्)—fixed sum allowed; deduction from account, etc. देऊं केलेली ठराविक रक्कम; कमी केलेली रक्कम, सूट. *Annual allowance*=वर्षासन. *Extra allowance*=खेरीज मुशाहिरा, जादा भत्ता.

Al'lowedly̆, *adv.* (अ'लाउइड्लि)—admittedly. मान्य केल्याप्रमाणें, कबूल केल्यावरून.

Alloy', *v. t.* (अलॉ'इ्)—mix with baser metal; debase. हीणकस धातुबरोबर मिसळणें; न्यूनता किंवा कमीपणा आणणें. *n.* baser metal mixed with gold; any base mixture. भेसळ, उत्तम धातूंत कमी दराची घातलेली धातु, हीण पदार्थ.

All'-round, *n.* (ऑ'ल्-राउन्ड्)—with ability in all departments. सर्व कामांत निष्णात.

All'spice, *n.* (ऑ'ल्-स्पाइस्)—Jamaica pepper. शीतळचिनी, कापुरचिनी, कंकोळ.

Allude', *v. i.* (अॅल्यू'ड्)—refer indirectly to, hint at. अप्रत्यक्ष रीतीनें सुचवणें, अनुलक्षून बोलणें, उल्लेख करणें. [ L. *ad*, at & *ludere*, to play ]

Allūre', *v. t.* (अॅल्यु'अर्)—lure, entice, tempt; charm. मोह घालणें; भुलवणें.

Allūre'ment, *n.* (अॅल्यु'अर्-मेन्ट्)—that which entices or allures. भुलवणें, मोह, लालूच, आमिष.

Allu'sion, *n.* (-lōōzhn, अॅल्यू'झन्)—indirect reference; hint. उल्लेख, संदर्भ; सूचना.

Allu'sĭve, *a.* (-lōō-, अल्यू'झिव्ह्)—hinting at. सूचनात्मक, अप्रत्यक्ष सूचनेचा.

Allu'vĭal, *a.* (अॅल्यू'व्हिअल्)—full of deposit of earth, sand, etc. left by flood. पुरानें वाहून आलेल्या माती, वाळु वगैरे खळमळीनें भरलेलें.

Alluv'ĭon, *n.* (-loo-, अॅल्यू'व्हिअन्)—wash of sea or river against shore; matter deposited by flood. समुद्रांतून किंवा नदींतून येऊन तीरावर सांठलेला खळमळ; पुरानें वाहून आलेली माती वगैरे.

Alluv'ĭŭm, *n.* (lōō-, अॅल्यू'व्हिअम्)—(*pl. -ia*) deposit of flood. समुद्राच्या किंवा नदीच्या प्रवाहाबरोबर वाहून आलेली घाण.

Ăllȳ', *v. t.* (अॅला'इ्)—join in confederation, connect by marriage, form relation for special object. सख्य करणें; शरीरसंबंध करणें; संबंध जोडणें. *n.* allied state or person. दोस्त राष्ट्र; सख्य असलेला, दोस्त. [ L. *ad*, to & *ligare*, to bind ]

Ăl'mă Ma'ter, *n.* (ऑ'ल्मा मे'टर्)—one's university or school. स्वतः ज्या ठिकाणीं शिक्षण घेतलें तें विश्वविद्यालय किंवा शाळा, विद्यापीठ.

Al'manăc, *n.* (awl- ऑ'ल्मॅनॅक्)—yearly calendar of months and days. पंचांग.

Almi'ghty, *a.* (awlmītĭ, ऑल्मा'इटि)—infinitely powerful. सर्वशक्तिमान् (परमेश्वर).

Almīr'a, *n.* (अॅल्मा'यूरा)—cupboard, press, chest of drawers, etc. कपाट, आल्मीरा.

Alm'ond, *n.* (äm-,आ'मन्ड्)—kernel of a fruit allied to plum. बदाम, बदामगर.

Ăl'mōner, *n.* (अॅ'ल्मोनर्)—official distributor of alms. दानाध्यक्ष, दानाधिकारी.

Al'mōst, *adv.* (awl-, ऑ'ल्मोस्ट्)—very nearly, all but. बहुतकरून, प्रायः, जवळजवळ. My work is almost done=माझें काम बहुतेक संपत आलें आहे. It is almost five o'clock=पांच वाजावयास आले. He had almost reached the village=तो गांवाला पोहोंचलाच होता.

Alms, *n.* (ämz, आम्झ्)—charitable relief or donation. भिक्षा, धर्मादाय. To live on alms=भीक मागून पोट भरणें.

Ăl'ōe, *n.* (अॅ'लो)—plant with erect spikes of flowers and bitter juice; (*pl.*) purgative drug from aloe juice. कोरफड, कोरकांडें, कुंवारकांडें; काळाबोळ.

Ăl'ōes-wŏŏd, *n.* अॅ'लोज़्वुड्)—the heart-wood of large spreading trees. अगर, अगरु.

Aloft', *adv.* (-aw-, अलॉ'फ्ट्)—high up, overhead; up in the rigging. उंच, वर; डोलकाठीवर.

Alō'ne, *a.* (अलो'न्)—solitary, by or to oneself. एकटा. *adv.* only, singly, without company. एकट्यानें. To let or leave alone=to abstain from interfering with. सोडून देणें, जाऊं देणें, ज्याच्या वाटेस न जाणें.

Alŏng', *prep.* (अलॉ'ङ्ग्)—through the length or any part of the length of. वरून, बाजूनें. *adv.* in company; onward, in progress. बरोबर; पुढें. *All along*=all the time. अथपासून इतिपर्यंत, आरंभापासून शेवटपर्यंत. To get along=to get onward. उत्कर्ष पावणें, भरभराट होणें. Along with=in company with, in conjunction with. बरोबर, सह, समवेत. Along-shore, *a.*=by the shore, along and on the shore. किनाऱ्यानें, किनाऱ्याच्या बाजूनें. Alongside, *adv.*=close to side of ship. गलबताच्या बाजूलगत. Along-side of=side by side with. एकमेकांच्या जवळ जवळ, एकमेकांच्या अगदीं लगत.

Alōōf', *adv.* (अलू'फ्)—away, apart. दूर, अलग. To stand or keep or hold *aloof*=to stand apart. अलिप्त राहणें, दूर राहणें.

Alōōf'nĕss, *n.* (अलू'फ्-नेस्)—unconcern, lack of sympathy. अलिप्तपणा, तुटकपणा.

Aloud', *adv.* (अला'उड्)—loudly, with a loud voice. मोठ्यानें, मोठ्या स्वरानें.

Ălp, *n.* (अॅल्प्)—mountain-peak, summit of a mountain. पर्वताचें शिखर.

Ălpăc'a, *n.* (अॅल्पॅ'का)—llama with long wool; wool of llama; fabric made from the wool of llama. लांब लोंकर असलेलें लामा नांवाचें एक जनावर, त्याची लोंकर; आल्पाक कापड.

Ăl'pĕnstŏck, *n.* (अॅ'ल्पेन्स्टॉक्)—a strong tall iron-shod staff used in climbing. चढतांना उपयोगांत आणण्याची काठी.

Ăl'pha, *n.* (अॅ'ल्फा)—first letter in Greek alphabet. ग्रीक लिपींतील पहिला वर्ण. From *Alpha to Omega*=from beginning to end. आरंभापासून शेवटपर्यंत, अथपासून इतिपर्यंत.

Ăl'phăbĕt, *n.* (अॅ'ल्फाबेट्)—letters used in a language. वर्णमाला, मूल वर्ण; मूळाक्षरें. Alphabĕt'ic, Alphabĕt'ical, *aa.*

Ălphabĕt'icallў, *adv.* (अॅल्फाबे'टिकलि)—in the order of the alphabet. वर्णानुक्रमें; विल्हेवारीनें.

Ăl'pīne, *a.* (अॅ'ल्पाइन्)—of the Alps; lofty. आल्प्स पर्वतासंबंधीं; फार उंच, अत्युच्च.

Alread'ў, *adv.* (-awlrĕdĭ, ऑल्रे'डि)—beforehand, even now. आधींच, अगोदर.

Al'sō, *adv.* (awl-, ऑ'ल्-सो)—besides, too, further, in addition. ही, देखील.

Al'tar, *n.* (awl-, ऑ'ल्टर्)—flat-topped block for offerings to a deity. वेदी, यज्ञवेदी.

Al'tar-piece, *n.* (ऑ'ल्टर्-पीस्)—painting or sculpture behind altar. स्थंडिलाच्या मागें केलेलें चितारी काम किंवा खोदकाम.

Al'ter, *v. t.* & *i.* (awl-, ऑ'ल्टर्)—change in character, position, etc.; modify. बदलणें, फेरफार करणें; कमजास्त करणें.

Alterā'tion, *n.* (ऑल्टरे'शन्)—change, modification. बदल, फेरफार, रूपांतर, विकृति.

Al'terātive, *a.* (awl-, ऑ'ल्टरेटिव्ह्)—tending to alteration. बदलणारा, फेरफार करणारा, फरक करण्यास समर्थ. *n.* medicine or treatment that alters processes of nutrition. शरीरास सर्व प्रकारें सुख देणारें औषध.

Al'tercāte, *v. i.* (awl-, ऑ'ल्टर्केट्)—dispute hotly, wrangle (*with*). वितंडवाद करणें; तोंडास तोंड देणें. [L. *alter*, another]

Altercā'tion, *n.* (awl-, ऑल्टर्के'शन्)—a dispute with anger, warm contention in words. तोंडास तोंड, हमरीतुमरी, झटापट.

Alter'nāte, *a.* (awl-, ऑल्ट'र्नेट्)—occurring each after one of the other kind. एक सोडून एक. On alternate days=एक दिवसा आड. *v. t.* & *i.* perform by turns, occur or happen in alternate order. आळीपाळीनें करणें, एक सोडून एक आळीपाळीनें येणें.

Alter'nātelў, *adv.* (ऑल्ट'र्नेट्लि)—in an alternate manner, by turns. एक सोडून एक.

Alternā'tion, *n.* (ऑल्टर्ने'शन्)—reciprocal succession. परस्पर पालट, अदलाबदल.

Altern ātive, *a.* (ऑल्ट'र्नेटिव्ह्)—offering a choice between two things. वैकल्पिक. *n.* choice between two or more things. विकल्प, दोन गोष्टींतून एकीची निवड.-tively, *adv.*

Ăl'ternātor, *n.* (awl-, ऑ'ल्टरनेटर्)—a dynamo for producing alternating currents. एक प्रकारचें गतिमापक यंत्र.

Although', *conj.* (awl*thō*, ऑल्द्हो')—though, admit all that. यद्यपि, जरी.

Ăltĭm'ĕter, *n.* (ॲल्टि'मिटर्)—aeronautical instrument showing height above sea-level. समुद्राच्या पृष्ठभागापासून वरील एकंदर उंची मोजण्याचें यंत्र.

Al'tĭtūde, *n.* (आ'ल्टिट्यूड्)—vertical height; height above sea-level; (usu. *pl.*) high place, elevation, exaltation, eminence. उंची; समुद्रसपाटीपासूनची उंची; उच्च स्थान.

Altogĕth'er, *adv.* (awl-, -*th*-, ऑल्टु'द्हर्)—completely, entirely; on the whole. निखालस, सर्वस्वीं, अगदीं; सर्व मिळून.

Ăl'truism, *n.* (-ōō-, अॅ'ल्ट्रुइझम्)—devotion to humanity, regard for others as a principle of action. परार्थनिरता, परहितनिष्ठा, परोपकारबुद्धि. Ăl'truĭst, *n.*; Ăl'truĭstic, *a.*

Ăl'ŭm, *n.* (अॅ'लम्)—a mineral whitish transparent astringent salt. फटकी, तुरटी.

Alum'ĭnă, *n.* (अल्यु'मिना)—oxide of aluminium. एक प्रकारची माती, अल्युमिनिअमच्या व ऑक्सिजनच्या संयोगानें बनलेला पदार्थ.

Ălŭmĭn'ĭŭm, *n.* (अॅल्युमि'निअम्)—a white metal with a bluish tinge. एक प्रकारची पांढरी व हलकी कथलासारख्या रंगाची धातु.

Ălum'ĭnous, *a.* (-lōō-, अॅल्यु'मिनस्)—of alum or alumina. तुरटीचा, फटकीचा.

Alŭm'nŭs, *n.* (अॅल'म्नस्)—(*pl. alumni*) pupil of school or university. अमुक एक शाळेचा अगर विश्वविद्यालयाचा विद्यार्थी, अमुक एक विद्यालयांत शिकून तयार झालेला विद्यार्थी.

Al'ways, *adv.* (awl-, -z, ऑ'ल्वेझ्)—at all times; on all occasions. सर्वदा; नेहमीं.

Ăm, (अॅम्)—1st per. sing. of verb *to be*. (*To be* या क्रियापदाचें वर्तमानकाळीं प्रथमपुरुषाचें एकवचनाचें रूप) (मी) आहें.

Amain', *adv.* (अमे'न्)—with force; in haste. झपाट्यानें, मोठ्या जोरानें; धांदलीनें, घाईनें.

Amăl'gam, *n.* (अमॅ'ल्गम्)—mixture of a metal with mercury; plastic mixture. पारदमिश्र धातु; पारदमिश्रण. [Gr. *malassein*, to soften]

Amăl'gamāte, *v. t.* & *i.* (अमॅ'ल्-गमेट्)—mix; unite, combine. मिसळणें; एकत्र होणें.

Amălgamā'tion, *n.* (अॅमल्गमे'शन्)—mixture; union, combination. मिसळ; संमेलन, मिलाफ,

एक होणें, एकीकरण, एकत्र होणें, सायुज्यता. Amalgama'tive, *a.* Amalgama'tor, *n.*

Amănūĕn'sĭs, *n.* ( pl. -*nses*, अॅमॅन्युएं'न्सिस् )—clerk who writes from dictation. दुसऱ्यानें सांगितलेला मजकूर लिहिणारा कारकून.

Ăm'arănth, *n.* ( अॅ'मरॅन्थ् )—kinds of plant with coloured foliage; imaginary unfading flower. कोरांटी, गुलमखर; एक काल्पनिक कधींहि न कोमेजणारें फूल. [ Gr. *a*, not & *mar*, to waste away ]

Ămarăn'thīne, *a.* ( ॲमॅरॅ'न्थाइन् )—pertaining to amaranth; unfading. कोरांटीचे फुलासारखें, जांभळटसर; कधींहि न कोमजणारें.

Amăss', *v. t.* ( अमॅ'स् )—heap together; accumulate. गोळा करणें; संचय करणें, सांठविणें. [ L. *ad*, to & *massa*, a mass ]

Ăm'ateur, *n.* ( -टर, अॅ'म-ट्युअर् )—one who is fond *of*; one who cultivates a thing as a pastime. शोकी, हौशी, कलाव्यसनी; धंदेवाला नसून करमणूक म्हणून कारागिरीचें काम किंवा अभ्यास हौशीनें करणारा मनुष्य.

Ăm'ative, *a* ( अॅ'मटिव्ह् )—disposed to love, amorous. विषयी, विलासी, कामी.

Ăm'atŏl, *n.* ( अॅ'मटॉल् )—a high explosive. उत्स्फोटक किंवा भडकणारें द्रव्य.

Ăm'atorў, *n.* ( अॅ'मेटरि )—of lovers, amorous. प्रेमीजनांसंबंधीं, प्रेमजनक, शृंगारिक.

Amāze', *v. t.* ( अमे'झ् )—overwhelm with wonder. आश्चर्यचकित करणें, थक्क करणें To be amazed=तोंडांत बोट घालणें, चकणें.

Amāze'ment, *n.* ( अमे'झ्-मेन्ट् )—astonishment, wonder, confusion. विस्मय, आश्चर्य, अचंबा.

Amāz'ing, *a.* ( अमे'झिंग् )—very wonderful, astonishing. फार आश्चर्यकारक, अद्भुत.

Ăm'azŏn, *n.* ( अॅ'मझॉन् )—female warrior; a warlike or masculine woman, virago. शूर स्त्री; पुरुषी स्त्री, जहांबाज बाई.

Ămbā'ges, *n. pl.* ( -jēz, अॅम्बे'जीझ् )—roundabout ways. द्राविडी प्राणायाम, आढेवेढे. [ L. *ambi*, about, & *agere*, to drive ]

Ămbăss'ador, *n.* ( अॅम्बॅ'सडर् )—minister sent to a foreign court. राजदूत, राजाचा परदरबारीं जाणारा वकील. [ L. *ambactus*, a dependant ]

Ăm'ber, *n.* ( अॅ'म्बर् )—a yellow translucent fossil resin. जमिनींत सांपडणारा पिंवळसर रंगाचा एक सुगंधी पदार्थ, तैलस्फटिक, तृणमणि.

Ăm'bergris, *n.* ( -ēs, अॅ'म्बरग्रीस् )—a fragrant substance of an ash-gray colour obtained from the sperm-whale. उदी अंबर, एका जातीचे माशाच्या अंगापासून उत्पन्न होणारा सुगंधी पदार्थ.

Ămbĭdĕx'ter, *a.* ( अॅम्बिडे'क्स्टर् )—able to use both hands alike; double-dealing. दोन्ही हातांनीं सारखा, सव्यसाची; उभयपक्षाला सारखा फसवणारा. [ L. *ambo*, both & *dexter*, the right hand ]

Ămbĭdĕxtĕ'rĭtў, *n.* ( अॅम्बिडेक्स्टे'रिटि )—superior cleverness or adaptability. सव्यसाचित्व, फार हुशारी. Ămbĭdĕxte'rous, -dextrous, *a.*

Ăm'bĭent, *a.* ( अॅ'म्बिएन्ट् )—going round about, surrounding. वेष्टन करणारा, वेढणारा, घेरणारा. [ *ambi*, about & *ire*, to go ]

Ămbĭgū'ĭtў, *n.* ( अॅम्बिग्यू'इटि )—doubtfulness of meaning, uncertaintly of signification. अर्थाचा संदिग्धपणा, द्व्यर्थता, दुटप्पीपणा.

Ămbĭg'ūous, *a.* ( अॅम्बि'ग्युअस् )—of doubtful meaning; uncertain, of uncertain signification. संदिग्ध, द्व्यर्थी; अनिश्चित (अर्थाचा).

Ăm'bĭt, *n.* ( अॅ'म्बिट् )—confines, scope, circumference, circuit. मर्यादा, सीमा, हद्द, विस्तार.

Ămbĭ'tion, *n.* ( अॅम्बि'शन् )—desire for distinction; aspiration, object of aspiration. महत्त्वाकांक्षा; मोठेपणाची हांव, ऐश्वर्याकांक्षा.

Ămbĭ'tious, *a.* ( -shus, अॅम्बि'शस् )—ardently desirous, full of ambition. महत्त्वाकांक्षी.

Ăm'ble, *v. i.* ( अॅ'म्बल् )—move at easy pace. साध्या गतीनें चालणें. *n.* easy pace. सहज गति, साधी चाल. [ L. *ambulare*, to walk about ]

Ămbrō'sĭa, *n.* ( -zĭa, अॅम्ब्रो'झिआ )—food of the gods; thing delightful to taste or smell. देवांचें अन्न, सुधा, अमृत; स्वादिष्ट वस्तु. Ămbrō'-sial, *a.* [ L. *a*, not & *mors*, death ]

Ăm'būlance, *n.* ( अॅ'म्बुलन्स् )—moving hospital; conveyance for sick or wounded persons. फिरता दवाखाना; आजारी किंवा जखमी लोकांकरितां गाडी. [ L. *ambulare*, to walk about ]

Ăm'būlātorў, *a.* ( अॅ'म्बूलेटरि )—of or for walking. चालता, फिरता, भटकण्याचा. *n.* place for walking; cloister. फिरण्याची जागा; वराजवळील हिंडण्याफिरण्याची जागा.

Ămbŭscāde', *n.* ( अॅम्बस्के'ड् )—a hiding to attack by surprise; a body of troops in concealment; the hidden place of ambush. दबा धरणें, दडी; दबा धरून राहिलेलें सैन्य; शत्रूवर हल्ला करण्याच्या हेतूनें दबा धरलेली जागा.

Ăm'bush, *n.* ( -ŏŏ-, अॅ'म्बुश् )—troops concealed in woods etc.; concealment to attack by surprise. दबा धरून राहिलेलें सैन्य; दबा धरणें.

Amē'lĭorāte, *v. t. & i.* ( अॅमी'लिओरेट् )—make or become better. अधिक चांगलें करणें किंवा होणें, उन्नति करणें. Ame'liorator, *n.* Ame'liorative, *a.* [ L. *ad*, to & *melior*, better ]

Amēlĭorā'tion, *n.* ( अमीलिओरे'शन् )—the condition of being made better; improvement. सुधारण्याची स्थिति; सुधारणा, बरें करणें.

Amĕn', *inter.* (आमे'न् )—so be it. तथास्तु.

Amē'nāble, *a.* ( ॲमी'नेबल् )—responsible, accountable; tractable. जबाबदार, जाब देणारा; ऐकून घेऊन त्याप्रमाणें चालणारा, वळवतां येणारा, अनुनेय. Ame'nably, *adv.* Amē'nability, *n.* [ Fr. *a*, to & *mener*, to lead ]

Amĕnd', *v. t.* & *i.* ( ॲमे'न्ड् )—abandon evil ways, correct, improve; make improvements. सुधारणें, टीक होणें; दुरुस्त करणें. [ L. *emendare*, free from faults ]

Amĕnd'ment, *n.* ( अमे'न्ड्-मेन्ट् )—change for the better; proposed alteration. सुधारणा, दुरुस्ती; उपसूचना, प्रतिसूचना.

Amĕnds', *n.* ( -z, अमे'न्ड्झ् )—compensation. मोबदला, भरपाई. To make *amends*=to supply a loss. निस्तरणें; नुकसान भरपाई करणें.

Amē'nĭtў, *n.* ( ॲमी'निटि )—pleasantness. रमणीयता. (*pl.*) agreeable manners. चांगली वागणूक, स्वभावाचा चांगुलपणा.

Amerce', *v. t.* ( ॲम'र्स् )—fine, punish by a fine. द्रव्यदंड करणें, दंड देण्याची शिक्षा देणें. Amer'ciable, *a.*; Amerce'ment, *n.*

Amĕ'rĭcan, *n.* ( अमे'रिकन् )—of America or United states. अमेरिका खंडांतील. *n.* citizen of America. अमेरिका खंडांतील रहिवासी.

Amĕ'rĭcănĭsm, *n.* ( अमे'रिकॅनिझम् )—word or phrase peculiar to America; attachment to America. अमेरिकन भाषेंतील विशेष शब्दप्रयोग; अमेरिकेविषयीं प्रेम.

Ăm'ĕthўst, *n.* ( ॲ'मिथिस्ट् )—a precious stone of purple violet colour. एक प्रकारचा मौल्यवान खडा, याकुत. Am'ethystine, *a.*

Ā'mĭable, *a.* ( ए'मिएबल् )—lovable, inspiring friendliness. प्रेमळ, प्रेमास पात्र, स्नेह उत्पन्न करणारा, मनमिळाऊ. Amiabi'lity, *n.*

Ăm'ĭcāble, *a.* ( ॲ'मिकेबल् )—friendly; done in a friendly spirit. मित्रत्वाचा, सलोख्याचा, सलोख्यानें केलेला. Amicabi'lity, *n.*

Ăm'ĭcablў, *adv.* ( ॲ'मिकेब्लि )—in a friendly manner. मित्रत्वानें, सलोख्यानें.

Amĭd', Amĭdst', *prep.* ( अमि'ड्, अमि'ड्स्ट् )—in the middle of, among. मध्यें, मध्यभागीं.

Amĭd'shĭps, *adv.* ( अमि'ड्शिप्स् )—in the middle of ships. जहाजांच्या मध्यभागीं.

Amĭss', *adv.* ( अमि'स् )—out of order, badly, wrongly, untowardly. गैरवाजवी, अयोग्य रीतीनें To take *amiss*=to take offence at. उलटा अर्थ घेणें, चीड येणें, अपमान झालासा वाटणें. *Not amiss*=appropriate. योग्य.

Ăm'ĭtў, *n.* ( ॲ'मिटि )—friendship, friendly relations. सख्य, स्नेहभाव, दोस्ती, ( राष्ट्रांराष्ट्रांमधील ) सुहृद्भाव. [ L. *amicus*, a friend ]

Ăm'mēter, *n.* ( ॲ'म्-मिटर् )—an instrument for measuring force of electric currents. विद्युत्प्रवाह मोजण्याचें यंत्र, विद्युत्प्रवाहमापक यंत्र.

Ammō'nĭa, *n.* ( ॲमो'निआ )—a colourless pungent gas with strong alkaline reaction. एक प्रकारचा वायुरूप पदार्थ, नवसागर. Ammō'nĭăc, Ammō'nĭacal, Ammō'nĭcāted, *aa.*

Ăm'mŏnīte, *n.* ( ॲ'मनाइट् )—coil-shaped fossil shell. एक शिंगासारखा खनिज पदार्थ.

Ammūnĭ'tion, *n.* ( ॲम्यूनि'शन् )—military stores (of powder, shot, etc.). दारूगोळा, युद्धसामुग्री. [ L. *munire*, to fortify ]

Ămnē'sĭa, *n.* ( ॲम्नी'सिआ )—loss of memory, forgetfulness. स्मृतिभ्रंश, विस्मृति. [ Gr. *a*, not & *mnesis*, memory ]

Ăm'nĕstў, *n.* ( ॲ'म्नेस्टि )—act of oblivion; general pardon. ( राजकीय गुन्हेगारांच्या ) माफीचा ठराव; सरसकट माफी, पूर्ण क्षमा. [ Gr. *a*, not & *mna*, to remember ]

Amoe'ba, *n.* ( -mē-, ॲमी'बा )—microscopic animalcule perpetually changing shape. नेहमीं आकार बदलणारा इंद्रियरहित सूक्ष्म जंतु. (*pl.* amaebae, -bas )

Among', Amongst', *prep.* ( -mŭ-, अमं'ग्, अमं'ग्स्ट् )—in the midst of, in the number of; reciprocally. मध्यें, आंत, ०च्या बरोबर; आपापसांत. From *among*=मधून, पैकीं.

Ā-mŏ'ral, *a.* ( ए-मॉ'रल् )—non-moral, out of morals. नीतीशीं संबंध नसलेला, अनैतिक.

Ăm'ŏrous, *a.* ( ॲ'मोरस् )—in love, loving; relating to love. कामेच्छु, विलासी; शृंगारिक.

Amŏrph'ĭsm, *n.* ( अमॉ'र्फिझम् )—a state of being amorphous or without crystallization even in the minutest particles. बेडौलपणा, बेढबपणा. [ Gr. *a*, not & *morphe*, form ]

Amŏrph'ous, *a.* ( अमॉ'र्फस् )—shapeless; anomalous. आकृतिविरहित, बेढब; असंबद्ध.

Amŏrt'īze, *v. t.* ( अमॉ'र्टाइझ् )—extinguish debt, especially by means of a sinking fund. ( ऋणविमोचक निधींतून पुन्हां न वाढेल अशा रीतीनें ) कर्ज फेडणें. Amŏrtīzā'tion, *n.* [ L. *ad*, to & *mortis*, death ]

Amount', *v. i.* ( अमा'उन्ट् )—be equivalent to; reach the total of. ०शीं पुष्कळ बाबतींत साम्य असणें, तात्पर्य असणें; एकूण जमा होणें. *n.* total; quantity. एकूण जमा, रास; परिमाण. Gross *amount*=गोळाबेरीज, एकंदर आकार. [ L. *a*, to & *mons*, *mont*, a hill ]

Amour', *n.* ( -ōōr, ॲमू'र् )—love-affair, intrigue. प्रेमविषय, प्रेमकारस्थान, इष्कबाजी.

Ămpēlŏp'sĭs, *n.* ( ॲम्पिलॉ'प्-सिस् )—kinds of vine-creeper. एक जातीची द्राक्षांची वेल.

Ăm'pere, *n.* (-pĕr, ॲ'म्पिअर्)—unit of electric current. विजेच्या प्रवाहशक्तीचें प्रमाण.

Ăm'persănd, *n.* (अॅम्पर्सॅन्ड्)—the sign & (and). 'आणि' या अर्थी & ही खूण.

Ămphĭb'ĭan, *a.* & *n.* (ॲम्फि'बिअन्)—(animal) living both on land and in water; (aeroplane) designed to rise from and alight on either land or water. जळीं स्थळीं राहण्यास समर्थ असा (प्राणी); जमिनीवर व पाण्यांत उतरतां येण्याजोगें विमान.

Amphĭb'ĭous, *a.* (ॲम्फि'बिअस्)—living both on land and in water. जमिनीवर व पाण्यांत राहणारा, जलस्थलवासी.

Am'phĭthēātre, *n.* (ॲ'म्फिथिएटर्)—semicircular gallery in theatre. अर्धचंद्राकार नाटकगृहांतील वरचा मजला.

Ăm'phora, *n.* (ॲ'म्फोरा)—Greek or Roman two-handled vessel. दोन कान असलेलें ग्रीक किंवा रोमन भांडें.

Ăm'ple, *a.* (ॲ'म्पल्)—spacious, extensive; abundant; quite enough. प्रशस्त; विपुल; अगदीं पुरेसा. A'mply, *adv.*; A'mpleness, *n.*

Ămplĭfĭcā'tion, *n.* (ॲम्प्लिफिके'शन्)—extension, enlargement; making the most of a thing. वाढविणें, विस्तार; पाल्हाळ.

Ăm'plĭfȳ, *v. t.* & *i.* (ॲ'म्प्लिफाय्)—enhance, enlarge, expatiate. वाढविणें, विस्तार करून बोलणें किंवा लिहिणें, फुगवून सांगणें. [L. *amplus*, ample, & *facere*, to make]

Ăm'plĭtūde, *n.* (ॲ'म्प्लिट्यूड्)—breadth; abundance; wide range; dignity; the distance *between the east point of a horizon at* which a heavenly body rises, or from the west point at which it sets. प्रशस्तपणा, विपुलता; विस्तीर्णता, अघळपघळपणा; मोठेपणा; प्रौढी; (खगोलविद्येंत) सूर्य तारे किंवा इतर ग्रह हे क्षितिजाच्या ज्या बिंदूंत उगवतात किंवा मावळतात तो बिंदु आणि क्षितिजावरील पूर्व किंवा पश्चिम बिंदु ह्यांच्यामध्यें जो कंस सांपडतो तो.

Ămpŭll'a, *n.* (ॲम्प'ला)—Roman globular two-handled flask. सुजासारखें दोन कान असलेलें रोमन भांडें. (*pl.* Ampullae—ॲम्प'ली)

Ăm'pūtāte, *v. t.* (ॲ'म्प्यूटेट्)—cut off (limb etc.). कापून काढणें, छाटणें, कलम करणें.

Ămpūtā'tion, *n.* (ॲम्प्यूटे'शन्)—the act of cutting off a limb. अंगच्छेदन. Ăm'pūtātor, *n.*

Amŭ'ck, *adv.* (ॲम'क्)—(*run about*) *in frenzied thirst for blood.* रक्तलालसेनें उन्मत्त होऊन, अविचारानें, माथेफिरूपणानें.

Ăm'ŭlĕt, *n.* (ॲ'म्यूलेट्)—thing worn as a charm against evil. (चेटुक, भूतबाधा व इतर रोग यांचें निवारण करणारा) मंत्रासिद्ध ताईत.

Amūse', *v. t.* (-z, ॲम्यू'झ्)—excite the risible faculty; find diversion for; entertain. करमणूक करणें; रमवणें; मनोरंजन करणें.

Amū'sement, *n.* (-z, अम्यू'झ्-मेन्ट्)—pleasant diversion; excitement of risible faculty; pastime. मनोरंजन; करमणूक; मौज.

Ăn, *a.* (ॲन्)—any one. कोणताहि एक (indefinite article). *conj.* if. जर.

Ănabăp'tĭst, *n.* (ॲनबॅ'प्टिस्ट्)—one who baptizes over again. दुसऱ्यांदा ज्याचा बाप्तिस्मा झाला आहे असा. [Gr. *ana*, again & *baptistes*]

Ănabăp'tĭsm, *n.* (ॲनबॅ'प्टिझम्)—re-baptism; doctrine of anabaptists. पुन्हा दुसऱ्यांदा बाप्तिस्मा देणें; प्रौढबाप्तिस्मावाद.

Ană'chrŏnĭsm, *n.* (-k-, ॲनॅ'क्रॉनिझम्)—chronological error; thing out of harmony with the period. कालगणनेमध्यें चूक, कालक्रमविपर्यय; कालक्रमविपरीत गोष्ट. [Gr. *ana*, back & *chronos*, time]

Anae'mĭa, *n.* (ॲनी'मिआ)—lack of blood; unhealthy pallor. रक्त कमी होणें, रक्तक्षय; विकारी फिकटपणा. Anae'mic, *a.* [Gr. *an*, not & *haima*, blood]

Ănaesthē'sĭa, *n.* (ॲनीस्थी'सिआ)—insensible condition. सर्वांगास किंवा कांहीं विशेष भागास बधिरता येणें, बधिरावस्था, सुप्ति.

Ănaesthĕt'ĭc, *a.* (ॲनीस्थे'टिक्)—producing anaesthesia. बधिरता उत्पन्न करणारा.

Ăn'agrăm, *n.* (ॲ'नॅग्रॅम्)—word or phrase formed from letters of another. एका शब्दाचीं अक्षरें फिरवून त्यांचा नवा शब्द करणें. Ănagrammă'tic, -tical, *aa.* -mătĭst, *n.*

Ā'nal, *a.* (ए'नल्)—of the anus, pertaining to the anus. गुदद्वाराचें, मलद्वारासंबंधीं.

Ăn'alĕcts, *n. pl.* (ॲ'नलेक्ट्स्)—literary gleanings. (निरनिराळ्या ग्रंथांतील) वेंचे, गाथाळग्रंथ. [Gr. *ana*, up & *legein*, to gather]

Ănalĕp tĭc, *a.* & *n.* (ॲनले'प्टिक्)—restorative (medicine). पौष्टिक, पुष्टिकारक (औषध).

Ănălgē'sĭă, *n.* (ॲनॅल्जी'सिआ)—absence of pain. दुःखाचा अभाव. Ănălgĕ'tĭc, *a.*

Analog'ĭcal, *a.* (ॲनलॉ'जिकल्)—according to analogy; expressing an analogy, analogous. सारखा; सदृश. [Gr. *ana*, according to, & *logos*, ratio]

Anăl'ogous, *a.* (ॲनॅ'लोगस्)—similar, parallel, proportional, corresponding. सारखा, समांतर.

Ăn'alŏgue, *n.* (ॲ'नलॉग्)—a word or body resembling another. सदृश शब्द, सारखा पदार्थ.

Anăl'ogȳ, *n.* (ॲनॅ'लॉजि)—parallelism, similarity; reasoning from parallel cases.

समांतरता, साम्य; तुलना, उपमिति. Ănalŏg'ical, *a.*; Ăna'lŏgīze, *v. t.* & *i.*; Ăna'lŏgĭst, *n.*

Ăn'alȳse, *v. t.* ( -z, ॲ'नलाइझ् )—ascertain the elements of; examine minutely the constitution of. मूळचीं तत्त्वें निराळीं करणें; पृथक्करण करणें. [ Gr. *ana*, up, & *lyein*, to loose ]

Ană'l̆ȳsĭs, *n.* ( ॲनॅ'लिसिस् )—resolution into simple elements. पृथक्करण, मूलतत्त्वशोधन. (*plu.* Ănălysēs –ॲनॅ'लिसीस् )

Ăn'alȳst, *n.* ( ॲ'नलिस्ट् )—one who analyses. पृथक्करण करणारा, मूलतत्त्वशोधक.

Ănalȳt'ĭc, Ănalȳt'ĭcal, *aa.* ( ॲनलि'टिक्, ॲनालि'टिकल् )—pertaining to analysis, employing the analytic method; resolving into first principles. पृथक्करणविषयक, मूलतत्त्वशोधात्मक.

Ăn'apaest, *n.* ( ॲ'नपीस्ट् )—*a metrical foot* of three syllables ( ˘ ˘ ¯ ). पहिलीं दोन पदें लघु आणि तिसरें दीर्घ असा गण ( ˘ ˘ ¯ ).

Ănär'chĭc, -chĭcal, *aa.* (ॲना'र्किक्, ॲना'र्किकल् )—lawless, without government. अंदाधुंदीचा, बेबंद. [ Gr. *an*, not, and *arche*, rule ]

Ăn'archĭst, *n.* ( -k-, ॲ'नर्किस्ट् )—advocate of anarchy, one who excites revolt in a state. बेबंदशाही माजविणारा, राजसत्ताविरोधक.

Ăn'ărchȳ, *n.* ( -k-, ॲ'नार्कि )—absence of government; disorder. अराजक स्थिति, बेबंदशाही; बंडाळी. An'archism, *n.*

Anăstomŏ'sĭs, *n.* ( ॲनॅस्टॉमॉ'सिस् )—cross connection between arteries, branches, rivers, etc. तंतुसंयोग, वाहिनींचा संधि. [ Gr. *ana*, again & *stoma*, a mouth ]

Anăth'ĕma, *n.* ( ॲनॅ'थिमा )—solemn curse; accursed thing. बहिष्कार, शाप; शापित वस्तु, बहिष्कृत केलेली वस्तु. Anăth'ĕmatīze, *v. t.*

Ănătŏmĭ'ĭcal, *a.* ( ॲनॅटॉ'मिकल् )—belonging to anatomy; structural. शारीरशास्त्रासंबंधीं; शरीरछेदनविच्छेसंबंधीं; रचनेसंबंधीं.

Anăt'omȳ, *n.* ( ॲनॅ'टोमि )—science of bodily structure; dissection; a mere skeleton. शारीरशास्त्र; शरीराचे अवयव निराळे करणें; केवळ अस्थिपंजर. Ănat'ŏmĭst, *n.* शारीरशास्त्रज्ञ.

Ăn'cĕstor, *n.* ( ॲ'न्-सिस्टर् )—forefather. पूर्वज, वाडवडील. [ L. *ante*, before, & *cedere*, to go]

Ăncĕs'tral, *a.* ( ॲन्से'स्ट्रल् )—*belonging to* ancestors, inherited from forefathers. वाडवडलार्जित, परंपरागत, पिढीजाद.

Ăn'cĕstrȳ, *n.* ( ॲ'न्सेस्ट्रि )—ancient honourable descent, lineage. कुलपरंपरा, खानदानी.

Ănc'hor, *n.* ( -k-, ॲं'ङ्कर् )—*an iron instrument* for holding ships at rest in water. गलबताचा नांगर. Sheet *anchor*=largest anchor; (*fig.*) source of confidence. जहाजाचा सर्वांत मोठा नांगर; सर्वांत मोठा आश्रय, शेवटचा तरणोपाय. To cast *anchor*=to let down anchor. नांगर टाकणें. To weigh *anchor*=to take up anchor. गलबत हांकारणें. *At anchor*=anchored. नांगरलेलें. *v. t.* & *i.* secure ship with anchor; fix one's hope on. नांगर टाकणें; एखाद्यावर आशा धरून असणें.

Ănc'horāge, *n.* ( -k-, ॲं'ङ्करेज् )—place for ship lying at anchor. नांगर टाकण्याची जागा, खुटवा.

Ănc'horĕt, Ănc'horīte, *n.* ( -k-, ॲं'ङ्करिट्, ॲं'ङ्कराइट् )—hermit, recluse; person of secluded habits. अरण्यवासी, तापसी, वैरागी; एकांतवासी. (*fem.* Anchoress, Aancress )

Ān'cient, *a.* ( ए'न्शन्ट् )—of times long past, old. प्राचीन, पुरातन, जुना. The *Ancient* of Days=God. ईश्वर. *The ancients*=civilized nations of antiquity. पूर्वीचे सुधारलेले देश. *n.* an ensign. निशाण.

Ăn'cĭllarȳ, *a.* ( ॲ'न्सिलरि )—subservient, subordinate. हाताखालील, गौणभूत, दुय्यम.

Ănd, *conj.* (ॲन्ड् )—*connecting* words, clauses. and sentences. आणि, व. And so forth=वगैरे, इत्यादि. And yet=तथापि.

Ăndăn'tĕ, *a.* ( ॲन्डॅ'न्टि )—( of *Music* ) moderately slow. सारख्या धिम्या तालाचें ( गाणें ).

Ăn'dīron, *n.* (-īrn, ॲ'न्डायर्न् )—a fire-dog for *supporting burning* wood on an open hearth. जळाऊ लांकडाला आधार म्हणून केलेली लोखंडी योजना.

Ăn'ĕcdōte, *n.* ( ॲ'नेक्डोट् )—narrative of detached incidents, single passage of private life. आख्यायिका, उपाख्यान, अप्रसिद्ध कथा. [ Gr. *an*, not & *didonai*, to give ]

Ăn'ĕcdōtāge, *n.* ( ॲ'नेक्डोटेज् )—*telling* of anecdotes, esp. in old age. गोष्ट सांगण्याची म्हातारपणची हौस. Ănĕcdō'tal, *a.*; Ăn'ĕcdōtĭst, *n.* चटकदार गोष्टी लिहिणारा.

Anēle', *v. t.* (ॲनी'ल् )—to anoint, give extreme *unction to.* उटणें लावणें, माखणें, मर्दन करणें.

Anĕmŏm'ĕter, *n.* ( ॲनिमॉ'मिटर् )—instrument for measuring force of wind. वायूची गति मोजण्याचें यंत्र, वायुगतिमापक यंत्र. [Gr. *anemos*, wind & *metron*, measure ]

Anĕm'onĕ, *n.* ( ॲने'मोनि )—a woodland flower, wind-flower. एक प्रकारचें रानटी फूल.

Anĕnt', *prep.* (अने'न्ट्)—concerning, about, respecting, regarding. विषयीं, बद्दल.

Ăn'erŏĭd, *a.* ( ॲ'नरॉइड् )—not employing fluid. अनार्द्र, अप्रवाही. Ănerŏĭd *barometer*, *n.*=barometer that measures air-pressure by its action on lid of box exhausted of air. अप्रवाही भारमापक. [Gr. *a*, not & *neros*, wet]

Ăn'eurўsm, -ĭsm, *n.* (ॲॅन्युरिझम्)—morbid dilation of an artery; abnormal enlargement. धमनीला आलेली सूज; विषम वाढ. [ Gr. *ana*, up & *eurus*, broad ]

Anew', *adv.* (अन्यू')—again, once more, over again, afresh. पुनः, नव्यानें, फिरून.

Ā'ngel, *n.* (-j-, ए'न्जल्)—divine messenger; attendant spirit; obliging person; old English gold coin. देवदूत; रक्षक देवता; उपकार करणारा; इंग्लंडांतील एक प्राचीन सोन्याचें चलनी नाणें. Ăngĕl'ic, *a.*

Ăngĕl'ĭca, *n.* (ॲन्जे'लिका)—a wild or garden aromatic plant. हळदी चाफा.

Ăng'er, *n.* (ॲ'ङ्गर्)—hot displeasure. राग, क्रोध. *v. t.* excite anger in, irritate, provoke. राग आणणें, क्रोध उत्पन्न करणें.

Ăng'le, *n.* (ॲ'ङ्गल्)—the space between two meeting lines; a corner; a fish-hook. कोन; कोंपरा; गळ. Acute angle=लघु कोन. Alternate angle=व्युत्क्रम कोन. Complementary angle=कोटि कोन. Corresponding angle=अनुरूप कोन. External angle=बाह्य कोन. Internal angle=अंतःकोन. Oblique angle=विषम कोन. Obtuse angle=विशाल कोन. Opposite angle=अभिमुख कोन. Right angle=काटकोन, समकोन. Supplementary angle=पूरक कोन. Vertical angle=शिरस्थ कोन. Angle at the circumference=परिघकोन. Angle in a segment=वर्तुलखंडांतील कोन. *v. i.* fish with rod, hook and bait. गळ वाकून मासे धरणें. [ L. *angulus*, an angle ]

Ăng'ler, *n.* (ॲ'ङ्ग्लर्)—a fisher. मासे धरणारा.

Ăng'lĭcĭsm, *n.* (ॲ'ङ्ग्लसिझम्)—English idiom. इंग्रजी भाषेचा संप्रदाय.

Anglo-mā'nĭa, *n.* (ॲंग्लोमे'निआ)—excessive admiration of English customs. इंग्रजी रीतिभातीविषयीं अतिशय वेड.

Anglo-phō'bia, *n.* (ॲंग्लो-फो'बिआ)—fear and dislike of England. इंग्रज लोकांबद्दल वाटणारी भीति व तिटकारा.

Anglo-Săx'on, *a.* (ॲङ्ग्लो-सॅ'क्सन्)—of the English before the Norman conquest. नॉर्मन विजयापूर्वीच्या इंग्रज लोकांसंबंधीं. *n.* the English before the Norman conquest; old English language before 1100. नॉर्मन विजयापूर्वीचे इंग्रज लोक; इसवी सन ११०० पूर्वी प्रचलित असलेली इंग्रजी भाषा.

Ăng'lĭcīze, *v. t.* (ॲ'ङ्ग्लिसाइझ्)—to make English. इंग्रजी भाषेचें रूप देणें.

Ănglo-In'dian, *n.* (ॲंङ्ग्लो-इं'डिअन्)—person of British birth but living or having lived long in India. हिंदुस्थानांत पुष्कळ दिवस राहणारा किंवा राहिलेला इंग्रज.

Ăngō'la, *n.* (ॲंगो'ला)—fabric made from wool of Angora goat. अँगोरा येथील बकऱ्यांच्या लोकरीपासून तयार केलेलें कापड.

Ăn'grĭlў, *adv.* (ॲंग्रिलि)—in anger. रागानें.

Ăng rў, *a.* (ॲ'ङ्ग्रि)—feeling or showing anger; inflamed, painful. क्रुद्ध, रागावलेला; सुजलेली, दुःख देणारी (जखम वगैरे).

Ăng'uĭsh, *n.* (ॲ'ङ्ग्विश्)—severe mental or bodily pain. मानसिक पीडा, मनोवेदना, यातना. [ L. *angustia*, perplexity ]

Ăng'ūlar, *a.* (ॲ'ङ्ग्युलर्)—having angles, sharp-cornered. कोण असलेला; अणीदार.

Ăngūlăr'ĭtў, *n.* (ॲङ्ग्युलॅ'रिटि)—the quality of being angular. सकोणता. Angularity of disposition=स्वभावाच्या खाणाखोचा.

Ăn'ĭlīne, *n.* (ॲ'निलाइन्)—a product of coaltar obtained from indigo and the source of many dyes. निळीपासून केलेला पदार्थ.

Ănĭmădvĕr'sion, *n.* (ॲनिमॅड्व्ह'र्शन्)—remarks by way of criticism or reproof. बोल, दोषारोप, कडक टीका, विरुद्ध टीका.

Ănĭmădvĕrt', *v. t.* (ॲनिमॅड्व्ह'र्ट्)—to pass criticism or censure upon, to remark. दोष लावणें, कडक टीका करणें. [ L. *aniums*, the mind, *ad*, & *vertere*, to turn ]

Ăn'ĭmal, *n.* (ॲ'निमल्)—a living being; a creature other than man. प्राणी; जनावर, पशु. *a.* of animals; carnal, sensual. प्राणिविषयक; विषयासंबंधीं, वैषयिक.

Ănĭmăl'cūle, *n.* (ॲनिमॅ'ल्क्यूल)—microscopic animal. अतिक्षुद्र जंतु, अगदीं लहान जीव.

Ăn'ĭmălĭsm, *n.* (ॲ'निमॅलिझम्)—exercise of animal faculties. शरीरधर्म, शरीरव्यापार.

Ănĭmăl'ĭtў, *n.* (ॲनिमॅ'लिटि)—state of being an animal, animal nature. प्राणिस्वभाव.

Ăn'ĭmalīze, *v. t.* (ॲ'निमलाइझ्)—convert into animal substance; sensualize. शरीरांत प्राणिद्रव्यरूपानें विकार पावणें; कामवासना जागृत करणें. Ănĭmalīza'tion, *n.*

Ăn'ĭmāte, *v. t.* (ॲ'निमेट्)—breathe life into; encourage, inspirit, enliven, invigorate. सचेतन करणें; प्रोत्साहन देणें, चेतविणें, चेव आणणें. *a.* living, not inanimate. सजीव, जिवन्त, सचेतन. [ L. *anima*, breath ]

Ănĭmā'tion, *n.* (ॲनिमे'शन्)—ardour, life, vivacity, sprightliness, vigour. उत्तेजन, चेव, उत्साह, चेतना, तेज. Ăn'ĭmātor, *n.*

Ănĭmŏs'ĭtў, *n.* (ॲनिमॉ'सिटि)—violent hatred, hostility, enmity. वैरभाव, शत्रुत्व, वैमनस्य, द्वेषभाव. [ L. *animus*, the mind ]

Ăn'ĭmŭs, *n.* ( ॲ'निमस् )—bitter feeling against, hostile spirit. द्वेषबुद्धि.

Ăn'ise, *n.* ( ॲ'निस् )—plant with aromatic seed with very useful seeds. बडीशेप.

Ăn'iseed, *n.* ( ॲ'निसीड् )—the seed of the anise. बडीशेपेचें बीं, बडीशेप.

Ăn'kle, *n.* ( ॲ'ङ्कल् )—joint connecting foot with leg. पायाचा घोटा, पाऊल आणि त्याचे वरील हाडाचा सांधा. Ănk'le-bone, *n.* घोटा.

Ănk'lĕt, *n.* ( ॲ'ङ्क्लेट् )—support or ornament for the ankle. वाळा, पैंजण, तोरड्या, सांखळ्या.

Ănn'a, *n.* ( ॲ'ना )—sixteenth part of a rupee. रुपयाचा सोळावा भाग, आणा.

Ănn'alĭst, *n.* ( ॲ'नलिस्ट् )—writer of annals. सालवार इतिहास लिहिणारा.

Ănn'als, *n. pl.* ( -z, ॲ'नल्झ् )—narrative of events year by year; records. प्रतिवार्षिक वृत्तांत, सालवार बखर. [ L. *annus*, a year ]

Ănneal', *v. t.* ( ॲनी'ल् )—toughen by gradually diminishing heat, temper. तापवून नरम करणें, ( रंग चढविण्याकरितां वस्तु ) तापविणें.

Annĕx', *v. t.* ( ॲने'क्स् )—add, append, attach; take possession of. नवीन जोडणें, सामील करणें; खालसा करणें. *n.* (*also* Ănnexe), supplementary building. जोड इमारत, जोड संस्था.

Ănnĕxā'tion, *n.* ( ॲनेक्से'शन् )—addition; act of annexing, appropriation of territory. जोडणें, लावणें; नवीन प्रांत जोडणें, खालसा करणें.

Annī'hĭlāte, *v. t.* (-nī-, ॲना'यूइलेट् )—destroy the existence of utterly. पूर्णपणें नाश करणें. [ L. *ad*, to and *nihil*, nothing ]

Annīhĭla'tion, *n.* ( अनायूइले'शन् )—utter destruction, nothingness. सत्यनाश, विध्वंस, उच्छेद. Anni'hilator, *n.*

Ănnĭvers'arӯ, *n.* ( ॲनिव्ह'र्सरि )—yearly return of a date; celebration of this. प्रतिवार्षिक दिवस, वार्षिक स्मारक, वार्षिकोत्सव; जयन्ती किंवा पुण्यतिथि. Anniversary of birth=वाढदिवस, जयन्ती. Anniversary of death=मृततिथि, श्राद्धतिथि, पुण्यतिथि. [L. *annus*, a year & *verto*]

Ănn'otāte, *v. t.* & *i.* ( ॲ'नोटेट् )—add notes to book, etc.; make notes on, mark written remarks on. पुस्तकाला वगैरे टीपा जोडणें; टीपा देणें. [ L. *ad*, to & *notare*, to note ]

Ănnotā'tion, *n.* ( ॲनोटे'शन् )—a note of explanation, comment. टिप्पणी, टीपा; भाष्य.

Ănn'otātor, *n.* ( ॲ'नोटेटर् )—a writer of notes; commentator. टीपा देणारा; भाष्यकार.

Announce', *v. t.* ( ॲना'उन्स् )—proclaim, give notice of. प्रसिद्ध किंवा जाहीर करणें.

Announce'mĕnt, *n.* ( ॲना'उन्स्-मेन्ट् )—proclamation, declaration, publication. प्रसिद्धि, जाहीरनामा, जाहीर खबर.

Annoy', *v. t.* ( ॲनॉ'य् )—irritate, molest. अतित्रास देणें, छळणें, उपद्रव करणें.

Annoy'ance, *n.* ( अनॉ'यन्स् )—molestation, vexation. अति त्रास, छळ, उपद्रव.

Ănn'ūal, *a.* ( ॲ'न्युअल् )—reckoned by the year; recurring yearly. वार्षिक; प्रतिवार्षिक, सालाबाद. *n.* plant living only for a year; yearly periodical. वर्षभर टिकणारें झाड किंवा औषधी; वार्षिक पुस्तक, सांवत्सरिक.

Ănn'ūallӯ, *adv.* ( ॲ'न्युअलि )—year by year, returning every year. प्रतिवर्षी, दरसाल.

Ănnū'ĭtant, *n.* ( ॲन्यु'इटन्ट् )—one who holds an annuity. वर्षासन असलेला वर्षासनदार.

Ănnū'ĭtӯ, *n.* ( ॲन्यू'इटि )—yearly grant or sum. वर्षासन, वार्षिक नेमणूक.

Ănnŭl', *v. t.* ( ॲन'ल् )—abolish, cancel; declare invalid, invalidate. रद्द करणें; बेकायदेशीर ठरविणें. Annul'ment, *n.*

Ănn'ūlar, *a.* ( ॲ'न्युलर् )—ring-shaped. मण्डलाकार. [ L. *annulus*, a ring ]

Ănn'ūlāte, Ănn'ūlāted, *aa.* ( ॲ'न्युलेट्, ॲ'न्युलेटेड् )—furnished or marked with rings or circles like rings. मंडलमुद्रित, कंकणवत्.

Annŭn'ciāte, *v. t.* ( -shĭ-, अन'न्शिएट् )—proclaim, announce. जाहीर करणें.

Annŭnciā'tion, *n.* ( ॲनन्सिए'शन् )—announcement. जाहीर करणें. Annŭn'ciātor, *n.*

Ăn'ōde, *n.* ( ॲ'नोड् )—the path by which electric current leaves the positive pole; the positive pole. उद्गामी मार्ग; धनध्रुव.

Ăn'odӯne, *a.* (ॲ'नोडाइन् )—pain-killing; soothing. दुःखनाशक; उपशमक. *n.* drug to allay pain. दुःखहारक किंवा वेदनाशामक औषध.

Anoint', *v. t.* ( अनॉ'इन्ट् )—apply ointment or oil to; smear, rub over with oil or unctous substance. मलम किंवा तेल लावणें; फांसणें.

Anŏm'alous, *a.* ( ॲनॉ'मलस् )—irregular, abnormal. नियमविरुद्ध, असंबद्ध, विलक्षण.

Anŏm'alӯ, *n.* ( ॲनॉ'मलि )—irregularity. नियमविरुद्ध किंवा रूढिविरुद्ध गोष्ट.

Anŏn', *adv.* ( ॲनॉ'न् )—soon, presently. लवकर, लागलाच. Ever and *anon*=every now and then. नेहमीं, वरचेवर.

Ănŏnӯ'mĭtӯ, *n.* ( ॲनॉनि'मिटि )—state of being anonymous. निनांवी होणें, निनांवीपणा.

Anŏn'ӯmous, *a.* ( ॲनॉ'निमस् )—of unknown name, of unknown authorship. अनामक, निनांवी. [ Gr. *an*, not & *onoma*, a name ]

Ănŏph'ēlēs, *n.* ( ॲनॉ'फिलीस् )—kinds of ( esp. malarial ) mosquito. हिंवतापाचे डास.

Anoth'er, *a.* ( -udh-, अॅन'दर् )—an additional ( one ), a different ( one ). दुसरा, निराळा. *pron.* another one. दुसरा एक.

An'swer, *v. t.* & *i.* ( -ser, आ'न्सर् )—make a reply to; be responsible for; correspond to. जबाब किंवा उत्तर देणें; जबाबदार असणें; मिळणें, जुळणें. Unable to *answer*=निरुत्तर. To answer *again*=उलटून बोलणें, उलट जबाब देणें. To *answer* the purpose=to fulfil the purpose. हेतु सिद्धीस नेणें. Will not *answer*=will not do or succeed. चालणार नाहीं. *Answer* ( summons to ) the door=द्वार ठोठावल्यावर तें जाऊन उघडणें. To *answer* a crime=अपराधाबद्दल शिक्षा भोगणें. To *answer* to a call=ओ देणें, हांक देणें. To *answer* to God=ईश्वराजवळ जाब देणें. *n.* a reply. उत्तर, जबाब. In answer to=उत्तर देतांना, उत्तर म्हणून.

An'swerăble, *a.* ( आ'न्सरेबल् )—responsible, accountable. जबाबदार, जाब देणारा.

Ănt, *n.* ( अॅन्ट् )—a small insect. मुंगी. White ant=वाळवी. Red ant=उंबील.

Antăg'onĭsm, *n.* ( अॅन्टॅ'गॉनिझम् )—active opposition; opposing principle, contrariety of things or principles. विरोध, वैमनस्य; प्रतिपक्षता.

Antăg'onĭst, *n.* ( अॅन्टॅ'गोनिस्ट् )—opponent, adversary. प्रतिपक्षी, विरोधी. Antăgonĭs'tĭc, *a.*

Antă'gonīze, *v. t.* ( अॅन्टॅ'गोनाइझ् )—counteract; provoke to opposition, make into an enemy. विरोध करणें, शत्रुत्व संपादणें.

Ăntärc'tĭc, *a.* ( अॅन्टा'र्क्टिक् )—of south polar regions. दक्षिणध्रुवाकडील. Antarct'ical, *a.*

Ăntė-cē'dĕnce, *n.* ( अॅन्टिसी'डेन्स् )—precedence, priority. पूर्वसिद्धि, पूर्वास्तित्व, पहिल्यानें असणें. [ L. *ante*, before & *cedere* to go ]

Ăntėcē'dent, *a.* ( अॅन्टिसी'डेन्ट् )—previous to. पूर्वगामी. *n.* preceding event or circumstance. पूर्वी घडलेली गोष्ट. ( *pl.* ) a person's past history. एकाद्याचा पूर्वेतिहास.

Ăn'tėchămber, *n.* ( अॅ'न्टि-चेम्बर् )—room leading to the chief apartment. दिवाणखान्याच्या अलीकडील खोली, सदरेची खोली.

Ăntėdāte', *v. t.* ( अॅन्टिडे'ट् )—affix or assign an earlier than the true date to. मागील तारीख घालणें. [ L. *ante*, before & *date* ]

Ăntėdĭluv'ian, *a.* ( -lōō-, अॅन्टिडिलू'व्हिअन् )—before the flood; antiquated. प्रलयपूर्वकालिक, जलप्रलयापूर्वीचा; गतकालीन.

Ăn'tėlōpe, *n.* ( अॅ'न्टिलोप् )—deer-like ruminant. हरिण, मृग. Black antelope=काळवीट.

Ăntėmŭn'dāne, *a.* ( अॅन्टिम'न्डेन् )—existing or occurring before creation of the world. पृथ्वीच्या पूर्वीचा, पृथ्वीच्या उत्पत्तीच्या आधींचा. [L. *ante*, before & *mundus*, the world ]

Ăntėpėnŭlt', -ĭmāte, *aa.* ( अॅन्टिपिन'ल्ट्, °न'ल्टिमेट् )—the last syllable of a word except two. उपान्त्यवर्णापूर्वीचा ( वर्ण ). [ L. *ante*, before, *pene*, almost and *ultimus*, last ]

Ăntėnā'tal, *a.* ( अॅन्टिने'टल् )—existing or happening before birth. जन्मापूर्वीचा.

Ăntĕnn'a, *n.* ( अॅन्टे'ना )—feelers or horns found on heads of insects. किड्यांच्या तोंडावरील मिशा. ( *pl.* Ănte nnae-अॅन्टे'नी)

Ăntēr'ior, *a* ( अॅन्टी'रिअर् )—prior to; more to the front. पूर्वीचा, अगोदरचा; अग्रवर्ती, पुढें असलेला. Anterio'rity, *n.*

Ăn'tėrōōm, *n.* ( अॅ'न्टिरूम् )—room leading to another. दिवाणखान्याच्या अलीकडील खोली.

Ănthelmĭn'tĭc, *n.* ( अॅन्थेल्मि'न्टिक् )—medicine of use against intestinal worms. कृमिनाशक औषध. ( also Ănthelminthic ) [ Gr. *anti*, against and *helmins*, a worm ]

Ăn'thĕm, *n.* ( अॅ'न्थेम् )—prose composition set to sacred music; song of praise. स्तोत्र; स्तुतिगीत. National *anthem*=राष्ट्रीय गीत. [Gr. *anti*, against, & *phone*, sound ]

Ăn'ther, *n.* ( अॅ'न्थर् )—part of stamen containing pollen. केसराग्र, परागकोश. Ăn'theral, *a.* Ăn'thĕrŏĭd. [ Gr. *anthos*, a flower ]

Ănt'-hĭll, *n.* ( अॅ'न्ट्-हिल् )—a mound over ants' nest. मुंग्यांचें वारुळ, भोम, भोमाड.

Ănthŏl'ogy̆, *n.* ( अॅन्थॉ'लोजि )—collection of small choice poems, epigrams. लहान निवडक चुटक्यांचा किंवा कवितांचा संग्रह, गद्यपद्यपुष्पसमुदाय. Anthŏ'logĭst, *a.* [ Gr. *anthos*, flower & *logia*, a collection ]

Ăn'thrăx, *n.* ( अॅ'न्थ्रॅक्स् )—malignant boil; a malignant disease of sheep and cattle. काळपुळी; काळपुळीचा आजार.

Ăn'thrŏpŏĭd, *a.* ( अॅ'न्थ्रोपॉइड् )—man-like, resembling man. मनुष्यासारखा. *n.* man-like ape. मनुष्यसदृश प्राणी, माकड.

Ănthropŏl'ogy̆, *n.* ( अॅन्थ्रोपॉ'लॅजि )—whole science of man; study of man as an animal. मानुष्यकशास्त्र; मनुष्यजातींच्या आचार-रूढींचा इतिहास. Ănthropolŏg'ical, *a.*; Ănthropo'logist, *n.* [ Gr. *anthropos*, a man & *logos*, discourse ]

Ănthropomŏrph'īze, *v. t.* ( अॅन्थ्रोपॉमॉ'र्फाइझ् )—attribute human form or personality to God or Deities. ईश्वराला मनुष्याचा आकार व त्याचे गुण वगैरे आहेत असें म्हणणें, सगुणरूप देणें. Anthropomor'phic, *a.* -phism, -phist, *nn.* [ Gr. *anthropos*, man, & *morphe*, form ]

Ănthropŏph'agī, *n. pl.* ( ॲन्थ्रोपॉ'फॅजाय् )—cannibals, man-eaters. नरभक्षक, मनुष्यें खाणारे.

Ănthropŏph'agous, *a.* ( ॲन्थ्रोपॉ'फॅगस् )—man-eating. मनुष्यें खाणारा. -phăgў, *n.* ( ०फॅजि )

Ănti-, *prep.* ( ॲन्टि- )—opposite, against. विरुद्ध ( या अर्थी योजिला जाणारा उपसर्ग ).

Ăn'tĭc, *n.* ( ॲ'न्टिक् )—grotesque posture or trick, caper. थट्टामस्करी. *a.* grotesque, fantastic. थट्टेचा, माकडचेष्टेचा.

Ăntĭ'cĭpāte, *v. t.* ( ॲन्टि'सिपेट् )—look forward to, expect; use in advance; forestall. अपेक्षा करणें; आगाऊ भोग घेणें; आघाडी मारणें. [ L. *ante*, before, & *capere*, to take ]

Ăntĭcĭpā'tion, *n.* ( ॲन्टिसिपे'शन् )—expectation; foretaste. अपेक्षा, आशा, अटकळ, होरा; पूर्वज्ञान. -tor, *n.*; -tive, -tory, *aa.*

Ăntĭclī'măx, *n.* ( ॲन्टिक्ला'यूमॅक्स् )—lame conclusion to anything promising a climax. एक अर्थालंकार, सारालंकारविपक्ष.

Ăn'tĭdōte, *n.* ( ॲ'न्टिडोट् )—medicine used to counteract disease or poison ( *against, for, to* ). रोगावर किंवा विषावर वस्ताद औषध, विषापहारक औषध. Ăn'tĭdōtal, *a.*

Ăn'tĭmonў, *n.* ( ॲ'न्टिमनि )—a brittle metallic silver-white element used in medicine, etc. सुरम्याची धातु, सुरमा.

Ăntĭn'omў, *n.* ( ॲन्टि'नॉमि )—contradiction in law or authorities or conclusions. दोन कायद्यांचा परस्पर विरोध, वचनद्वयविरोध. [ L. *anti*, against & *nomos*, law ]

Ăntĭp'athў, *n.* ( ॲन्टि'पथि )—constitutional or settled aversion to. स्वाभाविक वैर, शाश्वतिक विरोध. Ăntipath'ĭc, Ăntipathet'ic, *aa.*

Ăn'tĭphon, *n.* ( ॲ'न्टिफॉन् )—verse or sentence sung by one choir in answer to another. दोन गायकगणांनीं एकामागून एक गाइलेलें गाणें.

Ăntiph'onal, *a.* ( ॲन्टि'फॉनल् )—sung alternately. एकापाठीमागून एक गाइलेला.

Ăntĭph'onarў, *n.* ( ॲन्टि'फॉनरि )—a book of antiphons. प्रश्नोत्तररूपी धर्मगीतांचें पुस्तक.

Ăntĭph'onў, *n.* ( ॲन्टि'फॉनि )—antiphonal singing. आळीपाळीनें गाणें.

Ăntĭp'odēs, *n. pl.* ( -z, ॲन्टि'पोडीझ् )—region of the earth diametrically opposite ( esp. to our own ). भूगोलावर ज्याठिकाणीं आपण राहतों त्याच्या समोर अगदीं विरुद्ध दिशेला असणारा प्रदेश. Ăntip'odal, -dē'an, *aa.* [ Gr. *anti*, opposite, and *pedes*, foot ]

Ăn'tĭquarў, *n.* ( ॲ'न्टिक्वरि )—student or collector of antiquities. प्राचीन वस्तूंचा शोध करणारा, प्राचीनवस्तुशोधक, प्राचीनविद्यापंडित. [ L. *antiquus*, ancient ]

Ăntĭquār'ĭan, *a.* & *n.* ( ॲन्टिक्वे'रिअन् )—( one ) connected with the study of antiquities. प्राचीनवस्तुसंशोधक. Antiquarianism, *n.*

Ăn'tiquāted, *a.* ( ॲ'न्टिक्वेटेड् )—out of date, obsolete. जुना, गतकालीन, निरुपयुक्त.

Ăntique', *a.* ( -ēk, ॲन्टी'क् )—of or dating from old times; old-fashioned. प्राचीनकाळचा, जुना. *n.* relic of ancient art or of old times. प्राचीन काळचे किंवा जुने कलाकौशल्याचे पदार्थ. [ L. *antiquus*, ancient ]

Ăntĭq'uĭtў, *n.* ( ॲन्टि'क्विटि )—old times, esp. before the middle ages; the ancients. प्राचीन काळ, मध्ययुगाच्या पूर्वींचा काळ; प्राचीन लोक. *pl.* customs of the ancients; ancient relics. ( अने० ) प्राचीन काळच्या लोकांच्या चालीरीति; प्राचीन काळच्या वस्तु.

Ăntĭscŏrbū'tic, *a.* & *n.* ( ॲन्टिस्कॉर्ब्यू'टिक् )—( a medicine ) against scurvy. 'स्कर्व्ही' रोगावर ( औषध ), नाविकरक्तपित्तनाशक ( औषध ).

Ăntĭsĕp'tĭc, *a.* ( ॲन्टिसे'प्टिक् )—preventing putrefaction. सडूं न देणारें, किडे पडूं न देणारें ( द्रव्य ). [ Gr. *anti*, against and *sepein* to rot ]

Ăntĭth'ĕsĭs, *n.* ( ॲन्टि'थिसिस् )—opposition of word, contrast. विरोध, शब्दार्थविपर्यास. ( *pl.* Antithesēs )

Ăntĭthĕt'ic, -cal, *aa.* ( ॲन्टिथे'टिक्, ०टिकल् )—contrasted, consisting of two opposites. विरोध असलेला, विरोधमय.

Ănt'ler, *n.* ( ॲ'न्ट्लर् )—branched horn of a deer. सांबरांच्या शिंगांचा फांटा, हरणाच्या शृंगशाखा.

Ăn'tonўm, *n.* ( ॲन्टो'निम् )—a word of contrary meaning to another. विरुद्धार्थक शब्द.

Ā'nŭs, *n.* ( ए'नस् )—posterior opening of alimentary canal in animals. पश्चिमद्वार, मलद्वार.

Ăn'vĭl, *n.* ( ॲ'न्व्हिल् )—iron block on which smith works metal. ऐरण. To be on the *anvil*=घाटत असणें.

Anxī'etў, *n.* ( ăngz-, ॲङ्झा'यृटि )—troubled state of mind, uneasiness. काळजी, अस्वस्थता.

Ă'nxious, *a.* ( ăngk'shŭs, ॲ'ङ्क्शस् )—troubled, uneasy in mind; desirous to do. चिंतातुर, अस्वस्थ; कार्योत्सुक.

A'nў, *a.* ( ĕnĭ, ए'नि )—one, some, every. कोणीहि, कोणताहि.

An'ybŏdў, *n.* or *pron.* ( ए'निबॉडि )—any person; a person of consequence. कोणताहि मनुष्य; कांहीं किंमतीचा मनुष्य.

An'yhow, *adv.* ( ए'निहाउ )—in any way whatever; in any case, at any rate; at random. कोणत्याहि तऱ्हेनें, कांहीं झालें तरी; विचार न करतां, वाटेल तसें.

A'nyone, *n.* (ए'नि-वन्)—anybody. कोणताहि.
A'nŷthĭng, *n.* (ए'नि-थिंग्)—any thing. कांहींहि.
An'yway, *adv.* (ए'नि-वे)—at any rate. कांहीं झालें तरी, निदानपक्षीं.
An'yways, -wise, *adv.* (ए'नि-वेज्, ए'नि-वाइज्)—in any way. कोणत्याहि तऱ्हेनें, कसेंहि.
A'nŷwhēre, *adv.* (ए'नि-व्हेअर्)—at any place. कोठेंहि, कोणत्याहि ठिकाणीं.
A'ŏrĭst, *n.* (ए'ओरिस्ट्)—a past tense denoting occurrence merely. सामान्यभूतकाळ.
Aŏrt'a, *n.* (अऑ'र्टा)—great artery issuing from left ventricle of heart. रक्ताशयाची मुख्य धमनी. Aŏrt'ic, *a.* महाधमनीचा.
Apāce', *adv.* (अपे'स्)—with a quick pace, swiftly, fast. जलद् गतीनें, लवकर.
Apache', *n.* (-äsh, अपा'श्)—a street ruffian. रस्त्यावरील गुंड, आडदांड.
Ăp'anage, Ăpp-, *n.* (ॲ'पनिज्)—provision for younger children; dependency; perquisite. लहान मुलांकरितां केलेली तरतूद; आनुषंगिक गोष्ट, पराधीनता; अवांतर प्राप्ति, भत्ता.
Apart', *adv.* (अपा'र्ट्)—aside, away from others; separately. दूर; अलग.
Apärt'mĕnt, *n.* (अपा'र्ट्मेन्ट्)—a single room. खोली. *pl.* a suite of rooms; lodgings. खोल्या; राहण्याची जागा.
Ăpathĕt'ic, *a.* (ॲपथे'टिक्)—without feeling; insensible to emotion. भावनारहित; उदासीन, मंद. [ Gr. *a*, not and *pathos*, suffering ]
Ăp'athŷ, *n.* (ॲ'पथि)—insensibility, indifference; mental indolence. मनोविकाराचा अभाव, उदासीनता; मान्द्य, जडता.
Āpe, *n.* (एप्)—a tailless monkey; imitator. शेंपटीं नसलेलें माकड; नक्कल करणारा. *v. t.* imitate, mimic. नक्कल करणें. To play the ape=to mimic. माकडचेष्टा करणें.
Apē'rient, *a.* (अपे'रिएन्ट्)—laxative. सौम्य रेचक.
Ap'erture, *n.* (ॲ'पर्चर्)—opening, gap. भोंक, रंध्र. [ L. *aperire*, to open ]
Ā'perŷ, *n.* (ए'परि)—mimicry. नक्कल, अविचारानें केलेलें अनुकरण.
Ā'pĕx, *n.* (ए'पेक्स्)—tip, topmost point, pointed end. टोंक, कळस, शिखर.
Aphā'sĭa, *n.* (अफे'झिआ)—loss of speech. वाक्शक्तिवैकल्य, वाचाभंग.
Aphē'lion, *n.* (अफी'लिअन्) (*pl.* Aphelĭĭ)—point of orbit far from the sun. ग्रहांच्या कक्षेंतील सूर्यापासून अतिदूर बिंदु, उच्चस्थान. [ Gr. *apo*, from & *helios*, the sun ]
Ăph'ĭs, *n.* (ॲ'फिस्)—plant lice, minute insects. भाजीपाल्याचे पानावरील कीड. *pl.* Ăphĭdēs; Aphĭd'ian, *a.* & *n.*
Ăph'orĭsm, *n.* (ॲ'फोरिझम्)—short pithy maxim; definition. सूत्र, थोड्या शब्दांत निर्दिष्ट केलेलें तत्त्व; व्याख्या, लक्षण. Aphorĭs'tic, *a.*
Āpiār'ian, *a.* (एपिए'रिअन्)—pertaining to bee-keeping. मधमाशा पाळण्यासंबंधीं.
Ā'piarŷ, *n.* (ए'पिअरि)—place where bees are kept. मधमाशा राखून ठेवण्याचें स्थळ, मधुमक्षिकालय. [ L. *apis*, a bee ]
Ā'pĭcal, *a.* (ए'पिकल्)—of or at the apex. टोंकाजवळचा, टोंकासंबंधींचा.
Ā'pĭcŭlture, *n.* (ए'पिकल्चर्)—bee-keeping. मधमाशा पाळणें. [ L. *apis*, a bee & culture ]
Apiece', *adv.* (अपी'स्)—individually, severally, each. एकएकास, प्रत्येकास.
Ā'pĭsh, *a.* (ए'पिश्)—of or like an ape, foolish, foppish. नकल्या, मर्कटस्वभावाचा.
Apŏc'alŷpse, *n.* (अपॉ'कॅलिप्स्)—revelation, discovery, disclosure. प्रगट करणें.
Apŏc'ŏpē, *n.* (अपॉ'कोपि)—cutting off an end of a word. अन्त्याक्षरलोप. [ Gr. *apo*, off and *cope*, a cutting ]
Apŏd'osĭs, *n.* (अपॉ'डॉसिस्)—consequent clause in conditional sentence. संकेतार्थक वाक्यांतील पुढील पोटवाक्य. *pl.* Apŏd'osēs.
Ăp'ogee, *n.* (ॲ'पॉजी)—point in an orbit farthest from the earth; climax. पृथ्वीपासून अतिदूरचा चंद्राचे (कक्षेंतील) गमनमार्गांतील बिंदु, सीमा, कळस.
Apŏll'ō, *n.* (अपॉ'लो)—Greek sun-god; the sun; man of great beauty. ग्रीक लोकांचा सूर्यदेव; सूर्य; अत्यंत सुंदर पुरुष.
Apŏlogĕt'ic, *a.* (अपॉलॉजे'टिक्)—regretfully acknowledging fault; of the nature of an apology, vindicatory. दोषनिवारक; क्षमा व्हावी अशा अर्थाचा. *n. pl.* reasoned defence. विचारपूर्वक केलेलें समर्थन.
Apŏl'ogĭst, *n.* (अपॉ'लॉजिस्ट्)—one who defends by argument. युक्तिवादानें आत्मसमर्थन करणारा.
Apŏl'ogīze, *v. i.* (अपॉ'लोजाइझ्)—make an apology. क्षमा किंवा माफी मागणें.
Ăp'ologue, *n.* (-ŏg, ॲ'पोलॉग्)—moral fable or allegory. उपदेशपर कल्पित गोष्ट.
Apŏl'ogŷ, *n.* (अपॉ'लॉजि)—regretful acknowledgement of offence; explanation, vindication. केलेल्या अपराधाबद्दल खेद प्रदर्शित करणें; स्पष्टीकरण, समर्थन.
Ăp'ophthĕgm, *n.* (ॲ'पॉप्थेम्)—terse or pithy saying. नीतिवचन, सूक्ति, प्रसिद्धोक्ति. Apophthegma'tĭc, *a.* (अपॉप्थेग्मॅ'टिक्)
Ăp'oplĕxŷ, *n.* (ॲ'पॉप्लेक्सि)—a malady suddenly arresting powers of sense and motion. एकाएकीं गेरशुद्धि आणणारा एक रोग. Apoplec tic, *a.*

Ăp'osĭopē''sĭs, *n.* (pl. -sēs) (ॲ'पॅासयॅापी''सिस्)—sudden breaking off in speech. बोलतांना एकदम थांबणें. [ Gr. *apo*, from and *siopao*, I am silent ]
Apŏs'tasy̆, *n.* (अपॅा'स्टसि)—abandonment of one's religion, party, etc. स्वधर्मत्याग, स्वपक्षत्याग. Apos'tatīze, *v. i.*
Apŏs'tāte, *n.* (अपॅा'स्टेट्)—one guilty of apostasy. स्वधर्मत्यागी, धर्मभ्रष्ट, पतित.
Apŏs'tle, *n.* (अपॅा'सल्)—missionary; leader of reform. धर्मप्रचारक; सुधारणाग्रणी.
Apŏs'trŏphē, *n.* (अपॅा'स्ट्रॅाफि)—exclamatory address; sign of omitted letter, sign of possessive case. परोक्षसंबोधन; गाळलेल्या अक्षराबद्दल किंवा षष्ठीप्रत्ययाची ( ' ) ही खूण.
Apŏth'ĕcary̆, *n.* (अपॅा'थिकरि)—druggist; chemist. औषधें तयार करून विकणारा; गांधी.
Apŏthĕō'sĭs, *n.* (*pl.* -osēs) (ॲपॅाथिओ'सिस्)—deification; transformation; deified ideal. देवरूपी मानणें; रूपांतर; देवरूपी उद्दिष्ट. Apŏth'eosīze, *v. t.* ईश्वरतुल्य मानणें.
Appal', *v. t.* (-awl, अपॅा'ल्)—dismay; terrify. दहशत घालणें; पांचावर धारण बसवणें.
Ăpparā'tŭs, *n.* (ॲपरे'टस्)—appliances for scientific or other work. उपकरणें, यंत्रसामग्री, साहित्य (*pl.* the same or rarely Apparatuses) [ L. *ad*, & *parare*, to make ready ]
Appă'rĕl, *v. t.* (अॅ'रेल्)—dress, attire. कपडे घालणें; पोषाख करणें. *n.* (no plural) dress, clothes, clothing. कपडे, पोशाख.
Appă'rent, *a.* (अॅ'रेन्ट्)—manifest, palpable; seeming. स्पष्ट, उघड; दिसण्यांत येणारा, दिखाऊ, वरकरणी. Heir Apparent=whose right cannot be superseded by birth of nearer heir. ज्यास खात्रीनें अधिकार किंवा मालमत्ता मिळणार असा ज्येष्ठ वारस, युवराज.
Ăpparĭ'tion, *n.* (ॲपरि'शन्)—appearance; a ghost. उदय, दृग्गोचरता; छाया, भूत.
Appă'rĭtor, *n.* (अॅ'रिटर्)—herald; usher. अग्रदूत, निरोप्या; ओळख करून देणारा.
Appeal', *v. i.* & *t.* (-ēl, अपी'ल्)—apply to higher court; call upon for corroboration; make a request. वरच्या न्यायाधीशाकडे खटला नेणें; खरेपणाबद्दल आह्वान देणें; विनंति करणें. *n.* act or right of appealing. अपील, वरच्या अधिकाऱ्याकडे खटला नेणें; विनंति, मदतीकरितां विनवणी. [ Fr. *ad*, to and *pello*, I drive ]
Appear', *v. i.* (अपि'अर्)—become visible; present oneself; be published; seem. दिसणें; स्वतः हजर राहणें; प्रसिद्ध होणें; वाटणें.
Appear'ance, *n.* (अपि'अरन्स्)—appearing; seeming; look, aspect. दिसणें; वाटणें; चेहरा, स्वरूप. (*pl.*) outward show of prosperity, friendly relations, etc. बाह्यस्वरूप. In appearance=outwardly. दिसण्यांत. To put in an appearance=To show oneself. स्वतः हजर असणें. *To all appearance*=so far as can be seen. सर्व बाजूनें दिसण्याला, दिसण्यांत. *To keep* up appearances=to keep up outward show. वरकरणी भपका करणें.
Appease', *v. t.* (-z, अपी'झ्)—pacify, soothe; satisfy. सान्त्वन करणें; समाधान करणें.
Appĕll'ant, *a.* (अपे'लन्ट्)—concerned with appeals. अपीलासंबंधीचें. *n.* one who appeals to higher court. अपील करणारा, विवादी.
Appĕll'ate, *a.* (अपे'लेट्)—(court) hearing appeals. अपीलांचा विचार करणारें (कोर्ट).
Ăppĕllā'tion, *n.* (ॲपेले'शन्)—name, title; nomenclature. नांव, संज्ञा; परिभाषा.
Appĕll'ătĭve, *a.* & *n.* (अपे'लेटिव्ह्)—designating a class, common; common noun. जातिवाचक: सामान्य; सामान्य नाम.
Appĕnd', *v. t.* (ॲपे'न्ड्)—attach as an accessory; add to. पुरवणी जोडणें; जोडणें. [ L. *ad*, to & *pendere*, to hang ]
Appĕnd'age, *n.* (अपे'न्डिज्)—accompaniment. जोडलेला किंवा आनुषंगिक पदार्थ, अनुबंध.
Appĕndicī'tis, *n.* (अपेन्डि-सा'इ-टिस्)—inflammation of vermiform appendix of intestine of the caecum. आंतडीची सूज.
Appĕn'dĭx, *n.* (अपे'न्डिक्स्)—subsidiary addition, supplement. परिशिष्ट; पुरवणी. (pl. Appendixes or Appendices-ॲपेन्डिसीझ्)
Ăppertain', *v. i.* (ॲपर्टे'न्)—belong to; relate to. ०चें असणें; मालकीचें असणें.
Ăpp'ĕtīte, *n.* (ॲ'पिटाइट्)—desire or craving for food, pleasure, etc.; relish for food. भूक; वासना, कामना; अन्नवासना.
Ăpp'ĕtīzer, *n.* (ॲ'पिटाइ्झर्)—thing that gives appetite. भूक प्रदीप्त करणारी वस्तु, अग्निप्रदीपन.
Ăpp'ĕtīzĭng, *a.* (ॲ'पिटाइझिंग्)—inviting, attracting. प्रदीपक, चित्ताकर्षक, मोहक.
Applaud', *v. t.* & *i.* (अप्लॅा'ड्)—express approval (esp. by clapping); commend. वाहवा करणें; प्रशंसा करणें.
Applause', *n.* (-z, ॲप्लॅा'झ्)—loud approbation; acclamation. धन्यवाद; प्रशंसा.
Ăp'ple, *n.* (ॲ'पल्)—fruit of the apple tree. सफरचंद (फळ). Apple of the eye *i. e.* the pupil. डोळ्यांतील बाहुली, तारका. Apple of the eye=any cherished object. जिवाचा कलिजा, गळ्यांतला ताईत. To upset one's *apple-cart*=to spoil one's plans. एखाद्याचे बेत ढासळणें. Apple-pie order=perfect order. पूर्ण व्यवस्था.

Applī'ance, *n.* (ॲप्ला'यन्स्)—thing applied as a means; instrument; device. साधनीभूत वस्तु; साधन, उपकरण; योजना.

Ăpp'lĭcabĭl"ĭty, *n.* (ॲ'प्लिकॅबि'लिटि)—the quality of being applicable. लायकी; योजण्याची योग्यता, व्यवहार्यता.

Ăpp'lĭcāble, *a.* (ॲ'प्लिकेबल्)—that applies or may be applied; having reference, appropriate (to). लावण्याजोगता, व्यवहार्य; योग्य.

Ăpp'lĭcant, *n.* (ॲ'प्लिकन्ट्)—one who applies or makes application. अर्जदार.

Ăpplĭcā'tion, *n.* (ॲप्लिके'शन्)—request or demand; diligence; bearing of a thing, relevancy. विनंति, अर्ज; व्यासंग; योजणूक, विनियोग, प्रयोग.

Applȳ', *v. t.* & *i.* (ॲप्ला'य्)—put close; administer; to make request, request; attend closely to. लगत ठेवणें; उपाय योजणें; विनंति किंवा अर्ज करणें; लक्ष लावणें. [L. *ad*, to & *placare*, to fold]

Appoint', *v. t.* (अपॉ'इन्ट्)—fix (time etc.); prescribe, ordain; assign post to. (वेळ) नेमून देणें; ठरवणें; नेमणूक करणें.

Appoĭnt'mĕnt, *n.* (अपॉ'इन्ट्मेन्ट्)—engagement, assignation; (*pl.*) outfit. भेटण्याची ठरवून दिलेली वेळ; नेमणूक; (अने०) प्रवासी सामान.

Appŏr'tion, *v. t.* (अपो'र्शन्)—assign as share, portion out. विभागून देणें, भाग पाडून देणें. Appor'tionment, *n.* विभागणी, वांटणी.

Ăpp'ŏsĭte, *a.* (-z-, ॲ'पोझिट्)—well put, to the point. यथोचित, प्रसंगानुसार, समर्पक. [L. *ad*, to & *ponere*, to put]

Ăpp'osĭtion, *n.* (ॲ'पोझिशन्)—juxtaposition, placing side by side. स्थितिसांनिध्य, दोन नामें एका विभक्तींत असणें, समानाधिकरण.

Appraise', *v. t.* (अप्रे'झ्)—fix price of, estimate. किंमत ठरविणें. Apprais'al, Appraise'ment, *nn.* [L. *ad*, to & *pretium*, a price]

Apprē'ciable, *a.* (-sha-, ॲप्री'शेबल्)—capable of being estimated; perceptible. परिमाण समजण्याजोगा, विशेष परिमाणाचा; सुस्पष्ट, बराचसा.

Apprē'ciāte, *v. t.* & *i.* (ॲप्री'शिएट्)—set high value on; estimate rightly; rise in value. मोल ठरविणें; गुण किंवा योग्यता ओळखणें; किंमत वाढणें. Appre'ciative, Appre'ciatory, *aa.* [L. *ad*, to & *pretium*, a price]

Apprēciā'tion, *n.* (-shi-, ॲप्री'शिएशन्)—estimation; adequate recognition; rise in value; critique. किंमत; गुणपरीक्षा, पारख, किंमतीची वाढ; गुणदोषविवेचन.

Ăpprehĕnd', *v. t.* (ॲप्रिहे'न्ड्)—seize, arrest; understand; anticipate with fear. पकडणें; समजणें; धास्ती किंवा भीति पडणें. [L. *ad*, to & *prehendere*, to seize]

Ăpprehĕn'sĭble, *a.* (ॲप्रिहे'न्सिबल्)—perceptible to senses. इंद्रियगोचर. Apprehensibi'lity, *n.*

Ăpprehĕn'sion, *n.* (ॲप्रिहे'न्शन्)—arrest; understanding; dread. पकडणें; ज्ञान, बुद्धि; भीति.

Apprehĕn'sĭve, *a.* (ॲप्रिहे'न्सिव्ह्)—afraid, expecting evil, fearful. भयभीत, भितरा.

Apprĕn'tĭce, *n.* (ॲप्रे'न्टिस्)—learner bound to employer for specified term. कांहीं कालपर्यंत धंदा किंवा इतर कांहीं शिकण्याकरितां राहिलेला मनुष्य, उमेदवार. *v. t.* bind as an apprentice. शिकण्याकरितां करारानें ठेवणें.

Apprĕn'tĭceship, *n.* (ॲप्रे'न्टिस्-शिप्)—the time an apprentice serves. (काम वगैरे) शिकण्याचा काल, उमेदवारी.

Apprīse', *v. t.* (-z, ॲप्रा'इझ्)—give notice of, inform. सूचना देणें, खबर देणें, कळविणें.

Apprīze', *v. t.* (ॲप्रा'इझ्)—appraise, set a value on. किंमत ठरविणें.

Approach', *v. t.* & *i.* (ॲप्रो'च्)—come near to; make overtures to. जवळ जाणें; एकाद्या बाबतींत प्रथम बोलणें करणें. *n.* access, way or progress towards. आगमन, शिरकाव, मार्ग. [L. *ad*, to & *prope*, near]

App'robāte, *v. t.* (ॲ'प्रोबेट्)—approve formally, sanction. पसंत करणें.

Approbā'tion, *n.* (ॲप्रोबे'शन्)—sanction, approval. पसंती. To meet the approbation of = पसंतीस पडणें, मनास येणें. App'robatory, *a.*

Apprō'prĭāte, *a.* (ॲप्रो'प्रिएट्)—suitable, proper. योग्य, उचित. *v. t.* take possession of, devote to. आपलासा करणें, कामीं लावणें. [L. *ad*, to & *proprius*, one's own]

Apprŏprĭā'tion, *n.* (ॲप्रोप्रिए'शन्)—application to a particular use. अमुक एक कामाकडे लावणें. Appro'priator, *n.*; Appro'priative, *a.*

Approv'al, *n.* (-ōō-, ॲप्रू'व्हल्)—favourable opinion, approbation, sanction. पसंती, मान्यता, मंजुरी.

Approve', *v. t.* & *i.* (-ōōv, अप्रू'व्ह्)—pronounce good; have favourable opinion of. पसंत करणें; मर्जीस येणें, पसंतीस येणें.

Approved', *a.* (-ōōv-, ॲप्रू'व्ह्ड्)—pronounced to be good or satisfactory, accepted. मान्य किंवा पसंत केलेला.

Approv'er, *n.* (-ōōv-, ॲप्रू'व्हर्)—one who turns King's evidence. माफीचा साक्षीदार.

Apprŏx'ĭmāte, *a.* (ॲप्रॉ'क्सिमेट्)—fairly correct; near to. जवळ जवळ बरोबर; ठोकळ, जवळ जवळ. *v. t.* & *i.* be or make near to. जवळ जवळ बरोबर असणें किंवा करणें. [L. *ad*, to & *proximus*, nearest]

Apprŏxĭmā'tion, *n.* ( अप्रॉक्सिमे'शन् )—close approach, tolerably exact estimate or amount. जवळ जवळ बरोबर असणें, अंदाजी उत्तर.

Appŭr'tenance, *n.* ( अप'र्टिनन्स् )—appendage; that which belongs to something else; (*pl.*) belongings. अंगभूत वस्तु; मालकीच्या वस्तु.

Ā'prĭcŏt, *n.* ( ए'प्रिकॉट् )—orange-coloured stone-fruit allied to plum. अलुबुखारासारखें एक प्रकारचें विलायती फळ.

Ā'prĭl, *n.* ( ए'प्रिल् )—fourth month of the English year. इंग्रजी वर्षाचा चवथा महिना. April-fool=one sportively imposed upon on April 1. एप्रिल महिन्याचे पहिले तारखेस ज्याची मजेनें विलक्षण मस्करी केली आहे असा.

Ā'pron, *n.* ( ए'प्रन् )—garment worn in front of body. कंबरेला बांधण्याचें मलवस्त्र. [ L. *mappa*, a napkin ]

Ăpropos', *adv.* (-pō, अॅप्रॉपो' )—to the point or purpose. समयोचित, वेळेस योग्य. Apropos of=in connexion with. ०च्या संबंधीं.

Ăpse, *n.* ( अॅप्स् )—arched or domed recess at the end of church. चर्चच्या शेवटच्या बाजूला अर्धवर्तुलाकार घुमट असलेला इमारतीचा भाग.

Ăp'sĭdal, *a.* ( अॅ'प्सिडल् )—of the form of an apse. अर्धवर्तुलाकार घुमटासारखा.

Ăp'sĭs, *n.* (*pl.* ăp'sĭdēs ) ( अॅ'प्सिस् )—aphelion or perihelion of planet. ग्रहांच्या अगर उपग्रहांच्या कक्षेंतील सूर्यापासून अति दूर अगर अति समीप अशा दोन बिंदूंपैकीं एक, उच्च किंवा नीच बिंदु.

Apt, *a.* (अॅप्ट्)—suitable, appropriate; quick; ready; inclined. योग्य; सिद्ध, तयार; ०कडे कल असलेला. Apt'ly, *adv.*; Apt'ness, *n.*

Ăp'tĭtūde, *n.* ( अॅ'प्टिट्यूड् )—fitness; talent. योग्यता; बुद्धि, हुशारी.

Aquār'ĭŭm, *n.* ( अॅक्वे'रिअम् )—tank for aquatic plants or animals. वनस्पति अगर मासे ठेवण्याकरितां केलेलें तळें. [ L. *aqua*, water ]

Aquār'ĭŭs, *n.* ( अॅक्वे'रिअस् )—the eleventh sign of the zodiac. कुंभरास.

Aquăt'ĭc, *a.* ( अॅक्वॅ'टिक् )—living in or near water. पाण्यांत किंवा पाण्याजवळ राहणारा. *pl.* water sports. जलक्रीडा, पाण्यांतील खेळ.

Ā'quatint, *n.* ( अॅ'क्वॅटिन्ट् )—engraving on copper. तांब्यावर केलेलें खोदकाम

Ā'quedŭct, *n.* ( अॅ'क्विडक्ट् )—artificial channel for water; conduit. नहर; जलप्रणाली.

Ā'queous, *a.* ( ए'क्विअस् )—of water, of the nature of water, watery. जलरूप, जलमय.

Ă'quĭlīne, *a.* (अॅ'क्विलाइन्)—curved and hooked like the beak of an eagle. गरुडासारखी.

Ă'rāble, *a.* ( अॅ'रेबल् )—fit for tillage. लागवड करण्याला योग्य. [ Gr. *aroein*, to plough ]

Arb'ĭter, *n.* ( ār-, आ'र्बिटर् )—a judge, an umpire, arbitrator. पंच, मध्यस्थ, अमीन, लवाद.

Arb'ĭtrāment, *n.* ( आ'र्बिट्रमेन्ट् )—determination, award, decision. लवादाचा निवाडा.

Arb'ĭtrarў, *n.* ( आ'र्बिट्रारि )—capricious; despotic. मनास येईल तसा, लहरी; स्वतंत्र, जुलमी.

Arb'ĭtrāte, *v. t.* & *i.* ( आ'र्बिट्रेट् )—determine, settle dispute. मध्यस्थी करून निकाल करणें, निवाडा करणें, लवाद करणें.

Arbĭtrā'tion, *n.* ( आर्बिट्रे'शन् )—function or decision of an arbitrator, determination. लवादी, मध्यस्थी, लवादाचा निकाल.

Arbĭtrāt'or, *n.* ( आर्बिट्रे'टर् )—one appointed to settle dispute. पंच, मध्यस्थी करणारा, लवाद.

Arborā'ceous, *a.* ( -shus, आर्बरे'शस् )—tree-like. झाडांसारखा. [ L. *arbor*, a tree ]

*Arbŏr'eal*, *a.* ( आर्बॉ'रिअल् )—belonging or pertaining to trees. झाडांसंबंधीं.

Arbŏr'eous, *a.* ( आर्बॉ'रिअस् )—full of or abounding in trees. वृक्षमय.

Arborĕs'cent, *a.* ( आर्बरे'सेन्ट् )—tree-like in growth or general appearance. वाढींत किंवा दिसण्यांत झाडासारखा. Arbores'cence, *n.*

Arb'orĭcŭlture, *n.* (आ'र्बॉरिकल्चर् )—cultivation of trees and shrubs. मोठ्या किंवा लहान झाडांची केलेली लागवड. Arboricul'tural, *a.*; Arboricul'turist, *n.*

Arb'our, *n.* ( आ'र्बर् )—shady nook, bower of creepers. लताकुंज, लतागृह, लतामंडप. [ L. *arbor*, a tree ]

Arc, *n.* ( आर्क् )—part of circumference of circle. वर्तुळाच्या परिघाचा भाग.

Arcāde', *n.* ( आर्के'ड् )—covered walk lined with shops; row of arches. दुतर्फा दुकानें असलेला छायेचा रस्ता; कमानींची रांग.

Ar'cānŭm, *n.* ( आ'र्केनम् )—mystery, secret. रहस्य, गूढार्थ, अद्भुत.

Arch, *n.* ( आर्च् )—curved structure ( supporting bridge etc.), curve. कमान, तोरण. *a.* roguish, saucy. लबाड, अट्टल, उद्धट.

Archaeŏl'ogў, *n.* ( -kĭ-, आर्किऑ'लॉजि )—study of antiquities or of prehistoric remains. पुरातनवस्तुशास्त्र. Archaeol'ogical, *a.* प्राचीनवस्तुशास्त्रासंबंधीं. Archaeol'ogĭst, *n.* पुराणवस्तुशास्त्रज्ञ, पुराणवस्तुशास्त्रवेत्ता.

Archā'ĭc, *a.* ( -k-, आर्के'इक् )—primitive, antiquated; no longer in common use. पुरातन, जुना; आर्ष, प्रचारांत नसलेला.

Ar'chāĭsm, *n.* ( आ'र्केइझम् )—retention of what is old or obsolete; use of the archaic. जुनें तसेंच चालू ठेवणें; जुना शब्दप्रयोग.

Arc'hāngel, *n.* ( -k-, आ'र्कएंजल् )—a chief

angel, angel of the highest rank or order. श्रेष्ठवर्गातील देवदूत. Archängĕ'lic, *a*.

Archbĭsh'op, *n*. (आर्च्-बिं'शप्)—chief bishop, metropolitan. मुख्य धर्माध्यक्ष.

Archbĭsh'opric, *n*. (आर्च्-बिं'शप्रिक्)—the jurisdiction or office of archbishop. मुख्य धर्माध्यक्षाचा अधिकार किंवा स्थान.

Archdeac'on, *n*. (आर्च्-डी'कन्)—Church dignitary next below bishop. मुख्य बिशपचा साहाय्यकारी, मुख्य डीकन.

Archdeac'onrў, *n*. (आर्च्-डी'कन्रि)—jurisdiction of archdeacon. बिशपच्या साहाय्यकाऱ्याच्या अधिकारांतील प्रदेश.

Archdī'ocēse, *n*. (आर्च्-डा'योसीज्)—archbishop's see. आर्चबिशपच्या अधिकारांतील प्रांत.

Arch'dūke, *n*. (आ'र्च्-ड्यूक्)—son of Emperor of Austria. ऑस्ट्रिआ देशाचा राजपुत्र.

Arch'er, *n*. (आ'र्चर्)—one who shoots with bow and arrows. तिरंदाज, धनुर्धर.

Arch'erў, *n*. (आ'र्चरि)—use of bow and arrows. तिरंदाजी, धनुर्विद्या.

Arc'hetўpe, *n*. (-k-, आ'र्किटाइप्)—original model, prototype. मूळ प्रत, असल, मूळ नमुना. [ Gr. *arche*, origin, and *typos*, type ]

Archĭpel'agō, *n*. (-k-, आर्किपे'लगो)—sea with many islands; group of islands. पुष्कळ बेटें असलेला समुद्र; द्वीपसमूह. [ Gr. *archi*, chief, and *pelagos*, sea ]

Arc'hĭtĕct, *n*. (-k-, आ'र्किटेक्ट्)—one who prepares plans for building. शिल्पकार, कारागीर, इमारतशास्त्र जाणणारा.

Arc'hĭtĕcture, *n*. (-k-, आ'र्किटेक्चर्)—science of building. शिल्पशास्त्र, इमारतशास्त्र.

Arc'hives, *n. pl.* (kīvz-, आ'र्काइव्ह्ज्)—public records; place where public records are kept. सरकारी जुने कागद, दफ्तर; दफ्तरखाना.

Arc'hĭvist, *n*. (-k-, आ'र्काइव्हिस्ट्)—keeper of archives. दफ्तराचा रक्षक, दफ्तरदार.

Arch'way, *n*. (आ'र्च्-वे)—arched entrance, vaulted passage. कमानीचा दरवाजा.

Arch'wise, *adv*. (आ'र्च्-वाइझ्)—in the form of an arch, like an arch. कमानीसारखा.

Arc'tĭc, *a*. (आ'र्क्टिक्)—of the north pole, northern; frigid. उत्तरध्रुवाकडील; थंड.

Ard'ent, *a*. (आ'र्डन्ट्)—eager, zealous, fervent; burning. उत्कंठित, उत्कट; कडक.

Ard'our, *n*. (-der, आ'र्डर्)—fierce heat; warm emotion; fervour, zeal. दाह, तलखी; कळवळा; उत्साह, उत्कण्ठा. [L. *ardere*, to burn]

Ard'ūous, *a*. (आ'र्ड्युअस्)—hard; strenuous. कठीण; दुर्घट, श्रमसाध्य. [ L. *arduus*, high ]

Ār'ĕa, *n*. (ए'रिआ)—extent of surface, region; scope, range; sunk court before basement of house. क्षेत्रफळ; क्षेत्र; अंगण.

Ă'rĕca, *n*. (ॲ'रिका)—a kind of palm. पोफळीचें झाड. A'rĕca-nŭt, *n*.=पोफळ, सुपारी.

Arē'na, *n*. (अरी'ना)—centre of amphitheatre; scene of conflict. रंगभूमीचा मध्यभाग; रणांगण, मल्लभूमि, पटांगण, आखाडा.

Arēnā'ceous, *a*. (-shus, ॲरिने'शस्)—sandy. रेताड, वाळुकामय. [ L. *arena*, sand ]

Ar'gent, *a*. (आ'र्जन्ट्)—like silver. रुप्यासारखा चकचकीत. *n*. silver. रुपें.

Argentĭ'ferous, *a*. (आर्जन्टि'फरस्)—yielding silver. रजतात्मक, रजतोत्पादक.

Ar'gĭl, *n*. (आ'र्जिल्)—potter's clay. भांडीं करण्याची माती, पांढरी माती. [ L. *argilla*, white clay ]

Argĭlā'ceous, *a*. (आर्जिले'शस्)—of the nature of clay. कुंभारमातीचा.

Arg'on, *n*. (आ'र्गॉन्)—a gas, an inert constituent of the atmosphere. हवेंतील एका जातीचा गॅस. [ L. *argos*, inert ]

Arg'osў, *n*. (आर्गो'सि)—richly laden ship. मोठें व्यापारी गलबत, वारकस.

Arg'ūable, *a*. (आ'र्ग्यूएबल्)—capable of being argued. वादावाद किंवा वादविवाद करण्यास योग्य.

Arg'ūe, *v. t. & i.* (आ'र्ग्यू)—maintain by reasoning; prove; show; show by inference; reason. वादविवाद करणें; प्रमाण दाखविणें; दाखविणें; सप्रमाण सिद्ध करणें; वादावाद करणें.

Arg'ūfў, *v. i.* (आ'र्ग्यूफाय्)—argue for the sake of controversy. वादविवादाकरितां चर्चा करणें. [ L. *argutare*, to prove ]

Argū'mĕnt, *n*. (आर्ग्यू'मेन्ट्)—reason advanced; debate; summary of book. सबब, वादविवाद; पुस्तकाचा सारांश. Line of argument=प्रमाणसरणी, वादविवाद करण्याची पद्धति.

Argūmĕntā'tion, *n*. (आर्ग्यूमेन्टे'शन्)—process of argument, methodical reasoning; debate. व्यवस्थेशीर वादविवाद; वादावाद, चर्चा.

Argūmĕn'tātive, *a*. (आर्ग्यूमे'न्टेटिव्ह्)—addicted to reasoning, fond of arguing; logical. विवादप्रिय, वितंडवादी, न्यायानुसार, तर्कशास्त्रशुद्ध.

Arg'ŭs, *n*. (आ'र्गस्)—a fabulous person with hundred eyes. ग्रीक पुराणांतील एक शंभर डोळे असलेला प्राणी. [ Gr. *argos*, bright ]

Arg'ŭs-eyed, *a*. (आ'र्गस्-आईड्)—vigilant, watchful, extremely observant. दक्ष, सावध.

A'rĭd, *a*. (ॲ'रिड्)—dry, barren, parched; uninteresting. रुक्ष, रखरखीत; नीरस.

Arĭd'ĭtў, *n*. (ॲरि'डिटि)—dryness. रुक्षता, रखरखीतपणा. [ L. *aridus*, dry ]

Ar'ies, *n.* ( ए'रिईझ् )—the Ram, first zodiacal constellation. मेष, मेषरास.

Aright', *adv.* (-It, अरा'इट् )—rightly, justly, duly. बरोबर, ठाकठीक, व्यवस्थेशीर.

Arise', *v. i.* (-z, अरा'इझ् )—appear; spring up; occur. उदय पावणें; उत्पन्न होणें; घडून येणें. Arise out of=proceed. ०वरून प्राप्त होणें.

Aristoc'racy, *n.* ( ॲरिस्टॉ'क्रसि )—the nobility; government by the nobility; government by the best citizens. अमीर उमराव; अमीर उमरावांच्या सत्तेचें राज्य; उत्तम नागरिकांनीं चालविलेलें राज्य. [ Gr. *aristos*, best, and *cratos*, Sk. क्रतु power ]

A'ristocrat, *n.* ( ॲ'रिस्टॉक्रॅट् )—member of aristocracy. अमीर उमरावांपैकीं एक.

Aristocrat'ic, *a.* ( ॲरिस्टॉक्रॅ'टिक् )—of the aristocracy; grand, stylish. बडे लोकांचा; थोर, वैभवशाली, डामडौली.

Arith'metic, *n.* ( अरि'थ्-मिटिक् )—science of numbers; computation, use of figures. अंकगणित; हिशेब. [ Gr. *arithmos*, number ]

Arithmet'ical, *a.* ( ॲरिथ्-मे'टिकल् )—according to arithmetic. अंकगणिताप्रमाणें, गणितानुसार.

Arithmeti'cian, *n.* ( अरिथ्मेटि'शन् )—one skilled in arithmetic. अंकगणितज्ञ.

Ark, *n.* ( आर्क् )—covered floating vessel; a chest. आच्छादिलेलें तरंगतें जहाज; पेटी. Noah's ark=toy ark with animals. नोआचें गलबत.

Arm, *n.* ( आर्म् )—upper limb of human body; sleeve; branch; a weapon. बाहु, दंड; बाही, अस्तनी; फांदी; शस्त्र, हत्यार. *v. t. & i.* furnish with arms; take up arms; provide, furnish. सशस्त्र होणें; हत्यार उचलणें; तरतूद करणें. In one's arms=पोटाशीं. Arm of the sea= खाडी, फांसू. Arm-in-arm=with arms interlinked. हातांत हात घालून. With open arms= cordially. मनापासून, अंतःकरणपूर्वक. To keep at arm's length=to avoid familiarity with. सलगी न करणें, अतिपरिचय होऊं न देणें. A stand of arms=a set for one soldier. एका शिपायाच्या सर्व हत्याराचा संच. To take up arms= to arm oneself. शस्त्र उचलणें. Up in arms= actively engaged in rebellion, etc. उघड-पणें बंड करण्याच्या तयारींत. To lay down arms=to cease hostilities. लढाई बंद करणें. Under arms=in battle array. लढाई-करितां तयार.

Arma'da, *n.* ( आर्मे'डा )—a fleet of armed ships, fleet of warships. आरमार, लढाऊ गलबतांचा समुदाय. [ L. *arma*, arms ]

Armadill'o, *n.* ( आर्मडि'लो ) ( *pl.* Armadillos ) an animal with a hard bony shell divided into bands or belts. कठीण कवच असलेला पट्ट्यापट्ट्यांचा एक प्राणी.

Arma'ment, *n.* ( आर्म'मेन्ट् )—force equipped for war; military equipment. युद्धाकरितां सज्ज केलेलें आरमार; युद्धाची सामग्री.

Arm'ature, *n.* ( आ'र्मेचर् )—arms, armour; piece of soft iron placed in contact with poles of magnet. चिलखत; लोहचुंबकाची दोन टोकें जोडणारी लोखंडाची पट्टी.

Arm'istice, *n.* ( आ'र्मिस्टिस् )—cessation from arms; short truce. लढाईची तहकुबी; तात्पुरता तह. Armistice Day, 11th November, kept as anniversary of the armistice (1918) that ended hostilities in the great war. ११ नोव्हेंबर, १९१८ सालीं महायुद्ध थांबल्याबद्दल साजरा केला जाणारा वार्षिक दिन.

Arm'let, *n.* ( आ'र्म्-लिट् )—a band worn round arm; a small inlet of sea or branch of a river. कंकण; लहान खाडी.

Armor'ial, *a.* ( आर्मो'रिअल् )—of heraldic arms, belonging to coats of arms. शूर सरदारांच्या ढालींचा, ध्वजादि विचित्र चिन्हांचा.

Arm'ory, *n.* ( आ'र्मरि )—heraldry, armour or arms. कुलमानद्योतक ध्वजादि चित्रित चिन्हें.

Arm'our, *n.* (-mer, आ'र्मर् )—defensive covering worn in fighting; protective steel or iron covering of warship. चिलखत, कवच; लढाऊ गलबताचा लोखंडी किंवा पोलादी पत्रा.

Arm'ourer, *n.* ( आ'र्मरर् )—maker of arms; official in charge of arms and armour. शस्त्रें तयार करणारा; हत्याराधिपति.

Arm'oury, *n.* (आ'र्मरि)—a place where arms are kept, a repository of arms, arsenal. हत्यारें ठेवण्याची जागा, शस्त्रागार, शिलेखाना.

Arm'y, *n.* ( आ'र्मि )—land forces of a State; vast number. लष्कर, फौज; मोठी संख्या, मोठा समुदाय. Standing army=army of professional soldiers permanently on foot. पगारी सेना, स्थायिक सैन्य, खडी फौज.

Aro'ma, *n.* ( ॲरो'मा )—fragrance, pleasant odour, sweet smell; subtle pervasive quality. सुवास, सुगंध; बुद्धीचें कौशल्य.

Aromat'ic, *a.* ( ॲरोमॅ'टिक् )—fragrant. सुवासिक.

Around', *adv.* ( अरा'उन्ड् )—on every side, all round. सभोंवती, आसमंतात. *prep.* on every side of. ०च्या प्रत्येक बाजूला, आसपास.

Arouse', *v. t.* ( -z, अरा'उझ् )—rouse, awaken; stir up into activity. उठविणें, जागा करणें; चेतना उत्पन्न करणें, चेतवणें.

A'rrack, *n.* ( ॲ'रॅक् )—spirituous liquor, especially that made from coco-palm. ताडी, माडी, शिंदीची दारू.

Arraign, v. t. ( -ān, अरेन् )—indict, accuse; find fault with. कायदेशीर दोषारोप करणें; दोष काढणें. Arraign'ment, n. दोषारोप. [ L. ad, to & rationem, reason ]

Arrānge', v. t. & i. ( अरेंज् )—put in order; settle; form plans. व्यवस्थित मांडणें; बंदोबस्त करणें; तजवीज करणें, व्यवस्था करणें. [ L. ad, to & rangier, to range ]

Arrānge'mĕnt, n. ( -jm-, अरेंज्-मेन्ट् )—thing arranged; settlement; ( pl. ) plans. व्यवस्था; तजवीज; युक्ति, तोड.

Ă'rrant, a. ( अॅरन्ट् )—downright, notorious. अट्टल, चिलंदर, इरसाल.

Ă'rras, n. ( अॅरस् )—tapestry; hangings of tapestry. वेलबुट्टीदार कापड; कापडी पडदे.

Array', v. t. ( अरे )—dress (esp with display); marshal ( forces ). थाटमाट करणें; सैन्याची रचना करणें. n. dress; imposing series; martial order. पोषाख; थाटानें केलेली रचना; फौजेची रांग. [ L. ad, to and rai, order ]

Arrear', n. ( अरिअर् )—that which is behind; ( pl. ) outstanding debts; work etc. in which one is behindhand. मुदत टळून राहिलेला, तुंबलेला; ( अने० ) थकलेली बाकी; शिल्लक राहिलेलें काम वगैरे. In arrears of=बाकी चढलेलें, पाठीमागें राहिलेलें.

Arrear'age, n. ( अरिअरिज् )—being in arrears; debt. बाकी असणें; कर्ज.

Arrĕst', v. t. ( अरेस्ट् )—stop, seize by authority; apprehend; catch the attention of. थांबविणें, राजाज्ञेनें पकडणें: गतिनिरोध करणें; चित्त वेधणें. n. legal apprehension; stoppage. सरकारी हुकुमानें पकडणें, निरोध, प्रतिरोध. Under arrest=under legal restraint. पोलीसच्या ताब्यांत. [ L. ad, & restare, to remain ]

Arrīv'al, n. ( अराइव्हल् )—coming to the end of journey or destination; appearance on scene. पोहोंचणें, आगमन; येणें.

Arrīve', v. t. ( अराइव्ह् )—come to destination or end of journey; attain an object; establish one's position. मुक्कामीं पोहोंचणें; हेतु साध्य करणें; स्वत्व स्थापन करणें.

Ă'rrŏgance, n. ( अॅरोगन्स् )—insolence of bearing; haughtiness. उद्धटपणा, मगरुरी; ताठा.

Ă'rrogant, a. ( अॅरोगन्ट् )—making undue claims, overbearing, presumptuous, haughty. गर्विष्ठ, उद्धट, मगरूर, आढ्यतेचा.

Ă'rrogāte, v. t. ( अॅरोगेट् )—claim unduly, demand overbearingly. नसती आढ्यता बाळगणें. [ L. ad, to & rogare, to ask ]

Ărrogā'tion, n. ( अॅरोगेशन् )—unjust claim; unwarrantable assumption. पोकळ आढ्यता; नसता अभिमान, स्तोम.

Ă'rrow, n. ( -ō, अॅरो )—a straight slender pointed missile shot from bow; indication mark. बाण; दर्शविण्याची खूण, शरचिन्ह.

A'rrowrōōt, n. ( अॅरोरूट् )—a plant from which nutritious starch is prepared, a nutritive medicinal food. तवकीर, आरारूट.

Ars'ĕnal, n. ( आर्सेनल् )—place for storage or manufacture of war material. तोफखाना, युद्धसाहित्यगृह, शस्त्रागार, शस्त्रगृह.

Ars'ĕnic, n. ( आर्सेनिक् )—a well-known violent poison. सोमल, एक भयंकर विष.

Arsē'nious, a. ( आर्सीनिअस )—containing arsenic. सोमलाची धातु ज्यांत आहे असा.

Ars'on, n. ( आर्सन् )—wilful setting on fire of houses or other property. मुद्दाम घरें वगैरे जाळणें, दुसऱ्याची मिळकत अदावतीनें जाळणें.

Art, n. ( आर्ट् )—skill esp. applied to design, cunning. कसब, युक्ति. pl. certain branches of learning. कला. Fine arts=arts in which mind and imagination are chiefly concerned; music, painting, sculpture, architecture and poetry. ललितकला; संगीत, चित्रकला; खोदकाम, इमारतशास्त्र आणि काव्य.

Artēr'ial, a. ( आर्टीरिअल् )—of the nature of an artery. नाडीसारखा, धमनीचा.

Artēr'ialīze, v. t. (आर्टीरिअलाइझ् )—convert into arterial blood; furnish with arterial system. शुद्धवाहिनीचा करणें; नाडीचक्रसहित करणें.

Art'erў, n. ( आर्टरि )—any of the tubes by which blood is conveyed from the heart to all parts of the body. नाडी, धमनी.

Artē'sian well, n. ( -zhn, आर्टीझन् वेल् )—deep well made by boring until water is reached. जमिनींत पाण्याची शीर सांपडेपर्यंत यंत्रानें रंध्र खोदून वर आणलेल्या झऱ्याचे पाण्याची विहीर.

Art'ful, a. ( आर्ट्-फुल् )—cunning, crafty, deceitful, sly. धूर्त, कावेबाज, कुशल, फसव्या.

Arthrī'tĭs, n. ( आर्थ्राइटिस् )—inflammation of joint; gout. संधिदाह; सांध्यांत दाह उत्पन्न करणारा रोग. Arthrĭt'ic, a.

Art'icle, n. ( आर्टिकल् )—clause of agreement, treaty etc.; short literary composition; any particular thing; a part of speech. कलम; छोटा लेख; वस्तु; उपपद. In the article of death=in the moment of death. मरणसमयीं. v. t. to draw up in articles; to bind by articles of apprenticeship. कलमबंदी करणें; शिकण्याकरितां करारनाम्यानें बांधून घेणें. Articled clerk=सॉलिसिटर होण्याकरितां उमेदवार.

Art'ichōke, n. ( आर्टिचोक् )—an edible vegetable. एक जातीची भाजी.

Artic'ūlar, *a.* (आर्टि'क्युलर् )—of or belonging to the joints. संधिगत, सांध्यासंबंधी.

Artic'ūlāte, *a.* ( आर्टि'क्युलेट् )—having joints; *divided into* words or syllables. संधियुक्त; स्पष्टोच्चारक. *v. t. & i.* speak distinctly; connect by joints. स्पष्ट बोलणें; सांधणें.

Articūlā'tion, *n.* ( आर्टिक्युले'शन् )—articulate speech; jointing. स्पष्ट बोलणें; सांधा.

Art'ifice, *n.* ( आ'र्टिफिस् )—device, contrivance; skill. युक्ति, शक्कल; कृति.

Artif'icer, *n.* ( आर्टि'फिसर् )—craftsman; inventor (*of*). कारागीर; कल्पक शिल्पकार.

Artifi'cial, *a.* (-shl, आर्टिफि'शल् )—produced by art; feigned, affected. कृत्रिम, कृतिसिद्ध; खोटा, बनावट.

Artificial'ity, *n.* ( आर्टिफि-शिॲ'लिटि )—being produced by art or artificial. कृत्रिमपणा

Artill'ery, *n.* ( आर्टि'लरि )—cannon; great guns, ordnance branch of troops or army. तोफखाना; तोफखान्यांतील लोक.

Artisăn', *n.* ( -z-, आर्टिझॅ'न् )—mechanic, craftsman. कारागीर, हस्तव्यवसायी, शिल्पकार.

Art'ist, *n.* ( आ'र्टिस्ट् )—one who practises one of the fine arts; one who makes his craft a fine art. शिल्पकार; कारागीर, कसबी, शिल्पज्ञ.

Artiste', *n.* ( -tē-, आर्टी'स्ट् )—professional singer, dancer, etc.; an opera-dancer. धंदेवाईक गायक, नृत्यकर्ता वगैरे.

Art'istic, *a.* ( आ'र्टिस्टिक् )—according to art. conformed to art. कौशल्यपूर्ण, खुबीदार.

Art'less, *a.* ( आ'र्टलिस् )—guileless, simple; lacking art, crude. निष्कपटी, सरळ मनाचा; कलाकौशल्यरहित. Art'lessness, *n.*

As, *adv. & conj.* ( -z, ॲझ् )—in the same degree; similarly; while, when; since, seeing that; for example. जितका; त्याचप्रमाणें, म्हणून; जेव्हां; ज्याअर्थी; उदाहरणार्थ. *rel. pron.* that, who, which. जें. As far as=जितका, तितका; ०पर्यंत. As good as one's word=वचन पुरें करणारा. As though. as if, as it were=as if it were actually so. जणूं काय, जणूं. As from=०पासून. As regards=so far as it concerns. ०च्या विषयीं म्हटलें तर. As to=with respect to. विषयीं As yet=up to this time. अद्यापपर्यंत अजून. (I thought) as much=(I thought) so. तसेंच. As well (as)=in addition (to) आणखी तसेंच. As good as dead=practically dead. मृतप्राय. As long as=ऑपर्यंत.

As, *n.* ( ॲस् )—Roman copper coin. रोममधील अर्धा औंस वजनाचें एक तांब्याचें नाणें.

Asafoet'ida, *n.* ( -fēt-, ॲसफी'टिडा )—resinous gum with smell of garlic. हिंग.

Ascĕnd', *v. t. & i.* ( ॲसे'न्ड् )—go or come up: rise, mount, climb; go along towards the source. वर चढणें; उदय होणें; (नदीच्या) उगमाकडे जाणें. [ L. *ad.* & *scandere*, to climb ]

Ascĕn'dancy, -ency, *n.* ( असे'न्डन्सि )—dominant control, sway, powerful influence. प्राबल्य, वर्चस्व, प्राधान्य.

Ascĕn'dant, -ent, *a.* ( ॲसे'न्डन्ट् )—rising; predominant. उदयाप्रत आलेला, उदित; वरचढ. *n.* ascendant point or degree of zodiac; horoscope. उच्चस्थान; जन्मकुंडली. In the ascendant=supreme, dominating. प्रबल.

Ascĕn'sion, *n.* ( -shn, ॲसे'न्शन् )—ascent; *rising of celestial body.* आरोहण; उदय. Ascension Day=Holy Thursday. ख्रिस्ती धर्मांत ख्राइस्ट देहासकट आकाशांत गेला तो दिवस. Right ascension=celestial longitude. मेषराशीजवळच्या संपातबिंदूपासून कोणत्याहि ग्रहाचें किंवा तान्याचें अंतर, विषुवांश.

Ascĕnt', *n.* ( ॲसे'न्ट् )—ascending, rising; upward path or slope. चढण; चढाव. Ascent and descent=चढउतार, चढणउतरण. Steep ascent=उभा चढ.

Ăscertain', *v. t.* ( ॲसर्टे'न् )—to make certain or sure, to determine, to find out. निश्चित ठरविणें.

Ăsertain'āble, *a.* ( ॲसर्टेनेबल् )—fit to be ascertained. निर्धार किंवा निर्णय करण्याजोगा.

Ăscertain'mĕnt, *n.* ( ॲसर्टे'न्मेन्ट् )—act of ascertaining. निश्चय करणें, निर्णय, निर्धार.

Ascĕt'ic, *a.* ( ॲसे'टिक् )—severely abstinent; severe in self-discipline. विरक्त, तपोनिष्ठ. *n.* a person who practises austerity. तपश्चरण करणारा, वैरागी, तपस्वी.

Ascĕt'icism, *n.* ( ॲसे'टिसिझम् )—the practice of ascetics, self-mortification. तपश्चर्या, वैराग्य.

Ascrībe', *v. t.* ( ॲस्क्रा'इब् )—attribute, impute; assign. अंगीं लावणें; आरोपणें; नेमून देणें.

Ascrip'tion, *n.* ( ॲस्क्रि'प्शन् )—act of ascribing *or attributing.* आरोपणें, अंगीं लावणें.

Asĕp'sis, *n.* ( असे'प्सिस् )—absence of putrefactive matter or harmful bacteria; the aseptic method in surgery. सडून किंवा कुजून न जाणें; शस्त्रविद्येंतील एक प्रकार.

Asĕp'tic, *a.* ( असे'प्टिक् )—preventing putrefaction. सडून किंवा कुजून न जाईल असा.

Asĕx'ūal, *a.* ( असे'क्स्यूअल् )—non-sexual, without distinctive organs of sense. स्त्रीपुरुषभेदरहित, स्त्रीपुरुषभेद नसणारा.

Ash, *n.* ( ॲश् )—a forest tree; powdery residue of what is burnt. एक प्रकारचें झाड; राख.

(*pl.*) remains of human body after cremation. दहनविधीनंतरची शरीराची रक्षा, चिताभस्म. To lay in ashes=to burn to the ground. जाळून भस्म करणें. Ash Wednesday=the first day of Lent ख्रिस्ती लोकांच्या 'लेन्ट' नांवाच्या ४० दिवसांच्या उपवासाचा पहिला दिवस. Sackcloth and ashes=in the state of repentance. दुःखाच्या किंवा पश्चात्तापाच्या स्थितींत. To bring back the ashes=to wipe out the defeat (in cricket). पराजयाचा डाग धुवून टाकणें. To reduce to ashes=भस्म करणें.

Ăsh'en, *a.* (ॲशन्)—of ash; like ashes, pale; grey. 'ॲश' झाडाचा बनविलेला; राखेसारखा, फिकट; राखीरंगाचा, भुरकट.

Ashāmed', *a.* (-md, अशें'म्ड्)—abashed, conscious of shame. लाजलेला, खजील, ओशाळा.

Ăsh'lar, *n.* (ॲश्लर्)—square-hewn stone; masonry of square-hewn stones. चौरस दगड; चौरस घडलेल्या दगडांचें बांधकाम.

Ăsh'laring, *n.* (ॲश्लरिंग्)—ashlar masonry. चौरस घडलेल्या दगडांचें बांधकाम.

Ashōre', *adv.* (अशॉ'अर्)—to or on the shore, on the land. किनाऱ्यावर.

Ash'ȳ, *a.* (ॲशि)—of or like ashes; pale. राखेचा, भस्मी रंगाचा; फिकट.

Aside', *adv.* (असा'इड्)—to or on one side, away, apart. पलीकडे, दूर. *n.* words spoken aside (by actors). आत्मगत किंवा स्वगत भाषण. To set aside=to quash (verdict). नामंजूर करणें, विचारांत न घेणें.

Ăs'inine, *a.* (ॲ'सिनाइन्)—of asses; stupid. गाढवांचा; मूर्ख, बुद्धिहीन.

Ask, *v. t. & i.* (आस्क्)—inquire, put a question; seek by request; make a request. चौकशी करणें; विचारणें; विनंति करणें.

Askănce', Askant', *adv.* (आस्कॅ'न्स्, ०स्कॅ'न्ट्)—sideways; with indirect meaning. बाजूनें, तिरका; उलट अर्थानें. To look *askance* at=to view suspiciously. संशयित मनानें पाहणें.

Askew', *adv. & pred. a.* (अस्क्यू')—obliquely, awry. तिरकस, वांकडा, ओझरता. To look askew=not to look straight in the face. तिरक्या नजरेनें पाहणें.

Aslănt', *adv.* (अस्ला'न्ट्)—obliquely. तिरकस, ओझरता. *prep.* slantingly across. तिरका.

Asleep', *adv. & pred. a.* (अस्ली'प्)—in a state of sleep; benumbed. झोंपी गेलेला; गारठलेला. Fast asleep, Sound asleep=गाढ झोंप लागलेला. Half asleep=निजसुरा. To fall asleep=झोंप लागणें.

Aslōpe', *adv.* (अस्लो'प्)—on a slope, crosswise. उतरता, कलता, उतरणीनें.

Ăsp, *n.* (ॲस्प्)—small venomous serpent. एक जातीचा लहान विषारी साप.

Aspă'răgŭs, *n.* (अस्पॅ'रगस्)—plant whose vernal shoots are a table delicacy. शतावरीचें झाड, शतावरी.

Ăs'pĕct, *n.* (ॲ'स्पेक्ट्)—way a thing presents itself to eye or mind; direction in which a thing fronts; phase; look, expression. स्वरूप, आकार; अवस्थान; अवस्था; चेहरा, मुद्रा

Ăspĕ'rĭtȳ, *n.* (ॲस्पे'रिटि)—harshness, roughness; sharpness (of temper). तीव्रता, खरखरीतपणा; जहालपणा.

Asperse', *v. t.* (अस्प'र्स्)—defame, traduce, attack the reputation of; calumniate. काळोखी लावणें, अब्रूवर घाला घालणें; आळ घेणें.

Asper'sion, *n.* (अस्प'र्शन्)—calumny, slander; a sprinkling. आक्षेप, निंदा; प्रोक्षण.

Ăs'phălt, *n.* (ॲ'स्फॅल्ट्)—a bituminous substance; mixture of bitumen, pitch and sand. शिलाजिताची एक जात, एका जातीचें डामर; वाळू वगैरेचें मिश्रण, लादा. *v. t.* lay (road) with asphalt. डामर लावणें.

Ăs'phodĕl, *n.* (ॲ'स्फॉडेल्)—a kind of plants of the lily family. एक जातीचें भुईकमळ.

Ăsphȳx'ia, -xȳ, *nn.* (ॲस्फि'क्सिआ, ॲस्फि'क्सि)—suspended animation due to lack of oxygen in blood, suffocation. गुदमरणें, श्वासावरोध. Ăsphȳx'ial, *a.* [Gr. *a*, not & *sphyxis*, the pulse]

Ăsphȳx'iāte, *v. t.* (ॲस्फि'क्सिएट्)—to cause asphyxia, to suffocate. श्वासावरोध करणें, श्वास कोंडणें.

Ăs'pĭrāte, *a. & n.* (ॲ'स्पिरेट्)—(consonant) pronounced with a breathing, blended with sound of *h*; the sound of *h*. महाप्राणोच्चार; जोराच्या उच्चाराचा वर्ण ह्.

Ăspĭrā'tion, *n.* (ॲस्पिरे'शन्)—drawing of breath; an ardent desire; ambition. महाप्राणोच्चारण; उत्कट इच्छा, हांव; महत्त्वाकांक्षा.

Aspire', *v. i.* (अस्पा'यर्)—cherish elevated aims. feel earnest desire or ambition; reach high. महत्त्वाकांक्षा बाळगणें; उच्चस्थानीं जाणें. [L. *ad*, to & *spirare*, to breathe]

Asquint', *adv.* (अस्क्वि'न्ट्)—with a squint, toward one side. तिरपें, काण्या डोळ्यानें.

Ăss, *n.* (ॲस्)—long-eared quadruped; stupid fellow. गाढव; मूर्ख मनुष्य, टोणपा.

Assail', *v. t.* (असे'ल्)—attack, assault. हल्ला करणें, घाला घालणें. [L. *ad*, to & *salire*, to leap]

Assail'able, *a.* (असे'लेबल्)—that may be assailed, open to attack. हल्ला करण्याजोगा.

Assail'ant, *n.* (असे'लन्ट्)—one who assails, one that attacks. हल्ला करणारा.

Assăss'ĭn, *n.* (अॅसॅसिन्)—one hired to kill another treacherously; a murderer. कपटानें खून करणारा; गुप्त मारेकरी.

Assăss'ĭnāte, *v. t.* (अॅसॅसिनेट्)—kill by treacherous violence. विश्वासघातानें ठार मारणें. Assă'ssinātor, *n.* गुप्त रीतीनें खून करणारा.

Assăssĭnā'tion, *n.* (अॅसॅसिने'शन्)—treacherous murder. विश्वासघातानें ठार मारणें, खून.

Assault', *n.* (अॅसॉ'ल्ट्)—a sudden attack; unlawful personal attack. घाला, हल्ला; अंगावर धावून जाणें. *v. t.* make violent attack upon; assail. अंगावर धावून जाणें. Assault of arms, Assault at arms=attack in fencing, display of military exercises. एक प्रकारची हत्यारांची लष्करी कवाईत.

Assay', *n.* (अॅसे')—trial of metal; test. धातूची पारख; परीक्षा. *v. t.* try the purity of (precious metals); attempt task. पारख करणें; करून प्रयत्न करणें.

Assĕm'blage, *n.* (अॅसे'म्ब्लेज्)—collection, company, mass, concourse. समूह, जमाव.

Assĕm'ble, *v. t. & i.* (अॅसे'म्बल्)—bring or come together; collect; fit together parts of. एकत्र आणणें किंवा येणें; जमा करणें; निरनिराळे भाग एकत्र बसवणें.

Assĕm'blȳ, *n.* (अॅसें'ब्लि)—gathering of persons (esp. of deliberative body). सभा, समाज.

Assĕnt', *v. i.* (अॅसे'न्ट्)—agree to; defer or accede to. कबूल करणें; रुकार देणें. *n.* concurrence; sanction. अनुमति; रुकार. Assen'tor, *n.*

Assĕn'tient, *a.* (-shĭ-, अॅसे'न्शिएन्ट्)—(a person) that assents. संमति दर्शविणारा, रुकार देणारा.

Assert', *v. t.* (अॅसर्ट्)—maintain one's claim to; declare, state. निश्चितपणें सांगणें; प्रतिपादन करणें. To assert oneself=insist upon one's rights; declare. स्वतःच्या हक्कांचें जारीनें समर्थन करणें; आपलें घोडें पुढें ढकलणें.

Asser'tion, *n.* (अॅसर्'शन्)—insistence upon a right; affirmation, positive statement. हक्क प्रस्थापित करणें; निश्चित विधान.

Asser'tĭve, *a.* (अॅसर्'टिव्ह्)—positive, dogmatic. (आपलें म्हणणें) आग्रहानें पुढें मांडणारा.

Asser'tor, *n.* (अॅसर्'टर्)—one who asserts; champion, advocate (*of*). हक्क सांगणारा; दुसऱ्याकरितां लढणारा, तरफदार.

Assĕss', *v. t.* (अॅसे'स्)—fix amount of rate; value for taxation. कर बसविणें; कराची आकारणी करणें. [L. *ad*, to & *sedere*, to sit]

Assĕss'mĕnt, *n.* (अॅसे'स्-मेन्ट्)—valuation for the purpose of assessing; the sum assessed. कर बसविणें; कर, जमाबंदी.

Assĕss'or, *n.* (अॅसे'सर्)—one who assesses taxes; adviser to judge or magistrate. कर बसविणारा; न्यायाधीशाचा सल्लागार.

Ass'ĕts, *n. pl.* (अॅ'सेट्स्)—all the available property of person or company; (*sing.*) item of this property; any possession, any useful quality. मालमत्ता; मालमत्तेचा प्रत्येक तपशील; मालमत्ता, उपयुक्त गुण.

Assĕv'erāte, *v. t.* (अॅसे'व्हरेट्)—to declare solemnly. सत्य स्मरून बोलणें. Assev'erator, *n.*

Assĕverā'tion, *n.* (अॅसेव्हरे'शन्)—solemn affirmation. सत्यविधान, शपथेवर बोलणें.

Ăssĭdū'ĭtȳ, *n.* (अॅसिड्यु'इटि)—constant attention. आसक्ति, दीर्घोद्योग; व्यासंग.

Assĭd'ūous, *a.* (अॅसि'ड्युअस्)—diligent, unremitting. दक्ष, व्यासंगी.

Assīgn', *v. t.* (-īn, अॅसा'इन्)—make over formally; allot; appoint; ascribe. स्वाधीन करणें; नेमून देणें; योजना करणें, नेमणें; (कारण) दाखवणें. *n.* one to whom property or right is legally transferred. ज्याचे नांवें मालमत्ता करणें असतें तो मुखत्यार. [L. *ad*, to & *signum*, a mark or sign]

Assīgn'able, *a.* (अॅसा'इनेबल्)—that may be assigned. नेमून देण्याजोगा, निर्देश करण्याजोगा, सांगण्यासारखा.

Ăss'ĭgnăt, *n.* (अॅ'सिग्नॅट्)—paper money issued by revolutionary government of France. फ्रान्सच्या राज्यक्रांतीच्या वेळीं सरकारनें चालू केलेला कागदी पैसा.

Ăssĭgnā'tion, *n.* (अॅसिग्ने'शन्)—apportionment; formal transference; appointment of time and place for interview. विभागून देणें; वेचन देणें; नियमित स्थळीं आणि वेळीं नियमित भेटण्याचा संकेत, संकेत.

Assīgnee', *n.* (अॅसाइ-नी')—one appointed to act for another; one to whom property or right is legally transferred. मुखत्यार, मुखत्यारी; वेचन घेणारा, वेचनदार.

Assīgn'mĕnt, *n.* (अॅसा'इन्-मेन्ट्)—allotment; legal transference; document effecting legal transference; statement (of reasons). नेमून देणें; ज्याचे योगानें हक्क किंवा मालकी बदलली जाते असा लेख, वेचन; वेचनपत्र; (कारणांची) यादी. Assignment deed=वेचनपत्र.

Assĭm'ĭlāte, *v. t. & i.* (अॅसि'मिलेट्)—make or become like; absorb, be absorbed; digest. सारखा करणें किंवा होणें; मिळून जाणें; एकरूप होणें; जिरवणें, पचवणें. [L. *ad*, to, and *similis*, Sk. सम, like]

Assĭmĭlā'tion, *n.* (अॅसिमिले'शन्)—the act of assimilating. एकीकरण, एकरूप करणें; जिरणें,

जिरवणें; अन्नाचा परिपाक. Assim'ilator, *n.* Assi'milative, Assi'milatory, *aa.*

Assist', *v. t. & i.* (ॲसि'स्ट्)—help, aid; be present at. मदत करणें; हजर राहणें.

Assist'ance, *n.* (ॲसि'स्टन्स्)—help, aid, support, succour. मदत, साहाय्य.

Assis'tant, *a.* (ॲसि'स्टन्ट्)—helping. साहाय्य करणारा. *n.* helper, subordinate worker. मदतनीस, हाताखालील कामगार.

Assize', *n.* (असा'इझ्)—statutory price of bread and ale; *pl.* periodical courts of justice held by judges on circuit. ब्रेड व दारू यांची कायद्यानें ठरविलेली किंमत, धारण, भाव; (अने०) तात्पुरत्या फिरत्या न्यायसभा.

Asso'ciate, *v. t. & i.* (-shi-, ॲसो'शिएट्)—unite together; have intercourse with; connect in idea. मिसळणें, संबंध जोडणें; सलगी ठेवणें, संगतीनें राहणें; एकमत असणें. *n.* partner, companion; accomplice; subordinate member of an association. भागीदार, सोबती; साथीदार; एखाद्या मंडळाचा सभासद. [L. *ad*, to & *socius*, a companion]

Associa'tion, *n.* (असोसिए'शन्)—organized body of persons; connexion of ideas; intercourse. मंडळी, समाज; (विचार) संगति; जोड, सहवास, संयोग. *Association* of ideas = mental connection between an object and ideas connected with it. एका कल्पनेवरून कांहीं कारणानें दुसरी कल्पना भासविणारी मानसिक शक्ति, विचारसंगति, विचारसाहचर्य.

Ass'onance, *n.* (ॲ'सोनन्स्)—resemblance of sound between two syllables; rhyme depending on identity of vowel-sounds only. एकस्वरता, स्वरसाम्य; स्वरसाम्यावर अवलंबून असणारा यमक.

Assort', *v. t. & i.* (ॲसॉ'र्ट्)—arrange in sorts; harmonize. वर्ग लावणें; योग्य असणें.

Assor'ted, *a.* (ॲसॉ'र्टेड्)—selected, classified. निवडक, विल्हेवारीनें लावलेला.

Assort'ment, *n.* (ॲसॉ'र्ट्मेन्ट्)—assorting; assorted set of goods. प्रत लावणें; विल्हेवारी, वर्गीकरण. [L. *ad*, to and *sors*, a lot]

Assuage', *v. t.* (-sw-, अस्वे'ज्)—soothe, allay, mitigate. शांत करणें, हलका करणें, शमवणें.

Assua'gement, *n.* (अस्वे'ज्मेन्ट्)—mitigation, abatement. हलका करणें, उपशमन.

Assume', *v. t.* (ॲस्यू'म्)—take upon oneself; usurp authority; take for granted; to pretend to possess; to be arrogant. शिरावर घेणें, अंगीकार करणें; गैरवाजवी हक्क सांगणें; धरून चालणें; बहाणा करणें, आव आणणें; गर्विष्ठ होणें, ताठ्यांत असणें. [L. *ad*, to & *sumere*, to take]

Assum'ing, *a.* (अस्यू'मिंग्)—taking much upon oneself, arrogance. आढ्यतेचा, कुरेवाज.

Assump'tion, *n.* (ॲस'म्शन्)—the act of assuming; thing assumed; arrogance. अंगीकार, आधाराशिवाय गृहीत धरणें; प्रमाणावांचून मानलेली गोष्ट; डौल, ताठा.

Assump'tive, *a* (ॲस'म्टिव्ह्)—taken for granted. गृहीत धरून चाललेला.

Assur'ance, *n.* (-shoo-, ॲशू'रन्स्)—positive assertion; self-confidence; insurance (of life). खातरी; आत्मविश्वास; (आयुष्याचा) विमा.

Assure', *v. t.* (-shoo-, ॲशू'र्)—make positive or confident assertions; satisfy, convince; insure (life). निश्चयपूर्वक सांगणें; समाधान किंवा खातरी करणें; (आयुष्याचा) विमा उतरणें.

Assured'ly, *adv.* (ॲशूरे'ड्लि)—certainly, indubitably. खातरीनें, निश्चयपूर्वक.

Assur'gent, *a.* (ॲस'र्जन्ट्)—rising; aggressive. उगवता, वाढता; कुरापत काढणारा.

As'ter, *n.* (ॲ'स्टर्)—kinds of plant with showy radiated flower. अस्मानी रंगाचें व ताऱ्यासारखें फूल असलेलें एक फुलझाड. [Gr. *aster*, a star]

As'terisk, *n.* (ॲ'स्टेरिस्क्)—star used to mark words for reference or distinction (*). नक्षत्राचे आकाराची फुली ही खूण, चौफुली.

As'terism, *n.* (ॲ'स्टेरिझम्)—a small cluster of stars, a constellation. नक्षत्रगण, नक्षत्रसमुदाय.

Astern', *adv.* (ॲस्ट'र्न्)—in the stern, behind. (गलबताच्या) मागल्या बाजूस.

As'teroid, *n.* (ॲ'स्टेरॉइड्)—any of the small planets revolving round the sun between orbits of Mars and Jupiter. मंगळ व बृहस्पति यांच्या कक्षांमधून सूर्याभोंवतीं फिरणारे अल्पग्रह. *a.* star-shaped. नक्षत्राच्या आकाराचा.

Asth'ma, *n.* (ॲ'स्मा, or ॲ'स्थ्मा)—a disease marked by difficulty in breathing. दमा.

Asthmat'ic, *a.* (ॲस्थ्मॅ'टिक्)—caused by asthma. दम्याचा. *n.* person suffering from asthma. दमेकरी.

Astig'matism, *n.* (ॲस्टि'ग्मॅटिझम्)—defect in eye preventing proper focusing. एक प्रकारचा दृष्टिदोष Astigmat'ic, *a.*

Astir', *adv.* (अस्ट'र्)—in motion; out of bed. हालचाल करीत; बिछान्याबाहेर.

Aston'ish, *v. t* (ॲस्टॉ'निश्)—amaze, surprise, astound. चकित करणें, थक्क करणें.

Aston'ishing, *a.* (ॲस्टॉ'निशिंग्)—surprising, amazing. आश्चर्यजनक, चमत्कारिक.

Aston'ishment, *n.* (ॲस्टॉ'निश्मेन्ट्)—amazement, wonder. विस्मय, आश्चर्य.

Astound', *v. t.* (ॲस्टा'उन्ड्)—amaze, astonish, stun. चकित करणें, थक्क करून सोडणें.

Ăs'tral, *a.* ( ॲस्ट्रल् )—starry, star-like, of stars; spiritual. ताऱ्यांचा; आध्यात्मिक.

Astray', *adv.* ( अस्ट्रे )—out of the right way. वाट चुकून, चुकीच्या मार्गानें. To go astray= वहकणें, वांकडें पाऊल पडणें. To lead astray= कुमार्गाकडे नेणें, चुकीच्या मार्गानें नेणें.

Astrīde', *adv.* ( अस्ट्राइड् )—with legs wide apart or one on each side (*of*). पाय फांकून, दोन्हीकडे पाय टाकून.

Astrin'gent, *a.* ( -nj-, अस्ट्रिंजेन्ट् )—causing contraction or compression; austere, severe. संकुचित करणारें, स्तंभक; तुरट, कडक. *n.* astringent medicine. स्तंभक किंवा तुरट पदार्थ किंवा औषध. Astring'ency, *n.* [ L. *ad*, to & *stringere*, to bind ]

As'trolābe, *n.* ( ॲस्ट्रोलेब् )—instrument formerly used in taking altitudes etc. सूर्य व इतर तारे यांची क्षितिजापासून उंची मोजण्याचें पूर्वी प्रचारांत असलेलें एक यंत्र, वेधयंत्र.

Astrŏl'oger, *n.* ( ॲस्ट्रॉलॉजर् )—one that foretells events by the stars. फलज्योतिषी, प्रश्नज्योतिषी, मुहूर्त सांगणारा जोशी.

Astrŏlŏg'ĭcal, *a.* ( ॲस्ट्रॉलॉजिकल् )—relating to astrology. फलज्योतिषासंबंधीं.

Astrŏl'ogy̆, *n.* ( ॲस्ट्रॉलॉजि )—study of occult influence of stars on human affairs. फलज्योतिष, नक्षत्रफलगणनशास्त्र. [ Gr. *astron*, a star, & *logos*, knowledge ]

Astrŏn'omer, *n.* ( ॲस्ट्रॉनोमर् )—a student of astronomy. खगोल विद्येचा अभ्यासक, खगोलवेत्ता.

Astrŏn'omĭcal, *a.* ( ॲस्ट्रॉनोमिकल् )—relating to astronomy. खगोलविद्येसंबंधीं, ज्योतिषाचा, ज्योतिषविषयक. Also *Astron'omic.*

Astrŏn'omy̆, *n.* ( ॲस्ट्रॉनोमि )—science of the heavenly bodies. खगोलशास्त्र, ज्योतिर्विद्या. [ Gr. *astron*, a star & *nomos*, a law ]

Astūte', *a.* ( अस्ट्यूट् )—shrewd; crafty. धूर्त; कावेबाज. Astu'tely, *adv.*; Astu'teness, *n.*

Asŭn'der, *adv.* ( असन्डर् )—apart, in pieces. पृथक्, अलग, निरनिराळा. To tear asunder= to tear to pieces. तुटून पडणें, तुटणें.

Asy̆'lŭm, *n.* ( असाय्लम् )—institution for afflicted persons; shelter, refuge; sanctuary. रुग्णालय; आश्रय; आश्रयस्थान.

Asy̆mm'etry̆, *n.* ( असिमेट्रि )—want of symmetry or proportion between parts of a thing. समप्रमाण किंवा सारखेपणा नसणें.

At, *prep.* ( ॲट् )—in, by, toward, on, near or close to, with direction towards. आंत, कडे.

Ăt'avĭsm, *n.* ( ॲटव्हिझम् )—resemblance to remote ancestors rather than parents, reversion to earlier type; recurrence of disease after intermission of some generations. जुन्या पिढीच्या वळणाकडे जाणें; आनुवंशिक रोग, कुलागत रोग. At'avĭstĭc, *a.* पिढीजात, जुन्या वळणाकडे जाण्याचा. [ L. *atavus*, an ancestor ]

Atăxy̆, *n.* ( अटॅक्सि )—irregularity of animal functions. इंद्रियव्यापारांतील अनियमितता, कम्पवायु. [ Gr. *a*, not & *taxis*, order ]

Ā'theĭsm, *n.* ( एथिइझम् )—disbelief in the existence of God. अनीश्वरवाद, नास्तिकता.

Ā'theĭst, *n.* ( एथिइस्ट् )—one that denies the existence of God. नास्तिक, अनीश्वरवादी.

Ăthenae'ŭm, *n.* ( ॲथिनीअम् )—literary or scientific club; library. वाङ्मय कलादिकांच्या उत्तेजनार्थ संस्था, ज्ञानवर्धक संस्था, विद्यामंदिर, सरस्वतीमंदिर; पुस्तकालय. [ Gr. *Athene*, the goddess of wisdom ]

Athirst', *a.* ( अथर्स्ट् )-thirsty, wanting drink, eager for. तहानेलेला; उत्सुक.

Ăth'lēte, *n.* ( ॲथ्लीट् )—one who competes or excels in physical exercises. तालिमबाज.

Ăthlĕt'ĭc, *a.* ( ॲथ्लेटिक् )—physically powerful; of athletes. धट्टाकट्टा; पहिलवानांसंबंधीं. *n. pl.* physical exercises; athletic sports. तालीम, शारीरिक व्यायाम; व्यायामाचे खेळ. Athlet'ĭcĭsm, *n.* पहिलवानकी, मल्लविद्या.

Ăt'-hōme, *n.* ( ॲट्-होम् )—reception of visitors within certain hours during which host or hostess or both have announced that they will be at home. मित्रसंमेलन, खाना.

Athwart', *adv.* & *prep.* ( अथ्वॉर्ट् )—across (esp. obliquely). आडवा, मध्यें.

Ăt'las, *n.* ( ॲट्लास् )—volume of maps, collection of maps in a volume. नकाशांचें पुस्तक.

Ăt'mŏsphēre, *n.* ( ॲट्मॉस्फिअर् )—the air that surrounds the earth; mental environment. वातावरण; मानसिक किंवा नैतिक परिस्थिति, आवरण. [ Gr. *atmos*, air, & *sphaira*, a sphere ]

Ăt'mŏsphĕrĭc, *a.* ( ॲट्मॉस्फेरिक् )—belonging to the atmosphere. वातावरणासंबंधीं. Also *Atmospher'ical, a.*

Atŏ'll, *n.* ( अटॉल् )—a coral island or a round coral reef enclosing lagoon. खाजणांतील वाटोळा पोंवळ्याचा खडक.

Ăt'om, *n.* ( ॲटम् )—body too small to be divided; minute portion or thing. परमाणु; अतिसूक्ष्म पदार्थ. [ Gr. *a*, not & *tomos*, cut ]

Ătŏm'ĭc, *a.* ( ॲटॉमिक् )—of atoms. परमाणूसंबंधीं.

Ătomĭ'cĭty̆, *n.* ( ॲटॉमिसिटि )—the number of atoms in the molecule of an element. परमाणुता, परमाणुसंयोगप्रमाण.

Ăt'ŏmĭsm, *n.* ( ॲ'टॉमिझ्म् )—atomic philosophy or theory, doctrine of action of individual atoms. परमाणुवाद, सूक्ष्मवाद.

Ăt'ŏmĭst, *n.* ( ॲ'टॉमिस्ट् )—holder of atomic theory or philosophy. परमाणुवादी.

Ăt'omīze, *v. t.* ( ॲ'टॉमाइझ् )—reduce to atoms or very small particles. परमाणुरूप देणें.

Ăt'omīzer, *n.* ( ॲ'टॉमाइझर् )—instrument for spraying liquids. तुषारयंत्र.

Ăt'omȳ, *n.* ( ॲ'टॅमि )—atom, tiny being; emaciated body. परमाणु, अतिसूक्ष्म जंतु; अस्थिपंजर, सुदामजी.

Atōne', *v. t.* ( अटो'न् )—expiate; make up for. प्रायश्चित्त घेणें; भरपाई करणें.

Atōne'ment, *n.* ( ॲटो'न्-मेन्ट् )—act of atoning; expiation, satisfaction. प्रायश्चित्त; भरपाई.

Atŏn'ĭc, *a.* ( अटॉ'निक् )—unaccented, unstressed. स्वराघात न दिलेला.

Atŏp', *adv.* ( अटॉ'प् )—on or at the top ( *of* ). वर, वरती, शेंड्यावर.

Ătrabĭl'ious, *a.* ( ॲट्रबि'ल्यस् )—melancholy, gloomy; splenetic. खिन्न, उदासीन, विषण्ण; चिडखोर. [ L. *atra*, black, and *bilis*, bile ]

Atrō'cious, *a.* ( -shus, अट्रो'शस् )—horrible; extremely heinous, gross. उग्र, राक्षसी; बीभत्स.

Ătrŏ'citȳ, *n.* ( अट्रॉ'सिटि )—heinous wickedness; wicked deed. अत्यंत दुष्टता; अघोर कृत्य.

Ăt'rŏphȳ, *n.* ( ॲ'ट्रोफि )—wasting away for lack of nourishment. अपोषणक्षय, एकांगक्षय. [ Gr. *a*, without & *trophe*, nourishment ]

Attăch', *v. t. & i.* ( अॅटॅ'च् )—fasten, join; attribute to; adhere; bind in friendship, make devoted; seize by legal authority. बांधणें; आरोप करणें; चिकटणें; प्रीति जडविणें; टांच लावणें. [ L. *ad*, to & *tangere*, to touch]

Attăch'é, *n.* ( -shā, अॅटॅ'शे )—one attached to ambassador's suite. एका राष्ट्राच्या तर्फे दुसऱ्या राष्ट्रामध्यें ठेवलेल्या वकिलाचा मदतनीस, दुय्यम.

Attăch'mĕnt, *n.* ( अॅटॅ'च्-मेन्ट् )—a fastening; legal seizure; union or bond of affection (*for*). बंधन; जप्ति, टांच; प्रेम.

Attăck', *v. t.* ( अॅटॅ'क् )—fall upon, assault, assail. हल्ला करणें; घाला घालणें. *n.* assault, onset. हल्ला, घाला, चढाई, आक्रमण.

Attain,' *v. t. & i.* ( ॲटे'न् )—reach, arrive at; gain, accomplish. प्राप्त होणें, पोहोंचणें, मिळवणें, सिद्धीस नेणें. [L. *ad*, & *tangere*, to touch]

Attain'āble, *a.* ( ॲटे'नेबल् )—that may be attained, accessible. मिळण्याजोगा, साध्य.

Attain'der, *n.* ( ॲटे'न्डर् )—consequences of death or outlawry ( forfeiture of estate, corruption of blood, extinction of civil rights ). देहान्त शिक्षेचे किंवा बहिष्काराचे परिणाम, सामाजिक हक्क हिसकावून घेणें.

Attain'mĕnt, *n.* ( ॲटे'न्-मेन्ट् )—act of attaining; thing attained. संपादणें, प्राप्ति; संपादित वस्तु. ( *pl.* ) degree of education or skill attained, personal accomplishment. संपादिलेलें शिक्षण किंवा कलाकौशल्य.

Attaint', *v. t.* ( अटे'न्ट् )—subject to attainder; infect; sully. राजद्रोही ठरवून सर्व हक्क काढून घेणें; दूषित करणें; दूषण लावणें, कलंकित करणें.

Attĕm'per, *v. t.* ( ॲटे'म्पर् )—qualify by admixture; accommodate to; modify, temper. वेताचा किंवा सौम्य करणें; परिस्थितीला योग्य करणें; फेरफार करणें, बदलणें.

Attĕmpt', *v. t.* ( अटे'म्प्ट् )—try. प्रयत्न करणें. *n.* attempting, endeavour. उद्योग, प्रयत्न. To attempt the life of=to try to kill. ठार मारण्याचा प्रयत्न करणें.

Attĕnd', *v. t. & i.* ( ॲटे'न्ड् )—apply one's mind to; be present (*at*); accompany; wait upon. लक्ष देणें; हजर राहणें, जवळ असणें; बरोबर असणें; सेवा करणें. [ L. *ad*, to and *tendere*, to stretch ]

Attĕn'dance, *n.* (ॲटे'न्डन्स्)—act of attending; the persons present. हजिरी; नोकरी, सेवा; हजर असलेले लोक. To dance attendance on=to attend the convenience of. ० च्या सुखसोयीकडे लक्ष देणें.

Attĕnd ant, *a.* ( ॲटे'न्डन्ट् )—waiting on; accompanying. सेवा करणारा; बरोबर असणारा. *n.* servant. सेवक.

Attĕn'tion, *n.* ( ॲटे'न्शन् )—act of applying one's mind, close mental application, attending; (*pl.*) ceremonious politeness; courtship, addresses. लक्ष, अवधान; ( अने० ) आदरसत्कार; लग्नासाठीं आर्जव, मनधरणी.

Attĕn'tive, *a.* ( ॲटे'न्टिव्ह् )—heedful, observant; polite. तत्पर, लक्ष देणारा; नम्र. Atten'tively, *adv.*; Atten'tiveness, *n.*

Attĕn'ūate, *v. t.* ( ॲटे'न्युएट् )—make slender or thin; reduce in force or value. पातळ किंवा बारीक करणें; जोर कमी करणें, सत्त्वहीन करणें. *a.* slender; rarefied. कृश, बारीक, विरळ केलेला. Attĕnua'tion, *n.* [ L. *ad*, to & *tenuis*, Sk. तनु, thin ]

Attĕst', *v. t.* ( ॲटे'स्ट् )—bear witness to, certify; put on oath or solemn declaration. साक्ष देणें; दाखला देणें; शपथेवर सांगणें.

Attĕstā'tion, *n.* ( अटेस्टे'शन् )—formal confirmation (by signature, oath, etc.). खरेपणाविषयीं केलेली सही, सही, साक्ष.

Ătt'ĭc, *n.* (ॲ'टिक्)—room in the top story of a house, a garret. घोटमाळ्यावरची खोली, अगदीं वरच्या मजल्यावरील खोली.

Attīre', *v. t.* (अटा'यर्)—dress (*esp.* with fine clothes), array. पोषाख घालणें, सजवणें, सज्ज करणें. *n.* dress, apparel. पोषाख, पेहराव.

Ătt'ĭtūde, *n.* (ॲ'टिट्यूड्)—posture of body; settled behaviour as showing *opinion.* अंगाची ढब, शरीराची ठेवण, मनाचा कल, रोंख, धोरण, दिशा. [*L. attitudo,* fitness]

Ăttĭtū'dĭnize, *v. t.* (ॲटिट्यू'डिनाइझ्)—assume *attitudes;* show affectation. विशेष मुद्रा धारण करणें; उगाच डौल दाखवणें.

Attorn'ey, *n.* (-er- अट'र्नि)—one's business or legal representative; solicitor. वकील; मुखत्यार. *Attorney General=legal officer* empowered *to act in all* cases in which the State is a party. सरकारतर्फेचा मुख्य वकील. *pl.* Attorn'eys.

*Attrăct', v. t.* (अट्रॅ'क्ट्)—*draw to oneself;* allure, entice. (मन) आकर्षून घेणें, आपल्याकडे ओढणें; मोह घालणें, मोहून टाकणें. Attra'ctor, *n.* [L. *ad,* to & *trahere,* to draw]

Attrăc'tion, *n.* (अट्रॅ'क्शन्)—act of attracting; thing that attracts; charm, inducement. आकर्षण; मोहक वस्तु; मोह, मोहपाश, ओढा. Attraction of gravity=गुरुत्वाकर्षण. Magnetic attraction=action of magnet in drawing iron. लोहचुंबकाकर्षण. Molecular attraction=परमाणूंचें आकर्षण. Capillary attraction=attraction by which liquid is drawn up through hair-like tube. केशाकर्षण.

Attrăc'tĭve, *a.* (अट्रॅ'क्टिव्ह्)—inviting, pleasing. आकर्षक, मोहक, मोह घालणारा.

*Attrĭb'ūte, v. t.* (ॲट्रि'ब्यूट्)—ascribe as belonging or appropriate *to;* refer *to;* assign *to.* आरोपणें; संबंध लावणें; माथीं घालणें. *n.* quality ascribed to a person or thing; characteristic quality. निशाणी, विशेष गुणधर्म.

Attrĭbū'tion, *n.* (अट्रिब्यू'शन्)—ascription. आरोपणें, आंगीं विरुद्ध लावणें, संबंध लावणें.

Attrĭb'ūtive, *a.* (ॲट्रि'ब्यूटिव्ह्)—expressing an attribute; qualifying. विशेषणदर्शक; गुण दर्शविणारें. *n.* word denoting an attribute. *adjective.* विशेषण. *Attributively=*विशेषणरूपानें, विशेषण म्हणून.

Attri'tĕd, *a.* (अट्रा'यटेड्)—worn by friction or abrasion. घर्षणानें झिजलेला.

Attrĭ'tion, *n.* (ॲट्रि'शन्)—friction; abrasion. wearing out. घांसणें, घर्षण; चोळवटणें. झीज. [L. *ad,* to & *tritum,* to rub]

Attūne', *v. t.* (ॲट्यू'न्)—bring into musical accord; adapt; tune. एकसुराचा करणें; मेळ घालणें; सूर लावणें. [L. *ad,* to & tune]

Aub'ŭrn, *a.* (ऑ'बर्न्)—golden-brown. सोनसळा, पिंगट, पिंगळा. [L. *albus,* white]

Auc'tion, *n.* (ऑ'क्शन्)—sale in which articles are sold to highest bidder. लिलाव. Dutch auction=sale in which price is reduced by auctioneer till a purchaser is found. पहिल्या प्रथमच लिलांववाल्यानें भारी किंमत सांगून मग खालीं खालीं उतरवणारी लिलांवाची पद्धत.

Auctioneer', *n.* (ऑक्शनि'अर्)—holder of auctions. लिलांव करणारा, लिलांववाला.

Auctioneer'ing, *n.* (ऑक्शनि'अरिंग्)—work of auctioneer. लिलांव करणें, लिलांव.

Audā'cious, *a.* (-shus-, ऑडे'शस्)—daring, bold; impudent. शूर, धीट; उद्धट.

Audă'cĭty, *n.* (ऑडॅ'सिटि)—boldness, daring spirit; reprehensible boldness, impudence. धीटपणा, धाष्टर्य; उद्धटपणा. Also, *Auda'ciousness, n.* [L. *audere,* to dare]

Aud'ĭble, *a.* (ऑ'डिबल्)—that can be heard, perceptible to the ear. ऐकूं येण्याजोगा. Audĭbi'lity, *n.* [L. *audire,* to hear]

Aud'ĭĕnce, *n.* (ऑ'डिएन्स्)—a hearer's attention; assembly of listeners; formal interview. श्रोत्याचें लक्ष; श्रोतृसमाज; औपचारिक किंवा ठरींव मुलाखत. To give audience=to listen. ऐकणें.

Aud'ĭt, *n.* (ऑ'डिट्)—official examination of accounts. अधिकारयुक्त हिशेबतपासणी. *v. t.* examine accounts officially. अधिकारानें हिशेब तपासणें. [*L. auditus,* a hearing]

Audĭ'tion, *n.* (ऑडि'शन्)—power of hearing; listening; trial hearing of applicant. श्रवणशक्ति; ऐकणें; (गायकाचें वगैरे) परीक्षा म्हणून (गाणें) ऐकणें.

Au'dĭtor, *n.* (ऑ'डिटर्)—a hearer; one who audits. श्रोता; हिशेब तपासणारा.

Audĭtor'ial, *a.* (ऑडिटो'रिअल्)—connected with an audit. शेवटच्या हिशेबतपासणीसंबंधीं.

Audĭtor'ĭŭm, *n.* (ऑडिटो'रिअम्)—part of building occupied by audience. श्रोत्यांची बसण्याची जागा, प्रेक्षकस्थान.

Aud'ĭtorў, *a.* (ऑ'डिटरि)—of hearing. श्रवणासंबंधीं. *n.* hearers, audience, assembly of hearers. श्रोतृसमाज, श्रोतेमंडळी.

Aug'er, *n.* (ऑ'गर्)—a boring-tool. सळई, वेधन. Screw auger=गिरमिट.

Aught, *n.* (ऑट्)—anything. कांहींहि वस्तु.

Augmĕnt', *v. t. & i.* (ऑग्मे'न्ट्)—increase: prefix the augment to. वाढणें, वाढवणें;

आगम लावणें. *n.* increase; vowel prefixed. वृद्धि, वाढ; पाठीमागें जोडलेला स्वर, आगम.

Augmĕntā'tion, *n.* ( ऑग्मेन्टे'शन् )—enlargement, increase, addition. वृद्धि, वाढ.

Augmĕn'tātive, *a.* ( ऑग्मे'न्टेटिव्ह् )—having the property of increasing; increasing in force the idea of the original word. वाढण्यासारखा; अर्थवृद्धिकारक ( शब्द ).

Aug'ur, *n.* ( ऑ'गर् )—soothsayer; prophet. शकुन पाहणारा; भविष्यवादी. *v. t.* & *i.* predict, anticipate, foresee; promise. भाकीत करणें; आगाऊ अनुमान करणें. [L. *avis*, bird & *garrire*, to chatter ]

Aug'ūrȳ, *n.* ( ऑ'ग्यूरि )—divination; omen; prophecy. शकुनविद्या; शकुन; भविष्य.

Augŭst', *a.* ( ऑग'स्ट् )—venerable, imposing. आदरणीय; भव्य. *n.* the eighth month of the English year. इंग्रजी वर्षाचा आठवा महिना.

Auk, *n.* ( ऑक् )—a northern sea-bird with short wings used as paddles. एक आंखूड पंखाचा उत्तरेकडील समुद्रावरील पक्षी.

Aunt, *n.* ( änt, आन्ट् )—parent's sister or sister-in-law. आत, मामी, मावशी, चुलती.

Aur'a, *n.* ( ऑ'रा )—subtle emanation from anything; atmosphere diffused by or attending a person. व्यावर्तक चिन्ह, लक्षण; ( मनुष्यासभोंवतालचें ) तेजोमंडल.

Aur'al, *a.* ( ऑ'रल् )—of the ear; learned by ear. कानाचा, कानासंबंधीं; कानानें कळलेला.

Aurē'ola, *n.* ( ऑरी'ओला )—a celestial crown, a halo. दिव्य मुकुट, प्रभामंडळ.

Aur'ēole, *n.* ( ऑ'रिओल् )—gold disk or circle of light depicted round the head, halo (esp. that which is seen in eclipses). देवतांचे वगैरे देहाभोंवतीं चित्रांत काढलेलें दिव्य तेजोमंडल.

Aur'icle, *n.* ( ऑ'रिकल् )—external ear; either upper cavity of the heart. बाहेरील कान; रक्ताशयाचा वर असलेला अवयव, ऊर्ध्वाशय. [ L. *auris*, an ear ]

Aurĭc'ūla, *n.* ( ऑरि'क्युला )—kinds of flowering plant. एका जातीचीं फुलझाडें.

Aurĭc'ūlar, *a.* ( ऑरि'क्यूलर् )—of the ear or hearing; told privately in the ear. कानाचा, श्रवणासंबंधीं; गुप्तपणें कानांत सांगितलेला.

Aurĭf'ĕrous, *a.* ( ऑरि'फेरस् )—yielding gold. सोनें ज्यांतून उत्पन्न होईल अशी ( वस्तु ). [ L. *aurum*, gold & *ferre*, to bear ]

Aur'ist, *n.* ( ऑ'रिस्ट् )—ear specialist. कर्णवैद्य.

Aurōr'a, *n.* ( ऑरो'रा )—goddess of dawn. उषादेवता, प्रातःकाल, अरुण. Aurōr'a bōrēā'lis ( ऑरो'रा बोरिए'लिस् )=northern lights. उत्तरगोलार्धांतील अरुणप्रकाश. Aurora austrā'lis ( ऑरोरा ऑस्ट्रे'लिस् )=southern lights. दक्षिणगोलार्धांतील अरुणप्रकाश.

Auscultā'tion, *n.* ( ऑस्कल्टे'शन् )—act of listening to movement of the heart, etc. हृदय किंवा छाती तपासणें. Auscul'tātory, *a.*

Aus'pĭce, *n.* ( ऑ'स्पिस् )—omen, prognostic. शुभचिन्ह, शकुन. (*pl.*) prosperous lead, patronage. आश्रय, कृपाछत्र. *Under the auspices of* =॰च्या आश्रयाखालीं, ॰च्या तर्फे.

Auspĭ'cious, *a.* ( -shus, ऑस्पि'शस् )—having omens of success, of good omen; promising. शुभ, मंगल, मंगलदायक; अनुकूल, इष्ट.

Austēre', *a.* ( ऑस्टि'अर् )—morally strict; severely simple; stern; rough to the taste. उग्र; अत्यंत सरळ; कडक; चवीला वाईट.

Austĕ'rĭtȳ, *n.* ( ऑस्टे'रिटि )—severity, harsh discipline; asceticism; rigour. कठोरता, कडकपणा; उग्र तपश्चर्या; करडेपणा.

Aus'tral, *a.* ( ऑ'स्ट्रल् )—southern. दक्षिणेकडील.

Authĕn'tĭc, *a.* ( ऑथे'न्टिक् )—trustworthy, reliable, entitled to acceptance; genuine. विश्वसनीय; खरा, अस्सल.

Authĕn'tĭcāte, *v. t.* ( ऑथे'न्टिकेट् )—establish the truth, authorship or validity of. सत्यता किंवा कर्तृत्व सप्रमाण सिद्ध करणें, प्रमाण दाखवून खरा ठरविणें, शाबीत करणें. Authenticā'tion, Authen'ticātor, *nn.*

Authĕntĭ'cĭtȳ, *n.* ( ऑथेन्टि'सिटि )—genuineness, reality. सत्यता, खरेपणा, अस्सलपणा.

Auth'or, *n.* ( ऑ'थर् )—writer of book, etc.; originator. ग्रन्थकर्ता; कर्ता, जनक. Auth'oress, *n.*; Authŏr'ial, *a.*; Auth'orshĭp, *n.*

Authŏr'ĭtātive, *a.* ( ऑथॉ'रिटेटिव्ह् )—commanding, imperative; possessing or claiming authority; proceeding from competent authority. दरारा असलेला, प्रामाण्य असलेला, सप्रमाण; अधिकारयुक्त.

Authŏ'rĭtȳ, *n.* ( ऑथॉ'रिटि )—power or right to enforce obedience; personal influence; anything cited as authority. सत्ता, अधिकार; कदर, वजन; आधार, आप्तवचन.

Auth'orīze, *v. t.* ( ऑ'थराइझ् )—sanction; give authority to. परवानगी देणें; अधिकारपत्र देणें. Authorīzā'tion, *n.* मुखत्यारी, अधिकार.

Autobiŏ'grapher, *n.* ( ऑटोबायॉ'ग्रफर् )—one who writes his own history. आत्मचरित्रलेखक.

Autobiōgrā'phĭc, *a.* ( ऑटोबायॉग्र'फिक् )—pertaining to autobiography, engaged in autobiography. स्वतः लिहिलेल्या आपल्या चरित्राविषयीं, आत्मचरित्रासंबंधीं, आत्मचरित्रमय. Also, Autobio-gra'phical, *a.*

Autōbīōg'raphy̆, *n.* ( ऑटोबायॉग्रफि )—one's life written by oneself. आत्मचरित्र. [ Gr. *autos*, self, *bios*, life, *graphein*, to write ]

Aut'ocăr, *n.* ( ऑ'टो-कार् )—road-vehicle driven by mechanical power. मोटार गाडी.

Autŏ'chthon, *n.* ( -k-, ऑटॉ'क्थॉन् )—*original or earliest known inhabitants, aborigines.* मूळचे किंवा अगदीं प्राचीन रहिवासी. Auto'chthonous, *a.* [ Gr. *autos*, self and *chthon*, the earth ]

Autoc'racy̆, *n.* ( ऑटॉ'क्रसि )—absolute uncontrolled rule. अनियंत्रित राज्यकारभार.

Auto'crăt, *n.* ( ऑटॉ'क्रॅट् )—*absolute ruler.* अनियंत्रित राज्य करणारा राजा, सुलतान.

Autocră'tic, -cal, *aa.* ( ऑटोक्रॅ'टिक् -॰कल् )—ruling absolutely or by one's own power. एकसत्ताक राज्य असलेला, सुलतानी.

Aut'ogrăph, *n.* ( ऑ'टॉग्राफ् )—author's own manuscript; one's own handwriting, *signature.* ग्रंथकर्त्याचें स्वहस्तलिखित; स्वहस्तलेख, सही. Aut'ographic, *a.* स्वदस्तुरचा, स्वहस्ताक्षराचा. [ Gr. *autos*, self *&* *graphe*, writing ]

Autogy̆r'ō, *n.* ( ऑटोजा'यूरो )—a form of aeroplane that can descend vertically by means of a windmill revolving freely on its own shaft. एक प्रकारचें उभेंच्या उभेंच खालीं येणारें विमान.

Automăt'ic, *a.* ( ऑटोमॅ'टिक् )—self-moving, mechanical; unconscious. आपोआप चालणारें; न कळतां होणारें. [ Gr. *autos*, & *ma*, to strive ]

Autŏm'ătism, *n.* ( ऑटॉ'मॅटिझम् )—mechanical routine; *involuntary* action. यंत्राप्रमाणें ठरीव नित्यक्रम; स्वयंचलनशक्ति.

Autŏm'aton, *n.* ( ऑटॉ'मॅटन् )—thing endued with spontaneous motion; piece of mechanism; person whose actions are mechanical. आपोआप गति असलेली वस्तु; आपोआप चालणारें यंत्र; परिपाठानुरूप वागणारा मनुष्य.

Automobile', *n.* ( -ēl, ऑटोमोबी'ल् )-an auto-car or similar vehicle, motor-car. मोटार गाडी.

Autŏn'omy̆, *n.* (ऑटॉ'नमि )—the power or right of self-government. स्वाधीन शासनपद्धति, राजकीय स्वातंत्र्य. Autŏn'omous, *a.* [ Gr. *autos*, self and *nomos*, law, rule ]

Autŏp'sy̆, *n.* ( ऑटॉ'प्सि )—personal inspection; post-mortem. प्रत्यक्ष परीक्षा; परीक्षणार्थ मृतदेहाचें व्यवच्छेदन. [Gr. *autos*, & *opsis*, sight]

Auto-suggĕs'tion, *n.* ( ऑटो-सजे'स्चन् )—hypnotic suggestion proceeding from the subject himself. झोंप आणणारी स्वयंसूचना.

Aut'otȳpe, *n.* ( ऑ'टो-टाइप् )—facsimile; permanent photographic printing process for reproducing in monochrome. अस्सल बरहुकूम मुळावरून काढलेली प्रत; कांचेवरच्या उलट प्रतिमेवरून सुलट प्रतिमा घेणें. [ Gr. *autos*, self & *typos*, form ]

Aut'ŭmn, *n.* ( -m, ऑ'टम् )—third season of the year; season of incipient decay. शरद् ऋतु; सराईचे दिवस, खरीपाची वेळ.

Autŭm'nal, *a.* (ऑट'म्नल् )-of autumn; past the prime or middle stage of life. हिंवाळ्याचा, शरदृतूसंबंधीं; उतारवयासंबंधीं.

Auxĭl'iary̆, *a.* (ऑग्झि'ल्यरि)—helpful, subsidiary. साहाय्यकारी. Auxiliaries=auxiliary troops=foreign or allied troops in a nation's service. कुमकेस आलेली फौज, कुमक.

Avail', *v. t. & i.* ( अव्हे'ल् )—be of use or assistance; help, benefit. उपयोगीं पडणें; कामास येणें, फायदा करून घेणें. *n.* use, profit. उपयोग; फायदा. To avail oneself *of*=to profit by, to take advantage of. ॰चा आपल्याला फायदा करून घेणें. Of no avail, without avail, to little avail=of no use. निरुपयोगी, व्यर्थ. [L *ad & valere*, to be strong]

Avail'āble, *a.* ( अव्हे'लेबल् )—capable of being used, at one's disposal, within one's reach. उपयोगीं पडण्याजोगा, मिळणें किंवा भेटणें शक्य, सुगम, सुलभ, चालू.

Ăv'alănche, *n.* ( -nsh, अॅ'व्हलान्श् )—*falling* mass of snow, earth and ice. डोंगरावरून घसरणारा बर्फाचा खडक, हिमानी. [ L. *ad*, to & *vallis*, a valley ]

Ăv'arice, *n.* ( अॅ'व्हरिस् )—greed of gain, cupidity; eager desire to get or keep. द्रव्यलोभ; हांव, लालसा. [ L. *avarus*, greedy ]

Ăvarĭ'cious, *a.* ( -shus, अॅव्हरि'शस् )—extremely covetous, greedy. अतिलोभी, हांवरा.

Avăst', *int. nauti.* ( अव्हा'स्ट् )—stop, cease. थांबा, पुरे करा, हांहां!

Avaunt', *int.* ( अव्हॉ'न्ट् )—away ! begone! चालता हो, तोंड काळें कर.

Ā've, *int. & n.* ( ए'व्हि )—hail, welcome; farewell. सुस्वागतम्; जयजय, नमस्कार, नमस्ते.

Avĕnge', *v. t.* ( अव्हे'ंज् )—inflict retribution on behalf of; exact retribution for. न्यायबुद्धीनें प्रतिकार करणें; उलट नुकसान करणें. To be avenged=to avenge oneself; *to take* vengeance for *(injury).* प्रतिकार करणें; उलट सूड घेणें. [ L. *a & vindicare*, to avenge ]

Av'enūe, *n.* ( अॅ'व्हेन्यू )—*roadway; a means of attainment;* approach to house bordered by trees; way of approach. मार्ग; सफलतेचें साधन; दुतर्फा झाडीचा रस्ता; प्रवेशमार्ग.

Aver', *v. t.* (ॲव्ह'र्)—assert, affirm; prove (a plea). प्रतिज्ञेनें सांगणें; सिद्ध करून देणें.
Aver'ment, *n.* (अव्ह'मॅन्ट्)—positive assertion. प्रतिज्ञापूर्वक विधान, निश्चयपूर्वक बोलणें.
Ăv'erage, *n.* (ॲ'व्हरिज्)—arithmetical mean; ordinary standard. सरासरी; साधारण प्रमाण. *a.* estimated by average; of the usual standard. सरासरीनें गणललें; साधारण, मध्यम. *v. t.* estimate or reach the average of. सरासरी काढणें, सरासरीनें भरणें. On the or on an average=on a medial estimate. सरासरी, स्थूलतः, स्थूलमानानें.
Averse', *a.* (ॲव्ह'र्स्)—opposed, disinclined (*to*, *from*); unwilling (*to* do). विरुद्ध, पराङ्मुख, तिटकारा दाखविणारा; नाखूष.
Aver'sion, *n.* (ॲव्ह'र्शन्)—dislike or antipathy; thing or person one dislikes. नावड, तिटकारा, कंटाळा; तिरस्कार्य वस्तु किंवा मनुष्य.
Avert', *v. t.* (ॲव्ह'र्ट्)—ward off; turn away (eyes, thoughts, *from*). टाळणें; दूर करणें, परत लावणें. [L. *a*, from & *verto*, I turn]
A'vian, *a.* (ā-, ए'व्हिअन्)—pertaining or belonging to birds. पक्ष्यांसंबंधीं.
Ā'vĭarȳ, *n.* (ए'व्हिअरि)—large cage or building for keeping birds. पक्ष्यांचा शिकारखाना, खुराडा. [L. *avis*, a bird]
Ā'viāte, *v. i.* (ए'व्हिएट्)—manage or travel in aircraft. विमान चालविणें, विमानांतून जाणें.
Āvĭā'tion, *n.* (एव्हिए'शन्)—the art of flying through the air on a flying-machine. विमान चालविण्याची विद्या, वैमानिक कला.
Āvĭāt'or, *n.* (एव्हिए'टर्)—one who aviates or travels in aircraft. वैमानिक.
Ăv'ĭd, *a.* (ॲ'व्हिड्)—eager; greedy (*of*, *for*). उत्सुक; लोभी, हांवरा. Ăv'idlȳ, *adv.*
Ăvĭd'ĭtȳ, *n.* (ॲव्हि'डिटि)—intenseness of desire, eagerness; greed. उत्सुकता; लोभ, हांव.
Āvĭŏtte', *n.* (एव्हिऍ'ट्)—engineless man-worked aeroplane. एंजिनरहित मनुष्यानें चालविलेलें विमान.
Ăvocā'tion, *n.* (ॲव्होके'शन्)—vocation, calling. काम, धंदा, पेशा, व्यवसाय. [L. *ad*, from, and *vocare*, to call]
Avŏĭd', *v. t.* (अव्हॉ'इड्)—shun, keep away from; annul. टाळणें, चुकवणें; रद्द करणें.
Avoĭd'able, *a.* (अव्हॉ'इडेबल्)—that can be avoided. टाळतां येण्याजोगा.
Avoi'dance, *n.* (अव्हॉ'यडन्स्)—act of avoiding. टाळणें, वर्ज करणें.
Ăvoirdūpoĭs', *n.* (-er-, -z, ॲव्हर्ड्युपॉ'इझ्)—system of weights used for ordinary goods. एक प्रकारचीं इंग्रजी वजनाचीं परिमाणें.
Avouch', *v. t.* (अव्हा'उच्)—guarantee truth of; affirm. प्रतिज्ञेनें सांगणें; प्रतिपादन करणें.
Avow', *v.t.* (अव्हा'उ)—admit, confess, acknowledge, declare openly. उघड कबूल करणें.
Avow'al, *n.* (अव्हा'उअल्)—an open admission, frank acknowledgement उघड कबुली.
Avow'ĕdlȳ, *adv.* (अव्हा'उइड्लि)—in an open manner. सांगून सवरून, उघड उघड.
Avŭl'sion, *n.* (ॲव्ह'ल्शन्)—a forcible tearing away. जोरानें अलग करणें, फाडणें.
Avŭn'cūlar, *a.* (ॲव्ह'ङ्क्यूलर्)-of or resembling an uncle. मामाचा, मामासारखा.
Await', *v. t.* (अवे'ट्)—wait for; (of things) be in store for. वाट पाहणें, खोळंबणें; (करितां) राखून ठेवलेलें असणें.
Awāke', *v. t. & i.* (अवे'क्)—(*pa. t.* awoke, *p. p.* awaked *or* awoke) rouse from sleep; become active. जागें करणें किंवा होणें, उठणें; सावध होणें. *pred. a.* not asleep, vigilant. जागृत, सावध. *Awake to*=aware of. सावध, माहितगार. *To be awake* = जागें असणें, जागणें.
Awā'ken, *v. t. & i.* (अवे'कन्)—awake; arouse the consciousness of; to become awake. जागें करणें; चेतना उत्पन्न करणें, जागृत होणें.
Award', *v. t.* (-wōrd, अवॉ'अर्ड्)—adjudge to. निर्णय करून देणें. *n.* judicial sentence; payment or penalty awarded. पंचांचा ठराव, निवाडा; फैसला, दिलेला निर्णय.
Awāre', *a.* (अवे'अर्)—conscious, not ignorant of. सावध, माहितगार.
Awash', *pred. a.* (-wŏ-, अवॉ'श्)—flush with or washed by the waves. लाटांच्या आधीन, लाटांनीं वाहलेला.
Away', *adv.* (अवे')—to or at a distance. दूर, लांब. To go away=निघून जाणें. To give away=देऊन टाकणें. To throw away=टाकून देणें. To run away=पळून जाणें. Out and away=तुलना न करतां येणारें. Away with=go away with, take away! घेऊन जा! (Cannot) away with=get on with, tolerate. सहन करणें. To make away with=to destroy. नाश करणें.
Awe, *n.* (ऑ)—reverential fear. दरारा, जरब. *v. t.* inspire with awe. धाक दाखवणें, दरारा बसवणें. To stand in awe of=वचकणें, जुमानणें. Awe'less, *a.* ज्याचा दरारा बसत नाहीं असा. Awe'some, *a.* dread, terrible. दारुण, भयंकर.
Awe'strŭck, *a.* (ऑ'स्ट्रक्)—struck with reverential fear. धाक बसलेला.
Aw'ful, *a.* (ऑ'फुल्)—inspiring awe. दराऱ्याचा. Aw'fully, *adv.* फार मोठ्या प्रमाणानें, भयंकर रीतीनें.

Aw'fulness, *n.* ( ऑ'फुल्-नेस् )—reverential fear. सादर भीति, दराराु, वचक.

Awhile', *adv.* ( अव्हा'इल् )—for a time. कांहीं काळपर्यंत, अंमळसा, जरा.

Awk'ward, *a.* ( ऑ'क्वर्ड् )—ill-adapted for use; hard to deal with; clumsy. गैरसोईचा; अडाणी; वेडौल, चमत्कारिक.

Awl, *n.* ( ऑल् )—a small pricking-tool, pricker. ( चांभाराची ) आरी.

Awn, *n.* ( ऑन् )—beard of grain, etc. ( गवताचें किंवा धान्यावरचें ) कूंस, कुसूं, कुसळ. Awn'y̆, *a.* ज्याला कुसें फार आहेत असा.

Awn'ing, *n.* ( ऑ'निंग् )—canvas roof; shelter. छत; आश्रय. To cover with an awning=छत घालणें.

Awry̆, *adv.* ( arī, अरा'य् )—crookedly, amiss. तिरपा, वांकडा. To look awry=to look askance. काण्या डोळ्यानें पाहणें. To go or run or tread *awry*=to do wrong. चुकीच्या मार्गानें जाणें.

Ăxe, *n.* ( अॅक्स् )—tool for chopping. कुऱ्हाड. To put the axe in the helve=to solve a puzzle. कूटप्रश्न सोडवणें, अडचण दूर करणें An axe to grind=private ends to serve. स्वार्थ साधणें, आपलें घोडें पुढें ढकलणें.

Ăx'ĭal, *a.* ( अॅ'क्सिअल् )—pertaining to an axis. आंसाविषयीं, कण्यासंबंधीं.

Ăx'ĭom, *n.* ( अॅ'क्सिअम् )—self-evident truth; established principle, maxim. प्रत्यक्षसिद्ध वचन; सिद्ध तत्त्व, म्हण.

Ăxĭomă'tĭc, -ĭcal, *aa.* ( अॅक्सिअॅमॅ'टिक्, °कल् )—self-evident; characterized by axioms; full of maxims. स्वतःसिद्ध; सिद्धतत्त्वविशिष्ट; म्हणींनीं युक्त, म्हणींनीं भरलेलें.

Ăx'ĭs, *n.* ( अॅ'क्सिस् )—( *pl.* axes ) imaginary line round which a body rotates, a straight line between poles or ends. कणा, आंस, अक्ष.

Ă'xle, *n.* ( अॅ'क्सल् )—spindle on or with which a wheel revolves. चाकांचा आंस; कणा.

Ă'xle-tree, *n.* ( अॅ'क्सल्-ट्री )—bar connecting pair of carriage-wheels. आंस, कणा.

Ay, *int.* ( ī, आय् )—yes. होय. *n.* ( *pl.* ayes ) affirmative answer or vote. होकारार्थी उत्तर, अनुकूल मत.

Aye, *adv.* ( ā, ए )—always, for all occasions. नेहमीं, सतत. For *aye*=for ever. सर्वकाल.

Azā'lea, *n.* ( अझे'लिआ )—kinds of flowering shrubby plant. एक प्रकारचें फुलझाड.

Ăz'ĭmŭth, *n.* ( अॅ'झिमथ् )—vertical arc of sky from zenith to horizon. सूर्य किंवा तारा यापासून क्षितिजावर काढलेला लंब आणि क्षितिजाचा उत्तर किंवा दक्षिण बिंदु ह्यांच्यामध्यें जो क्षितिजाचा कंस सांपडतो तो, समांश.

Azŏ'ic, *a.* ( अझॉ'इक् )—having no trace of life. प्राणरहित.

A'zure, *n.* ( अॅ'झर् )—blue unclouded sky; blue colour; bright blue pigment. नीलवर्ण निरभ्र आकाश; नील वर्ण; तकतकीत निळा रंग. *a.* sky-blue. अस्मानी, आकाशासारखा निळा.

# B

B, ( बी )—second letter of the English alphabet. इंग्रजी वर्णमालेंतील दुसरा वर्ण.

Baa, *n.* ( bä, बा )—bleat of a sheep. बें बें करणें. *v. i.* bleat. बें बें करणें.

Bā'al, *n.* ( बे'अल् )—phoenician god; a false god. प्राचीन फिनिशिअन लोकांचा मुख्य देव; कल्पित देव. ( *Pl.* Ba'alim—बे'ऑलिम् )

Băb'ble, *v. i. & t.* ( बॅ'बल् )—talk idly; divulge foolishly. बोबडें बोलणें; बडबडणें; बहकणें. *n.* idle talk. बडबड; बोबडे बोल.

Băb'bler, *n.* ( बॅ'बलर् )—one who babbles, a chatterer; teller of secrets; long-legged Thrush. बोबडा, बडबड्या; गुप्त गोष्टी सांगणारा; लांब पायाचा ( युरोपांतील ) कोकिळेसारखा पक्षी.

Bābe, *n.* ( बेब् )—baby. तान्हें मूल.

Bā'bel, *n.* ( बे'बल् )—confused noise of talk, confused scene. गडबड, बजबज, बलबलपुरी.

Babirous'sa, *n.* ( -rōō-, बॅबिरू'सा )—an East Asiatic wild hog. उत्तर आशियांतील एक जातीचें रानटी डुकर.

Bāb'ĭsh, *a.* ( बे'बिश् )—childish. पोरकट, लहान मुलासारखा.

Babōōn', *n.* ( बबू'न् )—a large African and South-Asiatic monkey. अति मोठा वानर.

Bā'by̆, *n.* ( बे'बि )—an infant, a very young child; childish person. तान्हें मूल; पोरकट मनुष्य. Bābyish, *a.*

Bā'by̆-färmer, *n.* ( बे'बि-फार्मर् )—a farmer who contracts to keep babies. मुलें पोसणारा भाडोत्री पालक.

Bā'by̆hōōd, *n.* ( बे'बि-हुड् )—the state of being a baby. तान्हेपणा, पोरपण, बाल्यावस्था.

Bă'by̆lon, *n.* ( बॅ'बि-लॅान् )—the capital of Chaldean empire; any great empire or vicious city. कॅल्डिअन साम्राज्याची राजधानी; कोणतेंहि मोठें साम्राज्य, व्यसनांनीं परिपूर्ण असें शहर. Băby̆lō'nĭan, *a. & n.*

Băccalaur'ĕate, *n.* ( बॅक्-कॅ-लॉ'रिएट् )—the degree of Bachelor. बॅचेलरची पदवी.

Băcc'arat, *n.* ( -ä, बॅकॅरा )—a game of cards played by any number of players or rather betters and a banker. जुगारी लोकांचा एक पत्त्यांचा खेळ.

Băcc'hănal, *a.* ( बॅ'कॅनल् )—of Bacchus or his rites, riotous and drunken, noisy. बॅकसच्या

उत्सवाचा, छाकटा, दारूबाजीचा. *n.* Bacchant; reveller. बॅकसचा उत्सव, दारूबाज; चैनी.

Băcc'hănt, *n.* (बॅ'कॅन्ट्)—priest or votary of Bacchus. बॅकसचा पुजारी किंवा भक्त. Băc'chănte, *fem. n.* (बॅ'कॅन्टि); *pl.* Bac'cantes.

Băcc'hĭc, *a.* (बॅ'किक्)—relating to Bacchus; jovial; drunken. बॅकस देवतेचा; चैनी, रंगेल; दारू प्यालेला.

Băcc'hŭs, *n.* (बॅ'कस्)—Greek god of wine. ग्रीक लोकांची दारूची देवता.

Băch'ĕlor, *n.* (बॅ'चेलर्)—an unmarried man; one who has taken the university degree. अविवाहित पुरुष, ब्रह्मचारी; विश्वविद्यालयांतील पदवी घेतलेला, पदवीधर.

Băch'ĕlorhood, *n.* (बॅ'चेलर्-हुड्)—unmarried life. अविवाहितावस्था, ब्रह्मचर्य.

Băcĭll'ŭs, *n.* (बॅसि'लस्, *pl.* Băcill'ī, बॅसि'लाय्)—a name of microscopic organisms or germs resembling little rods that often swarm in the blood of animals in morbid states. प्राण्यांच्या रक्तांत उत्पन्न होणारे फार सूक्ष्म जंतु. Băcĭll'arȳ, *a.* यष्टिजंतुमय, यष्टिजंतूचा. [ L. *Bacillus*, a little rod ]

Băck, *n.* (बॅक्)—hinder surface of human body; upper surface of animal's body; hind part of things; the rear; a large shallow vat or vessel. पाठ; पृष्ठभाग; पिछाडी; एक मोठें उथळ भांडें. *a.* situated behind, covering past period. मागील, मागचा. *adv.* to the rear; into an earlier position. मागें, पाठीमागें; पाठमोरा. *v. t. & i.* put back-ground to; support; ride upon, break in to the saddle; countersign, endorse; cause to move back. पाठीमागें घालणें; पाठबळ देणें; पाठीवर चढणें, स्वार होणें; पाठीवर लिहिणें; मागें घेणें, हटवणें. To *back* a sail or yard=to lay a sail or yard to face wind. जहाज चालूं नये म्हणून वाऱ्याकडे तोंड करून शीड उभारणें. To *back* water=to reverse boat's motion with oars. उलट दिशेनें वल्हवणें. To go *back* from or upon one's word=to go away from a promise. वचन न पाळणें. To answer *back*=to retort. उलट जबाब देणें. *Back* and forth=to and fro. पुढेंमागें. At the *back of*=behind in support, pursuit or concealment. पाठीवर, पाठीमागें. Behind one's *back*=पाठीमागें, अप्रत्यक्ष. To turn one's *back* upon=to run away from, abandon. ऐनवेळीं सोडणें, त्याग करणें. With one's *back* to wall=hard pressed. कचाट्यांत सांपडलेला. To have on one's *back*=to be burdened with. ०चा भार होणें. To put, get or set person's *back* up=to make a person angry. एकाद्याला राग आणणें, चिथवणें. To break one's *back*=to overburden one. अतिशय ओझ्यानें लादणें. On the *back* of=in addition to. आणखी, शिवाय, पेक्षां जास्त. *Back* number, (*slang*) out-of-date method, person, etc. प्रचलित नसलेली रीत, व्यक्ति वगैरे. To *back* out of=to withdraw from. काढून मागें घेणें. To take a *back* seat=to efface or humble oneself. स्वतःला दिसेनासा करणें, नम्रता स्वीकारणें. *Back* talk, (*sl.*) impudent answer. उद्धट उत्तर. To *back* up=to support. आधार देणें, टेंकू देणें.

Băck'bīte, *v. t.* (बॅ'क्-बाइट्)—to speak evil behind one's back, slander. चहाडी सांगणें, पाठीमागें निंदा करणें.

Băck'bīter, *n.* (बॅ'क्-बायटर्)—one that slanders, a calumniator of the absent. चहाडखोर, पाठीमागें निंदा करणारा.

Băck'-blŏcks, *n.* (बॅ'क्-ब्लॉक्स्)—furthermost fringe of settlement. वसाहतींतील अत्यंत दूरचा कडेचा भाग.

Băck'board, *n.* (बॅ'क्-बोर्ड्)—a board for the back, a board strapped across child's back to straiten it. पाठ सरळ व्हावी म्हणून पाठीला बांधण्याची फळी.

Băck'bōne, *n.* (बॅ'क्-बोन्)—spine, main support; firmness of character. पाठीचा कणा; मुख्य आधारस्तंभ; स्वभावस्थैर्य. To the *backbone*=thoroughly. पूर्णपणें, हाडामाशीं.

Băckdoor', (-ōr, बॅक्-डो'अर्)—door at the back of house, a private passage. मागलें दार, मागीलदार, खासगी रस्ता.

Băck'er, *n.* (बॅ'कर्)—one who bets. पैज मारणारा.

Băckgămm'on, *n.* (बॅक्-गॅ'मन्)—a game on *double board with draughts and dice.* सोंगट्यांचे खेळासारखा एक प्रकारचा खेळ.

Băck'ground, *n.* (बॅ'क्-ग्राउन्ड्)—back part of scene; obscurity, retirement, a state of being out of view. चित्रांतील मागची जागा; अप्रसिद्धि.

Băck'hand, Băck-hăn'ded, *aa.* (बॅ'क्-हॅन्ड्, बॅक्-हॅ'न्डेड्)—delivered with back of hand; indirect; sloping back or to the left. हाताच्या पाठीनें दिलेला (ठोसा); अप्रत्यक्ष, वरकरणी; तिरकस, तिरपा.

Băck-hăn'der, *n.* (बॅक्-हॅ'न्डर्)—a blow delivered with back of hand; indirect attack. हाताच्या पाठीनें दिलेला ठोसा; न कळत किंवा कपटाचा हल्ला.

Băck'ing, *n.* (बॅ'किंग्)—support; succour. आश्रय, आधार; साहाय्य, मदत.

Băckslīde', *v. i.* ( बॅक्-स्लाइड्)—relapse into sin or disbelief. धर्मभ्रष्ट होणें, पतित होणें, सन्मार्ग सोडणें.

Băck'slīder, *n.* ( बॅक्-स्लाइडर् )—an apostate. धर्मभ्रष्ट, पतित.

Băckstairs', *n. plu.* ( बॅक्-स्टे'अर्झ् )—stairs in the back part of a house, private stairs. मागला जिना, खासगी जिना. *a.* secret, underhand. गुप्त, लपूनछपूनचा, आडमार्गाचा.

Băck'stitch, *v. t.* ( बॅक्-स्टिच् )—sew with overlapping stitches. एकमेकाला लागून टांके चालून शिवणें. *n.* a stitch sewn in this way. एकमेकाला लागून घातलेला टांका.

Băck'sword, *n.* ( बॅ'क्-सोर्ड् )—one-edged sword; singlestick. एकधारी तरवार; दांडपट्टा.

Băck'veld (t), *n.* ( बॅ'क्-व्हेल्ट् )—remoter parts of the veld or velt. दक्षिण आफ्रिकेंतील अरण्यरहित प्रदेशांतील अत्यंत दूरचा भाग.

Băck'ward, *adv.* ( बॅ'क्-वर्ड् )—back foremost; reverse way. मागें; उलटा. ( Also, Băck'wards ) *a.* slow in learning, behind in progress. अभ्यासांत मागें पडलेला, मागासलेला. Backward and forward=to and fro. उलटासुलटा, पुढेंमागें; धरसोडपणाचा.

Băck'water, *n.* ( बॅक्-वॉटर् )—still water beside stream and fed by its back flow. नदीच्या प्रवाहाजवळचें सांठलेलें संथ पाणी, कोंडून ठेवलेलें पाणी, धरणाचें पाणी.

Băck'wŏŏds, *n. pl.* ( बॅ'क्-वुड्झ् )—outlying woody or forest districts of a country. देशाच्या बाहेरील अरण्यमय प्रदेश.

Băck'wŏŏdsman, *n.* ( बॅ'क्-वुड्झमन् )—a settler in backwoods. दूर अंतरावर असलेल्या प्रदेशांतील रहिवासी.

Bā'con, *n.* ( बे'कन् )—cured back and sides of a pig. मीठ घालून वाळविलेलें डुकराचें मांस.

Băctēr'ĭal, *a.* ( बॅक्टी'रिअल् )—pertaining to bacterium. सूक्ष्म जंतू असलेला.

Băctērĭŏl'ogy̆, *n.* ( बॅक्टीरिऑ'लॉजि )—the doctrine or study of bacteria. सूक्ष्मजंतुशास्त्र. Bacteriol'ogist, *n.* सूक्ष्मजंतुशास्त्रवेत्ता.

Băctēr'ĭŭm, *n.* ( *pl.* Băctē'rĭă ) ( बॅक्-टी'रिअम् )—microscopic rod-shaped vegetable organism found in decomposing liquids. एकपेशीमय अत्यंत सूक्ष्म जंतु.

Băd, *a.* ( बॅड् )—worthless, defective, inefficient, not valid; wicked; corrupt; injurious; painful; ill. वाईट, खराब; दुष्ट; ओंगळ; नुकसानकारक; दुःखदायक; आजारी. To make bad worse=कांस्याचा नायटा करणें, जास्त घोटाळा करणें. He is gone to the bad=तो भिकेस लागला आहे; त्याचें वर्तन बिघडलें आहे. Bad coin=खोटें नाणें. Bad debts=debts that are not recoverable. बुडीत कर्ज. Bad faith=कपट, लबाडी. To go bad=to decay. कुजणें. With bad grace=reluctantly. नाखुशीनें. Bad shot=wrong guess. चुकीचा तर्क. Bad blood=ill-feeling. वितुष्ट, वैमनस्य. Bad turn=उलटा फेरा. On bad terms=वितुष्ट भावानें. To be in a bad humour=तब्यत न लागणें. To be in bad temper=रागावलेला असणें. To have a bad time of it=कठीण दिवस येणें, दिवस फिरणें. To put a bad construction upon=भलताच विपरीत अर्थ करणें To view in a bad light=दोषदृष्टीनें पाहणें.

Bad, Bade, *p. t.* ( बॅड् )—[ Bid या धातूचा भूतकाळ ] हुकूम केला, आज्ञा केली.

Bădge, *n.* ( बॅज् )—thing worn as a mark, sign or token. पट्टा, निशाणी, चिन्ह, बिल्ला.

Bădg'er, *n.* ( बॅ'जर् )—a hawker ( esp. of provisions ); a quadruped between weasel and bear (living in a burrow, nocturnal in habits and feeding on vegetables and small quadrupeds); fishing-fly and painting brush ( made of the hair of badger). फेरीनें माल विकणारा, फेरीवाला; जमिनींत बीळ करून राहणारें, रात्रीं फिरणारें व भाजीपाला किंवा इतर लहान प्राणी खाऊन राहणारें कोल्ह्याएवढें एक चतुष्पाद जनावर; बॅजर जनावराच्या केंसाचा कुंचला. *v. t.* bait, pester, worry, persecute. हाल हाल करणें, छळणें, जीव खाणें. Badger-baiting, badger-drawing=setting dogs to draw badger from its burrow or a cask. बॅजर नांवाच्या जनावराला बिळांतून हुसकावून लावण्याकरितां कुत्रे सोडण्याचा खेळ. Badger-legged=*with legs of unequal length.* उंच सखल पायांचा.

Băd'ly, *adv.* ( बॅ'ड्लि )—defectively, unsuccessfully; to a serious extent; cruelly, dangerously; very much ( *e. g.* want a thing *badly* ). अपूर्णपणें, अयशस्वी रीतीनें; अतिशय; निष्ठुरपणानें, भयंकर; निकडीनें.

Băd'mĭnton, *n.* ( बॅ'ड्-मिन्टन् )—game with nest, rackets and shuttlecocks. एक प्रकारचा खेळ, पिच्छकंदुक खेळ.

Băd'nĕss, *n.* ( बॅ'ड्-नेस् )—being bad; evil; want of good qualities. वाईटपणा; वाईट गोष्ट; चांगल्या गुणांचा अभाव.

Băf'fle, *v. t.* ( बॅ'फल् )—foil, frustrate, defeat, thwart; perplex. निष्फळ करणें; गोंधळून सोडणें.

Băf'fling, *a.* ( बॅ'फ्-लिंग् )—peprlexing, bewildering. गोंधळविणारा.

way. अतिशय उत्तम रीतीनें. ( Superlative of *good* or *well* ) *The best part*, most. पुष्कळसा भाग. *Had best*, would find it wisest to. चांगलें झालें असतें. *Best man*, bridegroom's supporter. नवऱ्याचा पाठराखा, टोकणा. *To put best leg* or *foot foremost*, to go at full pace. भरधांव ( जलद् गतीनें ) जाणें. *Bad is the best*, no good event possible. चांगली गोष्ट अशक्य. *To do one's best*, to do all one can. पराकाष्ठा किंवा शिकस्त करणें. *To have the best of it*, to win in argument, etc. वाद्‌विवादांत वगैरे जिंकणें. *To make the best of things*, to be contented. संतुष्ट असणें. *To make the best of one's way*, to go as fast as possible. होतां होईल तों लवकर जाणें. *At best*, on the most hopeful view. होईल तितक्या उत्तम तऱ्हेनें, फार फार झालें तर. *Did it for the best*, did it with good intentions. ती गोष्ट सद्धेतूनें ( चांगल्याकरितां ) केली. *To the best of one's power etc.*, as far as one's power etc. allows. यथाशक्ति, शक्त्यनुसार. *The best is the enemy of the good*, too high standard bars progress. अत्युच्च प्रमाण हें प्रगतीच्या आड येतें. *v. t.* ( colloq. ) get the better of, worst. ०च्या वर ताण करणें.

Bĕstead', *v. t. & i.* ( -ĕd, बिस्टें'ड् )—to avail, help. मदत करणें, फायदेशीर होणें.

Bĕstĕd', *p. p.* (with *ill, hard, sore,* etc.) (बिस्टेड्)—situated, circumstanced, pressed. ( वाईट किंवा कठीण ) परिस्थितींत सांपडलेला.

Bĕs'tĭal, *a.* ( बे'स्टि-अल् )—beastly, of beasts; brutish, barbarous; depraved, lustful, obscene. जनावरांसंबंधीं; पशुतुल्य, क्रूर; निंद्य, दुष्ट, अश्लील. Bes'tially, *adv.*

Bĕstĭăl'ity, *n.* ( बेस्टिॲ'-लिटि )—beastliness. पशुपणा, पशुतुल्य वर्तन.

Bes'tialīze, *v. t.* ( बे'स्टिअलाइझ् )—to make bestial or like a beast, to brutalize. पशूसारखें करणें किंवा वागविणें.

Bĕs'tĭary̆, *n.* ( बे'स्टिअरि )—one of those books written in the middle ages treating fancifully of the qualities of beasts. मध्ययुगांत लिहिलेला कल्पित किंवा खऱ्या प्राण्यांचा इतिहास.

Bĕstir', *v. refl.* ( बि-स्टर्'र् )—exert, rouse oneself. स्वतः खटपट करणें.

Bĕstow', *v. t.* (बि-स्टो')—confer as gift; deposit. समर्पण करणें, दान करणें; सांठवणें, सांठा करणें.

Bĕstow'al, *n.* ( बिस्टो'अल् )—act of bestowing, disposal. देणें, दान करणें, समर्पण. ( Also, Bestow'ment, *n.* )

Bĕstrew', *v. t.* ( -rōō, बि-स्ट्रू' )—strew; lie scattered over. चहूंकडे पातळ पसरणें; पेरणें, विखरणें.

Bĕstrīde', *v. t.* ( बि-स्ट्रा'इड् )—sit astride on ( horse, chair, etc. ), stand astride over. दोन बाजूंना पाय टाकून बसणें किंवा उभा राहणें. ( *past t.* Bestrōde; *p.p.* Bĕstrĭdden, Bestrĭd, Bĕstrōde )

Bĕt, *v. i. & t.* ( बेट् )—risk one's money etc. against another's on the result of a doubtful event. पैज मारणें, प्रतिज्ञा करणें. *n.* a wager. पैज, पण, प्रतिज्ञा. *You bet*, you may take it as certain. निश्चित समज. *A betting-book*, a book for entering bets in. पैजा नोंदण्याचें पुस्तक.

Bĕtake', *v. refl.* (बि-टे'क् )—to go to; to have recourse to, to resort. आश्रयाकरितां जाणें; अवलंब करणें. *To betake oneself to*, to try some course or means; to go to a place or person. अमुक एक मार्ग अवलंबणें; आश्रय घेणें. ( *past t.* Betook, *p. p.* Betaken )

Bē'tel, *n.* ( बी'टल् )—leaf of a plant chewed with areca nut. नागवेल, पानवेल, विड्याचें पान.

Bē'tel-nŭt, *n.* ( बी'टल्-नट् )—areca nut. सुपारी, पोफळ.

Bĕth'el, *n.* ( बे'थेल् )—hallowed spot; a place of worship. पवित्र ठिकाण; पूजास्थान.

Bethĭnk', *v. refl.* ( बि-थिं'क् )—reflect, stop to think, take into one's head *to*. विचार करणें, मनन करणें, लक्षांत आणणें.

Bĕtīde', *v. i. & t.* (बि-टा'इड्)—happen, happen to; befall. घडणें, गुदरणें, प्राप्त होणें; ०वर बेतणें.

Bĕtīmes', *adv.* ( -mz, बि-टा'इम्झ् )—early in ( day, year, life, etc. ), in good time, seasonably. लवकर, वेळेवर, उशीर न होतां, योग्य वेळीं.

Bĕtō'ken, *v. t.* ( बि-टो'कन् )—augur, indicate, suggest, be a sign of. दर्शविणें, सुचवणें, भासवणें.

Bĕtray', *v. t.* ( बि-ट्रे' )—give up or reveal treacherously (person or thing *to* enemy), be disloyal to; reveal involuntarily. विश्वासघात करणें, गळा कापणें; नाखुषीनें उघड करणें, प्रगट करणें.

Bĕtray'al, *n.* ( बि-ट्रे'अल् )—a breach of trust, an act of treachery. विश्वासघात.

Bĕtrōth', *v. t.* ( -dh, बिट्रो'द् )—bind with promise to marry, pledge to marriage. लग्नाबद्दल वचनबद्ध होणें. ( Usu. in *p. p.* )

Bĕtrōth'al, *n.* ( बिट्रो'दल् )—mutual promise or contract of marriage. लग्न करण्याबद्दल परस्परवचन, वाङ्‌निश्चय.

Bĕtt'er, *a.* ( बे'टर् )—(compar. of *good* or *well*) having good qualities in a higher degree. अधिक चांगला. *n.* more skilful person. अधिक

कुशल मनुष्य. *pl.* persons of higher rank. वरिष्ठ दर्जाचे लोक. *adv.* in a better degree. जास्त बरें, जास्त चांगल्या तऱ्हेनें. *No better than*, practically. वस्तुतः, खरोखरी, व्यवहारांत. *One's better feelings*, higher self. स्वतःचा अधिक मोठेपणा. *Better part*, most. बहुतेक. One's *better half*, wife. पत्नी. *For better for worse*, on terms of accepting all results. बरें होवो वा वाईट होवो तरी, कोणत्याहि परिस्थितींत. *Had better*, would find it wiser to. अधिक बरें झालें असतें. *To be better* or *to get better*, to be less unwell. प्रकृति सुधारणें, आजार कमी होणें. *Better than one's word*, more liberal than one promised to be. कबूल केल्यापेक्षां अधिक उदार. *To get the better of*, to defeat, to outwit. पराजय करणें, वर्चस्व मिळविणें. *To think better of it*, to change one's mind. चांगला विचार करून मत बदलणें, गुणदृष्टीनें पाहणें. *Better off*, richer, more comfortable. चांगला श्रीमंत किंवा सुखी. *v. t. & i. improve*, improve upon, surpass. सुधारणें, बरा होणें, मागें टाकणें, सरशी करणें. *To better oneself*, to get better situation (wages, etc.). एकंदर स्थिति सुधारणें.

Bet'ter, Bĕt'tor, *n.* (बें'टर्)—one who bets, पैज लावणारा, जुगारी.

Bĕtt'erment, *n.* ( बें'टर्-मेन्ट् )—making better, improvement. सुधारणा.

Bĕtween', *prep.* (बिट्-वीं'न् )—in or into a space or interval. दोन वस्तूंच्या किंवा स्थळांच्या मध्यें, दरम्यान. *Between ourselves, between you and me*, confined to us both. तुझ्या माझ्यांत, फक्त तुला व मला ठाऊक. *Far between*, at wide intervals. पुष्कळ अंतरानें असणाऱ्या, आशा पूर्ण निष्फळ झालेला. *A between-maid*, a servant assisting two others (e. g. a cook and a house-maid). दुसऱ्या दोन व्यक्तींना मदत करणारा नोकर. *Between wind and water*, at a vulnerable point. मर्मस्थानीं, वर्मी. *Between devil and deep sea*, with no escape. पळून जाण्याला मार्ग नसलेला. *Betwixt and between*, half-and-half. मध्यम स्थितींत (धड उत्तम नाहीं, धड वाईट नाहीं). *To stand between*, to mediate, be protector. मध्यस्ती करणें, रक्षक असणें. *Betweenwhiles*, *prep.* in the intervals. मधून मधून, कधीं कधीं.

Bĕtwixt', *prep. & adv.* (बि-ट्विं'क्स्ट्)—between. दोहोंमध्यें.

Bĕv'el, *n.* ( बें'व्हल् )—a tool for forming or taking angles; sloping edge or surface. कोन काढण्याचें यंत्र, विषमकोन; उतरती कडा किंवा पृष्ठभाग. *v. t. & i.* to slant or incline off to a bevel edge; to have other than a right angle. काटकोनांत नसणें, झुकता असणें; काटकोनाशिवाय दुसरा कोणताहि कोन असणें. *Bevel-edge*, edge as in a chisel. उताराची किंवा तिरकस धार. *Bevel-gear*, working one shaft from another as an angle to it by bevel wheels. दोन तिरकस दांत्यांच्या चक्रांची रचना. *Bevel-wheel*, a toothed wheel with the teeth cut to a bevel. तिरकस दांत्यांचें चाक.

Bĕv'erage, *n.* ( बें'व्ह-रिज् )—liquor for drinking. मादक पेय, पिण्याची दारू.

Bĕv'y̆, *n.* (बें'व्हि)—a company (of ladies, roes, quails, larks). झुंड, समुदाय, घोळका.

Bĕwail', *v. t. & i.* (बि-वें'ल्)—wail over, mourn for. शोक करणें.

Bĕware', *v. i. & t.* (बि-वे'अर्)—take heed, be on one's guard. सावध असणें, जपणें, संभाळून असणें. (This verb is not inflected.)

Bĕwĭl'der, *v. t.* (बि-विं'ल्डर्)—confound, perplex, confuse, lead astray. गोंधळणें, घाबरवणें, भांबावणें. Bewilderingly, *adv.*

Bĕwĭl'derment, *n.* (बिविं'ल्डर्-मेन्ट्)—confusion of mind, perplexity. बावरणें, चित्तवैकल्य, गोंधळ.

Bĕwĭtch', *v. t.* (बि-विं'च्)—affect by magic, cast magic spell on; delight exceedingly. जादूटोणा करणें, भारणें, मोहनी घालणें; आनंद देणें.

Bewĭtch'ing, *a.* ( बिविं'चिंग् )—fascinating, captivating, enchanting. मोहक, चित्तवेधक, भारण्यासारखा. Bewitch'ingly, *adv.*

Bĕwĭtch'ment, *n.* ( बिविं'च्-मेन्ट् )—power of bewitching or charming, fascination. मोहिनी, भुरळ, भूल.

Bĕwray', *v. t.* (bĭrā, बि-रें')—to reveal or disclose perfidiously, betray. विश्वासघातानें दर्शविणें, उघड करणें.

Bey, *n.* (bā, बे)—Turkish governor. तुर्कस्तानांतील गव्हर्नर, तुर्की सुभेदार.

Bēyŏnd', *adv. & prep.* (बि-यॉं'न्ड्)—at or to the farther side, further on; besides, more than; except. पलीकडे; अधिक, पुढें; शिवाय. *Beyond measure*, exceedingly. प्रमाणाबाहेर, अतिशय. *The beyond*, the future life, the unknown. भविष्यकाळ, अगम्य. *The back of beyond*, the remotest corner of the world. जगांतील अतिशय लांबचें स्थळ.

Be'zel, *n.* (बें'झल्)—sloped edge (of chisel, etc.); oblique faces of cut gem; groove holding watch-glass or gem. तासणीच्या पानाची निमुळती धार; कापलेल्या रत्नाचा तिरकस बाह्य भाग; कांच बसवण्याची खांचदार कडी.

Bézique', *n.* ( -ēk, बिझीं'क् )—a card-game. एक पत्त्यांचा खेळ, बिझिक खेळ.

Bī'as, *n.* ( बा'यस् )—predisposition, prejudice; oblique direction; a weight on the side of a bowl which turns it from a straight line ( in the game of bowls ). मनाचा कल, वाईट ग्रह; वांक, वळण; ( पेल्यांच्या खेळांत पेल्याच्या ) एका बाजूला ठेवलेलें वजन ( ज्या वजनानें पेल्यांची गति सरळ रेषेपासून कलती होते ). *v. t.* to incline to one side, to give a bias to; to prejudice. वळविणें, झोंक किंवा कल देणें; एकाच बाजूला मनाची प्रवृत्ति करणें, पक्षपात करणें. ( *Past p.* biased, biassed, बा'यस्ट् )

Bĭb, *v. i. & t.* ( बिब् )—to sip, tipple, drink frequently. चाखणें, घुटका घेणें, वारंवार पिणें. *n.* a child's chin-cloth to keep dress-front clean; apron-top. लहान मुलांचें लाळेरें; मल-वस्त्राचा वरील भाग. *Best bib & tucker*, best clothes. उत्तम कपडे. Bĭb'ber, *n.* one who drinks frequently. वारंवार मद्य पिणारा.

Bī'ble, *n.* ( बा'यू-बल् )—Old and New Testament. खिस्ती धर्मपुस्तक, बायबल ( जुना व नवा करार ).

Bĭb'lical, *a.* ( बि'ब्-लि-कल् )—of or concerning the Bible, contained in the Bible. बायबलचें, बायबलासंबंधीं, बायबलमध्यें असलेलें.

Bĭbliog'rapher, *n.* ( बिब्लिऑ'ग्रफर् )—one who writes about books. ग्रंथकोशकार.

Bĭbliŏg'raphy, *n.* ( बिब्लि-ऑ'ग्रफि )—history of books ( their editions, etc.); list of books. पुस्तकें त्यांच्या आवृत्त्या वगैरेंचा इतिहास; पुस्तकांची यादी. Bibliog'raphic, -al, *aa.*

Bĭbliŏl'ater, *n.* ( बिब्लिऑ'लॅटर् )—a worshipper of books. पुस्तकांची पूजा करणारा, ग्रंथपूजक. [ Gr. *biblos*, a book and *logos*, discourse ]

Bĭbliŏl'atry, *n.* ( बिब्लिऑ'लॅट्रि )—worship paid to books; excessive reverence for any book ( esp. the Scriptures ). पुस्तकांना दिलेला मान; कोणत्याहि पुस्तकाबद्दल अत्यादर. Bibliol'atrous, *adj.*

Bĭblĭomā'nia, *n.* ( बिब्लिऑमे'निआ )—a rage for collecting rare and curious books. दुर्मिळ किंवा अपूर्व पुस्तकें जमविण्याचा शोख, ग्रंथसंग्रहाचें व्यसन. [ Gr. *biblos*, a book and *mania*, madness ]

Bĭblĭomā'niac, *n.* ( बिब्लिऑमे'निॲक् )—a great book-collector. मोठा ग्रंथसंग्राहक.

Bĭb'lĭophile, *n.* ( बि'ब्लिऑफाइल् )—a book-lover. पुस्तकप्रेमी, पुस्तकांचा छंद असणारा. [ Gr. *biblos*, a book & *philos*, friend ]

Bĭb'lĭopōle, *n.* ( बि'ब्लिऑपोल् )—a seller of ( esp. rare ) books. ( विशेषतः दुर्मिळ ) पुस्तकें विकणारा. [ Gr. *biblos*, & *polein*, to sell ]

Bĭblĭŏp'olў, *n.* ( बिब्लिऑ'पॉलि )—selling of books. पुस्तकें विकणें.

Bĭb'ūlous, *a.* ( बि'ब्यूलस् )—absorbent; addicted to drink. शोषक, स्पंजासारखा; मद्य पिणारा.

Bīcam'eral, *a.* ( बायू-कॅ'मेरल् )—with two ( legislative ) chambers. कायदे करणाऱ्या दोन सभा असलेला. [ *Bi*+L. *camera*, chamber ]

Bīcärb'onate, *n.* ( बायू-का'र्बनेट् )—carbonate containing a double amount of the acid. दुप्पट ॲसिड असलेला कार्बनेट.

Bīce, *n.* ( बाइस् )—a dull blue or green pigment. फिकट निळ्या किंवा हिरव्या रंगाची पूड.

Bīcĕntē'nary, *a.* ( बायू-सेन्टी'नरि )—pertaining to two hundred years. दोनशें वर्षांचा. *n.* two hundredth anniversary or its celebration. द्विशतसांवत्सरिक उत्सव. [ L. *bis*, twice & *centum*, a hundred ]

Bīcĕnte'nnĭal, *a.* ( बायू-सेंटे'निअल् )—lasting or occurring every two hundred years. द्विशतवार्षिक, द्विशतसांवत्सरिक.

Bīcĕph'alus, *a.* ( बायू-से'फॅलस् )—two-headed. दोन डोक्यांचा. [ Bi + Gr. *kephale*, Sk. कपाल the head ]

Bī'cĕps, *n.* ( बा'यू-सेप्स्, *pl.* bīcepses)—a muscle having two heads or double attachment. द्विशिरस्स्नायु. [ Bi+*caputa*, head ]

Bĭck'er, *v. i.* ( बि'कर् )—quarrel, wrangle; (of stream, rain, etc.) brawl, patter; flash, glitter. भांडणें, तंटा करणें; खळखळ वाहणें; झुळझुळ हालणें.

Bĭck'ering, *n.* ( बि'करिंग् )—wrangling, quarrelling. भांडण, तंटा.

Bīcŭs'pĭd, *a.* ( बायू-क'स्पिड् )—two-cusped, ( tooth ) with two cusps or points. दोन टोकें असलेला, द्व्यग्र, द्विस्कंध ( उपदाढ ). [ Bi + L. *cuspis*, point ]

Bī'cўcle, *n.* ( बा'यू-सि-कल् )—two-wheeled velocipede or vehicle. दोन चाकांची गाडी, बायसिकल. *v. i.* ride on bicycle. बायसिकलवर बसणें. Bi'cyclist, *n.* सायकलवर बसणारा. [ Bi+Gr. *kuklos*, a wheel ]

Bĭd, *v. t. & i* ( बिड् )—command; invite; offer price. आज्ञा करणें; बोलावणें; ( लिलांवांत ) किंमत सांगणें. ( *Past t.* bad, băde—बॅड्, bid; *p.p.* bidden, bid. ) *n.* offer of price. देऊं केलेली किंमत, मागणी. *To bid defiance to* =धमकी देणें, सामन्यास बोलावणें. *To bid fair to do*, to show promise of doing. संभवनीय दिसणें, करण्याचा संभव दाखवणें. *To make a bid for*, to make an attempt to secure ( favour, prize, etc. ). मिळवण्याचा प्रयत्न करणें. *Bidding-prayer*, a prayer inviting

congregation to join. सर्वांनीं विशेष मागणी करण्याची प्रार्थना. *To bid adieu ( goodbye, farewell ) to*=जातांना निरोप घेणें.

Bĭdd'able, *a.* ( बिडेबल् )—ready to do what one bids, obedient, docile. आज्ञाधारक, सांगेल तें करणारा.

Bĭ'dder, *n.* ( बिंडर् )—one who bids; one who offers a price at an auction. हुकुम करणारा; लिलांवांत किंमत बोलणारा.

Bĭd'derў, *Bid'ree, n.* ( बिंडरि, बिंड्री )—an alloy of copper, tin, lead and zinc. तांबें, कथील, शिसें आणि जस्त यांचें मिश्रण.

Bidd'ĭng, *n.* ( बिंडिंग् )—invitation; order, injunction, command; offers at an auction. आमंत्रण, बोलावणें; आज्ञा, हुकूम; लिलांवांत किंमत बोलणें.

Bīde, *v. t. & i.* ( बाइड् )—abide. वस्ती करणें, राहाणें. *To bide one's time*, to await best opportunity. उत्तम संधीची वाट पाहणें.

Bīenn'ial, *a.* ( बाय्-एं-नि-अल् )—two year long, two-yearly, taking place once in two years. द्विवार्षिक, दोन वर्षांत एकदां घडणारा.

Bier, *n.* ( बिअर् )—stand on which coffin or corpse is taken to the grave. तिरडी, ताटी.

Biff, *n.* ( बिफ् )—a smart blow. एक जोराचा ठोसा. *v. t.* to strike (person). एकाद्याला मारणें.

Biff'in, *n.* ( बिंफिन् )—a red cooking apple. एक जातीचें लाल फळ.

Bī'fid, *a.* ( बांय्-फिड् )—divided by a deep cleft into two parts. द्विधा विभागलेलें.

Bī'fōliate, *a.* ( बांय्-फो-लि-एट् )—of two leaves. दोनच लहान पानें असलेलें, द्विदल. [ Bi+L. *folium*, a leaf ]

Bī'fūrcāte, *v. t. & i.* ( बांय्-फर्-केट् )—divide into two branches, fork. दोन शाखा करणें. *a.* forked. दुखांद्याचा, बेळक्याचा. Bifurca'-tion, *n.* विभक्तीकरण.

Bĭg, *a.* ( बिग् )—large, of the largest kind, grown up; pregnant; important; boastful. मोठा; गरोदर; महत्त्वाचा; मगरूर, घमेंडखोर. *A big bug, a big wig*, an important person. वडें प्रस्थ. *To get ( or grow ) too big for one's boots*, ( Sl. ) to become conceited, to put on airs. चढेल बनणें, शिटावणें. *To look big*, to look boastfully. दिमाख करणें, दुसऱ्याला तुच्छ लेखणें. *To talk big* ( i. e. boastfully )= बढाई मारणें, बढाइकी मारून दहशत घालणें.

Bĭg'amist, *n.* ( बिंगमिस्ट् )—one who has married two husbands or two wives at a time. एकाच वेळीं असलेल्या दोन नवऱ्यांची बायको किंवा दोन बायकांचा नवरा.

Bĭ'gamous, *a.* ( बिंगमस् )—guilty of or involving bigamy. द्विभार्याकरणाचा, द्विभर्तृकरणाचा.

Bĭg'amў, *n.* ( बिंग-मि )—having two wives or husbands at once. एकाच वेळीं दोन बायका किंवा दोन नवरे असणें. [Bi+Gr. *gamos*, marriage]

Bight, *n.* ( bit, बाइट् )—a loop of rope; a recess of coast, small bay. अढी, दोरीचें वेटोळें; उपसागर.

Bĭg'ot, *n.* ( बिंगट् )—violent and unreasonable adherent of a creed or view. धर्मवेडा, धर्मवेड असलेला, कट्टा उपासक, हेकेखोर.

Bĭ'goted, *a.* ( बिंगटेड् )—having the character of a bigot; blindly attached to some creed ( opinion, practice, or ritual ). धर्मवेडा, धर्मवेड असलेला; स्वमताग्रही, एककल्ली.

Bĭg'otrў, *n.* ( बिंगट्रि )—great prejudice. स्वमताचा फाजील अभिमान, धर्मवेड, दुराग्रह.

Bĭ'jou, *n.* ( bē'zhōō, बींझू )—a jewel, trinket. एक रत्न, विशेष कारागिरीचा दागिना. ( *Pl.* bijoux—बींझू ) *a.* small and elegant. लहान आणि सुंदर.

Bijou'terie, *n.* ( बिझूंटरी )—jewelry. नकशीचे जवाहीर किंवा दागिने.

Bīke, *n. & v. i.* ( बाइक् )—( colloq. ) bicycle. बायसिकल, बायसिकलवर बसणें.

Bīlăt'eral, *a.* ( बाय्-लॅटरल् )—of ( on or with ) two sides, between two parties. दोन बाजू असलेला, दोन बाजूंमधील. [ Bi+L. *latus, lateris*, side ]

Bĭl'berrў, *n.* ( बिंल्-बेरि )—a shrub with a deep-blue edible fruit, whortleberry. एक निळेंभोर खाण्यासारखें फळ असलेलें लहान झाड, त्या झाडाचें फळ.

Bĭl'bō, *n.* ( बिंल्बो )—a rapier, a sword. एक लहान तलवार. ( *pl.* bilbos )

Bĭl'boes, *n. pl.* ( ōz, बिंल्बोझ् )—an iron bar with sliding shackles for prisoners. कैद्यांच्या हातांत किंवा पायांत घालण्याच्या खोड्या-सारख्या बिड्या.

Bīle, *n.* ( बाइल् )—bitter fluid secreted by liver to aid digestion; derangement of bile; peevishness. पित्त; पित्तांत बिघाड; तिरसटपणा, चिडखोरपणा. *Bile-stone*, calculus in gall-bladder. पित्तातिशयानें झालेला मुतखडा.

Bĭlge, *n.* ( बिल्ज् )—the nearly horizontal part of a ship's bottom; the belly of a barrel. गलबताचें पोट, गमतड; पिंपाचें पोट *Bilge-keel*, timber fastened under bilge to prevent rolling. इकडे तिकडे हालूं नये म्हणून गमतडीच्या खालीं बसविलेलें लांकूड. *Bilge-water*, stinking water collected in bilge. गमतडींत सांठलेलें घाणेरडें पाणी, घमत. *v. t. & i.* to stave in

the bilge of, to spring a leak in the bilge or bottom; bulge, swell out. गावडें पडणें, घमत करणें; फुगारा येणें.

Bil'iary̆, *a.* ( बि'ल्यरि )—of the bile. पित्ताचा, पित्तासंबंधीं.

Biling'ual, *a.* ( बाय्-लिं'ग्वल् )—( of, in, or ) speaking two languages. दोन भाषेंतील, दोन भाषा बोलणारा.

Bil'ious, *a.* ( बि'ल्यस् )—liable to or affected by derangement of the bile; peevish. पित्तकर, पित्तक्षोभी, पित्तासंबंधीं; चिडखोर, तापट. Bil'iousness, *n.*

Bilk, *v. t.* ( बिल्क् )—evade payment; cheat, give the slip to. पैसे देण्याचें टाळणें; फसविणें, हातावर तुरी देणें.

Bill, *n.* ( बिल् )—the beak( of a bird ); narrow promontory; a draft of proposed Act of Parliament; a note of charges for goods ( work done, etc ); a halberd; an edged pruning-instrument ( also, bill-hook ); the point of anchor-fluke; ( Law ) the written statement of a case; a bill of indictment; promissory note; poster. चोंच; अरुंद भूशिर; कायद्याचा मसुदा; विकलेल्या जिनसांची यादी, आंकडा; लढाईंत वापरण्यासारखा परशु; कुरंदी, आंकडी असलेला मोठा कोयता; नांगराच्या पावक्याचें टोंक; फिर्यादीचें लेखी म्हणणें, वादीचा अर्ज, अपराधलेख; (कोर्टांतील पंचांला सादर केलेली) लेखी तोहमत; पैसे घेतल्याबद्दल वचनचिठ्ठी, रोखा; ( ढळढळीत अक्षरांची ) मोठी जाहिरात. *v. t.* to stroke bill with bill ( of doves ). चोंचीला चोंच लावणें. *To bill and coo*, to exchange caresses. लडिवाळपणानें परस्परांना गोंजारणें. *v. t.* announce on poster; plaster with bills. मोठी जाहिरात लावून जाहिर करणें; मोठ्या जाहिराती लावणें. *A bill of exchange*, a written order by drawer to drawee to pay a sum on a given date to drawer or to named payee. (ज्यांत बहुतकरून मुदत ठरलेली असते अशी) अदलाबदल करतां येणारी हुंडी. *A bill of fare*, a list of dishes to be served, menu; ( fig. ) programme. जेवणाचे पदार्थांची यादी; कार्यक्रम. *A bill of health*, a certificate regarding infectious disease on ship or in port at the time of sailing. गलबत निघण्याचे वेळीं किंवा बंदरांत कोणत्याहि प्रकारचा सांसर्गिक रोग नव्हता अशा बद्दलचा योग्य अधिकाऱ्याकडून मिळालेला दाखला. *A bill of lading*, a ship-master's detailed receipt to consignor. गलबतावरील भरवणाची याद, भरितपत्र. *A bill of sale*, a bill transferring personal property or authorizing its seizure by lender of money if payment is delayed. विक्रीचा करार. [ एखाद्या मनुष्यानें दुसऱ्या इसमापासून कर्ज काढलें असतां त्याला तो आपली जिनगी लिहून देतो व मुदतींत कर्ज परत न केल्यास सावकारास या करारपत्रानें ती जिनगी विकण्याचा हक्क प्राप्त होतो. ] *Bills of mortality*, ( hist. ) weekly return of deaths in London and district. लंडनमधील किंवा जिल्ह्यांतील मृत्युसंख्येची आठवड्याची याद. *Bill-broker*, a dealer in bills of exchange. हुंड्यांचा धंदा करणारा दलाल. *Bill-discounter*, कटमुदतीच्या हुंड्यांचा दलाल. *Bill-head*, printed account form. छापील हिशोबाचा नमुना. *Bill-sticker*, a man who pastes up placards. जाहिराती चिकटविणारा. *Bill of sufferance*, जकात दिल्याशिवाय ह्या त्या इंग्रजी बंदराशीं व्यापार करण्याचा व्यापाऱ्याला दिलेला परवाना.

Bill'et, *n.* ( बि'लिट् )—order requiring a person to board and lodge the soldier bearing it; the place where troops are lodged; destination; appointment, situation; a thick piece of firewood; a small bar of metal; ( Archit. ) a short roll inserted at intervals in hollow moulding. लष्करी शिपायाला राहूं देण्याचा हुकूम; सैन्याची राहण्याची जागा; जाण्याचें ठिकाण; नेमणूक, जागा; जळाऊ लांकडाचा मोठा ओंडा; लगड, कांब; ( बकलांत वगैरे अडकविण्याचा ) चामड्याचा वगैरे गुंडाळलेला तुकडा. *Every bullet has its billet*, every bullet hits only by providential order. प्रत्येक गोळी ईश्वरी हुकुमानेंच लागते.

Billet-doux', *n.* ( bĭlidōō, बि-लि-डू' )—a love-letter. प्रेमपत्र.

Bill'iard-märker, *n.* ( बि'ल्यर्ड-मार्कर् )—one who attends on players at billiards and records the progress of the game. बिलियर्ड खेळांतील डाव नोंदणारा इसम.

Bill'iards, *n.* ( बि'लि-अर्ड्झ् )—a kind of game played with cues and ivory balls on cloth-covered table. एक प्रकारचा टेबलावर खेळण्याचा गोट्यांचा खेळ, बिलियर्ड खेळ.

Bill'ingsgate, *n.* ( -z-, बि'लिंग्झ्-गेट् )—foul language, ribaldry, violent abuse. बीभत्स किंवा हलकट भाषा, जोराची शिवीगाळ.

Bill'ion, *n.* ( बि'लि-अन् )—a million millions. महापद्म.

Bill'ow, *n.* ( बि'लो )—a great wave; ( poet. ) *the* sea. मोठी लाट; समुद्र. *v. i.* to rise or move in billows. मोठी लाट येणें किंवा आदळणें.

Bil'lowy̆, *a.* ( बि'लोइ )—swelling or swelled into large waves. मोठ्या लाटांनीं युक्त.

Bi'lly̆, *n.* ( बि'लि )—a tin can used ( as kettle etc. ) in camping out. तंबूंत वगैरे वापरला जाणारा टिनचा डबा.

Bĭll'ȳcock, *n.* ( बि'लिकॉक् )—a round-crowned hard felt hat, bowler. एक प्रकारची वाटोळी फेल्टची ताठ टोपी.

Bĭll'ȳ-goat, *n.* ( बि'लि-गोट् )—a male goat. बकरा.

Bĭl'tŏng, *n.* ( बि'ल्-टॉंग् )—sun-dried meat in strips. उन्हांत वाळवलेले मांसाचे तुकडे.

Bīmetăll'ic, *a.* ( बाय्-मेटॅ'लिक् )—of using both gold and silver as standard in currency. सोनें व रुपें या दोन जातींचीं नाणीं चालू असलेला ( देश वगैरे ).

Bīmĕt'allĭsm, *n.* ( बाय्-मे'टॅलिझम् )—use of both gold and silver as legal tender at fixed ratio to each other. सोनें व चांदी यांचा चलनी नाण्यांकरितां उपयोग, द्विचलनवाद.

Bīmĕt'ăllĭst, *n.* ( बाय्-मे'टॅलिस्ट् )—one who favours bimetallism. द्विचलनवादी.

Bīmonth'ly, *a.* ( बाय्-मन्थ्-लि )—occurring once in every two months. द्विमासिक, दोन महिन्यांतून एकदां होणारा.

Bĭn, *n.* ( बिन् )—receptacle for corn, ( coal, wine, refuse, etc. ). कणगा, कोथळा, कणंग.

Bī'narȳ, *a.* ( बा'यनरि )—of two, dual. दोहोंचा, दुहेरी, द्विगुण. [ L. *binarius*, two by two ]

Bīnd, *v. t.* ( बाइन्ड् )—tie, fasten, attach together; wreathe; be obligatory on, impose obligation on; ratify ( ba·gain ); fasten ( sheets of book ) into cover. करकचून बांधणें; उपकारबद्ध करून ठेवणें; मंजुर किंवा कायम करणें; ( पुस्तक ) बांधणें.

Bīnd'er, *n.* ( बाइ'न्डर् )—one who binds books; sheaf-binding machine; anything that binds. पुस्तकें बांधणारा; गठ्ठे बांधण्याचें यंत्र; बांधणारा.

Bīnd'erȳ, *n.* ( बाइ'न्डरि )—book-binder's workshop. पुस्तकें बांधण्याचा कारखाना.

Bīnd'ing, *a.* ( बा'इन्डिंग् )—obligatory on. बंधनकारक. *n.* a book-cover; bandage. पुस्तकाचें कव्हर; बांधण्याची पट्टी.

Bī'nd-weed, *n.* ( बा'इन्ड्-वीड् )—kinds of plants of *convolvulus family*. *तडतडीचें झाड, तेड.*

Bīne, *n.* ( बाइन् )—a flexible shoot; stem of climbing plant ( esp. hop ). लवचीक कोम; झाडावर जाणाऱ्या वेलीचा नाजूक दांडा.

Bĭnn'ăcle, *n.* ( बि'नॅ-कल् )—the box of ship's compass. गलबताच्या होकायंत्राची पेटी. ( Also, Bin'acle )

Bī-nŏc'ū-lar, *a.* ( बाय्-नॉ'क्यूलर् )—for two eyes, adapted for both eyes. दोन्ही डोळ्यांच्या कामाचा. *n.* a binocular field or opera glass. नाटक पहाण्यास उपयुक्त असें नाटकी भिंग.

Bīnō'mĭal, *a.* & *n.* ( बाय्-नो'मि-अल् )—(*Algebraic* expression ) consisting of two terms, joined by + or −. दोन पदांचा, + किंवा − या चिन्हांनीं जोडलेल्या दोन पदांची संख्या. *Binomial Theorem*, formula for finding any power of a binomial without multiplying at length. द्विपदसिद्धान्त ( ज्याच्या योगानें हव्या त्या द्विपद संख्येचा हवा तो घात एकदम लिहितां येतो ). [ L. *bis*, Sk. द्वि, twice & *nomen*, Sk. नामन्, a name ]

Bīnŏm'ĭnal, *a.* ( बाय्-नॉ'मिनल् )—of ( or employing ) two names ( esp. those of genus and species ). दोन नांवाचा. ( Also, Binomial )

Bīogĕn'ĕsis, *n.* (बायॉजे'निसिस् )—the hypothesis or doctrine that holds that living matter arises only from living matter. जीवापासूनच जीव उत्पन्न होतो असें मत, जीवाज्जीववाद. [ Gr. *bios*, life, and *genesis*, generation ]

Bīog'rapher, *n.* ( बायॉ'ग्रफर् )—a writer of biography. चरित्रकार, चरित्रलेखक. [ Gr. *bios*, life & *graphein*, to write ]

Bīŏg'raphȳ, *n.* ( बायॉ'ग्रफि )—written life of a person, the history of the life. जीवनचरित्र. Biogra'phical, *a.* चरित्राचा, चरित्रविषयक.

Bīŏlŏg'ĭcal, *a.* ( बायॉलॉ'जिकल् )—pertaining to biology. जीवनशास्त्रासंबंधीं. Biolo'gically, *adv.* [ Gr. *bios*, Sk. जीव, life, & *logos*, a discourse ]

Bīŏ'logĭst, *n.* ( बायॉ'लॉजिस्ट् )—one skilled in or one who studies biology. जीवनशास्त्रवेत्ता.

Bīŏl'ogȳ, *n.* (बायॉ'लॉ-जि)—science of physical life of animals and plants. प्राण्यांचें व वनस्पतींचें जीवनशास्त्र.

Bī'oplasm, *n.* (-zm, बा'यॉप्लॅझम् )—the substance constituting the living matter of the elementary cell in plants and animals; germinal matter. सर्व प्राण्यांचा आद्यघटक; आद्यधातु. [Gr. *bios*, life, and *plasma*, anything formed ]

Bī'oplăst, *n.* ( बा'यॉ-प्लॅस्ट् )—small separate portion of bioplasm. आद्यधातूचा लहानसा निराळा भाग.

Bīpărt'īte, *a.* ( बाय्-पा'र्टाइट् )—divided into two parts, having two correspondent parts; in which two parties are concerned. दुभाग; द्विभाग; ज्यांत दोन बाजू आहेत असा, दोन पक्षांचा. [ L. *bis*, twice & *partitus*, divided ]

Bīpărti'tion, *n.* ( बाय्-पार्टि'शन् )—the act of making or state of being bipartite. ( देंठापर्यंत पानाचें ) दुभाग होणें.

Bī'pĕd, *a.* ( बा'य्-पेड् )—two-footed. दोन पायांचा. *n.* *two-footed animal.* दोन पायांचा प्राणी किंवा जीव.

Bi'plane, *n.* ( बाय्-प्लेन् )—two-planed aeroplane. दोन आधारभूत भाग असलेलें विमान.

Biquadrā'tic, *a.* ( बाय्-क्वॉड्रॅ'टिक् )—of the fourth power. द्विवर्गीय. *n.* the fourth power of a number. चतुर्घात, वर्गाचा वर्ग.

Birch, *n.* ( बर्च् )—a smooth-barked forest tree; a bundle of birch twigs for flogging school-boys. एक गुळगुळीत सालीचें रानटी झाड; शाळेतील मुलांना मारण्याकरितां भूर्जवृक्षाच्या डहाळ्यांची जुडी. *v. t.* to flog with a birch-rod. भोज वृक्षाच्या काठीनें मारणें.

Birch'en, *a.* (ब'र्चेन्)—made of birch, of birch. भोजवृक्षाचा.

Bird, *n.* (बर्ड्)—feathered back-boned animal; (*sl.*) a girl. पक्षि; लहान मुलगी, कुमारिका. *Little bird*, unnamed informant. निनांवी बातमीदार. *Old bird*, a wary person. मागलापुढला विचार करणारा माणूस. *Birds of a feather*, people of a like character. एकाच स्वभावाचे किंवा समान शीलाचे लोक. *A bird in hand*, certainty. निश्चित गोष्ट, निश्चितार्थ. *A bird in bush*, contingency. दैवाधीन गोष्ट, संभव. *Bird is flown*, a prisoner etc. escaped. कैदी वगैरे निसटला. *To kill two birds with one stone*, to gain two ends at once. एका धोंड्यानें दोन पक्षि मारणें, एकाच वेळीं दोन हेतु साधणें. *To give one the bird*, to hiss one. एखाद्याची छीथू करणें, हुर्यो करणें. *To get the bird*, to be hissed. छीथू केली जाणें. *Bird of Jove*, eagle. गरुड. *Bird of Juno*, peacock. मोर. *Bird of paradise*, New Guinea family of birds with beautiful plumage. सुंदर पिसारा असलेले पक्षी. *A bird of passage*, a migratory bird; a sojourner. फिरता पक्षी; एके ठिकाणीं फार वेळ न राहणारा मनुष्य. *A bird of prey*, हिंस्र पक्षी. *A bird-cage*, a cage of bird or birds. पक्ष्यांचा पिंजरा. *A bird-fancier*, one who knows about, collects, breeds or deals in birds. पक्षी पाळण्याचा शोकी, पक्ष्यांचा व्यापार करणारा. *Bird-lime*, a sticky stuff spread on twigs to catch birds. पक्षी पकडण्याकरितां झाडांच्या डहाळ्यांना लावण्याचा एक चिकट पदार्थ. *A bird-seed*, special seeds given to caged birds. पिंजऱ्यांतील पक्ष्यांना घालण्याचें विशेष प्रकारचें बीं. *Bird's-eye*, kinds of plant with small bright round flowers; tobacco in which ribs are cut as well as fibre. लहान सुंदर वाटोळीं फुलें असलेलें लहान झाड; अमेरिकेंतील एक जातीचा तंबाखू. *Bird's-eye view*, a view or landscape shown as it might appear to a flying bird; hence, a rapid and comprehensive view or resume of a subject. विहंगम दृष्टीनें अवलोकन; कोणत्याहि विषयाचें स्थूल अवलोकन. *Bird's nest*, *Bird-nest*, nest of a bird. पाखराचें घरटें. *Bird-nesting*, hunt for nests; (of horse) turning head from side to side. घरट्यांची शिकार; (घोड्याचें) एका बाजूकडून दुसऱ्या बाजूकडे डोकें हालविणें. *Bird's-eye-maple*, wood of the sugar maple. एका झाडाचें लांकूड.

Birett'a, *n.* ( बिरे'टा )—a square cap of the Roman Catholic and other clerics. धर्मोपदेशकाची चौकोनी टोपी, बिरेता.

Birth, *n.* ( बर्थ् )—bringing forth of offspring, being born; origin, beginning; descent, inherited position. जनन, जन्म; मूळ, कुळी. *New birth*, regeneration. पुनर्जनन, पुनरुत्पत्ति, नवजन्म. *Birth-control*, methods of preventing undesired sexual conception. संतति-नियमन, संतति-नियमन पद्धति. *Birth-day*, (anniversary of) the day of one's birth. जन्मदिन, वाढदिवस. *Birth-day suit*, one's skin. स्वतःच्या शरीराची कातडी. He was in his birth-day suit=तो नग्न होता. *Birth-mark*, mark on one's body at or from birth. जन्मखूण. *Birth-place*, the place at which one was born. जन्मस्थान. *Birth-rate*, births per thousand of population. दरहजारीं जननाचें प्रमाण. *Birth-right*, any right or privilege to which a person is entitled by birth; right of primogeniture. जन्मसिद्ध हक्क; ज्येष्ठत्वाचा किंवा वडीलपणाचा हक्क.

Bis, *adv.* ( बिस् )—(in references) in two places; (Mus.) twice, repeat. दोन ठिकाणीं; दोनदां (द्विरुक्तिचिन्ह).

Bis'cuit, *n.* (बि'स्-किट्)—small flat thin cakes. बिस्कीट.

Bisect', *v. t.* ( बाय्-से'क्ट् )—divide into two (*usu.* equal) parts. दोन (समान) भाग करणें. [ L. *bis*, twice & *sectus*, cut ]

Bisec'tion, *n.* ( बाय्-से'क्शन् )—division of any line or quantity into two equal parts. सारखे दोन भाग करणें, द्विधाछेदन.

Bisec'tor, *n.* ( बाय्-से'क्टर् )—a bisecting line. दोन सारखे भाग करणारी रेषा, द्विभागणारी रेषा.

Bisex'ual, *a.* ( बाय्-से'क्सुअल् )—of two sexes, having both sexes in one individual. स्त्री आणि पुरुष या दोन्ही जातींचा.

Bish'op, *n.* ( बि'शप् )—the governor of a diocese; a piece in chess; mulled and spiced wine. ख्रिस्ती धर्माध्यक्ष; बुद्धिबळांतील उंट; साखर, द्राक्षासव आणि नारिंगें यांचें पेय.

Bĭsh'oprĭc, *n.* ( बिं'शप्-रिक् )—the office of a bishop. बिशपाची जागा.

Bĭsk, *n.* ( बिस्क् )—rich soup made by boiling birds etc. पक्षी वगैरे शिजवून केलेला रस्सा.

Bĭs'mŭth, *n.* ( -z-, बिझ्'मथ् )—a reddish-white metal used as alloy, etc. एक रासायनिक मूलद्रव्य, 'बिस्मित'. [ Ger. *wiss*, white & *muth*, lively ]

Bī'son, *n.* ( बा'यू-सन् )—a wild ox, a buffalo. गवा, गवय.

Bĭsque, *n.* ( -k, बिस्क् )—right of scoring unearned point at tennis, or playing extra turn at croquet, etc.; unglazed white china for statuettes. टेनिसमध्यें एक विशेष पॉइंट खेळण्याचा किंवा क्रोके खेळांत जादा पाळी खेळण्याचा हक्क; सफाई न केलेली लहान पुतळ्यांकरितां सफेत चिनीमाती.

Bĭssex'tile, *a.* & *n.* ( बिसे'क्स्-टिल् )—leap, leap-year. अधिक दिवस, ज्या वर्षी फेब्रुवारी महिन्याचे २९ दिवस येतात तें वर्ष.

Bĭs'tort, *n.* ( बि'स्-टॉर्ट् )—a herb having flesh-coloured flowers. पिंवळसर रंगाचीं फुलें असलेली एक वनस्पति.

Bĭs'tre, *n.* ( बि'स्टर् )—a dark-brown pigment prepared from the soot of wood; brown colour. लांकडाच्या मशेरीपासून तयार केलेलें तपकिरी रंगाचें अंजन; तपकिरी रंग.

Bĭt, *n.* ( बिट् )—small piece of amount; a morsel, a bite; cutting part of tools, etc.; mouth-piece of bridle; control. लहान तुकडा, लवलेश; घांस; हत्याराचें किंवा रंध्याचें कापण्याचें पातें; लगाम, मुखयंत्रण; आळा, यंत्रण, दाब. *To draw bit*, to slacken pace. गति कमी करणें. *To take bit between teeth*, to reject control. दाब किंवा यंत्रण झिडकारणें. *Bit by bit*, gradually. हळूहळू, थोडथोड्या प्रमाणानें. *To give a bit of one's mind*, to speak candidly. मोकळेपणानें बोलणें. *To do one's bit*, to contribute service or money to some cause. एकाद्या कारणाकरितां द्रव्य किंवा अन्य साहाय्य करणें. *v. t.* to put a bit into the mouth of ( a horse ); accustom to the bit; restrain. तोंडांत लगाम घालणें; लगामीची संवय करणें; लगाम खेंचणें, ताब्यांत आणणें.

Bĭtch, *n.* ( बिच् )—a female dog, fox or wolf; a harlot. कुत्री, कोल्ही, लांडगी; छिनाल बायको.

Bite, *v. t.* & *i.* ( बाइट् )—seize with the teeth, penetrate grip; corrode. चावणें, डांसा घेणें; पकडणें. गंजणें. *To bite the dust or ground*, to fall and die. जमीनदोस्त होणें, धुळीस मिळणें, पडून मरणें. *To bite one's lips*, to control anger etc. क्रोध वगैरे आवरणें. *To bite off more than one can chew*, to attempt too great a task. फारच मोठें काम करण्याचा प्रयत्न करणें. *Bitten with*, infected with ( a mania, enthusiasm, etc.). चिघडलेला, पछाडलेला. *n.* act of biting; wound made by biting. चावणें; चावून केलेली जखम.

Bīt'er, *n.* ( बा'यू-टर् )—one who bites; one who defrauds, a hoaxer. चावणारा; फसवणारा, ठक. E. g. *The biter bit*, cf. शेरास सवा शेर.

Bīt'ing, *a.* ( बा'यू-टिंग् )—cutting; severe. मर्मच्छेदक; तीव्र, कडक.

Bĭtt'er, *a.* ( बि'टर् )—tasting like wormwood; virulent; biting, harsh. कडू; जहर; कडक. *Bitter cold*, मखर थंडी *To the bitter end*, to the last extremity. गोष्टी अगदीं कळसाला जाईपर्यंत. *The bitters of life*, संसारांतील दुःखें. *Bitter-sweet*, sweetness with bitter after-taste or element. कडुमिश्रित गोड, दुःखमिश्रित सुख, इष्टानिष्ट. Bitterly, *adv.*; Bitterness, *n.*

Bĭtt'ern, *n.* ( बि'टर्न् )—a marsh bird allied to the heron. बगळ्याच्या जातीचा एक पक्षी.

Bĭtū'mĕn, *n.* ( बिट्यू'मेन्, बाय्-ट्यू'मेन् )—kinds of inflammable mineral substance. एक ज्वालाग्राही खनिज पदार्थ किंवा द्रव्य. Bĭtu'minous, *a.* ज्वालाग्राही खनिज पदार्थाचा अंश असणारा. [ L. *bitumen*, mineral pitch ]

Bī'vălve, *a.* ( बा'यू-व्हॅल्व्ह् )—two-valved; ( of shellfish ) with double shell. दुझडपी झांकण असलेला; ज्याला दोन शिंपल्यांचीं झांकणें आहेत असा ( कालवासारखा प्राणी ). Bivăl'vūlar, *a.* with two valves. दुझडपी झांकण असलेला. [ L. *bis*, twice & *valva*, a valve ]

Bĭv'ouăc, *n.* ( -vŏŏ-, बि'व्हु-ॲक् )—a temporary encampment without tents, etc. उघड्यावर दिलेला तात्पुरता तळ. *v. t.* to resort to bivouac. उघड्यावर तळ देणें. [ Ger. *bei*, by and *wachen*, to watch ]

Bĭzărre', *a.* ( बिझा'र् )—of fantastic appearance or effect, fantastical; whimsical. तऱ्हेवाईक, विलक्षण; लहरी, विक्षिप्त.

Blaa, Blab, *n.* ( ब्ला )—blunder; foolish talk. ढोबळ चूक; मूर्खपणाचें बोलणें.

Blăb, *v. i.* & *t.* ( ब्लॅब् )—be indiscreet in talk, utter thoughtlessly; tell secret. वटवट करणें, अविचारानें बोलणें; ( जीभ स्वाधीन नसल्यामुळें ) गुप्त गोष्ट फोडणें.

Blăck, *a.* ( ब्लॅक् )—darkest of all colours; dark-skinned; dusky, gloomy; hateful, wicked; sullen. काळाकुट्ट रंग; काळा; अंधुक; दुष्ट; दुर्मुखलेला. *n.* black colour, paint or clothes, speck; negro. काळा रंग, काळे कपडे, काळा ठिपका किंवा डाग; हबशी, शिद्दी. *v. t.*

make black; polish with blacking. काळा करणें; काळें पॉलिश करणें. *Deep in one's black books*, quite out of one's favour. पूर्ण गैरमर्जीतला. *Black and white*, ink drawing. शाईनें लिहिलेलें. *Black art*, magic. जादू, जादूटोणा. *Black belt*, negro area of the United States. युनायटेड स्टेट्समधील नीग्रो लोकांची वसति. *Black bottom*, a kind of dance. एक तऱ्हेचें नृत्य. *Black cap*, a cap put on by a judge in sentencing to death. देहान्त शिक्षा देण्याच्या वेळीं न्यायाधीश घालीत असलेली टोपी. *Black draught*, a medicine to open the bowels. कोठा साफ करणारें औषध, जुलाबाचें औषध. *Black jack*, leather wine-bottle. चामड्याची दारू किंवा दुसरें पेय ठेवण्याची बाटली. *Black-letter*, old type like German. जुन्या इंग्रजी भाषेंतील जर्मनसारखें अक्षर. *To black out*, obliterate. पुसट किंवा अंधुक करणें, खोडून टाकणें. *Black Rod*, the chief usher of the House of Lords. हाउस ऑफ लॉर्ड्समधील मुख्य भालदार. *Black-shirts*, fascists. इटलीमधील फॅसिस्ट लोक. *Black-pudding*, sausage-shaped of blood, suet, etc. मांसांतील रक्त व इतर द्रव्यें यांचें केलेलें एक मिष्टान्न. *Black sheep*, scoundrel, one whose conduct is discreditable. वाईट चालीचा मनुष्य, कुलकलंक, हरामखोर, बदमाश.

Blăck'amoor, *n.* (ब्लॅक-मूर्)—a negro; a black man or woman. हबशी, शिद्दी; काळा भिल्ल, काळीकुट्ट स्त्री.

Blăck'ball, *v. t.* (ब्लॅक्-बॉल्)—to reject a candidate by putting black balls into a ballot-box, to exclude by vote. काळ्या गोटीनें नापसंती दर्शविणें, मतानें रद्द करणें.

Blăckbeet'le, *n.* (ब्लॅक्-बी'टल्)—cockroach. झुरळ, वाघुरडा.

Blăck'berry, *n.* (ब्लॅक्-बेरि)—a plant of the bramble kind, and its fruit, which is of a black colour. एका जातीचें काळ्या रंगाचें फळ, गौरीफळ.

Blăck'bird, *n.* (ब्लॅक्-बर्ड्)—a European song-bird; kidnapped negro on slave-ship. यूरोपमधील एक गाणारा पक्षी; वेठीस लावण्याकरितां पळवून आणलेला शिद्दी मनुष्य.

Blăck'board, *n.* (ब्लॅक्-बो-अर्ड्)—a board for chalk-writing in class-room, etc. शाळेंतील वगैरे खडूनें लिहिण्याकरितां केलेला काळा फळा.

Blăck'cap, *n.* (ब्लॅक्-कॅप्)—a British bird of the warbler family (so called from its black tufted crown); an apple roasted till black. ब्रिटनमधील गाणाऱ्या पक्ष्याची एक जात; कठीण कपचेचें करपेपर्यंत भाजलेलें एक फळ.

Blăck'cŏck, *n.* (ब्लॅक्-कॉक्)—the male of black grouse. काळ्या ग्राउज पक्ष्याचा नर.

Blăck'en, *v. t. & i.* (ब्लॅकन्)—make or grow black; speak evil of, defame. काळा होणें किंवा करणें; कलंक किंवा काळिमा लावणें, वाईट बोलणें, बदनामी करणें.

Blăck'guard, *n.* (blăgürd, ब्लॅगार्ड्)—scoundrel, foul-mouthed fellow. लुच्चा, बदमाश, हरामखोर. *v. t.* abuse scurrilously. अश्लीलपणानें शिवीगाळ करणें, नालस्ती करणें.

Black'guardly, *a.* (blă'gärdlў, ब्लॅगार्डलि)—characteristic of a blackguard, rascally; villainous. अश्लील, अभद्र; दुष्टपणाचा.

Blăck'ing, *n.* (ब्लॅकिंग्)—polish for boots. बुटाचें काळें पॉलिश.

Blăck-lead', *v. t.* (-lĕd, ब्लॅक्-लेॅड्)—to polish with plumbago or black lead. काळ्या शिशाचें पॉलिश करणें.

Blăck'leg, *n.* (ब्लॅक्-लेग्)—a swindler esp. on the turf; a workman who works for an employer whose men are on strike. फसव्या, शर्यतींत फसवणारा; संपाच्या वेळीं संपांत सामील असलेल्या कामगाराबद्दल काम करणारा.

Blăck'mail, *n.* (ब्लॅक्-मेल्)—extortion of money by means of threats or intimidation. धमकीनें पैसे उपटणें. *v. t.* to extort money from by threats. धमकी देऊन पैसे उकळणें.

Black'smith, *n.* (ब्लॅक्-स्मिथ्)—a smith working in iron. लोहार, घिसाडी.

Blăck'thŏrn, *n.* (ब्लॅक्-थॉर्न्)—a shrub bearing sloes, the sloe. एक प्रकारचें काळ्या कांट्याचें झाड, या झाडाची केलेली काठी.

Blăck'wŏŏd, *n.* (ब्लॅक्-वुड्)—various species of trees and their timber. शिसवी लांकूड, अबनूस, शिसव.

Blădd'er, *n.* (ब्लॅडर्)—membranous bag in human or other animal body; inflated thing. मूत्राशय; फुग्याची पिशवी, फुगारा, फुगा.

Blāde, *n.* (ब्लेड्)—flat narrow leaf of grass; cutting-piece of knife, etc.; any leaf-like part; flat bone of shoulder; gay dashing fellow. गवताची पाती; हत्याराचें पातें; कोणताहि पानासारखा भाग; खांद्याचें सपाट हाड; तरतरीत नखरेबाज मनुष्य.

Blae'berrў, *n.* (blā-, ब्लेबेरि)=Bilberry. एक लहान झाड.

Blain, *n.* (ब्लेन्)—an inflated sore. पाण्यानें भरलेला फोड.

Blāme, *v. t.* (ब्लेम्)—find fault with; fix the responsibility on. दोष लावणें; जबाबदारी लादणें. *n.* censure, reprehension, fault. दोष, निंदा. *He is to blame*, he deserves censure

तो निंदेला पात्र आहे. *To lay the blame on,* एखाद्याला दोष देणें. *To bear the blame,* दोष पदरीं घेणें.

Blāme'ful, *a.* (ब्लेॅम्-फुल्)—deserving blame or censure. दोषार्ह, सदोष.

Blāme'less, *a.* (ब्लेॅम्-लेस्)—innocent, guiltless. निरपराधी, निर्दोषी.

Blāme'worthy̆, *a.* (ब्लेॅम्-वर्दि)—deserving blame. दोषार्ह.

Blänch, *v. t. & i.* (ब्लांच्)—to whiten, make white; grow pale. सफेत करणें; पांढरा किंवा फिकाट होणें.

Blancmange', *n.* (blamänzh, ब्लमां'न्झ्)—a white jelly prepared with milk. एक प्रकारचा दुधाचा चिकचिकीत पदार्थ. [ Fr. *blanc,* white & *manger,* food ]

Blănd, *a.* (ब्लॅंड्)—gentle in manner, polite, mild; balmy. नम्र, शांत; सुखकर. Bland'ly̆, *adv.* कोमलपणानें, लाडीगोडीनें.

Blănd'ĭsh, *v. t.* (ब्लॅ'न्डिश्)—to flatter, coax. लाडीगोडी लावणें, गोडीगुलाबीनें बोलणें.

Blăn'dĭshment, *n.* (ब्लॅं'डिश्-मेन्ट्)—flattering attentions; soft words, cajolery. नखरा; गोड शब्द, लाडीगोडी.

Blănk, *a.* (ब्लॅंक्)—not written or printed on; void of interest, result, etc. कोरा; रसहीन, निष्फळ. *n.* empty space (in document, etc); printed form with blank spaces. रिकामी जागा, कोरा कागद; कोरी जागा ठेवून छापलेला कागद. *Blank cheque,* cheque with amount left for payee to fill in. रकमेचा आंकडा न भरतां दिलेला चेक. *Blank cartridge,* a cartridge without any ball. गोळी नसलेलें काडतूस. *To look blank,* to look non-plussed. गोंधळून गेलेला दिसणें, शून्यमनस्क किंवा बावरलेला दिसणें. *Blank verse,* a verse with the five-foot iambic; unrhymed verse. प्रत्येकीं गुरु व लघु असे पांच अवयव असलेली कविता; यमकहीन कविता. *Blank book,* book with clean paper. कोरें पुस्तक. *Point-blank*=directly, explicitly. स्पष्ट, उघड उघड.

Blănk'ĕt, *n.* (ब्लॅं'किट्)—a large woollen sheet as bed-covering. घोंगडी, कांबळें, ब्लँकेट. *a.* covering, inclusive. आच्छादणारा, मिळून, जमेस धरून. *v. t.* to cover with a blanket; stifle, keep quiet (scandal, question, etc.); toss in a blanket as punishment; take wind from sails of (another craft) by passing to windward. कांबळ्यांत गुंडाळणें; लोकनिंदा, प्रश्न वगैरे आंतल्या आंत दाबून टाकणें; शिक्षा म्हणून घोंगडींत आसडणें; वाऱ्याच्या प्रवाहांत असणाऱ्या गलबतापुढें जाऊन त्यास वारा न मिळेसा करणें, वाऱ्याच्या आड येणें. *Wet blanket,* a person who extinguishes conversation. संभाषण थांबविणारा मनुष्य. *Born on the wrong side of the blanket,* illegitimate. अनौरस. *Blanket Indian,* a wild or semi-civilized Indian. रानटी किंवा अर्धवट सुधारलेला हिंदी मनुष्य.

Blăn'kly, *adv.* (ब्लॅं'क्-लि)—helplessly; flatly. निरुपायास्तव; निक्षून.

Blare, *v. i. & t.* (ब्लेअर्)—make sound of trumpet; trumpet forth. तुतारी वाजविणें; जाहीर करणें. *n.* sound of a trumpet. तुतारीचा आवाज.

Blärn'ey, *n.* (ब्ला'र्नि)—excessively complimentary language; smooth deceitful talk. अत्यंत नम्र भाषा; कावेबाजपणाचें पण मधुर भाषण. *v. t. & i.* to cajole, use blarney. गोड बोलून ठकवणें.

Blăsphēme', *v. i. & t.* (ब्लॅस्फी'म्)—talk impiously; profane in words. ईश्वरनिंदा करणें; निंदा करणें.

Blăs'phėmous, *a.* (ब्लॅ'स्फि-मस्)—containing blasphemy, impiously irreverent. ईश्वरनिंदायुक्त, निंदात्मक, कुचेष्टेचा.

Blăs'phėmy̆, *n.* (ब्लॅ'स्फिमि)—impious speech, profanity. ईश्वरनिंदा, निंदा, आक्षेप, कुचेष्टा.

Bläst, *n.* (ब्लास्ट्)—a strong gust; the sound of a wind-instrument; the current in blast-furnace. वाऱ्याचा झपाटा; वाद्याचा आवाज; धातूंचा रस करण्याच्या भट्टींतील वाऱ्याचा झोत. *v. t.* to blow up with explosive; blight, shrivel. सुरुंगानें फोडणें किंवा उडवणें; नाश पावणें, संकोच पावणें, अवठरणें. *In blast,* (भट्टी) चालू आहे. *Out of blast,* (भट्टी) बंद आहे.

Bläst'-fŭrnāce, *n.* (ब्ला'स्ट्-फर्नेस्)—a smelting furnace into which compressed hot air is driven by an engine. धातूंचा रस करण्याची वाऱ्याच्या झोतानें चालणारी भट्टी.

Blăs'toderm, *n.* (ब्लॅ'स्टोडर्म्)—the germinal skin or superficial layer of an embryo in its earliest condition. गर्भपिंडावरील पहिली त्वचा. [ Gr. *blastos,* a bud, & *derma,* skin ]

Blā'tant, *a.* (ब्ले'टन्ट्)—loudly obtrusive, bellowing, noisy. उगाच गोंगाट किंवा गडबड करणारा, बें बें करणारा.

Blăth'er, *v. i.* (ब्लॅ'दर्)—to talk loquacious nonsense. कांहींतरी बोलणें. *n.* nonsensical talk. व्यर्थ बडबड.

Blauw'bŏk, *n.* (-ow-, ब्ला'उबॉक्)—a south-African large antelope with bluish hair. दक्षिण आफ्रिकेंतील एक मोठ्या निळसर केंसाचा हरिण.

Blāze, *n.* ( ब्लेझ् )—bright flame or fire; violent outburst of passion; a white mark on the face of a horse or an ox; a white mark chipped in the bark of a tree to mark route. भणभणीत उजेड; तीव्र मनोविकार; घोड्याच्या किंवा बैलाच्या कपाळावरील पांढरा ठिपका; रस्ता दाखविण्याकरितां साल कापून केलेली झाडावरची पांढरी खूण. *v. i.* flame, burn with excitement. प्रदीप्त होणें, भडकणें. *v. t.* to mark tree or path with blazes; to proclaim. ( साल कापून ) झाडावर पांढरी खूण करणें; चोहोंकडे प्रसार करणें, प्रकट करणें. *To blaze up*, to burst out in anger. रागानें जोरांत बोलणें. *To blaze away*, to fire continuously with rifles etc.; work enthusiastically at anything. बंदुकींचा सारखा भडिमार करणें; एखादें काम उत्साहानें करणें.

Blā'zer, *n.* ( ब्ले'झर् )—a coloured jacket for boating etc. होडी वगैरे चालवितांना घालण्याचें रंगीत जाकीट.

Blā'zon, *n.* ( ब्ले'झन् )—heraldic shield, coat of arms or banner; correct description of heraldic shields etc.; record, description ( esp. of virtues, etc. ). शस्त्रागारावरील अधिकाऱ्याची ढाल, चिलखत किंवा निशाण, चिलखतावरून घालण्याचीं उपवस्त्रें; अधिकारचिन्हें किंवा पदवीचिन्हें यांचें हुबेहुब वर्णन; गुणांची वगैरे माहिती, वर्णन. *v. t.* describe or point ( arms ) heraldically; proclaim. कुलमानद्योतक चित्रित चिन्हें काढणें किंवा त्यांचें वर्णन करणें; जाहीर करणें. Blā'zonment, *n.*

Blā'zonrў, *n.* ( ब्ले'झन्-रि )—heraldic devices, armorial bearings; art of describing or painting heraldic devices; brightly coloured display. अधिकारचिन्हें, पदवीचिन्हें; अधिकारचिन्हें गौरवानें वर्णन करण्याची किंवा रंगविण्याची कला; उत्तम रंगांनीं युक्त अशी मांडणी किंवा देखावा.

Bleach, *v. t.* & *i.* (ब्लीच्)—whiten in sun-light or by chemical process. सूर्यप्रकाशानें किंवा रासायनिक द्रव्यानें सफेत करणें, उजाळा देणें. *Bleaching-powder*, chloride of lime ( made by exposing slaked lime to the action of chlorine ). कपडे साफ करण्याची पूड, शुभ्रकक्षार.

Bleach'ers, *n.* ( ब्ली'चर्स् )—unroofed seats at baseball field etc. बेसबॉल खेळामध्यें वगैरे वर छपर नसलेल्या बसण्याच्या जागा.

Bleak, *a.* ( ब्लीक् )—dreary; bare; chilly; wanting colour. खुल्या हवेंतील; ओसाड, भयाण; थंड, सर्द, सर्दीचा; निस्तेज. *n.* a kind of small fish. एका जातीचे लहान मासे.

Blear, *a.* (ब्लिअर्)—dim-sighted, dull, filmy. अंधुक दृष्टीचा, सारा आलेला. *Blear-eyed*, *a.* having blear eyes; without foresight or penetration. अंधुक किंवा मजीक दृष्टि असलेला; दूरदृष्टि नसलेला, अदूरदृष्टि.

Bleat, *v. t.* & *i.* ( ब्लीट् )—utter cry of sheep, goat or calf; speak foolishly. बें बें करणें; मूर्खपणानें बोलणें. *n.* cry of goat, sheep or calf. बकऱ्याचें, मेंढीचें किंवा वांसराचें ओरडणें, बें बें करणें.

Bleed, *v. t.* & *i.* ( ब्लीड् )—emit blood; extort money from; feel extreme pain from pity. रक्त काढणें किंवा वाहणें; पैसे उकळणें; दया येऊन हृदय फुटणें. ( *pa. t.* blĕd )

Blĕm'ĭsh, *n.* ( ब्ले'मिश् )—flaw, defect, stain. छिद्र, दोष, कलंक. *v. t.* to deform, impair, spoil the beauty of, mar. व्यंग करणें, सौंदर्य बिघडविणें, कुरूप करणें.

Blĕnch, *v. i.* ( ब्लेन्च् )—start aside, flinch, shrink, quail; close the eyes to. कच खाणें, माघार घेणें, पाऊल मागें घेणें; डोळेझांक करणें.

Blĕnd, *v. t.* & *i.* (ब्लेंड्)—mix; mingle intimately *with*; become one. मिसळणें; एकजीव करणें; एक होणें. *n.* mixture made of various sorts. निरनिराळ्या प्रकारचें मिश्रण. ( *pa. t.* Blended, or Blent ).

Blĕnde, *n.* ( ब्लेन्ड् )—native sulphide of zinc. सफेत मोरचूत.

Blĕn'heim, *n.* ( -nĭm, ब्ले'निम् )—kind of spaniel. एका जातीचा कुत्रा. *Blenheim orange*, a kind of golden-coloured apple. एका जातीचें पिंवळ्या रंगाचें फळ.

Blent, *pa. t.* of Blend.

Blĕss, *v. t.* ( ब्लेस् )—consecrate; praise; invoke God's favour on; make happy; thank. अर्पण करणें; स्तुति करणें; ईश्वरकृपा भाकणें; आशीर्वाद देणें; सुखी करणें; आभार मानणें. *Bless me, bless my soul*, मला वांचव, माझें रक्षण कर. *God bless you* ! ईश्वर तुझें भलें करो.

Blĕss'ĕd, Blĕst, *aa.* ( ब्ले'सिड्, ब्लेस्ट् )—consecrated; fortunate; revered; happy; in paradise. पवित्र, पूज्य; भाग्यवान्; पूज्य, आदरणीय; सुखी, धन्य; स्वर्गांतील. He is *blessed with* a son, he is fortunate in the possession of a son. त्याला मुलगा झाल्याचें भाग्य लाभलें.

Blĕ'ssĕdness, *n.* ( ब्ले'सेड्-नेस् )—happiness; enjoyment of divine favour. सुख; स्वर्गीय सुख, ईश्वरकृपा. *Single blessedness*, the unmarried state, celibacy. अविवाहितावस्था, ब्रह्मचर्य.

Blĕss'ĭng, *n.* ( ब्ले'सिंग् )—invocation or bestowal of divine power; thing one is

thankful for ; grace at meals. ईश्वरी कृपा, अनुग्रह, आशीर्वाद ; उपकृत गोष्ट ; भोजनापूर्वी किंवा नंतर करावयाची ईश्वराची प्रार्थना. *Blessing in disguise*, unwelcome but salutary experience etc. अनिच्छित परंतु हितकर अनुभव वगैरे.

Blĕth'er, *v. i. & n.* ( ब्लें'द़र )—talk nonsense, non-sensical talk. अर्थहीन बोलणें, फटकळपणानें कांहींतरी बहकणें.

Blew, *pa. t.* of Blow.

Blew'it, *n.* (ब्लू'इट्)—a late edible mushroom with lilac stem. एक जातीचें खाण्यालायक अळंबें.

Blīght, *n.* ( ब्लाइट् ) kinds of plant disease; species of aphis ; hazy atmosphere. वनस्पतींचा एक रोग ; एक जातीची भाजीपाल्याचे पानावरील कीड ; धुकेंयुक्त वातावरण. *v. t.* to affect with blight ; to exert baleful influence on ; to nip in the bud ; to wither up. पीक बिघडविणारा रोग होणें ; अनिष्ट परिणाम होणें ; मुळांतच नाश करणें ; सुकून जाणें.

Blīght'er, *n.* (ब्ला'यूटर् )—( sl. ) an annoying person. त्रासदायक माणूस.

Blīght'ȳ, *n.* ( -it-, ब्ला'इटि )—( Army slang ) home ( England ) after foreign service. परकीय देशांत नोकरी केल्यानंतर परत घरीं. *A blighty one*, a wound that ensures return to Blighty. परत स्वदेशीं जाण्याला भाग पाडणारी जखम.

Blīmey, *int.* ( ब्ला'यू-मि )—an exclamation expressing surprise. आश्चर्य दाखविणारा उद्गारवाचक शब्द.

Blīnd, *a.* ( ब्लाइन्ड् )—without sight; without moral or mental discernment; reckless. आंधळा ; अंध ; अविचारी. *v. t.* to deprive of sight, make mentally blind. आंधळा करणें ; मनानें अंध करणें. *n.* obstruction to sight; screen on window ; screen ; horse's blinker. दृष्टीचें आवरण ; खिडकीचा पडदा ; पडदा ; घोड्याच्या अंधेऱ्या ( plu. ). *Blind of an eye*, having one eye blind. एक डोळ्यानें आंधळा, एकाक्ष. *To turn a blind eye to*, to affect not to see. पहात नाहीं असें दाखविणें. *Blind to*, incapable of appreciating. मर्म समजण्याला किंवा पारख करण्याला असमर्थ. One's *blind side*, direction in which one is unguarded. असुरक्षित बाजू. *Blind alley*, alley closed at one end. एका बाजूला बंद केलेली गल्ली किंवा बोळ. *Blind pig* or *tiger*, illicit liquor shop. बेकायदेशीर दारूचें दुकान. *Blindman's holiday*, the time before candles are lighted. सकाळपासून संध्याकाळपर्यंतचा वेळ, दिवे लागण्यापूर्वीचा वेळ. *Blindman's lantern*, आंधळ्याची काठी.

Blī'ndage, *n.* ( -ij, ब्ला'इन्डिज् )—screen for troops in fortification, sieges, etc. तोफेचे गोळे आपणांवर पडूं नयेत म्हणून उभारलेला लांकडाचा तट.

Blīnd'fold, *a. & adv.* ( ब्ला'इन्ड्-फोल्ड् )—with eyes bandaged ; without circumspection. डोळे बांधलेला ; सारासारविचारहीन, बुद्धिभ्रंश झालेला. *v. t.* deprive of sight with bandage, cover the eyes of, hinder from seeing. डोळे बांधून दिसेनासें करणें, डोळे झांकणें, दिसण्याला प्रतिबंध करणें.

Blīnd'lȳ, *adv.* ( ब्ला'इन्ड्-लि )—without seeing, gropingly ; recklessly. न पाहतां ; अविचारानें, विचार न करतां.

Blīnd'măn's-bŭff, *n.* ( ब्ला'इन्ड्-मॅन्स्-बफ् )—an indoor game in which one person is blindfolded and tries to catch some one of the company who pushes him about, and tell who it is. एक घरांत खेळण्याचा खेळ ( या खेळामध्यें एकाचे डोळे बांधलेले असतात व तो बाकीच्यांपैकीं कोणाला तरी पकडण्याचा व तो कोण आहे तें सांगण्याचा प्रयत्न करितो), आंधळी कोशिंबीर. [ Blindman's & buff, from obs. *buff= buffet* ]

Blīnd'ness, *n.* ( ब्ला'इन्ड्-निस् )—want of sight; want of discernment, folly, recklessness. अंधत्व ; असमंजसपणा, मूर्खपणा, अविचारीपणा.

Blīnd'worm, *n.* ( ब्ला'इन्ड्-वर्म् )—a small harmless worm-like reptile, also called *slow-worm*. एक लहान इजा न करणारा किड्यासारखा सरपटणारा प्राणी.

Blĭnk, *v. i. & t.* ( ब्लिंक् )—move the eyelids, look with eyes opening and shutting ; ignore or shirk consideration of ( facts ). डोळे मिचकावणें ; डोळ्याची उघडझांक करून पाहणें ; कानाडोळा करणें, टाळाटाळ करणें. *n.* momentary gleam or glimpse ; whiteness about horizon, reflection of distant icefields. उजेडाची झांक ; क्षितिजाच्या भोंवतालचा शुभ्रपणा, दूरच्या बर्फाच्या प्रदेशांतील प्रतिबिंब.

Blĭnk'ers, *n. pl.* ( ब्लिं'कर्स् )—horse's eye-screens, screens preventing a horse from seeing sideways. घोड्याच्या डोळ्यांना बांधण्याचे पडदे, घोड्याच्या अंधेऱ्या.

Blĭss, *n.* ( ब्लिस् )—gladness, perfect joy; blessedness. आनंद, हर्ष ; परमसुख.

Blĭss'ful, *a.* ( ब्लि'स्-फुल् )—full of bliss, full of joy and felicity. सुखमय, आनंदपूर्ण.

Blĭs'ter, *n.* ( ब्लि'स्टर् )—a thin bladder on the skin containing watery matter ; a plaster to raise a blister. कातडीवरील फोड ; फोड आणणारें औषध. *v. t. & i.* to raise blister on ;

to become covered with blisters; (sl.) to bore, weary, waste time of. फोड आणणें किंवा उठणें; फोडांनीं भरून जाणें; कंटाळा आणणें, कंटाळवाणा होणें, निष्कारण वेळ घालवणें.

Blithe, *a.* (ब्लाइद्)—gay, joyous, mirthful. आनंदी, हर्षयुक्त.

Blithe'some, *a.* (ब्ला'इद्-सम्)—somewhat gay, cheerful. थोडासा आनंदी, आनंददायक.

Blizz'ard, *n.* (ब्लि'झर्ड्)—a blinding snow-storm, a wintry storm with high wind, intense cold and fine drifting snow. (आकाशांतून पडलेल्या) बर्फाचें मोठें वादळ.

Bloat, *v. t. & i.* (ब्लोट्)—to inflate, make swollen; to become inflated; to cure (herring) by salting and smoking for a moderately short time. फोड आणणें, फुगविणें; फुगणें; (मासा) मीठ घालून व थोडा वेळ धुरी देऊन खारवणें.

Bloat'er, *n.* (ब्लो'टर्)—a bloated herring. खारवलेला मासा.

Blŏb, *n.* (ब्लॉब्)—a drop of liquid; a small roundish mass or spot; (Crick.) a duck's egg. पातळ पदार्थाचा थेंब; एक लहान वाटोळा गोळा किंवा जागा; बदकाचें अंडें.

Blŏck, *n.* (ब्लॉक्)—a log, tree-stump, large piece of wood or stone; a mould for shaping hats on; piece of wood engraved for printing; obstruction; square of buildings in town; the spot on which a batsman rests his bat before play. लांकडाचा ओंडा; हॅटला आकार देण्याचा सांचा; छापण्याकरितां खोदलेला ठोकळा; अडथळा, विघ्न, आडकाठी; चाळींतील गाळा; क्रिकेटमध्यें खेळण्याच्या पूर्वी बॅट्स्‌मन आपली बॅट टेकतो ती जागा. *v. t.* obstruct, put obstacles in the way of; announce opposition to (a bill); stop (a ball) with bat; shape (hats); emboss (book-cover). विघ्न आणणें, अडथळा करणें; विरोध जाहीर करणें; बॅटनें चेंडू थांबविणें; हॅटला आकार देणें; पुस्तकाच्या कव्हरावर ठशानें नकशी काढणें. *To block up, block in,* to confine. कोंडून ठेवणें. *To block out* or *in,* to sketch roughly, to plan (work). स्थूल मानानें रूपरेषा आंखणें, नियमित स्वरूप देणें. *Chip of old block,* child like his father (esp. in character). बापासारखें मूल. *To cut blocks with razor,* to waste ingenuity, etc. कौशल्याचा अपव्यय करणें. *The block,* death by beheading. शिरच्छेदानें मृत्यु.

Blŏckāde', *n.* (ब्लॉ-के'ड्)—shutting up of a place by hostile forces. कोंडमारा, नाकेबंदी. *v. t.* subject to blockade; obstruct (door, view, etc.). वेढा घालून कोंडणें, नाकेबंदी करणें; अडथळा करणें. *To raise a blockade,* to cease blockading, to compel blockaders to cease. वेढा उठविणें. *To run blockade,* to evade blockading force. वेढा घालणाऱ्यांना टाळणें.

Blŏckā'der, *n.* (ब्लॉके'डर्)—one who blockades; a vessel employed in blockading. कोंडणारा, अवरोधक, गराडा घालणारा; कोंडमारा करणारें गलबत.

Blŏck'head, *n.* (ब्लॉ'क्-हेड्)—a stupid fellow, a dolt. मूर्ख, ठोणपा.

Blŏck'-house, *n.* (ब्लॉक्-हाउस्)—a detached fort, a strong timber building with loop-holes used for defence. लढाईंत संरक्षणाकरितां व तोफा सोडतां याव्या म्हणून भिंतींत भोकें असलेला लांकडी किल्ला.

Blŏnd, Blŏnde, *a.* (ब्लॉन्ड्)—light auburn; of a fair colour or complexion. साधारण पिंगट; चांगल्या वर्णाचा, उत्तम अंगकांतीचा. *n.* a person (especially a woman) of a very fair complexion with light hair and with light-blue eyes. उत्तम वर्णाचा मनुष्य, सुंदर स्त्री.

Blood, *n.* (blŭd, ब्लड्)—red liquid circulating in veins of animals; murder, blood-shed; race, descent; relationship; a man of fashion. रक्त; खून, रक्तपात; उत्पत्ति; आप्तसंबंध; सभ्य मनुष्य, कुलीन मनुष्य. *v. t.* give first taste of blood (to hound, *or fig.* to inciting persons); (Surg.) remove a little of the blood of. रक्ताची संवय लावणें; रक्त काढणें. *Flesh and blood,* the animal nature; relations. मनुष्यस्वभाव; नातेवाईक. *Bad blood,* ill feeling. वाईट भावना, वाईट मत, मत्सर, द्वेष. *His blood is up,* he is in a fighting mood. त्याचें रक्त उसळलें आहे. *Blood out of a stone,* pity from the pitiless. निर्दय मनुष्यापासून दया. *In cold blood,* deliberately. जाणूनबुजून, मुद्दाम. *Blue blood,* high birth. उच्च कुलांत जन्म. *Fresh blood,* new members (admitted to a family, society, etc.). नवीन सभासद, नवीन इसम. *Blood royal,* royal family. राजवंश. *Runs in the blood,* is a family trait. पिढीतच आहे, आनुवंशिक आहे. *Blood is thicker than water,* the tie of kindred is real. आप्तसंबंध इतर संबंधापेक्षां अधिक जिव्हाळ्याचा असतो. *Blood and iron,* relentless use of force (esp. as motto of Bismarckian policy). दंडुकेशाही, ऊठ कीं मार हा कायदा. *To shed blood,* रक्तपात करणें.

Blood'ed, *a.* (-ŭ-, ब्ल'डिड्)—of good stock. उच्च किंवा चांगल्या कुळांतील.

Blood'hound, *n.* (ब्ल'ड्-हाउन्ड्)—a large dog for hunting; a detective. शिकारी कुत्रा; गुप्त पोलीस शिपाई.

Blood'less, *a.* ( ब्लॅड्-लेस् )—without blood or bloodshed; unfeeling. रक्तहीन, रक्तपाताशिवाय; अहृदय.

Blood'-relation, *n.* ( -ŭ-, ब्लॅड्-रिलेशन् )—one related by blood (not by marriage). एकाच रक्ताचा, रक्तसंबंधी, सपिंड.

Blood'shed, *n.* ( ब्लॅड्शेड् )—spilling of blood, slaughter. रक्तपात, रक्ताचा सडा, कत्तल.

Blood'shŏt, *a.* ( ब्लॅड्-शॉट् )—( of eyes ) suffused with blood. आरक्त, लाल ( डोळे ), तांबूस लाल. *To see things bloodshot,* to find incitements to slaughter or traces of blood in them. कत्तल करण्याचें प्रोत्साहन आढळणें.

Blood'-stained, *a.* ( -ŭ-, ब्लॅड्-स्टेन्ड् )—stained with blood, disgraced by bloodshed. रक्तानें डागळलेला, रक्तपातानें बदनामी पावलेला.

Blood'-sucker, *n.* ( -ŭ-, ब्लॅड्-सकर् )—a leech; an extortioner; a cruel man. रक्त शोषणारा प्राणी, जळू; जुलमानें कर घेणारा; निष्ठुर मनुष्य.

Blood'thirsty, *a.* ( ब्लॅड्-थर्स्टि )—thirsting for blood, eager for bloodshed. रक्तप्रिय, हिंसक

Blood'vessel, *n.* ( ब्लॅड्-व्हेसल् )—a vein or an artery conveying blood. रक्तवाहिनी.

Blood'y, *a.* ( blŭ'dĭ, ब्लॅडि )—pertaining to blood; red; involving bloodshed; cruel. रक्तासंबंधीं; लाल; रक्तबंबाळ; निष्ठुर. *Bloody (nose),* bleeding (nose). रक्त वाहात असलेलें (नाक). *Bloody flux,* dysentery. रक्ताची हगवण, रक्तातिसार. Bloody in foul language means *damned,* or as mere intensive. (*E. g.* Not a *bloody* one.) *adv.* confoundedly, very. अतिशय, फार. ( *E. g.* bloody hot, bloody drunk, bloody fool. ) *v. t.* to make bloody, to stain with blood. रक्तानें तांबडा करणें, रक्तानें माखणें.

Blōōm, *n.* ( ब्लूम् )—a flower; florescence; prime; freshness. फूल; टवटवी; तारुण्याचा भर, ऐन तारुण्य, तारुण्यावस्था; तजेला. *v. t.* to bear blooms, be in flower; flourish. विकसणें; फुलणें; टवटवणें. *In the bloom of life,* तारुण्याच्या भरांत, ऐन तारुण्यांत.

Blōōm, *n.* ( ब्लूम् )—a mass of puddled iron hammered or squeezed into a thick bar. खाणींतील अशुद्ध लोखंड शुद्ध करण्याच्या पहिल्या कृतीचे भट्टींत तयार झालेला लोखंडाचा गट.

Blōōm'ary, Blōōm'ery, *nn.* ( ब्लूमरि )—a forge in which iron blooms are made. शुद्ध करण्याच्या भट्टींत प्रथम तयार झालेलें लोखंड ठोकून कांहीं प्राथमिक आकार देण्याचें यंत्र.

Blōōm'er, *n.* ( ब्लूमर् )—( sl. ) blunder. घोडचूक.

Blōōm'ers, *n.* ( -z, ब्लूमर्झ् )—a woman's knickerbockers, female costume of short skirt and trousers. छोटेखानी कमरेचा कबजा व तुमान असलेला बायकांचा एक प्रकारचा पोषाख.

Blŏss'om, *n.* ( ब्लॉसम् )—a flower ( esp. as promising fruit ); mass of flowers on a tree; blooming state or period. फूल; मोहोर; (भावी) उत्कर्षद्योतक काल, भरभराटीचा पूर्वकाळ. *v. i.* to open into flower; to flourish and prosper. फुलणें, मोहोर येणें; उत्कर्ष होणें, भरभराट होणें. ( *E. g.* blossom out as a statesman ) *In blossom,* पूर्ण मोहोरलेला; पूर्ण उदयांत.

Blŏt, *n.* (ब्लॉट्)—a spot of ink, etc.; blemish; disgraceful act; an exposed piece in backgammon. डाग; बट्टा; कलंक; उघडा मांडलेला बॅक्गॅमन खेळांतील खडा. *v. t.* to make blot on; stain (character); dry with blotting paper; obliterate. डाग पाडणें; कलंक लावणें; टिपकागदानें टिपणें; स्मृतिशेष करणें. *To blot out,* to obliterate (writing), exterminate, destroy. पुसून टाकणें, पूर्ण नाश करणें.

Blŏtch, *n.* (ब्लॉच्)—inflamed patch on the skin; dab of ink or colour; (school slang) blotting paper. चकदा, फोड, काळी पुटकुळी; शाईचा किंवा रंगाचा डाग; टिपकागद. Blotched, Blotchy, *aa.* having blotches; spotted. खवले असलेला; काळ्या डागांचा.

Blŏtt'er, *n.* (ब्लॉटर्)—a pad of blotting-paper. टिपकागदाचा पॅड किंवा पुडा, टिपकागद.

Blŏtt'ing-paper, *n.* ( ब्लॉटिंग्-पेपर्)—absorbent paper drying inkmarks. शाई टिपण्याचा कागद, टिपकागद.

Blouse, *n.* ( -z, ब्लॉउझ् )—workman's upper garment; woman's loose dress-body visible to waist. कामगारांचा वरचा अंगरखा; बायकांचा कमरेपर्यंत दिसणारा अंगांत घालण्याचा कपडा, ब्लाऊज.

Blow, *v. i. & t.* ( -ō, ब्लो )—move as wind does; puff, pant; make or shape ( bubble, glass ) by blowing; sound by blowing; ( of fly ) deposit eggs ( on meat, etc. ); come into flower. वाहणें; फुंकणें; वारा घालून फुगविणें किंवा आकार देणें; फुंकून वाजविणें; ( माशीचीं ) अंडीं घालणें; फुलणें. *n.* blowing; puff of fresh air; flowering condition; hard stroke ( with fist, hammer, etc. ); disaster; shock. फुंकणें; वाऱ्याची झुळुक; फुलणें; ठोसा, टोला, प्रहार; संकट; धक्का. *To blow off the steam,* to get rid of superfluous energy. जास्त झालेली वाफ ( किंवा शक्ति ) सोडून देणें. *To blow one's own trumpet,* to praise oneself. स्वतःची स्तुति करणें, बढेजाव सांगणें. *To blow out,* to extinguish. वाऱ्यानें विझवणें, फुंकून विझवणें. *To blow out* or *up by explo-*

sion, दारूनें किंवा सुरुंग लावून उडवून देणें. *To blow out one's brains*, to shoot. गोळी घालून ठार करणें. *To blow the expense*, to spend recklessly. अविचारानें खर्च करून टाकणें. *To blow upon*, to stale; discredit; tell tales of. (एखाद्या वस्तूची) टवटवी किंवा किंमत कमी करणें; फलंक लावणें, अपकीर्ति करणें; विरुद्ध माहिती देणें. *To come to blows, to exchange blows*, to fight. हातघाईवर येणें, बुक्काबुक्की करणें. *To strike a blow for*, to help one. एखाद्याला मदत करणें. *To strike a blow against*, to oppose one. एखाद्याला विरोध करणें. *At one blow*, in one operation. एका तडाख्यास. *To blow hot and cold with the same breath*, असंबद्ध किंवा विसंगत बोलणें, क्षणांत रोख बदलणें.

Blow'er, *n.* (-ōer, ब्लो'अर्)—one who blows; a sheet of iron increasing the draught of fire. वाहणारा, वाहवणारा, फुंकणारा; शेगडींतील हवा खेळण्याकरितां किंवा खोलींतील हवा वाढवण्याकरितां ठेवलेली लोखंडाची पट्टी.

Blow'fly̆, *n.* (-ō-, ब्लो'-फ्लाय्)—a meat fly. मांसावर अंडीं घालणारी माशी.

Blow'pipe, *n.* (-ō-, ब्लो'पाइप्)—a tube for heating flame by blowing air into it. फुंकणी, धमनी.

Blow'y̆, *a.* (-ōĭ, ब्लो'इ)—windy, wind-swept. वाऱ्याखालचा, वारा असलेला.

Blowzed, *a.* (-zd, ब्लाउझ्ड्)—red-faced, coarse-looking; dishevelled. लाल तोंड असलेला, ओबडधोबड दिसणारा; विखरलेला, पिंजरलेला. Blowzy, *a.* (लाजेनें किंवा श्रमानें) तोंड लाल झालें आहे असा.

Blŭb, *v. i.* (ब्लब्)—(School sl.) to shed tears. अश्रु ढाळणें, रडणें.

Blubb'er, *n.* (ब्ल'बर्)—whale fat; weeping. देवमाशाची चरबी; (तोंड आणि डोळे सुजेपर्यंत) रडणें. *a.* swollen, protruding (of lips). फुगलेला, पुढें आलेला, जाड. *v. t.* & *i.* to utter with sobs, weep noisily; wet, disfigure, swell (face) with weeping. स्फुंदून रडणें, ओकसाबोकशी रडणें; रडून रडून तोंड विद्रूप करणें, रडून तोंड सुजविणें.

Blu'chers, *n. plu.* (bloo̅k'erz, ब्लू'कर्झ्)—old-fashioned low-cut laced boots. घोट्या इतका जुन्या चालीचा एक प्रकारचा अर्धा बूट.

Bludg'eon, *n.* (-ujn, ब्ल'जन्)—a heavy-headed stick. सोटा, लाठी.

Blue, *a.* (ब्लू)—coloured like sky or deep sea. निळा. *n.* blue colour; laundress's blue powder; sky; sea; blue uniform; colour or member of a party; (badge of) athlete representing university; (*plu.*) depression, melancholy; Royal Horse Guards. अस्मानी किंवा निळा रंग; धुण्याची नीळ; आकाश; समुद्र; सैन्याचा सारखा निळा पोषाख; एखाद्या पक्षाचा रंग किंवा सभासद; विश्वविद्यालयाचा विशिष्ट तालिमबाज किंवा त्याची खूण; (अने०) उदासीनता, विषाद; राजाचे घोडेस्वार रक्षक. *v. t.* to make blue; (sl.) to spend extravagantly. निळा करणें; भरमसाट खर्च करणें. *To look blue*, to be confused or terrified. काळवंडणें, काळा दिसणें. *To drink till all's blue*, to drink to drunkenness. (भोंवतालचें सर्व) निळें पिंवळें दिसेपर्यंत पिणें. Blueness, *n.* निळेपणा, नीलिमा.

Blue'bĕll, *n.* (ब्लू'बेल्)—wild hyacinth with blue or white flower growing in moist places and flowering in spring, harebell. वसंतांतील ओलसर जागीं उगवणारें निळ्या फुलांचें झाड.

Blue'-bo͝ok, *n.* (ब्लू'बुक्)—Parliamentary or Privy Council report; directory of prominent persons. पार्लमेंटचा किंवा प्रीव्ही काउन्सिलचा अहवाल; प्रमुख व्यक्तींची यादी.

Blue'-bŏttle, *n.* (ब्लू'-बॉटल्)—blowfly; blue cornflower. मोठ्या व निळ्या पोटाची माशी; धान्यांत उगवणारा एक प्रकारचा निळा रोपा.

Blue'-coat bŏy̆, *n.* (ब्लू'कोट् बॉय्)—a boy or scholar in Christ's Hospital and certain charity schools. इंग्लंडांतील कांहीं शाळांतील (निळे कपडे घालणारे) विद्यार्थी.

Blue gŭm, *n.* (ब्लू गम्)—a kind of eucalyptus tree. एका जातीचें यूकॅलिप्टस झाड.

Blue'-jacket, *n.* (ब्लू'-जॅकेट्)—a seaman in Navy. आरमारांतील निळ्या पोषाखाचा खलाशी.

Blue Peter, *n.* (ब्लू पीटर्)—a blue flag with white square, hoisted before sailing. गलबत चालविण्याच्या पूर्वी लावलें जाणारें मध्यें पांढरा चौकोनी भाग असलेलें निळें निशाण.

Blue'ribbon, *n.* (ब्लू'रिबन्)—ribbon of the Garter; a badge of teetotalism. (गार्टराच्या पदवीच्या लोकांनीं धारण केलेली सन्मानसूचक) निळी फीत; मद्यपानत्यागाची खूण.

Blue rŏck, *n.* (ब्लू रॉक्)—a kind of pigeon. एका जातीचें कबूतर.

Blue'-stŏcking, *n.* (ब्लू'-स्टॉकिंग्)—a woman having or affecting literary tastes and learning. आपल्या विद्वत्तेचा तोरा मिरवणारी विदुषी स्त्री.

Blŭff, *a.* (ब्लफ्)—with perpendicular broad front; blunt; frank; hearty. उंच पुढें आलेला सुळका ज्याला आहे असा; बोंधट; निर्मळ मनाचा; मनापासूनचा, मनःपूर्वक. *n.* a headland with a particular broad face; bluffing demeanour, threat, etc. भूशिर; धमकीचें भाषण. *v. t.* & *i.* to impose upon; hoodwink. फसविणें, ठक-

विणें; डोळे बांधणें, नजरबंदी करणें. Blŭffly̆, *adv.*; Blŭff'ness, *n.*

Blŭn'der, *v. i.* & *t.* ( ब्लं'न्डर् )—move blindly; ( *on*, *along* ) make gross mistake; mismanage. घसरणें; घोडचूक करणें; अव्यवस्था किंवा गोंधळ करणें. *n.* stupid or careless mistake. ढोबळ चूक, प्रमाद. *To blunder upon*, to find by fluke or lucky accidental stroke. सुदैवानें आकस्मिक रीतीनें सांपडणें. *To blunder out*, to utter thoughtlessly. अविचारानें बोलणें. *To blunder away*, to waste by mismanagement. अव्यवस्थेमुळें घालविणें, एखादी संधि वांया जाऊं देणें.

Blŭn'derbŭss, *n.* ( ब्लं'न्डर्-बस् )—a short gun with large bore firing many balls. एक प्रकारची मोठ्या तोंडाची लहान बंदूक.

Blŭnt, *a.* ( ब्लन्ट् )—dull, not sensitive; without edge or point; plain-spoken. मन्दबुद्धि; बोंथट; निर्भीड. *n.* ( sl. ) ready money; (*pl.*) grade of short thick needle. रोकड, नगद, नगदपैसा; (अने०) एक जातीची लहान जाड सुई. *v. t.* to make less sharp or sensitive, make blunt. धार काढणें, प्रखरता कमी करणें.

Blŭr, *n.* ( ब्लर् )—smear ( of ink, etc ); dimness. पुसटलेल्याचा डाग; अंधुकपणा. *v. t.* smear with ink; make indistinct; sully, disfigure. शाई फांसणें; अस्पष्ट करणें; डाग पाडणें, बिघडविणें.

Blŭrb, *n.* ( ब्लर्ब् )—( *sl.* ) publisher's commendatory advertisement of a book; summary etc. preceding magazine stories and articles. एखाद्या पुस्तकाबद्दल प्रकाशकाची स्तुतिपर जाहिरात; एकाद्या नियतकालिकांतील गोष्टी व लेख यांचा आरंभीं दिलेला गोषवारा.

Blŭrt, *v. t.* ( ब्लर्ट् )—utter abruptly or tactlessly ( *usu.* blurt *out* ). बडबड किंवा अविचारानें बोलून टाकणें, एकदम बोलून जाणें.

Blŭsh, *v. i.* ( ब्लश् )—become red in the face; be ashamed. लाजणें; लज्जा वाटणें. *n.* glance, glimpse; rosy glow; blushing. नजर; लाली; लाज, लाजेची छटा. *At the first blush*, prima facie. सकृद्दर्शनीं, प्रथमदर्शनीं. *To put to the blush*, लाजविणें. Blushingly, *adv.*

Blŭst'er, *v. i.* & *t.* ( ब्ल'स्टर् )—storm boisterously ( of wind, waves, persons ); utter overbearingly, bully. घो घो वाहणें; शिरा ताणणें, धमकावणें. *n.* boisterous blowing; self-assertive talk, threats. सोसाटा; धमकावणी, चढाईच्या गोष्टी. Blus'terer, *n.*; Blus'teringly, *adv.*

Bō'a, *n.* ( बो'आ )—a large non-poisonous snake; a woman's long fur throat-wrap. एक मोठा बिनविषारी साप; बायकांचा लांबलचक गळपट्टा. Boa-constrictor, *n.* अजगर.

Bōaner'gēs, *n.* (-z, बोॲन'र्जीझ् )—a loud-voiced preacher or orator. आवेशयुक्त व मोठ्या आवाजाचा उपदेशक किंवा वक्ता.

Boar, *n.* ( बोअर् )—a *male uncastrated pig.* डुकर, वराह. Wild boar=रानडुकर.

Board, *n.* ( बोअर्ड् )—a thin plank; table; daily meals; council table, councillors, committee. फळी; ( जेवावयाचें ) मेज; दररोजचें जेवणखाण; पंच, सभा, संघ, मंडळ, सभासद. *On board*=on ship, train, etc. गलबतावर, गाडींत, वगैरे. *v. t.* & *i.* cover with board; provide or be provided with meals at fixed time; come alongside ( ship ), embark on. तक्तपोशी करणें; ठराविक वेळीं जेऊं घालणें; ( गलबतादिकांवर ) चढणें. *Boards* ( *pl.* )=the stage. रंगभूमि. *Above board*, open, openly. उघडा, उघड्यावर. *To sweep the board*, to take all the cards or stakes. पत्त्याचे खेळांत सर्व बक्षिसें जिंकणें. *Bed and board*, conjugal relations. नवराबायकोचें नातें, वैवाहिक संबंध. *Groaning board*, plentiful meal. विपुल जेवण. *To go by the board*, गलबताच्या तक्तपोशीवरून खालीं पडणें; पूर्ण नाश होणें, पायमल्ली होणें.

Board'er, *n.* ( बो'अर्डर् )—one who is lodged and fed at a certain price; boy at a boarding-school. दुसऱ्याकडे जेवण्याखाण्यास राहिलेला मनुष्य; जेवण्याखाण्याची सोय करणाऱ्या शाळेंतील विद्यार्थी.

Board'-fence, *n.* ( बो'अर्ड्-फेन्स् )—a close fence of boards. फळ्यांचें घट्ट कुंपण किंवा कुडण.

Board'-wages, *n.* ( बो'अर्ड्-वेजिस् )—servant's pay in lieu of food. खाण्यापिण्याऐवजीं नोकराला दिलेला पगार.

Board'-walk, *n.* ( बो'अर्ड्-वॉक् )—foot-way of boards. फळ्या घालून केलेला पायरस्ता.

Board'ing-house, Board'ing-school, *nn.* ( बो'र्डिंग्-हाउस्, बो'र्डिंग्-स्कूल् )—the house or school where persons or boys and girls board ( with the teacher ). वसतिगृह, मुलांची खाण्यापिण्याची सोय असलेली शाळा.

Boast, *n.* ( बोस्ट् )—vain glorious statement; thing or fact one is proud of. बढाई, फुशारकी; अभिमानाची गोष्ट. *v. t.* & *i.* brag *of* or *about*; possess as thing to be proud of; magnify one's actions. शेखी मिरवणें; बढाई मारणें, स्वतःची बढाई मिरवणें. *To make boast of*, to announce proudly. गर्वानें जाहीर करणें.

Boas'tful, *a.* ( बो'स्ट्-फुल् )—given to boasting; apt to brag or boast. फुशारकी सांगणारा, शेखी मिरवणारा; आत्मश्लाघी, बढाईखोर. Boas't-

fully, *adv.* फुशारकीनें, शेखीनें. Boas't-fulness, *n.*

Boat, *n.* ( बोट् )—a small open oared or sailing vessel, steamer; a boat-shaped receptacle. लहान होडी, बोट; होडीच्या आकाराचें पात्र किंवा वाहन. *v. i.* to go or sail in a boat, to amuse oneself in a boat. बोटींतून जाणें, मौजेखातर होडींतून जाणें. *To take boat*, to embark. होडींत चढणें. *To be in the same boat with*, to have like risks etc. समदुःखी असणें, एकाच संकटांत असणें. *To have an oar in every one's boat*, to be a meddlesome person. दुसऱ्याच्या कामांत उगाच ढवळाढवळ करणें.

Boat'er, *n.* ( बोटर् )—a hard straw hat ( as worn in boating ). एक ताठ गवताची टोपी.

Boat-hook, *n.* ( बोट्-हुक् )—a long pole with hook and spike. आंकडा व मोठा खिळा असलेला एक लांब दांडा.

Boat'house, *n.* ( बोट्-हाउस् )—a shed at water's edge for keeping boats. नदीकांठीं किंवा खाडीकांठीं होडी ठेवण्याची जागा.

Boat'-man, *n.* ( बोट्-मन् )—a man who lets out boats; a waterman. होड्या भाड्यानें देणारा, होडीवाला; कसलेला वल्हेकरी.

Boat'-race, *n.* ( बोट्-रेस् )—a rowing contest. वल्हविण्याची शर्यत, होडींची शर्यत.

Boat'swain, *n.* ( bō'sn, बोसन् )—ship's officer in charge of sails, etc. गलबतावरील एक अधिकारी.

Bŏb, *n.* ( बॉब् )—weight on pendulum, etc.; bobbed hair; knot of hair, curl; horse's docked tail; ( Metre ) short line at the end of a stanza; jerk, bounding movement; curtsy; kinds of change in bell-ringing. लंबकाचा लोलक, ओळंब्याचें वजन; खांद्यापर्यंत पडतील असे कापलेले केंस; केंसांचा झुबका; शेंडा कापलेले घोड्याचे केंस; कवितेच्या शेवटीं असलेली लहान ओळ, ध्रुपद, पालुपद; एकदम झटकन हालवणें, हिसका; स्त्रीचें किंवा लहान मुलाचें नमन; ( देवळांतील ) घंटांचा आवाज बदलण्याची विशेष रीति. *v. t. & i.* move up and down; rap; jerk; cut ( hair ) to hang short of shoulders. खालींवर हालणें; थापट देणें, लटलट हालविणें; ( केंस ) खांद्यापर्यंत पडतील असे कापणें. *To bob up like a cork*, to be active or conspicuous again after defeat. पराजय झाल्यानंतर पुनः उद्योगमग्न होणें.

Bŏb, *n.* ( बॉब् )—( *Sl.*; *plu.* same ) a shilling. एक शिलिंग. *Dry bob*, cricketing Etonian. ईटनमधील क्रिकेटपटु. *Wet bob*, boating Etonian. ईटनमधील नाव चालविणारा.

Bŏbb'erў, *n.* ( बॉबरि )—noisy disturbance, row. गलबला, गडबड.

Bobb'in, *n.* ( बॉबिन् )—a cylinder for holding thread etc., reel, spool; a small bar and string for raising a door-latch. सुत वगैरे गुंडाळण्याची पोकळ वाटोळी कांडी, रीळ, बॉबिन; दरवाजाची कडी काढण्याकरितां तयार केलेला एक लहान दांडा व दोरी.

Bŏbb'inĕt, *n.* ( बॉबिनेट् )—a machine-made cotton net imitating lace made with bobbins on pillow. यंत्रानें तयार केलेली सुताची फीत.

Bŏbb'ish, *a.* ( बॉबिश् )—( *sl.* ) brisk, well, ( esp. *pretty bobbish* ). चपळ, चलाख, चांगला.

Bŏbb'ў, *n.* ( बॉबि )—( *sl.* ) a policeman. पोलिस शिपाई.

Bŏb'olĭnk, *n.* ( बॉबॉलिंक् )—the song-bird of the United States (so called from its cry). उत्तर अमेरिकेंतील एक गाणारा पक्षी.

Bŏb'-slĕd, Bŏb-sleigh, *n.* ( बॉब्-स्लेड्, बॉब्-स्ले )—two short sleighs coupled for drawing logs or for tobogganing. खेळण्याकरितां किंवा लांकडाचे ओंढे ओढण्याकरितां बर्फावरून घसरणाऱ्या जोडलेल्या दोन लहान गाड्या.

Bŏb'stay, *n.* ( बॉब्-स्टे )—a rope holding bowsprit down. गलबताचा नाळदांडा खालीं धरण्याकरितां असलेली दोरी.

Bŏb'tail, *n.* ( बॉब्-टेल् )—docked tail; a horse or dog with a docked tail. झुपकेदार तुटकी शेंपूट; झुबकेदार शेंपटी असलेला घोडा किंवा कुत्रा. *a.* bobtailed. झुबकेदार शेंपटी असलेला. *Tag-rag and bobtail*, the rabble. बाजारबुणगें.

Bŏb'wĭg, *a.* ( बॉब्-विग् )—short-curled, not full-bottomed. आंखुड केंसाचा. *n.* a wig of short hair. आंखुड केंसाचा टोप.

Bŏche, *n. & a.* ( -sh, बॉश् )—German. जर्मन, जर्मनींतील.

Bōde, *v. t. & i.* ( बोड् )—foresee, foretell; portend. भविष्य सांगणें; शकुन देणें; पूर्वसूचना करणें.

Bōde'ful, *a.* ( बोड्-फुल् )—threatening, foreboding, ominous. अशुभसूचक, अशुभलक्षणाचा, शकुनाचा.

Bŏd'ice, *n.* ( बॉडिस् )—close-fitting part of woman's dress down to waist; inner vest over stays. कंचुकी, चोळी, कांचोळी; बॉडिस.

Bo'died, *a.* ( बॉडिड् )—possessed of a body, embodied. देह असलेला, देही, शरीरी.

Bŏ'diless, *a.* ( बॉडि-लेस् )—incorporeal; separated from the body. अमूर्त; देह नसलेला, शरीररहित.

Bo'dilў, *a.* ( बॉ'डिलि )—of or affecting the body. शरीराचा, शारीरिक. *adv.* in person; with the whole bulk, as a whole. स्वतः प्रत्यक्ष; अगदीं, सर्व, पूर्णपणें.

Bŏ'dkĭn, *n.* ( बॉ'ड्किन् )—*a pointless thick* needle with large eye for drawing tape etc. through hem; a long pin for fastening hair. सुंधा दाभण; बायकांचा केंस अटकविण्याचा कांटा, आंकडा. *To ride* or *sit bodkin*, to be squeezed between two persons. दोन मनुष्यांमध्यें अगदीं चेंगरून बसणें.

Bŏd'ў, *n.* ( बॉ'डि )—a man or animal dead or alive; trunk apart from head and limbs; upper garment (minus sleeves and collar), bodice; person; aggregate of persons or things; solidity, substance. सजीव किंवा निर्जीव शरीर; डोकें आणि शरीराचे अवयव खेरीज करून राहिलेला शरीराचा भाग; अंगाबरोबर घट्ट बसणारा कमरेपर्यंतचा कपडा, बॉडिस; मनुष्य; टोळी, गट, मुख्य भाग, जड द्रव्य. *v. t.* give, mental shape to ( with usu. *forth* ); exhibit in outward shape; typify. आकृति देणें, आकार देऊन रूपास आणणें; नमुना म्हणून देणें. *To keep body and soul together*, to remain alive. कसेंतरी जगण्याइतकें खाऊन जिवंत राहणें. *Body of Christ*, sacramental bread. संस्कारित अन्न. *In a body*, all together. सर्व मिळून, एकजुटीनें. *Body politic*, State. राजसंस्था, एकाच राजनीतीनें चालणारी संस्था. *Heavenly body*, the sun, star, etc. सूर्य, चंद्र, तारे वगैरे.

Bŏd'ў-guard, *n.* ( बॉ'डि-गार्ड् )—retinue, escort, personal guard. हुजरात, शरीररक्षक.

Bŏdў'-servant, *n.* ( बॉ'डि-सर्व्हन्ट् )—a valet, a personal attendant. खिद्मतगार, हुजऱ्या.

Bō'er, *n.* ( बो'अर् )—a South-African of Dutch descent. दक्षिण आफ्रिकेंतील डच वसाहतवाला. *a.* of the Boers. बोअर लोकांचा.

Bŏg, *n.* ( बॉग् )—a piece of wet spongy ground, morass. दलदल. *v. t.* to submerge in bog. दलदलींत किंवा चिखलांत रुतणें.

Bŏg'gle, *v. i.* ( बॉ'गल् )—start with fright; hesitate, demur ( *at* or *about* ); equivocate; fumble. भीतीनें दचकणें; कांकूं करणें, अडखळणें; संदिग्ध किंवा दुटप्पी बोलणें; चांचपडणें, अडल्याप्रमाणें शोधणें.

Bŏg'-trŏtter, *n.* ( बॉ'ग्-ट्रॉटर् )—an Irishman. आयर्लंडांतील शेतकरी.

Bŏg'gy, *a.* ( बॉ'गि )—spongy, marshy, miry. दलदलीत, चिखलाचा.

Bō'gie, *n.* ( बो'गि )—an undercarriage, with two or more wheel-pairs, pivoted below the end of a locomotive or railway-car. गाडीचा दबा, दोन अथवा अधिक चाकांच्या जोड्यांवर बसविलेली सखल चौकट, रुळावर चालणारी लांब चौकट.

Bō'gle, *n.* ( बो'गल् )—a phantom, goblin; bugbear, scarecrow. भूत, पिशाच्च; बागुलबोवा, पाखरेंकेतुटके कपडे घातलेलें बाहुलें.

Bō'gŭs, *a.* ( बो'गस् )—counterfeit, sham. खोटें, बनावट.

Bō'gy, Bō'gey, *n.* ( बो'गि )—the devil, goblin; bugbear. भूत, पिशाच्च, राक्षस; बागुलबोवा. *Bogey, Colonel Bogey*, score that good golfer should do hole or course in. गोल्फ खेळामध्यें चांगल्या खेळाडूनें केलेला स्कोअर.

Bōhea', *n.* ( -hē, बोही' )—black tea of lowest quality ( last crop of the season ). अगदीं हलक्या प्रतीचा काळा चहा.

Bōhē'mĭan, *a.* & *n.* ( बोही'-मिअन् )—socially unconventional; a man of free and easy habits, manners, and sometimes morals ( esp. of artists, etc. ). सामाजिक दृष्ट्या स्वतंत्र वृत्तीचा, शिष्टाचाररहित; हव्या त्या ठिकाणीं बसणारा, हवें तें खाणारा ( असा नट, ग्रंथकार किंवा इतर कसबी ). Bōhē'mĭănĭsm, *n.*; Bōhē'mĭanīze, *v. t.*

Bŏĭl, *n.* ( बॉइल् )—hard inflamed tumour; boiling heat. गळूं, केसतूड; अत्यंत उष्णता. *v. i.* & *t.* bubble up with heat; be agitated; cook by boiling. उकळणें; ऊत येणें; शिजणें, शिजवणें. *To boil over*, overflow, be overflowed by bubbling up. ओतणें, ओतूं जाणें. *To boil down* or *away*, to reduce or convert to vapour by boiling. उकळून उकळून आटून जाणें. *To keep the pot boiling*, to get a living. चरितार्थ चालणें, पोटापाण्यास मिळणें. *Boiling hot*, boiling, very hot. उकळता, फार कढत. *His blood boils*, he was very indignant. तो रागानें लाल झाला आहे. *Boiled shirt*, cotton or linen shirt with starched front. पुढील भागाला खळ असलेला सुती किंवा तागाच्या कापडाचा शर्ट.

Bŏĭl'er, *n.* ( बॉ'इ-लर् )—vessel for boiling, esp. for making steam in engine; water-heating tank. वाफ तयार करण्याचें पात्र; कढई. *Boiler deck*, lower deck of a steamer. आगबोटींतील वाफभांडें ठेवण्याकरितां केलेला लहानसा मजला.

Bŏĭl'ĭng, *n.* ( बॉ'इ-लिंग् )—food prepared by boiling. उकळून तयार केलेलें अन्न.

Bŏĭl'ing-pŏĭnt, *n.* ( बॉ'इलिंग्-पॉइंट् )—temperature at which anything boils ( water at sea-level, 212° F., 100° C. ); high excitement. पाणी उकळण्याच्या वेळची उष्णता; फार खळबळ, भयंकर क्षोभ.

Bŏist'erous, *a.* ( बॉइ'स्टरस् )—violent, rough ( wind, sea, behaviour, speech, persons ); noisily cheerful. सोसाट्याचा; आडदांड, गडबड्या, धांदल्या. Boi'sterously, *adv.* सोसाट्यानें, आडदांडपणानें.

Bōld, *a.* ( बोल्ड् )—courageous, enterprising, confident; impudent, immodest; vigorous, well-marked, clear ( imagination, drawing, description, features, etc. ). धीट, धाडसी; अविचारी, उद्धट; जोराचा, स्पष्ट. Bo'ldly, *adv.* धाडस करून, बेधडक. Bo'ldness, *n.* निर्भयपणा, धाडस, उद्दामपणा. *To make bold, To make so bold as,* presume, venture. धाष्टर्य करणें, धाडस करणें.

Bōle, *n.* ( बोल् )—the body or stem of a tree, the trunk. झाडाचा बुंधा, झाडाचें खोड.

Boler'ō, *n.* ( बॉलें'अरो ) ( pl. Boleros )—a Spanish dance; a woman's short loose jacket with or without sleeves. स्पॅनिश लोकांचा नाच; बायकांचें लहान सैल जाकीट.

Bōll, *n.* ( बोल् )—the pod or capsule of a plant, a round seed-vessel of flax, cotton, etc. झाडाचें बोंड, ताग, कापूस वगैरेचें बोंड.

Bŏ'llard, *n.* ( बॉ'लर्ड् )—a strong post fixed on a wharf or quay for securing ropes. दोऱ्या बांधण्याकरितां धक्क्यावर बसवलेला मजबूत खांब.

Bŏl'shĕvĭck, *n.* ( बॉ'ल्-शिव्हिक् )—an advocate of proletarian dictatorship in Russia by soviets, Russian communist; any revolutionary. रशियांतील कनिष्ठ वर्ग किंवा मजूर वर्ग यांचीच सत्ता असावी असें प्रतिपादन करणारा, बोल्शेव्हिक, रशियांतील कम्युनिस्ट; क्रांतिकारक. Bo'lshevism, *n.*; Bo'lshevist, *n.* & *a.*

Bō'lster, *n.* ( बो'ल्स्टर् )—long stuffed pillow. तक्या, लोड. *v. t.* & *i.* support with bolster, prop up; fight with bolsters. गाद्या लावणें, आधार देणें, टेकू देणें, उचलून धरणें; तक्ये घेऊन भांडणें.

Bōlt, *n.* ( बोल्ट् )—a short heavy arrow of crossbow; door-fastening; headed metal pin secured with rivet or nut; running away. वज्र; खीळ, दरवाजाचें अडकवण; खिळी, अडसर; पःपलायन करणें. *v. i.* & *t.* dart off, run away; gulp down unchewed; fasten ( door ) with bolt. निसटणें, पळून जाणें; गडागट खाणें; खीळ लावणें. *adv.* quite ( upright ). सरळ उभा. *Bolt from the blue,* complete surprise. अकल्पित आश्चर्याची गोष्ट. *Fool's bolt soon shot,* a fool soon speaks and is soon silenced. मूर्ख मनुष्य बोलतो आणि लगेच स्तब्ध होतो. *To bolt in,* shut in by bolting door. दरवाजा लावून आंत अडकवून ठेवणें. *To bolt out,* to exclude by bolting door. दरवाजा लावून आंत येऊं न देणें.

Bōlt, Boult, *v. t.* ( बोल्ट् )—to sift; investigate. चाळणें; पूर्ण चौकशी करणें, छाननी करणें.

Bōlt'er, *n.* ( बो'ल्टर् )—a political deserter. राजकीय फरारी.

Bōl'ter, Boul'ter, *n.* ( बो'ल्टर् )—a sieve, a sifting machine. चाळण, चाळणी.

Bō'lus, *n.* ( बो'लस् )—a big pill. मोठी गोळी, गुटिका.

Bŏmb, *n.* ( बॉम् )—a case of explosive fired from gun or thrown by hand. कुलपी गोळा, बॉम. *v. t.* & *i.* to assail with bombs, to throw bombs. कुलपी गोळे मारणें, कुलपी गोळ्यांचा भडिमार करणें. *Bomb-proof, a.* ( shelter ) strong enough to resist shells, safe from bombs. कुलपी गोळ्यांनींहि अभेद्य, कुलपी गोळ्यांपासून सुरक्षित.

Bŏmbard', *v. t.* ( बॉ'म्बार्ड् )—to batter with shot and shell ( esp. of warships attacking town ); to assail persistently (with abuse, argument etc.). कुलपी गोळ्यांचा भडिमार करणें; शिवीगाळ करून हल्ला करणें. Bombar'dment, *n.*

Bombardier', *n.* ( bŭmb-, बम्बार्डि'अर् )—an artillery non-commissioned officer who is appointed to the service of mortars and howitzers. तोफखान्यावरील एक बिनसनदी ( 'कमिशन' नसलेला ) अधिकारी.

Bŏm'basine, *n.* ( -zēn, बॉ'म्बझीन्, or बम्बझीन् )—a twilled fabric ( ordinarily black ) of worsted with silk or cotton or alone (much used for mourning). ( विशेषतः सुतकाच्या वेळीं वापरलें जाणारें ) ट्विलचें किंवा दोरस्याचें कापड. [ Gr. *bombyx*, silk ]

Bŏm'bast, *n.* ( बॉ'म्बस्ट् )—high-sounding words, inflated talk. डबदार किंवा बढाईचें बोलणें, निरर्थक भाषण. Bombas'tic, *a.* डबदार, डौलाचा.

Bŏm'ber, *n.* ( -mer, बॉ'मर् )—a soldier or aeroplane using bombs. बॉम फेंकणारा शिपाई किंवा विमान.

Bonăn'za, *n.* ( बोनॅ'न्झा )—a rich mine; source of great wealth. संपत्तीची खाण; विपुल संपत्तीचें साधन.

Bŏn'bŏn, *n.* ( बॉ'न्-बॉन् )—sweetmeat, a Christmas cracker. खाऊ, मिठाई.

Bŏnd, *n.* ( बॉन्ड् )—that which binds or unites; covenant or binding agreement; fetters, chains. बंधन; रोखा, दस्तऐवज; सांखळी, शृंखला. *v. t.* to place goods in bond; to guarantee payment by issue of bonds. रुत करून देणें, गहाण ठेवणें; बॉन्ड्स काढून पैसे देण्याची हमी घेणें. *Bond-holder, n.* person holding a bond. मुदतीचे कर्जरोखे विकत घेणारा. *Bonded ware-*

Boo'dle, *n.* ( बूडल् )—money for political bribery, etc.; a card-game. राजकीय लाचलुचपतीकरितां ठेवलेला पैसा; एक प्रकारचा पत्त्यांचा खेळ.

Book, *n.* ( बुक् )—any printed or written literary composition forming a considerable collection of leaves made available for reading; a volume; a division of a volume; a particular part (generally including several chapters or sections); a division of a subject in the same volume; a register or record; person's bets on a race. पुस्तक; ग्रंथ; ग्रंथाचा एक भाग, पुस्तक; ग्रंथाचा विशिष्ट भाग; एकाच ग्रंथांतील विषयविभाग; हिशोबाचें वगैरे पुस्तक, चोपडी, रजिस्टर; शर्यतींतील पैजा. *A book of reference*, a book not read continuously but used intermittently for information. संदर्भग्रंथ. *To take a leaf out of somebody's book*, to imitate one. एखाद्याचें अनुकरण किंवा नक्कल करणें. *Without book*, without authority, from memory. पुस्तकांवांचून, स्मरणानें. *In good books*, in favour. मर्जीतील. *In bad* or *black books*, in disfavour. गैरमर्जीतील. *To bring to book*, to call to account. खुलासा करण्यास लावणें. *v. t.* to enter in a book or list; secure (seat, etc.) in advance. नोंद करणें; आगाऊ जागा मिळवून ठेवणें.

Book'-binder, *n.* ( बुक्-बाइन्डर् )—one who binds books. पुस्तकें बांधणारा.

Book'-binding, *n.* ( बुक्-बाइन्डिंग् )—the act or practice of binding books. पुस्तकें बांधणें.

Book'-case, *n.* ( बुक्-केस् )—a case with shelves for books. पुस्तकें ठेवण्याचें कपाट किंवा मांडणी.

Book'-concern, *n.* ( बुक्-कन्सर्न् )—a publishing house. प्रकाशनगृह.

Book'ie, *n.* ( बुकि )—( slang ) a betting bookmaker. पैजांची नोंदवही ठेवणारा.

Book'ing-clerk, *n.* ( बुकिंग्-क्लार्क् )—a clerk who issues tickets. तिकिटें विकणारा कारकून.

Book'ing-office, *n.* ( बुकिंग्-ऑफिस् )—an office for sale of tickets. तिकिटें विकण्याचें ऑफिस, तिकिट ऑफिस. ( Also, Booking-hall )

Book'ish, *a.* ( बुकिश् )—given to book-lore. पुस्तकव्यसनी, पुस्तकप्रिय.

Book'-keeper, *n.* ( बुक्-कीपर् )—one who keeps accounts. हिशेब ठेवणारा, मुनीम.

Book'-keeping, *n.* ( बुक्-कीपिंग् )—the art of recording mercantile transactions in a regular and systematic manner. हिशेब ठेवण्याची विद्या, जमाखर्च.

Book'-maker, *n.* ( बुक्-मेकर् )—one who compiles books for profit; a professional betting man. फायद्याकरितां पुस्तकें लिहिणारा; धंदेवाईक पैज मारणारा.

Book'muslin, ( बुक्-मझ्लिन् )—a fine kind of muslin folded like a book. पुस्तकासारखी घडी केलेली एक जातीची उत्तम मलमल.

Book'-plate, *n.* ( बुक्-प्लेट् )—a special label with owner's name, crest, etc. for pasting into books. पुस्तकांत लावण्याची मालकाच्या नांवाची चिठ्ठी.

Book'-post, *n.* ( बुक्-पोस्ट् )—that arrangement in the post office by which books, printed matter, and manuscripts are conveyed at a special rate. पुस्तकें, छापील कागद वगैरे विशिष्ट दरानें पाठविण्याची पोस्टाची व्यवस्था.

Book'-seller, *n.* ( बुक्-सेलर् )—one who sells books. पुस्तकें विकणारा, ग्रंथविक्रेता. Book-selling, *n.* पुस्तकें विकणें.

Book'-shop, *n.* ( बुक्-शॉप् )—a shop for sale of books. पुस्तकांचें दुकान. ( Also, Book-stall, Book-store )

Book'-work, *n.* ( बुक्-वर्क् )—the study of rules etc. ( as opposed to practice). केवळ पुस्तकांचा अभ्यास.

Book'worm, *n.* ( बुक्-वर्म् )—a book-destroying maggot; a great reader. कसर; वाचनाचा अत्यंत शोखी.

Boom, *n.* ( बूम् )—a spar stretching sail-foot and attached at one end of the mast; floating timber barrier ( across harbour etc. ); deep resonant sound; sensational activity in commerce, etc. शिडाचें कापड तळाशीं लांब ताणण्याकरितां वापरलेली काठी, शीड ताणण्याची तळकाठी; बंदरांत आडवा बांधलेला तरंगता लांकडी प्रतिबंध; मोठा घुमणारा आवाज; व्यापारांतील खळबळ. *v. i. & t.* to emit boom; to be in great demand; to win sudden popularity for ( an invention, cause, etc. ), by advertising. घुमघुमणें; मोठी मागणी असणें; एकदम लोकप्रियता संपादन करणें.

Boo'merang, *n.* ( बूमरँग् )—an Australian missile of curved wood that can be so thrown as to return to the thrower. लढाईच्या वेळीं आस्ट्रेलियन लोक वापरीत असलेला वांकडा सोटा.

Boon, *n.* ( बून् )—a request; a favour, gift. विनवणी; दान, कृपा, वर. *a.* bounteous; congenial, jolly, convivial. उदार; आनंदी, उल्हासी.

Boor, *n.* ( बुअर् )—a rustic, rude peasant; ill-mannered man. खेडवळ; अडाणी माणूस, गांवढळ. Boor'ish, *a.* unmannerly. गांवढळ, खेडवळ. Boor'ishly, *adv.*; Boor'ishness, *n.*

Bōōst, *n.* ( बूस्ट् )—a hoist, lift-up; puff. ( माल वगैरे ) वर उचलून नेण्याचें साधन किंवा यंत्र: फुंकारा, झपाटा. *v. t.* to help with a push, boom; ( Electr. ) to supplement voltage of battery. जोर देऊन पुढें आणणें, तेजी आणणें; विद्युच्चालक शक्तीच्या व्होल्टाला मदत करणें.

Bōō'ster, *n.* ( बूस्टर् )—an indefatigable promoter. अविश्रांत श्रम करून भरभराटीस आणणारा.

Bōōt, *n.* (बूट्)—a foot-covering of leather, etc. coming above the ankle; ( hist.) an instrument of torture; a luggage-receptacle in a coach under the guard's and coachman's seat. घोट्यापर्यंत येणारा उंच जोडा, बूट; छळ करण्याचें साधन; गाडींत सामान ठेवण्याची पेटी. *Boot is on the other leg*, truth or responsibility lies just the other way round. सत्य किंवा जबाबदारी ही दुसऱ्याच बाजूला आहे. *To have one's heart in one's boots*, to be in terror. अतिशय भयभीत होणें, गर्भगळित होणें. *To die in one's boots*, to die not in bed. (चांगली तब्यत असतांना ) एकाएकीं मरण येणें. *Boot and saddle*, cavalry signal to mount. घोड्यावर सज्ज होण्यास ( रणवाद्य फुंकून ) केलेली सूचना. *To boot*, as well; into the bargain. आणखी, शिवाय; फायद्यांत. *Boot-hose*=पायमोजा. *v. i. impers.* to be of avail. लाभणें, लाधणें. [ E. g. It boots us little; what boots it ? ]

Bōō'tĕd, *a.* ( बूटिड् )—having boots on. बूट घातलेला.

Bōōtee', *n.* ( बूटी )—kinds of lady's and infant's boot. बायकांचा किंवा अगदीं लहान मुलांचा बूट.

Bōōth, *n.* (बूद् )—structure of canvas or wood ( erected at fairs, etc. ). जत्रेंत वगैरे तात्पुरतें बांधलेलें दुकान.

Bōōt'-jăck, *n.* ( बूट्-जॅक् )—an appliance for pulling boots off. बूट काढण्याची पट्टी.

Bōōt'-lāce, *n.* ( बूट्-लेस् )—a string or leather strip for lacing boots. बूट बांधण्याची दोरी, बुटाची लेस.

Bōōt'lĕgger, *n.* ( बूट्-लेगर् )—one who smuggles or sells by retail prohibited liquor. कायद्यानें मना केलेली दारू (जकात दिल्याशिवाय ) चोरून आणणारा किंवा किरकोळ विकणारा. Boot-legging, *n.*

Bōōts, *n.* ( बूट्स् )—a servant at an inn ( who cleans boots, conveys luggage, etc. ). धर्मशाळेंतील बूट वगैरे साफ करणारा नोकर.

Bōōt'less, *a.* ( बूट्-लेस् )—unavailing; without boots. निरर्थक, व्यर्थ; बुटाशिवाय, बूट नसलेला.

Bōōt'-māker, *n.* ( बूट्-मेकर् )—one whose occupation is to make boots. बूट तयार करणारा.

Bōōt'-trees, *n. pl.* ( बूट्-ट्रीज् )—moulds for keeping boots in shape. बुटांला आकार आणण्याचे ठोकळे.

Bōō'tȳ, *n.* (बूटि)—spoil taken from an enemy in war, pillage, plunder or profit acquired in common, a prize. लूट, लुटीचा माल.

Bōōze, *v. i.* ( बूझ् )—to fuddle oneself with drink, to drink largely. दारू झोंकणें, दारू यथेच्छ पिणें. *n.* a drinking-bout; a drink. मद्य वगैरे पिण्याची चढाओढ; मद्य, पेय. *Booze-hoisting*, (slang) drinking liquor. मद्यपान.

Bōō'zȳ, *a.* ( बूझि )—drunk, merry with liquor, given to drink. प्यालेला, दारूनें धुंद झालेला.

Bō-pee'p, *n.* ( बो-पीप् )—a game of hiding and suddenly appearing to child. कुकडीकूचा खेळ, कुकू.

Bora'cĭc, *a.* ( बोरॅसिक् )—of borax. सवागीचा, टांकणखारासंबंधीं.

Bo'rage, *n.* ( bŭ-, बरिज् )—a blue-flowered plant ( used to flavour claret-cup, etc. ). एक निळीं फुलें असलेलें लहान झाड.

Bor'ăx, *n.* ( बोरॅक्स् )—a salt used as antiseptic and in soldering. टांकणखार, क्षार, पाचनक.

Bordeaux', *n.* (-dō, बॉर्डो )—a southern French wine, claret. दक्षिण फ्रान्समधील दारू.

Bŏrd'er, *n.* ( बॉर्डर् )—side, edge, boundary or part near it; distinct edging round anything. सीमा, हद्द; काठ. *v. t. & i.* to be a border to; to finish a thing off with a border. चिकटून असणें, लगत असणें; गोट किंवा कांठ लावणें. *To border upon*, to resemble. सारखा दिसणें.

Bŏrd'erer, *n.* ( बॉर्डरर् )—living on the border; a dweller on the English and Scottish frontier. शिवशेजारी; इंग्लंड आणि स्कॉटलंड यांच्या सरहद्दीवर राहणारा.

Bōre, *past tense* of Bear.

Bōre, *v. t. & i.* ( बोअर् )—to make a hole ( esp. with a revolving tool); to weary by tediousness; to push another, push aside. (गिरमिटानें) भोंक पाडणें; कंटाळा आणणें, त्रास देणें; दुसऱ्याला पुढें ढकलणें, पुढें घुसणें. *n.* the hollow of the gun-barrel, its diameter, calibre; a tiresome person, twaddler. ( बंदुकीची किंवा इतर नळीची ) लांब पोकळी, बंदुकीच्या नळीचें भोंक; व्यर्थ बोलून कंटाळा आणणारा, त्रासदायक मनुष्य, व्याद.

Bōre, *n.* ( बोअर् )—a tide-wave of exceptional height rushing up estuary. नदीच्या मुखा जवळ उसळणारी भरतीची प्रचंड लाट.

Bor'eüs, *n.* ( बो'रिअस् )—the north wind. उत्तरेकडील वारा.

Bor'eal, *a.* ( बो'रिअल् )—of Boreas, of the north. उत्तरेकडील वान्यासंबंधीं, उत्तरेकडचा.

Bore'dom, *n.* ( बो'अर्डम् )—being bored, ennui, bored state. त्रास, थकवा.

Bŏ'ric, *a.* ( बॉ'रिक् )—of boron. बोरॉन ( या रसायनशास्त्रांतील ) मूलतत्वासंबंधीं.

Born, *a.* ( बॉर्न् )—destined from birth. उपजत, जन्मतःच. *To be born*, to come into the world by birth. जन्मणें. *Born of*, owing origin to. ०पासून झालेला. *Born with a silver spoon in the mouth*, destined to wealth. गर्भश्रीमंत. *Born under a lucky star*, destined to good luck. चांगल्या नक्षत्रावर जन्मलेला. *In all my born days*, in all my life. आजन्मांत, सर्व जन्मांत.

Bŏr'ŏn, *n.* ( बो'रॉन् )—a non-metallic solid element ( a dark-brown powder ). एक रसायनशास्त्रांतील मूलतत्त्व, बोरोन.

Bo'rough, *n.*(-ō, ब'रो)—a town with a municipal corporation. म्युनिसिपालिटी असलेलें शहर. *Rotten borough*, a borough no longer ( before 1832 ) having real constituency. मोडकळीला आलेला भरो, लोकसंख्येच्या मानानें इक्क नसतांहि प्रतिनिधि निवडून देणारें शहर. ( अशीं शहरें १८३२ नंतर इंग्लंडांत रद्द केलेलीं आहेत. )

Bŏ'rrow, *v. t.* & *i.* (-ō, बॉ'रो)—to get temporary use of ( with promise of returning ); to borrow money; to plagiarize; ( Golf ) to allow for the wind or slope. उसणें घेणें; कर्ज काढणें; दुसऱ्याचे ग्रंथांतून चोरून घेणें; वाऱ्याला किंवा उतरणीला जागा देणें. *Borrowed plumes*, *fig.* उसना मोठेपणा.

Bor'stal, *n.* ( बॉ'र्स्टल् )—*Borstal system*, system of imprisonment for young criminals. लहान गुन्हेगारांकरितां कैदपद्धति. ( Borstal is in Kent ).

Bor'zoi, *n.* ( बॉअ'र्-झॉय् )—a Russian wolf-hound. रशियांतील एक शिकारी कुत्र्यांची जात.

Bos, *n.* ( बॉस् )—( slang ) a bad shot or guess. चुकीचा नेम किंवा अंदाज. *v. i.* & *t.* to miss, to bungle. ढोबळ चूक करणें.

Bŏs'cage, Bŏs'kage, *n.* ( बॉ'स्-किज् )—shrubs of trees, masses of trees or shrubs. जंगल, झाडी.

Bosch, *n.* ( bŏsh, बॉश् )—( South-African ) a wood, a bush. रान, झुडुप.

Bosch'bok, *n.* ( बॉ'श्-बॉक् )—an antelope, a bushbuck. हरिण, काळवीट.

Bosch'man, *n.* ( बॉ'श्-मन् )—Bushman. अरण्यांत राहणारा.

Bosch'vark, *n.* ( बॉ'श्-व्हर्क् )—species of wild pig. एका जातीचें रानटी डुकर.

Bosch'veld, ( -velt ), *n.* ( बॉ'श्-व्हेल्ट् )—a bush country. झाडाझुडुपांचा प्रदेश.

Bosh, *n.* & *int.* ( बॉश् )—( colloq. ) a foolish talk, nonsense. मूर्खपणाचें बोलणें, व्यर्थ बडबड. *v. t.* ( slang ) to make a fool of, to tease मूर्ख बनवणें, त्रास देणें.

Bŏs'kȳ, *a.* ( बॉ'स्कि )—wooded, bushy, with shrubs or trees. झाडेंझुडुपें असलेला.

Bo'som, *n.* ( bŏŏz-, बु'झम् )—the breast, that part which is about the breast; an expanse or onfolding space. छाती, वक्षःस्थळ; विस्तार. *Bo'som friend*, a confidential friend. जिवलग मित्र, जीवश्च कण्ठश्च सखा.

Bŏss, *n.* (बॉस्)—the master, manager, or overseer; a round knob or stud, a protuberance. वरचा अधिकारी, मॅनेजर; गोंडा, बोंड पुढें आलेला भाग. *v. t.* to be the boss of, to control. धनी होणें, ताब्यांत ठेवणें. *To boss the show*, to make all arrangements. ( एखाद्या नवीन कामाची ) सर्व कांहीं व्यवस्था करणें. *Bossed*, *a.* having bosses. गोंडे असलेला.

Bŏt, *n.* ( बॉट् )—a parasitic worm. एक अन्योपजीवी किडा. *The bots*, a horse disease caused by the worm. त्या किड्यापासून होणारा एक घोड्यांचा रोग.

Botăn'ic, Botăn'ical, *aa.* (बॉटॅ'निक्, बॉटॅ'निकल्)—of botany. वनस्पतिशास्त्रासंबंधीं, वनस्पतींची.

Bŏt'anist, *n.* ( बॉ'ट-निस्ट् )—a student of botany. वनस्पतिशास्त्राचा अभ्यासक, वनस्पतिशास्त्रवेत्ता.

Bŏt'anize, *v. i.* ( बॉ'टनाइझ् )—to study plants. वनस्पतिशास्त्राचा अभ्यास करणें.

Bŏt'anȳ, *n.* ( बॉ'टनि )—the science of plants. वनस्पतिशास्त्र.

Bŏtch, *v. t.* (बॉच्)—to patch, to mend clumsily. ओबडधोबड ठिगळ मारणें. *n.* a clumsy patch. ठिगळ. Botcher, *n.* ओबडधोबड काम करणारा.

Bōth, *a.* (बोथ्)—the pair of. दोन्ही. *pron.* both persons or things. दोन्ही इसम किंवा वस्तु.

Bŏth'er, *v. t.* & *i.* (-dh-, बॉ'दर्)—to give trouble to; to perplex; to take trouble. त्रास देणें; सतावणें; खस्ता खाणें, त्रास घेणें. *n.* worried state, fuss. दगदग, नसता उपद्व्याप. Botherā'tion, *n.* & *int.*

Bŏth'ersome, *a.* ( बॉ'दर्-सम् )—bothering. त्रासदायक.

Bŏ'thȳ, Bŏ'thie, *n.* (बॉ'थि)—a hut, a cottage; one-roomed building in which workmen are lodged. झोंपडी; एक खोलीचें घर.

Bō'-tree, *n.* ( बो'-ट्री )—the name given in Ceylon to the Pipal tree ( allied to the Banian ) पिंपळाचें झाड.

Bŏt'tle, *n.* ( बॉ'टल् )—a narrow-necked vessel ( with a cork or stopper ); a bundle of hay or straw. बाटली, शिसा; वाळलेल्या गवताची पेंढी. *v. t.* to store in bottles; ( slang ) to nab, to catch. बाटलींत भरून ठेवणें, शिशींत ओतणें; पकडणें, पकडून ठेवणें. *To bottle up*, to conceal for a time, restrain ( anger, etc. ). लपवून ठेवणें, दाबून ठेवणें. *The bottle*, drinking. पान, मद्यपान. *Over a bottle*, while drinking. पीत असतांना. *To bring up on the bottle*, not to be fed on the breast. वरच्या दुधावर पोसणें. *To look for a needle in the bottle of hay*, to make a hopeless search. निरर्थक शोध करणें.

Bott'le-hōlder, *n.* ( बॉ'टल्-होल्डर् )—an attendant in a boxing match (administering refreshment, etc. ). ठोंसाठोंशीच्या खेळांतील गड्याचा पाठिराखा.

Bott'le-washer, *n.* ( बॉ'टल्-वॉशर् )—an underling. बगलया, हस्तक, क्षुद्र मनुष्य.

Bŏtt'om, *n.* ( बॉ'टम् )—the lowest part of anything, the base; what is below the surface; the bottom of a ship's hull. बूड; तळ; जहाजाचा तळभाग. *v. t.* to touch the bottom of ( sea, etc.), to sound; to find the extent or real nature of, to find the truth of. तळाला स्पर्श करणें, तळाचा थांग लागणें; खरें स्वरूप किंवा सत्य शोधून काढणें. *To stand on own bottom*, to be independent. स्वतंत्र असणें, आपल्या पायांवर उभें राहणें. *Bottom up*, upside down. उलटापालटा, उलथापालथा. *To go* or *send to the bottom*, to sink. बुडणें, बुडवणें. *To touch the bottom*, to be at the lowest point or on firm facts. तळ लागणें, बूड गांठणें. *To* or *from the bottom of one's heart*, genuinely, profoundly. अगदीं अंतःकरणापासून, मनःपूर्वक. *To be at the bottom of*, to be the cause of. मुळाशीं असणें, कारण असणें. *Bet your bottom dollar*, stake all. सर्व कांहीं पणाला लाव.

Bŏtt'om-land, *n.* ( बॉ'टम्-लॅन्ड )—the low land along a river. नदीच्या बाजूची सखल जमीन.

Bŏtt'omless, *a.* ( बॉ'टम्-लेस् )—without the bottom ( a chair, etc. ); unfathomable तळ नसलेला; अगाध.

Bŏtt'ommōst, *a.* ( बॉ'टम्-मोस्ट् )—lowest down. अगदीं खालीं किंवा अत्यंत खोल असलेला.

Bŏtt'omrў, *n.* ( बॉ'टम्-रि )—borrowing of money by the owner on the security of a ship. जहाज तारण ठेवून कर्ज काढणें.

Bŏt'ūlĭsm, *n.* ( बॉ'ट्युलिझम् )—sausage-poisoning. कबाबविष.

Boud'oir, *n.* ( bōōd'war, बू'ड्-वॉर् )—a lady's small private room. जनानखाना.

Bough, *n.* ( बाउ )—a branch of a tree. झाडाची फांदी.

Bought, *pa. t. & pa. p.* of Buy.

Bou'gie, *n.* ( bōōzhē, बू'झी )—a surgical instrument for exploring passages of the body. सळई, बत्ती.

Boui'llon, *n.* ( bōōlyawn, बू'ल्-यॉं )—broth, soup. मांसाचें कढण, रसा, सूप.

Boul'der, *n.* ( bōl-, बो'ल्डर् )—a large water-worn rounded stone, cobble; a detached rock. पाण्यानें घांसून वाटोळा झालेला मोठा दगड, गोटा; सुटा झालेला खडक.

Boule'vard, *n.* ( bōōl'vär, बू'ल्-व्हार् )—a broad street with lines or rows of trees. दुतर्फा झाडांच्या रांगा असलेला रुंद रस्ता.

Bounce, *v. i. & t.*( बाउन्स् )—to spring up after striking ground; jump up (esp. in anger); bustle or bluff. सटकन वर उडणें; रागानें उडी मारणें; बढाई सांगणें, दडपून घुसणें. *n.* a rebound from ground; a swagger, boastfulness; an assurance. जमिनीवरून परत उंच उडणें; घमेंड, फुशारकी; खातरी. *adv.* startlingly, suddenly, noisily. दचकून, एकदम, सटकन.

Bou'ncer, *n.* ( बा'उन्सर् )—one who bounces; an unblushing lie, a great lie; a big specimen, a thing big of its kind. धाडकन उडी मारणारा; धडधडीत खोटी गोष्ट; कोणत्याहि जातीची मोठी वस्तु.

Boun'cing, *a.* ( बा'उन्सिंग् )—big and hearty. मजबूत आणि चलाख, दणकट.

Bound, *n.* ( बाउन्ड् )—( usu. in *pl.* ) encircling boundary, limit; recoil of ball, *etc.*; a springy upward or forward movement. मर्यादा, सीमा; (चेंडू वगैरे) उडणें; पुढें जाणें, उडी. *a.* ready to start, on the way for. जाणारा, जाण्याच्या बेतांत असलेला. *v. t. & i.* to set bounds to, to limit, to be the boundary of; to recoil from wall or ground; to spring, leap. मर्यादा असणें, हद्द घालणें; भिंतीवरून किंवा जमिनीवरून परत उडणें; उडणें, उडी मारणें. *To advance by leaps and bounds*, to advance with startling speed. विलक्षण गतीनें पुढें जाणें. *Bound up with*, having the same interests as. एकच हितसंबंध असलेला. *Bound to win*, certain to win. खात्रीनें जिंकणारा. *Out of bounds*, beyond the limits set by school rules. शाळेच्या नियमांचें उल्लंघन करणारा.

Bound, Bounden, *pa. t. & pa. p.* of Bind. *Bounden duty*, आवश्यक कर्तव्य.

Boun'dary, *n.* ( बाउ'न्डरि )—the line dividing a country etc. from another. बांध, मर्यादा, हद्द.

Boun'der, *n.* ( बा'उन्डर् )—one that bounds; ( colloq. ) a cheerfully or noisily ill-bred person. उड्या मारणारा, झडप घालणारा; रंगेल आडदांड माणूस.

Boun'dless, *a.* ( बा'उन्ड्-लेस् )—without bound or limit, unlimited, unconfined. अमर्याद, विपुल, मर्यादारहित.

Boun'teous, Boun'tiful, *aa.* ( बाउ'न्टिअस्, बाउ'न्टिफुल् )—showing bounty, generous; profuse. दानशूर, उदार, सढळ दाताचा; पुष्कळ, विपुल.

Boun'ty, *n.* ( बाउ'न्टि )—profuse giving, charitable gifts; a premium to encourage trade or industry. औदार्य, बक्षीस; व्यापारास उत्तेजनार्थ सरकारी मदत.

Bouquet', *n.* ( bŏŏkā', बु-के' )—a bunch of flowers, cut flowers arranged for carrying in the hand; perfume of wine. फुलांचा गुच्छ, तुरा, गुच्छा; दारूचा सुगंध, मजेचा सुवास.

Bou'quetin, *n.* ( bŏŏ'ke-, बू'केटिन् )—the Alpine wild goat. आल्प्स पर्वतांतील रानटी बोकड.

Bour'bon, *n.* ( बू'र्-बॉन् )—( polit. ) a stubborn conservative; Kentucky whisky. हट्टी किंवा पक्का रूढमार्गवादी; एक जातीची व्हिस्की दारू.

Bourg'eois, *a.* & *n.* ( bŏŏrzh-wā, बू'र्झ्-वा )—(a member) of the class between the gentry and the labourers, of shop-keeping middle class. मध्यम स्थितीचा नगरवासी, व्यापारी-उद्मी.

Bourgeois', *n.* (berjois, बर्-जॉ'इस् )—a printing type between the long primer and the brevier, a nine-point printing type. बर्जॉइस नांवाचा एक लहान टाइप.

Bourgeoisie', *n.* ( bŏŏrzhwāzē, बूर्झ्-वाझी' )—the bourgeois class. मध्यम स्थितीचे लोक, मध्यम स्थितीचे व्यापारी लोक.

Bourn, *n.* ( बोअर्न् )—a small stream. ओढा.

Bourn, Bourne, *n.* ( बोअर्न् )—a goal or destination, limit. अंतिम हेतु, जाण्याचें ठिकाण, मर्यादा, सीमा.

Bourse, *n.* ( बुअर्स् )—foreign money-market ( esp. that of Paris ), a place where merchants assemble for general business. सराफबाजार, उद्मी लोकांचा अड्डा.

Bout, *n.* ( बाउट् )—a spell or turn; a trial of strength. दम, पाळी; अवसान, शक्तीची परीक्षा, चढाओढ. *This bout,* on this occasion. यावसंगीं.

Bŏ'vine, *a.* ( बो'व्हाइन् )—of oxen; dull, inert. बैलांचा, गुरांविषयींचा; मंद, सुस्त, मठ्ठ.

Bŏv'ril, *n.* ( बॉ'व्ह्-रिल् )—a meat extract used like beef-tea. मांसाचा अर्क.

Bow, *n.* ( बो )—a weapon for shooting arrows; an implement used in playing fiddle etc.; a slip-knot with a loop or two; an ornamental knot of ribbon. धनुष्य; ( सारंगी किंवा ताऊस वाजविण्याचा ) कमानदार गज; निसरगांठ; निसरगांठ मारलेली फीत. *Two strings to one's bow,* more resources than one. पैसे मिळविण्याचीं एकापेक्षां जास्त साधनें. *To draw the long bow,* to exaggerate. अतिशयोक्ति करणें.

Bow, *v. i.* & *t.* ( बाउ )—to bend or kneel ( in sign of submission or reverence ), to signify submission to authority; to incline one's head in salutation. वांकणें, शिरसावंद्य करणें, नमणें; नमस्कार करणें. *n.* a fore-end of the boat or a ship; the rower nearest the bow. जहाजाच्या पुढचा भाग; पुढच्या भागाजवळ वल्हवणारा मनुष्य. *Bowing acquaintance,* acquaintance that stops at bowing, slight acquaintance. नमस्कार करण्यापुरती ओळख, थोडीशी ओळख. *Bowed down* ( i. e. crushed ) *by care,* काळजीनें खंगलेला. *To make one's bow,* to retire. ( लवून थाटानें रंगभूमीवरून ) परत जाणें. *On the bow,* within 45° of the point right ahead. अगदीं डोक्यावर सरळ रेषेपासून ४५° अंशाच्या आंत.

Bowd'lerize, *v. t.* ( बा'उड्-ल-राइझ् )—to expurgate a book. ( पुस्तकांतील ) खोडसाळ किंवा वाईट भाग गाळून टाकणें. Bowdlerism, Bowdlerization, *nn.*

Bow'els, *n. pl.* ( बॉ'विल्झ् )—entrails, one's inside; feelings of compassion. आंतडीं, आंतील भाग; करुणावृत्ति.

Bow'er, *n.* ( बा'उ-अर् )—a dwelling, a lady's room; an arbour; a leafy nook; the anchor at ship's bow. स्त्रियांची घरांतील खासगी खोली; लतागृह; पर्णमय कोंपरा; गलबताच्या नाळेकडील नांगर.

Bow'-head, *n.* ( बो'हेड् )—Greenland whale. ग्रीनलँडमधील व्हेल मासा.

Bow'ie, Bow'ie-knife, *nn.* ( बो'इ, बो'इ-नाइफ् )—a long hunting knife ( used in *U. S.* ). एक लांब सुरा, खंजीर. ( याचें पातें १५ इंच लांब असतें. )

Bowl, *n.* ( बोल् )—a basin ( esp. for drink or food ); the hollow of a tobacco-pipe, spoon, etc.; a ball. पेला, वाटी; चिलीम, चमचा वगैरेंचा पोकळ भाग; चेंडू. *v. i.* & *t.* to deliver a ball; to put a batsman out by bowling. चेंडू फेंकणें; चेंडू लोळत जाईल असा हुईसरपटत फेंकून 'आउट' करणें.

Bowl, *n.* ( बोल् )—( *pl.* ) a game played on green with biased wooden balls; ( Sing. )

a biased wooden ball; a ball used in skittles. काष्ठगोलकाचा खेळ; काष्ठगोलक, लांकडी चेंडू; स्किटल् खेळांतील चेंडू.

Bow'legged, *a.* (बो'ले-ग्ड्)—bandy, having legs wide apart at the knees. फेंगड्या पायांचा, फेंगडा.

Bow'ling-green, *n.* (बो'लिंग्-ग्रीन्)—the ground for bowls. चेंडू चांगला फेंकतां यावा म्हणून तयार केलेली जागा.

Bow'ling, *n.* (बो'लिंग्)—the game of skittles. काष्ठगोलकाचा खेळ.

Bow'ling-alley, *n.* (बो'लिंग्-ॲलि)—an enclosure for skittles. स्किटल खेळाकरितां राखून ठेवलेली मर्यादित जागा.

Bow'ling-crease, *n.* (बो'लिंग्-क्रीस्)—a line from behind which the bowler in cricket delivers balls. ज्या रेषेच्या पाठीमागून चेंडू टाकावयाचा ती रेष.

Bowl'er, *n.* (बो'लर्)—a person bowling at cricket; a player at bowls; a hard felt hat. (क्रिकेट खेळांत) चेंडू फेंकणारा, चेंडू देणारा; काष्ठगोलक खेळांतील खेळाडू; एका जातीची ताठ फेल्टची टोपी.

Bow'line, *n.* (bō-lin, बो'लिन्)—a knot in making fixed the end loop, a simple but very secure knot. एक साधी पण मजबूत गांठ.

Bow'man, *n.* (बो'मन्)—a man who shoots with the bow, an archer. तिरंदाज, धनुर्धारी.

Bow'sprit, *n.* (bō-, बो'स्प्रिट्)—a spar running forwards from a ship's bow. गलबताच्या नाळापासून पुढें असणारी डोलकाठी.

Bow'-window, *n.* (बो'विन्डो)—a curved bay-window. अर्धवर्तुलाकार खिडकी.

Bow'yer, *n.* (bō-, बो'यर्)—a maker or seller of bows. धनुष्यें तयार करणारा किंवा विकणारा.

Box, *n.* (बॉक्स्)—a chest; a blow; a driver's seat in front of a carriage; a small compartment in a theatre; kinds of evergreen shrub; wood of this shrub; a slap with the hand (*on the ears*); a hut for sentry or signalmen. पेटी; ठोसा; गाडी हांकणाराची बसावयाची जागा; नाटकगृहांतील एक निराळी खोली; एका जातीचें लहान झाड; त्या झाडाचें लांकूड; थप्पड, ठोसा; पहारेकऱ्याची किंवा सिग्नल देणाराची लहान झोंपडी. *v. t. & i.* to put in a box; to fight with boxing-gloves or bare fists. पेटींत घालून ठेवणें; मुष्टामुष्टी करणें, ठोसाठोंसी करणें. *In the same box*, in the same predicament. एकाच कठीण परिस्थितींत. *In the wrong box*, in an awkward position. चमत्कारिक स्थितींत, भलत्याच परिस्थितींत. *To box up*, to confine uncomfortably, to squeeze together. दुःखद स्थितींत एकत्र अडकवून ठेवणें. *To box the watch*, to overturn a watchman in his box. पहारेकऱ्याला त्याच्याच जागेंत उलथून पाडणें. *To box the compass*, (Naut.) to rehearse the points in correct order; (fig.) to make complete revolution and end where one began (in politics, argument, etc.). योग्य क्रमानें दिशा सांगणें; पूर्ण फेर घेणें आणि ज्या ठिकाणीं आरंभ केला त्याच ठिकाणीं शेवट करणें.

Bŏx'-car, *n.* (बॉ'क्स्-कार्)—an enclosed freight-car. झांकलेली मालाची गाडी.

Box'cloth, *n.* (बॉ'क्स्-क्लॉथ्)—a close-woven stuff like buff. कमावलेल्या कातड्यासारखें घट्ट विणलेलें कापड.

Box'er, *n.* (बॉ'क्सर्)—a glove-fighter or pugilist; a member of Chinese anti-foreign secret society. ठोसाठोंसी करणारा, मुष्टियोद्धा; चिनी लोकांच्या परकीय लोकांच्या विरुद्ध असलेल्या मंडळाचा सभासद.

Bŏx'ing, *n.* (बॉ'क्सिंग्)—an act of fighting with fists (usually gloved). बाहुयुद्ध, ठोसाठोंसीचा खेळ.

Bŏx'ing-day, *n.* (बॉ'क्सिंग्-डे)—the first week-day after Christmas when Christmas-boxes are given. नजराण्याच्या ख्रिस्मस पेट्या देण्याचा ख्रिस्मस नंतरचा पहिला दिवस.

Bŏx'ing-gloves, *n.* (बॉ'क्सिंग्-ग्लव्ह्ज)—padded gloves used in boxing. ठोसाठोंसीच्या खेळांतील हातमोजे.

Bŏx'-office, *n.* (बॉ'क्स्-ऑफिस्)—a place for boxing seats. जागेचीं तिकिटें मिळण्याचें ठिकाण.

Bŏx'seat, *n.* (बॉ'क्स्-सीट्)—the seat beside the driver on box. गाडी हांकणाऱ्याजवळ बसण्याची जागा.

Bŏx'-wood, *n.* (बॉ'क्स्-वुड्)—the wood of the box-tree. बॉक्स झाडाचें लांकूड.

Boy, *n.* (बॉय्)—a male child or youth, a son; a native male servant. मुलगा, पुत्र; नोकर, नोकर मनुष्य.

Bŏy'cŏtt, *v. t.* (बॉ'य्-कॉट्)—to refuse to hold relation with. बहिष्कार घालणें. *n.* systematic refusal of social or commercial relations. सामाजिक किंवा व्यापारी बहिष्कार.

Bŏy'hood, *n.* (बॉ'य्-हुड्)—boyish age; boys. बाळपण; मुलें.

Bŏy'ish, *a.* (बॉ'यिश्)—of boys; lively or high-spirited. मुलांचें, पोरकट; आनंदी, उत्साही.

Boy'scouts, *n. pl.* (बॉ'य्-स्काउट्स्)—organizations founded for developing character and physique of boys. मुलांचें शील व शरीर

सुधारण्याकारितां काढलेल्या संस्था. ( Also, Boys' Brigade. )

Brāce, *v. t.* (ब्रेस्)—*to strengthen or tighten*, to give firmness to, to fasten tightly. बळकटी आणणें, ताणून घट्ट करणें. *n.* a thing that braces or connects; (*pl.*) trouser-suspenders; a pair or couple. कसणी, ओढणी; (अने०) इजार वगैरे अडकाविण्याच्या खांकेबंद; जोडी.

Brāce'let, *n.* (ब्रे'स्लिट्)—an ornament for the arm or wrist. करभूषण, कंकण, कडें, बांगडी. Brā'celeted, *a.*

Brā'cer, *n.* (ब्रे'सर्)—pick-me-up; a wrist-guard in archery and fencing. हुशारी आणणारें पेय; मनगटाला बांधण्याचा पट्टा, कसणी.

Brach, *n.* (ब्रॅच्)—a bitch hound. शिकारी कुत्री.

Brā'chial, *a.* (-k-, ब्रे'किअल्)—of the arm, like an arm. बाहूचा, बाहूसारखा.

Brăchycephă'lic, *a.* (-kĭsi-, ब्रॅकिसिफॅ'लिक्)—short-headed. लहान डोक्याचा. [Gr. *brachys*, short, & kephale, Sk. कपाल, a head]

Brā'cing, *a.* (ब्रे'सिंग्)—invigorating, stimulating. जोमदार, हुशारी किंवा बळकटी आणणारा.

Bră'cken, *n.* (ब्रॅ'कन्)—a fern abundant on heaths; any large fern; a mass of ferns. ओसाड मैदानांत विपुल वाढणारा नेचा किंवा नेचरी; कोणताहि मोठा नेचा; नेच्यांचा समुदाय.

Brăck'et, *n.* (ब्रॅ'किट्)—a projection from a wall serving as a support, corbel; an angular support for something fastened to a wall; marks ( such as [ ], { } ) used in pairs for enclosing word or figures. भिंतींत बसविलेले दगडी किंवा लांकडी घोडे; भिंतींत फळी वगैरे मजबूत बसण्याकारितां दिलेला टेकू, ब्रॅकेट; कंस. *v. t.* to support with a bracket; to enclose in brackets; to couple (names, etc.) together. ब्रॅकेट लावून टेंकू देणें; कंस घालणें; नांवें वगैरे एकत्र घालणें. *Bracketed*, equal. सारखा.

Brăck'ish, *a.* (ब्रॅ'किश्)—between fresh and salt, saltish ( of water ). खारट, मचूळ.

Brăct, *n.* (ब्रॅक्ट्)—a small leaf or scale below calyx. फुलाच्या देंठाशीं असलेलें लहान पान.

Brăc'tĕate, *a.* (ब्रॅ'क्टिएट् )—having bracts. देंठाशीं लहान पानें असलेलें.

Brăd, *n.* (ब्रॅड्)—a thin flat slightly-headed nail. टेकस, एक लहान जातीची चूक.

Brăd'awl, *n.* (ब्रॅ'डॉल्)—a small boring tool. एक लहान भोंक पाडण्याचें हत्यार.

Brăd'bury̆, *n.* (ब्रॅड्-बरि)—(Slang) a currency note ( esp. for £ 1 ). (विशेषतः एक पौंडाची) कागदी नोट.

Brae, *n.* (-ā, ब्रे)—(Sc.) a steep bank, a hill-side. उतरण, टेंकडीची बाजू, टेंकाड.

Brăg, *v. i. & t.* (ब्रॅग्)—to talk boastfully, to boast of. बढाई मारणें. *n.* a boastful statement or talk; a card-game like poker. बढाई, फुशारकी, आत्मप्रशंसा, आत्मप्रौढी. शेखी; पत्त्यांचा एक प्रकारचा खेळ.

Brăggadō'ciō, *n.* (-shi-, ब्रॅगडो'शिओ)—bragging talk, empty vaunting; a boaster. फुशारकी, बढाईखोरपणा; बढाईखोर, बढाई मारणारा.

Brăgg'art, *n.* (ब्रॅ'गर्ट्)—a boaster, (attrib.) bragging. घमेंडखोर, आत्मश्लाघी.

Brahmapoo'tra, Brahma, *nn.* (ब्रह्मपु'त्र, ब्रह्म)—a kind of domestic fowl. एका जातीचा पाळीव पक्षी.

Brahm'in, *n.* (ब्रॅमि'न्)—a member of the Hindu priestly caste. ब्राह्मण. Brahmĭnee, *n.* a female Brahmin; belonging to the Brahmans. ब्राह्मणी; ब्राह्मणाचा. Brahmi'-nism, *n.* ब्राह्मणत्व.

Braid, *n.* (ब्रेड्)—a plaited tress of hair; silk or thread or wire woven into a band. वेणी; विणलेली दोरी किंवा तार. *v. t.* to form into a braid, to trim with a braid; to interweave. वेणी घालणें; गुंफणें.

Brain, *n.* (ब्रेन्)—nervous organ in the interior of skull. मेंदू. (*Pl.*) substance of the brain, intellectual ability. बुद्धि, अक्कल. *v. t.* to dash out brains of. कपाळमोक्ष करणें, डोकें फोडणें, ठार करणें. *To blow out one's brains*, to shoot him in the head. डोक्यांत गोळी घालणें. *To cudgel one's brain*, to think hard. फार विचार करणें. *To have something on the brain*, to be crazy about it. मेंदू जीर्ण होणें, वेडसर होणें. *To turn one's brain*, to make him vain and silly. बढाईखोर व मूर्ख बनविणें.

Brain'-făg, *n.* (ब्रे'न्-फॅग्)—nervous exhaustion. मेंदूचा शीण.

Brain'-păn, *n.* (ब्रे'न्-पॅन्)—cranium, skull. मेंदूची कवटी, डोकें.

Brain'y̆, *a.* (ब्रे'नि)—mentally smart, inventive. चलाखबुद्धीचा, शोधक.

Braise, *v. t.* (-z, ब्रेझ्)—to stew (with fire above and below) tender (with bacon, herbs, etc.). (मंद अग्नीवर) वाफ देणें, शिजविणें, रांधणें.

Brāke, *n.* (ब्रेक्)—an apparatus for checking the motion of a wheel, vehicle or train; a large wagonette; a heavy harrow; a bracken; a thicket, brushwood. गति कमी किंवा बंद करण्याचें यंत्र; मोठा चार चाकी गाडीचा डबा; दंताळें, फेंसाटी; नेचा, नेचरी; कांटेरान, खुरटी झाडी, दाट झाडांचें जंगल.

Brākes man, *n.* (ब्रे'क्स्-मन्)—a man in charge of the brake. आगगाडीचा वेग कमी करणारा, ब्रेक ज्याच्या ताब्यांत असतो तो.

Brāke'-văn, *n.* (ब्रे'क्-व्हॅन्)—a guard's compartment in which the train-brake is worked. आगगाडीचा ब्रेकडबा.

Brăm'ah, *n.* (ब्रॅ'मा)—a kind of lock; a key of that lock. एक जातीचें कुलुप; त्या कुलुपाची किल्ली.

Brăm'ble, *n.* (ब्रॅ'म्बल्)—blackberry bush; any wild prickly shrub; (Sc.) blackberry. कांटेझाड, कांटा; कोणतेंहि कांटेरी झाड; गौरीफळ.

Brăm'blĭng, *n.* (ब्रॅ'म्ब्लिंग्)—the mountain finch. पर्वतावरील एक जातीचा लहान पक्षी.

Brăm'blȳ, *a.* (ब्रॅ'म्ब्लि)—full of brambles. कांटेझाडांनीं भरलेलें.

Brăn, *n.* (ब्रॅन्)—husks separated from flour. कोंडा, भुसा.

Brăn'-pie, *n.* (ब्रॅ'न्-पाइ)—a tub of bran into which children dip for toys. भुशांनीं भरलेलें लांकडाचें पिंप.

Brănch, *n.* (ब्रान्च्)—a shoot of a tree, a small bough, a twig; an offshoot or subdivision of something. झाडाची फांदी, खांदी; कोणत्याहि गोष्टीची शाखा. *v. i.* to send branches forth; to divide into distinct parts. शाखा पसरणें, फांटे फुटणें; निरनिराळे भाग करणें. *Root-and-branch, a.* thorough, radical. पूर्ण, मुळापासूनचा. *Root and branch, adv.* thoroughly, radically. पूर्णपणें, मुळांफांद्यांसकट.

Brănched, Brăn'chy, *aa.* (ब्रान्च्ट्, ब्रान्चि)—having branches, with many branches. पुष्कळ फांद्या असलेला, पुष्कळ शाखांचा.

Brănd, *n.* (ब्रॅन्ड्)—a piece of burning or smouldering wood, a torch; a sword; an iron stamp used red-hot; stigma; particular kind of goods. कोलीत, मशाल; तलवार; डाग; कलंक; व्यापाराची खूण, छाप. *v. t.* to stamp with brand, impress indelibly; to stigmatize. डाग देणें; कायमचा ठसा उमटवणें; कलंक लावणें, काळें फांसणें. *A brand from the burning*, a rescued person, a convert. आलेल्या संकटांतून शिताफीनें बचावलेला मनुष्य, दुसऱ्या धर्मांत आलेला मनुष्य.

Brăn'dĭsh, *v. t.* (ब्रॅ'न्डिश्)—to wave about or flourish (a weapon or threat as preliminary to action or in display). (दहशत घालण्याकरितां) परजणें, फिरवणें.

Brănd'-new, *a.* (ब्रॅ'न्ड्-न्यू)—conspicuously new. नुकताच तयार झालेला, कोराकरकरित.

Brăn'dȳ, *n.* (ब्रॅ'न्डि)—a strong spirit distilled from wine or grapes. एक प्रकारची दारू, ब्रॅन्डी.

Brănt, *n.*=Brent.

Brăsh, *n.* (ब्रॅश्)—loose broken rock or ice; refuse of boughs of trees. खडकाचे किंवा बर्फाचे तुकडे; (झाडाची कापलेली) निकामी डाहाळी. *a.* (slang) brittle; hasty, saucy. ठिसूळ, अल्पकाळ टिकणारा; अल्लड, उद्धट.

Brăss, *n.* (ब्रास्)—yellow alloy of copper with zinc; sepulchral plate or table of brass; (fig.) effrontery, impudence; (sl.) money. पितळ; मृताच्या स्मरणार्थ त्याचा चेहरा ज्याच्यावर काढला जातो अशी पट्टी, पितळेची स्मरणपट्टी; निर्लज्जपणा, उद्धटपणा; पैसा. *The brass*, the brass instruments of a band. पितळेचीं वाद्यें (शिंग, तुतारी वगैरे). *Brass band*, set of musicians with brass instruments. पितळेचीं वाद्यें वाजविणारी मंडळी. *Brass farthing*, least possible amount. अगदीं कमींत कमी रकम, क्षुल्लक रकम. [E. g. I don't care a brass farthing.] *Brass hat*, (army slang) officer of high rank. मोठा अधिकारी. *Brass tacks*, (slang) actual details, real business. प्रत्यक्ष, बारीकसारीक गोष्ट, खरें काम. [E. g. Get down to brass tacks.]

Brăssärd', *n.* (ब्रासा'र्ड्)—a badge worn on the arm. बाहूवरील खूण.

Brăss'ȳ, *a.* (ब्रा'सि)—like brass in colour, sound or taste; impudent; pretentious. पितळेसारखा, पितळेच्या रंगाचा; उद्धट; आढ्यताखोर. *n.* brass-soled golf-club. पितळेच्या बुडाची गोल्फ खेळण्याची काठी.

Brăt, *n.* (ब्रॅट्)—child (contempt.). पोरटा, पोर, कारटा.

Brăvä'dō, *n.* (ब्राव्हे'डो)—ostentatious or simulated boldness, show of courage, bold front. दिखाऊ किंवा खोटें धाष्ट्यं, फुशारकी.

Brāve, *a.* (ब्रेव्ह्)—ready to confront and steady in enduring danger or pain, fearless of danger or pain; finely dressed, showy, excellent. शूर, धाडसी; उमदा, छानदार. *v. t.* to defy, dare, challenge. न डगमगतां झगडणें, धैर्यानें तोंड देणें, आव्हान करणें. *n.* a Red-Indian warrior. उत्तर अमेरिकेंतील शूर इन्डियन. *Brave it out*, carry oneself defiantly under suspicion or blame. संशयित किंवा दोषी असतांना बेपर्वाईनें वागणें.

Brā'verȳ, *n.* (ब्रे'व्हरि)—brave conduct or temper; bright colours, fine clothes. शौर्य, मर्दुमकी; सुंदर कपडे.

Brä'vō, *n.* (ब्रा'व्हो)—hired assassin or bully; cry of bravo! मारेकरी; वाहवा करणें. *int.* excellent! well done! भले शाबास, भले, वाहवा!

Bravur'a, *n.* ( -ōōr-, ब्रॅव्हू'रा )—a passage of music requiring exceptional powers, brilliant or ambitious execution. अतिशय अलंकारयुक्त गीत किंवा राग.

Brawl, *n.* ( ब्रॉल् )—squabble, noisy quarrel. आरडाओरड करून भांडणें. *v. i.* engage in a brawl; (of stream) to be noisy; to murmur. भांडणें, कलागत करणें; आवाज करणें.

Brawn, *n.* ( ब्रॉन् )—muscle, lean flesh; pickled or potted boar's flesh, meat of pig's head. शरीराचा मांसल भाग; डुकराच्या डोक्याचें मांस.

Brawn'ȳ, *a.* ( ब्रॉ'नि )—strong, muscular. मांसल, बळकट, गोंडस.

Bră'xȳ, *n.* ( ब्रॅ'क्सि )—( Sc. ) splenic apoplexy in sheep; mutton of a sheep dying from the disease. मेंढ्यांना होणारा एक रोग; या रोगानें मेलेल्या मेंढीचें मांस.

Bray, *n.* ( ब्रे )—an ass's cry: a blare of trumpet, etc. गर्दभध्वनि; तुतारी वगैरेंचा आवाज. *v. i.* & *t.* to emit bray; to pound in mortar. ( गाढव ) ओरडणें; कुट्टन भुकटी करणें. *To bray out,* to utter harshly. जोरानें कर्कश आवाज करणें.

Brāze, *v. t.* ( ब्रेझ् )—to solder with alloy of brass and zinc; to colour like brass. पितळेनें मढविणें, पितळ आणि जस्त यांच्या मिश्रणानें जोडणें; पितळेसारखा रंग देणें.

Brā'zen, *a.* ( ब्रे'झन् )—of or like brass, made of brass, strong, yellow or harsh-sounding as brass; shameless. पितळेचें, पितळी; निर्लज्ज, कोडगा. *v. t. Brazen out,* carry off shamelessly; make shameless. कोडगेपणानें वागणें; निर्लज्ज बनवणें. *Brazen-faced,* shameless. निर्लज्ज, कोडगा. *Brazen age,* the third stage in human deterioration ( golden, silver, brazen and iron ). मानवी ऱ्हासाची तिसरी पायरी, पितळयुग.

Brā'zier, *n.* ( ब्रे'झर् )—a brass-worker; a pan or iron basket holding lighted charcoal or coke as portable heater. कांसार, कांस्यकार; लोखंडी ( इकडे तिकडे नेतां येणारी ) शेगडी.

Brazĭl', *n.* ( ब्रॅझि'ल् )—( Also, Brazil-wood ) red wood ( of an East-Indian tree or of South-American species). उत्तर हिंदुस्थानांतील किंवा दक्षिण अमेरिकेंतील एका जातीचें तांबड्या रंगाचें लांकूड.

Brazĭl'-nŭt, *n.* ( ब्रॅझि'ल्-नट् )—a large three-cornered nut. एक मोठें तिकोनी फळ.

Breach, *n.* ( ब्रीच् )—infringement or breaking ( of rule, duty, promise, etc. ); breaking off of relations, a quarrel; fissure; a gap made in fortifications by artillery, etc.. मोडणें, तोडणें, भंग; भांडण, आपसांत फूट, चिधाड भेग, भगदाड; खिंड, खिंडार. *v. t.* to break through, to make gap in, to make breach ( in wall, etc. ). भिंतींत वगैरे भगदाड पाडणें. *A clear breach,* rolling over without breaking. जहाजावरून लाटा फुटल्याशिवाय सपशेल निघून जाणें. *A clean breach,* carrying away of masts and everything on to deck. जहाजावरचें सर्व कांहीं लाटांनीं उडवून देणें. *Breach of close,* trespass. ( बेकायदेशीर ) सीमातिक्रम, अतिक्रमण. *Breach of the peace,* riot or affray. शांतताभंग, दंगल. *To stand in the breach,* to bear the brunt of attack. हल्ल्याला तोंड देणें.

Bread, *n.* (-ĕd, ब्रेड् )—an article of food made of flour and baked; subsistence. भाकर, पाव; चरितार्थ. *To break bread,* to take food, to join in Lord's supper. जेवण करणें, जेवणें, प्रभुभोजनांत भाग घेणें. *Bread and butter,* bread slices spread with butter, necessary food, livelihood. लोणीभाकर, भाजीभाकर, मीठभाकर, आवश्यक लागणारें अन्न, उपजीविकेचें साधन. *Bread-and-butter miss,* a school-girl. शाळेंत जाणारी मुलगी. *Bread and scrape,* stingily buttered bread. चिक्कूपणानें लोणी लावलेली भाकर. *Ship's bread,* (*naut.*) a hard biscuit. एक कठीण बिस्कीट. *Bread and cheese,* simple food, a livelihood. साधें अन्न, उपजीविकेचें साधन. *Bread and milk,* broken bread in boiling milk. उकळलेल्या दुधांत मिसळलेले भाकरीचे तुकडे. *Bread and wine,* Lord's supper. प्रभुभोजन. *Bread of life,* means of livelihood. जीवनाचा आधार, जीवनाची भाकर. *To know which side one's bread is buttered,* to know where one's interest lies. आपलें हित कशांत आहे हें ओळखून असणें, स्वहिताकडे लक्ष देणें. *Bread buttered on both the sides,* easy prosperity. सुस्थिति, चांगली भरभराट. *To take the bread out of one's mouth,* to take away one's means of livelihood ( by competition, etc. ). निर्वाहाचें साधन नाहींसें करणें. *To eat the bread of idleness,* to be idle. आळशी असणें, मेहनत केल्याशिवाय खायला मिळणें. *To eat the bread of affliction,* to be afflicted. दुःखी कष्टी असणें, दुःखानें किंवा पुष्कळ कष्टानें खायला मिळणें. *Daily bread,* livelihood. निर्वाह, उपजीविका. *To make one's bread,* to earn a living. निर्वाह करणें, पोट भरणें.

Bread'-băsket, *n.* ( ब्रे'ड्-बास्किट् )—( slang ) stomach. पोट.

Bread'-crumb, *n.* ( ब्रे'ड्-क्रम् )—the inner part of loaf. पावांतील आंतील भाग.

Bread'-fruit, Bread'tree, *nn.* (ब्रे'ड्-फ्रुट्, ब्रे'ड्-ट्री )—South-Sea tree with farinaceous fruit. भाकरीचें झाड. ( हें झाड दक्षिण पॅसिफिक महासागराच्या बेटांत होतें, व त्यापासून भाकरी तयार करतां येते ).

Bread'-stŭffs, *n.* ( ब्रे'ड्-स्टफ्स् )—grain, flour. धान्य, भाकरीचें पीठ.

Bread'-tĭcket, *n.* ( ब्रे'ड्-टिकेट् )—ticket entitling one to ration. शिधासामुग्री मिळण्याकरितां दिलेलें तिकीट.

Breadth, *n.* ( ब्रेड्थ् )—broadness, distance from side to side; freedom from mental limitations or prejudices. रुंदी; मनाचा विकास, मनाचें औदार्य, विशालबुद्धि. *To a hair's breadth*, exactly. अगदीं बरोबर, तंतोतंत. Brea'dthways, Brea'dthwīse, *adv.* रुंदीच्या बाजूनें, पन्ह्यानें.

Bread'-wĭnner, *n.* ( ब्रे'ड्-विनर् )—a person (also art, trade, tool) that supports a family. कुटुंबाचें पोषण करणारा, पोशिंदा.

Break, *v. t. & i.* ( ब्रेक् )—to divide or separate by force; to tame, subdue, crush; to discard; to lay open; to fall to pieces, burst, issue forth; to fall out; (of cricket-ball) to deviate from direction on pitching; to become feeble; to grow weaker; to make or become bankrupt. तोडणें, मोडणें; (घोड्याला वगैरे ) शिकवणें; मोडा घालणें; उघडणें; तुकडे पडणें, फुटणें, फुटून बाहेर येणें; तुटून पडणें, भांडणें; ( क्रिकेट ) चेंडू ठराविक हद्दीच्या बाहेर जाणें; नरम होणें; अशक्त होणें; दिवाळें काढायला लावणें, दिवाळें काढणें. *n.* breaking; a breach; a gap, broken place; deviation of cricket-ball on pitching; player's scoring sequence in billiards, points scored continuously; a pause ( in work, etc. ). मोडणें; फूट; खिंडार; क्रिकेटच्या चेंडू विशिष्ट जागेवरून भलतीकडे जाणें; बिलियर्डच्या खेळांमध्यें सारखे एकामागून एक घेतलेले डाव किंवा पॉइंट्स; ( कामांत वगैरे ) खंड. *To break a set*, to sell parts separately. सुटे भाग विकणें. *To break up*, to dismiss; to depart. काढून टाकणें; निघून जाणें. *To break out a flag*, to release a flag when run up from its trussed state. गुंडाळलें गेलेलें निशाण सुटें करणें. *To break a lance with*, to argue against. विरुद्ध वादविवाद करणें, हल्ला करणें. *To break bread with*, to be entertained by. एखाद्याचा पाहुणचार घेणें. *To break Priscian's head*, to use bad grammar. व्याकरणाच्या चुका करणें. *To break butterfly on wheel*, to waste power. शक्ति व्यर्थ खर्च करणें. *To break ground*, to plough; to begin siege; (fig.) to begin any operations. नांगरणें; वेढा घालण्यास आरंभ करणें; (कोणत्याहि) कार्यास आरंभ करणें. *To break the ice*, to get over initial shyness or reserve. आरंभीचा लाजाळूपणा सोडून देणें, (संभाषणास) सुरुवात करणें. *To break the ranks*, to disorder by leaving the ranks. (सैन्याची वगैरे) रांग सोडून गोंधळ माजविणें. *Troops break*, troops disperse in confusion. सैन्याची गोंधळून पांगापांग होत आहे. *To break the neck* or *back of*, to kill or dispose of. मान मुरगळणें, ठार करणें, नाहींसा करणें. *To break off*, to bring to an end, to cease. शेवटाला आणणें, थांबणें. *To break with*, to quarrel or part with. भांडणें, विभक्त होणें. *To break an officer*, to dismiss an officer. एखाद्या अधिकाऱ्याला कामावरून काढून टाकणें. *To break in*, to intrude, to interpose. (कामावांचून) आंत घुसणें, आंत घुसडून देणें. *To break out*, to begin; to exclaim. आरंभ होणें; मोठ्यानें ओरडणें. *To break news* or *jest*, to reveal news or jest. बातमी फोडणें, थट्टा उघडकीस आणणें. *The merchant breaks*, the merchant is bankrupt. त्या व्यापाऱ्यानें दिवाळें काढलें आहे. *To break down*, to demolish, collapse, fail. कोसळून पडणें, ढांसळणें.

Break'able, *a.* ( -ak-, ब्रे'केबल् )—capable of being broken. मोडण्याजोगा, फुटण्याजोगा. *n.* (*plu.*) things that are capable of being broken. फुटण्याजोग्या वस्तु.

Break'age, *n.* ( -ak-, ब्रे'किज् )—breaking. फुटणें, फुटतूट.

Break'down, *n.* ( ब्रे'क्-डाउन् )—a collapse, failure of health; a negro dance. मोडकळीला येणें, शक्तिहीनता, शक्तिपात; नीग्रो लोकांचा नाच.

Break'er, *n.* ( ब्रे'कर् )—one who or that which breaks; heavy wave breaking on coast or over reef; small water-cask. फोडणारा, तोडणारा, वठणीवर आणणारा; खडकावर किंवा किनाऱ्यावरआपटणारी प्रचंड लाट; एक पाण्याचें भांडें.

Break'fast, *n.* ( ब्रे'क्-फस्ट् )—first meal of day. प्रातर्भोजन. *v.i.* to take breakfast. न्याहारी करणें.

Break'nĕck, *a.* ( ब्रे'क्-नेक् )—( of pace, road, climb ) dangerous. भयंकर, घातकी.

Break'water, *n.* ( ब्रे'क्-वॉटर् )—a mole built to break the force of waves. लाटांचा जोर नाहींसा करण्याकरितां बांधलेला धक्का, पाणी अडविण्याकरितां घातलेला बांध.

Bream, *n.* ( ब्रीम् )—a yellowish, arch-backed fresh-water fish of the carp family. एक जातीचा पिंवळसर कमानदार पाठ असलेला गोड्या पाण्यांतील मासा.

Breast, *n.* (ब्रेस्ट्)—either milk-secreting organ in a woman; (fig.) a source of nourishment; the chest; seat of affections. स्तन; पोषणस्थान; वक्षःस्थळ; प्रेमस्थान. *v. t.* to oppose the breast to, to face or struggle (with the waves, hill). छाती ठोकून पुढें उभा राहणें, सामना देणें, तोंड देणें. *To make a clean breast of,* to confess. मन मोकळें करून सांगणें, कबुली देणें.

Brea'st-bōne, *n.* (ब्रे'स्ट्-बोन्)—the thin flat vertical bone in chest connecting ribs. छातीचें किंवा उराचें हाड.

Breast'-high, *a.* (ब्रे'स्ट्-हाइ)—high as the breast, (submerged) to the breast. छातीइतका उंच, छातीभर.

Breast'-plāte, *n.* (ब्रे'स्ट्-प्लेट्)—a piece of armour for the breast. उरस्त्राण, छातीचें कवच.

Breast'-work, *n.* (ब्रे'स्ट्-वर्क्)—a temporary defence or parapet a few feet high. संरक्षणाकरितां घाईनें बांधलेला छातीइतका उंच तट, वरंडी.

Breath, *n.* (ब्रेथ्)—air as used by the lungs; breathing, one respiration; slight movement of the air; a mere word. प्राण; श्वास; (वाऱ्याची) झुळूक; केवळ शब्द. *To draw breath,* to breathe, live. श्वासोच्छ्वास करणें, जिवंत असणें. *To spend* or *waste breath,* to talk vainly. व्यर्थ बडबड करणें. *To keep breath to cool porridge,* to abstain from talk. बोलणें थांबवणें, न बोलणें. *Breath of life,* a necessity. आवश्यकता. *To take away one's breath,* to render one breathless with astonishment. आश्चर्यानें श्वासोच्छ्वास थांबवणें. *To catch* or *hold one's breath* (in fear or absorbing emotion), दम धरणें, दम छाटणें. (To say inconsistent things) *in one* or *the same breath,* एकाच वेळीं. *Out of breath,* not able to breathe quick enough. श्वासोच्छ्वास जलद करण्यास असमर्थ. *To take breath,* to pause, to rest. विश्रांति घेणें. *Below one's breath,* in a whisper. लहान स्वरानें, अगदीं हळू.

Breathe, *v. i.* & *t.* (ब्रीद्)—to use the lungs, live; to take breath or rest; to inhale, exhale or instil; to speak or utter softly. हृदयक्रिया चालू असणें; विश्रांति घेणें; श्वासोच्छ्वास करणें; हळू बोलणें, हळू उच्चारणें. *To breathe again, to breathe freely,* to recover from fear etc., to be at ease. भीतीपासून मुक्त होणें, मनाची स्वस्थता असणें, जीव सुखांत पडणें. *To breathe upon,* to tarnish, to taint. मलिन करणें. *To breathe one's last breath, to breathe one's last,* to die. प्राणोत्क्रमण होणें, प्राण सोडणें, मरणें.

Breath'er, *n.* (ब्री'दर्)—one who breathes: a spell of hard exercise or of rest. श्वासोच्छ्वास करणारा; थोडा वेळ जोराचा व्यायाम, थोडा विसांवा.

Breath'ing, *n.* (ब्री'दिंग्)—respiration. श्वासोच्छ्वास. *Breathing space,* time to breathe, pause. विश्रांतीचा काल, अल्प काळ.

Breath'less, *a.* (ब्रे'थ्-लिस्)—lifeless; panting, unstirred by wind; holding breath. प्राणहीन; धापा टाकीत असलेला; दम गेलेला.

Bred, *pa. t.* & *p. p.* of Breed.

Breech, *n.* (ब्रीच्)—the lower part of the body behind, the buttocks; back the end of a gun or gunbarrel. ढुंगण; बंदुकीचा पाठीमागील भाग, पृष्ठभाग. *To wear the breeches,* to rule the husband. नवऱ्याचा अधिकार हिरावून घेणें, नवऱ्यावर अंमल चालविणें.

Breech'ing, *n.* (-ĭch-, ब्रि'चिंग्)—a leather strap round the horse's breech for backing; (Naut.) a rope securing the gun to ship's side. घोड्याच्या पाठीमागच्या भागाभोंवती आधाराकरितां बांधलेला चामड्याचा पट्टा; गलबताच्या बाजूला तोफ घट्ट रहाण्याकरितां बांधलेली दोरी.

Breech'es, *n.* (-ĭch ĭz, ब्रि'चिझ्)—a man's garment fastened below the knees; (colloq.) trousers and knickerbockers. मांडचोळणा; विजार.

Breech'loader, *n.* (ब्री'च्-लोडर्)—a gun loaded at breech, not through muzzle. एक प्रकारची तोड्याची बंदूक.

Breed, *v. t.* & *i.* (ब्रीड्)—to bear, generate; to produce offspring; to give birth to; to bring up, to rear; to yield, produce, result in; to fit for being, adapt to; to arise, spread; to educate, train the faculties or manners. उत्पन्न करणें; जन्म देणें; वाढविणें, पालनपोषण करणें; उपजणें, उत्पन्न होणें; (कोणत्याहि धंद्याला) लायक असणें; पसरणें, वाढणें; शिक्षण देणें, शिकवून तयार करणें. *n.* a race or family with hereditary qualities. खाण, अवलाद. *To breed in and in,* always to marry near relations. नेहमीं जवळच्या नातलगांशीं लग्न करणें. *What is bred in the bone,* hereditary traits. आनुवंशिक गुण.

Breed'ing, *n.* (ब्री'डिंग्)—nurture; education, good manners. पालनपोषण; शिक्षण, सौजन्य, माणुसकी.

Breeze, *n.* (ब्रीझ्)—gentle wind; the wind off land or sea (at certain hours); (slang) a quarrel, display of temper; a gadfly; small cinders, coke (used by brickmakers). (वाऱ्याची) झुळूक; समुद्राचा वारा, मतलई;

कलह, वाद, क्षोभ; गोमाशी; (विटा भाजतांना वापरलेला) कचरा, राख.

*Bree'zy̆*, *a.* (ब्री'झि)—wind-swept; pleasantly windy; fresh, lively, jovial; irresponsible. वाऱ्यानें वाहून नेलेला; हवाशीर, हवेचा; मजेशीर, आनंदी; वाहेल तसा, बेजबाबदार.

Brĕnt, Brĕnt'-goose, *n.* (ब्रेन्ट्, ब्रें'न्ट्-गूज़्)—a smallest kind of wild goose (visiting Britain in winter). एका जातीचा अगदीं लहान असा रानटी हंसपक्षी.

Brer, *n.* (ब्रेर्)—(negro dial) brother. भाऊ.

Brĕth'ren, (ब्रे'द्-रेन्)—plural of Brother.

Brēve, *n.* (ब्रीव्ह्)—(Mus.) a note equal to two semibreves. चार मात्रांचा काळ दाखविणारें चिन्ह, लघुचिन्ह.

Brĕv'ĕt, *n.* (ब्रे'व्हिट्)—a document conferring nominal rank on an army officer. पलटणींत कमी पगारदाराला त्याच पगारावर वरिष्ठ जागा चालविण्याचा अधिकार किंवा सनद.

Brē'vĭary̆, *n.* (ब्री'व्हिअरि)—a book containing the Divine office of the R. C. church for each day (to be recited by those in orders). रोमन कॅथॉलिक लोकांचा स्तोत्रसंग्रह. [ L. *brevis*, short ]

Brĕvier', *n.* (ब्रिव्हि'अर्)—a small size of type (8 point). एक लहान टाइपाची जात.

Brev'ĭty̆, *n.* (ब्रे'व्हिटि)—conciseness, shortness of expression; a short span (*of* life). संक्षेप, अल्पता, आटपसरपणा; अल्पायुष्य.

Brew, *v. t.* & *i.* (-ōō, ब्रू)—to make beer (by infusion, boiling and fermentation); to make (tea or punch) by infusion or mixture; to concoct, bring about, gather force (usu. of evil results). निरनिराळीं द्रव्यें मिळवून दारू तयार करणें, आसव काढणें; इतर द्रव्यें मिश्र करून चहा वगैरे तयार करणें; युक्ति बनविणें, घडवून आणणें. *Drink as you have brewed*, take consequences of your actions. स्वतःच्या कृत्यांचा परिणाम भोग. *n.* the amount brewed at once; the quality of stuff or liquor brewed. एकाच वेळीं तयार केलेलें आसव; गाळलेली दारू.

Brew'er, *n.* (-ōō, ब्रू'अर्)—one who brews beer or malt liquors. दारू गाळून तयार करणारा, कलाल.

Brew'ery̆, *n.* (-ōō, ब्रू'अरि)—a commercial brew-house. दारूची भट्टी, दारू गाळण्याचा कारखाना.

Brew'-house, *n.* (ब्रू'हाउस्)—a building in which beer is brewed. दारू गाळून तयार करण्याचें ठिकाण.

Brews'ter, *n.* (ब्रू'स्टर्)—(arch.) brewer. दारू गाळणारा, कलाल. *Brewster sessions*, the court for issue of licenses to trade in alcoholic liquors. दारू विकण्याचें लायसेन्स देणारें कोर्ट.

Briar, *n.* see Brier.

Brībe', *n.* (ब्रा'इब्)—an inducement offered to persuade some one to do the briber a dishonest or illegal service. लांच. *v. t.* to practise bribery, to give bribe to. लांच देणें, मूठ दाबणें.

Brī'bery̆, *n.* (ब्रा'इ-बरि)—the act of giving or receiving bribes. लांच देणें, लांच खाणें, लांचलुचपत.

Brĭc'-a-brăc, *n.* (ब्रि'क्-अ-ब्रॅक्)—antiquarian or artistic odds and ends, objects having a certain interest or value (from their *rarity, antiquity or the like*). मौजेच्या किंवा हौसेच्या किरकोळ वस्तु.

Brĭck, *n.* (ब्रिक्)—building material of baked clay made in oblong blocks; (Sl.) a warmly approved person, a right good fellow. वीट; वाहवा केलेला मनुष्य, आनंदी पुरुष. *v. t.* to lay or surround with bricks. वीटबंदी करणें, विटांनीं बांधणें. *Brick up*, to block with brick-work. वीटकामानें अडवून टाकणें. *Baked brick*=पक्की वीट.

Brĭck'băt, *n.* (ब्रि'क्-बॅट्)—a piece or fragment of a brick (esp. used as a missile). विटकर, विटेचा टोला.

Brĭck'-dŭst, *n.* (ब्रि'क्-डस्ट्)—powdered brick. विटांचा चुरा.

Brĭck'kiln, *n.* (ब्रि'क्-किल्न्)—places for making and baking bricks. विटा भाजण्याची भट्टी. (Also, Brick-field)

Brĭck'layer, *n.* (ब्रि'क्-लेअर्)—a workman building in brick, one who builds with bricks. गवंडी.

Brī'dal, *n.* (ब्रा'इ-डल्)—a wedding feast or ceremony, a wedding. लग्नविधि, लग्नोत्सव. *a.* of bride; of wedding. नवरीचा; लग्नसंबंधीं, विवाहविषयक

Brīde, *n.* (ब्राइड्)—a woman on the wedding day and through the honeymoon; the delicate network connecting the patterns in lace; a bonnet-string. नवरी, नुकतेंच लग्न झालेली बायको; नाजूक जाळीदार काम; बायकांच्या टोपीची दोरी.

Brīde'-grōōm, *n.* (ब्रा'इड्-ग्रूम्)—a man on the wedding day. नवरा.

Brīdes'-maid, *n.* (ब्रा'इड्झ्-मेड्)—an unmarried woman or girl of bride's train (attending bride at wedding). करवली.

Bride'well, *n.* (ब्रा'इड्-वेल्)—(arch.) a gaol, a House of Correction. तुरुंग, कारागृह.

Bridge, *n.* (ब्रिज्)—a structure carrying road or path across a stream, ravine, etc.; the platform amidships for officer in command; movable piece over which violin strings are stretched; the upper bony part of nose; a card-game. पूल; गलबताच्या मध्यभागीं कप्ताना-करितां केलेला प्लॅटफॉर्म; व्हायोलिन पायाची घोडी, तारदानी; नाकाचा वरचा भाग; एक पत्त्यांचा खेळ. *v. t.* to make a bridge over; to span as with a bridge, to find a way out of or over. पूल बांधणें; ओलांडून जाणें, पार पडणें, टाळण्याचा मार्ग शोधून काढणें. *Bridge of boats*, bridge over boats moored abreast. एकाला लागून एक असलेल्या गलबतांवरील पूल. *Bridge of gold, golden bridge*, easy retreat provided for beaten enemy. पराभूत झालेल्या शत्रूला दिलेला परत जाण्याचा सुलभ मार्ग.

Bridge'-head, *n.* (ब्रि'ज्-हेड्)—a post held on the far side of a frontier-river giving access to the enemy's country. नदीच्या पुलावरच्या शेवटाची तटबंदी.

Bridle, *n.* (ब्रा'इ-डल्)—controlling headgear (for house, etc.). लगाम. *v. t. & i.* to put a bridle on; to control, curb. लगाम चढविणें, लगाम घालणें; ताब्यांत ठेवणें. *To give a horse the bridle, to lay bridle on the neck*, to abandon control. लगाम सोडून देणें. *A horse going well up to bridle*, a horse going willingly. खुशीत जाणारा घोडा.

Bridle'-path, Bridle'-road, *nn.* (ब्रा'इडल्-पाथ्-°रोड्)—a path or road fit for riders but not vehicles. फक्त घोडेस्वाराकरितां असलेला रस्ता.

Bridle'wise, *a.* (ब्रा'इ-डल्-वाइज्)—trained to obey reins. शिकवलेला (घोडा वगैरे).

Brief, *a.* (ब्रीफ्)—of short duration; concise. थोड्या अवधीचा; त्रोटक. *n.* a solicitor's summary for the guidance of the barrister; Pope's letter on the matter of discipline to a person or community. वकीलानें केलेलें मुद्यांचें टांचण; शिस्तीबाबत पोपचें पत्र. *v. t.* to instruct by brief, employ (a barrister). मुकदम्याचें टांचण करून (बॅरिस्टरास) देणें, बॅरिस्टर नेमणें. *To hold a brief for*, to be retained as counsel for, to argue in favour of. कुणाच्या वतीनें वकील म्हणून गुंतून राहणें, एकाद्याच्या वतीनें बोलणें. *To be brief*, to speak shortly. थोडक्यांत सांगावयाचें तर. *In brief*, in short. थोडक्यांत. *A brief*, a piece of employment for a barrister. बॅरिस्टरला मिळालेलें काम. *Brief-bag*, a small leather hand-bag. एक चामड्याची लहान बॅग. Briefly, *adv.*; Briefness, *n.*

Brief'less, *a.* (ब्रीफ्-लेस्)—without clients. पक्षकार नसलेला.

Bri'er, Bri'ar, *n.* (ब्रा'यर्)—a wild rose bush; the White Heath (of which the root is used for tobacco pipes); brier pipe. रानगुलाब; एक जातीचें रानटी झाड; मायर चिलीम. *Sweet brier*, a wild rose with fragrant leaves and flowers. सुवासिक पानें व फुलें असलेला रानटी गुलाब.

Brig, *n.* (ब्रिग्)—(Sc.) a bridge; a two-masted vessel. पूल; दुकाठी गलबत.

Brigade', *n.* (ब्रि-गे'ड्)—a subdivision of an army, a military unit; kinds of organization on military model. सैन्याची तुकडी, सैन्यदल; लष्करी पद्धतीवर तयार असलेलें मंडळ.

Brigadier', *n.* (ब्रि-गे'-डि'अर्)—a brigade-commander (a title now replaced by *Colonel Commandant* or *Colonel-on-the-Staff*). सैन्यदलाचा अधिपति, ब्रिगेडवरील अंमलदार.

Brig'and, *n.* (ब्रि'गन्ड्)—a member of a robber gang, a bandit, a robber. वाटमाऱ्या, पुंड, लुटारू.

Bri'gandage, *n.* (ब्रि'गन्डिज्)—a highway robbery by brigands, pillage, plunder, blackmail. दरवडेखोरी, लूट, धमकीनें पैसे उपळणें.

Brig'antine, *n.* (-ēn, ब्रि'गंटीन्)—a two-masted vessel. दुकाठी गलबत, दोन शिडें असलेलें जहाज.

Bright, *a.* (-īt, ब्राइट्)—shining, brilliant; cheerful; vivacious, quick-witted. तेजस्वी; आनंदी; चुणचुणीत, हुशार, पाणीदार, चाणाक्ष, तैलबुद्धीचा.

Bright'en, *v. t.* (ब्रा'इ-टन्)—to make bright, to increase the lustre of, to sharpen the faculties of. उजळ किंवा चकचकीत करणें, तेजस्वी करणें, खुलवणें.

Bright's disease, *n.* (-īts, -zēz, ब्राइट्स् डिझीझ्) granular degeneration of the kidneys, a kidney disease. मूत्रपिंडाचा एक रोग.

Brill, *n.* (ब्रिल्)—a flat-fish. एक जातीचा मासा.

Bri'lliance, Bri'lliancy, *nn.* (-lya-, ब्रि'ल्यन्स्, ब्रि'ल्यन्सि)—great brightness, splendour, lustre. चकाकी, तेज, पाणी.

Brill'iant, *a.* (-lya-, ब्रि'ल्यन्ट्)—bright, sparkling; distinguished. झकझकीत, तेजस्वी; उत्तम, नामांकित. *n.* a diamond of the finest quality. एक उत्तम जातीचा हिरा.

Bri'lliantine, *n.* (-ēn, ब्रि'ल्यन्टीन्)—a cosmetic for the hair. केसांची शोभा वाढविणारें मलम.

Brim, *n.* (ब्रिम्)—the edge (of a cup, hollow, channel, etc.); a projecting rim of the

hat. कांठ, किनारा; हॅटच्यी पुढें आलेली कडा. *v. i. & t.* to fill or to be full to the brim. कांठापर्यंत भरणें, तुडुंब भरलेलें असणें. *To brim over*, to overflow. भरून वाहणें, ओतूं जाणें. *Up to the brim*=तुडुंब, तंतोतंत.

Brĭm'ful, *a.* (ब्रिं'म्-फुल्)—full to the brim. ओतप्रोत, तुडुंब.

Brĭ'mmer, *n.* (ब्रिं'मर्)—a full cup; a hat. भरलेला प्याला; हॅट.

Brĭm'stōne, *n.* (ब्रिं'म्-स्टोन्)—sulphur. गन्धक.

Brĭn'dled, *a.* ( -dld, ब्रिं'न्ड्ल्ड् )—brown or tawny with streaks of other colour. चांदा, कसरा ( रंग ).

Brīne, *n.* (ब्राइन्)—salt and water for prickling; salt water; the sea; tears. मिठवणी; खारट पाणी; समुद्र; अश्रु. *v. t.* to treat with brine, to steep in brine. खारवणें, मीठ घालणें. *Brine-pan*, an iron vessel or shallow pit for getting salt by evaporation. मीठकोंडी.

Brĭng, *v. t.* (ब्रिंग्)—(*p. p.* brought, ब्रॉट्) to convey in one's hand, conduct; to fetch; to cause to come along with one; to prefer (charge); to prevail upon. आणणें; किंमत येणें; परोवर आणणें; (आरोप) करणें; वश करणें, मन वळवणें. *To bring home to*, to convict of; to convince of. अपराध पदरीं घालणें, खोटें आहे असें सिद्ध करणें; खात्री करणें. *To bring into play*, to cause to operate. चालू करणें, गति देणें. *To bring into the world*, to give birth to; to cause to become. जन्म देणें; घडविणें. *To bring to bear*, to apply ( influence, etc. ). वजन घालणें; वजन वगैरे टाकणें. *To bring to book*, to exact account from (an offender). गुन्हेगारापासून खरी हकीगत बाहेर काढणें, चुकींत पकडणें. *To bring to mind*, to recall. आठवण करणें, आठवून देणें. *To bring to pass*, to cause to happen. घडवून आणणें, घडविणें. *To bring about*, to cause to happen; reverse (ship). घडवून आणणें; (गलबत) फिरवून घेणें. *To bring back*, to call to mind. ध्यानांत आणणें, स्मरण करणें. *To bring down*, to kill or wound; to cause penalty to alight *on*; to abase; to lower (price); to continue (record) *to* a point. ठार करणें, जखमी करणें; शिक्षा करविणें; नमवणें, पाणउतारा करणें; (किंमत) उतरवणें; अमुक एक मर्यादेपर्यंत चालू ठेवणें. *To bring down the house*, to elicit tumultuous applause. फारच जोराच्या टाळ्यांचा गजर मिळविणें. *To bring forth*, to give birth to, to cause. जन्म देणें, घडविणें. *To bring forward*, to carry a sum of one page's figures to the next page. एका पानावरची बेरीज दुसऱ्या पानावर घेणें. *To bring in*, to introduce (custom); to produce (profit); to adduce; to pronounce (guilty or not guilty). प्रचारांत आणणें, रूढ करणें; (पासून) उत्पन्न होणें, वसूल करून देणें; पुढें आणणें; (अपराधी किंवा निरपराधी) जाहीर करणें. *To bring off*, to rescue from (wreck etc.); to conduct (enterprise) to success. (नाशापासून) वांचाविणें; यशस्वी करणें. *To bring on*, to lead to; to cause discussion of. (पासून) निघणें, उत्पन्न करणें; उपस्थित करणें. *To bring out*, to express, to exhibit clearly; to introduce (a girl to society); to publish. स्पष्ट दर्शविणें, ठळक रीतीनें पुढें आणणें; प्रसिद्ध करणें. *To bring over*, to convert (by persuasion), to cause to change sides. मन वळविणें, मन वळवून आपल्या बाजूला घेणें. *To bring round*, to restore to consciousness. शुद्धीवर आणणें, पठणीवर आणणें. *To bring through*, to save (a sick person). (आजारी मनुष्याला) वांचविणें. *To bring to*, to check the motion of; to come to a stop; to restore to consciousness. गति थांबवणें; थांबणें; शुद्धीवर आणणें. *To bring under*, to subdue, to reduce to obedience. ताब्यांत आणणें, वश करणें, जिंकणें. *To bring up*, to educate, rear; to sue in court; to anchor (ship); to come to a stop; to call attention again to, recall; to cause to rise and speak; to continue (accounts etc.) to a point. शिकवणें, पालनपोषण करणें, लहानाचा मोठा करणें; फिर्याद करणें, कोर्टापुढें आणणें; (गलबत) नांगरणें; गति बंद करणें, थांबणें; परत लक्ष वेधणें; उठून बोलावयास लावणें; हिशेब पुढें चालू ठेवणें. *To bring up the rear*, to come last. सगळ्यांच्या शेवटीं येणें.

Brĭnk, *n.* (ब्रिंक्)—the edge (of a precipice, etc.); verge, close proximity. कडा, किनारा. *On the brink of grave*, soon to die. मृत्युसंनिध. *To shiver on the brink*, to hesitate, to plunge. उडी मारण्याला कांकूं करणें.

Brĭn'jal, 'Brĭn'jaul, *n.* (ब्रिं'न्-जॉल्)—the fruit of the egg-plant. वांगें, वृंताक.

Brĭnjă'rrȳ, *n.* (ब्रिन्-जॅ'रि)—a travelling grain and salt merchant of the Deccan. वणजारा, वणजारी.

Brī'nȳ, *a* (ब्रा'इ-नि)—of brine or sea, salt. क्षारयुक्त, समुद्राचा, खारट. *n.* (joc.) the sea. समुद्र.

Brĭquette', *n.* ( -ket, ब्रिके'ट् )—a block of compressed coal-dust. कोळशाच्या भुग्याचा दाबून केलेला ठोकळा.

Brisk, *a.* (ब्रिस्क्)—active; sprightly, gay, lively; quick, smart; busy. चपळ; उल्हासी; चलाख; जोराचा. Briskly, *adv.*; Briskness, *n*

Brisk'et, *n.* (ब्रि'स्किट्)—the breast of an animal; that part of the breast that lies next to the ribs. पशूंचा ऊर, छाती, बरगड्यां-जवळचा भाग. [Fr. *brisket*, the breast-piece]

Bristle', *n.* (ब्रि'सल्)—a short stiff hair. आंखूड ताठ केंस. *v. t.* & *i.* to stand up (as hair, etc.); to show temper; to be thickly set (with obstacles, etc.). (केंस) उभे राहणें, थरारणें; आपलें पाणी दाखवणें; बेजार करून सोडणें. *To set up one's bristles*, to show one's temper, resistance or pride. आपला स्वभाव प्रदर्शित करणें, आपला पराक्रम दाखविणें.

Bris'tling, Bri'sling, *n.* (ब्रि'स्-लिंग्)—a small sardine-like fish. एक जातीचा लहान मासा.

Bris'tol, *n.* (attrib.) (ब्रि'स्टॉल्)—*Bristol board*, a kind of card-board for drawing on. एक जातीचा गुळगुळीत पुठ्ठयाचा कागद. *Bristol-fashion*, with all in good order. सर्व कांहीं अत्यंत व्यवस्थित. *Bristol fighter*, a type of aeroplane. एक जातीचें विमान.

Britănn'ia, *n.* (ब्रि-टॅ'न्या)—Britain personified. ब्रिटन देश. *Britănn'ia metal*, alloy of tin and regulus of antimony resembling silver. कथील वगैरे धातूंचें पांढरें मिश्रण.

Britănn'ic, *a.* (ब्रिटॅ'निक्)—of Britain. ब्रिटन (इंग्लंड, वेल्स व स्कॉटलंड) देशाचा.

Brit'ish, *a.* (ब्रि'टिश्)—of the ancient Britains; of Great Britain. जुन्या ब्रिटन देशाचा; ब्रिटिश (इंग्लंड, वेल्स व स्कॉटलंड) देशांतील.

Bri'tisher, *n.* (ब्रि'टिशर्)—a native of Great Britain. ग्रेट ब्रिटनमधील रहिवासी.

Bri'tishism, *n.* (ब्रि'टिशिझम्)—an idiom of Great Britain. ग्रेट ब्रिटनमधील भाषासंप्रदाय.

Brit'ish-warm, *n.* (ब्रि'टिश्-वॉर्म्)—a kind of short military overcoat for officers. लष्करी अधिकाऱ्यांचा एक प्रकारचा ओव्हरकोट.

Brit'on, *n.* (ब्रि'टन्)—one of the race found by the Romans in South Britain, modern British person. ब्रिटन, ब्रिटन देशांतील मनुष्य. *North Britain*, a Scotsman. स्कॉटलंडमधील मनुष्य.

Brit'tle, *a.* (ब्रि'टल्)—easily broken, easily breaking short, apt to break, fragile. ठिसूळ, फुसका. Brittleness, *n.*

Broach, *n.* (ब्रोच्)—a roasting-spit; a church spire rising from tower without parapet; a boring-bit. भाजण्याची काठी, सळा, शूळ; मनोऱ्याचा कळस; भोंक पाडण्याचें हत्यार, बारीक सामता, गिरमीट. *v. t.* to bore; to start using; to moot, bring up for discussion. तोंड पाडणें, भोंक पाडणें; वापरायला सुरवात करणें; वादविवादाकरितां पुढें आणणें. *To broach to*, to veer or cause (a ship) to veer and present side to wind and waves. एखादें जहाज वाऱ्याच्या बाजूस फिरविणें.

Broad, *a.* (ब्रॉड्)—large across, extensive; comprehensive, tolerant; of specified breadth; manifest, unmistakable. रुंद, विस्तीर्ण; प्रशस्त, उदात्त; (अमुक एक) रुंदीचा; स्पष्ट, उघड, खुला. *n.* the expanse of water formed by widening of a stream; the broad part of the back. प्रवाह रुंद झाल्यामुळें झालेला पाण्याचा विस्तार; पाठीचा रुंद भाग. *As broad as it is long*, indifferent. उदासीन, तटस्थ, निस्पृह. *Broad cloth*, fine plain-wove double-width dressed black cloth. साध्या विणीचें काळें दुप्पट पन्ह्याचें कापड. *Broad-gauge*, साडेचार फूट इंचांपेक्षां जास्त रुंदीचें आगगाडीच्या दोन रुळांमधील अंतर. *Broad-glass*, window-glass. खिडकीची कांच. *Broad-sword*, broad-bladed cutting sword. रुंद पात्याची तलवार. *To open a broad-side on the enemy*, to discharge all guns on one side of a ship. गल-बताच्या रुंद बाजूकडील सर्व तोफा शत्रूवर झाडणें.

Broad'-arrow, *n.* (ब्रॉ'ड्-ॲरो)—a stamp resembling the barbed head of an arrow (put upon stores etc.) belonging to British Government. रुंद बाण, ब्रिटिश सरकारच्या मालावर असलेली बाणासारखी खूण.

Broad'ly, *adv.* (ब्रॉ'ड्-लि)—widely; fully; openly, plainly. रुंद; पूर्णपणें; उघडपणें, स्पष्ट.

Broad'căst, *a.* (ब्रॉ'ड्-कॅस्ट्)—(seed) scattered or thrown about by the hand. मुठीनें पेरलेलें (बीं). *v. i.* & *t.* (*Pa. t.* Broadcasted, *Pa. p.* Broadcast) to sow by the hand; to disseminate widely; (Wireless) to transmit (speeches, music, any audible matter) by wireless telephony to owners of receiving sets; to speak, sing, etc. by wireless telephony. हातानें पेरणें; चोहोंकडे पसरणें किंवा पसरविणें, सर्वत्र प्रसार करणें; भाषण गायन वगैरे बिनतारी टेलिफोननें प्रसार करणें; बिनतारी टेलिफोन-मधून भाषण करणें, गाणें, वगैरे. *n.* (esp. attrib.) the practice etc. of broadcasting. बिनतारी टेलिफोननें प्रसार करणें. *adv.* in a widely disseminated manner. विस्तृत रीतीनें पेरलेल्या किंवा पसरलेल्या स्थितींत.

Broad Church, *n.* (ब्रॉ'ड् चर्च्)—section of a Church favouring comprehension. इंग्लंडां-तील चर्चमधील एक उदार विचार असलेली मंडळी.

Broad'en, *v. t.* & *i.* (ब्रॉ'डन्)—to make broader, to render more comprehensive, extensive or open; to become broad or broader. रुंद करणें, विस्तृत करणें; रुंद होणें, रुंदावणें.

Broad'sheet, *n.* (ब्रॉ'ड्-शीट्)—a large sheet of paper printed on one side. पाठकोरा कागदाचा मोठा ताव.

Broad'side, *n.* (ब्रॉ'ड्-साइड्)—a ship's side; all guns on one side; simultaneous firing of all guns on one side; a broadsheet. गलबताची रुंद बाजू; गलबताच्या रुंद बाजूवरील एकदम सोडतां येण्याजोग्या सर्व तोफा; एका बाजूनें छापलेला रुंद कागद.

Brŏcāde, *n.* (ब्रोके'ड्)—a fabric woven with raised patterns, Indian cloth of gold and silver. जरीचा किनखाब, जर, जरीचें कापड. *Brocaded*, woven or worked with raised patterns, woven with gold or silver thread. जरतारी, जरीचा, भरजरीचा.

Brŏcc'olĭ, *n.* (ब्रॉ'कॉलि)—species of cauliflower. कॉलिफ्लॉवर भाजीची एक जात.

Brŏ'chure, *n.* (-shoor, ब्रॉ'शूर्)—a stitched booklet, a pamphlet. तार मारलेलें लहान पुस्तक, छापील चोपडें.

Brŏck, *n.* (ब्रॉक्)—a badger; a stinking fellow. जमिनींत बीळ करून राहणारें कोल्ह्याएवढें एक चतुष्पाद जनावर; घाणेरडा माणूस.

Brōgue, *n.* (-g, ब्रोग्)—a rude form of shoe; a marked Irish or other accent. ओबडधोबड जोडा; आयरिश किंवा अन्य लोकांचा बोलतांना शब्दांवर दिलेला विशेष जोर.

Brŏil, *n.* (ब्रॉइल्)—a noisy quarrel, a confused tumult. भांडण, बाचाबाच. *v. t. & i. to cook* on fire or grid-iron; make or be very hot. निखाऱ्यावर भाजणें; फार गरम करणें किंवा होणें.

Brōke, *Pa. t.* of Break.

Brōken, *pa. p.* & *a.* (ब्रो'कन्)—in pieces; ruined, shattered; infirm; incomplete. फाटलेला, तुकडे झालेला; नाश झालेला; अशक्त; अपुरा, फुटका, फुटकर. *Broken meat*, scraps. उरलें सुरलें अन्न. *Broken ground*, uneven ground. उंचसखल खणलेली जागा. *Broken weather*, uncertain weather. अनिश्चित हवा. *Broken numbers*, fractions. अपूर्णांक. *Broken man*, a man reduced to despair. निराश झालेला मनुष्य. *Broken-winded*, (a horse) incapacitated for hard work by ruptured air-cells. फुटलेल्या दमाचा, दम गेलेला (घोडा).

Brō'ken-hearted, *a.* (ब्रो'कन्-हार्टेड्)—with spirits crushed by grief or despair. भग्नहृदय, दुःखानें भेदरून गेलेला, हताश, निराश झालेला.

Brō'kenlў, *adv.* (ब्रो'कन्-लि)—in a broken or interrupted manner, with breaks. अडथळा येईल अशा रीतीनें, खंड पाडून.

Brō'ker, *n.* (ब्रो'कर्)—a middleman, agent; a dealer in second-hand furniture; an appraiser and seller of distrained goods. दलाल; जुना माल विकणारा; जप्त केलेल्या मालाची किंमत करून विकणारा.

Brō'kerage, *n.* (ब्रो'कारिज्)—the business of a broker; a broker's commission. दलालाचें काम; दलाली.

Brō'king, *n.* (ब्रो'किंग्)—acting as broker, broker's trade. दलालाचा व्यापार.

Brŏ'llў, *n.* (ब्रॉ'लि)—(sl.) an umbrella. छत्री.

Brō'mate, Brō'mide, *nn.* (ब्रो'मेट्, ब्रो'माइड्)—kinds of compound of bromine. 'ब्रोमिन' म्हणून रासायनिक मूलतत्वाचें विशिष्ट मिश्रण.

Brō'mĭc, *a.* (ब्रो'मिक्)—containing bromine. ब्रोमिन रासायनिक तत्व असलेलें.

Brō'mĭne, *n.* (ब्रो'मिन्)—(Chem.) a liquid element used in sedatives. एक रासायनिक मूलतत्व.

Brō'mĭsm, *n.* (ब्रो'मिझम्)—morbid state due to the use of bromine. ब्रोमिनच्या उपयोगामुळें झालेली दूषित स्थिति.

Brŏn'chĭal, *a.* (-k-, ब्रॉं'कि-अल्)—of the ramifications of the windpipe. श्वासमार्गासंबंधीं, धाकट्या श्वासनळीविषयीं.

Brŏnchĭt'ĭs, (-k-, ब्रॉंका'य्-टिस्)—inflammation of the bronchial membrane. फुप्फुसांच्या नळ्यांचा रोग, घशांतील सूज, लघुश्वासनलिकादाह.

Brŏn'cō, *n.* (ब्रॉ'न्को)—a wild or half tamed horse (of California, etc.). कॅलिफोर्निआमधील रानटी किंवा अर्धवट शिकवलेला घोडा.

Brŏnze, *n.* (ब्रॉन्झ्)—a brown alloy of copper and tin; colour of bronze; a statue or other work of art in bronze. तांब्याची आणि कथलाची मिश्र धातु, ब्रॉंझ धातु, ब्रॉन्झ धातूचा रंग; ब्रॉन्झ धातूचें ओतीव काम, पुतळा. *a.* made of or coloured like bronze. ब्रॉन्झचा केलेला, ब्रॉन्झ धातूसारखा रंग असलेला. *The bronze age*, the age in which weapons and tools were made of bronze. ज्या युगामध्यें ब्रॉन्झ धातूचीं हत्यारें तयार केलीं जात असत तें युग. *v. t.* & *i.* to give bronze surface to; to make or grow brown, tan. ब्रॉन्झ धातूचा मुलामा देणें; पिंगट करणें किंवा होणें.

Brooch, *n.* (-ō-, ब्रोच्)—an ornamental safety-pin worn as fastening of dress. नकशीदार कपड्याला लावण्याची टांचणी, बायांचें छातीवरील अडकवण, कपडा नीट बसण्याकरितां लावलेली पिन.

Brood, *n.* (ब्रूड्)—birds or other animals produced at a hatch or birth; (contempt.) children of a family; a gang or crew. एकाच वेळीं जन्मलेले पक्षी किंवा इतर प्राणी; मुलें-बाळें; टोळी. *v. i.* to sit on eggs; to meditate deeply; to fret over. अंडीं उबविणें; ध्यान करणें; मनांत धुसधुसणें, सचिंत वसणें.

Broo'dy̆, *a.* (ब्रू'डि)—wishing to sit, inclined to hatch. उबविण्याची इच्छा असलेली (कोंबडी).

Brook, *v. t.* (ब्रुक्)—to tolerate, to put up with; to admit of (delay, etc.). सोसणें, सहन करणें; विलंब वगैरे चालूं देणें. *n.* a small stream. ओढा, नाला. Brook'let, *n.*=लहान ओढा.

Broom, *n.* (ब्रूम्)—a yellow-flowered shrub; a long-handled sweeping-brush. पिंवळीं फुलें असलेलें लहान झाड; लांब दांडा असलेली केरसुणी, झाडू. *New broom*, newly appointed officers eager to sweep away abuses. वाईट गोष्टी पूर्ण नाहींशा करण्याला उत्सुक असलेले एखाद्या हुद्यावर नेमलेले नवीन अधिकारी.

Broo'mstick, *n.* (ब्रू'म्-स्टिक्)—a broom-handle. झाडूची मूठ, केरसुणीचा दांडा.

Broth, *n.* (ब्रॉथ्)—thin meat soup. मांसाचें कढण.

Broth'el, *n.* (ब्रॉ'थेल्)—a house of prostitution, a house of ill fame, a bawdy-house. वेश्यागृह, कुंटणखाना.

Broth'er, *n.* ( -ŭdh-, ब्र'दर्)—(pl. *brothers*) son of the same parents; companion, equal; (plu. *brethren*) member of some religious order, fellow member (of Church, guild, order, etc.). सख्खा भाऊ; सोबती, बरोबरीचा; एखाद्या धार्मिक मंडळाचा सभासद, बरोबर काम करणारा. *Brother german*, brother on both the sides. सख्खा भाऊ. *Brother uterine*, brother born of the same mother only. आई एकच परंतु बाप भिन्न असा भाऊ.

Broth'erhood, *n.* ( -ŭdh-, ब्र'दरहुड्)—fraternal tie; set of brothers or comrades, brotherliness; association, fraternity. बंधुत्व; समाज, बंधुसमाज, मित्रमंडळ; आखाडा, एकाच धंद्याचे लोक.

Broth'er-in-law, *n.* ( -ŭdh-, ब्र'दर्-इन्-लॉ)—one's wife's or husband's brother; one's sister's husband. बायकोचा भाऊ; देवर, दीर; मेहुणा.

Broth'erly̆, *a.* ( -ŭdh-, ब्र'दर्-लि)—like a brother, fraternal, kind, affectionate. भावाप्रमाणें, बंधुत्वाचा, प्रेमळ. Bro'therliness, *n.* भाऊबंदी, बंधुभाव, बंधुत्व.

Brough'am, *n.* ( -ōōam, ब्र'अम्)—a short one-horse (or electric) closed carriage or car (with four wheels). एक घोड्याची किंवा विजेची झांकणाची गाडी.

Brought, *pa. t.* & *pa. p.* of Bring.

Brow, *n.* (ब्राउ)—the arch of hair over the eye (usu. in *plu.*); the forehead; the edge of cliff (hill, etc.); the summit of a pass. भुंवई; कपाळ; टेंकडी वगैरेचें टोंक; खिंडीचें शिखर. *To knit* or *bend one's brows*, to frown. भिंवया चढविणें, रागावणें. *Brow-ague*, megrim. कपाळ दुखणें, कपाळशूळ.

Brow'beat, *v. t.* (ब्रा'उ-बीट्)—to bear down with looks and words. डोळे वटारून बोलणें, गुरकावणी दाखवणें.

Brown, *a.* (ब्राउन्)—toast-coloured; dark-skinned. उदी रंगाचा, तपकिरी; श्यामवर्ण. *n.* brown colour or pigment. उदी रंग, बदामी किंवा तपकिरी रंग. *v. t.* & *i.* to make or grow brown. उदी रंग देणें, तांबूस रंगाचा होणें. *Brown bread*, bread made of unbolted flour. (बिनचाळलेल्या कणकीची केलेली जाडी-भरडी) तांबूस भाकर. *Brown paper*, a coarse unbleached kind of paper (used for parcels, etc.). पुड्याचा कागद, ब्राउन पेपर. *Brown study*, reverie. विचारमग्नता, शून्यमनस्कता, मन व्यग्र झाल्यामुळें देहभान नसणें. *Brown sugar*, half-refined sugar. अर्धवट शुद्ध केलेली साखर. *To do brown*, (sl.) to take in, to cheat. पूर्णपणें फसविणें.

Brown'ie, *n.* (ब्रा'उनि)—a benevolent shaggy goblin haunting a house and doing household work secretly; a junior member (aged 8 to 11) of Girl Guides; (Photog.) a kind of camera. घरांत येऊन गुप्तपणें काम करणारें एक उपकारक केंसाळ पिशाच्च; 'गर्ल गाइड्स' मधील अल्पवयी सभासद; एक जातीचा कॅमेरा.

Brow'ning, *n.* (ब्रा'उनिंग्)—a modern type of automatic pistol. एक जातीचें नवीन पिस्तूल.

Browse, *v. i.* & *t.* ( -z-, ब्राउझ्)—to feed on leaves and young shoots; to graze; to read for enjoyment. झाडपाला खाणें; चरणें; मजेखातर वाचणें. *n.* twigs or young shoots (as fodder for cattle); act of browsing. झाडपाला, झाडांचा कोंवळा पाला; झाडपाला खाणें, मजेखातर वाचन.

Bru'in, *n.* ( -ōō-, ब्रु'इन्)—(the personifying name for) a bear. अस्वल. (हा शब्द गोष्टींच्या पुस्तकांत अस्वलाकरितां वापरतात.)

Bruise, *n.* ( -ōōz, ब्रूझ्)—an injury caused by a blow or pressure; a dint in wood, etc. आघातानें झालेली दुखापत, चेंचलेला हात, जखम, चेंचणें; पोंचा. *v. t.* & *i.* to pound; to inflict bruise on. ठेंचणें; दुखवणें, जखम करणें.

Brui'ser, *n.* ( -ōō-, ब्रूझर् )—one that bruises; a boxer, a prize-fighter. चेंचणारा, जखम करणारा; मुष्टियुद्ध करणारा.

Bruit, *v. t.* ( ब्रूट् )—to spread about. चोहोंकडे पसरणें. *n.* (archaic) a report, a rumour. वदंता, वार्ता, अफवा.

Brŭmm'agĕm, *a.* ( ब्रॅमॅजिम् )—counterfeit, cheap and showy. बनावट, स्वस्त आणि भपकेबाज.

Brunette', *a. & n.* ( -ōō-, ब्रूनेट् )—( a girl or woman) of dark complexion. काळीसांवळी ( मुलगी किंवा स्त्री ).

Brŭnt, *n.* ( ब्रन्ट् )—stress of shock or attack. झपाटा, जोर, धक्का, तडाखा, थप्पड. *To bear the brunt of*, ( बचावाकरितां ) धक्काबुक्की किंवा मारा सहन करणें.

Brŭsh, *n.* ( ब्रश् )—cleaning (or hair-dressing) implement; a fox's tail; a skirmish; brushwood. कुंचला, ब्रश; कोल्ह्याची शेपटी; चकमक; झाडझुडुप. *v. t. & i.* to touch lightly, to graze in passing; to use brush on. घसटून जाणें; ब्रशनें किंवा कुंचल्यानें झाडणें. *The brush*, the art of painting. चितारी किंवा चित्रकार यांची कला. *Brush*, (*from the same brush*) painter's style; painter. चित्र काढण्याची पद्धति, शैली; चित्रकार. *To brush up*, to furbish; (fig.) renew one's memory of. ब्रशनें साफ करणें; उजळणी करणें. *To brush over*, to paint lightly. हलकेच किंवा फिका रंग देणें. *To brush aside* or *away*, to ignore, to pass over. दुर्लक्ष करणें, सोडून देणें.

Brŭsh'-wŏŏd, *n.* ( ब्रश्-वुड् )—undergrowth, thicket, bushes and saplings. झुडुप, कळप. खुरटी झाडी.

Brŭsh'-work, *n.* ( ब्रश्-वर्क् )—painter's ( style of ) manipulation. चितान्याची हस्तकुशलता, हस्तकौशल्य.

Brusque, *a.* ( -ŏŏsk, ब्रुस्क् )—blunt, off-hand, abrupt in manner or speech. बेपरवा, निर्भीड, अशिक्षित, बेमुर्वत.

Bru'tal, *a.* ( ब्रूटल् )—as of the brutes, coarsely sensual; callously cruel. पशुतुल्य; निर्दय, नागहृदय.

Bru'talīze, *v. t.* ( -ōō-, ब्रूटलाइझ् )—to destroy the human qualities in. मानवी गुण नाहींसे करणें. पशुतुल्य बनवणें.

Brutăl'ĭtȳ, *n.* ( ब्रूटॅलिटि )—savageness, cruelty. पशुत्व, क्रूरता.

Brute, *a.* ( ब्रूट् )—not gifted with reason; unconscious, merely material. बुद्धिहीन; अचेतन, जड. *n.* an animal other than man; a formidable beast: a human being of low type. जनावर; हिंस्र पशु; पशुतुल्य मनुष्य, पशु. *Brute force*, पशुबल, मनगटाचा जोर. Brutish, *a.* Brutishness, *n.*

Brȳ'onȳ, *n.* ( ब्रायॉनि )—a climbing hedge plant. एक कुंपणावर चढणारी वेल.

Bŭb'ble, *n.* ( बबल् )—a globe or half-globe of liquid enclosing air or gas; a visionary project; cheat, false show. बुडबुडा, फुगा; कल्पनातरंग; मायाजाल, ठकबाजीचा व्यापार. *To prick the bubble*, to unmask futility, pretension, etc. बुडबुडा फोडणें, व्यर्थता प्रगट करणें, लबाडी उघडकीस आणणें. *v. i. & t.* to send up ( or rise in ) bubbles; ( fig. ) to boil over ( with joy, wrath, etc. ). बुडबुडे येणें, बुडबुडणें; ( आनंदानें, रागानें वगैरे ) उसळणें, खवळणें.

Bŭbb'lȳ, *a.* ( बब्-लि )—full of bubbles, gurgling. बुडबुड्यांनीं भरलेला, बुडबुडणारा. Bubb'ly-jock, *n.* ( Sc. ) a turkey cock. एक जातीचा कोंबडा.

Bū'bō, *n.* ( ब्यूबो )—( *Pl.* Buboes )—an inflamed swelling in glandular part ( esp. groin or armpit ). ( जांघेतील किंवा कांखेतील ) गांठ, वळ, वाघणा.

Būbŏn'ĭc, *a.* ( ब्यूबॉनिक् )—accompanied by buboes. ग्रंथींनीं युक्त, ग्रंथिक, गोळीचा.

Bŭccanneer', *n.* ( बकॅनिअर् )—a sea-rover, a pirate ( esp. of the Spanish-American coasts ); an adventurer. समुद्रांत भटकणारा, समुद्रांतील चोर, चांचा; साहसी, धाडसी.

Bŭccaneer'ing, *a.* ( बकॅनिअरिंग् )—piratical. चांचेपणाचा *n.* piratical roving. गलबतें लुटण्याकरितां फिरणें.

Bŭcĕ'phălŭs, *n.* ( ब्युसेफॅलस् )—the charger of Alexander of Macedon; a riding horse. अलेक्झँडर दि ग्रेटचा प्रख्यात घोडा; बसावयाचा घोडा.

Bŭck, *n.* ( बक् )—a male of fallow deer, reindeer; chamois, antelope; hare or rabbit; dandy; a male sheep, ram; a male negro or Indian; act of buck-jumping; a buckshot; ( sl. ) dollar. हरिण, सांबर; काळवीट; ससा; अकडबाज किंवा झोंकदार मनुष्य; मेंढा, बकरा; नीग्रो, रेड इंडिअन; घोड्याचें उभें उडी मारणें; बंदुकीनें हरण मारण्याची मोठी गोळी; डॉलर. *Buck-horn*, a horn of a deer. हरणाचें शिंग. *Buck-hound*, a small variety of deer-hound. हरणाची पारध करणारी एक शिकारी कुत्र्याची जात. *Buck-jump*, ( of horse ) to jump vertically with back arched. पाठीची कमान करून उभीच उडी मारणें. *Buckshot*, a large coarse shot. बंदुकीनें हरिण मारण्याची मोठी गोळी. *Buck-skin* soft leather made from skin of deer, goat, etc. मेंढी, हरिण वगैरेचें कमावलेलें कातडें.

*Buck-tooth*, a projecting tooth. पुढें आलेला दांत. *To buck up*, (sl.) to make haste, to cheer up. धांदल करणें, उत्साह धरणें. *v. i.* to butt (*against, at* or *in*). ढुसकणें, टक्कर देणें.

Bŭck'er, *n.* (ब॑कर्)—a bucking horse. दौडत चालणारा घोडा.

Bŭck'ish, *a.* (ब॑किश्)—foppish, dandified. छानदार, झोंकदार, छानछोकीचा.

Bŭck'ĕt, *n.* (ब॑किट्)—a vessel for carrying or holding water, etc.; socket for whip. डोल, बालडी, बादली; चाबकाचा ठेपका. *v. t. & i.* to ride (a horse) hard; to go at the utmost speed; to row a hurried stroke. घोड्यावरून भरधांव जाणें; अत्यंत जलद् गतीनें जाणें; भराभर वल्हवणें. *To kick the bucket*, to die. मरणें.

Bŭ'cketful, *n.* (ब॑किट्-फुल्)—as much as a bucket will hold. बालडीभर. (*Pl.* Bucketfuls).

Bŭ'cket-shop, *n.* (ब॑किट्-शॉप्)—office for speculative dealing (in stocks, gain, etc.). हुंडीच्या किंमतीच्या चढउतारावर पैज मारणाऱ्या दलालाचें दुकान.

Bŭc'kle, *n.* (ब॑कल्)—a clasp with hinged tongue (used for straps, etc.). पट्ट्याची कडी, बकल. *v. t. & i.* to fasten with a buckle; to put on; to bend one's energies to work. बकल अडकवणें; घालणें; कमर बांधणें.

Bŭck'ler, *n.* (ब॑क्लर्)—a small round shield (usually held by a handle); (fig.) a protector or protection. लहान वाटोळी ढाल; रक्षणकर्ता, रक्षण.

Bŭck'răm, *n.* (ब॑क्रॅम्)—a coarse linen or cloth stiffened with gum or paste; stiffness; strength in appearance only. सरसानें कडकडीत केलेलें कापड, ताढपत्री; ताठपणा; बाह्यतः दिसणारी मजबुती. *a.* stiff; strong in appearance. कडकडीत, ताठ; दिसण्यांत मजबूत. *Men in buckram*, *Buckram men*, non-existent people. अस्तित्वांत नसलेले लोक.

Bŭck'wheat, *n.* (-wēt, ब॑क्-वीट्)—a cereal plant (with seed used for horse and poultry food and in U. S. for breakfast cakes). एक जातीची वनस्पति.

Būcŏ'lĭc, *a.* (ब्यूकॉ॑लिक्)—pastoral, relating to country life, farming, rustic. ग्राम्य, शेतकीचें, गांवढळ. *n.* a pastoral poem. धनगरी गाणें, ग्राम्य कविता, लावणी.

Bŭd, *n.* (बड्)—the projection from which a branch or a leaf-cluster or a flower develops; a flower or leaf not fully open. पानाचा अंकुर; कळी, कोंब. *v. t. & i.* to put forth buds; to begin to grow or develop; to graft. अंकुर येणें; भरभराट होऊं लागणें; कलम बांधणें. *To nip in the bud*, to destroy at the very early stage. जन्मतःच नाश करणें, विकासापूर्वी नाश करणें. *In bud*, putting forth buds. कळ्या आलेला, अंकुरित. *A budding man*, होतकरू तरुण मनुष्य. (Also, A budding lawyer, A budding cricketer.)

Bu'ddhism, *n.* (-ŏŏ-, बु॑धिझम्)—an Asiatic religion founded by Gautama Buddha. गौतम बुद्धानें स्थापिलेला धर्म, बुद्ध धर्म. Buddhist, *n.* बुद्धधर्माचा अनुयायी.

Bŭddlei'a, *n.* (बड्ली॑आ)—a shrub with lilac or yellow flowers. एक पिंवळीं फुलें असलेलें लहान झाड.

Bŭdd'y̆, *n.* (ब॑डि)—(Sl.) a chum. विन्हाड-सोबती, जिवलग मित्र.

Bŭdge, *v. i. & t.* (बज्)—to move in the least degree. थोडेंसें हटणें, सरकणें, माघार घेणें.

Bŭdge'row, *n.* (-rō. ब॑जुरो)—a lumbering keelless barge. एक जातीची क्रीडानौका, पडाव.

Bŭdg'ĕt, *n.* (ब॑जिट्)—contents of a bag, bundle of letters, etc.; annual estimate of revenue and expenditure. पिशवी, थैली, गठ्ठें; जमाखर्चाचा वार्षिक आढावा, (महसूल व खर्च यांचें) अंदाजपत्रक. *v. i.* *To budget for*, to allow or arrange for in the budget. अंदाजपत्रकामध्यें (बजेटमध्यें) तरतूद असणें किंवा करणें.

Bŭff, *n.* (बफ्)—a stout velvety dull-yellow leather of buffalo or ox-hide; the human skin; colour of buff. बदामी रंगाचें मजबूत कापड; मनुष्याचें शरीर; बदामी रंग. *In buff*, naked. उघडा, नग्न. *The Buffs*, East Kent Regiment. फिक्या पिंवळ्या रंगाच्या पोषाखाची पलटण. *Buff-coat* or *-jerkin*, a coat or jerkin formerly worn by soldiers as proof against sword-cut. मजबूत लष्करी कोट. *Buff-stick* or *-wheel*, polishing tools covered with buff. पॉलिश करण्याचें चामड्याचें चाक किंवा काठी. *v. t.* to polish with buff. मखमलीसारखें मऊ पॉलिश करणें.

Bŭff'ălo, *n.* (ब॑फ़लो)—(*pl.* Buffaloes) a kind of ox. रेडा किंवा म्हैस. *v. t.* to overpower, to overawe. धाक घालणें, घाबरगुंडी उडविणें.

Bŭff'er, *n.* (ब॑फर्)—an apparatus for deadening or sustaining concussions (esp. on railways); (Sl.) an old-fashioned or incompetent fellow. दोन गाडीचे डबे एकमेकांवर आदळून चेंगरूं नयेत म्हणून योजिलेला प्रतिबंधक; जुन्या चालीचा किंवा नालायक मनुष्य. *Buffer State*, a small state between two large ones

diminishing chance of hostilities. दोन मोठ्या (विरोधी) देशांमधील एक लहान देश.

Bŭgg'ȳ, *n.* (बॅगि)—a vehicle for one or two. एकदोघांना बसण्याची दुचाकी किंवा चार चाकांची गाडी, बगी.

Bug'house, *a.* (बॅग्-हाउस्)—crazy. वेडगळ, खुळा.

Bug'-hunter, *n.* (बग्-हन्टर्)—(colloq.) entomologist. कीटकशास्त्रज्ञ.

Bū'gle, *n.* (ब्यूगल्)—a brass instrument like small trumpet; a kind of plant; (*pl.*) long glass beads sewn on dresses as ornament. तुतारी, रणशिंग, कर्णा, बिगूल; एक जातीचें लहान झाड; (अने०) शोभेकरितां म्हणून कपड्यांवर शिवलेले लांब कांचेचे मणी, काळी पोत. *v. t.* & *i.* to sound bugle, to sound call on a bugle. तुतारी वाजविणें, तुतारीचा आवाज करणें.

Bū'gler, *n.* (ब्यूगलर्)—a bugle-signaller, a soldier whose duty is to convey the commands of the officers by sounding a bugle. बिगूल वाजविणारा, शिंगाड्या.

Bū'glĕt, *n.* (ब्यूगलिट्)—a bicyclist's small bugle. बायसिकलवाल्याचें वाजविण्याचें शिंग, लहान बिगूल.

Bū'glŏss, *n.* (ब्यू-ग्लॉस्)—a rough-leaved plant. खरखरीत पानें असलेलें एक लहान झाड.

Buhl, *n.* (-ōōl, बूल्)—an inlaid work of brass and tortoise-shell. पितळेचें आणि कचकड्याचें जडावाचें काम.

Build, *v. t.* & *i.* (bĭ-, बिल्ड्)—to construct or erect by successive additions; to be busy making one's house or nest; (fig.) to base hopes on, to depend on. (इमारत वगैरे) बांधणें; घर किंवा घरटें बांधण्याच्या धांदलींत असणें; भरंवसा ठेवणें. *n.* make, physique; proportions. बांधणी, बांधा, आंगकाठी; आकार.

Buil'der, *n.* (bĭ-, बिल्डर्)—one who builds; (esp.) a contractor for building houses. बांधणारा, बांधकाम करणारा; घरें बांधण्याचा कंत्राटदार.

Buil'ding, *n.* (bĭ-, बिल्डिंग्)—a house or other structure with roof and walls, an edifice. इमारत, इमला, घर, बंगला. *Building-lease*, a lease permitting lessee to build on the land. घर बांधण्याकरितां जागा अमुक एक मुदतीपर्यंत भाड्यानें घेणें. *Building-society*, a society of contributors to fund for a loan to members when needing a house. इमारती बांधणारी मंडळी.

Built, *pa. p.* (bĭ-, बिल्ट्)—constituted by nature. स्वभावतःच रचलेला, घंदिस्त.

Bŭlb, *n.* (बल्ब्)—a globular stem of some plants; a roundish swelling in a tube; an electric-light container. गड्डा, कांदा; फुगीर भाग; विजेचा ग्लोब.

Bŭl'-bous, *a.* (बल्बस्)—bulb-shaped, having a bulb or bulbs; swollen. लहान गोळ्याच्या किंवा कांद्याच्या आकाराचा, गोलक असणारा; फुगलेला, फुगीर

Bul'bul, *n.* (bŏŏl'bŏŏl, बुल्-बुल्)—an Eastern song-thrush; a singer, poet. बुलबुल पक्षी; गाणारा, कवि.

Bŭlge, *n.* (बल्ज्)—an irregular swelling out of a surface or line; advantage, upper hand. फुगा, फुगणें; फायदा, वर्चस्व. *v. i.* to form or show bulge, to jut out, to swell out. फुगणें, पोंक येणें, बेंहाळणें.

Bŭl'ger, *n.* (बल्जर्)—a wooden golf-club with a bulging face. कांसवाच्या तोंडाच्या आकाराचा एक खेळण्याचा लांकडी सोटा.

Bŭlk, *n.* (बल्क्)—the contents of a ship's hold, cargo; the mass or greater part; size, magnitude, volume. भरताड, भरखण; मोठा भाग; आकार, आकारमान. *v. i.* to seem in respect of size or importance. ढीगभर किंवा पुष्कळ दिसणें, अधिक वाढणें. *In bulk*, loose, not in package. सुटा; विस्कळित. *To load in bulk*, to put grain etc. in loose. जहाजांत माल विस्कळित भरणें. *To sell in bulk*, to sell in large quantities (as it is in the hold). जहाजांत असलेला सर्व माल एकदम विकून टाकणें. *To bulk up*, to form considerable sum etc., to amount to. मोठी रक्कम होणें, एकंदर करणें.

Bŭ lkhead, *n.* (बल्क्-हेड्)—the upright partition dividing ship's cabins or water-tight compartments; compartment, stall. पाणी अडवण्याकरितां केलेलें, दगडाचें किंवा लांकडाचें बांधकाम; भाग, विभाग, कक्षा.

Bŭl'kȳ, *n.* (बल्कि)—large, too large, unwieldy. स्थूल, अवजड. Bulkiness, *n.* स्थूलत्व, अवजडपणा.

Bull, *n.* (-ŏŏ, बुल्)—the male of an ox, elephant, whale, and other large animals; (Stock Exch.) a person interested in sending the prices up; the bull's-eye in shooting; a letter, edict or rescript of the Pope; a statement so made as to imply an absurdity; a drink made of water flavoured in empty spirit cask. बैल, हत्ती, देवमासा वगैरे मोठीं जनावरें; किंमती वाढविण्यांत दंग असलेला; निशाणाचा मध्य; पोपचें आज्ञापत्र; हंसें पिकण्यासारखी बोलण्यांतील ढोबळ चूक, वाग्दोष; दारूचें भांडें विसळून पेय म्हणून घेतलेलें. *v. t.* & *i.* to speculate for the rise; to try to raise

the price of stocks. वाढीकरितां सट्टा करणें; ठेवीची किंमत वाढविण्याचा प्रयत्न करणें. *A bull in the China shop*, a reckless or clumsy destroyer. अविचारानें नाजूक वस्तूंची नासाडी करणारा. *To take the bull by the horns*, to meet and not to evade any difficulty. संकटाला निश्चयानें तोंड देणें. *John Bull*, an Englishman. इंग्रज, इंग्लिश मनुष्य. *To make a bull's-eye*, मोठा घोरला फायदा करणें. *Bull-calf*, a young bull. खोंड, पाडा. *To bull-doze*, (sl.) to compel by show of force; bully. धाकानें भाग पाडणें; दहशत घालणें. *Bull-fight*, baiting of bulls with horsemen etc. बैलांची व घोडेस्वारांची वगैरे झुंजाझुंज. *Bull-puncher*, a bullock-driver. बैल गाडी हांकणारा. *Bull-whack*, an ox-whip. बैलाचा चाबूक.

Bull'ace, *n.* ( bŏŏl'is, बुॅलिस् )—a small wild plum. एक लहान मनूक किंवा बेदाणा.

Bull'dog, *n.* ( -ŏŏ-, बुॅल्-डॉग् )—a breed of dog noted for tenacity; a tenacious person; University proctor's attendant. मोठ्या कुत्र्याची एक जात; निग्रही मनुष्य, विलक्षण धैर्य दाखविणारा मनुष्य; युनिव्हर्सिटीतील प्रॉक्टर म्हणून अधिकाऱ्याचा नोकर.

Bull'ĕt, *n.* ( -ŏŏ-, बुॅलिट् )—a missile of lead or other metal ( for rifle, pistol, or machine-gun ), a cannon-ball. ( बंदुकीची वगैरे ) गोळी.

Bull'ĕtĭn, *n.* ( -ŏŏ-, बुॅलि-टिन् )—a short official statement ( of public event or invalid's condition ). सरकारी त्रोटक समाचारपत्र, प्रकृतिमानपत्र.

Bull finch, *n.* (-ŏŏ-, बुॅल्-फिन्च् )—a fine-plumaged song-bird; quickset hedge with ditch. एक सुंदर पिसारा असलेला गाणारा पक्षी; पट्ट कुंपण.

Bull'ion, *n.* ( -ŏŏ-, बुॅल्यन् )—gold or silver in the lump or by weight. लगडीचें सोनें-चांदी सोन्याचांदीची लगड.

Bŭ'ffĕt, *n.* ( बॅफिट् )—a blow with the hand; a blow dealt by wave, etc. or by fortune; a side-board; a recessed cupboard. ठोसा, दुर्दिप्रहार; धप्पड; लहान घडवंची, फडताळ. *v. t. & i.* to deal blows to; to struggle with. ठोसे देणें; तंटा करणें, भांडणें.

Buff'et, *n.* ( bŏŏ'fā, बुफे )—a refreshment bar. फराळाचें दुकान, उपाहारगृह.

Bŭffoon, *n.* ( बफून् )—a person who makes himself ridiculous to raise laughter, a coarse jester, a mimic. नकल्या, खुपमस्कऱ्या, विदूषक, थट्टेबाज.

Bŭffoon'erÿ, *n.* ( बफू॑नरि )—the arts and practices of a buffoon, low jests. कमी दर्जाची थट्टा, मस्करी, थट्टामस्करी.

Bŭg, *n.* ( बग् )—a small blood-sucking insect infesting beds. ढेकूण, मत्कुण. *A big bug*, a person of importance. बडा मनुष्य.

Bŭg'abōō, *n.* ( बॅगबू )—an object of baseless terror. निराधार भीतीचा विषय.

Bŭg'bear, *n.* ( बॅग्-बेअर् )—an object of terror; a dreaded event, etc. बागुलबोवा; धास्ती वाटणारा प्रसंग.

Bull'ionist, *n.* ( bŏŏl'yon-, बुॅल्-यनिस्ट् )—an advocate of metallic currency. धातूचें चलनी नाणें असावें असें प्रतिपादन करणारा, धातुनाणकवादी.

Bull'ock, *n.* ( -ŏŏ-, बुॅलक् )—a gelded or castrated bull. घडवलेला बैल.

Bull's-eye, *n.* ( -ŏŏlz-ī, बुल्झ्-आय् )—a hemispherical lens, any circular opening for the admission of light or air; a small lantern with a lens on one side to concentrate the light; the centre of a target; a kind of sweetmeat. झरोका, गवाक्ष; एक लहान एका बाजूला अर्धवाटोळी काच असलेला कंदील; निशाणाचा मध्य; एक जातीची मिठाई.

Bull'ÿ, *n.* ( -ŏŏ-, बुॅलि )—a hired ruffian; a blusterer; a school-boy tyrant; tinned beef; ( Football ) scrummage in the Eton game. भाडोत्री दांडगा मनुष्य; लठनिरंजन; शाळेंतल्या मुलांतील गुंड; व्यवस्थित राहण्याकरितां कथलाच्या डब्यांत घालून ठेवलेलें गोमांस; फुटबॉल खेळांत चेंडू मारण्याची सर्वांची झटापट. *v. i. & t.* to play the bully, to browbeat, to overawe by threats. धमकावणें, दांडदपट देणें, दरडावणें. *a.* first-rate, slap-up, quite up to date. अगदीं पहिल्या मतीचा, अगदीं नवीन पद्धतीचा. *To bully off*, to start play in hockey with crossed sticks. हॉकींत खेळाला सुरवात करणें. *To bullyrag*, (sl.) to maltreat, ballyrag. वाईट रीतीनें वागवणें, शिवीगाळ हांसडणें, धाक घालणें.

Bul'rŭsh, *n.* ( -ŏŏ-, बुॅल्-रश् )—a tall rush ( esp. reed-mace ), papyrus. मोठ्या जातीचा लव्हाळा.

Bul'wark, *n.* ( -ŏŏ-, बुॅल्-वर्क् )—the earthwork or other material defence; a person or principle that protects; a ship's side above deck. बुरूज, तट; रक्षण करणारा मनुष्य किंवा तत्त्व; डेकवरील जहाजाची बाजू.

Bŭm, *a.* ( बम् )—(sl.) worthless, good-for-nothing. निरुपयोगी, कुचकामाचा. *n.* a loafer, ne'er-do-well. भटक्या, रिकामटेकडा, कुचकामाचा माणूस. *v. i. & t.* to drink to excess; to tramp, to live the life of a vagabond. अतिशय पिणें; भटकून काळ घालवणें.

Bŭm-bail'iff, *n.* ( बम्-बे॑लिफ् )—a sheriff's officer employed for arrests ( from touching

debtor on the back). पकडण्याकरितां नेमलेला शेरिफचा अधिकारी, एक कनिष्ठ मतीचा बेलिफ.

Bŭm'-boat, *n.* (ब'म्-बोट्)—a boat plying with fresh provisions for a ship. किनाऱ्यापासून दूर असणाऱ्या जहाजावर अन्नसामुग्री नेणारी लहान व रुंद होडी, बांबोट.

Bŭm'ble-bee, *n.* (ब'म्बल्-बी)—a loud-humming bee. गुणगुण करणारी मोठी मधमाशी.

Bŭm'bledom, *n.* (ब'म्बल्डम्)—consequential minor officials and their ways. दिमाखदार लहान अधिकारी आणि त्यांचे मार्ग.

Bŭm'ble-pŭppy, *n.* (ब'म्बल्-पपि)—whist, tennis etc. played unscientifically. अशास्त्र रीतीनें खेळलेला व्हिस्ट, टेनिस वगैरे खेळ.

Bŭm'mer, *n.* (ब'मर्)—a worthless loafer. कुचकाम्या भटकणारा माणूस.

Bŭmp, *n.* (बम्प्)—a dull-sounding blow, collision, knock; swelling caused by a collision; a prominence on skull, protuberance. धडका, ठोंसा, बुक्का; ठोंशामुळें आलेली सूज, टेंगूळ; डोक्यावरील ठिकेठिकाणचा उंचवटा, उन्नत भाग. *adv.* with a bump, suddenly, violently. धाडकन, एकदम, जोरानें. *v. t. & i.* to strike heavily against, to come into collision with; to jolt; (of cricket-ball) to rise abruptly. धाडकन आपटून लागणें, एखाद्या वस्तूवर आपटणें; हबकणें, हादरणें; (चेंडू) एकदम वर उडणें. *Bumpy, a.* full of bumps; causing jolts. पुष्कळ धक्के बसलेला; हबकणारा, हादरणारा.

Bŭm'per, *n.* (ब'म्पर्)—a brimmer, brimming glass; a great harvest; a full theatre; a record score (in games); (motoring) a spring fender for mitigating collisions. पुरा भरलेला प्याला; मोठें पीक; गच्च भरलेलें नाटकगृह; खेळांत कल्पनेच्या बाहेर झालेला स्कोअर; अपघात कमी व्हावे म्हणून ठेवलेला स्प्रिंगचा रक्षक.

Bŭmp'kĭn, *n.* (ब'म्प्-किन्)—an awkward country lout. खेडवळ, गांवढ्या, गांवढळ माणूस.

Bump'tious, *a.* (ब'म्प्-शस्)—self-assertive, disposed to quarrel, domineering. आढ्यता बाळगणारा, सदोदित आपलेंच घोडें पुढें ढकलणारा.

Bŭn, *n.* (बन्)—a small soft currant cake; hair dressed in bun shape; (personifying name of) a squirrel, rabbit. पुरी, पाव, पोळी, पुरणाची पोळी; पोळीच्या आकारासारखे व्यवस्थित कापलेले केंस; खार, ससा.

Bŭnch, *n.* (बन्च)—set of things growing or fastened together (flowers, grapes, keys); group of people; herd of cattle. झुबका, गुच्छ; लोकसमूह; गुरांचा कळप. *v. t. & i.* to arrange in bunch or bunches; to gather in folds; to come or cling together. घोस किंवा झुबका करणें; घड येणें; एकत्र येणें किंवा चिकटणें. *Best of the bunch*, best of the lot. सर्वांत उत्तम. *Bunch of the fives*, the fist or hand. पांची बोटांची आंवळलेली मूठ, हात.

Bun'chy, *a.* (ब'न्-चि)—forming a bunch. गोंडेदार, झुबकेदार.

Bŭn'cō, *v. t.* (ब'न्-को)—(sl.) to swindle. फसविणें, उपटाउपटी करणें.

Bŭnd, *n.* (बन्ड्)—an embankment, causeway, quay. बांध, बंधारा, धक्का, घांट.

Bŭn'der, *n.* (ब'न्-डर्)—a landing-place or quay; seaport; harbour. उतरण्याची जागा, धक्का; समुद्राचें बंदर; बंदर.

Bŭn'der-boat, *n.* (ब'न्डर्-बोट्)—a boat used in communicating with ships in harbour etc. बंदरांतील बोट, बंदरनाव.

Bŭn'dle, *n.* (ब'न्डल्)—odds and ends tied up in cloth; set (of sticks, iron rods etc.) bound up together. गाठोडें, बुडकें; जुडी. *v. t. & i.* to tie in a bundle; to throw confusedly into a receptacle; to go or send (esp. a person) unceremoniously (*or in a hurry*) *out, off, away*. बुडकें (वगैरे) बांधणें; मोट बांधून फेंकून देणें; गाशा गुंडाळणें, एकदम चालता होणें किंवा घालवणें.

Bŭng, *n.* (बङ्)—a stopper of cork or other material for the bung-hole; (sl.) a lie. दट्टा, बूच, गुडदी; खोटें. *v. t.* to stop up. दट्टा बसवणें, दट्ट्यानें तोंड बंद करणें. *Bunged up*, (of eye, nose, pipe etc.) closed or stopped up with. मिटलेला, बंद केलेला, गुडदी ठोकलेला. *Bung-hole*, a hole by which a cask is filled. पिंपाचें तोंड.

Bung'alow, *n.* (-lō, ब'ङ्ग-लो)—a one-storied or lightly built house. बंगला, छोटेखानी घर.

Bŭng'le, *v. i. & t.* (ब'ङ्गल्)—to go awkwardly to work, to perform in a clumsy way; to mismanage, to fail to accomplish (task). अव्यवस्थितपणें कामाला जाणें, अडाणी रीतीनें काम करणें; घोंधळ करणें, चुकणें. *n.* a piece of bungling. अव्यवस्थित काम, ढोबळ चूक.

Bŭn'ion, *n.* (ब'न्यन्)—an inflamed swelling on foot. दाह होत असणारी पायावरील सूज.

Bŭnk, *n.* (बंक्)—a sleeping-berth. (गलबतांत) निजावयाची जागा, निजण्याबसण्याची लांकडी पेटी. *v. i.* to have a bed, to go to bed. अंथरुण मिळणें, निजणें. *To bunk, to do a bunk*, to abscond, to vanish. पळून जाणें, नाहींसा होणें. *Bunk-house*, a house with berths for lumberers etc. लांकडें तोडण्याकरितां (रानांत) निजावयाची सोय असलेलें घर. (Also, =Bunkum).

Bŭnk'er, *n.* (बंकर्)—a ship's coal-bin; a receptacle; a sandpit or other obstruction for free dealing with balls (in Golf); (fig.) an obstacle. जहाजांत कोळसे ठेवण्याचें भांडें; पात्र; गोल्फ खेळामध्यें चेंडू सरळ न जाऊं देणारे खांचखळगे; अडथळा, प्रतिबंध, विघ्न. *Bunkered, pa. a.* entangled in a bunker. खांचखळग्यांत अडकलेला.

Bŭnk'ŭm, Bŭn'combe, *n.* (बंक्कम्)—an insincere talk, humbug, claptrap, sophistry. लबाडीचें बोलणें, निरर्थक भाषण, खोटें खरें भासविणें.

Bŭm'malō, *n.* (बमॅलो)—a small fish found off Southern Asia (used, when dried, as a relish). एक जातीचा लहान मासा.

Bŭnn'ȳ, *n.* (ब'नि)—a pet name for rabbit. सशाचें आवडतें नांव, आवडता ससा. *Bunny-hug*, an American dance. अमेरिकेंतील एक प्रकारचें नृत्य.

Bun'sen burn'er, *n.* (-ōōn-, बुंन्-सेन् बर्नर्)—an invention for burning mixed air and gas, giving great heat. हवा आणि गॅस एकत्र जाळून मोठी उष्णता देणारा एक नवा शोध.

Bŭnt, *n.* (बन्ट्)—the baggy middle part of sail; baseball batted to point within the infield. वाऱ्यानें फुगणारा शिडाचा मधला ढिला भाग; आंतील क्षेत्रामध्येंच पॉइन्टजवळ बॅटेनें टाकलेला बेसबॉल. *Bunt-line*, a rope used in furling sail. शीड गुंडाळतांना लागणारी दोरी.

Bŭn'tĭng, *n.* (बन्-टिंग्)—kinds of small bird; flags; open-made worsted stuff used for flags. लहान पक्ष्यांची जात; पताका, निशाणें; निशाणें वगैरे करण्याचा पातळ व निरनिराळ्या रंगाचा विरविरीत कपडा.

Buoy, *n.* (boi, बॉय्)—anchored float as navigation mark, etc. (समुद्रामध्यें खडक दाखविण्याकरितां) पाण्यावर तरंगणारे शंकु, तरण्याचा ताफा, सांगड. *v. t.* to bring to surface of water, to keep afloat; to sustain (person, courage, etc.), uplift; to mark with buoys. तरंगत ठेवणें; धैर्य किंवा अवसान देणें, हिंमत देणें; तरंगणाऱ्या शंकूंनीं खूण दाखविणें. (usu. with *up*).

Buoy'age, *n.* (बॉ'यिज्)—providing of buoys. बोयऱ्यांचा पुरवठा करणें.

Buoy'ancȳ, *n.* (बॉ'यन्सि)—the power of floating on the surface of water or in the atmosphere; vivacity, cheerfulness, recuperative power. तरण्याची शक्ति, प्लवनसामर्थ्य; आनंदी वृत्ति, रंगेलपणा, उल्हास.

Buoy'ant, *a.* (बॉ'यन्ट्)—apt to float, light; cheerful. तरण्यासारखा, हलका; आनंदी, रंगेल.

Bur, *n.* (बर्)—clinging seed-vessel or other part of a plant; a plant producing burs; a person hard to shake off. कोणत्याहि झाडाचें चिकटून राहणारें बीजकवच किंवा अन्य भाग; चिकटून राहणारें बीजकवच असलेलें झाड; एखाद्या जागेपासून हालविण्याला कठीण असा मनुष्य.

Burb'errȳ, *n.* (बर्-बेरि)—a waterproof material; a garment made of the waterproof material. जलप्रतिबंधक पदार्थ किंवा कापड; जलप्रतिबंधक कापडाचा कपडा.

Burb'ot, *n.* (बर्-बॉट्)—an eel-like flat-headed bearded fresh-water fish. एक जातीचा गोड्या पाण्यांतील मासा.

Bŭrd'en, *n.* (बर्डन्)—a load, a task; weight of grief, obligatory expense; refrain of song, theme. ओझें, गळ्यावर धोंड; दुःखाचा भार; आवश्यक खर्च; ध्रुपद, पालुपद. *v. t.* to load, to encumber, to lie heavy on. ओझें लादणें, जड असणें, भाराक्रांत होणें. (*Burthen*=a ship's carrying capacity, tonnage; bearing of loads. ओझें नेण्याची पात्रता, टनी वजन, टनी दास्तान, भरवण, बारदान.) *Burden of proof*, the obligation to prove falling on the maker of a statement. पुराव्याची जबाबदारी, दाव्यांतील वादग्रस्त गोष्टी शाबीत करण्याचा बोजा.

Bŭrd'ensome, *a.* (बर्डन्-सम्)—imposing a burden, oppressive, wearying. जड, दुःसह, अवघड, नेण्याला कठीण, भारी, जाचणारा.

Bur'dock, *n.* (बर्-डॉक्)—a coarse plant with prickly flowers and dock-like leaves. कांटेरी फुलें व झुबकेदार पानें असलेलें एक लहान झाड.

Bŭreau', *n.* (-rō, ब्यूरो')—(pl. *Bureaux*, ब्यूरोझ्) a writing-desk with drawers, escritoire; chest of drawers; office (esp. of a Government department). खणांचें टेबल; खणांचें कपाट; कचेरी, खातें.

Bŭreau'cracȳ, *n.* (-rō-, ब्यूरॉ'क्रसि)—government by bureaux, centralization, officialism. निरनिराळीं खातीं करून राज्यकारभार चालविणारें अधिकारमंडळ, नोकरशाही. Bureaucra'tic, *a.* Bureau'crat, *n.* नोकरशाहीचा कट्टा अभिमानी.

Burg, *n.* (बर्ग्)—(sl.) a town. शहर.

Burgee', *n.* (बर्-गी')—a small swallow-tailed pennant (used by yachts etc.) एक लहान पाकोळीच्या शेपटीसारखी पताका.

Bur'geon, *n.* (-jn, बर्जन्)—a young shoot, a bud. लहान अंकुर, कोंब, कळी. *v. i.* to put forth young shoots, to spring forth as bud, to begin to grow. कोंब फुटणें, कळी येणें, वाढीस लागणें.

Bur'gĕss, *n.* (बर्जिस्)—an inhabitant of a borough with full municipal rights, a citizen; a member of parliament for a borough, corporate town or university.

नागरिकत्वाचे सर्व हक्क असलेला रहिवासी, नगरवासी; एकाद्या परो, शहर किंवा विश्वविद्यालया-तर्फेचा पार्लमेन्टचा सभासद.

Bur'gh, *n.* ( bŭ'ru, ब'रृ )—a Scotch borough. स्कॉटलंडमधील परो.

Bur'gher, *n.* ( -ger, ब'गेर् )—a citizen or member of a borough. नगरवासी, नगरप्रतिनिधि.

Bŭrg'lar, *n.* ( ब'र्ग्-लर् )—a person attempting burglary, one who breaks into a house by night with an intent to commit felony. घरफोड्या, भिंतफोड्या, अट्टल चोर.

Bŭrg'lary̆, *n.* (ब'र्ग्लरि)—breaking into a house by night with felonious intent, house-breaking. चोरी करण्याच्या हेतूनें रात्रीं घर फोडणें, घरफोडी. Burglarious, *a.* घरफोडीविषयीं.

Bur'gle, *v. t.* & *i.* ( ब'गल् )—to commit burglary, to enter or rob ( a house ) burglariously. चोरी करण्याच्या इरायानें रात्रीं घर फोडणें.

Bur'gomäster, *n.* ( ब'र् गो-मास्टर् )—the mayor of Dutch or Flemish town. हॉलंड किंवा फ्लॅन्डर्स शहराचा मेयर ( नगराध्यक्ष ).

Bur'gundy̆, *n.* ( ब'र्-गन्डि )—kinds of wine. एका जातीची लाल दारू.

Bu'rial, *n.* ( bĕ-, बे'रिअल् )—burying ( esp. of dead body ); funeral. जमिनींत पुरणें, प्रेत-संस्कार. *Burial-case*, coffin. प्रेताची पेटी. *Burial-ground*, cemetery. प्रेतें पुरण्याची जागा, स्मशान, कबरस्थान. *Burial-service*, religious form ( esp. that in the prayer-book ) at funeral. प्रेतसंस्कारविधि, और्ध्वदेहिक कर्मे.

Bŭr'in, *n.* ( ब्यू'अरिन् )—a tool for engraving on copper. तांब्यावर नकशी काढण्याचें पोलादी हत्यार, तक्षणी.

Bŭrke, *v. t.* ( बर्क् )—to murder ( esp. by stifling ); to stifle inquiry, hush up. नाकतोंड दाबून ठार मारणें; चौकशी आंतल्या आंत दाबून टाकणें, चौकशी न करणें.

Bŭrlesque', *a.* ( बर्लेस्क् )—of derisively imitative kind. हास्यरसप्रधान. *n.* a dramatic or literary parody. हास्यरसप्रधान नाटक किंवा लेख, प्रहसन, थट्टात्मक भाषण. *v. t.* to make or give burlesque of, to ridicule. हास्यजनक विडंबन करणें, हसूं येण्यासारखी नक्कल करणें.

Bŭrl'y̆, *a.* ( ब'र्लि )—of stout sturdy build, corpulent. मजबूत बांध्याचा, गलेलठ्ठ.

Bŭrn, *v. i.* & *t.* ( बर्न् )—( pa. t. *burnt*, sometimes *burned*) to consume or be consumed by fire; to feel intense heat or emotion; to injure by burning. जळणें, जाळणें; फार उष्णता भासणें; भाजणें. *To burn away, to burn out*, to burn to nothing, to burn to extinction. जळून राख होणें. *To burn up*, to get rid of by fire. जाळून नाहींसें करणें. *To burn out*, to consume the contents of. जाळून खाक करणें किंवा होणें. *To burn one's boats*, to commit oneself irrevocably to a course. परत जाण्याचीं साधनें नाहींशीं करणें. *To burn up*, to flash into blaze. भडकून उजेड पडणें. *To burn down, to burn low*, to burn less vigorously as fuel fails. कमी कमी जळत येणें. *To burn blue*, to give blue light. निळा उजेड पडणें. *To burn a candle at both ends*, not to husband energy. उधळपट्टी करणें. *To burn day light*, to use artificial light by day. दिवसांच दिवा लावणें. *To burn the midnight oil*, to work late at night. रात्रीं उशिरापर्यंत काम करणें. *Money burns hole in pocket*, money clamours to be spent. पैसे भराभर खर्च होण्याला लागणें, खिशाला भोंक पडणें. *To burn one's fingers*, to suffer for meddling or rashness. मध्यस्थीत किंवा उतावळेपणामुळें नुकसान सोसावयास लागणें, चट्टा बसणें. *To burn in* or *into*, to impress indelibly. मनावर कायमचा ठसा उमटणें किंवा उमटविणें. *To burn*, to get near discovery or truth ( as in child's game ). लपविलेल्या वस्तूकडे बिनचूक जाणें. *To burn the water*, to spear salmon by torchlight. मशालीच्या उजेडांत माशाला भाला मारणें. *n.* a brook, a stream; a sore or mark on body made by burning; burnt area (in a forest etc. ). ओढा, नाला, ओहोळ; भाजलेल्याची खूण, चरका, चट्टा; लास, जळलेली जागा.

Bŭrn'er, *n.* ( ब'र्नर् )—the part (of a lamp, etc.) that shapes the flame. कंदिलाचा वगैरे बर्नर, वातीचें घर.

Burn'et, *n.* ( ब'र्निट् )—a brown-flowered plant. पिंगट रंगाचीं फुलें असलेलें लहान झाड.

Burn'ing, *Pa. a.* ( ब'र्निंग् )—much heated, verly hot, scorching. संतप्त, दाहक, धगधगीत, झोंबणारा.. *Burning-glass*, a glass which collects the rays of the sun into a focus producing an intense heat. दाहमणि, सूर्यकांतमणि. *Burning shame* or *disgrace*, flagrant shame or disgrace. उघड उघड लज्जास्पद गोष्ट. *Burning question*, hotly discussed or exciting question. जोरजोरानें वादविवाद केला जाणारा विषय. *Burning* (*i. e.* strong ) *scent*, चांगलाच वास येणें, माग लागणें. *Burnt offering*, sacrifice made by burning. आहुति, होम, हवनद्रव्य.

Bŭrn'ish, *v. t.* & *i.* ( ब'र्निश् )—to polish by friction, to make smooth bright and glossy. उजाळा देणें, उजळणें, सफाई करणें.

Burnt, *Pa. t.* of Burn.

Burr, *n.* ( बर् )—a whirring sound; the sound of a strongly pronounced *r*. भर्र असा आवाज करणें; रचा कठोर आवाज.

Bŭ'rrō, *n.* ( ब'रो )—a donkey. गाढव.

Bŭ'rrow, *n.* ( -ō, ब'रो )—a hole excavated by animals as a dwelling. बीळ *v. i. & t.* to make or live in a burrow; to excavate; to retire out of sight; to investigate (mystery etc.). बीळ खणणें, बिळांत राहणें, बिळांत लपणें; खणून काढणें; दृष्टीआड जाणें; गूढ गोष्टीचा शोध लावणें.

Bŭrs'ar, *n.* ( ब'र्-सर् )—a treasurer (esp. of a college); holder of a bursary. विश्वविद्यालयाचा खजिनदार, खजिनदार; (स्कॉच युनिव्हर्सिटींत) शिष्यवृत्ति मिळविणारा विद्यार्थी, धर्मार्थ ठेवलेला स्कॉच विद्यार्थी.

Bŭrsā'rial, *a.* ( बर्-से'रिअल् )—of a bursary, of a bursar. विद्यालयाच्या खजिन्याविषयीं, मदत दिलेल्या विद्यार्थ्यांचा.

Burs'arȳ, *n.* ( ब'र्-सरि )—the treasury of a college or monastery; an allowance to a poor scholar. विद्यालयाचा खजिना किंवा तिजोरी; गरीब विद्यार्थ्यास दिलेली मदत.

Bŭrst, *v. i. & t.* ( *Pa. t. & Pa. p.* burst ) ( बर्स्ट् )—to fly violently; to give way suddenly, explode; to rush forth. जोरानें उडणें; जोरानें फुटणें; ( अश्रु ) कोसळणें. *n.* collapse, sudden issuing forth, bursting, explosion, outbreak; spurt; continuous gallop. स्फोट, झटका, उफाळी, धडाका, धार; उमाळा, झटका; सारखें भरधांव जाणें. *To burst in*, to come into room, interrupt. जोरानें आंत घुसून मार्ग काढणें, अडथळा करणें. *To burst out*, to exclaim. जोरानें ओरडणें. *To burst into tears*, to break into tears. रडें कोसळणें. *To burst out laughing*, to break into laughter. हांसतां हांसतां पोट दुखणें, हशा पिकणें. *To burst upon* ( *i. e.* overrun ) *enemy's country*, शत्रूच्या देशांत बळजबरीनें घुसणें. *To burst into* ( *i. e.* to open ) *blossom*, मोहोर येण्यास आरंभ होणें. *To burst* ( *i. e.* be full ) *with joy*, आनंदाचें भरतें येणें. *To burst up*, to explode, to bring or come to utter collapse. फुटून चुराडा होणें, कोसळून पडणें.

Bu'rȳ, *v. t.* ( bĕ-, बे'रि )—to inter, to hide in earth; to put away, forget, to consign to oblivion; to commit (a corpse) to earth or tomb or sea; to celebrate burial rites over; to withdraw from view (face in hands, hands in pockets). पुरणें, मूठमाती देणें; विसरून जाणें, स्मृतिशेष करणें; प्रेत पुरून टाकणें; प्रेत पुरल्यावर प्रेतविधि करणें; लपविणें, झांकणें. *To have buried*, to have lost. नाहींसें होणें. *To bury the hatchet*, to renounce a quarrel. भांडण बंद करणें.

Bŭs, *n.* ( बस् )—( *pl.* Buses ) an omnibus; an aeroplane; a motor-car. चार चाकांची मोठी गाडी, बस; विमान; मोटारगाडी.

Bŭs'bȳ, *n.* ( -z-, ब'झ्-बि )—a tall fur cap with a cloth bag on the right side (worn by hussars and others). उजव्या बाजूला एक कापडी पिशवी असलेली उंच लोंकरी टोपी.

Bush, *n.* ( -ŏŏ-, बुश् )—a shrub, clump of shrubs; woodland, untilled district; bunch of ivy as ancient vintner's sign; luxuriant growth of hair etc. झुडूप; झाडाचा प्रदेश, रान, ओसाड प्रदेश; आयव्ही नांवाच्या लतेचा गुच्छ, (हा इंग्लंडांतील खाणावळीबाहेर निशाणादाखल लावलेला असतो); केसांची वगैरे भरपूर वाढ. *Good wine needs no bush*, चांगल्या दारूला पुष्कळ जाहिरात लागत नाहीं. *Cf.* सूर्याला दाखविण्याकरितां मशालीची जरूरी नाहीं. *To take to the bush*, झाडाझुडपांचा आश्रय घेणें. *To beat about the bush*, प्रावेढी भाषणायान करणें, पाल्हाळ लावणें. *Bush-fighter*, a person used to fighting in the bush. गनिमी काव्यानें लढणारा. *Bush-fighting*, guerilla warfare. गनिमी काव्यानें लढणें. *Bush-bean*, kidney-bean. उडीद. *Bush-buck*, a small African antelope. एक लहान आफ्रिकेंतील काळवीट. *Bush-hog*, a wild pig of South Africa. दक्षिण आफ्रिकेंतील एक जातीचें रानटी डुकर. *Bush-hook*, a bill-hook. आंकडी असलेला मोठा कोयता. *Bush lawyer*, a New Zealand bramble. न्यू झीलंडमधील एक कांटेरी झाड. *Bushman*, an earliest known South African native race; dweller or traveller in a bush. अगदीं प्राचीन अरण्यांत राहणारा; वनवासी. *Bush-ranger*, Australian brigand living in a bush. अरण्यांत चोरून राहिलेला गुन्हेगार. *To bushwhack*, to work one's way through a bush. गनिमी काव्यानें फिरणें किंवा लढणें. *Bush-whacker*, a person who cuts down bush; a backwoodsman; an implement for cutting brushwood. झाडेंझुडपें तोडणारा; दूर अंतरावर असलेल्या दाट अरण्यांत राहणारा; झुडपें तोडण्याची कुऱ्हाड.

Bushed, *a.* ( bŏŏsht, बुश्ट् )—lost in a bush. झुडपांत झांकलेला, नाहींसा झालेला.

Bush'el, *n.* ( -ŏŏ-, बु'शेल् )—a measure of capacity (for corn, etc.). एक आठ गॅलनांचें कैली माप, बुशेल. *Not to hide light or candle under a bushel*, to set an example. उदाहरण

घालून देणें. *To measure others' corn by one's own bushel*, to judge others by oneself. आपल्यावरून जग ओळखणें.

Bush'y̆, *a.* (-ŏŏ-, बु'शि)—like a bush; abounding in bushes, growing thickly. झुडपासारखा; झुडपांचा, झुडपाळ. दाट, निबिड.

Bus'iness, *n.* ( bĭz'nĭs, बि'झ्-निस् )—one's occupation or affairs; one's province or duty; work or employment; (Theatr.) action, dumb-show; a commercial firm or its interests. काम, धंदा; स्वकर्म; काम, उद्योग, उद्योगधंदा; मूक नाटक; मुग्धाभिनय; व्यापारी पेढी, व्यापार, देवघेव. *To make it one's business to*, to undertake. एखादी गोष्ट करण्याचें हातीं घेणें. *He means business*, he is in earnest त्याचें कार्यांत अंतःकरण आहे. त्याची काम करण्याची खरीखुरी इच्छा आहे. *On business*, with definite purpose. विशिष्ट हेतूनें, विशिष्ट कार्याकरितां. *Business as usual*, things will proceed in spite of disturbing circumstances. व्यत्ययाला न जुमानतां सर्व कांहीं सुरळीत चालेल. *Business end of tin tack*, the point of business. कार्यहेतु. *Business hours, hours of business*, hours of regular work. नियमित कामाची वेळ. *Business man*, a man used to dealings with men and matters; a man engaged in commerce. व्यवहारांत पडलेला माणूस; व्यापारांत गुंतलेला मनुष्य. *A man of business*, an agent, attorney. दलाल. वकील. *Mind your own business, go about your business*, स्वतःच्या कामाकडे लक्ष दे, दुसऱ्याच्या भानगडींत पडूं नको. *Sound about his business*, त्याला आपल्या कामावर जावयाला लाव, घालवून दे *Has no business to*, has no right. कोणताहि हक्क नाहीं. *To do one's business*, to kill him. ठार मारणें. *Good business!* Well done! शाबास! भले बहाद्दर.

Bus'iness-like, *a.* ( बि'झ्-निस्-लाइक् )—systematic, practical, prompt, well-ordered. पद्धतीला अनुसरून, व्यवहारी, तत्पर, व्यवस्थित, टापटिपीचा.

Bŭsk, *n.* ( बस्क् )—a rigid strip stiffening corset-front. चोळीच्या पुढच्या भागाला ताठपणा आणण्याकरितां घातलेला तुकडा.

Bŭs'kĭn, *n.* (ब'स्किन्)—a high boot; an ancient tragic actor's boot; the tragic drama. पोटरीपर्यंत येणारा बूट; प्राचीन काळांतील नटाचा बूट; शोकपर्यवसायी नाटक. *To put on the buskin*, to write or act a tragedy. शोकपर्यवसायी नाटक लिहिणें किंवा करून दाखविणें.

Bŭs'kĭned, *a.* ( ब'स्किन्ड् )—wearing a buskin. बस्किन जोडा घातलेला.

Bŭss, *n.* ( बस् )—a kiss. मुका, चुंबन. *v. t.* to kiss. मुका घेणें, चुंबन घेणें.

Bŭst, *n.* ( बस्ट् )—the upper front of the body, bosom ( esp. of a woman ), the chest; sculptured head, shoulders, and chest; contour of breast and neck. (बायकांचा) छातीचा भाग; वरच्या शरीराचा पुतळा; अर्धपुतळा.

Bust, *n. & v. i.* ( बस्ट् )=( Sl. or vulgar ) Burst.

Bŭs'tard, *n.* ( ब'स्टर्ड् )—a large swift running bird. माळढोंक, एक जातीचा पक्षी.

Bŭ'stle, *v. i. & t.* ( ब'सल् )—to make show of activity, bestir oneself; to make (others) hurry or work hard; to hurry about. व्याप किंवा धांवाधांव करणें, गडबड करणें; धामधूम करायला लावणें: नाचानाच करणें. *n.* excited activity, hurry; the padding inside the top of, a woman's skirt behind. धांवाधांव, धामधूम, गडबड; बायकांच्या परकराच्या पाठीमागें वरील भागाच्या आंत घातलेला कापडाचा वगैरे भाग.

Bus'y̆, *a* ( bĭzĭ, बि'झि )—working with concentrated attention, fully employed; fussy, meddlesome. उद्योगी, कामांत दंग, कार्यव्यग्र; लुचरा, लुडबुड्या. *v. i.* to engage, occupy, keep busy. उद्योग करीत राहणें किंवा ठेवणें, कामांत गुंतवणें. *Busy idle*, spending energy on trifles. आपली ताकद क्षुद्र गोष्टींवर खर्चणें.

Bŭt, *adv.* ( बट् )—only. फक्त, केवळ. *prep.* except, without, outside of or apart from. शिवाय, वांचून. *conj* unless, if not, yet, still. परंतु, नाहींतर. तथापि. *But for this*, were it not so, without this. असें नसलें तर, याशिवाय. *But then*, but on the other hand. परंतु दुसऱ्या पक्षीं.

Butch'er, *n.* ( bŏŏ-, बु'चर् )—a slaughterer of animals for food, meat-dealer; one who delights in bloodshed. कसाई, खाटीक; रक्तपातांत आनंद मानणारा. *v. t.* to slaughter mercilessly; to ruin by bad reading or editing, to damage by harsh criticism. निर्दयपणानें कत्तल करणें: वाईट वाचनानें किंवा लेखनानें नाश करणें, कडक टीकेनें नुकसान करणें. *The butcher, the baker, the candlestick-maker*, people of all trades. सर्व धंद्याचे लोक. *Butcher's bill*, a list of people killed in war. लढाईंत ठार मारलेल्या लोकांची यादी. *Butcher-bird*, a kind of shrike. टीव पक्षी. *Butcher's broom*, a low spiny-leaved evergreen (=*Knee Holly* ). एक प्रकारची वनस्पति. ( या वनस्पतीच्या केरसुणीसारख्या झुबक्यांचा इंग्लंडांत खाटीक लोक केरसुणीसारखा

उपयोग करितात. ) *Butcher's meat*, खाटकानें कापलेल्या जनावरांचें खाण्याचें मांस.

Bu'tcherlŷ, *a.* ( बु'चर्-लि )—fit for or like a butcher, coarse, brutal. bloody. खाटकाला योग्य, खाटकासारखा, रानवट, निष्ठुर, रक्तप्रिय.

Buch'erŷ, *n.* ( bŏŏ-, बु'चरि )—needless or cruel slaughter of people, massacre; slaughtering department ( in barracks, camp, ship, etc. ); butcher's trade. लोकांची निष्कारण कत्तल, काटाकाट; कसाईखाना; खाटकाचा धंदा.

But'ler, *n.* ( ब'ट्-लर् )—a man-servant in charge of wine, plate, etc.; a head servant. कोठावळा; बटलर, बाकर्नीस.

Bŭtt, *n.* ( बट् )—a large cask ( 108-140 gallons ); a mound behind a target; an object of ridicule, a person habitually teased; the thicker end of an object. मोठें पिंप; निशाण मारण्याचें लक्ष्य, हास्यास्पद विषय, थट्टेचें पात्र; कोणत्याहि वस्तूचें जाड टोंक, बूड, बुडखा. *v. i. & t.* to push or run one's head into, to go headlong into, to strike with the head. टक्कर देणें, घुसणें, ढोसणें, खुपसणें. *To give a fish the butt*, to turn the butt of a rod towards a fish for firmer hold. माशानें घट्ट धरावें म्हणून काठीचा बुडखा त्याच्याकडे करणें. *Butt, butt-end*, remnant. शेष, अवशेष. *Butt-end*, the thicker end. बूड, बुडखा. *To come butt* ( or *full butt* ) *against*, to run into. आंत घुसणें. *To butt in*, to intervene, meddle. मध्यें पडणें, मध्यस्थी करणें.

Butte, *n.* ( būt, ब्यूट् )—an isolated hill or peak rising abruptly. टेंकाड, टेंकडी.

Bŭtt'er, *n.* ( ब'टर् )—a yellow fatty food-substance made from cream. लोणी, मस्का *v. t.* to spread butter on; to flatter grossly. लोणी लावणें; मस्का लावणें (*fig.*). *To look as if butter would not melt in the mouth*, to be demure. अतिशय नम्र दिसणें, वरवर विनय दाखविणें. *Butter-boat*, sauce-boat. द्रोण, डोणा. *Butter-fingered, a.* given to letting things slip, unable to hold things ( esp. a catch at cricket ). गुळगुळीत हाताचा, हातांत वस्तु घट्ट ठेवण्याला असमर्थ. *Butter-fingers*, a butter-fingered person. जो आपल्या हातांतून चेंडु धरण्याऐवजीं जाऊं देतो तो. *Butter-milk*, liquid left after butter-making. ताक. *Butter-sauce*, sauce made of melted butter, flour, etc. ताक, पीठ वगैरे पासून तयार केलेलें कालवण, तोंडी लावणें. *Fine words butter no parsnips*, mere professions are valueless. केवळ लाघवी भाषण हें निरुपयोगी होय.

Bŭtt'er-cŭp, *n.* ( ब'टर्-कप् )—kinds of yellow-flowered plant. एक पिंवळीं फुलें असलेलें लहान झाड.

Bŭtt'erflŷ, *n.* (ब'टर्-फ्लाय् )—an insect with large wings ( often of brilliant colours ); a showy person, a trifler. फुलपाखरूं, पतंग; भपकेबाज मनुष्य, खुशालचेंडु.

Butt'er-nŭt, *n.* ( ब'टर्-नट् )—a large oily nut of the white walnut-tree of North America; the white walnut-tree. उत्तर अमेरिकेंतील सफेत अक्रोड; सफेत अक्रोडाचें झाड.

Butt'er-wort, *n.* ( ब'टर्-वर्ट् )—a fleshy-leaved violet-flowered bog-plant. एक जांभळीं फुलें असलेलें झाड.

Bŭtt'erŷ, *n.* ( ब'टरि )—a place ( in colleges, etc. ) where provisions are kept. दुभत्याची खोली, खाद्यसंभारगृह, कोठी. *Buttery-hatch*, half-door over which provisions are issued. ज्या ठिकाणाहून सामान दिलें जातें तें अर्धें दार.

Bŭtt'ock, *n.* ( ब'टॉक् )—either protuberance of the seat of the body; the hind part of beasts; (*pl.*) a seat, hind quarters. ढुंगण; पाठीमागचा भाग; बैठक, पाठीमागची बसण्याची जागा, मागचा पुठ्ठा.

Bŭtt'on, *n.* ( ब'टन् )—a knob or disk sewn to a garment ( to fasten it to pass through the buttonhole, or for ornament ); an unopened flower-bud; a knob, handle, catch ( as in electric bell ). गुंडी, बटण; फुलाची कळी; विजेच्या दिव्याचें बटण. *v. t. & i.* to fasten with buttons ( usu. with *up, in, into* ). बटणें लावणें, गुंड्या अडकवणें. *A boy in buttons*, a page. नोकर, चाकर, हुजऱ्या. *To take by the buttons*, to detain. खोळंबून ठेवणें, थांबविणें. *To touch the button*, to produce a complicated result by a simple action. साध्या कृत्यानें कठिण परिणाम होणें. *Buttonhole, n.* a hole into which a button fits; a flower or flowers to be worn in a buttonhole. बटण घालण्याचें भोंक, बटणाचा काज; बटणाच्या काजामध्यें घालण्याचें फूल किंवा फुलें. *v. t.* to seize a person to secure his attention. लक्ष वेधण्याकरितां एखाद्या मनुष्याला धरणें. *Button-hook*, a hook for fastening buttons. बटणें अडकाविण्याचा हुक किंवा आंकडा. *Buttons, n. sing.* a liveried page. पूर्ण पेहेराव केलेला हुजऱ्या, नोकर.

Bŭtt'rĕss, *n.* ( ब'ट्-रिस् )—a support ( built against a wall, etc. ); a prop; a person etc. that strengthens a cause etc. भिंतीच्या

बाजूला बांधलेला टेंकावा, टेंकू; आश्रय; एखाद्या कामकाजाला बळकटी आणणारा माणूस. *v. t.* to support by a buttress, to strengthen. टेंकू देणें, मजबुती आणणें.

Bŭx'om, *a.* ( ब'क्सम् )—plump, comely. गोंडस, गोजिरवाणा.

Buy, *v. t.* ( bī, बाय् )—to obtain in exchange of money or other consideration; to obtain by bribery. विकत घेणें, खरेदी करणें; लांच देऊन आपलासा करणें. ( *Pa. t.* Bought ). *n.* a bargain. सौदा. *To buy in*, to buy a stock of, to withdraw at auction by naming higher price than the highest offered. घाऊक माल खरेदी करणें, ( पुरी किंमत येत नसली म्हणजे ) लिलांवांत वस्तूच्या जुन्या मालकाकरितां विकत घेणें. *To buy into*, to buy stock or shares in (the Funds or a Company ). कंपनीचे भाग विकत घेणें. *To buy off*, to get rid by payment of ( a claim, claimer, black-mailer ), to get (soldier) discharged by payment. पैसा देऊन वाद मिटविणें, पैसा देऊन लष्करी नोकरींतून मुक्त करणें. *To buy out*, to pay a person to give up a post, property etc. जागा, इस्टेट वगैरे सोडून देण्याकरितां एखाद्याला पैसे देणें. *To buy over*, to bribe. लांच देऊन आपलासा करणें. *To buy up*, to buy as much as possible of, to absorb ( other firm, etc. ) by purchase. एकदम सर्व माल विकत घेणें, दुसरी फर्म वगैरे खरेदी करून एकत्र करणें. *To buy a pig in poke*, to commit oneself inconsiderately. विचार न करतां गुंतला जाणें. Buy'able, *a.*

Buy'er, *n.* ( बा'यर् )—one who buys. विकत घेणारा, गिऱ्हाईक.

Bŭzz, *n.* ( बझ् )—humming like bees; a confused sound. गुणगुणणें; फुसफुसणें, कुजबूज. *v. i. & t.* to make a buzz; to spread secretly. गुणगुणणें; गुप्तपणें प्रसार करणें, कुजबूज करणें. *Buzz-saw*, a circular saw. वर्तुलाकार करवत. *To buzz an applause*, to utter an applause by speaking together. एकत्र बोलून वाहवा करणें. *To buzz (stones)*, to throw hard. जोरानें फेंकणें.

Bŭzz'ard, *n.* ( ब'झर्ड् )—kinds of falcons, kind of vulture. एक जातीचा बहिरीससाणा; एक जातीचें गिधाड.

Bŭzz'er, *n.* ( ब'झर् )—a steam-whistle; an electric buzzing-machine for sending signals; (Army sl.) a signaller. वाफेची शिटी; सिग्नल देण्याचें विजेचें यंत्र; सिग्नल देणारा.

Bȳ, *adv.* ( बाय् )—near, at hand; aside, in reserve; past. जवळ; बाजूला; जवळून. *prep.* near to, beside, within reach of; along, via, past; surrounded with; through the action, agency, means, or instrumentality of; as soon as, not later than; in accordance with. जवळ; द्वारा, मार्फत; वेष्टित; कडून; नें, ॰च्या आंत; प्रमाणें *By and by*, before long. थोड्या वेळानें. *n.* the future. भविष्यकाल, भवितव्य. *To stand by*, to be faithful to, to help. विश्वासू असणें, मदत करणें. *To abide by*, to accept, observe. स्वीकारणें, पाळणें. *To come by*, to obtain. मिळणें. *By oneself*, alone. एकटा, दुसऱ्याच्या मदतीशिवाय. *By the way*, as one goes, parenthetically. जातां जातां, सहजासहज मध्येंच घातलेलें. *To swear by vegetarianism*, to declare complete belief in. पूर्ण विश्वास प्रगट करणें.

Bȳ-blow, *n.* ( बा'य्-ब्लो )—a side-blow at some one else than the main opponent; a bastard child. भलत्यालाच लागलेला ओझरता फटका; अनौरस मूल.

Bye, *n.* ( बाय् )—a run made at cricket without ball being struck by the batsman. बॅटला चेंडू लागल्याशिवाय काढलेली धांव.

By'-ĕlection, *n.* ( बा'य्-इलेक्शन् )—an election caused by death or resignation. मधलीच निवडणूक, पोटनिवडणूक.

Bȳ'-ĕnd, *n.* ( बा'य्-एन्ड् )—a side or secret purpose. खासगी किंवा गुप्त हेतु.

By'gone, *a.* ( बा'य्-गॉन् )—no longer existent, past, departed, antiquated. अस्तित्वांत नसलेलें, गत. *n. pl.* the past, past offences. भूतकाळ, झालेल्या गोष्टी. *Let bygones be bygones*, forgive and forget. झालेल्या गोष्टी विसरून जा.

By'-lane, *n.* ( बा'य्-लेन् )—a side lane. आडगल्ली, आडरस्ता.

By'law, Bye'law, *n.* ( बा'य्-लॉ )—a regulation made by a local authority, etc. अवांतर कायदा, पोटकायदा.

By'-name, *n.* ( बा'य्-नेम् )—a nickname. टोपणनांव.

Bȳ'-pass, *n.* ( बा'य्-पास् )—a secondary gas-jet always alight from which the main jet is lit when wanted; a piece of new road relieving traffic by connecting two points of the old. ज्याच्यापासून जरूर पडेल तेव्हां मुख्य नळी पेटविली जाते अशी नेहमीं पेटलेली दुय्यम प्रतीची गॅस सोडण्याची नळी; जुन्याला जोडणारा नवीन रस्त्याचा भाग.

By'-păth, *n.* ( बा'य्-पाथ् )—an unfrequented path. आडमार्ग.

Bȳ'-play, *n.* ( बा'य्-प्ले )—a dumb show of

minor characters on the stage. गर्भनाटक, उपनाटक.

**Bȳ'-product**, *n.* ( बा'य्-प्रॉडक्ट् )—a thing or substance produced incidentally in the manufacturing of something else. मुख्य पदार्थाचें अंगभूत होणारा पदार्थ, अवांतर उत्पन्न.

**Byre**, *n.* ( बायर् )—a cow-house. गाईचा गोठा.

**Bȳ'-road**, *n.* ( बा'य्-रोड् )—a little frequented road. आडरस्ता.

**By'stander**, *n.* ( बा'य्-स्टँडर् )—a spectator. प्रेक्षक.

**Bȳ'-street**, *n.* ( बा'य्-स्ट्रीट् )—an out-of-the-way street. विशेष प्रचारांत नसलेला रस्ता, आडमार्ग.

**By the by**, ( बा'य्-दि-बाय् )—incidentally, parenthetically. सहज आठवण झाल्यावरून, प्रसंगानुरूपानें. ( Also, *by the bye* )

**Bȳ'-way**, *n.* ( बा'य्-वे )—a secluded road or track; a short cut; less known department of any subject. आडमार्ग, आडरस्ता; अगदीं जवळचा रस्ता; कोणत्याहि विषयाचा विशेष माहीत नसलेला विभाग.

**Bȳ'woner**, *n.* ( बा'य्-वोनर् )—a sub-occupier of a farm land ( paying rent in kind or service ). भाड्यानें पोटशेती करणारा.

**By'word**, *n.* ( बा'य्-वर्ड् )—a familiar saying; an object of derision. परिचित म्हण, न्याय; हास्यविषय.

**Bȳ'work**, *n.* ( बा'य्-वर्क् )—a work done by the way, work done at leisure moments. फावल्या वेळांत केलेलें काम.

**Bȳzăn'tine**, *a.* ( बाय्-झॅ'न्-टाइन् )—of Byzantium or Constantinople; of the architectural style of the Eastern Roman Empire ( round arch, cross, dome, circle, mosaic ). कॉन्स्टॅन्टिनोपलसंबंधीं; पौर्वात्य रोमन साम्राज्यांतील विशिष्ट स्थापत्यपद्धतीविषयीं.

## C

**C**, ( सी )—the third letter of the English alphabet; the Roman numeral 100; ( Mus. ) the first note of natural major scale. इंग्रजी वर्णमालेंतील तिसरा वर्ण; १०० हा रोमन आंकडा; स्वरसप्तकांतील प्रथम स्वराची संज्ञा, षड्जस्वर.

**Ca'aba**, *n.* ( का'अबा )—the sacred building at Mecca, Mohammedan Holy of Holies cotaining the black stone. काबा, मुसलमान लोकांची मक्केतील अतिपवित्र मशीद. ( या मशिदींत आग्नेयी बाजूला काळा दगड आहे. हा दगड धार्मिक मुसलमान लोक स्वर्गांतून आणिला आहे असें समजतात. )

**Căb**, *n.* ( कॅब् )—a hackney carriage ( esp. of brougham or hansom shape or taxi ). एका घोड्याची झांकणाची भाड्याची गाडी. *v. i.* to go by a cab, to go in a cab. कॅब गाडींतून जाणें. *Cabman*, driver of a cab. कॅब गाडी हांकणारा. *Cabstand*, a place where cabs stand for hire. कॅब गाड्या उभ्या राहण्याची जागा, भाड्याच्या गाड्यांचा अड्डा.

**Cabăl'**, *n.* ( कबॅ'ल् )—a secret intrigue; a political clique, faction. गुप्त कारस्थान, मसलत, कट; राजकीय कट, फाटाफूट. *v. i.* to join in or act as a cabal. गुप्त मसलत करणें, राजकीय कटाला सामील होणें. *The Cabal*, 'Committee for Foreign Affairs' under Charles II, esp. Clifford, Arlington, Buck ingham, Ashley, and Lauderdale ( 1672 ), precursor of modern Cabinet. इंग्लंडच्या राजा दुसरा चार्लस याचें परराष्ट्रमंडळ.

**Căbb'age**, *n.* ( -ij, कॅ'बिज् )—kinds of green vegetable with round heart. कोबीचा कांदा, कोबी. *v. i.* to form a head like a cabbage. कोबीच्या आकारासारखें डोकें होणें.

**Căbb'age**, *n.* ( कॅ'बिज् )—shreds ( or large pieces ) of cloth appropriated in cutting out clothes. घेतून कापल्यानंतर राहिलेले कापडाचे मोठे तुकडे. *v. t.* to appropriate ( pieces of cloth, etc. ) surreptitiously. घेतून राहिलेल्या कापडाचे तुकडे चोरणें, कपटानें आपलासा करणें.

**Căb'ala, Căbb'ala**, *n.* ( कॅ'बला )—Jewish oral tradition; occult lore, mystic interpretation, esoteric doctrine. ज्यू लोकांच्या धर्मशास्त्राचें परंपरागत भाष्य; गूढविद्या, रहस्यविद्या. *Căb'alism, Cabb'alism*, *n.* कॅबालापंथ, कॅबालासंप्रदाय, गूढार्थत्व. *Cabbalistic*, *a.*; *Cabbalist*, *n.* ज्यू धर्मशास्त्रवेत्ता.

**Că'bbȳ**, *n.* ( कॅ'बि )—( colloq. ) a cabman. भाड्याची गाडी हांकणारा.

**Ca'ber**, *n.* ( के'बर् )—a roughly trimmed pine-trunk used in Scotch Highland Sport of *tossing the caber*. खेळण्याकरितां तयार केलेलें पाइन झाडाचें खोड.

**Căb'in**, *n* ( कॅ'बिन् )—a small dwelling ( esp. of wood ); a hut; a private or public room on a ship. लहानशी राहण्याची जागा; झोंपडी; गलबतांतील खोली. *Cabin-boy*, a boy waiting on officers or passengers. गलबतांत अधिकाऱ्यांच्या किंवा उतारूंच्या सेवेकरितां ठेवलेला नोकर. *Cabined*, *a.* confined or cramped in a small space. अगदीं थोड्याशा जागेंत कोंडून ठेवलेला.

**Căb'inet**, *n.* ( कॅ'बि-निट् )—a closet, a private room; a body of Ministers attending councils with the Prime Minister; a case with drawers or shelves or com-

partments. लहान खोली, खास दिवाणखाना; मन्त्रिमंडळ, मुख्य प्रधानमंडळ; खण असलेलें कपाट किंवा पेटी. *Cabinet council*, a meeting of council of about twelve or or twenty chief ministers of state. राजाच्या मुख्य मंत्र्यांची सभा. *Cabinet crisis*, difficulties involving change of government or resignation of some members of the Cabinet. प्रधानमंडळाची चलाबिचल, प्रधानमंडळाचा डळमळितपणा. *Cabinet edition*, an edition between the library edition and the popular edition. पुस्तकालयांतील प्रतीपेक्षां आकारानें व किंमतीनें थोडी लहान प्रत. *Cabinet photograph*, a size larger than carte-de-visite. छायाचित्राचा कार्डापेक्षां थोडा मोठा आकार. *Cabinet-maker*, a skilled joiner. नकशीदार पेट्या व इतर लांकडी सामान तयार करणारा सुतार. *Cabinet-making*, *n.*

Ca'ble, *n.* (के'बल्)—an anchor rope or chain (as measure) 200 fathoms; a thick rope of wire or hemp; a submarine line containing insulated wires, a message sent by a submarine line. गलबताच्या नांगराचा दोरखंड किंवा सांखळी; जाड दोरखंड किंवा तार; जलमार्गानें नेलेलें तारायंत्र; जलमार्गानें पाठविलेली तार. *v. i. & t.* to use telegraphic cable, to wire message by a telegraphic cable. पाण्यांतील तारेचा उपयोग करणें, तार करणें.

Ca'ble-cär, *n.* (के'बल्-कार्)—a tram-car worked by an underground cable. जमिनीखालून नेलेल्या तारांनीं चालणारी ट्रॅमगाडी.

Ca'blegräm, *n.* (के'बल्ग्रॅम्)—a message sent by an oceanic telegraph cable. समुद्रांतून नेलेल्या तारेंतून गेलेली किंवा पाठविलेली बातमी.

Cabŏbs', *n. pl.* (कबॉ'ब्ज्)—meat roasted in small pieces on skewers; roast meat. मांसाचें पक्कान्न, कबाब; शिजवलेलें मांस.

Cabōō'dle, *n.* (कबू'डल्)—(Sl.) group, lot, set. टोळी, समुदाय. *The whole caboodle*, all the the lot (persons or things). सर्वच्या सर्व, सर्व समुदाय.

Cabōōse', *n.* (कबू'स्)—a cooking-room on the ship's deck; a car (for the use of a conductor, brakeman, etc.) on freight-train. गलबतावरील स्वयंपाकाची खोली, मालाच्या गाडीवरील एक डबा.

Căbriolet', *n.* (-lā, कॅब्रिओले')—a light two-wheeled hooded one-horse chaise. एका घोड्याची अर्ध्या झांकणाची दुचाकी गाडी

Cacā'ō, *n.* (कॅके'ओ)—the tree or its seed giving cocoa and chocolate. कॅकाओ झाड किंवा फळ. (याच्या बियांपासून कोको व चॉकोलेट तयार होतें.)

Căche, *n.* (-sh, कॅश्)—store of food etc. left behind for future use by explorers etc. पुढें उपयोगी पडावी म्हणून शिल्लक ठेवलेली धान्य-सामुग्री वगैरे. *v. t.* to place or store in cache. (धान्य दारूगोळा वगैरे) शिल्लक ठेवणें, लपवून ठेवणें.

Că'chet, *n.* (kăshā, कॅ'शे)—marks of authenticity, distinguishing mark; any distinctive stamp. खरें असल्याबद्दलची खूण, विशेष चिन्ह; विशिष्ट शिक्का.

Că'chĭnnāte, *v. i.* (कॅ'किनेट्)—to laugh loudly. मोठ्यानें हंसणें, खदखदां हंसणें.

Că'chinnā''tion, *n.* (-kĭ-, कॅकिने''शन्)—loud or immoderate laughter. अट्टाहास, मोठ्यानें हंसणें. Ca'chinatory, *a.* मोठ्या हंशाचा.

Ca'chou, *n.* (kăshōō, कॅ'शू)—a pill used by smokers to sweeten the breath. (श्वासोच्छ्वासाची वाण दूर करणारी) मंजिठ व काजू यांची केलेली गोळी.

Cacique', *n.* (-sēk, कसी'क्)—an aboriginal prince or chief of the West Indies and tropical America. वेस्ट इंडीजमधील अगदीं मूळचा राजा.

Căc'kle, *n.* (कॅ'कल्)—clucking of hen, calling of geese; glibe inconsequent talk. कलकल, हंसशब्द; उगीच व्यर्थ बडबड, जल्पना. *v. i. & t.* to make clucking of hen after laying; to indulge in noisy talk. खुटखुट आवाज करणें; बडबडणें.

Căcodē'mon, *n.* (कॅकॉडी'मन्)—an evil spirit; a malignant person. पिशाच्च, राक्षस; दुष्ट मनुष्य.

Căcoē'thēs, *n.* (-z, कॅकोई'थेझ्)—an ill habit, an itch for doing something unadvisable or foolish. हाडींमाशीं खिळलेली वाईट संवय, कुकर्मकंडु.

Căco'graphy̆, *n.* (कॅकॉ'ग्रफि)—bad handwriting or spelling. वाईट हस्ताक्षर, अशुद्ध लेखन.

Caco'phonous, *a.* (कॅकॉ'फोनस्)—ill-sounding. वाईट किंवा कर्कश आवाजाचा.

Căcŏph'ŏny̆, *n.* (कॅ-कॉ'फॉनि)—an ugly sound (esp. of words or music). कर्कश आवाज, बेसूर, बद्सूर. [Gr. *kakos* bad, & *phone*, to sound]

Că'ctŭs, *n.* (कॅ'क्टस्)—a juicy plant with thick fleshy stem (usually no leaves and clusters of spines). अमेरिकेंत उष्ण प्रदेशांत होणारी एक कांटेरी वनस्पति. Căctā'ceous, *a.*

Căd, *n.* (कॅड्)—a low ill-bred fellow, a mean vulgar fellow: an omnibus conductor; a hanger-on employed about (esp. school and college) games; a member of lower classes; a person guilty or capable of ungentlemanly conduct, a blackguard.

दलकट, अशिक्षित मनुष्य; ऑम्निबस गाडीचा कन्डक्टर; खेळांसंबंधीं नेमलेला अनुयायी; खालच्या वर्णाचा माणूस; असभ्य मनुष्य, लुच्चा, हरामखोर.

Că'ddĭsh, *a.* ( कॅडिश् )—dishonourable, ill-bred. नीच, कलंक लावणारा, असभ्य, उद्धट.

Cădă'verous, *a.* ( कॅडॅव्हरस् )—of corpse-like pallor, deadly pale. प्रेतकळेचा, प्रेतसदृश, मढ्यासारखा. [ L. *cadaver*, a corpse ]

Că'ddie, *n.* ( कॅडि )—a golf-player's attendant. गोल्फ खेळणाराचा बरोबर असणारा नोकर.

Că'ddis, Că'ddice, *n.* ( कॅडिस् )—a water-larva in cylindrical case of stems etc. पाण्यामध्यें असणारा कोशांतील किडा.

Că'ddȳ, *n.* ( कॅडि )—a small box for holding tea. चहा ठेवण्याची लहान पेटी.

Ca'dence, *n.* ( केडेन्स् )—rhythm, measured movement of sound; intonation; close of musical phrase. आवाजाचा चढाव किंवा उतार; स्वरभेद; गाण्याचा विराम, स्वरसंक्रम.

Cădĕt', *n.* ( कॅडेट् )—a younger son; a student in naval or military college; ( Austral. ) a young gentleman who is learning farming on a large farm. धाकटा मुलगा; नाविक किंवा लष्करी कॉलेजांतील विद्यार्थी किंवा उमेदवारी करणारा मनुष्य; मोठ्या शेतावर शेती शिकत असलेला तरुण गृहस्थ.

Cădge, *v. i. & t.* ( कॅज् )—to go about peddling or begging; to get by begging. भिक्षा मागत फिरणें; भीक मागून मिळविणें.

Că'dger, *n.* ( कॅजर् )—a pedlar, a street hawker; a beggar, loafer. फेरीवाला, रस्त्यांतून जिन्नस विकणारा; भीक मागत फिरणारा, भिकारी.

Ca'di, Ka'di, *n.* ( काडि )—a Mohammedan judge, a civil judge ( usu. of a town, etc. ) among Turks, Arabs & Persians. काजी, ग्रामन्यायाधीश, मुसलमानांचे जातिधर्मासंबंधीं खटले तोडणारा न्यायाधीश.

Căd'mĭŭm, *n.* ( कॅड्-मिअम् )—a bluish-white metal resembling tin. जस्तासारखी एक निळसर पांढरी धातु. *Cadmium-yellow*, an intense yellow pigment. एक अत्यंत निळें मलम.

Ca'dre, *n.* ( कार्डर् )—a framework, scheme ( Mil. ) a permanent establishment of a regiment forming nucleus for expansion at need. रचना, योजना; व्यवस्था; सैन्यविभागाची कायमची व्यवस्था.

Cădū'cēŭs, *n.* ( कॅड्यूसिअस् )—( *Pl.* Cadu'cēī, कॅड्यूसिआय् )—the ancient herald's wand ( esp. as symbol of Mercury ). प्राचीन देवदूताची काठी.

Cadū'cous, *a.* ( कॅड्युकस् )—fleeting, unenduring, perishable; falling off when work is done. निघून जाणारें, न टिकणारें, नाशवंत; ( काम झाल्यावर ) आपोआप गळून पडणारें. Cădū'city, *n.* आपोआप गळून पडण्याचा धर्म.

Cae'cŭm, *n.* ( सीकम् ) ( *Pl.* Cae'ca, सीका )—the blind gut or first part of the large intestine. अंधान्त्र, मोठ्या आंतडीचा आरंभीचा भाग. Caécal, *a.*; Caeci'tis, *n.*

Cae'sar, *n.* ( सीझर् )—Roman Emperor from Augustus to Hadrian; an autocrat. रोमन बादशहा सीझर; अनियंत्रित राजा, सुलतान. *Caesar's wife*, a person required to be above suspicion. ज्याचा संशयसुद्धां घेणें शक्य नाहीं असा इसम.

Cae'sarism, *n.* ( सीझरिझम् )—belief in autocracy. एकतंत्री राज्यकारभारावर विश्वास, राजाचा अनियंत्रित वर्तनक्रम. *Cae'sarist, n.* सीझरच्या अनियंत्रित राज्यतंत्राचा अभिमानी.

Caesu'a, *n.* ( siz-, सिझ्यु'र )—the point of natural pause in a metrical line. कवितेच्या ओळींत मध्येंच थांबण्याचें स्थळ, यति. Caesū'ral, *a.*

Că'fé, *n.* ( kă'fā, कॅफे )—a coffee-house or restaurant. उपाहारगृह, चहाकॉफीचें दुकान, फराळाचें दुकान.

Căfĕtĕr'ia, *n.* ( कॅफिटिअरिआ )—a restaurant where the patrons serve themselves with food. आश्रयदाते ज्याठिकाणीं स्वतःच वाढून घेतात असें फराळाचें दुकान.

Că'ffeine, *n.* ( कॅफिआइन् )—vegetable alkaloid found in coffee and tea plants. कॉफी व चहांच्या झाडांमध्यें सांपडणारें आल्कली द्रव्य.

Cāge, *n.* ( केज् )—a fixed or portable prison of wire or with bars ( esp. for birds or beasts ); a prison. पिंजरा; तुरुंग, बंदीखाना. *v. t.* to confine in a cage. पिंजऱ्यांत कोंडणें.

Cahōōt', *n.* ( कॅहूट् )—*in cahoot, in cahoots*, in league or partnership. संघांत किंवा भागीदारींत.

Caique', *n.* ( ka-ēk', कईक् )—a Turkish row-boat. तुर्कस्तानांतील वल्हवण्याची होडी.

Cairn, *n.* ( केर्न् )—a pyramid of stones. दगडी बुरूज, मनोरा.

Cairngōrm', *n.* ( केर्न्-गॉर्म् ) a yellow or wine-coloured gem-stone. पिंवळा अथवा तांबडट रंगाचा स्फटिकमय खडा.

Cai'sson, *n.* ( केसन् )—an ammunition chest or wagon; a watertight case used in laying foundations under water. दारूगोळ्याची पेटी किंवा वचा; पाण्याखालीं पाया घालण्याकरितां म्हणून तयार केलेली आंत पाणी न शिरणारी पेटी.

Cait'iff, *n.* ( केटिफ् )—a coward or rascal, a base or despicable person. भीरु, हरामी.

Căjōle', *v. t.* ( कॅ-जोल् )—to persuade or sooth

by flattery or deceit. फुसलावणें, गोड बोलून ठकवणें. Cajolery, Cajolement, *nn.*

Cāke, *n.* ( केक् )—a small flat loaf; a flattish compact mass; a compound of bread sweetened with sugar, currants and other ingredients. चपाती, पोळी; ( साबणाची वगैरे ) वडी; एक साहेबी गोड पक्वान्न, केक. *v. t. & i.* to form into cohesive mass, to harden. पोळी करणें, वडी बनवणें, घट्ट करणें. *Cakes and ale*, merry-making. चैन, मजा, सर्व प्रकारचें संसारसुख. *To take the cake*, to carry off the honours. शर्यतींत पहिल्या प्रतीचें बक्षीस मिळविणें. *Cake-walk*, a dance developed from a negro contest in graceful walking with cake for the prize. एक प्रकारचा नाच. Cāk'ȳ, *a.* lumpy, cohesive. गोळ्यासारखा, घट्ट.

Cal'abash, *n.* ( कॅल-बॅश् )—kinds of gourd and fruit-tree; a shell from these as a drinking or cooking vessel. भोंपळा; तुंबडी.

Călaboose', *n.* ( कॅलबूस् )—( colloq. ) a prison. तुरुंग.

Călamăn'der, *n.* ( कॅल-मँडर् )—a hard cabinet wood of Ceylon and India. एक सीलोनी ताठ लांकूड.

Calăm'ĭtous, *a.* ( कलॅमि-टस् )—causing or marked by calamity. दुःखद, विपत्तीचा, हालअपेष्टेचा.

Calăm'ĭtȳ, *n.* ( कलॅमि-टि )—adversity, deep distress, grave disaster; distressed state. विपत्ति, मोठें संकट; हाल, हालअपेष्टा.

Calăsh', *n.* ( क-लॅश् )—a hooded carriage; a carriage-hood; a hood protecting bonnet, etc.; a two-wheeled one-seated vehicle with the driver's seat on the splash-board. आच्छादनयुक्त गाडी; गाडीचें आच्छादन; ( तोंडावरचा ) बुरखा; एक दुचाकी एक स्वारी बसण्याजोगी गाडी.

Călcā'rĕous, *a.* ( कॅल्के'रिअस )—containing carbonate of lime; of limestone. खडू किंवा चुनखडा असलेला; चुनखडीचा.

Călcĕolā'rĭa, *n.* ( कॅल्-सिओले'रिआ )—a plant with slipper-shaped flower. पादत्राणाच्या आकृतीसारखें फूल असलेलें झाड.

Căl'cĭfȳ, *v. t. & i.* ( कॅ'ल्सिफाय् )—to convert or be converted into lime; to replace by lime; petrify. चुना होणें, चुन्याच्या स्थितींत येणें; चुना बनणें; (चुन्यासारखा) घट्ट दगड बनणें. Calcification, *n.*; Calcifiable, *a.*

Căl'cine, *v. t. & i.* ( कॅ'ल्-सिन् )—to reduce to powder by burning, to reduce to a friable state; to be converted by heat into a powder. उष्णता लावून भस्म करणें; उष्णतेच्या योगानें भस्म होणें. Calcination, *n.*

Căl'cĭŭm, *n.* ( कॅ'ल्-सि-अम् )—a yellow metal the basis of lime. एक प्रकारची धातु, रसायन शास्त्रांतील एक मूलतत्त्व. [ L. *calx, calcis*, lime ]

Căl'cūlāte, *v. t. & i.* ( कॅ'ल्-क्यु-लेट् )—to compute by figures, to ascertain by exact reckoning; to suppose, believe. हिशेब करणें, गणणें; हिशेब करून ताडून पाहणें; तर्क करणें, वाटणें. *Calculating-machine*, a machine that does sums automatically. आपोआप बेरजा करणारें यंत्र.

Căl'cūlāted, *a.* ( कॅ'ल्क्यू-ले-टेड् )—intentional, prearranged. जाणूनबुजून केलेला, बुद्धिपूर्वक, पूर्वसंकल्पित.

Călcūlā'tion, *n.* ( कॅल्क्युले'शन् )—reckoning, result got by reckoning; forecast. गणणें, गणित, शेवटचा आंकडा; अंदाज, अजमास, कयास, अटकळ.

Că'lcūlātor, *n.* ( कॅ'ल्क्युलेटर् )—one who calculates; a set of tables for use in calculating-machine. गणना करणारा, विचारी; हिशेब करण्याचीं कोष्टकें, गणनयंत्र, हिशेब करण्याचें यंत्र.

Că'lcūlŭs, *n.* ( कॅ'ल्क्युलस् ) ( *Pl.* Calculi )—(Med.) a stone, concretion of some part of the body; ( Maths. ) a particular method of calculation. खडा; गणिताची एक उच्च शाखा, कलन. *Urinary calculus*, मूतखडा. [ L. *calculus*, a pebble ]

Cal'dron, *n.* ( कॉ'ल्डन् )—a large boiling vessel. हांडा, कढई. Also, *Cauldron.*

Călēdō'nĭan, *a.* ( कॅलिडो'निअन् )—pertaining to Scotland. स्कॉट्लंडसंबंधीं. *n.* a Scot, native of Scotland. स्कॉटलंडचा रहिवासी.

Căl'ĕnder, *n.* ( कॅ'लिंडर् )—an almanac or table exhibiting year's arrangement; a register or list. तारीखवारांचें पत्रक, पंचांग, कॅलेंडर; फेरिस्त, याद. *v. t.* to register, to enter in a list; to arrange, analyse and index (documents). नोंद करणें, यादींत नमूद करणें; वर्गवारी लावून विल्हेवारीनें लिहिणें.

Căl'ĕnder, *n.* ( कॅ'लिंडर् )—a roller-machine for cloth, etc.; a steam mangle. इस्तरी; वाफेचा दाबाचा रूळ. *v. t.* to press in a calender. इस्त्री करणें.

Că'lends, Kă'lends, *n. pl.* ( कॅ'लिंड्ज् )—the first of a month in the ancient Roman calendar. प्राचीन रोमन पंचांगांतील दर महिन्याचा पहिला दिवस. *On the Greek calends*, never. कधींहि नाहीं, न उगवणाऱ्या दिवशीं.

Că'lenture, *n.* ( कॅ'लेंचर् )—a tropical fever or delirium in which sailors and other people leap into the sea as into fields. सततज्वर

किंवा भ्रम. ( जो झाला असतां खलाशी वगैरे लोक शेतें समजून समुद्रांत उडी टाकतात. ) [ L. *calere*, to be hot ]

Căĺf, *n.* ( *Pl.* Calves ) (काफ् )—a young of an animal ( esp. of a cow, or an elephant, or whale, or deer, or seal ); a stupid fellow; a fleshy hinder part of leg below knee. वासरूं, पच्चा; मूर्ख माणूस; पायाची पोटरी. *A cow in calf, A cow with calf*, a pregnant cow. गाभण गाय. *Slip her calf*, suffer abortion. गर्भपात होणें. *Golden calf*, wealth as object of worship. सर्वांना पुज्य असा पैसा. *Calf-love*, childish love affair. मुलगा व मुलगी यांमधील निष्कपट प्रीति. *Sea-calf*, seal. सील नांवाचा जलचर प्राणी. *Calf's teeth*, milk teeth. लहानपणचे पहिल्यानेंच आलेले दांत.

Că'librāte, *v. t.* ( कॅलिब्रेट् )—to find calibre of; to calculate irregularities of ( tube, gauge) before graduating. ( तोफेच्या ) परिघ मापणें, बुद्धीची ग्राहकशक्ति मापणें; ( अंशांच्या खुणा करण्याकरितां ) उष्णमापकाची पोकळी मोजणें. Calibration, *n.*

Căl'ibre, *n.* ( कॅलिब्‌र् )—the internal diameter of a gun or tube; moral weight, degree of importance. बंदुकीच्या तोंडाचा व्यास; नीतिमत्ता, महत्त्व, दर्जा.

Căl'icō, *n.* ( कॅलिको )—cotton cloth, esp. plain white kinds; printed cotton cloth. साधें सफेत कापसाचें कापड; छापील सुती कापड. *a.* variegated. चित्रविचित्र, रेघा वगैरे असलेलें. *Calico-ball*, a dance at which only cotton dresses are worn. फक्त सुती कपडे घालून केलेला नाच.

Că'liph, Că'lif, *n.* ( कॅलिफ् )—the successor of Muhammed, Mohammedan chief civil and religious ruler. खलिफ, मुसलमान लोकांचा धर्मगुरु. Caliphate, *n.* caliph's office. खलिफाचा अधिकार.

Că'lix, *n.* ( कॅलिक्स् )—( pl. Calicēs, कॅलिसीज् ) ( Anat. ) cuplike cavity or organ. फुलाचा बाह्यकोश, पुष्पकलश, पेला.

Calk, *n.* ( kawk, कॉक् )—the sharp iron set in horse-shoe or boot to save slipping. ( पाय घसरूं नये म्हणून ) नालावर मारलेला उंच खिळा. *v. t.* to provide with a calk. नालाला ( घसरूं नये म्हणून ) खिळा मारणें.

Calk'in, *n.* ( kawk'ĭn, कॉकिन् )—the turned down edge of a horse-shoe. जोड्याला मारलेल्या खिळ्याचें खालीं वांकवलेलें टोंक.

Call, *v. i. & t.* ( kawl, कॉल् )—to speak in a loud tone; to utter a summons; to pay a brief visit to; to convoke; to name, describe. ओरडणें; बोलावणें; भेटावयास जाणें; निमंत्रण करणें; नांव देणें, वर्णन करणें. *n.* a shout, bird's cry; a summons; a short visit; a signal. ओरड, पक्ष्यांचें ओरडणें; बोलावणें; भेट, मुलाखत; इशारत, खूण. *To call on a person at his house*, to go and pay a short visit to. एखाद्याच्या घरीं त्याला भेटावयास जाणें. *To call for*, to order, demand, need, go and fetch. हुकूम करणें, मागणी करणें, जरूरी भासणें, जाऊन आणणें. *To call on*, to invoke, appeal to. बोलावणें, उद्देशून बोलणें. *To call into being*, to create. उत्पन्न करणें. *To call into play*, to give scope for. अवसर देणें. *To call in question*, to dispute. आक्षेप किंवा शंका घेणें. *To call to mind, to call up*, to recollect. ध्यानांत आणणें, स्मरणें. *To call away, to call off*, to divert, to distract. ( एका कामावरून काढून ) दुसऱ्या कामाकडे लावणें, ( एकीकडून ) दुसरीकडे नेणें. *To call in* ( *i. e.* to recover ) *money lent*, उसने दिलेले पैसे गोळा करणें. *To call in a doctor* ( etc. for advice ), डॉक्टरला मदतीला किंवा सल्ल्याला बोलाविणें. *To call forth*, to elicit. काढून घेणें. *To call out*, to elicit, to challenge to duel, to summon ( troops ) esp. to aid the civil authorities. बाहेर काढून घेणें, द्वंद्व युद्धाला आह्वान करणें, मदतीकरितां ( सैन्य ) बोलावणें. *To call up*, to imagine, to summon; to talk by telephone, to summon to serve in the army, etc. कल्पना करणें, टेलिफोनवर बोलावणें, सैन्यांत नोकरी करण्याकरितां बोलावणें. *To call a spade a spade*, to call things by their names, to speak plainly or bluntly. जसें असेल तसें म्हणणें, स्पष्ट बोलणें, चोराला चोर म्हणणें. *To call attention to*, नजरेस किंवा निदर्शनास आणणें. *To call a person names*, to abuse him. एखाद्याला नांवें ठेवणें, शिवीगाळ करणें. *To call ( a thing ) one's own*, to possess the thing. मालकीची असणें. *To call to account*, हिशोब मागणें, झडती मागणें. *To be called to one's account*, to die. मरणें. *To call to order*, व्यवस्था लावणें. *To call down*, to reprove, abuse. खरडपट्टी काढणें, शिव्या देणें, *Call-loan, Call-money*, money lent subject to recall without notice. आगाऊ सूचना दिल्याशिवाय परत मिळण्याच्या अटीवर दिलेलें कर्ज. *At call, Within call*, ready for orders. बोलावतांक्षणींच काम करण्याला तयार. *Call-boy*, prompter's attendant summoning actors. नटांना रंगभूमीवर येण्याची सूचना देणारा नोकर. *Call of nature*, मलमूत्रविसर्जनाची आवश्यकता वाटणें.

Call'er, *n.* (kaw-, कॉ'लर्)—a visitor. भेटीस येणारा, पाहुणा. *a.* (Scotch) fresh, not decaying (fish etc); cool (air). ताजा, न कुजलेला; शांत.
Călli'graphy̆, *n.* (कॅ-लि'ग्रफि)—beautiful handwriting, handwriting. सुंदर अक्षर, हस्ताक्षर.
Call'ing, *n.* (kaw-, कॉ'लिंग्)—occupation, trade, profession. धंदा, व्यवसाय.
Că'llĭper, *n.* (कॅ'लिपर्)—(pl.) compasses with bowed legs for measuring diameter of convex bodies, or with out-turned points for measuring calibre. गोलाकार वस्तूंचा आंतील व बाहेरील व्यास मोजण्याचा वांकड्या टोंकांचा कंपास, कमानदार कंपास. *v. t.* to measure with callipers. कमानदार कंपासानें मापणें.
Căllĭsthĕ'nics, *n. pl.* (कॅलिस्थे'निक्स्)—exercises to develop strength and grace of body. (स्त्रियांकरितां.) सौंदर्यवर्धक व्यायाम. [Gr. *kalos*, beautiful, & *sthenos*, strength]
Callŏ'sĭty̆, *n.* (कॅलॉ'सिटि)—abnormal hardness and thickness of skin, hardened part, insensible lump. कातडीचा विलक्षण ताठपणा व जाडी; घट्टा, किणा, किण.
Căll'ous, *a.* (कॅ'लस्)—hardened, horny; unfeeling, unsympathetic. बहिरा, बधिर, कठिण, कठोर; अहृदय, कोडगा. Callousness *n.*
Căll'ow, *a.* (कॅ'लो)—unfledged; raw, inexperienced. अपूर्ण वाढीचा, पंख न फुटलेला; नवीन, अननुभवी, कच्चा.
Călm, *a.* (kăm, काम्)—tranquil, windless, unagitated. शांत, निर्वात, स्थ. *v. t. & i.* to make or become calm; to pacify. शांत करणें किंवा होणें. *n.* the state of calm. शांत स्थिति, निवांतता. *A calm*, a windless period. निर्वात वेळ. Calm'ness, *n.* शांतता, समाधान.
Că'lomĕl, *n.* (कॅ'लॉमेल्)—a purgative medicine. एक रेचक औषध.
Călŏ'rĭc, *n.* (कॅ-लॉ'रिक्)—heat, bodily warmth. उष्णता, उष्णताबीज, शरीराची उष्णता. *Caloric engine*, engine driven by hot air. उष्ण हवेनें चालणारें एंजिन.
Că'lorĭe, *n.* (कॅ'लरि)—a unit of heat. उष्णतेचा एकम्
Călorĭf'ĭc, *a.* (कॅ-ल-रि'फिक्)—heat-producing. उष्णता उत्पन्न करणारा, दाहकारक.
Călorĭ'mēter, *n.* (कॅलॉरि'मिटर्)—a heat-measuring instrument. उष्णतामापक यंत्र.
Că'ltrop, *n.* (कॅ'ल-ट्रॉप्)—a four-spiked iron ball thrown on the ground to main cavalry horses; kinds of plant. चार अणकोचींचें लोखंडी हत्यार. (याचा उपयोग लढाईत शत्रूंचे घोडे लंगडे करण्यांत होतो); गोखरूचें झाड. [L. *calx*, *calcis*, a heel & *trappa*, a snare]
Că'lūmĕt, *n.* (कॅ'ल्यूमिट्)—a clay-bawled reed-stemmed tobacco-pipe; a symbol of peace. एक प्रकारची चिलीम, हुक्का; शांततेचें चिन्ह. *To smoke the calumet together*, to make peace. शांतता करणें.
Călŭm'nĭāte, *v. t.* (कॅ-ल'म्नि-एट्)—to slander, to utter calumny about. दूषण लावणें, नालस्ती करणें, खोटा आरोप घेणें. Calumniator, *n.* Calumniation; Calumniatory, *a.*
Calŭ'mnious, *a.* (कॅल'म्निअस्)—given to or marked by calumny. चुगलखोर, कुभांडी, अपवादक.
Căl'ŭmny̆, *n.* (कॅ'लम्नि)—defamation, slander, malicious representation. बेअब्रू, नालस्ती, आळ, नसता दोष.
Că'lvary̆, *n.* (कॅ'ल्वरि)—representation of the Crucifixion. ख्रिस्तवधाचा देखावा.
Calve, *v. i.* (kăv, का'व्ह्)—to produce a calf; to throw off mass of ice. विणें, प्रसवणें; बर्फाचा लोंढाच्या लोंढा फेंकून देणें.
Căl'vĭnism, *n.* (कॅ'ल्-व्हिनिझम्)—Calvin's theology (esp. his doctrine of predestination); adherence to Calvin's theology. कॅल्व्हिनचा पंथ; कॅल्व्हिन पंथाचे अनुयायी. (कॅल्व्हिन हा १६ व्या शतकांत एक फ्रेंच सुधारक व विद्वान् शास्त्री होऊन गेला.) *Calvinist*, *n.* कॅल्व्हिनपंथी.
Călx, *n.* (कॅल्क्स्)—ashes left after smelting. भस्म. (pl. Calcēs, कॅल्सीज्.)
Că'ly̆x, *n.* (के'लिक्स् or कॅ'लिक्स्)—(*Pl.* Calycēs, Calyxes) whorl of leaves called sepals forming outer case of a bud. फुलांचा बाह्यकोश, फुलांचें बाह्य आच्छादन.
Căm, *n.* (कॅम्)—projecting part of a wheel etc. in machinery (grooved, toothed or otherwise adapted to convert circular into reciprocal or variable motion). स्वतः वाटोळें फिरून आपल्यावर अवलंबून असणाऱ्या जिनसाला मागेंपुढें किंवा इतर दिशेनें फिरवणारें यंत्र.
Căm'ber, *n.* (कॅ'म्बर्)—the convex or arched form of deck, road, etc. बाह्यगोल कमान, बाह्यगोल मेहराब. *v. t.* to construct with camber. कमानदार करणें, मेहराबदार करणें.
Căm'brĭan, *a.* (कॅ'म्-ब्रिअन्)—of Wales. वेल्सचा, वेल्समधील. *n.* Welshman. वेल्समधील रहिवासी.
Căm'brĭc, *n.* (कॅ'म्ब्रिक्)—fine white linen. तलम तागाचें कापड, केम्ब्रिक.
Came, *Pa. t.* of Come.
Căm'el, *n.* (कॅ'मेल्)—a large quadruped with one hump or two; a type of aeroplane.

उंट, सांढ; एका जातीचें विमान. A camel-driver=सारवान.

Cameleer', *n.* (कॅमेलिअर्)—a camel driver. सारवान.

Camē'llia, *n.* (कॅमीलिआ)—a flowering evergreen from China and Japan. चायना व जपानमधील नेहमीं हिरवें असणारें फुलझाड.

Camĕl'opărd, *n.* (कॅमेलोपार्ड्)—the giraffe. जिराफ (उंटासारख्या उंच मानेचें पण हरिणाच्या कोटींतलें एक आफ्रिकेंतील जनावर).

Căm'embert, *n.* (-ār, कॅमेम्बेअर्)—small soft rich Norman cheese. लहान नरम चीज.

Căm'ēō, *n.* (*Pl.* cameos) (कॅमिओ)—a piece of relief-carving in stone with colour-layers utilized to give the background. दगडावर केलेलें नकशीचें उठावकाम.

Căm'era, *n.* (कॅमेरा)—a photographing apparatus. प्रकाशलेखनाची पेटी, फोटो काढण्याचें यंत्र, कॅमेरा. *Cam'era obscura*, the apparatus projecting on paper an image of a distant object. दूरच्या विषयाची प्रतिमा किंवा छायाचित्र काढण्याचें यंत्र. *In camera*, (Lat.) in the judge's private room (not in the open court). न्यायाधिशाच्या खासगी बसण्याच्या खोलींत.

Cămi-knick'ers, *n. pl.* (कॅमि-निकर्स्)—woman's undergarment of camisole and knickers combined. बायकांचा दुसऱ्या कपड्याच्या आंत घालण्याचा बॉडिस व गुडघ्यापर्यंतचा चोळणा एकत्र शिवलेला कपडा.

Cămion, *n.* (कॅमिऑन्)—a low flat four-wheeled horse or motor truck. सखल सपाट असा घोड्याच्या किंवा मोटार गाडीचा चार चाकी उघडा डबा.

Că'misōle, *n.* (कॅमिसोल्)—an under-bodice. दुसऱ्या कपड्यांच्या आंत घालण्याचा बॉडिस.

Căm'lĕt, *n.* (कॅम्-लिट्)—a light cloth of various materials. एक जातीचें हलकें कापड.

Căm'omīle, *n.* (कॅमोमाइल्)—an aromatic herb. एक सुगंधि वनस्पति. *Camomile tea*, infusion of the flowers. या वनस्पतीच्या फुलाचा केलेला काढा.

Căm'ouflage, *n.* (-ōōflăzh, कॅमू-फ्लाझ्)—disguise of guns, ships, etc. by obscuring outline with splashes of various colours; means of throwing people off the scent. निरनिराळ्या रंगांच्या योगानें बंदुका, जहाजें, वगैरे लपविणें; लोकांना पत्ता न लागूं देण्याचें साधन. *v. t.* to hide by camouflage. लपवून ठेवणें, दाद न लागूं देणें.

Cămp, *n.* (कॅम्प्)—a place where troops etc. are lodged in tents, etc. तळ, छावणी. *v. i.* & *t.* to encamp, to be in camp. विश्रांतीस जागा देणें, तळ देणें, छावणींत असणें. *Camp-follower*, a non-military hanger-on of camp (male or female). लष्कराबरोबरचा मनुष्य. *To camp out*, to lodge in tent or in the open, to take up quarters. तळ देऊन राहणें, ठाणें देणें, तंबू ठोकणें. *Camp-bed*, *Camp-stool*, folding-up bed or stool. घडीचा प्रवासी पलंग. *Camp-chair*, folding-up chair. प्रवासी घडीची खुर्ची. *Camp-meeting*, a religious open-air meeting. उघड्या जागेंतील धार्मिक सभा. *To pitch a camp*, तंबू मारणें, तंबू ठोकणें. *To strike a camp*, तंबू काढून टाकणें.

Căm'paign, *n.* (कॅम्पेन्)—series of military operations, military service in the field, organized course of action. स्वारी, मोहीम, सारखी व्यवस्थित खटपट. *v. i.* to serve on a campaign. मोहिमेंत जाणें किंवा लढणें.

Cămpani'lĕ, *n.* (-nēlĭ, कॅम्पनीलि)—a detached bell-tower. देवळापासून निराळा असलेला घांटेकरितां बांधलेला घुमट. [ It. & L. *campana*, a bell ]

Cămpăno'logy, *n.* (कॅम्पॅनोलॉजि)—the subject of bells (founding, ringing, etc.), the art or principles of ringing bells. (घंटा कशा तयार करितात, वाजवितात वगैरे संबंधीचें) घंटाशास्त्र, घंटाविषय. [ L. *campana*, a bell ]

Campan'ūla, *n.* (कॅम्पॅन्यूला)—kinds of plant with bell-shaped flowers (*usu.* blue or white). (पांढरीं किंवा निळीं) घंटाकृति सुंदर फुलें असलेलें झाड, घंटापुष्प. Campanūlate, *a.* bell-shaped. घांटेच्या आकाराचा, घंटाकार.

Cam'phor, *n.* (कॅम्फर्)—whitish translucent crystalline aromatic bitter substance. कापूर, कर्पूर. Camphoric, *a.* कापुराचा. [ Fr. *camphre*, Sk. कर्पूर ]

Că'mphorate, *v. t.* (कॅम्फोरेट्)—to impregnate or treat with camphor. कर्पूरमिश्रित करणें, कापूर मिसळणें, कापूर (औषध म्हणून) लावणें.

Căm'pĭon, *n.* (कॅम्पिअन्)—a wild flowering-plant. एक रानटी फुलझाड.

Căm'pŭs, *n.* (कॅम्पस्)—open space for martial exercises; grounds of a school or college. लष्करी व्यायामासाठीं खुली जागा; शाळा किंवा कॉलेज यांचें अंगण. [ L. *campus*, a field ]

Căn, *n.* (कॅन्)—a metal vessel for liquid. आंकड्याचें पंचपात्र, धातूचें भांडें, डबा. *v. t.* to pack (food) in cans for preserving; (Sl.) to discharge, suppress. बिघडूं नये म्हणून डब्यांत बंद करून ठेवणें; सोडून देणें, दाबून ठेवणें *v. aux.* to be able to; to have the right to (do); to be permitted to; to feel inclined to. शकणें, समर्थ असणें; परवानगी असणें; होईलसें वाटणें.

Cănā'dĭan, *a.* & *n.* ( कॅने'डिअन् )—( an inhabitant ) of Canada. कॅनडामधील, कॅनडामधील रहिवासी.

Canăl', *n.* ( कनॅ'ल् )—an artificial water-course for inland navigation; a duct in plant or animal body ( for food, liquid, air, etc. ). कालवा, पाट, नाला ; नळ, प्रणाली, नळी. Că'nalīze, *v. t.* कालवा बांधणें, कालव्यासारखा करणें.

Cănärd', *n.* ( कॅना'र्ड् )—an unfounded rumour, a false report, hoax. निराधार अफवा, ( कांहींतरी पिकवलेली ) कंडी, पोकळ गप्पा.

Cănār'ȳ, *n.* ( कॅने'अरि )—a cage song-bird of yellow plumage; wine from the Canary Islands. एक जातीचा गाणारा पक्षी, कॅनरी पक्षी ; कॅनरी बेटांत तयार होणारी दारू. *a.* bright-yellow. अत्यंत पिंवळा. *Canary-coloured*, bright yellow. अत्यंत पिंवळा, पिंवळा जरद्.

Canăs'ter, *n.* ( कनॅ'स्टर् )—tobacco-leaf dried and broken up. सुकवलेलें आणि मोडलेलें तंबाकूचें पान.

Căn'cel, *v. t.* & *i.* ( कॅ'न्सेल् )—to cross out, annul; to countermand; to neutralize; ( Arith. ) to strike out a common factor. खोडून टाकणें, रद्द करणें; उलट हुकूम देणें; गुणधर्म नाहींसे करणें; छेद देणें, ( समीकरणांत ) दोन्ही बाजूंचीं सारखीं पदें उडविणें. *A pair of cancels*, pincers for punching tickets. तिकिटांला भोकें पाडण्याचा चिमटा. *Cancellation*, *n.* खोडून टाकणें, रद्द करणें, छेद देणें.

Căn'cer, *n.* ( कॅ'न्सर् )—the Crab in the zodiac; malignant tumour; ( fig. ) corruption. खेंकडा, कर्करास ; दुळी, चरणारा व्रण; बिघाड, खराबी, नीतिभ्रष्टता. Cancered, Cancerous, *aa.* विद्रधि रोगाचा, विद्रधि रोगासारखा.

Că'ncroid, *a.* ( कॅ'न्क्रॉइड् )—crab-like, like cancer. खेंकड्यासारखा, कॅन्सर ( विद्रधि ) रोगासारखा.

Căn'dĭd, *a.* ( कॅ'न्डिड् )—unprejudiced; free from dissimulation; outspoken. निष्कपट ; सरळ ; मनाचा मोकळा, सरळ बुद्धीचा.

Căn'dĭdāte, *n.* ( कॅ'न्डि-डेट् )—one who seeks some office or honour; a person thought likely to gain any position. उमेदवार, पदाभिलाषी ; प्रायः निवडून येईल असा इसम. *v. i. to be a candidate.* उमेदवार असणें.

Căn'dĭdāture, *n.* ( कॅ'न्डि-डे-चर् )—standing for election, being a candidate. उमेदवारी, उमेदवार म्हणून उभा राहाणें.

Căn'died, *a.* ( कॅ'न्डीड् )—coated with sugar; ( fig. ) sugared, honeyed, flattering. शर्करावगुण्ठित ; साखर पेरलेला.

Căn'dle, *n.* ( कॅ'न्डल् )—cylinder of wax or tallow enclosing wick for giving light. मेणबत्ती. *Candle-power*, a unit of light-measurement. प्रकाशाचें विशिष्ट प्रमाणभूत माप. *Roman candle*, firework, a tube discharging coloured balls. दारूकाम, रंगीत गोळे बाहेर फेंकणारी नळी. *Can't ( or is not fit to ) hold a candle to*, is not to be compared with. ०च्या बरोबर तुलना करणें शक्य नाहीं. *To sell by inch of candle*, to sell by auction. लिलांवांत विकणें. *Game not worth the candle*, result not justifying the cost or trouble. खर्चाला किंवा त्रासाला अनुरूप असें श्रमाचें चीज. *Candle-light*, artificial light. कृत्रिम उजेड.

Că'ndlemas, *n.* ( कॅ'न्डल्-मस् )—the feast of the purification of Virgin Mary, 2nd February. पवित्र कुमारी मेरी हिच्या शुद्धीकरणाकरितां दीपोत्सव, फेब्रुवारी महिन्याची दुसरी तारीख.

Căn'dle-stĭck, *n.* ( कॅ'न्डल्-स्टिक् )—a stand for holding a candle. ( नळीसारखें ) मेणबत्तीचें घर किंवा बैठक.

Căn'dour, *n.* ( कॅ'न्डर् )—open-mindedness, frankness, openness, freedom from bias. निष्कपटपणा, मनाचा सरळपणा.

Căn'dȳ, *n.* ( कॅ'न्डि )—crystallized sugar; sweets. खडीसाखर ; खाऊ. *v. i. & t.* to preserve fruit, etc. by coating with candy. साखरेंत पाकविणें, साखर होणें.

Că'ndȳ, *n.* ( कॅ'न्डि )—a weight used in India ( of about 500 lbs. ). हिंदुस्थानांतील एक माप, खंडी, वीस मण.

Că'ndȳtŭft, *n.* ( कॅ'न्डि-टफ्ट् )—a plant with white, pink or purple flowers. एक पांढरीं किंवा गुलाबी किंवा जांभळीं फुलें असलेलें झाड.

Cāne, *n.* ( केन् )—stems of giant reeds and grasses or slender palms; a walking-stick; a rod for punishment. वेत, बोरू; वेताची काठी ; वेताची छडी. *v. t.* to beat with cane; to weave cane into ( a chair etc. ). वेतानें मारणें ; ( खुर्चीला वगैरे ) वेत घालून घेणें.

Canē'phorous, *n.* ( कॅनी'फोरस् ) ( *Pl.* Canēphorī, कॅनी'फोराय् )—sculptured Greek youth or maid bearing a basket on the head at the feast of Demeter. डोक्यावर टोपली घेतलेला खोदीव ग्रीक तरुण पुरुष किंवा स्त्री.

Cā'nīne, *a.* ( के'नाइन् )—of the dog. कुत्र्याचा, कुत्र्याविषयीं. *Canine tooth*, one of the four strong pointed teeth between incisors and molars. सुळ्याच्या दातांपैकीं एक. [ L. *caninus*, *canis*, Sk. श्वा, a dog ]

Că'nĭster, *n.* ( कॅ'निस्टर् )—a small box ( usually of metal, for tea, shot, etc. ). लहान डबा, डबी. *Canister-shot*, a case-shot. ( नळकंडीसारखा ) कुलपी गोळा.

Cănk'er, *n.* ( कँकर् )—kinds of disease ( of human mouth, horse's hoof, fruit trees ); ( *fig.* ) corrupting influence; destructive caterpillar or larva. कीड; नाश करणारें बल; नाशकारक सुरवंट, कसर, वाळवी. *v. t.* to consume with canker; to infect, corrupt. कीड लागणें; खराब करणें, खराब होणें. *Cankered*, soured, malignant, crabbed. कसर लागलेला, कीड लागलेला, विषारी.

Că'nna, *n.* ( कॅना )—a plant with bright yellow, red, or orange flowers and ornamental leaves. पिंवळीं, तांबडीं किंवा नारिंगी फुलें व सुशोभित पानें असलेलें एक लहान झाड.

Că'nnel, *n.* ( कॅनेल् )—hard bright flamed coal rich in oil and gas. शिलाजिताचा अंश असणारा कोळसा. ( याची ज्योत तेजस्वी असते, व याचें तेल काढतात किंवा गॅस तयार करितात )

Cănn'ĭbal, *n.* ( कॅनि-बल् )—a man or animal that feeds on his own species. नरमांसभक्षक मनुष्य, स्वजातीयांचें मांस खाणारा प्राणी. *a.* having the habit of feeding on the flesh of his own species. स्वजातीयांचें मांस खाण्याची संवय असलेला. Cannibalism, *n.* नरमांसभक्षण, स्वजातिमांसभक्षण. Cannibalistic, *a.*

Că'nnikin, *n.* ( कॅनिकिन् )—a small can. लहान पेला, पेय पिण्याचें भांडें.

Cănn'on, *n.* ( कॅनन् )—a mounted gun throwing projectile larger than bullet; ( Billiards ) hitting of two balls successively by a player's ball. गोळी भरलेली तोफ; ( बिलियर्डमध्यें ) मधल्या गोटीवर आपटलेली गोटी प्रतिपक्षाच्या गोटीवर मारणें. *v. i.* to make cannon; ( of person or thing ) to come into collision without stopping. मधल्या गोटीवर आपटलेली गोटी प्रतिपक्षाच्या गोटीवर मारणें; थांबल्याशिवाय एकमेकावर आपटणें.

Cănnonāde', *n.* ( कॅनो-नेड् )—a continuous gunfire. तोफांचा भडिमार. *v. i. & t.* to fire continuously, to bombard. तोफांचा भडिमार करणें, तोफा सोडणें.

Cănn'on-ball, *n.* ( कॅनन्-बॉल् )—a round shot for cannon. तोफेचा गोळा.

Cannot, see Can.

Cănn'ȳ, *a.* ( कॅनि )—shrewd; quiet; circumspect, worldly-wise. कावेबाज, धूर्त, शांत; चौरस, व्यवहारचतुर. *Ca' canny*, *v. i.* to drive or go gently. हळू जाणें. *n.* practice or policy of limiting output of labour. बाहेर पडणारें काम नियमित करण्याची पद्धति. Cannily, *adv.*; Canniness, *n.*

Canoe, *n.* ( -noo, कनू )—a light boat propelled with paddles. लहान ( बिनसुकाणाची ) होडी, पडाव, पगार. *v. i.* ( canoeing ) to go in a canoe. होडी वल्हवणें. Canoeist, *n.* होडी चालवणारा.

Can'on, *n.* ( कॅनन् )—a Church decree; criterion; list of Bible books accepted by the Church; a member of Cathedral chapter. शास्त्रनियम; नियम, कसोटी; चर्चनें स्वीकारलेल्या बायबलांची यादी; ख्रिस्ती मंडळांतील एक उपासना चालविणारा धर्माधिकारी. *Canon law*, ecclesiastical law. ख्रिस्ती लोकांचें संस्कारप्रकरण, विवाहादि संस्कारप्रकरण.

Cañon, see Canyon.

Cănŏn'ĭcal, *a.* ( कॅ-नॉनि-कल् )—appointed by canon law; authoritative or accepted. कायदेशीर, विधियुक्त, कायद्यानुसार; अधिकृत, स्वीकारलेला. *n. pl.* clergy's appointed costume. ख्रिस्ती आचार्यांचा विशिष्ट पोषाख. *Canonical hours*, hours for prayer or celebration of marriage, 8 A. M. to 3 P. M. पर्वकाळ, शुभ वेळा, प्रार्थनेची वेळ, लग्नसमारंभाची वेळ. ( सकाळीं ८ ते दुपारीं ३ वाजेपर्यंत. ) *Canonical dress*, dress of clergy. ख्रिस्ती धर्मोपाध्यायाचा पोषाख. Canonically, *adv.*

Că'nonīze, *v. t.* ( कॅनॅनाइझ् )—to admit formally to the calendar of saints; to regard as a saint; to recognize ( a book ) as canonical; to sanction by Church authority. साधूंच्या मालिकेंत गणणें; साधु म्हणून मानणें; पुस्तक शास्त्रोक्त मानणें; चर्चच्या अधिकारांत संमति देणें. Canoniza'tion, *n.*

Că'nonrȳ, *n.* ( कॅननि )—the office of a canon. कॅनन धर्माधिकाऱ्याचा अधिकार किंवा हुद्दा.

Căn'ŏpȳ, *n.* ( कॅनॉपि )—the covering hung or held up over a throne, bed, person, etc.; a roof-like projection ( over niche, etc. ); ( *fig.* ) sky or overhanging shelter. छत; छप्पर, पिंजरी; आकाश, डोक्यावरील आश्रय. *v. t.* to supply a canopy to, to be a canopy to. छत लावणें, छत बांधणें, चांदवा बांधणें.

Canō'rous, *a.* ( कॅनो'रस् )—melodious, resonant. मंजुळ, मधुर, गोड.

Cănt, *n.* ( कॅन्ट् )—temporary catch-words; insincere pious or moral talk. सांकेतिक भाषा; कपटाचे धार्मिक बोल. *v. i.* to speak in a whining tone; to talk with an affectation of religion. दीनवाणीनें बोलणें; धर्मनिष्ठपणाचें ढोंग करून बोलणें.

Cant, *n.* ( कॅन्ट् )—bevel, slanting surface; tilted position; oblique push or jerk. विषमकोन, बाह्यकोन, कलता किंवा वांकलेला पृष्ठभाग; कलंडलेली स्थिति, उतार; बाजूचा धक्का

रींचा हिसका. *v. t. & i.* to bevel off; to tilt, turn *over*, turn upside down; to push sideways; to take slanting position; to lie aslant. कलंडणें; उलटा करणें; बाजूनें ढकलणें; कलती स्थिति असणें, तिरका असणें. *Cant-board*, sloping board. उतरती फळी.

Can't, see Can.

Că'ntaloup, *n.* (-ōōp, कॅन्टलूप्)—a small melon. एक लहान फळ, लहान खरबूज.

Căntănk'erous, *a.* (कॅन्-टॅंकरस्)—cross-grained, quarrelsome. हेकेखोर, वाईट स्वभावाचा, भांडखोर.

Căntä'ta, *n.* (कॅन्-टा'टा)—choral work, a kind of short oratorio or lyric drama set to music but not acted. गाण्याचे पद्धतीवर बसविलेली कविता किंवा नाटक. [It. *cantare*, to sing]

Cănteen', *n.* (कॅन्टी'न्)—a camp or barrack shop (for liquor, provisions, etc.); soldier's mess-tin or water-bottle; a chest fitted with cooking or table utensils. पलटणींतील दारू, अन्नसामुग्री, वगैरेचें दुकान; सोजिर लोकांचें जेवणाचें किंवा पिण्याचें भांडें; स्वयंपाकाचीं भांडीं ठेवण्याची पेटी.

Căn'ter, *n.* (कॅन्टर्)—an easy gallop. चौकचाल. *v. i. & t.* to go or make go at a canter. चौकचालीनें चालणें, चौकचालीवर चालविणें. *To win in a canter*, to win easily. सहज रीतीनें जिंकणें.

Că'nterbury̆, *n.* (कॅन्टर्बरि)—a stand with partitions for portfolios, music, etc. सुटे कागद, तसबिरी, गायनसामग्री, वगैरे ठेवण्याचा निरनिराळे भाग असलेला स्टॅन्ड.

Că'nterbury̆ bell, *n.* (कॅन्टर्बरि बेल्)—a kind of campanula. घंटेच्या आकारांच्या फुलांची एक जात.

Cănthă'rĭdēs, *n. pl.* (-z, कॅन्थॅ'रिडीझ्)—(Med.) dried Spanish Fly. सुकवलेली स्पॅनिश फ्लाय नांवाची माशी. (हिच्यापासून पलिस्तराचें औषध तयार करितात.)

Căn'tĭcle, *n.* (कॅन्टि-कल्)—a divine song. देवाचें गाणें, भजन, लहान स्तोत्र. *Canticles*, Song of Solomon. सॉलोमन राजाचें गीत.

Că'ntĭlēver, *n.* (कॅन्टाय्-लीव्हर्)—a bracket (of length many times breadth and more than twice depth) projecting from wall to support balcony, etc. कंसाकृति खांबासारखी पुढें आलेली पल्लेदार कमान. *Cantilever bridge*, a bridge in which great cantilevers run out from the piers. कंसाकृति खांबासारखी पल्लेदार कमानी असलेला पूल. [Fr. *cant*, an angle, *lever*, to raise]

Că'ntle, *n.* (कॅन्टल्)—a piece or slice cut off; a hind bow of saddle. कापलेला तुकडा, कोंपरा; खोगिराचा पाठीमागचा उंचवट्याचा भाग.

Căn'tō, *n.* (*Pl.* Cantos) (कॅन्टो)—a division of a poem. सर्ग, अध्याय, काव्याचा भाग.

Că'nton, *n.* (कॅन्टन्, कॅन्टॉ'न्)—a sub-division of a country; any State of Swiss Confederation; a square division less than a quarter in the upper corner of a shield. परगणा, जिल्हा, महाल; स्विट्झर्लंडमधील संस्थान; ढालेच्या उजव्या बाजूला वरील कोपऱ्यांत केलेली खूण. *v. t.* (-ōōn, कॅन्टून् or कॅन्टॉ'न्) to put (troops) into quarters. सैन्याची रहावयाची सोय करणें.

Cănton'ment, *n.* (-ōōn-, -ŏn-, कॅन्टूंन्मेन्ट्, कॅन्टों'न्मेन्ट्)—lodgings of troops. छावणी.

Cantŏr'ĭal, *a.* (कॅन्टॉ'अरायल्)—of the north or the precentor's side of the choir. गायकसमूहांतील उत्तरेकडील बाजूचा किंवा अग्रगायकाच्या बाजूचा.

Canŭck', *n.* (कॅनॅ'क्)—(sl.) French-Canadian; Canadian (horse). फ्रेंच-कॅनडामधील रहिवासी, कॅनडांतील (घोडा)

Căn'vas, *n.* (कॅन्व्हस्)—a coarse cloth of hemp or flax; a picture. जाडें भरडें कापड, किंतान; चित्र. *Under canvas*, in tent or tents; with sails spread. तंबूंत; शिडें सोडलेलीं आहेत अशा स्थितींत. *Canvas-back*, a species of wild duck एक जातीचें रानटी बदक.

Can'vass, *v. t. & i.* (कॅन्व्हस्)—to discuss thoroughly; to ask votes of. वाटाघाट करणें; (एखाद्याकरितां) मतें मिळविणें. *n.* canvassing of constituency for votes. मतें मिळविण्याची आर्जवपूर्वक खटपट किंवा प्रयत्न. Canvasser, *n.*

Căn'yon, Canon, *n.* (कॅन्यन्)—a deep gorge with a stream. मोठी खिंड.

Caou'tchouc, *n.* (kow'chŏŏk, का'उचुक्)—India rubber. रबर.

Căp, *n.* (कॅप्)—a soft brimless outdoor head-dress; an indoor head-dress; any cap-like covering. बाहेर घालण्याची कडा नसलेली टोपी; घरीं घालण्याची टोपी; टोपीसारखें कोणतेंहि आच्छादन, टोपण *v. t.* to confer a degree on; (Sport) to confer an international honour on; to crown; to take off or touch one's cap to. एखाद्याला पदवी अर्पण करणें; खेळांत आंतरराष्ट्रीय बहुमान देणें; डोक्यांत घालणें; सन्मानार्थ टोपीला स्पर्श करणें किंवा टोपी काढणें. *Cap in hand*, humbly. नम्रपणानें, लीनतेनें. *The cap fits*, the person feels that the general remark is true of him. आपल्याविषयीं केलेलें सर्वसाधारण विधान खरें आहे असें त्याला वाटतें.

*To set one's cap at*, to try to attract as suitor. (एखाद्या स्त्रीनें लग्न करण्याच्या हेतूनें) पुरुषाचें मन ओढून घेण्याचा सारखा प्रयत्न करणें. *Steel cap*, helmet. पोलादी टोपी, शिरस्त्राण. *Cap and bells*, the jester's insignia. टोपी आणि घंटा, मुखमस्कऱ्याचा विशेष सरंजाम. *Percussion cap*, a cap for igniting explosive in cartridges etc. बंदुकीच्या काडतुसावर घालण्याचें टोप. *Capstone*, top stone, coping. अगदीं वरचा दगड, वरचेंडी, चरी. *To cap verses*, to reply with a verse beginning with the last's last letter. अंत्याक्षरी किंवा भेंड्या लावणें.

Capabi'lity, *n.* (केपॅबि'लिटि)—capacity, qualification. योग्यता, धारणा-सामर्थ्य, कार्यकुशलता, कार्यक्षमता.

Ca'pable, *a.* (केपेबल्)—able, competent; susceptible of. योग्य, लायक, कार्यक्षम; ग्रहणक्षम.

Capa'cious, *a.* (कॅपेशस्)—roomy, of large content. ऐसपैस, प्रशस्त, विशाल, विस्तृत.

Capa'citate, *v. t.* (कॅपॅसिटेट्)—to make able or capable (*for, to do*), to enable to make legally competent. कार्यक्षम करणें, योग्य करणें; विशिष्ट एक मागण्याची कायदेशीर योग्यता आणणें.

Capa'city, *n.* (कॅपॅसिटि)—cubic content; mental power; function or character. व्यापलेली जागा; आकलनशक्ति, मन-सामर्थ्य; अधिकार, हुद्दा, पदवी. *Filled to capacity*, quite full. पूर्ण भरलेलें. *Capacity house*, packed theatre etc, भरगच्च भरलेलें नाटकगृह वगैरे. *Measure of capacity*, पैली माप.

Cap-a-pie, *a.* (कॅप्-अ-पी)—from head to foot. नखशिखान्त, डोक्यापासून पायापर्यंत.

Capa'rison, *n.* (कॅपॅरिसन्)—harness, trappings; gay clothing. साज, चारजामा; उंची पोशाख. *v. t.* to put caparison on. खोगीर, चिलखत, वगैरे घालून सज्ज करणें.

Cape, *n.* (केप्)—a headland, a promontory; a loose garment, a short sleeveless cloak. भूमीचें टोंक, भूशिर; साहेब लोकांचें उपवस्त्र. *The Cape*, the Cape of Good Hope. गुड होपचें भूशिर. *Cape boy, cape-coloured people*, South-Africans of mixed black and white descent. काळे व गोरे अशा मिश्र जातीचे दक्षिण आफ्रिकेंतील लोक. *Cape-cart*, a hooded cart (usually drawn by oxen in South Africa). दक्षिण आफ्रिकेंतील बैलांची टप असलेली गाडी.

Caper, *n.* (केपर)—a shrub; (*pl.*) the flower-buds of the shrub pickled. एक जातीचें झुडुप; (अने०) या झुडुपाच्या खारवलेल्या फुलांच्या कळ्या. *Caper-sauce*, *n.* केपर कळ्यांचें केलेलें तोंडी लावणें.

Ca'per, *n.* (केपर)—frisky jump; lark, spree, बागडणें; मौज, धमालीखुशाली. *v. t.* to cut capers. नाचणें, मौज करणें. Caperer, *n.*

Capercail'yé, Capercail'zie, *n.* (कॅपर्-केलिय, कॅपर्-केल्झि)—a largest bird of the grouse kind. ग्राउस जातीचा सर्वांत मोठा पक्षी.

Cap'ful, *n.* (-fool, कॅपफुल्)—enough to fill a cap. टोपी भरेल इतका. *Capful of wind*. passing gust. जवळून जाणारा वारा.

Capilla'rity, *n.* (कॅपिलॅरिटि)—power of exerting capillary attraction or repulsion. केशाकर्षणशक्ति.

Capil'lary, *a.* (कॅ-पि'लरि)—of the hair; of hair-like fineness. केशतुल्य; अतिसूक्ष्म. *n.* a minute blood-vessel (intervening between arteries and veins). केसाच्या आकाराची अतिसूक्ष्म रक्तवाहिनी.

Cap'ital, *a.* (कॅपिटल्)—of chief importance. principal, primary, leading, first-class, excellent; fatal, vital; punishable with death. महत्त्वाची, मुख्य, उत्कृष्ट; प्राणघातक; देहान्त, मरणान्त. *n.* a capital city; a capital letter; a stock with which company, etc. starts; accumulated wealth. राजधानी; मोठें अक्षर; मुद्दल, मूलद्रव्य; एकंदर जमा झालेला पैसा, भांडवल. *Capital ship*, a battleship, battle cruiser. लढाऊ जहाज. *Capital town, capital city, capital*, head town. राजधानी *Fixed capital*, machinery, etc. स्थिर किंवा कायमचें भांडवल (कारखान्याचा इमला, यंत्रें, हत्यारें वगैरे). *Circulating or floating capital*, goods, money, etc. फिरतें भांडवल (कच्चा माल, कामगारांची मजुरी वगैरे). *To make capital out of*, to turn to account. च्या फायदेशीर उपयोग करून घेणें. (क्षुल्लक गोष्टीचा) बराच फायदा करून घेणें. Capitally, *adv.* *Capital levy*, confiscation of a proportion of all capital. सर्व भांडवलांतील अमुक एक भाग जप्त करून घेणें.

Cap'italism, *n.* (कॅपि-टॅ-लिझम्)—an organization of production by capitalists. व्यापारांत भांडवल घालून उत्पन्नाची व्यवस्था, भांडवलशाही. Capitalistic, *a.*

Cap'italist, *n.* (कॅपिटॅ-लिस्ट्)—a person who possesses capital; a rich man. भांडवलवाला; धनवान गृहस्थ.

Cap'italize, *v. t.* (कॅपि-ट-लाइझ्)—to use as capital; to compute or realize present value of; to print in capitals. भांडवल म्हणून वापरणें; मुद्दल आकारणें, चालू किंमत ठरविणें; मोठ्या अक्षरांत छापणें. Capitaliza'tion, *n.*

Capita'tion, *n.* (कॅपिटेशन्)—levying of tax or fee of so much a head, reckoning by the

head. दर व्यक्तीला द्यावा लागणारा कर, शिरोगणना, शिरोगणती. *Capitation grant*, grant of so much for every person fulfilling conditions. अटी पुऱ्या करणाऱ्या प्रत्येक व्यक्तीला द्यावी लागणारी मदत.

Căp'itol, *n.* ( कॅपि-टोल् )—the temple of Jupiter in Rome on Tarpeian hill; Congress house; State house. प्राचीन रोम शहरांतील ज्युपिटरचें देऊळ; राष्ट्रीय सभागृह; राजभवन, सरकारवाडा. [ L. *caput*, the head ]

Căpĭ'tūlar, *a.* ( कॅपि'टयुलर् )—of a Cathedral chapter; (Physiol.) of a terminal protuberance of a bone. कॅथेड्रल किंवा ख्रिस्ती मुख्य देवळांतील कॅननसभेसंबंधीं; हाडाच्या शिरोभागाचा. [ L. *caput*, the head ]

Căpĭt'ūlāte, *v. t.* ( कॅपि-टयु'लेट् )—to surrender on terms. कांहीं अटींवर ( शत्रूच्या ) स्वाधीन होणें.

Căpĭtūlā'tion, *n.* (कॅ-पि-टयू-ले'शन् )—the summary of headings; terms of agreement; surrender on terms; the instrument containing terms of agreement. मथळ्यांचा सारांश; कराराच्या अटी; कांहीं अटींवर स्वाधीन होणें; तहाचा करारनामा. *The Capitulations*, agreements made by Western Powers with the Ottoman Empire, securing privileged legal Status to foreigners. परराष्ट्रीयांना विशिष्ट कायदेशीर हक्क मिळण्याकरितां ऑटोमन सरकाराशीं पाश्चिमात्य राष्ट्रांनीं केलेले करार.

Că'pon, *n.* ( केंपन् )—a castrated cock. खच्ची केलेला गुबगुबीत कोंबडा.

Că'porăl, *n.* ( कॅ'पोराल् )—a French tobacco. फ्रान्समधील एक जातीचा तंबाखू.

Capŏt', *n.* ( कपॉ'ट् )—winning of all tricks in picket. निरोधन ( पिकेटिंग ) करतांना सर्व युक्त्यांत यश मिळविणें. *v. t.* to win all tricks against an opponent. शत्रूला चीत करणें.

Căprice', *n.* ( -ēs, कॅप्रीं'स् )—unaccountable change of mind or conduct, freakish fancy. मनाची लहर, छंद.

Căprĭ'cious, *a.* ( -shus, कॅ-प्रि'शस् )—guided by whim, inconstant, liable to caprice; incalculable. लहरी, चंचलबुद्धीचा; अगणनीय. [ L. *capra*, a she-*goat* ]

Că'pricorn, *n.* ( कॅ'प्रिकॉर्न् )—zodiacal constellation Goat, the tenth sign of the zodiac. बारा राशींपैकीं एक राशि, मकर. *The Tropic of Capricorn*, मकरवृत्त. [ L. *caper*, a he-goat, & *cornu*, a horn ]

Că'prĭōle, *n.* ( कॅ'प्रिओल् )—a trained horse's high leap and kick without advancing. शिकवलेल्या घोड्याची पाऊल पुढें टाकल्याशिवाय तेथल्या तेथेंच मारलेली उंच उडी. *v. i.* to give a leap or caper without advancing. पुढें पाऊल टाकल्याशिवाय तेथल्या तेथेंच उंच उडी मारणें. [ L. *capra*, a she-goat ]

Căp'sĭcŭm, *n.* ( कॅ'प्-सि-कम् )—kinds of plant with hot capsules and seeds; the red pepper made from the hot capsules. मिरची; लाल मिरची, लाल मिरपूड.

Căpsīze', *v. t. & i.* ( कॅप्सा'इझ् )—to upset, to overturn ( of ship or boat ). बोट उपडी होणें, उलटणें. [ L. *caput*, Sk. कपाल, the head]

Căp'stan, *n.* ( कॅ'प्-स्टन् )—a revolving barrel ( worked by man walking round and pushing horizontal levers, or by steam etc., for winding cable in, hoisting heavy sails, etc. ) दोरखंड गुंडाळणें, मोठीं शिडें वर घेणें, वगैरेकरितां तयार केलेलें यंत्र, वाटोळें फिरतें पिंप, मोठालीं ओझीं उचलण्याचें यंत्र. [ L. *capistrum*, a halter ]

Căp'sūle, *n.* ( कॅ'प्-स्यूल् )—enclosing membrane; plant's seed-case; case for taking physic in. बोंड; बीजकोश; औषध आंत घालण्याची केस, पिशवी.

Căp'tain, *n.* ( -tĭn, कॅ'प्-टिन् )—a chief, leader; a naval or military officer; the master of a merchant ship; the leader of a side in games. मुख्य, पुढारी; जहाजावरील किंवा फौजेवरील एक अधिकारी; कप्तान; ( क्रिकेट वगैरे खेळांतील ) प्रत्येक बाजूचा पुढारी, कॅप्टन. *v. t.* to be the captain of, to lead. कप्तान होणें, ०चा पुढाकार घेणें.

Căp'taincy̆, *n.* ( -tĭn, कॅ'प्-टिन्सि )—the position of captain. कप्तानाची जागा किंवा अधिकार किंवा पदवी, कप्तानी, आधिपत्य.

Căp'tion, *n.* ( कॅ'प्-शन् )—legal arrest; certificate attached to or written on a document; a heading, a headline. कायदेशीर रीतीनें पकडणें; एखाद्या दस्तैवजावर लिहिलेला दाखला; मथळा.

Căp'tious, *a.* ( -shus, कॅ'प्-शस् )—given to carping, quibbling; censorious, fond of taking exception, trying to catch people in their words. तक्रारी, हुज्जतखोर, निंदक, दोषैकदृष्टि असलेला.

Căp'tĭvāte, *v. t.* ( कॅ'प्-टि-व्हेट् )—to fascinate by one's beauty or other attraction, to charm. सौंदर्यानें किंवा अन्य तऱ्हेनें चित्त वेधणें. Captivation, *n.*

Căp'tĭve, *a.* ( कॅ'प्-टिव्ह् )—taken prisoner; kept in confinement, under restraint; unable to escape. कैद केलेला; बंदिवान; पळून जाण्याला असमर्थ. *n.* a captive person or animals. कैद केलेला मनुष्य किंवा पशु, कैदी.

*To lead* or *hold* or *take captive*, बंदिवान करणें, तुरुंगांत घालणें. *Captive balloon*, a balloon held by a rope from the ground. जमिनीवरून दोरीनें पकडलेलें वाटोळें विमान. [ L. *capere*, to take ]

Căptĭv'ĭtў, *n.* ( कॅप्-टि'व्हि-टि )—subjection, bondage, slavery. कैद, दास्य, वश होणें.

Căp'tor, *n.* ( कॅ'प्टर् )—one who takes a captive or prize. युद्धांत पाडाव करणारा, कैद करणारा. Captress, *n. fem.*

Cap'ture, *n.* ( कॅ'प्चर् )—seizing ( of a person, etc. ) as captive; taking possession of; a thing or person seized. पाडाव करणें, कैद करणें; हस्तगत करून घेणें; हस्तगत केलेली वस्तु किंवा व्यक्ति. *v. t.* to make capture of, to take prisoner; to seize as a prize. कैद करणें; युद्धांत पकडणें, बळजबरीनें हस्तगत करून घेणें; Capturer, *n.*

Că'pūchĭn, *n.* ( कॅ'प्युचिन् )—a Franciscan friar ( of new rule of 1528 ); woman's cloak and hood. सेन्ट फ्रॅन्सिसच्या संप्रदायांतील महंत; बायकांचा झगा आणि बुरखा.

Căr, *n.* ( कार् )—a chariot of war, any wheeled vehicle; motor-car, tram-car; a railway carriage; a pendant of an air-ship or balloon. रथ, चाकांची गाडी, चाकें असलेलें वाहन; मोटार किंवा ट्रॅम गाडी; आगगाडीचा डबा; विमानाचा पाठीमागचा लोंबणारा भाग.

Cărabĭneer', *n.* ( कॅर-बि-नि'अर् )—a horse-soldier armed with a carbine. लहान बंदूक असलेला घोडेस्वार, करवली बंदूक वापरणारा. ( Also, *Carbineer* ).

Că'racōle, *n.* ( कॅ'रकोल् )—a trained horse's half turn to the right or left. शिकलेल्या घोड्यानें डावीकडे किंवा उजवीकडे घेतलेली अर्धी चक्कर. *v. t.* to perform a half turn to the right or left. घोडेस्वाराप्रमाणें डावीकडे किंवा उजवीकडे अर्धी चक्कर घालणें. [ Sp. *caracol*, a snail, spiral shell ]

Carăfe', *n.* ( कॅरा'फ् )—a glass water bottle for the table. पाणी ठेवण्याचें कांचेचें भांडें.

Că'ramĕl, *n.* ( कॅ'रमेल् )—burnt sugar used for colouring spirits etc.; a sweetmeat. जाळलेली साखर, साखरेचा केलेला पक्का पाक; एक प्रकारची मिठाई.

Că'rapăce, *n.* ( कॅ'रपेस् )—the upper shell of the tortoise and crustaceans. कासव, खेंकडा इत्यादि प्राण्यांची पाठ, पाठीची कठीण कवची.

Că'rat, *n.* ( कॅ'रट् )—a unit of weight for precious stones and fineness for gold, a measure of purity of gold ( pure gold being 24 carat ). मोत्यें, रत्नें वगैरे तोलण्याचें एक वजन, कॅरट नांवाचें माप.

Cărăvăn', *n.* ( कॅरव्हॅ'न् )—a company travelling together for safety; a house on wheels. काफला, सार्थ, पथिकसमूह; चाकें असलेलें घर. Caravaneer, *n.* सार्थनायक.

Cărăvăn'serai, *n.* ( -rī, कॅर-व्हॅ'न्-सराइ )—an Eastern quadrangular inn with inner court for caravans. सराई, धर्मशाळा, पथिकशाला.

Că'ravel, Căr'vel, *n.* ( कॅ'रव्हेल्, का'र्व्हेल् )—a small light fast ship ( chiefly Spanish and Portuguese of 15th—17th centuries ). एक लहान मच्छमारी नौका. [ Ital. *caravelia*, a kind of ship ]

Că'raway, *n.* ( कॅ'र-वे )—a plant with small fruit ( *caraway-seeds* ) used in cakes. ओंवा, जिरें यांच्या जातीचें एक धान्य.

Căr'bīde, *n.* ( का'र्बाइड् )—a compound of carbon with an element. कार्बन व एखादी धातु यांचा संयुक्त पदार्थ.

Că'raway, *n.* ( कॅ'रवे )—a plant with small fruit. ओंवा, अजमोद, जिरें यांच्या जातीचें धान्य.

Căr'bīne, *n.* ( का'र्बाइन् )—a short rifle for cavalry use. घोडेस्वारांच्या उपयोगाची लहान बंदूक.

Cărbohȳ'drāte, *n.* ( कार्बोहा'इ-ड्रेट् )—an organic compound of carbon with oxygen & hydrogen in the proportion to form water ( starch, sugar, glucose ). कार्बनचें ऑक्सिजन व हायड्रोजन यांच्याशीं विशिष्ट मिश्रण.

Cărbŏ'lĭc ă'cĭd, *n.* ( कार्बॉ'लिक् ॲ'सिड् )—a disinfectant and antiseptic. कार्बॉलिक तेल, कोल्डारपासून काढलेलें पूतिनाशक तेल.

Căr'bŏlīze, *v. t.* ( का'र्-बॉलाइझ् )—to treat with carbolic acid. कार्बॉलिक ॲसिडनें उपचार करणें.

Căr'bon, *n.* ( का'र्बन् )—a non-metallic element (occurring as diamond, graphite, & charcoal in carbonic acid gas, the carbonates and most organic compounds ); charcoal pencil used in one form of electric lighting. एक निर्धातुक रासायनिक मूलतत्त्व, शुद्ध कोळसा, कार्बन; विजेच्या उजेडाकरितां उपयोग केली जाणारी शुद्ध कोळशाची पेन्सिल. *Carbon printing*, *Carbon process*, printing or process producing permanent prints in black and white. काळ्या व पांढऱ्या कायमच्या छापील प्रति ज्यापासून मिळतात अशी पद्धति.

Cărbonā'ceous, *a.* ( -shus, कार्बोने'शस् )—containing carbon. कार्बन ज्यांत आहे असा.

Căr'bon-păper, *n.* ( का'र्बन्-पेपर् )—a thin paper laid with carbon for taking copies of letters, etc. पत्रांच्या वगैरे प्रति काढण्याकरितां उपयोगांत आणलेला पातळ कागद.

Căr'bonä'ri, *n. pl.* ( -ē, कार्बॉना'री )—members of Italian secret republican society. इटलींतील प्रजासत्ताकराज्यवादी गुप्त मंडळाचे सभासद.

Cărb'onate, *n.* ( का'र्-बॉ-नेट् )—salt of carbonic acid. कार्बोनिक अम्ल व एखादें भस्म यांपासून झालेलें लवण, कार्बनमय लवण.

Cărbŏ'nĭc, *a.* ( कार्-बॉ'निक् )—of carbon. कार्बन-संबंधीं, कार्बन वायु असलेला. *Carbonic acid (gas)*, the gas formed in combustion of carbon, given out in breathing and constituting choke-damp. ऑक्सिजन आणि कार्बन यांपासून झालेला एक वायुरूप पदार्थ.

Cărbonĭ'ferous, *a.* ( कार्-बॉ-नि'-फेरस् )—coal-producing. शुद्ध कोळसा उत्पन्न करणारा.

Cărb'onize, *v. t.* ( का'र्बनाइझ् )—to convert into carbon; to reduce to charcoal or coke; to cover (*paper*) with carbon for taking copies. कार्बनचें रूप देणें; शुद्ध कोळसा बनविणें; प्रति काढण्याकरितां कार्बन पेपर घालणें. Cărbonīzātion, *n.*

Cărborŭn'dum, *n.* ( कार्-बॉ-र'न्डम् )—a compound of carbon and silicon used for polishing by abrasion. पॉलिश करण्याकरितां तयार केलेलें कार्बन आणि सिलिकॉन यांचें मिश्रण.

Căr'boy, *n.* ( का'र्-बॉय् )—a large coloured-glass bottle protected with basket-work. रक्षक सांगाडा असलेली रंगीतकाचेची मोठी बाटली.

Cărb'ŭncle, *n.* ( का'र्-बंकल् )—a garnet cut in boss shape; an inflamed skin-tumour, a pimple on the nose or face. माणिक; मोठा फोड, काळपुळी. Carbuncular, Carbuncled, *aa.* काळपुळीचा; लाल, माणकाचा.

Cărbūrĕt', *v. t.* ( कार्-ब्यु-रे'ट् )—to combine (any element) chemically with carbon, to charge with carbon. एखाद्या धातूचें कार्बन-बरोबर मिश्रण करणें; कार्बननें युक्त करणें.

Cărbūre'tter, Cărbūre'ttor, *n.* ( कार्-ब्यु-रे'टर् )—carburetting-apparatus used in motor-engines etc. कार्बन घालण्याचें यंत्र.

Cărc'ăss, *n.* ( का'र्-कॅस् )—the dead body of a beast; the framework or skeleton or worthless remains; a kind of bomb मुडदा, मढें, शव; सांगाडा; एक प्रकारचा बॉम गोळा.

Cărd, *n.* ( कार्ड् )—a toothed *instrument or* wire-brush; thick paper or paste-board; ticket of admission, invitation, etc.; one of the 52 pieces making up a pack; (pl.) card-playing; (sl.) a queer character. फणी, पिंजण्याचें हत्यार; जाड कागद, पुठा; तिकीट, (निमंत्रण) पत्रिका; ५२ पत्त्यांपैकीं एक; (अने०) पत्ते किंवा गंजिफा खेळणें; चमत्कारिक स्वभावाचा माणूस. *v. t.* to comb (wool). (लोंकर) पिंजणें, *Carded seed*, सरकी. *House of cards*, an insecure scheme. अनिश्चित बेत. *To throw up one's cards*, to give up one's plan. स्वतःचा बेत सोडून देणें. *To show one's cards*, to let out one's plan. स्वतःचा बेत उघड करून सांगणें. *To card up one's sleeve*, to plan in reserve. गुप्तपणें बेत करणें. *On the cards*, likely, possible. घडून येण्याजोगा, शक्य. *To speak by the card*, to speak with precision. मुद्देसूद खरें बोलणें. *Card* or *visiting card*, a card with name etc. sent or left in lieu of formal visit. (भेटावयास आलों आहें असें कळविण्याची) नांवाची चिठ्ठी. *The card*, the correct thing, what is expected. अगदीं बरोबर गोष्ट, अपेक्षित गोष्ट. *Card-case*, a case for carrying visiting cards. आपलें नांव लिहिलेलीं कार्डें ठेवण्याची पेटी. *Card-board*, a paste-board (for cutting cards from or making boxes etc). जाड पुठ्याचा कागद. *Card-sharper*, a swindler at card games. पत्ते खेळतांना जादुगिरी करणारा, पत्त्यांचा जादुगार.

Cărd'amom, *n.* ( का'र्ड-मम् )—spice from seed-capsules of East Indian plants. वेलची, वेलदोडा, वेलचीचें झाड.

Căr'dĭăc, *a.* ( का'र्डिॲक् )—of the heart. काळजासंबंधीं, हृदयासंबंधीं. *n.* a heart-stimulant. हृदयांत विशेष चलनवलन उत्पन्न करणारें औषध, हृदुत्तेजक औषध.

Căr'dĭgan, *n.* ( का'र्डिगन् )—a warm sleeved over-waistcoat. एक जातीचा गरम बाह्या असलेला ओव्हरकोट.

Cărdĭ'nal, *a.* ( कार्डि'नल् )–fundamental, central; of deep scarlet. मुख्य, श्रेष्ठ; लाल शेंदरी. *n.* a prince of Roman Catholic Church; a cardinal number; cardinal colour. पोपच्या खालोखालच्या दर्जाचा अधिकारी; मूळ संख्या; मुख्य रंग. *Cardinal numbers*, the simple numbers, such as one, two, three, etc. मूळ संख्या, उदा० एक, दोन, तीन वगैरे. *Cardinal points*, North, South, East & West. मुख्य दिशा–उत्तर, दक्षिण, पूर्व, पश्चिम. *Cardinal winds*, मुख्य चार दिशांकडून वाहणारे वारे. *Cardinal virtues*, the principal virtues; prudence, justice, temperance, and fortitude. मुख्य सद्गुण–दूरदर्शित्व, न्यायप्रियता, नेमस्तपणा आणि सहनशीलता.

Care, *n.* ( के'अर् )—anxiety, concern; task, thing to be seen to; serious attention. चिंता, काळजी; ज्याची काळजी घ्यावयाची तें कार्य किंवा वस्तु; जपणूक, जतन, देखरेख. *v. i. & t.* to feel concern or interest. काळजी किंवा कळकळ वाटणें. *To take care*, *To have a care*, to be cautious. काळजी घेणें, सावध असणें. *To take care of*, *To have the care of*,

जतन करणें, संभाळणें. *Care-laden, Care-worn,* laden or worn with anxieties. चिंताग्रस्त, चिंतातुर. *Care-taker,* a person hired to take charge, (especially of a house in the owner's absence ). रखवालदार, ज्याच्या ताब्यांत घर वगैरे दिलें आहे असा. *To commit to the care of.* च्या हवालीं करणें. I care *a pin* or *a damn* or *a farthing.* मला बिलकुल पर्वा नाहीं. *I don't care if I do,* I am willing. माझी हरकत नाहीं.

Careen', *v. t.* & *i.* ( करीन् )—to turn (a ship) on one side for repair; to heel over. (तळाच्या दुरुस्तीसाठीं) जहाज कलतें करणें; कलतें होणें, कुशीस पडणें.

Careen'age, *n.* ( करीनिज् )—careening a ship; expanse of repairing a ship; place for careening a ship. दुरुस्तीकरितां जहाज कलतें करणें; जहाजाच्या तळाच्या दुरुस्तीचा खर्च; दुरुस्तीकरितां जहाज कलतें ठेवतात तें ठिकाण.

Career', *n.* ( करिअर् )—spell of rapid progression; course or progress through life; way of making a livelihood. दौड, धांव; आयुष्यक्रम, कारकीर्द: जीवनमार्ग. *v. i.* to go swiftly or wildly. दौडत जाणें, जलद चालणें.

Care'ful, *a.* ( केअर्-फुल् )—painstaking, watchful, cautious, solicitous. आस्थेवाईक, दक्ष, सावध, काळजी बाळगणारा. Carefully, *adv.* काळजीपूर्वक. Carefulness, *n.*

Care'less, *a.* ( केअर्-लिस् )—unconcerned, thoughtless; negligent of; inaccurate. निष्काळजी, अविचारी; बेपरवा, आळसानें केलेला; अशुद्ध किंवा चुकीचा. Carelessly, *adv.* Carelessness, *n.* निष्काळजीपणा, बेपर्वाई.

Căress', *n.* ( करेस् )—fondling touch, kiss; blandishment. कुरवाळणें, मुका घेणें; लाडीगोडी, गोडीगुलाबी, गुलगुल गोष्टी. *v.t.* to bestow caress on; to pat, to make much of. लाड करणें, कुरवाळणें; गोंजारणें, लडिवाळपणा करणें. Caressingly, *adv.* लाडीगोडीनें, लाडुकपणानें.

Că'ret, *n.* (कॅरेट्)—the mark (‸) placed below a line to show the place of omission. गाळलेल्याची खूण, काकपद, चुकीची खूण.

Care'worn, *a.* ( केअर्-वॉर्न् )—showing effects of anxiety. काळजीनें वाळलेला, चिंताग्रस्त, चिंतातुर.

Cărg'ō, *n.* (कार्गो)—freight of a ship. मालवाहतूक-भरणा. ( *Pl.* cargoes ).

Că'rib, *n.* ( कॅरिब् )—an aboriginal inhabitant of Southern West-Indian islands; the language of the Caribs. वेस्ट इंडीज बेटाच्या दक्षिणेंत राहणारा मूळचा रहिवासी, कॅरिब; कॅरिब लोकांची भाषा. Caribbē'an, *a.*

Căribou', *n.* ( -bōō, कॅरिबू )—North-American rein-deer. उत्तर अमेरिकेंतील एक जातीचें हरिण किंवा सांबर.

Căricā'ture', *n.* ( कॅ-रि-के'चर् )—grotesque representation of a person or thing by over-emphasis on the characteristic traits ( pictorial, literary, or mimetic ). हास्यजनक चित्र किंवा वर्णन. *v. t.* to make or give caricature of. हास्यजनक चित्र काढणें. Caricatu'-rist, *n.* हास्यकारक चित्रें काढणारा.

Car'iēs, *n.* ( -z, केअरिईझ् )—decay of tooth or bone. दांतांतील किंवा हाडांतील कुजकेपणा.

Că'rillon, *n.* ( कॅरिल्यन् )—set of bells that can be rung either by hand or mechanically; air played on bells; an instrument (or part of an organ) imitating peal of bells. हातानें किंवा अन्य तऱ्हेनें वाजविण्याच्या घंटांचा समूह; घंटानाद; घंटानादासारखा आवाज करणारें वाद्य किंवा वाद्याचा भाग.

Car'ious, *a.* (केअरिअस्)—affected with caries, decayed ( esp. of bones, teeth ). कुजका, सडका.

Cărk'ing, *a.* ( कार्किंग् )—burdensome ( always with *care* ); causing anxiety. जड, अवघड, दुःसह; काळजी उत्पन्न करणारा.

Car'man, *n.* ( कार्-मन् )—a van-driver, a man who drives a car. गाडी हांकणारा.

Cărm'elite, *n.* ( कार्मिलाइट् )—a member of a mendicant order of friars (also *White Friars* from their white cloak); fine woollen stuff (usually grey). एका शाखेचा जोगी, महन्त; एक चांगलें लोंकरीचें कापड. [From Mt. *Carmel,* the place of foundation, 12th century ]

Că'rmine, *n.* (कार्-मिन्)—a vivid red or crimson pigment or colour. किरमिजी रंगाचें मलम, किरमिजी रंग.

Cărn'age, *n.* ( कार्-निज् )—a great slaughter (especially of men), massacre, butchery. कत्तल, भयंकर मनुष्यवध, कापाकापी, रक्ताचा पूर.

Cărn'al, *a.* (कार्नल् )—fleshy; sexual; worldly. शारीरिक; विषयासंबंधीं, विषयांचा; ऐहिक. Cărn'alism, *n.* Cărnăl'ity, *n.* विषयासक्ति. Carnalize, *v. t.* विषयासक्त करणें. [ L. *caro, carnis,* flesh ]

Cărnā'tion, *n.* ( कार्नेशन् )—a fine rosy-pink colour; clove-pink. सुरेख गुलाबी पिंगट रंग; लवंगेसारखें वास येणारें 'पिंक' फूल. *a.* of rosy-pink. गुलाबी रंगाचा. [*L. carnatio,* fleshiness]

Cărn'ival, *n.* ( कार्निव्हल् )—the festive days preceding Lent; riotous revelry; reckless indulgence of something ( *of*; e.g. *carnival*

*of bloodshed*). ख्रिस्ती लेंट सणाच्या पूर्वीचा उत्सव; बेहुमार चैनीचा पानमहोत्सव; अविचारी कृत्य किंवा यथेच्छ आचरण.

Cărnĭ'vora, *n. pl.* (कार्नि'व्होरा)—the carnivorous order of mammals (such as the lion, tiger, dog, wolf, bear and their kindred). मांसभक्षक सस्तन प्राणी. [L. *caro, carnis*, flesh]

Că'rnĭvōre, *n.* (का'र्निव्होअर्)—a carnivorous animal or plant, a beast of prey. मांसभक्षक प्राणी किंवा लहान झाड.

Cărnĭv'ŏrous, *a.* (कार्नि'व्हो-रस्)—flesh-eating, eating or feeding on flesh. मांसभक्षक. [L. *caro, carnis*, flesh and *vorare*, to devour]

Că'rol, *n.* (कॅ'रोल्)—a joyous song (human or of birds), warbling; Christmas hymn. आनंदगीत; ख्रिस्मस् स्तोत्र, भक्तिगीत. *v. i.* to sing, to warble, to sing in joy or festivity. आनंदानें गाणें, कंपस्वरानें गाणें. Caroller, *n.*; Carolling, *n.*

Că'rom, *n.* (कॅ'रम्)—a kind of game. एक प्रकारचा खेळ. *Carom-board, n.* कॅरम खेळण्याचा फळा.

Carŏ'tĭd, *n.* (कॅरॉ'टिड्)—either of the two main arteries carrying blood to the head. मानेच्या दोन मोठ्या धमनींपैकीं एक. *a.* of or near these two great arteries. या दोन मोठ्या धमनींविषयीं; या धमनीजवळ.

Cărouse', *n.* (कॅरा'उझ्)—a *drinking-bout*, drunken revelry. पानसमारंभ, पानोत्सव. *v. i.* to hold carouse, to drink deep or freely with noisy jollity. Carou'sal, *n.* पानसमारंभ, पानोत्सव करणें, दारू झोंकणें, खूब दारू पिणें.

Cărp, *v. i.* (कार्प्)—to take exceptions, to indulge in faultfinding (usu. with *at*). तक्रार करणें; छिद्रें शोधून काढणें, दोषस्थान पाहणें. *n.* a fresh-water fish (usually bred in ponds). तळ्यांतील गोड्या पाण्यांत सांपडणारा मासा. *Carping* (*i. e.* captious) *tongue, carping criticism*, निंदात्मक भाषण, दोषात्मक टीका.

Că'rpal, *a.* (का'र्पल्)—of the carpus. मनगटाचा, मणिबंधीय.

Cărp'el, *n.* (का'र्पेल्)—a pistil or pistil-cell. (बीजकोशांतील) फलोत्पादक पान, शिंबा. [Gr. *karpos*, a fruit]

Cărp'ĕnter, *n.* (का'र्पेंटर्)—an artificer in wood-work. सुतार. *v. i.* & *t.* to do carpenter's work. सुतारकाम करणें. *The carpenter's son*, Jesus. येशू ख्रिस्त. *Carpenter-ant, Carpenter-bee, nn.* kinds of ant or bee boring into trees. लांकूड कुरतडून त्यांत आपलें घर करणारी मुंगी किंवा मधमाशी. [L. *carpentum*, a chariot]

Cărp'ĕntrў, *n.* (का'र्पेन्ट्रि)—carpenter's work. सुतारकाम.

Cărp'et, *n.* (का'र्पिट्)—textile fabric for covering floor; an expanse of grass, etc. गालिचा, सतरंजी; गवत असलेली सपाट जागा, गवताचें आस्तरण. *v. t.* to cover with a carpet. गालिचा घालणें, बैठक पसरणें. *To be on the carpet*, to be under discussion. (विषयाची) चर्चा होत असणें, चर्चा चालू असणें. *Carpet-bag*, a travelling bag (originally made of carpet). प्रवासी पिशवी, पडशी. *Carpet-bagger*, an adventurer, an itinerant politician. साहस करणारा, धाडसी, नेहमीं फिरतीवर असणारा राजकारणी मनुष्य. *Carpet-knight*, a stay-at-home soldier, a ladies' man. शेंदाड शिपाई, गेहेशूर मनुष्य. *Carpet-bed*, a garden bed with dwarf plants arranged in a pattern. चित्रविचित्र पण नियमित आकृतीचे बागेंतील लहान लहान झाडांचे ताटवे. (*Pa. p.* carpeted; *pr. p.* carpeting) [L. *Carpere*, to pluck]

Cărp'us, *n.* (का'र्पस्)—(*pl.* carpī, का'र्पाइ)—the small bones connecting the hand and forearm, wrist, horse's knee, etc. मणिबंध, मणिबंधास्थिसंघ.

Că'rriage, *n.* (-रि, कॅ'रिज्)—conveying of goods, etc.; manner of carrying oneself, bearing, deportment; wheeled vehicle; cost of conveying goods; management (of enterprise, etc.). (माल वगैरे) वाहणें; चालचलणूक, वागणूक, गति; वाहन, गाडी; वाहाणवळ, हेल, हमाली; व्यवस्था. *Carriage-drive*, a road in parks etc. intended to be used by vehicles. सार्वजनिक किंवा खासगी हद्दींतील गाड्या हांकण्याचा रस्ता. *Carriage-able, a.* वाहण्याजोगा. *Carriage and pair*, गाडी आणि दोन घोडे यांचा संच.

Că'rrĭer, *n.* (कॅ'रि-अर्)—a person conveying (parcels, etc.) for hire; the part (of a bicycle, etc.) for carrying luggage; *a person or animal that without catching* a disease conveys its germs. वाहक, हमाल, निरोप नेणारा; गाडींतील सामान ठेवण्याचा भाग; रोगाचे जंतु नेणारा प्राणी. *Carrier-wave*, high-frequency oscillations emitted by a wireless telephone receiver. बिनतारी तारायंत्राचे जलद हेलकावे. *Common carrier*, सार्वजनिक वाहक, ठरीव भाडें देणाराचें ओझें वाहून नेण्याची कायदेशीर जबाबदारी पतकरणारा भाडेकरी (रेल्वे कंपनी, ट्रम्वे कंपनी, आगबोटी वगैरे).

Că'rrĭōle, *n.* (कॅ'रिओल्)—a small open carriage for one. एक लहान उघडी गाडी.

Că'rrĭon, *n.* ( कॅ'रिअन् )—dead flesh ; garbage. शिळें मांस ; गाळसाळ, निकामी वस्तु, केरकचरा. *Carrion crow,* मुरदाड मांस खाणारा कावळा, डोंबकावळा.

Cărronāde', *n.* ( कॅरॉने'ड् )—a short large-calibred ship's gun. एक लहान मोठ्या तोंडाची गलबतांतील बंदूक.

Ca'rrot, *n.* ( कॅ'रट् )—an edible root. गाजर. *pl.* *Carrots,* red hair, a red-haired person. लाल केंस, लाल केंस असलेला मनुष्य. Că'rrotў, *a.* (sl.) red-haired ; red. लाल केंस असलेला ; लाल, तांबडा.

Că'rrў, *v. t.* & *i.* ( कॅ'रि )—to convey, to transport, to bear, to support ; to have about the person ready for use ; to bear or bring as a result. नेणें वाहून नेणें, आधार देणें ; उपयोगाकरितां जवळ तयार असणें ; हातत्या घेणें. *To fetch and carry,* to be underlying. हाताखालचें काम करणें. *To carry all before one,* to succeed. यशस्वी होणें, अप्रतिहत जय मिळविणें. *To carry weight,* लढंबर किंवा वजन नेणें ; ०चें वजन असणें. *To carry conviction,* to implant one's own conviction in other minds. खातरी करणें, पटवून देणें. *To carry over, To carry forward,* to carry entries to new page or account. पुढें नेणें, पुढच्या पानावर घेणें. *To carry it, To carry the day,* to succeed. जय मिळविणें, पैज जिंकणें. *To carry hearers with one,* to persuade the hearers. श्रोत्यांचें मन वळविणें. *To carry weight, To carry authority,* to be influential. वजन असणें. *To carry with one,* to remember. आठवण ठेवणें. *To carry away,* to inspire, to transport, to deprive of self-control ; to lose ( mast etc. ) by breakage. स्फूर्ति होणें, प्रेरणा होणें, भान नाहींसें होणें ; मोडून तोडून नाहींशी होणें. *To carry off,* to remove from life ; to win ; to render passable. जगांतून नेणें ; जिंकणें, पदकावणें ; चालण्याजोगा करणें. *To carry it off well,* to make a brave show. मोठा देखावा करणें. *To carry on,* to advance a stage, to continue, to manage ( business ) ; to behave strangely, to flirt, to have amorous intrigue ( *with* ). पुढें चालविणें, चालू ठेवणें, ( धंदा ) चालविणें ; चमत्कारिक तऱ्हेनें वागणें, चोरून प्रेमसंबंध ठेवणें. *To carry out,* to put in practice. बजावणें, अंमलांत आणणें. *To carry through,* to bring safely out of difficulties, to complete. निस्तरणें, पुरें करणें.

Că'rrў, *n.* ( कॅ'रि )—( Mil. ) the position of carrying a sword ; ( Golf ) ball's flight before pitching ; portage between rivers etc. बंदूक खांद्यावर टाकून घेण्याची स्थिति ; गोल्फ खेळांत पिच् करण्याच्या अगोदरच चेंडू उडून जाणें ; दोन नद्यांच्या वगैरे मधून वाहून नेणें.

Cärt, *n.* ( कार्ट् )—a strong two-wheeled vehicle for heavy work. मालगाडी, खटारा, छकडा, रेकला. *To put the cart before the horse,* to reverse order, to take effect for cause. वस्तुस्थितीचा विपर्यास करणें. *v. t.* & *i.* to carry in a cart, to use cart. गाडींतून नेणें, गाडी वापरणें.

Cärt'age, *n.* ( का'र्टिज् )—carting ; cost of carting. गाडींत घालून नेणें, वाहतूक ; मालनेणावळ.

Cärt'er, *n.* ( का'र्टर् )—driver of a cart. गाडी हांकणारा.

Cärt'horse, *n.* ( का'र्ट्-हॉर्स् )—a horse thickset and fit for heavy work. गाडीला जोडण्याचा मजबूत बांध्याचा घोडा, गाडीचा घोडा.

Cärt'-load, Cärt'ful, *nn.* ( का'र्ट्लोड्, का'र्ट्फुल् )—a load borne on a cart ; a large quantity of anything. गाडीभर ओझें ; कोणत्याहि गोष्टीचें जास्त प्रमाण.

Cärte, *n.* ( कार्ट् )—a bill of fare. जेवणांतील पदार्थांची यादी, भोजनपत्रक. (Also, *quarte*)

Cär'tel, Kär'tel, *n.* ( का'र्टल् )—a written challenge to duel ; an agreement for exchange of the prisoners ; a manufacturers' union ( also *kartell* ). द्वंद्वयुद्धाला केलेलें लेखी आह्वान ; कैद्यांची अदलाबदल करण्याचा करारनामा ; कारखानदारांचा संघ.

Cärthū'sian, *n.* ( -zhn, कार्थ्यू'झन् )—( *Pl.* ) an order of monks ; ( *sing.* ) a member of that order, or of the Charterhouse, or of the Charterhouse School. जोग्यांचा संप्रदाय ; त्या संप्रदायांतील सभासद, चार्टरहाउसचा किंवा चार्टरहाउस शाळेचा सभासद.

Cärt'ĭlage, *n.* ( का'र्टिलिज् )—*a firm elastic* structure in back-boned animals. लवचिक अस्थिकूर्चा, कूर्चा, मृदु अस्थींचें वेष्टन. ( हें शरीरांत सांध्यांत असतें. )

Cärtĭlă'gĭnous, *a.* ( कार्टिलॅ'जिनस )—of or like cartilage, gristly. तरुणास्थिमय, कूर्चामय.

Cärtŏ'grapher, *n.* ( कॅार्टॉ'ग्रॅफर् )—a worker in cartography. नकाशे तयार करणारा.

Cärtog'raphy, *n.* ( कार्-टॉ'ग्रफि )—map-drawing. नकाशे काढणें, नकाशे तयार करण्याची कला.

Cärt'omăncў, *n.* (का'र्-टॉमॅन्सि)—fortune-telling by playing-cards. खेळण्याच्या पत्त्यांच्या साह्यानें भविष्य सांगणें.

Cärt'on, *n.* ( का'र्टन् )—the inner bull's eye on targets ; a cardboard box, cardboard. निशाणाचा अगदीं आंतील मध्य ; कार्डबोर्डाची पेटी, कार्डबोर्ड.

Cärtōōn', *n.* (कार्टून्)—a design-sketch on stout paper; a humorous topical illustration, a pictorial sketch relating to any prevalent topic or event. चित्राची रेखाटणी; हास्यजनक चित्र, विडंबनचित्र. *v. t.* to draw a cartoon of, to represent (a person etc.) in a cartoon. एखाद्याचें हास्यजनक चित्र रेखाटणें. *Cartoonist*, *n.* हास्योत्पादक चित्रें काढणारा.

Cärtouche', *n.* (-ōōsh, कार्-टूश्)—a scroll ornament; an oval ring enclosing the name and title of an Egyptian king. सुरळीसारखा अलंकार; इजिप्तच्या राजाचें नांव व पदवी असलेली अंडाकृति आंगठी.

Cärt'rĭdge, *n.* (कार्ट्रिज्)—charge of explosive, a case containing the charge for a gun. काडतूस. *Cartridge-belt*, a belt with sockets for cartridges. काडतुसें ठेवण्याचा पट्टा.

Cärt'rĭdge-pāper, *a.* (कार्ट्रिज्-पेपर्)—thick and rough paper for drawing and large envelopes. फिकट रंगाचा जाड चिवट कागद.

Cärt'-wright, *n.* (कार्ट्-राइट्)—a maker of carts. गाड्या तयार करणारा सुतार, गाड्या बांधणारा सुतार.

Că'rŭncle, *n.* (कॅरन्कल्)—a fleshy lump. मांसाचा गोळा, मांसवृद्धि.

Cärve, *v. t. & i.* (कार्व्)—to cut figures or patterns in wood, etc.; to cut up (meat etc.) at or for table. कोरणें, खोदणें; मांस वगैरे कापणें. *Carving-knife*, *Carving-fork*, a long knife or fork for carving. मांस वगैरे कापण्याचा सुरा. *To carve out*, to take from a larger whole, to acquire esp. by the sword. तुकडा कापून घेणें, स्वतःच्या कर्तबगारीनें किंवा तरवारीच्या जोरावर मिळविणें.

Că'rvel, *n.* (कार्व्हेल्) =Caravel.

Cärv'er, *n.* (कार्व्हर्)—one who carves; (*pl.*) carving knife and fork. खोदकाम करणारा; (अने०) कापण्याची सुरी आणि कांटा.

Că'rving, *n.* (कार्व्हिंग्)—cutting figures in wood or ivory; sculpture; figures carved. लांकडांत किंवा हस्तिदंतांत खोदकाम करणें; खोदकाम, नकशीचें काम; कोरलेल्या मूर्ति.

Cărўă'tĭd, *n.* (कॅरिॲटिड्)—a female figure used as a pillar. खांबाकरितां तयार केलेली स्त्रीची कोरलेली मूर्ति.

Căscāde', *n.* (कॅस्केड्)—a small or artificial waterfall; a wavy fall of lace etc. लहान धबधबा, (कृत्रिम) पाण्याचा धोत; वस्त्राला लावलेली नागमोडी लेस किंवा दाल.

Case, *n.* (केस्)—an instance of a thing's occurring; hypothetical or actual situation; a plight or condition; a suit or cause; inflexion of nouns; a box; a cabinet; a bag, sheath designed to hold something. घडलेलें उदाहरण; काल्पनिक अवस्था किंवा वस्तुस्थिति; दशा, स्थिति; खटला, मोकदमा; नामाची विभक्ति; पेटी; कपाट; पिशवी, म्यान, टोपण. *v. t.* to enclose in a case. वरांत किंवा पेटींत वसविणें, पेटींत ठेवणें. *Is the case*, is true. खरी वस्तुस्थिति आहे. *Is not the case*, is false. खोटी गोष्ट आहे. *In good case*, well off. सुस्थितींत. *In evil case*, badly off. दुःस्थितींत, वाईट स्थितींत. *A leading case*, a case often cited and governing subsequent decisions. प्रमुख खटला. *To make out one's case*, to prove one's case. आपली बाजू सिद्ध करणें. *A case of conscience*, a matter in which conscience has to decide between conflicting principles. दोषादोषविवेचक प्रश्न. *In case*, if, in the event that, lest. जर, असें असेल तर. *In case of*, in the event of. अशी गोष्ट झाली तर. *In the case of*, as regards. विषयीं, विषयीं म्हटलें तर. *Put the case that*, suppose. कल्पना करा. *In any case*, whatever the fact is, whatever may happen. कांहीं झालें तरी. *In that case*, if that is true, if that should happen. तसें झालें तर. *Case-law*, law as cited by precedent. पूर्वी घडलेल्या उदाहरणांचा कायदा. *Case-bottle*, a square bottle to fit in a case with others. पेटींत दुसऱ्या बाटल्यांबरोबर ठेवतां येणारी चौकोनी बाटली. *To ca'se-harden*, *v. t.* to harden the surface of; (*fig.*) to render callous. बाहेरची बाजू कडक करणें, निर्लज्ज बनवणें. *Case-knife*, a large knife kept in sheath. झांकणांत ठेवण्याचा मोठा चाकू. *Case-shot*, bullets in a tin box fired from a gun. जवळच्या माऱ्याचे तोफेचे गोळे.

Că'seĭn, *n.* (केसिइन्)—the solid part of milk of wich cheese is made. दुधांतील सत्त्वशील भाग

Că'semāte, *n.* (केस्-मेट्)—an embrasured room in a wall of a fortress. जंगीच्या पाठीमागचें तोफघर.

Cāse'mĕnt, *n.* (केझ्-मेन्ट्)—a hinged window or part of a window. बिजागरें असलेली खिडकी, झरोका.

Căsh, *n.* (कॅश्) (*Pl.* cash)—one of various coins of low value in the East Indies and China. ईस्ट इंडीज् आणि चाइना येथील अगदीं लहान किंमतीचीं नाणीं.

Căsh, *n.* (कॅश्)—money in the form of coin or bank-notes. रोकड पैसा, नगद नाणें. *v. t.* to give or obtain cash for (cheque, etc.

(चेक वगैरे) वटविणें, सुटे पैसे करणें. *In cash*, having money. रोकडीच्या रूपांत, रोकडीनें. *Out of cash*, not having money. रोकड पैशा-शिवाय. *Cash down*, money paid on the spot. आगाऊ जागीं दिलेला पैसा. *Cash on delivery* (C. O. D.), forwarding of goods against cash to be paid on delivery. माल पोहोंचतांच पैसे देण्याच्या अटीवर आधीं पाठविलेला माल. *Cash-account*, an account to which only cash is carried and from which all payments are made. रोकडीचा हिशेब, रोकड व्यवहार. *Cash-book*, a book for record of cash received and paid. रोजकीर्द, रोकड वही. *Cash-payment*, payment in ready money. रोख पैसे देणें. *Cash-price*, lowest price for ready money. रोकड किंमत. *To cash in*, to settle accounts; to die. हिशेब करणें; मरणें.

Că'shew, *n.* (-शू, कॅशू)—a West-Indian tree bearing cashew-nut. काजू, काजूचें झाड.

Cashier', *n.* (कॅ-शि'अर्)—a person in charge of cash in a bank or an office. खजीनदार, पोतनीस. *v. t.* to dismiss from service for bad conduct; to discard. नोकरीवरून काढणें; त्याग करणें.

Căsh'mere, *n.* (कॅश्-मिअर्)—soft fabric of Cashmere goat's wool. काश्मीरी लोंकरीचें उंची कापड, काश्मीरी शाल.

Că'sing, *n.* (के'सिंग्)—enclosing material. सभोंवतालीं गुंडाळण्याचें कापड, लांकूड वगैरे.

Casi'nō, *n.* (-सी-, कसी'नो)—a public music or dancing room. सार्वजनिक गायन किंवा नृत्यगृह. (*Pl.* Casinos).

Căsk, *n.* (कास्क्)—a vessel for holding liquor, a barrel. (दारूचें) पिंप.

Căs'kĕt, *n.* (का'स्किट्)—a small box (often of precious material and workmanship) for holding valuables. मौल्यवान वस्तु ठेवण्याचा लहान डबा.

Căsque, *n.* (कॅस्क्)—a helmet, a head-piece wanting a vizor. डोकें आणि तोंड पापुरतें चिलखत, शिरस्त्राण.

Cassā'tion, *n.* (कॅसे'शन्)—an act of annulling, annulment. रद्द करणें. *Court of Cassation*, court of appeal (esp. of foreign countries). अपील कोर्ट.

Cassā'va, *n.* (कसा'व्हा)—a West-Indian plant; the starch or flour of the plant. वेस्ट इंडीज-मधील एक लहान झाड; त्याच्यापासून मिळालेलें पीठ.

Că'sserōle, *n.* (कॅ'सरोल्)—an earthenware vessel in which food is both cooked and served. ज्या भांड्यांत अन्न शिजवितात व वाढतातहि असें मातीचें भांडें.

Că'ssia, *n.* (-sha, कॅ'शा)—a kind of cinnamon. एक जातीची दालचिनी, दाल्चा.

Că'ssock, *n.* (कॅ'सक्)—a long close tunic (worn by some clergymen). एक लांब अंगा-बरोबर घालण्याचा झगा.

Că'ssowarў, *n.* (कॅ'सॅवरि)—kinds of large running bird related to ostrich. शहामृगा-सारखा मोठा धांवणारा पक्षी.

Căst, *v. t. & i.* (कास्ट्)—to throw, to fling, to drop; to give or get decision against; to give vote; to add up; to shape in mould; to assign a part to. फेकणें, टाकणें; विरुद्ध निकाल देणें किंवा मिळणें; जादा मत देणें; मिळवणें; मुशींत ओतणें; (नटाची) भूमिका नेमून देणें. *n.* a throw; a mould for casting; a thin cast in the mould; a type; slight squint. फेंकणें; सांचा; सांच्यांत घातलेली वस्तु; घडण, नमुना; दृष्टीची दव, थोडी तिरवी दृष्टि. *To cast a vote*, to give or deposit a vote. मत देणें. *Casting-net*, a net thrown and at once drawn in. फेंकून लागलेंच वर काढण्याचें मासे धरण्याचें एक प्रकारचें जाळें. *To cast in one's teeth*, to reproach one with. एखाद्याची निंदा करणें, एकाद्याचे दांत घशांत घालणें. *To cast a spell on*, to bewitch. जादूनें भारणें, मंत्र घालणें. *To cast aside*, to give up using, to abandon. उपयोग करण्याचें सोडून देणें, त्याग करणें. *A cow casts calf*, a cow drops a calf prematurely. गाय अकालीं व्याली आहे, गाभ-सणली आहे. *To cast a soldier* or *police-man*, to dismiss him. ∘नोकरीवरून काढून टाकणें. *To cast loose*, to detach, to detach oneself. सुटें करणें, मोकळें करून घेणें. *To cast accounts*, to do sums. बेरजा करणें. *To cast a column of figures etc.*, to add up. मिळविणें. *To cast about*, to go this way and that in search, to devise means (with *for*, to do, *how*). शोधार्थ इकडे तिकडे जाणें, उपाययोजना करणें. *To cast away*, to reject. टाकून देणें, नाकारणें. *To be cast away*, to be wrecked. (जहाज) आपटून फुटणें. *To cast back*, to revert. परत देणें. *To cast down*, to depress. खिन्न होणें, उदासीन होणें. *To cast in one's lot with*, to share fortunes of. दैवांत भागीदार होणें. *To cast off*, to abandon. टाकून देणें, त्याग करणें. *To cast up*, to calculate. गणणें, मोजणें.

Căs'tanĕts, *n. pl.* (कॅ'स्टनेट्स्)—dancer's chinking instrument. चिपळ्या.

Căst'away, *n.* (का'स्टवे)—a shipwrecked person; a reprobate. फुटलेल्या गलबतावरील मनुष्य; पापांत लोळणारा.

Căste, *n.* (कास्ट्)—an exclusive hereditary class. जात, वर्ण.

करणें, पसंत करणें. *To take one's choice,* to decide between possibilities. आपल्या आवडीप्रमाणें निवड करणें. *For choice,* by preference, if one must select, (स्वतःवर सोपविलें असतांना) पसंतीनें. *Hobson's choice,* to take *or* leave the one offer. द्या नाहीं तर सोडून द्या असें म्हणून जुलमानें करावयास लावलेली निवड. *At choice,* at pleasure. मनाला वाटेल तर, इच्छेप्रमाणें.

Choir, *n.* ( क्वायर् )—an organized band of singers; the chancel of a church; birds singing. उपासनागीत म्हणणारा गायकसमूह; चर्चमधील पूर्वेकडचा भाग; गाणारे पक्षी. *v. t.* & *i.* to sing in chorus. एकत्र गाणें.

Chōke, *v. t.* & *i.* ( चोक् )—to stop the breath of, to suffocate, to block up a passage; to have a coughing-fit. श्वास थांबवणें, गुदमरणें, मार्ग बंद करणें; कफ दाटणें, घुसमळणें.

Chōke'cherry, *n.* ( चो'क्-चेरि )—an astringent wild cherry. तुरट रानटी चेरी नांवाचें झाड व फळ.

Choke'-dămp, *n.* ( चो'क्-डॅम्प् )—a heavy gas essentially carbon dioxide ( in mines, wells, etc. ). कोळशांच्या खाणींत सांपडणारा विदारी वायु.

Chō'ker, *n.* ( चो'कर् )—that which chokes; a white tie; a high stand-up collar. श्वास कोंडणारा; पांढरी गळेटी; उंच ताठ कॉलर.

Chō'kÿ, *n.* ( चो'कि )—a custom or toll station; a lock-up. जकात नाकें; चौकी, बंदीखाना.

Chŏl'er, *n.* ( कॉ'लर् )—bile; anger; irascibility. पित्त; राग, क्रोध; तमोगुण, पित्तस्वभाव.

Chŏl'ĕra, *n.* ( कॉ'लेरा )—bilious disorder with diarrhoea and vomiting. जरीमरी, पटकी, विषूचिका, कॉलेरा.

Chŏl'ĕrĭc, *a.* ( कॉ'ले-रिक् )—irascible, angry. रागीट, चिडखोर.

Chōōse, *v. t.* & *i.* ( चूझ् )—to make a choice of, to select out of a greater number, to decide as between alternatives; to be pleased. निवडणें, पसंत करणें, पसंतीस येणें; आवडणें. *To pick and choose,* to select carefully, to be fastidious. काळजीपूर्वक निवडणें. *There is nothing to choose between them,* they are equal. त्यांच्यांत निवडण्यासारखें कांहींच नाहीं, ते दोन्ही सारखेच आहेत.

Chŏp, *v. t.* & *i.* ( चॉप् )—to cut with an axe or a heavy edge-tool; *to* mince; *to* cut words short; to swing this way and that. तोडणें; बारीक बारीक तुकडे करणें; भाषण मध्येंच थांबवणें; हेलकावे खाणें. *n.* a chopping stroke; a small cut-off portion. घाव; कापलेला लहानसा तुकडा. *To chop up,* to cut into small pieces. बारीक बारीक तुकडे करणें. *To chop in,* to intervene in talk. बोलतांना मध्येंच तोंड घालणें. *To chop back,* to reverse one's direction suddenly, to double. गेल्या रस्त्यानें एकदम मागें वळणें. *To chop up* or *out,* to come to surface. पृष्ठभागाला येणें. *Chopping sea,* sea with jerky motion. क्षुब्ध झालेला समुद्र. *Chop-house,* a cheap restaurant. स्वस्त असें फराळाचें दुकान. *To chop round, To chop about,* ( esp. of wind ) to change direction suddenly. एकाएकीं दिशा बदलणें. *To chop logic,* to bandy arguments. हमरीतुमरीचा वादविवाद करणें.

Chŏp, *n.* =Chap.

Chŏp, *n.* (चॉप् )—( India, China ) seal, license, passport, permit; ( China ) trade-mark, a brand of goods, official impress or stamp. छाप, परवाना; व्यापाराची खूण, विशिष्ट शिक्का.

Chŏpp'er, *n.* ( चॉ'पर् )—a large bladed short axe; a cleaver. लहान कुऱ्हाड; कापणी, तासणी, ( खाटकाची ) सुरी.

Chŏp'stĭck, *n.* ( चॉ'प्-स्टिक् )—( *pl.* ) sticks used by the Chinese as fork in eating. चिनी लोकांकडून जेवतांना वापरले जाणारे हस्तिदंती कांटे.

Chor'al, *a.* ( k-, को'रल् )—of or sung by a choir; of *or* with chorus. गाणाऱ्या मंडळींचा; एकत्र गाण्यासह.

Chorāle', Chorāl', *n.* ( कोरा'ल् )—a simple tune or hymn. साधा सूर, साधें गाणें, भजनगीत.

Chor'alĭst, *n.* ( कॉ'रलिस्ट् )—a choral singer. भजनगीत गाणारा.

Chōrd, *n.* ( कॉर्ड् )—a string ( of harp, etc. ); a string of the emotions; the straight line joining ends of an arc; harmonious combination of simultaneous notes. तंतु, तार; भावनातंतु; ( भूमितींतील ) ज्या, चापकर्ण; स्वरमेळ, तालसूर. *To touch the right chord,* to appeal skilfully to the emotion. भावनेला बरोबर स्पर्श करणें.

Chore, *n.* ( चोअर् )—an odd job; ( *usu. pl.* ) daily light work ( of house, farm, etc. ). किरकोळ काम; दररोजचें साधें काम. *v. i.* to do odd jobs, to chare. किरकोळ काम करणें, दररोजचें काम करणें.

Chŏ'rĭster, *n.* ( कॉ'रिस्टर् )—a member of a choir; a choir-boy. गायकगणांतला एक गाणारा; बरोबर गाणारा, सहगायक.

Chor'tle, *v. i.* ( चॉ'र्टल् )—to chuckle loudly, to laugh by making a peculiar noise in the throat and through the nose. गालांतल्या गालांत किंवा तोंडांतल्या तोंडांत हंसणें.

Chŏr'ŭs, *n.* (कॉ'रस्)—a band of singers, a choir; a thing sung or said by many at once; the refrain of a song. गाणाऱ्यांची मंडळी; सर्वांनीं एकसुरांत म्हटलेलें गाणें वगैरे; ध्रुपद, ध्रुवपद, आंकणकडवें. *v. t.* to say or sing in chorus. एकसुरांत गाणें, एकाच सुरांत म्हणणें.

Chose, Chosen, *pa. t.* & *p. p.* of Choose.

Chough, *n.* (चफ्)—a red-legged crow. एक लाल पाय असलेला कावळा.

Chouse, *v. t.* & *n.* (चाउझ्)—to swindle, to trick. फसवणें, ठकवणें, फसवणूक.

Chow'der, *n.* (चा'उडर्)—fish and vegetables cooked together in milk. दुधांत एकेठिकाणीं शिजवलेले मासे व भाजी.

Chrĭ'sm, *n.* (क्रि'झम्)—consecrated oil. संस्कारानें पवित्र केलेलें तेल.

Christ, *n.* (क्राइस्ट्)—the Anointed, the Messiah. येशू ख्रिस्त.

Chrĭst'en, *v. t.* (क्रि'सन्)—to baptize and give a name to a child. बाप्तिस्मा देऊन मुलाचें नांव ठेवणें, ख्रिस्ती बनविणें.

Chrĭ'stening, *n.* (क्रि'स-निंग्)—the ceremony of baptism. बाप्तिस्मा देण्याचा विधि, ख्रिश्चन करण्याचा विधि.

Chrĭ'stendom, *n.* (क्रि'सन्-डम्)—Christian countries as a whole. एकंदर सर्व ख्रिस्ती देश.

Chrĭ'stĭan, *a.* (क्रि'स्टिअन्)—professing Christian religion; of Christ or his teaching; civilized. ख्रिस्तीधर्मानुयायी; येशू ख्रिस्ताचा; सुधारलेला. *n.* a professor of the religion of Christ; civilized being; a decent person. ख्रिस्ती, ख्रिस्ताचा अनुयायी; सुधारलेला इसम; व्यवस्थित मनुष्य. *Christian era*, the era counted from the supposed year of Christ's birth. ख्रिस्ती शक, इसवी सन. *Christian name*, the name given at christening. बाप्तिस्मा देतांना ठेवलेलें नांव. *Christian Science*, the system by which christian faith is alleged to overcome disease etc. without medical treatment. धर्मश्रद्धेनें औषधोपचाराशिवाय रोग बरे करण्याची पद्धति. *Christian Scientist*, *n.*

Chrĭstĭăn'itў, *n.* (क्रिस्टिॲनि-टि)—Christian faith, quality or character. ख्रिस्तीधर्म, ख्रिस्तीधर्ममत.

Chrĭs'tianīze, *v.t.* (-cha-, क्रि'स्चनाइझ्)—to make Christian. ख्रिस्ती करणें, ख्रिस्ती धर्मांत आणणें.

Chrīst'like, *a.* (क्राइ'स्ट्-लाइक्)—partaking of the nature and attributes of Christ. ख्राइस्टच्या स्वभाव व गुण असलेला.

Chrĭst'mas, *n.* (क्रि'स्-मस्)—Christmas-day or Christmas-tide. नाताळ (२४ डिसेंबर ते १ जानेवारी). *Christmas-box*, a small box given as a present at Christmas. ख्रिस्तमसच्या वेळीं बक्षीस म्हणून दिलेली लहान पेटी. *Christmas card*, a card that is posted at Christmas as greeting of good will. नाताळांत मित्रानें मित्राला पाठविलेलें कार्ड किंवा पत्र. *Christmas Day*, the day of festival of Christ's birth, 25th Dec. नाताळ, येशू ख्रिस्ताच्या जन्मोत्सवाचा पहिला दिवस, २५ डिसेंबर. *Christmas rose*, a white-flowered winter-blossoming hellebore. एका जातिचें पांढरीं फुलें असलेलें फुलझाड. *Christmas-tide*, the holiday season from 24th Dec. to 1st Jan. नाताळ २४ डिसेंबर ते १ जानेवारी. *Christmas-tree*, a small tree set up in a room and hung with candles and presents. ज्या फांदीला नाताळांतील देणग्या व मेणबत्त्या टांगतात अशी खोलींत उभी केलेली लहान झाडाची फांदी. *Christmasy*, *a.* of festive appearance. उत्सवासारखा दिसणारा.

Chromăt'ic, *a.* (क्रोमॅ'टिक्)—of colours, in colours. रंगाचा, रंगांत असलेला. [Gr. *chroma*, colour]

Chromăt'ics, *n.* (क्रोमॅ'टिक्स्)—the science of colour. रंगाचें शास्त्र.

Chrōme, *n.* (क्रोम्)—a pigment got from compounds of chromium. क्रोमिअम धातूच्या मिश्रणापासून झालेला रंग.

Chrō'mĭum, *n.* (क्रो'मिअम्)—a metal. एका जातीची धातु.

Chrōmolĭth'ogrăph, Chrō'mō, *nn.* (क्रोमोलि'थोग्राफ्, क्रो'मो)—a picture lithographed in colours. शिळेवरील रंगीबेरंगी काढलेलें चित्र.

Chrŏ'nic, *a.* (क्रॉ'निक्)—constantly present or recurring; of a long standing, confirmed, permanent; (vul.) bad, intense. नेहमीं असणारा किंवा उद्भवणारा; बद्धमूल, जुनाट, कायमचा; वाईट, फारच जास्त झालेला.

Chrŏn'icle, *n.* (क्रॉ'नि-कल्)—a register of events in order of time. कालक्रमवृत्तान्त, बखर. *v. t.* to enter in chronicle or diary, to record in a newspaper. बखरींत किंवा डायरींत लिहून ठेवणें; वर्तमानपत्रांत नमूद करणें. Chronicler, *n.*

Chrŏnŏlŏ'gical, *a.* (क्रॉ-नॉ-लॉ'जि-कल्)—according to the sequence or order of time. कालक्रमानुसार.

Chrŏnŏlŏ'gў, *n.* (क्रॉ-नॉ-लॉ'जि)—the science of computing dates; the arrangement or table of events with dates for historic purposes. कालगणनविद्या; शकानुक्रम.

Chrŏnŏm'eter, *n.* (क्रॉ-नॉ'मि-टर्)—a time-measuring instrument. काल समजण्याचें साधन, घटीयंत्र, कालमापकयंत्र.

Chrȳs'alĭs, *n.* (क्रि'स-लिस्)—the form taken by an insect before becoming winged. किड्यांची रूपांतरपूर्वावस्था.

Chrȳsăn'thĕmum, *n.* (क्रिसॅ'न्-थिमम्)—a garden plant flowering in autumn. शरद् ऋतूंत फुलणारें एक फुलझाड.

Chrȳsobŏ'rȳl, Chrȳs'olīte, Chrȳs'oprāse, *nn.* (क्रिसॉबॅ'रिल्, क्रि'सोलाइट्, क्रि'सप्रेझ्)—precious stones of different colours. निरनिराळ्या रंगाचे मौल्यवान् दगड.

Chŭb, *n.* (चब्)—a thick river fish. नदींतला एक मोठा मासा.

Chŭbb'ȳ, *a.* (च'बि)—plump, round-faced, having a large fat face. गबदुल, वाटोळ्या तोंडाचा.

Chŭck, *v. i.* & *t.* (चक्)—to utter the call of fowls; to touch gently (under the chin); to fling, to throw carelessly. खुटखुटणें, खुटखुट करणें; खालून आघात करून हनुवटी उचलणें; एकदम निष्काळजीपणानें फेंकणें, टाकणें. *To give one the chuck,* to dismiss. काढून टाकणें. *To chuck away,* to waste, to lose. व्यर्थ घालवणें, गमावणें. *To chuck up the sponge,* to give up contest or attempt. स्पर्धा किंवा प्रयत्न सोडून देणें. *To chuck up,* to abandon in disgust. तिटकारा येऊन सोडून देणें. *To chuck out,* to expel (a troublesome person etc.) एखाद्याला घालवून देणें. *Chuck it,* cease. थांबवा, बस् करा. *Chuck-farthing,* a kind of quoit game with coins. एक जातीचा पांगडीचा खेळ. *A chucker-out,* one who expels (a troublesome person) from meeting etc. एखाद्या त्रासदायक माणसाला घालवून देणारा.

Chuck, *n.* (चक्)—an instrument which holds a piece of wood or metal while it is turned round and round for cutting into shape. पकडणारा चंद्रक, कातकामाच्या सांच्यावरील थाळी. (*usu. voc.*) darling. लाडकें मूल, बच्चा. (sl.) food. अन्न. *int.* a word calling fowls or urging a horse. चकचक, चकचक (असा आवाज करणें).

Chuck'er, *n.* (च'कर्)—each of the periods into which the game of polo is divided. पोलो खेळाचा प्रत्येक विभाग. (Cf. Mar. चक्कर.)

Chŭc'kle, *n.* (च'कल्)—a quiet laugh; a hen's call. गालांतल्या गालांत हंसणें; कोंबडीचा शब्द करणें. (Also *v. i.*)

Chŭc'kle-head, *n.* (च'कल्-हेड्)—a dolt, a stupid fellow. मूर्ख, अक्कलशून्य.

Chu'ckle-headed, *a.* (च'कल्-हेडेड्)—doltish, stupid. मूर्ख, अडाणी.

Chŭm, *n.* (चम्)—a familiar friend. परम स्नेही, जिवलग मित्र. *v. i.* To be intimate with, to occupy same rooms together. सख्य असणें, एकाच खोलींत राहणें. *New chum,* a recent immigrant. देश सोडून नुकताच आलेला रहिवासी.

Chŭmm'ȳ, *n.* (च'मि)—a type of car-body. गाडीची एक प्रकारची सपाट बैठक.

Chŭmp, *n.* (चम्प्)—(colloq.) a lump of wood; the thick end of a loin of mutton; (sl.) head; blockhead. लाकडाचा ठोकळा, ओंडा; जाडबुडखा; डोकें; मठ्ठ, टोणपा. *Off one's chump,* mad with excitement etc. डोकें ठिकाणावर नसलेला.

Chŭnk, *n.* (चंक्)—(colloq.) a thick lump cut off (wood, bread, cheese, etc.). कापलेला जाड भाग.

Chŭrch, *n.* (चर्च्)—a building for Christian worship; a collective body of Christians; the body adhering to one particular form of worship; the clerical profession. ख्रिस्ती देऊळ; ख्रिस्ती समाज; एकाच धर्माची मंडळी; ख्रिस्ती उपाध्येगिरी *v. t.* to hold church service over a woman after childbirth. प्रसूतीनंतर स्त्रीबद्दल प्रार्थना करणें, बाळंतपणानंतर देवळांत जाणें. *Churchman, Churchwoman,* a member of the established church. अँग्लिकन चर्चचा अनुयायी किंवा सभासद्. *Churchward'en,* (चर्च-वॉ'र्डन्) =an elected lay representative of a parish; a long clay smoking pipe. देवालयाचा एक निवडलेला प्रतिनिधि; एक लांब चिकणमातीचा तंबाकू ओढण्याचा पाइप.

Chŭrch'yărd, *n.* (च'र्च्-यार्ड्)—the enclosed ground round a church. चर्चच्या भोंवतालची प्रेतभूमि, स्मशान. Fat churchyard=many deaths. पुष्कळ मृत्यु.

Chŭrl, *n.* (चर्ल्)—an ill-bred fellow; a niggard; (arch.) a peasant, a low-born person. अशिक्षित मनुष्य, गांवढळ; कवडीचुंबक, कंजूप, चिक्कू; शेतकरी, हलक्या कुळांत जन्मलेला, अकुलीन.

Chŭrl'ish, *a.* (च'र्लिश्)—surly, rude. खट्याळ, उद्धट.

Chŭrn, *n.* (चर्न्)—a butter-making machine; a large milk-can. माथणी, रवी; मोठें दुधाचें भांडें. *v. i.* & *t.* to make butter by agitating in a churn; to stir to and fro. लोणी काढणें, घुसळणें; जोरानें इकडे तिकडे हालवणें. *A churning,* amount of butter made at once. एकाच वेळीं निघालेलें लोणी.

Chute, *n.* (shoot, शूट्)—a slide for conveying things to a lower level; rapid smooth fall

of water over a slope. वरहु खालच्या सपाटीवर आणण्याकरितां असलेली एक सरकती फळी; घसरणीवरून वाहणारा जलद पाण्याचा झोत.

Chyle, *n.* ( kil, काइल् )—a milky fluid into which chyme is converted. अन्नरस, पोटांत पचलेल्या अन्नाचें आतांत रूपांतर.

Chyme, *n.* ( kim, काइम् )—food converted by gastric secretion into acid pulp. अर्धपक्व अन्न, आमरस.

Cicā'da, *n.* ( सिके'डा )—a tree-insect which makes a loud noise. झाडांत मोठा आवाज करणारा एक कृमि.

Cic'ātrice, *n.* ( सि'कॅ-ट्रिस् )—the scar of a healed wound, a mark remaining after a wound. व्रण, चट्टा, क्षतचिन्ह.

Cic'atrize, *v. i.* & *t.* ( सि'क-ट्राइझ् )—to skin over, to heal up. जखम भरून येणें, खपली धरेसा करणें. Cicatrization, *n.*

Ci'celÿ, *n.* ( सि'सेलि )—kinds of flowering plant. कांहीं जातीचीं फुलझाडें.

Ciceró'nē, *n.* ( chicha-, चिचरो'नि )—a guide who shows the interesting parts of a building or a city. एखाद्या इमारतीचे किंवा शहराचे विशेष मनोरंजक भाग दाखविणारा मार्गदर्शक.

Ciceró'nian, *a.* ( सिसेरो नियन् )—pure as Cicero's Latin. सिसरोच्या भाषासरणीसारखा शुद्ध. *n.* an expert in Cicero. सिसरोच्या भाषेंत निष्णात.

Ci'der, *n.* ( सा'इडर् )—fermented drink from apple-juice. ॲपल नांवाच्या फळाचा खतखतवलेला रस, दारू.

Cigär', *n.* ( सिगा'र् )—a small tobacco-leaf rolled into cylinder. वाटोळें गुंडाळलेलें तंबाखूचें पान, सिगार.

Cigarëtte', *n.* ( सि-ग-रे'ट् )—cut tobacco rolled in paper. कागदाची विलायती तंबाखूची विडी, सिगारेट.

Cil'ia, *n. pl.* ( सि'लिआ )—eye-lashes; a fringe on a leaf or an insect's wing. पापणीचे केस; पानावरील किंवा पंखावरील पापणीच्या केसासारखी आकृति. *Ciliary, a.* ( सि'ल्यरि )—पापणीच्या केसासंबंधीं.

Cimmē'rian, *a.* ( सिमे'रिअन् )—extremely dark, thick, gloomy. अत्यंत अंधारमय, गाढ किंवा दाट ( अंधार ).

Cinch, *n.* & *v. t.* ( s-, सिन्च् )—a sure hold, advantage, easy job; to fasten firmly, to girth tightly up. खात्रीची पकड, फायदा, सोपें काम; घट्ट धरणें, घट्ट आवळून धरणें.

Cinchō'na, *n.* ( -k-, सिंको'ना )—the tree from which quinine ( a bitter medicine used for fever ) is obtained. ज्या झाडापासून क्विनीन तयार होतें तें झाड, सिंकोनाचें झाड.

Cinc'ture, *n.* ( सिं'क्चर् )—a band worn round the middle of the body, a girdle, belt, fillet. कमरपट्टा, पट्टा.

Cin'der, *n.* ( सि'न्डर् )—slag; piece of coal that has ceased to burn. गाळ, रेंगाड; न जळलेला कोळसा. *Hot-cinders*, फोपटा, फुपाटा. Cindery, *a.*

Cinderëll's dänce, *n.* ( सिन्डरे'ला डान्स् )—a gathering for dancing which ends at 12 o'clock at night. रात्रीं १२ वाजतां संपणारा नाच.

Cin'der-päth, *n.* ( सि'न्डर्-पाथ् )—a running track. धांवता मार्ग.

Cin'ēma, *n.* ( सि'नि-मा )—cinematograph theatre. सिनेमाचें थिएटर. *The cinema*, cinematography, moving pictures. हालतीं चित्रें, चलचित्रपट.

Cinémat'ögräph, *n.* ( सि-नि-मॅ'टो-ग्राफ् )—an apparatus producing pictures of motion. हालतीं चित्रें दाखविणारें यंत्र. Cinematographic, *a.*; Cinematography, *n.*

Cin'ēphöne, *n.* ( सि'निफोन् )—a gramophone fitted with some device to synchronize cinematograph with the sounds produced by it. एकाच वेळीं सिनेमाच्या आवाजाबरोबर आवाज असणारा ग्रामोफोन.

Cinerär'ia, *n.* ( सिनरे'रिआ )—kinds of flowering plant with ashy down on leaves. एका जातीचीं फुलझाडें.

Cin'eraryÿ, *a.* ( सि'नरि )—of ashes ( esp. of urn holding cremated ashes ). ( प्रेत ) भस्माचा, भस्म किंवा राख ठेवण्याचा.

Cingalese', Sinhalese, *n.* ( सिंगली'झ्, सिंहली'झ् )—of Ceylon. सीलोनचा, सिंहलद्वीपांतील. *n.* a native or language of Ceylon. सीलोनचा रहिवासी, सीलोनमधील लोकांची भाषा.

Cinn'abär, *n.* ( सि'नबार् )—red mercuric sulphide, vermillion. रक्तपारद, लाल पारा.

Cinn'ämon, *n.* ( सि'नॅ-मन् )—an East Indian tree, a brown powder made from the inner covering of the tree used to give a yellow colour and special taste; yellowish-brown colour. दालचिनी, दालचिनीची पूड; दालचिनीच्या रंगाचा, तांबूस पिंगट रंग.

Cinque, *n.* ( सिंक् )—the five at dice and cards पंजा, ( द्यूतपत्त्याचा ) पंजा, पांच.

Cinque'foil, *n.* ( सिं'क्-फॉइल् )—a plant with five-lobed leaves. पांच कमानींचें फूल.

Ci'pher, *n.* ( सा'इ-फर् )—arithmetical symbol 0; secret writing; a monogram; a person or thing of no importance. शून्य, शून्य

सांकेतिक लिपि ; नांवाचीं जोडलेलीं आद्याक्षरें ; कवडी मोलाचा मनुष्य किंवा जिन्नस. *v. i.* & *t.* to do sums, to work out ; to put into cipher writing. हिशेब करणें, आंकडे मोडणें, उदाहरणें करणें ; सांकेतिक लिपींत लिहिणें.

Cir'cē, *n.* ( स'र्सि )—an enchantress, a temptress. मोह किंवा भुरळ घालणारी, मोहिनी.

Circē'an, *a.* ( सर्सी'अन् )—pertaining to Circe, enchanting, tempting. सर्सीसंबंधीं, मोह किंवा जादू घालणारी.

Cir'cle, *n.* ( स'र्कल् )—a perfectly round plane figure ; a roundish enclosure, a ring ; a set or coterie or class ; a period or cycle. वर्तुळ ; मंडळ ; मंडळी ; नियमित काल. *v. i.* & *t.* to move in a circle, to revolve ; to surround. वर्तुळांत फिरणें, गिरकी मारणें, गरगर फिरणें ; घेरणें.

Circ'lĕt, *n.* ( स'र्क्लिट् )—a small circle ; a circular band as ornament for the head, a chaplet. लहान वर्तुळ ; भूषण म्हणून बांधण्याचा डोक्याचा वर्तुलाकृति पट्टा, कडें.

Cir'cuit, *n.* ( स'र्किट् )—circular or circuitous course. फेरा, फेरी.

Circū'ĭtous, *a.* ( सर्क्यू'इटस् )—going in a circuit, round-about, indirect. फेऱ्याचा, वांकडा, प्राविडी प्राणायामाचा.

Circ'ūlar, *a.* ( स'र्क्यु-लर् )—having the shape of a circle ; moving in a circle. वर्तुलाकृति ; चक्राप्रमाणें फिरणारा. *n.* a printed letter or notice sent round to many people. जाहिरात, प्रसिद्धिपत्रक, सर्क्युलर. Circularize, *v.t.* to send a circular to. नोटिस किंवा सर्क्युलर पाठविणें.

Circ'ūlāte, *v. i.* & *t.* ( स'र्क्यु-लेट् )—to go round ; to send round ; to give currency to. फिरणें ; फिरवणें ; प्रसिद्ध करणें.

Circūlā'tion, *n.* ( सर्क्यु-ले'शन् )—a movement from and back to the starting-point ; passing from place to place or hand to hand ; current coins ; the extent of sale (of newspapers, etc ). परिभ्रमण ; एका जागेवरून दुसऱ्या जागीं किंवा एका हातांतून दुसऱ्या हातांत जाणें ; चालू नाणीं ; वर्तमानपत्रें वगैरेचें विक्रीचें प्रमाण, प्रसार, फैलाव. *Circulation of blood,* रुधिराभिसरण. Circulator, *n.* प्रसारक, प्रसार करणारा. Circulatory, *a.* सर्वांना उद्देशून लिहिलेला, अभिसरणोपयोगी.

Circŭmăm'bient, *a.* ( सर्कॅमॅ'म्बि-यन्ट् )—surrounding, encompassing, being on all sides. सभोंवार असणारा, परिवेष्टक, वेढणारा.

Circumăm'būlāte, *v. t.* & *i.* ( सर्कॅमॅ'म्ब्यु-लेट् )—to walk round, to beat about the bush. सभोंवता फिरणें, प्रदक्षिणा घालणें, वळसा मारणें.

Cir'cumcīse, *v. t.* ( -z, स'र्कम्साइझ् )—to cut off the foreskin of (as Jewish or Mohammedan rite, or surgically ) ; to purify spiritually. सुंता करणें ; धार्मिक रीत्या पवित्र करणें.

Circŭmcĭ'sion, *n.* ( सर्कम्सि'झन् )—Jewish religious rite or surgical operation of cutting off the foreskin. सुंता.

Circŭm'ference, *n.* ( सर्क'म्फ-रन्स् )—the line enclosing a circle ; the distance round a thing. परिघ, घेरा, परिधि, वेढा.

Circŭmflex, *a.* & *n.* ( स'र्कम्-फ्लेक्स् )—a mark (^) over a vowel to indicate length, etc. स्वरित चिन्ह असलेला, स्वरितचिन्ह.

Circŭm'fluent, *a.* ( -ōō-, सर्क'म्-फ्लुयन्ट् )—flowing round, ambient. सर्व बाजूंना पसरणारा, सभोंवती वाहणारा.

Circumfūse', *v. t.* ( सर्कम्-फ्यू'झ् )—to pour round ; to bathe, to surround. चहूंकडे पसरणें, भोंवती ओतणें ; सभोंवार घेणें.

Circumgyrā'tion, *n.* ( सर्कम्-जाइ-रे'शन् )—turning round, rotation, turning this way and that. सभोंवती फिरणें, परिभ्रमण. [ L. *circum*, around, & *gyrare*, to turn ]

Circumjā'cent, *a.* (सर्कम्-जे'सन्ट् )—lying round, surrounding, situated around. सभोंवती असलेला, शेजारचा. [ L. *circum*, around, & *jacere*, to lie ]

Circŭmlōcū'tion, *n.* ( सर्कम्लो-क्यू'शन् )—a round about expression ; an evasive talk. प्राविडी-प्राणायाम ; चर्पटपंजरी. Circumlocutory, *a.* [ L. *circum*, around, & *locutus*, to speak ]

Circŭmnăv'igāte, *v. t.* ( सर्कम्नॅ'व्हि-गेट् )—to sail round, to pass round by water. गलबतांतून प्रदक्षिणा घालणें. Circumnavigation, *n.* गलबतांत बसून केलेली पृथ्वीप्रदक्षिणा. Circumnavigator, *n.* [ L. *circum*, around, & *navigare*, to sail ]

Circumpō'lar, *a.* ( सर्कम्पो'लर् )—about or near one of the earth's poles. पृथ्वीच्या ध्रुवासंबंधीं, पृथ्वीच्या ध्रुवाजवळ. [ L. *circum*, around, & *polus*, pole ]

Circ'ŭmscrībe, *v. t.* ( स'र्कम्स्क्राइब् )—to enclose or outline ; to mark or lay down the limits of ; to confine. घेरणें ; मर्यादा घालणें ; आळा घालणें ; मर्यादा करून देणें, मर्यादित करणें.

Circŭmscrĭp'tion, *n* —( सर्कम्स्क्रि'प्शन् )—limitation, boundary, limited district ; inscription round a coin etc. हद्द, मर्यादा, नियमन, मर्यादित स्थळ ; नाण्याच्या वगैरे भोंवतीं खोदणें.

Circŭmsō'lar, *a.* ( सर्कम्-सो'लर् )—revolving round the sun, being near the sun. सूर्याभोंवतीं फिरणारा, सूर्याजवळ असलेला.

Circ'ŭmspĕct, *a.* ( स'र्कम्स्पेक्ट् )—cautious, wary, taking everything into account. दूरदर्शी; प्रत्येक गोष्ट लक्षांत घेणारा, चौकस, सर्व बाजूंचा विचार करणारा.

Circŭmspĕc'tion, *n.* ( सर्कम्-स्पे'क्शन् )—exercise of caution, thoughtfulness. सावधानता, मागची पुढची दृष्टि.

Cir'cŭmstance, ( स'र्कम्स्टन्स् )—(*pl.*)all the surroundings of an act; a person's material welfare or situation; an occurrence or detail. भोंवतालची स्थिति, परिस्थिति; अवस्था, दशा; घडलेली गोष्ट, हकीगत. *In or under the circumstances*, since these things are so, owing to or making allowance for the circumstances. अशी परिस्थिति असल्यामुळें, अशा परिस्थितींत. *Under no circumstances*, not whatever happens, never. कांहीं झालें तरी नाहीं. *Without circumstance*, unceremoniously. बेमुरवतपणानें. शिष्टाचार न पाळतां.

Circ'ŭmstănced, *a.* ( स'र्कम्-स्टॅन्स्ड् )—in such and such circumstances. अमुक एक स्थितींत असलेला.

Circŭmstăn'tial, *a.* ( सर्कम्-स्टॅ'न्शल् )—with many details; accidental, not essential; particular, minute; inferred from the circumstances of the case. विस्तृत; आगंतुक, अनावश्यक; विपाक्षित, सूक्ष्म; परिस्थितीवरून काढलेला. Circumstantiality, *n.* आनुषंगिकत्व, आनुषंगिक माहिती, विस्तार.

Circumvallā'tion, *n.* ( सर्कम्व्हॅले'शन् )—a rampart or entrenchments made round a place. एखाद्या जागेभोंवती चोहोंकडून केलेली तटबंदी. [L. *circum*, around & *vallum*, a rampart ]

Circŭmvĕnt', *v. t.* ( सर्कम्-व्हे'न्ट् )—to overreach; to outwit, to deceive. वरचढ करणें; उलटा फसवणें, तोंडाला पानें पुसणें.

Circ'ŭs, *n.* ( स'र्कस् )—the arena for equestrian and other exhibitions; an open circle with streets converging on it; a travelling show of trained horses, etc. घोड्यांचें व इतर प्रदर्शन करण्याची जागा; सर्व रस्ते ज्या ठिकाणीं मिळतात असें उघडें मैदान; माणसें व जनावरें यांच्या कसरतींचा खेळ, सर्कस.

Cirque, *n.* ( सर्क् )—an arena, a natural amphi theatre. सर्कस, स्वाभाविक दीर्घवर्तुलाकार नाटकगृह.

Cĭrrĭpĕd, *n.* ( सि'रिपेड् )—kinds of hard-shelled animals. एका जातीचे कठीण कवचाचे प्राणी.

Cĭrrŭs, *n.* ( सि'रस् )—( *pl.* cirri, सिराइ ) very high white clouds. फार उंच असलेले शुभ्र ढग.

Cis'tern, *n.* ( सि'स्टर्न् )—a reservoir for storing water. टांकी, हौद.



Cĭ'stŭs, *n.* ( सि'स्टस् )—kind of flowering shrub, rock-rose. एक जातीचीं फुलझाडें.

Cĭt'adĕl, *n.* ( सि'ट-डेल् )—a fortress protecting or dominating a city, a strong place of arms. शहराच्या बचावाकरितां बांधलेला किल्ला, बालेकिल्ला.

Citā'tion, *n.* ( साइ-टे'शन् )—an official summons to appear as before a court, a summons; reverence, enumeration, mention. कोर्टांत हजर राहण्याविषयीं हुकूम; उतारा, अवतरण, उल्लेख.

Cite, *v. t.* ( साइट् )—to summon at law; to mention as an example, to adduce as an instance, to quote in support. सरकारच्या हुकुमानें बोलावणें; उदाहरण म्हणून पुढें करणें, आधार म्हणून देणें, उतारा घेणें.

Cĭth'ern, Cittern, *nn.* ( सि'दर्न्, सि'टर्न् )—a lute, a guitar. एक तंतुवाद्य, गिटार.

Cĭtĭ'zĕn, *n.* ( सि-टि'झेन् )—a townsman, a civilian; an inhabitant of. नगरवासी; रहिवासी. *Citizen of the world*, a cosmopolitan. जगन्मित्र, वसुधैवकुटुंबी. Citizenship, *n.* पौरजनत्व, नागरिक म्हणून असलेला हक्क.

Cĭt'rāte, *n.* ( सि'ट्रेट् )—salt of citric acid. लिंबाच्या रसाचे गुणधर्म असणारा क्षार, सिट्रिक अम्लाचें लवण.

Cĭt'rĭc ă'cĭd, *n.* (सि'ट्रिक् अॅ'सिड् )—an acid existing in the juice of the citron. लिंबाचें अम्ल.

Cĭt'ron, *n.* ( सि'ट्रन् )—the fruit of lemon kind but larger; lemon colour. महाळुंग; लिंबांचा रंग.

Cĭt'ȳ, *n.* ( सि'टि )—the important town. मोठें नगर, शहर. *Holy City*, Jerusalem, Heaven. जेरूसलेम, स्वर्ग. *Eternal City*, *City of the Seven Hills*, Rome. रोम. *Celestial City*, *Heavenly City*, *City of God*, Paradise. स्वर्ग, नंदनवन. *The City*, the business part of London. लंडन शहराचा मोठ्या व्यापाराचा भाग.

Cĭv'ĕt, *n.* ( सि'व्हिट् )—a fox-like animal with a peculiar smell. जवादी मांजर.

Cĭv'ĭc, *a.* (सि'व्हिक्)—having to do with a city, of city or citizenship, relating to civil affairs. शहराचा, नगरवासीय, नागरिक.

Cĭv'ĭcs, *n.* ( सि'व्हिक्स् )—the study of government ( esp. city government ), principles of civic duty. राजनीति.

Cĭv'ies, *n. pl.* ( सि'व्हिझ् )—civilian clothes. मुलकी खात्यांतील लोकांचे कपडे.

Cĭv'ĭl, *a.* ( सि'व्हिल् )—of a citizen community; nonmilitary; polite, obliging; not criminal. लोकव्यवहाराचा, मुलकी; सभ्य, उपकारशील; दिवाणी. *Civil servant*, a person employed by the government ( not a member of the army of king's warships ). मुलकी खात्यांतील

नोकर, मुलकी अधिकारी. *Civil list*, Parliamentary allowance for King's household & royal pensions. राजाच्या खासगी खर्चाकरितां तोडून दिलेली नेमणूक. *Civil service*, all non-warlike branches of State administration. मुलकी खात्याची नोकरी.

Civ'il war, *n.* ( सि'व्हिल् वॉर् )—a war between sections of the same state. एकाच राज्यांत दोन पक्षांची लढाई.

Civil'ian, *n.* ( सि-व्हि'लिअन् )—a person not in or of navy or army, any member of a country who is not a soldier. आरमार किंवा सैन्य यांत नसलेला अधिकारी.

Civil'ity, *n.*( सि-व्हि'लि-टि )—readiness to oblige; (*pl.*)acts of courtesy. दाक्षिण्य, सौजन्य; उपकार.

Civiliza'tion, *n.* ( सि-व्हि-लिझे'शन् )—advanced stage of social development. सुशिक्षितावस्था, सुधारणा.

Civ'ilize, *v. t.* ( सि'व्हि-लाइझ् )—to bring out of barbarism; to enlighten, to refine; to elevate in social life. रानटीपणा घालवणें; शिक्षित करणें; सुधारणें.

Clăck, *n.* ( क्लॅक् )—a sharp sound; a clatter of tongues. बडबड, हकटक; गजघंटेचा आवाज. *v. t.* to make a sharp sound. खणखण होणें, खडखडणें, जोराचा आवाज करणें.

Clăd, *a.* ( *Pa. t. & p. p.* of Clothe ) ( क्लॅड् )—clothed, covered; adorned, endowed with. कपडे घातलेला; अलंकृत, युक्त.

Claim, *v. t.* ( क्लेम् )—to demand as one's due; to proclaim; to have a right to; to assert claim; to assert. हक्क सांगणें; जाहीर करणें; अधिकार असणें; हक्कानें मागणें; मतिपादून करणें. *n.* a demand of a right or supposed right; a right or title *to*. हक्क, वारसा, अधिकार. *A claim-jumper*, an appropriator of another's claim. दुसऱ्याचा हक्क हिरावून घेणारा.

Clai'mant, *n.* ( क्ले'मन्ट् )—a claiming party, (esp. in a law-suit), one who asserts a right or title. हक्क सांगणारा, वारसा सांगणारा, वारसदार.

Clairvoy'ance, *n.* ( क्लेअर्-व्हॉ'यन्स् )—faculty of seeing mentally what is happening or exists out of sight; exceptional insight. दृष्टीच्या आड असलेल्या वस्तु मनानें पाहण्याची शक्ति; अलौकिक अंतर्दृष्टि. Clair'voyant, *n. & a.* सूक्ष्मदर्शी, अंतर्ज्ञान असलेला.

Clăm, *n.* ( क्लॅम् )—an edible shell-fish. एक जातीचा शिंपींतला मासा.

Cla'mant, *a.* ( क्ले'मन्ट् )—noisy, insistent; urgent. मोठ्यानें गलबला करणारा; जरूरीचा, निकडीचा.

Clămm'y, *a.* ( क्लॅ'मि )—soft and sticky, coldly damp and adhesive. चिकट, चिकचिकीत.

Clăm'orous, *a.* ( क्लॅ'मरस् )—noisy with the tongue, vociferous. गोंगाट करणारा, गलबल्या.

Clăm'our, *n.* ( क्लॅ'मर् )—a shouting, confused noise; a loud protest or demand. गलबला, गोंगाट; जोराचा निषेध किंवा जोरानें सांगणें. *v. i.* to vociferate, to make a confused noise. गोंगाट करणें, गलबला करणें, ओरड करणें. *To clamour down*, to silence. स्तब्ध करणें, गप्प बसवणें.

Clămp, *n.* ( क्लॅम्प् )—a brace or band of iron; a gripping appliance tightened by a screw. लोखंडाची पट्टी, आधारपट्टी, बंधन; पकड. *v. t.* to strengthen or fasten with a clamp. सांधपट्टीनें पक्क करणें, पकडीनें घट्ट धरणें.

Clăn, *n.* ( क्लॅन् )—Scotch highlanders with a common ancestor; a tribe; a family holding much together; a party or coterie. एकच पूर्वज असलेले स्कॉटलंडमधील हायलंडर लोक; टोळी; कुळ, घराणें; मित्रमंडळ, कंपू. Clannish, *a.* टोळीचा, विशिष्ट कुळाच्या फाजील अभिमान असणारा.

Clăndes'tine, *a.* ( क्लॅन्डे'स्टिन् )—done secretly and wrongfully or unlawfully, surreptitious, secret. गुपचुप केलेला, गुप्त, चोरीचा.

Clăng, *n.* ( क्लॅङ् )—a loud resonant metallic sound. मोठा खणखण आवाज. *v. i.* to make a clang. ठणठण वाजणें, खणखण आवाज करणें.

Clăn'gour, *n.* ( क्लॅं'गर् )—succession or prevalence of clanging noises, a continued clanging. सारखा खणखण वाजणारा आवाज.

Clănk, *n.* ( क्लॅङ्क् )—a sound as of a heavy chain shaken. जड सांखळीचा वगैरे होणारा आवाज, झणत्कार. *v. t. & i.* to make a clank, to cause to make a clank. झणत्कार करणें किंवा होणें.

Clăn'ship, *n.* ( क्लॅ'न्-शिप् )—prevalence of a clannish feeling. आपापल्या टोळीसंबंधानें असलेला फाजील अभिमान.

Clăp, *v. t. & i.* ( क्लॅप् )—to strike palms loudly together; to strike with a quick motion; to flap ( a wing ) audibly. टाळ्या वाजवणें; जोरानें ठोकणें; पंख फडफडवणें. *n.* an explosive noise; a spell of hand-clapping. गडगडाट, मेघगर्जना; टाळ्यांचा गजर, दर्पगर्जना. *To clap on the back*, to slap on the back in encouragement or congratulation. उत्तेजनार्थ किंवा अभिनंदनार्थ पाठ थोपटणें. *To clap up* (*peace* or *bargain*), to make hastily or carelessly. धांदलीनें किंवा निष्काळजीपणानें करणें. *To clap wings on*, to catch sight of. दिसणें, दृष्टीस पडणें.

Clăp'board, *n.* ( क्लॅप्-बोअर्ड् )—a narrow board for weather-boarding frame buildings. ( लांकडाचीं घरें झांकण्याकरितां केलेला ) पातळसा तक्ता.

Clăp'nĕt, *n.* ( क्लॅप्-नेट् )—a net closed by a pulling strip. दोरी ओढल्याबरोबर बंद होणारें जाळें.

Clăpp'er, *n.* ( क्लॅपर् )—one that claps; the tongue or striker of a bell; the hand or wind rattle for scaring birds. टाळी वाजवणारा; ( घंटेच्या ) लोळा, टोला; पक्ष्यांना भिवविण्याकरितां केलेला आवाज.

Clăp'per-claw, *v. t.* ( क्लॅपर्-क्लॉ )—to scratch and hit; to abuse, to criticize spitefully. ओरखडणें आणि मारणें; निंदा करणें, द्वेषानें टीका करणें.

Clăp'trăp, *n.* ( क्लॅप्-ट्रॅप् )—language or doings meant to catch applause. टाळ्या मिळण्याकरितां वापरलेली भाषा. *a.* showy, playing to the gallery. शाबासकी मिळविण्याकरितां केलेला, खोटा, दिखाऊ, बेगडी.

Clăque, *n.* ( -k, क्लाक् )—a hired body of applauders, hired applauders. भाडोत्री टाळ्या पिटणारी मंडळी.

Clă'rendon, *n.* ( क्लॅरेन्डन् )—a thick-faced type. वाटोळ्या वळणाच्या आंखूड टाइप, क्लॅरेंडन टाइप.

Clă'ret, *n.* ( क्लॅरेट् )—kinds of red wine imported from Bordeaux. एक प्रकारची तांबूस दारू, क्लॅरेट दारू. *To tap one's claret*, to make one's nose bleed with a blow of the fist बुक्का मारून नाकांतून रक्त काढणें.

Clă'rĭfȳ, *v. t. & i.* ( क्लॅरिफाय् )—to free from obscurity; to free from impurities; to become transparent. साफ करणें; निर्मळ करणें; पारदर्शक किंवा अगदीं स्वच्छ करणें. *To clarify butter*, लोणी कढवणें, तूप करणें.

Clă'rĭnĕt, *n.* ( क्लॅरिनेट् )—a reed instrument with holes and keys; a wooden single reed organ-stop. एक लहान वाद्य; लहान कर्णा. Clarinettist, *n.* बांसरी वाजविणारा.

Clă'rĭon, *n.* ( क्लॅरिअन् )—a trumpet sound, a shrill trumpet; a rousing call to action. रणशिंग, तुतारी, सनई; उद्योगाला लागण्याबद्दल जोराचें आव्हान.

Clarĭŏnet', *n.* ( क्लॅरि-ओनेट् )—a clarinet, a reed instrument with holes and keys. बांसरी, सनई, लहान कर्णा.

Clă'rĭtȳ, *n.* ( क्लॅरिटि )—brilliancy, splendour, clearness. स्वच्छता, स्पष्टता, प्रशस्तपणा.

Clärk'ia, *n.* ( क्लार्किआ )—a garden flower. एक बागेंतील फूल.

Clăsh, *n.* ( क्लॅश् )—a loud broken sound as of cymbals; collision; conflict. झांजेच्याप्रमाणें मोठा आवाज; एकमेकांच्या धक्का, टक्कर; विरोध. *v. t. & i.* to make a clash; to be at variance with; to bring together with clash. मोठा आवाज करणें; विरुद्ध असणें; एकमेकांवर आपटणें.

Clăsp, *n.* ( क्लास्प् )—a contrivance for fastening; a buckle, etc.; a grip of arms or hand; an embrace, a hand-shake. फांसा, अडकवण; बकल; घट्ट धरणें, पकड; आलिंगन, हस्तांदोलन. *v. t. & i.* to fasten up; to encircle, to embrace, to grasp. अडकवणें; घेरणें, आलिंगन देणें, घट्ट धरणें. *A clasp-knife*, a folding knife with a catch fixing the blade when open. मिटतां येणारी सुरी किंवा चाकू. *To clasp hands*, to shake hands emotionally, to make common cause with. भावनापूर्वक हस्तांदोलन करणें, एकाच कार्याच्या साथीदार होणें. *To clasp one's hands*, to interlace fingers. हातांत हात घालणें.

Clăss, *n.* ( क्लास् )—rank or order of society; a set of students taught; any set of persons or things differentiated by quality from others. जात; वर्ग; निरनिराळ्या दर्जाचे लोक किंवा वस्तु. *v. t.* to assign to a class वर्ग करणें, वर्गवारी लावणें, विल्हेवार लावणें. *Class-book*, a book designed for use by students in a class. वर्गाकरितां नेमलेलें पुस्तक, वर्गपुस्तक.

Clăss'ic, *a.* ( क्लॅसिक् )—of allowed excellence, approved, standard; of the first order or rank. उत्तम, सर्वमान्य, सरस, प्रमाणभूत; पहिल्या दर्जाचा. *n.* classic writer or artist; ancient Greek or Latin writer; a work of art which will always be considered as good, any great literary work; (*pl.*) study of ancient Greek and Latin. पहिल्या दर्जाचा लेखक किंवा कलाभिज्ञ; प्राचीन ग्रीक किंवा लॅटिन लेखक; कोणत्याहि कलेचें श्रेष्ठ काम, कोणताहि मोठा विद्वत्तामधुर ग्रंथ; ( अने० ) प्राचीन ग्रीक किंवा लॅटिनचा अभ्यास.

Clăss'ical, *a.* ( क्लॅसिकल् )—of the standard Greek and Latin authors; ( of education ) based on Greek and Latin authors. प्रमाणभूत ग्रीक आणि लॅटिन ग्रंथकारांचा; ग्रीक व लॅटिन ग्रंथकारांचें ( अध्ययन ).

Clă'ssicism, *n.* ( क्लॅसिसिझम् )—conformity to or adaptation of classical style; a classical idiom or expression, a Greek or Latin idiom; classical scholastic. सर्वोत्कृष्टतेचें ज्ञान; सर्वोत्कृष्ट ग्रंथांत वापरलेली भाषासरणी; सर्वमान्य विद्वत्ता. Classicist, *n.* ललितकलांतील सर्वश्रेष्ठ कृतींचा अभिमानी.

Clăssĭfĭcā'tion, *n.* ( क्लॅसि-फि-के'शन् )—systematic arrangement in classes. वर्गवारी, विल्हेवारी, मतवारी, वर्गीकरण. Classificatory, *a.*

Clăss'ĭfȳ, *v. t.* ( क्ला'सि-फाय् )—to arrange or distribute in classes, to class. वर्गवारी लावणें, वर्ग करणें.

Clă'ssȳ, *a.* ( क्ला'सि )—( Sl. ) superior. उत्तम प्रतीचा, अधिक चांगला.

Clatt'er, *n.* (क्लॅ'टर्)—a rattling sound; a sound; a noisy talk. खडखडाट, गोंगाट. *v. i.* to make a clatter, to fall with a clatter. खडखडणें, खडखडून पडणें, फडकडणें.

Clause, *n.* ( क्लॉझ् )—a single proviso in treaty or law or contract; a sentence or part of a sentence. कलम, पोटकलम; वाक्य किंवा वाक्याचा भाग, पोटवाक्य.

Claus'tral, *a.* ( क्लॉस्ट्रल् )—of the cloister monastic, narrow. मठाचा, मठासंबंधीं, आकुंचित.

Claustrophō'bĭa, *n.* ( क्लॉस्ट्रोफो'बिआ )—morbid dread of closed places. बंद असलेल्या ठिकाणाबद्दल मनाला वाटणारी धास्ती.

Clave, *Pa. t.* of Cleave.

Clăv'ĭchord, *n.* ( -k-, क्लॅ'व्हिकॉर्ड् )—the first string-instrument with a keyboard ( predecessor of piano ). पिआनोच्या पूर्वीचें पहिलें तंतुवाद्य.

Clăv'ĭcle, *n.* ( क्लॅ'व्हि-कल् )—collar-bone; merry-thought of birds. गळ्याभोंवतालचें हाड; पक्ष्याच्या छातीचें कांट्यासारखें असलेलें हाड. Clavicular, *a.*

Claw, *n.* ( क्लॉ )—the pointed horny nail of a beast's or bird's foot; an ugly hand; a grappling iron. पंजा, कुरूप किंवा ओंगळ हात; नखी. *v. t.* & *i.* to scratch or maul with claws or finger-nails; to clutch hold of. नखांनीं तोडणें किंवा बोचकरणें; पंजांत धरणें, पंजांनीं बोचकरणें. *To pare or cut the claws of*, to disarm. शस्त्रास्त्रें काढून घेणें. *Claw-hammer*, a hammer with bent split end for extracting nails. खिळे किंवा चुका काढण्याची हातोडी.

Clay, *n.* (क्ले)—stiff tenacious earth; substance of the body. चिकणमाती; शरीरद्रव्य. *White clay*=गोपीचंदन. *To wet or moisten one's clay*, to drink. पिणें, दारू पिणें. *Clay-pipe*, tobacco-pipe made of clay. तंबाकू ओढण्याचा पाइप किंवा चिलीम. *Clay-cold*, cold as clay ( usually of the dead ). मातीसारखा थंड, अचेतन, निर्जीव. Clay'ey, *a.* ( क्ले'इ )—of clay. मातीचा, शेडीचा.

Clay'more, *n.* ( क्ले'मोअर् )—an ancient Scottish two-edged broad-sword. जुनी स्कॉटिश लोक वापरीत असलेली दुधारी तलवार, तेलंगणी तलवार.

Clean, *a.* ( क्लीन् )—free from dirt; unsoiled; free from defilement or disease; complete, decisive. मलरहित; निर्मळ; कलंकरहित, रोगहीन; पूर्ण निर्णयात्मक. *adv.* completely, altogether. पूर्णपणें, सर्वथा. *v. t.* to make clean, to cleanse. साफ करणें, स्वच्छ करणें. *n.* process of cleaning. शुद्ध करण्याची रीत. *Clean hands, Clean-handed, Clean-handedness*, innocence, innocent. निरपराध, निर्दोष, निरपराधी, निर्दोषी. *Clean-fingered*, unbribed. लांच न घेतलेला. *Clean slate*, freedon from all commitments. कोणत्याहि बंधनापासून मुक्तता. *Clean tongue*, abstinence from foul talk. कधींहि वगैरहे न बोलणें, सरळ किंवा गोड वाणी. *To show a clean pair of heels*, to escape by speed. पळ काढणें, निसटून जाणें, निघून जाणें. *To make a clean breast of*, to confess. मोकळया मनानें कबूल करणें. *Clean-cut*, sharply outlined. स्पष्ट रूपरेषा असलेला. *To clean up*, to put things tidy. व्यवस्थेशीर ठेवणें. *To clean out*, to empty, to strip. उपसा करणें, धुवून टाकणें; निष्कांचन करणें.

Clean'lȳ, *adv.* ( क्ली'न्-लि )—in a clean manner. स्वच्छ किंवा शुद्ध तऱ्हेनें. *a* ( क्ले'न्लि ) habitually clean; attentive to cleanness. नेहमीं स्वच्छ; स्वच्छतेकडे लक्ष असलेला. Cleanlily, *adv.* ( क्ले'न्लिलि )—स्वच्छतेनें. Cleanliness, *n.* ( क्ले'न्लिनेस् )—स्वच्छता, साफसुफी.

Cleanse, *v. t.* ( क्लेन्झ् )—to purify from sin; to make clean, to remove filth. पापापासून शुद्ध करणें; स्वच्छ करणें.

Clear, *a.* ( क्लिअर् )—transparent; not clouded; distinct, intelligible, manifest; not dim; well-defined, unobstructed, open. स्वच्छ; निरभ्र, स्पष्ट, समजण्याजोगा, उघड; अंधुकतारहित; स्पष्टतऱ्हेनें मांडलेला, निर्विघ्न, मोकळा. *v. t.* & *i.* to make or become clear; to show or declare innocent; to remove any encumbrance; to make a sum as net gain. स्पष्ट करणें किंवा होणें; निरपराधी दाखविणें; अडचण दूर करणें; निव्वळ नफा मिळविणें. *Clear conscience*, feeling that one is innocent. निर्दोष अंतःकरण. *Clear-sighted*, *a.* विशद्-बुद्धीचा, मर्मज्ञ, दूरदर्शी. *Clearsightedness*, *n.* *The coast is clear*, no one is on the coast to see or interfere. किनारा निर्भय आहे. *Clear-cut*, well-defined. स्पष्ट, स्पष्टपणें निर्दिष्ट केलेला. *To clear one's throat*, to clear the throat by slight coughing. घसा साफ करणें. *To clear the decks for action*, to make the decks ready to fight. लढाईकरितां जहाजाचा वरील भाग मोकळा करणें. *To clear*

*land*, to cut down trees etc. for cultivating. झाडें वगैरे कापून जागा साफ करणें. *To clear out of the way*, to remove an obstruction. अडथळा दूर करणें. *To clear away*, to remove, (mist) to disappear. काढून टाकणें, साफ करणें; नाहींसें होणें. *To clear off*, to get rid of, to melt away, to go away. मोकळा होणें, वितळून जाणें, नाहींसा होणें, निघून जाणें. *To clear out*, to empty; to make off. मोकळें करणें; निघून जाणें, वाट धरणें. *To clear up*, to solve (a mystery), to make tidy; (weather) to grow clear. सोडविणें, नीट करणें, खुलासा करणें; स्वच्छ होणें. *To keep clear of*, च्या भानगडींत न पडणें, पासून अलिप्त राहणें. *To get clear of*, संकटांतून पार पडणें.

Clear'ance, *n.* (क्लि'अ-रन्स्)—removal of obstructions; selling or throwing away things not needed; the distance between a moving object and some other thing, space allowed for the passing of two parts; (certificate of) clearing of a ship at the Custom-House. अडथळा दूर करणें; वाईट माल काढून टाकणें; दोन पदार्थांतील अंतर; गलबत तपासल्याचा दाखला.

Clear'ing, *n.* (क्लि'अरिंग्)—a piece of land cleared for cultivation. लागवडीकरितां साफ केलेली जागा.

Clear'lў, *adv.* (क्लि'अर्लि)—yes, no doubt, evidently, obviously, explicitly. होय, खात्रीनें, निश्चयपूर्वक.

Clear'-sighted, *a.* (क्लि'अर्-साइटेड्)—having acuteness of sight, discerning. हुशार, दीर्घदृष्टि, मर्मज्ञ.

Cleat, *n.* (क्लीट्)—a tightening wedge; a piece of wood or iron bolted on for fastening ropes to. दोरीला ताण देण्याकरितां दोरींत आडवी घातलेली लाकडी किंवा लोखंडी पट्टी; (जहाजाच्या बाजूवर मारलेलें दोरी बांधण्याचें) लांकडी किंवा लोखंडी दुभेळकें.

Cleav'age, *n.* (क्ली'व्हिज्)—the way in which a thing tends to split. तडकण्यासारखा दगड वगैरेंत आलेला ठिसूळपणा.

Cleave, *v. i.* (*Pa. t.* Cleaved *or* clave; *p. p.* cleaved) (क्लीव्ह)—to be faithful to, to hold together; to stick, to adhere; *v. t. & i.* (*Pa. t.* Clove *or* cleft, *p. p.* Cloven *or* cleft) to split, to divide, to chop asunder; to make way through. प्रेमानें चिकटून राहाणें; चिकटणें; तोडणें; तुकडे करणें; मधून मार्ग काढणें. *In a cleft stick*, in a tight place allowing neither retreat not advance. मागें किंवा पुढें जाणें शक्य नाहीं अशा जागेंत. *To show the cloven hoof*, to reveal an evil nature. वाईट भाव उघड करणें.

Cleav'er, *n.* (क्ली'व्हर्)—butcher's chopper. खाटिकाचा सुरा.

Clea'vers, *n.* (used as *sing.* or *pl.*) (क्ली'व्हर्झ्)—a creeper sticking to clothes. कपड्यांना चिकटून राहणारी एक वेल.

Cleek, *n.* (क्लीक्)—an iron-headed golf-club. लोखंडी तोंड असलेला गोल्फ खेळण्याचा एक सोटा.

Clĕf, *n.* (क्लेफ्)—a symbol showing the pitch of stave in music. गायन शास्त्रांतील एक खूण.

Cleft, *Pa. t. & p. p.* of Cleave.

Clĕft, *n.* (क्लेफ्ट्)—split, fissure in earth. भेग, भगदाड, चीर, फट.

Cleg, *n.* (क्लेग्)—a large grey fly, a horse-fly. घोडमाशी, डांस.

Clem, *v. t. & i.* (क्लेम्)—to starve. उपाशीं मारणें, उपासमार होणें, अन्नान्नदशा होणें.

Clĕm'atĭs, *n.* (क्ले'मटिस्)—a flowering climbing shrub. एक फुलणारी वेल.

Clĕm'ĕncў, *n.* (क्ले'मेन्सि)—merciful treatment or feeling, mercifulness, mercy; mildness of temper or weather. दया, कृपा, क्षमा; सौम्यता.

Clĕm'ĕnt, *a.* (क्ले'मेन्ट्)—merciful, mild, lenient. दयाळू, कृपाशील; सौम्य, उदार.

Clĕnch, Clinch, *v. t. & i.* (क्लेंच्, क्लिंच्)—to secure a nail by hammering the point sideways; to close tight; to make conclusive, to confirm; to come to quarters too close for a full-arm blow. खिळा पळचणें; (मूठ वगैरे) घट्ट मिटून घेणें; समर्थन करणें, नक्की करणें, कायम करणें; ठोंसा देतां येणार नाहीं इतक्या जवळ जाणें. *n.* clenching state, a grip. घट्ट धरणें, दृढ ग्रह. *Clencher*, *Clincher*, one that clenches; a remark or argument that triumphantly settles a question. घट्ट धरणारा; एखाद्या प्रश्नाचा यशस्वी रीतीनें निकाल करणारें विधान.

Clere'story, *n.* (क्लि'अर्-स्टोरि)—the part of a wall of a cathedral or large church (with a series of windows) above aisle roofs. मोठ्या चर्चच्या भिंतीचा एक भाग.

Cler'gў, *n.* (क्ल'र्जि)—all persons ordained for religious orders. पाद्री लोक, ख्रिस्ती आचार्यमंडळ. [*The clergy* usually has *pl.* verb. *A clergy* (*i. e.* the clergy of a country or church) has usually *sing.* verb.] *Benefit of clergy*, exemption from trial by secular court, and later for sentence for first conviction, enjoyed by all who could read. लौकिक कोर्टांच्या चौकशीपासून व ज्या कोणाला

वाचतां येतें त्या सर्वांना प्रथम झालेल्या शिक्षेपासून सुटका.

Cler'gyman, *n.* (क्ल'र्जि-मन्)—a man in holy orders. पाद्री.

Clĕ'ric, *n.* (क्ले'रिक्)—a clergyman. खिस्ती धर्माधिकारी, पाद्री. *a.* of clergy. खिस्ती धर्माधिकाऱ्यासंबंधीं.

Clĕr'ical, *a.* (क्ले'रि-कल्)—of a clergyman; of clerks. पाद्रीलोकांसंबंधीं; कारकुनांचा, कारकुनी. *Clerical error*, an error in writing out. लिहितांना झालेली चूक. *n.* member of a clerical party in parliament etc. पार्लमेन्ट वगैरे मध्यें असलेला धर्माधिकारि सभासद. *Clericalism, Clercalish, nn.* To clericalize, *v. t.*

Clerk, *n.* (क्लार्क्)—a person employed to keep accounts, etc.; a clergyman; a scholar or penman. कारकुन; पाद्री; विद्वान, लेखक. *v. i.* to act as a clerk. कारकून किंवा पाद्री म्हणून काम करणें. Clerkess, *n.*; Clerkly, *a.* good in penmanship. लेखणींत तरबेज. *Clerk of the works*, overseer of materials etc. in buildings done by contract. कॉन्ट्रॅक्टनें दिलेल्या इमारतीच्या कामांत सामान वगैरेवर देखरेख ठेवणारा. Clerk'ship, कारकुनी पेशा.

Clĕv'er, *a.* (क्ले'व्हर्)—quick and neat in movement; skilful, ingenious. हुशार, चलाख; चतुर, बुद्धिमान. Cleverly, *adv.*; Cleverness, *n.*

Clew, *n.* (क्लू)—a ball of thread or yarn; the lower or apt corner of a sail by which it is extended. सुताची गुंडी; चौकोनी शिडाचा खालील भाग. *To clew up*, to draw the lower ends of sails to the upper yard or mast ready for furling. शीड गुंडाळण्याकरितां त्याचीं खालचीं टोकें वर करणें.

Clich'é, *n.* (क्ली'शे)—a hackneyed literary phrase. कायमच्या ठशाचा ठोकळा, नेहमींचा वाक्संप्रदाय.

Clĭck, *n.* (क्लिक्)—a sharp sound; a catch in machinery. चकचक; घड्याळाची किंवा दुसऱ्या यंत्राची खीळ. *v. i.* to make a sharp sound; to secure one's object. टिक टिक असा आवाज करणें; आपला हेतु साध्य करणें.

Clī'ent, *n.* (क्ला'इ-अन्ट्)—a person using the services of a lawyer or other professional man; a customer. पक्षकार, अशील; कुळ, गिऱ्हाइक, आश्रित लोक.

Clī'entēle, *n.* (क्ला'इ-एन्टील्)—a person's dependents; customers or supporters (of a physician, shop, theatre, etc.). आश्रित लोक; पक्षकार, असामी, अशील, आश्रय देणारे.

Clĭff, *n.* (क्लिफ्)—a steep rock-face (usually overhanging the sea). कडा, सुळका, पहाड. *Cliffsman*, a skilled climber. कुशल चढणारा.

Clīmăctē'rĭc, *a.* (क्लाइमॅक्टे'रिक्)—constituting a crisis, critical; occurring at the period of life (45 to 60) at which the vital force begins to decline. आणीबाणीचा, जिवावरचा; आयुष्यातील उतरत्या वयांत होणारा. *n.* the critical period in life. आयुष्यांतील आणीबाणीची वेळ, घातवर्ष. *The grand climacteric*, 63rd year. वयाचें त्रेसष्टावें वर्ष.

Clī'māte, *n.* (क्ला'इ-मेट्)—a place's weather characteristics; the region of certain climate. हवापाणी, हवामान, देशप्रकृति; अमुक एक हवामानाचा प्रदेश. Climatic, *a.* हवापाण्या-संबंधीं. Climato'logy, *n.* हवाशास्त्र, हवामानशास्त्र.

Clī'măx, *n.* (क्ला'इ-मॅक्स्)—an ascending scale; a series arranged in climax; culmination, apex. उत्तरोत्तरोत्कर्ष; उत्तरोत्तर श्रेणी; शिखर, शेवट, कळस, कमाल.

Clīmb, *v. t. & i.* (क्लाइम्)—to make way up; to mount slowly; to go up a wall or other support by clinging; to rise in social scale. चढणें; आरोहण करणें; भिंतीच्या वगैरे आधारानें वर जाणें; समाजांत दर्जा वगैरे वाढवणें योग्यतेला चढणें. *To climb down*, to descend; to retreat from the position taken up, to give in. खालीं उतरणें; माघार घेणें, मागें घेणें. *n.* a piece of climbing; the place to be climbed. चढण; चढण्याची जागा.

Clīm'ber, *n.* (क्ला'इमर्)—one who climbs; climbing-plant; a bird that climbs. चढणारा; वेल; चढणारा पक्षी.

Clīme, *n.* (क्लाइम्)—a region, tract, country. प्रदेश, ठिकाण.

Clinch, Clincher. See Clench, Clencher.

Clĭng, *v. i.* (क्लिंग्)—to maintain, to grasp, to to keep hold, to adhere closely. चिकटून राहणें, आश्रय धरणें, कवटाळणें.

Cling'stōne, *n.* (क्लिंग्-स्टोन्)—a kind of peach or nectarine in which flesh adheres to stone. मोठी बी असलेलें एक गोड फळ.

Clĭ'nĭc, *n.* (क्लि'निक्)—clinical method of teaching; a class taught at the hospital bed-side; a patient in bed. रोग्याला समक्ष दाखवून शिकविण्याची पद्धत; अशा तऱ्हेनें शिकव-लेला वर्ग; रोगी.

Clĭnĭ'cal, *a.* (क्लि-नि'कल्)—of or at the sick-bed. आजारी मनुष्यासंबंधीं किंवा त्याच्याकरितां. *Clinical thermometer*, a thermometer for taking patient's temperature. आजारी मनु-ष्याचें उष्णतामान पाहण्याचें यंत्र, थरमॉमिटर.

सारखी असणारी वस्तु; अगदीं खालच्या प्रतीचा कानिष्ठ उमराव. *v. t. & i.* to act as a companion to, to associate with. सोबती होणें, सोबत करणें. *Companion-hatch*, wooden covering over companion-way. कॅबिनकडे जाणाऱ्या जिन्यावरील लांकडी छपर. *Companion-hatchway*, an opening in the deck leading to cabin. डेकवरून कॅबिनकडे जाण्याचा रस्ता. *Companion ladder*, a ladder from deck to cabin. डेकवरून कॅबिनकडे जाण्याची शिडी. *Companion-way*, staircase to cabin. कॅबिनकडे जाण्याचा जिना.

**Compă'nionable.** *a.* ( कॅॅम्'निअनेब्ल् )—sociable. सहवास करण्याला योग्य, सहवासयोग्य.

**Compăn'ionship,** *n.* (कम्'प्यन्-शिप्)—fellowship, association. सख्य, मित्रत्व, साहचर्य.

**Com'panў,** *n.* (कंम्पनि)—being with another or others; persons assembled together; guest; body of persons combined for commercial or other end; a group of 100 to 200 men in army commanded by a captain. संगति, साहचर्य, सहवास; मंडळी; पाहुणा; व्यापारादिकांकरितां एकत्र जुळलेली मंडळी, कंपनी; सैन्याची एक तुकडी, कंपनी. *In company*, not alone. संगें किंवा बरोबर कोणी आहे असा. *To bear or keep a person company*, to accompany a person. एखाद्याबरोबर जाणें. *To weep for company*, to weep because one's companion weeps. आपला सोबती रडतो म्हणून रडणें. *To keep company*, to associate as lovers. प्रेमी जनांप्रमाणें एकमेकांबरोबर असणें, संगत धरणें. *To do in good company*, because better men have done the same. चांगलीं माणसें तसें करतात म्हणून तसें करणें. *Company manners*, the artificial behaviour put on before stranger. परकी माणसापुढें केलेली दिखाऊ-कृत्रिम वागणूक. *Ship's company*, the whole crew of the ship. जहाजावरील सर्व कामगार लोक. *Bad company leads to ruin*, असंगाशीं संग आणि प्राणांशीं गांठ.

**Cŏm'pārable,** *a.* ( कॉॅम्'पे-रेब्ल् )—susceptible of comparison *with*; fit to be compared *to*. समतोल; तुलना करण्याजोगा, तुलनीय.

**Compă'rātive,** *a.* ( कम्'रे-टिव्ह् )—working or perceiving by comparison; not absolute. तुलनात्मक; अपूर्ण.

**Compare',** *v. t. & i.* ( कम्पे'अर् )—to liken to; to estimate similarity of; to put side by side for comparison; to bear comparison with. बरोबरी करणें; साम्य दाखविणें; तुलना करणें; तुल्य किंवा बरोबरीचा असणें. *To compare notes*, to exchange views. परस्पर विचारविनिमय करणें.

**Compă'rĭson,** *n.* ( कम्'रिझन् ) – comparing; a simile or illustration. बरोबरी, तुलना; उपमा. *In comparison with*, compared to. ०शीं तुलना केली असतां. *Degrees of comparison*, positive, comparative and superlative. विशेषणांचा व क्रियाविशेषणांचा तरतमभाव.

**Compărt'mĕnt,** *n.* (कम्पा'र्ट्-मेन्ट्)—a division; space partitioned off. निराळा भाग; विभाग, निराळी खोली.

**Com'pass,** *n.* (कं'म्पस्)—circuit, extent, area, range; an instrument for describing circles on paper. फेरा किंवा वळसा, आटोका, टप्पा, आवांका; वर्तुळें काढण्याचें यंत्र, कंपास. *v. t.* to go round, to surround, to hem in, to attain, to procure, to accomplish, to bring about. घेरा किंवा वेढा घालणें; प्राप्त करणें, घडवून आणणें. *Within the compass of*, inside, not beyond. आंत, आवाक्यांत.

**Compă'ssion,** *n.* (कम्'शन्)—pity, sympathy. दया, करुणा. *To have compassion on*, दया दाखवणें.

**Compă'ssionāte,** *a.* (कम्'शनेट्)—feeling or showing compassion. दयाळू, दयाशील. *v. t.* to regard or treat with compassion. दया करणें, दयेनें वागविणें.

**Compăt'ible,** *a.* (कॉॅम्'टिबल्)-consistent; suitable, agreeable with. जुळणारा; अविरुद्ध, अनुरूप.

**Cŏmpăt'riot,** *n.* (कॉॅम्'ट्रिअट्)-fellow-countryman, one from the same country. स्वदेशाचा मनुष्य, स्वदेशबांधव.

**Cŏmpeer',** *n.* (कॉॅम्पि'अर्)—an equal, peer; comrade. समान दर्जाचा; सोबती; भाई, मित्र. [ L. *com*, with; & *par*, equal. ]

**Compĕl',** *v. t.* (कम्पे'ल्)—to force or constrain; to bring about irresistibly, to bring about (an action) by force. भाग पाडणें; करावयाला लावणें.

**Cŏmpĕn'dīous,** *a.* (कॉॅम्पे'न्डि-अस्)—abridged, brief, containing much in a little space, brief but comprehensive. थोडक्यांत आणलेला, संक्षिप्त; संक्षेपरूप; सारभूत.

**Cŏmpĕn'dīŭm,** *n.* (कॉॅम्पे'न्डि-अम्)—an abridgement or summary, abstract, epitome. संक्षेप, सारांश. (*pl.* compendiums, compendia)

**Cŏm'pĕnsāte,** *v. t. & i.* (कॉॅ'म्पिन्सेट्)—to counterbalance; to recompense, to make up for, to pay for. समतोल करणें किंवा होणें; भरून देणें, भरपाई करणें. *Compensa'tor*, *n.* तोटा भरून देणारा. *Compensa'tory*. *a.* हानिपूरक, भरपाई करणारा. [ L. *com*, *con*, together; & *pensare*, *pensatum*, to weigh. ]

**Cŏmpĕnsā'tion,** *n.* (कॉॅम्पिन्से'शन्)—that which compensates. नुकसानभरपाई, मोबदला.

**Compete'**, *v. i.* (कॉम्पी'ट्)—to strive against others; to contend for a prize. दुसऱ्या विरुद्ध प्रयत्न करणें; चढाओढ करणें; यश मिळविण्याची खटपट करणें.

**Cŏm'petence**, *n.* (कॉ'म्पि-टेन्स्)—competent ability; a sufficiency. लायकी, कार्यक्षमता; सत्ता, अधिकार; निर्वाहापुरतें धन. *Com'petency*, *n.*

**Cŏm'petent**, *a.* (कॉ'म्पिटन्ट्)—having the necessary qualifications; open or permissible; qualified for. कार्यक्षम; चालण्याजोगा, योग्य; अधिकृत.

**Cŏmpeti'tion**, *n.* (कॉम्पिटि'शन्)—competing; striving against; contest. स्पर्धा; चढाओढ; अहमहमिका.

**Compĕti'tive**, *a.* (कॉम्पेटि'टिव्ह्)—pertaining to competition. चढाओढीचा, चढाओढीसंबंधीं.

**Compĕti'tor**, *n.* (कॉम्पेटि'टर्)—one who competes, a rival. स्पर्धा करणारा, प्रतिस्पर्धी, उमेदवार.

**Cŏmpilā'tion**, *n.* (कॉम्पिले'शन्)—that which is compiled; a book. संग्रह केलेलें; संग्रहग्रंथ.

**Compīle'**, *v. t.* (कम्पा'इल्)—to collect together, to collect and arrange facts together. संग्रह करणें, जमवून एके ठिकाणीं करणें.

**Complā'cĕncy̆**, *n.* (कम्प्ले'सेन्सि)—pleasure; self-satisfaction; gratification. आनंद; संतोष; प्रसन्नता.

**Complā'cent**, *a.* (कम्प्ले'सन्ट्)—self-satisfied, satisfied with oneself; in pleasant mood. स्वसंतुष्ट; प्रसन्नचित्त, समाधानी.

**Complain'**, *v. i.* (कम्प्ले'न्)—to bewail; to make a complaint; to inform against. दुःख करणें; फिर्याद करणें; तक्रार सांगणें.

**Complain'ant**, *n.* (कम्प्ले'नन्ट्)—one who complains, a plaintiff in certain suits. तक्रार करणारा, फिर्यादी.

**Complaint'**, *n.* (कम्प्लें'न्ट्)—statement that one is aggrieved or dissatisfied; formal protest; bodily ailment. तक्रार, फिर्याद; कायदेशीर निषेध; रोग, आजार.

**Cŏmplaisănce'**, *n.* (कॉम्-प्लिझॅ'न्स)—obligingness, *politeness*, deference, civility; desire of pleasing. सभ्यता; संतुष्ट करण्याची इच्छा.

**Complaisant'**, *a.* (कम्-प्लिझॅ'न्ट्)—disposed to please, yielding to the wishes of others and eager to please, obliging. बोलूनचालून गोड, उपकारशील.

**Cŏm'plemĕnt**, *n.* (कॉ'म्प्लिमेन्ट्)—what completes or coexists with; complete set or provision; full number. पूरक भाग, पुरवणी; भरणा; पूर्ण संख्या.

**Cŏmplement'**, *v. t.* (कॉम्प्लिमे'न्ट्)—to act as complement to. उणेपणा भरून काढणें, पूरक असणें, पुरवणी करणें.

**Cŏmplĕmĕnt'ary̆**, *a.* (कॉम्प्लिमे'न्टरि)—being a complement to. पूर्ण करणारा, पुरवणी करणारा; पूरक.

**Complēte'**, *a.* (कम्प्ली'ट्)—having all its parts; finished. सर्व भाग असलेला; सफल, पूर्ण. *v. t.* to bring to entirety, to finish. पूर्ण करणें, शेवटास नेणें.

**Complē'tion**, *n.* (कम्प्ली'शन्)—completing. शेवट, समाप्ति, पूर्णता.

**Cŏm'plĕx**, *a.* (का'म्प्लेक्स्)—consisting of parts; complicated, involved. अनेक भाग असलेला; गुंतागुंतीचा, बिकट. *A complex*, (in the mind) a set of ideas or desires (which one does not know one possesses, yet) which have an effect on one's behaviour. ज्यांचा एखाद्याच्या वागणुकीवर विशिष्ट परिणाम होतो असे विचार, गंड.

**Complĕ'xion**, *n.* (कम्प्ले'क्शन्)—the colour of the face, colouring and skin-texture of the face; aspect. मुखवर्ण, चेहरा; स्वरूप, आकार. *To put a different complexion on it*, to make a thing appear different. एखादी गोष्ट निराळी भासविणें.

**Cŏm'plĕxity̆**, *n.* (कॉ'म्प्लेक्सिटि)—state of being complex, complexness, intricacy. गुंतागुंत, घोटाळा.

**Compli'ance**, *n.* (कम्प्ला'यन्स्)—acquiescence. मान्यता, रुकार.

**Compli'ant**, *a.* (कम्प्ला'यन्ट्)—yielding. हार घेणारा; नमणारा.

**Cŏm'plĭcāte**, *v. t.* (कॉ'म्प्लिकेट्)—to make complicated, to entangle. गुंतागुंत करणें, गुंतवणें, बिकट करणें.

**Cŏm'plĭcāted**, *a.* (कॉ'म्प्लि-के-टिड्)—intricate, involved, hard to unravel. अवघड, गुंतागुंतीचा, बिकट.

**Cŏmplĭcā'tion**, *n.* (कॉम्प्लिके'शन्)—complicated situation, entanglement, intricacy, complicating circumstance. गुंतागुंत, गोंधळ, बिघडलेली परिस्थिति.

**Cŏm'plĭmĕnt**, *n.* (कॉ'म्प्लि-मेन्ट्)—polite expression, implication of praise. आदरवचन; गर्भित स्तुति. *To make one a compliment*, ०ची उत्तम रीतीनें वाखाणणी करणें. *To make* or *pay* or *send one's compliments to*, नमस्कार करणें, नमस्कार सांगणें.

**Cŏmplĭmĕnt'**, *v. t.* (कॉम्प्लिमे'न्ट्)—to pay compliments to, to express admiration for; to flatter. गौरव करणें, मान देणें, खुशामत करणें.

**Cŏmplĭmĕnt'ary̆**, *a.* (कॉम्प्लि-मे'न्टरि)—laudatory; by way of compliment. प्रशंसापूर्ण; स्तुतिरूप, औपचारिक.

**Cŏm'plĭn, Cŏm'plīne,** *n.* (कॉम्प्लिन्)—last service of the day. दिवसाची शेवटची प्रार्थना, संध्याकाळची प्रार्थना.

**Complȳ',** *v. i.* (कम्प्ला'य्)—to act according to request or command or rules. मान्य करणें, रुकार देणें, स्वीकारणें.

**Cŏmpō'nent,** *a.* (कॉम्पो'नन्ट्)—going to the making of a whole; constituent. घटक, पूरक; अंगभूत.

**Cŏmpŏrt',** *v. t. & i.* (कॉम्पॉ'र्ट्)—to behave or conduct oneself; to be compatible or in harmony with. वर्तन ठेवणें, वागणें; सुसंगत असणें, जुळणें, ज्शीं मिळणें.

**Compōse',** *v. i. & t.* (कम्पो'झ्)—to form or constitute; to construct in one's mind; to become tranquil; to make up or reconcile; to set up type. बनवणें; मनांत रचणें, शांत होणें; समेट करणें; टाइप जुळणें.

**Compōsed',** *a.* (कम्पो'झ्ड्)—quiet, calm. शांत, स्वस्थ.

**Compōsed'lȳ,** *adv.* (कम्पो'झ्ड्-लि)—calmly. शांत चित्तानें.

**Compō'ser,** *n.* (कम्पो'झर्)—(कवन, काव्य, कविता) रचणारा.

**Cŏm'pŏsite,** *a.* (कॉ'म्पोझिट्)—consisting of different parts or materials, made up of parts. निरनिराळे भाग जुळवून केलेला, संमिश्र, संयुक्त.

**Cŏmposĭ'tion,** *n.* (कॉम्पो-झि'शन)—composing, thing composed; a mixture; agreement or compromise. रचना, जुळलेली वस्तु, कवन, प्रबंध; मिश्रण, करार, समेट.

**Compŏs'itor,** *n.* (कम्पॉ'झि-टर्)—a type-setter. टाईप जुळविणारा, टंक-जुळारी.

**Cŏm'pŏst,** *n.* (कॉ'म्पॉस्ट्)—compound manure; combination. मिश्र खत; मिश्रण, एकीकरण.

**Compō'sure,** *n.* (कम्पो'झर्)—calmness. शांतता, शांत स्वभाव.

**Cŏm'pōte,** *n.* (कॉ'म्पोट्)—fruit preserved in syrup. सरबतांत मुरवलेलें फळ.

**Compound',** *v. t. & i.* (कम्पा'उन्ड्)—to mix or combine into a whole; to settle by mutual concession; to commute. मिसळून एकत्र करणें; मिळवणें; तडजोड करणें. *To compound a debt,* to pay off a debt by one large payment less than the whole amount owed. देणें असलेल्या रकमेपेक्षां कमी परंतु एकदम मोठी रक्कम देऊन कर्ज फेडून टाकणें, तडजोड करून कर्ज फेडणें. *To compound a felony,* to forbear prosecution on some private motive, to help in an unlawful act. कांहीं खासगी हेतूकरितां फिर्याद मागें घेणें, बेकायदेशीर कृत्यांत मदत करणें.



**Cŏm'pound,** *a.* (कॉ'म्पाउन्ड्)—composite; compounded; not simple. संमिश्र; मिसळलेला; चक्रवाढीचा. *n.* a mixture; compound word; an enclosure (round a house, factory, etc.). मिश्रण; सामासिक शब्द, समास; आवार, पटांगण, वाडी, कंपाउंड.

**Com'pounder,** *n.* (कॅ'म्पाउन्डर्)—one who compounds. (रोग्यांकरितां दवाखान्यांत) औषधें बनविणारा.

**Cŏmprehĕnd',** *v. t.* (कॉम्प्रिहे'न्ड्)—to grasp mentally; to be inclusive of; to comprise; to include, to take in. समजणें, आकलन करणें; समावेश होणें; धरणें, आंत घेणें, समावेश करणें.

**Cŏmprehĕn'sible,** *a.* (कॉम्प्रि-हे'न्सि-बल्)—intelligible, conceivable by the mind, that may be understood; that may be comprised. स्पष्ट, समजण्याजोगा; समावेश करण्याजोगा.

**Cŏmprehĕn'sion,** *n.* (कॉम्प्रिहे'न्शन्)—understanding; inclusion; grasp. समज, बोध; समावेश; आकलन.

**Cŏmprehĕn'sĭve,** *a.* (कॉम्प्रिहे'न्सिव्ह्)—embracing much; of wide scope. बहुसमावेशक; बहुव्यापक.

**Comprĕss',** *v. t.* (कम्प्रे'स्)—to squeeze together; to bring into smaller compass, to press tightly together. पिळणें; दाबणें. *Compressibil'ity, n.* संपीड्यता, दाबणें. *Compres'sion, n.* संपीडन, संकलन, दाबणें. *A compress,* (कॉ'म्प्रेस्), a piece of wet cloth tied tightly on to a wound, a pad for compressing. दाबण्याची पट्टी, दाबून बांधण्याची वरचढी.

**Comprīse',** *v. t.* (कम्प्रा'इझ्)—to contain, to include, to be made up of. समावेश करणें, आंत घेणें, अंतर्भाव करणें.

**Cŏm'promīse,** *n.* (कॉ'म्प्रो-माइझ्)—an agreement attained by mutual concession. तडजोड. *v. t.* to adjust by mutual concessions; to bring oneself under suspicion. तडजोड किंवा लवाद करणें; स्वतःला धोक्यांत घालणें. *To compromise oneself,* to make people think that one may have done wrong. आपण कांहीं चूक केली आहे असें लोकांना भासविणें.

**Cŏmprovĭn'cial,** *a. & n.* (कॉम्-प्रो-व्हि'न्शल्)—of the same province. एकाच विभागाचा.

**Comptrō'ller,** *n.* (कन्ट्रो'लर्)—a controller, an officer or examiner of accounts. नियंता, हिशेब तपासणारा अधिकारी, हिशेबतपासनीस.

**Compŭl'sion,** *n.* (कम्प'ल्शन्)—constraint, obligation. जुलूम, जबरदस्ती, सक्ति. *Under* or *upon compulsion,* because one is compelled. बळजबरीनें, सक्तीनें.

**Compŭl'sorȳ,** *a.* (कम्प'ल्सरि)—done or acting under compulsion, that which must be done,

brought about by force. आवश्यक, केलेंच पाहिजे असें, जुलमाचें.

**Compŭnc'tion**, *n.* ( कम्प'ङ्क्शन् )—pricking of conscience, remorse, contrition, pity, sorrow for a cruel act. पस्तावा, पश्चात्ताप.

**Compūte'**, *v. t.* ( कम्प्यू'ट् )—to calculate, to reckon, to count, to estimate, to rate. गणणें, मोजणें, संख्या काढणें. *Comput'able a.* गणना करण्याजोगा. *Computa'tion*, *n.* गणना, अजमास.

**Cŏm'rade**, *n.* ( कॉ'-म्रिड् )—a mate or fellow; a companion or associate. सोबती; बरोबर असणारा मित्र. *Com'radeship*, *n.* सोबत, मैत्री.

**Cŏn**, *v. t.* ( कॉन् )—to study or learn; to direct steering of ship. संथा घेणें, घोकणें, पाठ करणें; सुकाणूं धरणें, गलबताचें सुकाणूं चालविणें.

**Cŏnā'tion**, *n.* ( कॅने'शन् )—the exertion of willing that desire or aversion shall issue in action. इच्छा, संकल्प, क्रियाप्रवर्तक हेतु.

**Concătenā'tion**, *n.* ( कन्कॅटिने'शन् )—connexion as of chain-links; a string or series ( of ideas, events, etc. ), a chain of events. शृंखला, सांखळी, श्रेणी, संबंध, परंपरा.

**Cŏnc'āve**, *a.* ( कॉ'न्केव् )—of interior curvature, curved inwards. अंतर्गोल.

**Cŏncăv'itў**, *n.* ( कॉन्कॅ'व्हिटी )—inner or interior curvature, hollowness, hollow. गोल पोकळी, अंतर्गोलता.

**Conceal'**, *v. t.* ( कन्सी'ल् )—to withdraw from observation, to hide or keep secret, to keep from being known. लपवणें, गुप्त ठेवणें.

**Conceal'ment**, *n.* ( कन्सी'ल्मेन्ट् )—act of keeping secret; suppression of the truth; a hiding-place. गुप्त ठेवणें; खरी गोष्ट लपवून ठेवणें, दाबादाबी, छपवाछपवी; दडून बसण्याची जागा.

**Concēde'**, *v. t.* ( कन्सी'ड् )—to grant; to admit as true; to allow, to yield after disagreeing. मान्य करणें; खरी आहे असें कबूल करणें; सोडणें.

**Conceit'**, *n.* ( कन्सी'ट् )—an overweening notion of oneself; vanity; farfetched comparison. मीपणा, अहंभाव; दिमाख; बढाई; क्लिष्ट तुलना.

**Conceit'ed**, *a.* ( कन्सी'टेड् )—having a high notion or too good an opinion of oneself; vain. अहंमन्य, बढाईखोर; पोकळ डौली.

**Conceive'**, *v. t. & i.* ( कन्सी'व्ह् )—to become pregnant; to think of, to imagine, to form in the mind; to formulate in words. गर्भधारणा करणें; मनांत योजणें; प्रतिपादन करणें, रचणें.

**Cŏn'centrāte**, *v. t. & i.* ( कॉ'न्सेन्ट्रेट् )—to bring to bear or bring together ( e.g. soldiers ) on one point; to collect one's thoughts or efforts, to employ all one's power or attention *upon*; to increase the strength of a liquid by boiling it down. समकेंद्र करणें; चित्तैकाग्र्य करणें, विचार एकत्र आणणें; आटवून किंवा गाळून तीव्रता वाढविणें. *To concentrate on*, to give one's whole mind *to*. पूर्ण लक्ष देणें, चित्तैकाग्र्य करणें.

**Cŏncĕntrā'tion**, *n.* ( कॉन्सेन्ट्रे'शन् )—collection to one point; mental faculty or exclusive attention. केंद्रीकरण; मनःसामर्थ्य, चित्तैकाग्र्य.

**Cŏncĕnt'ric**, *a.* ( कॉन्सें'ट्रिक् )—having a common or the same centre ( *with* ). एकाच मध्यबिंदु असलेले, समकेंद्रक, एककेंद्रक. *Concentric fire*, firing concentrated on a point. एकाच ठिकाणावर केलेला गोळीबार. *Concen'trically*, *adv.*; *Concentricity*, *n.*

**Cŏn'cĕpt**, *n.* ( कॉ'न्सेप्ट् )—idea of a class of objects; an abstract general notion. कल्पना; समज, विचार.

**Concĕp'tion**, *n.* ( कन्से'प्शन् )—conceiving; pregnancy; an idea. विचार; गर्भधारणा; कल्पना. *Conceptional*, *a.*

**Concĕp'tive**, *a.* ( कन्से'प्टिव्ह् )—capable of conceiving ( mentally ). कल्पक.

**Concĕp'tual**, *a.* ( कन्से'प्च्युअल् )—of mental conceptions. कल्पनाविषयक.

**Concern'**, *v. t.* ( कन्स'र्न् )—to relate to; to affect, to be relevant to; to mix oneself up in; to feel anxiety about. संबंध असणें; ०बद्दल वाटणें; समर्पक असणें; मिसळून जाणें; काळजी वाटणें. *n.* a thing that concerns one; (*pl.*) one's affairs; solicitude; firm or enterprise. संबंधीची गोष्ट; (अने०) स्वतःचा उद्योगधंदा; काळजी, कळकळ; धंदा, साहस. *To be concerned in*, to take part in. एखाद्या गोष्टींत भाग घेणें. *I am not concerned*, it is not my business *to*. त्यांत माझा संबंध नाहीं.

**Concern'ing**, *prep.* ( कन्स'र्निंग् )—about. विषयीं, संबंधीं.

**Concern'ment**, *n.* ( कन्स'र्न्मेन्ट् )—affair, business; importance; being concerned ( *with* ); anxiety. काम, उद्योग, धंदा; महत्त्व; संबंध; कळकळ, काळजी. *Of vital concernment*, अत्यंत महत्त्वाचा.

**Cŏn'cert**, *n.* ( कॉ'न्सर्ट् )—combined state; a musical entertainment; combination of voices or sounds. ऐकमत्य, एकोपा; संगीत जलसा; एकस्वर, एकसूर. *Concert grand*, a grand piano of brilliant tone. उत्तम आवाजाचा पिआनो. *Concert-pitch*, a pitch slightly higher than the ordinary. तारस्वर, नेहेमींपेक्षां चढविलेला स्वर.

**Concert'**, *v. t.* ( कन्स'र्ट् )—to plan, to contrive; to pre-arrange. युक्ति योजणें, मसलत करणें;

आगाऊ व्यवस्था करणें. *Concert'ed*, arranged in parts. निरनिराळ्या भागांत रचलेलें, योजिलेलें ( पद्य, गायनवादन इ. ).

**Concerti'na**, *n.* (कॉन्सर्टीना)—a portable musical wind instrument with a set of keys at each end, a wind-instrument pumped by the hands. पेटीबाजा, बाजा.

**Concerto'**, *n.* (कन्चे'अर्टो)—a composition for solo instrument accompanied by orchestra. विशिष्ट वाद्यांत वाजविण्याकरितां रचलेली चीज किंवा गत.

**Conce'ssion**, *n.* (कन्से'शन्)—conceding; thing conceded, grant; monopoly or similar privilege. कबूल करणें; सवलत, सूट; मक्ता किंवा त्यासारखा हक्क, विशेष हक्क. *Concessionaire'*, *n.* holder of a concession (esp. of monopoly given by government to a foreigner). सरकाराकडून विशेष सवलत मिळालेला मनुष्य. *Conce'ssive*, *a.* सवलतीचा, सवलत देणारा.

**Conch**, *n.* (कॉंक्)—a shellfish or its shell. कालव, शंख.

**Concho'logy**, *n.* (कॉन्कॉ'लॉजि)—study of shells and shell-fish. शंखशास्त्र.

**Concil'iate**, *v. t.* (कॉन्सि'लिएट्)—to propitiate; to gain the friendship of, win over from hostility; to reconcile. मर्जी प्रसन्न करून घेणें, मनधरणी करणें; अनुकूल करणें; मिळवून घेणें. *Concil'iator*, *n.* मनधरणी करणारा. *Concil'iatory*, *a.* सामोपचाराचा, मनमिळाऊ.

**Concilia'tion**, *n.* (कन्सि-लि-ए'शन्)—bringing of opponents into harmony, reconcilement; use of conciliating measures. प्रतिपक्ष्याचें मन वळविणें, मनधरणी, गोडी; सामोपचाराचा उपयोग.

**Concise'**, *a.* (कन्सा'इस्)—brief and comprehensive; condensed. थोडक्यांत पण पूर्ण असलेला; संक्षिप्त.

**Conc'lave**, *n.* (कॉं'क्लेव्ह्)—a meeting for secret consultation; the meeting-place or assembly of cardinals to the election of Pope. खासगी सभा, गुप्तसभा, गुप्तमंडळी; पोपची निवडणूक करण्याकरितां होणारी कार्डिनल लोकांची सभा.

**Conclude'**, *v. t. & i.* (कन्क्लू'ड्)—to bring about as a result; to come to an end; to finish, to settle; to infer. शेवट करणें; समाप्त होणें; संपणें, ठरविणें; अनुमान करणें.

**Conclu'sion**, *n.* (कन्क्लू'झन्)—ending, close; inference; final opinion. शेवट, समाप्ति; अनुमान; निश्चित मत, सिद्धान्त. *To try conclusions with*, to engage in a trial of skill etc. *with*. प्रचीती किंवा अनुभव घेणें. *Foregone conclusion*, अगाऊच ठरलेला निर्णय. *In conclusion*, सारांशरूपानें, थोडक्यांत; सरते शेवटीं.

**Conclu'sive**, *n.* (कन्क्लू'सिव्ह्)—convincing, decisive, final. निर्णायक, खात्री करणारा.

**Concoct'**, *v. t.* (कन्कॉ'क्ट्)—to compound; to fabricate; to make in concert. मिसळणें; खोटी गोष्ट रचणें; संगनमत करणें.

**Concoc'tion**, *n.* (कन्कॉ'क्शन्)—concocting; concocted thing. बनविणें; बनावट गोष्ट, खोटी हकीगत.

**Concom'itance**, *n.* (कन्कॉ'मिटन्स्)—being together, co-existence. एकाच वेळीं अस्तित्वांत असणें, समन्वय.

**Concom'itant**, *a.* (कन्कॉ'मि-टन्ट्)-attendant, going together, that which goes with something else, accompanying. सहचारी, बरोबर असणारा, जोडीदार.

**Conc'ord**, *n.* (कॉं'कॉर्ड्)—harmonious relations, peace; agreement (in gender, person, etc.) between words. जुळता संबंध, मिलाफ, ऐक्य; दोन शब्दांमध्यें (पुरुष, लिंग, वचन यांचा) मेळ, समानाधिकरण. *Concord'ance*, *n.* ऐक्य, मेळ, कारकसंबंध; अनुक्रमणिका.

**Conc'ordant**, *a.* (कॉं'कॉर्डन्ट्)—agreeing, in harmony, agreeable, harmonious. जुळणारा, एकमताचा.

**Concor'dat**, *n.* (कॉन्कॉ'र्डट्)-a friendly agreement between Pope and secular government. धर्मगुरु आणि सरकार यांमधील सख्य करार.

**Conc'ourse**, *n.* (कॉं'कोअर्स्)—a flocking together; a crowd, throng. एकत्र जमणें; जमाव, गर्दी, समुदाय.

**Conc'rete**, *a.* (कॉं'क्रीट्)—having objective reality; not abstract, real. प्रत्यक्ष दिसणारें; साकार. *n.* a concrete thing or word; a stone-like material (used for roads, buildings, etc.). प्रत्यक्ष सिद्ध वस्तु किंवा शब्द, गुणधर्मयुक्त पदार्थ; दगड, सिमेंट, वगैरेंचें मिश्रण, कॉंक्रिट.

**Conc'ubine**, *n.* (कॉं'क्यु-बाइन्)—a woman who cohabits with a man without marriage. वारांगना, वेश्या.

**Concur'**, *v. i.* (कन्क'र्)—to occur together, to coincide; to agree. एकत्र घडणें, जुळणें; एकमत असणें, संमति देणें. [L. *con*, together and *currere*, to run.]

**Concu'rrence**, *n.* (कन्क'रन्स्)—agreement. एकमत, मतैक्य.

**Concur'rent**, *a.* (कन्क'रन्ट्)—concurring, agreeing in the same act. एकचित्त, बरोबर असणारा.

**Concu'ssion**, *n.* (कन्क'शन्)—a violent shaking or shock; head injury due to heavy blow.

धक्का, गचका ; जोराच्या धक्क्यानें डोक्याला झालेली दुखापत.

**Condĕmn'**, *v. t.* (कन्डे'म्)—to censure, to blame ; to give a judicial decision against ; to pronounce unfit for use. निंदा करणें, दोष देणें ; शिक्षा फर्मावणें ; निरुपयोगी ठरवणें. *Condem'nable, a.* नालायक ठरविण्याजोगा ; शिक्षार्ह ; निंद्य. *Condem'natory, a.*

**Cŏndĕmnā'tion**, *n.* (कॉन्डिम्ने'शन्)— censure ; judicial conviction ; ground for condemning. निंदा ; दंडनियोजन, शिक्षा देणें; दंडहेतु, दोषकारण.

**Cŏndĕnsā'tion**, *n.* (कॉन्डेन्से'शन्)—act of condensing ; condensed mass. दृढ होणें, दृढीकरण ; दृढीभवन.

**Condĕnse'**, *v. t. & i.* (कन्डे'न्स्)—to make denser or briefer ; to compress ; to consolidate ; to express the meaning in fewer words. गोठवणें, अधिक दाट किंवा लहान करणें ; दाबणें ; दृढ करणें ; संकलन करणें ; थोडक्यांत अर्थ सांगणें.

**Conden'ser**, *n.* (कन्डे'न्सर्)—part of a machine which makes gas into liquid ; an instrument which stores electricity; a curved glass which brings light together into a beam. वायुरूप पदार्थाचें द्रवीभवन करणारा यंत्राचा भाग ; वीज सांठविण्याचें एक यंत्र ; प्रकाशाचें एकीकरण करणारी एक वक्र काच.

**Cŏndescĕnd'**, *v. i.* (कॉन्डिसे'न्ड्)—to deign to do ; to stoop from dignity. अभिमान सोडून वागणें ; लीनता धरणें.

**Cŏndescĕn'sion**, *n.* (कॉन्डिसे'न्शन्)—condescending manner or act, affability to inferiors. अनुग्रह, निरभिमान, प्रसाद, लीनतेचें वर्तन, लीनता.

**Condīgn'**, *a.* (कन्डा'इन्)—adequate, well deserved and well suited to the wrong act. योग्य, यथायोग्य, अनुरूप, रास्त.

**Cŏn'dimĕnt**, *n.* (कॉ'न्डिमेन्ट्)—relish or seasoning for use with food, matter added to food to make it taste nicer. मसाला, तोंडीलावणें, व्यंजन.

**Condĭ'tion**, *n.* (कन्डि'शन्)—quality ; state ; state of body ; attribute ; (*pl.*) circumstance ; stipulation ; social rank. गुण ; स्थिति ; शरीरावस्था, विशेष गुण ; (अने०) परिस्थिति ; शर्त, मुद्दा, अट ; सामाजिक दर्जा. *Condition precedent*, condition that must be fulfilled before something else is done. आधीं पुरी करण्याची अट. *On condition that*, if, provided that. जर, असें असलें तर. *In condition*, in good condition. चांगल्या स्थितींत. *Out of condition*, in bad condition. वाईट स्थितींत. *v. t.* to be a condition of ; to make terms ; to stipulate. स्थिति किंवा अट असणें ; अटी घालणें ; करार करणें.

**Condĭ'tional**, *a.* (कन्डि'शनल्)—made or granted on certain terms, not absolute. अटीचा, सशर्त.

**Condōle'**, *v. i.* (कन्डो'ल्)—to express sympathy in sorrow with, to express pity for. दुःखांत सहानुभूति दर्शविणें किंवा व्यक्त करणें.

**Condō'lence**, *n.* (कन्डो'लन्स्)—expression of sympathy in another's sorrow. दुसऱ्याच्या दुःखाबद्दल सहानुभूति व्यक्त करणें, दुःखप्रदर्शन.

**Condōne'**, *v. t.* (कन्-डो'न्)—to treat as non-existent, to pardon. अस्तित्वांत नाहीं असें मानणें ; क्षमा करणें. *Condona'tion, n.* माफी, सूट, क्षमा.

**Condūce'**, *v. i.* (कन्ड्यू'स्)—to help to produce or effect. उपयोगास येणें, साधक होणें, मदत करणें.

**Condū'cive**, *a.* (कन्ड्यू'सिव्)—tending to or having a tendency to help. उपयोगी, साधक.

**Cŏn'dŭct**, *n.* (कॉ'न्डक्ट्)—one's actions, personal deportment ; management ; convoy, escort. वर्तणूक, वर्तन ; व्यवस्था ; वाटेनें रक्षणाकरितां दिलेले लोक, वाटाड्या, मार्गदर्शक.

**Condŭct'**, *v. t.* (कन्ड'क्ट्)—to lead, to escort ; to control, to manage ; to behave oneself ; to transmit, to allow to pass. वाट दाखवून पोहोंचविणें, नेणें, वाट दाखविणें ; ताब्या ठेवणें, व्यवस्था पाहणें ; स्वतः आचरण करणें ; वाहकतेनें (उष्णता, वीज, प्रकाश) पोहोंचविणें ; पार जाऊं देणें. *Conduct'ible, a.* वाहून नेण्यासारखा, वाहून नेण्याजोगा, वाह्य.

**Condŭc'tor**, *a.* (कन्ड'क्टर्)—an official in charge of passengers ; a conductive substance or object. उतारूंवर लक्ष ठेवणारा नोकर, कण्डक्टर ; उष्णतावाहक पदार्थ किंवा वस्तु. *Lightning-conductor*, a rod at the top of a building conducting electricity away into earth. वीज नेणारी तार, विद्युद्वाहक दांडा. *Conduct'ress, n. fem.* गाण्यांतील नायिका, मुढारीण.

**Con'duit**, *n.* (क'न्डिट्, कॉ'न्डिट्)—a surface drain channel or a pipe, aqueduct. पाणी नेण्याचा नळ, नहर, सारणी.

**Cōne**, *n.* (कोन्)—tapering figure with circular base. गोपुच्छाकृति शंकु, (शंकूसारखा) सुळका.

**Confăb'ūlāte**, *v. i.* (कन्फॅ'ब्युलेट्)—to take familiarly together, to chat. गप्पा मारणें, गप्पागोष्टी करणें. *Confabulation, n.* [ L. *con*, together and *fabulare*, to converse ]

**Confĕc'tion**, *n.* (कन्फे'क्शन्)—a sweet-stuff ; light and elegant article of female dress. मिठाई; बायकांचा एक हलका आणि सुंदर कपडा.

**Confĕc'tioner**, *n.* (कन्फे'क्शनर्)—a dealer in cakes and sweets. मिठाई करणारा, मिठाईवाला, हलवाई.

**Confec'tionery**, *n.* ( कन्फे'क्शनरि )—cakes and sweets. मेवामिठाई, मिठाई.

**Confed'eracy**, *n.* ( कन्फे'डरसि )—a league; conspiracy; a league of confederate States. संघ; कट, संगनमत; राष्ट्रमंडळ, एकत्र संगनमत असलेलीं राष्ट्रें.

**Confed'erate**, *a.* ( कन्फे'डरेट् )—leagued together, joined by agreement for a common purpose. तहानें बांधलेलीं, एकत्र झालेलीं. *v. t. & i.* to make league with; to make a confederation. संघ करणें; एकत्र होणें.

**Confedera'tion**, *n.* ( कान्फेडरे'शन् )—a permanent union of sovereign States for common external action. एकाच पक्षांत मिळालेले लोक किंवा संस्थानें, राष्ट्रसंघ.

**Con'fer, Cf.**, *v. imperat.* ( कॉ'न्फर् )—Compare. ताडून पहा, पहा.

**Confer'**, *v. t. & i.* ( कन्फ'र् )—to bestow on; to take counsel *with*; to meet for discussion. देणें; मत घेणें; विचाराकरितां एकत्र जमणें; सहविचार करणें.

**Con'ference**, *n.* ( कॉ'न्फरन्स् )—a meeting for discussion; exchange of views. विचार करण्यासाठीं बैठक; वादविवाद, विचारविनिमय.

**Confess'**, *v. t. & i.* ( कन्फे'स् )—to acknowledge; to plead guilty to; to disclose one's sin to confessor; to hear confession of. कबूल करणें; दोष पदरीं घेणें; धर्मोपाध्यायाजवळ पापांचा झाडा देणें; पापें कबूल केलेलीं ऐकणें.

**Confe'ssor**, *n.* ( कन्फे'सर् )—a priest who hears others confess. पापें कबूल केलेलीं ऐकणारा धर्मोपाध्याय.

**Confess'edly**, *adv.* ( कन्फे'सिड्लि )—avowedly, undeniably, admittedly. उघड, निर्विवाद, निःसंशय.

**Confe'ssion**, *n.* ( कन्फे'शन् )—acknowledgement (of guilt, etc.); confession to priest; statement of one's principles. गुन्हा वगैरे कबूल करणें; उपाध्यायाजवळ पापनिवेदन किंवा पापाचा कबुलीजबाब; स्वतत्त्वनिवेदन.

**Confett'i**, *n. pl.* ( कन्फे'टि )—sweets or disks of coloured paper which are thrown at newly-married people as they leave the church. नुकत्याच लग्न झालेल्या लोकांवर चर्चमधून बाहेर पडतांना टाकले जाणारे रंगीत कागदाचे किंवा मिठाईचे तुकडे. *Confett'o*, *n. sing.* [It., = sweet-meat.]

**Confidant'**, *n.* ( कॉन्-फि-डॅ'न्ट् )—a person to whom one confides one's private affairs. अत्यंत विश्वासू मित्र. *Confidante'*, *n. fem.*

**Confide'**, *v. i. & t.* ( कन्-फा'इड् )—to repose confidence in; to impart. भरंवसा असणें, विश्वास ठेवणें; सोपवणें, देणें. *Confid'ing*, *a.* unsuspicious. विश्वास असलेला.

**Con'fidence**, *n.* ( कॉ'न्फिडन्स् )—firm trust; confidence in oneself, self-reliance, assurance, assured intimacy. पूर्ण विश्वास; आत्मविश्वास; खात्री, भरंवसा. *Told in confidence*, told as a secret. गुप्त गोष्ट म्हणून सांगितलेली. *In one's confidence*, allowed to know one's private affairs. एखाद्याच्या विश्वासांतला, खासगी गोष्टीसुद्धां ज्याला सांगितल्या जातात असा. *Confidence trick*, a trick persuading a victim to entrust valuables to one as a sign of confidence. आपल्यावर जास्त विश्वास उत्पन्न करून एखाद्याला लुबाडण्याची युक्ति, भामटेगिरी.

**Con'fident**, *a.* ( कॉ'न्फिडेन्ट् )—feeling or showing assurance; positive; self-reliant. खात्री असणारा, निःशंक; निभ्रांत, निश्चयपूर्वक; आत्मविश्वासी. *Con'fidently*, *adv.* विश्वासानें, विश्वासपूर्वक; खात्रीनें; उमेदीनें.

**Confiden'tial**, *a.* ( कॉन्फिडे'न्शल् )—that is to be kept secret, imparted in confidence; enjoying confidence. गुप्त, खासगी; विश्वासू, भरंवशाचा. *Confiden'tially*, *adv.*

**Configura'tion**, *n.* ( कॉन्फिग्यूरे'शन् )—aspect as produced by relative position of parts. अवयवांच्या आकारावरून झालेलें सापेक्ष स्वरूप, बाह्य स्वरूप, ग्रहांची सापेक्ष स्थिति.

**Confine'**, *v. t.* ( कन्-फा'इन् )—to keep within limits; to imprison, to hold in custody; (*pass.*) to be brought to bed of a child. मर्यादा करून देणें; कैदेंत ठेवणें, कोंडणें; बाळंत किंवा प्रसूत होणें (to be confined).

**Con'fine**, *n.* ( कॉ'न्फाइन् )—a boundary; (*pl.*) the border or edge. हद्द, मर्यादा; (अने०) कडा किंवा सीमा.

**Confine'ment**, *n.* ( कन्फा'इन्मेन्ट् )—being confined; imprisonment; the lying-in of a woman, child-birth. बांधलें जाणें; कैद, बंदी; बाळंतपण, प्रसूति.

**Confirm'**, *v. t.* ( कन्फ'र्म् )—to make stronger, to put past doubt, to ratify; to corroborate; to administer confirmation to. बळकट करणें; कायम करणें, मंजूर करणें; पुराव्यास बळकटी आणणें; मंजुरी देणें, सही करणें. *To confirm a child*, to receive a child into the church. (बाप्तिस्मा दिल्यानंतर) मुलाचा दृढीकरण संस्कार करणें. *Confirmed*, बळकट केलेला, दृढ झालेला, पक्का. *A confirmed bachelor*, an un-married man who will never marry. कधींहि लग्न न करूं इच्छिणारा पक्का ब्रह्मचारी.

**Confirmā'tion**, *n.* (कन्फर्मे'शन्)—a corroborating circumstance or statement; a rite in which persons confirm the vows made for them at baptism. पुष्टि, समर्थन, बळकटी, मंजुरी; खिस्ती धर्म स्वीकारल्यावर त्याचा पुर्तिसंस्कार.

**Cŏn'fiscāte**, *v. t.* (कॉन्फिस्केट्)—to seize private property for the public treasury; to seize as by authority, to appropriate by way of penalty, to seize a person's land or goods as a punishment. खासगी मालमत्ता सरकारांत जप्त करणें; शिक्षा म्हणून अधिकारानें जप्त करणें.

**Cŏnfiscā'tion**, *n.* (कॉन्-फिस्के'शन्)—seizure of private property as punishment. सरकारजमा करणें, जप्ती, दण्डार्थ हरण.

**Conflagrā'tion**, *n.* (कॉन्फ्लग्रे'शन्)—a widespread fire, a general burning; a great outbreak (of war, etc.). आगीचा डोंब, वणवा; (युद्ध वगैरेंचा) भयंकर उद्भव

**Cŏn'flict**, *n.* (कॉ'न्-फ्लिक्ट्)—a trial of strength; a fight, a disagreement; conflicting state. झगडा, झुंज; भांडण; विरोध *v. i.* (कन्फ्लि'क्ट्)—to be at odds or inconsistent with; to contest with. एकमेकांशीं टक्कर होणें, विरोध असणें; झुंजणें, लढणें.

**Cŏn'fluence, Cŏn'flŭx**, *nn.* (कॉ'न्फ्लुअन्स्, कॉ'न्फ्लक्स्)—a meeting of confluents; a concourse. संगम; जमाव, संघ

**Cŏn'fluent**, *a.* (कॉ'न्फ्लुअन्ट्)—merging into one, running into one another. एकत्र मिळून जाणारा, संगम होणारा, मिळणारा.

**Confŏrm'**, *v. t. & i.* (कन्फॉ'र्म्)—to adapt, to be shaped according to the form of; to make like; to comply with rules or general custom. जुळवून घेणें; सारखा करणें; विशिष्ट आचाराप्रमाणें किंवा संप्रदायानुरूप वागणें.

**Confŏrm'āble**, *a.* (कन्फॉ'र्मेबल्)—suitable, adapted or corresponding to. अनुरूप, नियमानुसार.

**Confŏrmā'tion**, *n.* (कन्फॉर्मे'शन्)—particular structure of a thing; adaptation *to*. कोणत्याहि वस्तूची बनावट किंवा रचना; अनुरूपता.

**Confŏr'mist**, *n.* (कन्फॉ'र्मिस्ट्)—one who conforms to the usages of the church of England. चर्च ऑफ् इंग्लंडला किंवा कायद्यानें स्थापलेल्या धर्माला अनुसरून वागणारा, प्रवृत्तधर्मानुसारी.

**Confŏrm'ĭtў**, *n.* (कन्फॉ'र्मिटि)—correspondence to or harmony with, agreement. सारखेपणा, अनुरूपता. *In conformity with*, according to, अन्वयें, बरहुकूम.

**Confound'**, *v. t.* (कन्फा'उन्ड्)—to mix up, to confuse, to throw into confusion, to astound; to baffle. संकर करणें, गडबडणें, आश्चर्यचकित करणें; गोंधळून जाणें. *Confound it! Confound you!* जळो तें. आग लागो त्याला! सत्यानाश होवो तुझा! *A confounded* (i.e. very very) *long time*. भयंकर वेळ झाली.

**Cŏnfrātern'ĭtў**, *n.* (कॉन्फ्रॅट'र्निटि)—a brotherhood, (esp. religious or charitable); a body, gang, मंडळी, समाज, टोळी. [L. *con*. together & *frater*, Sk. भ्रातृ, a brother]

**Cŏn'frere**, *n.* (कॉ'न्-फ्रेअर्)—a fellow worker. बरोबर काम करणारा, सहकारी, कार्यबंधु.

**Confront'**, *v. t.* (कन्फ्र'न्ट्)—to bring face to face *with*; to face or be confronted with; to resist. समोरासमोर आणणें, रुजुवात करणें; तोंड देणें; प्रतिबंध करणें.

**Confūse'**, *v. t.* (कन्फ्यू'झ्)—to throw into disorder; to obscure, to mix up: to mistake one thing for another. गोंधळ करून टाकणें; दुर्बोध करणें, मिसळणें; चुकणें. *Confu'sedly adv.*

**Confū'sion**, *n.* (कन्फ्यू'झन्)—confused state; tumult; discomfiture. गोंधळ; घोटाळा; पराजय, निराशा. *Confusion worse confounded*, confusion made worse than it was. होता त्याच्यापेक्षां जास्त गोंधळ.

**Confūte'**, *v. t.* (कन्फ्यू'ट्)—to prove to be untrue. खोटा आहे असें सिद्ध करणें, खंडन करणें, चूक ठरवणें. *Confuta'tion n.* खंडन.

**Con'ge**, *n.* (कॉ'ङ्-झे)—dismissal. शेवटचा निरोप, रामराम, सलाम. *To take one's conge*, to say goodbye. जातांना निरोप घेणें.

**Congeal'**, *v. t. & i.* (कंजी'ल्)—to solidify by freezing or otherwise; to become thick; to become hard. थिजणें, थिजवणें; गोठणें, घट्ट होणें. *Congela'tion*, *n.* (कॉन्जिले'शन्)—congealing. थिजणें, गोठणें, घनीभाव.

**Congēn'ial**, *a.* (कंजी'निअल्)—of kindred temper; suiting one's likes and dislikes; pleasurable to. सारख्या स्वभावाचा; स्वभावाला अनुकूल; सुखकारक. *Congenial'ity*, *n.* अनुकूलता, साधर्म्य, स्वभावसाम्य. [L. *con*. with & *genialis*, jovial]

**Congĕn'ĭtal**, *a.* (कंजे'निटल्)—inborn, born with one; dating from birth. सहज, बरोबर जन्मलेला; जन्मापासूनचा. [L. *con*, together and *genitum*, to beget.]

**Cŏn'ger**, *n.* (कॉं'गर्)—a large snake-like fish caught for food. एक मोठा सापाच्या आकाराचा मासा.

**Congĕs'tĕd**, *a.* (कन्जे'स्टिड्)—suffering congestion; accumulated to excess. रक्तस्तंभन-रक्तसंचय-झालेला; गर्दी असलेला, दाट.

**Congĕs'tion**, *n.* (कन्जे'स्चन्)—abnormal accumulation (of blood, population, etc.). प्रमाणाबाहेर एकत्र जमणें, गांठ, ग्रन्थि, रक्तसंचय; दाट वस्ती.

**Conglŏm'erāte,** *n.* ( कन्लॉम-रेट् )—a mass of pebbles cemented into a kind of stone; a mixture of things. लहान दगडांपासून केलेला एक मोठा दगड; वस्तुमिश्रण. *v. t. & i.* to collect into a mass. एक गोळा होणें, पिंड बनणें.

**Conglŏmerā'tion,** *n.* (कन्लॉ-मरे'शन्)—a collection into a mass; a collection. ढीग, गठ्ठा; रास, समूह, संचय.

**Congrăt'ūlāte,** *v. t.* ( कन्ग्रॅ'च्युलेट् )—to offer congratulations to; to felicitate, to express pleasure at another's good fortune. अभिनंदन करणें; आनंद प्रदर्शित करणें. *To congratulate oneself*, to think oneself happy. आनंद किंवा समाधान मानणें. *Congratula'tory, a.* अभिनंदनपर.

**Congrătūlā'tion,** *n.* (कन्ग्रॅच्युले'शन्)—an expression of pleasure in another's good fortune ( *usu. pl.* ). दुसऱ्याबरोबर आनंद मानणें; अभिनंदन.

**Cŏng'regāte,** *v. t. & i.* (कॉं'ग्रि-गेट्)—to flock together, to assemble, to meet in a crowd. एकत्र येणें किंवा जमणें, संमेलन होणें.

**Cŏngregā'tion,** *n.* (कॉंग्रि-गे'शन्)—an assemblage, a company or assembly of people ( esp. for religious worship ). सभा, समाज, प्रार्थनेकरितां जमलेली मंडळी. *Congrega'tional, a.*

**Cŏng'rĕss,** *n.* ( कॉं'ग्रेस् )—a formal meeting of delegates for discussion; the group of persons who make laws in America. महासभा, कॉंग्रेस; अमेरिकेंतील कायदेमंडळ.

**Cŏng'ruence,** *n.* (कॉं'ग्रुअन्स् )—agreement, consistency. मेळ, मिलाफ, समन्वय. ( Also, *Cong'ruency, n.* )

**Cŏng'ruent,** *a.* (कॉं'ग्रु-अन्ट्)—harmonious; able to be fitted one on the top of another, corresponding; agreeing. एकरूप; एकावर एक बरोबर बसणारा, जुळणारा; सम; समरूप.

**Cŏngru'itў,** *n.* (कॉंग्रू'इटि)—accordance; harmonious relation; correspondence. मेळ; मिलाफ; अनुसंधान. *Cong'ruous, a.*

**Cŏn'ic, Cŏn'ical,** *a.* (कॉ'निक, कॉ'निकल् )—cone-shaped, having the form of a cone. निमुळता, गोपुच्छाकार, शंकूसारखा. *Conics*, conic section, शंकुच्छेद ( गणित-शास्त्र ).

**Cō'nifer,** *n.* (कों'निफर्)—a cone-bearing plant. आडवें-धुंध्याला-वाढणारें झाड, कोनाकृति फळें येणारें झाड.

**Conif'erous,** *a.* (कॉनि'फरस्)—bearing fruit-cones. कोन असलेलें, शंकूच्या आकाराचें.

**Conjĕc'ture,** *n.* (कंजे'क्चर्)—guessing, guesswork, surmise. अटकळ, अनुमान, तर्क. *v. t. & i.* to guess. तर्क करणें, तर्क बांधणें.

**Conjĕc'tural,** *a.* (कंजे'क्चरल्)—depending on conjecture, done or said by guess. तर्कानुमेय, अनुमानिक.

**Conjŏin',** *v. t. & i.* (कन्जॉ'इन्)—to make into or become a single whole. एकत्र जोडणें, संयोग करणें; संयुक्त होणें, मिळणें. *Conjoint', a.* जोडलेला, सांधलेला, संयुक्त.

**Cŏn'jugal,** *a.* (कॉ'न्जु-गल्)—having to do with marriage; between married persons. विवाहाचा, विवाह-विषयक; दंपत्यसंबंधीं, जोडप्यामधील.

**Cŏn'jugāte,** *v. t. & i.* (का'न्जुगेट्)—to inflect (a verb) through its forms, to give the forms of a verb. क्रियापद किंवा धातु चालविणें. *a.* conjoint; growing in pairs. संयुक्त, जोडलेला; जोडीजोडीनें वाढणारा.

**Cŏnjugā'tion,** *n.* ( कॉन्जुगे'शन् )—conjoining; inflexion scheme of verbs. एकत्र जोडणें; क्रियापदें चालविणें; गण.

**Conjŭnct',** *a.* ( कन्जं'क्ट् )—associated with or assisting another. जोडलेला, मदत करणारा, संयुक्त.

**Conjŭnc'tion,** *n.* (कन्ज'क्शन्)—conjoining; simultaneous occurrence; word used to connect sentences and words together. एकत्र जोडणें; युति, एकाच राशींत येणें; उभयान्वयी अव्यय. *In conjunction with*, together with. एकत्र, मिळून.

**Conjŭnc'ture,** *n.* (कन्जं'क्चर्)—position of affairs at a particular moment, a combination of events. कठीण प्रसंग, योगायोग.

**Cŏnjurā'tion,** *a.* (कॉन्जुरे'शन्)—a solemn entreaty; incantation. कळकळीची विनंति; मंत्र, जादू.

**Conjure',** *v. t.* (कान्जु'अर)—to entreat solemnly to do something. एखादी गोष्ट करण्याला कळकळीची विनंति करणें.

**Con'jure,** *v. t. & i.* (क'न्जर्)—to produce magical effects; to do sleight-of-hand trick; to call up a spirit of the dead. जादू करणें, मंत्रप्रयोग करणें; हातचलाखीचे खेळ करणें; जादूनें किंवा मंत्रानें ( पिशाच्च वगैरे ) अंगांत आणणें. *Conjuring tricks*, clever tricks of a magical kind done to amuse. करमणुकीकरितां केलेले जादूचे खेळ. *A name to conjure with*, a name of vast influence. जोरदार वजन असलेलें नांव. *To conjure up*, to cause to appear to the fancy. कल्पनेनें दिसायला लावणें, ( मंत्र घालून ) दृष्टिगोचर करणें; नवीन बनवणें, कल्पिणें.

**Con'jurer, Con'juror,** *n.* (क'न्जरर्)—an adept at sleight-of-hand. हातचलाखीमध्यें वाकबगार, जादूगार.

**Cŏnk**, *n.* (कॉंक्)—nose. नाक, नासिका. *Conk'y*, *a.* & *n.* big-nosed (person). मोठ्या नाकाचा मनुष्य, गरुडनाक्या.

**Connāte'**, *a.* (कने'ट्)-innate, belonging naturally (*to*); of like nature; (of leaves) united at the base. स्वाभाविक; नैसर्गिक; सारख्या स्वभावाचा; बुडाशीं एकत्र झालेला, संयुक्तमूल.

**Connă'tural**, *a.* (कॅने'चरल्)—congenital; of the same nature. स्वाभाविक, सजातीय; समधर्मक.

**Connĕct'**, *v. t.* & *i.* (कने'क्ट्)—to join together, to link, to unite, to combine, to have a close relation. जोडणें, संबंध जोडणें. *Well connected*, connected with persons of good position. चांगल्या लोकांशीं संबंध असलेला.

**Connĕc'tive**, *a.* (कने'क्टिव्ह्)-serving as connexion, tending to connect. संबंध जोडणारा, संयोजक.

**Connĕ'xion, Connĕc'tion**, *n.* (कने'क्शन्)—state of being linked together, communication, intercourse; that which connects; relation; relationship. जोडणें, संयोग, संबंध; संदर्भ, धोरण; संबंध; नातें.

**Cŏn'ning-tower**, *n.* (कॉ'निंग् टॉवर्)—a low armoured tower on a warship used by the officers guiding the ship. लढाऊ गलबतावरील सुकाणधाऱ्या अधिकाऱ्याची उंचावरील संरक्षित जागा.

**Connī'vance**, *n.* (कना'इव्हन्स्)—pretence of being unaware, pretended ignorance; winking at offence, tacit permission. डोळेझांक; अपराधाकडे कानाडोळा करणें, मूक संमति.

**Connīve'**, *v. i.* (कना'इव्ह्)—to look on in connivance at misdoing, to help wrong-doers secretly, to pretend not to see wrong-doing. वाईट कृत्यांकडे जाणूनबुजून दुर्लक्ष करणें, डोळेझांक करणें, ऐकलें न ऐकलें करणें, उपेक्षिणें.

**Cŏnnoisseur'**, *n.* (कॉनिस'र्)—a critical judge (*of*, *in*, matters of taste). मार्मिक परीक्षक, गुणज्ञ, गुणग्राहक, मर्मज्ञ, सुरुची.

**Connōte'**, *v. t.* (क-नो'ट्)—to imply, to betoken; to mean; to include in its meaning, to signify along with the primary sense. ध्वनित करणें, सुचवणें, दर्शवणें; अर्थ असणें, गर्भितार्थ असणें. *Conno'tative*, *a.* गुणवाचक, जातिनिर्देशक.

**Connŏtā'tion**, *n.* (क-नोटे'शन्)—implied meaning. गर्भितार्थ.

**Cŏnnū'bial**, *a.* (कॉन्यू'बि-अल्)—connected with marriage, conjugal, matrimonial. विवाहसंबंधीचा, दांपतिक, नवराबायकोचा.

**Cō'noid**, *a.* (को'नॉइड्)—more or less conical. साधारणपणें शंकूच्या आकृतीचा (पदार्थ).

**Cŏnq'uer**, *v. t.* & *i.* (कॉं'कर्)—to overcome; to acquire by conquest; to master one's difficulties or passions, to win a victory over. पराभव करणें; हस्तगत करून घेणें; संकटें किंवा मनोविकार यांच्यावर जय मिळविणें, संयमन करणें.

**Cŏnq'ueror**, *n.* (कॉं'करर्)—a person who conquers. विजयी, जेता.

**Cŏnq'uest**, *n.* (कॉं'क्वेस्ट्)—conquering; what is won by subjugation, a thing conquered. जिंकणें, विजय; जितवस्तु. *To make a conquest* (*of*), to win a person's affections. एखाद्याचें प्रेम संपादन करणें.

**Cŏnsănguĭn'eous**, *a.* (कॉन्सँग्वि'निअस्)—related by birth, of the same blood or family; near of kin. एकरक्तसंबंधी; अत्यंत जवळचा नातलग.

**Cŏnsănguĭn'itў**, *n.* (कॉन्सँग्वि'निटि)—kinship, blood-relationship. रक्तसंबंध.

**Con'science**, *n.* (कॉ'न्शन्स्)—the inner feeling distinguishing between right and wrong; सदसद्विवेकबुद्धि; चांगल्या किंवा वाईट कृत्याची जाणीव. *To have the conscience to*, to have the impudence to. धैर्य किंवा धीटपणा असणें. *Conscience Clause*, धर्मासंबंधीं बाबतींत सवलत देणारें कायद्याचें कलम. *Conscience money*, money paid because one feels one aught to pay, not because one is forced to pay. मनाला देणें योग्य वाटतें म्हणून दिलेला पैसा. (चुकविलेला मालावरील कर इ.)

**Cŏnscĭĕn'tious**, *a.* (कॉन्-शिए'न्शस्)—obedient to the dictates of conscience, sincere, scrupulous. नेकीचा, न्यायनिष्ठ, इमानी.

**Cŏn'scious**, *a.* (कॉ'न्शस्)—having knowledge of one's thoughts and feelings; awake to one's surroundings; aware of. स्वतःचे विचार व भावना जाणणारा, जाणता; परिस्थितीचें ज्ञान असलेला; जाणीव असलेला.

**Cŏn'sciousness**, *n.* (कॉ'न्शस्-नेस्)—a person's thoughts and feelings as a whole. देहभान, जाणीव. *Bereft of consciousness*, बेशुद्ध, बेसावध. *To return to consciousness*, शुद्धीवर येणें, देहभानावर येणें. *To lose consciousness*, to faint. बेशुद्ध होणें, मूर्च्छित होणें.

**Conscrībe'**, *v. t.* (कन्स्क्रा'इब्)—to enrol by conscription. सक्तीनें लष्करी कामावर नांव नोंदणें, सक्तीनें लष्करभरती करणें.

**Cŏn'script**, *n.* (कॉ'न्स्क्रिप्ट्)—a man who is forced by law to become a soldier. लष्करी कामाकरितां नांव नोंदून ठेवलेला मनुष्य.

**Conscrĭp'tion**, *n.* (कॉन्स्क्रि'प्शन्)—compulsory enrolment for national service. राष्ट्रसेवेकरितां लष्करांत किंवा आरमारांत सक्तीनें नांव नोंदणें.

**Cŏn'secrāte**, *v. t.* (कॉन्सि-क्रेट्)-to make sacred; to devote to sacred purpose; to sanctify. पवित्र करणें; पवित्र कार्याकरितां वाहणें; शुद्ध करणें. *Consecra'tor, n.* अभिषेक करणारा; प्रस्थापक; देवाला अर्पण करणारा. *Consecra'tory, a.*

**Cŏnsecrā'tion**, *n.* (कॉन्सि-क्रे'शन्)—setting apart for sacred purposes; dedication. पवित्र कार्याकरितां वाहणें, अभिषेक, अभिषेचन; अर्पण करणें.

**Consĕc'ūtĭve**, *a.* (कन्से'क्युटिव्ह्)—following in order, consequential; orderly and unbroken. लागोपाठचा, मागून येणारा, एकापाठीमागून एक.

**Consĕn'sus**, *n.* (कन्से'न्सस्)—agreement (of opinion) on the part of all concerned. सर्वांचें मतैक्य, संमति, अनुमति.

**Consĕnt'**, *v. i.* (कन्से'न्ट्)—to agree to; to acquiesce in. रुकार देणें; कबूल होणें. *n.* an agreement; consenting or words expressing consent. रुकार, अनुमति. *Age of consent*, age at which the consent (esp. of a girl to seduction) is valid in law. संमतिवय. *With one consent*, unanimously. सर्वानुमतें, एकमतानें.

**Cŏnsĕntā'neous**, *a.* (कॉन्सेन्टे'निअस्)—in accord; done by common consent. योग्य, अनुरूप; संमत, एकविचारानें केलेलें.

**Consĕn'tient**, *a.* (कन्से'न्शन्ट्)-agreeing. एकमताचा. अनुकूल.

**Cŏn'sequence**, *a.* (कॉ'न्सिक्वन्स्)—that which comes from any cause or principle; importance; moment; influential position. फळ, परिणाम; महत्त्व; मोठेपणा; वजनदार स्थान, मोठा दर्जा. *To take the consequences*, to accept whatever results from one's choice or act. परिणाम भोगणें. *In consequence*, as a result (of). परिणाम म्हणून, वास्तव.

**Cŏn'sequĕnt**, *a.* (कॉ'न्सिक्वेन्ट्)—that results; following as a consequence or result. आनुषंगिक; परिणाम म्हणून.

**Cŏnsequĕn'tial**, *a.* (कॉन्सिक्वे'न्शल्)—of the nature of a corollary; self-important; having important results. उपसिद्धान्तासारखा; अहंमन्य, महत्त्वाचा, मानी; परिणामकारक.

**Cŏn'sequĕntly̆**, *adv. & conj.* (कॉ'न्सि-क्वेन्ट्-लि)—as a result, accordingly, therefore. परिणामीं, वास्तव, म्हणून.

**Conserv'ancy̆**, *n.* (कन्स'र्व्हन्सि)—a board controlling a river or a port, a group of persons in charge of preserving forest or rivers. नदी, बंदर किंवा अरण्य यांचें रक्षण करणारें मंडळ.

**Cŏnservā'tion**, *n.* (कॉन्सर्व्हे'शन्)—preserving; keeping from decay or from being destroyed; continuance; conserved state. जपून ठेवणें; चालू ठेवणें; जपलेली स्थिति. *Conservation of energy*, invariability in quantity of total energy of any system of bodies (including the universe). शक्तीचें प्रकृतिनित्यत्व, शक्तिसंस्थिति.

**Conserv'atĭve**, *a.* (कन्स'र्व्हेटिव्ह्)—wishing to keep things as they are, of conserving tendency; opposed to change; moderate. आहे ती स्थिति बरी समजणारा; नवीन सुधारणेचा द्वेष्टा; मध्यम, साधारण. *n.* a member of the Conservative party; a person of conservative disposition, one who does not want any change in government. इंग्लंडांतील कॉन्सर्व्हेटिव्ह पक्षाचा अनुयायी; चालू स्थिति हीच बरी असें म्हणणारा मनुष्य. *Conserva'tism, n.* रूढिप्रियता.

**Conservatoire'**, *n.* (कन्सर्व्हट्वा'र्)—a public school of music or art. संगीत, कला इत्यादि विशेष विषय शिकविण्याची सार्वजनिक शाळा.

**Conserv'atory̆**, *n.* (कन्स'र्-व्हेटरि)—a green-house for tender plants, a glass house for flowers. वनस्पति सुरक्षित ठेवण्याचें स्थळ, वनस्पतिरक्षणस्थान.

**Conserve'**, *v. t.* (कन्स'र्व्ह्)—to preserve; to keep from decay or change, to keep safe. राखून ठेवणें; नाश होऊं नये म्हणून जपून ठेवणें. *n. pl.* (कन्झ'र्व्ह्स्) preserved fruit, a fruit cooked with sugar so that it can be kept for a long time. साखरेंत घालून ठेवलेलें फळ, मुरंबा, साखरेंत मुरविलेला पदार्थ.

**Consĭd'er**, *v. t & i.* (कन्सि'डर्)—to contemplate; to think about; to hold a certain opinion; deliberate thoughtfully; to reckon with, to take into account; to show consideration for. विचार करणें; वाटणें, मत असणें; मनन करणें; गणणें, विचारांत घेणें; योग्य विचार करणें. *To consider others*, to think of the feelings and wishes of others. दुसऱ्याला काय वाटतें याचा -दुसऱ्यांच्या भावनांचा-विचार करणें.

**Consĭd'erable**, *a.* (कन्सि'डरेबल्)—rather important, of some importance; worthy of regard, worth considering; large. कांहीं महत्त्वाचा; विचार करण्याजोगा, योग्य, संभावित; मोठा, धराचसा.

**Consĭd'erate**, *a.* (कन्सि'डरेट्)—thoughtful for the feelings or right of others, kind. विचारी, दुसऱ्यांच्या भावना किंवा हक्क यांचा विचार करणारा, दयाळू. *Consid'erately, adv.* विचारानें, विचारपूर्वक. *Consid'erateness, n.*

**Considerā'tion**, *n.* (कन्सिडरे'शन्)—considering; a thing worth considering; a thing given or done as inducement; considerateness. विचार करणें; विचार करण्याजोगी गोष्ट; मोबदला;

**Dĕvotee'**, *n.* ( डेव्होटी' )—a votary of a pursuit or person; one who devotes himself to religion. कट्टा उपासक, भक्त; योगी; बैरागी.

**Devō'tion**, *n.* ( डि-व्हो'शन् )-devotedness; devoutness; self-surrender; (*pl.*) one's religious exercises. भक्ति, ईश्वरनिष्ठा; आत्मबलिदान; (अने०) प्रार्थना, ईशस्तोत्रें. *Devo'tional*, *a.* भक्तिविषयक, भक्तिपूर्वक.

**Dėvour'**, *v. t.* ( डि-व्हॉ'वर् )—to eat up; to eat greedily or fast; to destroy or consume; to read quickly; to look at eagerly. खाऊन टाकणें; आधाशीपणानें खाणें; नाश करणें; भराभर वाचणें; उत्सुकतेनें पाहाणें.

**Dėvout'**, *a.* ( डि-व्हा'उट् )—earnestly religious, reverent, prayerful. भक्तिपरायण, धर्मशील, देवभक्त. *Devout'ly*, *adv* eagerly. उत्सुकतेनें.

**Dew**, *n.* ( ड्यू )—water which forms on plants etc. after sunset; beaded moisture resembling it; wetness, damp. दंव; तुषार; ओलावा. *v. t.* to wet with dew, to moisten. दंवानें ओलें करणें, भिजवणें.

**Dew'lăp**, *n.* ( ड्यू'लॅप् )—the loose skin hanging from the throat, (esp. in cattle). गळ्याखालील लोंबतें कातडें, बैलाचें पोळें. *Dew'lapped*, *a.*

**Dew'ȳ**, *a.* ( ड्यू'इ )—wet or moist with dew; full of dew. दंवानें भिजलेला, तुषारमय.

**Dĕ'xter**, *a.* ( डे'क्स्टर् )—on the right-hand side. उजव्या बाजूचा, उजवा, दक्षिण.

**Dĕxtĕ'rĭtȳ**, *n.* ( डेक्स्टे'रिटि )-dextrousness, expertness, cleverness, skill. हस्तकौशल्य, हातोटी.

**Dĕx'terous, Dex'trous**, *a.* ( डे'क्स्टरस्,-क्स्ट्रस् )—neathanded, clever with the hands, adroit; clever, skilful. हस्तकुशल, पटाईत; चतुर, निपुण.

**Dhow**, *n.* ( डाउ )—a sailing boat used by the Arabs. अरब लोकांची नाव, गलबत, कोट्या.

**Dīăbē'tēs**, *n.* ( डायॅ-बी'टीझ् )—a disease characterized by excessive discharge of urine. मूत्रातिसार, मधुमेह. *Diabe'tic*, *a.* मधुमेहाचा, मधुमेह असलेला.

**Dĭa'blerie**, *n.* ( डि'आब्लरी )—sorcery; the devil-lore; uncanny proceedings. जादूटोणा; पिशाच्चविद्या; भयंकर-गूढ-कृति, आचार.

**Dīabŏl'ic**, *a.* ( डायबॉ'लिक् )—of the Devil; monstrously cruel or wicked. पिशाच्चासंबंधीं; अतिदुष्ट. *Diabol'ical*, *a.*; *Dia'bolism*, *n.* सैतानी कृत्य; जादूटोणा; पिशाच्चविद्या.

**Dīăcrit'ical**, *a.* ( डायॅ-क्रि'टिकल् )—distinguishing, distinctive. अन्तर किंवा फरक दर्शविणारा, ध्वनि-उच्चार-भेददर्शक.

**Dī'adĕm**, *n.* ( डा'यडेम् )—crown, coronet, fillet, a headband, a band of precious stones worn on the head, sovereignty. मुकुट, किरीट, बादशाही, सार्वभौमत्व.

**Dīagnōse'**, *v. t.* ( डायग्नो'झ् )—to determine from symptoms the nature of a disease. रोगाचें निदान ठरविणें, रोगपरीक्षा करणें

**Dīagnō'sis**, *n.* ( डायग्नो'सिस् )—identification of a disease, finding out the cause and nature of a disease, scientific discrimination. रोगपरीक्षा, चिकित्सा.

**Dīăg'onal**, *a.* ( डायॅ-गो'नल् )—going across from angle to angle or corner to corner. कर्णाकृति, कोणस्थ. *n.* a line drawn from angle to angle; any oblique line. कर्णरेषा; कर्ण; कोणतीहि तिरकी ओळ.

**Dīa'grăm**, *a.* ( डाय'ग्रॅम् )—a drawing made to illustrate a statement or idea. आकृति, चित्र.

**Dī'al**, *n.* ( डा'यल् )—the face of a clock or a watch; the sun-dial. ( वेळ दाखविण्याकरितां ) घड्याळाची तबकडी; शंकुयंत्र. *v. t.* छायायंत्रावर-शंकुयंत्रावर दाखविणें.

**Dī'alĕct**, *n.* ( डा'यलेक्ट् )—a form of speech peculiar to a district or class. पोटभाषा, बोली.

**Dīalĕc'tic**, *n.* ( डायले'क्टिक् )—(*pl.*) the art of arguing, the art of reasoning and debate; logical dexterity. युक्तिवादशास्त्र; तार्किक कुशलता. *Dialecti'cian*, *n.* युक्तिवादपटु, तर्कशास्त्रज्ञ.

**Dī'alogue**, *n.* ( डा'यलॉग् )-a conversation between two or more persons. संवाद, संभाषण.

**Dīăm'eter**, *n.* ( डायॅ'मिटर् )— the straight line passing from side to side of any body or figure through its centre; transverse measurement. मध्यरेषा, व्यास; आडवें माप.

**Dīamĕt'rĭcal**, *a.* ( डायमे'ट्रिकल् )—of or along a diameter; directly opposite. व्यासाचा; अगदीं उलट.

**Dī'amond**, *n.* ( डा'यमन्ड् )—a colourless precious stone of great value and hardness, a rhomb; a playing card with a diamond-shaped figure printed on it. हिरा; समभुज चौकोन; चौकट, पत्त्यांतील चौकटचें पान. *A rough diamond*, a person good at heart though rough in manners. चालीरीती माहित नसल्या तरी अंतःकरणाचा चांगला मनुष्य. *Diamond wedding*, the 60th year of being married. लग्न झाल्या-नंतरचें साठावें वर्ष. *Diamond cut diamond*, two persons equally clever trying to deceive each other. ठकास महा ठक. *Black diamonds*, coal. कोळसा.

**Dīapā'son**, *n.* ( डायपे'झन् )—a harmony of a voice or musical instrument from the highest to the

lowest note; a grand burst of music; a part of a musical organ. स्वरमेलन; स्वरांच्या उच्चतेचें प्रमाण; वाद्याचा एक भाग, मुरलीचें किंवा पाव्याचें छिद्र.

**Dī'aper**, *n.* (डा'यपर्)—a fine linen towelling; a small towel, a napkin.; reticulated decorative work. वेलबुट्टीदार रेशमी कापड; लहान हुमाल, नॅप्किन; शोभेचें जाळीदार काम, जाळीची नक्षी.

**Dīăph'anous**, *a.* (डायॅ'फॅनस्)—transparent. पारदर्शक.

**Dīaphorĕt'ic**, *a.* & *n.* (डायफरे'टिक्)—घाम आणणारें स्वेदजनक (औषध).

**Dī'aphrăgm**, *n.* (डा'यफ्रॅम)—the muscle which separates the lungs from the stomach; any thin plate or disk partly or wholly closing a tube. छाती व पोट यांमधील पडदा, मध्यपटल; यंत्राच्या आंतील पडदा किंवा आवरण. *Diaphragmat'ic*, *a.*

**Dī'archy**, *n.* (डा'यार्कि)—government by two independent authorities. द्विदल राज्यपद्धति, द्विसत्ताक राज्य.

**Dīarrhoe'a**, *n.* (डायरीं'आ)—an excessive looseness of bowels. अतिसार, संग्रहणी, परसाकडेचा उपद्रव.

**Dī'ary̆**, *n.* (डा'यरि)—a daily record of events; a book in which notes are written every day (of things done or to be done). रोजची हकीगत; रोजनिशी, दैनंदिनी.

**Dī'atŏm**, *n.* (डा'यटॉम्)—a very small creature or plant living in water. पाण्यांत राहाणारा एक अतिसूक्ष्म प्राणी किंवा झाड. *—ic*, *a.* द्विपरमाणुक. *Diatom'aceous*, *a.*

**Dī'atribe**, *n.* (डा'यट्राइब्)—a bitter criticism; a denunciatory harangue, a fierce speech attacking person or thing. कडु टीका; निंदात्मक जोरदार भाषण.

**Dĭb'ble**, *n.* & *v. t.* (डि'बल्)—gardener's implement for planting; use a dibble. ढपस, पेंहस; खुंटळणें, टोवणें.

**Dibs**, *n. pl.* (डिब्झ्)—(sl.) *money*. पैका, पैसा.

**Dice**, *v. i.* (डाइस्)—to gamble with dice. फांशांनीं खेळणें. *n.* (Pl. of *die*) फांसे. *Di'cer*, *n.* फांसे खेळणारा.

**Dīchŏ'tomy̆** *n.* (डाइकॉ'टमि)—division into two parts. दोन विभाग करणें, दुभागणें. [Gr. *dicha* in two & *temnein*, to cut]

**Dĭck'y, Dĭck'ey**, *n.* (डि'कि)—a donkey; a third seat at the back in a two-seated motor-car; a child's words for a bird. गाढव; दोन माणसें बसण्याच्या मोटारगाडींत पाठीमागें असलेली तिसरी बसावयाची जागा; पक्ष्यांना उद्देशून वापरण्याचा लहान मुलांचा शब्द.

**Dī'ctaphōne**, *n.* (डि'क्टफोन्)—an instrument for setting down the sounds of the voice on wax and producing them again later. आवाजाचे वर्णोच्चार मेणावर ठसवून नंतर पुनः ज्याच्यांत उमटवितां येतात असें यंत्र. ध्वनिपुनरुच्चारक यंत्र.

**Dĭctāte'**, *v. i.* & *t.* (डिक्टे'ट्)—to say aloud matter to be written down; to give peremptory orders to. लिहून घेण्याकरितां सांगणें; तायडतोब हुकूम किंवा आज्ञा करणें, निक्षून सांगणें. *n.* (डि'क्टेट्)—(usu. in *pl.*), the bidding of conscience, self-interest, or the like. (सद्सद्विवेकबुद्धि वगैरेंची) आज्ञा, हुकूम, प्रेरणा.

**Dĭctā'tion**, *n.* (डिक्टे'शन्)—act of dictating; a command; an *order*. सांगून लिहविणें, शुद्धलेखन; हुकूम, आज्ञा.

**Dĭctā'tor**, *n.* (डिक्टे'टर्)—an absolute ruler; a person in a position of supreme authority. मुखत्यार, एकतंत्री राजा; सर्वाधिकारसंपन्न, अप्रतिबंध सत्ता असलेला. *Dicta'torship*, *n.* अनियंत्रित सत्ता.

**Dĭctātor'ial**, *a.* (डिक्टे-टॉ'अरिअल्)—absolute, free of checks; rude and commanding in manner, despotic or overbearing. पूर्ण स्वतंत्र; अहंपणाचा, औद्धत्याचा, जुलमी, उद्धट.

**Dĭc'tion**, *n.* (डि'क्शन्)—the choice and use of words in speech or writing. भाषाशैली, वाक्यरचना, वाणी, भाषा.

**Dĭc'tionary**, *n.* (डि'क्शनरि)—a book containing the words of a language with their meaning; a word-book, a lexicon कोश, शब्दकोश; शब्दसंग्रह.

**Dĭc'tum**, *n.* (डि'क्टम्)—(*Pl Dicta*) an opinion expressed very strongly, pronouncement; a maxim, a current saying. ठांसून सांगितलेलें मत, वचन, निकाल, (Law) दाव्याशीं संबंध नसलेल्या मुद्यावर न्यायाधिशानें दिलेलें मत, वचन, म्हण, प्रचारांतील वाक्य.

**Did, Didst**, *Pa. t.* of Do.

**Dīdăc'tic**, *a.* (डायडॅ'क्टिक्)—teaching a lesson, meant or meaning to instruct. उपदेशात्मक, उपदेशरूप, नीतिपर. *Didac'ticism*, *n.* उपदेशपरता, नीतिपरता.

**Dī'dăpper**, *n.* (डा'इ-डॅपर्)—a diving bird. एक पाण्यांत बुडी मारणारा-पाणबुड्या-पक्षी.

**Dĭd'dle**, *v. t.* (डि'डल्)—to cheat, to take in. फसविणें, ठकविणें.

**Dī'dō**, *n.* (डा'इ-डो)—(*Pl. Didoes*) prank, caper. खोडी, फसविण्याची युक्ति. *To cut a dido*. खोड्या करणें.

**Die**, *n.* (डाय्)—1 (*Pl. dice*) one of the cubes used in games of chance; (*Pl.*) dice-play.

फांसा; (अने०) द्यूत. 2 (*Pl. dies*) a coining or embossing stamp. शिक्का. *v. i.* (*dying*) to cease to live; to suffer spiritual death; to fade away; to wither. मरणें; आध्यात्मिक दृष्टया नाश पावणें; कोमेजणें; सुकणें, वाळून जाणें *To die out*, to vanish. नाहींसा होणें. *To die in harness*, to go on working till death. मरेपर्यंत काम करीत राहणें, नेहमींचें काम करीत असतां मरणें. *To die in the last ditch*, to resist to the utmost. शेवटपर्यंत झगडणें, मरेपर्यंत लढणें. *To die in one's shoes*, to die by violence. अपघातानें मरणें *The die is cast*, the matter is now decided. त्या गोष्टीचा निर्णय झाला, फांसा टाकला.

**Die'härd**, *n.* (डा'इ-हार्ड्)—a person who resists to the end. शेवटपर्यंत विरोध करणारा, कट्टर विरोधी.

**Di'et**, *n.* (डा'यट्)—a group of persons who rule a country, a congress, (esp. foreign parliaments); a kind of food eaten by a person for reasons of health, a food-regimen. मुख्य राजकारणी सभा, मंत्रिमंडळ; आहार, अन्न, पथ्याचें अन्न.

**Di'etarў**, *a.* (डा'यिटरि)—of or concerning diet. पथ्यकर, पथ्यासंबंधी. *n.* an allowance or character of food proved. चंदी, आहार-योजना. *Dietet'ics*, *n.* पथ्यापथ्यविचार, आहार-योजनाशास्त्र

**Diff'er**, *v. i.* (डि'फर्)—to be unlike; to be distinguishable; to diverge in opinion. विसदृश असणें; फरक असणें; तफावत असणें; मतभेद असणें.

**Diff'erence**, *n.* (डि'फरन्स्)—unlikeness; degree or amount of unlikeness; disagreement in opinion. निराळेपणा; फरक, भेद; मतभेद.

**Diff'erent**, *a.* (डि'फरन्ट्)—dissimilar; not the same; of diverse qualities. वेगळा; भिन्न; निराळ्या स्वरूपाचा.

**Differen'tia**, *n.* (डिफरे'न्शिआ)—a distinguishing mark, that which distinguishes a thing from others. भेददर्शक किंवा विशेष खूण. (Logic) व्यावर्तक धर्म, व्यावर्तन, असाधारण धर्म.

**Differen'tial**, *a.* (डिफरे'न्शल्)—varying with circumstances; distinctive. भिन्न भिन्न प्रकारचा; विशेष, व्यावर्तक.

**Differen'tiate**, *v. t. & i.* (डिफरे'न्शि-एट्)—to constitute the difference between, or in; to develop into unlikeness; to discriminate, to see the difference between. भेद असणें किंवा दाखविणें; विसदृश होणें; मनांत भेद ओळखणें, फरक जाणणें.

**Diff'icult**, *a.* (डि'फिकल्ट्)—hard to do, hard to deal with, hard to understand; troublesome; hard to please. कठीण, अवघड, जड; त्रासदायक; दुराराध्य.

**Diff'icultў**, *n.* (डि'फिकल्टि)—difficultness; a difficult point or situation; an obstacle, an impediment. कठीणपणा; कठीण प्रश्न किंवा स्थिति; विघ्न, संकट. *To make difficulties*, to raise objections to a proposal or an order. अडथळे आणणें, हरकत घेणें. *With difficulty*, hardly, only by a great effort. कष्टानें, प्रयासानें.

**Diff'idence**, *n.* (डि'फि-डन्स्)—self-distrust; shyness. स्वतःविषयीं अविश्वास; लज्जा, संकोच.

**Diff'ident**, *a.* (डि'फि-डन्ट्)—wanting in self-confidence, without belief in one's own powers. आत्मविश्वास नसणारा, साशंक, आत्मशंकी.

**Diffract'**, *v. t.* (डिफ्रॅ'क्ट्)—to break up (beam of light) into bands. मोडणें, अपभवन होणें.

**Diffuse'**, *v. t.* (डिफ्यू'झ्)—to shed or spread around; to cause to intermingle. सभोंवार पसरणें; एकमेकांत मिसळूं देणें. *Diffu'sion*, *n.* प्रसार, फैलाव, अभिसरण. *Diffu'sible*, *a.* विस्तार-क्षम, अभिसरणशील. *Diffusibi'lity*, *n.* प्रसरण-शीलता.

**Diffu'sive**, *a.* (डि-फ्यू'झिव्ह्)—spreading readily; radiating; genial. फैलावणारा, पसरणारा; प्रकाशित करणारा; अनुकूल, प्रकृतीस मानवणारा.

**Dig**, *v. i. & t.* (डिग्)—to turn up soil with a spade; to thrust one's nails into; to make research; to study hard खणणें; नखें आंत खुपसणें; संशोधन करणें; पुस्तकांत डोकें खुपसणें, सडकून अभ्यास करणें. *To give one a dig*, to give a quick push to make one attend; to say something unpleasant about one. लक्ष वेधण्याकरितां कोंपर मारणें; एखाद्याला लागेल असें बोलणें. *Digg'ings*, *n.* goldfield; lodgings. सोन्याच्या खाणी; बिऱ्हाडाची जागा.

**Digest'**, *v. t. & i.* (डिजे'स्ट्)—to reduce into systematic or assimilable form; to summarize; to absorb and assimilate; (of food) to undergo digestion. विचारपूर्वक जुळणी करणें; संक्षिप्त करणें; विचार किंवा मनन करणें; पचणें, पचवणें. *n.* (डा'इजेस्ट्)—a compendium, (esp. of laws); a short account of a book or other writing. कायद्याचा सारग्रंथ; पुस्तकाचा सारांश. *Diges'tible*, *a.* पचण्याजोगा, पचनीय. *Digestibil'ity*, *n.*

**Diges'tion**, *n.* (डिजे'स्चन्)—digesting; power of digesting food. पचवणें; अन्न पचविण्याची शक्ति, पचनक्रिया.

**Diges'tive**, *a.* (डिजे'स्टिव्ह्)—assisting digestion. पचनाला मदत करणारा, पाचक, पचवणारा.

**Dight**, *a.* (डाइट्)—clad, adorned. आच्छादिलेला, विभूषित.

**Dĭ'gĭt**, *n.* (डि'जिट्)—any of the figures 0-9; a finger or toe; finger's breadth; (Atsron.) twelfth part of the sun's or moon's diameter. ० ते ९ पर्यंत अंक किंवा आंकडा; हाताचें किंवा पायाचें बोट; बोटभर; चंद्र-सूर्याच्या व्यासाचा बारावा भाग, अंश, कला.

**Digĭtā'lis**, *n.* (डिजिटे'लिस्), **Dĭgĭtā'lin**, *n.* (डिजिटे'लिन्)—a medicine which makes the heart beat more slowly. हृदय अधिक मंद चालण्याकरितां द्यावयाचें औषध.

**Dĭg'nĭfy̆**, *v. t* (डि'ग्नि-फाइ)—to give dignity to; to show honour to. मोठेपणा देणें, आदर दर्शविणें *Digni'fied*, *a.* मान्यतेस चढलेला, प्रतिष्ठित, थोर.

**Dĭg'nĭtary**, *n.* (डि'ग्निटरि)—a holder of a high office, (esp. in the Church); a person holding a high office. (विशेषतः चर्चमधील) मोठ्या पदवीचा मनुष्य, पदाधिकारी.

**Dĭg'nĭty̆**, *n.* (डि'ग्निटि)—claims to respect; an office or title; dignified behaviour. मोठेपणा; उच्च पदवी; दर्जा.

**Dī'grăph**, *n.* (डा'इ-ग्रॅफ्)—two letters composing a single sound. एकच उच्चार होणारीं जोडलेलीं दोन अक्षरें.

**Dīgress'**, *v.i.* (डाइ-ग्रे'स्, डि-)—to diverge temporarily from the main track, (esp. in a discourse), to wander from the subject in speaking or writing. (भाषणांत विषय सोडून भलतीकडे) वाहवत जाणें, विषयांतर करणें. *Digre'ssion*, *n.* विषयान्तर, अप्रस्तुत विषय. *Digre'ssive*, *a.* विषयान्तर करणारा.

**Dike, Dy̆ke**, *n.* (डाइक्)—a long ridge of earth, an embankment; a channel or ditch. बांध, धरण; खंदक.

**Dĭlăpĭdā'tion**, *n.* (डिलॅ-पिडे'शन्)—state of bad repair; falling into decay. मोडती किंवा पडती स्थिति; नाश, पडझड.

**Dĭlăp'ĭdāted**, *a.* (डिलॅ'पि-डेटेड्)—in decay. मोडकळीस आलेला, पडका, पडीत.

**Dīlāte'**, *v. t. & i.* (डाइ-ले'ट्)—to widen or expand, to expatiate or enlarge, to make larger. फेंदारणें, पसरणें, विस्तारणें; विस्तारानें सांगणें.

**Dĭl'atory̆**, *a.* (डि'ल-टरि)—tending to or designed to cause delay; tardy, causing delay. वेळ घालवणारा, चेंगट; मंद, दीर्घसूत्री.

**Dĭlĕmm'ă**, *n.* (डिले'म्मा)—position leaving only a choice between equal evils. चिमटा, कचाटी, पेंच.

**Dĭlĕttăn'tē**, *n.* (डिलिटॅ'न्टि)—a person with taste for the fine arts; an amateur, a smatterer. कलांचा शोकी; नवशिक्या, कच्चें ज्ञान असलेला. *a.* amateur; desultory. शोक म्हणून काम करणारा; निष्काळजी. *Dilettan'tism*, *n.* हरहुन्नर-कला यांची थोडथोडी माहिती.

**Dĭl'ĭgence**, *n.* (डि'लि-जन्स्)—unremitting application to work. उद्योग, व्यासंग, कार्यासक्ति.

**Dĭl'ĭgent**, *a.* (डि'लिजन्ट्)—persevering, working with care and not wasting time. उद्योगी, मेहनती, दक्ष.

**Dĭll**, *n.* (डिल्)—a herb with scented seeds. बडीशेपेचें झाड, बडिशेप, बाळंतशेप.

**Dĭll'y̆-dălly̆**, *v. i.* (डि'लि-डॅलि)—to procrastinate, to loiter, to delay, to trifle, to waste time. उशीर लावणें, अळंटळं करणें, वेळ घालवणें.

**Dīlute'**, *v. t.* (डाइ-ल्यू'ट्)—to reduce in strength by addition of water. पाणी मिसळून कमजोर करणें, सौम्य करणें.

**Dīlu'vĭal**, *a.* (डाइ-ल्यू'व्हि-अल्)—of a flood, of the Flood in Genesis. पुरासंबंधीं, पुराचा, महाप्रलयासंबंधीं. Also, *Dilu'vian*, *a.*

**Dĭm**, *a.* (डिम्)—deficient in brightness, or clearness; obscure; indistinct. अंधुक; जड, मंद; अस्पष्ट. *v. t. & i.* to make or grow dim. अंधुक करणें किंवा होणें.

**Dīme**, *n.* (डाइम्)—tenth of a dollar. अमेरिकन डॉलर नाण्याचा दहावा भाग.

**Dĭmĕn'sion**, *n.* (डि-मे'न्शन्)—any of the three linear measurements, length, breadth and depth; (*Pl.*) size or extent. मोजमाप; लांबी, रुंदी व उंची; (अनेः) आकार, विस्तार, क्षेत्रफळ, परिमाण. *Dimen'sional*, *a.* विस्तारासंबंधीं. *The Fourth Dimension*, time (as having an effect on the other three measures). काळ, काळवेळ.

**Dĭmĭn'ish**, *v. t. & i.* (डि-मि'निश्)—to make or become less; to impair. कमी करणें, कमी होणें; खराब करणें, बिघडवणें.

**Dĭmĭnū'tion**, *n.* (डि-मि-न्यू'शन्)—lessening, decrease, deduction, decay. कमी करणें, उतार, क्षय, ऱ्हास.

**Dĭmĭn'ūtive**, *a.* (डि-मि'न्यू-टिव्ह्)—implying smallness; tiny, undersized. लहानपणा दाखविणारा; लहान, लघु आकाराचा. *n.* अल्पार्थवाचक नाम.

**Dĭm'ĭty̆**, *n.* (डि'मिटि)—a kind of cotton fabric. दुमेटीचें कापड.

**Dĭm'ple**, *n.* (डि'म्पल्)—a small hollow, (esp. in the cheek or chin); a ripple in water. गालाची किंवा हनुवटीची खळगी, कपोलभंग; लहान लाट. *v. t. & i.* खळगी येणें, -असणें, लाटा येणें. *Dim'ply*, *a.*

**Dĭn**, *n.* (डिन्)—a continuous roar of confused notes. एकसारखा मोठा आवाज, कोलाहल, गोंगाट. *v. t.* to stun with a noise ; to ram (a fact, advice) into a person or his ears. कानटाळी बसणें; कानीं कपाळीं ओरडणें, (मनावर) ठसवणें. Din'ful, *a.* आवाजानें भरलेला, गोंगाटाचा. *To din into the ears of*, to continue saying the same thing over and over again. तीच तीच गोष्ट कानावर आदळीत असणें, कानींकपाळीं ओरडणें.

**Dīne**, *v. t. & i.* (डाइन्)—to take dinner ; to entertain at dinner. भोजन करणें, जेवणें; भोजन घालणें. *To dine on* or *off*, (भात वगैरे) जेवणें. *To dine with Duke Humphrey*, to go without dinner. उपाशीं राहणें. *A dining-room*, a room used for meals. जेवणाची खोली. *Din'er*, *n.* one who dines ; a railway car in which dinner is provided. जेवणारा; आगगाडींतील जेवणाचा डबा. *Din'er-out*, a person much sought as a dinner guest. नेहेमीं दुसऱ्याकडे-दुसऱ्या मंडळींत-घराबाहेर-जेवणारा.

**Dĭng**, *v. t. & i.* (डिंग्)—to throw, to dash, to hurl ; to ring (as a bell), to tell again and again in a wearisome way. जोरानें फेंकणें, आदळणें; (घंटा) वाजवणें; चऱ्हाट वळविणें.

**Dĭng'-dŏng'**, *n.* (डिंग्-डॉंग्)—the sound of two bells rung alternately. एका पाठीमागून एक वाजविल्या जाणाऱ्या दोन घंटांचा आवाज, घंटानाद, गजर. Also, *adv.*

**Dĭn'ghy, Dĭn'gey**, *n.* (डिंगि)—a small boat. लहान होडी, नाव.

**Dĭn'gle**, *n.* (डिंगल्)-a deep dell, a small valley. खोल दरी.

**Dĭn'gō**, *n.* (डिंगो)—(*pl. Ding'oes*) an Australian wild dog. ऑस्ट्रेलियांतील एक रानटी कुत्रा.

**Dĭn'gy̆**, *a.* (डिंजि)—dull-coloured ; grimy ; dirty-looking. मलिन, मळकट; किटलेला; घाणेरडा. *Din'gily, adv.; Din'giness, n.*

**Dĭn'ky̆**, *a.* (डिंकि)—pretty, neat ; of attractive appearance. सुरेख, नीट; आकर्षक.

**Dĭnn'er**, *n.* (डिनर्)—chief meal of the day ; a banquet. दिवसाचें मुख्य भोजन; भोजनसमारंभ, मेजवानी. *Dinner-wagon, n.* a movable sideboard on castored legs. अन्नसामग्री ठेवण्याचा मेज.

**Dī'nosaur**, *n.* (डाइनसॉअर्)—a very large reptile of very ancient times. फार प्राचीन काळचा एक भला मोठा प्राणी,-सर्प. *Dinosaur'ian, a.*

**Dĭnt**, *n.* (डिन्ट्)—a blow or stroke ; dent. ठोका, ठसा, पोंचा, पळ; (चाकाचा) दांता, खोचा. *v. t.* to dent. खोंचे पाडणें. *By dint of*, by means of, in virtue of. ॰च्या मुळें, ॰च्या बळावर,-जोरानें.

**Dī'ocēse**, *n.* (डाअसिस्)—a bishop's district, the part of the country in the charge of a bishop. बिशपाच्या अधिकाराखालचा प्रदेश, बिशपच्या वृत्तीचा प्रदेश. *Dio'cesan, a.* (डायॉसिझन्) बिशपाच्या अधिकाराचा किंवा अधिकारांतील. *n.* ख्रिस्ती धर्माधिकारी,-बिशप.

**Dīora'ma**, *n.* (डाइऑरामा)—a spectacular painting. हुबेहुब देखाव्याचें चित्र, प्रदर्शन. *Diora'mic, a.* [ Gr. *di*, through & *orama*, a sight ]

**Dīŏx'īde**, *n.* (डाइ-ऑक्साइड्)—oxide with two parts of oxygen to one of the metal. द्विप्राणिल.

**Dĭp**, *v. t. & i.* (डिप्)—to put or let down into liquid, to immerse ; to go under water and emerge quickly ; to read or study cursorily ; to lower for a moment ; to involve in debt. (पाण्यांत) बुडविणें; (पाण्यांत) बुडी मारणें, बुचकळणें; वरवर वाचणें किंवा अभ्यास करणें; क्षणभर खालीं उतरणें; कर्जांत बुडणें. *n.* an act of dipping ; a downward slope ; a short bath ; a tallow candle. बुडी किंवा बुचकळी मारणें; उतार, उतरण; थोडका वेळ स्नान; मेणबत्ती. *To dip into one's pocket*, to spend money. पैसे खर्चणें. *To dip the flag*, to lower the flag for a short time. निशाण कांहीं वेळ खालीं करणें.

**Dĭphthĕr'ĭa**, *n.* (डिफ्-थिअरिआ)—a serious and easily spread disease of the throat. घटसर्प; वलयरोग *Diphtheri'tic, a.*

**Dĭph'thong**, *n.* (डिफ्-थॉंग्)—union of two vowels in one sound ; digraph ; ligature. संधिस्वर; द्विस्वर; स्वरसंयोग.

**Dĭplō'ma**, *n.* (डिप्लोमा)-the voucher of a person's title to some degree or status. सनद, पदवी, पत्रक, दाखला.

**Dĭplō'macy̆**, *n.* (डिप्लोमसि)—management of international relations ; tact. परराष्ट्राशीं शिष्टाई करण्याचें काम, कारस्थान, मसलत; कौशल्य, चातुर्य.

**Dĭp'lomăt**, *n.* (डिप्लमॅट्)—one skilled in diplomacy ; one who has skill in securing advantages. राजदूतकामांत कुशल, राजकारणी; स्वार्थ साधण्यांत कुशल असलेला.

**Dĭplomăt'ic**, *a.* (डिप्लॅमॅटिक्)— of diplomacy ; engaged or skilled in diplomacy ; (of statements) uncandid. परराष्ट्रकार्यासंबंधीं; राजकारणी; कुशल, चतुर; आंतल्या गांठीचें.

**Dĭplo'mătist**, *n.* (डिप्लोमॅटिस्ट्)—a member of diplomatic service ; an adroit negotiator.

clever in dealing with other people so as to get them to agree. परराष्ट्रकार्यकर्ता; राजकार्यनिपुण मनुष्य, राजकारणी.

**Dip'per,** *n.* (डिं'पर्)—one who dips in the water; a kind of bird; a cup-like vessel on a handle for taking up liquid. पाण्यांत बुडी मारणारा; पाणबुड्या पक्षी; पळी, डवली. *The dipper,* (Astron.) Great Bear. सप्तर्षी तारे.

**Dĭpsomā'nĭa,** *n.* (डिप्समे'निआ)—mad desire for a strong drink. मादक पेयाची तीव्र इच्छा. *Dipsoma'niac, a.*

**Dĭp'teral,** *a.* (डिं'प्टरल्)—with double columns. दुखांबी, दुहेरी खांबाचें.

**Dĭp'terous,** *a.* (डिं'प्टरस्)—two-winged; (Bot.) with two wing-like appendages. द्विपक्ष, दुपंखी.

**Dīre,** *a.* (डायर्)—dread, terrible, fearful, very bad. घोर, भयंकर, उग्र.

**Direct',** *a* (डिरे'क्ट्, डाइरें'क्ट्)—straight, not crooked or round about; frank. सरळ, अवक्र; साफ, स्पष्ट, मोकळा. *adv.* by the direct route; without intermediaries. सरळ मार्गानें; मध्यस्थी न घालतां. *v t.* to put in the direct way by instructions; to tell the way to (place, &c.); to address (a letter, &c.) to; to command, to order. सरळ मार्ग दाखवणें; वाट दाखवणें; पत्ता लिहून पाठवणें; आज्ञा किंवा हुकूम करणें. *Direct action,* संप, सत्याग्रह वगैरेंनीं सरकारवर आणलेलें दडपण.

**Dĭrĕc'tion,** *n.* (डिरे'क्शन्)—directing; orders or instructions; address of letter, &c.; course; aim. मार्ग दाखविणें; हुकूम, सांगणी; पत्रावरील पत्ता; मार्ग, दिशा; झोंक, रोख. *In the direction of,* towards. कडे, ॰च्या दिशेला.

**Dĭrĕc'tive,** *a.* (डिरे'क्टिव्ह्)—giving guidance. योग्य मार्ग दाखविणारा, मार्गदर्शक.

**Dĭrĕct'lў,** *adv.* (डिरे'क्ट्-लि)—in direct manner; at once, without delay. प्रत्यक्ष रीतीनें; एकदम, विलंब न लावतां.

**Dĭrĕc'tor,** *n.* (डिरें'क्टर्)—superintendent, manager, a member of a board directing affairs of a company; an apparatus controlling direction in instruments etc. कोणत्याहि कंपनीच्या व्यवहार किंवा व्यवस्था पाहणारा मुख्य अधिकारी, चालक-व्यवस्थापक-मंडळांतील एक; गतिनियामक योजना, -यंत्र. *Direc'torship, n.; Direc'tress, n. fem.*

**Dĭrec'torate,** *n.* (डिरें'क्टरेट्)—a body or board of directors. व्यवस्थापकमंडळ, नियामकमंडळ.

**Dĭrĕc'tory,** *n.* (डिरें'क्टरि)—a book of rules; a list of names of people with their addresses and other details. नियमांचें पुस्तक; शहराच्या किंवा अन्य ठिकाणच्या रहिवाश्यांच्या नांवाच्या व पत्यांच्या नोंदीचें पुस्तक, दर्शिका, यादी.

**Dīre'ful,** *a.* (डा'यर्-फुल्)—dire, dreadful. भयानक, घोर, उग्र.

**Dirge,** *n.* (डर्ज्)—a song of mourning. प्रेत पुरतांना म्हणावयाचें गाणें, शोकगीत.

**Dĭ'rĭgible,** *n.* (डि'रिजिब्ल्)—a balloon or airship. वाटेल त्या दिशेस नेतां येणारें वायुयान, आकाशयान, विमान. *a.* which can be guided. वाटेल त्या दिशेला नेतां येण्याजोगें.

**Dirk,** *n.* (डर्क्)—a short sword, a dagger. सुरा, खंजीर.

**Dirt,** *n.* (डर्ट्)—mud, filth, mire; earth, soil; worthless things or people; a foul talk. चिखल; माती, घाण; केरकचरा; निरुपयोगी वस्तु किंवा लोक; घाणेरडें बोलणें. *v. t.* to make foul. घाणेरडें करणें. *Yellow dirt,* gold. सोनें. *Dirt-cheap,* मातीमोल, अति स्वस्त. *To eat dirt,* अपमान निमूटपणें सहन करणें.

**Dirt'ў,** *a.* (डर्'टि)—soiled, foul; unclean; obscene, filthy; mean, despicable; wet and windy. मळलेला, घाणेरडा; अस्वच्छ; बीभत्स, अमंगळ; नीच, तिरस्करणीय; दमट किंवा वादळी (हवा). *v. t.* to foul, to soil घाण करणें, मलिन करणें, मळवणें.

**Dis-,** *pref.* (डिस्)—away or separate; not. अलग, दूर, वेगळा; अभाव, नकार.

**Disabĭl'ĭtў,** *n.* (डिसॅबि'लिटि)—a thing that incapacitates or disqualifies, the state of not being able, weakness. असमर्थता, दुर्बलता; (कायदेशीर) अपात्रता; अयोग्यता, नालायकी.

**Dĭsā'ble,** *v. t.* (डिसे'ब्ल्)—to make unable to act or move, to incapacitate, to wound. (हालण्याला किंवा कोणतीहि गोष्ट करण्याला) असमर्थ करणें, निःशक्त करणें, नालायक करणें. *Disa'blement, n.*

**Dĭsabūse',** *v.t.* (डिसअब्यू'झ्)—to undeceive, to free from wrong ideas. भ्रम घालविणें, खोटा समज दूर करणें

**Dĭsaccord',** *v. i.* (डिस्-अकॉ'र्ड्)-to be at variance. न जुळणें, एकोपा नसणें.

**Disadvăn'tage,** *n.* (डिस्-ॲड्व्हा'न्टेज्)—unfavourable conditions; detriment, injury. गैरसोय; हानि, अपाय. *-ous, a.* अहितकारक, तोट्याचा, अनिष्ट, प्रतिकूल.

**Dĭsaffĕc'tĕd,** *a.* (डिस्-अफे'क्टिड्)-discontented; ill-disposed; disloyal. असंतुष्ट; मन बिघरलेला; राजद्रोही.

**Dĭsaffĕc'tion,** *n.* (डिस्-अफे'क्शन्)—dislike, ill-will, discontentedness; disloyalty. असंतुष्टता; अप्रीति, अराजनिष्ठा.

**Dĭsagree'**, *v. i.* ( डिस्-अॅग्री' )—to differ; to fail to agree with; to quarrel. मतभेद असणें; तफावत असणें; भांडणें. *Disagree'ment, n.*

**Dĭsăgree'able**, *a.* ( डिस्-अॅग्रि-'एबल् ) – unpleasant; ill-tempered. अप्रिय, नापसंत; वाईट स्वभावाचा. *n.* ( *usu. pl.* ) troubles, worries. कटु अनुभव, त्रास, दुःख.

**Dĭsallow'**, *v.t* ( डिस्-अला'उ )—to disapprove of, to reject; to prohibit. नाकारणें, प्रतिबंध करणें, मनाई-निषेध करणें.

**Dĭsăppear'**, *v. i.* ( डिस्-अॅपि'अर् )—to pass from sight, to vanish, to become invisible. अदृश्य होणें, नाहींसा होणें. *Disappear'ance, n.*

**Dĭsappoint'**, *v. t.* ( डिस्-अपॉ'इन्ट् )—to fail to fulfil; to defeat the hopes of; to break appointment with. निराशा करणें; आशाभंग करणें; संकेत मोडणें. *-ing, a.* निराशाजनक; *-ingly, adv.; Disappoin'tedly, adv.*

**Dĭsappoint'ment**, *n.* ( डिस्-अपॉ'इन्ट्मेन्ट् )—failure to fulfil; the defeat of hopes. निराशा, आशाभंग.

**Dĭsăpproba'tion**, *n.* ( डिस्-ॲप्रो-बे'शन् )—disapproval, censure ( expressed or unexpressed ). नापसंती, अमान्यता.

**Dĭsapprove'**, *v. t. & i.* ( डिस्-अ-प्रू'व्ह् )—to have unfavourable opinion of, to hold a bad opinion of, not to be in favour of. नापसंती दर्शविणें, अमान्य करणें. *Disapprov'al, n.* नापसंती.

**Dĭsärm'**, *v. t.* ( डिस्-आ'र्म् )—to deprive of weapons; to pacify hostility or suspicions of. हत्यारें काढून घेणें, निःशस्त्र करणें; वैरभाव नाहींसा करणें, संशय निवारण करणें.

**Dĭsärm'ament**, *n.* ( डिस्-आ'र्मंमेन्ट् )-abandonment or reduction of warlike establishment. युद्धसामुग्री कमी करणें, निःशस्त्रीकरण.

**Dĭsarrănge'**, *v. t.* ( डिस्-ॲरें'ज् )—to put out of order. अस्ताव्यस्त-अव्यवस्थित-करणें. *-ment, n.*

**Dĭsarray'**, *v. t.* ( डिस्-अरे' )—to throw into disorder. विस्कळीत करणें. *n.* a state of disorder. गोंधळ, अव्यवस्था.

**Disăs'ter**, *n.* ( डिझा'स्टर् )—a sudden or great misfortune, a mishap, a calamity. अनर्थ, दुर्दैव, अरिष्ट, संकट.

**Dĭsăs'trous**, *a.* ( डिझा'स्ट्रस् )—full of great misfortune, calamitous, gloomy. अनर्थावह, संकटमय.*-ly, adv.*

**Dĭsavow'**, *v. t.* ( डिस्-अव्हा'उ )—to disown; to deny knowledge of; to repudiate. नाकारणें; नाकबूल करणें; खरें न मानणें. *Disavow'al, n.* नाकबुली, नकार.

**Dĭsbănd'**, *v. t. & i.* ( डिस्-बॅ'न्ड् )—to let soldiers go out of the army, to break up an army, to disembody ( troops ); to be broken up; to disperse. लष्करी नोकरींतून मोकळें करणें, ( लष्कर ) मोडणें; मोडणें; उधळून लावणें. *-ment, n.*

**Dĭsbĕlieve'**, *v. t. & i.* ( डिस्-बिली'व्ह् )—to refuse credence to; to be a sceptic. विश्वास न ठेवणें; नास्तिक होणें. *Dis'belief, n*

**Dĭsbŭrd'en**, *v. t.* ( डिस्-ब'र्डन् )—to relieve of a burden, to unload; to ease the mind. ओझें उतरणें; मनाला स्वस्थता देणें, मनावरचें दडपण कमी होणें.

**Dĭsbŭrse'**, *v. t. & i.* ( डिस्ब'र्स् )—to spend out, to expend, to pay out; to make an outlay. देऊन टाकणें; बटवडा करणें. *Disburse'ment, n.* खर्च, व्यय, बटवडा.

**Disc**, *n.* See Disk.

**Dĭscärd'**, *v. t. & i.* ( डिस्का'र्ड् )—to throw out or reject; to give up; to dismiss, to discharge, to put away. फेंकून देणें, नाकारणें; टाकून देणें; काढून टाकणें, हाकून देणें. *n.* discarding at cards; a discarded card. ( पानें ) फेंकून देणें; फेंकून दिलेलें पान.

**Dĭscern'**, *v. t.* ( डिझ'र्न् )—to make out or descry to distinguish. पाहणें, निर्णय करणें; भेद पाहणें, निरनिराळा दाखविणें. *-ible, a.*: *Discern'ing, a.* having insight. सूक्ष्मदर्शी, शहाणा.

**Dĭscern'ment**, *n.* ( डि-झ'र्नमेन्ट् )—insight; critical sagacity. सूक्ष्म दृष्टि; तारतम्य जाणण्याची शक्ति, निर्णय करण्याचें सामर्थ्य.

**Dĭschärge'**, *v. t. & i.* ( डिस्चा'र्ज् )—to disburden, to unload; to disembark; to dismiss, to cashier; to release; to let flow; to send as a missile; to fire; to acquit oneself of (duty, debt). ओझें उतरणें; खालीं करणें; ( कामावरून वगैरे ) काढून टाकणें; ( कायदेशीर रीतीनें ) दोषमुक्त करणें; वाहूं देणें; ( बाण वगैरे ) सोडणें; बंदुक मारणें; ( कर्तव्यकर्म ) बजावणें. *n.* act of discharging or being discharged; poisonous matter which comes out of a wound. फेड; बडतर्फी, रजा; स्राव, पाझर.

**Dĭsci'ple**, *n.* ( डि-सा'यूपल् )—a follower of a ( great ) teacher or leader. शिष्य, चेला, अनुयायी.*-ship, n.* शिष्यत्व.

**Dĭsciplinăr'ian**, *n.* ( डि-सि-प्लिने'रिअन् )— a maintainer of strict discipline. कडक शिस्तीचा माणूस, शिस्तीचा भोक्ता.

**Dĭs'ciplinarў**, *a.* ( डि'सि-प्लि-नरि )-of or promoting discipline, intended for discipline. शिस्तीचा, शिस्तीविषयीं.

**Dis'cipline**, *n.* ( डिं'सिप्लिन् )—training that produces self-control, orderliness and obedience. वळण, शिस्त ; अट्ठल, ठेंच ; आज्ञाधारकपणा ; शिक्षा, शासन ; प्रायश्चित. *v. t.* to train with discipline. शिस्त लावणें.

**Disclaim'**, *v. t. & i.* ( डिस्क्लें'म् )—to disown, to disavow, to reject any connection with. अंगाबाहेर टाकणें, नाकारणें, ( हक्क ) न मानणें, ( जबाबदारी, संबंध ) न मानणें.-*er, n.*

**Disclose'**, *v. t.* ( डिस्क्लो'झ् )—to expose or lay open to view, to reveal, to unveil, to make known what has been secret. प्रगट करणें, उघडकीस आणणें, जाहीर करणें.

**Disclo'sure**, *n.* (डिस्क्लो'झर् )—utterance of what was secret; a thing that is made known. प्रगटीकरण ; उघडकीस आणलेली गोष्ट.

**Discol'our**, *v. t. & i.* ( डिस्क'लर् )—to change the colour of ; to destroy the natural or right colour of. रंग खराब करणें ; रंग बिघडणें,-उडणें ; शोभा घालवणें. -*ment, n.* ; *Discolo(u)ra'tion, n.* रंग बदलणें, वैवर्ण्य, डाग.

**Discom'fit**, *v. t.* ( डिस्क'म्फिट् )—to defeat ; to baffle ; to disconcert, to give an unpleasant shock. पराजय करणें, दाणादाण-धुव्वा उडविणें ; हताश करणें ; मनोभंग करणें.

**Discom'fiture**, *n.* ( डिस्क'म्फिचर् )—*defeat, rout.* पराभव, पराजय ; दाणादाण, धावरंडी.

**Discom'fort**, *n.* ( डिस्क'म्फर्ट् )—uneasiness of body or mind. मनाची किंवा शरीराची अस्वस्थता. *v. t.* to make uneasy, to agitate, to ruffle, to vex. खिन्न-नाउमेद-करणें ; अस्वस्थ करणें.

**Discom'mon**, *v. t.* ( डिस्-कॉ'मन् )—to enclose common land. समाईक जागेला आवार किंवा कुंपण घालणें.

**Discompose'**, *v. t.* ( डिस्-कम्पो'झ् )—to deprive of composure, to disturb. मन उद्विग्न करणें, त्रास देणें.

**Discompo'sure**, *n.* ( डिस्कम्पो'झर् )—disturbance, disorder, agitation, perturbation. त्रास, गोंधळ, अस्वस्थता.

**Disconcert'**, *v. t.* ( डिस्कन्स'र्ट् )—to derange or upset ; to embarrass, to disturb, to ruffle. धांदल करणें, गोंधळवणें, व्यग्र करणें, ( एकोपा-मेळ ) मोडणें. *Disconcert'ment, n.* अस्वस्थता, गोंधळ, मतभेद.

**Disconnect'**, *v. t.* ( डिस्कने'क्ट् )—to sever connexion of ; to separate, to disjoin. संबंध तोडणें, निराळा करणें, संबंध तोडून टाकणें. *Disconnected, a.* incoherent. असंबद्ध, विस्कळित ; -*ly, adv.* ; -*ness, n.* विस्कळितपणा.

**Discon'solate**, *a.* ( डिस्कॉ'न्सलेट् )— hopeless ; downcast for loss of something, sorrowful, sad, melancholy. समाधान करण्यास कठीण ; खिन्न, उदासीन. -*ly, adv.*

**Discontent'**, *n.* ( डिस्कन्टे'न्ट् )—unsatisfied state of mind, uneasiness of mind, dissatisfaction. असमाधान. *a.* असमाधानी, असंतुष्ट, नाखुष. *v. t.* नाखुष करणें.

**Disconten'ted**, *a.* ( डिस्-कन्टे'न्टिड् )—not satisfied, feeling discontent. असंतुष्ट, अतृप्त.

**Disconti'nue**, *v. t.* ( डिस्-कन्टि'न्यू )—to leave off, not to go on with, to put an end to, to stop. सोडणें ; टाकणें, बंद करणें. *Discontin'uance, n.* खंड, अडथळा, विघ्न. *Discontin'uous, a.* not continuous. सारखा नसलेला, खंडित. *Discontinuity, n.* सारखें नसणें, सातत्याभाव : अविराम.

**Dis'cord**, *n.* ( डि'स्कॉर्ड् )—disagreement, strife ; harsh noise ; want of harmony, disagreement of sounds. बेबनाव, भांडण ; कर्कश स्वर, बेसूर, बदसूरपणा ; स्वरांचा मेळ नसणें. *Discor'dant, a.* विषम, विसंगत, बेसूर. *Discord'ance, n.* विसंगतता.

**Dis'count**, *n.* ( डि'स्काउन्ट् )—deduction from amount of a bill ; ( fig. ) allowance made for exaggeration. सूट, वटाव, कमिशन ; अतिशयोक्तींत बाद, जमेस न धरणें. *v. t.* ( डिस्का'उन्ट् )-to lessen, to detract from ; to allow for exaggeration. कमी करणें; अतिशयोक्तींत बाद करणें. *At a discount,* below the normal price, depreciated. कमी किंमतीनें. *To discount a story,* to believe only a part of the story. गोष्टींतील कांहीं भागच विश्वसनीय मानणें.

**Discount'enance**, *v. t.* ( डिस्-का'उन्टिनन्स् )-to refuse to look on with favour, to show dislike for a plan ; to discourage. हिरमोड करणें ; पाठिंबा न देणें ; नाउमेद करणें.

**Discou'rage**, *v. t.* ( डिस्क'रेज् )—to cause one to lose courage, to reduce the confidence or spirits of ; to deter. धैर्य खचवणें ; मोडती घालणें. *Discou'ragement, n.* नाउमेद ; मोडती.

**Dis'course**, *n.* ( डि'स्कोर्स् )— a lecture, sermon, or other exposition ; a talk or conversation. व्याख्यान, प्रवचन ; संभाषण, संवाद. *v. i.* ( डिस्को'अर्स् )-utter a discourse ; to converse, to talk. प्रवचन-भाषण करणें ; संभाषण करणें, बोलणें.

**Discourt'eous**, *a.* ( डिस्को'र्टिअस्, डिस्क'- )—not polite, rude, uncivil, void of courtesy. आडदांड, उर्मट, उद्धट ; असभ्य. *Discourt'esy, n.* ill-manners, incivility. असभ्यता, अविनय.

**Disco'ver**, *v. t* ( डिस्क'व्हर् )—to find out, to detect ; to make known. शोधून काढणें, शोध

करणें; प्रगट करणें. *Disco'verer, n.* शोध करणारा, शोधक.

**Dĭsco'vert,** *a.* (डिस्क'व्हर्ट्)–(Legal) an unmarried or widowed (woman). अविवाहित किंवा विधवा (स्त्री).

**Dĭsco'very,** *n.* (डिस्क'व्हरि)—disclosure, discovering; thing discovered. शोध; शोधून काढलेली वस्तु.

**Dĭscrĕd'it,** *v. t.* (डिस्क्रे'टिट्)—to refuse belief to; to bring disbelief or disrepute on. भरंवसा न ठेवणें, अविश्वास उत्पन्न करणें, अपकीर्ति करणें. *n.* a discredited state; a disrepute, want of credit or good reputation. नापत, गैरभरंवसा; अपकीर्ति. *Discre'ditable, a.* causing harm to one's reputation or good name. नापत करणारा, नांवाला कलंक लावणारा.

**Dĭscreet',** *a.* (डिस्क्री'ट्)—prudent; cautious in speech or action. दूरदर्शी; विवेकी, धोरणी, सुज्ञ, सावध, धूर्त.*-ly, adv.*

**Dĭscrĕp'ancy,** *n.* (डिस्क्रे'पन्सि)—difference; failure to tally, divergence. अंतर, भेद; तफावत. *Discrep'ant, a.* विसंगत, विरुद्ध.

**Dĭs'crēte,** *a.* (डि'स्क्रीट्)—separate, distinct. निराळा, वियुक्त, सुटा, मोकळा, व्यक्त, अमूर्त. *-ness, n.*

**Dĭscrē'tion,** *n.* (डिस्क्रे'शन्)—discreetness, carefulness and good judgment; liberty of action. विचार, विवेक, अक्कल, सावधगिरी, तारतम्य; मुखत्यारी, स्वतंत्रता. *At the discretion of,* depending on the decision arrived at by. च्या योग्य विचारानें. *To surrender at discretion,* to be treated as another decides. दुसरा ठरवील त्याप्रमाणें बिनशर्त कबूल होणें, च्या बाहेर नसणें. *Years* or *age of discretion,* age at which one becomes a responsible person. प्रौढ वय. *-ary, a.*

**Dĭscrĭm'ĭnāte,** *v. t. & i.* (डिस्क्रि'मिनेट्)—to see the difference between, to choose with judgment. तारतम्य पाहून पसंत करणें, विवेक असणें. *To discriminate against,* to treat unfairly. दुजाभावानें वागविणें, भिन्न दूर ठरविणें. *Discrimina'tion, n.*

**Dĭscŭrs'ĭve,** *a.* (डिस्क'र्सिव्ह्)—rambling, wandering, not sticking to the main subject. चंचल बुद्धीचा, विषयान्तर करणारा.

**Dĭs'cŭs,** *n.* (डि'स्-कस्)—a flat round object used for throwing. फेंकून मारण्याचा एक चपटा वाटोळा तुकडा, चक्र.

**Dĭscuss',** (डिस्क'स्)—to talk about, to examine by argument, to debate, to reason together; to eat or drink. वाटाघाट किंवा भवति न भवति करणें, वादविवाद करणें; खाणें पिणें. *To discuss a bottle of wine,* to share or drink in a leisurely way. सावकाशपणें पिऊन टाकणें. *Discus'sible, a.; Discus'sion, n.* वादविवाद, वाटाघाट, चर्चा.

**Dĭsdain',** *v. t.* (डिस्डे'न्)—to scorn; to treat as unworthy of notice or of oneself. तिरस्कार करणें, तुच्छ मानणें. *n.* a contemptuous neglect or dislike, a feeling of disrespect for. तिटकारा, तिरस्कार. *Disdain'ful, a.* तिरस्कारपूर्ण, तिटकारा आणणारा.

**Disease',** *n.* (डिझी'झ्)–illness, a serious derangement of health; a bodily disorder. विकार, दुखणें; रोग.

**Diseased',** *a.* (डिझी'झ्ड्)—affected with disease; morbid; depraved. रोगी, दुखणेकरी; रोगट; नासका.

**Dĭsĕmbärk',** *v. t. & i.* (डिस्-इम्बा'र्क्)—to put or go ashore, to get off a boat, to land. जहाजांतून जमिनीवर उतरणें. *-a'tion, n.*

**Dĭsĕmbŏdy̆',** *v. t.* (डिस्-इम्बॉ'डि)—to set free from the body. शरीरापासून मुक्त करणें, देहानिराळा करणें. *Disembo'diment, n.*

**Dĭsĕmbo'wel,** *v. t.* (डिस्-इम्बॉ'वेल्)—to remove or cut out bowels from the body; to rip up. शरीरांतून बाहेर काढणें, आंतडीं फाडणें, चिरणें.

**Dĭsĕnchant',** *v. t.* (डिस्-इन्चा'न्ट्)—to free from the effects of magic; to disillusion. मोहनी दूर करणें, भ्रम घालवणें.

**Dĭsĕngāged',** *a.* (डिस्इन्गे'ज्ड्)—at leisure; vacant. मोकळा, रिकामा; निरुपयोगी.

**Dĭsĕntăngle',** *v. t.* (डिस्इन्टॅ'गल्)—to untie a knot, to extricate; to unravel; to untwist. गुंतागुंत काढणें; सोडवणें; अलग-मोकळा-करणें. *-ment, n.*

**Dĭsĕnthral',** *v. t.* (डिस्-इन्थ्रॉ'ल्)—to free from bondage, or slavery. दास्यमुक्त करणें, स्वातंत्र्य देणें. *-ment, n.*

**Dĭsfā'vour,** *n.* (डिस्-फे'व्हर्)-dislike; disapproval, being disliked. अवकृपा; नापसंती, नावड. *v. t.* to regard or treat with disfavour. अवकृपा करणें, नापसंती दर्शविणें.

**Dĭsfĭg'ure,** *v. t.* (डिस्-फि'गर)—to mar the appearance of, to harm the beauty or shape of; to sully. विरूप करणें, व्यंगता आणणें; बिघडवणें. *-ment, n.* विरूपता; डाग, कलंक.

**Dĭsfrăn'chīse,** *v. t.* (डिस्-फ्रॅ'चाइझ्)— to deprive of right of electing or voting. निवडण्याचा किंवा मतदानाचा हक्क काढून घेणें, नागरिकत्वाचा अधिकार काढून घेणें. *Disfran'chisement, n.*

**Dĭsgorge'**, *v. t.* (डिस्-गॉ'र्ज्)—to bring out from the throat what has been eaten; to give up (e. g. what is stolen). ओकून टाकणें; (नाइलाजानें) परत देऊन टाकणें.

**Dĭsgrăce'**, *n.* (डिस्-ग्रे'स्)—a loss of respect or favour; downfall; ignominy. मानहानि; पतन; बदनाम, कलंक, डाग; निंद्य गोष्ट. *v. t.* to dismiss from favour; to be a disgrace to, to bring shame or dishonour upon. मर्जीतून उतरणें; काळिमा लावणें.

**Dĭsgrāce'ful**, *a.* (डिस्-ग्रे'स्-फुल्)— shameful लाजिरवाणा.

**Dĭsgrŭn'tled**, *a.* (डिस्ग्र'न्टल्ड्)—discontented, in a bad temper. असंतुष्ट, कुरकूर करणारा.

**Dĭsguise'**, *v. t.* (डिस्-गा'इझ्)—to make unrecognizable; to pass off as something else; to cloak or hide. ओळखेनासा करणें; आपण दुसरा कोणीतरी अशी बतावणी करणें; वेष बदलणें, छपवणें, लपविणें. *n.* disguised state; a device or garb used to disguise. वेषबदल; सोंग, कपटवेष. *Disguised in*, वेष घेतलेला. *Blessing in disguise*, an apparent evil that results in good. परिणामीं हितकर अशी बाह्यतः कटु गोष्ट. *To throw off one's disguise*, to reveal one's intentions. हेतु उघड करून सांगणें. *Disguised in* or *with drink* or *liquor*, drunk. झिंगलेला, दारू प्यालेला.

**Dĭsgŭst'**, *n.* (डिस्ग'स्ट्)—a strong feeling of dislike, a violent distaste; a keen disappointment. किळस, तिटकारा, वीट, कंटाळा; तीव्र निराशा. *v. t.* affect with disgust. तिटकारा किंवा वीट येणें. *-ful*, *a.*

**Dĭsh**, *n.* (डिश्)— shallow vessel for holding food; a particular kind of food. ताट, तबक; विशिष्ट प्रकारचें अन्न, पक्वान्न, ताट. *v. t.* to put in dishes for serving; to frustrate. ताटें-पानें वाढणें; चीत करणें. *A standing dish*, a topic that appears regularly. नियमित येणारा विषय. *To dish up*, to put food in a dish and serve it. ताटांत अन्न घालून वाढणें.

**Dĭshabille'**, *n.* (डिस्-अबी'ल्)—not fully dressed state; undress garment. सर्व कपडे घातलेले नसणें; (घरांत घालण्याचा) पायघोळ झगा, कफनी.

**Dĭsheart'en**, *v. t.* (डिस्-हा'र्टन्)—to discourage; to deject, to depress, to cause to lose hope. नाउमेद करणें; विमनस्क करणें. *-ment*, *n.*

**Dĭshĕv'elled**, *a.* (डिस्-हे'व्हल्ड्)—with disordered hair; unkempt, untidy. (केंस) पिंजारलेला; अव्यवस्थित, गैदी.

**Dĭshŏn'est**, *a.* (डिस्-ऑ'निस्ट्)— fraudulent; knavish; insincere. लबाड; बेइमानी; अप्रमाणिक.

**Dĭshŏn'our**, *v. t.* (डिस्-ऑ'नर्)—to treat with contumely; to bring dishonour upon; to refuse to honour or pay. अपमान किंवा अप्रतिष्ठा करणें; (चेक किंवा हुंडी) नाकारणें, न स्वीकारणें. *n.* dishonoured state; loss of repute. अपमान, अप्रतिष्ठा.

**Dĭshŏn'ourable**, *a.* (डिस्-ऑ'नरेबल्)— shameful, base; unprincipled. लाजिरवाणा; विचारशून्य, नीच.

**Dĭsillu'sion**, *v. t.* (डिस्-इल्'झन्)—to open the eyes of, to wake to realities; to free from a wrong idea. (चे) डोळे उघडविणें,- उघडायला लावणें; भ्रम नाहींसा करणें. *-ment*, *n.*

**Dĭsinclĭnā'tion**, *n.* (डिस्-इन्क्लिने'शन्)—slight dislike or unwillingness. नावड, नाखुषी, अनादर, विरुद्ध कल.

**Dĭsincline'**, *v. t.* (डिस्-इन्क्ला'इन्)—to inspire with disinclination; to make disaffected. मनाचा कल नसणें; असंतुष्ट करणें.

**Dĭsinfĕct'**, *v. t.* (डिस्-इन्फे'क्ट्)—to purge of or cleanse from infection; to make clean and free from all seeds of disease. शुद्ध करणें. दूषित हवा स्वच्छ करणें. *-ant*, *a.* & *n.* रोग-जंतुनाशक, सूक्ष्मकृमिघ्न (औषध). *Disinfec'tion*, *n.* शुद्ध करणें.

**Dĭsingĕn'ŭous**, *a.* (डिस्-इन्जे'न्यु-अस्)—insincere; not candid. खोटा, कपटी; मनाचा कुजका. *-ly*, *adv.*; *-ness*, *n.*

**Dĭsinhĕ'rĭt**, *v. t.* (डिस्-इन्-हे'रिट्)—to deprive of right of inheriting, to take away a natural right. वारसा काढून घेणें, बेवारस करणें. *-ance*, *n.*

**Dĭsin'tĕgrāte**, *v. t. & i.* (डिस्-इ'न्टि-ग्रेट्)—to separate into the component parts; to lose cohesion, to break into pieces. अवयव वेगळे करणें; एकोपा जाणें, संबंध सुटणें, पृथक्करण होणें. *-tion*, *n.* फुटणें, विश्लेषण; चूर्णक्रिया; (खडक वगैरे) फुटून जाण्याची क्रिया; भाग निरनिराळे होणें.

**Dĭsinter'**, *v. t.* (डिस्-इन्ट'र्)—to take out of a grave, to unbury, to exhume; to unearth. पुरलेलें बाहेर काढणें; खणून बाहेर काढणें, उजेडांत-उघडकीस आणणें. *-ment*, *n.*

**Dĭsin'terĕstĕd**, *n.* (डिस्-इ'न्ट-रिस्टिड्)—not influenced by self-interest or partiality. निर्लोभी, स्वार्थरहित, निष्कामबुद्धीचा, तटस्थ, उदासीन. *-ly*, *adv.*; *-ness*, *n.* स्वार्थनिरपेक्षता, निःस्पृहता, निःपक्षपात.

**Dĭsjoin'**, *v. t.* (डिस्-जॉ'इन्)—to separate, to disunite. वेगळा करणें, संबंध तोडणें.

**Dĭsjoint'**, *v. t.* (डिस्-जॉ'इन्ट्)—to separate the joints of; dislocate. सांधे वेगळे वेगळे करणें,

-उकटणें ; स्थानभ्रष्ट करणें. *Disjoint'ed*, *a.* सांधा उकटलेला ; स्थानभ्रष्ट ; असंबद्ध ( भाषण ).

**Dĭsjŭnc'tion**, *n.* ( डिस्जं'क्शन् )-disjoining, separation. वियोग ; ( Logic ) पक्षान्तर वाक्य. *Disjunc'tive*, *a.* वियोगकारी ; विभाजक.

**Dĭsk, Dĭsc**, *n.* ( डिस्क् )—a thin flat circular object or semblance of this. बिंब, मंडल ; वर्तुळ, चक्र ; (Bot.) कर्णिका ; चपटी बांगडी.

**Dĭslīke'**, *v. t.* ( डिस्ला'इक् )—to feel aversion to. नावडणें, तिरस्कार करणें. *n.* a feeling of aversion नावड, अप्रीति, द्वेष.

**Dĭs'locāte**, *v. t.* ( डि'स्-लोकेट् )— to put limb out of joint, to put out of its proper place, to put out of gear, to throw into disorder. सांधा उखळणें ; गोंधळ करणें. *Disloca'tion*, *n.* सांधा उखळणें ; अव्यवस्था, गोंधळ.

**Dĭslŏdge'**, *v. t.* ( डिस्-लॉ'ज् )—to force out of position occupied, to remove from the place. स्थानापासून उठवून लावणें, हुसकून देणें,-लावणें. *-ment*, *n.*

**Dĭsloy'al**, *a* ( डिस्लॉ'यल् )—unfaithful ; untrue to allegiance ; disaffected. विश्वासघातकी ; राजद्रोही ; असंतुष्ट. *Disloy'alty*, *n.* अराजनिष्ठा, बेइमानी.

**Dĭs'mal**, *a.* ( डि'झ्-मल् )—sorrowful, cheerless ; dreary. खिन्न ; भयाण, उदास.

**Dĭsmăn'tle**, *v. t.* ( डिस्-मॅं'टल् )—to deprive of defences, equipment, or furniture ; to take away all ( the sails and fittings from a ship ). संरक्षण, सरंजाम किंवा सामानसुमान काढून घेणें.

**Dĭsmäst'ed**, *a.* ( डिस्-मा'स्टेड् )—having lost its masts. डोलकाठ्या नसलेला.

**Dĭsmay'**, *n.* ( डिस्-मे' )—loss of courage ; horrified amazement. दहशत, भय, धाक ; त्रेधा, भीति. *v. t.* to affect with loss of courage ; to reduce to despair. गाळण उडणें, दहशत बसणें, त्रेधा उडवणें ; निराश होणें.

**Dĭsmĕm'ber**, *v. t.* ( डिस्-मे'म्बर् )—to cut the limbs off a body ; to cut to pieces. अवयव तोडणें ; तुकडे तुकडे करणें. *Dismem'berment*, *n.* अवयवच्छेदन.

**Dĭsmiss'**, *v. t.* ( डिस्-मि'स् )—to send away, to disband ; to discharge, to cashier ; to put out of one's thought. घालवून देणें ; ( कामावरून ) काढून टाकणें ; ०बद्दल विचार न करणें. *Dismi'ssal*, *n.* पाठवणी ; बडतर्फी.

**Dĭsmount'**, *v. i. & t.* ( डिस्-मा'उन्ट् )—to alight or cause to alight from horseback, to take down a thing from that upon which it is mounted. घोड्यावरून खालीं उतरणें ; वरून खालीं आणणें ; ( यंत्र ) खालीं उतरणें, -अलग करणें.

**Dĭsobē'dience**, *n.* ( डिस्-ओबी'डिअन्स् )—disobeying; rebelliousness. आज्ञाभंग ; शिरजोरपणा. *Disobe'dient*, *a.* हुकूम मोडणारा, अवज्ञा करणारा, आज्ञाभंग करणारा.

**Dĭsobey'**, *v. i. & t.* ( डिस्-ओबे' )—to disregard orders ; to break rules. आज्ञा न जुमानणें ; नियमभंग करणें.

**Dĭsoblīge'**, *v. t.* ( डिस्-अब्ला'इज् )—to refuse to consult the convenience or wishes of. उपयोगीं न पडणें, सोय न पाहणें, नाखूष करणें, विरुद्ध वागणें. *Disobli'ging*, *a.* अनुपकारी, कधींहि उपयोगी न पडणारा.

**Dĭsŏrd'er**, *n.* ( डिस्-ऑ'र्डर् )—confusion ; bodily or mental ailment ; infractions of discipline. अव्यवस्था, गोंधळ ; विकृति, रोग ; बंडाळी, गैरशिस्त. *v. t.* to disturb the healthy working of. गोंधळ माजवणें, रोग- विकृति- उत्पन्न करणें.

**Dĭsŏrd'erlȳ**, *a.* ( डिस्-ऑ'र्डर्लि )—untidy ; riotous or illdisciplined. अव्यवस्थित ; दंगेखोर, शिस्तहीन.

**Dĭsŏrg'anīze**, *v. t.* ( डिस्-ऑ'र्गनाइझ् )—to destroy a system of ; to throw into disorder, to put out of working order. विघटित करणें ; रचना मोडणें, अव्यवस्था माजणें. *-za'tion*, *n.* अव्यवस्था, गोंधळ.

**Dĭsown'**, *v. t.* ( डिस्-ओ'न् )—to refuse to accept as being one's own ; to repudiate, to disclaim ; to renounce, to deny. माझें नाहीं असें म्हणणें ; त्याग करणें ; नाकारणें.

**Dĭspă'rāge**, *v. t.* ( डिस्-पॅ'रेज् )—to speak slightingly of ; to depreciate, to speak bad things about. तुच्छतापूर्वक बोलणें ; कमी दर्जाचा लेखणें. *-ment*, *n.* ; *Dispa'ragingly*, *adv.* तुच्छतादर्शक-अपमानकारक-रीतीनें.

**Dĭspă'rĭtȳ**, *n.* ( डिस्-पॅ'रिटि )— unequal state or degrees ; inequality, disproportion. तफावत ; न्यूनाधिक्य, अंतर, फरक, भेद, विषमता.

**Dĭspă'ssionate**, *a.* ( डिस्-पॅ'शनिट् )— free from passion or strong feeling ; devoid of emotion ; impartial. विकाररहित ; निःपक्षपाती. *-ness*, *n.* ; *-ly*, *adv.*

**Dĭspătch'**, **Despatch'**, *v. t.* ( डिस्पॅ'च् )—to send to destination, to send off quickly ; to kill ; to get business done promptly. मुक्कामीं-मुक्कामाला-पाठविणें ; ठार मारणें ; काम ताबडतोब उरकणें. *n.* dispatching ; rapidity ; a speedy performance ; an official message. पाठविणें ; जलदी, त्वरा ; ( सरकारी ) खलिता.

**Dĭspĕl'**, *v. t.* ( डिस्-पे'ल् )—to dissipate ; to disperse, to drive away, to banish, to clear away ( fears or darkness ). नाहींसा करणें, दूर करणें, घालविणें.

**Dĭspĕn'sable**, *a.* ( डिस्पे'न्सबल् )—that can be dispensed with or dispensed. सोडण्याला योग्य, अनावश्यक.

**Dĭspĕn'sarў**, *n.* (डिस्पे'न्सरि)—the place where medicine is mixed and given out. दवाखाना, औषधालय.

**Dĭspensā'tion**, *n.* (डिस्पेन्से'शन्)—dealing out; ordering of the world by providence; that which is enjoined; arrangement made by Nature or Providence; doing without. वांटणें, विभागणी; ईश्वरी सूत्र, नेमानेम; विहितधर्म; दैवी योजना-घटना; माफी, सूट; अभाव.

**Dĭspĕnse'**, *v. t. & i.* ( डिस्पे'न्स् )—to deal out (justice, &c.); to make up and issue medicines; to exempt. वांटून देणें, न्याय करणें; औषध तयार करून देणें; माफ करणें. *To dispense with*, do without, discharge. च्या वांचून चालणें, काढून टाकणें. *Dispen'ser*, *n.* देणारा; औषधें तयार करून देणारा.

**Dĭsperse'**, *v. t. & i.* (डिस्प'र्स्)—to break up from assembled state, to scatter; to go or make go various ways. पसरणें, वरखास्त होणें; निरनिराळ्या दिशेला जाणें, पांगापांग होणें, विकीर्ण होणें. *Dispers'al*, *n.*; *Dispers'ion*, *n.* फांकणें, पांगणें; गोठलेलें रक्त फांकणें; विकिरण.

**Dĭspĭ'rĭt**, *v. t.* (डिस्पि'रिट्)-to make despondent, to dishearten, to discourage. मनोभंग करणें, हिंमत खच्चवणें. *Dispi'ritedly*, *adv.*

**Dĭspĭ'rĭted**, *a.* (डिस्पि'रिटिड्)—sad and without hope. उमेद खचलेला, उदास.

**Displāce'**, *v. t.* ( डिस्प्ले'स्)—to shift from proper position; to oust, to remove from office. स्थळ पालटणें; कापून लावणें; कामावरून काढणें.

**Displā'cement**, *n.* ( डिस्-प्ले'स्-मेन्ट् )—displacing; the amount of water displaced by a ship; the depth to which a ship sinks into the water. स्थलच्युति, स्थलांतर करणें,- होणें; तरंगत्या गलबतानें बाजूला सारलेलें पाणी; गलबताची पाण्यांत बुडालेली खोली.

**Display'**, *v. t.* (डिस्प्ले')—to spread out to view; to exhibit. दिसण्याकरितां बाहेर काढणें, प्रदर्शन करणें. *n.* displaying; exhibition; ostentation; (Print.) arrangement of type with a view to calling attention. दाखविणें; प्रदर्शन; थाटमाट, भपका; ठळक टाईप घालून (विशेष रीतीनें) नजरेंत भरविणें,-सुव्यक्त करणें.

**Displease'**, *v. t.* ( डिस्-प्ली'झ् )—to offend; to make angry; to excite disapprobation of. मन दुखवणें; राग आणणें; नाखुष करणें. *Displea'sing*, *a.*; *-ly*, *adv.*

**Dĭsplea'sure**, *n.* (डिस्प्ले'झर्)—indignation, resentment; annoyance, vexation, disfavour. राग; त्रास; अवकृपा, असंतोष.

**Dĭsplume'**, *v. t.* ( डिस्-प्लू'म्)—to deprive of feathers, honour etc. पिसें-पिसारा काढून टाकणें, शोभा हरण करणें, शोभा -अपमान -करणें.

**Dĭspō'sal**, *n.* ( डिस्-पो'झल् )— disposing of; bestowal; sale; management. विनियोग; देणें; विक्री; व्यवस्था. *At one's disposal*, स्वाधीन.

**Dĭsport'**, *v. i.* (डिस्-पो'र्ट्)—to amuse oneself. स्वतःची करमणूक करणें, रमवणें. *n.* a pastime. करमणूक, गंमत.

**Dĭspōse'**, *v. t. & i.* (डि-स्पो'झ्)—to place in order; to adjust; to incline the mind to do; to bestow. व्यवस्थित ठेवणें; बरोबर मांडणी करणें; मन वळवणें, मनाचा कल असणें; देणें. *To dispose of*, to get rid of, to set oneself free from. मुक्त होणें, देऊन टाकणें. *Dispo'sable*, *a.* विल्हेवाट लावतां येण्याजोगा; हातचा, स्वाधीन.

**Dĭsposi'tion**, *n.* ( डिस्पोझि'शन् )—setting in order; the arrangement; temperament, a person's natural way of feeling and acting; dispensation; bestowal by deed or will; व्यवस्था-करणें,-लावणें; रचना, मांडणी, व्यवस्था; स्वभाव; (ईश्वरी) न्याय देणें; करारपत्रानें,-मृत्युपत्रानें-देऊन टाकणें.

**Dĭspossĕss'**, *v. t.* (डिस्-पझे'स्)—to deprive of possession, to oust or dislodge. ताबा काढून घेणें, हुसकावून लावणें.*-ion*, *n.*

**Dĭspraise'**, *v. t. & n.* ( डिस्प्रे'झ् )—disparage, censure. कमी किंमत, प्रशंसा, निंदा (करणें).

**Dĭsproŏf'**, *n.* ( डिस्-प्रू'फ् )—refutation. खंडन, निराकरण.

**Dĭspropor'tionāte**, *a.* ( डिस्-प्रपो'र्श-नेट्)—not duly proportioned, unsymmetrical, unequal. विजोड, बेडोल.*-ly*, *adv.*

**Dĭsprove'**, *v. t.* (डिस्प्रू'व्)—to prove to be false or erroneous, to show the fallacy of; to refute. खोटा आहे हें सिद्ध करणें; खोटेपणा दाखवणें; खण्डन करणें.

**Dĭs'pūtable**, *a.* ( डि'स्प्यू-टेबल् )—open to question. वादग्रस्त.

**Dĭs'pūtant**, *n.* (डि'स्प्यू-टन्ट्)—one who disputes, a controversialist. वादविवाद करणारा, वादी.

**Dĭspūtā'tion**, *n.* ( डिस्प्यूटे'शन्)—an argumentative debate, a discourse or treatise. वादविवाद, वाद, चर्चा, संवाद, चर्चात्मक प्रबंध, निबंध.

**Dĭspūtā'tious**, *a.* ( डिस्प्यूटे'शस्)—fond of argument, quarrelsome. वादप्रिय, तंटेखोर, अतिवादी, तक्रारी.

**Dispūte'**, *v. i. & t.* (डिस्प्यू'ट्)—to hold a debate; to quarrel, to controvert; to resist. वादविवाद करणें; भांडणें, आक्षेप घेणें; प्रतिकार करणें. *n.* a controversy, a debate; a quarrel; a difference of opinion. वादविवाद; भांडण; मतभेद. [ L. *dis*, apart & *putare*, to think ]

**Dĭsqualificā'tion**, *n.* ( डिस्-क्वॉलिफिके'शन् )—that which makes unfit; disability. नालायकी आणणारी गोष्ट; नालायकी, अयोग्यता, अपात्रता.

**Dĭsqual'ify**, *v. t.* (डिस्क्वॉ'लि-फाय् )—to make unfit or ineligible. अयोग्य किंवा नालायक ठरविणें, कायदेशीर हक्क-अधिकार-काढून घेणें.

**Dĭsquī'et**, *n.* (डिस्-क्वा'एट्)—uneasiness, anxiety. अस्वस्थता, तळमळ. *v. t.* to make uneasy, to perturb. मनाच्या शांततेचा भंग करणें, अस्वस्थ करणें. *a.* uneasy, disturbed. अस्वस्थ, अशांत, क्षुब्ध.—*ness*, *n.*

**Dĭsquī'etūde**, *n.* ( डिस्क्वा'इट्यूड् )—uneasiness, perturbation, anxiety. मनाची अस्वस्थता, तळमळ, व्यग्रता.

**Dĭsquĭsĭ'tion**, *n.* ( डिस्क्विझि'शन् )—an inquiry; a long speech, a long written report about some subject, a treatise. संशोधन, विवेचन, प्रबंध, परीक्षण.—*al*, *a.*

**Dĭsregärd'**, *v. t.* (डिस्-रिगा'र्ड्)—to ignore, to be uninfluenced by. अवमानणें; दुर्लक्ष करणें. *n.* neglect. अवमान, उपेक्षा.

**Dĭsrĕ'pūtable**, *a.* (डिस् रे'प्युटबल्)—having a bad character, bearing a bad name, not respectable. वाईट नांवलौकिक असलेला, असंभावित, असभ्य, निंद्य.—*ness*, *n.*

**Dĭsrepūte'**, *n.* ( डिस्-रिप्यू'ट् )—dishonour, ill-repute; discredit. अपकीर्ति; अप्रतिष्ठा.

**Dĭsrespĕct'**, *n.* (डिस्-रिस्पे'क्ट्)—lack of deference, want of respect or reverence. अनादर, अपमान. *Disrespect'ful*, *a.* showing want of respect, unpolite, rude. अनादर करणारा, अपमानकारक, उद्धट.

**Dĭsrōbe'**, *v. t. & i.* (डिस्-रो'ब्)—to take off the clothes or dress, to undress. कपडे काढून टाकणें, विवस्त्र करणें; उघडा करणें.

**Dĭsrŭpt'**, *v. t.* (डिस्-र'प्ट्)—to shatter; to separate, to sever. तुकडे तुकडे करणें; निराळा करणें. *Disrup'tion*, *n.* मोडणें, भंग, फाटाफूट. *Disrup'tive*, *a.*

**Dĭssătĭsfăc'tion**, *n.* (डिस्-सॅटिस्फॅ'क्शन्)—want of satisfaction, discontent. असंतोष, असमाधान, अतृप्ति.

**Dĭssăt'isfy**, *v. t.* (डिस्-सॅ'टिस्फाय्)—to fail to satisfy, to make discontented. नाखुष करणें, असंतुष्ट करणें.

**Dĭssĕct'**, *v. t.* (डिस्-से'क्ट्)—to cut in pieces; to anatomize; to examine or criticize. फाडणें, तुकडे करणें; अभ्यासासाठीं प्रेत फाडणें, व्यवच्छेद करणें; खरमरीत टीका करणें, चिंधड्या उडवणें. *Dissec'tion*, *n.* अवयवच्छेदन, फाडाफाडी; पृथक्करण. *Dissec'tor*, *n.* शस्त्रानें फाडणारा, व्यवच्छेदक.

**Dĭssĕm'ble**, *v. t. & i.* (डिस्-से'म्बल्)—to conceal or disguise; to be hypocritical, to hide one's feelings. लपवणें; कपट किंवा सोंग करणें, बहाणा करणें. *Dissem'bler*, *n.* ढोंगी, छद्मी, दांभिक.

**Dĭssĕm'ĭnāte**, *v. t.* (डि-से'मिनेट्)—to spread abroad, to propagate, to circulate. बाहेर प्रसार करणें, पसरणें. *Dissemina'tion*, *n.* propagation, diffusion. प्रसार, फैलाव. *Dissemina'tor*, *n.* प्रसार करणारा, प्रसारक.

**Dĭssĕn'sion**, *n.* (डि-से'न्शन्)—disunion, contention, strife. कलह, बखेडा, फाटाफूट.

**Dĭssĕnt'**, *v. i.* (डि-से'न्ट्)—to differ in opinion. मतभेद असणें. *n.* disagreement; difference of opinion. विरोध, मतभेद.

**Dĭssĕnt'er**, *n.* (डि-से'न्टर्)—one who dissents or does not agree with the teachings of the Church of England. भिन्नधर्मपंथी, धर्मविरोधी.

**Dĭssĕn'tient**, *a. & n.* (डि-से'न्शन्ट् )—not agreeing, dissenting. प्रतिकूल मत असणारा, भिन्न धर्माचा.

**Dĭssertā'tion**, *n.* ( डि-सर्टे'शन् )–a formal discourse; an essay, a disquisition. विवरण, प्रबंध, निबंध.

**Dĭsser'vĭce**, *n.* (डिस्-स'र्व्हिस्)—a bad turn done to a person or cause, a harmful action. नुकसान, हानि, अपाय, अहित.

**Dĭssĕ'ver**, *v. t. & i.* (डिस्-से'व्हर्)—to disunite, to separate, to cut apart. दोन तुकडे करून टाकणें, विस्कळित करणें, पांगापांग करणें, वेगळा होणें.

**Dĭss'ĭdence**, *n.* ( डि'सिडन्स् )–disagreement. मतभेद, विरोध.

**Dĭss'ĭdent**, *a.* ( डि'सिडन्ट् )—not in agreement, conflicting. न जुळणारा, भिन्न मताचा.

**Dĭssĭm'ĭlar**, *a.* (डि-सि'मिलर् )–unlike. असदृश, भिन्न, विजातीय. *Dissimila'rity*, *n.* असादृश्य, भिन्नता.

**Dĭssĭm'ūlāte**, *v. t. & i.* ( डि-सि'म्यू-लेट् )—to practise deceit, to feign, to pretend, to hide one's feelings. फसवणें, कपट करणें. *Dissimula'tion*, *n.* ढोंग करणें; ढोंग, कपट. *Dissimula'tor*, *n.* ढोंगी मनुष्य.

**Dĭss'ĭpāte**, *v. t. & i.* (डि'सिपेट्)—to dispel; to squander, to fritter away. नाहींसा करणें; उधळणें, घालवून टाकणें; नासाडी–खराबी करणें. —*d*, *a.*; *Dissipa'tion*, *n.* व्यर्थ अपव्यय, व्यसनीपणा; क्षुल्लक गोष्ट.

**Disso'ciate**, *v. t.* (डि-सो'शिएट्)—to separate, to disunite, to part; (Chem.) decompose. वेगळा करणें, संबंध तोडणें; विश्लेषण करणें. *Dissocia'tion*, *n.* वेगळें करणें, दुफळी, फूट. *Dissocia'tive*, *a.* वेगळें करणारा, दुफळी पाडणारा.

**Disso'lubi'lity**, *n.* (डिस'लूबि'लिटि)—capacity of being dissolved. वितळून जाण्याची स्थिति, विघटनीयता.

**Diss'oluble**, *a.* (डि'सलूब्ल्)—dissolvable. वितळून जाण्याजोगा, नाश पावण्याजोगा; पृथक्करणीय; (सभा) विसर्जन करण्याजोगा; (बंधन) तोडण्याजोगा.

**Diss'olute**, *a.* (डि'सो-ल्यूट्)—given to bad life, loose in behaviour and morals. दुर्व्यसनी, दुर्वर्तनी, दुराचारी.

**Dissolu'tion**, *n.* (डि-सो-ल्यू'शन्)—melting; death; annulment of marriage or other bond. सोडवणें, वितळविणें; मृत्यु; काडीमोड, विसर्जन.

**Dissolve'**, *v. t & i.* (डिझॉ'ल्व्ह्)—to decompose; to melt, to make or become liquid; to put an end to; to undo. भिन्न करणें; वितळविणें, (उष्णतेनें) द्रावण करणें; विसर्जन करणें; समाप्त-रद्द-करणें; संबंध तोडणें. *Dissolved in tears*, weeping. रडत असलेला, रडणारा. [L. *dis*, apart & *solvere*, to loosen]

**Dissol'vent**, *n.* (डिसॉ'ल्व्हन्ट्)—a substance that has the power of dissolving or melting another, a solvent. वितळविणारा पदार्थ.

**Diss'onant**, *a.* (डि'स-नन्ट्)—jarring, clashing; discordant, disagreeing, not agreeing in sound. बेसूर (आवाज); न जुळणारा. *Diss'onance*, *n.* बेसूर, बदसूर; विरुद्धपणा.

**Dissuade'**, *v. t.* (डि-स्वे'ड्)—to turn from a purpose by argument, to advise to refrain; to hinder. मन फिरवणें; निवृत्त करणें; अडथळा करणें. *Dissua'sion*, *n.*; *-sive*, *a.*

**Dis'taff**, *n.* (डि'स्टाफ्)—the staff from which the wool is pulled in spinning. सूत काढण्याची चरकी. *The distaff*, spinning. सूत काढणें. *On the distaff side*, on the female side of the family. जनानखान्यासंबंधीं, स्त्रियांसंबंधीं.

**Dis'tance**, *n.* (डि'स्टन्स्)—the length from one point to another; remoteness; distant behaviour. अंतर दूर असणें; सलगी नसणें. *v. t.* to leave far behind. फार मागें टाकणें, दूर अंतरावर ठेवणें. *To keep one's distance*, not to approach too near, to avoid familiarity. आपली मर्यादा राखणें, जास्त सलोखा टाळणें. *At a distance*, far away. फार दूर. *At this distance of time*, इतके दिवस लोटल्यानंतर.

**Dis'tant**, *a.* (डि'स्टन्ट्)—at a considerable or specified distance; indistinct. दूरचा, लांबचा; अस्पष्ट. *Distant in manner*, not friendly or familiar. विशेष सलगी न दाखविणारा.

**Distaste'**, *n.* (डिस्टे'स्ट्)—dislike; aversion. नावड, तिरस्कार.

**Distaste'ful**, *a.* (डिस्टे'स्ट्फुल्)—disagreeable to the taste; causing dislike. अस्वादिष्ट; तिटकारा आणणारा.

**Distem'per**, *n.* (डिस्टे'म्पर्)—a waterpaint for walls; a disease of dogs; a disordered condition. भिंतींना देण्याचा एक मिश्र रंग; कुत्र्यांचा एक रोग; अस्वस्थता, बेचैन, विकार, विकृति. *v. t.* to paint in distemper. मिश्र रंग देणें. *Distem'pered*, *a.* अस्वस्थ, वेडा, मन ठिकाणावर नसलेला.

**Distend'**, *v. t.* (डिस्टे'न्ड्)—to swell out or be dilated by pressure from within, to cause to swell. फुगवणें, ताणणें. *Disten'sible*, *a.* फुगण्याजोगा, फुगवण्यालायक. *Disten'sion*, *n.* फुगणें, फुगारा, ताण.

**Dis'tich**, *n.* (डि'स्टिक्)—a couplet. दोहरा, दोन चरणी कविता.

**Distil'**, *v. t. & i.* (डिस्टि'ल्)—to trickle, to come or give forth in drops अर्क काढणें, थेंब पाडणें, गाळून शुद्ध करणें, ऊर्ध्वपातन करणें. *Distilla'tion*, *n.* ऊर्ध्वपातन करणें,-क्रिया, शोधनक्रिया; अर्क, सत्व.

**Disti'llery**, *n.* (डिस्टि'लरि)—an establishment where whisky is made. कलालाची भट्टी, शराबभट्टी.

**Distinct'**, *a.* (डिस्टिं'क्ट्)—clearly seen, clear, easily discernible; separate or differing in identity. स्पष्ट दिसण्याजोगा, सुव्यक्त; भिन्न, पृथक्.

**Distinc'tion**, *n.* (डिस्टिं'क्शन्)—difference; a thing that differentiates; a mark of honour; an excellence; individuality. भेद; तारतम्य, प्रतिष्टा; विशेष सद्गुण; वैशिष्ट्य.

**Distinct'tive**, *a.* (डिस्टिं'क्टिव्ह्)—ditsinguishing; characteristic. भिन्नता दाखविणारा, भेददर्शक; विशेष, विशिष्ट.

**Disting'uish**, *v. t. & i.* (डिस्टिं'ग्विश्)—to draw or make distinctions between; to characterize; to recognize; to make oneself prominent. तारतम्य किंवा फरक करणें; गुणवर्णन करणें; ओळखणें; नांवलौकिक संपादणें. *To distinguish oneself*, to make oneself famous. स्वतःला प्रसिद्धीस आणणें, नांव कमावणें. *Disting'uished*, *a.* विशिष्ट, सिद्ध; नामांकित, प्रसिद्ध, थोर.

**Distort'**, *v. t.* (डिस्टॉ'र्ट्)—to pull or twist out of shape; to misrepresent. वांकडा करणें, विरूप

करणें; विपर्यास करून सांगणें. *Distor'tion, n.* विकृति. विपर्यास; अंगवैकल्य.

**Distract'**, *v. t.* (डिस्ट्रॅ'क्ट्)—to cause one's mind to wander in different directions, to bewilder. भांबावून टाकणें. गोंधळवणें.

**Distract'ed**, *a.* (डिस्ट्रॅ'क्टिड्)-driven mad, infuriated; bewildered. वेडा झालेला; कावरा बावरा, भांबावून गेलेला.

**Distrac'tion**, *n.* (डिस्ट्रॅ'क्शन्)—diversion; anger, perplexity; confusion, dissension. चित्तविभ्रम, व्यग्रता; राग, गोंधळ; ओढाताण, तिरपीट.

**Distrain'**, *v. i.* (डिस्ट्रे'न्)—to seize goods for debt. (कर्जफेडीकरितां) माल जप्त करणें.

**Distraint'**, *n.* (डिस्ट्रे'न्ट्)—legal seizure of goods as payment for debt. अटकावून ठेवणें, कर्जाबद्दल जप्ती.

**Distress'**, *n.* (डिस्ट्रे'स्)—mental pain; pressure of want, danger or fatigue; (Law) distraint. मानसिक दुःख; दुर्दशा. विपत्ति; जप्ती. *v. t.* to pain mentally; to exhaust. दुःख देणें, हाल करणें; जेरीस आणणें. *Distress'ful, a.* दुःखमय.

**Distrib'ute**, *v. t.* (डिस्ट्रि'ब्यूट्)—to deal out; to give each a share of; to classify. वांटणें; वांटणी करणें; विभाग-वर्गीकरण-करणें. *Distribu'tion, n.* वांटा; विभाग; दान. *Distri'butor, n.* वांटून देणारा.

**Distrib'utive**, *a* (डिस्ट्रि'ब्यूटिव्ह्)-that which distributes, concerned in distribution; referring to each individual of a class. विभाग किंवा वांटणी करणारा; उपजातिदर्शक. व्यक्तिदर्शक (विशेषण किंवा सर्वनाम).

**Dis'trict**, *n.* (डि'स्ट्रिक्ट्)—a region; a province; a territory. मुलूख, प्रदेश; जिल्हा; प्रांत.

**Distrust'**, *n.* (डिस्ट्र'स्ट्)—want of trust; doubt, suspicion. अविश्वास; शंका, संशय. *v. t.* to have no confidence in. विश्वास न ठेवणें, अविश्वास धरणें. *Distrust'ful, a.* अविश्वासी, शंकेखोर.

**Disturb'**, *v. t.* (डिस्ट'र्ब्)—to break the rest or quiet of; to worry; to disorganize. मन ग्रासून टाकणें. शांतताभंग करणें; त्रास देणें; विघटित करणें.

**Disturb'ance**, *n.* (डिस्ट'र्बन्स्)—trouble; disturbed state, tumult. त्रास देणें; अस्वस्थ स्थिति. क्षुब्धता, दंगा. *To cause a disturbance*, to make a noise; to start a fight. गडबड करणें; भांडण आरंभणें. दंगा करणें.

**Disu'nion**, *n.* (डिस्यू'न्यन्)—separation; want of union; dissension. वियोग; ताटातूट; भांडण, कलह.

**Disunite'**, *v. t. & i.* (डिस्युना'इट्)—to separate or become separate; to divide. निराळा करणें, विभक्त होणें; फुटणें.

**Disuse'**, *v. t.* (डिस्यू'झ्)—to cease to use. उपयोगांत आणण्याचें सोडणें किंवा बंद करणें. *n.* (डिस्यू'स्)—a disused state; a state of not being used. गैरवळण, अनभ्यास. *To fall into disuse*, to go out of use. निरुपयोगी होणें.

**Disyll'able**, *n.* (डिसि'लब्ल्)—a word or metrical foot of two syllables. दोन अवयवांचा शब्द. *Disylla'bic, a.*

**Ditch**, *n.* (डिच्)—a trench made in the earth, a deep water channel for carrying off water. चर, खंदक. *v. i. & t.* to make or repair ditches; to drain by a ditch. खंदक खणणें; चर खणून-पाटानें-पाणी बाहेर काढून लावणें. *To die in the last ditch*, to fight to the last. शेवटपर्यंत लढणें.

**Dith'er**, *v. t.* (डि'दर्)—to tremble, to quiver. कापणें, कम्प सुटणें.

**Ditt'o**, *n.* (डि'टो)—a substitute for repetition of word or phrase, the same. जशाचा तसाच शब्द किंवा शब्दसमूह. कित्ता, सदर.

**Ditt'y**, *n.* (डि'टि)—a short simple song. लहान सोपें गाणें, गीत.

**Diurn'al**, *a.* (डाय'र्नल्)—in or of the day. दैनिक.

**Di'vagate**, *v. i.* (डा'इ-व्हगेट्)-to digress. विषयान्तर करणें, बहकणें. *Divaga'tion, n.*

**Dive**, *v. i.* (डाइव्ह्)—to plunge or jump head foremost into water; to seek *for* by diving; to make deep inquiry into. पाण्यांत बुडी मारणें; पाण्यांत शोधणें; खोल चौकशी करणें. (कोणत्याही कामांत) पूर्ण लक्ष घालणें. *n.* act of diving; a place where bad men live or plan evil deeds. बुडी; वाईट लोकांचें राहण्याचें ठिकाण, अड्डा.

**Di'ver**, *n.* (डा'इ-व्हर्)—one who descends into deep water; kinds of diving-bird. पाणबुड्या. (पाण्यांत) बुडी मारणारा; पाणबुड्या पक्षी.

**Diverge'**, *v. t.* (डाइ-व्ह'र्ज्)—to take a different direction; to go off sideways; to digress. मार्ग सोडणें. दुसरी दिशा घेणें; फांकणें; वाहवत जाणें. *Diver'gent, a.* फांकणारा, अपसरण करणारा. *Diver'gence, n.* पसरणें, अपसरण; फेर, तफावत.

**Di'vers**, *a.* (डा'इ-व्हर्झ्)— sundry, several. नानाविध, कित्येक.

**Diverse'**, *a.* (डाय्-व्ह'र्स्)-of differing kinds, differing *from*. निरनिराळ्या प्रकारचा, भिन्न.

**Divers'ify**, *v. t.* (डाइ-व्ह'र्सिफाय्)—to introduce variety into; to vary. फेरफार करणें, पालटणें.

**Dīver'sion**, *n.* (डाइ-व्ह'र्शन्)—diverting, deviation, amusement. रमवणें, फेरफार; करमणूक.

**Dīvers'ity**, *n.* (डाइ-व्ह'र्सिटि)–diverseness. भिन्नता, निराळेपणा.

**Dīvert'**, *v. t.* (डाइ-व्ह'र्ट्)— to turn in another direction; to get rid of; to draw off attention of; to entertain, to amuse. भिन्न दिशेला वळवणें; मुक्त होणें; दुसरीकडे लक्ष लावणें; करमणूक करणें, रमविणें.

**Dīver'ting**, *a.* (डाइ-व्ह'र्टिंग)—amusing. मनोरंजक, गंमतीचा.

**Dīvĕst'**, *v. t.* (डाइ-व्हे'स्ट्)—to unclothe, to strip, to lay bare. नग्न करणें, नागवणें, उघडा करणें. *Divest'ment*, *n.* हिरावून घेणें, नागवणूक.

**Dīvīde**, *v. t. & i.* (डिव्हा'इड्)—to separate into parts; to sunder, to cut off; set at variance; to distribute; to ascertain how many times one number contains another. विभाग करणें; कापून टाकणें; मतभेद पाडणें, दुही माजविणें; विभागून देणें; वांटून देणें; भागणें.

**Dĭv'idend**, *n.* (डि'व्हिडन्ड्)—a number to be divided by divisor; a sum payable as interest on profit or share. भाज्य संख्या; नफ्याचा हिस्सा, भाग.

**Dīvī'der**, *n.* (डिव्हा'इडर)—that which divides; (*pl.*) a pair of measuring compasses. भाजक; (अने०) सारख्या टोकांचा भाग पाडण्याचा कंपास, कैवार.

**Divinā'tion**, *n.* (डिव्हिने'शन्)—the act of telling the unknown or the future by the aid of magic. प्रश्न किंवा शकुन सांगणें, शकुन.

**Dīvīne'**, *a.* (डिव्हा'इन्)—having to do with God; sacred; superhumanly beautiful or excellent. ईश्वरी; पवित्र; अत्यंत सुंदर. *n.* a priest, a theologian. धर्मगुरु, वेदान्ती, ब्रह्मज्ञानी. *v. t. & i.* to foresee, to predict, to conjecture; to practise divination. भाकीत करणें, भविष्य सांगणें, अनुमान किंवा तर्क करणें; शकुन पाहणें. *Divine'ly*, *adv.* by God. ईश्वराकडून. *To sing divinely*, to sing nicely or very well. उत्तम तऱ्हेनें-सर्वोत्कृष्ट-गाणें.

**Dīvī'ning-rŏd**, *n.* (डिव्हा'इनिंग् रॉड्)—a switch used by dowser to detect underground water or minerals. (भूमिगत पाणी किंवा धातु कोठें सांपडेल तें सांगणाऱ्या) पानाड्याची काठी, यक्षिणीची कांडी.

**Dĭvin'ity**, *n.* (डिव्हि'निटि)—divineness; a god; the divine Being; the study of the nature of God, theology. देवपणा; देव; ईश्वर; ब्रह्मज्ञान.

**Dĭvĭs'ible**, *a.* (डिव्हि'झिब्ल्)—that can be divided. पूर्ण भाग जाईल असा, विभाज्य. *Divisibil'ity*, *n.* विभाज्यता.

**Dĭvi'sion**, *n.* (डिव्हि'झन्)—the act of dividing; one of the parts into which something is divided; a part of an army (of about 20,000 men). भागणें, भागाकार; भाग, वर्ग, परिच्छेद, सैन्याचा विभाग,-तुकडी.

**Dĭvōrce'**, *n.* (डिव्हो'र्स्)—dissolution of marriage; separation between things that should go together. काडीमोड, घटस्फोट; वास्तविक एकत्र राहाणाऱ्या वस्तूंचा वियोग. *v. t.* to separate by divorce; to destroy the union of. विवाहसंबंध तोडणें, काडीमोड करणें; निराळा करणें.

**Dĭvŭlge'**, *v. t.* (डिव्ह'ल्ज्)—to let out (secret), to tell what has been secret; to make public. (गुप्त गोष्ट) फोडणें; जाहीर करणें.

**Dĭzz'y**, *a.* (डि'झि)—giddy, dazed, unsteady; causing dizziness. घेरी आलेला, अस्वस्थ; घेरी आणणारा. *Dizz'iness*, *n.* चक्कर, घेरी, भोंवळ.

**Do**, *v. t.* (डू)—to perform, to effect, to execute; to deal with, to set in order; to solve, to exhaust. करणें; व्यवस्थित करणें, सोडवणें; दमवणें. *v. i.* to act or proceed, to succeed, to make an end; to fare, to be suitable, to suffice. ०चें आचरण करणें, आचरणें, शेवटास नेणें; पुरेसें होणें; ठीक असणें. *To do away*, to remove; to put an end to. काढून टाकणें; नाहींसा करणें. *To do into*, to translate. भाषान्तर करणें. *To do over*, to perform again, to repeat. पुन्हां करणें, फिरून करणें. *To do without*, to dispense with. ०वांचून चालणें, कमी करणें. *To have done*, to have finished. संपविणें. *To have done with*, to have finished with. पुरें करणे, काम संपणें, गरज सरणें. *To do the polite*, to show courtesy. सभ्यता दाखविणें. *To do to death*, to kill. ठार मारणें. *To do in the eye*, to deceive, to cheat. फसविणें, ठकविणें. *To do justice to*, to show that one appreciates fully. योग्य मान देणें, पूर्ण पसंत पडल्याचें दर्शविणें. *That will do*, that is enough. तें पुरे, बस्स. *Done to a turn*, perfectly cooked. पूर्णपणें शिजवलेलें. *To have to do with*, to have concern with. (शीं) संबंध असणें. *To have nothing to do with*, to have no concern with. (शीं) संबंध नसणें. *To do for*, to kill. ठार मारणें. *To do out* (*a room*), to clean. साफ करणें. *How do you do?* आपलें कसें काय चाललें आहे? कसें काय? ठीक आहे ना? *Done up*, completely ruined; tired. सर्वस्वी नाश पावलेला; दमलेला. *n.* a trick; a feast or party of guests. लबाडी; मेजवानी; पाहुणे मंडळी.

**Dŏ'cile**, *a.* (डॉ'साइल्)—easy to teach and willing to obey, easily taught or led. सांगितल्याप्रमाणें ऐकणारा, गरीब, सालस. *Docil'ity*, *n.*

**Dŏck**, *n.* (डॉक्)—a basin for loading and repairing of ships; an enclosure in a court for a prisoner; a common plant in England. आगबोटी राहण्याची किंवा नीट करण्याची जागा, गोदी; कोर्टांत कैदी उभा राहण्याची जागा; इंग्लंडांतील एक झाड, लोलिका. *v. t.* to cut off a part. कापणें, छाटणें, कापून आंखूड करणें. *Dock'er, n* गोदींतील कामगार,-मजूर.

**Dŏck'ĕt**, *n.* (डॉ'किट्)—an endorsement on a document showing its subject or contents; a list of things to be done; a set of papers tied together with an endorsement and a short description of the contents. दस्तैवजावर आंतील मजकूर किंवा विषय असलेला शेरा, विषयनिर्देश, करावयाच्या गोष्टींची यादी; गोषवाऱ्यासह शेरा असलेले एकत्र केलेले कागद. *v.i.* to write on the back of a long report a summary of what it contains. गोषवारा काढून लिहिणें.

**Dŏck'yärd**, *n.* (डॉ'क्-यार्ड्)—an enclosure for building and repairing ships. आगबोटी वगैरे बांधण्याची किंवा दुरुस्त करण्याची जागा.

**Dŏc'tor**, *n.* (डॉ'क्टर्)—holder of the highest university degree in any faculty; a qualified medical practitioner. विश्वविद्यालयांतील अत्युच्च पदवी धारण करणारा; डॉक्टर, चिकित्सक. *v. t.* *To doctor a thing*, to repair a thing. वस्तु दुरुस्त करणें. *To doctor food*, to mix food with other things of bad quality. अन्नांत हलक्या प्रतीच्या वस्तु मिसळणें. *To doctor accounts*, to make accounts seem true. जमाखर्च बरोबर आहेत असें भासविणें,-दाखविणें. *Doc'toress, Doc'tress, n.* a woman medical practitioner. स्त्रीवैद्य, डॉक्टरीण.

**Dŏ'ctorāte**, *n.* (डॉ'क्टरेट्)—doctor's degree; persons holding the doctor's degree. डॉक्टरची पदवी; डॉक्टरची पदवी धारण करणारे गृहस्थ.

**Dŏctrĭnaire'**, *n.* (डॉक्ट्रिने'अर्)—a person who applies principles even in matters where they are unsuitable or impossible. हटवादी किंवा स्वमताग्रही मनुष्य. *Doctrinair'ism, n.* हटवाद्याचीं तत्त्वें.

**Dŏc'trĭne**, *n.* (डॉ'क्ट्रिन्)—what is taught; a particular dogma, a set of beliefs. शिक्षण, तत्त्व; धर्मतत्त्व. *Doctri'nal, a.*

**Dŏc'ūment**, *n.* (डॉ'क्युमन्ट्)—something that furnishes evidence, a legal deed or other piece of writing. कायदेशीर लेख, दस्तऐवज. *Documenta'tion, n.* लेखी पुरावा तयार करणें.

**Dŏcūmĕn'tarÿ**, *a.* (डॉक्युमे'न्टरि)—consisting of written documents. दस्तऐवजाच्या स्वरूपाचा, लेखी (पुरावा).

**Dŏdd'er**, *v. t.* (डॉ'डर्)—to walk unsteadily or totter like an old man. लटपटत चालणें, लटपटणें, कांपणें. *n.* a kind of plant. आकाशवेल.

**Dōdĕc'agon**, *n.* (डोडे'कगन्)—a plane figure of twelve sides. बारा बाजू असलेली आकृति, द्वादश कोणाकृति, द्वादशभुज. *Dodecahed'ron, n.* a solid figure of twelve faces. बारा पृष्ठभाग असलेला घन. *Dodecasyll'able, n.* a verse of twelve syllables. बारा अवयवी कविता.

**Dŏdge**, *n.* (डॉज्)—a swerving or zigzag movement; a trick, a piece of duplicity; a wrinkle or ingenious method. नागमोडी चाल, वक्रगति; लबाडी, युक्ति; नामी कल्पना, तोड. *v. t. & i.* to escape (duty) by means of a trick, to elude; to make a dodge into hiding; to treat evasively. चुकवणें; टाळणें; टोलवाटोलवी करणें. *Dodg'er, n.* (डॉ'जर्)—a shifty person; a small handbill. (एखाद्याला फसविण्याची) युक्ति लढविणारा; लहान हस्तपत्रक.

**Dō'dō**, *n.* (डो'डो)-an extinct bird. एक अस्तित्वांत नसलेला पक्षी.

**Doe**, *n.* (डो)—a female of fallow deer, hare, or rabbit. हरिणी, सशाची मादी.

**Dŏff**, *v. t.* (डॉफ्)—to take off. (टोपी वगैरे) काढून घेणें,-टाकणें.

**Dŏg**, *n.* (डॉग्)—a common animal of various breeds, wild and domesticated; a worthless man or boy; a *lucky* or *sly* fellow; an iron frame for supporting burning wood in a fireplace. कुत्रा; निरुपयोगी मनुष्य; दैववान किंवा लबाड मनुष्य; विस्तवांतील वस्तु धरण्याकरितां केलेला चिमटा किंवा पकड. *v. t.* to follow closely; to pursue, to track. पाठोपाठ जाणें; पाठलाग करणें. *To go to the dogs*, to be ruined in character. चुलींत जाणें, मसणांत जाणें. *Every dog has his day*, no one is always unlucky. कांहीं दिवस सासूचे कांहीं दिवस सुनेचे. *To throw to the dogs*, to throw away. उकिरड्यावर फेंकून देणें. *To give a dog a bad name and hang him*, goodness is not proof against censure. कोणाचें नुकसान करावयाचें असलें तर आधीं त्याची नालस्ती करणें. *A dog in the manger*, one who does not wish to use a thing, and yet will not allow others to use it; one who does not allow others to enjoy what is useless to him. आपणाला निरुपयोगी असलेली वस्तुहि दुसऱ्याला उपभोगूं न देणारा मनुष्य, गव्हाणींतल्या

कुत्र्याप्रमाणें वागणारा. *To lead a dog's life*, to have many troubles. पुष्कळशा अडचणींत आयुष्य घालविणें. *Let sleeping dogs lie*, leave alone things that are likely to cause trouble. त्रासदायक गोष्टी दूर राहूं द्या. *Dogs of war*, havoc. धुमाकूळ, धुमश्चक्री, अंदाधुंदी, अराजकता. *Dog days*, very hot days. भयंकर उन्हाळ्याचे दिवस. *Dogeared*, (a book) having the corners of the pages turned down. पानांचे कोंपरे मोडलेलें पुस्तक.

**Dŏg'cärt**, *n.* (डॉग्-कार्ट्)-a two-wheeled driving cart. घोड्याची दुचाकी उंच गाडी.

**Dŏgg'ed**, *a.* (डॉ'गिड्)—tenacious, persistent. निग्रही, हट्टी.

**Dŏgg'erel**, *n.* (डॉ'गरल्)—slipshod or unpoetic verses, a rough foolish poetry. हलक्या दर्जाची कविता, भिकारडें काव्य.

**Dŏg'mä**, *n.* (डॉ'ग्मा)—a principle, a tenet; docrinal system. तत्त्व, ठराविक मत, प्रमाणवचन, आदेश, तात्त्विक पद्धति.

**Dŏgmăt'ic**, *a.* (डॉग्मॅ'टिक्)—of the nature of dogma; authoritatively laid down, stated as indisputable, given to dogmatizing. निश्चित स्वरूपाचा, ठाम; हटवादी.

**Dŏg'mătism**, *n.* (डॉ'ग्मॅटिझम्)—dogmatizing temper. स्वमताग्रह, हटवादी स्वभाव.

**Dŏg'matīze**, *v. i.* (डॉ'ग्मटाइझ्)—to assert positively. आग्रहानें प्रतिपादन करणें, निश्चितपूर्वक सांगणें.

**Dŏg'rōse**, *n.* (डॉ'ग्-रोज्)—the wild rose. रानटी गुलाब.

**Dŏg'-star**, *n.* (डॉ'ग्-स्टार्)—the brightest star in the heavens, Sirius. लुब्धक तारा.

**Dŏg'-tired**, *a.* (डॉ'ग्-टायर्ड्)—very tired. अतिशय दमलेला, थकला भागलेला, श्रान्त.

**Dŏg'-watch**, *n.* (डॉ'ग्-वॉच्)—the shortest period of two hours (4 to 6 a. m., and 6 to 8 p. m.). गलबतावरील २ तासांचा पहारा.

**Doil'ȳ**, *n.* (डॉइ'लि)—a small napkin or ornamental cloth put under a dish or other pot on the table. टेबलावर भांड्यांच्या खालीं ठेवलेला लहान रुमाल.

**Do'ings**, *n. pl.* (डु'इंग्झ्)—things done; events; behaviour. कृत्यें, कृत गोष्टी; घडलेल्या गोष्टी; वागणूक.

**Doit**, *n.* (डॉइट्)— a very small sum. अगदीं लहान रक्कम, कवडी, दिडकी दुगाणी.

**Dŏl'drŭms**, *n. pl.* (डॉ'ल्ड्रम्झ्)—a place on the ocean where ships cannot move as there is no wind. ज्या ठिकाणीं वारा नसतो असा समुद्राचा निर्वात भाग. *To be in the doldrums*, to be in a low and sad state of mind. उद्विग्न मनःस्थितींत असणें.

**Dole**, *n.* (डोल्)—a charitable gift (of measured amount); payment of unemployment insurance; woe. भिक्षा, लहानसा वांटा; बैठें वेतन; दुःख, शोक. *v. t.* to deal out; to distribute. वांटणें; वांटून देणें. *To dole out*, to give out a small part at a time, प्रत्येक वेळेला दान म्हणून थोडा वांटा देणें, डोल देणें.

**Dōle'ful**, *a.* (डो'ल्-फुल्)—dreary, dismal, melancholy. उदास, दुःखी, विषण्ण, उतरलेल्या तोंडाचा.

**Dŏll**, *n.* (डॉल्)—a child's toy representing a baby, a pretty silly woman or child. (लहान मुलींची खेळण्याची) बाहुली; सुरेख मूर्ख स्त्री किंवा मूल.

**Dŏll'ar**, *n.* (डॉ'लर्)-a coin and money of account in U. S., Canada, and elsewhere=100 cents, (4 *s.* 1½ *d.*). अमेरिकेंतील एक नाणें.

**Dŏl'orous**, *a.* (डॉ'लरस्)— painful, sad, dismal. शोककारक, खेदकारक, दुःखी, खिन्न, विषण्ण.

**Dŏl'our**, *n.* (डॉ'लर्)— sorrow, distress. दुःख, क्लेश.

**Dŏl'phĭn**, *n.* (डॉ'ल्फिन्)—a sea animal six to eight feet long; a fish noted for its changes of colour in dying. एक मोठा समुद्रप्राणी; मरतांना रंग बदलणारा एक मोठा मासा.

**Dōlt**, *a.* (डोल्ट्)—a stupid fellow, a fool. मूर्ख, टोणपा. *Dol'tish*, *a.* जडबुद्धि, मूर्ख.

**Domain'**, *n.* (डमे'न्)-lands as held or ruled over; an estate or realm; the right to rule over a land; sphere or scope. अधिकाराखालचा प्रदेश; राज्य; जमिनीवरील मालकी; आटोका, टप्पा, क्षेत्र.

**Dōme**, *n.* (डोम्)—a rounded vault as roof; a stately building; the sky. घुमट; भव्य इमारत; आकाश. *Domed*, *a.* घुमट असलेला.

**Domes'day**, *n.* (डू'म्झ्डे)—land record made in 1086. १०८६ सालीं केलेली इंग्लंडमधील जमिनीची पाहणी,-नोंदणी पुस्तक

**Domĕs'tĭc**, *a.* (डोमे'स्टिक्)—of the home, household, or family affairs; of one's own country; home-keeping. घरांतला, माणसाळलेला, पाळींव; स्वदेशांतील; घर सोडून बाहेर न जाणारा. *n.* a household servant. घरांतील नोकर.

**Domĕs'tĭcāte**, *v. t.* (डोमे'स्टिकेट्)—to naturalize (plant); to tame (animal). हवापाण्याचा सराव पाडणें; माणसाळवणें. *Domestica'tion*, *n.* माणसाळवणें. *Domes'ticator*, *n.* माणसाळवणारा.

**Domĕs'tĭcāted**, *a.* (डोमे'स्टिकेटेड्)—devoted to home life. माणसाळलेला, पाळींव, घरसंबंधींचा.

**Dŏmĕstĭ'cĭtȳ**, *n.* (डॉमिस्टि'सिटी)—home life, privacy; homeliness. खासगी जीवन; घरगुतीपणा.

**Dŏm'icile,** *n.* (डॉ'मि-साइल्)—person's regular place of abode, the place where one lives. नेहमींची राहण्याची जागा, वसतिस्थान, कायमचा ठावठिकाण. *Dom'iciled, a.* कायमचें घर-वस्ती-करून राहिलेला, कायम रहिवासी.

**Dŏm'inant,** *a.* (डॉ'मिनन्ट्)—dominating, prevailing, established in power. जोराचा, प्रबल, प्रधान. *Dom'inance, n.* प्राबल्य, अधिकार, सत्ता.

**Dŏm'ināte,** *v. t. & i.* (डॉ'मिनेट्)—to have commanding influence over, to rule, to be the most important, to rise above. वर्चस्व असणें, वरचष्मा असणें, सत्ता गाजवणें, जबरदस्त होणें.

**Dŏmĭnā'tion,** *n.* (डॉमिने'शन्)—ascendancy, supremacy, authority. अंमल, वरचष्मा.

**Dŏmineer',** *v. i.* (डॉ-मिनी'अर्)—to behave overbearingly; to tyrannize over, to rule by force. ताठ्यानें वागणें; कडक अंमल गाजवणें.

**Domĭn'ical,** *a.* (डॉमि'निकल्)-of Sunday. रविवारचा.

**Dŏm'inie,** *n.* (डॉ'मिनी)—a schoolmaster in Scotland. शाळेंतील शिक्षक.

**Domĭn'ion,** *n.* (डोमि'न्यन्)—sovereignty or lordship; domination; territory or sovereign or government, a country ruled by one government. आधिपत्य, राज्यपद; सत्ता, अंमल; सरकारच्या ताब्यांतील मुलूख, साम्राज्यविभाग.

**Dŏm'ĭnō,** *n* (डॉ'मिनो)—a loose garment and covering for the face to conceal identity; (*pl.*) a game played with 28 pieces of wood with white spots on them. ओळखतां येऊं नये म्हणून घालण्याचा सैल झगा, कपटवेष, मुखवटा; एक प्रकारचा सोंगट्यांसारखा खेळ.

**Dŏn,** *v. t.* (डॉन्)—to put on (a garment). अंगांत घालणें,-चढवणें. *n.* a teacher in a University; a title of a gentleman or nobleman in Spain. विश्वविद्यालयांतील शिक्षक, प्राध्यापक; स्पेनमधील सद्गृहस्थाची किंवा सरदाराची एक पदवी.

**Donāte',** *v. t.* (डोने'ट्)—to make a donation, to give. देणगी देणें.

**Donā'tion,** *n.* (डोने'शन्)—gift to a fund or institution; benefaction. दान, देणगी, बक्षीस.

**Dŏn'jŏn,** *n.* (डॉ'न्जॅन्)—great tower or keep of castle. किल्ल्याचा मुख्य बुरूज.

**Dŏnk'ey,** *n.* (डॉ'कि)—an ass; a stupid fellow. गाढव; जडबुद्धीचा किंवा मूर्ख मनुष्य.

**Dŏnn'a,** *n.* (डॉ'ना)—an Italian, Spanish or Portuguese lady. इटली, स्पेन किंवा पोर्तुगालमधील सभ्य स्त्री.

**Dō'nor,** *n.* (डो'नर्)—a giver, a bestower. देणारा, दाता.

**Do-no'thing,** *a. & n.* (डू-न'थिंग्)—doing nothing, idle; an idler. आळशी; रिकामटेकडा; आळशी मनुष्य.

**Dōōm,** *n.* (डूम्)—fate, destiny; judicial sentence; the Last Judgment. दैव, नशीब; न्यायाधिशानें दिलेली शिक्षा; अखेरचा (प्रलयकालचा) न्याय. *v. t.* to condemn, to sentence. शिक्षेचा हुकूम देणें, शिक्षा फर्मावणें.

**Dōōms'day,** *n.* (डू'म्ज़-डे)—the Last Judgment. शिक्षेचा किंवा मरणाचा दिवस, जगाच्या न्यायाचा दिवस.

**Door,** *n.* (डोअर्)—a barrier at the entrance to a building, room, safe; a means of approach. द्वार, दरवाजा; प्रवेशाचें साधन, प्रवेशद्वार. *Doorway, n.* an entrance to a building. दरवाजा, घरांत जाण्याचा रस्ता. *Out of doors*, in the open air. उघड्यावर, मोकळ्या हवेंत. *To lay at a person's door*, to blame a person for. एखाद्याला दोष देणें. *Next door*, in the next house. लगतच्या किंवा शेजारच्या घरांत.

**Door'keeper,** *n.* (डो'अर्-कीपर्)—a porter. द्वारपाल, देवडीवरचा शिपाई.

**Dōpe,** *n.* (डोप्)—a thick liquid used for machines; a paint used on the wings of airplanes; a narcotic drug. यंत्रांकरितां वापरलें जाणारें एक प्रकारचें तेल; विमानांच्या पंखांना लावण्याचा रंग; एक मादक औषध. *v. t. & i.* तेल-रंग लावणें; मादक पदार्थ सेवन करणें; (शर्यतीच्या वगैरे) निकालाचा पूर्व-अंदाज करणें.

**Dŏrm'ant,** *a.* (डॉ'र्मन्ट्)—lying inactive as in sleep; concealed. झोंपेंतल्याप्रमाणें हालचाल न करणारा, स्वस्थ; गुप्त. *Dorm'ancy, n.*

**Dŏrm'er-window,** *n.* (डॉ'र्मर्-विन्डो)—an upright window set in a sloping roof. उतरत्या छपरांतील उभी खिडकी.

**Dŏrm'itorȳ,** *n.* (डॉ'र्मिटरि)—a sleeping-room with a number of beds; suburban district of city people's residences. पुष्कळ बिछाने असलेली निजण्याची खोली, शेजघर; शहरवासीयांचीं निवासस्थानें असलेलीं उपनगरें,-खेड्यापाड्यांतील विभाग.

**Dŏr'mouse,** *n.* (डॉ'र्-माउस्)—a small mouse-like animal with a long furry tail. (एक जातीचा) रानउंदीर.

**Dŏ'rothȳ bag,** *n.* (डॉ'रोथि बॅग्)—a lady's open-topped hand-bag hung at wrist. मनगटावर घेण्याची स्त्रियांची बॅग,-हातथैली.

**Dŏr'sal,** *n.* (डॉ'र्-सल्)—having to do with the back. पाठीचा, पृष्ठभागाचा.

**Dŏ'rȳ,** *n.* (डॉ'रि)—a flat-bottomed boat; a sea-fish. (मच्छिमारी) लहान होडी; समुद्रांतील मासा.

**Dōse**, *n.* ( डोस् )—an amount of medicine taken at one time; anything unpleasant which has to be taken. प्रमाणशीर औषध, डोस; कर्तव्य असलेला अप्रिय भाग, कटुकर्तव्य. *v. t.* औषधाचा भाग,-औषध देणें; मिश्रण करणें.

**Dŏss**, *v. i.* ( डॉस् )—to go to bed, to sleep in a doss-house. निजणें, गवताच्या बिछान्यावर झोंपणें. *Doss-house*, a sleeping place for the very poor. अगदीं गरीबांकरितां झोंपण्याची जागा.

**Dŏss'ier**, *n.* ( डॉ'सिअर् )— a collection of papers about a person's antecedents or the like. एखाद्या विषयींच्या कागदपत्रांचा संग्रह, ( व्यक्तीचा ) पूर्वेतिहास, पूर्वचरित्र.

**Dŏt**, *n.* ( डॉट् )—a small spot, a point; a small child, a tiny object; the money a woman brings with her at marriage. बिंदु, शून्य; लहान मूल, अगदीं लहान वस्तु; लग्नाच्या वेळीं मिळालेलें स्त्रीधन. *v. t.* to mark with a dot or dots; to place here and there. शून्य देणें, ठिपके ठिपके देणें; इतस्ततः ठेवणें. *Dott'y*, *a.* dotted; limping; mad. ठिपक्यांचा; लंगडा, डळमळीत; वेडा.

**Dō'tage**, *n.* ( डो'टिज् )— feeble-minded old age. म्हातारचळ, ( वृद्धावस्थेंतील ) मानसिक दुर्बलता.

**Dō'tard**, *n* ( डो'टर्ड् )—a man in his dotage; an old fool. म्हातारचळ लागलेला; वृद्ध मूर्ख मनुष्य.

**Dōte**, *v. i.* ( डोट् )—to be feeble-minded or silly; to be passionately fond of. म्हातारचळ लागणें; अतिप्रेमानें लुब्ध होणें. *To dote upon*, to love in a foolish way. भुलून जाणें, प्रेमानें वेडा होणें.

**Dŏtt'erel**, *n.* ( डॉ'टरल् )— a kind of shore bird. एक अतिशय मूर्ख पक्षी.

**Dŏtt'le**, *n.* ( डॉ'टल् )—the remaining part of tobacco in a smoked pipe. चिलीम ओढल्यानंतर चिलमींत शिल्लक राहलेला तंबाकू.

**Dou'ble**, *a.* (ड'बल् )—twofold; consisting of two parts; of two kinds; deceitful. दुप्पट; दुहेरी; दोन प्रकारचा; कपटी, दगलबाज. *adv.* twice the amount; two together. दोनदां; एकत्र दोन. *n.* a person or thing mistakable for another; a game between two pairs of players; twice the amount. दुसऱ्याबद्दल चुकून समजला जाणारा इसम किंवा वस्तु; दोघांमध्यें खेळण्याचा खेळ; दुप्पट. *v. t. & i.* to make or become double; to increase twofold; to clench (fist); to make a sudden turn; to play two parts in the same piece; to go or get round. दुप्पट करणें किंवा होणें; दुप्पट वाढविणें; मूठ वळाविणें,-आवळणें; एकदम वळणें; ( एकाच खेळांत-नाटकांत-नटानें ) दुहेरी काम करणें; भोंवताली फिरणें, वळसा घालणें. *A double door*, a door having two parts. दोन भाग असलेला दरवाजा. *To advance at the double*, to run. धांवणें. *One's double*, a person who looks just similar. अगदीं सारखा दिसणारा मनुष्य. *To double up*, to fold up, to sit closer. दुमडणें, घडी करणें; अगदीं जवळ बसणें. *To double back*, to bend back, to run back. पाठीमागें वळणें, पाठीमागें धांवणें.

**Dou'ble-cross**, *v. t.* ( ड'बल्-क्रॉस् )— to betray, to deceive, to sell to both the sides. फसवणें, दोन्ही पक्षांना विकणें.

**Dou'ble-dealer**, *n.* ( ड'बल्-डीलर् )—an insincere, dishonest person. अविश्वासी मनुष्य, कपटी, दुटप्पी.

**Dou'ble-dealing**, *n.* ( ड'बल्-डीलिंग् )—dishonesty. दुटप्पी व्यवहार, लबाडी. *a.* dishonest. लबाड, दुतोंड्या.

**Dou'ble-edged**, *a.* ( ड'बल्-एज्ड् )—( an argument ) damaging to the user as well as to the opponent. दुधारी.

**Dou'ble-fāced**, *a.* ( ड'बल्-फेस्ड् )—friendly in one's presence but secretly unfriendly, hypocritical. वरवर गोड बोलणारा, ढोंगी.

**Dou'ble-quick**, *adv.* ( ड'बल्-क्विक् )—very quickly. फारच जलद.

**Doub'lĕt**, *n.* ( ड'ब्लिट् )—a man's close body-garment. बंडी, अंगाबरोबर घालण्याची बंडी.

**Doublōōn'**, *n.* ( डब्लू'न् )—a gold coin in Spain ( worth slightly over £ 1 ). स्पेन देशांतील एक सोन्याचें नाणें.

**Doubt**, *n.* ( डाउट् )—a feeling of uncertainty; a state not allowing of certainty; suspicion. संशय; अनिर्णय, अनिश्चय; शंका; संदेह. *v. t. & i.* to question the truth of, to be uncertain; to disbelieve in; to feel distrust of; to be apprehensive. शंका येणें; विश्वास न ठेवणें; गैरविश्वास वाटणें; भीति वाटणें.

**Doubt'ful**, *a.* ( डा'उट्-फुल् )—feeling or giving rise to doubt; uncertain. साशंक, संशयास्पद; अनिश्चित.

**Doubt'lĕss**, *adv.* ( डा'उट्-लिस् )-certainly. खात्रीनें.

**Douche**, *n.* ( डूश् )—a jet of water forced into any part of the body externally or internally. फवाऱ्यांत स्नान, पिचकारी.

**Dough**, *n.* ( डो )—flour mixed with water ready for baking. मळलेलें पीठ, तिंबलेली कणीक.

**Dought'y**, *a.* ( डा'उटि )—able, valiant, brave. शूर, पराक्रमी.

**Dour,** *a.* ( डुअर् )—silent and unwilling to change an idea, stubborn. हट्टी, दुराग्रही.

**Douse,** *v. t.* (डाउस्)—to put into water; to throw water on; to put out a light, to extinguish; (डाउझ्) to use divining rod. पाण्यांत बुडविणें; पाणी फेंकणें; मालविणें; पानाड्याच्या काठीचा-पक्षिणीच्या कांडीचा-उपयोग करणें.

**Dove,** *n.* (डव्ह्)—a pigeon; a type of gentleness or innocence. कबूतर; सौम्यतेचा किंवा निर्दोषीपणाचा मासला.

**Dove'cŏt,** *n.* (ड'व्ह्-कॉट्)—a pigeon-house, a house built for doves to live in. कबुतरखाना, खुराडें. Also, *Dove'cote.*

**Dove'tail,** *n.* (ड'व्ह्-टेल्)—a joint shaped like a dove's tail. कळाशी, दांता. *v. t. & i.* to fit together very well. नीट तऱ्हेनें सांधणें.

**Dow'ager,** *n.* ( डा'वजर् )—a woman with a title or property derived from her late husband. मृत पतीच्या पश्चात् त्याच्या पदवीची किंवा संपत्तीची मालकीण. *The Dowager queen,* the wife of the dead king. मृत राजाची राणी.

**Dowd'ȳ,** *a.* (डा'उडि)—lacking smartness, ill-dressed, badly dressed. तेजोहीन, गबाळ पोषाख केलेला. *n.* a badly dressed woman. गचाळ पोषाख केलेली स्त्री.

**Dow'er,** *n.* (डा'उअर्)—a widow's share for life of husband's estate; a natural gift or talent. पतीच्या संपत्तींतील पत्नीचा भाग; स्वाभाविक देणगी किंवा बुद्धि. *v. t.* to give dowry to; to endow with talent. स्त्रीधन किंवा हुंडा देणें; बुद्धियुक्त असणें.

**Down,** *n.* (डाउन्)—an open high land; a fine soft short hair or feathers. माळजमीन; लव, लोंकर, पक्ष्यांचे मऊ पर. *adv.* towards or in a lower place or state; from earlier to later time; on the ground. खालीं, खालच्या स्थितींत; प्राचीन काळापासून अर्वाचीन काळापर्यंत; जमिनीवर. *prep.* downwards along, through, or into; at a lower part. खालीं, उपल्या, पालथा. *a.* directed downwards. खालच्या बाजूकडील, उतरता. *Ups and downs,* good and bad fortune. उच्च व नीच अवस्था, चांगली व वाईट स्थिति. *To be down on, to have a down on,* to dislike specially, to tend to be hard upon. विशेष तिरस्कार करणें. *To do down,* to deceive. फसविणें. *To down a person,* to beat or conquer a person. एकाद्याला मारणें किंवा जिंकणें. *To be down with,* to be down in bed with. ०नें आजारी असणें, अंथरुणाला खिळणें. *Down'y,* *a.* लव असलेला; मऊ, सुखदायक; (*Sl.*) जाणता, धूर्त.

**Down'cāst,** *a.* (डा'उन्-कास्ट्)—(of eyes) looking down; (of person) dejected, very low in spirits. अधोमुख; खिन्न, उदासीन.

**Down'fall,** *n.* (डा'उन्-फॉल्)—a fall from prosperity or power; downpour. अधःपात, अधिकारभ्रष्टता; वर्षाव.

**Down'hearted,** *a.* ( डा'उन्-हार्टेड् )—despondent, dejected. उद्विग्न, विषण्ण.

**Down'hill,** *n.* ( डा'उन्-हिल् )—a downward slope. उतरण. *a.* descending; declining. उतरता, घसरता.

**Down'pour,** *n.* ( डा'उन्-पोअर् )—heavy fall of rain, &c. भयंकर जोराचा वर्षाव, पावसाची मुसळधार.

**Down'rīght,** *a* ( डॉ'उन्-राइट् )—plain, straightforward; blunt; undisguised. साधा, सरळ, धोपट; स्पष्ट. *adv.* thoroughly, quite. निखालस, पूर्णपणें.

**Downs,** *n. pl.* (डाउन्झ्)—low hill covered with grass. गवतानें आच्छादलेल्या लहान टेकड्या.

**Downstairs',** *adv., n., & a.* (डाउन्-स्टे'अर्झ्)—in the lower part of a house. तळमजल्यावर, खालीं; तळमजला; तळमजल्याचा.

**Down'trŏdden,** *a.* (डा'उन्-ट्रॉडन्)—not getting proper treatment, oppressed. पायांखालीं तुडवलेला, चांगल्या तऱ्हेनें न वागलेला, दडलेला.

**Down'ward,** *a. & adv.* ( डा'उन्-वर्ड् )-Downwards, *adv.*-from higher to a lower place. खालीं; खालीं जाणारा; अधोगामी; खालचा.

**Dow'rȳ,** *n.* ( डा'उरि)—the property brought by a wife at marriage; a talent. लग्नाच्या वेळीं मिळालेली संपत्ति, स्त्रीधन; बुद्धि, अक्कल, शहाणपणा.

**Dowse,** See Douse.

**Dows'er,** *n.* (डा'उझर्)—a man who finds underground water by means of a dowsing-rod. विशिष्ट काठीच्या साहाय्यानें जमिनींत पाण्याची जागा शोधून काढणारा, पानाड्या.

**Dow'sing rod,** *n.* ( डा'उझिंगरॉड् )—पानाड्याची काठी.

**Dŏxŏl'ogȳ,** *n.* (डॉक्सॉ'लजि)—a short song of praise to God. ईशस्तुतिपर गाणें, स्तोत्र.

**Doy'en,** *n.* (डॉ'इयन्)—the oldest member (of a body of colleagues). सर्वांत जुना सहकारी,-सभासद.

**Dōze,** *v. i.* (डोझ्)—to yield to sleep, to be half asleep. डुलकी येणें. *n.* a light sleep. डुलकी.

**Do'zen,** *n.* (ड'झन्)—a set of twelve. बारा, डझन *A baker's dozen,* thirteen. तेरा.

**Drăb**, *a*. (ड्रॅब्)—of dull light colour, dull; uninteresting. भुऱ्या रंगाचा, फिकट; मनोरंजक नसणारें. *n*. a prostitute. वेश्या; व्यभिचारिणी.

**Drăchm, Dram**, *n*. (ड्रॅम)—a unit of weight 1/16 oz., 1/8 oz. १/१६ किंवा १/८ औंसाचें वजन, ड्राम.

**Draff**, *n*. ( ड्राफ् )—refuse, dregs. कचरा, गाळ, गदळ.

**Dräft'**, *n*. (ड्राफ्ट्)—a body of soldiers chosen to be sent to another place; an order for drawing money, bill or cheque drawn; a sketch of work to be done, a rough copy of a document. निवडक शिपायांची टोळी; हुंडी, हुंडीचिठ्ठी; मसुदा. *v. t*. to dispatch ( men ) as a draft; to make a draft of (document). निवडक लोक पाठविणें; मसुदा तयार करणें.

**Dräfts'man**, *n*. (ड्रा'फ्ट्स्मन्)—a man who draws plans. नकाशे किंवा नमुने काढणारा.

**Drăg**, *v. t. & i*. (ड्रॅग्)—to draw along with force, to trail or go heavily. ओढणें, फरपट काढणें. *n*. a check on progress, a retarded motion; a thing which is dragged, a coach-like 4-horse vehicle. गतिप्रतिबंध; लोढणा, आडकाठी; चार घोड्यांच्या गाडीसारखी गाडी. *To drag in*, to introduce ( a subject ) irrelevantly. अप्रस्तुत विषय मुद्दाम पुढें आणणें. *To drag on*, to be tedious. कंटाळवाणा होणें. *To drag out*, to protract. लांबविणें.

**Drăg'gle**, *v. t. & i*. (ड्रॅगल्)—to make dirty and wet by trailing; to hang trailing. चिखलांत किंवा ओलांत मळवणें, खराब करणें; लोळत ठेवणें.

**Drăg'oman**, *n*. (ड्रॅगमन्)—an interpreter and travellers' guide. वाटसरूंचा मार्गदर्शक दुभाष्या.

**Drăg'on**, *n*. (ड्रॅ'गन्)—an imaginary fire-breathing monster; a vigilant person. अग्निसारखा श्वास टाकणारा सपक्ष सर्प; दक्ष मनुष्य.

**Drăg'onflȳ**, *n*. (ड्रॅ'गन्-फ्लाइ)—a long-bodied flying insect. लांबट शरीराचा एक कीटक.

**Dragōōn'**, *n*. ( ड्रगू'न् )—a horse-soldier; a mounted infantry man. घोडेस्वार शिपाई; घोड्यावर बसलेला पायदळांतील मनुष्य. *v. t*. to subject to oppression; to force into submission or obedience. अति त्रास देणें; शरण यावयाला लावणें.

**Drain**, *v. t. & i*. (ड्रेन्)—to draw off (liquid) by ditches or pipes; to drink to the dregs, to exhaust; to run dry. पाट काढणें, काढून टाकणें; गाळ राहीपर्यंत पिऊन टाकणें; संपविणें; कोरडें करणें. *n*. a channel or pipe carrying off dirty water; a continued loss. नाला, मोरी, जलमार्ग; सारखें कमी होणें, गळती, अपनयन (*fig*.).

**Drain'age**, *n*. (ड्रे'निज्)—the water or waste carried away; the pipes or channels that carry away waste water. वाहून नेलें जाणारें घाणेरडें पाणी किंवा इतर घाण; पाणी वाहून नेण्याची मोरी, गटार, नाला.

**Drāke**, *n*. (ड्रेक्)—a male duck; a fly used in fishing. बदक, कलहंस; मासे मारण्याच्या गळाला लावण्याची एक जातीची माशी.

**Drăm**, *n*. (ड्रॅम्)—a drachm; a small draught of strong drink. एका प्रकारचें वजन; दारूचा घुटका.

**Drä'mä**, *n*. (ड्रा'मा)—a stage play; the dramatic art; play-like series of events. नाटक; नाट्यकला; नाटकांतल्याप्रमाणें घडलेल्या गोष्टी.

**Dramăt'ic**, *a*. (ड्रमॅ'टिक्)—of drama; forcible, theatrical; striking; vivid. नाटकाचा; जोरदार, नाटकी; विलक्षण, लक्षांत भरण्यासारखा; स्पष्ट.

**Drăm'atist**, *n*. (ड्रॅ'मटिस्ट्)—a playwright. नाटककार.

**Drăm'atīze**, *v. t*. (ड्रॅ'म-टाइझ्)—to turn into a drama. नाटकरूपानें लिहिणें, नाटकांत रूपांतर करणें, नाट्यरूप देणें.

**Drā'per**, *n*. (ड्रे'पर्)—a dealer in cloth or fabrics for clothing. कापड विकणारा, कापडविक्या.

**Drā'perȳ**, *n*. (ड्रे'परि)—draper's wares or trade; clothing or hangings disposed in folds. निरनिराळें कापड; पडदा, झालर, वगैरे तऱ्हेचें घड्या वगैरे करून दुकानांत लोंबत ठेवलेलें कापड.

**Drăs'tic**, *a*. (ड्रॅ'स्टिक्)—strongly operative; vigorous; violent; thorough. भयंकर परिणामकारक; जोरदार, जबर; पूर्ण, आमूलाग्र.

**Drăt**, *v. t*. (ड्रॅट्)—to curse, to bother. तळतळाट देणें, त्रास देणें.

**Draught**, *n*. (ड्राफ्ट्)—traction; one drawing of a net; one continuous act of drinking; a dose of medicine; depth of water ship draws; current of air; artist's skech for a picture. ओढणें; जाळें काढणें; घोंट, घुटका; औषधाचा डोस, भाग; गलबताला लागणारी पाण्याची खोली; वाऱ्याचा झोत; रेखाटलेलें चित्र, नकाशा. *Draught-horse*, *n*. a strong horse for pulling heavy things. मोठीं ओझीं ओढणारा घोडा.

**Draughts**, *n*. (ड्राफ्ट्स्)—a game played by two people each with 12 round pieces on a chess-board of 64 squares. बुद्धिबळांचा खेळ.

**Draughts'man**, *n*. (ड्रा'फ्ट्स्-मन्)-(*fem. Draughts-woman*) a person who makes drawings. नकाशे काढणारा.

**Draw**, *n*. (ड्रॉ)-act of drawing; a game finished but neither side having won. ओढणें; दोन्हीं बाजूंच्या संमतीनें मध्येंच बंद केलेला खेळ. *v. t. & i*.

to pull, to drag, to haul; to attract; to derive, to deduce, to infer; to inhale; to extract; to entice; to extort; to force; to elicit; to pull into or out of position; to make a picture by tracing lines; to describe in words; to write out (bill, cheque); to bring (game) to an undecided conclusion. ओढणें ; आकर्षण करणें ; अनुमान काढणें ; श्वास आंत घेणें ; (रस) काढणें ; फुसलावून नेणें ; बळजबरीनें घेणें ; (माहिती) काढून घेणें ; आंत घेणें किंवा काढून टाकणें ; चित्र रेखाटणें ; वर्णन करणें ; (हुंडी) लिहिणें ; दोन्हीं बाजूंच्या संमतीनें खेळ मध्येंच थांबविणें, खेळाचा अनिश्चित निर्णय करणें. *To draw on*, to allure; to bring about; to approach. मन वळवणें ; घडवून आणणें ; जवळ येणें. *To draw rein*, to check horse; to pull oneself up. लगाम खेंचणें ; स्वतःला आवरणें. *To draw the long bow*, to exaggerate, to tell lying tales. अतिशयोक्ति करणें ; थाता मारणें.

**Draw'băck**, *n.* (ड्रॉ'बॅक्)—a thing that qualifies satisfaction; an amount of excise or import duty remitted or repaid on exports. उणीव, वाण ; सूट, सोडलेला पैसा.

**Draw'bridge**, *n.* (ड्रॉ'ब्रिज्)—a bridge hinged for drawing up or drawing aside. काढतां घालतां येण्याजोगा पूल, लोंबता किंवा हालता पूल.

**Draw'er**, *n.* (ड्रॉ'अर्)—one who draws; a sliding box-like container in a table or chest; (*pl.*) a two-legged undergarment. ओढणारा, काढणारा ; टेबलाचा वगैरे खण ; (अने०) जंघिया, इजार, चोळणा.

**Draw'ing**, *n.* (ड्रॉ'इंग्)—act of pulling, dragging, or hauling; a picture drawn with a pencil; a sketch. ओढणें ; पेन्सिलीनें काढलेलें चित्र ; रूपरेषा, नकाशा, आराखडा.

**Draw'ing-room**, *n.* (ड्रॉ'इंग्रूम्)—a reception-room, a room for guests in a home. पाहुण्यांचें स्वागत करण्याची बैठकीची जागा, दिवाणखाना.

**Drawl**, *v. i. & t.* (ड्रॉल्)—to speak slowly (making each word long). हेल काढून बोलणें. *n.* indolent or affected slowness of speech. हळूहळू हेल काढून केलेलें भाषण.

**Draw'-wĕll**, *n.* (ड्रॉ'वेल्)—a well with a rope and a bucket for drawing water. पाणी काढण्याकरितां दोरी व बालदी असणारी विहीर.

**Dray**, *n.* (ड्रे)—a low heavy four-wheeled cart; a squirrel's nest. ओझ्याची गाडी, खटारा ; खारीचें घरटें.

**Dread**, *v. t. & i.* (ड्रेड्)—to anticipate with terror; to be in great fear of, to fear greatly. दहशत बाळगणें ; फार भिणें. *n.* great fear; awe. मोठें भय; धास्ती, दहशत. *a.* dreaded, भीतिदायक.

**Dread'ful**, *a.* (ड्रे'ड्-फुल्)—terrible; troublesome or horrid. भयंकर ; त्रासदायक, दारुण.

**Dread'nought**, *n.* (ड्रे'ड्-नॉट्)—a kind of heavy coat and cloth; a powerful modern large warship; one who fears nothing. एक प्रकारचें जाड कापड ; एक प्रकारचें मजबूत मोठें लढाऊ जहाज, बेडर जहाज ; निधड्या छातीचा मनुष्य.

**Dream**, *n.* (ड्रीम्)-a sleeping vision; indulgence in fancy; a day dream, reverie. स्वप्न ; कल्पनातरंग ; दिवसाचें स्वप्न, तन्द्री. *v. t. & i.* to experience a dream; allow oneself to believe or think that; fall into reverie. स्वप्न पाहणें किंवा पडणें ; मनाला वाटूं देणें ; तन्द्री लागणें, कल्पना चालविणें. *Dream'y*, *a.* स्वप्नानुभवी, स्वप्नमय, स्वप्नासंबंधीं.

**Dream'lănd**, *n.* (ड्री'म्-लंड्)—region outside the laws of nature. निसर्गाच्या बाहेरील प्रदेश, स्वप्नसृष्टि.

**Drear'y**, **Drear**, *aa.* (ड्रे'अरि, ड्रेअर्)— dismal, cheerless, sad, gloomy, dull. उदासवाणा, भयाण, सुना.

**Drĕdge'**, *n.* (ड्रे'ज्)— an apparatus for clearing mud, any instrument used to gather or take by dragging; oyster-net. चिखल काढण्याचें यंत्र ; कालवें पकडण्याचें जाळें. *v. i. & t.* to clear by means of a dredge; to scatter (sugar) over. यंत्रानें गाळ काढणें ; ०वर साखर पेरणें.

**Drĕdg'er**, *n.* (ड्रे'जर्)— one who fishes with a dredge; a dredge; a pot with holes in the top used for scattering sugar, salt or flour. कालवें पकडणारा ; गाळ काढण्याचें यंत्र ; साखर वगैरे पेरण्याकरितां भोकें असलेलें भांडें.

**Drĕg**, *n.* (ड्रेग्)—*(pl.)* sediment, grounds, refuse; *(sing.)* a small remnant. (अने०) गाळ, गदळ, रेंदा ; (एक०) शिल्लक राहिलेला थोडासा भाग.

**Drĕnch**, *v. t.* (ड्रेंच्)—to wet all over; to force (a beast) to take a dose. चिंब भिजविणें ; घोट्यानें पाजणें. *n.* a dose for a beast. गुरांना घोट्यानें पाजण्याचें औषध.

**Drĕss**, *v. t. & i.* (ड्रेस्)—to clothe, to clothe oneself; to wash and bind up (a wound); to prepare food; to trim. पोषाख घालणें किंवा करणें ; (जखम) बांधणें ; अन्न शिजवून तयार करणें ; सजविणें. *n.* clothing (*esp.* external), garments, habit, apparel. कपडे, पोषाख. *To dress ship*, to put up many flags on a ship. गलबतावर पुष्कळ निशाणें लावणें. *To dress by the right*, to look to the right and get into the line.

उजवीकडे पाहून रांगेंत जाऊन उभा राहाणें. *To dress down*, to scold. खरडपट्टी काढणें. *Full dress*, ceremonial clothes. समारंभीं घालण्याचे कपडे, पूर्ण पोषाख. *Dress'y*, *a.* wearing fine clothes, always well-dressed. भपकेदार पोषाख करणारा, पोषाखी.

**Drĕss cir'cle.** *n.* (ड्रेस्-स'र्कल्)—the first gallery in theatres. नाटकगृहांतील पहिली गॅलरी.-सज्जा.

**Drĕss'er,** *n.* (ड्रे'सर्)—one who dresses a wound; a fitting in a kitchen with shelves. जखम धुवून बांधणारा ; स्वयंपाकाचीं भांडीं ठेवण्याचें फडताळ.

**Drĕss'ing,** *n.* (ड्रे'सिंग्)—the act of putting on clothes; material which is put on a wound; a mixture of oil and other matter served with some foods. कपडे घालणें, पोषाख करणें; मलमपट्टी ; मसाला. *Dressing-case*, *n.* कपडे वगैरे ठेवण्याची पेटी, स्त्रियांची फणीघराची आरसा-पेटी. *Dressing-gown*, *n.* a long garment used when one is undressed. पायघोळ झगा, सैल झगा.

**Drew,** *pa. t.* of Draw.

**Drĭb'ble,** *v. t. & i.* (ड्रि'ब्ल्)—to flow or let flow in drops; to work ball forward with repeated touches of feet. थेंब थेंब गळणें किंवा पाडणें; चेंडू पायानें पुढें पुढें सरकवीत नेणें. *n.* पावसाची झिमझिम.

**Drĭb'lĕt.** *n.* (ड्रि'ब्-लिट्)—a small instalment; a small amount (of liquid). लहान हप्ता, अल्पांश.

**Dried,** *pa. t.* of Dry.

**Drĭft,** *n* (ड्रिफ्ट्)—being driven by current; inaction; meaning of speaker's words; matter heaped by wind or collected by water. वाऱ्यानें वाहून नेणें ; सुस्तपणा ; बोलण्याचा मतलब, भावार्थ, अभिप्राय ; वाऱ्यानें किंवा पाण्यानें वाहून आलेला ढीग. *v. i. & t.* to be carried by the current; to heap or be heaped into drifts; to go aimlessly. प्रवाहाबरोबर वाहात जाणें ; जोरानें वाहून जाऊन ढीग होणें किंवा करणें ; वाहवत जाणें. *A snow-drift*, snow blown by the wind to form a small hill. वाहून आलेला बर्फाचा ढीग. *A drift-net*, a net employed in mine-sweeping. सुरुंग गोळा करून मार्ग मोकळा करण्याचें जाळें. *Drif'ter*, *n.* सुरुंग काढणारी बोट.

**Drĭft'wŏŏd,** *n.* (ड्रि'फ्ट्-वुड्)—wood blown on to the shore by wind. वाऱ्यानें वाहात आलेलीं लांकडें.

**Drĭll,** *n.* (ड्रिल्)—a boring tool or machine; exercising of soldiers in correct movements; training by giving muscle practice; a seed-sowing machine; a small furrow; a coarse twilled fabric; a kind of baboon विंधण्याचें हत्यार, सामता ; लष्करी तालीम, कवाईत ; बीं पेरण्याचें यंत्र ; लहान फाळ, कुळव ; एक प्रकारचें जाड कापड ; एक जातीचा मोठा वानर. *v. t. & i.* to make a hole through or into; to subject to or undergo drill; to sow in rows. भोंक पाडणें, विंधणें ; कवाईत शिकवणें किंवा शिकणें ; रांगेनें पेरणें ; पाभरीनें पेरणें.

**Drĭnk,** *v. i. & t.* (ड्रिंक्)—to swallow liquid, to take in liquid with the mouth; to absorb moisture. पिणें ; शोषून घेणें. *n.* any liquid used for drinking; act of drinking. पिण्याचा पदार्थ, पेय ; पानक्रिया, पिणें. *To take to drink*, to begin to drink too much wine or some strong drink. अति दारू किंवा दुसरें मादक पेय पिण्याची संवय लावून घेणें. *Drink'ables*, *n.* (*pl.*) पिण्याचे-पेय-पदार्थ.

**Drĭp,** *v. i. & t.* (ड्रिप्)—to fall or let fall in drops. थेंब थेंब गळणें किंवा गळूं देणें, स्रवणें, पाझरणें. *n.* a small drop of liquid. लहानसा थेंब, टप टप गळणें.

**Drĭpp'ing,** *n.* (ड्रि'पिंग्)—fat used in cooking. स्वयंपाकांत वापरली जाणारी चरबी.

**Drīve,** *v. t. & i.* (ड्राइव्ह्)—to urge onwards by force; to chase (game) from the large area into small; to convey or be conveyed in a vehicle; to impel, to propel, to carry along. हांकणें ; (लहान जागेंत) हांकून नेणें ; गाडींतून नेणें किंवा फिरणें ; पुढें ढकलणें किंवा नेणें. *n.* excursion in a carriage; a carriage road; driving of game, cattle, or enemy. गाडींतून बसून फिरणें ; गाडीचा रस्ता ; हांकलून लावणें. *To drive a nail*, to hit a nail in. चूक आंत ठोकणें. *To let drive at*, to aim a blow at. मारण्याकरितां नेम धरणें. *What are you driving at?* What is your intention? तुमचें म्हणणें काय आहे?

**Drĭv'el,** *v. i.* (ड्रि'व्हल्)—to slaver; to talk like an idiot. लाळ गळणें ; मूर्खासारखें बोलणें. *n.* foolish talk. मूर्खपणाचें बोलणें. *Driv'eller*, *n.*

**Driven,** *pa. p.* of Drive.

**Drī'ver,** *n.* (ड्रा'इव्हर्)—one who or that which drives; a coachman. हांकणारा ; गाडीवान.

**Drĭz'zle,** *v. i.* (ड्रि'झल्)—to fall in fine dense rain. सुरेख सारखा पाऊस पडणें, झिरीमिरी पाऊस पडणें.

**Drōll,** *a.* (ड्रोल्)—amusing, odd, queer, peculiar, causing laughter. मौजेचा, विनोदी, चमत्कारिक, विलक्षण, गमतीचा.

**Drōll'erў,** *n.* (ड्रो'लरि)-quaint humour. थट्टामस्करी.

**Drŏm'edarў,** *n.* (ड्रॉ'मिडरि)—an Arabian camel, a camel bred for riding. एकमदारी उंट.

**Drōne**, *n.* (ड्रोन्)—a male or non-worker bee; an idler; a deep monotonous hum. मधमाशीचा नर; काम न करणारा, भोजनभाऊ; सारखी गुणगुण.

**Drōōp**, *v. t. &i.* (ड्रूप्)—to incline or hang down; to languish; to lose heart. मान खालीं घालणें; खालीं वांकणें; म्लान होणें; खचणें, धीर सोडणें.

**Drŏp**, *n.* (ड्रॉप्)—a portion of liquid; a draught of strong drink; sweetmeat; painted curtain let down between acts; dropping or fall. थेंब; घोट; साखरेची मिठाई; खालीं पडणें, पतन; दर्शनी पडदा, मुखपट, अंकाचा पडदा. *v. i. &t.* to fall or shed in drops; to let fall; to lose money; to leave hold of; to sink to lower level; to sink to ground. थेंब थेंब पडणें किंवा पाडणें; पडूं देणें; पैसे सांडणें; सोडून देणें; खालीं जाणें; जमिनीवर पडणें. *To drop a brick*, to say or do something very foolish when in company. मंडळींत असतांना कांहींतरी मूर्खपणाचें कृत्य करणें किंवा बोलणें. *To drop one at one's house*, to let one get down from the car at one's house. एखाद्याला गाडींतून नेऊन त्याच्या घराजवळ उतरणें. *To drop a person*, to cease to be friendly to a person. एखाद्याची मैत्री सोडून देणें. *To drop in*, to make an unexpected visit to a friend. मित्राला अनपेक्षित भेट देणें.

**Drŏp'cŭrtain**, *n.* (ड्रॉ'प्-कर्टन्)—a curtain let down between the acts in a theatre. नाटकाच्या दोन अंकांच्या मध्यें पडणारा पडदा, अंकाचा पडदा, मुखपट.

**Drŏp'let**, *n.* (ड्रॉ'प्-लिट्)—a little drop. लहान थेंब.

**Drŏpp'ings**, *n. pl.* (ड्रॉ'पिंग्ज्)—what has dropped; the dung of animals. गळलेलें, पडलेलें; शेण, लीद.

**Drŏp'sy̆**, *n.* (ड्रॉ'प्सि)—a disease with watery fluid collecting in the body. जलसंचय, हातपाय सुजणें, सर्वांग सुजणें, शोथ. *Drop'sical, a.*

**Drŏs'ky̆**, **Drŏsh'ky̆**, *n.* (ड्रॉ'स्कि)—a light four-wheeled horse-carrige used in Russia. रशियांतील चारचाकी गाडी.

**Drŏss**, *n.* (ड्रॉस्)—scum of molten metal; impurities; refuse. गाळ; कीट, मळ; रेंदाट. *Dross'y, a.* गाळ असलेला.

**Drought**, *n.* (ड्राउट्)—thirst; continuous dry weather, wanting rain. तहान, कोरड, शोष, अनावृष्टि, अवृष्टि. *Drought'y, a.* अवर्षणाचा. *Drouth, n. (poet.)* शोष, कोरड, अवर्षण.

**Drove**, *pa. t.* of Drive.

**Drōve**, *n.* (ड्रोव्ह्)—a moving herd or flock; a crowd in motion. गुरांचा तांडा, कळप; चालती गर्दी.

**Drō'ver**, *n.* (ड्रो'व्हर्)—a driver of or dealer in cattle. गुरें हांकणारा किंवा विकणारा, हेडवाला, हेड्या.

**Drown**, *v. i. & t.* (ड्राउन्)—to be suffocated, to suffocate, by immersion; to drench or flood; to deaden (grief) with drink. बुडुन मरणें; चिंब भिजणें; दारू पिऊन दुःख मारणें. *To drown a voice*, to make so much noise so that it cannot be heard. आवाज ऐकूं न जाईसा करणें.

**Drowse**, *v. i.* (ड्राउझ्)—to be half asleep. अर्धवट झोंपेंत असणें, गुंगी येणें, झोंपेच्या गुंगींत असणें.

**Drow'sy̆**, *a.* (ड्रा'उझि)—half asleep, sleepy. अर्धवट निजलेला, पेंगत असलेला; झोंपाळू.

**Drŭb**, *n.* (ड्रब्)—to beat with a stick. दांडकणें, चोपणें. *Drub'bing, n.* thrashing. दांडकणें.

**Drŭdge**, *v. i.* (ड्रज्)—to work hard at distasteful tasks. काबाडकष्ट करणें. *n.* a person who does hard unpleasant work for little pay. काबाडकष्ट करणारा, कष्टाळू, खप्या.

**Drŭdg'ery̆**, *n.* (ड्र'जरि)—a hard distasteful work, toilsome work. काबाडकष्ट, अति त्रासदायक काम.

**Drŭg**, *n.* (ड्रग्)—a simple substance used in medicine; an unsalable commodity. औषधि द्रव्य; न विकला जाणारा पदार्थ. *v. t. & i.* to give drugs to, to take drugs. औषधें देणें किंवा घेणें. *Drug-store*, औषधें विकण्याचें दुकान.

**Drŭgg'et**, *n.* (ड्र'गिट्)—a woollen floor-covering, an over-carpet. गालिचा.

**Drŭgg'ist**, *n.* (ड्र'गिस्ट्)—a dealer in drugs, maker and dispenser of medicines. औषधें विकणारा, गांधी.

**Dru'id**, *n.* (ड्रू'इड्)—an ancient French or British priest. प्राचीन काळचा फ्रेंच किंवा ब्रिटिश लोकांचा पाद्री. *Dru'idess, Dru'idism, nn.*

**Drŭm**, *n.* (ड्रम्)—a musical instrument of various kinds; a round structure or object; middle portion of the ear. पडघम, ढोल, मृदंग; पडघमासारखें उभट वाटोळें पात्र; मध्यकर्ण, कर्णविवर. *v. t. & i.* to beat a drum with sticks; to make a loud noise with wings. पडघम वाजविणें; पंखांनीं मोठा आवाज करणें. *To drum a thing into a boy's head*, to cause a boy to remember a thing by saying it over and over again. तीच तीच गोष्ट वारंवार सांगून

एखाद्याच्या स्मरणांत ठसविणें. *Drum-head*, *n.* the skin of a drum. पडघमाचें कातडें. *Drum-stick*, *n.* the stick for beating a drum; lower joint of cooked fowl's leg ; a kind of Indian vegetable. शिजवलेल्या कोंबड्या बदकाच्या तंगडीचा खालचा सांधा; पडघम वाजविण्याची काठी. शेंगटाची -शेवग्याची-शेंग.

**Drŭmm'er**, *n.* (ड्रं'मर्)—a player of a drum. पडघम वाजविणारा.

**Drŭnk**, *pa. p.* of Drink.

**Drŭnk**, *pred. a.* (ड्रंक्)—intoxicated, overcome by strong drink. प्यालेला. झिंगलेला; दारूचा कैफ चढलेला. *n.* (*Sl.*) दारूची निशा, कैफ. *Drunk'en*, *a.* झिंगलेला. दारू प्यालेला.

**Drŭnk'ard**, *n.* (ड्रं'कर्ड्)—a person who often drinks too much wine, addicted to a strong drink. दारूबाज, दारू पिणारा.

**Drupe**, *n.* (ड्रूप्)—a stone-fruit. आंत बी असलेलें फळ. अष्टिवर्गाचें फळ.

**Drȳ**, *a.* (ड्राय्)—without or deficient in moisture; without rain ; thirsty ; hard ; uninteresting. कोरडा. सुखा. शुष्क : बिनपावसाचा; तहानेलेला; कठीण; शुष्क, नीरस. *v. t. & i.* to make or become dry ; to take out all the water from. सुकणें किंवा सुकवणें.

**Drȳ'ad**, *n.* (ड्रा'यड्)—a wood-nymph, a spirit of the forest. वनदेवता.

**Drȳ-dock'**, *n.* (ड्राय्-डॉ'क्)—a place in which a ship is taken out of water for repair. पाण्याच्या बाहेर गलबत दुरुस्त करण्याचें ठिकाण, कोरडी-सुकी-गोदी.

**Drȳ'er**, *a.* (ड्रा'यर्)—more dry. अधिक सुका किंवा कोरडा. *n.* an instrument or machine used for drying. सुकविण्याचें यंत्र.

**Drȳ-goods'**, *n.* (ड्राय्-गु'ड्स्)— non-liquid goods. धान्य वगैरे कोरडे पदार्थ ; सुती-लोंकरी कापड.

**Drȳ-nŭrse'**, *n.* (ड्राय्-नर्'स्)—a woman tending but not suckling a child. अंगावर न पाजणारी दाई.

**Drȳ-rŏt'**, *n.* (ड्राय्-रॉ'ट्)—a diseased growth in wood ; moral or social decay. लांकडांतील कीड. सडकें लांकूड; नैतिक किंवा सामाजिक अधःपात.

**Drȳ'shŏd**, *a.* (ड्रा'य्-शॉड्)—with feet dry. पाय न भिजवितां. सुक्या पावलांनीं.

**Dū'al**, *a.* (ड्यू'अल्)—of double nature ; forming a pair; twofold. दोन तऱ्हेचा; जोडीचा; दुप्पट. *n.* dual number or form. द्विवचन. *Du'alize*, *v. t.* ; *Du'ality*, *n.* द्वित्व.

**Dū'alism**, *n.* (ड्यु'अॅ-लिझम्)—duality ; recognition of two independent principles or powers. द्वैतमत ; द्वैतवाद. *Du'alist*, *n.* द्वीश्वरवादी ; दोन अधिकार चालविणारा. *Dualis'tic*, *a.*

**Dŭb**, *v. t.* (डब्)—to confer kinghthood on ; to give a person a title or nickname. नाइटची पदवी देणें. 'सर' हा किताब देणें. *n.* a foolish fellow. मूर्ख मनुष्य.

**Dŭb'ber**, *n.* (ड'बर्)—a large leathern vessel used for holding or transporting oil or ghee. डबा. बुधला.

**Dŭbb'in**, **Dŭbb'ing**. *n.* (ड'बिन्, ड'बिंग्)—an oily matter used for making leather soft. चामडें नरम करण्याचा एक तेलकट पदार्थ.

**Dūbī'etȳ**, *n.* (ड्यूबा'यृइटि)—a feeling of doubt. अनिश्चय. संशय. शंकेखोरपणा.

**Dū'bious**, *a.* (ड्यू'बिअस्)—doubtful, not clear or decided ; uncertain. संशयास्पद ; अस्पष्ट. संशययुक्त ; अनिश्चित. *Du'biousness*, *n.* ; *Du'biously*, *adv.*

**Dūbĭtā'tion**, *n.* (ड्युबिटे'शन्)—hesitation, doubting. कांकूं, टंगळमंगळ, शंका घेणें. *Du'bitative*, *a.* expressing doubt. शंकास्पद, संशयखोर.

**Dū'cal**, *a.* (ड्यू'कल्)—having to do with a duke or nobleman. ड्यूकसंबंधीं.

**Dŭc'at**, *n.* (ड'कट्)—a gold coin worth about 9s., formerly used in Europe. एक जुनें ९ शिलिंग किंमतीचें सोन्याचें नाणें.

**Dŭch'ess**, *n.* (ड'चिस्)—a duke's wife or widow, (*Sl.*) coster's wife. ड्यूकची बायको. किंवा विधवा ; फळविक्याची बायको.

**Dŭch'ȳ**, *n.* (ड'चि)— the part of a country under the control of a Duke. ड्यूकच्या ताब्यांतील मुलूख.

**Duck**, *n.* (डक्)—a kind of swimming bird ; a heavy cloth ; (*pl.*) trousers ; batsman's score of 0. बदक ; डक नांवाचें कापड ; डकची इजार-तुमान ; (क्रिकेट) शून्य धांव. *v. i. & t.* to dip head under water and emerge ; to push head of (a person) under water ; to move the body down quickly so as to save the head from a blow ; to drop curtsy. पाण्यांत बुडी मारून लागलेंच बाहेर येणें ; बुडवणें ; मार टाळण्याकरितां डोकें एकदम खालीं करणें ; खालीं वांकणें. *Like water off duck's back*, without any effect (on the hearer). कांहींहि परिणाम न होतां. उपड्या घड्यावर पाणी. *In two shakes of duck's tail*, instantly, at once. तावडतोब. *To take to it like a duck to water*, to learn naturally and very easily. स्वाभाविक व सहज तऱ्हेनें शिकणें.

*Ducks and drakes*, a game in which one makes stones jump along the surface of water. भाकरीचा किंवा भिगरीचा पाण्यांतील खेळ. *To play ducks and drakes with one's money*, to waste money wildly, to squander. पैशाची उधळपट्टी करणें. *A lame duck*, a person or ship which cannot move properly. शक्तिहीन मनुष्य, बरोबर न चालणारें जहाज. *A duck's egg*, 0 (in Cricket and other games). शून्य धांव.

**Dŭck'lĭng**, *n.* ( ड'क्-लिंग् )—a young duck. बदकाचें पिलूं.

**Dŭck'ў**, *n.* ( ड'कि )—darling. लाडका, आवडता, प्रियतम.

**Dŭct**, *n.* ( डक्ट् )—a conduit, a tube. नळ, नाली ; ( शरीरांतील ) नलिका.

**Dŭc'tile**, *a.* ( ड'क्टाइल् )—capable of being drawn into wire which can easily be pulled into a thread ; plastic ; docile. तार काढतां येण्याजोगा ; लवचिक ; नरम. *Ductil'ity*, *n.* तंतुभवनयोग्यता.

**Dŭd**, *n.* ( डड् )—a useless person or thing. निरुपयोगी मनुष्य किंवा वस्तु. *n. pl.* clothes, rags, garments. फाटकेतुटके कपडे, जीर्णवस्त्रें.

**Dūde**, *n.* ( ड्यूड् )—a man who loves to wear fine clothes, a foppish person. भपकेबाज मनुष्य.

**Dŭdg'eon**, *n.* ( ड'जन् )—anger, resentment ; state of wrath or indignation. राग, रुसवा ; खप्पामर्जी.

**Due**, *a.* ( ड्यू )—that ought to be given to a person ; proper, adequate ; owing, payable as a debt or an obligation. रास्त असलेलें देणें, देय ; योग्य ; बाकी ; देणें. *adv.* exactly ; duly. तसेंच, अगदीं बरोबर ; योग्य तऱ्हेनें. *n.* a person's fair share ; (*usu. pl.*) fixed toll or fee. योग्य भाग; ठराविक कर किंवा आकार. *To give a man his due*, to give a man what is right. वाजवी आहे तें देणें. *To give the devil his due*, to be fair even to the worst, to be just even to a bad person. अत्यंत वाईट इसमालाहि योग्य तो न्याय देणें. *In due time*, *In due course*, in the usual way, at the proper time. वेळ आली म्हणजे, योग्य वेळीं. *Due west*, straight towards the west. थेट पश्चिमेकडे.

**Dū'el**, *n.* ( ड्यु'इल् )—a fight with weapons between two persons ; a two-sided contest. दोन मनुष्यांची सशस्त्र लढाई; द्वंद्वयुद्ध. *v. t.* द्वंद्वयुद्ध करणें.

**Dū'ellist**, *n.* ( ड्यु'इलिस्ट् )—a duel-fighter. द्वंद्वयोद्धा.

**Dūen'na**, *n.* ( ड्यु'ना )—a governess, a female guardian. दाई, परिचारिका.

**Dūet'**, *n.* ( ड्युएट् )—any piece of music performed by two people. दोघांनीं गाण्याकरितां रचलेलें गीत, द्वंद्वगीत.

**Dŭff'el**, *n.* ( ड'फल् )—a coarse woollen cloth. जाडेंभरडें लोकरीचें कापड.

**Dŭ'ffer**, *n.* ( ड'फर् )—a foolish fellow ; a slow learner. मूर्ख मनुष्य ; बुद्धिमंद, ठोंब्या.

**Dŭg**, *pa. t.* & *pa. p.* of Dig.

**Dŭg**, *n.* ( डग् )—an udder, a beast's teat. आंचळ, सड.

**Du'gŏng**, *n.* ( डू'गॉग् )—a large fish-like creature found in the sea, also called 'sea-cow'. माशासारखा एक मोठा समुद्रांतील सस्तन प्राणी.

**Dŭg-'out'**, *n.* ( ड'ग्-आउट् )—a boat made by hollowing out a tree ; an underground shelter in war-time ; a very old army officer recalled to serve in war. झाड पोखरून केलेली नाव ; युद्धकाळासाठीं केलेलें जमिनीखालील आश्रयस्थान, खंदक, भुयार ; युद्धांत भाग घेण्याकरितां पुनः बोलावलेला सेवानिवृत्त सैन्याधिकारी.

**Dūke**, *n.* ( ड्यूक् )—a British peer of highest rank below a prince. अत्यंत मोठ्या दर्जाचा ब्रिटिश सरदार, ड्यूक. *Duke'dom*, *n.* duchy ; duke's dignity. ड्यूकच्या ताब्यांतील प्रदेश ; ड्यूकचा किताब.

**Dŭl'cet**, *a.* ( ड'ल्-सिट् )—sweet, soothing. श्रवणमधुर, रसाळ.

**Dŭl'cimer**, *n.* ( ड'ल्-सिमर् )—a musical instrument with strings hit with a striker. एक प्रकारचें तंतुवाद्य.

**Dŭll**, *a.* ( डल् )—slow of understanding ; not bright ; wanting liveliness ; uninteresting ; not sharp ; not active. मंदबुद्धीचा ; निस्तेज ; सौंदर्यरहित ; नीरस ; मठ्ठ, जड ; सुस्त, मंद. *v.t.* & *i.* निस्तेज-नीरस करणें ; मंदावणें.

**Dŭll'ard**, *n.* ( ड'लर्ड् )—a slow-witted person, one who is slow of understanding. मंदबुद्धीचा मनुष्य, मंदबुद्धि, मूर्ख.

**Dū'ly**, *adv.* ( ड्यू'लि )—properly, fitly, rightly ; sufficiently ; punctually, at the proper time. यथायोग्य ; पूर्णपणें ; यथास्थित ; वेळेवर.

**Dŭmb**, *a.* ( डम् )—unable to speak ; silent, taciturn ; not speaking. मुका ; स्तब्ध, मुखस्तंभ ; मूक. *Dumb show*, a show giving ideas to people by means of the hands without speaking. मूकनाटक, मुखाभिनय. *To strike dumb*, आश्चर्यचकित करून सोडणें.

**Dŭmb'-bĕll**, *n* ( ड'म्बेल् )—a short bar used in pairs to exercise muscles, a wood or iron

weight used in exercising the arms. मुद्गल, डंबेल.

**Dŭmb'found**, *v. t.* (ड'म्फाउन्ड्)—to confound to dumbness, to cause one to lose the power of speech. गोंधळून स्वस्थ बसायला लावणें, बोबडी वळवणें.

**Dumb-wait'er**, *n.* (डम्-वे'टर्)—a movable table used for serving food. अन्न वाढण्याकरितां केलेलें फिरतें मेज,-टेबल.

**Dŭm'dŭm**, *n.* (ड'म्-डम्)—a soft-nosed expanding bullet. मऊ नाकाची वाढणारी बंदुकीची गोळी.

**Dŭmm'ў**, *n.* (ड'मि)—a sham article; a mere tool; a lay figure. खोटी वस्तु; केवळ बाहुलें; नक्कल, बनावट प्रतिमा. *a.* sham. खोटें, बनावट.

**Dŭmp**, *v. t.* (डम्प्)—to throw down in a mass; to set down carelessly; to sell goods in a foreign country at a very low price. खालीं फेंकून देणें; निष्काळजीपणानें ठेवणें; परकी देशांत अगदीं कमी किंमतींत माल विकणें. *n.* a place in the open for storing goods; a place for throwing waste matter. माल ठेवण्याची उघडी जागा; कचरा टाकण्याची जागा, उकिरडा. *To be in the dumps*, to be sad and spiritless. दुःखी आणि खिन्न असणें.

**Dŭmp'lĭng**, *n.* (ड'म्प्-लिंग्)—a boiled ball of dough. मळलेल्या कणकेचा शिजविलेला गोळा.

**Dŭm'pў**, *a.* (ड'म्पि)—short and stout. ठेंगणा पण मजबूत.

**Dŭn**, *a.* (डन्)—of dull greyish brown. काळसर, जरदा, मळया. *n.* an importunate creditor. तगादा लावणारा धनको. *v. t.* to demand payment of a debt. पैशाचा तगादा लावणें.

**Dŭnce**, *n.* (डन्स्)—a bad learner; a dullard. अक्षरशत्रु; ठोंब्या.

**Dŭn'derhead**, *n.* (ड'न्डरहेड्)—a fool, a blockhead. मूर्ख किंवा मठ्ठ मनुष्य.

**Dūne**, *n.* (ड्यून्)—a sandhill. वाळूचा ढिगारा, वाळूची टेंकडी.

**Dŭng**, *n.* (डंग्)—excrement of animals; manure. गोमय, शेण; खत. *Dung'hill*, *n.* उकिरडा.

**Dŭng'aree**, *n* (डंगरी)—a coarse Indian cloth. जाडेंभरडें कापसाचें कापड.

**Dŭn'geon**, *n.* (ड'न्जन्)—a dark underground prison. अंधारकोठडी.

**Dūodē'nŭm**, *n.* (ड्यूओडी'नम्)—the first 12 inches of the bowel. लघ्वन्त्र, वितस्त्यन्त्र.

**Dūpe**, *v. t* (ड्यूप्)—to deceive and make use of. फसविणें, ठकवणें. *n.* person who is deceived, one who is unknowingly used by another for a wrong purpose. सहज फसला जाणारा, भोळा मनुष्य.

**Dū'ple**, *a.* (ड्यू'पल्)—double. दुप्पट.

**Dū'plĕx**, *a.* (ड्यू'प्लेक्स्)—of two parts, twofold. दुहेरा, दुप्पट. *Duplex lamp*, a lamp with two wicks. दोन वातींचा दिवा.

**Dū'plĭcate**, *a.* (ड्यू'प्लिकिट्)—double; exactly like or reproducing another example. दुप्पट, अगदीं सारखा. *n.* an exact copy. दुसरी प्रत, नक्कल, उतारा. *v. t.* (ड्यू'प्लिकेट) to make copies of. दुसरी प्रत करणें.

**Dū'plĭcātor**, *n.* (ड्यू'प्लिकेटर्)—a machine for making many copies. अनेक प्रति-नकला-काढण्याचें यंत्र.

**Dūplĭ'cĭtў**, *n.* (ड्यूप्लि'सिटि)—the act of being dishonest, double-mindedness, deceitfulness. दुजाभाव, फसवेगिरी, लबाडी.

**Dūr'able**, *a.* (ड्यू'अरबल्)—capable of lasting; resisting wear, lasting a long time. पुष्कळ दिवस टिकणारा; टिकाऊ. *Durabil'ity*, *n.* टिकाऊपणा, स्थायित्व.

**Dūr'a mā'ter**, *n.* (ड्यु'अरा मे'टर्)—outer membrane of the brain. (मेंदूचें) घनवेष्टण, दृढवेष्टन.

**Dūr'ance**, *n.* (ड्यु'अरन्स्)—imprisonment. अटक, कैद.

**Dūrā'tion**, *n.* (ड्युरे'शन्)—the length of existence, the time a thing lasts. जीवनमर्यादा, स्थितिकाल, कालमान.

**Dur'băr**, *n.* (द'र्-बार्)—a special meeting of a ruler and the important men of his government in India. दरबार.

**Dūr'ĕss**, **Dūr'esse**, *n.* (ड्यू'अरेस्)—forcible restraint; threats or other illegal compulsion. बळजबरीनें कोंडून ठेवणें; बेकायदेशीर धमकी किंवा बळजबरी. *Made under duress*, made because of force, under compulsion. बळजबरीनें दिलेलें.

**Dūr'ĭng**, *prep.* (ड्यु'अरिंग्)—throughout or at a point in the duration of. पर्यंत, आंत, मध्यें.

**Durst**, *pa. t.* of Dare.

**Dŭsk**, *n.* (डस्क्)—the time when daylight is fading, partial darkness; obscurity. काळोख, काळोखी, अंधारी; अप्रसिद्धि, दुर्बोधता.

**Dŭs'kў**, *a.* (ड'स्कि)—in scanty light; dark, dark-coloured. धुकट; काळसर, काळ्या रंगाचा.

**Dŭst**, *n.* (डस्ट्)—powder made up of fine particles of waste matter, finely powdered earth. धुरळा, धूळ, रजःकण, चूर्ण. *v. t.* to cover with dust or powder; to take the dust off. ० वर धूळ

टाकणें ; धूळ झाडणें, झटकणें. *To shake off the dust of one's feet,* to go away in anger. रागानें-पाय आपटीत-निघून जाणें. *To throw dust in one's eyes,* to deceive one. ॰च्या डोळ्यांत धूळ फेंकणें, एखाद्याला फसविणें. *To bite the dust,* to fall, to die, to fall in the agonies of death. पडणें, मरणकाळच्या यातना होणें, मरणें. *In the dust,* dead. मेलेला. *Dus'ty, a.* चूर्ण केलेला, धुळकट, धूलिमय.

**Dŭst'-bin,** *n.* (ड'स्ट्-बिन्)—a receptacle for rubbish. कचरा टाकण्याची पेटी.

**Dŭs'ter,** *n.* (ड'स्टर्)—a cloth for dusting furniture. धूळ झाडण्याचा कपडा किंवा रुमाल, झाडायचें फडकें.

**Dŭst'man,** *n.* (ड'स्ट्-मन्)—a scavenger, a street-cleaner. झाडूवाला.

**Dŭs'ting,** *n.* (ड'स्टिंग्)—clearing of dust ; thrashing ; tossing at sea. धूळ झाडून टाकणें ; झोडपणें, मारणें ; समुद्रांत हेलकावे खाणें.

**Dŭtch,** *a.* (डच्)—of Holland or its people or in their language. हॉलंडचा, तेथील लोकांचा किंवा भाषेचा. *n.* the Dutch language. डच भाषा.

**Dū'teous,** *a.* (ड्यू'टिअस्)—obeying regularly and willingly. आज्ञाधारक, कर्तव्यदक्ष, कर्तव्याचा.

**Dū'tiable,** *a.* (ड्यू'टिएबल्)—liable to customs duties, on which one must pay duty. कर किंवा जकात बसविण्याजोगा.

**Dū'tiful,** *a.* (ड्यू'टि-फुल)—regular and willing in the discharge of duty. कर्तव्यतत्पर.

**Dū'tў,** *n* (ड्यू'टि)—moral or legal obligation ; office or function ; tax levied on article or transaction. कर्तव्यकर्म ; कामगिरी, नोकरी ; कर, जकात.

**Dwarf,** *n.* (ड्वॉर्फ्)—much undersized person. वाढ खुंटलेला, खुजा, वामनमूर्ति, ठेंगू.

**Dwĕll,** *v. i.* (ड्वेल्)—to keep one's attention fixed ; to write or speak at length on ; to inhabit ; to reside. पूर्ण लक्ष ठेवणें ; सविस्तर लिहिणें किंवा बोलणें ; वसति करणें, राहणें.

**Dwĕll'ing,** *n.* (ड्वे'लिंग्)—a habitation, a house, a place of residence. घर, राहण्याची जागा.

**Dwelt,** *pa. t.* of Dwell.

**Dwin'dle,** *v. i.* (ड्विं'डल्)—to waste away ; to diminish ; to lose importance. झिजणें ; कमी होणें ; महत्त्व जाणें.

**Dў'ad,** *n.* (डा'यड्)— two ; set of two. दोन ; दोन वस्तु, जोडी, द्वय.

**Dўe,** *v. t.* (डाय्)—to colour, to tinge ; to make of a specified colour. रंग देणें ; रंगवणें. *n.* a colour produced by dyeing ; a hue ; matter used to dye with. रंग, वर्ण ; रंगवणी, रंगाचें द्रव्य. *Of the deepest dye,* of the worst kind. अत्यंत वाईट प्रतीचा. *Dy'er, n.* रंगारी.

**Dў'ing,** *a.* (डा'इंग्)—nearing death ; becoming useless. मरणोन्मुख ; निरुपयोगी होत चाललेला.

**Dyke,** see Dike.

**Dўnăm'ic,** *a.* (डाय्-नॅ'मिक्)—of motive force or force in operation ; having great strength of character. चलन किंवा गतिविषयक, शक्तीचा ; खंबीर मनाचा.

**Dўnăm'ics,** *a.* (डाय्-नॅ'मिक्स्)—(*usu. with sing. vb.*) a branch of physics treating of the action of force, physical or moral forces in any sphere. पदार्थचलनशास्त्र, गतिशास्त्र, चलपदार्थशास्त्र.

**Dў'namite,** *n.* (डा'इनमाइट्)—a powerful explosive (used to break up rocks). मोठा बार होऊन उडणारा -प्रचंड स्फोटक- पदार्थ, सुरुंग. *v. t.* सुरुंग लावून उडविणें, तुकडे तुकडे करणें.

**Dў'namō,** *n.* (डा'इ-नमो)— a machine which produces electric power. वीज उत्पन्न करणारें यंत्र, गतिजन्य-विद्युत्-यंत्र.

**Dўnamŏ'mĕter,** *n.* (डाइनमॉ'मिटर्)—an instrument measuring energy spent. वीज मोजण्याचें यंत्र, शक्तिमापक यंत्र.

**Dў'nastў,** *n.* (डि'नस्टि)—a line of rulers all of the same family, the time during which number of kings of the same family rule a country. राजघराणें, राजवंशावळ ; राजघराण्याची कारकीर्द. *Dynas'tic, a.*

**Dўne,** *n.* (डाइन्)—the unit of force. प्रेरणा मापण्याचें एक प्रमाण.

**Dўs'enterў,** *n.* (डि'सेंटरि)—a disease of the bowels. आमांश, अतिसार, संग्रहणी. *Dysenter'ic, a.* आमांशासंबंधीं.

**Dўspĕp'sia,** *n.* (डिस्पे'प्सिआ)-indigestion. अपचन, अग्निमांद्य.

**Dўspĕp'tic,** *a.* (डिस्-पे'प्-टिक्)—having to do with dyspepsia, subject to dyspepsia. अपचन रोगाचा, अपचनविकारी. *n.* a person suffering. from dyspepsia. अपचनरोगी.

**Dyspnoe'a,** *n.* (डिस्प्नी'आ)—difficult breathing. दम-श्वास-लागणें, श्वासावरोध (रोगाचें चिन्ह).

**Dўsū'ria,** *n.* (डिस्यू'रिआ)—painful urination. लघ्वी होतांना कळ मारणें, मूत्रकृच्छ्र.

# E

**E,** (ई)—fifth letter of the English alphabet; third note in the diatonic scale. इंग्रजी वर्णमालेंतील पांचवा वर्ण; गांधार, 'ग' स्वर.

**Each,** *a. & prep.* (ईच्)—(of two or more) every one taken separately. दोन किंवा अनेकांपैकीं प्रत्येक.

**Eag'er,** *a.* (ईगर्)—full of keen desire; ardent; impatient, very anxious to. उत्सुक; उत्कंठित; उतावळा. *-ly*, adv.; *-ness*, n.

**Ea'gle,** *n.* (ईगल्)—a large bird of prey; an American coin worth 10 dollars; the ensign of the ancient Romans having the figure of an eagle. गरुड, गरुडपक्षी; दहा डॉलर किंमतीचें एक सोन्याचें नाणें; प्राचीन रोमन लोकांचें गरुडाचें राष्ट्रचिन्ह. *Eagle-eyed*, keen-sighted. तीव्र नजर असलेला, सूक्ष्मदृष्टि.

**Eag'let,** *n.* (ई'ग्लिट्)—a young eagle. लहान गरुड.

**Ear,** *n.* (इअर्)—the organ of hearing; an ear-shaped thing; faculty of discriminating sound. कान; कानाच्या आकाराची कोणतीहि वस्तु, धान्याचें कणीस; ध्वनिज्ञान, स्वरज्ञान. *To prick up one's ears*, to become suddenly attentive. कान टवकारणें, टवकारून ऐकणें. *Over head and ears*, deeply. अतिशय, मर्यादेच्या बाहेर. *To set (people) by the ears*, to cause a quarrel. भांडण लावणें. *Would give my ears to know*, would make any sacrifice. वाटेल तो त्याग करीन. *To give ear to*, to listen to. ऐकणें, लक्ष देणें, ऐकून घेणें. *To have a person's ear*, to have favourable attention. एखाद्यानें आपल्या म्हणण्याकडे अनुकूलतापूर्वक कान देणें, -ऐकणें. *To be all ears*, to be deeply attentive. पूर्ण लक्ष असणें. *In one's ear*, in private. एकांतांत, खासगी रीतीनें. *An ear of corn*, the head of a grain-producing plant. धान्याचें कणीस.

**Earl,** *n.* (अर्ल्)—a nobleman ranking next to marquis. मार्किसच्यापेक्षां खालच्या दर्जाचा सरदार. *Earl'dom*, *n.* अर्लचा प्रदेश; अर्लची पदवी.

**Ear'ly̆** *a. & adv.* (अर्लि)—soon; betimes; in advance of others. लवकर; थोड्या वेळांत; आधीं, अगोदर. *To keep early hours*, to rise and go to bed early. लवकर निजणें व लवकर उठणें. *An early bird*, a person who gets out of bed early. लवकर उठणारा मनुष्य.

**Ear'märk,** *v. t.* (इ'अर्-मार्क्)—to assign (a fund) to some definite purpose. पैसे वगैरे विशिष्ट कामाकरितां निराळे ठेवणें.

**Earn,** *v. t.* (अर्न्)—to obtain as reward of work or merit, to be worthy of. मिळवणें, कमावणें.

**Earn'ings,** *n. pl.* (अ'र्निंग्ज्)—money earned. मिळवलेला पैसा, मिळकत, कमाई.

**Earn'ĕst,** *a.* (अ'र्निस्ट्)—eager and serious, not trifling; ardent, zealous. मनापासून; उत्सुक, उत्कंठित. *n.* seriousness; money paid as instalment to confirm contract; foretaste, a promise of something to be done. खरेपणा; इसारा, सचकार; पूर्वभोग, हमी, इसार. *Earnest money*, चयाणा.

**Ear'-ring,** *n.* (इ'अर्-रिंग्)—an ornament worn in the lobe of the ear. कर्णभूषण, डूल, भिगबाळी.

**Ear'shŏt,** *n.* (इ'अर्-शॉट्)—*Within ear-shot*, near enough to hear. ऐकूं येईल इतकें जवळ, कानाच्या टापूंत, श्रुतिपथांत.

**Earth,** *n.* (अर्थ्)—the world on which we live; dry land; soil, mould; the ground. पृथ्वी; सुकी जमीन; भुई; माती, जमीन. *To move heaven and earth*, to do everything possible (to gain some object). शिकस्तीचा प्रयत्न करणें. *To come to earth*, not to dream, to think of the facts. वस्तुस्थितीचा विचार करणें. *To run to earth*, to drive an animal into its hole; to discover something after a long search. पाठलाग करून बिळांत घालवणें; पुष्कळ शोधानंतर सांपडणें. *Earth'y, a.* मातीचा, मातीसारखा; ऐहिक, सांसारिक.

**Earth'-bound,** *a.* (अ'र्थ्-बाउन्ड्)—not caring for the higher things of life. आयुष्यांतील उच्च गोष्टींची पर्वा न करणारा.

**Earth'en,** *a.* (अ'र्थन्)-made of earth or of baked clay. मातीचा, मृण्मय, मृत्तिकामय.

**Earth'enwāre,** *n.* (अ'र्थन्-वेअर्)— baked clay; vessels made of baked clay. भाजलेली माती; मातीचीं भांडीं.

**Earth'ly̆,** *a.* (अ'र्थ्-लि)—of the earth; terrestrial, worldly. पृथ्वीचा; ऐहिक, मृत्युलोकचा. *No earthly use*, no use at all. कांहींहि उपयोग नाहीं.

**Earth'quake,** *n.* (अ'र्थ्-क्वेक्)—shaking of the earth's surface which often destroys buildings. धरणीकंप, भूकंप.

**Ear'-wig,** *n.* (इ'अर्-विग्)—a small insect with two curved tooth-like things on its tail. कानघोण, कर्णजलूका.

**Ease,** *n.* (ईझ्)—freedom from pain, trouble or constraint; quiet, rest; facility. दुःख, त्रास, वगैरेपासून मुक्तता; स्वस्थता, विश्रांति; समाधान, सौख्य. *v. t. & i.* to relieve from pain, to relax, to slacken. दुःख किंवा त्रास कमी करणें;

कमी करणें. *At ease*, स्वस्थ. *Ill at ease*, अस्वस्थ, सचिन्त. *To stand at ease*, रांगेत आपापल्या जागेवर स्वस्थपणानें उभें राहणें. *Ease'ful*, *a.* comfortable; at rest. सुखावह; शांत, निश्चिन्त.

**Eas'el**, *n.* (ई'झल्)–a frame to support a picture, black-board, etc. चितारयाचा घोडा, फळा ठेवण्याचा घोडा.

**Ease'ment**, *n.* (ई'झ्-मेन्ट्)—the right of way; a supplementary building; relief from pain. वहिवाट, चालू वहिवाटीचा हक्क; पुरवणी–जोड–इमारत; दुःखमुक्तता.

**East**, *n.* (ईस्ट्)—the point of horizon where the sun rises; eastern parts, orient. पूर्व दिशा; पौर्वात्य प्रदेश. *a.* from or towards the east. पूर्वेकडील, पूर्वेकडचा, पूर्वेचा. *The Near East*, the counntries of Turkey, Egypt and others. जवळचे पौर्वात्य देश, टर्की, इजिप्त, वगैरे. *The Far East*, the countries of China, Japan and so on. दूरचे पौर्वात्य देश, चीन, जपान वगैरे.

**Eas'ter**, *n.* (ई'स्टर्)—a feast-day in memory of Christ's rising from the dead, a festival of Christ's resurrection. ख्रिस्ताच्या पुनरुत्थानानिमित्त पाळला जाणारा सण.

**Eas'terlў**, *a.* (ई'स्टर्लि)—coming from the east, from or to the east. पूर्वेकडील, पूर्वाभिमुख.

**Eas'tern**, *a.* (ई'स्टर्न्)—of or in the east. पूर्वेचा, पौर्वात्य, पूर्वेकडील. *n.* an inhabitant of the east. पूर्वेकडचा रहिवासी, पौरस्त्य.

**East'ward**, *adv.* (ई'स्ट्-वर्ड्)—towards the east. पूर्वेकडे. Also, *East'wards.*

**Eas'y**, *a.* (ई'झि)—free from bodily or mental pain, worry, &c.; not difficult; easily gained (money); complaint; tranquil. दुःखरहित, सुखी; सोपा; सुलभ; नम्र, शांत. *adv.* in a comfortable fashion. सुखानें, चैनींत. *n.* a short stop in rowing. वल्हवतांना मध्येंच थोडावेळ थांबणें. *Easy! Easy!*, go slowly or gently. हळू हळू जा, आस्ते!

**Eas'ў-gōing**, *a.* (ई'झि-गो-इंग्)–content with things as they are. आहे त्या स्थितींत संतुष्ट, काळजी न बाळगणारा.

**Eat**, *v. t. & i.* (ईट्)—to take in and swallow (food); to destroy, to consume. चावून खाणें, खाणें; नाश करणें. *To eat one's words*, to take back one's words, to say that one is sorry for having said the words. आपले शब्द मागें घेणें. *To eat one's heart out*, to suffer silently, to be very sad. मुकाट्यानें सहन करणें, अत्यंत दुःखी होणें. *To eat one's terms* or *dinners*, to be studying for the bar. बॅरिस्टरच्या परिक्षेचा अभ्यास करणें. *Eating its head off*, costing more to feed than it is worth. किंमतीपेक्षां खाण्याचा खर्च जास्त असलेला. *To eat into*, to destroy part of. आंत आंत चरत जाणें, कुरतुडणें. *Eating-house*, a restaurant. उपाहारगृह.

**Eat'able**, *n.* (ई'टबल्)—solid food. भक्ष्य, खाण्याचा पदार्थ.

**Eaves**, *n pl.* (ईव्ह्ज्)—the lower edge of a roof which comes out beyond the wall. वळचणी, पागोळ्या.

**Eaves'-drŏpper**, *n.* (ई'व्ह्ज्-ड्रॉपर्)–one who stands under the eaves or elsewhere to listen secretly to other people talking. चोरून ऐकणारा, कानवसा घेणारा. *Eaves-dropping*, *n.* चोरून ऐकण्याची संवय.

**Ebb**, *n.* (एब्)—reflux of tide; decline, decay. ओहोटी; उतरती कळा, नाश. *v. i.* to flow back; to decline. ओहोटी लागणें; उतरती कळा येणें. *Ebb and flow*, भरती ओहोटी. *Ebb-tide*, ओहोटी.

**Eb'onў**, *n.* (ए'बॉनि)—a very heavy hard black wood. एक प्रकारचें कठीण काळें लांकूड, टेंबुरणी. *Ebo'ny*, *Ebo'n. aa.* like ebony; very black, टेंबुरणीसारखा; अतिशय काळा.

**Eb'onite**, *n.* (ए'बनाइट्)—a hard black form of rubber. एक ताठ काळा रबर.

**Ebŭll'ient**, *a.* (इब'लिअन्ट्)—in a state of boiling; exuberant, over-enthusiastic. उकळणारा; विपुल, पुष्कळ; अति उमाळा आलेला. *Ebull'ience*, *Ebull'iency*, *nn.* ऊत, उकळी; उमाळा.

**Ebullĭ'tion**, *n.* (एबलि'शन्)—boiling; outburst. कढण्याची क्रिया, कढ, आधण; ऊत, अतिरेक.

**Ecărt'e**, *n.* (एका'र्टे)—a card-game for two. दोघांनीं खेळण्याचा एक पत्त्यांचा खेळ.

**Eccĕn'tric**, *a.* (इक्सें'ट्रिक्)—not concentric; not placed centrally; not circular; irregular; odd, whimsical. केंद्रपराङ्मुख; मध्यत्यागी; वाटोळा नाहीं असा; विषम; तऱ्हेवाईक, एककल्ली, लहरी, चमत्कारिक. *n.* an eccentric person. लहरी, तऱ्हेवाईक-मनुष्य.

**Eccentrĭ'citў**, *n.* (एक्सेंट्रि'सि-टि)—deviation from a centre; singularity of conduct. केंद्रपराङ्मुखता; तऱ्हेवाईकपणा, चमत्कारिक वागणूक.

**Ecclēsĭăs'tic**, *n.* (इक्लीझिॲ'स्टिक्)—an officer of the church, a clergyman. धर्मोपदेशक. *a.* having to do with the government of the church. धर्मखात्यासंबंधीं.

**Ec'hō**, *n.* (ए'को)—the same sound coming back again, repetition of sound by reflexion of

sound-waves; close imitation. प्रतिध्वनि; बरोबर अनुकरण. *v. i. & t.* to resound with an echo; to be repeated; to repeat (a person's words). प्रतिध्वनि करणें किंवा होणें; घुमणें; पुनः तसेच शब्द उच्चारणें.

**Eclat'**, *n.* (एक्ला') —great success and praise. जयघोष, वाहवा.

**Eclĕc'tĭc**, *a.* (इक्ले'क्टिक्)—drawing one's philosophy from various schools. निरनिराळ्या मतांतून उत्तम मतांचा संग्राहक. *n.* सारग्राही, सारसंग्राहक.

**Eclipse'**, *n.* (इक्लिप्स्)—the shutting off light of the sun and the moon by another body; loss of brilliance or splendour. ग्रहण; तेजोहीनता, तेजोभंग. *v. t.* to intercept light; to outshine, surpass. ग्रहण लावणें; निस्तेज करणें, मागें टाकणें, फिका पाडणें, तेज लोपविणें.

**Eclĭp'tĭc**, *a.* (इक्लि'प्टिक्)—of eclipse. ग्रहणासंबंधी. *n.* the sun's apparent orbit. क्रान्तिवृत्त.

**Ec'lŏgue**, *n.* (ए'क्लॉग्)—pastoral poem. ग्रामीण गीत, गुराख्याचें गाणें.

**Econŏm'ĭc**, *a.* (ईकनॉ'मिक्)—pertaining to economy; on business lines; paying costs. काटकसरीचा; धंद्याच्या दृष्टीनें; खर्च पार पाडणारा. *Econom'ics*, *n. pl.* political economy; material prosperity of a country. अर्थशास्त्र; देशाची सांपत्तिक-ऐहिक-भरभराट.

**Econŏm'ĭcal**, *a.* (इकनॉ'मिकल्)—saving, frugal; of economics. बेताचा खर्च करणारा, मितव्ययी; अर्थशास्त्रासंबंधीं.

**Ecŏn'omĭst**, *n.* (इकॉ'नॉ-मिस्ट्)—the manager or user (of money etc.); a thrifty person; writer on political economy. पैशाची वगैरे व्यवस्था पाहाणारा; काटकसरी मनुष्य; अर्थशास्त्रज्ञ.

**Ecŏn'omize**, *v. t. & i.* (इकॉ'नमाइझ्)—to use sparingly, to avoid expense. काटकसर करणें, खर्च टाळणें. *Economiza'tion*, *n.*

**Ecŏn'omy̆**, *n.* (इकॉ'नॉमि)—management of concerns and resources of a state, the planning or doing of any business or a household; frugality, frugal use. संस्थानाची, धंद्याची किंवा घराची व्यवस्था किंवा देखरेख; मितव्यय, काटकसर. *Political economy*, the theory of production and distribution of wealth. अर्थशास्त्र.

**Ec'stasy̆**, *n.* (ए'क्स्टसि)—great joy, exalted state of feeling; trance; poetic frenzy. परमानंद; तन्मयावस्था; काव्योन्माद.

**Ecstăt'ĭc**, *a.* (एक्स्टॅ'टिक्)—of or in ecstasies, delightful beyond measure. परमानंदाचा, मोहक.

**Ec'zēmă**, *n.* (ए'क्झिमा)—a skin disease. एक कातडीचा रोग, खरजी सारखा पुरळ, इसब, पैण.

**Edā'cious**, *a.* (इडे'शस्)—fond of eating, greedy. खादाड, हावरा, अधाशी, लोभी. *Eda'city*, *n.* खादाडपणा.

**Edd'y̆**, *n.* (ए'डि)—a small whirlpool, a movement of water or air in a circle. पाण्याचा किंवा वाऱ्याचा गरगर फिरणारा भोंवरा. *v. t. & i.* भोंवरे होणें,-करणें.

**Ed'elweiss**, *n.* (ए'डल्-व्हाइस्)—a plant with a white flower found only on high mountains. पांढऱ्या फुलांचें एक लहान उंच पर्वतावरील झाड.

**E'den**, *n.* (ई'डन्)—the abode of Adam and Eve; a delightful place or state. ॲडॅम व ईव्ह यांचें मूळ वसतिस्थान, त्यांची ईडन नांवाची बाग; नंदनवन, सुखस्थिति.

**Edĕn'tāte**, *a.* (ईडे'न्टेट्)—toothless. दंतहीन.

**Edge**, *n.* (एज्)—the cutting side of a blade; an edge-shaped thing; a boundary-line. धार; कड़ा, कांठ; किनारा, हद्द. *To put an edge on*, to sharpen. धार लावणें, पाजळणें. *To be on edge*, to be easily excited. थोडक्या कारणावरून रागावणें. *It set my teeth on edge*, it was very sharp in sound; it was very acid in taste. त्यानें माझी दांतखिळी बसली.

**Ed'ĭble**, *a.* (ए'डिबल्)—fit to be eaten. खाण्याला योग्य, खाद्य.

**E'dĭct**, *n.* (ई'डिक्ट्)—an order proclaimed by authority, a decree, a proclamation. राजाज्ञा, आज्ञापत्र, हुकूम, निर्बंध.

**Ed'ĭfice**, *n.* (ए'डिफिस्)—a building. इमारत, मोठा इमला.

**Ed'ĭfy̆**, *v. t.* (ए'डि-फाय्)—to improve one's thoughts, to teach good thoughts, to instruct; to improve morally. बोध करणें, शिकविणें; नीतिदृष्ट्या सुधारणें. *Edifica'tion*, *n.*

**Ed'ĭt**, *v. t.* (ए'डिट्)—to prepare for publication, to superintend the publication of. प्रकाशित करणें, संपादन करणें.

**Edĭ'tion**, *n.* (इडि'शन्)—copies of a book or a newspaper printed at one time. विवक्षित ग्रंथ, आवृत्ति.

**Ed'ĭtor** *n.* (ए'डिटर्)—one who conducts a newspaper or periodical or prepares a work for publication. संपादक.

**Editŏr'ĭal**, *a.* (एडि-टो'रिअल्)—of an editor. संपादकीय. *n.* an article written or sanctioned by an editor; a newspaper leader. संपादकीय लेख; अग्रलेख.

**Ed'ūcāte**, *v. t.* (ए'ज्युकेट्)—to bring up (a child); to train mentally and morally;

to instruct. (मुल) वाढविणें; मानसिक व नैतिक शिक्षण देणें; शिकविणें. *Educa'tive, a.* शिक्षण देणारा. *Ed'ucator, n.* शिक्षक, अध्यापक.

**Edūcā'tion**, *n.* (एज्युके'शन्)—instruction. शिक्षण. *Educa'tional, a.* विद्याविषयक, शिक्षणाविषयींचा. *Educa'tionist, n.* शिक्षणतज्ज्ञ, शिक्षणाचा पुरस्कर्ता; *Educa'tionalist, n.*

**Edūce'**, *v. t.* (इड्यू'स्)—to bring out, to develop; to infer, to form some judgment from facts; to extract. बाहेर आणणें; अनुमान करणें; काढून घेणें. *Edu'cible, a.*; *Educ'tion, n.*

**Eel**, *n* (ईल्)—a snake-like fish. एक सर्पासारखा मासा, वाम.

**E'en, E'er**, *adv.* (poet.) for Even, Ever.

**Eer'ie, Eer'ȳ**, *a.* (इ'अरि)—strange and fearful. चमत्कारिक आणि भीतिदायक, भेसूर.

**Effāce'**, *v. t.* (इफे'स्)—to rub or wipe out. पुसून टाकणें, खोडणें. *To efface the memory of*, to cause to forget. विसरायला लावणें, ची आठवण बुजविणें.

**Effĕct'**, *n.* (इफे'क्ट्)—the result of a cause, consequence; impression; (*pl.*) property. परिणाम, फळ; मनावर ठसा, छाप; (अने०) मालमत्ता, जिंदगी. *v. t.* to bring about, to accomplish. घडवून आणणें; साधणें, निष्पादन करणें.

**Effĕc'tive**, *a.* (इफे'क्टिव्)—operative; fit for service; existing. गुणकारक; कार्यक्षम, उपयोगी; अस्तित्वांत असलेला.

**Effĕc'tūal**, *a.* (इफे'क्चुअल्)-answering its purpose, having adequate power. सफळ, सार्थ, फलदायक.

**Effĕm'inate**, *a.* (इफे'मि-नेट्)— behaving like a woman, soft, lacking courage, womanly; womanish; voluptuous स्त्रीवत्; नामर्द; विषयी, बाइलया, बायक्या. *Effem'inacy, n.* नामर्दपणा, क्लैब्य.

**Effĕn'di**, *n.* (इफे'न्डि)—a title given in Turkey or Egypt to an officer of government or to a gentleman. टर्की किंवा इजिप्तमधील एक पदवी.

**Eff'erent**, *a.* (ए'फरन्ट्)—leading away or outwards. दूर किंवा बाहेर नेणारा.

**Effervĕsce'**, *v. i.* (एफर्व्हे'स्)—to give off bubbles of gas; to exhibit signs of excitement, to be in high spirits. ऊत येणें, खतखतणें; आनंदाची उकळी फुटणें. *Efferves'cent, a.* फसफसणारा. *Efferves'cence, Efferves'cency, nn.* फसफसणें.

**Effēte'**, *a.* (एफी'ट्)—having the energies worn out; feeble. दमलेला; हतबल, बलहीन.

**Efficā'cious**, *a.* (एफिके'शस्)—producing desired effect. गुणकारक, प्रबल, कार्यसाधक. *Eff'icacy*, सामर्थ्य, तेज, गुणकारिता.

**Effi'cient**, *a.* (इफि'शन्ट्)—competent, capable, qualified for duty. कार्यक्षम, लायक. *Effi'ciency, n.* कार्यक्षमता, लायकी.

**Eff'igȳ**, *n.* (ए'फिजि)—a portrait, an image. पुतळा, प्रतिमा.

**Efflorĕsce'**, *v. i.* (एफ्लरे'स्)-to burst into flower; to become hard and powdery on the surface. फुलें येणें; कणीदार रवा जमणें, रवाळ होणें. *Efflores'cent, a.* मोहोर येणारा, फुलणारा. *Efflores'cence, n.* मोहोर; रवा, कणी.

**Eff'luence**, *n.* (ए'फ्लुएन्स्)— flowing out (of liquid); what flows out. बाहेर येणें, वाहणें; स्राव.

**Eff'luent**, *a.* (ए'फ्लुअन्ट्)—flowing out. बाहेर वाहणारा. [L. *ef*, out & *fluere*, to flow]

**Efflu'vium**, *n.* (एफ्लू'व्हिअम्)—an unpleasant smell. घाण, दुर्गंध.

**Eff'lux**, *n.* (ए'फ्लक्स्)—effluence. बाहेर येणें, स्राव.

**Eff'ort**, *n.* (ए'फर्ट्)—exertion; endeavour. परिश्रम; प्रयत्न.

**Effron'tery**, *n.* (इफ्र'न्टरि)—impudence, daring, rudeness. धिटाई, उद्धटपणा.

**Effŭl'gence**, *n.* (इफ'ल्जन्स्)—lustre, brightness. तेज, चकाकी. *Efful'gent, n.* तेजस्वी, चकचकीत.

**Effūse'**, *v. t.* (इफ्यू'झ्)—to pour forth. बाहेर ओतणें. *Effu'sion, n.* the act of pouring out or sending out; an outburst of excited writing. लोट, ओतणें, स्राव; लिहिण्याचा प्रवाह. *Effu'sive, a.* expressing feeling very freely. बाहेर टाकणारा, अति मोकळेपणानें बोलून दाखविणारा.

**Eft**, *n.* (एफ्ट्)—a newt, a water lizard. एक पालीच्या जातीचा प्राणी.

**Egg**, *n.* (एग्)—the rounded body produced by female of birds (containing germ of new individual). अंडें. *v. t.* to incite, to urge on. चिथावणें, उठावणी करणें, फूस देणें. *A bad egg*, a wrong-doer. वाईट कृत्य करणारा. *To teach one's grand mother to suck eggs*, to teach a person who knows more than oneself. स्वतःपेक्षां जाणत्या माणसाला शिकविणें, आजास नातवानें शिकविणें. *To put all one's eggs in one basket*, to risk all on a single venture; to put all one's money into shares in one company. आपलें सर्वस्व एकाच ठिकाणीं धोक्यांत घालणें; आपला सर्व पैसा एकाच कंपनीच्या भागांत घालणें,-गुंतविणें. *Egg-plant, n.* वांग्याचें झाड, वांगें.

**Eg'lantine**, *n.* (ए'ग्लंटाइन्)—a sweet briar, the wild rose bush. एक प्रकारचा रानटी गुलाब.

**Eg'ō**, *n.* (एंगो)—I, one's self, the self. देहाभिमानी आत्मा.

**Eg'ōism**, *n.* (एंगो-इझम्)—thinking too much about one's self, systematic selfishness, self-opinionatedness. अहंता ; स्वतःची बढाई. *Eg'oist*, *n.* (एंगोइस्ट्)—one who talks too much about oneself. आपलीच बढाई सांगणारा. *Eg'oistic*, *Eg'oistical*, *aa.* गर्विष्ठ, आत्मस्तुतिसंबंधीं, अहंमन्यतेचा.

**Eg'otism**, *n.* (एंगो-टिझम्)—talking too much about oneself; self-conceit. आत्मस्तुति ; अहंमन्यता. *Eg'otist*, *n.; Eg'otistic*, *Eg'otistical*, *aa.*

**Egrē'gious**, *a.* (इग्री'जस्)-notable, distinguished (now depreciatory). विलक्षण, अलौकिक (वाईट अर्थी).

**E'grĕss**, *n.* (ई'ग्रेस्)—going out; a way out, an exit, an outlet. बाहेर जाणें ; बाहेर जाण्याचा मार्ग, निष्क्रमण.

**E'grĕt**, *n.* (ई'ग्रेट्)—a white bird with a long white tail and black feathers; hairy crown of seeds. एका जातीचा बगळा ; कुसवांचा तुरा.

**Eid'er**, *n.* (आ'इ-डर्)—a large black and white duck with very soft feathers on the breast एक मोठें काळें व पांढरें बदक. *Eid'er-down*, *n.* the breast feathers of eider-duck; a thick covering for a bed filled with the fine feathers of eider duck. आइडर बदकाची लव, पीस, पर; आयडर बदकाच्या लवेनें भरलेलें बिछान्याचें आच्छादन, पराची दुलई.

**Eight**, *n.* (एट्)—one more than seven (8, VIII). आठ. *Eight'fold*, *n.* आठपट. *Eighth*, *a.* & *n.* आठवा. *Eighth'ly*, *adv.*

**Eight'een**, *n.* (एंटीन्)-one more than seventeen (18, XVIII). अठरा. *Eight'eenth*, *a.* अठरावा.

**Eight'y**, *n.* (एंटि)-eight times ten (80, LXXX). ऐंशीं. *Eigh'tieth*, *a.* & *n.* ऐंशींवा.

**Ei'kon**, *n.* (आ'इ-कन्)—a small likeness of some holy person or object, an image. मूर्ति, प्रतिमा.

**Eith'er**, *a.* & *pron.* (आ'यूद्र, ई'द्र्)—one or other of two. दोहोंपैकीं एक, प्रत्येक.

**Ejăc'ūlāte**, *v. t.* & *i.* (इजॅ'क्युलेट्)—to utter suddenly, to cry out; to throw out with force. एकदम बोलून टाकणें, ओरडणें, (पिचकारी सारखें) जोरानें फेंकणें. *Ejacula'tion*, *n.* फेंकणें, उद्गार. *Eja'culator*, *n.; Eja'culatory*, *a.*

**Ejĕct'**, *v. t.* (इजे'क्ट्)—to throw out, to expel, to emit. बाहेर टाकणें, घालवून देणें, काढून टाकणें. *Ejec'tion*, *n.* उत्क्षेप, बाहेर घालविणें. *Eject'ment*, *n.* बाहेर काढणें, हुसकवून देणें. *Ejec'tor* *n.* बाहेर घालविणारा.

**Eke**, *v. t.* (ईक्)—(with *out*) to supply the deficiencies of; to prolong. उणीव भरून काढणें ; लांबवणें. *adv.* also. सुद्धां.

**Elăb'orate**, *a.* (इलॅ'बरट्)—minutely worked out; highly finished. मोठ्या श्रमानें तयार केलेला ; श्रमकौशल्यनिर्मित. *v. t.* (इलॅ'बरेट्)—to work out in detail, to do more work upon and improve. मोठ्या श्रमानें तयार करणें. *Elabora'tion*, *n.; Elab'orator*, *n.; Elab'orative*, *a.*

**E'land**, *n.* (ई'लन्ड्)—a large South African deer. दक्षिण आफ्रिकेंतील मोठें हरिण, काळवीट.

**Elăpse'**, *v. i.* (इलॅ'प्स्)—to pass away. (वेळ) निघून जाणें.

**Elăs'tĭc**, *a.* (इलॅ'स्टिक्)—having power to resume normal shape; springy, rebounding, flying back; buoyant. स्थितिस्थापक ; लवचीक ; तरण्यासारखा. *n.* a chord or string that can be stretched and afterwards springs back into its first shape. लवचीक ताणतां येण्याजोगा दोर. *An elastic rule*, a rule that is not stiff, that is able to fit all cases. सर्वत्र उपयुक्त होणारा नियम. *Elasti'city*, *n.* स्थितिस्थापकता, लवचीकपणा.

**Elāte'**, *a.* (इले'ट्)—in high spirits; exultant, proud. हर्षभरित ; आनंदी, गर्विष्ठ. *v. t.* to make proud. गर्विष्ठ करणें. *Elated*, *a.* full of joy. आनंदपूर्ण, हर्षनिर्भर. *Ela'tion*, *n.*

**El'bow**, *n.* (एल्बो)—the bend of the arm. कोंपर. *v. t.* to thrust, to jostle. कोंपरानें ढोसणें. *At one's elbow*, close by. जवळ, लगत. *Up to the elbows* (in work), busily engaged. निमग्न, गढून गेलेला. *Out of elbows*, badly dressed, poor-looking. वाईट पोषाख असलेला, गबाळ्या. *To elbow one's way through a crowd*, to push one's way out. ढकलून मार्ग काढणें. *Elbow-grease*, hard work. कष्टाचें काम. *To have elbow-room*, to have enough room. प्रशस्त -पुरेशी- जागा मिळणें.

**El'der**, *a.* (एल्डर्)—of greater age; senior. वडील, वयानें मोठा. *n.* a person of greater age ; 2. a white flowered tree. वडील मनुष्य, गुरुजन. २. एक जातीचें पांढऱ्या फुलांचें झाड.

**El'derly**, *a.* (एल्डर्लि)—growing old. वयस्क, वयातीत.

**El'dĕst**, *a.* (एल्डिस्ट्)—first-born or oldest surviving, most advanced in age. सर्वांत वडील, ज्येष्ठ.

El Dorā'dō, *n.* ( एल् डॉरा'डो )—an imaginary country or city in which there is much gold. काल्पनिक सुवर्णभूमि.

Elĕct', *v. t.* (इले'क्ट्)—to choose, to pick out; choose by vote. पसंत करणें, निवडणें; मत देऊन निवडणें. *a.* chosen; select. निवडून आलेला, निवडक. *President elect*, president chosen but not yet in office. नियोजित अध्यक्ष. *He elected to go*, he decided to go. त्यानें जायचें ठरविलें. *The elect*, the chosen (e. g especially chosen by God). निवडलेला, नियुक्त. *Electioneer'*, *v. i.* to busy oneself in political elections. राजकीय निवडणुकींत गुंतणें. *Elec'torate*, *a.* the body of electors. मतदारसंघ.

Elĕc'tion, *n.* (इले'क्शन्)—choosing (by vote). निवडणूक.

Elĕc'tive, *a.* (इले'क्टिव्ह्)—appointed by election; entitled to elect; optional. निवडून दिलेला; निवडून देण्याला पात्र,-लायक; ऐच्छिक, वैकल्पिक.

Elĕc'tor, *n.* (इले'क्टर्)—one entitled to choose or elect. निवडून देणारा, मताधिकारी, मतदार. *Elec'toral*, *a.* मताधिकाऱ्यांचा, मतदारांचा.

Elĕc'tric, *a.* (इले'क्ट्रिक्)—of or charged with electricity. विजेचा, विजेसंबंधीं, विद्युद्धर्मी, विद्युज्जनक. *Elec'trical*, *a.* concerned with electricity. विजेसंबंधींचा. *Electri'cian*, *n.* (एलिक्ट्रि'शन्)—one skilled in electricity. विद्युच्छास्त्रवेत्ता. *Elec'trify*, *v. t.* to put electricity into; to surprise greatly. वीज घालणें; (विजेसारखें) चकित करून सोडणें.

Elĕctri'city, *n.* (इलेक्ट्रि'सिटि)—condition of molecules or ether produced by chemical action, heat, or magnetism. विद्युच्छक्ति, वीज.

Elĕc'trify, Elĕc'trize, *vv. t.* (इले'क्ट्रिफाय्, इले'क्ट्राइझ्)—to charge with electricity; to convert (railways, transport) to electric working; to startle, to excite. विद्युज्जागृत करणें; वीज भरणें; विजेच्या शक्तीवर चालू करणें; दचकणें, एकदम चळवळ उत्पन्न करणें.

Elĕc'trocute, *v. t.* (इले'क्ट्रो-क्यूट्)—to execute (a criminal) by electricity. विजेच्या धक्क्यानें ठार मारणें.

Elĕc'troplāte, *v. t.* (इले'क्ट्रोप्लेट्)—to put a thin covering of metal on another metal object by means of electricity. विजेनें सोनें चांदी इत्यादि धातूंचा मुलामा देणें.

Elĕc'trŏn, *n.* (इले'क्ट्रॉन्)—an atom of electricity. विद्युत्परमाणु.

Eleēmŏ'sўnary, *a.* (एलिईमॉ'झिनरि)—of alms, dependent on alms; charitable. भिक्षेचा, भिक्षेवर अवलंबून असलेला; धर्मार्थ, धर्मादाय.

El'ĕgance, *n.* (ए'लिगन्स्)—grace, refinement. सुरेखपणा, लावण्य; सफाई.

El'ĕgant, *a.* (ए'लिगन्ट्)—graceful, tasteful; of refined luxury. सुरेख, शोभिवंत; अलंकारिक, प्रौढ.

Elegī'ac, *a.* (एलि-जि'अॅक्)— suited to elegies, mournful, plaintive. शोकगीताला योग्य, शोककारक.

El'ĕgў, *n.* (ए'लिजि)—a song of lamentation (for the dead), a mournful or plaintive song. शोकगीत.

El'ĕment, *n.* (ए'लि-मेन्ट्)—a simple thing of which other things are made up, a component part; any of the four elements—earth, water, air, fire; congenial surroundings; (*pl.*) rudiments or simplest beginnings of learning or of an art. घटकावयव; मूलतत्त्वांपैकीं एक; अनुकूल परिस्थिति; (अने०) एखाद्या विद्येचा किंवा कलेचा मूलारंभ, ओनामा. *An element of truth*, some truth. सत्यांश, थोडेंसें सत्य.

Elemĕn'tal, *a.* (एलिमे'न्टल्)—of or like the powers of elements or nature; essential. भौतिक, निसर्गाच्या शक्तींचें किंवा शक्तींसारखें; आवश्यक.

Elemĕn'tarў, *a.* (एलिमे'न्टरि)—rudimentary; unanalysable, uncompounded. मूलारंभाचा; अविभक्त. *An elementary school*, a school where learning begins. प्राथमिक शाळा.

El'ĕphant, *n.* (ए'लिफन्ट्)—a very large anima with a long trunk and ivory tusks. हत्ती. *A white elephant*, a burdensome possession, a useless possession of which one would gladly be free. पांढरा हत्ती, निरुपयोगी भारी किंमतीची वस्तु.

Elephănti'asis, *n.* (एलिफॅन्टा'यूअसिस्)—a disease which causes a part of the body (usually the legs) to swell up and grow very large. हत्तीरोग, वारूळ, वल्मीक.

Elephăn'tine, *a.* (एलिफॅ'न्टाइन्)—huge, large and clumsy, unwieldy. हत्तीसारखा अगडबंब, धेडग, अफाट.

El'ĕvāte, *v. t.* (ए'लिव्हेट्)—to lift up, to raise to a higher level or rank. उंच करणें, चढवणें, अधिकारास चढविणें, बढती देणें.

El'ĕvated, *a.* (ए'लिव्हेटिड्)—fine, noble. सुंदर, उच्च, भारदस्त.

Elevā'tion, *n.* (एलिव्हे'शन्)—raising aloft; exaltation, dignity; the height above a given

level, the altitude. वर चढवणें; योग्यता, उच्च दर्जा; उंची.

**El'evātor**, *n.* (ए'लि-व्हेटर्)—that which elevates; a lift; a hoisting-machine, a large machine for raising. वर चढवणारा; लिफ्ट, पाळणा; वर उचलण्याचें यंत्र.

**Elĕv'en**, *n.* (इले'व्हन्)—one more than ten (11, XI); side of eleven persons at cricket. अकरा; क्रिकेटमध्यें ११ जणांची बाजू.-संघ.

**Elf**, *n.* (एल्फ्)—a small fairy, a supernatural being; a small or mischievous creature. वनदेवता; अलौकिक प्राणी; लहान खोडकर भूत, फाजील मनुष्य. *El'fin*, *a.* elf-like. वनदेवतेसारखा, खोडकर. *n.* a dwarf, a child. गिड्डा माणूस, मूल. *El'fish* *a.* खोडकर. *Elf-locks*, *n.* tangled mass of hair. केसांचा गुंता, गुंतवळा, जटा.

**Eli'cĭt**, *v. t.* (इलि'सिट्)—to draw out. बाहेर काढणें, काढून घेणें.

**Elide'**, *v. t.* (इला'इड्)—to leave out a letter or sound. अक्षर किंवा उच्चार सोडून देणें. *Eli'sion*, *n.* (इलि'झन्)

**El'ĭgible**, *a.* (ए'लि-जिबल्)—fit to be chosen; desirable, suitable, legally qualified. इष्ट; योग्य, लायक. *Eligibi'lity*, *n.* योग्यता, लायकी.

**Elĭm'ĭnāte**, *v. t.* (इलि'-मिनेट्)—to remove, to expel; to set aside. काढून टाकणें, काट मारणें; दूर करणें. *Elimina'tion*, *n.*

**Elite'**, *n.* (एली'ट्)-the best people in any group. निवडक चांगले चांगले लोक, थोर लोक.

**Elĭx'ir**, *n.* (इलि'क्सर्)—an imaginary liquid designed to change metal into gold; a sovereign remedy. हीन धातूचें सोनें करण्याची किमया; रामबाण उपाय.

**Elk**, *n.* (एल्क्)—a large deer with broad flat horns. सांबर.

**Ell**, *n.* (एल्)—a measure of 45 inches. ४५ इंचांचें माप. *Give him an inch and he'll take an ell*, if you give a little, he will demand more. *Cf.* 'भटाला दिली ओसरी, भट हातपाय पसरी.'

**Ellĭpse'**, *n.* (इलि'प्स्)—a flat egg-shaped figure. दीर्घवर्तुल, लंबवर्तुळ.

**Ellĭp'sĭs**, *n.* (इलि'प्सिस्)—omission of words needed to complete the sense. पदन्यूनता, कृदन्त, अध्याहार. *Ellip'tic*, *-al*, *aa.*

**Elm**, *n.* (एल्म्)—a large tree with rough doubly-serrated leaves. एक प्रकारचें मौल्यवान् झाड.

**Elocū'tion**, *n.* (एलक्यू'शन्, ई-)—the art of public speaking, the art of oral delivery, oral expression, delivery. वक्तृत्व, वाक्चातुर्य. *Elocu'tionary*, *a.* भाषणकलेसंबंधी, वक्तृत्वविषयक. *Elocu'tionist*, *n.* वक्तृत्वकलानिपुण.

**Elō'gĭum**, **El'ogў**, *nn.* (इलो'जिअम्, ए'लजि)—a speech praising a (dead) person. गुणानुवाद, स्तुतिपाठ.

**E'lŏngāte**, *v. t.* (ई'लॉगेट्)—to lengthen, to extend, to draw out, to stretch out so as to be longer. लांब करणें, वाढविणें. *Elonga'tion*, *n.* लांबविणें, वाढ, वृद्धि.

**Elōpe'**, *v. i.* (इलो'प्)—to run away from home and marry secretly, to abscond. चोरून पळून जाणें; हात धरून जाणें; पळून दडणें. *Elope'ment*, *n.*

**El'oquence**, *n.* (ए'लक्वन्स्)—fluent and powerful speech, oratory. वक्तृत्व, वक्तृत्वशक्ति.

**El'oquent**, *a.* (ए'लक्वन्ट्)—able to make good speeches, possessing fluent and powerful speech, exciting emotion or interest. बोलका, वक्ता, वाक्पटु, वक्तृत्वपूर्ण, भावनोद्दीपक, मनोवेधक.

**Else**, *adv.* (एल्स्)—besides; instead; otherwise, if not. शिवाय; ऐवजीं; नाहींतर.

**Else'where**, *adv.* (ए'ल्स्-व्हेअर्)—in some other place. अन्य ठिकाणीं, अन्यत्र.

**Elu'cĭdāte**, *v. t.* (इलू'सिडेट्)—to throw light on, to explain, to make the meaning clear. कोणत्याहि गोष्टीवर प्रकाश पाडणें, स्पष्टीकरण करणें. *Elucida'tion*, *n.* स्पष्टीकरण, विवरण. *Elu'cidator*, *n.* विशद करणारा. *Elu'cidative*, *Elucida'tory*, *aa.* स्पष्ट करणारा.

**Elude'**, *v. t.* (इलू'ड्)—to escape cleverly from; to avoid; to baffle. निसटून जाणें; टाळणें; फसवणें, गोंधळविणें.

**Elu'sion**, *n.* (इलू'झन्)—an escape; artifice. युक्तीनें निसटणें, पळणें; युक्ति, शक्कल. *Elu'sive*, *Elu'sory*, *aa.* युक्तीनें निसटणारा, फसविणारा. *An elusive word*, a word that escapes the memory, that is difficult to remember. स्मरणांत ठेवण्याला कठीण शब्द.

**Elў's'ium**, *n.* (इलि'झिअम्)—heaven, the abode of the blessed after death; (place of) ideal happiness or exquisite felicity. स्वर्ग; इंद्रभुवन; सुखस्थान. *Elys'ian*, *a.* स्वर्गीय, दिव्य.

**Emă'ciāte**, *v. t.* (इमॅ'शिएट्)—to make lean, to waste, to lose freshness gradually. रोड करणें, कृश करणें, क्षीण करणें, निस्तेज करणें. *Emacia'tion*, *n.* कृशता, क्षीणता.

**Em'anāte**, *v. i.* (इ'मॅनेट्)—to issue, to originate, to proceed, to come from. निघणें, उत्पन्न होणें, उद्भवणें, निर्माण होणें.

**Emană'tion**, *n.* (एमॅने'शन्)—that which proceeds from a source. उत्पत्ति, उगमापासून उत्पन्न झालेली वस्तु, निर्यास. *Emana'tive, a.*

**Emăn'cĭpāte**, *v. t.* (इमॅ'न्सिपेट्)—to make free, to free from legal, social or other restraint. बंधमुक्त करणें, उद्धार करणें. *Eman'cipator, n.; Eman'cipatory, a.*

**Emăncĭpā'tion**, *a.* (इमॅन्सि-पे'शन्)-liberation from slavery. बंधमोचन, सुटका.

**Emăs'cūlate**, *v. t.* (इमॅ'स्क्यु-लेट्)—to castrate; to enfeeble, to take away the strength of; to weaken by excisions. पौरुषहीन करणें; दुर्बल करणें; खसी करणें. *a.* (इमॅ'स्क्युलट्) castrated; effeminate. खसी केलेला; नष्टवीर्य. *Emascula'tion, n.; Emas'culative, Emas'culatory, aa.* खच्ची करणारा, पुंस्त्वनाशक.

**Embälm'**, *v. t.* (इम्बा'म्)—to preserve (body) with spices; to preserve from oblivion; to make fragrant. प्रेत कुजूं नये म्हणून मसाला वगैरे घालून ठेवणें; विस्मृतीपासून रक्षण करणें; सुगंधित करणें, गंधमाधुर्य आणणें. *Embalm'ment, n.*

**Embănk'**, *v. t.* (इम्बॅं'क्)—to shut in (river) by means of wide walls of stone and earth. बंधारा करणें, बांध घालणें.

**Embănk'ment**, *n.* (इम्बॅं'क्-मेन्ट्)—act of embanking; mound, stone structure. बंधारा घालणें; बांध, बंधारा.

**Embärg'o**, *n.* (इम्बा'र्गो)—an order forbidding ships to enter or leave a port; suspension of commerce. गलबतास जाण्यायेण्याचा अटकाव करणारा हुकूम; व्यापारतहकुबी.

**Embärk'**, *v. t. & i.* (इम्बा'र्क्)—to put or go on board a ship; to engage in enterprise. गलबतावर चढवणें किंवा जाणें; साहसांत पडणें. *To embark upon* (an action), to start. आरंभ करणें. *Embarka'tion, n.* (एम्बार्के'शन्) गलबतावर चढणें; गलबतावर भरलेला माल, भरताड.

**Embă'rrass**, *v. t.* (इमॅ'रस्)—to encumber with debt; to perplex, to make movement difficult. कर्जाच्या ओझ्याखालीं लादणें; गोंधळवणें. *Emba'rrassment, n.* गोंधळ; अडथळा, व्यत्यय; (पैशाची) अडचण.

**Em'bassy̆**, *n.* (ए'म्बसि)—the officers sent by a government to do its business with the government of another country, an ambassador's function, office, or residence; deputation. परराष्ट्राकडे पाठविलेले राजवकील, परराष्ट्रीय वकिलात; दूताचें कार्य किंवा ठिकाण, दौत्य; महत्त्वाच्या कामाकरितां नेमून पाठविलेले लोक.

**Embŏd'**, *v. t.* (इम्बे'ड्)—to fix in a surrounding mass, to lay in surrounding matter, to be set firmly in. आंत घसविणें, पुरून ठेवणें. Also, *Im'bed.*

**Embĕll'ĭsh**, *v. t.* (इम्बे'लिश्)—to decorate, to beautify, to adorn; to enrich. सुशोभित करणें; गुणाधिक्य आणणें. *Embell'ishment, n.* सुशोभित करणें; अलंकार, शोभा.

**Em'ber**, *n.* (ए'म्बर्)—(*usu. pl*) a small piece of fuel in dying fire. फुपाटा, लहान निखारे. *Ember days*, 12 days of fasting and prayer. उपवास व प्रार्थना करण्याचे बारा दिवस.

**Embĕz'zle**, *v. t.* (इम्बे'झल्)—to use for oneself money entrusted to one for some other purpose, to appropriate fraudulently. लबाडीनें गिळंकृत करणें, अपहार करणें. *Embez'zlement, n.* अपहार, द्रव्यापहार.

**Embĭtt'er**, *v. t.* (इम्बि'टर्)—to make bitter; to aggravate; to exasperate, to make hatred or anger worse. कडु करणें; क्षोभविणें; चेतविणें. *Embitt'erment, n., Embitt'ered, a.* sad and angry. दुःखी आणि रागावलेला.

**Emblā'zon**, *v. t.* (इम्ब्ले'झन्)—to set out in beautiful colours (upon a shield); to celebrate, to extol. कुलसूचक चिन्हांनीं सुशोभित करणें; स्तुति करणें, प्रसिद्धीस आणणें.

**Em'blĕm**, *n.* (ए'म्ब्लिम्)—a symbol, a type; a symbolic figure, an allusive picture, a device. चिन्ह, प्रकार; निशाणी. *Emblemat'ic, Emblemat'ical, aa.* खुणेचा, सांकेतिक, लाक्षणिक.

**Embŏd'y̆**, *v. t.* (इम्बॉ'डि)—to clothe (spirit) with body, to give form to; to include. शरीराच्छादित करणें; अंतर्भूत करणें. *Embodi'ment, n.*

**Embō'lden**, *v. t.* (इम्बो'ल्डन्)—to give boldness or courage to; to encourage. उत्साह आणणें, उत्तेजन देणें.

**Embos'om**, *v. t.* (इम्बु'झम्)—to embrace. प्रेमानें आलिंगणें, प्रेमानें हृदयांत बाळगणें.

**Embŏss'**, *v. t.* (इम्बॉ'स्)—to carve or mould in relief, to represent in worked figures. उठावाचें चित्र काढणें, पृष्ठभाग उठावदार करणें. *Emboss'ment, n.*

**Embrāce'**, *v. t.* (इम्ब्रे'स्)—to fold in the arms, to clasp, to enclose; to accept, to adopt; to include. आलिंगणें, मिठी मारणें; स्वीकारणें; समावेश करून घेणें. *n.* folding in the arms, clasp. आलिंगन, मिठी मारणें, कवटाळणें. *This work embraces many subjects*, this work contains or deals with many subjects. या ग्रंथांत पुष्कळ विषयांचा समावेश होतो.

**Embrā'sure**, *n.* ( इम्ब्रे'झ़र् )—an opening in a wall of a fort for gun. किल्ल्याच्या भिंतींतील तोफेची खिडकी, जंगी, जंजीरी.

**Em'brocāte**, *v. t.* (ए'म्ब्रकेट् )—to bathe, to foment. औषध चोळणें, मर्दन करणें. *Embroca'tion*, *n.* a medicine used for rubbing. चोळण्याचें औषध.

**Embroid'er**, *v. t.* ( इम्ब्रॉ'इडर् )—to ornament with needlework; to embellish कशिदा काढणें, वेलबुट्टी काढणें; शोभविणें, सजविणें.

**Embroid'erÿ**, *n.* ( इम्ब्रॉय्'डरि )—embroidered work, adventitious ornament. कशीदा, बुट्टी, नकशी.

**Embroil'**, *v. t.* ( इम्ब्रॉ'इल् )—to bring (affairs) into confusion; to draw (a person) into a quarrel. घोंटाळ्यांत घालणें; भांडणांत पाडणें.

**Em'bryō**, *n.* ( ए'म्ब्रिओ )—an unborn offspring; a thing in its first state before birth. गर्भ; अपरिपक्व वस्तु, अंकुरबीज. *Embryol'ogy*, *n.* पिंड,-गर्भ-वृद्धिशास्त्र. *Embryon'ic*, *n.* anything in a very early stage of growth. गर्भसंबंधीं, प्राथमिक, बाल्यावस्थेंतील.

**Emĕnd'**, *v. t.* ( इमें'न्ड् )—to remove errors, to correct; to improve the reading of. चुका दुरुस्त करणें; शुद्ध करणें. *Emenda'tion*, *n.* पाठशुद्धि, दुरुस्ती.

**Em'erald**, *n.* ( ए'मरल्ड् )—a bright-green precious stone; a blue-green colour. पाच, पन्ना; हिरवा रंग. *The Emerald Isle*, Ireland. आयर्लंड बेट.

**Emerge'**, *v. i.* ( इम'र्ज् )—to come up or out into view; to issue; to appear; to crop up. बाहेर किंवा वर येणें; उदय पावणें; दिसणें; अकस्मात् उद्भवणें. *Emer'gence*, *n.* (अकल्पित) वर येणें. उद्गमन, उदय, अभ्युदय. *Emer'gent*, *a.* प्रकाशमान होणारा; तांतडीचा.

**Emer'gency**, *n.* ( इम'र्जन्सि )—a sudden happening needing prompt action. निकडीचा प्रसंग, आवश्यकता.

**Emĕ'ritus**, *a.* ( इमे'रिटस् )—who is no longer holding office, retired. सेवानिवृत्त.

**Emer'sion**, *n.* ( इम'र्शन् )—emerging; reappearance after an eclipse. बाहेर येणें; ग्रहणानंतर पुनर्दर्शन.

**Em'erÿ**, *n.* ( ए'मरि )—a very hard material, made into powder and stuck on paper, used for smoothing wood or metals. कुरुंदाचा चूर. *Emery wheel*, a wheel made of emery used for sharpening knives and other cutting instruments. सुऱ्या वगैरे पाजविण्याचें चक्र.

**Emĕt'ic**, *a.* ( इमे'टिक् )—that causes vomiting. वांतिकारक. *n.* वांति करण्याचें,-वामक-औषध.

**Em'ĭgrant**, *n.* ( ए'मिग्रन्ट् )—one who quits one's country and goes to live in another country. आपला देश सोडून गेलेला, देशत्यागी. *a.* देशांतर करणारा.

**Em'ĭgrāte**, *v. i. & t.* ( ए'मिग्रेट् )—to go to settle in another country. दुसऱ्या देशांत वसाहत करण्याकरितां जाणें. *Emigra'tion*, *n.*

**Em'ĭnence**, *n.* ( ए'मिनेन्स् )—recognized superiority; rising ground. प्रतिष्ठा, लौकिक; उंचवटा.

**Em'ĭnent**, *a.* ( ए'मिनेन्ट् )—distinguished, notable, high in rank or fame, lofty, high, prominent. प्रमुख, प्रसिद्ध, अत्युच्च. *Em'inently*, *adv.* notably, decidedly. विशेषेंकरून, अतिशय, खात्रीनें.

**Em'ĭssarÿ**, *n.* ( ए'मिसरि )— one sent on (esp. odious or underhand) mission. गुप्त दूत, हेर, टेहळणी करणारा.

**Emĭ'ssion**, *n.* ( इमि'शन् )—the act of sending out; matter sent out (as smoke from gun). टाकणें, बाहेर फेंकणें; बाहेर टाकलेला पदार्थ, स्राव, उत्सर्ग. *Emis'sive*, *a.*

**Emĭt'**, *v. t.* ( इमि'ट् )—to give out, to put forth. बाहेर टाकणें, सोडणें.

**Emŏll'ient**, *a.* ( इमॉ'ल्यन्ट् )—softening. मऊ करणारा, नरमपणा आणणारा, स्निग्ध. *n.* a medicine which softens the skin. कातडीला मऊपणा आणणारें औषध, अभ्यंजन.

**Emŏl'ūment**, *n.* (*pl.*) ( इमॉ'ल्यु-मेन्ट् )—profit from employment; salary. मिळकत, लाभ; पगार.

**Emō'tion**, *n.* ( इमो'शन् )—deep feeling, mental agitation or feeling; excited mental state. क्षोभ, मनोविकार; उचंबळलेली मनःस्थिति किंवा भावना. *Emo'tional*, *a.* भावनामय, भावनाप्रधान.

**Empăn'el**, *v. t.* ( इम्पॅ'नल् )—to put the name of a person on a list of persons who will serve on a jury. पंचांच्या यादींत नांव घालणें.

**Em'peror**, *n.* ( ए'म्परर् )—the ruler of an empire. बादशहा, सम्राट्, सार्वभौम राजा.

**Em'phasĭs**, *n.* ( ए'म्फसिस् )—a special stress on a word; vigour of expression. शब्दांवर जोर, स्वराघात; जोरदार बोलणें, ठासून प्रतिपादन करणें.

**Em'phasīze**, *v. t.* ( ए'म्फ-साइझ् )—to lay stress on. जोर देणें.

**Emphăt'ic**, *a.* ( इम्फॅ'टिक् )—forcible, strong; (of words) bearing the emphasis. जोरदार; सावधारण, स्वराघाताचा.

**Em'pīre**, *n.* ( ए'म्पायर् )—supreme and wide dominion, territory of an emperor. अधिराज्य, साम्राज्य.

**Empĭ'rĭc**, *a.* ( एम्पि'रिक् )—relying on experiment, not on theory; guided by experience rather

than by scientific ideas. केवळ अनुभवावर विश्वास ठेवणारा. *n.* a scientist or physician who is guided by experience rather than by theory; a quack. केवळ अनुभवजन्य ज्ञान असलेला तत्त्वज्ञ, वैद्य वगैरे; नाडीवैद्य, वैदू. *-al, a.*

Emplāce'ment, *n.* (इम्प्ले'स्-मेन्ट्)—a special place built for guns. तोफांकरितां बांधलेली विशेष जागा.

Employ', *v. t.* (इम्प्लॉ'य्)—to use (a thing, time, energies); to use the services of; to keep at work, to take on as a paid worker. उपयोग करणें, वापरणें; कामावर लावणें, नोकरीस लावणें.

Emplŏyee', *n.* (एम्प्लॉयी')—a person employed for wages. पगारी नोकर.

Employ'er, *n.* (इम्प्लॉ'यर्)—one who uses another's services. नोकरी लावणारा, कामास ठेवणारा.

*Employ'ment, n.* (इम्प्लॉ'य्-मेन्ट्)—*work; one's* trade; business entrusted to one. काम; स्वतःचा उद्योग, व्यापार; सोंपविलेलें काम, उद्योग, धंदा.

Empŏr'ĭum, *n.* (एम्पॉ'रि-अम्)—a centre of commerce, a place of trade, a large shop. व्यापाराची पेठ, बाजारपेठ, वखार.

Empŏw'er, *v. t.* (इम्पॉ'वर्)—to give power or authority, to authorize; to enable. अधिकार देणें; समर्थ करणें.

Em'press, *n.* (ए'म्-प्रिस्)—the wife of an emperor; the female ruler of an empire. महाराणी, सम्राज्ञी.

Emp'tў, *n.* (ए'म्टि)-containing nothing; meaningless. रिकामा; निरर्थक. *v. t. & i.* to remove contents of, to become empty; (of river) to discharge itself. रिकामा करणें किंवा होणें; उपसणें. *On an empty stomach,* when hungry. भूक लागली असतांना, अनशापोटीं. *Empty promises,* meaningless promises. पोकळ, निरुपयोगी वचनें.

Empўrē'an, *n.* (एम्पिरी'अन्)—the highest heaven as sphere of fire or abode of God. स्वर्गांतील उच्चतम भाग, तेजोलोक. *a.* स्वर्गलोकचा, स्वर्गीय; आकाशाचा. *Empy'real, a.*

Em'ū, *n.* (ई'म्यू)—a large Australian bird about six feet high. ऑस्ट्रेलियामधील एक मोठा शहामृगाच्या वर्गांतील पक्षी.

Em'ūlāte, *v. t.* (ए'म्युलेट्)—to try to equal or excel; to imitate. बरोबरी करण्याचा किंवा वरचढ होण्याचा प्रयत्न करणें; अनुकरण करणें, तोलास तोल देणें. *Emula'tion, n.* चढाओढ, स्पर्धा. *Em'ulative, a.* चढाओढीचा, चुरशीचा, ईर्ष्येचा. *Em'ulator, n.*

Em'ūlous, *a.* (ए'म्यूलस्)—desirous of fame, &c.; zealously imitative of. कीर्तीची वगैरे इच्छा करणारा, ईर्ष्यायुक्त; चढाओढ करणारा, प्रतिस्पर्धी.

Emŭl'sion, *n.* (इम'ल्शन्)—a mixture of milky liquid with oily particles suspended in it. दुधासारखें औषध, सत्त्व.

Enā'ble, *v. t.* (इने'बल्)—to cause to be able, to empower, to supply with means (to do). अधिकार देणें; समर्थ करणें.

Enăct', *v. t.* (इॅनॅ'क्ट्)—to make into a law, to ordain, to decree; to play (part). ठराव किंवा कायदा करणें; भूमिका घेणें.

Enăct'ment, *n.* (इॅनॅ'क्ट्-मेन्ट्)—a law enacted, a decree, an act. पास झालेला कायदा, ठराव, शासन, नियम.

Enăm'el, *n.* (इॅनॅ'मल्)—a glass-like coating on metal; any hard smooth coating, the hard outer covering of the teeth. कांचेचा मिना; दांतांचें लुकण. *v. t.* कांचेचा मुलामा चढविणें, कांचविणें.

Enăm'our, *v. t.* (इॅनॅ'मर्)—to inspire with love; to make fond of. प्रेमांत गुरफटणें; प्रेमासक्त होणें, मोहित करणें, भुरळ पाडणें. *To be enamoured of,* to be in love with. प्रेमासक्त होणें, प्रेमांत सांपडणें, मोहित होणें.

En blŏc' *adv.* (आँ ब्लॉ'क्)—wholesale, in a lump. एकंदर, एकूण, सरसहा, सरसकटपणें.

Encāge', *v. t.* (इन्के'ज्)—to put in a cage. पिंजऱ्यांत टाकणें.

Encămp', *v. t. & i.* (इन्कॅ'म्प्)—to settle in a camp; to lodge in tents. तळ देणें, तंबू ठोकून राहणें. *Encamp'ment, n.* a place where troops make a camp. सैन्याचा तळ, शिबिर.

Encāse', *v. t.* (इन्के'स्)—to put in a case, to shut up within some material. पेटींत घालणें, कांहीं वस्तूंच्या आंत घालून ठेवणें. *Encase'ment, n.*

Enceinte', *a.* (आङ्सॅ'न्ट्)—pregnant, with child. गरोदर. *n.* an enclosure. तट, तटबंदी, कोट.

Enchain', *v. t.* (इन्चे'न्)—chain up; fetter, hold in bondage, enslave. सांखळीनें बांधणें; अडकवणें, गुलामगिरींत ठेवणें.

Enchănt', *v. t.* (इन्चा'न्ट्)—to put a magic charm on, to subdue by charms, to bewitch; to delight, to please greatly. भारणें; आल्हादित करणें, रंजविणें.*-ment, n.* जादू, मोहिनी.*-ress, n. f.* चेटकीण; भुरळ घालणारी स्त्री.

Encir'cle, *v. t.* (इन्स'र्कल्)—to surround. घेरणें, वेटणें, वेढणें.

Enclōse', *v. t.* (इन्क्लो'झ्)—to surround, to fence in; to shut up, to put something inside a

letter; to hem in. घेरणें, कुंपण घालणें; आंत घालणें; कोंडून ठेवणें.

**Enclo'sure**, *n.* ( इन्क्लो'झर् )—enclosing; an enclosed land; a thing enclosed. कुंपण; आवार; आंत घातलेली वस्तु.

**Enco'mium**, *n.* ( इन्को'मिअम् )—an expression of praise, eulogy; formal or highflown praise. स्तुति; प्रशंसा, अतिशय तारीफ. *Enco'miast, n.* स्तुतिपाठक; स्तुतिस्तोत्रें रचणारा.

**Encom'pass**, *v. t* ( इन्क'म्पस् )—to shut in, to surround, to encircle, to environ. आंत कोंडून ठेवणें, घेरणें.

**Encore'**, *int.* ( आँको'अर् )—again! once more! पुन्हां, आणखी एकदां. *n. & v. t. & i.* पुन्हां, फिरून एकदां. ' वन्स मोअर् ' ( असें म्हणणें).

**Encoun'ter**, *v. t.* ( इन्का'उन्टर् )—to meet hostilely; to meet with (a person, an obstacle). गांठणें, तोंड देणें; गांठ पडणें. *n.* a hostile or casual meeting. सामना, भेटाभेट.

**Encou'rage**, *v. t.* ( इन्क'रेज् )—to give courage to; to make bold; to urge out, to further, to promote. धीट करणें; उत्तेजन देणें; मदत करणें.*-ment, n* प्रोत्साहन, जोर, हुरूप.

**Encroach'**, *v. i.* ( इन्क्रो'च् )—to go beyond one's own (land) and take part of another's (land); to trespass. स्वतःची हद्द सोडून दुसऱ्याची जागा घेणें, दुसऱ्याच्या हद्दींत घुसणें. *Encroach'ment, n.* बेकायदेशीर शिरकाव, अतिक्रमण. *To encroach upon one's time,* एखाद्याचा बराचसा वेळ घेणें.

**Encrŭst'**, *v. t. & i.* ( इन्क्र'स्ट् )—to cover with a thin hard outer covering. कवच चढवणें, पुटयुक्त करणें.

**Encŭm'ber**, *v. t.* ( इन्क'म्बर् )—to hamper, to impede; to burden with debt. अडथळा करणें; कर्जाच्या बोजाखालीं ठेवणें.

**Encŭm'brance**, *n.* ( इन्क'म्ब्रन्स् )—a burden, an impediment; mortgage on property. ओझें, खोडा, अडथळा; मालमत्तेवर दुसऱ्याचा गहाणाचा वगैरे हक्क. *Without encumbrance,* having no children. मुलेंबाळें नसलेला.

**Encÿclop(a)ed'ia**, *n* ( एन्साइ-क्लोपी'डिआ )-a book or set of books of information on all branches of knowledge. सर्व ज्ञानाचा कोश, विश्वकोश, ज्ञानकोश, विश्वज्ञानसंग्रह. *Encyclopaed'ic, a.*; *Encyclopaed'ist, n.*

**End**, *n.* ( एन्ड् )—the limit; the extreme point or part; the conclusion; destruction; death; result; object. मर्यादा; शेवट; परिसमाप्ति; नाश; मरण; परिणाम; हेतु. *v. t. & i.* to bring or come to an end. शेवट करणें किंवा होणें. *At a loose end,* having nothing to do, unoccupied. रिकामा, निरुद्योगी. *At one's wits' end,* much perplexed, very anxious, not knowing what to do. फार गोंधळलेला, किंकर्तव्यतामूढ. *To make both ends meet,* to live within one's income, to get just enough money for one's needs. खर्चाची तोंडमिळवणी करणें; अंथरूण पाहून पाय पसरणें. *At the end of one's tether,* unable to suffer any more. यापुढें सहन करणें अशक्य, सहनशीलतेचा कडेलोट होणें. *Odds and ends,* small useless pieces. लहान निरुपयोगी तुकडे. *To get hold of the wrong end of the stick,* to get a wrong idea exactly opposite to the right idea. चुकीची कल्पना करणें. *To put an end to, To make an end of,* to stop, to abolish, to destroy. थांबवणें, नाहींसें करणें, नाश करणें. *Nearing one's end,* nearing death. आसन्नमरण. *To end in smoke,* to have no result. व्यर्थ जाणें, कांहींच उपयोग न होणें. *On end,* upright; continuously. उभा; सतत, सारखा. *End'ing, n.* result; end. परिणाम; शेवट.

**Endā'nger**, *v. t.* ( इन्डें'जर् )—to put or bring into danger. धोक्यांत घालणें, संकटांत पाडणें.

**Endear'**, *v. t* ( इन्-डि'अर् )— to make dear, to cause to be loved. प्रिय करणें, आवडता करणें.

**Endear'ment**, *n.* ( इन्डि'अर्-मेन्ट् )—an act of endearing, tender affection, loving words or act. लाडिकपणा, लाडीगोडी, प्रेम, ममता.

**Endeav'our**, *v. i. & t.* ( इन्डे'व्हर् )— to try, to strive. प्रयत्न करणें. *n.* an attempt, an effort. प्रयत्न.

**Endĕm'ic**, *a.* ( एन्डे'मिक् )-regularly found present in certain people or places. विशिष्ट जागीं किंवा विशिष्ट लोकांमध्यें होणारा (रोग). *n.* स्थानिक-विशिष्टजागीं होणारा-रोग. *Endemi'city, n.*

**En'dive**, *n.* ( ए'न्डिव्ह् )—a bitter plant used for food. एक कडू ( सूर्यफूल किंवा शेवती या जातीची ) खाद्य वनस्पति.

**End'less**, *a.* ( ए'न्ड्-लिस् )—unending, without end, continual. ज्याला शेवट नाहीं असा, निरंतर, सतत.

**Endŏg'amÿ**, *n.* ( एन्डॉ'गमि )—the custom of marrying only within the tribe. स्वज्ञातिशरीरसंबंध, आपल्याच ज्ञातींत विवाहसंबंध करणें. *Endog'amous, a.*

**Endŏrse'**, *v. t.* ( इन्डॉ'र्स् )—to write on the back of a document; to confirm, to agree with what has been said or done. दस्तऐवज, हुंडी

वगैरेच्या पाठीवर लिहिणें; शेरा लिहून पसंती दाखविणें. *Endorse'ment, n.*

**Endow'**, *v. t.* (इन्डा'उ)—to give a permanent income to; to invest with powers or qualities. आंदण किंवा देणगी देणें; शक्ति, गुण वगैरेंनीं युक्त करणें. *Well endowed by nature*, clever and beautiful by birth. जन्मतःच हुषार व सुंदर. *Endow'ment, n.* नेमणूक, वर्षासन.

**Endue'**, *v. t.* (इन्ड्यू)—to clothe with; to give. नेसवणें, घालणें; देणें.

**Endur'ance**, *n.* (इन्ड्यु'अरन्स्)-power of enduring, sufferance, fortitude. सहनशक्ति, चिकाटी, धैर्य.

**Endure'**, *v. t. & i.* (इन्ड्यु'अर्)—to undergo; to bear; to last, to remain. भोगणें, सोसणें; सहन करणें; टिकणें. *I can't endure him*, I hate him. मी त्याचा द्वेष करितों.

**En'emä**, *n.* (ए'निमा, इनीं'मा)—an injection of liquid into the rectum; the syringe used. पिचकारीचें औषध; बस्ती, पिचकारी.

**En'emy**, *n.* (ए'निमि)—one who is unfriendly, a hostile person, an opponent. प्रतिपक्षी, शत्रु.

**Energet'ic**, *a.* (एनर्जे'टिक्)—forcible; operative; vigorous; full of energy, powerful, efficatious. जोरदार; परिणामकारक; बळकट; चिकाटीचा, जोमदार, उत्साहपूर्ण.

**En'ergy**, *n.* (ए'नर्जि)—force, vigour, activity; capacity for work. जोर, जोम, हिंमत; उत्साह, शक्ति.

**En'ervate**, *v. t.* (ए'नर्व्हेट्)—to deprive of vigour, to enfeeble, to cause to become weak, to debilitate. कमजोर किंवा दुर्बळ करणें, निःसत्त्व करणें.

**Enfee'ble**, *v. t.* (इन्फी'बल्)—to make feeble. दुर्बळ करणें. *Enfee'blement, n.* weakness. कमकुवतपणा, अशक्तता.

**Enfilade'**, *n.* (एन्-फि-ले'ड्)—a place on a battlefield which can be shot at from one end to the other. एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत गोळया घालतां येतील अशी रक्षणक्षेत्रांतील जागा. *v. i.* to shoot at a line of men from one end. रांगेंतील लोकांना एका टोंकापासून गोळी घालणें.

**Enfold'**, *v. t.* (इन्-फो'ल्ड्)—to wrap; to embrace. आच्छादणें; मिठी मारणें.

**Enforce'**, *v. t.* (इन्फो'र्स्)—to press, to urge; to compel observance of, to make people obey (a law). आग्रह करणें; बळजबरीनें अंमलांत आणणें, अंमलबजावणी करणें.

**Enforce'ment**, *n.* (इन्फो'र्स्-मेन्ट)—act of enforcing, compulsion. बळजबरी, अंमलबजावणी.

**Enfran'chise**, *v. t.* (इन्फ्रॅ'न्चाइझ्)—to set free; to give the right to elect members (to government), to give electoral franchise to. मुक्त करणें, स्वातंत्र्य देणें; मतदानाचा हक्क देणें. *Enfran'chisement, n.* बंधमुक्तता, स्वातंत्र्य; नागरिकत्वाचे हक्क देणें.

**Engage'**, *v. t.* (इगे'ज्)—to bind by contract or promise; to pledge oneself; to employ; to occupy; to bring or come into conflict. वचन किंवा करारबद्ध होणें; वचन देणें; कामाला लावणें; कामांत गुंतणें; झगडा करणें, झगड्यांत सांपडणें. *To engage oneself to*, to promise. वचन देणें. *To be engaged to*, to promise to marry. लग्न करण्याचें वचन देणें. *To engage a room*, to order a room to be kept for one. जागा राखून ठेवणें. *An engaging manner*, a pleasing manner. आकर्षक रीत. *To engage an enemy*, to join battle with an enemy. शत्रूबरोबर युद्ध करणें.

**Engage'ment**, *n.* (इगे'ज्-मन्ट्)—a promise; a promise to marry; a promise to meet or go out with a person; a battle. बोली, करार, वचन; लग्न करण्याचें वचन; संकेत, वायदा; लढाई, सामना.

**Engen'der**, *v. t.* (इन्जे'न्डर्)—to give rise to, to generate, to procreate, to be the cause of. उत्पन्न करणें, कारणीभूत होणें.

**En'gine**, *n.* (ए'न्जिन्)—a machine which produces power; a locomotive; a means, an instrument. यंत्र, एंजिन, आगगाडीचें (वाफेचें) यंत्र; साधन, हत्यार.

**Engineer'**, *n.* (एन्जिनि'अर्)—one who designs and constructs military works or works of public utility; one skilled in mechanical engineering work. रस्ते, घरें, वगैरेंचीं कामें करण्यामध्यें कुशल, शिल्पकलाभिज्ञ; वास्तुविद्याविशारद. *v. t. & i.* to construct, to manage or to act as an engineer; to contrive, make and carry out a secret plan. रस्ते, घरें, वगैरेचें काम करणें; युक्ति काढणें. *Engineer'ing, a.*

**Eng'lish**, *a.* (इं'ग्लिश्)—of England. इंग्लंडचा. *n.* the English language. इंग्रजी भाषा, आङ्ग्लभाषा. *Eng'lishman, n.* इंग्रज गृहस्थ. *Eng'lishwoman, n.* इंग्रज स्त्री.

**Engorge'**, *v. t* (इगॉ'र्ज्)—to swallow. गिळून टाकणें, गट्ट करणें. *Engorged with blood*, full of blood. रक्तानें भरलेलें.

**Engraft'**, *v. t.* (इग्रा'फ्ट्)—to insert; to implant; to incorporate; to add. आंत घालणें, शिरकाव करून देणें; मनावर ठसा उमटवणें; समावेश करणें, जोडणें.

**Engrain'**, *n.* (इन्ग्रे'न्)—to cause to sink deeply into. मजबूत ठसवणें, पक्का (रंग) देणें. *Engrained habits*, habits that have become part of one's character. पक्क्या किंवा दृढ झालेल्या -हाडींमासीं खिळलेल्या -संबंधी.

**Engrāve'**, *v. t.* (इन्ग्रे'व्ह्)—to cut in lines on a metal plate for printing; to carve; to impress deeply (on memory). खोदणें; कोरणें; मनावर ठसवणें, बिंबवणें. *Engra'vings*, *n.* कोरणें; नकशीकाम, खोदकाम.

**Engrŏss'**, *v. t.* (इन्ग्रॉ'स्)—to write out in large letters or in a legal form; to monopolize; to absorb. मोठ्या अक्षरांनीं लिहिणें; कायदेशीर स्वरूपांत लिहिणें; ग्रासणें, मक्ता घेणें; गुंग किंवा तल्लीन होणें. *An engrossing story*, a very interesting story. फार मजेदार गोष्ट. *Engross'ment*, *n.*

**Engŭlf'**, *v. t.* (एन्गल्फ्)—to swallow up (usu. in *pass.*), to overwhelm. गट्ट किंवा गडप करणें, दडपून टाकणें. *-ment*, *n.*

**Enhānce'**, *v. t.* (इन्हें'न्स्)—to heighten, to intensify; to exaggerate. वाढवणें, अधिक करणें; फुगवून सांगणें. *Enhance'ment*, *n.* वाढ, चढ' वृद्धि.

**Enĭg'mă**, *n.* (इनि'ग्मा)—a riddle; a person or thing that is difficult to understand. कोडें; गूढ मनुष्य किंवा वस्तु. *Enigmat'ic*, *-al*, *a.* कोड्यासारखा, गूढ.

**Enjŏin'**, *v. t.* (इन्जॉ'इन्)—to prescribe; to command. कायदा घालून देणें; हुकूम करणें, आज्ञा देणें. *To enjoin silence upon*, to order to be silent. स्तब्ध राहण्याचा हुकूम सोडणें.

**Enjoy'**, *v. t.* (इन्जॉ'य्)—to take delight in; to have or possess the use of. आनंद मानणें; सुखोपभोग घेणें, उपभोगणें. *Enjoy'able*, *a.* pleasant. उपभोग घेण्यासारखा. *Enjoy'ment*, *n.* संभोग, सुख, आनंद.

**Enkĭn'dle**, *v. t.* (इन्कि'न्डल्)—to set on fire. आग लावणें, चेतवणें.

**Enlāce'**, *v. t.* (इन्-ले'स्)—to bind or twist together. एकत्र बांधणें, -गुंफणें.

**Enlārge'**, *v. t.* & *i.* (इन्लार्'ज्)—to expand, to grow larger; to expatiate, to speak for a long time on some subject. वाढवणें; मोठा करणें किंवा होणें; विस्तृत विवरण करणें. *Enlarge'ment*, *n.* a larger copy of a small picture. आकाराची वाढ, लहान चित्राची मोठी प्रत.

**Enlight'en**, *v. t.* (इन्ला'इटन्)—to cause to understand, to instruct; to inform; to shed light on. बोध करणें; ज्ञान देणें; प्रकाश पाडणें. *Enlight'enment*, *n.* प्रकाश; अज्ञाननाश, ज्ञानदान.

**Enlĭst'**, *v. t.* & *i.* (इन्लि'स्ट्)—to engage or be engaged for military service; to get the support of. लष्करी नोकरीकरितां पटांत नांव दाखल करणें; आश्रय मिळणें. *Enlist'ment*, *n.*

**Enlī'ven**, *v. t.* (इन्ला'इ-व्हन्)—to make bright and full of action, to animate, to inspirit, to brighten. चेतना उत्पन्न करणें, उल्हसित करणें, तरतरी आणणें. *Enli'venment*, *n.*

**En măsse**, *adv.* (ऑं मॅस्)—all together, in a body. सर्व मिळून, सर्वांनीं, संघशः.

**Enmĕsh'**, *v. t.* (इन्मे'श्)—to catch in a net. जाळ्यांत पकडणें.

**En'mĭtў**, *n.* (ए'न्मिटि)—hatred, hostility. द्वेष, शत्रुत्व.

**Enn'ui**, *n.* (ऑ'न्वी)—tiredness caused by lack of interest, feeling of boredom. कंटाळा, वीट.

**Enōrm'ĭtў**, *n.* (इनॉ'र्मिटि)—great wickedness; crime; deviation from right. अतिदुष्टता; घोर पातक; अत्याचार.

**Enōrm'ous**, *a.* (इनॉ'र्मस्)—very large. अवाढव्य, प्रचंड.

**Enough'**, *a.* (इन'फ्)—sufficient. पुरेसा, पाहिजे तितका. *n.* as much or many as necessary. पुरवठा, पर्याप्ति. *adv.* to the necessary degree. पुरेसें, बस्स.

**Enquīre'**, *v. t.* & *i.* (इन्क्वा'यर्)—to ask about. चौकशी करणें. *Enquir'y*, *n.* तपास, चौकशी, शोध.

**Enrāge'**, *v. t.* (इन्रे'ज्)—to make furious, to make very angry. संतापविणें, फार राग आणणें.

**Enrăp'tūre**, *v. t.* (इन्रॅ'प्चर्)—to transport with pleasure, to delight intensely. अत्यानंदित करणें.

**Enrĭch'**, *v. t.* (इन्रि'च्)—to make rich. सधन करणें. *-ment*, *n.*

**Enrol'**, *v. t.* (इन्रो'ल्)—to insert a name in a list; to incorporate as a member; to register a deed; to record. पटावर नांव दाखल करणें; सभासद होणें; दस्तऐवज रजिस्टर करणें; नमूद करून ठेवणें. Enrol'ment, *n.* नांवनिशी, रजिस्टर.

**En route**, *adv.* (ऑं रूट्)—वाटेंत, मार्गावर

**Enshrīne'**, *v. t.* (इन्श्रा'इन्)—to enclose as in *shrine; to cherish.* देवान्यांतल्याप्रमाणें बसविणें; प्रेमदृष्टीनें मनांत बाळगणें, प्रेमाच्या देव्हाऱ्यांत बसविणें. *His name is enshrined in our memory*, he will always be remembered with love. त्याचें नांव नेहेमीं प्रेमानें स्मरलें जाईल.

**Enshroud'**, *v. t.* ( इन्श्रा'उड् )-to cover completely. पूर्ण आच्छादणें, आच्छादित करणें, झांकणें.

**En'sign**, *n.* (ए'न्साइन् )—a badge, an emblem ; a banner, a flag ; the lowest commissioned officer in infantry. चिन्ह, लक्षण; निशाण, ध्वज; निशाण वाहणारा, पायदळांतील कनिष्ठ दर्जाचा अधिकारी.

**En'silage**, *n.* (ए'न्-सि-लिज्)-green food or fodder for cattle preserved in air-tight chamber and used during the winter. हवाबंद अशा खोलींत सांठवून ठेवलेलें गवत किंवा चारा. *Ensile'*, *v. t.* गवत सांठवून ठेवणें.

**Enslave'**, *v. t.* ( इन्स्ले'व्ह् )—make a slave. दास बनविणें, गुलामगिरींत टाकणें. *-ment*, *n.*

**Ensnare'**, *v. t.* (इन्स्ने'अर्)—to get a person or creature into a trap, entrap. जाळ्यांत पकडणें.

**Ensue'**, *v. t. & i.* (इन्स्यू')—to happen later ; to result from. मागाहून घडणें; उद्भवणें, ०चा परिणाम होणें.

**Ensure'**, *v. i. & t.* (इन्शु'अर्)—to make safe or certain ; to secure. सुरक्षित करणें ; प्राप्त होईल अशी खात्री करणें.

**Entab'lature**, *n.* (इन्टॅ'ब्लचर्)—the part of an order above the column. खांबाच्या वरचा भाग-कंगोरा व तुळई.

**Entail'**, *v t.* (इन्टे'ल्)—to settle landed estate on persons ; to impose on ; to necessitate, to make necessary. जमीन वंशपरंपरा देणें; वंशपरंपरागत करणें ; लादणें, भाग पाडणें. *n.* दान किंवा विक्री करतां न येणारी वंशपरंपरेनें मिळालेली मिळकत.

**Entang'le**, *v. t.* (इन्टॅं'गल्)—to catch in a snare ; to involve in difficulties, to get a person into one's power. जाळ्यांत पकडणें, फसवणें ; गुंतागुंत करणें ; अडचणींत गोवणें. *Entang'lement*, *n.* गुंतागुंत ; गुंतागुंत करणारी गोष्ट.

**En'ter**, *v. i. & t.* (ए'न्टर्)—to go or come in ; to insert in a book. आंत जाणें, प्रवेश करणें ; पुस्तकांत वगैरे लिहिणें. *To enter the church*, to take orders. पाद्री होणें. *To enter an appearance*, to show oneself (at a meeting). हजर राहणें. *To enter a protest*, to make a formal objection. निषेध व्यक्त करणें. *To enter into*, to engage in ( conversation, agreement ). संभाषणांत गुंतणें, करार करणें. *To enter upon*, to begin, to begin to deal with. आरंभ करणें. *To enter into details*, to tell all the small points about. बारीकसारीक गोष्टी सांगणें. *To enter into ( a game )*, to take part in. भाग घेणें. *To enter into* (the feelings or spirit of), to understand. समजणें, समजून घेणें.

**Ente'ric**, *a.* ( एन्टे'रिक् )—of the intestines. आंतड्यांसंबंधींचा. *Enteric fever*, a dangerous disease of the bowels, typhoid. आन्त्र ज्वर, विषम ज्वर. *Enteri'tis*, *n.* आंतडीं सुजणें, आंतड्यांची सूज.

**En'terprise**, *n.* (ए'न्टर्-प्राइझ्)—a bold undertaking, a hazardous attempt. साहस कर्म, धाडस, जोखीम.

**En'terprising**, *a.* (ए'न्टर्-प्राइझिंग्)—full of enterprise, willing to do daring things, adventurous, venturesome. धाडसी, साहसी.

**Entertain'**, *v. t.* ( एन्टर्-टे'न् )—to receive as a guest ; to amuse ; to harbour ; to keep in mind. आदरातिथ्य करणें ; करमणूक करणें ; आश्रय देणें ; मनांत ठेवणें, मनांत बाळगणें. *Entertain'ing*, *a.* amusing. मनोरंजक, करमणूक करणारा.

**Entertain'ment**, *n.* ( एन्टर्टे'न्मेन्ट् )—hospitality ; an amusement ; a public performance. पाहुणचार, आदरातिथ्य; करमणूक; मेजवानी, जाहीर खेळ.

**Enthral'**, *v. t.* (इन्थ्रॉ'ल्)—to bring into bondage, to make a slave of, to enslave ; to captivate. दास करणें; चित्त वेधणें. *Enthrall'ing*, *a.* very interesting. फारच मनोरंजक.

**Enthrone'**, *v. t.* ( इन्-थ्रो'न् )—to put a king on a throne, to make a person a king. राजाला सिंहासनावर बसविणें, राजा करणें. *Enthroned in our hearts*, much loved and respected. त्याच्यावर आमचें फार प्रेम व आदर आहे.

**Enthu'siasm**, *n.* (इन्थ्यू'झि-ॲझम्)—a strong feeling of admiration for some one or something, ardent zeal. उत्साह, उत्सुकता.

**Enthu'siast**, *n.* ( इन्थ्यू'झि-ॲस्ट )—a person full of enthusiasm, one who is very eager and interested in some idea. अत्युत्साही मनुष्य, उत्साही.

**Entice'**, *v. t.* ( इन्टा'इस् )—to allure, to induce, to draw away, to draw over. मोह घालणें, लालूच दाखवून वळविणें. *Entice'ment*, *n.* आशा दाखवून वळविणें ; आमिष, लालूच.

**Entire'**, *a.* ( इन्टा'यर् )—complete, whole, unbroken, undamaged. पूर्ण, सर्व, सगळा, समग्र.

**Entire'ly**, *adv.* (इन्टा'यर्-लि )—wholly. पूर्णपणें.

**Entire'ty**, *n.* (एन्टा'यर्टि )—the sum total. पूर्णता, अखंडपणा.

**Enti'tle**, *v. t.* (एन्टा'इ-टल् )—to give ( a book ) the title of ; to give a claim to. पुस्तकाला वगैरे नांव देणें ; अधिकार देणें, अधिकृत करणें.

**En'tity**, *n.* ( ए'न्टिटि )—a thing with real existence, any real thing. अस्तित्वांत असलेली वस्तु, पदार्थ, अस्तित्व, सत्त्व.

**Entomb'**, *v. t.* (इन्टू'म्)—to place in a tomb, to serve as a tomb for. थडग्यांत ठेवणें, गाडणें.

**Entomŏl'ogy̆**, *n.* (एन्टामॉ'लजि)—the study of insects, the science that treats of insects. कीटकशास्त्र.

**En'trails**, *n. pl.* (ए'न्ट्रेल्स्)—the inner parts of an animal. आंतील भाग, कोथळा, आंतडीं, अंत्रें.

**Entrain'**, *v. t. & i.* (इन्-ट्रे'न्)—to put (troops) into a train, to get into a train. गाडींत चढविणें. गाडींत चढणें.

**Entrăm'mel**, *v. t.* (इन्-ट्रॅ'मल्)—to tie up as in a net. जाळ्यांत पकडणें.

**Entrănce'**, *v. t* (इन्-ट्रा'न्स्)—to throw into a trance, to cause to be in a state of great wonder and delight. देहभान नाहींसें करणें, समाधि लावणें.

**En'trance**, *n.* (ए'न्ट्रन्स्)—coming or going in; the right of admission; the door or passage for an entrance. प्रवेश; आंत शिरण्याचा हक्क; द्वार, प्रवेशमार्ग

**En'trant**, *n.* (ए'न्-ट्रन्ट्)—one who goes in; one who takes part in (a race, an examination). आंत जाणारा; भाग घेणारा.

**Entrăp'**, *v. t.* (इन्-ट्रॅ'प्)—to catch in a trap. पिंजऱ्यांत पकडणें, कोंडणें.

**Entreat'**, *v. t.* (इन्ट्री'ट्)—to ask earnestly; to beg. काकुळतीनें विचारणें; विनंति करणें, विनवणें.

**Entreat'y̆**, *n.* (इन्ट्री'टि)—an earnest request. विनवणी, विनंति.

**Entrĕnch'**, *v. t.* (इन्-ट्रे'न्च्)—to protect a place or an army with trenches. खंदकांच्या साहाय्यानें रक्षण करणें. *Entrench'ment*, *n.*

**Entrŭst'**, *v. t.* (इन्ट्र'स्ट्)—to charge with (duty); to confide to (thing, secret), to give in trust. स्वाधीन किंवा हवालीं करणें; विश्वासानें ठेवणें.

**En'try̆**, *n.* (ए'न्ट्रि)—the act of coming or going in; an entrance; an alley; entering, an item entered. आंत शिरणें; प्रवेश; आळी, गल्ली; नोंद करणें, नोंद.

**Entwīne'**, *v. t.* (इन्-ट्वा'इन्)—to twist round and round; to grow all around. भोंवतालीं गुंडाळणें; सभोंवार वाढणें.

**Enū'merāte**, *v. t.* (इन्यू'मरेट्)—to count; to specify, to name one by one. संख्येनें मोजणें, गणणें; एकामागून एक सांगणें. *Enumera'tion*, *n.* गणना, यादी, संख्या. *Enum'erator*, *n.* गणना करणारा. *Enum'erative*, *a.*

**Enŭn'ciāte**, *v. t.* (इन'न्शिएट्)-to state definitely, proclaim; to pronounce. नक्की विधान करणें; (ची) प्रतिज्ञा म्हणणें, -मांडणें; प्रतिपादन करणें; उच्चारणें. *Enuncia'tion*, *n.* प्रतिज्ञा, स्पष्टोच्चार. *Enun'ciator*, *n.* प्रतिज्ञा करणारा. *Enun'ciative*, *a.*

**Envĕl'op**, *v. t.* (इन्व्हे'लप्)—to wrap up, to cover; to surround (enemy). आच्छादणें, गुंडाळणें, लपेटणें; घेरणें. *Envel'opment*, *n.*

**En'velōpe**, *n.* (ए'न्व्ह-लोप्, ऑ'-)—a cover of a letter; a wrapper, a covering. लखोटा; वेष्टन, कव्हर.

**Envĕn'om**, *v. t.* (इन्-व्हे'नम्)—to put poison on or into; to fill with hatred. विष घालणें; द्वेषानें भरणें.

**En'vĭable**, *a.* (ए'न्व्हि-अबल्)— worthy of envy, calculated to excite envy. ईर्ष्याजनक, स्पृहणीय.

**En'vĭous**, *a.* (ए'न्व्हिअस्)—full of envy. मत्सरी, हेवेखोर.

**Envīr'on**, *v. t.* (इन्व्हा'इरन्)—वेढणें, घेरणें.

**Envīr'onment**, *n.* (इन्व्हा'यरन्मन्ट्)— surrounding; surrounding objects or circumstances. भोंवतालचा प्रदेश; परिस्थिति, सभोंवतालची स्थिति.

**Envīr'ons**, *n. pl.* (एन्व्हा'इरन्झ्, ए'न्व्हिरॉन्झ्)-district round a town, those parts of a town which lie outside. (शहराच्या) आसपासचा प्रदेश; सभोंवतालचा प्रदेश, नगरोपान्त.

**Envi'sage**, *v. t.* (इन्व्हि'झिज्)— to look in the face; to view, to form a picture in the mind; to contemplate. तोंडाकडे पाहणें; पाहणें; ध्यान करणें.

**En'voy**, *n.* (ए'न्व्हॉय्)— a special messenger of high rank sent from one government to another. जासूद, दूत.

**En'vy̆**, *n.* (ए'न्व्हि)—a bitter contemplation of another's success, the feeling of hate or ill will caused by the sight of another's success or wealth. हेवा, मत्सर. *v. t.* to feel envy of, to desire something owned by another and hate the owner for having it. हेवा करणें.

**Enwrăp'**, *v. t* (इन्रॅ'प्)—to wrap, to enfold. वेष्टणें, गुंडाळणें.

**En'zy̆me**, *n.* (ए'न्झाइम्)—(Chem.) an unorganized ferment. फेंस उत्पन्न करणारा अविकारी विद्राव्य पदार्थ. फेनकद्रव्य.

**Ep'aulĕt, Ep'aulĕtte**, *n.* (ए'पोलेट्)—an ornament worn on the shoulders by soldiers, ship's officers and others. खांद्यावर लावण्याचा पट्टा, -फीत, खांदफीत.

**Ephĕm'eral**, *a.* (इफे'मरल्)— short-lived; transitory. अत्यल्पकालिक, अल्पायुषी; क्षणिक, क्षणभंगुर.

*Ephemeral'ity*, *n.* क्षणभंगुरता. *Emphem'era*, *n.* एकच दिवस जगणारी माशी,-कीटक; अल्पायुषी वस्तु.

**Ep'ic**, *n.* (एपिक्)—a long poem narrating heroic deeds or embodying a nation's history. वीरचरित्र, महाकाव्य. *a.* of heroic type or scale. वीररसयुक्त, वीररसात्मक.

**Ep'icure**, *n.* (एपि-क्युअर्)—one who is dainty in eating or drinking. चैनी, विलासी, मिष्टान्नभोक्ता. *Epicure'an*, *a.* having to do with the teaching that what gives pleasure is good and what gives pain is evil. चैनबाजीचा, विलासी.

**Epidem'ic**, *a.* (एपिडे'मिक्)—prevalent for the time among community, (a disease) which passes from one person to another very quickly. सर्वत्र फैलाव झालेला, सांथीचा.

**Epiderm'is**, *n.* (एपिडर्'मिस्)—the outside part of the skin. अगदीं वरची कातडी, बाह्यत्वचा.

**Ep'igram**, *n.* (एपि-ग्रॅम्)—a short poem with witty ending; a pointed saying, a few words expressing a clever or amusing thought. चटकदार लहान कविता; चुटका. *Epigrammat'ic*, *a.* झणझणीत, चुटक्याचा.

**Ep'igraph**, *n.* (एपिग्राफ्)—an inscription, a quotation or a motto. स्मारकावर किंवा थडग्यावर लिहिलेला लेख, वास्तुलेख; वचन; बोधचिन्ह.

**Ep'ilepsy**, *n.* (एपिलेप्सि)—a disease of the brain in which person falls down unconscious with spasms and foaming. अपस्मार, फेंपरें.

**Ep'ilogue**, *n.* (एपिलॉग्)—the concluding part of a book; a speech or short poem delivered at the end of a play. समारोप, उपसंहार; भरतवाक्य.

**Epis'copal**, *a.* (एपिस्'कपल्)—having to do with bishops. बिशपांसंबंधीं, बिशपांच्या सत्तेतला. *Epis'copacy*, *n.* government of the bishops; the bishops. बिशपांनीं चालविलेला समाजाचा कारभार; बिशपवर्ग. *Episcopa'lian*, *a.* of the government of the bishops; a church of the bishops. बिशपांनीं चालविलेल्या कारभारासंबंधीं; बिशपांनीं चालविलेलें चर्च. *n.* an adherent or member of a church governed by the bishops. बिशपांनीं चालविलेल्या चर्चचा अनुयायी किंवा सभासद. *Epis'copate*, *n.* the bishops. बिशपांचा वर्ग.

**Ep'isode**, *n.* (एपिसोड्)—an incidental narrative or series of events. अवांतर कथा, गोष्टींतील गोष्ट, उपाख्यान. *Episod'ic*, *a.* उपकथेचा, उपकथेंत सांगितलेला.

**Epis'tle**, *n.* (इपि'सल्)—a letter, usually long and important. (लांबलचक व महत्त्वाचें) पत्र, पत्रात्मक पत्र.

**Epis'tolary**, *a.* (एपि'स्-टलरि)—of or carried on by letters. पत्रांचा, पत्रांत सांगितलेला.

**Ep'itaph**, *n.* (एपिटाफ्)—words inscribed on a tomb, an inscription; that which is written on a stone above a grave. थडग्यावर खोदलेला लेख.

**Ep'ithet**, *n.* (एपिथेट्)—an adjective expressing quality or attribute; an appellation. गुणवाचक विशेषण; नांव.

**Epit'ome**, *n.* (एपि'टॉमि)—a summary, an abstract, a short account of a book or speech. संक्षेप, सार, सारांश.

**Epit'omize**, *v. t.* (इपि'टॅमाइझ्)—to summarize. सारांश सांगणें.

**E'poch**, *n.* (ई'पॉक्)—the beginning of an era; a period marked by a notable event. युगारंभ; स्मरणीय गोष्टींचा कालावधि. *E'poch-making*, *a.* very important, notable, significant. फार महत्त्वाचा.

**Ep'opee**, *n.* (एपपी)—an epic poem. महाकाव्य.

**E'quable**, *a.* (ई'क्वबल्)—uniform, even; not easily disturbed, not changing suddenly; never very hot nor very cold. समान, सारखा; सहसा न खवळणारा, शान्त; समशीतोष्ण.

**E'qual**, *a.* (ई'क्वल्)—the same in number, size, merit, weight; adequate; evenly matched. सारखा; योग्य; बरोबरीचा, तुल्यबल, समर्थ, कार्यक्षम. *n.* a person of the same rank. बरोबरीचा किंवा समान दर्जाचा मनुष्य. *v. t.* to be equal to. बरोबरीचा असणें. *He is equal to his work*, he is able to do his work. तो तें काम करण्याला समर्थ आहे. *Equal to the occasion*, able to meet or deal with whatever happens. प्रसंगास तोंड देणारा. *He treated us equally*, he treated us both alike. त्यानें दोघांना सारखें वागवलें.

**Equal'ity**, *n.* (इक्वॉ'लिटि)—being equal. बरोबरी, समानता.

**E'qualize**, *v. t. & i.* (ई'क्वलाइझ्)—to make equal; to reach the opponent's score (in games). सारखा किंवा समान करणें; खेळांत विरुद्ध पक्षाची बरोबरी करणें. *Equaliza'tion*, *n.* बरोबरी करणें, सारखेपणा.

**Equanim'ity**, *n.* (ईक्वनि'मिटि)—evenness of mind, composure, calm. मनाचा समतोलपणा, शान्ति, शान्तवृत्ति.

**Equate'**, *v. t.* (इक्वे'ट्)—to make equal. सारखे करणें, समीकरण करणें.

**Equa'tion**, *n.* (इक्वे'शन्)—making equal, balancing; (*Math.*) statement of equality. बरोबरी करणें; समीकरण.-*al*, *a.*

**Equa'tor**, *n.* (इक्वे'टर्)—a great circle of the earth, equidistant from the poles, an imaginary line round the middle of the earth halfway between the north and south poles. विषुववृत्त, भूमध्यरेषा. *Equator'ial*, *a.* विषुव वृत्ताचा, भूमध्यरेषेजवळचा.

**Eq'uerry**, *n.* (ए'क्वरि)—an officer of a king's court in charge of horses; an officer of British royal household. अश्वाधिकारी, पागेवरील मुख्य; पागनीस.

**Eques'trian**, *a.* (इक्वे'स्ट्रिअन्)—pertaining to horses, of horseriding. अश्वविषयक, घोड्यावर बसण्यासंबंधीं. *n.* घोडेस्वार, तुरंगी.

**Equiang'ular**, *a.* (ईक्विॲं'ग्युलर्)—consisting of or having equal angles. सर्व कोण सारखे असलेला, समकोण.

**Equidis'tant**, *a.* (ईक्वि-डि'स्टन्ट्)-at equal distances. समांतर.

**Equilat'eral**, *a.* (इक्विलॅ'टरल्)—having all sides equal. सर्व बाजू सारख्या असलेला, समभुज.

**Equilib'rium**, *n.* (ईक्विलि'ब्रिअम्)-a state in which a thing is held level or steady because there is equal weight on both the sides, a state of balance; mental balance. समतोल, समतुलना; मनाचा समतोलपणा.

**E'quine**, *a.* (ई'क्वाइन्)—having to do with horses, like a horse. घोड्यांचा, अश्वसदृश.

**E'quinox**, *n.* (ई'क्विनॉक्स्)-the time at which the sun crosses equator (about March 21 and September 22) and day and night are equal. रात्र व दिवस सारखा असणारा काल. विषुव. *Equinoc'tial*, *a.* विषुवासंबंधीं.

**Equip'**, *v. t.* (इक्वि'प्)—to fit out, to furnish, to supply with the requisites; to dress for journey. आवश्यक वस्तूंचा पुरवठा करणें; प्रवासाकरितां पोषाख करणें. *Equip'ment*, *n.* तयारी करणें; तयारी, सिद्धता; सरंजाम, सामग्री.

**Eq'uipage**, *n.* (ए'क्वि-पेज्)—carriage, horses, and attendants, retinue, accoutrements; requisites, outfit. गाड्या, घोडे व नोकरचाकर; लवाजमा, इतमाम.

**E'quipoise**, *n.* (ई'क्विपॉइझ्)—equilibrium; counterbalancing weight. समतुलना; पासंग, धडा.

**Eq'uitable**, *a.* (ए'क्विटेबल्)—fair, just. न्याय्य, योग्य.

**Equita'tion**, *n.* (एक्विटे'शन्)—the art of horseriding. घोड्यावर बसण्याची कला, अश्वारोहणकला.

**Eq'uity**, *n.* (ए'क्विटि)—fairness; principles of justice supplementing law. खरा न्याय, निःपक्षपात, न्यायबुद्धि; कायद्याला सहाय्यकारी न्यायतत्त्वें, सारासारविचारन्याय, व्यवहारन्याय.

**Equiv'alent**, *a.* (इक्वि'व्हलन्ट्)—equal in value; corresponding. सारख्या किंमतीचा; एकार्थाचा. *n.* समतोल वस्तु -मोबदला; तुल्यशक्तिक. *Equiv'alence*, *Equiv'alency*, *nn.* समतोलपणा; समानार्थकता; तेवढीच रक्कम.

**Equiv'ocal**, *a.* (इक्वि'व्हकल्)—of double or doubtful meaning; dubious. दोन अर्थांचा, दुटप्पी; संशयास्पद. *Equivocal'ity*, *n.*

**Equi'vocate**, *v. i.* (इक्वि'व्हकेट्)—to use words ambiguously. संदिग्ध किंवा दुटप्पी बोलणें. *Equivoca'tion*, *n.*

**Er'a**, *n.* (ई'अरा)—the system of chronology starting from a particular period, a time in history usually begun from some important event. शक. The Christian era = ख्रिस्ती शक.

**Erad'icate**, *v. t* (इरॅ'डिकेट्)—to root out, to extirpate, to exterminate, to destroy completely समूळ उपटून टाकणें, निर्मूलन करणें. *Eradica'tion*, *n.* निर्मूलन, नाश. *Era'dicator*, *n.*

**Erase'**, *v. t.* (इरे'झ्)—to rub out, to obliterate. पुसून टाकणें, नाहींसें करणें, (मनांतून) काढून टाकणें. *Era'sure*, *n.* rubbing out, a word rubbed out. खोडाखोडी, खोडलेला शब्द.

**Ere**, *prep. & conj* (एअर्)—before; sooner than. पूर्वी; अगोदर. Ere long = लवकरच.

**Erect'**, *a.* (इरे'क्ट्)—upright, vertical, standing up on end. ताठ, उभा. *v. t.* to make erect; to build; to form. उभा करणें; बांधणें, रचणें. *Erec'tion*, *n.* a building. इमारत, घर *Erec'tor*, *n.* बांधणारा, उत्थापक.

**Erec'tile**, *a.* (इरे'क्टाइल्)—which can be made to stand up straight. सरळ उभा करतां येण्याजोगा.

**E'remite**, *n.* (इ'रिमाइट्)—यति, जोगी, संन्यासी. *Eremit'ic*, *a.*

**Erg'o**, *adv.* (अ'र्गो)—therefore. म्हणून.

**Erm'ine**, *n.* (अ'र्मिन्)—a small animal with thick white fur in winter, with a black end to its tail; white fur or ermine. एक लहान लोकरीचा प्राणी; त्या प्राण्याची लोंकर.

**Erne**, *n.* (अर्न्)—the golden eagle. सुवर्ण गरुडपक्षी.

**Erode'**, *v. t.* (इरो'ड्)—gnaw away; wear out, corrode. खाऊन टाकणें; झिजवून टाकणें. *Ero'sion*, *n.* खाऊन टाकणें, खाद. *Ero'sive*, *a.*

Erŏt'ic, *a.* (एरॉ'टिक्)—of love, amatory. प्रेमसंबंधीं, शृंगारिक.

Err, *v. i.* (अर्)—to make mistakes; to be incorrect; to sin. चुका करणें; चूक असणें; पाप करणें.

E'rrand, *n.* (ए'रन्ड्)—a short journey made to carry a commission. निरोप नेण्याकरितां छोटा प्रवास, निरोप, संदेश. *Errand-boy, n.* a boy employed on errands. निरोप्या.

E'rrant, *a.* (ए'रन्ट्)—roaming in quest of adventure; itinerant; erring. भटकणारा; भटक्या; चुकारतट्टू. *-ry, n.*

Errăt'ic, *a.* (एरॅ'टिक्)—लहरी, अनियमित.

Errā'tŭm, *n.* (एरे'टम्)—an error in printing. छापण्याची चूक.

Errō'neous, *a.* (एरो'निअस्)—incorrect. चूक, चुकीचा, अशुद्ध.

E'rror, *n.* (ए'रर्)—a mistake; a wrong opinion; transgression. चूक; चुकीचें मत; अतिक्रम.

Erst, Erst'while, *a. & adv.* (अर्स्ट्, अ'र्स्ट् व्हाइल्)—former, formerly. पूर्वीचा, पूर्वी.

Eructā'tion, *n.* (ई-रक्टे'शन्)—a sending of gas from the stomach up through the mouth. ढेंकर, ढेंकर देणें.

E'rudite, *a.* (ए'रु-डाइट्)—deeply read, learned. विद्वान्, निष्णात, पारंगत.

Erudĭ'tion, *n.* (एरुडि'शन्)—learning. विद्वत्ता, विद्या.

Erŭpt', *v. i.* (इर'प्ट्)—to break out फुटणें, फुटून बाहेर पडणें. [ L. *e*, out & *rumpere*, to break ]

Erŭp'tion, *n.* (इर'प्शन्)—an outbreak (of volcano, anger); rash, pimples. जोरानें बाहेर पडणें, स्फोट; पुरळ. *Erup'tive, a.*

Erўsĭp'elas, *n.* (एरिसि'पिलस्)—a serious disease producing red colour on the skin. धांवरें.

Escalāde', *n.* (एस्कले'ड्)—scaling of walls with ladders. शिड्या लावून चढणें.

Es'calātor, *n.* (ए'स्कलेटर्)—a moving staircase. हालता जिना.

Escapāde', *n.* (एस्कपे'ड्)—a wild and exciting act; a daring disobeying of rules. आवेशानें केलेलें कृत्य; धडधडीत नियमभंग.

Escāpe', *v. t. & i.* (इस्के'प्)—to get free; to find a way out; to elude, to avoid. मोकळा होणें; बाहेर जाण्याला मार्ग शोधणें; चुकवणें, टाळणें. *n.* escaping; leakage. टाळणें, ओंगसुटका, बचाव; बाहेर जाण्याचा मार्ग. *He escaped being hurt*, he was fortunate not to be hurt. सुदैवानें त्याला इजा झाली नाहीं. *Means of escape*, तरणोपाय. *Escape'ment, n.* the part of a clock which makes the noise "tick-tick" and keeps the clock running. ज्याच्या योगानें घड्याळ चालू राहतें ती घड्याळाची कळ.

Escărp', *n.* (इस्का'र्प्)—a steep slope just below the wall of a fort. किल्ल्याच्या भिंतीच्या खालील सरळ उतरता भाग. *Escarp'ment, n.*

Eschatŏl'ŏgў, *n.* (एस्कटॉ'लॅजि)—the doctrine of death and judgement. मृत्यु व और्ध्वदेहिक शिक्षाशास्त्र.

Escheat', *n.* (इस्ची'ट्)—lapse of property to crown; property seized by the king as a punishment or because the owner had no descendants. सरकारजमा होणें; सरकारजमा झालेला बेवारसी माल. *v. t. & i.* सरकारजमा होणें.

Eschew', *v t.* (इस्चू)—to abstain from, to shun, to avoid, to fly from. पासून दूर राहणें, टाळणें.

Es'cŏrt, *n.* (ए'स्कॉर्ट्)—a body of armed men as guard; a person accompanying another as protection. पहारेकरी; संरक्षणाकरितां बरोबर दिलेला इसम. *v. t.* (इस्कॉ'अर्ट्) to go along with to protect or in order to show the way. संरक्षणाकरितां किंवा वाट दाखविण्याकरितां बरोबर जाणें.

Es'critoire, *n.* (ए'स्-क्रिट्वार्)—a small writing-desk with a top which opens downward for writing and is closed when not in use. लिहावयाचें लहान मेज, लहान टेबल.

Es'cŭlent, *a.* (ए'स्क्युलन्ट्)—fit for food. खाण्याला योग्य. *n.* खाद्य पदार्थ.

Escŭtch'eon, *n.* (एस्क'चन्)—a shield on which the signs of titled families are painted; a pivoted keyhole cover. कुलसन्मानद्योतक चिन्हें असलेली ढाल; किल्ली घालण्याचे भोंकावर बसविलेला पत्रा,-ढापण.

Eskimo, Esquimau, *n.* (एस्किमो')—a member of a North American race. एस्किमो जातीचे लोक.

Esotŏ'ric, *a.* (एसॉटे'रिक्)—meant for the initiated; private, confidential. दीक्षा दिलेल्या लोकांकरितांच असलेला; गुप्त, खासगी, एकांतांत सांगितलेला.

Espĕ'cial, *a.* (इस्पे'शल्)—chief; more than ordinary; particular. मुख्य; विशेष प्रकारचा; विशिष्ट.

Espĕ'ciallў, *adv.* (इस्पे'शलि)—chiefly; more than in other cases. मुख्यत्वेंकरून, विशेषेंकरून.

Esperăn'tō, *n.* (एस्पॅरॅ'न्टो)—a specially made, easily learnt, universal language. मुद्दाम तयार केलेली सर्वांना शिकतां येण्याजोगी भाषा.

**Es'pionage**, *n.* (ए'-स्पिअनिज्)—spying; use of spies. हेरणें, टेहळणी करणें, हेरगिरी; चारप्रयोग, हेरांची योजना.

**Esplanāde'**, *n.* (एस्प्लने'ड्)—level space, esp. one used as promenade. किल्ल्याचे पुढील सपाट मैदान.

**Espous'al**, *n.* (इस्पा'उझल्)—decisions to support some idea or work; marriage, betrothal. अंगीकार, स्वीकार, कैवार; लग्न, विवाहनिश्चय.

**Espouse'**, *v. t.* (इस्पा'उझ्)—to marry; to uphold, to champion, to support (a cause). लग्न करणें; पक्ष उचलून धरणें.

**Esprit'**, *n.* (एस्प्री')—sprightliness, wit. अभिमान, आपलेपणा, बुद्धि.-*de corps*, (-ड'कोअर्)-स्वपक्षाभिमान.

**Espy̆'**, *v. t.* (इस्पा'इ)—to catch sight of, to see from a distance. दृष्टीस पडणें, दुरून पाहणें.

**Esquīre'**, *n.* (इस्क्वा'यर्)—a title of courtesy; a squire. एक बहुमानाची पदवी किंवा किताब; शिलेदार. (abbr. *Esq.*)

**Essay**, *n.* (ए'से)—a literary composition; an attempt. निबंध; प्रयत्न. *v. t.* (एसे') to try, to endeavour; to test. प्रयत्न करणें; परीक्षा घेणें. *Ess'ayist*, *n.* an essay-writer. निबंधलेखक, निबंधकार.

**Ess'ence**, *n.* (ए'सन्स्)—existence or entity; an indispensable quality or element; perfume. खरी वस्तु; आवश्यक गुण किंवा तत्त्व; अर्क, सुगंध.

**Essĕn'tial**, *a.* (इसे'न्शल्)—of or constituting a thing's essence, very necessary, indispensable. घटकतत्त्वाचा, स्वभावसिद्ध; आवश्यक. *n.* an indispensable element. आवश्यक तत्त्व. *Essentia'lity*, *n.* आवश्यकता.

**Estăb'lish**, *v. t.* (इस्टॅ'ब्लिश्)—to set up; to settle; to place beyond dispute. स्थापना करणें; नेमणें; सिद्ध करून देणें.

**Estăb'lishment**, *n.* (इस्टॅ'ब्लिश्-मेन्ट्)—establishing; the established church; staff; a house of business. स्थापना; प्रस्थापित चर्च; कामावर नेमलेले लोक; कारखाना.

**Estāte'**, *n.* (इस्टे'ट्)—rank; place in life; landed property or movables; one's assets and liabilities. स्थिति, पदवी; सामाजिक योग्यता, दर्जा; स्थावर जंगम मालमत्ता; देणें घेणें. *Man's estate*, प्रौढ स्थिति. *The three estates*, Lords Spiritual, Lords Temporal, Commons. धार्मिक लॉर्ड, ऐहिक लॉर्ड व कॉमन्स. *The fourth estate*, the press. वर्तमानपत्रें, वर्तमानपत्रांची संस्था.

**Esteem'**, *v. t.* (इस्टी'म्)—to think highly of; to consider. चांगला आहे असें समजणें, प्रशंसा करणें; विचार करणें. *n.* a favourable opinion, regard. प्रशंसा, आदर, बहुमान.

**Es'tĭmable**, *a.* (ए'स्टि-मबल्)—worthy of esteem or respect. स्तुतीस पात्र, प्रशंसनीय.

**Es'tĭmate**, *n.* (ए'स्टिमिट्)—an account of the probable cost of doing a certain piece of work, approximate judgement of value. सरासरी किंमत, अंदाज. *v. t.* (ए'स्टिमेट्) to form an estimate of. अंदाज करणें, किंमत ठरविणें. *Es'timator*, *n.* अंदाज करणारा.

**Estĭmā'tion**, *n.* (एस्टिमे'शन्)—judgement; opinion; esteem. अंदाज, अनुमान; मत; चांगलें मत.

**Estŏpp'el**, *n.* (इस्टॉ'पेल्)—the being precluded from a course by previous action of one's own. स्वतःच्या पूर्वकृतीनें आलेला मार्गातील अडथळा, प्रतिबंध, प्रतिबंधक कबुली.

**Estrānge'**, *v. t.* (एस्ट्रें'ज्)—to alienate a person from another, to cause to become unfriendly. संबंध तोडणें, अलग राहणें, दूरदूर ठेवणें. *Estrange'ment*, *n.* परकेपणा, अलगपणा, स्नेहाचा अभाव.

**Es'tūary**, *n.* (ए'स्च्यु-अरि)—the broad mouth of river into which the sea flows, a firth. खाडी, भरतीचें पाणी आंत घेणारें नदीचें मुख, फाटें.

**Et cĕt'era**, *phr.* (एट्-से'टरा)—and others, of the like kind, and the rest, and so on. इत्यादि, वगैरे. (abbr. *etc.*, &c.)

**Etch**, *v. t. & i.* (एच्)—to engrave with acids on metal plate etc. आम्लानें नक्षी कोरणें, आम्ल-लेखन करणें.

**Etern'al**, *a.* (इटर्'नल्)—without beginning or end, lasting for ever, that always (has existed and) will exist; constant. अनाद्यन्त; सनातन, शाश्वत.

**Etern'ity**, *n.* (इटर्'निटि)—being eternal; infinite time; future life; the life after death. सनातनत्व; शाश्वत काल; पुढील आयुष्य.

**E'ther**, *n.* (ई'थर्)—clear sky, region above clouds. निरभ्र आकाश, ढगांच्या वरील प्रदेश.

**Ethēr'eal**, *a.* (इथी'रिअल्)—very light, like air, airy; heavenly. हलका, उडून जाणाऱ्या जल-द्रव्यासारखा, हवेशीर; स्वर्गीय.

**Eth'ics**, *n. pl.* (ए'थिक्स्)—the study of right and wrong in human behaviour, the science of morals or moral duty; moral principles. नीतिशास्त्र, नीतितत्त्वें. *Eth'ic*, *Eth'ical*, *aa:* नैतिक, नीतिविषयक, नीतिपर.

**Eth'nic**, -al, *a.* (ए'थ्-निक्, -कल्)—having to do with races of people, heathen. (मनुष्यांच्या) भिन्नजातिविषयक, मूर्तिपूजक लोकांसंबंधी. [ Gr. *ethnos*, a nation ]

**Ethnŏl'ogў**, *n.* (एथ्नॉ'लॉजि)—the science of races, the study of the races of man. मानवजातिशास्त्र.

**Etiquette'**, *n.* (एटिके'ट्)-rules of good behaviour, conventional rules of manners; unwritten code of professional conduct. सभ्याचरणपद्धति; शिष्टाचार, सभ्यतेचे नियम.

**Etўmŏl'ogў**, *n.* (एटिमॉ'लजि)—(account of) word's formation and sense-development, the study of the history of words. व्युत्पत्ति, व्युत्पत्तिशास्त्र, निरुक्त. *Etymolo'gical*, *a.* व्युत्पत्तीसंबंधीं. *Etymo'logize*, *v. t.* & *i.* व्युत्पत्ति ठरविणें. *Etymo'logist*, *n.* व्युत्पत्तिशास्त्रज्ञ, व्युत्पत्तिकार.

**Eucalўp'tus**, *n.* (यूकलि'प्टस्)—a tree which produces a strong smelling oil used in medicine. युकलिप्टस नांवाचें झाड.

**Eu'chre**, *n.* (यू'कर्)—an American card-game. एक प्रकारचा पत्त्यांचा खेळ. *v. t.* to gain advantage over. दुसऱ्यावर मात करणें, चीत मारणें.

**Eugĕn'ics**, *n.* (यूजे'निक्स्)—the science of improving the human race or producing fine animals by care in choosing the fathers and mothers. प्राणिसुधारणाशास्त्र, सुप्रजाजननशास्त्र. *Eu'genist*, *n.*

**Eul'ogize**, *v. t.* (यू'लजाइझ्)—to speak well of, to extol, to praise highly. स्तुति करणें, प्रशंसा करणें. *Eul'ogist*, *n.* स्तुतिपाठक, प्रशंसक. *Eulogis'tic*, *a.* स्तुतिपर, प्रशंसायुक्त.

**Eul'ogў**, *n.* (यू'लजि)— speech or writing in praise of person; praise. प्रशंसापर भाषण किंवा लेख; पोवाडा, गुणगान, स्तुति.

**Eun'uch**, *n.* (यू'नक्)—a castrated person. नपुंसक, षंढ.

**Euph'ĕmĭsm**, *n.* (यू'फि-मिझम्)—the substitution of a mild for blunt expression, a pleasant way of saying an unpleasant truth. कटु अर्थ गोड शब्दांनीं सांगणें, एक अर्थालंकार. *Euphemist'ic*, *a.* सौम्य शब्दप्रयोग असलेला.

**Euph'onў**, *n.* (यू'फॉनि)-pleasantness or smoothness of sound, esp. in words. सुस्वरोच्चार, मधुरोच्चार. *Eupho'nious*, *a.* sounding well. कर्णमधुर. *Euphon'ic*, *a.*; *Euph'onize*, *v. t.*, *Eupho'nium*, *n.* a brass instrument of music. एक पितळी सुस्वर वाद्य.

**Euph'ūĭsm**, *n.* (यू'फ्यु-इझम्)—high-flown style of writing, high-flown diction. उच्च लेखनपद्धति, कठीण व मोठमोठे शब्द योजून लिहिण्याची-बोलण्याची पद्धति. *Euph'uist*, *n.*

**Eurās'ian**, *a.* (यूरे'शिअन्)—of mixed European and Asiatic parentage. युरोपिअन व एशिअन स्त्रीपुरुषांपासून झालेली संतति.

**Euthana'sia**, *n.* (यूथने'झिआ)—any painless and easy death. सुखाचें मरण. [Gr. *eu*, well & *thanatos*, death]

**Evăc'ūate**, *v. t.* (इव्हॅ'क्युएट्)—to make empty, to clear; to withdraw from, to leave. रिकामा करणें, खालीं करणें; स्थळ सोडून जाणें. *Evacua'tion*, *n.* रिकामा करणें, सोडून जाणें.

**Evāde'**, *v. t.* (इव्हे'ड्)—to escape from, to avoid; to elude, to slip away from, to baffle. चुकवणें, टाळणें; झुलवणें. *To evade the law*, to act dishonestly and yet just not to break the law. कायद्याच्या कचाट्यांत न सांपडतां अप्रामाणिक कृत्य करणें.

**Evanĕs'cent**, *a.* (इव्हने'सन्ट्)—quickly fading, liable to disappear, quickly disappearing. लवकर नाहींसा होणारा, क्षणिक. *Evanes'cence*, *n.*; *Evanesce'*, *v. i.* (एव्हने'स्) दृष्टिआड होणें, अदृश्य होणें.

**Evăn'gelist**, *n.* (इव्हॅ'न्जलिस्ट्)—a teacher of good news; a writer of one of the four Gospels (books of the Bible which tell the life of Christ). सुवार्ता सांगणारा शिक्षक; बायबलच्या चार ग्रंथांपैकीं शुभवर्तमानलेखक. *Evangeli'stic*, *a.*; *Evan'gelize*, *v. t.* to preach the Gospel to; to convert to Christianity. शुभवर्तमानाचा उपदेश करणें; क्रिश्चन धर्मांत घेणें.

**Evăp'orāte**, *v. t.* & *i.* (इव्हॅ'पोरेट्)—to turn into vapour, to change a liquid into a gas, to exhale moisture. वाफ होणें, वाफ करून सोडणें, बाष्पीभवन करणें, -होणें, अदृश्य होणें. *Evapora'tion*, *n.* बाष्पीभवन, वायुरूपानें उडून जाणें.

**Evā'sion**, *n.* (इव्हे'झन्)-act or means of evading; a shuffling excuse. उडवाउडव, टाळाटाळ; चुकविण्याचें साधन.

**Evā'sĭve**, *a.* (इव्हे'झिव्ह्)—elusive, trying to avoid. उडवाउडवीचा, टाळाटाळीचा.

**Eve**, *n.* (ईव्ह्)—the evening or day before a festival; the time just before an important event; evening. कोणत्याहि सणाच्या पूर्वीची संध्याकाळ किंवा दिवस; कोणतीहि महत्त्वाची गोष्ट घडण्याच्या लगत पूर्वीचा काळ; संध्याकाळ.

**E'ven**, *n.* (ई'व्हन्)—evening. संध्याकाळ. *a.* level, smooth; uniform; equable, calm; divisible by 2. सपाट, सारखा; एकसारखा; बरोबर सारखा; शान्त; सम. *v. t.* to make equal; to treat as equal. सारखा करणें; सारखा मानणें. *adv.* neither more nor less than; simply; notwithstanding; just at the moment. अगदीं

परोपर ; केवळ ; हि, सुद्धां ; त्याचक्षणीं. *Even if*, although, यद्यपि, जरी.

**Eve'nĭng**, *n.* (ई'व्ह्‌-निंग्)—the close of the day (esp. sunset to bedtime). संध्याकाळ, सायंकाळ, प्रदोष.

**Evĕnt'**, *n.* (इव्हें'ट्)—occurrence of a thing ; an item of a programme, esp. in sports ; result ; an important happening. घडलेली किंवा घडणारी गोष्ट ; कार्यक्रमांतील प्रत्येक भाग ; परिणाम ; घडणें, घडून येणें, महत्त्वाची गोष्ट. *In the event of his death*, if he dies. जर तो मेला तर. *At all events*, whatever happens. कांहीं झालें तरी.

**Evĕnt'ful**, *a.* (इव्हें'ट्‌-फुल्)—full of incidents. घडामोडीचा, महत्त्वाचा.

**E'ventīde**, *n.* (ई'व्हन्‌-टाइड्)—the evening संध्याकाळ.

**Evĕn'tūal**, *a.* (इव्हें'च्यु-अल्)—happening under certain conditions ; final, last. आनुषंगिक, परिणामाचा ; अंतिम.

**Evĕntūăl'ĭtў**, *n.* (इव्हेंच्युॲ'लिटि)—the possible event. शक्य गोष्ट, शक्यता.

**Ev'er**, *adv.* (ए'व्हर्)—at all times ; always ; at any time. सर्व काळीं ; सर्वदा ; कोणत्याही वेळीं. *Ever and anon*, from time to time. वेळोवेळीं. *For ever, For evermore*, always. नेहमीं, सर्वदा. *Ever so*, अतिशय, फार.

**Ev'ergreen**, *n.* (ए'व्हर्‌-ग्रीन्)—any tree or plant which does not leave its leaves in winter. नेहमीं हिरवें असणारें-सदापर्णी-झाड. *a.* always green or fresh. नेहमीं हिरवें किंवा टवटवीत असणारें, सदापर्णी

**Everlās'ting**, *a.* (एव्हर्‌ला'स्टिंग्)—lasting for ever ; perpetual. चिरकाल टिकणारा, नित्य, शाश्वत *n.* नित्यता, चिरकालिकता, शाश्वती ; सुकल्यावरही रंग टिकणारें फूल.

**Evermore'**, *adv.* (एव्हर्‌-मो'अर्)—for ever, always, unceasingly, eternally. सदोदित, सर्वदा, नेहमीं.

**Ev'ery**, *a.* (ए'व्ह्‌-रि)—each one of all. प्रत्येक, एकेक. *Every other day*, on alternate days. एक दिवसा आड. *Every bit as*, quite as. अगदीं तसेंच. *Every now and then*, from time to time. हरघडी, वेळोवेळीं. *Ev'ery-body, Ev'eryone, pron.* प्रत्येकजण, एकूणएक. *Every-day, a.* occurring everyday ; ordinary. दररोज घडणारा ; नेहमींचा.

**Ev'ery-where**, *adv.* (ए'व्ह्‌रि-व्हेअर्)—in every place, in all places. प्रत्येक ठिकाणीं, सर्वत्र.

**Evĭct'**, *v. t.* (इव्हि'क्ट्)—to expel a person by legal process. कायदेशीर मार्गानें घालवून देणें, हुसकावून लावणें, काढून टाकणें.

**Ev'ĭdence**, *n.* (ए'व्हि-डन्स्)—indication, sign ; facts available as proof, anything which helps to prove a fact. चिन्ह, लक्षण ; साक्ष, साक्षी-पुरावा. *v. t.* to be evidence of ; to indicate. पुरावा देणें ; दर्शविणें. *To turn King's or Queen's evidence*, to give evidence against one's accomplices. आपल्या साथीदारांविरुद्ध सरकारचे बाजूनें साक्ष देणें, माफीचा साक्षीदार होणें. *In evidence*, conspicuous, clear. स्पष्ट.

**Ev'ĭdent**, *a.* (ए'व्हिडन्ट्)—plain and clear to the mind, obvious, manifest. स्पष्ट, प्रकट.

**Evĭdĕn'tial**, *a.* (एव्हिडे'न्शल्)—relating to or furnishing evidence ; proving. साक्षीसंबंधीं, साक्षीपुराव्याचा ; स्पष्ट सिद्ध करणारा. *Eviden'tiary, a.*

**E'vĭl**, *a.* (ई'व्हिल्)—bad, harmful. वाईट ; दुष्ट. *n.* an evil thing ; a sin ; harm. वाईट गोष्ट ; पाप ; इजा, दुःख. *Evil-doer, n.* a sinner. दुष्ट कृत्य करणारा, पापी. *The evil one*, the Devil, Satan. सैतान. *The evil eye*, an eye that brings bad fortune, a malicious look. वाईट दृष्टि, दुष्ट नजर. *An evil tongue*, a slanderous tongue. निंदाखोर, निंदक. *To speak evil of*, to slander. निंदा करणें.

**Evĭnce'**, *v. t.* (इव्हि'न्स्)—to show ; to indicate. दाखविणें, दर्शविणें.

**Evĭs'cerāte**, *v. t.* (इव्हि'सरेट्)—to cut out the inner parts of the body. आंतडीं कापून बाहेर काढणें. [ L. *e*, out & *viscera*, the bowels ]

**Evocā'tion**, *n.* (ईव्हके'शन्)—act of calling out. बोलावणें, उठविणें. *Evoc'atory, a.*

**Evōke'**, *v. t.* (इव्हो'क्)—to call up (feelings), to summon forth. आवाहन करणें, जागृत करणें. *To evoke spirits of the dead*, भुतें उठविणें. *To evoke a feeling*, to produce a feeling. भावना उत्पन्न करणें.

**Evolu'tion**, *n.* (ईव्हलू'शन्)—the way in which simple forms of life, by slow changes, grow into other higher forms of life, development. उत्क्रान्ति, विकास, परिणति. *Evolu'tional, Evolu'tionary, aa.* ; *Evolu'tionism, n.* ; *Evolu'tionist, n.* उत्क्रांतिवादी, उत्क्रान्तितत्त्व खरें मानणारा.

**Evŏlve'**, *v. t. & i.* (इव्हॉ'ल्व्ह्)—to unfold, to open out ; to set forth in order ; to develop by natural process. उघड करणें ; अनुक्रमानें पुढें मांडणें ; निसर्गरीत्या वाढणें.

**Ewe**, *n.* (यू)—a female sheep. मेंढी.

**Ew'er**, *n.* (यू'अर्)—a pitcher, a water-jug, a large water-pot with handle. घडा, खुजा.

**Exa'cerbāte**, *v. t.* ( एक्सॅ'सर्बेट् )—to cause bitterness of feeling to increase, to aggravate, to irritate. चिडवणें, चीड आणणें. *Exacerba'tion, n.*

**Exact**, *a.* ( एग्झॅ'क्ट् )—precise, accurate, strictly correct. अगदीं बरोबर, तंतोतंत. *v. t.* to enforce payment of ( fees, obedience ). बळजबरीनें ( कोणतीहि गोष्ट ) करून घेणें, वसूल करणें, निघेल तितकें काढून घेणें. *Exac'tion, n.* जुलूम, जबरदस्ती, बळजबरी, बळजबरीनें घेणें.

**Exact'ing**, *a.* ( इग्झॅ'क्टिंग् )—demanding much work or care. कडक, करडा, जास्तींत जास्त काम करून घेणारा.

**Exac'titūde**, *n.* ( इग्झॅ'क्टिट्यूड् )—exactness, great care in being correct. तंतोतंतपणा, अगदीं बरोबर असण्याची मोठी काळजी.

**Exact'ly**, *adv.* ( इग्झॅ'क्ट्लि )—quite so, precisely, accurately, correctly. अगदीं तसेंच, अगदीं बरोबर.

**Exa'ggerāte**, *v. t.* ( इग्झॅ'जरेट् )—to carry beyond truth; to overstate. तिखटमीठ लावून सांगणें; अतिशयोक्ति करणें. *Exaggera'tion, n.* overstatement. अतिशयोक्ति. *Exa'ggerator, n.* अतिशयोक्ति करणारा. *Exa'ggerative, a.* अतिशयोक्तिपूर्ण.

**Exalt'**, *v. t.* ( इग्झॉ'ल्ट् )—to raise in rank or power; to magnify, to praise, to extol. पदवीनें किंवा सामर्थ्यानें वाढविणें, मोठ्या पदास चढविणें; स्तुति करणें, प्रशंसा करणें.

**Exaltā'tion**, *n.* ( एक्सॉल्टे'शन् )—a state of great excitement and of pleasure, elation, rapture. उच्चता, अत्यानंद.

**Exalt'ed**, *a.* ( एग्झॉ'ल्टिड् )—high, noble. उच्च, उदात्त, उन्नत.

**Examinā'tion**, *n.* ( इग्झॅमिने'शन् )—minute inspection; testing of knowledge or ability by questions. बारीक सारीक तपासणी; परीक्षा, शोध.

**Exam'ine**, *v. t. & i.* ( इग्झॅ'मिन् )—to investigate or inquire *into*; to test proficiency of ( pupils ) by questions. बारीक सारीक पूर्ण चौकशी करणें; परीक्षा घेणें. *Exam'iner, n.* परीक्षक. *Examinee', n.* a person examined. परीक्षा देणारा, परीक्षेस बसणारा.

**Exam'ple**, *n.* ( इग्झा'म्पल् )—a thing illustrating general rule; a model, a pattern; a specimen; a precedent. उदाहरण; कित्ता; नमुना; मागील दाखला. दृष्टान्त. *To set a good example*, to behave so well that others may perhaps do the same. कित्ता घालून देणें. *To make an example of*, to punish in such a way that others may be afraid to act in the same way. दुसऱ्यावर जरब बसण्याकरितां कडक शिक्षा देणें.

**Exas'perāte**, *v. t.* ( एग्झॅ'स्परेट् )—to irritate ( a person ); to aggravate ( pain ). खिजवणें; चेतवणें; प्रक्षुब्ध करणें. *Exaspera'tion, n.* चिथावणी, चेव. *Exas'perator, n.* चिथावणी देणारा. *Exas'perated, pa. p.* क्षुब्ध, क्रुद्ध, त्रस्त.

**Ex'cavāte**, *v. t.* ( ए'क्स् कव्हेट् )—to hollow out; to remove soil by digging, to dig. पोखरणें; खणून टाकणें. *Excava'tion, n.*; *Ex'cavator, n.*

**Exceed'**, *v. t. & i.* ( इक्सी'ड् )—to be greater than, to go beyond what is necessary or allowed; to be pre-eminent. अधिक होणें, मर्यादेपलीकडे जाणें; मागें टाकणें, चढ करणें.

**Exceed'ingly**, *adv.* ( इक्सी'डिंग् लि )—very, very greatly. फार, अत्यंत.

**Excel'**, *v. t. & i.* ( इक्से'ल् )—to go beyond, to surpass; to be pre eminent. मागें टाकणें, वरचढ करणें; श्रेष्ठ असणें.

**Ex'cellence**, *n.* ( ए'क्सलन्स् )—great merit. मोठा सद्गुण.

**Ex'cellency**, *n.* ( ए'क्सलन्सि )-title of ambassadors, governors, & their wives. गव्हर्नर वगैरे अधिकाऱ्यांची पदवी.

**Ex'cellent**, *a.* ( ए'क्सलन्ट् )—very good. अत्युत्कृष्ट.

**Excel'sior**, *int.* ( इक्से'ल्-सि-ऑर् )—let us try to go higher or do better. आपण वरचढ किंवा अधिक चांगले होऊं या!

**Except'**, *v. t. & i.* ( इक्से'प्ट् )—to exclude ( from general statement ); to make objection against. वगळणें, अपवाद करणें; हरकत घेणें. *prep.* ( *Excepting* ) not including; but. खेरीज करून, शिवाय. *conj.* unless. असें नाहीं तर, शिवाय.

**Excep'tion**, *n.* ( इक्से'प्शन् )—excepting; thing or case excepted; objection; slight anger or resentment. वगळलेली वस्तु; अडथळा, अपवाद; रोष. *To take exception to*, to object to, to disagree with, to be angry at. हरकत घेणं, रागावणें. *With the exception of*, except. शिवाय, खेरीज करून.

**Excep'tional**, *a.* ( इक्से'प्शनल् )— forming an exception; unusual, better than usual. अपवादात्मक; असाधारण, विशेष, अलौकिक.

**Excerpt'**, *v. t.* ( इक्स'र्प्ट् )—to extract, to quote ( a passage from a book ). पुस्तकांतील उतारा घेणें. *n.* a short interesting passage taken out of a book. ( पुस्तकांतील ) उतारा, वेंचा. *-ion, n.*

**Excĕss'**, *n.* (इक्से'स्)—the fact of exceeding; the amount by which a thing exceeds; unreasonable indulgence. अतिशय; वाजवीहून अधिक; अतिरेक, बेसुमारपणा. *Excesses*, too much eating and drinking. खाण्याचा किंवा पिण्याचा अतिरेक. *In excess of*, more than. ० च्या पेक्षां अधिक, जास्त.

**Excĕss'ive**, *a.* (इक्से'सिव्ह्)—overmuch, immoderate. अतिशय, फाजील, बेसुमार, कमालीचा.

**Exchānge'**, *n.* (इक्स्चें'ज्)—giving one thing and receiving another in its place; the mode of settling debts without use of money; the building where merchants assemble for trade. अदलाबदल; हुंडी; सराफबाजार. *v. t. & i.* to give something and receive something else for it, to give in exchange; to interchange. अदलाबदल करणें, विनिमय करणें; आपसांत बदलणें. *Exchan'geable*, *a.* capable of being exchanged. अदलाबदल करतां येण्याजोगा. *Exchangeabi'lity*, *n.*

**Exchĕq'uer**, *n.* (एक्स्चे'कर्)—national treasury; money of private persons. राष्ट्रीय खजिना; खाजगी द्रव्य.

**Excīse'**, *v. t.* (एक्सा'इझ्)—to cut out or off. तोडून टाकणें, कापून निराळा करणें, कापणें.

**Excĭ'sion**, *n.* (एक्सि'झन्)—the act of cutting out or off; a part cut out. कापून काढणें छेदन; कापून काढलेला भाग. [L. *ex*, out & *caedere*, to cut]

**Excīse'**, *n.* (एक्सा'इझ्)—duty charged on certain home goods, such as wine and strong drink. देशी मालावर ठेवलेला कर, अन्तर्गत मालावरील जकात.

**Excī'tāble**, *a.* (एक्सा'इटेबल्)—capable of being excited, easily stirred up. उत्तेजनीय, शीघ्रकोपी, चिडखोर.

**Excitā'tion**, *n.* (एक्साइ-टे'शन्)—exciting, rousing; stimulation. उत्तेजन, संताप; उद्दीपन.

**Excīte'**, *v. t.* (इक्सा'इट्)—to set in motion; to stir up; to stimulate to activity; to move to strong emotion. जागृत करणें; चेतविणें; उत्पन्न करणें; उद्दीपित करणें.

**Excīte'mĕnt**, *n.* (इक्सा'इट्-मेन्ट्)—agitation; excited state of mind. खळबळ; क्षुब्ध मनःस्थिति, मनःक्षोभ.

**Exclaim'**, *v. i. & t* (एक्स्क्ले'म्)—to cry out suddenly, to utter with vehemence, to shout. मोठ्यानें ओरडून बोलणें, उद्गारणें.

**Exclamā'tion**, *n.* (एक्स्क्लमे'शन्)—a loud utterance, a vehement outcry; clamour. ओरड, आवेशयुक्त उद्गार.

**Exclude'**, *v. t.* (इक्स्क्लू'ड्)—to shut out; to make impossible, to preclude. आंत येऊं न देणें; अशक्य करणें, प्रतिबंध करणें.

**Exclu'sion**, *n.* (एक्स्क्लू'झन्)—act of shutting out or rejecting. बहिष्कृति, अन्तर्भाव न करणें.

**Exclus'ive**, *a.* (एक्स्क्लू'झिव्ह्)—excluding; not inclusive; kept for a special class. सोडून; न धरतां, विशेष, केवळ; विशेष वर्गाकरितां असलेलें.

**Excŏ'gitāte**, *v. t.* (एक्स्-कॉ'जिटेट्)—to think out, to devise. विचार करून योजणें, कल्पना शोधून काढणें. *Excogita'tion*, *n.*; *Excogita'tor*, *n.*

**Excommū'nĭcāte**, *v. t.* (एक्स्कम्यू'निकेट्)—to cut off from a community, to put out of group; to take away the special rights of a member of the Christian Church. बहिष्कार घालणें, वाळींत टाकणें; धर्मांतून घालवून देणें, काढून टाकणें. *Excommunica'tion*, *n.* धर्मबहिष्कार, वाळींत टाकणें. *Excommu'nicator*, *n.*; *Excommun'icative*, *a.*; *Excommu'nicatory*, *a.* बहिष्कारासंबंधीं.

**Ex'crĕment**, *n.* (ए'क्स्-क्रिमन्ट्)—waste matter discharged from bowels, dung, (*often pl.*). अन्नमल, मळ, विष्ठा; शेण. *-al*, *-i'tious*, *aa.* विष्ठेसंबंधीं, अन्नमलविषयक, किट्टरूप.

**Excrĕs'cence**, *n.* (इक्स्क्रे'सन्स्)—an abnormal or morbid outgrowth on animal or vegetable body; (fig.) an incumbrance. (मांस-) वृद्धि, अवाळू, चामखीळ, गंड, गुंज, वांडगूळ; नड, पीडा, इत्यादि. *Excrescen'tial*, *a.*

**Excrĕs'cent**, *a.* (इक्स्क्रे'सन्ट्)—growing abnormally; redundant. (निरुपयोगी) जास्ती वाढणारा; अनावश्यक, फाजील.

**Excrē'ta**, *n.* (एक्स्क्री'टा)—(*pl.*) waste thrown out from body. (शरीरांतून बाहेर टाकला गेलेला) मळ, मलमूत्र, विष्ठा, किट्ट.

**Excrēte'**, *v. t.* (एक्स्क्री'ट्)—(of animals or plants) separate and expel from system (waste matters etc.) विसर्जन करणें, बाहेर टाकणें, मलमूत्र विसर्जन करणें, उत्सर्ग करणें, हगणें. *-tion*, *n.*; *-tive*, *-tory*, *aa.* उत्सर्जक, (मल-मूत्र-) विसर्जक.

**Excru'ciāte**, *v. t.* (इक्स्क्रू'शिएट्)—to pain acutely (person's senses; esp. in *part.* as *adj*); torture mentally. यातना,-तीव्र वेदना-होणें; हाल करणें, पीडा देणें. *-ting*, *a.* यातनाकारक, अति वेदनांचा, प्राणहर. *-tingly*, *adv.*; *-tion*, *n.* (-शिएशन्) यातना, पीडा, दुःख.

**Ex'cŭlpāte**, *v. t.* (ए'क्स्कल्पेट्)—to clear *from* imputation, to regard as innocent. निर्दोषी ठरविणें, दोषमुक्त करणें. *-tion*, *n.*; *-tory*, *a.*

**Excur'rent**, *a.* ( एक्सुक'रन्ट् )—running out; (Bot.) projecting. बाहेर धांवणारा, -पसरणारा; (of blood) धमनीचा; वहिर्वाहक; ऊर्ध्ववर्धक (उ० पोपयीन्चें झाड).

**Excŭr'sion**, *n.* (एक्स्क'र्शन्)—a short journey or trip taken for pleasure; ramble (fig.); a sally; (Astr.) deviation from regular path. (करमणुकीसाठीं केलेली) छोटी सफर, सहल, फेरफटका, पर्यटन, विपर्यातर, बहकणें; स्वारी, हल्ला, चाल; नेहमीच्या भ्रमणमार्गापासून दूर जाणें. *Excursion train*, (कमी दराच्या तिकिटांत) सफरीची (आग०) गाडी. *Excur'sionist*, सफरी, सहल करणारा. *Excur'sional*, *Excursion'-ary*, *aa.*

**Excur'sive**, *a.* (इक्सुक'र्सिव्ह)—digressive. भटकणारा, बहकणारा, स्वैरगामी. *-ly*, *adv.*; *-ness*, *n.*

**Excurs'us**, *n.* (इक्सुक'र्सस्)—(*pl.* *-uses*) detailed discussion of the special point in a book, esp in appendix. परिशिष्ट, पुरवणी.

**Excūse'**, *v. t.* (इक्स्क्यूझ्)—to lessen blame; to forgive; to grant exemption to. सबब सांगणें; क्षमा करणें, माफी करणें, माफी देणें, गय करणें; मोकळीक देणें. *n.* (-स्) an apology; exculpation. माफी, कारण, सबब; सोडवणूक, मुक्तता. *-s'able a.* क्षमार्ह. *-'satory*, *a.* दोषनिवारक.

**Ex'ĕat**, *n* (ए'क्सिअॅट्)—(in schools etc) leave of absence. रजा, तात्पुरत्या रजेची परवानगी.

**Ex'ecrable**, *a.* (ए'क्सिक्रबल्)—abominable. अतिनिंद्य, दुष्ट, तिरस्करणीय. *-ly*, *adv.*

**Ex'ecrāte**, *v. t. & i.* (ए'क्सिक्रेट्)—to express or feel abhorrence for; utter curses. तिरस्कार दाखविणें, -वाटणें; शाप देणें. *-tion*, *n.*, *-tive*, *a.*, *-tory*, *a & n.*

**Exĕc'ūtant**, *n.* (इक्झे'क्यूटन्ट्)—a performer (esp. of music). बजवय्या, वाजवणारा.

**Ex'ecūte**, *v. t.* (ए'क्सिक्यूट्)—to carry out; to perform; to put to death. सिद्ध करणें, बजावणें, अमलांत आणणें, पुरं करणें; उडवणें, गाऊन दाखविणें; देहान्त शासन करणें, शिरच्छेद करणें. *-table*, *a.*

**Execū'tion**, *n.* (एक्सिक्यू'शन्)—executing; skill in performing music; destructive work; seizure of goods for debt; capital punishment. बजावणें, अंमलांत आणणें, संपादन, साधणूक; वाजवण्याचें कौशल्य, हातोटी; (हत्याराची) मारक शक्ति नाश; कर्जासाठीं (मालमत्तेची) जप्ति, (कोर्टाच्या हुकमाची) बजावणी; देहांत शिक्षा. *-er*, *n* शिरच्छेद करणारा, मांग.

**Exĕc'ūtive**, *a.* (एग्झे'क्युटिव्ह्)—concerned with execution esp. of laws and sentences. कायदे वगैरे अंमलांत आणणारें; शासनविषयक. *n.* executive branch of government or of a society. राज्यसूत्रें चालविणारें मंडळ; अंमलबजावणी करणारे अधिकारी, नियामक मंडळ. *The E.*, (U. S.) संस्थानचा गव्हर्नर, सं. संस्थानांचा अध्यक्ष.

**Exĕc'ūtor**, *n.* (इग्झे'क्यूटर्)—a person appointed by testator to execute his will. मृत्युपत्रांत लिहिल्याप्रमाणें व्यवस्था करणारा, मृत्युपत्रव्यवस्थापक; (ए'क्सिक्यूटर्) करणारा, बजावणारा.

**Exegē'sis**, *n* (एक्सिजी'सिस्)—exposition, esp. of scripture. (धर्मशास्त्र-) स्पष्टीकरण, विवरण. *Exeget'ic (al)*, *aa.*; *-ically*, *adv.*

**Exĕm'plar**, *n.* (इग्झे'म्प्लर्)—a model, type. कित्ता, नमुना.

**Exĕm'plarў**, *a.* (इग्झे'म्प्लरि)—fit to be imitated; serving as example. अनुकरणीय; कित्ता घेण्याजोगा; दृष्टान्तादाखल; (Law) दहशत-, जरब, बसविण्याजोगा.

**Exĕm'plifȳ**, *v. t.* (इग्झे'म्प्लिफाय्)—to give or be an example of; to copy. उदाहरण देणें किंवा असणें, उदाहरणानें दाखविणें; नक्कल करणें. *-fication*, *n.*

**Exĕmpt'**, *a.* (इग्झे'म्प्ट्)-free (from), not subject. मुक्त, माफ, मोकळा. *v. t.* to make exempt. माफ करणें, कर वगैरे न घेणें.

**Exĕmp'tion**, *n.* (इग्झे'म्प्शन्)—being exempt, freedom, immunity, privilege. माफी, मोकळीक, सवलत, सोडवणूक, वर्जन.

**Ex'equies**, *n. pl.* (ए'क्सिक्विझ्)—funeral rites. क्रिया, उत्तरकार्य, और्ध्वदेहिक, अंत्यसंस्कार.

**Ex'ercīse**, *n.* (ए'क्सर्साइझ्)—employment (of faculties, &c.); practice; use of limbs (in walking &c.); (task set for) bodily or mental training; (*pl.*) military drill, athletics, etc.; composition set to pupils; act of worship; (*U. S.*) formal programme of events. उपयोग करणें, चालवणें; सराव, अभ्यास, तालीम, मेहनत, व्यायाम; कसरत; लष्करी कवाईत; धडा, पाठ; अनुष्ठान, आचरण; (ठरविलेला) कार्यक्रम. *v. t. & i.* to use; to give exercise to; to take exercise; to perplex, to worry. उपयोग करणें; व्यायाम देणें; विचार करावयास लावणें; व्यायाम घेणें; काळजी किंवा हुरहूर लागणें, छळणूक करणें. *-sable*, *a.*

**Exert'**, *v. t.* (इग्झ'र्ट्)—to exercise; to bring to bear; to put forth. उपयोग करणें; कामीं लावणें; झटणें; वठवून आणणें; करणें; खर्च करणें. *To e. oneself*, strive (*to* do, *for* a thing). मेहनत करणें,-घेणें, झटणें. *-ion*, *n.* परिश्रम, प्रयत्न, प्रयास.

**Exert'ion**, *n.* ( एग्झ'र्शन् )—an effort. उद्योग, प्रयत्न.

**Ex'eünt**, *v. i.* ( ए'क्सेअन्ट् )—( stage direction ) they leave the stage पडद्यांत जातात. *E. omnes*, सर्व पात्रें पडद्यांत जातात. [ L, = they go out ]

**Exfō'liāte**, *v. i.* ( एक्स्फो लिएट् )—to come off in scales or layers. ( साल, त्वचा यांचे ) कळपे गळून पडणें, ( झाडांचे,-सालींचे ) कळपे-तुकडे-उडून जाणें.-*tion*, *n.*

**Exhalā'tion**, *n.* ( एक्सले'शन् )—evaporation ; puff of breath ; short burst ( of anger etc. ) ; mist, vapour. वाफ होऊन जाणें ; उच्छ्वास ; ( रागाचा ) उष्ण श्वास ; बाष्प, धूम.

**Exhāle'**, *v. t. & i.* ( एक्स्हे'ल् )—to give off or be given off in vapour ; to breathe out. वाफ करून सोडणें, वाफ होऊन जाणें, उडून जाणें; श्वास बाहेर टाकणें, उच्छ्वास करणें

**Exhaust'**, *v. t.* ( इग्झॉ'स्ट् )—to draw off ; to consume, to use up ; to empty of contents ; to tire out. काढून टाकणें ; खर्चणें, फडशा करणें ; रिकामा करणें ; वायु-शून्य, -निर्वात, करणें ; दमवणें, शिणविणें, भागवणें. *n.* a passage for exit of used steam etc. ; process of exhausting vessel of air. श्रान्त बाष्प ; पात्रांतून हवा बाहेर काढून टाकण्याची पद्धति. -*ibility*, *n.* ;-*ible*, *a.* थकवून टाकतां येण्यासारखा.

**Exhaus'tion**, *n.* ( इग्झॉ'स्शन् )—exhausting ; total loss of strength ; arrival at a conclusion by eliminating alternatives. संपवून टाकणें, रिकामा करणें ; भागवटा, ग्लानि, क्षीणता ; ( पर्यायांचा पूर्ण विचार करून ) निश्चय करणें, ठाम मत बनविणें.

**Exhaus'tive**, *a.* ( इग्झॉ'स्टिव्ह् )-tending to exhaust; comprehensive. थकवणारा ; परिपूर्ण, सर्वग्राही, निःशेष.-*ly*, adv. ;-*ness*, *n.*

**Exhĭb'ĭt**, *v. t.* ( इग्झि'बिट् )—to display ; to manifest ; to show publicly. दाखविणें, ( निशाणी,-दाखला ) सादर करणें, पुढें ठेवणें, प्रकट करणें ; प्रदर्शनांत मांडणें,-ठेवणें. *n.* a thing exhibited. प्रदर्शनांतील वस्तु, वस्तुसंग्रह ; ( Law ) निशाणी, दाखला, लेख.

**Exhibi'tion**, *n.* ( एक्सिबि'शन् )—show, display ; any public show ( of works of art, etc. ) ; fixed sum given to student for term of years. दाखविणें ; प्रदर्शन, देखावा ; विद्यार्थ्यास मिळणारें वेतन, शिष्यवृत्ति. *To make an e. of oneself*, behave so as to be laughed at. ( मूर्खासारखें वागून ) स्वतःचें हंसें करून घेणें. *The Great E.*, first e. on a large scale, London, 1851. लंडनमधील पहिलें मोठें प्रदर्शन. *Exhibi'tioner*, *n.* a student holding an exhibition. नेमणूक असलेला विद्यार्थी, शिष्यवृत्ति धारण करणारा.

*Exhib'itor*, *n.* ( इग्झि'बिटर् ), प्रदर्शनांत वस्तू ठेवणारा. *Exhibi'tionism*, *n.* देखावा, -भपका-करण्याची प्रवृत्ति ; शरीरावयव उघडे करून दाखविण्याचें वेड.

**Exhĭl'arāte**, *v. t.* ( इग्झि'लरेट् )—to enliven, to make cheerful, to make glad or joyous. उल्हसित किंवा आनंदी करणें, उल्हास आणणें, ( चें ) मनरंजन करणें.-*tion*, *n.* आनंद देणें ; संतोष, उल्हास, आनंदवृत्ति.-*tive*, *a.* ; *Exhil'arant*, *a. & n.* उल्हासजनक, आनंददायक ( वस्तु इ. ).

**Exhort'**, *v. t.* ( इग्झॉ'अर्ट् )-to admonish earnestly ; urge to action ; advocate. आग्रहानें उपदेश करणें, प्रवृत्त करणें, बजावणें ; वळविणें ; पुरस्कार करणें, प्रोत्साहन देणें. -*ative*, -*atory*, *aa.*

**Exhŏrtā'tion**, *nn.* ( एग्झॉर्टे'शन् )—admonition, good advice, homily, counsel. सांगी, कानउघडणी, आग्रहाचा उपदेश, प्रबोधन, जागृति, प्रोत्साहन.

**Exhūme'**, *v. t.* ( एक्स्ह्यू'म् )—to disinter, dig out ( lit. & fig. ). ( पुरलेलें ) उकरून बाहेर काढणें, खणून काढणें, उकरून काढणें.-*mat on*, *n.* उकरणें, उत्खनन. ( L. *ex.* out of ; *humus*, ground ]

**Ex'igence**, -*cy*, *n.* ( ए'क्सि-जन्स् -न्सि )—an urgent need. जरूरी, गरज, ओढ, तारंबळ, अडचण, पंचाईत, आणीबाणीचा प्रसंग, आपत्ति.

**Ex'igent**, *a.* ( ए'क्सिजन्ट् )—urgent ; exacting. निकडीचा, तातडीचा ; ताणाताणीचा, गरजेचा.

**Ex'igible**, *a.* ( ए'क्सिजिबल् )-that may be exacted, ( *against*, *from*, person ). काढून घेण्याजोगा, वसूल करण्याजोगा.

**Exĭg'ūous**, *a.* ( एक्सि'ग्यूअस् )—scanty, small. तुटपुंजा, लहान, अल्प. *Exigu'ity*, *n.*

**Ex'ile**, *n.* ( ए'क्साइल् )—penal banishment ; long absence from one's country ; a banished person. हद्दपारी ; देशत्याग ; हद्दपार केलेला,-दूरदेशीं गेलेला मनुष्य. *v. t.* to banish, to drive from one's country. हद्दपार करणें.

**Exist'**, *v t.* ( इग्झि'स्ट् )—to be, to have being ; to live, to sustain life. चालू राहणें, अस्तित्वांत असणें, जिवंत असणें,-राहणें. -*ent*, *a.* जिवंत असणारा, विद्यमान, चालू.

**Exis'tence**, *n.* ( इग्झि'स्टन्स् )—fact or mode of living ; all that exists. अस्तित्व, चालू स्थिति ; आयुष्य, जीवित; अस्तित्वांत असलेलें सर्व, प्राणी, विद्यमान वस्तु. *In e.*, विद्यमान,-अस्तित्वांत,-चालू असलेला. *Existen'tial*, *a.*

**Ex'it**, *n.* ( ए'ग्झिट् )—going out ; way out ; departure ; death. बाहेर जाणें ; बाहेर जाण्याचा रस्ता ; पडद्याआड जाणें, निर्गमन, निष्क्रमण ; मरण.

*v. i.* (pl. *exeunt*, एʼग्झिअन्ट्). (stage direction) goes off stage. पडद्यांत जातो, निष्क्रान्त (होतो).

**Ex li'bris**, *n.* (एक्स् ला'इब्रिस्)—a book-plate. पुस्तकावरील नांवाची चिठी,-खूण. [L = from library]

**Ex'ŏdŭs**, *n.* (एʼक्सोडस्)—departure. बाहेर जाणें, निर्गत, निर्गमन.

**Ex offi'cio**, *adv.* & *a.* (एक्स् अफि'शिओ)—in virtue of one's office. अधिकारसंबंधीं, हुद्यामुळें करावयाचा,-झालेला अधिकार-परत्वें, हुद्याच्या नात्यानें.

**Exŏg'amy̆**, *n.* (एग्झॉ'गमि)—custom compelling a man to marry outside his tribe. असगोत्र विवाह (चाल). *Exog'amous*, *a.*

**Exo'genous**, *a.* (एक्सॉ'जिनस् )—(Bot.) growing outside. बाह्यवर्धक (झाड, उ० आंबा, फणस).

**Exŏn'erāte**, *v. t.* (इग्झॉ'नरेट्)—to free from blame; to exculpate; release (from duty). दोषमुक्त करणें; दोष उडवणें, जबाबदारींतून मुक्त करणें.-*tion*, *n.*

**Exŏrb'ĭtant**, *a.* (इग्झॉ'अर्बिटन्ट्)-grossly excessive; extravagant, enormous. बेसुमार; अमर्याद, भारी, कमालीचा, अनियमित -*nce*, *n.*;-*ly*, *adv.*

**Ex'ŏrcīze**, *v. t.* (एʼक्सॉअर्साइझ्)—to expel (evil spirit) by invocation &c. भूत घालवून देणें, भूतबाधा नाहींशी करणें. -*ism*, *n.*; -*ist*, *n.* पंचाक्षरी, मांत्रिक.

**Exŏrd'ĭŭm**, *n.* (एक्सॉ'अर्डिअम्)—an introductory part of a discourse or treatise. उपोद्घात, उपन्यास, आरंभ *Exord'ial*, *a.*

**Exotĕ'rĭc**, *a.* (एक्सटे'रिक्)—(of doctrines etc.) intelligible to outsiders; (of disciples) not admitted to esoteric teaching; ordinary, popular. सार्वजनिक, उत्तान; रहस्यबाह्य. गुह्योपदेशबाह्य (शिष्य): सामान्य, सुलभ. *Exote'rics*, *n. pl.* ॲरिस्टाटलचीं जाहीर व्याख्यानें.

**Exŏt'ĭc**, *a.* (इग्झॉ'टिक्)—introduced from abroad. परदेशी, विलायती. *n.* परदेशी-विलायती-झाड, चालरीत, इ.

**Expănd'**, *v. t.* & *i.* (इक्स्पॅ'न्ड्)—to spread out; to develop *into*; to increase, swell in bulk, become genial. पसरणें, विस्तारणें; वाढवणें, लांबवणें, विस्तार करणें, (Math.) विस्तार करणें; मोठा करणें, वाढणें, खुलणें, उमलणें. [L. *ex*, out; *pandere pans*, spread]

**Expănse'**, *n.* (इक्स्पॅ'न्स्)—wide area or extent; expansion. मोठा विस्तार, सपाटी, तळपट, अवाढव्य मैदान; विस्तार. -*sible*, *a.* पसरतां येण्याजोगा, प्रसारणीय. -*sibility*, *n.* प्रसरणशीलता.

**Expăn'sile**, *a.* (इक्स्पॅ'न्साइल्, -सिल्)—(capable) of expansion. प्रसरणाचा, विस्तारयोग्य.

**Expăn'sion**, *n.* (इक्स्पॅ'न्शन्)—the act of expanding; space; (Com.) extension of transactions; increase in bulk of steam in the cylinder of an engine. प्रसरणें, फैलाव, वृद्धि; अवकाश, जागा; (देवघेवीचा, व्यापाराचा) फैलाव, वृद्धि. (Math.) विस्तार, विस्तृत रूप; (इंजिनाच्या नळकांड्यांतील) वाफेच्या परिमाणाची वाढ. *E. of the currency*, चलनी नाण्यांची-चलनाची वाढ,-वृद्धि, चलनवृद्धि. -*ist*, *n.* चलनवृद्धीचा पुरस्कर्ता. *Triple-e. engine*, तीन नळकांड्यांतून वाफ पसरणारें यंत्र. *Cubical e*, घनप्रसरण.

**Expăn'sĭve**, *a.* (इक्स्पॅ'न्सिव्)—able or tending to expand; extensive; genial; comprehensive. प्रसारशील, प्रसरणशील; विस्तृत; सौम्य; व्यापक. -*ly*, *adv.*; -*ness*, *n.*; -*vity*, *n* प्रसरणशीलता.

**Ex part'e**, *adv* & *a.* (एक्स् पा र्टि)—(Law) on or in the interest of one side only; (*a exp.*) made thus. एकपक्षी, एकतर्फी; एकतर्फी केलेलें. *An ex.-p. statement*, एकतर्फी विधान. [L]

**Expā'tĭāte**, *v. i.* (इक्स्पे'शिएट्)—to wander, to move at large, to speak or write copiously (on). वाहवत जाणें, चहूकडे; विस्तारानें बोलणें किंवा लिहिणें, विषय वाढविणें, विस्तृत विवेचन करणें. -*tion*, *n.*; -*tory*, *a.*

**Expăt'rĭāte**, *v. i.* (इक्स्पॅ'ट्रिएट्)—to banish; (*reflex.*) emigrate; renounce citizenship. हद्दपार करणें, देशांतर करणें; नागरिकत्वाचे हक्क सोडणें. -*tion*, *n.* [L *ex*, out; *patria*, fatherland]

**Expĕct'**, *v. t.* (इक्स्पे'क्ट्)—to reckon on, to anticipate; to look for; to suppose, think. अपेक्षा करणें; वाट पाहणें, मार्गप्रतीक्षा करणें; कल्पना करणें, अटकळ करणें. -*ancy*, *n.* अपेक्षा, अटकळ, संभव.

**Expĕc'tant**, *a.* (इक्स्पे'क्टन्ट्)—expecting (*of*); looking for; (Med) characterized by waiting for events; (Law) reversionary. अपेक्षा करणारा; वाट पाहणारा; अगदीं थोड्याच वेळां औषध देऊन रोग आपोआप बरा होऊं देणारी (चिकित्सा), परिणामापेक्षी; अन्यभोगोत्तरप्राप्य. *n* आशा करणारा. उमेदवार.

**Expĕctā'tion**, *n.* (एक्स्पेक्टे'शन्)—anticipation; what one expects; probability. अपेक्षा, अंदाज, अटकळ; अपेक्षित वस्तु; संभव; (*n. pl.*) वारसा हक्काचा संभव.

**Expĕc'torant**, *a.* & *n.* (इक्स्पे'क्टरन्ट्)—(medicine) which promotes expectoration. कफ पाडणारें, कफोद्धारक (औषध).

**Expĕc'torāte**, *v. t.* & *i.* (इक्स्पे'क्टरेट्)—to cough or spit out from chest or lungs. थुंकून टाकणें,

खोकून खोकून कफ बाहेर पडणें, -पाडणें, उत्सर्ग करणें, थुंकणें. *-tion, n.; -tor, n.* [L. *ex*, & *pectus -oris*, breast]

**Expe'dient,** *a.* (एक्स्पी'डिअन्ट्)—suitable, advantageous, advisable; more politic than just. योग्य, लायक; उपयुक्त. *n.* contrivance, device. उपाय, युक्ति, साधन, सोय, तोड. *-nce, -ncy, nn.*; *-ly, adv.*

**Ex'pedite,** *v. t.* (ए'क्स्पिडाइट्)— to help on or facilitate the progress of, to dispatch, to hasten, to quicken, to accelerate. त्वरा करण्यास लावणें, पळत पाठवणें, त्वरित करणें, शीघ्रगतीनें उरकणें.

**Expedi'tion,** *n.* ( एक्स्पिडि'शन् )— promptness, dispatch; (men, fleet, sent on) journey or voyage for some definite purpose. चपळाई, त्वरा, घाई, जलदी; आक्रमण, कूच, मोहीम, मोहिमेवर पाठविलेलें सैन्य, आरमार. *-ary, a.* स्वारीचा, मोहिमेसंबंधीं. *-ist, n.*

**Expedi'tious,** *a.* (एक्स् पिडि'शस् )—done or doing speedily; suited for speedy performance त्वरेनें केलेला, -करणारा, -होणारा; त्वरेचा, घाईचा, तातडीचा. *-ly, adv.*; *-ness, n.*

**Expel',** *v. t.* (इक्स्पे'ल्)—to throw out, to eject, to drive out, to force to leave. बाहेर घालवणें, हांकून देणें, काढून टाकणें. *Expel'lent, a.*

**Expend',** *v. t.* ( इक्स्पे'न्ड् )—to spend (money, time, care); to use up, to consume; (Naut.) wind spare rope round spar. खर्च किंवा व्यय करणें; खलास करणें, संपविणें; जादा दोरखंड गुंडाळून ठेवणें.

**Expen'diture,** *n.* ( इक्स्पे'न्डिचर् )— expending; amount expended, disbursement. खर्च करणें; खर्च केलेली रक्कम, खर्च, व्यय.

**Expense',** *n.* (इक्स्पे'न्स्)—cost, charge. किंमत, खर्च, (*pl.*) खर्च, गुंतवलेला पैसा. *A laugh at his e.*, त्याचें हंसें होणें, त्याला हंसणें.

**Expen'sive,** *a.* (इक्स्पे'न्सिव्)—costly; extravagant. खर्चाचा, महाग, फार किंमतीचा; खर्चिक, उधळपट्टीचा. *-ly, adv.*; *-ness, n.*

**Exper'ience,** *n.* ( इक्स्पी'अरिअन्स् )—knowledge based on personal observation or contact; incident that affects one. अनुभव, स्वानुभव, प्रयोगपरीक्षा, प्रयोगज्ञान; प्रचीति, भोग. *v. t.* to find by experience, to suffer, to undergo. अनुभव घेणें, निदर्शनास येणें; सोसणें. *Experien'tial, a.* of experience. अनुभवाचा, अनुभवजन्य, प्रतीतीचा; *-ism, n.* अनुभवजन्य ज्ञानवाद.

**Exper'ienced,** *a.* (इक्स्पी'अरिअन्स्ट्)—having got much experience; knowing. अनुभवलेला, अनुभवशीर, अनुभविक; ज्ञाता, वाकबगार.

**Expe'riment,** *n.* ( इक्स्पे'रिमन्ट् )—procedure tried on the chance of success or as a test. पारख, अनुभव, परीक्षा, प्रयोग. *v. i.* ( -मेन्ट् ) to make an experiment (*on, with*). प्रयोग करून पाहणें, प्रयोग,-परीक्षा करणें. *-ation, n.*

**Experimen'tal,** *a.* ( इक्स्पेरिमे'न्टल् )—based on or done by way of experiment. प्रयोगासंबंधीं, अनुभवजन्य, प्रयोगात्मक, परीक्षात्मक *-ist, n.* प्रयोग करून,-अनुभव घेऊन,-पाहणारा. *-ize, v. t.* to try experiments. प्रयोग करून पाहणें.

**Expert',** *a.* ( इक्स्प'र्ट् )—practised, skilful, (*at, in*). कुशल, प्रवीण, कसबी. *n.* ( ए'क्स्पर्ट् ), a person expert in a subject. अनुभवशीर, वाकबगार, -मनुष्य, चतुर पारखी.

**Ex'piate,** *v. t.* ( ए'क्स्पिएट् )—to pay the penalty of, to make amends for (sin). प्रायश्चित्त घेणें, पापक्षालन करणें, निस्तरणें. *-tion, n.* प्रायश्चित्त घेणें, प्रक्षालन, परिमार्जन. *-tor, n.* प्रायश्चित्त घेणारा, निस्तरणारा. *-tory, a.* परिमार्जक, प्रायश्चित्तात्मक. *Ex'piable, a.* प्रायश्चित्त घेण्याजोगें, परिमार्जनीय.

**Expire',** *v. i. & t.* ( इक्स्पा'यर् )—to breathe out; to die; (of fire) to die out; (of period) to come to an end; (of law etc.) become void, or extinct. श्वास बाहेर सोडणें,-टाकणें; मरणें; विझणें; संपणें, शेवट किंवा अंत होणें, संपविणें; मुदत पुरी होणें,-संपणें. *Expira'tion, n.* (एक्स्पिरे'शन्), बाहेर सोडणें, उच्छ्वसन, निःश्वास; शेवट, अंत. *Expir'atory, n.* ( इक्स्पा'इरटरि ), उच्छ्वाससंबंधीं.

**Expir'y,** *n.* (इक्स्पा'यरि)—termination, end. शेवट, अंत, समाप्ति, मुदत संपणें.

**Expis'cate,** *v. t.* ( एक्स्पि'स्केट् )—( Sc. ) to find out by skilful means. (शिताफीनें, खुबीनें,) शोधून काढणें.

**Explain',** *v. t.* ( इक्स्प्ले'न् )—to make known; to make intelligible; to account for (conduct etc.). समजावून सांगणें, विवरण करणें; उलगडा करणें, अर्थ स्पष्ट करणें; कारण सांगणें, जाब देणें. *To e. away*, to modify or do away with (esp. offensive language) by explanation. (लागट भाषेचा-शब्दांचा) खुलासा करणें,-स्पष्टीकरण करणें. *To e. oneself*, स्वतःचें म्हणणें अधिक स्पष्ट करून सांगणें. वागणुकीचा जाब देणें. *-able, a.* व्याख्येय, उलगडा करण्याजोगा. [L. *ex*, out; *planus*, flat]

**Explana'tion,** *n.* ( एक्स्प्लने'शन् )—statement or circumstance that explains. स्पष्टीकरण, विवरण, खुलासा करणारी गोष्ट, खुलासा, समजूत.

**Explan'atory,** *a.* ( इक्स्प्लॅ'नेटरि )-serving to explain. उलगडा करणारा, अर्थ स्पष्ट करणारा, विवरणात्मक, अर्थबोधक.

Explē'tive, *a.* & *n.* ( एक्स्प्ली'टिव्ह्, इक्स्प्ली'टिव्ह् )—serving to fill out sentence &c. पादपूरण, वाक्यपूरक शब्द,-( शपथ ).

Ex'plicable, *a.* ( ए'क्स्प्लिकबल् )—explainable. समजण्यासारखा, व्याख्येय, अर्थ समजून सांगण्याजोगा.

Ex'plicāte, *v. t.* ( ए'क्स्प्लिकेट् )—*to* develop (idea, principle, etc.). विवरण करणें, उलगडा करणें. *-tive, -tory, a.* विवरणात्मक.

Expli'cit, *a.* ( इक्स्प्लि'सिट् )—expressly stated; (of persons) outspoken, plain in language; definite. अगदीं स्पष्ट, उघड, स्वच्छ, बिनभानगडीचा; निर्भीड, स्पष्टवक्ता; ठराविक, निश्चित.

Explōde', *v. i.* & *t.* (इक्स्प्लो'ड्)—*to* discredit; to go off with loud noise, to burst with a report and sudden violence. अपकीर्ति करणें, निरुपयोगी म्हणून धुडकावून लावणें; मोठा आवाज करून फुटणें, भडका होणें, स्फोट होणें.

Ex'ploit, *n.* (ए'क्स्प्लॉइट्)—a brilliant feat, a heroic act, a deed of renown. पराक्रम, शूर कृत्य, महत्कृत्य. *v. t.* ( इक्स्-प्लॉ'इट् ) to work (a mine etc); to utilize for one's own ends. उपयोगांत आणणें, चालू करणें; स्वार्थाकरितां अयोग्य रीतीनें नफा मिळविणें, अवास्तव उपयोग करणें. *-ation, n.*; *-able, a.* उपयोगी, फायदेशीर. *-age, n.*

Explōre', *v. t.* (इक्स्प्लो'अर्)—to examine (country) by going through; examine (wound) by touch; to inquire into. शोध करणें, शोधून काढणें, संशोधन करणें; (जखम) स्पर्श करून तपासणें; तपास करणें,-लावणें. *-ration, n.* शोध, संशोधन; *-rative, a., -ratory, a.*; *Explor'er, n.* शोधक; शोध (लावण्याचें) साहित्य.

Explō'sion, *n.* (इक्स्प्लो'झन्)—going off with loud noise; outbreak (of anger). आवाज होऊन फुटणें; स्फोट, भडका, धडाका.

Explō'sive, *a.* (इक्स्प्लो'सिव्ह्)—tending to explode, readily exploding. स्फोटक (द्रव्य), दार,-स्फोट होऊन उडणारा. *n.* an explosive agent or material. सुरुंग, दारू, स्फोटक पदार्थ, -वस्तु,-द्रव्य. *-ly, adv., -ness, n., High e.* भयंकर स्फोटक वस्तु, -सुरुंग, इ.

Expō'nent, *a.* & *n.* ( इक्स्पो'नन्ट् )—( a person, thing ) that explains or interprets; executant (of music etc.); a type, representative; algebraic symbol, index. द्योतक, निदर्शक (चिन्ह), उदाहरण, दाखला, निशाणी; (गाणें, वाद्य) गाणारा, वाजवणारा; (बीजगणितांत) घातचिन्ह, घात. *-ial, a.* घातप्रकारासंबंधीं; *n.* घातफल.

Export', *v. t.* ( इक्स्पॉ'र्ट् )—to send goods to another country. ( विक्रीसाठीं ) माल दुसऱ्या देशांत पाठविणें, परदेशीं पाठविणें. *n.* (ए'क्स्पॉर्ट्) an exported article; (*usu. pl.*) the amount exported. परदेशीं (विक्रीसाठीं) पाठविलेली वस्तु, निर्यात माल, निर्गत माल, -व्यापार. *-ation, n.* परदेशीं माल पाठविणें, निर्यात; निर्यात माल. *-able, a. Export duty,* निर्यात मालावरील कर,-जकात.

Expōse', *v. t.* (इक्स्पो'झ्)—to leave unprotected; to subject to (risk, criticism &c.); (Photog.) subject (plate) to light; exhibit for sale; disclose (secret), unmask (villain). उघडा टाकणें, उघड्यावर टाकणें, धोक्यांत घालणें, बिंग करणें; (फोटो०) चित्रपट (प्लेट) प्रकाशांत ठेवणें; विक्रीकरितां ठेवणें; उघडकीस आणणें, उघडा करणें, (बिंग) चव्हाट्यावर आणणें.

Expo'sé, *n.* ( एक्स्पो'झे )—statement of facts; showing up (of a discreditable thing). वस्तुस्थितिनिदर्शन; उघडकीस आणणें, उघडीक. [F]

Exposi'tion, *n.* ( एक्स्पोझि'शन् )— description, explanation; exhibition of goods; exposure. वर्णन, स्पष्टीकरण; प्रदर्शन; प्रकाशदर्शन, उघड्यावर ठेवणें.

Expŏs'itor, *n.* (इक्स्पॉ'झिटर्)—a person, thing, that expounds. टीकाकार, व्याख्याकार, विवरणकर्ता. *-y, a.* स्पष्टार्थबोधक, टीकात्मक. *Expos'itive, a.* वर्णनात्मक; स्पष्टार्थबोधक.

Ex pōst făc'tō, *a.* ( एक्स् पोस्ट् फॅ'क्टो )—( *-law* ), retrospective. गुन्हा घडल्यानंतर त्या अपराधास शिक्षा देण्यासाठीं केलेला (कायदा). [L]

Expŏs'tūlāte, *v. i.* ( इक्स्पॉ'स्ट्युलेट् )—to make (*esp.* friendly) remonstrance. कानउघाडणी करणें, समजुतीच्या चार गोष्टी सांगणें, निर्भीड उपदेश करणें. *-tion, n.* कानउघाडणी, खरमरीत उपदेश. *-tor, n.* कानउघाडणी करणारा. *-tory, a.* कानउघाडणीचा.

Expō'sure, *n.* ( इक्स्पो'झर् )— being exposed, exposing (*to* air, cold etc.); abandoning; display; unmasking; an aspect. उघडा पडणें, -करणें, -टाकणें, (*Phot.*) उजेडांत ठेवणें, उजेडप्रकाश देणें; त्याग, टाकून देणें; प्रदर्शन, मांडणावळ; उघडें करणें, उजेडांत आणणें; देखावा, दृश्य.

Expound', *v. t.* (इक्स्पा'उन्ड्)—to set forth in detail; to explain; to interpret. सविस्तर सांगणें; उघड किंवा स्पष्ट करणें; विवरण किंवा स्पष्टीकरण करणें (धर्मशास्त्राचें).

Expréss', *v. t* (इक्स्प्रे'स्)—to represent in words, to make known; squeeze out; omit; send by express. शब्दांनीं बोलून दाखविणें, व्यक्त करणें; विदित करणें, कळविणें; पिळून काढणें, बाहेर टाकणें; खास जासुदाबरोबर पाठविणें. *a.* definitely stated, explicit; meant for specia

purpose. स्पष्ट, उघड; खास. *n.* express train; messenger; an express rifle. जलद जाणारी आगगाडी; मुद्दाम पाठविलेला जासूद; जलद गोळ्या सोडणारी बंदूक. *adv.* with speed. घाईनें, ताबडतोबीनें, जलदीनें. *E. train,* जलद गतीची आगगाडी. *E. delivery,* पत्राचा जलद बटवडा. *Express'ly, adv., Express'ible, a.* उच्चारणीय.

**Exprĕ'ssion,** *n.* (इक्स्प्रे'शन्)—expressing; word, phrase; aspect of face; tone; style; (Alg.) collection of symbols expressing a quantity; (Art) mode of expressing character, etc.; (Mus.) execution that expresses the feeling. बोलणें, व्यक्त करणें, बोलून दाखविणें, पिळून काढणें; शब्द, शब्दसमूह; मुद्रा, चेहरा; बोलणें; बोलण्याची वगैरे (मनांत भरण्याजोगी) ढब; पदसमुच्चय, पदसंघात, पदावलि; मुद्रा, ठेवण; (भावना-) परिपोष, -उठाव. *-al, a.* अर्थसूचक, कल्पनासूचक, मुद्रेसंबंधीचा, शब्दसमूहाचा. *-less, a.*

**Exprĕss'ive,** *a.* (इक्स्प्रे'सिव्ह्)—serving to express; significant. वाचक, बोधक; सूचक. *-ly, adv.; -ness, n.*

**Exprō'priāte,** *v. t.* (एक्स्प्रो'प्रिएट्)—to disposses, to take away. मालकी- ताबा- काढून घेणें.

**Expŭl'sion,** *n.* (इक्स्प'ल्शन्)—expelling, driving away by violence; banishment. काढून टाकणें, उच्चाटन; हद्दपारी. *-sive, a. & n.* (Med.) निष्कासक, निःसारक.

**Expŭnge',** *v. t.* (इक्स्प'न्ज्)—to remove, to omit. खोडून टाकणें, पुसून टाकणें, गाळणें, काट मारणें, नष्ट करणें. *Expunc'tion, n.* विलोप, नाश, रद्द करणें, पुसून टाकणें.

**Ex'purgāte,** *v. t.* (ए'क्स्पर्गेट्)—to purge, purify; remove objectionable matter (from book etc.). शुद्ध करणें, सोवळा करणें; आक्षेपार्ह भाग गाळून-काढून टाकणें. *tion, n.* विशुद्धीकरण, शोधन. *-tor, n.* शुद्ध, पवित्र करणारा. *Ex'purgatory, -tor'ial, aa.* पावक, विशुद्धकारक.

**Ex'quisite,** *a.* (ए'क्स्-क्विझिट्)—of extreme beauty or delicacy; acute, keen. अत्युत्तम, फार नामी, सर्वोत्कृष्ट; पराकाष्ठेचा, अतिशय, चिकित्सक, सूक्ष्म-दृष्टीचा *n.* a coxcomb, a fop. नटवा, अक्कडबाज. *-ly, adv.* बहारीनें, सुंदरपणें, पराकाष्ठेचा.

**Exsan'guine,** *a.* (एक्स्सॅं'ङ्ग्विन्)—lacking blood. रक्तहीन, रक्तविरहित. *-nate, v. t.* to drain of blood. रक्त शोषून घेणें, रक्तहीन करणें.

**Exscind',** *v. t.* (इक्सिं'ड्)—to cut off, excise. तोडून टाकणें, कापून निराळा करणें.

**Exsert',** *v. t.* (इक्स'र्ट्)—(Biol.) to put forth. बाहेर टाकणें.

**Ex-ser'vice,** *a.* (एक्स्-स'र्व्हिस्)—that has been formerly in fighting services. लष्करी-सेवानिवृत्त.

**Ex'siccāte,** *v. t.* (ए'क्सिकेट्)—to dry up, drain, dry. कोरडा करणें, ओलावा नाहींसा करणें.

**Ex'tant,** *a.* (ए'क्स्टन्ट्, इक्स्टॅ'न्ट्)—still existing, in being, now subsisting. अद्याप अस्तित्वांत असलेला, वर्तमान, चालू, प्रचलित.

**Extĕm'porė,** *adv. & a.* (इक्स्टे'म्पोरि)—without preparation, off-hand. तयारी न करतां, आयत्या वेळीं, आयत्या वेळचा, समयस्फूत *-ra'neous, -rary, aa.* प्रसंगीं सुचलेला, आयत्या वेळचा, समयस्फूर्त.

**Extĕm'porize,** *v. t. & i.* (इक्स्टे'म्पराइझ्)—to compose, or produce, or speak extempore. आयत्यावेळीं रचणें, -तयार करणें, -बनविणें; पूर्वतयारी-विना-समयस्फूर्त-भाषण करणें. *-zation, n.*

**Extĕnd',** *v. t. & i.* (इक्स्टे'न्ड्)—to stretch out; to reach; to prolong; to enlarge; accord to; tax the powers of; (Law) value (land), seize (land) for debt. पसरणें; ०पर्यंत असणें; लांबविणें, पुढें ढकलणें; वाढविणें; लागू करणें, पुढें करणें; अर्पण करणें, देणें, दाखविणें; ताण पाडणें, -पडणें; (कर्जासाठीं) जमिनीची किंमत करणें, जमीन ताब्यांत घेणें. *Extend'ible, a.; Exten'sible, a.* पसरलेला, विस्तारित, विस्तार्य, प्रसार्य; *-bility, n.*

**Extĕ'nsile,** *a.* (इक्स्टे'न्साइल्,-न्सिल्)—that can be enlarged or stretched out. वाढवितां-लांबवितां-येण्याजोगा.

**Extĕn'sion,** *n.* (इक्स्टे'न्शन्)—extending; enlargement, additional part पसरणें; विस्तार, व्याप्ति; फैलाव; (Physics) प्रसरणशीलत्व, विततिः; (Commerce) वाढवलेली मुदत.

**Extĕn'sive,** *a.* (इक्स्टे'न्सिव्ह्)—large, far-reaching, wide, comprehensive प्रशस्त, विशाल; लांबरुंद; व्यापक, पसाऱ्याचा *-ly, adv.; -ness, n.*

**Extĕn'sor,** *n.* (इक्स्टे'न्सर्)—(*-muscle*), a muscle that straightens a joint. वितानक,-प्रतानक-पेशी,-स्नायु.

**Extĕnt',** *n* (इक्स्टे'न्ट्)—space covered; large space or tract; size. विस्तार; विस्तृत जागा; आकार, मर्यादा, व्याप्ति; (Law) किंमत, आकार.

**Extĕn'ŭate,** *v. t.* (इक्स्टे'न्युएट्)—to lessen; to mitigate. कमी करणें, हलका करणें, सौम्य स्वरूप देणें, सबब सांगणें. *-tion, n.; -tor, n.*

**Extēr'ior,** *a.* (इक्स्टी'अरिअर्)—external, not interior, outer, outward. बाहेरचा, बाहेरील, बाह्य. *n.* बाह्य देखावा, बाह्यस्वरूप, बाह्यांग.

**Exterm'ināte,** *v. t.* (इक्स्ट'र्मिनेट्)—to root out, to destroy utterly, to extirpate. समूळ उपटून टाकणें, निसंतान करणें, समूळ नाश करणें, अंत करणें. *-tion, n.; -tor, n.*

**Extern'al**, *a.* ( इक्स्ट'र्नल् )—outside; outward. बाहेरील, बाह्यदेशीय; बाह्य, दृश्य, आनुषंगिक. *n. pl.* non-essentials, outward features. अनावश्यक गाष्टी, अवांतर गोष्टी, बाह्यांग, बाह्यरूप. *Exter'nalism*, *n.* इंद्रियगोचरता; बाह्यवस्तुविज्ञानवाद *External'ity*, *n.* बाह्यता. *Externa'lly*, *adv.* बाहेरून, वरून, बाह्यतः.

**Extern'alize**, *v. t.* ( इक्स्ट'र्नलाइझ् )—to give, to attribute, external existence to. आकार,-रूप, देणें.

**Extĕrritor'ial**, *a.* (एक्स्टेरिटॉ'अरिअल् )—(*of ambassadors etc.*) free from the jurisdiction of the territory one resides in. प्रांतीय-देशीय-अंमलाबाहेरचा, देशीय कायदेकानू लागू न होणारा.

**Extinct'**, *a.* ( एक्स्टि'ङ्क्ट् )—no longer burning, quenched; that has died out. मालवलेला, विझलेला, रूक्ष, निद्रिस्त; मयत, निर्वंश; लुप्त.

**Extinc'tion**, *n.* ( इक्स्-टिं'क्शन् )—making or becoming extinct; wiping out ( of debt ); destruction. मालवणें, नाहींसा करणें, -होणें; (कर्ज) फेड; नाश, उच्छेद, विध्वंस. *Extinc'tive*, *a.*

**Exting'uish**, *v. t.* (एक्स्टिं'ग्विश् )—to put out, to quench; to obscure, eclipse; to wipe out (debt). मालवणें, शांतवणें; मागें टाकणें, वर ताण करणें; नाहींसें करणें; फेडणें. *-er*, *n.* a cap for extinguishing candle. मेणबत्ती विझविण्याची टोपी, -चें साधन. *-able*, *a.*; *-ment*, *n.* मालवणें, नाश, विध्वंस; (Law) अधिकारलोप, कर्तव्यलोप.

**Ex'tirpāte**, *v. t.* ( ए'क्स्टर्पेट् )—*to root out, to destroy utterly, to eradicate.* उपटून टाकणें, समूळ नाहींसें करणें, निर्मूलन करणें, पाळेमुळें खणून काढणें. *-tion*, *n.* उच्छेद, नाश, निर्मूलन. *-tor*, *n.* [ L *ex*, out ; *stirps*, stem, root ]

**Extŏl'**, *v. t.* (इक्स्टॉ'ल्)—to praise enthusiastically, to laud, to commend. मनापासून स्तुति करणें, वाखाणणें.

**Extŏrt'**, *v. t.* ( इक्स्टॉ'र्ट् )—to get by force, to exact by compulsion *(from)*. जबरीनें घेणें, पिळून काढणें, ओढून ताणून ( अर्थ ) लावणें. *-ive*, *a.*

**Extŏr'tion**, *n.* ( इक्स्टॉ'र्शन् )—extorting ( esp. of money ); illegal exaction. बळजबरीनें घेणें, अन्यायानें बळकावणें, पिळून काढणें; बेकायदेशीर रीतीनें वसूल करणें. *-er*, *n.*; *-ate*, *a.* using, given to, extortion; ( of prices ) exhorbitant. अन्यायी, जुलमाचा, जुलमी; बेसुमार, भरमसाट (किंमती इ.)

**Ex'tra**, *a.* ( ए'क्स्ट्रा )—beyond what is due, additional; larger, better, of superior quality. जास्त; अधिक, अधिक चांगला, अत्युत्तम, उत्कृष्ट. *adv.* more than usually; additionally. नेहमींपेक्षां जास्त; ज्यादा, अधिक *n.* an extra thing; thing charged extra; ( Crick. ) a run not scored off bat. ज्यादा वस्तु, ज्यादा आकार पडणारी गोष्ट, -वस्तु; इतर धांव. *E. binding*, विशेष चांगल्या तऱ्हेची बांधणी. *E. special edition*, latest. (संध्याकाळच्या वर्तमानपत्राची) शेवटची -ज्यादा -आवृत्ति.

**Extrăct'**, *v. t.* ( इक्स्ट्रॅ'क्ट् )—to take out; draw forth; to copy out, to quote; deduce, derive ( principle, pleasure *from* ); ( Math.) find ( root of a number ). उपटून काढणें, उत्पाटन करणें, काढून घेणें; उतारा घेणें; उतारा काढणें, - देणें; मिळणें, मिळविणें; (संख्येचें मूळ ) काढणें. *n.* ( ए'क्स्ट्रॅक्ट् )— essence; concentrated preparation; passage *from* book, &c. अर्क, सार, काढा, कषाय; वेंचा, सार, उद्धृत भाग. *-or*, *n.*; *-able*, *a.*

**Extrăc'tion**, *n.* (इक्स्ट्रॅ'क्शन् )—extracting; descent, lineage, origin, birth. काढणें, उपटणें; वंश, कुळ, जन्म, जाति. *Extrac'tive*, *a.* of extraction. बाहेर काढतां येण्यासारखा, निष्कर्षोपयोगी. *E. industries*, अर्क,-सार,-कषायोत्पादक उद्योगधंदा, -कारखाना.

**Ex'tradite**, *v. t.* ( ए'क्स्ट्राडाइट् )—to give up fugitive foreign criminal. परदेशस्थ आरोपीला परत (त्या देशाच्या अधिकाऱ्यांकडे ) करणें. *Extradi'table*, *a.* प्रत्यर्पणीय ( आरोपी ). *Extradi'tion*, *n.* आरोपीला परत करून देणें, -तद्देशीय अधिकाऱ्यांच्या हातीं देणें.

**Extrajudi'cial**, *a.* ( एक्स्ट्राज्युडि'शल् )—not made in court; not legally authorized. अतिन्याय्य; कायदेशीररीत्या अनधिकृत.

**Extramŭn'dāne**, *a.* ( एक्स्ट्रमन्'डेन् )—outside the world. इहलोकबाह्य, विश्वातीत.

**Extramŭr'al**, *a* (एक्स्ट्रम्यु'अरल् )—outside the walls of a town etc. शहराच्या तटभिंतीच्या बाहेरचा.

**Extrā'neous**, *a.* ( इक्स्ट्रे'निअस् )—of external origin; not naturally belonging; foreign. बाहेरचा; बाह्य; अनवश्यक, परकीय, विदेशीय, अप्रस्तुत. *-ly*, *adv.*; *-ness*, *n.*

**Extra offi'cial**, *a.* ( एक्स्ट्र-अफि'शल् )—not pertaining to an office. अधिकारबाह्य.

**Extraŏrd'inarў**, *a.* ( इक्स्ट्रॉ'डिनरि, एक्स्ट्रऑ'र्डिनरि )—out of usual course, specially employed; exceptional, surprising. विशेष, विलक्षण, विशिष्ट, मुद्दाम नेमलेला; लोकोत्तर, असाधारण. *n. pl.* सैन्याचें ज्यादा वेतन. *-rily*, *adv.*

**Extrăv'agance**, *n.* ( इक्स्ट्रॅ'व्हगन्स् )—extravagant expenditure; want of restraint. अपव्यय,

उधळपट्टी; असर्यादितपणा, अतिक्रम, विलक्षणपणा, विचित्रपणा.

**Extrăv'agant,** *a.* ( इक्स्ट्रॅ'व्हगन्ट् )—wild, absurd ; ( of price etc. ) exhorbitant ; profuse, wasteful. भरमसाट, अमर्याद; बेसुमार, कमालीचा; उधळा. खर्चिक, अपव्ययी.*-ly, adv.*

**Extrăvagăn'za,** *n.* ( इक्स्ट्रॅव्हगॅ'न्झा )—fantastic composition (literary, musical, or dramatical ), language, behaviour. विचित्र,-काल्पनिक, लिखाण,-भाषा,-वागणूक.

**Extrăv'asāte,** *v. t. & i.* ( एक्स्ट्रॅ'व्हसेट् )—to force out( fluid etc. ) from its vessel ; flow out. ( रक्त इ. द्रव पदार्थ वाहिन्यांतून ) बाहेर झिरपणें,-टाकणें; बहिस्संचय करणें.*-tion, n.* [ L. *extra*, out of, and *vas*, vessel ]

**Extrēme',** *a.* ( एक्स्ट्री'म् )—outermost, situated at the end, farthest from the centre ; severe, stringent ; last ; going to great lengths अगदीं बाहेरचा, कडेचा, टोंकाचा, अग्रवर्ती; अति तीव्र, कडक; अखेरचा, निदानीचा, शेवटचा; जबर, परमावधीचा, पराकाष्ठेचा. *n.* thing at either end ; extreme degree or measures; (Logic) either of the extreme terms of a syllogism ; ( Math. ) first, last, term of a series or ratio. शेवटच्या टोंकावरील वस्तु; पराकाष्ठा, कळस, कडेलोट, हद्द; शेवटचें किंवा पहिलें पद; आदिपद, अंत्यपद. *In e. danger*, पराकाष्ठेच्या संकटांत, धोक्यांत. *In the e.*, extremely. पराकाष्ठेचा, अतिशयच. *Avoid ee.*, 'अति सर्वत्र वर्जयेत्'. *The ee.*, संकटाचा, आणीबाणीचा,-प्रसंग. *To go to ee., run to an e.*, take an e. course. अतिरेक करणें. निर्वाणीचा उपाय योजणें, अत्यंत कठोर-कडक-मार्ग अवलंबणें. *Extreme'ly, adv.* पराकाष्ठेचा, कमालीनें, अत्यंत. *Extreme'ness, n.*

**Extrē'mĭst,** *n.* (इक्स्ट्री'मिस्ट्)—an advocate of extreme measures. कळस करणारा, जहालमतवादी, जहालपक्षीय.*-mism, n.*

**Extrĕm'ĭtў,** *n.* ( इक्स्ट्रे'मिटि )—extreme point, end ; extreme distress ; ( usu. pl. ) extreme measures. टोंक शेवट; दुःखाचा कळस, कठीण प्रसंग; शेवटचा उपाय. *The ee.*, hands and feet. हातपाय.

**Ex'trĭcāte,** *v. t.* ( ए'क्स्ट्रि-केट् )—to disentangle, to release, to free from difficulties. सोडवणें, मुक्त करणें; ( Chem. ) पृथक् करणें.*-tor, n ; -tion, n.*

**Extrĭn'sĭc,** *a.* ( एक्स्ट्रि'न्सिक् )—not inherent or intrinsic ; extraneous, external, outward. बाहेरील, बाह्य; अंगचा नसलेला. *-ally, adv.*

**Extrorse',** *a.* ( एक्स्ट्रॉ'र्स् )—(Bot.) facing outwards. बहिर्मुख.

**Ex'trovert,** *n.* ( ए'क्स्ट्रव्हर्ट् )—( Psychol. ) a person not given to introspection. अनात्मदर्शी, बहिर्दृष्टि मनुष्य, अन्तर्दृष्टि करून न पाहणारा.

**Extrude',** *v. t.* ( इक्स्ट्रू'ड् )—to thrust out (from). बाहेर टाकणें,-काढणें, घालवून देणें. *Extru'sion, n.* हकालपट्टी, बहिर्निष्कासन;*-sive, a.*

**Exu'berant,** *a.* ( इग्झ्यू'बरन्ट् )—luxuriant, prolific, effusive ; plenteous, copious. पुष्कळ, अतिशय; विपुल, समृद्ध; अलंकारिक (भाषा), मनमुराद. *-nce, n.* भर, चंगळ, रेलचेल, समृद्धि, वैपुल्य, प्रकर्ष, उत्कर्ष. *-ly, adv.*

**Exū'berate,** *v. i.* ( इग्झ्यू'बरेट् )—to abound ; indulge *in.* विपुलता असणें: चंगळ असणें.

**Exude',** *v. i. & t.* ( इग्झ्यू'ड् )—to ooze out ( like sweat); to give off ( moisture). ओघळणें; पाझरणें, गळणें, निचरणें; बाहेर टाकणें, निर्यासन करणें. *-da'tion, n.; -'dative, a.*

**Exŭlt',** *v. i.* ( इग्झ'ल्ट् )—to rejoice with triumph, ( *at, in, over* ), to be glad above measure. अत्यानंद पावणें, विजयानंद होणें, टाळ्या पिटणें. *-ant, a.* प्रमुदित, विजयानंदित.*-antly, adv. ; -ancy, n., -ation, n* परमानंद, हर्षनिर्भर, आनंदातिरेक.

**Exū'vĭae,** *n. pl.* ( एग्झ्यू'व्हिइ )—animal's cast skin, shell, etc. प्राण्यांनीं टाकलेलें कवच,-मेंग,-कात. *Exu'viate, v. t.* कात-मेंग-टाकणें;*-tion, n.*

**Ey'as,** *n.* (आ'यस्)— a young hawk not yet completely trained. शिकाऊ ससाणा (पक्षी).

**Eye,** *n.* (आय्) - organ of sight ; an iris of this ; an eye-like thing, a hole ; observation, perception. नयन, नेत्र, डोळा; डोळ्याचें बुबुळ; लहान भोंक, डोळ्यासारखा पदार्थ, मोरपिसाऱ्यावरील डोळा; नेढें; अवलोकन, दृष्टि, टापू, दृष्टांत, नजर, पारख. *v. t.* to observe, to watch closely or suspiciously. रोंखून पाहणें, निरखून पाहणें, टक लावून पाहणें. *In the wind's eye*, in the direction of wind. वाऱ्याच्या दिशेनें. *Eye of day*, the sun. सूर्य, दिनमणि. *Evil e.*, पापदृष्टि. *Mind your e.*, take care. नजर राख. *To pipe, put one's finger in, one's e.*, weep. अश्रू ढाळणें, रडणें. *A beam, mote, in one's e.*, डोळ्यांतील मुसळ,-कुसळ. *E. for e.*, retaliation. ठोशास ठोसा, प्रतिकार. *Clap, set. ee. on*, पाहणें, नजर टाकणें. *To be all ee.*, watch intently. लक्षपूर्वक पाहणें, नीट न्याहाळणें. *Up to the ee.*, पुरेपूर, मनसोक्त. *To open one's ee to.* डोळे उघडणें, समजून-कळून-येणें. *My eye ( s )* ! ओ हो ! अबब ! *To lose an e.*, दृष्टि जाणें, डोळा जाणें. *To see with half an e.*, at a glance. एकदां नजर टाकून-वरवर-पाहणें. *To have an e. to*, have as

one's object. हेतुपूर्वक पाहणें, सहेतुक पाहणें, वर नजर असणें. *With an e. to*, च्या हेतूनें. *To keep an e. on*, वर नजर ठेवणें, पहारा करणें. *Have an e. for*, a due sense for. ची नजर असणें. *In the mind's e.*, अंतश्चक्षूनें, कल्पनेनें, अपेक्षेनें. *To see e. to e. with*, agree entirely with. शीं पूर्ण मतैक्य असणें. *To throw dust in the ee. of*, च्या डोळ्यांत धूळ फेंकणें, ला ठकविणें, चकविणें. *To make ee. at*, प्रेमी नजरेनें पाहणें, डोळा मारणें, कामी दृष्टीनें पाहणें. *To cast sheep's ee.*, कामुक दृष्टीनें पाहणें, डोळा मारणें. *E.-ball*, डोळ्यांतील बुबुळ–बाहुली. *An e. of needle*, (सुईचें) नेढें. *Hook and e.*, kind of fastening for dress. कपड्याचें एक प्रकारचें बंधन *Glass e.*, कृत्रिम डोळा, कांचेचा डोळा *E. ball*, बुबुळ. *E. bath,-cup*, औषधी पाण्यानें डोळे धुण्याचा पेला. *E.-bolt*, भोंकवाली कडी,-कडीचा खिळा. *E.-bright*, plant formerly used to cure weak eyes. नेत्ररोगावरची औषधी वनस्पति. *E.-glass*, (*pl.*) डोळ्याचें भिंग, उपनेत्र, चश्मा; सूक्ष्मदर्शक भिंग *E.-opener* enlightening or surprising fact etc. डोळे उघडायला लावणारी,-आश्चर्यचकित करणारी गोष्ट,-घटना इ. *E.-piece*, lense (s). नेत्रकाच, दुर्बिणीचें आपल्याकडील बाजूचें भिंग. *E. servant*, तोंडदेखलें काम करणारा, नजरचुकार-कामचुकार नोकर. *E. service*, केवळ धन्याच्या नजरेखालीं असे तोंच केलेली नोकरी. *E shot*, दृष्टीचा टप्पा. *E. sight*, दृष्टि. नजर. *E sore*, an ugly object, thing that offends the sight. नेत्रशल्य. डोळ्यांत खुपणारी,-अप्रिय,-वस्तु. *E. splice*, दोरीचा फांस,-ची फांसकी *E. strings*, muscles, nerves, tendons of e. अक्षिकंडरा. *E.-tooth*, (दांताचा) सुळा सुळका. प्राण्याचा वरचा सुळा (दांत). *E.-water*, अश्रु; डोळ्यांचें औषध, औषधी पाणी. *E. wash*, (sl.) mere professions, humbug डोळे पुसणें, डोळ्यांत धूळफेंक, फसवणूक. *Eyed, eyeless, aa.*

Eye'brow, *n.* (आ'य्-ब्रौ)—fringe of hair over eye, the hairy arch above the eye. भुंवई, भ्रुकुटी. *To knit the e.*, भुंवया चढवणें, रागावणें.

Eye'lăsh, *n.* (आ'य्-लॅश्)—hair (s) on eyelid. डोळ्याच्या पापणीचे केंस.

Eye'let, *n.* (आय्'लिट्)—a small hole in cloth, sail, etc. for lace, ring etc.; a loop hole; a small eye. छिद्र, भोंक, डोळा; दारें, खिडकी; लहानसा डोळा.

Eye'lid, *n.* (आ'य्-लिड्)—either cover of eye. डोळ्याची पापणी, पातें. *To hang on the eyelids*, (fig.) नावापुरताच आधार-अधिकार-असणें.

Eye'-witnĕss, *n.* (आ'य्-विट्नेस्)—one who can testify from his own observation. प्रत्यक्षदर्शी, साक्षी, वस्तुस्थिति प्रत्यक्ष पाहिलेला साक्षीदार.

Eyot, *n.* (एट्)—a small isle in river. नदींतील लहान बेट.

Eyre, *n.* (एअर्)—a circuit, circuit court. फेरा, फिरती न्यायकचेरी, न्यायाधिशांचा दौरा.

Ey'rie, *n.* (आ'यू-रि)—aerie, the nest of a bird of prey. हिंस्र पक्ष्यांची घरटीं बांधण्याची जागा, पक्ष्याचें घरटें. [F *Aire*, nest of hawks]

## F

F, (एफ्)—sixth letter of the English alphabet; (Mus; also *fa*) fourth note of diatonic scale of C major. इंग्रजी वर्णमालेंतील सहावें अक्षर; शुद्ध स्वरसप्तकांतील चवथा स्वर (मध्यम). *F sharp*, (joc.) पुशी, क्षुद्र प्राणी. *F*, fine (in pencils), Fahrenheit. उंची (पेन्सिल), फारेनहाइट (उष्णतामापक).

Fā'bian, *a.* (फे'बिअन्)—*-policy*, cautiously persistent. सावध व धोरणी (कावा). [L *Fabius'* Commander against Hannibal]

Fā'ble, *n.* (फे'बल्)—a story (esp. supernatural one) not based on fact; a lie; a plot of play etc.; a short moral tale. दंतकथा, कल्पित कथा; कंडी, थापा, गप्पा; असत्य, खोटें; कथानक; लहान नीतिपर कथा. *v. i. & t.* to tell fictitious tales; celebrate in fable. कल्पित गोष्टी,-कथा सांगणें, लिहिणें; कल्पित वर्णन करणें; पुराणप्रसिद्धि देणें. *Fa'bled, pa. p.* दंतकथेंतील,-संबंधीं; पुराणांतरीं वर्णिलेला. *Fa'bler, n.* कल्पितकथालेखक; कंड्या पिकविणारा.

Făb'ric, *n.* (फॅ'ब्रिक्)—a thing put together; building; woven material, texture, cloth. एकत्रित वस्तु, जुळणी, जोडकाम, उभारणी, बांधणी; इमारत, बांधीव काम; वीण, पोत, विणणें, कारागिरी. *Textile f.*, विणलेलें कापड.

Făb'ricāte, *v. t.* (फॅ'ब्रिकेट्)—to invent (lie, &c.); to forge (a document); (U. S.) make by plan. जोडणें, जडविणें, बनवणें; (दस्तऐवज वगैरे) खोटा तयार करणें, बनावट करणें; मेहनतीनें,-योजून तयार करणें. *-tion, n.* कुभांड, थोतांड, बनावट गोष्ट, कंडी. *-tor, n.* बांधणारा, रचणारा, कारागीर; कुभांड रचणारा, बनवाबनवी करणारा.

Făb'ūlist, *n.* (फॅ'ब्युलिस्ट्)—a composer of fables, a liar. कल्पित कथा लिहिणारा, दंतकथा रचणारा; खोटें बोलणारा.

Făb'ūlous, *n.* (फॅ'ब्युलस्)—famed in fable; incredible, hardly to be believed. काल्पनिक, कल्पित; बनावट, अविश्वसनीय, कमालीचा मोठा, कल्पनातीत. *-ly, adv.*; *-ness, n.*, *Fabulos'ity, n.*

**Facade'**, *n.* (फसा'ड्)—face of building towards street or open space. इमारतीचा दृशनीभाग, सुखभाग, दर्शनी बाजू. [F]

**Fāce**, *n.* (फेस्)—front of the head; front right side; dial-plate of a clock; expression; grimace, aspect; surface. तोंड, मुख, चेहरा; दर्शनी बाजू, उजवी बाजू, समोरचा भाग; (घड्याळाची) तबकडी; स्वरूप, मुद्रा, रूप, बाह्यचर्या; बहिरंग, बाह्यरूप, देखावा; पृष्ठ (भाग). *v. t. & i.* to meet firmly; to be opposite to; (Mil.) turn, cause to turn, in some direction; (Golf) strike ball full; cover (surface) with layer, dress (surface) of: coat (tea) with colouring matter. धैर्यानें तोंड देणें, सहन करणें; समोर असणें, -राहणें; (दिशेला) तोंड वळणें, -वळविणें; (गोल्फचा चेंडू) जोरानें टोलावणें; (च्या पृष्ठभागावर) दुसरा थर बसविणें, च्या तोंडावर (शोभेसाठीं, सुरक्षिततेसाठीं) बसविणें; (चहाला) रंगाचें पूट देणें. *To look one in the f.*, वर मान करून पाहणें, नजरेस नजर भिडाविणें. *To show one's f.*, appear. तोंड दाखविणें, पुढें येणें. *F. to f.* (with), समोरासमोर, समक्ष. *To set one's f. against*, oppose. निषेध- प्रतिकार-करणें. *With sun in one's f.*, तोंडासमोर ऊन असतां. *To fly in the f. of*, openly disobey. धडधडीत न जुमानणें, -आज्ञाभंग करणें. *In f. of*, च्या समोर. *In the f. of, in f. of*, despite. ला न जुमानतां, ची पर्वा न करतां. *To one's f.*, च्या डोळ्यांदेखत, ऐकत असतां. *In the f. of day*, openly उघड उघड. *To pull, wear, a long f.*, look serious or dismal. गंभीर किंवा आंबट चेहरा करणें. *To make, pull, a f. or ff.*, वेंचकुल्या दाखविणें, वेडावणें, तोंडें वेडीं वांकडीं करणें. *To have the f.*, लाज न वाटणें. *To save one's f.*, (आपली किंवा दुसऱ्याची) लाज, -अब्रू, -राखणें. *On the f of it*, वरवर पाहतां, जास्त खोलांत न शिरतां. *To f. matter out*, (एखादी गोष्ट) शेवटास नेणें. *To f. opponent down*, प्रतिपक्ष्याला घाबरविणें, -भिवविणें. *To f. the music*, not quail at the moment of trial. धैर्यानें प्रसंगाला तोंड देणें, संकटें सोसणें. *F.-ache*, neuralgia मज्जातंतुव्यथा. *F. -card*, (पत्त्यांतील) राजा, राणी, गुलाम. *F -value*, दर्शनी किंमत

**Fa'cer**, *n.* (फे'सर्)—a blow in face; sudden difficulty. तोंडावर मारलेला ठोसा, -गुद्दा,-चपराक; हार, थोबाडीत बसणें, आकस्मिक प्रसंग.

**Fă'cĕt**, *n* (फॅ'सिट्)—one side of many-sided body, esp. cut gem; one segment of a compound eye. (रत्नाचा, वस्तूचा) पैलू; नेत्रविभाग.

**Facē'tiae**, *n. pl* (फसी'शिई)—pleasantries; books of humorous or obscene character. गंमत, विनोद, थट्टामस्करी; विनोदी किंवा ग्राम्य पुस्तकें.

**Facē'tious**, *a* (फसी'शस्)—marked by pleasantry. गमत्या, विनोदी, थट्टेवाईक. *-ly, adv.*; *-ness, n.*

**Fă'cia**, *n.* (फॅ'शा, फे'शा)—a plate over shop-front with name etc. दुकानाची दर्शनी (नांवाची) पाटी.

**Fā'cial**, *a.* (फे'शल्)—of the face. चेहऱ्याचा, मुखासंबंधीं, दर्शनी.

**Fă'cile**, *a.* (फॅ'साइल्)—easy, working easily; fluent; flexible. सोपा, सुकर, सुगम, सहज होणारा; चपल; जलद; लवचीक, मृदु.

**Fă'cĭlĕ prĭn'cĕps**, *pred. a.* (फॅ'सिलि प्रि'न्सेप्स्)—easily first. सहजा सहजीं पहिला. [L]

**Făcil'itāte**, *v. t* (फॅसि'लिटेट्)—to make easy; to promote. सोपा करणें, सुलभ करणें, पुरस्कार करणें. *Facilita'tion, n.*; *-tor, n.*

**Făcil'itỳ**, *n.* (फॅसि'लिटि)—absence of difficulty; dexterity; (*usu. pl.*) convenient opportunities; pliancy. सोय; सोपेपणा, हातोटी, कौशल्य; (अने०) संधि, साधन, नरमपणा, ढिलेपणा.

**Fā'cing**, *n.* (फे'सिंग्)—coating of different material; (*pl*) cuffs, etc, of soldier's jacket; turning in some direction. निराळ्या वस्तूचें दर्शनी आवरण, भिंतीची दर्शनी फरसबंदी; लष्करी शिपायाच्या कुडत्याचीं हातांचीं वगैरे निराळ्या रंगाचीं घडणें; तोंड वळवणें.

**Făcsĭm'ĭlē**, *n. & v. t.* (फॅक्-सि'मिलि)—an exact copy. हुबेहूब नक्कल,-प्रत, प्रतिरूप, प्रतिलेख (करणें).

**Făct**, *n.* (फॅक्ट्)—a thing done; a thing known to be true; an act, an event केलेली गोष्ट, घडलेली गोष्ट, झालेलें कार्य; वस्तुस्थिति, खरा प्रकार, सत्यता, विधान; कृत्य, हकीगत. *In f.*, वस्तुतः, खरें म्हटलें तर, तत्त्वतः. *Matter of f.*, independent of inference. खरी खरी हकीगत; (used adjectively) prosaic सरळ, साधासुधा, नित्याचा. *As a matter of f.*, खरोखरी, खरी गोष्ट पाहूं गेलें असतां. *The f. of the matter*, वस्तुस्थिति, खरी खरी हकीगत.

**Făc'tion**, *n.* (फॅ'क्शन्)—self interested or unscrupulous party (esp. in politics); prevalence of party spirit. तट, (राजकारणांतील) पक्ष, टोळी, फळी; पक्षभावनाप्राबल्य.*-al,-Fac'tious, aa.*;*-ly, adv.*;*-ness, n.*

**Făctĭ'tious**, *a.* (फॅक्टि'शस्)—designedly got up, artificial. कृत्रिम, बनावट, खोटा.*-ly, adv.*; *-ness, n.*

**Făc'titive**, *a.* (फॅ'क्टिटिव्)— *-verb*, expressing idea of making to be something. कारक, फलद्योतक, प्रयोजक, (क्रियापद).*-ly, adv.*

**Făc'tor,** *n.* (फॅ'क्टर्)—agent; a merchant buying and selling on commission; (Sc.) land agent; any of the numbers whose product is the given number; element in a result. अडत्या, गुमास्ता; दलाली घेऊन खरेदीविक्री करणारा व्यापारी, दलाल; वहिवाटदार; गुणपद, गुण्यपद, गुणकपद, अवयव; कारण, कारणीभूत गोष्ट. *Fa'ctorage, n.* अडत, दलाली. *Factor'ial, a. & n.* (Math) product of series of factors in arithmetical progression; product of an integer and all the lower integers. (अंकगणित-श्रेणींतील) गुणकपदावलीचा गुणाकार; एकादिचयाङ्क -*term,* एकादिचयाङ्कघात, एकादिघात; *f.* 4, L4, = 4×3×2×1, चतुरन्त-एकादि-घात.

**Făc'tory̆,** *n.* (फॅ'क्टरि)—a manufactory; merchant company's foreign trading station. कारखाना; शिल्पशाळा; परदेशी व्यापारी मंडळीची पेढी,-वखार. *F. acts,* कारखान्यांतील मजुरांसाठीं कायदेकानू,-सरकारी नियम.

**Făctō'tum,** *n.* (फॅक्टो'टम्)—a man of all work, हरकामो, हरकाम्या नोकर. [L *fac (ere),* to do; *totum,* whole, every thing.]

**Făc'ula,** *n.* (फॅ'क्युला)—(Astron.; pl.-*ae*) a bright spot or streak on the sun. सूर्यबिंबावरील चकचकणारा ठिपका,-रेषा.

**Făc'ŭltătive,** *a.* (फॅ'कल्टेटिव्ह्)—of a faculty; permissive, optional. शक्तिविषयक, विद्याशाखीय; अनुज्ञेय, वैकल्पिक.

**Făc'ŭlty̆,** *a.* (फॅ'कल्टि)—aptitude for particular action; physical or mental power; branch of science &c.; authorization. कार्यप्रवृत्ति; शक्ति, सामर्थ्य, पळ, बुद्धीची देणगी, बुद्धि (-सामर्थ्य); विश्वविद्यालयांतील विद्याशाखा, ज्ञानशाखा, (कोणत्याहि धंद्यांतील) मंडळी; सत्ता, हक्क.

**Făd,** *n.* (फॅड्)—pet notion, craze. आवडती कल्पना, नाद, लहर, छंद.-*dist, n.* नादी,-लहरी,-छांदिष्ट मनुष्य;-*dism, n.*;-*dish,-dy, aa.*

**Fāde,** *v. t. & i.* (फेड्)—to droop, to wither; to (or, cause to) lose freshness or colour; to disappear gradually. सुकणें, निस्तेज होणें, कोमेजणें; रंग विटणें-उतरणें; हळुहळु नाहींसा होणें, लयास जाणें.-*less, a.*;-*lessly, adv.*; *Fad'ed,* कोमेजलेला, सुकलेला.

**Fae'ces,** *n. pl.* (फीं'सीझ्)—sediment; excrement of bowels. गाळ, मळ; पुरीष, विष्ठा. *Faec'al, a.*

**Fā'erie, Fā'ery,** *n.* (फे'अरि)—fairy land, the fairies, (esp. as represented by Spencer); (attrib.) fancied, visionary. पऱ्यांची भूमी, पऱ्या, काल्पनिक सुंदर देवता; काल्पनिक, मनःकल्पित.

**Făg,** *v. i. & t.* (फॅग्)—to toil; to grow or make weary; (at schools) do service for juniors. काबाडकष्ट करणें; थकणें, दमणें, दमविणें, भागवणें; वरच्या वर्गातील मुलांचीं कामें करणें. *n.* a drudgery; a junior liable to fag; (sl.) a cigarette. काबाडकष्ट, दमणूक, थकवा; खालच्या वर्गातील सेवेकरी मुलगा; सिगरेट, विडी. *F. out,* (Cricket) to field. क्षेत्ररक्षण करणें

**Făg'ĕnd,** *n.* (फॅ'ग्-एन्ड्)—refuse, meaner part, inferior remnant; very end. गाळ, गाळसाळ, रद्दड काम; अगदीं शेवटचें टोंक,-भाग.

**Făgg'ot,** *n.* (फॅ'गट्)—bundle of sticks for fuel, or of steel rods; a kind of dish. मोळी, लांकडाचा भारा, पोलादी कांबींचा भारा; एक प्रकारचें पक्वान्न,-जेवण. *Also,* Fagot.

**Fahr'enheit,** *a.* (फा'रेनहाइट्)—thermometer, with 32° and 212° for freezing and boiling points. उष्णतामापक यंत्रासंबंधीं (३२ अंशांवर पाणी थिजतें व २१२ अंशांवर पाण्यास आधण येतें अशा रचनेचें) उष्णतामापक यंत्र. (abbr. F.) [name of German inventor]

**Fail,** *v. i. & t.* (फेल्)—to be missing; to be deficient; to break down; not to succeed; to disappoint; neglect. चुकणें; कमी पडणें; बंद पडणें; अपयश येणें; निराश करणें; दुर्लक्ष करणें. *n. Without fail,* for certain. न चुकतां, खात्रीनें, कांहीं झालें तरी.

**Fail'ing,** *n.* (फे'लिंग्)-deficiency; failure; foible, fault, weakness. उणीव, कमीपणा; अपयश, दिवाळें; दोष, न्यूनत्व, दुर्बलता. *prep.* in default of. च्या ऐवजीं, असें नसेल तर, नाहीं तर.

**Fail'ure,** *n.* (फे'ल्यर्)—non-performance, non-occurrence; running short; ill success; bankruptcy; unsuccessful person or thing. न करणें, न घडणें, चूक, कसूर; कमतरता, खोट, ठोकर; हार, नापास होणें; अपयश; दिवाळें; अयशस्वी मनुष्य किंवा वस्तु.

**Fain,** *pred. a.* (फेन्)—1. well-pleased (*to*); only too glad. संतुष्ट; आनंदी, शौकी, हौशी. *adv. Would fain,* gladly. आनंदानें, खुषीनें. 2 *Fain, -s, Fen(s),* (फेन्, फेन्झ्)—child's formula claiming exemption from unwelcome office. नकोरे बाबा! (तेवढें काम; अशा अर्थी).

**Fā'inéant,** *a.* (फे'नेऑं)—idle, inactive. आळशी, सुस्त, रेम्याडोक्या. *n.* an idler. निरुद्योगी, सुस्त मनुष्य. [F]

**Faint,** *a.* (फेन्ट्)—feeble; inclined to swoon; dim, pale; timid दुर्बल; मूर्च्छा आलेला; अंधुक, फिका; भित्रा, नेभळट, पोंचट. *v. i. & n.* to swoon, a swoon. मूर्च्छित होणें; मूर्च्छा. *F.-heart,* a coward. भित्रा, भ्याड मनुष्य. *F.-hearted, a.* भित्रा, नेभळट, भागूबाई;-*ly, adv.*;

*-ness. n.*; *Fain'tish, a.* अंधुक, पुसट. *Fain'tly, adv.*; *Fain'tness, n.* बेशुद्धि, मूर्च्छा, ग्लानि; अस्पष्टता, निस्तेजपणा; भिन्नपणा, नामर्दपणा. *Faints, n. pl.* दारू गाळण्याच्या आरंभीं व शेवटीं वर येणारी अशुद्ध मळी.

**Fair**, *n.* (फेअर्)—periodical gathering for sale of goods, often with shows and entertainments. मेळा, जत्रा, जत्रेचा बाजार. *A day after the f., too late* उशिरां, वेळ टळून गेल्यावर, 'वरातीपाठीमागून घोडें'. *F.-ground*, जत्रेचें आवार, -जागा. [ L. *feria*, holiday ]

**Fair**, *a.* (फेअर्)—beautiful; blond, not dark; just, equitable; of moderate quality or amount; (of weather) favourable. सुरेख, सुंदर; गोरा; न्याय्य, रास्त, नेमका, इमानी, नेकीचा; विपुल; अनुकूल, उघडाचा, निरभ्र. *adv.* in fair manner. यथान्याय्य, उघड, सरळपणानें *The f. sex, the f.*, women. स्त्रीजात, स्त्रिया. *A f.*, a woman. स्त्री, सुंदरी. *F. speeches* अघळपघळ रास्त भाषणें. *A f. complexion,-man*, देखणा, गोरा, -चेहरा, -मनुष्य. *F. copy*, स्वच्छ, सुवाच्य प्रत. *F. and square, a. & adv.* सरळ, प्रामाणिक, साफ (-पणानें). *All's f. in love and war*, प्रेम आणि युद्ध यांत सर्व कांहीं (बरेंवाईट) न्याय्यच ठरतें. *F. weather friends*, not good at need. 'चालत्या घोड्यावरील गोमाशी', संकटाचे-जरूरीचे-वेळीं उपयोगीं न पडणारे मित्र. *By f. means*, सरळ, न्याय्य, -मार्गानें. *F.-way*, नदीप्रवाहांतील तारवें-नौका-चालतात तोंपर्यंतचा मार्ग; गोल्फ खेळांतील नियमित मार्ग, -दिशा, -रेषा. *To speak one f.*, विनयशीलपणानें बोलणें. *F.-spoken* (of person), विनयशील, सभ्य. *F. & softly*, संभाळून, बेतानें. *Fair'ish, a.*

**Fair'ing**, *n.* (फे'अरिंग्)—a present bought at a fair. भेट म्हणून जत्रेंत खरेदी केलेली वस्तु.

**Fair'ly**, *adv.* (फे'अर्लि)—utterly; rather. पूर्णपणें; सामान्यतः.

**Fair'play**, *n.* (फे'अर्-प्ले)—equal opportunities, just treatment. सारखी संधि; न्याय्य वागणूक, न्याय.

**Fair'trade**, *n.* (फे'अर्ट्रेड्)—Free trade conditional on reciprocity. परस्पर विनिमयाच्या अटीचा खुला व्यापार.

**Fair'y**, *n.* (फे'अरि)—*a fay, small supernatural* being with magical powers. परी, अप्सरा, यक्षिणी, वनदेवता. *a.* of fairies; fairy-like. परीचा, अप्सरांचा, परीसारखा, काल्पनिक. *F. lamps*, रोषणाईचे (कांचेचे) दिवे. *F.-land*, home of fairies; enchanted land. अप्सरांचें, -वनदेवतांचें निवासस्थान; भुताटकीची जागा; अति सुखाचें काल्पनिक स्थान. *F. ring*, गवताचा काळसर वर्तुळाकार भाग (यावर पऱ्या नाचतात अशी कल्पना). *F. tale*, tale of fairies; marvellous account. वनदेवतांची कथा, -गोष्ट; काल्पनिक, -विलक्षण गोष्ट.

**Fait accom'pli**, *n.* (फेट् आकॉं'प्ली)—thing done and past arguing about. ठाम अविवादिक गोष्ट, -मुद्दा. [F]

**Faith**, *n.* (फेथ्)—trust; belief in religious doctrine or divine truth; religion; loyalty, fidelity, confidence. श्रद्धा, विश्वास; धर्मश्रद्धा; धर्म; धर्मबंध; मत, निष्ठा.

**Faith'ful**, *a.* (फे'थ्-फुल्)—loyal, constant; true, accurate. विश्वासू, इमानी; खरा, यथातथ्य. *The f., n. pl.* महंमदाचे अनुयायी.*-fully, adv.*

**Faith'less**, *a.* (फे'थ्-लिस्)—perfidious, false. बेइमानी, खोटा, अविश्वासी, नास्तिक, विश्वासघातकी. *-ly, adv.*; *-ness, n.*

**Fāke**, *v. t. & n.* (फेक्)—1. (Naut.) to coil rope; one round of a coil. दोर गुंडाळणें; दोराचें वेटोळें. 2. *v t.* to do up. बनवणें, फसविणें. *n.* faking; faked-up thing. बनवणें, बनावट गोष्ट. *Fa'ker, n.* (*U. S.*) फेरीवाला.

**Fal'chion**, *n.* (फॉ'ल्चन्)—a broad curved sword. लहान वांकडी तलवार.

**Fa'lcon**, *n.* (फॉ'कन्)—a small diurnal bird of prey trained to hawk for sport. बहिरीससाणा. *-er*, बहिरीससाण्यांना शिकविणारा. *-ry, n.* ससाण्यांची पारध करणें; त्यांना पाळणें;-धंदा

**Fal'stōol**, *n.* (फॉ'ल्स्टूल्)—bishop's armless chair; a small desk for kneeling at. धर्माधिकाऱ्याची बिनहाताची खुर्ची; टुमडणारी घडवंची.

**Fall**, *v. i.* (फॉल्)—to descend freely; drop, come down; lose high position; abate, droop, hang down; collapse; sin, perish; lapse; occur. खालीं येणें, पडणें, पतन होणें; गळणें, निघणें, प्रसवणें; च्युत,-भ्रष्ट होणें; कमी होणें, नरमणें, बसणें, गळणें; खचणें, नाश,-ऱ्हास होणें; नयच्युत होणें, विनाश पावणें; कडे येणें, -जाणें; येणें, घडणें. *n.* falling; amount (of rain etc.) that falls; (U. S.) autumn; (often pl.) cataract; descent, drop; downfall, ruin; kind of veil; amount of timber cut down. पडणें, पतन, च्युति, भ्रंश; (वर्षाव, वृष्टि,-) पतन,-मान; (झाडाचीं पानें गळतात तो ऋतु) पावसाळा; धबधबा; उतार, खोली, उतरणें, कमी होणें; विनाश, ऱ्हास, अस्त; एक प्रकारचा पडदा; तोडलेलें इमारती-लाकूड. *Falling star*, a meteor. उल्का, तुटलेला तारा. *Lambs f.*, are born. कोंकरें जन्मतात. *Fallen angel*, स्वर्गभ्रष्ट देवता. *Face falls*, चेहरा उतरतो, चेहऱ्यावर आश्चर्य-गोंधळलेलेपणा दिसतो. *Falling sickness*, अपस्मार, फेपरें. [*With*

*prepp.*] *To f. behind*, be passed by. च्या मागें पडणें. *F. for*, (U. S.) ला मोहित,-वश होणें. *F. into* (*line*), रांगेंत उभें राहणें; (*conversation with*), शीं संभाषण,-बोलणें सुरू करणें; (*habit* etc.) (संवय इ.) लावून घेणें. *F. up, -upon*, हल्ला करणें, शीं गांठ पडणें. *F. up,-upon one's feet or legs*, get well out of difficulty. अडचणींतून पुरी सुटका होणें. संकटमुक्त होणें. *F. to*, take to, begin. आरंभ करणें, कामाला लागणें. *F. under*, अंतर्भाव होणें, च्या अंमलांत असणें,-येणें. *F. within*, be included in. च्यांत धरलें जाणें. अंतर्भाव होणें. [*With advv.*] *To f. astern*, (of ship) drop behind. मागें राहणें. *F. away*, सोडून जाणें, बंड करणें; भ्रष्ट होणें, धर्मांतर करणें; फिका,-मंद,-कमी होणें, सुकणें, वाळणें, नाश पावणें. *F. back*, माघार घेणें. *F. back upon*, चा आश्रय करणें. *F. behind*, lag. मागें पडणें. *F. foul of*, शीं टक्कर होणें,-भांडणें, वर हल्ला करणें. *F. in*, (Mil.) नेमल्या-जागीं रांगेंत उभें करणें,-राहणें; (of buildings etc) खचणें, बसणें; (of debt etc.) मुदत संपणें *F. in with*, अकस्मात भेट होणें, गांठ पडणें; मताशीं जुळतें घेणें, मतैक्य होणें, कबूल करणें. *F. off*, गळून पडणें; झडणें, कमी होणें, माघार घेणें; बिघडणें; सुकाणूला (जहाज) न वळणें; बंड करणें. *F. on*, हल्ल्यांत भाग घेणें, खाण्याला सुरवात करणें *F. out*, भांडण होणें, पडणें, होणें; (Mil.) रांग सोडून जाणें,-मोडणें. *F. out of*, सोडून देणें (संवय इ.). *F. short*, तूट येणें, कमी पडणें. *F. short of*, न मिळणें. *F. through*, मध्येंच पडणें,-सिद्धीस न जाणें. *F. to*, begin eating or fighting. हातातोंडाच्या लढाईला,-खऱ्या लढाईला-आरंभ करणें. *F. of the year* or *leaf*, पर्जन्यकाळ. *The F. of man*, Adam's sin and its results. ॲडमचें (ज्ञानफळ चाखण्याचें) पाप व त्याचीं फळें. *Fell, pa. t.*; *Fallen, pa. p.*

**Fallā'cious**, *a.* (फलें'शस्)—containing a fallacy; delusive, deceitful, misleading. हेत्वाभासाचा, हेत्वाभासमूलक; भ्रामक, भ्रमात्मक, दुष्ट, असत्य, भ्रांतिकारक.*-ly, adv.,-ness, n.*

**Făll'acy̆**, *n.* (फॅलसि)—misleading argument; delusiveness, deception, deceitfulness; flaw in syllogism. चुकीचा युक्तिवाद; मिथ्याभास, भ्रम, आभास; दूषित अनुमान, हेत्वाभास, पक्षाभास. [L *fallere*, to deceive]

**Făl-lăl'**, *n.* (फॅलॅल्)—a piece of finery. भपकेबाज,-चैनीची वस्तु.

**Făll'ible**, *a.* (फॅलिबल्)—liable to err or be erroneous. चुकीला पात्र, स्खलनशील, चुकीचा. *-bility, n.*

**Făll'ow**, *a.* (फॅलो)—uncultivated. पडित, बिनलागवडीचा, (fig.) ओसाड, नापीक, ठणठणीत. *n.* land ploughed but not cropped. पडित जमीन. *v. t.* to break up land. जमीन नांगरून फोडून (पडीत) ठेवणें.

**Făll'ow**, *a.* (फॅलो)—of pale brownish or reddish yellow. पिंगट, पिंवळट, पिंवळसर, तांबूस पिवळा. *F. deer*, एकजातीचा लहान हरीण.

**False**, *a.* (फॉल्स्)—erroneous, deceptive; deceitful; lying; spurious; so-called. खोटा, चुकीचा, फसवा; लबाडीचा, लबाड, अप्रामाणिक; खोटा, नकली, बनावट; नांवापुरता, नांवाचा. *adv. to play person f.*, cheat, betray. ठकवणें, बेइमान,-कृतघ्न होणें. *F. bottom*, जहाजाच्या किंवा पेटीच्या खऱ्या तळाच्यावरचा कृत्रिम तळ. *F. tune*, बदसूर, बेसूर आवाज. *F.-face*, मुखवटा, झांकण.*-ly, adv.*;*-ness, fal'sity, nn.*

**False'hŏod**, *n.* (फॉल्स्-हुड्)—untrue assertion, untruth, falseness, lying, lie(s). खोटेपणा, खोटें, असत्य.

**Falsětt'ō**, *n.* (फॉल्से'टो)—voice above one's natural range. कृत्रिम,-तार,-स्वर.

**Fal'sĭfy̆**, *v. t.* (फॉ'ल्सिफाइ)—to alter fraudulently; to misrepresent, to pervert; to disappoint. लबाडीनें बदलणें; विपर्यास करणें; खोटें स्वरूप देणें; निराश होणें.*-fication, n.*

**Fal'ter**, *v. i. & t.* (फॉ'ल्टर्)—to stagger; say hesitatingly, speak with broken words. अडखळणें; अडखळत-तोतरें-बोलणें.*-ingly, adv.*

**Fāme**, *n.* (फेम्)—public report, rumour; reputation, celebrity, renown. प्रसिद्धि; अफवा, कीर्ति. नांव, लौकिक. *Famed, a. & pa. p.* प्रसिद्ध, नामांकित.

**Fămil'iar**, *a.* (फॅमि'ल्यर्)—intimate; well-known; common; over-free; amorously intimate with. अति परिचित; सुप्रसिद्ध; परिपाठांतील, घरगुती; अघळपघळ; अनैतिक परिचयाचा. *n.* दोस्त, सोबती; हुकमी भूत, पिशाच्च.

**Fămiliă'rĭty̆**, *n.* (फॅमिलिॲ'रिटि)—intimacy. दाट परिचय. *F. breeds contempt*, अतिपरिचय खोटा, मान राहात नाहीं; अतिपरिचयादवज्ञा.

**Fămil'iarize**, *v. t.* (फॅमि'ल्यराइझ्)—make familiar, accustom. परिचयाचा करणें *-zation, n.*

**Făm'ĭly̆**, *n.* (फॅ'मिलि)—a household; a set of parents and children or of relations; person's children; lineage; a race. कुटुंब; कुटुंबांतील मंडळी; मुलेंबाळें; कुळ; वंश, घराणें, जाति, वर्ग. *Happy f.*, animals of different kinds in one cage. एकाच पिंजऱ्यांत ठवलेले निरनिराळ्या जातीचे प्राणी. *Of f.*, nobly born. घरंदाज, कुलीन, चांगल्या कुळांत जन्मलेला. *F. hotel*, कुटुंबांकरितां विशेष सवलतींची खाणावळ. *In a f. way*, घरगुती

नात्यानें. *In the f. way*, with child. गरोदर. *F. Bible*, कुटुंबामध्यें उपयोग करण्याचें मोठ पायबल (धर्मग्रंथ, पोथी). *F. coach*, मोठी बंदिस्त गाडी; एक प्रकारचा (हार-जितीचा) खेळ. *F. likeness*, नातेवाइकांतील सारखेपणा,-साहश्य, अस्पष्ट साहश्य. *F. man*, कुटुंबवत्सल मनुष्य; घरगुती मनुष्य. *F. tree*, वंशावळीचा तक्ता, वंशावळ. [L. *familia*, a houshold]

**Făm'ine**, *n.* (फॅ'मिन्)—general want, extreme scarcity of food, etc.; starvation. दुष्काळ, दुर्भिक्ष, टंचाई, महर्गता; उपासमार, अन्नान्नदशा. *F. prices*, दुष्काळामुळें वाढलेल्या किंमती. *To die of f.*, उपासमार होऊन मरणें. [L. *fames*, hunger]

**Făm'ish**, *v. t. & i.* (फॅ'मिश्)—to reduce (or to be reduced) to extreme hunger. उपाशीं मारणें किंवा मरणें. *To be famishing*, (colloq.) feel hungry. पोटांत आग पेटणें, भूक लागणें.

**Fā'mous**, *a.* (फे'मस्)—celebrated, renowned, (*for*); (colloq.) very good, excellent. सुप्रसिद्ध, प्रख्यात, नामांकित, नामवंत, विख्यात; उत्तम. *-ly, adv.*

**Fā'mulus**, *n.* (फॅ'म्युलस्)— (*pl. -li*) an attendant on magician. जादूगाराचा नोकर.

**Făn**, *n.* (फॅन्)—winnowing-machine; ventilating apparatus; (Naut.) a blade of screw, propeller; a small sail (of windmill). सूप, झटकणें; पंखा, विंझण, व्यजन, पंख्यासारखी वस्तु; मळसूत्राचें पातें, बोटीचा पंखा; पवनचक्कीचें लहान शीड. *v. t.* to winnow; move air with a fan; stimulate; blow gently on, cool; spread out in fan shape. पाखडणें; पंख्यानें वारा घालणें, चेतवणें, झुळझुळ वाहणें, थंडाई आणणें; व्यजनाकार पसरणें,-होणें. *F. light*, fan-shaped window over door. दरवाज्यावरील व्यजनाकार (पंख्याच्या आकाराची) खिडकी. *F. palm*, (व्यजनाकार पर्णयुक्त) ताडाचें झाड, पंख्याचा ताड. *F. tail*, पंख्याच्या आकाराची शेंपटी; एक जातीचें कबुतर; कोळशाच्या खाणींतील मजुराची टोपी. *To f. the flame*, increase excitement. चेतवणें, प्रज्वलित करणें, गाधळ वाढविणें.

**Făn**, *n.* (फॅन्)—a devotee of specified thing. (चा) शोकीन, भक्त. *Film fans*, चित्रपटांचे शोकीन लोक, सिनेमावेडे लोक.

**Fanăt'ic**, *a.* (फनॅ'टिक्)—filled with mistaken enthusiasm, esp. in religion. धर्माबद्दल खोटा अभिमान बाळगणारा, धर्मवेडा. *n.* a fanatic person. धर्मवेडा मनुष्य. *-'ism, n.* (फनॅ'टिसिझम्) धर्मवेड, धर्मांधता.

**Făn'cier**, *n.* (फॅ'न्सिअर्)—one who is governed by fancy; one who has a special liking for an object; one who keeps and breeds for sale birds and animals. लहरी, छांदिष्ट मनुष्य; (चा) भोक्ता, शोकिन; (कुत्रे, -घोडे, -पांखरें-) विक्या. *A dog f.* कुत्र्यांचा शोकीन, कुत्रेवाला.

**Făn'ciful**, *a.* (फॅ'न्सिफुल्)—indulging in fancies; capricious; imaginary, unreal; odd-looking. छंदखोर; लहरी; मनःकाल्पत, खोटा; चमत्कारिक, विलक्षण.*-ness, n.*; *Fan'cifully, adv.*

**Făn'cy**, *n.* (फॅ'न्सि)—faculty of imagination; delusion; supposition; caprice, whim; taste. कल्पनाशक्ति, कल्पकता; आभास; कल्पना, तर्क, तरंग, लहर; आवड, गोडी, अभिरुचि. *a.* ornamental, not plain; of whimsical kind, extravagant. भपकेदार, चैनीचा, मनोहर, हरतऱ्हेचा; शोकी, सुंदर, चित्रविचित्र, भरमसाट, भारी. *v. t.* to conceive, to imagine; to take a fancy to, like; (colloq.) have a good conceit of (oneself). कल्पना करणें, तर्क करणें; पसंत पडणें, आवडणें; (स्वतःविषयीं) भलतीच घमेंड असणें, मोठें समजणें. *To catch the f. of*, please. चें मन राखणें, खूष करणें. *The f.*, शोकीन लोक. *F. free*, not in love. प्रेम, -आवड, -नसणारा, प्रेम न बसलेला,-ली. *F. dress*, ऐतिहासिक किंवा कल्पित गोष्टींतील भूमिकेला साजेसा पोषाख. *F. d.-ball, f.-ball*, निरनिराळ्या सोंगांना किंवा भूमिकांना योग्य असा पोषाख घालून केलेला नाच. *F. work*, ornamental sewing, etc. नकशीचें विणकाम. *F. fair*, मौजेच्या वस्तूंचा बाजार, मीना बाजार. *At a f. price*, भरमसाट,-अवाच्या सवा, -किंमतीला. *F. man*, प्रियकर; वेश्येच्या पैशावर जगणारा.

**Fāne**, *n.* (फेन्)—(poet.) a temple. देऊळ.

**Făn'fāre**, *n.* (फॅ'न्फेअर्)—a flourish of trumpets, bugles, etc. भेरीरव, तुताऱ्यांचा आवाज, शिंगांचा बाजा. [F]

**Fănfăronāde'**, *n.* (फॅन्फॅरने'ड्)—brag; fanfare. बढाई, आत्मश्लाघा; तुतारी वाजविणें, तुताऱ्यांचा निनाद.

**Făng**, *n.* (फॅङ्)—canine tooth; serpent's venom-tooth; prong of tooth; spike of tool held in the stock. सुळा, सुळका, सुळा दांत; (सर्पाचा) विषारी दांत; दंतमूळ; हत्याराचा (मुठींत घसवावयाचा) खिळा,-सुळा. *v. t.* to prime (pump) by pouring in water to start it. पंप (आंत पाणी ओतून) सुरू करणें.*-ed, -less, aa.*

**Făntasia**, *n.* (फॅन्टझी'आ,-न्टा'झिआ)—a musical composition in which form is subservient to fancy. निरंकुश काव्य, स्वैर काव्य.

**Făn'tăst, Phan'tast**, *n.* (फॅ'न्टॅस्ट्)—a visionary. विक्षिप्त मनुष्य.

**Făntăs'tic**, *a.* (फ़ॅन्टॅ'स्टिक्)—extravagantly fanciful; grotesque, quaint. छांदिष्ट; विलक्षण, हास्यजनक, विचित्र, तऱ्हेवाईक. *-al'ity, -ism, nn.*

**Făn'tasy̆, Ph-**, *n.* (फ़ॅन्टासि)-faculty of imagination; mental image, fanciful design. कल्पनाशक्ति; मनःकल्पित मूर्ति, आकार, नमुना.

**Fär**, *adv.* (फ़ार्)—at or to great distance; by much. दूर, लांब, लांबवर; पुष्कळ अंशीं. *n.* great distance. मोठें अंतर. *a.* distant, remote. दूरचा, लांबचा. *F. away.* लांबचा, पूर्वीचा; (of look etc.) शून्यमनस्क. *F. between*, infrequent. क्वचित्-फार अंतरानें-होणारा. *F.-famed*, widely known, सुप्रसिद्ध, विख्यात. *F.-fetched*, (of simile etc.) not obvious, forced. क्लिष्ट, ओढून ताणून लावलेला, काढलेला. *F.-flung*, widely extended. विस्तृत. *F. gone*, अतिशय आजारी, वेडा, (कर्जांत) रुतलेला. *F. off*, दूर, दूरचा. *F.-reaching*, दूरवर जाणारा,-पोंचणारा,-परिणाम करणारा. *F.-seeing,-sighted*, prudent, seeing distant things best. दूरदृष्टि, दीर्घदृष्टि, पोक्त, दूरवरचें नीट पाहणारा. *As f. as*, जेथपर्यंत तेथपर्यंत, ज्या इतका,-पावेतों. *By f.*, फार, बहुत. *How f.*, कोठपर्यंत? कोठपावेतों? *So f.*, तेथपर्यंत, तेथपावेतों, त्या घटकेपर्यंत. *Farther,-thest*; *further,-thest*, compa & superl.

**Fă'rad**, *n.* (फ़ॅ'रड्)—the electro-magnetic unit of capacity. विद्युच्चुंबनीय एकं.*-a'ic, a.* (of current) inductive, induced. प्रवर्तक, प्रवर्तित, (प्रवाह). [*From Faraday*, scientist]

**Färce**, *n.* (फ़ार्स्)—a dramatic piece intended to excite laughter; absurdly futile proceeding, empty pageantry. हास्यजनक नाटकाचा चुटका, प्रहसन; हास्यास्पद गोष्ट, फतावणी, सोंग, तमाशा. *Far'cical, a.* प्रहसनात्मक.

**Färd'el**, *n.* (फा'र्डेल्)—(arch.) a bundle, burden. जुडी, बोजकें, ओझें.

**Fāre**, *n.* (फेअर्)—cost of passenger's conveyance; food; a passenger in hired vehicle. प्रवासाचें भाडें; अन्न, खाण्याचे पदार्थ; भाडोत्री उतारू. *v. i.* to happen, to turn out; to get on; to be fed; journey, travel. घडून येणें; चालणें, प्रगति करणें; जेऊं घालणें; प्रवास करणें, जाणें. *F. forth*, start. (प्रवासाला) निघणें. *How fares it?* कसें काय चाललें आहे?-होत आहे?

**Fārewĕll'**, *int.* (फेअर्-वे'ल्)—good-bye. नमस्कार! यावें! *n.* leave-taking; act of departure. आज्ञा; प्रयाण, निरोप.

**Fär'fĕtchĕd**, *a.* (फा'र्-फेचेड्)—not obvious, forced, strained. ओढून ताणून केलेला (अर्थ), दूरान्वयी.

**Farī'na**, *n.* (फरा'यना)—flour or meal of corn, nuts etc.; powder; (Bot.) pollen; (Chem.) starch. पीठ, पिष्ट; पूड; (पुष्प-) रेणु, पराग; पिष्ट, पिठूळपणा. *Farina'ceous, a.* (फॅरिने'शस्) पिठाचा, पिष्टमय; पिठूळ. *Fa'rinose, a.* mealy. पिष्टोत्पादक, कोंडशीसारखा पदार्थ असलेला. [L. *far*, corn]

**Färl**, *n.* (फार्ल्)—(Sc.) thin-cake. पातळ भाकरीचा तुकडा.

**Färm**, *n.* (फार्म्)—tract of land cultivated by a tenant, a portion of land under cultivation. धान्यानें केलेली जमीन, शेत, शेतजमीन. *v. i. & t.* to take proceeds of (tax, office) on payment of fixed sum; till the soil; be a farmer. मक्ता, खंड घेणें, खंडानें देणें; (जमिनीची) लागवड,-मशागत करणें, नांगरणें; शेतांत खपणें,-राबणें. *F., F.-house*, शेतावरील घर, खोपट,-मांगर. *F. stead*, शेत व त्यावरील घरें वगैरे, शेतवाडी. *F. yard*, शेताचें आवार, वाडी.

**Färm'er**, *n.* (फा'र्मर्)—one who farms land. शेतकरी.

**Făr'ō**, *n.* (फे'अरो)—a gambling card-game. पत्त्यांचा जुगारी खेळ.

**Farra'gō**, *n.* (फरा'गो,फरे'गो)-medley, hotchpotch. खिचडी, मिसळ, पंचमेळ, भजभजपुरी.*-ginous, a.* पंचमेळीचा.

**Fă'rrier**, *n.* (फॅ'रिअर्)—a smith who shoes horses, shoeing-smith; horse-doctor. नाल मारणारा; अश्ववैद्य. *Fa'rriery, n.* नालबंदी (काम), अश्ववैद्यक.

**Fă'rrow**, *n.* (फॅ'रो)—a litter of pigs. डुकराचें वेत. *v. t. & i.* (डुकर) विणें.

**Fart**, *n. & v. i.* (फार्ट्)—(to emit) wind from the anus. पादणें; अपान वायू, पाद.

**Färth'er**, *adv.* (फा'दर्)—more far; (usu. *fur-*) also, in addition. अधिक दूर; आणखी. *a.* more distant or advanced; (usu. *fur-*) more. अतिशय लांब किंवा फारच पुढें गेलेला; शिवाय, आणखी.*-most, a.* अतिशय लांबचा, दूरचा. *Farth'est, a. & adv.* अतिशय दूरचा, लांबचा; अतिशय लांबवर.

**Färth'ing**, *n.* (फा'दिंग्)—quarter of a penny; a very small price. तीन पै किंमतीचें एक इंग्रजी नाणें, फार्दिंग; अत्यल्प किंमत, कवडी, दमडी.

**Făs'cēs**, *n. pl.* (फॅ'सीझ्)—(Rom. hist.) a bundle of rods with axe in the middle; ensigns of authority. (मध्यें कुऱ्हाड असलेली) काठ्यांची जुडी, अधिकारचिन्हें.

**Fă'scia**, *n.* (फॅ'शिआ)—long flat surface; band. कानोशीचा सपाट लांकडी-दगडी-पृष्ठभाग; वळचणी-

खालच्या सपाट भाग; पट्टा; पातळ पापुद्रा, तंतुमय स्नायूंचें पातळ आवरण.

**Făs'cicle, Făs'cicūle,** *n.* (फॅ'सिकल्, फॅ'सिक्यूल्)—bunch, bundle; part of a book. जुडका; पुस्तकाचा भाग.

**Fas'cĭnāte,** *v. t.* (फॅ'सिनेट्)—to charm irresistibly, to enchant, to bewitch, to captivate. मोह घालणें, भारणें, नजरबंदी करणें, मोहिनी घालणें.*-tion, n.* भारणी, मोहिनी.*-tor, n.*

**Fascine',** *n.* (फॅसी'न्)—a long faggot used for engineering purposes and for lining trenches. लांब जुडी, -मोळी, - लांकडाचा भारा.

**Făs'cism, Făscis'mo,** *n.* (फॅ'सिझम्, फॅशी'झ्मो)—principles and organization of the patriotic movement in Italy under Mussolini. इटली देशांतील नवीन राष्ट्रीय पंथाचीं तत्त्वें व घटना. *Fas'cist, Fascis'ta,* (फॅशी'स्टा, *pl. -ti,* -टी), इटली देशांतील राष्ट्रीय पंथ, त्याचा अनुयायी. [ It. *fascio,* bundle, group ]

**Făsh,** *v. t. & r.* (फॅश्)—(Sc.) bother, trouble. त्रास कटकट (देणें).

**Fă'shion,** *n.* (फॅशन्)—make, shape, style; way, manner; custom, esp. in dress. आकार, बेतणी; पद्धत, चाल, रीत; परिपाठ, वहिवाट, लोकप्रचार. *v. t.* to form, to shape. घनवणें, घडणें, घडवणें, करणें. *After the f. of,* like. च्या सारखा. *After a f., in a f.,* थोडासा, कांहीं, कसाबसा, जेमतेम. *F.-plate,* picture showing fashion of dress. तयार कपड्यांचा नमुदा दाखविणारें चित्र. *To set the f.,* नवीन प्रघात सुरू करणें. *A man of f.,* सभ्य शिष्ट मनुष्य. *-fashioned, a.*

**Fă'shionable,** *a.* (फॅ'शनेबल्)—characteristic of persons of fashion. सभ्यसंप्रदायाचा, शिष्टमान्य. *n.* सभ्य, शिष्ट, मनुष्य. *-ly, adv.*; *-ness, n.*

**Fäst,** *v. i.* (फास्ट्)—to go without food (esp. as religious observance). उपवास करणें, उपोषण करणें, उपाशीं राहणें, लंघन करणें. *n.* fasting, going without food. उपवास, उपोषण, उपास, लंघन.

**Fäst,** *a.* (फास्ट्)—firm, fixed, steady; rapid, pleasure-seeking. दृढ, घट्ट, ठाम, स्थिर; जलद, चलाख, चपल, शीघ्रगति; सुखैषी, चैनी, सोकाजी. *adv.* firmly, tightly; quickly; extravagantly. घट्ट, मजबूत; जलदीनें, घाईनें, त्वरित; उधळेपणानें. *F. friend, friendship,* जिवलग, जिवश्चकंठश्च, -मित्र, मैत्री. *F. asleep,* गाढ निजलेला. *F. colour,* न जाणारा, न विरणारा, पक्का रंग. *To make f.,* fasten. घट्ट बांधणें. *To play f., and loose,* be unreliable. अविश्वासूपणें वागणें, धरसोड करणें, बोलणें एक करणें एक असें वागणें. *The door is f.,* बंद केलेला दरवाजा. *Watch is f.,* घड्याळ पुढें आहे. *F. person,* चैनी मनुष्य. *F. cricket ground,* जीवरून चेंडू चटकन वर उडतो,-उशी घेतो, अशी जमीन,-क्रीडांगण. *F. bind f. find,* lock up what you would not lose. जें हरवूं नये तें नीट कुलुपांत घालून ठेवणें. *Sleep f.,* गाढ झोंपीं जाणें. *To live f.,* live in a dissipated way, मागचा पुढचा विचार न करतां चैनींत राहणें. *F. by, -beside, (poet.)* अगदीं नजीक, -जवळ, हाताशीं, कानाशीं. *Fast'ish, a.*

**Fä'sten,** *v. t. & i.* (फा'सन्)—to attach, to fix, to secure; to become fast. अडकवणें, जाम घसवणें, स्थिर करणें, लावणें, घट्ट बांधणें; चिलगून किंवा घट्ट धरणें. *To f. quarrel upon,* (शीं) भांडण उकरून काढणें. *Fa'stening, n.* खिळण, बंधन, बंधप; बांधणें. *Fa'stener, Fa'stening, nn.* चिमटा, बंधप, बंधन.

**Fäst'ness,** *n.* (फा'स्ट्निस्)—firmness, strength; a stronghold; rapidity. घट्टपणा, मजबुती, बळकटी, (रंगाचा) पक्केपणा, टिकाऊपणा; कोट, किल्ला, मजबुतीचें ठिकाण; जलदी, चपळाई, त्वरा.

**Făs'tī,** *n. pl.* (फॅ'स्टाय्)—records, annals. दप्तर, कागदपत्र, बखर. [ L, = calendar ].

**Făstĭd'ious,** *a.* (फॅस्टि'डिअस्)— squeamish, delicate to a fault, hard to please. खोडकर, दुराराध्य, चोखंदळ. *-ly, adv*; *-ness, n.*

**Fastĭ'giate,** *a.* (फस्टि'जिअट्)—(Bot.) with conical or tapering outline. शंक्वाकार, -अणकुचीदार, आकाराचा.

**Făt,** *a.* (फॅट्)—well-fed, plump; greasy, oily; fertile, profitable; resinuous. पुष्ट, लठ्ठ; तेलकट, चिकण, स्निग्ध, सुपीक, कुसदार, फायदेशीर, पुष्कळ उत्पन्नाचा; राळेचा, राळेसारखा, *n.* oily substance in animal bodies. चरबी, मेद, मेण. *v. t. & i. To fatten,* लठ्ठ करणें.-होणें, फुगणें, माजणें. *To cut up f.,* पुष्कळ पैसा मागें ठेवणें. *To cut it f.,* दिमाख दाखविणें, प्रदर्शन करणें. *A f. lot,* पुष्कळ; (*iron.*) अत्यल्प. *F.-head,* a dolt. मट्ठडोक्याचा, मूर्ख. *F.-witted,* बेअकली, मूर्ख. *The f. is in the fire,* गोंधळ माजला आहे, भडका उडणार.

**Fā'tal,** *a.* (फे'टल्)-destructive, ruinous; deadly, ending in death; ill-advised; of destiny. नाशकारक; घातकी, प्राणघातक; अनर्थावह; दैवाचा, दैवी. *F. thread,* आयुष्याची दोरी, आयुष्य. *F. shears,* death. मृत्यु, मरण. *Fa'tally, adv.* दैवयोगानें, नाशात्मक रीतीनें, मृत्युकारक.

**Fā'talism,** *n.* (फे'टलिझम्)—belief that all is predetermined; submission to all that happens as inevitable. अदृष्टवाद; प्रारब्धवाद, दैववाद, भवितव्यतावाद, दैवाधीनता. *-ist, n.* दैववादी मनुष्य. *-istic, a.*

Fatal'ity, *n.* (फेटॅलिटि)—supremacy of fate; calamity; death by accident. दैवाधीनता. दुर्दैव. संकट; अपघाती मृत्यु.

Fa'ta morga'na, *n.* (फॉटा मॉर्गॉना)—a kind of mirage seen, esp. in strait of Messina. (मसीनाच्या सामुद्रधुनीतच दिसणारें) एक मृगजळ. [It. *Morgana*, female name]

Fāte, *n.* (फेट्)—power predetermining events from eternity; what is destined; death, destruction; (Mythol.) a goddess, one of the three Greek goddesses, of destiny पूर्वसंचित, प्राक्तन, नशीब, दैव; दैवलिखित; मृत्यु, नाश, काळ, मरण; सटवी, तीन सटवायांपैकी एक. *v. t.* to preordain, दैवी असणें,-लिहिणें. *Fated, pa. p.* doomed. दैवघटित, प्राक्तननिर्मित, होणार वरी मरतेला, यावीनें विनाश पावणारा.

Fāte'ful, *a.* (फेट्फुल्)—prophetic; fraught with destiny; decisive; fatal. दैवी, शकुनी; दैवघटित; सोक्षमोक्ष करणारा,-लावणारा; अनिष्ट, घातपातक.

Fā'ther, *n.* (फा'दर्)—male parent; forefather; originator; priest of religious order &c.; eldest member; (pl.) elders. पिता, बाप; वाडवडील; जनक; उत्पादक; आदरी गुरु,-सर्वांत वृद्ध,-सभासद; वडीलधारी माणसें, बापजादे, पितर. *v. t.* to beget, to originate; to pass as father or author of. बा जनक होणें, उत्पन्न करणें; कर्तृत्व आपल्याकडे घेणें, शिरावर घेणें,-लादणें, उत्पादक पिता ठरणें. *The wish is f. to the thought*, one believes because one wishes to. इच्छा असें म्हणून विश्वास ठेवतो. *The child is f. to the man*, मोठेपणी मूल करील होईल ते त्याच्या लहानपणींच दिसून येतें. *F. of lies*, the devil. सैतान. *The Holy F.*, the Pope. पोप धर्मगुरु. *Like f., like son*, बाप तसा मुलगा, बाप तसा बेटा *Adoptive f.*, दत्तक बाप. *Natural f.*, जनक बाप; आपल्या सीत्रांखेरीज झालेल्या मुलाचा बाप. *Spiritual f.*, उपदेशक. *F.-hood, n.*, *F.-less, a. F.-ly, a.* like a father. पितृतुल्य, बापासारखा.

Fā'ther-in-law, *n.* (फा'दर्-इन्-लॉ)—wife's or husband's father. सासरा, श्वशुर.

Fā'therland, *n.* (फा'दर्लॅन्ड्)—one's country, the country of one's ancestors. स्वदेश, जन्मभूमि *The F.-l.*, Germany. जर्मन देश.

Făth'om, *n.* (फॅदम्)—measure of 6 ft., esp. in soundings; quantity of wood 6 ft. square in section, of any length. (पाण्याची खोली मोजण्याचें) सहाफुटी माप, वांव; सहा फूट चौरस जाडीचें लांकूड. *v. t.* to sound (water); to comprehend. पाण्याची खोली मोजणें; समजणें, थांग लावणें, कल्पना करणें.-*less, a.* अथांग, बेताग; कल्पनातीत;-*lessly, adv. F.-line, n.* a sailor's line with lead for taking soundings. बुडीद.

Fati'dical, *a.* (फटिडिकल्)—gifted with prophetic power. भविष्यज्ञानी, शकुनज्ञ.

Fatigue', *n.* (फटीग्)—weariness from exertion; a task that wearies; soldier's non-military duty. श्रम, थकवा; कष्टाचें काम. सैनिकाचें बिन-लष्करी काम. *v. t.* to employ to weariness, to tire (metal). थकवणें, भागवणें. शीण आणणें; (धातु) नरम करणें. *Fatiga'ting, F.-less, aa.*

Făt'ling, *n.* (फॅट्लिंग्)—a young fatted animal. लठ्ठ लहान प्राणी.

Fătt'en, *v. t. & i.* (फॅटन्)—to make or grow fat; enrich (soil). पोसणें, पुष्ट करणें, लठ्ठ होणें, अंगानें भरणें; (जमीन) खत घालून सुपीक करणें.

Fătt'y, *a.* (फॅटि)—of or like fat. चरबीचा, चरबीसारखा, लठ्ठ. *n.* (usu. voc.) a fat child. लठ्ठंभारत, गब्दुल्ल, भरपूर मूल.

Făt'ūous, *a.* (फॅट्युअस्)—silly, senseless; impotent. वेडगळ, बेअक्कल, मूर्ख, अशक्त,दुर्बळ; नामर्द.-*ly, adv.*;-*ness, n. Fatu'ity, n.* भ्रम, वेडगळपणा, वेड, मूर्खता.

Fault, *n.* (फॉल्ट्)—defect, blemish; a slight offence, misdeed; (Hunt) loss of scent, check so caused; (Tennis etc.) ball wrongly served; (Geol.) break in continuity of strata; (Telegr.) leakage चूक, उणीव, दोष, व्यंग, अभाव; अपराध, दुष्कृत्य; (शिकारी जनावराचा) वास सुटणें, गंधच्युति. शिकारीतला अडथळा; चेंडू मारण्यांत चूक; भारतील भंग, स्तरच्युति; विजेच्या तारेतील दोष. *Generous to a f.*, प्रमाणाबाहेर, काजील-उदार. *With all ff.*, at buyer's risk. खरेदी करणाऱ्याच्या, विकत घेणाऱ्याच्या जोखमीवर. *To find f. with*, दोष,-चूक,-काढणें. दोष लावणें. *In f.*, दोषी, दोषाई. *To be at f.*, गुंतवणारे होणें. गोंधळणें. *F.-finding, a. & n.* दोष काढणें,-काढणारा, निंदक, निंदा. *F.-finder n.*, *F.-less, a.* निर्दोष. *Fault'y, a.* सदोष.-*tily, adv.*;-*tiness, n.*

Faun, *n.* (फॉन्)—Latin rural deity. कल्पित वनदेवता.

Faun'a, *n.* (फॉना)—the animals of a region or epoch. प्रादेशिक-युगीन-प्राणी.

Fā'vour, *n.* (फेव्हर्)-liking, goodwill, approval; partiality; aid; thing given or worn as mark of favour; (arch.) looks. लोभ, पसंती, कृपा, पक्षपात; मदत, उपकार, आभार; नजर, देणगी; चेहरा, रूप. *v. t.* to regard or treat with favour; to oblige; to treat with

partiality, resemble in features. मेहरबानी करणें; कृपा करणें, उपकार करणें; पक्षपात करणें; ( चेहऱ्यांत ) साद्दश्य असणें, सद्दशमुख असणे. *To find f. in the eyes of*, be liked by. ( ला ) आवडणें, प्रिय असणें. *To curry f.*, लाळ घोटणें, लांगूलचालन -हांजी हांजी -करणें. *Your f. of yesterday is received*, आपलें कृपा (पत्र.) काल मिळालें. *By your f.*, (च्या) अनुज्ञेनें, परवानगीनें. *In f. of*, च्या वतीनें, -बाजूनें, च्या नांवानें, -जांवावर. *Favoured, pa. p.* having unusual advantages, having a certain appearance. कृपेंतला, मर्जीतला, (च्या) स्वरूपाचा. *Fa'vouring, a.*

**Fā'vourāble**, *a.* ( फे'व्हरबल् )— well-disposed; commendatory; promising, auspicious, helpful, suitable. अनुकूल; इष्ट; शुभकर, उपयुक्त, उपकारक, सोयीचा. *-ness, n*; *-bly, adv.*

**Fā'vourïte**, *a.* (फे'व्हरिट् )—habitually preferred. आवडता, प्रिय. *n.* a favourite person; a horse etc. expected to win contest. आवडता किंवा प्रिय मनुष्य. कृपापात्र, प्रियपात्र, गळ्यांतला ताईत, बगलबच्चा; खात्रीनें शर्यत जिंकील असा, खात्रीचा घोडा (वगैरे). *-tism, n.* practice of having favourites. पक्षपात, तरफदारी, प्रपंच, पंक्तिभेद.

**Fawn**, *n.* ( फॉन् )— fallow deer in first year; light yellowish brown colour. हरणाचें पाडस; पिंगट उदी रंग. *a.* fawn-coloured. उदी रंगाचा. *v. i. & t.* to bring forth; show affection by frisking, etc.; to lavish caresses upon; to behave servilely. पाडस घालणें -विणें; पुढच्यापुढें नाचणें, कुरवाळणें; हांजी हांजी करणें, लांगूलचालन करणें. *To f. on,-upon*, (कुत्र्यानें) शेंपूट हालवणें, नाचणें इ. *F. upon*, (मनुष्यानें) हांजी हांजी करणें. *Fawn'ing, a., -ly, adv.* हांजी हांजी करून.

**Fay**, *n.* ( फे )—(*Poet.*) a fairy. परी, अप्सरा.

**Faze**, *v. t.* (फेझ्)—(*U. S., sl.*) to discompose, disturb. बिघडविणें, चलबिचल करणें.

**Fē'altў**, *n.* ( फी'अल्टि )—faithful adherence. स्वामिभक्ति, प्रजाधर्म, राजनिष्ठा, इमान, विश्वास. [ L. *fidelis, fides*, faith ]

**Fear**, *n.* ( फिअर् )—painful emotion caused by impending evil; alarm, dread. भीति, भय, जरब; दरारा, दहशत, धास्ती, आदर. *v. i. & t.* to be afraid, be anxious, shrink from, fear God. भिणें, भीति वाटणें, दहशत वाटणें, उत्कंठित असणें, आशंका घेणें, ( मनांत ) आदर,-भय वाटणें. *For f. of (that)*, lest. नाहींतर, न जाणों. *Without f. or favour*, impartially. निःपक्षपातानें, भीडभाड न धरतां. *No f.*, it is not likely. तें असंभवनीय,- अशक्य. *Never f.*, घाबरूं नको, धास्ती नको.

**Fear'ful**, *a.* ( फि'अरफुल् )— terrible; afraid; (colloq.) annoying; reverential. भयाण, भयानक, भेसूर, भयंकर: भ्यालेला, भित्रा, भ्याड; त्रासदायक, कंटाळवाणा; आदरयुक्त, आदरशील. *-ness n.*; *-lly, adv.*

**Fear'less**, *a.* ( फि'अर्लिस् )—feeling no fear; brave. निर्भय, निःशंक, धीट, शूर. *-ly, adv.*; *-ness, n.*

**Fear'some**, *n.* (फि'अरसम् )—formidable. भयंकर, भयानक.

**Feas'ible**, *a.* ( फी'झिबल् )—practicable, possible; plausible. करतां येण्यासारखा, साध्य, सुकर, सुलभ, शक्य, लाघवी. *-bility, n.* सुसाध्यता, घटनीयता; सुकरता.

**Feast**, *n.* (फीस्ट्)—joyful religious anniversary; annual village festival; sumptuous entertainment; (*fig.*) gratification to the senses or mind. सण, उत्सव, वर्षाचा दिवस; गांवचा वार्षिक उत्सव; मेजवानी, समाराधना, जेवणावळ; करमणूक, दिवाळी, समाधान. *v. i. & t.* to (cause to) partake of feast, to fare sumptuously; to regale. मेजवानी करणें,-देणें; ताव,-हात मारणें, तृप्त करणें, संतुष्ट होणें, खूष होणें, मजा, चैन,-करणें. *F. of reason*, intellectual talk. बौद्धिक करमणूक,-वादविवाद. *Feast'er, n.*

**Feat**, *n.* ( फीट् )—a notable act, esp. of valour; surprising performance. मोठी कामगिरी, महत्कृत्य; पराक्रम, विक्रम, मात, कुशल कर्म, हातचलाखीचें काम. *a.* (arch.) smart, dextrous, चलाख, तल्लख, चतुर, कुशल. *-ly, adv.*

**Feath'er**, *n.* (फे'दर्)—the plume or quill of birds; plumage; a ridge of upright hair; feather-like flow in gem; (Rowing) action of feathering. पीस, पर, पंख, पिच्छ; पिसारा; केंसाचा उभा झुपका, भोंवरा; रत्नावरील पिसासारखा चरा; उभें वल्हें मारणें. *v. t. & i.* to furnish, line, or coat with feathers; enrich; turn oar so as to pass edgeways. पिसें लावणें, पिसांनीं मढविणें; शोभिवंत करणें, संपन्न करणें; वल्हें उभें मारणें. *To show the white f.*, भित्रेपणा दाखविणें. *Birds of a f.*, एका माळेचे मणि (लोक). *A f. in one's cap*, मान, प्रतिष्ठा. *To f. one's nest*, enrich oneself, आपली तुंबडी भरणें. *F.-bed*, पराची गादी. *F.-brain(ed),-head(ed), -pate(d)*, silly (person). मूर्ख, खुळचट. *F.-weight*, हलक्या वजनाचा मनुष्य, हलकी वस्तु. *Feath'ered, a.*; *Feath'ery, a.* पिसांचा, पिसें असलेला, सपिच्छ. *Feath'ering, n.* पिसारा; बाणाचीं पिसें; पशूच्या अंगावरील पिसांची रचना; फुलांतील पिसासारखा भाग.

**Fea'ture**, *n.* ( फी'चर् )—(*usu. pl.*) external appearance; characteristic part of a thing.

बाह्य स्वरूप, तोंडवळा, चेहरा: आकारविशेष, लक्षण, चिन्ह. *v. t.* to be a feature of; portray; show on cinema screen. चें लक्षण असणें; रंगविणें, दाखविणें; रुपेरी पडद्यावर (सिनेमांत) दाखविणें. *F.-less, a.* तोंडवळ्यांत वैशिष्ट्य नसलेला.

**Fĕb'rĭfūge,** *n.* (फी'ब्रिफ्यूज्, फे-)—a medicine to reduce fever; cooling drink ज्वरनाशक औषध; थंड,-शीतल,-पेय.

**Fē'brile,** *a.* (फी'ब्रिल्)—of fever, feverish. तापाचा, ज्वरसूचक.

**Fĕb'ruary,** *n.* (फे'ब्रुअरि)—second month of the English year. इंग्रजी वर्षाचा, दुसरा महिना.

**Fĕck'less,** *a.* (फे'क्लिस्)—feeble, futile, lacking purpose or resource. क्षुद्र, निरर्थक, निराधार, व्यर्थ.

**Fĕc'ulence,** *n.* (फे'क्यूलन्स्)—turbidness, dregs. गढूळपणा, गदूळ, रेंदा, मळ.*-lent, a.* turbid, fetid. रेंद्याचा, गाळाचा, गढूळ, गवळ.

**Fē'cŭnd,** *a.* (फी'कन्ड्, फे'-)—fertile, prolific; fertilizing. सुपीक, विपुल, अवंध्य; सुपीक करणारा.*-ity, n.* सुपीकपणा; बहुप्रजोत्पादनशक्ति, प्रजननशीलत्व.

**Fē'cŭndāte,** *v. t.* (फी'कन्डेट्)—to make fruitful; impregnate. फलद करणें; अमोघ,-फलित,-करणें; गर्भाधान करणें, प्रजनन करणें, रेतसिंचन करणें. *-tion, n.* रेतस्सेचन, गर्भाधान.

**Fed,** See *Feed. Fed up*, tired, bored. कंटाळलेला, त्रासलेला, त्रस्त.

**Fĕd'eral,** *a.* (फे'डरल्)—(of States) united, but independent in internal affairs. एकत्र परंतु स्वायत्त (राष्ट्रें), संयुक्त, तहानें बांधलेला. *-ism, n.*; *-ist, n.* संयुक्ततावादी.

**Fĕd'erāte,** *v. t. & i.* (फे'डरेट्)—to unite on federal basis or for common object. स्वायत्ततेच्या तत्त्वावर, -पायावर, -एकत्र होणें, संयुक्त होणें, -करणें; सामान्य उद्देशास्तव एकत्रित होणें. *a* (फे'डरट्) संयुक्त, संघटित. *-tion, n.* संघ, जूट, संयुक्त होणें. *-tive, a.* संयुक्त.

**Fee,** *n.* (फी)—sum payable to others for services; charge; gratuity; inherited estate; fief. वेतन, मेहनताना, कामाबद्दल द्यावा लागणारा मोबदला, फी; आकार; पारितोषिक; वाडिलार्जित मालमत्ता; मोकासा, वेतनादाखल जमीन, जहागीर. *v.t.* to pay fee to; engage for fee. मेहनताना देणें; फी देऊन बोलावणें, -काम सांगणें. *F. simple.* वंशपरंपरा चालणारें वेतन (म्हणून बिन अटीनें दिलेली जमीन). *F. tail*, वंशपरंपरा सशर्त वेतन म्हणून दिलेली जमीन, -वडिलोपार्जित मालमत्ता. *To hold in f. simple* or *f.*, have as absolute property. केवळ स्वतःच्या मालकीचीच अशी मालमत्ता असणें. *Retaining f.*, सचकार, बयाणा.

**Fee'ble,** *a.* (फी'बल्)—weak; wanting in character or intelligence or force or effect; dim, indistinct. निःशक्त, कमजोर, दुर्बळ; बुद्धिहीन, दुबळा, कमजोर; अस्पष्ट, अंधुक. *-ness, n.*; *-bly, adv.*

**Feed,** *v. t. & i.* (फीड्)—to supply with food; to graze (cattle); comfort, keep in hope; keep supplied; eat. खाऊं घालणें, पालनपोषण करणें; चारणें (गुरें); तृप्त करणें, (आशेवर) झुलवणें, पोसणें; पुरवठा करणें (यंत्राला); खाणें, जेवणें, चरणें. *n.* the act of feeding; meal; pasturage; fodder. पोषण, पुरवठा, (यंत्राला) भरवण; खुराक, आहार, भोजन; वैरण, चारा. *F. on*, consume. फस्त करणें. *F. up*, पुष्ट करणें, तृप्त करणें. *Out at f.*, चरायला सोडलेलीं (गुरें). *Off one's f.*, तोंडाला रुचि नसणें. *Fed, pa. t.*

**Feed'er,** *n.* (फी'डर्)—one who eats; one who feeds a machine; child's feeding-bottle or bib; a tributary; feeding apparatus in a machine; player who tosses ball to striker. खाणारा, आहारी, जीवी; (यंत्राला) भर घालणारा; दूध पाजण्याची बाटली; मुलाच्या छातीवरचें मळवस्त्र; (नदीचा) ओढा, फांटा, पोषक प्रवाह; पुरवठा करणारें उपयंत्र, पोषक; चेंडू उंच करून-आपटून फेंकणारा.

**Feed'-pīpe,** *n.* (फी'ड्पाइप्)—a pipe carrying water etc. to machine. यंत्राची पोषक नळी.

**Feel,** *v. t. & i* (फील्)—to explore or perceive by touch; to experience; to be affected by; to have pity for; (Mil.) reconnoitre. स्पर्श करणें, स्पर्शेंद्रियद्वारा जाणणें, चाचपून पाहणें; अनुभव येणें, मनाला लावणें, -वाटणें; -भासणें, दया येणें; टेहळणी, -पाहणी करणें. *n.* sense of touch; testing by touch; sensation. स्पर्शेंद्रिय; स्पर्शज्ञान: कशाचा तरी भास. *To f. the pulse*, नाडी पाहणें. *To f. one's legs* or *feet*, घट्ट आधार मिळणें; निश्चित असणें. *To f. well*, बरें वाटणें.

**Feel'er,** *n.* (फी'लर्)—an organ of touch in some animals; tentative suggestion; (Mil.) scout. (प्राण्यांचें) स्पर्शेंद्रिय, कांहीं प्राण्यांच्या मिशा; (दुसऱ्याचें मत अजमावण्याकरितां) खडा टाकून पाहणें, सूचना; लष्करी टेहेळ्या.

**Feel'ing,** *n.* (फी'लिंग्)—sense of touch; physical sensation; emotion; (*pl.*) susceptibilities; opinion. स्पर्शेंद्रिय; स्पर्श; (मनो-)विकार; कळवळा, भावना; मत. *a.* कोमल, कनवाळू, सहृदय; कळकळीचा, कळवळ्याचा.

**Feign**, *v. t. & i.* (फेन्)—to pretend ; to invent to forge, imagine. बहाणा करणें, ढोंग करणें; बनावट करणें, योजणें, कल्पिणें. *Feign'ed, a.* कल्पित, खोटा, ढोंगी, बनावट.

**Feint**, *n.* (फेन्ट्)—a sham attack, blow, etc. to deceive opponent ; pretence. हूल, हुलकावणी, डावपेंच ; ढोंग, सोंग, छल, मिष. *v. t.* हूल दाखविणें.

**Feist**, *n.* (फाइस्ट्)—(*U. S.*) a small dog. लहान कुत्रा.

**Fĕld'spar**, *n.* (फॅल्डस्पार्)—a kind of mineral. सोमकांत, चंद्रकांत: (खनिज पाषाण).

**Fēli'cĭtāte**, *v. t.* (फिलि'सिटेट्)—to make happy (rare); congratulate. सुखी करणें ; अभिनंदन करणें, आनंद प्रदर्शित करणें. *-tion. n.* (usu. *pl.*)

**Fēli'cĭtous**, *a.* (फिलि'सिटस्)— extremely appropriate. apt, well-chosen, happy. योग्य, पाहिजे तसा, सुखी, उचित सुखी.

**Fēli'cĭtў**, *n.* (फिलि'सिटि)—great happiness ; bliss, joys of heaven, blissfulness. मोठें सुख, परमानंद, कल्याण, सौभाग्य.

**Fe'line**, *a.* (फी'लाइन्)—of cats ; cat-like. मांजराचा, बिडालजातीय: कपटी, लबाड, विश्वासघाताचा. *Felin'ity, n.*

**Fell**, *pa. t.* of Fall

**Fĕll'**, *n.* (फेल्)—animal's hide or skin ; thick matted wool ; (in names) mountain ; stretch of moor-land ; amount of timber cut. जनावराचें कातडें, सकेश चामडें ; खडकाळ टेंकडी,-पर्वत ; माळरान, दलदलीचा प्रदेश ; तोडलेलें इमारती लांकूड, लांकूडतोड. *.a.* fierce ; destructive. भयंकर, क्रूर ; घातक. *v. t.* to strike down ; to cut down (a tree) ; stitch down (seam). पाडणें ; तोडणें, तोडून घालणें ; शिवणें, शिवून काढणें.

**Fĕll'oe, Fĕll'ў**, *n.* (फे'लि,-लो,-लि)—outer circle, or section of circumference, of wheel. चाकाचा बाहेरचा वर्तुळाकार वेर, अढेकड, बांक. पाटा, कड.

**Fĕll'ow**, *n.* (फॅ'लो)—comrade, associate ; member of some learned societies ; counterpart, equal, other of pair ; elected stipendiary gradute doing research ; (colloq.) man, boy. सोबती. साथीदार, गडी, इसम ; सन्मान्य सभासद ; जोडीपैकीं एक, जोडीचा ; नर, मादी ; वृत्तिधारी पदवीधर (संशोधक) ; मनुष्य, माणूस, पोऱ्या, मुलगा. *a.* of same class ; associated in joint action, etc. तत्सम, तुल्य, तद्वर्गीय ; साथी, जोडीदार. *Stone dead hath no f.*, मृतासारखा गुप्त गोष्ट राखणारा दुसरा कोणी नाहीं. *F. commoner*, फेलोंच्या टेबलावर (पंक्तींत) जेवणारा विद्यार्थी. *Poor f.* ! गरीब बिचारा ! *The f.*, लुच्चा, लबाड, क्षुद्र मनुष्य. *F.-creature*, जातभाई, प्राणी, सजातीय प्राणी, बंधु. *F.-citizen*, सहनागरीक, नागरीकभाई,-बंधु. *F.-countryman*, देशबंधु. *F.-student*, सहाध्यायी, गुरुबंधु. *F.-worker*, सहकारी.

**Fĕll'ow-feeling**, *n.* (फॅ'लो-फीलिंग्)—a like or kindred feeling, sympathy. सहानुभूति, कळवळा, दया, अनुकंपा.

**Fell'owshĭp**, *n.* (फॅ'लो-शिप्)—companionship ; status of college fellow ; (Arith.) sharing of profit and loss. सोबत, संगत ; फेलोची जागा, शिष्यवृत्ति ; भागीदारी, पाती, सरकत, सरकतवांटणी.

**Fēlō dē sē**, *n.* (फेलोडिसी)—(*pl.* felones, -felos) self murderer ; self-murder (no *pl.*) आत्मघातकी, आत्महत्या करणारा ; आत्महत्या.

**Fĕll'ў**, *n.* (फॅ'लि)—circumference of a wheel. चाकाचा वेर.

**Fĕl'on**, *n.* (फॅ'लन्)—a criminal ; small abscess. घोर अपराधी, खुनी ; लहान गळूं, फोड, नखुरडें. *a. & n.* cruel, wicked, murderous ; one who has committed felony. दुष्ट, खुनी ; घोर अपराधी. *Felo'nious, a.* (फिलो'निअस्) criminal ; (Law) of, involving, felony. स्वामिद्रोही ; घोर अपराधाचा, खून दरोडा वगैरे गुन्ह्यासंबंधी, देहान्त शिक्षेजोगा (गुन्हा). *-ly, adv.*

**Fĕl'onў**, *'n.* (फॅ'लनि)—a crime graver than misdemeanour. भयंकर गुन्हा, अत्यंत घोर अपराध, देहान्त शिक्षेजोगा गुन्हा.

**Fĕlt**, *n.* (फेल्ट्)—cloth of matted wool etc. एक जातीचा बुरणुस, जीन, नमदा. *v. t. & i.* to make into felt ; become matted. फेल्टसारखा कपडा तयार करणें ; फेल्ट कपडा चढवणें ; बुरणुसाप्रमाणें होणें. *F. hat*, फेल्ट-जीनची -टोपी. *Felty, a.*

**Felt**, *pa. t.* of *Feel.*

**Fēlŭcc'a**, *n.* (फिल'का)—a small coasting vessel with oars or sails or both. लहान पडाव.

**Fē'māle**, *a.* (फी'मेल्)—of the offsping-bearing sex ; (Bot.) fruit-bearing ; having pistil and no stamens ; of women ; of inferior quality ; (in instruments etc.) fitted to receive corresponding male part. स्त्री, मादी, स्त्रीजातीय ; गर्भतंतुकेसरयुक्त, स्त्रीकेसरयुक्त ; जनानी, स्त्रीधर्मी ; हलक्या प्रतीचा, सौम्य ; मादी. *n.* a female person or animal ; (vulg.) a woman, girl. स्त्री, मादी ; बायको, बाई, मुलगी.

**Fĕmĭnăl'ĭtў**, *n.* (फेमिनॅ'लिटि)—female nature or peculiarity. स्त्रीजातीचा स्वभाव,-चें वैशिष्ट्य.

**Fĕm'inĭne**, *a.* (फे'मिनिन्)—of women ; womanly ; effeminate ; having the gender proper to women's names. स्त्रियांचा ; बायकांना शोभणारा,

कोमल, नाजूक, दुर्बळ; ब्याढ, नामर्द; स्त्रीलिंगी. *Femine'ity*, *Feminin'ity*, *nn.*

**Fĕm'inĭsm**, *n.* (फे'मिनिझम्)—influence of women; belief in or advocacy of it. स्त्रीजातीचें वर्चस्व; स्त्रीवर्चस्वावरील विश्वास, त्याचा पुरस्कार. *-ist*, *n.*; *Fem'inize*, *v. t. & i.* स्त्री, स्त्रैण, स्त्रीलिंगी होणें, -करणें.

**Fĕn**, *n.* (फेन्)—a low marshy tract of land, a swamp where water stagnates. पाणथळ जमीन, दलदल. *Fenn'y*, *a.*

**Fĕnce**, *n.* (फेन्स्)—a hedge &c. enclosing a field; art of using sword; guard in machine; receiver, receiving house, of stolen property. कुंपण, वई, आवार, कोट; दांडपट्टा (खेळण्याचें कसब); चाप; चोरीचा माल घेणारा, चोरबाजार. *v. t. & i.* to surround as with fence; practise sword-play; (fig.) evade; deal in stolen goods. कुंपण घालणें; दांडपट्टा खेळणें; युक्तिवाद खेळणें, -करणें; चोरीच्या मालाचा व्यापार करणें. *To sit on the f.*, तटस्थ राहणें, बाजू न घेणें.

**Fĕnce'lĕss**, *a.* (फेन्स्'लिस्)—not enclosed; (poet.) unfortified, defenceless. उघडा, कुंपण नसलेला; अरक्षित, तटबंदी नसलेला.

**Fĕn'cer**, *n.* (फेन्सर्)—one who practises art of using sword; (of horse) one that leaps fences. दांडपट्टा शिकविणारा,-खेळणारा; कुंपणावरून उडी मारणारा घोडा.

**Fĕn'cible**, *n.* (फे'न्सिबल्)—(hist.) a soldier liable only for home defence. देशांतल्या देशांत नोकरी करणारा सैनिक.

**Fĕn'cĭng**, *n* (फे'न्सिंग्)—art of sword-play; (material for) fences. दांडपट्ट्याचा खेळ,-सराव,-अभ्यास; कुंपणाचें सामान, काठ्या, शिरीं; कुंपण, आवार. *F.-cully*, चोरीचा माल सांठवून ठेवणारा. *F.-ken*, चोरीच्या मालाची वखार.

**Fĕnd**, *v. t. & i.* (फेन्ड्)—to ward *off*, keep *away*; provide *for*. दूर राखणें, वारणें, निवारणें; (स्वतःसाठीं) तरतूद करणें, बचाव करणें. *Fen'der*, *n.* thing used to keep something off; frame round hearth. निवारक, (धक्क्याला जहाज आपटूं नये म्हणून जहाजाच्या बाजूस सोडलेलें) जाड दोरखंडाचें वेटोळें, डफरा; चुलीचा आडोसा,-ची पाळ. *-less*, *a.*

**Fĕnes'trate**, *a.* (फेने'स्ट्रेट्)—(bot., zool.) with small window-like perforations. गवाक्षसदृश जाळीचा, छिद्रांचा. *-tion*, *n.* इमारतींतील खिडक्यांची रचना; जाळीदार, सच्छिद्र असणें. [L. *fenestra*, window]

**Fē'nian**, *a. & n.* (फी'निअन्)—one of a league among the Irish in U. S. for overthrowing English rule in Ireland. (इंग्रजी राज्य उलथून पाडणाऱ्या गटापैकीं) आयरिश क्रांतिकारक.*-ism*, *n.*

**Fĕnn'el**, *n.* (फे'नल्)—yellow-flowered fragrant herb used in sauces. (एक जातीची) बडीशोप.

**Fĕn'ŭgreek**, *n.* (फे'न्यूग्रीक्)—leguminous plant with seeds. मेथी, मेथीदाणा.

**Feoff**, *n.* (फेफ्)—fief; territory held in fee. ताबा, मालकी; बक्षी करून मिळालेली जमीन. *-ee'*,*-'er*,*-'or*, *nn.* बक्षीस करून जमीन घेणारा, देणारा.*-ment*, *n.*

**Fēr'al**, **Fēr'ine**, *n.* (फी'अरल्,फी'अराइन्)—wild; uncultivated; brutal. रानटी, जंगली; पढीत; घातक, प्राणनाशक.

**Fĕ'retorў**, *a.* (फे'रिटरि)—a shrine; tomb; bier. समाधि, छत्री; थडगें; तिरडी, ताटी.

**Fēr'ial**, *a.* (फी'अरिअल्)—(of day) ordinary. (आठवड्यांतील, उपास तापासाचा नव्हे असा) सामान्य, साधा (दिवस).

**Ferm'ĕnt**, *n.* (फ'र्मेन्ट्)—fermenting agent; tumult. आंबविणारा पदार्थ, मंड, किण्व, विपाक; क्षोभ, गडबड, गोंधळ. *v. t. & i.* (फर्मे'न्ट्), to suffer, subject to, fermentation; excite, foment. विपाक उत्पन्न होणें,-करणें, आंबवणें; प्रक्षुब्ध होणें, करणें.*-able*,*-ative*, *aa.*

**Fermentā'tion**, *n.* (फर्मेन्टे'शन्)—process like that induced by leaven in dough; agitation, excitement. आंबवणें, फसफसणें, फदफदणें; मनाचा क्षोभ, अस्वास्थ्य, क्षोभ.

**Fern**, *n.* (फर्न्)—(Bot.) kinds of vascular cryptogamous plants. नेचा, नेचरी, सीतेचे केंस. *Fern'ery*, *n.* नेचाचे रोप तयार करण्याची जागा. *Fern'y*, *a.*

**Ferō'cious**, *a.* (फरो'शस्)—fierce, cruel. क्रूर, निष्ठुर, हिंस्र, हिंसक. *-ly*, *adv.*

**Ferŏ'citў**, *a.* (फरॉ'सिटि)—savage wildness or fierceness, savageness, cruelty. रानटीपणा, क्रौर्य.

**Fĕ'rreous**, *a.* (फे'रिअस्)—of, containing, iron. लोखंडाचा, लोखंडी, लोहमय.

**Fĕ'rret**, *n.* (फे'रिट्)—a kind of polecat used in catching rabbits, etc; detective; a tape. एक जनावर (पारध) शोधून काढणारा; फीत. *v. i. & t.* फेरिट जनावराच्या साह्यानें शिकार करणें; शोध काढणें.

**Fĕ'rrotўpe**, *n.* (फे'रटाइप्)-positive photograph on thin iron plate; this process. पातळ लोखंडी पत्र्यावर काढलेला फोटो,-छायाचित्र; तें काढण्याची पद्धति.

**Ferru'ginous**, *a.* (फरू'जिनस्)—of iron rust; rust-coloured. लोहांश असलेला; लोखंडाच्या गंजाच्या रंगाचा, तांबूस, पिंगट.

**Fĕ'rrule,-rel,** *n.* (फे'रल्)—a ring or cap of metal. मायणी, घसवी, लोहवलय.

**Fĕr'ry,** *n.* (फे'रि)—a place or provision for ferrying; right of ferrying; a small boat. तरीची जागा, उतार, तर; तरीचा मक्ता; जाण्यायेण्याची नाव. *v. t. & i.* तरीपार नेणें,-जाणें. *F.-man*, तर्या, नावाडी. *Fe'rriage, n.* तरीनें नेणें; तरीचें भाडें.

**Fert'ile,** *a.* (फ'टाइल्,-टिल्)—bearing or producing abundantly; fruitful. सुपीक; फलोत्पादक; कल्पक, सुपीक होण्याचा. *-lity, n.* सुपीकपणा फलवत्ता.

**Fert'ilize,** *v. t.* (फ'र्टिलाइझ्)—to make fertile, to fecundate. सुपीक करणें; (गर्भ) आहित करणें, गाभवणें. *-zation, -zor, nn.*

**Fĕ'rula,** *n.* (फे'रुला)—(Bot.) giant fennel. एक जातीची घहीशेप. *Fe'rule, n. & v. t.* flat ruler for punishing boys. पंतोजीची पट्टी, छडी (-नें शिक्षा करणें.)

**Ferv'ent,** *a* (फ'र्व्हन्ट्)—hot, glowing; ardent, intense, zealous. उष्ण, तेजस्वी; उत्साही, तीव्र, तीक्ष्ण, कळकळीचा. *Ferv'ency, Ferv'our, nn.*

**Ferv'ĭd,** *a.* (फ'र्व्हिड्)—ardent. उष्ण, उत्सुक, उत्साही, कळकळीचा.

**Fĕs'cūe,** *n.* (फे'स्क्यू)—teacher's pointer; kind of grass. लहान काठी, छडी; एक जातीचें गवत.

**Fĕs'tal,** *a.* (फे'स्टल्)—of a feast; gay. सणावाराचा; मौजेचा.

**Fĕs'ter,** *v. i.* (फे'स्टर्)—to generate matter; rankle; rot. पुवळणें, चिडणें, उतणें, (गळूं) पिकवणें. *n.* गळूं; सळ.

**Fĕs'tĭval,** *n.* (फे'स्टिव्हल्)—day of a feast; celebration, merry-making. उत्सव, सणाचा दिवस; सण, आनंद, मजा.

**Fĕs'tĭve,** *a.* (फे'स्टिव्ह्)—of a feast; joyous, gay, mirthful. मेजवानीचा आनंदाचा, मौजेचा. *-ly, adv.*

**Fĕstĭv'ĭtў,** *n.* (फेस्टि'व्हिटि)—gaiety, festive celebration, the mirth of a feast. आनंद, मौज, उत्सव, सण.

**Fĕstōōn',** *n.* (फे'स्टून्)—a hanging chain (of flowers, ribbons, &c.). फुलांची किंवा रंगीत पदार्थांची केलेली माळ, तोरण, माळ, हार. *v. t.* माळा, तोरण लावून शोभा आणणें.

**Fĕtch,** *v. t. & i.* (फेच्)—to go for and bring back; to draw forth; to be sold for; to deal (a blow). जाऊन आणणें; (रडें, अश्रू) काढणें, -आणणें; किंमत आणणें, किंमत येणें; (टोला) देणें. *n.* trick; far-reaching effort; person's double. युक्ति, डाव; दीर्घ श्रम, परिश्रम; जिवंत समंध, भूत, छायापुरुष.

**Fĕtch'ing,** *a.* (फे'चिंग्)—attractive. मनोहर, आनंददायक.

**Fête,** *n.* (फेट्)—a festival, an entertainment. सण, उत्सव, उत्सवदिन, जत्रा, मेजवानी. *v. t.* to entertain, make much of. मेजवानी देणें; (एकाद्याचा) गौरव करणें, उदो उदो करणें. *Fete champetre,* (फेट्शांपे'ट्र), out-door fete. वन-भोजन. *F. day,* उत्सव दिन, चाढदिवस. [F]

**Fē'tĭd, Foe'tĭd,** *a.* (फी'टिड्, फे'टिड्)—stinking. घाणेरा, दुर्गंधीचा, कुजणारा, सडका. *-ly, adv., -ness, n.*

**Fē'tĭsh,** *n.* (फी'टिश्, फे-)—an inanimate object worshipped by savages; a principle etc. irrationally reverenced. रानटी लोक पूजा करितात ती मूर्ति -सृष्टींतील जड वस्तु; अति आवडीची वस्तु, स्तोम माजविलेलें तत्त्व इ. *-ism, n.* मंतरेल्या,-भारलेल्या,-दैवी म्हणून मानलेल्या जडवस्तूची पूजा. *-ist, n.* भारलेल्या जड वस्तूचा पूजक. Also, *Fe'tich (e), n.*

**Fĕt'lŏck,** *n.* (फे'ट्लॉक्)—part of horse's leg where tuft of hair grows. घोड्याच्या खुरावरील केंस, -ती जागा, नेवर, नेवरावरील केंस.

**Fĕtt'er,** *n.* (फे'टर्)—a shackle for the feet; a band; (*pl.*) captivity; restraint. पायबेडी, बंधन; (अने०) कैद, बंदिवास. *v. t.* to bind as with fetters, impede. बिड्या घालणें, प्रतिबंध करणें, अटकाव करणें. *F. lock,* D या आकाराचा घोड्याचा पायबंद. *F. -less, a.* मोकळा, निरंकुश, मुक्त.

**Fĕt'tle,** *n.* (फे'टल्)—condition. स्थिति, ठाकठीक.

**Fetus,** See *Foetus.*

**Feu,** *n.* (फ्यू)—perpetual lease at fixed rent; piece of land so held. ठराविक भाडें घेऊन निरंतर भोगवट्यासाठीं देणें; -अशी दिलेली जमीन.

**Feud,** *n.* (फ्यूड्)—lasting mutual hostility; fief, feudal benefice, territory held in fee. कलह, भांडण, हाडवैर; जहागीर, कुणबावा, मोकासा.

**Feud'al,** *n.* (फ्यू'डल्)—of a feud or fief, held of a lord on condition of service. नोकरी करण्याच्या अटीवर दिलेल्या जहागिरीसंबंधीं, मोका-शाचा. *F. system,* लष्करी जहागिरीची पद्धत. *Feud'alism, n.* (लष्करी किंवा इतर नोकरी करण्याच्या अटीवर मिळालेली) मोकासदारी, जहा-गिरदारी. *Feud'alist, n.* लष्करी जहागीर देण्याच्या पद्धतीचा कैवारी.

**Feud'atorў,** *a. & n.* (फ्यू'डटरि)—feudally subject to; a feudal vassal. लष्करी नोकरीबद्दल जहागीर धारण करणारा, मोकाशानें घेतलेला. *n.* मोकाशी, सरदार, सामंत.

**Fē'ver,** *n.* ( फी'व्हर् )—morbid condition with temperature ; nervous excitement. ताप, ज्वर; उत्कंठातिरेक, मनःक्षोभ. *v. t.* to throw into fever. ताप येणें, संतप्त-क्षुब्ध होणें. *Fe'vered,* (*pa. p., fig.*) restless, agitated. अस्वस्थ, क्षुब्ध, संतप्त. *F.-heat,* तापाची आग,-उष्णता. *F.-trap,* तापाचे जंतु साठविणारी रोगट जागा,-स्थळ. *Fe'verous, a.* तापकरी, ज्वरकारी (स्थळ, हवामानाची जागा).

**Fē'verish,** *a.* (फी'व्हरिश्)—having symptoms of fever; excited, restless; (of place) feverous. तापाचीं पूर्वचिन्हें वाटत असलेला; कसर आलेला; अस्वस्थ, चंचल; तापकरी, ज्वरकारी. *-ly, adv., -ness, n.*

**Fē'verfew,** *n.* (फी'व्हर्फ्यू )—a herb formerly used as a febrifuge. ज्वरनाशक वनस्पति.

**Few,** *a. & n.* ( फ्यू )—not many, small in number. थोडे, अगदीं थोडे, दोन चार, चार पांच, अल्पसंख्या. *A f.* (opp. to none), थोडेसे, कांहीं. *The f.,* अल्पसंख्य, शिष्ट, सभ्य. *Not a f,* many. पुष्कळ, बरेच. *A good f.,* a fair number (*of*). बरेचसे लोक. *A f.* (*sl.*) बरेचसे, निःसंशय. *In f.,* संक्षेपानें. *Few'ness, n.* अल्पता, थोडकेपणा, थोडेपणा.

**Fey,** *a.* ( फे )—with the mind in abnormal state ; fated to die. मनाची अत्यवस्थता असलेला, आसन्नमरण.

**Fēz,** *n.* (फेझ्)—Turkish cap. तुर्की टोपी.

**Fianc'e,** *n.* (फीआं'न्से)—one's betrothed (male). वाङ्निश्चित वर, विवाहवचनबद्ध पुरुष.*-ee,* (*fem.*) वाङ्निश्चित वधू. [F]

**Fiās'cō,** *n.* (फीॲ'स्को)—(*pl. -os*) an ignominious and notorious failure, break-down. अपयश, फजिती, विचका, बोऱ्या.

**Fī'at,** *n.* ( फा'यट् )—authorization ; decree. अधिकार; हुकूम, आज्ञा, फर्मान, आदेश. [ L=be it done ]

**Fib,** *n. & v. i.* (फिब्)—(to tell) a trivial lie. क्षुल्लक गोष्टींत लबाडी, खोटें (बोलणें). *Fibb'er, Fib'ster, nn.* गप्पाड्या, थापाड्या.

**Fib,** *n. & v. t.* (फिब्)—(*Boxing*) (*to hit*) a blow. ठोसा देणें.

**Fī'bre,** *n.* ( फा'इबर् )—a thread-like filament ; (substance formed of fibres ; fibrous structure; character ; small root or twig. तंतु, तांत, सूत, दोरा ; तंतुमय पदार्थ, तंतूसारखा पदार्थ, तंतुमय कच्चा माल (कापूस, रेशीम); तंतुमय रचना ; शील, दम, पाणी ; अगदीं लहान मूळ किंवा फांदी. *F. silk,* artificial silk. कृत्रिम रेशीम. *Fī'bred, a.* (फा'इबर्ड्), तंतूंचा केलेला,-बनविलेला, तंतुमय. *Fī'brous, a.*

**Fī'bril,** *n.* (फा'इब्रिल् )—small fibre. बारीक तंतू, तंतुकडी.

**Fī'brin,** *n.* (फा'इब्रिन्)—coagulable lymph found in animals and plants. रक्ततंतुबीज, तान्तव, रक्तांतील एक पांढरें तंतुमय द्रव्य.*-ous, a.*

**Fī'broid,** *a.* ( फा'इब्रइड् )—fibre-like. तंतूसारखा, तंतुमय रचनेचा. *n.* fibroid uterine tumour. गर्भाशयांतील तंतुमय ग्रंथी.

**Fibro'ma,** *n.* (फा'इब्रो'मा )—(*pl.-ta*), fibrous tumour. तंतुमय ग्रंथी, तंतुमय-त्वचेनें घनलेलें गाळूक.

**Fib'ūla,** *n.* (फि'ब्यूला )—(*pl.-ae,-as*), splint bone on outer side of leg ; brooch. गुल्फास्थि, बहिर्जंघास्थि, पायाच्या दोन हाडांपैकीं एक ; अडकवण. *Fib'ular, a.*

**Fic'kle,** *a.* (फि'कल् )—inconstant, changeable. चंचल (-बुध्दीचा,-मनाचा), अस्थिर.*-ness, n.*

**Fic'tile,** *a.* (फि'क्टाइल्)—made by a potter ; of pottery. कुंभारानें केलेला, मातीचा ; मातीच्या भांड्यांचा.

**Fic'tion,** *n.:* (फि'क्शन्)—feigning, invention ; invented statement or narrative, nòvels, etc.; conventionally accepted falsehood. कल्पनेनें निर्माण करणें, कल्पिणें ; कल्पना, रचना, मानससृष्टि ; कल्पित कथा, कादंबरी इ. वाङ्मय ; व्यंगपूरक कल्पना.*-al, a.* कल्पनेचा, काल्पनिक, कादंबरी-संबंधीं.*-ist, n.* कादंबरीकार.

**Ficti'tious,** *a.* (फिक्टि'शस्)—not genuine ; assumed, imaginary ; of, in, novels. असत्य ; रचलेला, कल्पित, बनावट ; कादंबरीचा, कादंबरींतील, काल्पनिक.*-ly, adv.;-ness, n.*

**Fic'tive,** *a.* (फि'क्टिव्ह्)—creating, created, by imagination. कल्पनासूचक, काल्पनिक.

**Fid'dle,** *n.* (फि'डल्)—a violin ; (*Naut.*) a contrivance for stopping things from rolling off table ; (*Bot.*) a kind of dock with fiddle-shaped leaves. एक तंतुवाद्य, सारंगी ; (टेबलावरून वस्तु घसरूं नयेत म्हणून) फिडलसारखी मांडणी ; एक फिडलसारख्या पानांची वनस्पति. *v. i. & t.* to play the fiddle ; be idle, potter, move aimlessly. सारंगी वाजवणें ; आळशीपणानें वागणें, उगाच हाताचीं बोटें हालवणें, बोटांचे चाळे करणें, भटकणें. *Fit as a f.,* in good condition and spirits. हुशारींत, स्वस्थचित्त. *To play first, second, f.,* पुढाकार घेणें, पुढारी होणें, ऱ्या हाताखालीं काम करणें, चा हस्तक बनणें. *Face as long as a f.,* a dismal face. आंबट, दुःखीकष्टी, चेहरा. *Hang up one's f. when one comes home,* बाहेर बहुभाष, विनोदी पण घरांत सुखस्तंभ. *F.bow,-stick,* सारंगी वाजविण्याची काठी, कमान, गज.

*F.stick(s)*, *F.-stickend*, nonsense. छट्, छे! कुचकामाची गोष्ट. *Fiddle faddle*, *n.* क्षुल्लक गोष्ट, नसती उठाठेव; रिकामटेकडा. *a.* क्षुद्र, क्षुल्लक. *int.* छट्! *v. i.* उगाच माशा मारणें.

**Fidd'ler**, *n.* (फि'ड्लर्)—a player on fiddle, esp. for hire; kind of small crab. (भाडोत्री) सारंगीवाला; लहान खेकडा, कुरली.

**Fidd'ling**, *a.* (फि'ड्लिंग्)—petty, trifling. क्षुद्र, कुचकामाचा.

**Fidĕl'itў**, *n.* (फिडे'लिटि)—faithfulness, loyalty; accuracy. इमानीपणा, निःसीम भक्ति; सत्यता, तंतोतंतपणा.

**Fidg'ĕt**, *n.* (फि'जिट्)—an uneasy restless state or mood, restlessness; one who fidgets, act of bustling. चळवळ, अस्वास्थ्य, चुळबूळ, चुळबूळ, हालचाल,-करणारा,-करविणारा; धांदल, हालचाल. *v. i. & t.* चुळबूळ करणें, चळवळणें, अस्वस्थ करणें. *Fidg'ety*, *a.* अस्वस्थ, चळवळ्या; *-tiness*, *n.*

**Fĭd'ĭbus**, *n.* (फि'डिबस)—a paper spill for lighting candles, etc. (मेणबत्ती वगैरे पेटविण्याची) कागदाची चिरफळी.

**Fidū'cial**, *a.* (फाइड्यू'शल्)—having the nature of trust or reliance. भरंवशाचा, अढळ; निश्चल म्हणून मानलेला.

**Fidū'ciarў**, *n.* (फाइड्यू'शरि)—held or given in trust. विश्वासाचा, अढळ, विश्वासात्मक. *n.* a trustee. विश्वस्त.

**Fie**, *int.* (फाय्)—expressing sense of outraged propriety. *F. upon you!* छी, थू, धिक्कार!

**Fief**, *n.* (फीफ्)—estate held under condition of service. नोकरी करण्याच्या अटीनें दिलेली जहागीर, मोकासा.

**Field**, *n.* (फील्ड्)—ground, esp. for pasture or tillage; a battle, the ground where battle is fought; a tract rich in some natural product; expanse of sea, snow, etc.; (Crick.) fielders; area or sphere of operation etc.; (attrib.) found in the open country. क्षेत्र, शेत, वाडी, वावर, वाडगें, माळ; लढाई, युद्ध; रणक्षेत्र, समरांगण, रणमैदान; (खनिजद्रव्यें असलेला) प्रदेश, (खनिजद्रव्यें असलेली) जमीन; विस्तार; (क्रिकेटच्या खेळांतील) क्षेत्ररक्षक; कार्यक्षेत्र, अवसर, वाव, संधि; मैदानांतील, शेतांतील (विशे॰). *v. i. & t.* to act as fieldsman; to stop and return ball. क्षेत्ररक्षण करणें; चेंडू थांबविणें व परत देणें. *Battle-f.*, रणक्षेत्र. *Fair f. and no favour*, equal conditions in contest. उभयपक्षीं सारख्या अटींचा-निःपक्षपाती-सामना. *To hold the f.*, आपली जागा कायम राखणें *To take the f.*, स्वारीला-लढाईला- प्रारंभ करणें. *To keep the f.* लढाई चालू ठेवणें. *A good f.*, many and good competitors. पुष्कळ व चांगले (खेळांतील) प्रतिस्पर्धी,-खेळाडू. *F. allowance*, रणांगणावरील अधिकाऱ्याला मिळणारें जादा वेतन. *F. artillery*, *-battery*, गाड्यावरच्या हलक्या तोफा, हलक्या तोफांचा ताफा. *F.-cornet*, magistrate of township. शहराचा मॅजिस्ट्रेट-अधिकारी *F.-day*, (Mil.) manoeuvring exercise or right; (fig.) great occasion, important debate; an athletic meeting (U. S.) कवायतीचा, गोळीबाराचा दिवस; सणाचा दिवस, महत्त्वाचा वादविवाद; कुस्त्यांचा फड, शारीरिक खेळांचा दिवस. *F.-driver*, भटक्या जनावरांना पकडून कोंडवाड्यांत घालणारा अधिकारी. *F.-fare*, a kind of thrush spending winter in Britain. मदनसारिकेसारखा पक्षी. *F.-glass*, binocular telescope for outdoor use; a small telescope. दोन्ही डोळ्यांनीं पाहाण्याची लहान दुर्बीण; यथावर्णदर्शक दुर्बीण. *F. greys*, German soldiers in servics uniform. लष्करी गणवेषधारी जर्मन सैनिक. *F.-hospital*, ambulance; temporary hospital near battlefield. शुश्रूषापथक; रणक्षेत्रावरील तात्पुरता दवाखाना; इस्पितळ. *F.-Marshal*, general officer of the highest rank. रणधुरंधर, सर-सेनापति, रणगाजी. *F.-night*, (fig.) f. day. उत्सवाचा, सणाचा,-दिवस. *F.-officer*, कॅप्टनच्या वरच्या दर्जाचा व जनरलच्या खालचा लष्करी अधिकारी. *F.-s'man*, (क्रिकेट इ) खेळांतील क्षेत्ररक्षक. *F.-sports*, outdoor sports, esp. hunting, shooting and fishing. (पारध, शिकार, निशाणबाजी, मासे मारणें वगैरे) मैदानी खेळ. *F.-work*, temporary fortification. तात्पुरती तटबंदी. *F.-wards*, *adv.*

**Field'er**, *n.* (फी'ल्डर्)—fieldsman at cricket. क्रिकेटच्या खेळांत चेंडू अडवणारा किंवा झेलणारा. *Field'ing*, क्षेत्ररक्षण.

**Fiend**, *n.* (फीन्ड्)—the devil; superhumanly wicked or clever person. भूत, पिशाच्च; सैतान; अत्यंत दुष्ट क्रूर मनुष्य, अति हुशार मनुष्य.*-ish*, *a.*

**Fierce**, *a.* (फिअर्स्)—violent in hostility; raging, vehement; intense. भयंकर, क्रूर; उग्र, आवेशी, कडक, तीव्र.*-ly*, *adv*; *-ness*, *n.*

**Fier'ў**, *a.* (फा'यरि)—consisting of fire, flaming, flashing; easily provoked, irritable; spirited; (of cricket pitch) making ball rise dangerously. अग्नियुक्त; जाज्वल्य; तापट; कडक; पाणेदार; चेंडू जोरानें उडी घेतो अशी घट्ट (जमीन). *Fier'ily*, *adv.*; *fier'iness*, *n.*

**Fife**, *n.* (फाइफ्)—a. shrill military flute; a fifer. मुरली, पावा, रणतुर, रणवाजंत्र; रणवाजंत्री. *v. i. & t.* रणवाजंत्र वाजविणें,-वाजणें. *Fi'fer*, *n.* रणवाजंत्र वाजविणारा.

**Fifteen'**, *a. & n.* (फिफ्टी'न्)—one more than fourteen, 15, XV; Rugby foot-ball side of 15 players. पंधरा; रग्बि फुटबॉल खेळांतील पंधरा खेळाडूंचा संघ. *The f.*, १७१५ मधील जेकोबाइट पक्षाचें बंड. *Fifteen'th, a. & n.* पंधरावा.

**Fifth**, *a. & n.* (फिफ्थ्)—next after fourth. पांचवा; पंचमांश, पांचवा भाग; पंचम स्वर. *To smite under the f. rib*, kill. ठार मारणें. *Fifth'ly, adv.*

**Fif'ty̆**, *a. & n.* (फि'फ्टि)—five times ten.–50, L. पन्नास. *Fifty fifty, ( U. S. )* half and half, equal shares. निम्मेनिम, सारखा वांटा. *I have fifty things to tell you*, मला पुष्कळच गोष्टी तुला सांगावयाच्या आहेत. *The fifties*, ४९ ते ६० या वर्षांमधील काळ. *Fif'tieh, a. & n.* पन्नासावा. *Fiftyfold, a. & adv.* पन्नासपट.

**Fig**, *n.* (फिग्)—a soft pear-shaped many-seeded fruit.; the tree, a valueless thing. अंजीर, अंजिराचें झाड, किंमतहीन वस्तु, कवडी, कसपट. *F. tree*, अंजीराचें झाड. *Under one's vine and f.-tree*, safe at home. घरांत सुरक्षित *Don't care a f. for that*, त्याची पर्वा करूं नको. *A f. for—*,! फे! हट्! *F-leaf*, a device for concealing what is indecorous. अश्लील-असभ्य,-गोष्ट,- वस्तु,- लपविण्याची युक्ति. *F.-wort*, पिंगट फुलांची वनस्पति.

**Fig**, *v. t.* (फिग्)—*F.-out* (a person), dress up, adorn. (मनुष्याला) सजविणें, (घोड्याला) नटविणें, थाटमाट करणें. *n.* dress, equipment, condition. पोषाख, थाटमाट, भपका; स्थिति.

**Fight**, *v. i. & t.* (फाइट्)—to contend in battle or single combat or with the fists; to maintain against an opponent, contend over (question), win one's *way* by fighting; set on (cocks, dogs) to fight; manoeuvre in battle. लढणें, लढाई,-युद्ध-करणें, झगडणें, शीं सामना करणें, -देणें; निकाल लावून घेणें, लढविणें; धकाधकीनें मार्ग काढणें; झुंज लावणें; टक्कर लावणें; लढाईंत,-युद्धांत-डावपेंच लढविणें. *n.* fighting battle; (*figu.*) strife, conflict. युद्ध; लढाई; भांडण, झगडा. *To f. off*, repel with effort. प्रयासानें निवारणें. *To f. it out*, settle by fighting. सोक्षमोक्ष करणें.-लावणें. निकाल लावून घेणें. *F. shy of*, keep aloof from. पासून अलग राहणें, धाडस न करणें, हात न लावणें. *Running f.*, शत्रूचा पाठलाग करीत चालविलेलें युद्ध. *Sham f.*, लुटुपुटूची-कवायतीची लढाई. *Stand-up f.*, उघड उघड लढाई *To show f.*, not to yield tamely. दोन हात करणें, स्वाधपणें शरण न जाणें. *Fight'er, n.* योद्धा, लढवय्या. *Fight'ing, n.* युद्धोपयोगी, लढाईच्या उपयोगाचा लढाईचा. *Fought*, (फॉट्) *pa.* t. &. *pa.* p.

**Fig'ment**, *n.* (फि'ग्मन्ट्)—an invented statement; imaginary thing. कल्पिलेली, -रचलेली गोष्ट, मानससृष्टि, खोटी गोष्ट.

**Fig'ūrant**, *n.* (फि'ग्यूरन्ट्)—a ballet dancer. मुग्धनाट्यांतील नट, मुग्ध-नर्तक.*-te*, fem. मुग्धनाट्य-नर्तकी.

**Figūrā'tion**, *n.* (फिग्युरे'शन् .-फिगरे) an act of formation; shape बनणें, घडणें; आकार, आकृति.

**Fig'ūrative**, *a.* (फि'ग्युरेटिव्ह्)—metaphorical, emblematic; pictorial, plastic. लाक्षणिक, औपचारिक, अन्योक्तीचा; अलंकारिक, अलंकार-प्रचुर; चित्राचा, प्रतिकृतिसंबंधीं. *-ly, adv.*; *—ness, n.*

**Fig'ure**, *n.* (फि'गर्)—an external form; bodily shape; an image; a diagram, an illustration; a statue emblem, type, simile; likeness; horoscope; (Logic) the form of a slloygism according to position of middle term; (Rhet.) any deviation from the plainest form of statement; eovlution in dancing; a character denoting, a number (0, 1, 2, &c.). आकार, बाह्य रूप; आकृति; मूर्ति, प्रतिमा; आकृति, घनाकृति, चित्राकृति पुतळा, चित्र, छबी, तसबीर; प्रतिबिंब, प्रतिरूप, नमुना; सादृश्य; जन्मकुंडली; (तर्क०) आकार, अनुमानवाक्यप्रकार; (अलं०) रूपक, अलंकारिक भाषा; पदन्यास, नाचाचीं पावलें : अंक, आंकडा, आंख. संख्यादर्शक चिन्ह. *v. t. & i.* to represent in diagram or picture; imagine; estimate, be estimated; appear; mark with numbers or prices, cipher, आकृतींत,-चित्रांत दाखविणें, चित्र काढणें; कल्पना करणें; किंमत ठरविणें, -ठरणें; दिसणें; किंमत,-किंमतीचा अंक मांडणें; मोजणें, गणती करणें. *To keep one's f.*, शरीरानें आहे तसेंच राहणें, लठ्ठ न होणें. *A person of f.*, प्रसिद्ध पुरुष. *Double ff*, १० ते १०० यांमधील आंकडे. *Reach three ff.*, (क्रिकेटच्या खेळांत) शंभर धांवा काढणें. *F. of speech*, भाषेचे अलंकार. *F.*-caster, ज्योतिषी.

**Fig'ure head**, *n.* (फि'गरहेड्)—a carved bust, etc. over ship's cutwater; merely nominal leader, etc.; (Joc.) person's face. गलबताच्या नाळीवरील खोदींव पुतळा, आकृति; नांवाचा पुढारी, नामधारा; माणसाचा चेहरा.

**Fig'ūrine'**, *n.* (फिग्यु'रिन्)—statuette. लहान पुतळा, -आकृति.

**Fila'ment**, *n.* ( फि'लमन्ट्)-thread-like body, fibre; part of stamen that supports another. तंतु, सूत्र ; केसर .—*ary*,—*ous*, *aa*.

**Fil'ature**, *n.* (फि'लचर्)-reeling silk from cocoons. रेशमी कोसल्यांतील वेटोळेदार रेशीम.

**Filch**, *v. t.* ( फिल्च् )—to steal, to pilfer. भुरटी चोरी करणें.

**File**, *n.* ( फाइल् )—an instrument for reducing or smoothing objects ; ( *sl.* ) artful person ; a stiff pointed wire or other device for holding papers ; an orderely collection of papers; a row (of persons &c.) one behind another. कानस, कानसण्याचें हत्यार ; लबाड,-काबेबाज,- मनुष्य ; अडकवणें ( कागदाची वगैरे ) फाइल क्रमवार लावलेले कागदपत्र ; रांग, ओळ. *v. i. & t.* to smooth, reduce, remove with a file; polish; to march in a file; to place papers on a file. कानस मारणें, कानशीनें घासणें; घासून गुळगुळीत करणें ; एका पाठीमागून एक रांगेनें जाणें; फाइलमध्यें कागद ठेवणें, निशाणी क्रमांक घालून खटल्यांत दाखल करणें; रांगेनें चालणें,-चालवणें. To *bite*, or *gnaw*, *f.* कानस कुरतडणें म्ह. अशक्य गोष्ट करण्याचा प्रयत्न करणें.

**Fil'ial**, *a.* ( फि'लिअल्, फा'इ-)-of or befitting a son or daughter. मुलग्याला किंवा मुलीला योग्य असा, अपत्यसंबंधाचा. ( L *filias*, a son )

**Filia'tion**, *n.* (फिलिए'शन्, फाइलि— )—parentage ; descent ; branch of a society. पुत्रत्व, पुत्रत्वाचें नातें; वंशीयता; वंशावळ, शाखा.

**Fil'ibuster**, *n.* ( फि'लिबस्टर् )—one who wages unauthorized warfare against foreign State ; an obstructionist. बंडखोर, पेंढारी; विरोध करणारा, कायदेकानू करण्यामध्यें अडथळा करणारा. *v. i.* बंडखोरी करणें, अडथळा करणें, विरोध करणें

**Fil'igree, Fil'agree**, *n.* (फि'लिग्री फि'लग्री )—fine tracery of gold, silver or copper wire; anything delicate, light and showy. नाजूक जरतारी काम,—कलाबतूचें काम ; नाजूक, हलकी व दिखाऊ वस्तु.—*d*, *a*.

**Fill**, *v. t. & i.* ( फिल् )—to make or become full ; to spread over, to pervade ; to satisfy, to satiate ; to occupy ; (of dentist) block up (hollow tooth with gold). भरणें, भरून देणें ; पूर्ण भरून राहाणें, व्यापणें, तृप्त करणें, भरून टाकणें, मन विटणें, चा वीट येणें; ची जागा घेणें, काम करणें ; दांतांतील रिकामी जागा भरून काढणें. *n.* a full supply. तृप्ति, पुरेसें, -पोटभर, -अन्न, भरती, भरणा. *The sails f.*, शिडांत वारा भरला.—शिरला.—आहे. *To f. the bill*, be the only chief item ; do all that is required, suffice. (बिलांतील) एकच मुख्य बाब असणें, महत्त्वाचा प्रमुख भाग असणें;सर्व आवश्यक तेवढें करणें; पुरे होणें. *To f. in*, (मध्यें) भरणें. *F. out*, enlarge, become enlarged, to the proper limit. पुरें तयार करणें,-वाढविणें. *F. up*, तुडुंब भरणें; भरून टाकणें, होरणें, बुजवणें. *To drink, have, one's f.*, ओ येइतों पिणें, यथेच्छ खाणें पिणें, आकंठ पान करणें. *Fill'er*, *n.* vessel etc. for filling others. भरणारें मापाचें भांडें. *Fill'ing*, *n.* भरणें, भरणी, पूरण.

**Fill'et**, *n.* (फि'लिट्)—a little band to tie about the hair, ribbon for hair ; thin narrow strip ; (*pl.*) animal's loins ; undercut of sirloin ; boneless strip of fish ; (Archit.) narrow flat band between mouldings ; raised ridge or rim on any surface ; (Book-bind.) plain line impressed on cover ;-horizontal division of shield. केंस बांधण्याचा दोर, फीत, आगवळ बारीक अरुंद पट्टी; प्राण्याची-जनावराची कंबर, पृष्ठभाग; पुठ्ठ्याच्या मांसाचा तुकडा, माशाची हाडरहित पट्टी,-भाग; नक्षीकामांतील अरुंद सपाट जाड पट्टी, उंचवट्याची कडा; मलपृष्ठावरील खोदलेली साधी रेषा; ढालीचा आडवा छेद,-विभाग. *v. t.* to bind, encircle, with fillet ; divide (fish) into fillets. पट्टीनें बांधणें, फीत लावणें; (माशाचे) हाड काढून तुकडे करणें.

**Fill'ip**, *n.* (फि'लिप्)—smart stroke given with the finger ; stimulus ; mere trifle. टिचकी; प्रेरणा, जागृति, उत्तेजन; चुटकी, क्षुद्र बाबत. *v. t.* to strike slightly and smartly ; give fillip to. टिचकी मारणें; प्रेरणा-उत्तेजन-देणें.

**Fill'y**, *n.* (फि'लि)—female foal; (*sl.*) a girl. लहान घोडी, शिंगी, तरुण तरतरीत मुलगी, फुटाणी, माशी.

**Film**, *n.* (फिल्म्)—thin skin or layer ; coating on photographic paper or plate ; celluloid roll used in cinema, its contents as shown; dimness over eyes ; fine thread. पातळ कातडी किंवा थर, तवंग; फोटोच्या कागदावरील, कांचेवरील आवरण, सिनेमाची फिल्म; (डोळ्यावरील) सारा, कोशेटा, पटल, (कोळ्याच्या जाळ्याचा इ.) धागा, दोरा. *v.t. & i.* to cover, become covered, with film ; take picture of ( scene ) for the cinema. तवंगानें, साऱ्यानें, सूक्ष्म पडद्यानें-झाकणें; सिनेमासाठीं देखावे घेणें, चित्रित करणें. *F.-fan*, सिनेमा शौकीन. *F.-star*, सुप्रसिद्ध सिनेमा नट, नटी. *Fil'my*, *a.* सपटल; साऱ्याचा, तवंगाचा; तंतुमय. *Fil'miness*, *n.* ; *Fil'mily*, *adv.*

**Fil'oselle**, *n.* (फि'लसेल्)—floss-silk. लडीचें-कच्चें-रेशीम.

**Fil'ter**, *n.* (फि'ल्टर्)—device for cleaning liquid from impurities. गाळणें, पाणी स्वच्छ करणारा

सच्छिद्र पदार्थ, गळतीच यंत्र. *v. t.* & *i.* to pass (liquid) or flow through filter; percolate; (of news) leak out. गाळून स्वच्छ करणें, गळण, पाझरणें, झिरपणें, (बातमी) पसरणें, -फुटणें, कर्णोपकर्णी होणें. *Fil'trate*, गाळणींतून गाळणें. *Filtra'tion*, *n.* गाळण्याची,—शुद्ध करण्याची -पद्धति. *Filter-paper*, गाळणकागद..

**Filth**, *n.* (फिल्थ्)—loathsome dirt; garbage, foul language. अति घाण; दुर्गंधी-गलिच्छ-घाणेरडी, भाषा. *Fil'thy*, *a.*

**Fin**, *n.* (फिन्)—fish's propelling and steering organ; (*sl.*) hand. (माशाचा) पंख, पंखासारखा अवयव; हात. *Tip us your f.*, shake hands. हस्तांदोलन कर.—*ned*,-*less*, *a.*

**Fi'nal**, *a.* (फा'इ-नल्)—at the end, coming last; conclusive, decisive. अंत्य, शेवटील; अंतिम, निकालाचा, निर्णायक. *n.* अंतिम सामना, शेवटची परीक्षा. *Fi'nally*, *adv.* शेवटीं, अखेर.

**Fina'le**, *n.* (फिना'लि)—last movement of instrumental composition; close of opera etc. अखेरची गत,-चीज; गीताचा शेवटचा भाग, शेवट.

**Final'ity**, *n.* (फाइनॅ'लिटि)—final act, state, utterance; being final. शेवटची पायरी, संपूर्णता, अंत, शेवट.

**Finance'**, *n.* (फाइ-नॅ'-न्स्, फिनॅ'-)-management of (public) money; (*pl.*) pecuniary resources. पैशाची-सार्वजनिक पैशाची-व्यवस्था; (अने०) पैशाचें किंवा आर्थिक उत्पन्न, संस्थानाचा महसूल, जमा (धंद्या). *v. t.* & *i.* to find capital for; deal with money. (धंद्यासाठीं) भांडवलाची व्यवस्था करणें, पैशाची देव-घेव करणें. *Finan'cial*, *a.* उत्पन्नाचा, पैशासंबंधीं जमाबंदी-विषयक; *F.-year*, जमामहसुलाचें वर्ष. *Finan'cier*, *n.* जमीनमहसूल खात्याचा तज्ज्ञ, भांडवलवाला, भांडवल पुरविणारा.

**Find**, *v. t.* (फाइन्ड्)—(*found*, *pa. t.*) to come across, to meet with, to obtain; to discover, to ascertain; to determine; to supply. गांठणें, मिळवणें; शोधून काढणें; खातरी करणें; समजणें, निर्णय करणें, दाखला,-प्रत्यय येणें; पुरवठा करणें. *n.* discovery of treasure, etc. शोध, तलास, लाभ, प्राप्ति. *To f. oneself*, स्वतःला योग्य असा धंदा शोधून काढणें; तरतूद करणें. *F. out*, हुडकून काढणें; उकलणें; जाणणें. *All found*, with all necessaries provided. सर्व आवश्यक गोष्टीं-खर्चा-सह.

**Fi'nder**, *n.* (फा'इन्डर्)—discoverer; small telescope attached to large one. शोधणारा, उपदुर्बीण.

**Fi'nding**, *n.* (फा'इन्डिंग्)—verdict of jury. (ज्यूरीचा-पंचांचा-) निकाल.

**Fine**, *n.* (फाइन्)—a sum fixed as penalty; sum paid for privilege. दंड, दंडाची रक्कम; पागडी (भाडेपट्यानें दिलेली जागा रक्कम.) *v. i.* & *t.* to punish by fine. दंड करणें; पगडी देणें. *In f.*, सारांश, शेवटीं.

**Fine**, *a.* (फाइन्)—of high quality; refined, pure; thin, in small particles; excellent; handsome, imposing; bright, free from rain; smart, showy; dainty, fastidious; complimentray. छानदार, नामी; शुद्ध; तलम, अत्यंत सूक्ष्म; अत्युत्कृष्ट; सुरेख; निरभ्र; भपकेदार, तरतरीत; चविष्ट, चोखंदळ; खुषामतीचें, भलावणुकीचें, अघळपघळ स्तुतिपर. *n.* fine weather. निरभ्र-स्वच्छ-हवा. *adv.* finely. चांगल्या रीतीनें, उत्तम प्रकारें. *v. t.* & *i.* to make (beer) clear; (of liquid) become clear; (with *away*, *down*, *off*) make or become finer, -thinner; taper. शुद्ध करणें; शुद्ध होणें; जास्त तलम, बारीक करणें; टोंकदार-निमुळतें-होणें. *F. pencil*, of hard lead for making f. lines. अगदीं बारीक रेषा काढण्याची कठीण शिसपेन्सिल. *F. pen*, बारीक टोंकाची लेखणी. *A f. distinction*, अति सूक्ष्म भेद. *A f. friend you are!*, (iron.) काय पण छान (वाईट) मित्र! वाहवारे मित्र! *One f. day*, कोणे एके काळीं, एकदां, पूर्वी. *One of these f. days*, some day. पुढें, कधीं काळीं. *F. arts*, poetry music, painting and sculpture appealing to sense of beauty. साहित्य संगीतादि (सौंदर्यप्रधान) कला. *F.-draw*, *v. t.* to sew together with imperceptible join. शिवण न दिसेल इतक्या सफाईनें शिवणें, बेमालूम रफू करणें. *F.-drawn*, *a.* subtle, extremely thin; (Athlet.) trained down in weight. सूक्ष्म, अतिशय बारीक,-नाजूक; प्रमाणांत वजन कमी झालेला (मल्ल). *F. gentleman*, -*lady*, नाजूक छानछोकी पुरुष, स्त्री. *F. spun*, delicate; unpractical. अति सूक्ष्म, तलम; अव्यवहारी (तत्त्व इ.). *Fin'ish*, *a.*; *Fine'ly*, *adv.*; *Fine'ness*, *n.* बारीकपणा; तलमपणा; डूम, सुंदरपणा; सूक्ष्मता.

**Fi'nery**, *n.* (फा'इनरि)—show, splendour; showy dress or decoration; hearth where cast iron is made malleable. भपका, बाह्य शोभा, भपकेदार पोषाख; लोखंडाची भट्टी.

**Finesse'**, *n.* & *v. t.* & *i.* (फिने'स्)— delicate manipulation; artfulness. डावपेंच, युक्ति, कपटसंधान (करणें, -लढवणें).

**Fing'er**, *n.* (फि'ङ्गर्)—one of the four terminal members of the hand; finger-like object; part of glove that holds finger. हाताचें बोट, अंगुली; बोटासारख्या आकाराची वस्तु; हातमोजाच्या बोटाचा भाग. *v. t.* to touch, turn about, with the fingers; take (bribe etc.); play

with finger. बोटांनीं स्पर्श करणें, बोटांनीं हालविणें, -फिरविणें; (लांच) घेणें; बोटांनीं (वाद्य) वाजविणें. *Thumb f.*, आंगठा. *Index f.*, तर्जनी, आंगठ्याजवळचें बोट. *Middle f.*, मधलें बोट, मध्यमा, कर्णिका. *Ring f.*, आंगठीचें बोट, करांगळीजवळचें बोट. *Little f.*, करंगळी, आंगठी. *Done by the f. of God*, ईश्वरी नेमानेमानें घडलेलें. *To look through one's ff. at*, pretend not to see. पाहात नाहीं असें ढोंग-असा बहाणा-करणें,-दाखविणें. *To stir a f.*, make the least effort. अगदीं अल्पसा प्रयत्न करणें. *His ff. are all thumbs*, he is clumsy. तो आडमुठ्या आहे. *With a wet f.*, easily. सहजगत्या, आपोआप. *My ff. itch*, माझीं बोटें-हात-शिवशिवत आहेत, अधीर आहें. *To have a f. in the pie*, take part in a matter. एखाद्या गोष्टींत हात घालणें,-भाग घेणें. *To let slip through one's ff.*, lose hold of. च्या ताबा सोडणें, हातांतून सोडणें. *To have at one's f.-tips*, or *f.-ends*, know familiarly. हातखंडा, तोंडपाठ,-असणें, सुबोद्धत असणें. *To the f.-nails*, completely. पूर्णपणें. *F.-alphabet,-language*, बोटांच्या खुणांची-करपल्लवी-भाषा, करपल्लवी. *F. post*, sign-post at the turning of road. रस्त्याच्या वळणावरील बोटाच्या खुणेचा खांब. *F. print*, (गुन्हेगारांना ओळखून काढण्यासाठीं) बोटाचा ठसा. *F. stall*, cover of leather or rubber to protect finger. अंगुलीरक्षक. *F.-less*, *F.-ed*. *aa.*

**Fing'ering**, *n.* (फिं'ङ्गरिंग्)—management of the fingers in playing upon an instrument; wool for stockings. वाद्यावर बोटें फिरविणें, अंगुलिप्रयोग, बोटांनीं वाद्यवादन; पायमोज्यासाठीं लोकर.

**Fi'nial**, *n.* (फा'इनिअल्)—(Archit.) ornamental top to gable, canopy, etc. (चांदई, छत वगैरेचा) वरचा नक्षीदार भाग.

**Fin'ical, Fin'icking, Fin'ikin**, *aa.* (फि'निकल्, फि'निकिंग्,-किन्)—over-nice, fastidious; too much finished. चापचोप्या, ठाकठिकीचा, चोखंदळ; अतिशय ठाकठिकीचा. *Fin'ically*, *adv.*; *Finical'ity*, *Fin'icalness*, *nn.*

**Fi'nis**, *n.* (फा'इनिस्)—the end, conclusion. समाप्ति; शेवट.

**Fi'nish**, *v. t. & i.* (फिं'निश्)—to bring to an end, to come to the end; to perfect, to put final touches to; kill, dispatch, overcome completely. शेवटास नेणें, संपवणें, आटोपणें, संपणें; शेवटचा सफाइचा हात देणें, ठार मारणें, नाहींसा करणें, पूर्ण-पुरा-चीत करणें. *n.* last stage; decisive result: completed state, completion. शेवट; निर्णायक निकाल; पूर्णता, समाप्ति, शेवटचा हात, चकाकी. *To fight to a f.*, एका पक्षाचा पूर्ण पराभव होईपर्यंतचा निर्णायक सामना लढणें.

**Fin'isher**, *n.* (फि'निशर्)—one who finishes; a workman doing final operation; a crushing blow, etc. संपविणारा, पूर्ण करणारा; कामाला शेवटचा हात,-संस्कार,-देणारा (मनुष्य, यंत्र); सणसणीत तडाखा, शेवटचा तडाखा.

**Fi'nite**, *a.* (फा'इ-नाइट)—bounded, limited. मर्यादित, समर्याद.

**Finn'an**, *n.* (फि'नन्)—*F.-haddock*, smoke-cured haddock. धुरावलेला (कॉडसारखा) मासा.

**Finn'y**, *a.* (फिं'नि)—like or having fins; of fish. माशाच्या पंखासारखा, सपक्ष; माशासंबंधीं, मत्स्यप्रचुर.

**Fiord, Fjord**, *n.* (फिऑर्ड्)—long narrow arm of the sea between cliffs as in Norway. उंच कड्यांमधील लांब अरुंद आखात,-खाडी.

**Fir**, *n.* (फर्)—*F. tree*, kinds of coniferous tree, their wood. देवदार वृक्ष; त्याचें लांकूड. *F.-apple, -ball, -cone*, देवदाराचें फळ. *Firr'y*, *a.*

**Fire**, *n.* (फायर्)—state of combustion; flame, glow; burning fuel; conflagration; burning heat; fervour, spirit, poetic inspiration; firing of guns. अग्नि; ज्योत; आगटी, शेकोटी, परसा, विस्तव; दावाग्नि; दाह, उष्णता; उत्साह, त्वेष, काव्य, प्रतिभा; गोळीबार, मारा. *v. t. & i.* to set fire to; to kindle; to catch fire; to become heated or excited; cause to explode; (of gun) go off. आग लावणें, पेटवणें; पेटणें; आग लावणें; तापणें; स्फोट उडवणें, दारूगोळा सोडणें, बंदूक झाडणें. *To set f. to*, kindle. ला आग लावणें, पेटवणें, जाळणें. *To strike f.*, (घर्षणानें) अग्नि उत्पन्न करणें. *No smoke without fire*, always some ground for rumour. लोकवार्तेच्या मुळाशीं कांहीं तर कारण असतेंच,-आधार असतोच. *On f.*, burning, excited. जळणारें; अत्युत्सुक, प्रक्षुब्ध. *To set on f.*, पेटवणें; भडका उडवणें, प्रक्षुब्ध करणें. *To set Thames on f.*, do something remarkable. मोठें विलक्षण कृत्य करणें, अघटित गोष्ट करणें. *Out of frying-pan into f.*, आगींतून फोफाट्यांत. *To pour oil on f.*, आगींत तेल ओतणें, जास्त पेटवणें,-भडकवणें. *To go through f. and water*, सर्व प्रकारच्या भयंकर संकटांना तोंड देणें. *F. and sword*, जाळपोळ व खून,-कत्तल. *Greek f.*, शत्रूचीं जहाजें वगैरे पेटवून देण्याचें स्फोटक द्रव्य. *St. Anthony's f.*, धांवरें, अग्निविसर्प (रोग). *St. Elmo's f.*, वादळांत जहाजावर दिसणारा विजेचा झोत. *Under f.*, being shot at. (बंदुकीच्या, तोफांच्या) माऱ्यांत. *F.-alarm*, आगीची (आग लागल्याची) सूचना देणारें यंत्र. *F. ball*, अग्निगोलक, उल्का; स्फोटक गोळा. *F.-brick*, आगीनें

न जळणारी-पक्की-वीट. *F.-damp*, खाणींतील कार्बननें बनलेला जलजनक वायु,- उज्ज. *F. dog*, आगीच्या भट्टींत लाकडें ठेवण्याची मंडपी. *F.-eater*, juggler who eats fire; a great fighter. अग्नि, आग खाऊन दाखविणारा जादूगार; पट्टीचा भांडखोर, -लढवय्या, -मल्ल. *F.-eyed*, (*poet.*) with glowing eyes. सतेज नेत्रांचा, तेजस्वी नेत्र असलेला. *F. guard*, चुलीची पाळ. *F. insurance*, आगीचा विमा. *F.-irons*, चिमटा इ. भट्टीचीं हत्यारें. *F.-lock*, चापाची जुनी बंदूक. *F.-man*, आगवाला मनुष्य; आग विझविणारा- बंबवाला- मनुष्य. *F. new*, कोरा करकरीत, चकचकीत. *F.-pan*, शेगडी, आगटें. *F.-place*, भिंतींतील चूल, चुला. *F.-plug* (*abbr. F.:P.*), आग विझविण्याच्या पाणी मारणाऱ्या नळासाठीं पाण्याच्या मुख्य नळाला असलेली चावी,-सांधा. *F-water*, whisky. कडक जळजळीत दारू. *F.-wood*, जळण, सरपण, इंधन. *F.-worship*, अग्निपूजा. *To f. up*, एकदम भडकणें, -रागावणें. *F. salute*, सन्मानार्थ बंदुकी झाडणें,- तोफा झाडणें; तोफांची, बंदुकांची, सलामी देणें. *F. broadside*, लढाऊ जहाजावरील एका बाजूच्या सर्व तोफा डागणें. *F. away*, begin, go ahead. सुरवात करणें, पुढें जाणें. *F.* (*out*), (U. S.) expel, dismiss (a person). हाकलून देणें, काढून टाकणें. *F.-proof*, आगबंद, आगीपासून सुरक्षित. *F.-less, a.*

**Fire'ärm**, *n.* (फा'यर्-आर्म्)—a gun, pistol. बंदुक, पिस्तुल.

**Fire'brănd**, *n.* (फा'यर्-ब्रॅन्ड्)—piece of burning wood; kindler of strife. कोलीत; भांडण लावणारा, आगलाव्या, कळीचा नारद.

**Fire'-brigāde**, *n* (फा'यर्-ब्रिगेड्)—organized body of firemen. आग विझविणारे लोक, आगीचा बंबवाली टोळी.

**Fire'-bŭg**, *n.* (फा'यर्बग्)—(*U. S.*) an incendiary. दुष्टाव्यानें, -वेडामुळें,- आग लावणारा, आगलाव्या.

**Fire'engine**, *n.* (फा'यर्इंजिन्)—engine for putting out fire. आग विझविणारा-आगीचा-बंब.

**Fire'flȳ**, *n.* (फा'यर्-फ्लाय्)—a winged insect emitting phosphorescent light at night. काजवा.

**Fīr'ing**, *n.* (फा'यरिंग्)—fuel; act of letting off firearms; cauterizing. जळण, जळवण; गोळीबार, मारगिरी; गूल, -गोदा, -चोरा देणें. *F. iron*, डागणी, डाहणी.

**Firk'in**, *n.* (फर्'किन्)—a small cask; half kilderkin. लहान पिंप; अर्धें पिंप (माप).

**Fire'work**, *n.* (फा'यर्-वर्क्)—a device giving spectacular effect by use of combustibles; (*fig., pl.*) display of wit, etc. दारूकाम, दारू; बुद्धीचें तेज, प्रतिभानल, आविष्कार.

**Firm**, *n.* (फर्म्)—partners in business. धंद्यांतील भागीदार; पेढी, मंडळी. *Long f.*, माल खरेदी करून पैसे बुडविणारी टोळी.

**Firm**, *a.* (फर्म्)— of solid structure; fixed, steady; steadfast, resolute; (of offer) not liable to cancellation after acceptance; (of prices) maintaining their level or value. मजबूत, बळकट; स्थिर, घट्ट, घन, खंबीर; निश्चयी, निर्धाराचा; ठाम, कायम असलेला, निश्चित; न बदलणारी, स्थिर (किंमत). *adv. firmly.* घट्ट, बळकट; धैर्यानें, चिकाटीनें, दृढनिश्चयपूर्वक. *v. t. & i.* to solidify; fix firmly. घट्ट, घन करणें; घट्ट-मजबूत बसविणें, बसणें, मूळ धरणें, जाम बसणें. *Firm'ly. adv.*; *Firm'ness, n.* कठीणपणा, नेट, निग्रह, जोर, बळकटी.

**Firm'ament**, *n.* (फ'र्मंमन्ट्)—vault of heaven. आकाश, नभ, नभोमंडळ. —*al, a.* नभोमंडळाचा, आंतरिक्ष.

**First**, *a.* (फर्स्ट्)—the ordinal of 1; earliest in time or order; of highest repute. प्रथम; अगदीं पहिला, प्रथमचा, आधींचा; सर्वांत पुढें; यशस्वान्, सर्वोत्कृष्ट. *n.* first class honours at university, etc.; first prize at show; (*pl.*) best quality. विश्वविद्यालयीन परीक्षेंतील प्रथम श्रेणी; प्रदर्शनांतील पहिलें बक्षीस,-पारितोषिक, पहिला क्रमांक; सर्वोत्कृष्ट नमुना, जात. *adv.* before all, or something else; for the first time. प्रथमतः, सर्वांपूर्वी; पहिल्यांदा, प्रथम. *At f. sight,-view,-blush*, prima facie. सकृद्दर्शनीं, वर वर पाहतां. *To come in f.*, शर्यत जिंकणें. *In the f. place*, to begin with. प्रथम, पहिल्यांदा. *F. aid*, प्राथमिक उपचार. *F.-born*, eldest (child). ज्येष्ठ (अपत्य), पहिलें-वडील-मूल. *F.-class, a., n. and adv.* पहिल्या प्रतीचा, उंची, प्रथम श्रेणींतील (उत्तीर्ण विद्यार्थी); (आगगाडींतील उतारूंचा) पहिला वर्ग; पहिल्या वर्गानें (प्रवास करणें). *F. coat*, रंगाचा पहिला हात. *F. cost*, मूळ किंमत. *F. day*, Sunday. रविवार. *F. floor*, (तळमजल्यावरचा) पहिला मजला; (*U. S.*) तळमजला. *F. form*, पहिली इयत्ता. *F.-fruit*, (*usu. pl.*) season's first products as offered to God; f. results of work. नवान्न, नवधान्य, पाड, नवाळी; पहिलीं फळें. *F. hand*, मुळांतून मिळविलेली, प्रत्यक्ष; *At f.-hand*, directly. प्रत्यक्ष. *F. night* (*er*), खेळाचा पहिला प्रयोग (हटकून पाहणारा). *F. rate*, पहिल्या प्रतीचा-सर्वोत्कृष्ट. *F.-rate powers*, पहिल्या प्रतीचीं-श्रेष्ठ, राष्ट्रें. *From the f.*, पहिल्यापासून. *From f. to last, of*, throughout. साद्यंत, अव्वलपासून अखेरपर्यंत. *At f.*, आरंभीं *F come f. served*, हजीर तो वजीर. *F. and last*, on the whole. एकंदरीनें, एकंदरींत. *F. or last*, आजना उद्यां, केव्हांतरी. *F.-ly, adv.*

**First'lings**, *n pl.* (फ'र्स्ट्लिंङ्ज्)—first fruits. पहिलें वेत्, पहिली वीण, पहिली गोष्ट, पहिला विचार, पहिलें काम.

**Firth, Frĭth**, *n.* (फर्थ्, फ्रिथ्)—an arm of the sea, an estuary. आखात, खाडी.

**Fĭsc, Fĭsk**, *n.* (फिस्क्)—treasury of ancient Rome, (rare) exchequer. प्राचीन रोमन राजस्वकोष ; राज्याचा वसूल.

**Fĭs'cal**, *a.* (फि'स्कल्)—of public treasury or revenue. राजाच्या किंवा सरकारी वसुलासंबंधीं. *n.* legal, official; kind of shrike. न्यायाधिकारी (द.आफ्रि.) पक्षी. *F. policy*, (आयात मालावरील) जकातीचें धोरण. *Fis'cally, adv.*

**Fĭsh**, *n.* (फिश्)—an animal living in water; flesh of fish ; (colloq.) a person (usu. with *queer, cool*). मासा, मत्स्य, मासळी ; माशाचें मांस ; माणूस. *v. i. & t.* to try to catch fish ; to try to get information indirectly. मासे मारणें ; अप्रत्यक्ष रीतीनें माहिती मिळविणें, युक्तीनें प्रयत्न करणें. *Pretty kettle of f.*, confusion. गोंधळ, अव्यवस्था, अस्ताव्यस्तपणा. *A f. out of water*, अस्वस्थचित्त मनुष्य, गोंधळून गेलेला मनुष्य. *Drink like a f.*, अतिपान करणें. *To feed the ff.*, be drowned, be sea-sick. बुडणें, दर्या लागणें. *All's f. that came to his net*, मिळेल तेवढें पदरांत टाकतो. *There's as good f. in the sea as ever came out of it*, no fear of scarcity. तूट पडण्याची भीति नाहीं. *Queer f.*, चक्रम-तमासगीर माणूस. *Neither f., flesh, nor good red herring*, अनिश्चित स्वरूपाची गोष्ट, हेंही नाहीं, तेंही नाहीं. *Other f. to fry*, अधिक महत्त्वाचें काम. *F.-ball*, माशाची पोळी. *F.-carver*, मासे कापण्याची सुरी. *F.-hook*, गळ, नरी. *F. pond*, मत्स्यकुंड, समुद्र. *F.-story*, भरमसाट,-अविश्वसनीय गोष्ट. *F.-wife*, कोळीण, मासेविकी.

**Fĭsh**, *n.* (फिश्)—a piece of wood for strengthening mast; flat plate of iron etc. strengthening beam; piece of ivory. डोलकाठीला मजबुती आणणारी जोडपट्टी ; माशाच्या आकाराचें जोड पहाल; हस्तिदंती पट्टी. *v. t.* जोडपट्टी देणें. *F. plate*, दोन रुळांच्या सांध्यावरची सांधपट्टी.

**Fĭsh'erman**, *n.* (फि'शर्-मन्)—one who lives by fishing, angler. मासे धरणारा, कोळी. *Fish'er,n.* मासे धरणारा ; (sl.) कागदी चलन.

**Fĭsh'erў**, *n.* (फि'शरि)—business of fishing; fishing-rod. मासे धरण्याचा -मच्छेमारीचा- धंदा, दालद ; मच्छेमारीची जागा.

**Fĭsh'ing**, *n.* (फि'शिंग्)—taking fish; angling. मासे पकडणें ; गळी टाकणें. *F.-line,-net,-rod,-tackle*, मासे पकडण्याची दोरी, जाळें, काठी, साधन.

**Fĭsh'y**, *a.* (फि'शि)—of or like fish ; bounding in fish ; (sl.) dubious. माशांचा, माशांसारखा, माशांनीं युक्त ; संशयित. *F.-eye*, मेंगळी दृष्टि, शून्य नजर.

**Fĭss'ile**, *a.* (फि'साइल)—tending to split. भेग,-तडा-पडणारा,-पडायला आलेला. *Fi'ssion, n.* तडे पडणें.

**Fĭ'ssure**, *n.* (फि'शर्)—cleft, split; (Bot., Anat.) narrow opening in organ; cleavage. भेग ; अरुंद द्वार, चीर, फट, तडा, तीर. *v. t.* split. चिरणें, भेग पाडणें, विभागणें.

**Fĭst**, *n.* (फिस्ट्)—a clenched hand, hand, handwriting. घट्ट केलेली मूठ, मुष्टि, हात, हस्ताक्षर. *v. t.* to strike with fist; (Naut.) handle (sail etc.) ठोसे लगावणें; मारणें; (शीड, वल्हें) हातानें चालविणें. *Fis'tic (al.), aa.* हात धाईवर येणारा, ठोसा ठोशी करणारा. *Fisticuffs, n. pl.* हातकुटी, धव्वाधव्वी.

**Fĭs'tŭlă**, *n.* (फि'स्टयूला)—a natural pipe or spout (in whales, insects, etc.); a pipe-like ulcer. तोटी, नळी ; भगेंद्र, भगंदर, द्विमुखी,-बहुमुखी-नाडीव्रण. *Fis'tular,—lous, aa.*

**Fĭt, Fўtte**, *n.* (फिट्)—section of a poem. कवितेचा विभाग,-पाद.

**Fĭt**, *n.* (फिट्)—sudden seizure of hysteria, sudden transitory state. (रोगाचा) झटका, झपाटा; आवेग, तिडीक; तब्यत, लहर. *To give one a f.*, एकाद्याला घाबरविणें,-तडाखा लगावणें. *To beat one into, give one, ff.*, सहज पाडाव करणें,—जिकणें. *By ff. (and starts)*, धरून सोडून, अधून मधून, लहरीप्रमाणें. *Fit'ful, a. Fit'fully, adv.*; *Fit'fulness n.* लहरीपणा.

**Fĭt**, *a.* (फिट्)—qualified, competent, worthy; becoming, proper; in good health or condition. योग्य, लायक, उपयोगी, क्षम, अनुरूप; जोगा, जोगता, योग्य, तयार; निरोगी. *v. t. & i.* to be in harmony with, to be of right size and shape; to adapt; to make competent; to supply. योग्य दिसणें, शोभणें, साजणें, ठीक होणें, अगदीं बरोबर होणें, जमणें ; जम बसवणें ; लायक करणें; सज्ज करणें, युक्त करणें. *n.* the way a garment fits, जुळणी, बेत, (कपडा) ठाकठीक बसणें,-होणें. *Survival of the fittest*, बळी तो कान पिळी (हा न्याय). *To f. on*, (कपडा) घालून पाहणें. *F. out,-up*, equip. युक्त,-सज्ज,-करणें; पूर्ण तयारी करणें. *F.-out, n.* equipment. तयारी, सज्जता.

**Fĭt'ful**, *a.* (फि'ट्-फुल्)—active by fits and starts; spasmodic, intermittent. चंचल; लहरी, अनिश्चित, छांदिष्ट.

**Fit'ness**, *n.* (फि'ट्नेस्)—being fit; moral worthiness; propriety. योग्यता; लायकी, शिस्तपणा; औचित्य. *The f. of things*, वाजवीपणा, न्याय्यता.

**Fitt'er**, *n.* (फि'टर्)—one who fits, specially in various trades. यंत्रें वगैरे जोडून बसविणारा, सांधणारा, जुळारी, जोडारी.

**Fitt'ing**, *n.* (फि'टिंग्)—(usu. pl.) fixtures, apparatus. जोडकाम, जोडकामाचें साहित्य,-साधनें, उपकरणें. *a.* becoming, proper. साजेसा, योग्य, उचित.—*ly*, *adv*.

**Five**, *a.* & *n.* (फाइव्ह्)—one more than four, (5, V). पंच, पांच. *n.* the number five; a set of five things; a card, die, with five pips. पांचाचा आंकडा, पांच; पंचकडी, फाड; पांच ठिपक्यांचें पान, पंच्या, पांचाचा फासा. *Bunch of ff.*, hand. (पांच बोटांचा) हात. *F. fold*, *a.* & *adv.* repeated five times. पांचपट,-टीनें. *F.-hundred*, (U.S.) एक पत्त्यांचा खेळ. *F.-penny*, (फि'पेनि), पांच पेन्स किंमतीचें, दराचें. *F.-percents*, stock or shares paying 5%. ५ दराची ठेव,-रोखे. *Fi'ver*, *n.* (*sl.*) पांच पौंडाची नोट, (कागदी चलन); ५ डॉलरचें बिल,-आकार. *Fives*, (फाइव्झ्), a kind of ball game. एक प्रकारचा चेंडूचा खेळ. [*Sk. Panchan, five*]

**Fix**, *v.t.* & *i.* (फिक्स्)—to fasten, to secure; direct steadily (eyes, attention) on; identify, locate; to attract and hold attention; to settle, to specify (price, date, &c.); get the better of, win over. जाम करणें, घट्ट बसवणें; स्थिरावणें, लावणें, टक लावून पहाणें; निश्चित करणें, कायम करणें, आकर्षण करणें; ठरविणें; मुक्रर करणें; धर पगडा बसविणें, वश करणें. *Fix'er*, *n.* (U.S.) कायदे मोडणाऱ्यांच्या वतीनें न्यायाधीश, पंच वगैरेंना वश करून घेणारा. *Fix'ings*, *n. pl.* सिद्धता, साफसूफ करणें, ठाकठीक. *Fixed*, *a.* —*acid*, *oil*, न उडून जाणारें द्रव्य, तेल; *F. property*, स्थावर मिळकत, घरें व जमीन. *n.* a dilemma, a difficult position. पंचाईत, अडचण, पेंच, संकट.

**Fixa'tion**, *n.* (फिक्से'शन्)—fixing, being fixed; coagulation; process of combining gas with solid. स्थिर करणें, स्थिरता; घट्ट होणें; वायूचें घनाशीं संयोजन करण्याची पद्धति, स्थिरीकरण. *Fix'ature*, *n.* केंस घट्ट बसविणारें चिकटवण, स्थिरीकरणद्रव्य.

**Fix'edly**, *adv.* (फि'क्सिड्लि)—intently. स्थिरपणानें. *Fix'edness*, *n.*

**Fix'ity**, *n.* (फि'क्सिटि)—fixed state; security. ठामपणा, स्थिरता; निश्चितपणा.

**Fix'ture**, *n.* (फि'क्स्चर्)—a thing fixed; (*pl. Law*) articles affixed to freehold; (date fixed for) match, etc. ठाम, ठरीव, कायम-गोष्ट; (पूर्ण मालकीच्या वतनांतील) मालकानें स्वतः बसविलेल्या (दारें खिडक्या इमारती वगैरे) वस्तु; सामना, खेळ, शर्यत वगैरे (चा निश्चित केलेला दिवस).

**Fizz**, *v. i.* (फिझ्)—to hiss. फसफसणें, फुरफुर करणें. *n.* फसफस आवाज; फसफसणारें पेय, शाम्पेन दारू. *Fiz'zle*, *v. i.* to hiss feebly. फसफसणें. *n.* फसफस आवाज; फजिती, वायफळ यत्न.

**Flăbb'ergast**, *v. t.* (फ्लॅ'बर्गास्ट्)-to dumbfound. आश्चर्यानें बोबडी वळवणें, निरुत्तर करणें.

**Flăbb'y**, *a.* (फ्लॅ'बि)—(of flesh, &c.) limp, not firm; (*fig.*) nerveless, feeble. गुबगुबीत, फोपशा; अशक्त, कमजोर. *Flabb'iness*, *n.*

**Flăbell'ate**, **Flăbell'iform**, *aa.* —(फ्लॅब'लेट्, फ्लॅब'लिफॉर्म्)-(Bot., Zool.) fan-shaped. पंख्याच्या आकाराचा, व्यजनाकार.

**Flăc'cid**, *a.* (फ्लॅ'क्सिड्)—flabby. लिबलिबीत, विळविळीत, बिलबिलीत.-*ity*, *n.*

**Flăg**, *n.* (फ्लॅग्)—a standard, an ensign, a signal; tail of dog. निशाण, फ्लॅग, बावटा, ध्वज, निशाणी; कुत्र्याचें शेंपूट. *v. t.* & *i.* to inform by flag-signals; to hang down; to droop; to fall off in interest. बावट्यांनीं कळविणें; सुंगा करणें, लोंबकळणें, ढिला पडणें; वांकणें; कमी होणें, मरगळणें, शिथिल होणें. *Black f.*, चांचे लोकांचें निशाण; गुन्हेगाराला फांशी देतांना तुरुंगावर लावतात तें काळें निशाण. *White f.*, *f. of truce*, सुलूतहकुबीदर्शक,-तहाचें पांढरें निशाण. *Yellow f.*, (आजारी लोकांच्या) इस्पितळावरील निशाण, सांसर्गिक रोगराई असलेल्या जहाजावरील पिवळें निशाण. *To lower or strike one's f.*, (शरण आल्याची खूण म्हणून) निशाण उतरणें,-पाडणें. *To dip f.*, (सलामी देण्याकरितां) निशाण खालीं करून एकदम वर करणें. *To hoist one's f.*, assume command. अधिकार हातीं घेणें. *To strike one's f.*, अधिकारत्याग करणें. *F.-boat*, जलशर्यतींतील खुणेची निशाणधारी बोट. *F. captain*, captain of f.-ship. आरमारी निशाण-जहाजाचा नायक. *F.—day*, लहान निशाणें जाणाऱ्या येणाऱ्यांना विकून एकाद्या कार्याकरितां पैसे जमविण्याचा दिवस; (U. S.) १४ जून हा दिवस. *F. officer*, vice- or rear-admiral, आरमारी नायक, उप-नायक, सारंग, दुर्यासारंगाच्या खालचा अधिकारी. *F.—man*, signaller at races, etc. शर्यतींतील निशाण दाखविणारा. *F.-ship*, having admiral on board. दुर्यासारंगाचें जहाज. *F.-staff*, निशाणाचा खांब. *F.-station*, बावटा दाखविल्यावरच आगगाडी थांबते. ती जागा, तें

(स्टेशन). *F.-wagging*, (mil. sl.) signalling. हातांत बावटे-निशाणें-घेऊन त्यांनीं खुणा करणें, संदेश पोंचविणें. *F.-waver*, an agitator. चळवळ्या, चळवळ करणारा.

**Flăg**, *n.* (फ्लॅग्)—kinds of water-plant. जलरुह, जलवनस्पती.

**Flăg**, *n.* (फ्लॅग्)—(*-stone*) a flat slab of rock; (*pl.*) pavement of flag-stones; (*f.-feather*) quill feather of bird's wing. ठिसूळ पातळ पत्र्यासारखा दगड, फरशा दगड; फरशा दगडांची फरसबंदी; पक्षाच्या पंखाचें दांडेरी पीस. *v. t.* to pave with flags. फरशा दगडांची फरसबंदी करणें.

**Flagĕll'ant**, *n.* (फ्लजे'लन्ट्)—one who scourges himself. (पापक्षालनार्थ) स्वतःस कोरडे मारून घेणारा. *a.* self-scourging; given to flogging. स्वतःचा निषेध,-धिक्कार करणारा; फटके मारून घेणारा. *Fla'gellate*, *v. t.* चाबकानें मारणें; —*tion*,—*tor*, *nn.*

**Flăgeolĕt'**, *n.* (फ्लॅजोले'ट्)—a wind instrument with mouth-piece at end. एक प्रकारचें अलगूज, अलगुजें.

**Flagĭ'tious**, *a.* (फ्लजि'शस्)—deeply criminal, heinous. अति निंद्य, घोर.-*ly*, *adv.*,-*ness*, *n.*

**Flăg'on**, *n.* (फ्लॅ'गन्)—a vessel to hold liquor. सुरई, चंबू.

**Flā'grant**, *a.* (फ्ले'ग्रन्ट्)—flaming, glowing, glaring; scandalous. ठळक, उघड, धडधडीत; निंदास्पद, भयंकर, नीच.—*ly*, *adv.*;-*ncy*, *n.* ढळढळीतपणा, ठळकपणा.

**Flail**, *n.* (फ्लेल्)—a hand-threshing instrument. धान्य झोडण्याची काठी, मोगरी, चडवणी,(-चें) यंत्र.

**Flair**, *n.* (फ्लेअर्)—selective instinct for what is good, paying, etc. (बरेंवाईट, फायदेशीर जाणण्याची) उपजतबुद्धि, तारतम्यज्ञान. [F]

**Flāke**, *n.* (फ्लेक्)—a rack; a stage for drying fish etc. मांडणी, उंचावर मारलेली फळी; माचा.

**Flāke**, *n.* (फ्लेक्)—a light fleecy tuft or piece (esp. of snow), a thin broad piece; a layer; portion of ignited matter thrown off. कळपा, ढलपा, बर्फाचा अगदीं पातळ रुंद तुकडा; थर; कीट, काजळी, किटाळ. *v. i. & t.* to fall in, sprinkle, with flakes; ..., come (off, etc.) in flakes. बर्फाचे थर बसणें, ढलपे,-कपचे पडणें; कपचे उडणें. *Flak'y*, *a.*

**Flăm**, *n.* (फ्लॅम्)—a sham story, hoax. बनावट गोष्ट, फसवणूक.

**Flăm'beau**, *n.* (फ्लॅ'म्बो)--(*pl.-x,-s,*-झ्) a lighted torch. मशाल, दिवटी, चूड. [L. *Flamma*, flame]

**Flămboy'ant**, *a.* (फ्लॅम्बॉ'यन्ट्)—marked by wavy flame-like lines; gorgeous. हालत्या ज्वालाकार रेषा असलेला; शोभिवंत रंगाचा. *n.* kinds of flame-coloured flowers. लाल रंगाचीं फुलें.

**Flāme**, *n.* (फ्लेम्)—visible combustion; bright light; passion (esp. love); a sweetheart; kinds of moth. ज्वाला; जाळ; मनोविकार, प्रेम; प्रियकर, प्रेयसी, प्राणवल्लभ (-भा); एक जातीचा पतंग,-कीटक. *v. i.* to emit flames; break out into anger; gleam. ज्वाळा येणें,-उठणें; (रागानें) भडकणें; प्रकाशणें. *The ff.*, आग, ज्वाळा. *To fan the f.*, मनोविकार अधिक भडकाविणें. *F. up.*, भयंकर लाजणें. *F.-less*; *F.-y*, *aa.* ज्वालामय. *Fla'ming*, *a.* very hot or bright; exaggerated. झगझगीत, झक्क, उज्ज्वल; अतिशयित, अतिशयोक्तीचें.

**Flām'ĕn**, *n.* (फ्ले'मेन्)—a god's priest. देवाचा पुजारी.

**Flamĭn'gō**, *n.* (फ्लमिं'गो)—(*pl.-es*) a bird with long legs and neck. (लांब पायाचा व लांब मानेचा) हंसक पक्षी.

**Flamm'enwerfer**, *n.* (फ्लॅ'मन्व्हेअर्फर्)—a machine spouting liquid fire in war. युद्धांत प्रवाही अग्नि वर्षाव करणारें यंत्र. [G]

**Flâneur**, *n.* (फ्ला'नर्)—an idler. भटक्या, आळशी.

**Flănge**, *n.* (फ्लॅन्ज्)—a projecting flat rim, collar or rib. बाहेरची कड,-कडा, बाह्यपाळी. *v. t.* to provide with a flange. बाहेरची कडा लावणें, बसविणें,-काढणें.

**Flănk**, *n.* (फ्लॅंक्)—a fleshy side of body between ribs and hip; a side of building, mountain etc. or of body of troops or fleet. कटिपार्श्वभाग; इमारतीची बाजू, सैन्याची डावी किंवा उजवी बाजू. *v. t.* to guard or strengthen on the flank; take in flank; march past flank of. बाजू राखणें,-संभाळणें,-मजबूत करणें; बाजूवर हल्ला करणें; च्या बाजूनें कूच करणें.—*er*, *n.* बाजूची तटबंदी; (*pl.*) फौजेंतील तुकडीच्या बाजूची लढाऊ टोळी, त्यांनीं शत्रूशीं केलेली झटापट.

**Flănn'el**, *n.* (फ्लॅ'नेल्)—open woollen stuff; (*pl.*) white f. trousers, f. bandages etc. एक प्रकारचें लोंकरीचें मऊ कापड, फ्लॅनेलची तुमान, बंधप इ. *a.* फ्लॅनेलचा केलेला. *Flannelette'*, *n.* फ्लॅनेलसारखें दिसणारें सुती कापड. *Flann'elled*, *a.* (फ्लॅ'नल्ड्), dressed in flannels. फ्लॅनेलचे कपडे घातलेला.

**Flăp**, *v. t. & i.* (फ्लॅप्)—to strike, to drive (flies, &c.) with a broad thing; (of bird) to strike with flat of wing; to sway about, to flutter. फडफडवणें, हडपणें, झटकावणें; (पंखानें) फडफडावणें; फडफडणें, फडफड वाजणें. *n.* a

light stroke of a broad thing; broad hanging piece. झटका, फडफड; झोल, घेर, झांकण, पाळी, खिस्तक, विंझुणा. *F.-jack*, small cake. लहान पाव.

**Flăpp'er**, *n.* (फ्लॅपर्)—a flat fly-killer; a flap; a young wild duck etc.; (*sl.*) a girl not yet out; (*sl.*) a hand. माशा मारण्याचें फटकणें,-झडकणें; पाळी; रानटी पद्क; चार चौघांत न फिरणारी,-समाजांत न वावरणारी-मुलगी; हात.

**Flāre**, *v. i.* (फ्लेअर्)—to blaze with a bright unsteady flame, bulge upwards (of ship's sides). भडाभड जळणें, भडकणें; झळकणें; वरवर फुगीर होत जाणें. *n.* bright unsteady light; signal light at sea; outburst of flame, anger, display. ढळढळीत प्रकाश; दीपस्तंभावरील प्रकाश; ज्योत; क्रोधानल, भडका, भपका. *F. up*, एकदम भडकणें, क्षुब्ध होणें; *F.-up*, *n.* ज्वाळांचा डोंब; रागाचा भडका; मजा मारणाऱ्यांचा गोंधळ, गडबड.

**Flăsh**, *v. i. & t.* (फ्लॅश्)—to break into a flame or sparks; to gleam; to appear or occur suddenly, fill or flood with water. चकमकणें; चकाकणें; एकदम दिसणें किंवा घडणें, अकस्मात सुचणें; पाण्यानें भरून टाकणें. *n.* sudden short blaze; an instant; sudden short access; signal light at sea; rush of water; ostentation. क्षणिक चकाकी,-चमक,-भडका,-झळ; क्षण, पळ, चक्क होण्यास लागणारी वेळ; (बुद्धीची, अकलेची) चमक; पाण्याचा सोडलेला झोत, जलमय करणें; डामडौल, ढोंग, दिमाख. *a.* gaudy; counterfeit; slang; connected with thieves, etc. दिखाऊ, भपकेदार; नकली; हलकट, ग्राम्य; चोर, लफंगे यांसंबंधीं. *To f. in the pan*, to fail after showy start. (तोफेची) रंजक उडणें; दिमाखानें प्रारंभ करून अपयश येणें. *To f. up or out*, to show sudden passion. एकदम रागाचा झटका येणें, भडक होणें. *News was flashed*, sent by telegraph. विद्युत्संदेशानें (तारेनें) बातमी पसरली. *F.-light*, विद्युद्दीपिका, झोतमय प्रकाश, प्रकाशाचा झोत (खुणेसाठीं, दीपगृहासाठीं, रात्रीं फोटो काढण्यासाठीं). *F.-point*, *Flashing point*, temperature at which vapour from oil etc. ignites. (ज्या उष्णतामानावर ज्वालाग्राही वाफ निघते तो) स्फुरणबिंदु.

**Flăsh'ing**, *n.* (फ्लॅशिंग्)—a strip of metal to obviate flooding or soaking. पाणी आंत शिरूं किंवा झिरपूं नये म्हणून मारलेली धातूची पट्टी.

**Flăsh'ÿ**, *a.* (फ्लॅशि)—gaudy; fiery; without taste. लखलखीत, भडक; उग्र, तामसी; बेचव, नीरस. *Flash'ily, adv.,—iness, n.*

**Flăsk**, *n.* (फ्लास्क्)—pocket-bottle of metal or glass; gunpowder case. शिसा, कुपी, बाटलीसारखें भाडें; बंदुकीची दारू ठेवण्याची पिशवी.—*'et*, *n.* a small flask; long shallow basket. लहान कुपी; लांबट उथळ टोपली.

**Flăt**, *a.* (फ्लॅट्)—horizontal, level; prostrate; even, smooth; dull, lifeless; slow-witted; dejected; (Mus.) below true pitch. सपाट, समान, चढउतार नसलेला; भुईसपाट, जमीनदोस्त, पडलेला; गुळगुळीत, कंटाळवाणा, बेचव; मंदबुद्धि; हताश, खिन्न; मृदु, कोमल (सुरांत). *n.* plain, lowland, level ground; suite of rooms on one floor; a flat-bottomed boat; a shallow basket; (sl.) a duffer; (Mus.) note a semi-tone below natural pitch; (Theatr.) section of scenery mounted on frame. पटांगण, माळ, भाटी, भाट; एका मजल्यावरील सर्व खोल्या,-मजला; सपाट तळाची होडी; उथळ टोपली; रेम्या डोक्या, मंदबुद्धि-मनुष्य; कोमल स्वर, त्याची खूण; चौकटीवर बसविलेला देखाव्याचा भाग. *v. t.* to make flat (in manufacturing processes). सपाट, गुळगुळीत-करणें. *To lay f.*, पाडून टाकणें, जमीनदोस्त करणें. *F. tint*, uniform. गणवेष. *F. denial*, उघड,-स्पष्ट,-नकार. *That's f.*, त्यांत कांहीं शंका नाहीं. *To fall f.*, निष्फळ, निरर्थक,-होणें. *The market is f.*, बाजार (भाव) पडून राहिला आहे, विशेष घडामोड नाहीं. *F. speech,-beer*, अळणी, बेचव भाषण,-दारू. *F.-boat*, उथळ पाण्यांत चालणारी सपाट (तळाची) होडी. *F.-car*, (U. S.) rail-road freight car without sides or roof. (बाजवा किंवा छपर नसलेला) उघडा डबा. *F.-fish*, एक जातीचा मासा. *F.-footed*, बांकरहित पावलाचा; (U. S.) हट्टी, मट्ठ. *F.-iron*, इस्तरी. *F.-race*, over level ground. सपाट जमिनीवरील शर्यत. *F.-rate*, प्रमाणांत कमीजास्त न होणारा, एकच एक दर. *To join the ff.*, (transf.) make a thing into a coherent whole. एकजिनसी करणें, एकजीव आहे-सलग आहे-असें भासविणें. *Flat'ly, adv.* निक्षून, साफ. *F.-wise, F.-ways, adv. F.-ness, n.*

**Flătt'en**, *v. t. & i.* (फ्लॅटन्)—to make or become flat. सपाट,-चपटा,-करणें,-होणें.

**Flătt'er**, *v. t.* (फ्लॅटर्)—to fawn upon, to praise falsely, to overpraise; exaggerate good looks of. खुशामत करणें, खोटी स्तुति करणें, फाजील वहावा-स्तुति-करणें; (आहे त्यापेक्षां) जास्त सजवणें,-उठावदार करणें,-दाखविणें, अधिक खुलवून दाखविणें. *-er, n.* तोंडपुज्या, खुशामत्या. *-ingly, adv.*

**Flatt'erÿ** *n.* (फ्लॅटरि)—overpraise. खुशामत, खुशमस्करी, हांजी हांजी, मिथ्या प्रशंसा.

**Flăt'ūlent**, *a.* (फ्लॅट्युलन्ट्)—generating gas; inflated, pretentious, vain, puffy. फुगलेलें,

वातग्रस्त, वातकर, वातुळ; घढाईखोर, दांभिक, फुगलेला. *Flat'ulence,–ncy, nn.* वातग्रस्तता, कोष्ठवायु; फुशारकी. *Flat'ulently, adv.*

**Flaunt**, *v. i. & t.* (फ्लॉंट्)—to wave proudly; to display oneself. दिमाखानें हालवणें; डामडौल करणें, दिमाख करणें,–मारणें. *n.* flaunting motion. डौलाची हालचाल, दिमाख, प्रदर्शन.

**Flaut'ist**, *n.* (फ्लॉ'टिस्ट)—a flute-player. पावरी वाजविणारा. [ It. ]

**Fla'vin**, *n.* (फ्ले'व्हिन्, फ्लॅ'–)—surgical antiseptic and yellow dye. विनसडविणारा पिवळा चीक,–रंग.

**Fla'vour**, *n.* (फ्ले'व्हर)—mixed sensation of smell and taste; distinctive taste. स्वादयुक्त रुचि; विशेष चव, लज्जत. *v. t.* to give flavour to, to season. स्वादयुक्त करणें; विशेष चव आणणें, लज्जत आणणें.*–ing, n.;–less, a.* बेचव, नीरस, पाणचट.

**Flaw**, *n.* (फ्लॉ)—a crack, a rent; a blemish; defect in document, etc. तडा भेग, चीर, फट, रेघ; दोष, व्यंग, खोड; कायद्याच्या दृष्टीनें उणीव,–दोष. *v. t. & i.* to crack, damage, mar. तडकणें, भेग पडणें, तडा उडणें; नुकसान होणें, उणीव असणें, बिघडविणें.*–less, a.* निर्भंग, निर्दोष.

**Flaw**, *n.* (फ्लॉ)—a squall of wind; short storm. वाऱ्याचा सपाटा, लहानसें वादळ.

**Flax**, *n.* (फ्लॅक्स्)—a plant known for its textile fibre and its seeds. आळशी. आंबाडी, जवस.

**Flax'en**, *a.* (फ्लॅ'क्सन्)—of flax; (of hair) pale yellowish brown. आंबाडीचा; फिकट पिंवळसर पिंगट (केंस).

**Flay**, *v. t.* (फ्ले)—to strip off skin or hide; to peel off; to criticize severely; plunder (person), pare off (turf). चामडी काढणें, सोलणें; कडक टीका करणें, वाभाडे काढणें; लुबाडणें; (गवत) कापून टाकणें. *F.–flint,* पिळून पैसे काढणारा, चिक्कू.

**Flea**, *n.* (फ्ली)—a small wingless jumping insect; a small or contemptible person. पिसू, पुशी; क्षुद्र–तुच्छ–माणूस. *F.–bane,* (Bot.) kinds of plant. कडू कारली, काळी जिरी, (ह्या वनस्पतींच्या वासानें पिसवा जातात). *F.–wort,* इसपगोल (वनस्पति). *F.–bite,* पिसूचा दंश; क्षुल्लक गोष्ट; क्षुल्लक दुखापत. *To send one away with a f. in his ear,* कानपिचकी देऊन रवाना करणें.

**Fleck**, *n.* (फ्लेक्)—skin-spot, freckle; a patch (of colour, &c.); a speck. ठिपका, खूण; पट्टा; डाग. *v. t.* ठिपका,–डाग,–पाडणें, चित्रविचित्र करणें.*–er, v. t.* रंगीबेरंगी करणें.

**Fled**, *pa. t. & pa. p. of* Flee.

**Fledge**, *v. t.* (फ्लेज्)—to provide or furnish with feathers or down. पंख फुटणें, लव येणें, लवेनें–पंखानें आच्छादित करणें,–झांकणें.*–less, a.*

**Fledg(e)ling**, *n.* (फ्लेज्लिंग्)—a young bird; inexperienced person. नुकतेच पंख फुटलेलें पिलूं; अनुभव नसलेला मनुष्य.

**Flee**, *v. i. & t.* (फ्ली)—(*fled*) to run away, to *take to flight; to shun.* पळून जाणें, पळ काढणें; टाळणें.

**Fleece**, *n.* (फ्लीस्)—woolly covering (esp. of sheep); wool shorn from a sheep; woolly head of hair; thing like a fleece, whitecloud etc.; thin sheet of cotton or wool fibre. लोंकरीचें आच्छादन, मेंढ्याची लोंकर, भीस; एका मेंढीची एका कापणीची लोंकर; केंसाळ झुबका,–डोकें; लोंकरीसारखी वस्तु, पांढरा ढग; कापसाचा; किंवा लोंकरीचा पातळ पडदा. *v. t.* to shear. (sheep); to strip, to plunder; overspread. (मेंढी) भादरणें, फसविणें; लुबाडणें, बुचाडून घेणें; झांकणें, झांकून टाकणें. *Fleeced, a.* लोंकरीनें आच्छादलेला; लुबाडलेला. *Flee'cy, a.* लोंकर असलेला; लोंकरीचा; लोंकरीसारखा.

**Fleer**, *v. i.* (फ्लीअर्)—to laugh inpudently or mockingly; jeer. हंसून टर उडवणें, अवहेलना–तिरस्कार,–करणें, वेडावणें; थट्टा करणें. *n.* a mocking look or speech. उपहासदर्शक चेहरा, उपहासात्मक भाषण.

**Fleet**, *v. i.* (फ्लीट्)—*to glide* away, *to* pass rapidly, slip *away.* झपाट्यानें जाणें, निसटून जाणें. *n.* naval armament; ships or boats sailing in company; creek, inlet. आरमार; लढाऊ गलबतांचा ताफा,–समुदाय; खाडी, आखात. *a.* swift of foot, nimble; shallow. चपळ, वेगवान्, नश्वर, क्षणभंगुर; उथळ (पाणी), वरवर. *A f. of cabs, taxis.* एकाच मालकाच्या गाड्यांचा तांडा,–समुदाय. *The F.,* stream, now covered sewer, running into the Thames. टेम्स नदीला मिळणारा नाला; फ्लीट नांवाचा तुरुंग. *F. marriage,* performed by a *F. parson,* or disreputable clergyman in and about the *F.* ready to marry clandestinely. चोरटें लग्न, गुप्त विवाह (चोरटीं लग्नें लावणाऱ्या पोटभरू उपाध्यायानें लावलेलें). *F. street.* वृत्तपत्रें, छापखाने (यांची गल्ली). *F.–ly, adv.* चपळाईनें, त्वरेनें; *F.–ness, n. Fleeting, a.* क्षणिक, क्षणभंगुर, चपळ; *–ly, adv.* अति वेगानें.

**Flem'ing**, *n.* (फ्ले'मिंग्)—an inhabitant of Flanders. फ्लॅन्डर्सचा रहिवासी. *Flem'ish, a. &*

n. फ्लॅन्डर्सचा,-ची भाषा; v. i. (of hound) (मागावर असतां शिकारी कुत्र्याचें )अंग व शेंपटी थरथर कांपणें.

**Flĕnch,—nse,** v. t. (फ्लेन्च्,-न्स्)—to cut up (whale); flay (seal). (व्हेल माशाचे ) तुकडे करणें ; ( सील मासा ) सोलणें.

**Flĕsh,** n. ( फ्लेश् )—soft substance between the skin and the bones; animal food, meat; pulpy substance of fruit or plant; fat; visible surface of human body; the sensual appetites; near relations. मांस; मांसाहार, मांसाद्य; गर, मगज, घलक; चरबी, मांसलपणा, अंगकांति,-वर्ण; इंद्रियोपभोगेच्छा, विषयवासना, कामवासना; जवळचे आप्त, सोयरेधायरे. v. t. to incite (hound etc.) by taste of blood, initiate in bloodshed; use (sword etc.) for first time on flesh. पारधीच्या मांसाची चटक लावणें; पारध करण्याची चटक लावणें; प्रथमच मांसावर (हत्यार) चालविणें. *F. and blood*, शरीर, रक्तमांस, मनुष्यजात,-स्वभाव. *One's own f. and blood*, near relations, एकाच रक्ताचे नातेवाईक, वंशीय. *F. and fell*, the whole body. सर्व शरीर ( त्यांतील सर्व जड पदार्थ ); *adv.* entirely, पूर्णपणें. *Proud f.*, जखमेवर येणारा कांट्यासारखा पुरळ. *To make one's f. creep*, frighten or horrify one, esp. with dread of the supernatural. गर्भगळित करणें, भेदरविणें. *To lose f.*, शरीरानें खंगणें, मांस झडणें. *To put on f.*, लठ्ठ होणें, कापूस जमविणें. *In f.*, fat. लठ्ठ, स्थूल. *All f.*, सर्व शरीरधारी प्राणिमात्र. *In the f.*, सदेहस्थितींत. *After the f.*, जडदेहाच्या रूपाचा. *F. pots*, high living. श्रीमंती, उच्च राहणी. *Sins of the f.*, unchastity. व्यभिचार. *F. colour*, yellowish pink. पिंवळसर गुलाबी रंग. *F.-less*, *a.*

**Flĕsh'er,** n. (फ्ले'शर्)—a butcher; a fleshing knife. खाटीक; चामडीं साफ करण्याचा चाकू.

**Flĕsh'ings,** n. pl. (फ्ले'शिंङ्झ्)—tight-fitting flesh-coloured garment. पिंवळसर गुलाबी वर्णाचें तंग वस्त्र,-अंगरखा.

**Flĕsh'ly̆,** a. (फ्ले'श्लि)—carnal, worldly. विषयी, रजोगुणी, ऐहिक.-*liness*, *n.*

**Flĕsh'y,** a.( फ्ले'शि )—plump; of or like flesh. मांसल, पुष्ट; मांसाचा, मांसासारखा; (Bot.) गरभरू, भरदार.

**Flĕx'ible,** a. ( फ्ले'क्सिबल् )—easily bent; pliable; supple. वांकवितां येणारा, लवचीक; लवका; नरम. -*bility*, *n. Flex*, *n.* लवकी विद्युत्स्थापित तार.

**Flĕ'xion,** n. ( फ्ले'क्शन् )—bending, bent state; a bent part. वांकणें, वक्रता; वक्रभाग, वळण. *Also Fle'xure*, *n.*

**Flĕx'or,** n. ( फ्ले'क्सर् )—a muscle which bends a part of the body. लवणारा स्नायु.

**Flĕx'ūous,** a. ( फ्ले'क्स्यूअस् )—winding. वळणाचा, नागमोडी. *Flexuos'ity*, *n.*

**Flew,** *pa. t. of Fly. Flews*, *n. pl.* ( शिकारी कुत्र्याचे इ.) लोंबते ओंठ.

**Flick,** n. & v. t. ( फ्लिक् )—( to strike ) a light-blow. हळूच तडाका-फटकारा-मारणें.

**Flick'er,** v. i. ( फ्लि'कर् )—to flutter, to shine or burn unsteadily. झुकझुक प्रकाशणें किंवा जळणें, लुकलुकणें. *n.* लिकलिकणारा प्रकाश, फडफड, झूळझूळ.

**Flight,** n. (फ्लाइट्)—act or mode of flying through air; flock of birds or insects; swift passage of time; a series (of stairs etc.); volley of arrows; running away. हवेंत उडणें, उड्डाण, भरारी; पक्ष्यांची झुंड, कळप; वेळ लवकर निघून जाणें; परंपरा, जिना, सोपान; बाणांचा वर्षाव; पलायन, माघार. *v. t.* to shoot. नेम धरून बंदुकीनें मारणें. *To take to f.*, run away. पळून जाणें. *Put to f.*, दाणादाण उडविणें. *F. lieutenant*, हवाईदलांतील अधिकारी (ब्रिटिश).

**Flight'y̆,** a. ( फ्लाइटि )—fickle, changeable, half-witted. चंचल, अस्थिर, लहरी, मनोराज्यांत दंग असणारा.-*tily*, *adv.*;-*tiness*, *n.*

**Flim'sy̆,** a. ( फ्लि'म्झि )—slight, frail; paltry, shallow. पातळ, झिरझिरीत; कुचकामाचा, उथळ. *n.* पातळ कागद; व्यापारी हुंडी.

**Flinch,** v. i. ( फ्लिंच् )—to draw back ( from pain or danger), to shrink. कचरणें, कच खाणें, पराङ्मुख होणें.

**Fling,** v. i. & t. ( फ्लिंग् )—(*flung*) to rush, to go violently; to throw, to hurl. जोरानें घुसणें, -जाणें; फेंकणें, जोरानें आपटणें. *n.* a throw, cast; impetuous dance. फेंक, ढोला, दुगाणी, लाथ; आवेशाचा,-जोराजोराचा नाच. *To have a f. at*, चा प्रयत्न करणें; ची टर उडविणें. *To f.* (fact, etc.) *in one's teeth*, त्याच्याच शब्दानें त्याचे दांत पाडणें.

**Flint,** n. (फ्लिंट्)—a hard stone found in steel-grey lumps; anything very hard; a very hard stone formerly used for striking fire; piece of flint used with steel to produce fire, esp. in f.-lock gun. गारगोटी; फार कठीण पदार्थ; गार, गारगोटी, गारगोटीचा दगड; (बंदुकींतील) पोलादाच्या जोडीची बंदूक झाडण्याची गारगोटी. *F. and steel*, गारगोटी आणि पोलादाचा तुकडा. *To wring water from a f.*, to work miracles. गारगोटींतून पाणी काढणें, दगडास पाझर फोडणें, "प्रयत्नें वाळूचे कण रगडितां

तेलहि गळे.' *To skin a f.*, be miserly or greedy. कवडीचुंबक,-अधाशी,-असणें. *To set one's face like a f.*, be determined. निग्रही-करारीपणा दाखविणें. *F. glass*, गारगोटीची कांच. *F. -lock*, (lock of) gun discharged by spark from f. गारगोटीची बंदूक,-बंदुकीचा चाप. *Flin'ty, a.*, *-tiness, n.*

**Flĭp**, *v. t. & i.* (फ्लिप्)—to propel, strike with a flip; make a flick. सपाटा,-झटका,-देऊन चालू करणें; हलू तडाखा मारणें. *n.* a flick; mixture of beer and spirits. तडाखा; मिश्र दारू.

**Flĭp'flăp**, *n.* (फ्लि'प् फ्लॅप्)—a kind of somersault; a cracker; a machine with passenger cars hung at end. कोलांटी उडी; फताकडी, दारूकाम; (जत्रेंतील) गरगर फिरणारें यंत्र, पाळणे.

**Flĭpp'ant**, *a.* (फ्लि'पन्ट्)—treating a serious thing lightly; disrespectful. महत्त्वाची गोष्ट क्षुल्लक लेखणारा; अनादरशील, बालिश, अक्कलशून्य. *-ly, adv.*; *-ancy, n.* छिचोरपणा, वावदूकता.

**Flĭpp'er**, *n.* (फ्लि'पर्)—limb used by turtle etc. in swimming; a hand. (कांसवाचा वगैरे) पोहण्याच्या उपयोगाचा अवयव; हात.

**Flirt**, *v. t. & i.* (फ्लर्ट्)—to fillip, to jerk; to play at courtship. टिचकी मारून फेंकणें; हिसका देणें; नखरा करून मन वेधणें, प्रणयचेष्टा करणें. *n.* a sudden jerk; a man or woman who encourages attention for amusement. हिसका, झटका; नखरा करून खोटें प्रेम दाखविणारी स्त्री, नखरेबाज तरुण. *-ish,-y, aa.*; *-ation, n.* नखरा, तोरा, प्रणयचेष्टा करणें. *-a'tious, a.*

**Flĭt**, *v. i.* (फ्लिट्)—to depart; to pass or fly lightly or rapidly about; to die down. स्थलांतर करणें, निघून जाणें; उडून जाणें, भरारी मारणें; विझणें. *Flit'ter, v. i.* to flit about, flutter. इकडे तिकडे फडफडणें, पंख फडफडावणें; *F.-mouse*, a bat. वटवाघूळ.

**Flĭtch**, *n.* (फ्लिच्)—side of hog salted; a slice of timber from tree-trunk. मीठ लावून वाळवलेली डुकराची बरगडी; (ओंडतुळईची) लांकडी फळी.

**Flĭv'ver**, *n.* (फ्लि'व्हर्)—Ford motor-car. फोर्ड मोटरगाडी. (U. S.).

**Float**, *v. i. & t.* (फ्लोट्)—to rest or drift on surface of liquid; to circulate (rumour); hover *before* eye or mind; (of water) support, bear along; waft through air; (Commerc.) be in circulation, (of company or scheme) launch. तरंगणें, पोहणें, प्लवन होणें; (बातमी) पसरणें,-पसरविणें; डोळ्यापुढें,-मनांत,-घोळत राहणें; तरवणें, तरंगत ठेवणें,-नेणें; वहावणें.; हवेंतून तरंगत जाणें; चालू असणें, पत असणें; (धंदा वगैरे) चालू करणें. *n.* a hollow metallic ball; a thing that floats or rests on surface of liquid; a raft; a tool for smoothing plaster; single-cut file; (Theatr.) foot-lights; a kind of low cart. धातूचा पोकळ गोळा; ताफा, सांगड; तर; करणी, नहला; कानस; (नाटकाच्या रंगभूमीवरील) तळचे दिवे; सखल गाडी. *On the f.*, floating. तरंगणारा. *F.-board*, one of the boards of water-wheel or paddle wheel. पाय-रहाटाची पायंड्याची फळी, आगबोटीच्या पंख्याची फळी. *F.-bridge*, तराफ्यांचा पूल. *Float'able, a.*

**Float'age**, *n.* (फ्लो'टिज्)—floating (wreckage); ships etc. afloat on river; part of ship above water-line. तरणें, तरतेपणा; तरंगणारा (मोडक्या जहाजाचा वगैरे) सांगाडा; नदींतील तरतीं जहाजें; जलरेषेच्या वरचा जहाजाचा भाग.

**Floată'tion, Flot-**, *n.* (फ्लोटे'शन्)—floating; starting of company or scheme. तरंगणें, प्लवन; उभारणें, सुरू करणें (कंपनी, मंडळी, योजना).

**Float'ing**, *a.* (फ्लो'टिंग्)—that floats; variable. तरता, तरंगता; बदलणारा. *F. bridge*, तरता, झुलता, पूल; पुढें मागें सारतां येण्याजोगा दुहेरी पूल; उतरण्याची शिडी. *F. light*, तरती बत्ती. (भयसूचक) तरता नौकादीप. *F. capital*, चालू खर्चाकरतां वापरण्याचें भांडवल.

**Flŏck**, *n.* (फ्लॉक्)—a lock or tuft (of wool, &c.); (*pl.*) wool-refuse, etc.; powdered wool or cloth for making wall-paper. (लोंकरीची किंवा केंसाची) बट, झुपका, पुंजका; (बिछान्यांत भरण्यासाठीं) यंत्रानें चुरलेला (लोंकरीचा,-चिंध्यांचा) भुगा; (भिंतीला लावण्याच्या कागदासाठीं) बारीक चाळलेला लोंकरीचा-चिंध्यांचा-भुगा. *F.-bed*, राठ लोंकरीनें भरलेला बिछाना. *F.-paper*, लव चिकटवलेला कागद. *Floc'cose, a.* लोंकरीसारखा; (Bot.) केंसांचे झुपके असलेला. *Floc'cus*, शेंपटीचा गोंडा; पिसारा.

**Flŏck**, *n.* (फ्लॉक्)—a large number of people; animals of one kind feeding or kept together; a congregation with relation to its pastor. लोकांचा समुदाय, घोळका, जमाव; झुंड, थवा, कळप, खिल्लार; खिस्ती लोकांचा कळप, खिस्तभक्त मेळा. *v. t.* to congregate, to go in flocks. जमणें, एकत्र येणें, एकवटणें, थवा जमणें, थवा करून जाणें. *F. master*, मेंढपाळ, धनगर.

**Floe**, *n.* (फ्लो)—a large sheet of floating ice in the ocean. तरणारा बर्फाचा मोठा तुकडा.

vessel containing gall. पित्ताशय. *G.-stone*, पित्ताशयांतील-पित्ताच्या पिशवींतील-खडा. *G. -less, a.*

**Gall**, *v. t.* (गॉल्)—to rub sore; to vex, to humiliate. चोळवटणें; त्रास देणें, मनाला दुःख देणें, छळणें, नकोसें करणें. *-ing, a.*

**Gall**, *n.* (गॉल्)—a painful swelling, blister; a sore; patch of barren soil. चांद्, चट्टा, चकदूळ; दुखी, व्रण; ओसाड जमिनीचा तुकडा.

**Gall**, *n.* (गॉल्)—an excrescence caused by insect on trees. (झाडाच्या कोणत्याहि भागावर किड्यांनीं उत्पन्न केलेली) मायफळाच्या आकाराची गांठ. *G., G. -nut*, मायफळ.

**Gă'llant**, *a.* (गॅ'लन्ट्, गलॅन्ट्)—fine, stately; brave; attentive to women. भडक, छानदार; सुंदर, भव्य, शूर; स्त्रियांचा कैवारी, स्त्रीदाक्षिण्य दाखविणारा. *n.* a man of fashion; ladies' man, lover. ऐटबाज मनुष्य; स्त्रीदक्ष मनुष्य, रमण, वल्लभ. *v. t. & i.* to play the gallant, to flirt with, to escort (lady). स्त्रियांचा कैवार घेणें; त्यांच्या पुढें पुढें करणें, तैनात ठेवणें. *-ly adv.*

**Găll'antry̆**, *n.* (गॅ'लन्ट्रि)—bravery; devotion or polite attention to women. शौर्य; स्त्रियांबद्दल भक्ति, स्त्रीदाक्षिण्य.

**Găll'ĕon**, *n.* (गॅ'लिअन्)—a Spanish ship of war, a large Spanish ship used in trade. स्पॅनिश लढाऊ जहाज, व्यापारी गलबत.

**Găll'ery̆**, *n.* (गॅ'लरि)—verandah; passage, corridor; room for showing works of art. सज्जा; दालन, ओवरी, चौक, घरांतील मोकळा मार्ग; चित्रप्रदर्शनालय, चित्रमंदिर, दर्शनीय वस्तुसंग्रह. *To play to the g.*, to appeal to lower taste. सामान्य प्रेक्षकांना-खालच्या वर्गाला-आवडेलसें करणें.

**Găll'ey**, *n.* (गॅ'लि)—a low flat one-decked vessel, usu. rowed; a light open boat; a tray for set-up type. एक प्रकारचें पसरट गलबत; उथळ होडी, छबिना; जुळलेले टाईप ठेवण्याचा सांचा, गॅलि.

**Găll'ic**, *a.* (गॅ'लिक्)—of Gauls; French. गॉल लोकांचा, फ्रेंच.

**Găll'ĭpŏt**, *n.* (गॅ'लिपॉट्)—a small earthen glazed pot, a small vessel. औषध ठेवण्याचें लहान भांडें

**Găll'on**, *n.* (गॅ'लन्)—a measure of four quarts (for liquids, corn, &c.). एक कैली माप, गॅलन.

**Găll'op**, *n.* (गॅ'लप्)—horse's fastest pace. घोड्याची भरधांव, दौड. *v. i. & t.* to go at gallop; to make (a horse) gallop; to read etc. fast. चौखुर धांवणें; घोड्याला भरधांव धांववणें; अति जलद वाचणें.

**Gallopāde'**, *n.* (गॅलपे'ड्)—a lively (orig. Hungarian) dance. एक प्रकारचा नाच.

**Gall'oper**, *n.* (गॅ'लपर्)—(in vbl. senses); an aide-de-camp; a light field-gun. चौखूर चालणारा; (सेनापतीचा) निरोप्या अधिकारी, नकीब; हलकी तोफ.

**Gall'oway**, *n.* (गॅ'लोवे)—a small breed of horse. लहान आकाराचा मजबूत घोडा, तट्टू.

**Găll'ows**, *n. pl.* (गॅ'लोझ्)—(usu. as sing.) a structure for hanging criminals; punishment of hanging; any similar structure. फांशीं देण्याचा खांब, वधस्तंभ, वधस्थान; फांशीची शिक्षा; (कोणतीहि वस्तु) टांगून ठेवण्याची चौकट. *G. -bird*, a person fit to be hanged. फांशी देण्याच्या लायकीचा मनुष्य. *G.-ripe*, फांशी देण्यालायक. *G.-tree*, gallows. वधस्तंभ.

**Găll'op**, *n. & v. t.* (गॅ'लप्)—a lively dance. सुंदर नाच (नाचणें).

**Galore'**, *adv.* (गलो'अर्)—in plenty. मुबलक, विपुल. *n.* abundance. विपुलता.

**Galŏsh', Golŏsh'**, *n.* (गलॉ'श्,गोलॉ'श्)—an overshoe usu. of rubber to keep shoes clean or dry. पावसाळी रबरी वरजोडा, वरचा मळखाऊ -जोडा.

**Galvăn'ic**, *a.* (गॅल्व्हॅ'निक्)—of, pertaining to, galvanism; (of smile etc.) sudden and forced. चलविद्युतेचा, चलविद्युत्संबंधी; आकस्मिक कृत्रिम (हास्य इ.). *G. battery*, रसायन-कार्यानें वीज उत्पन्न करणारी घटमाला. *-ally adv.*

**Găl'vanĭsm**, *n.* (गॅ'ल्व्हनिझम्)—electricity produced by chemical action. रासायनिक क्रियेनें तयार केलेली वीज, विद्युत्प्रवाह, विद्युत् (शास्त्र). *Gal'vanize, v. t.* to apply galvanism to; to coat, as iron with zinc; to rouse by shock. विजेनें संचलित करणें, विजेनें जागृत-चैतन्यक-करणें; लोखंडावर जस्ताचा मुलामा चढविणें; कृत्रिम जागृति उत्पन्न करणें. *-ization, n.; -izer, n.*

**Gălvanŏm'ĕter**, *n.* (गॅल्व्हनॉ'मिटर्)—an instrument for measuring galvanism. चलविद्युत्मापक यंत्र.

**Gămbāde', Gămbā'dō**, *n.* (गॅम्बे'ड्, गॅम्बे'डो)—a horse's leap; escapade. घोड्याची उडी; विलक्षण वर्तन.

**Găm'bĭer**, *n.* (गॅ'म्बिअर्)—catechu. कात. [Malayan]

**Găm'bĭt** *n.* (गॅ'म्बिट्)—(Chess) kinds of opening in which player sacrifices pawn to secure

certain ends. पुढें डाव साधावा म्हणून डावाच्या आरंभीं आपलीं प्यादीं मारणीं टाकणें. ( *It. gamba*, the leg )

Găm'ble, *v. i.* ( गॅम्बल् )—to play games of chance for money stake; ( *fig.* ) to take great risks. द्यूत-जुगार-खेळणें; पैज लावून खेळणें; मोठें जोखीम घेणें. *n.* a risky undertaking. जोखीम, धोका. *To g. away*, जुगारांत पैसे गमावणें. Gamb'ler, *n.* जुगारी, द्यूतकार.

Gămboge' *n.* ( गॅम्बूज् )—gum-resin used as yellow pigment. खंदसार, रेवाचिनीचा शिरा. [ f. Cambodia ]

Găm'bŏl, *v. i. & n.* ( गॅम्बॉल् )—to dance and skip about in sport; a caper, frisk. खिदळणें, नाचणें, बागडणें; नाच, लीला.

Gāme, *n.* ( गेम् )—a spell of play, pastime, sporting contest; animals (and birds, &c.) hunted for sport or food. खेळ, क्रीडा, थट्टा, शर्यत, डाव; पारध, शिकार. *v. i.* to gamble, to play for money, to practise gaming. जुगार खेळणें. *a.* spirited; ready; ( of leg etc. ) crippled. हिंमतवान, धाडसी. सिद्ध, तत्पर; वांकडा, मोडका, लंगडा. *To make g. of*, to ridicule. (चा) थट्टामस्करी करणें, टर उडविणें, ( ला ) बनविणें. *To play the g.*, to observe the rules, to behave honourably. खेळाचे नियम पाळणें; प्रामाणिकपणानें वागणें. *The g. is up*, आतां जिंकायची -यशाची-आशाच नको, डाव हरला. *G. bag*, शिकार ठेवण्याची पिशवी; एकंदर मिळालेली शिकार,-पारध. *G-cock*, of kind bred for fighting. लढाऊ -लढतीचा-कोंबडा. *G.-keeper*, मृगयारक्षक, शिकारी जनावरांवर नजर ठेवणारा. *G.-some, a.* sportive. रंगेल, खिलाडू, गमत्या. *Game'ly, adv.* शौर्यानें. *Game'ness, n.* हिंमत, शौर्य.

Gāme'ster, *n.* ( गे'म्स्टर् )—a gambler. जुगारी.

Gămm'a, *n.* ( गॅमा )—the third letter of the Greek alphabet; a kind of moth. ग्रीक मूळाक्षरांतील तिसरें मूळाक्षर, गॅमा; एक कीटक, पतंग.

Gămm'er, *n.* ( गॅ'मर् )—an old woman. बुढ्ढी स्त्री, आजीबाई.

Gămm'on, *n.* ( गॅ'मन् )—smoked or cured ham. डुकराच्या मांडीचें खारवून वाळविलेलें मांस. 2. a complete victory at back-gammon; a humbug, deception. फाशांच्या खेळांतील डाव-जय; आंधळा पाटा, हेलकावा, झोला, भुलवणूक. *v. t. & i.* to defeat at back-gammon; talk plausibly. डावांत वर सरशी करणें; गोड गोड बोलून ठकवणें. *int.* nonsense! मूर्खपणा! वटवट! छट्!

Gămp, *n.* ( गॅम्प् )—( colloq. ) an umbrella. ( भली मोठी ) छत्री.

Găm'ut, *n.* ( गॅ'मट् )—the musical scale; compass of voice; ( fig. ) entire range. सप्त स्वर, स्वरसप्तक; आवाजाची मर्यादा; एकंदर मर्यादा, आटोका.

Găn'der, *n.* ( गॅ'न्डर् )—a male goose; a fool. हंस, कलहंस; वेडा, मूर्ख.

Găng, *n.* ( गॅंग् )—a set of associates ( esp. for criminal purposes ), a crew or band. ( चोरांची वगैरे ) टोळी, संघ, जमाव.-*ster, n.* चोरांच्या वगैरे टोळींतील साथीदार.

Găng'er, *n.* ( गॅं'गर् )—the foreman of a gang. टोळीचा म्होरक्या, पुढारी, नायक.

Găng'lĭon, *n.* ( गॅं'ग्लिअन् )—a knot of nervous matter; nerve-nucleus; ( fig. ) centre of force or interest. ज्ञानतंतुग्रंथि; स्नायुपुच्छग्रंथि; शक्ति वगैरेचा गाभा.

Găng'rēne, *n.* ( गॅं'ग्रीन् )—mortification of part of body. शरीराचा भाग सडून जाणें, कोथ.

Găng'way, *n.* ( गॅं'ग्वे )—opening in ship's bulwarks; a bridge; a passage. जहाजावर जाण्याचें द्वार; पूल; दोन ओळींमधून जाण्याचा रस्ता, मार्ग.

Gănn'ĕt, *n.* ( गॅ'निट् )—the solan goose, a sea-bird. समुद्रावरील पक्षी, हंस.

Gaol, *n.* ( जेल् )—a prison. तुरुंग, कारागृह. *v. t.* तुरुंगांत टाकणें. *G.-bird*, तुरुंगाच्या वाऱ्या करणारा, अट्टल गुन्हेगार.

Gaol'er, *n.* ( जे'लर् )—a warder in gaol. तुरुंगाचा अधिकारी.

Găp, *n.* ( गॅप् )—a breach in hedge or wall; an interval; wide divergence. खिंडार, खिंड; मधला वेळ; महदन्तर.

Gāpe, *v. i.* ( गेप् )—to open mouth wide; to stare at; to yawn. आ पसरणें, तोंड विचकणें; न्याहाळून पाहाणें; जांभई देणें. *n.* a yawn, a stare. जांभई ( देणें ), जृंभण, तोंडाची फंदी. *The gapes*, a poultry disease with gaping as symptom; a fit of yawning. ( कोंबड्या-बदकांचा ) जांभयांचा रोग, जृंभारोग; जांभयांवर जांभया येणें; जांभया. *G.-seed*, staring; occasion for staring, thing stared at. टक लावून पाहणें,-पाहण्याचा प्रसंग,-वेळ,-पाहिलेली वस्तु.

Gă'rage, *n.* ( गॅ'रिज्, गॅ'राझ् )—a building for storing or repair of motor-cars. मोटारगाड्या ठेवण्याची, दुरुस्त करण्याची, जागा.

Gărb, *n.* ( गार्ब् )—( characteristic ) dress ( of nation, class ); fashion ( of speech ). वेष, ( विशिष्ट तऱ्हेचा ) पेहराव. वेषपद्धति; भाषापद्धति. भाषेचा पेहराव. *v. t.* पोषाख करणें; घालणें, पेहराव चढवणें.

**Garb'age**, *n.* (गा'र्बिज्)—offal used as food; refuse; worthless reading. टाकाऊ भाग, गाळसाळ; केरकचरा, घाण; टाकाऊ पुस्तकांचें वाचन.

**Gar'ble**, *v. t.* (गा'र्बल्)—to make (unfair) selection. निवड करणें.

**Gard'en**, *n.* (गार्डन्)—piece of ground for growing flowers, fruit, or vegetable; (*pl.*) pleasure-grounds; specially fertile region. बाग, बगीचा; क्रीडास्थान, उद्यान; विशेष सुपीक-समृद्ध-प्रदेश. *v. i.* to cultivate a garden. मळा-बाग-तयार करणें. *G.-engine*, झाडांना पाणी लावण्याची नळी,-तोटी. *G.-party*, उद्यानोपहार, उद्यानभोजन. *G.-stuff*, vegetables and fruit. फळफळावळ व भाजीपाला.

**Gärd'ener**, *n.* (गा'र्ड-नर्)—a person who tends gardens. माळी, बागवान.

**Gar'fish**, *n.* (गा'र्फिश्)—a fish with long spear-like snout and green bones. भाल्यासारख्या लांब सोंडेचा व हिरव्या हाडांचा मासा.

**Gargăn'tūan**, *a.* (गार्गॅ'न्ट्यूअन्)—gigantic. अफाट, भव्य.

**Gar'gle**, *v. t. & i.* (गा'र्गल्)—to wash throat with liquid. गुळण्या करणें, गंडूष करणें. *n.* गुळण्या करण्याचें औषध.

**Garg'oyle**, *n.* (गा'र्गॉइल्)—a grotesque gutter-spout usually with human or animal mouth. (भिंतीपलीकडे) पाणी वाहून नेणारें गाय-मुख.

**Găribăl'di**, *n.* (गॅरिबॅ'ल्डि)—a blouse; a kind of biscuit. स्त्रियांचें किंवा मुलांचें आंगांतलें; एक जातीचें बिस्कीट.

**Găr'ish**, *a.* (गे'अरिश्)—dazzling, showy. चकचकीत, भपकेबाज.

**Gărl'and**, *n.* (गा'र्लन्ड्)—a wreath or chaplet, distinction, prize, for victory etc.; an anthology. हार, माळ; सन्मान, बक्षीस; काव्यमाला, पद्यमाला, गद्यपद्यावलि. *v. t.* to crown or deck with a garland. हार घालणें.

**Gărl'ic**, *n.* (गा'र्लिक्)—a plant with bulbous strong-smelling pungent root. लसूण, लशुन. *-cky*, *a.* लसणीसारखा, लसूण घातलेला.

**Gărm'ent**, *n.* (गा'र्मेंट्)—an article of dress. कपडा, वस्त्र, वस्त्रप्रावरण.

**Găr'ner**, *n.* (गा'र्नर्)—a storehouse (for corn, etc.). कोठार, कोठी, धान्यागार. *v. t.* (usu. fig.) to store up. सांठवणें, संग्रह करणें.

**Garn'ĕt**, *n.* (गा'र्निट्)—a precious stone, esp. red kind used as gem. चुनडी, लालडी (रत्न).

**Gărn'ish**, *v. t.* (गा'र्निश्)—to decorate (esp. a dish of food); (Law) to serve notice on (a person), to summon (a person) as party to litigation started between others. सजविणें, सुशोभित करणें, (पक्वान्नाचें ताट) शृंगारणें; ला कायदेशीर सूचना देणें, पक्षकार करून घेणें. *n.* आरास, शोभा, शृंगाराचें साधन,-वस्तु.*-er,-ment*, *nn.*;*-ing*, *n.*; *Garnishee'*, *n.* कायदेशीर सूचना-नोटीस-बजावला गेलेला.

**Gă'rrĕt**, *n.* (गॅ'रिट्)—a room on the top floor; (sl.) head. पोटमाळ्यावरची खोली, कातरमाळा, कात्री; डोकें.*-teer'*, *n.* कातरमाळ्यावरचा गरीब भाडोत्री; गरीब पोटभरू ग्रंथकार,-लेखक.

**Gă'rrison**, *n.* (गॅ'रिसन्)—troops stationed in town or a fortified place. शहरांत ठेवलेलीं सैन्यें, ठाणबंद फौज, दुर्गसैन्य. *v. t.* रक्षणासाठीं फौज ठेवणें.

**Garrŏtte'**, *n.* (गरॉ'ट्)—(an apparatus for) Spanish capital punishment by strangulation; highway robbery by throttling victim. देहांत शिक्षा देण्याची स्पॅनिश पद्धति, शिक्षेचें साधन, गळा दाबून वाटमारेपणा करणें.

**Garrul'ĭty̆**, *n.* (गॅरू'लिटि)—loquacity. वाचाळता, बडबड.

**Gă'rrulous**, *a.* (गॅ'रुलस्)—talkative; (of bird) chattering. वाचाळ, बडबड्या; कुलकुलाट करणारा पक्षी.*-ly*, *adv.*;*-ness*, *n.*

**Gărt'er**, *n.* (गा'र्टर्)—a band to keep stocking up; highest order of knighthood. गार्टर पायमोजे बांधण्याचे बंद; अमीरउमरावांचा पहिल्या प्रतीचा किताब. *v. t.* to fasten with garter. पायमोजे बंदानें बांधणें.

**Garth**, *n.* (गार्थ्)—a close, a garden, a paddock. आवार, परसूं, बाग, वाडगें, गुरचरण.

**Găs**, *n.* (गॅस्)—any aeriform or completely elastic fluid; coal-gas used for light or heat; explosive mixture of fire-damp with air; nitrous oxide gas; (also *poison-gas*) gas used to asphyxiate enemy in war; empty talk or boasting. वायुरूप एक प्रवाही पदार्थ, वायुरूप द्रव्य, वात, बाष्प, उजेडासाठीं-उष्णतेसाठीं वापरण्याचा वायु; (खाणींतील) पेटणारा विषारी वायु, विषारी हवा; नत्रप्राणिलास्त वायु (शस्त्रप्रयोग करितांना वापरण्याचा); विषारी वायु; पोकळ बडबड, घमेंडखोर बोलणें. *v. t. & i.* to supply with gas; to project poison-gas over (enemy); (*pass.*) to be poisoned with gas; to talk emptily or boastfully. गॅसचा-वायूचा-पुरवठा करणें; (शत्रूवर) विषारी वायु सोडणें; विषारी वायूची बाधा होणें; पोकळ बडबड करणें; घमेंड मारणें. *G.-bag*, गॅसची-वायूची-पिशवी; घमेंडखोर, पोकळ गडबड करणारा;

आकाशयानांतील वायुधारक ( भाग ); आकाशयान. *G.-fitter*, person installing and repairing gas-pipes etc. गॅसच्या-धुराच्या-नळ्या वगैरे घस-विणारा,-दुरुस्त करणारा. *G.-helmet*, *G.-mask*, विषारी धुरापासून रक्षण करणारें शिरस्त्राण,-मुख-त्राण,-मुखवटा. *G.-meter*, an apparatus registering amount consumed in house etc. धूर किती वापरला गेला तें मोजण्याचें गॅस-धूर-मापक घड्याळ.

**Găs'con**, *n.* ( गॅ'स्कन् )—a native of Gascony; a braggart. फ्रान्सदेशांतील गॅस्कन परगण्याचा रहिवासी; घमेंडखोर.

**Găsconāde'**, *n. & v. i.* ( गॅस्कॅनें'ड् )— boast, boasting, bragging. बढाई, बढाई किंवा फुशा-रकी मारणें.

**Găsĕlier'**, *n.* ( गॅसिलि'अर् )—a gas lamp with several burners. धुराच्या दिव्यांचें झुंबर.

**Găs'ĕous**, *a.* ( गॅ'सिअस्, गे- )—of gas. वायुरूप, वायुसदृश.

**Găsh**, *n. & v. t.* ( गॅश् )—a long deep cut or wound. जखम, दीर्घक्षत, घाव ( करणें ).

**Găs'l**[illegible] .all cord securing furled sail to yard. गुंडाळलेलें शीड परचानाला बांधण्याची लहान दोरी.

**Găs'olēne**, **Găs'oline**, *n.* ( गॅ'सोलीन् )—liquid got from petroleum; ( U. S. ) petrol. पेट्रोलियम-पासून उर्ध्वपातनानें निघणारा द्रव पदार्थ; पेट्रोल, फनेल.

**Gasŏm'ĕter**, *a.* ( गॅसॉ'मिटर् )—reservoir from which gas is distributed; ( Chem. ) a vessel for holding gas. गॅसचा-धुराचा-सांठा; गॅस असलेलें पात्र.

**Găsp**, *v. i.* ( गास्प् )—to catch breath with open mouth, to pant violently. धापा टाकणें. *n.* धाप, दम, कास, श्वास *To gasp life* etc. *away* or *out*, to expire. जीव जाणें. *To g. out*, to utter with gasps. धापा टाकीत-दम टाकीत-बोलणें. *At one's last g.*, at the point of death. मरणोन्मुख. *Gas'per*, *n.* ( *sl.* ) a bad cigarette. हलकी विडी. *Gas'pingly*, *adv.*

**Găs'trĭc**, *a.* ( गॅ'स्ट्रिक् )—of the stomach. जठरा-संबंधीं, जाठर. *Gastron'omer*, *Gastron'omist*, *nn.* a judge of cookery. चविष्ट, भोजनशौंड. *Gastron'omy*, *n.* सुभोजनकला; *-nucal*, *a.*

**Găss'ȳ**, *a.* ( गॅ'सि )—like gas; wordy. वायु-सारखा, धुराचा; वटवटीचा, पोकळ बढाईचा. *Gass'iness*, *n.*

**Găs'teropŏd**, *n.* ( गॅ'स्टरपॉड् )—a mollusc, e. g. snail. गोगलगाईसारखा मृदुशरीरी प्राणी. Also, *Gas'tropod.*

**Gāte**, *n.* ( गेट् )—( also, Gate'way ) an opening ( in wall, etc. ) closable with barrier; place of judicial assembly in a city; a mountain pass; means of entrance or exit; a contrivance regulating passage of water; number paying at gates to see a match etc.; money so collected ( also *gate-*money ). द्वार, फाटक, कवाड; शहरांतील न्याय-मंदिर; पर्वतांतील खिंड; आंतबाहेर येण्याजाण्याचा मार्ग, प्रवेशद्वार, निर्गमद्वार; पाणी आंत-बाहेर सोडण्याचें द्वार,- दरवाजा; ( खेळाचा सामना ) पैसे देऊन पाहणारे लोक; प्रवेश-द्रव्य. *v. t.* to confine to college entirely or after certain hours. पूर्णपणें किंवा ठराविक वेळेनंतर कॉलेज-मध्येंच राहणें,-बाहेर न जाणें. *Gate-keeper*, attendant at gate, a kind of butterfly. द्वारपाळ, वेसकर, एक जातीचें फुलपांखरूं. *G.-post*, फाटकाचा खांब. *Between you and me and the g.-p.*, or *bed-post*, in close confidence. अगदीं विश्वासानें, तुला ठाऊक का मला ठाऊक. *G.-less*, *a.*

**Găth**[illegible] .& *i.* ( गॅ'दर् )—to bring or come together; to pick up from the ground; to infer; to collect ( as harvest ); to receive addition of; to draw together in folds or wrinkles; to develop purulent swelling; to receive additions. एकत्र येणें किंवा आणणें; गोळा करणें, निवडणें; अनुमान करणें,-काढणें; धान्य कापून गोळा करणें; ची भर पडणें, संग्रह करणें; सुरख घालणें, चुणणें, चुण्या पडणें, सुर-कुतणें; पुवळणास येणें, सुज होणें; भर पडणें. *To be gathered to one's fathers*, to die. मरणें. *Rolling stone gathers no moss*, change of calling does not pay. वारंवार धंदे बदलण्यांत फायदा नसतो, एक ना धड भाराभर चिंध्या *To g. head*, शक्ति एकवटणें, पिकणें, पूर्ण सुजणें. *To g. way*, ( of ship ) begin to move. गलबत चालूं लागणें, हाकारणें. *Gathers*, *n. pl.* gathered-in part of dress. वस्त्राचा-कपड्याचा-चुण्या पडलेला भाग, आकुंचन झालेला भाग.

**Gă'therĭng**, *n.* ( गॅ'दरिंग् )—an assembly; purulent swelling. जमाव, संमेलन; पुवळणास आ-लेली सूज.

**Găt'ling**, *n.* ( गॅ'ट्लिंग् )—( Also, *G.-gun* ) a machine gun with clustered barrels. एक यांत्रिक बंदूक,-तोफ. [ inventor's name ]

**Gauche**, *a.* ( गोश् )—tactless, socially awkward. अव्यवहारी, चार माणसांत कसें वागावें हें न समज-णारा. *Gaucherie* *n.* ( गोशरी' ), अव्हाणीपणा, अव्यवहारीपणाचें कृत्य. [ F ]

**Gaud**, *n.* (गॉड्)—a showy ornament; (*pl.*) showy ceremonies. दिखाऊ गोष्ट, दागिना; भपकेदार-थाटामाटाचा-समारंभ.

**Gaud'y̆**, *a.* (गॉ'डि)—tastelessly showy. दिखाऊ, भपकेदार. *n.* थाटाचा भोजनसमारंभ. *Gaud'ily*, *adv.*, *Gaud'iness*, *n.*

**Gauge**, *n.* (गेज्)—a standard measure; capacity, extent; criterion, test. ठराविक माप, मापन-यंत्र, मापक; प्रमाण, कसोटी. *v. t.* to measure exactly, to test dimensions of; to measure the contents of. मापणें, मोजणें. *Broad gauge*, distance between pair of rails, more than 4 ft. 8½ in. रेलवेच्या (लोहमार्गाच्या) दोन रुळांतील ४ फू. ८½ इं. पेक्षां जास्त गाळा,-अंतर; *narrow g.*, ४ फू. ८½ इं. पेक्षां कमी अंतर; *standard g.*, ४ फू. ८½ इं. अंतर. *A Rain g.*, पर्जन्यमापक यंत्र. *Gauging rod*, गजनळी, मापननलिका. *Gau'ger*, *n.* मोजणारा. *Gau'geable*, *a.* Gage, (Naut.), relative position in respect to wind. (जहाजाची) वाऱ्याच्या अनुरोधानें गति,-स्थिति.

**Gaul**, *n.* (गॉल)—an inhabitant of ancient Gaul; (joc.) a Frenchman. प्राचीन गॉलमधील रहिवासी; फ्रेंच मनुष्य. *-ish*, *a.* & *n.* प्राचीन गॉल लोकांची (भाषा); फ्रेंच (भाषा).

**Gault**, *n.* (गॉल्ट्)—clay and marl beds. मऊ आणि चिकण मातीचा थर,-थरांच्या रांगा.

**Gaunt**, *a.* (गॉन्ट्)—lean, haggard. रोड, रोडका, रडतोंड्या. *-ness*, *n.*

**Gaunt'lĕt**, *n.* (गॉ न्ट्लिट्)—*To run the g.*, to pass between rows of men etc., who strike one with sticks, cords etc. as punishment; (fig.) to be subjected to criticism. शिक्षा म्हणून काठीनें वगैरे मारणाऱ्या माणसांच्या रांगांमधून जाणें; टीका-प्रहार सोसणें.

**Gaunt'lĕt**, *n.* (गॉ'न्ट्-लिट्)—armoured glove; glove with long loose wrist. मोठा लोखंडी हातमोजा, वज्रमुष्टि, मोठा हातमोजा. *To fling, throw down, the g.*, आव्हान देणें,-करणें. *To pick, take up, the g.*, आव्हान स्वीकारणें.

**Gauze**, *n.* (गॉझ्)—thin transparent fabric of silk. एक प्रकारचें रेशमी विरविरीत कापड, जाळीदार कापड. *-zy*, *a.*, *-z'iness*, *n.*

**Gā'vĭal**, *n.* (गे'व्हिअल्)—a kind of alligator found in the Ganges. गंगा नदींतील मगर, सुसर.

**Gawk**, *n.* (गॉक्)—awkward or bashful person. अडाणी-लाजाळू-मनुष्य. *-y*, *a.*

**Gay**, *a.* (गे)—light-hearted, mirthful; showy; dissolute. आनंदी; चैनी, रंगेल; विलासी. *Gai'ly*, *adv.*

**Gāze**, *v. i.* (गेझ्)—to look fixedly at. टक लावून पाहणें, टकमक पाहणें, न्याहाळणें. *n.* an intent look. टक, एकाग्रदृष्टि. *To stand at g.*, न्याहाळीत उभें राहणें, टक लावून उभें राहणें. *Ga'zer*, *n.*; *Gaze'bo*, *n.* structure whence a view may be had. टेहेळणीची जागा.

**Gazĕlle**, *n.* (गझे'ल्)—small graceful soft-eyed kinds of antelope. एक सुंदर हरणाची जात.

**Gazĕtte'**, *n.* (गॅझे'ट्)—a newspaper (esp. an official journal). (सरकारी) वर्तमानपत्र, अखबार, समाचार. *v. t.* to publish in an official gazette. सरकारी पत्रकांत प्रसिद्ध करणें.

**Găzĕtteer'**, *n.* (गॅझिटि'अर्)—a geographical dictionary; a newspaper; a writer of news. भौगोलिक कोश, स्थलवर्णनकोश; वर्तमानपत्र; वृत्तलेखक.

**Găz'ogēne, Găs'ogēne**, *n.* (गॅ'झोजीन्, गॅ'- )—an apparatus for making aerated waters. (कर्बिकाम्लयुक्त-कार्बानिक ॲसिड-युक्त) पेयें तयार करण्याचें यंत्र.

**Gear**, *n.* (गीअर्)—harness; apparel; household utensils; tools; combination of wheels, levers, etc.; wheels working on one another by teeth; arrangements connecting motor with its work; rigging. सरंजाम, सामान; पोषाख; घरांतील भांडीं; हत्यारें, साधन; चाकें, तरफा वगैरेंचा संच; दांते असलेलीं जोडचाकें, दंतचक्रांचा समुदाय; यंत्रांच्या निरनिराळ्या भागांची मुख्य चालकाशीं कळाशी, जोडणीचा सरंजाम; गलबताचीं दोरखंडें, शिडें वगैरे सरंजाम. *v. t.* to harness; to put in gear. (खोगीर वगैरे) सरंजाम घालणें; यंत्राचे भाग,- यंत्र,- जोडणें. *In g.*, connected or working. सुसंलग्न, जोडलेलें, चालू असलेलें. *Out of g.*, विस्कळित, न चालणारें, विलग्न. *-ing*, *n.*; *-less*, *a.*

**Gĕck'ō**, *n.* (गे'को)—a house-lizard found in warm climates. पाल. [f. Malay]

**Gee, Gee'-gee**, *n.* (जी, जीं'जी)—(*Colloq.*) a horse. घोडा. Gee, Gee'ho', Gee'-(h) up', Gee'-wo, *intt.* (जी, जीं'हो',-अप्,-वो)—go, go faster, turn to right (words of command to horse etc.) चलाव! हॅक हॅक!

**Geez'er**, *n.* (गीं'झर्)—(*sl.*) an old person. म्हातारा, बुड्ढा.

**Gei'sha**, *n.* (गे'शा)—a Japanese dancing-girl. जपानी नर्तिका.

**Gĕl'atĭn(e)**, *n.* (जे'लटिन्)—transparent tasteless substance. सरसासारखें प्राणिज द्रव्य.

**Gĕld**, *v. t.* (गेल्ड्)—to deprive of generative powers, to castrate. खसी करणें, बडवणें,

( बैल वगैरे ) ठेंचून टाकणें. *-ing, n.* खसी, केलेलें जनावर ( घोडा इ. ).

**Gĕl'id,** *a.* ( जे'लिड् )—ice-cold, cool. बर्फासारखें थंड, थंडगार, गारठलेलें. [ L. *Gelidus, gelu,* frost ]

**Gĕl'ignite,** *n.* ( ज'लिग्नाइट् )—a nitro-glycerine explosive. एक स्फोटक द्रव्य.

**Gĕm,** *n.* ( जेम् )—a precious stone ; a thing of great beauty or worth ; a jewel. मूल्यवान् दगड ; सुंदर वस्तु ; काव्यरत्न, चित्ररत्न ; रत्न, मौक्तिक. *v. t.* to adorn as with gems. रत्नभूषित करणें, शोभा आणणें. *Gem'my, a.*

**Gĕm'inate,** *v. t.* ( जे'मिनेट् )—to double. जोडी जोडीनें येणें, युग्म होणें. *a.* (-निट्) arranged in pairs. युग्म, जोडीनें येणारें, यमज. *-tion, n. Gem'ma, n.* ( जे'मा )—leaf-bud ; bud-like animal growth. पानांचा कळा ; खालच्या वर्गाच्या प्राण्यांवरील कळ्यासारखी पुढें स्वतंत्रपणें वाढणारी वाढ.

**Gĕn'der,** *n.* ( जे'न्डर् )—any of the classes ( *masculine, feminine, neuter gender* ) corresponding to the two sexes and sexlessness ; sex. लिंग ( पुंलिंग, स्त्रीलिंग, नपुंसकलिंग ); ( स्त्री-पुरुष ) जात. *v. t.* उत्पन्न करणें, जन्म देणें.

**Gĕneăl'ogy,** *n.* ( जीनिॲ'लाजि )— pedigree, lineage. वंशावळ, वंशवृक्ष, कुलक्रम, उत्क्रांतिक्रम. *-gical, a.*

**Gĕn'eral,** *a.* ( जे'नरल् )—applicable to all, prevalent, usual ; vague, lacking detail. सामान्य, प्रचारांतील, चालू, सार्वत्रिक, रूढींतील, सर्वसाधारण. *n.* an army officer, commander of army ; the public ; ( *Colloq.* ) general servant. सेनापति ; जनसमाज ; हरकामी नोकर. *In g.,* generally. सामान्यपणें.

**Gĕneralissĭmō,** *n.* ( जेनरलि'सिमो )— commander of combined forces. मुख्य सेनापति, सरसेनापति. [ It. ]

**Gĕnerăl'ity,** *n.* ( जेनरॅ'लिटि )—a general statement ; vagueness ; the majority of. साधारण विधान ; संदिग्धता ; बहुजनसमाज.

**Gĕn'eralize,** *v. t. & i.* ( जे'नरलाइझ् )—to reduce to general laws or statement, to call by a general name ; to infer by induction ; to base general statement upon ( facts etc. ) ; to speak vaguely. सामान्य विधान करणें ; व्यापक वर्गाखालीं आणणें, सामान्य नामाभिधान देणें ; अनुमान काढणें ; सामान्य सिद्धांत काढणें.-बसविणें ; सर्वसाधारणपणें बोलणें, सामान्य नियम ठोकून देणें. *-zation, n.* सामान्य विधान. *-zer, n.*

**Gĕn'erally,** *adv.* ( जे'नरलि )—in a general sense ; in most respects ; usually. साधारणतः ; बहुतांशीं ; नेहमीं.

**Gĕn'eralship,** *n.* ( जे'नरल्शिप् )—office of a general ; military skill ; management. सेनापतित्व, सेनानायकाचें काम ; युद्धनैपुण्य ; चालकत्व, व्यवस्था.

**Gĕn'erāte,** *v. t.* ( जे'नरेट् )—to bring into existence ; ( Math. ) ( of point, line etc. ) to make ( line, surface etc. ). उत्पन्न करणें, अस्तित्वांत आणणें ; करणें, बनविणें. *Gen'erative, a.* उत्पादक. *Gen'erator, n.* उत्पन्नकर्ता ; उत्पादकपात्र,-यंत्र.

**Gĕnerā'tion,** *n.* ( जेनरे'शन् )—procreation, begetting ; period of about 30 years. जनन, प्रसव, प्रसूति, उत्पत्ति ; पिढी ( सुमारें ३० वर्षांचा काळ ).

**Genĕ'ric,** *a.* ( जिने'रिक )—relating to a genus or class ; not specific. जातिगत, सामान्य ; व्यापक.

**Gĕnerŏs'ity,** *n.* ( जेनरॉ'सिटि )—nobleness of soul, liberality, munificence. मनाचा थोरपणा, उमदा स्वभाव, माहात्म्य ; दानशूरता, औदार्य.

**Gĕn'erous,** *a.* ( जे'नरस् )—noble-minded, not mean ; munificent ; abundant ; ( of soil ) fertile ; ( of diet etc. ) rich and full. थोर मनाचा ; उदार ; मढळ, विपुल ; सुपीक ( जमीन ); सुंदर व भरपूर ( अन्न इ. ).*-ly, adv.* मोठ्या मनानें, उदार मनानें, सढळपणानें.

**Gĕn'esis,** *n.* ( जे'निसिस् )—an origin ; mode of formation or generation ; ( G ) the first book of old testament. उत्पत्ति, उद्भव, जन्म, मूळ ; रचना ; सृष्टयुत्पत्तिवर्णनात्मक, जुन्या करारांतील, पहिलें पुस्तक.

**Gĕn'et,** *n* ( जे'निट् )—a kind of civet cat ; its fur. जवादी मांजराची जात, ओतु ; त्याची लव.

**Genĕt'ic,** *a.* ( जिने'टिक् )—of, in, origin ; of genetics. उत्पत्तीसंबंधी ; जननशास्त्राचा.

**Genĕt'ics,** *n. pl.* ( जिने'टिक्स् )—the study of heredity and variation ; the physiology of reproduction. आनुवंशिकताशास्त्र, जननशास्त्र ; उत्पत्ति-इंद्रियविज्ञान.

**Genē'va,** *n.* ( जिनी'व्हा )—spirit flavoured with berries ; gin. एक प्रकारचें मद्य ; दारू. ( G.- ) *a. & n.* of, from, Geneva. जिनीव्हा शहराचें,-शहरापासूनचें. *G. Conventions,* of 1864-5, neutralizing ambulances etc. in war. युद्धाच्या वेळीं शुश्रूषापथकें वगैरे अयुध्यमान ठरविणारे जिनीव्हा येथें झालेले आंतरराष्ट्रीय करार. *G. cross,* युद्धकालीं शुश्रूषा पथक वेगळें दाखविणारें चिन्ह.

**Gē'nial,** *a.* ( जी'निअल् )—mild, warm ; cheering ; sociable ; ( anat. ) of the chin. प्रकृतीस मानवणारा ; आनंदी ; मनमिळाऊ ; हनुवटीचा.

*-lity*, *n.* आनंदी स्वभाव, सुप्रसन्नता.*-lly*, *adv.* आनंदानें, उल्हासानें.

**Gē'nie**, *n.* (जी'नि)—a sprite or goblin of Arabian tales. अरबी दंतकथेंतील-गोष्टींतील भूत, पिशाच्च, देवता.

**Genĭs'ta**, *n.* (जिनि'स्टा)-kinds of yellow-flowered shrub. पिंवळ्या फुलांचें फुलझाड,- झुडुप.

**Gĕn'ĭtal**, *a.* ( जे'निटल् )—of generation. जनन-विषयक, जननेंद्रियासंबंधीं. *Gen'itals*, *n. pl.* जननेंद्रिय, उपस्थ.

**Gĕn'ĭtive**, *a.* ( जे'निटिव्ह् )—indicating source, origin, or possession. संबंधदर्शक. *n.* (*Gram.*) *genitive case.* षष्ठी विभक्ति, संबंधकारक. *Geniti'val*, *a.* षष्ठी विभक्तीचा.

**Gē'nĭus**, *n.* (जी'निअस्)—tutelary spirit; (a person having) exalted intellectual power, (*pl.* Genii). अधिदैवत, देवता; बुद्धिवैभव, अत्यंत बुद्धिमान मनुष्य; (*pl.* Geniuses) प्रकृति, स्वभाव, शील, आवड, गोडी.

**Gĕnt**, *n.* (जेन्ट्)—(vulg.) a gentleman. पुरुष, गृहस्थ.

**Gĕnteel'**, *a.* (जेन्टी'ल्)—elegant, fashionable, decorous, stylish; well-bred. सभ्य चालीचा, सुशिक्षित, विनीत; कुलीन.*-ly*, *adv.* (जेन्टी'लृलि).

**Gĕn'tian**, *n.* ( जे'न्शन्)—kinds of usu. blue-flowered plant. किराईत. *G. bitter*, काडेकिराईत.

**Gĕn'tile**, *a.* & *n.* ( जे'न्टाइल्)—( a man ) not of Jewish race; heathen. यहुदीतर मनुष्य.

**Gĕntĭl'ĭtў**, *n.* (जेन्टि'लिटि)—gentle birth; social superiority; upper-class habits, genteel or fashionable style. कुलीनता; वर्णश्रेष्ठता; उच्च आचार.

**Gĕn'tle**, *a.* (जे'न्टल्)—well-born; mild, quiet; not rough or severe. कुलीन; पिढीजाद, आर्य; सौम्य, शांत, मंद; कोमल, नरम. *n.* (*pl.*, vulg.) gentle folk; a maggot etc. as fishing bait. गृहस्थ, सभ्य मनुष्य; मासे पकडण्याचें आमिष. *The g. craft*, angling. गरीनें मासे पकडणें. *The g. sex*, women. स्त्रीवर्ग, स्त्रिया. *G.-folks*, people of good family. कुलीन लोक, सभ्य-पांढरपेशे-लोक. *G.-hood*, *n.* कुलीनता, सभ्याचार.

**Gĕn'tleman**, *n.* (जे'न्टल्-मन्)—a chivalrous well-bred man; a man of good social position; a man of gentle birth attached to the household of a sovereign or great person; a man entitled to bear arms but not included in the nobility; a man of wealth and leisure; (Law) a man who has no occupation; (pl., in voc.) male members of audience, sirs; (pl. as sing. *n.*) men's public urinal. कुलीन सभ्य गृहस्थ; समाजांतील उच्च दर्जाचा मनुष्य; बादशहाचा-अमीरउमरावाचा-कुलीन खाजगी नोकर; शस्त्रधारी-हत्यारें वागवणारा, (उमरावाची पदवी नसलेला) गृहस्थ; ऐष आरामी-खुशालचेंडू श्रीमान मनुष्य; धंदा उद्योग नसलेला-उडाणटप्पू-मनुष्य; सद्गृहस्थ (हो!); पुरुषांची सार्वजनिक मुत्री. *G.-at-arms*, राजाचा-बादशहाचा-शरीररक्षक. *Old g.*, the devil. सैतान, पिशाच्च. *My g.*, the fellow I was speaking of. ज्याविषयीं मी बोलत होतों तो इसम. *G.'s g.*, a valet. हुजऱ्या. *G.-hood*, *G.-ship*, *nn.* गृहस्थपणा, सभ्यता. *G.-like*, *a.* सद्गृहस्थास शोभण्याजोगें. *Gen'tlemanly*, *a.* सभ्य, शिष्ट, रीतीचा.

**Gĕn'tleness**, *n.* (जे'न्टल्निस्)—mildness, kindliness; freedom from violence. सौम्यवृत्ति, सौजन्य; मृदुता, कोमलता, अनत्याचार.

**Gĕn'tlewoman**, *n.* ( जे'न्टल्-वुमन् )—woman of good birth or breeding, lady. कुलीन सभ्य स्त्री, कुलवधू.*-hood*, *n.*;*-like*,*-ly*, *aa.*;*-liness*, *n.*

**Gĕn'tlў**, *adv.* ( जे'न्ट्-लि )—mildly, kindly; quietly; softly, slowly. सौम्यपणानें; धिमेपणानें, हळूहळू. *G. born*, of noble birth. उच्च कुलीन, थोरकुळांत जन्मलेला.

**Gĕn'trў**, *n.* (जे'न्ट्रि)—people next below nobility; (contempt.) people. मध्यमवर्गाचे लोक; जनता, लोक.

**Gĕn'ūal**, *a.* (जे'न्यूअल्)—of the knee. गुडघ्याचा.

**Gĕnū'flĕct**, *v. i.* ( जे'न्यूफ्लेक्ट् )—to bend the knee (esp. in worship). प्रार्थनेच्या वेळीं गुडघे टेकणें. *-or*, *n.*;*-ory*, *a.*, *Genufle'xion*, *n.*

**Gĕn'ūine**, *a.* ( जे'न्युइन् )—pure-bred; not sham; authentic, properly so called. अस्सल; खरा; विश्वसनीय.*-ly*, *adv.*;*-ness*, *n.* अस्सलपणा, खरेपणा. [L. *genuinus*, Sk. *gen*, to beget]

**Gē'nus**, *n* (जी'नस्)—(*pl.* Gen'era), (Logic) a class of objects divided into several subordinate species; (Zool., Bot.) a group of animals, plants, etc. containing several species; (loosely) a kind or class. जाति, परसामान्य; प्राणिवर्ग, वनस्पतिवर्ग; जात, वर्ग. *The genus Homo*, मनुष्यजात.

**Gēocĕn'tric**, *a.* (जीअसे'न्ट्रिक्)—having the earth for its centre; considered as seen from earth's centre. भूकेंद्रीय, भूगत; पृथ्वी मध्य कल्पून पाहिलेला,- घेतलेला- मोजलेला. [Gk *Geo*, Sk. *Jya*, the earth; Gk *Kentron*, Sk. *kendra*, centre]

**Gē'ōde**, *n.* (जी'ओड्)—( a stone containing ) cavity lined with crystals. स्फटिकवेष्टित पोकळी, -असलेला दगड.*-dic*, *a.*

**Gĕŏd'ĕsy̆**, *n.* (जीऑ'डिसि)—study of the earth and its parts (a branch of mathematics). भूविद्या, भूमापनशास्त्र, भूभागमापनविद्या.

**Gĕŏg'nosy̆**, *n.* (जीऑ'ग्नसि)—geology, esp. of particular district or particular rocks. विशिष्ट भूभागाचें, किंवा विशिष्ट भूस्तरांचें,-भूस्तरशास्त्र, भूगर्भशास्त्र.

**Gĕŏg'raphy̆**, *n.* (जिऑ'ग्रफि)—science of earth's form, physical features, &c.; features of a place; a manual of geography. भूगोलविद्या-शास्त्र; एखाद्या स्थानाची रूपरेषा; भूगोल (पुस्तक). *-pher*, *n.* भूगोलवेत्ता, -शास्त्रज्ञ. *-phical*, *-phic*, *aa.* भूगोलीय; *-phically*, *adv.* भूगोलदृष्ट्या. *Geographical mile*, २००० यार्ड, भूगोलीय मैल, विषुववृत्तावरील १ वृंच रेखांश अंतर.

**Gĕŏl'ogy̆**, *n.* (जिऑ'लॉजि)—science of earth's crust, its strata and their relations. भूरचना-शास्त्र, भूगर्भशास्त्र.*-gic*,*-gical*, *aa.*;*-gist*, *n.* भूस्तरशास्त्रज्ञ, भूगर्भशास्त्रवेत्ता. *Geol'ogize*, *v. i.* भूस्तर-भूगर्भशास्त्राचा अभ्यास करणें,-संशोधन करणें.

**Gē'omancy**, *n.* (जीं'ओमॅन्सि)-divination by figures or lines drawn on the earth. जमिनीवर आकृति किंवा रेघोट्या काढून शकुन पाहण्याची विद्या, भूरमलविद्या. *Ge'omancer*, *n.* भूरमलज्ञ. *Geoman'tic*, *a.*

**Gĕŏm'ĕter**, *n.* (जिऑ'मिटर्)—a person skilled in geometry; a kind of caterpillar. भूमितिज्ञ; भूमापक पतंग,-किडा.

**Gĕŏm'ĕtry̆**, *n.* (जिऑ'मिट्रि)—science of properties and relations of magnitudes in space. रेखागणित, भूमिति. *Geomet'ric*,*-al*, *aa.* भूमितीय, रेखागणिताचा. *Geomet'rically*, *adv.* भूमितिशास्त्रप्रमाणें. *Geometri'cian*, *a.* (जीअमिट्रि'शन्), भूमितिशास्त्रज्ञ.

**George**, *n.* (जार्ज्)—a jewel forming part of Garter insignia. 'गार्टर' सरदाराच्या मानदर्शक चिन्हांतील रत्न. *Brown G.*, पिंगट-तपकिरी-रंगाचें मातीचें भांडें. *St G.*, इंग्लंडचा एक सत्पुरुष. *By G.*, oath or exclamation. देवाच्यान्.

**Georgĕtte'**, *n.* (जार्जे'ट्)—a thin silk dress material. तलम रेशमी कापड.

**Gerā'nium**, *n.* (जरे'निअम्)—a kind of plant. एक फुलझाड.

**Germ**, *n.* (जर्म्)—source, origin; rudiment of an animal or a plant; a microbe. बीज, मूळ; अंकुर, कोम; सूक्ष्मजीव,-जंतु.

**Germ'an**, *a.* (ज'मन्)—closely related. जवळचा आप्त. (*G.-*) *a.* & *n.* जर्मनी देशचा, जर्मन (मनुष्य, भाषा). *G. silver*, एक पांढरी धातु.

**Germāne'**, *a.* (जर्मे'न्)—closely akin, pertinent, relevant to a subject. जवळचा, संबद्ध, अनुरूप.

**Germ'icide**, *a.* (ज'र्मिसाइड्)-destructive of germs. जंतुनाशक. *n.* a germicide substance. जंतुनाशक द्रव्य, जंतुकुठार.

**Germ'ĭnal**, *a.* (ज'र्मिनल्)—of germs; in the earliest stage of development. मूलांकुराचा, जंतुविषयक; बीजरूप, अप्रगल्भ. *Germ'inally*, *adv.*

**Germ'ĭnāte**, *v. i.* & *t.* (ज'र्मिनेट्)—to sprout, to bud; to cause to shoot, to produce; to develop. अंकुर फुटणें; ला मोड येणें; प्रादुर्भूत होणें; अंकुररूपानें वाढविणें. *Germ'inant*, *a.*; *Germ'ination*, अंकुरोद्भव, उद्भवन; *-tor*, *nn.*

**Gĕrry̆măn'der**, *v. t.* (गेरिमॅ'न्डर्)—to manipulate (constituency, etc.) so as to give undue influence to some class. विशिष्ट वर्गाला अधिक फायदा व्हावा म्हणून (मतदारसंघ वगैरेंत) खोटे फेरफार करणें, पनवापनवी करणें, खोटे पनवणें. *n.* (मतदारसंघ इ.) खोटे पनविणें.*- er*, *n.*

**Gĕ'rŭnd**, *n.* (जे'रन्ड्)—English verbal noun in *ing*. धातुसाधित नाम, कृदन्त. *Gerun'dial*, *a.*; *Gerun'dive*, *a.* & *n.*

**Gĕss'ō**, *n.* (जे'सो)—plaster of Paris, gypsum, as used in painting and sculpture. रंगकामांत किंवा खोदकामांत वापरण्याचा गिलावा,-चुना.

**Gĕstā'tion**, *n.* (जेस्टे'शन्)—carrying in the womb between conception and birth; this period. गर्भधारण करणें, गर्भारपणा;-चा काल.

**Gĕstĭc'ūlāte**, *v. i.* & *t.* (जेस्टि'क्युलेट्)—to use expressive motion (of limbs, &c.) with or instead of speech. हावभाव करणें, अंगविक्षेप करणें, (बोलतांना) हातवारे करणें.*-tion*, *n.* अंगविक्षेप, हावभाव, नखरा.*-tor*, *n.*;*-tive*,*-tory*, *aa.*

**Gĕs'ture**, *n.* (जे'स्चर्)—significant movement of limb or body; a step or move calculated to evoke response from another. हावभाव, अंगविक्षेप; (दुसऱ्याची प्रतिक्रिया पाहाण्यासाठीं केलेली) हालचाल, योजना. *v. i.* & *t.* to gesticulate. हावभाव करणें.

**Gĕt**, *v. t.* & *i.* (गेट्)—to obtain, to earn; to learn; to have recourse to; to gain, win or procure; to fetch; to induce; to beget; to experience or suffer; to catch or contract; to have inflicted; to arrive at; to find the way; (sl.) to clear out, be off. संपादणें, मिळणें, मिळविणें, लाभणें; शिकणें, तोंडपाठ करणें; आश्रय करणें; लाभ होणें, मिळवून देणें; जाऊन आणणें; मन वळविणें; उपजणें, विणें; अनुभवणें, सोसणें; होणें, लागणें, बाधणें; भोगणें; पोंचणें; मार्ग काढणें; चालतें होणें, निघून जाणें.

*To g. the best of it*, to be victorious. यशस्वी होणें, जय मिळविणें. *To g. knowledge* or *wind of*, to learn, hear rumours of. कळणें, सुगावा लागणें, कानावर येणें, बातमी कळणें,-ऐकूं येणें. *To g. religion*, to be converted. धर्मांतर होणें. *To g. it into* one's *head*, ठाम मत होणें, खात्री पटणें. *To g. wind* (of story etc.), become known. प्रसृत होणें, पसरणें. *what has got him?* what has become of him? त्याचें झालें तरी काय? *It has got to be done*, must be done. तें केलेंच पाहिजे.-झालेंच पाहिजे. *To g. person* upon a subject. एकाद्या विषयावर बोलायला लावणें. *To get a ship under way*, to start her. गलबत हाकारणें. *Where has it got to?*, त्याचें काय झालें? *To g. there*, (sl.) to succeed. यशस्वी होणें, साधणें, जमणें. *To g. well, better*, to recover from illness. आजारांतून बरें होणें. *To g. done with*, to bring to an end. शेवट करणें. (With prepp.) *To get at*, to reach, get hold of, ascertain, bribe, (sl.) attack, banter. (ला) पोंचणें, मिळविणें, निश्चित करणें, लांच देणें, हल्ला करणें, थट्टा करणें. *To g. into*, to put on; affect, confuse (one's *head*). (कपडे वगैरे) घालणें; परिणाम करणें, कैफ चढणें. *To g. off*, to dismount from, obtain release from. वरून उतरणें, मोकळीक करून घेणें. *To g. on*, to mount, to rise on one's *feet* or *legs* to speak in public. वर बसणें, आरूढ होणें, चढणें, सभेंत भाषण करण्यासाठीं उभें राहणें. *To g. over*, ओलांडून जाणें, पार पडणें, (पुरावा, मुद्दा) खात्रीलायक नाहींसें दाखविणें, खोडा पाडणें, निभावणें, वाटावणें, पुरें करणें. (sl.) वरचढ करणें, फसविणें. *To g. round*, तोंडभर स्तुति करून चढविणें.- फसविणें, टाळणें. *To g. through*, to bring to an end, (of Bill etc.) be passed by, while away. संपविणें, शेवटास नेणें, पसार-पास-मंजूर करणें, घालविणें. *To g. to*, to begin (business). सुरवात-प्रारंभ-करणें. [With advv.] *To g. down*, खालीं उतरणें, *To g. in*, निवडून येणें, गाडींत चढणें, (पीक) घरीं आणणें, (कर्ज) वसूल करणें. *To g. off*, सुटका होणें, -करणें, निघणें, झोंपीं जाणें, क्षमा केली जाणें, ठरावीक दंड होऊन सुटणें. *To g. on*, घालणें, दाखविणें, पुढें जाणें, प्रगति करणें, चलती असणें, चालणें. *G. out*, be off! nonsense! चालता हो! चेअकली कुठला? *To g. out of hand*, निसटणें, सुटणें, (काम) हातावेगळें करणें,-संपविणें. *To g. under*, (आग) कह्यांत आणणें. *To g. up*, (निजून) उठणें, (घोड्यावर) चढून बसणें, क्षुब्ध होणें, खवळणें, वाढणें, दर्शनीय -सुंदर-सुहृढीत दिसेलसें करणें, चांगली बांधणी करणें. *Get*, *n.* (जनावरांची) वीण, पिलें.

**Getăt'able**, *a.* (गेट्ँ'टबल्) —accessible. सुलभ, सहज मिळण्याजोगा, प्राप्य, भेटण्याजोगा.

**Gĕt'-ŭp**, *n.* (गे'ट्-अप्)—style of arrangement or production. बांधणी, रचना, बाह्यांग.

**Gē'um**, *n.* (जी'अम्)—kinds of flowering plant. एक जातीचें फूलझाड.

**Gew'gaw**, *n.* (ग्यू'गॉ)—gaudy play-thing or ornament. भपकेदार खेळण्याची वस्तु किंवा भूषण.

**Gey'ser**, *n.* (गे'झर्)—a hot spring; an apparatus for heating water. गरम पाण्याचा झरा, उन्हाळें; पाणी गरम करण्याचें यंत्र.

**Ghăst'lў̆**, *a.* (गॅ'स्ट्लि)—horrible, frightful; deathlike, pallid. भयंकर; मृतवत्, प्रेतकळा आलेला. *adv.* ghastlily. भयंकर रीतीनें, भयंकर. *-lily*, *adv.*, *-liness*, *n.* मढेकळा, प्रेतकळा.

**Ghee**, *n.* (गी)—Indian clarified butter. तूप, घी.

**Gherk'in**, *n.* (ग'र्किन्)—young or small cucumber for pickling. लहान कोंवळी फांकडी, रिंगा, वाळूक.

**Ghōst**, *n.* (गोस्ट्)—principle of life; a dead person appearing to the living, a spectre, an apparition; a pale thin person; semblance. जीव, आत्मा; भूत, पिशाच, समंध; मरतमढ्या मनुष्य; भास, आभास, छाया, सादृश्य. *To give up the g.*, die, मरणें, प्राण जाणें. *Holy Ghost*, त्रिमूर्तींतील तिसरी मूर्ति, पवित्र आत्मा. *To raise g.*, भूत उत्पन्न करणें, -दाखविणें. *To lay g.*, भूत अदृश्य होणें. *Not the g. of a chance*, none at all, मुळींच संधि (संधीची आशा) नसणें. *Ghost'-hood*, *n.*; *Ghost'-like*, *a.*; *Ghost'ly*, *a.* spiritual; as of a ghost. आत्मिक, आत्म्याचा; भूत-पिशाच-संबंधीं;*—liness*, *n.*

**Gī'ant**, *n.* (जा'यन्ट्)—a being of superhuman size; a very tall person or animal &c.; a person of extra-ordinary ability. दैत्य, दानव; धिप्पाड मनुष्य किंवा प्राणी, राक्षस; विलक्षण बुद्धिमत्ता असलेला मनुष्य. *a.* gigantic. राक्षसी, प्रचंड. *-ess*, *n.* राक्षसीण. *Giant's -stride*, *n.* a gymnastic apparatus enabling user to take huge strides round a pole. लांब ढेंगे-पावलें -टाकण्याचें व्यायामाचें साधन. *Giant'like*, *a.*

**Gĭbb'er**, *v. i.* (जि'बर्, गि')—to chatter inarticulately. घाईनें व अस्पष्ट बोलणें, रांगडी भाषा बोलणें. *n.* such chatter. अस्पष्ट बोलणें.*-ish*, *n.* हेंगाडी-न समजणारी-भाषा, बडबड, वटवट.

**Gĭbb'et**, *n.* (जि'बिट्)—a post on which an executed criminal was exposed; death by hanging. फांशी देण्याचा खांब, वधस्तंभ; फांशीं देणें. *v. t.* to expose on gibbet; to hold up to contempt. फांसावर लटकत ठेवणें; नांवाला कमीपणा आणणें, बदनामी करणें.

**Gibb'on**, *n.* (गिं'बन्)—kinds of long-armed ape. लांब हातांचा वानर,-माकड.

**Gibb'ous**, *a.* (गिं'बस्)—convex; hunch-backed; (of moon or planet) having bright part more than a semi-circle and less than a circle; (Bot.) like a bag. फुगीर, बाह्यगोल, फुगाऱ्याचा; पोंक्या, कुबडा; अर्धाधिक बिंबाकार; पिशवीसारखा. *-ly, adv.; Gibbos'ity, n.* फुगीरपणा, बहिर्गोलता, पोंक, अर्धाधिकता.

**Gibe, Jibe**, *v. i. & t. & n.* (जाइब्)—to flout, to jeer, to mock (at); a taunt. टोंचून बोलणें, उपहास करणें; टोमणा, टवाळी, कुचेष्टा. *Gib'er, n.; Gib'ingly, adv.*

**Gib'lets**, *n. pl.* (जि'ब्लिट्स्)—liver, gizzard, feet etc. of a bird removed before cooking. पक्ष्याचा काळीज, यकृत् इ० खाण्यासारखा कापून काढलेला भाग.

**Gi'bus**, *n.* (जा'इबस्)—opera or crush hat. एक प्रकारची घडीची साहेबी टोपी.

**Gidd'y**, *a.* (गि'डि)—dizzy, disposed to fall or stagger; making dizzy; circling with bewildering speed; mentally intoxicated, unsteady, frivolous. भोंवळ आलेला, चक्कर आलेला; भोंवळ आणणारा, घेरी-चक्कर-आणणारा; भयंकर वेगानें वाटोळा-गरगर-फिरणारा; भ्रमिष्ट, चंचल, छचोर. *v. t. & i.* वाटोळें फिरणें, भोंवळ आणणें,-येणें. *To play the g. goat*, to play the fool. वेडेचार करणें. *G.-go-round*, लांकडी घोड्यांचें चक्र. *Gid'dily, adv.; Gid'diness, n.* चक्कर, भोंवळ.

**Gift**, *n.* (गिफ्ट्)—a thing given, a present; natural endowment, talent. दान, बक्षीस, इनाम; ईश्वरी देणगी, बुद्धि. *v. t.* to endow with gifts; to present. अमोलिक गुण-शक्ति-देणें; बक्षीस देणें. *G.-book*, देणगी-बक्षीस-दिलेलें -देण्यासारखें पुस्तक. *Gift'ed, a.* बुद्धिमान्, विशेष गुणयुक्त. *Gift'ie, n.* (गि'फ्टि) दान, बक्षीस.

**Gig**, *n.* (गिग्)—a light two-wheeled one-horse carriage; a light ship's boat; a rowing-boat esp. for racing; a kind of fish-spear. एक-घोड्याची दुचाकी गाडी; जहाजावरील हलकी होडी; (शर्यतीची) वल्ह्यांनीं चालणारी होडी,-नौका; मासे मारण्यासाठीं तीक्ष्ण टोंकाचें कांटेरी हत्यार,-भाला.

**Gigan'tic**, *a.* (जाय्-गॅं'टिक्)—enormous, prodigious, huge; giant-like. अवाढव्य, अफाट; राक्षसी, प्रचंड. *-ally, adv.; Gigantes'que, a.*

**Gig'gle**, *v. i. & n.* (गि'गल्)—to laugh affectedly, titter with childish levity, to have small bursts of half suppressed laughter; (*n.*) such a laugh. फिदी फिदी हंसणें, खिदखिदणें, ही ही करून हंसणें *Gig'let, Gig'lot, n.* फिदी फिदी हंसणारी मुलगी.

**Gild**, *v. t.* (गिल्ड्)—to cover thinly with gold; to tinge with golden colour; to make specious. सोन्याचा मुलामा देणें; सोनेरी छटा आणणें; बाह्यस्वरूप मोहक करणें. *To g. a pill*, to soften down an unpleasant necessity. अप्रिय-कटु-गोटीवर मुलामा चढविणें, अप्रिय गोष्टीची तीव्रता कमी करणें. *Gilded Chamber*, House of Lords. लॉर्डांची सभा. *Gilded* or *gilt spurs*, an emblem of knighthood. मुलामा दिलेल्या टांचा-सरदारकीची खूण. *Gilded youth*, the young men of fashion and wealth. चैनी श्रीमंत तरुण मंडळी. *Gilt-cup*, a butter-cup. एक पिंवळ्या फुलाचें फूलझाड.

**Gild**, see Guild.

**Gill**, *n.* (गिल्)—(usu. *pl.*) the respiratory organ of fish, &c.; flesh below person's jaws and ears. कल्ला, माशांचें श्वासेंद्रिय; हनुवटी-खालचा मांसल भाग. *Rosy about the gg.*, जाड गडद्रुणीचा, सुदृढ. *G. cover*, माशांचे कल्ले झांकणारें हाडांचें वेष्टण *G.-net* माशांचे कल्ले अडकून मासे पकडण्याचें जाळें.

**Gill**, *n.* (गिल्)—a deep wooded ravine; a narrow mountain torrent. दाट झाडी असलेली खोल दरी; डोंगरांतील अरुंद जलप्रवाह,-वहाळ.

**Gill**, *n.* (जिल्)—a liquid measure of capacity (quarter or half pint). ¼ किंवा ½ पाइंटचें लहान केलेलें माप.

**Gill**, *n.* (जिल्)—(*Jack and Jill*), a lass. अल्लड पोर, पोरगी, मुलगी.

**Gilt**, *n.* (गिल्ट्)—gilding. सोन्याचा-सोनेरी-मुलामा. *a.* overlaid with gold. सोनेरी मुलामा दिलेला, मढवलेला. *Cloth g.*, सोनेरी वेलबुट्टी किंवा अक्षरें असलेली कापडी बांधणी. *G.-edged paper, securities, stocks*, such investments as trustees prefer. सर्वोत्कृष्ट, नामी पैसे गुंतविण्याची संधि,-सोय. *To take the g. off the ginger-bread*, वस्तूचा दिखाऊपणा दूर करणें.

**Gim'bal**, *n.* (जिं'म्बल्)—(*pl.*) a contrivance usu. of rings and pivots for keeping things (esp. compass) horizontal at sea. होकायंत्र, समुद्रावर गलबत हेलकावे खात असतें तेव्हां वस्तु स्थिर राखण्याचें साधन,-योजना.

**Gim'crack**, *n.* (जिं'म्क्रॅक्)—a trumpery ornament, a toy. दिखाऊ दागिना, वस्तु, खेळणें. *a.* trumpery, worthless. दिखाऊ, क्षुल्लक, क्षुद्र. *-ery, n., -y, a.*

**Gim'let**, *n.* (गिम्-लिट्)—a small boring-tool. गिरमीट, सामता, वेधन.

**Gĭn**, *n.* (जिन्)—a snare, a trap; a machine separating cotton from seeds; kinds of crane, husking apparatus. फांस, सांपळा; जड ओझें उचलण्याची तिपायी यारी; कापसाच्या सरक्या काढण्याचें यंत्र. *v. t.* to trap; to clear of seeds. फांसांत-सांपळ्यांत-पकडणें; (यंत्रानें) सरक्या काढून टाकणें.

**Gĭn**, *n.* (जिन्)—a strong liquor distilled from grain or malt. एक प्रकारची दारू, मद्यविशेष.

**Gĭn'gall**, *n.* (जिं'न्जल्)—a kind of gun. एक प्रकारची बंदूक. [F. Hind. *janjal*]

**Gĭn'ger**, *n.* (जिं'न्जर्)—a hot spicy root; mettle, spirit; stimulation; light reddish-yellow colour. आलें, आर्द्रक, सुंठ; जोम, पाणी, धमक; चेतना, उत्तेजन; फिकट तांबूस पिंवळसर रंग. *v. t.* to flavour with ginger; to apply ginger to (horse) to produce show of spirit; to rouse up (a person). सुंठ-आलें-घालून चव आणणें; (घोड्याला) आल्याचा तोबरा देणें; उत्तेजन देणें, चेतविणें. *G. shall be hot in the mouth*, the love of pleasure is immortal. सुखाची इच्छा अमर आहे. *G. ale* or *beer*, or *pop*, आर्द्रक-सुंठ घातलेलें-पेय. *Gin'gery*, *a.*; *Gingerade'*, *n.* ginger-beer. आर्द्रकासव, सुंठ घातलेलें पेय.

**Gĭn'gerlў**, *a.* (जिं'न्जर्लि)—such as to avoid noise or injury to oneself, cautious. सावध, आस्ते आस्ते, बेताचा. *adv.* सावधानतेनें, आस्ते आस्ते, बेतानें.

**Ging'ham**, *n.* (गिं'गॅम्)—a kind of cotton or linen cloth in stripes; (colloq.) an umbrella. रेघा रेघांचें कापसाचें किंवा तागाचें कापड; छत्री.

**Gĭn'nerў**, *n.* (जिं'नरि)—(*S.-Afr.*) cotton factory. कापसाची गिरणी.

**Gĭp'sў**, *n.* (जिं'प्सि)—a member of a wandering race; a mischievous or dark-complexioned woman. एका भटकणाऱ्या जातींतील मनुष्य; काळीकुट्ट स्त्री. *-dom*, *-hood*, *-ism*, *nn.* जिप्सी मनुष्याची अवस्था, भामटेगिरी.

**Gĭraffe'**, *n.* (जिरा'फ्, जिॅरॅ'फ्)—an African ruminant quadruped with spotted skin and long neck and legs. जिराफ, चित्रोष्ट्र. [F. Arab. *Zarifah*]

**Gĭ'randōle**, *n.* (जि'रन्डोल्)—a revolving fire-work, or jet of water; branched candle-bracket or candle-stick; an ear-ring or pendant with large central stone surrounded by small ones. शोभेच्या (दारूकामाचें) चक्र, सुदर्शन चक्र, पाण्याचा फिरता-गरगर फिरणारा-फवारा; फांद्यांचें मेणबत्तीघर,-शाम्दान, (भिंतीला लावण्याचें) शामदान; मध्यें मोठा खडा व सभोंवार बारीक खडे असलेला कानांतील लोलक,-कर्णभूषण.

**Gĭ'rasol,-e**, *n.* (जि'रसोल्,-सॉल्)—an opal reflecting reddish glow. तांबूस तकाकीचा क्षीरस्फटिक, पुलक, विमलक (रत्न).

**Gird**, *v. t.* (गर्ड्)—to encircle with waist-belt, &c., to equip; to invest with strength etc.; to encircle, to surround. कमरपट्ट्यानें बांधणें; जय्यत तयारी करणें, सज्ज करणें; (बळानें) युक्त करणें; लपेटणें, वेष्टणें. *v. i.* & *n.* gibe, jest, *at*, वेडावणें, उपहास करणें. *Gird'er*, *n.* लोखंडी किंवा पोलादी तुळई, मधली तुळई, मुख्य तुळई.

**Gir'dle**, *n.* (ग'र्डल्)—a cord or belt used to girt waist; something that surrounds; bony supports for upper and lower limbs; a ring round a tree made by the removal of bark; a part of cut gem dividing crown from base. कमरपट्टा, मेखला, कडदोरा; वेढणारी वस्तु; अस्थिबंध आधार; झाडाच्या खोडाभोंवतालचें कडें; कापलेल्या रत्नाचा-मण्याचा-वरचा भाग (कोंदणांतील). 2. *n.* circular iron plate for cooking. *girdle cakes*. एक प्रकारचा तवा.

**Girl**, *n.* (गर्ल्)—a female child; a young unmarried woman, a maid-servant; a man's sweetheart. मुलगी; कुमारी, लग्न न झालेली स्त्री; दासी; प्रेयसी, एकाद्याची प्रेमपात्र मुलगी.*-hood*, *n.* कौमार्य, कुवारपणा.*-ie*, *n.*; *-ish*, *a.*, *-ishly*, *adv*, *-ishness*, *n.*

**Girl'guides**, *n.* (ग'र्ल्-गाइड्स्)—an organization parallel to boy scouts. बालवीरांच्या धर्तीवर एक मुलींची संस्था.

**Girt**, *pa. t.* of gird.

**Girth**, *n.* (गर्थ्)—a band round the body of a horse securing saddle, measurement round a thing. घोड्याच्या भोंवतालीं बांधलेला पट्टा, तंग; घेर, परिघ, फेर, कक्षा. *v. t.* to surround; to encircle (horse etc.) with girth, to measure in girth. वेढणें, वेष्टणें; घोड्याला तंग बांधणें; अमूक इतका घेर-फेरा-भरणें.

**Gĭst**, *n.* (जिस्ट्)—substance, pith. सारांश, मुद्दा, निष्कर्ष, फलितार्थ.

**Gĭve**, *v. t.* & *i.* (गिव्ह्)—to bestow gratuitously; to grant, to accord; to deliver, administer (medicine); to consign, put (food etc.) before one; to pledge; to devote, dedicate; to present, offer, hold out (one's hand, arm etc.); to impart; to assume, grant, specify; to collapse, yield to pressure, shrink; to look, lead *up*, *upon.*, or *into* (of window, passage etc.). दान करणें, अर्पण करणें;

एक कांटेरी फळझाड ; त्याचें फळ ; गुझबेरी फळांची दारू. *To play g.*, to act as a chaperon. पाठराखणेपणा करणें. *Goose'gog*, ( गु'झ्गॉग् )-( colloq. ) गुझबेरी फळ.

**Gō'pher**, *n.* ( गो'फर् )—kinds of N. American burrowing rodents. जमिनींत बिळें करून राहणारा उंदीर. *v. i.* to burrow; ( Mining ) dig haphazard. जमिनींत बीळ करणें, पोखरणें ; अंदाजाशिवाय-यदृच्छेनें-खणणें.

**Gŏrd'ian**, *a.* ( गॉ'र्डि-अन् )—intricate. गुंतागुंतीचा. *To cut the Gordian knot*, to solve a problem by force or evasion. मोठा हिय्या करून निश्चयानें संकटांतून पार पडणें, कठीण प्रसंगांतून शर्थीनें निभावणें. [ *f. Gordius*, tier of the knot that none could untie. ]

**Gōre**, *n.* ( गोअर् )—clotted blood ; wedge-shaped piece inserted to narrow a garment. गोठलेलें रक्त ; ( कपड्याला लावण्याचा ) तिकोनी तुकडा, कळी. *v. t.* to pierce with a horn ; to shape with a gore. शिंग भोंसकणें, -मारणें ; कळी-बगलपट्टी-लावणें.

**Gŏrge**, *n.* ( गॉर्ज् )—internal throat ; contents of stomach ; surface ; narrow opening between hills. गळा, कंठ ; पोटांतील अन्न, आकंठ जेवण, खाणें; खिंड. *v. i. & t.* to feed greedily ; to satiate. अधाशीपणानें खाणें ; आकंठ भरणें.

**Gŏr'geous**, *a.* ( गॉ'र्जस् )—richly coloured ; ( of diction ) splendid, dazzling. चांगल्या रंगाचा, भडक ; भपकेदार, डौलदार. *-ly, adv.*; *-ness, n.* झकझकाट, भडकपणा.

**Gor'gĕt**, *n.* ( गॉ'र्जिट )—a piece of armour for throat ; woman's wimple ; a necklace ; patch of colour on the throat of a bird etc. ; a channel-shaped steel instrument used in operations for stone etc. कंठत्राण, ठुशी ; ( स्त्रियांचें ) डोक्यावरील ( मागी कापडाचें ) आच्छादन ; गळपट्टा ; पक्ष्याच्या मानेवरील-कंठावरील-रंगीत पट्टा, कंठ ; शस्त्रक्रिया करण्याचें पन्हळीदार शस्त्र.

**Gŏrg'on**, *n. & a.* ( गॉ'र्-गन् )—( Gk mythol. ) one of three snake-haired terrible women ; a terrible or repulsive woman ; very ugly person. ग्रीक पुराणांतील सर्पासारखे केंस असलेल्या तीन भयंकर स्त्रिया ; भयानक राक्षसी स्त्री ; विद्रूप मूर्ति. *-ize, v. t.* to stare at like a gorgon. भेसूर दृष्टीनें पाहून घाबरविणें, बोबडी वळविणें. *Gorgo'nian, a.*

**Gorgonzō'la**, *n.* ( गॉर्गन्झो'ला )—a rich cheese. उत्कृष्ट खवा.

**Gorĭll'ă**, *n.* ( गॉरि'ला )—a large ferocious anthropoid ape. ( आफ्रिका खंडांतील ) एक मोठा भयंकर मनुष्याकृति वानर, माकड.

**Gŏrm'andīze**, *v. i.* ( गॉर्म'न्डाइझ् )—to eat like a glutton, to swallow voraciously. अधाशासारखें खाणें. *-zer, n.* अधाशी.

**Gŏrse**, *n.* ( गॉर्स् )—a prickly yellow-flowered shrub ; furze. पिंवळ्या फुलांचें कांटेरी फुलझाड ; कांटेरी झुडुप. *Gors'y, a.*

**Gŏr'ȳ**, *a.* ( गो'अरि )—covered with blood. रक्तबंबाळ, रक्तानें माखलेला.

**Gŏsh**, *int.* ( गॉश् )—( Also, *by g.* ) by God. देवाच्यान्.

**Gŏs'hawk**, *n.* ( गॉ'स्हाक् )—a large short-winged hawk. एक मोठा ससाणा पक्षी.

**Gō'shen**, *n.* ( गो'शन् )—place of light or plenty. उजेडाची किंवा समृद्ध जागा.

**Gŏs'ling**, *n.* ( गॉ'झ्-लिंग् )—a young goose. लहान हंस.

**Gŏs'pel**, *n.* ( गॉ'स्पेल् )—glad tidings, esp. those preached by Christ ; Christian revelation ; one of the four narratives of Christ's life ; a thing that may safely be believed ; the principle that one acts upon, believes in, or preaches. शुभवार्ता, ( ख्रिस्तानें उपदेशिलेलें ) शुभवर्तमान, ख्रिस्ती धर्मग्रंथ ; ख्रिस्त चरित्राचें निरूपण,-शुभवर्तमान ; सत्य-ब्रह्म-वाक्य, वेदवाक्य ; ( आचरणांत आणलें जाणारें-विश्वास असलेलें-प्रचारिलें जाणारें ) स्वतःचें तत्त्व. *G.-truth*, truth contained in g., something as true as g. ख्रिस्ती शुभवर्तमानांतील सत्य गोष्ट, निर्विवाद सत्य गोष्ट. *Gos'peller, n.* reader of gospel in the Communion service. ( ईश्वरोपासनेच्या वेळीं ) शुभवर्तमानांतील अध्याय वाचणारा. *Hot gospeller*, धर्मवेडा प्रचारक. [ OE *god spel*, good tidings ]

**Gŏss'amer**, *n.* ( गॉ'सॅमर् )—a filmy substance of small spider's webs ; a flimsy thing ; delicate gauze ; a thin waterproof garment. कोळ्याच्या जाळ्याचा धागा, म्हातारी, वाततूल ; क्षुद्र वस्तु ; नाजूक जाळी ; पाणी आंत न येऊं देणारा पातळ आंगरखा. *-ed,-y, aa.*

**Gŏss'ĭp**, *n.* ( गॉ'सिप् )—familiar acquaintance ; tattler, esp. woman ; idle talk. दाट परिचयाचा इसम, सोबती, गडी, दोस्त ; गप्पीदास, गोष्टीवेल्हाळ स्त्री ; गपसप, थाप, वाता. *v. i.* to talk idly. गप्पा मारणें, वाता मारणें. *-y, a.*; *-er, n*; *-ry, n.* गप्पा, संवदण, मेतकूट.

**Gossōōn'**, *n.* ( गसू'न् )—( Anglo-Ir. ) a lad. पोऱ्या, मुलगा.

**Got,** ( गॉट् )—*pa. t. & pa. p.* of Get. *Got-up,* factitious, artificially produced or adorned. कृत्रिम, बनावट, मुद्दाम-कृत्रिम रीतीनें-बनविलेलें-महविलेलें.

**Gō'tha,** *n.* (गो'टा)—a type of large German aeroplane. एक मोठें जर्मन आकाशयान, विमान.

**Gŏt'ham,** *n.* (गॉ'ट्हॅम्)—a typical foolish town. नमुनेदार मूर्ख-गांवढळ गांव. *Wise man of G.*, a fool. मूर्ख, भोळसट, गांवढळ. *-ite, n.* गॉटहम गांवचा खेडवळ, दीडशहाणा, अकलेचा खंदक.

**Gŏth'ic,** *a.* ( गॉ'थिक् )—( Archit. ) in the pointed-arch style; barbarous; ( of type ) German, black-letter. ( बांधकाम ) अणकुचीदार कमानीच्या रचनेचें; रानटी, आडदांड; विशिष्ट आकाराचा गॉथिक टाइप्, ठसा. *n.* Gothic language, architecture, type. गॉथिक भाषा, शिल्पशास्त्र,-बांधणी,-ठसा.

**Gotten,** (गॉटन्)—*pa. p.* of Get.

**Gouge,** *n.* ( गाउज्, गूज् )—a concave-bladed chisel; a groove; a cheat. विंधण्याचें अऊत, नारव्या, सन्या; खोबण, पोकळी, पन्हळी; ठक, लुच्चा. *v. t.* to cut with a g.; to force (*out*, esp. person's eye) as with a g. ( नारव्यानें ) पन्हळी-खोबण-पाडणें; आंगठ्याच्या नखानें ( डोळा ) उपसून काढणें.

**Gourd,** *n.* ( गोअर्ड्, गुअर्ड् )—a trailing or climbing plant; dried rind of the tree used as a bottle. भोंपळा, कमंडलु, तुंबा. *-ful, a.*

**Gourm'and,** *n.* ( गु'अर्मॅन्ड् )—a lover of delicacies. खाद्यनंदन, खाद्, औदरिक. *a.* gluttonous. खादाड.

**Gout,** *n.* ( गाउट् )—a disease with inflammation, esp. of great toe; a drop esp. of blood; wheat-disease caused by gout-fly. ( पायाच्या आंगठ्याला सूज आणणारा ) संधिविकार, वातरक्त; ठिपका, थेंब, बिंदु; धान्याचा रोग. *Gouties, n. pl.* over-shoes. अगोदरच्या जोड्यावरून-बुटावरून-घालण्याचे मोठे जोडे,-बूट. *Gout'y, a., Gout'ily, adv., Gout'iness, n.*

**Gov'ern,** *v. t. & i.* ( ग'व्हर्न् )—to rule with authority; to conduct the policy and affairs ( of State &c. ); to curb, to control; to influence; ( Gram. ) to have depending on it. अधिकार चालवणें; राज्य करणें; ताब्यांत ठेवणें, नियमन करणें; वजन पाडणें; ( व्याकरणांत ) विशेष विभक्ति लावणें, च्या प्रमाणें चालणें. *-ance, n.* ताबा, हुकमत, सत्ता.

**Go'verness,** *n.* ( ग'व्हर्निस् )—a female teacher ( esp. in private household ). लहान मुलांस शिकविण्यास ठेवलेली शिक्षकीण. *G.-car(t),* light two-wheeled cart. हलकी दुचाकी गाडी.

**Go'vernment,** *n.* ( ग'व्हर्न्-मेन्ट् )—form of polity; persons governing a state. राज्यकारभार; सरकार. *To form a g.*, मंत्रिमंडळ बनविणें. *-al, a.*

**Go'vernor,** *n.* ( ग'व्हर्नर् )—a ruler; an official governing a province or town; one's employer or father; ( Mech. ) automatic regulator. राज्य करणारा; इलाखाधिपति; मालक, धनी, बाप; यंत्रांतील नियामक सांचा.

**Gowk,** *n.* ( गाउक् )—the European cuckoo; a fool. युरोपांतील कोकिळा; वेडसर, मूर्ख.

**Gown,** *n.* ( गाउन् )—a woman's upper garment, frock; a robe ( of alderman, judge, &c. ). पोलकें, फ्रॉक; ( अधिकार-व्यवसाय-दर्शक ) झगा. *-s'man,* member of a university; a civilian. विश्वविद्यालयाचा सभासद, झगेवाला मुलकी अधिकारी. *Gow'ned, pa. p.* झगा घातलेला.

**Grăb,** *v. t. & i.* ( ग्रॅब् )—to seize suddenly; to appropriate greedily; to arrest, capture; to make snatch *at*. एकदम पकडणें; बळकावून बसणें; पकडणें, धरणें; हिसका देणें. *n.* sudden grasp or seizure; rapacious proceedings esp in politics or commerce; ( Mech. ) a de[illegible]e or implement for clutching. पकड, मिठी, धकाधकीचा कारभार; पक्कड, गुराब. *-grab'ber, n.* देखतचोर.

**Grăb'ble,** *v. i.* ( ग्रॅ'बल् )—to grope about. चाचपडणें, चाचपडत, -सरपटत जाणें.

**Grăbb'ȳ,** *n.* ( ग्रॅ'बि )—( *Naut. sl.* ) a soldier. सैनिक, शिपाई, लष्करी शिपाई.

**Grāce,** *n.* ( ग्रेस् )—pleasing quality, charm; air, bearing; an embellishment of extra note or notes; goodwill as ground of concession; divine regenerating and inspiring influence; delay granted; thanks-giving at meals. शोभा, लावण्य; ढब, रुबाब, डौल, चांगुलपणा; अलंकारिक सुरावट, तान; अनुग्रह, कृपा ईश्वरी कृपा; सवलत; जेवण्यापूर्वीची प्रार्थना. *v. t.* to add grace to, to adorn; to honour; to favour. सुशोभित करणें; मोठेपणा देणें; अनुग्रह करणें. *With a good g.*, खुषीनें, डौलानें. *With a bad g.*, नाखुषीनें, कुरकुरत. *The Graces,* ( Gk Myth. ) [illegible] देवता. *To be in one's good graces,* enjoy his favour or liking. मर्जीतला-कृपेंतला असणें. *The year of grace,* इ. स. ( अमुक ). *In this year of g.*, usu. iron., when Christianity has been so long established. इ. स. च्या ह्या वर्षी ( मुद्दां ). *Days of g.*, time allowed

by law for payment of bill of exchange or insurance premium after it falls due, usu. three days. हप्ता भरण्याची सवलतीची मुदत (तीन दिवस ). *His, her, your g.*, ड्यूक, त्याची बायको, आर्चबिशपची पदवी. *G.-less. a.* निर्लज्ज, कोडगा, निर्ढावलेला, अधार्मिक. *-ly, adv., -ness, n.*

**Grāce'ful**, *a.* ( ग्रे'स्‌-फुल्‌ )—beautiful with dignity, full of charm, attractive. सुंदर, डौलदार, गोजिरा, आकर्षक. *-ness, n.; -lly, adv.*

**Grā'cious**, *a.* (ग्रे'शस्‌ )—pleasing ; kindly ; full of grace, merciful. आनंददायक ; कृपाळू ; दयापूर्ण ; दयाशील. *Good g. ! my g. !* ( int. for *g. god !* ) ( आश्चर्यदर्शक उद्गारवाचक अव्यय ). *-ly, adv.; -ness, n.*

**Gradāte'**, *v. i. & t.* ( ग्रॅडे'ट्‌ )—to pass or cause to pass by gradations from one shade to another ; to arrange in gradations. रंग हळू हळू पालटणें,- पालटविणें, रंगच्छटा बदलणें ; क्रमवार रचना करणें.

**Gradā'tion**, *n.* (ग्रॅडे'शन्‌ )—each stage in transition or advance ; arrangement in grades ; series of degrees in rank, merit etc. ; ( Fine arts ) a gradual passing from one tint to another. अनुक्रम, क्रम, पायरी ; क्रमवार रचना ; परंपरा, श्रेणि ; रंग हळू हळू पालटणें, क्रमिक वर्णांतर. *-al, a.; -ally, adv.*

**Grāde**, *n.* (ग्रेड्‌ )—a degree in rank, merit etc.; ( Math. ) the hundredth part of a right angle ; ( cattle-breeding ) variety produced by crossing native stock with superior breed ; a slope, gradient ; ( Zool. ) group supposed to have branched from parent stock at same stage of development. पायरी, दर्जा, स्थान : काटकोनाचा शंभरावा भाग ; श्रेष्ट जातीचीं जनावरें व स्थानिक जनावरें यांच्या भेसळीनें उत्पन्न झालेली चांगली अवलाद ; चढण, उतरण, चढ-उतार मोजण्याचें माप,-प्रमाण ; (प्राण्यांचा) मुख्य वर्ग. *v. t.* to arrange in grades ; to sort ; to give gradations of colour to ; to reduce ( road, canal ) to easy gradients ; ( cattle-breeding ) to cross with better breed. अनुक्रम लावणें, प्रती लावणें; रंगाच्या क्रमवार छटा देणें ; सोपा चढ-उतार देणें, एकच चढ-उतारांत आणणें ; ( चांगली अवलाद उत्पन्न करण्यासाठीं ) श्रेष्ठ प्रतीच्या जनावराशीं संकर करविणें. *On the up-g*, rising, चढणीचा, चढता. *On the down-g*, falling, उतरणीचा, उतरता.

**Grā'dely**, *a.* ( ग्रे'ड्लि )—excellent, thorough ; handsome ; real, true, proper. उत्कृष्ट, पूर्ण, उत्तम ; सुंदर ; खरा, अस्सल, योग्य.

**Grā'dĭent**, *n.* ( ग्रे'डिअन्ट्‌ )—amount of slope, inclination in road, railway, etc.; proportional rise or fall in thermometer or barometer in passing from one region to another. चढाचें- उताराचें मान,- प्रमाण ; तपमापक-वायुभारमापक-नळींतील स्थलमानाप्रमाणें होणारा चढ-उतार.

**Grā'dĭn (e)**, *n.* (ग्रे'डिन्‌, ग्रॅ'डीन्‌ )—one of series of low steps or tier of seats. पायऱ्या पायऱ्यांची मांडणी,-तींतील एक पायरी,-बैठक.

**Grăd'ūal**, *a.* ( ग्रॅ'ड्युअल्‌ )—happening by degrees; not steep or abrupt. अनुक्रमानें घडणारा ; क्रमाक्रमाचा. *-lly, adv., -ness, n.*

**Grăd'ūāte**, *v. i. & t.* ( ग्रॅ'ड्युएट्‌ )—to take or admit to academic degree; to arrange in gradations ; to mark out in degrees or portions ; to concentrate ( solution ) by evaportaion. विश्वविद्यालयांतील पदवी देणें किंवा घेणें ; यथाक्रम रचणें; अंश- भाग- मांडणें, भाग दाखविणें ; बाष्पीभवनानें ठराविक घनपणा आणणें. *n.* (-इट्‌ ) the holder of academic degree ; chemist's graduated measuring glass. विश्वविद्यालयाचा पदवीधर ; औषध तयार करण्याचा अंश मांडलेला मापाचा पेला, अंशांचें कांचपात्र. *-tor, n., -tion, n.*

**Graffi'to**, *n.* ( ग्रॅफी'टो )—drawing or writing scratched on ( ancient ) wall. प्राचीन भिंतीवरील रेखाटलेलें चित्र किंवा लेख. [ It. ]

**Graft**, *n.* (ग्राफ्ट्‌ )—a shoot, a scion, planted in slit of another stock ; ( surg. ) a portion of transplanted living tissue ; process of grafting ; place where graft is inserted. कलम, खुंटी, दुसऱ्या झाडावर बांधलेलें कलम ; जखम भरून काढण्याकरितां बाहेरचें योजिलेलें-पेशीजाल,- शरीरघटक धातु ; कलम करणें ; कलम लावलेली-खुंटीची-जागा. *v. t.* to insert graft; ( *fig.* ) to insert or fix *in* or *upon* so as to produce vital union ; to transplant living tissue. कलम बांधणें,-करणें, खुंटी मारणें ; एकजीव -संलग्न-करून टाकणें ; बाहेरील शरीरघटक धातु-मांस-कातडें आणून योजणें, गात्रसंधान करणें.

**Graft**, *n.* (ग्राफ्ट्‌ )—the depth of earth that may be thrown up at once with spade ; crescent-bladed spade. कुदळीचा-फावड्याचा एक टॅव, एक टॅव खणून उकरलेली माती ; वांटोळ्या- चंद्रकोर आकृतीची कुदळ, पिकांव.

**Graft**, *n.* ( ग्राफ्ट्‌ )—( practices for securing ) illicit spoils in politics or municipal business. राजकारणी- स्थानिक स्वराज्य संस्थेंतील-गैरवाजवी लाचलुचपत, नफेबाजी,- लूट, अशा नफेबाजीची पद्धति. *v. i.* ( अशी ) लूट मारणें, हात -डल्ला मारणें. *-er, n.* लांच खाणारा.

**Grail**, *n.* (ग्रेल्)—platter used by Christ at the Last Supper. अंत्य भोजनासाठीं ख्रिस्तानें वापरलेला थाळा, ताट. Also *holy g.*, *saint g.*, *sangreal*.

**Grail**, *n.* (ग्रेल्)—comb-maker's file. फण्या तयार करण्याची कानस.

**Grain**, *n.* (ग्रेन्)—a fruit or corn of a cereal; (collect.) corn; a particle, least possible amount; (*pl.*) refuse malt after brewing; unit of weight; texture in skin, wood, stone, etc.; the arrangement of lines of fibre in wood, (*fig.*) nature, temper, tendency; (poet.) dye, colour. दाणा, कण; धान्य, दाणागोटा, अन्न; लवलेश, अल्पांश, कण, गाळ, रेंदा, चोथा; (गव्हाच्या कणसांतील मधल्या दाण्याइतकें) एक इंग्रजी वजन; घटना, रचना, वीण; लांकडांतील दोरा, तंतु, रेषा, स्वभाव, प्रकृति; रंग (किरमिजी, तांबूस). *v. t. & i.* to form into grains; to dye in grain; to paint in imitation of the grain of wood, marble etc.; to take the hair off the skin. बारीक बारीक कण होणें, रवाळ होणें,-बनणें; (किरमिजी, तांबूस) पक्का रंग देणें; (लांकूड, दगड इ॰ च्या दोऱ्यांसारखे) दोरे काढून रंगविणें; (चामड्यावरील) केंस काढणें, चामडें साफ करणें. *Against the g.*, contrary to inclination. स्वभावधर्माविरुद्ध, मनाविरुद्ध. *G.-ed*, *G.-y*, *G.-less*, *aa.* *Grain'er*, *n.* कातडें कमावतांना वापरण्याची कबुतराची शीट; (चामड्यावरील केंस काढण्याची आरी; लांकडासारखा रंग देणारा,- रंग देण्याचा कुंचला. *Grain'ing*, *n.* grain-painting. लांकडांतील दोऱ्यांसारखें रंगविणें.

**Grăm**, *n.* (ग्रॅम्)—chick-pea; (Also, gramme) a unit of weight in metric system चणा, हरभरा; एक वजनी माप.

**Grăminā'ceous, Gramin'eous**, *aa.* (ग्रेमिनें'शस्, ग्रमि'निअस्)—of, like, grass, grassy. गवताचा, गवतासारखा; तृणजातीय, गवताळ. *Graminiv'orous*, *a.* grass-eating, गवत खाणारा, तृणाहारी.

**Grămm'alogue**, *n.* (ग्रॅ'मलॉग्)—(short-hand) word represented by single sign; such sign. (लघुलिपींत) एकेरी खुणेनें दर्शविलेला शब्द, तशी खूण.

**Grămm'ar**, *n.* (ग्रॅ'मर्)—science of the sounds, inflexions and constructions used in a language; a book on grammar; person's manner of using grammatical forms, speech or writing regarded as good or bad by the rules of grammar; elements of an art or science. व्याकरण, व्याकरणशास्त्र; व्याकरणाचें पुस्तक,-चा ग्रंथ; व्याकरणदृष्ट्या शुद्ध किंवा अशुद्ध भाषा; मूलतत्त्वविचार *G.-school*, school founded for teaching of Latin, now of the public school type; (U. S.) school between primary and high school. लॅटिन भाषेचें व्याकरण शिकविण्याची प्राथमिक शिक्षणाची शाळा; प्राथमिक शिक्षणाच्या नंतर व्याकरण शिकविण्याची शाळा. *G.-less*, *a.*

**Grammăr'ian**, *n.* (ग्रमे'रिअन्)—one versed in grammar, a philologist व्याकरणज्ञ, वैय्याकरणी, शब्दव्युत्पत्तिज्ञ.

**Grammăt'ical**, *a.* (ग्रमॅ'टिकल्)—of or according to the rules of grammar. व्याकरणासंबंधीं, व्याकरणविषयक.*-lly*, *adv.* व्याकरणदृष्ट्या.

**Grămme, Grăm**, *n.* (ग्रॅम्)—a French unit of weight = 15·432 grains. एक प्रकारचें वजनी माप, ग्रॅम.

**Grăm'ophōne**, *n.* (ग्रॅ'मोफोन्)—phonograph, esp. of the kind reproducing music, speech, &c. ध्वनिलेखकयंत्र.

**Grăm'pus**, *n.* (ग्रॅ'म्पस्)—kinds of blowing and spouting cetacean; a person who breathes loud. एक मोठा मासा; मोठ्यानें श्वास घेणारा-घोरणारा-मनुष्य.

**Grăn'ary̆**, *n.* (ग्रॅ'नरि)—a storehouse for grain; a region fertile in, and esp. exporting, much corn. धान्याचें कोठार, अन्नकोठ, धान्यसमृद्ध-सुपीक-प्रदेश. [L. *granum*, grain]

**Grănd**, *a.* (ग्रॅन्ड्)—chief, of highest rank; of chief importance, imposing, lofty, noble, elevated, magnificent; belonging to high society; (colloq.) excellent; (in names of relationships) in the second degree of ascent or descent. मुख्य, श्रेष्ठ; भव्य, उदात्त, थोर, उच्च, महान्, विशाल; वरच्या-थोर-वर्गाचा; अप्रतिम; (वंशज) खालच्या किंवा वरच्या पिढींतील. *n.* a grand piano. एक मोठें पेटीसारखें, आडव्या तारांचें, वाद्य,-पिआनो. *Gran'dad*, *n.* आजोबा. *Gran'dam(e)*. *n.* आजी. *G.-total*, बहु-एकूण-बेरीज. *To do the g.*, to put on airs. दिमाख दाखविणें. *G.-style*, उच्च लेखनपद्धति. *The Grand Old Man*, *G. O. M.*, इंग्लंडचा मुत्सद्दी ग्लॅड्स्टन. *G. stand*, principal stand for spectators at races etc. (खेळ, शर्यती वगैरे पाहणाऱ्या प्रेक्षकांसाठीं) उंच बैठकांची मुख्य जागा. *G. tour*, विलायतेंतील शिक्षणक्रम पुरा करण्यासाठीं युरोपांतील मुख्य शहरें पाहण्यासाठीं केलेली सफर. *G.-ly*, *adv.*; *G.-ness*, *n.*

**Grănd'child**, *n.* (ग्रॅ'न्ड्-चाइल्ड्)—one's child's child. नातवंड.

**Grănd'daughter**, *n.* (ग्रॅ'न्ड्-डॉटर्)—one's child's daughter. नात.

**Grănd'fāther,** *n.* (ग्रँ'ड्-फादर्)—one's parent's father. आजा, पितामह, आजोबा. *Grandfather's clock*, worked by weights in tall wooden case. उंच लाकडी पेटींतलें वजनांच्या साह्यानें चालणारें गुनाट, आजोबाच्या काळचें घड्याळ.

**Grănd'mother,** *n.* (ग्रँ'ड्-मदर्)—one's parent's mother. आजी. *v. t.* coddle, etc. आजीबाई-सारखे लाड करणें.

**Grănd'parent,** *n.* (ग्रँ'ड् पेरेन्ट्)—one's parent's parents. आजा, आजी.

**Grănd'sīre,** *n.* (ग्रँ'ड्-सायर्)-grandfather. आजोबा.

**Grănd'son,** *n.* (ग्रँ'ड्-सन्)—one's child's son. नातू.

**Grăndee',** *n.* (ग्रँन्डी')—foreign noble of high rank; great personage. अमीर उमराव; वडा मनुष्य, थोर व्यक्ति.

**Grăn'deur,** *n.* (ग्रँ'जर्, ग्रँ'ड्यर्)—high rank, eminence; majesty, splendour. उच्च पदवी, मोठेपणा; प्रताप, तेज, भव्यता.

**Grăndĭl'oquent,** *a.* (ग्रँडि'लॉक्विन्ट्)— pompous or inflated in language. प्रगल्भ भाषण करणारा, मोठमोठे शब्द योजणारा, शब्दावडंबरी.*;-nce, n.* प्रगल्भ भाषण.*-ly, adv.*

**Grăn'dīose,** *a.* (ग्रँ'न्डिओस्)—imposing, splendid, pompous; on a large scale. मनोवेधक, भव्य, भपकेबाज; मोठ्या प्रमाणावरील. *-sity, n.; -ly, adv.*

**Grānge,** *n.* (ग्रेन्ज्)—a country-house with farm buildings; a barn (arch.); agricultural association. शेतावरील वाडा, खोपट; धान्याचें कोठार; शेतकऱ्यांचा संघ.

**Grā'ngerize,** *v. t.* (ग्रे'न्जराइझ्)—to illustrate (a book) with extra prints etc. often cut from other books. इतर पुस्तकांतील वगैरे अधिक चित्रें घालून (ग्रंथ) सजविणें,-उपयुक्त करणें. *-zation,-zer, nn.*

**Gră'nīte,** *n.* (ग्रँ'निट्)—granular crystalline rock of quartz, mica, etc. used for a building. वज्रतुंड, वज्र (नांवाचा इमारती बांधण्याचा दगड-यांतील घटक पदार्थांचे कण वेगळाले दिसतात). *To bite on g.*, to waste pains, persist in vain. निरर्थक श्रम करणें, व्यर्थ-निष्फळ-चिकाटी धरणें. *G.-ware*, ग्रॅनिट सारखीं दिसणारीं मातीचीं भांडीं; मुलामा दिलेलीं लोखंडी भांडीं.*-tic,-tiform, aa.;-toid, a. & n.*

**Grănn'ȳ,** *n.* (ग्रँ'नि)—(colloq.) grand-mother; reef-knot crossed the wrong way. आजीबाई; उलटी गांठलेली दुहेरी गांठ.

**Grānt,** *v. t.* (ग्रान्ट्)—to consent to give; to concede; to permit; to admit; to bestow (right) formally, to transfer (property) legally. (मागितल्यावरून) देणें, देण्याला संमति देणें; कबूल-मान्य-करणें,-असणें; परवानगी देणें; मान्य करणें; (हक्क) देऊन टाकणें, दुसऱ्याच्या नांवावर कायदेशीर चढवून देणें. *n.* granting; formal conferment, legal assignment; a thing, esp. sum, granted. देणें, मान्य करणें; दान, इनाम (पत्र), सनद; बक्षीस, द्रव्यसहाय्य, मदत. *I g. you*, I admit. मी मान्य करतों, कबूल. *To take for granted*, assume. गृहीत धरणें. *G.-in-aid*, मदत-देणगी. *Grantee', n.* इनाम घेणारा,-पावणारा. *Grantor', n.* इनाम-बक्षीस-देणारा. *Grant'able, a.*

**Grăn'ūlar,** *a.* (ग्रँ'न्यूलर्)—of or like grains, with granulated surface. रवाळ, कणीदार; रवाळ पृष्ठभागाचा,-रचनेचा.*-ly, adv.; -ity, n.*

**Grăn'ūlāte,** *v. t. & i.* (ग्रॅ'न्यूलेट्)—to form into grains; to roughen surface of; (of wound) form small prominences as beginning of healing, heal. दाणेदार-रवाळ-करणें,-बनणें; पृष्ठभाग खरबरीत करणें; (जखम इ.) माठळणें, शेजेस येणें, बरें होऊं लागणें. *G.,* (ग्रँ'न्यूलट्) *a.* रवाळदार, कणीदार.*-tion,-tor, nn.*

**Grăn'ūle,** *n.* (ग्रँ'न्यूल्)—a small grain. लहान कण,-रवा.

**Grāpe,** *n.* (ग्रेप्)—a green or purple berry growing in clusters on vine; a grape-shot; diseased growth on the pastern (of horse etc.). द्राक्ष; कुलपी गोळा; घोड्याच्या पायाचा रोग,-गळूं. *G. stone*, द्राक्षांतील बी. *G. sugar*, द्राक्षाफलशर्करा, ग्लूकोस. *G. vine*, द्राक्षाची वेल; बर्फावरील घसरगुंडीच्या खेळाचा एक प्रकार. *The gg. are sour, sour gg.*, (इसापनीतींतील) आंबट द्राक्षें, हवी असणारी परंतु अप्राप्य म्हणून नको म्हटलेली गोष्ट. *Grap'ery, n.* द्राक्षांची बाग. *Grap'y, a.*

**Grăph,** *n.* (ग्रॅफ्)—a symbolic diagram expressing a system of connexions by spots or circles. सांकेतिक आकृति,-चित्र,-रेखाचित्र. *n. & v. t.* (to multiply with) a gelatine copying apparatus. अनेक प्रती काढणें,-काढण्याचें यंत्र.

**Grăph'ic,** *a.* (ग्रँ'फिक्)—vividly descriptive, pictorial, vivid; of writing; (of minerals) showing marks like writing; of diagrams. स्वरूपदर्शक, हुबेहूब वर्णनात्मक, सचित्र; लेखनाचा, लेखनकलेचा; लिहिल्या सारख्या खुणा असलेलें (खनिज द्रव्य); आकृतियुक्त.*-al, a.*

**Grăp'nel,** *n.* (ग्रॅ'प्-नल्)—a small many-fluked anchor; a grappling iron. एक लहान नांगर, गळ.

**Grăp'ple,** *n.* (ग्रॅ'पल)—a clutching instrument; grip, as of wrestler; close contest. गळ; पेंच, पकड; मिठी *v. t. & i.* to seize; to grip with

hands; to come to close quarters with. पकडणें; घट्ट धरणें; अंगाशीं भिडणें, नेटानें टक्कर देणें, झोंबी खेळणें. *To g. with*, शीं झगडणें. *Grappling iron*, गळ.

**Gräsp**, *v. t. & i.* ( ग्रास्प् )—to clutch, to seize or hold firmly; to understand, to realize; to seize greedily. हातांत गच्च धरणें; ग्रहण करणें, अर्थ समजणें; अधाशीपणानें धरणें,-पकडणें. *n.* fast hold, grip; mental hold, mastery. आकलनशक्ति, पकड; मनावर ठसणें, प्रभुत्व. *To g. nettle*, अडचणीला-संकटाला-धैर्यानें तोंड देणें. *Within one's g.*, आवांक्यांत, हातचें. *Beyond one's g.*, आवांक्याबाहेरचें. *G.-able, a. G.-ingly, adv.*

**Gräss**, *n.* ( ग्रास् )—herbage, pasture; pasture-land; grass-covered ground; (Mining) earth's surface, pit-head. गवत, रान; चराऊ गवताळ जमीन; तृणाच्छादित जमीन; भूपृष्ठ, खाणीच्या वरचा भाग. *v. t.* to cover with turf; to knock down. वर गवत उगवणें, गवताळ करणें, गवतानें झांकणें; खालीं पाडणें, लोळविणें. *Not let g. grow under one's feet, g. does not grow under one's feet*, of a person who wastes no time in doing something. कोणतेंहि गोष्ट करण्यांत विलंब न लावणें, दिरंगाई न करणें. *At g.*, (fig.) out of work, making holiday, etc. बेकार, सुटी घेणारा. *G. widow*, (sl.) wife whose husband is absent from her. पति जवळ नसलेली, जिचा पति दूर देशीं राहतो, अशी बायको.

**Gräss'hŏpper**, *n.* (ग्रा'स्-हॉपर्)—a jumping chirping insect, an insect that hops among grass. टोळ, नाकतोडा.

**Grate**, *n.* ( ग्रेट् )—a metal frame confining fuel in a fire-place; grating. (शेगडीला-चुलीला) बसविलेली लोखंडी गजांची जाळी; जाळीचा कठडा. *v. t. & i.* to rub to small particles on a rough surface; to grind, to creak; to have irritating effect. (किसणीवर) किसणें, घांसून कीस काढणें,-करणें; करकरणें, कर्कश आवाज होणें; चिडविणें, चीड आणणें. *G.-d*, जाळीचा कठडा घातलेला (चुला). *G.-less, a.*; *Grat'ingly, adv.* करकरां वाजत.-*grater, n.*

**Grāte'ful**, *a.* ( ग्रे'ट्-फुल् )-thankful (to a person, for a thing); feeling or showing gratitude. कृतज्ञ; कृतज्ञता दाखविणारा.-*lly, adv.*;-*ness, n.*

**Grăt'ify**, *v. t.* ( ग्रॅ'टि-फाय् )—to remunerate; to please, to delight; to indulge to satisfaction. मोबदला देणें; संतोषविणें; तृप्त करणें. -*fication, n.*; -*ing, a.*

**Grā'ting**, *n.* ( ग्रे'टिंग् )—a framework of parallel or crossed bars; (Opt.) a set of parallel wires, or surface of glass etc. ruled with parallel lines, for producing spectra by diffraction. गजांची जाळी, जाळीचा कठडा; अपभवनानें विच्छिन्नकिरण तयार व्हावे म्हणून बनविलेली समांतर रेषांची जाळी, कांचेच्या पृष्ठभागावरील समांतर रेषा.

**Grā'tis**, *adv. & a.* ( ग्रे'टिस् )—free of charge. फुकट, मोफत, विनामूल्य. [ L. *gratia*, favour ]

**Grăt'itūde**, *n.* (ग्रॅ'टि-ट्यूड्)—being thankful for and ready to return kindness. कृतज्ञता, उपकार स्मरणें.

**Gratū'itous**, *a.* ( ग्रॅट्यु'इटस् )—got or done gratis; uncalled for, motiveless. मोफतचें; न मागतां दिलेलें, अनाहूत, आगंतुक, निर्हेतुक, निष्कारण. -*ly, adv.*; -*ness, n.*

**Gratū'ity**, *n.* (ग्रॅट्यु'इटि)—a free gift money present for services, tip. देणगी, बक्षीस, इनाम.

**Gratū'latory**, *a.* ( ग्रॅट्युलेटरि )— conveying congratulations, complimentary. अभिनंदनपर. *Grat'ulate, -tion, n.* अभिनंदन (करणें).

**Gravā'mĕn**, *n.* ( ग्रव्हे'मेन् )—a grievance; essence of accusation. (फिर्यादीची) तक्रार, फिर्याद (-कारण); तक्रारींतील तात्पर्य, सारांश.

**Grāve**, *n.* (ग्रेव्ह्)—a hole dug for a corpse; being dead, death, Hades; a trench for digging up potatoes etc.; (*fig.*) a receptacle of what is dead. प्रेत पुरण्याचा खळगा, खाडा; मरण, मृत्यु, नाश, नरक; चर, मळी; थडगें, समाधी, कबर. *v. t.* to engrave, carve; to fix indelibly (*on, in*, mind etc.); (arch.) to bury. खोदणें, कोरून ठेवणें; मनावर पक्के ठसविणें, बिंबविणें; थडग्यांत पुरणें, गाडणें. *Secret as the g.*, quite. अगदीं- निखालस- गुप्त. *To make one turn in his g.*, (of act etc.) जिवंत असता तर अशा कृत्यानें दुःखकलाच असता, त्याला मरणप्राय दुःख झालें असतें. *Some one walking on my grave*, (एकाद्याला निष्कारण धडकी भरते-भीति वाटते तेव्हां). *G.-clothes*, प्रेतवस्त्रें, कफन. *G.-digger*, थडगें- खाडा-खणणारा; एक जातीचा कृमि,- कीटक. *G. stone*, थडग्यावरील दगड. *G.-yard*, burial ground. स्मशान, कबरस्थान. *Graven image*, खोदून तयार केलेली देवाची मूर्ति. *Graven, -ed, pa. p.*

**Grāve**, *a.* (ग्रेव्ह्)—serious, weighty; dignified, solemn; not showy; (accent) low-pitched, not acute. गंभीर, भयंकर, मोठा, गंभीर मनाचा; साधा, भपकेबाज नसलेला; प्लुत, खोल, गंभीर (स्वर). *G.-ly, adv.*

**Grāve**, *v. t.* (ग्रेव्ह्)—to clean (ship's bottom) by burning and tarring while aground or

in graving dock. गलबताचा तळ जमिनीवर किंवा सुक्या गोदींत साफसूफ करणें.

**Grăv'el**, *n*. (ग्रॅव्हेल्)—coarse sand and small stones; (Geol.) a stratum of gravel, esp. one containing gold; aggregations of visible urinary crystals. रेंव, रेती, कंकर, बारिक खडी; (सोनें-सोन्याचे कण-असलेला) भूगर्भातील रेंवेचा थर; अश्मरी, मुतखडा (रोग). *v. t.* to lay with gravel; to puzzle. (वर) रेंव, रेती, खडी-पसरणें; तोंड बंद पाडणें, गोंधळविणें. *Grav'elly*, *a.*

**Gră'vĭd**, *a*. (ग्रॅ'व्हिड्)—pregnant. गर्भार, गर्भवती, सुपीक.

**Grăv'ĭtāte**, *v. i.* (ग्रॅ'व्हिटेट्)—to move or tend towards the centre, by force of gravity; to sink as by gravity; (*fig.*) to be attracted towards; (Diamond-digging) to manipulate so that heavy stones sink to bottom. गुरुत्वाकर्षण होणें, मध्यकेंद्राभिसरण करणें; खालीं जाणें, बुडणें. (कडे) कल, -गति- असणें; हिऱ्यांच्या खाणींत) खणतांना जड हिरे तळीं राहतील अशा रीतीनें रेती चाळणें.

**Grăv'ĭtātion**, *n*. (ग्रॅ'व्हिटेशन्)—tendency to move or tend towards the centre. गुरुत्वाकर्षण, विश्वांतील सर्व वस्तूंचें परस्पराकर्षण. *-al*, *a.*

**Grăv'ĭtў**, *n*. (ग्रॅ'व्हिटि)—solemnity; importance; weight or weightiness; a body's attraction to the centre of the earth. गांभीर्य; महत्त्व, गौरव; भार; गुरुत्व, गुरुत्वमध्याकर्षण.

**Grā'vў**, *n*. (ग्रे'व्हि)—juices that exude from flesh in and after cooking; dressing for food. पक्वमांस, रसा, (शिजतांना) मांसांतून गळणारा रस; पातळ मसाला.

**Gray**, *a*. (ग्रे)—coloured like ashes or lead; white with old age. करडा, भुरा; केंस पिकलेला. *-ling*, *n*. गोड्या पाण्यांतील एक पांढरा-करडा मासा; एक जातीचें फूलपांखरूं.

**Grāze**, *v. i. & t.* (ग्रेझ्)—to feed on growing grass; to pasture cattle; to touch lightly in passing, to abrade skin etc. in rubbing past. चरणें, गवत खाणें; गुरें चारणें; चाटून घासून-जाणें, खरचटणें. *n.* grazing; an abrasion. चाटून जाणें; खरचटणें. *Gra'zier*, *n.* (ग्रे'झर्)—विकण्याकरितां गुरें पाळून त्यांची निगा राखणारा. *Gra'zing*, *n.* pasture; grass feed. कुरण, गुरें चारण्याचें मैदान.

**Grease**, *n*. (ग्रीस्)—melted fat of a dead animal; fatty or oily matter; disease in horse's heels. वंगण, ओंगण; चरबी, माखण, चिकटा; घोड्याच्या टांचेंतील सूज, भेंडी. *v. t.* (ग्रीझ्)—to lubricate or soil with g.; to affect horse with g.; to bribe. वंगण घालणें,-करणें; घोड्याच्या टांचेला भेंडी रोग उत्पन्न करणें; लांच देणें, मूठ दाबणें. *Grea'ser*, *n.* आगबोटींतील मुख्य आगवाला. *Greas'y*, *a.* तेलकट.

**Great**, *a*. (ग्रेट्)—large in bulk or number; considerable in extent or time; important, pre-eminent; of great ability; hard, difficult; familiar; pregnant. मोठा, थोर, वडा; मोठ्या विस्ताराचा; कर्तृत्ववान, अलौकिक, विलक्षण बुद्धीचा, महत्त्वाचा, प्रमुख; मोठ्या योग्यतेचा; कठीण, जड; ओळखीचा, नात्याचा; गरोदर, गर्भवती, गाभण. *A g. while ago*, फार फार पूर्वी, फार काळापूर्वी. *G. with child*, pregnant. गर्भवती, गरोदर. *The g. world*, high society. उच्च वर्गीय लोक, वडे लोक. (*Alexander*) *the g.*, *the g.* (*Mongal*), सुप्रसिद्ध थोर. *G. aunt*, one's parent's aunt. (आत्या-) आजी. *G. nephew*, *-niece*, पुतण्याचा मुलगा,-मुलगी, नातू, नात *Greatest happiness of the greatest number*, तत्त्वज्ञ 'बेन्थॅमाचें' पुष्कळांचें पुष्कळ सुख' हें मुख्य तत्त्व. *G. go*, final examination for B. A. at cambridge. बी. ए. पदवीची शेवटची परीक्षा (केंब्रिजची). *G. house*, chief house in village etc. खेड्यांतील वगैरे प्रमुख-मोठें-घर. *Greats*, *n. pl.* Oxford B. A. final examination. (ऑक्सफर्डची) बी. ए पदवीची शेवटची परीक्षा. *The great*, वडे-थोर-लोक. *G. and small*, लहानथोर, गरीब-श्रीमंत. *G.-hearted*, थोर अंतःकरणाचा, थोर-उदार-मनाचा. *G.-ness*, *n.* मोठेपण, थोरपण, वैभव, थोरवी. *Great'ly*, *adv.* पुष्कळ, अतिशय.

**Greatcoat'**, *n*. (ग्रेट्कोट्)—an overcoat. वरचा (मोठा-सैल-पायघोळ) अंगरखा. *-ed*, *-less*, *aa.*

**Greave**, *n*. (ग्रीव्ह्)—(*usu. pl.*) piece of armour for shins. गुडघ्यापासून खालच्या पायाचें कवच, जंघात्राण.

**Greaves**, *n. pl.* (ग्रीव्ह्झ्)—tallow refuse. (गाळलेल्या) चरबीचा गाळ, रेंदा.

**Grēbe**, *n*. (ग्रीब्)—a diving bird; its plumage. एक पाणबुड्या पक्षी, त्याचीं पिसें.

**Grē'cian**, *a*. (ग्री'शन्)—ग्रीस देशाचें,-देशासंबंधीं. *G. knot*, डोक्याच्यामागें स्त्रियांनीं केसांचा आंबाडा-वेणी घालण्याची पद्धति. *G. nose*, अवक्र सरळ नाक. *G. slippers*, पौर्वात्य पद्धतीच्या वाहणा. *G.*, *n.* a Greek scholar. ग्रीकभाषाप्रवीण, पंडित.

**Greed**, *n*. (ग्रीड्)—insatiate desire for food or wealth; an eager desire or longing. अधाशीपणा; लोभीं, हांव.

**Greed'ў**, *a*. (ग्री'डि)—gluttonous, avaricious. अधाशी, लोभी, हांवरा. *Greed'ily*, *adv.*, *-iness*, *n.* [Skr. *gridh*, to be greedy]

**Greek,** *n.* (ग्रीक्)—a native of Greece; Greek language. ग्रीस देशांतील रहिवासी ; ग्रीक भाषा. *a.* of Greece or its people, Hellenic. ग्रीस देशाचा, ग्रीस देशच्या रहिवाशांचा, प्राचीन ग्रीसचा. *G. to me,* beyond my comprehension. न समजण्याजोगें, आटोक्यापलीकडचें. *G. gift*, अपाय व्हावा म्हणून दिलेली देणगी, खोटी,-लबाडीची,-देणगी.

**Green,** *a.* (ग्रीन्)—of colour like grass; unripe, young; inexperienced; not seasoned or dried; pale, sickly; jealous; full of vitality. हिरवा; अपक्व; अननुभवी; कोंवळा, कच्चा; फिकट, रोगट (चेहरा); मत्सरी; जोमदार, सतेज, रसाळ. *n.* green colour; green part of thing; (*pl.*) vegetables; grass-plot. हिरवा रंग; कोणत्यादि वस्तूचा हिरवा भाग; (अने०) भाजीपाला; गवत-जमीन, ओलवण, कुरण. *v. i. & t.* to become or make green; (*sl.*) to hoax. हिरवा होणें,-करणें, हिरवा रंग देणें; फसविणें, ठकविणें. *G. eye,* jealousy. मत्सर, हेवा; *-eyed, a. In the g. tree,* under good conditions. सुस्थितींत. *In the dry tree,* under bad conditions. वाईट स्थितींत. *A g. wound,* ताजी-ओली-जखम. *G. gro'cer,* काछी, ताजी भाजी विकणारा, *-gro'cery, n., G. horn, n.* साधाभोळा, नवशिका मनुष्य. *G. stone, n.* kind of jade. एक प्रकारचा मौल्यवान् 'मर्गस' दगड,-हिरा. *G. stuff,* भाजीपाला. *G. sward n.* turf. आंखूड हिरव्या गवताची जमीन,-मैदान. *G. wood, n.* woodland in spring or summer. हरित वनश्री, दाट हिरवें रान. *Green'ish, -ny, aa. Green'ly, adv., -ness, n.*

**Green'băck,** *n.* (ग्री'न्बॅक्)—(U. S.) a legal tender note. कायदेशीर कागदी चलन, हुंडी.

**Green'ery̆,** *n.* (ग्री'नरि)—vegetation. हिरवळ.

**Green'finch,** *n.* (ग्री'न्-फिंच्)—a bird with gold and green plumage. पिवळ्या आणि हिरव्या पिसाऱ्याचा पक्षी.

**Green'house,** *n.* (ग्री'न्-हउस्)—glass house for rearing plants. लहान रोपट्यांच्या वाढीसाठीं केलेलें कांचेचें घर.

**Green'rōom,** *n.* (ग्री'न्-रूम्)—retiring room for actors off the stage. नटांची सजण्याची खोली, नेपथ्यशाला, नेपथ्य.

**Greet,** *v. t.* (ग्रीट्)—to accost with salutation; to salute, to receive; to meet (ear, eye). भेटल्यावर नमस्कार करणें; वंदन करणें, स्वागत करणें; दृष्टीस पडणें, कानावर येणें.

**Greet,** *v. i.* (ग्रीट्)—(Sc.) to weep. रुदन करणें, रडणें.

**Gregăr'ious,** *a.* (ग्रिगे'अरिअस्)—living in flocks or communities; (Bot.) growing in clusters; fond of company. कळप-संघ-करून राहणारा; झुपक्यांनीं वाढणारा; संगति-प्रिय, समाजप्रिय.*-ly, adv.;-ness, n.*

**Grĕnāde',** *n.* (ग्रिने'ड्)—explosive shell. दारूनें भरलेला गोळा, स्फोटक गोळा, हिंगणभेद.*-dier, n.* स्फोटक हातगोळा फेकणारा सैनिक.

**Grey,** *a.* (ग्रे)—coloured like ashes or lead; clouded, dull. करडा, भुऱ्या रंगाचा; फिकट. *n.* करडा रंग; करड्या रंगाचा घोडा; धंद्रावा आणणारा अंधुक प्रकाश. *v. t. & i.* करडा, भुरकट,-करणें-होणें.

**Grey'hound,** *n.* (ग्रे'हाउन्ड्)—a tall, very slender swift dog kept for the chase. शिकारी कुत्रा.

**Grief,** *n.* (ग्रीफ्)—sorrow, deep trouble. दुःख, शोक. *To come to g.,* आपत्ति, संकट-ओढवणें, फसणें, पडणें.

**Griev'ance,** *n.* (ग्री'व्हन्स्)—real or fancied ground of complaint, hardship. तक्रारीची जागा, गाऱ्हाणें, अडचण, संकट, क्लेश, पीडा.

**Grieve,** *v. t. & i.* (ग्रीव्ह्)—to cause to feel grief; to be in pain; to mourn, to sorrow. दुःख देणें, दुखवणें; दुःखांत असणें; शोक करणें, चिंता करणें, दिलगीर होणें.

**Griev'ous,** *a.* (ग्री'व्हस्)—oppressive, painful; (of pain etc.) severe; flagrant, heinous. त्रासदायक, दुःखद, तीव्र; जबर, भयंकर.

**Griff'in,** *n.* (ग्रि'फिन्)—(Anglo-Ind.) a newly arrived European; a greenhorn. नुकताच विलायतेहून आलेला युरोपिअन गृहस्थ; भोळसट, नवखा.

**Griff'in, Griff'on, Gry̆ph'on,** *n.* (ग्रि'फिन्,-फन्)—a fabulous creature half lion and half eagle; (*griffon*) a kind of vulture, a coarse-haired dog. (शरीर व पाय सिंहासारखे आणि पंख व चोंच गरुडासारखी असणारा) गरुड-सिंह प्राणी,-राक्षस; एक मोठें गिधाड, एक जातीचा शिकारी कुत्रा.

**Grĭg,** *n.* (ग्रिग्)—a small eel; a grass-hopper, a cricket. लहान वाम,-वांब-मासा; टोळ, राळ, रातकिडा.

**Grĭll,** *n.* (ग्रिल्)—a gridiron; grilled food; (also *g.-room*) room where food is served and grilled; (also *grille*) grating, latticed screen, esp. in door for observing callers. तळाशीं लोखंडी जाळी असलेलें भांडें; भाजलेला पदार्थ, भाजप; जेवणघर-स्वयंपाकघर; दरवाजाला बसविलेली जाळीदार चौकट. *v. t. & i.* to broil on grill (fig. of great heat). भाजणें, शेकणें; (अति उष्णतेनें) भाजून-करपून-निघणें *-age, n.* heavy framework or cross-timbering

as foundation for building. इमारतीचा सुस-सुशीत जमिनींतील मजबूत जाळीदार लांकडी पाया.

**Grilse**, *n.* ( ग्रिल्स् )—a young salmon. 'सामन' माशाचें पोर.

**Grim**, *a.* ( ग्रिम् )—stern, merciless; of harsh aspect; ghastly, joyless. कठोर, निर्दय; उग्र स्वरूपाचा; उदास, भकास, खिन्न. *-ly, adv.; -ness, n.*

**Grimace'**, *n.* ( ग्रिमे'स् )—a wry face made in disgust or in jest; affected look, affectation. नाकडचेष्टा, वांकुली; ढोंगी मुद्रा, ढोंग. *v. i.* to make grimaces. वांकुल्या करणें, तोंडें वेडीं-वांकडीं करणें. *-cer,-cier, nn.*

**Grimal'kin**, *n.* ( ग्रिमॉ'ल्किन् )—an old she-cat; a spiteful old woman. म्हातारी मांजरी,-भाटी; चुट्टी, थेरडी.

**Grime**, *n.* ( ग्राइम् )—soot, dirt, deeply ingrained. मळ, किटण, पुट. *v. t.* to blacken, to dirt. मळकट करणें, कीट धरणें. *-my, a.; -miness, n.*

**Grin**, *v. i. & n.* ( ग्रिन् )—to show teeth in pain or in smile. दुःखांत किंवा हंसतांना दांत विचकणें, दांत विचकून हंसणें. *To g. and bear it*, शांतपणानें सहन करणें.

**Grind**, *v. t. & i.* ( ग्राइन्ड् )—to crush to small particles; to sharpen; to harass with exactions, oppress; to toil, to study hard, to teach ( subject, pupil *in* it ) laboriously; to rub gratingly. दळणें, पीठ करणें, भरडणें; घांसणें, धार लावणें, पाजळणें; छळणें, गांजणें, पिळून काढणें; अंगमेहनत श्रम-करणें; ( पुस्तकांचें ) पीठ पाडणें, अभ्यासाच्या घोड्या लावणें, ( विषय ) घोकून घोकून शिकविणें; कर कर आवाज करणें, करकरणें, घांसटणें. *n.* grinding; hard work; walk for exercise; a plodding student; steeple chase. दळण, दळणें, दळप; कष्ट, श्रम; व्यायामासाठीं फिरणें; घोकंपट्टी करणारा विद्यार्थी, घोड्यांची शर्यत.

**Gri'nder**, *n.* ( ग्रा'इन्डर् )—the molar tooth; grinding machine; one who grinds. दाढ, चिरट, चक्की; दळणारा.

**Grind'stone**, *n.* ( ग्रा'इन्ड्-स्टोन् )—revolving disk for grinding and polishing. धार लावण्याचें चाक, निसणा. *To hold, keep, one's nose to the grindstone*, to make him work incessantly. एकाद्याला सारखें घाण्याला जुंपणें, जुंपणें.

**Grip**, *n.* ( ग्रिप् )—a firm hold, grasp; mastery, control of a subject. घट्ट मूठ, पकड, जेटी; ( कोणत्याहि विषयाचें ) पूर्ण आकलन, ताबा. *v. t. & i.* to grasp tightly, to take firm hold. घट्ट धरणें, गच्च पकडणें. *At gg., come to gg.*, हातघाई (-वर येणें). *G. sack*, a hand-bag. लहान-हातांतून नेण्याची-हातपिशवी.

**Gripe**, *v. t.* ( ग्राइप् )—to clutch, to grip; to oppress; to affect with colic pains. मुठींत धरणें; त्रास देणें; ( पोटांत ) कळा-मुरडा-येणें. *n.* a grip; hold, control; ( *pl.* ) colic pains. पकड, मूठ; ताबा; मुरडा, तिडीक.

**Grippe**, *n.* ( ग्रिप् )—influenza. इन्फ्लुएंझा ताप.

**Gris'ly**, *a.* ( ग्रि'झ्लि )—causing terror. भयंकर, दारुण, भयानक.

**Grist**, *n.* ( ग्रिस्ट् )—corn for grinding; malt crushed for brewing. दळण, दळप; दारू तयार करण्यासाठीं सातूचें पीठ करणें. *Brings g. to the mill*, is profitable. फायद्याचें कलम आणून देतो, फायदा करून देतो. *All is g. that comes to his mill*, he utilizes everything. तो प्रत्येक गोष्टीचा उपयोग करून घेतो, हातीं धरतो त्याचें सोनें बनवितो.

**Grist**, *n.* ( ग्रिस्ट् )—size or thickness of yarn or rope. सुताचा-दोरीचा-आकार, जाडी.

**Gri'stle**, *n.* ( ग्रि'सल् )—tough flexible tissue, cartilage. अस्थिकूर्चा, कोमलास्थि. *Gri'stly*, ( ग्रि'स्लि ) *a.*

**Grit**, *n.* ( ग्रिट् )—particles of sand; ( also *grit'stone* ) coarse sand-stone; grain or structure of stone; ( colloq. ) pluck, endurance. रेंव, रेवा, ककर; खडबडीत रेंवाळ-रेतीचा-दगड; दगडाची बनावट; हिंमत, धैर्य, छाती. *v. i. & t.* to make a grating sound; to grind. करकरणें, घांसटणें; ( दांत ) चावणें. *Gritt'y, a.* रेंवाळ; हिंमतवान.

**Grits**, *n. pl.* ( ग्रिट्स् )—coarse oatmeal. भरड, कणी, रवा.

**Griz'zled, Grizz'ly**, *aa.* ( ग्रि'झल्ड्, ग्रि'झ्लि )—grey, grey-haired. करडें, करड्या रंगाचें. *Grizzly, bear*, उत्तर अमेरिकेंतील उग्र धिप्पाड अस्वल.

**Groan**, *v. i. & t.* ( ग्रोन् )—to make deep sound expressing pain or the like; to be oppressed; long for. कण्हणें, कुंथणें, विव्हळणें; गांजलें जाणं; ची प्रबळ इच्छा धरणें. *n.* कण्हणें, विव्हळणें, हायहाय. *-ingly, adv.*

**Groat**, *n.* ( ग्रोट् )—a silver coin =4d; small sum. चार पेन्सचें चांदीचें नाणें; लहान रक्कम, चवली-पावली.

**Groats**, *n. pl.* ( ग्रोट्स् )—hulled grain. भरडलेलें धान्य.

**Grŏ'cer,** *n.* (ग्रो'सर्)—a dealer in spices, tea, sugar and domestic stores. किराणा जिन्नस विकणारा, वाणी. *G. 'sitch*, eczema caused by handling sugar. एक त्वचेचा रोग, कंडुरोग.

**Grŏ'cery,** *n.* (ग्रो'सरि)—grocer's trade or goods. किराणा व्यापार, किराणा जिन्नस, वाणसौदा.

**Grŏg,** *n.* (ग्रॉग्)—drink of spirit and water; a social meeting with grog. केवळ जलमिश्रित मद्य, दारुपाणी; मद्यपानमंडळ. *v. i. & t.* to drink g.; to extract spirit from (empty cask) by pouring hot water. मद्य पिणें; गरम पाणी ओतून (रिकाम्या पिंपांतून) मद्य-दारू-काढून घेणें. *G.-blossom*, pimple or redness on nose due to excessive drinking. अतिशय दारू पिणाऱ्या लोकांच्या नाकावर दिसणाऱ्या पुटकुळ्या,-लाली. *Grogg'y, a.* drunk; unsteady. अति प्यालेला, झिंगलेला, झोकांड्या जात असलेला; लटपटणारा. *Grog'giness, n.*

**Grŏg'ram,** *n.* (ग्रॉ'ग्रम्)—coarse fabric of silk, mohair etc., often stiffened with gum. खळ लावलेलें जाडेंभरडें कापड. [*F. gros grain*, large grain]

**Groin,** *n.* (ग्राइन्)—depression between belly and thigh; (Arch.) edge formed by intersecting vaults, fillet covering this. मांडीचा सांधा, जांघ, आडसांधि; (घुमटाचे दोन डेरे एकत्र जुळण्यानें होणारा) जंघाकोन, त्यावरील पट्टी. *v. t.* to build with groins. जंघाकोनांनीं बांधकाम करणें.-*ing, n.*

**Grōōm,** *n.* (ग्रूम्)—an officer of Royal Household; a servant who tends horses; a bridegroom. राजघराण्यांतील कारभारी; घोडेवाला, मोतद्दार; नवरा, वर. *v. t.* to tend (a horse), to feed and take care of. घोड्याची निगा राखणें; पालन करणें. *Well-groomed*, (of persons) neatly got up. व्यवस्थित केस, दाढी असलेला, टाकटीक. *Grooms'man*, a friend attending bride-groom at wedding. (नवऱ्याचा) करवला, टोंकणा,-ण्या.

**Grōōve,** *n* (ग्रूव्ह्)—channel or hollow; routine. खाचणी, कोरणी, पाट, चोगदा; कामाचें रहाटगाडगें, ठराविक क्रम, गाडा. *v. t.* to make groove in. खोदणें, खांच पाडणें.-*vy, a.,-viness, n.*

**Grōpe,** *v. i.* (ग्रोप्)—to feel about as in dark; to search blindly. अंधारांत चांचपणें; चांचपत शोधून काढणें. *Grop'ingly, adv.*

**Grō'sbeak,** *n.* (ग्रो'स्बीक्)—kinds of small bird with a large strong beak. मोठी व मजबूत चोंच असलेला लहान पक्षी.

**Grōss,** *a.* (ग्रोस्)—luxuriant, rank; total, not net; rude, rough, coarse; indecent. फार सुपीक; स्थूल, समग्र; भसडा, जाडाभरडा; बीभत्स, बाष्कळ, पशुतुल्य, नीच. *n.* the bulk; twelve dozen. एकंदर, ठोकरास; बारा डझन (१४४). *In (the) g.*, in a general way. सामान्यपणें, एकंदरीनें. *Gros'sly, adv. Gros'sness, n.*

**Grŏt,** *n.* (ग्रॉट्)—(poet.) a grotto. गुहा, गुंफा.

**Grotĕsque',** *n.* (ग्रॅटे'स्क्)—a style of decorative art; distorted figure. मनुष्य व पशु-आकृति आणि झाडांची पालवी यांच्या विचित्र-विलक्षण-रचनेचें शोभेचें चित्रकाम-खोदकाम; विलक्षण आकृति,-देखावा. *a.* distorted; incongruous; absurd, ludicrous, fantastic. वेडाविद्रा; असंबद्ध; हास्यास्पद.-*ly, adv,-ness,-rie, nn.* वेडेविद्रेपणा, विरूपता.

**Grŏtt'ō,** *n.* (ग्रॉ'टो)—a picturesque cave; a structure imitating a cave. सुंदर गुहा; कृत्रिम गुहा, लेणें, गुंफा.-*ed, a.*

**Ground,** *n.* (ग्राउन्ड्)—surface of earth; bottom of sea or water; foundation; motive; (pl.) dregs, esp. of coffee; substratum, underlying part; (pl.) enclosed land attached to house; land; floor or level; (Painting etc.) surface worked upon. जमीन, भूमि, भुई, देश, मुलूख; समुद्राचा किंवा पाण्याचा तळ; पाया, आधार; हेतु, मूळ कारण, प्रयोजन; गाळ, सांका, रेंदा; तळचा भाग, खालचा भाग; घराभोंवतालची जमीन, जमीनजुमला, आवार; जमीन, वतन, शेतभात; पृष्ठभाग, सपाटी; भूमिका, तलभाग. *v. t. & i.* to fix or place on the g.; to base upon cause or principle; to instruct thoroughly (in elements); to run ashore; to lay (esp. hands) on g.; (Electr.) connect with earth as conductor; alight on g. जमिनीवर बसविणें,-ठेवणें; सबळ कारण असणें, तत्त्वाचा आधार देणें, आधारलेलें असणें; ओनामा-मूलतत्त्वें-घोटविणें,-पक्कीं शिकविणें; तळाला लागणें, कोरड्या जमिनीवर लागणें; जमिनीवर (हात) टेकणें; (जमिनींत) विद्युत्प्रवाह नेणें; जमिनीवर उतरणें. *To touch g.*, मुद्यावर येणें. *To take g.*, (of ship) strand. (जहाज) जमिनीवर लागणें. *On the g. of*, by reason or under pretext of. च्या कारणामुळें, सबबीमुळें. *On public gg.*, सार्वजनिक हिताच्या दृष्टीनें. *To fall*, or *be dashed to, the g.*, (of scheme, hope) be abandoned, fail. सोडून देणें, फसणें, निष्फळ-व्यर्थ-होणें. *Down to the g.*, (colloq.) thoroughly पूर्णपणें, सर्व बाजूंनीं. *Above g.*, alive. जिवंत. *To cut the g. from under one's feet*, एकाद्याचें म्हणणें किंवा बेत सपशेल उलटविणें,-फसविणें,-हाणून पाडणें. *To cover much g.*, बरेंच परिणामकारी-दूरवर परिणाम-

कारक-होणें. *To stand one's g.*, आपला मुद्दा-वेत-न सोडणें. त्याला घट्ट धरून राहणें. *To shift one's g.*, मत-वेत-बदलणें. *To gain g.*, advance. पुढें जाणें, प्रगति करणें. *To lose, give, g.*, retreat. माघार घेणें *Forbidden g.*, टाळण्याचा विषय. *G.-colour*, रंगाचा पहिला हात. *G. game*, hares, rabbits etc. ससे इ. ची शिकार. *G. nut*, भुईमूग (शेंग). *Ground (s)-man*, man in charge of cricket ground. क्रिकेट खेळण्याच्या मैदानाचा रखवालदार,-रक्षक. *G.-rent*, rent paid for ground leased for building. इमारतीचें भुई-भाडें. *G.-swell*, पूर्वी होऊन गेलेल्या वादळामुळें खवळलेला समुद्र. *G. torpedo*, fixed to bottom of the sea. समुद्राच्या तळाशीं लावलेला पाणसुरुंग. *Ground'y*, *a.* गाळ-सांका-धरणारें. *Ground'edly, adv.*

**Ground'-floor**, *n.* (ग्रा'उन्ड-फ्लोअर्)—story of a house on level of outside ground. तळ मजला. *To get in on the g.-f.*, मूळ चालकांबरोबर समान हक्कानें धंद्यांत घेतलें जाणें.

**Ground'work**, *n.* (ग्रा'उन्ड्-वर्क्)—foundation; chief ingredient, fundamentals. पाया, बुडखा, मूळ, आधार; मुख्य तत्त्व,-घटक द्रव्य.

**Groun'dĭng**, *n.* (ग्रा'उन्डिंग्)-drill in the elements of a subject. कोणत्याहि विषयाचा मूळ पाया.

**Ground'lĕss**, *a.* (ग्रा'उन्ड्-लिस्)—without motive or foundation, baseless. निष्कारण, निराधार. *-ly, adv.*; *-ness, n.*

**Ground**, *pa. t.* & *pa. p.* of Grind.

**Ground'lĭng**, *n.* (ग्रा'उंड्लिंग्)—kinds of fish living at bottom; a creeping or dwarf plant; a person of inferior taste. तळाशीं राहणाऱ्या माशांची जात; वेल, खुजट झाड; हीन अभिरुचीचा मनुष्य.

**Ground'sel**, *n* (ग्रा'उंड्सल्)—kinds of weed. (पिंजऱ्यांतल्या पक्ष्यांचा) चारा, वनस्पति. 2. lowest part of wooden frame-work, threshold. लांकडी चौकटीचा खालचा पाया, लांकडी बैठक, पाया, उंबरठा.

**Group**, *n.* (ग्रूप्)—a number of persons or things near together or belonging or classed together. गट, पक्ष, जमात, टोळी, समुच्चय, समुदाय, वर्ग, गण, उपवर्ग, (Fine arts) वस्तूंचा गट. *v. t.* & *i.* to form, to fall, into a group; to classify. गट-पक्ष-संघ करणें,-बनणें, जमाव करणें; वर्गीकरण करणें, वर्ग पाडणें. *G. captain*, R. A. F. (Royal Air Force) officer. शाही विमानदळाचा अधिकारी.

**Grou'per**, *n.* (ग्रू'पर्)—kinds of W.-Ind. and Austral. fish. एक जातीचा मासा.

**Grouse**, *n.* (ग्राउस्)—the heath-cock or moor-fowl. एक जातीचा पक्षी. 2. *v. i.* & *n.* (*sl.*) grumble. कुरकूर (करणें).

**Grout**, *n.* (ग्राउट्)—thin fluid mortar for filling joints of masonry and brick work; (*pl.*) dregs. (दरजा भरण्याचा) कमावलेला भरभरीत चुना; गाळ, रेंदा. *v. t.* to finish with g. भरभरीत चुन्यानें दरजांमधील सांधे भरून काढणें.

**Grout**, *v. i.* & *t.* (ग्राउट्)—(of pigs) to turn up (earth) with snout. (डुकरांचें) सुसकुटानें माती उकरणें, उकरणें.

**Grōve**, *n.* (ग्रोव्ह्)—a small wood; a group of growing trees. उपवन; राई, वृक्षवाटिका, वन, राजी. *-d,-less,-vy, aa.*

**Grŏv'el**, *v. i.* (ग्रॉ'व्हल्)—to lie prone; to abase oneself, to be low or mean. (शेळपटपणामुळें) जमीन धरणें-धरून चालणें, सरपटत जाणें; हलकट बनणें. *Grov'elling, pr. pa.* abject, low, base. निकृष्ट, नीच, अधम; *-lly, adv. Groveller, n.*

**Grow**, *v. i.* & *t.* (ग्रो)—to develop or exist as living plant; to be found in some place; to spring up; to produce by cultivation; to increase (in size, height, amount, &c.); to let grow; (pass) to be covered with some growth. वाढणें; आढळणें; रुजणें; उत्पन्न करणें, पिकवणें; मोठा होणें, वाढत जाणें; वाढूं देणें; वाढवणें, वरच्या वाढीनें झांकलें जाणें, आवृत-आच्छादित-होणें. *To g. into one, together*, coalesce. एकत्र वाढणें,-उगवणें, एकजीव होणें. *To g. downwards*, diminish. कमी कमी होत जाणें. *To g. up*, पुरी वाढ होणें, ज्ञानींत येणें; जमिनींतून वर येणें, पूर्ण वाढ होणें; रूढ होणें, (दाढी इ.) वाढविणें. *G.-able, a. G.-ingly, adv. Grown-up, a.* & *n.* adult. वयांत आलेला, तरुण, प्रौढ, थोर.

**Grow'er**, *n.* (ग्रो'अर्)—one who grows fruit etc.; plant that grows in a specified way. (फळें इ.) पिकविणारा; वाढणारा.

**Growl**, *v. i.* & *t.* & *n.* (ग्राउल्)—(make) guttural sound of anger *at*; rumble; murmur of an angry person, complaint गुरकावणी; गुरगुरणें; कुरकुर करणें, कुरकूर.*-ingly, adv.*

**Growl'er**, *n.* (ग्रा'उलर्)—one who growls; a four-wheeled cab; (*sl.*) beer-jug. गुरगुरणारा, कुरकुरणारा, कुरकुऱ्या; चारचाकी गाडी; दारूचा खुजा.

**Grown**, *pa. p.* of Grow.

**Growth**, *n.* (ग्रोथ्)—increase; what has grown or is growing; morbid formation. वाढ, विस्तार; पूर्णावस्था, भर; रोगट वाढ, सूज.

**Groyne**, *n.* (ग्रॉइन्)—a structure run out to stop shifting of sea-beach. समुद्राच्या लाटांनीं किनारा धुपूं नये म्हणून बांधलेला लांकडी-दगडी-बांध, धक्का.

**Grŭb**, *n.* (ग्रब्)—larva of an insect, caterpillar; a dull drudge, a literary hack; (cricket) a ball bowled along ground; (sl.) food, a feed. कोशपक्षकिड्याचा पूर्वावस्थेंतील नेत्र. कुसरूड, सुरवंट; कंटाळवाणें काम करणारा, भाडोत्री लेखक; भुईसरपट चेंडू; अन्न, जेवण.

**Grŭb**, *v. i. & t.* (ग्रब्)—to dig superficially to clear ground of roots etc.; to search; to plod, toil (*on, along, away*); (*sl.*) to feed. जमीन वरवर खणणें; पालेंमुळें खणून टाकून साफ करणें; शोधणें; काबाडकष्ट करणें, राबणें; अन्न-जेवण-चालणं *G.-axe*, *n.* खुरपें; *G.-hoe*, खुरपें (रान उपटण्याचें); *G.-hook*, खुरप्या नांगर. *Grub'ber*, *n.* खुरपणारा; खुरपण्याचें हत्यार, खुरपणें. *Grub'by*, *a.* dirty; of, infested with, grubs. मलिन, घाणेरडा; रान-पालेंमुळें-असलेला. *G.-street*, *n.* (सतराव्या शतकांत लंडनमध्यें) कमी दर्जाचे, गरजू ग्रंथकार व वर्तमान-पत्रकर्ते राहात ती गल्ली; *a.* असल्या लेखकांचा, भाडोत्री.

**Grŭdge**, *v. t.* (ग्रज्)—to be unwilling to give or allow. देण्याला नाखूष असणें, कुरकुरणें. *n.* resentment, ill-will from envy or sense of injury. आकस, चुरस, पीळ, अढी. *To have a g. against, to bear, owe, one a g.*, एखाद्या-विषयीं मनांत द्वेष-अढी-धरणें. *Grudg'ing*, *pr. p.* reluctant. नाखूष, असंतुष्ट. *Grudg'ingly*, *adv.* नाखुषीनें.

**Gru'el**, *n.* (ग्रु'इल्)—liquid food of oatmeal; severe punishment. कणेरी, पेज; कांजी, मंड; कडक शासन,-शिक्षा. *v. t* (*sl.*) कडक शिक्षा करणें. *To have, get, one's g.*, शिक्षा होणें, सपाटून मार खाणें, पराभूत होणें, ठार मारलें जाणें. *To give one his g.*, कडक शिक्षा देणें. *Gru'elling*, *n.* कडक वागवणूक.

**Grue'some**, *a.* (ग्रु'सम्)—horrible, frightful. घोर, भयंकर; भयानक. *-ly*, *adv.*; *-ness*, *n.*

**Grŭff**, *a.* (ग्रफ्)—surly, laconic, rough-mannered, rough-voiced. उद्धट, द्वाड, रुक्ष, त्रोटक, आडदांड, कर्कश, कठोर (आवाजाचा). *-ish*, *a.*; *-ly*, *adv.*, *-ness*, *n.*

**Grŭm'ble**, *v. i. & t.* (ग्र'म्बल्)—to utter grumble; to complain, to murmur. कुरकुर करणें; तक्रार करणें. *n.* faint growl, murmur, complaint. कुरकुर, तक्रार. *-er*, *n.*

**Grume**, *n.* (ग्रूम्)—(med.) a clot of blood, viscous fluid. गठडी, गुठडी, चान्हळ. *-mous*, *a* [L. *grumus*, small heap]

**Grŭm'pȳ, Grŭm'pĭsh**, *aa.* (ग्र'म्पि, ग्र'म्पिश्)—ill-tempered. रागीट, चिडखोर. *Grum'pily*, *adv.*, *Grum'piness*, *n.*

**Grŭnt**, *v. i. & t. & n.* (ग्रन्ट्)—(to utter) a deep sound like a hog; express discontent: (डुकराचें) हुरहुर करणें, डुरकणें, घुरकणें, रें रें करणें. *-er*, *n.* a pig. डुक्कर. *-ingly*, *adv.*

**Grȳ'sbŏk**, *n.* (ग्रा'इस्बॉक्)—a small grey S. Afr. antelope. लहान करडें काळवीट,-हरीण.

**Gua'nō**, *n* (ग्वा'नो)—excrement of sea-fowl used as manure, artificial manure. माशांचें खत.

**Guarantee'**, *n.* (गॅरन्टी')—the giver of guaranty or security; guaranty; recipient of guaranty. हमीदार, जामीन; जिम्मा, लेखी जिम्मेदारी, हवाला, जामिनकी; जामीन,-हवाला,-घेणारा. *v. t.* to be a guarantee for; to answer for; to engage, to secure (*against, from*, risk etc. or *in*). जामीन होणें; हमी घेणें; खात्रीनें सांगणें, हवाला देणें किंवा घेणें. *Gua'rantor*, *n.* जामीन; विम्याच्या धर्तीवर खजिनदार वगैरे जबाबदार कामगारांच्या सचोटीबद्दल हवाला घेणाऱ्या मंडळ्या.

**Gua'rantȳ**, *n.* (गॅ'रन्टि)—a written or other undertaking to answer for performance of obligation, a ground of security. लेखी हमी, जिम्मेदारी, हवाला.

**Guard**, *n.* (गार्ड्)—a defensive posture; a watch, vigilant state; a protector; a sentry; an official in charge of a train; body of soldiers protecting place or person, escort; (*pl*) household troops; a device to prevent injury or accident. रखवाली, पहारा, सावधगिरी, दक्षता; रक्षण करणारा, रखवालदार, पहारेकरी; आगगाडीची सर्व जबाबदारी ज्याच्यावर असते तो गार्ड, रक्षक; चौकी-वरील शिपाई, रक्षक सैनिक,-शिपाई; खाजगी सैनिक, -सैन्य; रक्षक पट्टा, संरक्षक साधन, त्राण, कठडा, पिंजरा. *v. t. & i.* to protect, to defend; to take precautions; to keep in check. रक्षण करणें; सावधगिरी ठेवणें; ताब्यांत ठेवणें. *To take g.*, (क्रिकेटच्या खेळांत) चेंडूसमनन-खेळणाऱ्यानें बॅट टेंकण्याची जागा अजमावून घेणें; *to give g.* फलंदाजाला पंचानें बॅट टेंकण्याची जागा अजमावण्याला मदत करणें. *To keep g., be on g.*, पहारा करणें. *On one's g.*, prepared against attack etc. सावध, हुशार. *Off one's g.*, गैरसावध, अव-धान नसलेला. *G. of honour*, सन्मानार्थ सलामी. *G. chain*, सांखळीवजा पट्टा. *G. house*, लष्करी पहारेकऱ्यांची चौकी, चावडी. *G. rail*, संरक्षक कठडा. *Guards'man*, soldier of the Guards. खाजगी तैनातींतील सैनिक. *G.-less*, *a.*, *Guardedly*, adv.,—*edness*, *n.*

**Guard'ian**, *n.* (गा'र्डिअन्)—one who guards, keeper, protector; custodian. पालक, रक्षक, (Law) (अज्ञान) पालक; रखवालदार. *-angel*, राखण देवता, अधिदेवता, स्थानदेवता; वाली, पाठीराखा. *-ship*, *n.* पालकत्व.

**Gua'vä**, *n.* (ग्व 'व्हा) —a tropical tree with acid fruit used for jelly. पेरूचें झाड, पेरू.

**Gudg'eon**, *n.* (ग'जन्)—a small fresh-water fish used as bait; a person easily duped. एक गोडा मासा; भोळानाथ, भोळसट मनुष्य. 2. a pivot at the end of beam, axle etc., on which bell, wheel, works; socket in which rudder works. पिन, चावी, उथळें, खुपसें.

**Guel'der rōse**, *n.* (गे'ल्डर रोझ्)—a plant with balls of white flowers. पांढऱ्या झुबकेदार फुलांचें फुलझाड.

**Guerd'on**, *n.* & *v. t.* (ग'र्डन्)—(Poet.) reward, recompense. पारितोषिक, मोबदला, फळ, -देणें. *-less*, *a.*

**Guern'sey**, *n.* (ग'र्न्झि)—thick knitted woollen (usu. blue) outer tunic or jersey worn by sailors, workmen, and children. घट्ट विणीचें लोंकरी (निळें) कुडतें,—आंगरखा.

**Guerill'ä**, **Guerrill'ä**, *n.* (गेरि'ला)-*G.war*, irregular war waged independently by small bodies, a man engaged in this. गनिमी काव्यानें चालविलेलें युद्ध, गनिमी काव्याची लढाई; गनिमी सैनिक.

**Guĕss**, *v. t.* & *i.* (गेस्)—to conjecture, think likely. तर्क बांधणें, अटकळ बांधणें, अनुमान करणें. *n.* a rough estimate, conjecture. अजमास, तर्क, अनुमान, अंदाज, समज. *I guess*, (U. S.) I know, I am sure. मला ठाऊक आहे, माझी खात्री आहे. *G. work*, guessing. अंदाज, अनुमान-धपका.

**Guĕst** *n.* (गेस्ट्)—a visitor or friend entertained at one's house; a person lodging at a hotel or boarding-house; animal or vegetable parasite. पाहुणा, अतिथि, अभ्यागत, खानावळींत उतरणारा पाहुणा, मुसाफर, बांडगूळ. *Paying g.*, a boarder. पैसे देऊन खाणावळींत जेवणारा. *G. chamber*, अतिथिगृह. *G. -ship*, *n.*

**Guest'-rope**, **Guess'-rope**, (गे'स्ट् रोप, गे'स् रोप्)—second rope fastened to boat in tow to steady it; rope slung outside a ship to give hold for boats coming alongside. गलबत स्थिर करणारा दुसरा दोर, नांगर; इतर लहान पडावांना आधार देणारा गलबताच्या बाहेर ताणलला दोर.

**Gŭff**, *n.* (गफ्)—(U. S.) an empty talk. पोकळ-वायफळ-बडबड.

**Gŭffaw'**, *n.*, *v. i.* & *t.* (गफॉ')—(to make, say, with) coarse laugh. हाहा करून मोठ्यानें हसणें, हसून बोलणें.

**Guid'ance**, *n.* (गा'इ-डन्स्)—act of guiding; direction; a leading. मार्ग दाखविणें; दिशा; योग्य मार्ग.

**Guide**, *n.* (गाइड्)—one who shows the way, an adviser; directing principle; (Mil.) one of company formed for reconnoitring etc.; (*Naut.*) *ship on which rest of the* fleet regulate their movements; (also, g. book) book of information about place etc.; a manual; (Mech.) a bar or rod directing motion; a guage etc. controlling tool; thing marking a position or guiding the eye. मार्गदर्शक, वाटाड्या, उपदेशक; तत्त्वदर्शक; लष्करी हेहेऱ्या, वाटाड्या; वाटाडें जहाज; मार्गदर्शक-माहितीचें पुस्तक; अंकलिपी, प्राथमिक पुस्तक; वाटाड्या, खुणेचा सांचा, (पाण्याच्या चक्रींतील) चक्राला जोडलेली वाटाडी नळी; यंत्र- नियामक साधन; स्थानदर्शक खूण,- वस्तु. *G. post*, वाट दाखविणारा खुणेचा खांब. *G. rope*, यारीला लावलेल्या ओझ्याला योग्य गति देणारा दोर. *G. -way*, groove, track. खांचणी, मार्ग. *v. t.* to act as a gide to; to lead, to direct. वाटाड्या होणें, दिशा दाखवणें, मार्गाला लावणें. *G.-less*, *Guid'able*, *aa.*

**Guid'on**, *n.* (गा'इडन्)—a small flag narrowing to point at free end. (लष्करी) खुणा दाखविण्याचा बावटा, (विशिष्ट चिन्हांकित) झेंडा, बावटा.

**Guild**, **Gild**, *n.* (गिल्ड्)—a society for mutual aid or with common object; a business corporation, परस्परसाहाय्यार्थ व स्वहितसंरक्षणार्थ संस्था, संघ, मंडळ; व्यापारी संघ.

**Guild'-hall**, *n.* (गि'ल्ड्-हॉल्)—a town hall. सार्वजनिक दिवाणखाना, नगरभवन.

**Guile**, *n.* (गाइल्)—treachery, deceit. विश्वासघात, कपट, कावा, माया, चेटूक. *-ful*, *a.*; *-fully*, *adv.*, *-fulness*, *n.*; *-less*, *a.*, *-lessly*, *adv.* *-lessness*, *n.*

**Guill'ĕmot**, *n.* (गि'लिमॉट्)—a kind of sea-bird. एक समुद्रावरील-दर्यावरील-पक्षी.

**Guilloche'**, *n.* (गिलो'श्)— an architectural ornament imitating braided ribbons. विणलेल्या फितींसारखें शोभिवंत शिल्पकाम.

**Guillotine'**, *n.* (गिलॉटी'न्)—a beheading-machine; a machine for cutting paper; a surgical instrument; (Parl.) closure. शिरच्छेद करण्याचें यंत्र; कागद कापण्याचें यंत्र, गिलोटीन;

शस्त्रवैद्यकाचें छेद करण्याचें शस्त्र; ( पार्लमेंटमध्यें ) एखादा कायदा पास करतांना विरोधकांवर नियंत्रण घालण्यासाठीं मतें देण्यावर वेळाचें घातलेलें नियंत्रण. [ F G. inventor, 1789 ]

**Guilt**, *n.* ( गिल्ट् )—the having committed an offence; culpability. गुन्हा, दोष, अपराध; दण्डार्हता, शिक्षेला पात्र असणें, सदोषता.

**Guilt'less**, *a.* ( गि'ल्ट्-लस् )—innocent; not having knowledge or possession of. निरपराधी, निर्दोष, निष्कलंक; अनभिज्ञ, कच्चा, नेणता, रहित, नसलेला. *G. of Greek*, ग्रीक भाषा येत नसलेला. *G. of moustache*, मिशा नसलेला. *G.-ly*, *adv.*, *G.-ness*, *n.*

**Guil'tў**, *a.* ( गि'ल्टि )—having committed an offence; culpable, criminal. दोषी, अपराधी; दोषदर्शक, सदोष. *-tily*, *adv.*, *-tiness*, *n.*

**Guin'ea**, *n.* ( गि'नि )-part of W. coast of Africa; a coin of 21 s. आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यावरील 'गिनी' प्रांत; २१ शिलिंगाचें नाणें.

**Guise**, *n.* ( गाइझ् )—external ( esp. assumed ) appearance; pretence. बाह्य स्वरूप; वेष, ढोंग, मिष. *Under, in, the g. of*, च्या वेषांत,-वेषानें

**Guitär'**, *n.* ( गिटा'र् )—a six-stringed lute played with the hand. ततुवाद्य, सतार, सारंगी, वीणा. *v. i.* गिटार वाजविणें. *-ist*, *n.* गिटारवादक,-वाजविणारा, सारंगीवाला.

**Gŭlch**, *n.* ( गल्च् )—a ravine, esp. one with gold deposit. ( भूमिगत सोनें असलेली ) दरी, खोरें.

**Gūles**, *a. & n.* ( ग्यूल्झ् )—( Herald. ) red. तांबडा-( रंग ).

**Gŭlf**, *n.* ( गल्फ् )—a piece of sea like a bay; a deep hollow, chasm; an impassable dividing line, a wide interval; ( *poet.* ) profound depth, the sea; a whirlpool. आखात; मोठा चर, खळगा; महदन्तर; अगाध, खोली, समुद्र; भोंवरा, आखात.

**Gŭll**, *n. & v. t.* ( गल् )—dupe, fool. फसवणें, मूर्ख बनवणें.

**Gŭll**, *n.* ( गल् )—a web-footed sea-fowl. दर्यातील एक जातीचा पक्षी.

**Gŭll'ible**, *a.* ( ग'लि-बल् )—easily imposed on, easily gulled or cheated. सहज फसविला जाणारा, सहज फसणारा.*-bility*, *n.*; *Gull'ish*, *a.*

**Gŭll'ĕt**, *n.* ( ग'लिट् )—food-passage from mouth to stomach; throat; a channel for water, a strait, a defile. अन्नाची नळी, अन्नमार्ग; घसा, गळा; पाण्याचा पाट, सामुद्रधुनी, खिंड.

**Gŭll'ў**, *n.* ( ग'लि )—a water-worn ravine; a gutter, a drain; 2, a large knife. घळ, ओहोळ; गटार, नाला; मोठा सुरा. *v. t.* पन्हळ पाडणें. *G. hole*, गटाराचें तोंड. *G.-drain*, गटाराचा पाट ( मुख्य गटाराला मिळणारा ).

**Gūlŏs'itў**, *n.* ( ग्यूलॉ'सिटि )—excessive appetite. खावखाव, पोटांतला राक्षस.

**Gŭlp**, *v. t. & i.* ( गल्प् )—to swallow ( down ) hastily or with effort; to gasp, to choke. गटागट खाणें, गट्ट करणें; गुदमरणें. *n.* घोटासरसें पिणें, घोट, घास.

**Gŭm**, *n.* ( गम् )—firm flesh in which the teeth stand. दातांची हिरडी. *G. boil*, हिरडीचा फोड.

**Gŭm**, *n.* ( गम् )—viscid secretion of some trees and shrubs that hardens in drying but is soluble in water, used as glue; a *gum-tree*, kinds of eucalyptus; ( *pl.* ) kinds of sweetmeat; ( *pl., sl.* ) rubber boots; morbid secretion of gum as disease of fruit-trees; secretion in eye. ( झाडाचा ) चीक, डिंक, गोंद; गोंदाचें झाड; खाऊच्या गोळ्या, वड्या; रबराचे बूट,-जोडे; फळझाडांचा एक रोग; डोळ्यांतील चिपडा, शेण्या. *v. t. & i.* to apply g. to; to fasten with g.; to exude g. गोंद लावणें; गोंद लावून चिकटविणें; डिंक-चीक-बाहेर टाकणें. *Up a g. tree*, in a fix. घोटाळ्यांत पडलेला, गोंधळलेला, भांबावलेला. *G. Arabic*, मस्ताई-आरबी-गोंद. *G. dragon*, tragacanth. एक प्रकारचा औषधी डिंक.

**Gŭm**, *n.* ( गम् )—( vulg. ) God. देव.

**Gŭmm'ў**, *a.* ( ग'मि )—sticky; exuding gum; swollen. चिकट; गोंद-चीक-बाहेर टाकणारा; सुजलेला.

**Gŭmp'tion**, *n.* ( ग'म्प्-शन् )—practical sense, enterprising spirit, go; ( Painting ) vehicle for colour. बुद्धि, अक्कल, धैर्य, हिय्या; रंग-साधन.

**Gŭn**, *n.* ( गन् )—firearms; member of shooting party. ( छऱ्यांची, काडतुसी ) बंदूक, तोफ; शिकारी टोळींपैकीं एक. *Sure as a g.*, certainly. खात्रीनें, निःसंशय. *To stand, stick, to one's guns*, आपली जागा-मुद्दा-धरून राहणें. *Son of a g.*, क्षुद्र, हलकट, पाजी. *Great g.*, थोर शक्ति,-माणूस. *To blow great gg.*, तुफानी-वादळी-वारा सुटणें. *G. boat*, a small warship with heavy guns. तोफी युद्धनौका. *G.-cotton*, an explosive prepared by saturating cotton with nitric and sulphuric acids. नत्रिक व गंधक आम्लामध्यें भिजवून तयार केलेला विस्फोटक तूल,-कापूस. *G. fire*, firing of morning or evening g. to show time. सकाळ-संध्याकाळच्या वेळीं वेळ दर्शविण्यासाठीं सोडलेली तोफ. *G. -man*, an armed civilian; ( U. S. ) an armed robber. शस्त्रधारी-बंदूकवाला-निनलष्करी नागरिक,-लुटारू. *G.-metal*,

तोफा ओतण्याचें कासें (धातु.) *G.-runner, -running*, परतंत्र देशांत चोरून-बेकायदेशीर-शस्त्रास्त्रें, बंदुका वगैरे आणणारा,-आणणें. *G.-shot*, range of a gun. गोळीचा टप्पा. *G.-smith*, बंदुका ओतणारा-तयार करणारा-लोहार *G.-stock*, (ज्याच्यावर बंदुकीची नळी बसविलेली असते तो) लांकडाचा दस्ता, कुंदा.-*gunned, gun'less, aa.*

**Gunn'el,** *n.* (ग'नल्)—a small sea-fish. समुद्रांतील एक लहान मासा.

**Gunnel,** *n* See Gunwale.

**Gŭnn'er,** *n.* (ग'नर्)—game-shooter; officer or man of artillery; (Naut.) warrant officer in charge of battery. शिकारी, पारधी; तोफखान्यावरील अधिकारी, गोलंदाज; जहाजावरील गोलंदाज खलाशी-अंमलदार. *G.'s daughter*, खलाशांना फटक्यांची शिक्षा देण्यासाठीं ज्या तोफेला बांधतात ती तोफ. *To kiss, marry, g.'s daughter*, फटक्यांची शिक्षा खाणें.

**Gunn'era,** *n.* (ग'नेरा)—the prickly rhubarb. मोठ्या शोभिवंत पानांचें कांटेरी झाड.

**Gŭn'powder,** *n.* (ग'न्-पॉवडर्)—explosive of saltpetre, sulphur and charcoal; fine green tea. बंदुकीची दारू, अग्निचूर्ण; स्वाळ चहाची पूड. *White g.*, आधुनिक स्फोटक द्रव्य.

**Gŭnn'erў,** *n.* (ग'नरि)—management of large guns. गोलंदाजी, तोफा करण्याची व उडवण्याची कला, तोफा उडविणें.

**Gŭnn'ing,** *n.* (ग'निंग्)—(*to go g.*,) shooting (of game). गोळी घालून शिकार मारणें.

**Gŭnn'y,** *n.* (ग'नि)—coarse sacking, sack, of jute fibre. गोणपाट, गोणी [Hind.]

**Gŭn'ter,** *n.* (ग'न्टर्)—(*G.'s scale*), flat 2-ft rule with scales etc. for solving mechanically problems in navigation etc. (नाविक व जमीन मोजणीचें गणित याच्या उपयोगाची) दोन फूट लांबीची गन्टरची गणित-पट्टी.

**Gŭn'wale, Gunn'el,** *n.* (ग'नल्)—upper edge of ship's side. वहाण,-णी, बाणी.

**Grugitā'tion,** *n.* (गर्जिटे'शन्)—surging, bubbling motion or sound. उसळणें, लाटा येणें, बुडबुडे, त्यांचा आवाज.

**Gur'gle,** *v. i. & t. & n.* (ग'र्गल्)—(make) bubbling sound. गुडगुड आवाज करणें.

**Gŭsh,** *n.* (गश्)—a sudden or copious stream; effusiveness. जोराचा प्रवाह; उमाळा, उफाळा. *v. i. & t.* to flow with a gush; to speak or behave with a gush. भडभड-जोरानें-बाहेर पडणें; भडाभड बोलणें, भडाभड व्यक्त करणें.-*er, n*; -*ingly, adv.*; -*y, a.*

**Gŭss'ĕt,** *n.* (ग'सिट्)—a triangle let into garment to strengthen or enlarge; strengthening iron bracket. कळी, बगल, चिडी; (मजबुतीसाठीं) लोखंडी आधार, कंस.

**Gŭst,** *n.* (गस्ट्)—a sudden violent rush of wind; burst (of rain, smoke, anger, &c.). झपाट्याचा किंवा सोसाट्याचा वारा; पाऊस वगैरेचा सोसाटा, झपाटा, सपाटा, झटका.-*y, a.,-ily, adv.*

**Gŭst,** *n.* (गस्ट्)—sense of taste, keen relish, flavour. जीभ, रुचि, चव.-*ation, n.*; -*atory, a.* चवदार, रुचकर.

**Gŭs'tō,** *n.* (ग'स्टो)—special flavour; zest, enjoyment. विशेष रुचि, चव; उत्साह; उपभोग.

**Gŭt,** *n.* (गट्)—a narrow passage of water; (*pl.*) bowels or entrails; intestine; belly as seat of appetite; material for violin strings (made from intestines of animals); material for fishing-lines (made from intestines of silkworm). प्रणाली, पाण्याचा अरुंद प्रवाह; आंतडें, आंतडीं; उदर, जठर, पोट; (प्राण्याच्या आंतड्यांची) तांत; रेशमी किड्याच्या कोथळ्यापासून काढलेलें दोऱ्या तयार करण्याचें साधन. *v. t.* to remove guts of; to remove, destroy, internal fittings of (house); to extract essence of book; eat greedily. (च्यीं) आंतडीं काढणें.-उपसणें; लुटणें, रिकामा करणें, खलास-साफ-करणें; (च्यें) सार-तात्पर्य-काढणें; अधाशीपणानें खाणें. *Has no guts in it*, is of no real value, or force. त्याचा काडीचाही उपयोग नाहीं, त्याच्यांत राम-जोर-नाहीं.

**Gŭtta-perch'a,** *n.* (गटा-प'र्चा)—horny flexible substance of juice of some Malayan trees. गटा-पर्चा रबर.

**Gŭtt'er** *n.* (ग'टर्)—a shallow trough below eaves, a channel in a street carrying off water; a channel, or groove. पन्हळ, गटार, मोरी, नाला; कारण, खोबण, खांच. *v. t. & i.* to furrow, (of candle) to melt away. गटार-मोरी-काढणें,-बनविणें; (मेणबत्ती) जळून वितळणें. *G. child, G. snipe*, a street arab. भटकें उनाड पोर. *G. man*, रस्त्यांतून हलक्या व स्वस्त वस्तु विकणारा.

**Gŭtt'ural,** *a.* (ग टरल्)—of, produced in, throat. कंठ्य, कंठस्थ, कंठवर्गीय, कवर्गाचा. *n.* कंठस्वर, कवर्गीय अक्षर. -*ize, v. t.* कंठांतून आवाज काढणें. -*ism, n.,—lly, adv.*

**Gŭtt'y,** *n.* (ग'टि)—(Golf) gutta-percha ball. गटापर्चा रबराचा चेंडू.

**Guy,** *n.* (गाय्)—a rope, chain, to steady crain-load or secure a tent. वारीच्या ओझ्याला

समतोल ठेवणारी. तंबुला घट्ट बसविणारी सांखळी,-दोरी. *v. t.* सांखळीनें-दोऱ्यांनीं-घट्ट करणें.

**Guy,** *n.* (गाय्)—an effigy of Guy Fawkes burnt on 5th Nov.; a fright; a fellow, a boy; act of decamping. गाय् फॉक्सचा पुतळा; भयंकर-विद्रूप-पोषाख केलेला इसम; इसम, मुलगा; हातावर तुरी देणें, सूंबाल्या करणें. *v. t.* to ridicule. थट्टा करणें, टर उडविणें. *To give the g. to,* escape from. च्या हातावर तुरी देणें. *To do a g.*, नाहींसें होणें.

**Gŭz'zle,** *v. i. & t.* (ग'झल्)—to drink, eat, greedily. आधाशीपणानें पिणें, खाणें.

**Gy̆m,** *n.* (जिम्)—(sl) gymnasium. तालीमखाना, व्यायामशाळा.

**Gy̆mkhä'nä,** *n.* (जिम-का'ना)—a place for display of athletic sports. व्यायामशाळा; व्यायामाचे खेळ.

**Gy̆mnā'sĭŭm,** *n.* (जिम्-ने'-झि-अम्)—a room or place fitted up for gymnastics; German school of highest grade preparing for universities. तालीमखाना, व्यायामशाळा ; उच्च दुय्यम शाळा.

**Gy̆m'năst,** *n.* (जिं'म्-नॅस्ट्)—an expert in gymnastics. पहिलवान, मल्ल, तालामबाज.

**Gy̆mnăs'tĭc,** *a.* (जिम्नॅ'स्टिक)—of gymnastics. व्यायामविषयक. *n.* course or mode of bodily or mental discipline ; (*pl.*) muscular exercises (esp. as done in gymnasium). व्यायामाचा कार्यक्रम,-ची पद्धति, (बौद्धिक) तालीम ; (अने०) व्यायाम, मल्लविद्या.

**Gy̆naecŏl'ogy̆,** *n.* (जायनिकॉ'लाज, गा-)—science of women's diseases. स्त्रीरोगविज्ञान,-चिकित्सा.

**Gy̆p'sum,** *n.* (जि'प्सम्)—mineral from which plaster of Paris is made. कुलनार, कर्पूरशिलाजित (धातु).

**Gy̆p'sy̆,** *n.* (जि'प्सि)—gipsy ; a deceitful woman. एका भटकणाऱ्या जातींतील मनुष्य ; काळीकुट्ट स्त्री ; कावेबाज स्त्री.

**Gy̆rāte',** *v. i.* (जायरे'ट्)—to move in circle or spiral. वाटोळें-वर्तुलाकार-फिरणें. *-tion, n.*; *-tory, a.*

**Gy̆r'ō,** *n.* (जा'यरो)—Gyroscope. भ्रमणदर्शक. *Gyrose', a.* (Bot.) चुणलेलें व सुरकुत्या पडलेलें.

**Gy̆ve,** *n.* (*usu. pl.*) *& v. t.* (जाइव्ह्)—fetter, shackle ; to chain. शृंखला, बंधन ; बंधन घालणें.

## H

**H,** (एच्)-eighth letter of the English alphabet. इंग्रजी वर्णमालेंतील आठवा वर्ण.

**Ha,** *int.* (हा)—an interjection expressing joy, surprise, grief. हा ! हाहा !

**Hā'beăs cor'pŭs,** *n.* (हे'बिॲस्-कॉ'र्पस्)—a writ requiring a person to be brought before a judge. कैद्याला न्यायासनासमोर प्रत्यक्ष हजर करण्याची लेखी आज्ञा.

**Hăb'erdăsher,** *n.* (हॅ'बरडॅशर्)—a dealer in small articles of dress etc. फीत, दोरा, गुंड्या वगैरे विकणारा फेरीवाला. *-y, n.* किरकोळ जिन्नस.

**Hăb'ergeon,** *n.* (हॅ'बरजन्)—sleeveless coat of mail. बिनबाह्यांचें चिलखत.

**Hăbĭl'ĭment,** *n.* (*pl.*) (हॅबि'लिमन्ट्)—dress, clothes. पोषाख, कपडे, पेहेराव.

**Hăb'ĭt,** *n.* (हॅ'बिट्)—settled tendency or practice ; constitution (of body or mind) ; (Bot, Zool.) mode of growth ; dress. संवय, सराव, खोड, चटक ; भावना, तब्यत ; वाढण्याची रीत, -तऱ्हा; पोषाख, कपडे. *v. t.* to clothe. कपडे घालणें.

**Hăb'ĭtable,** *a.* (हॅ'बिटे-बल्)—that can be inhabited by human beings. राहाण्याला योग्य, वस्तीला योग्य, वासाई *-bil'ity, n.* वासाईता.

**Hăb'ĭtant,** *n.* (हॅ'बिटन्ट्)—an inhabitant. रहिवासी ; (ॲबीटॉ') (a descendant of) French settler in Canada. कॅनडांतील फ्रेंच वसाहतवाला, -त्याचा वंशज.

**Hăb'ĭtăt,** *n.* (हॅ'बिटॅट्)—the natural home of a plant or animal. मूलस्थान, उत्पत्तिस्थान; जन्मस्थान.

**Hăbĭtā'tion,** *n.* (हॅबि-टे'शन्)—inhabiting ; a place of abode, dwelling, residence. राहाणें; वसतिस्थान, वसति, ठिकाण, गृह.

**Hăbĭt'ūal,** *a.* (हॅबि'टयुअल्)—customary ; given to some habit. नेहमींचा ; संवयीचा, संवयींतला, चालीचा. *-ally, adv.* ; *-alness, n.*

**Hăbĭt'ūate,** *v. t.* (हॅबि'टयुएट्)—to accustom, to make familiar by frequent use. संवय लावणें, अभ्यास असणें. *-tion, n.*

**Hăb'ĭtūde,** *n.* (हॅ'बिटयूड्)—a customary mode of action ; habit of body or of action ; tendency. संवय, सराव ; परिचय, ढब, रीत ; कल.

**Habit'ue,** *n.* (हॅबि'टयूए)—a habitual visitor or resident. नेहमींचा पाहुणा,- रहिवासी. [F]

**Hachures,** *n. pl.* (हॅश्युअर्स्)—lines used in hill-shading to indicate the slope. टेंकडीची उतरण दर्शविणाऱ्या (नकाशांतील) रेषा. [F]

**Hăck,** *n.* (हॅक्)—a hired horse ; a horse for ordinary riding ; a common drudge. भाड्याचा घोडा; बसण्याकरितां घेतलेला घोडा ; घोडकें, तट्टू; भाडोत्री (लेखक इ.), भाड्याचा चाकर. *a.* hired,

भाडोत्री. *v. t. & i* नित्याचा,- सामान्य,- करणें; घोड्यावर बसणें; भाडोत्री घोडें करणें. [ *abbr.* of Hackney ]

**Hăck**, *n.* ( हॅक् )—a mattock; a pick; a gash, a wound; a kick on the shins ( in Foot-ball); a frame for drying bricks. खांच पाडण्याचें हत्यार; मोटें पिकांव; घांव, जखम; पायाच्या नळीवर मारलेली लाथ; ( विटा वगैरे ) सुकत घालण्याची जाळी, जाळीची चौकट. *v. t. & i.* to cut, to mangle; to kick shin of; to cough in a short broken manner. तोडणें, खापलणें, तोतरें बोलणें; पायाच्या नळीवर लाथ मारणें; ओढत ओढत,- दृचत दृचत,- खोकणें, हांसडा लागणें, ख्याक् ख्याक् खोकणें.

**Hăck'erў**, *n.* ( हॅकरि )—an Indian bullock-cart, a horse-carriage. बैलगाडी, खटारा, घोड्याची गाडी.

**Hăc'kle**, *n.* ( हॅक्ल् )—a steel flax-comb; long feathers on the neck of a domestic cock etc.; a fishing-fly dressed with hackle. ( ताग, कच्चें रेशीम वगैरे विंचरण्याची ) फणी, पिंजणी; कोंबड्याच्या मानेवरील पिसें. शेंडी; ( मासे पकडण्यासाठीं ) पिसांची केलेली कृत्रिम माशी. *v. t.* to dress ( flax etc. or fly ) with hackle. विंचरून साफ करणें; ( माशीला ) पिसें लावणें. 2. to hack. खांचा पाडणें; कापणें, तोडणें. *With his hackles up*, ( of a cock, dog, man ) angry, ready to fight. क्रुद्ध रागानें लढायला फुरफुरलेला. *Hack'ly*, *a.* rough, jagged. ओबडधोबड, खडबडीत, दांताळ, दांते,-खांचा,-पाडलेला.

**Hăck'ney**, *n.* ( हॅक्नि )—a horse for ordinary riding; a drudge. बसावयाचा घोडा, तट्टू; भाडोत्री, लेखणीचे कष्ट करणारा, भाडोत्री लेखक. *v. t.* to make common or trite. प्रचारांतील करणें. *Hack'neyed*, *a.* made common or trite. नित्याचा, शिळा, उष्टा.

**Hăck'ney-coach**, *n.* ( हॅक्नि-कोच् )—a coach or vehicle kept for hire. भाड्याची गाडी. Also, *Hackney-carriage, n.*

**Had**, *pa. t. & pa. p.* of Have.

**Hăd'dock**, *n.* ( हॅडाक् )—a fish allied to cod. कॉड सारखा एक मोठा मासा.

**Hā'dēs**, *n.* ( हेडीझ् )—abode of the dead. प्रेतलोक, यमलोक. [ a name of Pluto ]

**Hădj'ĭ, Hăjj'ĭ**, *n.* ( हॅजि )—a Mohammedan pilgrim who has been to Mecca. मक्केची यात्रा केलेला मुसलमान ( यात्रेकरू ). [ Arab. ]

**Haem'al**, *a.* ( हीमल् )—of the blood; situated on same side of body as the heart and blood-vessels. रक्ताचा, रक्तासंबंधीं; शरीरांत रक्ताशय व हृदय यांच्या बाजूस असलेला. [ Gk. *haima*, blood ]

**Haemăt'ic**, *a.* ( हीमॅटिक् )—of or containing blood. रक्ताचा, रक्त असलेला. *n.* रक्तावर परिणाम करणारें-रक्तवर्धक-औषध.

**Haem'atīte, Hĕm'-**, *n.* ( हीमटाइट्, हे'- )—a red or brown iron ore. तांबूस किंवा पिंगट अशुद्ध लोखंड.

**Haemoglō'bĭn**, *n.* ( हीमग्लो'बिन् )—the colouring matter of red corpuscles of blood. ( रक्तामध्यें असणारें ) रक्तरंजक द्रव्य.

**Haemorrhage, Hem-**, *n.* ( हे'मोरिज् )—the escape of blood from blood-vessels. रक्तस्राव.

**Haemorrhoids, Hem-**, *n. pl.* ( हे'मोराइड्स् )—piles. अर्श, मूळव्याध.

**Hăf'nĭum**, *n.* ( हॅफ्निअम् )—a rare metal discovered in 1923. एक दुर्मीळ धातु.

**Hăft**, *n.* ( हाफ़्ट् )—handle of knife &c. सुरी वगैरेची मूठ. *v. t.* सुरीला मूठ घालणें,-बसविणें.

**Hăg**, *n* ( हॅग् )—an ugly old woman. कुरूप वृद्ध स्त्री, हिडिंबा, जखीण. *H.-ridden*, *a.* afflicted by a nightmare. जाखिणीनें पछाडलेला, झोपेंत भिणारा,- दचकणारा.

**Hăg**, *n.* ( हॅग् )—a quagmire. दलदल, पाणथळ.

**Hăgg'ard**, *a.* ( हॅगर्ड् )—wild-looking; ( of hawk) untamed. निस्तेज, खप्पड; जंगली,- रानटी ( ससाणा ). *n.* रानटी ससाणा. *-ness, n.*

**Hăgg'ĭs**, *n.* ( हॅगिस् )—heart, lungs and liver of sheep boiled in maw. मेंढराचें काळीज.

**Hăg'gle**, *v. i. & n.* ( हॅगल् )—dispute (esp. *about, over*, price or terms ). खिटखिट, घासाघीस ( घालणें किंवा करणें ).

**Hagio-**, *pref.* ( हॅगिओ- )—*in comb*, saint, -ly. संत, संतांचें ( या अर्थी ). *Ha'giarchy*, ( हॅगिआर्कि ) the rule, order, of saints. संन्यासिसत्ताक-राज्य. *Hagioc'racy*, *n.* उपाध्यायसत्ताक राज्य-पद्धति, संतांचें राज्य. *Hagiog'rapha*, *n. pl.* Hebrew Scriptures not included under Law and Prophets. यहुदी धर्मशास्त्रें, संतचरित्रें. *Hagiol'ogy*, *n.* संतचरित्रमाला.

**Ha'-ha**, *n.* ( हा'हा )—sunk fence bounding garden etc. जमिनींत खोल पुरलेलें कुंपण. 2. Ha ha! int. showing laughter. हा हा! ( हास्यदर्शक ).

**Hail**, *n* ( हेल् )—frozen vapour falling down in pellets ( *hail-stones* ); a shower of missiles, curses etc. गार, गारा, करका; वर्षाव. *v. i. & t.* to pour down hail; ( *fig.* ) to pour down, to come down like hail; to salute; to greet as; to call to; to be come *from*.

गारांचा पाऊस पडणें; गारांसारखें खालीं पडणें; वर्षाव होणें,-करणें; नमस्कार करणें; स्वागत करणें; हटकणें, हांक मारणें; अमुक एक ठिकाणाहून येणें, -सुटणें, ठिकाणचा असणें. *int.* an expression of greeting. स्वस्ति! कल्याण असो! सुस्वागतम्! नमस्कार! *n.* a salutation. नमस्कार, रामराम, सलामी. *H. storm*, गारांचें वादळ. *It hails*, गारा पडतात. *H. fellow, h. fellow well met*, intimate, too intimate *with*. दोस्त, मित्र, दाट मैत्री असलेला. *Within h.*, नमस्कार करण्याइतका-हांक मारण्याइतका-जवळ. *Hail'y, a.*

**Hair**, *n.* (हेअर्)—any or all of the fine filaments growing from the skin; (of plants) an outgrowth of the epidermis, consisting of one or several elongated cells; a hair-like thing; a jot. केश, केंस, लोंकर, लोम, बाल; केस, लव, लोम; केंसासारखी बारीक वस्तु; लेश, कण. *Against the h.*, against the grain. स्वभावाविरुद्ध, प्रतिलोम रीतीनें. *To a h.*, exactly. तंतोतंत. *To keep one's h. on*, keep cool. शांत राहणें. *Not turn a h.*, न थकतां, शांत रीतीनें *H. stands on end*, भीतीनें रोमांच उभा राहतो. *H. breadth*, minute distance. केंसभर अंतर. *H. breadth escape*, very narrow. जेमतेम-कसेंतरी ऐन वेळीं निभावणें, धोक्यांत वांचणें. *H. brush*, केशमार्जनी. *H. dresser*, केंस कापणारा न्हावी, केशरचनाकार न्हावी. *H. net,-oil,-pin*, केंसांसाठीं जाळी,-तेल,-आंकडा. *H. splitting, a. & n.* over-subtle (ty). (रिकामा) काथ्याकूट (करणें.) *Hair'y, a.* केशमय, लोममय, केंसांचा, खरखरीत. *H.-like, a.; Hairiness, n. -haired, h.-less, aa.*

**Häke**, *n.* (हेक्)—a fish like the cod. कॉडसारखा मासा. 2 a wooden frame-work. लांकडी चौकट; also, *Haik.*

**Häl'berd**, *n.* (हॅल्बर्ड्)—(*hist.*) combined spear and battle-axe. भाला आणि परशु एकांतच असलेलें शस्त्र, भाले-कुऱ्हाड.-*ier'*, *n.* भाला-परशुधारी मनुष्य. Also, Hal'bert.

**Häl'cÿon**, *a.* (हॅल्-सिऑन्)—a bird fabled to calm the sea; the king-fisher. एक जातीचा पक्षी. *a.* peaceful, quiet. शांत, निर्वात. *H. days*, शांततेचा काळ,-चे दिवस.

**Häle**, *a.* (हेल्)—robust, vigorous. धट्टाकट्टा, बळकट, जोमदार.-*ness, n. 2. v. t.* to drag, draw, forcibly. जोरानें-जोमानें-ओढणें.

**Hälf**, *n.* (हाफ्)—(*pl. halves*), either of two (esp. equal) parts into which a thing is divided; (colloq.) h.-pint,-mile,-back, -holiday; a school-term. *अर्धा भाग, अर्धांश,* निम्मे, अर्धेल; अर्धे पाइंट माप,-मैल इ.; शाळेची सहामाही. *a.* amounting to half. अर्ध, अर्धा, निम्मा, निम्माशिम्मा. *adv.* in part, equally. हिश्शानें, सारखा सारखा, निम्म्यानें. *Better h.*, wife. अर्धांगी, पत्नी. *To do a thing by hh.*, imperfectly. अपुरें काम करणें. *To go hh.* (*with* a person *in* a thing), सारखा-निम्माहिस्सा-भाग-मिळणें. *To cry hh.*, बरोबरीनें भागहिस्सा-मिळण्याची मागणी करणें. *Is h. the battle*, कार्यसिद्धीकडे बरीच आघाडी मारली आहे, निम्मेअधीक काम झालें आहे. *H. as much again, H. as many again*, दीडपट. *H. back*, (Football) (फुटबॉलच्या खेळांत) आघाडीच्या खेळाडूंच्या लगत मागचा खेळाडू, -त्याची जागा. *H.—baked*, (fig.) half-witted, incomplete. अर्धवट, कच्चें मडकें असलेला, अपुरा. *H. blood, H. breed*, सापत्न,-भिन्नपैतृक-संबंध, *H.blooded*, वर्णसंकरजन्य, भ्रष्ट, पतित. *H. brother,-sister*, सावत्र भाऊ,-बहीण. *H. caste* युरोपिअन व हिंदु किंवा मुसलमान अशा आईबापांचें मूल, वर्णसंकरजन्य मूल. *H. crown*, २½ शिलिंगाचें नाणें. *H. mast high*, दुःख-शोक-दर्शक ढोलकाठीच्या थोडें खालीं उतरलेलें (निशाण). *H. volley*, (क्रिकेटमध्यें) पुन्हां उशी घेतल्यावर सहज मारतां येण्याजोगा टाकलेला चेंडू.

**Hälf-heart'ed**, *a.* (हाफ्-हा'र्टेड्)—far from enthusiastic, lacking courage or zeal. उत्साहरहित, धैर्यरहित.

**Halfpenny**, *n.* (हे'पनि)—a bronze coin worth half of a penny. *ब्रांझ धातूचें अर्धपेनी नाणें.* *To turn up again like a bad h.*, चिकाटीनें न चुकतां करणें. *H. worth*, (हेपंथ्, हॅपॉर्थ्) दीड दमडीचें, अर्धपेनी किंमतीचें.

**Häl'ibut, Höl'-**, *n.* (हॅलिबट्, हॉ'-)—a large flat fish used for food. एक मोठा चपटा मासा.

**Halieut'ic**, *a. & n.* (हॅल्यू'टिक्)—(*n. pl.*, art) of fishing. मासे मारण्याची कला.

**Hall**, *n.* (हॉल्)—a large room for public business, a large public room; entrance-passage of a house; residence of a landed proprietor; building of a guild; college dining-room. दिवाणखाना, सार्वजनिक सभागृह; घराच्या प्रवेशद्वाराजवळची खोली; जमीनदाराचें राहण्याचें घर; व्यापारीसंघाची इमारत, अड्डा; कॉलेजमधील जेवणाचा दिवाणखाना. *H. mark, n.* कसाचाप्रतीचा-शिक्का, (*fig.*) शिक्कामोर्तब, छाप, पसंती; *v. t.* छाप मारणें.

**Hallelujah**, *n.* (हॅलेलू'या)—song of praise. ईश्वराची स्तुति करा अशा अर्थाचें गायन, 'हालेलूया'.

**Häll'iard**, *n.* (हॅ'लिअर्ड्)—tackle for raising and lowering sail etc. *शिडें वर-खालीं करण्याची* दोरी,-दोरखंडें, कांड.

**Hallo', Hallca',** *int.* ( हॅलो' )—calling attention or expressing surprise. ए! हो! ( हांक मारण्या-करण्याकरितां, आश्चर्यदर्शक ). *n. & v. i.* ए! हो! ( हांक मारणें, उद्गार काढणें ).

**Halloo'** *v. i. & t.* ( हॅलू' )—to cry 'halloo' esp. to dogs; to urge on (dogs) with shouts; to shout to attract attention. (कुत्र्यांना) हांक मारणें; हांकाटी करून (कुत्र्यांना) उत्तेजन देणें, पिटाळणें; लक्ष वेधण्याकरितां मोठ्यानें हांक मारणें. *Do not h. until you are out of the wood,* (Prov.) संकटांतून पुरी सुटका होण्यापूर्वीच सुरक्षित आहों असें समजूं नका.

**Hăll'ow,** *v. t. & i.* ( हॅ'लो )—to chase with shouts; to incite with shouts; to shout to incite dogs etc. आरोळ्या मारून पाठलाग करणें; आरोळ्या मारून उत्तेजन देणें; कुत्र्यांना चेतविणें.

**Hăll'ow,** *v. t.* ( हॅ'लो )—to make or honour as holy, to consecrate, to sanctify. पवित्र करणें, पवित्र मानणें. *n.* a saint साधु, सत्पुरुष.—*mas,* All Saints Day. नोव्हेंबरचा पहिला दिवस.

**Hăllucĭnā'tion,** *n.* ( हॅलू-सि-ने'शन् )—an illusion; the apparent perception of an object not present; a mistake. भूल, मोह, भ्रम; अदृश्य वस्तूचा भास, दृग्भ्रम, इंद्रजाल; चुकीची समजूत. —*tory, a.*

**Hā'lō,** *n.* ( हे'लो )—a circle (round the sun, the moon, &c.); disk of light round head of saint; (fig.) ideal glory. सूर्याच्या किंवा चंद्राच्या भोंवतालचें वलय, कडें, खळें, परिवेष; तेजोवलय; श्रेष्ठ तेज. *v. t.* भोंवतीं वेष्टण करणें.

**Halt,** *n.* ( हॉल्ट् )—temporary stoppage on march or journey. मुक्काम, तळ, डेरा, विराम. *v. t. & i.* to come or bring to a stand. थांबणें, थांबविणें, तळ देणें, मुक्काम करावयास-थांबावयास-लावणें.

**Halt,** *a.* ( हॉल्ट् )—lame; crippled. लंगडा; पंगू-दुबळा-झालेला. *v. i.* to walk hesitatingly; to hesitate; to limp; (of argument, verse etc.) be defective. चोंटाळल्यासारखें चालणें; संशयांत पडणें, विचारांत पडणें; लंगडणें; सदोष असणें. तालांत-तालशुद्ध-नसणें.—*ingly, adv.* अडखळत, लंगडत-लंगडत.

**Hal'ter,** *n.* ( हॉ'ल्टर् )—a rope or strap with a noose for horses or cattle; a rope for hanging a person; death by hanging. (घोड्याची वगैरे) काढणी, चागदोर; फांशीं देण्याची दोरी, गळफास; फांसावर चढणें,-मरण. *v. t.* to fasten (*up*) with a halter; to hang (a person) with a halter. काढणीनें बांधणें, काढणी गळ्यांत घालणें; फांशीं देणें. *To h.-break, v. t.* (घोड्याला) काढणीची-चागदोराची-संवय लावणें.

**Hălve,** *v. t.* ( हाव्ह् )—to divide into halves; to reduce to a half; to share equally; to fit (crossing timbers) together by cutting out half thickness of each at the joining place. दोन अगदीं सारखे भाग करणें; निम्मे करणें; सारखा सारखा वांटा घेणें; प्रत्येकाच्या जाडीचा जोडण्याच्या जागीं अर्धा अर्धा भाग कापून दोन लांकडें जोडणें, त्यांचा सांधा जमविणें. *By halves* (*n. pl.*), अंशतः, अर्धवट. (Golf) *To halve a hole with,* (दुसऱ्या-प्रतिस्पर्धी) खेळाडूच्या इतक्याच टोल्यांत चेंडू भोंकांत-घरांत-घालणें,-एक डाव करणें.

**Hălyard,** *n.* ( हॅल्यर्ड् )—See Halliard.

**Hăm,** *n.* ( हॅम् )—the back of thigh, thigh and buttock; thigh of hog salted and smoked. मांडीचा मागचा भाग, मांडी व ढुंगण; खारवून वाळविलेली डुकराची मांडी,-लवण.

**Hăm,** *n.* ( हॅम् )—(hist.) a town, a village. नगर, खेडेगांव.

**Hămădry̆'ăd,** *n.* ( हॅमॅड्रा'यॅड् )—(Gk Myth.) a wood nymph; a venomous Indian serpent; a baboon. (ग्रीक) वनदेवता; विषारी साप; मोठा वानर.

**Hames,** *n. pl.* ( हेम्ज् )—two curved pieces of wood or metal in the harness of a draught horse. (गाडीच्या घोड्याच्या गळेबंदाला असलेल्या) कड्या, पट्टेकड्या.

**Hăm'let,** *n.* ( हॅ'म्-लिट् )—a small village. लहान खेडें, वाडी.

**Hămm'er,** *n.* ( हॅ'मर् )—an instrument for driving nails &c. हातोडा, हातोडी. *v. t. & i.* to strike or drive with or as with a hammer; (colloq.) to inflict heavy defeats in war or games; (St. Exch.) to declare defaulter. हातोड्यानें ठोकणें,-ठोकून आकृति देणें; सपाटून पराभव करणें,-मार देणें; (हातोड्याचे तीन ठोके मारून एकाद्याला) नादार-दिवाळखोर-ठरविणें. *To come under the h.,* to be sold by auction, (चें) लिलांव करणें, लिलांवानें विकणें. *Knight of the h.,* a black-smith. लोहार. *H. & tongs,* with might and main. मोठ्या चळानें, सर्व शक्ति एकवटून. *H. cloth,* cloth covering a coach-box. गाडी हांकणाऱ्याच्या बैठकीच्या पेटीवरील कपडा. *H.-head,* हातोड्याचें डोकें; एक प्रकारचा शार्क मासा, आफ्रिकेंतील पक्षी. *H.-man,-smith,* घणकरी, घणानें-हातोड्यानें-काम करणारा *To h. out,* devise. योजणें, ठरविणें. *H.-less, a.*

**Hămm'ock,** *n.* ( हॅ'मॉक् )—a bed (of canvas, &c.) hung by cords at ends. कितानासारख्या

जाड कापडाचा ) खलाशाचा झोळीसारखा बिछाना, झुला.

**Hăm'per**, *v. t.* ( हॅम्पर् )—to obstruct movement of; ( fig. ) to impede, to hinder. मार्गगति खुंटवणें, अटकावणें, अडथळा करणें, घोटाळा करणें, विरोध करणें. *n.* ( naut. ) necessary but cumbrous part of equipment of a vessel. 2. basket-work packing-case; hamper of food. गलबतावरील आवश्यक परंतु अडगळ करणाऱ्या वस्तु; टोपली, पेटारा, हारा; अन्नाचा हारा.

**Hăm'shăckle**, *v. t.* ( हॅम्-शॅकल् )—to shackle ( horse etc. ) with a rope connecting head and foreleg. ( घोड्याचा ) पुढचा पाय व डोकें दोरानें बांधणें.

**Hăm'ster**, *n.* ( हॅम्स्टर् )—a rodent like a large rat. मोठ्या घुशीसारखा कुरतडणारा प्राणी.

**Hăm'string**, *n.* ( हॅम्स्ट्रिंग )—the string or tendon of the thigh. ( गुडघ्याच्या मागची ) घोंडशीर, कुच्या. *v. t.* घोंडशीर तोडून लंगडा-पंगू करणें.

**Hănd**, *n.* ( हॅन्ड् )—an extremity of human arm comprising palm and fingers; a forefoot of a quadruped; a manual worker ( in a factory, &c. ); style of writing; the cards held by one person in play; index, pointer of a clock &c.; measure of horse's height, 4 inches; authority, disposal. हात, हस्त, कर, पंजा; कामकरी, मजूर; अक्षर, अक्षराचें वळण; पत्त्याचा हात, डाव; ( घड्याळाचा ) कांटा; चार इंच उंचीचें माप, चौंगा; सत्ता, अधिकार, शक्ति, हात. *v. t.* to hold out hand to, to give or transmit with the hand. हात पुढें करणें, हात देणें; हातानें उचलून देणें. *To give one's h. to*, लग्नाचें वचन देणें. *A legible h.*, सुवाच्य हस्ताक्षर, अक्षर. *As witness the h. of*, साक्षीदार म्हणून ची सही. *At h.*, close by, about to happen soon. जवळच, समीप, लवकरच घडून येण्याजोगें. *By h.*, हातीं, हातानें, अंगमेहनतीनें. *To bring up by h.*, बाहेरच्या-बाटलीच्या दुधावर ( मुलाला ) पोसणें. *For one's own h.*, on one's own account. स्वतःच, आपणहून. *( To live) from h. to mouth*, कशीबशी हातातोंडाची गांठ घालणें, जेमतेम पोट भरणें. *In h.*, हातांतलें, हातचें, स्वाधीनचें, हातीं घेतलेलें ( काम इ.). *Off- h.*, without preparation. तयारी न करतां, ऐनवेळचें, हातोहातीं. *On h.*, स्वतःच्या ताब्यांत, स्वाधीन. *On one's hh.*, स्वतःवर जबाबदारी म्हणून पडलेलें,-असलेलें. *On all hh.*, to, from, all quarters. सर्व बाजूंना, सर्वत्र, चोहींकडून. *On the one h., on the other h.*, ह्या पक्षीं, त्या पक्षीं. *Out of h.*, at once. एकदम, स्वयंस्फूर्त, आयत्या वेळचें, आटोक्याबाहेर गेलेलें, ताबा सुटलेलें. *To h.*, आटोक्यांतलें, मिळालेलें. *To one's h.*, ( श्रम न करतां ) अगदीं हातांतलें, हातचें. *To bear a h.*, to take part *in*. ( च्यांत ) भाग घेणें, हात असणें. *To come to h.*, प्राप्त होणें, मिळणें, हातीं येणें. *To do a h.'s turn*, अगदीं अत्यल्प श्रम करणें, इकडची काडी तिकडे करणें. *To lay hh. on*, स्पर्श करणें, धरणें *To take in h.*, to undertake. हातीं घेणें. *To change hh.*, ( मिळकत ) एकाच्या हातून ( ताब्यांतून ) दुसऱ्याच्या हातीं जाणें, मालकी बदलणें. *Clean hh.*, innocence. निरपराधीपणा. *With a heavy h.*, oppressively. कडक रीतीनें, करडेपणानें. *With a high h.*, boldly, arrogantly. धिटाईनें, उद्धटपणानें. *To have, to keep, one's h. in*, चा सराव-संवय-असणें. *His h. is out*, संवय-सराव-सुटला आहे. ( *To win* ) *hh. down*, easily. सहजासहजीं-लीलेनें-जिंकणें. *Hh. off*, चल ! दूर रहा ! स्पर्श करूं नको ! हात लावूं नको ! *Hh. up* ! ( शरण ये याअर्थी ) 'हात वर कर ' ( इशारा ). *H. in h*, हातांत हात घालून. *To go h. in h. with*, शीं हातांत हात घालून चालणें, अगदीं जुळून-बरोबरीनें-संगतीनें असणें. *H over h.* or *fist*, ( दोरीवर चढतांना ) हातावर हात टेकीत; दोन्हीं हात टेकीत; झपाट्यानें, भराभर. *H. to h.* ( fight ), हातघाई ( ची लढत ). *To bind* ( one ) *h. and foot*, मुसक्या बांधणें, हातपाय जाम बांधून-जखडून-टाकणें. *H. bag*, हातपिशवी. *H cart*, हातगाडी. *H. made*, हातीं बनविलेलें, ( यंत्रानें नव्हे ). *H.- maid* ( *en* ), दासी, स्त्री, नोकर, परिचारिका. *H.-rail*, जिन्यावरील हात टेकण्याचा कठडा. *H. shake*, हस्तांदोलन.*-handed, h -less, aa.*

**Hănd'bill**, *n.* ( हॅन्ड्-बिल् )—a notice or loose printed sheet circulated by hand. हस्तपत्रक, हस्तपत्रिका.

**Hănd'book**, *n.* ( हॅन्ड्-बुक् )—a short treatise, a guide-book for travellers, a manual. लहान पुस्तक.

**Hănd'cŭff**, *n.* ( हॅन्ड्-कफ् )—( *pl.* ) pair or metal rings joined by a short chain. हातबेडी, हातबिडी. *v. t.* to secure with handcuffs. हातबेडी घालणें.

**Hand'ful**, *n.* ( हॅन्ड्-फुल् )—enough to fill the hand; a small number or quantity; a troublesome person or task. मूठभर; फार थोडे; त्रासदायक मनुष्य, खिचकट काम.

**Hand'gallop**, *n.* ( हॅन्ड्गॅलप् )—an easy gallop. साधी सोपी दुडकी चाल, साधी चौकचाल.

**Hand'glass**, *n.* ( हॅन्ड्ग्लास् )—a small mirror with a handle. मुठवाला आरसा, आरशी.

**Hăn'dicăp**, *v. t.* ( हॅन्डि-कॅप् )—to place ( a person ) at a disadvantage. अडथळा घालणें,

अडचणींत घालणें. *n.* a race or contest in which competitors are equalized by start, difference of weight etc.; a hindrance. सारखी संधि-सवलत-सर्व खेळाडूंना मिळण्याची योजना असलेली शर्यत. तीसाठीं अडथळा. प्रतिबंध. *-capper, n.*

**Hăn'dicrăft,** *n.* ( हॅ'न्डि-क्राफ्ट् )—work performed by the hand, manual art, trade or skill. कला. हातकाम, हुन्नर. हस्तकौशल्य.*-sman, n.* हुन्नरवाला, शिल्पी.

**Hăn'diwork,** *n.* ( हॅ'न्डिवर्क् )—work or thing done or made by the hands or by any one's personal agency. हस्तकौशल्याचें-हातींचें-काम. वस्तु. ( स्वतःची ) कारागिरी.

**Hănd'kerchief,** *n.* ( हॅं'ङ्कर्-चिफ् )—a square (of linen, silk, &c.) used to wipe the face or cover the neck. हातरुमाल. *Pocket h.*, खिशांतील हातरुमाल. *Neck h., neckerchief*, गळ्याभोंवतालीं गुंडाळण्याचा रुमाल. *To throw the h. to*, एकाद्यावर मेहेरनजर-कृपा-करणें. (खेळांत) पाठलाग करण्याची (हातरुमाल फेंकून) सूचना देणें.

**Hăn'dle,** *n.* ( हॅं'न्डल् )—part of a thing by which it is held; a fact that may be taken advantage of. मूठ, दांडा, कान; साधन. करण. *v. t.* to touch or feel with the hands; to manage, to deal with; to treat; to treat in discourse; to deal in (goods). हात लावून पाहणें. हातांत धरणें; व्यवस्था करणें, वापरणें. वहिवाटणें; वागविणें; (विषयावर) ऊहापोह करणें. लिहिणें. प्रतिपादन करणें; व्यवहार-व्यापार-करणें. *H. of the face*, the nose. नाक. *A h. to one's name*, title. पदवी.

**Hăn'dley-pāge,** *n.* ( हॅं'न्ड्लेपेज् )—a type of large aeroplane. मोठें विमान. [ maker ]

**Hănd'sel,** *n.* ( हॅं'न्सल् )—New-Year gift; earnest money; a foretaste. नूतन वर्षाचें बक्षीस. देणगी; बयाणा. सचकार; पूर्वानुभव. चुणूक. *v. t.* to give *h.* to; to be the first to try. देणगी,-बयाणा,-देणें; मुहूर्त करणें.

**Hănd'some,** *a.* ( हॅं'न्सम् )—of fine appearance, well-formed, shapely; generous; (of price etc.) considerable. सुंदर, देखणा; उदार; बराच; पुष्कळ. *H. is that h. does*, ज्याची कृति चांगली तो चांगला (सुंदर). *H.-ly, adv.*; *H.-ness, n.*

**Hănd'writing,** *n.* ( हॅं'ड्-राइटिंग् )—way a person writes, the peculiar way of writing. हस्ताक्षर.

**Hăn'dy̆,** *a.* ( हॅं'ङि )—ready to the hand; convenient for use; clever with the hands. हाताशीं, हाताजवळ, हुकमी; आटोपसर, सोईस्कर; हाताचा कुशल, क्रियाकुशल. *H.-dandy*, a child's game. (मिटलेल्या मुठींत काय आहे तें ओळखण्याचा) मुलांचा खेळ, 'जिक जिक पोरा कोणत्या हातीं खडा' हा खेळ. *H.-man*, हरकामी (खलाशी). *Hand'ily, adv.*; *-iness, n.*

**Hăng,** *v. t. & i.* ( हॅंग् )—to cause a thing to be supported (by hooks, &c.) from above; to attach (wall-paper); to decorate (wall); *to droop; to hover; to rest upon; (pa. t. & pa. p. hanged)* to suspend on gibbet as capital punishment. टांगणें, लोंबकळत ठेवणें, खालीं सोडणें; (भिंतीला) कागद चिटकविणें; (चित्रें इ० टांगून भिंत) सुशोभित करणें; वांकणें, लोंबत राहणें; (वर) घिरट्या घालणें; वर आधारणें. अवलंबून असणें; फांसावर चढविणें,-लटकावणें. फांशीं जाणें. *n.* a downward droop or bend; the way a thing hangs. लटकणी. लोंबकळ; लोंबकळण्याची तऱ्हा. *H. I, H. it, H. you!* etc. जळो! मरो! मर! (या अर्थी). *To h. the head*, (लाजेनें-शरमेनें) मान खालीं घालणें. *To h. in the balance*, अनिश्चित असणें. अर्धवट स्थितींत असणें. *To h. about*, to loiter. रिकामटेकडें भटकणें, रमणें, गमणें. *To h. fire*, be slow in going off. (पिस्तूल-बंदूक इ०) लवकर न झडणें,-न झाडली जाणें, (fig.) सावकाशीनें होणें, रखडत पडणें. *To h. heavy*, (of time) (वेळ) जातां न जाणें, कंटाळवाणा होणें. *To h. on*, वर अवलंबून असणें, कडे नीट लक्ष देणें. *To h. back*, कचरणें, घोंटाळणें, माघार घेणें. *To h. behind*, पाठीं राहणें, मागें पडणें. *To h. out*, खालीं लोंबकळणें, खालीं येणें,-डोकावणें, (*sl.*) राहणें. *To h. together*, (त्या) ताळ-मेळ-बसणें, जुळतें असणें, संबद्ध असणें. *To h. up*, to suspend, (fig.) to put aside, postpone, indefinitely. टांगणें, लटकत ठेवणें, लटकावणें, बाजूला टाकणें, पुढें ढकलणें (अनियमित काळपर्यंत). *H.-dog, a. & n.* base and sneaking (fellow). हलकट, पाजी, नीच (मनुष्य). *H.-man*, an executioner. फांशी देणारा मनुष्य, मांग, चांडाळ. *To get the h. of*, ची ढब साधणें, समजणें, कळणें. *Not a h.*, (colloq.) not at all. मुळींच नाहीं.

**Hăng'ar,** *n.* ( हॅं'ङ्गर् )—a shed for housing aeroplane etc. विमानें ठेवण्याची जागा, विमानतळ. [ F ]

**Hăng'er,** *n.* ( हॅं'गर् )—a person or thing that hangs; that by which a thing hangs; a short sword. फांशी देणारा, टांगणारा, टांगलेली वस्तु; ज्याला वस्तु टांगतात तें (खुंटी, कमरेचा पट्टा, इ.); आंखूड तलवार, खांडें. *H.-on*, a follower, a dependant. अनुयायी, आश्रित.

**Hăng'ing**, *pr. pa. & n.* ( हॅंगिंग् )—( in vbl. senses. ) लोंबकळणें. लटकणें. ( *-s ; n. pl.* ) drapery for walls etc. ( भिंतीवरील ) झालर, पडदे. *H. committee*, प्रदर्शनांत मांडण्याच्या चित्रांची निवड करणारें मंडळ,-मंडळी. *H. garden*, उंचवटयावरची-झुलती-कृत्रिम बाग. *A h. matter*, शेवटीं फांशीची शिक्षा होण्याजोगी गोष्ट,-खटला.

**Hăng'nail**, *n.* ( हॅंग्नेल् )—agnail. ( नखाच्या ) नर.

**Hănk**, *n.* ( हॅंक् )—a parcel or skein of cotton thread ( 840 yds. ), worsted ( 560 yds. ); ( Naut. ) a ring of rope or iron for fixing stay-sails to stays; hold, influence. सुताची ( ८४० वार लांब ) गुंडी, लोंकरीची ( ५६० वार लांब ) गुंडी,-गुंडा; शिडाच्या टोंकाच्या दोरीचें नाक; वजन, जरब, धाक.

**Hăn'ker**, *v. i.* ( हॅंकर् )—to crave *after*. अत्यंत उत्कंठा असणें, तहान लागणें.*-ing*, *n.*

**Hănk'ÿ-pănk'ÿ**, *n.* ( हॅंकि-पॅंकि )—trickery. फसवेगिरी, हातचलाखी.

**Hăp**, *n.* ( हॅप् )—a chance; luck; chance occurrence. योगायोग, दैवयोग; नशीब; अवाचित घडून येणें. *v. i.* to happen. घडणें, घडून येणें.

**Hăphă'zard**, *n.* ( हॅप्-हॅझर्ड् )—mere chance, accident ( *at, by, h.* ). दैवगति. *a.* casual. सहजासहजीं होणारा. *adv.* casually. सहजगत्या.

**Hăp'less**, *a.* ( हॅप्-लिस् )—unlucky, unfortunate. दुर्दैवी, हतभागी, भाग्यहीन.*-ly, adv.*

**Hăp'lÿ**, *adv.* ( हॅप्लि )—perhaps; by chance. कदाचित्; प्रसंगवशात्.

**Hăpp'en**, *v. i.* ( हॅपन् )—to come to pass, to take place, to fall out, to occur; to come *upon* by chance. घडून येणें, घडणें; आढळणें, सहजगत्या नजरेस पडणें.*-ing*, *n.* घडून येणें, घडलेली गोष्ट.

**Hăpp'ÿ**, *a.* ( हॅपि )—lucky, fortunate; content; glad; felicitous; apt. दैववान्; समाधानी; आनंदी; सुखी; योग्य, समर्थ, क्षम. *H. family*, ( पूर्वापार हाडवैर असलेले परंतु एकाच पिंजऱ्यांत कोंडून ठेवल्यावर ) स्नेहभावानें एकत्र नांदणारे प्राणी, नांवाची दोस्ती. *H.-go-lucky*, *a.* haphazard. ढकलपंचीचा, चालढकलीचा, दैवाधीन. *Hap'pily*, *adv.* सुदैवानें, सुखांत, आनंदानें, खुषीनें. *Hap'piness*, *n.* सुदैव, उत्कर्ष, सौख्य, स्वाभाविक लावण्य-गोडी,-सौंदर्य.

**Hära-kĭ'ri**, *n.* ( हाराकिरि )—suicide by disembowelment, happy dispatch. जपानी वरच्या वर्गांतील व्यक्तीनें पोट फाडून घेऊन केलेली आत्महत्या, सुखाचें मरण. [ Jap. *hara*, belly; *kiri*, cut ]

**Harăngue'**, *n.* ( हरॅंग् )—speech to assembly; vehement address. समाजाला उद्देशून केलेलें भाषण; जोरदार भाषण, बडबड, टकळी. *v. i. & t.* ( अविशयुक्त ) भाषण करणें, ( पुढें ) भाषण-बडबड-करणें.

**Hă'rass**, *v. t.* ( हॅरस् )—to worry, to trouble; to attack repeatedly. त्रास देणें, सतावणें; नको नकोसें करणें, जेरीस आणणें.*-ment*, *n.* छळणें, छळ, गांजणूक.

**Härb'inger**, *n.* ( हार्बिं-जर् )—one who announces another's approach; forerunner, precursor. आगमनाची सूचना देणारा, पुढें पाठविलेला मनुष्य, अग्रदूत, अग्रेसर; आगमसूचक, पूर्वसूचना देणारा. *v. t* to announce the approach of. ( ची ) आगम-सूचना देणें.

**Härb'our**, *n.* ( हार्बर् )—a place of shelter for ships; shelter. बंदर, नांगरवाडा; आश्रय, थारा. *v. i. & t.* to come to anchor in harbour; to give shelter to; entertain or cherish in the mind. ( गलबतानें ) बंदर करणें, नांगर टाकणें; आश्रय देणें; थारा देणें, मनांत बाळगणें.*-age*, *n.* ( a place of ) shelter. आश्रयस्थान, आसरा.

**Härd**, *a.* ( हार्ड् )—firm, solid; stern, unyielding, cruel; difficult to bear or do; inclement, severe; strenuous; ( of liquor )- strong; stingy; ( of prices ) high; ( phonetics ) ( said of certain consonants, as c in cut ). कठीण, भरींव; कडक, निष्ठुर; असह्य, दुष्कर; रखरखीत; कष्टाळू; कडक, तलख ( दारू ); कृपण; चिक्कू, चिकट, चिकटोळा; भारी, कडाडलेल्या ( किंमती ); कठोर ( व्यंजन ). *adv.* strenuously, severely; with difficulty. मेहनतीनें, सपाटून, रगडून; कष्टानें, अडचणीनें, मुष्किलीनें. *n.* a beach or jetty for landing; ( sl. ) hard labour. ( गलबतांतून जमिनीवर उतरण्याचा ) उतार, धक्का, बंदरधक्का; सक्तमजुरी, सश्रम कारावास. *H. cash*, रोकड, नाणें, रोख पैसा ( कागदी नव्हे ). *H. facts*, निर्विवाद- संशयातीत-गोष्टी,-सत्य. *A h. nut to crack*, a hard problem, a person hard to make out or influence. बिकट-अवघड-प्रश्न, मनांतलें न समजूं देणारा-दाद न देणारा-मनुष्य. *H. of hearing*, somewhat deaf. अर्धवट बहिरा. *H. winter*, कडक-तीव्र-हिंवाळा. *H. water*, खनिज क्षारांमुळें धुण्याच्या उपयोगाला अयोग्य पाणी. *H. row to hoe*, कठीण काम. *To be h. put to it*, be in difficulties. अडचणींत-संकटांत-सांपडणें. *To die h.*, शेवटपर्यंत धडपड करून-चिवटपणानें-मरणें. *H. by*, close by. नजीक, जवळ, समीप. *H. upon*, close to. च्या लगत,-जवळ. *To run ( a person ) hard*, पाठलाग करणें. *H. and fast*, ( of rules ) कडक ( नियम ),

ठराविक, ठरीव. *H. bake*, almond toffee. बदामी मेवा. *H. bitten* लढण्यांत-दांत हात करण्यांत चिवट. *H.-favoured,-featured*, राकट चेहऱ्याचा, ओबडधोबड. *H.-fisted*, stingy चिकू, कृपण *H.-headed*, व्यवहारी, चाणाक्ष. *H. lines*, worse fortune than one deserves. कठीण प्रसंग,-अवस्था, दुर्दैव. *H. set*, rigid, tight. ताठ, घट्ट; उबविलें जाणारें (अंडें); भुकेलेला (माणूस). *H. up*, short of money. पैशाची चणचण असलेला, ओढवलेला. *H.-ness, n.*

**Härd'en**, *v. t. & i.* (हा'ड्न्)—to make or grow hard, callous or robust. कठीण करणें किंवा होणें, कठोर बनणें.

**Härd'-hearted**, *n.* (हा'र्ड्-हार्टेड्)—cruel, unfeeling, merciless, pitiless, inhuman. पाषाणहृदय, निर्दय.*-ly, adv.;-ness, n.*

**Härd'ihood**, *n.* (हा'र्डि-हुड्)—audacity, boldness धिटाई, धैर्य, हिंमत, छाती, ताकद.

**Härd'ly**, *adv.* (हा'र्ड्-लि)—with difficulty, severely, rigorously; scarcely. कष्टानें, प्रयासानें, कठोरपणानें, क्वचितच.

**Härd'ship**, *n.* (हा'र्ड्-शिप्)—severe suffering or privation, affliction, oppression, injustice. दुःख, कष्ट, संकट, हाल.

**Härd'up**, *a.* (हा'र्ड्-अप्)—short of money. द्रव्यहीन.

**Härd'ware**, *n.* (हा'र्ड्-वेअर्)— iron-mongery. लोखंडी जिन्नस,- जड सामान.

**Härd'y**, *a* (हा'र्डि)—bold; robust; capable of resisting exposure; (of plants) able to grow in the open air all the year. धीट, धारिष्टवान्, हिंमती, धट्टाकट्टा; कणखर, काटक, राठ, भक्कम; बाराहि महिने उघड्या हवेंत वाढणारा. *H. annual*, उघड्या हवेंत वाढणारें; (*fig.*) दर वर्षाला पुढें येणारा विषय,-री गोष्ट, प्रतिवार्षिक गोष्ट. *Hard'ily, adv., -diness, n.*

**Härd'y**, *n.* (हा'र्डि)—the blacksmith's bar of hard iron for cutting metal on etc. लोहाराचा धातु वगैरे तोडण्याचा भक्कम दांडा.

**Hāre**, *n.* (हेअर्)—a speedy rodent with long ears, short tail and divided upper lip. ससा, शशक. *Mad as a March h.*, (hare in breeding season). मार्च महिन्यांतील वाफेला आलेल्या,- आणणाऱ्या सशाप्रमाणें रंगेल,- वेडा,- पिसाट. *To hold (or run) with the h. and run (or hunt) with the hounds*, to keep in with both the sides. दुटप्पी वर्तन ठेवणें, धरसोड करणें. *H. and hounds*, paper-chase दौडपकडीचा खेळ. (दोन गडी मशांप्रमाणें पुढें धावून बाकीचे शिकारी कुत्र्यांप्रमाणें त्यांचा पाठलाग करितात तो) मशाकुत्र्यांचा खेळ. *H.-bell*, बांटोळ्या पानांचें फुलझाड. *H.-brained*, rash, wild. उरफाट्या काळजाचा, साहसी. *H.-lip*, तुटका,- फाटका वरला ओंठ. *H.'s foot*, species of clover, corkwood tree. एक जातीची वनस्पति,- रान, एक जातीचें हलक्या सच्छिद्र लांकडाचें झाड.

**Hăr'em,-am**, *n.* (हे'अरम्)—women's part of Mohammedan dwelling; its occupants; a Mohammedan sacred place. जनानखाना, अन्तःपुर, अवरोध; अन्तःपुरांतील स्त्रिया, जनाना, कबिला. मुसलमानांचें पवित्र स्थान *H. skirt*, (*sl.*) स्त्रियांचा मेल चोळणा, लहंगा.

**Hă'ricot**, *n.* (है'रिको)—ragout usu. of mutton. (बकऱ्याच्या मासाचा) रसा,- पदार्थ. *H. (bean)*, French bean. फरसबी (भाजी).

**Härk**, *v. i.* (हार्क्)—to listen (to); to lend the ear; (as call to hounds) go (forward). ऐकणें, कान देणें; जाणें. *int.* ऐका! ऐक! *H. back*, to retrace course to find scent; (*fig.*) to revert to a subject. माग काढण्यासाठीं परत येणें,-वळणें; मूळपदावर येणें.

**Harl(e)**, *n.* (हर्ल्)—a barb, fibre, of a feather. पिंसाचा धागा,- तंतु.

**Härl'equin**, *n.* (हा'र्लिक्विन्)—(in a pantomime) mute character invisible to clown and pantaloon, a buffoon. (मुग्ध नाट्यांतील) एक मुग्ध नट; विदूषक, मसखऱ्या, वैहासिक. *-ade' n.* विदूषक-प्रधान प्रहसन.

**Härl'ot**, *n.* (हा'र्लट्)—a prostitute. वेश्या; वारांगना, कलावंतीण. *v. i.* कलावंतीणीचा धंदा,- शिंदळकी करणें. *-ry, n.* वेश्यावृत्ति, शिनळकी, बाह्य भपका.

**Härm**, *n. & v. t.* (हार्म्)—mischief, wickedness; to damage, to hurt. नुकसान, इजा; नुकसान करणें, दुखवणें. *Out of harm's way*, in safety. सुरक्षिततेंत, सुरक्षित, सुखरूप.

**Härm'ful**, *a.* (हा'र्म्-फुल्)—that does harm. नुकसानकारक.

**Härm'less**, *a.* (हा'र्म्-लेस्)—that does no harm. निरुपद्रवी.

**Härmŏn'ic**, *a.* (हार्मॉ'निक्)—of, in, harmony. जुळणीचा, मेळाचा, सुसंगत; (Math.) हरात्मक, एकतान. *n.* जुळणीचा स्वर.*-s, n. pl.* स्वरशास्त्र.

**Härmŏn'ica,-cŏn**, *nn.* (हार्मॉ'निका,-कॉन्)—kinds of musical instrument. जलतरंग (वाद्य).

**Härmō'nious**, *a* (हार्मो'निअस्)—in concord; free from dissent; tuneful; sweet-sounding. मिळाफाचा; सुसंगत; समताल; एकताल; कर्णमधुर. *-ly, adv.*

**Härm'onist**, *n.* ( हा'र्मनिस्ट् )—a person skilled in harmony; a musician. स्वरज्ञानी, स्वरज्ञ; गायक, शास्त्रशुद्ध संगीतकार.

**Härmō'nium**, *n.* ( हार्मो'निअम )—a keyboard instrument with metal reeds. वाजाची पेटी, हार्मोनियम.

**Härm'onize**, *v. t. & i.* ( हा'र्मनाइझ् )—to bring into harmony, to be in harmony; to form chords for melody. मेळ घालणें, मेळ असणें, जुळणें, जम बसणें; सूर जमविणें.-*zation, n.*

**Härm'onў**, *n.* ( हा'र्मनि )—agreement, concord; melodious sound; collation of parallel narratives. मेळ, मिलाफ, ऐक्य, एकवाक्यता; मधुर आवाज; सुसंगत जुळणी लावणारा ग्रंथ, संगतिदर्शक ग्रंथ.

**Härn'ess**, ( हा'र्निस् )—gear of draught horses &c.; defensive armour; (fig.) working equipment; an apparatus in a loom for shifting, warp-threads. घोड्याचा सरंजाम, ओढण, अश्वसामुग्री; रक्षणार्थ चिलखत; चालू साधनसामग्री; (मागाच्या) वया व त्या खालींवर करण्याचा सरंजाम. *v. t.* to put harness on (a horse etc.); (fig.) to utilize (river, waterfall etc.) for motive power. सरंजाम घालणें, खोगीर चढवणें; (नदी, धबधबा यांचा) यंत्रें चालविण्यासाठीं शक्ति उत्पन्न करण्याकरितां उपयोग करून घेणें,-उपयोजणें. *In h.*, दररोजचें नित्याचें-काम करीत असतां. *To die in h.*, लढतां लढतां-नित्याचा कामधंदा करीत असतां-मरणें,-मरण येणें.

**Härp**, *n.* ( हार्प् )—a musical instrument with strings played by the fingers. वीणा, सारंगी. *v. i.* to play on a harp; to dwell tediously on a subject. वीणा वाजविणें; एकाच विषयावर कंटाळा येईपर्यंत तुणतुणें वाजवीत बसणें,-घोळत बसणें, घोकणी करणें, छंद-जपमाळ-घेणें.-*er,-ist, nn.* हार्प-सारंगीवाला,-सारंगी-वाजविणारा.

**Härpoon'** *n.* ( हार्पून् )—a spear to strike whales. मगर, मासे किंवा इतर मोठे प्राणी मारण्याची बरची. *v. t.* to strike, pierce, with a harpoon. बरचीनें (मोठे मासे) मारणें,-भोसकणें. *H. gun*, बरची फेंकण्याची बंदूक.

**Härp'sichord**, *n.* ( हा'र्प्सिकॉर्ड् )—a stringed instrument with a key-board. एक प्रकारचें तंतुवाद्य.

**Härp'ў**, *n.* ( हा'र्पि )—(Gk Myth.) a rapacious monster; a rapacious person. (स्त्रीचें तोंड व गिधाडाचें धड असलेला) हिंस्र राक्षस; दुसऱ्यावर धाड घालणारा मनुष्य, गिधाड. *H. eagle*, दक्षिण अमेरिकेंतील हिंस्र पक्षी.

**Härq'uebus, Ar-**, *n.* ( हा'र्क्विबस्, आ'र्- )—(hist.) a portable gun supported on a tripod तिपाईवर ठेवण्याची लहान बंदूक.

**Hă'rridan**, *n.* ( है'रिडन् )—a haggard old woman; a vixen. म्हातारी, हडळ; वृद्ध वेश्या.

**Hă'rrier**, *n.* ( है'रिअर् )—a hound used in hunting hares; (*pl.*) a pack of hounds; kind of falcon. ससेपारधी कुत्रा; ससेपारधी झोडी, ससा.

**Hă'rrow**, *n.* ( है'रो )—a frame with iron teeth for breaking clods &c. दंताळें, कुळव, गुंठे. *v. t.* to draw a harrow over; to wound; to distress, to wound (feelings, &c.); 2 to harry, spoil. दंताळें फिरविणें; जखम करणें, खरचटविणें; दुःख देणें, काळजाला घरे पाडणें; लुटणें, लुबाडणें, छळणें. *Under the h.*, in distress. दुःखांत, संकटांत. *H.-ing, a.*

**Hă'rrў**, *v. t.* ( है'रि )—to plunder, ravage, spoil (land, people); to harass. लुटणें, उध्वस्त करणें; गांजणें, छळणें.

**Härsh**, *a.* ( हार्श् )—severe, unfeeling; rough to the touch, ear or taste. निर्दय, निष्ठुर, करडा; खडबडीत, कर्कश, रुक्ष.-*ly, adv.*-*ness, n.* खडबडीतपणा, कठोरपणा, निष्ठुरता, कर्णकटुता.

**Härt**, *n.* ( हार्ट् )—the male of (esp. red) deer, (esp. after fifth year). हरिण, हरण. *H. of ten*, शिंगांना दहा फांटे फुटलेलें हरण. *H.'s horn*, हरणाच्या शिंगांतून मिळणारा पदार्थ. *H.'s tongue*, a fern. एक जातीची वनस्पति, नेचा.

**Hăr'um-scăr'um**, *a. & n.* ( हे'अरम्-स्के'अरम् )-reckless (person, conduct). धांदलया, धांदरट, अविचारी, हूड (मनुष्य, वागणूक).

**Härv'est**, *n.* ( हा'र्व्हिस्ट् )—(a season for) reaping and storing of grain &c.; a season's yield; (fig.) product of any action. कापणीचा हंगाम, सुगी; पीक, उत्पन्न; श्रमाचें चीज, फळ, मोबदला. *v. t.* to reap and gather in; to lay up. कापणी करणें, पीक काढून घेणें,-गोळा करणें; सांठवणें, संग्रह करणें. *H. home*, कापणीच्या हंगामाचा शेवट, सुगीचा सण. *H. moon*, सप्टेंबर २२-२३ तारखेचा पौर्णिमेचा चंद्र, शरदृतूंतील पौर्णिमा. *H. mouse*, वाढत्या धान्याच्या कडब्यांत घरटें करून राहणारा लहान उंदीर. *Har'vester, n.* a reaper; a reaping machine; a harvest bug. कापणी करणारा,-रे यंत्र; पिकाची कीड.

**Has**, see Have.

**Hăsh**, *v. t.* ( हॅश् )—(*h. up*,) to cut in small pieces. खिमा करणें, चोंचारून तुकडे करणें. *n.* a dish of hashed meat; repetition. खिमा; नव्याजुन्याची खिचडी, पुनरावृत्ति. *To make a*

*h. of*, चुरगळणें, चेंदामेंदा करणें. *To settle a person's h.*, एकाद्याची चटणी करणें,-खिमा उडविणें.

**Hăsp**, *n.* (हास्प्)—the clasp of a padlock; a hank of yarn. कडी; सूत गुंडाळण्याची चाती. *v. t.* कडी घालणें,-लावणें.

**Hăss'ock**, *n.* ( हॅ'साक् )—a kneeling cushion. गुडघे टेंकण्याची जाड चटई.

**Hāste**, *n.* ( हेस्ट् )—urgency of movement, hurry; rashness. त्वरा, धांदल; उतावळ, गडबड. *v. i.* to hasten. घाई करणें. *To make h.*, त्वरा करणें.

**Hā'sten**, *v. t. & i.* ( हे'सन् )—to proceed or go quickly; to cause to hasten; to accelerate (work etc.). जलद् जाणें; त्वरा करायला लावणें; जलद्-त्वरेनें-(काम) उरकणें.

**Hā'sty̆**, *a.* ( हे'स्टि )—speedy, hurried; precipitate, rash; quick-tempered. जलद्; अविचारी; उतावळा; तापट, रागीट. *Has'tily, adv.* घाईनें, उतावीळपणानें. *Has'tiness, n,* जलदी, त्वरा, उतावीळ.

**Hăt**, *n.* (हॅट्)—an out-door head-covering. (साहेबी) उभी टोपी. *v. t.* टोपी घालणें, टोपीनें झांकणें. *Top h., high h., chimney-pot h.*, रेशमी उभट-उंच-(साहेबी) टोपी. *Opera h.*, घडीची उभट टोपी. *Cardinal's h., red h.*, (fig.) कार्डिनलचा-धर्माधिकाऱ्याचा अधिकार. *H. in hand, a. & adv.* servile, servilely. मिंधा, लाचार, नम्र (पणानें). *To send round the h.*, (टोपी फिरवून) वर्गणी मागणें. To talk through one's *h.*, (sl.) घमेंड मारणें, दिमाख दाखविणें, अतिशयोक्ति करणें. *As black as my h.*, काळाकुट्ट. *H. trick*, (Crick.) taking three wickets by successive balls. लागोपाठ तीन चेंडूंनीं तीन गडी बाद करणें. *Bad h.*, (sl.) वाईट चालीचा-असभ्य-हलकट मनुष्य. *H.-ful a., H.-less, a., Hatter, n.* टोप्या करणारा, विकणारा, टोपीवाला.

**Hătch**, *v. t. & i.* (हॅच्)—to produce by incubation, to bring the young to maturity, to bring or come forth from egg; to form (a plot). अंड्यास ऊब देणें, अंडें फोडून बाहेर येणें किंवा आणणें; (कट, व्यूह) रचणें. *n.* hatching; brood hatched. पिलें काढणें,-होणें; वीण, वेत. *Hh., catches, marriages, and dispatches*, जनन (जन्म), लग्नें जुळणें, विवाह, व मृत्यु यांची वर्तमानपत्रांतील नोंद,-यादी.

**Hătch**, *n.* (हॅच्)—the lower half of divided door; an aperture in a door, wall, floor or deck; (Naut.) a hatch-way, a cover used in closing it; a flood-gate. जाळीच्या-दिंडी-दरवाजाच्या खालचा अर्धा भाग; खिडकी, भोंक; गलबताच्या मजल्यांतील चौकोनी मार्ग,-त्याचें झांकण; उघडी, सांड. *Under hh.*, गलबताच्या मजल्याखालीं, (fig.) दृष्टीआड खोल, मेलेला. *H. way, n.* (माल खालीं नेण्याचा) गलबताच्या मजल्यांतील चौकोनी मार्ग,-वाट.

**Hătch**, *v. t.* (हॅच्)—to engrave (usu. parallel) lines on (surface). (पृष्ठभागावर समांतर) सूक्ष्म रेषा कोरणें,-खोदणें. *n.* कोरीव,-खोदीव-रेषा.

**Hătch'ĕt**, *n.* (हॅ'चिट्)—a light short axe. लहान हलकी कुऱ्हाड, परशु. *H. face*, लांबट, तीक्ष्ण, उग्र मुद्रा, चेहरा. *To bury the h.*, स्नेह संपादणें, समेट करणें. *To throw the h.*, अतिशयोक्ति करणें. *To throw the helve after the h.*, to add new loss to that already incurred. नुकसानींत भर पडणें.

**Hătch'ment**, *n.* (हॅ'च्मन्ट्)—an escutcheon; an armorial tablet of deceased person. कुलचिन्हांकित ढाल; मृत सरदाराचें ढालतलवार वगैरेंनीं युक्त असें स्मृतिचिन्ह.

**Hāte**, *v. t.* ( हेट् )—to dislike strongly, to detest, to loathe; to bear malice to. द्वेष करणें; वैर असणें. *n.* hatred. द्वेष, तिरस्कार, वैर. *Morning h.* (army sl.) सकाळची जर्मन तोफांची सरबत्ती. *Hat'able, n.*

**Hāte'ful**, *a.* (हे'ट्फुल्)—exciting hatred. द्वेषी, ओंगळ, द्वेषजनक. *-lly, adv., -ness, n.*

**Hā'trĕd**, *n.* ( हे'ट्रिड् )—active dislike; ill-will. द्वेष, मत्सर.

**Hau'berk**, *n.* ( हॉ'बर्क् )—(hist.) coat of mail. (लोखंडी लहान लहान कड्यांचें) चिलखत.

**Haugh**, *n.* ( हॉफ्, हॅक् )—a piece of flat alluvial land by river. नदीकांठचा पुरानें माती वगैरे सांचून झालेला सुपीक प्रदेश.

**Haught'y̆**, *a.* (हॉ'टि )—proud, arrogant, dignified. गर्विष्ठ, मगरूर; थोर. *Haught'ily, adv.* आढ्यतेनें, गर्विष्ठपणानें, दिमाखानें,*-iness, n.* दिमाख, गर्व, आढ्यता.

**Haul**, *v. t. & i.* (हॉल्)—to pull or drag forcibly; to turn a ship's course; (of wind) to shift. जोरानें ओढणें, खेंचणें; जहाजाची दिशा बदलणें; (वारा) बदलणें. *n.* hauling; amount gained. जोराचा हिसका, जोरानें ओढणें; एकदम झालेला लाभ, एका झपाट्यास झालेली मिळकत.*—age, n.* conveyance of loads, the charge for it. ओढणें, माल-ओझीं वाहणें-नेणें; नेणावळ, वाहणावळ.*—ier, n.* ओढणारा, कोळशाच्या खाणींतील कोळसा वर ओढण्याचीं पिंपें; भाड्यानें माल वाहून नेणारा खटारेवाला. *To haul*

*over the coals*, (colloq.) हाताशीं धरणें, खरडपट्टी काढणें.

**Haulm, Halm,** *n.* (हाम्)—stalk, stem, stalks of beans, peas etc. बुंधा, बुडखा, जुडी.

**Haunch,** *n.* (हॉन्च्, हान्च्)—part of the body between ribs and thigh; leg and loin of deer etc. as food; (Archit.) side of arch between crown and piers. कटिप्रदेश, जघन, पार्श्वभाग, खवाटा; (हरिणाची वगैरे) तंगडी व खवाटा (मांस); मध्यापासून वांकणापर्यंतचा कमानीचा कोणत्याहि बाजूचा माथ्याचा भाग, खवाटा.

**Haunt,** *v. t. & i.* (हॉन्ट्)—to frequent (a place); to frequent company of (a person); (of thoughts etc.) to visit (a person) frequently; to stay habitually. (एकाद्या ठिकाणीं) नेहमीं जाणें येणें; (एकाद्याच्या) संगतीत नेहमीं असणें; वारंवार उद्भवणें, पाठीस लागणें; संचार असणें. *n.* a place much resorted to (often fig.). अड्डा, बैठक, माहेरघर. Haunted, *pa. p.* frequented by ghosts. भुताचा संचार असलेला, झपाटलेला.

**Haut'boy, Ho'boy, O'boe,** *n.* (हो'बॉय्, ओ'बॉय्)—a high-pitched wooden wind instrument; a reed-stop on organ; a species of strawberry. सनईसारखें एक वाद्य; बोरूची-लांकडी-जिव्हाळी; एक जातीचें बोर,-फळ.

**Hauteur',** *n.* (होट'र्)—haughtiness of manner. उद्धटपणा, मगरूरी, दर्प. [F]

**Hăve,** *v. t. & i. & aux.* (हॅव्ह्)—to own, possess; to enjoy, to suffer; to contain; to be under necessity; to permit (person) to; to know; to retain; to engage in. जवळ असणें, मालकीचें असणें; उपभोगणें, भोगणें; आंत -ला-असणें; भाग असणें; (करूं, बोलूं) देणें; जाणणें, येणें; ठेवणें; संबंध-चालू-ठेवणें. *n.* (sl.) a swindle, take-in; possession; (*Haves & have-nots*), rich and poor. फसवणूक, ठकबाजी, बनवाबनवी; संचय, मालमत्ता; श्रीमंत आणि गरीब लोक. *To h. a try*, प्रयत्न करणें. *As Plato has it*, expresses it. प्लेटोच्या म्हणण्याप्रमाणें. *Let him h. it*, त्याला चांगली शिक्षा कर, त्याची चांगली कानउघाडणी कर. *To be had*, (sl.) फसविलें जाणें. *To h. one up*, (एकाद्याला) न्यायालयापर्यंत-कोर्टांत-खेंचणें. *H. it your own way*, बरें बुवा, तुझ्याचप्रमाणें! बस्स पुरे! *To h. at*, वर हल्ला चढविणें. *To h. done*, to stop. बंद करणें, पुरें करणें. *To h. on*, (कपडे) चढविणें, चढवीत असणें. *To h. it out*, to settle dispute (with person), to get a tooth extracted. तडजोड करणें, (भांडण) मिटविणें, दांत काढवून घेणें. *Had rather go*, would prefer to go. जाणें परवडेल,-पसंत पडेल. *Had better go*, जाईल तर बरें,-हिताचें. *Had he known*, if he had known. जर त्याला कळलें-ठाऊक-असतें (तर). *Has*, (हॅझ्), 3rd sing., *pre.*; *Had*, (हॅड्), *pa. t. & pa. p.*

**Hā'ven,** *n.* (हे'व्हन्)—a harbour, a port; (fig. *h. of rest*) a refuge. बंदर, नांगरवाडा; आधार, आश्रयस्थान, निवारा

**Hăv'ersăck,** *n.* (हॅ'व्हर्सॅक्)—a canvas bag for soldier's provisions. लष्करी शिपायाची (शिधा वगैरे ठेवण्याची) पोतडी,-थैली.

**Hăv'ing,** *n.* (हॅ'व्हिंग्)—(*in pl.*) property, belongings. मालमत्ता, (स्वतःचें) सामानसुमान.

**Hăv'oc,** *n.* (हॅ'व्हक्)—devastation. नाश, अनर्थ, प्रलय. *v. t.* to devastate. नाश-उजाड-करणें, उध्वस्त करणें.

**Haw,** *n.* (हॉ)—(a fruit of) hawthorn; (hist.) a hedge, an enclosure. कांटेरी झाड, त्याचें फळ; कुंपण, आवार. *H. buck*, गांवढळ मनुष्य. *H.'finch*, मोठ्या मजबूत चोंचीचा एक लहान पक्षी.

**Haw,** *n.* (हॉ)—third eyelid of a horse, dog etc., cartilage within inner corner of eye. (घोड्याची इ.) डोळ्याची तिसरी पापणी, तिसरें नेत्रचर्म, डोळ्याच्या आंतील कोंपऱ्याचें मृदु अस्थींचें वेष्टन,-कूर्चा.

**Haw-Haw,** *int. & n. & v. i.* (हॉ-हॉ)—a boisterous laugh. हा-हा करून (मोठ्यानें) हसणें, विकट हास्य (करणें). 2. ha-ha, sunk fence round a garden. बागेभोंवतालचें जमिनींत पुरलेलें मोखळ्यांचें कुंपण.

**Hawk,** *n.* (हॉक्)—a bird of prey used in falconry; a rapacious person. घारीससाण्याच्या जातीचा पक्षी, श्येन, शेन; अधाशी, लुटारू,-मनुष्य. *v. i. & t.* to hunt with a hawk: (*h. at*) to hunt as a hawk does; to hunt insects. शेन पक्ष्याकडून शिकार करणें; शेन पक्ष्याप्रमाणें पकडणें; किडे पकडणें. *H.-eyed*, तीक्ष्णदृष्टि, तीक्ष्ण नजरेचा-दृष्टीचा. *H.-nosed*, गरुडनाक्या. *To know a h. from a handsaw* (hernshaw), to have ordinary discernment. सामान्य सारासारदृष्टि असणें. *H.-ish, H.-like aa.*

**Hawk,** *v. i. & t.* (हॉक्)—to clear the throat noisily; bring *up* from throat. खाकरून घसा साफ करणें; (थुंकी, कफ) घशांतून वर आणणें, खाकरणें.

**Hawk,** *v. t.* (हॉक्)—to carry (goods) about for sale, to peddle. फेरीनें विकणें, दारोदार-दारा-

वर विकणें. *Hawk'er*, *n.* an itinerant dealer. फेरीवाला.

**Hawk**, *n.* (हॉक्‌)—plasterer's square board with a handle. (गिलावा काढणाऱ्याची) गिलावा घेण्याची मूठवाली चौकोनी फळी.

**Hawse**, *n.* (हॉझ्‌)—a hawse-hole; situation of the cables when a vessel is moored with two anchors. (दोरखंडें बाहेर सोडण्याचा गलबताच्या नाळीवरील) होल. आंख; (गलबत दोन्ही नांगर टाकून राहिल्यावरची) दोरखंडांची स्थिति. *Haw'ser*, *n.* (हॉ'सर्‌,-अर्‌)—a large rope, a cable, often of steel. मोठा दोरखंड, (पोलादी) दोरखंड, चऱ्हाट.

**Haw'thorn**, *n.* (हॉ'थॉर्न्‌)—a thorny shrub bearing haws. एक कांटेरी फळझाड, झुडूप (कुंपणाच्या उपयोगाचें).

**Hay**, *n.* (हे)—grass mown and dried for fodder. वाळलेलें गवत, सुखी वैरण, सुका घास. *v. t. & i.* to put (land) under hay, to make into hay; to make hay. जमिनीवर वाळलेलें गवत घालणें, गवत वाळविणें; वैरणीकरितां गवत कापून वाळविणें. *To make h. of*, to throw into confusion. अस्ताव्यस्त टाकणें, गोंधळ करणें. *To make h. while the sun shines*, to seize opportunities. संधि साधणें, वाहत्या गंगेंत हात धुणें. *H. cock*, वाळलेल्या गवताची उडवी, -उटी. *H. fever*, summer disorder due to pollen or dust. गवताच्या तुसानें,-धुळीनें,-येणारें पडसें, खोकला. *H. fork*, वाळत घातलेलें गवत परतण्याची, गवत उडवीवर रचण्याची डेळकी. *Hay-rick*, *H.-stack*, वाळलेल्या गवताची उटी, उडवें, गंज.

**Hăz'ard**, *n.* (हॅ'झर्ड्‌)—a game at dice with complicated chances; chance; danger, risk. फाशांचा तवकलीचा खेळ; दैव, जोखीम; भय, धोका. *v. t.* to expose to hazard; to run the hazard *of*; to venture on. धोक्यांत घालणें; संकटांत पाडणें; संभव पाहणें.-*ous*, *a.* धोक्याचा; नशिबाचा, अनिश्चित. -*ously*, *adv.*,-*ousness*, *n.*

**Hāze**, *n.* (हेझ्‌)—fog, mist; obscurity, dimness, mental obscurity. धुकें; संदिग्धता, अंधार, मानसिक तेजोऱ्हास. *v. t.* to make hazy. धुकट,-धुरकट,-धूसर करणें.

**Hāze**, *v. t.* (हेझ्‌)—(Naut.) to harass with overwork; to bully. अवघड काम सांगून छळणें, सतावणें, वठणीस आणणें; त्रास देणें.

**Hā'zel**, *n.* (हे'झल्‌)—a bush with fruit, *h.-nut*, its wood, stick; reddish brown colour (of eyes). एक झुडूप,-झाड; त्याचें लांकूड, काठी; तांबुस पिंगट रंग. -*lly*, *a.*

**Hā'zy̆**, *a.* (हे'झि)—misty; vague; slightly drunk. धुक्याचा; अंधुक, अस्पष्ट; झिंगलेला.-*zily*, *adv.*;-*ziness*, *n.*

**Hē**, *pron.* (ही)—the male person or animal in question. तो, तो पुरुष. *n.* (*pl. Hes*) *& a.* पुरुष, पुंलिंगी. *He-goat*, बकरा. *He-man*, (*U.S.*) बलवान मनुष्य, धैर्याचा मनुष्य. *He-togs*, (*sl.*) पुरुषाचे कपडे.

**Head**, *n.* (हेड्‌)—the upper part of a body; a ruler, a chief, a principal person, head master; the source of a stream; a division in discourse; culmination; seat of intellect or imagination; life; a person; a thing like head in form: the antlers of a deer; (Naut.) sea-men's latrine in ship's bows; foam; cream. डोकें; अधिपति, मुख्य, मुख्याधिकारी; प्रवाहाचा उगम; प्रकरण, भाग; कळस, शिखर; मेंदू, मगज, डोकें; जीवित; इसम, जण; माथा, शेंडा, कणीस, झुपका; काळविटाच्या शिंगाच्या शाखा; खलाशांची मुत्री; दारूवरचा फेंस; दुधावरची साई. *v. t. & i.* to lead, to influence, to direct; to put oneself or be put at the head; to get ahead of; to furnish with a head; (also *h. down*) to lop off head of; to oppose; to front; (of ship) to make *for* (a place). पुढाकार घेणें, वजन पाडणें, (कार्याची) दिशा दाखविणें; प्रमुख होणें,-असणें; पुढें जाणें, आघाडी मारणें; (ला) तोंड बसविणें, बोंड,-माथा,-करणें, -ठोकणें; शेंडा छाटून-कापून-टाकणें; तोंड देणें; कडे तोंड असणें; (कडे) जाणें. *Cannot make h. or tail*, cannot understand. समजत नाहीं. *King's* or *Queen's h.* (*sl.*), पोस्टाचें तिकिट. *A hot h.*, hasty person. उतावळा इसम. *At the h. of*, च्या पुढें, अग्रणी, पुढारी. *To come to a h.*, तोंड फुटणें, पिकणें, शेवट-कळस होणें. *Old h. on young shoulders*, वयानें लहान पण शहाणपण मोठें. *Off one's h.*, crazy. वेडा, माथेफिरू. *Could do it on my h.*, (sl.) (मला) तें अगदीं सोपें जाईल. *Over one's h.*, above one, esp. of danger; beyond one's comprehension. डोक्यावर (येणारें संकट); न समजण्याजोगें, बुद्धीपलीकडचें. *By the h. and ears*, forcibly. जोरानें, बळजबरीनें. *Over h. and ears*, पुरेपूर बुडलेला. *From h. to foot*, नखशिखांत, सर्व शरीरभर. *H. of hair*, पुष्कळ केंस असलेलें,-केंसाळ डोकें. *H. over heels*, topsyturvy. खालीं डोकें वर पाय, उलटा. *By h. and shoulders*, पुरेपूर बुडलेला, बराच, पुष्कळ. *To keep one's h.*, to keep cool. डोकें शांत ठेवणें. *To keep one's h. above water*, (*fig.*) ऋणांत-कर्जांत-नसणें. *To lose one's h.*,

to be beheaded, to become confused. शिरच्छेद होणें, भान विसरणें, गोंधळांत पडणें,-गोंधळ होणें. *To make h.*, पुढें जाणें,-दामटणें,-ढकलणें. *To make h. against*, यशस्वी प्रतिकार करणें. *To put* (a thing) *into* (person's) *h.*, एकाद्याच्या डोक्यांत (गोष्ट) भरविणें, सुचविणें. *H. first, H. foremost*, सूरसुडी, खालीं डोकें करून मारलेली. (*fig.*) अकस्मात्, उतावीळपणें. *To give* (*a horse*) *his h.*, (घोड्याला) मोकळा-स्वैर-जाऊं देणें,-सोडणें. *To lay* (*our* etc.) *heads together*, एकत्र विचारविनिमय करणें. *To take* (a person's) *h. off*, एकाद्याला बोलून,-चडवडून-कंटाळा आणणें,-बेजार करणें. *To beat* (a person's) *h. off*, एकाद्यावर वरताण करणें, त्याला मागें टाकणें. *H. dress*, (विशेषतः स्त्रियांचें) शिरस्त्राण, शिरोवेष्टन. *H. gear*, टोपी, रुमाल, शिरोवेष्टन. *H. line*, पुस्तकाच्या पानावरील मथळ्याची ओळ. *H. man*, नायक, म्होरक्या, पुढारी. *H. master*, मुख्याध्यापक. *H. mistress*, मुख्याध्यापिका. *H. money*, डोईपट्टी. *H. phones*, telephone or wireless receiver attachable to listener's ears. (संदेश ऐकणाऱ्यानें) कानाला लावण्याचा संदेशग्राहक. *H. spring*, मूळ, उगम, उत्पत्तिस्थान. *H. stall*, डोक्याभोंवतीं गच्च बसणारा लगामीचा किंवा गळेबंदाचा भाग. *H.-stone*, थडग्यावरील दगड. *H. stone*, chief stone in foundation etc. पायाचा मुख्य दगड, कोना. *H. work*, डोक्याचें काम, मानसिक श्रम.-*headed*, *Head'less*, *aa*.

**Head'āche**, *n.* (हे'ड्-एक्)—pain in the head. मस्तकशूळ, डोकेंदुखी.-*achy*, *a.*

**Head'er**, *n.* (हे'डर्)—a plunge into water head first. खालीं डोकें करून पाण्यांत मारलेली उडी.

**Head'ing**, *n.* (हे'डिंग्)—that which stands at the head, the title at the head of an article or a page. मथळा.

**Head'land**, *n.* (हे'ड्-लॅन्ड्)—a promontory; a strip of land left unploughed at the end of field. टोंक, भुशीर; (शेताच्या बाजूची-कुंपणाजवळची) न नांगरलेली जमिनीची पट्टी, कडपट्टी.

**Head'long**, *adv.* (हे'ड्-लॉन्ग्)—with the head foremost, rashly, precipitately. अविचारानें, मागेंपुढें न पाहतां.

**Head'piece**, *n.* (हे'ड्पीस्)—a helmet; intellect, a man of intellect; an ornamental engraving at the head of chapter etc. शिरस्त्राण; डोकें, बुद्धि, बुद्धिमान मनुष्य; (पुस्तकांतील प्रकरणाच्या आरंभीची) शोभेची वेलबुटी, चित्र इ.

**Headquart'ers**, *n. pl.* (हेड्-क्वॉ'टर्स्)—centre of operations; commander-in-chief's residence. हुकूम सुटण्याची जागा, मुख्य कार्यालय, मुख्य ठाणें; सेनापतीचें राहण्याचें ठिकाण.

**Heads'man**, *n.* (हे'ड्स्मन्)—an executioner; a man in command of a whaling boat. मांग, शिरच्छेद करणारा; देवमासे पकडणाऱ्या बोटीचा नाखवा.

**Head'strŏng**, *a.* (हे'ड्-स्ट्रॉंग्)—self-willed. हट्टी, हेकेखोर. -*ness*, *n.* हट्टीपणा, हेकेखोरपणा.

**Head'way**, *n.* (हे'ड्-वे)—progress. प्रगति, (जहाजाची) गति.

**Head'ȳ**, *a.* (हे'डि)—intoxicating; rash, impetuous. मादक, अंमली (दारू इ.); हूड, उल्लू, वेगवान.—*dily*, *adv.*,—*diness*, *n.*

**Heal**, *v. t. & i.* (हील्)—to restore to health; to cure of a disease or wound; to become sound; to reconcile. निरोगी करणें; बरा करणें किंवा होणें; प्रकृति निर्दोष होणें; मिटविणें, समेट करणें. *H.-all*, universal remedy. त्रैलोक्यचिंतामणि (गुटिका इ.), सार्वत्रिक गुणकारी वनस्पति. *Heal'er*, *n. Time is a great healer*, काळ हा मानसिक व्यथा बरी करणारा आहे.

**Health**, *n.* (हेल्थ्)—soundness of body; condition of body; (*fig.*) soundness of mind, a sound state of mind; toast drunk in a person's honour. आरोग्य; शरीरस्थिति; मनःस्वास्थ्य; आरोग्यचिंतनार्थ पान,-पिणें.—*ful*, *a.* निरोगी; आरोग्यदायक; पथ्यकर, हितकर.—*fully*, *adv.*, —*fulness*, *n.*

**Health'y**, *a.* (हे'ल्थि)—having or conducive to good health. निरोगी; शरीरास हितकर. *Health'ily*, *adv.*,-*iness*, *n.*

**Heap**, *n.* (हीप्)—group of things lying one on another; (colloq.) a large number or amount. समुच्चय, ढीग, रास; गर्दी, जमाव, मोठी संख्या. *v. t.* to pile in a heap; to load; to accumulate. रास करणें; लादणें; सांठविणें, सांचविणें. *Struck all of a heap*, mentally prostrated. मानसिक दैन्य आलेला, शरणागत, केंविलवाणा.

**Hear**, *v.t. & i.* (हिअर्)—to perceive with ear; to listen or give audience to; to be informed of; to listen judicially to (a case etc.); to grant (a prayer). ऐकणें; श्रवण करणें; कानावर पडणें; माहिती मिळणें, कळणें; (खटला, सुनावणी) ऐकणें; चें ऐकणें, पकार देणें. *To h. one out*, एकाद्याचें म्हणणें पूर्ण ऐकून घेणें. *To h. from*, कडून पत्र,-निरोप-येणें. -*er*, *n.* श्रोता.

**Hear'ing**, *n.* (हिं'अरिंग्)—act of perceiving by the ear; the sense of perceiving sound; reach of the ear; a listening to facts and evidence. ऐकणें, श्रवण; श्रवणशक्ति, श्रुति; ऐकूं येण्याइतकें अंतर; सुनावणी (खटल्याची) ऐकणें, चौकशी करणें. *Hard of h.*, deaf. बहिरा, भेरा. *To give one a fair h.*, एकाद्याचें म्हणणें निःपक्षपात बुद्धीनें ऐकणें.

**Heark'en, Har–**, *v. i.* (हा'र्कन्)—to listen to. ऐकणें, लक्ष देणें.

**Hear'say**, *n.* (हिं'अरसे)—a gossip, a report, a rumour. लोकवार्ता, बातमी, अफवा, सांगोसांगी गोष्ट.

**Hearse**, *n.* (हर्स्)—a car for conveying the dead to the grave, a bier. प्रेत नेण्याची गाडी, तिरडी.

**Heart**, *n.* (हार्ट्)—organ of circulation; seat of the emotions or affections; soul, mind; courage; central or vital part, essence; (of land) fertility; (pl.) a suit of playing-cards marked with hearts. रक्ताशय, हृदय; अंतःकरण; मन; हिंमत, अवसान, धैर्य; केंद्रस्थान, मध्यभाग, सत्त्व; सुपीकता, जोम, कस; (अने॰) (लाल) बदामाचीं पत्त्याचीं पानें. *Smoker's h.*, heart disorder due to smoking. धूम्रपानानें होणारा काळजाचा रोग. *H. to h.*, मनमोकळेपणानें. *H.-to-h. talks*, मनमोकळेपणानें-खुल्या दिलानें-बोलणें,-बोलणीं करणें. *After* one's (*own*) *h.*, इच्छेनुसार. *My hh.*, (Naut.) शूर खलाशी. *H. of oak*, timber; a courageous man. ओकचें इमारती लांकूड; धैर्यवान-शूर-निधड्या छातीचा मनुष्य. *At h.*, मनाचा, अंतःकरणाचा,-पासून. *By h.*, तोंडपाठ, मुखोद्गत. *From one's h.*, sincerely. मनापासून. *In one's h.*, secretly. मनांतल्या मनांत, गुप्तपणें. *In h.*, जोमांत, उत्साहानें. *Out of h.*, in low spirits. खिन्न, दुःखी, उद्विग्न. *With all one's h.*, sincerely. अगदीं मनापासून, पूर्ण सदिच्छेनें. *To have* a thing *at h.*, एकाद्या गोष्टींत विशेष लक्ष घालणें, ची विशेष आवड असणें. *To lay* a thing *to h.*, एकाद्या गोष्टीचा गंभीरपणें विचार करणें. *Searchings of h.*, misgivings. संशय, कांक्षा, किंतु, अविश्वास. *H. and hand*, enthusiastically. उत्सुकतेनें, मनःपूर्वक. *In one's h. of hh.*, अगदीं मनांतील-गुप्त-भावनेप्रमाणें, अंतःकरणांत. *H. and soul*, with all one's energy. तनमनधनेंकरून, सर्व बळ एकवटून. *To have one's h. in one's mouth*, to be violently alarmed or startled. धास्ती वाटणें, एकदम दचकणें. *His h. is in the right place*, त्याचा हेतु चांगला आहे, सद्हेतु आहे. *To take h. of grace*, धैर्य धरणें. *To wear one's h. upon one's sleeve*, to lack proper reserve. मनांत-तोंडांत-न राहणें. *It does my h. good*, त्या गोष्टीमुळें मला आनंद होतो,-वाटतो. *H.-ache*, चिंता, हृद्रोग. *H.-beat*, छातीचा ठोका,-ची धडधड; (fig.) भावना. *H.-blood*, *H.'s-blood*, life-blood, life. जीवित, आयुष्य. *H.-break*, crushing sorrow. छाती फुटेल इतकें-भयंकर-दुःख. *H.-breaking,-broken*, छाती फाटेल इतकें, भेदरून गेलेला. *H.-burn*, छातीची-शीं-जळजळ. *H. burning*, jealousy, grudge. हेवा, दावा, जळफळ, गुप्त वैर. *H.-disease*, काळजाचा रोग. *H.-rending*, हृदयद्रावक. *H. sick*, despondent. निराश, हताश. *H.-sore*, मन दुखावलेला, मनाला लागून राहिलेला. *H.-strings*, one's deepest affections. मनापासूनचें-सखोल-प्रेम. *H.-whole*, not in love, sincere. निष्काम, अनन्यभावयुक्त, पूर्ण अंतःकरणाचा,-मनाचा.-*hearted*, *a.*-हृदयी.

**Heart'en**, *v. t. & i.* (हा'र्टन्)—to inspirit, to cheer (*up, on*). उत्तेजन देणें, धैर्य-प्रोत्साहन-जोर देणें.

**Heart'felt**, *a.* (हा'र्ट्-फेल्ट्)—sincere. मनापासूनचा, प्रामाणिक.

**Hearth**, *n.* (हार्थ्)—floor of fireplace. चूल, चुलीची जागा, आगटी, शेकोटी. *H. stone*, चुलीचा दगड.

**Heart'ily**, *adv.* (हा'र्टिलि)—in hearty manner; very. मनःपूर्वक, कळकळीनें, खरोखर; अतिशय, फार.

**Heart'less**, *a.* (हा'र्ट्-लिस्)—without affection, cruel, unfeeling, pitiless. निर्दय, निष्करुण, क्रूर, दुष्ट.-*ly*, *adv.*,-*ness*, *n.* कठोरता, निष्ठुरपणा.

**Hearts'ease**, *n.* (हा'र्ट्सईझ्)—pansy. एक फूलझाड.

**Heart'y**, *a.* (हा'र्टि)-vigorous; genial; sincere; (of meals) copious, large to satisfaction. जोमदार; आनंदी; निष्कपटी; भरपूर, आकंठ (भोजन). *My hearties*, *n.*, (as address to sailors) माझ्या शूर खलाशांनो! *Heart'iness*, *n.*

**Heat**, *n.* (हीट्)—hotness; hot weather; inflamed state of body; anger; pungency of flavour; single effort; warmth of feeling; violent state (of debate etc.); course at a race; sexual excitement in animals. उष्ण, उष्णता, गरमी; उष्ण हवा; ताप, दाह, आंगाचा डोंब; राग; तिखटपणा, झणझणीतपणा; एकच दम, तडाखा, एलगार; कडाका, भर; चांचपणीचा सामना,-ची शर्यत; (जनावरांचा) कामप्रकोप, माज, उधान. *v. t. & i.* to make or become hot; to inflame. तापणें, तापविणें; क्षुब्ध करणें,

पेटविणें, चेतविणें. *Red, white, h.*, धातु लाल, पांढरी, होण्याइतकी उष्णता,-आंच. *Latent h.*, घनपदार्थाचा द्रव, किंवा वाफ, व द्रवाची वाफ होण्याइतकी उष्णता. *Specific h.*, विशिष्ट उष्णता. *Prickly h.*, उष्ण देशांत अंगावर येणारें घामोळें. *At a h.*, झटक्यासरशीं, एका दमांत. *H. wave*, प्रचंड उष्णतेची, स्थलांतर करणारी, लाट. *Heat'er, n.* तापविणारा, तापक, तापविण्याचें यंत्र (चुला, इ.). *Heat'edly, adv.*

**Heath,** *n.* (हीथ्)—a flat waste tract of land; kinds of shrub. ओसाड जमीन, रान, जंगल; एक प्रकारचें झुडूप. *H.-bell*, हीथ् झुडुपाचें फूल. *Heathy, a.* झुडुपाळ.

**Heath'en,** *a. & n.* (हीदन्)—one who is not Christian, Jewish, or Mohammedan; an unenlightened person. रानटी अधर्मी मनुष्य; अज्ञाणी मनुष्य, रानटी, अशिक्षित.*-dom, -ism, nn.*;*-ish, a.,-ishness, n.*

**Hea'ther,** *n.* (हे'दर्)—kinds of shrub; a heath, ling. लहान रानटी झुडूप,-झाड; रान, जंगल.*-y, a.*

**Heave,** *v. t. & i.* (हीव्ह्)—to lift; to raise; to utter (groan, sigh) with effort; to throw; (Naut.) to haul up by rope, to pull (*at* rope); to rise as waves, swell up; to displace. वर उचलणें; उठविणें; (उसासा) टाकणें, सोडणें; फेंकणें, दोरीनें ओढणें; खेंचणें; (दोरी) खेंचणें, ओढणें; उचंबळविणें, उचंबळणें, फुगणें, भरून येणें; (थर इ.) दुसऱ्याच्या जागीं येणें,-वर येणें. *n.* heaving, displacement; (*pl.*) a disease of horses. वरखालीं होणें, उचंबळ, स्थलांतर; (अने.) घोड्यांचा रोग. *To h. to*, गलबत थांबविणें, उभें करणें, नांगरणें. *To h. in sight*, to become visible. दिसूं लागणें, दृष्टीस पडणें. *H. ho*, 'हेलंवेसे', नांगर वर ओढतांना खलाशांचा जोर येण्याकरितां मोठा आवाज. *H. of the sea*, समुद्राच्या लाटांच्या हेलकाव्यांनीं गलबताच्या गतीला मिळणारा जोर.

**Hea'ven,** *n.* (हे'व्हन्)—the sky, the firmament; the regions above; the abode of God and his angels; place of bliss; God, Providence. आकाश, आभाळ, गगन, अंतरिक्ष; भूलोकाच्या वरचे लोक; स्वर्ग, देवलोक, सुरलोक; परमसुखाचें धाम, मोक्ष; देव, परमेश्वर, परमात्मा. *Seventh h., h. of hh.*, (ज्यू लोकांच्या मतें) सप्त-सात-स्वर्गांतील अत्युच्च सातवा स्वर्ग. *By h.*, good hh.! देवाच्यान्! नशीबच्च! देव भलें करो! *H.-born*, of divine origin. दैवी, स्वर्गीय. *H.-ward, a.*; *H.-ward,-s, adv.*

**Hea'venlў,** *a.* (हे'व्हन्लि)—of heaven, divine; of the sky. स्वर्गीय; दिव्य; आकाशांतील. *The H. city*, paradise. नंदनवन. *H.-minded*, holy, पवित्र, भक्त, निष्ठ.*-liness, n.*

**Hea'vilў,** *adv.* (हे'व्हिलि)—laboriously, densely, with ponderousness; sorrowfully, dejectedly. फार जोरानें; दुःखानें, खिन्न अंतःकरणानें.

**Hea'vў,** *a.* (हे'व्हि)—of great weight, ponderous; of great specific gravity; abundant; dull, tedious; oppressive, grievous, hard to bear, sad; laden *with*; striking or falling with force; (of ground) clinging; (of food) hard to digest; (of sky) overcast; clumsy; intellectually slow; unwieldy; despondent; drowsy; (Mil.) carrying heavy arms. भारी, जड; मोठें वजनशीर,-विशिष्ट गुरुत्वाचें; विपुल, समृद्ध; मंद, कंटाळवाणें; त्रासदायक, पीडक, जाचक, असह्य, दुःखित; (नें) भारावलेलें,-लादलेलें; जोराचा, जबर, वेगाचा; चिकट (जमीन); पचण्यास कठीण, जड, अपथ्य (अन्न); अभ्राच्छादित, काळें; ओबडधोबड; मंदबुद्धीचा; अवजड, वजनशीर; हताश, निराश; झोपाळू; अवजड रणसाहित्यवाहू,-वाहक. *n.* (*pl.*) Dragoon Guards; heavy artillery. रक्षक घोडदळ; जड तोफखाना. *adv.* heavily. अतिशय, वजनदाररीतीनें. *H. metal*, (fig.) प्रबळ-भयंकर-शत्रु,-प्रतिपक्षी. *H. news*, दुःखाची-दुःखकारक बातमी. *Time hangs h.*, passes slowly. वेळ जातां जात नाहीं,-कंटाळवाणा वाटतो. *H.-armed*, जड शस्त्रास्त्रें किंवा चिलखत धारण करणारा. *H.-hearted*, खिन्न, दुःखी, उदासीन, सचिंत. *H.-weight*, boxing weight, 11 stone 4 lb. भारी वजनाचा मुष्टियोद्धा,-त्याचें वजन. *Heav'iness, n.* वजन, जडपणा, जडत्व, सुस्ती, इ. *Heavy'ish, a.*

**Hĕb'domad,** *n.* (हे'ब्डोमॅड्)—a week. आठवडा, सप्ताह. *Hebdom'adal, a.* weekly. सात दिवसांचा, साप्ताहिक. [Gk *hepta*, Sk. *sapta*, seven]

**Hē'bē,** *n.* (ही'बि)—(Gk Myth.) the goddess of youth; (joc.) a waitress. यौवनदेवता; वाढपीण, स्त्रीनोकर.

**Hĕb'ĕtate,** *v. t. & i.* (हे'बेटेट्)—to make, become, dull. बोथट करणें,-होणें, तीव्रता मोडणें.

**Hĕbrā'ic,** *a.* (हीब्रे'इक्)—of Hebrew or the Hebrews. हीब्रू भाषेचा, हीब्रू लोकांसंबंधीं.*-ically, adv.*; *He'braism, n.* हीब्रू लोकांचा स्वभावविशेष; हीब्रू लोकांची चालरीत, त्यांच्या भाषेंतील विशेष शब्दप्रयोग. *He'braist, n.* हीब्रूभाषापंडित,-शास्त्रवेत्ता, हीब्रू धर्मानुयायी.

**Hē'brew,** *n.* (ही'ब्रू)—Israelite, Jew; the language of the ancient Hebrews; (colloq.) unintelligible speech. हीब्रू, ज्यू; त्यांची भाषा;

न समजणारी भाषा. *a.* हीब्रू (जात, भाषा). *H.-wise*, (of writing) उजवीकडून डावीकडे (लिहिण्याची पद्धत).

**Hĕc'atŏmb**, *n.* (हे'कटॉम्)—a great public sacrifice (of a 100 oxen). शतगोमेध, शतबलिदान, सरसहा कत्तल.

**Hĕck**, *n.* (हेक्)—a frame obstructing passage of fish in a river. मासे धरण्याची ताटी.

**Hĕc'kle**, *v. t.* & *n.* (हे'कल्)—to catechize (esp. a candidate) severely; to dress *flax*, *hemp*, with a hackle. खोंचून प्रश्न विचारणें; पिंजणीनें-फणीनें विंचरणें, विंचरून साफ करणें.

**Hĕc'tĭc**, *a.* (हें'क्टिक्)—consumptive; morbidly flushed; exciting, wild. क्षयाचा, क्षयी; रोगट, लाली-सूज-आलेला: स्फुरण आणणारें, विकारी, क्षोभक. *n. hectic fever*, patient, flush. कफक्षय-ज्वर, कफक्षयांत येणारा रोजचा ताप, कफक्षयी, पू-स्राव. [Gk *hektikos*, habitual]

**Hĕcto-**, (हेक्टो)—*in comb.*=100. शत-,शंभर. *H.-gram(me)*, शंभर ग्रामचें वजन.—*graph*, an apparatus for multiplying copies. (चरबीचा मध-ग्लिसरिन-लावून सरसाच्या पाटावर) पुष्कळ प्रति काढण्याचें यंत्र.—*litre*, *liter*, (-लीटर्), शंभर लीटरचें (३·५३१ घन फुटाचें) घनमाप. *-metre*, (-मीटर्), शंभर मीटर, (३२८·०८९ फूट).

**Hĕc'tor**, *n.* (हे'क्टर्)—a bully, a blustering fellow. तिस्मारखान, अरेराव. *v. t. & i.* to bully, to bluster. गुरकावणें, अरेरावी करणें, चढाईच्या गोष्टी करणें. [Gk *Hektor*, Trojan hero in *Iliad*]

**Hed'dles**, *n. pl.* (हे'डल्स्)—(weaving) small cords or wires through which the warp is passed in a loom before going through the reed. (विणकामांतील) वया, ओंव्या.

**Hĕdge**, *n.* (हेज्)—a fence of bushes or low trees; a line of things or persons forming a barrier; (fig.) a barrier; (Betting) an act, means, of hedging. वय, वई, कुंपण, आवार; वाटेंतील-मार्गांतील-अडगळ, अडथळा; (जुगाराच्या खेळांत) एकाद्यावरील संकट-बोजा-कमी करणें, त्याचें साधन. *v. t. & i.* to surround with a hedge; to make or trim hedges; to hem *in*; to fence *off*; to secure oneself against loss (in betting); to avoid committing oneself. वय-कुंपण घालणें, आवार-वईवाडा-करणें; वई करणें,-छाटणें; वेढणें, कोंडणें; कुंपण घालून दूर ठेवणें,-आंत येऊं न देणें; (जुगारांत) नुकसानी न येईल अशी काळजी घेणें; स्वतःला गुंतवून न घेणें. *Quickset h.*, जिवंत झुडपांचें कुंपण; *dead h.*, तोडलेल्या फांद्यांची-शिऱ्यांची वई. *It doesn't grow on every h.*, it is rare. तें दुर्मीळ आहे. *H. priest*, अशिक्षित गांवढळ उपाध्याय. *H.-row*, (हेज्-रो) bushes forming a hedge. झुडपांचें कुंपण. *H.-school*, गांवढळ शाळा, तात्पुरती-तात्यापंतोजीची शाळा. *H. sparrow*, (हेज्-स्पॅरो), a song-bird. एक गाणारा पक्षी. *-er*, *n.* वई घालणारा,-दुरुस्त करणारा.

**Hĕdge'hŏg**, *n.* (हे'ज्-हॉग्)—kinds of spiny animals; a porcupine; prickly seed-vessel of some plants; a person hard to get on with. एक जातीचें जनावर; साळू, साळिंदर; कांहीं वनस्पतींचें कांटेरी बीज-पात्र,-बोंड; हेकट,-हट्टी,-न पटवून घेणारा मनुष्य.-*ggy*, *a.* दुराराध्य (मनुष्य).

**Hēdŏn'ĭc**, *a.* (हीडॉ'निक्)-of pleasure. सुखासंबंधीं. *n. pl.* सुखापेक्षक कर्मवाद.

**Hē'donĭsm**, *n.* (ही'डॉ-निझम्)—the doctrine that pleasure is the chief good. सुख हेंच अंतिम साध्य मानणारें मत.*-ist*, *n.*;*-istic*, *a.* [Gk *hedone*, pleasure]

**Heed**, *v. t.* (हीड्)—to attend to, to take notice of. मनावर घेणें, लक्ष देणें. *n.* care, attention. काळजी, लक्ष, अवधान, जपणें.*-ful*, *a.* सावध, सावधान.*-fully*, *adv.*,*-fulness*, *n.*

**Heed'less**, *a.* (ही'ड्-लेस्)—negligent, careless, inattentive. दुर्लक्ष करणारा, निष्काळजी, गैरसावध. *-ly*, *adv.*,*-ness*, *n.*

**Hee'-haw'**, *n.* (ही' हॉ')—the ass's bray; a loud laugh. गाढवाचें ओरडणें, रासभध्वनि; मोठ्यानें हंसणें. [imit.]

**Heel**, *n.* (हील्)—the hinder part of human foot; a quadruped's hind foot; hinder part of hoof, (*pl.*) hind feet; part of stocking etc. that covers heel, part of boot that supports heel; a thing like heel in shape or position. पायाची टांच, खोट; जनावराचा खूर, पाय; खुराचा मागचा भाग, (अने॰) जनावराचे मागचे पाय; पायाची टांच झांकणारा (पायमोजाचा) भाग, जोड्याची खोट, बुटाचा तळ; टांचेच्या आकाराची वस्तु. *v. i. & t.* to touch ground with heel; to furnish (boot) with heel; to chase or follow closely; (Football) to pass ball *out* with the heels; (Golf) to strike (ball) with the club-heel. (नाचतांना वगैरे) जमिनीला खोट लावणें; (जोड्याला) खोट घालणें; पाठलाग करणें; टांचेनें पदकंदुक प्रति-पक्ष्यांच्या मागें पार उडविणें; गोलकदांडूच्या बांकड्या टोंकानें चेंडू हाणणें. *The h. of Achilles*, the only weak point or spot. एकटा एकच दोष, मर्म, भेद्य स्थल. *At h.*, *at*, *on*, *upon*, *one's hh.* अगदीं मागोमाग, पाठोपाठ. *To h.*, (o·

dog), अगदीं मागोमाग, हांकेसरसा येणारा (कुत्रा). *Hh. over head, head over hh.*, खालीं डोकें वर पाय (अशी स्थिति), उफराटा, उलटा, कोलांटी (उडी). *To kick one's hh.*, तिष्ठत-वाट पहात-उभें राहणें. *To lay, clap, by the hh.*, to imprison. पायांत बिड्या-बेड्या-ठोकणें, तुरुंगांत टाकणें. *To show a clean pair of hh.*, *to take to one's heels*, to run away. पळून जाणें, पोबारा करणें, धूम ठोकणें. *To have the hh. of*, धांवून मागें टाकणें.-च्या पुढें जाणें. *To turn on one's h.*, झटकन मागें वळणें. (Cribbage) *his hh.*, पत्त्याचीं पानें वांटणाऱ्यानें फोडलेला गुलाम (दोन गुण). *H.-ball*, a shoe-maker's composition of wax and lamp-black. (जोड्यांना पालीश-सफाई-करण्याचें) काजळी मेण. *H. tap*, जोड्यांतील टांचेच्या चामड्याचा जाडपणा; कांचेच्या पेल्याच्या तळीं राहिलेली दारू. *Heel'ed, a.* (U. S.) रिव्हॉल्व्हर-पिस्तूल-घेतलेला; पैसे पुरविलेला.

**Heel**, *v. i. & t.* (हील्)—(of ship) to lean or tip to one side; to make heel. (गलबत) एका बाजूस कलंडणें,-कलणें; कलंडावयास-कलण्यास-लावणें. *n.* inclination of heeling ship. कलंडणाऱ्या गलबताचा कल,-झोंक.

**Hĕft**, *n.* (हेफ्ट्)—(U. S.) weight. वजन. *v. t.* वजन अजमावण्याकरितां उचलणें. *Hef'ty, a.* मजबूत, धट्टाकट्टा; जड.

**Hĕgemŏn'ic**, *a.* (हीगिमॉ'निक्, हेजि— )—ruling, supreme. मुख्य, सर्वश्रेष्ठ. *Hegem'ony, n.* leadership. धुरीणत्व, पुढारीपण. [Gk *hegemon*, a leader]

**Hei'fer**, *n.* (हे'फर्)—a young cow that has not had a calf. वासरूं न झालेली गाय, कालवड, पाडी, गोजी.

**Heigh**, *int.* (हे)—an expression of encouragement or inquiry. हा! हा! *H.-ho*! अरे बापरे! वुमलों!

**Height**, *n.* (हाइट्)—measure from base to top; elevation above ground or sea level; high point, top; utmost degree. उंची; उंचवटा; शिखर; कळस, भर, पराकाष्ठा.

**Height'en**, *v. t. & i.* (हा'इटन्)—to make or raise higher; to intensify; to exaggerate; to rise. उंच करणें; वाढवणें, उत्कर्ष करणें, भडाकणें; अतिशयोक्ति करणें; वाढणें.

**Hei'nous**, *a.* (हे'नस्)—atrocious, hateful. घोर, उग्र, अघोर, किळसवाणा, ओंगळ (गुन्हा, गुन्हेगार). *-ly, adv.*, *-ness, n.* अघोरपणा, ओंगळपणा.

**Heir**, *n.* (एअर्)—a person entitled to property or rank as legal representative of the former holder; one to whom something is due. वारस, दायाद, वारसदार; (चा) वांटेकरी, हक्कदार वारसदार. *H. apparent*, युवराज, पुढील-भावी-हक्कदार. *H.-at-law*, एकाच रक्तसंबंधानें वारसदार,-हक्कदार.*-dom, n.* वारसा.*-ess, n. fem.* वारसदारीण, हक्कदारिण, स्त्रीवारस. *H.-loom*, (वंशपरंपरागत मिळकतीबरोबर) वारसाहक्कानें मिळणाऱ्या वस्तु; वंशपरंपरागत वतन, (अं०) गुण इ. *H.-less, a.*; *H.-ship*, वारससंबंध, वारसा (हक्क).

**Held**, *pa. t. & pa. p.* of Hold.

**Hĕl'ical**, *a.* (हे'लिकल्)—spiral. कानाच्या पाळीसारखा, वर वर चढत जाणारा, नागमोडी, सर्पिल. *-ly, adv.*

**Hĕl'icon**, *n.* (हे'लिकॉन्)—the mountain sacred to Muses; the source of poetic inspiration. (ग्रीक) विद्यादेवतांचें निवासस्थान असलेला पर्वत; काव्यस्फूर्तीचा उगम,-चें मूळ.*-co'nian, a.*

**Hĕl'icŏpter**, *n.* (हे'लिकॉप्टर्)—a flying-machine that should rise vertically by airscrews. हवा कापणाऱ्या मळसूत्री रचनेनें सरळ उंच जाणारें विमान. [Gk *helikos*, screw, *pteron*, wing]

**Hēlio-**, (हीलिओ- )—in comb.=sun. सौर. *-cen'tric, a.* सूर्याला मध्य कल्पून मोजलेला, सूर्यकेन्द्रक.*-chromy, n.* रंगीत-रासायनिक रंगांतील-प्रकाशलेख, छायाचित्र, फोटो.*-graph*, प्रकाशलेख, फोटो; सूर्याचा प्रकाशलेख घेण्याचें यंत्र; सूर्यप्रकाशाची चमक दाखवून संदेश देणारें यंत्र. *v. t.* अशा यंत्रानें संदेश पाठविणें *-m'eter. n.* दोन ताऱ्यांमधील अंतर मोजण्याचें यंत्र, तारांतरमापक. *-scope*, सूर्य पाहण्याची दुर्बीण, सूर्यदर्शक (यंत्र). *-the'rapy*, use of sun-baths in treating diseases. सूर्यप्रकाशानें-(रोग्याला) उन्हांत बसवून-रोग बरे करणें, आतपस्नान.*-trope, n.* सूर्यकमळ, त्याचा रंग,-वास. रक्त धांवविणारा दगडी ताईत; सायनयंत्र.*-trop'ic, a.* प्रकाशोन्मुख-सूर्यप्रकाशाच्या दिशेनें वळणारी (वनस्पति,-रें झाड).

**Hē'lium**, *n.* (हीलिअम)—a transparent gas first inferred in sun's atmosphere सूर्याभोंवतील वातावरणांत प्रथम शोध लागलेला एक विरळ वायु, पारदर्शक वायु.

**Hē'lix**, *n.* (ही'लिक्स्, हेलिक्स्)—a spiral; the external part of the ear; a snail-shell. पेंच, पेंच; कानाची पाळ,-पाळी; गोगलगाईच्या जातीचा किडा.

**Hĕll**, *n.* (हेल्)—abode of the dead or of the damned; a state of misery; a gaming-house; (*sl.*) drunken frolic. नरक, पाताळ; अधोगति; दुःस्थिति, दुर्दशा; जुगारी अड्डा; दारुड्यांचा गोंधळ,-नाच. *A h. of a noise*, considerable noise. भयंकर गोंगाट. *H.-cat*, भयंकर,-

क्रूर-स्री, हडळ, जखीण. *To ride h. for leather*, भयंकर वेगानें (घोड्यावरून) दौड मारणें.-*ish, a.* नरकाचा, अतिदुष्ट.-*ishly, adv.*, -*ishness, n.*; -*ward, adv.*

**Hĕll'ĕbōre**, *n.* (हे'लिबोअर्)—kinds of plant. (पूर्वी वेडसरपणा घालविण्यासाठीं उपयोगांत येणारी) काळी कुटकी, कटुरोहिणी; कांहीं प्रकारचीं झाडें, वनस्पति.

**Hĕll'ēne**, *n.* (हे'लीन्)—a native of ancient or modern Greece. ग्रीस देशाचा रहिवासी, ग्रीक मनुष्य.-*nic, a.*; -*nism, n.* ग्रीक भाषेचा शब्दप्रयोग; ग्रीस देशची संस्कृति.-*nist, n.* ग्रीक भाषापंडित; ग्रीक भाषा बोलणारा परकी मनुष्य.

**Hĕlm**, *n.* (हेल्म्)—tiller or wheel for managing rudder; the steerage; guidance. सुकाणूं, सुकाण, कर्ण; सुकाणूं धरणें; सूत्रधारकत्व, चालकत्व. *v. t.* सुकाणूं धरणें, सूत्रें चालविणें. *To take the h.*, to assume control. चालकत्व पतकरणें, चालक-नियंता-होणें. *Helms'man, n.* a steersman. सुकाण्या, कर्णधार, चालक.

**Hĕlm**, *n.* (हेल्म्)—(arch.) a helmet; (also *h. cloud*) a cloud forming over mountain in a storm. शिरस्त्राण, जिरेटोप; वादळाचे वेळीं पर्वतावर बनणारा ढगाचा टोप.-*ed, a.* शिरस्त्राण घातलेला.

**Hĕl'mĕt**, *n.* (हे'ल्मिट्)—a defensive head-cover; a kind of hat for hot climates; the upper part of a retort; a helmet-like thing or cover of a flower, or mollusc. शिरस्त्राण; उष्ण देशांत घालण्याची साहेबी टोपी, नलिकामुकुट; शिरस्त्राणासारखी टोपी,-सारखें वेष्टण,-कवच.-*ed, a.*

**Hĕl'mĭnth**, *n.* (हे'ल्मिन्थ्)—(intestinal) worm. (आंतड्यांतील) कृमि.-*ic*,-*oid, aa.* कृमीच्या आकृतीचा, कृमीसारखा.-*ology, n.* कृमिशास्त्र.

**Hĕl'ot**, *n.* (हे'लट्)—a Spartan slave; a serf. प्राचीन स्पार्टामधील गुलाम; दास, बंदा नोकर. -*ism*,-*try, nn.*,-*ize, v. t.*

**Hĕlp**, *v. t.* (हेल्प्)—to aid, to assist; to remedy; to prevent, to avoid. मदत करणें; उपाय करणें; टाळणें. *n.* aid; remedy; helper; (U. S.) a domestic servant. मदत; इलाज, उपाय; मदतनीस; घरकाम करणारा नोकर-चाकर. *To h. forward*,-*on*, (पुढें नेण्यास) हातभार लावणें, मदत करणें. *To h. out*, (दुसऱ्यास संकटांतून) वाचविणें, बाहेर काढणें. *To help* (a person) *on with coat*, आंगरखा घालायला मदत करणें. *To help* (one) *off with coat*, आंगरखा-कोट-काढायला मदत करणें. *To help* (a person) *to*, to serve (him) with (food). (अन्नाचा, खाद्य पदार्थांचा, जेवतांना) पुरवठा करणें, (पदार्थ) वाढणें. *Help'ing, n.* मदत; वाढप, वाढलेलें जेवण, पदार्थ इ.

**Hĕlp'ful**, *a.* (हे'ल्प्-फुल्)—that gives assistance, useful, serviceable. उपयोगी, उपयोगीं पडणारा, उपयुक्त.-*ness, n.*,-*lly, adv.*

**Hĕlp'lĕss**, *a.* (हे'ल्प्-लिस्)—unable to help oneself, without help, feeble, weak. असहाय, अशक्त, दुर्बळ.-*ly, adv.*, -*ness, n.*

**Hĕlp'māte, Hĕlp'meet**, *nn.* (हे'ल्प्मेट्,-मीट्)—a helpful companion esp. husband or wife. सहाय, मदतगार, पति किंवा अर्धांगी,-पत्नी.

**Hĕl'ter-skĕl'ter**, *adv., a. & n.* (हे'ल्टर्-स्के'ल्टर्)—in disordered haste. सैरावैरा, इतस्ततः; धांदल, गडबड.

**Hĕlve**, *n.* (हेल्व्ह्)—handle of a tool. हत्याराचा दांडा, मूठ.

**Hĕm**, *n.* (हेम्)—the border of a garment turned down and sewed; a border, margin. गोट, दुमडून शिवलेली कडा; सुरळ; किनारी, कांठ. *v. t.* to sew edge; to enclose, to confine. सुरळ घालून शिवणें, सुरळणें; घेरणें, वेढणें.

**Hĕm**, *int.* (हेम्)—(calling attention or expressing hesitation). हुं! ऊंहूं! *n.* हुं! ऊंहूं! शब्द. *v. i.* to utter *hem*, to clear throat, to hesitate in speech. हुं! ऊंहूं-करणें, खांकरणें, घसा साफ करणें, बोलतांना अडखळणें.

**Hĕmi**,- *pref.* (हेमि-)—(Gk) half. अर्ध.- -*crania, n.* अर्धी कपाळदुखी, अर्धशिशी.-*cycle, n.* a half-moon figure. अर्धचंद्राकृति.-*ple'gia, n.* paralysis of one side. अर्धांग (वायु), पक्षघात.-*ptera, n.* (एकावर एक पंख असलेल्या प्राण्यांचा) अर्धपक्ष कीटकवर्ग.

**Hĕm'ĭsphere**, *n.* (हे'मि-स्फीअर्)—half sphere; half the celestial sphere; half the earth. अर्धगोल; खगोलार्ध; भूगोलार्ध, पृथ्वीचा अर्धा भाग. -*eric*,-*erical, aa.*

**Hĕm'ĭstĭch**, *n.* (हे'मिस्टिक्)—half line of a verse, a verse not completed. श्लोकार्ध, चरण.

**Hĕm'lŏck**, *n.* (हे'म्लॉक्)—a poisonous plant used as sedative, potion got from this. एक औषधी विषारी वनस्पति,-त्यापासून काढलेला अर्क,-रस.

Hemorrhage, see Haem-.

**Hĕmp**, *n.* (हेम्प्)—herbaceous plant, native of India, with fibre used for rope, &c.; its cortical fibre; (facet.) a rope for hanging; plants yielding fibre. ताग, सण, अंबाडी; तागाचें साल, दोर; फांशी देण्याचा दोर; तंतु काढतां येणाऱ्या वनस्पति.—*en, a.* तागाचा, अंबाडीचा, तागासारखा.

**Hĕm-stitch**, *n. & v. t.* (हेॅम्स्टिच्)—a kind of ornamental stich. शोभेची शिवण (चालणें).

**Hĕn**, *n.* (हेन्)—female of birds of the common domestic fowl; any female bird. कोंबडी; (पक्ष्यांची) मादी. *Like a h. with one chicken*, absurdly fussy. विलक्षण गडबड्या,-धांदरट. *H. & chickens*, डेझी व इतर (फुल-) झाडें. *H.-coop*, *n.* खुराडें, खुडी. *H. crab*, *H. lobster*, (स्त्रीलिंगी) खेंकडा, मासा. *H.-harrier*, एक जातीचा हिंस्र पक्षी,-ससाणा. *H.-hearted*, faint-hearted. दुर्बळ, स्त्रीहृदयी. *H.-party*, स्त्रीसंमेलन. *H.-roost*, कोंबडीं-बदकें-रात्रीचीं झोंपतात ती जागा,-तें खुराडें. [A.S., fem. of *hano*, cock]

**Hĕn'bāne**, *n.* (हेॅन्-बेन्)—narcotic and poisonous drug, a poisonous herb. भांग, गांजा, खुरासनी ओंव्याचें साड, खुरासनी ओंवा.

**Hĕn'pĕcked**, *a.* (हे'न्-पेक्ट्)—domineered over by one's wife. बायकोच्या ताब्यांत असलेला, स्त्रीवश, बाइल्या, बाईलबुध्या.

**Hĕnce**, *adv.* (हेन्स्)—from here; from now; as a result of or inference from this. येथून, आतांपासून; ह्यामुळें, म्हणून, ह्या कारणास्तव. *H.!* (poet.) go away. नीघ! *H. with*, away with. घेऊन जा. *Go h.*, die. मर! *Three years h.*, आजपासून तीन वर्षांनीं.

**Hĕnce'forth**, **Hĕnce'fŏrward**, *adv.* (हे'न्स्-फोर्थ्, हे'न्स्-फॉर्वर्ड्)—from this time forward. यापुढें, अतःपर.

**Hĕnch'man**, *n.* (हे'न्च्मन्)—(hist.) a squire, a page of honour; a trusty follower; a political supporter. तैनातींतील सैनिक, हुजऱ्या; अनुचर, अनुयायी; (राजकीय) मतानुयायी, पक्षीय.

**Hĕndĕc'agon**, *n.* (हेन्डे'कगॉन्)—a plane figure of eleven angles or sides. एकादश कोणाकृति, एकादश कोन. [Gk *hendeca*, eleven]

**Hĕndĕcasy̆ll'able**, *n.* (हेन्डेकसि'लबल्)—अकरा अवयवी-अक्षरी-कविता.

**Hĕndi'adȳs**, *n.* (हेन्डा'य्-अडिस्)—expression of a complex idea by two words connected by 'and', *e. g. in cups & gold* for *in golden cups*. 'आणि' नें जोडलेल्या दोन निराळ्या शब्दांनीं एकच कल्पना सांगणें. [Gk=one thing by two]

**Hĕn'nȳ** *a.* (हे'नि)—hen-like. कोंबडीच्या बदकासारखें. *n.* a hen-like cock. कोंबडीसारखा कोंबडा.

**Hĕn'rȳ**, *n.* (हे'न्रि)—unit of inductance. चुम्बकीय प्रवर्तनाचा,-उपपादनाचा,-एकक.

**Hĕpăt'ic**, *a.* (हिपॅ'टिक्)—of or good for the liver; like the liver in colour or form. यकृताचा, यकृतासंबंधीं; यकृताच्या रंगाचा,-आकाराचा. [Gk *hepar*, liver]

**Hepta-**, (हेप्टॅ-)—in comb., seven. सप्त,-सात-*H.-chord*, *n.* सात-तारी वाद्य. सप्तस्वरयोजना, *H.-glot*, *a. & n.* सात भाषेंतील (ग्रंथ) *H.-gon*, a plane rectilineal figure of seven sides. सप्तकोणाकृति, सप्तकोण; *-al*, *a.* *H.-hed'ron*, a solid of seven faces. सात बाजूंचा घन.

**Hĕp'tad**, *n.* (हे'प्टड्)—a set or group of seven. सातांचा संच,-समुदाय.

**Hĕp'tärchȳ**, *n.* (हे'प्टार्कि)—a government by seven rulers. सप्तसत्ताक राज्य. *-chic*, *-chical*, *aa.*

**Her**, *pron. & a.* (हर्)—(objective and possessive case of She.) तिला, तिचा. (colloq.) ती. *Hers*, तिचा.

**Hĕ'rald**, *n.* (हे'रल्ड्)—an officer who made State proclamations, etc.; a messenger; a forerunner. ललकाऱ्या, भाट; वार्ताहर, निरोप्या, दूत; पुढें जाऊन बातमी कळविणारा, अग्रदूत, सूचक. *v. t.* to proclaim, to foretell. पुकारा करणें, ललकारी देणें, पूर्वसूचना देणें.

**Herb**, *n.* (हर्ब्)—a plant (whose leaves, &c. are used for food, medicine, &c.), a plant the stem of which dies every year. वनस्पति (ज्याचें मूळ दर वर्षास सुकून मरतें असा) रोपा, वुडि, औषधि. *Herba'ceous*, *a.* वनस्पतीचा,-*border*, (in gardens) नेहमीं फुलणाऱ्या फुलझाडांचा विभाग. *Her'bal*, *a. & n.* वनस्पतीसंबंधीं (पुस्तक), वनस्पतिगुणधर्मवर्णनात्मक ग्रंथ. *Her'balist*, *n.* वनस्पतिवेत्ता; काष्ठौषधिविक्रेता, वनस्पति विकणारा, गांधी. *Herb'arium*, *n.* शुष्क वनस्पति ठेवण्याची पेटी, कपाट इ. *Herb'iferous*, *a.* वनस्पति धारण करणारा. *Herb'ivorous*, *a.* वनस्पति खाऊन राहणारा, शाकतृणादिजीवी. *Herb'y*, *a.* वनस्पतिप्रचुर, वनस्पतिगुणधर्मी.

**Herb'age**, *n.* (हर्'बिज्)—herbs; pasturage, green food for beasts; (Law) right of pasture on another's ground. झाडपाला; ओला चारा, हिरवळ; गुरेंचराईचा हक्क.

**Hercū'lean**, *a.* (हर्क्यू'लिअन्)—strong as Hercules; (of task) of great difficulty. हरक्यूलीझसारखा; महत्प्रयासाचें, अतिदुष्कर.

**Her'culēs**, *n.* (हर्'क्युलीज्)—a Greek hero famous for his strength; a strong man; northern constellation. (ग्रीक पुराणांतील) महाशक्तिमान योद्धा हर्क्यूलीझ, बलभीम; शक्तिमान् मनुष्य, मल्ल; उत्तर गोलार्धांतील 'गौरी' तारकापुंज. *Pillars of H.*, जिब्राल्टरच्या सामुद्रधुनीच्या दोन्हीं बाजूचे खडक. (*fig.*) अत्यसीमा,-मर्यादा.

**Herd**, *n.* (हर्ड्)—a company of animals, esp. cattle, feeding or travelling together; the common people; a herdsman. (जनावरांचा, गुरांचा) कळप, तांडा, झुंड, खिल्लार; घोळका, जमाव;-पाळ, धनगर, गुराखी, हेटकरी. *v. i. & t.* to go in a herd; to tend (sheep etc.). कळप करून राहणें,-जाणें, जमावानें-घोळक्यानें-जाणें; पाळणें, निगा राखणें. *The h. instinct*, gregariousness and mutual influence as a psychological factor. कळप-संघ-करून राहण्याची प्रवृत्ति, संघप्रियता. *H.-book*, जनावरांच्या-डुकरांच्या-वंशावळीचें पुस्तक. *A cow-h.*, गुराखी, गाई राखणारा.

**Herds'man**, *n.* (ह'र्ड्स्-मन्)—keepr of herds. धनगर, गुराखी.

**Here**, *adv.* (हिअर्)—in or to this place; at this point; in this life; now; in this matter. या ठिकाणीं, येथें; या वेळीं; या जन्मीं, इहलोकीं; आतां; ह्या गोष्टींत. *n.* this place or point. हें स्थान,-ठिकाण. *Here*! (हजेरी देतांना) हजर! *H. below*, ह्या जगांत, इहलोकीं. *H. & there*, in various places. आजूबाजूस, इकडेतिकडे, जागोजाग. *H., there and everywhere*, all about. सर्वत्र. *Neither h. nor there*, not to the point, of no importance. लागू न पडणारा, गैरलागू, मुळींच महत्त्व नसलेला (मुद्दा). *H. about,-s*, येथेंच जवळपास. *H. at*, (arch.) ह्या ठिकाणीं. *H. by*, by this means, as a result. यानें यावरून, यामुळें. *H.inafter*, *adv.* या (लेखांत इ.) पुढें, खालीं. *H. of*, *adv.* येथचा, येथील. *H.to*, याला. *H.under*, below. खालीं (पुस्तकांत इ.). *H.upon*, ह्याजवर, ह्यावरून, म्हणून. *H.-with*, (:पत्राच्या) सोबत, जोडून, ह्यासहित.

**Here'ăfter**, *adv.* (हि'अर्-आफ्टर्)—in the future, in the next world. पुढच्या काळांत, परलोकीं. *n.* भविष्यकाळ, भावी-पर-लोक.

**Here'tofore**, *adv.* (हि'अर्-टुफोर्)—formerly. पूर्वी, मागें.

**Herĕd'ĭtable**, *a.* (हिरे'डिटबल्)—that can be inherited. वारशानें मिळणारा.*-bility*, *n.* वंशपरंपरा-प्राप्यता.

**Herĕd'ĭtament**, *n.* (हिरे'डिटमेन्ट्, हेरिडि'-)—property that can be inherited; real property; inheritance. वारशानें मिळणारी मिळकत; खरी-मालकीची-मालमत्ता; वारसा.

**Herĕd'ĭtarў**, *a.* (हिरे'डिटरि)—descending by inheritance; transmitted from one generation to another; of inheritance. आनुवंशिक, वडिलोपार्जित; वंशपरंपरागत, पिढीजाद; वारशाचा. *-rily*, *adv.* वंशपरंपरेनें.*-riness*, *n.*;*-rian*, *n.* आनुवंशिकतामतानुवादी.

**Herĕd'ĭtў**, *n.* (हिरे'डिटि)—tendency of like to beget like. आनुवंशिकता, पिढीजादपणा.*-tism*, *n.*

**Hĕ'resў**, *n.* (हे'रिसि)—an opinion contrary to an accepted doctrine. स्थापितमतविरोधी मत, पाखंडमत.

**Hĕ'retic**, *n.* (हे'रिटिक्)—holder of a heresy. धोतांड्या, पाखंडी. *Heret'ical*, *a.*

**Hĕ'rĭtable**, *a.* (हे'रिटबल्)—that can be inherited; capable of inheriting. वंशपरंपरा चालणारें, वंशपरंपरोपभोग्य; वारसा सांगणारा, रिक्थहारी (व्यक्ति).*-ably*, *adv.*

**Hĕ'rĭtage**, *n.* (हे'रिटिज्)—what is or may be inherited; one's portion or lot; (bibl.) the ancient Israelites. वडिलोपार्जित मिळकत; वारसा, वतन, वांटा, भाग्य; (ईश्वराचे लाडके) प्राचीन इस्राइल लोक.

**Hĕ'rĭtor**, *n.* (हे'रिटर्)—one who inherits, a proprietor. वारसदार, मालक, धनी.

**Hermăph'rodīte**, *n.* (हर्मॅ'फ्रडाइट्)-a human being, animal, or plant with characteristics of both sexes; a person, thing, combining opposite qualities; a ship with two kinds of craft. हिजडा, हिजडी, द्विलिंगी प्राणी,-वनस्पति, स्त्रीकेसर-पुंकेसरयुक्त पुष्प; विरुद्धगुणयुक्त पुरुष, व्यक्ति किंवा वस्तु; दोन तऱ्हेच्या संयुक्त रचनेचें जहाज. *a.* उभयलिंगी, विरुद्धगुणयुक्त.*-dit'ic,-dit'ical*, *aa.*, *-tism*, *n.* [Gk. *Hermaphroditos*, son of Hermes and Aphrodite who, when bathing, grew together with the nymph Salmacis into one person.]

**Her'mēs**, *n.* (ह'र्मीझ्)—(Gk Myth.) a messenger of the gods, god of science, eloquence etc. ग्रीक देवता, किमया-वक्तृत्वादिकलांची देवता.

**Hermĕt'ic**, *a.* (हर्मे'टिक्)—of alchemy. किमयेचा, रसायनाचा. *H. art*. किमया, रसायनविद्या. *H. seal*, वायुप्रतिबंधक बूच,-गच्च-बट्ट बंद करणें. *-tically*, *adv.* वायु न शिरेल अशा रीतीनें, गच्च.

**Herm'ĭt**, *n.* (ह'र्मिट्)—a person living in solitude, an anchorite, a recluse. बैरागी, वानप्रस्थ, तपस्वी, योगी. *H.-crab*, दुसऱ्या कवचधारी प्राण्यानें टाकलेल्या कवचांत राहून आपलें रक्षण करणारा एक जातीचा खेंकडा,-ची कुर्ली.

**Herm'ĭtage**, *n.* (ह'र्मिटिज्)—hermit's abode; a solitary abode; a French wine. पर्णकुटी, आश्रम; एकांतवासाची जागा; एक प्रकारची फ्रेंच दारू.

**Hern'ĭa**, *n.* (ह'र्निआ)—a rupture, esp. of the abdomen. शीर उतरणें, अंतर्गळ (रोग).*-ial*, *-iary.*, *aa.-iot'omy*, *n.* अन्तर्गळाची छेदनक्रिया.

**Hēr'ō**, *n.* (ही'अरो)—a demigod ; a man admired for great or noble deeds ; chief man in a poem, play, or story. (ग्रीक) यक्ष, गंधर्व; शूर, मर्द, रणधीर; (काव्यांतील वगैरे) मुख्य व्यक्ति, नायक. *H. worship,-pper*, विभूति-पूजा,-पूजक, फाजील स्तोम माजविणारा.

**Hērō'ic**, *a.* (हिरो'इक्)—of, fit for, worthy of, having qualities of, a hero ; (of poetry) dealing with heroes ; (of language) high-flown ; bold. मर्दपणाचें, शूराचें, शौर्याचें ; वीररसात्मक (काव्य); प्रौढ, अलंकारिक (भाषा); मर्द, शूर. *n.* a heroic verse ; (*pl.*) high-flown language. वीररसात्मक काव्य; प्रौढ भाषा. *-ically, adv.*

**Hĕrōi-cŏm'ic**, *a.* (हेरोइ-कॉ'मिक्)—combining the heroic and the comic. हास्यवीरात्मक, हास्यवीररसमधुर.

**Hērō'in**, *n.* (हिरो'इन्)—a morphia preparation. अफूचा सत्त्वांश, गुंगी आणणारें द्रव्य.

**Hĕ'rōine**, *n.* (हे'रोइन्)—a female hero ; chief woman in a poem, novel, etc. वीरा, शूर स्त्री ; नायिका.

**Hĕ'rōism**, *n.* (हे'रोइझम्)—heroic conduct. शौर्य, प्रभाव, मर्दुमकी. *He'roize, v. t. & i.* प्रमुख नायक-वीर-करणें, (ला) विभूति मानणें ; वीररसात्मक करणें ;-मुख्य नायकाचें काम करणें.

**Hĕ'rŏn, Hern**, *n.* (हे'रॉन्, हर्न्)—a long-legged wading bird. कुर्कैची, क्रौंच, बगळा (पक्षी). *-ry, n.* a place where herons breed. बगळ्यांची विण्याची जागा,-चें उत्पत्तिस्थान.

**Her'pēs**, *n.* (ह'र्पीझ्)—a skin disease with patches of small vesicles upon an inflammatory base. तापाच्या पुटकळ्या येणें, तोंडावर ज्वर उमटणें.

**Herr**, *n.* (हेअर्)—(*pl.* Herren) German equivalent of *Mr.* 'श्रीयुत', 'मिस्टर' या अर्थी (पुरुषांना नांवापूर्वी लावावयाचा) जर्मन शब्द.

**Hĕ'rrĭng**, *n.* (हे'रिंग्)—a North-Atlantic fish, much used for food. 'हेरिंग' जातीचा मासा. *H. bone*, हेरिंगच्या हाडांसारख्या रचनेची शिवण, दगडांची-कौलांची-नागमोडी रचना. - मांडणी. *H.-pond*, North Atlantic. उत्तर अटलांटिक महासागर.

**Hers**, see Her.

**Hersĕlf'**, *pron.* (हर्से'ल्फ्)—emphatic and reflexive form of *she, her.* ती स्वतः, तिनें स्वतः. *She is not herself*, in her normal state. ती शुद्धीवर-भानावर-नाहीं.

**Hertz**, *n.* (हर्ट्झ्)—(Electr.) a term denoting frequency of one cycle per second. (विद्युत्‌शास्त्रांत) दर सेकंदाला एका फेऱ्याच्या होणाऱ्या आवृत्त्यांची संज्ञा. *Hert'zian telegraphy*, wireless telegraphy. बिनतारी संदेश (यंत्र). *Hert'zian waves*, electric waves. विद्युल्लहरी (यांमुळें बिनतारी संदेश पाठवितां येतो).

**Hĕs'ĭtant**, *a.* (हे'झिटन्ट्)—hesitating ; irresolute. कांकू करणारा, घुटमळणारा, अनिश्चित ; अनिश्चयी. *Hes'itance,-cy, nn.* hesitation. घुटमळणें, अनिश्चितता.

**Hĕs'ĭtāte**, *v. i.* (हे'झिटेट्)—to feel or show indecision ; to scruple. कांकू करणें, गुळमुळणें ; आशंकणें, शंका घेणें. *Hesita'tion, n.* कांकू, धरसोड, आशंका, किंतू. *Hes'itatingly, adv.* अडखळत, कुरकुरत. *Hes'itative, a.*

**Hĕspĕr'ĭan**, *a.* (हेस्पी'अरिअन्)—(poet.) western. पश्चिमेकडील, पश्चिम, पाश्चात्य.

**Hĕs'perus**, *n.* (हे'स्परस्)—the evening star. शुक्राची चांदणी, शुक्रतारा.

**Hĕ'ssian**, *a.* (हे'शन्)—of Hesse in Germany. जर्मनींतील हेसचा. *n.* a coarse cloth ; a *Hessian boot*, high boot first worn by H. *troops.* जाडेंभरडें कापड ; उंच बूट. *H. fly*, a fly whose larva destroys wheat. गव्हांवर कीड घालणारी माशी.

**Hĕst**, *n.* (हेस्ट्)—(arch.) behest. आज्ञा, शब्द, आदेश.

**Hĕtaer'a, Hetair'a**, *n.* (हेटी'अरा,-टा'इरा)—a courtesan, a harlot. नायकीण, वेश्या, वारांगना. *-rism, n.* उघड स्वैराचार ; टोळीमधील स्वैर विवाहपद्धति.

**Hĕtero-**, (हेटरो-)—(*Heter*, before vowel) other, different. भिन्न, इतर, वाम. [GK *heteros*, Sk *Itara*, other]

**Hĕt'erodŏx**, *a.* (हे'टरॉडॉक्स्)—not orthodox, contrary to established opinions. पाखंडी, सुधारक.*-y, n.* भिन्न मत, - धर्म.

**Hĕt'erodȳne,-nĭng**, *n.* (हे'टरोडाइन्,-निंग्)—(in wireless reception) the pulsation due to simultaneous sounding of waves that are nearly of same length. (बिनतारी संदेश-आकाशवाणी-ऐकतांना) जवळ जवळ सारख्या अंतरावरून येणाऱ्या वायुलहरींच्या एकसमयानें येणाऱ्या आवाजामुळें होणारा (आवाजांतील) कंप.

**Hĕterogē'nĕous**, *a.* (हेटरोजी'निअस्)—diverse in kind or race ; composed of diverse elements. विजातीय, भिन्नधर्मीय ; विधर्मक, विविधगुणयुक्त. *-nial, a.,-ne'ity, n.* वैजात्य, वैधर्म्य.*-ousness, n.,-ly, adv.*

**Hĕterogĕn'ĕsĭs**, *n.* (हेटरोजे'निसिस्)—birth other than from parent of the same kind ; sponta-

neous generation. भिन्नधर्मीय वंशोत्पत्ति;तात्कालिक -आपोआप-उत्पत्ति.

**Hĕt'man**, *n.* (हे'ट्मन्)—the chief or general of the Cossacks, Polish military commander. कॉसॅक लोकांचा सेनापति, पोलिश सेनापति.

**Heurĭs'tĭc**, *a.* (ह्युरि'स्टिक्)—serving to discover. संशोधनात्मक, स्वतः शोधून काढण्याचा. *H. method*, *Heuristics*, a system of education under which the pupil is trained to find out things for himself. (शिक्षण शास्त्रांतील) स्वतः-शोधनपद्धति, स्वतःशिक्षणपद्धति, स्वतःच विद्यार्थ्याला नवीन नवीन गोष्टी शोधण्यास शिकविण्याची पद्धति.

**Hew**, *v. t. & i.* (ह्यू)—to chop, to cut (with axe etc.), to cut into shape; to cut coal from seam. कापणें, तोडणें; कापून आकार आणणें,-देणें; खाणींतील थरांतून कोळसा तोडून काढणें.-*er*, *n.* तोडणारा, तोड्या, बेलदार. *Hewed*, *Hewn*, *pa. p.*

**Hex-**, **Hexa-**, (हेक्स्-, हेक्सा-)—in comb., six. षट्-, षट. *Hex'ad*, *n.* a set or group of six. सहांचा संच,-समुदाय. *Hexahed'ron*, (हेक्स्-हे'ड्रन्)—a figure having six faces. सहा पृष्ठ-भागांची आकृति.-*hed'ral*, *a.* *Hexam'eter*, *n.* a line of six metrical feet. सहा गणांची कवितेची ओळ, षट्पदीचरण,-*etric*,-*etrical*, *a.* *Hex'astyle*, *a. & n.* (a portico) of six columns. सहा खांबी (इमारत,-देवडी).

**Hĕx'agon**, *n.* (हे'क्स-गॉन्)—a plain figure having six angles and six sides. षट्कोण. *Hexag'-onal*, *a.* षट्कोणी.

**Hey**, *int.* (हे)—(calling attention, or of joy, etc.) ये! ए! हे! *H. for*-! शाबास! वाहवा! *H.-day*, ओ हो! हा हा!

**Hey'day**, *n.* (हे'डे)—bloom, prime, flush (of youth, prosperity etc.). ऐन भर, बहर, कमाल, उल्हास, हर्ष.

**Hi**, *int.* (हाय्)—(calling attention.) हे! अहो! ही!

**Hiā'tus**, *n.* (हायए'टस्)—a break or gap; a break between two vowels. खिंड, भगदाड; (हस्तलिखित प्रतींत) तुटक-अर्धवट-भाग, खंड, भंग, (व्याक०) प्रगृह्य.

**Hi'bernāte**, *v. i.* (हा'इबर्नेट्)—to pass the winter in torpor or (of persons) in mild climate; (fig.) to remain inactive. (जनावरांचें) हिंवाळा सुस्तींत घालविणें, (मनुष्यांचें) हिंवाळ्यांत स्थलांतर करणें, सौम्य प्रदेशांत हिंवाळा घालविणें,-काढणें; स्वस्थ-निष्क्रिय-राहणें.-*tion*, *n.*,-*nant*, *a.*

**Hibern'ian**, *a. & n.* (हाय्ब'र्निअन्)—(native) of Ireland, Irish (man). आयर्लंडचा, आयरिश (रहिवासी).

**Hĭcc'ŭp**, *n.* (हि'कप्)—spasm of respiratory organs. उचकी. Also, Hic'cough. *v. i. & t.* उचकी येणें,-लागणें, उचकत बोलणें.

**Hĭck**, *n.* (हिक्)—(U. S.) a farmer, country-man. शेतकरी, गांवढळ, प्रांतीय मनुष्य.

**Hĭd**, **Hĭdden**, *pa. p.* of hide. गुप्त, प्रच्छन्न, अज्ञात.

**Hīde**, *n.* (हाइड्)—animal's skin, raw or dressed; human skin. चामडें, कातडें; माणसाची चामडी, चामडें. *H. bound*, (of cattle) with skin clinging close as a result of bad feeding; (fig.) narrow-minded. हाडें बाहेर पडलेलें, रोडकें (जनावर); क्षुद्रमनस्क, हलक्या मनाचा.

**Hīde**, *v. i. & t.* (हाइड्)—to put or keep (a thing) out of sight; to conceal oneself; to conceal a fact; to flog. दृष्टीआड करणें; लपविणें, लपणें; छपविणें; फटके मारणें. *To h. one's head*, (लाजेनें) तोंड लपविणें, तोंड दाखवावयाला लाज वाटणें. *H. & seek*, a children's game; (also fig.). लपंडाव, लपालपी, डोळे-झांकणी (खेळ); (अलं०) लपवाछपवी. *Hid*, *pa. t.*; *hidden*, *hid*, *pa. p.*

**Hīde**, *n.* (हाइड्)—(hist.)—a measure of land (about 120 acres). १२० एकर जमिनीचा तुकडा.

**Hĭd'eous**, *a.* (हि'डिअस्)—frightful; horrible; repulsive, revolting. भीषण; भयानक; तिरस्करणीय; हिडिस.-*ly*, *adv.*,-*ness*, *n.* भेसूरपणा, अघोरपणा, हिडीसपणा.

**Hī'dĭng**, *n.* (हा'इडिंग्)—thrashing. चामडी लोळविणें, झोडपून काढणें, मारणें.

**Hī'dĭng**, *n.* (हा'इडिंग्)—the act; the place of concealment. लपविणें, लपवणूक, प्रच्छादन; लपून राहण्याची जागा. *To be in h.*, remain hidden. लपून राहणें, अज्ञातवासांत राहणें. *H.-place*, लपून राहण्याची जागा, अज्ञातवासस्थळ.

**Hīe**, *v. i.* (हाय्)—to go quickly. जलद्-हां हां म्हणतां-जाणें, लगे लगें जाणें.

**Hī'erärch**, *n.* (हा'यरार्क्)—the chief priest; an archbishop. मुख्य आचार्य, मुख्य पुरोहित; मुख्य धर्माधिकारी. *Hi'erarchy*, *n.* (हा'यरार्कि)—each of the three divisions of angels; the angels; priestly government; any graded priesthood or other organization. देवदूतांच्या तीन प्रकारांपैकीं एक; देवदूत; धर्माधिकाऱ्यांची सत्ता; धर्ममंडळ, आचार्यसंप्रदाय; वरिष्ठापासून कनिष्ठापर्यंतची पायरीपायरीनें केलेली अधिकार-विभागणी, अधिकारपरंपरा, अशा अधिकारी वर्गाची संस्था.-*archic*, -*archical*, *aa.*, -*archism*, *n.* [Gk *hieros*, sacred, *arkhes*, ruler]

**Hierăt'ĭc**, *a.* (हायइरॅ'टिक्)—of the priests; priestly. (प्राचीन इजिप्त व ग्रीक) उपाध्यायांचा; धर्माधिकाऱ्यांचा; धार्मिक.

**Hi'eroglyph**, *n.* (हा'इरोग्लिफ्)—the sacred characters of the ancient Egyptian language; picture-writing, figure of an object standing for one word or sound; a secret symbol; writing difficult to make out. प्राचीन इजिप्शिअन भाषेची पवित्र लिपी; चित्रलिपी, चित्राक्षर; सांकेतिक अक्षर, गूढ चिन्ह; न समजणारें-न लागणारें-लिखाण,-हस्ताक्षर,-लेख.-'*ic*, *a.* चित्रलिपींत, चित्राक्षरांत-लिहिलेलें; प्रतीकात्मक, वैशिष्ट्यसूचक, सांकेतिक; (*n. pl.*) चित्राक्षरलेखन. -*ical*, *a.*, -*ically*, *adv.*

**Hig'gle**, *v. i.* (हि'गल्)—to be tedious and nice in bargaining, to dispute about terms; to chaffer. घासाघीस करणें, ओढून धरणें, सौदा करणें.

**Hig'gledy-pig'gledy**, *adv., a. & n.* (हि'गल्डि-पि'गल्डि)—(in) utter confusion. अस्ताव्यस्त (पणें), उलटापालट, सांवळा गोंधळ.

**High**, *a.* (हाइ)—of great or specified upward extent; of exalted rank or superior quality; (of sound) acute in pitch; tempestuous; exorbitant in price; (of meat or game) slightly tainted; (of time) far advanced; extreme in opinion. उंच, उंच ठिकाणचा, तुंग, उंचीचा; उच्च, श्रेष्ठ, परम, बडा, मोठ्या पदवीचा; उंच, चढा, किनरा, पहाडी (स्वर, आवाज,); जोराचा, सोसाट्याचा, वादळी, प्रचंड, प्रबळ; भारी किंमतीचा, उंची, महाग; किंचित् वाशेलें,-वास मारणारें (मांस, अन्न, शिकार); ऐन, भर, खडी (वेळ); कट्टर मताचा, हटवादी, दुराग्रही. *n.* a high place, elevation; superior region. उच्च स्थान, उंचवटा; उच्च-श्रेष्ठ-प्रदेश, आकाश. *adv.* far up, aloft; in or to a high degree; at a high price; at or to a high pitch. अगदीं उंच, उच्चस्थानीं, वर; फार, अतिशय; मोठ्या-भारी-किंमतीला; उंच-मोठ्या-पहाडी स्वरांत. *The Most High*, God. परमेश्वर. *H. art*, उच्च प्रतीची कला. *H. spirit*, courageous, enterprising. शूर-धाडसी-स्वभाव,-मन. *A h. opinion of*, विषयीं फार अनुकूल मत. *H. life*, वरच्या वर्गाचें श्रीमंती-जीवन. *H. colour*, गहिरा-तांबडा-रंग, तांबडा-लालबुंद चेहरा,-वर्णकांति, लज्जेची लाली. *It is h. time to go*, फार वेळ झाला (आतां गेलें पाहिजे). *H. & dry*, (of ship) out of the water, (*fig.*) out of the current of events. (पाण्याच्या बाहेर) सुक्या जमिनीवर असलेलें (गलबत), अलिप्त. *H. & Low*, (people) of all conditions, (*adv.*) everywhere. सर्व दर्जाचे (लोक)-गरीब श्रीमंत, सर्वत्र. *H. & mighty*, arrogant. उन्मत्त, चढेल. *On the h. ropes*, (colloq.) चढेल, गर्वानें फुगलेला, क्रुद्ध, तिरस्कारपूर्ण. *On h.*, in or to heaven. आकाशांत, स्वर्गांत, स्वर्गलोकाकडे. *From on h.*, आकाशांतून, उंचावरून. *To play h.*, मोठा जुगार खेळणें, मोठें-जड-परखाचें पान खेळणें,-टाकणें. *To run h.*, (of sea, fig. of feelings) भरतीच्या मोठ्या लाटा येणें, खवळणें, खळबळ उडणें. *H.-blower*, (of horse) नाकपुड्या मोठ्या आवाजानें फुरफुरविणारा. *H.-born*, उच्चकुलीन, थोर कुळांतला. *H. brow*, श्रेष्ठ विचारी मनुष्य. *H. Court*, वरिष्ठ न्यायालय. *H. day*, सणाचा दिवस, दुपारची वेळ. *H.-flyer, H.-flier*, (*fig.*) an ambitious person, one who has high-flown notions. महत्त्वाकांक्षी मनुष्य, अतिरेकी मतें असलेला मनुष्य. *H.-pitched*, उंच (स्वर), किनरा-पहाडी (आवाज), उभें, उंच (छपर, आढें), (स्वभावानें) थोर, उच्च. *H. priest*, (ज्यू लोकांचा) मुख्य उपाध्याय. *H. road*, मुख्य रस्ता, राजरस्ता, राजमार्ग. *H. strung*, very sensitive. अति नाजूक, अति हळवा. *H. tea*, tea at which meat is served. मांसपदार्थांसह चहा (संध्याकाळचें जेवण). *H. water*, high tide. पूर्ण भरती, उधान. *H. watermark*, पूर्ण भरतीची रेषा,-खूण, (fig.) जास्तींत जास्त चढ. *H. wrought*, *a.* highly finished, worked up to a high degree. मोठ्या कुशलतेनें तयार केलेलें, बनावटीचें, उद्दीप्त, खूप चेतविलेला.

**High'-flown**, *a.* (हा'इ-फ्लोन्)—elevated; extravagant; bombastic. उच्च; बेताल, फाजील; दबदार, डौली, अलंकारिक (भाषा).

**High'-handed**, *a.* (हा'इ-हॅन्डेड्)—acting with a high hand, overbearing, arbitrary. उद्दाम, दंडेलीचें, स्वैर, स्वच्छंद -*ness*, *n.* अरेरावी, स्वच्छंदीपणा.

**High'lander**, *n.* (हा'इलन्डर)—an inhabitant of (the Scotch) highlands. (स्कॉटलंडमधील) पहाडी लोक, डोंगराळ देशांतील लोक,-रहिवासी. *High'lands*, *n.* (Sc. ही'लन्ड्स्), (उत्तर स्कॉटलंडमधील) उंचवट्याचा डोंगराळ प्रदेश, पहाडी मुलूख.

**High'ly**, *adv.* (हा'इलि)—greatly, in a high or great degree, at a high rate. फार, अतिशय, महाग.-*paid*, मोठ्या वेतनाचा,-पगाराचा.-*descended*, थोर कुळांतील.

**High'minded**, *a.* (हा'इ-माइन्डेड्)—morally elevated proud, arrogant. थोर मनाचा, उदार, उदार मनस्क; गर्विष्ठ.-*ness*, *n.*

**High'ness**, *n.* (हा'इनिस्)—the title of princes; elevation above the surface. (मांडलिक) राजांच्या नांवापूर्वी लावण्याचें उपपद; उंची, उंचपणा.

**High' school**, *n.* (हा'इ स्कूल)—the chief public school in a town providing secondary edu-

cation. दुय्यम शिक्षण पूर्ण देणारी शाळा, दुय्यम शिक्षणाची शाळा.

**High'-spirited**, *a.* (हा'इ-स्पिरिटेड्)—of courageous spirit, bold, daring. धीट मनाचा, धैर्यशाली, शूर, साहसी, धाडसी.

**Hight**, *pa. p.* (हाइट्)—(arch.) called, named. नांवाचा.

**High'jacker**, *n.* (हा'इजॅक्र्)—(U. S.) an armed bandit who preys upon smugglers of illicit liquor. चोरून दारू आणणाऱ्यांना धाक दाखवून पैसे काढणारा सशस्त्र लुटारू.

**High'way**, *n.* (हा'इ-वे)—a public road, main road, main route. राजमार्ग, हमरस्ता.

**High'wayman**, *n.* (हा'इ-वे-मन्)—a man who robs on the public road or highway. वाटमाऱ्या, चोर.

**Hilar'ious**, *a.* (हिले'अरिअस्)—cheerful, merry. आनंदी. *-ly, adv., -ness, n.*

**Hilar'ity**, *n.* (हिलॅ'रिटि)—merriment. आनंद, उल्हास, मौज.

**Hill**, *n.* (हिल्)—eminence, a small mountain; heap, pile, mound. डोंगर, टेंकडी; ढीग, रास. *v. t.* टेंकडी बनणें, मातीचा कूड-ढीग-करणें. *The hills*, हवा खाण्याचें ठिकाण. *Hill'y, a.* डोंगराळ. *Hill'iness, n.*

**Hillo', Hilloa'**, *int.* (हिलो', हि'लो)—(for hailing or expressing surprise) हे हो!

**Hill'ock**, *n.* (हि'लक्)—a small hill; a mound. टेंपर, टेंकाड.

**Hilt**, *n.* (हिल्ट्)—handle of a sword. (तलवारीची) मूठ, दस्ता, परज. *v. t.* मूठ घालणें *To prove up to the h.*, completely. पुरेपूर सिद्ध करणें,-माप घालणें.

**Hi'lum**, *n.* (हा'इलम्)—(Bot.) the eye of a bean, the point of attachment of seed to seed-vessel. (घेवडा वगैरेच्या) बीचा डोळा, बीजनाभि. फलकोशांत जेथें बीं लागलेलें असतें ती जागा.

**Him**, *pron.* (हिम्)—objective case, colloq. subjective case of He. त्याला, तो. *Himself', pron.* the emphatic and reflexive form of He and Him. तो स्वतः, त्याला स्वतःला. *He is not himself*, तो भानावर-शुद्धीवर-नाहीं, त्याचें मन ठिकाणावर नाहीं.

**Hind**, *n.* (हाइन्ड्)—the female of (esp. red) deer. हरिणी, मृगी.

**Hind**, *n.* (हाइन्ड्)—a farm servant, married and skilled farm workman provided with a cottage on the farm; a steward; a rustic. शेतावरील मजूर; शेतावर खोपटांत कुटुंबासह राहणारा शेतकरी; व्यवस्थापक; गांवढळ, खेडवळ.

**Hind, Hind'er**, *aa.* (हाइन्ड्, हा'इन्डर्)—at the back, posterior, backward. मागचा, पाठीमागचा *Hind'most, a.* सर्वांत मागचा, शेवटचा.

**Hind'er**, *v. t.* (हि'न्डर्)—to impede; to prevent the progress of, to check. अटकाव करणें; अडथळा करणें, मोडा-खोडा-घालणें.

**Hindi'**, *a.* (हिन्दी')—of N. India. उत्तरहिंदुस्थानी. *n.* हिन्दी भाषा. *Hindu', Hindoo', a.* (हिन्दू', हि'न्दू)—Indian. हिन्दुस्थानचा. *n.* हिंदुधर्मीय, हिंदुधर्मानुयायी; *-ism, n.* हिंदु धर्म. *Hindu-sta'ni, n.* (हिन्दुस्ता'नी)—*a. & n.* हिंदुस्तानचा, हिंदुस्तानी भाषा, उर्दू.

**Hin'drance**, *n.* (हि'न्ड्रन्स्)—obstruction. अडथळा, हरकत, विघ्न.

**Hing**, *n.* (हिंग्)—the drug asafoetida. हिंग.

**Hinge**, *n.* (हिन्ज्)—a movable joint like that by which a door is hung on a post; a natural joint doing similar work; (fig.) critical point on which all turns. बिजागर; सांधा; मुख्याची गोष्ट, इंगित, मख्खी, सूत्र. *v. t. & i.* to attach with hinge; (fig.) to turn, to stand or depend *on*. बिजागर बसविणें; फिरविणें, वर अवलंबून असणें. *Off the hh.*, in disordered state. विस्कळित, बिघडलेलें. *-ged, -geless, aa.*

**Hinn'y**, *n.* (हि'नि)—an offspring of she-ass by stallion. (वडू) घोड्यापासून गाढवीला झालेली अवलाद, खेचर.

**Hinn'y, -nie**, (हि'नि)—(Sc.) a sweet-heart. प्रेयसी, प्रिया. (See Honey.)

**Hint**, *n.* (हिन्ट्)—a covert suggestion; a slight indication. सूचना; इशारा, दिग्दर्शन, चुणूक. *v. t. & i.* to suggest covertly, to make indirect allusion. सुचवणें, ध्वनित करणें, उल्लेख करणें. *To h. at*, ची सूचना देणें.

**Hin'terland**, *n.* (हि'न्टर्-लन्ड्)—the district behind that lying along the coast or river's banks. (किनाऱ्याच्या किंवा नदीच्या तीराच्या) पाठीमागील प्रदेश, पार्श्व प्रदेश, पृष्ठवर्ती भाग, प्रदेश. [G]

**Hip**, *n.* (हिप्)—projection of pelvis and upper part of thigh-bone; (Arch.) arris of roof from ridge to eaves. ढुंगण, कटिप्रदेश, कंबर; छपराचा कोनवाशाचा भाग. *To have* (a person) *on the h.*, चा फायदा घेणें. *To smite h. and thigh*, सपाटून तडाखा मारणें, बीमोड करणें, फडशा उडविणें. *H.-bath*, कटिस्नान. *-hipped, a.*

**Hip, Hep**, *n* (हिप्, हेप्)—fruit of (wild) rose. (रान) गुलाब-कळी.

**Hip, Hyp,** *n.* (हिप्)—morbid depression. खिन्नता, गळल्यासारखें वाटणें. *v. t.* to make low-spirited. उदास-खिन्न-करणें.

**Hip,** *int.* (हिप्)—(introducing united cheer.) *Hip, hip, hurrah!* हे! हो!

**Hipe,** *v. t. & n.* (हिप्)—to throw (an antagonist in wrestling) in a particular way; such a throw. (प्रतिपक्ष्याला मल्लयुद्धांत) विशिष्ट तऱ्हेनें फेंकणें,-हापटणें; अशी हापटी.

**Hip'po,** *n.* (हि'पो)—(colloq.) a hippopotamus. जलाश्व, पाणघोडा. [abbr.]

**Hippo-** (हिपो-)—(in comb.) horse. घोडा, अश्व. *-phagy*, घोड्याचें मांस खाण्याची चाल. [Gk *hippos*, horse]

**Hippocam'pus,** *n.* (हिपोकॅ'म्पस्)—(*pl.-pi*) kinds of small fish; a sea-horse. लहान जातीचा मासा; समुद्रांतील अश्वाकार मासा. *H. major, -minor*, (Anat.) eminences on the floor of each lateral ventricle of brain. मस्तिष्क-विवराच्या प्रत्येक बाजूच्या पृष्ठभागावरील फुगीरपणा.

**Hipp'ocras,** *n.* (हि'पक्रस्)—(hist.) spiced wine. मसालेदार दारू-मद्य.

**Hipp'odrome,** *n.* (हि'पड्रोम्)—a course for chariot races etc.; a circus. (रथांच्या, घोड्यांच्या इ.) शर्यतीचें मैदान,-रिंगण; चित्रांचा व घोड्यांचा खेळ.

**Hipp'ogriff,-yph,** *n,* (हि'पग्रिफ्)—a fabulous griffin-like creature with horse's body. अश्व-शरीरधारी काल्पनिक राक्षस.

**Hippopot'amus,** *n.* (हिपपॉ'टमस्)—African river-horse. पाणघोडा, जलाश्व.

**Hir'cine,** *a.* (हि'र्साइन्)—goat-like. बकऱ्यासारखा, मेषसदृश. [L *hircus*, goat]

**Hire,** *n.* (हायर्)—payment for use of a thing, labour, &c., a reward. भाडें, मोल, वेतन, बक्षीस. *v. t.* to employ or procure on hire. भाड्यानें घेणें किंवा देणें, व्याजानें (पैसे) काढणें. *On h.*, भाड्यानें देण्याचें. *H. purchase, h. system*, हप्तेबंदीनें वस्तु खरेदी घेण्याची पद्धति. *Hir'er, n.* वस्तु भाड्यानें देणारा-घेणारा. *Hir'able, a.*

**Hire'ling,** *n.* (हा'यलिंग्)—one who works for hire, a mercenary person. मजुरदार, भाडोत्री.

**Hirs'ute,** *a.* (हि'र्स्यूट्)—hairy, shaggy. केंसाळ, मिसाळ, लोममय.

**His,** *pron. & a.* (हिझ्)—possessive of He. त्याचा-ची-चें.

**His'pid,** *a.* (हि'स्पिड्)—(Bot., Zool.) shaggy; bristly. खडबडीत, केंसाळ, लोममय; तीव्रकेशयुक्त.

**Hiss,** *n.* (हिस्)—sharp sound of *s* as a sign of disapproval. फूत्कार, फुस्कारा, सीत्कार. *v. i. & t.* to make a hiss; to express disapproval. फुसकारणें, सूंसूं करणें; हुशहुश करून नापसंति दर्शविणें, हुसकणें, हुसकावून लावणें.

**Hist,** *int.* (हिस्ट्)—(used to call attention, enjoin silence, or incite a dog etc.) चुप्! गप्! हं! छुः!

**Histo-,** (हिस्टॉ-)—in comb., web, tissue. जाल, पिंड. *Histol'ogy, n.* the science of organic tissues. सूक्ष्मपिंडरचनाशास्त्र.*-ogical, a.-ogist, n.*

**Histor'ian,** *n.* (हिस्टॉ'रिअन्)—writer of history. इतिहासकार, इतिहासज्ञ.

**Histo'ric,** *a.* (हिस्टॉ'रिक्)—noted in history. इतिहासप्रसिद्ध.

**Histor'ical,** *a.* (हिस्टॉ'रिकल्)—pertaining to history; belonging to the past; (of picture, novel etc.) dealing with historical events, historic. ऐतिहासिक; गतकालीन; ऐतिहासिक गोष्टींचें वर्णन करणारें, इतिहासरूप,-निदर्शक; इतिहासप्रसिद्ध. *H. evidence*, इतिहासाचा-ऐतिहासिक-पुरावा.*-lly, adv.*

**Histori'city,** *n.* (हिस्टरि'सिटि)—historical character, genuineness. ऐतिहासिकता, इतिहास-सिद्धता, खरेपणा.

**Historiog'rapher,** *n.* (हिस्टॉरिऑ'ग्रफर्)—writer of history, an official historian of a court. इतिहास-लेखक (कामगार, अधिकारी).*-graphy, n.* इतिहासलेखन.

**His'tory,** *n.* (हि'स्टरि)—a methodical record of public events; past events, study of these; an eventful career. इतिहास; गतगोष्टी, गत-गोष्टींचा अभ्यास; चरित्र, पुरावृत्त.

**His'trion,** *n.* (हि'स्ट्रिअन्)—a stage-player. नट, नाटकी मनुष्य.

**Histrion'ic,** *a.* (हिस्ट्रिऑ'निक्)—of acting, stagy; hypocritical. अभिनयाविषयीं, नाटकासंबंधीं; दांभिक. *n. pl.* theatricals; stagy language; pretence. (अने०) नाटकासंबंधीं गोष्टी; नाटकी भाषा; ढोंग, मिष. *-ism, -icism, nn.; -ically, adv.*

**Hit,** *v. t. & i.* (हिट्)—to strike with a blow or missile, to aim a blow; to light upon; to find; to affect sensibly; to suit; to arrive at. ठोसा मारणें, हाणणें; उतरणें, लाग साधणें; सुचणें; धक्का बसणें, ठोकर बसणें-लागणें; (शीं) जमणें,-जुळणें; येणें, पोंचणें. *n.* a blow; stroke of satire (*at*); success. तडाखा, आघात, टोला; टोमणा; लाग, यश. *Hard h.*, (पैशाच्या वगैरे) अडचणींत सांपडलेला. *To h. upon*, (नशिबानें) मिळणें,

लाभणें, सुचणें. *To h. off*, to imitate to a nicety. अचूक अनुकरण करणें. *To h. below the belt*, to play foul. लबाडी करणें, लबाडीनें ठोकर देणें, फसविणें, खोटा हात-पेंच-टाकणें,-घालणें. *To h. it, to hit the (right) nail on the head*, बरोबर अंदाज करणें,-ताडणें, खरें खुरें सांगणें. *To h. it off*, जुळणें, जमणें. *To h. out*, जोरानें तडाखा लगावणें.

**Hitch**, *v. t. & i.* (हिच्)—to move with a jerk; to fasten with loop, &c.; to become so fastened; to shift. हिसके देत जाणें किंवा ओढणें; बांधून टाकणें; अडकवणें, अडकणें; हालवणें. *n.* a jerk; an impediment; (Naut.) kinds of noose. हिसका; अडथळा; सुरगांठ.

**Hĭth'er**, *adv.* (हि'दर्)—to this place. इकडे. *a.* इकडचा, इकडील. *H. ward*, ह्या दिशेनें. *Hither & thither*, इकडे तिकडे, चोहींकडे.

**Hĭtherto'**, *adv.* (हिदर्-टू')—up to now. आतांपर्यंत.

**Hive**, *n.* (हाइव्ह्)—(also, *beehive*) artificial home for bees; a busy swarming place. मधमाशांचें पोळें; गर्दीची जागा, घोळका, गर्दी. *v. t. & i.* to place or enter in a hive; to house snugly; to hoard up; to live together (like bees). पोळ्यांत ठेवणें,-जाणें; जमावानें ठेवणें; सांठविणें; जमावानें-घोळक्यानें राहणें.

**Hīves**, *n. pl.* (हाइव्ह्झ्)—skin eruption; inflammation of bowels etc. कातडीवरील पुटकुळ्या, पुरळ; सूज.

**Hō**, *int.* (हो)—expressing surprise, etc., calling attention, added to name of destination. हो! हो हो! रे! इष्टस्थलदर्शक प्रत्यय.

**Hoar**, *a.* (होअर्)—grey-haired; white. पांढऱ्या केसांचा; शुभ्र, भुरकट. *n.* hoar-frost. बर्फ.

**Hoar'frost**, *n.* (हो'अर्-फ्रॉस्ट्)—white frost, white particles of frozen dew. थिजलेलें दंवाचें बर्फ, हिम, गोठलेल्या दंवाचे कण.

**Hoard**, *n.* (होअर्ड्)—a stock, a store. सांठा, निधि, संचय, डबोलें. *v. t. & i.* to amass or keep in hoard; to husband privily; to treasure up. सांठवणें; गुप्त रीतीनें सांठवून ठेवणें; जमविणें, जमणें.

**Hoard'ing**, *n.* (हो'अर्डिंग्)—a high board fence round building during erection or repairs. (इमारतीच्या बांधकामाच्या किंवा दुरुस्तीच्या वेळीं) फळ्यांचें सभोंवार उंच कुंपण,-आवार.

**Hoarse**, *a.* (होअर्स्)—(of voice) rough, husky; having a hoarse voice. घोगरा, कर्कश, फुटलेला; घोगऱ्या गळ्याचा.*-ly, adv.,-ness, n.,-en, v. t. & i.* घसा बसविणें,-बसणें, घोगरा करणें,-होणें.

**Hoar'y**, *a.* (हो'अरि)—white or grey with age; venerable; (Bot.) covered with short white hairs. पिकल्या केसांचा; सन्माननीय; श्वेतलोमयुक्त, आंखूड व सफेत लव असलेला. *Hoar'iness, n.*

**Hoax**, *v. t.* (होक्स्)—to deceive by way of joke, to play a trick upon. थट्टेनें फसवणें, थट्टा करणें, चकवणें. *n.* such a deception. फसवणूक, चलाखी, चकवणूक.

**Hŏb**, *n.* (हॉब्)—a side easing of a fire-place; a peg; the hub of a wheel. (चुलीचा) वैल; मेख, खुंटी; (चाकाचें) तुंब.*-nail*, बुटाच्या तळव्याला मारण्याची मोठ्या डोक्याची-गुलाची-चूक.

**Hŏb'ble**, *v. i. & t.* (हॉ'बल्)—to walk lamely, to limp; (fig.) to proceed haltingly; to tie together legs (of horse) to keep it from straying. लंगडत चालणें, लंगडणें; अडखळत-चांचपडत (काम) करणें,-बोलणें,-भाषण करणें; (घोड्याच्या) पायांत खोडा घालणें, दोन्ही पाय बांधून टाकणें. *n.* a limping gait; an awkward situation; a rope etc. for hobbling a horse. लंगडी गति, लंगडी चाल; पेंच, अडचण, घोंटाळा; पायबंद (दोर इ.). *H. skirt*, (ज्यानें चालतांना अडथळा होतो असा) पायाशीं तंग-घट्ट-चोळणा.

**Hŏb'bledehoy'**, *n.* (हॉ'बल्डिहॉ'य्)—an awkward youth between boyhood and manhood. (वाढीला लागलेला, दिसण्यांत) चमत्कारिक मोठा मुलगा,-तरुण.*-hood,-ism, nn..-ish, a.* Also, *Hobbad-, Hobbed-.*

**Hŏbb'y̆**, *n.* (हॉ'बि)—a favourite pursuit outside one's main occupation; a small horse; a small falcon. आवडता विषय, छन्द, नाद; तट्टू; लहान ससाणा.

**Hŏbb'y̆-horse**, *n.* (हॉ'बि-हॉर्स्)—a wicker horse for morris dance etc.; a rocking-horse; a child's stick with horse's head; a horse on merry-go-round; a hobby. लव्हाळ्याचा-काटक्यांचा-घोडा; लांकडी हालता-डुलता-घोडा; (मुलांच्या खेळांतील) काठीचा घोडा; (जत्रेंतील) फिरत्या चक्राचा घोडा; छंद; नाद.

**Hŏb'gŏblin**, *n.* (हॉ'ब्गॉब्लिन्)—an elf, a bogy. पिशाच, भूत, बागूलबुवा.

**Hŏb'nŏb**, *v. i.* (हॉ'ब्नॉब्)—to drink together; to associate familiarly (*with*). सह (दारू) पिणें, सह (मद्य) पान करणें; (शीं) दोस्तीनें-मिळून मिसळून-वागणें. [F. *hob or nob*, give & take]

**Hō'bō**, *n.* (हो'बो)—a wandering workman or tramp. फिरता कारागीर, भटक्या.

**Hŏck**, *n.* (हॉक्)—the joint of animal's hindleg. (जनावराच्या) मागच्या पायांतील घोंटा. 2. kinds

of white wine. श्वेत मद्य, दारू. 3. *v. t.* (*sl.*) to pawn, to pledge. गहाण टाकणें.

**Hŏck'ey**, *n.* (हॉ'कि)—a game with ball and curved sticks between goals. चेंडूदांडूचा हॉकीचा खेळ.

**Hō'cus**, *v. t.* (हो'कस्)—to hoax; to drug. फसविणें; (मनुष्याला) गुंगीचें औषध देणें, मादक पेयानें गुंगविणें, मादक द्रव्य घालून भेसळ करणें.

**Hō'cus-pō'cus**, *n.* (हो'कस्-पो'कस्)—jugglery, trickery used by conjurers. गारुड्याची हातचलाखी, जादुगिरी, थातूरमातूर, छांदूं. *v. t. & i.* फसविणें, जादू करणें.

**Hŏd**, *n.* (हॉड्)—a trough on staff for carrying mortar, bricks etc. (दांडेवालें) लांकडी घमेलें (इमारतीच्या बांधकामासाठीं चुना वगैरे वाहून नेण्याचें).-*man*, *n.* a labourer carrying a hod, (*fig.*) a mechanical worker, a literary hack. लांकडी घमेलें वाहणारा मजूर, (अलं०) यंत्राप्रमाणें काम करणारा, भाडोत्री लेखक.

**Hŏdd'en**, *n.* (हॉ'डन्)—(Sc.) a coarse woollen cloth. जाडेभरडें लोंकरी कापड. *H. grey*, करड्या रंगाचें लोंकरी कापड, खेडवळ-खेडुताचे-कपडे.

**Hŏdge**, *n.* (हॉज्)—an English farm-labourer. इंग्लिश शेतकरी,-शेतावरील मजूर.

**Hŏdge'-pŏdge'**, *n.* (हॉ'जपॉ'ज्)—hotch-potch. पंचमेळ, खिचडाभिचड.

**Hŏdŏm'eter**, *n.* (हॉडॉ'मिटर्)—an *instrument for* measuring distance travelled by a wheeled vehicle. चाकें असलेलें वाहन किती अंतर चाललें हें मोजण्याचें यंत्र.

**Hoe**, *n* (हो)—a tool for cutting up weeds, &c. कुदळ, खोरें, खुरपें, फावडें. *v. t.* to loosen ground or remove weeds with a hoe. कुदळीनें खणणें, कुदळणें.

**Hŏg**, *n.* (हॉग्)—swine, esp. castrated boar; young sheep before first shearing; a greedy person. डुकर, सूकर, डुकर; अगदीं लहान मेंढी; (डुकरासारखा) गलिच्छ, अधाशी मनुष्य. *v. t. & i.* to raise (back etc.), to rise archwise in the centre; to cut (mane) short. (पाठ) उंच करणें, मध्यें डुकराच्या पाठीसारखें-कमानदार-वर येणें,-उंच होणें; उभे केस कापणें. *To go the whole hog*, to do the thing thoroughly. एखादी गोष्ट शेवटास पोंचविणें,-पूर्णपणें करणें, पूर्णपणें वाहून घेणें. *H. back*, *h.'s back*, crested hill ridge. टेंकडीची उंच कडा, उंच सुळका,-सूळ. *H.-fish*, डोक्यावर कांट्यासारखे केंस असलेला मासा. *H.like*, greedy. अधाशी, लोभी. *H. mane*, घोड्याची कापलेली-आंखूड केलेली-आयाळ. *H.-plum*, अंबाडा. *H. sty*, डुकरांची जागा, डुकरवाडा. *H. wash*, डुकरांना घालण्याचें खरकटें मरकटें (पाणी). *Hogg'ish*, *hog-like*, *aa. Hogg'ishly*, *adv.*,-*ishness*, *n. Hog'ling*, *n.*

**Hŏgs'head**, *n.* (हॉ'ग्झ्-हेड्)—a large cask; a measure (abbr. *hhd*), 52½ gallons. मोठें पिंप; साडे बावन गॅलनचें एक माप.

**Hoick**, **Hoik**, *v. t. & i.* (हॉइक्)—to force an aeroplane to turn abruptly upward. विमान एकदम वर वळविणें.

**Hoist**, *pa. p.* (हॉइस्ट्)—*H. with his own petard*, blown up by his own bomb meant for others. स्वतः टाकलेल्या सुरुंगानें स्वतःच उडवून लावलेला, दुसऱ्याचें वाईट करतां स्वतःचेंच वाईट झालेला.

**Hoist**, *v. t.* (हॉइस्ट्)—to raise aloft (esp flags); to raise with a tackle, &c. उभारणें, उंच फडकविणें, उचलणें. *n.* उचलणें, उभारणें, उचलणारें यंत्र, पाळणा.

**Hoit'ȳ-toit'ȳ**, *a.* (हॉ'यटि-टॉ'यटि)—haughty, frolicsome. उद्धट, खेळकर, खोडकर. *n.* riotous or giddy conduct. खट्याळपणा, मायेफिरूपणा. *int.* (आश्चर्यदर्शक) अरे च्या!

**Hō'key-pō'key**, *n.* (हो'कि-पो'कि)—hocus-pocus; cheap icecream sold by street vendors. हातचलाखी; रस्त्यांत विकलें जाणारें स्वस्त आइस्क्रीम, थंडी मलई.

**Hōld**, *v. t. & i.* (होल्ड्)—to keep fast, to grasp; to keep in particular attitude; to possess; to contain, to have room for; to observe, to celebrate; to restrain; to think, to believe; (Mil.) to keep possession of (a place); (of judge) to lay down, decide (that); to apply; not to give way; to keep going. धरणें, धरून ठेवणें; विशिष्ट स्थितींत ठेवणें,-राखणें; ताब्यांत असणें; मावणें, समावेश होणें; (उत्सव वगैरे) करणें, भरविणें; आवरणें; प्रतिपादणें, मत असणें, वाटणें; (ठिकाण, जागा) ताब्यांत ठेवणें, न सोडणें; (न्यायाधिशाचें) निकाल देणें, कायद्यानें ठरविणें; लागू होणें,-असणें; न तुटणें, अखंड राहणें; चालू असणें. *n.* grasp; means of holding; a place of custody; a fortified place; the cavity below the deck for cargo. पकड, कबजा; अडकवण, डाव; कैद, कोठी; किल्ला; डेकच्या खालील माल ठेवण्याची जागा, फाळका. *To h. to bail*, to bind. जामीन घेणें. *To h. one's hand*, शिक्षा-कृति-न करणें, हात आवरणें. *To h. by*,-*to*, to adhere to. न सोडणें, चिकटून राहणें. *To h. with*, to approve of. पसंत करणें. *To hold good*,-*true*, (नियम इ.) लागू असणें,-पडणें, खरा असणें. *H!* (arch.) हां! थांब! धीर धर! *To h. one's head high*, to behave proudly. गर्वानें वागणें, मान वर करून वागणें,-राहणें. *To h. up one's head*, खिन्न-उदास-न

होणें, मान खालीं घालून न बसणें. *To h. one's ground, to h. one's own,* not give way. हार न जाणें आपला मुद्दा-हेका-न सोडणें. *To h. water,* ( fig. ) to be sound, bear examination. न गळणें; पायाशुद्ध असणें, निभावणें, टिकणें, निभणें. *To h. aloof,* शीं संबंध न ठेवणें, अलिप्त राहणें. *To h. back,* to restrain, hesitate, refrain *from.* आवरणें, बंधन-लगाम-घालणें, कांकूं करणें, पासून दूर राहणें. *To h. forth,* to speak publicly. जाहीर-सभेंत-भाषण करणें, जाहीर प्रतिपादन करणें, चारचौघांत बोलणें. *H. hard,* घट्ट धर! *H. in,* आवरणें, कह्यांत ठेवणें. *H. off,* to delay. विलंब लावणें, उशीर करणें. *H. on,* keep one's grasp on something, stop. धरून राहणें, थांबणें, बंद करणें. *H. out,* पसरणें, पुढें-देऊं-करणें, लालूच दाखविणें, सहन करणें, चिकाटी धरणें. *H. over,* postpone. पुढें ढकलणें, दिरंगाईवर टाकणें. *H. up,* support, sustain, display, obstruct, stop and rob on highway, ( of horse ) not fall. आधार देणें, टिकाव धरणें, प्रदर्शन करणें, उघड्यावर-चव्हाट्यावर-आणणें, अडथळा करणें, वाटमारेपणा करून लुटणें, ( घोडा ) न घसरणें, -पडणें. *H.-all,* a portable case for clothes etc. ( कपडे, हांतरूण पांघरूण वगैरे ) सर्वसंग्राहक प्रवासी पिशवी,-बिछाना. *H. -back,* hindrance. अडथळा, विघ्न, गाडीची ढक. *H. fast,* वस्तु घट्ट बसण्या-करितां मारलेला खिळा, हूक इ., आधार, आश्रय. *Held, pa. t., Held, Holden,* ( arch. ) *pa. p.*

**Hō'lder,** *n.* ( हो'ल्डर् )—one who holds anything; a tenant; a temporary accupant of office etc.; a device for holding ( *cigar-h.,* pen-h., etc. ). धरणारा, ( हुंडीचा ) मालक; पोटधरेकरी, कूळ; ( जागेवर ) तात्पुरती नेमणूक झालेला; मूठ, दांडा, नळी, धारक.

**Hōld'ing,** *n.* ( हो'ल्डिंग् )—tenure of land; land or stocks, &c. held. पट्ट्यानें दिलेली जमीन; भाड्यानें वगैरे घेतलेली जमीन, हुंडी-रोखे ( घेतलेले ).

**Hōle,** *n.* ( होल् )-a hollow place, a gap; animal's burrow; a wretched place; a cavity into which a ball must be got in some games, ( Golf ) point scored by player who gets ball from one hole to another with the fewest strokes; perforation; ( sl. ) awkward situation. खळगा, खांच, भोंक; विवर, बीळ, घर; गलिच्छ जागा; कांहीं खेळांत ( चेंडू दवडण्याचा ) खळगा, भोंक, घर, ( गोल्फच्या खेळांत ) असा चेंडू थोडक्या टोल्यांत दवडून मिळविलेला गुण,-डाव; जाळीचें भोंक, जाळी, छिद्र; पेंच, अडचण. *v. t. & i.* to make holes in; to pierce side of ( ship ); to make ( a tunnel ); ( Mining ) to dig through; to put or drive ( a ball ) into a hole. भोंकें पाडणें, खळगे पाडणें, ( गल-बताच्या ) बाजूंत भोंक पाडणें, शिरणें; ( विवर, बोगदा ) खणणें, तयार करणें; ( खाणींत ) खोल खणीत जाणें; ( चेंडू ) भोंकांत-घरांत-दवडणें. *To pick hh. in,* to find fault with. छिद्र-दोष-पाहणें, छिद्रान्वेषण करणें. *To make h. in,* to use a large amount of. मोठा खळ-खळगा-पडणें, बराच भाग वापरला जाणें, खर्चून जाणें. *Round peg in a square h., Square peg in a round h.,* a person not fitted for his place. न जुळ-णारा-अयोग्य-मनुष्य. *H.& corner,* गुप्त, लबाडीचा. *Hol'ey, a.*

**Hŏl'iday,** *n.* ( हॉ'लिडे )—a day of cessation from work or of recreation; ( *pl.* ) vacation. सुटीचा किंवा सणाचा दिवस, सण, रजा, पर्वणी; सुटी. *To make h., take a h.,* कामावर न जाणें, रजा घेणें. *H. clothes,* सणावारीं घालण्याचे-उंची-कपडे. [ *holy day* ]

**Hō'lĭlў,** *adv.* ( हो'लिलि )—in a holy manner. पवित्रपणानें, शुचिर्भूतपणें, निर्मळपणें.

**Hō'liness,** *n.* ( हो'लिनेस् )—freedom from sin, sanctity. निष्पापता, पवित्रपणा, शुद्धि. *H., his H.,* पोपची पदवी, शंकराचार्यांची पदवी, पुण्य-राशि,-निधि.

**Holl'a,** *int.* ( हॉ'ला )—( for shouting ). ओलो! होलो!

**Hŏll'and,** *n.* ( हॉ'लन्ड् )—a fine linen fabric made in Holland. तलम तागी कापड. *-s, n.* a grain spirit. धान्यापासून केलेलें मद्य, दारू.

**Hŏll'o,** *int. & n.* ( हॉ'लो )—calling attention. हे! हो! ( अशी आरोळी, हांक ). *Holl'o, Holloa', v. i. & t.* to shout, to call out; to call to hounds. आरोळी मारणें, मोठ्यानें हांक मारणें; शिकारी कुत्र्यांना हांक मारणें,-हांकारणें.

**Hŏll'ow,** *a.* ( हॉ'लो )—having a hole; empty; ( *fig.* ) false, unreal. पोकळ; रिकामा; खोटा. *n.* a hollow place; hole: valley. खळगा; ढोल, विवर; दरी. *v. t.* (also) *h. out,* to excavate; to bend into a hollow shape. खणून काढणें; पोकळ आकार देणें, वांकविणें; पोकळी तयार करणें. *Beaten h.,* ( *adv.* ) completely. सपशेल चीत, पूर्णपणें पराभूत. *H.-eyed,* डोळे खोल गेलेला, खोंल्या डोळ्यांचा. *H.-hearted,* insincere. मनाचा कुजका *H. race,* पोकळ-विशेष चढाओढ नसलेली-शर्यत. *H.-ly, adv., H.-ness, n.*

**Hŏll'ў,** *n.* ( हॉ'लि )—an evergreen shrub with red berries. तांबड्या फळांचें सदापर्णी झुडूप.

**Hŏll'ўhŏck,** *n.* ( हॉ'लिहॉक् )—a tall plant with large showy flowers. मोठ्या भपकेबाज फुलांचें उंच फुलझाड.

**Hŏ'llÿwood**, *n.* ( हॉ'लिवुड् )—moving pictures of American type, chiefly made at Hollywood in California. अमेरिकन चलच्चित्रपट ( हॉलिवुड येथें तयार झालेले ).

**Hōlm, Hōlme**, *n.* ( होम् )—an islet in a river; low flat land near a river, submerged in time of flood. जूं, जुवा ( लहान बेट, नदींतील ); ( भरतीच्या वेळीं पाणी भरणारी ) नदीकांठची सखल-सपाट-जमीन.

**Hōlm**, *n.* ( होम् )—( *h. oak* ), an evergreen oak. सदापर्णी ओक वृक्ष.

**Hŏlo-**, ( हॉलो- )—in comb., Gk *holos*, whole. पूर्ण, सर्व-. *Hol'ograph, a. & n.* स्वदस्तुरचा-संपूर्ण स्वहस्तलिखित-लेख. *Holohe'dral*, ( of crystal ) पूर्ण समांतरपणा राखणाऱ्या सर्व बाजू असलेला ( स्फटिक ). *Holometa'bola, n. pl.* ज्यांचें स्वरूप पूर्ण बदलतें असे कीटक,-किडे, पूर्ण रूपांतर होणारे कीटक. *Holophote, n.* दिव्याचा सर्व उजेड उपयोगांत आणण्याचें-एकत्रित करण्याचें-साधन.

**Hŏl'ocaust**, *n.* ( हॉ'लोकॉस्ट् )—whole burnt-offering; ( *fig.* ) wholesale sacrifice or destruction. पूर्ण हुतभाग, होम.; पूर्ण नाश, कत्तल.

**Hō'lster**, *n.* ( हो'ल्स्टर् )—a leather case for pistol. पिस्तूल ठेवण्याची चामड्याची पिशवी.

**Hōlt**, *n.* ( होल्ट् )—( poet. ) a copse; a wooded hill. झुडपाळ प्रदेश, रान ; जंगलें असलेली टेंकडी.

**Hō'lÿ**, *a.* ( हो'लि )—belonging or devoted to God; of high moral or spiritual excellence; consecrated, sacred. ईश्वरपरायण, भाविक; धार्मिक, नीतिमान्; पवित्र. *n.* inner chamber of sanctuary in Jewish temple, *h. of hh.*, innermost shrine. हिब्रू-ज्यू-लोकांच्या जेरुसलेम येथील देवळाचा आंतील सोंवळा गाभारा, देवघर, देवाचा गाभारा. *H. day*, धार्मिक सणाचा दिवस, धार्मिक उत्सव, सण. *H. Ghost, H. Spirit*, ( त्रिमूर्तींतील ) पवित्र आत्मा. *H. Joe*, ( naut. ) a pious person. धार्मिक वृत्तीचा मनुष्य. *H. terror*, ( *sl.* ) a formidable person, a bore ( child ). भयंकर माणूस, त्रासदायक मूल. *H. Thursday*, Ascension Day. ईस्टर रविवार पूर्वीच्या आठवड्यांतील गुरुवार. *H. water*, तीर्थोदक, गंगोदक, पवित्र पाणी. *H. week*, ईस्टर रविवार-पूर्वीचा आठवडा. *H. writ*, holy writings collectively, the Bible. पवित्र धर्मशास्त्रें, धर्मग्रंथ, ख्रिस्ती लोकांचें बायबल.

**Hō'lÿstōne**, *n.* ( हो'लिस्टोन् )—a sandstone for scouring decks. ( बोटींतील ) तक्तपोशी घांसण्याचा रेंवाळ दगड. *v. t.* अशा दगडानें तक्तपोशी घासणें.

**Hŏm'age**, *n.* ( हॉ'मिज् )—formal acknowledgement of allegiance; ( *fig.* ) tribute paid to a person or merit. सेवा, उपासना; पूजा, नमन, मान, सत्कार, सन्मान. *To pay h. to, to do h. to* ( a person, his qualities ), ला मान देणें.

**Hōme**, *n.* ( होम् )—a dwelling-place; fixed residence; native land; habitation or seat; an institution of refuge or rest; ( in games ) a goal. स्वतःचें घर, राहण्याचें ठिकाण; जन्मभूमि, मातृभूमि, ठिकाण, स्थान; आश्रम, आश्रयस्थान, स्थान; डाव. *a.* pertaining to home; not foreign. घरचा, खासगी, घरगुती; परकी नव्हे असा, स्वदेशी. *adv.* to or at one's home; the point aimed at. घरीं, घराकडे; नेमलेल्या ठिकाणीं, मर्मस्थानीं, मर्म भेदून. *v. i. & t.* to go home (esp. of pigeons); to furnish with a home. निवासस्थानाकडे- घराकडे- जाणें; घर करून देणें. *Long h., Last h.*, the grave. थडगें, स्मशान, अंत्य विश्रांतिस्थान. *At h.*, स्वगृहीं, स्वदेशांत, स्वस्थ, सुखानें, ( एखाद्या विषयांत ) प्रवीण, माहीतगार, पूर्ण ज्ञान असलेला, घरांत. *Not at home*, घरांत नाहींत, बाहेर गेले आहेत. *At-home', n.* निमंत्रित पाहुण्यांना मेजवानी, भोजन-सत्कार समारंभ. *To come h. to*, affect intimately. अंगास येणें, जिव्हारीं लागणें. *H.born*, native. घरचा, स्वदेशी, तद्देशीय. *H.-bred*, घरांत वाढवलेला. *H.-coming*, स्वगृहीं- स्वदेशीं-परत येणें. *H.-felt*, वर्मी लागलेला. *H.-keeping*, *a.* stay-at-home. नेहमीं घरांत असणारा, घर-कोंबडा. *H.-made*, घरगुती, घरीं तयार केलेलें, घरांत उपयोगाचें. *H. Rule*, ( आयरिश ) स्वराज्य. *H.-sick*, depressed by absence from home. कुटुंबविरहानें दुःखी झालेला, गृहविरहदुःखी. *H.-sickness*, कुटुंबविरहदुःख. *H. spun*, *a. & n.* cloth of home spun yarn; plain, homely. घरीं सूत कातून विणलेला कपडा; साधें, घरगुती. *H. stead*, घर गोठा वगैरे, शेत. *H.-less*, *a.* घरदाररहित. *H.-like, a.*

**Hōme'lÿ**, *a.* ( हो'-म्-लि )—plain; unpretending; not beautiful; primitive. साधा; निरहंकारी, लीन; सामान्य, दहाजणांसारखा; मूळचा, घरगुती. *-liness, n.*

**Homeopathy**, See Homoeopathy.

**Homē'ric**, *a.* ( होमे'रिक् )—of Homer, in the style of Homer; heroic. होमर कवीचा; होमरच्या धर्तीवरील; शौर्याचा, वीराचा.

**Hōme'ward**, *a. & adv.* ( हो'म्-वर्ड् )—towards home or one's native land. घराकडे, मातृ-भूमीकडे. *H. bound*, स्वदेशाकडे जाणारें-आण्याच्या तयारींत असणारें (जहाज). [Also, Home'wards]

**Hŏm'icide**, *n.* ( हॉ'मि-साइड् )—killing or killer of a human being. मनुष्यवध, मनुष्यवध कर-णारा. *-dal, a.* मनुष्यवधाचा,-वधासंबंधीं.

**Hŏm'ilў**, *n.* (हॉ'मिलि)—a sermon; a serious discourse or admonition. धार्मिक उपदेश; धर्मोपदेश, प्रवचन, कानउघाडणी. *Homilet'ic*, *a.* धर्मोपदेशपर; *n. pl.* प्रवचनपटुत्व.

**Hō'ming**, *a.* (हो'-मिंग्)—that goes home; (of pigeons) trained to fly home. घरीं-स्वस्थानीं -जाणारा; मूळ ठिकाणीं-स्वदेशीं-परत जाण्यास शिकविलेलें (कबूतर).

**Hŏm'iny**, *n.* (हॉ'मिनि)—coarsely ground maize boiled in water or milk. मक्याच्या रव्याची खीर, कण्हेरी.

**Hō'mo**, *n.* (हो'मो)—(zool.) a man. मनुष्य *H. sapiens*, (wise) man regarded as species. मनुष्यवर्ग.

**Hŏmo-**, (हॉमो-)—in comb., Gk *homos*, same. सम-. *Homocen'tric*, having the same centre. समकेंद्रक, एकच मध्यबिंदू असलेला. *Ho'mogamous*, (Bot.) having all florets of the same sex. एकलिंगी लघुपुष्पांचा. *H.-genet'ic* सम-एक-वंशीय, एकमूलक. *H.-phone*, a word having same sound as another, but of different meaning or origin (as *fair*, जत्रा, *fair*, सुंदर). (भिन्नार्थदर्शक) तुल्यवर्णोच्चारी शब्द.

**Hŏmoeŏp'athў**, *n.* (होमिऑ'पथि)—treatment of diseases by drugs that in healthy persons would produce symptoms like those of the disease. ज्या पदार्थाच्या सेवनानें निरोगी माणसाला एखादा विकार होतो तो पदार्थ तो विकार झालेल्या रोग्याला देऊन रोग बरे करण्याची पद्धत, व्याधिविपर्यस्तार्थकारी चिकित्सा, समचिकित्सा. *-'ath*, *n.* समचिकित्सक. *-ath'ic*, *a.* समचिकित्सेचा.

**Hŏmŏgē'nĕous**, *a.* (हॉमोजी'निअस्)—of the same kind or nature; uniform. एकजातीय, सजातीय; एकजिनसी. (alge.) समगुणक, समघातिक. *-ly*, *adv.*; *-ness*, *n.*; *-ne'ity*, *n.* uniformity. सजातीयता, साधर्म्य, समघातता.

**Homŏl'ŏgāte**, *v. t.* (हमॉ'लॅगेट्)—to admit, to acknowledge; to confirm. कबूल-मान्य-करणें; दुजोरा देणें. *-tion*, *n.*

**Homŏl'ogous**, *a.* (हमॉ'लगस्)—having the same relation or value; corresponding. समधर्मीय, एकजातीय, सममूलक, एकास्पद; सदृश, अनुरूप. *Hom'ologue*, *n.* तुल्यजातीय वस्तु. *Homol'ogy*, *n.* समधर्मता, समश्रेणिकता, सममूलकता.

**Hŏm'onўm**, *n.* (हॉ'मोनिम्)—a word of the same form as another but of different sense; a namesake. भिन्नार्थदर्शक समोच्चारी शब्द; एकाच नांवाचा, समाननामा.*-mous*, *a.*

**Hōne**, *n.* (होन्)—whetstone, esp. for razor. निसणा, साण. *v. t.* साणेवर घासणें, धार लावणें.

**Hŏn'est**, *a.* (ऑ'निस्ट्)—upright; not cheating or stealing; chaste; good, worthy. इमानी, प्रामाणिक; सचोटीचा; सात्त्विक, पवित्र, शुद्ध; चांगलें, योग्य. *To make an h. woman of*, फूस लावून नेलेल्या स्त्रीशीं विवाह करणें. *Hon'estly*, *adv.* प्रामाणिकपणानें.

**Hŏn'estў**, *n.* (ऑ'निस्टि)—uprightness; truthfulness; a kind of plant with purple flowers. प्रामाणिकपणा, सचोटी, इमान; खरेपणा; एक जातीचें फूलझाड. *H. is the best policy*, सचोटीनें वागणें हा उत्तम व्यवहार,-उत्तम मार्ग.

**Ho'ney**, *n.* (ह'नि)—sweet fluid collected from flowers by bees &c.; sweetness; (also Sc. *hinnie*, *hinny*) sweetheart, darling. मधु, मध, मधासारखा गोड पदार्थ; मधुरता, गोडी; आवडती, प्रियकर, जिवलग. *H.-bee*, *n.* मधमाशी, मधुकर. *H. buzzard*, एक प्रकारचा मधमाशांच्या अळ्या खाणारा पक्षी. *H.-dew*, sweet sticky substance found on leaves and stems, an ideally sweet substance, tobacco sweetened with molasses. पानें व झाडांचे बुंधे यांवर येणारा गोड चिकट पदार्थ, -चीक, सर्वोत्कृष्ट गोड पदार्थ,-वस्तु, काकवीचें पाणी लावलेला तंबाखू. *H.-suckle*, a climbing shrub; woodbine. एक पिंवळ्या फुलांचें फूलझाड, फूलवेल; एकजातीची विडी,-सिगारेट. *H. sweet*, *a.* मधाप्रमाणें गोड. *Ho'neyed*, *Ho'nied*, *a.* sweet. गोड, मधुर.

**Hon'eycōmb**, *n.* (ह'नि-कोम्)—bees' wax structure of hexagonal cells for honey and eggs; a cavernous flow in metal; ornamental or other work hexagonally arranged. मधमाशांचें पोळें, पोळा, पोळी; धातूंतील पोकळी-सच्छिद्रता दोष, तडा; षट्कोनी रचनेचें काम. *v. t.* सच्छिद्र करणें, भोकें भोकें पाडणें, षट्कोनी रचना करणें.

**Ho'neymōōn**, *n.* (ह'नि-मून्)—holiday of newly married couple. नुकत्याच लग्न झालेल्या जोडप्याचा आनंदमास, गर्भाधान, मधुचंद्र. *v. i.* to spend honey-moon (*in*, *at*, a place). लग्नानंतर जोडप्यानें मजेंत काळ घालविणें, मधुचंद्र उपभोगणें.

**Hŏng**, *n.* (हॉग्)—(in China) a set of buildings used as a factory etc.; foreign trading establishment. (कारखान्याच्या) इमारतींची रांग; परदेशी लोकांची वखार, व्यापारी संस्था.

**Hŏnk**, *n.* (हॉंक्)—wild goose's cry; sound of a motor horn. रानटी हंसाचें ओरडणें; मोटरच्या शिंगाचा आवाज.

**Honorăr'ĭŭm**, *n.*(ऑनरे'रिअम, हॉ-)—fee for services rendered. परिश्रमाबद्दल दिलेली फी किंवा बक्षीस, सन्मानवेतन.

**Hŏn'orarў**, *a.* (ऑ'नररि)—conferred by way of honour; unpaid. प्रतिष्ठा म्हणून केलेला किंवा दिलेला; बिनपगारी, सन्मान्य.

**Hŏnorĭf'ic**, *a.* & *n.* (ऑनरि'फिक्)—implying respect. सन्मानयुक्त, सन्मानदर्शक,-सूचक (वचन).

**Hŏn'our**, *n.* (ऑ'नर्)—glory, high reputation; chastity; a mark of respect; (*pl.*) distinction for proficiency in examination, &c.; (Golf) right of driving off first as having won last hole; (in Whist) ace, king, queen, knave, of trumps; (in Bridge the ten also); (Commerc.) acceptance. प्रतिष्ठा, थोर कीर्ति; अब्रू, पावित्र्य, पातिव्रत्य; बहुमान, सन्मानचिन्ह; (अने०) विद्याशाखेंत मिळविलेलें नैपुण्य; (गोल्फच्या खेळांत) मागील डाव-गुण-जिंकल्यामुळें पहिल्यानें खेळण्याचा मान,-हक्क; हुकमाचा एक्क्या, राजा, राणी, गुलाम; (ब्रिजमध्यें) दश्शा; (हुंडीचा) स्वीकार. *v. t.* to respect highly; to confer honour on; to accept or pay a bill of exchange when due. मान देणें, पूज्य मानणें; (हुंडी वगैरे) सचकारणें, पटविणें. *Your, his, H.*, सन्मानदर्शक पदवी. *Last hh., funeral hh.*, प्रेतयात्रेचे वेळचा शेवटचा मानसन्मान. *Military hh.*, marks of respect paid by troops at the burial of officer, to royalty, etc. लष्करी मानसन्मान,- सलामी. *Hh. of war*, (विजयी सैन्यानें) पराभव पावलेल्या सैन्यास दिलेले (निशाणासहित कूच करणें वगैरे) विशिष्ट हक्क. *In h. of*, च्या स्मरणार्थ. *Bound in h.*, नैतिक जबाबदारी असलेला, मनानें बांधलेला. *Upon my h.*, गळ्याच्यान्! कुळशील स्मरून. *Code of h., law of h.*, शिष्टसंप्रदाय, पूर्वापार चालत आलेले वर्तनाचे नियम,- पद्धति. *Hon'oured, a.* मान दिलेला.

**Hŏn'ourable**, *a.* (ऑ'नरबल्)—deserving or bringing honour; generous; title (*Hon.*). प्रतिष्ठेचा, नामदार, संभावित, सन्मान्य, थोर मनाचा, उदार; नामदार, नेकनामदार. *-bly, adv.*

**Hŏŏd**, *n.* (हुड्)—covering for the head and neck; a thing like a hood; a badge worn over the gown to show university degree. कानटोपी, शीर्षाच्छादन; टोपी, बुरखा, फडा; पदवीधरांच्या झग्याला पाठीवर असलेला शोभामूलक झोल, हुड. *v. t.* to cover with hood. बुरख्यानें-टोपीनें-झांकणें, छपविणें. *-ed, a.*

**Hŏŏd'ie,-dy**, *n.* (हु'डि)—(Also *h. crow*) a hooded crow. एक जातीचा कावळा.

**Hŏŏd'lum**, *n.* (हु'ड्लम्)—(*U.S., sl.*) a street rowdy. मवाली, आडदांड, दंगेखोर.

**Hōō'dōō**, *n.* (हू'डू)—bad luck. दुर्दैव, वाईट नशीब. *v. t.* एखाद्याला संकटांत घालणें.

**Hŏŏd'wink**, *v. t.* (हु'ड्-विंक्)—to blindfold, to impose on, to deceive, to humbug. (एखाद्याचे) डोळे बांधणें, नजरबंदी करणें, फसवणें, भूलथाप देणें.

**Hōōf**, *n.* (हूफ्)—the horny casing of the foot of the horse and other equine animals; (joc.) human foot. खुर;माणसाचा पाय, पाऊल. *v. t. & i.* to strike with a hoof; to kick; to go on foot. खूर मारणें, खुरानें आपटणें; लाथ मारणें; पायीं जाणें.*-hoofed, a.*

**Hŏŏk**, *n.* (हुक्)—bent piece of wire, &c. for catching hold or for hanging things on; (also *fish-hook*) a bent piece of wire for catching fish; (fig.) a trap, a snare; a stroke in cricket or golf; a curved cutting instrument; a sharp bend. आंकडा, आंकडी, कडी; मासे पकडण्याची गरी; सांपळा, जाळें; टोला; (आंकड्यासारखा) कोयता, विळा, खोडसें; वांकण. *v. t. & i.* to grasp, to secure; to fasten; to catch (fish, fig. husband) with a hook; (Crick.) to play (ball) round from off to on side without hitting it at the pitch; (Golf) to drive widely to left side. आंकड्यांत धरणें, पकडणें, घट्ट बांधणें; गरीनें (मासे) पकडणें, (नवऱ्याला) मुठींत ठेवणें; (क्रिकेट०) चेंडू एकदम वळविणें, (गोल्फ) दूर डाव्या बाजूला दवडणें. *Reaping h.*, (गवत, धान्य) कापण्याचा कोयता, विळा. *H. & eye*, हुकाचें (कपड्याला) अडकणें. *By h. or by crook*, by fair means or foul. बऱ्या वाईट मार्गानें, येन केन प्रकारेण. *To drop off the hh.*, (sl.) die. मरणें. *On one's own h.*, (sl.) स्वतःच्या हिंमतीवर,-आंगावर. *To take one's h., h. it*, make off, run away. पाय काढणें, निघून-पळून-जाणें. *H.-nosed*, गरुडनाक्या.

**Hook'er**, *n* (हु'कर्)—kinds of small sailing-ships. शिडाचें जहाज, शीडवाली होडी. *The old h.*, गलबत, होडकें.

**Hoo'lĭgan**, *n.* (हू'लिगन्)—one of a gang of street roughs. रस्त्यांत मारामारी करणाऱ्या गुंडांपैकीं एक, मवाली, दंगेखोर.*-ism, n.*

**Hōōp**, *n.* (हूप्)—a band of metal (for binding cask, &c.); a wooden or iron circle trundled by a child; a circle of elastic material for expanding woman's skirt; an iron arch used in croquet. गाडा, आडा, विडी; मुलें फिरवितात तें कडें, वर्तुलाकार गाडा; चक्कर, चक्र; क्रोकेखेळांतील लोखंडी कमान. *v. t.* to bind with a hoop; to encircle. पट्ट्यानें-कड्यानें-बांधणें; वेढणें, वेरणें, मध्यें धरणें. *H.-petticoat*, चक्कर लावून फुगीर केलेला झगा.

**Hōōp**, *v. i.* (हूप्)—to cry hoop. हुप् हुप् करणें, ओरडणें, मोठ्यानें खोकणें. *n.* the cry hoop;

the sound heard in hooping-cough. हुप् हुप् आरोळी; खसखस खोकला,-खोकणें.

**Hoop'ing-cough**, *n.* (हु'पिंग्-कॉफ्)—a disease with convulsive cough. डांग्या खोकला.

**Hoop'oe**, *n.* (हू'पू)—a S.-European bird with a large crest. सुतार (पक्षी).

**Hoosh**, *n.* (हूश्)—(sl.) a hotch-potch in Arctic travel. आर्क्टिकमधील प्रवासाची शिधा-सामुग्री.

**Hoot**, *v. i. & t.* (हूट्)—to make a loud sound (esp. of disapproval); (of owl) to utter cry; to sound. हुर्यो हुर्यो करणें, हुडकावणें; ओरडणें; (मोटर वगैरे) आवाज करणें. *n.* a sound of derision etc.; an owl's cry. हिडिस फिडीस, शुक्, हड्हड्; घुबडाचें ओरडणें, घूंघूं. *Not care a h., not worth a h.,* (U. S.) not worth anything. कःपदार्थ, क्षुल्लक. Hoot! Hoots! *int.* हत्त! हुर्र! थूः! हट्! *Hoot'er, n.* steam whistle. शिटी, भोंगा.

**Hootch**, *n.* (हूच्)—(sl.) a strong drink. मादक पेय, मद्य.

**Hoove**, *n.* (हूव्ह्)—a cattle disease, with stomach inflation due to green fodder. गुरांचा पोट-फुगी रोग.

**Hoo'verize**, *v. i.* (हू'व्हराइझ्)—(sl.) to economize, esp. in use of food. (अन्नाची) काटकसर करणें.

**Hŏp**, *n.* (हॉप्)—a plant with bitter cones to flavour beer etc.; (pl.) these cones. एक तुरट फळांचें झाड,-वनस्पति; (मद्याला-दारूला-चव आणण्याकरितां) हॉपचीं फळें. *v. t. & i.* to bear, gather, hops; to flavour with hops. हॉप फळें धरणें,-गोळा करणें; हॉप फळांनीं चव-स्वाद-आणणें.

**Hŏp**, *v. i. & t.* (हॉप्)—(of person) to spring on one foot, (of animals) with all feet at once; to jump over (a ditch etc.). एका पायावर उडी मारणें, लंगडत चालणें, (जनावरांचें) लंगडी घालणें, चौखूर उडी मारणें; वरून उडी मारणें. *n.* a hopping; a jump; a dance. उडी मारणें; उडी; नाच (-णें). *To h. the twig* or *stick*, (sl.) to depart suddenly, die. अकस्मात निघून जाणें, मरणें. *H. (it)*, go away. चल, निघून जा. *H. off*, (of aeroplane) to start. (विमान) निघणें, उडणें. *Hop o'-my-thumb*, a dwarf. खुजा-ठेंगू-वामन-मूर्ति मनुष्य. *Hopscotch*, a child's game of hopping over scotches or lines. मुलांचा लंगडीचा खेळ. *On the h.*, bustling about. नाचरा, धांदरट. *H., skip* (or *step*) *& jump*, an exercise in which these three movements are done in sequence. एक प्रकारचा व्यायाम,-खेळ.

**Hōpe**, *n.* (होप्)—expectation and desire; trust; probability; a person or thing that hope centres in. आशा; उमेद, विश्वास; संभव; आशा-विषय. *v. i. & t.* to expect and desire; to feel hope. अपेक्षा करणें; आशा बाळगणें, विश्वास-भरंवसा-ठेवणें. *Hoping against hope*, clinging to a mere possibility. व्यर्थ आशा करीत राहणें. *Hope'less, a.* निराश, हताश; निराशेचा, उपायहीन, निराशाजनक,*-ly, adv., -ness, n.* निराशा.

**Hōpe'ful**, *a.* (हो'प्-फुल्)—feeling hope; promising. आशा असलेला, आशायुक्त; होतकरू, आशाजनक. *n. young h.,* होतकरू मुलगा,-गी.*-lly, adv.,-ness, n.*

**Hŏpp'er**, *n.* (हॉ'पर्)—a person etc. that hops; a hopping-insect; a device, an inverted pyramid or cone, for feeding grain into mill; a barge or vessel for carrying away mud etc.; 2. a hop-picker. लंगडणारा; उडणारा कीटक,-पतंग; (गिरणींत) यंत्राला धान्य पुरविणारें वैरणें; कचरा-चिखल-वाहून नेणारा पडाव; हॉप गोळा करणारा.

**Hŏp'ple**, *v. t.* (हॉ'पल्)—to fasten together legs of (a horse etc.). पायांत खोडा घालणें, जखडणें. *n.* खोडा, पदशृंखला.

**Hōrde**, *n.* (होअर्ड्)—a gang, troop. टोळी, थवा, बाजारबुणगे.

**Hori'zon**, *n.* (होरा'इ-झन्)—the line at which the earth and the sky appear to meet; a boundary of mental outlook etc. क्षितिज, धार, दिगन्त; टप्पा, पोंच.

**Hŏrizŏn'tal**, *a.* (हॉरिझॉ'न्टल्)—parallel to the plane of the horizon, level; of or at the horizon. सपाट, आडवा; क्षितिजाचा, क्षितिजाबरोबर. *n.* a horizontal line, bar, etc. आडवी रेघ, आडवा दांडा.*-tality, n.,-tally, adv.* क्षितिजाशीं समान, आडवा.

**Hor'mōne**, *n.* (हॉ'र्मोन्)—(Physiol.) kinds of internal secretion that pass into the blood and stimulate the organs to action. इंद्रिय-क्रिया-प्रवर्तक आन्तरोत्सर्ग,-स्राव.

**Horn**, *n.* (हॉर्न्)-curved and pointed excrescence on the head of cattle, &c.; projection on the head of other animals; deer-antler; a thing or vessel made of horn; a wind-instrument; arm or branch of a bay, river etc. शिंग, शृंग; (किड्याची वगैरे) मिशी; हरणाचें

शिंग,-त्याचा फांटा ; शिंगाचा पदार्थ,-चें भांडें, पात्र ; वाजवायचें शृंग, शिंग, कर्णा ; फांसूं, फांटा. *v. t. & i.* to furnish with horns ; to gore with the horns ; to adjust ( frame of a ship ) at right angles to the line of keel. सशृंग करणें, शिंगें लावणें ; शिंगांनीं भोंसकणें ; नावेच्या-गलबताच्या-कण्याशीं ( गलबताच्या बाजू ) काटकोनांत बसविणें. *To draw in one's hh.*, to restrain one's ardour, to draw back. उल्हासाला लगाम घालणें, मागें-माघार-घेणें. *H. of plenty*, cornucopia. समृद्धिदर्शक शिंग. *The H.*, Cape Horn, केप हॉर्न् ( भूशिराचें नांव ). *H. bar*, गाडीचा आडवा दांडा. *H. beam*, a hedgerow tree. कुंपणाच्या उपयोगाचें झाड *H.-bill*, a kind of bird. चोंचीवर शिंगासारखें उठाणूं असलेला पक्षी. *H.-book*, मुलांचें पहिलें पुस्तक. *H. mad*, (arch.) stark mad. एकदम वेडसर, माथेफिरू. *H.-plate*, axle guard of railway carriage. आगगाडीच्या डब्याच्या चाकाच्या आंसाचा रक्षक. *H.-rimmed*, ( of spectacles ) शिंगाच्या कडा बसविलेला ( चष्मा ). *H. stone*, एक जातीचा दगड,-खडक. *H. in*, ( U. S. ) to intrude. मध्येंच येणें,-घुसणें,-पडणें. *Horns of a dilemma*, दुहेरी पंचाईत, दोहोंकडून पेंच,-अडचण. *H.-ful*, *H.-less*, *Horned*, *aa.*

**Horn'blĕnde**, *n.* ( हॉ'र्न्ब्लेन्ड् )—a mineral of various colours found in granite. एक जातीचा खनिज पदार्थ.

**Horn'er**, *n.* ( हॉ'र्नर् )—maker of horn combs etc.; one who blows a horn. शिंगाच्या फण्या वगैरे करणारा ; शिंग वाजविणारा.

**Hŏrn'ĕt**, *n.* ( हॉ'र्निट् )—a large species of wasp. एक मोठ्या जातीची गांधीलमाशी, साळखादें, तुंबसर. *To bring hornets' nest about* one's *ears*, पुष्कळ हाडवैरी-शत्रु-निर्माण करणें.

**Horn'pipe**, *n.* ( हॉ'र्न्पाइप् )—an old wind instrument ; ( music for ) a lively dance, esp. of sailors. तुतारीसारखें वाद्य ; ( खलाशांचा ) नाच, नाचतांना गाण्याचा राग.

**Horn'y̆**, *a.* ( हॉ'र्नि )—of, like, a horn ; hard, callous. शिंगाचा, शिंगासारखा ; कठीण, चिवट, निष्ठुर. *Horn'iness*, *n.*

**Hŏ'rolŏge**, *n.* ( हॉ'रलॉज् )—a timepiece, a clock, a dial. कालमापकयंत्र, घड्याळ, कालमापक तबकडी.*-ger*,*-gist*, *n.* [ Gk *hora*, time, *logos*, telling ]

**Horŏl'ogy̆**, *n.* ( हरॉ'लजि )—art of measuring time or making clocks. कालामापनविद्या, घड्याळें बनविण्याची कला.

**Hŏ'roscŏpe**, *n.* ( हॉ'रस्कोप् )—configuration of the heavens at certain moment, esp. at one's birth. ग्रहकुंडली, जन्मकुंडली, जन्मटिपण. *To cast a h.*, जन्मटिपण तयार करणें.*-pic*,*-pical*, *aa.*,*-py*, *n.* पत्रिका-जन्मकुंडली-पाहण्याची कला.

**Hŏ'rrent**, *a.* ( हॅ'रन्ट् )—bristling. अंगावर शहारे आणणारा, कांटा उभा करणारा.

**Hŏ'rrĭble**, *a.* ( हॉ'रिबल् )—exciting horror ; hideous, shocking ; unpleasant. भयंकर, भीतिदायक ; अघोर ; विषम, कडु.*-bly.*, *adv.*,*-ness*, *n.*

**Hŏ'rrĭd**, *a.* ( हॉ'रिड् )—horrible ; unpleasing. भयंकर ; अप्रिय.*-ly*, *adv.*,*-ness*, *n.*

**Hŏ'rrĭfy̆**, *v. t.* ( हॉ'रिफाय् )—to strike with horror, to excite horror in ; to shock. भीति उत्पन्न करणें ; धडकी भरवणें.*-fic*, *a.* भयंकर, धडकी भरविणारें.*-fication*, *n.*

**Hŏ'rror**, *n.* ( हॉ'रर् )-terrified shuddering, terror ; intense dislike or fear. अतिभय, कंप ; शिसारी, ओकारी. *The horrors*, a fit of horror or depression, esp. as in delirium tremens. धडकी, अति मद्य-पानानें लागणारें वेड. *Horror-struck*, *-stricken*, shocked. उरांत धस्स झालेला. *Chamber of Horrors*, गुन्हेगारांचे ( हाल हाल करण्याची ) कोठडी, भय उत्पन्न करणारें स्थान.

**Hors**, *adv. & prep.* ( ऑर् )—outside. बाहेरून, बाह्य. *H. concours*, ( of exhibit ) not competing for a prize. बक्षिसासाठीं न पाठविलेलें,-मांडलेलें. *H. de combat*, ( ऑर्डकॉं'बा ) out of fight, disabled. न लढूं शकणारा, दुर्बळ, जखमी झालेला. *H.-d'œuvre*, ( ऑर्ड'व्हर् ) an extra dish as relish. विशेष-जादा-पदार्थ ( चवीसाठीं ).

**Hŏrse**, *n.* ( हॉर्स् )—a solid-hoofed quadruped used as a beast of burden and draught ; ( *collect.* ) cavalry; a gymnastic vaulting-horse ; a frame ( often with legs ) for supporting things ; ( Naut. ) a rope or bar ; ( Mining ) an obstruction in a vein. घोडा, अश्व ; घोडदळ, घोडेस्वारांची पलटण ; व्यायाम करतांना उड्या मारण्याचा लांकडी घोडा ; घडवंची, घोडी, घोडा ; दोर, दांडा ; ( खाणींत ) थरतरभंग, दोष. *v. t. & i.* to provide with a horse or horses ; to carry ( a person ) on one's back ; to place person on a wooden horse to be flogged ; to mount, go, on horseback. घोडा, घोडे जोडणें,-पुरविणें ; ( मनुष्याला ) पाठुंगळीला घेणें ; फटके मारण्यासाठीं घोडीवर चढविणें, घोडी देणें ; घोड्यावर बसणें,-बसून जाणें. *Light h.*, कमी वजनाचीं शस्त्रास्त्रें घेतलेलें घोडदळ. *Clothes-h.*, कपडे अडकवण्याची घोडी. *To h.*, ( command ) mount your hh., आपापल्या घोड्यावर बसा,-स्वार व्हा. *To grin through a*

*h.-collar*, ग्राम्य- साधा- विनोद करणें. *To look a gift h. in the mouth*, to find fault with a gift. देणगी मिळालेल्या वस्तूला नांवें ठेवणें. *To mount, to ride, the high h.*, to put on airs. दिमाख दाखविणें. *To eat, to work, like a h.*, घोड्यासारखें पुष्कळ चरणें,- खाणें, भरपूर काम करणें. *On h.-back*, घोड्यावर स्वार. *H.-block*, a small platform for mounting h. घोड्यावर बसतां यावें म्हणून पाय ठेवण्याचा लहान ठोकळा. *H.-box*, घोडे नेण्याचा रेल्वेचा बंदिस्त डबा, घोड्याची पेटी, मोठी बंदिस्त जागा. *H.-breaker*, one who trains or breaks in horses. घोड्यांना शिकविणारा, अश्व-शिक्षक, चाबूकस्वार. *H.-chestnut*, a tree with conical clusters, its fruit. शंक्वाकार फळांचें मोठें झाड, त्याचें फळ. *H.-cloth*, घोड्याच्या पाठीवर घालण्याची झूल. *H. coper*, a horse-dealer. घोड्यांची खरेदी-विक्री करणारा. *H.flesh*, घोड्याचें मांस (अन्न), घोड्यांची जात, घोडे. *H.fly*, घोडमाशी. *H. Guards*, cavalry brigade of English Household troops; militry authorities at the head of an army. राजाचे पहारेकरी घोडेस्वार, घोडे-पलटण ; सैन्याचा मुख्य लष्करी अधिकारी. *H. hair*, घोड्याच्या आयाळीचा- शेपटीचा- केंस. *H. latitudes*, belt of calms. ईशान्य व्यापारी वाऱ्यांच्या उत्तर टोंकाचा निर्वात प्रदेश. *H.- laugh*, a loud coarse laugh. खदखदां- मोठ्यानें- हंसणें. *H.-leech*, a large kind of leech, an insatiable person. मोठी जळू, घोडजळू, अधाशी- हांवरा- अतृप्त मनुष्य. *H. marines*, an imaginary corps of mounted marines as men out of their element. नाविक घोडेस्वारांचें काल्पनिक दल ( यांची माथेफिरूपणाबद्दल प्रसिद्धि). *H.-play*, boisterous play. धांगडधिंग्याचा खेळ. *H.-power*, a machine by which work of a h. is made to drive other machinery, ( Mech. ) (abbr. *h.p.*) the unit of rate of doing work, 550 foot-pounds per second. अश्वशक्ति, ५५० पौंड वजन एक सेकंदांत एक फूट उंच उचलण्यास लागणारी शक्ति. *H.-race*, ( घोडेस्वारांसह ) घोड्यांची शर्यत. *H.-radish*, a plant with pungent root. शेवग्याचें झाड, शेगट. *H. sense*, (colloq. ) plain rough common-sense. साधें व्यवहारज्ञान, साधी अक्कल. *H. shoe*, (घोड्याचा) नाल, नालासारखी वस्तू. *H. whip*, घोड्याचा चाबूक; *v. t.* घोड्याच्या चाबकानें (एखाद्याला) फटके मारणें. *H. woman*, स्त्री घोडेस्वार. *Horse'-less, a.* *Hors'y, a.* घोड्याचा, अश्वविषयक; घोडेस्वाराची आठवण करून देणारा,-नक्कल करणारा. *Hors'ily, adv.*, *-iness, n.*

**Hŏrse'ărtĭllerў**, *n.* (हॉ'र्स्-आर्टिलरि)—artillery of mounted gunners. घोड्यावरील तोफखाना, घोडे-स्वारांचा तोफखाना.

**Hŏrse'man**, *n.* (हॉ'र्स्मन्)—a rider on horseback. ( पटाईत ) घोडेस्वार.*-ship*, अश्वारोहणकला.

**Hŏrt'atĭve**, *a.* (हॉ'र्टटिव्ह्)—giving exhortation, advisory. उपदेशात्मक, प्रोत्साहनपर, उपदेशक, बोधपर. *Hort'atory, a.*

**Hŏrt'ĭcŭltŭre**, *n.* ( हॉ'र्टि-कल्चर् )—the art of gardening, the art of cultivating gardens. बागकाम, बागाईत, उद्यानविद्या. *Horticul'tural, a.*, *-rist, n.*

**Hōse**, *n.* ( होझ् )—stockings ; a flexible tube (for watering plants, &c.). पायमोजे ; रबराची पाणी घालण्याची नळी. *v. t.* to provide with a hose; to water with a hose. पायमोजे घालणें ; रबरी नळीनें पाणी घालणें. *H. tops*, (होटॉप्स्) footless stocking. बिनतळव्याचे मोजे.

**Hōs'ier**, *n.* ( हो'झर् )—a dealer in hose &c. (*esp.* in underclothing ). पायमोजे (आंगडीं, कुडतीं, गंजीफ्राक, वगैरे) विकणारा. *Ho'siery, n.* पायमोजे व त्यासारख्या वस्तु ( विकण्याचा धंदा ).

**Hŏs'pĭce**, *n.* ( हॉ'स्पिस् )—a travellers' house of rest kept by religious order ; a home for the destitute or sick. प्रवाशांसाठीं मठ,-मठी ; अनाथालय, रुग्णालय.

**Hŏs'pĭtable**, *a.* (हॉ'स्पिटेबल् )—given to hospitality, kind to strangers and guests. आदरातिथ्य करणारा, आदरशील. *-bly, adv.* आतिथ्य-पूर्वक, स्वागत करून.

**Hŏs'pĭtal**, *n.* ( हॉ'स्पिटल्)—an institution for care of the sick ; a charitable institution. रुग्णालय, इस्पितळ ; धर्मशाळा, धर्मार्थ संस्था. *-ism, n.* रुग्णालयांतील आरोग्यशास्त्रद्दष्टच्या उणीवा, रुग्णालयपद्धति.

**Hŏspĭtăl'ĭtў**, *n.* (हॉस्पिटॅ'लिटि)—friendly reception of guests or strangers. आदरातिथ्य, आदर-सत्कार, पाहुणचार.

**Hŏs'pĭtaller,-aler**, *n.* (हॉ'स्पिटलर् )—a member of charitable religious order ; a chaplain in a hospital. धर्मार्थसंस्थेचा सभासद ; इस्पि-तळांतील पाद्री, धर्माधिकारी.

**Hōst**, *n.* (होस्ट्)—a large number (of) ; an army. समुदाय, झुंड ; सैन्य, सेना. *Hosts of heaven*, the sun, moon, stars, angels. सूर्य, चंद्र, तारे, देवदूत, देवता. *He is a h. in himself*, अनेक सामान्य व्यक्तींचें काम तो एकटा करूं शकतो. [ L. *Hostis*, a stranger, an enemy ]

**Host**, *n.* ( होस्ट् )—one who entertains another as a guest; landlord of an inn; an animal or plant having parasite. यजमान, परधनी; खाणावळवाला; परोपजीवी वाढलेलें जनावर, झाड. *To reckon without one's h.*, to overlook difficulty etc. अडचण, अवघड़ता. विरोध लक्षांत न घेणें. *-ess, n.* यजमानीण. यजमानीण. [ L. *Hospes*, host, guest ]

**Hōst**, *n.* ( होस्ट् )—bread consecrated in the Eucharist. प्रभुभोजनांतील पवित्र भाकरी,-पाव.

**Hŏs'tage**, *n.* ( हॉ'स्टिज् )—a person or thing given as a pledge; a pledge, security. हमी म्हणून शत्रूच्या स्वाधीन केलेला मनुष्य किंवा वस्तु. ओलीस ठेवलेला मनुष्य,-वस्तु. हमी, तारण. *H. to fortune*, a person or thing that one may lose. दैवावर हवाली सोडलेला मनुष्य,-वस्तु.

**Hŏs'tĕl**, *n.* ( हॉ'स्टेल् )—a house of residence (for students, &c.); a lodging-house, an inn. विद्यार्थिवसतिगृह; खाणावळ, पथिकाश्रम.

**Hŏs'telrȳ**, *n.* ( हॉ'स्टेल्रि )—an inn. खाणावळ.

**Hŏs'tile**, *a.* ( हॉ'स्टाइल् )—of an enemy; opposed, inimical, unfriendly. शत्रूचा; शत्रुभावाचा, प्रतिकूल. *-ly, adv.*

**Hŏstil'itȳ**, *n.* ( हॉस्टि'लिटि )—enmity; warfare; (*pl.*) hostile proceedings. शत्रुभाव, वैर; लढाई, युद्ध.

**Hŏ'stler**, *n.* ( ऑ'स्लर् )—one who takes care of horses at an inn. खानावळींतील मोतद्दार.

**Hŏt**, *a.* ( हॉट् )—of high temperature, very warm; pungent; ardent; excited, violent, furious, giving or feeling heat. उष्ण, गरम, उष्णता देणारें, ऊबदार; तीक्ष्ण, जोरदार, चरचरीत; तिखट, तीक्ष्ण; उत्साही; आवेशी, तुंबळ, उग्र, रागीट. *adv.* hotly, eagerly, angrily आवेशानें, जोमानें, जोरानें, उत्सुकतेनें, रागानें. *v. t.* to heat, to warm *up*. तापवणें, उष्णता-ऊब-उत्साह-जोर आणणें. *H. & h.* (of food), गरमागरम-ताजें-अन्न. *Give it him hot*, chastise him severely. त्याला जोराचा दम द्या, जोरानें कानउघाडणी करा. *To make it too h. for one, to make the place too hot to hold him*, सळो का पळो करून सोडणें. डाव धुडकावून पळण्यास लावणें. *H. air.* (sl.) रागारागानें बोलणें, धमकीचें बोलणें. *H. & strong*, आवेश, आवेशानें. *H. bed*, a bed of earth heated by fermenting manure, (fig.) a place favourable to the growth (of). भाजावळ केलेला जमिनीचा तुकडा. (ल्या) पुढीलवाढीला-अनुकूल अशी जागा, गादी, आवी. *H. blast*, तापवलेल्या हवेचा भट्टींत सोडलेला गरम झोत. *H.-blooded*, ardent,

पाडणें. *The hh.*, शिकारी कुत्र्यांचा कळप. *H.'s tongue*, a kind of plants. एक जातीची वनस्पति. *Hound'ish, a.*

**Hour**, *n.* (अवर्)—60 minutes or twenty-fourth part of day; a short (esp. present) time; (*the h.*) time o'clock; (pl.) fixed time for daily work etc.; seven stated times of day for prayer, prayers to be said at these times; (Astron.) 15° of longitude. तास, अडीच घटका, साठ मिनिटें; (चालू) अल्प काळ; घड्याळांतील वेळ, तास; (कामाचे) तास; दिवसांतील प्रार्थनेच्या सात ठरावीक वेळा, त्यावेळीं म्हणण्याच्या प्रार्थना; १५ अंश रेखांश. *At the eleventh h.*, at a late stage. उशीरां, आयत्या वेळीं. *Small hh.*, रात्रीचे एक, दोन इ. वाजतांचे तास, (लवकर जाणारे). *The question of the h.*, of the present time. चालू काळचा प्रश्न. *In a good h.*, luckily. सुदैवानें, सुमुहूर्तावर. *In an evil h.*, unluckily. दुर्दैवानें. *H. circle*, meridian. होरावृत्त. *H. glass*, sand-glass running for an hour. वाळूचें घड्याळ. *H.-hand*, घड्याळांतील तास दाखविणारा कांटा. [Gk. *hora*, season, hour]

**Houri**, *n.* (हूअरि, हॉवुरि)—a nymph of Mohammedan paradise; a voluptuously beautiful woman. मुसलमानांच्या स्वर्गांतील परी, अप्सरा; उन्मादक सुंदर-विलासी-स्त्री, परी.

**Hour'lў**, *adv.* (अवर्लि)—every hour. दर तासाला.

**House**, *n.* (हउस्)—(*pl.* हउझिझ्), a building for habitation or for some specified purpose; a family; an inn; an assembly, a business firm; (a place of abode of) religious fraternity; (an audience in) a theatre; (Astrol.) twelfth part of heavens; a game of chance played with only pencil and paper. घर, गृह, भवन, भुवन, सदन; कुटुंब, घराणें, वंश; खाणावळ; सभा, समाज, मंडळी, पेढी, वखार, धर्ममंडळ (-स्थान); नाट्यशाळा, नाटकगृह, प्रेक्षक; (पत्रिकेंतील एक) घर, राशि; कागद व पेन्सिल घेऊन खेळण्याचा एक खेळ. (attrib.) (of animals) kept in, frequenting, house. घरांतील, पाळींव, माणसाळलेलें (जनावर). *v. t. & i.* (हउझ्) to receive (a person etc.); to store in a house; (naut.) to place gun in a secure position; to lower (upper masts); to take shelter; to provide houses for the population. घरांत घेणें, स्वागत करणें; सांठविणें, सांठा करणें; तोफ नीट बसविणें; (वरच्या डोलकाठ्या) सखल करणें; आसरा घेणें, आश्रय घेणें,-करणें; (लोकवस्तीला) राहण्याचीं घरें बांधण्याला साह्य करणें. *H. of God*, प्रार्थनामंदिर, देवालय. *To bow down in the h. of Rimmon*, to sacrifice one's principles for the sake of conformity. स्वतःचीं मतें बाजूला ठेऊन मान तुकविणें (इतरांशीं जुळतें घेण्यासाठीं). *Hen-h.*, कोंबड्यांचें खुराडें. *Hh. of Parliament*, पार्लमेंट सभागृहें. *The H.*, रोखे-हुंडणावळी-बाजार; धर्मशाळा; लॉर्डांची किंवा कॉमन्सची सभा. *Full h.*, प्रेक्षकांनीं चिक्कार भरून गेलेलें-एकहि तिकीट न मिळूं शकणारें-नाटकगृह. *The H. of Windsor*, ब्रिटिश राजघराणें. *H. of call*, माल वाहून नेण्याचें भाडें मागण्याची जागा, दारू लावून घेण्याची जागा. *H. of ill fame*, a brothel. कुंटणखाना. *H. & home*, home. गृह. *H.-to-h.*, घरोघर नेलेला,-जाणारा. *To bring down the h.*, सर्व सभेकडून मोठी-कडाक्याची-वाहवा करून घेणें. *To keep h.*, निराळा संसार थाटणें,-चालविणें. *To keep open h.*, to provide general hospitality. सर्वांना घर खुलें ठेवणें, घरीं येणाऱ्या सर्वांचा सर्व काळ आदरसत्कार ठेवणें,-करणें. *To keep the h.*, not to go outdoors. घर धरून बसणें, घराबाहेर न पडणें. *Like a h. on fire*, vigorously, fast. उत्साहानें, जोमानें, जोरानें, जलद, उतावळेपणें. *H. agent*, घरांची खरेदी-विक्री करणारा, घरें भाड्यानें (मिळवून) देणारा अडत्या. *H.-boat*, a boat fitted up for living in. राहण्याच्या सोईचें घरवजा जहाज,-पडाव. *H.-dog*, kept to guard house. घराची राखण करणारा-रखवालदार-कुत्रा. *H.-flag*, व्यापारी पेढीच्या जहाजावरील निशाण. *H.-flannel*, घरांतील जमीन पुसण्याचें गोणपाट वगैरे. *H. keeper*, a woman managing the affairs of a household, a person in charge of house etc. घरांतील कारभारीण, व्यवस्थापक-स्त्री; घरवारी, कारभारी, व्यवस्थापक. *H. keeping*, घरकारभार, घरप्रपंच, संसार, पाहुणचार. *H. leek*, a herb with pink flowers growing on walls and roofs. भिंतींवर व छपरांवर वाढणारी गुलाबी फुलांची वेल,-वनस्पति. *H. master*, शाळेच्या वसतिगृहाचा व्यवस्थापक. *H. of cards*, पत्त्यांचा बंगला, (अलं०) धोक्याचा-असुरक्षित-धंदाउद्योग, बेत. *H. room*, घरांत राहायला जागा. *Would not give it h. room*, would not take it as a gift. देणगी म्हणून सुद्धां न घेणें,-फुकटचें मिळालें म्हणून न स्वीकारणें. *H. surgeon*, *H. physician*, resident doctor of a hospital. रुग्णालयांतच (चोवीस तास) राहणारा डॉक्टर,-वैद्य. *H. top*, *proclaim from the h. tops*, publicly. जाहीर रीतीनें, उघड, प्रसिद्धपणें. *H. warming*, घरभरणीचा समारंभ. *H. work*, cleaning, cooking etc. घरकाम, गृहधंदा.

**House'breaker**, *n.* (हउस्‌ब्रेकर्)—a burglar; a man employed for demolishing old house.

घरफोड्या, दिवसाचा दरोडा घालणारा; जुनीं घरें पाडून टाकणारा मजूर.

**House'hōld**, *n.* (ह'उस्-होल्ड्)—inmates of a house, family. घरचीं माणसें, कुटुंब, घरदार. *-troops*, बादशहाचे शरीररक्षक. *H. word*, प्रचारांतील म्हण.

**House'hōlder**, *n.* (ह'उस्-होल्डर्)—one who occupies a house as his own dwelling. गृहस्थ, घरधनी.

**House'maid**, *n.* (ह'उस्-मेड्)—a maid-servant (in charge of room-cleaning, &c.). घरांतील काम करणारी मोलकरीण, कामकरीण.*-'s knee*, swelling over the knee due to kneeling. गुडघ्यावरील सुजेचा रोग.-सूज.

**House'wīfe**, *n.* (ह'उस्-वाइफ्)—the mistress of a *house; domestic manager; (हझिफ्) a case* for needles etc. घरधनीण: घराची व्यवस्था पाहणारी; सुया वगैरे ठेवण्याची पिशवी, जुगदान.

**House'wīfelў**, *a.* (ह'उस्-वाइफ्लि)—domestic, prudent. घरगुती, प्रापंचिक, काटकसरी, चतुर.

**House'wifery**, *n.* (ह'उस्-विफ्रि)—domestic economy, housekeeping. घरधनिणीचा कारभार, संसारांतील काटकसर, गृहकृत्य.

**Hous'ing**, *n.* (ह'उझिंग्)—horse-cloth; (*pl.*) the trapping of a horse. घोड्याचें सामान: घोड्याचा शृंगार, झूल.

**Hove**, *pa. t.* of Heave.

**Hŏv'el**, *n.* (हॉ'व्हल्, ह-)—a shed, an outhouse; a mean dwelling. खोपट, खोपटी; लहानसें घर.

**Hŏv'eller**, *n.* (हॉ'व्हलर्, ह'व्हलर्)—an unlicensed pilot or boatman. वाहन चालविण्याचा परवाना न मिळलेला, नवशिका वाहन चालविणारा, नावाडी.

**Hŏv'er**, *v. i.* (हॉ'व्हर्)—to hang in the air; to loiter about. हवेंत तरंगणें, लोंबकळणें; घिरट्या घालणें. *n.* तरंगणें, घुटमळणें.

**How**, *adv.* (हाउ)—in what manner or way; by what means; to what extent; (in indirect, rhet.) that. कसें, कसा, कोणत्या प्रकारें; कसें, कशानें, कशामुळें; केवढा, किती, कितपत; कीं. *n.* the way in which, in whatever way. रीत, तऱ्हा, प्रकार. *H. do you do?* What is *your state of health?* कशी काय प्रकृति आहे? कसें काय? बरें आहे ना? ठीक? *How-d'ye-do*, (colloq.) अरे बापरे! कसें काय? *How's that*, (Cricket) is he out or not? तो बाद झाला कीं नाहीं? *H. now?* त्याचा अर्थ काय? काय म्हणाल याला? *H. so?* हें कसें बरें? *H. is corn?* धान्याचा भाव काय?

**Howbē'it**, *adv.* (हाउबी'इट्)—nevertheless, तथापि, तत्राप, कसेंहि असलें तरी.

**Howd'ah**, *n.* (ह'उडा)—a seat on elephant's back. हत्तीवरील अंबारी, हौदा. [Pers.]

**How'itzer**, *n.* (ह'विट्झर्)—a short gun firing shells at high elevation. गर्नाळीसारखी एक प्रकारची तोफ. [G, a catapult]

**How'ĕver**, *adv.* (हा'उ-एव्हर्)—nevertheless; in or to whatever way or degree; in any case. तथापि; घडेल तसें; कांहीं झालें तरी. *How-so-ever*, कसेंहि, कितीहि.

**Howl**, *v. i. & t.* (हाउल्)—(of animal) to utter a long loud cry; (of person) to utter long cry of pain, derision, &c. मोठ्यानें ओरडणें, केंकाटणें; गळा काढून रडणें. *n.* a long doleful *cry of a dog, wolf, etc.; a loud cry of pain;* a yell of derision; (Broadcast) whining noise in the receiver during tuning in. केंकाटणें. आरोळी; मोठ्यानें कण्हणें, त्याचा आवाज; उपहासात्मक आरोळी: (बिनतारी संदेश ग्राहकांत) यंत्र लावीत असतां होणारा कर्कश आवाज.

**Howl'er**, *n.* (ह'उलर्)—(in vbl. senses); a S.-American monkey; a glaring blunder. ओरडणारा, केंकाटणारा; द. अमेरिकेंतील वानर; ढोबळ चूक, घोडचूक. *To come a h.*, to come to grief. कोंकलत येणें; संकट ओढवणें, चुकणें, पडणें. *Howl'ing, a.* ओरडणारा; भयाण, घोर.

**Howl'et**, *n.* (ह'उलिट्)—an owl. घुबड.

**Hoy**, *n.* (हॉय्)—a small coasting vessel, carrying passengers and goods. लहान गलबत,-घोट,-जहाज.

**Hoy**, *int.* (हॉय्)—used to call attention, drive beasts, (naut.) hail. हे! हो! हट्! हो ओ!

**Hoy'a**, *n.* (हो'या)—a genus of climbing flower plants, wax-flowers. एक फुलवेल, फुलझाड.

**Hoyd'en**, *n.* (हॉ'इडन्)—a boisterous girl. नाचरी बडबडी मुलगी, घोडी.*-hood,-ism, nn. -ish, a.*

**Hŭb**, *n.* (हब्)—central part of a wheel, *from* which spokes radiate; (fig.) central point of interest etc. चाकाचा मध्यभाग,-तुंबा,-तुंब; मध्य, केंद्र.

**Hŭb, Hŭb'bў**, *n.* (हब्, ह'बि)—(colloq.) the husband. नवरा.

**Hŭb'ble-bŭb'ble**, *n.* (ह'बल्-ब'बल्)—a form of hookah; bubbling noise; a confused talk. गुडगुडी, हुक्का; बुड्बुड् आवाज; गोंगाट.

**Hŭbb'ŭb**, *n.* (ह'बब्)—din; tumult. गलका; गलबला, गोंधळ.

**Hŭck'abăck**, *n.* (ह'कुअॅक्)—rough linen fabric. जाडेंभरडें नागी सूत.

**Hŭc'kle**, *n.* (ह'कल्)—the hip; the haunch. ढुंगण, कमरेच्या खवाटा, कटि; मांड. *H.-back*, *-ed*, hump-backed. पोंक (आलेला). *H.-bone*, hip or haunch bone; knuckle-bone of a quadruped. ढुंगणाचें-कमरेच्या खवाट्याचें हाड; जनावराच्या मांडीच्या सांध्याचें हाड.

**Hŭc'kleberrў**, *n.* (ह'कल्बेरि)—a shrub in N. Amer.; its fruit. उत्तर अमेरिकेंतील झुडूप, फळझाड; त्याचें फळ.

**Hŭck'ster**, *n.* (ह'क्स्टर्)—a hawker, a mercenary person. फेरीवाला, हुटपुंजा व्यापारी, हिंगमिऱ्या वाणी, भाडोत्री इसम. *v. t. & i.* to bargain, to haggle; to hawk; to adulterate. सौदा करणें, बाजारांतून घालणें; त्या हुटपुंजा व्यापार करणें; भेसळ करणें. *-y*, *n.*, *-er*, *-eress*, *nn.*

**Hŭd'dle**, *v. t. & i.* (ह'डल्)—to heap, to crowd to nestle promiscuously. कसेंतरी एकत्र करणें किंवा घालणें. खेटाखेट करणें, गुरफटणें, गुड्या करून [illegible], *n.* [illegible] confused heap, confusion, [illegible] [illegible]. अव्यवस्थित [illegible], [illegible]: गोंधळ, [illegible]

[illegible], *n.* [illegible]—colour, tint, a variety of colour [illegible] by admixture of another रंग, वर्ण, [illegible] मिश्रणानें झालेली) रंगच्छटा.

[illegible], *n.* [illegible]—*ue & cry*, clamour of pursuit [illegible] outcry (*against*). proclamation for the capture of a criminal आरड, [illegible], [illegible], [illegible]. गुन्हेगाराला शोधून काढण्या- [illegible] जाहिरनामा.

[illegible], [illegible]—to bully, to storm at to offend, to take offence, (Draughts) to remove (opponent's) man as forfeit [illegible] देणें. [illegible] करणें. [illegible], [illegible] मानणें, अपमान मानणें. (बुद्धिबळात) प्रति- [illegible] मोहरें-सोंगटी-जिंकणें. [illegible], *n.* a fit of petulance; (Draughts) the act of huffing. [illegible], [illegible], (बुद्धिबळांत) मोहरें- [illegible]. *-y*, *-ish*, *aa.*; *-ily*, *-ishly*, *adv.*; *-iness*, *-ishness*, *n.* [imit. sound of blowing]

**Hŭg**, *v. t.* (ह्ग्)—to squeeze in one's arms; to keep close to (the shore, &c.); to cling to. उराशीं कवटाळणें,-घट्ट धरणें; जवळून जाणें; आलिंगणें, आलिंगन देणें, (मतांना इ.) चिकटून राहणें. *H.-me-tight*, a woollen wrap. लोकरीचें वेष्टण,-पांघरूण. *n.* घट्ट पकड, मिठी.

**Hūge**, *a.* (ह्यूज्)—very large. फार मोठा, अवाढव्य. *-ness*, *n.*, *-ly*, *adv.*

**Hū'geous**, *a.* (ह्यू'जस्)—huge. मोठा, प्रचंड. *-ly*, *adv.*, *-ness*, *n.*

**Hŭgg'er-mŭgg'er**, *n.* (ह'गर्-म'गर्)—concealment, privacy, secrecy; confusion. गुपचुपी, गुप्त; घोटाळा. *a.* गुप्त; गोंधळाचा. *adv.* गुप्तपणें, लपून छपून. *v. t. & i.* लपविणें, छपविणें, दाबून टाकणें.

**Hŭlk**, *n.* (हल्क्)—body of a dismantled ship; an unwieldy vessel; a big person, or mass. जुन्या गलबताचा सांगाडा; प्रचंड जहाज, धूड, अवजड वस्तु; गलेलठ्ठ मनुष्य, मोठा ढीग. *Hulk'-ing*, *a.* big, clumsy. अजस्र, मोठा, अवाढव्य, ओबडधोबड.

**Hŭll**, *n.* (हल्)—the husk or outer covering of anything, pod of beans, etc.; (*fig.*) covering: (naut.) the frame of a ship. साल, सालपट, टरफल, फोल; आच्छादन, झांकण; (गलबताचा) सांगाडा, कोठारा. *v. t.* to remove the hull of, strike (a ship) in hull with a cannon shot. सोलणें, साल,-टरफल काढणें; (तोफेच्या गोळ्यानें) सांगाडा भोसकणें. *H. down*, far away, so that the hull is invisible. सांगाडाहि दिसत नाहीं इतकें अति दूर.

**Hŭllabaloō**, *n.* (हलॅबलू')—an uproar. आरडा-ओरडा, गलबला.

**Hŭllō,-loa**, *int.* (ह'लो)—used to call attention, express surprise, or answer call esp. on telephone. हो! ओहो! हां कोण आहे! (या अर्थी).

**Hŭm**, *v. i. & t.* (हम्)—to make a buzzing sound like bee or top, to make inarticulate low sound of hesitation; to sing or utter with closed lips; to be in a state of activity; to smell unpleasantly. गुणगुण करणें, हुं हुं आवाज करणें, गुंजणें; हं हं-हुंजहुंज -करणें; गुणगुणणें, गुणगुणत बोलणें; चाळणा मिळणें; दुर्गंध वास-दुर्गंधि-येणें. *n.* a humming sound; a bad smell. गुणगुण, हुंजहुंज. दुर्गंधी. *int.* expressing doubt etc. हं! *Hum & ha*, (कुरकुर [illegible]) हं हं! आवाज. *To make things h.*, गोष्टींना चालना मिळणें.

**Hŭm**, *n.* (हम्)—(sl.) a sham, hoax. बनावट गोष्ट, फसवणूक.

**Hū'man**, *a.* (ह्यू'मन्)—having the qualities of a man; belonging to the human race. मानवी गुण असलेला, मनुष्याचा, मानुष, मानवी. *n.* human being. मनुष्य, माणूस. *H. kind*, mankind. मनुष्यजात. *H.-ness*, *n.*

**Hūmāne'**, *a.* (ह्यु-मे'न्)—benevolent, compassionate; (of studies) refined. परोपकारी, दयाळू; सुसंस्कृत, उदात्त, उच्च. *H. society*, for rescue of drowning persons. बुडणाऱ्या

माणसांना चांचविणारी संस्था. *-ly, adv., -liness, n.*

**Hū'manism,** *n.* ( ह्यू'मनिझम् )—devotion to human interests; human nature; literary culture. मनुष्यहितैकता ; मनुष्यस्वभाव ; उदात्त वाङ्मयाचा अभ्यास, ग्रांथिक-साहित्य-संस्कृति.

**Hū'manist,** *n.* ( ह्यू'मनिस्ट् )—a student of human affairs; a classical scholar. मनुष्यस्वभावज्ञाता; उदात्तवाङ्मयाभ्यासी. *-istic, a.*

**Hūmănĭtār'ian,** *n.* ( ह्यमॅनिटे'अरिअन् )—one who rejects the supernatural and concerns himself chiefly with man's welfare; a philanthropist. मनुष्यहिताविषयीं झटणारा ; परोपकाररत, दानशूर. *a.* मनुष्यहितैकवाद्यांचा,-वादाचा. *-ism, n.*

**Hūmănĭ'tў,** *n.* ( ह्यमॅ'निटि )—human nature or (*pl.*) qualities; the human race; humaneness; (*pl.*) polite scholarship; (Sc.) study of Latin. मनुष्यस्वभाव, मनुष्याचे गुण ; मानवजाति; दयाळूपणा, वात्सल्य ; उदात्तवाङ्मयशिक्षण ; लॅटिन भाषेचें ज्ञान. *Religion of Humanity*, मनुष्यहित साधणें-भूतदया-हाच धर्म, मानवी सेवेचा धर्म. *The humanities*, लॅटिन व ग्रीक काव्यशास्त्रांचा अभ्यास.

**Hū'manize,** *v. t. & i.* ( ह्यू'मनाइझ् )—to make human; to make or become humane. माणसाळणें, मनुष्यपणा आणणें ; सदय करणें,-होणें, मानवधर्माचा आरोप करणें, माणसाळणें.

**Hū'manlў,** *adv.* ( ह्यू'मन्लि )—in a human way; by human means; from human point of view, with human feeling. मानवी रीतीनें ; मानुषी शक्तीनें, मनुष्यशक्त्यनुसार ; माणुसकीच्या दृष्टीनें.

**Hŭm'ble,** *a.* ( ह'म्बल् )—having or showing low estimate of one's importance; lowly, modest. विनयशील ; नम्र ; साधा, गरिबीचा विनीत. *v. t.* to abase, to lower. नमवणें, पाणउतारा करणें. *Your h. servant*, (formally in subscribing letter) ( पत्राच्या, अर्जाच्या, शेवटचा मायना ) आपला नम्र सेवक. *To eat h. pie*, to make humble apology, to submit to humiliation. नम्रपणानें लाचारी पतकरणें, मानहानि सहन करणें, मूग गिळून बसणें. *H. plant*, लाजरीसारखें झाड. *H.ness, n. Hum'bly, adv.* नम्रपणानें, गरीबीनें.

**Hŭm'ble-bee,** *n.* ( ह'म्बल्-बी )—a bumble-bee. झुंगा, भ्रमर.

**Hŭm'bŭg,** *n.* ( ह'म्बग् )—a sham, a deception; an impostor. भूलथाप, फसवणूक ; थापाड्या, भोंदू, फसव्या. *int.* nonsense! भलतेंच! हट्! मूर्खपणा! *v. t. & i.* to cheat, to deceive; to be or behave like a humbug. थाप मारणें, फसविणें ; थापाड्या होणें, थापाडेपणा करणें. *Hum'buggery, n.* थापाथापी.

**Hŭm'drŭm,** *a.* ( ह'म्-ड्रम् )—dull, commonplace. मट्ठ, जड, निस्तेज, साधा. *n.* मट्ठ मनुष्य, कंटाळवाणेपणा, एकसारखेपणा. *v. i.* तेंच तेंच-कंटाळवाणें काम--करीत राहणें.

**Hū'meral,** *a.* ( ह्यू'मरल् )—of the shoulder खांद्याचा, स्कंधाचा.

**Hū'merus,** *n.* ( ह्यू'मरस् )—( anat. ) the bone of the upper arm in man, similar bone in other vertebrates. खांद्याचें हाड, स्कंध, प्रगण्डास्थि.

**Hū'mĭd,** *a.* ( ह्यू'मिड् )—damp, moist. ओलसर, दमट, आर्द्र. *-ify, v. t.* ओलसर-दमट-करणें. *Humid'ity, n.* ओलावा, आर्द्रता.

**Hūmĭl'iāte,** *v. t.* ( ह्यु-मि'लिएट् )—to humble, to depress, to abase; to mortify. नम्र करणें ; मानखंडना करणें, पाणउतारा करणें. *-tion, n.* पाणउतारा, मानभंग. *-ting, a., -tor, n.*

**Hūmĭl'itў,** *n.* ( ह्यमि'लिटि )—humbleness, self-abasement, meekness; a humble condition. नम्रता, लीनता, विनय ; नम्र-नीच-स्थिति.

**Hŭm'mĭng,** *a.* ( ह'मिंग् )—in vbl. senses; vigorous, energetic. गुणगुणणारा ; जोराचा, आवेशाचा. *H. bird*, kinds of bird making humming sound by the vibration of wings. (पंखांच्या फडफडण्यानें गुणगुण करणारा) गाणारा पक्षी. *H. top*, भूं आवाज करीत फिरणारा भोंवरा.

**Hŭmm'ock,** *n.* (ह'मक्)—a hillock; rising ground; a ridge in an ice-field. टेंकाड ; उंचवटा ; बर्फाच्या क्षेत्रांतील उंचवटा,- बांध. *-y, a.*

**Hū'moral,** *a.* ( ह्यू'मरल् )—( med. ) of the bodily humours. ( मनुष्याच्या शरीरांतील ) दोष,-धातु, -रस-यांचा. *H. pathology*, ( कफ-वात-पित्त ह्या ) त्रिदोषापासुळें सर्व रोग उत्पन्न होतात हें वैद्यकीय मत,-हा सिद्धांत. *-ism,-ist, n., -istic, a.*

**Hū'morist,** *n.* ( ह्यू'मरिस्ट् )—a facetious talker or writer. विनोदी भाषण करणारा किंवा लेखक.*-tic, a.*

**Hū'morous,** *a.* ( ह्यू'रस् )—full of humour; adapted to excite laughter, funny. विनोदी ; गमतीखोर, गमत्या.*-ly, adv.* विनोदीपणानें, गंमतीनें.*-ness, n.*

**Hū'mour,** *n.* ( ह्यू'मर्, यू- )—state of mind, mood, inclination; facetiousness, comicality, jocose imagination; (Med.) fluid of the body. मनोवृत्ति, लहर, स्वभाव, कल ; विनोद, विनोदी स्वभाव, थट्टेखोर वृत्ति, हास्यजनक रस ; शरीरांतील धातु, रस, दोष. *v. t.* to gratify, to adapt oneself to. लळा-लाड-चालविणें,-करणें ;

शीं जुळतें घेणें, जमवून घेणें. *Out of h.*, displeased. नाराज, नाखूष, असंतुष्ट. *Good, ill, h.*, मर्जी, खुशी, राग, घुस्सा. *Cardinal hh.*, रक्त, पित्त, कृष्णपित्त व कफ हे शरीरांतील चार मुख्य दोष. *Aqueous, vitreous, h.*, transparent fluid parts of the eye. नेत्राचे पारदर्शक द्रव भाग. *-ed, -less, aa., -some, a.*, लहरी, चिडखोर. *-someness, n.*

**Hŭmp**, *n.* (हम्प्)—normal or other protuberance, esp. on the back; a fit of depression. कुबड, पोंक, (बैलाचें) कोळें, (उंटाची) मदार; खिन्नता. *v. t. & i.* to make hump-shaped; to annoy, to depress; to exert oneself, to hurry; to hoist up, to shoulder. कुबड-पोंक-आणणें; सतावणें, खिन्नता आणणें; श्रम करणें, घांदल करणें; उंच उभारणें,-उचलणें, खांद्यावर घेणें. *H. back*, पोंक आलेली पाठ, कुबडा-पोंक असलेला-मनुष्य. *Hump'ed, Hump'less, Hump'y, aa.*

**Hŭmp'băcked**, *a.* (ह'म्प्-बॅक्ट्)—having the back with a hump, having a crooked back. कुबडा, पोंक्या.

**Humph**, *int. & v. t.* (हम्फ्)—expressing doubt or dissatisfaction; to utter thus. हूं! ऊंहूं (म्हणणें).

**Hŭmp'ty-dŭmp'ty**, *n.* (ह'म्प्टि-ड'म्प्टि)—a short and stout person; a person or thing that once thrown down cannot be restored. ठेंगू व लठ्ठ मनुष्य; एकदां खालीं पडला कीं फुटला असा मनुष्य-अशी वस्तु.

**Hŭm'py**, *n.* (ह'म्पि)—an Australian hut. ऑस्ट्रेलियांतील झोंपडी.

**Hū'mus**, *n.* (ह्यू'मस्)-a vegetable mould. उद्भिज्ज बुरशी. [L=ground]

**Hŭnch**, *n.* (हन्च्)—hump; a thick piece; (sl.) suspicion. पोंक, कुबड; ठोकळा; शंका, भीति, कल्पना. *v. t.* to bend, arch, convexly; to thrust (*out, up*); to form a hump. पोंक काढणें, बाह्यगोलाकार वांकणें; पोंक बाहेर टाकणें. *H.-back,-ed*, hump-back, -ed, कुबडा, पोंक्या. *Hunch'y, a.*

**Hŭn'dred**, *n.* (ह'न्ड्रेड्)—ten times ten (100, C); a hundred pounds (of money), subdivision of a country having its own court. शंभर, शत; शंभर पौंड; शंभर कुटुंबांचें गांव,-परगण्याचा विभाग. *H. & one*, a large number. मोठी संख्या, अनेक, पुष्कळ. *Not a h. miles from*, (facet.) at or close to. अगदीं नजीक, जवळच. *A h. per cent efficient*, शंभर टक्के कार्यक्षम,-गुणकारी *Great h., long h.*, पक्का शेंकडा, १२०. *Hh. & thousands*, sweets like small shot. खाऊच्या बारीक गोळ्या. *Hun'dredweight*, (abbr. *cwt*) 112 lb.; (U. S.) 100 lb. वजनी ११२ पौंड, टनाचा विसावा भाग; (अमे०) वजनी १०० पौंड. *Hun'dredfold, a. & adv.* शंभरपट-पटीनें. *Hun'dredth, a.* शंभरावा.

**Hung**, *pa. t. & pa. p.* of Hang.

**Hŭng'er**, *n.* (हं'गर्)—craving or desire for food; a strong desire for anything. भूक, क्षुधा; उत्कंठा, प्रबळ इच्छा. *v. i. & t.* to feel hunger; to crave *for, after*; to starve. भूक लागणें; ची भूक-उत्कंठा-लागणें,-असणें; उपाशीं ठेवणें, भुकेलेलें-अन्नाशिवाय-ठेवणें. *Hung'ered, pa. p.* (arch.) hungry. भुकेलेला, भूका. *To die of hunger*, भुकेनें-अन्न अन्न करून-मरणें. *Hunger needs no sauce*, भुकेला कोंडा.

**Hŭng'er-strīke**, *n.* हं'गर्-स्ट्राइक्)—prisoner's refusal to take food in order to secure release. अन्नसत्याग्रह.

**Hŭn'gry̆**, *a.* (हं'ग्रि)-feeling or showing hunger; eager; inducing hunger; (of soil) poor, barren. भुकेलेला, बुभुक्षित. उत्कंठित, उत्सुक; भूक लागणारें-वाढविणारें; ओसाड, नापीक, कमी कसाची.*-rily, adv.,-riness, n.*

**Hŭnk**, *n.* (हंक्)—a large piece cut off; a hunch. (कापलेला) मोठा-जाड-तुकडा; पोंक, कुबड.

**Hŭnks**, *n.* (हंक्स्)—a miser, a close-fisted man. चिक्कू, कृपण, कवडीचुंबक मनुष्य.

**Hŭnt**, *v. t. & i.* (हन्ट्)—to pursue wild animals for food or sport; to search for; to drive away; to scour (district) in pursuit of game; to use in hunting. शिकार करणें; शोधणें; हांकून लावणें, घालवून देणें; शिकार हुडकण्यासाठीं (सर्व प्रदेशभर) धांवणें, धुंडाळणें, रान उठविणें; (घोडा, शिकारी कुत्रे यांचा) शिकारीसाठीं उपयोग करणें. *n.* hunting; a hunting district or party. शिकार, मृगया (करणें); पारध; शिकारीची जागा, रान, शिकारी टोळी,-लोक,-संस्था. *To h. down*, to bring to bay. शिकार रोखून धरणें. *To h. out*, माग काढणें. *To h. up*, चा शोध करणें. *To h. the hare, squirrel*, सशाची, खारीची शिकार करणें. *H. ball*, शिकारी लोकांचा नाच, व मेजवानी. *H.-the-slipper*, a parlour game. घरांत खेळण्याचा एक खेळ.

**Hŭn'ter**, *n.* (ह'न्टर्)—one who hunts; a horse for hunting; a watch with cover protecting glass. शिकार करणारा, पारधी; शिकारी घोडा; कांचेला आच्छादन असलेलें घड्याळ.*-ress, n.* शिकार करणारी स्त्री.

**Hŭn'tĭng**, *n.* (ह'न्टिंग्)—the act (in vbl. senses). पारध, शिकार, मृगया. *H.-box*, a temporary residence for hunting. पारधीच्या हंगामांतील

शिकाऱ्यांची बसण्याची जागा. *H. ground*, मृगया-भूमि, पारध करण्याची जागा,-रान, शिकार साधण्याची जागा. *Happy h.-ground,-s*, पुढील स्थिति; चांगली शिकार साधण्याची जागा. *H.-horn*, शिकारीचे वेळीं कुत्र्यांस उत्तेजन देण्याकरितां वाजविण्याचें शिंग; घोड्याच्या एकाच बाजूला दोन्ही पाय टाकून बसण्याच्या खोगीराचा पुढला दुसरा फुगीर भाग.

**Hŭnts'man**, *n.* (ह'न्ट्स्मन्)—a man in charge of a pack of hounds; a hunter. शिकारी कुत्रे घेऊन पारध करणारा. मुख्य पारधी; शिकारी.

**Hur'dle**, *n.* (ह'र्डल्)—a portable frame (with bars, &c.); a wooden frame to be jumped over in a *h. race*; (hist.) the frame on which traitors were dragged for execution. गजांची वगैरे लहान आडवी चौकट, ताटी, सांकाटा; (एक प्रकारच्या शर्यतींत) उडी मारून जाण्याची लांकडी चौकट; (पूर्वी) देशद्रोह्यांना फांशीं देण्याची ताटी,-चौकट. *v. t.* to fence off with hurdles. चौकटींचें कुंपण घालणें. *Hurd'ler*, *n.* a hurdle-maker; a hurdle-racer. चौकटी-ताट्या-तयार करणारा; ताटीवरून उडी मारून जाण्याच्या शर्यतींत भाग घेणारा.

**Hurd'y̆-gurdy̆**, *n.* (ह'र्डि-गर्डि)—a musical instrument with a droning sound. एक प्रकारचें वाद्य.

**Hurl**, *v. t.* (हर्ल्)—to throw violently from some position; to throw (a missile etc.). जोरानें आपटणें, फेंकणें, झुगारणें, खालीं आणणें; फेंकणें, जोरानें उच्चारणें. *n.* फेंकणें, जोराची फेंक. *-er*, *n.* thrower. फेंक्या, फेंकणारा.

**Hurl'ey, Hurl'ing**, *n.* (ह'र्लें, ह'र्लिंग्)—an Irish game similar to hockey. हॉकीसारखा एक खेळ, हॉकी खेळण्याची काठी.

**Hurl'y̆**, *n.* (ह'र्लि)—(arch.) commotion. गोंधळ, गडबड, धांदल.

**Hŭrl'y̆-bŭrl'y̆**, *n.* (ह'र्लि-ब'र्लि)—commotion. गोंधळ, धामधूम, गडबड.

**Hurrah', Hurray'**, *int.* (हुर्रा', हुरें)—an expression of joy or applause or approval. जयजयकार, वाहवा, हुर्यो! *n.* जयजयकार, वाहवा असें म्हणणें. *v. i.* वाहवा, हुर्यो करणें,-ओरडणें.

**Hŭ'rrĭcane**, *n.* (ह'रि-कन्)—a violent storm, esp. West-Ind. cyclone. प्रचंड वादळ, तुफान, प्रचंड वात; (fig.) तुफान, वावटळ. *H. lamp*, मोठ्या वाऱ्यांत सुद्धां न विझणारा दिवा.

**Hŭ'rriedly̆**, *adv.* (ह'रिड्-लि)—in a hurried manner. घाईनें, लगबग, घाईघाईनें.

**Hŭ'rry̆**, *n.* (ह'रि)—undue haste; eagerness; need for haste. धांदल, उतावीळ, लगबग; उत्सुकता; धांदलीचें कारण. *v. t. & i.* to move or act with great haste; to cause to move with haste. घाई करणें, उतावळ करणें, त्वरा करणें; उतावळ करण्यास प्रवृत्त करणें, तांतड लावणें. *In a h.*, easily; willingly. सहजासहजीं, चुटकीसरसें; खुषीनें, मनःपूर्वक. *H.-scurry*, *adv., a. & n.* (in) a disorderly haste; धांवाधांव, धांवपळ, घाई (नें); *v. i.* धांवपळ करणें, घाई करणें. *Hur'riedness*, *n.*

**Hurst**, *n.* (हर्स्ट्)—a hillock; a sand-bank in sea or river; wooded eminence; a wood. टेंकाड; वाळूचा बांध,-ची भाटी, भाट; उंचवट्यावरचें रान, जंगल.

**Hŭrt**, *v. t. & i.* (हर्ट्)—to injure, to damage, to pain; to distress, to wound; to suffer उपद्रव देणें, नुकसान करणें, दुःख देणें; इजा किंवा जखम करणें; सहन करणें, सोसणें. *n.* a wound, an injury; harm, wrong. जखम, इजा; नुकसान, धक्का, हानि, मानसिक दुःख.*-ful,-less, aa., -fully, adv.,-fulness, n.*

**Hur'tle**, *v. t & i.* (ह'र्टल्)—(arch) to strike against, to hurl swiftly; (of missile etc) to go with a rushing sound. वर आदळणें; जलद फेंकणें; सूं करीत-अति वेगानें-जाणें. *n.* सूं, धप्, आवाज.

**Hŭs'band**, *n.* (ह'झ्बन्ड्)—a man married to a woman; an economist. नवरा, पति, भर्ता; काटकसरी मनुष्य. *v. t.* to manage thriftily, (arch.) to till (ground), to cultivate (crops); (poet.) to provide with husband, to marry (woman). काटकसरीनें खर्च करणें,-वापरणें; (जमीन) नांगरणें, (पिकें) वाढविणें. (ला) नवरा करून देणें; (स्त्रीशीं) लग्न करणें. *H.'s tea*, weak and cold tea. सौम्य, थंड चहा *H.-hood,-ship, nn. H.-like, a.*

**Hŭs'bandman**, *n.* (ह'झ्बन्ड्मन्)—a farmer. शेतकरी, कृषीवल.

**Hŭs'bandry̆**, *n.* (ह'झ्बन्ड्रि)—agriculture, farming; domestic economy, thrift. शेती, कृषिकर्म, शेतकाम; मितव्यय, काटकसर.

**Hŭsh**, *v. t. & i.* (हश्)—to silence, to be silent: (with *up*) to suppress. शांत करणें; स्तब्ध होणें, चूप बसणें; दाबून टाकणें, दाबादाबी करणें, दडपून टाकणें. *n.* silence. शांतता, स्तब्धता. *H.!*, चूप! गप बस! *Hushaby*, *int.* (हशबाय्), जो जो! (बाळा!) *H.-ship*, great ship secretly built in the last great war. गेल्या महायुद्धांत गुप्त रीतीनें बांधलेलें मोठें जहाज.

**Hŭsh'money**, *n.* (ह'श्-मनि)—sum paid to avoid exposure. कोणतीहि गोष्ट बाहेर न फोडण्याकरितां दिलेला पैसा, मूठदाबणी, लांच.

Hussy, n. (...)—a worthless woman, a pert girl. वाईट चालीची स्त्री; उच्छृंखल-पोरगी.

Hŭs'tings, n. (ह'स्टिंग्ज्)—a platform for the nomination of candidates; (fig.) election proceedings; (hist.) a court. उमेदवारांचीं नांवें सुचविण्यासाठीं उभारलेला मंडप; निवडणुकीचें कामकाज; न्यायसभा.

Hŭ'stle, v. t. & i. (ह'सल्)—to push roughly, to jostle; to hurry; to push one's way; to bustle. गर्दीत जोरानें घुसणें, गर्दी करणें; धक्काबुक्की करून पुढें जाणें; घाई करणें. n. hustling गर्दी करणें, घुसणें, धांदल.

Hŭt, n. (हट्)—a small mean house; a temporary wooden house for troops. खोपट, झोपडी, पर्णकुटी; छावणीतील झोपडी,-तात्पुरतें लाकडी घर. v. t. & i. झोपडींत ठेवणें,-राहणें. -ment, झोपड्या बांधून राहणें.

Hŭtch, n. (हच्)—a pen for rabbits, etc.; a hut, cabin; a truck used in mining etc. (सशांसाठीं) खुराडें, घरकुल; झोंपडी, लहान घर; (खाणींतील वगैरे) माल नेण्याची गाडी.

Huzza', int. (हुझा)-expressing joy or applause. अहो! वाहवा! n. जयध्वनि, हर्षनाद. v. i. जयध्वनि-हर्षनाद-करणें.

Hy'acinth, n. (हा'यसिन्थ्)—kinds of bulbous plant with a bell-shaped flower; a precious stone. घाटोळीं फुलें असलेली एक वनस्पति; एक नारिंगी रंगाचें रत्न. H. locks,-hair, डोंदरी निळे केस,-ine, (-थाइन्) a.

Hy'adēs, n. pl. (हा'यडीझ्)—the group of stars near Pleiades. रोहिणी तारकापुंज. [Gk huo, rain]

वस्तु, संकर-मिश्रण-समास. a. cross-bred, mongrel; heterogeneous. संकरज, संकीर्णजाति; संकीर्ण, भिन्नजातीय, विधर्मक.-ity, n.,-ism, n. संकरजात स्थिति; संकर करून वाढविणें.

Hy'datid, n. (हा'इडटिड्)—a watery cyst sometimes found in animal bodies, esp. that of tapeworm larva. फितीसारख्या लांब जंतांच्या योगानें झालेली पाण्यानें भरलेली (यकृतांतील) पोकळ पिशवी, कृमिगर्भजलग्रंथि.

Hy'dra, n. (हा'इड्रा)—(Gk. myth.) a snake whose many heads grew again when cut off; (fig.) a thing hard to extirpate; a water-snake; a fresh-water polyp; (astron.) a southern constellation. बहुमस्तकांचा कल्पित सर्प; समूळ नष्ट न होणारी वस्तु,-गोष्ट; पाणसाप; एक प्रकारचा गोड्या पाण्यांतील जलजंतु; मोठा, वासुकी (तारकापुंज). [Gk hudra, water-snake]

Hydra'ngea, n. (हाइड्रे'न्जा,-ई-)—kinds of flowering shrub with globular clusters of flowers. एक फुलझाड.

Hy'drant, n. (हा'य्ड्रन्ट्)—a waterpipe (esp. in a street) with nozzle for hose. मोठ्या नळांतून पाणी काढून घेऊन रस्ते भिजविण्याची नळी.

Hy'drate, n. (हा'इड्रट्)—(chem.) compound of water with another compound or an element. पाण्याशीं संयोग पावून उत्पन्न होणारा संयुक्त पदार्थ, उज्जेत. v. t. to combine with water. उज्जेत बनविणें, पाण्याशीं संयोग करणें. -tion, n. [Gk hudor, water]

Hydraul'ic, a. (हाय्-ड्रॉ'लिक्)—of water conveyed through pipes &c. operated by water-power; hardening under water. व्यवहारोपयोगी जलासंबंधीं; जलशक्तीनें चालविलेला; पाण्यांत लवकर कडक होणारा. n. pl. the science of conveyance of liquids, esp. of water, through pipes etc., esp. as motive power. व्यवहारोपयोगी जलशास्त्र.

चलज्जलशास्त्र. *H. lift*, जलशक्तीवर चालणारा पाळणा. *H. ram*, a kind of automatic pump for raising water. पाणी वर खेचण्याचें यंत्र,-ची नळी. *H. cement*, पाण्यांत ठेवून कठक होणारा चिकट चुना. *H. press*, जलदाबाचें यंत्र.-*ically*, *adv.*,-*ician*, *n.*

**Hy̆'dric**, *a.* (हा'इड्रिक्)—(chem.) of, containing, hydrogen. जलजनक वायूचा, उज्जाचा, उज्जयुक्त. *Hy'dride*, *n.*

**Hy̆'drō**, *n.* (हा'इड्रो)—(colloq.) hydropathic. जलचिकित्साकार्यालय,-संस्था.

**Hy̆dro-**, *n.* (हाइड्रो)—in comb., having to do with water; dropsical; (in chem.) combined with hydrogen. जलगतिसंबंधीं; रक्तोदकसंचयासंबंधीं; उज्जयुक्त. *H. carb'on*, *n.* the compound of hydrogen and carbon. जलजनक-उज्ज-वायु आणि कर्ब यांचें रासायनिक मिश्रण,-संमीलन. *H. ceph'alus*, *n.* water on the brain. डोक्यांत रक्तोदक सांचणें,-जलशीर्ष, मस्तिष्कशोथ. *H.-cephal'ic*,-*lous*, *aa.* *H.-chloric*, *a.* containing hydrogen and chlorine. 'उज्ज' आणि 'हर' युक्त. *H.-cyan'ic*, *a.* containing hydrogen and cyanogen. 'उज्ज' आणि 'कर्बनत्रिल' युक्त. *H.-dynam'ics*, *n. pl.* the science of forces exerted by liquids. द्रवशक्तिशास्त्र, जलगतिशास्त्र. *H. elec'tric*, *a.* developing electricity by friction of water, or steam. पाण्याच्या किंवा वाफेच्या घर्षणानें वीज उत्पन्न करणारें, जलघर्षणविद्युज्जनक. *Hydrog'raphy*, *n* description of the waters of the earth. पृथ्वीवरील जलभागवर्णन, जलविद्या, समुद्रनद्यादिविवरण, समुद्राचे नकाशे काढण्याची कला. *Hydrog'rapher*, *n.* समुद्राचे नकाशे काढणारा. *Hydrokinetics*, *n. pl.* the science of the motion of liquids. द्रवाभिसरणशास्त्र, जलाभिसरणशास्त्र, चलजलगतिशास्त्र. *H.-ma'nia*, *n.* craving for water. अतितृष्णा, जलाचा शोष. *H.-mechanics*, *n. pl.* जलप्रेरणाशास्त्र, जलस्थिति-गति-शास्त्र. *Hydrop'athy*, रोगांवर शीतजलचिकित्सा.-*thist*, *n.* जलचिकित्सक. *H.-phane*, *n.* an opal that absorbs water and becomes transparent when put under water. एक जातीचा पाणी शोषून घेणारा व पाण्यांत बुडाला असतां पारदर्शक होणारा क्षीर-स्फटिक, गोमेद (रत्न). *H.-phone*, *n.* जलद्वारा आवाज शोधून काढण्याचें यंत्र, जलध्वनि-शोधन यंत्र. *H.-phyte*, *n.* पाण्यांतील-जल-वनस्पति. *H.-plane*, *n.* a fin-like device for making a submarine to rise or fall; a light flat-bottomed motor boat skimming on surface. पाणबुडीला पाण्याच्या वर-खालीं जाण्याला मदत करणारी माशाच्या पंखासारखी योजना, सपाट तळाची पाण्याच्या पृष्ठभागावरोवर चालीत जाणारी जलद्गतीची बोट. *H.-pneumat'ic*, *a.* involving combined action of water and air. पाणी आणि हवा यांच्या मिश्र कार्यासंबंधीं. *H.-sphere*, *n.* waters of the earth's surface. भूपृष्ठावरील जलाशय, जलसंचय, जलविभाग. *H.-stat*, *n.* पाणी शोधून काढण्याची विद्युद्योजना. *H.-static*, *n. pl.* जलस्थितिशास्त्र; *a.* जलस्थितिशास्त्रासंबंधीं. *H. static press*, जलदाबक यंत्र. *H.-therapeutic*, *a.* *H.-the'rapy*, *n.* जलचिकित्सेसंबंधीं. थंड पाण्याच्या उपयोगानें रोग बरे करण्याची विद्या. जलचिकित्सा. *H.-therm'al*, *a.* पृथ्वीच्या पृष्ठभागावर तापलेल्या पाण्याच्या क्रियेविषयीं. *H.-thor'ax*, *n.* dropsy of the chest. उरस्तोयरोग, जलोरोग्रह. *H.-tropism*, *n.* (वनस्पतींची) पाण्याकडे-ओलाव्याकडे-वळण्याची किंवा पाण्यासून-ओलाव्यापासून-दूर जाण्याची प्रवृत्ति. *Hydrozo'a*, *n. pl.* एक जातीचे (जलनिवासी) प्राणी.

**Hy̆'drogĕn**, *n.* (हा'य्-ड्रोजिन्)—colourless invisible odourless gas, an element forming two-thirds in volume of water. एक जलघटक वायु, जलजनक वायु, उज्ज.-*ous*, *a.* *Hydro'genate*, *v. t.* उज्जाशीं संमीलन करणें, उज्जयुक्त करणें; -*genize*, *v.t.*

**Hy̆'dromĕl**, *n.* (हा'इड्रोमेल्)—mixture of honey and water. मधपाणी. *Vinous h.*, (*mead*), फेसावलेलें,-आम्ल झालेलें-मधपाणी.

**Hy̆drŏm'eter**, *n.* (हाय्-ड्रॉ'मिटर्)—an instrument for finding densities of liquids. द्रवपदार्थाचें विशिष्ट गुरुत्व मापण्याचें यंत्र, जलगुरुत्वमापक. -*metric*, *a.*,-*metry*, *n.*

**Hy̆drŏphō'bĭă**, *n.* (हाय्-ड्रो-फो'बिआ)—aversion to water, esp. as symptom of rabies in man; rabies. पिसाळलेल्या कुत्र्याच्या चावण्यापासून उत्पन्न होणारा आजार; पाणी पाहून भिणें, कुत्र्यासारखें पिसाळणें.

**Hy'drous**, *a.* (हा'इड्रस्)-containing water. सजल, जलीय, जलमय.

**Hȳe'nă, Hȳae'nă**, *n.* (हायी'ना)—a carnivorous quadruped allied to dog; a cruel, treacherous or rapacious person. एक जातीचा चतुष्पाद प्राणी, तरस; दुष्ट, विश्वासघातकी किंवा अति लोभी मनुष्य.

**Hȳgei'a**, *n.* (हायजी'आ)—goddess of health; health personified. आरोग्यदेवता, मूर्तिमंत आरोग्य.

**Hy̆'giene**, *n.* (हा'य्-जिईन)—principle of health; sanitary science. आरोग्यतत्त्व; (सार्वजनिक) आरोग्यशास्त्र. *Hygien'ic*, *a.* (हायजिए'निक्), -*ically*, *adv.* *Hygien'ics*, *n. pl.*; *Hy'gienist*, *n.* आरोग्यशास्त्रवेत्ता.

**Hy̆grŏm'eter**, *n.* (हाइग्रॉ'मिटर्)—an instrument for measuring humidity of air or gas.

हवेंतील-वायूंतील-ओलावा मोजण्याचें यंत्र, आर्द्रता-मापक, क्लेदमापक. *-met'ric, a., -metry, n.*

**Hy̆'groscōpe,** *n.* (हा'इग्रास्कोप्)—an instrument for showing humidity of air. हवेंतील ओलावा दाखविणारें यंत्र, क्लेददर्शक, क्लेदसूचक. *-copic, a.*

**Hy̆'mĕn,** *n.* (हा'यूमिन्)—the god of marriage, represented as young man carrying a torch and whale. विवाहदेवता, लग्नदेवता. *Hymene'al, a., -ally, adv.*

**Hy̆'mĕn,** *n.* (हा'यूमिन्)—(anat.) virginal membrane often found at the orifice of the vagina. योनींत असणारा 'कार्णिक' नांवाचा पडदा, योनिजवनिका.

**Hy̆mĕnŏp'tera,** *n. pl.* (हायूमिनॉ'प्टरा)—(zool.) a large order of insects with four membranous wings. कातड्यासारखे ज्यांचे पंख आहेत असे कीटक, त्वक्पक्षकीटक वर्ग. *-p'terous, a., -p'teral, a.*

**Hy̆mn,** *n.* (हिम्)—a (sacred) song of praise. स्तोत्र, भजन, अभंग, स्तुतिस्तोत्र. *v. t. & i.* to praise or sing in hymns. स्तोत्रांनीं स्तुति करणें, स्तविणें, स्तुति गाणें. *H. book,* स्तोत्ररत्नाकर, गाथा. *Hym'nic, a. Hym'nal, a.* स्तोत्रांचा : *n.* स्तोत्रसंग्रह. *Hym'nist, n.*

**Hy̆m'nody̆,** *n.* (हि'म्नोडि)—singing or making of hymns; hymns collectively. स्तोत्रें गाणें, -करणें; स्तोत्रसंग्रह, स्तोत्रें. *-dist, n.*

**Hy̆mnŏl'ogy̆,** *n.* (हिम्नॉ'लजि)—the composition or study of hymns; hymns collectively. स्तोत्रें रचणें, स्तोत्राभ्यास; स्तोत्ररत्नाकर, गाथा. *-lo'gic, a., -lo'gist, n.*

**Hy̆per-,** *pref.* (हाइपर्-)—over, above, excessive. अति, उपरि, बेसुमार (या अर्थी).

**Hy̆perb'ola,** *n.* (हायप'बाला)—a curve produced when a cone is cut by a plane making larger angle with the base than the side of cone makes. अतिपरवलय, अपरावर्त, अपास्त. *-bol'ic, a.*

**Hy̆perb'ŏlē,** *n.* (हाय्-प'बालि)—rhetorical exaggeration, a figure of speech much beyond truth. अतिशयोक्ति, अत्युक्ति अलंकार. *-bol'ical, a. -cally, adv., -bol'ist, n.* अतिशयोक्ति करणारा.

**Hy̆perbor'ēan,** *a.* (हाय्पर्बॉ'रिअन्)—of the extreme north of the earth or of a country. (पृथ्वीच्या किंवा देशाच्या) अगदीं उत्तरेकडचा. *n.* an inhabitant of this; (Gk. myth.) one of a race living in land of sun-shine and plenty beyond north wind. उत्तरस्थ, उत्तरनिवासी; (ग्रीक पुराणांतील) सूर्यप्रकाशाच्या समृद्ध उत्तरदेशांतील रहिवासी. [Gk *hyper*, above, *boreas*, north wind]

**Hy̆percrĭt'ĭcal,** *a.* (हाय्परक्रि'टिकल्)—too critical, esp. of small faults. (लहानसहान दोषांविषयीं) फाजील चिकित्सक, चिकित्साखोर. *-tically, adv., -ticism, n., -ticize, v. t. & i.*

**Hy̆pert'rophy̆,** *n.* (हायप'ट्रॉफि)—enlargement (of an organ etc.) due to excessive nutrition. अतिपुष्टि, विकृतवृद्धि.

**Hy'phen,** *n.* (हा'य्-फन्)—a sign (-) used to join or divide a word. दोन शब्दांना जोडणारें चिन्ह, संयोगचिन्ह. *v. t.* अशा चिन्हानें जोडणें, वेगळें दाखविणें. *-ated, a.*

**Hy̆pnō'sĭs,** *n.* (हिप्नो'सिस्)—hypnotic state; artificially produced sleep. मूर्च्छना (प्रयोग-) पात्रता; कृत्रिम रीतीनें आणलेली झोंप, गुंगी. मूर्च्छा.

**Hy̆pnŏt'ic,** *a.* (हिप्नॉ'टिक्)—of hypnosis; producing sleep. मूर्च्छनापात्र, मूर्च्छनेचा; झोंप-निद्रा-आणणारा. *n.* झोंप आणणारी वस्तु; मूर्च्छनाप्रयोग झालेला मनुष्य, मूर्च्छनावश-पात्र-मनुष्य.

**Hy̆p'notism,** *n.* (हि'प्नॉ-टिझम्)—(the production of) hypnosis or artificial sleep. विशेष सामर्थ्यानें दुसऱ्याला गुंगी आणणें, मोहनी घालणें, मूर्च्छना (शास्त्र), वशीकरण. *-ist, n.* मूर्च्छनाशास्त्रवेत्ता. *-ize, v. t.* वशीकरणासाठीं मूर्च्छना आणणें.

**Hy̆'pocaust,** *n.* (हा'यपकॉस्ट्, हि-)—the hollow space under floor for heating a house or bath from furnace. जमिनीखालील आगटी पेटविण्याचें भुयार-तळघर.

**Hy̆pochon'driă,** *n.* (हिपोकॉ'न्ड्रिआ)—state of causeless depression. प्रकृतीची नेहमीं फाजील चिंता करण्याचें वेड, विमनस्कता, रोगभ्रम. *-dri'asis, a.* रोगभ्रम. *Hypochon'driac, a. & n.* रोगभ्रमिष्ट (मनुष्य). *-dri'acal, a., -driacally, adv.*

**Hy̆pŏc'rĭsy̆,** *n.* (हिपॉ'क्रिसि)—simulation of virtue; dissimulation, pretence. ढोंग, दंभ; बकध्यान, दांभिकता.

**Hy̆p'ocrĭte,** *n.* (हि'पो-क्रिट्)—a person guilty of hypocrisy; a dissembler. ढोंगी, दांभिक; भोंदू. *-tical, a.* ढोंगाचा, दांभिक. *-tically, adv.*

**Hy̆poderm'ic,** *a.* (हायपड'र्मिक्, हि-)—(Med.) introduced beneath the skin; (Anat.) lying under the skin. कातडीच्या खालून घातलेलें (टोंचलेलें) औषध; कातडीखालीं असणारा. *-ically, adv.*

**Hy̆pos'tasĭs,** *n.* (हायपॉ'स्टासिस्)—(Med.) excess of blood in the organs of body; (Meta-

physics) underlying substance; person of the God-head. शरीरावयवांतील रक्ताचा अतिरेक; मूळ वस्तु, सार, वास्तव वस्तु, पुरुष.

**Hўpŏt'enūse,** *n.* (हाय्-पॉ'टिन्यूस्, हि-)—the side of a right-angled triangle opposite the right angle. काटकोनत्रिकोणाची सर्वांत लांब बाजू, कर्ण.

**Hўpŏth'ecāte,** *v. t.* (हाय्-पॉ'थि-केट्)—to pledge, to mortgage. तारण लावून देणें, तारण गहाण ठेवणें. *-ca'tion, n.*

**Hўpŏth'esĭs,** *n.* (हाय्-पॉ'थि-सिस्)—supposition made as basis (for reasoning, &c.). गृहीत धरून चाललेली गोष्ट, गृहीतपक्ष, पक्षप्रतिज्ञा, अनुमानिक प्रतिज्ञा, उपन्यास. *Hypothet'ic,-al, a.* पूर्वपक्षात्मक, अनुमानिक, प्रतिज्ञात्मक, सापेक्ष; *-thet'ically, adv.*

**Hў'son,** *n.* (हा'यूसन्)—kind of Chinese green tea. एक प्रकारचा चिनी चहा.

**Hў'spў, I spy,** *n.* (हा'यूस्पाय्, आय् स्पाय्)—boys' hiding game. मुलांचा लपंडावाचा खेळ.

**Hўss'op,** *n.* (हि'साप्)—an aromatic herb formerly used medicinally; (bibl.) plant whose twigs were used for sprinkling in Jewish rites, or in purification. एक औषधी वनस्पति; अभिषेक किंवा शुद्धीकरणासाठीं जिच्या डहाळ्या वापरीत ती वनस्पति,-तें झाड.

**Hўster'ĭă,** *n.* (हिस्टी'अरिआ)—disturbance of (esp. a woman's) nervous system; morbid excitement. स्त्रियांस होणारी वायुबाधा, गर्भाशयोन्माद; फेंपरें. *Histe'rical, a.* गर्भाशयोन्मादासंबंधीं, फेंपऱ्याचा;*-cally, adv.*

**Hўstĕ'rics,** *n. pl.* (हिस्टे'रिक्स्)—fit of hysteria. फेंपऱ्याची लहर, उन्मादवायु.

**Hўsterot'omy,** *n.* (हिस्टेरॉ'टमि)—the operation of cutting into the uterus. गर्भकोशछेदन-क्रिया. [Gk *hustera*, womb, *tome*, cutting]

**Hўs'terŏn-prŏt'erŏn,** *n.* (हि'स्टरॉन्-प्रॉ'टरॉन्)—(Gram.) a figure of speech in which what should come last is put first. हेतुसाध्यव्यत्यास स्वाभाविक क्रमाची उलटापालट.

## I

**I, i,** *pron.* & *n.* (आय्)—(*pl.* Is, I's) Roman numeral=1; pronoun of the first person singular; ninth letter of the English alphabet. रोमन अंकपद्धतींत १; मी; इंग्रजी वर्णमालेंतील नववा वर्ण. *Me*, objective, द्वितीयेचें एकव०, मला; *we*, pl. आम्ही; *us*, obj. आम्हांला.

**Iăm'bus, I'ămb,** *nn.* (आयॅ'म्बस्, आ'यॅम्ब्)—a metrical foot of one short and one long syllable; an iambic verse. लघुगुरु अक्षरांचा पाद, लघुगुरु-अक्षरपादयुक्त कविता. *Iam'bic, a.* of iambics. उत्तर गुरुद्व्यक्षरपादाचा, *n.* उत्तर गुरुद्व्यक्षरपाद.

**I'bĕx,** *n.* (आ'यूबेक्स्)—a wild goat. डोंगराळ भागांत राहणाऱ्या बकऱ्यांची एक जात.

**Ibī'dem,** *adv.* (आयुबा'इडम्)—(abbr. *ib., ibid*) in the same book, chapter etc. त्याच स्थळीं,-पुस्तकांत,-अध्यायांत, इ. [L=in the same place]

**I'bĭs,** *n.* (आ'यूबिस्)—a stork-like bird. करकोंच्यासारखा पक्षी.

**Ice,** *n.* (आइस्)—frozen water; (with pl.) frozen confection, ice-cream, water-ice. (कृत्रिम) बर्फ, गोठलेलें पाणी; बर्फाचे गोड पदार्थ,-पेयें. *v. t.* to freeze; to cover with ice; to cool (wine) in ice; to cover with concreted sugar. गोठणें; बर्फांत ठेवणें; बर्फांत ठेवून (दारू) थंड करणें; वर घट्ट साखर पेरणें. *To break the i.*, (fig.) to make a beginning, to break through reserve or stiffness. आरंभ करणें, प्राथमिक अडचणी दूर करणें, उपक्रम करणें. *Ice age*, the glacial period. हिमानीयुग. *I.-blink*, बर्फावरून परावर्तन पावणारा प्रकाश,-कवडसा. *I. boat*, बर्फावरून चालणारी होडी,-बोट, (also *i.-breaker*) बर्फ फोडून जाणारी बोट. *I.-cream*, थंडी मलई. *I.-field*, (ध्रुवांजवळील) बर्फ-क्षेत्र. *I. man*, बर्फावरून चालण्यांत-जाण्यांत-पटाईत मनुष्य; बर्फविक्या. *I.-pack*, drift ice. हलतें-तरंगणारें-बर्फ. *I.-pick*, बर्फ फोडण्याचें हत्यार.

**Ice'berg,** *n.* (आ'इस्-बर्ग्)—a vast mass of floating ice in the ocean; an unemotional person. बर्फाचा डोंगर, हिम पर्वत; भावनारहित-थंडप्रकृति-मनुष्य.

**Ichneum'on,** *n.* (इक्-न्यू'मन्)—weasel-like quadruped that destroys crocodiles' eggs; (also *i. fly*) a kind of insect. मुंगूस, नकुल; एक प्रकारचा कीटक.

**I'chŏr,** *n.* (आ'यू-कॉर्)—(Gk Myth.) fluid flowing like blood in the veins of gods; watery discharge from wound, etc. देवांच्या वाहिन्यांतील रक्ताऐवजीं असलेला पातळ पदार्थ, दिव्यरस; लस, जखमेंतून वाहणारें पाणी, नासका पू. *I'chorous, a.*

**Ichthyo-,** (इक्थिओ-)—in comb., (before a vowel Ichthy-), Gk=fish. मत्स्य. *-o'grapher, -graphy, nn.* मत्स्यवर्णनकार, मत्स्यवर्णन. *Ich'thyoid, a.* fish-like. माशासारखा, मत्स्यसदृश. *n.* मत्स्यसदृश पृष्ठवंशी प्राणी.*-l'atry, n.* मत्स्यमूर्तिपूजा, मत्स्यदेवपूजा. *-lite, n.* fossil fish.

अश्मीभूत मत्स्य. -*logy*, *n.* natural history of fishes. मत्स्यविज्ञानशास्त्र.-*logical*, *a.*,-*logist*, *n.* मत्स्यविज्ञानवेत्ता.-*phagi*,-*phagist*, *nn.* मत्स्याहार, मत्स्याहारी, मासे खाणारा.-*phagous*, *a.* माशांवर उपजीविका करणारा. *Ichthyornis*, सदंत पक्ष्यांची ( अस्तित्वांत नसलेली ) एक जात. *Ichthyosaur'us*, *n.* an extinct marine animal. ( हल्लीं न सांपडणारा ) प्रचंड मासा, जलचर प्राणी.

**Ichthyō'sis**, *n* ( इक्थिओ'सिस् )—( med. ) a disease in which the epidermis becomes dry and horny. ज्यामुळें त्वचा जाड व खडबडीत होऊन माशाचे आंगासारखी दिसते असा त्वग्रोग, मत्स्यचर्मकुष्ठ.

**I'cicle**, *n.* ( आ यू-सिकल् )—tapering spike of ice hanging from caves &c. लोलकासारखा लोंबणारा बर्फाचा तुकडा.

**I'cle**, *a.* ( इ'क्ल् )—( nursery ) little. लहान, इवलें.

**I'con**, *n.* ( आयूकॉन् )—an image, a statue; a sacred painting, etc. मूर्ति, प्रतिमा; पवित्र चित्रकाम इ. -*'ic*, *a.* मूर्तीचा, चित्रासारखा; ( पुतळ्यांच्या ) रूढ पद्धतीचा.

**Icŏn'ŏclasm**, *n.* ( आयकॉ'नॉक्लॅझम् )—breaking of images. मूर्तिभंजन, मूर्ति फोडणें.

**Icŏn'oclăst**, *n.* ( आयू-कॉ'नो-क्लॅस्ट् )—a breaker or destroyer of images, ( fig. ) one who assails cherished belief. मूर्ति फोडणारा, मुर्तिभञ्जक; रूढ समजुती मोडणारा, रूढिविध्वंसक.-*ic*, *a.*

**Icosahe'dron**, *n.* ( आयूकोसहे'ड्रन् )—a solid contained by 20 plane faces. वीस समान बाजूंचा घन, विंशतिफलक.

**Ic'tus**, *n.* ( इ'क्टस् )—metrical stress. (छंदःशास्त्रांत) आघात, जोर.

**I'cy̆**, *a.* ( आ'यूसि )—abounding in ice; very cold; ( of manners ) chilling. हिमप्रचुर, बर्फमय, अति थंड; प्रेमोष्मशून्य, रांकट.

**Id**, *n.* ( इड् )—( Biol. ) the unit of germ-plasm; ( psycho-anal. ) *the* instinctive impulses of the individual. मूलांकुराच्या जीवनरसाचा एकं; ( मनोविश्लेषणशास्त्रांत ) व्यक्तीगत प्राण्याच्या स्वाभाविक भावना, प्रेरणा.

**Ide'ă**, *n.* ( आ'य-डिआ )—a notion conceived by the mind; vague belief, fancy; plan, intention, aim. कल्पना; कल्पनाचित्र, मनोगतकल्पना; मत, तर्क; ( कायम ठरलेला ) विचार, हेतु, संकल्प. *The young i.*, the child's mind. बालकाचें मन. *Idea'd*, *Ideaed*, *aa.*, *Idea'less*, *a.*

**Ide'al**, *a.* ( आयू-डी'अल् )—perfect; existing only in idea; visionary. उत्कृष्ट, परम, अत्युच्च, श्रेष्ठ; कल्पनामय; कल्पित. *n.* perfect type; an actual thing as standard for imitation. उत्कृष्ट नमुना, साध्य, ध्येय; अनुकरणीय उत्तम गोष्ट. *Ide'ally*, *adv.*

**Ide'alĭsm**, *n.* ( आयूडी'अलिझम् )—the representation of things in ideal form; imaginative treatment; ( Philos. ) the system of thought in which the object of external perception is held to consist of ideas. वस्तूंचा अत्युत्कृष्टपणा दाखविणें, परम कल्पना; कल्पनासृष्टीचें रूप देणें; कल्पनामयतत्त्ववाद, कल्पनावाद. *Ide'alist*, *n* कल्पनासृष्टींत दंग असणारा, कल्पनामयतत्त्ववादी, कल्पनावादी; मायावादी. -*listic*, *a*, *Ideal'ity*, *n.* quality of being ideal; imaginative faculty. मनोमयता; काल्पनिकता, साध्यता, ध्येयवादिता; कल्पनाशक्ति.

**Ide'alize**, *v. t. & i.* ( आयूडी'अलाइझ् )—to make or treat as ideal, to become ideal. कल्पना करणें, कल्पनासृष्टीचें रूप देणें, अंतिम ध्येय मानणें,-असणें. -*lization*, *n.* कल्पनास्वरूप देणें.

**Idē'āte**, *v. t. & i.* ( आयूडी'एट् )—to imagine; to form ideas. कल्पना करणें; मनोगत प्रतिमा बनविणें. -*tion*, *n.*, -*tional*, *a.*

**I'dĕm**, *n.* or *adv.* ( आ'यूडम् )—( abbr. *id* ) ( in ) the same author; ( इ-' ) ( in ) the same word. त्याच ग्रंथांत; त्याच शब्दांत, वरच्याप्रमाणें, सदरहू. *I quod*, ( इ-) the same as. सदरहू, तद्वत् [ L ]

**Idĕn'tic**, *a.* ( आयूडे'न्टिक् )—*i. note*, simultaneous and uniformly worded ( expression of opinion ); identical. एकाच अर्थाचा व आशयाचा निरोप ( खलिता ); अभिन्न, एकरूप.

**Idĕn'tĭcal**, *a.* ( आयू-डे'न्टिकल् )—the same; agreeing in all details *with*; (Logic, Math.) expressing an identity. तोच, एकच; तंतोतंत जुळणारा, अभिन्न; सरूप. -*ally*, *adv.*

**Idĕn'tĭfy̆**, *v. t.* ( आयू-डे'न्टि-फाय् )—to treat as identical; to associate oneself with ( a party, policy, &c ); to establish the identity of. तोच आहे असें मानणें; एकरूप किंवा तद्रूप तोच आहे असें सिद्ध करणें. -*fication*, *n.* सरूपता, ओळख पटविणें. -*fiable*, *a.*

**Idĕn'tĭty̆**, *n.* ( आयू-डे'न्टिटि )—absolute sameness; individuality; ( Alg. ) equality of two expressions; equation expressing this. अगदीं साम्य, पुर्ण समानता, तादात्म्य; व्यक्तिता, व्यक्तीची खूण,- ओळख; सरूपता, सरूपसमीकरण.

**Ideo-**, *pref.* ( आयूडिओ, -इ- )—in comb. = idea. कल्पना-. *I. gram*, -*graph*, ( आ'यूडिऑग्रॅम, -ग्रॅफ् )—character indicating the idea of a

thing without its name. कल्पनादर्शक चिन्ह (चिनी लिपींतील). -graph'ical, a., -graphy, n. Ideologue, n. कल्पनावादी, कल्पनासृष्टींत रमणारा. -logy, n. science of ideas; visionary speculation. कल्पनाशास्त्र; कल्पनातरंग; -logical, a.; -logist, n.

Ides, n. pl. (आइड्झ्)—(in ancient Rome) eighth day after nones, 15th of March, May, July, October, 13th of other months. मार्च, मे, जुलै, ऑक्टोबर या महिन्यांची १५ तारीख, व बाकीच्यांची १३ तारीख.

Id ĕst, (इद् एस्ट्)—(abbr. i. e.) that is to say. म्हणजे. [L]

Id'iocy̆, n. (इ'डिअसि)—extreme imbecility, hopeless insanity or madness. खूळ, वेड, बुद्धीची कमतरता, भ्रमिष्टपणा.

Id'iom, n. (इ'डि-अम्)—language, peculiarity of phraseology. भाषावैशिष्ट्य; वाक्संप्रदाय,

आळशी चाकर.-कपी. I'dly, adv निरर्थकपणें, आळसानें, आळसांत, निष्काळजीपणानें. I'dlesse, n. Idleness रिकामपणा, आळस, सुस्ती.

I'dol, n. (आइ-डल्)—an image as object of worship; a false god, an object of devotion; (Logic) false mental conception. मूर्ति, प्रतिमा, खोटा देव, देवमूर्ति, भक्तीचा विषय, पूज्य वस्तूची प्रतिमा, दैवत, भ्रामक कल्पना, भ्रम, चूक. Idols of the tribe, (L idola tribus) limitations of human mind मनुष्यमात्राच्या उणीवा,-चे दोष, -of the cave, (L -specus) prejudices of an individual mind. व्यक्तिविशेषाच्या उणीवा,-चुका, दोष, -of the market, (L-fori) influence of words केवळ शब्दांमुळें होणाऱ्या चुका, भ्रामक शब्दयोजनेचे दोष. of the theatre, (L -theatri) philosophical prepossessions भ्रामक विचारसरणीमुळें होणारे दोष.

**Ig'nĭs făt'ūus**, *n.* ( इ'ग्निस् फॅ'ट्यूअस् )—phosphorescent light seen on marshy ground; a delusive hope or gain. भुताचें कोलीत, दलदलीवर दिसणारा प्रकाश; भ्रामक आशा, मोह, भूल.

**Ignīte'**, *v. t. & i.* ( इग्ना'इट् )—to set fire to; to take fire; to make intensely hot; (chem.) to heat to the point of combustion. आग लावणें, पेटवणें; पेट घेणें, जळूं लागणें; अति तप्त करणें; कडक उष्णता-आंच-देणें.-*t'able*, *a.* प्रज्वलनीय, ज्वालाग्राही, पेटण्याजोगा. *Ignit'ion*, *n.* आग लावणें, जाळणें, प्रज्वलन.

**Ignō'ble**, *a.* ( इग्नो'बल् )—of low birth or position; mean, base. हीन कुळांत किंवा स्थितींत जन्मलेला; अधम, नीच, क्षुद्र, हलकट.-*ness*, *n.*-*bly*, *adv.*

**Ignomĭn'ĭous**, *a.* ( इग्नॉमि'निअस् )—mean, shameful, dishonourable, worthy of contempt. क्षुद्र, अपमानास्पद, लज्जास्पद.-*ly*, *adv.*

**Ig'nomĭnў**, *n.* ( इ'ग्नोमिनि )—public disgrace, dishonour, infamy; infamous conduct. अप्रतिष्ठा, बदनामी; दुर्वर्तन, शरमेची गोष्ट, लाजिरवाणें काम.

**Ignorā'mus**, *n.* ( इग्नरे'मस् )—an ignorant person. अडाणी, ठोंब्या, माहिती नसलेला.

**Ig'norance**, *n.* ( इ'ग्नरन्स् )—want of knowledge. अज्ञान, अज्ञानत्व, अजाणपणा, अज्ञानांधकार. *Where i. is bliss, 'tis folly to be wise*, अज्ञान ( कांहीं वेळां ) ज्ञानापेक्षां चांगलें असतें. ' अज्ञात तें शुद्ध '.

**Ig'norant**, *a.* ( इ'ग्नरन्ट् )—illiterate, lacking knowledge; uninformed (*of*, *in*). ज्ञानहीन, अडाणी, मूर्ख, अजाणता. -*ly*, *adv.*

**Ignorā'tio, ele'nchī**, *n.* ( इग्नरे'शिओ इले'न्काय् )—(logic) an argument that appears to refute opponent. तर्काभास, अप्रकृतानुमितीचा हेत्वाभास.

**Ignōre'**, *v. t.* ( इग्नो'अर् )—to refuse to take notice of, to shut the eyes to; to reject. दुर्लक्ष करणें, कानाडोळा करणें; ( साक्षी पुरावा भरपूर नसल्यामुळें ) मान्य न करणें, विचारांत न घेणें. [ F-L *in*-, not, *gno*-, know ]

**Igua'na**, *n.* ( इग्वा'ना )—a kind of lizard. घोरपड, गोधा. *Iguan'odon*, *n.* huge fossil lizard. प्रचंड अश्मीभूत घोरपड.

**I'lĕx**, *n.* ( आ'यलेक्स् )—holm-oak; (Bot.) a genus including holly. सदापर्णी ओक वृक्ष; हॉलि जातीच्या वनस्पतींचा वर्ग.

**Il'ĭăc**, *a.* ( इ'लिॲक् )—of the flank (bone). लहान आंतड्याच्या खालच्या भागाचा, सूक्ष्मांत्रमूलासंबंधी. *I. passion*, उदावर्त ( रोग ).

**Il'ĭad**, *n.* ( इ'लिअड् )—an epic poem by Homer and describing the siege of Troy. होमरकृत-महाकाव्य ' इलिअड ' *I. of woes*, (fig.) दुःखपरंपरा.

**Il'ium**, *n.* ( इ'लिअम् )—( *pl.*-*ia* ) hip-bone. कडेचें हाड, कटिकपाल.

**Ilk**, *a.* ( इल्क् )—(Sc.) the same. तोच, सदृश. *Of that ilk*, त्याच नांवाचा. *That ilk*, (vulg.) that family, class or set. तोच वंश, वर्ग, गट.

**Ill**, *a.* ( इल् )—out of health, sick; evil, harmful; faulty, deficient; morally bad; (arch.) difficult. आजारी; वाईट, दुष्ट; अशुद्ध, पापी, दुष्ट; कठीण. *n.* evil; harm; (*pl.*) misfortunes. दुःख; अनिष्ट, अपाय, दुःख, रोग, व्याधि, संकट. *adv.* badly, unfavourably; with pain or difficulty; imperfectly, scarcely. वाईट रीतीनें; कष्टानें, प्रतिकूल; अपुरा, क्वचितच. *To be taken i.*, आजारी पडणें. *I. fame*, अपकीर्ति, दुष्कीर्ति, अनीति. *I. will*, animosity, strife. वैर, भांडण. *I. nature*, दुष्ट स्वभाव. *I. humour*,-*temper*, गैरमर्जी, खप्पा मर्जी, राग. *To do an i. turn to a person*, एकाद्याला अपकार करणें, दुष्टपणा करणें, त्याचें अहित करणें. *To speak i. of*, च्या विरुद्ध बोलणें. *To take* ( a thing ) *i.*, take offence at. चा राग येणें, नें अपमान झालासा वाटणें. *I. at ease*, embarrassed, uneasy. गोंधळलेला, अस्वस्थ. *I.-advised*,-*visedly*, ( इल्अॅड्व्हा'इझ्ड्लि ) imprudent,-ly. अदूरदृष्टि, अविचारी,-चाराचें,-चारानें. *I.-affected*, not well disposed. प्रतिकूल ग्रह-मत-असलेला. *I.-bred*, rude. उद्धट, गैरशिस्त. *I. breeding*, bad manners. असभ्य चालरीत. *I.-conditioned*, वाईट स्वभावाचा, वाईट स्थितींतला. *I.-disposed*, वाइटाकडे कल असलेला, दुष्ट, ( विषयीं ) चांगलें मत नसलेला. *I.-fated*, दुर्दैवी, अपशकुनी. *I.-favoured*, uncomely, objectionable. दिसण्यांत विद्रूप, हरकत घेण्याजोगा, न आवडणारा. *I.-gotten*, gained by evil means. हपापानें मिळविलेलें, वाईट उपायांनीं-रीतीनें-मिळविलेलें. *I.-humoured*, दुष्ट स्वभावाचा, चिडखोर. *I.-judged*, unwise. वेडेपणाचा, अव्यवहारी. *I.-mannered*, रीतभात नसलेला, उद्धट. *I.-omened*, attended by bad omens. दुश्चिन्हांचा, अपशकुनी. *I.-starred*, unlucky. जन्मतःच वाईट ग्रह पडलेला, कमनशिबी, भद्र्या कपाळाचा. *I.-tempered*, morose. दुःखी, उदास, खिन्न. *I.-timed*, unseasonable. अवेळचा, बिनहंगामी. *I.-treat*, *I.-use*, to treat badly. वाईट रीतीनें वागविणें, छळणें.

**Illā'tion**, *n.* ( इले'शन् )—the act of inferring; deduction, conclusion; the thing deduced. तर्क बांधणें; तर्क, अनुमान; अनुचित गोष्ट.

**Illā'tive**, *a.* ( इले'टिव्ह् )—that may be inferred, inferential. तर्काचा, आनुमानिक, परिणामबोधक. *I. particle*, अनुमानवाचक अव्यय.-*ly*, *adv.*

**Illē'gal**, *a.* (इल्ली'गल्)—not legal, contrary to law. बेकायदेशीर, कायद्याविरुद्ध, अन्याय्य, अधर्म्य. *Illegal'ity, n., Ille'gally, adv.* गैरकायद्यानें, अन्यायानें.

**Illĕ'gible**, *a.* (इल्लें'जिबल्)—not legible, that cannot be read, unreadable. अस्पष्ट, वाचण्याला कठीण. *Illegibil'ity, n.* गिजमीडपणा, दुर्वाच्यता. *Illeg'ibly, adv.*

**Illegit'imate**, *a. & n.* (इलि-जि'टि-मिट्)—not legitimate; bastard, born out of wedlock, wrongly inferred; abnormal. बेकायदेशीर; अनौरस, दासीपुत्र; तर्कशास्त्रविरुद्ध; अस्वाभाविक. *v. t.* (-मेट्)—to declare illegitimate. गैरकायदा-शास्त्रविरुद्ध-अनौरस ठरविणें. *Illegit'-imacy, n.* bastardy. अनौरसता, जारजता. *-timately, adv.*

**Illib'eral**, *a.* (इलि'बरल्)—vulgar, narrow-minded; sordid, stingy. अशिक्षित, ग्राम्य, आकुंचित मनाचा, अनुदार; कृपण, चिक्कू.*-'ity, n., -ally, adv.*

**Illi'cit**, *a.* (इलि'सिट्)—unlawful; forbidden. बेकायदेशीर, गैरकायदा, अन्याय्य, निषिद्ध.*-ly, adv.*

**Illim'itable**, *a.* (इलि'मिटेबल्)—boundless. अमर्याद, निस्सीम.*-tability, n.,-tableness, n.,-tably, adv.*

**Illit'eracy**, *n.* (इलि'टरसि)—want of learning. निरक्षरता.

**Illit'erate**, *a. & n.* (इलि'टरेट्)—unlettered, not educated, unlearned; unable to read. अशिक्षित; निरक्षर, अक्षरशत्रु (मनुष्य). *-ness,* निरक्षरता.

**Ill'ness**, *n.* (इ'ल्-निस्)—ill health, sickness. दुखणें, आजार.

**Illŏ'gical**, *a.* (इलॉ'जिकल्)—devoid of logic, contrary to sound reasoning. तर्कविरुद्ध, न्यायविरुद्ध, अयुक्तिक.*-cally, adv., -cal ity, n.*

**Illth**, *n.* (इल्थ्)—(rare) an evil state. वाईट स्थिति, दुर्दशा.

**Illume'**, *v. t.* (इल्यू'म्)—(poet.) to make bright. प्रकाशित करणें.

**Illu'minant**, *a.* (इल्यु'मिनन्ट्)—serving to illuminate. प्रकाशित करणारा, वर प्रकाश पाडणारा. *n.* agent of light. दिव्याचा प्रकाश पाडणारें साधन, कांच, आरसा.

**Illu'minate**, *v. t.* (इल्यु'मिनेट्)—to light up; to throw light on; to decorate with lights as a sign of festivity; to decorate (initial letter in manuscript etc.) with gold, silver and bright colour. प्रकाशित करणें; कोणत्याहि गोष्टीवर प्रकाश पाडणें; रोशनाई करणें, आरास करणें; आद्याक्षराला सोनेरी वगैरे वेलबुट्टी काढणें. *-tion, n., -tor, n., -tive, a.* प्रकाशक.

**Illu'mine**, *v. t.* (इल्यु'मिन्)—(poet.) to light up; to enlighten intellectually. प्रकाशित करणें; (बुद्धीचा) प्रकाश पाडणें.

**Illu'sion**, *n.* (इल्यू'झन्)—deceptive appearance, statement or belief, mockery; a transparent tulle. मोह, भ्रम, जादू, अविद्या; तलम झिरझिरीत रेशमी जाळी.

**Illu'sionist**, *n.* (इल्यू'झनिस्ट्)—one who does believe in objective existence; a conjurer. दृश्य वस्तु ही माया आहे असें मानणारा, मायावादी; इंद्रजालिक, जादूगार. *Illu'sionism,* मायावाद, जग मिथ्या आहे असें मानणें.

**Illu'sive**, *a.* (इल्यू'सिव्ह)—deceptive. भ्रामक, मोहक, फसविणारें, मायामय. *-ly, adv. -ness, n.*

**Illu'sory**, *a.* (इल्यू'सरि)—deceptive. भ्रामक, मायावी. *-rily adv., -riness, n.*

**Ill',ustrate**, *v. t.* (इ'लस्ट्रेट्)—to make clear esp. by examples or drawings; to adorn with pictures or designs. उदाहरणें देऊन किंवा काढून स्पष्ट करणें; चित्रांनीं-आकृतींनीं-सुशोभित करणें. *-tor, n.* स्पष्टीकरण करणारा. *-tive, a.* explanatory. स्पष्टीकरणात्मक, दृष्टान्ताचा, प्रकाशक. *-tively, adv.*

**Illŭstra'tion**, *n.* (इलस्ट्रे'शन्)—elucidation; an example; drawing, &c. in a book. स्पष्टीकरण; उदाहरण, दाखला; पुस्तकांतील चित्रें.

**Illŭs'trious**, *a.* (इल'स्ट्रिअस्)—distinguished by the reputation of greatness, renowned. नामांकित, प्रसिद्ध. *-ly, adv., -ness, n.* श्रेष्ठता, मोठेपण, कीर्ति, नांव.

**Im'age**, *n.* (इ'मिज्)—imitation of object's external form, as a statue; an idol; an optical counterpart produced by rays of light reflected from a mirror, refracted through lens, etc., a counterpart; type; form; simile, metaphor; idea, conception. प्रतिरूप, पुतळा, प्रतिमा, तसबीर; देवताप्रतिमा, मूर्ति; प्रतिबिंब, बिंब; हुबेहूब नमुना; नक्कल; नमुना; सारखेपणा; दाखला, उदाहरण, दृष्टान्त, रूपक; कल्पना, भास, आभास. *v. t.* to imagine; to mirror; to describe vividly; to portray. कल्पना करणें; प्रतिबिंब पाडणें; हुबेहूब वर्णन करणें; तसबीर-छबी-रेखाटणें. *I.-less, a. I.-able, a.* कल्पना करतां येण्याजोगें, कल्पनीय, *-ably, adv.*

**Im'agery**, *a.* (इ'मिजरि)—images; statuary images; figurative illustration. मूर्ति; प्रतिमा, पुतळा; कल्पनासृष्टि, काल्पनिक वर्णन.

**Imă'gĭnal**, *a.* ( इमॅ'जिनल् )—of an insect imago. किड्याच्या पूर्णस्थितीच्या स्वरूपाचा.

**Imă'gĭnarў**, *a.* ( इमॅ'जिनरि )—existing only in or due to imagination. मनःकल्पित, कल्पित, काल्पनिक. *-arily, adv.*

**Imă'gĭnātion**, *n.* ( इमॅ'जिनेशन् )— imagining; mental faculty forming images of objects not present; fancy; creative faculty of the mind. कल्पना करणें, कल्पनाशक्ति; कल्पना, भावना, विचार; प्रतिभा.

**Imă'gĭnative**, *a.* ( इमॅ'जिनटिव्ह् )— proceeding from the imagination; full of imagination, creative, given to imagining. कल्पनेपासून निघणारें, कल्पनोत्पन्न; कल्पक, प्रतिभावान. *-ly, adv.*, *-ness, n.*

**Imă'gĭne**, *v. t.* ( इमॅ'जिन् )—to form mental image of, to conceive, to suppose; to think; to fancy. कल्पना करणें; मनाशीं ताडून पाहणें, विचार करणें, वाटणें.

**Imā'gō**, *n.* ( इमे'गो )—the last or perfect state of insect's life. किड्याचें ( सर्व रूपांतरें होऊन झालेलें ) शेवटचें पूर्ण स्थितीचें स्वरूप,-पूर्णावस्था.

**Im'bĕcile**, *a.* ( इ'म्बिसील् )—mentally weak; physically weak; idiotic, extremely foolish, silly. मनानें दुर्बळ; अशक्त, क्लीब, षंढ; अत्यंत मूर्ख. *-ly, adv.*, *-cil'ity, n.* दुर्बलता, क्लैब्य.

**Imbibe'** *v. t.* ( इम्बा'इब् )—to drink in; to drink; to inhale; to absorb. शोषणें; पिणें; श्वास आंत घेणें, शोषून घेणें. *Imbibi'tion, n.* शोषण, ग्रहण.

**Im'brĭcate**, *v. t. & i.* ( इ'म्ब्रिकेट् )—to arrange ( leaves etc. ), be arranged, so as to overlap like tiles. कौलें-पानें-एकावर एक चढवून लावणें,-लागणें. *a.* ( -कट् ) overlapping कौलें एकावर एक चढलेला. *-tion, n.*, *-tive, a.*

**Imbrŏ'glio**, *n.* ( इम्ब्रो'ल्यो )—confused heap; complicated situation. अस्ताव्यस्त ढीग,-ढिगारा, घोटाळा, गोंधळ, भानगड.

**Imbrue'**, *v. t.* ( इम्ब्रू' )—to stain. हात माखून घेणें.

**Imbue'**, *v. t.* ( इम्ब्यू' )—to soak, to drench in a fluid, to saturate ( with ), to dye ( with ); to inspire ( with ), to imbrue. भिजवणें, लिप्त करणें; चेतना आणणें; माखणें.

**Im'ĭtable**, *a.* ( इ'मिटबल् )—worthy of imitation. अनुकरणीय, अनुकरण-नक्कल-करता येण्यासारखा. *-bil'ity, n.* अनुकरणीयता.

**Im'ĭtāte**, *v. t.* ( इ'मिटेट् )—to follow the example of; to mimic; to be like. कित्ता-वळण-घेणें, अनुसरणें; नक्कल करणें; धाटणी उतरणें, अनुकरण करणें. *Im'itator, n.* अनुकरण-नक्कल-करणारा.

**Imĭtā'tion**, *n.* ( इमिटे'शन् )—imitating: a copy, likeness; counterfeit ( often attrib. ) ( Mus. ) repetition of melody etc. in another part or voice. अनुकरण करणें, उदाहरण घेणें; नक्कल, सादृश्य, साम्य; कृत्रिम, बनावट, खोटा; तानेची ( गाण्याची ) नक्कल, जोड, साथ. *I. silk*, कृत्रिम-खोटें-रेशीम.

**Im'ĭtative**, *a.* ( इ'मिटटिव्ह् )—following the model or example ( *of* ), inclined to imitate; counterfeit. ( चें ) अनुकरण करणारा, अनुकरणप्रिय; नकली. *I. arts*, painting and sculpture. चित्रकाम व खोदकाम या ( अनुकरणानें शिकण्याच्या किंवा अनुकरणानें झालेल्या ) कला. *I. word*, अनुकरणवाचक शब्द. *-ly, adv.*, *-ness, n.*

**Immăc'ūlate**, *a.* ( इमॅ'क्युलट् )—pure, spotless; unstained, without blemish; not spotted. पवित्र, निष्कलंक, निर्दोष, निर्मळ, विमल; बिनठिपक्याचा,-डागांचा. *I. conception*, ( of Virgin Mary, as born free from the taint of original sin. ) अपौरुषेय गर्भाधान. *-lacy, n.* *-lateness, n.* निर्दोषपणा, निष्कलंकत्व. *-lately, adv.*

**Imm'anent**, *a.* ( इ'मॅनन्ट् )—inherent ( *in* ); ( of God ) pervading the universe. अंतर्भूत, अंतर्गत, आंत असणारा; विश्वव्यापी ( परमेश्वर ). *-nence*, *-nency, nn.* अंतर्भाव, व्यापकता.

**Immatēr'ial**, *a.* ( इमटी'अरिअल् )—incorporeal; unimportant. अजड, निराकार; अनावश्यक, महत्त्वाचा नाहीं असा, क्षुल्लक. *-al'ity, n.* अजडत्व, निराकारत्व. *-alise, v. t.* निराकार बनविणें. *-alism, n.* the doctrine that matter does not exist in itself apart from perception. जडाभाववाद, निराकारवाद. *-alist, n.*

**Immature'**, *a.* ( इमॅच्यु'अर् )—not mature. अपक्व, अप्रौढ. *-rity, n.*

**Immea'surable**, *a.* ( इमॅ'झरबल् )—not measurable; immense. अमेय, अपरिमित; अमर्याद, अफाट, पुष्कळ. *-ness, n.*, *-ability, n.* *-ably, adv.*

**Imme'diate**, *a.* ( इमी'डिअट् )—not separated by any intervening medium; without intervening medium, direct; occurring at once, without intervention of time; nearest, next. अगदीं जोडलेला, लगतचा; प्रत्यक्षकारी, प्रत्यक्ष; तात्कालिक, तेव्हांचा, अव्यवहितकालिक; शेजारी, जवळचा. *I. inference*, ( तर्क० ) अव्यवहित अनुमान. *I. reply*, तात्काळचें उत्तर. *-ness, n.*, *-diacy, n.* साक्षात् संबंध, अव्यवधान.

**Immē'diately**, *adv.* ( इमी'डिअट्-लि )—without delay, instantly, forthwith. विलंब न लावतां, तावडतोब, सत्वर.

**Immēmor'ial**, *a.* ( इमिमॉ'रिअल् )-beyond memory, of unknown duration. स्मरणाच्या पलीकडचा, स्मृत्यतीत, फार पुरातन काळचा, पुरातन.-*ially*, *adv.*

**Immĕnse'**, *a.* ( इमे'न्स् )—vast, huge ; ( sl. ) very good. फार मोठा, अमर्याद ; फार उत्तम.-*ly*, *adv.* vastly ; very. फारच, अमर्यादपणें ; अतिशय. -*ness*, *n.*

**Immĕns'itў**, *n.* ( इम्मे'न्सिटि )—vastness ; infinity. अवाढव्यपणा, अफाटपणा ; अनंतत्व, अमर्यादत्व.

**Immerse'**, *v. t.* ( इम'र्स् )—to dip, to plunge ; to put under water ; to involve deeply, absorb. ( द्रवांत, पाण्यांत ) बुडविणें ; मज्जन करणें ; ( कर्जांत, विचारांत ) बुडलें जाणें, निमग्न करणें, वेधून घेणें, गुंतविणें.

**Immer'sion**, *n.* ( इम'र्शन् )—immersing ; baptism by plunging whole person in water ; ( fig. ) absorption ( in thought etc. ); ( Astr. ) the disappearance of a celestial body behind another or in its shadow ( opp. to *emersion* ). बुडविणें, निमज्जन ; स्नान, अवगाहन ( करवून बाप्तिस्मा देणें ); निमग्नता, तंद्री, तन्मयता ; अस्त, निमज्जन, निमीलन, ग्रहण.

**Imm'igrant**, *a. & n.* ( इ'मिग्रन्ट् )—( a person ) immigrating or removing into a country. देशांतर करणारा, परदेशीं रहावयास जाणारा (इसम).

**Imm'igrāte**, *v. i. & t.* ( इ'मिग्रेट् )—to remove into a country for permanent residence ; to bring in as settler. देशान्तर करणें ; वसाहत करविणें.-*tion*, *n.*

**Imm'inence**, *n.* ( इ'मिनन्स् )—being imminent. जवळ येऊन ठेपणें, निकटवर्तित्व.

**Imm'inent**, *a.* ( इ'मिनेन्ट् )—( of danger, &c. ) about to happen soon, impending. येऊन ठेपलेलें, भिडलेलें ( संकट वगैरे ), आसन्न.-*ly*, *adv.*

**Immĭs'cĭble**, *a.* ( इमि'सिबल् )—that cannot be mixed. मिश्रण करतां न येणारा, अमेलनीय.

**Immĭt'igable**, *a.* ( इमि'टिगबल् )—that cannot be softened or toned down or appeased. कमी करतां न येण्यासारखा, असांत्वनीय.-*ably*, *adv.*

**Immĭx'ture**, *n.* ( इमि'क्स्चर् )—mixing up ; being involved ( *in* ). मिश्रित होणें, गुंतागुंत होणें ; गुरफटणें.

**Immō'bile**, *a.* ( इमो'बिल् )—immovable ; not mobile ; motionless, fixed. न हलवितां येणारा ; स्थिर ; स्तब्ध, घट्ट बसलेला. -*bility*, *n.* अचलता, स्थिरपणा, स्थाणुत्व. -*bilize*, *v. t.* to fix immovably ; to make ( troops ) incapable of being shifted ; to withdraw ( specie ) from circulation. घट्ट बसविणें ; ( सैन्य ) न हालवितां येईलसें करणें ; चलन-नाणें-बंद करणें,-काढून घेणें ;-*ization*, *n.*

**Immŏd'erate**, *a.* ( इमॉ'डरेट् )—excessive, wanting in moderation. अमर्याद, अनेमस्त.-*ly*, *adv.*

**Immŏd'ĕst**, *a.* ( इमॉ'डिस्ट् )—indecent, indelicate ; impudent. निर्लज्ज ; उद्धट, दांडगा, धृष्ट.-*y*, *n.* उद्धटपणा, दांडगाई, निर्लज्जपणा.-*ly*, *adv.*

**Imm'ōlāte**, *v. t.* ( इ'मोलेट् )—to sacrifice ; to kill in a sacrifice. बळी देणें ; यज्ञांत ठार मारणें, बलिदान करणें.-*tion*, *n.*,-*tor*, *n.*

**Immŏ'ral**, *a.* ( इमॉ'रल् )—contrary to morality, morally wrong or evil ; dissolute. अनीतीचा, अन्यायाचा ; दुर्व्यसनी, दुर्वृत्त.-*ral'ity*, *n.*-*rally*, *adv.*

**Immort'al**, *a.* ( इमॉ'र्टल् )—not mortal, undying ; famous of all time ; constant, long-lasting. अमर ; सर्वकाळीं प्रसिद्ध ; स्थिर, चिरकालिक. *n.* an immortal being, ( *pl.* ) gods of antiquity ; a person, esp. author, of enduring fame ; ( pl. ) royal bodyguard of ancient Persia. अमर्त्य, अमर व्यक्ति, देव ; मरुद्गण ; चिरकीर्ति पुरुष,-व्यक्ति,-लेखक ; प्राचीन इराणमधील बादशहाचे शरीररक्षक.-*ity*, *n.* अमरत्व, चिरस्थायित्व, शाश्वती.

**Immort'alīze**, *v. t.* ( इमॉ'र्टलाइझ् )—to make immortal ( esp. in fame ). अमर करणें, कीर्ति शाश्वत करणें, अजरामर करणें.

**Immort'allў**, *adv.* ( इमॉ'र्टलि )—eternally ; ( colloq. ) very, infinitely. अमरत्वानें, कायमपणानें ; अतिशय, मर्यादेबाहेर, बेसुमार.

**Immortĕlle'**, *n.* ( इमॉर्टे'ल् )—a flower of papery texture retaining colour when dried. सुकून गेल्यावर सुद्धां रंग कायम टिकणारें फूल.

**Immo'vable**, *a.* ( इमू'व्हबल् )—not movable ; unyielding ; ( Law, of property ) consisting of land, houses, etc. अचल, स्थिर ; स्थिर मनाचा ; दृढनिश्चयी ; जमीन, घरदार वगैरे स्थावर ( मिळकत ). *n. pl.* fixtures. स्थावर मिळकत, मालमत्ता, चीजवस्त.-*bility*, *n.*, -*ness*, *n.*, -*bly*, *adv.*

**Immūne'**, *a. & n.* ( इम्यू'न् )—exempt, secure. मुक्त, अबाधित, रहित ( मनुष्य ).

**Immū'nitў**, *n.* ( इम्यू'निटि )—exemption ; freedom ( *from* ); being proof against contagion, etc. ( *from* ). सूट, माफी ; नोकळीक, मुक्ति, अभाव ; निर्भयता.

**Im'mūnīze**, *v. t.* ( इ'म्यूनाइझ् )—to render immune ( *against* contagion ). रोगाच्या संसर्गापासून मुक्त करणें. -*zation*, *n.*

**Immūre'**, *v. t.* ( इम्यू'अर् )—to enclose within walls, to confine, to imprison, to shut up. कैद करणें ; कोंडून ठेवणें.–*ment*, *n.*

**Immū'table**, *a.* ( इम्यू'टबल् )—unchangeable ; invariable, unalterable. निर्विकार, न बदलणारा. –*ability*, *n.*,–*ably*, *adv.*

**Imp**, *n.* ( इम्प् )—a little malignant spirit, little devil ; a mischievous child ; a child. सैतान, भूत ; खोडकर मूल ; मूल.

**Imp**, *v. t.* ( इम्प् )—to strengthen the flight of a bird (*imp the wings of*); to enlarge, to eke *out.* तुटलेला किंवा कमकुवत पंख नवीन पीस घालून दुरुस्त करणें, ( पक्ष्याला ) उडण्यालायक शक्ति आणणें ; भरपूर तयारी करून देणें, सरंजाम देणें, समर्थ करणें.

**Im'păct**, *n.* ( इ'म्पॅक्ट् )—collision, striking. धक्का, धडका, टक्कर, आघात, संघात. *v. t.* ( इम्पॅ'क्ट् ) to press, fix, firmly ( *into*, *in.* ). घट्ट चेपणें, दाबणें, बसविणें.–*pac'tion*, *n*.

**Impair'**, *v. t.* ( इम्पे'अर् )—to make worse, to deteriorate, to damage, to weaken. बिघडविणें, नुकसानी करणें, दुर्बल करणें.–*ment*, *n.* दुर्बलता ; इजा, अपाय.

**Impāle'**, *v. t.* ( इम्पे'ल् )—to transfix on a stake ; esp. as a form of capital punishment ; ( Herald. ) to combine ( two coats of arms ) by placing side by side on one shield ; (rare) to fence in with stakes. सुळावर चढविणें, सुळीं देणें ; ( दोन कुलमानद्योतक ध्वजादिचिन्हें ) एकाच ढालीवर जवळजवळ एकत्र दाखविणें ; मोळ्यांचें कुंपण करणें, आवार करणें,–घालणें. –*ment*, *n.* शूलारोपण ; आवार, कुंपण. [ L. *im*, in, *palus*, a stake ]

**Impăl'pable**, *a.* ( इम्पॅ'ल्पेबल् )—not to be perceived by touch ; not easily grasped or apprehended by the mind. अति सूक्ष्म, स्पर्शानें न कळणारें ; सहज न समजणारें, दुर्बोध्य, अवघड. –*bility*, *n.*, –*bly*, *adv.*

**Impăl'ūdism**, *n.* ( इम्पॅ'ल्यूडिझम् )—morbid state, with tendency to intermittent fevers. ( मधून मधून तापकरी असणें, प्लीहा वाढणें, अशी ) रोगट स्थिति.

**Impanel'**, *v. t.* ( इम्पॅन'ल् )—to enter in a list or on a piece of parchment called a panel, to empanel. पंचांची यादी ठरविणें,- पंचांच्या वगैरे यादींत नांव घालणें.

**Impark'**, *v. t.* ( इम्पा'र्क् )—to enclose ( beasts ) in a park ; to enclose ( land ) for a park. मृगयाभूमींत- शिकारीच्या रानांत- ( पशू ) कोंडणें,- अडवून ठेवणें ; ( जागेला ) आवार घालणें. –*ation*, *n.*

**Impärt'**, *v. t.* ( इम्पा'र्ट् )—to give a share of ; to communicate to. अंश देणें ; कळवणें, विदित करणें, उघड करून दाखविणें, देणें.–*ation*, *n.* –*ment*, *n.*

**Impär'tial**, *a.* ( इम्पा'र्शल् )—not partial ; unprejudiced, equitable, fair. निःपक्षपाती, समदृष्टि ; न्याय्य, योग्य. –*ity*, *n.* ( इम्पार्शिअॅ'लिटि) निःपक्षपात, समदृष्टि. —*ally*, *adv.*

**Impăss'able**, *a.* ( इम्पा'सेबल् )—that cannot be traversed, that cannot be passed over. दुस्तर, दुर्गम. –*bility*, *n.*; –*ness*, *n.* अगम्यता, दुस्तरपणा.

**Impăsse'**, *n.* ( इम्पा'स्, इम्पॅ'स् )—a blind alley ; deadlock ; fix. रस्ता नसलेली- बंद- गल्ली ; कामाची पूर्ण बंदी, खंड, अडथळा ; पेंच, अडचण.

**Impăss'ible**, *a.* ( इम्पॅ'सिबल् )—not liable to pain or injury, showing no sign of emotion. दुःखरहित, दुःखातीत, निगरगट्ट, कोडगा. –*bility*, –*ness*, *nn.* , –*bly*, *adv.*

**Impă'ssioned**, *a.* ( इम्पॅ'शन्ड् )—animated, excited, deeply moved ; ardent. विकारवश ; उत्सुक.

**Impăss'ive**, *a.* ( इम्पॅ'सिव्ह् )—void of feeling or emotion ; serene ; not subject to suffering. मनाला कांहीं न वाटणारा, भावनारहित ; गंभीर ; मनाला लावून न घेणारा, दुःखातीत, निगरगट्ट. –*ly*, *adv.* ; –*ness*, –*iv'ity*, *n.*

**Impăs'to**, *n.* ( इम्पॅ'स्टो )—( paint. ) laying on of colour thickly. दाट रंग लावणें, दाट रंगविणें. *Impas'te*, *v. t.* खळीनें बंद करणें, चिकटविणें ; खळ करणें ; दाट रंगांनीं रंगविणें. [It.]

**Impā'tient**, *a.* ( इम्पे'शन्ट् )—not patient ; not enduring delay, intolerant ( *of* ). उतावळा, अधीर ; असहनशील, असहिष्णु. –*ly*, *adv.*, –*tience*, *n.* अधीरपणा, उतावळेपणा, औत्सुक्य.

**Impawn'**, *v. t.* ( इम्पॉ'न् )—to put in pawn ; (*fig.*) to pledge. तारण गहाण लावणें ; वचन देणें.

**Impay'able**, *a.* ( इम्पे'अबल् )—beyond price ; ( colloq. ) going beyond limits. किंमतीहून जास्त ; मर्यादेबाहेरचें.

**Impeach'**, *v. t.* ( इम्पी'च् )—to call in question ; to disparage ; to accuse ( a person ) *of*, to charge ( *with* ) ; to find fault with ; to accuse of treason etc. before a competent tribunal. संशय घेणें,- घेणें, शंका काढणें ; उणेपणा–दोष–काढणें ; आरोप करणें ; नांवें ठेवणें ; नाक मुरडणें ; न्यायासनापुढें चौकशी करविणें. –*able*, *a.* दोषार्ह. –*ment*, *n.* ( सरकारी कामगारावर दोषारोप ठेवून त्यास ) चौकशीसाठीं

न्यायासनासमोर आणणें. ( सार्वजनिक स्वरूपाच्या मोठ्या गुन्ह्याबद्दल ) आरोप करणें; शंका, तक्रार.

**Impĕcc'able,** *a.* ( इम्पे'कब्ल् )—not liable to sin; ( of things ) faultless. पापसंभवशून्य, पापरहित, निष्पाप; निर्दोष, खोडी ठेवण्याला जागा नसलेलें. *-bility, n., -bly, adv., -ccant, a.* पापरहित, निष्पाप. [ L *im*, not, *peccare*, sin ]

**Impĕcū'nious,** *a.* ( इम्पिक्यू'निअस् )—having no money, poor. निर्द्रव्य, गरीब, धनहीन. *-nios'ity, n.* ( -निऑ'सिटि ) धनहीनता, गरिबी. [ L *im*, not, *pecunia*, money ]

**Impē'dance,** *n.* ( इम्पी'डन्स् )—( electr. ) virtual resistance due to self-induction in an electrified body. विद्युत्संचारित वस्तूंत स्वतः-प्रवर्तनामुळें होणारा भ्रामक- आगन्तुक-विरोध.

**Impede',** *v. t.* ( इम्पी'ड् )—to stop or delay the progress of, to retard; to hinder. विघ्न-अडथळा-करणें; मोडती घालणें, अटकविणें.

**Impĕd'iment,** *n.* ( इम्पे'डिमन्ट् )—hindrance. विघ्न, अडथळा, प्रतिबंध. *I.* ( *in* one's *speech* ), stammer. बोलतांना अडखळणें. वाक्स्खलन. *Imped'iments, n. pl.* ( also, *-ta.* ) baggage, esp. of army. ( सैन्याचें ) सामानसुमान. *-al, a.* बाधक, अडथळ्याचा.

**Impĕl',** *v. t.* ( इम्पे'ल् )—to drive, to force; to propel; to incite to action. जोरानें हांकणें; पुढें ढकलणें; प्रवृत्त करणें. *-ellent, a. & n.* प्रवर्तक ( शक्ति इ. ).

**Impĕnd',** *v. i.* ( इम्पे'न्ड् )—to hang over; to be imminent, to threaten. डोक्यावर येऊन ठेकणें; येऊन भिडणें, नेटणें. *-ence, -ency, nn., -ent, a.*

**Impĕn'etrable,** *a.* ( इम्पे'निट्रब्ल् )—not penetrable; impervious ( *to, by*, ideas, &c. ), inscrutable. अभेद्य, निर्भेद्य; मनावर परिणाम न होऊं देणारा; गहन, अचिन्त्य. *-bility, n. -ness, n.* अभेद्यता, निर्भेद्यता, कठोरपणा, मूर्खपणा. *-bly, adv.*

**Impĕn'etrāte,** *v. t.* ( इम्पे'निट्रेट् )—to penetrate deeply. आंत खोल शिरणें, भेद करणें.

**Impĕn'itent,** *a.* ( इम्पे'निटन्ट् )—not penitent; obdurate. अनुतापशून्य, पश्चात्ताप न पावणारा; कठीण मनाचा, हट्टी. *Impen'itence,-cy, nn., -ly, adv.*

**Impĕ'rative,** *a.* ( इम्पे'रेटिव् )—( Gram.) expressing command; peremptory; obligatory, necessary; urgent. आज्ञावाचक, आज्ञार्थक; करमरीत; आवश्यक, अवश्यकर्तव्य, जरूरीचा; निकडीचा. *n.* आज्ञार्थ.*-ly, adv.-ness, n. Imperatival, a.* आज्ञार्थक.

**Imperā'tor,** *n.* ( इम्परे'टर् )—( Rom-Hist. ) commander; an emperor. ( यशस्वी ) सेनापति; बादशहा.

**Impercĕp'tible,** *a.* ( इम्पर्से'प्टिब्ल् )—not perceptible; very slight or gradual. अगोचर, अव्यक्त; अतिसूक्ष्म.*-tibly, adv.* कळत न कळत, हळूच.

**Imper'fect,** *a.* ( इम्प'र्फिक्ट् )—not perfect; incomplete; faulty, defective. अपुरा; अपूर्ण; सदोष, दोषयुक्त, सव्यंग. *n.* अपूर्ण भूतकाळ. *I.tense,* अपूर्ण भूतकाळ.*-ly, adv.* अपूर्णपणें, अर्धवट ( रीतीनें ).*-tion, n.* अपूर्णता, न्यूनता, कसर, गोम.

**Imper'forate,** *a.* ( इम्प'र्फरिट् )—not perforated, not pierced; ( Anat. ) lacking the normal opening. भोंकें न पाडलेला, अच्छिद्र, नीरंध्र; गुदद्वाररहित.

**Impēr'ial,** *a.* ( इम्पी'अरिअल् )—of an empire; of an emperor; of superior excellence, supreme; majestic; magnificent; ( of paper ) of large size, 22×32 in. सार्वभौमिक, साम्राज्याचा, बादशाही, सम्राटाचा; सर्वश्रेष्ठ; तेजस्वी; भव्य; मोठ्या आकाराचा (२२×३२) इंची कागद. *n.* a small part of beard under a man's lower lip; a trunk for luggage on the top of a coach; a Russian tsarist gold coin of 8 dollars. खालच्या ओंठावर ठेवलेला दाढीचा लहान झुपका; सामानाची पेटी; ( सुमारें २५ रुपये किंमतीचें ) जुनें सोन्याचें ( रशिअन ) नाणें. *I. Institute,* ब्रिटिश साम्राज्याच्या निरनिराळ्या विभागांतील व्यापारवृद्धीसाठीं लंडनमधील संस्था,-संस्थेची इमारत. *I. preference,* साम्राज्यांतील देशांतून येणाऱ्या आयात मालावर परकी देशच्या मालाहून कमी जकात ठेवण्याचें धोरण. *Imper'ially, adv.*

**Impēr'ialism,** *n.* ( इम्पी'अरि-अलिझम् )—the rule of an emperor, esp. when despotic or arbitrary; the extension of British Empire where trade requires protection of the flag; the union of different parts of the British Empire; the belief in the value of colonies and dependencies. ( जुलमी, स्वच्छंदी ) बादशाही सत्ता; ब्रिटिश साम्राज्यविस्तार; ब्रिटिश साम्राज्यांतील विभागांची-देशांची-एकी, जूट; साम्राज्यशाही, साम्राज्याचें वारें.*-listic, a.,-lize, v. t.*

**Impēr'ialist,** *n.* ( इम्पी'अरिअलिस्ट् )—an advocate of imperialism or of imperial rule. साम्राज्यवादी, साम्राज्यशाहीचा पुरस्कर्ता,-अभिमानी.

**Impĕ'ril,** *v. t.* ( इम्पे'रिल् )—to endanger. धोक्यांत घालणें, संकटांत पाडणें, वर संकट आणणें.

**Imper'ious,** *a.* ( इम्पि'अरिअस् )—domineering; commanding; urgent, not capable of being resisted; arrogant. हुकूमी, करडा; हुकूम चालविणारा; जरूरी आवश्यक, तांतडीचा, निकडीचा;

**Intĕnd'ed**, *n.* ( इन्टें'डेड् )—( colloq. ) an affianced lover. मनसोद्दिष्ट, विवाहोद्दिष्ट वधू,-वर.

**Intĕnd'ment**, *n.* ( इन्टें'ड्मन्ट् )—true meaning as fixed by law. कायद्यानें ठरविलेला खरा अर्थ, कायदेशीर अर्थ.

**Intĕnse'**, *a.* ( इन्टें'न्स् )—existing in a high degree; violent, vehement; strenuous; strained; eager; feeling, apt to feel, intense emotion. अतिशय, पराकाष्ठेचा, भारी, जबर; जोराचा, आवेशाचा; जोनदार; ताणलेला, ताठ; उत्सुक; भावनावश, भावनाशील.-*ly*, *adv.* अति, भारी, एकतानतेनें, ध्यासंगपूर्वक.-*ness*, *n.*, *Inten'sity*, *n.* तीव्रता, तीक्ष्णता, प्रखरपणा, कडाका, ताण, नेट, ध्यासंग, ऊणाया.

**Intĕn'sify**, *v. t. & i.* ( इन्टें'सिफाइ )—to make or become intense; to heighten, to aggravate. अधिक तीव्र करणें,-होणें; चेतविणें, जास्त वाढविणें, विकोपाला नेणें.-*fication*, *n.* ( *phot.* ) घनीकरण.

**Intĕn'sion**, *n.* ( इन्टें'शन् )-intensity, high degree, of a quality; strenuous exertion of mind or will; ( logic ) the sum of the qualities implied by a general name, the comprehension of connotation. गुणाचा उत्कर्ष,-प्रकर्ष,-चार; ( मनावरील-इच्छाशक्तीवरील ) ताण; जातिवाचक शब्दावरून निर्दिष्ट होणारा गुणसमुदाय, गुणव्यंजकता.

**Intĕn'sive**, *a.* ( इन्टें'सिव् )—of or in intensity; producing intensity; forced; assiduous; (Gram.) giving force; concentrated; (Econ.) serving to increase production of a given area. तीव्रतेचा, जोराचा, नेटानें; तीव्रता-तीक्ष्णता-उत्पन्न करणारा; नेटाचा; चिकाटीचा, जबर; आधिक्यदर्शक, उत्कर्षबोधक, प्रकर्षबोधक; एककेंद्रीभूत, एकाच ठिकाणावर लक्ष धरलेला, एकाच विषयावर लक्ष ठेवलेला; विशिष्ट क्षेत्रांतील उत्पन्न-पिकाव-वाढविणारा. *I. bombardment*, एकाच केंद्रावर-ठिकाणावर-केलेला जोराचा मारा. *I. inoculation*, ( Med. ) in which intensity of matter introduced is increased in successive operations. प्रत्येक खेपेला अधिकाधिक जोराची लस टोंचणें,-लसिकापान करणें.-*ly*, *adv.*

**Intĕnt'**, *n.* ( इन्टें'न्ट् )—intention, purpose. उद्देश, आशय, हेतु, मतलब. *a.* resolved; bent on; absorbed; eager. निश्चित, ठाम बेत केलेला; तत्पर; मग्न, तल्लीन; सोत्सुक. *To all intents & purposes*, practically, virtually. व्यवहारदृष्ट्या, वस्तुतः, खरोखरी, सर्वस्वी. *I.-ly*, *adv.*,*-ness*, *n.*

**Intĕn'tion**, *n.* ( इन्टें'शन् )—intending; purpose, aim; ( pl. ) purposes in respect of proposal of marriage; ( Logic ) conception. मनांत योजणें, मन लावणें; उद्दिष्ट, हेतु, ध्येय, संकल्प; विवाहोद्दिष्टें, विवाहहेतु; वस्तुबोध, वस्तुज्ञान, कोणत्याही पदार्थाची बोधांत आलेली कल्पना. *Second i.*, ( Med. ) healing of a wound by granulation. जखम इ. हळेहळ येऊन-मांस भरून-बरी होणें. *First i.*, healing of a wound by immediate reunion of parts. जखम न मावळतां एकदम सांधणें,-बरी होणें. *Well-inten'tioned*, *a.* सद्धेतूचा, सद्धेतुमूलक. *Ill-inten'tioned*, *a.* वाईट हेतु धरून केलेला, दुष्टतामूलक.

**Intĕn'tional**, *a.* ( इन्टें'शनल् )-done on purpose, intended, designed. हेतुपुरःसर-जाणून बुजून-केलेला, सहेतुक, बुद्धिपुरःसर.-*ally*, *adv.* समजून उमजून, बुद्ध्या, मुद्दाम.

**Inter'**, *v. t.* ( इन्टर् )—to place in earth or tomb; to bury. जमिनींत-थडग्यांत-घालणें, ठेवणें; पुरणें. [ L *in* & *terra*, earth ]

**Inter**, *prep.* ( इन्टर् )-between, among. आंत, मध्यें. *I. a'lia*, ( इन्टर् ए'लिआ ) among other things. तसेंच, इतर गोष्टींबरोबर, शिवाय. *I. nos*, (-नोस् ) between ourselves. आपसांत, आपणा दोघांत. *I. se*, between themselves. त्यांच्या त्यांच्यांत. *I. vi'vos*, between the living. हयात-जिवंत-असणाऱ्यांमध्यें. [L]

**Inter-**, *pref.* ( इन्टर्- )—among, between. आंत, मध्यें.

**In'teract**, *n.* ( इ'न्टरॅक्ट् )—an interval between two acts of a play; an interlude. नाटकाच्या दोन अंकांमधील वेळ,-सुटी,-विश्रांति; उपांक, विष्कंभ ( क ).

**Interăct'**, *v. i.* ( इन्टरॅ'क्ट् )—to act reciprocally or on each other. परस्पर-एकमेकांवर-क्रिया करणें. -*tive*, *a.*,*-tion*, *n.* परस्परक्रिया, अन्योन्यक्रिया.

**Interblĕnd'**, *v. t. & i.* ( इन्टर्ब्लें'न्ड् )—to mingle ( things, one *with* another ); to mingle or blend with each other. मिसळणें, मिश्रण करणें; एकमेकांत मिसळणें, एकजीव-मिश्रित-होणें.

**Interbreed'**, *v. t. & i.* ( इन्टर्ब्री'ड् )—to cross-breed with each other. संकर करविणें, संकर-मिश्रजातीय-अपत्य उत्पन्न करणें; आपापसांत संकर करणें.

**Intercăl'ary̆**, *a.* ( इन्टर्कॅ'लरि )—(of day or month) inserted between others to harmonize the calendar with the solar year; (of year) having such addition; interpolated. मध्यें घातलेला, अधिक, धोंड ( दिवस, महिना ); अधिक मासाचें-दिवसांचें-( वर्ष ); मध्यें घातलेला, येणारा.

**Interc'alāte**, *v. t.* ( इन्टर्कॅ'लेट् )—to insert; to interpose. ( अधिक दिवस इ. ) मध्यें घालणें,-धरणें; ( अस्वाभाविकपणें ) मध्यें घालणें,-उत्पन्न करणें ( थर इ. ).-*lation*, *n.*

**Intercede'**, *v. i.* ( इन्टर्सी'ड् )—to plead; to mediate. च्या वतीनें बोलणें; रद्बदली करणें, मध्यस्थी करणें, भीड घालणें.

**Intercept'**, *v. t.* ( इन्टर्से'प्ट् )—to seize, to catch (on the way); to stop in transit; to cut off; (Math.) to mark off space between two points etc. (मार्गांत) पकडणें, धरणें; अडकवणें; अटकाव करणें, जाऊं न देणें, गतिरोध करणें; तोडणें, छेदणें; आंत घेणें, अंतर्भूत करणें. *-tion,-tor, nn.,-tive, a.*

**Interce'ssion**, *n.* ( इन्टर्से'शन् )—the act of pleading for another. मध्यें पडणें, मध्यस्थी, परार्थ प्रार्थना, रद्बदली. *-ssor, n.* समेट-रद्बदली-करणारा. *-ssorial, a.,-ssory, a.*

**Interchange**, *v. t.* ( इन्टर्चें'न्ज् )—to exchange (things) with each other; to put each of (two things) in the other's place; to alternate. (दोन इसमांनीं, वस्तूंची) अदलाबदल करणें, विनिमय करणें; दोन वस्तूंच्या जागा बदलणें; आळीपाळीनें आणणें. *n.* (इं'-) exchange between persons; alternation. अदलाबदल,-लीचा व्यवहार, विनिमय; आलटपालट, एक आड एक येणें. *-ability,-ableness, nn.,-able, a.*, विनिमय-योग्य, परस्परानुगामी.

**Intercolo'nial**, *a.* ( इन्टर्कलो'निअल् )—existing, carried on, between different colonies. वसाहती-वसाहतींमधील, आंतर-वसाहतींचा.

**Intercommu'nicate**, *v. i.* ( इन्टर्कम्यू'निकेट् )—to have intercourse with. परस्पर-संबंध ठेवणें, परस्परांशीं व्यवहार करणें, दळणवळण असणें,-चालू राहणें. *-cation, n.* परस्पर-व्यवहार,-संबंध,-दळणवळण.

**Intercommu'nion**, *n.* ( इन्टर्कम्यू'न्यन् )—intimate intercourse; mutual relation. परस्पर समागम,-संघट्टण,-दळणवळण; परस्परसंबंध.

**Intercommu'nity**, *n.* ( इन्टर्कम्यू'निटि )—being or having things in common to various parties. अनेक ज्ञातींशीं-समाजांशीं-सामान्यता, सामान्य-व्यवहार, परस्परसंबंधैक्यता.

**In'tercourse**, *n.* (इं'न्टर्कोर्स्)—social communication; trade between countries etc.; communion between man and God; sexual connection. सामाजिक-व्यक्तींमधील परस्पर-संबंध, दळणवळण; देशांदेशांतील व्यापार; देव आणि मनुष्य (भक्त) यांमधील संबंध, सख्य, भक्ति, निष्ठा; संभोग, मैथुन, रति.

**Intercu'rrent**, *a.* ( इन्टरक'रन्ट् )—intervening; (of disease) occurring during the progress of another, recurring at intervals. मधला, मध्यें येणारा, मध्यंतरीचा; (एका रोगापोटीं) उद्भवणारा,-असणारा, मधून मधून येणारा,-उद्भवणारा. *-ence, n.*

**Interdepend'**, *v. i.* ( इन्टर्डिपे'न्ड् )—to depend on each other. परस्परांवर अवलंबून असणें, अन्योन्याश्रयी असणें,-होणें. *-ence,-ency, nn.* अन्योन्याश्रय, परस्परावलंबिता. *-ent, a.,-ently, adv.*

**Interdict**, *v. t.* ( इन्टर्डि'क्ट् )-to prohibit (action); to forbid; to restrain. मनाई करणें, बंद ठेवणें,-पाडणें; निषेध करणें, पंक्तिबाह्य करणें; बंधन घालणें. *n.* (इं'-) an authoritative prohibition. अधिकृत मनाई,-निषेध, द्वाही, अटकाव, प्रतिबंध, (रोमन कॅथॉ.) समाजबहिष्कृतता. *-tion, n., -tory, a.*

**In'terest**, *n.* (इं'न्टरिस्ट्)—a legal concern, title, right; pecuniary stake; concern; selfish benefit; a share; personal influence; persons interested in particular business; money paid for the use of a loan. कायदेशीर हितसंबंध, अधिकार, हक्क; गुंतविलेला पैसा, आर्थिक हितसंबंध; आस्था, अगत्य; स्वार्थ, स्वहित; हिस्सा, पाती, भाग; वजन; व्यापारी मंडळ,-ळी; व्याज, मिति, वृद्धि. *v. t.* to excite interest of; to cause (a person) to take interest in. चित्त-लक्ष-वेधणें, (मनांत) आस्था उत्पन्न करणें, (मन) जडवणें, ओढ लावणें. *To make i.*, to bring personal interest to bear (*with* a person). (एकाद्यावर) वजन घालणें,-पाडणें,-खर्चणें. *With i.*, जोरानें, सव्याज. *Simple i.*, सरळव्याज. *Compound i.*, चक्रवाढव्याज. *In an interesting condition*, pregnant. गरोदर, गर्भार. *In'terested, pa. p.* कळकळीचा, आस्थेवाईक, हितबद्ध, संबंधी, सहेतुक, स्वार्थी, अपमतलबी;*-edly, adv.*

**In'teresting**, *a.* (इं'न्टरिस्टिंग्)—exciting interest, engaging the attention. चित्तवेधक, मनोरंजक, आस्था उत्पन्न करणारा.*-ly, adv.* मनोरंजक रीतीनें.

**Interfere'**, *v. i.* ( इन्टर्फी'अर् )—(of things) to come into collision or opposition (*with*); (of person) to meddle, to intervene; (Physics, of waves of light etc.) to strike against each other; (of horse) to knock one leg against another. आडवा येणें, वर आदळणें, टक्कर होणें; मध्यें पडणें, नसती उठाठेव करणें; (प्रकाशलहरी) एकमेकांवर आदळणें; (घोड्याचा) एक पाय दुसऱ्यावर घासटणें,-आपटणें, पायांची घासाघास होणें.

**Interfer'ence**, *n.* ( इन्टर्फी'अरन्स् )—meddling. मध्यें पडणें, ढवळाढवळ, लुडबूड, समाघात, घोंटाळा.

**Inter'fluent**, *a.* (इन्ट'र्फ्लुअन्ट्)—flowing into each other. परस्परांत वाहणारा, परस्परवाही.

**Interfuse'**, *v. t. & i.* ( इन्टर्फ्यू'झ् )—to mix; to blend. (शीं) भेसळ-मिश्रण-करणें; एक जीव करणें.-होणें.*-sion, n.*

**In'terim**, *n.* ( इं'न्टेरिम् )-meantime. मधील अवकाश, मधला-दरम्यानचा-काळ. *a.* intervening ; provisional, मधील, मधला, तात्पुरता ; हंगामी, चालचलाऊ, मधल्या काळापुरता. *adv.* meanwhile. दरम्यान. *I. dividend*, वार्षिक नफापत्रक प्रसिद्ध करण्यापूर्वी दिलेला नफावांटणींतील हिस्सा. *I. order*, मध्यंतरीय-तात्पुरता-हुकूम.

**Inte̅r'ior**, *a.* (इन्टी'अरिअर् )—situated within ; inland ; internal, domestic ; inward. आंतला, आंतील ; ( समुद्रापासून ) दूर, देशाच्या आंतला, अंतःप्रदेशांतील, अंतर्देशीय ; घरगुती, खाजगत ; अंतस्थ, मनांतला. *n.* an inland part ; inside, internal part of a thing ; inner nature or soul ; home affairs of a country. अंतःप्रदेश ; आंतील बाजू,-भाग, अभ्यंतर, गाभा ; मन, अंतःकरण ; गृहखातें, गृहमंत्र्याच्या अधिकारांतील गोष्टी, गृहकारभार.*-ly, adv.*

**Interja̅'cent**, *a.* ( इन्टर्जे'सन्ट् )—lying between, intermediate. (दोन वस्तूंच्या) मध्यें असणारा, मध्यस्थित, मधला.

**Interjĕct'**, *v. t.* (इन्टर्जे'क्ट्)—to throw between, interpose, abruptly ; to remark parenthetically. मध्येंच ( शब्द, उद्गार ) फेंकणें, बोलणें, घालणें ; मध्यप्रक्षेपण करणें.

**Interjĕc'tion**, *n.* ( इन्ट्र्जे'क्शन् )—exclamation, ejaculation. उद्गार, केवलप्रयोगी अव्यय.*-al, -tory, aa.* ;*-ally, adv.* ;*-tor, n.*

**Interla̅ce'**, *v. t. & i.* (इन्टर्ले'स् )—to unite as by lacing together ; to entangle ; to interweave. विणणें, गुंफणें, गांठवणें ; गुंतागुंत करणें, एकमेकांत अडकविणें,-अडकणें ; एकांत एक विणणें.*-ment, n.*

**Interlard'**, *v. t.* (इन्टर्ला'र्ड् )—to mix, diversify, ( writing, speech, *with* foreign words ). ( लिहिण्यांत-बोलण्यांत ) परकी शब्द घुसडणें, अशा भेसळीनें वैचित्र्य उत्पन्न करणें.

**In'terleaf**, *n.* (इं'न्टर्लीफ् )—a ( blank ) leaf inserted between leaves of a book. ( पुस्तकाच्या दोन पानां ) मध्यें घातलेलें अधिक-जादा-कोरें पान.

**Interleave'**, *v. t.* (इन्टर्ली'व्ह् )—to insert blank leaves between printed leaves in a book. पुस्तकांत छापील पानांबरोबर ( कोरीं ) पानें घालून बांधणें.

**Interline'**, *v. t.* (इन्टर्लाइ'न् )—to insert words between lines ; to write in alternate lines. ओळींच्यामध्यें शब्द लिहिणें,-घालणें, शोध घालणें ; एकेक ओळ सोडून लिहिणें.*-linea'tion, n.* दोन ओळींमध्यें लिहिणें, शोध, एकांतऱ्या ओळीनें लिहिणें.

**Interlin'ear**, *a.* ( इन्टर्लि'निअर् )—written, printed, between the lines. ओळींच्यामध्यें लिहिलेला, छापलेला ( मजकूर ).

**Interlink'**, *v. t.* ( इन्टर्लि'ङ्क् )—to connect by uniting links, to join. दुवे जोडणें, दुव्यांनीं सांधणें, जोडणें.

**Interlŏck'**, *v. i. & t.* (इन्टर्-लॉ'क् )—to be locked together ; to lock or clasp together, to lock one in another firmly ; ( Railways ) to connect ( levers for signals etc. ) by bolts to ensure uniformity of movement. दुव्यानें किंवा कडीनें जोडणें ; एकांत एक अडकविणें, एकत्र जुळणें, मिठी मारणें ; सांधे जुळविणें, सांधणें.

**Interlŏc'u̅tor**, *n.* (इन्टर्लॉ'क्यूटर् )—one who takes part in a dialogue or conversation. संवादांत-संभाषणांत-भाग घेणारा, संभाषणकर्ता, प्रश्नकर्ता. *My i.*, माझ्यापाशीं संभाषण करणारी व्यक्ति.*-tress, -trix, nn.* संभाषण-संवाद्-कर्त्री. *-tory, a.* संवादात्मक, संभाषणरूप, संवादरूपी.

**Interlŏcu̅'tion**, *n.* ( इन्टर्-लॉक्यू'शन् )—dialogue. संवाद.

**Interlo̅pe'**, *v. i.* (इन्टर्लो'प् )—to intrude ; to thrust oneself into others' affairs, esp. for gain ; to traffic without licence. मध्यें पडणें, लुडबूड करणें ; इतरांच्या व्यवहारांत स्वतःच्या फायद्यासाठीं शिरकाव करून घेणें ; परवान्याशिवाय व्यापार करणें.*-per, n.* लुडबुड्या, विनपरवाना व्यापारी.

**In'terlude**, *n.* (इं'न्टर्-लूड् )—a pause between acts of a play ; a short entertainment ( piece of music, event, &c. ) interposed. नाटकाच्या दोन अंकांमधील विश्रांती ; दोन अंकांमध्यें गायन वगैरे करमणूक, विष्कंभ ( क ).

**Interma̅'rry̆**, *v. i.* ( इन्टर्-मॅ'रि )—to become connected by marriage with members of different tribes or families, or with near relations. अंतर्ज्ञातिविवाह करणें, आंतर्जातीय विवाह करणें, जवळच्या नात्यांत लग्न करणें. *-ma'rriage, n.*

**Intermĕd'dle**, *v. i.* (इन्टर्-मे'डल् )—to interpose *in*, *with*, others' concerns. दुसऱ्याच्या कामांत मध्यें पडणें, लुडबूड-ढवळाढवळ-करणें.

**Interme̅'di̅ary̆**, *a.* (इन्टर्मी'डिअरि )-acting between parties, mediatory ; intermediate. दलालीचा, मध्यस्थीचा ; मध्यस्थ. *n.* मध्यस्थ इसम.

**Interme̅'di̅ate**, *a.* (इन्टर्-मी'डिअट् )—intervening, interposed. मध्यें असलेला, मधील, अंतःस्थित. *n.* मधील वस्तु, मध्यस्थ-मध्यम-वस्तु. *v. i.* (-डिएट् )-mediate between. मध्यें असणें, मध्यस्थी करणें.

**Interme̅'di̅um**, *n.* ( इन्टर्मी'डिअम् )—an intermediate thing, a medium. मधील वस्तु, माध्यम.

**Interm'ent**, *n.* ( इन्ट'र्मेन्ट् )—burial. पुरणें, प्रेतसंस्कार.

**Interme'zzo**, *n.* ( इन्टर्मे'इझो )—a short light dramatic or other performance between acts of drama or opera. नाटकांच्या-खेळाच्या-अंकांमधील करमणूक. [ It. ]

**Interm'inable**, *a.* ( इन्ट'र्मिनबल् )—endless, tediously long. न संपणारा, अमर्याद, असीम.*-ness*, *n.*,*-bly*, *adv.*

**Intermingle**, *v. t. & i.* ( इन्टरमिं'ङ्गल् )—to mix together. मिसळणें, एकीकरण करणें,-होणें.

**Intermi'ssion**, *n.* ( इन्टर्-मिं'शन् )—a pause ; cessation for a time, stop, rest. खंड, तहकुबी, विश्रांति. *Without i.*, सतत, न थांबतां, अखंड.

**Intermit'**, *v. t. & i.* ( इन्टर्मि'ट् )—to suspend, to discontinue ; to interrupt ; to stop for a time. थांबविणें, बंद पाडणें ; खंड पाडणें ; मधून मधून ( ताप ) निघणें,-राहणें.*-itt'ence*, *n.*

**Intermitt'ent**, *a.* ( इन्टर्मि'टेन्ट् )—that intermits, ceasing at intervals. मधून मधून येणारा, थांबून येणारा,-वाहणारा, आंतरिक, अंतरित.*-ly*, *adv.* [ L. *inter*, & *mittere*, to send ]

**Intermix**,' *v. t. & i.* ( इन्टर्मि'क्स् )-to mix together. एकत्र मिसळणें,-करणें, संमिश्रण करणें, मिश्रित होणें. *-ture*, *n.* मिश्रण, भेसळ, मिसळ.

**Intern'**, *v. t.* ( इन्ट'र्न् )—to confine within prescribed limits. अमुक एक हद्दीच्या बाहेर जाऊं न देणें, स्थानबद्ध ( अटक-कैद ) करणें.*-ment*, *n.* स्थानबद्धता.

**Intern'al**, *a.* ( इन्ट'र्नल् )—of or in the inside ; intrinsic ; of the domestic affairs of a country ; of the mind or soul, inward. आंतील भागाचा, आंतील ; मूळचा, अंगचा, स्वाभाविक, हाडाचा ; देशांतला, अंतर्देशीय, गृहखात्याचा ; मनाचा, आत्मिक. *I. evidence*, अंतर्गत पुरावा. *Intern'als*, *n. pl.* intrinsic qualities. अंगचे-मूळचे-स्वाभाविक गुण.*-al'ity*, *n.*;*-ally*, *adv.* आंत, आंतल्या बाजूनें, मनांतून, पोटांत.

**Interna'tional**, *a.* ( इन्टर्-नॅ'शनल् )—existing or carried on between different nations ; of the International Working Men's Associations (for promoting joint political action of working classes in all countries). आंतरराष्ट्रीय, आंतरराष्ट्रीय कामकरी संघांचा. *n.* one who takes part in an international ( usu. athletic ) contests or match ; I. Working Men's Associations. आंतरराष्ट्रीय सामन्यांत भाग घेणारा ; ( जगांतील सर्व राष्ट्रांच्या कामकरी वर्गाचें हित साधणारा ) आंतरराष्ट्रीय कामकरी संघ. *The first I.*, Marxist, 1862-73. मार्क्सचा आंतरराष्ट्रीय कामकरी संघ. *The second I.*, French socialist, 1889. फ्रेन्च् समाजसत्तावाद्यांचा संघ. *The third I.*, Russian communist, abbr. Comintern, 1918. इ. स. १९१८ सालीं स्थापन झालेला रशियांतील समाजसत्तावादी आंतरराष्ट्रीय संघ. *The Internationale'*, ( इन्टर्नॅशना'ल् ) a French socialistic hymn. फ्रेंच समाजसत्तावाद्यांचें गीत. *International'ity*, *n.*,*-ally*, *adv.*

**Interna'tionalist**, *n.* ( इन्टर्नॅ'शनलिस्ट् )—one who advocates community of interests between nations ; one versed in international law. आंतरराष्ट्रीय समतावादी ; आंतरराष्ट्रीय कायदेपंडीत. *-ism*, *n.*

**Interna'tionalize**, *v. t.* ( इन्टर्नॅ'शनलाइझ् )-to make international, to bring ( territory ) under combined protection of different nations. आंतरराष्ट्रीय करणें, आंतरराष्ट्रीय संरक्षणाखालीं (प्रदेश) आणणें.*-za'tion*, *n.*

**Interne'cine**, *a.* ( इन्टर्-नी'साइन् )—mutually destructive ; deadly, causing great slaughter. परस्परविघातक ; भयंकर, ( दोन्ही पक्षांचा ) संहार करणारा. [ L *inter & necare*, to kill ]

**Internode'**, *n.* ( इन्टर्नो'ड् )—( Bot. ) part of the stem between two nodes or points of the stem, ( Anat. ) slender part between two joints. कांडें, पेर.

**Internun'cial**, *a.* ( इन्टर्न'न्शिअल् )—( of nerves ) joining different parts of the system. ( शरीराचे ) निरनिराळे अवयव जोडणारा (स्नायु, मज्जातंतू).

**Internun'cio**, *n.* ( इन्टर्न'न्शिओ )—the Pope's ambassador ; (Hist. ) a messenger or minister. पोपचा दूत,-वकील,-उपप्रतिनिधि ; दूत, परराष्ट्रीय वकील. [ L *inter & nuntius*, messenger ]

**Interos'culate**, *v. i.* ( इन्टर्ऑ'स्क्युलेट् )—to intermingle with each other to form a connecting link. एकमेकांशीं मिसळणें,-जुळणें, जोडणारा दुवा असणें,-होणें.*-tion*, *n.*

**Interpell'ate**, *v. t.* ( इन्टर्पे'लेट् )—to interrupt to demand explanation from ( the Minister concerned, in legislative councils ). ( कायदेमंडळांत त्या त्या प्रधानाला ) प्रश्न विचारणें, कामकाजांत खोटी-अडथळा-पाडून प्रश्न विचारून खुलासा करून घेणें.*-tion*, *n.* ( कायदेमंडळांतील ) वादविवादांत उपस्थित होणारा प्रश्न,-मुद्दा, अडथळा, खोटी. *-tor*, *n.*

**Interpen'etrate**, *v. t. & i.* ( इन्टर्पे'निट्रेट् )—to pervade, to penetrate thoroughly or mutually. पूर्ण व्यापणें,-आंतपर्यंत शिरणें,-प्रवेश करणें, परस्परांत शिरणें.*-tra'tion*, *n.*,*-trative*, *a.*

**In'terplay**, *n.* ( इं'न्टर्प्ले )—reciprocal play or action. परस्पर-देवाणघेवाणीचा-खेळ, परस्परक्रिया, -प्रयोग.

**Interplead'**, *v. i.* ( इन्टर्प्ली'ड् )—to litigate with each other in order to settle a point in which

a third party is concerned. (ज्यांत तिसऱ्याचा संबंध येतो त्या मुद्याचा निकाल लावण्यासाठीं) आपापसांत ( दोन पक्षांनीं-व्यक्तींनीं ) वाद खेळणें,-कज्जा लढविणें.

**Interp'ŏlāte**, *v. t.* ( इन्टं'र्-पोलेट् )—to make ( esp. misleading ) insertions in; to interject in talk; to add a spurious word or passage to; ( Math. ) to fill up intermediate term in series. मध्यें घुसडणें ; मध्यें तोंड घालणें ; खोटा-पदरचा-शब्द किंवा उतारा मध्येंच घुसडणें, प्रक्षेपण करणें ; मधील पद ( श्रेणींत ) भरणें.*-tion*, *n.*, *-tor*, *n.*

**Interpōse'**, *v. t.* & *i.* ( इन्टर्-पो'झ् )—to insert between others; to interject a remark; to intervene; to make an interruption. दोहोंच्या मध्यें घालणें ; मध्यें गोलणें ; मध्यस्थी करणें, मध्यें पडणें, -येणें; अडथळा आणणें,-करणें. *-sal*, *n.*, *-si'tion*, *n.* अंतरागमन, मध्यें येणें ; मध्यस्थी.

**Interp'rĕt**, *v. t.* & *i.* ( इन्टं'र्-प्रिट् )—to explain; to render, to represent; to translate; to act as interpreter. अर्थ सांगणें, चा अर्थ करणें, विवरण करणें, उलगडा करणें; कलात्मक कृतींत-चित्रांत-दर्शविणें ; भाषांतर करणें ; दुभाषेपणा करणें.*-ation*, *n.* उलगडा, स्पष्टीकरण, खुलासा, व्याख्या, भाषांतर, स्वरूपनिर्णय. *-able*,*-ative*, *aa.*

**Interp'rĕter**, *n.* ( इन्टं'र्-प्रिटर् )—an expositor; one who translates orally. विवरणकर्ता; दुभाषा, तोंडी भाषांतर करणारा.*-tress*, *n. f.*,*-ship*, *n.*

**Interrĕg'num**, *n.* ( इन्टरे'ग्नम् )—interval between successive reigns; an interval, a pause. (एक राजा जाऊन दुसरा गादीवर बसेपर्यंतचा ) मधला काळ, मधली कारकीर्द ; मधली रजा, खंड. [ L *inter*, between, & *regnum*, rule ]

**Interrelā'tion**, *n.* ( इन्टर्रिले'शन् )—mutual relation. परस्पर संबंध.*-ship*, *n.*

**Intĕ'rrogāte**, *v. t.* ( इन्टे'रोगेट् )-to question closely or formally, to examine by questions. फसून प्रश्न करणें, प्रश्न विचारून तपासणी-चौकशी-करणें, पुसतपास-पुरशीस-करणें.*-tor*, *n.*

**Intĕrrogā'tion**, *n.* ( इन्टेरोगे'शन् )-asking questions; a question. प्रश्न विचारणें ; प्रश्न. *Point*, *mark*, *note*, *of i.*, प्रश्नचिन्ह, ?

**Interrŏg'ative**, *a.* ( इन्टरॉ'गेटिव्ह् )—of or suited to questions, expressed in the form of a question. प्रश्नार्थक, प्रश्नात्मक. *n.* प्रश्नार्थक शब्द, सर्वनाम इ.

**Interrŏg'atorў**, *a.* ( इन्टरॉ'गटरि )—of inquiry. प्रश्नरूप, प्रश्नार्थक. *n.* a question; a set of questions put to accused person. प्रश्न ; आरोपीला विचारलेले प्रश्न,-ली प्रश्नमालिका.

**Interrŭpt'**, *v. t.* ( इन्टर'प्ट् )—to break in upon; to break the uniformity or continuity of; to obstruct ( a view, &c. ). मध्येंच अडथळा-अटकाव-हरकत करणें, मोडा घालणें, व्यत्यय येणें : ( चा ) भंग करणें, खंड पाडणें, क्रमभंग करणें ; आड येणें, अडथळा करणें.*-ion*, *n.* अडथळा, हरकत, प्रतिबंध, खंड, क्रमभंग.*-edly*, *adv.*,*-er*, *n.*, *-ory*, *a.*

**Intersĕct'**, *v. t.* & *i.* ( इन्टर्-से'क्ट् )—to divide ( a thing ) by crossing it, to cut asunder; ( of lines etc. ) to cross, cut, each other. मध्यें कापणें, छेदणें, तोडणें, तुटणें ; ( रेषा ) परस्परांना छेदणें.

**Intersĕc'tion**, *n.* ( इन्टर्-से'क्शन् )—intersecting; a point or line common to intersecting lines or planes. छेदन, छेदणें ; छेदबिंदु, छेद.*-al*, *a.*

**In'terspāce**, *n.* ( इ'न्टर्स्पेस् )—space between two things. मधली जागा, मधलें अंतर.

**Intersperse'**, *v. t.* ( इन्टर्-स्प'र्स् )—to scatter ( things ) between; to diversify. मधून मधून टाकणें, इकडे तिकडे पसरणें, विकीर्ण करणें ; विचित्रता आणणें.*-sper'sion*, *n.*

**Interstĕll'ar**, *a.* ( इन्टर्स्टे'लर् )—between stars. तारामंडलमध्यवर्ती, ताऱ्यांच्या मधला.

**Inters'tice**, *n.* ( इन्ट'र्-स्टिस् )—a chink, a crevice, a gap; an intervening space. फट, भेग, चीर, झरोका, दरज, दर्ज ; मधलें अंतर, अवकाश. *Intersti'tial*, *a.* ( इन्टर्स्टि'शल् ) फटीमधील, फटीसंबंधीं, शरिराच्या पेशींमधील.

**Interstrăt'ified**, *a.* ( इन्टर्स्ट्रॅ'टिफाइड् )-interspersed ( *with* strata ). आंत थर होऊन बसलेला, आंतरस्तरीभूत.*-fica'tion*, *n.*

**Intertwine'**, *v. t.* & *i.* ( इन्टर्-ट्वा'इन् )—to twine closely together, to unite by twining. एकत्र गुंफणें,-वळणें, गुंतविणें, गुंतणें, गुरफटणें.*-ment*, *n.*

**In'terval**, *n.* ( इ'न्टर्-व्हल् )—intervening time or space; a pause, a break; ( Mus. ) the difference of pitch between sounds. मधला काळ, अवकाश ; अंतर, भाग, खंड, भंग ; ( दोन सुरांमधील ) अंतर, आंतरा.*-all'ic*, *a.*

**Intervēne'**, *v. i.* ( इन्टर्-व्ही'न् )—to come in as something extraneous; to occur in the meantime; to come between persons or things; to interfere, to mediate; ( Law ) to interpose in a law-suit to which one was not an original party. आगंतुक म्हणून आंत येणें,-मध्यें पडणें ; मध्यें येणें ; आड येणें ; आंत हात घालणें, मध्यस्थी करणें ; मूळ पक्षकार नसतांना खटल्यांत-मुकद्दम्यांत ( पक्षकारांमध्यें ) मध्यस्थी करणें,-सामील होणें.*-vener*, *n.*,*-venient*, *a.* मध्यें पडणारा,

मधला, व्यवहित, मध्यें होणारा,-घडणारा ; बाधक, विघ्न करणारा.

**Interven'tion**, *n.* ( इन्टर्-व्हे'न्शन् )—interference, mediation, interposition. मध्यें पडणें, मध्यस्थिति, व्यवधान ; मध्यस्थी.

**In'terview**, *n.* ( इ'न्टर्-व्ह्यू )—meeting of persons face to face ( for purpose of discussion, business, &c. ), a conference of thoughts. भेट, मुलाखत. *v. t.* मुलाखत घेणें.-*er*, *n.*

**Intervolve'**, *v. t.* ( इन्टर्व्हॉ'ल्व्ह् )—to wind, to roll up, ( things ) within each other. एकांत एक ( वस्तु ) गुंडाळणें,-गुंडळी करणें. परस्परग्रथित करणें.

**Interweave'**, *v. t.* ( इन्टर्-वी'व्ह् )—to weave together ; to blend intimately. एकत्र गुंफणें-विणणें ; अगदीं एकत्र मिळविणें.-मिसळणें.

**Interwind'**, *v. t. & i.* ( इन्टर्वा'इन्ड् )—to wind together. एकत्र गुंडाळणें.

**Intes'tate**, *a.* ( इन्टे'स्टट् )—not having made a will, not disposed of by will. मृत्युपत्र न करतां, कायदेशीर मृत्युलेख केल्यावांचून मरणारा, मृत्युपत्रानें व्यवस्था न लावलेला. *n.* अकृतमृत्युलेख मनुष्य. *Intes'tacy*, *n.* कायदेशीर मृत्युपत्र न करतां मरणें.

**Intes'tine**, *n.* ( इन्टे'स्टिन् )—( usu. *pl.* ) lower part of alimentary canal. आंतडीं, आंतडें, अंत्र. *a.* ( of wars etc. ) internal, domestic, civil ; wholly within a body. आंतला, अंतस्थ, अन्तर्वर्ती, आपापसांतील यादवीचा ; कोष्ठांतील, शरीरांतर्गत. *Large i.*, स्थूलांत्र. *Small i.*, सूक्ष्मांत्र.-*nal*, *a.* ( इन्टे'स्टिनल्,-'स्टाइनल् ) आंतड्याचा, आंत्रिक, अंत्रसंबंधी.

**In'timate**, *a.* ( इ'न्टिमट् )—closely acquainted ; familiar ; close ; intrinsic. दाट परिचयाचा, दृढ, गाढ ; सलगीचा, घरोब्याचा, जिवलग ; खरा, खराखुरा. *n.* an intimate friend. जिवलग मित्र. *v. t.* ( इ'न्टिमेट् ) to make known, to state ; to imply, to hint. जाणवणें, सुचविणें, माहिती देणें, सांगणें ; दर्शविणें, सुचविणें. *In'timacy*, *n.* सलगी, सख्य, घरोबा, निकट परिचय.-*tely*, *adv.*,-*tion*, *n.* सूचना, इषारा, बातमी, माहिती.

**Intim'idate**, *v. t.* ( इन्टि'मिडेट् )—to put in fear or dread, to inspire with fear, to frighten, to cow. भिववणें, दहशत घालणें, दडावणें, हिंमत खच्चवणें, ( चे ) पाय मोडणें.-*tion*, *n.* भय, भीति, धाक, दहशत.-*tor*, *n.*

**In'to**, *prep.* ( इ'न्टु )-expressing motion or direction to a point within, or change to a state. आंत, मध्यें, कडे.

**In'toed**, *a.* ( इ'न्टोड् )—having the toes turned inwards. पायाचीं बोटें आंत वळलेला.

**Intol'erable**, *a.* ( इन्टॉ'लरबल् )-not to be endured; enormous. असह्य, दुःसह ; अतिशय, असंख्यात.-*ness*, *n.*,-*ably*, *adv.* सोसवेनासा, असह्यपणानें.

**Intol'erant**, *a.* ( इन्टॉ'लरन्ट् )—not tolerant ( *of* ). असहिष्णु ( इतर धर्ममतांविषयीं ).-*rance*, पर ( धर्म ) मतासहिष्णुता.-*rantly*, *adv.*

**In'tonate, Intone**, *vv. t.* ( इ'न्टनेट्, इन्टो'न् )—to recite in a singing voice ; to utter with a particular tone. गाइल्यासारखें-गाण्याच्या आवाजांत-पाठ म्हणणें ; हेल काढीत बोलणें, विशिष्ट स्वरांत बोलणें.

**Intona'tion**, *n.* ( इन्टोने'शन् )—intoning ; modulation of voice, accent, &c. सुस्वर गाणें, गाण्याच्या आवाजांत म्हणणें ; स्वरभेद, स्वर कमीजास्त करणें.

**In to'to**, *adv.* ( इन् टो'टो )—पूर्णपणें.

**Intox'icant**, *a.* ( इन्टॉ'क्सिकन्ट् )-intoxicating. मादक अंमली. *n.* मादक-अंमली-दारू, मद्य.

**Intox'icate**, *v. t.* ( इन्टॉ'क्सिकेट् )—to make drunk ; to excite, to elate, beyond self-control. कैफ-गुंगी-आणणें, झिंगविणें ; माज आणणें, उन्मत्त करणें.-*ting*, *a.*,-*tion*, *n.* कैफ, अंमल. [ L *in & toxicare*, to smear with poison, Gk *toxa*, arrows]

**Intra-**, ( इन्ट्रा )—in comb.=on the inside, within. आंतील, आंत, अंतर्. *I.-cranial*, within the skull. कवटीच्या आंतील. *I.-national*, राष्ट्रीय, आंतरराष्ट्रीय नव्हे असा.

**Intrac'table**, *a.* ( इन्ट्रॅ'क्टबल् )—not docile, refractory ; ( of things ) not easily dealt with or managed. कह्यांत न राहणारा, अनिवार्य, हट्टी, हटवादी ; अनिवार, बेसुमार.-*ness*,-*ability*, *nn* हट्टीपणा, दुर्धर्षता, अनिवारपणा.-*ably*, *adv.*

**Intra'dos**, *n.* ( इन्ट्रे'डॉस् )—interior curve of an arch. कमानीचें आंतील वांकण.

**Intramur'al**, *a.* ( इन्ट्राम्यू'अरल् )—existing, done, within the walls. शहराच्या तटाच्या-भिंतींच्या-आंतील, भित्त्यंतरवर्ती.

**Intran'sigent**, *a.* ( इन्ट्रॅ'न्झिजन्ट् )-uncompromising in politics. राजकारणांत कट्टर, हेकेखोर. *n.* कट्टर लोकसत्तावादी ( मनुष्य ).

**Intran'sitive**, *a.* ( इन्ट्रा'न्सिटिव्ह् )—not taking direct object, not having an object. अकर्मक ( क्रियापद ).-*ly*, *adv.*

**In'trant**, *n.* ( इ'न्ट्रन्ट् )—one who enters a college etc. प्रवेश करणारा, आंत येणारा.

**Intrep'id**, *a.* ( इन्ट्रे'पिड् )—fearless ; brave. निर्भय ; शूर.-*ity*, *n.*,-*ly*, *adv.*

**In'tricate**, *a.* ( इ'न्ट्रिकट् )—entangled ; involved ; complicated, obscure. गुंतागुंतीचा ; भानगडीचा ; समजण्यास अवघड, क्लिष्ट, गहन.-*cacy*, *n.*;-*ly*, *adv.*

**Intrigue'**, *n.* ( इन्ट्रीग् )—a plot; secret amour, an illicit connection between two persons. कारस्थान, कपट, चक्रव्यूह, भानगडीचें कथानक; कुलंगडें, व्यभिचार, जारकर्म. *v. i. & t.* to carry on intrigue or underhand plot, to employ secret influence (*with*); to carry on illicit love (*with*); to rouse the interest or curiosity of. कारस्थान-गुप्त कट-करणें,-रचणें, (वर) गुप्त वजन पाडणें; जारकर्म करणें, (शीं) चोरून संबंध ठेवणें; औत्सुक्य वाढविणें, जिज्ञासा जागृत करणें. *In'trigant,-guant, n.,-te, n. f.* कट करणारा,-री.

**Intrin'sic**, *a.* ( इन्ट्रिन्सिक् )—being within; inherent; essential. अंगभूत, मूळचा, अंतर्गत; स्वाभाविक; महत्त्वाचा, आवश्यक.*-cally, adv.*

**Intro-**, ( इन्ट्रो- )—in comb.=to the inside. अंतर्, आंतील बाजूला. *I.-flex'ion*, inward bending. अंतर्वक्रता. *I.-gres'sion*, अंतर्गमन, आंत जाणें,-येणें.

**Introduce'**, *v. t.* ( इन्ट्रोड्यू'स् )—to bring in, to usher in, to bring forward; to make (person) known to another; to bring into notice; to bring before parliament. आंत आणणें, सुरवात करणें, प्रचारांत आणणें, पुढें आणणें; परिचय-ओळख-करून देणें; नजरेस आणणें; आंत घालणें; सभागृहापुढें (ठराव वगैरे) आणणें.

**Introduc'tion**, *n.* ( इन्ट्रोड'क्शन् )—introducing; preliminary matter in a book; presentation of a person to another. वहिवाटींत आणणें; प्रस्तावना; ओळख करून देणें. *Letter of i.*, ओळख करून देण्यासाठीं चिठी,-पत्र,-परिचयपत्र. *-duc'tory, a.* प्रास्ताविक, पूर्वतयारीचा.

**Intro'it**, *n.* ( इन्ट्रो'इट् )—a psalm etc. sung while the priest approaches altar. ख्रिस्ती धर्मोपाध्याय प्रभुभोजनाच्या मेजाकडे जात असतां गाइलेलें गीत इ.

**Intromit'**, *v. t.* ( इन्ट्रोमि'ट् )—to let in, to admit into; to insert. आंत येऊं देणें; आंत घालणें,-बसविणें.*-mitt'ent, a.,-mi'ssion, n.*

**Introspect'**, *v. i.* ( इन्ट्रोस्पे'क्ट् )—to examine one's own thoughts and feelings. अंतर्मुख होणें, आत्मनिरीक्षण करणें.*-ion, n.* अंतर्दृष्टि, अंतर्मुखता, आत्मनिरीक्षण.*-ionist, n.,-ive, a.,-ively, adv.*

**Introvert'**, *v. t.* ( इन्ट्रोव्ह'र्ट् )—to draw (organ) within its own tube or base; to turn (mind) inwards. (अवयव इ.) आकुंचन करणें, आंत ओढून घेणें; (मन) आंत वळविणें, अंतराभिमुख करणें. *n.* ( इ'- ) an introversible organ etc.; a thing or person introverted. आकुंचन पावणारें-आंत ओढलें जाणारें-इंद्रिय इ., संकोचन पावलेली वस्तु, अंतराभिमुख व्यक्ति.*-vers'ible, a.; -ver'sion, n.,-vers'ive,-vert'ive, aa.*

**Intrude'**, *v. t. & i.* ( इन्ट्रू'ड् )—to thrust *into*; to encroach; to force upon. आंत घुसणें किंवा घुसडणें; आगंतुकपणें येणें; जोरानें शिरकवणें,-ढकलणें.*-'der, n.* आगंतुक, अनाहूत येणारा.

**Intru'sion**, *n.* ( इन्ट्रू'झन् )—intruding; forcing in, encroachment. आगंतुकी; आंत घुसणें, अतिक्रम. *-ist, n.;-ive, a.* ( -सिव्ह् ), *-ively, adv., -iveness, n.*

**In'tubate**, *v. t.* ( इ'न्ट्यूबेट् )—( Med. ) to insert a tube into to keep it open. (श्वासनलिका उघडी रहावी म्हणून) आंत नळी घालणें.*-tion, n.*

**In'tuit**, *v. t. & i.* ( इ'न्ट्यूइट् )—to know by intuition; to receive knowledge by direct perception. अतर्ज्ञानानें-स्फूर्तीनें-जाणणें; साक्षात् ज्ञान मिळविणें, इंद्रियांच्या अनुभवानें ज्ञान मिळविणें.

**Intui'tion**, *n.* ( इन्ट्यूइ'शन् )—immediate apprehension by the mind without reasoning; immediate insight. उपजत ज्ञान, प्रतिभा, स्फूर्ति; तात्कालिक ज्ञान, अंतर्ज्ञान, सहजावबोध.*-al, a.* अंतर्ज्ञानाचा, सहजावबोधाचा.*-alism, n.* सहजज्ञानवाद, अंतःकरणप्रवृत्तिप्रामाण्यवाद.*-alist, n.*

**Intui'tionism**, *n.* ( इन्ट्यूइ'शनिझम् )—the doctrine that in perception external objects are known immediately; intuitionalism. बाह्य वस्तूंचें स्पष्टज्ञान-सविकल्पज्ञान-तात्कालिक होतें हा वाद; सहजज्ञानवाद.*-ist, n.*

**Intu'itive**, *a.* ( इन्ट्यू'इटिव्ह् )—possessing or perceived by intuition. उपजत, स्वभावतः असणारें, स्वाभाविक, अंतःस्फूर्तीनें समजणारा.*-ly, adv.,-ness, n.; Intu'itivism, n.* the principle that ethical principles are matters of intuition. अंतःस्फूर्तनीतिशास्त्रवाद.*-vist, n.*

**Intumes'cence**, *n.* ( इन्टयूमे'सन्स् )—a swelling. सुजणें, सूज, शोथ.*-cent, a.* सुजणारा.

**Intussuscep'tion**, *n.* ( इन्टस्सर्से'प्शन् )—( physiol. ) taking in of foreign matter by living organism, and converting it into organic tissue; taking in (*of* ideas etc.); withdrawal of one portion of intestine within another. परकी द्रव्य आंत घेऊन सेंद्रिय वस्तूनें त्याचें इंद्रियपेशींत केलेलें रूपांतर; (कल्पना इ.) ग्रहण करणें; (आंतड्याचा) एक भाग दुसऱ्या भागांत शिरणें. [ L *intus*, within, *sus*, and *capere*, take ]

**Inun'ction**, *n.* ( इन'ङ्क्शन् )—the act of anointing, rubbing with oil. माखणें, विलेपन करणें, विलेपन, माखण, तेल लावून चोळणें.

**In'ŭndāte**, *v. t.* (इ'नन्डेट्)—to spread or flow over, to deluge, to flood, to submerge. पूर येणें, जलमय करणें, समृद्धि करणें, रेलचेल-चंगळ-करणें. *Inunda'tion*, *n.* बुडविणें, जलप्रलय, चंगाळी, समृद्धि, रेलचेल.

**Inūre'**, *v. t.* (इन्यू'अर)—to habituate, to accustom, to harden by use or practice. वहिवाटणें, अंगीं पाडणें, रावणें, मुरवणें. *v. i.* (Law, enure), to come into operation, to take effect. अंमल चालू होणें, लागू पडणें. *Inure'ment*, *n.* संवय पाडणें, संवय, रावता.

**Inurn'**, *v. t.* (इन'र्न्)—to put (ashes of the cremated body) in an urn. (अग्निसात् केलेल्या प्रेताची रक्षा-अस्थि-) भांड्यांत ठेवणें.

**Inū'tile**, *a.* (इन्यू'टिल्)—useless. निरुपयोगी, निरर्थक.-*tility*, *n.* निरुपयोगिता.

**Invāde'**, *v. t.* (इन्व्हे'ड्)—to make hostile inroad into; to assail; to encroach on. स्वारी करणें; हल्ला करणें, आक्रमण करणें; दुसऱ्याच्या हद्दींत घुसणें, अतिक्रमण करणें.-*er*, *n.*

**In'valid**, *a.* (इ'न्व्हलीड्)—not valid or strong, weak, enfeebled by illness or injury. अशक्त, दुर्बळ, रोगी, दुखणेकरी, जखमी. *n.* an invalid person. रोगी-दुखणेकरी-जखमी झालेला मनुष्य. *v. t.* to remove from active service; to send away as an invalid; to lay up, disable, by illness (usu. pass.). नोकरीला नालायक ठरविणें, दुखणेकरी-जखमी झालेला-म्हणून (घरीं-मायदेशीं) पाठवून देणें; दुखण्यानें आजारी पाडणें, दुखणें आणणें.-*hood*,-*ism*, *nn.*

**Invăl'id**, *a.* (इन्व्हॅ'लिड्)—not valid. (कायद्याच्या दृष्टीनें) अप्रमाण, पोंचट, रद्द, वायां.-*ly*, *adv.*

**Invăl'idate**, *v. t.* (इन्व्हॅ'लिडेट्)—to make invalid, to destroy the strength of. रद्द करणें, कमजोर-निर्बल-करणें.-*dity*, *n.*,-*dation*, *n.*

**Invăl'ūable**, *a.* (इन्व्हॅ'ल्युएबल्)—above price, priceless. बहुमूल्य, अमोल.

**Invār'iable**, *a.* (इन्व्हे'रिएबल्)—always the same; (Math.) constant, unchangeable. एकसारखा; न पालटणारा, अविकासी, अविकार्य.-*ability*, *n.* -*ableness*, *n.*;-*ably*, *adv.* सतत, नित्य, न चुकतां.

**Invā'sion**, *n.* (इन्व्हे'झन्)—invading, incursion, inroad; an encroachment. स्वारी, हल्ला; पर-हद्दींत जाणें, अतिक्रमण, उल्लंघन.-*sive*, *a.* (-सिव्ह्), (प्रथम) हल्ला करणारा, कुरापत काढणारा, स्वारीचा, हल्ल्याचा.

**Invĕc'tive**, *n.* (इन्व्हे'क्टिव्ह्)—abusive speech, railing language, vituperation. निंदात्मक भाषण, दोषारोप (ण), निर्भर्त्सना, कानउघाडणी.

**Inveigh'**, *v. i.* (इन्व्हे')—to speak violently, to reproach; to rail *against*. निंदा करणें; जोरानें उलट घोलणें, घुस्सा करणें.

**Invei'gle**, *v. t.* (इन्व्ही'गल्,-व्हे'-)—to entice, to seduce; to wheedle. फुसलावणें, मोह घालणें; डोळ्यांत धूळ फेंकणें.-*ment*, *n.*

**Invō'nit, Invenēr'unt**, *v. 3rd pers.* (इन्व्हों'निट्, इन्व्हनीं'अरन्ट्)—designed this work (used with artist's signature) (abbr. *inv.*). (अमूक अमूक कारागिरानें) हें काम केलें (कारागिराच्या-चित्र-काराच्या सहीसह योजिलेला शब्द).

**Invĕnt'**, *v. t.* (इन्व्हें'न्ट्)—to devise, to originate; to fabricate, to concoct. युक्ति-कल्पना-काढणें, (कल्पनेनें) नवीन शोध काढणें,-लावणें; रचणें, खोटा बनविणें, कल्पित बनविणें.-*ive*, *a.* कल्पक, कल्पनाचतुर, हिकमती, युक्तिबाज.-*ively*, *adv.* -*iveness*, *n.* शोधकता, शोधकबुद्धि, कल्पनाशक्ति कल्पनाचातुर्य. *Invent'or*, *n.* नवीन शोध लावणारा, कल्पक, योजक.-*tress*, *n. f.*

**Invĕn'tion**, *n.* (इन्व्हे'न्शन्)—inventing; a thing invented; inventiveness. शोध; नवीन कल्पलेली गोष्ट, नवीन शोधून काढलेलें यंत्र इ.; नवी कल्पना.

**In'vĕntorў**, *n.* (इ'न्व्हेन्टरि)—a list (of goods, &c.). (मालाचें) टिपण, यादी, फेरिस्त. *v. t.* to make a list of. (मालाचें) टिपण-यादी-करणें, यादींत घालणें.

**Inveră'citў**, *n.* (इन्व्हॅ'सिटि)—untruthfulness. खोटेपणा, असत्यपणा.

**Invernĕss'**, *n.* (इन्व्हर्ने'स्)—a town in Scotland; a kind of man's sleeveless cloak. एक शहर पुरुषाचा बिनबाह्यांचा अंगरखा.

**Inverse'**, *a.* (इन्व्ह'र्स्)—opposite or inverted (in position, order or relation). उलटा, उरफाटा, व्यस्त, व्युत्क्रांत. *n.* उलट स्थिति, व्युत्क्रम. *I. ratio, proportion*, व्यस्त प्रमाण.-*ly*, *adv.*

**Inver'sion**, *n.* (इन्व्ह'र्शन्)—turning upside down; reversal of position, (Gram.) reversion of natural order of words; reversal of a ratio. उलटा करणें; व्युत्क्रम, उलटापालट, विपर्यास, व्युत्क्रांति; स्वाभाविक शब्दानुक्रमांत उलटापालट, विपरीत रचना, शब्दविपर्यास.-*sive*, *a.*

**Invert'**, *v. t.* (इन्व्ह'र्ट्)—to turn upside down, to reverse position, order or relation of. उलटा करणें, अनुक्रम फिरविणें, व्युत्क्रम करणें. *n.* (इ'न्व्हर्ट्) an inverted arch. उलटी कमान (नाल्याच्या तळची). *Inverted commas*, अवतरण चिन्ह (यांतील उलटा स्वल्पविराम).

**Invert'ĕbrate**, *a. & n.* (इन्व्ह'र्टिब्रट्)—without a backbone, or spinal column; (fig.) weak-

willed. पाठीचा कणा नसलेला, बिनकण्याचा (प्राणी), अशक्त, खंबीर मन नसलेला (इसम, व्यक्ति).

**Invĕst'**, *v. t. & i.* ( इन्व्हे'स्ट् )—to clothe, to dress; to endue with qualities, &c.; to lay siege to; to lay out money. पोषाख चढविणें, नेसवणें; संपन्न-भूषित-करणें; वेढा घालणें; पैसा गुंतविणें, खर्चणें.-*or*, *n.* पैसे गुंतविणारा.

**Invĕs'tĭgāte**, *v. t.* ( इन्व्हे'स्टिगेट् )—to examine, to inquire into, to search into. चौकशी करणें, तपास करणें, शोध लावणें.-*tion*, *n.* चौकशी, तपास, शोध.-*tor*, *n.*,-*tive*, *a.*,-*tory*, *a.*

**Invĕs'titure**, *n.* ( इन्व्हे'स्टिचर् )—formal investing of a person with an office; enduing with attributes. पदार्पण, अभिषेक, संस्कार, अधिकारदान; गुणांनीं अलंकृत करणें.

**Invĕst'ment**, *n.* ( इन्व्हे'स्ट्मेन्ट् )—investing; money invested. पांघरूण, वेढा, अधिकारदान; पैसे गुंतविणें, भांडवल गुंतविलेला व्यवहार,-धंदा.

**Invĕt'erate**, *a.* ( इन्व्हे'टरट् )—long-established, obstinate, deep-rooted, confirmed. जुनाट, अंगीं मुरलेला, पुरातन, हट्टी, दृढमूल, दृढ, कायम होऊन बसलेला, पक्का संवयीचा.-*ly*, *adv.*,-*racy*, *n.* दृढमूलता, कट्टेपणा, जुनाटपणा, बद्धवैर.

**Invĭd'ious**, *a.* ( इन्व्हि'डिअस् )—giving offence; likely to provoke ill-will. अपमानास्पद; मत्सरजनक, हेवा उत्पन्न करणारा.-*ly*, *adv.*,-*ness*, *n.*

**Invĭ'gĭlāte**, *v. i.* ( इन्व्हि'जिलेट् )—to watch over students at examination. परीक्षेच्या वेळीं विद्यार्थ्यांवर देखरेख ठेवणें.-*tor*, *n.* परीक्षेच्या वेळीं विद्यार्थ्यांवर देखरेख-नजर-ठेवणारा, पर्यवेक्षक.-*tion*, *n.* पर्यवेक्षण.

**Invĭg'orāte**, *v. t.* ( इन्व्हि'गोरेट् )—to make vigorous, to give life and energy to. बळकटी किंवा जोर आणणें, जोमदार करणें,-बनविणें, बलवर्धन-तेजोवृद्धि-करणें, तरतरी आणणें.-*ative*, *a.* उत्साहवर्धक, बलवर्धक.-*ator*, *n.* पुष्ट करणारा.

**Invĭn'cible**, *a.* ( इन्व्हि'न्सिबल् )—unconquerable; not to be subdued, insurmountable. अजिंक्य; दुर्जेय, दुस्तर, अनिवार्य, जबरदस्त.-*bly*, *adv.*, -*bility*, *n.* अजिंक्यपणा, अनिवार्यता.

**Invi'olable**, *a.* ( इन्व्हा'योलबल् )—not to be violated; to be kept sacred. अनतिक्रमणीय, अलंघ्य, अबाध्य; पूज्य-पवित्र-राखण्याजोगा.-*ability*, *n.* अलंघ्यता, अबाधता, अनपवित्रीकरणीयता.-*ably*, *adv.*

**Invi'olacy̆**, *n.* ( इन्व्हा'यलसि )—the state of being inviolate. अलंघ्यता, अनुल्लंघनीयता.

**Invi'olate**, *a.* ( इन्व्हा'यलट् )-not violated. अलंघित, अखंड, अबाधित, शुद्ध, अदूषित, पवित्र.-*ly*, *adv.*, -*ness*, *n.*

**Invĭs'ible**, *a.* ( इन्व्हि'झिबल् )—that cannot be seen. अदृश्य, परोक्ष, अगोचर, दृष्टीस न पडणारा,-पडलेला, अतिसूक्ष्म. *The i.*, the unseen world, God. अदृश्य-परोक्ष-अगोचर सृष्टि, परमेश्वर. *I. exports*, shipping services, foreign investments etc. that account for the apparent excess of a country's imports over exports. परोक्ष-अदृश्य-निर्यात (व्यापारी मालाची निर्यात, परकी भांडवल इत्यादींमुळें देशाची आयात निर्यातीपेक्षां फुगलेली-वाढलेली-भासणें). *I. ink*, ink that can be seen only after heating etc. (उष्णता वगैरे लावल्यानंतरच दिसणारी) अदृश्य शाई. *Invisibil'ity*, *n.*,-*bleness*, *n.*,-*bly*, *adv.* अदृश्य रूपानें, गुप्तपणें.

**Invīte'**, *v. t.* ( इन्व्हा'इट् )—to request courteously, to come, ( to dinner, to one's house, *in* etc.); to tempt to come, to solicit courteously; to be attractive, to attract. आमंत्रण करणें, बोलावणें; निमंत्रण देणें; विनंति करणें; चित्त वेधणें, मन ओढून घेणें, भूल पाडणें. *n.* ( colloq. ) an invitation. बोलावणें, आमंत्रण, निमंत्रण.-*tingly*, *adv.* आकर्षक रीतीनें, मोहकपणें.-*tingness*, *n.* *Invit'atory*, *a.*

**Invĭtā'tion**, *n.* ( इन्व्हिटे'शन् )—a courteous request to come or pay a visit. आमंत्रण, निमंत्रण, बोलावणें, निमंत्रणपत्रिका.

**Invocā'tion**, *n.* ( इन्व्होके'शन् )—invoking; calling upon or addressing in prayer; an appeal to Muse for inspiration or helping in poem. धांवा करणें; प्रार्थना करणें, धांवा; कविता-देवीचा धांवा, स्तवन (कवित्वस्फूर्तीसाठीं). *Invoc'atory*, *a.*

**In'voice**, *n.* ( इ'न्व्हाइस् )—a list of goods sent with prices. पाठविलेल्या मालाची ( जात, वजन, हेल, किंमत यांसह ) यादी.-पट्टी. *v. t.* to make an invoice of ( goods ). ( खरेदीदारास ) पाठविलेल्या मालाची यादी-पट्टी-तयार करणें, यादींत घालणें.

**Invōke'**, *v. t.* ( इन्व्हो'क् )—to call on in prayer; to appeal to; to ask earnestly for, to call for with earnestness; to summon by charms. चा धांवा करणें, प्रार्थना करणें; कळकळीनें विनंति करणें; विनंति करणें, आग्रह-याचना-करणें; जादूनें-मंत्रानें-( भुतें ) बोलाविणें,-उठविणें.

**In'volucre**, *n.* ( इ'न्व्हलूकर् )—( Anat. ) a covering, an envelope; ( Bot. ) a whorl of bracts round inflorescence. वेष्टन, आच्छादन; फुलांच्या मांडणीभोंवतीं असलेली पानांची चक्रवत् रचना, फुलाच्या दांड्याभोंवतालचें पर्णमंडल.

**Invŏl'ŭntary̆**, *a.* ( इन्व्हॉ'लन्टरि )—unintentional. निर्हेतुक, अस्वैच्छ, अनैच्छिक, नाखुषीचा.-*arily*, *adv.*,-*ariness*, *n.*

**In'volute,** *a.* ( इ'न्व्हलूट् )—intricate, involved; curled spirally; (Bot.) rolled inwards at edges. गुंतागुंतीचा, एकमेकांत गुंतलेला-अडकलेला; मळसूत्राकार-शंकुसदृश-वळलेला; अंतर्वलित,-ताग्र. *n.* (Math.) वक्रकेंद्रिक-अनवलूत-बिन्दुमार्ग,-पथ, -कक्षा.

**Involu'tion,** *n.* ( इन्व्हलू'शन् )-involving; intricacy; curling inwards, part so curled; (Math.) raising of quantity to any power. गुंडाळणें; गुंतागुंत, गोंधळ; अंतर्वलितता, अंतर्वलित भाग; घात, घातक्रिया, सवर्गीकरण.

**Invŏlve',** *v. t.* ( इन्व्हॉ'ल्व्ह् )—to wrap; to wind spirally; to imply, to entail; to include. गुंडाळणें, वेष्टणें; मळसूत्राकार गुंडाळणें; गुंतविणें, गोंधळांत पाडणें; गोवणें, ओढून घेणें, गुरफटविणें; (कार्यकारणसंबंधानें) जोडणें; गर्भित-ध्वनित-करणें; आंत धरणें,-असणें.-*ment, n.* involving; financial embarrassment; complicated affair. गुंतविणें; सांपत्तिक-पैशाची-चणचण, अडचण; गुंतागुंतीचा व्यवहार.

**Invŭl'nerable,** *a.* ( इन्व्ह'ल्नरेबल् )—that cannot be hurt or wounded, unassailable. वज्राप्रमाणें अभेद्य, वज्रासारखा कठीण, निरुत्तर, बेमालूम.-*ably, adv.,-ableness, n.*

**In'ward,** *a.* ( इ'न्वर्ड् )—situated within; mental, spiritual; directed towards the inside. आंतील, अंतर्गत, आंतर; मानसिक, आध्यात्मिक; आंतल्या बाजूकडे. *n. pl.* entrails. आंतडीं.

**In'wardlў,** *adv.* ( इ'न्वर्ड्लि )—on the inside. आंत.

**In'wardnėss,** *n.* ( इ'न्वर्ड्निस् )—inner nature, essence; *quality of being inward, spirituality.* अंतःस्वभाव, अंतःस्थिति, सार; आंतरता, अंतर्गतता; आध्यात्मिकता.

**In'wards, In'ward,** *adv.* ( इ'न्वर्ड्झ्, इ'न्वर्ड् )—towards the inside, into the mind. आंत, आंतील बाजूस, मनांत.

**Inweave',** *v. t.* ( इन्वी'व्ह् )—to weave in or together. एकत्र विणणें, विणून भरणें,-मिळविणें, गुंफणें. Also, *In-weaven.*

**Inwrought',** *a.* ( इन्रॉ'ट्, इ'न्राट् *before noun.* )—decorated, adorned with figures, wrought or worked in; intimately blended with. जडित, खचित, भरित, (शीं) एकजीव झालेला, एकजीव, एकरूप.

**In'yala,** *n.* ( इ'न्याला )-a South African antelope. द. आफ्रिकेंतील हरीण, काळवीट.

**I'odine,** *n.* ( आ'यूअडाइन् )-a non-metallic element used in medicine and photography. 'अद्' नांवाचें मूलतत्त्व, योद्. *I'odize, v. t.* ( आ'यूअडाइझ् ) to impregnate with iodine. 'अद्' युक्त करणें. *Iod'ic, a., I'odism, n.*

**Iō'doform,** *n.* ( आयूओ'डोफॉर्म् )—a compound of iodine used as an antiseptic. किडे पडूं न देणारें -पूतिनाशक-अदाचें रासायनिक मिश्रण.

**I'olite,** *n.* ( आ'युओलाइट् )—silicate of aluminium, iron, and magnesium, of violet or blue colour. (ॲल्यूमिनिअम्, लोह व मॅग्नेसिअम् यांचा बनलेला) जांभळा-निळा-दगड,-सिकता,-गारगोटी. [Gk *ion*, violet]

**I'on,** *n.* ( आ'यूअन् )—either of the elements that pass to the poles in electrolysis, a particle of moving matter carrying a unit or unitary charge of positive or negative electricity. अयन, विद्युद्‌यन, दल.

**Iō'nĭan,** *a.* ( आयूओ'निअन् )—of Ionia. आयोनियाचा,-यांतील. *n.* a member of the Hellenic race. प्राचीन ग्रीकवंशीय मनुष्य. *Ion'ic, a.* ( आयूऑ'निक् ), आयोनियाचा.

**Iō'tă,** *n.* ( आयो'टा )—Greek letter *i*; a jot, a very small quantity. एक ग्रीक अक्षर; अतिसूक्ष्म अंश, कण, बिंदु, लवमात्र.

**IOU,** *n.* ( आय्-ओ-यू )-a signed document bearing these letters followed by the specified sum, as acknowledging debt. (ठराविक रक्कम कर्जाऊ घेतल्याबद्दल) सही केलेला कर्जरोखा,-लेख. [=I owe you]

**Ipecăcuăn'ha,** *n.* ( इपिकॅक्यूॲ'ना )—a root of S. American plant used as emetic and purgative. द. अमेरिकेंतील वनस्पतीचें वांतीकारक व रेचक मूळ (औषधि).

**Ip'sė dix'it,** *n.* ( इ'प्सि डि'क्सिट् )—a dogmatic statement; a dictum. (सत्य अथवा पुरावा यांकडे न पाहतां) प्रतिपादिलेलें वचन,-मत, आप्तवाक्य; अधिकारी व्यक्तीचें मत,-वचन.

**Ip'sō făc'to,** *adv.* ( इ'प्सो फॅ'क्टो )—by that very fact. त्यावरून, त्याच वस्तुस्थितीवरून.

**Irăs'cĭble,** *a.* ( आय्-रॅ'स्-सिबल् )—easily provoked with resentment, irritable; hot-tempered. तापट; रागीट, तामसी, संतापी.-*bility, n.* तापटपणा, तामसीपणा, चिडखोरपणा.

**Irāte',** *a.* ( आयुरे'ट् )—angry. रागीट, क्रोधिष्ठ, कोपिष्ठ.

**Ire,** *n.* ( आयर् )—anger, wrath. क्रोध, संताप, राग. *-ful, a.,-fully, adv.*

**Ire'nĭc,-nĭcal,** *aa.* ( आयुरे'निक्,-री'निक्,-कल् )—aiming at peace, aimed at peace. शांततानुकूल, समेटासाठीं केलेला, शांतताहेतुक. [Gk *eirene*, peace]

**Iridā'ceous,** *a.* ( आयुरिडे'शस् )—(*of plants*) of the iris kind. (वनस्पतींच्या) 'आयरिस्' जातीचा.

**Irĭdĕs'cent**, *a.* ( इरिडे'सन्ट् )—showing rainbow-like colours. इंद्रधनुष्यासारखे रंग दाखविणारा, सप्तरंगी, रंग बदलणारा.-*cence*, *n.*

**Irĭd'ium**, *n.* (आयुरि'डिअम् )—a white metal of platinum group. ऐंद्र धातु.

**Ir'ĭs**, *n.* ( आ'युरिस् )—the circle round the pupil of the eye ; a genus of plants with showy flowers ; a kind of rock-crystal reflecting prismatic colours. डोळ्यांतील बाहुलीचा काळा पडदा ; कनीनिका, नेत्रतारकामंडल ; भपकेबाज रंगांच्या फुलांचें फुलझाड ; स्फटिकाचा दगड (-इंद्र-धनुष्यासारखे सात रंग दाखविणारा.) [Gk= (goddess of ) rainbow ]

**Ir'ish**, *a.* ( आ'युरिश् )—of Ireland. आयर्लंडचा. *n.* आयरिश भाषा. The I., (*n. pl.*) आयरिश लोक. -*ism*, *n.* Irish idiom. आयरिश वाक्संप्रदाय. *I. Free State*, part of Ireland separated and established as a British Dominion 1922. आयर्लंडचें स्वतंत्र संस्थान ( ब्रिटिश वसाहत ).

**Irk**, *v. t.* (अर्क् )—to tire, to bore. कंटाळा-थकवा-आणणें, त्रास देणें, सतावणें, सतविणें.

**Irk'some**, *a.* ( अ'र्क्-सम् )—giving uneasiness, wearisome ; tedious. त्रासदायक ; कंटाळवाणा. -*ly*, *adv.*,-*ness*, *n.*

**Iron**, *n.* ( आयर्न् )—a metal much used for tools, &c. ; ( fig. ) type of hardness ; preparation of iron as a tonic ; a tool made of iron ; a golf-club with iron head ; an iron tool for smoothing out linen etc. ; (*pl.*) fetters. लोखंड, लोह, आयस ; ताठरपणा, कठोरपणा ; लोहभस्म इ. शक्तिवर्धक औषध ; लोखंडी हत्यार ; लोखंडी डोक्याचा गोल्फचा दांडू ; इस्त्री ; बेड्या, हातकड्या, पायकड्या. *a.* of iron ; robust, firm, unyielding, merciless. लोखंडी,-डाचा, लोहमय ; कणखर, मजबूत, न नमणारा, निर्दय, निष्ठुर. *v. t.* to smooth with iron ; to shackle with irons, to fetter or handcuff ; to furnish or arm with iron. इस्तरी करणें ; बिड्या घालणें, हातकड्या घालणें ; लोखंडी पत्र्यानें,-पट्टीनें-मढविणें-मजबूत करणें. *Wrought i.*, शुद्ध केलेलें लोखंड. *Cast i.*, बीड. *Steel*, पोलाद, तिखें. *A man of i.*, कठोर-दृढनिश्चयी-मनुष्य. *A rod of i.*, करडा-कठोर-अंमल. *In ii.*, बिड्या घातलेला,-पडलेला. *The i. entered into his soul*, 'his person entered into the iron', i. e. fetters. त्याला बिड्या पडल्या, तो संकटांत-दुःखांत-पडला. *Strike while the i. is hot*, strike at a good opportunity. आलेली संधि दवडूं नका, तापल्या तव्यावर पोळी भाजून घ्या. *To have ( too ) many ii. in the fire*, many uudertakings, many expedients. पुष्कळ कामें एकाच वेळीं करणें, पुष्कळ युक्त्या-योजना-असणें,-करणें. *I. age*, the era of iron implements ; the age of cruelty. लोहयुग, लोक लोखंडी हत्यारें पहिल्यानेंच वापरूं लागले तें युग ; जुलमाचा-क्रूर कृत्यांचा-काळ. *I. bark*, जाड सालीच्या युकॅलिप्टस झाडांची जात. *I.-bound*, bound with iron ; rock-bound ( coast ); ( fig.) rigorous, hard and fast. लोखंडी पत्र्यानें मढविलेला ; खडकाळ ( किनारा ) ; कडक, नियम बद्ध, नियमांनीं-रूढीनें-जखडलेला. *I. clad*, *a.* protected with iron. लोखंडी पत्र्यानें सुरक्षित केलेला ; *n.* a ship cased with iron. लोखंडी पत्र्यानें सुरक्षित केलेलें जहाज. *I. Duke*, ड्यूक ऑफ् वेलिंग्टन. *I. founder*, maker of iron castings. लोखंडाचें ओतकाम करणारा, ओतारी. *I.-grey*, *a. & n.* ताज्या लोखंडी रंगाचा. *I. horse*, a locomotive steam engine, a bicycle or tricycle. (आगगाडीचें वगैरे ) वाफेचें यंत्र, दुचाकी, तिचाकी गाडी. *I. man*, ( sl. U. S. ) चांदीचा डॉलर ( नाणें ). *I. master*, manufacturer of iron. लोखंडी ( सामायनाचा ) कारखानदार. *I. monger*, a dealer in iron goods. लोखंडी सामान विकणारा. *I. mongery*, लोखंडी सामान,-जिनसा -चिजा. *I. mould*, *n.* a spot caused by iron-rust or ink-stain. ( कपड्यावर पडलेला ) लोखंडी गंजाचा किंवा शाईचा डाग ; *v. t. & i.* ( असा ) डाग पाडणें,-पडणें. *I. rations*, soldier's modicum of food for emergency. आणीबाणीच्या वेळीं उपयोगांत आणण्याचा लष्करी शिपायाचा शिधा ( अन्न-वांटा ). *I. sides*, मोठा शूर योद्धा, क्रॉम्वेलचे शूर शिपाई,-घोडदळ-स्वार. *I. stone*, ore of iron. लोखंडाचा दगड,-ची कच्ची माती. *I. wood*, kind of trees. नागचाफा, नागचंपक. *I. work*, लोखंडी काम ; लोखंडी जिनसा. *I. works*, लोखंडी कारखाना.

**Irŏn'ĭc,-al**, *a.* ( आय्-रॉ'निक्,-कल् )—of or addicted to irony, expressing one thing and meaning the opposite. उपरोधिक, व्याजोक्तीचा, व्याज-स्तुतीचा.-*ically*, *adv.*

**Ir'onĭst**, *n.* ( आ'युरनिस्ट् )—one who uses irony. उपरोध-व्याजस्तुति-करणारा, व्यंगोक्तिकार.

**Ir'onў**, *n.* ( आ'यु-रनि )—expression of one's meaning by language of opposite or different tendency, subtle kind of sarcasm. उपरोधिक बोलणें, व्याजस्तुति, द्व्यर्थी भाषण,-बोलणें. *The i. of Fate*, नशिबाचा-दैवाचा-विपरीत खेळ, विचित्र लीला. *Socratic i.*, simulation of ignorance as a means of confuting adversary. अज्ञानाचें सोंग करून प्रतिपक्ष्याला निरुत्तर करणें,-खोटें ठरविणें.

**Iron'ў**, *a.* ( आय'र्नि )—of or like iron. लोखंडाचा, लोहसदृश.

**Irrā'diant**, *a.* ( इरे'डिअन्ट् )—shining brightly. प्रकाशित करणारा, प्रकाश देणारा, प्रकाशक.-*ance*, *n.*

**Irrā'diāte,** *v. t.* (इरें'डिएट्)—to shine upon; to throw light on; to light up (face *with* joy etc.), to illuminate, to brighten. प्रकाशित करणें; प्रकाश पाडणें; उल्हसित करणें, तेजस्वी करणें. *-ative, a.*

**Irrădĭā'tion,** *n.* (इरेडिए'शन्)—*shining, illumination*; the apparent illumination of edges of an illuminated object seen against dark ground. प्रकाश देणें, प्रकाश(न); अंधुक पृष्ठभागावर प्रकाशित वस्तूच्या कडांची दृश्य चकाकी,-लकाकी.

**Irră'tional,** *a.* (इरॅ'शनल्)—unreasonable, illogical; not endowed with reason, contrary to reason; (Math., of roots etc.) not rational. अयुक्तिक, असमंजसपणाचें, अयोग्य; सदसद्विवेकबुद्धिहीन, अजाण, मूर्ख; करणीगत.*-lity, n.* अजाणपणा, बुद्धिहीनता, करणीपदता *-lize, v. t., -lly, adv.*

**Irreclaim'able,** *a.* (इरिक्ले'मबल्)—that cannot be reclaimed or reformed. परत न मिळण्याजोगा, फुकट गेलेला, सुधारणेच्या पलीकडचा.*-ably, adv.*

**Irrĕc'ognīzable,** *a.* (इरॅ'कग्नाइझबल्)—that cannot be identified or detected. न ओळखण्याजोगा, ओळख न पटणारा.

**Irrĕc'oncīlable,** *a.* (इरॅ'कन्साइ-लबल्)—implacably hostile; incompatible. अत्यंत विरुद्ध, दुराराध्य, बेवनावाचा; विसंगत, मेळ न बसणारा. *n.* कट्टा विरोधक,-प्रतिस्पर्धी.*-ability,-ness, nn., -ably, adv.*

**Irrĕco'verable,** *a.* (इर-रिक'व्हरबल्)—that cannot be recovered or remedied. वसूल न होणारा, पुन्हां न मिळणारा, कष्टसाध्य, निरुपाय.*-ably, adv.*

**Irrĕcū̆s'able,** *a.* (इरिक्यू'झबल्)—that cannot be refused, that must be accepted. नाकारतां न येणारें, अवश्य स्वीकार्य.

**Irrĕdeem'able,** *a.* (इरिडी'मेबल्)—irreclaimable, hopeless; not to be redeemed. पुनः परत न मिळण्याजोगा, सर्वस्वी नष्ट, नष्टाश; भरपाई करतां न येण्याजोगा, ज्याची किंमत नाण्यांत देण्याची हमी न घेतलेलें (कागदी चलन).*-ably, adv.*

**Irrĕdū'cible,** *a.* (इरिड्यू'सिबल्)—that cannot be brought (*to* desired condition); that cannot be reduced or simplified. फेरफार करतां न येणारा; कमी करतां न येणारा.*-bility, n.*

**Irrĕf'ragable,** *a.* (इरॅ'फ्रगबल्)—that cannot be disputed, unanswerable. निर्विवाद, निरुत्तर, बेमालूम, बिनतोड.*-ably, adv.*

**Irrĕfrăn'gible,** *a.* (इरिफ्रॅ'न्जिबल्)—inviolable; (Opt.) that cannot be refracted. अलंघ्य, अखंड; वांकडा न होण्याजोगा, वक्रीभवनायोग्य.

**Irrĕf'ūtable,** *a.* (इरॅ'फ्यूटबल्)—not to be refuted, unanswerable. खंडन न करतां येण्याजोगा, निरुत्तर, बिनतोड.*-ability, n.,-ably, adv.*

**Irrĕg'ūlar,** *a.* (इरे'ग्युलर्)—contrary to rule; uneven, varying; disorderly; not in regular service; (Gram.) not normally inflected. अशास्त्र, नियम-बाह्य; विषम, बदलणारें; अव्यवस्थित; अनियमित, कायम नोकरींत नसलेलें (लष्कर, सैनिक); (व्याक०) अनियमित चालणारा (शब्द). *n. pl.* irregular troops. अनियमित-हंगामी-सैनिक, लष्कर.*-ity, n.,-ly adv.*

**Irrĕl'rative,** *a.* (इरॅ'लटिव्ह्)—unrelated (*to*); absolute, unconnected. संबंधरहित, असंबंधी, स्वतंत्र.*-ly, adv.*

**Irrĕl'ĕvant,** *a.* (इरॅ'लिव्हन्ट्)—not relevant. अप्रासंगिक, अप्रकृत, मुद्याला सोडून, इकडचा तिकडचा.*-vance,-vancy, nn.,-vantly, adv.*

**Irrelĭ'gion,** *n.* (इरिलि'जन्)—hostility to or disregard of religion; impiety. धर्मविरोध, धर्मलोप, धर्माविषयीं अनादर; देव-धर्म-निंदा, अधर्म. *-ist, n.* अधार्मिक, धर्मविरोधक, धर्मभ्रष्ट.

**Irrĕlĭ'gious,** *a.* (इरेलि'जस्)—hostile or indifferent to religion; impious, ungodly, profane. धर्मविरुद्ध, धर्माच्या बाबतींत उदासीन; अधार्मिक, दुष्ट, पापी.*-ly, adv.*

**Irrĕmē'dĭable,** *a.* (इरिमी'डिएबल्)—past remedy, incurable, irreparable. अचिकित्स्य, दुःसाध्य, उपायाबाहेरचा, निरुपाय, भरून न येणारा.*-bly, adv.*

**Irrĕmĭss'ible,** *a.* (इरिमि'सिबल्)—unpardonable; binding. अक्षम्य; अवश्य बंधनकारक, न चुकणारा. *-bly, adv.*

**Irrĕmo'vable,** *a.* (इरिमू'व्हबल्)—that cannot be removed. अचल, स्थिर, काढून टाकतां न येणारा. *-ability, n.,-ably, adv.*

**Irrĕp'arable,** *a.* (इरॅ'परेबल्)—(of loss etc.) that cannot be made good, irretrievable. भरून न येणारा, पुनः न मिळणारा. *-ness, n.,-ably, adv.*

**Irrĕplāce'able,** *a.* (इरिप्ले'सबल्)—of which the loss cannot be supplied. बदली दुसरा न देतां येणारा, ची जागा भरून न काढणारा.

**Irrĕprĕss'ĭble,** *a.* (इरिप्रे'सिबल्)—that cannot be repressed or restrained. न दाबतां येणारा, ताब्यांत-कह्यांत- न ठेवतां येणारा, अनिवार. *n.* (colloq.) कह्यांत न ठेवतां येणारा-बेफाट-मनुष्य. *-bly, adv.*

**Irrĕproach'able,** *a.* (इरिप्रो'चेबल्)—*innocent*, faultless, blameless, unblemished. निर्दोष, अनवद्य, अनिंद्य, निष्कलंक.*-bility, n.* निर्दोषता, निष्कलंकता.*-bly, adv.*

**Irrĕsĭs'tible,** *a.* (इरिझि'स्टिबल्)—too strong or convincing or charming to be resisted, resistless. अनिवार्य, दुर्निवार, अप्रतिकार्य, प्रतिबंध करतां न येणारा.

**Irrĕs'olute,** *a.* (इरे'झोल्यूट्)—hesitating; undecided, wavering, wanting in resolution. अस्थिर, चंचलवृत्ति; कच्च्या निश्चयाचा, डळमळीत, कच्चा.*-ness,-tion n.,* चंचलबुद्धि, अनिश्चय.*-ly, adv.*

**Irrĕsŏl'vable,** *a.* (इरिझॉ'ल्व्हबल्)—that cannot be resolved into parts. अविद्राव्य, भाग किंवा अवयव करतां-पाडतां-न येणारा.

**Irrĕspĕc'tive,** *a.* (इरिस्पे'क्टिव्ह्)—*I. of,* without reference to; not taking into account. अनपेक्ष, ॰विषयीं अपेक्षा न ठेवतां; ॰वर दृष्टि न ठेवतां, कडे लक्ष न देतां.*-ly, adv.* निरपेक्षतेनें, अनपेक्षतेनें.

**Irrĕspŏn'sible,** *a.* (इरिस्पॉ'न्सिबल्)—not responsible; acting or done without due sense of responsibility. अनुत्तरदायी, जबाबदार नसलेला; बेजबाबदारपणाचा, अनुत्तरदायित्वाचा.*-bility, n.* बेजबाबदारी, अनुत्तरदायित्व.*-bly, adv,* बेजबाबदारपणानें.

**Irrĕspŏn'sive,** *a.* (इरिस्पॉ'न्सिव्ह्)—not responsive *to.* असंवादी, अप्रतियोगी, ला प्रत्युत्तर न देणारा.

**Irrĕstrain'able,** *a.* (इरिस्ट्रे'नबल्)—that cannot be restrained. अनावर, दुर्निवार.

**Irrĕtĕn'tive,** *a.* (इरिटे'न्टिव्ह्)—not retentive. लक्षांत न राहणारा, धारणाशक्तिहीन, अधारणाक्षम. *-ness, n.*

**Irrĕtriev'able,** *a.* (इरिट्री'व्हबल्)—not retrievable, irrecoverable, irreparable. पुनः न मिळणारा, भरून न येणारा, अपुनःप्राप्य, निरुपाय.*-ability, n., -ably, adv.*

**Irrĕv'erent,** *a.* (इरे'व्हरेन्ट्)—wanting in reverence or respect to superiors. पूज्यबुद्धी नसलेला, अनादरशील. *-rence, n.* अनादर, अवज्ञा, अपूज्यबुद्धी.*-ren'tial, a., -rently, adv.*

**Irrĕvers'ible,** *a.* (इरिव्ह'र्सिबल्)—not capable of being made to turn back; not reversible. मागें परत वळवितां न येणारें; रद्द करतां-फिरवितां-न येणारा, अपरावर्तनीय.*-ibility, n.,-ibly, adv.*

**Irrĕv'ocable,** *a.* (इरे'व्होकबल्)—unalterable; gone beyond recall. बदलतां-रद्द करतां-न येणारा; परत घेण्यास अशक्य, वज्रलेप.*-bility, n.,-bly, adv.*

**I'rrigāte,** *v. t.* (इ'रिगेट)—to supply (land) with water; to water (land) with channels; (Med.) to supply (a wound) with constant flow of liquid; (fig.) to refresh. जमिनीला पाण्याचा पुरवठा करणें, पाणी घालणें, भिजविणें, कालवे किंवा पाट काढून पाणी देणें; जखमेला सतत ओलावा देणें, अभ्युक्षण; ताजें तवानें करणें, जोम आणणें. *I'rrigable,-gative, aa.,-gator, n., -ga'tion, n.* पाट सोडणें, कालवे काढणें, पाटबंधाऱ्यांचें काम, प्रणालिकासिंचन.

**I'rrĭtable,** *a.* (इ'रिटेबल्)-easily annoyed, touchy; (of organ etc.) very sensitive; (of muscles etc.) capable of being excited to vital action by physical stimulus. रागीट, चिडखोर, शीघ्रकोपी; हुळहुळा; क्षोभक्षम, चेतनाक्षम.*-ability, n.,-ably, adv.* चिडखोरपणानें.

**I'rrĭtancy̆,** *n.* (इ'रिटन्सि)-irritation, annoyance; (Law) making, being, null and void. त्रास, संताप, चीड; रद्दबातल करणें.-होणें, निरर्थक करणें.-होणें.

**I'rrĭtant,** *a.* (इ'रिटन्ट्)—causing (physical) irritation. चिडविणारा, खिजविणारा, क्षोभकारक. *n.* क्षोभजनक कारण.-वस्तु.

**I'rrĭtāte,** *v. t.* (इ'रिटेट्)—to excite to anger, to annoy; to inflame, to provoke, to exasperate; to stimulate (an organ etc.) to vital action. चिडविणें, सतावणें; संतप्त करणें, खाजवणें, संतापवणें; उत्तेजित करणें, क्षोभ करणें.*-tion, n., -tive, a.*

**I'rrĭtāte,** *v. t.* (इ'रिटेट्)—(Law) to make null and void. रद्द करणें, रद्दबातल करणें; निरर्थक-व्यर्थ-ठरविणें.

**Irrŭp'tion,** *n.* (इर'प्शन्)—a breaking or bursting in, violent entry; an invasion. फुटून आंत येणें.-पडणें; धाड, दौड.

**Is,** *3rd pers. sing. pres.* of Be (इझ्)—आहे, असतो-ते-तें.

**Isabĕ'lla, I'sabel,** *a. & n.* (इझबे'ला, इ'झबल्)—greyish yellow. पिवळसर करडा (रंग).*-lline, a.*

**Isagŏ'gic,** *a.* (आयसगॉ'जिक्)—introductory. प्रास्ताविक, आरंभींचा. *n. pl.* the study of literary and external history of Bible. बायबलच्या भाषाविषयक व अवांतर इतिहासाचा अभ्यास.

**I'satin,** *n.* (आ'यसटिन्)—(chem.) crystalline reddish substance got from indigo. नीळापासून काढलेलें स्फटिकमय तांबूस द्रव्य.

**Ischĭăt'ĭc,-ăd'ĭc,** *a.* (इस्किॲ'टिक्,-ॲ'डिक्)—of the hip, sciatic. कमरेच्या खवाट्यासंबंधीं. [Gk *iskhias -ados,* pain in the hip]

**I'shmāel,** *n.* (इ'श्मेल्)—an outcast, one at war with society. समाजबहिष्कृत, वाळीत टाकलेला.

**I'singlass**, *n.* ( इ'झिङ्ग्लास् )—a kind of gelatin got from the air-bladders of the sturgeon and other freshwater fish. ( खाण्याच्या उपयोगाचा, स्टर्जन– ) माशापासून काढलेला सरसासारखा चिकट पदार्थ, बलक, शुद्धसरस.

**I'slam**, *n.* ( इ'स्लाम् )—Mohammedanism ; the Mohammedan world. महमदी–मुसलमानी–धर्म ; मुसलमानी धर्माचे लोक.*–ism*, *n.* ;*–itic*, *a.* ; *–ite*, *n.* [ Arab. *islam–salama*, to submit to God ]

**I'sland**, *n.* ( आ'इलन्ड् )—a piece of land surrounded by water ; ( fig. ) anything detached or isolated ; ( *physiol.* ) detached portion of tissue or group of cells. बेट, द्वीप ; अलग–स्वतंत्र–तुटक राहिलेली वस्तु. ( गवताळ प्रदेशांतील झाडाझुडपांचा समुदाय. रहदारीच्या रस्त्यांमधील वर्तुळाकार आश्रयस्थान इ. ); पेशिजालाचा तुटक भाग.–स्वतंत्र भाग, अलग सूक्ष्मपिंडसमुदाय. *v. t.* to make into an island, to isolate. बेटाचा आकार देणें, बेट होऊं देणें, बेट बनविणें, अलग–तुटक–करणें.*–er*, *n.* बेटांत राहणारा, द्वीपस्थ.

**Isle**, *n.* ( आइल् )—an island. बेट.

**Isl'ĕt**, *n.* ( आ'इ–लिट् )—a small island ; an isolated tract or spot. लहान बेट, उपद्वीप, तुटक प्रदेश,–विभाग, अलग स्थान.

**I'sm**, *n.* ( इ'झम् )—any particular doctrine or practice. ( कोणताहि ) विशिष्ट पंथ, मत, मार्ग.*–ism*, a suffix forming abstract nouns. भाववाचक नामें बनविणारा प्रत्यय.

**Isn't**, ( इझन्ट् )—is not. नाहीं ( आहे ).

**Iso–**, *pref.* ( आइसो–,इसो– )—in comb. = equal. सम, तुल्य. [ Gk ]

**I'sobar**, *n.* ( आ'इसोबार्, इ'– )—a line on the map connecting places at which the barometric pressure is the same at a given time or on the average. ( नकाशावरील ) समभार रेषा,–रेखा. *Isobar'ic*, *a.* समभार रेषेचा,–रेषेनें दाखविलेला.

**I'socheim**, *n.* ( आ'इसोकाइम् )—a line on the map connecting places on the earth having the same mean winter temperature. ( नकाशावरील ) समशीतरेषा, समहिमरेखा.*–al*,*–chim'enal*, *aa.* समहिमासंबंधीं.

**Isochromăt'ic**, *a.* ( आइसोक्रमॅ'टिक् )—having the same colour. एकाच रंगाचे, एकरंगी, समवर्णिक.

**Isŏc'hronous**, *a.* ( आइसॉ'क्रनस्, इसॉ'– )—occupying equal time, vibrating uniformly. सारख्याच वेळांत होणारा, समकालावधि ( क ).

**Isocli'nal**, *a.* & *n.* ( आइसक्ला'इनल् )—( a line ) of equal magnetic dip. समचुंबकरेखीय,–रेखा, समपातरेखीय,–रेखा.

**I'socracy̆**, *n.* ( आ'इसॉक्रसि )—polity in which all have equal political power. सर्वांना समान राजकीय हक्क असलेली राज्यव्यवस्था,–घटना. *–crat'ic*, *a.* राजकीय समतेचा.

**Isody̆năm'ic**, *a.* ( आइसोडाइनॅ'मिक् )—indicating equal magnetic force. समशक्तिरेखीय, समचुंबकीयबलदर्शक.

**Isogē'ŏtherm**, *n.* ( आइसोजी'ऑथर्म् )—a line connecting points in the interior of earth having the same mean temperature. समभूतापरेखा.

**I'solāte**, *v. t.* ( आ'इसलेट् )—to place apart or alone, to place in a detached situation ; ( Chem. ) to free ( substance ) from its combinations ; ( Electr. ) to insulate; to subject ( a person etc. ) to quarantine. वेगळा करणें, अलग ठेवणें ; पृथक्‌ करणें ; विद्युत्स्थापन करणें, पृथक्‌न्यास करणें ; ( रोग्याला रोग पसरूं नये म्हणून ) अलग ठेवणें.*–tion*, *n.* ;*–tor*, *n.* पृथक्‌ करणारा, पृथक्करणद्रव्य.

**Isomĕ'rĭc**, *a.* ( आइसोमे'रिक् )—composed of same elements in the same proportions, and having the same molecular weight, but differently grouped. समावयविक.

**Isomĕt'rĭc,–cal**, *a.* ( आइसॉमे'ट्रिक्,–कल् )—of equal measure. समपरिमाणाचा,– परिमाणयुक्त.

**Isomor'phĭsm**, *n.* ( आइसमॉ'र्फिझम् )—property of crystallizing in the same or closely related geometric forms. समाकृतिकत्व. *–phous*, *a.* समाकृतिक.

**I'sopŏd**, *n.* ( आ'इसोपॉड् )—a crustacean with seven pairs of equal and similarly placed legs. समसप्तपदयुगुल कवचजीवी प्राणी, –कर्कजातीय प्राणी.

**Isŏs'celēs**, *a.* ( आइसॉ'सिलीस् )—( of triangle ) having two sides equal. समद्विभुज, दोन सारख्या बाजूंचा ( त्रिकोण ).

**Isoseis'mal**, *a.* & *n.* ( आइसोसा'इझ्मल् )—( a line ) of equal earthquake-shock intensity. समभूकंपरेषेचा,–रेषा.

**I'sŏtherm**, *n.* ( आ'इ–सॉथर्म् )—line of equal mean annual temperature. समोष्णदर्शक रेषा, समोष्णरेखा.*–al*, *a.* समोष्णिक, समोष्णदर्शक.

**I'sraĕl**, *n.* ( इ'झ्रएल् )—the Jewish people ; ( fig. ) God's elect. ज्यू–यहुदी–लोक ; देवाचा लाडका मनुष्य,–भक्त.*–lite*, *n.*,*–litish*, *a.*

**Iss'ūe**, *n.* ( इ'स्यू )—outgoing, outflow ; result, outcome ; children ; a question, a dispute ; copies of journal, &c. issued at one time ;

discharge of blood, etc., an incision for this; an outlet; mouth of a river. बाहेर जाणें किंवा पडणें; निकाल, शेवट, परिणाम; संतति; वादविषय, कायद्याचा मुद्दा, वाद; प्रवाह, पोत; बहिर्मार्ग, मुख, द्वार, नदीचें मुख. *v. i. & t.* to go or come out, to emerge; to be derived, to result; to send forth; to publish, to circulate; (Mil.) to supply (a soldier) with article of equipment. बाहेर जाणें किंवा येणें; उत्पन्न होणें; चालू करणें, व्यवहारांत आणणें; प्रसिद्ध करणें, देवघेवींत आणणें, प्रसृत करणें; (लष्करी शिपायाला) आवश्यक साधनसामग्री पुरविणें. *Without male i.,* पुत्रसंतान-मुलगा-नसलेला. *I. of fact,* एकादी खरी गोष्ट नाकबूल केली जाते तेव्हां उत्पन्न होणारा वादग्रस्त मुद्दा; *I. of Law,* कायद्याच्या लागू-गैरलागूपणाचा मुद्दा. *At i.,* (of persons) मतभेद झालेला; (of things) वादग्रस्त. *To join i.,* वाद करणें.-खेळणें. *I.-less, a.* संतान-मूलबाळ-नसलेला. *Iss'uable, a., Iss'uance, n.*

**Isth'mŭs,** *n.* (इ'स्थ्-मस्)—a narrow neck of land; a narrow connecting part. संयोगभूमि; दोन मोठ्या भागांना-अवयवांना-जोडणारा चिंचोळा भाग. *Isth'mian, a.*

**I'stle,** *n.* (इ'स्ट्लि)—a kind of fibre got from species of agave etc. झाडाच्या सालीचा दोर.-तंतु. [Mex.]

**It,** *pron.* (इट्)—the thing in question, the person in question. तें, तो, ती (इसम, व्यक्ति). [some uses] *Who is it* at the door? *It is I.* दाराशीं कोण आहे? मी आहें. *It rains,* पाऊस पडत आहे. *It is cold,* थंडी पडली आहे. *It is to him that you must go,* तुला त्याच्याचकडे गेलें पाहिजे. *It was the Russians that began it,* रशियनांनींच प्रथम सुरुवात केली. Possessive *its,* त्याचा; Pl. *they,* ते; Obj. *them,* त्यांना; Poss. *their,* त्यांचा.

**Ital'ian,** *a. & n.* (इटॅ'ल्यन्)—(a native, language) of Italy. इटलीचा, इटालिअन, (रहिवासी, -ची भाषा).*-ism, n.,-ize, v. t. & i.*

**Ităl'ic,** *a.* (इटॅ'लिक्)—of ancient Italy. प्राचीन इटली देशचा. *Ital'ics, n. pl. italic type,* sloping type. इटालिक-तिरकस-वर्णमुद्रा,-वर्णाक्षरें.

**Ităl'icize,** *v. t.* (इटॅ'लि-साइझ्)—to print in italics, to write in italics. इटॅलिक टाइपांत छापणें, तिरकस अक्षरांनीं लिहिणें.

**Itch,** *n.* (इच्)—irritation in skin; a disease with itch; a restless desire. खाज, कंडू; खरूज; खवखव, खैरी, खुरखुरी. *v. i.* to feel itch; to crave for; to desire to do. खाज खाणें, कंड सुटणें; खवखव सुटणें; हुळहुळणें. *I.-mite,* खरजेची-कंडाची-कीड. *Scratch where it itches,* कंड खाते तेथें खांजव, खरजेची जागा खांजव. *Itch'iness, n., Itch'y, a.* कंडूसंबंधीं, खरजेचा, कंडूरोगी, खरज्या, कंड सुटलेला.

**I'tĕm,** *n.* (आ'इ-टेम्)—any one separate particular in a list of enumerated things, entry of this; detail of news. कलम, प्रकरण, बाब; त्याची नोंद; थोडासा मजकूर, चार ओळी. *adv.* likewise, also. तसेंच, आणखी, शिवाय, दुसरें. *-ize, v. t.* तपशीलवार सांगणें.

**It'erāte,** *v. t.* (इ'टरेट्)—to repeat, to do a second time; to state repeatedly. पुनः पुनः करणें; अनेकवार सांगणें. *It'erance,-cy, nn., Itera'tion, n.,-ive, a.* पुनः पुनः बोलणारा, -करणारा.

**Itĭn'erant,** *a.* (इटि'नेरन्ट्, आइटि'-)—travelling from place to place, wandering, strolling. फिरस्ता, फिरता, फेरीवाला. *Itin'eracy,-rancy, nn.* प्रवास करणें, फिरतीवर असणें.

**Itĭn'erarў,** *n.* (इटि'नररि, आइटि'-)—a route; a record of travel; a guide-book. मार्ग, रस्ता; प्रवासवर्णन; प्रवासाचा मार्गदर्शक (ग्रंथ, पुस्तक). *a.* of travelling, of roads. प्रवासाचा, फिरतींत केलेला, रस्त्यांचा, मार्गाचा. [L *iter itineris,* journey]

**Itĭn'erāte,** *v. i.* (इटि'नेरेट्)—to be itinerant, esp. preach in circuit, to travel from place to place. गांवोगांव फिरणें, फिरून उपदेश करणें, संचार करणें.*-ation, n.*

**Its,** (इट्स्)—possessive of *It.* त्याचा.

**Itsĕlf,** *pron.* (इट्सें'ल्फ्)—emphatic & reflexive form of *It.* तेंच (स्वतः). *By i.,* स्वयंप्रेरित, स्वतःच. *In i.,* स्वतंत्रपणें तेंच, स्वतः इ.

**I'vorў,** *n.* (आ'इ-व्हरि)—white substance of the tusks of elephants, &c; (sl., *pl.*) dice, billiard ball, piano-keys; teeth. हस्तिदंत, हत्तीचे दांत; हस्तिदंती वस्तु-फांसे, इ.; दांत. *Fossil i.,* अश्मीभूत प्राण्याचे दांत. *Vegetable i., i. nut,* द. अमेरिकेंतील ताडाच्या बींमधील कठीण मगज, अशा मगजाचें फळ. *Black i.,* African negro slaves. आफ्रिकेंतील नीग्रो गुलाम. *I. black,* हस्तिदंत किंवा हाडें जाळून केलेली काळी पूड, काळें अंजन. *a.* made of ivory. हस्तिदंती.

**I'vў,** *n.* (आ'इ-व्हि)—climbing evergreen with shining leaves. एक प्रकारची हिरवीगार लता. *I'vied, a.* (आ'इव्हिड्) आइव्हि लतेनें आच्छादिलेला.

**I'xĭa,** *n.* (आ'इक्सिआ)—a S.-African plant of iris kind with large showy flowers. मोठ्या भपकेदार फुलांचें फुलझाड.

**Ixion's wheel,** *n.* (इक्सा'यन् व्हील्)—(Gk myth.) the wheel on which Ixion was condemned to revolve for ever in Hades. (ग्रीक पुराणांतरीं वर्णिलेलें, इक्सायननें ज्यावर सतत गरगर फिरण्याचें) मृतलोकांतील भ्रमणचक्र.

**I'zard,** *n.* (इ'झर्ड्)—a capriform antelope of Pyrenees. एकजातीचा काळवीट.

**I'zzard,** *n.* (इ'झर्ड्)—(arch.) the letter *z*. शेवटचें-झेड्-अक्षर, वर्ण. *From A to Z.*, एपासून झेड्पर्यंत. [*Zed*]

## J

**J,** (जे)—(Pl. *Js, J's, js, j's*), tenth letter of the English alphabet. इंग्रजी वर्णमालेंतील दहावें अक्षर. J (pen), 'J' अक्षर वर असलेला रुंद टोंकाचा टांक. Abbr. J=Judge; J. P.=Justice of Peace; Jan.=January; Jon.=John; jun.= junior.

**Jā'al-goat,** *n.* (जे'अल्गोट,याल्-)—a wild goat. रानटी बकरा. [Heb.]

**Jăb,** *v. t.* (जॅब्)—to poke roughly; to stab; to thrust abruptly (*into*). जोरानें घालणें, जखम करणें, भोंसकणें; अकस्मात् (आंत) घालणें,घुसडविणें. *n.* an abrupt blow; (Mil.) supplementary bayonet thrust. अकस्मात् दिलेला तडाखा-सपाटा, संगिनीनें जादा भोंसकणें.

**Jăbb'er,** *v. i. & t.* (जॅ'बर्)—to talk rapidly and indistinctly; to chatter volubly. बडबडणें; अगडतगड बोलणें, जावडणें, वटवट करणें, चिरचिर लावणें. *n.* chatter, gabble. वटवट, वचवच, बड-बड, चिरचिर.

**Jăb'iru,** *n.* (जॅ'बिरू)—a tropical American bird of the stork family. करकोंच्यासारखा अमेरिकेंतील पक्षी.

**Jabōt',** *n.* (झॅबो')—an ornamental frill on bodice, or (Hist.) on man's shirt-front. स्त्रियांच्या पोलक्यावरील शोभेची झालर, (पूर्वीं) पुरुषाच्या अंगरख्यावरील दर्शनी झालर.

**Jă'cana,** *n.* (जॅ'काना)—a small tropical wading bird with large straight claws. एक जातीचा (तरंगत्या पानांवरून चालूं शकणारा) पक्षी.

**Ja'cĭnth,** *n.* (जे'सिन्थ्, जॅ'-)—a reddish-orange gem, a variety of zircon. 'सुगंधी' नांवाचा मौल्यवान दगड.

**Jăck,** *n.* (जॅक्)—a familiar nickname or substitute for *John*, as type of the common people; a jack tar; a labourer: the knave in cards; machines for turning spits, lifting heavy weights, etc.; (also, *carriage jack*) a machine for lifting axle off ground; a fish, the pike; a ship's flag, esp. one flown from a *jack-staff* at the bow, indicating nationality; (also *black-jar*) a leather vessel for liquor; figure of man which strikes bell on the outside of a clock; a small ball aimed at in bowls; (arch.) foot-soldier's sleeveless tunic; (U. S.) money; the male of certain animals. 'जॉन्'बद्दल टोपण नांव, 'रामा'प्रमाणें सामान्य व्यक्तिवाचक नांव; खलाशाचें नांव, खलाशी; मजूर, 'रामा' गडी; (पत्त्यांतील) गुलाम; कालथा, उलथणें, जड वजन-ओझें-उचलण्याची यांत्रिक योजना,-यारी; (चाक दुरुस्त करतांना) गाडीचा कणा (जमिनीपासून वर) उचलण्याचें साधन,-यंत्र; गोड्या पाण्यांतील मोठा खादाड मासा; (राष्ट्रत्वसूचक) निशाण, बावटा; दारूचें चामड्याचें भांडें; मोठ्या घड्याळाच्या बाहेरच्या बाजूला ठोके वाजविणारें मनुष्याकृति-बाहुलें; 'बोलस' खेळांतील नेमाचा-निशाणाचा-चेंडू; पायदळ. सैनिकांचें बिनहाताचें कुडतें,-बिनबाह्यांचा डगला; पैका, पैसा, द्रव्य, नाणें; (कांहीं जनावरांतील नर. *v. t.* to hoist with a jack. 'जॅक' यंत्रानें वर उचलणें. *To j. up*, to abandon, to give up. (मध्येंच) सोडून देणें, सोडणें, टाकणें. *Everyman j.*, every individual. प्रत्येक (सामान्य) व्यक्ति, इसम. *J. boot*, large boot coming above the knee. गुडघ्यापर्यंतचा मोठा बूट. *J.-in-office*, a fussy official. धांदल्या-गडबड्या-अधिकारी. *J.-in the-box*, a toy figure that springs out of box when opened, a kind of fire-work. (पेटी उघडतांच बाहेर उडी घेणारें) पेटींतील बाहुलें, खेळणें, एक प्रकारचें दारूकाम. *J.-in-the-green*, a man or boy in framework covered with leaves in May-day sports. मेच्या एक तारखेला होणाऱ्या उत्सवांतील (पानांनीं झांकलेल्या चौकटींत ठेवलेला) मनुष्य किंवा मुलगा. *J. Johnson*, जर्मन सुरुंग. *J. Ketch*, a common hangman. फांशीं देणारा मांग. *J. knife*, large pocket clasp-knife. खिशांतील मोठा मिटणारा चाकू. *J. of all trades* (and master of none), 'एक' ना धड, (भाराभर चिंध्या)' *J.-o'-lantern*, will-o'-the-wasp. भुताची कोलीत, पिशाच्चदीपिका, मोह, भूल. *J. pudding*, a buffoon. हंडीबाग, विदूषक, मस्कऱ्या. *J.-towel*, endless towel hung from a roller. रुळावर अडकविलेला टावेल, फडकें.

**Jăck,** *n.* (जॅक्)—East-Indian fruit; the tree. फणस, पनस; फणसाचें झाड.

**Jăck'al,** *n.* (जॅ'काल्)—a wild animal of the dog kind supposed to hunt up lion's prey for him; a drudge for another. कोल्हा, जंबूक, शृगाल; दुसऱ्याच्या फायद्याकरितां कष्ट करणारा, कष्टाळू, कोल्हा. *v. t.* to act as a jackal *for*. (करितां) कष्ट करणें. [Pers. *shagal*, Sk. shrigal]

Jăck'anāpes, *n.* (जॅ'कनेप्स्)—a monkey; a pert fellow or child; a coxcomb. वानर, माकड, केलडें; आडदांड इसम, उद्धट पोर; अक्कडबाज–नटवा–मनुष्य.

Jăck'ass, *n.* (जॅ'क्-अस्)—a male ass; blockhead. गर्दभ, गाढव; ठोंब्या, गधडा, मठ्ठ मनुष्य. *J. copal*, झांझीबारची कच्ची राळ,-चंद्रुस. *J.-deer*, आफ्रिकेंतील काळवीट. *J.-fish*, आस्ट्रेलियांतील उंची खाण्याचा मासा.

Jăck'daw, *n.* (जॅ'क्डॉ)—a small species of crow. डोमकावळा.

Jăck'ĕt, *n.* (जॅ'किट्)—a short-sleeved outer garment extending to the hips; an outer covering round boiler etc.; animal's coat; skin of a potato; outside wrapper of a book. लहानसा कोट, कुडतें, डगलें; आवरण, आच्छादन; जनावराची केंसाळ चामडी; बटाट्याची साल; पुस्तकाचें बाह्य वेष्टन. *v. t.* to cover with jacket. आवरण घालणें, डगलें घालणें, वेष्टनानें झांकणें. *To dust one's j.*, to beat one. (ला) मार देणें, चोप देणें, लोळविणें.

Jā'cob, *n.* (जे'कब्)—*J.'s ladder*, a flowering plant with leaves suggesting a ladder; (Naut.) a rope-ladder with wooden rungs. (शिडीप्रमाणें रचना असलेल्या पानांचें) फुलझाड; (आगबोटीवरील) लांकडी पावठण्यांची दोरीची उंच शिडी. *J.'s staff*, surveyor's rod; an instrument for measuring distances and heights. मोजणीदाराची (मोजण्याची) लोखंडी काठी; अंतर आणि उंची मोजण्याचें यंत्र.

Jăcobē'an, *a.* (जॅकबी'अन्)—of the reign of James I; of St James the Less. पहिल्या जेम्स्च्या कारकीर्दीचा; सेंटजेम्स द लेस्चा.

Jăc'obĭn, *n.* (जॅ'कबिन्)—a Dominican friar; one of a society of revolutionists in France; an extreme radical; a kind of pigeon with reversed feathers on the back of neck. डॉमिनिकन पंथाचा महंत; फ्रान्समधील क्रांतिकारक मंडळाचा सभासद; कट्टर सुधारणावादी, क्रांतिकारक; एक कबुतर.*-ic,-ical, aa.,-ism, n.*

Jăc'obīte, *n.* (जॅ'कबाइट्)—an adherent of the exiled Stuarts. दुसऱ्या जेम्स राजाच्या व वंशजांच्या पक्षाकडील मनुष्य. *-bit'ical, a., -bitism, n.*

Jăc'onĕt, *n.* (जॅ'कोनिट्)—a thin cotton fabric. जगन्नाथी कापड, सुती पातळ कापड. [Hind. *Jaganathi*]

Jăctitā'tion, *n.* (जॅक्टिटे'शन्)—*J. of marriage*, (Law) offence of falsely claiming to be a person's wife or husband; (Med.) restless tossing of the body in illness; twitching of a limb or muscle. पति-पत्नीत्वाचा खोटा हक्क सांगणें; (आजारीपणांत) शरीराची तळमळ, अस्वस्थता; वाताच्या झटक्यानें आखडणें. [L *jactitare*, toss, boast]

Jāde, *n.* (जेड्)—a poor or worn-out horse; a low playful woman or girl. शक्तिहीन किंवा दमलेला घोडा, घोडकें; छिनाल स्त्री, छिचोर-उनाड-पोरगी. *Ja'ded, a.* tired out. थकलेला, भागलेला, श्रांत.

Jāde, *n.* (जेड्)—a dark green stone used for ornamental purposes. मर्गझ (मौल्यवान दगड).

Jā'deite, Jā'dite, *n.* (जे'डाइट्)—silicate of sodium and aluminium. सोडिअम व अॅल्यूमिनिअमचा बनलेला ' मर्गझ 'सारखा दिसणारा दगड.

Jae'ger, *n.* (ये'गर्)—kinds of woollen clothing material. एक जातीचें लोंकरी कापड [*J.*, *inventor*]

Jăg, *n.* (जॅग्)—a sharp projection. खांड, कातरा, दांता. *v. t.* दांते-कातरे-पाडणें. *Jagg'ed, a.* दांताळ, खडबडीत, *-ly, adv.,-ness, n.*; *Jagg'y, a.*

Jăg, *n.* (जॅग्)—(U. S.) a small load. लहान ओझें. *To have a j. on*, to be drunk. दारू पिऊन झिंगणें.

Jăgg'erÿ, *n.* (जॅ'गरि)—raw palm-sugar made in India, crude sugar. गूळ, कच्ची साखर.

Jăg'uar, *n.* (जॅ'ग्वार्,-ग्यूआर्)—a large American carnivorous spotted quadruped of the cat kind. (अमेरि.) चित्ता, चित्रव्या वाघ.

Jah, *n.* (जा)—Jehovah. (हिब्रू लोकांचा) परमेश्वर, परमात्मा, जेहोवा.

Jail, *n.* (जेल्)—a prison, a place of confinement. तुरुंग. See Gaol.

Jai'ler, *n.* (जे'लर्)—keeper of a jail. तुरुंगावरचा अधिकारी.

Jain, *a. & n.* (जइन्)—(the follower) of a non-Brahmanical East Indian sect with doctrines like those of Buddhism. जैनधर्माचा-धर्मी (मनुष्य).*-ism, n.* जैनधर्म. [Sk. *jina, ji*, to conquer]

Jăl'ap, *n.* (जॅ'लप्)—a purgative drug or medicine. एक प्रकारची कडक जुलाबाची औषधी जुळी.

Ja'lousie, *n.* (झॅ'लझी)—a blind, a shutter, with slats sloped upwards from outside. (बाहेरच्या बाजूनें वर कललेल्या ढापण्यांचें-पट्ट्यांचें-खिडकीचें) झांकण, झडप. [F]

Jăm, *v. t. & i.* (जॅम्)—to squeeze; to cause to get wedged; to block (a passage); (Wireless) to

make (a message) unintelligible by operating elsewhere. पिळून काढणें; चेंगरणें, चिरडणें; रस्ता अडवणें, गर्दी करून मार्ग बंद करणें; (बिनतारी) संदेश नीटपणें ऐकूं न येईसा करणें. *n.* squeeze; stoppage; conserve of boiled fruit and sugar. पिळणें, चेंगराचेंगर; थांबविणें, बंद करणें; मुरंबा. *Real j.*, (*sl.*) a real treat. खरी मेजवानी.

**Jămb**, *n.* (जॅम्)—a side post or side of doorway, window, or fireplace or other opening in a wall. दाराच्या, खिडकीच्या किंवा चुलीच्या बाजूचा खांब, दारकस, बाही.

**Jămboree'**, *n.* (जॅम्बोरी')—merry-making, celebration. मौज, मजा, समारंभ, मेळावा, उत्सव.

**Jŭng'le**, *n. & v. i. & t.* (जँगल्)—a discordant sound, a harsh noise, a wrangle. कर्कश आवाज, कटकट, खटखट, खिसखीस, भांडण (करणें).

**Jăn'itor**, *n.* (जॅनिटर्)—a doorkeeper, a caretaker of a building. द्वारपाळ, द्वाररक्षक, देवडीवाला, पहारेकरी; इमारतीची निगा राखणारा, व्यवस्थापक.

**Jăn'ŭarў**, *n.* (जॅन्युअरि)—(abbr. *Jan.*), the first month of the English year. इंग्रजी वर्षाचा पहिला महिना. [L = of Janus, the sun-god]

**Jăp**, *a. & n.* (जॅप्)—(colloq.) Japanese. जपानचा, जपानी.

**Japăn'**, *n.* (जपॅन्)—(J.) the insular empire on the east of Asia; a hard varnish, a work in Japanese style. जपान राष्ट्र; जपानी रोगण; जपानी पद्धतीचें काम. *v. t.* to varnish, lacquer, with japan; to make black and glossy. जपानी रोगण लावणें; जपानी रोगण लावून काळा तुकतुकीत करणें. *Japanned,'* जपानी रोगण लावलेला. [Chin *Jih*, sun, *pun*, origin, rise]

**Jăpanēse'**, *a.* (जॅपनीझ्)—of Japan. जपानचा, जपानी. *n.* जपानी मनुष्य, जपानचा रहिवासी, जपानी भाषा.

**Jāpe**, *v. i. & n.* (जेप्)—jest. थट्टा (करणें).

**Japŏn'ĭca**, *n.* (जपॉनिका)—kinds of plant from Japan. जपानी फळझाड,-वनस्पति.

**Jär**, *v. i. & t.* (जार्)—to make a harsh discordant sound; to grate; to wrangle, to dispute; to disagree (*with*); to cause to jar; to vibrate, resound, discordantly; to send shock through (nerves). कर्कश शब्द-आवाज-काढणें,-करणें; करकरणें; घासाघीस घालणें, भांडणें; (शीं) मतभेद होणें; करकर शब्द करविणें; बदसूर कंप किंवा प्रतिध्वनि होणें; धक्का देणें. *n.* a harsh sound, shock, or thrill; a quarrel; want of harmony. करकर आवाज, धपका, शिसारी; भांडण; बदसूरपणा. *Jarr'ingly*, *adv.*

**Jär**, *n.* (जार्)—kinds of round cylindrical earthenware, stoneware, or glass vessel with or without handles. रुंद तोंडाचें उभट भांडें, घडा, घट. *Jar'ful*, *a.* घडाभर, हांडाभर. [Arab. *jarrah*]

**Jär**, *n.* (जार्)—(colloq.) *on the j, on (a) j.*, ajar. किंचित्-थोडेंसें-उघडें (दार).

**Jardiniere**, *n.* (झार्डिन्येअर्)—an ornamental pot or stand for display of growing flowers. वाढणारीं फुलें ठेवण्याचें शोभेचें भांडें, पुष्पपात्र, फुलदाणी. [F]

**Järg'on**, *n.* (जार्गन्)—debased or unintelligible language; gibberish; twittering of birds. हेंगाडी बोली; धेडगुजरी भाषा, खिचडी; पक्ष्यांची चिवचिव,-चा किलबिलाट.-*ize*, *v. t. & i.*

**Järg'on, Järgo͞on'**, *n.* (जार्गन्,-गून्)—a variety of zircon found in Ceylon. एक जातीचा सिलोनमधील मौल्यवान दगड.

**Järgonĕlle'**, *n.* (जार्गने'ल्)—a kind of pear that ripens early. लवकर पिकणारें 'पीअर' फळ.

**Järv'ey**, *n.* (जार्व्हे)—a hackney coach-man; driver of Irish car. गाडीवान; आयरिश गाडी हांकणारा.

**Jăs'mĭn(e)**, *n.* (जॅस्मिन्)—a shrub with beautiful white or yellow flowers. जाई, जातिपुष्प. Also, *Jess'amin(e).* [Pers. *yasmin*]

**Jăs'per**, *n.* (जास्पर्)—a red, yellow, or brown opaque quartz admitting of an elegant polish. सूर्यकान्त मणि, याशेफ, राहु (-चा खडा), गोमेद.

**Jaun'dĭce**, *n.* (जॉन्डिस्, जा-)—morbid state due to obstruction of bile; disordered (esp. mental) vision. कावीळ, कामला; कावीळ, मत्सरी दृष्टि. *v. t.* to affect with jaundice. कावीळ होणें, मात्सर्यानें भरणें, विकारवश करणें. *Jaun'diced*, *pa. p.* कावीळ झालेला, विकारवश, मत्सरग्रस्त.

**Jaunt**, *n. & v. i.* (जॉन्ट्, जा-)—a pleasure excursion. सहल, सफर (करणें). *Jaunting-car*, a light two-wheeled Irish vehicle. आयरिश दुचाकी हलकी गाडी, छकडा.

**Jaun'tў**, *a.* (जॉन्टि, जा-)—airy, showy, sprightly. दिमाखी, अकडबाज, नटवा, रंगेल. *n.* (naut.) the head of ship's police. गलबतावरील शिपायांचा मुख्य,-प्रमुख,-अधिकारी.-*tily*, *adv.*, -*tiness*, *n.*

**Jäv'an**, *a. & n.* (जाव्हन्)—(a native) of Java. जावा बेटाचा (रहिवासी).-*ese'*, *n.* मध्य जावांतील लोकांची भाषा.

**Jăv'elin**, *n.* (जॅव्ह्-लिन्)—a light spear, a dart. भाला, बरची.

**Jaw**, *n.* (जॉ)—a bone containing the teeth; (*pl.*) mouth; (*pl.*) narrow mouth of a valley, channel etc.; seizing members of a machine; (*colloq.*) a talk, lecture. जबडा, जाभाड; (अने०) तोंड, दाढ; (खिंडीचें, खाडीचें) अरुंद तोंड,-मुख; यंत्रांतील पकडणारा भाग,-पकड; वटवट, बडबड, व्याख्यान. *v. i. & t.* चऱ्हाट वळविणें; व्याख्यान देणें,-ऐकविणें. *J. bone*, जबड्याचें हाड. *J.-breaker*, (colloq.) उच्चारण्याला कठीण शब्द.

**Jay**, *n.* (जे)—a noisy bird of brilliant plumage; its genus; (fig.) a silly chatterer. नीलकण्ठ, मैना, चास; यांची जात; वटवट करणारा, बडबड्या, साधाभोळा. *J. walker*, रहदारीच्या नियमांकडे दुर्लक्ष करून रस्त्यांतून चालणारा निष्काळजी पादचारी,-भटक्या.

**Jăzz**, *n.* (जॅझ्)—syncopated music and dancing, of U. S. negro origin; noisy proceedings. (नीग्रो लोकांचें) नाचगाणें, नाचतमाशा; तमाशा, गोंधळ. *v. i.* 'जॅझ्' नाचगाणें करणें,-खेळणें. *a.* (sl.) discordant, rude. बेसूर, बिनमेळाचा, ग्राम्य. *J. up*, (U. S.) चेतविणें, जोम-उत्साह-आणणें.

**Jea'lous**, *a.* (जे'लस्)—anxiously fearful or careful, watchfully tenacious; suspicious or resentful of rivalry in the affections; envious *of*; (bibl., of god) intolerant of unfaithfulness. काळजीपूर्वक पाहाणारा, अभिमानी, फारच जपणारा; प्रेमसंशयी; हेवा करणारा, मत्सरी; पापी लोकांविषयीं निष्ठुर (देव).*-ly, adv.*

**Jea'lousy̆**, *n.* (जे'लसि)—apprehension of another's superiority to ourselves, suspicious fear. परोत्कर्ष-द्वेष, मत्सर, हेवा.

**Jean**, *n.* (जेन्)—a twilled cotton cloth; (pl.) a garment of jean, (sl.) trousers. जीनचें सुती कापड; जीनचा कपडा,-वस्त्र; तुमान.

**Jeer**, *v. i. & t.* (जीअर्)—to scoff derisively (*at*), to deride. थट्टा करणें, उपहास-टवाळी-करणें, टर उडविणें. *n.* a gibe, a taunt. टर, थट्टा, उपहास, टोमणा.

**Jeer**, *n.* (जीअर्)—(naut., pl.) tackle for raising and lowering lower yards. खालच्या परमानाच्या काठ्या वर-खालीं करण्याचीं दोरखंडें.

**Jeho̅'vah**, *n.* (जिहो'वा)—Hebrew name of God, Scripture name of Supreme Being. परमेश्वराचें हिब्रू नांव, सनातन व स्वयंभू परमेश्वर.

**Je'hu̅**, *n.* (जी'ह्यू)—(facet.) a (furious) driver. भयंकर वेगानें गाडी हांकणारा, गाडीवान.

**Jejune'**, *a.* (जिजू'न्)—poor, scanty; (of land) barren; void of interest. फुसका, तुटपुंजा, अल्प; नापीक, भुकाड (जमीन); नीरस, रुक्ष, मनाला न आवडणारा.*-ly, adv.,-ness, n.*

**Je̅'kyll & Hy̅de**, *n.* (जे'किल् ॲन्ड् हाइड्)—a single person with alternating two personalities. दोन व्यक्तिमत्त्वाच्या आलटपालटाची एक व्यक्ति, दोन रूपांची-स्वभावांची-एकच व्यक्ति. [*Dr. J. & Mr. H.* by Stevenson]

**Jĕll'y̆**, *n.* (जे'लि)—a soft semi-transparent food made with gelatin; fruit-juice boiled with sugar. मांसरसपक्वान्न; फळांचा मुरंबा, फलरस-पक्वान्न. *v. t. & i.* to congeal. गोठविणें, गोठणें, थिजविणें, थिजणें. *J.-fish*, a jelly-like marine animal, medusa or sea-nettle. मऊ व चिकट घटाकार श्लेष्ममय जलचर (प्राणी), समुद्रफेण,-फेंस. *J.- graph*, a copying apparatus using sheet of jelly in a tray. 'जेलि' वापरून अनेक प्रति काढण्याचें यंत्र.

**Jĕmm'y̆**, *n.* (जे'मि)—burglar's crow-bar; sheep's head as food. (घरफोड्या चोराची) वांकड्या टोंकाची पहार, कटवणी; मेंढीचें मुंडकें,-डोकें (खाण्याच्या उपयोगी).

**Jĕnn'ĕt**, *n.* (जे'निट्)—a small Spanish horse. स्पेन देशांतील लहान जातीचा घोडा.

**Jĕnn'y̆**, *n.* (जे'नि)—a locomotive crane; *a spinning jenny*. फिरती यारी; कापूस पिंजण्याचें यंत्र, जिन.

**Jeo'pardize**, *v. t.* (जे'पर्डाइझ्)—to endanger. संकटांत घालणें, धोक्यांत घालणें.

**Jeo'pardy̆**, *n.* (जे'पर्डि)—a danger. जोखीम, धोका, संकट.

**Jerbo̅'a**, *n.* (जर्बो'आ)—a small jumping rodent of African deserts with long hind legs. आफ्रिकेंतील एक लहान प्राणी, उड्या मारणारा उंदीर.

**Jĕremi'ad**, *n.* (जेरिमा'यूअड्)—a doleful complaint, wailing. दुःखाची-कर्माची-कहाणी, विलाप, दुःख. [L *Jeremiah*, the prophet, author of 'Lamentations']

**Jĕ'rĭcho**, *n.* (जे'रिको)—a town in Palestine. पॅलेस्टाइनमधील गांव. *To go to J.*, to go to the devil. नाश पावणें, निघून जाणें.

**Jerk**, *n.* (जर्क्)—a sharp sudden pull; spasmodic twitch of muscle; a jerking throw. हिसका, हिसडा; आचका, आळेपिळे, हातवारे, हावभाव; झटकून फेंकणें. *v. t. & i.* to move with a jerk; to throw with suddenly arrested motion, to give a start. हिसकत जाणें, हिसका देणें; हिसका देऊन फेकणें.*-y, a.,-ily, adv.,-iness, n.*

**Jerk**, *v. t.* (जर्क्)—to cure (esp. beef) by drying in sun. मांस वाळवून ठेवणें.

**Jerk'in**, *n.* (ज'र्किन)—a jacket, usu. of leather. (चामड्याचा) लहान कोट, कुडतें.

**Jĕ'rrȳ**, *n.* (जे'रि)—*J.-builder*, *J.-building*, a builder, building, of flimsy houses with bad material. वाईट सामानसुमान वापरून तकलुफी कच्चीं घरें बांधणारा,-बांधणें. *J.-built*, जुनें वाईट सामान वापरून बांधलेलें. *J.*, *J.-shop*, माडीचें छपर,-दुकान. *J.*, a chamber pot. लघ्वी करण्याचें भांडें. *J.*, (army sl.) जर्मन शिपाई,-लोक.

**Jers'eȳ**, *n.* (ज'र्झि)—a close woollen tunic or undervest. लोकरीचा अंगाबरोबर बसणारा गंजी-फ्राक,-रें कुडतें. स्त्रियांचें विणलेलें आंगांतलें. [From the island *Jersey*]

**Jĕss**, *n.* (जेस्)—a short strap of leather, silk etc. round each leg of a hawk used in falconry. (शिकारीकरितां) बहिरी ससाण्याच्या प्रत्येक पाया-भोंवतीं बांधण्याचा लहान पट्टा. *v. t.* ससाण्याच्या पायांवर पट्टे बांधणें.

**Jĕss'amïne**, *n.* (जे'स-मिन्)—jasmine. जुई.

**Jĕst**, *n.* (जेस्ट्)—taunt, jeer; joke; fun; object of derision. टोमणा; थट्टा; गंमत; हास्यविषय. *v. i.* to joke, to make jests. थट्टा करणें, टर उडविणें, गंमत करणें. *In j.*, सहजगत्या, थट्टेनें. *A standing j.*, नेहमींचा हास्यविषय, थट्टेचा विषय. *J.-book*, विनोदी गोष्टींचें पुस्तक, विनोदकथासंग्रह. *Jes'tingly*, *adv.*

**Jĕs'ter**, *n.* (जे'स्टर्)—(esp.) a professional joker (of a court, &c.). खुषमस्कऱ्या, विदूषक.

**Jĕs'ūit**, *n.* (जे'झ्यूइट्)—a member of Society of Jesus, Roman Catholic order founded by Ignatius Loyola; a crafty person. जेझ्यूइट पंथीय मनुष्य; कावेबाज-लुच्चा-फसव्या मनुष्य.-*ical*, *a.* जे. पंथाचा, लुच्चा, कावेबाज.-*ically*, *adv.*, -*icism*, *n.* जे. संप्रदाय,-मतें, लुच्चेपणा.

**Jĕt**, *n.* & *a.* (जेट्)—hard black lignite taking brilliant polish; colour of this; (also *jet-black*) deep glossy black. डांबरासारखा कृत्रिम काळा दगड. कार (दगड); तुकतुकीत काळा रंग,-काळ्या रंगाचा, काळा कुळकुळीत. [Gk. *gagates-Gagae*, town and river in Asia Minor]

**Jĕt**, *n.* (जेट्)—a stream or shoot of water, steam, &c.; a spout or nozzle for emitting jet. फंवारा, कारंजें, चिळकांडी; फवाऱ्याची नळी, तोटी. *v. t.* & *i.* धार-फंवारा-सोडणें, धारेसारखें-फंवाऱ्यासारखें-उडणें. [L *jacto*, to throw]

**Jĕt'sam**, *n.* (जे'ट्सम्)—goods thrown overboard from a ship to lighten it and washed ashore. (वजन कमी करण्यासाठीं) गलबतावरून पाण्यांत फेंकलेला माल, मालाची वाहणी, किनाऱ्याला लागलेला असा माल,-अशी वाहणी.

**Jĕtt'ïson**, *n.* & *v. t.* (जे'टिसन्)—throwing out of goods from a ship in distress. (वादळांत सांप-डलेल्या) गलबतावरून माल समुद्रांत फेंकणें, मालाची वाहणी करणें.

**Jĕtt'on**, *n.* (जे'टन्)—a counter with stamped or engraved device. खेळांतील, छाप असलेली किंवा कोरीव रचनेची, धातूची चकती.

**Jĕtt'ȳ**, *a.* (जे'टि)—black as jet. काळामोर, काळाकभिन्न. *n.* mole, landing-pier. समुद्राच्या लाटांचा जोर कमी करण्याकरितां बांधलेला धक्का, धक्का, बंदर.

**Jeu de mots**, (झर् ड मो)—pun. श्लेष, शब्दावर-शाब्दिक-कोटी. *Jeu d'esprit'*, (झर्डेस्प्री') a humorous trifle. अल्प-क्षुद्र-विनोद, क्षुल्लक शाब्दिक कोटी. [F]

**Jew**, *n.* (जू)—a persan of Hebrew race; (*fig.*) unscrupulous usurer. इस्राएल, ज्यू, यहुदी; बेसुमार व्याजानें पैसे देणारा सावकार, चिक्कू मारवाडी, चिकट सौदाखोर. *v. t.* to cheat. फस-विणें, ठकविणें. *Unbelieving J.*, an incredulous person. अविश्वासू-विश्वास धरतां येत नाहीं असा-मनुष्य. *Tell that to the Jews*, बनवाबनवी (ची गोष्ट) काढूं नका. *J.'s ear*, an edible fungus. खाण्याजोगे पेल्याच्या आकाराचें अळंबें,-भूछत्र. *J.'s harp*, (मोर) चंग, मुखवाद्य. *J.-ess* *n. f.*, *Jew'ish*, *a.* यहुदी (चालीचा).

**Jew'ĕl**, *n.* (जू'इल्)—a precious stone; an ornament with jewels; a precious thing, a highly prized person. रत्न; रत्नखचित अलंकार, -भूषण, -दागिना; बहुमूल्य वस्तू, नररत्न, जीव, काळिजा. *v.t.* to adorn, to furnish, with jewels; to fit (a watch) with jewels. अलंकार घालणें, रत्नभूषित करणें; (घड्याळांत) रत्नें-मणि-बसविणें. *J.-house*, (राजघराण्याचा) जवाहीरखाना, रत्न-शाळा. *Jew'elly*, *a.* रत्नजडित, मणिमय.

**Jew'ĕller**, *n.* (जू'इलर्)—a dealer in jewels. जवाहिऱ्या, जवाहिराचा व्यापारी, जव्हेरी, मणिकार.

**Jew'ĕlrȳ**, **Jew'ĕllerȳ**, *n.* (जू'इलि,-इलरि)—the goods made by a jeweller, jewels in general. जवाहिराचा धंदा, जवाहीर, जडावाचे दागिने, रत्नें, जडजवाहीर.

**Jew'ïng**, *n.* (जू'इंग्)—wattles at the base of beak in some pigeons. पाळींव कबुतरांच्या चोंचीच्या मुळाशीं असलेले कल्ले.

**Jew'rȳ**, *n.* (जू'अरि)—the Jews; Jews' quarter in a town. ज्यू लोक, ज्यू-यहुदी-मोहल्ला.

**Jĕz'ĕbel**, *n.* (जे'झिबल्)—a shameless woman. निलाजरी-निर्लज्ज-स्त्री, बाई.

**Jib**, *n.* (जिब्)—the foremost sail of a ship, triangular stay-sail ; projecting arm of crane. एक त्रिकोणाकृति शीड, पोगी ; यारीचा हात,-ची पोगी. *v. t. & i.* to shift a boom sail to other side, to swing round ; (of horse) to refuse to go on, (fig.) to refuse to proceed in some action. पोगी दुसऱ्या बाजूला खेचणें,-वळविणें. (शीड) फिरणें ; (घोडा) चालतांना अडणें, अडखळणें. (कामांत) खंड पडणें. *Cut of his jib*, his personal appearance. त्याची चेहरेपट्टी,-चा रुबाब, बाह्य देखावा, दिसणें. *J.-boom*, spar from the end of bow-sprit. (गलबताच्या) नाळ-दांड्याच्या टोकापासूनची डोलकाठी. *J. at*, to show repugnance to. तिटकारा दाखविणें. *Jibb'er*, *n.* अडेलतट्टू.

**Jib door**, *n.* (जिब् डोअर्)—door level with the wall usu. painted so as to be indistinguishable. (भिंतीशीं एकाच पातळींत बसविलेला व न उमगणार) चोर-दरवाजा.

**Jibe**, *v. i. & t. & n.* (जाइब्)—See *Gibe*. 2. *v. i.* to agree. एकमत असणें, जुळणें.

**Jiff'(y)**, *n.* (जि'फ्,-फि)—a short time, moment. पळ, क्षण, थोडा वेळ.

**Jig**, *n.* (जिग्)—a lively dance; music for it. एक प्रकारचा मौजेचा नाच ; त्या नाचासाठीं जलद् वाजविलेली गत. *v. i. & t.* to dance jig ; to move quickly up and down ; to separate coarser and finer portions of (ore) by shaking it under water in a box with a perforated bottom. (जलद् गतीचा-पावलांचा-) नाच नाचणें,-खेळणें ; झपाझप फेऱ्या घालणें ; (अशुद्ध धातु) पाण्यांत घालून चाळणींतून चाळणें. *J.-saw*, (U. S.) a machine fret-saw. लांकडी जाळीची नकशी कापण्याची यांत्रिक करवत. *J.-saw puzzle*, जाळीच्या नक्षी कामाच्या करवतीनें वांकडें तिकडें कापलेलें व फळीवर चिकटविलेलें चित्र,-चित्राचें कोडें.

**Jigg'er**, *n.* (जि'गर्)—(naut.) a small tackle ; a small sail ; (sl.) rest for cue ; one who jigs ore ; a kind of flea burrowing into skin. जोड आणि एकेरी कप्पीवरील लहान दोरखंड ; लहान शीड ; बिल्यर्ड्स् खेळांतील खेळण्याच्या दांड्याचा आधार,-टेकू ; अशुद्ध धातु चाळणारा ; एक जातीची पूस,-पुशी. *J.-mast*, चारकाठी गलबताची सर्वांत पाठीमागची डोलकाठी. *v. t. I'm jiggered*, (pass.) (शपथ घेतांना योजितात).

**Jigg'le**, *v. t.* (जि'गल्)—to rock or jerk lightly. हळूहळू-लहान-हेलकावा देणें,-हिसका देणें.

**Jihad'**, **Jehad'**, *n.* (जिहा'द्)—religious war of Mohammedans against unbelievers ; (fig.) a crusade. मुसलमानांचें नास्तिकांविरुद्ध धर्मयुद्ध ; मोहीम, स्वारी. [Arab.]

**Jill**, *n.* (जिल्)-See *Gill*. मुलगी, पोरगी (-चें नांव).

**Jilt**, *n.* (जिल्ट्)—a woman who capriciously discards the lover ; a man who treats woman thus. लबाड फशीं पाडणारी स्त्री, प्रतारिका ; फसव्या पुरुष. *v. t.* to discard a lover capriciously, to trick in love. प्रेमवंचना करणें, फशीं पाडणें, प्रतारणा करणें.

**Jim Crow**, *n.* (जिम् क्रो)—(U. S.) a negro ; an implement for straightening iron bars or rails. नीग्रो मनुष्य ; लोखंडी दांडे किंवा रूळ सरळ करण्याचें यंत्र. *J.-C. car*, फक्त नीग्रो लोकांसाठीं आगगाडीचा डबा.

**Jimp**, *a.* (जिम्प्)—(Sc.) slender, graceful ; scanty. नाजूक, बारीक, सुंदर ; अल्प.

**Jing'le**, *n.* (जिं'गल्)—mixed noise ; repetition of same sound in words ; a covered two-wheeled car. रुणझुण, वणवणाट, झंकार ; (अनु-) प्रास ; दुचाकी गाडी. *v. i. & t.* to make or cause to make a jingle ; be full of alliteration. खुळखुळणें, वणवणणें, रुणझुण आवाज करणें ; अनु-प्रास-यमकादि-युक्त असणें.

**Jing'o**, *n.* (जिं'ङ्गो)—*by j.*, *by the living j.!* a form of asseveration ; a bellicose or blustering patriot. शपथ! गळ्याच्यान्! प्राणाच्यान्! युद्धप्रिय, किंवा आपलेंच वर्चस्व गाजवूं पाहणारा, मुत्सद्दी. *a.* vulgurly dashing. आडदांड. *J.-ism*, *-ist*, *nn.*, *-istic*, *a.*

**Jinks**, *n.* (जिंक्स्)—*high j.*, merry-making, धांगडधिंगा, मजा, खेळ.

**Jinrick'sha**, **-rik'isha**, *n.* (जिन्रि'क्शा,-रि'किशा)—a light two-wheeled car drawn by man or men. (माणसानें किंवा माणसांनीं ओढण्याची) दुचाकी हलकी गाडी, नरवाहन, माणूसगाडी. [Jap. *jin*, man, *riki*, power, *sha*, vehicle]

**Jiu-Jitsu**, *See* Ju-jutsu.

**Job**, *n.* (जॉब्)—a piece of work ; an unscrupulous transaction ; anything one has to do. किरकोळ काम, नोकरी-धंदा ; तत्त्वरहित लबाडीचा व्यवहार, संधिसाधू धंदा; काम, कर्तव्य कर्म. *v.t. & i.* to do jobs ; to hire, let out for a time or job ; buy and sell as a broker ; to turn position of trust to private advantage ; to handle corruptly. किरकोळ कामें पत्करणें, आडकाम करणें ; उक्त्या भाड्यानें घेणें,-देणें ; दलाली करणें, दलाली घेऊन खरेदी-विक्री करणें ; सार्वजनिक कामांत स्वहित साधणें,-आपली तुंबडी भरणें ; सदोष व्यवहार करणें. *On the j.*, (sl.) alert. सावध, कामांत गुंतलेला. *To do person's j.*, to ruin him. त्याचा नाश

करणें, त्याला वाटेला लावणें. *Bad j.*, फुकट मेहनत, व्यर्थ श्रम. *Good j.*, *bad j.*, बरी-वाईट परिस्थिति. *J. lot*, lot of goods bought as speculation. सट्ट्यानें घेतलेला माल. *J. master*, one who lets out horses and carriages for hire. घोडे आणि गाड्या भाड्यानें देणारा. *Jobb'er*, *n.* उक्तें काम करणारा, मुकादम, दलाल, स्वार्थसाधु अधिकारी. *Jobb'ery*, *n.* corrupt dealing. लुच्चेगिरी, लबाडीचा व्यवहार.

**Jŏb**, *v. t. & i.* (जॉब्)–to prod, to stab slightly; to hurt (a horse) with bit; to thrust at (a thing). (अचानक) भोंसकून किंचित् प्रहार करणें,-भोंसकणें; लगामीनें (घोड्याला) दुखापत करणें,-होणें; (वस्तु) चांचपटणें, भोंसकणें. *n.* a prod; a jerk at bit. शस्त्रानें भोसकणें; लगामीचा झटका.

**Jŏb**, *n.* (जॉब्)—a patriarch. प्राचीन यहुदी लोकांचा एक मूळ पुरुष. *It would try the patience of J.*, it is vexatious. तें त्रासदायक आहे, मी मी म्हणणाऱ्याची रग जिरविणारें आहे. *J.'s comforter*, सांत्वन करण्याच्या निमित्तानें दुःखांत भर घालणारा,-दुःख वाढविणारा,-मनुष्य. *J.'s tears*, seeds of a grass used as beads. मणी म्हणून वापरलें जाणारें गवताचें बीं.

**Jobā'tion**, *n.* (जोबे'शन्)–(lengthy) reprimand. (लांबलचक) कानउघाडणी.

**Jŏbb'ernowl**, *n.* (जॉ'बर्नोल्)—a stupid head or person. वेडसर डोकें, मूर्ख मनुष्य.

**Jŏck**, *n.* (जॉक्)—(sl.) a Highland soldier. स्कॉटिश सैनिक. [=Jack]

**Jŏck'eў**, *n.* (जॉ'कि)—a rider in horse-races; a lad under-strapper. शर्यतींतील घोडेस्वार, पोऱ्या, दुय्यम व्यक्ति. *v. t. & i.* to cheat, to trick. फसवणें, ठकविणें; फसणें.

**Jŏck'ō**, *n.* (जॉ'को)—a chimpanzee. एक जातीचा वानर.

**Jŏcōse'**, **Jŏc'ūlar**, *aa.* (जॉको'स्, जॉ'क्युलर्)—waggish, humorous, sportive; given to jokes and jesting. विनोदी; थट्टेखोर, गंमतीबाज. *Jocose'ly*, *adv.*,*-se'ness*, *n.*,*-'sity*, *n.*,*-cula'rity*, *n.* थट्टेखोरी, विनोदीपणा.*-cularly*, *adv.* विनोदानें, थट्टेबाजपणानें.

**Jŏc'und**, *n.* (जॉ'कन्ड्)—merry, sprightly. आनंदी, उल्हासी.*-ity*, *n.* आनंदीपणा, उल्हासी वृत्ति, हौशी स्वभाव.*-ly*, *adv.*

**Joe**, *n.* (जो)—*not for J.!*, not for me! (slang refusal). छट्!, छे! *Joe Mill'er*, *n.* a stale joke or anecdote. शिळा विनोद, शिळी गप्प.

**Jō'ey**, *n.* (जो'इ)—(Austral.) a young kangaroo; a young animal. कांगारूचें पिलूं; पाडस, जनावराचें वासरूं.

**Jŏg**, *v. t. & i.* (जॉग्)—to push; to nudge; to stimulate (memory); to walk or trot at a slow pace. हालविणें; डवचून खुणवणें; (स्मरणशक्ति) उत्तेजित करणें; रडत कुथत-रखडत-पायीं चालणें, सावकाश जाणें, कष्टानें चालणें. *n.* a push, a jerk; a slow walk or trot; (U. S.) irregularity of a line or surface. धक्का, डंवचणी, हिसका; हळूहळू-दुडकी-चाल; रेषेचा किंवा पृष्ठभागाचा अनियमितपणा,-वक्रता. *J. trot*, a slow regular trot. आस्ते कदम दुडकी चाल.

**Jŏg'gle**, *v. t. & i.* (जॉ'गल्)—to move to and fro in jerks, to give a sudden but slight push *to*; to shake. हिसके खात जाणें, हळूच धक्का देणें,-मारणें; कांपणें, हालणें. *n.* हळूच धक्का, हिसका.

**Jŏg'gle**, *n.* (जॉ'गल्)—a joint of two pieces of stone or timber, to prevent their sliding on one another; a key or notch for this purpose. (दोन दगडांचा-लांकडांचा, एकमेकांवर घसरूं नये म्हणून) सांधा; चावी, खांच. *v. t.* सांधणें, खांचेनें जोडणें.

**John**, *n.* (जॉन्)—a masculine Christian name. ख्रिस्ती मनुष्याचें 'जॉन्' नांव (पुल्लिंगी). *J. Barleycorn*, malt liquor. इंग्रजी सातूची दारू. *J. company*, (nickname of) the East-Indian Company. ईस्ट इंडिआ कंपनी,-चें टोपण नांव. *J. Dory*, an edible sea-fish. खाण्यालायक खारा मासा, समुद्रांतील मासा.

**Jŏhn Bull**, *n.* (जॉन्बुल्)—nickname for the English people or a typical Englishman. इंग्रजांचें टोपण नांव, इंग्रज लोक,-राष्ट्र, (इंग्रजी राष्ट्रविशिष्टगुणदर्शक) इंग्रज मनुष्य.*-ism*, *n.*

**Jŏhnn'ў**, *n.* (जॉ'नि)—(colloq.) a fashionable idler, a fellow. शिष्ट, उडाणटप्पू, व्यक्ति, अदमी. *J. Armstrong*, (naut.) hand-power. हाताची-मनगटाची-शक्ति. *J. Raw*, a novice. नवशिका, शिकाऊ. *J.-cake*, cake of (U. S.) maize-meal or (Austral.) wheat-meal. मक्याच्या किंवा गव्हाच्या पिठाची पोळी,-भाकरी.

**Johnsō'nĭan**, *a.* (जॉन्सो'निअन्)—of, like, Samuel Johnson, abounding in Latin-derived words. सॅम्युअल् जॉन्सनची,-सारखी, लॅटिन भाषेतून उत्पन्न झालेल्या शब्दांनीं युक्त (भाषाशैली).*-sonese'*, *n.*

**Join**, *v. t. & i.* (जॉइन्)—to put together, to fasten, to unite; to connect (two points) by a straight line; to unite or be united (in marriage, friendship, &c.); to take part with others; to come together, be united; to become a member of; to come into connexion with. जोडणें, सांधणें, एकत्र बांधणें, संयोग करणें; (दोन बिंदू) रेषेनें जोडणें;

विवाहसंबंध जोडणें,-जडणें, संबंध ठेवणें,-राखणें, सामील होणें, जाऊन मिळणें, दाखल होणें ; एकत्र येणें,-मिळणें, संयोग होणें; सभासद होणें : संगम होणें, मिळणें. *n.* a point, line, plane, of junction. संयोग-संगम-बिंदु,-रेषा,-स्थान किंवा पातळी. *To j. battle,* to begin fighting. लढाईला सुरुवात-प्रारंभ-करणें. *To j. hands,* (स्वतःचे) हात जोडणें, (एकमेकांच्या) हातांत हात घालणें, (अलं०) (एकाद्या कामांत किंवा धाडसांत) भाग घेणें. *To j. up,* सैन्यांत नांव नोंदविणें. [L *jungere junct,* join]

**Joi'nder,** *n.* (जॉइंन्डर्)—(esp. law) joining, union. जोडणी, जोडणूक, मिळणें, मिलाफ, एकी.

**Join'er,** *n.* (जॉइंनर्)—one who or that which joins; maker of furniture and light woodwork. जोडणारा-रें, सांधणारें; जोडकाम करणारा, सुतार, सांधकाम्या, सांधल्या.-*y, n.* जोडकाम, जड-सांध-काम.

**Joint,** *a.* (जॉइन्ट्)—joined, combined; shared by two or more in common. जोडलेला, संलग्न, एकत्र केलेला; समाईक, जुटीचा, संघाचा, संयुक्त, पातीचा, भागीदार. *n.* point at which two things join; structure by which two bones fit together; part of the stem from which leaf or branch grows; (Geol.) fissure in a mass of rock; leg, loin, of a carcass as used for food; (U. S., sl.) an illicit opium-den, a drinking saloon. सांधा, जोड, संधिस्थान; शरीरांतील हाडांचा सांधा, कांडें, पेर, ग्रंथी; झाडाच्या खोडाचा (पान किंवा फांदी फुटते तेथील) सांधा, स्कंध; खडकांतील चीर, भेद, संधि; (जनावराच्या शरीराचा) सांध्यानें जोडलेला (तंगडी इ.) भाग; चोरटा अफूचा अड्डा, दारूदुकान, गुत्ता. *v. t.* to unite by joints, to fit together; to fill up joints of (wall etc.); to divide at a joint or into joints; to prepare (board etc.) for being joined to another. सांध्यांनीं जोडणें, सांधणें, सांधून बसविणें; (भिंतींवरील चिरा-भेगा) चुन्यानें सांधणें,-भरून काढणें; सांधा सोडवणें,-उसकटणें, सांधे सुटे सुटे करणें; (फळीची बाजू रांधून) सांधण्याला-जोडण्याला लायक अशी करणें. *J. capital,* समाईक भांडवल. *J. owners,* संयुक्त-समाईक-मालक. *During their j. lives,* while they are all alive. ते सर्व जिवंत-हयात-असतां. *J. stock company,* समाईक भांडवलाची मंडळी. *Out of j.,* (of bone) dislocated, (fig.) out of order. संधिभ्रष्ट, निखळलेलें (हाड); न चालणारें, अव्यवस्थित, गोंधळाचें. *J.-less, a.* बिनसंधी, अखंड, एकसंधी. *J.-ly, adv.* जुटीनें, समाईकपणें, भागीदारीनें, पातीनें.

**Joint'er,** *n.* (जाइंटर्)—one who or that which joints; a plane for jointing; mason's tool for pointing; a workman employed in jointing (electric wire). जोडणारा, सांधणारा: मोठा रंधा, दुर्जे; गवंड्याची-दुर्जाची-भिंतींतील भेगा इ. भरण्याची) थापी; (विजेच्या तारा) जोडणारा कामगार.

**Join'tress,** *n.* (जॉइंट्रिस्)—a widow holding jointure or property settled on her. (नवऱ्याच्या पश्चात्) स्त्रीधन मिळालेली विधवा.

**Join'ture,** *n.* (जॉइंन्चर्)—an estate settled on wife to be enjoyed by her after her husband's death. विधवेच्या उदरनिर्वाहाकरितां ठेवलेली मिळकत, विधवास्त्रीधन. *v. t.* (आपल्या पश्चात्) स्त्रीच्या उदरनिर्वाहाची सोय करून ठेवणें.

**Joist,** *n.* (जाइस्ट्)—any of the parallel timbers stretched from wall to wall to support ceiling laths or floor boards. वरगा, घरोद, कडोद.-*ed, a.* वरगे घातलेला, कडीपाट केलेला.

**Jōke,** *n.* (जोक्)—a thing said or done to excite laughter, a jest, witticism; a ridiculous circumstance. थट्टा, मस्करी; गमतीची थट्टा, खुबीदार विनोद; हास्यास्पद प्रसंग,-गोष्ट. *v. i. & t.* to make merry with, to make jokes; to banter. थट्टा करणें; मजा-गंमत-करणें; उपहास करणें. *Practical j.,* दुसऱ्याच्या अंगशीं येणारी थट्टा,-मस्करी, दुसऱ्याची फजिती करणारी थट्टा. *It is no j.,* it is a serious matter. हा थट्टेचा विषय नाहीं, ही गंभीर गोष्ट आहे. *Jo'ky, a.; Jo'kingly, adv.* थट्टेनें, गंमतीनें, मस्करीनें.

**Jō'ker,** *n.* (जोकर्)—one who jokes; (sl.) a chap, a fellow; (Cards) odd (blank) card in some games, counting as (highest) trump. थट्टेबाज मनुष्य, विनोदी, मस्कऱ्या; इसम, वल्ली, व्यक्ति; (पत्त्याच्या जोडांतील) विदूषक (जादा पान).

**Jo'kul, Jōkull,** *n.* (योकुल्, यकुल्)—snow-mountain in Iceland. आइसलंडमधील बर्फाचा पर्वत, हिमगिरी. [Icel. *jaki,* piece of ice, *jo-,* icicle, glacier]

**Jŏll'ify,** *v. i. & t.* (जॉलिफाय्)—to make merry, tipple; to make jolly. मजा करणें; दारू पिणें, झिंगणें; आनंदी-उल्हसित-रंगेल करणें.-*fica'tion, n.*

**Jŏll'itў,** *n.* (जॉलिटि)—merrymaking. आनंद, उत्सव.

**Jŏll'ў,** *a.* (जॉलि)—joyful; festive, jovial, merry, gay, mirthful. आनंदी; उल्हासी, रंगेल. *n.* (Nav. sl.) a royal marine. लढाऊ गलबतावरील सैनिक. *adv.* very. फारच, अतिशय. *v. t.* (U. S.) थट्टेनें-खुषमस्करीनें-बोलणें, खुषामत करणें. *J. along,* मधुर-विनोदी-भाषण करणें, खुषामत करणें. *J.-boat, J.,* गलबताचा पगार, छबिना. *Joll'ily, adv.*

**Jōlt,** *v. t. & i.* (जोल्ट्)—to jerk (from a seat, &c.), (of vehicle) to move along with jerks खालीं वर असे धक्के बसणें, हिसके बसणें: (गाडी,

वाहन ) हिसके खात जाणें, खडखडत जाणें. *n.* such a jerk. धक्का, हिसका, गचका. *Jo'lty, a.*

**Jōlt'erhead,** *n.* ( जो'ल्टर्हेड् )—a clumsy head ; a stupid person. मठ्ठ डोकें ; ठोंबा, दोणपा, दगड.

**Jō'nah,** *n.* ( जो'ना )—a person who brings ill luck. अपशकुनी मनुष्य.

**Jŏn'athan,** *n.* ( जॉ'नथन् )-( *Brother* ) *J.*, personified people, or a typical citizen, of U. S. अमे. संयुक्त संस्थानांतील लोकांचा प्रतिनिधि, नमुनेदार अमे. रहिवासी.

**Jonq'uĭl,** *n.* ( जॉ'क्विल्, ज'- )—species of narcissus, a rush-leaved daffodil ; pale yellow. एक वनस्पति, लव्हाळी-पानांचें ( नागदवण्यासारखें ) फूलझाड ; फिकट पिंवळा रंग.

**Jŏr'dan,** *n.* ( जॉ'र्डन् )—a chamber pot. लघवीचें भांडें, मूत्रपात्र.

**Jor'um,** *n.* ( जॉ'अरम् )—a large drinking-bowl ; its contents, punch. पिण्याचें मोठें भांडें ; त्यांतील पेय ( मद्य ).

**Jō'seph,** *n.* ( जो'झफ् )—a chaste man ; woman's long cloak. शुद्धाचरणी-पवित्र-मनुष्य ; ( घोडेस्वार ) स्त्रीचा लांब झगा.

**Jŏsh,** *v. t.* ( जॉश् )—( U. S ) to make fun of, to jest. थट्टा करणें, मस्करी करणें.*-er, n.* a joker. थट्टेबाज मनुष्य, नकल्या.

**Jŏs'kĭn,** *n.* ( जॉ'स्किन् )—( sl. ) a rustic, a dolt. गांवढळ, वेडपा.

**Jŏss,** *n.* ( जॉस् )—a Chinese idol. चिनी ( देवाची ) मूर्ति. *J.-house,* चिनी देऊळ. *J. stick,* अगरबत्ति, उदबत्ति.

**Jŏss'er,** *n.* ( जॉ'सर् )—( sl. ) a fool ; a fellow. वेडा, मूर्ख ; इसम, व्यक्ति.

**Jŏ'stle,** *v. i. & t.* ( जॉ'सल् )—to push or knock against, to elbow; to struggle with. धक्काबुक्की करणें, गर्दी करून रेटणें, रेटारेटी करणें; झगडणें, धडपड करणें. *n.* दाटी, खेटाखेट, चेंगराचेंगर.

**Jŏt,** *n.* ( जॉट् )—a small amount, whit. लेश, अंश, अणुरेणु, तिळमात्र. *v. t.* to write briefly, to set down in writing. टांचून ठेवणें, टांचण-टिपण -करणें.

**Joule,** *n.* ( जूल् )—( Electr. ) a unit of work or energy. ( विद्युत्- ) कार्याचें किंवा शक्तीचें एक.

**Jounce,** *v. t. & i.* ( जाउन्स् )-to bump, to bounce, to jolt. जोरानें आदळणें, आपटणें, टक्कर होणें, आपटून उडणें, उशी घेणें, हिसका देणें,-बसणें.

**Journ'al,** *n.* ( ज'र्नल् )—a *diary, a daily record* of events, etc. ; ( in book-keeping by double entry ) a book containing an account of each day's transactions ; (Naut.) a log-book ; a daily newspaper or other periodical ; (Parl., *pl.* ) the record of daily proceedings ; the part of a shaft or axle that rests on bearings. रोजनिशी, दिनचर्या, दैनंदिनी ; रोजकीर्द, पक्का खर्डा ; खलाशांनीं ठेवलेली रोजची नोंद ; दैनिक वर्तमानपत्र, नियतकालिक ; रोजच्या कामाचें दप्तर ; ( पेटींत ) फिरणारा यंत्राचा भाग. *J.-box,* a box enclosing journal and bearings. फिरणाऱ्या यंत्रविभागाची पेटी. *Journ'alism, n.* वर्तमानपत्राचा धंदा, पत्रकाराचें काम. *Journalese', n.* ; *Journ'alize, v. t. & i.* ( book-keeping ) to enter in a journal, to record in, keep, private journal. रोजकीर्दीत लिहिणें, रोजनिशींत-दैनंदिनींत-लिहिणें, रोजनिशी ठेवणें.

**Journ'alist,** *n.* ( ज'र्नलिस्ट् )—a writer for public journal, a newspaper editor. वर्तमानपत्रलेखक, ( वर्तमान ) पत्रकार.*-ic, a.* वृत्तपत्रीय, पत्रकाराचा.

**Journ'ey,** *n.* ( ज'र्नि )—travel ; going to a place usu. by land. प्रवास ; मार्गक्रमण, देशपर्यटन. *v. i.* to travel, to pass from place to place. प्रवास करणें, फिरणें, पर्यटन करणें, मुशाफरी करणें. *A day's, 5 days', j.,* एक दिवसाचा, पांच दिवसांचा, प्रवास *J.-man,* a qualified mechanic or artisan ; ( fig. ) a mere hireling. पुरा शिकलेला कारागीर ; केवळ भाडोत्री रोजंदार, इसम. *J.-man* ( *Clock* ), secondary clock in an observatory. वेधशाळेंतील दुय्यम घड्याळ. *J.-work,* रोजावरचें काम, रोजपगारी काम. [F *jornee,* a day, day's work or journey ]

**Joust,** *n.* ( जूस्ट् )-a combat with lances between two mounted knights. दोन घोडेस्वारांचें लटकें द्वंद्वयुद्ध, भालाईत शिलेदारांचें क्रीडायुद्ध. *v. i.* to engage in a joust. घोड्यावर बसून लटकी लढाई खेळणें.

**Jōve,** *n.* ( जोव्ह् )—Jupiter. बृहस्पति, गुरु, प्राचीन रोमन लोकांचा मुख्य देव. *By j.,* अरे बापरे ! देवाच्यान् !

**Jō'vĭal,** *a.* ( जो'व्हिअल् )—merry, convivial. आनंदी, गंमती. *Jovial'ity, n.* ( जोव्हिॲ'लिटि ) रंगेलपणा, आनंदीपणा. *Jo'vially, adv.* रंगेलपणानें.

**Jō'vĭan,** *a.* ( जो'व्हिअन् )—of, like, Jove ; of the planet Jupiter. रोमन मुख्य देवतेचा, जोव्हचा,-सारखा ; गुरु ग्रहाचा.

**Jowl,** *n.* ( जाउल् )—jaw, jawbone ; cheek, *external prominent throat or neck,* dewlap of cattle, crop of a bird ; head and shoulders of salmon and other fish. उंच ( बाह्य ) घसा, उंच मान, जनावरांचें ( मानेखालचें ) पोळें, पक्ष्याच्या

गळ्यांतील अन्नाशयाची पिशवी, चुनाळ; (सामन इ.) माशांचें डोकें,-पुढचा भाग.

**Joy**, *n.* (जॉय्)—gladness, pleasure; thing that causes joy. आनंद, हर्ष, उल्हास, सुख, संतोष, प्रमोद; आनंदाचा हेतु, हर्षाचें कारण. *v. i. & t.* to rejoice, to delight, to gladden. आनंद वाटणें, हर्षभरित होणें,-करणें. *J.-bells*, आनंदोत्सवाच्या (वेळीं वाजविलेल्या) घंटा. *J.-ride*, (sl.) stolen or other pleasure-ride in a motor etc. चोरटी सहल,-सफर, चोरून मारून फुकटांत मजा मारण्याकरितां फेरफटका. *J.-stick*, (sl.) control lever of an aeroplane. विमानाचा गतिनियामक दांडा. *J.-ful, a., J.-fulness, n., J.-fully, adv., J.-less, a., J.-lessly, adv., J.-lessness, n.*

**Joy'ous**, *a.* (जॉयस्)—glad, gay, joyful. आनंदी, उल्हासी.*-ly, adv.,-ness, n.*

**Ju'bilant**, *a.* (जूबिलन्ट्)—exultant. हर्षपूर्ण, जयघोष करणारा, आनंदानें उड्या मारणारा,-नाचणारा. *-ly, adv.*

**Ju'bilāte**, *v. i.* (जू'बिलेट्)—to exult, to shout for joy. हर्षभरित होणें, आनंदानें-हर्षानें-ओरडणें,-नाचणें. *n.* (जूबिला'टि, यू—) the hundredth psalm in Anglican service; an outburst of triumph. (बायबलमधील) शंभरावें गीत; जयघोष. *Ju'bilance, n.* [L=shout ye (its first word)]

**Jubilā'tion**, *n.* (जूबिले'शन्)—exultation; demonstrations of joy. अत्यानंद; जयघोष, जयजयकार.

**Ju'bilee**, *n.* (जू'बिली)—(Jewish Hist.) year of emancipation and restoration, kept every 50 years; (R. C. Ch.) year of remission from penal consequences of sin; fiftieth anniversary; public rejoicing. (यहुदी लोकांमधील) दासमोचनाचें-गुलाम वगैरे सोडून देण्याचें-पन्नासावें वर्ष (त्या वर्षाच्या आरंभीं शिंगें फुंकीत); पापमुक्तिवर्ष, पापमोचनाब्द; पन्नासावा वाढदिवस, अर्धशतसांवत्सरिक उत्सव, शतकार्धोत्सव; सार्वजनिक सण, महोत्सव. *Silver j.*, 25th anniversary. रौप्य महोत्सव, रजतमहोत्सव. *Golden j.*, 50th anniversary, सुवर्णमहोत्सव. *Diamond j.*, 60th anniversary. हीरकमहोत्सव. [F *jubile*, L *jubilaeus*, Heb. *yobel*, ram's horn trumpet]

**Judā'ic**, *a.* (जूडेइक्)—Jewish. यहूद्यांचा, ज्यू लोकांचा, यहुदी.

**Ju'dāize**, *v. t. & i.* (जू'डेइझ्)—to follow Jewish customs or rites; to make Jewish. यहुदी धर्म पाळणें,-धर्माचारांप्रमाणें वागणें; यहुदी करणें,-धर्माची दीक्षा देणें.*-ism, n.* यहुदी (लोकांचा) धर्म.*-ist, n.* यहुदीधर्मानुयायी.

**Ju'das**, *n.* (जूडास्)—(*J-*) a disciple who betrayed Christ, an infamous traitor; a peep-hole in a door. ख्रिस्ताचा विश्वासघात करणारा शिष्य, दुष्ट घरभेद्या, विश्वास-घातकी मनुष्य; दरवाज्यांतील (डोकावून बघण्याची) फट. *J.-colour(ed)*, (of beard etc.) red. तांबूस रंग,-रंगाची. *J.-tree*, पानें येण्यापूर्वी शेंदरी फुलें येणारें झाड.

**Judge**, *n.* (जज्)—an officer appointed to try causes in court of justice; (of God) supreme arbiter; one appointed to decide dispute or contest; a person who is qualified to decide on merits of a thing or person; (Heb. Hist.) a magistrate having civil and military powers; (pl., abbr. *Judg.*) the seventh book of the Old Testament. न्यायाधीश, मुनसफ, जज्ज; सर्वश्रेष्ठ न्यायाधीश-न्याय करणारा-(परमेश्वर); खटला तोडणारा, निवाडा करणारा, लवाद; पारखी, तज्ज्ञ, परीक्षक, मर्मज्ञ; (मुलकी व लष्करी सत्ता असलेला) यहुदी न्यायाधीश; (बायबलच्या) जुन्या करारांतील न्यायाधिशाचें-सातवें-पुस्तक. *v. t. & i.* to pass sentence upon; to try a case or cause; to decide questions; to award; to estimate, to form an opinion about; to censure; to conclude, to consider, to suppose; to act as a judge; to form a judgement (*of*). शिक्षा फर्मावणें; खटला किंवा फिर्याद चालविणें; निवाडा करणें; निर्णय देणें; विचार करून ठरविणें; मत बनविणें; टीका करणें, दोष देणें; निर्णय देणें, वाटणें, मानणें; लवाद-पंच-न्यायाधीश म्हणून काम करणें,-होणें; (विषयीं) निश्चित मत-निकाल-बनविणें. *J.-made law*, principles based on judges' decisions. न्यायाधिशांच्या निवाड्यांवरून निघणारीं कायद्याचीं तत्त्वें. *J. Advocate General*, लष्करी कोर्टांतील मुख्य दिवाणी अधिकारी.

**Judgemat'ic (al)**, *aa.* (जज्मॅ'टिक्,-कल्)—(colloq.) judicious, discerning. न्यायी, विचारी, सूक्ष्मदर्शी. *-ically, adv.*

**Judge'ment, Judg'ment**, *n.* (ज'ज्मन्ट्)—sentence of court of justice, &c.; misfortune as sign of divine displeasure; opinion, estimate; sagacity. कोर्टाचा निकाल, निवाडा; ईश्वरी कोप, अस्मानी; मत, निर्णय, निकाल, न्याय; चातुर्य, हुशारी, शहाणपण. *The last j.*, (by God at the end of the world) जगाच्या शेवटचा ईश्वरी न्याय. *In my J.*, माझ्या मतें,-मतानें. *J.-day*, जगाच्या (पापपुण्याच्या) ईश्वरी न्यायाचा शेवटचा दिवस. *J. debt*, (कोर्टाच्या) निवाड्यांत ठरविलेलें कर्ज. *J. creditor*, (कोर्टाच्या) निवाड्यांत ठरविलेला धनको. *J. debtor*, निवाड्यांत ठरविलेला ऋणको, कर्जदार. *J. summons*, कोर्ट-निवाड्यांत ठरलेलें कर्ज न दिल्याबद्दल कोर्टाचें बोलावणें. *J.-seat*, न्यायाधिशाची बसण्याची जागा, न्यायासन, न्यायमंदिर, न्यायसभा, कोर्ट.

**Ju'dicāture,** *n.* (जू'डिकेचर्)—administration of justice; court of justice; judge's (term of) office; body of judges. न्यायदान, न्यायपद्धति; न्यायालय, न्यायमंदीर; न्यायाधिशाची कचेरी, -कारकीर्द; न्यायाधिकारीमंडळ.

**Judĭ'cial,** *a.* (जूडि'शल्)—of or by a court of law; of or proper to a judge; impartial; critical; inflicted as a divine judgement. कोर्टासंबंधीं; न्यायाधीशाचा, न्यायाधीशाला योग्य; निःपक्षपातीपणाचा; सयुक्तिक, कांटेकोर, सूक्ष्मदर्शी; दैवी, देवाघरच्या न्यायाचा. *J. murder*, a legal but unjust death sentence. कायदेशीर परंतु अयोग्य मृत्यूची-फांशीची-शिक्षा. *A j. assembly*, न्यायाधिकारयुक्त सभा, न्यायाधिशी अधिकार असलेली सभा.-*cially, adv.*

**Judĭ'ciarў,** *n.* (जूडि'शरि)—the judges of a State collectively. राज्यांतील न्यायकर्ते, न्यायाधिकारीमंडळ.

**Judĭ'cious,** *a.* (जूडि'शस्)—sensible, possessing sound judgement, prudent; skilful. समजदार, विवेकी, चिकित्सक, शहाणा; चतुर, कुशल.-*ly, adv.,-ness, n.*

**Jŭg,** *n.* (जग्)—a deep vessel for liquids with handle, a drinking vessel, a mug, a pitcher; (sl., also *stone-j.*) a prison. चंबू, खुजा, तुंब, सुरई; तुरुंग, कैदखाना. *v. t.* to stew, boil, (hare) in a jug or jar; (sl.) to imprison. सुरईत शिजविणें; तुरुंगांत घालणें-टाकणें.

**Jŭg,** *v. t.* (जग्)—to utter the sound *jug.* (पक्ष्याचें) 'जग्' 'जग्' असें आवाज करणें. *J., J.-J., nn.* [imit.]

**Ju'gate,** *a.* (जू'गट्)—(Bot.) having leaflets in pairs. जोड-पानी तुऱ्यांचा, द्विपर्णी.

**Jugg'ernaut,** *n.* (ज'गर्नॉट्)—(Hind. Myth.) Krishna, his idol at Puri, annually dragged in a procession; (fig. also *J. car*) an institution, a notion, to which persons blindly sacrifice. कृष्ण, जगन्नाथ पुरीच्या देवळांतील रथांतून वार्षिक मिरविली जाणारी कृष्णमूर्ति; अंधश्रद्धेनें (स्वतःला किंवा इतरांना) सर्वस्वानें वाहून घेतलेली संस्था,-कल्पना. [Skr. *jagat*, world, *natha*, lord]

**Jŭ'ggĭns,** *n.* (ज'गिन्झ्)—(sl.) a simpleton. साधाभोळा, वेडपा, गांवढळ.

**Jŭg'gle,** *v. i. & t.* (ज'गल्)—to play conjuring tricks; to trick, to cheat. हातचलाखी करणें, गौडबंगाल करणें; फसवणें, ठकविणें. *n.* a trick, fraud. ठकवण, फसवणूक, हातचलाखी, गौडबंगाल. *To j. with*, (एकाद्याला) फसविणें, (वस्तुस्थितीचा) विपर्यास करणें.

**Jŭgg'ler,** *n.* (ज'ग्-लर्)—conjurer; cheat. गारुडी; फसवणारा, तोतया, ढोंगी.

**Jŭgg'lerў,** *n.* (ज'ग्लरि)—sleight-of-hand. गारुड, हातचलाखी, इंद्रजाल, नजरबंदी; ठकवण, फसवणूक.

**Jŭg'ūlar,** *a.* (ज'ग्यूलर्)—of the neck or throat; (of fish) having the ventral fins in front of the pectoral. गळ्याचा, घशाचा,-संबंधीं; छातीवरील आच्छादनाच्या पुढें पोटाखालचे पंख असलेला (मासा). *J. veins*, मन्या, कंठस्थ शिरा, 'नीला'.

**Jŭg'ūlate,** *v. t.* (ज'ग्यूलेट्)—to kill, (fig.) to arrest the course of (a disease etc.) by powerful remedy etc. ठार मारणें, कडक उपायानें गति कुंठित करणें.

**Juice,** *n.* (जूस्)—the sap or liquid part of vegetables or fruit; fluid part of animal body or substance; (fig.) essence, spirit; (sl.) petrol or electricity used in an engine. रस, द्रव, ओलावा; मवाही रस,-द्रव,-निर्यास; सार, जोम; (इंजिनांत-यंत्रांत) वापरलेलें फवेल किंवा वीज. *The jj.*, the bodily humours. शरीरांतील दोष,-धातु,-रस. *Gastric j.*, जाठररस. *J.-less, a.*

**Jui'cў,** *a.* (जू'सि)—full of juice; (of weather) wet; (colloq.) of rich intellectual quality; (Art) of rich colouring suggestive of moisture. रसाळ, रसभरित; आर्द्र, ओलसर, दमट (हवा); बौद्धिक चमक दाखविणारें; ओलावा सुचविणाऱ्या गर्द रंगाचें.-*ciness, n.*

**Ju'-ju,** *n.* (जू'जू)—(W.-Afr.) charm or fetish; ban effected by juju. जादू, टोणा, जारण-मारणसाधन; या साधनांनीं उत्पन्न केलेला अडथळा,-प्रतिबंध.

**Ju'jube,** *n.* (जू'जुब्)—a kernel-fruit; Chinese dry-fruit; lozenge of gelatin etc. बोर, वांढीबोर; उन्नाब; खाऊची चाकी, वडी, चकती.

**Jujutsu', Jiu-jitsu',** *n.* (जूजुत्स्')—Japanese art of wrestling, &c. जपानी कुस्तीची वगैरे कला, जपानी कुस्ती.

**Jul'ep,** *n.* (जू'लिप्)—sweet drink, esp. as vehicle for medicine; a medicated drink as a stimulant; (U. S.) iced or spiced spirit and water. अवलेह, चाटण; सरबतासारखें (उत्तेजक) पेय; लज्जतदार दारू. [Arab. *julab*, pers. *gulab*, rose-water]

**Ju'lĭan,** *a.* (जू'लिअन्)-of Julius Caesar. जूलिअस् सीझरचा. *J. calendar*, (introduced by Julius Caesar and used from 46 B. C. till 1752 A.D.) जूलिअन शक,-पंचांग.

**Julў',** *n.* (जूला'य्)—the seventh month of the English year, called after Julius Caesar. इंग्रजी वर्षाचा सातवा महिना, जुलै.

**Jŭm'bal,-ble,** *n.* (ज'म्बल्)–thin crisp sweet cake. पातळ खुसखुशीत गोड पाव,-पोळी.

**Jŭm'ble,** *v. t. & i.* (जं'म्बल्)—to move about in disorder; to mix confusedly or in a confused mass. अव्यवस्थित रीतीनें इकडे तिकडे फिरणें; गोंधळ करून एकत्र करणें, गोंधळ-घोटाळा-करणें,-होणें. *n.* a confused heap etc., muddle; jolting. गोतांबील, गोइत, ढिगारा; गोंधळ; धक्का, आंचका. *J. sale,* सटरफटर स्वस्त जिनसांची-चिजांची-विक्री. *J.-shop,* सटरफटर वस्तु-विक्रीचें दुकान. *-bly, a.*

**Jŭm'bō,** *n.* (जं'म्बो)—a big clumsy person, animal or thing; (J-) famous elephant in London zoo; a notably successful person. ओबडधोबड मोठा इसम, प्राणी, वस्तु; लंडनमधील प्राणिसंग्रहालयांतील मोठा हत्ती; प्रसिद्ध यशस्वी व्यक्ति.

**Jŭmp,** *v. i. & t.* (जम्प्)—to leap, spring from ground; to rise or move with a sudden start; to cause to jump; to rise suddenly in price; to come *to*, arrive *at*, (a conclusion) hastily; to agree; (of railway carriage) to leave (line); to startle; to cook in a frying pan; to pounce upon a thing; to steal a march upon; to skip over (a book, subject etc.); to drill with a jumper. उडी मारणें, उडणें; उसळी मारणें; उडविणें, उडायला-उडी मारायला-लावणें; (किंमती) अस्कमात् चढणें,-वाढणें; घाईघाईनें (निष्कर्ष) काढणें, (मत) बनविणें; जुळणें, एकमत होणें; (आगगाडी) रुळावरून घसरणें; घाबरविणें, दचकविणें, धक्का देणें; तळून-अरतून परतून-शिजविणें; (वर) झडप घालणें; हळूच-न कळत-आघाडी मारणें, -वर मात करणें; वर वर चाळणें,-पाहणें, उडत उडत वाचणें; (खडकाला) भुराक-भोंक-पाडणें. *n.* a leap; start caused by shock, &c.; sudden rise (in price, &c.); sudden transition, or gap. उडी; दचकणें; किंमतींत एकदम वाढ,-चढ; आकस्मिक विपर्यांतर, तुटकपणा, त्रुटि. *To j. in,* एकदम आंत-गाडींत-उडी मारणें,-जाऊन बसणें. *To j. for joy,* आनंदानें नाचूं लागणें. *To j. at,* (fig.) to accept eagerly. (देणगी, सौदा) आनंदानें स्वीकारणें,-पटविणें. *To j. down* person's *throat,* to answer, to interrupt, him violently. घुस्सा करून-आवेशानें-उत्तर देणें,-अडथळा करणें,-थांबविणें. *To j. out of* one's *skin,* to jump with surprise. आश्चर्यानें नाचूं लागणें,-उडी मारणें. *Long j.,* लांब उडी. *High j.,* उंच उडी. *The jumps,* (sl.) अति दारू पिऊन येणारा उन्माद, मद्योन्माद. *J.-able., a., J.-iness, n.*

**Jŭm'per,** *n.* (ज'म्पर्)—one who jumps; a member of Welsh Methodist body etc. who jump(ed) as part of worship; a jumping insect; rope made fast to keep yard etc. from jumping; a heavy iron bar with a chisel at the end for drilling blasting holes. उडी मारणारा, उडणारा; वेल्श मेथडिस्ट पंथाचा अनुयायी, भक्तीनें ईश्वरोपासनेच्या वेळीं नाचणारा, उड्या मारणारा; उडता कीटक,-किडा; (शीड वगैरे उडूं नये म्हणून) बांधलेली दोरी; (भुराक पाडण्याची) टोंकदार जड लोखंडी पाऱ्हय,-पहार.

**Jŭm'per,** *n.* (ज'म्पर्)—loose jacket of sailors etc.; women's outer garment slipped on over head and reaching hips. (खलाशाचें) कुडतें, आंखूड आंगरखा; स्त्रियांचे डोक्यांतून घालण्याचें सैल अंगातलें, झबलें, झम्पर.

**Jŭm'pĭng,** *a.* (ज'म्पिंग्)—one that jumps. उडी मारणारें, उडतें. *J.-deer,* N.-Amer. black-tailed deer. उत्तर-अमे. हरीण. *J.-bean,* seed of Mexican plant. मेक्सिकोमधील वनस्पतीचें उडतें बीं.

**Jŭm'pў,** *a.* (ज'म्पि)-nervous, panicky. घाबरलेला, गोंधळलेला.

**Jŭnc'tion,** *n.* (जं'क्शन्)—joining-point; meeting-place; station where railway lines meet. संगम, सांधा; संयोग-बिंदु,-स्थान; ज्या ठिकाणीं आगगाडीचे रस्ते एकत्र मिळतात तें स्टेशन,-ठिकाण.

**Jŭnc'ture,** *n.* (जं'क्चर्)—joining; joining-point, state of affairs, critical point. जोडणें, सांधणें; संयोग, मिलाफ; वस्तुस्थिति, आणीबाणीची वेळ. *At this j.* अशा आणीबाणीच्या वेळीं,-प्रसंगीं.

**June,** *n.* (जून्)—sixth month of the English year. इंग्रजी वर्षाचा सहावा महिना. [L *Junius,* Skr. *yuvan*]

**Jŭn'gle,** *n.* (जं'गल्)—a land covered with tangled vegetation; wild tangled mass; (sl.) W.-Afr. share-market. जंगल, रान; झाडां-वेलींची गुंतागुंत; पश्चिम आफ्रिकेंतील सट्टेबाजार, रोख्यांच्या खरेदीविक्रीचें ठिकाण. *J.cat,* बौल, भौगा. *J.-fowl,* रानटी पक्षी. *J.-fever,* जंगलांतील रोगजंतूनीं येणारा ताप, जंगली हवेचा ताप. *J.-rice,* millet-rice. ऋषीचे-वऱ्यांचे-तांदुळ,-भात. *J.-sheep,* रानमेंढा. *Jun'gli, n. & a.* जंगलनिवासी, रानांत राहणारा, रानटी, आडदांड. *Jun'gled, a., Jun'gly, a.* [Hind.]

**Jun'ior,** *a.* (जू'निअर्)—the younger, (abbr. *jun., jr.*); of less standing. वयानें लहान, धाकटा; कमी काळ असलेला, नवा, खालचा. *n.* a junior person. लहान-खालचा-मनुष्य. *Junior'ity, n.* धाकटेपणा, लहानपणा, खालचा दर्जा, नवीनपणा.

**Jun'iper,** *n.* (जू'निपर्)—a genus of coniferous evergreen shrubs. शंक्वाकार फळांचें सदापर्णी

झुडूप,-झाड. *Common j.*, कांटेरी पानांचें व काळ्या फळांचें औषधी तेल देणारें झुडूप,-झाड.

**Jŭnk**, *n.* (जंक्)—old cable cut up for oakum or loose fibres; discarded material; a lump; (Naut.) salt-meat: lump of tissue in sperm-whale. काथ्या उसवण्यासाठीं कापलेलें जुनें दोरखंड; अडगळींत टाकलेली वस्तु, कचरपट्टी, मोडतोड: गोळा, तुकडा; खारावलेलें मांस; चरबीयुक्त व्हेल माशाच्या पेशीजालाचा गोळा. *v. t.* to divide into junks. तुकडे करणें. *J.-shop*, marine-store. जुन्या गलबताच्या सामानाचें-मोडतोडीचें-दुकान.

**Jŭnk**, *n.* (जंक्)—a flat-bottomed sailing vessel used in Chinese seas. चिनी कोळ्या,-गलबत.

**Jun'ker**, *n.* (जु'ङ्कर्)—a young German noble; a member of aristocratic party in Prussia. तरुण जर्मन सरदार; प्रशियांतील जमीनदार उच्चवर्गांतील व्यक्ति.

**Jŭnk'et**, *n.* (जं'किट्)—a dish of sweetened curds and whey; a feast. गोड दह्याचें पक्वान्न,-ची मिठाई; मेजवानी. *v. t. to* feast, to picnic. मेजवानी करणें, वनभोजन करणें.*-ing, n.*

**Ju'no**, *n.* (जू'नो)—wife of Jupiter; a woman of excellent beauty; third of the asteroids. जूपिटर-रोमन मुख्य देवाची-पत्नी; अतिसुंदर स्त्री, अप्सरा, रंभा; 'जूनो' नांवाचा (मंगळ आणि गुरु यांच्या कक्षांमधील) एक लघु-ग्रह, उपतारा.

**Jŭn'ta**, *n.* (जं'न्टा)—a deliberative or administrative council in Spain or Italy; (also, *jun'to*) a clique, a faction. स्पेन किंवा इटाली-मधील कायदे करणारी किंवा राज्यकारभार चालविणारी सभा,-रें मंडळ; कट, जूट, गट, संघ.

**Ju'pĭter**, *n.* (जू'पिटर्)—(Rom. Myth.) king of gods; largest of the planets. मुख्य रोमन देवता, देवांचा राजा किंवा गुरु; बृहस्पति, गुरु (ग्रह). *J. Pluvius*, god of rain. पर्जन्यदेवता, वरुण.

**Jur'al**, *a.* (जु'अरल्)—of law, of moral rights and obligations. कायद्याचा, नैतिक हक्कसंबंधाचा, बंधनाचा.

**Jurăss'ic**, *a.* (जुअॅ'सिक्)—of the Jura mountains; marked like these by the prevalence of oolitic lime-stone. जुरा पर्वताचा; रेवाळ चुनखडीचा.

**Jurĭd'ĭcal**, *a.* (जुअरि'डिकल्)—of judicial proceedings; legal. न्यायदानासंबंधीं; कायदेशीर, कायद्याचा.

**Jurĭsconsŭlt'**, *n.* (जुअरिस्-कन्स'ल्ट्)—one-learned in law or jurisprudence. कायदेपंडित, कायदेमंत्री, कायद्यासंबंधीं सल्ला देणारा.

**Jurĭsdĭc'tion**, *n.* (जुरिस्डि'क्शन्)—administration of justice; legal or other authority; territory it extends over. न्यायाधिकार; हुकमत; अंमलाखालील मुलूख, स्थलमर्यादा,-सीमा.*-al, a.*

**Jurisprud'ence**, *n.* (जुरिस्प्रू'डन्स्)—science of or skill in law. न्यायतत्त्वशास्त्र, धर्मशास्त्र, कायदेशास्त्र, कायद्यांतील निपुणता,-प्रवीणता.*-en'tial, a.,-ent, a. & n.* न्यायतत्त्वप्रवीण, न्यायशास्त्रप्रवीण.

**Jur'ĭst**, *n.* (जु'अरिस्ट्)—one versed in law; a writer on law; a student of law, a graduate in law. कायद्यांत प्रवीण; धर्मशास्त्रावर-न्यायशास्त्रावर (ग्रंथ) लिहिणारा, स्मृतिकार; कायद्याचा अभ्यास करणारा, कायद्याचा पदवीधर.*-ic,-ical, a.,-ically, adv.*

**Jur'or**, *n.* (जु अर्)—one who serves on a jury, member of jury; one who takes oath. पंचांपैकीं-ज्वादमंडळापैकीं-एक, पंच; शपथ घेणारा.

**Jur'y̆**, *n.* (जु अरि)—a body of persons sworn to render verdict in a court of justice; judges in a competition. पंच, पंचसभा, पंचांचें मंडळ; चढाओढीच्या सामन्याचा निर्णय देणारें परीक्षक-मंडळ, पंच. *Grand j.*, (of from 12 to 23 men appointed to make preliminary inquiries) प्राथमिक चौकशीचें पंचमंडळ. *Trial, common, petty, j.*, (of 12 men, who try final issue of fact) and pronounce unanimous verdict). प्रत्यक्ष खटला चालू असतांना तो ऐकून एकमतानें निकाल देणारें (१२ जणांचें) पंचमंडळ, पंचसभा. *Special j.*, समाजांतील विशेष दर्जाच्या पंचांचें मंडळ. *J. box*, न्यायालयांतील पंचांना बसण्याची राखीव जागा. *J.-man*, member of a jury. पंचमंडळांतील एक पंच. [L *jurare*, swear]

**Jur'y-măst**, *n.* (जु'अरि-मास्ट्)—a temporary mast in place of a broken or lost one. (मोडलेल्या-नाहींशा झालेल्या—डोलकाठीबदली) तात्पुरती डोलकाठी.

**Jŭss'ĭve**, *a.* (ज'सिव्)—expressing a command. आज्ञार्थक.

**Jŭst**, *a.* (जस्ट्)—upright, fair; correct, due, proper, right. न्यायी, प्रामाणिक, न्याय्य; यथायोग्य, बरोबर, योग्य, वाजवी, ठीक. *adv.* exactly; barely; not long ago; quite. अगदीं बरोबर; शिकस्तीनें, जेमतेम; केवळ, मात्र, फक्त, नुकताच, आतांच; अगदीं.

**Just**, (जस्ट्)—See Joust.

**Jŭs'tĭce**, *n.* (ज'स्टिस्)—justness, fairness; judicial proceedings; exercise of authority in maintenance of right; magistrate, judge. न्याय, नीति, न्यायीपणा, रास्तपणा, खरेपणा, योग्यपणा; न्यायदान, इनसाफ, दाद; योग्य शिक्षा,-न्याय, न्यायरक्षणार्थ अधिकाराचा उपयोग; मुलकी

अधिकारी, न्यायाधीश, न्यायमूर्ति. *Poetical j.*, ideal as shown in a poem etc. कविसृष्टींतील अंतिम ध्येय,-साध्य,-न्याय. *J. of the Peace*, inferior magistrate appointed to preserve peace in a town etc. (देशांतील-नगरांतील) शांततारक्षक अधिकारी, 'जे. पी.' *To do j. to*, to treat fairly. न्यायीपणा किंवा मार्मिकता दाखविणें. *To do oneself j.*, to perform worthily of one's abilities. आपल्या शक्त्यनुसार-बुद्धीनुसार-(एकादी गोष्ट) उत्तम रीतीनें करणें. *J.-ship*, *n.*

**Jŭsti'ciar,-ary̆**, *n.* (जस्टि'श्यर,-रि)—an administrator of justice; the chief political and judicial officer in England in old times. न्यायाधीश; (जुन्या इंग्लिश राजांच्या वेळचा) मुख्य न्यायमंत्री, पंडितराव. *a.* (-ary) of the administration of justice. न्यायदानपद्धतीचा.

**Jŭstĭfĭcā'tion**, *n.* (जस्टिफिके'शन्)—act of justifying, defence; vindication. दोषनिराकरण, दोषमुक्ति, उजळ माथा; समर्थन.

**Jŭs'tĭfȳ**, *v. t.* (ज'स्टि-फाय्)—to show the justice or truth of; to clear from imputed guilt; to warrant; to adjust, to make so as to fit accurately. समर्थन करणें, बरोबर आहे असें दाखविणें; निर्दोष मानणें, दोषमुक्त-पापमुक्त-करणें, दोष उडवून देणें; वाजवी असणें, खात्री करून देणें, खात्री पटविणें; सारखा करणें, अनुरूप करणें. *-fiabil'ity*, *n.*,*-fiable*, *a.* समर्थनीय, शाबीत करण्याजोगा, निर्दोष ठरविण्यासारखा, न्याय्य, वाजवी.*-fiably*, *adv.*,*-ficative*,*-ficatory*, *aa.*

**Jŭt**, *n.* (जट्)—a projection, protruding point. (पुढें आलेलें) टोंक, सुळका. *v. i.* to project (*out*, *forth*). बाहेर-पुढें-येणें,-वाढणें.

**Jute**, *n.* (जूट्)—the fibre of an Indian plant used for canvas etc. ताग, सण. [Skr. *juta*, *jata*, braid of hair]

**Jute**, *n.* (जूट्)—one of Low German tribe invading Britain in the 5th and 6th centuries. ब्रिटनवर स्वारी करणारा (५ व्या व ६ व्या शतकांतील) लो जर्मन जातीचा मनुष्य.

**Juvenĕs'cence**, *n.* (जुव्हने'सन्स्)—being juvenile or youthful; youth. यौवन, ज्वानी, तारुण्य; तरुण मनुष्य. *Juvenes'cent*, *a.* तरुण होणारा, ज्वानींत येणारा. [L *juvenis*, Skr. *yuvan*, young]

**Juv'ĕnīle**, *a.* (जू'व्हिनाइल्)—young, youthful; of, for, young persons. तरुण, ज्वान, जवान; तारुण्याचा, तरुणांचा, तरुणांकरितां. *n.* a young person; (*pl.*) books meant for children. तरुण मुलगा,-पुरुष; मुलांकरितां-बालवाचनाचीं-बालोपयोगी पुस्तकें.*-nil'ity*, *n.* (-नि'लिटि),*-nil'ely*, *adv.*

**Juvĕnĭl'ia**, *n. pl.* (जुव्हिनि'लिआ)—works produced in author's youth. (लेखकाच्या) तारुण्यांतील ग्रंथ,-लेखन.

**Jŭx'tapōse**, *v. t.* (ज'क्स्टपोझ्)—to put (things) side by side. जवळ जवळ ठेवणें, नजीक ठेवणें. *Juxtaposi'tion*, *n.* placing or being placed near, contiguity. जवळ जवळ ठेवणें, लगता, सान्निध्य. [L *juxta*, next and *position*]

## K

**K**, (के)—eleventh letter of the English alphabet. इंग्रजी वर्णमालेंतील अकरावा वर्ण.

**Kăf'ir, Kăff'ir, Căf'fre**, *n.* (कॅ'फर)—member of a South African race of Bantu family. दक्षिण आफ्रिकेंतील बान्टु जातीचा मनुष्य, काफीर.

**Kai'ser**, *n.* (का'यझर)-emperor. बादशहा (जर्मनीचा, ऑस्ट्रियाचा—माजी).

**Ka'ka**, *n.* (का'कॅ)—a New Zealand parrot. न्यू-झीलंडमधील एक जातीचा पोपट.

**Ka'kapo**, *n.* (का'कॅपो)—the ground parrot or owl parrot of New Zealand. न्यू झीलंडमधील एक विशिष्ट जातीचा पोपट.

**Kāle, Kail**, *n.* (केल्)—cabbage. एक जातीचा कोबी (भाजीपाला).*-yard*, *n.* kitchen-garden. भाजी-पाल्याचा मळा.

**Kaleid'oscōpe**, *n.* (कला'इडॉस्कोप्)—tube through which are seen symmetrical figures. अनेक प्रतिबिंबें दाखविणारी नळी, चारुदर्शक.*-pic*,*-pical*, *aa.*

**Kăngaroō'**, *n.* (कॅंगरू')—Australian marsupial, with hind-quarters strongly developed for jumping. ऑस्ट्रेलियांतील एक चतुष्पाद जनावर, कांगारू.

**Kar (r) ōō'**, *n.* (कारू')—S. Afr. high plateau, waterless in dry season. द. आफ्रिकेंतील उंच पठार.

**Kĕck**, *v. i.* (केक्)—to make sound as if about to vomit. उचळणें, उमासा येणें, कळमळणें. *To k. at*, (ची) ओकारी-(चा) वीट-येणें.

**Kĕdge**, *n.* (केज्)—small anchor. (गलबताचा) लहान नांगर, लोळी, लंगर.

**Keel**, *n.* (कील्)—lowest longitudinal timber on which ship's framework is built up; (poet.) a ship. (गलबताचा) कणा किंवा आडें; जहाज, गलबत. *v. t.* to turn (ship) keel upwards. उपडें होणें. *To keel over*, to upset, capsize. उलथें पालथें करणें, उलटणें.

**Keen**, *a.* (कीन्)—sharp ; strong, acute, penetrating ; eager, ardent. तीक्ष्ण, प्रखर, कडक, झोंबणारा ; उत्सुक, उत्साही. *Keen-set*, hungry, eager (for). अधाशी, उत्सुक. *Keen'ly*, *adv* ; *Keen'ness*, *n*.

**Keen**, *n.* (कीन्)—Irish funeral song accompanied with wailing. आयरिश लोकांचें प्रेतयात्रेच्या वेळचें रडत म्हणावयाचें पद्य. *v. i. & t.* to bewail person ; to utter in wailing tone. एकाद्याविषयीं शोक करणें ; रडत म्हणणें.

**Keep**, *v. t. & i.* (कीप्)—(*pa. t. & pa. p.* kept) to pay due regard to, to observe ; to protect, to have charge of ; to retain possession of ; to maintain ; to reserve for future use ; to remain in the same state ; to conduct or maintain for profit. पाळणें, मानणें ; संभाळणें ; ठेवून घेणें ; बाळगणें ; शिल्लक ठेवणें ; आहे तसाच ठेवणें ; (फायद्याकरितां) चालविणें. *n.* maintenance; tower, citadel. निर्वाह, पोटगी ; किल्ला. *To keep fast*, उपास करणें, पाळणें. *To keep house*, to remain (in-doors &c.) घराबाहेर न पडणें ; घरदार करून राहणें. *To keep goal*, to be goal-keeper. (खेळांत) गोल-चेंडूची मर्यादा-संभाळणें. *To keep wicket*, to be wicket-keeper. (क्रिकेट मध्यें) यष्टिरक्षण करणें. *To keep back*, to hold back ; to conceal. आवरणें ; चोरून ठेवणें. *To keep off*, to avert, to ward off. टाळणें, निवारणें. *To keep on*, to continue to hold, use, etc ; to continue (doing). ताबा-वापर-चालू ठेवणें ; करीत राहणें. *To keep up*, to prevent (one's spirits) from sinking, maintain. (उत्साह) कायम ठेवणें. *For keeps*, for good, permanently. कायमचें, कायमपणानें.

**Keep'er**, *n.* (कीं'पर्)—one who has superintendence or care of anything ; ring that keeps another, esp. wedding-ring, on the finger. राखणारा, ठेवणारा, रखवालदार ; जोडवळें, जोड आंगठी.

**Keep'ing**, *n.* (कीं'पिंग्)—holding ; custody ; conformity, consistency, harmony. ठेवणें ; ताबा ; मेळ, मिलाफ. *In his keeping*, त्याच्या ताब्यांत. *In safe keeping*, सुरक्षित. *In keeping with*, in harmony with. योग्य, जुळणारें. *Out of keeping with*, न जुळणारें ; विसदृश. *Keeping (fruit)*, fit for keeping. ठेवण्याजोगें, टिकाऊ (फळ). *Keeping room*, बैठकीची खोली.

**Keep'sāke**, *n.* (कीं'प्-सेक्)—a thing treasured for the sake of the giver. आठवण म्हणून ठेवलेली वस्तु, प्रेमाची आठवण, स्मरणचिन्ह.

**Kĕg**, *n.* (केग्)—a small cask or barrel. लहान पिंप.

**Kĕlp**, *n.* (केल्प्)—a seaweed ; calcined ashes of sea-weed. समुद्रकांठीं वाढणारी वनस्पति ; त्या वनस्पतीचें भस्म,-ची रक्षा.

**Kĕl'pĭe,-py**, *n.* (के'ल्पि)—malevolent water-spirit, usually in form of a horse. घोड्याचें रूप घेणारी दुष्ट जलदेवता.

**Kĕn**, *v. t.* (केन्)—to know. ओळखणें, जाणणें. *n.* range of knowledge or sight. ज्ञानाची मजल, दृष्टीचा आटोका.

**Kĕnn'el**, *n.* (कें'नल्)—a house for shelter of house-dog or hounds ; the hole of a fox. कुत्र्याचें घर, खुराडें ; कोल्ह्याचें बीळ. 2. gutter. गटार. *v. t. & i.* घरांत-खुराड्यांत-घालणें,-असणें.

**Kept**, *pa. t.* of Keep.

**Kerch'ief**, *n.* (क'र्चिफ्)—a cloth used to cover or dress the head ; (poet.) handkerchief. डोक्याला गुंडाळण्याचें कापड, रुमाल ; (कवितेंत) हातरुमाल.

**Kerm'es**, *n.* (क'र्मिझ्)—pregnant female of an insect, red dye-stuff made of its dried body. एक प्रकारचे 'काकस' किडे ; किरमिजी रंग.

**Kern'el**, *n.* (क'र्नल्)—the part within the hard shell of a nut or stone fruit ; central or essential part, the core, gist. गर, मगज, खोबरें ; मध्य किंवा मुख्य भाग.

**Kĕ'rosēne**, *n.* (के'रोसीन्)—lamp-oil got by distillation of petroleum, &c. दगडी तेल, घासलेट तेल.

**Kĕs'trel**, *n.* (के'स्ट्रल्)—a kind of small hawk. एक जातीचा लहान बहिरी ससाणा.

**Kĕtch**, *n.* (केच्)—a small two-masted vessel. दुकाठी गलबत.

**Kĕtch'ŭp**, *n.* (के'च्-अप्)—a kind of sauce made of mushrooms, tomatoes, &c. चटणी, रसा.

**Kĕt'tle**, *n.* (के'टल्)—a metal vessel with spout and handle for boiling. कढई, किटली, चहादाणी. *A pretty kettle of fish*, awkward state of affairs. गुंतागुंतीची परिस्थिति, चमत्कारिक स्थिति.

**Kĕt'tle-drŭm**, *n.* (के'टल्-ड्रम्)—a drum with parchment spread over a brass hemisphere ; a large afternoon tea-party. नगारा, दुंदुभि ; तिसऱ्या प्रहरचा चहा व फराळ.

**Key**, *n.* (की)—an instrument for turning bolt of a lock ; solution ; a code, crib, manual ; low island or reef ; (pl.) levers for the fingers in a piano, a type-writer, etc. ; an instrument for winding clock etc. किल्ली, चावी ; स्पष्टीकरण, उलगडा ; स्पष्टीकरणार्थ पुस्तक ; सखल बेट किंवा खडप ; बाजाच्या पेटीचे सूर, टाइपरायटरच्या बोटें ठेवण्याच्या अक्षरांच्या चाव्या ; घड्याळाला चावी

वेण्याचें साधन.-किली. *v. t.* to fasten with wedge, bolt etc.; brace up, raise. पाचरीनें-कडीनें-घट्ट करणें-लावणें-बांधणें; बळकटी आणणें, वाढवणें. *Key-hole, n.* that by which key is put into lock. कुलपाचें भोंक. *Key-industry, n.* an industry essential to the carrying on of others. प्रमुख उद्योगधंदा. *Key'less, a.* without a key. बिनचावीचें ( घड्याळ इ. ).

**Key'nōte,** *n.* (की'नोट्)—the first note of any scale, a note on which key is based; (*fig.*) a dominant idea. (गाण्याचा) मुख्य सूर; मुख्य कल्पना, खुबी.

**Key'stōne,** *n.* (की'स्टोन्)—central stone of an arch; (fig.) central principle. कमानीचा मध्य दगड, चावीचा दगड; मुख्य तत्त्व, खुबी, गोम.

**Kibe,** *n.* (काइब्)—ulcerated chilblain. थंडीनें पडलेली भेग, तडा, विपादिका.

**Kĭck,** *v. i. & t.* (किक्)—to strike or move with the foot, to manifest opposition to. लाथ मारणें; लाथेनें झाडणें. *n.* kicking; a blow given with the foot; recoil of gun; reacting power. लाथ मारणें; लत्ताप्रहार; बंदुकीच्या मागें बसणारा झटका; उलट फिरण्याचें सामर्थ्य, प्रतिक्रियेची शक्ति.-*er, n.* लाथ मारणारा, लाथाळ ( घोडा इ.).

**Kĭck'shaw,** *n.* (कि'क्-शॉ)—fancy dish of food; toy, trifle. चटकदार पदार्थ किंवा पक्वान्न; खेळणें, भिकार वस्तु.

**Kĭd,** *n.* (किड्)—a young goat; leather made from the skin of a kid; (slang) child; a small wooden tub. करडू; करडाचें कमावलेलें कातडें; लहान मूल; लांकडी थाळी, कोठंबा. *v. t. & i.* give birth to (kid.) करडूं विणें, विणें. *Kid-glove, a.* over-dainty, avoiding every-day work etc. अति नाजूक, कामचुकारू.

**Kĭdd'y̆,** *n.* (कि'डि)—a child. लहान मूल.

**Kĭdd'le,** *n.* (कि'डल्)—a barrier in a river with opening fitted with nets to catch fish; arrangement of stake-nets on the sea-beach. नदींतील मच्छेमारीच्या उपयोगाचा बांध; समुद्र किनाऱ्यावरील मासे पागण्याच्या खुंट-जाळ्यांची रचना.

**Kĭd'năp,** *v. t.* (कि'ड्-नॅप्)—to steal (a child); to carry off (a person) illegally, to seize and forcibly carry away. मूल चोरून नेणें; (मनुष्य) पळवून-हिरावून-नेणें. *Kid'napper, n.* [*kid, & nap,* to seize]

**Kĭd'ney,** *n.* (कि'ड्-नि)—(*pl.*—eys) either of a pair of glandular organs serving to excrete urine; constitution, nature, kind. मूत्रपिंड; वृक्क; स्वभाव, प्रकृति, प्रकार. *Kidney-bean, n.* dwarf French bean; scarlet-runner. एक प्रकारचा लांबट लहान घेवडा, उडीद; शेंदरी फुलांचा वेल-घेवडा.

**Kĭl'derkĭn,** *n.* (कि'ल्डर्-किन्)—(a cask holding) 18 or 16 gallons of liquid; a measure for this. १८ किंवा १६ गॅलनचें पिंप; १८ किंवा १६ गॅलनचें माप.

**Kĭll,** *v. t. & i.* (किल्)—to put to death, to slay; to cause the death of; to destroy; to make useless. ठार मारणें; वध करणें; नाहींसें करणें; सत्त्वहीन करणें. *n.* killing; animal(s) killed by sportsman. वध, हत्या; शिकार. *To kill two birds with one stone,* to effect two purposes at once. एका दगडानें दोन पक्षी मारणें, दोन्ही कामें एकदम साधणें. *Kill-joy,* depressing person. निरुत्साही-रडतोंड्या-मनुष्य. *Kill-time, n. & a.* (occupation) intended to kill time. कसा तरी वेळ घालविणें, ( घालविणारें).

**Kĭln,** *n.* (किल्न्,किल्)—a furnace or oven (e. g. *lime-kiln, brick-kiln,* for calcining lime or baking bricks.). भट्टी. *Kiln-dry, v. t.* dry in kiln. भट्टींत वाळविणें. [ L *culina,* a kitchen ]

**Kĭlo-,** (किलो-)—१०००. *Kilo-gram (me), n.* (किलोग्रॅम्)—weight of 1000 grammes. १००० ग्रॅमचें वजन, इ०.

**Kĭlt,** *n.* (किल्ट्)—Highlander's skirt from waist to knee. स्कॉट्लंडच्या हायलंडर लोकांचा घागरा, मांडचोळणा. *v. t.* to tuck up round body; to gather in vertical pleats. आवरून घेणें; उभ्या चुण्या घालणें.

**Kĭn,** *n.* (किन्)—ancestral stock, family; one's relative, kindred. गोत्रसंबंध; गोतवळा, नातलग. *pred. a.* related. सजातीय, नात्याचा. *K.-less, a.*

**Kĭn,** (-किन्)-suffix forming diminutive. अल्पत्व-दर्शक प्रत्यय.

**Kĭn'chĭn,** *n.* (कि'न्चिन्)-(sl.) a child. लहान मूल.

**Kind,** *n.* (काइन्ड्)—a race of animals, &c.; class, sort. जात; प्रकार, तऱ्हा. *a.* gentle, benevolent, friendly, considerate. सहृदय, दयाळू, सलोख्याचा, विचारी. *To pay in kind,* (to pay) in goods or natural produce, not in money; (Fig.) tit for tat. वस्तूंच्या-उत्पन्नाच्या-रूपानें, रोकड पैशानें नव्हे (देणें), जशास तसें इ० (e. g. *repay his insolence in kind,* i. e. with insolence. उद्धटपणाला उद्धटपणानें उत्तर देणें.). *Kind-hearted, a.* having a kind heart. दयाळू अंतःकरणाचा. *Kind'ness, n.* दयाळूपणा.

**Kin'dergärten,** *n.* ( कि'न्डर्-गार्टन् )—a school for educating young children by object lessons, games, &c. प्रत्यक्ष वस्तु, नाना तऱ्हेचे खेळ, चित्रें, गाणीं वगैरेंच्या साहाय्यानें मुलांना शिक्षण देणारी शाळा. बालोद्यानशिक्षणसंस्था. [ G =children's garden ]

**Kin'dle,** *v. t. & i.* ( कि'न्डल् )—to set on fire, to inflame, to light ; to inspire ; to become kindled ; to glow. पेटवणें, प्रदीप्त करणें ; ( मनोवृत्ति ) जागृत करणें ; पेटवणें, उद्दीप्त होणें. *n.* setting on fire ; small wood etc. for lighting fires. आग लावणें ; कोलीत. *Kind'ling, n.* विस्तवाचें कोलीत, चूड.

**Kind'ly,** *a.* ( का'इन्ड्लि )—kind, sympathetic. ममताळू, प्रेमळ, सहानुभूति दाखविणारा. *adv.* in a kind manner, benevolently. प्रेमळपणानें, सहानुभूतिपूर्वक ; कृपा करून. *-lily, adv., -liness, n.*

**Kin'dréd,** *n.* ( कि'न्ड्रिड् )—blood relationship ; one's relations. नातलग ; नातेवाईक. *a.* related by blood ; similar, allied, cognate ; ( fig. ) similar. तत्सम, सगोत्र ; सजातीय. *Frost & kindred phenomena,* धुकें व तत्सम नैसर्गिक देखावा.

**Kīne,** *n.* ( काइन् )—( arch. plu. of cow ) cows. गाई.

**Kine'ma,** *n.* ( किनी'मा, काइनी'मा )—see Cinema.

**Kīnemăt'ic,** *a.* ( काइनिमॅ'टिक् )—of motion considered without reference to force. ( केवळ ) गतीच्या. *n. pl.* science of this. गतिगणित. *-ical, a. Kinematograph,-ic,-y,* See Cinematograph etc.

**Kinĕt'ic,** *a.* ( कायने'टिक् )—of motion in relation to force गतिविशिष्ट, गतीच्या, गतिजन्य. *Kinetic energy, n* गतिविशिष्ट शक्ति,-तेज, गतिजन्य शक्ति. *K. theory.* गतिकल्पना *n pl* जडगतिगणित.

**King,** *n.* ( किंग् )—a sovereign ruler of independent State, monarch, prince, ruler ; a piece in chess, a card with king on it. राजा, प्रभु, अधिपति ; ( बुद्धिबळांतील, पत्त्यांतील ) राजा. *v. i. & t.* to act the king, to govern, esp. *king it* ; to make ( person ) a king. राजाची भूमिका घेणें ; राजा करणें

**King craft,** *n.* ( किंग्-क्रॅफ्ट् )—able exercise of royalty. राजनीति, राज्यनीति, राज्यचातुर्य.

**King'dom,** *n.* ( किंग्-डम् )—State or territory ruled by a king, dominion of a king, realm ; province of nature. राज्य, राजपद, सत्ता ; कोटी.

**King'fisher,** *n.* ( किंग्-फिशर् )—a small brilliant-plumaged bird diving for fish. पाणकावळा, ढिसा, राण्या.

**King's evil,** *n.* ( किंग्ज़् ईव्हल् )—scrofula, formerly held curable by king's touch. गंडमाळा ( रोग ).

**Kins'fōlk, -man, -woman,** *nn.* ( कि'न्स्फोक्, कि'न्समन्, कि'न्स्वुमन् )— blood relation( s ). नातलग, नातेवाईक.

**Kin'shĭp,** *n.* ( कि'न्-शिप् )—relationship ; similarity. नातें ; सादृश्य.

**Kipp'er,** *v. t.* ( कि'पर् )—to cure ( fish ). ( मासे ) खारवणें, वाळवून ठेवणें. *n.* खारावलेला मासा, सामन माशाचा नर.

**Kiŏsk',** *n.* ( किऑ'स्क् )—light open pavilion ; structure for sale of newspapers, bandstand etc. डेरा, तंबू.

**Kirk,** *n.* ( कर्क् )—Church. ( स्कॉटलंडांतील ) खिस्ती लोकांचें प्रार्थनामंदीर. *K.-yard,* graveyard. स्मशानभूमि.

**Kis'mĕt,** *n.* ( कि'स्मेट् )—destiny, fate. नशीब, दैव.

**Kiss,** *n.* ( किस् )—caress given with lips. मुका, चुंबन. *v. t.* to touch with the lips ( as sign of affection, reverence, &c. ), touch slightly. मुका घेणें, चुंबन घेणें. *To kiss the dust,* to yield abject submission ; to be slain. दातीं तृण धरणें, शरण येणें ; ठार मारलें जाणें. *To kiss the ground,* साष्टांग नमस्कार घालून शरण जाणें ; नक्षा उतरणें. *To kiss the rod,* to accept chastisement submissively. नम्रपणें शिक्षेस तयार होणें. *A kiss-in-the ring,* a game for young people in which one pursues and kisses another of opposite sex. शिवाशिवीचा व परस्पर चुंबन घेण्याचा तरुण-तरुणींचा एक खेळ. *Kissing kind,* on affectionate terms. जिवश्च कंठश्च स्नेही.

**Kit,** *n.* ( किट् )—wooden tub ; personal equipment or necessaries and tools, outfit. लांकडाचें पिंप ; सामानसुमान, प्रवासाच्या तयारीला लागणारें साहित्य. *Kit-bag,* प्रवासी सामान-सुमानाची पिशवी, थैली.

**Kit,** *n.* ( किट् )—1. a kitten ; 2. a small fiddle. मांजराचें पिल्लूं ; लहान इंग्लिश सारंगी.

**Kit'-căt,** *n.* ( कि'ट्-कॅट् )—a portrait less than half-length but including hands. अर्ध्यापेक्षां लहान, हात असलेली, तसबीर किंवा चित्र.

**Kitch'en,** *n* ( कि'चिन् )—a room used for cooking. स्वयंपाकघर *K. garden,* garden for fruit and vegetables फळांचा व भाजीपाल्याचा मळा. *K. maid,* a servant employed in a k. usu. under a cook. स्वयंपाकीण, तिच्या हाताखालील नोकर. *K. physic,* good and plentiful food. चांगलें भरपूर अन्न. *K. stuff,* k. requisites, esp. vegetables. स्वयंपाकाचें भाजीपाला वगैरे

सामायन. *K.-er*, *n.* चुलींची रांग, आचारी, स्वयंपाकी. *K.-ette'*, लहान सैंपाकघर व कोठी.

**Kite**, *n.* (काइट्)—a bird of prey of falcon family; a rapacious person; a child's toy flown in wind. घार; खादाड मनुष्य, अधाशी मनुष्य; पतंग, वावडी. *v. i.* soar like a kite. घारीप्रमाणें वर जाणें, उडणें. *v. t.* to cause to soar. उडविणें. *To fly a kite*, (fig.) to make experiment to gauge public opinion etc. लोकमत अजमावण्यासाठीं प्रयोग करणें. *Kites*, (pl.) highest sails of ship, set only in light wind. जहाजाचीं अगदीं वरचीं शिडें.

**Kith**, *n.* (किथ्)—an acquaintance. ओळखीचा-आप्तइष्ट-मनुष्य. *Kith and kin*, acquaintance and kinsfolk. इष्टमित्र, सोयरेधायरे लोक.

**Kitt'en**, *n.* (कि'टन्)—a young cat, young of a cat; a playful girl. मांजराचें पिल्लूं; खेळाडू-खेळकर-मुलगी. *v. i.* to bring forth kittens. पिलें विणें.

**Kittereen'**, *n.* (किटरी'न्)—W.-Ind. one-horse chaise. एक-घोड्याची गाडी.

**Kitt'iwāke**, *n.* (कि'टिवेक्)—a kind of sea-gull. एकजातीचा जलकुक्कुट.

**Ki'wi**, *n.* (की'वि)—a New Zealand bird with no tail. न्यू झीलंडमधील एक पक्षी.

**Klĕptomā'nĭa**, *n.* (क्लेप्टमे'निआ)—a morbid tendency to theft. चोरी करण्याचें वेड,-चा रोग. *-niac*, *n.*

**Klip'springer**, *n.* (क्लि'प्स्प्रिंगर्)—a small S.-Afr. antelope. द. आफ्रिकेंतील लहान काळवीट.

**Kloof**, *n.* (क्लूफ्)—a S.-Afr. ravine. दरी.

**Knăck**, *n.* (नॅक्)—readiness in performance, acquired dexterity; trick, habit. हातोटी कसब; युक्ति, संवय, लकब. *Knack'y*, *a.* युक्तीचा, हिकमतीचा, कावेबाज.

**Knăck'er**, *n.* (नॅ'कर्)—one who buys and slaughters useless horses; one who buys old houses etc. for the materials. (घोड्यांचा) कसाई; जुनापुराणा सामानवाला.

**Knăg**, *n.* (नॅग्)—a knot in wood. (लांकडाची) गांठ, गुंज. *Knagg'y*, *a.* गांठाळ, गुंजदार (लांकूड).

**Knăp**, *v. t.* (नॅप्)—to break (flints) with a hammer; to break, to snap. हातोड्यानें दगड फोडणें; मोडणें. *Knapp'er*, *n.* पाथरवट, दगड-फोड्या.

**Knăp**, *n.* (नॅप्)—crest of hill, rising ground. टेंकाड, टेंकडी, चढण.

**Knăp'-săck**, *n.* (नॅ'प्-सॅक्)-soldier's or traveller's bag for necessaries. शिपायाच्या किंवा प्रवाशांच्या सामानाची पिशवी.

**Knär**, *n.* (नार्)—knot in wood. (लांकडाची) गांठ, गुंज.

**Knāve**, *n.* (नेव्ह्)—an unprincipled man, a rogue; lowest court card. तत्त्वहीन मनुष्य, ठक; (पत्त्यांतील) गुलाम. *Kna'very*, *Kna'vishness*, *nn.* (ने'व्हरि, ने'व्हिशनेस्) ठकबाजी, लबाडी. *Kna'vish*, *a.* फसव्या, खोडसाळ, ठकबाज. *Kna'vishly*, *adv.*

**Knead**, *v. t.* (नीड्)—to work up into dough or paste; to massage; to mix. कणीक मळणें; मर्दन करणें; मिसळणें. *Knead'able*, *a.*; *Knead'er*, *n.*

**Knee**, *n.* (नी)—joint between thigh and lower leg. गुडघा, ढोंपर. *Knee-cap*, ढोंपराची वाटी. *To give a knee to*, to support (a pugilist) on one's knee between rounds, act as second to. मल्लयुद्धांत प्रतिपक्ष्याला गुडघ्यावर घेणें, साथ-मदत-करणें. *On one's knees*, kneeling. गुडघे टेंकून. *To bring (a person) to his knees*, to reduce him to submission. शरण यावयाला लावणें. *Is on the knees of the gods*, is yet uncertain. देव जाणे, अनिश्चित आहे. *K. breeches*, (reaching down to knees), गुडघ्या-पर्यंत पोंचणारी (तुमान). *K.-deep*, so deep as to reach the knees. गुडघाभर (खोल).

**Knee**, *v. t.* (नी)—to touch with knee; to fasten (framework etc.) with knees; to cause (trousers) to bulge at knees (colloq.). गुडघा लावणें; सांधे जुळवून घट्ट करणें; (विजार) गुडघ्याजवळ फुगीर करणें.

**Kneel**, *v. i.* (नील्)—(*pa. t. & pa. p.* knelt नेल्ट्) to fall or rest on the knees (esp. in reverence). गुडघे टेंकणें, ढोंपरें टेंकणें.

**Knĕll**, *n.* (नेल्)—sound of a bell (esp. at funeral or after death); doom *of*; death-signal. मृत्युसूचक किंवा प्रेतसंस्कारसमयींचा घंटा-नाद; मृत्युचिह्न; नाशाचें चिह्न. *v. t. & i.* to ring, to proclaim as by, a knell. मृत्युसूचक घंटा वाजविणें,-घंटा वाजवून जाहीर करणें.

**Knelt**, (नेल्ट्)—*pa. t. & pa. p.* of kneel.

**Knew**, (न्यू)—*pa. t.* of know.

**Knĭck'erbŏcker**, *n.* (नि'कर्बॉकर्)—(K-) a New-yorker; (*pl.*) loose-fitting breeches gathered in at knee. न्यू यॉर्कचा रहिवासी; (गुडघ्याजवळ गोळा होणारा) सैल पायजमा. *Knickers*, *n. pl.* (colloq.) सैल पायजमा.

**Knĭck'-knăck, Nick'-năck**, *n.* (नि'क्नॅक्)- a light dainty article; gimcrack. हलकी दिखाऊ वस्तु: हलका दिखाऊ दागिना.-*ery*, *n*; -*ish*, *a*.

**Knife**, *n.* ( नाइफ् )—(*Pl. knives*, नाइव्ज् ) *& v. t.* ( *pa. t. knifed* )—a cutting tool, a blade with long, sharpened edge used for cutting. सुरी, चाकू, छुरिका, कत्यार, सुरीनें भोसकणें,-कापणें. *A war to the knife*, a relentless war. घनघोर-प्राणांतिक-युद्ध. *The knife*, surgical operations, (as *have a horror of the knife*), शस्त्रक्रिया. *Before you can say knife*, very quickly or suddenly. अकस्मात, हां हां म्हणतांच. *To play a good knife & fork*, to eat heartily. मनापासून खाणें, पोटभर-आतृप्त-खाणें.

**Knight**, *n.* ( नाइट् )—a man-at-arms, one devoted to service of (lady) as champion etc.; a person raised to the rank below baronetcy; a person raised to honourable military rank; a piece in the game of chess. लष्करी शूर वीर, -शिपाई, स्त्री-कैवारी; सरदार; एक पदवी; ( बुद्धि-बळांतील ) घोडा. *v. t.* to dub a knight, to confer knighthood on. 'सर' हा किताब देणें. *K.-errant*, medieval k. wandering in search of chivalrous adventures; (fig.) person of chivalrous spirit. धाडस दाखविण्यासाठीं हिंडणारा मध्ययुगांतील शूर सरदार; (अलं०) उमद्या स्वभावाचा मनुष्य;-*errantry*, *n.*; *K. of the post*, one who got his living by giving false evidence. खोट्या साक्षी देऊन उदरनिर्वाह करणारा. *Carpet k.*, शेंदाड शिपाई; ऐषआरामी सरदार. *Knight'age*, *n.* (the list of) the knights. सरदार (यादी). *K.-hood*, *n.* सरदारकी. *Knight'ly*, *a. & adv.* (poet.)

**Knĭt**, *v. t. & i.* ( निट् )—to form (texture, garment) of interlooping yarn or thread; to wrinkle (brow); to make or become compact; to unite together. विणणें; (कपाळावर) आंठ्या पडणें; जुळणें, जोडणें; एकत्र करणें. *To knit up*, to repair by knitting; (fig.) to close up, to conclude, (argument etc.). विणून दुरुस्त करणें; (अलं०) (भाषण, मुद्दा इ०) संपविणें, पुरा करणें. (*pa. t. & pa. p. knitted*, or *knit*)

**Knĭtt'ĭng-nee'dle**, *n.* ( नि'टिंग् नी'डल् )—a slender rod of steel, ivory, wood etc. used for knitting. विणण्याची सळई, सुई.

**Knĭtt'le**, *n.* ( नि'टल् )—(naut.) a small line made of yarn. ओढदोरा, सणदोरा, कसा.

**Knŏb**, *n.* ( नॉब् )—rounded protuberance; (sl.) head. गांठ, गुंज; डोकें. *A door knob*, a handle of door, or drawer. मूठ. *Knob-ke'rrie*, short knob-headed stick of S.-Afr. tribes. मूठ असलेला द. आफ्रिकन मनुष्याचा लहान दांडका. *Knob-stick*, (1) मूठ असलेला सोटा; (2) a workman who works during strike. संप चालू असतां काम करणारा, संपफोड्या कामगार. *Knob'-ble*, *n.* a small knob. लहान गांठ,-मूठ इ०. *Knobb'ly*, *Knobb'y*, *aa.* गांठाळ, गांठीचें, मुठीचें.

**Knŏck**, *v. t. & i.* ( नॉक् )—to strike, esp. with a hard blow; to collide with or be driven against; (sl.) to amaze, to stupefy; to depreciate, to disparage. जोरानें मारणें, फटकावणें; आदळणें, हापटणें; आश्चर्यचकित करणें-होणें, थक्क करून सोडणें; कमी लेखणें, तुच्छ मानणें. *n.* a blow; a rap (esp. at a door); innings at cricket. तडाखा, फटका; (दरवाजावर) थाप, ठोका; (क्रिकेट०) डाव. *To knock (a person) on the head*, to stun, kill, him by blow on head; (fig.) to put an end to (scheme etc.). डोक्यांत फटका मारून बेशुद्ध पाडणें,-ठार करणें; (अलं०) (योजना वगैरे) बंद करणें,-पाडणें. *To k. one's head against*, (fig.) to come into unpleasant collision with. (अलं०) वाईट परिस्थिति-अनुभव-येणें, डोकें शेकणें. *To k. the bottom out of*, to render (argument) invalid. (म्हणणें) खोडून काढणें, खोटें-अग्राह्य-ठरविणें. *To knock about*, to strike repeatedly, to treat roughly. (एकाद्याला) सतावणें; (intr.) to wander, to lead irregular life. भटकणें, अनियमितपणानें राहणें. *To knock off*, तडाका देणें; (काम) सोडणें; काम जलद उरकणें; कविता शीघ्र रचणें; कमी करणें. *To k. person's head off*, (अलं०) एकाद्यावर सहज सरशी करणें. *To k. out*, रिकामा करणें; चीत पाडणें (प्रतिपक्षी); जिंकणें, पाडाव करणें; घाईनें (बेत) करणें. *To knock under*, शरण जाणें, हार जाणें; पत्करणें. *To k. up*, तडाक्यानें वर उडवणें; घाईघाईनें जुळवणें,-करणें; (क्रिकेट खेळांत) धांवा काढणें; (दार ठोठावून) जागें करणें; दमणें, दमविणें. *A knock-out*, *n.* a plot between buyers at auction to secure lot cheap by avoiding competition; finishing blow; (sl.) paragon. कमी किंमतींत लिलावाचा माल घेण्याचा कट; अखेरचा तडाका; उत्कृष्ट नमुना, सर्वोत्कृष्ट-नमुनेदार-वस्तु.

**Knōll**, *n.* ( नोल् )—a small hill, a mound. लहान टेंकडी, टेंकाड. 2. *v. t. & i.* to ring or sound (bell); to toll out; to summon by the sound of bell. (घंटा) वाजविणें,-वाजणें, (तासाचे) ठोके वाजणें; घंटा वाजवून बोलावणें.

**Knŏp**, *n.* ( नॉप् )—(arch.) a knob; a bud. गेंद, गोंडा, गुंज; कळा.

**Knŏt**, *n.* ( नॉट् )—intertwining of parts of one or more strings to fasten them together; tangled mass, cluster; difficulty; a nautical

mile ( 6,080 ft ). गांठ. ग्रंथि : ( झाडाची ) गांठ. झुपका. गुच्छ ; अडचण ; पाण्यांतील मैल ( ६,०८० फूट अंतर ). *v. t. & i.* to tie a knot in ( string, &c. ); to entangle, to unite closely ; to knit eyebrows. गांठ मारणें ; गुंतणें. गुंतविणें ; कपाळाला आंठ्या घालणें, भुंवया चढवणें. *A Gordian knot*, a difficult problem or task, an intricate knot. गूढ प्रश्न. कोडें. कठीण-अवघड-काम ; गुंतागुंतीची गांठ. *A porter's knot*, a double shoulder-pad used for carrying loads. खांद्यावर ओझें वाहण्यासाठीं खांद्यावरील जाड बैठक. चुंबळ. *K. work*, a kind of fancy needlework. विणकामाचा प्रकार.

**Knŏtt'ȳ**, *a.* ( नॉ'टि )—full of knots ; puzzling, difficult, intricate. गांठळ ; गुंतागुंतीचा, गूढ, गोंधळवणारा.*-tt'iness*, *n.*

**Knout**, *n.* & *v. t.* ( नाउट्, नूट् )—( to flog with ) a scourge formerly used in Russia. फटके मारण्याचा चाबूक ( –चाबकानें फटके मारणें ).

**Know**, *v. t. & i.* ( नो )—to be aware of ; to perceive with certainty ; to be acquainted with ; to recognize. जाणणें ; खात्री करणें ; माहिती किंवा ओळख असणें ; ओळखणें. *Know'ing*, *a.* cunning, wide-awake; stylish. धूर्त, कावेबाज, शहाणा ; तरतरीत, उठावदार. *To know about* or *of*, ( –ची ) माहिती असणें. *To k. better than*, to be too discreet to do. न करण्याइतकें शहाणपण असणें. *To k. what's what*, जगाची रीतभात समजणें. *A know-nothing*, an ignorant person. अज्ञानी मनुष्य ; देव आहे किंवा नाहीं याविषयीं संशयग्रस्त मनुष्य. *To be in the know* (*of*), खरी गोष्ट-वस्तुस्थिति-माहीत असणें. ( *pa. t. knew*, न्यू ; *pa. p. known*, नोन् )

**Know'ingly̆**, *adv.* ( नो'इंग्लि )—in a knowing manner ; consciously. जाणून बुजून ; बुद्धिपुरःसर.

**Knŏwl'edge**, *n.* ( नॉ'लिज् )—knowing ; what one knows ; all that is or may be known. जाणणें ; माहिती ; ज्ञान. *Knowl'edgeable*, *a.* intelligent or well-informed. हुशार, माहीतगार.

**Knŭc'kle**, *n.* ( न'कल् )—a bone at finger-joint ; projection of knee-joints or ankle-joints of a quadruped. बोटाच्या सांध्याचें हाड ; चतुष्पाद जनावरांचा ढोपा. *v.t. & i.* to strike, to rub with knuckles. ढोप्यानें मारणें, –चालणें. *To k. down or under*, to give in, to submit ( to ). कबूल करणें, शरण जाणें. *Knuckle-bones*, a game played with sheep's knuckle bones. एक प्रकारचा खेळ. *K.-duster*, metal instrument to protect knuckles. जनावरांच्या ढोप्यांवर घालण्याचें धातूचें आच्छादन.

**Kō'dăk**, *n.* ( को'डॅक् )—a kind of camera. एक प्रकारचा हात-कॅमेरा. *v. t.* to photograph with kodak ; ( *fig.* ) to seize quickly, to describe vividly ( scene, view ). कोडॅक कॅमेरानें फोटो काढणें ; ( अलं॰ ) त्वरित ग्रहण करणें, हुबेहूब वर्णन करणें.

**Kraal**, *n.* ( क्राल् )—South African village of huts enclosed by fence ; a cattle-enclosure. द. आफ्रिकेंतील खेडें ; गुराढोरांची बंदिस्त जागा, गोठण, गोठा.

**Krĕm'lin**, *n.* ( क्रे'म्लिन् )—Russian citadel, esp. imperial palace at Moscow. रशियांतील किल्ला. मॉस्को येथील रशियाच्या बादशहाचा राजवाडा.

**Kultur**, *n.* ( कुल्टु'अर )—civilization as conceived by the Germans. जर्मन लोकांनीं कल्पिलेली संस्कृति. [ G.=*culture* ]

**Ku'mara**, *n.* ( कू'मारा )—( New Zealand ) sweet potato. न्यू झीलंडमधील रताळें.

**Kur'saal**, *n.* ( कु'अरझाल् )—a building for the use of visitors esp. at German health resort. ( जर्मनींतील ) प्रवाशांचें विश्रांतिगृह.

**Kȳ'mograph**, *n.* ( का'यूमोग्राफ् )—an instrument recording curves of pressure, pulsations, soundwaves, etc., a wavewriter. ( दाब-नाडी-ध्वनि ) लहरी-लेखक. [ Gk. *kuma*, wave ]

## L

**L**, ( एल् )—twelfth letter of the English alphabet ; Roman numeral 50. इंग्रजी वर्णमालेंतील बारावें अक्षर ; रोमन संख्या ५०.

**La**, *n.* ( ला )—the sixth note of scale. सप्त स्वरांतील सहावा स्वर, धैवत स्वरनिर्देशक अक्षर.

**Laag'er**, *n.* ( लाग'र् )—a camp, an encampment, esp. in a circle of wagons. ( गाड्यांचा ) तळ. *v. t. & i.* गाड्या वर्तुळाकार लावणें, तळ ठोकणें.

**Lăbefăc'tion**, *n.* ( लॅबिफॅ'क्शन् )—shaking, weakening, downfall. कांपणें, कंप, अशक्त होणें, पतन.

**Lā'bel**, *n.* ( ले'बल् )—a slip attached to an object to give some information about it. खूणचिठी, चकती, तिकिट, नांव, सदर. *v.t.* to attach a label to. चिठी लावणें.

**Lā'bial**, *a.* ( ले'बिअल् )—of the lips ; pronounced chiefly with the lips. ओठांचा ; ओष्ठ्य ( वर्ण ). *n.* a labial sound. ओष्ठ्य वर्ण.*-ize*, *v. t.*

**Lăb'oratorȳ**, *n.* ( लॅ'बरेटरि, लबॉ'- )-a place used for scientific experiments or for manufacture of chemicals. शास्त्रीय प्रयोगशाळा, रसायनप्रयोगशाळा. *-rial*, *a.*

**Labŏr'ious**, *n.* ( लॅबॉ'रिअस् )—hard-working, toilsome ; (of style) laboured. मेहनतीचा, कष्टाचा,

कठीण, अवघड, बोजड (लेखनपद्धति). *Labor'iously*, *adv.*; *Labor'iousness*, *n.*

**Lā'bour**, *n.* (ले'बर्)—exertion of body or mind; task; pains of childbirth; labourers. मेहनत, श्रम; काम, उद्योग; प्रसववेदना; मजूर. *v. i. & t.* to exert oneself; to work hard: to strive, to advance with difficulty; (of ship) roll or pitch heavily; to elaborate, to work out in detail, to treat at length. मेहनत करणें; कष्ट करणें; प्रयत्न करणें; कष्टानें जाणें; (बोट-) फार हालणें, हेलकावे खाणें; सविस्तर मांडणें. *Labour Party*, party representing wage-earners, M.P.s elected by it. मजूरपक्ष; त्या पक्षाचे (ब्रिटिश)-पार्लमेंटचे सभासद. *Hard l.*, सक्तमजुरीची (शिक्षा). *Lost l.*, fruitless efforts. निरर्थक-निष्फळ-यत्न. *L. of love*, आवडीचें-आवडतें-काम. *L. of Hercules*, *Herculean l.*, मोठ्या शक्तीचें-शक्ति-सामर्थ्याचें-काम. *In l.*, प्रसूत होणारी (स्त्री). *Labouring man*, मजूर, कामकरी.

**Lā'bourer**, *n.* (ले'बरर्)—one who labours, (*esp.*) a man doing unskilled work. मजूर, कामकरी.

**Lā'bourite**, *n.* (ले'बराइट्)—a member or adherent of Labour Party. मजूरपक्षाचा सभासद किंवा अनुयायी.

**Labūrn'um**, *n.* (लॅबर्नम्)—a tree with yellow hanging flowers. लोंबतीं पिवळीं फुलें असलेलें एक झाड.

**Lăb'yrinth**, *n.* (लॅ'बरिन्थ्)—a network of winding passages; maze; tangled affairs; (Anat.) complex cavity of internal ear. आडव्या तिडव्या वाटांचें जाळें; घोंटाळ्याचा रस्ता; गुंतागुंतीचे व्यवहार; कानांतील नागमोड, श्रवणान्तर्पुट. *Labyrin'thine*, *a.*

**Lăc**, *n.* (लॅक्)-dark-red resin used as scarlet dye. लाख, लाक्षा. [ Skr. *laksha* ]

**Lăc, Lăkh**, *n.* (लॅक्)—100,000 (esp. lac of rupees). लक्ष, लाख (रुपये). [ Skr. *laksha* ]

**Lāce**, *n.* (लेस्)—kinds of fine open fabric; cord etc. passed through eyelets or hooks to fasten or tighten boots, stays, etc. कलाबतू, लेस; बंद, फीत, नाडी, जाळी. *v. t. & i.* to fasten, tighten, compress, trim, with lace; to flavour (milk, beer etc.) with spirit; to lash, to beat. विणणें, फीत लावणें, फितीनें बांधणें; मद्यानें चव आणणें; ठोकणें, चोप देणें. *La'cy*, *a.*, *La'cing*, *n.* फितीनें बांधणें; शिडें बांधण्याची दोरी.

**Lă'cerāte**, *v. t.* (लॅ'सरेट्)—to tear, to rend; to wound feelings. फाडणें; मन दुखविणें, हृदयाला घरे पाडणें.*-a'tion*, *n.*,*-ate*,*-able*,*-ative*, *aa.* विदारक, विदारणक्षम,-योग्य.

**Lăch'es**, *n.* (लॅ'शिझ्)—(Law) negligence in performing a legal duty; culpable negligence. कर्तव्याची हयगय; सदोष हयगय.

**Lăc'hrȳmal**, *a.* (लॅ'क्रिमल्)—of tears. आंसवांचा, अश्रुमय; अश्रूत्पादक. [ L. *lacrima*, a tear ]

**Lăc'hrȳmatorȳ**, *a.* (लॅ'क्रिमेटरि)—of or causing tears. अश्रु उत्पन्न करणारा. *n.* (प्राचीन रोमन थडग्यांतील) अश्रूत्पादक शिशी,-कुपी. *L. shell*, a shell emitting gas that disables by making eyes water. अश्रूत्पादक वायु सोडणारा बॉंब गोळा. *Lac'hrymose*, *a.* tearful. रडता, अश्रु ढाळणारा.

**Lacin'ate,-āted**, *aa.* (लसि'नट्,-नेटिड्)— (bot., zool.) cut into deep irregular segments, jagged, fringed. अनियमित विभागांनीं युक्त, दांताळ, लोमश-केसाळ-कडांचा.

**Lăck**, *n.* (लॅक्)—deficiency or want. न्यूनता, उणीव. *v. i. & t.* to need, to be without. जरूर असणें, उणीव असणें. *No lack*, plenty *of.* ची विपुलता. *For lack*, owing to want or absence *of.* (ची) उणीव. *Lackland*, (person) having no land. स्वतःचा जमीनजुमला नसलेला (मनुष्य). *La'ck-lustre*, (of eye &c.) dull. निस्तेज, तेजोहीन; खरडेवजा, कमी पाण्याचा.

**Lăckadais'ical**, *a.* (लॅकडे'झिकल्)—languidly superior; feebly sentimental. कुर्रेबाज, घमेंडखोर; भावनामय, हळवा.*-ally*, *adv.*,*-alness*, *n.*

**Lăck'-a-day**, *interj.* (लॅ'कडे)—Alas! हाय हाय!

**Lăck'ey**, *n.* (लॅ'कि)—a footman. खिद्मतगार, नोकर. *v. t.* to wait upon, to play lackey to. ची खिद्मतगारी करणें, मिनतवारीनें बरोबर असणें. Also *Lac'quey*.

**Lacŏn'ic**, *a.* (लकॉं'निक्)—expressed in few words, short, pithy. मितभाषी, थोडक्यें पण अर्थपूर्ण, संक्षिप्त, त्रोटक. *Lacon'icism*, *n.*,*-ically*, *adv.*

**Lă'conism**, *n.* (लॅ'कॉनिझम्)—brevity of speech; short pithy saying. मितभाषण; उद्बोधक म्हण,-वचन.

**Lăcq'uer**, **Lăck'er**, *n.* (लॅ'कर्)—a kind of varnish. लाख, लाखेचें रोगण. *v. t.* लाखेचा रंग-रोगण-लावणें, लाख लावणें.

**Lăctā'tion**, *n.* (लॅक्टे'शन्)—suckling; secreting and excreting of milk. स्तनपान देणें; पान्हा सोडणें. *Lac'teal*, *a.* of milk; conveying chyle. दुधाचा, दुग्धमय; अन्नरसवाहक. *Lac'teals*, *n. pl.* chyle-conveying vessels. (शरीरांतील) अन्नरसवाहक नलिका, अन्नरसवाहिन्या.

**Lăctĕs'cent**, *a.* (लॅक्टे'सन्ट्)—looking like milk or yielding milky juice. दुधासारखा दिसणारा, दुधया रंगाचा, पांढऱ्या चिकाचा.*-cence*, *n.*

**Lăc'tic**, *a.* (लॅ'क्टिक्)—of milk. दुधाचा, दुधापासूनचा, दुग्धज. *L. acid*, दुग्धाम्ल. *Lac'tate*, *n.* दुग्धाम्ल.

**Lăctif'erous**, *a.* (लॅक्टि'फरस्)—yielding milk or milky juice. दुग्धवाहक, पांढरा चीक उत्पन्न करणारें (झाड वगैरे). [ L *lac*, *lactis*, milk & *fero*, I bear ]

**Lăctŏm'ĕter**, *n.* (लॅक्टॉ'मिटर्)—instrument for testing purity of milk. दुधांतील पाणी मोजण्याचें यंत्र, दुधाचा कस ठरविण्याचें यंत्र, दुग्धपरीक्षणयंत्र, दूधकांटा.

**Lăctose'**, *n.* (लॅक्टो'स्)—sugar of milk. दुधांतून काढलेली साखर, दुग्धशर्करा.

**Lacū'na**, *n.* (लक्यू'ना)-(*pl. lacunae*) gap in MS.; missing link in argument; vacant interval; interstice. हस्तलिखितांतील रिकामी जागा,-गळलेला मजकूर; (भाषणांतील) चुकून राहिलेला मुद्दा; मधली रिकामी वेळ; मधली पोकळी.

**Lacŭs'trine**, *a.* (लक'स्ट्राइन्, -स्ट्रिन्)—of, dwelling or growing in, lakes. तळ्यांतील, तळ्यांत राहणारा, तलावांत वाढणारा, जलेरुह.

**Lăd**, *n.* (लॅड्)—a boy, a young fellow. मुलगा, तरुण मनुष्य. *Lad'die*, *n.*

**Lădd'er**, *n.* (लॅ'डर्)—a frame with cross-bars (rungs) used as a means of ascent; (*fig.*) a means of rising to eminence. शिडी; उत्कर्षाचें साधन. *To kick down ladder*, to abandon friends or occupation that have helped one to rise. कृतघ्न होणें.

**Lāde**, *v. t.* (लेड्)—to load (ship), to ship (goods). ओझें भरणें, गलबतांत माल भरणें. *n.* a water-course. पाट. *Laden*, (*pa. p.*) loaded or burdened (with). भाराखालीं चुरडलेला, (ओझें) लादलेला. *La'ding*, *n.* load, cargo. ओझें; (गलबतावर) चढलेला माल.

**Lā'dle**, *n.* (ले'डल्)-a long-handled large-bowled spoon for transferring liquids. पळी, डाव. *v. t.* to transfer with ladle. पळीनें वाढणें. *L.-ful*, *n.*

**Lā'dy̆**, *n.* (ले'डि)—a gentlewoman, a woman of good birth or breeding, (prefixed to name) a woman of title below duchess, a daughter of duke, marquis or earl; mistress of a house; wife; (esp. in pl.) complimentary term applied to women in general. सभ्य स्त्री, कुलीन स्त्री; 'लेडी' ही पदवी धारण करणारी स्त्री; घरधनीण; पत्नी; (अने॰) सभ्य स्त्री, (e. g. *ladies & gentlemen*, सभ्य स्त्रीपुरुष हो!). *Lady-bird*, *Lady-bug*, a winged insect usu. reddish-brown with black spots. सोनकिडा, ताम्र कृमि. *Our Lady*, Virgin Mary. कुमारी मेरी. *Lady-help*, a gentlewoman servant. सभ्य स्त्री-नोकर. *Lady-killer*, a male flirt. स्त्रियांचीं मनें मोहित करणारा-वश करून घेणारा-मनुष्य. *Lady love*, a man's sweetheart. प्रियकरीण, प्राणप्रिया. *La'dy-ship*, title of a lady. कुलीन स्त्रीची पदवी, गृहिणीपद. *Lady's fingers*, (भाजीचे) भेंडे.

**Lā'dy̆-like**, *a.* (ले'डि-लाइक्)—with manners etc of a lady; (of man) effeminate; befitting a lady. स्त्रीजातीस साजेसा, नाजूक; स्त्रैण; नायकी.

**Lăg**, *v. i. & t.* (लॅग्)—to go too slow, to fall behind, to stay behind: (slang) to take into custody. अगदीं हळू जाणें, पाठीमागें पडणें; तुरुंगांत पाठविणें, अटकेंत ठेवणें. *n.* (Physics) (amount of) retardation in current or movement; (slang) a convict. प्रवाहाचें किंवा गतीचें मागें पडणें स्तंभन होणें; कैदी.

**Lăgg'ard**, *n. & a.* (लॅ'गर्ड्)—a person who lags behind, slow, sluggish, backward. पाठीमागें रेंगाळणारा मनुष्य; आळशी.

**Lagōōn'**, *n.* (लगू'न्)—salt-water lake parted from sea by sand-bank. खाऱ्या पाण्याचें सरोवर; खाजण. [ L *lacuna*, from root of Lake ]

**Lā'ic**, *a.* (ले'इक्)—non-clerical. गृहस्थी. *n.* a lay man, गृहस्थ.

**Lair**, *n.* (लेअर्)—a beast's lying-place, a place to lie or rest. पशूंचें विश्रांतिस्थान, गुहा, गोठण.

**Laird**, *n.* (लेअर्ड्)—a Scotch landowner, a house-proprietor. स्कॉटलंडमधील जमीनदार.

**Laiss'ez faire**, *n.* (ले'से फेअर्)-the let-alone principle in Government business, esp. commerce. प्रजेच्या व्यवहारांत सरकारचा तटस्थपणा, तटस्थपणाची वृत्ति, व्यक्तिस्वातंत्र्याची मुभा. [ F=*to let act* ]

**Lā'ity̆**, *n.* (ले इटि)—laymen. गृहस्थवर्ग, साधारण लोक; अनभिज्ञ लोक.

**Lāke**, *n.* (लेक्)—a large sheet or body of water wholly surrounded by land. सरोवर, तळें. *The Great Lake*, the Atlantic ocean. अटलांटिक महासागर. *The Great Lakes*, कॅनडा व युनायटेड स्टेट्स यांच्या सरहद्दीवरील सरोवरें. *Lake-country*, *L.-land*, *the Lakes*, the region of English lakes. इंग्लंडमधील सरोवरांचा प्रदेश. *Lake-poets*, Coleridge, Southey, & Wordsworth, who lived in lake-land. कॉलरिज साउदे व वर्ड्जवर्थ हे इंग्लिश कवि. *Lake-let*, *n* a little lake. लहान सरोवर, तळें.

**Lāke**, *n.* (लेक्)—a crimson pigment. लाखेमारख्या तांबडा गर्द रंग.

**Lăkh**, *n.* (लॅख्)—a hundred thousand, 100,000. एक लक्ष.

**Lămb**, *n.* (लॅम्)—a young sheep, its meat; an innocent child, a helpless person. कोंकरूं, कोंकराचें मांस: निरपराधी मूल, अनाथ मनुष्य. *v. i. & t.* (of sheep) to give birth (to); to tend. कोंकरूं विणें; पाळणें. *Lamb-kin, n.* a little lamb. लहान कोंकरूं. *Lamb'like, a.* (esp.) meek. कोंकरासारखा सौम्य, निरुपद्रवी. *The Lamb (of God)*, Christ. येशू ख्रिस्त, ईश्वराचें कोंकरूं. *Like a lamb*, unresistingly. प्रतिकार न करतां, शरणागतीनें. *As well be hanged for a sheep as for a lamb*, to sin boldly, to go the whole hog. बेधडक पापाचरण करणें, पूर्णपणें एकरूप होणें. *A wolf, a fox, in lamb's skin*, a hypocrite. ढोंग करणारा, ढोंगी-अविश्वासू-मनुष्य, साळसूद फसव्या मनुष्य.

**Lam'bent**, *a.* (लॅम्बेन्ट्)— (of flame, &c.) playing about a surface; gently brilliant, gleaming, twinkling. वरवर खेळणारा; थोडासा चकाकत असणारा; सौम्य प्रकाशणारा. *Lam'bency, n., -bently, adv.*

**Lāme**, *a.* (लेम्)—crippled by injury or defect; limping or unable to walk; (of argument, excuse) imperfect, unsatisfactory; (of metre) halting. व्यंग असलेला; लंगडा; लेचापेचा, कच्चा, अर्धवट (पुरावा, सबब इ॰); अडखळणारें वृत्त. *v. t.* अधू-लंगडा-पांगळा करणें. *Lame of* or *in a leg*, पायानें लंगडा. *A lame duck*, अधू मनुष्य; दिवाळखोर; पुन्हां निवडून न आलेला मनुष्य.

**Lamĕnt'**, *n.* (लॅमें'न्ट्)—passionate expression of grief; an elegy. शोक, विलाप; शोकगीत. *v. i. & t.* to utter lament, to express or feel grief for, to bewail, to mourn for, to bemoan. शोक करणें, विलाप करणें. *Lament'ed, pa. p.* mourned for (esp. conventionally of the dead, as the *late lamented*), परलोकवासी, मरहूम.

**Lăm'entable**, *a.* (लॅ'मिन्टेबल्)—deserving sorrow, doleful, deplorable. शोचनीय, दुःखद.

**Lămentā'tion**, *n.* (लॅमिन्टे'शन्)—lament, lamenting, expression of sorrow, mourning. शोक, विलाप, आक्रोश.

**Lăm'ina**, *n.* (लॅ'मिना)—(*pl.*-ae) a thin plate or flake or layer. पातळ पत्रा, कवच, पडदा, पदर, चीप, कातळा. *Lam'inate, v. t. & i.* (लॅ'मिनेट्) to beat or roll metal into laminae; to split into layers, to overlay with metal plates. धातूचे पातळ पत्रे करणें; त्यातळे काढणें; धातूच्या पत्र्यानें मढविणें. *Lam'inated*, (लॅ'मिनेटिड्), *Lam'inar, Lam'inose, aa.* in plates. पातळ काप-पत्रे-थर-कातळे काढलेला.

**Lămp**, *n.* (लॅम्प्)—a vessel with oil and wick for giving light; (*fig.*) source of spiritual or intellectual light; sun, moon, star. दिवा, दीप; (अलं॰) आध्यात्मिक प्रकाशाचा उगम, ज्ञानप्रदीप; सूर्य, चंद्र, तारा. *To smell of the lamp*, to betray nocturnal study, to be laborious in style etc. जागून अभ्यास केल्याची छटा दिसणें, विशेष परिश्रम करून लिहिणें वगैरे. *To pass, to hand, on the lamp*, to do one's part in advancing knowledge, cause etc., ज्ञानवृद्धीला-एखाद्या सत्कार्याला-हातभार लावणें.

**Lămp'blăck**, *n.* (लॅ'म्प-ब्लॅक्)—a pigment made from fine soot. काजळ, मस. *Lamp-lighter*, a man who lights street lamps. बत्तीवाला, दिवे लावणारा. *Like a lamp-lighter*, with speed. जलदीनें, घाईनें.

**Lăm'pĭon**, *n.* (लॅ'म्पिअन्)—a glass pot holding light for illuminations. हांडी, झुंबर.

**Lămpōōn'**, *n.* (लॅम्पू'न्)—a piece of scurrilous or virulent satire. निंदाव्यंजक उपरोधिक लेख. *v. t.* to write lampoon against. एखाद्याविरुद्ध निंदात्मक लेख लिहिणें.

**Lănce**, *n.* (लान्स्)—a horseman's long spear. भाला, बरची. *v. t.* to prick or open with a lancet; to pierce with a lance. नस्तरानें फाडणें-चिरणें-कापणें; भाला-बरची-मारणें.

**Lănce'lĕt**, *n.* (ला'न्स्लिट्)—a small fish. लहान मासा.

**Lăn'cĕolate**, *a.* (लॅ'न्सिओलिट्)—shaped like a spear-head. भाल्याच्या टोकाच्या आकाराचा, अणकुचीदार.

**Lă'ncer**, *n.* (ला'न्सर्)—a soldier of cavalry regiment armed with lances. भालेकरी घोडेस्वार.

**Lă'ncĕt**, *n.* (ला'न्सिट्)—a pointed and two-edged surgical instrument; arch or window with pointed head. नस्तर, फाडण्याचें शस्त्र; वरती टोंकदार असी कमान,-खिडकी.

**Lănd**, *n.* (लॅन्ड्)—solid part of earth's surface; country, state; landed property; (pl.) estates. जमीन, भूमि, प्रदेश; प्रांत, राष्ट्र; वतन; (अने॰) जमीनजुमला, स्थावर मिळकत. *v. t. & i.* to set on the land or shore, to disembark, to go or put ashore; to catch fish, to win a prize. किनाऱ्यावर उतरणें; (मासे) पकडणें, (बक्षीस) मिळविणें. *Land-agent, n.* जमिनीची-इस्टेटीची-व्यवस्था पाहणारा, विक्री करणारा दलाल, गुमास्ता. *Land-bank, n.* स्थावर मिळकतीच्या तारणावर कर्जाऊ पैसे देणारी पेढी,-बँक.

*L.'breeze*, n. (लॅ'ड्ब्रीझ्)—जमिनीवरून समुद्राकडे वाहणारा वाऱ्याचा प्रवाह. *L. force*, n. (जमिनी-वर) लढणारें सैन्य, लष्कर (आरमार नव्हे तें).

**Lăn'dau**, n. (लॅ'डो)—a four-wheeled coach or carriage with top whose back and front can be raised and lowered. खालींवर पाडतां येणाऱ्या टपाची चौचाकी गाडी. *Landaulet (te)'*, n. a coupe with landau top. दोन माणसें बसण्याजोगी टपाची गाडी. [From *Landau*, a town in Germany]

**Lăn'dĕd**, a. (लॅं'डिड्)—possessed of land; consisting of land. जमीनजुमलेवाला; जमिनीचा. *The landed interest*, owners and holders of land. जमीनदारवर्ग.

**Lănd'hōlder**, n. (लॅ'न्ड्-होल्डर्)—a holder or proprietor of land, (*usu.*) a tenant of land. जमीनदार, मिरासदार, मिराशी.

**Lăn'dĭng**, n. (लॅ'न्डिंग्)—a place for setting on land or disembarking; a platform at the head of stairs. (गलबतांतून) उतरण्याची जागा, घाट, बंदर; जिन्यावरची सपाटी.

**Lănd'lădy̆**, n. (लॅ'ड्-लेडि)—a woman keeping an inn or lodgings; a woman having tenants. खाणावळीची मालकीण; घराची मालकीण, घरधनीण.

**Lănd'locked**, a. (लॅ'ड्लॉक्ट्)—almost or quite enclosed by land. भूवेष्टित.

**Lănd'lŏrd**, n. (लॅ'ड्-लॉर्ड्)—a person of whom another holds any tenement; keeper of an inn or lodgings. घरवाला, जमीनदार; खाणावळ-वाला, खाणावळीचा मालक.

**Lănd'märk**, n. (लॅ'ड्-मार्क्)—a boundary mark; a conspicuous object; a notable event. क्षेत्रमर्यादाचिन्ह, शिंवेची-हद्दीची-खूण; प्रसिद्ध वस्तु; महत्त्वाची गोष्ट.

**Lănd'scāpe**, n. (लॅ'न्-स्केप्)—a piece of inland scenery, a country scene. सृष्टीचा (रम्य) देखावा.

**Lănd'slīde**, n. (लॅ'ड्स्लाइड्)—over-whelming political defeat; land-slip. राजकारणांतील मोठा पराभव; कड्याचा-डोंगराचा-भाग कोसळून पडणें.

**Lănd'tax**, n. (लॅ'ड्टॅक्स्)—tax assessed on landed property. शेतसारा, फाळा, जमिनीचा सारा.

**Lănd'wind**, n. (लॅ'ड्वुइंड्)—land-breeze. तडीचा-किनाऱ्यावरून येणारा-वारा, मतलई.

**Lănd'ward**, a., adv. & n.; **Land'wards**, adv. (लॅ'ड्वर्ड्, लॅ'ड्वर्ड्झ्)—जमिनीवर, किनाऱ्यावर, जमिनीकडे.

**Lāne**, n. (लेन्)—a narrow street; a passage between two houses, etc. अरुंद रस्ता, आळी, गल्ली, मार्ग. *Red lane*, throat. घसा. *The Lane, Drury Lane* (theatre), ड्रुरी लेन नाटकगृह. *It is a long lane that has no turning*, a change is sure to come. परिस्थिति खास पालटणार.

**Lăng syne**, adv. & n. (लॅंग् साइन्)—(in) the old days. पुरातन काळीं; पूर्वीचा काळ. [Scotch, = long since]

**Lăng'uage**, n. (लॅ'ग्विज्)—speech; form of speech used by a people, speech peculiar to a nation; style, expression. भाषण; भाषा, बोली; भाषणपद्धति, परिभाषा. *Dead-l.*, मृतभाषा, *Bad l.* or *vulgar l.*, हलकट भाषा, शिवीगाळ. *Strong l.*, जोरदार-कडक-भाषा. *L.-master*, भाषाविषयशिक्षक. *Finger l.*, करपल्लवी भाषा. [L *lingua*, tongue]

**Lăng'uĭd**, a. (लॅ'ग्विड्)—suffering from or seeming to be affected by languor. गळून गेलेला, सुस्त, मंद, धिमा.

**Lăng'uĭsh**, v. i. (लॅ'ग्विश्)—to lose or lack vitality; to lose intensity; to droop; to pine for; to look with softness or tenderness. अशक्त होणें; मंदावणें; गळून जाणें; झुरणें.

**Lăng'uor**, n. (लॅं'गर्)—faintness; lassitude; soft or tender mood. सुस्ती; ग्लानि; शैथिल्य.

**Lănk**, a. (लॅंक्)—lean and tall; long. सडपातळ; लांब. *Lank'y*, a. tall, long. उंच, लांब, लंबाड्या.

**Lăn'tern**, n. (लॅ'न्टर्न्)—a case for light to be used out of doors. कंदील. *Magic lantern*, जादूचा कंदील. *Parish lantern*, the moon. चंद्र. *Lantern-jawed*, a. thin-faced. गालफिचा, चापटतोंड्या.

**Lăn'yard**, n. (लॅ'न्यर्ड्)—a short cord for fastening something. (डुंभाची) कोपरी.

**Lāodicē'an**, n. (लेआडिसी'अन्)—a person lacking zeal, esp. in religion or politics. धर्म किंवा राजकारण यांत कळकळ न बाळगणारा.

**Lăp**, n. (लॅप्)—tail or skirt of a coat; thighs of a sitting person; front of woman's skirt held up as a receptacle; one circuit of course in a race. कोटाचें पाठीमागील टोंक; मांडी; ओटी; शर्यतीच्या मैदानावरील एक फेरा. v. t. & i. to swathe, enfold; to arrange so as to over-lap. लपेटणें, गुंडाळणें, वेढणें; (वर) चढणें, वाढविणें. *In Fortune's lap, In the lap of luxury*, दैववान, दैवाचा, ऐश्वर्यसंपन्न असणें. *Lap-dog*, n. a dog small enough to be held in the lap. कुलंगें कुत्रें. *Lap-stone*, n. चांभाराचा चामडें मळण्याचा दगड. *Lap-ful*, a. & n. ओटीभर, ओटी.

**Lăp**, *n.* (लॅप्)—liquid food ; sound of wavelets. (कांजी, खीर वगैरे) पातळ पेय (अन्न) ; चकचक आवाज *v. i. & t.* to drink by scooping with the tongue ; to drink greedily ; (of waves etc.) to make a lapping sound. चाटून खाणें ; अधाशीपणानें पिऊन टाकणें; (लाटां-प्रमाणें) चकचक आवाज करणें. [Gk *lapto*, Sk. *liha*, to lick]

**Lapĕl'**, *n.* (लपें'ल्)—a part of coat-breast folded back. कोटाची परतलेली गळपट्टी, कॉलर. *Lapelled'*, *a.* (लपें'ल्ड्).

**Lăp'idarў**, *n.* (लॅ'पिडरि)—a stone-cutter, an engraver of gems. जवाहिरावर खोदकाम करणारा ; जवाहिऱ्या. *a.* of stones ; engraved on stone. हिरेमाणकांवरील नक्षीकामासंबंधीचा ; धडग्यावरील खोदलेल्या लेखाविषयींचें, दगडाचें, पाषाणात्मक.

**Lăp'is lăz'ūlī**, *n.* (लॅ'पिस् लॅ'झ्यु-लाय्)—a bright blue pigment, a mineral of a rich blue colour. वैडूर्य, नीळ.

**Lăpp'et**, *n.* (लॅ'पिट्)—a flap or fold of garment etc. or flesh. पदर.

**Lăpse**, *n.* (लॅप्स्)—slip of memory, &c. ; slight mistake ; coming to an end ; elapsing ; moral slip. स्मृतिभ्रंश ; लहानशी चूक ; शेवट होणें ; निघून जाणें ; नीतिभ्रष्टता. *v. i.* to fall back or away ; to become void, to fall in ; to elapse, to pass slowly or by degrees. मागें पडणें ; रद्द होणें ; निघून जाणें.

**Lăp'sus căl'amī**, *n.* (लॅ'प्सस् कॅ'लमाय्)—a slip of pen. लेखणीचा दोष, चुकून लिहिलें जाणें, लेखन-दोष. [L *lapsus*, to slip or fall]

**Lăp'sus lĭng'uae**, *n.* (लॅ'प्सस् लिं'ग्वी)—a slip of the tongue. जीभ चळणें, चुकून उच्चारणें.

**Lăp'wĭng**, *n.* (लॅ'प्-विंग्)—a handsome bird, pewit. टिटवी.

**Lär'board**, *n.* (ला'र्बर्ड्)—the left-hand side of a ship, port. जहाजाची डावीकडची बाजू.

**Lär'cenў**, *n.* (ला'र्सिनि)—theft of goods. मालाची चोरी. *Larcenous*, *a.*

**Lärch**, *n.* (लार्च्)—bright-foliaged tree of pine kind ; its timber. देवदारजातीचा वृक्ष ; त्याचें लांकूड.

**Lärd**, *n.* (लार्ड्)—pig-fat prepared for cooking. डुकराची चरबी. *v. t.* to smear with lard, to grease, to garnish (talk, writing) with metaphors, technical terms, foreign words, etc. डुकराची चरबी लावणें ; रूपक, पारिभाषिक शब्द वगैरेची भेसळ करणें.

**Lärd'er**, *n.* (ला'र्डर्)—a room or cupboard for meat & other articles. मांस वगैरे ठेवण्याची जागा किंवा कपाट.

**Lärge**, *a.* (लार्ज्)—of considerable or relatively great magnitude ; of wide range, comprehensive ; liberal, generous. मोठा ; व्यापक, प्रशस्त ; उदार, सढळ. *n.* (only with *at* or *in*). *At large*, not in custody ; at full length ; as a whole ; broad-cast. मोकळा, सुटा ; विस्तारानें, पाल्हाळानें, पाल्हाळिक ; सर्वांमिळून, सर्वांशीं ; प्रसृत झालेली, प्रसिद्ध झालेली. *A gentleman at large*, निरुद्योगी दरबारी मनुष्य, खुशालचेंडू गृहस्थ. *In large*, on large scale, मोठ्या प्रमाणा-वर (opp. *in little*). *Large'ly*, *adv.* (ला'र्ज्लि) to a large extent. पुष्कळ अंशीं, उदारपणानें, सविस्तर.

**Lär'gĕsse**, *n.* (ला'र्जेस्)—money or gifts scattered on occasions of rejoicing. देणगी, बक्षीस. [L *largus*, copious]

**Lärk**, *n.* (लार्क्)—kinds of small bird ; frolic, spree ; amusing incident. भारद्वाज, चंडोलपक्षी ; चैन ; गंमत, मौज. *v. i.* to indulge in lark. गंमत करणें. *To rise with the lark*, to get up early. लवकर निजून उठणें.

**Lă'rrĭkĭn**, *n.* (लॅ'रिकिन्)—a rowdy street boy, a hooligan. गुंड, बाजारबुणगा.

**Lär'va**, *n.* (ला'र्व्हा)—(*pl. larvae*), insect in caterpillar stage. किड्याची अंड्यांतून बाहेर निघाल्यावरची स्थिति, कोशेटा. *Lar'val*, *a.* कीटक स्थितींतला. [L *larva*, a mark]

**Lă'rўnx**, *n.* (लॅ'रिंक्स्)—cavity in throat holding vocal chords. घशांतील पोकळी, कंठनाल, नरडी, वागिंद्रिय.

**Lărўngī'tĭs**, *n.* (लॅरिंजा'इटिस्)—inflammation of larynx. घशांतील सूज.

**Lăs'car**, *n.* (लॅ'स्कर्)—an East-Indian sea-man. नाखवा, खलाशी, लास्कर. [Hindi *lashkari*, a soldier]

**Lascĭv'ĭous**, *a.* (लॅसि'व्हिअस्)—lustful, exciting voluptuous emotions. कामातुर, कामोद्दीपक. *-ly*, *adv.* ;*-ness*, *n.* [L *lascivus*, sportive, Skr. *lasha*, to desire]

**Lăsh**, *v. i. & t.* (लॅश्)—to beat with a thong, &c. ; to urge as with a whip ; to tie tightly ; to castigate in words, to rebuke ; to dash against. वादीनें मारणें ; चाबकानें दामटणें ; घट्ट बांधणें ; टोमणे मारणें, खरड काढणें ; (वर) आदळणें, तडाके मारणें. *n.* a stroke given with a thong, &c. ; flexible part of a whip. वादीचा फटकारा ; चाबकाची वादी. *To lash one-self into a fury*, भडकणें, क्रोधाविष्ट होणें. *Lash'ing*, *n.* a flogging ; a cord used in making fast. फटके मारणें ; बांधण्याची दोरी. *Lash'ings*, (*n. pl.*) (slang) plenty. विपुलता.

**Lăsh'er**, *n.* ( लॅं'शर् )—a weir, a pool below it. नदींचें पाणी अडविण्यासाठीं बांध, बंधारा, त्याखालील जलसंचय.

**Lăss, Lăss'ie**, *nn.* ( लॅस्, लॅ'सि )—a sweetheart, a girl. तरुणी, सुलगी.

**Lăss'itūde**, *n.* ( लॅ'सिट्यूड् )—languor; disinclination to exert oneself. ग्लानि; सुस्ती, मांद्य. [ L *lassus*, tired ]

**Lăss'ō**, *n.* ( लॅ'सो, लसू' )—*pl. lassos*, a noosed rope for catching cattle. ( रानघोडे, जनावरें वगैरे धरण्याची ) फांसकी असलेली दोरी. *v. t.* to catch with lasso. दोरीच्या फाशांत-पाशांत -पकडणें.

**Lăst**, *a.* ( लास्ट् )—after all others, coming at the end; most recent; utmost. सरता, शेवटचा; अगदीं अलीकडील; निर्वाणीचा. *adv.* on the last occasion before the present. मागील खेपेस, शेवटीं. *v. i.* to go on; to remain unexhausted or adequate or alive. पुढें चालू असणें; टिकणें, पुरणें, राहणें. *n.* 1. most recent letter etc.; last performance of certain acts; end. अगदीं ताजें-अलीकडचें-पत्र; शेवटचें कृत्य ( श्वास इ० ); शेवट. 2. a shoemaker's model for shaping shoe on. जोड्याचा-बुटाचा-( चांभाराचा ) सांचा, पायाच्या आकाराचा लांकडी ठोकळा. 3. a load; cargo; commercial measure or weight varying with the class of goods. ओझें; गलबताची भरताड, भरवण; एक प्रकारचें माप, वजन. 4. a kind of hard cloth used for boot-tops. एक प्रकारचें ( बुटांवर बसविण्याचें ) जाड कापड. *Last but not least*, शेवटीं सांगितलें तरी कमी महत्त्वाचें नव्हे, असें. *The four last things*, death, judgement, heaven, and hell. मृत्यु, पापपुण्याचा निवाडा, स्वर्ग, नरक. *Last day*, Day of Judgement, पापपुण्याच्या निवाड्याचा काल. *The last word on the matter*, त्या गोष्टीविषयीं अखेरचें-निर्णायक-मत,-म्हणणें. *At last, At long last*, सरतेशेवटीं. *To* or *till the last*, अखेरपर्यंत, मरेपर्यंत. *To breathe one's last*, मरणें. *To last out*, तग धरणें, पुरणें, शेवटपर्यंत टिकणें. *To stick to one's last*, आपल्याला समजत नाहीं त्यांत लुडबुड न करणें. *Last but one*, उपांत्य. *Last night*, गेल्या रात्रीं. *Last year*, सालगुदस्त, गेल्या वर्षी.

**Lăst'ing**, *a.* ( ला'स्टिंग् )—such as will last or endure, permanent; durable. चिरस्थायी; टिकणारा, टिकाऊ.

**Lăst'ly̆**, *adv.* ( ला'स्ट्-लि )—finally, at last. सरते शेवटीं.

**Lătch**, *n.* ( लॅच् )—a bar with catch as fastening of gate, &c. दाराची खिटी, कडी. *v. t.* to fasten with a latch. खिटी किंवा कडी घालणें.

**Lătch'ĕt**, *n.* ( लॅ'चिट् )—the string that fastens a shoe. ( बुटाचा ) बंद, वादी, वाद्.

**Lāte**, *a.* ( लेट् )—after the right time; far on in day or night period; backward; now dead; that occurred lately. उशिरां आलेला; मागासलेला; मयत; आधुनिक, अलीकडील. *adv.* after right time. उशिरां. *n. Of late*, recently, in time not long past. अलीकडे, नुकताच. *Late-comer*, उशिरां येणारा. *Late-hours*, ( निजण्याचा, उठण्याचा ) अवेळ,-उशीर. *The late prime minister*, परलोकवासी, किंवा माजी, मुख्यप्रधान. *The late war*, अगदीं अलीकडील-गेलें-युद्ध. *Of late years*, गेलीं कांहीं वर्षें. *Late fee*, fee on letter posted after ordinary collection time. पत्र नेहमींच्या वेळेपेक्षां उशिरां टपालांत टाकतांना तें वेळेवर जावें म्हणून द्यावयाची जादा फी,-चा अधिक आकार. *Late in the day*, at a late stage. फार उशिरां, फार वेळानें. *La'ten, v. t. & i.*; *La'teness, n.*; *La'tish, a. & adv. Comparative : later* or *latter*; *Superlative : latest* or *last*.

**Lateen'**, *a.* ( लटी'न् )—*l. sail*, triangular sail. त्रिकोणाकृति शीड. *L. ship*, अशा शिडाचें जहाज.

**Lāte'ly̆**, *adv.* ( ले'ट्-लि )—of late, not long ago; in recent times, recently. नुकताच; अलीकडे.

**Lā'tent**, *a.* ( ले'टन्ट् )—not manifested, under the surface, concealed; dormant. अदृश्य, गुप्त; अप्रगट, सुप्त. *L.-heat*, अनुद्भूत उष्णता. *La'tency, n.*; *La'tently, adv.*

**Lăt'eral**, *a.* ( लॅ'टरल् )—of, at, toward, or from the side or sides. बाजूचा, बाजूकडील, पार्श्व. *n.* a lateral shoot or branch. बाजूवर वाढलेला कोंब किंवा फांदी. *Lateral branch of family*, side branch etc., भावाचा किंवा बहिणीचा वंश. *La'terally, adv.*

**Lath**, *n. & v. t.* ( लाथ् )—*plu. laths* ( लादज् ), a thin strip of wood. कांबीट, रीप, पट्टी, ओमणाची काठी (-घालणें). *Lath & plaster*, material for interior wallfaces, ceilings etc. भिंतीच्या आंत घालण्याचें काठ्या व गिलावा वगैरे सामायन. *As thin as a lath*, कागदी जवान; चारकोळा ( मनुष्य ). *La'thy, a.* ( ला'थि ) काटकोळ्या, लकड्या. *Lath'ing, n.* ओंबण, रीप, ओमण.

**Lāthe**, *n.* ( लेद् )—kinds of machine used in turnery and pottery. ( कातकामाचा ) चरक, कुंभाराचें चक्र

**Lăth'er**, *n.* ( लॅ'दर )—froth of soap and water. साबणाचा फेंस. *v. i. & t.* to form lather; to cover ( chin ) with lather; to thrash. फेंस काढणें; साबणाचा फेंस लावणें; फटकावणें, मारणें.

**Lăt'in**, *n.* (लॅ'टिन्)—the language of ancient Rome; an inhabitant of ancient Latium. लॅटिन भाषा; इतालींतील प्राचीन लेशिअम परगण्यांतील रहिवाशी. *a.* of or in *Latin.* लॅटिन भाषेचा, -भाषेंतील.

**Lăt'inism**, *n.* (लॅ'टिनिझम्)—idiom or construction imitating Latin. लॅटिन संप्रदायविशेष, लॅटिनभाषेंतील वाक्संप्रदायाचें अनुकरण. *Lat'inist*, *n.* a person knowing Latin. लॅटिन भाषापंडित. *Lat'inity*, *n.* Latin style. लॅटिन भाषापद्धति. *Lat'inize*, *v. t. & i.* लॅटिन प्रत्यय लावणें, लॅटिन भाषाप्रयोग वापरणें,-*zation*, *n.* *The Latin peoples*, फ्रान्स, स्पेन, पोर्तुगाल इ. देश. *Thieves' Latin*, ठगांची-चोरांची-सांकेतिक भाषा.

**Lăt'itūde**, *n.* (लॅ'टि-ट्यूड्)—breadth, scope, full *extent; freedom from rules* or *restriction;* angular distance north or south of the equator; (Astronomy) angular distance of heavenly body from ecliptic. रुंदी, रुंदावा, विस्तार, परिमाण; मोकळेपणा, स्वातंत्र्य; विषुववृत्तापासून अंतर, अक्ष, अक्षांश; (खगोलविद्येंत) विक्षेप, शर. *Lat'itudes*, regions, climes (of temperature). उष्णतामानदर्शक विभाग, -प्रदेश. *Latitu'dinal*, *a.* रुंदीचा, रुंदाव्याचा. *Latitudinarian*, *a. & n.* स्वच्छंदी, मनसोक्त (वागणारा). [ L *latus*, broad ]

**Latrine'**, *n.* (लॅट्री'न्)—a place for evacuation of bowels or bladder, privy, water-closet. मुत्री, संडास, पायखाना.

**Lătt'er**, *a.* (लॅ'टर्)—recent; mentioned later of the two (opposed to *former*). अलीकडील; दुसरा. *Latter end*, शेवट, मृत्यु. *Latter-day*, *a.* modern. अलीकडील, अर्वाचीन. *Latt'erly*, *adv.* of late; in later part of. अलीकडे, हल्लीं, (च्या) उत्तर काळांत.

**Lătt'ice**, *n.* (लॅ'टिस्)—a structure of laths or bars crossing each other with interstices. जाळीदार काम, जाळी. *L.-window*, जाळीची खिडकी. *Latt'iced*, *a.* (लॅ'टिस्ट्).

**Laud**, *n.* (लॉड्)—praise; a song of praise, स्तुति; स्तोत्र. *v. t.* to praise in words, to extol, to celebrate. स्तुति करणें. *Laud'atory*, *a.* (लॉ'डटरि) प्रशंसारूप, स्तुतिरूप. [ L *laudem*, praise ]

**Laud'able**, *a.* (लॉ'डेबल्)—commendable; (Medical) healthy, sound. स्तुत्य, प्रशंसनीय; (वैद्यकशास्त्रांत) आरोग्यदर्शक, हितावह. *Laud'ability*, *n.* स्तुतिपात्रता, स्तवनयोग्यता.

**Laud'anŭm**, *n.* (लॉ'ड्-नम्)—opium prepared in spirit of wine, alcoholic tincture of opium. अफूचा अर्क.

**Laudā'tion**, *n.* (लॉडे'शन्)—praising, panegyric, praise, commendation. स्तुति, प्रशंसा.

**Laugh**, *v. i. & t.* (लाफ्)—to make the sounds usual in expressing amusement, exultation, and scorn; to utter with a laugh, to treat with contempt. हंसणें. *n.* sound or act of laughing. हंसण्याचा आवाज, हास्य. *To laugh in one's sleeve*, to be secretly amused. मनांतल्या मनांत हंसणें, गुदगुल्या होणें. *To laugh on the wrong side of mouth*, रडण्याची पाळी येणें, अश्रु गळणें. *He laughs best who laughs last*, गोड शेवट होईपर्यंत-संकटमुक्त होईपर्यंत-हसूं नये. *To laugh at*, (ची) थट्टा करणें, टर उडविणें, हंसणें. *To laugh a person out of court*, हंशावारी (दुसऱ्याचें म्हणणें) न ऐकणें. *To laugh away*, हंसून-थट्टा मस्करींत-वेळ घालविणें; हंशावारी घालविणें. *To laugh down*, हंसून बंद पाडणें,-गप्प बसविणें. *To l. off*, हंसून दुर्लक्ष करणें. *To l. over*, हंसून वादविवाद करणें. *To join in the laugh*, दुसऱ्यानें केलेली चेष्टा-थट्टा-हंशावारी नेणें,-खेद न मानणें. *To have* or *get the laugh of*, प्रतिस्पर्ध्यावर बाजू उलटविणें. *Laugh'er*, *n.*; *Laugh'ing*, *a.*; *Laugh'ingly*, *adv.*

**Laugh'able**, *a.* (ला'फेबल्)—ridiculous, ludicrous, exciting laughter; amusing. हास्यजनक; मनोरंजक.

**Laugh'ĭng-gas**, *n.* (ला'फिंग् गॅस्)—a gas that excites laughter. हास्योत्पादक वायु.

**Laugh'ĭng-stŏck**, *n.* (ला'फिंग्-स्टॉक्)—an object of general derision or ridicule. हास्यविषय, हास्यास्पद गोष्ट.

**Laugh'ter**, *n.* (ला'फ्टर्)—an act of laughing. हंसें.

**Launch**, *v. t. & i.* (लॉन्च्, लांच्)—to hurl, to send forth; to start on a course; to set vessel afloat. फेंकणें; सुरू करणें; (जहाज) लोटणें. *n.* a large boat. मोठी नाव, पगार, बोट. *Steam launch*, लहान आगबोट.

**Laun'dress**, *n.* (लॉ'न्ड्रेस्)—a woman who washes and gets up linen, a washer-woman. परटीण, धोबीण. [ L *lavare*, to wash ]

**Laun'drỹ**, *n.* (लॉ'न्ड्रि)—establishment for washing clothes. कपडे धुवून मिळण्याचें ठिकाण.

**Laur'eate**, *a.* (लॉ'रिअट्)-wreathed or decked or invested with laurel. लॅरिल वनस्पतीच्या माळेनें भूषित. *n. Poet l.*, पगारी राजकवि.-*ship*, *n.*

**Lau'rel**, *n.* (लॉ'रेल्)—kinds of glossy-leaved shrub; (*pl.*) honour, fame. एक प्रकारचें लहान झुडुप; कीर्ति, मान, सन्मान, गौरव. *v. t.* to wreathe with *l.*, लॉरेलनें भूषविणें. *To look to one's*

*laurels*, आपलें थोरपण कमी न होण्याविषयीं सावध असणें. *To reap, win, ll.*, यश-मान-मिळविणें. *To rest on one's ll.*, आहे तेवढाच नांवलौकिक संभाळून राहणें.

Lau'relled, *a.* (लॉ'रेल्ड्)—wreathed with laurel. लारेल-माला-विभूषित, विद्वान्.

Laurusti'nus, Laures-, *n.* (लॉरस्टा'इनस्)—an evergreen flowering shrub. एक सदापर्णी फूलझाड.

Lä'vä, *n.* (ला'व्हा)—matter discharged in fluid form by volcano. ज्वालामुखी पर्वतांतून वाहणारा तप्त रस, ज्वालामुखी रस.

Lăv'atorў, *n.* (लॅ'व्हेटरि)—a room or place for washing hands and face. (हात व तोंड) धुण्याची जागा, स्नानगृह.

Lāve, *v t.* (लेव्ह्)—to wash, to bathe; to wash against, to flow along. (अंग) धुणें, आंघोळ करणें, क्षालन करणें; बाजूनें वाहणें (प्रवाह इत्यादि).

Lāve'ment, *n.* (ले'व्ह्मन्ट्)—(med.) injection, enema. औषध (शरीरांत) टोंचणें, बस्ती.

Lăv'ender, *n.* (लॅ'व्हिन्डर्)—a fragrant-flowered shrub, an aromatic plant; the pale purple colour of lavender flowers. एक सुवासिक वनस्पति; तांबूस, जांभळा किंवा निळा रंग. *v. t.* (वर) लव्हेंडर पाणी शिंपडणें *L.-water*, लवेंडरचें सुवासिक पाणी,-अत्तर. *To lay up in lavender*, to put aside for future use. (पुढील उपयोगासाठीं) राखून ठेवणें, हातचा राखून ठेवणें.

Lā'ver, *n.* (ले'व्हर्)—kinds of (edible) marine algae. शेवाळ, जलशेवाळ.

Lā'ver, *n.* (ले'व्हर्)—a large vessel for washing; spiritual cleansing. घंगाळ, प्रक्षालनपात्र; आध्यात्मिक शुद्धि.

Lăv'erock, *n.* (लॅ'व्हरॉक्)—a lark. चंडोल पक्षी.

Lăv'ish, *a.* (लॅ'व्हिश्)—profuse, prodigal; over-abundant. सढळ, उधळ्या, खर्चीक; वाजवीपेक्षां फाजील, अपरिमित, घळघळीत. *v. t.* to bestow or spend lavishly. फाजील खर्च करणें, उधळणें, उधळपट्टी करणें. *Lavish of money*, पैसे उधळणारा; *L. in giving*, सढळ हातानें देणारा. *Lav'ishly, adv.* सढळ हातानें. *Lav'ishness, n.* उधळेपणा. *Lav'ishment, n.* उधळपट्टी करणें, सढळ हातानें देणें.

Law, *n.* (लॉ)—a rule established among a community and enjoining or prohibiting certain action. नियम, कायदा, कार्याकार्यनिर्बंध, धर्मशास्त्र, धर्म, न्याय, नीति. *To be a law unto oneself*, रूढिविरुद्ध वागणें. *To lay down the law*, नियम घालून देणें. *To go to law*, कोर्टाकडे खटला नेणें. *To take the law into one's own hands*, to redress one's wrong by force. दंडेली करून आपल्या अपकाराचा प्रतिकार करणें, दंडेली करणें. *To take-to have-the l. of*, (ला) कायद्याचे कचाटींत धरणें. *L.-abiding*, obedient to the laws. कायदे पाळणारा, न्यायानुसारी. *L.-court*, न्यायालय. *Law'-giver*, न्यायप्रवर्तक, स्मृतिकार. *Law'-point*, कायद्याचा मुद्दा. *Law'-suit*, खटला, मुकदमा.

Law, laws, *int* (लॉ, लॉज्)—(vulg.) expressing astonishment. बापरे! ओहो! [var. of lo]

Law'ful, *a.* (लॉ'फुल्)—permitted or appointed by law, not illegal, (of child) illegitimate. कायद्याला अनुसरून असणारा, कायदेशीर; अनौरस (संतति).*-fully, adv.,-ness, n.*

Law'less, *a.* (लॉ'लिस्)—having no laws; unrestrained by law, contrary to or disobedient to law; unbridled. कायदे नसलेला; बेकायदेशीर; अनिर्बन्ध.*-ness, n.*

Lawn, *n.* (लॉन्)—a close-mown piece of turf (in gardens, &c.); a kind of fine linen. जमिनीबरोबर कापलेलें गवत असलेलें पटांगण; एक जातीचें बारीक कापड. *L.-mower*, गवत कापण्याचें यंत्र. *L.-sprinkler*, गवताळ पटांगणावर पाणी शिंपडण्याचें यंत्र,-नळी. *Lawn'y, a.* गवताचें मैदान असलेला, मैदानासारखा, उघडा.

Lawn, *n.* (लॉन्)—kind of fine linen. सणाचें उंची कापड.*-y, a.*

Law'yer, *n.* (लॉ'यर्)—a person pursuing law as a profession, a practitioner of law. वकील, कायदेपंडीत, न्यायशास्त्रज्ञ. *Penang lawyer*, walking stick of Penang palm. पेनँग झाडाची (हातांत धरण्याची) काठी.

Lăx, *a.* (लॅक्स्)—negligent; not strict or rigidly exact; loose; vague. निष्काळजी; नरम; ढिला, विरविरीत; संदिग्ध. *Lax'ity, n.* सैलपणा, हलगर्जीपणा. *Lax'ly, adv.* ढिलेपणानें. 2. *n.* a Swedish or Norwegian salmon. सॅमन जातीचा मासा.

Lăx'ative, *a.* (लॅ'क्सटिव्ह्)—loosening the bowels. कोठा साफ करणारा, सारक. *n.* a gentle purgative. सौम्य रेचक, कोठा साफ करणारें औषध.

Lay, (ले)—*pa. t.* of lie.

Lay, *n.* (ले)—a minstrel's song, ballad, a lyrical poem, song of birds. गीत, पोवाडा, पक्ष्यांचें गाणें. *a.* non-clerical; non-professional, amateur; (Cards) other than trump. गृहस्थ; अनभिज्ञ; हुकुमाखेरीज इतर (पत्ते). *Lay'-man*, सामान्य मनुष्य, (कायदा, वैद्यक यांत) अनि-

होतकरू, योग्य. *adv.* probably, as may be expected. बहुधा, बहुतकरून.

**Li'ken,** *v. t.* (ला'इकन्)—to represent as comparable or similar to. सारखा करणें,-मानणें; तुलना करणें.

**Like'ness,** *n.* (ला'इक्-निस्)—resemblance; semblance; portrait. साहश्य; रूप, आकार; तसबीर, चित्र.

**Like'wise,** *adv. & conj.* (ला'इक्-वाइझ्)—similarly; also, moreover. त्याचप्रमाणें, सुद्धां, आणखी.

**Li'king,** *n.* (ला'इ-किंग्)—one's taste; regard or taste or predilection for. आवड, अभिरुचि, कल.

**Li'lac,** *n.* (ला'इलॅक्)—a flowering shrub, a pale violet coloured flower. एक फुलझाड; (त्याचें) अस्मानी फिकट जांभळ्या रंगाचें फूल. *a.* lilac-coloured. फिकट जांभळ्या रंगाचें.

**Lillipū'tian,** *a. & n.* (लिलिप्यू'शन्)—a native of Lilliput; pygmy, dwarf, a person of very small size. लिलिपुट बेटांतील रहिवासी; ठेंगू मनुष्य, वामनमूर्ति. [*Lilliput* in *Gulliver's Travels*, *-ian*]

**Lilt,** *v. t. & i.* (लिल्ट्)—to sing with rhythmical effect. तालसुरावर गाणें, गळ्यावर गाणें. *n.* such effect; song marked by it. तालसूर; गळ्यावर गाइलेलें गाणें.

**Lil'y̆,** *n.* (लि'लि)—kinds of plant with showy and fragrant flower; the fleur-de-lis. भुई-कमळ, दिसण्यांत सुंदर व सुवासिक फुलें असलेलें फुलझाड; कमलपुष्प. *Lily of the valley*, a spring flower of small white bells. लहान पांढऱ्या घंटावजा पाकळ्यांचें वसंतऋतूंतील फूल. *Lilies & roses*, fair complexion. सुंदर गौरवर्णी चेहरा. *The lilies*, फ्रान्स देशाच्या जुन्या बुर्बोन राजघराण्याचें राजचिन्ह. *Lily mind,-hand*, गोरी पान मुलगी,-शुभ्र कोमल हात. *Lily-livered*, cowardly, भ्याड, भित्रा. *L. white*, as white as a lily, लिलीप्रमाणें शुभ्र. *Li'lied*, *a.*

**Lĭmb,** *n.* (लिम्)—a leg, arm, or wing; the main branch of a tree; 2. (Astr.) specified edge of sun, moon, etc.; edge of surface; expanded part of petal, leaf etc. पाय, हात किंवा पंख; झाडाची मुख्य फांदी; कडा; किनार; पाकळीचें-पानाचें-टोंक इ०. *v. t.* to disable, to pull to pieces. शक्तिहीन करणें, तुकडे करणें. *To escape with life & limb*, without grave injury. विशेष दुखापत न होतां निसटणें. *L. of the devil* or *Satan*, खोडकर मूल. *L. of the law*, वकील, पोलीस इ०.*-limbed*, *a.* अंगी, सावयव. *Limb'-less*, *a.* अवयवरहित, निरवयव.

**Lĭm'ber,** *a.* (लि'म्बर्)—1. easily bent, yielding, flexible; lithe, agile. लवचीक; चपळ. *L. neck*, *n.* a disease of poultry. कोंबड्यांचा आजार. 2. *n.* a detachable front of gun-carriage. तोफगाडीची, अलग करतां येणारी, बैठक. *v. t.* to attach limber to gun. तोफगाडीच्या बैठकीवर तोफ बसविणें.

**Līme,** *n.* (लाइम्)—fruit of lemon kinds. लिंबू. *L. tree*, लिंबाचें झाड, लिंबुणी, लिंबुणी. *L. juice*, लिंबाच्या रसाचें पेय. *Li'mey*, *n.* (*sl.*) इंग्लिश खलाशी.

**Līme,** *n.* (लाइम्)—white caustic substance got by burning kinds of rock. चुना. *v. t.* to smear (twigs) with bird-lime; to snare (birds) thus; to treat with lime. (डहाळ्यांना) चिकटा लावणें; चिकटा लावून पक्षी पकडणें; चुना लावणें. *Lime-stone*, चुनखडी.

**Līme'kiln,** *n.* (ला'इम्-किल्न्)—a furnace for making lime. चुन्याची भट्टी, चुना तयार करण्याची भट्टी, चुनेभट्टी.

**Līme'light,** *n.* (ला'इम्-लाइट्)—intense light given by heating lime; (*fig.*) glare of publicity. चुन्याच्या उष्णतेच्या योगानें पडलेला प्रखर प्रकाश; प्रसिद्धि, लौकिक.

**Lĭm'it,** *n.* (लि'मिट्)—a bounding line; a terminal point; a bound that may not or cannot be passed. मर्यादा; हद्द, सीमा; शेवटची मर्यादा. *v. t.* to set limits to; to serve as a limit to; to restrict. मर्यादा घालणें; मर्यादित करणें; आळा घालणें. *L. man*, a competitor receiving maximum start in a handicap. शर्यतींत जास्तींत जास्त सवलत मिळालेला खेळाडू. *Lim'itary*, *a.* restrictive, नियामक, मर्यादा घालणारा. *Limited company*, भागीदारांची नियमित (जोखमाची) कंपनी (संस्था). *Limited monarchy*, नियंत्रित राजसत्ता (opp. *absolute*, अनियंत्रित). *Lim'it-less*, *a.* मर्यादा नसलेला. *Lim'itative*, *a.* मर्यादा--नियंत्रण घालणारा. *Limited*, *pa. p.* scanty. अल्प, बेताचेंच.

**Lĭmĭtā'tion,** *n.* (लिमिटे'शन्)—limiting; limited condition or disability. मर्यादा; इयत्ता, मुदत.

**Lĭmn,** *v. t.* (लिम्)—to paint (picture); to portray. (चित्र) रंगविणें; (चित्र) काढणें. *Lim'ner*, *n.* (लि'मर्), चित्रकार, चितारी.

**Lĭm'ousine,** *n.* (लि'मुझीन्)—a motor-car with closed body and roof over the driver. बंदिस्त व आच्छादित मोटार गाडी.

**Lĭmp,** *v. i.* (लिम्प्)—to go with a lame gait; to halt. लंगडत चालणें; थांबणें, धपकणें, अडखळणें. *n.* a lame walk. लंगडत चाल,-चालणें. *a.* flexible,

pliant, neither stiff nor springy; without energy. लवचीक ; शक्तिहीन. *Limp'ingly, adv.* अडखळत, लंगडत लंगडत. *Li'mply, adv.* लवचीकपणें. *Limp'ness, n.* लवचीकपणा, अशक्तता.

**Lĭm'pĕt,** *n.* (लिं'म्पिट्)—a tent-shaped shell-fish sticking tight to a rock ; (fig.) a person, esp. State employee, who clings to office. तंबूच्या आकाराचा, खडकाला चिकटून राहणारा (कालव, खेंकडा वगैरे प्राणी ); नोकरीला चिकटून राहणारा इसम.

**Lĭm'pĭd,** *a.* ( लिं'म्पिड् )—transparently clear, translucent, pure (of liquids, atmosphere, eyes, literary style). स्फटिकासारखा स्वच्छ, निवळ, नितळ, शुद्ध. *Lim'pidly, adv.; Limpi'dity, Lim'pidness, nn.* स्वच्छपणा, निवळपणा.

**Lĭnch'pĭn,** *n.* (लिं'च्-पिन्)—pin passed through axle-end to keep wheel on, axle-pin. गाडीच्या चाकाची खीळ.

**Lĭn'den,** *n.* (लि'न्-डेन्)—the lime-tree. लिंबाचें झाड.

**Līne,** *n.* (लाइन्)—a piece of cord ; a long narrow mark ; a row of persons or things ; lineage ; a track or course or direction ; a limit or boundary ; contour or outline ; the equator ; a measure of 12th of an inch ; (pl.) driving reins ; set of field-works or boundaries of encampment ; regular regiments, esp. infantry. दोरी, सुतळ ; ओळ, रेषा ; मनुष्यांची किंवा वस्तूंची रांग ; वंशावळ ; मार्ग, दिशा ; सीमा, मर्यादा, हद्द ; बाह्यरेषा ; विषुववृत्त, भूमध्यरेषा ; इंचाच्या 1/12 माप ; (अने० ) लगाम ; खंदक, मोर्चा, छावणी, सैन्याच्या तळाची मर्यादा ; पायदळ. *v. t. & i.* to mark with lines ; to post men or take post or stand at intervals along a road, hedge, &c. ; to put in the inside of, to put lining into, to serve as lining of. रेषा काढणें ; रांगेनें उभें करणें ; अस्तर घालणें. *Hard lines*, bad luck, hardship. दुर्दैव, कठीण प्रसंग, हाय हाय ! *To give one line enough*, एकाद्याला तात्पुरती मुभा देणें (नंतर तावडींत धरण्यासाठीं). *By rule & l.*, with precision, यथासूत्र, अचुक बरोबर. *Line drawing* or *engraving*, टांकानें किंवा पेन्सिलीनें रेखा-रेषा-चित्र काढणें,-खोदणें. *L. of life*, fortune, दीर्घायुष्य-भाग्य-दर्शक हस्तरेषा. *To toe the line*, (*fig.*) to accept party programme, एकाद्या पक्षाचा कार्यक्रम मान्य करणें. *To read between the lines*, to detect hidden meaning in document, speech etc., लिहिण्यांतील, भाषणांतील, गुप्त हेतु ( गर्भितार्थ ) शोधून काढणें. *To line through*, to cross out, खोडणें, खोडून टाकणें. *Every cloud has a silver lining*, there is good in every evil. वाइटांतून चांगलें निघतेंच. *Lines'man*, a soldier of line regiment ; an umpire's assistant. पायदळाचा शिपाई ; (खेळांतील) लवादाचा-मध्यस्थाचा-मदतनीस.

**Lĭn'eage,** *n.* ( लि'निएज् )-descent, pedigree, race, progeny, family, house. वंश, वंशपरंपरा.

**Lĭn'eal,** *a.* ( लि'निअल् )—in the direct line of descent or ancestry. वंशपरंपरागत, आनुवंशिक. *Lin'eally, adv.* वंशपरंपरेनें.

**Lĭn'eament,** *n.* ( लि'निअमेन्ट् )-(*usu. pl.*) distinctive feature(s) or characteristic(s) (esp. of the face) ; feature, form, make. आकृतिविशेष ; ठेवण, आंगलट.

**Lĭn'ear,** *a.* ( लि'निअर् )—of or in lines ; long and narrow and of uniform breadth. ओळीचा, रेषारूप ; सारख्या रुंदीचा अरुंद व लांबट. *Lin'early, adv.*

**Lĭn'en,** *a.* ( लि'निन् )—made of flax, resembling linen cloth. तागाचें. *n.* linen cloth. तागाचें कापड.

**Lĭn'en-drāper,** *n.* (लि'निन्-ड्रेपर् )—a person who deals in linen, calico, &c. तागाचें कापड विकणारा,-कापडव्यापारी.

**Lī'ner,** *n.* ( ला'इनर् )—a ship of a line of passenger-ships, a vessel belonging to a line. उतारूंचें गलबत, एकाद्या कंपनीचें जहाज (आगबोट).

**Lĭng,** *n.* ( लिंग् )—a sea-fish ; kinds of heather. एक समुद्रांतला मासा ; एक प्रकारचीं झुडुपें.

**Lingerie,** *n.* (लॅ'झरी )—linen articles ; women's underclothing. तागी वस्तु ; स्त्रियांचें अंतःप्रावरण, आंतील चड्डी, झगा वगैरे. [*French*]

**Lĭng'ō,** *n.* (लि'ङ्गो)—foreign language ; queer way of talking. (परकी) बोली, भाषा ; घेडगुजरी भाषा.

**Lĭng'ua fra'nca,** *n.* ( लि'ङ्ग्वा फ्रॅ'न्का )—any mixed jargon serving as medium of instruction. सर्वसामान्य-घेडगुजरी-भाषा, राष्ट्रव्यवहारभाषा.

**Lĭng'er,** *v. i.* (लिं'गर् )—to be slow to depart ; to seem long ; to stay about, to dally ; to be protracted. रेंगाळणें ; लांबसा वाटणें ; इकडे तिकडे वेळ घालवणें ; लांबवणें. *Ling'erer, n.* चेंगट, चेंगट्या, सुस्त. *Ling'eringly, adv.* रेंगाळत, रखडत रखडत. *A lingering disease*, रेंगाळणारें दुखणें.

**Lĭng'ual,** *a.* (लिं'ग्वल् )-pronounced by the tongue, of the tongue, of speech. जिव्हेसंबंधीं, भाषणाचा, मूर्धन्य.

**Lĭn'guĭst**, *n.* (लिं'ग्विस्ट्)—a person skilled in foreign languages. परकीयभाषाकोविद, अनेक भाषा जाणणारा. *Lingui'stic, a.* भाषाविषयक, भाषेसंबंधीं.

**Lĭn'iment**, *n.* (लि'निमन्ट्)—a liquid for rubbing into an affected part, embrocation. चोळण्याचें औषध.

**Lī'nĭng**, *n.* (ला'इनिंग्)—a layer of material applied to the inside of a garment, &c. कापडाचें वगैरे अस्तर, मढवणी, मढण.

**Lĭnk**, *n.* (लिंक्)—one loop or ring of a chain or of knitted work, &c.; member of a series; a measure of 7·92 in.; (hist.) a torch made of tow and pitch. कडी; दुवा, बंधन; ७·९२ इंचाचें माप; मशाल, दिवटी. *Link-boy, L.-man*, मशालजी, दिवट्या. *v. t. & i.* to connect, to join together; to clasp or intertwine. एकत्र करणें, जोडणें; जुळणें. *Link'age, n.*

**Lĭnks**, *n. pl.* (लिंक्स्)—ground on which golf is played; sandy ground near sea-shore. 'गोल्फ' नांवाचा खेळ खेळण्याचें मैदान; समुद्रकांठचें वाळवंट.

**Linn**, *n.* (लिन्)—(chiefly Scotch) a waterfall; pool below this; a precipice, ravine. धबधबा; त्याखालील जलसंचय; कडा, दरी.

**Lĭnn'ĕt**, *n.* (लिं'निट्)—a song-bird. एक गाणारा पक्षी.

**Lĭnō'lēum**, *n.* (लिनो'लिअम्)—(also *lino*, abbreviated) floor-covering of canvas thickly coated with a preparation of linseed. जमिनीवर आंथरण्याचें एक प्रकारचें तागी कापड.

**Lī'notȳpe**, *n.* (ला'इ-नोटाइप्)—a machine producing stereotyped lines of type. आपोआप टाइपांच्या-टंकांच्या-ओळी ज्याच्यावर तयार होतात तें यंत्र. [=line o' type]

**Lĭn'seed**, *n.* (लिं'न्सीड्)—seed of flax. अळशी, तागाचें बीं. *L. cake*, जवसाची पेंड. *L. meal*, जवसाचें पीठ.

**Lĭn'stŏck**, *n.* (लि'न्स्टॉक्)—a staff holding match for firing a gun. (तोफ डागण्याकरितां) तोडा, बत्ती.

**Lint**, *n.* (लिन्ट्)—flax, linen with one side made fluffy by scraping. जखमेवर पट्या वगैरे बांधण्याकरितां एक जातीचें मऊ तागाचें कापड.

**Lĭn'tel**, *n.* (लि'न्टल्)—wood or stone across top of door or window. दरवाजाची वरील चौकट. *Lin'telled, a.*

**Lion**, *n.* (ला'यन्)—a large carnivorous beast noted for his courage; a sign of the zodiac; a courageous person; a famous or conspicuous person much sought after. सिंह; सिंहरास; सिंहासारखा शूर-पराक्रमी-पुरुष; विलक्षण-असामान्य-पुरुष. *Lion in the way* or *path*, (काल्पनिक) अडथळा. *L.'s mouth*, धोक्याची स्थिति. *L.'s share*, फारच मोठा व श्रेष्ठ हिस्सा,-भाग. *L.'s skin*, धैर्याचा खोटा आव. *To twist lion's tail*, to defy or insult England. इंग्लंडला तुच्छ लेखणें, ०चा अपमान करणें. *Lion-hearted, a.* निधड्या छातीचा. *To see, show, the lions*, (शहरांतील) प्रेक्षणीय गोष्टी पाहणें,-दाखविणें. *Lion hunter*, मोठ्या लोकांच्या कच्छपीं लागणारा. *The British Lion*, ब्रिटिश सिंह (राष्ट्र). *Li'oness, n. f.* सिंहीण, सिंही. *To li'onize, v. t. & i.* to treat person as a celebrity. एकाद्याचा चढेजाव वाढवणें, देव्हारे माजवणें.

**Lĭp**, *n.* (लिप्)—either edge of the opening into the mouth; brim of a vessel; saucy talk, impudence. ओंठ; (भांड्याचा) कांठ; उर्मट भाषण. *v. t.* to touch with lips, to apply lips to; (of water) just to touch, lap; to murmur. ओठांनीं स्पर्श करणें, मुका घेणें; (पाण्याचा) स्पर्श होणें, वरून जाणें; मृदु आवाज होणें; तोंडांतल्या तोंडांत-ओंठांतल्या ओंठांत,-बोलणें. *To open* one's *lips*, बोलणें, बोलूं लागणें. *To pass* one's *lips*, ओंठाबाहेर-तोंडावाटे-(शब्द) निघणें. *To hang the l.*, हिरवटपणें-हिरमुसलें-बसणें. *To lick, to smack*, one's *lips*, तोंडाला पाणी सुटणें *lip-, from the lips only*, professed, not sincere. कृत्रिम, दिखाऊ. (*lip-service*, वरपांगी सेवा, भक्ति; *lip-homage*, वर वर दाखवलेली-कृत्रिम-शाब्दिक-स्वामिनिष्ठा). *L. deep*, उथळ, मनापासून नसलेला. *L. language*, (बहिऱ्या मुक्यांसाठीं) ओंठांची भाषा. *Lip-salve*, सुजलेल्या ओंठासाठीं मलम; खुशामत. *Lip-stick*, a stick of cosmetic for roughing lips. ओष्ठशलाका, ओंठ रंगविण्यासाठीं सुगंधी कांडी *Lip-sympathy*, शाब्दिक, वरपांगी,-सहानुभूति. *Lipped, a.* ओंठाचा, वळलेल्या कांठाचा.

**Lĭp'per**, *n.* (लि'पर्)—(naut.) rippling or ruffled motion, surface roughness, of the sea. समुद्राच्या पृष्ठभागावरील लाटांची हालचाल, खळखळाट, लाटा.

**Lĭquāte'**, *v. t.* (लिक्वे'ट्)—to separate or purify (metals) by liquefying. वितळवून (धातु) वेगळी करणें,-शुद्ध करणें.

**Lĭ'quefȳ**, *v. t. & i.* (लि'क्विफाइ)—to make or become liquid, to melt, to dissolve by heat. पातळ करणें, वितळविणें. *Liquefac'tion, n.* पातळ करणें, द्रवीकरण.

**Lĭquĕs'cent**, *a.* (लिक्वे'सन्ट्)—being liquid. पातळ होणारा, द्रवणारा, द्रविष्णु.

**Liqueur'**, *n.* (लिक्यूर्)—kinds of strong alcoholic liquor. कडक दारू.

**Liq'uid**, *a.* & *n.* (लि'क्विड्)—having a consistence like that of water or oil; (of sounds) fluent, not discordant; one of the letters l, r, m, n; not fixed, unstable. प्रवाही (पदार्थ), द्रवरूप; द्रवरूप, जलरूप; कोमल, मृदु, सुस्वर (स्वर); एल्, आर्, एम्, एन् पैकीं एक अक्षर; अस्थिर, चंचल.

**Liq'uidate**, *v. t.* & *i.* (लि'क्विडेट्)—to settle, to pay off (a debt); to wind up the affairs of (a company, &c.) कर्ज फेडणें; (कंपनीचे) सर्व व्यवहार आटोपते घेणें. *Liq'uidator*, *n.* (बुडत्या कंपनीचा) देण्याघेण्याचा व्यवहार पाहणारा अधिकारी.

**Liquida'tion**, *n.* (लिक्विडे'शन्)—process of winding up affairs; settling and adjusting debts. निरवानिरव; कर्जाची व्यवस्था व फेड करणें. *To go into l.*, दिवाळें काढणें.

**Liq'uor**, *n.* (लि'कर्)—alcoholic or other drink. दारू, मद्य. *In l., the worse for l.*, दारू प्यालेला, झिंगलेला. *v. t.* & *i.* (चामडें, जोडे) कमावणें; (सातू) पाण्यांत भिजविणें, आंबविणें. *To l. up, to l.*, दारू-मद्य-पिणें.

**Liq'uorice**, *n.* (लि'करिस्)-black substance used in medicine and as sweetmeat; plant from whose root it is obtained. ज्येष्ठमध, रतनगुंज. [L *liquiritia*, Gk. *glukus*, sweet, & *rhiza*, root]

**Lira**, *n* (ली'अरा)—an Italian frank coin. इटालिअन नाणें (महायुद्धापूर्वी १० पेन्स किंमतीचें).

**Lisp**, *v. i.* & *t.* & *n.* (लिस्प्)-to fail to pronounce the sibilants (*s*, *z*, *sh*) clearly, to speak imperfectly. बोबडें बोलणें, अस्पष्ट-अडखळत-बोलणें.

**Liss'om**, *a.* (लि'सम्)—lithe, agile. सुटसुटीत, चपळ.

**List**, *n.* (लिस्ट्)-(*pl.*) tilting-ground; roll or catalogue or inventory; a border of cloth. रंगण, आखाडा; यादी, नांवनिशीवार यादी; किनार, कांठ. *v. t.* & *i.* to enter in a list; to be pleasing to; to be inclined to do; to lean over to one side; (arch.) to listen (to). यादींत नांव दाखल करणें; आवडणें; मर्जीस येणें; एका बाजूला कलणें; ऐकणें, लक्ष,-कान,-देणें.

**Li'sten**, *v. i.* (लि'सन्)—to make effort to hear something; to give ear to. ऐकण्याचा प्रयत्न करणें; कान देणें. *To listen in*, to tap telephonic communication; to use broadcast receiver. टेलिफोनवर बोलणें,-ऐकणें; ध्वनिग्राहकानें (आकाशवाणीवर) भाषणें ऐकणें, रेडिओवर ऐकणें. *Li'stener*, *n.* (लि'स्नर्) श्रोता.

**List'less**, *a.* (लि'स्ट्-लिस्)—without inclination or energy; languid. उदासीन, निःस्पृह; सुस्त.

**Lit**, *pa. t.* & *pa. p. of* Light.

**Lit'any**, *n.* (लि'टनि)—a solemn public prayer. शांतिप्रार्थना, शांतिपाठ, अरिष्टशांत्यर्थ सामुदायिक प्रार्थना.

**Litchi**, *n.* (लीट्शी')—a tree, or its fruit, orig. from China, grown in Bengal. बंगालमधील एक फळ-झाड.

**Lit'eracy**, *n.* (लि'टरसि)—ability to read and write. लिहितां वाचतां येण्याची पात्रता, साक्षरता.

**Lit'eral**, *a.* (लि'टरल्)—of the letters or a letter; exactly corresponding to the original, giving words their ordinary sense. अक्षराचा; शब्दशः किंवा अक्षरशः (अर्थ). *Lit'eralism*, *n.* मूळ अक्षराला-अक्षरशः अर्थाला-चिकटून राहणें.

**Lit'erary**, *a.* (लि'टररि)—of or constituting or concerned with literature. विद्याविषयक, विद्याव्यासंगी, वाङ्मयप्रेमी.

**Lit'erate**, *a.* & *n.* (लि'टरेट्)—lettered, learned, able to read and write. लिहितां वाचतां येणारा, साक्षर.

**Litera'ti**, *n. pl.* (लिटरे'टाय्)—the lettered or learned. पंडितमंडळ, विद्वत्समाज.

**Litera'tim**, *adv.* (लिटरे'टिम्)—letter for letter. शब्दास शब्द, शब्दशः, अक्षरशः.

**Lit'erature**, *n.* (लि'टरेचर्)—books and written composition valued for form and style; the realm of letters; (colloq.) printed matter. उत्तम पुस्तकें-ग्रंथ किंवा लेख; वाङ्मय; छापील मजकूर. *Light literature*, मनोरंजक कल्पित ग्रंथ,-पुस्तकें, कल्पित गोष्टी.

**Lithe**, *a.* (लाइद्)—pliant, supple; flexible, easily bent. लवचीक; सहज वांकणारा, वळणारा. *Lithe'some*, चपळ, हुशार, तरतरीत. *Lithe'ness*, *n.* लवचीकपणा, नरमाई.

**Lith'ograph**, *v. t.* (लि'थग्राफ्)—to engrave or draw on stone and print impressions from it. शिळाछापावर खोदून छापणें. *n.* such impression. शिळाछाप. *Lithog'rapher*, *n.* (लिथॉ'ग्रफर्) शिळाछापाचें काम करणारा. *Lithograph'ic*, *a.* (लिथग्रॅ'फिक्) शिळाछापासंबंधीं.

**Lithog'raphy**, *n.* (लिथॉ'ग्रफि)—the art or process of engraving on stone and printing impression from it. शिळाछापाची कला,-विद्या.

**Lithot'omy**, *n.* (लिथॉ'टमि)—(surg.) cutting operation for stone in the bladder. मूतखड्यावरील शस्त्रक्रिया.

**Lit'igant**, *a.* (लि'टिगन्ट्)—disposed to litigate, engaged in lawsuit. वादी, वाद् सांगणारा. *n.* party to a law-suit. पक्षकार, वादी.

**Lit'igate**, *v. i. & t.* (लि'टिगेट्)—to go to law for decision; to contest at law. न्याय मागणें; वाद घालणें,-लावणें, वाद् सांगणें,-खेळणें.

**Liti'gious**, *a.* (लिटि'जस्)—fond of litigation; contentious. भांडखोर, कज्जेबुलाल; वाद सांगण्यासारखा, वादाचा.

**Lit'mus**, *n.* (लि'ट्मस्)—blue colouring-matter got from lichens. लायकेन वनस्पतीपासून काढलेला निळा (जांभळा) रंग. *L.-paper*, (ॲसिडें-क्षार-ओळखण्याचा) लिट्मस (-रंगीत) कागद.

**Litre**, *n.* (ली'टर्)—a unit of capacity in metric system (about 1¾ pints). (सुमारें) १¾ पिंटचें माप.

**Litt'er**, *n.* (लि'टर्)—carrying-couch used as a carriage; a heap of straw (for animals to lie upon); the young brought forth at a birth; odds and ends lying about. डोली, पाळणा; (गुरांकरितां) गवताची शय्या, गवताचा बिछाना; वीण, वेत; केरकचरा, पडझड, घाण. *v. t. & i.* to provide (horse etc.) with litter; to make place untidy; to bring forth young. गवती बिछाना तयार करणें; केरकचरा टाकून अस्वच्छ करणें; विणें.

**Litterateur**, *n.* (लीटेरा'टर)—a man of letters. विद्वान मनुष्य. [*French*]

**Lit'tle**, *a.* (लि'टल्)—not great or big; small in quantity; short in stature or distance or time; unimportant; paltry or mean. लहान; थोडा; ठेंगणा; अल्प; क्षुद्र. *n.* or *pron.* only a small amount. अल्पांश. *adv.* to a small extent only; not at all. अंमळ. किंचित्; मुळींच नाहीं. *The little finger*, करंगळी. *Little ones*, children or cubs etc. मुलें, मुलेंबाळें, पिलें इ०. *The l. people*, fairies. परी, कल्पित देवता. *A little*, थोडा, थोडका, कांहींसा, थोडा (वेळ). *The l.*, क्षुद्र माणसें; लहान गोष्ट,-वस्तु. *In little*, अल्पांशानें, लहान प्रमाणावर. *l. Englander*, ग्रेट ब्रिटननें आपल्या वसाहतींची वगैरे जबाबदारी पतकरावी हें तत्त्व प्रतिपादणारे (उदारमतवादी) (opp. imperialist). *l. go*, (colloq.) केंब्रिज विश्वविद्यालयांत बी. ए. च्या शिक्षणक्रमांतील पहिली परिक्षा. *l. Mary*, (colloq.) the stomach, उदर, पोट. *Litt'leness*, *n.* लहानपणा, कोतेपणा, क्षुद्रता. *By l. & l.*, *l. & l.*, by degrees, हळूहळू, अंशाअंशानें, क्रमाक्रमानें. (*Little*, *less* or *lesser*, *least*; also *smaller*, *smallest*, *Comparat. & Superl.*).

**Li'ttoral**, *a.* (लि'टरल)—of or on the shore; close to the sea. तीरस्थ, समुद्रकिनाऱ्याचा; समुद्रकांठचा, खाडीचा. *n.* littoral district of a country. समुद्रकांठचा प्रदेश. [L *litus oris*, the shore]

**Lit'urgy**, *n.* (लि'टर्जि)—a Church's formularies for public worship. ख्रिस्ती सार्वजनिक प्रार्थनाविधी. *Litur'gical*, *a.*

**Liv'able**, *a.* (लि'व्हेबल्)—(of house, room, climate, etc.) fit to live in; (of life) worth living; easy to live with. राहण्याला योग्य; जगण्यास योग्य; सहवासयोग्य.

**Live**, *v. i. & t.* (लिव्ह्)—to have life; to be or continue alive; to pass or spend; to dwell; to subsist *up*, *upon*; to conduct oneself in a specified way; to enjoy life to the full. जिवंत असणें; जिवंत राहणें, जगणें; आयुष्य कंठणें; राहणें, वसति करणें; गुजराण करणें; ठराविक मार्गं क्रमणें-पद्धतीनें वागणें; पूर्ण उपभोगणें, जीविताचें सार्थक करणें. *Living wage*, जगण्यापुरती मजुरी-उत्पन्न,-पगार. *Live & let live*, दुसऱ्याच्या दोषांकडे कानाडोळा करा (म्हणजे ते आपल्या दोषांकडे तसें करतील); जगा व जगूं द्या. *To l. from hand to mouth*, कसेंबसें पोट भरणें, जेमतेम उदरनिर्वाह करणें, 'हातातोंडाची गांठ घालणें.' *To l. up to* one's *principles*, स्वतत्त्वांप्रमाणें आचरण करणें 'बोले तैसा चाले.'

**Live**, *a.* (लाइव्ह्)—that is alive or real or active; not dead or fictitious or exhausted. जिवंत; उत्साही, जागृत. *Live* (लाइव्ह) *issue*, महत्त्वाची बाब. *L. embers*, जळजळीत निखारे. *L. stock*, animals kept or dealt with for use or profit. गुरेंढोरें, जनावरें, जीवसंपत्ति *L. wire*, विजेचा प्रवाह चालू असलेली तार. [live=alive, used attrib.]

**Live'lihood**, *n.* (ला'इव्ह्-लि-हुड्)—means of living, sustenance. उपजीविकेचें साधन, उदरनिर्वाह.

**Live'long**, *a.* (लि'व्ह्लॉग्)—the whole (tedious or delightful) length of. सगळा; लांबलचक, कंटाळवाणा.

**Live'ly**, *a.* (ला'इव्ह-लि)—lifelike or realistic; full of life or energy; gay; (joc.) exciting or dangerous. हुबेहुब, उठावदार; उत्साहपूर्ण; आनंदी, रंगेल; भावनोद्दीपक, भयानक.

**Li'ven**, *v. t. & i.* (ला'इव्हन्)—to brighten up. उत्तेजित करणें, उल्लसित करणें.

**Li'ver**, *n.* (लि'व्हर्)—1. an organ secreting bile and purifying the blood. यकृत्, पित्ताशय. *L. complaint*, यकृताची व्यथा. *Hot liver*, विषयासक्तता, रंगेलवृत्ति. *White* or *lily l.*, भ्याडपणा, नामर्दपणा. *L. line*, एक हस्तरेषा. *L. wing*, (*joc.*) right arm, उजवा हात. *Li'verless*, *a.*; *Li'very*, *a.* पित्ताशयात्मक, यकृताच्या रंगाचा;

चिवट, कणखर (जमीन); पित्तप्रकोप झालेला, चिडखोर.

**Liv'er,** *n.* (लि'व्हर्)-one who lives in a specified way (clean, loose, liver). ठराविक तऱ्हेच्या राहणीचा मनुष्य. *A good liver*, सद्गुणी मनुष्य; सदाचार-संपन्न.

**Liv'ery,** *n.* (लि'व्हरि)—distinctive clothes (worn by any body of persons). विशिष्ट तऱ्हेचा पोषाख, पेहराव. *To sue* one's *livery*, वयांत आल्यावर वारसाहक्काचा दावा मांडणें. *Livery stable*, घोड्यांचा अड्डा, भाड्यानें गाड्या-घोडे पुरविण्याचा कारखाना. *l. man*, खास पोषाखवाला नोकर; घोड्यांच्या अड्ड्यांचा मालक किंवा नोकर, गाड्याघोडेवाला.

**Liv'id,** *a.* (लि'व्हिड्)—black and blue, of bluish leaden colour. काळ्या निळ्या रंगाचा. *Livid'ity*, *n.*, *Li'vidly*, *adv.*

**Liv'ing,** *n.* (लि'व्हिंग्)—livelihood; a benefice. उपजीविकेचें साधन; वृत्ति. *a.* now alive; lifelike, exact. जिवंत; हुबेहुब. *Plain living & high thinking*, साधी राहणी व उच्च विचारसरणी. *L. room*, रोजची बैठकीची खोली. *L. wage*, जगण्यापुरती-पोटापाण्यापुरती-मोलमजुरी.

**Lixi'viate,** *v. t.* (लिक्सि'व्हिएट्)—to separate (substance) into soluble and insoluble constituents by percolation of water. क्षार काढण्यासाठीं धुणें, (राखेंतील) धुऊन क्षार काढणें.

**Liz'ard,** *n.* (लि'झर्ड्)—kinds of many four-legged tailed reptile. चोपई, सरडा, पाल.

**Lla'ma, la'ma,** *n.* (ला'मा)—a woolly ruminant used in S. America as a beast of burden. द. अमिरिकेंतील एक ओझें वाहणारें (उंटासारखें) जनावर.

**Lloyd's,** *n.* (लॉ'इड्झ्)—an incorporated society of marine under-writers. (पाण्यावरील जहाजें वगैरेंचा) नाविक विमा उतरणारी संस्था. *L. list*, नाविक वार्ता पुरविणारें वर्तमानपत्र. *L. register*, निरनिराळ्या जहाजांची वार्षिक यादी. [*orig. 17th-c. coffee-house established by Lloyd*]

**Lo,** *int.* (लो)—look, see, behold, observe. पहा!

**Loach,** *n.* (लोच्)—a small fresh-water fish. गोड्या पाण्यांतील एक जातीचा लहान मासा.

**Load,** *n.* (लोड्)—what is carried or borne; an amount that a cart, &c. can carry. ओझें, भार; भरत्रण, भरताड. *v. t. & i.* to put a load on; to burden; to charge (a gun, &c). लादणें, भरताड करणें; भार घालणें: बार भरणें. *To take a load off* one's *mind*, मनावरचा बोजा दूर (हलका) करणें. *L.* (*water*) *line*, ship's water-line when laden. (गलबत पाण्यांत किती बुडेपर्यंत भरताड भरावें हें दाखविणारी) भरताड-रेषा.

**Load'stone,** *n.* (लो'ड्-स्टोन्)-a magnet. लोहचुंबक; अकर्षिणारी वस्तु. Also, lode'stone.

**Loaf,** *n.* (लोफ्)—a piece of bread. पाव, रोट. *L. sugar*, शुद्ध केलेल्या साखरेचा शंकूसारखा गोळा. *Loaves & fishes*, personal profit as inducement to religious profession or public service. व्यक्तिगत फायद्याची गोष्ट. *Half a loaf is better than no bread*, (a motto) सर्व नाशापेक्षां अर्ध-नाश परवडला: सगळा नाहीं तर अर्धाच पुरे! (म्हण). *v. i.* to spend time idly or lazily. आळसांत वेळ घालवणें. *To l.* (*time*) *away*, वेळ फुकट-भटक्या मारीत-दवडणें.

**Loaf'er,** *n.* (लो'फर्)—a low idler. भटक्या, भीकमाग्या.

**Loam,** *n.* (लोम्)—a rich soil of clay, sand, and decayed vegetable matter. चिकणमाती. *Loam'y*, *a.* चिकणमातीचा, चिकणमातीसारखा.

**Loan,** *n.* (लोन्)—a thing lent; a sum of money to be returned with or without interest. उसनी दिलेली वस्तु; उसनी किंवा व्याजीं दिलेली रक्कम. *v. t.* to grant loan of. उसनें देणें. *On loan*, उसनवार. *L. collection*, प्रदर्शनासाठीं मालकानें उसना दिलेला चित्रांचा वगैरे संग्रह. *L. holder*, कर्जरोखे धारण करणारा, गहाणदार. *L. office*, व्याजानें कर्जाऊ रकमा देण्याघेण्याची कचेरी.

**Loath, Loth,** *a.* (लोथ्)—disinclined, reluctant, unwilling, averse. नाखुष, नाराज, असंतुष्ट. *Nothing loath*, quite willing or willingly; अगदीं खुषी,-खुषीनें. *L.-to-depart*, tune played as farwell. निरोप देण्यासाठीं गाइलेला सूर (गाणें).

**Loathe,** *v. t.* (लोद्)—to regard with disgust, to abhor, to abominate. तिटकारा येणें, किळस येणें. *Loath'ing*, *n.* कंटाळा, वीट, तिरस्कार. *Loath'ingly*, *adv.* कंटाळा करून, द्वेषानें.

**Loath'some,** *a.* (लो'थ्-सम्)—exciting nausea or disgust; odious. तिटकारा येण्याजोगा; किळसवाणा.

**Lob,** *v. i. & t.* (लॉब्)—to walk, run, or move heavily or clumsily or slowly (often *along*); to toss, bowl, or send (ball) with slow or high-pitched motion. जड पावलें टाकणें, सुस्तपणें चालणें; चेंडू दणादिशीं वर उडविणें, चेंडू हळू फेंकणें. *n.* ball bowled underhand a cricket or sent high in air at tennis. (क्रि'क्रेट) खालून टाकलेला चेंडू, (टेनिस०) वर उंच उडविलेला चेंडू.

**Lō'bāte,** *a.* ( लो'बेट् )-having lobes. पाळी असलेलें. पाळीदार.

**Lŏbb'ȳ,** *n.* ( लॉ'बि )—a porch, an entrance-hall; ante-room or corridor. द्वारमंडप ; सदरेची पुढली खोली. गॅलरी. *Lobb'ying, n.* frequenting of parliamentary lobby to solicit votes, etc. मतें मिळविण्याकरितां कायदेमंडळाच्या शेजारचे खोलींत जाणें. *Division lobby,* मतमोजणीच्या वेळीं दोन्ही पक्षांचे लोक दोन निरनिराळ्या विभागांत जातात तो विभाग.-खोली. [ L *lobia*, lodge ]

**Lōbe,** *n.* ( लोब् )—the lower pendulous part of the outer ear, a flap of other natural objects. कानाचा खालील भाग, पाळी. Lobed, *a.*

**Lŏb'ster,** *n.* ( लॉ'ब्स्टर् )—a long-tailed clawed shellfish ( used by some for food ). एक लांब शेंपटीचा मासा, समुद्रांतील खेंकडा. *L. eyed,* with protruding eyes, पुढें आलेल्या-पटपटीत-डोळ्यांचा. *L. pot,* लॉब्स्टर मासे पकडण्याचें साधन ( टोपली ).

**Lŏb'ūlar,** *a.* ( लॉ'ब्युलर् )—lobe-shaped. पाळीच्या आकाराचा.

**Lŏb'ūle,** *n.* ( लॉ'ब्यूल् )—a small lobe. लहान पाळी.

**Lō'cal,** *a.* ( लो'कल् )—of the place; belonging to or peculiar to some place or places. जागेचा ; स्थानिक. *L. government,* स्थानिक स्वराज्य. *L. examination,* examinations held by universities at centres convenient for candidates. सोईस्कर अशा निरनिराळ्या केंद्रांत विश्वविद्यालयानें घेतलेली परीक्षा. *L. option,* veto. दारुबंदी करण्याविषयीं त्या त्या विभागांतील मत-स्वातंत्र्य,-मत. *L. disease,* स्थानविशिष्ट रोग. *Lo'cally, adv.* स्थानपरत्वें. स्थलपरत्वें. *Lo'cal, n.* स्थानिक रहिवाशी ; ठिकाणची बातमी ; शहराच्या आसपास जाणारी आगगाडी. [ L *locus*, place ]

**Locale',** *n.* ( लोका'ल् )—a scene or locality of operations or events. जेथें गोष्टी किंवा हकीकती घडल्या ती जागा ; तें स्थान.

**Lō'calism,** *n.* ( लो'कलिझम् )—an attachment to a place; a local idiom, custom etc. एकाद्या स्थानाविषयीं आवड. स्थानिक प्रेम ; स्थानिक म्हण, रीतभात, इ.

**Locăl'ity,** *n.* ( लोकॅ'लिटि )—a thing's position; site or scene of something; faculty of remembering places etc. जागा ; स्थान ; स्थानिक ज्ञान-ओळख-माहिती असणें, स्थलज्ञान.

**Lō'calize,** *v. t.* ( लो'कलाइझ् )—to make local, to decentralize. स्थानिक (-ठिकाणचा) करणें, ठिकाण ठरविणें, स्थानीं निश्चित करणें. *Localiza'tion, n.* स्थलनिश्चय, स्थाननिश्चय.

**Locāte',** *v. t. & i.* ( लोके'ट् )—to state the locality of; to discover the exact place of; to establish in a place. स्थान सांगणें ; घरोघर जागा शोधून काढणें, स्थान ठरवणें ; घर करून-जम बसवून-राहणें. *Loca'tion, n.* ( लोके'शन् ) ठेवणें, वसविणें ; स्थान, स्थळ ( ठरविणें ).

**Lŏc'ative,** *a.* ( लॉ'केटिव्ह् )—( *Gram.* ) denoting place where. स्थळवाचक, स्थानवाचक. *n.* locative case. सप्तमी विभक्ति.

**Lŏch,** *n.* ( लॉख् )—a Scotch lake or arm of the sea; a lake. स्कॉट्लंडमधील सरोवर ; सरोवर, आखात.

**Lŏck,** *n.* ( लॉक् )—a tuft of hair or wool; (*pl.*) the hair; fastening for a door, &c.; mechanism by which a gun is fired; a section of river or canal confined within sluiced gates; interlocking. केंसाची बट ; ( अने० ) केंस ; कुलूप, टाळें ; बंदुकीचा चाप ; ( घोटी आंत-बाहेर येण्याच्या ) दरवाज्यांमधील नदीचा किंवा कालव्याचा भाग ; अडचण, जखडण, पेंच. *v. t. & i.* to fasten with a lock, to shut up, to confine. कुलूप घालणें, बंदोबस्तांत ठेवणें. *Lock jaw,* दांतखिळी, दांतखीळ ( बसणें ). *L.-keeper,* a custodian of river or canal lock. नदीच्या किंवा कालव्याच्या वेशीचा रखवालदार. *L. smith,* a maker and mender of locks. कुलुपें नीट करणारा, कुलुपें करणारा, लोहार. *Under lock and key,* locked up. कडीकुलुपांत, बंदोबस्तानें. *Lock, stock & barrel,* whole of a thing, completely. पूर्णपणें, सगळेंच्या सगळें. *L Hospital,* hospital for venereal diseases. गुप्त रोगांचा दवाखाना. *L. fast,* secured with a lock. कुलूप लावलेला, बंदिस्त. *To lock the stable door after the horse has been stolen,* बैल गेला, झोंपा केला.

**Lŏck'er,** *n.* ( लॉ'कर् )—a small cupboard, esp. one reserved for an individual in a public room; one who locks; that which locks. किल्लीकुलपाचा खण ; कुलूप लावणारा, बंद करणारा ; अडकवण.

**Lŏck'et,** *n.* ( लॉ'किट् )—a small gold or silver case ( for portrait or esp. a lock of hair ). लहान सोन्याची किंवा चांदीची पेटी किंवा ताईत.

**Lŏck'out,** *n.* ( लॉ'क्-अउट् )—exclusion of workmen by an employer in a dispute as to wages, &c. मजुरांना चढणीवर आणण्याकरितां त्यांना कामावरून दूर करणें.

**Lŏck'up,** *n.* ( लॉ'क्-अप् )—a room or place for detention of prisoners; ( time of ) locking up school etc. for the night. कच्चा कैदखाना, अटकखाना ; शाळा वगैरे बंद होण्याची वेळ.

**Lōcomō'tion,** *n.* ( लोकमो'शन् )—going from one place to another; power of accomplishing

this. एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं जाणें, स्थलांतर, गमन; गमनशक्ति, चलनशक्ति

**Lō'comōtive**, *a.* (लो'कमोटिव्ह्)—of or having or effecting locomotion; not stationary, moving from place to place. गति असणारा; स्थिर नसणारा; चलनशील, जंगम. *n.* a locomotive engine. आगगाडीचें वाफेचें यंत्र. *A locomotive person*, a person constantly travelling. चिरप्रवासी, भटक्या. *Use your locomotives*, (legs), पायांचा उपयोग कर, चालूं लाग, पळ.

**Lō'cum tē'nĕns**, *n.* (लो'कम् टी'नेन्झ्)—a deputy acting for clergyman, doctor etc. in his absence. (उपाध्यक्ष, डॉक्टर वगैरेंचा) प्रतिनिधी, मुतालिक.

**Lō'cus**, *n.* (लो'कस्)—(*pl. Loci*, लोसाय्) an exact place of something; (Math.) a curve etc. made by all the points satisfying certain conditions, or by the defined motion of a point or line or surface. स्थान, ठिकाण, नक्की जागा; कक्षा, बिन्दुपथ, रेखापथ. *Locus classicus*, the best known or most authoritative passage on a subject. एखाद्या विषयावरील प्रमाणभूत उतारा. *L. in quo*, a scene of event. प्रसंग घडण्याचें ठिकाण. *L. standi*, recognized position, right to intervene, appear in court etc. कायदेशीर हक्क, विशेष हक्क.

**Lō'cust**, *n.* (लो'कस्ट्)—a destructive winged insect migrating in swarms; kinds of tree and their fruit. टोळ, शलभ; एक प्रकारची वनस्पति व तिचें फळ.

**Locū'tion**, *n.* (लोक्यू'शन्)—style of speech, mode of expression; a phrase or idiom. भाषणशैली; वाक्संप्रदाय.

**Lōde**, *n.* (लोड्)—a vein of metal ore; a watercourse. अशुद्ध धातूची शीर, रेषा; पाण्याचा पाट. *L. stone*, लोहचुंबक, चुंबकधर्मी पाषाण.

**Lōde'star**, *n.* (लो'ड्-स्टार्)—the pole-star; guiding principle or object. ध्रुवाचा तारा; मार्गदर्शक तत्त्व किंवा वस्तु.

**Lŏdge**, *n.* (लॉज्)—a place where members of a branch meet; a small house; gatekeeper's cottage or porter's room. सभासद एके ठिकाणीं जमण्याचें स्थान; लहान घर; पाहारेकऱ्याची झोंपडी, चौकी, हमालाची खोली-कोठडी. *v. t.* & *i.* to provide with sleeping quarters; to reside as a lodger; to fix in; to settle; to place. निजायला जागा देणें; भाड्यानें जागा घेऊन राहणें; अडकविणें; वसविणें; ठेवणें. *Lodg'er*, a person paying for accommodation in another's house. भाडोत्री, भाड्यानें जागा घेऊन राहणारा, बिऱ्हाडकरू. *Lodg'ement*, (लॉ'जमेंट्) a stable position gained, foothold; a deposit of money; accumulation of matter intercepted in fall or transit. (चढाई केलेल्या ठिकाणांत) मोर्चा ठोकणें, पाय रोवणें, स्थिरता पावणें; पैशाची ठेव; खालीं पडतांना किंवा स्थानांतर करतांना सांचलेली वस्तु.

**Lŏdg'ing**, *n.* (लॉ'जिंग्)—a place where one lodges. वसतिस्थान, राहण्याचें ठिकाण.

**Lŏft**, *n.* (लॉफ्ट्)—an upper room directly covered by the roof; a gallery in a church or hall; a pigeon-house; a flock of pigeons; (Golf) backward slope in club-head, lofting stroke. शेवटचा उंच माळा, पोटमाळा; उंच गॅलरी; कबुतरांची राहण्याची जागा; कबुतरांचा थवा; (गोल्फची) पाठीच्या बाजूची काठी, चेंडू उंच उडविणारा टोला. *v. t.* to hit (golf-ball) high up; to keep (pigeons) in a loft. (गोल्फचा चेंडू) उंच उडविणें; कबुतरांना खुराड्यांत ठेवणें.

**Lŏf'tȳ**, *a.* (लॉ'फ्टि)—of imposing height; haughty; exalted, high-flown. उंच; भव्य; घमेंडखोर; वैभवशाली, थोर.

**Lŏg**, *n.* (लॉग्)—an unhewn piece of a felled tree; apparatus for gauging ship's speed. ओंडका, ओंडा; नौकागतिमापक यंत्र. *Log-roll*, *v. t.*, *log-rolling*, *n.* & *a.* mutual puffery. परस्पर थोर मानणें, पोकळ स्तुति करणें. *Log'-wood*, wood of American tree yielding dye. रंगाचें लाकूड किंवा झाड (ज्यापासून रंग काढतात).

**Lŏg'book**, *n.* (लॉ'ग्-बुक्)—a book containing daily record of ship's rate of progress, &c. गलबताचा रोजनामा; (प्रवासाची वगैरे) रोजनिशी.

**Lŏg'arithm**, *n.* (लॉ'गॅरिथम्)—one of a series of reckoning-numbers tabulated for simplifying computation. घातांकगणित, घातगणन. *Logarith'mic*, *a.* *Common Logarithms*, those whose base is 10. दशमूलकघातगणन. (e. g. the log of 1,000 is 3; (10) $3$=1000). [From Gk. *logos*, reckoning, ratio & *arithmos*, number]

**Lŏgg'erhead**, *n.* (लॉ'गर्-हेड्)—a block-head, fool. मठ्ठ, ठोणया, मूर्ख. *At loggerheads (with)*, engaged in a dispute; on bad terms. भांडणावर किंवा हातघाईवर आलेले; सलोख्याचा संबंध नसलेले.

**Lŏgg'ia**, *n.* (लॉ'ज्या)—an open-sided gallery or arcade. उघडा सज्जा.

**Lŏ'gic**, *n.* (लॉ'जिक्)—the science of reasoning; power of convincing. तर्कशास्त्र, न्याय; खात्री करण्याचें सामर्थ्य.

**Lŏ'gical**, *a.* ( लॉ'जिकल् )—of logic ; in conformity with the laws of logic ; defensible on the ground of consistency. तर्कशास्त्राचा, न्याय शास्त्राचा ; तर्कशास्त्रानुसार, तार्किक ; तर्कांला पटण्याजोगें, तर्कशास्त्रशुद्ध. Lo'gically, *adv.*

**Lŏgi'cian**, *n.* ( लॉजि'शन् )—a person well-versed or skilled in logic. तर्कशास्त्री, नैय्यायिक.

**Logŏm'achy̆**, *n.* ( लॉगॉ'मॅकि )—a war of words, dispute about words, वाग्युद्ध, शब्दच्छल, शुष्कवाद.

**Loin**, *n.* ( लाइन् )—( *pl.* ) the back part between the hipbone and the ribs. कमर, कटिप्रदेश. ( *sing.* ) joint of meat cut from the loins. जनावराच्या मधल्या भागाचें ( खाण्याकरितां ) मांस. *To gird up one's loins*, to prepare for journey or effort. कमर बांधणें, सज्ज किंवा तयार होणें. *Fruit, child of -sprung from-*, one's *loins*, स्वतःचें अपत्य. *Loin-cloth*, लंगोटी, कटिवस्त्र, पंचा. *Loined, a.*

**Loit'er**, *v. i.* ( लॉ'इ-टर् )—to linger on the way ; to hang about ; to be dilatory. आळसानें रेंगून राहणें, रेंगाळणें ; रमत गमत चालणें ; गमणें. *Loit'erer, n.* रेंगाळणारा, भटक्या. *Loit'eringly, adv.* रमत गमत, रेंगाळत.

**Lŏll**, *v. i. & t.* ( लॉल् )—to recline or stand in a lazy attitude ; to hang out ( the tongue ) ; ( of tongue ) to hang out. आरामानें पडणें ; जीभ बाहेर काढणें ; जीभ बाहेर पडणें. *Lo'llingly, adv.*

**Lŏll'ard**, *n.* ( लॉ'लर्ड् )—one of the 14th century heretics holding views like those of Wycliff. चौदाव्या शतकांतील पाखंडी-नास्तिकांपैकीं एक. *—ism,-ry, nn.*

**Lŏll'ipŏp**, *n.* ( लॉ'लिपॉप् )—( Usu. pl. ) sweetmeat(s), sugar-plum(s). मेवामिठाई, साखरफुटाणे.

**Lo'ndon pride**, *n.* ( लं'डन् प्राइड् )—a saxifrage. खडकावरील वनस्पति.

**Lōne, Lōne'ly̆**, *a.* ( लोन्, लो'न्-लि )—solitary, isolated, unfrequented ; companionless, not having others near. एकांत, निर्जन, विविक्त ; असहाय, सडा. *Lone'some, a.* feeling or making feel lonely. निर्जन, उदास, भयाण, भयानक. *Lone'somely, adv.* उदासपणानें. *Lone'someness, n.* उदासपणा, निर्जनता.

**Lŏng**, *a.* ( लॉंग् )—protracted ; dilatory ; of specified length. लांबवलेला ; रेंगाळ, दीर्घसूत्री ; लांब, *adv.* for a long time. पुष्कळ वेळपर्यंत. *n.* a long interval or period ; a long vowel or syllable. दीर्घ काळ ; दीर्घ स्वर. गुरु. *v. i.* to yearn or wish vehemently, to desire earnestly. उत्कट इच्छा असणें. *In the long run*, eventually. सरतेशेवटीं. *Long-armed*, लांब हातांचा, आजानुबाहु. *Long cloth*, a kind of calico. एक जातीचें उंची सुती कापड. *L. field, l. off, l. on*, a man fielding at bowler's left or right rear. ( क्रिकेटमध्यें ) बोलरच्या डाव्या किंवा उजव्या बाजूस मागें क्षेत्ररक्षण करणारा. *Long-eared*, one who is stupid as an ass. लांबकानाचा, गाढव, मूर्ख. *L. firm*, a set of swindlers who obtain goods and do not pay. माल घेऊन पैसे न देणाऱ्या फसव्या लोकांची टोळी. *L.-headed*, sagacious. दूरदर्शी, दूरवर विचार करणारा. *L. shanks*, a stilt or long-legged plover. एक लांबटांगा पक्षी. *To draw the long bow*, to tell exaggerated or invented stories. भरमसाट थापा मारणें, काल्पनिक गोष्टी सांगणें. *The long & the short of it*, all that can or need be said. सारांश, तात्पर्य, मथितार्थ. *As long as*, जोंपर्यंत, जों पावेतों. *Ere long*, लवकरच. *How long*, कोठवर, कोठपावेतों. *Long ago*, फार दिवसांपूर्वी, मागें. *So long*, तेथपर्यंत, तूर्त येतो. *L. standing*, that has long existed. फार दिवसांचें, पुरातन. *L. suffering*, bearing provocation patiently. त्रास शांतपणें सहन करणारा. *Long'ish, a.*; *Longways, l.-wise, adv.* in a direction parallel with a thing's length. लांबीच्या बाजूनें. *Long'er*, अधिक लांब. *Longest*, ( super. ) सर्वांहून लांब.

**Lŏngĕv'ity̆**, *n.* ( लॉंजे'व्हिटि )—long life. दीर्घायुष्य.

**Lŏng'ing**, *n.* ( लॉ'गिंग् )—an eager desire, a craving or unnatural appetite. उत्कट इच्छा, अभिलाष, आशा, भूक, डोहाळे.

**Lŏn'gitūde**, *n.* ( लॉ'जिट्यूड् )—angular distance east or west from the meridian. लांबी, रेखांश, रेखांतर.

**Long'shore-man**, *n.* ( लॉ'ग्शोअरमन् )—a landsman employed in loading ships, shorefishing etc. धक्क्यावरचा हमाल, मासे धरणारा, इ. [For *along shore man* ]

**Lōōb'y̆**, *n.* ( लूबि )—a silly fellow. मूर्ख मनुष्य, अडाणी.

**Lŏŏk**, *v. i. & t.* ( लुक् )—to use or direct one's eyes (at) ; to make a search ; to have specified appearance or aspect ; to face or be turned in specified direction. दृष्टि फेंकणें ; शोधणें ; दिसणें ; तोंड फिरवणें. *n.* act of looking ; gaze or glance ; expression of the eyes ; appearance or aspect ; ( *pl.* ) ( personal ) appearance. पाहणें ; दृष्टि, मुद्रा ; स्वरूप ; ( अने० ) चर्या, चेहरा. (*With preps* ) *To look after*, to attend to, to take care of, to search. संभाळणें, काळजी घेणें, विचारपूस करणें, शोध करणें. *To l. for*, to expect

search for. वाट पाहणें, शोधणें. *To l. into,* निरीक्षण करणें, चौकशी करणें, विचार करणें. *To l. on,* लेखणें, मोजणें, पाहणें. *To l. over,* to inspect, overlook or pardon. तपासणें, कानाडोळा करणें, क्षमा करणें. *To l. through,* डोकावून पाहणें, भेदक नजरेनें किंवा अंतर्ज्ञानानें पाहणें-तपासणें, दिसून येणें, वर वर पाहणें. *To l. to,* विचार करणें, नजर ठेवणें, विश्वासून राहणें. *To l. upon,* to regard with specified feeling. विशिष्ट भावनेनें पाहणें. ( *With adv.*) *To look about,* सावध असणें, चा शोध करणें. *To l. down (up) on,* to consider oneself superior to. तिरस्कार करणें, कस्पटासमान मानणें. *To l. forward to,* आशा करणें. *To l. up to,* to respect, to venerate. आदर दाखविणें, मान देणें. *To l. well,* साजेसा दिसणें, शोभून दिसणें. *Look before you leap,* avoid precipitate action. साहस करूं नका, पुढें पाहून पाऊल टाका. *Let (one) l. at home,* make mental search. आत्मनिरीक्षण कर. *Look you,* (imperat.) observe, mind. नीट ध्यानांत धर, पहा. *Look sharp,* lose no time, bestir oneself. वेळ दवडूं नको. आटप. *Good looks,* beauty, सौंदर्य.

**Lŏŏker-on',** *n.* (लुकर-ऑ'न्)—( pl. lookers-on ) a spectator. प्रेक्षक, तमासगीर, बघ्या.

**Look-in',** *n.* ( लुकइ'न्)—a casual visit. सहज गांठ, सहजासहजीं भेट. *To have a look-in,* to come near winning, to have a chance. जवळजवळ यश येणें, यशाची आशा असणें.

**Lŏŏk'ing-glāss,** *n.* ( लु'किंग्-ग्लास् )—a mirror. आरसा.

**Lŏŏk'out',** *n.* ( लु'क्-अ'उट )—watch ; post of observation ; a man stationed to watch ; view ; a person's own concern. टेहळणी ; टेहळणीचें ठिकाण ; टेहळणी करणारा इसम ; देखावा; व्यक्तिगत संबंध पाहाणें.

**Lōōm,** *n.*( लूम् )—weaving machine. शिवण्याचा माग. *v. i.* to appear dimly ; to be seen in a vague magnified shape. अस्पष्ट दिसणें ; दुरून अस्पष्ट-अस्वाभाविक-स्वरूप दिसणें.

**Lōōn,** *n.* (लून्)—1. a scamp, an idler ; a lad. हरामी, पाजी, दुर्जन ; लहान मुलगा. 2. a kind of diving bird. पाणबुडा पक्षी.

**Lōōp,** *n.* (लूप्)—a figure made by a curve that crosses itself, noose. फांस, वाळा, दोरीचा फांस, कानी. *v. t. & i.* to make loop or loops in ; to form a loop ; to fasten with a loop or loops. दोरीचा फांस करणें ; आंकड्यानें बांधणें, फांसानें बांधणें, गांठवणें. *Loop-line,* a piece of railway or telegraph that leaves main line and joins it again. रेल्वेचा-तारेचा-जोड फांटा. *To loop the loop,* (of airman ) to execute somersault. (वैमानिक ) हवेंत विमानाची कोलांटी उडी मारतो ती कृति करणें, ( खालीं डोकें वर पाय ), विमानांतून किंवा दुकाचीवरून कोलांटी गिरकी मारणें.

**Lōōp'hōle,** *n.* (लू'प्-होल्)—a narrow slit in a wall ; (*fig.*) a means of evasion. भिंतींतील फट ; पळवाट, सवड.

**Lōōse,** *a.* (लूस्)—free from ties, released from bonds or restraint ; not fixed or tight ; not exact or literal ; careless ; wanton, incontinent. बंधमुक्त, मोकळा ; ढिला, सैल ; अक्षरशः नाहीं तो ; निष्काळजी ; दुर्वृत्त, व्यभिचारी. *v. t.* to let loose, to untie ; to free from constraint. सैल सोडणें, हाकारणें, बंदर सोडणें ; बंधमुक्त करणें ; मोकळा सोडणें *n.* freedom from restraint. मोकळीक. *Loose end, at a l. end,* without definite occupation. ठराविक धंदाउद्योग नसलेला, बेकार. *L. fish,* a dissolute person. स्वैराचारी मनुष्य, दुर्वृत्त मनुष्य. *Loose'ly, adv., Loose'ness, n.* ढिलेपणा ; उच्छृंखलपणा, व्यभिचार.

**Loos'en,** *v. t. & i.* (लू'सन्)—to make or become less tight or firm ; to relax. ढिला होणें, सैल करणें ; मोकळा करणें.

**Lōōt,** *n.* ( लूट् )—booty, spoil. लूट. *v. t. & i.* to plunder. लुटणें, लूट घेणें.

**Lŏp,** *v. t.* ( लॉप् )—to cut away branches or twigs of trees ; to cut off. झाडाच्या फांद्या तोडणें ; तोडणें. *v. i.* to hang limply. खालीं लोंबणें, लोंबकळणें. *Lop'pings, n. pl.* तोडणी, छाटणी, कवळकाठी. *Lop-eared, a.* लोंबत्या कानाचा. *L.-ear,* a kind of rabbit. एक जातीचा ससा. *L. sided,* with one side lower etc. ; unevenly balanced. एक बाजू सखल किंवा लहान असलेला ; समतोल नसलेला.

**Lŏquā'cious,** *n.* ( लॉक्वे'शस् )—talkative, babbling, given to continual talking. बोलका, वाचाळ, बोलघेवडा.

**Lŏquă'cĭtў,** *n.* ( लॉक्वॅ'सिटि )—talkativeness. वाचाळता. [ L *loquax,* speak ]

**Lŏrd,** *n.* ( लॉर्ड् )—superior, master, owner' husband ; God ; a British title of a nobleman. वरिष्ठ, अधिपति, मालक, पति ; परमेश्वर ; 'लॉर्ड' ही पदवी. *Lord !* ( int. ) expressing wonder etc. ( उद्गारवाचक ) आश्चर्यार्थक. *My lord,* ( मिलॉर्ड् ) ( voc. ) polite way of addressing l., mayor or judge of supreme court. खावंद ! सरकार ! ( सन्मानदर्शक ). *v. t. & i.* To play lord over, to domineer. स्वामित्व गाजविणें, कडक अंमल गाजविणें, सत्ता चालविणें. *Lord'ling,* young or petty lord. लहान सरदार. *Lord'ly, a.* as of, or beseeming, a lord. उमरावासारखा-

शोभेसा; 2. haughty, imperious. उद्धट, तिरस्करणीय. *Lord'ship, n.* rule over, ownership of; domain or manor; lord's personality. सत्ता, मालकी; जमीनदारी, जहागिरी; धनीपणाचा स्वभाव,-ऐश्वर्य. *Your lordship, his l.,* खावंद!, सरकार! *Lords & ladies,* wild arum. रानटी वनस्पती.

**Lord's,** *n.* (लॉर्ड्‌ज्)—(used for) Lord's cricket ground in London, headquarters of the M.C.C. and English cricket. लंडनमधील लॉर्ड्‌चें क्रिकेट-क्रीडांगण, इंग्लंडमधील क्रिकेट खेळाचें मुख्य ठाणें. [f. Thomas *Lord,* maker of successive grounds named after him]

**Lōre,** *n.* (लोअर्)-store of knowledge, erudition; a body of tradition and facts. विद्या, विद्वत्ता; (परंपरा-प्राप्त) ज्ञान.

**Lŏrn,** *a.* (लॉर्न्)—desolate, forlorn. निराधार, अनाथ.

**Lŏ'rrў,** *n.* (लॉ'रि)—a long low sideless wagon; a large truck. एक मोठी गाडी; गाडीचा मोठा डबा.

**Lose,** *v. t. & i.* (लूझ्)—to be deprived of; to let pass from one's control; to get rid of; to forfeit; to be worsted in; to suffer loss, to suffer detriment; to cause the loss of to. हरवणें; मुकणें, आंचवणें; सुटणें; जप्त करणें किंवा होणें; हरणें, हार जाणें; नुकसान होणें; नाश करणें. *Lost, pa. p.* (लॉस्ट्) vanished; not to be found; deprived of help; astray. हरवलेला; नष्ट झालेला; निराधार; भकलेला. *Los'er, n.* (लूझर्) one who is deprived of anything; not a winner. हरणारा; हारखाऊ. *To lose ground,* मागें पडणें, उतरती कळा लागणें. *To l. heart,* धैर्य खचणें. *To l. one's head,* डोकें ताळ्यावर नसणें, डोकें फिरणें. *To l. one's life,* प्राणाला मुकणें. *To l. sight of,* दृष्टीआड होणें, विस्मरण होणें. *Los'able, a.* हरण्यासारखा.

**Lŏss,** *n.* (लॉस्)—losing; what is lost; detriment resulting from losing. हरवणें, हरवलेली वस्तु; नुकसान. *At a loss* (for, to discover etc.), puzzled, at fault. थक्क,-कुंठित,-अक्कल-गुंग झालेला.

**Lŏt,** *n.* (लॉट्)—a share, fortune, destiny; appointed task; article or set of articles put up for sale at auction, &c.; a considerable number or amount. हिस्सा, भाग्य, दैव; नेमलेलें काम; गट, लाट; विपुलता; रेलचेल. *v. t.* to divide into lots. गट करणें, विभाग पाडणें. *To draw, to cast, lots,* सोडतचिठी उचलणें. *To throw,* or *cast in,* one's *lot with,* to share fortunes of, दैवाचे वाटेकरी-भागीदार-होणें. *Bad lot,* vicious person. वाईट चालीचा मनुष्य, दुर्गुणी मनुष्य. *The lot,* the whole number or quantity. एकंदर संख्या किंवा वस्तु, एकवट गट,-भाग.

**Loth,** *a.* (लॉथ्)—*See* Loath.

**Lothăr'iō,** *n.* (लॉथे'रिओ)—(pl.-os) a libertine, a rake. व्यसनी, चंगीभंगी, फंदी मनुष्य.

**Lō'tion,** *n.* (लो'शन्)—a wash for wounds or the skin. औषधी पाणी, जखम धुण्याचें औषध.

**Lŏtt'erў,** *n.* (लॉ'टरि)—1 gamble in which prizes are won by lot or chance by ticket-holders. सोडत, लाटरी. *L. wheel,* सोडतीचे अंक फिरविण्याचें यंत्र, 2. (fig.) a thing that defies calculation (life, marriage, is a lottery). (अलं॰) नशिबाची पारख, सोडत. [fr. It. *lotteria,* lottery]

**Lō'tus,** *n.* (लो'टस्)—a water-lily; a legendary plant possessing the eater with luxurious languor. कमळ; कमलिनी. *Lotus eater,* a person given to indolent enjoyment. आळशी चैनबाज मनुष्य. *L. eating, a. & n.; L. land,* a place of indolent enjoyment. चैनबाजीची जागा.

**Loud,** *a.* (लाउड्)—strongly audible, sonorous; noisy; obtrusive. मोठा, उंच स्वराचा; गलबल्या, भडक, उच्छृंखल, लुच्चा. Loud, Loud'ly, *adv.* with loud voice. मोठ्यानें. *Loud speaker,* a wireless receiver loud enough to be heard without head phones. ध्वनिक्षेपक यंत्र.

**Lough,** *n.* (लॉख्)—An Irish lake or arm of sea. आयर्लंडमधील सरोवर किंवा समुद्राचें फाटं.

**Lounge,** *v. i.* (लाउन्ज्)—to loll, to recline; to stand about lazily, to idle. रिकामा पडून राहणें; भटकणें, निष्कारण फिरणें. *n.* a spell of, a place for, lounging; a sofa or deep chair. भटकणें, रिकामटेकडेपणा, चावडी, चव्हाटा, गप्पाष्टकांचा अड्डा, सज्जा किंवा बाहेरील दिवाणखाना; कोच, खोलसर खुर्ची. *Loun'ger, n.* रिकामटेकडा. *Loun'gly, adv.*

**Lour, Lower,** *v. i.* (लॉवर्)—to frown, to look sullen; (of sky, &c) to look dark and threatening. दुर्मुखणें, आंठ्या घालणें; (आकाश) काळें होणें, मेघाच्छादित होणें. *n.* a scowl; gloominess of clouds etc. भिवया चढवणें, कपाळाला आंठ्या; ढगांची काळोखी इ. *Lour'y, a.*

**Louse,** *n.* (लाउस्)—(pl. *lice,* लाइस्) kinds of parasitic insect. ऊ. *Lous'y* (ला'उझि) *a.* infested with lice. उवांनीं भरलेला, बुजबुजलेला गोचिड्यांनीं भरलेला. *Lous'iness, n.* उवांचा बुजबुजाट.

**Lout,** *n.* (लाउट्)—1. a hulking or rough-mannered fellow, a mean awkward fellow. ढुंभ,

**Mĕl'on**, *n.* (मे'लन्)—kinds of gourd eaten as fruit. खरबूज. *Water m.*, कलिंगण, कलिंगड.

**Mĕlt**, *v. i. & t.* (मेल्ट्)—*(pa.p. melted* ; and, as adj., *mo'lten*), to pass or convert from solid to liquid form under heat ; to dissolve, to dwindle, to vanish. वितळणें, द्रव होणें, वितळविणें ; विरघळणें, पान्हा फुटणें, पान्हा फोडणें, कनवाळणें, कमी होणें, नाहींसा होणें. *Melt away*, पार वितळून जाणें, नाहींसा होणें. *To m. down*, मोडून वितळविणें. *To go into the melting pot*, be revolutionized, रूपांतर होणें, क्रांति होणें. *Melting point*, वितळण्याचा अंश, द्रवणांक, द्रवणांश. *Melting process*, द्रवीकरणपद्धति, अशुद्ध धातु गाळण्याची पद्धति. *Melt*, *n.* melted metal ; amount melted at a time. वितळविलेली धातु ; एका वेळीं वितळविलेलें सर्व द्रव्य किंवा धातु.

**Mĕm'ber**, *n.* (मे'म्बर्)—a limb or other bodily organ ; distinct part of a complex structure ; one of a society. अंग, गात्र, अवयव ; निराळा भाग, प्रकरण, खंड ; सभासद, व्यक्ति. *Unruly member*, tongue. जीभ. *Member of Christ*, Christian. ख्रिश्चन मनुष्य *M. P.*, member of Parliament. पार्लमेंटचा सभासद.

**Mĕm'bership**, *n.* (मे'म्बर्शिप्)—being a member ; number of members. सभासदत्व ; सभासदांची संख्या.

**Mĕm'brāne**, *n.* ( मे'म्ब्रेन् )—pliable sheet-like tissue, a thin flexible skin or texture. आंतील त्वचा, वेष्टनत्वचा. *Membrana'ceous*, (मिम्ब्रने'शस्), *Membra'neous*, *aa.* कोमल, मृदु, पातळ, आंतील त्वचेचा, वेष्टनसदृश.

**Mėmĕn'tō**, *n.* (मिमे'न्टो)—*( pl.–os )* an object serving as a memorial ; a keepsake. स्मरणार्थ वस्तु ; आठवणूक, स्मरण, यादगिरी. *M. mori*, (=remember you must die), warning or reminder of death (e. g skull). (डोक्याची कवटी वगैरे ) मरणाधीनतेची आठवण करणारें, मृत्युसूचक.

**Mem'oir**, *n.* (मे'म्वार्)—a brief biography ; *(pl.)* account of one's life or experiences ; what is treasured in the mind ; scientific paper. लहानसें चरित्र ; ( अने० ) स्वतःचें चरित्र किंवा आठवणी ; टांचण, बखर ; संशोधनात्मक निबंध.

**Mĕm'orable**, *a.* (मे'मोरबल् )—likely or worthy to be remembered, remarkable, famous. संस्मरणीय, स्मरण ठेवण्याजोगा. *Memorabil'ia*, *n. pl.* memorable things. संस्मरणीय गोष्टी. *Memorabil'ity*, *n.* संस्मरणीयता. *Mem'orably*, *adv.*

**Mĕmorăn'dŭm**, *n.* (मेमो'रॅन्डम् )—*( pl.–da )* a note made for future use, a brief entry in a diary ; informal business communication. टांचण, याद ; निवेदनपत्रिका, कायदेशीर यादी. *M. of Association*, ( एकाद्या ) संस्थेच्या व्यावहारिक स्थितीची व उद्देशाची यादी, उद्देशपत्रक.

**Mėmor'ial**, *a.* ( मिमॉ'रिअल् )—commemorative. स्मृतिजनक, स्मारक. *n.* commemorative monument, ( *usu. pl.* ) chronicles ; a written representation made to authorities. स्मारक ; स्मरणार्थ टिपणें ; अर्ज, विनंतीपत्र. *Memor'ialist*, *n.* signatory of memorial. विनंतीपत्रकावर सही करणारा. *Memor'ialize*, *v. t.* to address memorial to. ( ला ) विनंतीअर्ज करणें. *M. Day*, 30th May or other day to commemorate those who fell in the U. S. Civil War. अमेरिकेच्या सं. संस्थानांतील अंतस्थ यादवींत मृतांच्या स्मरणार्थ दिवस.

**Mĕm'orīze**, *v. t.* ( मे'मराइझ् )—to learn by heart. तोंडपाठ करणें.

**Mĕm'orў**, *n.* ( मे'मरि )—faculty by which things are recalled to or kept in the mind ; posthumous repute. धारणाशक्ति, आठवण, स्मरणशक्ति, स्मृति ; मरणानंतर होणारी कीर्ति. *Convenient* or *accommodating memory*, सोईस्कर किंवा आवडत्या गोष्टींचें स्मरण,स्मृति. *In m. of*, च्या स्मरणार्थ. *To commit to m.*, तोंडपाठ करणें.

**Mĕn'ace**, *n.* ( मे'निस् )—threat ; apparent danger, indication of a probable evil to come. धमकी ; दहशत. *v. t.* to threaten. धमकी देणें, धमकावणें, दटावणें, भिवविणें. *Men'acingly*, *adv.*

**Menage'**, *n.* (मेना'झ् )—household, or its management. गृहसंस्था, घर, प्रपंच ; संसाराची व्यवस्था, गृहव्यवस्था.

**Mėnă'gerie**, *n.* ( मिनॅ'जरि )—a show of caged wild animals. जनावरखाना, पशुसंग्रह.

**Mĕnd**, *v. t. & i.* ( मेन्ड् )—to repair, to patch ; to put right ; to improve upon ; to rectify, to advance to a better state. डागडुजी करणें, दुरुस्त करणें ; नीट करणें ; सुधारणें ; शुद्ध करणें. *n.* mended hole or crack. दुरुस्त केलेलें भोंक किंवा चीर. *On the m.*, improving in health or condition. प्रकृति सुधारत असलेला, स्थिति सुधारत असलेला. *To m. matters*, स्थिति सुधारणें. *To m. or end*, to improve or abolish. सुधारणें किंवा नाहींसें करणें. *Men'dable*, *a.*

**Mĕndā'cious**, *a.* ( मेन्डे'शस् )—lying, given to lying or telling untruths. खोटें बोलणारा, लबाड, खोटा, लुच्चा. *Menda'city*, *n.* खोटें भाषण, खोटें बोलण्याची संवय, लबाडी.

**Mĕn'delism**, *n.* ( मे'न्डलिझम् )—theory of heredity tending to reduce to numerical law the recurrence of inherited characters आनुवंशिक गुणांची आवृत्ति संख्येनें ठरविणारा आनुवंशीयतेचा

( मेन्डेल नांवाच्या मानसशास्त्रज्ञानें ठरविलेला ) सिद्धान्त. *Mende'lian, a. & n.* [ G. J. Mendel, 1822-84. ]

**Mĕn'dĭcant,** *n.* (मे'न्डिकन्ट्)—a beggar. भिकारी. याचक, भिक्षु, यति. *M. friars*, भिक्षेवरच राहणारे संन्यासी, भिक्षु. *Men'dicancy, n., Men'dicity, n.*

**Mē'nĭal,** *n.* (मी'निअल्)—a household servant. घरचाकर. *a.* fit only for a menial. घरकाम करणारा.

**Mĕnĭngī'tĭs,** *n.* (मेनिन्जा'यूटिस्)—inflammation of membrane enclosing the brain. मेंदूच्या वेष्टनाची सूज, मेन्दूचा विकार, मेन्दूज्वर.

**Men'sēs,** *n. pl.* (मे'न्सीझ्)—monthly discharge from the womb. मासिक विटाळ, मासिक स्राव.

**Mĕn'shĕvik,** *n.* (मे'न्शिव्हिक्)—Russian Socialist of the more moderate party (*cf.* Bolshevik). रशियांतील मवाळ पक्षीय समाजसत्तावादी ('बोल्शेव्हिक'च्या उलट).

**Mĕn'strual,** *a.* (मे'न्स्ट्रुअल्)-monthly ; pertaining to the menses of females. मासिक ; मासिक विटाळासंबंधीं.

**Mĕn'struāte,** *v. i.* (मे'न्स्ट्रूएट्)—to discharge the menses. विटाळ येणें ; मासिक स्राव होणें. *Menstrua'tion, n.*

**Mĕn'struum,** *n.* (मे'न्स्ट्रूअम्)—(*pl.-rua*), solvent liquid. द्रावक, औषधांचें वाहक.

**Mĕn'sūrable,** *a.* (मे'न्स्युरबल्)—measurable; having fixed rhythm. प्रमाणाचा, मोजण्याजोगा ; तालबद्ध.

**Mĕnsūrā'tion,** *n.* (मेन्स्यूरे'शन्)—the art or practice of computing measurements. महत्त्वमापन ; मोजणें ; मापन.

**Mĕn'tal,** *a.* (मे'न्टल्)—of or in the mind. मानसिक, मनाचा. *M. arithmetic*, performed without the use of written figures. तोंडी गणित, तोंडचे हिशेब. *M. patient*, under care for disordered mind. वेड लागलेला रोगी, भ्रमिष्ट रोगी. *Men'tally*, adv. मनांतल्या मनांत, मानसिक श्रम करून. *Men'tal, a.* of the chin. हनुवटीचा.

**Mĕntăl'ĭty,** *n.* (मेन्टॅ'लिटि)—character of a person's mind ; idiosyncrasy. मनाचा स्वभाव, स्वभाववैचित्र्य.

**Men'thŏl,** *n.* (मे'न्थॉल्)—camphor-like substance used in relieving pain. कापरासारखें दुःखहारक औषध, मेंथाल.

**Mĕn'tion,** *v. t.* (मे'न्शन्)—to speak of ; to call attention to. सांगणें ; कळविणें, लिहिणें, उल्लेख करणें *n.* a mentioning. निवेदन, कथन, उल्लेख. *Honourable m.*, award of merit to candidate in examination, work of art etc. not entitled to prize. प्रशस्तिपत्र ; प्रशस्तिपर नामानिर्देश.

**Men'tor,** *n.* (मे'न्टॉर्)—an experienced and trusted adviser, a counsellor. अनुभाविक आणि विश्वस्त उपदेशक, सदुपदेशक.

**Mĕn'u,** *n.* (मे'न्यु or मेनू)—a bill of fare. भोजनपत्रक, जेवणांतील पदार्थांची यादी.

**Mēphi'tĭs,** *n.* (मिफा'इ-टिस्)—noxious emanation from below ground. कुजट पदार्थांतून निघणाऱ्या विषारी वाफा, जमिनींतून निघणारी दूषित हवा, वाफ. *Mephit'ic, a.* घाणेरा, घाणीचा, रोगजनक, दूषित.

**Merc'antile,** *a.* (म'र्-कन्टाइल्)—trading ; of trade or merchants, commercial. व्यापारी ; व्यापाराचा. *M. theory*, theory that money is the only wealth. पैसा हीच संपत्ति, हा सिद्धान्त. *M. marine*, shipping employed in commerce. व्यापारी जहाजें, व तिचा चालकवर्ग

**Mer'cenarў,** *a.* (म'र्सिनरि)—working for money or reward ; not disinterested. पैशासाठीं किंवा वशिलाकरितां काम करणारा भाडोत्री ; स्वार्थी. *n.* a hired soldier. भाडोत्री शिपाई.

**Mer'cer,** *n.* (म'र्सर्)—a dealer in silk, velvet and such fabrics. रेशमी किंवा लोकरी कापड विकणारा. *Mer'cery, n.* रेशमी कापड, पट्टवस्त्रें.

**Mer'cerīze,** *v. t.* (म'र्सराइझ्)—to prepare (cotton goods) for dyeing by use of the chemicals. क्षारांच्या योगानें कापसाचें सूत रेशमाप्रमाणें तकतकीत करणें. *Mercerized, (pa. p.)* having silk gloss due to mercerizing. क्षारांच्या साह्यानें रेशमाप्रमाणें तकतकीत दिसणें.

**Merch'andīse,** *n.* (म'र्चन्डाइझ्)—mercantile commodities ; goods for sale. व्यापारी जिन्नस ; विक्रीचा माल.

**Merch'ant,** *n.* (म'र्चन्ट्)—wholesale trader, esp. with foreign countries ; dealer. परदेशाशीं व्यापार करणारा, घाऊक व्यापारी ; व्यापारी. *M. prince*, wealthy m. श्रीमान व्यापारी. *M. ship, Merchantman*, a ship conveying merchandise. व्यापारी जहाज. *M. service*, व्यापारी जहाजांची वाहतूक. *Speed m.*, reckless motorist, बेदरकार मोटार हांकणारा. *Lob m.*, slow bowler. सावकाश व हळू चेंडू फेंकणारा. *Merch'antable, a.* salable ; in demand. विकण्याजोगा ; मागणीचा.

**Mer'cĭful,** *a.* (म'र्सिफुल्)—disposed to mercy ; compassionate ; kind. दयाशील ; दयाळू ; सदय, कृपाळू.

**Mer'cĭlĕss,** *n.* (म'र्सिलिस्)—cruel, pitiless. निष्ठुर, दयाहीन, निर्दय.

**Mercūr'ĭal,** *a.* (मर्क्यू'रिअल्)—of lively temperament ; of or containing mercury. रंगेल, आनंदी ; पाऱ्यासंबंधींचा, पाऱ्याचा.

**Merc'ūrў,** *n.* (म'र्क्युरि)—a white normally liquid metal, quicksilver ; Roman god, the mess-

enger of Jove; a messenger. पारा; एक रोममधील देवता, बृहस्पतीचा दूत, बुधग्रह; दूत. *The m. is rising*, weather or temper is improving. हवा किंवा पारा सुधारणें; पारा चढणें.

**Mer'cy̆**, *n.* (म'र्सि)—pity, compassion, compassionateness; a piece of good fortune कृपा, करुणा, दया; सुदैव. *At the m. of*, wholly in the power of, liable to danger or harm from. च्या हातांत सांपडणें, च्या स्वाधीन असणें.

**Mēre**, *n.* (मिअऱ्)—a pool or small lake; a boundary. सरोवर; सीमा, हद्द. *a.* neither more nor less than; bare, undiluted. केवळ, फक्त; निर्भेळ, अमिश्रित.

**Mere'ly̆**, *adv.* (मि'अर्लि)—just, only. केवळ; फक्त.

**Mĕrĕtrĭ'cious**, *a.* (मेरिट्रि'शस्)—showily attractive; flashy; of, befitting, a harlot. भपकेबाज, दिखाऊ, अलंकारिक; वेश्येचा, वेश्येसंबंधी.

**Mergăn'ser**, *n.* (मर्गॅ'न्सर्)—a diving fish-eating duck. पाण्यांत बुडी मारणारें मत्स्यभक्षक बदक.

**Merge**, *v. t. & i.* (मर्ज्)—to lose or cause to lose identity by absorption. गड्ड करणें, मिळून जाणें. *Mer'ger*, *n.* absorption in a greater whole. मोठ्या विभागांत सामील होणें, अंतर्भाव होणें.

**Mērĭd'ĭan**, *n.* (मिरि'डिअन्)—sun's position at noon; star's highest altitude; circle passing through a place and the N. & S. poles; prime, full splendour; *(attrib.)* culminating; of noon. मध्याह्न; ताऱ्याची अत्युच्च स्थिति; याम्योत्तर वृत्त; भर, बहर, कळस; (विशे०) भराचा, शिकस्तीचा, कळसाचा; मध्याह्नाचा. *Calculated for the m. of*, to suit the tastes of (place, people). आवडीनुसार, आवडीनावडीप्रमाणें.

**Mērĭd'ĭonal**, *a.* (मिरि'डिअनल्)—of the south; of a meridian. दक्षिणेकडील; मध्याह्नाचा.

**Meringue'**, *n.* (मरॅं'ग्)—sweet made with white of egg, sugar etc. अंड्याचें बलक, साखर वगैरेंनीं युक्त असा खाऊ.

**Meri'no**, *n.* (मरी'नो)—(*pl.*—*os*), a kind of sheep with fine wool; fine yarn or soft fabric of its wool; fine woollen yarn. उंची लोंकरीच्या मेंढ्यांची जात (स्पेनमधील); त्या मेंढ्यांच्या लोंकरीचे तंतू; उंची लोकरीचें कापड.

**Mĕ'rit**, *n.* (मे'रिट्)—commendable quality; goodness; (*pl.*) deserts. चांगला गुण; चांगलेपणा; पुण्य; (अने०) गुणदोष. *v. t.* to deserve. योग्य असणें, योग्यता-लायकी-असणें.

**Mĕrĭtor'ious**, *a.* (मेरिटॉ'रिअस्)—having merit, deserving, praiseworthy. स्तुत्य, गुणवान्.—*ly adv.*,—*ness*, *n.*

**Merle**, *n.* (मर्ल्)—a black bird. एक जातीचा पक्षी.

**Merl'in**, *n.* (म'र्लइन्)—a kind of falcon. एक जातीचा बहिरी ससाणा.

**Merm'aid**, *n.* (म'र्मेड्)—a half-human being with head & trunk of a woman & tail of a fish. मत्स्यकन्या, कमरेखालीं मत्स्यासारखी स्त्री.

**Mērm'an**, *n.* (म'र्मन्)—man of the sea with fish tail. कमरेखालीं मत्स्यासारखा पुरुष, मत्स्यपुरुष.

**Mĕ'rriment**, *n.* (मे'रिमेन्ट्)—gaiety with laughter or noise, amused enjoyment; mirth. हास्यविनोद, हंसणें खिदळणें, नाचतमाशा, थट्टामस्करी, चैन, मौज; आनंद.

**Mĕ'rry̆**, *a.* (मे'रि)—laughing, given to laughter; full of fun, jovial, hilarious. हास्यमुख, आनंदी; गंमतीचा. *M. andrew*, clown, baffoon. खुषमस्कऱ्या, विदूषक. *M.-go-round*, a revolving machine with wooden horses or cars. लांकडी घोडे किंवा बैठका बसविलेलें फिरतें चक्र, गोल चांक. *M.-making*, festivity. चैन, मजा, उत्सव. *M.-thought*, the forked bone of a bird's breast. पक्ष्याच्या छातीचें कांटेरी हाड. *To make m.*, to be festive. मजा करणें, चैन करणें. *To make m. over*, to make fun of. ची थट्टा करणें.

**Mĕsalliance**, *n.* (मेझॅ'लिआंस्)—a marriage with person of inferior social position. कमी दर्जाच्या पुरुषाशीं विवाह, प्रतिलोम विवाह. [F]

**Meseem's**, *v. i.* (मिसी'म्स्)—it seems to me. मला वाटतें, मला भासतें.

**Mĕsh**, *n.* (मेश्)—one of the spaces between the threads of a net; (*pl.*) something that entangles, a net. जाळ्याच्या धाग्यांतील फट; (अने०) जाळें. *v. t.* to catch in a net; (of teeth of wheel) be engaged. जाळ्यांत पकडणें; (चाकाचे दांते, दांत्यांत) अडकलें जाणें. *In mesh*, engaged. एकमेकांत अडकलेले (चाकाचे दांते).

**Mĕs'merĭsm**, *n.* (मे'झ्मेरिझ्म)—hypnotic state induced in a person by the exercise of another's will-power, animal magnetism. मोहिनीप्रयोग. *Mesme'ric*, *a.* मोहिनी प्रयोगाचा, मोहन शक्तीचा. *Mesmer'ist*, *n.* मोहनप्रयोग करणारा, जादूगार, जादूचे प्रयोग करणारा.

**Mĕs'merīze**, *v. t.* (मे'झ्मेराइझ्)—to bring into a state of hypnotic sleep. मोहिनीविद्येनें भुरळ पाडणें.

**Mĕss**, *n.* (मेस्)—portion of food; untidiness, dirty state; company, esp. in army or navy, feeding together. अन्न, भोजन; खिचडी, चिवडा, गड्डागोंधळ, फजिती, अव्यवस्था, गचाळपणा; (नाविकांचें, सैनिकांचें) सहभोजन, भिसी. *v. t. & i.* to make dirty or untidy, to bungle; to take meals *with*. गोंधळ करणें; सहभोजन करणें. *To*

*make a m. of*, to bungle (undertaking). गोंधळ करणें, फसणें. *Mess-mate*, गलबतावरील सहभोजक (खलाशी), एकाच भिशींत जेवणारा. *Me'ssy*, *a.*

**Mĕss'age,** *n.* (मे'सिज्)—communication sent; what a prophet or moralist is inspired to say. निरोप; संदेश. *v. t.* to send as a message; to transmit (plan etc.) by signalling. निरोप म्हणून पाठविणें; खुणांनीं-संकेतचिन्हांनीं (बातमी किंवा बेत) कळविणें.

**Mĕss'enger,** *n.* (मे'सिंजर्)—bearer of a message. दूत, जासूद.

**Mĕss'rs,** *n.* (मे'सर्झ्)—title prefixed to name of firm or to list of gentlemen. (मिस्टरच्या अनेकवचनाप्रमाणें) व्यापारी मंडळाच्या किंवा गृहस्थांच्या नांवाच्यापूर्वी लावण्याची पदवी.

**Mĕss'ŭage,** *n.* (मे'स्वुइज्)—a dwelling house with out-building and land. घरवाडी.

**Mĕtăb'olism,** *n.* (मिटॅ'बालिझम्)—the changes undergone by nutritive material in the body. शरीरांतील पाचक द्रव्यानें पडविलेले फरक, चयापचयक्रिया. *Metabol'ic*, *a.*

**Mĕtacărp'us,** *n.* (मेटॅका'र्पस्)—the part of hand from the wrist to the finger-roots. हाताचा तळवा.

**Mĕt'al,** *n.* (मे'टल्)—a class of substance; the broken stones for road-making; (*pl.*) the rails of a railway. धातु; खडी; (अने०) आगगाडीचे रूळ. *v. t.* to fit with metal; to make or mend (road) with metal. धातुमय करणें; खडी घालून रस्ता करणें,-दुरुस्त करणें. *Metall'ic*, of, or as of, metal. धातूचा, धातूप्रमाणें, धातूसारखा. *Metallic currency*, gold, silver, etc. सोनें, चांदी वगैरेचीं नाणीं. *Metallif'erous*, *a.*, *Met'alline*, *a.* of the nature of or yielding metal. धातुयुक्त, धातूत्पादक, धातूचा, धातुमय. *Met'allize*, *v. t.* to give metallic qualities to. धातुरूप देणें.

**Mĕtăll'urgy̆,** *n.* (मिटॅ'लर्जि)—art of extracting metal from ore and of working in metal. धातुशोधनविद्या, धातुविद्या.-*gist*, *n.* धातुशोधक, धातुविद्या जाणणारा.

**Mĕtamŏrph'ic,** *a.* (मेटमॉ'र्फिक्)—(of rocks) changed in structure by volcanic or other natural agency. ज्वालामुखीच्या किंवा इतर नैसर्गिक कारणानें मूल रूपांत फरक पडलेले (खडक), मूलरूपान्तरीभूत. *Metamorph'ism*, *n.* रूपांतरक्षमता.

**Mĕtamŏrph'ōse,** *v. t.* (मेटॅमॉ'र्फोझ्)—to subject to metamorphosis. रूपांतर करणें, स्वरूप बदलणें.

**Mĕtamŏrph'osis,** *n.* (मेटमॉ'र्-फॉसिस्)—(*pl.-oses*) change of form, esp. magic transformation, change of character, circumstances etc. रूपांतर, रूपभेद, विकृति. [ Gk *meta*, beyond and *morphe*, form ]

**Mĕt'aphor,** *n.* (मे'टफर्)—application of name or descriptive term to an object to which it is not literally applicable. रूपक, दोन सारख्या पदार्थांचें अभेदवर्णन. *Metapho'rical*, *a.* रूपकाचा, लाक्षणिक.

**Mĕtaphy̆s'ics,** *n. pl.* (मेटाफि'झिक्स्)—speculations on the nature of being, truth, and knowledge; abstract or subtle talk, mere theory. अध्यात्मविद्या, मानसशास्त्र, तत्त्वज्ञान, केवळ तात्विक भाषण. -*cal*, *a.*,-*cian*, *n.* तत्त्वज्ञानवेत्ता.

**Mĕtatărs'us,** *n.* (मेटटा'र्सस्)—group of five long bones of foot between tarsus and toes. पायाच्या चवड्याचीं हाडें.—*tars'al*, *a.* पायाच्या चवड्याचा.

**Mĕtăth'ĕsis,** *n.* (मिटॅ'थिसिस्)—(*pl.-eses*)—transposition of the letters or sounds in a word; (*Chem.*) interchange of atoms between two molecules. शब्दांतील अक्षरांची किंवा उच्चाराची उलटापालट (उदा॰ उरफाटा, उफराटा इ॰), वर्णविपर्यय); परमाणुविपर्यय. [ Gk *meta*, over, and *tithemi*, to place ]

**Mēte,** *v. t.* (मीट्)—to measure, to dole. मापणें, मोजणें, मोजून—मापून—देणें. *n.* boundary, boundary stone. मर्यादा, सीमा, हद्द, हद्दीचा दगड.

**Mĕtĕmp'sy̆chō''sĭs,** *n.* (मिटें'प्-सिको''सिस्)—(*pl.-oses*), migration of soul at death into another body. जन्मांतर, पुनर्जन्म.

**Mē'tĕor,** *n.* (मी'टिअर्)—any atmospheric phenomenon esp. a shooting star. उल्का, दिव्य उत्पात, आकाशांतून पडणारा तारा.

**Mētĕŏ'ric,** *a.* (मीटिऑ'रिक्)—brilliant and transitory as a meteor, transiently brilliant; of meteors; (fig.) dazzling, rapid. उल्केसारखा तेजस्वी आणि क्षणिक; उल्कासंबंधीं; दृष्टि दिपवून टाकणारा, जलद.

**Mē'teorīte,** *n.* (मी'टअराइट्)—a fallen meteor, a meteoric stone. आकाशांतून पडलेला तारा, उल्कापाषाण.

**Mētĕorŏl'ogy̆,** *n.* (मीटिअरॉ'लॉजि)—science of the atmospheric phenomena or weather. वातावरणशास्त्र, हवामानविषयक शास्त्र.-*o'gical*, *a.* हवामानशास्त्रविषयक.-*gist*, *n.* हवामानशास्त्रज्ञ.

**Mē'ter,** *n.* (मी'टर्)—apparatus registering the amount of gas or other fluid that passes through it; a person, a thing, that measures. (लांबी, गॅस, वीज, वगैरे) मापण्याचें यंत्र, मीटर; मापणारा, मोजणारा.

**Mĕthinks',** *v. impers.* (मिथिं'क्स्)—it seems to me, it appears to me, I think. मला वाटतें, मला भासतें.

**Mĕth'od**, *n.* (मे'थड्)—way of doing something; orderliness, systematic way; (Nat. Hist.) a scheme of classification. मार्ग, पद्धति, व्यवस्था, अनुक्रम, बेत, कृति, रीत; वर्गीकरण, वर्गीकरण-पद्धति.

**Mĕthŏd'ical**, *a.* (मिथॉ'डिकल्)—characterised by a method, orderly, systematic. पद्धतशीर, यथाक्रम. *Method'ically, adv.*

**Mĕth'odist**, *n.* (मे'थडिस्ट्)—a member of any of the religious bodies owing their origin to the evangelistic movement of Charles & John Wesley & George Whitefield; (contempt.) a person of strict religious views; one who follows a method esp. in Nat. Hist. कर्मनिष्ठ ख्रिस्ती पंथाचा मनुष्य; कर्मठ मनुष्य; वर्गीकरण-पद्धतिनिष्ठ. *Meth'odism, n.* 'मेथडिस्ट' पंथाचीं मतें.—*distical, a.*

**Mĕth'odize**, *v. t.* (मे'थडाइझ्)—to introduce method into. पद्धतशीर करणें, व्यवस्था लावणें.

**Mĕth'ўl**, *n.* (मे'थिल्)—the base of wood spirit. पुष्कळ सेंद्रिय संयुक्त पदार्थांचे आवश्यक घटक, काष्ठमद्यार्काचें मूल. *Meth'ylate, v. t.* to mix with methyl. काष्ठमद्यार्कांशीं संयुक्त करणें. *Methylated spirit*, मनुष्यानें पिण्याला अगदीं नालायक केलेली दारू. [ Gk *methu*, wine, hule, wood ]

**Mĕtĭc'ūlous**, *a.* (मिटि'क्युलस्)—slavishly accurate or correct or proper. फाजील सावध, अति चिकित्सक.

**Mĕtŏn'ўmў**, *n.* (मिटॉ'निमि)—substitution of an attribute for the name of the thing meant (*e. g. crown* for *king*). नामाकरितां विशेषण किंवा विशेषनाम योजणें, अजहल्लक्षणा.

**Mē'tre**, *n.* (मी'टर्)—verse rhythm. छंद, वृत्त. *Me'trist, n.* कवितारकार.

**Mē'tre**, *n* (मी'टर्)—a unit of length (39·37 in) in metric system. लांबी मोजण्याचें मीटर नांवाचें फ्रेंच माप (= ३९·३७ इंच).

**Mĕt'ric, Mĕt'rical**, *aa.* (मे'ट्रिक् मे'ट्रिकल्)—of or in metre; involving measurement. छंदाचा, वृत्तसंबंधीं; छंदोबद्ध; मोजण्याचा, मापनविषयक. *M. system*, decimal measuring system with the metre and the litre and gramme determined by it, as units of length, capacity and weight. दशांशात्मक मेट्रिक पद्धति. (मीटर्, लिटर् आणि ग्राम् हीं त्या पद्धतींत लांबी, द्रव पदार्थ व वजन मोजण्याचीं अनुक्रमें मुख्य मापें आहेत.)

**Mĕtrŏl'ogў**, *n.* (मिट्रॉ'लजि)—science, system, of weights and measures. वजनमापशास्त्र,-पद्धत. *-gist, n.*

**Mĕt'ronome**, *n.* (मे'ट्रनोम्)—musician's pendulum giving regular beat at required pace. तालमापक (यंत्र).-*nom'ic, a.*

**Mĕtrop'olis**, *n.* (मिट्रॉ'पॉलिस्)—the mother city, chief city of a State, *Metropolitan's see.* मुख्य शहर, राजधानी; बिशपच्या अधिकारांतील विभाग-प्रदेश.

**Mĕtropŏl'itan**, *a.* (मेट्रपॉ'लिटन्)—of a metropolis. राजधानीचा. *n.* archbishop. मुख्य-बिशप किंवा धर्माधिकारी.

**Mĕt'tle**, *n.* (मे'टल्)—spirit, courage, stuff or material, endurance. तेज, धैर्य, सहनशक्ति किंवा ताकद. *M.-some, met'tled, aa.* spirited. तेजस्वी, पाणिदार, जोरदार. To *be on* one's *met'tle*, to be incited to do one's best. जोम दाखविण्याला भाग पडणें, आवेश चढणें.

**Mew**, *v. i. & t.* (म्यू)—to shut up; to cry like a cat or baby. कोंडून ठेवणें; मांजरासारखें किंवा लहान मुलासारखें ओरडणें. *n.* a cage for hawks. पिंजरा, खुराडें. *Mews*, (pl. as sing.) stable-yard and stables. तबेल्यांची जागा, घोड्यांचे तबेले.

**Mew**, *n.* (म्यू)—a sea-gull, a seafowl. दर्यावरील पक्षी, केगई.

**Mīăs'ma**, *n.* (मायॅ'झ्मा)—(pl.-*ata*), noxious exhalation from marshes, putrid matter, etc. दूषित रोगजनक हवा.

**Mī'că**, *n.* (मा'इ-का)—kind of mineral found as crystals separable into thin plates. अभ्रक.

**Mĭc'kle**, *n.* (मि'कल्)—a large amount. मोठी संख्या. *Many a little*, or *pickle, makes a m.*, थेंबे थेंबे तळें सांचे.

**Mī'crōbe**, *n.* (मा'इ-क्रोब्)—a minute plant or animal, esp. as cause of a disease. अगदीं सूक्ष्म (रोगजनक) वनस्पति किंवा प्राणी.

**Mī'crocŏsm**, *n.* (मा'इ-क्रा-कॉझम्)—a man as an epitome of the universe; analogue on a small scale of something, the little world. पिंड, मानवदेह, मनुष्य; सूक्ष्म जगत्. *Microcos'mic, a.* सूक्ष्म विश्वाचा, मानवदेहाचा. [ Gk *mikros*, little; *kosmos*, world ]

**Mī'cron**, *n.* (मा'इक्रन्)—millionth of a metre. मीटरचा दशलक्षांश भाग.

**Mī'crophōne**, *n.* (मा'इ-क्रोफोन्)—a device for making faint sounds louder. अस्पष्ट शब्द मोठे करणारें यंत्र, सूक्ष्मध्वनिवर्धक यंत्र.

**Mī'croscōpe**, *n.* (मा'इक्रॅ-स्कोप्)—lens or arrangement of lenses, &c. by which minute objects are made visible. सूक्ष्मदर्शक यंत्र, सूक्ष्मदर्शक भिंग,-कांच. *Microscop'ic, a.* of, with, like, the microscope. सूक्ष्मदर्शक यंत्राचा, सूक्ष्मदर्शकाच्या

साधनानें केलेला, अतिसूक्ष्म. *Microscop'ical, a.*; *Micros'copy, n.* सूक्ष्मदर्शक यंत्राचा उपयोग, सूक्ष्मदर्शनविद्या.

**Micturi'tion**, *n.* (मिक्ट्युरि'शन्)—passing of urine. मूत्रोत्सर्जन, लघवीला अति होणें.

**Mid**, *a.* (मिड्)—that is in the middle, intermediate. मधला, मध्य, मध्यम, मध्यवर्ती. *prep.* amid. मध्यें. *Mid-night*, twelve o'clock at night. मध्यरात्र. *Mid-off*, *Mid-on*, fielders nearer batsman than long-off, and long-on. खेळाडूच्या जवळचे मध्यक्षेत्रांतील क्षेत्ररक्षक.

**Mid'day**, *n.* (मि'ड्-डे)—noon or thereabouts. दुपार, मध्याह्न.

**Midd'en**, *n.* (मि'डन्)—a dung-hill; a refuse-heap. उकिरडा, कचऱ्याचा ढीग.

**Midd'le**, *a.* (मि'डल्)—equally distant from the extremes, equidistant from extremities, intermediate in rank, quality, &c. मधला, मधील, मधचा; मध्यम दर्जाचा. *n.* middle point or position; the waist. मध्यबिंदु; मधला भाग, मध्यम प्रदेश, कमर. *M.-aged*, मध्यमवयस्क. *M. finger*, second finger. आंगठ्याजवळचें हाताचें बोट. *M.-man*, a dealer intervening between producer & consumer. मध्यस्थ, अडत्या, दलाल. *In the M. of*, while (doing), during (process). दरम्यान, मध्यें, मध्यंतरीं. *M. weight*, boxing weight from 11 st. 6 lb. to 10 st. 7 lb. मल्लाचें वजन (१६० ते १४० पौंड वजन).

**Midd'le Ages**, *n.* (मि'डल् एजिस्)—about A. D. 1000-1400. मध्यकाळ, सुमारें १००० ते १४०० इसवी.

**Midd'ling**, *a.* (मि'ड्-लिंग्)—moderately good; fairly well in health. माफक, मध्यम प्रतीचा; सामान्य. *adv.* fairly or moderately. माफक रीतीनें, सामान्यपणें.

**Midge**, *n.* (मिज्)—a gnat; a small fly. चिलट; घुंगरूट, कैंचरें, चिलट.

**Midg'et**, *n.* (मि'जिट्)—diminutive person; photograph of small size. अतिशय लहान मनुष्य, अत्यंत ठेंगू; लहान आकाराचें छायाचित्र.

**Mid'land**, *a.* (मि'ड्-लन्ड्)—remote from the sea or border. समुद्रापासून दूर असलेला, मध्यदेशस्थित. *n.* middle part of country; (*pl.*) the middle countries of England. देशाचा मध्यभाग; (अने०) इंग्लंडांतील समुद्रापासून दूर असे मध्यवर्ती परगणे.

**Mid'night**, *n.* (मि'ड्-नाइट्)—the middle of the night, twelve o'clock at night. मध्यरात्र.

**Midst**, *n.* (मिड्स्ट्)—the middle. मध्य. *prep.* amidst. मध्यें.

**Mid'summer**, *n.* (मि'ड्समर्)—summer solstice, about 21 June. कर्कवृत्त, २१ जूनचा सुमार, उत्तरायणान्त. *Mid-summer madness*, height of madness. मूर्खपणाचा,-वेडेपणाचा, कळस.

**Mid'wife**, *n.* (मि'ड्-वाइफ्)—a woman who assists other women in childbirth. सुईण.

**Mid'wifery**, *n.* (मि'ड्-विफ्रि, मि'डिफ्रि)—obstetrics. सुईणकाम, सुईणपणाचा धंदा; सूतिकाशास्त्र.

**Mien**, *n.* (मीन्)—person's bearing or look as showing person's character or mood. आकार, चर्या, रूप, मुद्रा, डौल, ढब.

**Might**, *a.* (माइट्)—*pa. t. of* 'May'

**Might**, *n.* (माइट्)—great power or strength or resources, force. मोठें सामर्थ्य, पराक्रम, कुवत, ताकद, तकवा, बळ, शक्ति. *With might & main*, शिकस्त करून, सामर्थ्य किंवा बळ खर्चून.

**Might'y**, *a.* (मा'इटि)—having might; displaying great power, massive or huge. पराक्रमी, शक्तिमान्; प्रचंड, अफाट, अचाट, अद्भुत. *adv.* (colloq., iron.) very, quite. अतिशय, फारच, पराकाष्ठेचा. *Might'ily, adv.*; *Might'iness, n.*

**Mignonette'**, *n.* (मिन्योने'ट्)—a plant with fragrant flowers; greyish green colour of these; kinds of lace & fine net. एक सुवासिक फुलझाड; करडा हिरवा रंग; जाळीदार कापड.

**Migrate'**, *v. i.* (माइ-ग्रे'ट्)—to change one's abode; to come and go with the seasons. स्थानांतर करणें; देश किंवा मुलूख पालटणें. *Migra'tion, n.* देशांतर करणें. *Migrat'ory, a.* देशांतर करणारा, भटकणारा. *Mi'grant, a. & n.* that migrates. स्थलांतर करणारा (पक्षी, प्राणी).

**Mika'do**, *n.* (मिका'डो)—(*pl.-os*), Emperor of Japan. जपानच्या बादशहाची पदवी.

**Mike'**, *v. i.* (माइक्)—(sl.) to shirk work, to idle. कामचुकारूपणा करणें, आळसांत वेळ दवडणें. *n.* idling or a spell of it. भटकेपणा, आळसाची तंद्री.

**Mi'lage**, *n.* (मा'इलिज्)—miles travelled, used, etc.; expenses per mile. (अमुक) मैल अंतर, लांबी; दर मैली भाडें, प्रवासखर्च, भत्ता; मैलीतिकिटांचें पुस्तक.

**Milch**, *a.* (मिल्च्)—giving milk, kept for milk. दुभती, दूध देणारी. *Milch animals*, दुभतीं ढोरें. *Milch cow*, (*fig.*) source of profit, *esp.* a person from whom money is easily drawn. फायद्याचें कलम, ज्याच्याकडून सहज पैसा काढतां येईल असा मनुष्य.

**Mild**, *a.* (माइल्ड्)—gentle; not severe or harsh or drastic; not bitter. स्वभावानें गरीब, शांत, सौम्य; नरम; मधुर. *Mild'ly, adv.*; *Mild'ness, n.*

**Mil'dew**, *n.* (मि'ल्-ड्यू)—growth of minute fungi on plants, or on leather, &c, exposed to damp. बुरशी, टाका. *v. t. & i.* to taint, to be tainted with mildew. बुरशी येणें, बुरसावणें.

**Mile**, *n.* (माइल्)—linear measure, measure of length or distance, 1760 yards. मैल, १७६० यार्ड, अर्धा कोस. *Geographical, nautical, mile*, पाण्यांतला मैल, हा ६०८० फुटांचा असतो. *Milestone*, road-side pillar stating milage; (fig.) stage, event, in life. मैलांचा दगड (-खांब), देवारणें; आयुष्यांतील संस्मरणीय काल, -प्रसंग,-पायरी.

**Mil'itant**, *a.* & *n.* (मि'लिटन्ट्)—fighting, combating, engaged in warfare; combative. लढवय्या, लढणारा; योद्धा (असा पुरुष इ.).

**Mil'itarism**, *n.* (मि'लिटॅरिझम्)—exaltation of or reliance on military force or method. लष्करी शिपाईगिरी, लष्करी सत्ता किंवा पद्धत ह्यांची बढेजावी, लष्करशाही. *Mil'itarist*, *n.* लष्करी शिस्तीचा,-पेशाचा,-मनुष्य.

**Mil'itary**, *a.* (मि'लिटरि)—pertaining to soldiers or army or land warfare. लष्करी. *n.* the soldiery. लष्कर, फौज.

**Mil'itate**, *v. i.* (मि'लिटेट्)—to serve as an argument or influence *against*. लढणें, झगडणें; प्रतिकूल असणें.

**Mili'tia**, *n.* (मिलि'शा)—a branch of British military service enlisted for home defence since 1908 absorbed in Special Reserve. जरूर पडल्यास उपयोगी आणण्याचें लष्कर, गुजची फौज, शिबंदी. *Militiaman*, *n.* a member of militia. शिबंदींतील सैनिक.

**Milk**, *n.* (मिल्क्)—liquid with which mammals feed their young, cow's milk as article of food. दूध, दुग्ध, गाईचें दूध (हें अन्न). *v.t.* to draw milk from; to get money out of, to exploit, (a person); to steal message from; to extract juice etc. दूध काढणें; (एकायाला) पिळून पैसे काढणें,-उकळणें; दुसऱ्याची तार चोरून वाचून बातमी काढणें, तिचा फायदा घेणें; पिळून काढणें, लुटणें. *Milk for babes*, simple form of literature, doctrine, etc. opp. to *strong meat*. सोपें, सुलभ वाङ्मय, मत इ. *M. & honey*, चैनीचीं विपुल साधनें. *M. of human kindness*, मनुष्याची नैसर्गिक माया, दयाशीलपणा. *M. white* दुधाप्रमाणें पांढरें.

**Milk'maid**, *n.* (मि'ल्क्मेड्)—a woman milking cows or working in a dairy, woman selling milk. दूधवाली, गवळण.

**Milk'man**, *n.* (मि'ल्क्-मन्)—a seller of milk. दूधवाला, गवळी.

**Milk'sop**, *n.* (मि'ल्क-सॉप्)—an unmanly fellow. दूधखुळा, मेपपात्र, (मनुष्य).

**Mil'ky**, *a.* (मि'ल्कि)—of, like, mixed with, milk; (of liquid) cloudy, not clear; effeminate, weakly amiable. दुधाचा, दुधासारखा, दूधमय; फेसाळ, अस्वच्छ; कमकुमत, ग्पाड, बेहिंमती. *M. way*, galaxy. आकाशगंगा, स्वर्गंगा.

**Mill**, *n.* (मिल्)—a building in which corn is ground; a grinding-machine; factory. धान्य दळण्यांची गिरणी; जातें, घिरट, गिरण; कारखाना. *v. t.* to grind or treat in mill. दळणें, पीठ करणें, गिरणींतून तयार करणें. *Mill board*, stout paste board. जाड कागदी पुठ्ठा. *To put, to go, through the mill*, to subject to, undergo, training or experience. अनुभव, शिक्षण,-देणें,-घेणें. *Mill stone*, जात्याचा,-घिरट्याचा,-पेड. *Mill-race*, current of water that drives the mill-wheel. गिरणीचें मुख्य यंत्र चालविणारा पाण्याचा झोत. *Mill-wright*, one who designs or erects mills. गिरण्यांची उभारणी करणारा, दुरुस्ती करणारा, गिरणीकार.

**Mill'hand**, *n.* (मि'ल्-हॅंड्)—a factory worker. गिरणी-कामगार.

**Millenar'ian**, *a.* & *n.* (मिलिने'रिअन्)—of, expecting, the millennium. *n.* believer in the millennium. हजार वर्षांचा, हजार वर्षांचा सुखाचा काल येण्याची अपेक्षा करणारा.

**Mill'enary**, *a.* (मि'लिनरि)—consisting of a thousand (esp. years). सहस्रसंख्याक, सहस्र वर्षांचा.

**Millenn'ium**, *n.* (मिले'निअम्)—a thousand-year period; coming time of happiness on earth. एक हजार वर्षांचा अवधि; पृथ्वीवर येणारा सुखाचा काल. *Millenn'ial*, *a.*

**Mill'epede**, *n.* (मि'लिपीड्)—many-legged creature; wood-louse, etc. अनेक पायांचा किडा. [L *Mille*, a thousand, *pedis*, Sk *pada*, foot]

**Mill'er**, *n.* (मि'लर्)—one whose business is to grind corn. धान्य दळणारा, चक्कीवाला. *M.'s thumb*, kinds of small fish. लहान जातीचे मासे.

**Millesm'ial**, *a.* (मिले'स्मिअल्)—thousandth. हजारावा, सहस्रांशात्मक.

**Mill'et**, *n.* (मि'लिट्)—cereal with minute seeds. बाजरी, ज्वार.

**Mill'iard**, *n.* (मि'ल्यर्ड्)—a thousand millions. एक अब्ज संख्या.

**Mill'iner**, *n.* (मि'लिनर्)—maker-up of or dealer in women's hats, ribbons, &c. स्त्रियांच्या टोप्या, पट्ट्या, वगैरे विकणारा. *Mill'inery*, *n.* स्त्रीवस्त्र-सामुग्री. *Man milliner*, (fig.) a man busied in trifling occupations. क्षुद्र, हलक्या, निरुपयोगी कामांत गुंतलेला मनुष्य.

**Mill'ion**, *n.* (मि'ल्यन्)—ten hundred thousand. दशलक्ष. *The m.*, bulk of the population. सामान्यलोक, जनसमूह.

**Millionaire'**, *n.* ( मिल्यनेंअर् )—possessor of a million of money or more; a rich person. कोट्यधीश ; श्रीमंत मनुष्य.

**Milt**, *n.* ( मिल्ट् )—spawn of male fish, spleen in mammals. मत्स्यवीर्य, प्लीहा. *v. t.* to impregnate (female roe). माशांचीं अंडीं तयार करणें.

**Mime**, *n.* ( माइम् )—dramatic scene of ancient Greek or Italian common life with mimicry; a performer in it. नक्कल, विनोद, थट्टा, यांनीं युक्त असें नाटक, त्यांतील पात्र.

**Mimē'sis**, *n.* ( माइमीं'सिस् )—close external resemblance between animal & another animal or inanimate object. बाह्यस्वरूपसाम्य, नक्कल, अनुकरण.

**Mimĕt'ic**, *a.* ( माइमे'टिक् )-of or showing mimesis; given to mimicry. बाह्य स्वरूपसाम्याचा ; नकला करणारा, थट्टा करणारा.

**Mim'ic**, *n.* ( मि'मिक् )—a person who closely imitates others, a servile imitator. नक्कल करणारा, नकल्या. *a.* feigned, esp. to amuse; sham; imitative, नकलेचा, नकली, अनुकरणशील. *v. t.* to copy the speech, or gestures of, esp. to amuse others; to closely imitate. नक्कल करणें, हुबेहूब अनुकरण करणें.

**Mim'icrў**, *n.* ( मि'मिक्रि )—mimicking; an imitative action or objects. अनुकरण, वांकुल्या ; नक्कल, नकलीवस्तु.

**Mimō'sa**, *n.* ( मिमों'झा )-kinds of plant, including sensitive plant. लाजाळू, लाजरी (वनस्पति).

**Min'arĕt**, *n.* ( मि'नरेट् )—a lofty turret of mosque with one or more balconies. मशिदीचा मनोरा, घुमट, बुरूज.

**Min'atorў**, *a.* ( मि'नटरि )—threatening. धमकीचा, भयसूचक, भयानक.

**Mince**, *v. t. & i.* ( मिन्स् )—to cut quite small; to walk with affectedly short steps. अगदीं बारीक बारीक तुकडे करणें ; सुद्दाम हळू हळू पावलें टाकून चालणें. ठुनकत चालणें. *n.* minced meat. बारीक तुकडे केलेलें मांस, सागोती. *Not to mince matters*, to express oneself politely in condemnation. (दोष किंवा अपराध कमी दाखविण्याकरितां) गुळमुळीत न बोलणें, खरें खरें स्पष्ट सांगणें.

**Mind**, *n.* ( माइन्ड् )—the seat of consciousness, thought, volition, and feeling; intellectual powers; memory; opinion. मन ; बुद्धिसामर्थ्य ; स्मरणशक्ति, आठवण ; मत. *v. t.* to bear in mind; to heed; to take charge of; to have any objection. ध्यानांत ठेवणें ; लक्ष देणें, मानणें, ऐकणें ; ताब्यांत घेणें ; हरकत असणें. *Mind'ed*, *a.* disposed, inclined. मनाचा, कलाचा, घेत असलेला. *To be of* (person's) *mind*, (दुसऱ्याशीं) एकमत असणें, मतैक्य असणें. *To my m.*, as I think. माझ्या मतें. *To be of a* or *one m.*, to agree. मत जुळणें, कबूल होणें. *To know* one's *own m.* स्वतःचें मत बनवून त्याला चिकटून राहणें *To make up* one's *m.* (to do). निश्चय करणें. *To have a good* or *great m.*, to be strongly disposed (to do). अमुक एक गोष्ट करण्याची उत्कट इच्छा असणें. *To be in two minds*, मन द्विधा होणें, निश्चय न होणें. *To give* one's *m. to*, कडे लक्ष देणें. *Mind's eye*, mental view. मनांतला विचार, मन, मत, ज्ञानचक्षू. *Never mind*, कांहीं हरकत नाहीं.-चिंता नाहीं. *Mind one's P's & Q's*, be careful as to one's words or behaviour. शब्द तोलून बोलणें, जपून वागणें. [ Gk *means*, Sk *manas*, mind ]

**Mind'ful**, *a.* ( मा'इन्ड्-फुल् )—not forgetful. regarding with care, heedful. सावध, न विसरणारा.

**Mine**, *pron. & a.* ( माइन् )—the one (s) belonging to me; *a.* belonging to me. माझें. *Me & m.*, my relations. माझे नातेवाईक.

**Mine**, *n.* ( माइन् )—excavation from which minerals are extracted; explosive charge placed ready to go off when required; abundant source (of information etc.); iron ore. खाण ; सुरुंग ; निधी, माहेरघर ; खाण *v. t.* to dig for minerals; to lay explosive charges under or in; to undermine. (खाण) खणणें, बोगदा खणणें ; सुरुंग लावणें ; गुप्त उपायांनीं नाश करणें. *M.-layer*, *M.-sweeper*, ship used for laying mines,-for clearing away enemy *mines*. सुरुंग पेरणारें जहाज, आगबोट ; शत्रूंचे पाणसुरुंग काढून टाकणारें जहाज. *Mi'ner*, a worker in mine; a soldier who lays mines. खाणींतील मजूर ; सुरुंग लावणारा.

**Min'eral**, *a.* ( मि'नरल् )—inorganic, not animal or vegetable; got from the earth by mining. धातुधर्मक; खाणींतला. *n.* a mineral substance. खनिज पदार्थ, धातु. *M. kingdom*, खनिजकोटि. *M. water*, खनिजोदक, धातुधर्मयुक्त पाणी, सोडा वाटर. *Min'eralize*, *v. t.* impregnate with mineral, खनिजरूप करणें, धातूचे गुणधर्म (वस्तूंत) उतरविणें. *Min'eralization*, *n.*

**Minerăl'ogў**, *n.* ( मिनरॅ'लाजि )—the science of minerals. खनिजशास्त्र, धातुविद्या, धातुपरिज्ञान. *-o'gical*, *a.*, *-gist*, *n.* खनिजशास्त्रवेत्ता.

**Min'gle**, *v. i. & t.* ( मिं'गल् )—to be mixed, to be united with; to mix, to blend, to confuse. मिळणें ; मिसळणें, एकत्र करणें. *Mingle with*, go about among. मिळून मिसळून जाणें. *M. their* etc. *tears*, weep together. समदुःखी होणें, एकत्र बसून रडणें.

**Min'iature**, *n.* ( मि'निअचर् )—painted portrait on small scale or of small dimensions ; small-scale representation. लहान आकाराची तसबीर; लघु प्रतिकृति. *a.* small-scale ; diminutive. लहान प्रमाणाचा ; लघु. *Min'iaturist*, *n.* ( मिं'न्यचरिस्ट् ) painter of miniatures. लहान चित्रें, रंगीत तसबीर,-काढणारा.

**Min'ify**, *v. t.* ( मि'निफाय् )—to represent as smaller or less important than it is ; lessen in size or importance. कमीपणा आणणें,-करणें; आकार-महत्त्व,-कमी करणें.

**Min'im**, *n.* ( मि'निम् )—a musical note ; 1/60 of a fluid drachm ; a creature of the smallest size or importance. गाण्यांतील सूर; १/६० ड्राम. थेंब, बिंदु ; अतिशय लहान प्राणी, कृमि, वस्तु, जीवजंतु.

**Min'imalist**, *n.* ( मि'निमॅलिस्ट् )—a person ready to accept a minimum provisionally. कमींत कमी तात्पुरतें स्वीकारण्यास तयार असा मनुष्य.

**Min'imize**, *v. t.* ( मि'निमाइझ् )—to reduce to or estimate at the minimum, to represent as of little moment. अतिशय लहान करणें, किमान मर्यादेत आणणें, कमी करणें.

**Min'imum**, *n.* ( मि'निमम् )—(*pl.-ima*), least possible amount, the smallest amount or degree. कमींत कमी अंश, अत्यल्प संख्या, लघुतम, न्यूनतम. *M. wage*, कायद्यानें किंवा करारानें ठरविलेलें कमींत कमी वेतन.

**Min'ion**, *n.* ( मि'न्यन् )—a spoilt darling, a favourite ; mere dependant, slave ; (Print.) size of type. लाडावलेलें मूल, बगलबच्चा, मर्जींतील इसम; गुलाम, परावलंबी; एक बारीक टाइपाचें नांव. *Minions of the law*, gaolers, police etc. तुरुंगाधिकारी, शिपाई वगैरे.

**Min'ister**, *n.* ( मि'निस्टर् )—an executive agent ; a person in charge of State department ; an ambassador or State envoy ; a clergyman. कारभारी ; अमात्य, प्रधान, दिवाण ; राजाचा परराष्ट्राकडे पाठविलेला वकील ; उपाध्याय, पाद्री. *v. i. & t.* to give, to afford ; to be serviceable or contributory ; to officiate as a minister of religion. पुरविणें, देणें ; गरज भागविणें ; चाकरी,-सेवाशुश्रूषा,-करणें ; उपाध्येपणा करणें. *Prime m.*, मुख्य दिवाण, मुख्य प्रधान, पंत-अमात्य, पंत-प्रधान.

**Ministe'rial**, *a.* ( मिनिस्टी'रिअल् )—of a minister of religion or his office ; of or on the side of the Government ; of minister of State. उपाध्याचा, पाद्र्याचा, उपाध्येपदाचा ; सरकारपक्षाचा, सरकारपक्षीय ; प्रधानाचा, मंत्र्याचा.-*ist*, *n.* government supporter. सरकारपक्षाला पाठिंबा देणारा.

**Min'istrant**, *a.* ( मि'निस्ट्रन्ट् )—ministering. सेवक, नोकरी करणारा ; शुश्रूषा करणारा. *n.* one who ministers. सेवक, शुश्रूषक मनुष्य.

**Ministra'tion**, *n.* ( मिनिस्ट्रे'शन् )—rendering of help ; priestly service. मदत करणें ; चाकरी,-सेवा करणें ; उपाध्येपणा.

**Min'istry**, *n.* ( मि'निस्ट्रि )—priestly office ; ministers of a church, the clergy ; the office of a State minister ; the ministers forming a Government. उपाध्येपण ; चर्चचे पाद्री; प्रधानकी, दिवाणगिरी ; प्रधानमंडळ.

**Minn'ow**, *n.* ( मि'नो )—a small fresh-water fish. गोड्या पाण्यांतला लहान मासा. *Triton among the minnows*, one who seems great from insignificance of others. 'वासरांत लंगडी गाय', इतर क्षुद्र प्राण्यांच्या मानानें मोठा दिसणारा तो.

**Mino'an**, *a.* ( माय्नो'अन्, मिनो'अन् )—of the recently discovered prehistoric culture ( 3000-1500 B. C.) of Crete, named from King Minos. क्रीटच्या इतिहासपूर्वकालीन संस्कृतिसंबंधीं.

**Mi'nor**, *a.* ( मा'इ-नॉर )—lesser of two units or sets ; of the lesser kind. दोहोंपैकीं लहान; हलका, गौण. *n.* a person under age ( 21). २१ वर्षांच्या आंतील मनुष्य. (Logic) *M. term*, पक्ष. *M. premiss*, पक्षप्रमाण, केवलवाक्य. *Conversation in a minor key*, doleful conversation. कंटाळवाणें रडकें संभाषण.

**Mino'rity**, *n.* ( माइ-नॉ'रिटि )—being a minor ; the smaller number. अज्ञानदशा ; लहानसंख्या, अल्पपक्ष, अल्पसंख्याक (लोक).

**Min'otaur**, *n.* ( मि'नाटॉर )—*the M.*, fabulous monster, half bull half man, fed with human flesh. कमरेखालीं मनुष्यासारखा व कमरेच्या वर बैलासारखा कल्पित राक्षस, नृवृषभ. [ *fr. Minos*, king of crete, & *tauros*, bull ]

**Min'ster**, *n.* ( मि'न्स्टर् )—a large church. मोठें ख्रिस्ती देऊळ.

**Min'strel**, *n.* ( मि'न्स्ट्रेल् )—a medieval singer or musician ; a bard, a poet. गायक ; भाट, कवि, शाहीर.

**Min'strelsy**, *n.* ( मि'न्स्ट्रेल्सि )—minstrel's art ; instrumental music, poetry. सवाद्य गायन, पोवाडे ; वाद्यवादन, काव्य.

**Mint**, *n.* ( मिन्ट् )—a place where money is coined ; vast sum ( of money ). टांकसाळ; भरपूर पुरवठा. *v. t.* to coin money ; to invent, to forge, to fabricate. नाणें पाडणें ; नवीन शोधून काढणें, बनविणें. *Min'tage*, *n.* what is minted ; duty paid for minting. ( टांकसाळेंत ) छापलेलें नाणें ; नाणें-छापणावळ, टांकसाळीची फी. *Mint master*, टांकसाळीचा वरिष्ठ अधिकारी.

**Mint**, *n.* (मिन्ट्)—an aromatic herb. पुदिना वनस्पति.

**Minuet'**, *n.* (मिन्यूए'ट्)—a slow stately dance or music for it. एक प्रकारचा, हळू पावलें टाकून नाचण्याचा, नाच ; त्या नाचाची साथ.

**Mi'nus**, *prep.* (मा'इ-नस्)—less, less by so much with the deduction of (symbol,– ). कमी, उणा, उणें चिन्ह (–); (collq.) *a.* deprived of (as *He came back minus an arm.*), negative. गमावून, घालवून ; उणी (रक्कम).

**Min'ute**, *n.* (मि'निट्)—the sixtieth part of an hour ; the sixtieth of a degree (in angles); a short time ; an official paper ; (*pl.*) summary of proceedings, short notes. तासाचा साठावा भाग, मिनिट ; अंशाचा साठावा भाग, कला; पळ, क्षण; सरकारी कागद ; (अने॰) टिपणें. *v. t.* to draft, to note down. टिपणें करणें, टांचण करणें, मसुदा तयार करणें ; मिनिटें मोजणें. *M. book*, टांचणवही, टांचण पुस्तक. *M. gun*, दर मिनिटानें होणारी तोफ. *M. hand*, घड्याळांतील मिनिट कांटा. *M. mark*, (') अशी मिनिटाची खूण. *To minute down*, to make a note of. टिपून घेणें; टांचून घेणें *Min'utely, adv.* (मि'निट्लि) दर मिनिटास, पळापळानें, क्षणोक्षणीं.

**Minute'**, *a.* (माइ-न्यू'ट्, मिन्यू'ट्)—very small ; precise, going into details. अत्यल्प, सूक्ष्म ; बारीकसारीक पाहणारा, तपशीलवार, अगदीं खरा. *Minute'ly, adv.* बारकाईनें, सूक्ष्म दृष्टीनें.

**Minx**, *n.* (मिंक्स्)—a sly girl, hussy. नाचरी पोर.

**Mi'ocene**, *a.* (मा'योसीन्)—of the middle division of tertiary strata. गाळानें बनलेल्या खडकाच्या वर्गातील या नांवाच्या खडकांच्या पोटवर्गाविषयीं.

**Mi'racle**, *n.* (मि'रॅकल्)—an event due to supernatural agency ; a remarkable event, a marvel, a prodigy. लोकिक कर्म, अद्भुत कर्म ; करामत, चमत्कार. *To a m.*, surprisingly well. अद्भुत, सुंदर, आश्चर्यकारक, चांगलें.

**Mirac'ulous**, *a.* (मिरॅ'क्युलस्)—supernatural, extraordinary ; wonderful. अलौकिक, अद्भुत ; आश्चर्यकारक.

**Mirage'**, *n.* (मिरा'झ्)—an illusion produced by atmospheric conditions. दृग्भ्रम, मृगजळ, मृगतृष्णा.

**Mire**, *n.* (मायर्)—wet muddy soil, swampy ground ; mud. दलदलीची जागा ; चिखल. *v. t.* to entangle in mud ; to soil ; (fig.) to involve in difficulties. चिखलांत रुतवणें ; चिखलानें खराब करणें ; संकटांत सांपडलें जाणें.

**Mi'rror**, *n.* (मि'रर्)–an image-reflecting surface ; a looking-glass ; (fig.) what gives faithful reflection or true description of a thing. प्रतिबिंबदर्शक पृष्ठभाग ; आरसा, आदर्श, नमुना ; वस्तूचें अचूक प्रतिबिंब किंवा वर्णन. *v. t.* to reflect image of. प्रतिबिंब पाडणें, दाखविणें.

**Mirth**, *n.* (मर्थ्)—merriment, glee. आनंद, मौज. *Mir'thful*, आनंदी, हास्यमुख, रंगेल. *Mir'thless*, *a.* उदासीन, खिन्न. *Mir'thfully, adv.*; *Mir'thfulness, n.*

**Mir'y**, *a.* (मा'इरि)—muddy. चिखलाचा, चिखलट.

**Misadven'ture**, *n.* (मिसॅड्व्हें'चर्)—an undesigned evil result ; an unlucky accident. दुर्दैवाची गोष्ट ; अपघात.

**Misalli'ance**, *n.* (मिस्-अला'यन्स्)—unsuitable marriage, improper connection by marriage. कुसंबंध, अयोग्य विवाह.

**Mis'anthorope**, *n.* (मि'सॅन्थ्रोप्)—hater of mankind ; one who avoids human society. मनुष्यजातीचा द्वेष करणारा, माणुसघाण्या, माणसांचा संसर्ग नको असणारा. *Misanthrop'ic, a.*, *Misan'thropy, n.* misanthroper's temper. समाजद्वेष, माणसांचा कंटाळा, एकलकोंडा स्वभाव. [Gk *miseo*, hate & *anthropos*, man]

**Misapply'**, *v t.* (मिस्-अप्ला'य्)—to apply wrongly, to apply to a wrong purpose. दुरुपयोग करणें, अपव्यय करणें. *Misapplica'tion, n.* wrong application, wrong use (esp. of funds). दुर्योजना, दुरुपयोग.

**Misapprehend'**, *v. t.* (मिस्-ॲप्रिहें'न्ड्)—to misunderstand, to take in a wrong sense. गैरसमजूत करणें, गैरसमज करून घेणें,-होणें. *Misapprehen'sion, n.* चुकीचा समज, कुकल्पना, गैरसमजूत. *Misapprehen'sive, a.*

**Misappro'priate**, *v. t.* (मिस्-अप्रो'प्रिएट्)—to use (other's money) as one's own. दुसऱ्याचा पैसा स्वतःचा म्हणून वापरणें. *Misappro'priation, n.* दुरुपयोग, उधळपट्टी, परस्वापहार.

**Misbecome'**, *v. t.* (मिस्बिक'म्)—to suit ill, to be unbecoming to. न शोभणें, अयोग्य असणें

**Misbegot'ten**, *a.* (मिस्बिगॉ'टन्)—illegitimate, bastard. व्यभिचाराचा, कुजात.

**Misbehave'**, *v. i. & refl.* (मिस्-बिहे'व्ह्)—to behave ill or improperly. गैरशिस्त रीतीनें वागणें *-viour, n.*

**Misbelief'**, *n.* (मिस्-बिली'फ्)—a wrong or erroneous belief ; a false opinion. गैरविश्वास ; खोटें मत *-believer, n.*

**Miscal'culate**, *v t. & i.* (मिस्कॅ'ल्क्युलेट्)—to calculate wrongly. चुकीचा अंदाज करणें, हिशेबांत चूक करणें. *Miscal'culation, n.*

**Miscall'**, *v. t.* (मिस्कॉ'ल्)—to call by wrong name ; to abuse भलत्या-चुकीच्या-नांवानें हांक मारणें, चुकीनें म्हणणें ; अपशब्द बोलणें, शिवीगाळ करणें.

**Misca'rriage**, *n.* (मिस्-कॅ'रिज)—failure (of letter) to reach destination; failure (of scheme); miscarrying; a woman's untimely delivery. गळफटणें, गहाळ होणें ; अपयश, असिद्धि ; फसगत ; गर्भपात. *M. of Justice.* न्यायाचा दुरुपयोग.

**Misca'rry**, *v. i.* (मिस्-कॅ'रि)—to fail of success; (of letter, &c.) not to reach the destination; (of women) to have miscarriage. अपयश मिळणें ; न पोहोंचणें ; नासावणें, गर्भपात होणें.

**Miscegena'tion**, *n.* (मिस्सिजिने'शन्)—interbreeding between races, esp. of whites and negroes. निरनिराळ्या जातींचा संकर होऊन प्रजोत्पत्ति होणें.

**Miscella'nea**, *n. pl.* (मिसले'निआ)—odds and ends; stray items. नानाविध गोष्टींची खिचडी ; विविधवस्तु, किरकोळ जिन्नस, वस्तु.

**Miscella'neous**, *a.* (मिसले'निअस्)—consisting of various kinds, diversified. नानाविध, संकीर्ण, मिश्र, विविध.

**Mis'cellany**, *n.* (मि'सलनि)—literary or other medley, mixture of varions kinds. पंचमेळ, विविधलेखसंग्रह, विविधविषयसंग्रह.

**Mischance'**, *n.* (मिस्-चा'न्स्)—an unlucky event, misfortune, mishap, disaster. दुर्दैवाची गोष्ट, अपघात.

**Mis'chief**, *n.* (मि'स्चिफ्)—harm, injury; discord; childish scrapes. अपकार, अपाय, अपायाचें कारण ; अनर्थ, हानि ; बेबनाव ; चावटपणा, चेष्टा. *To do one a m.*, (vulg.) to wound or kill one. एकाद्याला जखमी किंवा ठार करणें. *To make m.*, to create discord. बेबनाव उत्पन्न करणें. *M.-maker*, खोडकर, टवाळखोर, आगलाव्या. *M.-making*, कळ लावणें, कळलावणी, लावालाव. *The mischief*, devil. दुष्ट, खोडकर मनुष्य.

**Mis'chievous**, *a.* (मि'स्चिव्हस्)—tending to harm; full of mischief. अपायकारक ; चावट, चेष्टेखोर, खोडकर, उपद्रवी.*-ly, adv.;-ness, n.*

**Mi'scible**, *a* (मि'सिब्ल्)—that can be mixed (*with*). मिसळण्याजोगा, मिश्रणार्ह.*-bil'ity, n.* मिश्रणार्हता

**Misconceive'**, *v. i. & t.* (मिस्-कन्सी'व्ह्)—to conceive erroneously, to have a wrong idea of; to misunderstand. उलटी समजूत होणें ; भलता ग्रह करणें.

**Misconcep'tion**, *n.* (मिस्-कन्से'प्शन्)—a wrong notion; misunderstanding. चुकीची कल्पना ; गैरसमजूत.

**Miscon'duct**, *n.* (मिस्कॉ'न्डक्ट्)—improper conduct (esp. adultery); bad management. गैरशिस्त वर्तन, अनाचार, व्यभिचार ; गैरवहिवाट, दुर्व्यवस्था. *Misconduct'*, *v. t.* (मिस्कन्ड'क्ट्), गैरवर्तन करणें.

**Miscon'strue**, *v. t.* (मिस्-कॉ'न्स्ट्रू)—to put a wrong construction on (word, action), to mistake meaning of (person). चुकीचा अर्थ करणें, भलताच ग्रह करणें. *Misconstruc'tion, n.* उलटा अर्थ, विपरीत समजूत.

**Miscount'**, *n., & v. t. & i.* (मिस्का'उन्ट्)—(to make) wrong count, esp. of votes; count (things) wrongly. मोजण्यांत चूक (करणें), चुकीनें मोजणें.

**Mis'creant**, *n.* (मि'स्क्रिअन्ट्)—a wicked person; (archaic) heretical; depraved. दुष्ट मनुष्य ; नास्तिक, दुरात्मा ; दुर्जन, शठ.

**Misdate'**, *v. t.* (मिस्डे'ट्)—to date wrongly. चुकीची तारीख घालणें.

**Misdeal'**, *v. t. & n.* (मिस्डी'ल्)—to make mistake in dealing (cards). पत्ते वाटतांना चूक करणें ; चुकीचा व्यवहार करणें.

**Misdeed'**, *n.* (मिस्-डी'ड्)—a sinful act, a crime. पापाचरण ; दुष्कर्म, गैरवर्तन.

**Misdemean'ant**, *n.* (मिस्डिमी'नन्ट्)—a person convicted of misdemeanour. दुर्वर्तनाच्या गुन्ह्याबद्दल शिक्षा झालेला.

**Misdemean'our**, *n.* (मिस्डिमी'नर्)—an indictable but not felonious offence. दुराचरण, अपराध.

**Misdirect'**, *v. t.* (मिस्-डिरे'क्ट्)—to direct (a person, a letter, &c.) wrongly. भलत्याच दिशेला लावणें, भलताच पत्ता लिहिणें. *Misdirect'-ion, n.*

**Misdo'ing**, *n.* (मिस्डू'इंग्)—misdeed. कुकर्म, दुष्कर्म, दुराचरण, गुन्हा, अपराध, दोष.

**Misdoubt'**, *v. t.* (मिस्डा'उट्)—to have doubts or suspicions; to be apprehensive; to suspect (that). शंका,-संशय-वाटणें ; साशंक असणें.

**Mise en scene**, *n* (मेझआँसें)—staging of a play, surroundings of an event. नाटक रंगभूमीवर आणणें,-करणें ; एकाद्या गोष्टीची साधनसामुग्री, सभोंवारची परिस्थिति. [F]

**Mi'ser**, *n.* (मा'इ-झर्)—an avaricious person; a hoarder of money. लोभी मनुष्य ; कवडीचुंबक, चिक्कू.*-ly, a.*

**Mi'ser**, *n.* (मा'इझर्)—a boring instrument for well-sinking. विहीर खोदण्यासाठीं जमिनीला भोंक पाडण्याचें यंत्र,-सामता.

**Mis'erable**, *a.* (मि'झरेब्ल्)—pitiable; very unhappy; despicable, contemptible; very poor or mean. दीन ; अत्यंत दुःखी ; तिरस्करणीय ; हलकट, पीडादायक. *Mis'erably, adv.*

**Mise'ricord**, *n.* (मिझे'रिकॉर्ड्)—a hinged seat in choir stall. चर्चमधील वाद्यवादकांची उपडझांप करतां येणारी बैठक.

Mis'ery̆, *n.* (मि'झरि)—acute unhappiness; distressing poverty. अत्यंत दुःख, हाल; विपत्ति, अत्यंत दारिद्य.

Misfeas'ance, *n.* (मिस्फी'झन्स्)—wrongful exercise of law-ful authority. कायदेशीर हक्काचा दुरुपयोग.

Misfire', *v. i. & n.* (मिस्फा'यर्)—(of gun, motor engine etc.) fail (ure) to act. (बंदूक, मोटर इंजिन इ०) न चालणें, बंद पडणें.

Mis'fit, *n.* (मि'स्फिट्)—a garment etc. that does not fit. अंगाला बरोबर न बसणारा कपडा.

Misfŏr'tune, *n.* (मिस्-फॉ'र्च्यन्,-दयुन्)—ill fortune, calamity, mishap; bad luck. संकट, अरिष्ट; दुर्दैव.

Misgĭve', *v. t.* (मिस्-गि'व्ह्)—(-*gave, pa. t.;-given, pa.p.*) to fill with doubt; to suggest misgiving to. घाबरणें; भीति-शंका-अविश्वास उत्पन्न करणें.

Misgiv'ing, *n.* (मिस्-गि'व्हिंग्)—apprehension; uneasy doubt; distrust. भीति; संशय, शंका; अविश्वास.

Misgo'vern, *v. t.* (मिस्-ग'व्हर्न्)—to govern badly, to administer unfaithfully. वाईट रीतीनें वागवणें, अव्यवस्थितपणें अंमल चालविणें,-राज्य करणें.-*ment, n.* अव्यवस्था, अंदाधुंदीचा राज्यकारभार.

Misguide', *v. t.* (मिस्-गा'इड्)—to mislead. दिशाभूल करणें. *Misguid'edly, adv.*

Mĭshan'dle, *v. t.* (मिस्हॅं'न्डल्)—to handle (person, thing) roughly or rudely, to ill-treat. वाईट रीतीनें,-उद्धटपणें-वागविणें.

Mishăp', *n.* (मिस्-हॅं'प्)—a minor calamity. अनिष्टापत्ति, अवचित प्रसंग, दुर्दैवाची गोष्ट.

Misinfŏrm', *v. t.* (मिसइन्फॉ'र्म)—to give wrong information to, to mislead. खोटी,-चुकीची माहिती देणें, गैरसमजूत करणें. *Misinforma'tion, n.*

Misinterp'ret, *v. t.* (मिसिन्ट'र्प्रिट्)—to give wrong interpretation to, to make a wrong inference from. खोटा,-चुकीचा-अर्थ करणें, विपर्यास करणें, चुकीचें अनुमान काढणें. *Misinterpreta'tion, n.*

Misjŭdge', *v. t.* (मिस्ज'ज्)—to judge wrongly; to have a wrong opinion of. विपरीत ग्रह करणें; चुकीचें मत असणें.

Mislay', *v. t.* (मिस्ले')—to put (thing) by accident where it cannot readily be found. अव्यवस्थितपणें टाकणें, गहाळ करणें, हरवणें.

Mislead', *v. t.* (मिस्-ली'ड्)—to lead astray; to give a wrong impression to. चुकीच्या मार्गानें नेणें; गैरसमज करणें.

Mismăn'age, *v. t.* (मिस्मॅ'निज्)—to manage badly or wrongly. बिघाड किंवा अव्यवस्था करणें. -*ment, n.*

Misnāme', *v. t.* (मिस्ने'म्)—to call by wrong name. चुकीचें नांव देणें, चुकीच्या नांवानें हांक मारणें.

Misnō'mer, *n.* (मिस्-नो'मर्)—a name applied wrongly; wrong use of a term. चुकीचें नांव; नांवाचा दुरुपयोग.

Misŏg'amy̆, *n.* (मिसॉ'गमि)—hatred of marriage. लग्नाचा तिटकारा, विवाहद्वेष. *Misog'amist, n.* विवाहनिंदक,-द्वेष्टा.

Misŏg'y̆ny̆, *n.* (मिसॉ'गिनि)—hatred of women. स्त्रीद्वेष, बायकांचा कंटाळा. *Misog'ynist, n.* स्त्रीद्वेष्टा.

Misplāce', *v. t.* (मिस्प्ले'स्)—to put in wrong place; to bestow (love, etc.) on ill-chosen object. भलत्या ठिकाणीं वस्तु ठेवणें; अनाठायीं, अपात्रीं,-(प्रेम) ठेवणें, करणें. *Misplace'ment, n.*

Misprĭnt', *n. & v. t.* (मिस्प्रि'न्ट्)—to make an error in printing. छापण्यांतील चूक, अशुद्ध करणें.

Misprĭ'sion, *n.* (मिस्प्रि'झन्)—wrong action or omission. चुकी, खोटा ग्रह. *M. of treason*, अपराधाची छपवणी, अपराधाकडे कानाडोळा.

Misprize', *v. t.* (मिस्प्रा'इझ्)—to scorn, to undervalue. तुच्छ लेखणें, किंमत कमी करणें, कमी मानणें.

Mispronounce', *v. t.* (मिस्प्रनाउ'न्स्)—to pronounce wrongly. चुकीचा उच्चार करणें. *Mispronuncia'tion, n.* अशुद्ध उच्चार, उच्चाराची चूक.

Misquōte', *v. t.* (मिस्-क्वोट्)—to quote or cite wrongly. चुकीचा उतारा देणें, चुकीचा आधार देणें. *Misquota'tion, n.*

Misrĕprĕsĕnt', *v. t.* (मिस्-रेप्रिझे'न्ट्)—to represent wrongly; to falsify. विपर्यास करून हकीगत सांगणें; बनावट करणें. *Misrepresenta'tion, n.*

Misrule', *n.* (मिस्-रू'ल्)—bad government. अंदाधुंदी, बजबज. *v. t.* to rule badly. अंदाधुंदीचा राज्यकारभार करणें.

Miss, *v. t. & i.* (मिस्)—to fail to hit, etc.; to pass over; to regret the absence of; to have a failure. नेम वगैरे चुकणें, वरून जाणें; वियोगामुळें चुकल्यासारखें होणें; हरणें, फसणें. *n.* fact of missing. चूक, फसगत. *To miss out*, to leave out (words etc. in reading, writing, etc.). (शब्द) सोडणें, गाळणें, खाणें. *To miss fire*, (बंदुकीचा) बार न होणें; बेत फसणें, उद्देश साध्य न होणें.

Miss, *n.* (मिस्)—unmarried woman or girl. अविवाहीत स्त्री, कुमारी. *Miss'ish, a.* like a school girl. शाळकरी मुलीसारखी.

Miss'al, *n.* (मि'सल्)—Roman Catholic mass-book, R. C. book of prayers. रोमन कॅथॉलिक पंथाचें प्रार्थना-पुस्तक.

**Mĭss'el,** *n.* (मि'सल्)—*M. thrush*, a large kind of thrush. मोठ्या जातीची सारिका.

**Mĭs-shā'pen,** *a* (मिस्-शे'पन्)—deformed. बेढब, कुरूप.

**Miss'ile,** *n* (मि साइल्)—a thing or weapon that can be thrown to do damage. फेंकावयाचें शस्त्र, अस्त्र.

**Miss'ing,** *a.* (मि'सिंग्)—not to be found, wanting, lost. हरवलेला, न सांपडलेला. *The missing*, soldiers neither present after a battle, etc., nor known to have been killed or wounded. थांगपत्ता लागत नसलेले शिपाई. *M. link*, a thing lacking to complete the series; (zool.) hypothetical intermediate type esp. between man & anthropoid apes. चुकलेला दुवा, मनुष्य आणि त्याचे पूर्वज माकड यांच्या मधील जोडणारा सांधा,-स्थिति.

**Mĭ'ssion,** *n.* (मि'शन्)—persons sent out as envoys or evangelists; the task or operations of envoys; person's vocation or divinely appointed work in life. धर्मप्रचारकसंघ, प्रसारकमंडळ; दौत्य, दूतकर्म, धर्मप्रसाराचें कार्य; इतिकर्तव्यता, जीवनहेतु, ध्येय.

**Mĭ'ssionarў,** *n.* (मि'शनरि)—a person who goes on work of religious mission. धर्मप्रसारार्थ पाठविलेला मनुष्य, मिशनरी, प्रेषित.

**Miss'is,** *n.* (मि'सिस्)—(vulg.) mistress; (joc.) wife. मालकीण; स्त्री, पत्नी.

**Miss'ive,** *n.* (मि'सिव्ह्)—a letter, esp. an official one. (सरकारी कामाचें) पत्र. *Letter(s) m.*, a letter from sovereign राजाचें आज्ञापत्र.

**Mĭs-spĕll',** *v. t.* (मिस्-स्पे'ल्)—to spell wrongly. वर्णविपर्यास करणें, चुकीची वर्णरचना करणें.

**Mĭs-spĕnd',** *v. t.* (मिस्-स्पे'न्ड्)—to spend amiss or wastefully. अनाठायीं खर्च करणें, उधळपट्टी करणें.

**Mĭs-stāte',** *v. t.* (मिस्-स्टे'ट्)—to state wrongly, to make erroneous representation of. चुकीचें विधान करणें. *Mis-state'ment, n* असत्य विधान, विपर्यास.

**Mĭst,** *n.* (मिस्ट्)—water-vapour; bleared effect given by tears in the eyes. धुकें; झिम् झिम् पाऊस; अंधेरी, धुरकटपणा, धुंदी. *v. i. & t.* to cover, be covered, as with mist. धुक्यानें आच्छादणें, झांकलें जाणें, धुकें पडणें. *Scotch m.* thick mist frequent on Scottish hills. स्काटलंडमधील टेंकड्यांवरील दाट धुकें. *Mist'ful, a., Mist'like, a. & adv.*

**Mĭstāke',** *v. t. & i.* (मिस्टे'क्)—(*-took,-taken*), to come to wrong conclusion about, to misinterpret; to take a person or a thing erroneously for another. भलता ग्रह करणें; चुकणें, भूलणें: चुकीनें एकाला दुसराच समजणें. *Mistak'en, pa. p.* due to error, ill-judged. चुकीचा, गैरसमजुतीचा, चुकलेला. *There is no mistaking*, no one can help recognizing (person, fact) ओळख अवश्य पटणारच, चूक होणें शक्यच नाहीं. *and*, or *make, no mistake*, undoubtedly. निःसंशय, खात्रीनें. *Mistak'enly, adv.*; *Mistak'enness, n.* an error, a blunder; a mistaken opinion or act. चूक; गैरसमजूत, चुकीचा ग्रह.

**Mĭs'ter,** *n.* (मि'स्टर्)—(*Mr.*) master, sir. संभावनार्थ पुरुषाच्या नांवामागें लावण्याचा शब्द, पदवी. *v. t.* to address as Mr. 'मिस्टर्' म्हणून संबोधणें. *Mr Right*, destined husband. भावी पति.

**Mĭstīme',** *v. t.* (मिस्टा'इम्)—to say, do (thing) out of season (esp. in pa. p.). अवेळीं,-अकालीं म्हणणें,-बोलणें,-करणें,-योजणें.

**Mĭs'tletōe,** *n.* (मि'स्लटो)—parasitic white berried plant. ओक वगैरे झाडांच्या फांद्यांवर वाढणारी पांढऱ्या फळांची लता,-बांडगूळ,-बांधें.

**Mĭstranslāte',** *v. t.* (मिस्ट्रॅन्स्ले'ट्)—to translate incorrectly. चुकीचें भाषांतर करणें. *Mistransla'tion, n.* खोटें,-चुकीचें-भाषांतर.

**Mĭs'trĕss,** *n.* (मि'स्ट्रिस्)—a woman in relation to servants; a woman having control; a female teacher; a man's paramour; a female sweetheart. मालकीण; धनीण, गृहस्वामिनी; शिक्षकीण, अध्यापिका; दासी, रखेली; प्रिया, दयिता.

**Mĭs'trŭst,** *v. t.* (मि'स्ट्रस्ट्)—to feel no confidence in. अविश्वास वाटणें. *n.* lack of confidence; uneasy doubts, suspicion. अविश्वास; संशय. *Mistrust'ful, a.*

**Mĭs'ty,** *a.* (मि'स्टि)—of, in, or like mist; of dim outline; obscure. धुक्याचा, धुक्यांत, धुक्यासारखा, तुषारयुक्त; अंधुक, अस्पष्ट, पुसट.

**Mĭsŭnderstand',** *v. t. & i.* (मिस्-अन्डर्-स्टॅ'न्ड्)—(-stood), to take in wrong sense; to come to a false conclusion about. भलता अर्थ समजणें; गैरसमजूत करणें, उलटी समजूत होणें.-*ing, n.* विपरीत ग्रह, मतभेद.

**Mĭsūse',** *v. t.* (मिस्-यू'झ्)—to apply to a wrong use; to ill-treat. दुरुपयोग करणें; वाईट रीतीनें वागविणें. *n.* (मिस्यू'स्), ill-treatment; wrong use. वाईट वागविणें, दुरुपयोग, उधळपट्टी.

**Mīte,** *n.* (माइट्)—anything very small; a small child or person; a small insect found in cheese. अत्यंत लहान वस्तु; लहान मूल, लहान मनुष्य; कीड. *Mi'ty, a.* (of cheese) full of mites. किडी पडलेला खवा. *To offer one's mite (of comfort)*, फूल नाहीं फुलाची पाकळी म्हणून देणें. *Not a m.*, not at all. मुळींच नाहीं.

**Mit'ĭgāte,** *v. t.* (मि'टिगेट्)—to appease, to alleviate; to reduce the severity of. सान्त्वन करणें; नरम करणें. *Mitigā'tion, n.* शमवणूक, उतार, हलकें करणें. *Mit'igatory, a., Mit'igator, n.*

**Mī'tre,** *n.* (मा'इटर्)-a tall cap worn by bishops; episcopal rank; a joint between boards, etc. meeting at right angles. बिशपचा मुकुट, उंच टोपी; बिशपचा मान; दोन लांकडांचा ९०° चा काटकोनाचा सांधा. *v. t.* to put or bestow mitre on; to join with or shape for a mitre joint. बिशपचा मुकुट घालणें; काटकोनानें सांधणें.

**Mitt, Mitten,** *nn.* (मिट्, मिटन्)—a glove leaving fingers and thumb-tip bare; (*pl.* sl.) boxing gloves; (sl. *mitt*) hand, fist. बोटें व आंगठ्याचें टोंक उघडे ठेवणारा हातमोजा; (अने.) मुष्टियुद्धाकरितां हातमोजे; हात, मूठ.

**Mĭx,** *v. t. & i.* (मिक्स्)—to unite or blend into one mass; to become united, to mingle. मिसळणें, एकत्र करणें; एकत्र होणें. *Mixed,* (मिक्स्ट्) *a.* of diverse qualities or elements; of both sexes; confused. मिश्रित, भेसळ केलेला, संकीर्ण; मुलांमुलींचा, स्त्रीपुरुषांचा; सरमिसळ. *To mix up,* to mix thoroughly; to confuse in thought. पुरतें मिसळून जाणें, -टाकणें; विचारांत गोंधळ होणें. *Be mixed up,* be involved. गुंतले जाणें, गोंधळांत सांपडणें.

**Mĭx'ture,** *n.* (मि'क्श्चर्)—mixing; compound. esp. a medicinal draught. मिश्रण, भेळ; औषधाचें मिश्रण.

**Mĭzz'en măst,** *n.* (मि'झन्-मास्ट्)—aftermost mast of three-masted ship. गलबताच्या मागल्या बाजूची डोलकाठी. Also, *Miz'en mast.*

**Mnēmŏn'ic,** *a.* (निमॉ'निक्)—of or designed to aid the memory. स्मृतिसहायक, स्मृतिप्रवर्तक.-*s, n. (pl.)* mnemonic art or system. स्मृति बळकट करण्याची कला किंवा शास्त्र.

**Moan,** *n.* (मोन्)—a low inarticulate sound expressing pain or grief. कण्हणें, कुंथणें. *v. i. & t.* to utter moan; to lament, to deplore. शोक करणें, हुंदके देणें, विलाप करणें.

**Moat,** *n. & v. t.* (मोट्)—a defensive ditch (round a castle, town, or other fortified place). खंदक, चर, (खणणें). *Moat'ed, a.*

**Mŏb,** *n.* (मॉब्)—a riotous crowd; a promiscuous gathering. आडदांड लोक, गर्दी, लोकांचा घोळका,-अव्यवस्थित समुदाय, लोकांचा जमाव. *v. t. & i.* to crowd upon and hustle or ill-treat, to attack, molest. गर्दी करून दंगा करणें, उपद्रव होणें,-करणें. *M. law,* law imposed or enforced by *m.* जबरदस्तीचा न्याय, लोकांचा दंडेलीचा कायदा. *Swell m.,* a class of stylishly dressed pickpockets. संभावित खिसेकातरू, ठग, भामटे. *Mob'bish, a.* उच्छृंखळ, गैरकायदा. *Mobo'cracy, n.* बेशिस्त लोकांचा स्वैर अंमल, अडाणी लोकांचा जुलमी अंमल.

**Mŏb'-căp,** *n.* (मॉ'ब्कॅप्)—woman's indoor cap. घरांत वापरण्याची स्त्रियांची टोपी.

**Mō'bĭle,** *a.* (मो'बाइल्)-shifting position readily; not fixed, changeable, fickle. सहज हालणारा; सहज हालचाल करतां येणारें (सैन्य); अस्थिर. *Mobil'ity, n.* गमनशीलता, प्रसरणशीलता, रजोगुण.

**Mō'bĭlize,** *v. t. & i.* (मो'बिलाइझ्)—to prepare (forces) for active service; to render movable. लढाईकरितां (सैन्य) तयार करून ठेवणें; हलवितां येण्यासारखें करणें. *Mobiliz'ation, n.* लढाईसाठीं एकत्र जमविणें, सैन्याची जमवाजमव.

**Mŏcc'asĭn,** *n.* (मॉ'कसिन्)—Amer.-Ind soft shoe of deerskin etc. हरणाच्या चामड्याचे मऊ जोडे, -पादत्राण.

**Mŏck,** *v. t. & i.* (मॉक्)—to scoff at, to ridicule, to mimic; to tantalize with illusion. उपहास करणें, थट्टा-विडंबन-करणें, कुचेष्टा करणें. वेडावणें; आशाभंग करणें, तोंडाला पानें पुसणें, फसवणें. *a.* sham, mimic, counterfeit. खोटा, कृत्रिम, छुटपुटचा, कपटाचा, बनावट. *M. heroic, a. & n.* वीररसात्मक भावासरणीचें विडंबन करणें.

**Mŏck'ery,** *n.* (मॉ'करि)—derision, laughing stock; futile action. थट्टा, मस्करी, टवाळकी. उपहासविषय; सोंग, मिष, खोटा देखावा.

**Mŏck'ing-bird,** *n.* (मॉ'किंगबर्ड्)—an American song-bird that mimics other birds' notes इतर पक्षांच्या आवाजाप्रमाणें आवाज काढणारा अमेरिकन पक्षी.

**Mō'dal,** *a.* (मो'डल्)—of mode or form and not of substance. रूपाचा, आकाराचा, आकारविषयक, प्रकारदर्शक. *Modal'ity, n.* (esp) method laid down for discharge of obligation, etc. प्रकारदर्शकता, आकारमात्रता.

**Mōde,** *n.* (मोड्)—a way in which a thing is done; the current fashion. रीत, तऱ्हा, पद्धति; शिष्टसंप्रदाय.

**Mŏd'el,** *n.* (मॉ'डेल्)—representation of a designed or actual object; a design or style to be followed. नमुना, सांचा, प्रतिमा; किता. *v. t.* to mould, to fashion; to give a shape to, to form. घडणें, तयार करणें, आकार देणें, बनवणें.

**Mŏd'erate,** *a.* (मॉ'डरिट्)-not given to extremes; (of cost, etc) not excessive; middling in quantity or quality. नेमस्त; माफक; मध्यम, मध्यम प्रतीचा. *n.* a politician of moderate views. नेमस्त; नवाळ राजकारणी पुरुष. *v. t. & i.* (मॉ'डरट्) to make or become less violent or excessive; to act as a moderator नेमस्त किंवा

माफक करणें; नेमस्तपणा राखण्याकरितां अध्यक्ष होणें.

**Mŏderā'tion,** *n.* ( मॉडरे'शन् )—moderating; moderateness. नेमस्त किंवा माफक करणें; नेमस्तपणा, माफकपणा. *In m.*, in a moderate manner or degree. नेमस्तपणानें.

**Mŏd'erātor,** *n.* ( मॉ'डरेटर् )—one who moderates, a mediator; a kind of oil lamp. ( परीक्षेत ) नेमस्तपणा राखणारा. आवरणारा; एक जातीचा तेलाचा दिवा. *M.-ship, n.*

**Mŏd'ern,** *a.* ( मॉ'डर्न् )—of the present and recent times; new-fashioned. आधुनिक, अर्वाचीन; नवीन पद्धतीचा. *n.* (esp. in pl.) a person living in modern times (opp. to ancient). अर्वाचीन काळांतील.

**Mŏd'ernism,** *n* ( मॉ'डर्निझम् )—tendency to subordinate tradition to harmony with modern thought. अर्वाचीनपणा, नवीनपणा. *Mod'ernist, n.* नवमताभिमानी.

**Mŏd'ernize,** *v. t & i.* ( मॉ'डर्नाइझ् )—to assimilate to modern needs; to adopt modern views नवीन आचारविचारांशीं जुळतें घेणें; नवविचार घेणें,-स्वीकारणें. *Moderniza'tion, n.*

**Mŏd'ĕst,** *a.* ( मॉ'डिस्ट् )—not overrating one's own merit; unassuming; not excessive; pure-minded, decorous. विनयशील; निरभिमानी; परिमित; माफक, मर्यादेचा, शुद्ध मनाचा. *-ly, adv.*

**Mŏd'estў,** *n.* ( मॉ'डिस्टि )—modestness. विनयशीलता, नम्रता.

**Mŏd'ĭcum,** *n.* ( मॉ'डिकम् )—what is barely enough; a little or small quantity. बेतबात, अगदीं बेताचा; अल्पांश.

**Mŏd'ĭfў,** *v. t.* ( मॉ'डिफाय् )—to tone down, to qualify; to make less severe; to change the form of, to alter in some respect. फेरफार करणें, पाळणें; तीव्रता कमी करणें; रूप बदलणें, अंशतः हलका करणें. *Modifica'tion, n. Modifi'able, a.*

**Mō'dĭsh,** *a* ( मो'डिश् )—fashionable. सभ्य संप्रदायाचा, डौलाचा.

**Modiste',** *n.* ( मोडी'स्ट् )—a milliner, a dress-maker. स्त्रियांच्या टोप्या, झगे वगैरे बनविणारा, कपडे शिवणारा.

**Mŏd'ūlāte,** *v. t. & i.* ( मॉ'ड्युलेट् )—to vary or regulate the pitch or proportion, to adjust, to attune; to change the key. प्रमाणांत आणणें; सूर मिळविणें, स्वरभेद करणें, स्वरसप्तक बदलणें. *Modula'tion, n.* स्वरनियमन करणें, स्वरभेद. *Mod'ulator, n.*

**Mŏd'ūle,** *n.* ( मॉ'ड्यूल् )—standard, unit, for measuring. ( मापण्याचें ) प्रमाण, परिमाण, एकं.

**Mō'dus ŏperăn'dī,** *n.* ( मो'डस् ऑपरॅ'न्डाइ )—method of procedure. काम करण्याची पद्धत किंवा रीत. *Mo'dus viven'di,* ( मो'डस् व्हिव्हे'न्डाइ ), compromise pending settlement of dispute. वादाचा निकाल होईपर्यंतची तात्पुरती तडजोड.

**Mofŭss'il,** *n.* ( मोफ'सिल् )—rural localities as distinct from the chief station. खेडींपाडीं, बाहेरगांव, देश, प्रांत.

**Moid'ore,** *n.* ( माइ'डोअर् )—Portuguese gold coin (27s.). पोर्तुगाल देशाचें सोन्याचें नाणें (=२७ शिलिंग).

**Mogul',** *n. & a.* ( मोग'ल् )—Mongolian. मंगोलिअन जातीचा मनुष्य; (pl.) खेळण्याचे उत्कृष्ट पत्ते. *The (great* or *grand) M.*, दिल्लीचा बादशहा.

**Mŏi'etў,** *n.* ( मॉ'इ इटि )—a half. अर्धा भाग, निम्मा हिस्सा.

**Moil,** *v. i.* ( मॉइल् )—to drudge, to work with painful efforts. काबाडकष्ट करणें, जिवापाड श्रम करणें. *Toil & m.*, धडपड करणें.

**Moire,** *n.* ( म्वार् )—watered fabric, usu silk. झुळझुळीत हेलकावेदार पृष्ठभागाचें सूत, कापड किंवा रेशिम. *Moire',* ( म्वा'रे ) *a.* having watered surface. हेलकावेदार, झुळझुळीत पृष्ठभाग असलेलें.

**Moist,** *a.* ( मॉइस्ट् )—slightly wet, humid; (of season) rainy; (of disease) marked by discharge of matter etc. ओलसर, दमट; पावसाळी; प्रवाही, वाहणारा. *Moi'stness, n*

**Moi'sten,** *v. t. & i.* ( मॉइ'सन् )—to make or become moist, to wet in a small degree. ओलसर करणें, ओला होणें

**Mois'ture,** *n.* ( मॉइ'स्चर् )—liquid in a diffused or absorbed state, humidity. ओलावा, दमटपणा, आर्द्रता. *Mois'tureless, a.* विनओलाव्याचा, शुष्क, कोरडा.

**Mōke,** *n.* ( मोक् )—(sl.) donkey; a negro. गाढव; नीग्रो जातीचा मनुष्य.

**Mō'lar,** *a.* ( मो'लर् )—(of teeth) serving to grind. चर्वणाचा, चर्वणोपयोगी. *n.* a molar tooth. दाढ.

**Molăss'ĕs,** *n.* ( मोलॅ'सिझ् )—a syrup produced from sugar; treacle. काकवी, मळी, गूळ. [f. Port. f. L. *mel, mellis*, honey]

**Mōle,** *n.* ( मोल् )—a permanent dark excrescence on the skin; a small burrowing animal with short dark fur; stone pier, breakwater or causeway. (अंगावरील) तीळ, चामखीळ; चिचुंद्री; धक्का, बांध. *Blind as a mole*, quite blind. पूर्ण आंधळा.

**Mŏ'lecūle,** *n.* ( मॉ'लिक्यूल् or मो'- )—one of the uniform particles of which a homogeneous substance is composed. अणु, कण, रज. *Molec'ular, a.*

**Mōle'hill,** *n.* ( मो'ल्-हिल् )—a mound thrown up by a mole, a very small hill. चिचुंद्रीनें उकिरलेला मातीचा ढीग, वारूळ. *To make mountains out of molehills,* पराचा कावळा करणें, राईचा पर्वत करणें, लहानशा गोष्टीचें अतिशयोक्तीनें वर्णन करणें.

**Mōle'skin,** *n.* ( मो'ल्स्किन् )—mole's fur; kind of fustian like it; (*pl.*) clothes, *esp.* trousers of this. चिचुंद्रीच्या अंगावरील लोंकर, त्या लोंकरीसारखें सुती ड्रिलचें कापड; त्या कापडाचे कपडे, पायजमे, तुमान.

**Molĕst',** *v. t.* ( मले'स्ट् )—to subject to intentional annoyance, to harass, to vex, to disturb. जाणून बुजून पीडा देणें, उपद्रव देणें, ढवळाढवळ करणें. *Molesta'tion, n.*

**Mŏll'ify,** *v. t.* ( मॉ'लि-फाय् )—to soften, to calm down, to appease, to tone down. मऊपणा आणणें, शांतवन करणें, शमविणें, कमी करणें, हलका करणें. *Mollifica'tion, n.* नरम,-मऊ करणें, नरमपणा, मार्दव, शमन.

**Mŏll'usc,** *n.* ( मॉ'लस्क् )—one of the *Mollusca,* a sub-kingdom of soft-bodied animals, often with hard shells, including snails, oysters, etc. मृदुशरीर प्राण्यांच्या वर्गापैकीं एक. ( ह्या वर्गात गोगलगाई, कालवे वगैरे शिंपायुक्त प्राणी येतात. )

**Mŏll'ўcŏddle,** *n.* ( मॉ'लिकॉडल् )—an effeminate creature. नामर्द, कमजोर, किंवा पौरुषहीन प्राणी, दूधखुळ्या प्राणी. *v. t. & i. to coddle, to coddle oneself.* ( स्वतःला ) कमजोर करणें, कमजोरनिःसत्त्व-होणें.

**Mō'loch,** *n.* ( मो'लॉक् )—Canaanite idol to which children were sacrificed (often used fig.); the thorn-lizard or thorn-devil, a hideous Australian reptile. ( नरबलि घेणारा ) कॅननाइट लोकांचा देव; आस्ट्रेलियांतील एक भयंकर सरपटणारें जनावर.

**Mŏlўbdē'nŭm,** *n.* ( मॉलिब्डी'नम् )—a rare silvery-white metallic element. रसायन शास्त्रांतील एक मूलधातु.

**Mol'ten,** ( मो'ल्टन् )—*pa. p.* of Melt. रस केलेला, गाळलेला, प्रवाही; ओतीव.

**Mō'ment,** *n.* ( मो'मेन्ट् )—a point of time, a brief space of time; importance, consequence. पळ, क्षण; महत्त्व.

**Mō'mentarў,** *a.* ( मो'मेन्टरि )—lasting or continuing only a moment, fleeting. क्षणिक, क्षणभंगुर, क्षणापुरता.

**Momĕn'tous,** *a.* ( मोमे'न्टस् )—of great importance, important, weighty. फार महत्त्वाचा.

**Momĕn'tum,** *n.* ( मोमे'न्टम् )—(*pl.* Momenta) quantity of motion of a moving body; (pop.) impetus gained by movement. चालण्याची गति, वेगमान; गतीमुळें येणारा जोर, प्रेरणा.

**Mŏn'achal,** *a.* ( मॉ'नकल् )—monastic. मठाचा, मठासंबंधी; वैराग्याश्रमाचा. *Mon'achism, n.* मठवास, संसारत्याग.

**Mŏn'ad,** *n.* ( मॉ'नॅड् )—a unit; a simple organism assumed as the first term in evolution. ( मूळचा अविभाज्य ) एक; मूल सत्कण, मूल कारण, मूल चित्कण. *Monad'ic, a.*

**Mŏn'arch,** *n.* ( मॉ'नर्क् )—an imperial or royal ruler of a State, sovereign. राजा, बादशहा. *-ism, n.* एकसत्ताक राज्यपद्धति.—*ist, n.* राजपक्षीय.

**Mŏn'archў,** *n.* ( मॉ'नर्कि )—a system or State governed by a single person. राजसत्ताक पद्धति, राजसत्ताक देश.

**Mŏn'astery,** *n.* ( मॉ'नेस्टरि )—residence of a community of monks, an abbey, a priory, a nunnery. मठ, आश्रम. *Monas'tic, a.* of monks or monasteries. यतीसंबंधी, मठासंबंधी. *Monas'ticism, n.* life in monasteries. मठवास, वैरागीपणा.

**Mon'day,** *n.* ( म'न्डि )—second day of the week that is sacred to the moon. सोमवार, इन्दुवार. *Black M.,* (school slang) first day of term. सद्दामाहीचा पहिला ( अभ्यासाचा ) दिवस. *St M., M.* as day of little work (w. ref. to saint's-day holidays). अल्पकामाचा वार, सोमवार. [OE *mona,* moon; *daeg,* day]

**Mon'dayish,** *a.* ( म'न्डिइश् )—(of clergy) indisposed as result of Sunday work; (of others) slack as result of Sunday work. रविवारीं काम केल्यामुळें कंटाळलेला, सुस्तावलेला.

**Monde,** *n.* ( मॉन्ड )—the fashionable world, society; the set in which one moves. छानछोकीचें जग, सभ्य समाज; स्नेहीसोबत्यांचें मंडळ, परिवार. [F]

**Mō'netarў,** *n.* ( मॉ नेटरि or म'-)—of coinage or money, relating to money. नाण्यासंबंधीं, पैशासंबंधीं, सांपत्तिक, द्रव्यासंबंधीं, पैशाअडक्याचा.

**Mo'nĕtize,** *v. t.* ( म'निटाइझ् )—to make into, or recognize, or put into circulation, as money. नाण्यांच्या रूपांत आणणें, नाणें म्हणून ओळखलें जाणें, नाणें म्हणून वापरणें.

**Mo'ney,** *n.* ( म'नि )—current coin; bank notes or other documents representing it; wealth, affluence. चालू नाणें; नोटा वगैरे चलन, पैसा, द्रव्य; संपत्ति. *Money bag,* पैशाची पिशवी, पोतडी, पाकिट. *Moneys-bag,* wealth. संपत्ति. *M. bags,* wealthy or avaricious person. श्रीमंत किंवा हावरा मनुष्य. *M.-box,* closed box into which savings or contributions are dropped through slit. पैसे टाकण्यासाठीं वरतीं भोंक असलेली बंदिस्त पेटी. *M.-changer,* one whose busi

ness it is to change money at fixed rate. सराफ, नाणेवटी, नाण्यांची देवघेव करणारा. *M.-grubber*, a person sordidly intent on amassing money. येनकेन द्रव्यसंचय करणारा मनुष्य. *M.-grubbing*, *a.* & *n.* वाटेल त्या मार्गानें द्रव्य-संचय करणें. *M.-lender*, (व्याजानें) कर्जाऊ पैसे देणारा सावकार, धनको. *M.-market*, haunts and operations of dealers in stocks and bills. पैशाच्या, रोख्यांच्या व हुंड्यांच्या उलाढालीचा बाजार, सराफकट्टा, सराफ बाजार, शेअर बाजार. *M.-order*, टपालानें पाठविलेला पैसा. *M.-spinner*, a small spider thought to bring good luck. एक जातीचा लहान कोळी. (तो ज्याच्या अंगावरून जाईल त्याला पुष्कळ पैसा मिळवून देईल, अशी समजूत). *M.-wort*, a plant with round glossy leaves. वाटोळीं चकाकदार पानें असलेली वनस्पति. *M.'s-worth*, anything recognized as equivalent to money. ऐवज. *Paper money*, कागदी नोटा वगैरे चलन. (Proverbs) '*Money makes the mare to go.*' (म्हण) 'दाम करी काम', 'द्रव्येण सर्वे वश:'. '*Time is money*', 'वेळ म्हणजे पैसा.' *To make m.*, पैसा मिळविणें, धनसंचय करणें. *To coin m.*, झपाट्यानें पैसा मिळविणें. *not every man's m.*, not worth its price to every one. प्रत्येकाला पैशाचें किंमत सारखीच असत नाहीं. *Mo'neyless*, *a.* द्रव्यहीन, दरिद्री.

**Mon'eyed**, *a.* (मनिड्)—wealthy. पैसेवाला, धनिक. *Moneyed interest*, सावकारलोक, धनिकवर्ग.

**Mo'nger**, *n.* (मंगर्)—dealer, trader (chiefly in combinations). (चा) व्यापारी, व्यवसायी.

**Mong'oose**, *n.* (मॉंगूस्)—an ichneumon (noted for killing venomous snakes). मुंगूस, नकुल.

**Mo'ngrel**, *a.* (मंग्रेल्)—of a mixed breed or type, hybrid. संकर जातीचा, मिश्रजातीय. *n.* a mongrel animal; hybrid plant or person. मिश्रजातीय प्राणी,-वनस्पति,-मनुष्य.

**Mŏn'ism**, *n.* (मॉनिझम्)—forms of doctrine maintaining that there is only one kind of being. अद्वैत मत, एकतत्त्ववाद. *Mon'ist*, *n.* एकतत्त्ववादी, अद्वैतवादी.

**Monĭ'tion**, *n.* (मॉनिशन्)—admonition; summons. ताकीद, सूचना, समन्स.

**Mŏn'ĭtor**, *n.* (मॉनिटर्)—a person who gives advice or admonishes; a senior schoolboy placed in authority; an iron-clad heavily gunned & armoured for coast defence. उपदेष्टा; (वर्गातील) अधिकार दिलेला मुख्य विद्यार्थी, मॉनिटर; किनाऱ्याचें रक्षण करणारें चिलखती जहाज. *Monitor'ial*, *a.* (esp. in school sense), *Mon'itress*, *n. f.*

**Monk**, *n.* (मंक्)—member of male community living apart under religious vows. जोगी, मठवासी. *Monk's hood*, kinds of flowering plants. एकजातीचीं फुलझाडें.

**Mo'nkey**, *n.* (मंकि)—kinds of mammal closely allied to man; kind of hammer; (sl.) temper; £ 500. माकड, वानर; घण, हातोडा; (मर्कट)-स्वभाव; ५०० पौंड. *v. t.* & *i.* to mimic, mock; to play mischievous tricks. वांकुल्या दाखविणें; खोड्या करणें. *Monkey-bread*, एक जातीचें आफ्रिकेंतील झाडाचें फळ. *M.-nut*, peanut. शेंग, दाणा. *M.-jacket*, खलाशांची तंग बंडी. *M.-puzzle*, एक कांटेरी झाड.

**Monk'ish**, *a.* (मंकिश्)—of monks. मठवाशाचा, जोग्याचा.

**Mŏn'ochord**, *n.* (मॉनाकॉर्ड्)—one-stringed musical instrument. एकतारी (वाद्य).

**Mŏn'ochrōme**, *n.* (मॉनाक्रोम्)-one-colour picture or design. एकरंगी चित्र.

**Mŏn'ocle**, *n.* (मॉनकल्)—a single eye-glass. एक-डोळी चष्मा.

**Mŏn'odў**, *n.* (मॉनाडि)—dirge. विलापगीत.

**Monŏc'ūlar**, *a.* (मानॉक्यूलर्)-one-eyed. एकडोळ्या.

**Mŏn'odў**, *n.* (मॉनडि)—a dirge or elegy. विलापगीत, शोकगीत.

**Monŏg'amў**, *n.* (मानॉगमि)—a custom by which one man or male has one wife or mate. एकपत्नीव्रत.-*mist*, *n.*;-*mous*, *a.*

**Mŏn'ogrăm**, *n.* (मॉनाग्रॅम्)—a set of letters interwoven in one design. ठशासाठीं नांवाचीं जोडलेलीं आद्याक्षरें, एकाक्षरी शिक्का.

**Mŏn'ogrăph**, *n.* (मॉनाग्राफ्)—a treatise on a single subject. एका विशिष्ट विषयावर लिहिलेला छोटासा निबंध.-*ic*, *a.*;-*ist*, *n.*

**Mŏn'olith**, *n.* (मॉनालिथ्)—a single block of stone as pillar, etc. अखंड खांब, अखंड दगडी कीर्तिस्तंभ. *Monolith'ic*, *a.*

**Mŏn'olŏgue**, *n.* (मॉनालॉग्)—soliloquy; a dramatic composition in which only one person speaks. आत्मगत भाषण; एकाचेंच भाषण असणारें नाटक, एकपात्री भाषण,-प्रवेश.

**Mŏnomā'nia**, *n.* (मॉनामेनिआ)—madness on a single subject. एकाच बाबतींतील वेड, एक-विषयभ्रम.-*ma'niac*, *a.* छांदिष्ट, एकच विषय घेऊन बसणारा.

**Mŏnomĕt'allĭsm**, *n.* (मॉनामेटॅलिझम्)—use of one metal as standard of currency. नाण्यासाठीं एकाच धातूचा उपयोग, एकचलनोपयोग.

**Mŏn'oplāne**, *n.* (मॉनप्लेन्)—an aeroplane with one plane. तोल राखण्यासाठीं एक पंख असलेलें विमान.

**Monop'olist**, *n.* (मनॉपलिस्ट्)—one who holds or favours a monopoly. मक्ता घेणारा, मक्तेवाला, मक्तेदारीच्या पद्धतीचा पक्षपाती.

**Monŏp'olize**, *v. t.* ( मॅनॉ'पलाइझ् )—to secure monopoly of, to obtain the whole of. मक्ता घेणें, एकट्यानें व्यापून टाकणें, सर्वच्या सर्व खरेदी करणें, -घेणें.-*zation*, *n.*

**Mŏnŏp'olȳ**, *n.* ( मॅनॉ'पलि )—an exclusive privilege of the trade in something ; sole possession or control of anything to the exclusion of others. एकाच्या वस्तूच्या व्यापाराचा पूर्ण मक्ता ; परवाना, मक्ता, पूर्ण ताबा.

**Mŏn'orail**, *n.* ( मॉ'नरेल् )—railway with cars running on a single rail. एकरुळी आगगाडी, एकाच रुळावरून ( एकेरी लाइनीवर ) चालणारी आगगाडी.

**Mŏnosyll'able**, *n.* ( मॉनोसि'लेबल् )—a word of one syllable. एकावयवी शब्द. *Monosyllab'ic*, *a.*

**Mŏn'othĕism**, *n.* ( मॉ'नाथीइझम् )—a doctrine that there is only one God. एकेश्वरवाद, एकेश्वरमत. -*theist*, *n.* एकेश्वरवादी ;-*theis'tic*, *a.* एकेश्वरवादविषयक.

**Mŏn'otōne**, *n.* ( मॉ'नाटोन् )—successive sounds or utterance without change of pitch. एकच सूर, एकच सुरांतील आवाज.

**Monŏt'onous**, *a.* ( मनॉ'टनस् )—unvarying in tone ; wearisome. एकाच सुराचा, एकसारखा ; कंटाळवाणा.

**Monŏt'onȳ**, *n.* ( मनॉ'टनि )—uniformity or sameness of sound, monotonousness. एक स्वर, एकप्रकारीपणा, कंटाळवाणेपणा. [ Gk *monos*, one ; *tonos*, tone, sound ]

**Mŏn'otȳpe**, *n.* ( मॉ'नाटाइप् )-a composing machine that casts & sets up type. हवा तसा एकेक टाईप पाडून तो जुळविण्याचें यंत्र.

**Monseigneur**, *n.* ( मॉसेंय'र् )—French title for dignitaries. थोरा मोठ्यांची फ्रेंच पदवी.

**Monsieur**, *n.* ( मस्य'र् )—( as French title, abbr. M. ) Mr ; sir ; a French man. ( पदवी ) मिस्टर ; सर ( महाराज ) ; फ्रेंच मनुष्य.

**Mŏnsōōn'**, *n.* ( मॉन्सू'न् )—seasonal wind, rainy season. पावसाळी वारा, पावसाळा.

**Mŏn'ster**, *n.* ( मॉ'न्स्टर् )—a mis-shapen creature ; a person or thing of portentous appearance or size ; a miscreant, one unnaturally wicked or evil. चमत्कारिक आकाराचा प्राणी ; भयंकर प्राणी, राक्षस ; दुराचारी मनुष्य. *a.* huge. भव्य, प्रचंड, भयानक.

**Mŏn'strance**, *n.* ( मॉ'न्स्ट्रन्स् )—( R. C. Ch. ) vessel in which the host is exposed. रोमन कॅथालिक देवळांत लोकांच्या दर्शनाकरितां ठेवलेलें पात्र.

**Mŏnstrŏs'ĭtȳ**, *n.* ( मॅन्स्ट्रॉ'सिटि )—monstrousness ; a mis-shapen or outrageous thing. प्रचंडपणा, अवाढव्यपणा, राक्षसीपणा, अद्भुतता.

**Mon'strous**, *a.* ( मॉ'न्स्ट्रस् )—of the nature of a monster ; huge ; outrageous. राक्षसी ; प्रचंड ; भयंकर जुलुमाचा.

**Mŏ'ntane**, *a.* ( मॉ'न्टेन् )—of, inhabiting, mountainous country. पर्वतमय प्रदेशाचा, डोंगराळ मुलखांत राहणारा.

**Mo'ntĕ**, *n.* ( मॉ'न्टे )—a Spanish game of chance played with 45 cards. स्पॅनिश लोकांचा पत्त्यांचा ( जुगारी ) डाव.

**Month**, *n.* ( मन्थ् )—any of the twelve divisions of a year, a calendar month ( four weeks ). महिना, मास. *Month'ly*, *a.* recurring, payable, etc. once a month. महिन्याचा, मासिक, दर महिन्याला देण्याजोगा ; *n.* a monthly magazine. मासिक ( पुस्तक ) ; *adv.* once a month. दर महिन्याला. *Monthlies*, *n. pl.* menses. ऋतु, आर्तव, मासिक विटाळ. *Calendar month*, पंचांगांतील महिना. *Lunar m.*, चांद्रमास ; २८ दिवस. *Month of Sundays*, अनियमित काळ. *This day m.*, a month from day. आजपासून एक महिना. *Monthly nurse*, बाळंतपणानंतर पहिल्या महिन्यांतील दाई. *M. rose*, दर महिन्याला फुलणारा ( चिनी ) गुलाब.

**Mŏn'ūment**, *n.* ( मॉ'न्युमेन्ट् )—written record, anything designed or serving to commemorate something. ( स्मारक ) लेख, स्मारक.

**Mŏnūmĕn'tal**, *a.* ( मॉन्युमे'न्टल् )—of or serving as monument; colossal or stupendous. स्मारकाचा, स्मारक म्हणून असलेला ; विशाल, भव्य, अद्भुत, चिरस्मरणीय. [ L *monere*, to remind ]

**Mōō**, *v. i. & n.* ( मू )—(of cow or horse) low हंबरणें, खिंकाळणें.

**Mōōch**, *v. i. & t.* ( मूच् )—( colloq. ) to slouch along, to loiter about ; to steal. अक्कडबाजपणें भटकणें, हिंडणें ; चोरणें.

**Mōōd**, *n.* ( मूड् )—( *Gram.* ) any of the groups of forms in conjugation of verb that serves to indicate its function ; state of mind or feeling. ( व्याकरणांत ) क्रियापदाचा रूपप्रकार, अर्थ; मनःस्थिति, लहर ; ( logic ) अनुमानाचा प्रकार, रूप.

**Mōōd'ȳ**, *a.* ( मू'डि )—subject to changes of mood ; depressed, sullen. अस्थिर मनाचा, चंचलवृत्ति ; उद्विग्न, खिन्न, रुष्ट, रागीट.

**Mōōn**, *n.* ( मून् )—the satellite revolving round the earth in lunar month and reflecting light from the sun ; ( poet. ) month. चंद्र, चंद्रमा; ग्रह, उपग्रह ; ( काव्यांत ) महिना, मास. *v. i. & t. to go dreamily or listlessly about ; to pass* away ( time ) in listless manner. वेड्याप्रमाणें भटकणें ; रिकामटेकडेपणानें वेळ घालविणें. *Full moon*, पूर्ण (पूर्णिमेचा) चंद्र. *New m.*, प्रतिपदेचा चंद्र. *M. beam*, चंद्रकिरण. *M. calf*, born fool, उपजत वेडा. *M. light*, चंद्रप्रकाश, चांदणें. *Old m. in new m.'s arms*, *m.* during first quarter.

शुद्ध सप्तमीपर्यंतचा चंद्र. *Moonlight flitting*, भाडें देण्याचें टाळण्यासाठीं रातोरात बिऱ्हाड चोरून खालीं करणें. *M.-lit*, lit up by *m.*, चंद्रप्रकाशित. *M. shine*, visionary talk or ideas ; smuggled spirits. वेडगळ बोलणें किंवा समजूत ; बेकायदा चोरून आणलेली दारू. *M.shiny*, चंद्रप्रकाशित, भ्रामक, काल्पनिक. [L *mensis*, Gk *men*, month]

**Mōōn'-light, Mōōn'shīne,** *nn.* (मून्‌लाइट्, मून्‌शाइन्)—the light of the moon. चंद्रप्रकाश, चांदणें.

**Mōōn'stōne,** *n.* (मून्‌स्टोन्)—a pearly feldspar (used in trinkets or otherwise). चंद्रकांत मणि.

**Mōōn'strŭck,** *a.* (मून्‌स्ट्रक)—lunatic. भ्रमिष्ट, वेडा.

**Mōōn'y̆,** *a.* (मूनि)—of, like, the moon ; dreamy. चंद्राचा, चंद्रासारखा ; विचारमग्न, भ्रमिष्ट, वेडा.

**Moor,** *n.* (मूअर्)—a tract of uncultivated and often heather-clad ground. पाणथळ जमीन, रान, ओसाड प्रदेश *v. t.* attach ( boat, &c.) by rope to shore or something fixed. बोट वगैरे घट्ट बांधून ठेवणें, जहाज खुंटवणें, नांगरणें. *Moor'age*, place, charge etc., for mooring. गलबत नांगरण्याची जागा, भाडें, नोर, खुंटणावळ. *Moor land*, पाणथळीची जागा. *M. hen*, पाणकोंबडी. *Moor'ish*, *Moor'y*, *aa.* पाणथळ, दलदलीचा.

**Moor,** *n.* (मूअर्)—one of a Mohammedan race of N.-W. Africa. उत्तर आफ्रिकेंतील शिद्दी मनुष्य. *Moor'ish, a.*

**Mōōr'ing,** *n.* (मूरिंग)—(*usu. pl.*) anchored chains to which boat is moored. नाव बांधलेली जागा ; दोरखंड, नांगर इ. सामायन.

**Mōōse,** *n.* (मूस्)—N. American elk. उत्तर अमेरिकेंतील सांबर.

**Mōōt,** *n.* (मूट्)—meeting esp. of legislative or judicial kind; (Law) students' discussion of hypothetical case for practice. लोकसभा ; काल्पनिक खटल्यांत कायदा शिकणाऱ्या विद्यार्थ्यांची चर्चा, वादविवाद. *v. t.* to raise ( a question) for discussion. वादविवादासाठीं (प्रश्न) उपस्थित करणें, वादविवाद करणें. *a.* debatable. वादग्रस्त.

**Mōōt'cāse, Moot'pōint,** *n.* (मूट्‌केस्, मूट्‌पॉइन्ट्)—matter on which opinions differ. वादग्रस्त मुद्दा, लढा, विषय.

**Mop,** *n.* (मॉप्)—a bundle of yarn, &c. fixed to stick for use in cleaning. काठीला फडकें बांधून केलेली झाडणी, दांडपोतेरें. *v. t.* to clean or wipe with mop-head or absorbent stuff ; to wipe tears, sweat (from brow ). पोतेऱ्यानें किंवा पोतेऱ्याप्रमाणें झाडणें, पुसणें, साफ करणें ; (डोक्याचा) घाम, अश्रु वगैरे पुसून काढणें. *M. head*, thick head of hair like m., a person with this. झाडणी प्रमाणें दाट केसांचें डोकें, अशा केसांचा मनुष्य. *Mo'ppy, a.*; *To m. the floor with*, to have and use overwhelming advantage of ( combatant ). (प्रतिपक्षावर) मात करणें, (त्याला) चीत करणें. *To mop up*, साफ पुसून काढणें ; (नफा) खाणें, लाटणें ; (चा) शेवट करणें. [ L *mappa*, a napkin ]

**Mŏp,** *v. i. & n.* (मॉप्)—*Mop and mow*, to make grimaces. वांकुल्या दाखविणें, वेडींवांकडीं तोंडें करणें. *Mops & mows*, grimaces. वांकुल्या.

**Mōpe,** *v. i.* (मोप्)—to be spiritless or gloomy. उदास होऊन बसणें. *n.* a low-spirited person ; (pl.) dumps. उदास मनुष्य ; खिन्नता, उदासपणा. *Mo'pish, a.* खिन्न, उदास.

**Mō'poke, More'pork,** *nn.* (मोपोक्, मोर्‌पोर्क)—(*in N. Zealand*) *an owl* ; (*in Tasmania*) night-jar ; (in Australia) various birds. घुबड ; रात्रीं फिरणारा पक्षी ; निरनिराळे पक्षी. [ *imit.* of birds' note ]

**Moraine',** *n.* (मरेन्)—debris deposited by glacier. बर्फाच्या नदींतील गाळसाळ किंवा कचरा, हिमनदीगाळ.

**Mŏ'ral,** *a.* (मॉरल्)—concerned with right and wrong conduct ; practising virtue. सद्सद्विचारविषयक, नैतिक, नीतिविषयक ; नेकीचा. *n.* the guidance deducible from a fable, incident, &c. ; (*pl.*) conduct of a person, nation, &c. भावार्थ, तात्पर्य ; (अनेः) नैतिक वर्तन, आचार. *Moral courage*, नीतिधैर्य, मनोधैर्य. *M. certainty*, probability so great as to admit of no reasonable doubt. (पुराव्याशिवाय) मनाची खात्री, अंतःकरणप्रवृत्ति. *M. sense*, सद्सद्विचारशक्ति, प्रज्ञा. *M. science*, आचारशास्त्र. *M. philosophy*, ethics. नीति-शास्त्र. *M. victory*, defeat, indecisive result, that eventually produces the m. effects of victory. पराभव झाला तरी मनाला वाटणारा नैतिक विजय. *To draw the moral*, तात्पर्य सांगणें. *To point a m.*, to illustrate or apply *a m.* तात्पर्य, भावार्थ, उदाहरण देऊन सांगणें. *The very m. of*, (vulg.) exact likeness of. हुबेहूब सारखेपणा. *Mor'ally, adv.* नीतीनें, नीतिदृष्ट्या, न्यायानें. [ L *mos*, custom, *pl. mores*, morals ]

**Morāle',** *n.* (मोराल्)—discipline and spirit pervading an army or other body of persons. सैन्यांतील किंवा इतर लोकांतील शिस्त व मनःसामर्थ्य, मनोधैर्य.

**Mŏ'ralist,** *n.* (मॉरलिस्ट्)—a person given to moralizing ; a person for whom morality requires no religious sanction. नीतीचा उपदेश करणारा, नीतिउपदेशक ; केवळ नैतिक, सद्वर्तनी. *Moralist'ic, a.*

Moral'ity, *n.* (मरॅ'लिटि)—ethics; morals; moral conduct; kind of moralizing drama. नीतिशास्त्र, कर्तव्याकर्तव्यविचार; सदाचरण; नीतितत्त्वपूर्ण नाटक, नीतिबोधक नाटक.

Mo'ralize, *v. i. & t.* (मॉ'रलाइझ्)—to talk on the moral aspect of things; to draw the moral of. चा सारांश काढणें, नीति सांगणें; नीतीचा विचार करणें, नीति शिकविणें.

Morass', *n.* (मोरॅ'स्)—marsh, slough. पाणथळ जमीन, दलदल.

Morator'ium, *n.* (मॉरटॉ'रिअम्)—legal authorization to defer payment. ऋणकोला देणें देण्यासाठीं दिलेली कायदेशीर सवलत,-मुदतवाढ.

Mo'rb'id, *a.* (मॉ'र्बिड्)—not sound and healthy; diseased, sickly. अस्वस्थ, रोगट; विकारी. *M. anatomy,* विकृत शरीर. *Morbid'ity,* prevalence of disease (in a district), morbidness. आजार, रोगाचें प्रमाण, अस्वस्थता.

Morbif'ic, *a.* (मॉर्बि'फिक्)—causing disease. रोगकारक, रोगजनक, रोगट

Mord'ant, *a.* (मॉ'र्डन्ट्)—(of wit) biting, stinging; (of pain) acute; (of acids) corrosive or cleansing. बोंचक, मर्मभेदक; तीव्र; जाळून काढणारा, दाहक, साफ करणारा. *n.* mordant substance. दाहक (इ०) पदार्थ. *Mord'ancy, n.*

More, *a. & pron.* (मोअर्)—a greater or additional quantity or number (of). आणखी, जास्त. *adv.* to a greater degree or extent or amount. अधिक, आणखी, पुनः. *More & more,* अधिकाधिक. *M. or less,* in greater or less degree. कमीजास्त प्रमाणांत. *To be no more,* to be dead. मरणें, नाहींसें होणें.

Moreo'ver, *adv.* (मोअरो'व्हर्)—besides what has been already said; and further. आणखी; शिवाय.

Moreen', *n.* (मरी'न्)—a stuff for curtains. पडद्याचें कापड.

Moresque', *a.* (मॉरे'स्क्)—Moorish in style. मूर लोकांच्या पद्धतीसारखा.

Morganat'ic, *a.* (मॉर्गॅ'टिक्)—*M. marriage,* one between man of exalted rank and woman of lower rank, who remains in her former station. प्रतिलोम (विवाह), उच्चवर्णीयाचा हीनवर्णीय स्त्रीशीं झालेला विवाह.

Morgue, *n.* (मॉर्ग्)—a building (esp one formerly in Paris) in which bodies of persons found dead are exposed for identification. (पत्ता लावण्याकरितां) अज्ञातप्रेतगृह, अनाथप्रेतालय.

Mo'ribund, *a.* (मॉ'रिबन्ड्)—at the point of death, likely soon to perish. मरणोन्मुख, सद्योविनाशी.

Mo'rion, *n.* (मॉ'रिअन्)—a steel cap. पोलादी टोपी.

Morn, *n.* (मॉर्न्)—(*poet.*) morning. सकाळ, प्रातःकाळ.

Morn'ing, *n.* (मॉ'र्निंग्)—the day from dawn till noon or the midday meal; dawn. सकाळ, प्रातःकाळ, प्रभात, पूर्वाह्णकाळ; अरुण देवता. *Good m.,* रामराम, नमस्कार. *M. star,* शुक्राचा तारा, शुक्र. *M. watch,* (Naut.) 4-8 a. m. (सकाळीं ४ ते ८ वाजेपर्यंतचा) सकाळचा पहारा (नाविक).

Morocc'o, *n.* (मरॉ'को)—(pl.-os), leather of goatskin tanned with sumac. बकऱ्याचें कमावलेलें उंची चामडें.

Mor'on, *n.* (मॉ'अरन्)—an adult whose mental development is arrested at the stage normal in a 7-year child. सात वर्षांच्या मुलाइतकीच बुद्धीची वाढ झालेला मनुष्य. [Gk *moros*, dull]

Morose', *a.* (मरो'स्)—of bitter unsociable temper; sullen, gloomy. कटुस्वभावी, खिन्न, दुर्मुखलेला.*-ly, adv.*

Morph'eus, *n.* (मॉ'र्फ्यूस्)—God of dreams or sleep. (ग्रीक लोकांची) स्वप्न-(निद्रा)-देवता. *In the arms of M.,* asleep. झोंपी गेलेला

Morph'ia, Morph'ine, *nn.* (मॉ'र्फिआ, मॉ'र्फिन्)—narcotic principle of opium, powerful anodyne. अफूचा अर्क. *Morph'inism, n.* state induced by excessive use of morphia. अफूच्या अर्काच्या अतिसेवनामुळें आलेली धुंदी.

Morphol'ogy, *n.* (मॉर्फॉ'लजि)-branch of biology, or of philology, dealing with forms. आकारविज्ञान; शब्दरूपविचार.—*gical, a*;—*gist, n.*

Mo'rris, *n.* (मॉ'रिस्)—*M. dance,* kind of dance, with bells, cudgels, etc. मूर लोकांचा आडदांड नाच, टिपर-खेळ.

Mo'rris tube, *n.* (मॉ'रिस् ट्यूब्)—a small-bore rifle barrel insertable in a rifle for practice on miniature range. लहान टप्प्यावर नेम धरण्याचा सराव करण्यासाठीं बंदुकींत बसविण्याची लहान तोंडाची नळी. [R. *Morris*, the inventor]

Mo'rrow, *n.* (मॉ'रो)—the day that follows a day or event, the day after the present. दुसरा दिवस, उद्यांचा दिवस.

Morse, *n.* (मॉर्स्)—a walrus. समुद्रांतील लांब सुळ्याचा एक प्राणी.

Morse, *n.* (मॉर्स्)—*M. alphabet,-code,-signals, etc.* विद्युत्संदेश पाठविण्याची एक पद्धति.

Mors'el, *n.* (मॉ'र्सल्)—mouthful, bit; a small quantity, a fragment, a little piece. घांस, तुकडा; थोडासा भाग.

Mort'al, *a.* (मॉ'र्टल्)—subject to or causing death; very great. मरणाधीन, नाशवंत; अतिशय. *n.* a human being. मनुष्य प्राणी. *Mort'ally, adv.*

Mortal'ity, *n.* (मॉर्टॅ'लिटि)—being mortal; human beings; death-rate. मरणाधीनता; मनुष्यप्राणी; मृत्युसंख्या.

**Mor'tar**, *n.* (मॉ'टर्)—a vessel in which drugs, food, &c. are pounded with a pestle; mixture of lime, water, etc. used in building; short gun throwing shells. उखळी, खल; चुना, चुन्याचा गारा; उखळी तोफ, गरनाळ.

**Mortg'age**, *n.* (मॉ'र्गिज्)-conveyance of property as security for debt until money is repaid. गहाण. *v. t.* to make over by mortgage, to pledge. गहाण ठेवणें.

**Mortg'agor**, *n.* (मॉ'र्गजर्)—the person who mortgages. गहाण ठेवणारा. (*Also* Mortg'ager).

**Mortgagee,'** *n.* (मॉर्गजी')—the person to whom mortgage is given or an estate is mortgaged. गहाण घेणारा, धनको.

**Mŏrt'ify̆**, *v. t. & i.* (मॉ'र्टिफाय्)—to chasten (flesh, &c.) by repression; to humiliate, to chagrin; to be affected with gangrene or mortification. चैतन्य नष्ट करणें, जायबंदी करणें; अपमान किंवा पाणउतारा करणें; सडणें, झडणें. *Mort'ifying*, *a.* नासलेला, इंद्रियदमनकारक, मानहानिकारक. *Mortifica'tion*, *n.*

**Mort'ise,-ice**, *n.* (मॉ'र्टिस्)—a hole made in a piece of wood, etc. to receive the end of another piece. खोबण, कहूचें भोंक. *v. t.* to make mortise in; to join by m. कळाशीसाठीं भोंक पाडणें; कळाशी करून सांधणें,-जोडणें.

**Mort'main**, *n.* (मॉ'र्टमेन्)—condition of land, etc. held inalienably by a corporation. दुसऱ्याला न विकतां येणाऱ्या स्थावर मिळकतीचा ताबा.

**Mort'ūary̆**, *n.* (मॉ'र्च्युअरि)—the building for temporary keeping of corpses, a dead-house. मेतालय. *a.* of or for burial. मरतिकाचा, मृतासंबंधीं.

**Mosā'ĭc**, *n.* (मझे'इक्)—a picture or pattern made with small coloured pieces of stone or glass. लहान लहान रंगीत तुकड्यांचें बनविलेलें चित्र किंवा नक्षीकाम.

**Mosā'ic**, *a.* (मझे'इक्)—of Moses. मोझिझचा.

**Mŏsque**, *n.* (मॉस्क्)—Mohammedan temple, a place of religious worship. मशीद, दरगा.

**Mosqui'tō**, *n.* (मास्की'टो)—(*pl.-oes*), kinds of gnat (very annoying from the severe bites). चिलट, सुरकुट, मच्छर. *M.-net*, *M.-curtain*, मच्छरदाणी. *M.-craft*, small light vessels for rapid manœuvring. जलद चालीचीं लहान हलकीं जहाजें.

**Mŏss**, *n.* (मॉस्)—a small plant growing on moist surfaces; bog, a place where peat is found. शेवाळ, शैवाल; दलदल. *v.t.* to cover with *m.* शेवाळानें झांकणें. *Mo'ssy*, *a.*; *Mo'ssiness*, *n.* '*Rolling stone gathers no moss*', one who constantly changes his place or employment will not grow rich. 'एक ना धड भाराभर चिंध्या'. *M.-grown*, शेवाळलेला. *M.-trooper*, border free-looter of 17th c. (१७ व्या शतकांतील) लुटारू, पुंड, वाटमारा.

**Mōst**, *a.* (मोस्ट्)—the greatest number or quantity of. अतिशय, बहुतेक. *pron.* the greatest amount; the greater part of. सर्वांत जास्त; अधिक, बहुतेक. *adv.* to a great or the greatest degree or extent or amount. बहुत, विशेषेंकरून. *The most*, बहुतेक भाग. *For the most part*, बहुतकरून, बहुंशीं. *To make the m. of it*, employ it to the best advantage, represent it at the best or worst. शक्य तितका फायदाकरून घेणें; अतिशय बरें-वाईट, असें दाखवून देणें.

**Mōst'ly̆**, *adv.* (मो'स्ट्-लि)—for the most part, mainly, chiefly, generally speaking. फार करून, बहुधा.

**Mōt**, *n.* (मो)—(*pl.-s* मोझ्), a witty saying. शहाणपणाचें वचन, सुभाषित.

**Mōte**, *n.* (मोट्)—a particle of dust. अणु, रजःकण, कण. *M. in* (another's) *eye*, trifling fault if compared to one's own. 'दुसऱ्याच्या डोळ्यांतील कुसळ,' आपल्या दोषाच्या मानानें दुसऱ्याचा अतिशय क्षुद्र दोष, छिद्र.

**Mŏth**, *n.* (मॉथ्)—kinds of winged insect resembling butterflies; (fig.) a person hovering around temptation. पिंगाणा, पतंग, कसर; पतंगाप्रमाणें मोहांत गुरफटलेलो. *M.-eaten*, कसरीनें खाल्लेला; जुना पुराणा, जुनाट. *Moth'y*, *a.* कसर लागलेलें.

**Mo'ther**, *n.* (म'दर्)—the female parent; an old woman; head of female religious community; apparatus for rearing chickens; that which has produced or nurtured anything. आई, माता; वृद्ध स्त्री, (खिस्ती धर्मांतील) संतीण, महंतीण; कोंबडीच्या पिलांना वाढविण्याचें यंत्र; उत्पत्तिस्थान, मूळ. *a.* native, natural. जन्मसिद्ध. *v. t.* be mother of; act as mother to. आईप्रमाणें होणें,-वाढवणें,-पाळणें; मातृभाव दाखविणें. *M. country*, country in relation to its colonies. वसाहतींचा मूळ देश. *M. craft* skill in treatment of offspring. पिलांची,-मुलाबाळांची-निगा राखण्याचें कौशल्य. *M. earth*, भूमाता, भूमि; जमीन. *M. of pearl*, मोत्यांचा शिंपला. *M. wit*, native wit, common sense. व्यवहारज्ञान, प्रज्ञा. *Mother's Day*, मातृदिन. *Mo'therless*, *Mo'therlike*, *aa.*, *Mo'therly*, *a.* मातृवत्, मातेप्रमाणें, मातृसदृश.

**Mo'ther**, *n.* (म'दर्)—(*M. of vinegar*) dregs or sediments of vinegar. गाळ, चिकटा, थर. *Mo'thery*, *a.*

**Mo'therhood**, *n.* ( म'द्र्-हुड )—office or state of a mother, state of being a mother. आईपणा, मातृत्व.

**Mo'ther-in-law**, *n.* (म'द्र्-इन्-ला)—wife's mother, husband's mother. बायकोची किंवा नवऱ्याची आई, सासू.

**Mo'ther-tongue**, *n.* ( म'द्र्-टग् )—one's native language; tongue from which others spring. मातृभाषा, जन्मभाषा, स्वभाषा; मूळभाषा, भाषा-जननी.

**Mōtif'**, *n.* ( मोटी'फ् )—a distinct element or feature in a composition; ornament of lace etc. sewn separately on dress. लेखांतील,-निबंधांतील विशेष तत्त्व, विशेष गोष्ट,-मुद्दा; कपड्यावरील फितीनें शिवलेली शोभादायक आकृति,-बिल्ला.

**Mō'tion**, *n.* ( मो'शन् )—moving; a gesture; proposal for action to be taken; evacuation of bowels. गति, चलन; अंगविक्षेप, सूचना; (कोर्टाला केलेली) तोंडी विनंती, अर्ज; शौच, झाडा. *v.i. & i.* to make significant gesture; direct by gesture. खूण करणें, सूचना करणें, खुणेनें सांगणें. *In motion*, moving, not at rest. चालू झालेलें, सुरू झालेलें; अस्थिर. *To put in m.*, गति देणें, चालीस लावणें, सुरू करणें. *Mo'tional, Mo'tionless, aa.*

**Mō'tive**, *n.* ( मो'टिव्ह् )—what impels a person to action, cause, object, intention. कारण, निमित्त, हेतु. *a.* productive of motion or action. चालक, प्रेरक, प्रेरणा देणारा, प्रवर्तक, गति देणारा. *v. t.* ( also *mo'tivate* ), supply a motive to, be the motive or motif of. प्रवृत्त करणें, ( चा ) हेतु किंवा उद्देश असणें, सहेतुक करणें. *Motiva'tion, Motiv'ity, nn., Mo'tiveless a.*

**Mŏt'ley**, *a.* ( मॉ'ट्-लि )—parti-coloured; heterogeneous, diversified. अनेकरंगी, चित्रविचित्र; भिन्नगुणधर्माचा. *n.* incongruous mixture; fool's particoloured dress. पंचमेळ मिश्रण; विदूषकाचा रंगीबेरंगी पोषाख. *To wear motley*, to play the fool. विदूषकाप्रमाणें वागणें.

**Mō'tor**, *n.* ( मो'टर् )—what imparts motion; a machine supplying motive power, internal-combustion engine. चालक शक्ति; गाड्या चालविणारें यंत्र, गत्युत्पादक यंत्र. *a.* propelled by such machine. ( मोटर बायसिकल,-बोट, गाडी वगैरे ) यंत्रानें चालणारी. *v. i. & t.* to go, convey, by motor-car. मोटरगाडीनें जाणें,-नेणें. *M. man*, ( अमेरिकेंत ) विजेची गाडी हाकणारा. *Mo'torist, n.* a user of motor car. मोटर गाडींत बसणारा, मोटरगाडी चालविणारा.

**Mō'tor-căr**, *n.* ( मो'टर्-कार् )—a motor carriage for use on roads. मोटार गाडी.

**Mŏt'tle**, *v. t.* ( मॉ'टल् )—to make mottled. ( वर निरनिराळ्या रंगाचे ) डाग,-ठिपके देणें. *Mot'tled*, ( मॉ'टल्ड् ) *a.* showing colours in blotches. रंगीबेरंगी, रंगीबेरंगी ठिपक्यांचा.

**Mŏtt'ō**, *n.* ( मॉ'टो )—( pl.-oes ), a short sentence or phrase chosen for inscription or quotation. म्हण, कित्ता, आदर्शवचन.

**Mou'jik, Muzhik**, *nn.* ( मू'झिक् )—Russian peasant; loose fur cape for ladies' wear. रशियांतील शेतकरी; स्त्रियांचा चिनबाह्यांचा सैल झगा.

**Mould**, *n.* ( मोल्ड् )—loose earth; soil rich in organic matter; woolly fungous growth formed on moist surface; matrix in which metal is cast; form or character; gauge or pattern used in making mouldings. माती; खताची माती; बुरशी, कणशी; सांचा, ठसा; बनावट, स्वभाव; नमुना, सांचा, प्रतिमा, मूस. *v. t.* to form or shape according to a pattern. नमुन्याप्रमाणें बनविणें. *To become mouldy*, बुरशी येणें. *Man of mould*, mere mortal. केवळ मर्त्य ( मनुष्य ), क्षुद्र मानव.

**Moul'der**, *v. i.* ( मो'ल्डर् )—to decay to dust; crumble away. माती होणें, मातीला मिळणें; जुरत जाणें, क्षीण होणें.

**Moul'ding**, *n.* ( मो'ल्डिंग् )—a piece of ornament running along some line in a building. ( भिंत दरवाजा वगैरेवरील ) नक्षीदार कडा, कांठ, कंगोरा.

**Moul'dy**, *a.* ( मो'ल्डि )—covered with mould; (fig.) stale, antiquated; (slang) dull, tiresome, boring. बुरसलेला; शिळा, जुनापुराणा; कंटाळवाणा, तापदायक. *n.* ( naut. slang ) torpedo. सुरंग.

**Moult**, *v. t. & i. & n.* ( मोल्ट् )—to shed feathers; to shed (feathers) in changing plumage. पिसें टाकणें; पंख गाळणें किंवा गळणें, ( सापानें ) अंगावरील कात टाकणें.

**Mound**, *n.* ( माउन्ड् )—a heap or bank of earth, a bulwark, rampart. बांध, बंधारा, टेकडी, तट.

**Mount**, *n.* ( माउन्ट् )—a mountain or hill (abbre. *Mt*, preceding name, as *Mt* Everest); (palmistry) fleshy prominence on palm of hand; a card on which a photograph &c. is mounted; a horse for person's use. पर्वत किंवा टेकडी; ( हस्तसामुद्रिकांत ) तळ हातावरील उंचवटा; फोटोग्राफ वगैरे ज्याच्यावर बसवतात तो पुठ्ठा, नक्षी, चौकट; स्वारीचा घोडा. *v. t. & i.* to rise on high, to rise, to ascend, to go upwards; to climb on to. वर चढून जाणें, आरोहण करणें; चढणें किंवा चढवणें, घोड्यावर बसणें,-बसविणें, अडवणें, तयार करणें. *To m. a gem*, रत्न कोंदणांत बसविणें. *To m. guard (over)*, पहाऱ्यावर जाणें, पहारा करणें. *To m. a play*, नाटक रंगभूमीवर आणणें.

**Pāne**, *n.* (पेन्)—a single piece or plate of glass inserted in a window. तावदान, भिंग.-*less*, *a.*

**Pănĕgy̆'ric**, *n.* ( पॅनिजि'रिक् )-laudatory discourse; eulogy, praise bestowed. स्तुतिवाद; प्रशंसा, स्तुति.-*al*, *a.*; *Pane'gyrist*, *n.* स्तुतिपाठक.

**Pănĕgy̆'rize**, *v. t.* ( पॅनिजि'राइझ् )—to laud, to praise. स्तुति करणें, वाखाणणें.

**Păn'el**, *n.* ( पॅनेल् )—a distinct compartment (*inserted in door, wainscot, &c.*); a thin board with a picture on it; a list of jurors, jury; vertical strip of material in dress; list of Health Insurance doctors; kind of saddle. लांकडी तावदान; रंगीत चित्र काढलेली फळी; पंचाचे नांवनिशीची यादी, पंच; फितीची किनारी; विमा कंपनीचे नोंदविलेले डॉक्टर; खोगीर. *v. t.* *to adorn with panels.* लांकडी तावदानें बसविणें. *Pan'elling*, panelled work. तावदानी काम.

**Păng**, *n.* (पॅग्)—agony, throe. अतिव्यथा, वेदना, कळ.

**Păngo'lin**, *n.* ( पँगो'लिन् )—a scaly ant-eater. खवलें मांजर, वज्रकीट.

**Păn'ic**, *n.* ( पॅनिक् )—sudden and infectious fright. अकस्मात् उपस्थित झालेलें भय, धस्स, धडकी. *P.-monger*, हुल्लड उठविणारा.

**Pănn'ier**, *n.* (पॅन्यर्)—a basket carried by a beast of burden, or by a person on shoulders; part of skirt round hips. पेटारा, टोपला; कमरेखालचा झग्याचा भाग.

**Păn'ŏply̆**, *n.* (पॅनॉप्लि)—full armour. सर्वांगकवच. *Pan'oplied*, *a.*

**Pănoră'mă**, *n.* ( पॅनारा'मा )—cylindrical surface painted with scenery and unrolled before spectators, continuous revolving landscape; wide prospect or view of objects in every direction. विस्तृत-विस्तीर्ण-देखावा; भागशः दाखवितां येणारा चित्रपट; सर्व बाजूंचा पूर्ण देखावा, सर्व बाजूंचा विचार. *Panoram'ic*, *a.*

**Păn'sy̆**, *n.* ( पॅन्झि )—a flowering plant, the heartsease. एक फूलझाड, पॅन्सी नांवाचें एक फूल.

**Pănt**, *v. i. & t.* ( पॅन्ट् )—to breathe quickly and audibly; to throb; to yearn. धापा टाकणें; छाती धडधडणें, थरथर कांपणें; उत्कंठा लागणें. *n.* a panting respiration; a throb. धाप, दम; धडकी.

**Păntalĕttes'**, *n. pl.* ( पॅन्टले'ट्स् )—child's frilled drawers; woman's knicker-bockers, etc. झालर लावलेली लहान मुलांची चड्डी; स्त्रियांचे पायजामे.

**Păntaloons'**, *n. pl.* ( पॅन्टलू'न्झ् )—a kind of tightly fitting trousers; trousers in general. पायजमा; पाटलोण, तुमान. *Pantaloon'*, *n. sing.* pantomime character serving as butt to clown. विदूषकाचा साथीदार.

**Păntĕc'hnicon**, *n.* ( पॅन्टे'क्निकन् )—place for storing or van for removing furniture. लांकडी सामानाचें कोठार,-संग्रह; लांकडी सामान नेण्याची गाडी.

**Păn'theism**, *n.* ( पॅ'न्थि-इझम् )—the doctrine of indentification of God with the universe. जगदीश्वरमत, अद्वैतमत, सर्व वस्तूंत देव भरला आहे हें मत.-*ist*, *n.*;-*istic*,-*istical*, *aa.*

**Pănthē'ŏn**, *n.* ( पॅन्थी'ऑन् )—a temple devoted to all the gods or divinities; a building with memorials of a nation's great dead. सर्वदेवमन्दिर; राष्ट्रांत होऊन गेलेल्या मोठ्या लोकांचें स्मारक असलेलें गृह.

**Păn'ther**, *n.* ( पॅन्थर् )—a leopard; cougar, puma. बिब्या वाघ, चित्ता; 'प्युमा' नांवाचें जनावर. -*ess*, *n. f.*

**Păn'tile**, *n.* (पॅन्-टाइल्)—a tile for roofs with hollow surface, curved roof-tile. कोना, कोन्याचें कौल.

**Păn'tograph**, *n.* ( पॅन्-टोग्राफ् )—an instrument for copying mechanically diagrams to any scale. चित्राकृतींची-नकाशांची-लहानमोठी नक्कल करण्याचें यंत्र.

**Păn'tomime**, *n.* (पॅन्-टोमाइम् )—a dumb show; a dramatic performance for children; a dumb-show actor. केवळ हावभावयुक्त मुकें नाटक, मुग्धनाट्य; मुलांकरितां नाटक; मुग्धनाटकांतील नट. *v. t. & i.* to express (thing), express oneself, by dumb-show. हावभावांनीं जाणविणें,-अर्थ कळविणें. *Pantomi'mic*, *a.*; *Pan'tomimist*, *n.*

**Păn'try̆**, *n.* ( पॅन्-ट्रि )—a room in which provisions, &c. are kept. कोठी, कोठार, भोजनसामुग्रीची खोली. *P.-man*, butler or his assistant. कोठीवाला, स्वयंपाकी, त्याचा नोकर. [L *panis*, bread]

**Pănts**, *n. pl.* ( पट्स् )—trousers (chiefly U. S.); long tight drawers. तुमान, विजार.

**Păp**, *n.* ( पॅप् )—a nipple of the breast; soft or semi-liquid food for infants; (pl.) conical hill-tops side by side. स्तनाग्र, बोंडी; मुलांसाठीं केलेली लापशी; टेंकड्यांचीं स्तनाकार व जवळजवळ असलेलीं शिखरें.

**Papă'**, *n.* ( प-पा' )—a childish name for father. बाबा.

**Pā'pacy̆**, *n.* ( पे'पसि )—Pope's office and dignity. ख्रिस्ती धर्मगुरु पोप याची गादी किंवा हुद्दा, अधिकार, परंपरा.

**Pā'pal**, *a.* (पे'पल्)—of the Pope or his office. पोपचा, पोपच्या अधिकाराचा,-कामाचा.

**Papāverā'ceous**, *a.* (पपेव्हरे'शस्)—of the poppy family. खसखशीच्या जातीचा. *Papa'verous, a.*

**Pā'per**, *n.* (पे'पर्)—a substance made of pulp (of rags, straw, wood, &c.); set of examination questions; a newspaper; essay, memorandum; banknotes, negotiable documents e. g. bills of exchange; (sl.) free passes to theatre etc.; (pl.) documents proving person's or ship's identity, standing, etc. कागद; प्रश्नपत्रिका; वर्तमानपत्र; निबंध, लेख; बँकेच्या किंवा चलनी नोटा; हुंडी; नाटकाची वगैरे मोफत तिकिटें; शिफारस-ओळख-पत्र. *v. t.* to paste a paper (on a wall &c.); to wrap up in paper; (sl.) fill theatre by means of free passes. कागद चिकटवणें; कागदांत गुंडाळणें; मोफत तिकिटें देऊन नाटकगृह भरणें. *To commit to p.*, कागदावर लिहिणें, कागदावर पांढरें करणें. *To put pen to p.*, begin writing. लिहिण्याला सुरुवात करणें. *To send in* one's *pp.*, to resign. राजीनामा देणें. *P. currency*, कागदी चलन,-हुंड्या, नोटा. *P. war (fare)*, (वर्तमानपत्रांतून-लेखांतून-चालविलेलें) वाग्युद्ध, वादाची धुमश्चक्री. *On p.*, hypothetically, to judge from statistics, etc. कागदोपत्रीं,-आंकडे-शास्त्रावरून ठरविणें,-अजमावणें. *P. weight*, कागदांवर ठेवण्याचें वजन, -दडपण.

**Pā'perchase**, *n.* (पे'पर्चेस्)—cross-country run on scent laid by scattering small pieces of paper. कागदाच्या इकडे तिकडे टाकलेल्या तुकड्यावरून पाठलाग करणें.

**Pā'per-hanger**, *n.* (पे'पर्हँगर)—wall-paperer. भिंतीना कागद चिकटविणारा. *P.-hanging*, decorating with wall-paper; occupation of a paper-hanger. कागद चिकटवून सुशोभित करणें; कागद चिकटविण्याचा धंदा.

**Pā'per money**, *n.* (पे'पर् मनि)-bank-notes. कागदी-चलन, नोटा.

**Papier mache'**, *n.* (पॅप्ये मॅ'शे)—moulded paper pulp made into solid objects. कागदाचा लगदा करून त्याच्या बनविलेल्या वस्तू. [F,=chewed paper]

**Papīliona'ceous**, *a.* (पॅपिल्यने'शस्)—(Bot.) butterfly-shaped. फुलपांखराच्या आकाराचें.

**Papill'a**, *n.* (पॅपि'ला)—(*pl. Papill'ae*, पॅपि'लि) nipple-shaped protuberance, a small pap; small fleshy projection on plants. बोंडी, टोंक; झाडांवरील पुढें आलेला भाग, गांठ, पुटकुळ्या सारख्या पेशी. *Pap'illary, a.* papilla-shaped. बोंडीच्या आकाराचें. *Pap'illate, pap'illose, aa.* having papillae. बोंडें-टोंकें-असलेला, स्तनाग्रासारख्या बोंड्या असलेला.

**Pā'pist**, *n.* (पे'पिस्ट्)—adherent of the Pope or papal power; Roman Catholic (usu. in hostile sense). ख्रिश्चन धर्मगुरु पोप ह्यांचा अनुयायी; रोमन कॅथॉलिक. *Papis'tical, a., Pa'pistry, n.*

**Papoōse'**, *n.* (पपू'स्)—a Red-Indian child. रेड इंडिअन् मूल.

**Păpp'ÿ**, *a.* (पॅ'पि)-like pap. बिलबिलीत; स्तनाग्रासारखा.

**Papyr'us** *n.* (पपाइ'रस्)—the paper-reed; ancient writing material made from its stem. एक जातीचें लव्हाळें; भूर्जपत्र (लेख).

**Păr**, *n.* (पार्)—equal footing; average or normal value or degree. बरोबरी, समता; साधारण नेहमींची किंमत किंवा मान.' (of stocks, shares, etc.) *Above par*, मूळ किंमतीपेक्षां जास्त. *At p.*, at face-value. दर्शनी किंमतीबरोबर. *Below p.*, at a discount. दर्शनी-मूळ-किंमतीपेक्षां कमी. *On a p. with*, (शीं) बरोबरीचा. *P. of exchange*, recognized value of one country's currency in terms of another's. (निरनिराळ्या देशांतील नाण्यांचें) विनिमयाचें प्रमाण,-दर.

**Pă'rable**, *n.* (पॅ'रबल्)—a narrative used to typify some moral or spiritual truth; apologue, allegory. दाखला, दृष्टान्तरूप कथा; उपदेशात्मक गोष्ट, अन्योक्ति. *Take up* one's *p.*, (archaic) to begin to discourse. प्रवचनाला सुरुवात करणें.

**Parăb'olă**, *n.* (पॅरॅबोला)—a plane curve formed by intersection of cone with plane parallel to its side. समकक्षछिन्न, तिरकस आकृति, परवलय.

**Părabŏl'ic,-al**, *aa.* (पॅरबॉ'लिक्,-कल्)—expressed by parable (usu.-*ical*); of the nature of a parabola (usu.-*ic*). दृष्टांताचा, दृष्टांत देऊन सांगितलेला; परवलयिक, परवलयाचा.

**Părachute'**, *n.* (पॅरशू'ट्)—umbrella-like apparatus for descending safely from a height, esp. from aircraft; natural or artificial contrivance serving this purpose. (वैमानिकाची) वरून सुरक्षितपणें खालीं जमिनीवर उतरण्याची छत्रा; वैमानिकाची छत्री; अशा तऱ्हेचें स्वाभाविक वा कृत्रिम साधन.-*tism, n.,-tist, n.* छत्रीधर. [F, *parer*, to ward off, *chute*, a fall]

**Pă'raclēte**, *n.* (पॅ'रक्लीट्)—one called to aid, advocate (as title of Holy Ghost). मध्यस्थ (पवित्र आत्मा), मदतनीस, मदतगार, संबोधक.

**Parāde'**, *n.* (परे'ड्)—display, ostentation; muster of troops for inspection, ground used for this; public promenade. आव, थाटमाट,

प्रदर्शन, भपका; तपासणीकरितां सैनिकांचें संमेलन, कवाईत, कवायतीची जागा; सहल करण्याची सार्वजनिक जागा. *v. t. & i.* to assemble for parade; to display ostentatiously; to promenade. कवाइतीकरितां एकत्र जमणें; मिरवणें, प्रदर्शन करणें; रपेट करणें. *To make a p. of* (one's virtues etc.), चा ढोल मिरविणें, दिमाख दाखविणें.

**Pă'radigm**, *n.* (पॅ'रडाइम्)—a pattern; tabulated inflexions of a word. नमुना; शब्दाचीं चालवून दाखविलेलीं रूपें.

**Pă'radise**, *n.* (पॅ'रडाइस्)—garden of Eden; heaven; region or state of felicity; park in which animals are kept. नंदनवन; स्वर्ग; सुखधाम; शिकारीकरितां राखलेलें रान, पशुखाना. *Paradi'siac,-al, aa.* (पॅरडि'झिॲक्,-ॲकल्), स्वर्गलोकाचा, नंदनवनसदृश.

**Pă'radŏx**, *n.* (पॅ'रॅडॉक्स्)—a statement contrary to received opinion, seeming contradiction. असत्याभास, विरोधाभास. *Paradox'ical, a.* विपरीत वाटणारा, विरोधाभासात्मक.

**Pă'raffin**, *n.* (पॅ'रफिन्)—waxy substance distilled from shale, wood, etc.; oil of similar origin. पांढरें खनिज मेण; लांकूड, कोळसा वगैरेपासून काढलेला मेणासारखा पदार्थ; अशाच प्रकारें काढलेलें तेल.

**Pă'ragŏn**, *n.* (पॅ'रगॉन्)—a model of excellence; an excellent person or thing; perfect diamond of more than 100 carats. उत्कृष्ट नमुना; उत्कृष्ट व्यक्ति; आदर्शवस्तु; सर्वोत्कृष्ट हिरा. *v. t.* (poet.) compare (thing *with*). तुलना करणें.

**Pă'ragrăph**, *n.* (पॅ'रग्राफ्)—distinct passage in a book usually marked by indentation of first line; a brief notice; symbol (¶). कलम, परिच्छेद, छेदक; स्फुटलेख; खूण (¶). *v. t.* to write *p.* about (person, thing); arrange (article) in *pp.* (विषयीं) छेदक लिहिणें; एकाद्या विषयाची परिच्छेदांत रचना करणें.

**Pă'rakeet**, *n.* (पॅ'रकीट्)—a small long-tailed parrot. लांब पंखांचा लहानसा पोपट. Also, *Pa'roquet*, (पॅ'रोकिट्).

**Pă'rallăx**, *n.* (पॅ'रलॅक्स्)—(Astron.) apparent displacement of object due to different position of observer; angular amount of this. (पाहणाऱ्याची जागा बदलल्यामुळें भासणारा) वस्तुस्थलभेद; शीघ्रस्थान-भेद; स्थानभेदांश. *Parallac'tic, a.*

**Pă'rallel**, *a.* (पॅ'रलल्)—(of line) continuously equidistant; precisely analogous or corresponding to. समांतर; अगदीं बरोबर, सारखा. *n.* parallel position, comparison, analogy; mark (‖) of reference. समांतरस्थिति; उपमा, तुलना, सादृश्य; (‖) संदर्भाची खूण. *v. t.* to represent as similar; compare; be parallel or correspond to. सारखेपणा दाखविणें; तुलना करणें; शीं समांतर-सदृश-असणें. *P.-bars*, कसरतीसाठीं किंवा व्यायामासाठीं समांतर दांडे,-गज. *P. of latitude*, अक्षवृत्त, अक्षांशवृत्त. *To draw a p. between* (two things), (दोन वस्तूंची) तुलना करणें.

**Părallelĕp'ipĕd**, *n.* (पॅरलले'पिपेड्)—solid contained by parallelograms. समांतरभुजचौकोनांनीं बनलेला घन, चिति, समखात.

**Pă'rallelism**, *n.* (पॅ'रलेलिझम्)—being parallel, resemblance, equality of state. समांतरता, सादृश्य.

**Părallĕl'ogrăm**, *n.* (पॅरले'लोग्रॅम्)—a four-sided rectilineal figure whose opposite sides are parallel. समांतरभुज चौकोन, समांतर चतुर्भुज. *P. of forces*, (*p.* illustrating) theorem that if two forces acting at a point be represented in magnitude and direction by two sides of a *p.* their resultant is represented by diagonal drawn from that point. प्रेरणासमांतरभुज-चौकोन.

**Parăl'ogism**, *n.* (पॅरॅ'लाजिझम्)—violation of logic; false reasoning; a fallacy. सिद्धान्ताभास; अयुक्ति, चुकीची विचारसरणी; आभास.

**Pă'ralȳse**, *v. t.* (पॅ'रलाइझ्)—to affect with paralysis; to make helpless or ineffectual; to cripple. अर्धांगवायूनें त्रस्त होणें; नेभळा किंवा निरुपयोगी करणें; लंगडा करणें.

**Parăl'ysis**, *n.* (पॅरॅ'लिसिस्)—partial incapacity to move or feel, palsy; (fig.) state of utter powerlessness. पक्षघात, अर्धांगवायु; अत्यंत असहायता,-दुर्बलता.

**Părală̆t'ic**, *a.* (पॅरलि'टिक्)—of or affected with paralysis. अर्धांगवाताचा; अर्धांगवातानें पिडलेला. *n.* a paralysed person. अर्धांगवायू झालेला मनुष्य.

**Păramătt'a**, *n.* (पॅरमॅ'टा)—dress-fabric of merino and cotton. एका जातीचें कोराचें कापड. [f. *P.*, town in N. S. Wales]

**Pă'ramount**, *a.* (पॅ'रमाउन्ट्)—possessing the highest title, eminent, supreme; superior. प्रमुख; श्रेष्ठ, वरचढ.

**Pă'ramour**, *n.* (पॅ'रमुअर्)—an illcit lover. जार, जारिणी.

**Păr'ăng**, *n.* (पा'रंग्)—large heavy sheath-knife used by Malays as weapon, etc. मोठी जड सुरी, सुरा.

**Pă'rapĕt,** *n.* ( पॅ'रपिट् )—a low wall at the edge (of a roof, balcony, bridge, &c.) to prevent a fall; (Mil.) mound along front of trench. उंच तट, वरंडा, धक्का; खंदकाच्या पुढचा संरक्षक उंचवठा,-उंच बांध. *Pa'rapeted, a.*

**Pă'rapherna''liă,** *n. pl.* ( पॅरफर्ने''लिअ )—personal belongings; accessories, appendages, trappings; (formerly) articles of personal property that law allowed married women to keep and treat as her own. स्वतःच्या मालकीच्या वस्तू; उपकरणसामग्री; स्त्रीधन.

**Pă'raphrāse,** *n.* ( पॅ'रफ्रेझ् )—restatement of the sense of a passage in other words, a loose or free translation. अनुवाद. तोच अर्थ दुसऱ्या शब्दांत सांगणें. *v. t.* to render in paraphrase. चा अनुवाद करणें. *Paraphras'tic, a.* अनुवादात्मक, अनुवादरूपानें.

**Pă'rasīte,** *n.* ( पॅ'रसाइट् )—interested hanger-on; sycophant; animal or plant living in or on another. हांजी हांजी करणारा; आर्जवी, खुशामत्या; परान्नपुष्ट, बांडगूळ. *Parasit'ic, a.*; *Pa'rasitism, n.*

**Părasŏl',** *n.* ( पॅरसॉ'ल् )—a small umbrella used by ladies to keep off the sun's rays. उन्हाची लहान छत्री.

**Părată̆x'is,** *n.* ( पॅरटॅ'क्सिस् )—use of separate sentences, etc. one after another without grammatical subordination. व्याकरणदृष्ट्या अगदीं स्वतंत्र अशीं सुटीं सुटीं वाक्यें योजणें,-वापरणें.

**Părată̆'phoid,** *n.* ( पॅरटा'यफॉइड् )—kinds of fever distinguishable from typhoid only by bacteriological examination. केवळ जंतुभेदांमुळें टायफॉइडहून वेगळा असा समजला जाणारा ताप,-तापाच्या जाति.

**Pärb'oil,** *v. t.* ( पा'र्-बॉइल् )—to boil in part, to scald the surface of in boiling water; to scorch. अर्धकच्चें शिजविणें; पोळणें, होरपळणें.

**Pärb'ŭckle,** *n.* ( पा'र्बकल् )—a rope for raising or lowering casks, etc. पिंपें वर उचलणें,-खालीं सोडणें,-यासाठीं दोर,-दोरखंड. *v. t.* to raise (up) or lower (down) thus. अशा रीतीनें वर उचलणें किंवा खालीं उतरणें.

**Pär'cel,** *n.* ( पा'र्सेल् )—a package (of goods, &c.); a portion; a piece of land, esp. as part of estate; (Commerc.) quantity dealt with in one transaction. गठ्ठा, पुडकें; भाग, अंश; जमिनीचा तुकडा; दळ, दळा, फाळा; एकाच वेळीं सौदा केलेली वस्तु,-परिमाण, भाग. *v. t.* to divide (*out*) into portions; (Naut.) to cover with canvas strips. विभाग करणें, वाढणें, विभागणें; कापडाच्या तुकड्यांनीं,-किंतानानें,-गुंडाळणें. *adv.* (archaic) partly. अंशतः, कांहींसा. *Part & parcel,* आवश्यक अंग,-भाग. *Parcel post.* पोष्टाचें बंगी-खातें. *P. blind,-drunk,* कांहींसा आंधळा,-झिंगलेला. *P.-gilt,* कांहीं भागाला मुलामा दिलेला.

**Pär'cener,** *n.* ( पा'र्सेनर् )—a joint heir. समाईक वारस.

**Pär'cenary̆,** *n.* ( पा'र्सिनरि )—joint-heirship. समाईक वारसा.

**Pärch,** *v. t. & i.* ( पार्च् )—to dry by exposure to heat; to roast; to make dry. खडखडीत वाळणें; भाजणें; वाळवणें.

**Pärch'ment,** *n.* ( पा'र्च्-मेन्ट् )—the skin of a sheep or goat dressed and prepared for writing on. चर्मपट, चर्मपत्र.

**Pärd,** *n.* ( पार्ड् )—1. (arch.) leopard. चित्ता वाघ. 2. (sl. esp. U. S.) partner. भागीदार.

**Pärd'on,** *n.* ( पा'र्डन् )—forgiveness; remission of punishment. क्षमा; माफी. *v. t.* to forgive; to abstain from punishing. क्षमा करणें; माफ करणें. *General p.,* सार्वत्रिक माफी, सरसकट क्षमा,-माफी. *(I beg your) p.,* (शिष्टाचाराबद्दल) क्षमा मागणें, दिलगिरी व्यक्त करणें, दुसऱ्याचें म्हणणें न समजलें किंवा न ऐकूं आलें असतां दिलगिरी व्यक्त करणें.

**Pär'donable,** *a.* ( पा'र्डनेबल् )—easily pardoned or or excused, venial, excusable. माफ करण्याजोगा, क्षम्य.

**Pāre,** *v. t* ( पेअर् )—to trim or reduce by cutting away the edge or surface *of*; to whittle away, to cut away little by little; (fig. (*p. away,-down*) to diminish little by little. तासणें, सोलणें, ची साल काढणें; सुरीनें कापणें; छाटाछाट करणें, हळूहळू संपुष्टांत आणणें. *To p. (nails etc.) to the quick,* (नख वगैरे) जिव्हाळीं लागेपर्यंत कापणें,-छाटून काढणें.

**Pār'ing,** *n.* ( पे'अरिंग् )—that pared off; the rind. कापून-सोलून-काढलेली वस्तु; साल, त्वचा.

**Părĕgŏ'ric,** *n.* ( पॅरिगॉ'रिक् )—tincture of opium. अफूचा अर्क (दुःखशामक औषध).

**Pār'ent,** *n.* ( पे'अरन्ट् )—father or mother; forefather; source, origin. आई किंवा बाप; वाडवडील; उगमस्थान, मूळ. *Par'enthood, n.*; *Paren'tal, a.*

**Pār'entage,** *n.* ( पे'रन्टेज् )—lineage; condition with respect to the rank of parents. कुळी, वंश; उत्पत्ति.

**Parĕn'thĕsis,** *n.* ( पॅरे'न्थिसिस् )—(*pl.-theses*), a word, clause, or sentence inserted into a passage independently of the grammatical sequence; (sing. or pl.) round brackets ( )

uesd for this; (fig.) interlude, interval. कुंडलींतलें वाक्य, निक्षिप्त वाक्य, अनन्वित वाक्य, उपवाक्य; वर्तुळ कंस ( ); मधला वेळ, अवकाश, मधली सुटी. *Parenthet'ic, a.* inserted as parenthesis. कंसांतला, निक्षिप्त; मधला. [ Gk *para*, beside; *en*, in; & *thesis*, placing]

**Parĕn'thĕsize,** *v. t.* (पॅरे'न्‌थिसाइझ्)—to insert (words etc.) as parenthesis; put between marks of parenthesis. निक्षिप्त शब्द-वाक्य-योजणें; कंसांत घालणें.

**Pär ĕx'cellence,** *adv.* (पार् ए'क्सलान्स्)-by virtue of special excellence. उत्कृष्टपणामुळें, सर्वोत्कृष्टपणें. Mayfair was the fashionable quarter *p. e.*, 'मेफेअर' हा लंडनशहराचा सर्वोत्कृष्टपणें शिष्टमान्य -रंगेल-असा विभाग होता.

**Pär'gĕt,** *v. t. & n.* (पा'र्जिट्)—rough-cast; plaster. (भिंतींना) गिलावा, लेप (देणें).

**Parhē'lion,** *n.* (पर्ही'ल्यॉन्)—(*pl.-ia*), bright spot in solar halo. सूर्याभोंवतालचें प्रकाशवर्तुळ, सूर्याभास.

**Pa'rīah,** *n.* (पॅ'रिआ)—an Indian of a low or no caste; a social outcaste. अतिशूद्र; जातिबहिष्कृत.-*dog*, रस्त्यांतला भटक्या बिनवारसी कुत्रा. *P.-kite*, the scavenger-kite of India. घार, गिधाड.

**Pār'ian,** *a.* (पे'अरिअन्)—of the island of Paros. पेरॉस बेटाचा,-बेटांत सांपडणारा. *n.* kind of fine white porcelain. चिनीमातीचीं उंची पांढरीं भांडीं.

**Parī'ĕtal,** *a.* (परा'यृइटल्)—of the wall of the body or any of its cavities; (Bot.) of the wall of a hollow structure, etc. शरीराच्या भिंतीसारख्या भागाचा किंवा त्यांतील खोलगट भागांचा; पार्श्विक, बाजूकडचा.

**Pāri mūtūĕl',** *n.* (पॅरी म्यूट्यूए'ल्)-form of betting in which those who have staked on winning horse divide the stakes on the rest. (घोड्याच्या शर्यतींत) जिंकणाऱ्या घोड्यावर जे पैसे लावतात त्यांनीं बाकीच्यांवर तो वांटून घेणें, घोड्याच्या पैजेची परस्पर-विभागणी, हा शर्यतींत पैसे लावण्याचा प्रकार. [F=mutual stake]

**Pār'i pass'ū,** *adv.* (पे'अराय् पॅ'स्यू)-with simultaneous progress. बरोबरच, एकसमयावच्छेदेंकरून.[L]

**Pă'rĭsh,** *n.* (पॅ'रिश्)—an ecclesiastical division having its own church and clergyman; a poor-law district; inhabitants of parish. पाद्रीच्या वृत्तीचा प्रदेश; परगणा; परगण्यांतील रहिवासी. *Parish'ioner, n.* inhabitant of parish. पाद्रीच्या प्रदेशांत राहणारा. *To go on the p.*, to receive parochial relief. पॅरिशची धर्मादाय मदत घेणें. *P. council*, local administrative body in rural civil *p.* पॅरिशचें धर्मादाय-व्यवस्थापक मंडळ. *P. register*, नामकरणविधी, लग्नें, मृत्यु यांची नोंदणी असलेलें पुस्तक.

**Pă'rĭtў,** *n.* (पॅ'रिटि)—being on a par; equivalence; parallelism. सारखा असणें; बरोबरी; सारखेपणा. *P. of reasoning*, विचारसादृश्य.

**Pärk,** *n.* (पार्क्)—a large enclosed piece of ground attached to country house or devoted to public use; artillery, space in camp occupied by it; place assigned for storing motor-cars, aeroplanes, etc. घराभोंवतालचा किंवा सार्वजनिक चौक किंवा पटांगण, मैदान, बाग; युद्ध-साधनें, तोफखाना, तोफखान्याची जागा; मोटारी, विमानें यांचा सांठा करण्याची जागा, मोटारी वगैरे तात्पुरत्या उभें करण्याची जागा. *v. t.* to enclose as a park; arrange compactly in place assigned; (Mil.) arrange (artillery etc.) in a park. पटांगण म्हणून जागा राखून ठेवणें; ठराविक जागेंत एकमेकांलगत उभें करणें, ठेवणें, रचणें; तोफखाना जोडून उभा करणें. *Oyster p.*, enclosed area for *o.*-breeding, overflowed by sea at high tide. कालवें-शिंपले वाढविण्याची जागा.

**Pärk'ў,** *a.* (पा'र्कि)—(*sl.*) chilly (of air, morning, etc). सरदावलेली, कुंद.

**Pär'lance,** *n.* (पा'र्लन्स्)—way of speaking. बोलणें, संभाषण, बोलीचाली, बोलण्याची पद्धत. *In common, legal,* etc. *p.*, सामान्य,-कायदे-शीर,-भाषेंत, संभाषणांत.

**Pärl'ey,** *n.* (पा'र्ले)—a meeting between representatives of opposed forces to discuss terms, mutual discourse. विरुद्धपक्षांतील प्रतिनिधींची वाटाघाटीकरितां सभा, परस्पर विचारविनिमय. *v. t.* to hold discussion on terms, speak (*esp.* foreign language.) तहाचें बोलणें करणें, वाटाघाट करणें; (परकी भाषा) बोलणें.

**Pärl'iament,** *n.* (पा'र्लमेन्ट्)—a deliberative body consisting of House of Commons and House of Lords and forming with the sovereign the legislature of the United Kingdom; any legislative assembly. इंग्लंडांतील राज्यकारभार पाहणारी लोकप्रतिनिधि सभा, पार्लमेन्ट; कायदेमंडळ. -*ar'ian*, लोकप्रतिनिधिसभेंतील कुशल वक्ता. -*ary, a.* कायदेमंडळाचा; कायदेमंडळानें-पार्लमेंटनें पास केलेला,-ठरविलेला.

**Pärl'our,** *n.* (पा'र्लर्)—a sitting-room in a small house, a drawing-room; a private room in an inn. बैठकीची खोली; खानावळींतील खाजगी खोली. *P.-maid*, maid waiting at table. जेवणें वाढणारी दासी. *P.-car*, (U. S.) luxuriously fitted railway carriage ऐषआरामयुक्त रेल्वेचा डबा.

**Pärl'ous**, *a.* ( पार्लस् )—hard to escape from or deal with ; embarassing ; surprisingly clever. सुटका होण्यास कठीण असें, धोक्याचें ; गोंधळून सोडणारें ; कल्पनातीत हुशार. *adv.* extremely. अतिशय, फारच.

**Pärmesăn'**, *n.* ( पार्मिझॅन् )—hard cheese of the kind made at Parma. ( पार्मा येथें बनते तशी ) कठीण,-टणक,-मलई, साय, खवा.

**Pärnăss'ŭs**, *n.* ( पार्नॅसस् )—mountain in central Greece, anciently sacred to Muses ; the realm of poetry ; poetic fame. ग्रीक पुराणांत वर्णिलेला, वाग्देवतेचें अधिष्ठान, असा मध्य ग्रीस देशांतील पर्वत ; कवितेचें राज्य ; कवियश, कवित्वाची कीर्ति.

**Parō'chĭal**, *a.* ( परोकिअल् )—of a or the parish ; of narrow range, merely local. ख्रिस्ती पाद्र्याच्या प्रदेशाचा ; संकुचित, अनुदार, केवळ स्थानिक. *-ism*, *n.*

**Pă'rodў**, *n.* ( पॅरॉडि )—composition in which an author's characteristics are ridiculed by imitation ; travesty. विडंबन काव्य,-लेख ; विनोदार्थ अनुकरणकाव्य ; उपहासविषय. *v. t.* to make ridiculous by imitation. विडंबन करून उपहास करणें. *Pa'rodist*, *n.* विडंबनकाव्यलेखक, विडंबनें लिहिणारा.

**Parōle**, *n.* ( पॅरोल् )—a word of honour engaging giver to abstain from attempting escape or from resuming hostilities ; ( Mil. ) pass-word. प्रतिज्ञाशब्द, अभिवचन ; परवलीचा शब्द, परवल, इषारा, संकेत ( शब्द ). *v. t.* to put ( prisoner ) on parole. अभिवचन घेऊन मुक्त करणें,-सोडणें. *On p.*, liberated on parole. प्रतिज्ञेवर मुक्त केलेला,-सोडलेला.

**Păronomā'sia**, *n.* ( पॅरानामेझिआ )—a play on words of similar but different sense ; a pun. शब्दश्लेष ; श्लेष.

**Pă'roquet**, *n.* ( पॅरॉकिट )—See *Parakeet.*

**Parŏt'id**, *a.* ( परॉटिड् )—situated near the ear. कानाजवळ असलेला, कर्णोपवर्ती. *n.* a parotid gland. कर्णोपवर्ती पिंड,-गांठ, कर्णमूल. [Gk *para*, near ; *otos*, ear ]

**Pă'roxўsm**, *n.* ( पॅरॉक्सिझम् )—a sudden violent access ( of pain, rage, &c. ). चढ, उच्चल, झटकारा, झटका.*-al*, *a.*

**Pärq'uet**, *n.* ( पार्किट् )—flooring of wooden blocks arranged in a pattern ; groundfloor of theatre auditorium, esp. from front of stage to beneath gallery. नक्षीदार, लांकडी, तक्तपोशी,-फरसबंदी ; नाटक गृहांतील ' पीट '. *v. t.* to lay with parquet. लांकडी तक्तपोशी घालणें,-करणें.*-ing*,*-ry*, *nn.* parquet-work. लांकडी तक्तपोशी,-फरसबंदीचें काम.

**Pärr**, *n.* ( पार् )—a young salmon. सामन जातीचा लहान मासा.

**Pă'rricīde**, *n.* ( पॅरिसाइड् )—a murder or murderer of father, parent or person entitled to veneration ; person guilty of treason against his country. मातृवध, पितृवध, गुरुहत्या ; वडील नातेवाइकांची हत्या ( करणारा ) ; मातृहत्या किंवा पितृहत्या करणारा ; स्वदेशद्रोही मनुष्य. *Parrici'dal*, *a.*

**Pă'rrot**, *n.* ( पॅरट् )—kinds of bird with a hooked bill ; an unintelligent imitator or chatterer. राघू , पोपट ; अर्थ किंवा स्वारस्य न समजतां घोकंपट्टी करणारा. *v. t.* to repeat ( words ) mechanically, drill ( ( person ) to do this. पोपटपंची करणें, पोपटाप्रमाणें ( एकाद्याला) पढविणें. *P. fish*, kinds with brilliant colouring or mouth like parrot's bill. चकचकीत रंगाचें,-पोपटाच्या चोंचीसारखें, तोंड असलेले मासे.

**Pă'rrў**, *v. t.* ( पॅरि )—to avoid, to evade, to ward off (by interposing an arm, sword, &c.). चुकवणें, निवारणें. *n.* act of parrying. चुकवणें, टाळणें, वारणें.

**Pärse**, *v. t.* ( पार्झ् )—to describe ( a word ), to analyse ( a sentence ) in terms of grammar. ग्रंथावरून व्याकरण सांगणें,-करणें.

**Pärsee'**, *n.* ( पार्सी )—Indian adherent of Zoroastrianism ; language of Perria under Sassanian kings. पारशी मनुष्य ; फारसी भाषा. *-ism*, *n.* पारशी लोकांचा धर्म व त्यांच्या रीतिभाति.

**Pärs'ėval**, *n.* ( पार्सिव्हल् )—type of non-rigid German airship. एक जातीचें जर्मन विमान. [ Inventor's name ]

**Pärs'ĭmonў**, *n.* ( पार्सिमनि )—avoidance of waste ; economy, frugality ; stinginess. विनाकारण खर्च न करणें ; काटकसर, मितव्यय ; कंजूषपणा. *Law of parsimony*, law that no more causes or forces should be assumed than are necessary to account for the facts. एकादी गोष्ट सिद्ध करण्याकरितां अनावश्यक कारणें वगैरे गृहीत न धरणें हा, कारणपरंपरेच्या काटकसरीचा नियम. *Parsimo'nious*, *a.* चिक्कू, काटकसरी, कृपण.

**Pärs'ley**, *n.* ( पार्स्लि )—herb used for seasoning and garnishing. एक झुडूप, वनस्पति, अजमोदा.

**Pars'nĭp**, *n.* ( पार्स्निप् )—plant with yellow root cooked for food. रानटी गाजराच्या जातीची

वनस्पति. *Fine words butter no pp.*, शाब्दिक बडबड व्यर्थ होय ; फुकट बढाया काय कामाच्या.

**Pärs'on**, *n.* (पा'र्सन्)—the clergyman of a parish ; a person who is in orders ; (colloq.) any clergyman. धर्मोपदेशक ; पाद्री. *Parson-bird*, न्यूझीलंडमधील काळ्या पिसाऱ्याचा व पांढऱ्या मानेचा पक्षी. *P.'s nose*, rump of fowl etc. कोंबड्याच्या पिसाऱ्याचें टोंक.

**Pärs'onage**, *n.* (पा'र्सनिज्)—a parson's house. धर्मोपदेशकाचें घर.

**Pärt**, *n.* (पार्ट्)—some but not all ; share, allotted portion ; assigned character or role ; region, direction, way ; side in dispute or dealing ; one of the melodies making up the harmony of a concerted piece ; (*pl.*) ability. खंड, तुकडा, अंश ; भाग, अंगविभाग, वाट्यास आलेलें काम ; सोंग, भूमिका ; प्रदेश, दिशा, मार्ग ; पक्ष, बाजू ; गाण्यांतील,-पद्यांतील,-प्रत्येक सूर ; (अने०) बुद्धि, लायकी. *v. t. & i.* to divide into parts ; to separate (friends &c.) ; to quit one another's company, to bid farewell ; to distribute in share ; (*sl.*) to pay money. विभाग करणें ; वेगळा करणें, (केंसाचा) भांग पाडणें ; संगत सोडणें, निरोप देणें ; वांटून देणें ; पैसे देणें. *P. -owner*, sharer of ownership. भागीदार. *P. -song*, song for three or more voice-parts. तीन किंवा त्यांहून जास्त सुरांतलें गाणें. *I have done my part*,-my duty. माझें कर्तव्य मी केलें. *To play a noble p.*, to behave nobly. मोठेपणानें, -थोरपणानें वागणें. *To play a p.*, act deceitfully. फसवेगिरी करणें, खोटेपणानें वागणें. *P. & parcel*, essential *p.*, आवश्यक विभाग,-गोष्ट. *Parts of speech*, शब्दांच्या जाति. *For the most part*, बहुतांशीं. *To take p.*, assist, भाग घेणें, मदत करणें. *To take the p. of*, support, back up. साह्य करणें, ची बाजू घेणें. *For my p.*, माझ्याविषयीं म्हणाल तर. *In p.*, partly. अंशतः, कांहींसा. *To take* (words, action) *in good p.*, not be offended. चा राग न मानणें. *To p. company (with)*, ची संगत सोडणें. *Let us p. friends*, आपण एकमेकांची संगत सोडूंया. *To p. from* or *with*, to say good-bye to. चो रजा घेणें,-निरोप घेणें. *To p. with*, सोडून देणें.

**Pärtake'**, *v. i.* (पार्टे'क्)—to take a share of or with, to have a part in, to share ; to eat or drink some of ; have something of the character of. भाग-वांटा-घेणें, भागीदार होणें ; चा कांहीं भाग-अंश-खाणें,-घेणें ; चा कांहींसा गुण, -स्वभावधर्म-असणें.

**Pärterre'**, *n.* (पार्टे'अर्)—space filled with flower-beds and the paths between them ; ground floor of theatre auditorium, esp. part beneath gallery. फुलबाग ; गॅलरीखालचा नाटकगृहाचा भाग,-'पीट'.

**Pärti'**, *n.* (पार्टी')—person regarded eligible or in specified light in the marriage market. लग्नाच्या बाबतींतील लायक-नालायक असा गणलेला इसम. *P. pris*, (पार्टी प्री), preconceived view, bias. पूर्वग्रह, आगाऊ बनलेलें मत. [F]

**Pärt'ial**, *a.* (पा'र्शल्)—biased in favour of one side ; not total or complete. पक्षपातीपणाचा, एकतर्फी, पक्षपात करणारा ; अपूर्ण. *A p. success*, अपुरें,-कांहींसें,-यश. *P. eclipse*, खंडग्रस्त (खग्रास नव्हे असें) ग्रहण.*-lly*, *adv.*

**Pärtiăl'ity**, *n.* (पार्शिॲ'लिटि)-unfair bias, undue favour shown ; liking for. तरफदारी, पक्षपात ; फाजील आग्रह.

**Pärti'cipant**, *n.* (पार्टि'सिपन्ट्)—one who shares. भागीदार.

**Pärti'cipāte**, *v. t. & i.* (पार्टि'सिपेट्)—to share in by common action ; to have a share in. वांटा,-हिस्सा,-भाग घेणें ; भाग असणें.

**Pärt'iciple**, *n.* (पा'र्टि-सिपल्)—an adjective formed by inflexion from a verb. कृदंत, धातुसाधित विशेषण. *Particip'ial*, *a.*

**Pärt'icle**, *n.* (पा'र्टिकल्)—minute portion of a matter ; an uninflected word. परमाणु, कणी, कण, लेश ; अव्यय.

**Pärt'icoloured**, *a.* (पा'र्टिकलर्ड्)-differently coloured ; variegated, motley. भिन्न रंगाचा ; रंगीबेरंगी ; चित्रविचित्र.

**Partic'ūlar**, *a.* (पर्टि'क्यूलर्)—relating to one as distinguished from others ; individual ; peculiar ; scrupulously exact ; fastidious. वैयक्तिक ; विशेष, विशिष्ट, विवक्षित ; सूक्ष्मदृष्टि, चोकस, बारीकसारीक पाहणारा, व्यवस्थित ; खोडकर, चोखंदळ. *n.* a detail, an item ; (*pl.*) detailed account. प्रकरण, तपशील, बाबत, गोष्ट, रकम, कलम ; (अने०) तपशीलवार हकीगत. *In p.*, especially. विशेषेंकरून.

**Parti'cūlarism**, *n.* (पर्टि'क्युलरिझम्)—exclusive devotion to a party, sect, etc.; principle of leaving political independence to each state in an empire, etc. एकादा पक्ष, बाजू, तत्त्व यांविषयीं अखंड निष्ठा ; साम्राज्यांतर्गत स्वायत्तता.

**Particūlă'rity**, *n.* (पर्टिक्युलॅ'रिटि)—fullness or minuteness of detail. विस्तार, तपशील, विशेष गोष्ट, चोखंदळपणा.

**Partic'ūlarize**, *v. t. & i.* (पर्टि'क्यूलराइझ्)—to mention one by one ; to go into particulars, to enumerate in detail. एकापाठीमागून एक

सांगणें; तपशीलवार सांगणें, विशेष वर्णन करणें, निरूपण करणें.-*zation*, *n*.

**Partic'ūlarly**, *adv*. (पर्टि'क्यूलर्लि)—very; to an especial extent; in detail. अतिशय; विशेषें-करून; सविस्तर.

**Pärt'ing**, *n*. (पा'र्टिंग्)—leave-taking; division; dividing line of combed hair. निरोप घेणें, रजा घेणें; वांटणें, वांटणी, वेगळा करणें; केसांचा भांग. *P. injunctions*, जातांना केलेल्या सूचना. *P. of the ways*, point at which road divides into two or more, (fig.) of choice between courses. निरनिराळे रस्ते फुटण्याचें ठिकाण, तिठा; निरनिराळ्या मार्गांपैकीं सोईस्कर मार्ग-दिशा-पत्करणें.

**Pärtisăn**, *n*. (पार्टिझॅ'न्)—an adherent of a party or side or cause, a party man. तरफेचा, स्वपक्षाभिमानी, पक्षपाती, सार्थीदार, जोडीदार. *Partisan'ship*, *n*. strong party spirit. कैवार, जोरकस स्वपक्षाभिमान. *In partisan spirit*, पक्षाभिनिवेशानें, कैवार घेऊन.

**Pärt'isan**, *n*. (पा'र्टिझन्)—(hist.) kind of halberd. भाला, परशुयुक्त भाला.

**Pärti'tion**, *n*. (पार्टि'शन्)—a division into parts; a structure effecting a division. वांटा, वांटणी, विभागणी, विभाग; पडदा, कूड. *v. t.* to divide into distinct parts. निरनिराळे विभाग करणें.-*ed*, *a*.

**Pärt'itive**, *a*. (पा'र्टिटिव्ह्)—(Gram.) denoting partition or part. विभागदर्शक. *n*. a partitive word. (समुदायाचा) विभागदर्शक,-अंशदर्शक, (शब्द).

**Pärt'lў**, *adv*. (पा'र्ट्-लि)—in part; in some measure or degree; not wholly. थोडासा; काहीं अंशीं; अंशतः

**Pärt'ner**, *n*. (पा'र्ट्-नर्)—a sharer; one who shares in a business; either of a pair, a husband or wife; (Naut. *pl.*) timber framework round hole in deck through which mast, pump, etc. passes. भाग घेणारा; भागीदार; जोडीदार, सहचर, नवरा किंवा बायको; गलबताच्या मजल्यावरील भोंकांभोंवतीं असलेली लांकडी चैठक (तीमधून डोलकाठी वगैरे बसविलेली असते). *v. t.* to associate as partners; to be partner of. भागीदार म्हणून एकत्र येणें; चा भागीदार होणें. *Working p.*, प्रत्यक्ष काम करणारा वांटेकरी,-भागीदार. *Sleeping p.*, भांडवल पुरविणारा (पण प्रत्यक्ष काम न करणारा) भागीदार. *Part'nership*, *n*. भागीदारी, भागी, पाती; (गणितांत) सरकत वांटणी; भागीचा व्यवहार.

**Pärt'ridge**, *n*. (पा'र्ट्-रिज्)—kinds of well-known game-bird, its flesh. तितर, कवडा, त्या पक्ष्याचें मांस.

**Pärtür'ient**, *a*. (पार्टयू'रिएन्ट्)—about to give birth, bringing forth young; (often fig. of the mind, etc). प्रसवोन्मुख, वाळंत होणारी, प्रसवणारी; नवविचार प्रसवणारें (मन इ०).

**Pärtüri'tion**, *n*. (पार्ट्यू-रि'शन्)—child-birth. प्रसव, प्रसूति.

**Pär'tў**, *n*. (पा'र्टि)—a body of persons united in a cause or in opposition to another body; a body of persons travelling or engaged together; a social reception; a person consenting or contributing to an affair; either side in a lawsuit, a contract or other transaction; (vulg.) person. फळी, पक्ष; टोळी, तुकडी, जमाव, मंडळी, आमंत्रित लोक; मेजवानी; भागीदार, सहकारी; वादी, पक्षकार; असामी, व्यक्ति, माणूस. *a*. (herald.) divided into parts of different tinctures. निरनिराळ्या छटा असलेले भाग केलेला. *Garden party*, उद्यान-भोजनसमारंभ, उद्यानोपहार. *P. coloured*, चित्रविचित्र. *P. spirit*, पक्षाभिमान, *P. wall*, शेजारच्या दोन घरांमधील भिंत.

**Pärv'enu**, *n*. (पा'र्व्हेनू)—a person who has newly risen from obscurity to eminence or notice; an upstart. एकदम प्रसिद्धीस आलेला मनुष्य; उपटसुंभ्या. [F]

**Pärv'is**, *n*. (पा'र्व्हिस्)—enclosed area or court in front of cathedral, etc. ख्रिस्ती देवळापुढील कुंपण घातलेली जागा किंवा अंगण.

**Pas**, *n*. (पा)—precedence, (esp. *dispute, give, take, the pas*; a step in dancing. पहिला मान,-हक्क, पुढें जाणें, अग्रेसरत्व; नाचांतील पद,-पाऊल. [F, =step]

**Păsc'hal**, *a*. (पॅ'स्कल्)—of the Passover; of Easter. (यहुदी लोकांचा) 'वलांडण्याच्या' सणाचा; 'ईस्टर' सणाचा.

**Pasha**, *n*. (पा'शा)—Turkish or Egyptian officer of high rank. तुर्की किंवा ईजिप्तमधील प्रांताधिपति. *Pa'shalic*, *n*. pasha's district or jurisdiction. पाशाच्या अंमलाखालील प्रांत,-जिल्हा, किंवा त्याचा अंमल,-अधिकार. *Pasha of three, two, tails, of one tail*, of first, second, third grade. पहिल्या, दुसऱ्या, तिसऱ्या प्रतीचा पाशा.

**Păsque'flower**, *n*. (पॅ'स्क्फ्लॉवर्)—kind of anemone with bell-shaped purple flowers. एक फुलझाड.

**Păsquĭnāde'**, *n*. (पॅस्क्विने'ड्)—a lampoon. निंदाव्यंजक लेख.

**Păss**, *v. t. & i.* (पास्)—(*pa. p. passed*, or as adj. *past*), to move onward, to proceed; to be current; to change into; to die; to go by; to come to an end; to be accepted as adequate; to be sanctioned; to satisfy an

examiner; to happen; to go across; to spend, to percolate; to outstrip; to surpass; to hand round, to give currency to; to utter. सरकणें, पुढें जाणें; चालू असणें; बदलणें; मरणें; जवळून जाणें; शेवट होणें; पसंत पडणें, मान्य करणें, मंजूर होणें; परीक्षा उतरणें; घडणें; पलीकडे जाणें; चालविणें; गळणें, पाझरणें; मागें टाकणें; पुढें जाणें, वर ताण करणें; पुढल्या इसमाला-पुढें-देणें; प्रसिद्धी देणें,-करणें; उच्चारणें, म्हणणें, आवाज करणें. *n.* passing, esp. of examination; a state, critical position; a written permission or ticket or order; a narrow passage through mountains; a thrust in fencing; (Footb.) passing of ball from one player to another. परीक्षा उतरणें; अवस्था, कठीण स्थिति; लेखी परवाना; चिंचोळी वाट, खिंड, घाट; (दांडपट्ट्याच्या खेळांतला) वार; चेंडू सरकवणें,-दुसऱ्या खेळाडूकडे पाठविणें (पायानें). *To come to pass*, घडून येणें. *To p. out*, (sl.) lose consciousness. बेशुद्ध होणें. *To p. the buck*, (sl.) shift responsibility. जबाबदारी टाळणें,-दुसऱ्यावर टाकणें. *To p. up*, (sl.) let go by. सोडून देणें. *To p. by*, जवळून जाणें. *To p. for*, be accepted as. समजला जाणें, मानला जाणें. *To p. by the name of*, च्या नांवानें ओळखला जाणें. *Has passed the chair*, has been chairman, president, mayor etc. अध्यक्ष वगैरे झाला आहे. *To pass away*, die, come to an end. मरणें, मरण पावणें, शेवट होणें. *To p. off*, (इंद्रियांची शक्ती) लुप्त होणें; (सभा वगैरे) शांतपणें-कटकटीशिवाय-पार पडणें. *To p. over*, omit, make no remark upon. गाळणें, वर मत वगैरे न देणें. *To p. through*, experience. अनुभवणें. *Freepass*, मोफत परवाना,-तिकीट. *P.-book*, बँकेंत वगैरे रकमा ठेवणाऱ्यांची हिशेबाची चोपडी,-वही. *P. key*, खाजगी किल्ली, सर्व कुलपांना लागणारी सामान्य किल्ली. *Pa'ssman*, विश्वविद्यालयाच्या परीक्षेंत तिसऱ्या वर्गाचे गुण मिळवून पदवी घेणारा. *Pass'word*, खुणेचा शब्द, परवलीचा शब्द.

**Pä'ssable**, *a.* (पा'सेबल्) — pretty, fair, tolerable, fairly good; (of river, &c.) that can be crossed. चालण्याजोगा, साधारण बरा; तरून जाण्याजोगी (नदी वगैरे).

**Păss'age**, *n.* (पॅ'सिज्) — passing, transit; crossing or being conveyed from port to port; a corridor; part of a speech or literary work; (*pl.*) what passes between two persons mutually, interchange of confidences, etc. रहदारी, जाणें, गमन, मार्ग, अतिक्रमण, उल्लंघन; एका बंदरांतून दुसऱ्या बंदरांत जाणें किंवा नेणें, मोकळीक, जाण्यायेण्याची परवानगी; मधून जाण्याचा रस्ता, बोळ, चिळण, सज्जा; भाषणांतील किंवा एकाद्या ग्रंथांतील उतारा; परस्पर संभाषण, पत्रव्यवहार वगैरे; विश्वस्तपत्रें. *v. i. & t.* (of horse or rider) move sideways, by pressure of rein or horse's neck & of rider's leg on opposite side; make horse do this. आजूबाजूला सरकणें, वळणें; घोड्याला वळवणें. *Bird of p.*, भ्रमण-देशांतर-करणारा (पक्षी, इसम). *P. of or at arms*, fight (often fig.). सामना, (समोरासमोर) भेट.

**Păss'ant**, *a.* (पॅ'सन्ट्) — (Herald.) shown sideways as walking past. बाजूनें-जवळून-जात आहे असा तिरपा दाखविलेला.

**Pa'sse**, *a.* (पॅ'से) — (*fem.-ee*), past his, her, or its prime; gone off; out of date. उतरलेला खप्पड, जरठ; होऊन गेलेला, मागचा, पुरातन, प्राचीन. [F]

**Păss'enger**, *n.* (पॅ'सिंजर्) — a traveller by public conveyance, a wayfarer. वाटसरू, उतारू, प्रवासी. *Foot p.*, पायीं प्रवास करणारा, पादचारी. *P.-pigeon*, लांबलांबचा प्रवास करणारें उत्तर अमेरिकेंतील रानटी कबुतर.

**Pä'sser, Pä'sser-by̆**, *nn.* (पा'सर्, पा'सर्-बाय्) — one who happens to be passing, a passenger. जवळून जाणारा, प्रवासी.

**Păss'erine**, *a.* (पॅ'सराइन्) — of the sparrow kind. चिमणीच्या जातीचा.

**Păss'im**, *adv.* (पॅ'सिम्) — every here and there; all over the place. इकडे तिकडे, सगळीकडे. *This occurs in Milton p.*, (हे विचार वगैरे) मिल्टनच्या काव्यांत जिकडे तिकडे आढळतात. [L, = scatteredly, *pandere pass*, spread]

**Pä'ssing**, *n.* (पा'सिंग्) — act of moving on or by; dying. गमन, पुढें जाणें, रस्ता; मरणें. *a.* current, now occurring; transient, fleeting, cursory, incidental. चालू; क्षणिक, चंचल; वरवरचा, प्रसंगोपात्त. *adv.* (*arch.*) very. फार, अतिशय, अत्यंत. *P.-bell*, bell rung in moment of person's death. मरतिकाची घंटा. *P.-note*, गाण्याला गोडी आणणारा निराळा मध्यें म्हटलेला,-गायिलेला,-वाजविलेला सूर. *P.-rich*, very rich. अतिशय श्रीमंत.

**Pă'ssion**, *n.* (पॅ'शन्) — strong emotion; violent anger; sexual love; strong enthusiasm (for). मनोविकार; क्रोध; प्रेम, अनुराग; वेड, नाद, छंद. *v. i.* (*poet.*) to feel or express passion. मनोविकार होणें,-दर्शविणें. *The P.*, sufferings of Christ on cross, (musical setting of) narration of this from Gospels. खिस्ताच्या शेवटच्या यातना; त्यांचें रागदारींतलें वर्णन. *P.-play*, खिस्ताच्या शेवटच्या यातनांवरील गूढ-व्यंजनात्मक-नाटक. *P.-week*, ईस्टर सणापूर्वीचा आठवडा.

**Pă'ssionate,** *a.* ( पॅ'शनेट् )—prone to passion; lacking self-control; due to, showing, passion. रागीट, विकारवश; मन ताब्यांत नसलेला; मनोविकाराचा, मनोविकारदर्शक.

**Păss'ive,** *a.* ( पॅ'सिव्ह् )—not acting, inactive, inert; submissive; of or in the passive voice. निष्क्रिय; सहनशील, सोसणारा; कर्मणि प्रयोगाचा,-प्रयोगांत. *n. Passive voice* or *form*, कर्मणि प्रयोग, कर्मणि प्रयोगाचें रूप. *P. debt*, on which no interest is paid. बिनव्याजी कर्ज. *Passiv'ity*, *n.* निष्क्रियता, सहनशीलता, सोशिकपणा.

**Pass'ōver,** *n.* ( पा'सोव्हर् )—Jewish feast or lamb sacrificed at it; (fig.) Christ. यहुदी लोकांचा एक सण, त्या सणांत बळी दिलेलें कोंकरूं; येशू ख्रिस्त.

**Păss'port,** *n.* ( पा'स्-पॉअर्ट् )—an official document showing the traveller's identity; (fig.) thing that ensures admission. प्रवासाचा परवाना, दस्तक; (काम यशस्वी करून देण्याची ) गुरुकिल्ली, कळ, साधन.

**Pass'word,** *n.* ( पा'स्-वॉअर्ड् )—a selected word or phrase, a secret word; countersign. (ओळखण्याकरितां ) खुणेचा निवडक शब्द, परवलीचा शब्द, मान्यतादर्शक सही, रुजवात.

**Păst,** *a.* ( पास्ट् )—gone by, just over. होऊन गेलेला, गतकालाचा, भूतकाळ( चा ). *n.* past time; a person's past life or career, esp. one that will not bear inquiry. भूतकाल; गेलेलें ( संशयास्पद-निंद्य-) आयुष्य किंवा कारकीर्द. *prep.* beyond. पलीकडे; नंतर, वर. *adv.* by, so as to pass by. जवळून, बाजूनें. *Past-master*, one who has been master in guild, freemasons' lodge, etc.; thorough master (*in, of*, a subject). व्यापारी संघांतील शिक्षक,-तरबेज; पुरा, पक्का, प्रवीण. *The past*, भूतकाळ, पूर्व आयुष्यांतील-होऊन गेलेल्या-गोष्टी. *Half p. three*, साडेतीन वाजतां, ३ वाजून ३० मिनिटें.

**Păste,** *n.* ( पेस्ट् )-flour kneaded with water, suet, butter, etc. as material for pastry, &c.; flour and water as adhesive mixture; material of imitation gems. पेस्ट्रि पक्वान्नाकरितां लोण्यांत तिंबवलेला मैदा, खळ; चिकटा; बनावट हिरे तयार करण्याकरितां एक प्रकारची कांच. *v. t.* to fasten with paste, to cover by pasting. खळीवर चिकटविणें, खळ लावणें. *P. board*, card-board; ( fig., *attrib.*) unsubstantial, flimsy; ( sl. ) visiting or playing card, railway tiket. (खळीवर अनेक कागद चिकटवून केलेला) जाड पुट्ठा; बनावट, खोटा, नकली; स्वतःच्या नांवाची भेट घेण्यासाठीं दाखवावयाची चिठी, पत्त्याचें पान, रेल्वेचें तिकीट.

**Păs'tel,** *n.* ( पॅ'स्टल् )—dry pigment-paste used for crayons, a drawing in this; woad. रंगीत खडू, पाटोळी कांडी, अशा कांडीनें काढलेलें चित्र; निळा रंग. *Pas'telist*, *n.* artist drawing in pastel. रंगीत खडूनें चित्रें काढणारा.

**Păs'tern,** *n.* ( पॅ'स्टर्न् )—the part of horse's foot between fetlock and hoof. ( घोड्याच्या खुराचा ) नेवर, तंगडी, टांग.

**Păs'teurism,** *n.* ( पॅ'स्टरिझ्म् )—Pasteur's method of inoculation with virus as preventive or cure of hydrophobia, etc. ( कुत्र्याचें वीष वगैरे रोगांवर ) लस टोंचण्याची पॅश्चरची पद्धत. *Pas'teurize*, *v. t.* to apply pasteurism to, sterilize ( milk etc. ) by exposure to high temperature. लस टोंचणें, दूध वगैरे नासूं नये म्हणून पॅश्चरच्या पद्धतीनें रोगजंतुरहित करणें.

**Păstiche',** *n.* ( पॅस्टी'श् )—musical or other medley of borrowings. ( निरनिराळ्या लेखकांच्या किंवा चित्रकारांच्या ) कल्पना उसनवार घेऊन लिहिलेलें लिखाण किंवा काढलेलें चित्र, संगीत भारूड.

**Pas'til,-ille,** *n.* ( पॅस्टी'ल् )—roll of aromatic paste; a lozenge. उदबत्ती, अगरबत्ती; खाऊची गोड वडी,-गोळी.

**Pä'stīme,** *n.* ( पा'स्टाइम् )—diversion, recreation; a sport, a game, a play. करमणूक; खेळ, क्रीडा.

**Pä'stor,** *n.* ( पा'स्टर् )—a minister of a congregation; a spiritual adviser. पाद्री; धर्मोपदेशक. *Pas'torate*, *n.* pastor's office or tenure of it; the body of pastors. पाद्र्याची जागा,-अधिकार,-हुद्दा; पाद्रीमंडळ. *Pastor'ium*, *n.* parsonage. पाद्र्याचें वसतिस्थान.

**Pä'storal,** *a.* ( पा'स्टोरल् )—of shepherds; of rural life, rustic, rural; used for pasture; of a pastor. मेंढपाळांविषयीं; ग्राम्य, ग्रामीण, आडमुलखांतील, गांवठी; चराऊ रानाचा; धर्मोपदेशकाचा. *n.* a pastoral poem or picture; a letter from bishop or other pastor to clergy or people. मेंढपाळांविषयींचें काव्य किंवा चित्र; बिशपचें आज्ञापत्र.

**Pā'strў,** *n.* ( पे'स्ट्रि )—baked flour-paste; food made of or with it. भाजून मळलेलें पीठ; त्या पिठाचें पक्वान्न. *P. cook*, 'पेस्ट्री' पक्वान्नें विक्रीसाठीं करणारा.

**Păs'turage,** *n.* ( पा'स्चरिज् )—business of pasturing; pasture, grazing ground. गुरें चारण्याचा धंदा; कुरण.

**Päs'ture,** *n.* ( पा'स्चर् )—herbage for cattle to eat; land or field under such a crop. चारा

गवत, गुरचरण, गायरान; कुरण. *v. t. & i.* to put cattle to pasture, graze on land. कुरणांत गुरें चारणें, चरणें.*-rable, a.*

Pa'stў, *n.* (पा'स्टि)—venison etc. enclosed in paste without pie-dish and baked. चिकींत घालून भाजलेलें हरणाचें मांस. *a.* (पे'स्टि) like paste, doughy; pallid. चिकीसारखा; फिकट चेहऱ्याचा.

Păt, *v. t.* (पॅट्)—to strike gently with the open hand or other flat surface. थापटी मारणें. *n.* patting touch or sound; small lump of butter. थाप, थापटी; लोण्याचा लहानसा गोळा. *a.* opportune. योग्य, नेमका. *P. ball*, game of rounders; poor or feeble lawn-tennis. एक प्रकारचा खेळ; मैदानावरील टेनिसचा पुळपुळीत खेळ. *To p.* (person, oneself) *on the back*, express approbation of; beat lightly upon. पाठ थोपटून शाबासकी देणें, पाठ थोपटणें; हळू आपटणें.

Pătch, *n.* (पॅच्)—a piece put on in mending; a piece of plaster over a wound; irregular stain on surface; a small plot of ground. ठिगळ, कप्पी; गाचडी; डाग; लहानसा जमिनीचा तुकडा. *v. t.* to mend with a patch; to piece together; (with *up*) patch sufficiently to serve; set (quarrel, etc.) to rights for the time. ठिगळ मारणें; एकत्र जोडणें; तात्पुरतें थांगडणें; तात्पुरतें मिटविणें; भागविणें. *Patch of land*, जमिनीचा तुकडा, टिकें. *Not a p. on*, not comparable to, nothing to. तुलना न करण्यासारखें, ज्या पासंगास न पुरणारें. *P.-work*, तुकड्यातुकड्यांचें काम, गोधडी, रंगीबेरंगी काम. *Patch'y, a.*

Pătch'oulí, *n.* (पॅ'चुलि)—an Indian perfume. पाच, पाचेचें अत्तर.

Pătch'work, *n.* (पॅ'च्-वर्क्)—patching; a thing made up of odds and ends. तुकड्यातुकड्यांचें काम; गाचडी.

Pāte, *n.* (पेट्)—head often as seat of intellect; the top of head. डोकें, टकलें.

Pă'ten *n.* (पॅ'टन्)—plate for eucharist bread, usu. of silver; thin circular plate of metal. प्रभुभोजनांतील भाकरी ठेवण्याचें चांदीचें ताट; ताट.

Pā'tent, *a.* (पे'टन्ट्)—obvious, unconcealed; patented; (colloq.) such as might be patented, ingenious, well-contrived; (of door) open. उघड, स्पष्ट, खुला, जाहीर; सनद असलेला, सनदी; पेटंट मिळण्यासारखें, डोक्याचें, चांगल्या योजनेचें; उघडा (दरवाजा). *Letters patent*, an open letter from a sovereign, &c. conferring some privilege, e. g. a title, or the sole right for a term to make or sell something. एखादी गोष्ट तयार करण्याचें किंवा विकण्याचें विशेष अधिकारपत्र. *n.* (पे'टंट्, पॅ'टंट्) letters patent; grant of sole right to make or sell invention; invention, process, so protected; (fig.) sign that one is entitled to something, possesses a quality, etc. विशेष अधिकारपत्र; सनद, परवाना; पेटंट.-विशेष अधिकारपत्र-मिळालेला शोध, योजना; अधिकार निदर्शक-गुण, दर्शक-खूण,-चिन्ह. *v. t.* to obtain a patent for (invention). हक्काबद्दल सनद मिळविणें. *Patentee'*, *n.* holder of a patent. विशेष अधिकारपत्र-पेटंट-मिळालेला, सनदी, हक्कदार.

Pā'ter, *n.* (पे'टर्)—(sl.) father. बाप.

Pāter-famil'iăs, *n.* (पेटर्-फॅमि'लिॲस्)—the head or father of a family. कुटुंबचालक, कुटुंबाचा मुख्य.

Pater'nal, *a.* (पॅट'-नल्)—pertaining to or of a father; fatherly, hereditary. पित्याचा, बापाचा; आनुवंशिक. *P. grandmother*, father's mother. बापाची आई, आजी. *P Government, legislation*, मायबाप सरकार,-सरकारनें केलेला कायदा.*-ally, adv.*

Patern'itў, *n.* (पॅट'र्निटि)—fatherhood; paternal descent; (*fig.*) source, authorship. पितृत्व, पितेपणा; पितृवंश; मूळ, जनकत्व, ग्रंथकर्तृत्व.

Păt'ernŏster, *n.* (पॅ'टर्नॉस्टर्)—the Lord's prayer in Latin, bead for it at intervals in rosary; fishing line with hooks at intervals. (लॅटिन भाषेंतील) प्रभुप्रार्थना, जपमाळेंतील प्रभुप्रार्थनानिदर्शक मधून मधून असलेला मणी; मधून मधून गळ्या किंवा गळ असलेली मासे धरण्याची काठी. [L *paternoster*, our father]

Păth, *n.* (पाथ्; —(*pl.* पाद्झ्) footway: a track. पायवाट; रस्ता, मार्ग. *P. way*, मळलेली वाट, रहदारीचा रस्ता; मार्ग, पंथ. *P.-less, a.*

Pathĕt'ic, *a.* (पॅथे'टिक्)—exciting or appealing to compassion; of the emotions. करुणरसोत्पादक, करुणाजनक; भावनांचा.*-ally, adv.* द्रव सुटेसा, गहिंवरून.

Pathŏl'ogў, *n.* (पॅथॉ'लजि)—the study of diseases, the doctrine of diseases. रोगशास्त्र, रोगनिदानशास्त्र. *Patholo'gical, a.* रोगनिदानविषयक,-चिकित्साविषयक.*-gist, n.* रोगचिकित्सक, रोगाचें निदान करणारा.

Pa'thŏs, *n.* (पे'थॉस्, पॅ-)—a quality that excites pity or sadness, touching influence. करुणरसोत्पादक गुण, करुणरस.

Pā'tience, *n.* (पे'शन्स्)—endurance under pain, weariness, etc.; perseverance; card-game

कारस्थानी; हुशार, चतुर; कावेबाज, मतलबी, हिकमती. Pol'itically, *adv*.

**Polit'ical**, *a.* (पोलि'टिकल्)—pertaining to civil government, of the state or its affairs; of politics. संस्थानचा, राज्यकारभाराचा; राजकीय, राजनीती-संबंधीं. *n. p. agent*. पोलिटिकल एजंट, एक सरकारी अधिकारी. *P. economy*, अर्थशास्त्र. *P. geography*, *g.* dealing with boundaries & possessions of States. राजकीय भूवर्णन.

**Pŏliti'cian**, *n.* (पॉलिटि'शन्)—a person engaged or interested in politics. राजनीतिकुशल, राजकारणपटु, मुत्सद्दी.

**Pŏl'itics**, *n. pl.* (पॉ'लिटिक्स)—the science of government; affairs of State; questions of policy; strife of parties contesting for power. राजनीति; राज्यकारभार; राजकारण; निरनिराळ्या पक्षांतील भांडण. *Is not practical politics*, is too remote to be worth discussing. अव्यवहारी राजकारण.

**Pŏl'ity**, *n.* (पॉ'लिटि)—a form of civil government; an organized State. राज्यनीति; राज्यव्यवस्था, समाजरचना.

**Pŏ'lka**, *n.* (पॉ'ल्का)—a kind of dance. एक प्रकारचा नाच.

**Poll**, *n.* (पोल्)—the head or back part of the head; counting of votes, voting, number of votes. डोई, डोचकें, डोकें; मतदारांची संख्या व मतांची नोंद, मतदान. *P.-tax*, डोईपट्टी. *v. t. & i.* to crop hair of; cut off top of tree or horns of beast; count votes of, vote, receive votes of. चे केंस कापणें, छाटणें; (झाडाचा शेंडा किंवा गुराचीं शिंगें) तोडणें; मतें मोजणें, मत देणें, मतें मिळविणें.

**Pŏll**, *n.* (पॉल्)—(*P-*) conventional proper name of parrot. पोपटाचें ठेवलेलें नांव. *P-parrot*, a parrot, a silly babbler. पोपटपंची करणारा, मूर्खपणाची बडबड करणारा.

**Pŏll'ack,-ock**, *n.* (पॉ'लक्,-लॉक्)—a sea-fish allied to cod. कॉडसारखा एक समुद्रांतील मासा.

**Pŏll'ard**, *n.* (पॉ'लर्ड)—a tree made by cutting off the top to produce a close head of young shoots; a hornless animal. वरचा भाग कापलेलें झाड; शिंगें नसलेलें जनावर.

**Pŏll'en**, *n.* (पॉ'लिन्)—fertilizing powder discharged from flower's anther. फुलांतील पराग, -रज, पुष्परेणु,-रज.

**Pŏll'inate**, *v. t.* (पॉ'लिनेट्)—to fertilize with pollen. परागकण घालणें, परागकण घालून नवीन उत्पत्ति करणें. *Pollina'tion*, *n.*

**Pollute'**, *v. t.* (पोल्यूट्)—to destroy the purity of, to taint or infect morally. भ्रष्ट करणें, बिघडवणें. *-tion*, *n.* मलिन करणें, अपवित्रता, भ्रष्टाकार.

**Pō'lō**, *n.* (पो'लो)—a game of Eastern origin like hockey played on horse-back. 'पोलो' नांवाचा घोड्यावर बसून चेंडू खेळण्याचा खेळ. *P.-stick*, पोलो खेळण्याची लांब दांड्याची काठी.

**Pŏlonaise'**, *n.* (पॉलने'झ्)—form of woman's dress; slow dance of Polish origin. एक प्रकारचा स्त्रियांचा पोषाख; एक प्रकारचा नाच.

**Polō'nium**, *n.* (पलो'निअम्)—a highly radio-active element. एक मूलतत्त्व.

**Polō'nў**, *n.* (पलॉ'नि)—kind of sausage. एक प्रकारचें तयार केलेलें मांस.

**Pŏltrōōn'**, *n.* (पॉल्ट्रून्)—a coward. नामर्द, भित्रा. *-ery*, *n.*

**Pŏly-** (पॉलि)—in comb.=Gk *polus*, many. पुष्कळ, बहु-, अनेक-.

**Pŏl'yăndrў**, *n.* (पॉ'लिॲन्ड्रि)—polygamy in which one woman has more than one husband, plurality of husbands. अनेक पति करण्याची चाल, बहुपतित्व.-rous, *a.* of, practising, polyandry; (Bot.) with numerous stamens. एकाच वेळीं अनेक पति असलेली (स्त्री); अनेक पुंकेसरी (गुलाब, निशिगंध).

**Pŏlyăn'thus**, *n.* (पॉलिॲन्थस)—kinds of cultivated primula. एक जातीचें फूल.

**Pŏlўchromăt'ic**, *a.* (पॉलिक्रमॅटिक्)—many-coloured. बहुरंगी, पुष्कळ रंगांचा. *Poly'chrome*, *n.* (-क्रो-), polychromatic work of art. पुष्कळ रंगांचें चित्रकाम.

**Pŏlўg'amў**, *n.* (पॉलि'गमि)—state or custom of having more than one wife or more than one husband at once. अनेक बायका किंवा अनेक नवरे असण्याची चाल, बहुपतित्व, बहुपत्नीकत्व. *Polyg'amist*, *n.*; *-mous*, *a.*

**Pŏl'ўglŏt**, *a. & n.* (पॉ'लिग्लॉट)—many-tongued, of or in several languages. पुष्कळ भाषा बोलणारा; बहुभाषाकोविद; पुष्कळ भाषांचा किंवा भाषांतील (पुस्तक).

**Pŏl'ўgŏn**, *n.* (पॉ'लिगॉन्)—a figure with many angles or sides. अनेक कोण किंवा बाजू असलेली आकृति. *Polyg'onal*, *a.*

**Pŏlyhĕd'rŏn**, *n.* (पॉलिहे'ड्रॉन्)—many-sided solid, a body of many sides. पुष्कळ बाजू असलेला घन पदार्थ, बहुफलक.*-al*, *a.*

**Pŏl'ўp**, *n.* (पॉ'लिप्)—kinds of animal of low organization, as sea-anemones. खालच्या वर्गातील बहुहस्त प्राणी.

**Polўph'onў**, *n.* (पोलि'फनि)—harmonizing of separate simultaneous melodies. अनेक निरनिराळ्या सुरांचें मिश्रण,-एकीकरण.

**Pŏl'ўpodў**, *n.* (पॉ'लिपोडि)—fern growing on rocks, walls, etc. खडक, भिंत वगैरेंवर वाढणारा नेचा.

**Pŏl'ўpus**, *n.* (पॉ'लिपस)—(pl.*-pi,-puses*), kinds of tumour, esp of nose. अर्श, वेंढ.

**Pŏ'lўsўllable**, *n.* (पॉ'लि-सिलेबल)—a word having many or more than three syllables. अनेक अक्षरांचा शब्द.*-a'bic*, *a.*

**Pŏlўtĕc'hnic**, *a.* (पॉलिटे'क्निक्)—comprehending many arts, dealing with or devoted to various arts. अनेक कलांसंबंधींचा, अनेक कलांना वाहलेला

*n.* a technical school. कलाशिक्षणसंस्था, कलामंदिर.

**Pŏ'lўthēism,** *n.* ( पॉ'लिथिइझम् )—belief in more than one god, doctrine of plurality of gods. अनेकेश्वरी मत. *Pol'ytheist, n.* अनेकेश्वरवादी.-*istic, a.*

**Pomace,** *n.* ( प'मिस )—crushed apples in cider-making; any pulp; refuse of fish etc. used as fertilizer. फळांचें सत्त्व; रेंदा, ठेंचा; माशांचें खत, कुटी.

**Pomāde',Pomā'tŭm,** *nn.* ( पोमे'ड्, पोमे'टम् )—scented ointment for the hair. केसांना लावण्याचें सुगंधि मलम.

**Pōme,** *n,* ( पोम् )—succulent fruit with firm fleshy body enclosing carpels forming the core. सिताफळ, रामफळ, सफरचंद या जातीचें फळ.

**Pŏme'grănate,** *n.* ( पॉ'म्-ग्रॅनेट् )—a large tough-rinded fruit containing numerous seeds. डाळिंब.

**Pŏmerā'nĭan,** *n.* ( पॉमेरे'निअन् )—a breed of small dogs. लहान जातीचे कुत्रे.

**Pŏm'frĕt,** *n.* ( पॉ'म्फ्रिट् )—fish found in Indian and Pacific oceans, used as food. सरगुडलें, सरंगा, ( माशांची जात. )

**Po'mmĕl,** *a.* ( प'मेल् )—the knob on the hilt of a sword; front of saddle; horn of side-saddle. तलवारीच्या मुठीचें बोंड किंवा गांठ; खोगिराच्या पुढलें उंच टोंक. *v. t.* to strike with sword-pommel or with fists. कुदवणें, बुकलणें, बडवणें.

**Pŏmp,** *n.* ( पॉम्प् )—a splendid display; splendour, grandeur, display. स्वारी, मिरवणूक, थाट; डामडौल, भपका, ऐट.

**Pŏm'pŏm,** *a.* ( पॉ'म्-पॉम् )—a quick-firing gun, loaded and fired with great rapidity. जलद उडणारी बंदूक.

**Pŏm'pŏn,** *n.* ( पॉ' म्पॉन् )—tuft of ribbon, etc. on hat, shoe, etc. टोपी, जोडा वगैरेवरील फितीचा झुबका, टोंक, गांठ.

**Pŏm'pous,** *a.* ( पॉ' म्पस )—magnificent, splendid; showing self-importance; ( of language ) inflated, highflown. भपकेदार, भव्य, थाटाचा; स्वतःची पढाई दाखविणारा; डबदार, शब्दावडंबराची (भाषा, शैली). *Pompos'ity, n.*; *Pomp'ously, adv.*; *Pomp'ousness, n.*

**Pŏn'chŏ,** *n.* ( पॉ'न्शो )—( *pl.-os* ), S.-Amer.-cloak or cape made of a piece of cloth, etc. with opening for the head. एकाच कापडाचा, डोकें शिरण्यापुरता उघडा, असा मोठा डगला.

**Pŏnd,** *n.* ( पॉ'न्ड् )—a small body of still water artificially formed, ( facet. ) the sea. डबकें, तळें, तलाव, पुष्करिणी; समुद्र. *v. t. & i.* to hold *back,* dam *up,* ( stream ); ( of water ) form a pool or pond. ( प्रवाह ) अडविणें, अडकविणें, तुंबविणें; तळें, तलाव,-बनणें. *Herring p.,* हेरिंग मासे असलेला समुद्र. *P.-life,* तळ्यांतील जीवजंतु, प्राणी. *Pond'weed,* kinds of aquatic herb growing in still water. दह, गोड्या पाण्यांतील वनस्पति.

**Pŏn'der,** *v. t. & i.* ( पॉ'न्डर् )—to weigh in mind, to consider with deliberation. विचार करणें, चिंतन करणें. *Pon'deringly, adv.* विचार करून, मननपूर्वक.

**Pŏn'derable,** *a.* ( पॉ'न्डरेबल् )-of appreciable weight, material. वजन करण्याजोगता, वजनाचा; चिंत्य, चिंतनीय. *n.* ( *esp. in pl.* ) material things. चिंत्य, -विचाराई-गोष्टी.

**Pŏn'derous,** *a.* ( पॉ'न्डरस )—unwieldy by weight; heavy, dull ( style ). वजनदार; जड, कंटाळवाणी ( लेखनपद्धति ). *Ponderos'ity, n.*

**Pŏn'iard,** *n.* ( पॉ'न्यर्ड )—a dagger. कट्यार, खंजीर. *v. t.* to stab with *p.* कट्यार भोसकणें; खंजीर खुपसणें, व ठार मारणें.

**Pŏn'tĭff,** *n.* ( पॉ'न्टिफ् )—the Pope; bishop; the chief priest, a high-priest. पोप; बिशप; मुख्य धर्माधिकारी. *Pontif'ical, a.* episcopal, papal; ( of manner, etc. ) as of a pontiff. रोमन कॅथॉलिक धर्मगुरूचा, पोपचा; धर्माधिकाऱ्यासारखा. *n.* a book of episcopal rites; ( pl. ) episcopal vestments. रोमन कॅथॉलिक धर्मविधींचें पुस्तक; पोपचीं वस्त्रें, पोषाख.

**Pontōōn',** *n.* ( पॉन्टू'न् )—a flat-bottomed boat for use with others as supports of temporary bridge, a kind of boat. तात्पुरता पूल बांधण्याची नाव, तराफा, पडाव. *v. t.* to cross river by means of pontoons. नौकेंतून-पडावांतून-पडावांच्या तरत्या पुलावरून नदी ओलांडणें.

**Pō'nў,** *n,* ( पो'नि )—a horse of any small breed; ( sl. ) £25; translation, crib. तट्टू; २५ पौंड; भाषांतर, टिप्पणी, अर्थपट्टी.

**Pōōd,** *n.* ( पूड )—a Russian weight ( 36 lb. ). छत्तीस पौंडाचें रशियांतील वजन.

**Pōō'dle,** *n.* ( पु'डल् )—kinds of a pet dog with long curling hair. कुत्रा, केसाळ कुत्र्याची एक जात.

**Pooh,** *int.* ( पुः )—of contempt. तिरस्कारदर्शक अव्यय.

**Pooh-Pooh',** *v. t.* ( पुःपु )—to ridicule. उपहास करणें.

**Poo'koo, Puku,** *n.* ( पु'कु )—red antelope of Central Africa. मध्य आफ्रिकेंतील तांबडा मृग,-हरिण.

**Pōōl,** *n.* ( पुल )—a small body of still water; puddle; deep place in a river. डबकें, लहान तळें, नदींतील खोल जागा.

**Pōōl,** *n.* ( पुल् )—collective stakes in cards or betting; game for several players on billiard -table with pool taken by winner; combination of manufacturers. पत्त्यांच्या खेळांतील किंवा इतर पातीचा सट्टा; एक प्रकारचा खेळ; कारखानदारांची जूट,-एकी,-कोंडी. *v. t.* to throw into common fund, share ( traffic, profits ). सर्वसाधारण फंडांत ठेवणें,-टाकणें; ( व्यापाराची,-वाहतुकीची, नफ्याची ) वांटणी करणें.

**Pōōn,** *n.* ( पून् )—an E.-Ind. tree. एक झाड. *P.-oil.,* oil from seeds of this, used in medicine and for lamps. पून् झाडाच्या बियांचें तेल.

**Pōōp,** *n.* ( पूप् )—stern of a ship; aftermost and highest deck of a ship. गलबताची मागची

बाजू; पिछाडी, वराम; अगदीं मागचा आणि सर्वांत उंच जहाजाचा वरचा भाग. *v. t. & i.* (of wave) break over stern of ship; (of ship) receive (wave) over stern. गलबताच्या वरामावर (लाट) आदळणें; (गलबताच्या) वरामावर लाट घेणें. *Poop'ed, a.*

Poor, *a.* (पुअर्)—having little money or means; (of soil) unproductive; inadequate; despicable, insignificant; deserving pity. गरीब, दरिद्री; कंगाल; निकामी, निकस; अयोग्य; क्षुद्र, भिकार; करुणाजनक. *The poor,* गोरगरीब, दानधर्मावर जगणारे. *P.-box,* गरिबांच्या मदतीसाठीं पेटी, धर्मादायपेटी. *P.-house,* गोरगरिबांसाठीं धर्मशाळा, कंगालखाना.

Poor'lў, *adv.* (पुअर्-लि)—insufficiently, with little success. अपुरा, यशावांचून. *pred. a.* out of sorts, not in good health. अस्वस्थ, कांहींसा आजारी.

Poor'nĕss, *n.* (पुअर्निस्)—unproductiveness; lack of some good quality or constituent. नापीकपणा, गुणहीनपणा, धनहीनता, निर्धनता.

Poor-spi'rĭtĕd, *a.* (पुअर्-स्पिरिटेड्)—of a mean spirit, meek, cowardly. गरीब, दुबळा, धैर्यहीन.

Pŏp, *n.* (पॉप्)—abrupt explosive sound, dot, spot, esp. in marking sheep, etc.; (colloq.) champagne, ginger-beer; (*sl.*) pawning; popular concert; social and debating club at Eton; father. फट् असा आवाज; डाग, ठिपका; शांपेन दारू; गहाण टाकणें; लोकप्रिय करमणूक, खेळ; ईटनमधील समाजसंघ, वादविवादसभा; बाप. *v. i. & t* to make pop; (colloq.) let off (pistol, etc.); go or come unexpectedly or suddenly; put quickly in, down, etc. फट् असा आवाज करणें; (पिस्तूल) उडविणें, बार करणें; फटकन्,-तडकन्-जाणें किंवा येणें; झटकन आंत,-खालीं, -ठेवणें. *adv.* with a pop, suddenly. फट् असा आवाज करून, अकस्मात्, झटकन्, ताडकन्. *To pop the question,* to propose marriage. (मुलीला) मागणी करणें,-घालणें. *P.-gun,* child's toy-gun. फटकळी, खेळांतील बंदूक

Pōpe, *n.* (पोप्)—the bishop of Rome as the head of R. C. church. रोमन कॅथॉलिक धर्माचा मुख्य अधिकारी.-*dom, n.* पोपचा-हुद्दा, पदवी, हुकमत.

Pō'perў, *n.* (पोपरि)—(contempt.) the papal system; Romanizing tendencies. रोमन कॅथॉलिक पंथ;-धर्म.

Pŏp'injay, *n.* (पॉपिन्जे)—a parrot; fop, coxcomb, green wood-pecker. पोपट; नखरेबाज-फाकडलाल-मनुष्य; सुतारपक्षी.

Pō'pĭsh, *a.* (पोपिश्)—of popery; popistical. पोपचा; रोमन कॅथॉलिक धर्मपंथाचा.

Pŏp'lar *n.* (पॉप्-लर्)—kinds of tree noted for tallness and slenderness. हिवर, हिवराचें झाड, -लाकूड.

Pŏp'lin, *n.* (पॉप्-लिन्)—corded fabric made of silk and worsted. एक प्रकारचें रेशमी कापड.

Pŏpp'ĕt, *n.* (पॉपिट्)—darling; lathe-head. आवडतें, लाडकें; चरकाचा,-कातकामाच्या चाकाचा,-शेंडा, -वरचा भाग.

Pŏpp'ied, *a.* (पॉपिड्)—having poppies; drugged with opium. खसखस असलेला,-घातलेला; अफूचें विष घातलेला.

Pŏpp'ing-crease, *n.* (पॉपिंग्-क्रीझ्)—white line 4ft. in front of & parallel to wicket within which batsman must stand. बॅट्समनन उभें राहण्याची जागा मर्यादित करणारी रेषा.

Pŏpp'ў, *n.* (पॉपि)—kinds of plant with bright showy flowers and milky juice. एक सुंदर फुलें असलेलें झाड. *Flanders poppies, pp.* sacred to dead of great war; as name of those made for and sold on Poppy Day, 11 Nov. गेल्या महायुद्धांतील मृतांना वाहण्याचीं फुलें; नोव्हेंबर ११ या 'पॉपि डे' दिवशीं विकलीं जाणारीं फुलें.

Pŏp'ūlāce, *n.* (पॉप्यूलेस्)—the common people, the multitude, the commonalty. सामान्य लोक, साधारण लोक.

Pŏp'ūlar, *a.* (पॉप्युलर्)—of, carried on by, the people; generally liked, or admired; adapted to the understanding, taste, or means of the people; prevalent among the people. लोकांचा; सुलभ, सहजसाध्य, लोकमान्य, लोकप्रिय; लोकरूढीचा, लोकप्रसिद्ध. *At p. prices,* at low prices. कमी किंमतींत. *Pop'ularly, adv.* व्यवहारांत, लौकिकांत, सर्वतोमुखीं.

Pŏpūlă'rĭtў, *n.* (पॉप्युलॅरिटि)—being generally liked, favour or goodwill of the people. लोकप्रियता.

Pŏp'ūlarize, *v. t.* (पॉप्युलराइझ्)—to make popular; extend (suffrage etc.) to common people; present in popular form. लोकप्रिय करणें, सामान्य लोकांत प्रसार करणें; सामान्य लोकांना समजेल असें करणें.

Pŏp'ūlāte, *v. t.* (पॉप्युलेट्)—to fill or furnish with inhabitants, to people. वसाहत करणें, वसविणें; लोक भरणें. *Densely populated,* दाट वस्तीचा. *Pop'ulator, n.*

Pŏpūlā'tion, *n.* (पॉप्युलेशन्)—the inhabitants; the number of inhabitants. रहिवासी; लोकसंख्या, प्रजा, वस्ती.

Pŏp'ūlist, *n.* (पॉप्युलिस्ट्)—an adherent of U. S. political party aiming at public control of railways, graduated income-tax, etc.; adherent of Russian political party advocating collectivism. (अमेरिकेंतील सं. संस्थानांतील) रेल्वे वगैरे लोकसत्ताक असावी असें मानणाऱ्या राजकीय पक्षाचा अनुयायी; (रशियांतील) जमिनी वगैरे सार्वजनिक असाव्या असें मानणाऱ्या राजकीय पक्षाचा अनुयायी.

Pŏp'ūlous, *a.* (पॉप्युलस्)—thickly populated. भरवस्तीचा, दाट वस्तीचा.-*ness, n.* भरवस्ती.

Pŏrce'lain, *n.* (पॉर्स्-लिन्)—the finest kind of earthen or pottery ware, china. चिनी मातीचीं भांडीं. (fig. attrib.) delicate, fragile. नाजूक, फुटणारें, ठिसूळ. *P.-shell,* कवडी.

Pŏrch, *n.* (पॉर्च्)—a portico, a covered approach to the entrance of a building. देवडी, द्वारमंडप.

*The P.*, colonnade at Athens to which Zeno and his disciples resorted; stoic school or philosophy. झिनो आणि त्याचे शिष्य जिथें बसत ती अथेन्स-मधील खांबांची रांग; (ग्रीक) तत्त्वज्ञानमंदिर, तत्त्वज्ञान.

**Pŏr'cine**, *a.* (पॉर्साइन्)—of or like pigs. डुकरांचा, डुकरांसारखा.

**Pŏrc'ūpine**, *n.* (पॉर्क्यु-पाइन्)—a beast (about two feet long) armed with pointed quills. साळू, साळिंदार.

**Pore**, *n.* (पोअर्)—one of the small openings making skin, wood, brick, &c. permeable to fluids. छिद्र, भोक, द्वार; स्वेदरंध्र, रंध्र. *v. i.* to have the eyes or mind intent upon, to look with steady application; to meditate, think intently upon (subject). मन लावणें, डोळेफोड करणें, सारखें पाहाणें; चिंतन करणें, विचार,-मनन-करणें. *P.-over*, be absorbed in studying (book etc.). अभ्यासांत गढून जाणें. *P. one's eyes out*, tire them by close reading. एकसारखें वाचून डोळ्यांना क्षीण देणें,-आणणें.

**Pŏrk**, *n.* (पॉर्क्)—pig's flesh. डुकराचें मांस. *P.-barrel*, (*colloq.*) congressional grant of money for local public works. स्थानिक सार्वजनिक हिताच्या कामासाठीं पैशाची मदत.

**Pŏrk'er**, *n.* (पॉर्कर्)—young fattened hog; pig raised for food. लहान डुकर; खाण्याकरितां पाळलेलें डुकर.

**Pŏrnŏg'raphy̆**, *n.* (पॉअर्नॉग्रफि)—description of manners etc. of harlots, obscene writing. वेश्या-व्यवहारवर्णन, बीभत्स लिखाण,-ग्रंथ. [Gk *porne*, a harlot]

**Pōr'ous**, *a.* (पो'रस्)—having pores; permeable. सच्छिद्र; पाझरणारा. *Poros'ity*, *n.* सच्छिद्रता, विरविरीतपणा.

**Pŏrph'yry̆**, *n.* (पॉर्फिरि)—kinds of rock with crystals embedded in a red or other ground-mass. एक जातीचे कठीण खडक,-दगड.

**Pŏrp'oise**, *n.* (पॉर्पस्)—a blunt-snouted marine mammal 5 ft. long. गाधा मासा, पदयाळ मासा, डुळका. [L. *porcus*, a hog; *piscis*, a fish. Lit. the hog-like fish]

**Pŏ'rridge**, *n.* (पॉ'रिज्)—a thickened mass of oat meal or other meal boiled in water or milk. (ओट नांवाच्या धान्याची) लापशी, घांटा. *Keep* one's *breath to cool* one's *p.*, keep one's advice etc. for one's own use. आपला उपदेश स्वतःच पाळणें, परोपदेश स्वतःच्या उपयोगीं आणणें.

**Pŏ'rringer**, *n.* (पॉ'रिंजर्)—a small basin for porridge. लहान भांडें, पेला, वाटी, वाडगा.

**Port**, *n.* (पॉर्ट्)—a harbour, haven; a town or place possessing harbour; gate, gateway (of walled town) opening in a ship's side for entrance, etc.; (also *port-hole*) aperture in ship's side to admit light and air; bearing, deportment, mien, demeanour; left of a ship looking forward; a strong sweet red wine of Portugal. बंदर; मांडवी, बंदर असलेलें शहर; तटबंदीच्या शहराची वेस; गलबताच्या बाजूंतील उघडा भाग; गलबताच्या बाजूंतील हवा-उजेडासाठीं बारीक खिडकी,-भोंक, -बारी,-जंगी; वर्तणूक, तव्हा, ढब, बाह्य स्वरूप; गलबताची डावी बाजू; लाल दारू. *v. t. & i.* to hold (rifle, sword) diagonally in front of body; to turn (helm, ship) to port; (of ship) turn to port. उजव्या हातांत दस्ता धरून डाव्या खांद्यावर बंदूक टाकणें,-तलवार अशा प्रकारें धरणें; बंदराकडे वळवणें,-वळणें. *Free port*, आयातनिर्यातीसाठीं सर्व देशच्या व्यापाऱ्यांना खुलें बंदर; बिनजकातीचें बंदर. *Close p.*, p. lying up river. नदीकांठचें बंदर.

**Pōrt'able**, *a.* (पॉ'र्टेबल्)—that can be carried about, easily carried; moveable. वाहून नेण्यासारखा; हलणारा, सुटसुटीत, सहज हातांत घेऊन जाण्याजोगा. *Portabil'ity n.*

**Pŏrt'age**, *n.* (पॉ'र्टिज्)—transport of goods or its cost; carrying of goods etc. necessary between two navigable rivers. मालाची ने-आण करणें, त्याची मजुरी, त्याचा खर्च; दोन वाहतुकीच्या नद्यांच्या मध्यें पडाव किंवा माल इकडून तिकडे नेणें.

**Pŏrt'al**, *n.* (पॉ'र्टल्)—doorway, gateway; (*anat.*) of the porta or transverse fissure of the lever. द्वार, फाटक, मार्ग, रस्ता, वाट; यकृताच्या मुखापासून निघणारा, यकृतासंबंधीं. *P. vein*, यकृतांतील (सपित्तरक्त वाहणारी) शीर.

**Pŏrtcŭll'is**, *n.* (पॉर्ट्-कॅलिस्)—a sliding or falling gate, grating raised and lowered in grooves as defence of gateway. द्वाररक्षणार्थ दरवाजाला अडकवलेली व खालींवर करतां येणारी लोखंडी सळ्यांची चौकट.-*ed*, *a.*

**Pŏrtĕnd'**, *v. t.* (पॉर्टेन्ड्)—to foreshadow, to be an omen or presage of. आगाऊ सुचविणें, दर्शविणें, भविष्य सुचविणें.

**Pŏrt'ent**, *n.* (पॉ'र्टेन्ट्)—a thing that portends something; a significant sign; a prodigy; an ill omen. भविष्यसूचक गोष्ट; महत्त्वाची खूण; अद्भुत; अवलक्षण, अरिष्ट, व्यतिपात.

**Pŏrtĕn'tous**, *a.* (पॉर्टे'न्टस्)—of the nature of a portent; solemn. अरिष्टसूचक, आश्चर्यावह; गंभीर, हृदयंगम.

**Pōrt'er**, *n.* (पॉर्टर्)—attendant at door or gate; a person employed to carry burdens esp. servant of railway-company who handles luggage; a dark-brown bitter beer. देवडीवाला, द्वारपाळ; हमाल; एक प्रकारची दारू. *P.-house*, tavern restaurant. पोर्टर दारूचें दुकान,-खाणावळ,-उपाहारगृह. *P.-housesteak*, a choice cut of beef. गोमांसाचा तुकडा. *Porterage*, *n.* hire of porters. हमाली, हेल. *P.'s knot*, हमालाच्या खांद्यावरील ओझें वाहण्यासाठीं मऊ गिरदी. [L. *portare*, carry]

**Pōrt'fire**, *n.* (पॉर्ट् फायर्)—appliance for igniting fireworks or explosives. दारूकाम किंवा सुरुंग यांना पेटी लावण्याचें साधन.

**Pŏrtfō'liō,** *n.* ( पॉर्ट्‌-फो'लिओ )—( *pl.-os* ), a case for loose drawings or sheets of paper; office of minister of state. कागद ठेवण्याचें जुजदान; राजमंत्र्याचा हुद्दा किंवा अधिकार.

**Pŏr'tĭcō,** *n.* ( पॉ'र्टिको )—( *pl.-os* ) a colonnade, a kind of porch to a building fronted with columns. इमारतीच्या दर्शनी भागीं असलेली सुंदर खांबांच्या रांगांची ओसरी, देवळज.

**Portiere,** *n.* ( पॉ'र्ट्येअर् )—a curtain over door or doorway. दरवाज्यावरील पडदा. [ F. *porte*, gate ]

**Pŏr'tion,** *n.* ( पॉ'र्शन् )—a part allotted, a share; helping; dowry; destiny or lot. भाग, हिस्सा, वांटा, अंश, खंड; मदत; स्त्रीधन; नशीब, दैव. *v. t.* to divide into shares or lots; to give dowry to. विभागणें, वांटून देणें; स्त्रीधन म्हणून देणें.*-less, a.* without dowry. स्त्रीधनरहित, हुंड्याशिवाय.

**Pŏrt'lў,** *a.* ( पॉ'र्ट्‌-लि )—bulky, corpulent; of stately appearance. उमदा, धष्टपुष्ट; भव्य, उमदा, भारदस्त, देखणा. *Port'liness, n.*

**Pŏrtmăn'teau,** *n.* ( पॉर्ट्‌-मॅ'न्टो )—( *pl.-s,-x* ) a leather trunk ( for clothes, &c. ); ( fig. ) factitious word blending the sounds and combining the meanings of two others ( e. g. *slithy*=lithe & slimy ). कपडे वगैरे ठेवण्याकरितां चामड्याची प्रवासी पेटी; ( दोन शब्दांचे उच्चार व अर्थ यांच्या मिश्रणानें बनलेला ) नवीन बनावट शब्द.

**Pŏr'trait,** *n.* ( पॉ'र्ट्रिट् )—likeness of a person or an animal; a vivid description or delineation in words. मनुष्याचें किंवा प्राण्याचें हुबेहूब चित्र, तसबीर; हुबेहूब वर्णन, शब्दचित्र.

**Pŏr'traiture,** *n.* ( पॉ'र्ट्रेचर् )—portraying, portrait. चित्र काढणें; चित्र, तसबीर, प्रत, प्रतिमा.

**Pŏrtray',** *v. t.* ( पॉर्ट्रे' )—to paint or draw likeness of; to describe graphically. तसबीर किंवा चित्र काढणें; हुबेहूब वर्णन करणें.*-al, n.*

**Pŏrt'reeve,** *n.* ( पॉ'र्ट्रीव्ह )—officer inferior to mayor in some towns. नगराध्यक्षाच्या खालचा अधिकारी.

**Pŏrt'rĕss,** *n.* ( पॉ'र्ट्रिस )—a female porter. हेलपाटी करणारी, हमालीण.

**Pōse,** *v. t. & i.* ( पोझ् )—to propound for solution; to arrange in required attitude; to set up or give one-self out *as*; to puzzle ( a person ) with a question or problem. विचारार्थ पुढें मांडणें; पाहिजे तसें किंवा व्यवस्थेनें बसविणें; डौल मिरविणें; निरुत्तर करणें, अडविणें, प्रश्न विचारून विचारांत पाडणें. *n.* a certain attitude of body or mind, esp. one assumed for effect. ऐट, ढब, डौल.

**Po'ser,** *n.* ( पो'झर् )—a difficult question. बिकट प्रश्न, कूट-गूढ-कठीण-प्रश्न.

**Pŏs'it,** *v. t.* ( पॉ'झिट् )—to lay down as basis of argument or inference; put in position. वादाचा किंवा अनुमानाचा आधार म्हणून मांडणें, गृहीत धरणें, बसविणें, ठेवणें.

**Pŏsĭ'tion,** *n.* ( पोझि'शन् )—the way a thing is placed; state of affairs; mental attitude, posture; rank or status; an office; strategic point or condition; proposition, laying down of this. स्थिति, परिस्थिति, व्यवहारस्थिति, मनःस्थिति, मनाची दृष्टि, कल, दर्जा, अधिकार, नोकरी; मान्याची जागा, लष्करी महत्त्वाचें ठाणें,-ठिकाण; सिद्धान्त, प्रमेय, प्रतिज्ञा, सिद्धान्त मांडणें. *v. t.* place in position, determine p. of. जागेवर स्थापणें, ठेवणें, जागा ठरविणें. *Posi'tional, a. In position,* जागेवर, ठिकाणावर. *Out of p.*, जागा सोडून, अस्थानी.

**Pŏs'ĭtĭve,** *a.* ( पॉ'झिटिव्ह )—formally or explicitly laid down, definite; unquestionable; absolutely confident in opinion, cocksure; not negative; greater than zero; ( *Gram. adjective, degree* ) stating simply the existence of the quality without comparison; ( *Photog.* ) showing lights and shades as seen in nature आधीं ठरविक, निश्चित; निःसंशय, निर्विवाद, स्पष्ट; स्वतंत्र, निरपेक्ष, सापेक्षेतर, मताभिमानी, दुराग्रही; फाजील खात्रीचा; ऋण किंवा उणें नव्हे तें; शून्यापेक्षां अधिक; ( व्याक. ) मूळ कोटि, मूलगुणदर्शक, साधारण, ( फोटो० ) निसर्गतः दिसणारे प्रकाश व छाया दाखविणारा, वास्तविक. *n.* positive degree, adjective, quantity, photograph, etc. विशेषणाचें मूल रूप, साधारण कोटि, घन प्रकाशलेख, वास्तविक छायाचित्र. *P. laws,* मनुष्यनिर्मित, कृत्रिम,-कायदे. *P. proof,* खात्रीलायक पुरावा. *P. nuisance,* down-right, out-and-out *n.*, एकदम-निस्संशय-तापदायक. *P. philosophy,* प्रत्यक्षप्रमाण तत्वज्ञान, वास्तव-विद्या *P. sign,* +अधिक चिन्ह. *Pos'itively, adv.* खरोखर, वास्तविक; उघड, स्पष्टपणें, निक्षून, हट्टानें.

**Pŏs'ĭtĭvism,** *n.* ( पॉ'झिटिव्हिझम् )—philosophy of Comte recognizing only positive facts and observable phenomena; religion founded on this. फ्रेंच तत्त्ववेत्ता कॉम्प्ट यानें प्रतिपादिलेला प्रत्यक्षज्ञानमूलक धर्मपंथ.*-ist, n.* प्रत्यक्षज्ञानवादी.

**Pŏ'ssĕ,** *n.* ( पॉ'सि )—body ( *of* constables ), strong force or company. ( हवालदारांची,-पोलीस शिपायांची- ) तुकडी; मजबूत तुकडी,-लष्कर. *P. Comita'tus,* body of men above age of *15* in a county, whom sheriff may summon to repress riot etc. दंगा वगैरे मोडण्यासाठीं पंधरा वर्षांवरील तरुणांची भरती असलेली स्वयंसेवक-मंडळी.

**Possĕss',** *v. t.* ( पझे'स )—to hold as property; to own, to have; to have the mastery of, to have power over; to infatuate; to seize. स्वामित्व असणें; ०चा मालक असणें; अधिकार असणें; बुद्धिभ्रंश करणें, भुलवणें; घेरणें, भूतसंचार होणें. *Possessed by a devil,* भूतबाधा झालेला, भुतानें पछाडलेला. *To p. oneself of,* take, get, for one's own. स्वतःसाठीं घेणें, मिळविणें. *Be possessed of,* own, have. स्वताच्या मालकीचें असणें.

**Possĕ'ssion,** *n.* ( पझे'शन् )—possessing or being possessed; occupancy, a thing possessed; subject territory, foreign dominions; ( *pl.* ) property; wealth. मालकी; वहिवाट, धापर, ताबा; माल-

फीची वस्तु; कार्यीज केलेला मुलूख, ताब्यांतील परमांत; (अने०) मालमत्ता.

Posses'sive, *a.* (पझे'सिव्ह)—of or indicating possession. कबजाचा, स्वामित्ववाचक. *n.* possessive pronoun or case or word. स्वामित्ववाचक सर्वनाम; षष्ठी विभक्ति, षष्ठी विभक्त्यंत शब्द.

Pŏssĕss'or, *n.* (पझे'सर्)—owner; proprietor. मालक, धनी; वहिवाटणारा, भोक्ता.-*y*, *a.* of, or as of, a possessor. मालकाचा, मालकी, कबजाचा, मालकी ताबा असणारा.

Pŏss'ĕt, *n.* (पॉ'सिट्)—hot drink of milk with wine, spice, etc. दुधांत दारू वगैरे घालून केलेलें पेय.

Pŏss'ible, *a.* (पॉ'सिब्ल्)—that can exist, be done, or happen, practicable. संभवनीय, साध्य, शक्य. *n.* full marks, highest possible score. संपूर्ण गुण, जास्तीत जास्त गुण,-गुणसंख्या,-आंकडा. *Do one's p.*, do all one can. शिकस्तीचे प्रयत्न करणें. *As much as p.*, यथाशक्ति.

Pŏssibil'ity, *n.* (पॉसिबि'लिटि)—the state or condition of being possible; occurrence. शक्यता; संभवनीय गोष्ट.

Pŏss'ibly, *adv.* (पॉ'सिब्लि)—perhaps. कदाचित्, न जाणों.

Pŏss'um, *n.* (पॉ'सम्)—(colloq. for) opossum. पोटाच्या पिशवींतून पिलें नेणारें अमेरिकन जनावर; माणी. *To play p.*, to feign illness or death (from p.'s habit of feigning death when attacked). अजारीपणाचें किंवा मेल्याचें सोंग करणें.

Pōst, *n.* (पोस्ट्)—upright of timber or metal; official conveying of letters and parcels; appointed station; a place of duty; appointment; trading station; size of paper; local branch of Grand Army of the Republican or American Legion; (Hist.) courier, letter-carrier, mail-cart. खांब, स्तंभ; टपाल, डांक, ठाणें, चौकी; व्यापाराचें ठाणें; कागदाचा आकार; अमेरिकन सैन्याची स्थानिक शाखा; निरोप्या, पत्रें नेणारा, टपालाची-डाकेची-गाडी. *v. t. & i.* to put (letter, &c.) into post; to travel with post-horses; to hurry; to station in particular spot; to enter in ledger; supply with latest information, to display on a post or notice-board. (पत्र वगैरे) टपालांत टाकणें; भरधांव टपाल नेणाऱ्या किंवा प्रवासी घोड्यावरून जाणें; जलदी जाणें, दौड करणें; अमुक एक ठिकाणीं ठेवणें किंवा उभें करणें; पत्रकांत खतावणींत -खातेवहींत-नोंदणें,-लिहिणें; अगदीं ताजी बातमी पुरवणें; (खांबाला वगैरे) चिकटविणें. *adv.* with post-horses; express, in haste. भरधांव; तांतडीनें. *Post-boy*, letter-carrier, postilion. पत्रें नेणारा, जासूद, निरोप्या; गाडी ओढणाऱ्या घोड्यांपैकीं एकावरचा स्वार. *P.-card*, पोस्टाचें कार्ड. *P.-chaise*, (पोस्टशेज्), टपालाचा टांगा,-ची गाडी, प्रवाशांचा टांगा. *P.-free*, आगाऊ डांकहंशील लावलेलें,-पोस्टांतून मोफत जाणारें. *P.-haste*, with all speed. अत्यंत वेगानें. *P.-horses*, formerly used in relays by the post or by travellers. टप्प्याटप्प्यांनीं बदलावयाचे टांग्याचे किंवा टपालाचे घोडे. *P.-man*, डांकवाला, पत्रें वांटणारा. *P.-mark*, पोस्टाचा छाप. *P.-master*, पोस्टांतील मुख्य अधिकारी. *P.-paid*, on which postage has been paid. टपाल हंशील-तिकिट-आगाऊ लावलेलें. *The post*, winning post. अखेरची मजल, शर्यतींतील शेवटची जिंकण्याची जागा,-पोंचण्याची जागा.

Pōst, *prep.* (पोस्ट्)—L. post = after. नंतर, पुढें.

Pō'stage, *n.* (पो'स्टिज्)—the charge for carriage of letters or other articles by post. डांकहंशील, टपालखर्च. *P. stamp*, पोस्टाचें तिकीट.

Pō'stal, *a.* (पो'स्टल्)—of the post office. टपालखात्याचा, पोस्टखात्याचा. *P. union*, union of governments of various countries for regulation of international postage. आंतरराष्ट्रीय टपालहंशील ठरविण्यासाठीं निरनिराळ्या देशांच्या सरकारांचा संघ.

Pōst-dāte', *v. t.* (पोस्ट्-डे'ट्)—to affix or assign a later date than the real one. पुढील तारीख घालणें. *n.* (पो'स्ट्डेट्) नंतरची-पुढील-तारीख.

Pōst-dilu'vian, *a. & n.* (पोस्ट्डायल्यु'विअन्,-डिलू-)—(person) existing after the Flood. (नोहाचे वेळच्या) जलप्रलयानंतरचा (मनुष्य).

Pŏsteen', *n.* (पॉस्टी'न्)—Afghan leathern pelisse. अफगाणी स्त्रियांचा चामड्याचा झगा.

Pō'ster, *n.* (पो'स्टर्)—a posted placard; (Rugby footb.) attempt at goal that passes straight over a post. चिकटवलेली जाहिरात; (फुटबॉलचे खेळांत) सीमेवरील खांबावरून चेंडू घालवणें.

Pŏstē'rior, *a.* (पॉस्टी'रिअर्)—hinder; later in time or order. पिछाडीचा, पाठीमागचा; नंतरचा, पश्चात्कालीन. *n.* the buttocks. ढुंगण, गुदप्रदेश.

Pŏstĕ'rity, *n.* (पॉस्टे'रिटि)—a person's descendants; later generations. संतति, वंशज; पुढील पिढ्या.

Pō'stern, *n.* (पो'स्टर्न्)—the back or side entrance; a private door. मागलें किंवा बाजूचें दार; खाजगी दरवाजा, चोरखिडकी, दिंडी.

Pōst'-hāste, *adv.* (पो'स्ट्-हेस्ट्)—with all speed. अत्यंत वेगानें.

Post'hūmous, *a.* (पॉ'स्ट्युमस्)—born or published after the father's or author's death; occurring after death. बापाच्या मृत्यूनंतर जन्मलेला; कर्त्याच्या मृत्यूनंतर प्रसिद्ध झालेला (ग्रंथ); मरणोत्तर घडणारा.

Postil'ion, *n.* (पोस्टि'ल्यन्)—man riding one of the horses that draw a carriage and guiding the team. दोन घोडे जोडलेली गाडी (त्यांपैकीं एकावर बसून) हांकणारा.

Pōst merid'iem, *adv.* (पोस्ट्मेरि'डिअम्)—(abbr. *p. m.*) after noon, as 3·20 P. M. दुपारनंतरचा [L.]

Pōst-mŏrt'ĕm, *a.* (पोस्ट्-मॉ'र्टेम्)—after death. मरणानंतरचा. *n.* examination made after death. (मृत्यूचें कारण जाणण्याकरितां) मृत्यूनंतरची चौकशी [L.]

**Pōst-ōb'it**, *a.* & *n.* (पोस्ट्‌ऑ'बिट्)—taking effect after death; bond given by expectant heir for money to be paid on succession to the property. मरणानंतर अमलांत येणारा; भावी वारसानें मिळकत ताब्यांत आल्यावर पैसे (कर्ज) फेडण्याचा करारनामा.

**Postpōne'**, *v. t.* & *i.* (पोस्ट्‌-पो'न्)—to defer, to put off for a future or later time; treat (thing) as inferior in importance (*to* another); (of ague) be later in coming on. पुढें ढकलणें, लांबणीवर टाकणें; कमी महत्त्वाचा लेखणें, मागें टाकणें; मागून-उशिरां-येणें. *Postpone'ment*, *n.* तहकुबी, लांबणीवर टाकणें.

**Pōst-prăn'dial**, *a.* (पोस्ट्‌-प्रॅ'न्डिअल्)—(of speech, etc.) after-dinner. भोजनोत्तर, जेवणानंतरचें (भाषण इ.) [ L. *post*, after; *prandium*, lunch ]

**Post'script**, *n.* (पो'स्क्रिप्ट्)—(abbr. p. s.), addition made at the end of a letter or a book. ताजा कलम, पत्राची वगैरे पुरवणी.

**Pŏs'tūlāte**, *v. t.* (पॉ'स्ट्युलेट्)—to demand as a pre-requisite or basis; to lay down as indisputable. सिद्ध आहे असें गृहीत धरून चालणें, गृहीत धरणें; स्वयंसिद्ध मानणें. *n.* (पॉ'स्ट्युलिट्), thing postulated. गृहीत गोष्ट, गृहीत घेतलेलें तत्त्व,-सिद्धान्त.

**Pŏs'ture**, *n.* (पॉ'स्चर्)—carriage, attitude of body or mind; condition, particular state at a certain time. ठेवण; शरीरस्थिति, मनःस्थिति; अवस्था, दशा. *v. t.* & *i.* to take up a posture for effect, pose. विशिष्ट (शरीर) स्थिति घेणें, आसन घालणें; बतावणी करणें, ढोंग करणें, आविर्भाव आणणें. *P. maker*, acrobat, contortionist. कसरत करणारा, अंगप्रत्यंगाच्या नकला करणारा. *P. master*, कसरत करणारा.

**Pō'sy̆**, *n.* (पो'झि)—a bunch of flowers; inscribed motto or poetical verse (on ring, &c). पुष्पगुच्छ; मुद्रालेख.

**Pŏt**, *n.* (पॉट्)—a vessel of earthenware, metal or glass; (usu. *pott*) a size of paper; large sum; (Racing sl.) large sum staked or betted, favourite. मातीचें, कोणत्याहि धातूचें किंवा कांचेचें भांडें, भासन, पात्र; कागदाचा आकार; मोठी रक्कम, खूप पैसा; (शर्यतींत) जुगाराला लावलेला पैसा, आवडता (घोडा इ०). *v. t.* & *i.* to put into pot for preservation; plant in flower; (Billiards) pocket; bag (game); shoot at, secure. भांड्यांत-बरणींत-भरून ठेवणें; कुंडींत लावणें; (चेंडू) कशांत-कप्प्यांत-घालणें; शिकार साधणें; नेम धरणें, पकडणें. *P.-hook*, भांडीं अडकविण्याचा हूक,-कान; बांकदार अक्षर. *P.-hunter*, बक्षिसावर बक्षिसें मिळविण्यासाठीं चढाओढ करणारा; बाजारांत नेऊन विकण्याकरितां शिकार करणारा. *Big p.*, important person. महत्त्वशीर वजनदार-असामी,-मनुष्य. *The p. calls the kettle black*, person blaming another for fault he too has. स्वतःच्या अंगीं दोष असतां त्याच दोषांबद्दल दुसऱ्यांस नांवें ठेवणें. *To go to p.*, be ruined or destroyed. चुलींत जाणें, रसातळास जाणें. *To make the p. boil*, make a living. पोट भरणें, पोटापुरतें मिळविणें. *Keep the p. boiling*, स्वतःचें पोट भरणें; कोणतीहि गोष्ट तशीच जोरांत चालू ठेवणें. *P. house*, ale-house. दारूचा पिठा, गुत्ता. *Pot'sherd* *n.* (पॉ'ट्‌-शर्ड्)—a piece or fragment of an earthenware pot. मडक्याचा तुकडा, खापरी.

**Pō'table**, *a.* (पो'टेबल्)—drinkable. पिण्याला योग्य, पेय. *n. pl.* drinkables. पेय पदार्थ.

**Pŏt'ăsh**, *n.* (पॉ'टॅश्)—an alkali in an impure state used in soap. एक जातीचा साबणांत वापरण्याचा क्षार.

**Pōtăs'sium**, *n.* (पोटॅ'सिअम्)—a white metal. एक पांढरी धातु, पालाश.

**Potā'tion**, *n.* (पोटे'शन्)—drinking, draught. पिणें, घोंट.

**Potā'to**, *n.* (पाटे'टो)—(pl.-*oes*), a plant with tubers used as food, the tuber of potato. बटाटा. (*sl.*) *Quite the p.*, *proper thing.* योग्य वस्तु,-गोष्ट. *P.-box,-trap*, mouth. तोंड, मुख.

**Poteen'**, **potheen'**, *n.* (पोटी'न्, पॉटही'न्)—Irish whisky from illicit still. आयरिश लोकांनीं चोरून काढलेली दारू.

**Pō'tent**, *a.* (पो'टन्ट्)—powerful; cogent; strong; influential. प्रतापी, पराक्रमी; दृढ; बळकट; वजनदार, भारी. *Potency*, *n.*; *Potentate*, *n.* ruler, king, etc. अधिपती, राजा, सत्ताधीश, अधिराज.

**Potĕn'tial**, *a.* (पोटे'न्शल्)—capable of coming into being, latent; (*Gram.*) expressing possibility of an action. संभवनीय, अव्यक्त; शक्यतादर्शक. *n.* potential mood; potential function or amount of energy or work denoted by it. शक्यार्थ; संभाव्यता, संभाव्यशक्ति, अव्यक्त शक्ति,-जोम,-जोर.

**Potĕntiăl'ity̆**, *n.* (पोटेन्शिॲ'लिटि)—possibility. शक्यता.

**Poth'er**, *n.* (पॉ'दर्)—choking smoke or cloud of dust; disturbance, din; display of sorrow. गुदमरविणारा धूर किंवा धुरळा; गोंधळ, धांदल, कलकलाट; रडारड, आरडाओरड. *v. t.* & *i.* to fluster, worry; make a fuss. त्रास देणें, त्रेधा करणें; गडबड करणें.

**Pō'tion**, *n.* (पो'शन्)—draught of medicine or poison, dose to be drunk. औषधाचा किंवा विषाचा घोंट.

**Pot-pourri**, *n.* (पो' पुरि)—mixture of rose petals, spices, etc. kept in jar for its perfume; musical or literary medley. गुलाबाच्या पाकळ्या, सुगंधी मसाल्याचीं द्रव्यें वगैरेंचें सुवासिक मिश्रण; संगीताची किंवा वाङ्मयाची भेसळ,-पंचमेळ,-मिश्रण, -भारूड.

**Pŏtt'age**, *n.* (पॉ'टिज्)—soup or stew. मांसाची कढी.

**Pŏtt'er**, *n.* (पॉ'टर्)—a maker of earthenware vessels. मातीचीं भांडीं तयार करणारा, कुंभार, कुंभकार, कुलाल. *P.'s asthma, bronchitis*, कुंभारकामांतील धुळीमुळें होणारा दमा, खोकला.

**Pŏtt'er**, *v. i.* & *t.* (पॉ'टर्)—to work in feeble manner (*at*, *in* subject, occupation); loiter

(*about*); trifle *away* (one's time). खतखत काम करणें; टंगळमंगळ करणें; वेळ फुकट घालवणें.

**Pŏt'erў**, *n.* (पॉ'टरि)—earthenware; potter's work or workshop. मातीचीं भांडीं; कुंभाराचा कारखाना. *The potteries*, district in N. Staffordshire, seat of pottery industry. इंग्लंडांतील उ. स्टॅफोर्डशरमधील मातीच्या भांड्यांसाठीं प्रसिद्ध विभाग.

**Pŏt'tle**, *n.* (पॉ'टल्)—liquid measure (half gallon), pot containing it; small wicker or chip basket. चार पाइंटाचें केलें माप; फळांची टोपली,-करंडी.

**Pŏt'ty**, *a.* (पॉ'टि)—(sl.) insignificant; crazy. क्षुद्र, क्षुल्लक, माथेफिरू; वेडसर.

**Pouch**, *n.* (पाउच्)—a small bag; a detachable pocket. (चामड्याची) पिशवी, थैली; सुटा खिसा, तोसदान. *v. t. & i.* to put into pouch; take shape of or hang like pouch. पिशवींत घालणें, -टाकणें; पिशवीचा-खिशाचा-आकार असणें, पिशवी-सारखें लोंबणें.

**Poult**, *n.* (पोल्ट्)—a young fowl, turkey, or game-bird, young chicken. लहान पक्षी, कोंबडीचें लहान पिल्लूं.

**Poul'terer**, *n.* (पो'ल्टरर्)—a dealer in poultry. कोंबडीवाला, कोंबडीविक्या.

**Poul'tice**, *n.* (पो'ल्टिस्)—soft dressing applied to a sore or inflamed part. पिकवण, पोटीस. *v. t.* to apply p. to. पोटीस लावणें.

**Poul'try**, *n.* (पो'ल्ट्रि)—barndoor and other fowls reared for food. कोंबडी व तशाच जातीचे भक्ष्य प्राणी.

**Pounce**, *v. i.* (पाउन्स्)—to swoop, to come suddenly down upon, to fall on suddenly. पंजा मारणें, झडप घालणें, हल्ला करणें. *n.* sudden descent upon something; claw, talon, of bird of prey. आकस्मिक झडप, हल्ला; (पक्ष्याचा) पंजा. *To make a p.*, झडप घालणें.

**Pounce**, *n.* (पाउन्स्)—fine powder used in pattern-tracing or to prevent ink from spreading on unsized paper. रांगोळी, धूळ, रेती; वाळू. *v. t.* to smooth with pumice or pounce; transfer by use of p.; dust pattern with p. दगडानें किंवा वाळूनें घासून तुळतुळीत करणें; रांगोळी वगैरे घालून नमुना -छाप-उमटविणें; नमुन्यावर वाळू घालणें,-पसरणें.

**Pound**, *v. t. & i.* (पाउन्ड्)—to crush to pieces or powder or shapelessness; to thump, to pummel, *to make continued efforts; walk, run,* heavily (*along*); to shut (*up*) in a pound. ठेचणें, कुटणें; बडवणें, ठोकणें, चेंचणें; सारखे प्रयत्न करणें; जोरानें-वेगानें-चालणें, धांवणें; कोंडवाड्यांत कोंडणें. *n.* enclosure for detention of stray cattle; a measure of weight (*lb.*), 16 oz. or 12 oz.; 20 shillings; (his.) pound Scots, 1 s. 8 d. कोंडवाडा; एक रत्तल (१६ किंवा १२ औंस); वीस शिलिंग किंमतीचें एक पौंडाचें सोन्याचें नाणें; (ऐति.) १ शि. ८ पे. नाणें.

**Pound'age**, *n.* (पा'उंडिज्)—commission or fee of so much per £; payment of so much per lb.; (hist.) customs duty on pound's-worth of imports and exports. दर पौंडामागें घेतलेली वटवणावळ; दर पौंडामागें ठरलेली दस्तुरी; आयात-निर्यातीच्या मालावर दर पौंड किंमतीवर जकात.

**Pour**, *v. t. & i.* (पोअर्)—to issue or make issue in a stream or shower; to discharge; to send forth, to give vent to, to throw in profusion. ओतणें, वाहणें, सोडणें; वर्षाव करणें, भडिमार-मारा-करणें, पाऊस पाडणें. *Pour'ing, a. To pour oil upon troubled waters,* (fig.) calm disturbance with soothing words, etc. गोड शब्दांनीं भांडण मिटविणें,-भानगड मिटविणें. *To p. cold water on,* (fig.) discourage (person, zeal, plan). निरुत्साह करणें, उत्तेजन न देणें. *It never rains but it pours,* misfortunes always come together. संकटें चोहोंकडून येतात-ओढवतात.

**Pourparler**, *n.* (पोअर्पा'र्ले)—(usu. in pl.) informal discussion preliminary to negotiation between diplomatists. वाटाघाटीपूर्वीचें अनौपचारिक संभाषण,-बोलणें,-वाटाघाट.

**Poussĕtte'**, *n. & v. i.* (पुसे'ट्)—swing round with joined hands in country dance. हातांत हात घालून जोडीजोडीनें वाटोळें नाचणें.

**Pout**, *v. t. & i.* (पाउट्)—to thrust out the lips; protrude (lips). ओंठ बाहेर काढणें; (ओंठ रागानें) बाहेर पडणें, बाहेर येणें. *n.* act or fact of pouting; kinds of fish. बाहेर ओंठ काढणें, रुसवा, फुरगटणें; एक जातीचे मासे. *Pout'er, n.* (esp.) pigeon with prominent crop. लठ्ठ मानेचें-गळ्याचें-कबुतर.

**Pŏv'ertў**, *n.* (पॉ'व्हर्टि)—want of means, indigence; the poor; poorness. निर्धनता; गरीब लोक; दारिद्र्य. *P. stricken,* दरिद्री, कंगाल (भाषा इ.).

**Powd'er**, *n.* (पॉ'व्-डर्)—a mass of fine dry particles; cosmetic or dose of medicine in this form; gun-powder; (Games etc.) force put into a blow or stroke. चूर्ण, पूड; केसांना लावण्याची सुगंधी पूड,-चूर्ण; औषधी चूर्ण, पूड; बंदुकीची दारू; (खेळांत) फटाक्यांतील जोर,-आवेश, जोराचा टोला. *v. t. & i.* to reduce to powder; to sprinkle with powder. चूर्ण करणें; पूड होणें; केसांना,-तोंडाला-पूड लावणें. *Powd'ery, a.* consisting of or covered with powder. पिठासारखा, पिठूळ, चूर्णमय, चूर्णाचा. *Powder flask,-horn,-magazine,* for carrying or storing gun-powder. बंदुकीची दारू ठेवण्याचा शिंगडा,-साठा. *Powder monkey,* (hist.) जहाजावर बंदुकीची दारू संभाळणारा व लढाईच्या वेळीं पुरविणारा पोऱ्या. *P.-puff,* सुवासिक पूड तोंडावर मारण्याची लहान मऊ उशी,-साधन.

**Pow'er**, *n.* (पॉ'वर्)—ability to do or act; delegated authority; control, influence, ascendancy; mechanical energy applicable to work; state having international influence; deity; (Math.) product obtained by multiplying the number into itself. योग्यता, कर्तृत्वशक्ति; अधिकार; वजन,

प्रभाव; शक्ति, धर्म, गुण, ताकद, जोर, जोम, कुवत, सामर्थ्य; सामर्थ्यवान-प्रबल-राष्ट्र; वेयता; (गणितांत) घात. *P.-house,-station*, house or station for generating and distributing electric power. विजेची शक्ति (वीज) निर्माण करून ती चोहोंकडे पुरविण्याचें ठिकाण. *In* one's *power*, under one's control. आपल्या ताब्यांत, हाक्यांत. *Party in p.*, अधिकारारूढ पक्ष. *P.-mill*, वाफेच्या शक्तीवर चालणारी गिरण. *P. of Attorney*, मुखत्यारपत्र.

**Pow'erful**, *a.* (पॉ'वर्-फुल्)—having great power, strong, efficacious, influential. बलवान्, प्रबळ, बळकट, उग्र. *Powerless, a.* without power, helpless. असमर्थ, निःशक्त, दुबळा, दुर्बळ, निस्तेज, फिक्का.

**Pow'wow**, *n.* (पॉ'व्वॉव्)—meeting of N. American Indians for conference; (joc.) conference, palaver. उत्तर अमेरिकेंतील रेडइंडिअन लोकांची सभा; सभा, संमेलन.

**Prăc'ticable**, *a.* (प्रॅ'क्टिकेबल्)—that can be done or effected; feasible, passable. शक्य; साध्य, सुकर. *-bility, n.*

**Prăc'tical**, *a.* (प्रॅ'क्टिकल्)—of or shown in action rather than theory or words. कृतीचा, परिपाठांतील, सरावाचा, व्यवहार्य, अनुभविक.*-al'ity, n.*

**Prăc'tically**, *adv.* (प्रॅ'क्टिकलि)—in a practical manner, actually, virtually. खरोखर, व्यवहारदृष्ट्या, वस्तुतः

**Prăc'tice**, *n.* (प्रॅ'क्टिस्)—action as opposed to theory; an established method; an exercise to improve skill; lawyer's or doctor's professional business; (*Arith.*) mode of multiplying together expressions of several denominations stratagem. कृति, आचरण; पद्धत, आचरण, आचार वहिवाट, चाल, रीत; अभ्यास, परिपाठ, संवय, धंदा, काम, उद्योग; हिस्सेरशी; युक्ति, कावा, हिकमत, क्लृप्ति. *In practice, out of p.*, अलीकडे सराव,-संवय,-असलेला; -नसलेला. *In p.*, व्यवहारांत, प्रत्यक्ष कृतींत. *To put in (to) p.*, carry it out. व्यवहारांत आणणें, कृतींत उतरविणें.

**Prăc'tise**, *v. t. & i.* (प्रॅ'क्टिस्)—to teach by practice, to accustom, to put in practice; to pursue profession; to exercise oneself in; to impose *upon*. आचरणांत आणणें; धंदा चालवणें; अभ्यास करणें; सराव असणें; राबवणें, तालीम देणें; ठकविणें, फसावेणें, अयोग्य फायदा घेणें.

**Prăcti'tioner**, *n.* (प्रॅक्टि'शनर्)—engaged in practising as doctor or lawyer. धंदा करणारा डॉक्टर, वैद्य, किंवा वकील. *General p.*, औषधीक्रिया व शस्त्रक्रिया हीं दोन्हीं करणारा.

**Praepŏs'ter**, *n.* (प्रिपॉ'स्टर्)—prefect or monitor in school. शाळेंतील अधिकारी विद्यार्थी, प्रिफेक्ट.

**Prætor**, *n.* (प्रे'टर्)—ancient-Roman magistrate of lower rank than Consul; (later) annually elected magistrate. प्राचीन रोमन साम्राज्यांतील एक अधिकारी, (नंतर) प्रतिवर्षी निवडलेला अधिकारी (मॅजिस्ट्रेट). **Praetŏr'ian**, *a.* of a praetor; of the bodyguard of Roman Emperor or general. मॅजिस्ट्रेटचा; रोमन बादशहाच्या किंवा सेनापतीच्या शरीररक्षकाचा. *n.* man of praetorian rank; praetorian soldier. मॅजिस्ट्रेटच्या दर्जाचा मनुष्य; शरीररक्षक शिपाई.

**Prăgmăt'ic,-al**, *aa.* (प्रॅग्मॅ'टिक्,-कल्)—(usu.-*al*) meddlesome; positive, dictatorial; (usu.-*ic*) treating facts of history with reference to their practical lessons; of State affairs. लुबरा, लुडबुड्या, नसती उठाठेव करणारा; अधिकारवाणीचा, अरेरावीचा; ऐतिहासिक गोष्टींची व्यावहारिक उपयोगाशीं सांगड घालणारा, इतिहासाचा व्यावहारिक उपयोगाच्या दृष्टीनें विवेचन करणारा; राज्यकारभारासंबंधीं.

**Prăg'matism**, *n.* (प्रॅ'ग्मॅटिझम्)—pragmatical behaviour or tendencies; (philos.) doctrine that estimates any assertion solely by its practical bearing upon human interests. लुडबुडेपणाची वागणूक, चोंबडेपणाकडे कल; (तत्त्व.) केवळ मानवी हिताच्या दृष्टीनें कोणत्याहि विधानाचा किंवा गोष्टीचा विचार करण्याचें तत्त्व.*-ist, n.*

**Prair'ie**, *n.* (प्रे'अरि)—extensive treeless tract of grassy land mostly level or nearly so. (उत्तर अमेरिकेंतील) माळजमीन, गवताळ रान.

**Praise**, *v. t.* (प्रेझ्)—to express approbation of; to commend; to glorify. वाखाणणें; स्तुति करणें, गुणानुवाद गाणें. *n.* commendation. approbation, admiration, glorification; praising. वाखाणणी, प्रशंसा; स्तुति, स्तवन, शाबासकी, वाहवा.

**Praise'worthy̆**, *a.* (प्रेझ्-वर्दि)—deserving of praise or applause, meritorious. स्तुत्य, वाखाणण्यासारखा.

**Pra'line**, *n.* (प्रा'लिन्)—sweetmeat of nuts and sugar. बदाम वगैरेची मिठाई.

**Prănce**, *v. i.* (प्रान्स्)—(of horse) to spring from the hind legs; to walk or move in elated or arrogant manner. पाठीमागच्या पायांनीं उडी मारणें; डौलानें किंवा आढ्यतेनें चालणें. *n.* spring, caper. उडणें, नाचणें, बागडणें.

**Prăn'dial**, *a.* (प्रॅन्डिअल्)—of or at dinner. भोजनाचा, भोजनसमयींचा.

**Prănk**, *v. t. & i.* (प्रँक्)—to deck, to adorn, to spangle; to show oneself *off*. नटणें, शृंगारणें; डौलानें मिरवणें. *n.* gambol, freak or frolic, escapade. उडी मारणें, चेष्टा, ढंग.

**Prāse**, *n.* (प्रेझ)—a green quartz. हिरवा कांचमणि.

**Prāte**, *v. i.* (प्रेट्)—to discourse foolishly, to talk solemn nonsense, to babble, to chatter. मूर्खपणानें बोलणें, बडबडणें, बडकणें. *n.* idle talk. बटबट, बडबड, जल्पना.

**Prā'ties**, *n.* (प्रे'टिझ्)—(Anglo-Ir.) potatoes. बटाटे.

**Prăt'tle**, *v. t.* (प्रॅ'टल्)—to talk in childish or artless way. पोरासारखें बोलणें, बडबडणें. *n.* prattling talk, loquacity on trivial subjects. बटबट, पोरकट

भाषण, बोबडें बोलणें. *Pratt'ler, n.* ( arch. ) young child. ( बोबडें बोलणारें ) लहान मूल. *Prat'tling, a.*

**Prawn,** *n.* ( प्रॉन् )—crustacean like large shrimp. एक जातीचा मोठा मासा, कोळंबें ; झिंगा, अग्निमत्स्य. *v. i.* to fish for prawns. कोळंबें ( मासे ) पकडणें.

**Pray,** *v. i. & t.* ( प्रे )—to offer prayers, to make supplication ( to God or person ); to ask earnestly; to beg for, to beseech. प्रार्थना करणें ; करुणा भाकणें.

**Pray'er,** *n.* ( प्रे'अर् )—petition made to God; praying; an entreaty; one who prays. ईश्वराची प्रार्थना; विनंति, विनवणी ; प्रार्थना करणारा. *P. book,* ( esp. ) Book of common prayer. प्रार्थनापुस्तक.

**Prayer'ful** *a.* ( प्रेअर्-फुल् )—not without prayer, devotional ; given to prayer. भाविक, भक्तियुक्त; प्रार्थनानिष्ठ.

**Pre-,** *pref.* ( प्रि )—before ( in time, place, order, or importance ). पूर्वी,-पूर्व.

**Preach,** *v. i. & t.* ( प्रीच् )—to deliver sermon ; to give obtrusive advice. धर्मावर प्रवचन करणें ; न विचारतां उपदेश करणें.*-er, n.* धर्मोपदेशक.*-ment, n.* ( colloq. ) intrusive moralising. आपण होऊन नीतीच्या-धर्माच्या-गोष्टी सांगणें,-उपदेश करणें.

**Preăm'ble,** *n.* ( प्रिॲम्बल् )—part of a document, &c. serving as an introduction. उपोद्घात, प्रस्तावना, कायदा वगैरे करण्याची कारणमीमांसा. *v. i.* to make p. प्रस्तावना जोडणें,-लिहिणें-लावणें.

**Pre'ărrange,** *v. t. & i.* ( प्री'अरेंज् )—to arrange before-hand. आगाऊ तजवीज करणें, आधींच योजून ठेवणें.*-ment, n.*

**Prĕb'end,** *n.* ( प्रे'बंद् )—stipend of canon or member of chapter. धर्मोपदेशकाला वगैरे द्यावयाचें वेतन,-पगार, -वर्षासन.*-al, a.* कॅननच्या वृत्तीसंबंधीं.*-ary, n.* holder of a p. वर्षासन धारण करणारा, वृत्ती असलेला कॅनन.

**Precār'ious,** *a.* ( प्रिके'रिअस् )—dependent on chance; uncertain, risky. दैवाधीन ; अनिश्चित; परतंत्र, पराधीन, संकटमय, धोक्याचें.

**Precau'tion,** *n.* ( प्रिकॉ'शन् )—a thing done beforehand to prevent an apprehended evil. आगाऊ तजवीज, पूर्वदक्षता.*-ary, a.* सावधगिरीचा, आगाऊ दक्षतेचा, पूर्वोपायाचा, सावध करणारा. *To take precautions aginst,* पूर्वीच दक्षता बाळगणें,-आगाऊ उपाय योजणें.

**Precēde',** *v. t. & i.* ( प्रिसी'ड् )—to come or go before in place or time or rank or importance. पुढें किंवा अगोदर येणें किंवा जाणें ; पुरोगामी होणें ; ( मानसन्मानांत ) पहिला, अग्रेसर,-असणें.

**Precē'dence,** *n.* ( प्रिसी'डन्स )—priority in time or succession; superiority, the right to more honourable higher position. अग्रगमन ; श्रेष्ठत्व, प्राधान्य ; पहिला मान. *To take p. of all others,* इतर सर्वांहून श्रेष्ठ असणें, अग्रगामी असणें.

**Prĕ'cedent,** *n.* ( प्रे'सिडेन्ट )—a previous case taken as an example or justification of a rule to be followed in subsequent cases. मागील उदाहरण किंवा दाखला, मामूल, शिरस्ता. *a.* preceding. मागील, पूर्वीचा, पूर्वगामी.

**Precĕn'tor,** *n.* ( प्रिसे'न्टर् )—the leader of a choir's or congregation's singing in cathedral. ख्रिस्ती देवळांतील अग्रगायक. [ L. *prae,* before; *canere,* sing ]

**Prē'cept,** *n.* ( प्री'सेप्ट )—a rule for action or conduct; command, maxim, moral instruction, divine command, kinds of writ or warrant. विधि, नियम, शास्त्राज्ञा, नीतिबोध ; दैवी आज्ञा ; लेखी हुकूम. *Example is better than precept,* दुसऱ्या उपदेशापेक्षां ती स्वतः आचरून दाखविणें हें चांगलें.

**Precĕp'tor,** *n.* ( प्रिसे'प्टर् )—a teacher, an instructor, the teacher of a school. शिक्षक, अध्यापक, गुरु, उपदेशक.*-tress, n.* fem.

**Precĕs'sion,** *n.* ( प्रिसे'शन् )—change by which the equinoxes occur earlier in each successive sidereal year. अयनचलन, अयनांश. *P. of the equinoxes,* अयनगति, विषुवायन.

**Prē'cinct,** *n.* ( प्री'सिंक्ट )—ground pertaining to a sacred or official building or place ; ( *pl.* ) the environs of ; boundary ; ( U. S. ) police or election district. अमुक एक मर्यादित जागा ; ( अने० ) आसपासचा प्रदेश, शेजार, सीमा, शींव, हद्द ; पोलीसच्या अधिकारांतील किंवा निवडणुकीसाठीं प्रांत,-विभाग.

**Prēcĭŏs'ity,** *n.* ( प्रेशिऑ'सिटि )—over-refinement in art, esp. in choice of words. कलेंतील किंवा शब्दांची निवड करण्यांत फाजील चिकित्सा,-चोखंदळपणा.

**Prĕ'cious,** *a.* ( प्रे'शस )—of value, valuable, highly valued ; ( colloq. usu in irony ) great, fine. मोठ्या किंमतीचा ; अमूल्य, बहुमूल्य, किंमतवान, मोठा, सुंदर, चांगला.*-ly, adv.;-ness, n. Precious metals,* सोनें, रुपें वगैरे मौल्यवान धातु. *P. stone,* jewel. रत्न.

**Prĕ'cipice,** *n.* ( प्रे'सिपिस् )—a headlong declivity, vertical steep face of a rock, &c. ( तुटलेला ) कडा, कड, डगर.

**Precip'itance,-cy̆** *nn.* ( प्रिसि'पिटन्स,-सि )—rash or excessive haste; headlong hurry. निष्कारण घाईल; उतावीळपणा, घाई, धडपड, हुडपणा.

**Precip'itāte,** *v. t.* ( प्रिसि'पिटेट् )—to throw headlong down ; to cause to go hurriedly or violently ; cause (solid matter in solution) to be deposited ; condense ( vapour ) into drops and so deposit. डोकीकडून खालीं लोटणें, कडेलोट करणें ; धामधूमीत नेणें, उतावीळ करणें ; तळीं बसवणें, सांका पाडणें, निवळीच्या रूपानें बसणें, अवक्षेप करणें ; थेंब बनून तळीं राहणें,-बसणें. *a.* ( प्रिसि'पिटिट् ) headlong ; rash ; done too soon. अविचाराचा ; उतावळा ; उतावळेपणानें केलेला. *n.* ( -टिट् ) solid matter precipitated. ( खालीं बसणारा ) सांका, अवक्षेप. *Precip'itation, n.* rash haste ; depositing of solid matter from solution. उतावीळ, घाई ; अवक्षेप, सांका, तळाशीं बसवणें.

**Precip'itous,** *a.* ( प्रिसि'पिटस् )—of the nature of a

isions), of highest quality. मुख्य, प्रमुख; मूळचा, अविभाज्य, अस्सल; उत्तम प्रतीचा, उत्कृष्ट, उंची, शेलका, निवडक. *n.* first or best part of something, the spring of life; state of highest perfection. तारुण्याचा भर, भरज्वानी, यौवन, (आयुष्याचा) उत्तम भाग, सार; निवडक-शेलका-भाग, उत्तमांश; उत्तम स्थिति *v. t.* to prepare (old gun, explosive charge) for being let off; equip with facts; ply with liquor; prepare (wood) for paint. (बंदुकीला, स्फोटक द्रव्याला) रंजक,-काना,-भरणें;-उडविण्याची तयारी करणें; माहिती देणें, पुरविणें; भरपूर दारु पाजणें,-झिंगविणें; रंग देण्याच्या लायकीचें करणें, पहिला (रंगाच्या-तेलाचा) हात देणें. *P. cost,* मूळ किंमत. *P. minister,* (इंग्लंडचा) मुख्य, प्रधान. *P. number, factor.* अविभाज्य संख्या,-अवयव (उदा. २, ३, ५, ७, ११ इ.) *P. vertical (circle),* पूर्वापर वृत्त. *To reach one's prime,* उमेदींत येणें.

**Pri'mer,** *n.* (प्रा' इ-मर्)—an elementary schoolbook; a manual, a small book. वर्णमालेचें पुस्तक; लहान मुलांचें पहिलें पुस्तक. *Great, long, primer,* sizes of type. टंकाचे-टायपाचे-प्रकार.

**Prime'val,** *a.* (प्राइ-मी'व्हल)—of the first age of the world; original, primitive. पुराणयुगीन, प्राचीन काळचा, आदियुगाचा; मूळचा.—*lly, adv.* प्रथमतः, आदौ.

**Pri'ming,** *n.* (प्रा' इमिंग)—(*esp.*) powder, mixture, used to prime explosive or wood. रंजकीची दारू, रंजक; स्फोटक द्रव्याला पत्ती लावण्याची दारू. 2. acceleration of the tides taking place from neap to spring tides. भांगाच्या आणि उधानाच्या भरतीमधल्या दिवसांत भरतीची उत्तरोत्तर होणारी वाढ.

**Prim'itive,** *a.* (प्रि'मिटिव्ह्)—ancient; of an early, simple or old-fashioned kind; original. प्राचीन; जुन्या चालीचा, प्राथमिक, मूळचा; असाधित. *n.* a word or colour not derived from another; painter of period before Renaissance, picture by such painter. सिद्ध शब्द, सिद्ध रंग; (युरोपखंडांतील विद्येच्या व कलांच्या) पुनरुज्जीवन-काळापूर्वीचा चित्रकार, त्यानें काढलेलें-रंगविलेलें चित्र.

**Primogeni'ture,** *n.* (प्राइमॉजे-नि'चर्)—principle by which property descends to the eldest son or child. ज्येष्ठ मुलाला-संततीला-संपत्ति मिळावी हें तत्त्व, ज्येष्ठपणाचा वारसा. *Primoge'nitor n.* earliest ancestor. आद्य पूर्वज, मूळपिता; पूर्वज, वाडवडील.

**Primor'dial,** *a.* (प्राइमॉ'र्डिअल्)—existing at or from the beginning, first in order. पहिल्यापासूनचा, मूळचा, प्राथमिक, अगदीं पहिला, अस्सल.

**Prim'rose,** *n.* (प्रि'म्रोझ्)—a pale-yellow spring flower; plant bearing it; (attrib.) primrose-coloured. एक जातीचें पिंवळसर फुल,-फुलझाड; या पिंवळसर फुलाच्या रंगाचें. *The p. path,* the pursuit of pleasure. सुखेच्छा, सुखाच्या मार्गे लागणें.

**Prim'ula,** *n.* (प्रि'म्युला)—kinds of flowering plant including primroses. प्रिमरोझ आदिकरून एका जातीचीं फुलझाडें.

**Pri'mus,** *a.* (प्रा'इमस)—the first. पहिला. *n.* kind of stove burning vaporized oil, P. प्राइमस् स्टव्ह, -चुला.

**Prince,** *n.* (प्रिन्स्)—sovereign; ruler of feudatory State; male member of royal family, the chief of any class of men, noble of high rank. राजा; मांडलिक राजा; राजपुत्र; राजा, प्रमुख, सर्वश्रेष्ठ पुरुष. *P. of Peace,* Christ. येशु ख्रिस्त. *P. of darkness, the air, the world,* Satan, सैतान. *P. of Wales,* heir apparent to British throne. ब्रिटिश सिंहासनाचा भावी वारस. *P. Consort,* (राज्यकर्त्या) राणीचा नवरा. *Hamlet without the Prince of Denmark,* thing robbed of its essence. मुख्य तत्त्वच-राम-जीव नाहीं अशी वस्तु,-गोष्ट. *Prince's feather,* kinds of plant. एक जातीचीं फुलझाडें. *P.'s metal,* alloy of copper & zinc. तांबें आणि जस्त यांची भेसळ; कांसें.

**Prince'ly,** *a.* (प्रि'न्स्लि)—becoming a prince; sumptuous, grand. राजाला शोभणारा; वैभवशाली, भव्य.

**Prin'cess,** *n.* (प्रि'न्सेस्)—prince's wife; a female member of the royal family. राणी; राजकन्या, राजकुमारी.

**Prin'cipal,** *a.* (प्रि'न्सिपल)—first in importance; chief, leading. पहिल्या प्रतीचा; मुख्य; प्रमुख. *n.* head of some institution; a person for whom another is an agent; the capital sum originally lent or invested. मुख्याधिकारी; मालक; मूळ दिलेली रक्कम, मुद्दल. *Lady p.,* female head. (शाळा-कॉलेज वगैरेची) मुख्याधिकारिणी, स्त्री-प्रमुख. *Prin'cipalship, n. P. in the first degree,* पहिल्या प्रतीचा,-प्रत्यक्ष स्वतः (गुन्हा करणारा.); *P. in the second degree,* त्याचा साथीदार,-मदतनीस *Prin'cipally, adv.* मुख्यत्वेंकरून.

**Principal'ity,** *n.* (प्रिन्सिपॅ'लिटि)—a State ruled by a prince, the territory of a prince. मांडलिक राज्य, मांडलिक देश. *The P.,* Wales. वेल्स परगणा,-प्रांत.

**Prin'ciple,** *n.* (प्रि'न्सिपल्)—primary source or element; fundamental truth; a rule by which conduct may be guided. कारण, बीज; मूलतत्त्व, कारकतत्त्व; सामान्य नियम, तत्त्व. *First principles,* मूलतत्त्वें. *A man of high p.,* उच्च तत्त्वाचा मनुष्य. *On p.,* from settled moral motive. केवळ तत्त्वासाठींच (स्वार्थी हेतूनें नव्हे.)

**Print,** *n.* (प्रिन्ट्)—mark left on a surface by pressure; impression left on paper by inked type or photography; reading-matter produced from type; cotton fabric stamped in colours; engraving, newspaper, photograph or picture produced from negative. छाप, ठसा; शिक्का, मुद्रा; छापील मजकूर; चीट, छापील कापड; खोदीव ठसा, वर्तमानपत्र, ऋणकांचेवरून छापलेलें छायाचित्र. *v. t.* to stamp or impress; to produce by means of printing-types; stamp fabrics in colours. ठसा मारणें, मनावर ठसविणें,-बिंबविणें; छापणें, छापविणें, छापून काढणें; कापड छापणें, चीट तयार करणें, खडी

काढणें. *Finger p, foot p.*, बोटाचा,-पायाचा,-ठसा. (Book is) *in print*, in printed form; on sale. छापून तयार, विक्रीस तयार. *Out of p.*, sold out. आवृत्ति संपलेलें, सध्यां न मिळणारें (पुस्तक). *To rush into p.*, (of writer) publish book, write to newspaper, on insufficient grounds. अपुऱ्या माहितीनें पुस्तक प्रसिद्ध करणें,-वर्तमानपत्रांत लिहिणें. *P. hand, letters, script.* छापीलप्रमाणें हस्ताक्षर, अक्षरें, लेखन. *P. seller*, छापील-खोदीव-माल विकणारा. *P. shop*, छापाच्या मालाचें दुकान. *P. works*, चित्रें वगैरे छापण्याचा कारखाना.

**Prin'ter**, *n.* (प्रि'न्टर्)—a workman employed as a compositor, a pressman or a machine-minder; an employer or overseer of these workmen. छापखान्यांतील नोकर; छापखानेवाला, छापण्याचें काम करणारा, मुद्रक. *P.'s devil*, an errand-boy. छापखान्यांतील पोऱ्या,-निरोप्या. *Printing*, *n.* (esp.) the process of impressing words from type; typography. छापणें, छपाई; मुद्रणकला, छापण्याची कला.

**Pri'or**, *n.* (प्रा'यर्)—superior of a religious house; (in abbey) abbot's deputy; (hist.) chief magistrate in some Italian republics. महंत, मठाधिपति; ॲबटच्या दर्जाचा अधिकारी; (ऐति.) इटालींतील कांहीं संस्थानांचा मुख्य अधिकारी, न्यायाधीश. *a.* earlier; antecedent (to). अगोदरचा; पहिला. *Pri'oress*, *n.* मठाधिपतीण, महंतीण. *Pri'ory*, *n.* religious house governed by prior (-ess). मठ.

**Prio'rity**, *n.* (प्रायॉ'रिटि)—being earlier; precedence, pre-eminence, preference. आद्यता; अग्रमान, मोठेपणा, पहिला मान.

**Pri'sm**, *n.* (प्रि'झम्)—a solid figure whose two ends are similar, equal and parallel rectilineal figures, and whose sides are parallelograms; transparent body of this form with refracting surfaces; (pl.) prismatic colours. त्रिपार्श्वकांच, चिति; त्रिकोणाकार भिंग,-कांच, त्रिपार्श्वानें भिन्न झालेले सात रंग.

**Prismat'ic**, *a.* (प्रिझ्-मॅ'टिक्)—rainbow-like; (of colour) such as is produced by refraction through prism; of prism shape. इंद्रधनुष्यासारखा; त्रिपार्श्व कांचेनें दर्शविलेले (रंग); चितीच्या आकाराचा, त्रिपार्श्वआकाराचा. *P. colours*, सात रंग.

**Pris'on**, *n.* (प्रि'झन्)—a place of captivity for law-breakers, a place of confinement. तुरुंग, कारागृह, बंदिखाना, बंदिशाळा. *v. t.* (poet. rhet.) to imprison. तुरुंगांत घालणें,-अडकवणें.

**Pris'oner**, *n.* (प्रि'झनर्)—a person kept in prison; war-captive. कैदी, बंदिवान, युद्धांत पकडलेला,-कैद केलेला. *P. at the bar*, कच्चा कैदी, ज्याच्यावरील खटला चालू आहे असा कैदी. *P. of state, state p.*, राजकीय कैदी. *To take person p.*, (एकाद्याला) पकडून कैदी करणें,-कैद करणें.

**Pris'tine**, *a.* (प्रि'स्टाइन्)—original, first, earliest, primitive; unspoiled by modern tendencies. आद्य, पूर्वीचा, मूळचा; अर्वाचीन चालीरीतींनीं न बिघडलेला.

**Prith'ee**, *int.* (प्रि'दि)—(arch.) pray, please (as *tell me, p.*). प्रार्थना करणें, कृपा करा. [=(I) pray thee]

**Priv'acy**, *n.* (प्रा'इ-व्हसि)—seclusion. एकांतता, एकांत.

**Pri'vate**, *a.* (प्रा'इ-व्हेट्)—not public; secret, confidential; unofficial; reserved, secluded. खाजगत, वैयक्तिक, गुप्त; बिनसरकारी, घरगुती-खाजगी-खात्याचा; एकान्ताचा. *n.* a private soldier (ranking below non-commissioned officers), a common soldier. शिपाई, प्यादा. *In p.*, एकांतीं, गुप्तपणें, पडद्यांत. *P. parts*, genitals. गुह्यांग. (*This is for your*) *p. ear*, confidential. गुप्त, दोघांतच. *Pri'vately, adv.*

**Privateer'**, *n.* (प्राइ-व्हटि' अर्)—a ship or vessel of war having letters of marque; its captain. सरकारी परवाना मिळालेलें खाजगी लढाऊ जहाज; अशा जहाजाचा कप्तान. *a.* acting as privateer. खाजगी लढाऊ जहाजाचें-जहाजावर-काम करणारें.

**Priva'tion**, *n.* (प्राइ-व्हे'शन्)—want or absence of necessaries or comforts, destitution; hardship; loss, absence (of quality). आवश्यक वस्तूंचा किंवा सुखसोयींचा अभाव, हाल, संकट; (गुणधर्माचा) अभाव. *Cold is the p. of heat*, थंडी म्हणजे उष्णतेचा अभाव होय. *Suffer many pp.*, उपासमार-हाल-होणें.

**Priv'ative**, *a.* (प्रि'व्हटिव्ह्)—denoting the absence of something usually present. हानिकारक, अभावसूचक; (व्याक.) अभावदर्शक (उपसर्ग), नञ् (पद); (तर्क.) अभावदर्शक (पद).

**Priv'et**, *n* (प्रि'व्हिट्)—a white-flowered evergreen used for hedges. कुंपणाला लावतां येणारीं पांढऱ्या फुलांचीं कांटेरी झुडपें.

**Priv'ilege**, *n.* (प्रि'व्हिलिज्)—right, advantage or immunity belonging to a person, class or office, peculiar advantage; monopoly, patent. विशेष हक्क, अधिकार, मान, सत्ता; एकमेव अधिकार, राखीव सत्ता, अधिकार. *v. t.* to invest with privilege; exempt from burden. वैयक्तिक-विशेष-अधिकार देणें; माफ-माफी असणें. *P. of Parliament*, पार्लमेंटच्या सभासदांना असणारे विशेष हक्क. *Breach of p.*, दुसऱ्याच्या हक्कांत ढवळाढवळ करणें. *Priv'ileged, a.* विशेष हक्क-अधिकार-असलेला. [L. *privus*, private; *lex*, law]

**Priv'ity**, *n.* (प्रि'व्हिटि)—being privy to; knowledge shared with another of something kept private; (Law) any relation between two parties that is recognized by law, e. g. that of blood, lease, service. गुप्तता; दुसऱ्याच्या गुप्त गोष्टीची आंतून माहिती; दोन माणसांचा कायदेशीर परस्पर संबंध.

**Priv'y**, *a.* (प्रि'व्हि)—hidden, secret, private, confidential. गुप्त, खासगी, खास, खाजगत, एकांतवासाचा, गुह्य. *n.* the place for easing nature, a latrine; (Law) person having a part or interest in any action, matter, or thing. संडास, शेतखाना, मुत्री;

हितसंबंध असलेला,-भागीदारी असलेला-मनुष्य. *Privy parts,* external organs of sense. गुह्यांग, उपस्थ. *P. purse,* allowance from public revenue for monarch's private expense. राजाच्या खाजगी खर्चासाठीं तोडून दिलेलें उत्पन्न. *P. seal,* State seal. राजाचें खाजगी शिक्कामोर्तब. *P. Council,* sovereign's private counsellors. राजाचें खाजगी मंत्रिमंडळ ; इंग्लंडमधील वरिष्ठ सल्लागार मंडळ, प्रिव्हि कौन्सिल. *P. counsellor,-cillor,* private adviser, esp. ( abbr. P. C. ) member of Privy Council. खाजगी सल्लागार ; इंग्लंडमधील 'प्रिव्ही कौन्सिल' चा सभासद. *Privy to,* in the secret of ( person's designs etc. ). दुसऱ्याच्या गुप्त बेतांचा-गोष्टींचा-माहीतगार,-अंतस्थ माहितगार.

Prize, *n.* ( प्राइझ् )—a reward given as a symbol of victory or superiority ; a thing to be striven for ; reward in lottery, competition, etc. ; a ship or property captured in naval warfare. बक्षीस ; इनाम, पारितोषिक, स्पृहणीय वस्तु ; सोडत, शर्यत, यांतील पैसा,-बक्षीस,-सोडत ; लढाईंत धरलेला माल, लूट. *v. t.* to value highly, to set a high value upon, to esteem ; to make prize of. बहुमोल लेखणें, मानणें, मोजणें ; मोल ठरविणें ; लढाईंत लूट मारणें. *P.ox,-poem,* बक्षीस मिळालेला बैल,-कविता. *P.-fellow,* परीक्षेत जास्त वर येऊन शिष्यवृत्ति मिळालेला. *P.-fight,* बक्षिसाचें मुष्टियुद्ध. *P.-fighter,* धंदेवाला मुष्टियोद्धा. *P.-man,* winner of specified prize. ठराविक बक्षीस मिळविलेला विद्यार्थी. *P.-ring,* मुष्टियुद्ध खेळण्याचें रंगण ; धंदेवाईक मुष्टियोद्धे ; मुष्टियुद्धसंस्था.

Prize,-se, *v. t.* ( प्राइझ् )—to force open or up by leverage. कांट्यानें-सळईनें-उघडणें. *n.* leverage, purchase. कांटा, जाड सळई, दांडा.

Prō'a, *n.* ( प्रो'आ )—kinds of Malay boat, esp. a type of sailing boat. एक प्रकारची मलायांतील शिडाची बोट.

Prō and cŏn, *adv.* ( प्रो अॅन्ड् कॉन् )—for and against. अनुकूल व प्रतिकूल. *n. pl.* ( pros and cons ) the reasons for and against. ( एखाद्या गोष्टीचीं ) साधकबाधक प्रमाणें.

Prŏbabil'itў, *n.* ( प्रॉबबि'लिटि )—being probable, likelihood ; what is probable. संभव, संभाव्यता ; संभवनीय गोष्ट. *In all p.,* most likely. बहुतकरून.

Prŏb'able, *a.* ( प्रॉ'बेबल् )—that may be expected to happen or prove true or correct, likely, rendering something likely or credible. संभवनीय, संभाव्य.

Prŏb'ablў, *adv.* ( प्रॉ'बेब्लि )—most likely. बहुतकरून.

Prō'bate, *n.* ( प्रो'बट् )—an official proving or proof of a will. मृत्युपत्र खरें असल्याबद्दल सरकारी दाखला, वारसाचा दाखला, वारसपत्र. *v. t.* ( -बेट् )—to prove ( will ). ( मृत्युपत्र ) शाबीत करणें.

Probā'tion, *n.* ( प्रबे'शन् )—testing of a person's conduct or character ; noviciate ; the period of trial. मनुष्यस्वभावाची कसोटी किंवा पारख ; नवशिकेपणा, उमेदवारीची मुदत, उमेदवारी. *On p.,* उमेदवार म्हणून. *P. officer,* ( acting as friend and adviser). स्नेही आणि उपदेशक किंवा सल्लागार म्हणून काम करणारा अधिकारी. *Proba'tionary, a.* of, serving for, done in the way of, probation. पसंतवारीचा, पसंतीचा, उमेदवारीचा ; सत्त्वपरीक्षेचा, *Proba'tioner, n.* उमेदवार, तात्पुरता नोकर, नवशिका.

Prōbe, *n.* ( प्रोब् )—blunt-ended surgical instrument for exploring wound, &c. जखमेची खोली पाहण्याची सळई. *v. t.* to explore with probe ; to examine closely, to search to the bottom. सळईनें पाहणें ; पक्का छडा लावणें.

Prŏb'itў, *n.* ( प्रो'बिटि )—uprightness, integrity, incorruptibility, high principle. खरेपणा, सचोटी, इमान.

Prŏb'lĕm, *n.* ( प्रॉ'ब्लेम् )—a question or difficulty in need of solution, a knotty point ; ( Geom. ) *proposition in which something has to be done ;* ( Log. ) the question involved in a syllogism ; ( Physics, Math. ) inquiry starting from given conditions to investigate a fact, result, law. प्रश्न, गूढ वादविषय ; कृत्य ; विकल्पविषय, वाद ; सिद्धान्त, उदाहरण. *P. play,-novel,* ( in which social or other *p.* is treated ). सामाजिक किंवा इतर प्रश्नाचें विवेचन असलेला खेळ,-कादंबरी.

Prŏblĕmăt'ic (al), *a.* ( प्रॉब्लेमॅ'टिक्,-कल )—presenting a problem ; disputable ; unsettled, questionable, doubtful, uncertain. संशयाचा ; वादविवादात्मक ; प्रश्नात्मक, अनिश्चित.

Probŏs'cis, *a.* ( प्रबॉ'सिस )—elephant's trunk ; snout ; insect's sucking-tube. हत्तीची सोंड ; मनुष्याचें नाक ; (कृमि-कीटकांची रस शोषण करण्याची) नळी. *P. monkey,* मोठ्या नाकाचा वानर. *pl.* Prōbos'cides ( प्रोबॉ'सिडीस् ) ; *Proboscid'ean, a.* शुंडा,-सोंड, असणारा ( सस्तन प्राणी ).

Procē'dure, *n.* ( प्रसी'ज्यर् )—mode of conducting business ( esp. in parliament ) or legal action, a course of action. कार्य करण्याची पद्धति, कामकाज, खटला.

Proceed', *v. i.* ( प्रसी'ड् )—to go on ; to make one's way ( *to* place ) ; to continue or resume ; to take legal proceedings ( against ), to begin and carry on legal action, to adopt course of action ; go on to say ; be carried on, take place, come forth, issue, originate. पुढें जाणें, जाऊं लागणें, चालणें ; पुढें चालू ठेवणें, खटला करणें ; फिर्याद लावणें ; पद्धत-तऱ्हा-ठरविणें ; पुढें सांगणें, सांगत जाणें,-म्हणणें ; चालू-सुरू-होणें ; बाहेर येणें ; उत्पन्न होणें.

Prŏceed'ing, *n.* ( प्रसी'डिंग् )—piece of conduct ; ( *pl.* ) business done at a meeting ; ( *pl.* ) legal steps. कार्य, व्यवहार, काम ; ( अने० ) सभेंतील कामकाजाची नोंद,-अहवाल ; कायदेशीर इलाज.

Prō'ceeds, *n. pl.* ( प्रो'सीड्स् )—the produce in money ( of a sale, &c. ). विक्रीचा पैसा, विक्रीचें उत्पन्न.

Prŏ'cĕss, *n.* (प्रो'सेस्)—state of going on or being carried on; method of operation in manufacture, etc.; an action at law, course of legal proceedings; summons of writ; projection from a bone, etc., out-growth, protuberance. धांव. चाल, गति, प्रवृत्ति; अनुक्रम, पद्धति; खटला, हुकूम. प्रतिवादीस कोर्टात हजर राहण्यासाठीं केलेलें बोलावणें,-समन्स; पुच्छ, शृंग, उंचवटा, आवर्त, पालि. *v. t.* to subject to a legal or manufacturing process; *v. i.* (colloq.) walk in procession. कायदेशीर इलाज-खटला-करणें, (विक्रीसाठीं) माल तयार करणें; मिरवणुकींत सामील होणें,-बरोबर जाणें. *In process of time,* as time goes on. कालमानाप्रमाणें.

Procĕ'ssion, *n.* (प्रोसे'शन्)—a marching forward, array of persons going along in fixed order; (*fig.*) ill-contested race. चाल, गति, गमन; मिरवणूक; विनचढाओढीची शर्यत. *Procĕ'ssional, a.* of, in, for processions. मिरवणुकीचा, स्वारीचा, व्यूहविन्यासंबंधीं, दिंडींत,-दिंडीसंबंधीं, *n.* processional hymn. मिरवणुकीच्या-समारंभाच्या-वेळीं म्हणण्याचें गीत. *Procĕ'ssionist, n.* मिरवणुकींतील मनुष्य, मिरवणूकवाला.

Proces-verbal, *n.* (प्रॉसे'व्हेअर्बा'ल्)—(pl.-baux,-बो). written report of proceedings, minutes; (Fr. Law) written statement of facts in support of charge. (सभेच्या कामकाजाचा) लेखी अहवाल; आरोपाच्या समर्थनार्थ लेखी पुरावा. [F.]

Proclaim', *v. t.* (प्रोक्ले'म्)—to announce publicly and officially; to tell openly; to prohibit (a meeting). जाहीर करणें, दवंडी फिरविणें; उघडपणें सांगणें; (समेला) प्रतिबंध करणें, सभाबंदी करणें, बेकायदेशीर ठरविणें.

Prŏclamā'tion, *n.* (प्रॉक्लमे'शन्)—proclaiming; formula or document that proclaims. जाहीर करणें; जाहीरनामा.

Procliv'ĭty̆, *n.* (प्रॉक्लि'व्हिटि)—natural leaning or tendency to, inclination, propensity. स्वाभाविक कल, प्रवृत्ति, मनाचा ओढा.

Prŏcŏn'sul, *n.* (प्रोकॉ'न्सल्)—ancient Roman provincial governor; (rhet.) modern colonial governor; (*pro-consul*) deputy consul. प्राचीन रोमन साम्राज्यांतील प्रांताचा सुभेदार; वसाहतीचा प्रमुख अंमलदार-गव्हर्नर; गव्हर्नरचा-मुख्य अंमलदाराचा-दुय्यम.-*sular, a.*

Prŏcrăs'tĭnāte, *v. i.* (प्रोक्रॅ'स्टिनेट्)—to put off doing things from day to day, to defer; to leave things undone as long as possible. चालढकल करणें, दिवसगतीवर ढकलणें, लांबणीवर टाकणें; दिरंगाई करणें.-*tion, n.* चालढकल, अळंटळं, टाळाटाळ.-*tor,* चेंगट, दीर्घसूत्री. [L. *pro,* off; *crastinus,* of to-morrow]

Prŏ'crĕāte, *v. t.* (प्रो'क्रिएट्)—to produce an offspring, to beget, to generate, to engender. उत्पन्न करणें, जन्म देणें, विस्तार करणें, वाढविणें.-*tion, n.* जनन, उत्पादन, उत्पत्ति.-*tor,* जनक, जनिता, उत्पादक.-*tive, a.* प्रजननशक्तिक, फलदायी.

Prŏc'tor, *n.* (प्रॉ'क्टर्)—University official with disciplinary powers; an attorney in ecclesiastical courts. (इंग्लंडांतील) विश्वविद्यालयांतील एक अधिकारी; वकील, मुखत्यार.

Procŭm'bent, *a.* (प्रोक'म्बन्ट्)—prone, lying down; (Bot.) trailing. पालथा पडलेला, उपडा; भुईसरपट वाढणारा, भूमिशाई.

Prŏcūrā'tion, *n.* (प्रॉक्युरे'शन्)—procuring, bringing about; service rendered for acting as another's agent; (fee for) negotiation of loan; procurer's trade or offence. संपादन, मिळवणें, संपादणें, दुसऱ्याचा मुखत्यार म्हणून काम करणें; कर्ज मिळवून देणें (चा मोबदला, मेहनताना); कुंटणगिरीचा व्यापार,-गुन्हा.

Prŏc'ūrātor, *n.* (प्रॉ'क्युरेटर्)—a person's proxy or agent, holder of power of attorney. दुसऱ्याचा मुखत्यार, गुमास्ता, प्रतिनिधि, वकील.

Prŏcūre', *v. t.* (प्रोक्यु'अर्)—to succeed in getting; to bring about or cause by others' agency, to effect, to contrive; to act as procurer or procuress. मिळविणें, साध्य करणें; घडवून आणणें, साधणें, संपादणें; कुंटणपणा भडवेगिरी-करणें. *Cannot p. employment,* नोकरी मिळवितां येत नाहीं,-मिळत नाहीं. *Procured his death by poison,* विष पिऊन मरण ओढवून आणलें. *Procure'ment, n.* मिळविणें, संपादणें, संपादन.

Procur'er, *n.* (प्रोक्यु'अरर्)—one who obtains, esp. man or woman who procures women for gratification of another's lust. मिळवणारा; भडवा, कुंटणकी करणारा. *Procur'ess, n. f.* कुंटीण, कुंटण

Prŏd, *v. t.* (प्रॉड्)—to poke with stick, etc. esp. to arouse or urge on; (*fig.*) goad, irritate. टोंचणें, बोंचणें, ढोसणें, भोसकणें; खपवणें, (च्या मागें) टुसणें लावणें. *n.* poke, thrust, pointed instrument. बोंचणी, टोंचणी, पराणी, अगी, अंकुश.

Prŏd'ĭgal, *a.* (प्रॉ'डिगल)—wasteful, lavish, expending wastefully, lavishly bountiful. स्वार्चिक, उधळ्या, बेताल *n.* a spendthrift. उधळ्या मनुष्य. *P. son,* (ल्यूकच्या शुभवर्तमानांत वर्णिलेला) उधळ्या मुलगा. *Prodigal'ity, n.* उधळपट्टी, उधळेपणा, अपव्यय.

Prŏdĭ'gious, *a.* (प्रॉडि'जस)—marvellous, enormous, extraordinary, very great. अद्भुत, अवाढव्य, अफाट.-*ly, adv.*;-*ness, n.*

Prŏd'ĭgy̆, *n.* (प्रॉ'डिजि)—a miracle, marvellous thing; wonderful person. आश्चर्य, अद्भुत गोष्ट; विलक्षण मनुष्य, धेंड, मस्य.

Produce', *v. t.* (प्राड्यू'स्)—to bring forward or show for examination; to yield, to give birth

to; to cause or bring about; to make or manufacture; to bring (play, performer, book, etc.) before the public; (Geom.) extend, continue (line *to* a point). दाखवणें, दाखल करणें, हजर करणें; पीक देणें, उत्पन्न,-उत्पत्ति,-करणें; घडवून आणणें; घडवणें, घनवणें; लोकांपुढें आणणें, प्रसिद्ध करणें; (ओळ) वाढविणें, वाढवून पुढें नेणें. *Produ'cible, a.* हजर,-उत्पन्न,-करण्याजोगा,-*bility, n.*

Prŏd'ūce, *n.* (प्रॉ'ड्यूस)—that which is produced, yield, amount produced; agricultural or natural products. उत्पन्न; उपज, निपज. *Raw p.*, कच्चा माल, -उत्पन्न. *Brought to p.*, (of ordnance or military or naval stores) broken up and assorted into classes to be disposed of. विकून टाकण्यासाठीं मोडतोड मालाची केलेली वर्गवारी.

Prodū'cer, *n.* (प्रड्यू'सर्)—(in vbl. senses, esp.) person producing articles of consumption or manufacture. उपजवणारा, घनवणारा, उत्पादक.

Prŏd'ŭct, *n.* (प्रॉ'डक्ट्)—a thing produced by natural process or manufacture; result; (*Math.*) quantity given by multiplication of quantities together. उत्पन्न, फळ; परिणाम; गुणाकार, घात.

Produc'tion, *n.* (प्रड'क्शन्)—producing; products; a thing produced by human activity, esp. literary or artistic work. उत्पन्न करणें; पैदास, निपज, उत्पन्न केलेल्या वस्तु; मनुष्यप्रयत्नानें तयार केलेला माल, -कृति, वाङ्मयविषयक किंवा इतर कलाकृति.

Produc'tive, *a.* (प्रड'क्टिव्ह्)—tending to production; producing good crops, fertile; producing commodities of exchangeable value. उत्पन्न, करणारा, उत्पादनक्षम, उत्पादक; सुपीक, बहुफल, मातबर, पिकाऊ; विक्रीचा माल तयार करणारा,-उत्पादक, धनोत्पादक, किफायतीचा. *Productivity, n.*

Pro'ĕm, *n.* (प्रो'इम्)—preface, preamble, to book or speech; prefatory discourse. उपोद्घात, प्रस्तावना. *Proem'ial, a.* उपोद्घाताचा, प्रस्तावनेदाखल, प्रास्ताविक.

Prŏfanā'tion, *n.* (प्रॉफने'शन्)—profaning. बाटवणें, भ्रष्ट करणें, भ्रष्टीकरण.

Profāne', *a.* (प्रफे'न्)—secular; not possessing sanctity, heathen, unhallowed; irreverent, blasphemous. व्यावहारिक; भ्रष्ट, अधार्मिक, अपवित्र; अश्रद्धालु, धर्मनिन्दक. *v. t.* to pollute, violate; treat with irreverence or disregard. भ्रष्टविणें, बाटवणें, विटाळविणें; अपमान,-अनादर,-निंदा करणें.

Profăn'itȳ, *n.* (प्रफॅ'निटि)—blasphemy; profane swearing; irreverent speech or behaviour. धर्मनिन्दा; खोटी शपथ घेणें; अपवित्र भाषण किंवा वागणूक.

Prŏfĕss', *v. t.* (प्रफे'स)—to represent oneself to feel or believe in, to pretend; to declare oneself to be or to do, have as one's trade or art or profession; teach (subject) as professor. आव घालणें, ढोंग निरवणें; स्पष्ट बोलून दाखवणें, उघड सांगणें, कबूल करणें; स्वतःचा व्यापार, कला, धंदा म्हणून करणें,-चालवणें; प्राध्यापक म्हणून शिकविणें, प्राध्यापकाचें काम करणें.

Prŏfĕss'ĕdlȳ, *adv.* (प्रफे'सिड्लि)—according to one's account, avowedly. उघडउघड सांगून, धडधडीत, सांगून-सवरून, प्रसिद्धपणें.

Profĕ'ssion, *n.* (प्रफे'शन्)—declaration, avowal; vocation or calling esp. of learned or scientific or artistic kind; *the* body of persons engaged in this, esp. (Theatr. sl.) actors. जाहीर करणें, कबुली, स्वीकार; धंदा, पेशा, वृत्ति, उद्योग, व्यवसाय; सुशिक्षित धंदेवाईक मंडळी; नट (नाटकांतील). *The learned pp.*, (divinity, law, medicine). धर्मोपदेश, वकिली, वैद्यक हे सुशिक्षित धंदे. *The medical p.*, वैद्यकी (चा धंदा). *A carpenter by p.*, धंद्यानें सुतार, सुतारकीचा धंदा करणारा.

Profĕ'ssional, *a.* (प्रफे'शनल्)—of the vocations called professions; practising for a livelihood or money; (of game, etc.) played by professionals. धंद्यांचा, उद्योगधंद्यांसंबंधींचा; धंदेवाईक, रोजगारी, रोजगारासाठीं-पोटासाठीं-करणारा; धंदा म्हणून खेळणारा. *n.* a professional man; (abbr. *pro.*) paid performer at cricket, football, etc. धंदेवाला मनुष्य; धंदेवाईक-पगारी-खेळाडू.-*ism, n.* (esp.) practice of employing professionals in games. खेळांत धंदेवाईक खेळाडू नेमण्याची चाल,-पद्धत.

Prŏfĕss'or, *n.* (प्रफे'सर्)—holder of a university chair or other teacher of high rank (abbr. *Prof.*); one who makes profession (*of* a religion). विश्वविद्यालयांतील उच्च दर्जाचा अध्यापक, प्राध्यापक; धर्माचा वगैरे बाणा बाळगणारा. *P.-ship, n.* प्राध्यापकाची जागा. *Professor'ial, a.* प्राध्यापकाचा,-संबंधीं. *Profess'oriate, n.* the professors of a university. विश्वविद्यालयांतील प्राध्यापक-वर्ग,-मंडळ.

Prŏff'ĕr, *v. t.* (प्रॉ'फर्)—to offer spontaneously, to offer for acceptance, (esp. in p. p.). स्वतःहून देऊं करणें *n.* spontaneous offer. सूचना, म्हणणें, आपणहून देणें.

Profi'ciencȳ, *n.* (प्रफि'शन्सि)—adeptness; progress or improvement in anything. प्रावीण्य, निपुणता, वाकबगारी; प्रगति, सुधारणा.

Profi'cient, *a. & n.* (प्रफि'शन्ट्)—fully acquainted with a subject, expert, adept. निपुण, प्रवीण, पारंगत.

Prō'file, *n.* (प्रो'फाइल्)—outline of the face as seen from the side; any edge outlined against the sky or other background; (Fortif.) transverse vertical section of fort, comparative thickness of earthwork etc. बाजूच्या किंवा अर्ध्या चेहऱ्याची रूपरेषा; मर्यादारेषा; किल्ल्याचा तिरपा उभा परिच्छेद, बांधकामाची जाडी. *Pro'filist, n.* एकडोळी-एकांगी-चित्र काढणारा. *Drawn in p.*, (as seen from one side). एक बाजूनें दिसलेलें असें काढलेलें (चित्र), एक बाजू दाखविणारें.

**Prŏf'it,** *n.* ( प्रॉ'फिट् )—advantage, benefit; ( *pl.* or *sing.* ) pecuniary gain, excess of returns over outlay. फायदा, हित; आर्थिक लाभ, उत्पन्न, नफा. *v. t. & i.* to bring advantage to, to be of service to; to get good; to make gains. फायदेशीर होणें, हितकारक होणें; कल्याण होणें; नफा मिळणें. ( Book keep. ) *P. & loss account,* निव्वळ नफ्यातोट्याचें अंदाजपत्रक, निव्वळ नफा किंवा तोटा किती झाला हें दाखविणारा ताळेबंद.

**Prŏf'itable,** *a.* ( प्रॉ'फिटेब्ल् )—bringing profit or gain, beneficial, lucrative. हितकारक, किफायतशीर, फायदेशीर.

**Prŏfiteer',** *v. i.* ( प्रॉफिटि'अर् )—to make inordinate profit out of the State's or the consumer's necessities ( esp. of contractors and traders in war-time ). ( सरकारकडून अगर गिऱ्हाइकांकडून नक्तेदारीनें-मक्ते घेऊन ) बेसुमार फायदा काढणें. *n.* one who profits thus. अशा तऱ्हेनें भरमसाट फायदा खाणारा.

**Prŏf'ligāte,** *a. & n.* ( प्रॉ'फ्लिगेट् )—morally ruined, licentious, dissolute; reckless. व्यसनी, दुर्वृत्त; अविचारी, ( -मनुष्य ). *Prof'ligacy, n.* evil courses. लफंगेगिरी, बदफैली, दुराचरण.

**Profound',** *a.* ( प्रोफा'उन्ड् )—deep in skill or knowledge, of great insight or knowledge; heartfelt; having, coming from, extending to, a great depth. खोल; अभिज्ञ, गाढ ज्ञान असलेला; मनापासूनचा, कळकळीचा; खोल, मोठा, गाढ, खोलीचा. *n.* ( poet. ) *the* vast depth ( *of* ocean, futurity, the soul, etc. ). अत्यंत खोलपणा, गहनता, अगाधता.

**Profŭn'dĭty,** *n.* ( प्रोफ'न्डिटि )—being profound, depth of place or knowledge. गांभीर्य, अगाधता; प्रावीण्य.

**Profūse',** *a.* ( प्रोफ्यू'स् )—lavish, extravagant ( *in, of,* gifts, promises, expenditure ); very copious, excessive, exuberant. सढळ, उधळ्या; विपुल, समृद्ध, रेलचेल.*-ly, adv*;*-ness,-sion, nn.* सढळपणा, औदार्य; चंगाळी, वैपुल्य, समृद्धि.

**Profū'sion,** *n.* ( प्रोफ्यू'झन् )—lavishness, prodigality, profuseness; quantity. सढळपणा, विपुलता, समृद्धि.

**Prŏg,** *n.* ( प्रॉग )—( sl. ) food, grub, esp. for journey or excursion. ( प्रवासासाठीं ) खाणें, खाद्य, पाथेय.

**Prŏgĕn'itor,** *n.* ( प्रॅजे'निटर् )—a person or animal in relation to his descendants. पूर्वज, वाडवडील. *-tress, n. f.* स्त्रीपूर्वज.

**Prŏg'ĕny̆,** *n.* ( प्रॉ'जिनि )—offspring or descendants, children, young ones; ( *fig.* ) issue, outcome. संतति, अपत्य, मुलेंबाळें, वंशज; निष्पत्ति, फळ, फलश्रुति.

**Prŏg'nathous,** *a.* ( प्रॉ'ग्नॅथस् )—with projecting jaws as in negroes; ( of jaws ) projecting. नीग्रोप्रमाणें पुढें जबडा आलेला; पुढें आलेला ( जबडा ). *Prognath'ic, a.* [ Gk *pro,* before; *gnathos,* jaw ]

**Prŏgnō'sis,** *n.* ( प्रॉग्नो'सिस )—( pl.-oses ), forecast of course of disease. अटकळ; रोगचिकित्सा.

**Prŏgnŏs'tĭc,** *n.* ( प्रॅग्नॉ'स्टिक् )—indication that something is likely to happen, prediction. पूर्वलक्षण, पूर्वचिन्ह. *a.* foretelling, predictive ( *of* ). पूर्वसूचक, भविष्यसूचक.

**Prŏgnŏs'tĭcāte,** *v. t.* ( प्रॅग्नॉ'स्टिकेट् )—to foreshow, to foresee, to foretell, to tell beforehand. भविष्यकथन करणें, पूर्वी दाखविणें,-सुचविणें.*-tion, n.* भविष्य, भाकित, पूर्वलक्षण.*-tor, n.,-tive, a.*

**Pro'gramme,** *n.* ( प्रो'ग्रॅम् )—a plan of intended proceedings, mode or action; a printed list. कार्यक्रम; ठरलेलीं कामें, क्रमपत्रक, कामांची यादी. *What is the p. for to-day,* what are we going to do to-day? आजचा कार्यक्रम काय आहे? [ Gk *pro,* before; *grapho,* write ]

**Pro'gress,** *n.* ( प्रो'ग्रेस, प्रो'ग्रिस )—forward movement; advance; improvement; increase; a journey of state. प्रगमन; प्रगति; सुधारणा; वाढ; दौरा, प्रवास. *v. i.* ( प्रॅग्रे'स ) to make progress, to make improvement, to proceed. पुढें जाणें, प्रगति करणें, वाढविणें, सुधारणें.

**Progrĕ'ssion,** *n.* ( प्रोग्रे'शन् )—physical onward movement; ( Math. ) series of quantities each in the same relation to preceding one; ( Mus. ) passing from one note or chord to another. पुढें गति, प्रगति; श्रेढी, श्रेणी; आवाजाचा चढउतार, आरोहावरोह. *Arithmetical p.,* गणित श्रेढी; *Geometrical p.,* भूमिति श्रेढी; *Harmonic p.,* गायनात्मक,-हरात्मक,-श्रेढी. *Progre'ssional, a.*

**Progrĕss'ĭve,** *a.* ( प्रोग्रे'सिव्ह् )—forward; increasing; proceeding onward, improving, favouring progress or form. पुढें जाणारा, वाढणारा; प्रगमनशील.

**Prŏhĭb'it,** *v. t.* ( प्रोहि'बिट् )—to forbid the doing, making, practice or use of; to debar, to prevent, to inhibit. मनाई करणें; हरकत किंवा अडथळा करणें, बंदी,-हरकत,-निषेध करणें, अडथळा करणें.

**Prohĭbĭ'tion,** *n.* ( प्रोइबि'शन् )—forbidding; edict, order, that forbids something; forbidding by law of sale of intoxicants for common consumption. मनाई; मनाई हुकूम; ( मादक पदार्थांच्या विक्रीला कायद्देशीर ) बंदी,-प्रतिबंध. Prohi'bitory, *a.*

**Prohib'ĭtionist,** *n.* ( प्रोहि'बिशनिस्ट् )—advocate of prohibitive legislation. प्रतिबंधवादी; मद्यपानप्रतिबंधवादी.

**Prŏhĭb'ĭtĭve,** *a.* ( प्रोहि'बिटिव्ह् )—that prohibits, implying prohibition, forbidding; ( of price ) high enough to prevent purchase. मना करणारा, प्रतिबंधक; जबर, भारी. *P. tax,-price,* प्रतिबंधक किंवा जबर-भारी-जकात, किंमत.

**Project',** *v. t. &. i.* ( प्रजे'क्ट् )—to make plans for; to protrude, to stick out; hurl, send forth, into space; represent as plane surface. युक्ति किंवा योजना करणें; योजना करवणें; पुढें येणें; फेंकणें, प्रक्षेप

करणें; (एकाद्या आकृतीचा रेघा काढून) आराखडा काढणें, प्रत्यालेख काढणें. *n.* (प्रॉ'जेक्ट्), a scheme or plan, design. युक्ति, योजना, कल्पना, काल्पनिक नकाशा.

**Projectile,** *a.* (प्रोजे'क्टिल्,-क्टाइल्)—impelling; capable of being projected by force, esp. from cannon. पुढें ढकलणारा,-सारणारा,-लोटणारा; प्रक्षेपणीय. *n.* (प्रॉ'जिक्टाइल्, प्रोजे'क्टाइल्,-टिल्), heavy missile; shell, cannon-ball. मोठें अस्त्र; फेंकलली वस्तु, तोफेचा गोळा.

**Projĕc'tion,** *n.* (प्रजे'क्शन्)—projecting, a part that protrudes; a map made by projecting; alchemist's powder of philosopher's stone; (Geom.) projecting of a figure; representation on plane surface of (any part of) surface of earth or of celestial sphere; mental image viewed as objective reality. पुढें आलेला भाग; नकाशा, चित्र, कंगोरा, देखावा; किमया करतांना वापरण्याची पुड; प्रलंबता, प्रत्यालेख, विक्षेप; पातळीवर काढलेला भूगोलाचा किंवा इतर ग्रहाचा गोलवक्र नकाशा; मूर्त कल्पना, विक्षेप.

**Projĕc'tor,** *n.* (प्रोजे'क्टर्)—one who forms schemes; a promoter of bubble companies; apparatus for projecting rays of light. योजक, योजना तयार करणारा; अशक्य,-अवाढव्य,-कल्पना काढून मंडळ,-कंपनी-बनविणारा; प्रकाशकिरणप्रक्षेपक, -भिंग.

**Prolăp'sus,** *n.* (प्रोलॅ'प्सस्)—forward or downward displacement of an internal organ. इंद्रियाचा भाग खालीं वर सरकणें,-भ्रंश,-च्युति.

**Prō'lāte,** *a.* (प्रो'लेट्)—(of sphere) lengthened in the direction of the polar diameter. ध्रुवबिंदू-मधील व्यासाच्या बाजूनें लांब केलेला (गोल).

**Prōlēgŏm'ĕnă,** *n. pl.* (प्रोलिगॉ'मिना)—preliminary remarks or dissertation. प्रस्तावना, पूर्वपीठिका, उपोद्घात.

**Prōlĕ'psis,** *n.* (प्रोलीं'प्सिस्,-ले'-)—(*pl.-pses*), assumption that something is done or true before it is so. प्रत्यक्ष गोष्ट घडण्यापूर्वी ती घडली आहे,-खरी आहे,-अशी अटकळ, अपेक्षा, अंदाज. *Prole'ptic, a.*

**Prōlētār'ian,** *a. & n.* (प्रोलिटे'अरिअन्)—of, member of, the proletariate. सामान्य लोकांविषयीं, खालच्या वर्गाचा (मनुष्य).

**Prōlētār'iat (e),** *n.* (प्रोलिटे'अरिअट्)—lowest classes; the common people. खालच्या वर्जाचे -सामान्य -लोक, मजूरवर्ग.

**Prōlĭf'ic** *a.* (प्रॉलि'फिक्)—producing offspring; fruitful; abundantly productive. प्रजोत्पादक; फलप्रद, सुपीक.

**Prō'lix,** *a.* (प्रो'लिक्स्)—lengthy; speaking at great length, tedious. लांबलचक; कंटाळवाणा, बयादखोर.

**Prōlĭx'itў,** *n.* (प्रॉलि'क्सिटि)—great length; tediousness. मोठा विस्तार; कंटाळवाणेपणा, चऱ्हाट, विस्तार, शब्दजाल.

**Prō'lŏgue,** *n.* (प्रो'लॉग्)—poem recited before first part of a play; first of a series (of events, &c.), preface (of *epilogue*). प्रवेशक, नांदी; प्रस्तावना. *v. t.* to introduce, furnish, with a p. प्रस्तावानें सुरू करणें; प्रस्ताव करणें.

**Prolŏng',** *v. t.* (प्रलॉं'ग्)—to lengthen out, to make longer; to cause to continue. लांबविणें, वाढविणें; पुढें चालविणें, दिरंगाईवर टाकणें. *Prolonged, p. p.* long. लांबविलेलें, फार वेळ चाललेलें, दीर्घकालिक.

**Prōlŏnga'tion,** *n.* (प्रोलॉंगे'शन्)—a part prolonged; extension; delay. वाढवणें; लांबणीवर टाकणें; विलंब.

**Prŏmĕnāde',** *n.* (प्रॉमिना'ड्)—a going up and down in a public place; a place used or specially set apart for a public walk. सहल, रपेट, फेरी, विहार; सहल करण्याची जागा. *v. i. & t.* to take *p.*; lead (person etc.) up and down for show. सहल करणें, रपेट करणें, फेरा मारणें; चें प्रदर्शन करणें,-प्रदर्शन करण्यासाठीं फिरविणें.

**Prŏm'inence,** *n.* (प्रॉ'मिनन्स्)—being prominent; a protuberance. ठळकपणा, प्रामुख्य; पुढें आलला भाग उंचवटा. *Prominency, n.*

**Prŏm'inent,** *a.* (प्रॉ'मिनेन्ट्)—projecting; conspicuous; distinguished. उंच पुढें आलेला; प्रसिद्ध; प्रमुख, ठळक.

**Prŏmĭs'cūous,** *a.* (प्रॉमि'स्क्युअस्)—of mixed and disorderly composition, confused; unsorted; indiscriminate; (colloq.) casual. घोटाळ्याचा, सरमिसळीचा, अव्यवस्थित, गबाळ; निर्विशेष; स्वैर, यथेच्छ; सहजगत्या, अहेतुक. *Promiscu'ity, n.* भेदाभेदशून्यता, खिचडी, चिवडा, भेसळ.

**Prŏm'ise,** *n.* (प्रॉ'मिस्)—explicit undertaking to do or not to do something; favourable indications. वचन, शब्द, प्रतिज्ञा, अभिवचन; आशेचें कारण, होतकरूपणा, संभव. *v. t. & i.* to afford hopes or expectations, to undertake to give or procure; to foretell, to show promise. वचन देणें; भविष्य करणें, भाकीत करणें; खात्री देणें, होईल अशी आशा असणें, होईलसें दिसणें. *To p. oneself,* look forward to (a pleasant time etc.). आशा करणें, आशेवर राहणें. *I p. you,* (colloq.) I assure you. मी खात्रीपूर्वक सांगतों, कीं. *Promised land, land of p.,* Canaan, heaven, any place of expected felicity. स्वर्गलोक. *A writer of great p.,* चांगलाच होतकरू लेखक. *Prom'iser, n.* वचन देणारा.

**Prŏm'issorў,** *a.* (प्रॉ'मिसरि)—of the nature of or containing a promise. अभिवचनात्मक, समतिज्ञ. *A promissory note,* (रोख पैसे देणें असल्याबद्दल) वचन चिठ्ठी, रोखा, चिठ्ठी, दस्तऐवज.

**Prŏm'ontorў,** *n.* (प्रॉ'मन्टरि)—headland; highland jutting out into sea, etc.; (Anat.) kinds of

protuberance in the body. (उंच) भुशिर; समुद्रांत शिरलेलें जमिनीचें उंच टोंक; टेंगूळ, अवाळूं. [L. *pro*, forward; *montis*, mountain]

**Promōte',** *v. t.* (प्रमो'ट्)—to move up to a higher office or position; to help forward or initiate the process or formation of, to encourage. उन्नति करणें, बढती देणें, चढविणें; उत्तेजित करणें, साहाय्य करणें, उत्तेजन देणें. *Promo'ter*, *n.* encourager; a person who promotes formation of joint-stock company. पुरस्कर्ता, उत्तेजन देणारा साहाय्यकर्ता; सहकारी मंडळी स्थापन करण्यामध्यें पुरस्कार घेणारा,-सहकारमंडळप्रवर्तक.

**Promō'tion,** *a.* (प्रमो'शन्)—advancement. बढती, वाढ.

**Prŏmpt,** *a.* (प्रॉम्ट्)—done at once or without delay; ready in action. जलदीचा, तामडतोबीचा, तात्कालिक; तत्पर, चलाख. *v.t.* to incite, to inspire; to help out (actor, speaker.) by reading next words of the part. उत्तेजन देणें, प्रेरणा करणें; पुढची आठवण करून देणें, (पडद्याच्या आंतून नटाला भाषण) सुचवणें. *n.* thing said to help the memory, esp. of actor. (नटाला पुढच्या भाषणाची आठवण करण्यासाठीं) सांगितलेले शब्द. *For p. cash*, (on the spot). रोख किंमत देऊन.

**Prŏmp'ter,** *n.* (प्रॉम्टर्)—(*esp.*) a person stationed to prompt actors. नटांना (पडद्याच्या आडून) सूचना करणारा.

**Prŏmp'ting,** *n.* (प्रॉम्प्टिंग)—incitement. उठावणी, उच्चल, उत्तेजन, प्रेरणा; नटाला सूचना.

**Prŏmp'titūde,** *n.* (प्रॉ'म्टिट्यूड्)—promptness, readiness, quickness of decision. दक्षता, चलाखी, तडफ.

**Prŏm'ŭlgāte,** *v.t.* (प्रॅ'मलेट्)—to publish as coming into force or having authority, to proclaim, to make known. अंमलांत येईल म्हणून प्रसिद्ध करणें, (माहिती) फैलावणें, जाहीर करणें.*-tion*, *n.* प्रसिद्धीकरण, जाहीर करणें.*-tor*, *n.* जाहीर-प्रसिद्ध-करणारा अधिकारी. [L. *promulgare*, to proclaim]

**Prōne,** *a.* (प्रोन्)—lying face or front downwards; (loosely) prostrate; inclined, disposed; (of ground) having downward aspect or direction; (loosely) steep, headlong. अधोमुख, अधोवदन, प्रणत; पालथा, उतरता, कलता, फल असलेला, प्रवृत्त; कललेली, उतरती (जमीन); उंच, उंचवट्याची. *-ly*, *adv.*

**Prŏng,** *n.* (प्रॅंग)—spike of a fork. अणीदार टोंक, कांटा, दांता, दूळ, अणी, टोंक.

**Pronŏm'inal,** *a.* (प्रोनॉ'मिनल्)—of, or of the nature of, a pronoun. सर्वनामाचा, सर्वनामासंबंधीं.

**Prō'noun,** *n.* (प्रो'नाउन्)—a word serving as substitute for a noun. नामाच्या ऐवजीं योजलेला शब्द, सर्वनाम. *Personal pp.*, (I, we, thou etc.) पुरुषवाचक सर्वनामें. *Interrogative pp.*, (who, what, which) प्रश्नार्थक सर्वनामें. *Relative pp.*, (who, that, which) संबंधी सर्वनामें. *Possessive pp.*, (my, mine etc.) षष्ठ्यन्त सर्वनामें. *Demonstrative pp.*, (this, that) दर्शक सर्वनामें. *Distributive pp.*, (each, every, etc.) भिन्नत्वदर्शक सर्व॰. *Indefinite pp.*, (any, some, etc.) सामान्य सर्व॰

**Pronounce',** *v. t.* & *i.* (प्रना'उन्स्)—to utter formally, to declare, to affirm, to pass judgement, to give one's opinion; to articulate. यथाविधि-गंभीरपणानें-सांगणें; निश्चयपूर्वक सांगणें, स्पष्ट मत देणें; उच्चार करणें, उच्चारणें, बोलणें.*-able*, *a.* उच्चार्य, उच्चारण्याजोगा.

**Pronounce'mĕnt,** *n.* (प्रोना'उन्स्-मेन्ट्)—an official declaration of opinion or judgement. मत जाहीर करणें, निकाल जाहीर करणें, स्पष्ट अभिप्राय देणें.

**Pronounced',** *a.* (प्रोना'उन्स्ट्)—strongly marked, decided, extreme, glaring. स्पष्ट, निश्चित, ठळक, ठळठळीत.

**Pronoun'cing,** *a.* (प्रोना'उन्सिंग)—P. dictionary, (शब्दांचे) उच्चार देणारा कोश, उच्चारदर्शक कोश.

**Pronŭn'ciā"tion,** *n.* (प्रोन'न्सिए"शन्)—the way a word is pronounced, the mode of uttering words. उच्चारणें, उच्चारण, उच्चार, वर्णोच्चार.

**Proof,** *n.* (प्रूफ्)—a fact, evidence or reasoning that proves the truth of something; test or trial; impression from type subject to correction before final printing: careful impression of engraved plate before printing of ordinary issue; (place for) testing of fire-arms or explosives; (arch.) proved impenetrability; standard of strength of distilled alchoholic liquors; test-tube; rough edges left to some leaves of books to show it has not been cut down. प्रमाण, दाखला, पुरावा, ताळा, उपपत्ति, कसोटी, परीक्षा; छापण्यापूर्वी शुद्ध करण्याकरितां छापलेला कच्चा काग़द, मुद्रित, खर्डा; खोदीव कामाचा पहिला छाप,-प्रतिमा,-ठसा; बंदुकी, दारूगोळा वगैरे तपासण्याची जागा; खात्रीलायक अभेद्यता; (मादक द्रव्याची) तीव्रता; तेजी; कसनळी, कस-नलिका; पुस्तकाच्या पानांच्या न छाटलेल्या कडा. *a.* (of armour) of proved strength; giving or having an impenetrable defence. खबरदार, मजबूत, बलवान; अभेद्य, दुर्भेद्य. *v. t.* to make (fabric) waterproof. पाणी आंत न शिरेल असें,-अभेद्य-करणें. *P.-reader*, press-corrector. छापखान्यांतील मुद्रितें तपासणारा. *P.-sheet*, printing-proof. मुद्रित. *P.-less*, *a.* प्रमाणरहित, पुरावा नसलेलें, प्रमाणशून्य.

**Prŏp,** *n.* (प्रॉप्)—a thing used to support something or keep it upright; supporter of cause, &c. टेंकण; मेढ, आधार. *v. t.* to be a prop to; to uphold; to hold up, to support by standing under or against; (of horse etc.) come to a dead stop with forelegs rigid. आधार देणें, टेंकू देणें, नेटावा देणें; (घोडा) एकदम थांबणें.

**Prŏpagăn'dă,** *n.* (प्रॅपगॅन्डा)—means for propagating a doctrine or practice. विशिष्ट मतांचा प्रसार

करण्याची योजना, स्वतःच्या मतांचा फैलाव करणें.-*dist*, *n.* agent of a *p.* मतप्रचारक.

**Prŏp'agāte**, *v. t. & i.* ( प्रॉ'पगेट् )—to multiply or reproduce by sowing, grafting, breeding, etc.; to spread abroad, to diffuse; to disseminate. वाढविणें, उत्पत्तीनें वाढ होणें; प्रसार करणें, फैलावणें. -*tion*, *n.* प्रसार, फैलाव, पसारा, विस्तार.-*tor*, *n.* प्रसार, -विस्तार-करणारा.

**Propĕl'**, *v. t.* ( प्रपे'ल् )—to drive or push forward; to give forward motion to. पुढें चालवणें; पुढील गति देणें. *Propell'er*, *n.* revolving shaft with blades for propelling steamer or aircraft. ( आगबोट,-विमान ) चालविणारा पंखा.

**Propĕn'sĭtў**, *n.* ( प्रपे'न्सिटि )—bent of mind, inclination; predisposition to anything. ओढा, कल; प्रवृत्ति, नाद.

**Prŏp'er**, *a.* ( प्रॉ'पर् )—one's own; particularly suited to, suitable, appropriate; right; decent, decorous; ( arch. ) handsome; ( colloq. ) thorough. खुद्द, स्वतःचा; योग्य; खरा, वास्तविक; नीटनेटका; सुरेख, पूर्ण. *P. noun,-name*, विशेषनाम,-नांव. *Within the sphere of architecture p.*, वास्तविक-खन्या-शिल्पशास्त्राच्या कक्षेत. *P. fraction*, *f.* less than unity. शुद्ध अपूर्णांक.

**Prŏ'perlў**, *adv.* ( प्रॉ'पर्-लि )—in the right way; justifiably; with decency or good manners; thoroughly. योग्य रीतीनें; खरें पाहूं गेलें असतां; व्यवस्थित रीतीनें; पूर्णपणें.

**Prŏ'pertў**, *n.* ( प्रॉ'पर्टि )—owning; things or thing owned; a landed estate; attribute or quality; ( usu. pl. ) stage appurtenances. स्वामित्व, सत्ता, मालकी; मालकीच्या वस्तु; जमीनजुमला, मालमत्ता; गुणधर्म, लक्षण, स्वभाव; नाटकवाल्यांचें सामानसुमान, नाटकी सामान. *P. qualification*, जमीनजुमला असणें, वी,-स्थावर मालमत्तेची लायकी. *P. tax*, स्थावर मालमत्तेवरील,-जमीनजुमल्यावरील,-कर. *A man of p.*, ऐपतदार मनुष्य.

**Prŏph'ĕcў**, *n.* ( प्रॉ'फिसि )—prophesying; inspired prediction or utterance. भविष्यकथन; भविष्य, भाकीत.

**Prŏph'ĕsў**, *v. i. & t.* ( प्रॉ'फिसाय् )—to predict the future, to utter prophecies or predictions; ( arch. ) expound the scriptures. भविष्य सांगणें,-वर्तविणें; भाकीत करणें, पूर्वीच सांगून टाकणें, धर्मग्रंथावर प्रवचन करणें.

**Prŏph'ĕt**, *n.* ( प्रॉ'फिट् )—an inspired teacher, a person who predicts or foretells future events; revealer or interpreter of God's will. प्रासादिक,-ज्ञानी,-पुरुष, भविष्यवादी; ईश्वराचा प्रेषित,-दूत. *Proph'etess*, *n. fem.* भविष्यवादिनी, प्रासादिक स्त्री.

**Prophĕt'ic ( al )**, *aa.* ( प्रफे'टिक्,-कल् )—of or like a prophet; predicting; serving as a prediction ( *of* ). भविष्यवाद्याचा, देवदूताचा, देवदूतासारखा; भविष्यसूचक; भाविसूचक, चा सूचक.

**Prŏphўlăc'tic**, *a. & n.* ( प्रॉफिलॅ'क्टिक् )—( medicinal ) measure done or used as preventive or warding off a disease. रोगनिवारक ( औषध, उपाय ).

**Propĭnq'uĭtў**, *n.* ( प्रपि'न्क्विटि )—vicinity, neighbourhood, nearness, esp. in blood; similarity. जवळपणा, जवळचा संबंध; सारखेपणा.

**Propĭ'tiāte**, *v. t.* ( प्रपि'शिएट् )—to appease; to gain the forgiveness or favour of. सान्त्वन करणें, आराधना करणें, प्रसन्न करणें, खुलवणें.-*ation*, *n.* propitiating; gift or act meant to propitiate. आराधना, मनधरणी, शांति, सांत्वन.

**Propĭ'tiatorў**, *a.* ( प्रपि'शिएटरि )—meant to propitiate, conciliatory. आळविणारा, आराधना करणारा.

**Propĭ'tious**, *a.* ( प्रपि'शस् )—favourably disposed, favouring; of good omen. अभिमुख, अनुकूल; शुभशकुनाचा, शुभ, प्रसन्न, दयाळू.

**Propŏr'tion**, *n.* ( प्रपो'र्शन् )—comparative part; part bearing a definite relation to the whole; comparative relation, ratio; symmetrical arrangement, symmetry; ( Arith. ) rule of three; ( Math. ) equality of ratios between two pairs of quantities; ( pl. ) dimensions. प्रमाण, परिमाण, हिस्सा, भाग; हिस्सेरशी; प्रमाणबद्धता, मेळ; त्रैराशिक; निरनिराळ्या गुणोत्तरांचा सारखेपणा; लांबरुंदी, आकार. *v. t.* to make proportionate; arrange the proportions of. प्रमाणांत ठेवणें,-मांडणें; जम,-मेळ,-बसविणें. *Was out of ( all ) p. to*, too great for. च्या प्रमाणाबाहेर. *Direct p.*, समप्रमाण. *Inverse p.*, व्यस्त प्रमाण. *Compound p.*, पंचराशिक.

**Propŏr'tionable**, *a.* ( प्रपो'र्शनेबल् )—proportionate. बेताचा, प्रमाणाचा.

**Propŏr'tional**, *a.* ( प्रपो'र्शनल् )—of proportion; aiming or aimed at due proportion. प्रमाणाचा, प्रमाणशुद्ध; प्रमाणात्मक. *n.* one of the terms of a proportion. प्रमाणपद, अनुमानपद. *Propor'tionate*, *a.* that is in due proportion; proportionally adjusted. प्रमाणांत असणारा, प्रमाणाचा; प्रमाणबद्ध.

**Propō'sal**, *n.* ( प्रपो'झल् )—scheme put forward; an offer of marriage. सूचना, योजना, बेत; लग्नाची मागणी.

**Propōse'**, *v. t. & i.* ( प्रपो'झ् )—to put forward as a problem, object, plan, intention, candidate, or toast; to make offer of marriage. पुढें ठेवणें, सुचवणें, योजणें; जुळवणें, लग्नाचें बोलणें करणें.

**Prŏposĭ'tion**, *n.* ( प्रॉपो-झि'शन् )—statement, assertion; predication; ( *Math.* ) formal statement of theorem or problem; offer of terms for consideration, proposal; ( sl. ) task, job, problem, opponent, prospect, etc.; ( Log. ) form of words consisting of predicate and subject connected by copula. वाक्य, विधान; सूचना; सिद्धान्त; कर्तव्यनिर्देश; कर्तव्य; ( तर्क० ) प्रतिज्ञा, वाक्य, पूर्वपक्ष. *Porposi'tional*, *a.* [ L. *pro*, before; *ponere*, to place ]

**Prōpound'**, *v. t.* ( प्रो-पा'उन्ड् )—to put forth for

protuberance in the body. (उंच) भूशिर; समुद्रांत शिरलेलें जमिनीचें उंच टोंक; टेंगूळ, अवाळूं. [L. *pro*, forward; *montis*, mountain]

Promōte', *v. t.* (प्रमो'ट्)—to move up to a higher office or position; to help forward or initiate the process or formation of, to encourage. उन्नति करणें, बढती देणें, चढविणें; उत्तेजित करणें, साहाय्य करणें, उत्तेजन देणें. *Promo'ter*, *n.* encourager; a person who promotes formation of joint-stock company. पुरस्कर्ता, उत्तेजन देणारा साहाय्यकर्ता; सहकारी मंडळी स्थापन करण्यामध्यें पुरस्कार घेणारा,-सहकारमंडळप्रवर्तक.

Promō'tion, *a.* (प्रमो'शन्)—advancement. बढती, वाढ.

Prŏmpt, *a.* (प्रॉम्ट्)—done at once or without delay; ready in action. जलदीचा, तावडतोबीचा, तात्कालिक, तत्पर, चलाख. *v. t.* to incite, to inspire; to help out (actor, speaker) by reading next words of the part. उत्तेजन देणें, प्रेरणा करणें; पुढची आठवण करून देणें, (पडद्याच्या आंतून नटाला भाषण) सुचवणें. *n.* thing said to help the memory, esp. of actor. (नटाला पुढच्या भाषणाची आठवण करण्यासाठीं) सांगितलेले शब्द. *For p. cash*, (on the spot). रोख किंमत देऊन.

Prŏmp'ter, *n.* (प्रॉ'म्टर्)—(*esp.*) a person stationed to prompt actors. नटांना (पडद्याच्या आडून) सूचना करणारा.

Prŏmp'ting, *n.* (प्रॉ'म्प्टिंग्)—incitement. उठावणी, उचल, उत्तेजन, प्रेरणा; नटाला सूचना.

Prŏmp'titūde, *n.* (प्रॉ'म्टिट्यूड्)—promptness, readiness, quickness of decision. दक्षता, चलाखी, तडफ.

Prŏm'ŭlgāte, *v. t.* (प्रॉ'मल्गेट्)—to publish as coming into force or having authority, to proclaim, to make known. अंमलांत येईल म्हणून प्रसिद्ध करणें, (माहिती) फैलावणें, जाहीर करणें.*-tion*, *n.* प्रसिद्धीकरण, जाहीर करणें.*-tor*, *n.* जाहीर-प्रसिद्ध-करणारा अधिकारी. [L. *promulgare*, to proclaim]

Prōne, *a.* (प्रोन्)—lying face or front downwards; (loosely) prostrate; inclined, disposed; (of ground) having downward aspect or direction; (loosely) steep, headlong. अधोमुख, अधोवदन, प्रणत; पालथा, उतरता, कलता, कल असलेला, प्रवृत्त; कललेली, उतरती (जमीन); उंच, उंचवट्याची. *-ly*, *adv.*

Prŏng, *n.* (प्रॅग्)—spike of a fork. अणीदार टोंक, कांटा, दांता, शूळ, अणी, टोंक.

Pronŏm'inal, *a.* (प्रोनॉ'मिनल्)—of, or of the nature of, a pronoun. सर्वनामाचा, सर्वनामासंबंधीं.

Prō'noun, *n.* (प्रो'नाउन्)—a word serving as substitute for a noun. नामाच्या ऐवजीं योजलेला शब्द, सर्वनाम. *Personal pp.*, (I, we, thou etc.) पुरुषवाचक सर्वनामें. *Interrogative pp.*, (who, what, which) प्रश्नार्थक सर्वनामें. *Relative pp.*, (who, that, which) संबंधी सर्वनामें. *Possessive pp.*, (my, mine etc.) षष्ठ्यन्त सर्वनामें. *Demonstrative pp.*, (this, that) दर्शक सर्वनामें. *Distributive pp.*, (each, every, etc.) भिन्नत्वदर्शक सर्व०. *Indefinite pp.*, (any, some, etc.) सामान्य सर्व०

Pronounce', *v. t. & i.* (प्रना'उन्स्)—to utter formally, to declare, to affirm, to pass judgement, to give one's opinion; to articulate. यथाविधि-गंभीरपणानें-सांगणें; निश्चयपूर्वक सांगणें, स्पष्ट मत देणें; उच्चार करणें, उच्चारणें, बोलणें.*-able*, *a.* उच्चार्य, उच्चारण्याजोगा.

Pronounce'mĕnt, *n.* (प्रोना'उन्स-मेन्ट्)—an official declaration of opinion or judgement. मत जाहीर करणें, निकाल जाहीर करणें, स्पष्ट अभिप्राय देणें.

Pronounced', *a.* (प्रोना'उन्स्ट्)—strongly marked, decided, extreme, glaring. स्पष्ट, निश्चित, ठळक, ठळठळीत.

Pronoun'cing, *a.* (प्रोना'उन्सिंग्)—P. dictionary, (शब्दांचे) उच्चार देणारा कोश, उच्चारदर्शक कोश.

Pronŭn'ciā"tion, *n.* (प्रोन'न्सिए"शन्)—the way a word is pronounced, the mode of uttering words. उच्चारणें, उच्चारण, उच्चार, वर्णोच्चार.

Prōof, *n.* (प्रूफ्)—a fact, evidence or reasoning that proves the truth of something; test or trial; impression from type subject to correction before final printing; careful impression of engraved plate before printing of ordinary issue; (place for) testing of fire-arms or explosives; (arch.) proved impenetrability; standard of strength of distilled alchoholic liquors; test-tube; rough edges left to some leaves of books to show it has not been cut down. प्रमाण, दाखला, पुरावा, ताळा, उपपत्ति, कसोटी, परीक्षा; छापण्यापूर्वी शुद्ध करण्याकरितां छापलेला कच्चा कागद, मुद्रित, खरडा; खोदीव कामाचा पहिला छाप,-प्रतिमा,-ठसा; बंदुकी, दारूगोळा वगैरे तपासण्याची जागा; खात्रीलायक अभेद्यता; (मादक द्रव्याची) तीव्रता; तेजी; कसनळी, कास-नलिका; पुस्तकाच्या पानांच्या न छाटलेल्या कडा. *a.* (of armour) of proved strength; giving or having an impenetrable defence. खबरदार, मजबूत, बलवान; अभेद्य, दुर्भेद्य. *v. t.* to make (fabric) waterproof. पाणी आंत न शिरेल असें,-अभेद्य-करणें. *P.-reader*, press-corrector. छापखान्यांतील मुद्रितें तपासणारा. *P.-sheet*, printing-proof. मुद्रित. *P.-less*, *a.* प्रमाणरहित, पुरावा नसलेलें, प्रमाणशून्य.

Prŏp, *n.* (प्रॉप्)—a thing used to support something or keep it upright; supporter of cause, &c. टेंकण; मेढ, आधार. *v. t.* to be a prop to; to uphold; to hold up, to support by standing under or against; (of horse etc.) come to a dead stop with forelegs rigid. आधार देणें, टेंकू देणें, मेढाग देणें; (घोडा) एकदम थांबणें.

Prŏpagăn'dä, *n.* (प्रॉपगॅन्डा)—means for propagating a doctrine or practice. विशिष्ट मतांच्या प्रसार

करण्याची योजना, स्वतःच्या मतांचा फैलाव करणें.-*dist*, *n.* agent of a *p.* मतप्रचारक.

**Prŏp'agāte**, *v. t.* & *i.* ( प्रॉ'पगेट् )—to multiply or reproduce by sowing, grafting, breeding, etc.; to spread abroad, to diffuse; to disseminate. वाढाविणें, उत्पत्तीनें वाढ होणें; प्रसार करणें, फैलावणें. -*tion*, *n.* प्रसार, फैलाव, पसारा, विस्तार.-*tor*, *n.* प्रसार, -विस्तार-करणारा.

**Propĕl'**, *v. t.* ( प्रपे'ल् )—to drive or push forward; to give forward motion to. पुढें चालवणें; पुढील गति देणें. *Propell'er*, *n.* revolving shaft with blades for propelling steamer or aircraft. ( आगबोट,-विमान ) चालविणारा पंखा.

**Propĕn'sity̆**, *n.* ( प्रपे'न्सिटि )—bent of mind, inclination; predisposition to anything. ओढा, कल; प्रवृत्ति, नाद.

**Prŏp'er**, *a.* ( प्रॉ'पर् )—one's own; particularly suited to, suitable, appropriate; right; decent, decorous; ( arch. ) handsome; ( colloq. ) thorough. खुद्द, स्वतःचा; योग्य; खरा, वास्तविक; नीटनेटका; सुरेख, पूर्ण. *P. noun,-name*, विशेषनाम,-नांव. *Within the sphere of architecture p.*, वास्तविक-खऱ्या-शिल्पशास्त्राच्या कक्षेत. *P. fraction*, *f.* less than unity. शुद्ध अपूर्णांक.

**Prŏ'perly̆**, *adv.* ( प्रॉ'पर्-लि )—in the right way; justifiably; with decency or good manners; thoroughly. योग्य रीतीनें; खरें पाहूं गेलें असतां; व्यवस्थित रीतीनें; पूर्णपणें.

**Prŏ'perty̆**, *n.* ( प्रॉ'पर्टि )—owning; things or thing owned; a landed estate; attribute or quality; ( usu. pl. ) stage appurtenances. स्वामित्व, सत्ता, मालकी; मालकीच्या वस्तु; जमीनजुमला, मालमत्ता; गुणधर्म, लक्षण, स्वभाव; नाटकवाल्यांचें सामानसुमान, नाटकी सामान. *P. qualification*, जमीनजुमला असणें, ही,-स्थावर मालमत्तेची लायकी. *P. tax*, स्थावर मालमत्तेवरील,-जमीनजुमल्यावरील,-कर. *A man of p.*, ऐपतदार मनुष्य.

**Prŏph'ecy̆**, *n.* ( प्रॉ'फिसि )—prophesying; inspired prediction or utterance. भविष्यकथन; भविष्य, भाकीत.

**Prŏph'ĕsy̆**, *v. i.* & *t.* ( प्रॉ'फिसाए )—to predict the future, to utter prophecies or predictions; ( arch. ) expound the scriptures. भविष्य सांगणें,-वर्तविणें; भाकीत करणें, पूर्वीच सांगून टाकणें, धर्मग्रंथावर प्रवचन करणें.

**Prŏph'ĕt**, *n.* ( प्रॉ'फिट् )—an inspired teacher, a person who predicts or foretells future events; revealer or interpreter of God's will. प्रासादिक,-ज्ञानी,-पुरुष, भविष्यवादी; ईश्वराचा प्रेषित,-दूत. *Proph'etess*, *n. fem.* भविष्यवादिनी, प्रासादिक स्त्री.

**Prophĕt'ic** ( al ), *aa.* ( प्रफे'टिक्,-कल् )—of or like a prophet; predicting; serving as a prediction ( *of* ). भविष्यवाद्याचा, देवदूताचा, देवदूतासारखा; भविष्यसूचक; भाविसूचक, च्या सूचक.

**Prŏphy̆lăc'tic**, *a.* & *n.* ( प्रॉफिलॅ'क्टिक् )—( medicinal ) measure done or used as preventive or warding off a disease. रोगनिवारक ( औषध, उपाय ).

**Propĭnq'uity̆**, *n.* ( प्रपिं'क्विटि )—vicinity, neighbourhood, nearness, esp. in blood; similarity. जवळपणा, जवळचा संबंध; सारखेपणा.

**Propĭ'tiāte**, *v. t.* ( प्रपि'शिएट् )—to appease; to gain the forgiveness or favour of. सान्त्वन करणें, आराधना करणें, प्रसन्न करणें, खुलवणें.-*ation*, *n.* propitiating; gift or act meant to propitiate. आराधना, मनधरणी, शांति, सांत्वन.

**Propĭ'tiātory̆**, *a.* ( प्रपि'शिअटरि )—meant to propitiate, conciliatory. आळविणारा, आराधना करणारा.

**Propĭ'tious**, *a.* ( प्रपि'शस् )—favourably disposed, favouring; of good omen. अभिमुख, अनुकूल; शुभशकुनाचा, शुभ, प्रसन्न, दयाळू.

**Propŏr'tion**, *n.* ( प्रपो'र्शन् )—comparative part; part bearing a definite relation to the whole; comparative relation, ratio; symmetrical arrangement, symmetry; ( Arith. ) rule of three; ( Math. ) equality of ratios between two pairs of quantities; ( pl. ) dimensions. प्रमाण, परिमाण, हिस्सा, भाग; हिस्सेरशी; प्रमाणबद्धता, मेळ; त्रैराशिक; निरनिराळ्या गुणोत्तरांचा सारखेपणा; लांबीरुंदी, आकार. *v. t.* to make proportionate; arrange the proportions of. प्रमाणांत ठेवणें,-मांडणें; जम,-मेळ,-बसविणें. *Was out of ( all ) p. to*, too great for. च्या प्रमाणाबाहेर. *Direct p.*, समप्रमाण. *Inverse p.*, व्यस्त प्रमाण. *Compound p.*, पंचराशिक.

**Propŏr'tionable**, *a.* ( प्रपो'र्शनेबल् )—proportionate. बेताचा, प्रमाणाचा.

**Propŏr'tional**, *a.* ( प्रपो'र्शनल् )—of proportion; aiming or aimed at due proportion. प्रमाणाचा, प्रमाणशुद्ध; प्रमाणात्मक. *n.* one of the terms of a proportion. प्रमाणपद, अनुमानपद. *Propor'tionate*, *a.* that is in due proportion; proportionally adjusted. प्रमाणांत असणारा, प्रमाणाचा; प्रमाणबद्ध.

**Propō'sal**, *n.* ( प्रपो'झल् )—scheme put forward; an offer of marriage. सूचना, योजना, बेत; लग्नाची मागणी.

**Propōse'**, *v. t.* & *i.* ( प्रपो'झ् )—to put forward as a problem, object, plan, intention, candidate, or toast; to make offer of marriage. पुढें ठेवणें, सुचवणें, योजणें; जुळवणें, लग्नाचें बोलणें करणें.

**Prŏposĭ'tion**, *n.* ( प्रॉपो-झि'शन् )—statement, assertion; predication; ( *Math.* ) formal statement of theorem or problem; offer of terms for consideration, proposal; ( sl. ) task, job, problem, opponent, prospect, etc.; ( Log. ) form of words consisting of predicate and subject connected by copula. वाक्य, विधान; सूचना; सिद्धान्त; कर्तव्यनिर्देश; कर्तव्य; ( तर्क० ) प्रतिज्ञा, वाक्य, पूर्वपक्ष. *Porposi'tional*, *a.* [ L. *pro*, before; *ponere*, to place ]

**Prōpound'**, *v. t.* ( प्रो-पा'उन्ड् )—to put forth for

consideration or solution, to propose. विचारार्थ पुढें मांडणें, पुढें ठेवणें.

**Prōpri'etarỹ**, *a.* ( प्रो-प्रा'इटरि )—of a proprietor; held as property; holding property. स्वतःच्या मालकीचा; खासगी; जमीनजुमला असलेला. *n.* proprietorship; proprietors. मालकी, सत्ता, स्वामित्व; स्थावर मिळकत असलेले लोक, जमीनदारवर्ग. *P. rights*, मालकी हक्क. *The p. classes.*, जमीनदार लोक,-वर्ग. *P. medicines*, खाजगी मालकीचीं औषधें.

**Prōpri'etor**, *n.* ( प्रो-प्रा'इटर् )—a person having an exclusive or legal right to property, owner. धनी, मालक.-*tress*, *n. f.*

**Prōpri'etỹ**, *n.* ( प्रो-प्रा'इटि )—appropriateness, suitableness, fitness, rightness; suitability; correct conduct. औचित्य, युक्तता, समर्पकता; याथार्थ्य; अनुरूपता; योग्यता, शिस्त.

**Propŭl'sion**, *n.* ( प्रप'ल्शन् )—propelling; ( fig. ) impelling influence. पुढें ढकलणें; पुढें ढकलण्याची शक्ति, प्रचोदन; प्रेरक शक्ति,-वजन.-*ive*, *a.*

**Prorogue'**, *v. t. & i.* ( प्ररो'ग् )—to defer, to discontinue meetings of parliament at the end of a session. ( पार्लमेंटच्या ) सभेचें काम पुढील बैठकीवर टाकणें, लांबचे मुदतीवर ठेवणें,-नेणें. *Proroga'tion*, *n.*

**Prōsā'ic**, *a.* ( प्रोझे'इक् )—like prose; unpoetical; commonplace. गद्यासारखा, गद्यात्मक; शुष्क, रसहीन, बेचव, नीरस, रुक्ष; सर्वसाधारण. *Pros'aist*, *n.* a prose-writer; prosaic person. गद्यलेखक; अरसिक मनुष्य.

**Proscē'nium**, *n.* ( प्रोसी'निअम् )—( pl.-*a* ) part of theatre stage in front of curtain. पडद्याच्या पुढील रंगभूमीचा भाग.

**Proscribe'**, *v.t.* ( प्रो-स्क्रा'इब् )—to publish the name as condemned; to exile, to ostracize. बेकायदा ठरवणें, अपात्र ठरविणें; निषेध करणें, हद्दपार करणें, बहिष्कृत करणें, दूर ठेवणें; मना करणें, सरकारजमा करणें. *Proscrip'tion*, *n.*; *Proscrip'tive*, *a.*

**Prōse**, *n.* ( प्रोझ् )—unversified language ( esp. as a form of literature ); plain speech. गद्य वाङ्मय, छंदोरहित लेख; साधें भाषण. *v. i. & t.* to talk tediously,-prosily ( *about* ); to turn ( poem etc. ) into prose. चऱ्हाट लावणें, नीरसपणानें बोलणें; गद्यांत उतरणें,-लिहिणें. *P. works*, गद्यग्रंथ. *P. poem*, prose work of poetical style. गद्यकाव्य.

**Prŏs'ĕcūte**, *v. t.* ( प्रॉ'सिक्यूट् )—to pursue or carry on; to institute legal proceedings. नेटानें पुढें चालू ठेवणें, पाठीस लागणें, पिच्छा पुरवणें; खटला भरणें.

**Prŏs'ĕcūtion**, *n.* ( प्रॉ'सिक्यूशन् )—prosecuting ( *of* pursuit etc. ); ( law ) exhibition of criminal charge before court; carrying on of legal proceedings against person; the prosecuting party in a lawsuit. पाठलाग, पाठपुरावा; पुढें चालवणें; खटला, फिर्याद; खटला भरणें,-फिर्याद चालवणें; फिर्यादी.

**Prŏs'ĕcūtor**, *n.* ( प्रॉ'सिक्यूटर् )—the bringer of a suit in a criminal court. ( फौजदारी कोर्टांतील ) फिर्यादी. *Public p.*, law officer conducting criminal proceedings in public interest. फौजदारी काम चालविणारा सरकारी वकील. *Pros'ecutrix*, *n.* female prosecutor. सरकारी स्त्री-वकील.

**Prŏs'ĕlȳte**, *n.* ( प्रॉ'सिलाइट् )—a convert. धर्मांतर केलेला मनुष्य, बाटगा.-*lism*, *n.* practice of proselytizing. धर्मांतर करविण्याची-बाटविण्याची चाल.-*lize*, *v. i. & t.* to seek proselytes; make a proselyte of. धर्मांतर करणाऱ्याचा शोध करणें; ( ला ) बाटविणें.

**Prosen'chyma**, *n.* ( प्रॉसे'न्किमा )—( bot. ) tissue of elongated cells placed with their ends interpenetrating, esp. fibro-vascular tissue. तंतूइतक्या बारीक वाहिन्या उत्पन्न करणाऱ्या दीर्घ पेशींचें जाल ( धातु ), तंतुपेशीमयधातु. ( *cf. parenchyma*, मृदुपेशीमय धातु, मृदुधातु. )

**Prŏs'odỹ**, *n.* ( प्रॉ'साडि )—the science of versification and vowel quantity. छन्दःशास्त्र, छन्दोविद्या. *Proso'dial*, *Prosod'ic*, *aa.* छंदःशास्त्रासंबंधीं,-चा. *Pros'odist*, *n.* छंदःशास्त्रवेत्ता.

**Prŏsōpopoe'ia**, *n.* ( प्रॉसोपपी'इआ )—( rhet. ) introduction of pretended speaker; personification of abstract thing. भावदर्शक गोष्टींवर सचेतनत्वाचा आरोप, भाविक ( अलंकार ). [ *Gk prosopon*, person; *poieo*, make ]

**Prŏs'pect**, *n.* ( प्रॉ'स्पेक्ट् )—a view; mental view; anticipation, expectation; ( Mining ) spot giving prospects of mineral deposit. देखावा; दूरदृष्टि; भावी आशा, संभव; खनिज द्रव्य मिळण्याजोगी जागा,-स्थळ,-स्थान. *v. i. & t.* ( प्रेस्पे'क्ट् ), to go on exploring expedition; institute, search; explore. शोधून काढण्यासाठीं जाणें; शोध सुरू करणें; ( धातूच्या खाणी ) शोधून काढणें.

**Prospĕc'tive**, *a.* ( प्रॉस्पे'क्टिव् )—concerned with or applying to the future only; expected. भावि, पुढील; अपेक्षित.

**Pros'pector**, *n.* ( प्रॉ'स्पेक्टर् )—person who prospects for gold etc. सोन्याच्या वगैरे धातूंच्या खाणी शोधून काढणारा.

**Prŏspĕc'tus**, *n.* ( प्रॉस्पे'क्टस )—( *pl.-tuses* ) a circular describing chief features of a company, &c. योजनापत्रक, उद्देशपत्रक.

**Prŏs'per**, *v. t. & i.* ( प्रॉ'स्पर् )—to get or go on well; to thrive, to render prosperous. चलती असणें किंवा होणें; भरभराट होणें; यश देणें, यशस्वी करणें.

**Prŏspĕ'ritỹ**, *n.* ( प्रॉस्पे'रिटि )—state of prospering, flourishing condition, good fortune. उत्कर्ष, भाग्य, भरभराट.

**Prŏs'perous**, *a.* ( प्रॉ'स्परस् )—flourishing, thriving, prospering; auspicious. संपन्न, भरभराटीचा; अनुकूल.

**Prŏs'tāte**, *n.* ( प्रॉ'स्टेट् )—large gland, each of several small glands, accessory to male generative organs in mammals. ( पुरुषाचे ) मूत्राशयाचे तोंडाजवळ असणारा ग्रंथि, शुक्राशय पिंड. *Prosta'tic*, *a.*

Prŏs'titūte, *n.* ( प्रॉ'स्टिट्यूट् )—a harlot. वेश्या. *v. t.* to make a prostitute of ; to sell for base gain ; to put to infamous use. वेश्या बनवणें ; पैसे घेऊन नीच कामास लावणें ; अपव्यय करणें. *Prostitu'tion, n.* वेश्या-वृत्ति, दुरुपयोग, भ्रष्ट करणें. *Prostitu'tor, n.*

Prŏs'trāte, *a.* ( प्रॉ'स्ट्रेट )—stretched on the ground ; overcome, exhausted ; ( Bot. ) lying flat on ground. साष्टांगप्रणत ; दमलेला, क्षीणशक्ति, पराभूत पावलेला, चीत झालेला ; सुईसरपट. *v. t.* ( प्रोस्ट्रे'ट ), to throw flat on ground ; reduce to, exhaustion or despair. लोळवणें, जमीनदोस्त करणें ; चीत करणें, थकवा आणणें ; नम्र,-निराश,-करणें. *Prostra'tion, n.*

Prō'sy̆, *a.* ( प्रो'झि )—tedious, commonplace. सामान्य, कंटाळवाणा, चर्पटपंजरीचा.

Protăg'ŏnĭst, *n.* ( प्रोटॅ'गॉनिस्ट् )—the chief person ( in a drama, &c. ), the leading character ; a champion. सूत्रधार, नाटकांतील मुख्य पात्र ; शूर योद्धा. पाठी, कैवारी.

Prō'tean, *a.* ( प्रो'टिअन् )—of or as of Proteus ; versatile ; variable. प्रोटसचा, प्रोटसप्रमाणें अनेक-रूपधारी,-रूपें बदलणारा ; अष्टपैलू ; बहुप्रकारक, अनेकरूपी. [ Gk *Proteus*, sea-god taking various shapes ]

Protĕct', *v. t.* ( प्रोटे'क्ट् )—to keep safe ; to shield ; to secure, to guard, to shelter, to defend ; ( Pol. Econ. ) guard ( home industry ) against competition by imposts on foreign goods ; (Commerce.) provide funds to meet ( bill, draft ). सुरक्षित ठेवणें ; रक्षण करणें , ( परकी मालावर संरक्षक जकात बसवून ) देशी उद्योगधंद्यांचें संरक्षण करणें ; आधीं पैशाची तरतूद करून ठेवणें.

Protĕc'tion, *n.* ( प्रोटे'क्शन् )—protecting care ; shelter, shield, defence ; system of protecting home industries by taxing imports ; certificate of American citizenship issued to sea-men. संरक्षण ; बचाव, पुरस्कार, आश्रय ; देशी उद्योगधंद्यांना, संरक्षक जकात बसवून,-उत्तेजन देणें, संरक्षक जकात ; अमेरिकन खलाशांना तद्देशीयत्वाबद्दल दिलेलें प्रशस्तिपत्र. *Protec'tionism, Protec'tionist, nn.* principle or practice, advocte ; of economic protection. संरक्षक जकातींचें तत्त्व किंवा पद्धत ; संरक्षक जकातीचा पुरस्कर्ता. *Protec'tive, a.* संरक्षक.

Protĕc'tor, *n.* ( प्रोटे'क्टर् )—a person who protects ; appliance for protecting something ; ( hist. ) regent of State. संरक्षक, रक्षणकर्ता ; झांकण, टोपण, टोपी, संरक्षण ; ( राजाच्या अज्ञानदशेंत, गैरहजेरींत ) राज्यरक्षणकर्ता, राज्याचा कारभारी *Protec'tress, n. f.* *Lord P. of the Commonwealth*, ऑलिव्हर क्रॉम्वेल व रिचर्ड क्रॉ. ( १६५३ ते १६५९ ). *Protec'torship, n.* संरक्षकाची जागा,-हुद्दा.

Protĕc'torate, *n.* ( प्रोटे'क्टरेट )—office of protector of State ; a State or territory protected or controlled by another State. राजसंरक्षकाची जागा,-हुद्दा,-अमदानी ; संरक्षणाखालील मुलुख,-संस्थान.

Prŏt'ege, *n.* ( प्रॉ'टेझे )—a person to whom another is a patron or protector. आश्रित, पगलग्या. *Protegee', n. f.* आश्रित स्त्री. [ F ]

Prō'tein, *n.* ( प्रो'टिइन् )—kinds of organic compound forming the most essential part of food of animals. प्राण्यांच्या अन्नांत अगदीं अवश्य असलेला एक रासायनिक पदार्थ, ओजस द्रव्य. [ Gk *protos*, first ]

Protĕst', *v. t. & i.* ( प्रटे'स्ट् )—to affirm solemnly ; to make a protest ( *against* ). प्रतिज्ञेनें बोलणें ; हरकत घेणें. *n.* ( प्रो'टेस्ट् ) a formal statement or solemn declaration of dissent or disapproval ; remonstrance. हरकत, निषेध , लेखी विरोध. *Made a p.*, हरकत घेतली ; निषेध व्यक्त केला. ( *paid it* ) *under p.*, निषेध-पूर्वक, बिनकबुलीनें,-दिलें.

Prŏt'estant, *a. & n.* ( प्रॉ'टिस्टन्ट् )—of or belonging to any of the Christian bodies separated from the Roman communion in the Reformation ; ( also प्रटे'स्टंट ), making of a protest. रोमन कॅथोलिक धर्मपंथाचा निषेध करणाऱ्या धर्मसुधारणावादी पंथाचा ( -अनुयायी ) , निषेध करणारा, हरकत घेणारा. *Protes'tantism, n.* ; *Prot'estantize, v. t. & i.*

Prŏtestā'tion, *n.* ( प्रॉटिस्टे'शन् )—solemn affirmation or the making of it ; protest against. जोराची-गंभीर,- प्रतिज्ञा ; तीव्र निषेध,-नापसंती.

Prō'tocŏl, *n.* ( प्रो'टोकॉल् )—draught of terms agreed upon as the basis of a formal treaty ; formal statement of transaction. तहनाम्याच्या मुद्द्यांचा अव्वल मसुदा ; कोणत्याहि व्यवहाराचा लेखी दाखला. [ Gk *proto*, first ; *kolla*, glue, fly leaf glued to book ]

Prō'tomartyr, *n.* ( प्रो'टोमार्टर् )—first person martyred for a cause ( esp. of Christians, St Stephen ). पहिला धर्मवीर, धर्मासाठीं मरणारा.

Prō'ton, *n.* ( प्रो'टन् )—( physics ) unit of positive electricity, forming part ( or, in hydrogen, whole ) of the nucleus of the atom. धनविद्युत्.

Prō'toplasm, *n.* ( प्रो'टोप्लॅझम )—the semi-fluid substance constituting the basis of life in plants and animals. वनस्पति व प्राणी यांचा मूळजीवनाधार रस, जीवनरस.

Prō'totype, *n.* ( प्रो'टोटाइप् )—first or primary type in relation to any copy, &c. मूळरूप, प्रकृति, नमुना.

Protrăct', *v. t.* ( प्रोट्रॅ'क्ट् )—to lengthen duration of ; to be dilatory with ; draw to scale. लांबवणें ; लांबणीवर टाकणें ; प्रमाणानें काढणें.-*ed, pp.* लांबवलेला, लांबणीवर टाकलेला. *Protrac'tion, n.* विलंबन, दिरंगाई.

Protrăct'or, *n.* ( प्रोट्रॅ'क्टर् )—an instrument for measuring angles. कोन मोजण्याचें साधन किंवा यंत्र, प्रोट्रॅक्टर.

Protrūde', *v. i. & t.* ( प्रोट्रू'ड् )—to stick out ; to thrust out, to stand out prominently. बाहेर पडणें ; बाहेर येणें, फुगून बाहेर पडणें. *Protru'sion,* ( प्रोट्रू'झन् ) *n.* ; —*sive, a.* ( L *pro*, forward, *trudere*, draw )

Prŏtū'berance, *n.* (प्रॅटयू बरन्स् )—a knob, bulging shape; a swelling or hump. उंचवटा; टेंगूळ.

Prŏtū'berant, *a.* (प्रॅटयूबरन्ट )—bulging out beyond the surrounding surface; prominent. बाहेर आलेला; मुख्य, उंच, फुगीर, फुगलेला.

Proud, *a.* (प्राउड )—setting too high a value on oneself; arrogant; haughty, resolute to avoid dependence, humiliation, etc.; self-respecting; reserved; feeling honoured by something; of which one is or may be justly proud; (of things) imposing, splendid; (of waters) swollen, in flood. अहंमन्य; गर्विष्ठ; ताठ्याचा, माजोरी; निश्चयी, बाणेदार; स्वाभिमानी; आंतल्या गांठीचा; अभिमानी; अभिमान वाटण्याजोगा; भव्य, विशाल, विस्तीर्ण; तुडुंब-लेलें; पूर आलेलें. *P. flesh*, भरणाऱ्या जखमेभोंवतालचें सेलेलें मांस. (*adv.* colloq.) *you do me p.* (honour me greatly). तुम्हीं माझा मोठा मान केलात,-मोठा मान देतां. *Proud'ly, adv.*

Prove, *v. t.* & *i.* (प्रूव् )—to give proof of; to demonstrate; to ascertain by experience; to establish validity of (a will); to turn out to be; to test, to put to the proof. सिद्ध करणें; (प्रात्यक्षिक) दाखविणें; अनुभव घेणें; (मृत्युपत्राची) सत्यता स्थापित करणें; दिसून येणें; पारख करणें, परीक्षा घेणें. p. p. *proved* and arch *proven.* सिद्ध केलेला, शाबीत केलेला, कसास उतरलेला.

Prŏvĕ'nance, *n.* (प्रॉव्हिनन्स् )—what source something comes from. मूळ ठिकाण, मूळस्थान, मूळ.

Prŏv'ender, *n.* (प्रॉव्हिन्डर् )—fodder for beasts. (joc.) human food. अन्न, चारा, वैरण.

Prŏv'erb, *n.* (प्रॉव्हर्ब )—a short pithy saying in general use; adage, saw; notoriety, byword; (pl.) round game played with proverbs. म्हण; लोकोक्ति, आहाणा, संप्रदाय; प्रख्याति, (वाईट) प्रसिद्धि; एक प्रकारचा खेळ. *Book of Pp.*, (in Old Testament) जुन्या करारांतील एका पुस्तकाचें नांव. [ L *pro*, publicly, *verbum*, a word ]

Prŏverb'ial, *a.* (प्रव्ह'र्बिअल् )—of proverbs; notorious or constantly spoken of. म्हणींचा, लोकप्रसिद्ध, अतिप्रसिद्ध. *P. wisdom*, म्हणींतील बोध, बोधवचन. *Proverb'ially, adv.*

Provide', *v. t.* & *i.* (प्रव्हा'इड )—to make due preparation, to take precautions; to equip, to supply. आगाऊ तयारी करून ठेवणें; तरतूद किंवा तजवीज करणें; पुरवठा करणें.

Prōvi'ded, *conj.* (प्रॅव्हा'इडिड )—on the condition or understanding that. जर, असें असेल तर. *a. P. school*, public elementary school provided by local authority. (नगरपालिका वगैरे संस्थांनीं चालविलेली) प्राथमिक शाळा.

Prŏv'idence, *n.* (प्रॉ'व्हिडन्स )—timely care, provision or preparation; thrift; beneficent care of God. आगाऊ तजवीज, तरतूद; काटकसर; ईश्वरी साहाय्य. *Providence*, (P) God. ईश्वर.

Prŏv'ident, *a.* (प्रॉ'व्हिडन्ट )—prudent, cautious; showing foresight, frugal, thrifty. दूरदृष्टि, काटकसरी, मितव्ययी, *P. fund*, वारसनिधि, पूर्वव्ययस्थानिधि.

Prŏviden'tial, *a.* (प्रॉव्हिडे'न्शल् )—arranged by providence, effected by the providence of God; strikingly opportune. ईश्वरी करणीचा, ईश्वरी सूत्राचा, नेमानेमाचा; अगदीं ऐनवेळचा, दैवाचा.

Provi'der, *n.* (प्रव्हा'इडर )—In verbal sense; (esp.) purveyor. मोठ्या प्रमाणावर मालाचा पुरवठा करणारा. *Lion's p.*, jackal (lit. & fig.). (सिंहाला खाद्य पुरविणारा) कोल्हा. *Universal p.*, सर्व तऱ्हेचा माल ठेवणारा व्यापारी.

Prŏv'ince, *n*, (प्रॉ'व्हिन्स् )—a large division of a country; sphere of action; the proper business of a person, one's concern, branch of learning etc.; (Rom. Hist.) territory outside Italy under Roman Governor; (eccl.) district under archbishop or metropolitan. सुभा, प्रांत, कामाचा टप्पा, कर्तव्यक्षेत्र, अधिकार, विषय; संबंध; शाखा; प्रांत, विषय, प्रकरण; इटालीच्या बाहेरील रोमन प्रांताधिपतीच्या अधिकाराचा मुलूख, प्रांत, इलाखा; धर्माधिकाऱ्याच्या अधिकाराचा मुलूख,-प्रांत. *The pp.*, whole of a country outside the capital. राजधानीखेरीज इतर सर्व देश; मुलूख.

Provin'cial, *a.* (प्रॉव्हि'न्शल् )—of a province; of the provinces; having the speech or manners of the provinces. प्रांताचा, प्रांतिक, इलाख्याचा, राजधानीच्या बाहेरचा, देशांतला, खेड्यांतला, खेडवळ, ग्राम्य. *n.* an inhabitant of a province or the province, countrified person; (Eccl.) head of religions order in a province. प्रांतांतील,-खेड्यांतील रहिवासी, खेडवळ मनुष्य; धर्माध्यक्ष, प्रांतीय धर्माधिकारी. *Provin'cialist, n.* ग्राम्य,-खेड्यांतील,-मनुष्य.

Prŏvin'ciălism, *n.* (प्रॉव्हि'न्शिअॅलिझम् )—a provincial word or phrase, a rustic idiom, provincial manner, attachment to one's province rather than country. प्रांतिक वाक्संप्रदाय; प्रांतिक आचारविचार; (संकुचित) प्रांताभिमान. *Provin'ciality, n.* (आचार विचारांची) प्रांतिकता,-प्रांतभेद.

Provi'sion, *n.* (प्रव्हि'झन् )—providing; amount of something provided; legal or formal statement providing for something, clause of this; (*pl.*) eatables, supply of food. योजना, तरतूद, तयारी; साहित्य, सामुग्री; अट, कलम, शर्त; (अने०) खाद्य, अन्नपुरवठा. *v. t.* to supply with *pp.* अन्नपुरवठा करणें, खाद्यपदार्थांची तरतूद करणें.

Prōvi'sional, *a.* (प्रव्हि'झनल् )—temporary; subject to revision. तूर्ताचा, तात्पुरता; फेरविचार केला जाणारा, कामचलाऊ.

Provi'sō, *n.* (प्रव्हा'इ-झो )—(pl.-os) a conditional provision, a stipulation; a limiting clause. संकेत; शर्त, अट. *Provi'sory, a.* (प्रव्हा'इझरि) conditional; making provision. शर्तीचा, शर्तीच्या स्वरूपाचा, तात्पुरता.

**Prŏvocā'tion,** *n.* (प्रॉ-व्होकें'शन्)—an act by which anger is roused, incitement. रागाचें कारण, चिथावणी, उत्तेजन, चेतावणें, चिथवणूक.

**Provoc'ative,** *a.* (प्रॉव्हॉ'केटिव्ह)—adapted for the provoking of anger; intentionally irritating, inciting, stimulating. क्रोधोत्पादक; चिथावणारा. *n.* thing that excites appetite. (उत्सुकता, चव वगैरे) जागृत करणारी गोष्ट,-वस्तु.

**Provoke',** *v. t.* (प्राव्हो'क्)—to rouse the anger of; to call forth or give rise to. चिथवणें, चेतवणें, खिजविणें,कोपाविणें; उत्पन्न करणें

**Prŏv'ost,** *n.* (प्रॉ'व्हस्ट)—head of certain colleges; Scottish official corresponding to mayor; (provo) officer of military police. (इंग्लंडांतील) कांहीं कॉलेजांचा मुख्य अधिकारी; नगराध्यक्षासारखा स्कॉटलंडमधील अधिकारी; (प्रव्हो-) लष्करी शिपायांचा अधिकारी.

**Prow,** *n.* (प्राउ)—the part of a ship or boat immediately about its stem; vessel; (zool. also *prora*) prow-like projection in front. गलबताची नाळ; पडाव; नाळीसारखा पुढें आलेला भाग. *a.* (arch.) worthy, gallant. थोर, शूर, दिलदार.

**Prŏw'ess,** *n.* (प्रॉ'विस्)—military bravery combined with skill, valour, gallantry. शौर्य, पराक्रम, प्रताप.

**Prowl,** *v. i. & t.* (प्राउल्)—to go about in search of plunder or prey (also fig.); traverse (streets, place) thus. लुटीसाठीं,-शिकारीसाठीं,-फिरणें,-हिंडणें, घिरट्या घालणें, पाळतीवर असणें; शिकारीचे लागावर फिरणें. *On the p.*, पाळतीवर. *Prow'ler, n.*

**Prŏx'imate,** *a.* (प्रॉ'क्सिमेट्)—nearest; next before or after, immediate. अगदीं जवळचा; लगतचा, लगत्याचा.

**Proxime accĕss'it,** *n.* (प्रॉ'क्सिमिॲक्से'सिट्)—person posted as coming next to winner of prize, etc. बक्षीस वगैरे मिळविणाऱ्याच्या खालचा मनुष्य. *I was, he got a. p. a.*, (was very near). माझें, त्याचें, बक्षीस, -पारितोषिक,-थोडक्यांत चुकलें. [L.]

**Prŏxĭm'itў,** *n.* (प्रॉक्सि'मिटि)—closeness; near neighbourhood or approach. जवळ असणें; सांनिध्य, जवळपणा. *P. of blood*, kinship. नातें-गोत्र-संबंध.

**Prŏx'imō,** *a.* (प्रॉ'क्सिमो)—of next month. पुढील महिन्याचा.

**Prŏx'ў,** *n.* (प्रॉ'क्सि)—agency of substitute; authorized agent, one appointed to act for; a document authorizing one to vote on another's behalf; vote so given. मुखत्यारी, प्रतिनिधित्व; प्रतिनिधि, मुखत्यार, बदल्या; दुसऱ्याबद्दल मत देण्याचें अधिकारपत्र,-मुखत्यारपत्र; मुखत्यारामार्फत दिलेलें मत.

**Prude,** *n.* (प्रूड)—a woman of squeamish propriety. लज्जेचा आव घालणारी स्त्री, सुरकेसोर स्त्री. *Prud'ery, n.* लाजेचें सोंग,-ढोंग,-नखरे. *Prud'ish, a.*

**Pru'dence,** *n.* (प्रूडन्स)—being prudent; wisdom applied to practice, discretion. दूरदर्शित्व; सारासारविचार.

**Pru'dent,** *a.* (प्रूडन्ट्)—avoiding rashness; discreet, careful of consequences of actions. सावध; दूरदर्शी. *Pruden'tial, a.* (प्रुडे'न्शल्), dictated by prudence. दूरदर्शिपणाचा, समजदारीचा. *n. pl. p.* considerations or matters. दूरदर्शिपणाचे विचार, -गोष्टी.

**Prune,** *n.* (प्रून्)—dried plum; the colour of its juice, dark reddish purple (esp. attrib.) मनूक; गर्द तांबूस जांभळा (रंग). *v. t.* to rid of dead or overgrown parts; to reduce the luxuriance of. सुकलेला व अधिक वाढलेला भाग कापणें; व्यवस्थित कापणें, छाटणें, कलम करणें, छाटाछाट करणें. *Pruning hook*, कोयता.

**Prunĕll'a,** *n.* (प्रुने'ला)—a strong silk or worsted stuff. मजबूत रेशमी कापड. *n.* kinds of fever of throat disorder; germs of plants used to cure prunella. तापाचे प्रकार, घशाचे रोग; या रोगांवरील औषधी वनस्पति. *P. salt*, तापावर व घशाचे रोगावर घेण्याचें औषध, मीठ.

**Prur'ient,** *a.* (प्रु'रिएंट्)—given to or springing from lascivious thoughts. विषयलोलुप, खाजाळू, खाजाळ. *Prur'ience, n.* खाज, कंड, कंडू. [*L. prurire*, to itch]

**Prŭ'ssian,** *a.* (प्र'शन्)—of or from Prussia. प्रशिआ देशाचा,-देशांतील. *n.* a native of Prussia. प्रशिआ देशचा मनुष्य,-रहिवासी. *P. blue*, निळा रंग. *Pru'ssianize, v. t.* (esp.) to assimilate to the P. system of sacrificing the individual to the state. देशासाठीं व्यक्तिमत्त्वावर पाणी सोडण्याची प्रशिअन पद्धति अंगीं बाणविणें.

**Prŭ'ssic,** *a.* (प्र'सिक्)—of, got from, Prussian blue. 'प्रशियन ब्लू'-या नांवाच्या निळ्या रंगाचा,-रंगापासून केलेला. *P. acid*, hydrocyanic acid. हायड्रोसायनिक आम्ल.

**Prў,** *v. i.* (प्राय्)—to make furtive search or inquiries (*into*). नसती लुडबुड करणें, बारकाईनें टेहळणी किंवा चौकशी करणें. *Pry'ing, a.*; *Pry'ingly, adv.*

**Psälm,** *n.* (साम्)—a sacred song, a hymn. गीत, स्तोत्र.*-ist, n.* author of a psalm. गीतकार. *Psal'mody, n.* practice of singing psalms, anthems, etc. स्तोत्रगानपद्धति.

**Psal'ter,** *n.* (सॉ'ल्टर्)—the book of psalms; volume of psalms. जुन्या करारांतील 'गीतें', गीतांचें,-स्तोत्रांचें -पुस्तक,-संग्रह.

**Psal'terў,** *n.* (सॉ'ल्टरि)—an obsolete stringed instrument. एक जुनेंपुराणें तंतुवाद्य.

**Pseudo,** *pref.* (स्यूडो)—sham. खोटा, कृत्रिम. [Gk]

**Pseud'onўm,** *n.* (स्यू'डॅनिम्)—a fictitious name assumed by an author. ग्रंथकर्त्यानें धारण केलेलें खोटें नांव, कल्पित नांव, टोपण नांव.

**Pu'llet**, *n.* (पुलिट्)—a young domestic fowl before shedding feathers. तरुण कोंबडी किंवा इतर पक्षी.

**Pull'ey**, *n.* (पुलि)—a grooved wheel fixed in block enabling weights to be raised by downward pull of the cord running in the groove. कप्यांतलें चाक, कप्पी.

**Pu'llman-car**, *n.* (पुलमन् कार्)—a railway-saloon -carriage. रेल्वेचा, झोपायची सोय असलेला डबा; सलून-डबा.

**Pŭl'mŏnarў**, *a.* (पल्मोनरि)—of the lungs. फुफ्फुसांचा.

**Pŭlp**, *n.* (पल्प्)—the flesh of soft fruits; any fleshy or soft part of animal body; soft formless mass, esp. of materials for paper-making; ore pulverized and mixed with water. गर; मृदुमांस, (शरीरांतील,-दांतांखालील,-) मांसल भाग; लगदा, रांधा; अशुद्ध धातु कुट्टन केलेला लगदा, गादा. *v. t. & i.* to reduce to or rid of pulp; become pulpy; remove pulp from (coffee-beans). रांधा,-गादा,-करणें; (चा) गोळा होणें, मऊ होणें; (काफीच्या बोंडांचें) टरफल काढणें. *Pul'py, a.* of or like pulp. रांध्याचा, रांध्यासारखा, बिलबिलीत.

**Pu'lpit**, *n.* (पुल्-पिट्)—erection for preaching from; (*fig.*) preaching; preachers. व्यासपीठ; उपदेश, धर्मोपदेश; धर्मोपदेशक.

**Pŭlsate**, *v. i.* (पल्सेट्)—to expand and contract rhythmically; to throb, to vibrate, to quiver; agitate (diamonds) with machine to separate them from earth in which they are found. धडधडणें, खालींवर उडणें; फुरफुरणें, कंप होणें, कांपणें; (मातींतून हिरे) चाळणें.*-ation, n.*; *Pulsa'tor*, हिरे चाळण्याचें यंत्र. *Pul'satory, a.* स्फुरण पावणारा, (नाडीसारखा) उडणारा.

**Pŭlse**, *n.* (पल्स्)—throbbing of the arteries as blood is poured through them, point where this can be felt externally as in the wrist, throb of feeling; edible seeds (of peas, beans, lentils, &c.). नाडीचा ठोका, नाडी; धडधड, आघात; कडदण, डाळ. *To feel* person's *p.*, नाडी पाहणें; मन पाहणें; खडा टाकून पाहणें.

**Pul'verize**, *v. t. & i.* (पल्व्हराइज्)—to reduce to powder or dust; to crumble; to demolish (an argument, an opponent). चूर्ण किंवा पीठ करणें; चुराडा करणें; चिंधड्या करणें, जमीनदोस्त करणें, पाडाव,-चीत-करणें,*-zation, n.-zer, n.* a machine for pulverizing. चूर्ण,-पीठ,-करण्याचें यंत्र.

**Pulvĕ'rulent**, *a.* (पल्व्हेरुलन्ट्)—powdery, of dust; covered with powder; (of rock etc.) of slight cohesion, apt to crumble. मळाचा, चूर्णमय; मळ बसलेला, मळयुक्त; ठिसूळ (खडक इ०).

**Pū'ma'** *n.* (प्यूमा)—a large tawny American carnivorous beast. अमेरिकेंतील एक मोठा मांसभक्षक पशु.

**Pŭm'ice (stōne)**, *n.* (प्युमिस,-स्टोन्)—light kind of porous lava used for rubbing off stains, polishing, etc. एक जातीचा (घासून डाग घालविण्याच्या, गुळगुळीत करण्याच्या, उपयोगाचा) दगड. *Pumice hoof* (of horse), made spongy by disease. रोगानें भोकें पडलेला-मऊ झालेला-घोड्याचा खूर.

**Pŭmm'ĕl**, *v. t.* (पमेल्)—to strike repeatedly with the fists. एकापाठीमागून एक बुक्के मारणें.

**Pŭmp**, *n.* (पम्प्)—a machine used for raising water from a well or to a higher level; attempt, person skilful, at pumping others; kind of light shoe. (पाण्याचा) पंप,-बंब; दुसऱ्याचे गुप्त घेत युक्तीनें काढण्याचा प्रयत्न; दुसऱ्यांची रहस्यें हुडकून काढण्यांत कुशल मनुष्य; एक जातीचा बूट. *v. t. & i.* to work a pump; to bring or send liquid out or up; to exhaust breath of; get information out of, interrogate. पंप लावणें, पंपानें पाणी वर काढणें; धांपा टाकायला लावणें, दमविणें; माहिती काढून घेणें, प्रश्न विचारणें. *P. room*, a room at spa where medicinal water is sold. आरोग्यकारक झऱ्यावरील खोली.

**Pŭmp'kin**, *n.* (पंप्-किन्)—a kind of gourd. कोहळा, भोपळा. *Dark green p.*, काळा डांगर, काळा भोपळा,-भोपळीचा वेल.

**Pŭn**, *n.* (पन्)—a jest consisting of a play on words with more than one meaning. श्लेष, श्लेषोक्ति. *v. i.* to make pun. शब्दांवर श्लेष करणें, कोटि करणें. *2. v. t.* to consolidate (earth, rubble) by pounding or ramming. कुट्टन एकजीव करणें.

**Pŭnch**, *v. t.* (पंच्)—to strike with the fist; to bore or perforate with a punch, to prod with stick etc., esp. (U. S.) drive (cattle) thus; drive nail with punch. गुद्दा-ठोसा-मारणें, टिचकीनें-टोच्यानें-भोंक पाडणें, काठीनें ढोसलणें,-गुरें हांकणें; खिळा ठोकणें. *n.* a blow with the fist; a tool hammered or pressed against a surface; mixture of spirit or wine with water &c.; a short -legged thickset draught horse; a humpbacked figure in a puppet-show called *Punch and Judy*; (sl.) vigour, effective force, momentum. धक्का, गुद्दा; टिचकी, पोगर; एक प्रकारचें अंमली-अंमल आणणारें-पेय; आंखूड पायाचा घोडा; बाहुल्यांच्या (पंच आणि ज्युडि नांवाच्या) खेळांतील एक कुबड असलेली आकृति; जोम, जोर, उत्साह, प्रेरकशक्ति. *As pleased, as proud, as Punch,* (much, very) पुष्कळ,-अतिशय,-खूप, गर्विष्ठ.

**Pun'cheon**, *n.* (पंचन्)—a large cask. मोठें पिंप.

**Pŭnchĭnĕll'ŏ**, *n.* (पंचिनेलो)—(pl.*-os*) chief character in Italian puppet show; fat person of comical appearance. (इटालिअन) बाहुलेभोरपांतील मुख्य पात्र, विदूषक; ठेंगू लठ्ठ मनुष्य.

**Pŭnc'tāte**, *a.* (पंक्टेट्)—spotted, dotted. ठिपके असलेला, भोंकें असलेला, छिद्रयुक्त, सच्छिद्र. [*L. punctus*, to prick]

**Pŭnctil'io,** *n.* ( पंक्टि'ल्यो )—nice point of ceremony; a mere form. शिष्टाचाराची बारीकसारीक गोष्ट; शिष्टाचार.

**Pŭnctil'ious,** *a.* ( पंक्टि'ल्यस )—laying stress on punctilios, very exact in behaviour. शिष्टाचाराच्या बारिकसारिक गोष्टींकडे लक्ष पुरविणारा; कडक आचरणाचा.

**Pŭnc'tūal,** *a.* ( पं'क्च्युअल् )—observant of appointed time, not late; ( Geom. ) of a point. वक्तशिर, नियमित, उशिर न झालेला; बिंदूचा.-*ity, n.* वक्तशीरपणा, समयपालन. [ L. *punctum*, a point ]

**Pŭnc'tūāte,** *v. t.* ( पं'क्च्युएट् )—to mark or divide with stops, to mark with proper pauses; ( *fig.* ) interrupt ( speech ) *with* 'exclamations etc.; emphasize, accentuate. योग्य विरामचिन्हें देणें; ( टाळ्या वगैरे वाजवुन ) भाषणाला खंड पाडणें,-भाषण थांबविण्यास लावणें; जोर देणें, जोरानें व्यक्त करणें.

**Pŭnctūā'tion,** *n.* ( पंक्च्युए'शन् )—practice, art, of punctuating. विरामचिन्हें देणें, अवसानाच्या खुणा करणें,-देणें.

**Pŭnc'ture,** *n.* ( पं'क्चर् )—pricking; prick, esp. accidental pricking of pneumatic tire; a hole made by pricking. टोंचणें; टोंचा, सूक्ष्म छिद्र, लहान भोंक. *v. i. & t.* to experience a puncture; prick, pierce. भोंक पडणें, छिद्र पडणें; टोंचणें, बोंचणें.

**Pŭn'gent,** *n.* ( पं'जन्ट् )—sharply affecting the tongue, stinging, caustic, biting. तिखट, तीक्ष्ण, मसाला, कडक, खरमरीत, जहाल, झोंबणारा. *Pun'gency, n.*

**Pŭn'ish,** *v. t.* ( पं'निश् )—to subject to retributive or disciplinary suffering; inflict penalty; ( colloq. ) handle or test severely. शिक्षा करणें, शासन करणें; शिक्षा भोगायला लावणें; जोराचे तडाखे मारणें,-लगावणें, ( प्रतिस्पर्ध्याला ) खूप दमविणें, ( चा ) पुरेपूर फायदा घेणें.

**Pŭn'ishment,** *n.* ( पं'निश्-मेन्ट )—penalty. शिक्षा, दंड, शासन.

**Pū'nītive,** *a.* ( प्यू'निटिव्ह् )—that punishes or is designed to punish. दंडात्मक, शिक्षेदाखल योजलेलें. *P. police,* ( शिक्षा म्हणून नेमलेले ) जादा शिपाई, -लष्कर. *Pu'nitory, a.*

**Pŭnk,** *n.* ( पंक् )—( arch. ) prostitute; rotten wood, fungus growing on wood used as timber. वेश्या; टाकाऊ लांकूड; झाडावरील अळंबें. *a.* ( of bodily condition ) seedy; ( of things ) poor, worthless. गचाळ, गचाळ्या, फिकट; भिकार, टाकाऊ.

**Pŭnk'ie,** *n.* ( पं'कि )—( U. S. ) kind of small biting fly. एक लहान चावरी गांधील-माशी.

**Pŭnn'ĕt,** *n.* ( पं'निट् )—a chip basket for fruit etc. फळांची लांकडी टुरडी,-टोपली.

**Pŭn'ster,** *n.* ( पं'न्स्टर् )—a person given to punning. श्लेष,-कोट्या,-करणारा.

**Pŭnt,** *n.* ( पन्ट् )—flat-bottomed boat propelled by a pole. काठीनें चालविली जाणारी चपटी नाव, पडाव, छबिना. *v. t. & i.* to propel with or use punt -pole. ताज मारून पडाव चालविणें, ताज मारणें. 2. *v. t. & i. & n.* kick football on its way from one's hands to the ground; such a kick. हातांतून सुटून जमिनीवर पडण्यापूर्वी फूटबॉल पायानें उडवणें; अशा तऱ्हेचें उडवणें. 3. *v. i.* bet on a horse. शर्यत खेळणें.

**Pū'nў,** *a.* ( प्यू'नि )—undersized, feeble, small and weak, insignificant. अगदीं लहान आकाराचा, दुबळा.

**Pŭp,** *n.* ( पप् )—a puppy, a young dog. कुत्रीचें पिल्लूं. *v. i. & t.* to bring forth pups; give birth to. ( पिलें ) विणें,-घालणें. *In p.*, pregnant. गाभण ( कुत्री ). *To sell* ( person ) *a p.*, to swindle him by selling thing on prospective value. ( वस्तु जास्त किंमतीला विकून ) फसविणें.

**Pūpa,** *n.* ( प्यू'पा )—( pl.-*ae* ), chrysalis. किड्यांची पंख फुटण्यापूर्वीची स्थिति, कोशनिवासी स्थिति.

**Pū'pĭl,** *n.* ( प्यू'पिल )—a person being taught, a child under guardianship; opening in the middle of the iris of the eye. विद्यार्थी, शिष्य; पालकत्वाखालीं असलेलें मूल; ( डोळ्याची ) बाहुली. *P. teacher,* boy, girl, teaching in elementary school under head-teacher and concurrently receiving general education from him or elsewhere. स्वतः शिकत असतां खालच्या वर्गांतील मुलांमुलींना शिकविणारा विद्यार्थी,-विद्यार्थिनी; शिष्यगुरु. *Pu'pillage, n.* non-age; minority; being a pupil. अज्ञानदशा, पाल्यस्थिति; पालकत्वाखालीं असण्याचें वय; वयांत न आलेला अशी स्थिति; विद्यार्थीपणा, शिष्यत्व. *Pu'pillary, a.* underguardianship; of a pupil or pupils; of the pupil of the eye. पालकत्वाखालील, ताबेदारीचा; विद्यार्थ्यांचा, शिष्याचा; डोळ्याच्या बाहुलीचा.

**Pŭpp'ĕt,** *n.* ( प'पिट् )—the figure of a person worked by wires, &c.; a person controlled by another. कळसूत्राची बाहुली; सर्वस्वीं पराधीन मनुष्य, नामधारी मनुष्य, दुसऱ्याच्या हातांतील बाहुलें. *P.-play, -show,* a play or show with puppets. बाहुले भोंरीप, कळसूत्री बाहुल्यांचा खेळ. [ L. *pupa,* a doll ]

**Pŭpp'ў,** *n.* ( प'पि )—a young dog; a vain young man, a coxcomb. लहान कुत्रा; अकडबाज तरुण, छाकटा मनुष्य.

**Pŭrb'lind,** *a.* ( प'र्ब्लाइन्ड )—dim-sighted; lacking discernment. मंद दृष्टी असलेला; सारासारविचारहीन, मठ्ठ.

**Pŭrch'ăse,** *v. t.* ( प'र्चेस )—to acquire at a cost, to buy; ( Naut. ) haul up ( anchor etc. ) by means of pulley, lever, etc. खरेदी करणें, विकत घेणें; वर ओढून घेणें. *n.* purchasing, buying, bargain, a thing purchased; annual return from land; ( Law ) acquisition of property by one's personal action, not by inheritance; mechanical advantage, leverage, ( often fig. ); ( Naut. ) its appliance. खरेदी, सौदा, क्रीत वस्तु, विकत घेतलेली

वस्तु; वार्षिक उत्पन्न, खंड; स्वतः मिळविणें,-खरेदी करणें; नेटावा, जोर; नेटाव्याचें साधन. *Life is not worth an hour's p*, cannot be trusted to last an hour. एका तासाचाही देहाचा भरंवसा नाहीं. *P.-money*, price (to be) paid. विकत घेतलेल्या वस्तूची दिलेली किंमत. *Pur'chaser, n.* विकत घेणारा.

Pure, *a.* (प्युअर्)—without admixture; unadulterated; unpolluted; free from sin, chaste, innocent; mere. शुद्ध; निर्मळ, पवित्र, शुचिर्भूत, सात्त्विक, निष्कलंक, निरपराधी; केवळ, निव्वळ.*-ness, n.*

Pure'lў, *adv.* (प्यु' अर्लि)—solely, entirely. अगदीं, पूर्णपणें.

Pŭr'fle, *n.* (प'र्फल्)—ornamental border of dress, etc. शोभेसाठीं लावलेली किनार,-कडा. *v. t.* to adorn with purfle. किनार लावून शोभा आणणें. *Purf'ling, n.* purfle on violin. सारंगीवर काढलेली,-कोरलेली,-नक्षीदार कडा.

Pŭrga'tion, *n.* (पर्गे'शन्)—act of cleansing or purifying, operation of purging. साफ करणें, शुद्धीकरण, शोधन.

Pŭrg'ative, *a.* (प'र्गटिव्ह्)—that tends to purge. रेचक (औषध), शुद्धिकारक.

Pŭrg'atorў, *n.* (प'र्गटरि)—the condition or place of spiritual purging or expiation of the pain, or distress. मरणोत्तर प्रायश्चित्तभूमि, नरक; दुःखस्थिति. *a.* purifying. शुद्धिकारक, स्वच्छ करणारें. *Purgator'ial, a.*

Pŭrge, *v. t.* (पर्ज्)—to make physically or spiritually clean, to clear (bowels); to clear of charge, &. शरीरानें व मनानें शुद्ध करणें; कोठा साफ करणें; दोषमुक्त करणें. *n.* aperient. जुलाब, रेच; रेचक औषध.

Pūrifica'tion, *n.* (प्यूरिफिके'शन्)—purifying; ritual cleansing. शुद्धीकरण, प्रायश्चित्तविधि, पापक्षालन. *-tory, a.* शुद्धि करणारा, पावन, पावक, प्रायश्चित्ताचा.

Pūr'ifier, *n.* (प्यु'रिफायर्)—kinds of apparatus for purifying gas, flour, etc. शुद्ध-स्वच्छ-करण्याचें-साधन.

Pūr'ifў, *v. t.* (प्यु'रिफाय्)—to make pure or cleanse; to clear of foreign elements. शुद्ध करणें; सोंवळा करणें, प्रायश्चित्त देणें; विजातीय द्रव्यें काढून टाकणें, शोधन करणें.

Pūr'ist, *n.* (प्यु'अरिस्ट्)—stickler for, scrupulous purity esp. in language. भाषाशुद्धिवादी, शुद्धिवादी, शुद्धभाषेचा अभिमानी. *Pur'ism, n.* भाषाशुद्धीवादी.

Pūr'itan, *n.* (प्यु'अरिटन्)—(hist.) a member of the protestant party who sought to expel unscriptural and corrupt ceremonies from the church; person of professed strictness in religion or morals. प्युरिटनपंथीय-पवित्र धर्माचारवादी, ख्रिश्चन-मनुष्य; कर्मठ, कडक आचरणाचा. *a.* of or like a Puritan. प्युरिटनपंथीय मनुष्याचा,-मनुष्यासारखा, कर्मठ. *Puritanic (al), aa.*; *Pur'itanism, n.* प्युरिटन लोकांचा पंथ, त्यांचीं मतें

Pūr'itў, *n.* (प्यू'रिटि)—freedom from physical or moral pollution, cleanness, chastity. शुद्धता, पवित्रता.

Pŭrl, *v. i.* (पर्ल्)—1. to flow with babbling sound. झुळझुळ वाहणें, खळखळणें. *n.* such motion or sound. खळखळ; खळाळी. 2. *v. t. & i. & n.* (colloq.) to turn upside down, upset; (*n.*) heavy fall. उलटें करणें, पालथें करणें; जोरानें पडणें, धाडकन् पडणें.

Pŭrl, *n.* (पर्ल्)—edging of gold or silver wire or of small loops; ribbing in knitted work; inversion of stitches. चुणीदार जर-किनारी; वीणकामांतील कडा,-वीण; धाग्यांची उलट वीण. *v. t.* to adorn with purl. किनार लावणें, कांठ लावणें.

Pŭrl'er, *n.* (प'र्लर्)—a headlong fall. तोंडघशीं पडणें, धाडकन पडणें.

Pŭrl'ieu, *n.* (प'र्ल्यू)—(*usu. pl.*) ground bordering on something; parts lying adjacent, outskirts, suburbs, squalid street or quarter of a town. हद्दीवरील प्रदेश; सीमेच्या आसपासचा प्रदेश; शहराचा घाणेरडा रस्ता,-भाग.

Pŭrlŏin', *v. t.* (पर्-लॉ'इन्)—to take by theft or plagiarism, to steal; to make off with. चोरणें, चोरून घेणें; चोरी करून पळून जाणें. *Purloin'er, n.*

Pŭr'ple, *n.* (प'र्पल्)—the colour between crimson and violet; purple robe or the imperial or cardinal's rank denoted by it; (pl.) swine fever, disease in wheat. जांभळा, अंजिरी रंग, धेंगणी; नीललोहित; जांभळा झगा, त्या झग्यानें दर्शविलेला बादशहाचा,-वरिष्ठ धर्माधिकाऱ्याचा,-दर्जा,-मान; (अने.) डुकरांना होणारा ताप, गव्हावरील कीड,-रोग. *a.* purple-coloured. जांभळ्या,-अंजिरी,-रंगाचा. *v. t. & i.* to make or grow purple. जांभळें करणें,-होणें. *Born in the purple*, राजघराण्यांत, उच्चकुलांत जन्मलेला.

Pŭrp'ort, *n.* (प'र्-पोअर्ट)—tenor or apparent meaning or substance, import. अभिप्राय, तात्पर्य, भाव, गोषवारा. *v. t.* (पर्पो'अर्ट), to profess, be intended to seem; have as its meaning. दर्शविणें, आशय असणें, मथितार्थ असणें, उद्देश असणें.

Pŭrp'ose, *n.* (प'र्-पस्)—design of effecting something; fact or faculty of resolving on something. उद्देश, हेतु; कार्य. *To no purpose*, वृथा, व्यर्थ. *v. t.* to design, intend. संकेत वेणें, योजणें, उद्देशणें.

Pŭrp'oseful, *a.* (प'र्पस्‌फुल्)—having a purpose, intentional. उद्देश असलेला, सहेतुक, सकारण.

Pŭrp'oseless, *a.* (प'र्पस्लेस्)—given to drifting; answering no purpose. उद्देशरहित, निरर्थक, विनाकारण, निष्कारण.

Pŭrp'osely, *adv.* (प'र्-पस्-लि)—on purpose; intentionally, by purpose or design. इद्दाम; जाणून बुजून.

**Pŭrp'osive**, *a.* (पॅर्पॅ सिव्ह्)—having, serving, done with purpose; (of person or conduct) having purpose and resolution. सहेतुक, उद्देश सफल करणारें, मुद्दाम केलेलें; सोद्देश व निश्चयी.

**Pŭrr**, *n.* (पर्)—vibrating sound with which cat expresses pleasure. मांजरांचें घुरघुरणें, म्यांव म्यांव करणें. *v. i.* to emit pur, to express by purring. घुरघुरणें, गुरगुर करणें.

**Pŭrse**, *n.* (पर्स्)—a small pouch for carrying money in; funds; sum given as testimonial or prize. पैशांची पिशवी; निधि, खजिना, तिजोरी; पैसे; पारितोषिक किंवा इनाम म्हणून दिलेली रक्कम. *Heavy* or *long p.*, wealth. संपत्ति, विपुल धन. *Light p.*, poverty. दरिद्रता, गरिबी. *The public p.*, national treasury. राष्ट्रीय खजिना-,तिजोरी, राष्ट्राची तिजोरी. *P. net*, bag—shaped net for catching rabbits etc. ससे वगैरे पकडण्याचें पिशवीसारखें जाळें. *P. proud*, puffed up by wealth. धनोन्मत्त. *To hold, tighten, loosen, the purse-string*, खर्चावर ताबा ठेवणें, खर्च करण्यांत हात आखडणें, सढळ हाताने खर्च करणें.

**Pŭrse**, *v. t. & i.* (पर्स्)—to contract (lips, brow etc.) in wrinkles; become so contracted; (rare) put (*up*) into one's purse. आंठ्या घालणें, सुरकुत्या पाडणें,-पडणें; आंठ्या पडलेलें असणें; आपल्या पिशवींत ठेवणें,-टाकणें,-घालणें.

**Pŭrs'er**, *n.* (पॅर्सॅर्)—an officer keeping the accounts etc. on a ship. गलबतावरचा हिशेब ठेवणारा,-पोतनीस.

**Pŭrs'lane**, *n.* (पॅर्स्लिन्)—a herb formerly much used in salads. (भाजीची) घोळ, रानघोळ, राजघोळ.

**Pŭrsū'ance**, *n.* (पर्-स्यू'अन्स)—carrying out, pursuing (*of* object, &c.). पाठलाग, पिच्छा, अनुरोध. *In p. of*, च्या प्रमाणें, च्या अनुरोधानें,-हुकुमाप्रमाणें, अनुरोधानें.

**Pŭrsū'ant**, *adv.* (पर्-स्यू'अन्ट्)—conformably to; in pursuance of. प्रमाणें, अनुसरून, च्या अनुरोधानें.

**Pŭrsūe'**, *v. t. & i.* (पर्-स्यू')—to follow with an intent to kill, to capture or overtake; to assail persistently; to proceed along; to continue; to follow (a procession &c.). पाठलाग करणें; पिच्छा पुरवणें, छळ करणें, पुढें चालणें; चालू ठेवणें; अनुसरणें.

**Pursū'er**, *n.* (पर्स्यू'अर्)—In vbl. senses; also (Law) prosecutor. मागें चालणारा, पिच्छा पुरविणारा, चालू ठेवणारा; फिर्यादी, फिर्याद करणारा.

**Pŭrsuit'**, *n.* (पर्-स्यूट्)—pursuing; employment or study, prosecution. पाठलाग; उद्योग, प्रयत्न, अभ्यास. *In p. of*, च्या पाठीमागें,-शोधार्थ,-पाठलाग करण्यासाठीं.

**Pŭrs'uivant**, *n.* (पॅर्स्विव्हॅन्ट्)—officer of College of Arms below herald; (poet.) follower, attendant. 'कॉलिज ऑफ् आर्म्स्'चा अधिकारी; सरदाराच्या नोकराचा अनुयायी, हुजऱ्या, खपराशी.

**Pŭrs'y̆**, *a.* (पॅर्सि)—short-winded; fat. लवकर दम लागणारा; लठ्ठ, जाडा, स्थूळ.

**Pŭr'ulent**, *a.* (प्यू'रुलन्ट्)—containing or discharging pus. पुवानें भरलेला, पू पाहात असलेला, पूनप.

**Pŭrvey'**, *v. t. & i.* (पर्-व्हे')—to procure and supply (provisions). खाण्यापिण्याच्या सामुग्रीचा पुरवठा करणें, *Purvey'ance*, *n.* purveying; right of crown to provisions etc. at fixed price and to use of horses etc. राष्ट्रांतील अन्नसामग्री, घोडे वगैरेंवर ताबा ठेवण्याचा राजाचा हक्क.

**Pŭrvey'or**, *n.* (पर्-व्हे'अर्)—one whose business it is to supply provisions on a large scale. मोदी, वाकनीस.

**Pŭrv'iew**, *n.* (पॅर्-व्यू)—a providing clause; range or province, limit, sphere. अट, शर्त; विषय, टप्पा.

**Pŭs**, *n.* (पस्)—the matter produced by festering or inflammation, putrid matter. पू.

**Push**, *v. t. & i.* (पुश्)—to move by the exertion of force; to shove, to propel, to impel, urge, to press or ply hard; (bibl.) butt with the horns; cause to project, thrust, *out*, forth, etc. ढकलणें, लोटणें; पुढें नेणें, हिंमतीनें चालवणें; शिंगांनीं ढोसळणें, घुसशी देणें; (रेटून) बाहेर टाकणें; पुढें येणें. *n.* act of pushing; application of propelling force; (Mil.) attack in force; enterprise, self-assertion; thrust of weapon or beast's horn; pressure of affairs, crisis, pinch; (sl.) gang of thieves, convicts, etc. ढकलणें, रेटणें, सरकवणें; गति देणें, प्रेरक शक्ति; नेटाचा हल्ला, स्वारी; साहस, उद्योग, उलाढाल. जोर, हिंम्मत; (शस्त्रानें,-शिंगानें) भोसकणें, हुंदाडा; आणिबाणीची वेळ,-प्रसंग; चोरांची,-कैद्यांची,-टोळी. *To p. off*, (of person in boat) to push against bank with oar to get boat out into stream. होडी पाण्यांत ढकलून नेणें,-ढकलणें. *P.* (matter) *through*, bring it to a conclusion. (गोष्ट) शेवटास नेणें,-पोंचविणें,-पुरी करणें. *Am pushed for time*, can scarcely find time. वेळ क्वचितच मिळतो, वेळ मिळत नाहीं. *P.-pin*, a child's game. मुलांचा एक खेळ. *P.-bike*, (sl.) bicycle worked by pedalling (opp. *motor-bike*). पायानें चालवावयाची बायसिकल,-दुचाकी. *Push'ful, push'ing, aa.* inclined to push oneself; bustling. खटपटी, उद्योगी, धीट, पुढें जाणारा.

**Pu'sher**, *n.* (पुशर्)—(esp.) aeroplane with air-screw behind. एक जातीचें विमान.

**Pūsillăn'imous**, *a.* (प्यूझिलॅनिमस्)—lacking courage; faint-hearted; mean-spirited. धैर्यहीन; भित्रा; नामर्द. *Pusillanim'ity*, *n.* भित्रेपणा, नामर्दपणा.

**Puss**, *n.* (पुस्)—a cat; a hare; a playful or coquettish girl. मांजर; ससा; खेळकर,-नटवी,-मुलगी.

**Pu'ssy̆**, *n.* (पुसि)—a pet name for a cat; a softy furry object. मांजर; मऊ लोंकरीची वस्तु. *P.-foot*, advocate of prohibitionist legislation (from nick-name of a U. S. prohibitionist). मद्यपानि-षेधक कायद्याचा पुरस्कर्ता.

**Pŭs'tūle**, *n.* (पॅस्-ट्यूल्)—a small pimple. पुटकुळी, फोड. *-lar,-lous, aa.* पुटकुळ्या आलेला, फोड झालेला.

*Pus'tulate, v. i.* to form pimples. पुटकुळ्या-फोड -येणें.

Put, *v. t. & i.* ( पुट् )—( *pa. t. & pa. p. put* ) to transfer to specified place; to set in a specified position; to express in words; to cause to be in a specified state; ( Naut. ) proceed, take one's course, in ship. ठेवणें, मांडणें; विवक्षित तऱ्हेनें ठेवणें; शब्दांत सांगणें; ठरावीक स्थितींत ठेवणें; ( गलबत ) हाकारणें. *Put over,* ( U. S. ) succeed in, carry through. यश मिळविणें, शेवटास नेणें. *Put wise,* ( *sl.* ) disabuse or enlighten. भ्रम दूर करणें, शहाणें करणें, शिकविणें. *To put an end to one's life,* जीव देणें. *I p. it to you,* appeal to you. मी तुला विचारतों, -तुझ्यापुढें विचारार्थ मांडतों. *Don't be put upon by him,* victimized by him. त्याचा छळ सहन करूं नकोस, त्याच्या आहारीं जाऊं नकोस. *To put about,* उलट फिरविणें,-वळविणें; त्रास देणें, सतावणें. *P. away,* सोडचिठी देणें; संग्रहीं ठेवणें, शिल्लक ठेवणें; खाणें; तुरुंगांत टाकणें; गहाण टाकणें. *P. back,* अडथळा करणें, थोपविणें; ( घड्याळाचे कांटे ) मागें फिरविणें, मागें करणें; मूळच्या जागीं ठेवणें. *P. by,* ( पैसे ) मागें टाकणें, संग्रह करणें; टाळाटाळ करणें; चुकविणें. *P. down,* दाबून टाकणें; गप्प बसविणें; ( खर्च ) कमी करणें; मानणें, ठरविणें ( *I put him down as nine years old, a fool* ). *P. forth,* कामीं लावणें, कामास आणणें; प्रसिद्ध करणें; फुटणें. *P. forward,* पुढें पुढें करणें, पुढें मांडणें. विचारार्थ प्रसिद्ध करणें. *P. in,* install in office. जागेवर नेमणें; present formally as in law-court, दाखल करणें. *P. off,* पुढें ढकलणें, टाळाटाळ करणें; परावृत्त करणें; लादणें; ( कपडे ) काढणें; किनारा सोडून जाणें. *P.-off, n.* evasion, postponement, टाळाटाळ, चालढकल. *P. on,* clothe oneself or another with. ( अंगावर कपडे ) घालणें. *P. it on,* फाजील किंमत आकारणें,-लादणें; सोंग आणणें, बहाणा करणें. *P. out,* dislocate ( shoulder etc. ), ( हाड ) निखळणें; ( Crick. ) cause ( batsman ) to be out, बाद करणें; extinguish ( candle etc. ), विझविणें, बंद करणें; disconcert, confuse, गोंधळविणें; annoy, irritate, त्रासविणें, सतावणें; lend ( money ) at interest, ( पैसे ) व्याजीं लावणें-गुंतविणें. *P. through,* पुरें करणें; मधला सांधा जोडून टेलिफोनवर संभाषण करूं देणें. *P. heads together,* विचारविनिमय करणें. *P. up with,* सोसणें, सहन करणें, कडे दुर्लक्ष करणें. *P. up, a* fraudulently concocted. बनवाबनवीचा, खोटा. फसवणुकीचा.

Pŭt, *v. i. & t. & n.* ( पट् )—1. ( *pa. t. & pa. p. putted* ) to propel golf-ball with gentle stroke towards hole; ( *n.* ) such stroke. गोलफचा चेंडू हळू तडाका मारून भोकाकडे नेणें; असा हळू तडाका. *2.* ( पट् or पुट् ) ( in athletics ) to cast weight. वजन फेंकणें; वजनाची एकवार फेंक. 3. *n.* ( पट् ) ( old *sl.* ) duffer, queer person, countryman. निरुपयोगी, चमत्कारिक; गांवढळ माणूस.

Pū'tative, *a.* ( प्यूटटिव्ह् )—supposed; reputed, ( *the p. father of a child* ). मानीव, मानलेला, लोकसमजुतीचा, प्रसिद्ध. [ L. *putare,* think ]

Pū'trefȳ, *v. t. & i.* ( प्यूट्रिफाय् )—to become putrid; to go bad; to rot; to fester; to cause to p. कुजणें; घाणेरडें होणें; सडणें; सडावयास लावणें. *-fac'tion, n.*; *-factive, a.*

Pūtrĕs'cent, *a.* ( प्यूट्रे'सन्ट् )—in process of rotting, undergoing putrefaction. सडत चाललेला, कुजत असलेला, कुजूं लागलेला. *Putres'cence, n.*

Pū'trid, *a.* ( प्यू'ट्रिड् )—decomposed, corrupt, rotten; stinking. कुजलेला, सडलेला, सडका, कुजका; दुर्गन्धियुक्त. *Putrid'ity, n.* सडकेपणा.

Pŭtt'ȳ, *a.* ( प'टि )—a paste of whiting and linseed oil used by glaziers. लांबी, पटी, लुकण; कांच वगैरे स्वच्छ करण्याची पूड. *v. t.* to cement with putty. लांबीनें भरणें.

Pŭz'zle, *n.* ( प'झल् )—a perplexing question; a problem or toy designed to test ingenuity. गूढ प्रश्न; कोडें, कूट, गूढ, उखाणा. *v. t. & i.* to perplex; to cudgel one's brains or pore *over.* गुरफटवणें, पेंचांत पाडणें; गोंधळवणें; निरुत्तर करणें.*-ment, n. P. head (ed), P. pate( d ),* ( person ) with confused ideas. डोक्यांत गोंधळ उडालेला,-भ्रमिष्ट,-वेडा,-मनुष्य. *P. peg,* कुत्र्यानें जमिनीला नाक लावूं नये म्हणून त्याच्या खालच्या जबड्यांत बसविलेली लांकडी खुंटी.

Pŭz'ler, *n.* ( प'झलर् )—( esp. ) a difficult question or problem. कठीण प्रश्न, कूट प्रश्न, कोडें.

Pȳaem'ia, *n.* ( पायई'मिआ )—blood-poisoning marked by formation of pus-foci. पूतिज्वर, सपूयरक्तविकार. *Pyaem'ic, a.* [ Gk *puon,* pus. *haima,* blood]

Pȳg'mȳ, *n. & a.* ( पि'ग्मि )—a very small person or thing. ठेंगू मनुष्य, वामनमूर्ति, अगदीं लहान वस्तु. *Pygm'ean a. The Pp.,* a dwarf race in equatorial Africa. मध्य आफ्रिकेंतील ठेंगू लोकांची जात.

Pie,-Pȳe'dog, *n.* ( पा'इडॉग )—an ownerless dog; pariah dog. बिनवारशी कुत्रा, भटक्या कुत्रा,-कुत्रें, कुत्रें कुत्रें.

Pȳlon, *n.* ( पा'इलॉन् )—a gateway flanked by towers as in Egyptian temples. मनोरेयुक्त महाद्वार.

Pȳlor'us, *n.* ( पायलो'रस )—opening from stomach into bowels. जठराचें खालचें द्वार, जठराधोद्वार. *Pylor'ic, a.*

Pȳorrhoe'a, *n.* ( पायोरि'आ )—purulent discharge ( esp. in a dental disease ). दांतांतून पू वाहणें, दंतरोग.

Pȳ'ramid, *n.* ( पि'रॅमिड् )—a solid figure with triangular or square or polygonal base and sloping sides meeting at apex; ( pl. ) a billiard-table game. मनोरा, सूच्यग्रस्तंभ; एक खेळ. *Pyramidal, a.* shaped or arranged like a pyramid. सूच्याकार.

Pȳramidist, *n.* ( पि'रॅमिडिस्ट् )—a student of structure and history of Egyptian pyramids. सूचिस-

मधील मनोऱ्यांच्या रचनेचा आणि इतिहासाचा अभ्यासक,-विद्यार्थी,-संशोधक.

Pyre, *n.* ( पायर् )—a pile of combustibles for burning a corpse, a funeral pile. चिता, सरण.

Pyri'tes, *n.* ( पाय्रा'यटीझ् )—sulphite of iron or copper. लोखंड किंवा तांबें व गंधक यांचा संयोग होऊन बनलेला खनिज पदार्थ, सुवर्णमुखी, सुवर्ण माक्षिक, चकमकीचा गारगोटी. *Copper p.*, तांबें, लोखंड, व गंधक यांचा बनलेला खनिज पदार्थ. [Gk *pur*, fire].

Pyro-( पायरो )—in comb. Gk *pur*, fire. अग्नि, आग, उष्णता.

Pyrom'eter, *n.* ( पायरॉ'मिटर् )—an instrument for measuring high temperatures. अतिशय उष्णतामान मोजण्याचें यंत्र, अग्निमापक.

Pyrotec'hnic,-al, *aa.* ( पायरॉटे'क्निक्,-कल )—of or like fireworks. दारूकामासंबंधींचा, दारूकामासारखा. -*tech'nics,-techny*, *nn.* art of making or using fire-works, pyrotechnic display. दारूकाम तयार करण्याची,-वापरण्याची-कला; आतषबाजी, दारूकाम लावणें. *Pyrotec'hnist*, *n.* दारूकाम तयार करणारा.

Py'rrhic, *a.* ( पि'रिक् )—*P. dance*, ancient-Greek war-dance. प्राचीन ग्रीक लोकांचा लढाऊ नाच. *P. victory*, victory that is as bad as a defeat. अपजयाइतकाच वाईट जय, हानिकारक जय. *P. foot*, metrical foot of two short syllables. दोन लघु ᵕᵕ अक्षरांचा मात्रांचा गण, *n. p.* dance,-foot. लढाऊ नाच, दोन लघु मात्रांचा,-अक्षरांचा-चरण.

Py'rrhonism, *n.* ( पि'रॉनिझम् )—doctrine that certainty of knowledge is unattainable; philosophic doubts. सत्यज्ञान अशक्य आहे असें मत; खऱ्या ज्ञानमार्गाविषयीं, तत्त्वज्ञानाविषयींची,-शंका.

Pythagorean, *a.* ( पिथॅ,-पायथॅगोरी'अन् )—of Pythagoras or his doctrines, esp. the transmigration of souls. पायथॅगोरसचा; पुनर्जन्माच्या-जन्मांतराच्या-त्याच्या सिद्धांताविषयींचा. *n.* follower of P. पायथॅगोरसाचा अनुयायी.

Pyth'ian, *a.* ( पि'थिअन् )—of Delphi or the oracle or priestess of Apollo there. डेल्फीचा, तेथील अपोलो देवतेच्या कौलाचा,-दृष्टांताचा,-किंवा पुजारणीचा.

Py'thon, *n.* ( पा'यथॉन् )—( Gk. Myth. ) huge serpent or monster slain near Delphi by Apollo, large snake that crushes its prey; familiar spirit; soothsayer. अपोलोनें डेल्फिजवळ मारलेला प्रचंड सर्परूपी राक्षस, अजगर; भूत; भविष्य सांगणारा. -*ess*, *n.* woman having familiar spirit. भूतसंचार झालेली स्त्री.

Pyx, *n* ( पिक्स )—a vessel in which the Host is reserved; box in which specimen coins are deposited at the mint. पवित्र भाकरी ठेवण्याचें पात्र; ( टांकसाळेंतील ) नमुन्याच्या नाण्यांची पेटी. *v. t.* to test coin by weight and assay. ( मूळ नमुन्याशीं लावून ) नाण्यांचा कस व वजन तपासून पाहणें.

Py'xis, *n.* ( पि'क्सिस )—a small box, a casket. लहान पेटी, करंडा.

# Q

Q, ( क्यू )—seventeenth letter of English alphabet. इंग्रजी वर्णमालेंतील १७ वा वर्ण.

Quā, *conj.* ( क्वे )—as, in the capacity of. कारणानें, च्या नात्यानें,-अधिकारानें.

Quack, *n.* ( क्वॅक् )—the harsh sound made by ducks; a pretender to medical or other skill, a charlatan. बदकाचें ओरडणें; ढोंगी वैद्य, वैदू, लब्धप्रतिष्ठित. *v. t. & i.* to utter quack; talk loudly and foolishly; talk pretentiously; puff or advertise ( cure ); play the quack. बदकाचा आवाज काढणें; मूर्खासारखें मोठ्यानें बोलणें; बढाई मारणें, ( औषधांची ) भपकेबाज जाहिरात देणें,-करणें; वैद्यकपणाचा डौल आणणें. *Q. doctor,-remedies*, वैद्यकीचा आव आणणारा, वैद्य,-औषधें, फसवेगिरीचीं औषधें,-उपाय. *Q.-q.*, ( nursery ) a duck. बदक.

Quack'ery, *n.* ( क्वॅ'करि )—quack methods, the mean practice of a quack. वैद्यकीचें ढोंग, फसवेगिरी, टाणेटोणे, जादूटोणे.

Quack'-salver, *n.* ( क्वॅ'क्साल्व्हर् )—( rare ) a quack. जडीबुट्या, नाकाबोल्याचा वैदू.

Quadrages'ima, *n.* ( क्वॉड्रजे'सिमा )—first Sunday in Lent. ( ईस्टर सणापूर्वीच्या ) लेंटचा पहिला रविवार. *Quadrages'imal*, *a.* lasting 40 days; Lenten. ( 'लेंट' चे ) चाळीस दिवस चालणारा; लेंटचा.

Quad'rangle, *n.* ( क्वॉ'ड्रँगल )—a four-sided figure ( esp. square or rectangle ); ( also quad ) a four-sided court, esp. in colleges. चतुष्कोणाकृति; चौक, चौसोपी.

Quadrang'ular, *n.* ( क्वॉड्रँ'ग्युलर् )—having four angles and four sides. चौकोनी, चौसोपी, चौरंगी. *Quadrangular cricket matches*, क्रिकेटचा चौरंगी सामना.

Qua'drant, *n.* ( क्वॉ'ड्रन्ट् )—a quarter of a circle's circumference; an instrument for taking angular measurements. वर्तुलाच्या परिघाचा एक चतुर्थांश भाग, पाद; कोन मापण्याचें यंत्र, तुरीय यंत्र, सूर्ययंत्र.

Quad'rat, *n.* ( क्वॉ'ड्रिट् )—a square or rectangular block, esp. ( abbr. *quad* ) small one used by printers in spacing. चौकोनी ठोकळा, दोन शब्दांमधील जागा भरून काढण्यासाठीं घातलेली ( शिसे ) पट्टी.

Quad'rate, *a.* & *n.* ( क्वॉ'ड्रिट् )—square or rectangular, a square surface or figure. समचतुरस्र, समचतुष्कोण, चौरस, चौकोन. *v. t. & i.* ( क्वॉड्रे'ट् )—to square or agree with. वर्ग करणें, मिळणें, जमणें, जुळता करणें. *Q. bone*, *Q. muscle*, समचौरस अस्थि,-स्नायु.

Quadrat'ic, *a.* ( क्वॉड्रॅ'टिक् )—involving the square and no higher power of unknown quantity or variable. वर्गात्मक, वर्गाचा. *Quadratic equation*, वर्गसमीकरण, वर्गात्मक समीकरण. *Quadratics*, *n. pl.* algebra dealing with quadratic equation. वर्गसमीकरणप्रकरण.

Qua'drature, *n.* (क्कॉड्रचर्)—finding a square with area precisely equal to that of a given figure; position of heavenly body in relation to another 90 degrees away. (दिलेल्या क्षेत्राएवढें) चौरस क्षेत्र काढणें; त्रिभांतर (भ=९० अंश), वृत्तपाद. *Q. of the circle,* वर्तुळाच्या क्षेत्रफळाएवढें क्षेत्रफळ काढणें.

Quadrĕnn'ial, *n.* (क्वॅड्रि'निअल्)—occurring every (or lasting) four years. चार वर्षांनीं येणारा, चार वर्षे टिकणारा.

Quadri, (क्वॅड्रि-)—L comb. form=four. चतुः-, चौ-, चार.

Quadrilăt'eral, *a.* & *n.* (क्कॉड्रिलॅ'टरल्)—a four-sided (figure or area), (a figure) having four sides. चतुर्भुज, चार बाजूंची, चौभुज, चौकोनी (आकृति, क्षेत्र). *The Q.,* four fortresses in N. Italy and district protected by them. उत्तर-इटाली देशांतील चार किल्ले,-त्यांमधील प्रदेश.

Quadrille', *n.* (काड्रिल्)—a squ re dance, music for it; an old card game for four persons. चौफेर नाच, त्या नाचाचें वाद्य; चार माणसांनीं चाळीस पत्त्यांनीं खेळण्याचा एक जुना खेळ.

Quadrill'ion, *n.* (क्कॉड्रिल्यन्)—fourth power of a million. दशलक्षाचा चतुर्घात, एकावर चोवीस पूज्यें देऊन झालेली संख्या.

Quadrino'mial, *a.* (क्कॉड्रिनो'मिअल्)—consisting of four algebraic terms. चतुष्पद असलेली, चतुष्पादिक.

Quadripărt'ite, *a.* (क्कॉड्रिपा'र्टाइट्)—consisting of four parts; shared by or involving four people. चार भाग असलेला; चार माणसांत विभागलेला, चौघांचा, चौघाचारी.

Quadroon,' *n.* (क्कॉड्रून्)—an offspring of white and mulatto, person of quarter-negro blood; hybrid of similarly proportioned descent between other human, aninal, or vegetable stocks. अंगीं चतुर्थांश नीग्रो रक्त असलेलें मूल,-मनुष्य; भेसळ (रक्ताचा) प्राणी, पशु, किंवा वनस्पती.

Qua'drupĕd, *n.* (क्कॉ'ड्रपेड्)—a four-footed animal, an animal with four legs (usu. of mammals). चार पायांचा प्राणी. *Quadru'pedal, a.* चार पायांचा, चतुष्पाद. [L. *quatuor*, Sk *chatur*, four; *pes, pedis*, Sk *pada*, foot]

Qua'druple, *a.* (क्कॉ'ड्रुपल्)—fourfold; of four parts or parties; four times greater than. चौपट, चौपटीइतका; चार भागांचा, चौघांचा, चतुरंगी, चौरंगी, चौहेरी; (पेक्षां) चार पट मोठा. *n.* number or amount four times greater than another. दुसरीपेक्षां चौपट मोठी संख्या,-आंकडा. *v. t.* & *i.* to multiply, increase, four times. चौपट करणें, चार पटीनें वाढविणें.

Quad'ruplet, *n.* (क्वॉ'ड्रुप्लेट्)—(*pl.*) four children at a birth; four things working together; bicycle for four. (एका वेळीं एकाच खेपेला झालेलीं) दोन जुळी मुलें; दोन जोड्या; चार स्वाऱ्यांची दुचाकी.

Quadru'plicate, *v. t.* (क्वॉड्रु'प्लिकेट्)—to multiply by four; make four specimens of. चौपट करणें, चारांनीं गुणणें; चार चार नकला काढणें. *a.* (-किट्) quadruplicated. चौपट, चार वेळ केलेला, चार नकला काढलेला. *n.* (-किट्), quadruplicated state; (*pl.*) four similar specimens. चौपट करणें; चार नकला, चार प्रती.

Quaes'tor, *n.* (क्वे'स्टर्)—ancient-Roman official with financial and other duties. प्राचीन रोमन अर्थ-सचीव,-एक अधिकारी.-*ship, n.*

Quaff, *v. t.* & *i.* (क्वॉफ्)—to drain to the bottom, to drink in copious draughts. ढोंसणें, गटागट पिणें, घटाघटा पिणें.

Quăgg'a, *n.* (क्वॅगा)—S. Afr. animal related to ass and zebra. द. आफ्रिकेंतील गाढव व झेब्रा जातीचा एक प्राणी.

Quăg'mire, *n.* (क्वॅ'ग्मायर्)—also quags, quaking bog, marsh. दलदल, रेवण, रुपण.

Quail, *n.* (क्वेल्)—a bird allied to partridge. लाव पक्षी, लावी पक्षीण. *v. i.* to flinch, to show fear. खचणें, अवसान गाळणें.

Quaint, *a.* (क्वेन्ट्)—unfamiliar or old-fashioned; daintily odd. विलक्षण, जुन्या पद्धतीचा; तऱ्हेवाईक.

Quāke, *v. i.* (क्वेक्)—to quiver, to tremble; to rock to and fro, to move or be agitated. थरथर कांपणें; हेलकावे खाणें. Quā'kȳ, *a.* कांपणारें.

Quā'ker, *n.* (क्वे'कर्)—1. a member of the religious Society of Friends. 'सोसायटी ऑफ फ्रेंड्स्' या धार्मिक संस्थेचा सभासद. 2. (U. S.) a dummy gun in ship or fort. नकली,-बनावट तोफ. *Qua'keress, n. f.*; *Qua'kerish, a.*;-*ism, n.*

Qua'lificā"tion, *n.* (क्कॉ'लिफिके"शन्)—qualifying; thing that qualifies, suitable quality; modification. योग्यता, लायकी; कायदेशीर अधिकार, गुण; मर्यादा, आळा, आळाबंधा, कमतरता, उणीव. *Qual'ificatory, a.*

Qua'lifȳ, *v. t.* & *i.* (क्कॉ'लि-फाय)—to attribute a quality to, to describe as; to make or become competent; to modify, to limit; to soften or moderate, to mitigate. नांव देणें, गुण देणें, गुण दर्शविणें; लायक करणें, पात्रता आणणें; मर्यादित करणें; नरम करणें, कमी करणें, जोर कमी करणें. *Qualifying examination,* पात्रता,-लायकी,-पाहण्यासाठीं परीक्षा.

Qua'litative, *a.* (क्कॉ'लिटेटिव्ह्)—concerned with or depending on quality (opp. to *quantitative*). गुणवाचक, गुणदर्शक; गुणविशिष्ट, जातिविशिष्ट. *Q. analysis,* गुणविशिष्ट,-गुण,-पृथक्करण; गुणानुबंधी पृथक्करण.

Qua'litȳ, *n.* (क्वॉ'लिटि)—degree of excellence; relative nature; superior or high rank, attribute, trait, faculty; (log.) being affirmative or negative. विशेष गुण, गुण; जात, प्रकार; दर्जा, विशेष धर्म;

गुण, अस्तिपक्ष किंवा नास्तिपक्ष. *Has q.*, is excellent. उत्कृष्ट आहे. *Give a taste of* one's *q.*, show what one can do. स्वतःची करामत,-चें कसब,-चाखविणें. *People of q., the q.*, the upper classes. बडे लोक, उच्चवर्गांतील लोक.

**Qualm**, *n.* (क्वाम्)—momentary faint or sick feeling; misgiving; scruple or twinge of conscience, compunction. उमाळा, उसासा; संशय; चुरचुर, रुखरुख, टोंचणी. *Qualm'ish, a.*

**Quandar'y**, *n.* (कॅन्डि'अरि)—perplexed state, practical dilemma. विवंचना, कोडें, पंचाईत, पेंच. *Am in a q.*, पंचाईत पडली आहे.

**Qua'ntify**, *v. t.* (क्वांन्टिफाय्)—to express as a quantity; (Log.) define application of (term, proposition) by use of *all, some*, etc. परिमाण ठरविणें, संख्या सांगणें,-ठरविणें; (चा) परिच्छेद करणें, व्याप्ति ठरविणें.

**Qua'ntitative**, *a.* (कॉन्टिटेटिव्ह्)—of or measured or measurable by quantity; based on vowel quantity. परिमाणाचा, परिमाणात्मक, परिमाणाविशिष्ट, संख्यापरिमेय; मात्रापरिमेय. *Q. analysis*, परिमाणविशिष्ट, संख्यापरिमेय; समात्रा परिमेय. *Q. analysis*, परिमाणविशिष्ट,-परिमाण,-पृथक्करण.

**Qua'ntity**, *n.* (कॉन्टिटि)—how-muchness; specified or considerable amount; length or shortness of vowel sounds; (pl.) large amounts or numbers, abundance; (Math.) thing having quantity, figure or symbol representing it: (Log.) extension given to subject of proposition. परिमाण; प्रमाण, मोठा भाग; मात्रा; मोठा संचय, ढीग, विपुलता; संख्या, राशि; परिच्छेद. *Unknown q*, person or thing whose action cannot be foreseen. अव्यक्त राशि,-व्यक्ति. *Negligible q.*, person etc. that need not be reckoned with. दुर्लक्ष करण्याजोगा मनुष्य, विचारांत न घेण्याजोगा मनुष्य. [ L. *quantus*, how much ]

**Qua'ntum**, *n.* (कॉन्टम्)—required or desired amount, sufficient quantity. ठरीव प्रमाण, बेतास बेत, प्रमाण, भाग, हिस्सा, स्तीच. *Q. sufficit*, abbr. *Quant. suff.*, or *q. s.*, as much as suffices. जितक्यास तितका, जरूर तितका.

**Qua'rantine**, *n.* (कॉरन्टीन्)—isolation imposed on a ship or person. (सांथींत) जहाजाला किंवा मनुष्याला निराळें ठेवण्याची (साधारणपणें ४० दिवसांची) मुदत. *v. t.* to put in q. क्वारन्टीनमध्यें ठेवणें,-बसवणें.

**Qua'renden,-der** *n.* (कॉरन्डेन्,-न्डर्)—a kind of apple. एक जातीचें सफरचंद,-फळ.

**Qua'rrel**, *n.* (कॉरल्)—an occasion of complaint, violent contention, rupture of friendly relations; (hist.) crossbow bolt. भांडण, जोराचा वादविवाद, कलह, तंटा, वितुष्ट; आखूड बाण. *v. i.* to contend or dispute violently, to fall out *with*, find fault with. भांडणें, वांकडें येणें. *To find q. in a straw*, be captious. हुजत घालणें, पान्यावरोबर भांडणें. *To pick a q.*, invent or eagerly avail oneself of such occasion to commence hostilities. भांडण,-कलह,-उकरून काढणें, कलहाची सांधि केव्हां मिळेल तें पाहणें. *To fight* one's *qq. for him*, to assist him in getting redress. (निकाल लागावा म्हणून) दुसऱ्याचीं भांडणें भांडणें,-त्याला मदत करणें. *In a good q.*, योग्य रीतीचें भांडण. *Qua'rrelsomeness, n.* भांडखोरपणा.

**Qua'rrelsome**, *a.* (कॉरल्-सम्)—apt to quarrel. भांडखोर.

**Qua'rry**, *n.* (कॉरि)—an intended prey, an object of pursuit; a place from which stone is extracted (for building, &c.) from the earth. सावज, पारध, शिकार; दगडाची खाण. *v. t. & i.* to extract from quarry; expend toil in searching documents etc. खाणींतून (दगड) काढणें; कागदपत्रांचें संशोधन करणें. *Q.-man, n.* worker in q. खाणींतून दगड काढण्याचें काम करणारा मजूर.

**Quart**, *n.* (कॉर्ट)—quarter of a gallon, two pints. एक चतुर्थांश गॅलन, दोन पाइन्ट, क्वार्ट. *Q.-bottle*, क्वार्ट मापाची बाटली,-भांडें. *To put quart into pint pot*, make less contain greater. लहान भांड्यांत पुष्कळ-प्रमाणाबाहेर-कोंबणें. *Still takes his q.*, एक क्वार्ट बीर (दारू) अजून घेतो.

**Quar'tan**, *n.* (कॉर्टन्)—ague or fever with paroxysm every third (by inclusive reckoning fourth) day. दर चार दिवसांनीं येणारा हिंवताप, पाळीचा ताप, चातुर्थिक ज्वर.

**Quar'ter**, *n.* (कॉर्टर्)—fourth part; point of compass, direction; district, locality; source of supply, help, or information; (*pl.*) lodgings, abode, station; mercy shown to enemy in battle; a grain measure of eight bushels; 28 lb, quarter of cwt., (U. S.) 25 lb; period ending at each quarter-day; point of time 15 min. before or after an hour; (U. S., Can.) 25 cents; a quarter-mile race. एक चतुर्थांश भाग, चौथा हिस्सा, चतुर्थांश, पाव; चौत; दिशा; विभाग, प्रांत, बाजू, प्रदेश, पुरवठ्याचें, मदतीचें किंवा माहिती मिळवण्याचें ठिकाण; (अने०) राहण्याचें ठिकाण; युद्धांत दिलेलें जीवदान, प्राणदान, दया; (धान्याचें) आठ बुशेलांचें माप; २८ पौंड (वजनी, = बंगाली १४ शेर), (अमेरि.) २५ पौंड; तीन तासांचा प्रहर; पंधरा मिनिटें, पाव तास; २५ सेंट (किंमतीचें नाणें); पाव मैलाची शर्यत. *v. t.* to divide into quarters; to divide by 4; to provide with lodgings, to find lodgings and food for; to put (troops etc.) into quarters. बरोबर चार भाग करणें; चारांनीं भागणें; राहायला ठिकाण देणें; शिपायांना बराकींची सोय करणें. *Bad q. of an hour*, short unpleasant experience. थोडा वेळ टिकणारा कडु अनुभव. *What q. is the wind in?* (lit. & fig.) how are things going? वारा कसा वाहात आहे? कशी काय हालहवाल आहे? *Head qq.* मुख्य ठाणें,-ठिकाण. *To ask for, cry, q.* जीवदान

मागणें. *To give, show, receive, q.* जीवदान देणें,-मिळविणें. *To come to close qq.*, हमरीतुमरीवर येणें, हातघाईवर येणें. *Q.-bell*, पाव तासांची घंटा. *Q.-binding*, फक्त (पुस्तकाच्या) पाठीलाच चामडें वापरलेली बांधणी. *Q.-day*, day on which quarterly payments are due. (25 Mar., 24 June, 29 Sep., 25 Dec.). त्रैमासिक (भाडें वगैरे देण्याचा, पगार घेण्याचा) दिवस. *Q. deck*, मुख्य डोलकाठीजवळचा कोषिनच्या उताराचा डेक,-मजल्याचा भाग; आरमारी अधिकारी. *Q.-ill*, गुरांचा एक रोग. *Q. left, right*, (Mil.) quarter of a right angle to left, right. डाव्या-उजव्या-बाजूला २२½ अंशाचा कोन करून वळणें. *Q.-master*, (Naut.) जहाजावरील एक दुय्यम अधिकारी; (*Mil. abbr. Q. M.*) दुय्यम लष्करी अधिकारी, (याच्याकडे शिपायांना राहण्याची सोय करणें, तंबू ठोकणें, वगैरे कामें असतात). *Q.-plate*, छायाचित्राची ३¼ × ४¼ इंचाची प्लेट,-कांच, तीवरून घेतलेलें छायाचित्र. *Quar'terstaff*, a stout pole 6 to 8 ft. long formerly used by peasantry as weapon. ६ ते ८ फूट लांबीचा मजबूत दांडका,-सोटा,-लाठी.

**Quar'tering**, *n.* (क्वॉ'टरिंग)—division into quarters; (Herald. pl.) various coats marshalled on shield to denote alliance with other families. चार विभाग करणें; ढालीवर निरनिराळ्या वंशांशीं संबंधदर्शक विजयचिन्हें.

**Quar'terly̆**, *a.* (क्वॉ'र्टर्लि)—occurring or due in each quarter of the year. तिमाही, त्रैमासिक. *n.* quarterly magazine. त्रैमासिक पुस्तक. *adv.* once in a quarter of a year. तीन महिन्यांनीं एकदां.

**Quar'tern**, *n.* (क्वॉ'र्टर्न्)—fourth part of a pint or peck; 4 lb. loaf (usu. q.-loaf). पाइंटच्या (१/८ गॅलनचा) चवथा भाग; चार पौंड वजनाचा पाव.

**Quartĕt(te)**, *n.* (क्वॉ'र्टेट्)—a musical composition for four voices or instruments; players or singers rendering this; a set of four. चौघांनीं म्हणण्याचें गीत,-वाजविण्याची चीज; चतुष्खंड गीत गाणारे किंवा वाजविणारे चार इसम; चारांचा समुदाय.

**Quar'to**, *n.* (क्वा'र्टो)—(pl.-*os*), (abbr. 4 to, 4°) size given by folding sheet of paper twice; book of sheets so folded. चौपानी पुस्तक, चौपानी, चौघडी, चतुष्पत्री; चतुष्पत्री पुस्तक.

**Quartz**, *n.* (क्वॉर्ट्स्)—kinds of silicious mineral often containing gold. काचमणि, बिलोरी कांच.

**Quash**, *v. t.* (क्वॉश)—to put an end to, to annul; to reject as not valid. दाबून टाकणें, रद्द करणें; बेकायदेशीर म्हणून नाकारणें.

**Quā'sī**, *conj.* (क्वे'सि)—as if, as though. जणूं काय. *Qua'si-,pref.* seeming (ly), almost. वरवर, बहुतेक.

**Qua'ssia**, *n.* (क्वॉ'शा)—S.-Amer. tree; its wood or bark or root; bitter medicinal decoction made from these. द. अमे. वनस्पति,-झाड; त्याचें लांकूड किंवा साल किंवा मूळ; हिच्या सालांचा किंवा मुळांचा (तापावर) काढा. [f. name of negro who discovered its virtues 1761]

**Quăt'er-cĕntē'nary̆**, *n.* (क्वॅ'टर्-सेन्टी'नरि)—four hundredth anniversary. चारशेंवा वाढदिवस. [L. *quater*, four times]

**Quătern'ary̆**, *n.* (क्वॅटॅ'नरि)—having four parts, consisting of four parts; (Geo.) belonging to period subsequent to Tertiary. चार भाग असलेला; भूगर्भाच्या चतुर्थ युगाचा. *n.* set of four things; the number four. चार चार; चार (संख्या).

**Quatĕrn'ion**, *n.* (क्वॅटॅ'र्निअन्)—set of four; (pl.) a calculus named as depending on four geometrical elements. चार वस्तूंचा समुदाय, चौकडा; गणनशास्त्र.

**Quat'rain**, *n.* (क्वॉ'ट्रिन्)—a stanza of four lines rhyming alternately. चार ओळींचा श्लोक, (पहिली आणि तिसरी व दुसरी आणि चवथी या ओळींचा एक यमक असतो).

**Quā'ver**, *v. t. & i. & n.* (क्वे'व्हर्)—to have a tremulous motion, to vibrate, to shake, to tremble, to thrill. कांपणें, कंप येणें, (गायनांत) कांपत किंवा फिरकी घेऊन म्हणणें.

**Quay**, *a.* (की)—artificial landing-place for loading or unloading ships. बोटीचा धक्का. *Quay'age*, धक्काभाडें.

**Quean**, *n.* (क्वीन्)—(arch.) bold girl or woman; hussy. चटोर पोरगी; छिनाल स्त्री, कसबीण.

**Queas'y̆**, *a.* (क्वी'झि)—(of digestion) easily upset; feeling or liable to qualms or scruples, causing nausea. मळमळ सुटलेला, ओकारी आणणारा, हलक्या कांतडयाचा.

**Queen**, *n.* (क्वीन्)—king's wife; the female sovereign of a kingdom, a pre-eminent female, woman; country, etc. supreme in specified sphere; (sl.) lady; perfect female of bee, wasp, ant, etc.; a piece in chess; adored female e. g. Virgin Mary, ancient goddess; person's sweetheart, or wife or mistress; a majestic woman. राजपत्नी; महिषी, अधिराज्ञी; राणी; सभ्य स्त्री; श्रेष्ठ मादी; वजीर; कुमारी मेरी, प्राचीन देवता; प्रेमपात्र, बायको, भार्या, पात्र; ऐश्वर्यवान,-वैभवशाली,-स्त्री, राणी. *v. t. & i.* to make (woman) queen; play the queen. राणी करणें; राणीची भूमिका घेणें,-सोंग घेणें. *Q. of heaven*, Juno. जुनो. *Q. of love*, Venus. व्हीनस्-शुक्र-देवता. *Q. of night*, Diana. डायना. *Q. of the May*, मेच्या सणाच्या खेळांतील राणी. *The q. of roses*, गुलाबांची राणी (अत्युत्कृष्ट फूल). *Q. of hearts*, any beautiful woman. सुंदर स्त्री. *Q of the Adriatic*, Venice, व्हेनिस शहर. *Q. of the seas*, ग्रेटब्रिटन. *Q.-bee*, राणी माशी. *Q.-mother*, queen,-dowager who is mother of king or queen. राजमाता. *Q.-posts*, (कैचीचे) बाजूचे खांब. *Q.'s weather*, sun-shine, सूर्यप्रकाश, ऊन.

**Queen'-dowager**, *n.* (क्वी'न्-डॅविजर)—late king's

wife, the widow of a deceased king. मृत राजाची पत्नी.

**Queen'ing**, *n.* (क्वी'निंग)—a kind of apple. एका जातीचें फळ, सफरचंद.

**Queen'ly**, *a.* (क्वी'न्लि)—like a queen. राणीला शोभेसा, भव्य, गंभीर.

**Queer**, *a.* (क्विअर्)—strange, odd, eccentric, out of sorts, singular, whimsical; (sl.) drunk. विलक्षण, तऱ्हेवाईक; बेचैन, कसेंचसें; झिंगलेला. *v. t.* (sl.) to put out of order. बिघडवणें, नासणें. *To feel q.*, बेचैन वाटणें. *In q. street*, (sl.) in a difficulty, in debt or trouble or disrepute. अडचणींत, कर्जांत, संकटांत, हालांत. *To q. the pitch for one*, to spoil his chance beforehand by secret dealings. (गुप्त खटपट करून) एकाद्याचें कार्य बिघडविणें, एकाद्याला अपयश आणणें. *Queer'ish, a.*; *Queer'ness, n.*

**Quell**, *v. t.* (क्वेल्)—to put down or cause to cease, to suppress, to crush. मोडणें, दाबुन टाकणें, नाहींसा करणें, चेपून टाकणें, चिरडणें.

**Quench**, *v. t.* (क्वेन्च्)—to slake thirst; to put out or extinguish fire; to cool; to stifle or suppress. (तहान) भागवणें; (अग्नि) विझवणें; शांत करणें, थंड करणें; दडपुन टाकणें. *To q. smoking flax*, cut short promising development. भावी वाढ खुंटविणें,-दाबून टाकणें. *Quench'er, n.* something to drink. पेय. *Quench'less, a.* unquenchable. विझविता न येण्याजोगें.

**Quenelle'**, *n.* (कने'ल्)—a ball of fish or meat pounded and seasoned. माशाचा,-मांसाचा, -खारावलेला गोळा.

**Quer'ist**, *n.* (क्वी'अरिस्ट)—a person who asks question, a questioner. सवाल करणारा,-पुसणारा, प्रश्न विचारणारा, पृच्छक.

**Quern**, *n.* (क्वर्न्)—a rude stone hand-mill for grinding corn. जातें, घिरट. *Queen stone*, जात्याचें पेड.

**Que'rulous**, *a.* (क्वे'रुलस्)—expressive of complaint, complaining; peevish. रडका, पिरपिरा; तिरसट, चिडखोर.

**Quer'y**, *n.* (क्वि'अरि)—(abbr. *qu.*) a question (esp. one disputing a fact, &c.) or an enquiry to be answered; a mark of interrogation. प्रश्न; सवाल; प्रश्नचिन्ह. *v. t.* to ask, inquire; (whether, *if*) dispute accuracy of. प्रश्न विचारणें, पृच्छा करणें, आक्षेप घेणें.

**Quest**, *n.* (क्वेस्ट्)—seeking; thing sought by inquiry or search. शोधणें, शोध, तपास; शोधण्याचा विषय, शोधविषय; चौकशी. *v. i. & t.* (of dogs etc.) search for game (often *about*); go about in search of someting; (poet.) search for, seek *out*. शिकार शोधून काढणें; शोधार्थ भटकणें, माग काढीत जाणें; शोध करणें, तपास काढणें. (vulg.) *crowner's q.*, coroner's inquest. करोनरनें केलेली चौकशी, मयतचैयास. *In q. of*, च्या शोधार्थ.

**Ques'tion**, *n.* (क्वे'स-चन्)—a sentence put in interrogative form; problem, concern, matter; subject of discussion or voting; doubt about a thing; (arch.) torture to elicit confession. प्रश्न; वाद, बाब, विषय, वादविषय; संशय, शंका; (गुन्हा कबूल करून घेण्यासाठीं केलेले) हाल, छळ. *v. t.* to ask questions of, to interrogate; to throw doubt upon; to raise objection to. प्रश्न विचारणें; शंका घेणें; हरकत घेणें. *To put a q. to one*, ask him something. (ला) प्रश्न विचारणे, पृच्छा करणें. *Q. and answer*, प्रश्नोत्तर (पद्धति). *Leading q.*, सूचक प्रश्न; *Rhetorical q.*, वक्तृत्वाची छाप पाडण्याकरितां प्रश्न. *Indirect, oblique, q.*, q. made into dependent clause. गौण (वाक्यरूपी) प्रश्न. *Q. mark,-stop*, प्रश्नचिन्ह (?). *Beyond all, beyond, q, out of q., past* or *without q.*, certainly, undoubtedly. खात्रीनें, खात्रीपूर्वक, निश्चित (पणें). *To call in q.*, to raise objections to. हरकत घेणें, शंका,-आक्षेप,-घेणें. *To beg the q.*, जें सिद्ध करावयाचें तेंच गृहीत धरणें. *The person in q.*, that we are referring to. ज्यासंबंधीं आपण बोलत आहों तो. *To come into q.*, महत्त्व येणें, चर्चेचा विषय होणें. *That is not the q.*, is irrelevent. हें गैरलागू आहे. *Q.*, (in public assemblies) (वक्त्याला मुद्दा सोडून न बोलण्याची सूचना). *Out of the q.*, अशक्य, अव्यवहार्य. *Put the q.*, प्रश्न मताला टाकणें, प्रश्नावर अनुकूल-प्रतिकूल मतें घेणें. [L *quaerere*, seek]

**Ques'tionable**, *a.* (क्वे'स्चनबल)—doubtfully true; not clearly consistent with honesty or wisdom. संशय वाटण्याजोगा, संशयास्पद, शंकनीय, शंकाई; लफाडीचा.

**Ques'tionless**, *adv.* (क्वे'स्चन्लेस्)—indubitably. निःसंशय.

**Questionnaire'**, *n.* (केस्टिऑ-ने'अर्)—a formulated series of questions, an interrogatory. प्रश्नमालिका, प्रश्नपत्रिका.

**Quet'zal**, *n.* (क्वे'ट्झल्)—beautiful Central-American bird. मध्य अमेरिकेंतील एक सुंदर पक्षी.

**Queue**, *n.* (क्यू)—hanging plaited tail of hair, pigtail; a line of persons or vehicles waiting their turns behind each other. लोंबती वेणी; वाट पाहात असलेल्या एकापाठीमागून एक गाड्या किंवा लोक, -गाड्यांची किंवा लोकांची रांग. *v. i.* to dress (hair) in q.; (of persons etc.) form *up* in, join *on* to a q. वेणी घालणें; रांगेत उभें राहणें, रांग करणें.

**Quib'ble**, *n.* (क्वि'बल्)—a play on words; equivocation, evasion. शब्दच्छल करणें, कीस काढणें, आढेवेढे, उडवाउडव. *v. i.* to use quibbles, to evade the plain truth. आढेवेढे घेणें. *Quib'bler, n., quib'bling, a.*

**Quick**, *a.* (क्विक्)—living; lively, prompt; sensitive, intelligent; swift. जिवंत; जलदीचा; चलाख,

तीक्ष्ण; चपळ. *n.* sensitive flesh below nails or skin or a sore; seat of feeling or emotion. नखाखालचें नाजूक मांस; मर्मस्थान. *adv.* quickly, soon. लवकर, जलद. *Q. with child,* (पोटांत गर्भ हलूं-फिरूं-लागणारी) गरोदर (स्त्री). *A q. child,* intelligent. तल्लख, हुशार, मूल. *Q. temper,* easily irritated temper. राग. *Q.-tempered, a.* रागीट, चिडखोर. *Q.-witted,* हजरजबाबी. *Be q.,* make haste. चल, आटप, जलदी कर. *Q.-march, Q.-step,* step used in *q. time,* (mil.) दर मिनिटाला ३३ इंचाचीं १२४ पावलें, किंवा तासाला ४ मैल, अशी (लष्करी) चाल. *Quick'ly, adv.* जलदीनें, जलद.

**Quick'en,** *v. t. & i.* (क्विकन्)—to give life to; to come to life; to animate, to inspire, to kindle; to accelerate; to make or become quicker. जिवंत करणें; जिवंत होणें; चेतविणें, प्रज्वलित करणें; वाढविणें; जलद करणें किंवा होणें.*-ing, a.*

**Quick'-lime,** *n.* (क्विक्-लाइम)—unslaked lime. lime burned but not slaked with water. भाजलेले चुनखडे.

**Quick'-sand,** *n.* (क्विक्सॅन्ड्)—(bed of) loose wet sand readily swallowing up ships, animals, etc. (जहाजें, जनावरें वगैरेंना गिळंकृत करणारा) ओल्या भुसभुशीत वाळूचा समूह, दलदलीचा प्रदेश, रुपणीची पुळण.

**Quick'-set,** *a.* (क्विक्सेट्)—(of hedge) formed of living plants, esp. hawthorn. जिवंत मोख्याचें (कुंपण). *n.* live slips esp. of hawthorn; hedge of these. कुंपणासाठीं रोविलेले जिवंत मोखे,-खुंट; त्यांचें घनविलेलें कुंपण.

**Quick'silver,** *n.* (क्विक्-सिल्व्हर्)—mercury; (fig.) mobility of temperament or mood. पारा; स्वभावाचा चंचलपणा. *v. t.* to coat (mirror-glass) with amalgam of tin. (आरशाला) पारा चढविणें.

**Quid,** *n.* (क्विड्)—a lump of tobacco chewed and rolled about in the mouth. तंबाखूची केलेली गोळी. (sl.) a sovereign, £ 1. एक पौंड (नाणें).

**Quidd'ity** *n.* (क्वि'डिटि)—essence; what makes a thing what it is; quibble. तत्त्व; पदार्थत्व; शब्दच्छल, कोटी. [ L. *quid,* what ]

**Quid'nunc,** *n.* (क्वि'ड्नंक्)—a news-monger; person given to gossip. बातम्या पसरविणारा, गांवकुटाळ मनुष्य, गप्पाष्टकें झोडणारा. [ L. *quid,* what; *nunc,* now ]

**Quid pro quo,** *n.* (क्विड प्रो क्वो)—(rare) blunder made by using or putting one thing for another; compensation, return made, consideration (*must get a q. p. q.*). अदलाबदलीची चूक, चूकभूल; नुकसानभरपाई. [ L. *quid,* something; *pro,* for; *quo,* something ]

**Quies'cent,** *a.* (क्वाएसन्ट्)—inert, being in a state of rest, dormant; silent. स्थिर, अचल; शांत.—*nce, n.* स्थिरता, निश्चलता; शांतता.—*ncy, n.*

**Qui'et,** *n.* (क्वा'एट्)—undisturbed state; tranquillity, repose; calm, silence. निवांतपणा; स्वास्थ्य; शांतता. *a.* with little or no sound or motion, of gentle disposition; tranquil; (of colour etc.) unobtrusive. निवांत शांत. मनांतल्या मनांत; थंड स्वभावाचा, सालस; स्वस्थ; साधा, विनभपक्याचा *v. t. & i.* to soothe, to calm, to reduce to quiet, to allay, to still, to become quiet. शांत करणें; शांत होणें, कमी करणें,-होणें. *Q. resentment,* मनांतल्या मनांतला संताप,-चीड. *On the q.* (*sl. abbr.*) *on the q. t.,* secretly. गुप्तपणें, आंतल्या आंत. *To q. down,* शांत होणें. *Qui'etly, adv.*

**Qui'etism,** *n.* (क्वा'एटिझम्)—passive attitude towards life as a form of religious mysticism. निवृत्तिमार्ग, शांति, शम, शांतिमार्ग. *Qui'etist, a. & n.*

**Qui'etude,** *n.* (क्वा'एट्यूड्)—quietness. स्वस्थता, शांतता.

**Quie'tus,** *n.* (क्वाए'टस्)—receipt for a bill; release from life; being got rid of. कर्जफेड, बिलाची-आकाराची पावती; मुक्ति; मुक्तता.

**Quill,** *n.* (क्विल्)—a large feather or wing of a tail; a hollow stem of the feather; pen, fishing-float, plectrum, or tooth-pick made of quill; hollow reed used as bobbin or musical pipe; porcupine's spines. मोठें पीस, पर; पिसाची कांडी पिसाची लेखणी वगैरे; चाती, कांडी, पांवा; साळपीस, साळशिंदर. *v. t. & i.* to form into q.-like folds, goffer; wind thread or yarn or bobbin. पिसासारखी किनारी काढणें, सुरकुत्या पाडणें; चात्या भरणें. *Q.—driver,* a clerk or journalist or author. (खरडेघाश्या) कारकून, वर्तमानपत्रकार, किंवा ग्रंथकार.

**Quill'et,** *n.* (क्वि'लिट्)—quibble, nice distinction. शब्दच्छल, श्लेष, कोटी, शुष्क भेद.

**Quill'ing,** *n.* (क्वि'लिंग)—goffered edging. पिसासारखी,-सुरकुत्यांची,-किनारी.

**Quilt,** *n.* (क्विल्ट्)—a coverlet (esp. of quilted material), bed-covering made of padding. रजई, लेप, दुलई, गोधडी. *v. t.* to make (coverlet, garment) of padding held between two layers of linen, etc. by cross rows of sewing; (sl.) thrash; compile (literary work) out of extracts or borrowed ideas; sew up (coin, letters) between two layers of garment etc. रू-कापूस-भरून (रजई) शिवणें; झोडपणें; उतारे घेऊन,-उष्ट्या कल्पना घेऊन,-(ग्रंथ) रचणें; (नाणीं, अक्षरें वगैरे एके ठिकाणीं होऊं नये म्हणून) गोधडीसारखें आडवें उभें शिवणें. *Quilt'ing, n.* रजया भरणें,-तयार करणें; रजयांना लागणारें सामान. [ L *culcita,* cushion ]

**Qui'nary,** *n.* (क्वाइ-नरि)—of the number five, consisting of five things. पांचाचा, पंचक.

**Qui'nate,** *a.* (क्वा'इनट्)—(bot.) (of leaf) composed of five leaflets. पांच विभागांचें,-पंचदल,-(पान).

**Quince,** *n.* (क्विन्स्)—a hard yellowish pear-shaped fruit used as preserve, tree bearing it. एक कठीण आंबट फळ, त्याचें झाड.

**Quincĕntĕ' narў**, *n.* ( क्विन्सेन्टी'नरि )—500th anniversary. पांचशेंवा वाढदिवस, पंचशताब्दिक वाढदिवस,-उत्सव.

**Quinc'ŭnx**, *n.* ( क्वि'न्कंक्स )—( arrangement of ) five objects set so that four are at corners of square or rectangle and the other at its centre ( e. g. the five on dice or cards ). ( फांशांवर किंवा पत्त्यावर ठिपें असतात त्याप्रमाणें ) चार कोपऱ्यांत चार व मध्यें एक अशी पांच पदार्थांची मांडणी.

**Quinine'**, *n.* ( क्विनी'न् )—a bitter drug got from cinchona bark. क्विनीन, कोयनेल.

**Quinqu (e)** –, ( क्विंक् )—comb. form of L. *quinque*, five-.पंच-, पांच.

**Quinquĕnn'ial**, *a.* ( क्विन्क्वे'निअल् )—five-year-long; five-yearly. पांच वर्षें टिकणारा, पंचवार्षिक. *Quinquennium*, *n.* पांच वर्षांचा काल.

**Quin'sў**, *n.* ( क्विंझि )—an inflammation of the throat or tonsils or of the part adjacent. घसा सुजणें, घटसर्प.

**Quin'tain**, *n.* ( क्वि'न्टिन् )—( hist. ) mark set up to be tilted at, with sand-bag on pivoted bar. भालाईतवाल्याच्या लष्करी खेळांतील लक्ष्य,-खूण.

**Quin'tal**, *n.* ( क्वि'न्टल )—100 lb; 112 lb. or hundredweight; 100 kilograms. १०० पौंड, ११२ पौंड किंवा एक हंड्रेडवेट ( वजन ); १०० किलोग्राम.

**Quint'an**, *a.* & *n.* ( क्विं'न्टन् )—( ague or fever ) with paroxysm every fourth day. दर पांच दिवसांनीं येणारा ताप.

**Quintĕss'ĕnce**, *n.* ( क्विन्टे'सेन्स )—purest form or manifestation of some quality, highly refined extract, highest essence of a body. कस, सार; तत्त्व, सत्त्व.

**Quintĕt'(te )**, *n.* ( क्विन्टे'ट् )—( performers of ) piece for five voices or instruments; set of five. पांचजणांनीं गाण्याचें पद्य, पांच वाद्यांवर वाजविण्याचें गाणें; पांचांचा समुदाय, पंचक, पंचकडा.

**Quin'tŭple**, *a.* ( क्वि'न्-ट्युपल् )—fivefold. पांचपट, पंचगुणी.

**Quip**, *n.* ( क्विप् )—a sarcastic remark, a clever hit, verbal conceit; epigram; equivocation, quibble. टोमणा, टोला; चुटका, दुटप्पी बोलणें.

**Quire**, *n.* ( क्वायर् )—24 sheets of writing-paper. कागदाचा दस्ता, चोवीस ताव. *In qq.*, unbound, in sheets. सुटे-न बांधलेले-ताव, कागद. 2. choir. गायक मंडळी; ख्रिस्ती देवळांतील गाभारा; गाणारे पक्षी.

**Quir'inal**, *n.* ( क्वि'रिनल )—the Italian Government or Court ( esp. as *opp. Vatican* ). इटालिअन सरकार, -दरबार. [ name of palace ]

**Quirk**, *n.* ( क्वर्क् )—quip; trick of gesture, etc.; flourish in writing. टोमणा, टोला; ढब, लकब, आडेवेढे; ( अक्षराचे ) फांटे.

**Quirt**, *n.* ( क्वर्ट् )—( western U. S. ) a riding whip with long lash of braided leather. विणलेल्या चामड्याचा लांब टोकाचा घोडेस्वाराचा चाबूक. *v. t.* to lash with q. ( अशा ) चाबकानें फोडणें.

**Quit**, *v. t.* & *i.* ( क्विट् )—( pa. t. & pa. p. *quitted*, rarely *quit* ), to give up, to let go, to abandon; to depart from; ( poet. ) requite, repay, clear off. सोडून देणें; सोडून दूर जाणें; परत करणें, फेडणें, फेड करणें. *pred. a.* rid of; absolved. मोकळा, मुक्त; ऋणमुक्त. *Quit you like men*, मर्दाप्रमाणें,-माणुसकीनें -वागा. *To q. hold of*, loose. ढैल सोडणें, सोडून देणें. *Notice to q.*, भाडेकरी जागा खाली करण्याची सूचना. *To q. scores*, to balance accounts. हिशेबाचा ताळा बरोबर होणें, फिटास फिट होणें, ताळा काढणें. *Quit-claim*, *n.* हक्काची सोडचिठ्ठी; *v. t.* हक्क सोडणें, वारसा सोडणें. *Quit-rent*, रोख,-नक्त,-खंड; उक्ता धारा.

**Quitch**, *n.* ( क्विच् )—couch-grass. लांब मुळें असलेलें गवत.

**Quite**, *adv.* ( क्वाइट् )—completely, altogether, absolutely; noticeably. अगदीं, पूर्णपणें, निखालस, स्पष्टपणें. *q. other*, very different, अगदीं निराळा, *q. another*, a very different. अगदीं निराळी ( गोष्ट इ. ) *Is q. the thing*, fashionable. रूढ, शिष्टसंमत,-गोष्ट. *Not q. proper*, rather improper कांहींसें अयोग्य. *q. so, q.*, I grant the truth of that. अगदीं बरोबर, अगदीं असेंच

**Quits**, *pred. a.* ( क्विट्स )—on even terms by retaliation or repayment. फिटास फिट, देणें घेणें किंवा येणें कांहीं नसलेलें, फिटं फाट. *Will be quits with him yet*, will have revenge. त्याचा सूड घेईन, वचपा काढीन. *Now we are q.*, आतां आपली बरोबरी, येणें देणें कांहीं नाहीं. *To cry q.*, आतां भांडण वगैरे कांहीं नाहीं असें कबूल करणें, फिटास फिट झाली हें मान्य करणें.

**Quitt'ance**, *n.* ( क्वि'टन्स )—release from obligation; receipt for payment. ऋणमुक्तता; पावती, भरपाई, पोंच.

**Quitt'er**, *n.* ( क्वि'टर् )—( colloq. ) a person lacking in determination or strength of will. चंचल वृत्तीचा, दुबळ्या मनाचा,-मनुष्य.

**Quiv'er**, *n.* ( क्वि'व्हर् )—a case for arrows; quivering motion. बाणांचा भाता; कांपणें, कंप. *v. i.* to tremble or vibrate with slight rapid motion. कांपणें, कंप सुटणें, पंख फडफडावणें. *n.* quivering motion or sound. कांपणें, हुडहुडी, स्फुरण, फडफडणें. *To have an arrow, shaft, left in one's quiver*, not resourceless. अगदींच कंगाल नसणें, थोडासा आधार असणें. *q. full of children*, large family. पुष्कळ मुलेंबाळें असलेलें कुटुंब.

**Qui'vive** ( की'व्हीव् )—*on the-*, on the alert, watching for something to happen. सावध, दक्ष, जागरूक, पाळतीवर असलेला. [ F ]

**Quix'ote**, *n.* ( क्वि'क्सोट )—an enthusiastic visionary. तन्हेवाईक वृत्तीचा मनुष्य, वेडापीर. [ hero of Cervantes's *Don Q.* ]

Quixŏt'ic, *a.* (क्विक्सॉ'टिक्)—extravagantly romantic, aiming at an impossible ideal or visionary ends. अत्यंत तऱ्हेवाईक; अशक्य ध्येय असणारा. *Quixotics, n. pl.* अशक्य कल्पना.

Quĭz, *v. t.* (क्विझ्)—to make sport of; regard with mocking air; chaff; examine or coach by questioning. ची थट्टामस्करी करणें; उपहास,-निंदा करणें; प्रश्नोत्तररूपानें परीक्षा घेणें किंवा शिकविणें. *n.* person given to quizzing; eccentric person; hoax, ridicule. थट्टामस्करी करणारा मनुष्य; विक्षिप्त मनुष्य; कोडें, थट्टा, उपहास, निंदा. *Quizz'ical, a.*

Quŏd, *n.* (क्वॉड्)—(*sl.*) prison. तुरुंग, बंदिखाना.

Quŏd vi'di, (क्वॉड्व्हा'यडि)—(abbr *q. v.*) which see (used in references). (संदर्भार्थ) (हें) पहा.

Quoin, *n.* (कॉइन्)—an external angle or corner of a building, corner-stone. इमारतीचा कोन, कोनशिला.

Quoit, *n.* (कॉइट्)—a sharp-edged circular iron ring for throwing at a mark in the game of *quoits.* फेकण्याकारितां लोखंडाचें तीक्ष्ण कडा असलेलें चक्र, -थाळी.

Quon'dăm, *a.* (क्वॉन्डॅम्)—that was; having been formerly, former. माजी; पूर्वीचा. [ L.=formerly ]

Quōr'um, *n.* (क्वो'अरम्)—a number of members that must be present to constitute a valid meeting. सभा कायदेशीर होण्याइतकी सभासदांची संख्या, कमीत कमी संख्या, कामचलाऊ संख्या.

Quō'tă, *n.* (क्वो'टा)—a share to be contributed to or received from a total by one of the parties concerned, a proportional part. वर्गणी, हिस्सेरशी, वांटणी.

Quō'table, *a.* (क्वो'टबल्)—worth quoting from or quoting. अवतरण,-उतारा,-घेण्याजोगा,-भाव-किंमत-सांगण्याजोगा.

Quotā'tion, *n.* (क्वोटे'शन्)—quoting; a passage or price quoted. अवतरण; उतारा, सांगितलेली किंमत, बाजारभाव, चालू दर. *Q. marks,* (' ' or " "), used at beginning and end of quoted passages or words. अवतरण चिन्ह.

Quōte, *v. t. & i.* (क्वोट्)—to cite or appeal to (an author, book) in confirmation of some view; to state price of. दुसऱ्याचे ग्रंथांतून अवतरण घेणें; किंमत सांगणें. *n.* (colloq.) passage quoted; (usu. pl.) quotation mark (s). अवतरण, दुसऱ्याचा,-दुसऱ्या पुस्तकांतुन घेतलेला-उतारा; अवतरणचिन्ह.

Quōth, *v. t.* (क्वोथ्,क्वाथ्)—(*arch.*) said, spoke. म्हणाला, म्हणालों.

Quotĭd'ian, *a.* (क्वटि'डिअन्)—daily; (of intermittent fever or ague) with a paroxysm every day, occurring daily. दैनिक; दररोज येणारा (ताप). *n.* a quotidian ague or fever. दररोज येणारा ताप. [ L. *quotidie,* daily ]

Quō'tient, *n.* (क्वो'शन्ट्)—result of a division sum. भागाकार.

Quoti'ety, *n.* (क्वाइ'इटि)—number as a category. संख्या हा वर्ग, संख्या-वर्ग.

R

R, (आर्)—(*pl. Rs, R's*) the eighteenth letter of the English alphabet. इंग्रजी वर्णमालेंतील १८ वा वर्ण. *The r months,* those with *r* in their names (Sep.-Ap.) as season for oysters. सप्टेंबर ते एप्रिलपर्यंतचे-ज्यांच्यांत r हें अक्षर आहे असे-महिने. *The three Rs,* reading, (w) riting, & (a) rithmetic, as basis of elementary education. प्राथमिक शिक्षणाचा पाया,-वाचन, लेखन व हिशेबठिशेब.

Răbb'ĕt, *n.* (रॅ'बिट्)—the groove or notch cut along edge or face (of wood, &c.) to receive corresponding projection of another piece. लांकडाचा दुसरा तुकडा बरोबर बसावा म्हणून कडेला केलेली खांच, खोबण, खांच. *v. t.* to cut rabbet in; to join or fix with rabbet. खांच पाडणें; खांचीत, -खांच पाडून,-बसविणें.

Răbb'i, *n.* (रॅ'बाय्)—Jewish doctor of the law. यहुदी धर्मशास्त्र शिकविणारा, त्याची पदवी. *Rabb'in, n.* rabbi. यहुदी राबी. *Rabb'inic,-ical, aa.* of the rabbins. राबींचा, राबींच्या मताचा,-मापेचा. *Rabbinism, n.* doctrines etc. of the rabbins. राबींचीं तत्त्वें,-मतें इ०

Răbb'it, *n.* (रॅ'बिट्)—a well-known wild and domesticated rodent of hare family; (*sl.*) feeble player or person. ससा, शशक; कमजोर,-कच्चा, खेळाडू; अशक्त-दुर्बल-मनुष्य. *Rabb'iling, n.* hunting of rabbits. सशांची शिकार करणें. *Rabb'ity, a.*

Răb'ble, *n.* (रॅ'बल्)—disorderly crowd of vulgar or noisy people, mob, *the* lower part of the populace. घोळका, गर्दी, बाजारबुणगे लोक; खालच्या वर्गाचे लोक. *Rab'blement, n.* a tumult as of a rabble. बाजारबुणग्या लोकांचा दंगा, वटवट, गलका.

Răb'ble, *n.* (रॅ'बल्)—an iron bar with bent end for stirring molten metal. (धातूचा रस ढवळण्याकारितां गजासारखी) ढाणी, लोखंडी मोठा पळा.

Răbĕlais'ian, *a.* (रॅबिले'झ्यन्)—as of Rabelais, exhuberantly and coarsely humorous. रॅबिलेझूचा, -सारखा; भरपूर ग्राम्यविनोदपूर्ण. *n.* an admirer of or student of Rabelais. रॅबिलेझूचा चाहता किंवा अनुयायी. [ R., French humorist. ]

Răb'id, *a.* (रॅ'बिड्)—furious, unreasoning; headstrong; (of dog) affected with rabies, mad. भयंकर, अत्यंत जोराचा; माथेफिरू; पिसाळलेला (कुत्रा). *Rabid'ity, n.* माथेफिरूपणा, पिसाटपणा.

Ră'bĭes, *n.* (रे'बिईझ्)—canine madness, hydrophobia. कुत्र्याचें वेड, पिसेपणा, श्वानदंश, जलसंत्रासरोग.

Rāce, *n.* (रेस्)—contest of speed; course of life; strong current in sea, &c.; channel of stream; (pl.) series of contest of speed for horses at fixed time or regular course; a channel along which shuttle moves; group of persons having

a common ancestor; the posterity of; family; kindred people; a particular breed of animals; genus or species of plants; root (of ginger). शर्यत, दौड, ओढ; आयुष्यक्रम; पाण्याचा जोराचा प्रवाह, प्रवाहाची जोरगत; प्रवाहाच्या स्रोताचा मार्ग; घोड्यांच्या शर्यती; घोडा फिरण्याची पट्टी; वंश, जात, ची वंशपरंपरा, संतति; कुळ; जाति, एकाच वंशाचे लोक; विशिष्ट जात, बीज, अवलाद; (वनस्पति) वर्ग; (आल्याचें) मूळ, कांडी, फडा, फणा. *v. i. & t.* to go at full speed; compete in speed with; indulge in horse-racing. अति वेगानें धांवणें,-जाणें,-पळणें, दौड मारणें; (शीं) स्पर्धा,-शर्यत-लावणें, शर्यत खेळणें; घोड्यांच्या शर्यतींत (पैसे) लावणें, घोड्यांच्या शर्यतींचा नाद असणें. *R. ball,* dance held in connexion with races. घोड्यांच्या शर्यतीनिमित्त नाच. *R. card,* programme of races. घोड्यांच्या शर्यतींचा कार्यक्रम-पत्रिका,-माहिती. *Race'course,* ground for horse-racing. घोड्यांच्या शर्यतींचें अंगण,-रंगण,-आवार. *Race'horse,* शर्यतींत धांवणारा घोडा. *R. meeting,* horse-racing fixture. घोड्यांच्या शर्यतींचा कार्यक्रम, वेळ, तारखा वगैरे. *A racing man,* घोड्यांच्या शर्यतींचा नादी. *The racing world,* the turf. टर्फ्-क्लब.

**Racēme',** *n.* (रसीं'म्)—an inflorescence in which separate flowers are attached by short stalks along central stem. पुष्पगुच्छ, बंधनयुक्त मंजरी, देंठ असलेली मंजरी, (उ० संकासुर, मोहरी, मुळा). *Ra'cemose, a.* संकासुरी मंजिऱ्या असलेला; संकासुरी मंजिरीसारखा.

**Rā'cer,** *n.* (रे'सर्)—one who races; a runner; racehorse or yacht or vehicle kept for racing. शर्यत मारणारा; धांवणारा; शर्यतीचा घोडा किंवा बोट किंवा वाहन.

**Rā'chis, Rha-,** *n.* (रे'किस्)—(pl.-ides), a stem to grasses etc. bearing flower-stalks at short intervals; an axis of pinnately compound leaf or frond; feather-shaft. (गवतांचा, फुलांचा) मुख्य दांडा,-देंठ, पुष्पवंश, मणाल; (पिच्छवत् संयुक्त) पानाची मुख्य शीर,-दांडा, मुख्यपर्णवंश, मणाल (उ० शेवगा, कडुनिंब); पिसाऱ्याचा दांडा. [Gk *rhakis,* spine]

**Rachi'tis,** *n.* (रका'इटिस्)—rickets. हाडांचा-अस्थींचा -वांकडेपणा, अस्थिकौटिल्य.

**Rā'cial,** *a.* (रे'शल्)—of a race, of races. जातीचा. जातवार, कुळाचा, वंशवर्धक, जातिनिष्ठ, जातीजातींचा. *Ra'cially, adv.*

**Răck,** *n.* (रॅक्)—kinds of wooden or metal frame-work for holding fodder, or for keeping various articles on or in, or for torturing victims by stretching the joints; driving clouds; destruction. गव्हाणी; मांडण; घोडा, ताणघोडा; रिकामे धावते ढग, कापशी,-पोकळ,-ढग; नाश, सत्यानाश. *v. t. & i.* to place in or on rack; to torture on the rack; (of disease etc.) inflict torture or strain; draw off (wine, cider) from the lees. गव्हाणींत बांधणें, मांडणीवर ठेवणें; सतावून सोडणें, पिडणें, पीडा देणें; फार ताण पडणें; (दारू) गाळणें. *Go to rack & ruin,* नाश,-विध्वंस,-होणें. *R. wheel,* cog-wheel. दांते असलेलें चक्र. *To r. up horse,* घोड्याला रात्रीं खाण्यासाठीं गव्हाणींत गवत वगैरे घालणें. *A racking headache,* पीडा देणारी,-सतावून सोडणारी,-डोकें-दुखी. *To rack* one's *brains,* मेंदूवर फार ताण पडणें.

**Răck'et,-cquet,** *n.* (रॅ'किट्)—catgutted bat used in tennis, rackets, etc.; (pl.) a ball-game for two or four with rackets in a court of four plain walls, racket-like snow-shoe. टेनिसची बॅट; दोघांनीं किंवा चौघांनीं खेळण्याचा टेनिस खेळ; चेंडूचा एक खेळ; बर्फावरून जातांना घालण्याचा जोडा. *R.-tail,* टेनिसच्या बॅटीसारखा पिसारा असलेले एक जातीचे पक्षी.

**Răck'et,** *n.* (रॅ'किट्)—uproar, din; bustle, hurry; social excitement, gaiety, dissipation. गलबला, कलकलाट; गडबड, धांदल, घाई; धांगडधिंगा, दंगा. *v. i.* to live gay life; be much on the move. मजेंत राहणें; गडबड,-धांदल,-उडवणें. *Rack'ety, a.* noisy; dissipated. गलबल्या; नादिष्ट, छंदी. *To stand the racket,* come successfully through test, face consequences of action. परीक्षेला उतरणें, कसोटीला उतरणें; परिणाम भोगणें.

**Răck'rĕnt,** *n.* (रॅक्-रेन्ट्)—greater than reasonable rent that can be exacted. जास्तींत जास्त भाडें. *v. t.* to extract this from tenant. कमालीचें जास्त भाडें -खंड-वसूल करणें.

**Raconteur,** *n.* (रॅकॉन्ट'र्)—(*fem.-euse,*-ट्'झ्), teller of anecdotes. दंतकथा सांगणारा. [F.]

**Racōōn',** *n.* (रॅकू'न्)—a bushy-tailed American nocturnal carnivorous animal. अमेरिकेंतील एक मांसभक्षक प्राणी.

**Rā'cy̆,** *a.* (रे'सि)—of distinctive quality or vigour; vernacular. झणझणीत, जोरदार; देशी, मुलखी. *R. of the soil,* of homely directness, spirited, lively. झणझणीत, जोमदार, मजेदार.

**Răd'dle,** *n.* (रॅ'डल्)—red ochre. तांबडी माती,-गेरू *v. t.* to paint with raddle; plaster with rouge. तांबड्या मातीनें रंगविणें,-गिलावा,-रंग,-काढणें.

**Rā'dial,** *a.* (रे'डिअल्)—of, in, rays; having position or direction of a radius; of radium; of the radius of the fore-arm. किरणांचा, किरणात्मक, किरणासारखा; त्रिज्येसारखा, केंद्रिक, (किरणासारखा) केंद्रापासून निघणारा; 'रेडिअम्' धातूचा; अंगुष्ठ-मूलाश्रित (नाडी). *n.* a radial nerve or artery. नाडी.

**Rā'dĭan,** *n.* (रे'डिअन्)—an angle at centre of circle subtending arc whose length is equal to the radius. समत्रिज्याकोन, त्रिज्येएवढ्या चापानें वर्तुळ-मध्यबिंदूशीं केलेला कोन.

**Rā'dĭance,** *n.* (रे'डिअन्स्)—brilliant light; dazzling looks or beauty. चकाकी; चमक, तेज. *Ra'diancy, n.*

**Rā'dĭant,** *a.* (रे'डिअन्ट्)—emitting rays; issuing or operating radially; beaming with joy, &c;

bright or dazzling. किरण बाहेर टाकणारा; (उष्णता, -प्रकाश,-) किरणविसर्जक, किरणप्रमाणें मध्यापासून पसरणारा; आनंदानें प्रफुल्लित; दीप्तिमान, तेजस्वी. *n.* point from which heat or light radiates; (Astron.) a radiant point. किरणविसर्जनबिंदु; उल्कासंपातबिंदु.

**Ra'diate,** *v. t. & i.* (रे'डिएट्)—to diverge or emit from a centre; to emit rays of light or heat; to disseminate (joy, &c.); send or broadcast by wireless; be arranged like spokes. एका केंद्रांतून सरळ बाहेर येणें; किरण बाहेर टाकणें, किरणविसर्जन करणें; (आनंद) पसरणें; बिनतारी संदेशयंत्रानें (बातमी) पाठविणें,-पसरविणें,-जाहीर करणें; चाकाच्या आरांप्रमाणें रचलें जाणें, अरीभवन करणें. *Radia'tion, n.* किरणविसर्जन, अरीभवन. *Ra'diative, a.*

**Ra'diator,** *n.* (रे'डिएटर्)—(esp.) appliance for warming room etc. by radiation of heat; engine-cooling apparatus in motor car. (खोलींत) उष्णतोत्पादक यंत्र; (मोटार) एंजिन थंड करण्याचें (ठेवण्याचें) साधन,-यंत्र.

**Răd'ical,** *a.* (रॅ'डिकल्)—of, from, or going to the root; fundamental, inherent, essential; primary; thorough; (math.) of the root of a number or quantity; (bot.) of, springing direct from, the root or the main stem close to it. मुळापासूनचा; तळाला पोहोंचणारा, महत्त्वाचा; स्वाभाविक, धातुसिद्ध; निःशेष, पूर्ण; कारणात्मक, मूलक, मूलीय, मुळालाच फुटणारा. *n.* one desiring radical reforms; a word that is itself a root; quantity as root of another, radical sign; (chem.) element or atom, or group of these forming base of compound and remaining unaltered during compound's ordinary chemical changes. आमूलाग्र सुधारणा इच्छिणारा; असाधित किंवा सिद्ध शब्द; करणी, मूल; मूलमापक चिन्ह (√, ∛); मूलक. *Rad'calism, n.* radical politics. आमूलाग्र सुधारणावादी पक्षाचीं मतें,-तत्त्वें. *Radical heat,* जीवनाला आवश्यक उष्णता, जन्माची-स्वाभाविक-उष्णता. *R. sign,* मूलमापक चिन्ह (√, ∛, ∜). *Rad,* (colloq.) आमूलाग्र सुधारणावादी मनुष्य.

**Răd'icle,** *n.* (रॅ'डिकल्)—part of seed that develops into the root; root-like sub-division of nerve or vein. मूळचा मोड, बीज, अंकुर; मूळसदृश शाखा.

**Ra'dio,** *n.* (रे'डिओ)—wireless telegraphy and telephony; X-rays, Hertzian rays, and their applications. बिनतारी संदेशवाहक, बिनतारी दूरध्वनिक्षेपक यंत्र, रेडिओ; क्ष-किरण, त्यांचे उपचार. *v. t. & i.* to telegraph or broad-cast by wireless; photograph by X-rays; treat with radium. बिनतारी संदेश पाठविणें,-बातमी पसरविणें; क्ष-किरणांनीं छायाचित्र काढणें,-घेणें; रेडियम-धातूचे उपचार करणें. *R.-phare,* wireless signalling station. बिनतारी संदेश पाठविण्याचें ठिकाण. *R.-station,* wireless transmitting station. बिनतारी ध्वनिक्षेपक यंत्र असलेलें ठिकाण; बिनतारी संदेश ज्या ठिकाणाहून पाठवितात तें ठिकाण.

**Radio-,** (रेडिओ-)—of rays or radiation; of radium. किरणांचा, किरणकार्यकारी; रेडिअम्‌धातूचा, तीपासून निघणाऱ्या अदृश्य किरणांचा. *Radio-ac'tive,* (रेडिओ ॲ'क्टिव्ह्), exercising radiation; emitting invisible rays that penetrate opaque matter and produce electrical effects. किरणकार्यकारी, विवृद्ध किरणांमुळें कार्य करणारा, अदृश्य किरण बाहेर टाकणारा, क्ष-किरणविसर्जक. *R. activity, n. Ra'diograph, n.* an instrument recording sunshine; image on sensitive plate given by Rontgen rays. सूर्याची विसर्जनशक्ति मोजण्याचें यंत्र; किरणलेखक यंत्र; क्ष-किरणांनीं घेतलेला लेख,-प्रतिबिंब. *v. t.* to secure such image of. चा क्ष-किरण-लेख घेणें. *Radiom'eter, n.* instrument showing conversion of radiant energy into mechanical force. किरणभारदर्शक,-मापक यंत्र. *Radios'copy, n.* examination by Rontgen rays. क्ष-किरणांनीं केलेली परीक्षा,-तपासणी. *Radio-telegram,* बिनतारी संदेश.

**Răd'ish,** *n.* (रॅ'डिश्)—plant with fleshy pungent root eaten raw. मुळा. *Follicle of a radish.,* मुळ्याची शेंग.

**Ra'dium,** *n.* (रे'डिअम्)—a metal yielded by pitchblende and named from its radio-active power. 'रेडिअम्' नांवाची मूळधातु. (हिचा शोध १८९८ त लागला. हिच्यापासून अदृश्य किरण बाहेर पडतात व ते अपारदर्शक वस्तूंतून पलीकडे जातात).

**Ra'dius,** *n.* (रे'डिअस्)—(*pl* Ra'dii—रे'डिआय्) straight line from centre to circumference of circle or sphere; any of a set of spokes or other objects diverging from a point like radii of a circle; the thicker and shorter bone of the fore-arm; circular area as measured by its radius; (bot.) outer rim of composite flower-head. व्यासार्ध रेषा, त्रिज्या; त्रिज्येसारखी वस्तु, चाकाची आरी; मनगटाची कांब, मणिबंधास्थि; (वाटोळें) क्षेत्र; पुष्पकिरण, फुलाच्या देंठाची बाह्य कडा.

**Ră'dix,** *n.* (रॅडिक्स्)—(*pl.-ices,*-डिसीझ्), number or symbol used as basis of numeration scale (e. g. ten is the r. of decimal numeration & of common logarithms); source or origin of. संख्यामापनाची मूळ संख्या,-अंक,-चिन्ह; मूळ, आरंभ.

**Răff,** *n.* (रॅफ्)—riff-raff. निकृष्ट दर्जाचें,-हलकट, -लोक; कचरा, घाण. *Raff'ish, a.* of dissipated appearance; disreputable. घाणेरडा; हलकट, पाजी.

**Răff'ia,** *n.* (रॅ'फिआ)—a kind of palm; fibre from its leaves. एक जातीचा ताड; ताडपत्रांचा तंतु.

**Răff'le,** *n.* (रॅ'फल्)—lottery in which article is assigned by drawing lots or throw of dice. सोडतीचा एक प्रकार. *v. t. & i.* to sell by raffle; compete in raffle. सोडतीनें विकणें; सोडतींत घालणें, सोडत खेळणें.

**Răffle**, *n.* (रॅफल)—rubbish, refuse, lumber, debris. घाण, केरकचरा, अडगळ, कचऱ्याचा-मातीचा -ढीग.

**Răft**, *n.* (राफ्ट)—a collection of logs, casks, &c., fastened together in the water for transportation; flat floating structure of timber. तराफा; तराफा, तर, तरण. *v. t. & i. to transport on raft*; form into a *r.*; cross (water) on raft(s); work raft. तराफ्यावरून ने-आण करणें; (चा) तराफा करणें; तराफ्यानें जाणें; तराफा चालवणें,-हांकणें. *Raftsman*, worker on raft. तराफा चालवणारा.

**Ră'fter**, *n.* (राफ्टर्)—one of the sloping beams or pieces of timber of a roof. छपराचा वांसा. *v. t.* (*usu.* in p. p.) to provide with rafts; half-plough. वांसे मारणें,-बसविणें; पहिली,-अर्धी,-नांगरटी करणें.

**Răg**, *n.* (रॅग)—torn or frayed piece of woven material; remnant: (contempt.) flag or handkerchief or newspaper. चिंधी; अंश; शेष; निशाणी, हातरुमाल, वर्तमानपत्र. *In rags*, फाटका, फाटका तुटका; फाटके तुटके कपडे घातलेला, चिंध्या नेसलेला. *R.-baby*, doll made of rr. चिंध्यांची बाहुली. *R.-bag*, उपयोगी चिंध्या ठेवलेली पिशवी. *Ragtag, ragtag and bob-tail*, the riff-raff. खालच्या दर्जाचे लोक, हलकट-पाजी-लोक. *R.-time*, music with such syncopation as in negro melodies; (attrib.) farcical (as *a r.-t. army*). नीग्रो लोकांच्या गाण्यांतील तालसुरासारखें गाणें; प्रहसनात्मक, लुटुपुटूचें, नाटकी. *R.-wheel*, दांते असलेलें चक्र. *R.-wort*, yellow-flowered wild plant. पिवळ्या फुलांचें रानटी फुलझाड.

**Răg**, *n.* (रॅग)—kinds of hard coarse stone breaking in slabs, large coarse roofing-slate. पातळ कळपे,-फरशी,-पडणारा कठीण दगड; खरबरीत छपरी दगड.

**Răg**, *v. t. & i.* (रॅग)—(*sl.*) to scold; torment, tease: play rough jokes on; engage in rag. निर्भर्त्सना करणें; त्रास देणें, सतावणें, छळणें; दांडगाईनें थट्टामस्करी करणें; हमरीतुमरीवर येणें. *n.* (sl.) noisy disorderly conduct or scene; spree. गोंधळ, हमरी तुमरी, दांडगाई; धांगडधिंगा.

**Răg'amŭffin**, *n.* (रॅगमफिन्)—a ragged dirty fellow. हलकट, पाजी,-मनुष्य.

**Rāge**, *n.* (रेज्)—violent anger; a fit of this; object of widespread temporary popularity. संताप, क्रोध, रागाचा झपाटा, पिसें, छंद. *v. i.* to rave, to storm; to be angry, to be furious with anger. वादळणें, चवताळणें, अनर्थ किंवा कहर मांडणें, क्षुब्ध होणें, अति संतापणें. *Rage itself out*, (esp. of storm), cease raging. वादळ कमी होणें, थांबणें.

**Rägg'ĕd**, *a.* (रॅगिद)—rough with sharp or irregular points, shaggy, hanging in tufts; torn or frayed; wearing rags. ओबडधोबड, खरबरीत, फाटका; चिंध्या नेसलेला. *R. rhymes*, ओबडधोबड कविता,-गीतें. *R. robin*, a crimson-flowered wild plant. फिरमिजी रंगाच्या फुलांचें रानटी फुलझाड. *R. school*, free school for poor children. गरीब मुलांकरितां मोफत शिक्षणाची शाळा.

**Ragout'**, *n.* (रॅगू'द)—meat in small pieces stewed with vegetables and highly seasoned. मसाला घालून शिजविलेले मांसाचे लहान तुकडे,-मांस. *v. t.* to cook thus. अशा तऱ्हेनें मांस शिजविणें.

**Raid**, *n.* (रेड)—sudden incursion; a surprise visit by police. स्वारी; पोलिसांचा अचानक-एकदम-हल्ला. *v. t. & i.* to make a raid upon; make raid. हल्ला करणें, एकदम छापा घालणें. *Raid'er*, *n.* छापा घालणारा, स्वारी करणारा, हल्ला करणारा.

**Rail**, *n.* (रेल)—level or sloping bar; iron bar making part of the track of a railway or tramway. गज, कठडा; लोखंडी रस्ता. *v. t.* to furnish or enclose with rails; lay railway-route with rails; convey, travel, by rail. रेल्वेचे रूळ घालणें; आगगाडीनें ने-आण करणें.-जाणें. *off the rails*, disorganized, out of order, not working right. नादुरुस्त, बरोबर न चालणारा. *By r.*, by railway. रेल्वेनें. *Rails*, (pl. St. Exch.) railway shares. रेल्वेचे शेअर्स,-रोखे. *R.-chair*, iron-holder, attached to sleeper, in which railway rail rests. रेल्वेच्या रुळाचा लोखंडी आधार. *Rail'road*, (U. S.) railway, रेल्वे (मार्ग); *v. t. & i.* to transport or travel by rail, (colloq.) send or put through with great speed, रेल्वेनें (माल) पाठविणें;-ने आण,-प्रवास,-करणें, अतिशय जलदीनें पाठविणें. *Rail'way*, road laid with rails for the transit of trains with passengers and goods; railroad, esp. of those roads with light rails, as of street cars, or elevated or underground-railroads. आगगाड्यांचा रेल्वे-मार्ग.

**Rail**, *n.* (रेल्)—kinds of bird, (esp. land *r.*, water-*r.*). एक जातीचे पक्षी.

**Rail**, *v. i.* (रेल्)—to use abusive language (*at, against, upon*). शिव्या देणें, अपशब्द बोलणें.

**Rail'ing**, *n.* (रेलिंग)—a fence or barrier. कुंपण, कठडा.

**Raill'erў**, *n.* (रेलरि)—banter. विनोद, थट्टा, मस्करी.

**Raim'ent**, *n.* (रेमन्ट)—clothing, apparel. चिरगूट, वस्त्र.

**Rain**, *n.* (रेन्)—condensed moisture of atmosphere falling visibly in separate drops; (pl.) *the rains*, the rainy season; rain-like descent of falling liquid or solid particles or bodies. पाऊस; पर्जन्य, बरसात; पावसाळा, वर्षाऋतु; (पावसासारखा) वर्षाव, पाऊस. *v. t. & i.* send down rain; to fall or send down in showers, to pour down. पाऊस पडणें किंवा लागणें; वर्षाव होणें,-करणें, गळणें. *Rain or shine*, whether it rains or not. पाऊस पडो किंवा न पडो, पाऊस असो-नसो. (Naut.) *the Rains*, rainy region of Atlantic 4-10° N. lat. अटलांटिक महासागरांतील पावसाळी भाग (उ० ४ ते १०° अक्षांश). *R.-coat*, waterproof. पावसाळी अंगरखा. *R.-water*, सांठवलेलें पावसाळी (पावसाचें)

पाणी. *It never rains but it pours*, events usually happen several together. पुष्कळ गोष्टी बहुधा एकाच वेळीं घडून येतात. *It rains in*, पाऊस आंत येतो, गळतें होतें. *It has rained itself out*, *r.* has ceased. पाऊस खळला,-थांबला,-आहे.

**Rain'box**, *n.* (रे'नूबॉक्स)—theatre contrivance imitating sound of rain. (नाटकगृहांतील पावसाचा देखावा दाखविण्याची) पर्जन्य पेटिका.

**Rain'bow**, *n.* (रे'न्-बो)—arch of prismatic colours formed in rain or spray by the sun's rays. इंद्रधनुष्य. *a.* many-coloured. बहुरंगी, विविधरंगाचा. *All the colours of the rain-bow*, many colours. पुष्कळ रंग.

**Rain'dŏctor**, *n.* (रे'न्डॉक्टर्)—producer of rain by magic. मंत्राच्या सामर्थ्यानें पाऊस पाडणारा.

**Rain'fall**, *n.* (रे'न्-फॉल्)—quantity of rain that falls within a given area in given time. पर्जन्य, पाऊस.

**Rain'gauge**, *n.* (रे'न्-गेज्)—an instrument for measuring the quantity of rainfall. पाऊस मापण्याचें यंत्र, पर्जन्यमापक यंत्र.

**Rain'y̆**, *a.* (रे'नि)—in or on which rain falls; abounding with rain, showery. पावसाचा; वर्षावाचा; पावसाळी.

**Raise**, *v. t.* (रेझ्)—(with *up*) to set upright; to make stand up; to rouse; to build up; to breed; to utter; to put or take into higher position; to increase the amount or heighten the level of; to levy, to collect, to procure, to extract from earth. उभारणें; उठवणें, उभा करणें, वर उचलणें; जागृत करणें; बांधणें, रचणें; उत्पन्न करणें; उच्चारणें; पुढें आणणें, मोठेपणास चढवणें; दर वाढवणें, उंच करणें; गोळा करणें, जमवणें, मिळवणें; जमिनींतून खणून काढणें, पिकविणें, पैदा,-उत्पन्न,-करणें. *n.* (U. S.) increase in wages, a rise. पगारांत,-रोजमुऱ्यांत,-वाढ. वेतनवाढ. *To raise the wind*, (fig.) procure money for some purpose. विशिष्ट हेतूकरितां पैसा उभा करणें, -मिळविणें,-गोळा करणें; रोकड पैसा उभारणें. *To r. a dust*, cause turmoil, obscure the truth. गोंधळ घालणें, सत्यापलाप करणें, खरें,-वस्तुस्थिति,-लपविणें *To r. a question*, प्रश्न (विचाराकरितां) उपस्थित करणें. *To r. one's voice*, speak. बोलणें, तोंड उघडणें *To r. one's hat*, bow. वंदन,-रामराम,-नमस्कार करणें. *To r. one's glass to*, drink health of. च्या अभीष्टचिंतनार्थ पिणें. *R.* one's *eyes*, look upwards. वर दृष्टि करून पाहणें. *R.* one's *eyebrows*, भांबावल्यासारखें,-भ्याल्यासारखें,-पाहणें. *R. Cain, hell, the devil, the mischief*, make disturbance. उपद्रव, त्रास,-उत्पन्न करणें. *R. cloth*, make nap on it. कपड्यावर फूल पाडणें. *R. colour* (in dyeing), रंग अधिक तकतकीत करणें. *R. money*, रक्कम उभी,-गोळा,-करणें.

**Rais'in**, *n.* (रे'झन्)—a dried grape. मनूका, बेदाणा.

**Raison d'etre**, *n.* (रे'झाँडे'टर्)—what accounts for or justifies or has caused a thing's existence. (कोणत्याहि गोष्टीचें) सयुक्तिक कारण, सयुक्तिक उपपत्ति, हेतु. [F]

**Rake**, *n.* (रेक्)—pole with comb-like cross-bar for drawing hay, &c. together or smoothing loose soil; dissipated or immoral man; raking position or build; croupier's money-raking implement. दांताळें; व्यसनी किंवा फंदी मनुष्य; कल, उतार; जुगाऱ्याचें पैसे गोळा करण्याचें हत्यार,-साधन, पैसे वर-खालीं करण्याचें साधन. *v. t.* & *i.* to use rake, collect, draw together, as with rake; to draw together as with a rake; to ransack, to search over; to give backward inclination to; (of ship) to project at upper part of bow or stern; (of mast, funnel) incline towards stern or rear; (naut.) send shot along (ship) from stern to stern. दांताळ्यानें साफ करणें,-सपाट करणें, दांताळें चालविणें; दांताळ्यानें गोळा करणें; बारकाईनें शोधणें, चाळणें; मागच्या बाजूला कलणें; जहाजाचा किंवा नाळीचा किंवा सुकाणूचा वरचा भाग पुढें येणें; कलणें, वळणें, नाळीकडून सुकाणाकडे तोफा सोडणें.

**Ra'kish**, *a.* (रे'किश्)—of dissolute appearance or manners, fast; (of ship) smart, seeming to be built for speed. व्यसनी, फंदी, सोदा, इष्कीबाज; जलद चालीचें, उमदें, (जहाज).

**Răll'i cär (t)**, *n.* (रॅ'लि-कार्,-र्ट)—light two-wheeled driving-trap for four. दुचाकी हलकी गाडी. (*Ralli*, first purchaser, 1885).

**Răll'y̆**, *v. t.* & *i.* (रॅ'लि)—to bring or come together for a united effort; revive by effort of will; throw off illness; (of prices) recover from depression; to banter, to chaff. एकत्र गोळा करणें किंवा होणें; जमविणें, जमवाजमव करणें; इच्छाशक्तीनें सावरणें,-थावरणें; (प्रकृति) ताळ्यावर येणें, सुधारणें; (बाजारभाव) सावरणें, चढणें, पूर्वस्थितीवर येणें; उपहास करणें, टर करणें. *n.* coming together in support of a cause, &c.; act of rallying, recovery of energy or spirit; (in tennis, etc.) strokes quickly exchanged. एखाद्या गोष्टीकरितां एकत्र होणें; जमवाजमाव; प्रकृति सुधारणें,-पूर्ववत होणें; झपाट्याचा खेळ (टेनिसचा वगैरे).

**Răm**, *n.* (रॅम्)—an uncastrated male sheep; thing used for ramming, e. g. battering ram; ship's charging beak or ship having one; pile-driving or hydraulic or pumping machine or parts of them; (Ram) zodiacal sign Aries. मेंढा, एडका; (किल्ल्याच्या भिंती फोडण्याकरितां) झुलता घण; (लढाऊ जहाजाची) नाळेकडची घणासारखी चोंच, घणासारख्या नाळेचें लढाऊ जहाज; ठांसणी बंदुक, ठोकणी, पाणी वर खेचण्याचें यंत्र,-पंप,-पंपाचे भाग: मेष (राशि). *v. t.* to beat firm; squeeze tight; pack closely; butt: (of ship) strike with ram; impress by repetition. ठोकणें, घट्ट ठांसणें; घट्ट आवळणें; आवळून बांधणें, गच्च भरणें; ठांसणी करणें; घणासारख्या नाळीनें ठोकर देणें; ठाकून

ठोकून पुनः पुन्हां सांगून ठाम बिंबविणें. *Ram-rod,* for ramming home charge of muzzle-loader. बंदुक ठांसण्याचा गज. *Ram'mer, n.* (esp.) block of wood for ramming soil. मोगरा, ठोकणी, चोपणी, चोपणें, धुमस, राजमोगरा.

Ră'mal, *a.* (रें'मल)—(bot.) of, proceeding from, a branch. फांदीचा, फांदीपासून निघणारा. [L. *ramus,* branch]

Răm'ble, *n.* (रें'म्बल)—to walk without a definite route; to talk in an irrelevant way. भटकणें, हिंडणें; (बोलण्यांत) वाहावत जाणें, भरकटणें, वहावणें. *n.* an excursion or trip in which one wanders from place to place. रपेट, सहल.

Răm'bler, *n.* (रें'म्ब्लर्)—(esp.) kinds of climbing rose. (कांहीं जातींचे) वेल-गुलाब.

Răm'bling, *a.* (रें'म्ब्लिंग)—(esp. of street etc.) irregularly arranged, straggling; peripatetic, wandering; disconnected, incoherent. अव्यवस्थित रचनेचा, वेडावाकडा; इक्या तशा वर चढणाऱ्या (वेली); भटकणारा, हिंडणारा; असंबद्ध.

Răm'bŭnctious, *a.* (रें'म्बंक्शस्)—cantankerous, unruly. भांडखोर, चिडखोर, बंडखोर.

Răm'ify̆, *v. t. & i.* (रें'मिफाय्)—to form branches or subdivisions; to develop into a complicated system, to branch out. विभाग पाडणें; निरनिराळे अनेक फांटे फुटणें, शाखा फुटणें. *Ramifica'tion, n.* शाखा, फाटा, धुमारा.

Ramōse', *a.* (रॅमो'स)—(Bot.) branched, branching. फांदे-फांटे-फुटलेला, शाखा फुटणारा.

Rămp, *v. i. & t.* (रॅम्)—to stand on hind legs, with forepaws in air; to assume or be in threatening posture; to ascend or descend to different level; storm, rush about. मागील दोन पायांवर उभा राहणें; झडप घालण्याच्या तयारीनें (उभें) राहणें (सिंहाचें इ०); (भिंतीचें) उंच सखल असणें; अंगावर चालून जाणें, गुरगुरणें. *n.* inclined plane joining two levels of earthwork or wall; upward bend in stair-rail. दोन पातळींमधील उतार, जडण, दोन बांधकामांना जोडणारी पातळी; जिन्याच्या उंच होत जाणाऱ्या कठड्याचें वांकण. 2. *n.* (sl.) attempt to extort payment of fictitious debt; levying of exorbitant prices. भरमसाट कर्जाच्या-येण्याच्या-वसुलीचा प्रयत्न करणें; भरमसाट दर वाढविणें.

Rămpāge', *v. i.* (रॅम्पें'ज)—(joc.) rage, storm, rush about. खवळणें, रागावणें, गुरगुरणें.-*ous, a.*

Răm'pant, *a.* (रॅं'म्पन्ट्)—(*Herald.*) ramping; arrant; rank, aggressive, unchecked, unrestrained; having one abutment higher, climbing. मागल्या पायावर उभा, पुढें आलेला; भिलंदर, इरसाल; प्रचलित, माजलेला, जबर, मानाचा; चढता.

Rămp'ărt, *n.* (रॅम्पा'र्ट्)—defensive mound of earth; (*fig.*) defence, protection. तट, किल्ल्याची भिंत; संरक्षण, रक्षणाचें साधन. *v. t.* to fortify or protect (as) with *r.* तटबंदी करणें.

Răn'cĭd, *a.* (रॅ'न्-सिड्)—smelling or tasting like rank stale fat, strong-scented. खवट, वाशेरा. *Rancid'ity, n.*

Rănc'our, *n.* (रैंकर्)—deep-seated enmity, malignant hate; bitterness, malice. हाडवैर, दीर्घद्वेष; घुस्स, द्रोह. *Ranc'orous, a.* दीर्घद्वेष करणारा, हाडवैराचा, खुनशी.

Rănd, *n.* (रॅन्ड्)—strip of leather between heel and shoe or boot; (S.-Afr.) highlands on either side of river-valley. बुटाचा आंतील पातळ तळ,-तळवा; सडा, देश. *The Rand,* जोहान्सबर्ग.

Rănd̆ăn', *n.* (रॅन्डॅ'न्)—1. a boat for one sculler and two oarsmen. तिघांनीं बसून जाण्यासारखी होडी. 2. *n.* spree (esp *on the r.*). ख्यालीखुशाली, चैन, नाचरंग, झिंगून दंगामस्ती करणें.

Răn'dom, *n.* (रॅ'न्डम्)—*At random,* haphazard, without aim or purpose. संधानावांचून, वाटेल तसा, बिनहिशेबी, यदृच्छेनें होईल तसा. *a.* made or done at random; (of masonry) with stones of irregular size or shape. नेम न धरतां मारलेला; भरमसाट; ओबडधोबड दगडांचा, वेडावांकडा. *To talk at random,* बरळणें, भरकटणें, हवें तें बोलणें.

Răn'dy̆, *a.* (रॅं'न्डि)—having a rude aggressive manner; loud-tongued; (of cattle etc.) wild, restive, lustful. गांवढळ, जंगली; मोठ्यानें वटवट-बडबड-करणारा; रानटी, ओढाळ (गुरूं); ऐषआरामी, चैनी, व्यसनी. *n.* loud-tongued, coarse-mannered woman; a scold. बडबड,-वटवट,-करणारी आडदांड स्त्री; अपशब्द बोलणारी स्त्री.

Rang, *p. t.* of Ring.

Rănge, *n.* (रेंज्)—a row, line, tier, or series of things; piece of ground with targets for shooting; sphere; scope, compass; register; distance passed over by gun or projectile; cooking fireplace; stretch of grazing or hunting ground. ओळ, रांग; निशाणबाजी करण्याची जागा; टप्पा, पल्ला, पोहोंच, आटोका, मर्यादा; नोंदणी; मारा, टप्पा; चुलींची रांग; मोठें कुरण, शिकारीची जागा. *v. t. & i.* to place or arrange in a row or ranks; to extend, to reach; to vary between limits; to rove, to wander; sail along coast or about sea; throw projectile over. रांगेनें किंवा व्यवस्थित लावणें; सरकणें, पसरणें; पोंचणें; कमीजास्ती होणें; भटकणें, हिंडणें, फिरणें, चालणें; कडेनें जाणें; विशिष्ट अंतरापर्यंत मारा करणें. *R.-finder,* instrument for finding distance of object to be shot at. निशाणाचें अंतर मोजण्याचें यंत्र. *Of a long range,* पल्लेदार, लांब पल्ल्याची (बंदूक). *Ranging fancy,* inconstant affections. चंचल प्रेम,-स्नेह. *To range oneself,* take up definite position in society, settle down, e. g. by marrying. समाजांत आपलें स्थान मिळविणें, स्थायिक

होणें. *Ranges with the great writers,* (ranks or finds place *with* or *among*). थोर लेखकांच्या मालिकेंत त्याला स्थान आहे, थोर लेखकांत मोडतो. *Out of range,* आटोक्याबाहेर.

**Rā'nger,** *n.* (रे'न्जर्)—one who ranges; the keeper of a royal park; (*pl.*) mounted force; senior girl-guide. भटकणारा; जंगलखात्याचा अधिकारी; घोडदळ, घोडेस्वार; मुलींचें वरिष्ठ (बालवीर) पथक.

**Rā'ngy,** *a.* (रे'न्जि)—(colloq.) (U. S.) capable of ranging; of long slender form. रांग-व्यवस्थित-लावण्यालायक; सडपातळ, बारीक व लांबट आकाराचें.

**Rănk,** *n.* (रँक्)—row, queue; soldiers in single line abreast; (*pl.*) common soldiers; distinct social class; station; place in a scale. ओळ, रांग; लष्करी शिपायांची रांग; (अने०) सामान्य लष्करी शिपायांचा वर्ग; विशेष दर्जा; स्थिति; वर्गांतील अनुक्रम, स्थान, जागा. *a.* too luxuriant; coarse; loathsome, disgusting; flagrant, gross. उफाड्याचा, जोमदार, कसदार, फार सुपीक; साधा, कमी दर्जाचा; किळसवाणा; ठळक, कमालीचा, निखालस. *v. t. & i.* to arrange in rank; assign a rank to; have relative rank; (Mil.) march past or off. रांगेनें उभें करणें,-बसविणें; योग्य स्थान असणें,-होणें; वर्गवारी,-प्रत,-लावणें; कूच करणें. *The ranks* or *the rank and file,* common soldiers, lower classes. सैन्यांतील खालच्या दर्जाचे सैनिक,-शिपाई; खालच्या दर्जाचे लोक. *To rise from the rr.,* सामान्य दर्जाच्या शिपायापासून वरिष्ठ दर्जाला चढणें, (सामान्य मनुष्य) खालून वर चढणें. *To keep r., break r.,* रांगेत राहणें, रांग मोडणें. *Persons of r.,* members of nobility. सरदार लोक. *R. and fashion,* high society. उच्च समाज, बडे लोक. *Rank'ly, adv.*; *Rank'ness, n.*

**Răn'kle,** *v. i.* (रँ'कल्)—to gnaw at the heart; to cause recurring pangs. मन खाणें; सलणें, डांचणें, टोंचणें.

**Răn'săck,** *v. t.* (रँ'न्-सॅक्)—to search the recesses of, to search thoroughly; to pillage. धुंडाळणें; लुटणें, लुबाडणें. [ ON *rann,* house; *saekja,* seek ]

**Răn'som,** *n.* (रँ'न्-सम्)—redeeming of a captive; money or other consideration paid for pardon; blackmail, extortion of money. पैसे भरून कैद्याची मुक्तता; कैद्याच्या सुटकेकारितां दिलेला पैसा, खंडणी, दंड, भीति घालून पैसा उकळणें. *v. t.* to secure release of by paying ransom; redeem; expiate. (खंडणी भरून) सुटका करणें, सोडवणें, बंधमुक्त करणें; सुटका करणें; प्रायश्चित्त देणें. *To hold one to r.,* ओलीस ठेवून घेणें, दंड भरून सुटका करण्यासाठीं अडवून ठेवणें. *Worth a king's r,* of immense value. बहुमोल, अतिशय महत्त्वाचें,-किंमतीचें. *R.-bill,-bond,* undertaking, esp. on part of captured ship, to pay *r.* खंडणी,-दंड,-देण्याचा लेखी करार.

**Rănt,** *v. i. & t.* (रॅन्ट्)—to use bombastic language; recite theatrically; preach noisily. शब्दावडंबरानें बोलणें; नाटकी पद्धतीनें म्हणणें; बडबड लावणें, बडबड करून शिकविणें. *n.* piece of ranting, tirade; empty turgid talk. वटवट, शब्दावडंबर, बडबड, अधिक्षेप, निरर्थक आवेशयुक्त भाषण. *Ran'ter, n.* noisy preacher. आवेशयुक्त भाषण करणारा (मत) प्रचारक.

**Ranŭnc'ūlus,** *n.* (रॅनं'क्युलस्)—(pl.-*luses,-li*), kinds of plant including butter-cup. एक जातीची वनस्पति.

**Răp,** *n.* (रॅप्)—a smart slight blow; sound of this, esp. on door, a knock, esp. on door. रपाटा, तडाका; थाप; ठोका, आवाज. *v. t. & i.* to deal a rap to; to make the sound of a rap; to carry away. तडाखा,-सपाटा मारणें, ठोकणें; थाप मारणें; पळवणें. *A rap on the knuckles,* punishment inflicted on child; reproof. (मुलांच्या हाताच्या) पेरावर (शिक्षा म्हणून) तडाखा मारणें, रपाटा मारणें; रागें भरणें; कान उपटणें. *To rap out* (oath, pun, etc.), utter abruptly or on the spur of the moment. आवेशानें उद्गारणें, ठोकून देणें, ऐन वेळीं बोलणें; (of spirits) ठोक्यांनीं-आवाजानें-संदेश देणें.

**Răp,** *n.* (रॅप्)—a skein of 120 yds of yarn. १२० वार लांब सुताची लडी.

**Răp,** *n.* (रॅप्)—an atom, the least bit (*don't care a r*). तसू, अणु, लवमात्र, किंचित्.

**Rapā'cious,** *a.* (रपे'शस्)—grasping, greedy of plunder, avaricious; extortionate; predatory. अधाशी, लोभी; बळजबरीनें पैसे उकळणारा; लुटारू. *Rapa'city, n.*

**Rāpe,** *n.* (रेप्)—carrying off by force; violation of chastity. जबरदस्ती, लूट, अपहार, जबरी, जुलमानें घेऊन जाणें; बलात्काराचा स्त्रीसंभोग; बलात्कार. *v. t.* to carry off by force; violate chastity of (woman), ravish. लुटणें, जबरदस्तीनें नेणें; बलात्कार करणें, गहजब करणें, अब्रू घेणें, जबरी करणें.

**Rāpe,** *n.* (रेप्)—plant used as food for sheep; plant with oil-yielding seed; refuse of grapes; vessel used in vinegar-making; any of six administrative divisions of Sussex. मेंढ्यामेंढ्यांना खाण्यासारखी वनस्पति; शिरस; द्राक्षांचा चोथा; दारू तयार करण्याचें भांडें; ससेक्स् परगण्याच्या पोटविभागापैकीं एक.

**Ră'pid,** *a.* (रॅ'पिड्)—speedy, swift; descending, steep. जलद, शीघ्र; उभ्या उताराचा, सुळक्यासारखा खोल. *n.* steep descent in river-bed causing swift current. नदीचा खोल व जलद प्रवाह, शीघ्र प्रवाहाचें नदींतील ठिकाण. *Rap'idly, adv.* जलदीनें, घाईनें, लगबगीनें.

**Răpĭd'ity,** *n.* (रॅपि'डिटि)—swiftness, quickness of motions, celerity. जलदी, त्वरा, शीघ्रता, जोर, वेग.

**Rā'pier,** *n.* (रे'पिअर्)—a light slender sword for thrusting only, small-sword. खुपसण्याची चौधारी तरवार, खांडा. *R. thrust,* (*fig.*) (of delicate or witty repartee). हजीरजबाबीचा,-सफाईदार,-टोमणा-उत्तर.

Răp'ine, *n.* (रॅपिन्)—plundering. लुटणें, लुटालूट.

Rappee', *n.* (रॅपी')—coarse kind of snuff. एक जातीची तपकीर.

Rapport', *n.* (रॅपो'र्ट्)—communication, relationship, connexion. संबंध, एकतान. [ F ]

Răpprŏche'ment, *n.* (रॅप्रॅ'श्‌-मां)—re-establishment or recommencement of harmonious relations (between states). संगनमताचा किंवा सलोख्याचा पुनरारंभ, समेट, सलोखा, पुनरैक्य.

Răpscăll'ion, *n.* (रॅप्स्कॅ'ल्यन्)—a rascal, scamp, rogue. लुच्चा, उडाणटप्पू, शठ, लबाड.

Răpt, *a.* (रॅप्ट्)—carried away in spirit; absorbed; enraptured. तल्लीन, तन्मय, गढून गेलेला; विचारमग्न; आनंदमग्न. *Listen with rapt attention*, तल्लीन होऊन, -एकाग्रतेनें,-ऐकणें,-लक्ष देणें.

Răptor'ial, *a.* (रॅप्टॉ'अरिअल्)—predatory. लुटारू, अधाशी; (zool.) of the *Raptores*, an order of birds of prey. हिंस्र पक्ष्यांचा.

Răp'ture, *n.* (रॅ'प्चर्)—ecstatic delight, extreme joy or pleasure, ecstacy. अत्यानंद, आल्हाद. *To be in, go into, rr.* रंगांत येऊन बोलणें, खुशींत येणें. *Rap'turous, a.*

Rār'a ā'vis, *n.* (रेअ'रॅ ए'व्हिस्)—kind of person or thing rarely met with. क्वचित् मिळणारा-दिसणारा-मनुष्य, वस्तु. [ L, = rare bird ]

Rāre, *a.* (रेअर्)—thin, not dense; scarce, uncommon, seldom occurring, of uncommon excellence, remarkably good; (U. S.) (of meat) underdone. पातळ, विरळ, सूक्ष्म; विरळा, दुर्लभ; सर्वोत्कृष्ट, सरस, नामी, अपूर्व, अर्धवट; शिजविलेलें, अर्धकच्चें (मांस). *Rare'ness, n.*

Rār'efȳ, *v. t. & i.* (रे'अरिफाय्)—to lessen the density of (air, etc.); refine; make (idea) subtle; become less dense. विरळ करणें,-होणें, पातळ करणें; शुद्ध करणें; अधिक सूक्ष्म करणें; विरल होणें. *Rarefac'tion, n.* पातळ करणें, विरलीभवन. *Rarefica'tion, n., Rar'efactive, a.*

Rāre'lȳ, *adv.* (रे'अर्-लि)—in a rare degree or manner, seldom, not often. विरळा, क्वचितच.

Rār'itȳ, *n.* (रे'अरिटि)—thinness; rareness, uncommonness; a rare thing. विरळपणा; अपूर्वता; अपूर्व वस्तु.

Rä'scal, *n.* (रा'स्कल्)—rogue, knave. लबाड, शठ, लुच्चा, हरामी.*-dom, Rascal'ity, nn., Ra'scally, a.* लुच्चा, पाजी, लुच्चेगिरीचा, सोदेपणाचा.

Răsh, *n.* (रॅश्)—skin eruption in spots or patches. त्वचेवरील पुरळ. *a.* hasty, impetuous, overbold; reckless. उतावीळ; फाजील धीट; अविचारी, अदूरदर्शी. *Rash'ly, adv., Rash'ness, n.* अविचार, उतावळेपणा, साहस.

Răsh'er, *n.* (रॅशर्)—thin slice of bacon or ham. मांसाचा पातळसा तुकडा.

Räsp, *n.* (रास्प्)—coarse file with raised teeth. कानस, कानशी, किसणी. *v. t. & i.* to scrape with a rasp; scrape roughly; grate upon, irritate (person); make grating sound. कानशीनें घासणें; किसणें, तासणें, खरडणें; संताप आणणें, लागणें, झोंबणें; कर्कश आवाज करणें.

Ras'patory, *n.* (रा'स्पटरि)—rasp used in surgery. (शस्त्रवैद्याचें) घर्षणयंत्र, कानस, घर्षणी.

Ra'spberry, *n.* (रा'झ्बरि)—(garden shrub with) red or yellow fruit resembling raspberry. एक प्रकारचें तांबडें किंवा पिवळें फळ, त्याचें फळझाड.

Răt, *n.* (रॅट्)—kinds of rodent resembling but larger than the mouse; a person who deserts his party or his union. मोठा उंदीर, घूस; (अडचणीच्या वेळीं) स्वतःचा पक्ष सोडणारा, फुटून निघणारा, कामगारसंघांतून फुटून निघणारा, संपांत सामील न होणारा, संपवाल्याच्या जागीं काम करणारा. *v. i.* to hurt or kill rats; (Pol.) desert one's party. उंदीर घुशी-पकडणें,-ठार मारणें; स्वपक्षत्याग करणें. *To smell a rat*, have suspicions. शंका,-संशय-येणें, -वाटणें; वहीम येणें, (चा) वास येणें. *Like a drowned rat*, चिंब भिजलेला मनुष्य. *Rats!*, (*sl.*) nonsense! incredible! मूर्ख कुठला! अबब! *R.-catcher*, उंदीर पकडणारा, उंदीरमान्या; शिकारीचा (नवीन तऱ्हेचा) पोषाख. *Rat'stane, r.*-poison (now only in lit. fig. use). उंदीर मारण्याचें औषध. *Rat's-tail*, उंदराच्या शेंपटीच्या आकाराची वस्तु (उदा. कानस). *Rat'tail*, घोड्याची चिनकेसांची शेपटी, अशा शेंपटीचा घोडा. *R.-trap*, (उंदराचा) सांपळा, पिंजरा, चाप; दुचाकीचा दांताळ लोखंडी पायडा. *Ratt'y, a.* चिडखोर.

Rā'ta, *n.* (रें'टा)—large handsome New Zealand tree with crimson flower and hard red wood न्यूझीलंडमधील एक सुंदर झाड.

Rătafi'a,-fee', *n.* (रॅटफी'आ,-फी')—liqueur flavoured with almonds, etc.; biscuit so flavoured; kind of cherry. एक प्रकारची बदामी चवीची दारू;-बिस्किट एक जातीचें फळ.

Rătaplăn', *n. & v. t. & i.* (रॅटप्लॅ'न्)—(make drumming sound. पडघम किंवा ढोल यांचा आवाज (करणें); ढोलासारखा आवाज (करणें).

Răch'ĕt, Rătch, *nn.* (रॅ'चिट्, रॅच्)—set of teeth in edge of bar or wheel with catch allowing motion in one direction only; (also *r.-wheel*) wheel with rim so toothed. दांतांची,-दांतवाली,-पट्टी; लंबकावरील धरसोडीचें चक्र; कुत्रेंवालें (दांतवालें) चक्र.

Rāte, *n.* (रेट्)—statement of numerical proportion between two sets of things; the standard or way of reckoning; (measure of) value, tariff charge, cost, relative speed; assessment levied by local authorities. प्रमाण, मान; धारण, भाव, दर; मोल, भाडें, भाड्याचा दर; किंमत; चाल, प्रमाण, प्रकार; पट्टी, महसूल, भाडें. *v. t. & i.* to estimate worth or value of; to consider, to regard *as*; to subject to

payment of a local rate; (Naut.) to class under a certain rating. दर किंवा किंमत ठरविणें, लेखणें, गणना करणें; कर बसविणें,-व्यावयास लावणें; (उतारूंचें) वर्गीकरण करणें. *Going at the rate of six miles an hour*, ताशीं सहा मैलांच्या वेगानें जाणारा. *Death-rate* मृत्यूचें प्रमाण. *R. of interest*, व्याजाचा दर. *At that r.*, (colloq.) if this is a fair specimen, if this assumption is true. हें खरें असेल तर, अशा रीतीनें. *At any r.*, कसेंहि असलें तरी, कांहीं झालें तरी. *Rate-payer*, person liable to pay local rates. कर भरणारा, पट्टी भरणारा इसम. *To rate up*, (विम्याचा) नेहमीपेक्षां अधिक हप्ता बसविणें.

**Rāte**, *v. t. & i.* (रेट्)—to scold angrily; storm *at*. खरडपट्टी काढणें, कानउघाडणी करणें; घसरा करणें.

**Rā'teable**, *a.* (रे'टेबल्)—liable to payment of municipal rates. (स्थानिक) कर बसविण्यालायक,-योग्य, करास पात्र.-*ability, n.*

**Ra'tel**, *n.* (रा'टल्)—S.-African carnivorous quadruped. एक मांसभक्षक पशु.

**Rā'the**, *a.* (रेद्)—(arch.) coming or blooming early. नेहमींपेक्षां लवकर येणारा,-फुलणारा.

**Rā'ther**, *adv.* (रा'दर्)—more truly; to a greater extent; somewhat; for choice; sooner; (colloq. in answer) assuredly, most emphatically. अगदीं खरें सांगावयाचें म्हटलें तर; बऱ्याच अंशीं, पुष्कळ अंशीं; अधिक, जास्ती; कांहींसा; पसंतीनें; लवकरच; खात्रीनें, खचित.

**Rătificā'tion**, *n.* (रॅटिफिके'शन्)—confirmation. मंजुरी, संमति, अनुमति, कबुली.

**Răt'ify**, *v. t.* (रॅ'टि फाय्)—to confirm or accept by signature or other formality. (सही करून किंवा संमति देऊन) कायम किंवा मंजूर करणें.

**Rā'ting**, *n.* (रे'टिंग)—amount fixed as local or municipal rate; (Naut.) person's position or class in ship's books, (collect.) all persons of a particular rating; tonnage-class of racing-yacht. स्थानिक कराची (ठरीव) रक्कम; उतारूंचा (गलबतावरील) वर्ग, प्रत्येक वर्गांतील सर्व उतारू; शर्यत नौकांचें टनी वजनाप्रमाणें वर्गीकरण.

**Rā'ting**, *n.* (रे'टिंग)—angry scolding. खरडपट्टी, रागानें कानउघाडणी करणें.

**Rā'tiō**, *n.* (रे'शिओ)—(*pl.-os*), the relation or proportion of one thing to another. प्रमाण, परिमाण, गुणोत्तर, मान, दर. *are in the r. of two to three or 2:3*, दोहोंस तीन, २:३ या प्रमाणांत आहेत. *The ratios 1:5 & 20:100 are the same*, १:५ व २०:१०० हीं गुणोत्तरें सारखीं (एकच) आहेत.

**Rătiŏ'cĭnāte**, *v. i.* (रॅटिऑ'सिनेट्)—to argue, to reason formally; to use syllogisms. युक्तिवाद करणें; उपपत्ति सांगणें; तर्कपद्धतीनें विचार करणें.-*tion, n.* तर्कपद्धती. *Ratio'cinator, n*·;-*tive, a.*

**Ration**, *n.* (रे'शन्. रॅ'शन्)—fixed daily allowance of food served out, (*pl.*) provisions. रतीब, शेर, शिधा, अन्न. *v. t.* to limit (person, food) to rations. अन्नसामुग्री नियमित करणें,-वांटून देणें.

**Ră'tional**, *a.* (रॅ'शनल्)—endowed with reason, able to reason; agreeable to reason; sensible; sane; moderate; of or based on reasoning; (Math. of quantity or ratio) expressible without radical signs (opp. surd). तर्कज्ञ; बुद्धिविशिष्ट, विचारवान्, सुज्ञ; शाहाणा; माफक; सयुक्तिक; अकरणिगत. *n.* (*pl.*) rational dress. युक्त पोषाख. *Has r. leanings in religion*, has doubts about the truth of revelation, the possibility of miracles, etc. त्याची धर्मविषयीं बुद्धिप्रामाण्यता आहे, सयुक्तिक श्रद्धा. *R. function*, अकरणीगत फल. *R. creature*, बुद्धिविशिष्ट प्राणी. *Ra'tionally, adv.* तर्कशक्तीनें, बुद्धीनें, समंजसपणानें. *Rational'ity, n.* बुद्धिविशिष्टता, तर्कशक्ति, विवेक, समंजसपणा.

**Rationā'lé**, *n.* (रॅशने'लि)—fundamental reason or logical basis of. उपपत्ति, कार्यकारणपरंपरा, आधार, प्रमाण.

**Ră'tionalism**, *n.* (रॅ'शनॅलिझम्)—practice of explaining the supernatural in religion in a way consonant with reason, or of treating reason as the ultimate authority in religion as elsewhere; theory that reason is the foundation of certainty in knowledge. (धर्माच्या बाबतींत) बुद्धिप्रामाण्यवाद, बुद्धिवाद; (ज्ञान हें बुद्धिमूलक आहे असा) बुद्धिमूलक ज्ञानवाद. *Ra'tionalist, n. & a.* बुद्धिप्रामाण्यवादी, बुद्धिवादी.-*istic, a.* बुद्धिवादाचा, बुद्धिवादात्मक.

**Ră'tionalize**, *v. t. & i.* (रॅ'शनलाइझ्)—to bring into conformity with reason; be or act as a rationalist; (Math.) clear from surds; (Econ.) reform (an industry) by making production balance consumption, and by co-operation of rival producers and of capital and labour. बुद्धिवादाचा करणें; बुद्धिवादी करणें, बुद्धीला पटेलसें करणें; बुद्धीप्रामाण्यवादी असणें; अकरणीरूप देणें; (मालाच्या) उठावाइतकी पैदास; प्रतिस्पर्धी धंदेवाल्यामध्यें संघटना, भांडवल व मजूर यांची संघटना करून उद्योगधंद्यांची सुधारणा करणें.-*zation, n.* (esp.) cooperative and scientific organization in industry. उद्योगधंद्यांत सहकारी तत्त्व आणि शास्त्रीय पद्धति आणणें.

**Răt'lin** (e),-ling, (रॅटलिन्,-लिंग)—(usu. pl.) small line (s) fastened across ship's shrouds like ladder-rungs. (डोलकाठीच्या दोरखंडांना बांधलेली) आडवी दोरी, (या शिडीच्या पायऱ्यांप्रमाणें असतात).

**Ratoon'**, *n. & v. i.* (रटून्)—(send up) new shoot springing from sugar-cane root after cropping. (पहिल्या वर्षाच्या कापणीनंतरचा) उंसाचा खोडवा, खडवा (फुटणें).

**Rattăn'**, *n.* (रटॅ'न्)—a palm with long thin many-jointed stems; cane of this. वेताचें झाड, वेताची काठी, वेत, छडी.

**Ratt'en,** *v. t.* (रॅटन्)—to molest (workman or employer) by abstracting or injuring tools or machinery. (संपाच्या वेळीं हत्यारें काढून घेऊन किंवा यंत्राची नासधूस करून) मजुराला किंवा कारखानदाराला त्रास देणें,-सतावणें.

**Răt'tle,** *v. i. & t.* (रॅटल्)—to give out rapid succession of short sharp sounds; to cause such sounds by shaking something; move or fall with rattling noise; make move quickly; (sl.) shake nerves of, hustle, frighten; talk in lively thoughtless way (often *on, away, along*); to say or recite rapidly. (गाडी) खडखडणें, घरघरणें, (ढग) गडगडणें, (वीज) कडकडणें, खडखड वाजविणें,-आवाज करणें; घडघडत जाणें किंवा पडणें; जलदीनें-झपाट्यानें चालविणें,-जाणें; गर्भगळीत करणें, धांदल उडविणें, भिवविणें; बडबडत सुटणें, लवलव घोलणें, भरभर-घाईनें-किंवा पाठ म्हणणें, भडाभड बोलणें, *Rattling,* (part.) brisk, vigorous; remarkably (*good*). जोराचा, सोसाट्याचा; अतिशय, फारच (चांगलें). *n.* an instrument or play-thing made to rattle; set of horny rings in rattle-snake's tail; rattling sound; incessant talker; kinds of plant with seeds that rattle in their cases when ripe; empty chatter, trivial talk. खुळखुळा, खुळखुळी काठी; खडखड्या नागाच्या शेंपटीवरील वाटोळीं कडीं,-खवले; गडगडाट, खडखडाट; खटखट करणारा; कांहीं (कुल) झाडांचीं खुळखुळ्यासारखीं वाजणारीं सुकया बियांचीं घोंटें; वटवट, बडबड. *R.-snake,* खडखड्या नाग. *Rattler, n.* (sl.) first-class specimen; (U. S.) rattlesnake. उत्कृष्ट नमुना; खडखड्या नाग. *To rattle the sabre,* threaten war. तलवारींचा खणखणाट उडणें, लढाई-युद्ध-उपस्थित होणें. *To r. fox,* to hunt it close. कोल्ह्याची जवळून शिकार करणें. *R. bill through the House,* कायदेमंडळांत घाईघाईनें ठराव पास करून घेणें. *Death-r.,* मरणापूर्वीची घशांतील घरघर. *The rattles,* croup. मुलांचा घशांचा रोग. *Rattle-brain,-head,-pate,* (person with) empty brain. रिकाम्या डोक्याचा, निर्बुद्ध, ठोंब्या, डोक्यांत घटाटे भरलेला (मनुष्य). *R.-brained,-headed,-pated, aa. R.-trap, n. & a.* rickety (vehicle etc.); (pl.) curiosities, odds & ends. मोडकी खिळखिळी (गाडी); सटरफटर (जिनसा, वस्तु).

**Ratt'y,** *a.* (रॅटि)—(sl.) irritable, touchy. चिडखोर.

**Rauc'ous,** *a.* (रॉकस)—hoarse; harsh-sounding. घोगरा, घोगऱ्या आवाजाचा; कर्कश आवाज असलेला.

**Rau'po,** *n.* (रॉउपो)—Naw Zealand bulrush used for thatching roofs etc. लव्हाळा.

**Răv'age,** *v. t & i.* (रॅव्हिज्)—to lay waste, to plunder; to make a havoc. नासधूस करणें, लुटणें; उध्वस्त करणें. *n.* (*usu. pl.*) devastation, havoc. नासधूस, सत्यानाश.

**Rāve,** *v. i. & refl.* (रेव्ह)—to talk wildly or deliriously or enthusiastically; (of sea or wind) to howl or roar. वेड्याप्रमाणें बडबडणें, वेडांत बडबडणें, बरळणें, आरडाओरड करणें; (समुद्र किंवा वारा) घोंघों वाहणें, सोसाट्यानें वाहणें.

**Răv'el,** *v. t. & i.* (रॅव्हेल्)—to disentangle; to entangle, to make intricate. उकलणें, गुंता काढणें; गुंतागुंत करणें. *n.* tangle; complication; frayed or loose end. गुंतागुंत; भानगड; सुटें (सुताचें) टोंक, बाहेर आलेलें सूत.

**Răv'elin,** *n.* (रॅव्हलिन्)—(fortif.) outwork of two faces forming salient angle outside main ditch in front of the curtain. (तटबंदीचा) बाहेरचा तट.

**Rā'ven,** *n.* (रेव्हन्)—a large black bird of prey of the crow kind; (*attrib.*) black. डोंबकावळा; काळा. *R. locks,* black hair. काळेभोर केंस.

**Ră'ven,** *v. t. & i.* (रॅव्हन्)—to seek prey or plunder; to devour voraciously; have ravenous appetite (for). भक्ष्य किंवा लूट शोधणें; अधाशीपणानें खाणें, पोटांत खाखा उठणें, वखवखणें.

**Ră'venous,** *a.* (रॅव्हेनस्)—furiously voracious; famishing, eager for gratification. अधाशी; वखवखलेला.

**Ră'vin,** *n.* (रॅव्हिन्)—(poet, rhet.) robbery, rapine; seizing and devouring of prey; spoil. चोरी, लूटमार; भक्ष्य पकडून खाण; लुटालूट.

**Răvine',** *n.* (रॅव्हीन्)—a deep and narrow gorge; mountain-cleft. दरी, खोरें, खिंड; घळण, घळ, नाला, ओहोळ. *R. buck,-deer,* the Indian gazelle. एक जातीचा मृग, हरीण, सांबर. [F, = violent rush]

**Răv'ish,** *v. t.* (रॅव्हिश्)—to carry off by force; to commit a rape upon; to enrapture, to fill with delight. हिरावून नेणें, बलात्कारानें नेणें, हटाआड करणें; (स्त्रीवर) बलात्कार करणें, भ्रष्ट करणें; आनंदमग्न करणें, संतोषविणें, मोहित करणें, भुलविणें. *Rav'ishment, n.* पळकावणें. बलात्कार, अत्यानंद. *Rav'ishing, a.*; *Rav'isher, n.* बलात्कार करणारा.

**Raw,** *a.* (रॉ)—uncooked; unwrought; crude inexperienced, unskilled; stripped of skin; sore, sensitive to touch; (of weather) damp and chilly. कच्चा; अपक्व; अल्लड, अननुभवी, अशुद्ध कातडी निघालेला, कातडी काढून टाकलेला; कोंवळा, नाजूक; सर्द, दमट (हवा). *n.* a raw place on the skin. चोळवटलेली,-खरचटलेली,-जागा. *v. t.* to rub (esp. horse's back) into rawness. (घोड्याच्या पाठीला) खरारा करणें. *Raw cream,* (दूध तापविल्याशिवाय काढलेली) कच्ची मलई. *R. brick,* कच्ची वीट. *R.-silk,* कच्चें रेशीम, *R.-cloth,* विन खळीचें कापड. *R.-hide,* न कमावलेलें चामडें. *R.-spirit,* undiluted. पाणी न मिसळलेला मद्यार्क. *R.-material,* कच्चा माल *R.-boned,* with bones almost exposed, हाडकुळा. *R.-head and bloody bones,* nursery bug-bear, death's head and crossbones; (attrib.) crudely horrible (style). बागुलबुवा, बाऊ; रौद्र, भयानक (लेखनपद्धति). *Raw'ish, a.* कच्चासा, कोंवळासा, अर्धवटसा.

**Ray,** *n.* (रे)—a single line or narrow beam of light; analogous propagation line of heat

other non-luminous physical energy; beginning of enlightening influence; marginal part of daisy, etc.; radial division of starfish; radius of a circle; any of a set of radiating lines or parts or things. किरण, कर, रश्मि; किरण, तंतु, अवशेष, बिंदु; पुष्पाचा परिघ; चक्राकार माशाच्या दोन त्रिज्यांमधील विभाग,-त्रिज्यात्मक विभाग; त्रिज्या; समकेंद्र रेषांपैकीं-वस्तूंपैकीं-एक. *v. i. & t.* to come or send out in or like rays. चकाकणें, बाहेर (किरण) टाकणें, चकचकीत करणें, प्रकाशित करणें. *Rontgen*, or *X, rays*, क्ष-किरण. *Bacquerel rr.*, rays emitted by radio-active bodies. किरणकार्यकारी वस्तूंतून बाहेर टाकलेले किरण. *A r. of hope*, आशेचा किरण,-अंश. *Ray'ed, a.* किरणात्मक, किरण असलेला.

Ray, *n.* (रे)—kinds of edible sea-fish allied to shark. एक जातीचा खाण्यालायक मोठा खारा मासा.

Ray'on, *n.* (रे'यान्)—artificial silk. कृत्रिम बनावट रेशीम, बनावट रेशीम. [F.]

Rāze, Rāse, *v. t.* (रेझ्)—to destroy completely, to demolish, to extirpate; level with the ground; to wipe out. पूर्णपणें नाश करणें, सपाट करणें, जमीनदोस्त करणें, धुळीस मिळवणें; पुसणें, पुसून टाकणें.

Rā'zor, *n.* (रे'झर्)—an instrument for shaving. वस्तरा. *R.-back*, sharp ridge (as *r.* back hill); (U. S.) kind of half-wild hog. तीक्ष्ण,-तुटलेली-कडा; अर्धवट रानटी डुकर. *R.-bill*, kinds of bird with bill shaped like razor. वस्तऱ्याच्या आकारासारखी चोंच असलेले पक्षी. *R.-edge*, sharp mountain ridge; critical situation. पर्वताची तीक्ष्ण-तुटलेली-कडा; आणीबाणीचा प्रसंग. *R.-fish,-shell*, bivalves with shell-like razor-handle. वस्तऱ्याच्या मुठीप्रमाणें कवच असलेले मासे. *R. strop*, पलाटणें, लपाटणें.

Răz'zle (-dăzzle) *n.* (रॅ'झलडॅझल)—(sl.) excitement, bustle; spree; undulating merry-go-round. गडबड, धांदल; धांगडधिंगा; (जत्रेंतील) वरखालीं होणारें लांकडी घोड्याचें यंत्रानें फिरणारें चक्र.

Rē, *pref.* (री) -once more, again, anew, afresh, back. फिरून, पुन्हां, उलट. *prep.* in the matter of (च्या) विषयीं, बाबतींत, संबंधीं. *R. infe'cta*, without. having accomplished one's object. आपलें काम न बजावतां,-होतां.

Reach, *v. t. & i.* (रीच्)—to stretch out (the hand etc.), to extend; to get as far as, to attain to, to arrive at; to amount to; to pass or take with outstretched hand. पसरणें, विस्तारणें; जाणें, पोहोंचणें; भरणें, होणें, एकंदर होणें; हात लांब करून देणें किंवा घेणें. *n.* act of reaching; range of the hand; power of the mind; compass, scope; continuous extent, esp. a straight stretch of river; (Naut.) tack. पोचणें; आटोका, अवसान, सुमार, आवांका, पोहोंच, टप्पा; दोन वळणांमधील दृष्टीच्या टापूंत येणारें नदीचें सरळ पात्र; दोर, शिडाचा कोंपरा, गलबताची दिशा. *Out of reach*, आटोक्याबाहेर, *Reach'-me-down, a. & n.* (sl.) ready-made (garment). तयार (कपडा). *Reach'able, a.* पोहोंचण्याजोगा, आटोक्यांतला, आहारांतला. *My income will not reach to it.* माझें उत्पन्न-मिळकत-तितकें भरणार नाहीं. *Mind reaches forward to an ideal*, ध्येय गांठण्याचा-ध्येयापर्यंत पोचण्याचा-प्रयत्न मन करतें. *As far as the eye could reach*, दृष्टि पोचते तोंपर्यंत, नजर पोचते तोंपर्यंत.

Rēăct', *v. i.* (रि-ॲ'क्ट्)—to act in return, to produce a reciprocal or responsive effect; to respond to stimulus; undergo change due to some influence; (Chem. of substance applied to another) call out activity, cause manifestation; (Mil.) make counter-attack (s); be actuated by repulsion *against*, tend in reverse or backward direction. उलट परिणाम होणें, उलट कार्य घडणें; उलट खाणें, प्रतिकार करणें, फेरफार,-बदल,-रूपांतर होणें; प्रतिक्रिया घडणें; उलट हल्ला करणें, प्रतिहल्ला चढवणें, प्रतिसारण घडणें; उलट बाजूस जाणें, उलट खाणें, प्रतिगामी होणें.

Rēăc'tion, *n.* (रि-ॲ'क्शन्)—response to stimulus; responsive or reciprocal action (esp. *action & re-action*); (Chem.) action set up by one substance in another; retrograde tendency in politics, etc.; (Mil.) counter-stroke; return of previous condition after interval of opposite (e. g. glow felt after cold bath). उलट, प्रतिक्रिया; (क्रियाप्रतिक्रिया, आघातप्रत्याघात); प्रतिकार्य, प्रतिक्रिया; पिछेहाट, माघार, पिछेहाटीचें (राजकारणी) धोरण; प्रतिहल्ला; विरुद्ध क्रियानुभवानंतर प्राप्त होणारी पूर्वस्थिति.

Rēăc'tionarў, *a.* (रिॲ'क्शनरि)—retrograde; recoiling from progress. प्रतिगामी; उलट खाणारा, प्रतिक्रियात्मक. *n.* a retrograde person. पिछेहाटीचा पुरस्कर्ता.*-tionist, n. & a.*

Read, *v. t. & i.* (रीड)—to interpret mentally; to divine; to peruse and reproduce mentally; to study by reading; find (thing) stated, find statement, in print; interpret in certain sense; present (figure etc.) to one reading it. वाचणें, पढणें; भविष्य सांगणें; मनन करणें; अभ्यास करणें; वाचनांत येणें,-आलेलें असणें; अर्थ लावणें, उपपत्ति लावणें, अर्थ सांगणें; दर्शविणें. *n.* time spent in reading. वाचनांत घालविलेला काळ,-वेळ. *To r. person's hand*, हस्तसामुद्रिक पाहणें. *To r. the sky*, आकाशाकडे पाहून हवामानाचा अंदाज सांगणें. *To r.* one *a lesson*, admonish him. ची कानउघाडणी करणें, खरडपट्टी काढणें. *Reading man*, who devotes most of his time to study. अतिशय अभ्यासू मनुष्य. *Read me to sleep*, मला झोंप लागेपर्यंत वाच, *Thermometer reads 35°*. उष्णतामापक यंत्राचा पारा ३५ अंशावर आहे. *To r. between the lines*, search for or discover hidden meanings. गर्भितार्थ ओळखणें,-ताडणें,-शोधून काढणें.

Read, (रेड)—*pa. t. & pa. p. & a.* वाचलेला; *a well-read man*, बहुश्रुत मनुष्य.

Read'able, *a.* (री'डबल)—interestingly written; legible. वाचनीय, मनोरंजक; वाचतां येण्याजोगा, स्पष्ट. *-ability, n.*

**Read'er**, *n.* (रीडर्)—(*esp.*) a publisher's private critic; a printer's proof-corrector; a university lecturer; a book of selections for educational purpose. प्रकाशकाचा सल्लागार-टीकाकार; छापखान्यांतील मुद्रें-मुद्रितें-तपासणारा; विश्वविद्यालयांतील शिक्षक; क्रमिक वाचनपुस्तक. *R.-ship*, office of university reader. विश्वविद्यालयांतील व्याख्यात्याची जागा.

**Read'ing**, *n.* (रीडिंग्)—perusal of a book; literary knowledge; variation found in another MS or book; one of the three stages of a Bill in each House of Parliament; entertainment at which something is read; interpretation or view taken of; figure etc. shown by graduated instrument. वाचन; पुस्तकी ज्ञान; पाठ, पाठांतर; कायद्याचें स्वरूप मिळण्यापूर्वी कायदेकाउन्सिलांत बिलाचें वाचन; जाहीर वाचन; अर्थ, संगति,-लावणें; तर्क, कल्पना; (भारमापक, उष्णतामापक यंत्रानें) दर्शविलेला अंक, -आंकडा. *R. desk*, desk for supporting book, etc. (वर पुस्तक ठेवून) वाचण्याचें मेज. *R.-room*, room in club, etc. for persons wishing to read. वाचनाची खोली, सार्वजनिक वाचनालय. *First r.*, permitting introduction. (ठरावाचें,-बिलाचें) पहिलें, -प्राथमिक,-वाचन. *Second r*, approving general principles. बिलाचें सामान्य तत्त्व मान्य करण्यासाठीं दुसरें वाचन. *Third r.*, accepting details as amended in committee. शेवटच्या मंजूरीचें तिसरें वाचन.

**Rea'dily**, *adv.* (रे'डिलि)—without reluctance; willingly; easily. आढेवेढे न घेतां; खुषीनें; सहजगत्या.

**Rea'dinèss**, *n.* (रे'डिनिस्)—prompt compliance; prepared state, promptitude; quickness in argument or action. तयारी, सिद्धता, उत्सुकता; शीघ्रता.

**Rea'dy̆**, *a.* (रे'डि)—with preparations complete, unreluctant; fit for immediate use or action, in fit state, willing, quick, facile, within reach. तयार, सादर, उभा, सिद्ध, सज्ज; खूष असलेला; वापरण्याला योग्य किंवा तयार; सुस्थितींत असलेला; उत्सुक, उद्यत, इच्छा असलेला; रोखठोक, रोकडा, दक्ष, चपळ, चलाख, हुशार, सोईचा, सोईस्कर, सुगम; जवळचा, हातासरसा. *adv.* beforehand, in readiness. आगाऊ, तत्परतेनें, तयारीनें, तयारींत. *n.* position in which rifle is held before the present; (*sl.*) ready money. ('तयार!' असा हुकूम सुटण्यापूर्वी) शिपायाच्या बंदुकीची सिद्धता, नेम; रोकड, नगद, पैसा. *Ready, present, fire!* (बंदुक सोडण्याच्यापूर्वी दिलेले तीन हुकूम). *Ready-witted, a.* हजरजबाबी, समयसूचक. *To make r.*, prepare. सज्ज करणें, सिद्ध करणें, तयारींत राहणें,-असणें. *R.-money*, actual coin, payment on the spot. रोकड, नगदी पैसा, रोखीचा सौदा, व्यवहार, रोख पैसे मोजणें,-देणें, *R.-reckoner*, book of tables for use in commerce, etc. (व्याज, किंमती वगैरे आकारतांना सोपीचें) तयार-आकारणी-पुस्तक.

**Ready'-māde**, *a.* (रे'डि-मेड्)—(of clothes) made to standard sizes. आयता, तयार, तयार करून ठेवलेला (कपडा).

**Rēa'gent**, *n.* (रीए'जन्ट्)—(Chem.) substance used to detect presence of another by reaction, reactive substance or force. प्रतिक्रियाद्रव्य, परीक्षकद्रव्य, प्रतिक्रियोत्पादक शक्ति.

**Re'al**, *n.* (रि'अल्)—Spanish monetary unit (about 2½ d.). अडीच पेन्स किंमतीचें स्पेन देशांतील नाणें.

**Re'al**, *a.* (रि'अल्)—actually existing or occurring, objective, genuine, consisting of immovable property such as land or house. अस्तित्वांत असलेली, वास्तविक, मूर्त, प्रत्यक्ष, सत्य, खरा, स्थावर. *Real money*, coin, cash. रोकड पैसा, नाणें, नगद. *R. presence*, of Christ's body and blood in the Eucharist as disputed by theologians. (प्रभुभोजनाच्या वेळीं ख्रिस्ताच्या शरीराची व रक्ताची) प्रत्यक्ष विद्यमानता (ही विवादिक गोष्ट आहे). *R. life*, that lived by actual people, opp. to fictitious and dramatic imitations. वास्तविक जीवन (काल्पनिक किंवा नाटकांत सोंग घेतल्यासारखें नव्हे!). *R. estate*, स्थावर मालमत्ता.

**Re'alism**, *n.* (रि'अलिझम्)—fidelity of representation, truth to nature; doctrine that general ideas have objective existence. हुबेहूबपणा, यथार्थता, सत्यता; वास्तववाद. *Realistic, a.* यथार्थ, सत्य स्वरूपाचें, हुबेहूब, वास्तव, वस्तुगत.

**Reăl'ity̆**, *n.* (रिॲ'लिटि)—being real; likeness to the original; existent thing, real existence; the real nature of. खरेपणा; सत्यस्थिति, सत्य वस्तु, वास्तवता, सत्यता, वस्तुस्थिति, प्रत्यक्ष,-सत्स्वरूप, वस्तुगतता. *In r.*, in fact. वस्तुतः, खरोखरी.

**Re'alize**, *v. t.* (रि'अलाइझ्)—to convert (a hope, plan, &c.) into fact, make realistic, to apprehend clearly; to convert into money; to fetch as price; amass. साधणें, मास करून घेणें, कृतींत आणणें, मूर्त स्वरूप देणें, अनुभव घेणें; विकून रोख किंमत घेणें, किंमत येणें, संपत्ति मिळविणें. *Realiza'tion*, कृतींत आणणें, साधणें, साक्षात्कार; वसूल करणें, उगाणी. *Re'alizable, a.*

**Re'ally̆**, *adv.* (रि'अलि)—in fact; positively. वस्तुतः, खरोखर. *Really?*, is that so? असें काय? खरें का?

**Re'alty̆**, *n.* (रि'अल्टि)—real estate. अचल धन, स्थावर इस्टेट, प्रदेश, प्रांत.

**Realm** *n.* (रेल्म्)—kingdom; sphere, domain. राज्य, प्रदेश, प्रांत, विषय.

**Ream**, *n.* (रीम्)—twenty quires or 480-500 sheets of paper. कागदाचें रीम, ४८० ते ५०० कागदाचे ताव. *Printer's r.*, 516 sheets or 21½ quires. ५१६ कागदांचें रीम. (*pl.*) large quantity of paper. पुष्कळ कागद, रिमेच्या रिमें.

**Reap**, *v. i. & t.* (रीप्)—to cut (grain, &c.) with sickle or machine; to gather harvest from field; to gather in as harvest or reward, to receive as fruit of labour. शेत कापणें; कापणी करणें; फळ मिळणें, संपादन करणें, कापणें, भोगणें. *Reaping hook*, sickle. कोयता, विळी, धान्य कापून पेंढ्या तयार करण्याचें यंत्र. *To reap as one has sown, sow wind and r.*

*whirlwind, r. the fruits of*, take consequences of one's actions. केलेल्या कर्माचीं फळें भोगणें, करावें तसें भरावें. *To r. where one has not sown*, profit by other's toil. आयत्या बिळावर नागोबा होणें, आयत्या पिठावर रेघोट्या ओढणें, दुसऱ्याच्या मेहनतीचा फायदा घेणें.

**Reap'er**, *n.* (रीप्‌र्)—one who reaps; a machine employed to reap. कापणी करणारा; कापण्याचें यंत्र.

**Rear**, *v. t. & i.* (रिअर्)—to raise, to build; to bring up, to breed, to cultivate, educate, foster, raise, nourish, grow, (of a horse, &c.) to stand upright on hind legs. उठविणें, बांधणें; लहानाचा मोठा करणें, वाढविणें, पालनपोषण करणें, मोठा करणें, शिकविणें, शिक्षण देणें, उभारणें, उत्पन्न करणें; मागील पायांवर उभा राहणें. *n.* back part of anything, esp. an army or fleet; space or position at the back; (*colloq.*) *w. c. or latrine*; (*attrib.*) *hinder*, back. पिछाडी, पाठीमागचा भाग; मुत्री, शौचकूप; मागचा, शेवटचा, पिछाडीचा. *Rear'er, n.* वाढविणारा, उंच करणारा, उभारणारा. *To hang on the rear of*, follow with view to attacking. (हल्ला करण्याच्या हेतूनें) पिछाडीवर, पाठीं पाठीं,-राहणें. *Bring, close up, the r.*, come last. सर्वांच्या मागून,-शेवटीं,-येणें. *Take enemy in r.*, attack from behind. शत्रूंच्या पिछाडीवर हल्ला करणें. *Far in the r.*, behind. पाठीमागें. *At the rear of*, behind. च्या पाठीं,-पाठीमागें. *Rear'most, a.* सर्वांच्या पाठीं असलेला, अगदीं पाठचा. *Rear admiral*, flag-officer below vice-admiral. जहाजावरील तिसऱ्या दर्जाचा अधिकारी. *Rear-guard*, पिछाडीची तुकडी, टोळी. *Rear'-ward. a., adv. & n.*; *Rear' wards, adv.* मागें, पाठीकडे, पिछाडीकडे.

**Re-arm'**, *v. t.* (रीआर्म्)—to provide (troops) with arms of new pattern. (सैन्याला) नवीन तऱ्हेचीं हत्यारें-शस्त्रास्त्रें-देणें, नवीन शस्त्रास्त्रांनीं सज्ज करणें. *Re-arm'ament, n.* आधुनिक पद्धतीची यंत्रसामुग्री.

**Reas'on**, *n.* (रीझन्)—fact adduced or serving as argument, motive, cause, or justification, the intellectual faculty by which things are judged; sanity; sensible conduct; moderation.; (Log.) one of premises of syllogism, esp. minor premiss when given after conclusion; intellect personified; (in Kant's philos.) faculty transcending the understanding and providing a priori principles, intuition. मुद्दा, हेतु, प्रयोजन, निमित्त, कारण, सबब; बुद्धि, विचारशक्ति, तर्कशक्ति; शहाणपणा; विवेक; रास्तपणा; न्यायीपणा, नेमस्तपणा; (तर्क॰) हेतु, प्रमाण; बुद्धि, विचार; (तत्त्व॰) प्रतिभा, स्फूर्ति, सहज स्फूर्ति, सहजावबोध. *v. i. & t.* to use argument *with* person by way of persuasion; form or try to reach conclusions by connected thought; think out (consequences etc.). युक्तिवाद,-बुद्धिवाद,-करणें, समजुतीचें बोलणें करणें; तर्क करणें, अनुमान काढणें; वाद करणें, उहापोह करणें, (वर) विचार करणें, संबंधीं विचार करणें. *The woman's reason*, repetition of fact as its own explanation (*e. g. I love him because I love him.*). एकाच गोष्टीची द्विरुक्ति करणें, (स्त्रियांचें) एकच गोष्ट कारण म्हणून सांगणें. *R. of state*, political justification, esp. for immoral proceeding. राजकीय हेतु; कारण. *He complains with r.*, not unjustifiably. त्याच्या म्हणण्यांत तथ्य आहे, तें सकारण आहे. *To bring to r.*, induce to cease from vain resistance.समजुतीवर,ताळ्यावर-आणणें. *It stands to r.*, would be generally admitted. तें ग्राह्य आहे, योग्य आहे, युक्त आहे. *Hear or listen to r.*, suffer oneself to be persuaded. समजूत होणें,-पडणें; अक्कल ऐकणें. *With or without r.*, हक्कनाहक. हकनाक, वळेंच. *Rea'soning, n.*

**Rea'sonable**, *a.* (रीझनेबल्)—sound of judgement, moderate; inexpensive; not extortionate. समंजस; समजूतदार; माफक; कमी खर्चाचा; योग्य, रास्त, नेमस्त, माफक. *Rea'sonableness, n*, *Rea'sonably, adv.* अक्कलेनें, शहाणपणानें, योग्य रीतीनें; सुमाराचा, बेताचा.

**Reassure'**, *v. t.* (री-अशुअर्)—to restore to confidence, to dispel apprehensions of. पुन्हां आश्वासन देणें, धीर देणें; भीति नाहींशी करणें.

**Reave, Reive**, *v. i. & t.* (रीव्)—(arch., poet.; pa. t. & p. p. *reft.*) to commit ravages (usu. *reive*), take by force; carry off. जाळपोळ करणें, बळजबरी करणें, लुटालूट करणें, बळजबरीनें नेणें. *Rei'ver, n.* (रीव्हर्), robber. चोर, लुटारू.

**Rebate'**, *v. t.* (रिबेट्)—to diminish, to deduct, to make a discount from; to reduce force or effect of, to blunt, to dull. कमी करणें, सूट देणें, कसर कापणें; तीक्ष्णता कमी करणें, बोथट करणें. *n.* (usu. रीबेट्) discount. कसर, द्यावयाच्या रकमेंतून कमी केलेली रक्कम.

**Re'bĕck**, *n.* (रीबेक्, रे-)—early form of fiddle with three strings. तीनतारी जुन्या काळची सारंगी.

**Re'bel**, *n.* (रे'बल्)—a person who rises in arms against established government; a person who resists authority or control. राजद्रोही; बंडखोर. (attrib.) rebellious, of rebels, in rebellion. बंडखोर, राजद्रोह्यांचा किंवा बंडखोरांचा; दंगेखोर; राजद्रोही. *v. i.* (रिबे'ल्)—to act as a rebel (*against*), to manifest repugnance to some custom, &c. बंड किंवा दंगा करणें; °वर उठणें, विरुद्ध उठणें, न जुमानणें.

**Rebĕll'ion**, *n.* (रिबे'ल्यन्)—armed resistance to an established government; violent resistance to authority. बंड करणें, बंड; अधिकाऱ्यांविरुद्ध दंगा, धुडगूस. *The Great R.*, period of history, 1642-60. इंग्लंडच्या इतिहासांतील १६४२-६० मधला बंडखोरीचा काळ.

**Rebĕll'ious**, *a.* (रिबे'ल्यस्)—in rebellion; disposed to defy authority; (of diseases, things) difficult to treat, unmanageable, refractory. दंगेखोर; सत्ता

किंवा अधिकार न जुमानणारा; इलाज न चालणारा, आटोक्यांत न येणारा, शिरजोर.

**Rebound'**, *v. i.* & *n.* (रिबा'उन्ड)—to spring back after impact; recoil upon agent. उसळी मारणें; उलट खाणें; कर्त्यावर उलट परिणाम होणें,-उलटणें. *To take* one *on* or *at the r.*, utilize reaction after emotion to persuade him to contrary action. मनांत आलेल्या उसळीचा उलट क्रिया करविण्याकडे उपयोग करणें,-प्रवृत्त करणें.

**Rebuff'**, *n.* & *v. t.* (रिब'फ्)—to check, to snub, to repulse. टोला, थप्पड, नकार, वाटाण्याच्या अक्षता, मागें ढकलणें.

**Rebuke'**, *v. t.* & *n.* (रिब्यू'क्)—to reprimand, to reprove, reproof, शब्दाचा मार, धमकी, दबावणी, धमकावणें.

**Rebut'**, *v. t.* (रिब'ट्)—to force back; to refute, to disprove (evidence, charge). मागें हटवणें; खंडन करणें, प्रत्युत्तर देणें; खोडून टाकणें,-काढणें, खोडणें. *Rebutment, Rebut'tal, nn.; Rebutt'ing, pr. p.* खोडून काढणारा, खंडन करणारा.

**Recal'citrant**, *a.* & *n.* (रिकॅ'लिसट्रन्ट)—refusing compliance; refractory. मान्यता न देणारा; दांडगा, शिरजोर, हटवादी, हट्टी, (मनुष्य). *Recal'citrance, n.*

**Recal'citrate**, *v. i.* (रिकॅ'लिसट्रेट्)—to kick *against*, or *at* rules, refuse compliance, be refractory. लाथाडणें, न जुमानणें, झुगारून देणें, नापसंती दर्शविणें, दुराग्रह धरणें, हट्ट धरणें,-करणें.

**Recall'**, *v. t.* (रिकॉ'ल)—to summon back; to bring back to memory, remember; to revoke, annul; cancel appointment of (official sent overseas); revive, resuscitate. माघारा बोलावणें, आठवण करणें, स्मरणें; फिरवणें, बदलणें, परत घेणें, रद्द करणें; परत बोलावून रद्द करणें, पुनः जिवंत करणें, पुन्हां जीव आणणें. *n.* summons to come back; (U. S. pol.) removal of public official from office before expiration of his term by popular vote. माघारा किंवा परत बोलावणें, लोकमतानुसार अधिकाऱ्याला अधिकारावरून कमी करणें. *Recallable, a.*

**Recant'**, *v. t.* & *i.* (रिकॅ'न्ट्)—to disavow former opinion, to unsay, to detract one's words. पहिलें मत फिरवणें; (चुकीचें म्हणून) परत घेणें, चूक कबूल करणें. *Recanta'tion, n.*

**Recapit'ulate**, *v. t.* & *i.* (रीकॅपि'टयुलेट्)—to summarize; to go quickly through again; to give an epitome. (कलमवार) सारांश देणें, संक्षेपानें सांगणें; पुनः गोषवारा सांगणें; सिंहावलोकन करणें.*-tion, n.* संक्षेप, गोषवारा, सारांश, सिंहावलोकन.*-tor, n.,-tive, -tory, aa.* सारांशरूपाचा, गोषवाऱ्याचा.

**Recast'**, *v. t.* (रीका'स्ट)—to put into new shape; to amend the form of. पुन्हां ओतणें, नवा घाट पाडणें, नवीन रूप देणें; पुन्हा नवीन रचना करणें.

**Recede'**, *v. i.* (रिसी'ड्)—to go or shrink back; to slope backwards; to withdraw, (from engagement, opinion), to retreat; to decline in value. पाऊल माघारें घेणें, कच खाणें, हटणें, मागें पडणें; पाठीमागें सरणें; माघार घेणें; किंमत-महत्त्व-कमी होणें. [L. *re*, back, *cedere*, to go]

**Receipt'**, *n.* (रिसी'ट्)—recipe; an amount of money received (*usu. in pl.*); fact or action of receiving or being received into person's hands or possession, written acknowledgement of money received. यादी, याद, पाठ; जमेची रकम; पैशाची पोंच; पोंच, भरपाई; जमा, पावती. *v. t.* to give receipt for. पावती लिहिणें, -देणें, पोंच देणें. (arch.) *R. of custom*, custom-house where money is officially received.. जकातीचें-जकात घेण्याचें-सरकारी ठिकाण.

**Receive'**, *v. t.* & *i.* (रिसी'व्ह्)—to accept the delivery of; to take into one's hands or possession; to allow, to entertain as a guest, to welcome; to accept as true; to get, to come by; bear up against, stand force or weight of, encounter with opposition. घेणें, पावणें; स्वीकारणें; जागा देणें, आदरातिथ्य करणें; खरें आहे असें मानणें, मान्य असणें,-करणें; मिळणें, प्राप्त होणें, येणें; (वजन) सहन करणें, (भार) सोसणें, प्रतिकार करणें. *To r. stolen goods*, (as thief's accomplice). चोरीचा माल ठेवून घेणें, चोराचा साथीदार होणें. *R. a letter, news*, पत्र-बातमी, पोचणें,-मिळणें. *Lord, r. my soul.* (dying man's prayer. मरणाऱ्या मनुष्याची प्रार्थना). *Receiv'ed, pa. t. & pa. p. & a.; Recei'vable, a.*

**Receiv'er** *n.* (रिसी'व्हर्)—(*esp.*) a person appointed to administer debtor's or disputed property; apparatus designed to receive wireless messages, &c. (also *receiving set*); ear-piece of telephone; person who receives stolen goods. कर्जदाराच्या किंवा वादग्रस्त अशा मालमत्तेची व्यवस्था पाहणारा अधिकारी; बिनतारेचा संदेश वगैरे घेण्याचें यंत्र, टेलिफोनचें कानाला लावण्याचें यंत्र, ग्राहक; चोरीचा माल ठेवून घेणारा. *Receiv'ership, n.* कोर्टानें नेमलेल्या वहिवाटदाराचा हुद्दा, जागा.

**Recen'sion**, *n.* (रिसे'न्शन्)—revision of a text; a revised text. मूळ लेखाची दुरुस्ती, ग्रंथशोधन, ग्रंथशुद्धी; शुद्ध केलेला मूळ ग्रंथ.

**Re'cent**, (री'सेन्ट्)—not long past, late; not long established, modern. अलीकडचा; अर्वाचीन, ताजा, नवा. *Re'cency, n.* नवेपणा, ताजेपणा, नूतनता; अर्वाचीनता. *Re'cently, adv.* नुकताच, नवीन, अलीकडे. *Re'centness, n.*

**Recep'tacle**, *n.* (रिसे'प्टेकल्)—a vessel or space or place for containing things; (Bot.) common base of floral organs, axis of cluster. पात्र, आधार, आशय, बारदान; (अनेक फुलांचा सर्वसाधारण) पुष्पाशय, पुष्पाधिष्ठान, पुष्पासन (उदा० झेंडूच्या फुलांतील खोबरें).

**Recep'tion**, *n.* (रिसे'प्शन्)—receiving or being received into a place or company; receiving of ideas or impressions into the mind, mental acceptance, recognition of something as true or advi-

sable : welcome of specified kind. शिरकाव, प्रवेश, स्वीकार, अंगीकार; (मनानें) ग्रहण करणें, अंगीकार, स्वीकार, ग्रहण; स्वागत, आदरातिथ्य, संभावना, स्वागत-समारंभ. *R. room*, घसण्याउठण्याची खोली,-जागा (*opp. bedroom*). *Warm r.*, vigorous resistance or enthusiastic welcome. जोराचा प्रतिकार, संभावना, किंवा मनःपूर्वक आदरातिथ्य,-स्वागत. The general *r.* of the Newtonian hypothesis, न्यूटनच्या अनुमानांचा सार्वत्रिक स्वीकार.

**Recep'tive,** *a.* (रिसे'प्टिव्ह्)—able or quick to receive ideas, etc. ; (rare) concerned with receiving. ग्राहक, ग्रहणक्षम, ग्रहणशील ; घेण्यासंबंधीं, स्वागतसंबंधीं. *Recep'tivity, n.* ग्रहिष्णुता, ग्राहकता.

**Recess',** *n.* (रिसे'स्)—vacation ; niche or alcove, retired or secret place ; receding of water, land, glacier, etc. from previous limit, amount by which it recedes, recession (rare) ; (Anat.) fold or indentation in organ. विराम, मधली सुटी ; कोनाडा ; एकान्त, एकान्तस्थान,-जागा ; परतणें, मागें हटणें, माघार, उलट ; पर्वताच्या रांगेंतील मागील भाग ; नलिकाकार पोकळ जागा, नलिकाविवर. *v. t.* to place in a recess, set back ; provide with recesses. कोनाड्यांत ठेवणें, मागें ठेवणें ; कोनाडे, एकान्त जागा,-तयार करणें.

**Rece'ssion,** *n.* (रिसे'शन्)—receding, withdrawal, from a place or point ; preceding part of object, recess. परतणें, मागें हटणें ; आंत गेलेला,-मागें हटणारा,-भाग. *Rece'ssive, a.* receding. मागें जाणारा, माघार घेणारा. *Rece'ssional, a. & n.* (of hymn) sung while clergy and choir withdraw after service ; of the parliamentary recess. प्रार्थनेच्या शेवटीं निघून जाण्याच्या वेळीं म्हणण्याचें (गीत) ; पार्लमेंटच्या सुटीचा, सुटीसंबंधीं. *the R.*, poem of Kipling in *the Five Nations* sung on imperial occasions. किप्लिंग कवीची बादशाही दरबाराचे वेळीं म्हणण्याची कविता.

**Rechauffe,** *n.* (रिशो'फे)—warmed up dish ; rehash. ऊन केलेलें अन्न ; जुन्या साधनांवरून तयार केलेले ग्रंथ.

**Recherche,** *a.* (रशे'अर्शे)—choice, far fetched (esp. of meals or words carefully thought out). दुर्मिळ, दुःसाध्य, विचारपूर्वक शोधून काढलेला, तयार केलेला.

**Recid'ivism,** *n.* (रिसि'डिव्हिज़म्)—habitual relapse into crime. गुन्हेगारीची प्रवृत्ति, संवय. *Recid'ivist, n.*

**Re'cipe,** *n.* (रे'सिपि)—statement of ingredients and procedure for a medicine or dish ; nostrum. औषधांची यादी, औषधपत्रिका, चिकित्सापत्र, पक्वान्नांचा पाठ ; गुप्त औषध, वल्ली. [L *recipe*, take thou (abbr. R. in prescriptions)]

**Recip'ient,** *n.* (रिसि'पिअन्ट)—one who receives, the person who accepts something. ग्राहक, घेणारा, घेऊन पावणारा. *Recip'iency, n.* ग्राहकता, ग्रहण करणें.

**Recip'rocal,** *a.* (रिसि'प्रोकल्)—in return ; mutual ; expressing mutual relation, inversely correspondent, complementary; (Gram.) expressing mutual action or relation. बदल, उलट, परस्पर, अन्योन्य, परस्परसंबंधदर्शक, उलट तसाच. उलट तोच, पूरक *n.* (*Math.*) expression so related to another that their product is 1. ज्या पदाचा दुसऱ्या पदाशीं गुणाकार १ होतो तें पद, व्युत्क्रम. (1/5 is the r. of 5). *R. term*, व्युत्क्रमपद. *Recip'rocally, adv.* परस्पर, परस्परां, परस्परें, व्युत्क्रमेंकरून.

**Recip'rocate,** *v. t. & i.* (रिसि'प्रोकेट)—to interchange ; to requite in kind ; (Mech.) go with backward and forward motion. अदलाबदल करणें ; विनिमय करणें, मोबदला करणें,-देणें, उलट देणें, उलट करणें ; मागेंपुढें होणें,-जाणें. *Recip'rocator, n.; Reciproca'tion, n.* विनिमय, परस्पर देवघेव, व्युत्क्रमीकरण.

**Recipro'city,** *n.* (रेसिप्रॉ'सिटि)—reciprocal condition mutual action ; principle or practice of give and take, esp. interchange of privileges between states as basis of commercial relations. परस्पर-अन्योन्यता, व्यापारी संबंधांत (राष्ट्राराष्ट्रांतील) परस्पर भाव, देवाण घेवाण, अदलाबदल, विनिमय.

**Reci'tal,** *n.* (रिसा'इटल्)—a detailed account or narration of facts; instrumental, musical or dramatic performance by one person ; act of reciting ; part of document stating facts. सविस्तर हकिगत, निरूपण ; नाटकांतील नकला पाठ म्हणणें, चिजा वाजवून दाखविणें, पाठ म्हणणें, तोंडपाठ म्हणणें ; वस्तुस्थितीनिदर्शक कथन.

**Recita'tion,** *n.* (रेसिटे'शन्)—(*esp.*) reciting as entertainment ; a piece recited. करमणुकीकरितां म्हणणें ; पाठ, तोंडपाठ म्हणून येण्याकरितां दिलेला उतारा.

**Recitative',** *n.* (रेसिटेटी'व्ह्)—musical declamation as in narrative and dialogue of opera and oratorio ; words, part, given in *r.* नाटकांतील वर्णन व संवाद यांतील संगीतक, संगीताचा भाग, संगीताचे-गाण्यांतील-शब्द,-भाग.

**Recite',** *v. t. & i.* (रिसा'इट)—to repeat aloud ; to declaim from memory ; to enumerate ; (Law) rehearse facts in document. मोठ्यानें वाचून दाखवणें मोठ्यानें म्हणणें ; पाठ म्हणणें ; कथन करणें ; सांगणें, (कागदपत्रांतील गोष्टींची) सुनावणी करणें, सुनावणें.

**Reci'ter,** *n.* (रिसा'इटर्)—person who recites ; book of pieces for recitation. तोंडपाठ म्हणणारा ; तोंडपाठ करण्याच्या उताऱ्यांचें पुस्तक.

**Reck,** *v. i. & t.* (रेक्) (rhet. poet.) (in neg. & interrog. sentences only) to reck it, take account of. लक्ष देणें, लक्ष पुरविणें, पर्वा करणें, काळजी बाळगणें.

**Reck'less,** *a.* (रे'क्-लिस्)—regardless of consequences ; rash, heedless, having no care or concern. परिणामाकडे लक्ष न देणारा ; बेपरवा, अविचारी, बेफिकीर, साहसी. *Reck'lessly, adv.; Reck'lessness, n.*

**Reck'on,** *v. i. & t.* (रे'कन्)—to ascertain number or amount of by counting or calculation ; to compute ; to settle accounts *with* a person ; to

rely or base *upon*; (chiefly southern U. S.) think, suppose, to answer *for*. मोजून,-गणती करून, -ठरविणें; मोजणें, गणती करणें; हिशेब करणें किंवा पाहणें; भरंवसा ठेवणें; अवलंबून राहणें; अदमास करणें, अंदाज करणें; कल्पना बांधणें; जाब,-झाडा,-हिशेब देणें. *To r. without* one's *host*, सामनेवाल्याचा विचार न करणें, गांठ कोणाशीं आहे हें न पहाणें. (*Ready*) *reckoner*, (व्याजाचा, पगाराचा, वगैरे कोष्टकावरून) हिशेब आकारण्याचें पुस्तक, आकारणीपुस्तक.

**Rĕckon'ing**, *n*. (रेक्'निंग)—tavern bill (arch.); account of time; accounts of debtor and creditor; calculation. खानावळीचा आकार; बिल; वेळाची गणती; मोजणी: कर्जाचे हिशेब; मोजणें; गणती; मोजणी. *Day of r.*, time when something must be atoned for or avenged. (चा) झाडा,-जाब,-देण्याचा दिवस. *Be out in one's r.*, mistaken in calculation or expectation. अदमास चुकणें, अंदाज चुकणें.

**Réclaim'**, *v. t. & i. & n.* (रिक्लेम्)—to win from vice or error; to reform, to civilize; to bring (waste land) under cultivation; make protest, say in protest (rare). मार्गावर किंवा ताळ्यावर आणणें; सुधारणें, विद्याचारसंपन्न करणें; (ओसाड जमीन) लागवडीस आणणें, समुद्र हटवून जमीन निर्माण करणें; निषेध करणें,-दर्शविणें. *Past* or *beyond reclaim*, मार्गावर, ताळ्यावर, न येण्याजोगा; लागवडीस न येण्याजोगी. *Reclaim'able, a.*

**Rĕ'clinate** *a*. (रेक्लिनट्)—(Bot.) bending downwards. अवनत, खालीं वांकलेला.

**Récline'**, *v. t. & i.* (रिक्लाइन्)—to assume or be in recumbent position, to lean back or sideways; to rely *upon*. रेलणें, टेंकून राहणें, निजणें, पासल घेणें, अंग टेकणें, पाठीमागें किंवा बाजूला टेंकणें; अवलंबून असणें.

**Récluse'**, *a*. (रिक्लूस्)—living in retirement or isolation. एकान्तांत राहणारा, एकान्तवासी. *n*. a recluse person; a hermit. एकान्तवासी मनुष्य; तपस्वी, योगी [L. *re*, again; *clandere*, to shut up]

**Rĕcogni'tion**, *n*. (रेकग्निशन्)—act of recognizing; acknowledgement. ओळखणें, ओळख; प्रत्यभिज्ञा; कबुली. *Reco'gnitory, a.*

**Rĕ'cognizable**, *a*. (रेक्ग्नायझेबल्)—that can be identified or detected. ओळखतां येण्याजोगा, ओळखण्यासारखा.*-bility, n.*

**Rĕcogn'izance**, *n*. (रेकॉग्निझन्स)—bond by which person engages before court or magistrate to observe some condition; sum pledged as surety of such observance. (न्यायाधिशापुढें) लिहून दिलेला करार,-जातमुचलका; जातमुचलक्याची रक्कम.

**Récogn'izant**, *a*. (रिकॉग्निझन्ट्)—showing recognition or consciousness of. ओळख ठेवणारा,-दाखविणारा, (ची) जाणीव असलेला.

**Rĕ'cognize**, *v. t.* (रेक्ग्नाइझ्)—to know again, to identify as known before; to accord a notice or consideration to; to realize; to admit *that*. जाणणें, ओळखणें, पसंती दर्शविणें; कबूल करणें, मान्य करणें, पसंत करणें. *Recognized schools*, सरकारनें मान्य केलेल्या शाळा.

**Récoil'**, *v. i.* (रिकॉइल्)—to start back, to shrink in horror or disgust or fear; to rebound after impact; (of fire-arms) kick, be driven backwards by discharge. मागें हटणें, दचकणें; उलटणें, माघार खाणें,-घेणें; मागें हिसका बसणें,-धक्का बसणें, मागें येणें, उडी खाणें. *n*. the fact or sensation of recoiling. माघार, उलट, हिसका, उडी. [L. *re*, again; *cul.*, posterior]

**Rĕcollĕct'**, *v. t.* (रेकलेक्ट्)—to succeed in remembering; to call to mind, to collect again. स्मरणें; आठवणें; आठवण करणें. *To r. oneself*, शुद्धीवर,-ठिकाणावर,-येणें.

**Rĕcollĕc'tion**, *n*. (रेकलेक्शन्)—person's memory or time over which it extends; remembrance, something recalled to mind. स्मृति, स्मरणकाल, संस्मृति, आठवण, स्मरण. *It is in my r. that*, I remember that. मला असें स्मरतें कीं, माझ्या आठवणींत आहे कीं, *Recollec'tive, a.*

**Rĕcommĕnd'**, *v. t.* (रेकमेन्ड्)—to commit to the care of; to commend as fit for employment, &c.; to advise (course of action, &c.); (of qualities, conduct, etc.) make acceptable, serve as recommendation of. शिफारस करणें; सल्ला देणें; शिफारशीवजा असणें, ग्राह्य होणें.

**Rĕcommĕndā'tion**, *n*. (रेकमेन्डेशन्)—a statement meant to recommend; quality that recommends something. तारीफ, प्रशंसा, शिफारस; शिफारशीला योग्य असा गुण, शिफारस-प्रशंसा-पत्र.*-atory, a.*;*-able, a.* प्रशंसनीय.

**Rĕcommit'**, *v. t.* (रीकमिट्)—to commit anew; refer back for further consideration. (ठराव वगैरे) पुन्हां विचारार्थ पाठविणें.*-ment,-al, nn.*

**Rĕc'ompĕnse**, *v. t.* (रेकम्पेन्स)—to requite; to make amends to, to compensate. बदला देणें, फेडणें; भरपाई करणें. *n*. reward; requital; compensation. बक्षीस; फेड, बदला; भरपाई.

**Rĕc'oncile**, *v. t.* (रेकन्साइल्)—to make friendly after estrangement; to harmonize; make resigned; make compatible, show compatibility of; purify (place) by special service after desecration; heal quarrel. समेट करणें; एकवाक्यता करणें, मेळ बसवणें, ताळा घालणें; सादर होणें, हवाला ठेवणें; अनुरूप-योग्य-करणें, जुळवणें; संगति लावणें; (जागेची) शुद्धि करणें; (भांडण) मिटविणें. *Rec'oncilement, n.*; *Rec'oncilable, a.*; *Reconcilabil'ity, n.*

**Rĕconciliā'tion**, *n*. (रेकन्सिलिएशन्)—friendship after estrangement, harmonization. समेट, मिलाफ; एकवाक्यता.

**Rĕc'ondite**, *a*. (रेकन्डाइट)—hidden from view or intellect, abstruse; obscure. खोल, गहन; गूढ, दुर्बोध.*-ly, adv.*;*-ness, n.*

**Recondi'tion,** *v. t.* (रिकन्डि'शन्)—to overhaul and refit ship etc. फेरफार करून (गलबत वगैरे) दुरुस्त करणें, जीर्णोद्धार करणें.

**Récǒnn'aissance,** *n.* (रिकॉ'निसन्स)—military or naval examination of tract by detachment to locate enemy or ascertain strategic features; reconnoitring survey or party. (शत्रूची,-तटबंदीची,-) टेहळणी, पाहणी, टेहळणी करणारे लोक, -तुकडी. *R. in force,* सैन्याच्या तुकडीनें टेहळणीकरितां केलेला हल्ला.

**Récǒnnǒi'tre,** *v. t. & i.* (रेकॉनॉ'इटर्)—to approach and try to learn the position and condition or strategic features of (enemy, district); to make reconnaissance. शत्रूची किंवा देशाची टेहळणी किंवा पाहणी करणें; टेहळणें, हेरणें. *Reconnoi'trer, n.,-tring, pr. p. & a.*

**Recǒrd,** *v. t.* (रिकॉ'र्ड)—to register; to put in writing or other legible shape; celebrate; (of birds) practise (tune) by singing in an undertone. नोंदणें; नोंद करून ठेवणें; प्रसिद्ध करणें; खालच्या आवाजांत म्हणणें,-गाणें.

**Rěc'ord,** *n.* (रे'कॉर्ड)—recorded state, register; official report of proceedings; document or object that records (e. g. gramophone disk); facts known about a person's past; best performance on record; limit hitherto attained. नोंदणी, नोंद, दप्तर; सरकारी कामाकाजाची संगतवार हकीगत; लेख, फोनोची प्लेट,-तबकडी,-बांगडी; एखाद्याचा पूर्वेतिहास; अत्युत्तम ग्रंथ किंवा प्रयोग; आजपर्यंतची कमालीची मर्यादा, कमाल, शिकस्त. *Is on r.,* legally or otherwise recorded. दप्तरांत नमूद केलेलें-नोंदलेलें-आहे. *Matter of r.,* नमूद करून ठेवल्यामुळें सिद्ध-खरी-असलेली गोष्ट. *To travel out of the r.,* introduce irrelevant matter. गैरलागू गोष्ट पुढें आणणें,-मांडणें. *Keep to the r.,* मुद्देसूद बोलणें, गैरलागू गोष्ट पुढें न मांडणें. *Public R. office.,* सरकारी दप्तर-कचेरी. *To break* or *cut* or *beat the r.,* outdo all predecessors. पूर्वीच्यांना (पूर्वीच्या नोंदींना, खेळाडूंना, खेळांना वगैरे) चीत मारणें, अप्रतिम (खेळ, वगैरे) दाखविणें. *At r. pace,* best hitherto recorded. अप्रतिम चालीनें,-वेगानें.

**Récord'er,** *n.* (रिकॉ'र्डर्)—In verbal senses; chief judicial officer of city or borough holding court of quarter sessions; (hist., usu. *pl.*) a kind of flute; recording apparatus in instruments. लिहून ठेवणारा, नोंद करणारा; सरकारी दप्तरदार; एक प्रकारची बांसरी, पांवा; (यंत्रांतील) लेखक, नोंदपत्र.

**Récount',** *v. t.* (रिका'उन्ट्)—to narrate the particulars of; to tell in detail; count again. तपशीलवार कथन करणें; सविस्तर सांगणें; पुन्हां मोजणें, गणती करणें.

**Récoup',** *v. t.* (रिकू'प्)—to recompense, to compensate, to indemnify, (Law) deduct, keep back (part of sum due), make such deduction. नुकसान भरून काढणें, भरपाई करणें; (नुकसानी कमी करण्याकरितां) काटणें, कमी करणें. *To r. oneself,* recover what one has expended or lost. पुन्हां परत मिळविणें, नुकसान भरून काढणें. *To r. one's health,* प्रकृति पूर्ववत् सुधारणें. *Recoup'ment, n.* नुकसान भरून देणें; (प्रतिवादीची) काटलेली रक्कम.

**Récourse',** *n.* (रिको'अर्स्)—resorting to some source of help, a resort in difficulty. अवलंबन, आधार, आश्रय, आसरा. *To have r. to,* adopt as adviser, helper or expedient. (चा) आश्रय करणें, आधार धरणें, अवलंब करणें.

**Réco'ver,** *v. t. & i.* (रिक'व्हर्)—to regain possession or use or control of; to reclaim; to bring or come back to life; to regain health after sickness, to come to normal state or position; secure restitution or compensation by legal process; get over, cease to feel effects of; retrieve. पुन्हां मिळविणें, भरून काढणें; प्रकृति सुधारणें, पूर्वस्थितीवर येणें; (कायदेशीर इलाज करून) वसूल करणें, नुकसानी भरून घेणें,-मिळविणें; बरें होणें, सुधारणें, थावरणें, रोगमुक्त होणें; भरपाई करणें, भरून काढणें. *n.* position to which sword etc. is brought back in fencing or drill, act of coming to this. (द्वंद्वयुद्धांत वगैरे) हत्यार माघारें घेऊन सांवरणें, अशा पवित्र्यांत राहणें. *To r. oneself,* regain consciousness or calmness or control of limbs or senses. शुद्धीवर,- पूर्वस्थितीवर,- येणें. *To r. one's legs,* stand up after fall. (पडल्यावर पुन्हां) सावरणें, उठून उभें राहणें. *R. sword,* bring it back after thrust, hold it upright with hilt opposite mouth. तलवार हात केल्यावर मागें घेणें, तलवार नाकासमोर सरळ धरणें. *Recovered the shore with difficulty,* मोठ्या मुष्किलीनें परत किनारा गांठला.

**Réco'verў,** *n.* (रिक'व्हरि)—restoration of something; restoration. पुनर्लाभ, वसूल, बरा करणें; रोगमुक्तता.

**Rěc'réant,** *a. & n.* (रे'क्रिअन्ट्)—(rhet., poet.), craven, cowardly, apostate. लबाड, लुच्चा; भित्रा, भेकड; भ्रष्ट; क्रियानष्ट (मनुष्य). *Rec'reancy, n.* apostasy. भ्रष्टता, क्रियानष्टपणा. *Rec'reantly, adv.*

**Rěc'réāte,** *v. t. & i.* (रे'क्रिएट्)—to refresh, entertain; indulge in recreation, amuse oneself. श्रमपरिहार करणें, ताजातवाना करणें, मन रंजविणें, मनोरंजन करणें. *Rec'reative, a.* श्रमापहारक, मनोरंजक.

**Rē-create',** *v. t.* (रिक्रिए'ट्)—to create over again. पुनः उत्पन्न,-निर्माण,-करणें.

**Rěcréā'tion,** *n.* (रेक्रिए'शन्)—a pastime; relaxation; amusement. क्रीडा, कौतुक; श्रमापहार, विसांवा; करमणूक.

**Réc'rement,** *n.* (रे'क्रिमन्ट्)—waste product, refuse; (physiol.) fluid separated from blood and again absorbed in it (e. g. saliva, bile). घाण, कचरा, गाळसाळ; (रक्तांतील) पुनःशोषित रस, पुनःपाचित रस (लाळ, पित्त वगैरे).

**Récrim'ināte,** *v. i.* (रिक्रि'मिनेट्)—to indulge in mutual counter charges; to retort an accusation upon another. उलट आरोप करणें; उलट दोष लावणें, उलट आळ घेणें.*-tion,-tor,-nn.;-tive,-tory, aa.*

**Récriminā'tion** *n.* (रिक्रिमिने'शन्)—a counter accusation. उलट आरोप किंवा दोष, उलटा दोषारोप; प्रत्यारोप, उलट फिर्याद.

**Rēcrudēsce',** *v. i.* (रीक्रुडे'स्)—(of sore, disease, discontent, etc.) to break out again. उलटणें, फिरून उद्भवणें, उपटणें.*—des'cent, a.* फिरून येणारा, उलटणारा, उपटणारा.

**Rēcrudēs'cence,** *n.* (रीक्रुडे'सन्स)—fresh or renewed outbreak. (दुखणें वगैरे) उलटणें, पुनः चाढणें; पुनरुद्भव.

**Récruit',** *n.* (रिक्रूट)—newly enlisted and not yet trained soldier, peson who joins a society etc.; tiro (often *raw r.*). नवीन शिपाई, नवशिक्या सैनिक; संस्थेचा नवीन होणारा सभासद; नवशिक्या, उमेदवार. *v. t. & i.* to enlist recruits, to gain new supplies of men, to replenish; to reinvigorate; to recover health. (नवीन शिपायांची वगैरे) भरती करणें; भरती करणें; भरून काढणें; पुनः बळकटी आणणें; प्रकृति सुधारणें. *—ment, n.* सैन्यांत शिपायांची नवीन भरती, -भरणा. *Recruit'al, n.* (प्रकृति) सुधारणें, नीट होणें.

**Rĕc'tal,** *a.* (रेक्टल्)—of the rectum. गुदद्वाराविषयीं, मलमार्गाविषयक.

**Rĕc'tăngle,** *n.* (रेक्टँगल्)—a plane rectilinear four-sided figure with four right angles, esp. one with adjacent sides unequal. समचतुष्कोणाकृति, समकोन, आयत. [L. *rectus*, right; *angulus*, angle]

**Rĕctăng'ūlar,** *a.* (रेक्टँ'ग्युलर्)—shaped like a rectangle, right-angled, placed at right angles. समचतुष्कोणाकृति असलेला, काटकोनी, काटकोनांत ठेवलेला, काटकोनाचा. *Rectangula'rity, n.; Rectangu'larly, adv.*

**Rĕc'tifȳ,** *v. t.* (रे'क्टिफाय्)—to put right, to correct, to make right what is wrong, exchange for what is right, abolish; (chem.) refine, purify by renewed distillation or other process; (Geom.) find straight line equal to curve. बरोबर करणें, सुधारणें, (चुकी) काढून टाकणें, दुरुस्ती करणें; (गाळून) शुद्ध करणें, प्रतिशोधन करणें; वक्ररेषेच्या लांबीची सरळ रेषा (शोधून) काढणें.-निर्माण करणें. *-fication, n.* चुकीची दुरुस्ती करणें, सुधारणा; शोधन; संशोधन.*-fier, n.-fiable, a.*

**Rĕctilin'ear,-eal,** *aa.* (रेक्टिलि'निअर्, -निअल्)—in or forming a straight line; bounded or characterized by straight lines. सरळ रेषेचा, सरळ रेषेंतील, सरळ रेषांनीं मर्यादित, सरलरेषात्मक.

**Rĕc'titūde,** *n.* (रे'क्टिट्यूड)—moral uprightness, integrity, probity, honesty, (rare) correctness, rightness. नैतिक सचोटी, नीतिमत्ता, खरेपणा, सरळपणा.

**Rĕc'tō,** *n.* (रे'क्टो)—right hand page of open book; front of leaf. (उघडलेल्या पुस्तकाचें) उजवीकडचें पान; पानाच्या पुढचा दर्शनी भाग.

**Rĕc'tor,** *n.* (रे'क्टर्)—the parson of a parish; the head of some educational or religious institutions. धर्मोपदेशक; कांहीं शैक्षणिक किंवा धार्मिक संस्थांचा मुख्य.*-ial, a.;-ship, n.* धर्मोपदेशकाची द्र. जागा, अधिकार. *Rec'tory n.* parish rector's benefice or house. खिस्ती धर्मोपदेशकाची वृत्ति, त्याचें राहण्याचें ठिकाण. *Rec'torate, n.* रेक्टरची जागा, अधिकार.

**Rĕc'tum,** *n.* (रे'क्टम्)—final section of the large intestine, terminating of anus. गुदकांड, मलाशय, मळाचा कोठा.

**Rĕcŭm'bencȳ,** *n.* (रिकं'म्बन्सि)—posture of lying, rest, repose, idle state. पडून राहणें, विश्रांति, पासल.

**Rĕcŭm'bent,** *a.* (रिकं'म्बन्ट्)—lying, leaning, reclining, reposing, inactive. आडवा पडून राहिलेला, पासलां, आडवा, टेकून राहिलेला.*-ly, adv.* पासल घेऊन; कुशीस होऊन.

**Rĕcū'perāte,** *v. t. & i.* (रिक्यू'परेट्)—to restore, be restored, or to recover (from exhaustion, illness, loss, &c.). पुनः मिळविणें, सुधारणें, नुकसान भरून काढणें, आजारांतून उठणें, रोगमुक्तता होणें. *Recuperation, n.; -tor, n.,-tive, a.* पौष्टिक, शक्तिवर्धक (औषध).

**Rĕcur',** *v. i.* (रिक'र्)—to go back in thought or speech *to*; to return to mind; to occur again; to be repeated. सुचणें, आठवणें, स्मरणें, स्मरण होणें, पुनः मनांत येणें; फिरून होणें, पुनरावर्तन होणें, पुनरावृत्ति होणें. *Recurring decimals,* आवर्त दशांश. *Recurring curve,* that returns upon itself. e. g. circle. आवर्तवक्र, वर्तुलाकार वक्ररेषा, वर्तुळ.

**Rĕcŭ'rrence,** *n.* (रिक'रन्स्)—return. पुनर्घटना, पुनरुपस्थिति; स्मरण, आठवण.

**Rĕcŭ'rrent,** *a.* (रिक'रंट्)—(of nerve, vein, branch etc.) turning back so as to reverse direction; occurring again or often or periodically. परत वळणारा, माघारीं येणारा; पुनः पुनः घडणारा, पुनरावर्तक्रम, आवर्तमान, वारंवार येणारा,-घडणारा. *n. r.* artery or nerve, esp. one of the two *r.* laryngeal nerves. आवर्तक (कंठनाडीस्थ) मज्जातंतु.*-ly, adv.*

**Rĕcurve',** *v. t. & i.* (रिकर्व्ह)—to bend backwards. पाठीमागें वळणें,-वाकणें,-मुरडणें; पाठीं वळविणें.*-vate, a.* पाठीकडे वाकलेला, मागे वळलेला.*-vature, n.*

**Rĕcū'sant,** *n.* (रिक्यू'झन्ट्)—person who refuses submission or compliance, esp. (hist.) one who would not attend Anglican services. सत्ता न जुमानणारा, मान न तुकविणारा, इंग्लिशचर्चची प्रार्थनापद्धति न मानणारा. *Recu'sancy, n.* [L. *re.*, against; *causa*, a cause]

**Rĕd,** *a.* (रेड)—of a colour varying from crimson to orange; having to do with bloodshed, burning, violence or revolution. तांबडा, लाल, आरक्त, लोहित; रक्ताचा, रक्तपाताचा, आगीचा, अत्याचारी, क्रांतिकारक. *n* red colour; red cloth or clothes; red ball at billiards; radical or republican or anarchist. तांबडा रंग, लालट छटा; तांबटें

कापड, तांबडे-लाल-कपडे; 'बिल्यर्ड्स' खेळांतील तांबडा चेंडू; जहाल, लोकसत्तावादी किंवा क्रांतिवादी मनुष्य. *Red-admiral*, a butterfly. एक जातीचें फुलपांखरूं. *R.*-bark, चांगल्या जातीचें सिंकोनाचें झाड. *R.-blind*, colour-blind to red. तांबडा रंग न ओळखणारा,-पाहणारा. *R.-breast*, the robin. लाल पोटरीचा रॉबिन पक्षी. *Red-cross*, St. George's cross, emblem of England; (emblem of) ambulance service in war organized according to Geneva Convention. इंग्लंडचें लाल क्रॉस असलेलें राष्ट्रीय चिन्ह; लढाईतील शुश्रूषापथक (त्याचें लाल क्रॉसचें चिन्ह). *R. ensign*, flag of British merchant-ships. ब्रिटिश व्यापारी जहाजांचें लाल निशाण. *R.-fish*, 'सामन' जातीचा मासा. *R.-flag*, symbol of revolution; battle signal, danger signal. (राज्य) क्रांतीचें निशाण; युद्धाचा बावटा, धोक्याची सूचना (*The R. F.*, अर्वाचीन क्रांतिगीत.) *R. gum*, teething rash in children; kinds of eucalyptus yielding reddish resin. लहान मुलांना दांत येतांना येणारा पुरळ; तांबडा चीक,-डिंक. *R.-herring* smoked herring; subject raised to distract attention from the point in hand. भाजून लाल झालेला 'हेरिंग' जातीचा मासा; चालू मुद्द्यावरून लक्ष दुसरीकडे लावण्याकरतां केलेलें विषयांतर (*Neither fish, flesh nor good r. herring.* अनिश्चित व घोटाळ्यांत पाडणाऱ्या स्थितीचें). *R.-letter (day)*, marked with red letters in calendar as Saint's day or festival; (*fig.*) memorable as date of joyful occurrence. तांबड्या अक्षरांनीं दाखविलेला सणाचा दिवस; सुवर्णाक्षरांनीं लिहिण्यासारखा, संस्मरणीय (दिवस). *R. light*, danger signal on railways etc. धोक्याच्या सूचनेचा (रेल्वेवरील वगैरे) लाल दिवा, प्रकाश. *R.-poll*, kinds of red-crested birds. लाल तुऱ्याचे पक्षी. *R.-rag*, एखाद्याला राग आणणारी गोष्ट. (बैलाला तांबडी वस्तू चुजविते त्याप्रमाणें). *R.-shank*, एक जातीचे पक्षी. *R.-skin*, American *Indian*, *R. man*, उत्तर अमेरिकेंतील नीग्रो. *R.-start*, a red-tailed song-bird. एक गाणारा पक्षी. *R.-triangle*, emblem of the Y. M. C. A. 'यंग् मेन्स् ख्रिश्चन असोशिएशन' या संस्थेचें लाल त्रिकोणाकृति चिन्ह,-निशाणी,-खूण. *R.-wing*, एक जातीचे पक्षी. *Red with anger*, रागानें लाल झालेला, अतिशय रागावलेला. *With red hands*, रक्तानें हात माखलेला. *Red'ness, n.* तांबडेपणा, लाली, रक्तिमा. *Reddy, a.*, *Red'ly, adv.* (rare.) *Red'coat, n.* British soldier. ब्रिटिश शिपाई. *Red'handed, adv.*, in the act of crime. प्रत्यक्ष क्रिया करीत असतां, प्रत्यक्ष अपराध करीत असतांना. *To take r.-h.*, प्रत्यक्ष गुन्हा करीत असतां पकडणें. *Redhot, a.* heated to redness; (*fig.*)furious, excited. तापून लाल झालेला, लालबुंद; अति रागावलेला. *R.-hot poker*, लाल परागांच्या फुलांचें (फुल-) झाड. *Red'lead n. & v. t.*, a red pigment. शेंदूर (फासणें, लावणें). *Redtape, n.* excessive adherence to forms in official transactions. सरकारी कामामध्यें अगदीं बारीकसारीक गोष्टींतसुद्धां महत्त्व देणें. *Red-tapism, n.* सरकारी कचेरींतील फाजिल शिस्त. *R.-tapery, n.* *R.-tapist, n.* सरकारी कामांतील फाजील शिस्त पाळणारा.

**Rĕdact'**, *v. t.* (रिडॅक्ट्)—to put into literary form, arrange for publication, edit. वाङ्मयाचें रूप देणें; प्रसिद्ध करण्याकरितां मजकूर तयार करणें, संपादन करणें. *Redac'tor, n.*

**Rĕdăc'tion**, *n.* (रिडॅक्शन्)—putting into literary form; new edition. वाङ्मयाचें रूप देणें; नवीन आवृत्ति.

**Rĕdăn'**, *n.* (रिडॅन्)—field-work with two faces forming salient angle. (कोनाकृती दर्शनी बाजूंची) तात्पुरती तटबंदी.

**Rĕdd**, *v. t.* (रेड्)—(Sc.) to clear up, arrange, tidy, put right. साफसूफ करणें, व्यवस्थित लावणें,-करणें.

**Rĕdd'en**, *v. t. & i.* (रेडन्)—to make or grow red, to become red, to blush. तांबडा होणें; तांबडा करणें,

**Rĕdd'ish**, *a.* (रेडिश्)—rather red. तांबूस, आरक्त.

**Rede**, *v. t.* (रीड्)—(arch.) to advise; read (riddle). उपदेश करणें, मत देणें; (कोडें) उलगडणें, उघड करून सांगणें, सोडवणें. *n.* (arch.) advice; tale. उपदेश; गोष्ट.

**Rĕdeem'**, *v. t.* (रीडीम्)—to buy back; to recover by expenditure of effort; to save, rescue, reclaim; deliver from sin; make amends for, to compensate. परत विकत घेणें; पैसे भरून किंवा प्रयत्नानें सोडविणें; मुक्त करणें, तारणें; पापापासून मुक्त करणें; भरपाई करणें, भरून काढणें.

**Rĕdeem'er**, *n.* (रिडीमर्)—one who ransoms or redeems; title of Christ. पैसे देऊन सोडविणारा, तारक, उद्धारक, त्राता; येशू खिस्त.

**Rĕdĕmp'tion**, *n.* (रिडेम्प्शन्)—redeeming or being redeemed; thing that redeems. पैसे देऊन सोडविणें, सुटका, मुक्तता; तारक गोष्ट, खंडणी, खरेदी. *Past, beyond, without, r.*, so that *r.*, is hopeless. उद्धाराची आशा नसलेला, उद्धार न करतां येण्याजोगा. *In the year of our r. 1918, etc.*, १९१८ सालीं.

**Rĕdin'tegrāte**, *v. t.* (रिडिंट्रिग्रेट्)—to restore to wholeness or unity; re-establish, (तुकडे तुकडे जोडून) वस्तु पहिल्यासारखी करणें, पुनर्घटना करणें, पुन्हां स्थापन करणें.—*tion n*;—*tor, n.*

**Rĕdīre'ct**, *v. t.* (रिडायरेक्ट्)—to re-address. पत्ता बदलून पाठविणें.

**Rĕd'ōlent**, *a.* (रेडोलन्ट्)—emitting odour, smelling strongly of; suggestive of. सुगंधयुक्त; उग्र; सूचनात्मक, सूचक, दर्शक. *Red'olence, n.*

**Rĕdou'ble**, *v. t. & i.* (रिडबल्)—to intensify; increase, multiply. पुष्कळ वाढविणें, जोरदार करणें, दुणावणें, दुप्पट होणें,-करणें.

**Rĕdoubt'**, *n.* (रिडाउट्)—(fortif.) detached outwork without flanking defences. बाहेरील कोट, बाह्य-कोट (तटबंदी).

**Redoubt'able**, *a.* (रिडा'उ-टेबल्)—(of opponent, warrior, controversialist, etc.) formidable. भयंकर, प्रतापी, प्रचंड, दांडगा.

**Rédound'**, *v. i.* (रिडा'उन्ड्)—to contribute in the end (to one's advantage, &c.), come as final, परिणामीं (फायदेशीर) होणें, (मध्यें) पर्यवसान होणें, परिणाम -शेवट-असणें, होणें. [L. *re*, back; *unda*, a wave]

**Rédrĕss'**, *v. t.* (रिड्रे'स्)—to put right again, to remedy, make up for, re-adjust. बंदोबस्त करणें; दूर करणें; दाद घेणें; भरपाई करून देणें, सरळ-नीट-करणें. *n.* redressing; compensation, reparation. (गान्हाणीं) दूर करणें; भरपाई; बंदोबस्त, तजवीज इलाज. *To r. the balance*, restore equality. समतोल करणें.

**Rédūce'**, *v. t.* (रिड्यू'स्)—to bring down, lower, weaken, impoverish; subdue; convert to another form; diminish; suit or adapt to; compel to do (rare); restore to original or proper position कमी करणें; क्षीण करणें; जिंकणें; दुसरें रूप देणें, चें रूपांतर करणें; कमी-हलका-करणें; शिजविणें, स्वरूप देणें, साजेसा करणें; करण्याला भाग पाडणें; (निखळलेलें हाड) जाग्यावर बसविणें. *To r. rule to practice*, to act on it. नियम आचरणांत आणणें, नियमाप्रमाणे वागणें. *Is in a very reduced state*, feeble. फार अशक्त झाला आहे. *Reduced circumstances*, poverty after prosperity. संपन्न स्थितीनंतर दरिद्रावस्था येणें. *R. the establishment*, dismiss officials, cut down expenses. अधिकारी-नोकरवर्ग-कमी करणें, खर्च कमी करणें. *Reduced officers*, काटकसरीसाठीं नोकरीवरून कमी केलेले अधिकारी. *Reduc'ible, a.*

**Réduc'tion**, *n.* (रिड'क्शन्)—reducing or being reduced; diminution, curtailment; reduced copy of picture, maps etc.; a rule in arithmetic. कमी करणें, कमी होणें; क्षीणता; (चित्र, नकाशा, वगैरेंची) लहान प्रमाणावर काढलेली प्रत; (अंक०) भांजणी, रूपांतरक्रिया. *R. to absurdity*, proof of the falsity of a principle etc. given by producing a logical consequence of it that is absurd; pursuing of a principle to unpractical length. अयुक्त सिद्धांता-कडे जाणें, विसंगतिप्रदर्शन; अव्यवहारी तत्त्वप्रदर्शन,-तत्त्वनिष्ठा.

**Reduc'tio ad absurd'um**, *n.* (रिड'क्टिओ ॲड् ॲब्स'र्डम्)—reduction, absurdity. अयुक्त सिद्धांताकडे जाणें, असंगतिप्रदर्शन, अनिष्टापत्ति.

**Rédŭn'dant**, *a.* (रिड'न्डंट्)—superfluous; excessive; pleonastic; copious; luxuriant; full पाजवीपेक्षां जास्त; अतिशय; अनावश्यक शब्दांचा; अगदीं विपुल, पूर्ण. *Redun'dancy, n. Redun'dance, n.*; *Redun'dantly, adv.*

**Rédū'plicate**, *v. t.* (रिड्यू'प्लिकेट्)—to make double, repeat; (gram.) repeat (letter, syllable), form (tense) by reduplication. दुप्पट करणें, द्विरुक्ति करणें. *Redu'plicative, a.*

**Rédū'plica''tion**, *n.* (रिड्यू'प्लिके''शन्)—repetition of the initial syllable. पुनरावृत्ति, पुनरुक्ति, अभ्यास.

**Reed**, *n.* (रीड्)—kinds of water or marsh plant, with tall straight stalk; musical instrument; a weaver's instrument; (collect. pl.) reeds growing in a marsh or used as material esp. for thatching, wheat straw prepared for thatching; pastoral poetry; vibrating part of sound instruments. बोरू, वेत, वेत्र; वेणु, अलगुज, विवेरें; (कापड विणण्याची) फणी; (अने०) बोरूचीं-वेताचीं -झाडें, (शाकारण्याकरितां उपयोगांत येणारे) बोरू, गव्हाचीं कांडें; मेंढपाळांचें गाणें, ग्रामीण गीतें; (वाद्याची) जिव्हाळी. *v. t.* to thatch with reed; make (straw) into *r.*, fit (musical instrument) with reed. वेतानें-बोरूनें-शाकारणें; बोरू तयार करणें; जिव्हाळी बसाविणें. *Broken reed*, unreliable person or thing. अविश्वासू मनुष्य,-वस्तु. *To lean on a r.*, put trust in weak thing or person. दुर्बळावर विश्वास ठेवणें,-विसंबून राहणें. *R.-organ, R.-pipe*, धातूच्या जिव्हाळीचें वाद्य. *Reed'ed, a.* (esp.) with vibrating reeds. जिव्हाळी बसाविलेला.

**Re-ĕd'ĭfy**, *v. t.* (रीएडिफाय्)—to rebuild (house etc.); build up again (hopes, wasted tissue etc.). पुन्हां बांधणें; पुनर्घटना करणें.

**Reed'y̆**, *a.* (रीडि)—abounding in reeds; like a reed, (of voice) scratchy like a reed instrument. वेतांनीं भरलेला, वेतमय; वेतासारखा (बारीक, लवचीक); फुटका, चिरका (आवाज). *Reed'iness, n.*

**Reef**, *n.* (रीफ्)—one of several strips along the top or bottom of a sail that can be taken in; ridge of rock, sand, etc. about the level of the water's surface; (gold-mining) bed-rock; lead or vein of auriferous quartz. वारा वाढेल त्याप्रमाणें शिडाचा आंवळून घेतां येणारा भाग, शिरी; पाण्यांतील खडक, खडकांची ओळ, खराबा; सोन्याचे कण असलेल्या स्फटिकासारख्या पदार्थाचा थर,-रांग; (वरील मातीच्या आधारावरून) गाळाचा पाया खडक. *v. t.* to take in reefs of (sail), shorten (top mast, paddles of paddle-wheel). शिरी बांधणें; आत ओढून घेणें, आखूड करणें *To take in a r.*, proceed cautiously. सावधगिरीनें पुढें जाणें,-पुढें पाऊल टाकणें. *R.-knot*, दुहेरी गांठ.

**Reefer**, *n.* (री'फर्)—close double breasted stout jacket; (sl.) midshipman. एक प्रकारची तंग मजबूत बंडी; (गलबतावरील) [illegible] दर्जाचा अधिकारी.

**Reek**, *n.* (रीक्)—foul or stale smell; smoke, vapour, exhalation; fetid atmosphere. [illegible] वास, धाण; धूर, वाफ; घाणेरडी हवा. *v. i.* to smell unpleasantly (of), emit vapour, steam, smoke. घाण येणें, (कशा) दुर्गंधि येणें; वाफ (वगैरे) धूर निघणें,-येणें, धुमसणें. *The r. of [illegible]* [illegible] घाण,-[illegible]. *Reeky, a.* [illegible] मय, धुरकट, धुम्रमय; [illegible]

Reel, *n.* (रील्)—kinds of winding-apparatus; a cylinder for holding wound cotton, &c.; staggering motion; a Scottish dance. सूत गुंडाळण्याचें चाक, चरक, चक्र, दोऱ्याचें रीळ; झोकांडी, झेप; स्कॉटलंडमधील लोकांचा एक प्रकारचा नाच. *v. t & i.* to wind on reel; rattle (story, list, verses) off without pause; sway, stagger; be shaken; (of eyes, mind, head) be in a whirl; be dizzy, swim; seem to shake. रिळावर सूत गुंडाळणें; भडाभडा, खडाखड-म्हणणें; झोकांडी जाणें, धडपडणें; हादरून जाणें; फिरणें, गोंधळांत पडणें, गरगर-चक्कर-करणें,-येणें; काळोखी येणें; हालतोसा भासणें. *Off the reel,* (fig.) straight off in rapid succession. एकदम सरळ, लागोपाठ, मध्ये अडथळा न येतां. *Reel'ingly, adv.*

Reeve, *n.* (रीव्ह)—1. (hist.) chief magistrate of town or district; (Canada) president of village or town council; 2. female of the ruff. (ऐति०) शहराचा किंवा प्रांताचा मुख्य अंमलदार; (कॅनडा) ग्राम-शहर-पंचायतीचा अध्यक्ष; एक जातीच्या पक्ष्याची मादी. *v. t.* (Naut.) to pass rope, etc. through ring etc., fasten (rope etc.) by reeving; (of ship) thread (shoals, ice pack). कड्यामधून दोर घालणें; कड्यांत दोर घालून आवळणें; मार्ग काढणें.

Refe̱ction, *n.* (रिफे'क्शन्)—slight meal; refreshment of food or drink. फराळ; उपाहार, अल्पाहार.

Refec'tory, *a.* (रिफे'क्टरि, रे'फिक्टरि)—a room for meals in monastery, &c. मठांतील भोजनगृह. फराळाची खोली.

Refer', *v. t. & i.* (रिफर्')—to trace or ascribe *to*; assign *to*; send on or direct to some authority or source of information; make allusion *to.* (चा) आधार घेणें; पाहणें; 'शीं' संबंध जोडणें, लावणें; (चा) अभिप्राय घेणें, (चें) मत घेणें. (निर्णयाकरितां कडे) पाठविणें; माहितीकरितां धाडणें, (च्यावर) सोंपविणें; हवाला देणें, हवालणें, सोंपविणें; (चा) उल्लेख करणें. *To r. to drawer,* abbr. R D. banker's note suspending payment etc. of cheque. हुंडीचें-चेकचे-पैसे न देण्याविषयींची,-अडकवून ठेवण्याची-खूण,-शेरा.

Referee', *n.* (रेफरी')—an arbitrator, a person chosen to decide between opposing parties; an umpire. तिऱ्हाईत; मध्यस्थ, लवाद, प्रमाणपुरुष, निर्णेता. *v. i.* to act as referee. मध्यस्थ-लवाद-म्हणून काम करणें.

Ref'erence, *n* (रे'फरन्स्)—referring of something to another authority; allusion, a passage referred to; a person vouching for another; (vulg.) testimonial; relation, respect, correspondence, to. आधार, आश्रय, उल्लेख, संदर्भ; दुसऱ्याकरितां खातरी देणारा मनुष्य; प्रशंसापत्र; प्रशस्तिपत्र; परस्पर संबंध,-अवलंबन, प्रमाणबद्धता. *v. t.* to provide (book) with *r.* to authorities. संदर्भ-ग्रंथांची यादी (पुस्तकांत) देणें. *In, with, r. to,* regarding, as regards, about. (च्या) विषयीं, संबंधीं. *Without r. to,* irrespective of. च्या शिवाय, ला न जुमानतां. *Cross r.,* to another passage in same book. एकाच पुस्तकांतील दुसऱ्या उताऱ्याचा हवाला,-संदर्भ. *Book of r.,* संदर्भग्रंथ. *R. library,* library of books that can be consulted but not taken away. संदर्भग्रंथसंग्रह. *Referen'tial, a.*

Referen'dum, *n.* (रेफरे'न्डम्)—a system by which a question is submitted to the direct vote of the electorate for final approval or rejection. ज्या पद्धतीनें कोणताहि विषय मतदारमंघाच्या पुढें संमति किंवा नकार देण्याकरितां मांडला जातो ती पद्धत, सार्वजनिक मतमोजणीनें (एकाद्या गोष्टीचा) निर्णय लावण्याची पद्धत.

Refine', *v. t. & i.* (रिफा'इन)—to free from impurities or defects, to purify, to clarify; to make elegant or cultured; employ sub'lety of thought or language, make fine distinctions, discourse subtly (*up*) *on*; improve (*up*) *on* by refinements. शुद्ध करणें, मळी काढणें, साफ करणें, शोधन करणें, (सोनें, चांदी वगैरे) गाळणें; सुसंस्कृत करणें, सुविनीत करणें; सूक्ष्म विचार,-भाषा,-योजणें; सूक्ष्म-नाजूक-भेद दाखविणें,-काढणें; सूक्ष्म-विवेचकरीतीनें वादविवाद,-प्रवचन,-करणें, सूक्ष्म विवेचन करणें; संशोधन करून सुधारणें. *Refinedly, adv.*

Refine'ment, *n.* (रिफा'इन्-मेन्ट्)—fineness of taste or feeling or manners; subtle piece of arrangement or reasoning. सभ्यता, सौजन्य; संशोधन, सुधारणा; सूक्ष्म भेद, नाजूक भेद; नाजूकपणा; बुद्धिवादाची सूक्ष्मता.

Refi'ner, *n.* (रिफा'इनर)—purifier, (esp.) person who refines sugar, metal, etc. संशोधन करणारा, शुद्ध करणारा, (साखर, सोनें, चांदी वगैरे) गाळणारा. *Refinery, n.* place where sugar etc. is refined. (साखर वगैरे) शुद्ध-सफेत-करण्याचा कारखाना.

Refit', *v. t. & i.* (रीफि'ट्)—to renew or repair ship; (of ship) undergo refilling. जहाज दुरुस्त करणें,-नव्यासारखें करणें; (जहाजाची) दुरुस्ती होणें. *n.* process of refitting. दुरुस्ती (क्रिया), डागडुजी. —*ment, n*

Reflect', *v. t. & i.* (रिफ्लें'क्ट्)—to throw back (light, heat, sound); (of mirror) to show the image of; to throw discredit *on*; to meditate, to consider; to make disparaging remarks *on*; reproduce to eye or mind, exactly correspond in appearance or effect to; (of action, result) bring back or cause to redound; fold back (rare). मागें फिरविणें, प्रतिक्षेप,-परावर्तन,-करणें, उशी घेणें; प्रतिबिंब पाडणें; ठपका देणें, मनन करणें, विचार करणें, दोष देणें, ठपका ठेवणें, दोषास्पद उल्लेख करणें; डोळ्यांसमोर-मनश्चक्षूपुढें-उभें करणें,-राहणें; चें प्रतिबिंब असणें, प्रतिमा असणें; उलट परिणाम होणें, उलटणें; परिणामीं होणें; दुमडणें, दुमटणें.

Reflec'tion, *n.* (रिफ्लें'क्शन्)—reflected light, heat, colour, or image; a thing that brings discredit *on*; a thought; reconsideration; mental faculty dealing with products of sensation and perception; mental or verbal comment (*on, upon*).

प्रतिच्छाया, प्रतिबिंब, परावर्तन, प्रतिक्षेप; दोष किंवा ठपका आणणारी गोष्ट, ठपका; विचार, मनन, विमर्श; पुनः विचार करणें, पुनश्चिंतन; विचारशक्ति, विमर्शनशक्ति, टीका. *Angle of r.*, made by reflected ray with perpendicular to surface. परावर्तन कोन. *Reflectional, Reflec'tionless, aa.*

Reflĕc'tive, *a.* (रिफ्लेक्टिव्ह्)—throwing back images; meditative. परावर्तक, प्रतिबिंबग्राही, प्रतिबिंब पाडणारा; चिंतन करणारा, विचारी, मननशील.

Reflĕct'or, *n.* (रिफ्लेक्टर्)—(esp.) appliance for reflecting light or for reflecting image in telescope. किरण परावर्तन होण्यासाठीं (दिव्याचे मागें लावलेली) अन्तर्गोल चकाकित तबकडी, आरसा, परावर्तक; (दुर्बिणीची) परावर्तक तबकडी.

Re'flĕx, *n.* (रीफ्लेक्स्)—reflected light or colour or glory; an image in mirror, &c.; reflex action. प्रतिबिंबित प्रकाश, रंग, वैभव, उसनें वैभव; (आरशांतील) प्रतिबिंब, प्रतिरूप, प्रतिच्छाया; परावर्तनक्रिया. *a.* reactive, reflected; directed back, reflective, recoiling: introspective. प्रतिबिंबित; परावृत्त, परत आलेला; अंतर्मुख झालेला, अंतर्मुख (विचार).

Reflĕx'ive, *a.* (रिफ्लेक्सिव्ह्)—(*Gram.*) implying an agent's action upon himself. कर्मकर्तृवाच्य; कर्तृवाचक. *n*, a reflexive word or form कर्मकर्तृवाच्य,-कर्तृवाचक,-शब्द,-रूप.

Rĕf'luent, *a.* (रेफ्लुअन्ट्)—back-flowing (of tide, flood, etc.). परत वळणारा, ओहोटीचा. *Refluence, n.* ओहोट, ओहोटी. [ L. *re*, back; *fluere*, flow ]

Re'flŭx, *n.* (रीफ्लक्स्)—backward flow. ओहोटी, ओहोट.

Refŏrm', *v. t. & i.* (रिफॉर्म्)—to form again; to make or become better; to abolish or cure abuses. पुन्हा करणें, फिरून घनविणें, सुधारणें; मार्गावर किंवा ताळ्यावर आणणें. *n.* removal of abuses; amendment; improvement. सुधारणें; दुरुस्ती; सुधारणा. *R.-School*, (U. S.) reformatory. बालगुन्हेगारांसाठीं शाळा. *Reformable, a.*

Rĕforma'tion, *n.* (रेफर्मेशन्)—change for the better, esp. in political or religious or social affairs. सुधारणा. *The R.*, प्रॉटेस्टंट धर्मपंथ स्थापन करणाऱ्यांची सोळाव्या शतकांतील धर्मसुधारणेची चळवळ.

Refŏrma'tive, *a.* (रिफॉर्मेटिव्ह्)—tending to reform. सुधारणापर, सुधारणेचा, सुधारक.

Refŏrm'atory, *n.* (रिफॉर्मेटरि)—a school for juvenile offenders. लहान वयाच्या अपराध्याकरितां सुधारण्याची शाळा. *a.* reformative. सुधारणा करणारा, सुधारणापर.

Refŏr'mer, *n.* (रिफॉर्मर्)—an advocate of reform; leader in the Reformation. सुधारक, सुधारणावादी; सोळाव्या शतकांतील धर्मसुधारणेचा पुढारी.

Refrăct', *v. t.* (रिफ्रॅक्ट्)—(of water, air, glass, etc.) to deflect (light) where it enters obliquely from a medium of different density; (Chem.) analyse (nitre) to discover percentage of impurities. निराळें वळण लावणें, वक्रगति देणें, फिरवणें, वक्रीभवन करणें; सोऱ्याचें पृथक्करण करणें.—*able, a.*; —*ion, n.* वक्रीभवन.;—*ional*,—*ive, aa.* वक्रीभवनाचा, वक्रीभवनविषयक.

Refrăc'tor, *n.* (रिफ्रॅक्टर्)—refracting medium or lens or telescope. वक्रीभवन करणारा (-रें माध्यम, वक्र दुर्बीण).

Refrăc'tory, *a.* (रिफ्रॅक्टरि)—stubborn; unmanageable; rebellious. हट्टी; कह्यांत न येणारा (रोग वगैरे), दुःसाध्य, हट्टी, चेंगट; शिरजोर, दांडगा, बंडखोर. —*torily, adv.*;—*toriness, n.*

Refrain', *n.* (रिफ्रेन्)—recurring phrase or line, esp. at the end of stanzas. ध्रुपद, अखंड कडवें. *v. t. & i.* to abstain from doing something; to keep oneself aloof; to check oneself (*from*). आवरणें; स्वतः अलग राहणें; थांबवून धरणें.

Refrăn'gible, *a.* (रिफ्रँजिबल्)—refractable, subject to refraction (as rays of light). वक्रगति देण्यासारखा, वक्रीभवनयोग्य. *Refrangibi'lity, n.* वक्रीभवनयोग्यता, वक्रीभवन होणें.

Refrĕsh', *v. t. & i.* (रिफ्रेश्)—to reanimate, to give new strength to, to reinvigorate; to freshen up (memory); (sl.) take drink or food; (rare) make cool again; restore (fire, electric battery etc.) with fresh supply. ताजातवाना करणें, टवटवी आणणें; हुशारी आणणें; (स्मृति, आठवण) ताजी करणें; खाऊन पिऊन ताजेतवानें होणें; (विस्तव कोळसा घालून) पेटता ठेवणें, जागृत ठेवणें.

Refrĕsh'er, *n.* (रिफ्रेशर्)—in vbl. senses; extra fee to counsel in prolonged case; (sl.) a drink. ताजातवाना करणारा; (लांबलेल्या खटल्यांत) वकिलाला दिलेली जादा फी,-मेहनताना; पेय.

Refrĕsh'ment, *n.* (रिफ्रेश्‌मेन्ट्)—a thing that refreshes; (usu. pl.) food. टवटवी आणणारी वस्तु; (अने०) उपाहार, अन्न. *R. room*, (at railway station) रेल्वेस्टेशनवरील उपाहारगृह, फराळाचें दुकान. *R. car*, (on train) आगगाडींतील फराळ करण्याचा डबा,-उपाहारगृह.

Refri'gerant, *a. & n.* (रिफ्रिजरन्ट्)—(substance) serving to refrigerate. थंडावा देणारा, गार करणारा, शीतकर, थंड ठेवणारा (पदार्थ,-साधन).

Refri'gerāte, *v. t.* (रिफ्रिजरेट्)—to make cool or cold; freeze or preserve (food etc.) by exposure to extreme cold. थंड करणें, (पदार्थ न सडावा, अन्न न नासावें, म्हणून किंवा गोठण्याकरितां) अतिशय गारांत ठेवणें, गार ठेवणें,-करणें.—*tion, n.* शीतोपचार क्रिया, शीतकरण. *Refri'gerator, n.* refrigerating apparatus. (बर्फाच्या साहाय्यानें) पदार्थ गार ठेवण्याची पेटी,-खोली. [ L, *re*, back; *frigus*, cold ]

Rĕf'ūge, *a.* (रेफ्यूज)—a shelter from pursuit or danger or trouble, retreat; a person or thing that provides shelter; raised piece in middle of busy road for crossers to halt on. आश्रय, आसरा, आधार, शरण; आश्रय देणारा मनुष्य, उपाय,

इलाज, तरणोपाय, युक्ति ; रहदारीचा रस्ता ओलांडण्यासाठीं पायीं चालणाऱ्यांना मध्यें थांबण्याची उंचवट जागा, आधारस्थान. *House of r.*, institution for the homeless etc. अनाथालय. *Seek r.*, आसरा,-आश्रय-घेणें. *To take r.*, आसरा करणें. *v. t. & i.* (rare) to. give *r.* to, take *r.* आसरा-आधार-देणें,-घेणें. [L. *re*, back ; *fugere*, flee]

**Rĕfūgee'**, *n.* (रेफ्यू-जी')—a person who flees for refuge abroad to escape persecution. शरणागताश्रित, शरणार्थी, छळ टाळण्यासाठीं परागंदा झालेला मनुष्य, निर्वासित.

**Rĕfŭl'gent**, *a.* (रिफ़'ल्जन्ट्)—casting a bright light, shining, gloriously bright. चकचकीत, तेजस्वी, उज्ज्वल —*gence, n.*;—*gently, adv.* [L. *re*, intensively ; & *fulgere*, shine]

**Rĕfŭnd'**, *v. t. & i.* (रिफ़'न्ड्)—to pay back, to repay ; to restore, to reimburse. परत देणें ; पुन्हा भरपाई करणें.—*ment, n.*

**Rĕfū'sal**, *n.* (रिफ्यू'झल्)—act of refusing ; chance of taking a thing before it is offered to others, preemption. नाकारणें, नकार, अव्हेर, न पतकरणें, पसंती नापसंती. *Will take no r.*, is importunate. अत्याग्रही,-हट्टी,-आहे.

**Rĕfūse'**, *v. t. & i.* (रिफ्यूझ्)—to decline a request or offer, to reject ; to deny what is solicited or required ; not to accept. नाकारणें, नकार देणें, नाहीं म्हणणें; नाकबूल करणें; (विनंति) अमान्य करणें, अर्ज नामंजूर करणें. *Resfus'er, n. Refus' able, a.*

**Rĕfū'se**, *n.* (रेफ्यूस्)—what is left as worthless or not wanted, dregs, scum, dross. कचरा, गाळसाळ, केर.

**Rĕfūte'**, *v. t.* (रिफ्यूट्)—to prove falsity or error of, to prove to be false or erroneous ; to rebut by argument. खोटा पाडणें ; खंडन किंवा निराकरण करणें, खोडून काढणें, *Refu'table, a.* खंडनीय, निराकरणीय, खोडून काढण्याजोगा.

**Rĕfūtā'tion**, *n.* (रेफ्युटे'शन्)—proving to be erroneous, confutation, disproof. खंडन, निराकरण, निरसन, निरास.

**Rĕgain'**, *v. t.* (रिगे'न्)—to recover possession of (esp. *r. consciousness*) ; to reach (a place) again ; recover (one's *feet, footing, legs*). पुन्हां मिळविणें, शुद्धीवर येणें ; पुन्हां पोहोंचणें ; पुन्हां सांवरणें.

**Rē'gal**, *a.* (री'गल्)—of or pertaining to kings, kingly, royal ; magnificent. राजांचा, राजाला शोभणारा ; भव्य, थोर, दरबारी, शोभिवंत. *Regal'ity, n.* royal privilege. राजाचा हक्क,-अधिकार.

**Rĕgāle'**, *n.* (रिगे'ल)—a choice repast. मेजवानी. *v. t. & i.* to refresh sumptuously, to entertain choicely *with* ; to give delight to ; to feed oneself choicely. चमचमीत मेजवानी देणें ; संतुष्ट करणें. आनंद देणें ; संतोष-होणें ; चमचमीत भोजन करणें, वर ताव मारणें, वर हात मारणें.—*ment, n.*

**Rĕgā'lia**, *n. pl.* (रिगे'ल्या)—ensigns of royalty, insignia of royalty used at coronation, &c. ; insignia of an order. राजचिन्हें ; पंथाचें चिन्ह. 2. *n.* large cigar of good quality. उंची विडी.

**Rĕgärd'**, *v. t. & i.* (रिगा'र्ड्)—to gaze upon ; to give heed to, to take into account ; to have respect or reverence for ; consider, (of things) concern, have relation to. लक्षपूर्वक पाहणें, न्याहाळणें, लक्ष देणें, मानणें, गणणें ; सन्मान करणें, समजणें, मानलें जाणें ; शीं संबंध असणें,-येणें. *n.* gaze ; attention, heed, care ; relation ; kindly or respectful feeling ; (*pl.*) good wishes, compliments. नजर, दृष्टि, लक्ष, ध्यान ; संबंध ; सन्मान, आदरबुद्धी, पूज्यबुद्धि ; (अने॰) शुभेच्छा, प्रेमभाव. *Does not r. me*, has nothing to do with. माझ्याशीं कांहीं कर्तव्य-संबंध-नाहीं. *As regards, regarding*, about, touching. च्या विषयीं,-संबंधीं. *In r. to*, or *of, with r. to*, regarding, as touching, about. विषयीं, संबंधीं. *Out of r. for*, कडे लक्ष देऊन. *with kind rr.* (*to you all*), *my best rr.*, प्रेमानें, प्रेमपूर्वक, स्नेहभावानें.

**Rĕgärd'ant**, *a.* (रिगा'र्डन्ट्)—(Heral.) looking backwards ; observant, with steady or intent gaze. मागें पाहणारा ; टक लावून पाहणारा.

**Rĕgärd'ful**, *a.* (रिगा'र्ड्फुल्)—having or paying regard, not neglectful. (*of*). दक्ष, सावध, दक्षता बाळगणारा.

**Rĕgärd'ing**, *prep.* (रिगा'र्डिंग)—concerning. संबंधीं.

**Rĕgärd'less**, *a. & adv.* (रिगा'र्ड्-लेस्)—taking no account of, heedless, negligent. बेपरवा, बेफिकिरीनें.

**Rĕgătt'ă**, *n.* (रिगॅ'टा)—a race in which boats or yachts contend for prizes. नावांची शर्यत, नौकांची शर्यत.

**Rēgĕlāte'**, *v. i.* (रीजिले'ट्)—(of fragments of ice, snow, etc.) be fused into frozen mass. (बर्फाच्या तुकड्यांचा) पुन्हां गोठून गोळा होणें, फिरून जमणें.—*tion, n.* बर्फाच्या तुकड्यांचा गोळा. [L. *re*, again ; *gelare* freeze]

**Rē'gency̆**, *n.* (री'जन्सि)—office of a regent ; commission acting as regent ; regent's period of office. राजप्रतिनिधीचा अधिकार ; राजप्रतिनिधीमंडळ ; त्यांचा अंमल, कारकीर्द. *The R.*, (in Eng. Hist.) 1810-20. इंग्लंडमधील १८१०-२० वर्षांमधील अंमल.

**Rĕgĕn'erāte**, *v. t. & i.* (रिजे'नरेट्)—to invest with new and higher spiritual nature ; to improve moral condition of ; to breathe more vigorous life into (person, institution etc.) ; generate again, bring or come into renewed existence ; reform oneself. नवा जन्म देणें, आध्यात्मिक उत्क्रान्ति करणें; नीतिमत्ता सुधारणें ; चेतना उत्पन्न करणें, पुनरुज्जीवन करणे, नवा जोम उत्पन्न करणें ; फिरून वाढणें, उत्पन्न करणें, होणें ; स्वतःची सुधारणा करणें. *a.* (रिजे'नरिट्) generated or born anew, spiritually born again ; reformed. पुनरुत्पादित, आध्यात्मिक दृष्ट्या पुन्हां जन्मलेला ; सुधारलेला, संस्कार झालेला. *Regenera-*

*tion, n.* पुनरुत्पत्ति, पुनरुज्जीवन, नवोद्गम, नव्यानें बनणें. —*tive, a.*

Régĕn'erātor, *n.* (रिजे'नरेटर्)—(esp.) fuel-saving firebrick device in furnaces. (भट्टींतील न जळणाऱ्या विटांची) उष्णता राखणारी कमान.

Re'gent, *n.* (री'जन्ट्)—a person administering kingdom during minority, absence, or incapacity of a monarch, ruler, ruling principle (rare); (U. S.) member of governing board in some universities. प्रतिनिधि म्हणून राज्यकारभार पाहणारा मनुष्य, रीजंट; शास्ता, प्रमुख तत्त्व; कांहीं विश्वविद्यालयांच्या व्यवस्थापक मंडळाचा सभासद. *a* (following n.) acting as r. प्रतिनिधि म्हणून राज्यकारभार पाहणारा. *Queen, prince etc. r.,* राजाचे ऐवजीं राज्यकारभार चालविणारी राणी, राजपुत्र इ.

Re'gicide, *n.* (रे'जिसाइड्)—one who kills or murders a king; king-killing. राजवध करणारा; राजवध, राजहत्या. *The rr.,* those concerned in trying and executing Charles I. इंग्लंडचा राजा पहिला चार्ल्स याला देहांत शासन करणारे लोक. *Regicid'al, a.* [L. *rex,* a king; *caedere,* to kill]

Rĕgime', *n.* (रेझी'म)—the method of government; prevailing system of things. राज्यपद्धति; चालू पद्धति, अमदानी, कारकीर्द.

Re'gimĕn, *n.* (रे'जिमेन्)—an orderly government, prescribed diet and habits; (Gram.) syntactic dependence between words; rule, regime (rare). खाण्यापिण्यांत पथ्य, पथ्यापथ्यनियम; कारकसंबंध; अमदानी, कारकीर्द.

Re'giment, *n.* (रे'जमेन्ट्)—permanent unit of an army or a body of troops usually commanded by Lieut. Colonel; (off. sl.) large array or number, legion (usu. *of*). सैन्याची तुकडी, पलटण; सैन्य, सेना, फौज, पुष्कळ संख्या, जमाव. *v. t.* to form into regiment (s), organise in groups. सैन्याच्या तुकड्या पाडणें, (कामकरी लोकांचे वगैरे) गट पाडणें. *Regimen'tal, a.* of a regiment. पलटणीचा, तुकडीचा. *Regimen'tals, n. pl.* (-ल्ट्ज्), regimental uniform. तुकडीचा गणवेष, लष्करी पोषाख. *Regimenta'tion, n.*

Re'gion, *n* (री'जन्)—tract of a country; a separate part of the world; (often pl.) sphere or realm; part round some bodily organ. प्रदेश; विभाग; लोक, भुवन; प्रांत, विषय; चक्र, मंडळ. *Lower rr.,* hell, realm of the dead. नरक, पाताल, अधोभुवन. *Upper rr.,* sky, heaven. आकाश, स्वर्ग (लोक). *The r. of the eyes,* नेत्रमंडळ.

Re'gister, *n.* (रे'जिस्टर्)—a book in which items are recorded for reference; official list; compass of voice or instrument; recording indicator of speed etc.; adjustable plate for widening or narrowing an opening etc. in fire-grate; (print.) exact correspondence of printed matter on two sides of leaf; (photog.) correspondence of focussing screen with plate or film. नोंदपुस्तक, नोंदणी, नोंद, यादी; (आवाजाचा, यंत्राचा) फेर, घेर; वेगमापक (व दर्शक) घड्याळ; सुपडींतील हवा बंद करणारें झांकण; (छापील पानाच्या दोन्ही बाजूंच्या मजकुराचा ओळीस ओळ असा) मेळ; (छायाचित्र) मेळ, एकोपीपणा. *v. t.* to set down formally, to record in writing; enter or cause to be entered in some register; (of instrument) record automatically, indicate; correspond, make correspond exactly; (U. S.) express (surprise, grief etc.) by bodily movement, etc. लिहून ठेवणें, नोंदणें, नोंद करणें, रजिस्टर करणें; विशिष्ट पुस्तकांत,-तऱ्हेनें -नोंदणें, नोंदविणें; (आपोआप) मोजणें, दर्शविणें; मेळ बसणें,-बसविणें; (हावभावांनीं भावना) दर्शविणें. *To r. letter,* टपालांत (पोष्टांत) पत्र वगैरे जादा आकार भरून नोंदविणें. *R. luggage,* प्रवासी सामानाची रेल्वे ऑफिसांत नोंद करणें. *R. oneself,* put one's name on electoral *r.* मत देणाऱ्याच्या यादींत नांव नोंदविणें. *Re'gistrable, a.*

Re'gisträr, *n.* (रे'जिस्ट्रार्)—an official charged with keeping a public register. दफ्तरदार, फडणीस, रजिस्ट्रार. *Re'gistrarship, n.* रजिस्ट्रारची जागा,-हुद्दा.

Rĕgistra'tion, *n.* (रेजिस्ट्रे'शन्)—act of registering; enrolment. नोंदणें, दफ्तरांत दाखल करणें; नोंद, नोंदणी.

Re'gistrў, *n.* (रे'जिस्ट्रि)—place where registers are kept. नोंदणीखात्याची कचेरी. *Married at a r.* or *r. office* or *register office,* (without religious ceremony.). धार्मिक विधि न करितां नोंदणीपद्धतीनें विवाह झालेला. *Servant's registry (office),* नोकरीसाठीं रिकाम्या जागांची व नोकरीसाठीं अर्ज करणाऱ्यांची नोंद,-नोंदणी कचेरी.

Rĕg'nal, *a* (रे'ग्नल्)—of a reign. राज्यारोहणाचा. *R. year,* राज्यारोहणवर्ष. *R. day,* anniversary of accessions. राज्यारोहणाचा वाढदिवस.

Rĕg'nant, *a.* (रे'ग्नन्ट्)—reigning; (of things, qualities, opinions etc.) predominant, prevalent. राज्य करीत असलेला, राज्य करणारा; विशेष, मुख्य, प्रचलित, चालू. *Queen R.,* queen ruling in her own right and not as consort. राज्य करणारी राणी.

Rĕgŏrge', *v. t. & i.* (रिगॉ'र्ज्)—to bring or cast up again, vomit, disgorge; flow back from pit, channel, etc.; swallow again. उलटून टाकणें, वांति करणें, उलटणें; मागें,-उलट,-वाहणें, पुन्हां गिळणें.

Re'gress, *n.* (री'ग्रेस्)—going back, a passage back; backward tendency. मागें जाणें, प्रतीपगमन; प्रतिगमन; पाठीमागें जाण्याचा कल, परागति, वक्री गति. *v. i.* (Astron.) (रिग्रे'स्), to move backwards. वक्री होणें, माघारीं वळणें, मागें जाणें. *Regress'ive, a.*

Regrĕ'ssion, *n.* (रिग्रे'शन्)—backward movement, reversion, retrogression. प्रतिगमन; उलट जाणें, परागति, वक्रीगति.

Regrĕt', *v. t.* (रिग्रे'ट्)—to be sorry for loss of; be sorry for something past; to grieve at, to

repent. खेद वाटणें, शोक करणें, वाईट वाटणें ; दुःख होणें ; पश्चात्ताप पावणें, पस्तावा होणें. *n.* sorrow for loss; repentance or vexation, pain of conscience for some fault. शोक, खेद, दुःख ; पस्तावा, पश्चात्ताप, रुखरुख. *Regret'ful, a.* full of regret. अनुतप्त, दुःखपूर्ण, दुःख वाटणारा, दुःखाचा. *Regrett'ed, pa. t. & pa. p.*

Regrett'able, *a.* (रिग्रे'टेबल्)—undesirable, unwelcome; deserving censure. अनिष्ट, शोचनीय; निंद्य.—*ably, adv.*

Re'gular, *a.* (रे'ग्युलर्)—following or exhibiting a principle, harmonious; consistent; having the parts symmetrical, systematic; habitual; not capricious or casual; not defective or amateur; acting or done uniformly; correct; (Eccl.) bound by religious rule, belonging to monastic order; (Gram.) following a normal type of inflection; (colloq.) complete, thorough, indubitable. नियमबद्ध, नियमित ; शिस्तवार; प्रमाणबद्ध, रेखीव, पद्धतशीर ; नियमानें,-नेमानें-होणारा ; कसलेला, तरबेज ; समप्रमाण, एकमारखा ; अचूक, बरोबर ; नियमनिष्ठ, नेमनिष्ठ, व्रती ; नियमित (शब्द, क्रियापद इ.) ; पक्का, निखालस, शुद्ध. *n.* a soldier of the regular or standing army (*usu. in pl.*); one of the regular clergy; person permanently employed. खड्या फौजेंतील सैनिक; धर्मसंस्थेंतील पाद्री; कायम नोकरी असलेला मनुष्य. *A regular (solid)*, सम (घन). *A r. life*, नेमस्त राहणी. *R. people*, living *r.* lives, नेमस्तपणानें राहणारे लोक. *To keep r. hours*, do same thing at same time daily. दररोज नेमल्या वेळीं नेमलेलें काम करणें. *A r. cook*, धंदेवाईक आचारी. *R. soldier*, कायमचा सैनिक. *R. army*, कायमचें (खडें) सैन्य. *A r. rascal, hero*, पक्का लबाड, खंदा वीर. *R. fellow,-guy*, (U. S. sl.) all round good fellow. एकंदरींत चांगला-गुणी-मनुष्य. (*adv.*) *is r. angry*, पक्का-भरपूर-रागावला आहे. *Comes, happens, r.*, नियमितपणें येतें,-घडतें. *Reg'ularize, v. t.* नियमित करणें;-*iza'tion, n.*

Regula'rity, *n.* (रेग्युले'रिटि)—conformity to rules, steadiness or uniformity in course. नियमितपणा.

Reg'ulate, *v. t.* (रे'ग्युलेट्)—to control by rule; to subject to restrictions; to adapt to requirements; to adjust (watch, &c.). कायदा,-नियम,-लावणें, नियमित करणें; शिस्त लावणें; धोरणानें चालविणें; (घड्याळ) बरोबर लावणें, (गति किंवा चाल) सारखी ठेवणें. *Reg'ulative, a.* नियामक.

Regula'tion, *n.* (रेग्युले'शन्)—regulating or being regulated; prescribed rule. नियमित ठेवणें ; ठराव, कायदा. (*attrib.*) ordinary, usual, formal. सामान्य, नेहमींचा, चालू, ठराविक.

Reg'ulator, *n.* (रे'ग्युलेटर्)—(*esp.*) part of a watch or other machine that regulates (pace, movements, &c.). गतिव्यवस्थापक (घड्याळ्याचा किंवा यंत्राचा) भाग, (यंत्राची गती सारखी ठेवणारा) दांडा, कांटा, (दिव्याची) फिरकी, चावी.

Reg'ulus, *n.* (रे'ग्युलस)—(pl-li), (astron.) bright star in Leo (R.); (chem.) purer or metallic part of mineral separated by sinking to bottom in crucible, impure metallic product of smelting various ores; golden-crested wren. सिंहराशींतील एक तेजस्वी तारा, मघा नक्षत्र ; (मुशीच्या तळाशीं बसलेला) धातूचा शुद्ध अवशेष, (निरनिराळ्या अशुद्ध धातु गाळून उरलेला) गाळ, अशुद्ध गाळसाळ; (युरोपांतील 'रेन' पक्ष्याची एक जात *Reg'uline, a.* मघा नक्षत्राचा. [L. *rex, regis* king]

Regur'gitate, *v. i. & t.* (रिग'र्जिटेट्)—to gush back; (of stomach or receptacle) pour or cast up again. जोरानें परत येणें, उलटणें ; ओकून टाकणें, ओतून टाकणें.—*gita'tion, n.*

Rehabil'itate, *v. t.* (रीहॅबि'लिटेट्)—to restore to rights, privileges, reputation, etc. पूर्वींचे अधिकार परत देणें, पूर्वपदारूढ करणें.-*tion, n.*-*tor, n.*

Rehe'ar, *v. t.* (रीहि'अर्)—to hear (law suit) over again. (फिर्यादीची वगैरे) पुन्हां सुनावणी होणें, पुन्हा चालणें, ऐकणें. *Rehear'ing, n.*

Rehears'al, *n.* (रिह'र्सल्)—recital, narration; practice, trial performance. पाठ म्हणणें; तालीम, पूर्व प्रयोग. *Dress r.*, such *r*, in costume, when practice is far advanced. रंगीत,-रंगी,-तालीम.

Rehearse', *v. t. & i.* (रिह'र्स)—to recite, to say over; to give list of; to enumerate; to repeat in private, to practise (a play &c.). पाठ म्हणणें; हकीकत सांगणें ; कथन करणें ; तालीम करणें; पूर्वप्रयोग करणें.

Reichs'tag, *n.* (रा'इख्सटाग)—Parliament of the German federation. जर्मनराष्ट्राचें पार्लमेंट, जर्मनीची पार्लमेंटसभा.

Reign, *n.* (रेन्)—sovereignty, rule; sovereign's period of rule. राजसत्ता, राज्य; राजवट, अमदानी, कारकीर्द. *v. i.* to be a sovereign; to prevail. राज्य करणें; अंमल असणें, वरचढ असणें. *R. of terror*, period of sanguinary excesses by revolutionaries or reactionaries. झोटिंगपादशाही, अंदाधुंदीचें राज्य. *Better to r. in hell than serve in heaven*, बरवी ती निरयगति, परवशता शतगुणी करी जाच; स्वर्गात बंदा गुलाम होऊन राहण्यापेक्षां नरकांतलें राजेपण पत्करलें. *Reigning beauty*, सौंदर्यराणी. *Silence reigns*, all is quiet. सर्वत्र शांततेचें साम्राज्य पसरलें आहे. *Reign'ing, a.*

Reimburse', *v. t.* (रीइम्ब'र्स)—to repay (a person, to replace in treasury, to refund. पुन्हा देणें, परत भरणें, भरून देणें, भरणें.-*ment, n.* [F *re*, back; *im*, in; *bourse*, purse]

Rein, *n.* (रेन्)—a long narrow strap used to guide horse; (*fig.*) means of control (oft pl. in same senses). लगामाची दोरी; ताब्यांत ठेवण्याचें साधन, सूत्र, लगाम. *v. t.* to check with reins; (*fig.*) to govern, to control. लगाम खेचणें, लगामीनें आवरणें; ताब्यांत ठेवणें, कह्यांत आणणें. *To draw r.*, stop one's horse, pull up, abandon effort, retrench expenditure. घोडा थांबवणें, लगाम खेचणें, प्रयत्न सोडून देणें.

खर्च कमी करणें. *to give horse the rr.* or *r.*, let its own way. घोड्याची लगाम सैल सोडणें, त्याला वाटेल तसा जाऊं देणें. *To give r.* or *the rr. to one's imagination*, let it have free scope. कल्पनाशक्तीला पूर्ण मुभा देणें. *Assume, drop, the rr. of government*, enter upon, resign, office. अधिकार-सत्ता-हातीं घेऊन चालविणें,-सोडणें. *Rein'less*, *a.* लगाम नसलेला, स्वैर.

Reincarn'āte, *v. t.* ( रीइन्का'र्नेट् )—to be again embodied in flesh, be again living embodinent of. पुनः अवतार धारण करणें, नवा अवतार घेणें. *Reincarna'tion*, *n.* पुनः अवतार, नवा अवतार.

Rein'deer, *n.* ( रे' न्-डिअर् )—deer of cold climates used for drawing sledges. उत्तर प्रदेशांतला एक प्रकारचा सांबर.

Reinfōrce', *v. t.* ( री-इन्फो' र्स् )—to support or strengthen by additional men or material; ( rare ) enforce again, reinforce. जास्त मनुष्यें किंवा साहित्य देऊन बळकटी आणणें, कुमक पाठवून मजबूत करणें, पुन्हा अमलांत आणणें. *n.* thicker part of gun next breech, strengthening part, band etc. added to object. बंदुकीच्या मागचा जाड भाग, मजबुतीचें साधन. *Reinforced concrete*, with metal bars, gratings or wire embedded in it. धातूच्या तारा, किंवा खांब लावून त्यांमध्यें खचून भरलेला चुना, दगड वगैरेचें मिश्रण ( इमारतीच्या बांधकामासाठीं ).

Reinfōrce'mĕnt, *n.* ( री-इन्फो'र्स्-मेन्ट् )—( often *pl.* ) additional troops or ships. जादा सैन्य किंवा जहाजें.

Reins, *n. pl.* ( रेन्झ् )—( *arch.* ) the kidneys; the lower part of the back, loins. मूत्राशय; कमर.

Reinstāte', *v. t.* ( री-इन्स्टे'ट् )—to instate anew, to re-establish in former position; to restore to health or proper order, restore to privileges. पूर्वपदावर स्थापना करणें; प्रकृति सुधारणें; पुनः स्थापित करणें, फिरून ठेवणें, नेमणें, योजणें.—*ment*, *n.* पुनः स्थापना, पुनः नेमणें,-ठेवणें.

Reinsure', *v. t. & i.* ( रीइन्शु'अर् )—to insure against ( loss that one has under-written ). ( पाण्यासंबंधींच्या विम्याचा पुन्हा ) विमा उतरणें. *Reinsurance*, *n.*

Reinvĭgo'rāte, *v. t.* ( रीइन्व्हिगो'रेट् )—to make vigorous again. पूर्वीचा जोम आणणें, पुनः शक्ति आणणें.

Reĭt'erāte, *v. t.* ( री-इ'टरेट् )—to repeat over again or several times. फिरून फिरून किंवा अनेक वेळां म्हणणें.-*tion*, *n.*-*tor*, *n.*;-*tive*, *a.*

Reive, reiver,—See Reave.

Rejĕct', *v. t.* ( रिजे'क्ट् )—to put aside as not to be accepted, used, etc.; vomit. नाकारणें, झिडकारणें, अमान्य करणें; वांती करणें, ओकून टाकणें. *Rejec'tion* *n.*; *Rejec'tor*, *n.*

Rejoice', *v. t. & i.* ( रिजॉ'इस् )—to cause joy to, to make glad; to feel joy, to be glad; to celebrate an event. आनंद देणें, हर्षविणें; आनंदणें; हर्ष पावणें; प्रसंग साजरा करणें. *Rejoic'ingly*, *adv.*

Rejoi'cings, *n. pl.* ( रिजॉ'इसिंङ्झ् )—merrymaking, feeling of joy, festivity. उत्सव, उत्साह, मौज.

Rejoin', *v. i. & t.* ( रिजॉ'इन् )—to say in answer, to retort; to join ( one's companion, etc. ) again., reunite. प्रत्युत्तर करणें, उलट जबाब देणें; फिरून भेटणें; पुनर्भेट होणें.

Rejoin'der, *n.* ( रिजॉइ'न्डर् )—a retort; ( Law ) reply to replication. प्रत्युत्तर, उलटजबाब, उत्तरपक्ष, परतजबाब.

Reju'vĕnāte, *v. t. & i.* ( रिजू'व्हिनेट् )—to make or grow young again. फिरून तारुण्य देणें, पुनः तरुण होणें,-*nation*, *n.*;-*nator*, *n.*

Rejuvenes'cence, *n.* ( रिजूव्हिने'सन्स् )—growing young again, the state of being young again; पुनर्यौवनावस्था; पुनः टवटवीत होणें -*cent*, *a.* पुनः नवीन-तरुण-होणारा, पुनः टवटवीत होणारा.

Relăpse', *v. i.* ( रिलॅ'प्स् )—to fall back *into* worse state after improvement. फिरून बिघडणें, उलट खाणें, दुराचरणाकडे-आळसाकडे-वळणें,-उलटणें. *n.* a falling back. फिरून बिघडणें, उलट, माघार.

Relāte', *v. t. & i.* ( रिले'ट् )—to narrate, to recount; to bring into relation. कथन करणें; हकीकत सांगणें; संबंध किंवा नातें जोडणें, संबंध असणें. *Rela'ted*, ( *p. p.* ) connected, allied. संबंधी, नातेवाईक, आप्त, आप्तसंबंधी. *Rela'tedness*, *n.*

Relā'tion, *n.* ( रिले'शन् )—narration, a narrative; connexion between persons or things; kinsman, kinswoman, relative. निवेदन, निरूपण; संबंध, अन्वय; नातलग, आप्त. *In r. to, with r. to*, as regards. संबंधीं, विषयीं. *Relations are rather strained*, cordiality is impaired. ( त्यांचे ) संबंध दुरावले आहेत, मैत्रींत बिघाड झाला आहे, वितुष्ट आलें आहे. *Rela'tional*, *a.*;-*ally*, *adv.*

Relā'tionship, *n.* ( रिले'शन्-शिप् )—the tie of kindred, kinship; affinity. नातें, आप्तपणा; संबंध.

Rĕl'ative, *a.* ( रे'लटिव्ह् )—corresponding in some way; related to each other, having reference to; ( Gram. ) referring to an expressed or implied antecedent; comparative; correlative. सापेक्ष; संबंधीं, विषयक; तुलनात्मक; परस्परसंबंधीं; संबंधीं. *n.* ( *Gram.* ) a relative word; a kinsman or kinswoman, a relation; ( philos. ) *r.* thing or term. संबंधी शब्द; नातलग; संबंधी पदार्थ,-पद. *R. pronoun*, संबंधी सर्वनाम. *Supply is r. to demand*, मागणीच्या प्रमाणांत पुरवठा असतो. *Rel'atively*, *adv.* सापेक्षतेनें, सापेक्ष रीतीनें. ( Gram. ) *The principal rr. are* who, which, that, what. चार मुख्य संबंधीं शब्दः ' हू ', ' व्हिच् ', ' दॅट् ', व्हॉट् '.

Rĕl'ativism, *n.* ( रे'लटिव्हिझम् )—doctrine that knowledge is of relations only. संबंधानुबंधि ज्ञानवाद, वस्तुमात्रांमधील परस्पर संबंध जाणल्यानें ज्ञानप्राप्ति होते हा वाद. *Rel'ativist*, *n.* संबंधानुसंबंधिज्ञानवादी.

Rĕlativ'ity, *n.* ( रेलटि'व्हिटि )—relativeness; ( philos.) Einstein's theory of the universe, based on the

principle that all motion is relative, and regarding space-time as a fourth dimension. संबंधिता, परस्परसंबंध ; आइन्स्टीन नामक तत्त्ववेत्त्याचा सापेक्षतावाद.

Rèlăx', *v. t. & i.* (रिलॅक्स)—to cause or allow to become loose or slack; to enfeeble, to enervate, to mitigate; to grow less strict or energetic, to make less severe. सैल सोडणें,-करणें, शिथिल करणें, ढिला होणें,-करणें ; कमी करणें ; सौम्य होणें, सुस्त होणें. *Relaxed throat*, form of sore throat, घशाचा (सुजेचा) एक रोग. *A relaxing climate*, (opp. *bracing*), सुस्ती आणणारी हवा. *To r. one's efforts, r. in one's efforts*, प्रयत्नांत कसूर करणें, प्रयत्न शिथिल करणें.

Rēlăxā'tion, *n.* (रीलॅक्सेशन्)—partial remission of penalty, duty etc.; diminution of tension, etc.; cessation of restraint, recreation, amusements (शिक्षेची, कर्तव्याची, वगैरे) सूट, कमी होणें,-करणें ; सौम्यपणा, हलकेपणा ; विश्रांति, करमणूक.

Rēlay', *n.* (रि-ले')—set of fresh horses or gang of men to replace tired ones, gang of men or supply of material similarly used; (Teleg.) instrument reinforcing long distance current with local battery; (Wireless) broadcast of a message, programme, originating at, and received from, another station. दमलेल्यांच्या ऐवजीं बांधण्याकरितां ठेवलेले घोडे, टप्प्याचे घोडे किंवा कामाला लावण्याकरितां ठेवलेलीं माणसें ; टप्प्यावरची बॅटरी, (परठिकाणाहून आलेले संदेश व कार्यक्रम टेलिफोनद्वारें घेऊन) बिनतारी यंत्रानें प्रसृत करणें. *v. t. & i.* to arrange in, provide with, replace by, get, relay (s). टप्प्याची व्यवस्था करणें, टप्पे असणें; बिनतारीनें परठिकाणचे संदेश घेऊन प्रसृत करणें. *R. race*, race between teams of which each runner does part of the distance, the second etc. members of teams starting when 1st etc. ends. (प्रत्येक बाजूपैकी दर एक गडी हप्त्याहप्त्यानें धावून खेळली जाणारी) धावण्याची शर्यत. *R. station*, (Wireless) a transmitting station which receives most of its programme by a telephone line from a distant studio. फार दूरच्या (बिनतारी संदेश-) ठिकाणाहून टेलिफोनद्वारें बिनतारी-संदेश कार्यक्रम-घेऊन तो सगळीकडे प्रसृत करणारें ठिकाण.

Rélease', *v. t.* (रि-लीस)—to set free, to liberate, to deliver; to unfasten; to remit, to make over to another; to exhibit (a cinema film) for first time. मुक्त करणें ; सोडवणें ; मिळकतविरील हक्क सोडणें, दुसऱ्याच्या स्वाधीन करणें ; सिनेमा फिल्म पहिल्या प्रथम दाखविणें. *n.* liberation from confinement, fixed position, trouble &c.; written discharge, receipt; conveyance of right or estate. मुक्तता ; सुटका, सोडवणूक, सोडचिठ्ठी, बेदावापत्र. *Releasee', Releas'or, nn.*; *Releas'able, a.*

Rĕl'ĕgāte, *v. t.* (रॅलिगेट्)—to banish, to exile; to consign to an inferior position; to transfer to a person for decision or execution; to refer for information etc. *to.* देशाबाहेर पाठविणें, हद्दपार करणें ; कमी दर्जावर ढकलणें, निर्णयार्थ एखाद्याकडे पाठविणें ; (बजावणीकरितां, माहितीकरितां) पाठविणें. *Relega'tion, n. Rel'egable, a.*

Relent', *v. i.* (रिलेन्ट्)—to relax severity; to give way to compassion. कमी तीव्र,-कठोर,-होणें ; सौम्य होणें ; कळवळा येणें, द्रवणें, कळवळणें, दया येणें. *Relent'ingly, adv.*

Rēlĕnt'lĕss, *n.* (रिलेन्ट्लेस)—without tenderness or compassion, merciless, pitiless. निर्दय, पाषाणहृदयी, क्रूर, कठोर.*-ly, adv.*; *-ness, n.*

Rĕl'évant, *a.* (रॅलिव्हन्ट्)—concerned with the matter in hand; appropriate, pertinent *to.* प्रसंगोचित ; समर्पक, प्रस्तुत. *Rel'evance,-cy, nn.* प्रस्तुतता, प्रसंगोचितता. *Rel'evently, adv.* (चालू) विषयाला धरून.

Relī'able, *a.* (रिलायबल)—that may be relied upon or trusted, trustworthy. विश्वासू, भरंवशाचा. *Reliabil'ity, n.*; *Reli'ableness, n.*; *Reli'ably, adv.* विश्वासानें, भरंवशानें.

Relī'ance, *n.* (रिलायन्स)—act of relying, trust, confidence (*upon, on, in*), dependence, thing depended on विश्वास, भरंवसा, श्रद्धा ; आधार, आश्रय, आश्रयस्थान, विश्वासाचें ठिकाण. *Reli'ant, a.*

Rĕl'ic, *n.* (रॅलिक्)—part of holy person's body or belongings kept after his death; memento, souvenir; (*pl.*) dead body of person; what has survived destruction or wasting, residue. साधुसंताच्या देहाचा अवशेष, अस्थी ; स्मृति, स्मारक ; (अने०) प्रेत ; शेष, अवशेष ; पडका भाग.

Rĕl'ict, *n.* (रॅलिक्ट्)—man's widow. विधवा.

Relief', *n.* (रिलीफ्)—alleviation or end of pain, distress, or anxiety; money or food given to victims of disaster, &c.; delivery of a place from siege; replacing of persons on duty by those appointed to take turn of duty; redress of hardship or grievance; feature that diversifies monotony or relaxes tension; way of carving or moulding in which design stands out from surface; distinctness like this. दुःखपरिहार, दुःखमोचन ; विसावा, विश्रांति ; संकटग्रस्तांना केलेलें साहाय्य ; (वेढ्यांतून) मुक्तता, सुटका ; (पाहाऱ्याचा) पालट, सोडवणें ; बदलणें, बदली, बदल्या, सोडविणारा ; गाऱ्हाण्याची दाद, संकटाची दाद लावणें ; (एकसारखेपणाचा कंटाळा घालविणारें) वैचित्र्य, विरोध ; नकाशांतील कांहीं भाग पृष्ठभागापासून उंचसखल दिसतील अशा तऱ्हेनें कोरणें ; उंचसखलपणा, उठाव, उंची ; ठळकपणा, ठळठळीतपणा. *R. works*, building etc. operations started to give work to the unemployed. मदतीचीं कामें ; दुष्काळी कामें. *A r. fund*, संकटग्रस्तांच्या मदतीसाठीं वर्गणी. *A blank wall without r.*, कंटाळवाणी दिसणारी उघडीनागडी भिंत. *A comic scene follows by way of r.*, कंटाळा घालविण्यासाठीं-वैचित्र्य उत्पन्न करण्यासाठीं-हास्यरसप्रधान प्रसंग दाखविला जातो-

*Stands out in r.,* अगदीं ठळकपणें दृष्टीस पडतो. *General r.,* सामान्य उंची,-उंचपणा.

Rĕlieve', *v. t.* (रिलीव्ह्)—to give relief to; bring, be, a relief to; to bring into relief. आराम देणें, सुटका करणें; दुःखपरिहार करणें; शमविणें, उपशमन करणें; मदत करणें, सोडविणें, उठावदार करणें, ठळकपणा आणणें. *Relieving officer,* official with care of the poor गोरगरिबांची काळजी घेण्यासाठीं नेमलेला अंमलदार. *Relieving arch,* arch built in substance of wall to relieve part below from weight. मुकी कमान. *To relieve one's feelings,* मन (विचार बोलून दाखवून) हलकें करणें. *To r. nature,* मलमूत्र विसर्जन करणें. *To r. guard* पहारा बदलणें, आळीपाळीनें बदली पहारा करणें. *Reliev'able, a.*

Rĕli'gion, *n.* (रिलि'जन्)—a system of faith and worship; human recognition of a personal God entitled to obedience; monastic state; action that one is bound to do. धर्म; भक्ति, आस्तिक्यबुद्धि, ईश्वरभक्ति, कर्तव्यकर्म. *To enter into, in r.,* मठवासी-संन्यासी-बनणें. *Established r.* (इंग्लंड मधील) राजस्थापित धर्म. *Natural r.,* सृष्टिसिद्ध धर्म. निसर्गधर्म, *Revealed r.,* ईश्वरप्रेषिताच्या द्वारें प्रगट झालेला धर्म. *R.-less, a.* धर्म नसलेला, धर्महीन.

Rĕli'gious, *a.* (रिलि'जस्)—imbued with religion, teaching religion; devout; belonging to a monastic order; scrupulous, conscientious. धार्मिक; भक्तिमान्, भाविक, आस्तिक, श्रद्धाळु; मठवासी; सदसद्विवेकपूर्वक, फार, अतिशय. *n.* person bound by monastic vows. (दारिद्र्य, ब्रह्मचर्य, आज्ञापालन ह्या तीन शपथा घेतलेला) रोमन कॅथोलिक जोगी. *Reli'giously, adv.*; *Reli'giousness, n.*

Rĕlinqu'ish, *v. t.* (रिलि'न्क्विश्)—to give up; to resign, to surrender, to renounce a claim to. सोडणें; सोडून देणें, (हक्क) सोडणें, त्याग करणें. *—ment, n.*

Rĕli'quarў, *n.* (रिलि'क्वरि)—a receptacle for holding relics. मृताच्या अस्थि वगैरे ठेवण्याची पेटी, भांडें; अवशेष ठेवण्याचें पात्र.

Rĕliq'uiae, *n. pl.* (रिलि'क्विई)—remains; (Geo.) fossil remains of animals or plants; (Bot.) withered remains of leaves decaying on stem. अवशेष; जमिनींत कुजलेले मृत प्राण्यांचे किंवा वनस्पतींचे अवशेष; देठांवर कुजलेल्या पानांचे अवशेष. [L.]

Rĕl'ish, *n.* (रे'लिश्)—distinctive flavour or taste of, enjoyment of food or other things, zest; sauce or other appetizer. स्वाद, चव, रुचि, गोडी; कळकळ, अभिरुचि, आवड; तोंडीं लावणें. *v. t. & i.* to serve as relish to; get pleasure out of, to be pleased with, to have a pleasing taste, smack of. स्वादिष्ट असणें; गोड वाटणें; गोड लागणें, खमंग लागणें; चव येणें, पसंत पडणें, बरा वाटणें; चवदार असणें; ची चव, छटा असणें. *No r. for poetry,* कवितेबद्दल गोडी न वाटणें, काव्याविषयीं गोडी नसणें. *Rel'ishable, a* रुचि लागण्यासारखा, आवडण्यासारखा, स्वादिष्ट, रुचकर.

Rĕlŭc't, *v. i.* (रिल'क्ट्)—to feel or show reluctance, make opposition (*at, against*). नाखुशी, तिटकारा, -वाटणें,-दाखविणें, प्रतिकार करणें. *Reluc'tate, v. i., Reluc'tation, n.*

Rĕlŭc'tance, *n.* (रिल'क्टन्स)—unwillingness. नाखुशी, नाराजी, कंटाळा, विमुखता.

Rĕlŭc'tant, *a.* (रिल'क्टन्ट्)—unwilling to do something, loath, disinclined. नाखुश, नाराज, विन्मुख. *Reluc'tantly, adv.* नाखुषीनें, कष्टानें.

Rĕlў, *v. i.* (रिला'य्)—to put one's trust in; to depend with confidence *on,* (or *upon* person or thing). विश्वास ठेवणें; भरंवसा असणें, पातणें, अवलंबणें.

Rĕmain,' *v. i.* (रिमे'न्)—to be left over; to abide, to stay in some place or condition, to be left behind after any event; (with compl.) continue to be. उरणें, शिल्लक असणें, शिल्लक राहणें; मुक्काम करणें; टिकणें; नांदणें; राहणें, असणें. *R. faithful,* विश्वासू असणें,-राहणें. *Ir. Yours truly, etc.,* (पत्राच्या शेवटचा मायना).

Rĕmain'der, *n.* (रिमे'न्डर्)—residue; remaining persons or things, unsold stock, esp. of books; (Arith.) number left after subtraction; (Law) residual interest in estate devised to another, right of succession to title or position on holder's decease. अवशेष; शिल्लक राहिलेले लोक किंवा वस्तु; शिलकी (पुस्तकांचा) सांठा; (अंक.) बाकी, अंतर, शेष; (काय.) अवशिष्ट (राहिलेला) मालकी हक्क, शेष. *R. man,* devisee of r. शेषाधिकारी (cf. *Reversioner,* उत्तराधिकारी). *R. theorem,* अवशेष-सिद्धान्त.

Rĕmains', *n. pl.* (रिमे'न्झ्)—what remains over; surviving parts or amount, remainder, relics of antiquity, a dead body. अवशेष; शिल्लक भाग किंवा रक्कम; प्रेत, शव.

Rĕmänd', *v. t.* (रिमा'न्ड्)–to send back (a prisoner) into custody to allow of further evidence being obtained. (पुरा पुरावा मिळेपर्यंत कच्चा कैदी) परत (अटकेंत) पाठविणें. *n.* such recommittal. परत अटकेंत पाठविणें.

Rĕm'anent, *a.* (रे'मनन्ट्)—remaining, residual. बाकी, अवशिष्ट. *R. magnetism,* that left in iron after electric excitation. अवशिष्ट लोहचुंबकधर्म,-आकर्षण-शक्ति.

Rĕmärk', *v. t. & i.* (रिमा'र्क्)—to take notice of, to perceive; to observe; to say by way of comment, make comment upon. (कडे) लक्ष देणें,-पाहणें, लक्षांत घेणें; पाहणें; टीका करणें. *n.* noticing, an observation; comment; a thing said. पाहणें; टीका; उल्लेख, बोलणें; शेरा मारणें, शेरा. *Worthy of r.,* remarkable. महशूर, प्रसिद्ध. *To make a r.,* speak. बोलणें, टीका करणें, शेरा मारणें.

Rĕmärk'able, *a* (रिमा'र्केबल्)—worth notice; exceptional; striking. लक्षांत ठेवण्यासारखा, असामान्य; विलक्षण. *-ably, adv.*;*—ableness, n.*

**Rēmar'ry**, *v. t.* ( रीमॅरि )—to marry again. पुनर्विवाह करणें,-लावणें. *Remar'riage*, *n.* पुनर्विवाह.

**Rĕm'ĕdў**, *n.* ( रें'मिडि )—cure for disease or any evil; healing medicine or treatment; redress. उपाय, उपचार; इलाज. *v. t.* to rectify, to counteract; to make good; to cure medically (rare). उपाय करणें; परिहार करणें; ( औषधानें ) बरें करणें. *Remé'dial*, *a.* affording a remedy. उपायाचा, इलाजाचा, परिहारक, प्रतिबंधक. *Remé'dially*, *adv.*; *Rem'ediless*, *a.* असाध्य, उपाय नसलेला. *Remé'diable*, *a* परिहार,-उपाय,-करण्याजोगा, साध्य.

**Rémĕm'ber**, *v. t.* ( रिमे'म्बर )—to retain in the memory; not forget; make present to, tip; to convey greetings from, to put in mind of. स्मरण ठेवणें, आठवणें; न विसरणें; बक्षीस देणें, चिरिमिरी देणें; नमस्कार सांगणें, आठवण करून देणें. *To r. oneself*, bethink oneself of one's manners or intentions after a lapse. ( स्वतःच्या वागणुकीची,-च्या विचारांची- ) कांहीं काळानंतर स्मृति होणें, आठवण होणें. *R. me kindly to them*, त्यांना माझे नमस्कार सांगा. *Remembered me in his will*, त्यानें आपल्या मृत्युपत्रांत मला देणगी देऊन ठेवली आहे. *R. the waiter*, चाकराला बक्षीस दे. *Remem'berable*. *a.* स्मरणीय, ध्यानांत ठेवण्यासारखा.

**Rémĕm'brance**, *n.* ( रिमे'म्ब्रन्स )—memory, recollection; keepsake, souvenir, memorial, regard; (*pl.*) greetings conveyed through third person. स्मरण, आठवण; आठवणूक, स्मारक, स्मरणार्थ ( दिलेली वस्तु; ( अने० ). दुसऱ्यामार्फत सांगितलेला नमस्कार. *To put in r*, remind. आठवण करणें,-देणें.

**Rémĕm'brancer**, *n.* ( रिमे'म्ब्रन्सर् )—reminder, memento, of; title of certain officials. आठवण देणारा, स्मरण करणारा; सरकारी ( कांहीं ) अधिकाऱ्याची पदवी *Legal r.*, सरकारला कायद्याचा सल्ला देणारा वरिष्ठ सरकारी अधिकारी.

**Rémind'**, *v. t.* ( रिमा'इन्ड् )—to put in mind of, to bring to the remembrance of, cause to remember. आठवण करणें, सुचवणें.

**Remi'nder**, *n.* ( रिमा'इन्डर् )—a speech or thing that reminds, a hint. आठवण करून देणारें भाषण, सूचना, स्मरणपत्र, स्मरणार्थ पत्र.

**Rĕmĭnĭs'cence**, *n.* ( रेमिनि'सन्स )—remembering, recollection; fact or incident of which one remembers the occurrence; recovery of knowledge by mental effort; (*pl.*) collection in literary form of incidents that person remembers; point in thing reminding of other thing. आठवण; आठवणींतील घडलेली गोष्ट; पूर्वस्मृति; ( अने० ) आयुष्यांतील आठवणी; स्मृतिकारक विषय. *Platonic doctrine of r.*, that all knowledge is such recovery of things known to the soul in previous existences. ह्या जन्मींचें ज्ञान ( पूर्वीच्या जन्मांतील ज्ञानाची स्मृति होय, हा प्लेटोचा ) पूर्वस्मृति-सिद्धांत. *Reminiscen'tial*, *a.*

**Rĕmĭnĭs'cent**, *a.* ( रेमिनि'सन्ट् )—recalling the past; reminding one *of*, retrospective. मागील आठवण करून देणारा,-सूचक.-*ly*, *adv.*

**Rémise'**, *v. t.* ( रिमा'इम् )—( legal ) surrender, make over ( right, property ). ( हक्क ) सोडणें.

**Rémiss'**, *a.* ( रिमि'स )—careless of duty; negligent; lacking energy. ढिला, शिथिल, कामचुकार, निष्काळजी; बेपरवा; सुस्त.-*ly*, *adv.*-*ness*, *n.*

**Rémiss'ible**, *a.* ( रिमि'सिबल् )—that may be remitted. ढिला करण्यासारखा, सूट देण्यासारखा, क्षमा करण्यासारखा.

**Rémiss'ion**, *a.* ( रिमि'शन् )—release, relinquishment; forgiveness, pardon; diminution of force ( sins etc. ). सुटका; क्षमा, माफी, सूट; बाधा कमी होणें, उतार, उपशम. *Remiss'ive*, *a.*

**Remit'**, *v. t. & i.* ( रिमि'ट् )—to pardon; to refrain from exacting or inflicting ( debt, punishment, etc. ), to abate, to slacken; to refer ( matter ) to some authority; send back to lower court; to transmit. क्षमा करणें; सूट देणें; कमी होणें; हवालीं करणें; मुकदमा खालच्या कोर्टाकडे पुन्हां पाठविणें; पैसे ( वगैरे ) पाठविणें. *Remitter*, *n.* ( पैसे ) पाठविणारा; माफी, क्षमा,-करणारा. *Remittee'*, *n.* पैसे घेणारा, ज्याला पैसे पाठविले तो. *Remittal*, *n.* पाठविणें, सोडणें, देणें.

**Rémit'tance**, *n.* ( रिमि'टन्स )—the sum or thing remitted, money sent to a person. पाठविलेला पैसा किंवा वस्तु.

**Rémit'tent**, *a. & n.* ( रिमि'टन्ट् )—( fever ) that abates at intervals. मधून मधून कमी होणारा ( ताप ), संतत ( ज्वर ).

**Rĕm'nant**, *n.* ( रे'म्नन्ट् )—small remaining quantity or piece or number, surviving trace of; fragment, scrap, esp. piece of cloth offered at reduced price. अवशिष्ट भाग, बाकी, शेष; शिल्लक राहिलेला तुकडा, कटका.

**Rémŏn'strance**, *n.* ( रिमॉ'न्स्ट्रन्स )—remonstrating, expostulatory counsel or advice, a protest. कानउघाडणी, तक्रार, तक्रार-अर्ज.

**Rémŏn'strant**, *a.* ( रिमॉ'न्स्ट्रन्ट् )—of or in remonstrance. कानउघाडणी करणारा, तक्रारीचा. *n.* person who remonstrates. कानउघाडणी करणारा,-तक्रार करणारा,-मनुष्य.

**Rémŏn'strāte**, *v. t. & i.* ( रिमॉ'न्स्ट्रेट् )—to make protest, expostulate, (*against* course, *with* person, *on* or *upon* matter ), to urge in remonstrance. तक्रार करणें, कान उघडणें, आक्षेप,-हरकत,-घेणें. *Remonstrator*, *n.*

**Rémŏrse'**, *n.* ( रिमॉ'र्स )—stings of conscience, bitter repentance, compunction. पश्चात्ताप, खेद, चुरचूर, तळमळ, सदयता.-*ful*, *a.* filled wtih repentance. पश्चात्ताप झालेला, अनुतप्त.-*less*, *a.* deaf to compassion. निर्दय, कठोर.

**Rémōte'**, *a.* ( रिमो'ट् )—far away in place or time; not closely related; far apart; distant from;

out-of-the way, secluded; (chiefly superl. of idea etc.) slight (est), faint (est), least. दूरचा, लांबचा; दूरच्या नात्याचा; अतिशय दूरचा; अंतरावरील; एकांतवासाचा, रहदारीपासून दूरचा; थोडकासा, अगदीं थोडा, यत्किंचित् *A r. village,* अगदीं बाजूचें,-आडवळणी,-खेडें, *Have not the remotest, a very r., conception of what he means,* त्याचें म्हणणें काय आहे याची त्यांना यत्किंचित् सुद्धां कल्पना नाहीं. *Remote'ly, adv.*; *Remote'ness, n.*

Rĕmount', *v. t.* & *i.* (रिमा'उन्ट्)—to go up, get on to (hill, horse, etc.), provide with fresh horse (s); go up again; go back *to* specified date, period, source. पुन्हां वर चढणें, पुनः स्वार होणें; घोडे जोडणें, घोडे बदलणें; पुन्हां वर जाणें; मूळ ठराविक-तारीख,-काळ-उगम पाहणें. *n.* horse to replace one killed or worn out. नवीन बदली घोडा.

Rĕmo'vable, *a.* (रिमू'व्हब्ल्)—that can be removed or taken away. दूर नेतां-करतां-येण्यासारखा, हालवतां येण्याजोगा, जंगम. *Removabil'ity, n.*

Rĕmo'val, *n.* (रिमू'व्हल्)—dismissal from a post; change to another place. काढून टाकणें; स्थलान्तर.

Rĕmove', *v. t.* & *i.* (रिमू'व्ह्)—to take off or away from place occupied; convey to another place; dismiss; to change one's residence; (pass. of course at dinner) be succeeded by. हालविणें, दूर नेणें, जागा बदलणें; काढणें, काढून टाकणें; घालविणें, दूर करणें; जागा बदलणें; उचलून नेणें, दुसरें (पक्वान्न, खाद्य) आणणें-वाढणें. (p. p.) *remov'ed,* distant from. दूरचा, मध्यें पिढ्या असलेला (नातेवाईक). *n.* stage in gradation; promotion to higher form at school; a form in some schools; (ra e) change of residence, removal, departure; distance; a dish that succeeds. पायरी, अंतर, पल्ला, टप्पा; चूल, पिढी; शाळेंत वरच्या वर्गांत चढवणें, वर्ग; बिऱ्हाड बदलणें, निघून जाणें; अंतर; (एका नंतरचें) दुसरें पक्वान्न. *To r. mountains,* do miracle. अद्भुत गोष्ट -चमत्कार-घडवून आणणें. *Boy is removed from school,* taken away by parents. आईबापांनीं नाव काढून नेलेला मुलगा. *Remov'er, n.* बिऱ्हाड बदलतांना समानसुमान नेण्याचा धंदा करणारा. *My first cousin, once, twice removed,* चुलतभावाचें मूल, किंवा चुलत चुलता; चुलतभावाचें नातवंड किंवा आजोबाचा चुलतभाऊ इ.

Rĕmū'nerāte, *v. t.* (रिम्यू'नरेट्)—to reward; to pay for service rendered. बक्षीस देणें, मोबदला देणें, पगार देणें.-*tor, n.*

Rĕmūnerā'tion, *n.* (रिम्यूनरे'शन्)—what is received as pay, reward, recompense. पगार, मोबदला, बक्षीस, भरपाई.

Rĕmū'nerātive, *a.* (रिम्यू'नरेटिव्ह्)—profitable. किफायतशीर, फायदेशीर.-*ly, adv.*;-*ness, n.*

Rĕnais'sance, *n.* (रिने'सन्स)—revival of arts and letters in 14th-16 th ce., period of its progress; any similar revival; style of art and architecture developed by it; renewal, new birth. कलांचें व विद्येचें पुनरुज्जीवन, त्यांचा काल; तत्सदृश पुनरुज्जीवन, पुनर्जीवन; कला आणि शिल्प यांचें तत्कालीन पुनरुज्जीवन; नवजन्म, नवावतार.

Rē'nal, *a.* (री'नल्)—of the kidneys. मूत्राशयाचा, मूत्रपिंडसंबंधीं.

Rĕnăs'cence, *n.* (रिनॅ'सन्स)—rebirth, rejuvenation, reappearance; renaissance. पुनर्जन्म, नवोद्भव, नवजन्म; पुनरुज्जीवन.

Rĕnăs'cent, *a.* (रिनॅ'सन्ट्)—springing up anew; being re-born. नव्यानें वर येणारा, उद्भवणारा, उत्पन्न होणारा, नवोदित.

Rĕncoun'ter, Rencŏn'tre, *n.* (रेन्-का'उन्टर्, रैकॉ'न्टर्) —(rare) encounter, duel; casual meeting. चकमक; अकस्मात् गांठ.

Rĕnd, *v. t.* & *i.* (रेन्ड्)—to tear or wrench, to force asunder; to split or divide. फाडणें, हिसकणें; फाटणें, चिरणें, तडकणें, विदारणें. *To r. one's garments, hair,* (in sign of grief etc.). (दुःखातिशयानें) अंगावरील वस्त्र फाडणें, केंस उपटणें. *To turn & r. one,* (fig.) abuse him unexpectedly. एखाद्याला अकस्मात् शिवीगाळ करणें; अपशब्द बोलणें. *Shouts r. the air,* sound explosively. आरोळ्यांनीं आकाश फाडून-दुमदुमून-गेलें. *To r. in two,* दुफाड करणें. *To r. in pieces,* तुकडे तुकडे करणें. *Pa. t. & pa. p. rent.*

Rĕn'der, *v. t.* (रे'न्डर्)—to give in return; to pay as due; to deliver up; to execute, translate; present, submit; portray; melt (fat) down; (with obj. & compl.) make, came to be, convert into; cover (stone, brick) with first coat of plaster. परत देणें, परत करणें, उलट करणें; देणें असलेलें देणें; स्वाधीन करणें, देऊन टाकणें; पुरें करणें; भाषांतर करणें; जाब,-हिशेब, देणें; चरबी (वितळवून) काढणें; करणें, बनविणें, युक्त करणें; गिलाव्याचा पहिला हात देणें. *n.* (legal) return in money or kind or service made by tenant to superior. (मोबदल्यादाखल) खंड, खंडादाखल चाकरी. *To r. thanks,* (बद्दल) आभार मानणें. *To r. good for evil,* अपकाराची फेड उपकारानें करणें. *Account rendered,* bill previously sent in and not yet paid, phr. used as substitute for repetition of items. पूर्वींच काढून दिलेला पण वसूल न झालेला हिशेबाचा आंकडा, हिशेब. *To render-set, v. t.* plaster (wall etc.) with two coats. (भिंतीला) गिलाव्याचे दोन हात देणें; *n.* & *a.* (plastering) of two coats. दोन हाती (गिलावा).

Rĕn'dering, *n.* (रे'न्डरिंग)—translation or portrayal, interpretation, exhibition. भाषांतर, तसबीर, चित्र.

Ren'dezvous, *n.* (रॉ'न्-डि-व्हू)—(*pl.* same -व्हूज्) a place appointed for assembling of troops or ships; place of common resort; meeting place agreed on; meeting by appointment. (सैन्य किंवा आरमार एकत्र होण्याचें) संकेतस्थान, एकत्र जमण्याची किंवा भेटण्याची जागा, अड्डा; आधीं ठरवून भेटणें. *v. i.* to meet at *r.* संकेतस्थळीं जमणें,-मिळणें. [F]

**Rĕndi'tion**, *n.* (रेन्डि'शन्)—(rare) surrender of place or person; (U. S.) translation; act of rendering or performing. स्वाधीन करणें; भाषांतर देणें,-करणें.

**Ren'ēgāde**, *n.* (रे'निगेड्)—deserter of party or principles; one who deserts to an enemy, apostate. आपला पक्ष किंवा तत्त्वें सोडणारा, स्वपक्षत्यागी, -मतत्यागी; शत्रुपक्षाला जाऊन मिळणारा; स्वधर्मत्यागी. *v. i.* to turn *r.* आपलें मत, तत्त्व, आपला पक्ष,-धर्म, -सोडणें. *Renega'tion, n.*

**Rénew'**, *v. t. & i.* (रिन्यू')—to make new or as good as new; to patch, to fill up, to replace, to re-establish, become new again. नवीन किंवा नव्यासारखा करणें; ठिगळ लावणें, नवा भरणें,-घालणें, बद्दल नवा करणें; पुनः नवा होणें,-बनणें. *To r. lease, bill*, भाडेचिठ्ठी, करार वगैरे फिरून नवा करून देणे *To r. garrison*, किल्ल्यांतील सैन्यांत नवीन भरणा करणें, अधिक सैनिक आणणें,-पाठविणें. *Nature dies & is renewed*, वृक्षवनस्पतियुक्त सृष्टि मृत होऊन पुन्हां ती जोमानें वाढते, मृतसृष्टींत नवचैतन्य येतें. *To r.* one's *youth, strength*, to grow *young, strong, again*. पुनर्यौवन, पुनर्जोम प्राप्त होणें. *Renew'able, a.*; *Renew'al, n.*

**Rĕn'iform**, *a.* (री'निफॉर्म्)—(Bot.) kidney-shaped. मूत्रपिंडाकार, गुर्दाकार. (*R. leaf*, उदा. ब्राह्मीचें पान).

**Rĕnn'ĕt**, *n.* (रे'निट्)—1. curdled milk from calf's stomach, or artificial preparation, used in curdling milk for cheese, etc. (ऊन पाण्याच्या योगानें काढलेलें) वासराच्या जठरांतील पाचक अम्ल, कृत्रिम अम्ल. 2. kinds of dessert apple. सुखशुद्धीसाठीं खाण्याचीं एक जातीचीं फळें.

**Rénounce'**, *v. t.* (रिना'उन्स्)—to surrender, to give up; to repudiate, to forsake; consent formally to abandon; withdraw from, discontinue; follow with card of another suit for want of right one. सोडून देणें, त्याग करणें, टाकून देणें, अगाबाहेर टाकणें; हक्कसंबंध तोडणें,-सोडून देणें, अधिकार सोडून देणें; माघार घेणें, बंद करणें; (पत्त्यांच्या डावांत) दुसऱ्या रंगाचें पान खेळणें (त्या रंगाचें पान नसल्यामुळें). *n.* playing of card of another suit. दुसऱ्या रंगाचे (पत्त्याचें) पान टाकणें. *To r. the world*, जगाचा-संसाराचा-त्याग करणें.

**Rĕn'ōvāte**, *v. t* (रे'नोव्हेट्)—to restore to good condition or vigour; to repair. सुस्थिति प्राप्त करून देणें, नवीन शक्ति,-जोम,-आणणें, दुरुस्त करणें, पूर्ववत् करणें. *Renova'tion, n.* नवीनीकरण, सुधारणा. *Ren'ovator, n.*

**Renown'**, *n.* (रिना'उन्)—fame, high distinction, glory, celebrity, exalted reputation. कीर्ति, मोठे नांव, आख्या, लौकिक. *Man, town, of r., of great r*, famous. प्रसिद्ध, प्रख्यात (पुरुष, शहर इ.). *Renown'ed, a.* famous, celebrated. प्रसिद्ध, विख्यात. [L. *re*, again; *nomen*, Sk naman, name]

**Rent**, (रेन्ट्)—pa. t. & pa. p. of *rend*. फाडलें, फाडलेलें, चिरलें, चिरलेलें.

**Rĕnt**, *n.* (रेन्ट्)—periodical payment for use of land, house, room; hire for machinery, etc.; a hole torn, a breach, gap, cleft, fissure, tear in garment. खंड, धारा, सारा, वसूल; भाडें; चीर भगदाड, फाळा, खिंड, बाभाडा. *v. t. & i.* to let or hire for rent; be let (*at*); take, occupy, or use at a rent. भाड्यानें देणें, किंवा घेणें; (अमुक) भाड्यानें देणें, भाड्यास लावणें; भाडें देऊन घेणें, वापरणें, मक्त्यानें-खंडानें-घेणें. *R.-charge*, periodical charge on land, etc. reserved to one who is not the owner. जमिनीचा वगैरे मालक नसलेल्याला द्यावयाचा ठराविक मक्ता,-खंड. *R.-free, a. & adv.*, with exemption from rent. विनाभाड्यानें, विनामक्त्याचें, मोफत *R.-roll*, register of person's lands etc. with *rr.* due from them, sum of one's income from rent. जमीनदारांच्या जमिनी व त्यांचें भाडें यांची नोंद असलेली वही, खातेदारांच्या जमाबंदीची वही; भाड्याच्या उत्पन्नाची रक्कम. *R. service*, (tenure by) personal service in lieu of or addition to *r.* जमिनीच्या खंडादाखल किंवा खंडाच्या भरीला चाकरी करणें. *Rent'able, a.*

**Rĕn' tal**, *n.* (रे'न्टल्)—a sum payable as rent; income from rents. भाड्याची रक्कम; खंड, वसूल, धारा.

**Rénŭnciā'tion**, *n.* (रिनन्सिए'शन्)—renouncing, document expressing it; self-denial; giving up of things, abandonment. त्याग, त्यागपत्र; संन्यास, आत्मत्याग, अनंगीकार, त्याग. *Renun'ciant, n. & a.* (रिनं'न्शिअंट्); *Renun'ciative*, (-शे-) *a.*; *-tory* (-शट्टि) *a.*

**Rĕp'**, **rĕpp**, **rĕps**, *n.* (रेप्,-रेप्स्)—textile fabric with corded surface used in upholstery. (खुर्च्या वगैरेंना घालण्याचें) रेघेरी जाडेंभरडें कापड.

**Rĕp**, *n.* (रेप्)—(sl.) person of loose character; (school sl.) verse etc. learnt by heart. वाईट चालीचा,-स्त्री,-मनुष्य; तोंडपाठ केलेली कविता.

**Rĕpair'**, *v. t.* (रिपे'अर्)—to resort; to go *to*; to restore to a good condition, to mend, renovate; remedy; make amends for. आश्रय घेणें; जाणें; दुरुस्त करणें, नीट करणें, जीर्णोद्धार-डागडुजी-करणें; प्रकृति सुधारणें; इलाज करणें; भरपाई करणें. *n.* restoring to sound condition; condition for working or using, resort, haunt. सुधारणा, डागडुजी; दुरुस्ती; स्थान, जागा, अड्डा, निवास, आश्रय. *A place of great, little, r.*, पुष्कळजण, थोडेजण,-जमण्याचें स्थान. *Shop is closed during rr.*, डागडुजीसाठीं,-दुरुस्तीसाठीं,-दुकान बंद आहे. *Is in r.*, सुस्थितींत,-दुरुस्त,-आहे. *Is out of r.*, नादुरुस्त,-बिघडलेलें,-आहे. *Repair'able, a.*

**Rĕpand'**, *a.* (रिपां'न्ड्)—(Bot., Zool.) with undulating margin, wavy. विषमकडेचा, लाटेसारखा हेलकाव्याचा. *Repa'ndo-form, a.* [L. *re*, again; *pandus*, bent]

**Rĕp'arable**, *a.* (रे'परबल्)—(of loss etc.) that may be repaired, that can be made good. नुकसान भरून येण्याजोगा, सुधारण्यासारखा.

Rĕpară'tion, *n.* (रेपरे'शन्)—recompense for injury, compensation, amends; (*pl.*) repairs, compensation for war damages. भरपाई, फेड, मोबदला; (अने०) डागडुजी, नुकसानभरपाई.

Rĕpärtee', *n.* (रेपार्टी')—a witty retort. विनोदात्मक प्रत्युत्तर, हजरजबाबी उत्तर.

Rĕpäst', *n.* (रिपा'स्ट्)—a meal (esp. one of specified quality), food, victuals. भोजन, जेवण.

Rĕpa'trĭāte, *v. t.* (रिपे'ट्रिएट्, रिपॅ-)—to restore to the native land or one's own country. स्वदेशाला परत पाठविणें, स्वदेशीं परत आणणें. *-tion, n.* [L. *Re*, back; *patria*, fatherland]

Rĕpay', *v. t. & i.* (रिपे')—to pay back; to return, to make return, to requite, to recompense. परत देणें; फेड करणें, मोबदला देणें; भरपाई करणें. *pa. t. & pa. p. Repaid. Repay'able, a; Repay'ment, n.* परत करणें,-देणें,-परत केलेली वस्तु,-दिलेला पैसा; फेड, भरपाई.

Repeal', *v. t.* (रिपी'ल्)—to annul, to revoke. (कायदा वगैरे) रद्द करणें, मोडणें, परत घेणें. *n.* repealing, revocation. रद्द करणें, मोडणें. *Repeal'able, a.*

Rĕpeat', *v. t. & i.* (रिपी'ट्)—to say or do over again; to recite, rehearse; reproduce; recur, appear again or repeatedly; (refl.) recur in same form. पुन्हां सांगणें, फिरून करणें; पुन्हा म्हणणें, पुनरावृत्ति करणें; म्हणून दाखविणें; पुन्हा येणें, वारंवार येणें; पुनरावृत्ति होणें. *n.* (Mus.) passage to be repeated; repeating or thing repeated, mark indicating this; (commerc.) fresh consignment similar to previous one, order given for this. पुन्हां घोळून म्हणण्याचें गीत; (गीत) पुन्हां म्हणणें; पुनरावृत्ति दर्शविणारी खूण, (पसंत पडलेल्या मालाची) पुनः पुनः मागणी. *Language will not bear repeating*, is too foul to repeat. पुन्हां न उच्चारण्यासारखे घाणेरडे शब्द,-घाणेरडी भाषा. *Repeating watch, Repeater*, जबाबी घड्याळ, (कमान दाबल्यावर) किती वाजले हें ठोके वाजवून सांगणारें घड्याळ. *Repeating rifle*,. firing several shots without reloading. अनेकमारी बंदूक. *The last three figures repeat*, शेवटचे तीन आंकडे पुनः पुनः येतात, त्यांची पुनरावृत्ति होते. *History repeats itself*, इतिहासाची पुनरावृत्ति होते. *Repeat'able, a.*

Rĕpeat'edlў, *adv.* (रिपी'टिड्-लि)—several times, more than once, again and again. वारंवार, कित्येक वेळां, पुनः पुनः, फिरून फिरून, घडोघडीं.

Rĕpeat'er, *n.* (रिपी'टर्)—(esp.) repeating watch; (telegr. etc.) a device for automatically retransmitting signals, etc. from one circuit to another. जबाबी घड्याळ, (कमान दाबल्यावर) किती वाजले हें ठोके वाजवून सांगणारें घड्याळ, न दिसणारा सिग्नल (-खूण) खालीं पडला आहे कीं नाहीं हें आपोआप दाखविणारा विजेनें चालणारा धाकटा सिग्नल (खूण).

Rĕpĕl', *v. t.* (रिपे'ल्)—to drive back, to check the advance of, to repulse; to ward off; be repulsive or distasteful to. मागें लोटणें; परतविणें, हटविणें, (Phys.) प्रतिसारण करणें; निवारणें; तिरस्कार,-कंटाळा, तिटकारा आणणें. *Repelled', pa. t. & pa. p.*

Rĕpĕll'ent, *a.* (रिपे'लन्ट्)—(of manner etc) unsociable, uninviting; (of task) formidable, unattractive; (Phys.) driving back. तिरस्करणीय, घाणेरडी (चालचलणूक, वर्तन); भयंकर, त्रासदायक, कंटाळवाणें (काम इ.); (Phys.) प्रतिसारक.

Rĕpĕnt', *v. t. & i.* (रिपे'न्ट्)—to feel regret or penitence about something. पश्चात्ताप पावणें, खेद वाटणें, पस्तावणें. *You shall repent (of) this*, तुला ह्याबद्दल खात्रीनें पश्चात्ताप होईल. *Have nothing to r. of*, पस्तावण्याचें मुळींच कारण नाहीं. *R. my kindness*, मी दया केली त्याचा आतां मला खेद वाटतो,-पश्चात्ताप वाटतो. *Repent'ant, a.;-ly, adv.*

Rĕpĕnt'ance, *n.* (रिपे'न्टन्स्)—sorrow for sin; penitence, contrition. दुःख, खेद; पश्चात्ताप, पस्तावा, ननस्ताप.

Rĕpercŭ'ssion, *n.* (रीपर्क'शन्)—recoil after impact; (fig.) indirect effect of event etc.; reverberation. (संघर्षानें) परत लोटणें, उलटविणें, प्रतिसारण; (एखाद्या गोष्टीचा) आनुषंगीक परिणाम, प्रतिध्वनि, फळ; प्रतिसंघर्षध्वनि, प्रतिध्वनि.

Rĕp'ertoire, *n.* (रे'पर्ट्वार्)—stock of pieces, etc. that performer or company is prepared to give. (मालाचा) पुरवठा, सांठा.

Rĕp'ertorў, *n.* (रे'पर्टरि)—place for finding something; store of information; repertoire. खजिना; भांडार; वखार, कोठी. [F. fr. L. *re*, again; *paris*, I bring forth]

Rĕpĕti'tion, *n.* (रेपिटि'शन्)—repeating or being repeated, recital from memory; copy, replica. पुनरुक्ति, पुन्हा म्हणणें, तोंडपाठ म्हणणें; चित्रांची नक्कल, पुनरावृत्ति.

Rĕpine', *v. i.* (रिपा'इन्)—to fret, to be discontented, to complain discontentedly. मनांत झुरणें, धुसमुसणें, हुरहुरणें. *Repin'ingly, adv.*

Rĕplāce', *v. t.* (रिप्ले'स्)—to put back in place, to refund; to take place of. पुन्हा ठेवणें; दुसऱ्याची जागा घेणें, बदली ठेवणें, जागा भरून काढणें. *Be replaced, (pass.)*, be superseded. बदली दुसऱ्याला वर चढवणें. *Replacement, n.*

Rĕplĕn'ish, *v. t.* (रिप्ले'निश्)—to fill up again. पुन्हा भरणें, फिरून भरून काढणें. *Replenished, (pa. p.)* fully stored. भरपूर सांठा असलेला, परिपूर्ण, संपूर्ण. *Replen'ishment, n.* पुन्हां भरणें, भर, पुरवठा.

Rĕplēte', *n.* (रिप्ली'ट्)—filled, well stocked, stuffed, sated, thoroughly imbued. पूर्ण, परिपूर्ण भरलेला. *Reple'tion, n.* पूर्णता, पर्याप्ति. *Full to repletion*, परिपूर्ण.

Rĕp'lica, *n.* (रे'प्लिका)—duplicate of work made by the artist; (loosely) copy, fascimile. (मूळ चित्रकारानेंच केलेली) दुसरी प्रत,-दुसरी नक्कल; नक्कल, हुबेहुब प्रत,-नक्कल.

Rĕp'licate, *a.* (रे'प्लिकट्)—(Bot.) folded back on itself. परावलित पर्ण.

Rĕplicā'tion, *n.* (रेप्लिकेशन्)—making of replicas or copies ; echo ; (Law) plaintiff's reply to defendant's plea. नकला,-प्रती,-काढणें,-करणें ; प्रतिध्वनि ; प्रतिवादीचे म्हणण्यास वादीचा जबाब.

Reply̆', *v. t. & i.* (रिप्लाइ)—to make answer, to respond. उत्तर देणें, बोलणें, म्हणणें, जबाब देणें, प्रत्युत्तर देणें. *n.* replying ; what is replied. म्हणणें, उत्तर, जबाब. *R. paid*, (of telegram) with cost of reply prepaid by sender. उत्तरासाठीं आगाऊ पैसे भरलेली (तार).

Rĕport', *v. t. & i.* (रिपोर्ट्)—to bring back account of ; to tell as news ; to make official or formal statement ; to inform against ; to give account of. हकीगत कळविणें; बातमी सांगणें; अधिकाऱ्याकडे लेखी हकीगत कळविणें; च्या विरुद्ध बातमी देणें; कळविणें, बातमी कळविणें,-प्रसिद्ध करणें. *n.* common talk, rumour ; repute ; account given or opinion formally expressed after investigation ; reproduction or epitome of speech or law-case, esp. for newspaper publication ; sound of explosion. वार्ता, बातमी ; लौकिक, कीर्ति ; चौकशीअंतीं कळविलेली हकीगत ; (वर्तमानपत्रासाठीं वगैरे) भाषणाचा वगैरे सारांश ; खटल्याची हकीगत, निवाडा ; बार, आवाज. *It is reported*, commonly said. असें म्हणतात कीं, अशी बातमी आहे. *Reported speech*, oblique narration. आपल्या किंवा तिऱ्हाइताच्या शब्दांत दुसऱ्याचें बोलणें सांगणें. *To r. progress*, state what has been done so far. आतांपर्यंत काय काय झालें तें सांगणें, चें काम कोठपर्यंत आलें तें सांगणें. *The r. goes*, it is said. असें म्हणतात, बोलवा अशी आहे. *Law reports*, खटल्यांच्या निवाड्यांचा छापील संग्रह. *Report'able, a.*

Rĕport'er, *n.* (रिपोर्टर्)—(*esp.*) one who reports, a person reporting for newspaper. वर्तमानपत्राचा बातमीदार.

Rĕpōse, *v. t.* (रिपोझ्)—to place trust *in*. (विश्वास) ठेवणें,-टाकणें, पातणें., *Repos'al, n. 2. v. i. & t.* to rest, to lay to rest, to give rest to ; to be lying or laid, be supported or based on. विश्रांति घेणें, आराम देणें ; निजणें, पडून राहणें, आराम करणें, चा आधार घेणें, वर आधारणें. *n.* rest ; sleep ; peaceful state, settled composure, tranquility, ease of manner. विश्रांति ; झोंप ; स्वास्थ्य, आराम, शांतवृत्ति, प्रसन्नता. *Repose'ful, a. ;-fully, adv.*

Rĕpŏs'itory̆, *n.* (रिपॉझिटरि)—a receptacle ; a place where things are stored, a store-house ; museum, warehouse, shop ; burial-place ; recipient *of* confidences or secrets. पात्र ; भांडार, कोठार, कोठी, संग्रहालय, वखार, दुकान ; स्मशान, मसणवटी ; विश्वासांतला मनुष्य.

Repousse, *a. & n.* (रपूसे)—(of metal) hammered into relief from reverse side. आंतून ठोकून केलेलें (धातूचें) उठावदार-उठावाचें-काम, उठावाची (नकशी). [F]

Rĕprĕhĕnd', *v. t.* (रेप्रिहेन्ड्)—to rebuke, to censure, to take exception to, to speak of as fault. दोष लावणें, निंदा करणें, नांवें ठेवणें.

Rĕprĕhĕn'sible, *a.* (रेप्रिहेन्सिब्ल्)—blameworthy. दोषास्पद, दूषणीय, निंद्य, दोषार्ह.-*ibly, adv.*

Rĕprĕhĕn'sion, *n.* (रेप्रिहेन्शन्)—censure, blame. निंदा, दोष.

Rĕprĕsĕnt', *v. t.* (रेप्रिझेन्ट्)—to place likeness of before mind or senses ; to allege that ; to describe or depict as ; to play (character) ; to stand for, to correspond ; to be substitute or deputy for. मांडणें, दर्शविणें, (चें) चित्र उभें करणें, स्वरूप दाखविणें ; भासविणें, विधान करणें, पुढें मांडणें, पटवून देणें ; सांगणें ; वर्णन करणें ; भूमिका घेणें ; सोंग-वेष-घेणें, भूमिका करणें ; दाखविणें, (ची) संज्ञा असणें, दर्शक-वाचक-असणें ; ऐवजी वर्तणें असणें ; प्रतिनिधि असणें. *Represent'able, a.*

Rĕprĕsĕntā'tion, *n.* (रेप्रिझेन्टेशन्)—(*esp.*) a calling of attention to something. प्रदर्शन, वर्णन, निवेदन, अर्ज, विनंती. *Proportional r.*, electoral system so arranged that minorities are represented in proportion to their strength. अल्पसंख्यांकांना त्यांच्या संख्येच्या प्रमाणांत मिळालेले मतदानाचे हक्क,-मिळालेल्या जागा. *Representa'tional, a.*

Rĕprĕsĕn'tātive, *n.* (रेप्रिझेन्टेटिव्ह्)—a specimen or typical embodiment of ; person's agent, delegate, substitute, successor or heir ; person representing a constituency. दर्शक, प्रतिनिधि, विशिष्ट उदाहरण ; वकील ; मुखत्यार, मुनीम, बदली, वारस ; (लोकांतर्फेचा) प्रतिनिधि. *a.* typical of a class ; containing typical specimens ; of or based on the representation of constituencies. द्योतक, निदर्शक, प्रतिनिधिरूप ; सर्वजातिसंग्राहक ; प्रातिनिधिक, प्रतिनिधित्वाच्या तत्त्वावर आधारलेला. *n. House of Representatives*, अमेरिकेंतील सं. संस्थानची कनिष्ट प्रतिनिधिसभा.-*ly,-adv.* ;-*ness,*

Rĕprĕss', *v. t.* (रिप्रेस्)—to keep under ; to put down, to quell, to subdue, to suppress. दाबून ठेवणें ; दबविणें ; चा निकाल करणें ; दडपणें, दडपून टाकणें.-*ible, a.* ;-*ive, a.* दडपशाहीचा ; -*or, n.* दडपशाही करणारा.

Rĕprĕss'ion, *n.* (रिप्रेशन्)—In vbl. senses ; (esp. in Psychol.) putting down or subduing of natural promptings. स्वाभाविक मनोवृत्ति दडपून टाकणें,-दाबून ठेवणें, अंतःकरणप्रवृत्तींचा निग्रह.

Rĕprieve', *v. t.* (रिप्रीव्ह्)—to suspend the execution of (condemned person) ; to relieve temporarily. फांशीच्या शिक्षेची तहकुबी करणें, वेळांतशिक्षा लांबणीवर टाकणें ; तात्पुरता विसांवा,-विश्रांति,-देणें. *n.* (warrant for) remission or commutation of capital sentence ; respite. फांशीच्या शिक्षेंत बदल,-शिक्षेची माफी (करणारा हुकूम) ; स्वस्थता, स्वस्थपणा.

Rĕp'rĭmānd', *n.* (रेप्रिमान्ड्)—official reproof (*for* fault). ठपका, ताकीद. *v. t.* to administer reproof to. ठपका देणें, ताकीद देणें.

Reprint', *v. t.* ( रिप्रिन्ट् )—to print again; to print another edition of. पुन्हां छापणें; दुसरी आवृत्ति काढणें,-छापणें. *n.* ( रीप्रिन्ट् )—another printing; a new edition. पुन्हां छापणें; नवीन आवृत्ति.

Répri'sal, *n.* ( रिप्राइझल् )—retaliation. परतफेड, सूड, प्रतिहरण, बदला. *Letters of r.*, official warrant authorizing *r.* लष्करी सूड,-बदला,-घेण्याचा सरकारी हुकूम,-आज्ञापत्र. *To make rr.* or *r.*, सूड घेणें, प्रत्यपकार करणें.

Repri'se, *n.* ( रिप्राइझ् )—( Law ) rent-charge or other payment to be made yearly out of estate: ( rare ) resumption of action. मालमत्तेवरील वार्षिक कर,-खंडणी; पुन्हां कामाला सुरुवात ( करणें ).

Rèproach', *v. t.* ( रिप्रोच् )—to upbraid, to scold; ( of look, etc. ) convey reproach to. ठपका देणें, खरडपट्टी काढणें; तिरस्कारदर्शक असणें, तुच्छता दाखविणें. *n.* upbraiding, censure; a thing that brings discredit. निंदा; लज्जास्पद गोष्ट, दोष, दूषण, ठपका, लाजिरवाणी गोष्ट. *To heap rr. on*, शिव्यांची लाखोली मोजणें. *Term of r.*, word implying censure. निंदाव्यंजक शब्द, अपशब्द. *Reproach'ful, n.* conveying reproach. निंदेचा, निंदात्मक, लाजिरवाणा, *-fully, adv.*; *-fulness, n.*

Rĕp'robāte, *v. t.* ( रेप्रबेट् )—to express or feel disapproval of, censure, ( of God ) cast off. नापसंती दर्शविणें, नापसंत करणें,-वाटणें; नरकांत टाकणें, मुक्ति न देणें *a.* ( रेप्रबिट् ). cast off by God hardened in sin; unprincipled. ईश्वरानें टाकलेला; पापांत लोळणारा; तत्त्वहीन, दुर्वृत्त. *n* ( -बिट् ) a person abandoned to sin. पापात्मा, पापांत निढावलेला मनुष्य, महापापी. *Reproba'tion, n.* ( esp. ) rejection by God. नरकांत टाकणें,-लोटणें.*-tor, n.*

Rēproduce', *v. t. & i.* ( री-प्र-ड्यूस् )—to produce again, to generate; to produce copy or representation of: to carry on by breeding or propagation. पुन्हां उत्पन्न करणें; पुन्हां पैदा करणें; ( ची ) प्रतिमा,-नक्कल-उतरणें, ( चा ) नकाशा काढणें; वंशविस्तार करणें, प्रजोत्पत्ति करणें, प्रजोत्पादन करणें. *-cible, a.*

Rēproduc'tion, *n.* ( रीप्रडक्शन् )—( *esp.* ) breeding or propagation; an accurate copy of something. प्रजोत्पादन, फैलाव; हुबेहुब नक्कल,-प्रतिमा. *Reproduc'tive, n.* पुनरुत्पादक, पुनरावर्तक, पुनर्दर्शक; प्रजोत्पादनविषयक.

Rēproof', *n.* ( रिप्रूफ् )—blame or an expression of blame, rebuke, reprimand. दोष, ठपका, शब्दप्रहार, तंबी.

Rèprove', *v. t.* ( रिप्रूव्ह् )—to charge with a fault orally, to rebuke, to blame. खरडपट्टी काढणें, दोष देणें. *Reprov'ingly, adv.*

Rep'tant, *a.* ( रेप्टंट् )—(nat. hist.) creeping. रांगणारें, सरपटणारें, भुईसरपट जाणारें.

Rĕp'tile, *n.* ( रेप्टाइल )—an animial that crawls or moves on its belly, crawling animal of the class including snakes; a mean grovelling person, ( oft. attrib. ). सरपटणारा प्राणी किंवा जीव, ( साप, सुसर, कांसव वगैरे ) सरपटणाऱ्या प्राण्यांच्या वर्गांतील एक; हलकट, नीच, पाजी ( मनुष्य ). *The r. press*, subservient semi-official newspapers esp. in pre-war Germany. सरकारच्या पगलेंतील पत्रें. सरकारी पगलपत्रीं वर्तमानपत्रें. *Reptil'ian, a. & n.*; *Reptilif'erous, Reptil'iform, aa.* [ L. *repere*, crawl ]

Rèpŭb'lic, *n.* ( रिपब्लिक् )—a State in which the supremacy of the people is formally acknowledged, commonwealth; ( *fig.* ) society of persons or animals with equality between members. लोकसत्ताक राज्य, प्रजासत्ताक राज्य; समानाधिकारात्मक समाज. *The r. of letters*, literary men, literature. विद्वज्जनसमाज, विद्येचें साम्राज्य.

Rèpŭb'lican, *a.* ( रिपब्लिकन् )—of or characteristic of a republic. लोकसत्ताक राज्यपद्धतीचा. *a. & n.* an advocate of a republican government; member of U. S. political party favouring liberal interpretation of constitution, extension of central power & protective tariff; ( of birds ) social, living in large communities. लोकसत्ताकराज्यवादी, प्रजासत्ताकवादी; अमेरिकेंतील सं. संस्थानांतील उदारमतवादी पक्षाचा अनुयायी; समाजप्रिय,-मोठमोठे थवे करून राहणारे पक्षी. *Repub'licanism, n.* प्रजासत्ताकपद्धति; प्रजासत्ताक-लोकसत्ताक-राज्याभिमान.

Rèpū'diāte, *v. t. & i.* ( रिप्यूडिएट् )—to disown, to disavow, to deny; to refuse to recognize or obey ( authority ) or discharge ( obligation ), to refuse to pay; ( of state ) refuse to pay public debt; divorce ( one's wife ). नाकारणें, नाकबूल करणें; न जुमानणें, त्याग करणें, सोडून देणें; ( राष्ट्रीय कर्ज ) नाकबूल करणें, देण्याचें नाकारणें, काडीमोड करणें, दार ( पत्नी ) त्याग करणें. *Repudia'tion -diator, n.*

Rèpŭg'nance, *n.* ( रिपग्नन्स )—aversion (*to, against*), disinclination; unwillingness, inconsistency or incompatibility ( *between, to, with, of* ideas, &c. ). उद्वेग, तिटकारा, कंटाळा; नाखुशी, विरोध, वांकडेपणा.

Rèpŭg'nant, *a.* ( रिपग्नन्ट् )—distasteful, contradictory ( *to* ), incompatible ( *with* ). नावडता, तिटकारा आणणारा, नापसंत, विरोधी, प्रतिकूल, विरुद्ध, विपरीत.

Rĕpŭlse', *v. t.* ( रेपल्स )—to drive back ( attack, attacking enemy ) by force of arms; to rebuff, to reject. मागें सारणें, हटवणें; ( वादांत ) हटवणें; झिडकारणें. *n.* defeat, rebuff; refusal, denial. पिछेहाट, पराभव, थप्पड; नाकारणें, झिडकारणें.

Rèpul'sion, *n.* ( रिपल्शन् )—repulsing ( rare ); ( Physics ) tendency of bodies to repel each other or increase their mutual distance ( opp. *attraction* ); aversion. परस्परनिवारण; ( विज्ञान० ) अपसारण, प्रतिसारण, प्रतिसारणशक्ति; तिटकारा, किळस, वीट, खंत. *Capillary r.*, tendency in some liquids ( e. g. quicksilver in glass ) to shrink from wall

of capillary tubes so that upper surface is convex. केशमतिसारण, केश-अपसारण.

**Rĕpŭl'sĭve**, *a.* (रिपॅल्सिव्ह्)—exciting repulsion, repellent; loathsome; (Physics) exercising repulsion. निवारक, दूर सारणारा, किळसवाणा; अपसारक, प्रतिसारक.*-ly, adv.;-ness, n.*

**Rĕp'ūtable**, *a.* (रॅप्यूटेबल्)—of good repute, held in esteem, esteemable. अब्रूचा, चांगल्या कीर्तीचा, शिष्ट, मान्य, आदरणीय. *Rep'utably, adv.*

**Rĕpūtā'tion**, *n.* (रॅप्युटे'शन्)—what is generally said or believed about a person's or thing's character, good name, honour, fame, credit. कीर्ति, नांवलौकिक, ख्याति, नांव, प्रतिष्ठा, गौरव, अब्रू.

**Rĕpūte'**, *n.* (रिप्यूट्)—reputation. कीर्ति, नांव, अब्रू. *Repu'ted, pa. p. & a.* generally considered to be or regarded as. कीर्तीचा, नामांकित,-म्हणून समजला जाणारा. *Repu'tedly, adv.* लोकहष्ट्या, ऐकिवांत, लोकांत. *Is reputed the best doctor*, or *to be*, or *as the best doctor*, सर्वांत चांगला डॉक्टर म्हणून त्याची ख्याति आहे.

**Rĕquĕst'**, *n.* (रिक्वे'स्ट्)—asking for something, a thing asked for; demand. प्रार्थना, विनंति; मागणी. *v. t.* to seek permission *to* do; to ask, to entreat. विनंति करणें; मागणें, प्रार्थणें, विनविणें *You shall have your r.*, तुझी मागणी-विनंति-पुरी केली जाईल. *To make, r. for*, ची,-बद्दल,-विनंति करणें. *By r.*, in response to expressed wish. मागणीवरून, विनंतीवरून.

**Rĕq'uĭem**, *n*, (रे'क्विम्)—mass or musical service for the dead; dirge. मृतव्यक्तीकरितां ईश्वराची प्रार्थना, मृतात्म्याच्या शांतीसाठीं प्रार्थनागीत.

**Rĕquire'**, *v. t.* (रिक्वा'यर्)—to demand, to order, to claim or call for, to ask as of right; to lay down as imperative; to need. हक्कानें मागणें, हुकूम करणें; भाग पडणें; गरज असणें, जरूर असणें. *They r. me*, or *of me, to appear*, मला हजर राहण्याविषयीं त्यांनीं हुकूम केला आहे,-भाग पाडलें आहे.

**Rĕquire'ment**, *n.* (रिक्वा'यर्-मेन्ट्)—a thing needed, demand, an essential condition. जरूरी, गरज, (हक्कानें,-सत्तेनें,-) मागणें, आवश्यक गोष्ट.

**Rĕq'uĭsite**, *a.* (रे'क्विझिट्)—needed, essential. जरूरीचा, अगत्याचा, आवश्यक. *n.* for accomplishment of some purpose (*for*), requirement. जरूरीची किंवा अगत्याची गोष्ट, आवश्यक वस्तु.*-ness, n.*

**Rĕquĭsi'tion**, *n.* (रेक्विझि'शन्)—formal demand, usu. made in writing; order to furnish supplies for army, etc.; being called or put into service. कायदेशीर लेखी मागणी; (लष्करासाठीं सामानसुमानाच्या पुरवठ्याची) मागणी करणें; कामावर हजर राहण्याचा किंवा तयारींत राहण्याचा हुकूम. *v. t.* to demand the supply or use of for military purposes; to make a demand for, to press into service. (लष्करी कामाकरितां,-लष्कराकरितां) मागणी करणें, ची मागणी करणें, कामाकरितां मागणें, कामाला-उपयोगाला-लावणें. *Is under* or *in r.*, being used or applied. उपयोगांत आणलेलें असणें. *Put in, call into, r.*, have recourse to. चा आश्रय घेणें, चा उपयोग करणें.

**Rĕquite'**, *v. t.* (रिक्वा'इट्)—to make return for; to reward, to avenge; give in return. परत फेड करणें; बक्षीस देणें, मोबदला देणें, बदला घेणें, उगविणें; उसनें फेडणें, परत करणें. *Requi'tal, n.*

**Rere'dŏs**, *n.* (रीअ'रडॉस्)—ornamental screen covering wall above back of altar. वेदीच्या मागच्या बाजूची भिंत सुशोभित करण्याचा शोभेचा पडदा.

**Rēs,*** *n.* (रीझ्)—thing; property. वस्तु; मालमत्ता. *R. angusta domi*, poverty. दरिद्रता, गरिबी. [L]

**Rĕscind'**, *v. t.* (रिसि'न्ड्)—to abrogate, to revoke, to cancel, to render null, to make void. मागें घेणें, रद्द करणें. *Resci'ssion, n.* (रिसि'झन्), परत करणें, रद्द करणें [L. *re*, again; *scindere*, to cut]

**Rēs'script**, *n.* (री'स्क्रिप्ट्)—Roman emperor's written reply to appeal for guidance esp. from magistrate on legal point; Pope's decision; an edict or official announcement; thing re-written. (प्राचीन) रोमन बादशहाचा निर्णय, ठराव; पोपनें दिलेला निर्णय, -दिलेलें आज्ञापत्र; सरकारी हुकूम,-जाहीरनामा; (जोड) नक्कल.

**Rĕs'cue**, *v. t.* (रे'स्क्यू)—to deliver from an attack, custody, danger, or harm, (Law) unlawfully liberate (person), forcibly recover (property). सोडवणें, बचाव करणें, बेकायदेशीर सोडवणें, सोडणें, जबरदस्तीनें (मिळकत) ताब्यांत घेणें. *n.* deliverance from restraint or danger, succour, illegal liberation, forcible recovery. सुटका, मुक्तता, मदत, साहाय्य, बचाव; बेकायदेशीर सुटका, जबरदस्तीचा ताबा. *Res'cuer, n.*

**Rĕsearch'**, *n* (रिस'र्च्)—search, inquiry; (usu. pl.) endeavour to discover facts by study or investigation. चौकशी, शोध; संशोधन. *v. t.* to search again. बारकाईनें तपासणें, संशोधन करणें.*-er, n.*

**Rĕsĕ'ct**, *v. t.* (रिसे'क्ट्)—(surg.) to pare down (bone, cartilage, etc.). (हाडाचीं टोकें वगैरे) कापून काढणें. *Resection, n.* (हाडाची टोकें) कापून काढण्याची शस्त्रक्रिया.

**Rĕsĕm'ble**, *v. t.* (रिझे'म्बल्)—to be like; to have similarity to, to bear similitude of. सारखा असणें, अनुरूप असणें, सादृश्य असणें, बरोबरी करणें. *Resemblance, n.* साम्य, अनुरूपता, प्रतिमा, प्रतिच्छाया.

**Rĕsĕnt'**, *v. t. & i.* (रिझे'न्ट्) —to show or feel indignation at, to take ill, to consider as affront. रागावणें, संतापणें, राग येणें, संताप-क्रोध येणें.*-ful, a.* आकसखोर, लौकर चिडणारा.*-fully, adv.;-ment, n.*

**Rĕservā'tion**, *n.* (रिझर्व्हे'शन्)—reserve; express or tacit limitation or exception; (Eccl.) right reserved to Pope of nomination to vacant benefice, etc.; (Law) right or interest retained in estate being conveyed, clause reserving it, (U. S.) tract of land reserved for Indian tribe. राखून ठेवणें; मर्यादा, अपवाद, निर्बंध, (राखून ठेवलेली)

अट; पोपचे राखीव अधिकार; (कायदा) (स्वतःकरितां) राखून ठेवलेले अधिकार, राखून ठेवलेल्या हक्काचें कलम; (अमेरिकेतील सं. सं.) तांबड्या इंडियन लोकांकरितां राखीव विभाग. *Mental r.*, qualification tacitly added in making statement, oath, etc. मानसिक संकोच, मनाचा संकोच.

Rèserve', *v. t.* (रिझ़र्व्ह)—to postpone use or enjoyment or treatment of; to hold over, to lay up for future time; to retain possession or control of by stipulation. पुढल्या कामासाठीं ठेवणें, राखणें, राखून ठेवणें, ठरविणें; ताबा ठेवणें, हक्क राखून ठेवणें. *n.* something reserved for future use; tract reserved for native tribe or wild animals; (*sing.* or *pl.*) troops held in reserve; forces outside regular army and navy liable to be called out in emergencies; (in games) extra player chosen in case substitute should be needed; limitation or qualification; self-restraint in artistic expression; reticence, lack of cordiality; intentional suppression of truth. राखून ठेवणें, संग्रह; राखून ठेवलेली-राखीव-जागा; राखून ठेवलेली फौज; राखीव,-शिलकी,-फौज; राखीव सैनिक,-नाविकदल; शिलकी भिडू, राखीव खेळाडू; अपवाद, अट, मर्यादा; कलाकृतींतील संयम, संकोच, मुग्धता, कांहीं राखीव (अस्पष्ट) गोष्टी (ज्या कल्पनेनें ताडावयाच्या त्या); भिडस्तपणा, लाज, भीड, संकोच, संकुचितपणा; सत्यापलाप, खरी गोष्ट मुद्दाम दडपून टाकणें. *Reserved seats*, राखीव जागा. (*I accept your statement*) *without r.*, fully. पूर्णपणें, बिनशर्त. *Sale* or *auction without r.*, not subject to a fixed price's being reached. येईल त्या किंमतीस विकणें, लिलाव करणें. *R. price*, than which less will not be accepted. ठरीव किमान किंमत. *We publish this with all r., all proper rr.*, without endorsing it. त्याच्या खरेखोटेपणाची ग्वाही न देतां,-आमचें मत राखून ठेवून छापीत आहों.

Rèserved', *a.* (रिझ़र्व्हड)—reticent, uncommunicative, cautious, cold. जास्त न बोलणारा, आंतल्या गांठीचा, संकोचवृत्तीचा.

Rèserv'edlў, *adv.* (रिझ़र्व्हिड्लि)—guardedly; without openness, with reserve. सावधगिरीनें, संकोचवृत्तीनें.

Rèserv'ist, *n.* (रिझ़र्व्हिस्ट)—member of reserve forces. शिलकी,-राखीव,-सैन्यांतील शिपाई.

Rĕs'ervoir, *n.* (रे'झ़र्व्हॉर्)—a place where anything is kept in store, reserve supply of something e. g. knowledge or facts, etc.; a *receptacle for fluid, esp. one for storing water.* खजिना, सांठवण, सांठा; संग्रह; पाण्याची टांकी, हौद, सांठवण, जलसंचय. *R. pen*, शाई ठेवण्याची सोय असलेली लेखणी,-कलम.

Rèside', *v. i.* (रिझ़ाइड)—to have one's home, to dwell, to abide in; (of power, rights) be vested in; (of qualities) be present or inherent in. राहणें, वस्ती करणें; असणें; अंगचा-मूळचा-असणें, जन्मसिद्ध-स्वयंसिद्ध-असणें.

Rĕs'idence, *n.* (रे'झ़िडेन्स)—residing; a place where one resides, habitation; abode. वसती, वास्तव्य, नांदणें, राहणें; वसतिस्थान; मोठें घर. *To have, take up, one's r.*, dwell, begin to dwell. (बिऱ्हाड करून) राहणें. *R. is required*, official etc. must live on the spot. अंमलदारानें ठिकाणावर (बिऱ्हाड करून,-वस्ती करून,) राहणें आवश्यक आहे.

Rĕs'idencў, *a.* (रे'झ़िडेन्सि)—the official residence of a political agent or resident; residence. अधिकाऱ्याचें राहण्याचें ठिकाण; वसतिगृह.

Rĕs'ident, *n.* (रे'झ़िडेन्ट)—a permanent inhabitant; a British political agent. कायमचा रहिवासी; राजप्रतिनिधि. *a.* residing; (of birds) non-migratory; having quarters on the spot; inherent, located, *in.* राहणारा, वस्ती करणारा, निवासी; देशान्तर न करणारा, स्थायिक (पक्षी इ.); स्थानिक, त्याच ठिकाणीं राहणारा; अंगचा, मूळचा,-असणारा.

Rĕsidĕn'tial, *a.* (रेझ़िडे'न्शल्)—suitable for or occupied by private house; based on residence. खाजगी राहत्या घरांचा,-घरें असलेला,-घरांस योग्य; घरांत राहात असल्यामुळें-भाडें भरीत असल्यामुळें-प्राप्त झालेला (मतदानाचा हक्क).

Rĕsidĕn'tiarў, *a.* (रेझ़िडे'न्शरि)—bound to or involving or provided for official residence. अंमलदाराला राहण्यासाठीं ठेवलेलें (घर.). *n.* ecclesiastic bound to reside. तेथेंच वस्ती करून राहणारा धर्मोपदेशक,-पाद्री.

Resĭd'ūal, *a.* & *n.* (रिझ़ि'ड्युअल्)—left as residuum; (of error) still unaccounted for or eliminated; (Math.) (quantity) resulting from subtraction. शेष, शिल्लक राहिलेला, बाकीचा (अंश, भाग); बाकी राहिलेली, जमा न केलेली (रक्कम, हिशेबांतील चूक); वजाबाकी करून उरलेली (रक्कम), वजाबाकी.

Resĭd'ūarў, *a.* (रिझ़ि'ड्युअरि)—of the residue of an estate; residual, still remaining. शेषाचा, शेषसंबंधीं; बाकी राहिलेल्यासंबंधीं.

Rĕs'idūe, *n.* (रे'झ़िड्यू)—the remainder, what is left over, the balance; (Chem.) residuum. अवशेष, शिल्लक राहिलेला भाग, बाकी; शेष.

Resĭd'ūum, *n.* (रिझ़ि'ड्युअम्)—(pl.-*dua*), amount not accounted for in calculation; (Chem.) substance left after combustion etc.; lowest stratum of population. हिशेबांत न आलेली रक्कम, अनामत रक्कम; शेष, अवशेष, गाळ; कनिष्ठ दर्जाचे लोक.

Resign', *v. t.* & *i.* (रिझ़ाइन्)—*to relinquish, to* surrender; to reconcile (oneself) to; to give up office, to retire. सोडून देणें, त्याग करणें, पाणी सोडणें; शरण जाणें, नाशीबावर हवाला ठेवणें, मान वांकवणें; राजीनामा देणें, नोकरी सोडणें, घरीं बसणें.

Rĕsigna'tion, *n.* (रेझ़िग्ने'शन्)—resigning of an office, document conveying it; uncomplaining

endurance, surrender, relinquishment. सोडून देणें, राजिनामा; न घोलतां सहन करणें, सोडणें, परित्याग. *Give, send in, one's r.*, (नोकरीचा) राजिनामा पाठवून देणें.

Rėsigned', *a.* (रिझा'इन्ड्)—having resigned oneself; content to endure; submissive. राजिनामा दिलेला, -देऊन सोडलेला; सहिष्णु, नशिबावर हवाला ठेवलेला, मान वांकविणारा. *Resign'edly, adv.*

Rėsil'ience, *n.* (रिझि'ल्यन्स)—power of resuming the original form after compression, etc.; elasticity. उशी खाणें, स्थितिस्थापकता; लवचीकपणा, रंगेलपणा, आनंदीवृत्ति,-स्वभाव. *Resil'ient, a.* स्थितिस्थापक; लवचीक; रंगेल. [L. *re*, back; *silire*, jump]

Rĕs'in, *n.* (रे'-झिन्)—adhesive substance exuding from certain plants, hardened juice of pines. राळ, यक्षधूप. *v. t.* to apply resin to. राळ लावणें, -माखणें. *Res'inous, a.* राळेच्या गुणाचा, राळेचा, राळेनें माखलेला.

Rėsist', *v. t. & i.* (रिझि'स्ट्)—to stop the course of; to oppose successfully, to make opposition; to repel, to abstain *from*. प्रतिबंध-प्रतिकार-करणें, अडथळा करणें; विरोध करणें; प्रतिकार करणें, निवारणें. *n.* composition applied to surfaces for protection from some agent employed on them, esp. to parts of calico that are not to take dye. इतर रंग त्या भागांत मिसळूं नये म्हणून त्या भागाला लावण्याचें मिश्रण. *Cannot r. a joke*, थट्टा केल्याशिवाय राहावत नाहीं. *Resis'ter, n.* विरोधक, प्रतिकारक. *Resis'tible a.* प्रतिकार्य, प्रतिकारक्षम. *Resis'tless, a.* too strong to be resisted. अनिवार्य, अप्रतिकार्य.*-lessly, adv. Resis'tant, Resis'tent, Resis'tive, aa.*

Rėsist'ance, *n.* (रिझि'स्टन्स)—resisting; power of resisting; stopping effect, hindrance, check; (Electr., Magnet., Heat) non-conductivity; part of apparatus used to offer definite resistance to current. अडथळा; प्रतिकार करण्याची शक्ति; प्रतिकार; प्रतिबंध; (विद्युत्) प्रतिबंधक (पेटी, वेटोळी). *Passive r.*, refusal to comply. निःशस्त्र प्रतिकार. *Line of r.*, direction in which it acts. प्रतिकाराची दिशा. *To take line of least r.*, (*fig.*) adopt easiest method or course. सर्वांत सुलभ मार्ग पत्करणें.

Rėsistibil'ity, *n.* (रिझिस्टिबि'लिटि)—being resistible; power of offering resistance. विरोधकता; विरोध-प्रतिबंध-करण्याची शक्ति, विरोधशक्ति.

Rĕs'oluble, *a.* (रे'झोल्युबल्)—capable of being resolved into elements. द्राव्य, विद्राव्य, गाळण्याजोगा, पृथक् करण्याजोगा.

Rĕs'ōlute, *a.* (रे'झोल्यूट्)—firm of purpose; determined, constant, steadfast, unshaken. करारी, निग्रही; दृढनिश्चयी, नेटाचा, खंबीर, दमदार.*-ly, adv.* दृढनिश्चयानें, नेटानें.

Rĕsōlu'tion, *n.* (रेझोल्यू'शन्)—resolute temper or character or conduct; a thing resolved on; formal expression of opinion of meeting; separation into components; (Med.) disappearance of inflammation without suppuration; (pros.) substitution of two short syllables for one long; solving of doubt, etc. निश्चय, कृतनिश्चय; दृढसंकल्प, निग्रह; करार; (सभेंतील) ठराव; पृथक्करण, मूलतत्त्वें निराळीं करणें,-काढणें; फोड-पुटकुळी-जिरणें, सूज उतरणें; एका गुरूबद्दल दोन लघु स्वर योजणें; शंका-समाधान करणें, (प्रश्नाचा) उलगडा. *Good rr.*, intentions that one formulates mentally for virtuous conduct. सत्संकल्प, सद्वर्तनाविषयींचे संकल्प.

Rėsŏlve', *v. t. & i.* (रिझॉ'ल्व्ह्)—to disintegrate, analyse, break up into parts; to solve, to settle; to decide upon; to pass vote by resolution; convert or be converted into; (Mus.) convert (discord) or be converted into concord. पृथक्करण करणें, द्रवविणें; सोडविणें, मिटविणें, उलगडणें, निरसन करणें; निश्चय करणें, ठरवणें, ठराव करणें, रूपांतर करणें; केलें जाणें; चें रूप देणें; (विसंवादी सुरांचें) संवादी सुरांत रूपांतर करणें,-होणें, *n.* a mental resolution; courage. निश्चय, संकल्प; धैर्य. *Resolved', pa. p.* (as *a.* resolute. ठराव-निश्चय-केलेला; *pa. p.* used in minutes of meeting,) the following resolution was passed, namely *that.* (पुढील) ठराव संमत (पास) करण्यांत आला (कीं, इ.). *Resolv'edly, adv.*

Resolv'ent, *a. & n.* (रिझॉ'ल्व्हंट्)—(chiefly med. & chem.), (drug etc.) effecting resolution of tumour etc., or division into component parts. (गळूं किंवा सूज) फांकविणारें (औषध); द्रावक, विद्रावक (द्रव्य).

Rĕs'onant, *a.* (रे'झोनन्ट्)—(of sound) echoing, resounding; continuing to sound; (of bodies, rooms, etc.) tending to reinforce or prolong sounds esp. by vibration; (of places) resounding *with*. प्रतिध्वनि करणारा; नादपूर्ण; प्रतिध्वनिजनक; गजबजलेला, दुमदुमलेला. *Res'onance, n.* प्रतिध्वनि, अनुनाद.

Rĕs'onator, *n.* (रे'झोनेटर्)—instrument responding to single note and used for detecting it in combination, appliance for giving resonance to sounds. प्रतिस्वननयंत्र.

Rėsŏrt', *v. i.* (रिझॉ'र्ट्)—(with *to*) to adopt as an expedient or method; to go to (a person) for aid or advice; to frequent. उपाय योजणें, उपयोग करणें, मदतीकरितां जाणें, आश्रय करणें; खेपा घालणें, ये जा करणें, यात्रा करणें. *n.* resorting to an expedient; a place frequented for some purpose, frequent assembling, a haunt; frequenting. आश्रय, आधार, अवलंब, उपाय; फेरी टाकण्याची जागा, बैठक, स्थान, ठिकाण, अड्डा, चवाठा; येरझार, राबता. *To resort to force*, दंडेली करणें, शक्तीचा उपयोग करणें. *In the last r.*, when all else has failed, as final attempt. शेवटचा उपाय,-निर्वाणीचा उपाय-म्हणून. *Health r.*, हवेशीर-हवेचें-ठिकाण; आरोग्यस्थान.

Resort' v. t. (रीसॉ'र्ट)—to sort again. पुन्हां गट पाडणें, वर्गीकरण करणें.

Résound', v. i. & t. (रिझा'उन्ड्)—(of place) to ring or echo (with); produce echoes, go on sounding; fill place with sound; (of fame, etc.) to be much and loudly mentioned. घुमणें, प्रतिध्वनि करणें,-होणें, -उठणें; घुमघुमणें, दणदणणें; (आवाजानें) घुमघुमून टाकणें; (कीर्ति) घुमघुमून राहणें. *Resound'ingly, adv.*

Résource', n. (रिसो'अर्स)-(pl.) means of supplying a want, stock that can be drawn on; country's collective means for support and defence; expedient, device; means of passing the time; practical ingenuity, quick wit. गरज भागविण्याचें साधन, सांठा; देशाच्या संरक्षणार्थ साधनें, आरमार व लष्कर; उपाय, तरणोपाय, सोय, गति; वेळ घालविण्याचें साधन; योजकता, युक्ति, हिकमत. *Am at the end of my rr.*, अगदीं अगतिक झालों आहें. *past r.*, शेवटच्या -निर्वाणीच्या-उपाय. *Is full of r.*, हिकमती-युक्तिबाज आहे. *Resource'ful;-less, aa.* युक्तिबाज, नाना साधनें असलेला; युक्तिहीन. *Resource'fulness, n.*

Réspĕct', n. (रिस्पे'क्ट)—deferential esteem; (pl.) message or attention conveying message; heed or regard to; reference or relation to. सन्मान, आदर, भीड, भीडभाव; (अने०) नमस्कार, सलाम; लक्ष, नजर, दृष्टि, विषय, बाबत, संबंध, संधान, धोरण. v. t. to regard with deference, to treat with consideration, avoid insulting or injuring or interfering with; (arch.) pay heed to, relate to, be concerned with (rare). मान देणें; महत्त्व देणें, पर्वा करणें; मान ठेवणें,-राखणें, दुसऱ्याचें पथ्य पाळणें -मानणें; (कडे) पाहणें, लक्ष देणें; (च्या) विषयीं,-(ला) अनुलक्षून,-असणें. *With respect to,* विषयीं. *R. of persons,* partiality or favour shown esp. to the powerful. (बलिष्ठांविषयीं) आदर,-पंक्तिप्रपंच, पक्षपात. *In all rr.,* सर्व गोष्टींत, बाबींत. *Is held in r.*, त्याच्याविषयीं (लोकांना) आदर वाटतो. *Self r.*, स्वाभिमान. *Give him my rr.*, त्याला माझे नमस्कार सांगा. (*Went*) *to pay his rr. to,* दर्शन घेण्याला, नमस्कार (वगैरे) करण्याला, मुजरा करण्याला. *Respecter of persons,* थोरांचा पक्षपाती. *To respect oneself,* refrain from unworthy conduct or thoughts, have self-respect. चांगली वागणूक ठेवणें, विचारानें पवित्र राहणें, स्वाभिमान बाळगणें. *To r. privileges,* (दुसऱ्याच्या) हक्कांकडे लक्ष देणें,-ते पाळणें.

Réspĕc'table a. (रिस्पे'क्टेब्ल)—deserving respect; of some amount or size or merit, of fair social standing, honest and decent सन्माननीय; बऱ्याचसा जमेस धरण्याजोगा, बराच मोठा; संभावित, शिष्ट, अब्रूदार, प्रतिष्ठित.—*bility, n.*;—*tably, adv.*

Réspĕct'ful, a. (रिस्पे'क्टफुल)—showing deference. आदरयुक्त, विनयशील, आदराचा, मर्यादशील.-*fully, adv.*;—*fulness, n.*

Réspĕc'tive, a. (रिस्पे'क्टिव्ह)—each's own, proper to each; individual. आपला, परस्पर, प्रत्येकाचा, ज्याचा त्याचा; वैयक्तिक, सापेक्ष, व्यक्तिविषयक.-*ly, adv.* अनुक्रमें, अनुक्रमानें, क्रमशः.

Rĕspīrā'tion, n. (रेस्पिरे'शन)—breathing, single taking in and expelling of breath; plant's absorption of oxygen and emission of carbon dioxide. श्वास, श्वासोच्छ्वास.

Rĕs'pirātor, n. (रे'स्पिरेटर)—appliance of gauze etc. worn over mouth and breathed through by invalids etc.; (Mil.) kinds of chemical filtering apparatus worn for defence against poison gas. श्वासोच्छ्वासाकरितां जाळीची टोपी,-यंत्र; विषारी वायूपासून रक्षण करणारा मुखवटा. *Res'piratory, a.* श्वासोच्छ्वासाचा, श्वासोच्छ्वासविषयक.

Respire', v. i. & t. (रिस्पा'यर्)—to breathe, to take breath, to recover one's breath. श्वासोच्छ्वास करणें; श्वास घेणें.

Rĕs'pīte, n. (रे'स्पाइट)—delay permitted in the discharge of an obligation or suffering of a penalty; interval of rest or relief. विलंब, शिक्षेची किंवा दंडाची तहकुबी, कर्जाची तहकुबी; विश्रांतीची वेळ, विसावा. v. t. to grant or bring respite to; to reprieve (condemned person); postpone execution or exaction of (sentence, obligation); give temporary relief from; (Mil.) withhold pay (from). विसावा देणें; (शिक्षेची,-फांशीची) तहकुबी देणें; (कर्जाची) तहकुबी देणें; तात्पुरता उतार देणें, कमी करणें; (पगार) अडकवून ठेवणें.

Résplĕn'dent, a. (रिस्प्लें'डन्ट)-shining with brilliant lustre, brilliant, glittering. तेजस्वी, चकचकीत. -*dence,-dency, nn.* चकचकीतपणा, तेजस्वीपणा. -*dently, adv.*

Résp ŏnd', v. i. (रिस्पॉ'न्ड्)—to make answer; to show sensitiveness to (an action, stimulus) by behaviour or change; perform corresponding action; (U.S.) be answerable or liable to make payment; (rare) correspond, be analogous. प्रत्युत्तर देणें, जबाब देणें, (ख्रिस्ती लोकांनीं धर्मोपदेशकाला उद्देशून) अनुकूल-ठराविक-उत्तरवाक्यें म्हणणें, प्रतिवचन देणें, जुळणें, जम बसणें; संवादी क्रिया करणें; देण्याला जबाबदार-लायक-असणें; संवादी असणें, जुळता-जुळणारा-असणें.

Respŏn'dent, n (रिस्पॉ'न्डन्ट)—defendant in a suit esp. in divorce case; one who makes answer, defends thesis, etc. प्रतिवादी, जबाब देणारा. a. answering, conformable. उत्तर देणारा, प्रत्युत्तर-जबाब-देणारा; संवादी.

Résp ŏnse', n. (रिस्पॉ'न्स)—answer given in word or act, an oracular answer, reply; feeling or movement elicited by stimulus; set answer of congregation. उत्तर, जबाब, समाधान, देवतेचा कौल-जबाब; संवादी क्रिया, इच्छित उत्तर-परिणाम-जबाब; ठराविक प्रतिवचन, उत्तर-वाक्य, उत्तर.

Résp ŏnsibil'itў, n. (रिस्पॉन्सिबि'लिटि)—being responsible; charge, trust. जबाबदारी; हवाला, [illegible] जोखीम; भर, भार. *Did it on his own r.*, [illegible]

authorization. स्वतःच्या जोखमीवर,-जबाबदारीवर. *Is not afraid of r.*, of having to act without detailed guidance. कोणाच्याहि विशेष मदतीशिवाय, स्वतःच्या हिमतीवर काम करण्याला-तो भीत नाहीं.

Respŏn'sible', *a.* ( रिस्पॉ'न्सिब्ल )—liable to be called to account; of good credit or position; trustworthy. उत्तरदायी, जिम्मेदार, जबाबदार; उच्च दर्जाचा, जबाबदारीचा; विश्वासू, विश्वसनीय. *R. ruler, government*, not autocratic, जबाबदार राजा,-राज्यकर्ता,-राज्यपद्धति ('हम करे सो कायदा' नव्हे ती). *Respon'sibly, adv.*

Respŏn'sions, *n. pl.* ( रिस्पॉ'न्शन्झ् )—first of three examinations for the Oxford B. A. degree. ऑक्सफर्ड विश्वविद्यालयाच्या बी. ए. पदवीसाठीं द्यावयाच्या तीन परीक्षांतील पहिली परीक्षा, ( also ) *smalls*, colloq. ).

Respŏn'sive, *a.* ( रिस्पॉ'न्सिव्ह )—answering; by way of answer; responding readily to some influence, impressionable, sympathetic. उत्तर देणारा, प्रतिवचन देणारा; उत्तरादाखलचा; संवादी, प्रत्युत्तरदायी, सहानुभूतीचा, प्रतियोगी. *R. co-operation*, प्रतियोगी सहकारिता. *Respon'sively, adv.*; *-siveness, n.* संवादिता, संवादी धर्म.

Rĕst, *v. i.* & *t.* ( रेस्ट )—to be still; to lie in sleep or death; be let alone; to give relief or repose to; to lie or rely *on*; be propped *against*, place for support or foundation upon; to repose trust in. स्वस्थ किंवा शांत असणें; झोपेंत असणें, मेलेला असणें; थांबणें, विश्रांति घेणें,-देणें; विसंबणें; वर अवलंबून राहणें, च्या आधार घेणें,-देणें; टेकावा-नेटावा-असणें, टेकणें, वर बसणें; विश्वास ठेवणें. *v. i.* to remain in specified state. विशिष्ट स्थितींत पडणें,-राहणें,-असणें. *n.* repose or sleep, resting; a prop or support or steadying piece; pause in music, elocution, metre etc. स्वस्थता, झोंप; विश्रांति; आधार, नेटावा, बैठक, लग आधार, विराम. *n.* the remainder, what remains; the others; ( Banking ) reserve fund; (Commerce.) stock-taking and balancing. बाकी शिल्लक राहिलेला; बाकीचे, इतर, वरकड; गंगाजळी ठेव; शिलकी माल-मोजणी, व हिशेबाचा ताळा (पाहणें). *Rested, p.p.* विश्रांति घेऊन ताजातवाना झालेला. *To r. upon* one's *oars*, temporarily cease rowing or any exertion. वल्हवतांना तात्पुरतें थांबणें, काम करतांना मध्यें विसांवा घेणें. *Rests in the church-yard*, lies buried. थडग्यांत विश्रांति घेत आहे. *The matter cannot r. here*, must be further examined. ह्या गोष्टीचा आणखी छडा लावला पाहिजे. *R.* or *God r. his soul*, may God give it repose. ईश्वर त्याच्या आत्म्याला शांति देवो. *Resting-place*, provided or used for resting. विश्रांतिस्थान,-स्थळ; *Last r.-p.*, the grave. थडगें. *Day of Rest*, Sunday. रविवार. *At r.*, still, not agitated ( often of the dead ). शांत, स्तब्ध. *To lay to r.*, bury. पुरणें, थडग्यांत पुरणें. *R.-cure*, विश्रांति घेण्याचा इलाज,-उपाय. *R.-house*, a dawk-bungalow. धर्मशाळा, प्रवाशांसाठीं डांक बंगला. *To r. with*, च्या हातीं राहणें.

Res'taurant, *n.* ( रे'स्टॉरन्ट् )—a place where refreshments may be had, an eating-house. उपाहारगृह, विश्रांतिगृह. *R.-car*, आगगाडींतील फराळाचा डबा.

Rĕst'ful, *a.* ( रे'स्टफुल् )—quiet, soothing. शांत, शांति देणारा, स्वस्थतेचा.

Rĕst'-hărrow, *n.* ( रे'स्टहॅरो )—a tough-rooted shrub. एक चिवट मुळाचें झुडुप.

Rĕstĭtū'tion, *n* ( रेस्टिट्यू'शन् )—restoring of property, &c. to its owner; reparation, amend, indemnification; ( rhet. ) restoring of thing to its original state; resumption of original state by elasticity. मालमत्ता मालकाला परत देणें; भरपाई, प्रतिदान; पूर्वस्थितीवर येणें; (स्थितिस्थापकत्वामुळें) पूर्वस्थितीवर येणें; पूर्वस्थिति. *To make r.*, परत देणें. *R. of conjugal rights*, नष्ट वैवाहिक हक्क पुनः परत मिळविणें ( साठीं फिर्याद ), लग्नामुळें प्राप्त झालेले कायदेशीर हक्क परत मिळविणें.

Rĕst ive, *a.* ( रे'स्टिव्ह )—( of horse ) jibbing, refractory; ( of person ) fretful or obstinate under control, stubborn. अडगारा, अडेल; धैमान करणारा, बेफाम, हट्टी, द्वाड ( मनुष्य ).*-ly, adv.*; *-ness, n.* अडेलपणा; बेफामपणा, द्वाडपणा.

Rĕst'less, *a.* ( रे'स्टलिस )—disinclined to rest, never still, fidgety. विश्रांतिरहित, निद्रारहित, जागरणाचा; तळमळणारा, चैन न पडणारा; चुळबळ्या, चंचल.*-ly, adv.*; *-ness, n.*

Rĕstorā'tion, *n.* ( रिस्टोरे'शन् )—act of restoring; recovery, renewal, re-establishment ( of monarchy in Eng. in 1660 ); model or drawing representing supposed original form of extinct animal, ruined building, etc. परत देणें; सुधारणें, जीर्णोद्धार, पुनःस्थापना; ( इंग्लंडमध्यें १६६० या वर्षी झालेली ) राजसत्तेची पुनःस्थापना; ( हल्लीं अस्तित्वांत नसलेल्या प्राण्याचा, इमारतीचा ) काल्पनिक मूळ नमुना, -प्रतिकृति,-आकृति. *Restora'tionism, n.* doctrine that all men will ultimately be restored to happiness in future life पुढील जन्मीं सर्व मनुष्यमात्रांना सुखप्राप्ति होईल, असें मत; (जन्मान्तर) अन्यजन्म -सुखप्राप्ति-वाद.

Rĕstŏr'ative, *a.* ( रिस्टो'अरेटिव्ह )—tending to restore health or strength. आरोग्यवर्धक, बलवर्धक. *n.* restorative medicine or food or agency. बलवर्धक औषध, पौष्टिक अन्न.*-ly, adv.*

Restore', *v. t.* ( रिस्टो'अर् )—to give back, to make restitution of; to replace, to put back, to re-establish; ( attempt to ) bring back to original state by rebuilding, repairing, etc.; make representation of supposed original state of ( extinct animal, ruin, etc. ); reinstate; bring back to health, cure ( person ); reinsert by conjecture ( missing words, etc. ). परत देणें, परत करणें, माघारा देणें; भरपाई करणें; पुनः स्थापना करणें,

पुनः स्थापणें; सुधारणें, मिटावणें, दुरुस्ती करणें, मूळ स्थितीचें काल्पनिक चित्र रेखाटणें; पूर्वपदावर स्थापणें; बरा करणें, रोगमुक्त करणें, (प्रकृति) सुधारणें; (गाळलेले शब्द वगैरे) अंदाजानें घालणें. *Restor'able, a.*; *Restor'er, n.*

**Rėstrāin'**, *v. t.* (रिस्ट्रे'न्)—to keep under control; to repress; to confine. ताब्यांत ठेवणें; दाबांत ठेवणें; निरोध करणें, आवरणें, मर्यादित ठेवणें.-*able, a.* दाबांत ठेवण्यासारखा, आवरतां येण्याजोगा. *Restrainedly, adv.* with moderation; without exuberance or exaggeration. नियमितपणानें, समर्याद; बेतावातानें, अतिशयोक्तिशिवाय.

**Rėstraint'**, *n.* (रिस्ट्रेन्ट्)—check; confinement; self-control; avoidance of exaggeration; reserve; restraining or being restrained. दाब; नियंत्रण, मर्यादा; अटक, कैद, बंदी; आत्मसंयमन, नियमितपणा, मर्यादा, संकोच, भीड, आडपडदा; दाबणें, आवरणें; निरोध, निग्रह. *Without r.*, freely, copiously. सढळपणें, विपुलतेनें. *To be under r.*, esp. as lunatic. अटकेंत, कैदेंत (असणें).

**Rėstrict'**, *v. t.* (रिस्ट्रि'क्ट्)—to confine within limits, to bound, to limit (*to, within*). मर्यादा घालणें, आळा घालणें, मर्यादित-संकुचित-करणें.-*ive, a.*; -*ively, adv.*

**Rėstric'tion**, *n.* (रिस्ट्रि'क्शन्)—something that limits action, restraint, reservation. मर्यादा, आळा, बंधन.

**Rėsŭlt'**, *v. t.* (रिझ'ल्ट्)—to follow as a consequence (from); to end in a specified way. (पासून) निघणें, उद्भवणें, निपजणें, उत्पन्न होणें; शेवट होणें, परिणाम होणें. *n.* what results, consequence; effect, outcome, issue; product of calculation. परिणाम; निकाल; फळ, निष्पत्ति, सिद्धान्त, मथितार्थ; इष्टफल. *Without r.*, निष्फळ, व्यर्थ.

**Rėsŭlt'ant**, *a.* (रिझ'ल्टन्ट्)—resulting as the outcome of conflicting tendencies, or of more or less opposed forces. (पासून) होणारा, निघणारा, परिणामी. *n.* composite effect given by such conflict (esp. in Mech.). परिणामी प्रेरणा, फलित प्रेरणा.

**Rėsūme'**, *v. t. & i.* (रिझ्यू'म्)—to take again or back; to reoccupy, to recommence, begin again; recapitulate. परत घेणें, फिरून घेणें, परत मिळविणें.-व्यापणें; फिरून सुरू-आरंभ-करणें; गोषवारा सांगणें, थोडक्यांत सांगणें. *To r. thread of* one's *discourse*, भाषणांतील मूळ मुद्यावर येणें, कथासूत्र जुळविणें. *To r. pipe*, go on smoking again. पुन्हां चिलीम भरणें.

**Rès'ūme**, *n.* (रें'झुमे)—a recapitulation, a summary. थोडक्यांत गोषवारा, सारांश, संक्षेप.

**Rėsŭmp'tion**, *n.* (रिझ'म्प्शन्)—resuming. परत घेणें,-मिळविणें; पुनर्ग्रहण; पुनः सुरवात.-*tive, a.*;-*tively, adv.*

**Rėsū'pīnate**, *a.* (रिस्यू'पिनट्)—(Bot. of leaf etc.), inverted, bottom up. व्यस्ततळी (पर्ण).-*pination, n.*

**Rėsŭr'gent**, *a.* (रिस'र्जन्ट्)—rising again after subsidence or defeat or disappearance. पुन्हां डोकें वर काढणें, पुनरुत्थान होणें.-gence, *n.* [L. *re*, again; *surgere*, rise]

**Rĕsurrĕct'**, *v. t.* (रेझ़रे'क्ट्)—(sl.) exhume; revive practice or memory of. थडग्यांतून खणून काढणें, (संवय, स्मृति यांचा) पुनरुद्धार करणें.

**Rĕsurrĕc'tion**, *n.* (रेझ़रे'क्शन्)—the springing into or coming to life at the last day; revival (from disuse, &c.). शेवटच्या दिवशीं पुन्हा जन्मास येणें; पुनरुत्थान, पुनः उठणें, पुनरुद्धार.

**Rĕsŭs'citāte**, *v. t. & i.* (रिस'सिटेट्)—to revive, to return or restore to life, consciousness, vogue, vigour or vividness. पुनः सजीव करणें, जिवांत जीव येणें, फिरून चेतना येणें, संजीवन करणें.-*citative, a.*; -*citator, n.*; *Resuscita'tion, n.* संजीवन करणें, सावध-हुशार-करणें.

**Rē'tail**, *n.* (री'टेल्)—sale of goods in small quantities. फुटकळ विक्री, किरकोळ विक्री. *adv.* by retail. फुटकळ रीतीनें, किरकोळीनें. *v. t. & i.* (रिटे'ल) to sell by retail, to be retailed; recount, relate details of. किरकोळ विकणें, फुटकळ विकणें,-विकलें जाणें; पूर्वी ऐकलेलें दुसऱ्याला सांगणें, साद्यंत-समग्र-वर्णन करणें. *By r.*, किरकोळ, फुटकळ. *R. trading, dealer*, किरकोळ व्यापार; किरकोळ विकणारा, फुटकळ व्यापारी. *Do you buy wholesale or r.*, तूं घाऊक खरेदी करतोस का किरकोळीनें? *Retail'er, n.*

**Rėtain'**, *v. t.* (रिटे'न्)—to keep possession of; to keep in mind, not forget; to secure services of by preliminary fee; keep in place, hold fixed; continue to practise or recognize, not abolish or discard. पदरीं ठेवून घेणें; मनांत ठेवणें; (वकिलाला) आगाऊ वेतन देऊन (गुंतवून) ठेवणें; आधारासाठीं राखणें, रोखून धरणें; (ताबा) चालू ठेवणें. *Retaining wall*, supporting and confining mass of earth or water. आधार देणारी-थोपवून धरणारी-भिंत. *Retaining force*, (mil.) posted to keep part of enemy inactive. शत्रुसैन्याच्या विभागाला रोखून धरणारें सैन्य. *Retaining fee*, (वकिलाचा) बयाणा, आगाऊ दिलेलें वेतन. *Retain'able, a.*

**Rėtain'er**, *n.* (रिटे'नर्)—retaining fee; (hist.) dependant of nobleman, etc.; (Law) formal retention of something as one's own; authorization to retain this. (बॅरिस्टर, वकील वगैरेंना) गुंतवून ठेवण्याकरितां दिलेला बयाणा (फी); सरदाराचा आश्रित, सेवक; स्वतःच्या हक्काचें म्हणून राखून ठेवणें, हक्कपत्र.

**Rėtăl'īāte**, *v. i. & t.* (रिटॅ'लिएट्)—to repay in kind; to retort upon a person; do as one is done by, esp. return evil, make reprisals; (Pol. Econ.) impose duties on imports from foreign State in return for its import duties. जशास तसें परत करणें, उसनें फेडणें; उट्टें काढणें; जशास तसें करणें; आयात मालावर (जशास तसें या न्यायानें) उलट जकात बसविणें. *Retal'iative, Retal'iatory, aa.*; *Retal'iator, n.*

**Retalia'tion**, *n.* ( रिटॅलिए'शन् )—return of like for like, reprisal, revenge उसनें फेडणें, सूड, मत्यपकार, पदला.

**Retard'**, *v. t.* ( रिटा'र्ड् )—to make slow or late, to put off, to postpone; to delay progress or accomplishment of; ( motion of tides, waves, etc. ) happen, arrive, behind normal or calculated time. कमी करणें, लांबणीवर टाकणें; अडथळा करणें; ( ठराविक वेळेच्या ) नंतर घडणें,-येणें. *n.* retardation. मंद-कमी-करणें; वेगाचा ऱ्हास; क्षीयमाणान्तर; *Retarda'tion, Retard'ment, nn. Retardative,-atory, nn.* [ L. *re*, back; *tardus*, slow ]

**Retch**, *v. i.* ( रीच् )—to make motion of vomiting. वांति-ओकारी-काढणें. *n.* such motion or sound of it. अशी ओकारी, वांति, तिचा आवाज.

**Reten'tion**, *n.* ( रिटे'न्शन् )—retaining. ठेवणें, राखणें, धारण, धारणाशक्ति; मूत्रावरोध, मलावरोध.

**Reten'tive**, *a.* ( रिटे'न्टिव् )—having the power or characteristic of retaining things. धारणाशक्ति असलेला, दृढ, धरून राहणारा, घट्ट, धड. *R. memory*, मेधा, धारणाशक्ति. *R. ( of moisture )*, apt to retain it. ओलावा-ओलसरपणा-धरून ठेवणारा, राखणारा. *Reten'tively, adv.; -tiveness, n.*

**Ret'icence**, *n.* ( रे'टिसन्स् )—reserve in speech, uncommunicativeness. अबोला, मौन, मनांतील विचार लपविणें, मुग्धता, स्तब्धता.

**Ret'icent**, *a.* ( रे'टिसन्ट् )—reserved in speech, uncommunicative. कमी बोलणारा, घुम्या, भिडस्त, मुग्ध. *-ly, adv.* स्तब्ध राहून, घुमेपणानें.

**Retic'ulate,-lated**, *aa.* ( रिटि'क्युलट्,-लेटिड् )—having the appearance of or markings like network; divided into mesh-like compartments. जाळीदार, जाळीचा; जालाकार. [ L. *rete*, a net ]

**Retic'ulate**, *v. t.* ( रिटि'क्यूलेट् )—to mark with reticulations. जाळी करणें, जाळीदार करणें, चौकडीचें काम करणें.

**Retic'ulation**, *n.* ( रिटि'क्यूलेशन् )—net-like marking or arrangement ( usu. in pl ). जाळीचें काम, जाळी, जाळें.

**Retic'ulum**, *n.* ( रिटि'क्यूलम् )—( *pl.-la* ), ruminant's second stomach; net-like structure, reticulated membrane, etc. ( रवंथ करणाऱ्या प्राण्याचें ) द्वितीय कोठ, पोटांतील दुसरी पिशवी; जाळी, जाळीदार अंतरत्वचा.

**Ret'iform**, *a.* ( रे'टिफॉर्म् )—net-like, reticulated. जालरूप, जालाकार, जाळ्यासारखा.

**Ret'ina**, *n.* ( रे'टिना )—( *pl.-as,-a* ), layer at back of eyeball sensitive to light. डोळ्यांतील एक विशिष्ट पडदा, दृग्रज्जामंडळ, नेत्रादर्श. *Ret'inal, a.; Retini'tis, n.* ( med. ) दृग्रज्जामंडलदाह.

**Ret'icule**, *n.* ( रे'टिक्यूल् )—a lady's netted or other bag for carrying things; ( Astron. ) a Southern constellation. बायकांची जाळीदार हातपिशवी; दक्षिण गोलार्धातील राशि; जालक.

**Ret'inue**, *n.* ( रे'टिन्यू )—great person's suite of attendants, a train of persons. लवाजमा, नोकरचाकर, परिवार.

**Retire'**, *v. i. & t.* ( रिटा'यर् )—to withdraw from place or company or occupation; retreat; recede; go to bed; compel to retire from office; ( Mil. ) order ( troops ) to retire; ( Finance ) withdraw ( bill, note ) from operation or currency; ( crick. ) voluntarily terminate one's innings; give up public position or service. मागें होणें, बाजूस सरणें; माघार घेणें, मागें जाणें; निजणें, झोपीं जाणें, झोपणें; ( सैन्याला ) माघार घेण्याला फर्मावणें; ( ठराव, नोट ) मागें घेणें, रद्द करणें; आपण होऊन आपला डाव थांबविणें; नोकरी सोडणें,-सोडावयास लावणें. *n.* order for troops to retire. ( सैन्याला ) मागें सरण्याचा, माघार घेण्याचा,-हुकूम. *To r. from the world*, become recluse. एकांतवास पत्करणें, संन्यासी बनणें, जोगी बनणें. *To r. into one self*, be uncommunicative or sociable. जगाशीं संबंध सोडून देणें. *Retiring room*, for retiring to, esp. lavatory. एकांतांत जाण्याची-हातपाय धुण्याची खोली. *Retired pay*, pension. सेवानिवृत्तवेतन. *Retired list*, of retired officers. सेवानिवृत्त अधिकाऱ्यांची नोंद,-यादी.

**Retired'**, *a.* ( रिटा'यर्ड् )—that has retired from office, etc.; secluded. नोकरी सोडलेला, सेवानिवृत्त, एकांताचा, विविक्त, एकांतवासाचा.

**Retire'ment**, *n.* ( रिटा'यर्-मेन्ट् )—seclusion, privacy; solitude, state of having retired from office. एकान्तस्थळ, एकान्त, एकान्तवास; नोकरी किंवा अन्य वृत्ति सोडून घरीं बसणें.

**Retir'ing**, *a.* ( रिटा'यरिंग )—shy; fond of seclusion. संकोचवृत्तीचा, लाजाळू, संकोची; एकांतप्रिय, विविक्तसेवी. *-ly, adv.*

**Retort'**, *v. t. & i.* ( रिटॉ'र्ट् )—to requite in kind; to make a repartee or counter-charge. उलट करणें; टोमणा मारणें; उत्तरास प्रत्युत्तर देणें. *n.* a thing done in retaliation or said as repartee. सणसणीत जबाब, टोला, प्रत्युत्तर, टोमणा. *Retorted, p. p.* recurved, twisted or bent backwards. पुन्हां-मागें-वळविलेलें.

**Retort'**,[2] *n.* ( रिटॉ'र्ट् )—a vessel with bent neck used in distilling; kinds of receptacle used in gas-making, etc. ऊर्ध्वपातनयंत्र, वक्रपात्र, हंसपात्र; धूर,-वायु,-तयार करण्यासाठीं पात्र. *v. t.* to purify ( mercury ) by heating in retort. हंसपात्रांत घालून ( पारा ) तापवून शुद्ध करणें,-गाळणें.

**Retouch'**, *v. t.* ( रिट'च् )—to improve by giving new touches. नवीन छटा देऊन सुधारणें, निर्दोष करणें, ( वर ) संस्कार करणें; हातानें ( फोटोची-छायाचित्राची-उलट प्रतिमा )सुधारणें.

**Retrace'**, *v. t.* ( रिट्रे'स् )—to trace back ( one's *steps, way* ) to source; go back over again. परत ( मुळापर्यंत ) जाणें; परत येणें,-जाणें; उलट पहात जाणें; मनांत घोळवणें.

**Retract'**, *v. t. & i.* ( रिट्रॅक्ट् )—to withdraw or pull back ( esp. part of one's body ); to take back or unsay one's words, to withdraw ( a promise., &c. ); recant. आंत ( ओढून ) घेणें, प्रतिकर्षण करणें, आखडणें ; बोलणें, परत घेणें,-फिरविणें ; शब्द-वचन-परत घेणें, वचनाला फिरणें ; उलट खाणें. *Retract'ation, n.* recanting, revoking. परत घेणें ; फिरविणें. *Retract'ile, a.* that can be drawn back. मागें ओढतां येण्यासारखा, प्रतिकर्षणीय.*-ility, n. Retrac'tion, n.* pulling back. मागें ओढणें. *Retrac'tive, a.* serving to pull back. मागें ओढण्यासारखा, प्रतिकर्षणीय. *Retract'or, n.* ( शस्त्रप्रयोगामध्यें ) घावाच्या कडा ओढून धरणारें शस्त्र, ( प्रति-)कर्षणी ; भाळी ; प्रतिकर्षक स्नायु ; बोलणें परत घेणारा. [ L *re*, back ; *trahere*, draw ]

**Retreat'**, *v. i.* ( रिट्रीट् )—to go back, to retire ; recede, slope away. मागें जाणें, परतणें ; माघारें घेणें, आंत जाणें. *n.* an act of retreating, military signal for retreating ; withdrawing into seclusion ; a place of seclusion or shelter, a place of safety. हटणें, मागें सरण्याची-परतण्याची,-इशारत ; एकान्त स्थळीं जाणें ; एकान्तस्थान, आश्रयस्थान, आसरा, आश्रय. *a. retreating chin, forehead.* बसकी-आंत गेलेली,-हनुवटी,-कपाळ. To beat *a retreat*, abandon undertaking. हातीं घेतलेलें काम सोडून देणें. *To make good* one's *r.*, get safely away. सुरक्षितपणें अंग काढून घेणें,-मागें वळणें,-बाहेर पडणें.

**Retrench'**, *v. t. & i.* ( रिट्रेन्च् )—to reduce the amount of, to cut down ; to live at a less expense, to economize ; ( Fortif. ) furnish with inner line of defence, usu. consisting of trench and parapet. रकमेंत कपात करणें, कमी करणें, छाटणें ; काटकसर करणें ; ( किल्ल्याच्या वगैरे ) आंतून संरक्षक साधन निर्माण करणें.

**Retrench'ment**, *n.* ( रिट्रेन्च्-मेन्ट् )—reduction of expenses ; cutting off, economy ; inner trench, parapet provided against loss of outer defences. खर्चांत काटकसर ; छाटाछाट ; ( बाह्यकोटाच्या आंतील ) खंदक व तटबंदीची भिंत.

**Retribu'tion**, *n.* ( रेट्रिब्यूशन् )—recompense, esp. for ill deeds. वाईट कृत्यांबद्दल मोबदला, प्रायश्चित्त, प्रतिफळ.

**Retrib'utive**, *a.* ( रिट्रिब्युटिव्ह् )—by way of recompense for ill deeds ; just, well-deserved. दुष्कर्माबद्दल पारिपत्य करणारा, दुष्कर्मफलदायी ; योग्य ( शासन ).

**Retrieve'**, *v. t. & i. & n.* ( रिट्रीव्ह् )—to regain possession of ; to restore to a good state ; to repair ( loss, disaster, error ) ; find and bring in game. ठाकठीक करणें, चांगली स्थिति प्राप्त करून देणें ; सुधारणें, ( नुकसान ) भरून काढणें ; ( मारलेली ) शिकार शोधून आणणें.

**Retriev'al**, *n.* ( रिट्रीव्हल् )—act of retrieving, recovery, restoration. परत मिळविणें, भरपाई, भरून काढणें.

**Retriev'er**, *n.* ( रिट्रीव्हर )—a dog used for retrieving game. मारलेली शिकार शोधून आणणारा कुत्रा.

**Retroce'ssion**, *n.* ( रेट्रसे'शन् )—ceding back of ceded territory, retrogression. परत देणें, प्रतिदान ; परतणें, उलटणें, प्रतिगमन.

**Re'trograde**, *a.* ( रे'ट्रग्रेड् )—directed backwards ; reversing progress. मागें जाणारा, प्रतिगामी ; उलट्या प्रगतीचा, उलटा, अपकर्षाचा, ऱ्हासाचा. *n.* ( rare ) degenerate person ; backward tendency. अधोगतीला गेलेला मनुष्य ; उलटणें, माघार, अपकर्ष. *v. i.* ( Astr. ) show retrogration ; move backwards, recede ; revert. वक्री जाणें,-येणें,-असणें ; मागें होणें, परतणें ; अपकर्ष होणें. *Re'trogradely*, परत, वक्री.

**Retrogress'**, *v. t.* ( रीट्रग्रे'स् )—to move backwards, deteriorate. मागें जाणें, परतणें, उलटणें ; खचणें, अपकर्ष होणें.*—ive, a.*

**Retrogress'ion**, *n.* ( रीट्रग्रे'शन् )—deterioration ; backward movement ; ( Astron. ) retrogradation. अवनति ; प्रतिगमन, उलटणें, परतणें ; वक्री गति.

**Ret'rospect**, *n.* ( रे'ट्रस्पेक्ट् )—what one looks back upon, backward survey. झालेल्या गोष्टींचें अवलोकन, मागल्याचा विचार, सिंहावलोकन.

**Retrospec'tion**, *n.* ( रेट्रस्पे'क्शन् )—meditation on the past. गतावलोकन, गतगोष्टींचें चिंतन, सिंहावलोकन.

**Retrospec'tive**, *a.* ( रेट्रस्पे'क्टिव्ह् )—looking back on past events ; ( of view ) lying behind one, applicable to what has already happened. गतावलोकनाचा, सिंहावलोकनाचा, सिंहावलोकन करणारा ; पाठीमागें असलेला, पृष्ठवर्ती ; मागील कालाला लागू असणारा, भूतकालसापेक्ष.*-ly, adv.*

**Return'**, *v. i. & t.* ( रिटर्न् )—to come or go back ; to revert ; to give, send, or pay back ; to say in reply ; to elect as member for a constituency ; state, mention, or describe officially. परत येणें किंवा जाणें ; परत फिरणें, परत वळणें, उलटणें ; परत पाठविणें,-देणें,-करणें ; उत्तर देणें ; मतांनीं निवडून देणें, निवडणें, निवडून पाठविणें ; ( वरिष्ठ अधिकाऱ्याकडे ) तक्ता, -यादी,-आंकडे पाठविणें, निकाल सांगणें. *n.* returning or being returned ; what is returned ; profits of undertaking ; official report ; ( Archit. ) part receding from line of front, e. g. side of house or of window-opening ; ( pl. ) kind of mild pipe -tobacco. परत येणें,-जाणें, पुनरागमन, आगमन ; फेड, मोबदला ; प्राप्ति, मिळकत ; जाहीर करण्याकरितां प्रसिद्ध केलेलें सरकारी माहितीपत्रक ; हकीकतनामा, पत्रक, आंकडे ; आंत गेलेला भाग ; ( अने० ) हलक्या प्रतीचा ओढण्याचा तंबाखु. *To r. to the subject*, मूळ विषयाकडे पुन्हां वळणें. *Unto dust shalt thou r.*, ( माती असशी ) मातींत मिळशील. *To r. to* one's *old habits*, पुन्हां मूळ स्वभावावर जाणें. *To r. ball*, strike back in tennis etc. चेंडू परत करणें, *Returned empties*, packing, cases etc. sent back. परत पाठविलेले ( रिकामे ) खोके इ०. *Returning officer*, official conducting election and announcing name of person elected. निवडणुकीचा अधिकारी. *Return ticket*, or *r.*, परतीचें तिकीट, परतप्रवासाचें तिकीट.

*Small profits and quick rr.*, motto of cheap shop relying on large trade. स्वस्त दर व पुष्कळ उलाढाल-व्यापाराचें तत्त्व. *Fielder has a good r.*, (in cricket) sends ball in fast and straight. (क्रिकेटमध्यें) चेंडू जलद व सरळ फेंकणें. *R. match* or *game*, or *r.*, परतीचा सामना. *Return'able a.*

Rĕtuse', *a.* (रिट्यूस)—(Bot.) with broad end and central depression (of leaf or similar part). मध्यें खोलगट आणि टोंकाला जाड (स्थूल) (पात, पर्ण), निम्नस्थूल.

Reūnion, *n.* (रीयू'न्यन्)—renewal of unity; social gathering. पुनर्भेट, पुनर्योग, पुनर्मीलन, स्नेहसंमेलन.

Reūnite', *v. i. & t.* (रीयुनाइट्)—to join again. पुनः मिळणें.

Rĕveal', *v. t.* (रिव्हील्)—to make known by supernatural means, to disclose, to divulge, to betray; to show, to let appear. दैविक शक्तीनें आविष्करण करणें, साक्षात्कारानें कळविणें; प्रगट करणें; दाखविणें, बाहेर पडूं देणें, बाहेर आणणें. *n.* internal side surface of opening or recess, esp. of door way or window-aperture. आंतल्या बाजूचा खोलगट पृष्ठभाग.

Rĕvei'lle, *n.* (रिव्हे'लि)—(Mil.) waking signal. (सैनिकांना) सकाळच्या उठविण्याचा इशारा.

Rĕv'el, *v. i.* (रे'व्ह्ल्)—to make merry, to be riotously festive; to carouse, to take keen delight *in*; throw *away* (money, time) in revelry. मौज करणें, धांगडधिंगा घालणें; अति आनंद मानणें, चैन करणें; चैनींत उडविणें,-घालविणें. *n.* (oft. pl.) revelling, merry-making. धांगडधिंगा, चैन, मजा मारणें. *Rev'eller, n.*

Rĕvēlā'tion, *n.* (रेव्हिले'शन्)—revealing or being revealed; making known by inspiration; striking disclosure, revealing of some fact. आविष्करण, प्रकटीकरण; (ईश्वरानें स्वतः) प्रकट केलेलें ज्ञान; साक्षात्कार; चमत्कार; आश्चर्यकारक गोष्ट, अज्ञात गोष्टीवर प्रकाश पाडणें. *The R.*, *Rr.*, the *Rr.*, abbr. *Rev.*, नव्या करारांतील एक विभाग. *Revel'ationist, n.* धर्मग्रंथ ईश्वरप्रणीत आहेत असें मानणारा, अपौरुषेयवादी.

Rĕv'elrȳ, *n.* (रे'व्ह्ल्रि)—noisy festivity. मौज, चैन, बहार.

Rĕvĕnge', *v. t.* (रिव्हें'ज)—to satisfy oneself by retaliation; to avenge; to take vengeance. उट्टें काढणें; वैर साधणें; सूड घेणें. *n.* a desire for vengeance; an act that satisfies vengeance, (games) opportunity given for reversing former result by return game. सूडाची इच्छा; सूड, वैरप्रतिक्रिया; डावाची संधि, बदला डाव.

Rĕvĕnge'ful, *n.* (रिव्हें'ज-फुल्)—eager for revenge; vindictive. सूड उगविण्याची बुद्धि असलेला; खुनशी, आकसखोर, सूडबुद्धीनें केलेला.—*fully, adv.*; *-fulness, n.*

Rĕv'ĕnūe, *n.* (रे'व्हिन्यू)—annual income (esp. that of a State); department collecting state revenue. वार्षिक वसूल, जमाबंदी, महसूल; जमाबंदीखातें. (pl.) *Rev'enues*, collective items of *r.* उत्पन्नाच्या रकमा, -ठोकळ बाबी.

Rĕverb'erāte, *v. t. & i.* (रिव्हर्बरेट्)—to echo or throw or reflect (sound, light, heat), to resound; (rare) rebound, react upon. प्रतिध्वनि करणें,-होणें; परावर्तन होणें; (चेंडू) उडी घेणें; (क्व.) उलट परिणाम करणें.

Rĕverberā'tion, *n.* (रिव्हर्बरे'शन्)-an echo, a rolling sound, a sound reverberated. प्रतिध्वनि, परावर्तन.

Rĕverb'erator, *n.* (रिव्हर्बरेटर्)—reflector, reflecting lamp. परावर्तक, (उजेडाचें) परावर्तन करणारा दिवा.

Rĕvere', *v. t.* (रिव्हिअर्)—to regard with deep and affectionate or religious respect, venerate. पूज्यबुद्धि असणें, मान ठेवणें, पूज्यबुद्धि दाखविणें,-व्यक्त करणें.

Rĕv'erence, *n.* (रे'व्हरन्स्)—feeling of deep respect, veneration. परम आदर, पूज्यबुद्धि, आदरबुद्धि, श्रद्धा. *v. t.* to regard with *r.*; venerate. पूज्य मानणें, पूज्यबुद्धि-आदर-ठेवणें.

Rĕv'erĕnd, *a.* (रे'व्हरन्ड्)—deserving reverence by age, character, or associations of the clergy. पूज्य, सन्माननीय, पूजार्ह; उपाध्यायाचा, उपाध्यायवर्गाचा. (abbr.) Rev., of clergyman; *Very Rev.* of dean; *Right Rev.* of bishop; *Most Rev.*, of archbishop, (ह्या सन्मानदर्शक पदव्या आहेत.) *The r. gentleman*, the clergyman in question. उल्लेख केलेला-ज्याविषयीं आपण बोलतों तो-उपाध्याय.

Rĕv'erent, *a.* (रे'व्हरन्ट्)—feeling or showing reverence. आदराचा, पूज्यबुद्धीचा, आदरभावयुक्त.

Rĕverĕn'tial, *a.* (रेव्हरे'न्शल्)—due of or full of reverence. आदराचा, आदरयुक्त, पूज्यबुद्धीचा, आदर असणारा.

Rĕv'erie, *n.* (रे'व्हरि)—musing; a day-dream, waking dream; (arch.) fantastic notion or theory, delusion; (Mus.) dreamy instrumental piece. भ्रम, भ्रमिष्टता, विचारभ्रमण; मनोराज्य, कल्पनातरंग; अकल्पित कल्पना, भ्रामक तत्त्व; कल्पनातरंगमय पद्य. *Was lost in r.* or *a. r.* कल्पनातरंगांत निमग्न झाला होता. [*F. rever*, to dream]

Revers', *n.* (रव्हे'अर्)—(pl. the same), turned back edge of coat, bodice etc. displaying lining. (कोट, अंगांतलें वगैरेचें) उलटवलेलें टोंक (त्यांतून अस्तर दिसतें असें). [F]

Rĕvers'al, *n.* (रिव्ह'र्सल्)—reversing or being reversed, a change or overthrowing. उलट फिरणें, परावृत्ति, परावर्तन, फरक, उलट.

Rĕverse', *a.* (रिव्ह'र्स्)—contrary in character or order, inverted, upside down, back or backward. उलटा, उफराटा, व्यस्त, विपरीत, विरुद्ध; पालथा, उलट. *v. t. & i.* to invert, to transpose; to

revoke, to annul; turn the other way round or up or inside out. उलट करणें; परिवर्तन करणें, (बाजू) बदलणें, मागें घेणें, रद्द करणें, फिरवणें, उलटणें. *n.* the contrary (*of*); defeat, check; back of coin etc. उलटा, प्रतिपक्ष, विपक्ष; पराजय, मागें-उलट पाऊल, दुर्दैव। (नाणें, पदक इ. ची) उलट बाजू, मुखवटा नसलेली बाजू. *R. fire, battery*, playing on enemy's rear or into works from rear. शत्रूच्या पाठीमागून हल्ला चढवणें. *To r. engine*, make it work backwards. एंजिन उलटें,-पाठीं-चालविणें. *On the r*, (in motoring) with car moving backwards. मागें-उलटी-मोटरगाडी घेणें. *The rr. of fortune*, दैवाचा उलटा फेरा, आपत्ति, दुर्दैव. *Reversely*, *adv.* उलटा, व्यतिक्रमानें. *Rever'sible*, *a.* उलटावयाजोगा, प्रतीपगामी, प्रतिलोम. *Rvers'ibility*, *n.*

**Rever'sion**, *n.* (रिव्हर्शन्)—reverting, return to former state or habit esp. (Biol.) to ancestral type; passing of an estate back to grantor or his heirs; right of succession to such estate. पूर्वस्थितीवर येणें, पूर्वस्थितीला जाणें, पूर्व-मूळ-दशाप्राप्ति। मालमत्ता मालकाला परत देणें,—त्याच्या वारसाला परत मिळणें, पुनर्भोग, उत्तराधिकार. *R. right*, मूळ मालकाच्या वारसाला परत मिळण्याचा हक्क, उत्तराधिकार. *Rever'sioner*, उत्तराधिकारी. *Reversionary*, *a.*

**Revert'**, *v. i.* (रिव्हर्ट्)—to return to former state; to recur in thought or talk, fall in by reversion; fall back into wild state; turn (eyes, steps) back. पूर्वस्थितीवर येणें; मागें वळणें, मूळ विषयावर परत येणें, मूळपदावर येणें, (मूळ मालकाच्या वारसाला) उत्तराधिकारानें मालमत्ता परत येणें; मूळ रानटी स्थितीला येणें। (दृष्टि इ.) मागें वळविणें,-वळणें. *Revert'ible*, *a.* (of property) subject to reversion. (मूळ मालकाच्या वारसाला) उत्तराधिकारानें परत मिळणारा.

**Revet'ment**, *n.* (रिव्हेट्मेन्ट्)—facing of masonry, concrete faggots, etc. on rampart or embankment. किल्ल्याची भिंत, बांध,-यांवरील दर्शनी बांधकाम

**Review'**, *n.* (रि-व्यू)—(law) revision; survey inspection; retrospect; critique of a book, &c.; periodical in which events, books, etc. are reviewed; second view. तपासणी; पाहणी; चौकशी; सिंहावलोकन; परीक्षण, समालोचन; नियतकालिक; पुनः पाहणें. *v. t. & i.* to view again; to survey, to look back on; to write review of (a book) hold review (of troop etc.). पुन्हा पाहणें; फिरून मागें पाहणें; परीक्षण करणें, समालोचन करणें, परीक्षणात्मक -टीकात्मक-लेख लिहिणें; (सैन्याची) पाहणी करणें. *Review'able*, *a.*; *Reviewal*, *n.*

**Review'er**, *n.* (रिव्यूअर्)—writer of or one who writes a review or reviews. गुणदोषविवेचक, परीक्षण करणारा, टीकाकार.

**Revile'**, *v. t.* (रिव्हाइल्)—to call by ill names; to abuse, to rail at, to vilify, to upbraid. कुटाळी करणें, शिवीगाळ करणें, निंदा करणें, निर्भर्त्सना करणें *Revil'er, Revil'ing*, *nn.*; *Revil'ingly*, *adv.*

**Revise'**, *v. t.* (रिव्हाइझ्)—to examine and amend faults in, to reconsider and amend. तपासून शुद्ध करणें, तपासणें, सुधारणें, दुरुस्ती करून पक्का करणें, उजळणी करणें. *n.* proof sheets embodying corrections made in earlier proof. सुधारलेलें दुसरें मुद्रित, द्वितीयमुद्रित. *Revi'ser*, *n.* one who re-examines for correction. तपासणारा, शुद्ध करणारा. *Revised Version*, abbr. R. V., बायबलची सुधारलेली आवृत्ति. *Revi'sory*, *a.* तपासणीचा, उजळणीचा.

**Revi'sion**, *n.* (रिव्हिझन्)—revising, revisal; revised edition or form. तपासणी, उजळणी, तपासून सुधारणें; सुधारलेली आवृत्ति. *Revi'sional*, *a.* तपासणीचा, दुरुस्तीचा, उजळणीचा, पुनः तपासून पाहण्याचा.

**Revi'val**, *n.* (रिव्हाइव्हल्)—reviving or being revived; reawakening of fervour; restoration to bodily or mental vigour or to life or consciousness. पुनर्जीवन, पुनरुज्जीवन, पुनरुत्साह, (पुनः) जिवंत होणें-करणें, संजीवन, सावरणें. *Reviv'alism*, *n.* धर्माचें पुनरुज्जीवन, पुनरुज्जीवनमार्ग. *Reviv'alist*, *n.* पुनरुज्जीवनाभिमानी.

**Revive'**, *v. i. & t.* (रिव्हाइव्ह्)—to come or bring back to life, consciousness, vigour, notice, or vogue; (Chem.) restore (metal) to natural form. पुन्हां जिवंत करणें किंवा होणें; चेतना आणणें, चेतना येणें, पुन्हां शक्ति-सामर्थ्य-येणें, सावरणें, पुन्हां प्रसिद्धीला येणें,-चालू होणें, अमलांत येणें,-चालू करणें। (धातुला) मूळ स्वरूप देणें,-मूळ स्वरूपांत रूपांतर करणें. *Reviv'able*, *a.* [L. *re.* again, *vivere*, live]

**Revi'ver**, *n.* (रिव्हाइव्हर्)—In verbal senses; (sl.) a stimulating drink; preparation for restoring faded colour etc. उत्साहवर्धक-जोसाचें-पेय; (फिकट रंगाला) तजेला आणणारें.

**Reviv'ify**, *v. t.* (रिव्हिव्हिफाय्)—to restore to vigour or life. to reanimate; (Chem.) to revive.. नवशक्ति देणें, परत चेतना आणणें, पुन्हां जिवंत करणें, पुनरुद्धार करणें; (धातुला) मूळ स्वरूपांत आणणें. *Revivifica'tion*, *n.*

**Rev'ocable**, *a.* (रेव्होकेबल्)—that may be revoked. रद्द करण्यासारखा, फिरविण्यासारखा.

**Revoca'tion**, *n.* (रेव्होकेशन्)—act of revoking, annulment, repeal; (Whist etc.) neglect to follow suit though able to. पुन्हां फिरवणें, रद्द करणें। फिरविणें, खोडणें; (पत्त्याच्या डावांत) त्या रंगाचें पान असून न टाकणें. *n.* (Whist etc.) revoking; (rare) revocation. (पत्त्याच्या डावांत) योग्य त्या रंगाचें पान टाकण्यास चुकणें; फिरवाफिरव, रद्दपणा.

**Revoke'**, *v. t. & i.* (रिव्होक्)—to rescind, to withdraw, to cancel, to declare void. मागें घेणें, रद्द करणें.

**Revolt'**, *v. t. & i.* (रिव्होल्ट्)—to rise or fall away or go over in rebellion; to feel revulsion, to affect with disgust. बंड करणें, सरकारविरुद्ध उठणें,-फितूर होणें; एकाएकीं बदल होणें। वीट येणें, चीड-

किळस-येणें,-वाटणें. *n.* insurrection; rebellious mood; sense of loathing. बंड; फितुरी, स्वपक्षत्याग (-वृत्ति); किळस, वीट. *Revolt'ing, a.* disgusting, horrible. किळसवाणा, क्षोभजनक, उद्वेगजनक, भयंकर, *Revolt'ingly, adv.*

**Rĕv'olute,** *a.* (रे'व्होल्यूट)—1. (Bot.) with back rolled edge. प्रतिवलिताग्र, मागें वळलेल्या कडेचा. 2. *v. i.* (sl.) to engage in political revolution, राज्यक्रांतींत भाग घेणें.

**Rĕvōlu'tion,** *n.* (रेव्होल्'शन्)—revolving; single completion of orbit or rotation; fundamental change, complete change; forcible substitution of new government or ruler for the old. भोंवतीं फिरणें, परिभ्रमण; फेरा, वेढा, प्रदक्षिणा; समूळ पालट, उलटापालट, क्रांति; राज्यक्रांति. *Revolu'tionist, n.* क्रांतिकारक, क्रांतिवादी,*-tionism, n.* क्रांतिकारकपणा, क्रांतिवाद. [L. *re,* again; *volvere,* roll]

**Rĕvōlū'tionary,** *a. & n.* (रेव्होल्यू'शनरि)—involving great change; (instigator) of political revolution; (rare) of rotation or revolving. उलाढालीचा, चळवळीचा, क्रांतिकारक; राज्यक्रांति घडवून आणणारा, राज्यक्रांतीचा; परिभ्रमणाचा, प्रदक्षिणेचा, फेऱ्याचा.

**Rĕvōlu'tionize,** *v. t.* (रेव्होल्'शनाइझ्)—to reconstruct completely, to bring about a revolution or complete change in. पूर्ण क्रांति घडवून आणणें, उलथापालथ करणें, दांडगे फेरफार घडवून आणणें.

**Rĕvŏlve',** *v. t. & i.* (रिव्हॉ'ल्व्ह्)—to turn round a centre; to rotate; go rolling about. भोंवतीं फिरणें, फेरा घालणें, प्रदक्षिणा करणें, वाटोळा फिरणें; परिभ्रमण करणें,-करविणें, घोळणें, विचार करणें. *To r. problem, fact. in the mind,* ponder over it. प्रश्नाचा-गोष्टीचा-मनांत घोळून घोळून विचार करणें, मनांत घोळत राहणें.

**Revŏl'ver,** *n.* (रिव्हॉ'ल्व्हर्)—(*esp.*) a pistol that will fire several shots without reloading. अनेकबारी पिस्तूल. *Policy of the big r.,* of threatening foreign states with retaliatory tariff. परराष्ट्रीय आयात मालावर प्रतिकारबुद्धीनें जकात लादण्याची धमकी (परराष्ट्रांना).

**Revue',** *n.* (रिव्ह्यू)—loosely constructed play or series of scenes satirizing current events. (चालू घडामोडींवर-परिस्थितीवर टीका करणारें) व्यंग्य-नाटक, प्रहसन, [F.]

**Rĕvŭl'sion,** *n.* (रिव्ह'ल्शन्)—sudden violent change of feeling; sudden reaction in taste, fortune, trade, etc.; (rare) drawing or being drawn away; (Med.) counter-irritation. भावनेंतील आकस्मिक उलटापालट,-फरक; उलटापालट, विपर्यास; उलट दाह, प्रतिक्षोभ.*-sive, a.*

**Reward',** *n.* (रिवॉ'र्ड)—return or recompense for service or merit; requital for good or evil; sum offered for detection of criminal, restoration of lost property, etc. बक्षीस, फळ, मोबदला, उलट, प्रतिदान; इनाम, रोख बक्षीस. *v. t.* to give or serve as a reward, repay, recompense. बक्षीस देणें, फळ देणें, परत देणें, मोबदला देणें, उलट करणें. *Reward-less, a.*

**Rey'nard,** *n.* (रे'नर्ड)—(proper name for) the fox, a fox. कोल्हा.

**Rhăb'domăncy̆,** *n.* (रॅ'ब्डोमॅन्सि)—use of divining rod, esp. for discovering subterranean water or ore, dowsing. (भूमिगत जल किंवा धातु शोधून काढण्यासाठीं) दंडाचा-पानाड्याच्या यष्टीचा-उपयोग (करणें), जलसंशोधक दंडाचा-काडीचा-उपयोग.

**Rhădamăn'thus,** *n.* (रॅडमॅ'न्थस्)—stern and incorruptible judge. कडक न्यायाधीश.*-thine, a.* [name of judge in Gk Hades]

**Rhăp'sŏdy̆,** *n.* (रॅ'प्सॉडि)—an enthusiastic high-flown utterance or composition, a rambling composition; (Gk. Ant.) on epic poem, or part of it, of length for one recitation. अविशयुक्त जोरदार भाषण किंवा लेख, असंबद्ध भाषण,-कविता; महाकाव्यांतील एका वृत्तांताच्या वर्णनाचा एकाच वेळेस गातां येईल एवढा भाग. *Rhapsod'ical, a. Rhap'sodist, n.* person who writes rhapsodies (usu. *about, on*); reciter of rhapsody. असंबद्ध काव्य करणारा,-लिहिणारा; (होमरच्या) काव्यांतील उतारे गाणारा.

**Rhē'nish,** *n.* (र्‍हीनिश्)—Rhine wine. र्‍हाइन् नदीच्या खोऱ्यांतील दारू.

**Rheo,-reo-,** (रीओ)—(comb. form in electr. terms,) stream, current. प्रवाह. *Rheom'eter, n.* विद्युत्प्रवाहमापक. *Rhe'oscope, n.* विद्युत्प्रवाहदर्शक. *Rheotome, n.* device for interrupting current. विद्युत्प्रवाहव्यवच्छेदक, विद्युद्व्यवच्छेदक. *Rhe'ostat, n.* instrument regulating current to constant degree of force. विद्युत्समस्थापक.

**Rhē'tor,** *n.* (र्‍ही'टर)—ancient Greek or Roman teacher or professor of rhetoric; (rare) (mere) orator. प्राचीन ग्रीस किंवा रोममधील साहित्यशास्त्र-वक्तृत्व-शिक्षक; वक्ता.

**Rhĕt'oric,** *n.* (र्‍हे'टारिक्)—art of speaking or writing effectively, inflated or exaggerated language, eloquence; persuasiveness of looks or acts. अलंकारशास्त्र, आलंकारिक भाषा, वक्तृत्व; आकर्षकता.

**Rhĕtŏ'rical,** *a.* (र्‍हिटॉ'रिकल्)—of the nature of or exhibiting rhetoric; oratorical. आलंकारिक; वक्तृत्वपूर्ण, वक्तृत्वाचा; छाप पाडणारा. *R, question,* asked not for information but to produce effect. वक्तृत्वाची छाप पाडणारा प्रश्न.*-rically, adv. Rhetorician, n.* (-शन्), rhetorical speaker or writer. उत्कृष्ट वक्ता; अलंकारिक भाषेंत बोलणारा,-लिहिणारा.

**Rheum,** *n.* (रूम्)—humid matter or water secretion collected in eyes, nose, or mouth; catarrh; (pl.) rheumatic pains. श्लेष्मा, कफ, सर्दी, शैत्य; (अने०) आमवात, संधिवात.

**Rheumăt'ic,** *a.* (रूमॅ'टिक्)—subject to rheumatism. संधिवाताचा, संधिवातग्रस्त, संधिवात झालेला. *n. r.*

patient; (pl.) rheumatism. संधिवाताचा रोगी, संधिवात. *R. fever*, *n.* सांधेदुखीचा ताप.

**Rheumăt'ickȳ**, *n.* (र्‍हूमॅ'टिकि)—(colloq.) like or having rheumatism. संधिवातासारखा, संधिवातग्रस्त.

**Rheu'mătism**, *n.* (र्‍हू'मॅटिझम्)—a disease marked by inflammation and pain in the joints. संधिवात. *Acute r.*, तीव्र आमवात, फूट.

**Rheu'mȳ**, *a.* (र्‍हू'मि)—affected with rheum, (of air) damp, raw. चिपडा, पिचका; थंड, गारठ्याची, सर्द. *R.-eyed*, चिपड्या,-पिचक्या,-डोळ्यांचा; अश्रुढाळ (घोडा).

**Rhi'nal**, *a.* (र्‍हाइ'नल्)—(anat.) of nostril or nose. नाकपुडीचा, नाकाचा.

**Rhino-**, (र्‍हाइनॉ-)—comb-form of Gk *rhis, rhinos,* nostril, nose. नाकपुडी-नाक-, *Rhino-pharyngeal*, of nose and pharynx. नाक व घसा यांसंबंधीं. *R.-plastic,-plasty*, (of plastic surgery) of the nose. शस्त्रक्रियेनें नाक दुरूस्त करणें, (करण्याचें); अभिनव नागबंध. *Rhinoscope,-scopic*, नासिकादर्शक, नाक तपासण्याचें यंत्र.

**Rhinŏ'cerŏs**, *n.* (र्‍हाइनॉ'सरॉस)—a large animal with a horn or two horns on the nose. गेंडा, खड्ग.

**Rhŏ'dium**, *n.* (रो'डिअम्)—a hard white metal extracted from the ore of platinum. अशुद्ध 'प्लॅटिनम' धातूंतून काढतां येणारी कठीण पांढरी धातु, र्‍होड.

**Rhŏdodĕn'dron**, *n.* (र्‍होडाडे'ड्रॉन)—evergreen shrub with large flowers. एक जातीचें नेहमीं हिरवें असणारें फुलझाड.

**Rhŏmb, Rhŏm'bŭs**, *nn.* (र्‍हॉम्ब्, र्‍हॉ'म्बस्)—(pl.-buses) equilateral but not right-angled parallelogram diamond or lozenge. तुल्य चतुर्भुज, सम चतुर्भुज; या आकाराचा हिरा; (पेपरमिंटची) वडी, इ० *Rhom'bic*, *a.* rhomb-shaped. सम -चतुर्भुजाचा, समभुजचौकोनाचा,-नी. *Rhom'boid*, *n.* a parallelogram, neither equilateral nor right-angled. समप्रतिभुज (चौकोन); विषम सम चतुर्भुज. *Rhomboid'al*, *a.*

**Rhu'barb**, (र्‍हूबार्ब)—purgative made from root of Chinese plant. रेवाचिनी.

**Rhȳme, Rime**, *n.* (र्‍हाइम, राइम्)—identity between terminal sounds of words or verse-lines; a poem with rhymes; a word providing a rhyme. यमक; सयमक कविता, यमक साधलेली कविता; यमकाचा शब्द. *v. t. & i.* to write rhymes, versify; exhibit rhyme; while (time) away in rhyming. सयमक कविता करणें, यमक जुळविणें, कवन करणें। यमक होणें, -साधणें,-मिळणें,-जुळणें; यमकें करण्यांत वेळ घालविणें. *Without r. or reason*, quite unaccountably. ताळ नाहीं तंत्र नाहीं, असा; ताळतंत्ररहित, कारणमीमांसा न होण्याजोगी. *Rhymer,-ster*, *nn.* writer of rhyme. कविता करणारा, कवि, यमक्या.

**Rhȳ'thm**, *n.* (रि'दम्)—measured flow of words in verse or prose; movement with regular succession, metrical movement. लय, मात्रासाम्य, लयसाम्य, तालबद्धता; ताल, मेळ, साम्य; सारखी गति, गतिसाम्य, समगति. *Rhyth'mic,-mical*, (-द्), *aa.* तालबद्ध, लयात्मक, मेळ असलेला, समगतिक.

**Rib**, *n.* (रिब्)—one of the curved bones round the upper part to the body; an arch supporting a vault; a rod of umbrella-frame; curved timber to which boat's planks are nailed; (joc.) wife, woman. बरगडी, बरगडीचें हाड; पार्श्वास्थि, फांसळी, फांसळीचें हाड, बरगडी; कमान, (पानाचा) दांडा; वलय, शीर; शलाका, छत्रीची ताडी; (जहाजाचा) कणा; पत्नी, स्त्री. *v. t.* to provide with ribs, act as rr. of; mark with ridges; half-plough, rafter. दांडा, ताडी वगैरे घालणें; (चा) दांडा; कणा वगैरे असणें; कणा, दांडा, रांग वगैरे काढणें; (नांगरून) दांड पाडणें, वरंबा घालणें. *To poke one in the rr.*, to draw his attention facetiously. चट्टेखोरपणानें,-विनोदानें,-लक्ष वेधणें. *To smite under fifth rib*, bibl. to stab. भोसकणें. *R.-grass,-wort*, Narrow-leaved Plantain. एक जातीचें गवत,-वनस्पति. *Ribbed, Rib'less*, *aa.* *Ribb'ing*, *n.* ribs or rib-like structure. फांसळ्या; फांसळ्यांच्या आकाराची बांधणी.

**Rib'ald**, *a.* (रि'बल्ड)—scurrilous, irreverent, indecent. हलकट, असंबद्ध, अश्लील (भाषा, बोलणारा). *n.* a lewd person. हलकट मनुष्य, तोंडाचा फटकळ, अभद्र, बीभत्स.

**Rib'aldry**, *n.* (रि'बॅल्ड्रि)—ribald talk. अभद्र,-बीभत्स -भाषण, पांचकळ बोलणें.

**Ribb'on, Rib'and**, *n.* (रि'बन्, रि'बन्ड)—silk or other fine material woven into a narrow band; piece of this used for ornament; (*pl.*) reins. फीत, नाडी, लगाम, लगामाची दोरी. *To hang in, torn to, rr.*, ragged strips. फाटक्यातुटक्या फिती, (कापडाच्या) पट्ट्या. *To handle, take, the rr.*, drive. (लगाम धरून) हांकलणें. *R.-grass*, slender-leaved kind. बारीकपानी गवत.

**Ri'bēs**, *n.* (राइ'बीझ्)—(bot.) kinds of plants including currants, etc. एक जातीची वनस्पति, -झाड,-झुडूप.

**Rice**, *n.* (राइस)—pearl-white seeds of an oriental plant used as food; the plants. तांदूळ; भात, साळ, साळी. *Boiled rice*, भात. *Husked rice*, तांदूळ. *R.-bird*, Java sparrow, also bobolink. मनिया (पक्षी). *R.-milk*, दूधपाक, खीर. *R.-paper*, kind made from pith of a Formosan plant and used by Chinese artists for painting on (named after rice in error). चिनी लोकांचा चित्रें काढण्याचा एक प्रकारचा कागद.

**Rich**, *a.* (रिच्)—wealthy, having riches; fertile; valuable; (of dress) splendid, costly; highly amusing; abundant; (of food) containing large proportion of fat, butter, sugar, etc.; (of colours, sounds, smells) mellow, deep, full, not thin. धनिक, श्रीमंत; सुपीक; उंची, मौल्यवान; सुरेख, छान, अत्यंत मनोरंजक; विपुल, स्निग्ध

मिट ( अस्त ); पक्काल; घमघमीत, झगझगीत, चकचकीत, मोठा, उंच. *Rich*-,richly-clad, थाटामाटाचा पोषाख केलेला. *Rich'en, v. t.* & *i.* ( rare ); *Rich'ness, n.*

**Rich'es,** *n.* ( रि'चिझ् )—wealth; valuable possessions, opulence, affluence. द्रव्य, संपत्ति; दौलत.

**Rich'ly̆,** *adv.* ( रि'च्-लि )—In adj. senses; fully; abundantly. भपक्यानें, थाटानें; पूर्णपणें, यथायोग्य रीतीनें. *Richly deserves* ( a thrashing, to succeed ). पुरतेपणी,-पुरेपूर,-लायक आहे.

**Rick,** *n.* ( रिक् )—stack of hay, corn, peas, etc. गंजी, गंज, उडी, उडवें, सुडी. *v. t.* to form into ricks. गंजी रचणें, उडवी घालणें. 2. See Wrick.

**Rick'ets** *n.* ( रि'किट्स )—a children's disease ( with softening of bones, bow-legs, &c. ). मुलांचा एक रोग, मुडदूस, अस्थिमार्दवरोग.

**Rick'ety̆,** *a.* ( रि'किटि )—of, like or having rickets; shaky, insecure. मुडदुसाचा, मुडदुसासारखा, मुडदूस झालेला; लटपटीत, ढिला.-*etiness, n.*

**Ric'ochet,** *n.* ( रि'कोशे )—skipping on water or ground of a cannon-ball or bullet, hit made after it. पाण्यावरून किंवा जमिनीवरून ( तोफेचा ) गोळा उडत उडत जाणें; त्याप्रमाणें लगावलेला टोला, *v. i. &. t.* ( *pa. t. & pa. p.*-cheted,-शेड्; pr. pa. -cheting,-शेइंग ), to skip once or more; hit or aim at with ricochet shot. ( एकदां किंवा अधिक वेळां ) उडी खाणें; उडी घेणें; उडी घेणाऱ्या गोळीनें-माराने-नेम धरणें.

**Ric'tus,** *n.* ( रि'-क्टस् )—expanse or gape of person's or animal's mouth, bird's beak, or flower with two-lipped corolla. ( मनुष्याची ) जांभई, ( पशूचें ) उघडें तोंड, ( पक्ष्याची ) उघडी चोंच,- पोकळी. [ L. *ringi*, open the mouth ]

**Rid,** *v. t.* ( रिड् )—( pa. t. *ridded, rid*; pa. p. rid ), to disencumber or relieve of; to abolish ( pest ). मुक्त करणें, सोडवणें; नाहींसा करणें. *a.* free. मुक्त. *To get r. of, be r. of*, पासून मुक्त होणें,-सुटणें, मोकळा होणें.

**Ridd'ance,** *n.* ( रि'डन्स् )—getting rid of. सोडवणूक, सुटका, मुक्तता. *A good r.!* (as excl. of joy). सुटलों एकदांचा! *Person* etc. is *a good r.*, better away. त्याच्या तावडींतून सुटलों-तो निघून गेला-छान छान झालें! पीडा गेली!

**Rid'dle,** *n.* ( रि'डल् )—a question designed to test one's ingenuity in divining an answer; a puzzling fact, thing or person; a coarse sieve; plate with pins used in straightening wire. कूट प्रश्न, कोडें, उखाणा, गूढ; जाडी चाळण, घोळणा; तार सरळ करण्याचें यंत्र,-साधन. *v. i. & t.* speak in, propound, riddles; solve a *r.* कोड्यांत बोलणें, गूढ भाषण करणें, कोडीं घालणें; कोडें सोडविणें *v. t.* to sift; pierce in many places with shot ( also fig. ). चाळणें, घोळणें; ( आंगाची इ. ) चाळण करणें, भोकें पाडणें; ( पुरावा ) चाळून-तपासून-पाहणें; प्रश्नांचा भडिमार करणें. *Rid'dingly, adv.*

**Ride,** *v. i.* & *t.* ( राइड )—to sit on and be carried by a horse, &c.; to go on a conveyance, manage a horse; to be at anchor; to float buoyantly; to oppress, to tyrannize over; ( of sun ) seem to float; project or overlap; traverse on horse-back; cause to ride, give ride to, ( of ground ) be of specified character for riding on. ( घोड्यावर ) बसून जाणें; ( गाडींत ) बसून जाणें; सवारी करणें, नांगर टाकून असणें; तरंगणें; जुलूम करणें, वर्चस्व गाजविणें; तरंगत आहेसें दिसणें, अति वेगानें जाणें-फिरणें; वर चढणें, वर पडणें,-अधिक होणें; घोड्यावर बसून-रपेट,-प्रवास,-करणें; बसून नेणें, वाहून नेणें; घोड्यावर बसून जाण्याच्या दृष्टीनें ( बरी वाईट जमीन ) असणें. *n.* a journey in public conveyance; a road esp. through wood, for riding; ( Mil. ) batch of mounted recruits, ( गाडींतून किंवा घोड्यावरून ) रपेट; रपेटीचा मार्ग, घोडेस्वार; नवीन भरतीच्या घोडेस्वारांची तुकडी. *To r. for a fall*, act recklessly, निष्काळजीपणानें,-अविचारानें,-वागणें. *To r.* one *down*, overtake by riding, put one's horse at him, भरधांव घोडा फेंकून ( दुसऱ्याला ) गांठणें; घोडा दुसऱ्याच्या आंगावर घालणें. *To r. off on* a side issue, use it to evade the main point. मुख्य प्रश्नाला बगल देण्यासाठीं अवांतर गोष्टी काढणें. *To r. out the storm*, come safely through it, ( lit & fig. ). वावटळींतून-संकटांतून निभावून बाहेर पडणें. *To r.* one's *horse*, hobby, jest etc. ( to death ). आपलेंच घोडें पुढें दामटणें, आपलाच मुद्दा, वेड, नाद, छंद घेऊन बसणें; -अतिरेक करणें. *Ridden by fears, prejudices*, भयग्रस्त, संशय-भ्रम-ग्रस्त. *Priest-ridden*, उपाध्यायवर्गाचें प्राबल्य असलेला. *Rid'able, a.*

**Ri'der,** *n.* ( रा'इडर )—In vbl. senses; additional clause amending or supplementing document; expression of opinion, recommendation, etc. added to verdict; corollary, naturally arising supplement; ( Math. ) problem; piece in machine etc. that surmounts or bridges or works over others; ( Naut. pl. ) additional set of timbers or iron plates strengthening ship's frame, ( sing. ) over-lying rope or rope-turn. घोड्यावर बसणारा, स्वार, स्वारी; पुरवणी-कलम, ( निकालाची ) पुस्ती; पुरवणी,-मुख्य सिद्धांतावरील प्रश्न, उदाहरण; ( यंत्रांतील ) जोडणारा भाग,-सांधा,-गलबताला अधिक बळकटी आणणारें लांकूडकाम, दोरीचें वेटोळें. *Ri'derless, a.*

**Ridge,** *n.* ( रिज् )—a line of junction in which two sloping surfaces meet; ( agric. ) one of a set of raised strips separated by furrows; a long narrow hill-top; a mountain range. कणा, आढें; कांडाळें, कांडें, दंड; लांब चिंचोळें शिखर; पर्वतांची रांग, श्रेणी. *v. t.* &. *i.* to break up land into *rr.*; mark with *rr.*; plant in *rr.* कांडीं पाडणें, वरंबा घालणें; रांगा घालणें; कांडीं पाडून त्यांत लावणें. *R.-pole, R.-piece*, आढें, आढें. *Ridged, Ridg'y, aa.* कणा-दांडा-असणारा.

**Rid'icūle,** *v. t.* ( रिडिक्यूल् )—to make a laughing-stock of; to deride, laugh at. उपहास करणें; टर उडवणें, थट्टा करणें. *n.* treatment of a person or thing as ridiculous. उपहास, थट्टा; टर.

**Ridic'ūlous,** *a.* ( रिडि'क्युलस )—deserving to be laughed at as foolish or absurd. उपहासास्पद, हास्यास्पद.*-ly, adv. ;-ness, n.*

**Ri'ding,** *n.* ( रा'इडिंग् )—In vbl. senses; road for riders. घोड्यावर बसणें, स्वारी; घोडेस्वारांचा रस्ता. *a.* used for riding on; intended for a rider. सवारीचा, बसणीचा, घोडेस्वारासाठीं असलेला. *R.-breeches,* घोड्यावरून रपेट करतांना घालण्याचा चोळणा. *R.-habit,* lady's long skirt for riding. घोड्यावर बसण्याचे वेळीं घालण्याचा स्त्रियांचा झगा. *R.-master,* one who teaches riding. अश्वारोहणशिक्षक, घोड्यावर बसण्यास शिकविणारा. *R.-school,* घोड्यावर बसायला शिकविण्याची शाळा.

**Rife,** *pred. a.* ( राइफ् )—of common occurrence; prevailing; numerous. नेहमीं घडणारा; प्रचलित; विपुल.*-ness, n.*

**Riff'-răff,** *n.* ( रिफ्-रॅफ् )—the rabble; disreputable people. बाजारबुणगे लोक; मवाली लोक.

**Ri'fle,** *n.* ( रा'इ-फल् )—a musket with grooved barrel; (*pl.*) troops armed with these. एक प्रकारची बंदुक, रायफल नांवाची बंदुक; ( अने० ) रायफलवालें सैन्य,-शिपाई,-सैनिक. *v. t.* to search and rob; make spiral grooves in (gun etc.); shoot with rifle. लुटणें, बुचाडणें, लुबाडणें; ( बंदुकीच्या आंतल्या बाजुला ) खोबणी पाडणें; रायफलनें गोळी घालणें. *R.-bird,* एक आस्ट्रेलियांतील पक्षी. *R. brigade,* रायफलवाल्यांची ( ब्रिटिश ) तुकडी. *R.-corps,* रायफल-स्वयंसेवकतुकडी. *R.-man,* soldier with rifle; member of rifle brigade. बंदुकवाला शिपाई; रायफलतुकडीचा सैनिक. *R.-range,* distance *r.* carries; place for *r.* practice. रायफलबंदुकीचा नेम, पल्ला; चांदमारीचें मैदान. *Ri'fling, n.* arrangement of the grooves in a rifle. बंदुकींतील खोबण्यांची रचना.

**Rift,** *n.* ( रिफ्ट् )—fissure, chasm, crack in earth or rock; rent, crack in an object, opening in cloud etc. चीर, भेग, तडा, पोकळी. *v. t.* (usu. in p.p.) rend apart, cleave. चीर-भेग-पाडणें, उकलवणें. *Little r. within the lute,* अन्तःकलह, शुष्क भांडण. *Riftless, Rifty, aa.*

**Rig,** *v. t.* ( रिग् )—to provide a ship with spars, ropes, &c.; prepare for sea in this respect; to furnish with clothes or equipment; to set *up* hastily or as makeshift. दोरखंडांनीं वगैरे ( जहाज ) दुरुस्त करणें,-सजवणें; जहाज सजवून जलप्रवासाला सिद्ध करणें; कपडे घालून सजविणें, पोषाख घालणें; सजवणें, सज्ज करणें. *n.* way ship's masts, sails, etc. are arranged; (transf.) person's or thing's look as determined by clothes etc.; (U. S.) carriage or equipage, esp. with its horses. जहाजाचीं शिडें, डोलकाठ्या वगैरेची रचना; पत्रादिकांनीं आलेली शोभा,-सजावट. *Rig-out, n. & v. t.* प्रवासी तयारी ( करून देणें ).

**Rig,** *n.* ( रिग् )—trick, dodge, swindle. चेष्टा, टवाळी, लुच्चेगिरी, फसवणूक. *v. t.* to manage by trickery. फसवेगिरीनें चालविणें. *To r. the market,* cause artificial rise or fall in prices. ( फसवेगिरीनें ) बाजारभावाचा चढउतार करणें.

**Rigg'ing,** *n.* ( रि'गिंग् )—the ropes which support the masts of a ship. जहाजाचीं दोरखंडें.

**Right,** *a.* ( राइट् )—straight; (of angle) of 90°, made by lines meeting perpendicularly; just; proper, not mistaken, correct, true; on or to the right hand; in good or normal condition, sound, sane, satisfactory, well-advised. सरळ; काटकोनाचा, ९० अंशाचा; योग्य, न्याय्य; वाजवी, बरोबर; उजवा, उजव्या हाताकडील; सुस्थितींत असलेला, सुदृढ, सुधा, समाधानकारक, सुनीत, समंजस. *v. t. & i.* to restore to or recover proper position; avenge, vindicate, rehabilitate; (of ship) recover vertical position; to make reparation; to correct, to set in order. ठिकाणीं आणणें, योग्य स्थानीं-ठिकाणीं येणें; न्याय करणें, दाद घेणें; काटकोनांत येणें; सुलट-सरळ-होणें; ताळ्यावर आणणें; बरोबर करणें, सुधारणें, निटावणें, दुरुस्त करणें, व्यवस्थित करणें. *n.* what is just; fair treatment; justification; (*pl.*) right claim, right condition. सत्य; नीति, न्याय्यता, न्याय; रास्तपणा, औचित्य; अधिकार, सत्ता, हक्क; उजवीकडचा प्रदेश,-भाग,-दिशा; ( राज० ) परराष्ट्राच्या लोकसभेंतील पुराणमतवादी-सुधारणाविरोधी-सभासद. *adv.* straight; all the way, completely, exactly; justly, properly; to the right hand; very, to the full. थेट, नीट, सरळ; अगदीं बरोबर, ठीक; योग्य तऱ्हेनें; न्यायानें, योग्य मार्गानें; उजव्या बाजूला, उजवीकडे; अगदीं, फारच, अति. *At r. angles,* काटकोनांत, ९० अंशांचा कोन करून. *R. sailing,* due N., S., E., or W. उत्तर, दक्षिण, पूर्व, पश्चिम दिशेनें गलबत जाणें. *On the r. side of 40,* not yet 40 years old. वयानें चाळीस वर्षांच्या आंतील. *In one's r. mind,* not mad. डोकें ठिकाणावर असलेला. *R. you are, all r., r. oh!,* वाहवा! ठीक! बरोबर! अगदीं योग्य! *R. and left, adv.* to or on both sides, on all hands, दोन्हीं बाजूंकडे,-बाजूनीं, सर्वबाजूंनीं; *a.* दोन्हीं बाजूनें-बाजूचा. *R. arm,* उजवा हात, (fig.) one's most reliable helper. उजवा हात, मुख्य साह्यकारी. *The r.,* the juster cause. सत्पक्ष. *To be in the r.,* have justice or truth on one's side. आपली बाजू न्यायाची किंवा सत्याची असणें. *Woman's rr.,* of equality with men. स्त्रियांचे ( पुरुषाशीं ) समान हक्क. *R. of way,* right established by usage to pass over another's ground, also path subject to such right. दुसऱ्याच्या जमिनींतून जाण्यायेण्याचा चालू वहिवाटीचा हक्क, असा हक्क असलेला रस्ता. *To set* or *put to rr.,* arrange properly. ठाकठीक रचणें, लावणें. *R.*

*R. away,* immediately, without pause.

न वांधतां. *R. angle*, काटकोन. *R. minded*, having virtuous inclinations. सत्प्रवृत्त, सद्वृत्तीचा, सात्त्विक वृत्तीचा. *R. whale*, kind yielding best whale-bone. उत्कृष्ट जातीचा देवमासा.

**Righ'teous**, *a.* (रा'इचस)—virtuous, upright in conduct, just, honest. गुणवान, नेकीचा, प्रामाणिक, न्याय्य, सात्त्विक.-*ly, adv.* ;-*ness, n.*

**Right'ful**, *a.* (रा'इट्-फुल्)—legitimately entitled to; justifiable, just, lawful. हक्कदार, न्यायाचा, रास्त, यथान्याय.-*fully, adv.* -*fulness, n.*

**Right'ly**, *adv.* (रा'इट्-लि)—justly, correctly, properly, justifiably. न्यायानें, यथायोग्य, अगदीं बरोबर.

**Ri'gid**, *a.* (रि'जिड्)—that cannot be bent, inflexible, unyielding; harsh, strict. न वांकणारा, ताठ; कडक, न्यायनिष्ठुर.-*ly, adv.* ताठपणें, कडक रीतीनें.

**Ri'gidity**, *n.* (रि'जिडिटि)—inflexibility, harshness, strictness, severity. ताठरपणा, कडकपणा, दक्षता.

**Rig'marole**, *n.* (रि'ग्मरोल्)—meaningless talk or string of words. मूर्ख बटबट, बडबड, गडबडगुंडा. (attrib.) incoherent. असंबद्ध, ताळमेळ नसलेला.

**Ri'gor**, *n.* (रा'इगॉर्,रि'-)—(path.) sudden chill with shivering before fever etc. आकस्मिक थंडी वाजून हुडहुडी भरणें. *R. mortis*, stiffening of body after death. मृत्यूनंतर शरीरांतील स्नायू ताठ होणें, प्रेत ताठ होणें. [ L. rigere, be stiff ]

**Rig'our**, *n.*(रि'गर्)—severity, strictness, harshness; cruel extremity of cold, intense coldness, inclemency; (pl.) harsh measures; logical accuracy. कडकपणा, तीव्रता, कडाका, ताठा; कांटा; कडक उपाय; नेमकेपणा, अचूकपणा. *Rig'orism, Rig'orist, nn.*

**Rig'orous**, *a.* (रि'गरस्)—severe, strict. कठोर, कडक, -*ly, adv.*

**Rig'sdag**, *n.* (रि'ग्स्डॅग्)—Danish Parliament. डच पार्लमेंट,-लोकसभा.

**Rile**, *v. t.* (राइल्)—(sl.) to raise anger in, irritate. राग आणणें, चिडविणें.

**Rill**, *n.* (रिल्)—a tiny stream. लहान ओढा, ओहळ ओघळ. *v. i.* issue or flow as *r.* ओहोळ-ओढा-होऊन वाहणें. *Ri'llet,'n.*

**Rille**, *n.* (रिल्)—(astron.) trench or narrow valley of moon's surface. चंद्रावरील अरुंद दरी, खंदक.

**Rim**, *n.* (रिम्)—the raised edge or border of a thing, the margin, verge; outer ring of wheel's frame-work not including tire; frame of sieve, (poet.) circular object; (Naut.) surface of the water. कांठ, किनारा, कडा, चाकांचा कंगोरा; चाळणीचा सांगाडा,-कडा; वाटोळी वस्तु; पाण्याचा पृष्ठभाग. *v. t.* to furnish with *r.*, serve as *r.* to, edge, border. कडा-कांठ-कंगोरा-लावणें,-असणें. *A golden rim*, crown, राजमुकुट. *Rim'less,-rimmed, aa.*

**Rime**, old form of Rhyme.

**Rime**, *n.* (राइम्)—white or hoarfrost. हिम, थिजलेलें दंव. *v. t.* to cover with *r.* दंवानें-हिमानें-झांकून जाणें. *Ri'my, a.* तुषारमय, हिममय.

**Rind**, *n.* (राइन्ड्)—bark, peel, husk, skin, external aspect, surface. साल, त्वचा, सालपट, बाह्यभाग, पृष्ठभाग.

**Rin'derpest**, *n.* (रि'न्डरपेस्ट्)—disease of ruminants esp. oxen; cattle-plague. गुरांचा एक रोग,-देवी, पटकी, बुळकांडी. [ *G. rinder*, pl. of *rind, ox.* ]

**Ring'**, *v. i. & t.* (रिंग्)—(*pa. t. rang*, rarely *rung*; *pa. p.* rung), to give forth clear resonant sound; (of place) resound, re-echo; (of ears) be filled with sensation as of bell-ringing; make ring; ring bell; announce or summon by sound of bell. वाजणें, खणखण-घणघण-वाजणें, दणदणणें, घणाणणें, घुमणें; (कानांत) झणझणणें, भणभणणें, भिरभिरणें, आवाज होणें; आवाज करणें; घंटा वाजवणें; घंटा वाजवून सांगणें,-बोलावणें. *n.* a ringing sound, resonance; act of ringing bell; set of church bells. नाद, खणखणाट, घणघणाट; घंटा वाजवणें; देवालयांतील घंटांची रांग. *Ringing frost*, in which ground rings under foot. पायाखालची जमीन चालतांना निनादणारें थिजलेलें दंव. *To r. true, false*, (of coin, of sentiments). (नाणें, भावना) यांचा खरेखोटेपणा आवाजावरून समजणें. *To r. the bell*, esp. घंटा वाजवून नोकराला बोलावणें. *To r. the knell of*, बारा वाजवणें; रद्दपणा जाहीर करणें; नाहींसा करणें. *To r. up*, on telephone, शीं टेलीफोन करून बोलणें.

**Ring**, *n.* (रिंग्)—a circlet of gold worn esp. on finger; circular thing; enclosure for circus-riding, boxing, betting, etc.; combination of persons acting together for control of market or policy; persons, trees, etc. disposed in a circle, such disposition; circular appliance of any material and any size. आंगठी, वळें, वलय, कडें, चक्र; रिंगण; मंडळी, मंडल; वर्तुळाकार महिरपि,-साधन. *v. t. & i.* to encompass, hem in; to fit with ring; put ring in nose of (pig, bull); cut (onions, apples) into *rr.*; (of hawk) rise in spirals; (of hunted fox) take circular course. कठडा घालणें, घेरणें, वर्तुळांत धरून (गुरें इ०) अडविणें; कडें,-वळें,-अडकविणें; नाकांत वेसण घालणें,-कडें अडकविणें; वाटोळे काप काढणें गिरक्या घेत वर उडणें; वक्रगतीनें जाणें, वेडेवांकडें-वांकणें घेत-जाणें. *Nose-r.*, नथ. *R.-dove*, wood-pigeon. जंगली कबुतर. *R.-finger*, डाव्या हाताचें तिसरें बोट. *R.-master*, manager of circus performance. सर्कशींतील कामें करून घेणारा, 'रिंग मास्तर.' *R.-ouzel*, bird allied to black-bird. एक जातीचा पक्षी. (-)*ringed, Ring'less, aa.*

**Rin'gent**, *a.* (रि'न्जन्ट्)—(bot.) gaping, grinning. विवृतमुख.

**Ring'leader,** *n.* (रिं'ग-लीडर्)—the leader of a ring of people, instigator in mutiny or riot. (बंडाचा) म्होरक्या, पुढारी, नायक.

**Ring'worm,** *n.* (रिं'ग-वर्म्)—a contagious skin-disease in circular patches. नायटा, गजकर्ण, दद्रु, चकंदळ.

**Ring'let,** *n.* (रिं'ग-लिट्)—curly lock of hair, a hanging curl; small ring, ring-shaped mark (rare). झुलूप, कुरळे केंस; लहान आंगठी, वलयाकार खूण.-*ed*,-*y*, *aa.*

**Rink,** *n.* (रिंक्)—stretch of ice used for curling or skating; floor for roller-skating. (विशिष्ट तऱ्हेचे जोडे घालून घसरण्याकरितां केलेला) बर्फविस्तार, बर्फांगण; घसरत्या जोड्यांनीं फिरण्यासाठीं केलेलें रंगण,-अंगण,-जमीन. *v. i.* to skate on ring with roller-skates. घसरते जोडे-बूट-घालून बर्फावरून किंवा रंगणांत धांवणें. *Ri'nker, n.*

**Rinse,** *v. t.* (रिन्स्)—to pour water into and out of to remove dirt, etc.; wash lightly; to cleanse by water. धुणें, विसळणें, आंतून बाहेरून पाण्यानें स्वच्छ करणें, खळखळावून स्वच्छ करणें, आंचळणें. *n.* rinsing. स्वच्छ करणें, धुणें.

**Ri'ot,** *n.* (रा'यट्)—tumult, disorder; disturbance of the peace by a crowd; loose living; unrestrained indulgence or display; (Hunt.) following of any scent indiscriminately. धुमाकूळ, गोंधळ; गर्दी, दंगा; चैन, रंग, ऐषआराम; धुंदाई; बेबंदशाही; अविचारानें केलेला (शिकारीचा) पाठलाग. *v. i.* to make or engage in a riot; to revel, to act in an unrestrained manner. दंगा करणें, गोंधळ करणें; चैन करणें, मजा मारणें. *To run r.*, अद्वातद्वा बोलणें, दंगा करणें, भडकणें, वेडगळणें, विथरणें. *Ri'oter,* बंडवाला. *Ri'otous, a.,-ly, adv.,-ness, n.*

**Rip,** *v. t. & i.* (रिप्)—to cut or tear open, to split esp. with a single quick motion; strip off or away or open up thus; (of material) be ripped; (of ship) rush along, to search to the bottom. चिरणें, फाडणें, फाडून टाकणें; टरकन फाडणें, उसवणें, उस्तरणें; फाडले-उघडलें-जाणें; वेगानें जाणें, तळापर्यंत शोधणें. *n.* act of ripping, long tear or cut. चिरणें, फाडणें, चीर, फाड, भेग. *Ripp'er, n.* one who rips; (sl.) first rate person or thing. चिरणारा, फाडणारा, उसवणारा; उत्तम प्रकारचा माणूस, उत्कृष्ट वस्तु. *Ripp'ing, a.* (sl.) splendid, first-rate, enjoyable. उत्तम, पहिल्या प्रतीचे, उपभोग्य, मनोरंजक. *R.-saw,* लांकूड कापण्याची करवत. *Let her r.*, do not check speed or interfere. अडथळा करूं नको, वेग कमी होऊं देऊं नको. *Ripp'ingly, adv.*

**Rip.,** *n.* (रिप्)—a worthless horse; dissolute person, stretch of broken water in sea or river. निरुपयोगी घोडा; छंदी,-पदफेली,-मनुष्य; समुद्रांतील किंवा नदींतील खळखळीचा भाग.

**Ripār'ion,** *a.* (रा'यपेअरिअन्)—of or on the river-bank. नदीकांठचा, नदीकिनाऱ्यावरील. *R. proprietor, rights,* नदीकांठच्या जमिनीचा मालक, -जमिनीचे हक्क. [*L. ripa,* bank]

**Ripe,** *a.* (राइप्)—ready to be used; mature, consummate, ready for action. पक्का, पिकलेला, पक्व झालेला; परिपक्व, प्रौढ, पोक्त, प्रगल्भ. *R. lips,* red and full like *r.* fruit. पक्वबिंबाधरोष्ठ, लाल ओंठ. *R. beauty,* of grown woman. तरुणीचें सौंदर्य, ऐन तारुण्य. *Ripe age,* old age. उतार वय, म्हातारपण. *Soon r. soon rotten,* prov. depreciating precocity. लवकर पक्व होतें तें लवकर कुजतें. *Ripe'ly, adv.; Ripe'ness, n.* पक्वता, पिकेपणा, पोक्तपणा, प्रौढपणा.

**Ri'pen,** *v. t. & i.* (रा'इ-पन्)—to mature, to make or grow ripe, to become ready. पिकणें, पक्वदशेस येणें.

**Ripōste',** *n.* (रिपो'स्ट्)—quick return thrust in fencing; (*fig.*) counter-stroke, retort. दांडपट्ट्याच्या खेळांतील जलद उलट हात; प्रतिहल्ला, टोमणा. *v. i.* to deliver *r.* उलट हात करणें, प्रतिहल्ला करणें.

**Rip'ple,** *n.* (रि'पल्)—ruffling of water's surface; small curling waves; bubble of water. पाण्याची खळखळ; लहान लाटा; पाण्याची खळाळी, बुळबूळ. *v. i & t.* to form or flow in ripples; make ripples in. खळखळ वाजणें,-वाहणें; लाटा -तरंग-उत्पन्न करणें. *R.-mark,* ridge, ridged surface left on sand or wind by water or wind. पाण्याच्या लाटांनीं किंवा वाऱ्यानें वाळूवर किंवा चिखलावर केलेली खुणेची रेषा,-खूण. *A r. of conversation,* संभाषणांतील हास्य-विनोदतरंग. *Ri'pply, a.; Ripp'let, n.* लहान लाट, बुडबुडा.

**Rise,** *v. i.* (राइझ्)—(pa. t. rose, रोझ्; p. p. risen, रिझन्), to get up from lying, sitting or kneeling; to get out of bed; to make revolt; to ascend, to soar; to come to surface; to have origin, to flow from; (of meeting etc.) cease to sit for business; project or swell upwards; come to life again; be progressive; develop powers equal to; (poet.) arise. वर उठणें, निजून उठणें; बंड करणें; उदय पावणें; उगवणें; वर चढणें; उंच उडणें; पृष्ठभागाला येणें, उद्भवणें, उत्पन्न होणें; (सभा) संपणें, उठणें, बरखास्त होणें, काम संपणें; पाणी चढणें, फुगणें, भरती-लाटा-येणें; (मेलेला फिरून) उठणें, जिवंत होणें; चढती-घडती-होणें, सुधारणें, पुढें जाणें; वाढावणें; (प्रसंगानुरूप) जोर चढणें; उत्पन्न होणें. *n.* an upward incline; social advancement; increase; origin; coming up of sun etc. चढण; चढती पायरी, अभ्युदय, सामाजिक उत्कर्ष; वाढ, उगम; उगवणें, उदय. *To r. from table,* leave meal. जेवणावरून उठणें. *To r. up early,* (निजून) उठणें. *My whole soul rises against it,* finds it intolerable. अति दुःसह वाटतें. *The rising generation,* the young.

पिढी. *Spirits r.*, become more cheerful. अधिक उत्साह वाटतो. *To r. in the world*, सामाजिक दर्जा मिळविणें. *Ask for a r.*, higher wages. अधिक वेतनाची मागणी करणें. *To get* or *take a r. out of one*, एखाद्याला संताप-चीड-आणणें. *Give r. to*, occasion, suggest. घडवून आणणें, कारणीभूत होणें.

**Ri'sing**, *n.* (राइझिंग)—eminence, prominence, (*esp.*) insurrection; boil or pimple. उंचवटा, बंड; गळू.

**Ris'ible**, *a.* (रिझिबल)—inclined to laugh; of laughter; (rare) laughable, ludicrous. हसणारा, हसूं येणारा; हास्याचा, हंसण्याचा, हास्यजनक, हंसण्यासारखा. *Risibility*, *n.* inclination to laugh; risible faculties. हास्यजनकता, हास्यशीलता; हंसण्याची प्रवृत्ति, हास्यप्रवृत्ति.

**Risk**, *n.* (रिस्क्)—hazard, chance of bad consequences. भय, संकट, जोखीम, धोका. *v. t.* to expose to chance of injury or loss; to venture. धोक्यांत पाडणें; साहस करणें, धाडस-हिंय्या-करणें. *R.-money*, (खजीनदाराजवळ) अडीअडचणीकरितां ठेवलेली शिल्लक.

**Risk'y̆**, *a.* (रिस्कि)—full of risk. धोक्याचा, जोखमाचा.

**Risqué**, *a.* (रिस्के)—of doubtul propriety; suggestive of indecency. अश्लील, असभ्य. [ F ]

**Riss'ōle**, *n.* (रिसोल्)—fried ball or cake of meat or fish mixed with bread-crumbs, etc. तळलेला मांसाचा गोळा,-भाकरी.

**Rite**, *n.* (राइट्)—religious or solemn ceremony of observance. विधि, संस्कार, अनुष्ठान, आचार. *Conjugal* or *nuptial rr*, sexual intercourse between husband and wife. पतिपत्नीमधील संभोग. *Ri'teless*, *a.*

**Rit'ūal**, *n.* (रिच्युअल्)—a prescribed order for performing religious service; book containing this; performance of ritual acts. संस्कारशास्त्र, आचारपद्धति; संस्कारग्रंथ, कर्मपद्धति; आचारधर्मपालन. *a.* of or with rites. आचारपद्धतीचा, विधीचा, विधिविषयक. *Rit'ualism*, *n.* attaching of great importance to ritual. कर्मनिष्ठा, आचारनिष्ठा, कर्मकांडसंप्रदाय. *Rit'ualist*, *n.* आचारसंप्रदायी, कर्मसंप्रदायी.-*istic*, *a.* कर्मपद्धतीचा, आचारपद्धतिसंप्रदायी.

**Ri'vage**, *n.* (राइव्हिज्)—(poet.) coast, shore, bank. किनारा, तीर, कांठ.

**Ri'val**, *n.* (राइव्हल)—a person or thing that competes with another. प्रतिस्पर्धी, चढाओढ करणारा. *v. t.* & *i.* to vie with, to emulate; to be comparable to, be in rivalry (rare). स्पर्धा करणें, बरोबरी करणें; °शीं प्रतिस्पर्धा करणें.

**Ri'valry̆**, *n.* (राइव्हलरि)—emulation; being rivals. स्पर्धा, हेवा; प्रतिस्पर्धी असणें, -होणें.

**Rive**, *v. t.* & *i.* (राइव्ह)—(pa. t. rived, riven, रिव्हन्), to strike or rend asunder; wrench; split; be split. फाडणें, फोडणें, चिरणें, विदारणें; भेग-चीर-जाणें, भेगाळणें. *Ri'ver*, *n.*

**Riv'el**, *v. i.* & *t.* (रिव्हल्)—(arch.) to wrinkle, crumple, shrivel. सुरकुती पडणें, आकुंचन पावणें, चिंबणें.

**Riv'er**, *n.* (रिव्हर्)—a large natural stream of water flowing in channel; abundance; the boundary between life and death. नद, नदी; विपुलता, प्रवाह, पूर, पाट; जीवित व मरण यांमधील सीमा-मर्यादा-रेषा. (attrib.) living in, situated or used on river(s). नदी-स्थ; नदीतीरस्थ; नदीवरील. *The r.*, (Ganga). (नदीच्या नांवापूर्वी लावतात.),. *Rr. of blood*, much bloodshed. रक्ताच्या नद्या,-रक्ताचे पाट. *R. bed*, नदीचें पात्र. *R.-god*, नदी-जल-देवता. *R.-horse*, hippopotamus. पाणघोडा. *R. side*, ground along river's bank (often attrib.), नदीकांठच्या प्रदेशाचा, नदीकांठ (चा). (-) *riv'ered*, *riv'erless*, *aa.*

**Riv'erain, Riv'erine**, *aa.* (रिव्हरिन्,-राइन्)—of or characteristic of a river. नदीचा, नदीसारखा. *Riv'erain*, *n.* person dwelling by river. नदीकांठीं राहणारा मनुष्य.

**Riv'et**, *n.* (रिव्हिट्)—a nail or bolt used in fastening together (plates of metal, &c,). दोन्ही बाजूला चोळवलेला खिळा, रिवीट. *v. t.* to clinch (bolt); to fasten with rivets; fix, make immovable; to fix one's eyes, &c. upon; to engross. खिळ्यांनीं घट्ट बसणें; खिळ्यांनीं बसवणें, घट्ट करणें; टक लावून पाहणें; गुंग होणें, (लक्ष) वेधून घेणें,-ठेवणें. *Riv'eter*, *n.*

**Riv'iere**, *n.* (रिव्हिअर्)—gem necklace, esp. of more than one string. (अनेकपदरी) रत्नांचा कंठा, माळ. [ F ]

**Riv'ūlet**, *n.* (रिव्ह्युलिट्)—a small stream; kinds of moth. ओढा, नाला, पर्या; एक जातीचा पतंग.

**Roach**, *n.* (रोच)—a fresh-water fish; (naut.) upward curve in foot of square sail. एक गोड्या पाण्यांतला मासा; चौकोनी शिडाच्या तळचें धांकण.

**Road**, *n.* (रोड)—a way prepared to travel on, an open way or public passage; route, way one means to take; (usu. pl.) piece of water near the shore in which ships can ride at anchor; way of getting to. रस्ता; वाट, मार्ग; किनाऱ्याजवळची गलबतें नांगरण्याची जागा, नांगर-ठाण; (-ला जाण्याचा) मार्ग, रस्ता. *on the r.*, travelling. मार्गावर, प्रवास करणारा. *To take the r.*, set out. निघणें, जाणें. *The r.*, the highway. मुख्य रस्ता, राजमार्ग. *Rule of the r.*, (गाडी, वाटसरू इ.) रस्ता वापरण्याचे नियम. *Royal r. to* (*success*), way of attaining without trouble, (चा) सुलभ, सोपा, मार्ग; राजमार्ग. *R.-hog*, reckless motorist etc. बेफाम,-बेदरकार-निष्काळजीपणें-मोटर हाकणारा. *R. house*, (U. S.) inn. खाणावळ. *R.-metal*, broken stone for road-making. खडी. *R. stead*, road for ships. जहाजांचा नांगर-वाडा; खुंटवडा, चिखली बंदर. *R.-way*, main part of road. रस्त्याचा

मधला-मुख्य-भाग. *R.-worthy,* fit to be used on the road; (of person) fit to travel. रस्त्यावर वापरण्याजोगा; प्रवासालायक. *Road'-ster,* चिखली पेंद्रांत नांगरून ठेवलेलें जहाज; अनुभविक प्रवासी.

**Roam,** *v. i. & t.* (रोम्)—to ramble, to wander about, to rove, to range. रमणें, भटकणें, भटक्या मारीत फिरणें. *n.* a rambling walk. भटकणें, सहल.

**Roan,** *a.* (रोन्)— (of animal) with coat of which the prevailing colour is thickly interspersed with another, esp. bay or sorrel mixed with white or grey. मगजी (रंग). *n* a roan horse, cow. मगजी रंगाचा घोडा, गाय. 2. *n.* soft sheepskin leather used in book-binding. पुस्तकें बांधण्याचें एक प्रकारचें चामडें.

**Roar,** *n. & v. i. & t.* (रोअर्)—(utter, send forth) a loud deep hoarse sound as of a lion, or the voice in rage or pain or loud laguhter, or of the sea, thunder etc.; (of place) be full of air, re-echo; say, sing, utter in loud tone. सिंहगर्जना, आरोळी; डरकाळी, गर्जना, हाकी, आक्रोश, कल्लोळ, घणघणाट, गलका, आरडाओरड, गडबड, दृशा, दणका, दणाणा, (करणें इ०). *Roarer, n.* (esp.) roaring horse. रोगानें-दुःखानें-खिंकाळणारा घोडा. *Roaring, a.* noisy, boisterous, brisk. आवाज-गर्जना-करणारा; परजणारा, गाजणारा; दणकेबाज.

**Roast,** *v. t. & i.* (रोस्ट्)—to cook or heat by exposure to the open fire or sun; heat or calcine ore in furnace; undergo roasting; (*sl.*) banter, chaff. विस्तवानें किंवा उन्हानें भाजणें; अशुद्ध धातु भट्टींत भाजणें; भाजलें जाणें; थट्टा-टर-उडवणें. *a.* roasted. भाजलेलें. *n.* भाजलेला पदार्थ.

**Roast'er,** *n.* (रो'स्टर्)—In vbl. senses; esp. kind of oven for roasting; ore-roasting; furnace; coffee-roasting apparatus; pig, potato, etc. fit for roasting. भाजणारा; भट्टी, चूल, (अशोधित धातु) भाजण्याची भट्टी; कॉफी भाजण्याचें यंत्र; (डुकर, बटाटा वगैरे) भाजण्याजोगा पदार्थ.

**Rŏb,** *v. t. & i.* (रॅब्)—to despoil violently or feloniously; to deprive of, to commit robbery. लुबाडणें, हिरावून घेणें, लुटणें, लुबाडून घेणें. *Robbed, pa. t. & pa. p.*

**Rŏbb'er,** *n.* (रॉ'बर्)—one who robs. दरोडेखोर, लुटारू. *Robb'ery, n.* लुटणें, लूट, मोठी चोरी, दरोडा.

**Rōbe,** *n.* (रोब्)—a long loose garment; (often pl.), such garment as sign of rank or office or profession; (U. S.) dressed skin of buffalo etc. used as rug or garment. लांब झगा, जामा, फरगोल; (पदवी, अधिकार, धंदा-दर्शक) झगा; वस्त्र किंवा पांघरूण म्हणून वापरावयाचें कमावलेलें कातडें. *v. t. & i.* to invest (person) in robe; dress; assume one's robes. अधिकाराचीं वस्त्रें चढविणें,-देणें; झगा घालणें, पोषाख चढविणें. *The long r.,* legal or clerical dress. वकिलाचा किंवा पाद्र्याचा झगा. *Gentlemen of the r.,* lawyers. वकीलवर्ग. *R.-de chambre,* (F), dressing-gown, wrapper. लांब झगा, पांघरूण, आवरण.

**Rŏb'in,** *n.* (रॅ'बिन्)—a small red-breasted bird. एक जातीचा पक्षी, (Also called *Redbreast*); (U. S.) the migratory thrush. स्थानांतर करणारा एक (अमेरिकेंतील) पक्षी-कोकीळ, सारिका. *R. good fellow,* a sportive goblin.. एक खेळकर भूत. *R. hood,* (type of) medieval forest out-law. मध्ययुगीन रानटी चंडखोर (त्याचा आदर्श,-नमुना).

**Rō'borant,** *a., & n.* (रो'बॉरन्ट्)—(med.) strengthening (drug). शक्तिवर्धक (औषधी).

**Rō'bot,** *n.* (रो'बॉट्)—an apparently human automaton, an intelligent and obedient but impersonal machine; (transf.) machine-like person. मनुष्याकृति यंत्र; यंत्राप्रमाणें असलेला (काम करणारा) मनुष्य.

**Rō'burite,** *n.* (रो'बराइट्)—a strong flameless explosive. ज्वाला न निघणारें जोरदार स्फोटक द्रव्य.

**Robŭst',** *a.* (रोबस्ट्)—of strong health and physique; not weakly, vigorous; sensible, straightforward. धट्टाकट्टा; धळकट; जोरदार, शक्तिवर्धक (व्यायाम); दांडगा, विशाल, जोमाचा, सरळ, ऋजु.-*ly, adv.*;-*ness, n.* *Robustious, a.* boisterous, self-assertive, noisy. गडबड्या, आपलेंच घोडें पुढें दामटणारा. [L. *robur*, strength]

**Rŏc,** *n.* (रॉक्)—gigantic bird of Eastern tales. एक प्रचंड पक्षी.

**Rŏck,** *n.* (रॉक्)—solid part of earth's crust; a mass of this, large detached stone or boulder; (geol.) any particular igneous or stratified mineral constituent of earth's crust including sands, clays, etc.; stone as a substance; kinds of hard sweetmeat. खडक, धोंड, शिला; शिलोच्चय, मोठा विस्तीर्ण खडक, मोठा दगड, धोंडा; (धातुमय) प्रस्तर, खडक, दगड; घट्ट दणक मिठाईचा प्रकार. *Built, founded, on the r., lit & fig.* secure. अभंग, भंग नसलेला, भक्कम पायावर रचलेला. *R. of ages,* Christ. येशू ख्रिस्त. *To run upon the rr., see rr. ahead,* shipwreck or danger of it. खडकावर आदळून फुटणें,-फुटण्याची भीति. *On the rr.,* (sl.) hard up. संकटांत पडलेला, कठीण अवस्था प्राप्त झालेला. *The R.,* Gibralter. जिब्राल्टरचा कडा,-खडक. *R.-bottom,* (sl., of prices etc.), very lowest. अतिशय कमी, स्वस्त (किंमती). *R.-crystal,* silica, or quartz in hexagonal prisms. षट्पैलू स्फटिक. *R.-dove,-pigeon* kind haunting rocks. खडकावरील कबूतर. *R.-oil,* घासलेट, रॉकेल. *R.-salt,* सिंधुलवण, शैंदेलोण. *R.-tar,* petroleum, पेट्रोलिअम्-कच्चेल-तेल. *R.-work Rock'ery,* झाडें वाढवण्याकरितां सभोंवतीं केलेली दगडांची रास,-गडगा.

**Rŏck,** 2 *v. t. & i. & n.* (रॉक्)—to make oscillate; to oscillate; to move to and fro in a cradle or in the arms; to sway heavily from side to side.

डोलपणें; हांदुळणें; झुलणें; झोंके देणें; हालविणें. *Rocking'chair*, झुलती खुर्ची, झोंके घेण्याची खुर्ची. *Rock'ing*, (खेळण्यांतला) झुलता लांकडी घोडा. *Rock'ing-stone*, झुलता खडक.

**Rŏck'er**, *n.* (रॉकर्)—one of the curved bars on which a cradle etc. rocks; (U. S.) rocking-chair. पाळण्याचा आडवा व झुलणारा दांडा; झुलती खुर्ची.

**Rŏck'ĕt**, *n.* (रॉकिट्)—kinds of flowering plant. एक जातीचीं फुलझाडें.

**Rŏck'ĕt**, *n.* (रॉकिट्)—an artificial firework used in fire-work displays, for signalling, to carry line to ship in distress, etc. बाण, कळकीबाण, अग्निबाण, लष्करी खुणेसाठीं सोडलेला बाण, आरमारी बाण. *v. i.* (of pheasant etc.) to fly straight upwards; fly fast and high. तीरासारखा उडणें; बाणासारखें हवेंत उडणें; उंच व जलद उडणें. *Rock'eter*, *n.*

**Rŏck'ў**, *a.* (रॉकि)—of rock; full of rocks; rugged; hard as rock; (rare) unsteady, tottering. खडकाचा; खडकाळ, कातळी; खडकासारखा कठीण; डळमळीत, हालता. *The R. mountains*, (as *n.*) *the Rr.*, उत्तर अमेरिकेंतील पश्चिमेकडचा पर्वत.

**Rocō'cō**, *a.* (राकोको)—(of furniture, architecture, etc.) much conventional decoration; antiquated. जुनाट ठराविक पद्धतीच्या आराशीचा; जुनापुराणा, जुनाट. *n.* the *r.* style. जुनी पुराणी ठरावीक पद्धतीची नकशी.

**Rŏd**, *n.* (रॉड्)—a slender straight round stick or metal bar, wand, switch; a cane or birch for flogging; a measure of 5½ yards. दंड, काठी; छडी; साडेपांच यार्डांचें माप, काठी. *Spare the r. & spoil the child*, छडी लागे छम छम विद्या येई घम घम. *Make a r. for one's own back*, prepare trouble for oneself. नसतें विघ्न उपस्थित करणें. *Kiss the r.*, take punishment meekly or gladly. निमूटपणें शिक्षा सोसणें. *Have a. r. in pickle for*, be ready to punish when time comes. वेळ येईल तेव्हां शिक्षा करण्याला तयार असणें. *R.-man, Rod'ster*, angler. मासे पकडणारा.

**Rode**, *pa. t. of* Ride.

**Rō'dent**, *n.* (रोडन्ट्)—an animal of the order *Rodentia* or gnawers, an animal that gnaws. कुरतडणारें जनावर (उंदीर, खार).

**Rŏdomontade'**, *n.* (रोडामान्टेड्)—boastful talk, brag. फुशारकी, बढाई. *v. i.* to talk boastfully. फुशारकी-बढाई-मारणें.

**Rōe**, *n.* (रो)—(*collect. sing.*) a small kind of deer the female of the hart; a mass of eggs in female fish. एक प्रकारचें हरिण; माशांचीं अंडीं *R.-buck*, male roe. हरीण.

**Rōgue**, *n.* (रोग्)—a rascal, swindler, knave; mischief-loving child; arch or sly person; elephant living apart from the herd and of savage temper, any large wild animal of similar character; horse inclined to shirk work on race-course or in hunting-field. लबाड, लुच्चा; खोडकर मूल; दगलबाज मनुष्य, शठ; एकलकोंडा, मस्त हत्ती; मोठें मस्त जनावर; चुकार तट्टू घोडी. *Ro'guery*, *n. Ro'guish*, *a.*

**Roil**, *v. t.* (राइल्)—(U. S.) to render (water etc.) turbid; annoy. गढळ,-गढूळ,-करणें; राग आणणें, चीड आणणें; त्रास देणें. *Roil'y*, *a.* turbid. गढूळ, गढळलेलें.

**Rōi'nĕk, Rooinĕk**, *n.* (रोइनेक्,रूइ-)—a newcomer; a British soldier in Boer war. नवीन येणारा मनुष्य; बोअर युद्धांतील ब्रिटिश सैनिक.

**Rois'terer**, *n.* (रॉइस्टरर्)—noisy reveller; jovial swaggerer. चैन करणारा, थापाड्या, घमेंड्या.

**Rōle**, *n.* (रोल्)—an actor's part; any conspicuous task or function performed by one. भूमिका; काम, कार्य.

**Rōll**, *n.* (रोल्)—a cylinder formed by turning paper, cloth etc. over on itself without folding; document in this form, register, list; more or less (semi)-cylindrical straight or curved mass of anything however formed; turned-back edge of something, e. g. coat-collar; cylinder or roller; rolling motion or gait; continuous sound of thunder or drum or shouting. गुंडाळी. वळकटी, सुरळी; कागदांची-लेखाची-गुंडाळी, सुरळी; पट, यादी, नांवनिशी, तक्ता; लाटा, लाट्या, लाटी; मागें परतवलेली कडा, बाजू (कोटाची गळपट्टी); रूळ, लाट्या; हेलकावा, झोंका; हंदुळा, झुलकी चाल; हालणें, वरखालीं होणें; धडाका, दणका; मेघनाद, मेघगर्जना, कडकडाट. *v. t. & i.* to move by turning on the axis; to sway or rock; to sound with vibration; to flatten with a roller; to make into or form a roll; make by rolling; undulate, show undulating motion or surface; wrap *up in* by rolling motion; lie on back and kick about (of horse etc.). लोटीत नेणें, जाणें, घसरणें, (गरगर) लोटणें; झुलणें, डोलणें, हांदुळणें, हालणें, हेलकावे खाणें; फिरवणें, गरगरवणें; सुरावर म्हणणें, घुमणें; रूळानें सपाट करणें; सुरळी करणें, वळकटी करणें; लाटून तयार करणें; वरखालीं होणें; गुरफटावून घेणें, पांघरणें, लोळण घेणें, लोळी करून पाय झाडणें. *R. of honour*, esp. list of those who have died for their country in war. (स्वदेशासाठीं धारातीर्थीं देह ठेवणाऱ्या) सन्मान्य वीरांची यादी. *To strike off the rr.*, debar from practising for dishonesty etc. (अप्रामाणिकपणामुळें) धंदा करण्याची मनाई करणें, पटावरून नांव काढून टाकणें (विद्यार्थ्यांचें,-वकिलाचें,-पदवीधराचें इ०). *Rr. of fat*, मांसाच्या-चरबीच्या गुठळ्या, वळ्या. *Years r. on* or *by*, go smoothly. वर्षामागून वर्ष धिमेपणानें लोटतें. *R. one over*, send him rolling. घडघडत जावयास लावणें, *To r. cigarettes*, विड्या-सिगारेट-वळणें. *R.-top desk*, घसरत्या-गुंडाळण्याजोग्या-झांकणाचें मेज. *Roll'able*, *a.*

**Rōll'call**, *n.* (रो'ल्‌-कॉल्‌)—the calling over of a list of names (as of soldiers). नांवनिशीवार हजिरी घेणें, हजिरी.

**Rōll'er**, *n.* (रो'लर्‌)—a cylinder used alone or as part of a machine; a long heavy wave. मोठा रूळ, मोठी लाट.

**Rō'lling**, *a.* (रो'लिंग्‌)—turning on axis; moving from side to side. आंसावर फिरणें, वाटोळें-गरागरां-फिरणारें; हेलखावे खाणारें. *R.-pin*, a roller for pastry-making. लाटणी, लाटणें. *R.-stock*, railway company's wagons and trucks. रेल्वेकंपनीचे मालाचे उघडे डबे, 'वाघिणी'.

**Rŏll'ick**, *v. i.* (रॉ'लिक्‌)—to be jovial and boisterous (esp. in part. as adj.). मजा-दंगल-करणें; धांगड-धिंगा घालणें. *n.* exhuberant gaiety; frolic. हुल्लडू; मस्ती, दंगल.

**Rō'lȳ-pō'lȳ**, *n.* (रो'लि-पो'लि)—(*r.-pudding,*) pudding of paste covered with jam and rolled up. एक प्रकारचें पक्वान्न. *a.* (usu. of child) podgy, plump. लठ्ठ, बाळसेदार.

**Romā'ic**, *n.* (रॉमे'इक्‌)—language of modern Greece. अर्वाचीन ग्रीक भाषा. *a.* of or in Romaic. अर्वाचिन ग्रीक भाषेचा,-भाषेंतील. *Roma'ica*, अर्वाचीन ग्रीस देशांतील राष्ट्रीय नाच.

**Rō'man**, *a.* (रो'मन्‌)—of the ancient or modern city of Rome; of the people or the state or the Christian Church of Rome. प्राचीन किंवा अर्वाचीन रोम शहराचा; रोममधील लोकांचा, राज्याचा किंवा ख्रिस्ती धर्माचा. *n.* a member of ancient Roman State; an inhabitant of Rome, Roman Catholic; (Print.) Roman type (abbr., *Rom.*). प्राचीन रोमन साम्राज्याचा नागरीक; रोमचा रहिवासी; रोमन कॅथॉलिक धर्मपंथीय; रोमन टाइप,-टंक. *R. candle*, tube discharging coloured balls in fire-works. फुलबाजा, नळा. *R.-Catholic*, member of the Church of Rome. पोपचा अनुयायी. *R.-numerals*, रोमन आंकडे,-संख्या. (I, V, X, = 1, 5, 10; L = 50; C =100, D = 500; M = 1000).

**Rōmănce'**, *n.* (रोमॅ'न्स्‌)—medieval tale of chivalry; a tale with scenes and incidents remote from ordinary life; an episode or love affair suggesting romance; (R-) vernacular language of old France developed from Latin; (collect.) the languages so developed (R-). मध्ययुगीन शौर्याची कथा; अद्भुत गोष्ट; कादंबरी, अद्भुत कथा,-वाङ्मय, अद्भुत प्रेमकथा; लॅटिन भाषेवरून निर्माण झालेली प्राचीन फ्रान्स देशाची (बोली) भाषा; अशा रीतीनें निर्माण झालेल्या भाषा. *a.* (of languages) developed from Latin. लॅटिनपासून निघालेली. *v. i.* to exaggerate or distort the truth. अतिशयोक्ति करणें, अद्भुत वर्णन करणें. *Roman'cer*, *n.* writer of romances; a fantastic liar. अद्भुत कथा-कादंबरी-लिहिणारा; काल्पनिक व असत्य कथन करणारा; नकल्या.

**Rōmanĕsque'**, *a.* & *n.* (रोमने'स्क्‌)—Romance; (Archit.) (in) style of building prevalent in Romanized Europe between the Classical and Gothic periods. लॅटिनवरून बनलेली फ्रान्स देशाची भाषा; रोमन अंमलाखालील युरोपांतील शिल्पकला,-स्थापत्यकला,-कलेचा.

**Romăn'ic**, *n.* (रोमॅ'निक्‌)—(of languages) Romance; Romance-speaking; descended from, inheriting civilization etc., of the Romans. लॅटिनवरून बनलेली (भाषा); लॅटिनोद्भव भाषा बोलणारा, रोमन संस्कृतीपासून झालेला.

**Rō'manize**, *v. t.* & *i.* (रो'मनाइझ्‌)—to make Roman or R. Catholic; adopt or cause to adopt Roman Catholic beliefs or practices. रोमवासीय किंवा रोमन कॅथॉलिक धर्मपंथाचा करणें; पोपचा अनुयायी होणें; बनविणें. *Romanization,-ism,-ist, nn.*

**Rōmăn'tic**, *a.* (रोमॅ'न्टिक्‌)—marked by or suggestive of or given to romance; fantastic, visionary; (of literary or artistic method etc.) preferring grandeur or passion or irregular beauty to finish and proportion; (of projects) fantastic, dreamy; (of music) imaginative, passionate. अद्भुत गोष्टींविषयीं; विलक्षण, चमत्कारिक; अद्भुत-कथामय, कादंबरीचा; अद्भुत, विचित्र, काल्पनिक, स्वप्नवत्‌ (बेत इ०); विकारमय, कल्पनामय (संगीत). *n.* (*pl.*) romantic ideas or thoughts; a romanticist. अद्भुत-प्रेममय-निसर्गमय कल्पनाविशेष, अद्भुतरसात्मक-काव्य किंवा कादंबरी-लेखक, निसर्गप्रधान कवि, लेखक. *Roman'ticism, n.* adherence to romantic methods. अद्भुतकथालेखनपद्धति; कल्पनावशता; अद्भुतरसानुसरण-पद्धति. *Roman'ticist, a.* writer of the romantic school. भावनाप्रधान लेखक, निसर्गप्रधान सांप्रदायी लेखक, प्रेमकथालेखक.

**Rŏm'anȳ**, *n.* (रॉ'मनि)—a gipsy; gipsy language. 'जिप्सी' नामक घरदार नसलेल्या भटक्या जातीचा मनुष्य; त्याची भाषा. *a.* gipsy. 'जिप्सी' लोकांची.

**Rōme**, *n.* (रोम्‌)—city, ancient state, Empire, or Church of Rome. रोम शहर, प्राचीन रोमन साम्राज्य, रोमचा ख्रिस्तीधर्म. *R.-ward, a. & adv.,-wards, adv.* etc. the direction of Roman-Catholicism. रोमन कॅथॉलिक धर्मपंथाच्या दिशेनें. *Romish, a.* (contempt.) papistical. पोपचा अनुयायी, रोमन कॅथॉलिक. *Rome was not built in a day,* (encouragement to faint-hearted). (निराशा झालेल्यांना उत्तेजनार्थ हें कवन म्हणतात.) *Do in Rome as Rome does, as the Romans do.* परिस्थितीप्रमाणें चाला.

**Rŏmp**, *v. i.* (रॉम्प्‌)—(of children etc.) to play together with chasing, wrestling, etc., (*Racing sl.*) get *along, past,* without effort. खिदळणें, बोकाळणें, धांगडधिंगा घालणें, धमामा,-हुल्लडू-खेळणें; (शर्यत) सहज पुढें जाणें; सहज जिंकणें. *n.* child given to romping; (of girl or woman) tom-boy. खिदळणारें मूल, धोडगी, धोडी, ढोणगी. *Romp'y, a. Romp'er, n.* child's overall. लहान मुलाचा झगा-, कपडे.

Ron'deau, Rŏn'del, *nn.* (रॉन्डो,-डेल्)—artificial forms of short poem with refrain. दहा किंवा तेरा ओळींच्या कवितेचा प्रकार,-कवितावृत्त.

Röntgen rays, *n. pl.* (रॅन्टयन्रेझ्)—(or *X-rays*) form of radiation penetrating many substances impervious to ordinary light. विद्युज्जन्य प्रकाश-किरण, क्षकिरण (सामान्य प्रकाशाविगळें व धातुव्यतिरिक्त इतर पदार्थांना हे पारदर्शक असतात). *Ront'genogram,* क्ष किरणांनीं काढलेलें छायाचित्र. [after *Rontgen,* the discoverer, 1815.]

Rōōd, *n.* (रूड)—a cross or crucifix; quarter of an acre; small piece of land. क्रूसावरील ख्रिस्ताची मूर्ति; एक चतुर्थांश एकर, काठी, जमिनीचा लहानसा तुकडा.

Rōōf, *n.* (रूफ्)—the upper covering of a house or building; top of a covered vehicle. घराचें छप्पर; गाडीचें छप्पर. *v. t.* to cover with a roof, to shelter. छप्पर घालणें; आश्रय देणें. *Under* one's *r.,* in one's house, esp. with ref. to hospitality. च्या घरीं, चा पाहुणा म्हणून. *R. of the world,* high mountain range. उंच पर्वताची रांग (पामीरपर्वत). *R. of the mouth,* तालु, ताळू, टाळू. *R. tree,* ridge-pole of roof, छपराचें आढें. *Roof'ing, n.* material used for roof. शाकार, शाकारणें, शाकारण्याचें साधन.

Rōōf'er *n.* (रूफर्)—(colloq.) a letter of thanks for entertainment sent by departed visitor. (झालेल्या पाहुणचाराविषयींचें) पाहुण्याचें आभार-प्रदर्शक पत्र.

Rōōk, *v. t.* (रूक्)—to win money from (at cards, &c.) esp. by swindling; to charge (customer) extortionately. खेळांत फसवून पैसे मिळविणें; ठकविणें, फसविणें, (गिऱ्हाइकाकडून) अवाच्यासवा किंमत घेणें. *n.* black hoarse-voiced bird of crow tribe; sharper, esp. at dice and cards; (chess) castle. कोवळा, डोंबकावळा; (जुगारांत नवख्यांना) फसविणारा, फसव्या; (बुद्धिबळांतील) हत्ती.

Rōōk'erȳ, *n.* (रूकरि)—(clump of trees with) colony of rooks; colony of penguins or seals; crowded cluster of mean houses. (झाडवळींतील) कावळ्यांची वसाहत; समुद्रपक्ष्यांची,-सील माशांची-वसाहत, घाणेरड्या घरांची रांग,-आळी.

Rōōm, *n.* (रूम्)—space occupied; capaciousness or ability to accommodate contents; opportunity, scope; apartment in a house; (*pl.*) apartments or lodgings; (transf.) the company in a room. अवकाश, जागा; वाव, सवड,; अवसर, संधि; खोली, कोठडी; (अने°) स्थान, रहाण्याचें ठिकाण, खोल्यांची जागा, खोल्या; खोलींत राहणारे लोक,-मंडळी. *v. i.* (U. S.) to occupy room(s) or share room(s) with. खोल्यांत राहणें, पोटभाडोत्री म्हणून खोलींत राहणें. *To make r.,* जागा करणें, वाट देणें, जागा करून देणें, वाव देणें, खालीं करून देणें. *In the r. of,* instead of, in succession to, as substitute for. च्या जागीं,-ऐवजीं.

Rōōm'er, *n.* (रूमर्)—(U. S.) an occupier of room(s) only, eating out. (जेवणखाण बाहेर करणारा परंतु) खोलींत फक्त राहणारा.

Rōōm'ȳ, *a.* (रूमि)—spacious, not confined. ऐसपैस, प्रशस्त, विस्तीर्ण, अघळपघळ. *Room'ily, adv.* प्रशस्तपणें. *Room'iness, n.* ऐसपैसपणा, प्रशस्तपणा.

Rōōst, *n.* (रूस्ट्)—a bird's resting place; (transf.) sleeping accommodation. पक्ष्यांचें रात्रीचें थाऱ्याचें ठिकाण, थारा, विश्रांतिस्थान; झोपण्याची सोय, बिछाना, निजण्याची खोली. *v. i.* to occupy a roost, to settle for sleep; to be perched or lodged for the night. झोपेकरितां राहणें; रात्रीकरितां राहणें विश्रांति-झोंप-घेणें.

Rōōt,[1] *n.* (रूट्)—the part of a plant that fixes it to the earth and conveys nourishment from the soil to it; (*pl.*) fibres or branches of this; (*usu. pl.*) plants with edible roots; part of bodily, organ, etc. serving as a root; (Mus.) fundamental note of chord; (bibl.) scion; offshoot; bottom, essential substance of; nature; source, means of growth, basis; (*Math.*) the factor of a quantity which multiplied by itself gives that quantity; original element from which words are formed. मूळ, मुळी, मुळ्या, मूळखंड, मुळ्याचे तंतु, खाण्याजोगीं मुळें असलेल्या वनस्पति, बुडखा, बुंध, बुंधा, आधार; मूलतत्त्व; संतान, अपत्य; तत्त्व, मूळस्वरूप, सत्यांश; उगम, आदि-कारण, पाया; (गणि°) बीज, मूळ,; धातु, मूळशब्द. *v. t. & i.* to take or cause to take root; to establish firmly; to pull up by the root; (of swine etc.) turn up ground in search of food; (often *rout* राउट्) find or bring out after search, etc.; rummage (*among, in*). मूळ धरणें, पाळें घेणें; रुतणें, बद्धमूल होणें; उपटणें, मुळासकट उपटणें, निर्मूलन करणें; (डुकरानें सोंडेनें भक्ष्यार्थ) जमीन उकरणें; शोधून बाहेर काढणें, धुंडाळणें, हुडकणें. *To pull up by the rr.,* (*lit. & fig.*) uproot. मुळासकट उपटणें, पाळेंमुळें खणून काढणें. *Take, strike, r.,* पाळें धरणें, मूळ धरणें, जोर-जीव-घेणें; जोरानें वाढीला लागणें. *Lay axe to r. of* (झाडाच्या, संस्थेच्या) मुळाशीं घाव घालणें, नाशाला आरंभ करणें. *R. & branch,* पूर्ण, पूर्णपणें, समूळ, मुळा-शेंड्यासकट. *Love of money is the r. of all evil,* द्रव्याची हांव हें सर्व पापांचें मूळ आहे. *Square r.,* वर्गमूळ. *Cube r.,* घनमूळ. *Square r., Second r., of 4, r. of 4, r. 4,* चाराचें वर्गमूळ. *Cube or third r. of 27,* $\sqrt[3]{27}$. २७ चें घनमूळ. *To r. out,* exterminate. मुळा-सकट उपटून टाकणें, नायनाट करणें. *Rooted, pa. p.* बद्धमूळ, दृढमूळ; (अंत) उगम असलेला. *Rootedly, adv. Rootedness, n.*

Rōōt,[2] *v. i.* (रूट्)—(*sl.*) (*U. S.*) to be active for another by giving encouraging applause or support. वाहवा करून दुसऱ्याला उत्तेजन-प्रोत्साहन-देणें.*-er, n.*

उमेदवार ) उभा करणें ; ( कायद्यानें बंदी केलेला माल ) चोरून किनाऱ्यावर उतरविणें, चोरटा प्रसार करणें ; ( क्रिकेटमध्यें ) धांव काढणें । पळून जाणें, बेपत्ता होणें, घाईघाईनें जाणें, आकस्मिक प्रवास करणें ; सहज ( नजर ) जाणें, ( विचार ) सुचणें ; ( सारखा ) वेढणें, पसरणें, सरळ जाणें ; पाठलाग करणें, मागून पळणें ; पसरणें ; चरणें ; घरंगळणें, घळघळत जाणें. *n.* act or spell of running ; unit scored at cricket ; continuous stretch or spell or course ; general demand ; range of pasture ; way things tend to move, direction, rapid fall ; ( U. S. ) small stream, water-course ; long series or succession ; enclosure for fowls ; licence to make free use of ; common, general, average type or class ; regular track of some animals ; trough for water to run in ; part of ship's bottom narrowing towards stern. दौड, धांवणें ; पळ, पलायन ; धांव ; मार्ग, वाट ; मागणी, खप ; चराऊ रान ; गति, दिशा ; लहान ओढा, जलप्रवाह, जलमार्ग ; सातत्य, दीर्घक्रम । ( कोंबड्यां, बदकें वगैरेसाठीं ) बंदिस्त जागा, आवार ; मुभा, सवलत ; सामान्य वर्ग, सर्वसाधारण वर्ग । मळलेली वाट ; ( पाणी सांडण्याचें ) पात्र, जलद्रोण, कोठिंबा ; गलबताचा ( नाळीकडील ) निमुळता ( होणारा ) भाग. *To r. to meet one's troubles.* anticipate them. भावि दुःखांचें-संकटांचें आगाऊ भाकीत करणें. *He who runs may read,* ( सहज-लीलेनें-समजण्याजोगी गोष्ट ). *How your tongue runs !* जिभेचा पट्टा-तोंडाचा पट्टा चालू आहे ! *Play ran 100 nights.* सारखे,-अखंड शंभर खेळ झाले. *News ran like wild fire,* बातमी हां हां म्हणतां पसरली. *Running commentary,* ओझरती टीका. *One's blood runs cold,* he is horrified. भीतीनें गाळण उडाली, दांतखिळी बसली, गार पडला. *The sands are running out,* आयुष्य संपत आलें, काळ-मृत्यु-समीप आला. *To run dry,* कोरडें पडणें, वाहायचें थांबणें. *R. low, short,* संपत येणें, संपुष्टांत येणें. *Prices r. high,* भाव-किंमती-वाढणें-कडाडणें. *To r. errands, messages,* निरोप्याचें काम करणें, दौत्य करणें. *To r. to earth,* पाताळांतून हुडकून काढणें, पुरेपूर शोध करणें. *To r. the show,* ( *sl.* ) dominate in an undertaking etc. ( एखाद्या गोष्टींत ) वर्चस्व असणें, मिरासदारी ठेवणें. ( *With across.* ) *To r. across,* fall in with. सहज भेटणें, गांठ पडणें. *To r. after,* pursue with attentions, seek society of, give much time to ( pursuit, etc. ). पाठीस लागणें, ( च्या ) मागें लागणें ; नादीं लागणें ; छंद धरणें, नादीलागणें. *To r. against,* वर हापटणें, आदळणें. *R. at,* assail by charging or rushing. हल्ला करणें, ( वर ) चालून जाणें. *To r. in debt,* कर्ज काढणें, कर्ज काढावें लागणें. *R. into,* संवय लागणें, आंत पडणें ; शीं टक्कर होणें ; पोंचणें, मजल मारणें. *R. on,* विषयीं चालू राहणें,-असणें. *R. over,* review, glance over, peruse, touch ( notes of piano ) in quick succession ; pass over ( prostrate person ). वर नजर फेंकणें ; गोषवारा सांगणें, ( घोटें ) झरझर उठणें, नाचणें, ( वाहन अंगावरून ) जाणें, वरून जाणें. *R. through,* examine cursorily, deal successively with, consume by reckless spending, pervade. वरवर पाहणें, ( पानें ) चाळणें, उधळपट्टी करणें, उधळून टाकणें, व्यापणें, व्यापून टाकणें. *R. to,* पोंचणें, पुरेसा-पुरेपूर-असणें, ( नाशाला ) जाणें, ( विनाश ) पावणें, कडे फल होणें,-असणें. *R. upon,* कडे लागून असणें, अकस्मात् गांठ पडणें. *With advv. : R. down,* चावी संपणें, घड्याळ बंद पडणें, प्रकृति खालावणें, टक्कर होणें, हुडकून काढणें, तुच्छ लेखणें, तुच्छतेनें बोलणें. *R. in,* भिडणें ; ( colloq. ) पकडून तुरुंगांत घालणें, निवडून आणणें. *R. off,* पळून-निघून-जाणें ; अकस्मात् विषयांतर करणें ; अस्खलित लिहिणें,-पाठ म्हणणें ; गळून जाणें,-संपणें. *R. out,* खपणें, संपणें, ( खेळांत ) धांवतां बाद होणें. *R. through,* ( तलवारीनें ) भोसकणें ; ठार मारणें. *A run on the bank,* ठेवीदारांचा ( पेढींतील ठेवी काढून घेण्याचा ) एकच गिल्ला, गर्दी, झोड. *R. on book,* पुस्तकाला भरमसाट मागणी, खप. *The common r. of men,* सर्वसामान्य लोक, जनसमुदाय.

Run'about, *a.* ( रंनअबाउट् )—roving. हिंडगा, भटक्या, पायांवर नक्षत्र पडलेला. *n.* light motor-car. सुटसुटीत मोटरगाडी.

Rŭn'agāte *n.* ( रॅनॅगेट् )—( *arch.* ) vagabond. भटक्या.

Rŭn'away, *n.* & *a.* ( रॅनॅवे )—a fugitive ; horse bolting. पळपुटा ; पळपुटा ( घोडा ).

Run'cinate, *a.* ( रंन्सिनट् )—( bot. ) saw-toothed, with lobes curved towards base. पिच्छवत् अधोदल ( पर्ण ). करवतीच्या धारेसारखें ( पान ).

Rune, *n.* ( रून् )—( *usu. in pl.* ) letters of early Teutonic alphabet ; marks of mysterious significance resembling them. प्राचीन रूनिक अक्षर ; त्या अक्षरासारख्या गूढार्थक खुणा. [ AS *run,* whisper, secret counsel ].

Rung, *pa. t.* & *pa. p.* of Ring.

Rŭng, *n.* ( रंग )—a short stick fixed as cross-bar esp. in ladder. ( शिडीची ) पायरी, पावठणी. *fig. the lowest, topmost, r. of Fortune's ladder,* दैवाची -वैभवाची-तळची-अत्युच्च पायरी.

Rŭn'let, *n.* ( रंन्लिट् )—small brook ; cask for wine etc. लहान ओढा ; ( दारूचें ) पिंप.

Runn'el *n.* ( रंनल् )—brook ; gutter. ओढा ; नाला ; गटार, मोरी.

Rŭnn'er, *n.* ( रंनर् )—a racer ; a messenger ; revolving mill-stone ; kinds of twining bean ; creeping stem issuing from plant's stem and capable of rooting itself ; sliding ring on rod, etc. शर्यतींत धावणारा ; ( पोस्टाची थैली घेऊन जाणारा ) जासूद ; जात्याची वरची तळी, पेड ; द्विदल धान्याचे वेल ; ताणा, धमनी ( दुर्वा वगैरे ) ; धांवती पकड.

Rŭnn'ing, *a.* ( रंनिंग )—consecutive ; successive ; flowing ; cursive ; discharging ( matter ). लागोपाठचा, पाठोपाठचा ; वाहणारा, प्रवाही ; एकटोकी, वळणदार ; बरबरीत, पू वाहणारा. *n.* act of moving quickly, discharging matter. जलद, गति, धांव ; पू, निचरा.

**Rupee'**, *n.* (रुपी')—a silver coin worth 16 annas. रुपया.

**Rŭp'ture**, *n.* (रंप्-चर्)—breaking, breach; breach of harmonious relations; tumour. तोडणें, फोडणें; बिघाड; भांडण, अंत्रवृद्धि, अनर्थक पीटिका. *v. t. & i.* to burst, sever; suffer *r.* तोडणें, काढणें, अंतर्गळ होणें.

**Rur'al**, *a.* (रूरल्)—in or of the country, suiting the country, rustic. खेड्यापाड्यांतील, ग्राम्य, शेतकामाचा. *Rural'ity, n.*;-*ize, v. t.*-*zation, n.*

**Ruse**, *n.* (रूझ्)—indirect device; stratagem, wile, fraud, deceit. अप्रत्यक्ष उपाय; युक्ति, डावपेंच.

**Rŭsh**, *n.* (रश्)—marsh plant with slender pithy stem; (*fig.*) a thing of no value; tumultuous advance; charge, onslaught. लव्हाळा; कसपट, क्षुद्र वस्तु; पुढें घुसणें; हल्ला. *v. t. & i.* to run precipitately or with great speed; to go or do without proper consideration. घुसणें, झपाट्यानें पुढें जाणें; जोरानें पुढें ढकलणें, कोणतीहि गोष्ट अविचारानें करणें.

**Rŭsh'y̆**, *a.* (रंशि)—full of rushes. लव्हाळ्यांनीं भरलेला. *Rush-bottomed*, (of chairs) लव्हाळ्यांच्या बैठकीची, वेताची. *Rush-light*, अंधुक उजेड; अल्प बुद्धिमत्ता, बुद्धिमत्तेची किंचित् लुकलुकी. *Rush-like, a.*

**Rŭsk**, *n.* (रस्क्)—kinds of light biscuit; a piece of bread pulled or cut off and re-baked. हलकें चुरचुरीत बिस्किट; पुन्हा भाजलेला भाकरीचा तुकडा.

**Rŭss'et**, *a.* (रंसिट्)—of soft reddish-brown. लालट रंगाचा. *n.* russet colour; rough-skinned russet -coloured apple. तांबूस रंग; लालट रंगाचें खडबडीत सालीचें फळ.

**Rŭ'ssia leather**, *n.* (रंशॅलेदर्)—a leather prepared with birch-bark oil. एक जातीचें कमावलेलें चामडें.

**Rŭ'ssian**, *n.* (रंशन्)—(Rŭss, रस, *arch.*), native language of Russia. रशिया देशाची मूळ भाषा. *a.* of or from Russia. रशियादेशाचा, रशियांतील. *Ru'ssianize, v. t.*,-*ization, n.*

**Rŭss'ophil**, *n.* & a. (रंसोफिल्)—friend of or friendly to Russia. रशियादेशाचा दोस्त,—देशाशीं सख्यत्वाचा. *Russ'ophobe, n. & a.* opponent of or opposing the Russians. रशियन लोकांचा शत्रु,—लोकांविरुद्ध असलेला. —*phobia, n.*

**Rŭst**, *n.* (रस्ट्)—yellowish-brown coating formed on iron by oxidation and corroding it; (*fig.*) impaired state due to disuse or inactivity, inaction as deteriorating influence; plant-disease with rust-coloured spots, kinds of fungus, blight. तांब, गंज, कळंक, मळ, किट्ट, मालिन्य, मलिनपणा; अनुपस्थिति; गंज; वनस्पतींचा एक रोग,—बुरशी, खार. *v. i. & t.* to affect with rust, lose quality by rust. तांबणें, गंजणें, गंजवणें; मलिन-क्षीण-होणें, गंजणें. *Better wear out than rust out*, (maintain activity in old age). गंजून जाण्यापेक्षां झिजून जाणें चांगलें. *Rust'less, a.*

**Rŭs'tic**, *a.* (रं स्टिक्)—of or like country people or peasants; uncouth, of rude workmanship. खेडेगांवचा, गांवढळ; साधा. *n.* a countryman, peasant. गांवढळ मनुष्य, शेतकरी. *Rusti'city, n.* गांवढळपणा, गांवढेपणा, ग्राम्यत्व, ओबडधोबडपणा. [L. *rusticus, rus*, the country]

**Rŭs'tĭcāte**, *v. i. & t.* (रंस्टिकेट्)—to retire to the country; to send down from university for a time as punishment; mark (masonry) with sunk joints or roughened surface. खेडेगांवांत राहायला जाणें; शाळेंतून किंवा कॉलेजांतून कांहीं दिवस शिक्षा म्हणून मुलाला काढून टाकणें; (दगडविटांच्या बांधकामाला) खोलगट सांधे करणें, ओबडधोबड पृष्ठभाग करणें. *Rustica'tion, n.* [L. *rus*, the country]

**Rŭ'stle**, *n.* (रंसल्)—sound as of blown leaves or pattering rain. खडखड किंवा सरसर सळसळ आवाज. *v. i. & t.* to make or cause to make rustle, go with rustle. खडखडणें, सरसरणें, सळसळणें; सरसरत. —सळसळत जाणें. *To r. in silks*, be clad in silk. रेशमी कपडे घालणें,-वस्त्रें नेसणें. *Ru'stlingly, adv.* सळसळ, सरसर, सरसरत.

**Rŭs'ty̆**, *a.* (रंस्टि)—rusted, affected with rust, rust-coloured; (of black clothes) discoloured by age; impaired by disuse. गंजलेला, गंज-तांब -आलेला; तांबेच्या-गंजाच्या-रंगाचा; वापरून रंग गेलेला (काळा कपडा); गंज चढलेला, मलिन, मळीण, सराव नसल्यामुळें विसरून गेलेला, अनुपस्थित. *Rus'tily, adv.* *Rus'tiness, n.*

**Rŭs'ty**, *a.* (रंस्टि)—rancid (esp. of bacon). कुजट, शिळें, वाशेरें.

**Rŭt**, *n.* (रट्)—a track sunk by passage of wheels, an established course; beaten track, groove; periodic sexual excitement of male deer, &c. रुतल्याच्या योगानें झालेला रस्ता; चाकोरी, चाकोरें. गराडो; मळलेला रस्ता, खांच; मद, माज, उधान, भर.

**Ruth**, *n.* (रूथ्)—pity, compassion, tenderness. दया, करुणा.

**Ruthē'nium**, *n.* (रूथी'नियम्)—a hard brittle metal found in the ore of platinum. एक ठिसूळ धातु.

**Ruth'less**, *a.* (रूथ्-लेस्)—merciless. निर्दय, निष्ठुर. -*ly, adv.*;-*ness, n.*

**Rŭtt'y̆**, *a.* (रंटि)—(*Also, rutt'ed*)—*road*. चाकोऱ्या पडलेला (रस्ता.)

**Rȳe**, *n.* (राय्)—a grain used for fodder, etc.; (colloq.) rye-whisky. एक प्रकारचें उत्तर युरोपांतील (राय्) धान्य व गवत; रायधान्यापासून केलेली दारू.

**Rȳe'grass**, *n.* (राय्ग्रास्)—kinds of fodder-grass. वैरण, गवत.

**Rȳ'ot**, *n.* (राय्ट्)—Indian peasant, husbandman, cultivating tenant. शेतकरी लोक, किसान, रयत.

## S

**S, s**, (एस्)—nineteenth letter of the English alphabet; S-shaped object or curve. इंग्रजी वर्णांतील १९ वा वर्ण; S च्या आकाराची वस्तु,-चें वळण, वांकण. (*pl.* Ss, S's).

**Săbbatar'ian,** *a.* ( सॅबटे'अरिअन् )—opposed to sabbath -breaking. आठवड्याचा विश्रांतीचा दिवस पाळणारा. *n.* Sabbath-keeping Jew; person of such views. सबाथ ( दिवस ) पाळणारा ज्यू,-ख्रिस्ती मनुष्य.—*ism, n.*

**Sabb'ath,** *n.* (सॅ'बथ)—the rest day appointed for Jews on the last and for Christians on the first day of the week; period of rest. आठवड्याचा विश्रांतीचा दिवस; ( ज्यूंचा शनिवार, ख्रिश्चनांचा रविवार ) विश्रांतीचा काल. *S. day,* विश्रांतीचा दिवस. *S. breaker n.* विश्रांतीचा दिवस न पाळणारा, S. *-less, a.*

**Sabbăt'ic,-al** ,*aa.*( सॅबॅ'टिक्,-कल् )—of or appropriate to the sabbath. सबाथचा, सबाथयोग्य, विश्रांतीचा. *S. year,* the seventh year in which Israelites were to cease tilling; ( *U. S.* ) period of freedom from lectures etc. allowed to professor for travel, research, etc. ज्यू लोकांचें विश्रांतीचें सातवें वर्ष, ( प्रवास, संशोधन वगैरेकरितां ) प्राध्यापकाला दिलेली रजा,-मोकळीक.

**Sā'ble,** *n.* (से'बल)—small dark-furred beast; its skin or fur; the tincture or colour black; ( *pl.* ) mourning garments,black garments. एक काळ्या रंगाचा पशु, त्याचें कातडें किंवा लोंकर; काळा रंग; ( अनेo ) काळा सुतकी पोषाख. *a.* black, gloomy. काळा, अंधुक. *Sa'bled, a.* काळ्या रंगाचा. *His sable Majesty,* the devil, यम, पिशाच्चराज.

**Să'bot,** *n.* (सॅ'बो)—a shoe hollowed out from one piece of wood worn by French lower classes; wooden-soled shoe; ( Mil. ) wooden disk metal cup; ( Mech. ) shoe or armature of pile, boring rod, etc. ( फ्रेंच शेतकरी लोकांचा ) लांकडी जोडा; लांकडी तळाचा जोडा; लांकडी चकती, -चाकी, धातूची टोपी. *Sa'boted, a.*

**Săb'otage,** *n.* ( सॅ'बोटिज् )—intentional damage to plant etc. done by workmen on bad terms with employers. ( कामगारांनीं ) हेतुपूर्वक ( यंत्रसामुग्रीची ) नासधूस करणें. [ F ]

**Sā'bre,** *n.* ( सेबर् ) —a cavalry sword with a blade curved backward at the point; ( *in pl.* ) cavalry unit, cavalry soldier and horse; copper tool for skimming molten glass. बांकडी तरवार, वक्र खड्ग; घोडेस्वार, घोडदळ; ( वितळलेला कांचरस ढवळण्याचें ) तांब्याचें ढवळणें. *v. t.* to cut down or wound with sabre. वक्र तलवारीनें कापणें, घार करणें. *The Sabre,* लष्कर, लष्करी सत्ता. *S.bill,-wing,* kinds of bird. एक जातीचे पक्षी. *S.-cut,* वक्र खड्गानें केलेला घाव,-जखम. *Sabretache, n.* ( सॅबर्टॅश् ), cavalry officer's satchel. घोडदळ अधिकाऱ्याची पिशवी. [ F ]

**Săc,** *n.* ( सॅक् )—a bag of membrane forming a cavity, a pouch, a receptacle for liquid. पेशी, पिशवी, कोष.

**Săb'ulous,,** *a.* ( सॅ'ब्युलस )—sandy, of sand; ( Med. ) ( of secretions ) granular. वाळूचा, वालुकामय; खड्यांचा, अश्मरीयुक्त.

**Săbu'rra,** *n.* ( सॅब्यू'रा )—( med. ) foul granular matter deposited in stomach. पोटांत खडे धरणें, अश्मरी रोग.

**Săcc'harin,** *n.* ( सॅ'कॅरिन् )—intensely sweet substance got from coal-tar used in place of sugar. एक प्रकारची कृत्रिम रासायनिक अतिशय गोड साखर *Sacc'harine, a.* of or containing or like sugar. साखरेचा, शर्करायुक्त, शर्करागुणधर्मक. [ Gk *sakkharon,* sugar ]

**Săcerdō'tal,** *a.* ( सॅसर्डो'टल् )—priestly. उपाध्यायाचा, याज्ञिक.*-ism, n.* उपाध्येपणा; उपाध्यायवर्गाची फाजील सत्ता.*-ist, n.*

**Săch'em,** *n.* ( सॅ'शिम् )—supreme chief of some Amer.-Ind. tribes; an eminent person. अमेरिकेंतील मूळच्या रहिवाश्यांच्या जातीचा प्रमुख; विख्यात मनुष्य.

**Să'chet,** *n.* ( सॅ'शे )—a small bag of perfume or odorous substances. सुगंधि पदार्थ असलेली पिशवी.

**Săck,** *n.* ( सॅक् )—a large bag of coarse textile stuff; amount of which a sac holds; sacking of a town. पोतें, कोथळा; पोतेंभर जिन्नस; शहराची लुटालूट. *v. t.* to put in sacks; to subject ( town etc. ) to an unrestrained pillage and licence; ( colloq. ) dismiss from employment; defeat. पोत्यांत भरणें; शहर वगैरे लुटणें, लुटालूट करणें; नोकरी-वरून कमी करणें,-घालवून देणें; पराभव करणें, पाडाव करणें. *Sack'ful, n.* पोतेंभर, गोणभर. *Sack'ing, n.* material used for sacks. तागाचें कापड, गोणपाट, तरट. *Sack'race,* between competitors tied in sacks upto the neck. ( मानेपर्यंतचें अंग पोत्यांत घालून ) ढकलाढकलीची शर्यत.

**Săck,** *n.* ( सॅक् )—( hist. ) kinds of white wine from Spain. स्पेनमधील कांहीं जातींची सफेत दारू.

**Săck'but,** *n.* ( सॅ'क्बट् )—an obsolete kind of trumpet. अलगूज.

**Săck'clŏth,** *n.* ( सॅ'क्-क्लॉथ् )—coarse stuff or cloth such as sacks are made of; ( *fig.* ) mourning or or penitential garb. गोणपाट, तरट; सुतकी कपडे, पश्चात्तापसूचक वस्त्रें.

**Sā'cral,** *a.* ( से'क्रल् )—( Anat. ) of the sacrum; ( Anthropol. ) of or for sacred rites. त्रिकास्थिसंबंधीं, त्रिकास्थिगत; धार्मिक विधींसंबंधीं.

**Săc'rament,** *n.* ( सॅ'क्रमेन्ट् )—a symbolic solemn religious ceremony ( esp. baptism ). संस्कार, बाप्तिस्मा.*-al, a.* संस्कारासंबंधीं, संस्कारित. *Sacramen'talism,-ist, nn,* संस्कारांना विशेष महत्त्व देणें,-देणारा. *Sacramen'tarian, a. &n.*

**Sacrār'ium,** *n.* ( सेक्रे'अरिअम् )—( pl.-ia ), ( Rom. Ant. ) a shrine in house; sanctuary, part of church within altar-rails. देव्हारा; देवघर, ( चर्चमधील ) वेदीजवळची जागा. [ L. *sacer,* sacred ]

**Sā'cred,** *a.* ( से'क्रिड् )—consecrated to a deity; hallowed by religious association; dedicated or appropriated to some person or purpose; inviolable. देवतार्पण केलेला, देवाचा; ईश्वराचा;

धार्मिक, पवित्र, धर्मसंबंधीं; व्यक्तीला किंवा हेतूला वाहिलेला; पुज्य, पूजनीय, पवित्र. S. *book, writings,* धर्मग्रंथ; स्मृति. S. *history,* बायबलांतील धर्मेतिहास. *S. number,* associated with religious symbolism, e. g. 7. पवित्र अंक, आंकडा (सात, तीन इ०). *S. poetry,* music, धर्मपर काव्य. *Sa'credly, adv. Sa'credness, n.* पवित्रपणा, धार्मिकता, पुज्यता, अनुल्लंघनीयता. [ L. *sacer,* holy ]

**Săc'rifice,** *n.* (सॅ'क्रिफाइस)—the slaughter of a victim, (or presenting of a gift, or doing of an act) to propitiate a god; such victim, or gift etc.; (fig.) act of prayer or penitence as propitiation; the giving up of something. देवाला बळी देणें, उपहार, याग, होम, यज्ञ; देवाला दिलेला बळी, यज्ञपशु; अनुष्ठान, तपश्चर्या, कायाक्लेश; त्याग; सोडणें, स्वार्थत्याग. *v. t. & i.* to offer as sacrifice; to offer sacrifice to; to give up (one's life, interests, etc.) as of inferior importance to something else; to sell at a loss. बळी देणें, यज्ञ करणें, (ला) बळी देणें, उपहार करणें; त्याग करणें; तोट्यानें विकणें. *The great* or *last s.,* esp. death for one's country in war. देशासाठीं युद्धांत-समरांगणीं-देह ठेवणें, मरण. *Self-s.,* स्वार्थत्याग, आत्मयज्ञ. *Sacrifi'cial,* (-शल्) *a.* यज्ञाचा, यागाचा, यज्ञसंबंधीं-*cially, adv.*

**Săc'rilege,** *n.* (सॅ'क्रिलिज्)—violation or profaning of what is sacred. पवित्र वस्तु बाटवणें, पवित्रवस्तुदूषण, देवस्थानची चोरी, (देवस्थान वगैरे) बाटविणें, भ्रष्ट करणें. *Sacrile'gous, a.* भ्रष्टपणाचा, देवस्वापहरणाचा, पवित्रवस्तुचौर्याचा.-*gouly, adv.* -*gist, n.*

**Sā'crist, Săc'ristan,** *nn.* (से'क्रिस्ट्, सॅ'क्रिस्टन्)—an official in charge of the sacred vessels, vestments, relics, etc. of a church; a sexton. (ख्रिस्ती देवळांतील) देवाचीं भांडीं वगैरे जपून ठेवणारा, दफ्तरदार, चर्चची देखरेख करणारा (पाद्र्याच्या हाताखालचा) नोकर, रखवालदार. *Sac'risty, n.* Sacristan's repository. देवाचीं भांडीं, वगैरे ठेवण्याची कोठी.

**Sa'crosanct,** *a.* (से'क्रोसॅंक्ट्, सॅ-)—(of person, place, law etc.) secured by religious sanction against outrage, inviolable. अतिपवित्र, धर्मतः आदरणीय,-पूज्य. *Sacrosanc'tity, n.* अतिपवित्रता, पूज्यता व आदरणीयता.

**Sa'crum,** *n.* (से'क्रम)—the compound triangular bone forming the back of the pelvis. (माकड हाडाच्या वरच्या बाजूचें) त्रिकोणाकृति हाड, त्रिकास्थि. *Sa'cral, a.*

**Săd,** *a.* (सॅड्)—sorrowful; showing or causing sorrow; incorrigible, shocking, deplorably bad; (of bread) heavy, doughy; (of colour) dull. दुःखी, उदास, खिन्न, रडका, रडतोंड्या, रडवा, दुःखप्रद, दुःखावह; अतिशय वाईट, हेकट, तिरस्कार्य; जाड, घट्ट (भाकरी); मळकट, मळका, निस्तेज (रंग). *A sadder and a wiser man,* हात पोळून निघालेला, कटु अनुभव घेऊन शहाणा झालेला,-विटलेला. *In sad earnest,* seriously. गंभीरपणानें, मनःपूर्वक. *Sad'ly, adv.* अतिशय दुःखानें, उद्वेगानें. *Sad'ness, n. Sadd'er, Sadd'est,* Comp. & Super.

**Sădd'en,** *v. t. & i.* (सॅ'डन्)—to make or grow sad. दुःखी,-उदासीन,-खिन्न,-करणें,-होणें.

**Să'ddle,** *n.* (सॅ'डल्)—a rider's seat on the back of a horse or on a bicycle, or of some agricultural machines; a saddle-shaped thing (e. g. ridge betweeen two summits, etc.); a joint of mutton or venison consisting of the two loins. जीन, खोगीर, (बायसिकल-दुचाकी-वरील; किंवा नांगरावरील) बैठक; खोगिराच्या आकाराची वस्तु; (दोन शिखरांमधील) कडा, (तारेच्या खांबावरील चिनी मातीची) तारेची बैठक. *v. t. & i.* to put a saddle on; to saddle one's horse; to load or burden (with task, &c.); to put blame upon. जीन घालणें, खोगिर ठेवणें; ओझें किंवा काम लादणें; (वर) दोष देणें. *In the s.,* mounted, (fig.) in office or control. घोड्यावर असलेला,-स्वार, कामगिरीवर असतांना. *Put s. on right, wrong, horse,* blame right, wrong, person. खऱ्या, दोषी, -माणसाला दोष लावणें; 'चोराला सोडून संन्याशाला दोष देणें', भलत्यालाच दोषी ठरविणें. *Saddle-back,* खोगिराच्या आकाराचें (घराचें) दुपाखी शिखर,-डोंगर; कांहीं जातीचे पक्षी. *S.-backed, a.* जीनपाठीचा, जीनसारखी पाठ असलेला. *S. bag,* one of a pair of bags laid across horse behind saddle. खुर्जी, पडशी. S.-*fast,* firmly seated in *s.* खोगिरावर घट्ट बसविलेला,-बसलेला. S.-*less, a.*

**Sădd'ler,** *n.* (सॅ'डलर्)—a maker of saddles and harness; (Mil.) man in charge of cavalry regiment's saddlery. जीन-खोगीर-करणारा, जिनगर; लष्करी घोडदळाच्या खोगिरांचा रखवालदार.

**Sădd'lery,** *n.* (सॅ'ड्-लरि)—saddler's trade or wares. जिनगरांचा धंदा; खोगिरासाठीं लागणारें सामान.

**Săd'tree,** *n.* (सॅ'ड्-ट्री)—the Night jesmine of India. रानजुई,-जाई.

**Sāfe,** *a.* (सेफ्)—uninjured, out of danger; affording security or not involving danger; cautious; reliable; sure. शुद्ध, शाबूत, निर्विघ्न; सुरक्षित; सावध, जपून वागणारा; विश्वसनीय; खात्रीचा. *n.* (also meatsafe), ventilated cupboard for provision; a strong-box for valuables. जाळीचें कपाट,-फडताळ; तिजोरी, सुरक्षित पेटी. *Is a s. first,* खात्रीनें पहिल्या वर्गांत येईल असा. *Safe'ness, n.*

**Sāfe-cŏn'dŭct,** *n.* (सेफ्-कॉं'डक्ट्)—immunity from arrest or harm granted to a person, passport. अभयपत्र, परकी देशांत निर्बंधपणें प्रवास करण्याचा परवाना, कौल.

**Sāfe'guard,** *n.* (सेफ्-गार्ड्)—a proviso or other device against foreseen risks, a warrant of protection. रक्षण किंवा बचावाचें साधन, खबरदारी,

आगाऊ तरतूद, पूर्वयोजना; आश्रय, संरक्षण, अभयपत्र. *v. t.* to protect by precaution or stipulation. खबरदारी घेणें, सुरक्षित ठेवणें. *Safe-guarding, n.* (Econ.) protection of certain industries by levying duties on imports of the same character as the home product. (आयात मालावर जकात ठेवून) देशी मालाचें संरक्षण (करणें).

**Sāfe-keeping**, *n.* (से'फ्कीपिंग)—custody. सुरक्षितता, सुरक्षित ठेवणें.

**Sāfe'ly**, *adv.* (सें'फ्लि)—in a safe way. सुरक्षितपणानें, निर्भयपणें, बिनधोक.

**Sāfe'tў**, *n.* (से'फ्-टि)—being safe, freedom from danger or risks, preservation from hurt. सुरक्षितपणा, बचाव, संरक्षण, बिनधोकपणा. *There is s. in numbers, prov.* महाजनो येन गतः स पन्थाः, जमावांत असणें सुरक्षितपणाचें असतें. *S. first (association)*, जीवितरक्षकसंघ, दक्ष-जपून-सुरक्षितपणें वागा!-चाला! *S.-lamp*, miner's lamp so protected as not to ignite fire-damp. (खाणींतील) संरक्षित दिवा, बिनधोक्याचा दिवा. *S. fuse*, बिनधोक्याची (सुरुंगाची) वात. *S.-match*, बिनधोक्याची आगकाडी. *S.-pin*, घंदिस्त-न बोंचणारी-गळपट्टीला लावण्याची टोंचणी,-पिन. *S.-razor*, बिनधोक वस्तरा (त्याचें पातें).

**Sāfe'tў-vālve**, *n.* (से'फ्टि-व्हाल्व्ह)—automatic vent relieving excessive pressure of steam; (fig.) outlet for excitement. सुरक्षिततेचा पडदा; मनोविकारांच्या सौम्य प्रदर्शनाचें साधन. *To sit on s. valve*, follow policy of repression. दडपादडपीचें, -दडपशाहीचें-धोरण स्वीकारणें.

**Săfflower**, *n.* (सॅ'फ्लॉवर्)—a thistle-like plant, cultivated for the dye obtained from its flowers; its dried petals; the red dye produced from this. कुसुंब, करडई, करडी; कुसुंबा; करडईचा लाल रंग, तेल, करडेल.

**Săffron**, *n.* (सॅ'फ्रन्)—richly orange-coloured stigmas or the Autumnal Crocus; the colour of these. केशर; केशरी रंग. *a.* saffron-coloured. केशरी, केशरी रंगाचा. [*F safran*, Arab. *Zafaran*, plant cultivated by the Moors in Spain]

**Săg**, *v. i.* (सॅग)—to sink unevenly under pressure; hang sideways or show downward curve in middle; (commerc.) decline in price; (of ship) drift from course. वांकणें, दबणें, घसणें; मध्येंच लटपटणें,-घसणें, कलणें, लवणें; किंमत उतरणें; (मार्गापासून) भरकटणें, दूर-बाजूला-जाणें. *n.* state of sagging. बांक, पांक, दमणें, थकणें; उतरलेली किंमत, भरकटणें. *Sag'gy, a. Stretched rope, ladder, sags*, ताणलेल्या दोरीला, शिडीला, मध्यें पांक येतें, मध्यें लवते, घसते.

**Sa'ga**, *n.* (सा'गा)—medieval tale of Scandinavian heroes; (transf.) a story of heroic achievement or adventure. (नॉर्वे-स्वीडन देशांतील) मध्ययुगीन वीरांची कथा; शौर्याची कथा, वीराची कथा.

**Sagā'cious**, *a.* (सगे'शस्)—having or showing insight and practical wisdom. तैलबुद्धि, चतुर, हुषार, चलाख.

**Sagă'citў**, *n.* (सॅगॅ'सिटि)—insight and practical wisdom, high intelligence. शहाणपणा, चलाखी, धूर्तपणा.

**Sāge**, *a.* (सेज्)—wise, judicious, experienced. शहाणा, सुज्ञ, अनुभवी, धूर्त, दूरदर्शी. *n.* a person credited with profound wisdom. शहाणा मनुष्य, ज्ञानी पुरुष, ऋषि.—*ly, adv.* साधुवृत्तीनें, शहाणपणानें, वृद्धासारखें. *Sage'ness, n.* शहाणपणा, चतुरपणा.

**Sāge**, *n.* (सेज्)—a kitchen herb with dull-greyish-green leaves. कापुरकचरी, गौलाकचरी. *S. green*, गौलाकचरीच्या पानांचा रंग. *S. tea*, कापुरकचरीच्या पानांचा रंग.

**Sagĭ'tta**, *n.* (सॅजि'टा)—a northern constellation, the Arrow. (उत्तरगोलार्धांतील) शर (राशी). [L. arrow]

**Sagĭttār'ius**, *n.* (सॅजिटे'अरिअस्)—constellation and ninth sign of the Zodiac, the Archer. धनरास, धन, धनु.

**Săg'ittate (d)**, *aa.* (सॅ'जिटेट्,-टिड)—(*bot., zool.*) shaped like arrow-head. बाणासारखा, बाणाग्रवत् (उ॰ चांदवेलीचें पान, कण्हेरीचा परागकोश.)

**Sā'gō**, *n.* (से'गो)—(plu.-os), (kind of palm with pith yielding) kind of starch used as food, in puddings etc. साबूदाणा, सागू.

**Sail**, *n.* (सेल्)—a piece of canvas extended on rigging to catch the wind and propel a vessel; (collect., with number) ships; wind-catching apparatus attached to arm of a wind-mill; spell of sailing; sail-fish's dorsal fin, tentacle of nautilus; (also *wind-sail*) funnel-shaped bag on ship's deck or above mine giving ventilation; voyage or excursion in a sailing-vessel; voyage of specified duration. शीड, अरजार; जहाज, तारूं, नौका; पवनचक्कीचें वारा आंत घेण्याचें साधन,-शीड; नौकेंत बसून जाणें, मगरीच्या पाठीचा पंख; वाऱ्यासाठीं धुराडें; जलपर्यटन, जलप्रवास; ठराविक मुदतीची सफर. *v. i. & t.* to progress by the use of a sail, to start on a voyage; to navigate a ship; traverse the sea; (of bird, cloud) glide in air; (esp. of women) walk in stately manner; set (toy-boat) afloat. शिडाच्या योगानें पुढें जाणें, शीड हांकारणें; जलपर्यटनाला आरंभ करणें; गलबत चालविणें; समुद्रपर्यटन करणें; (आकाशांतून) तरंगणें, संथपणें जाणें, डुलत डुलत चालणें, मुरडत-ठेक्यांत-चालणें; पाण्यावर तरंगायला लावणें. *To take in sail (fig.)*, आपल्या महत्त्वाकांक्षा आवरणें. *Full s., adv.* सर्व शिडें उभारून, (*fig.*) सर्व बळ एकवटून. *Under ss.*, with ss. set. जहाज शिडें उभारून चालू झालें. *S. ho!* जहाज (दिसलें, आलें!) जहाज! *S. cloth*, शिडासाठीं कापड;

एक जातीचा कपडा. *To s. close to or near the wind*, वाऱ्याच्या उलट (दिशेनें) जहाज हांकारणें; नैतिकतत्त्वें जपळजवळ झिडकारणें.

**Sail'er**, *n.* (से'लर्)—a ship of specified sailing power. (ठराविक गतीनें जाणारें) जहाज, नौका, तारूं.

**Sail'or**, *n.* (से'लर्)—seaman or mariner. खलाशी, दर्यावर्दी.—*ing*, sailor's life. खलाशाचें जीवन. *A good sailor*, घोट-समुद्र—ज्याला लागत नाहीं तो इसम; *A bad sailor*, घोट लागणारा.

**Sain'foin**, *n.* (से'न्फॉइन्)—a fodder-plant. गुरांना वैरण म्हणून उपयोगी वनस्पती.

**Saint**, *n.* (सेन्ट्)—a canonized person (for use as pref., abbr. *St*, in pl. Sts); one of the blessed dead or other of the company of heaven; a saint-like person. रोमन कॅथोलिक संत; ईश्वरी पुरुष, मुक्तात्मा, मुक्त; संत, साधु, सत्पुरुष, जितेंद्रिय, (ढोंगी) साधु. *a.* holy, canonized. पवित्र, पूज्य, धर्माधिकारी. *v. t.* to canonize; call or regard as a saint. संत ही पदवी देणें; संत म्हणून संबोधणें,-मानणें. *Saint'ed, a.* canonized or deserving to be so; hallowed, sacred (of place). संत म्हणून मानलेला, संतासारखा; पवित्र, पूज्य (क्षेत्र इ.). *S.-like, a.* साधुतुल्य, साधुवृत्तीचा, पवित्र. *Saint'hood, n.* साधुपणा, संतपणा, संतसंप्रदाय,-मंडळ. *St Bernard dog*, or *St Bernard*, प्रवाशांना मदत करण्याकरितां (आल्प्स पर्वताच्या खिंडींतून संतमंडळीनें पाळलेला) कुत्रा. *St Cecilia*, patron saint of music. गानदेवता. *St John's-wort*, एक पिवळ्या फुलांचें झाड. *St Michael*, a kind of orange, *f.* one of the Azores so called. एक जातीचें नारिंग. *Patron saint*, रक्षक, संत,-पुरुष,-महापुरुष, कुलदेवता. *Young saints, old devils or sinners*, early piety is no good sign. तरुणपणचें वैराग्य टिकत नसतें,-हें कांहीं पुढच्या आयुष्याचें चांगलें लक्षण नव्हे! *St. Vitus's dance*, (med.) कंपवात, कंपवायु.

**Saint'ly**, *a.* (से'न्ट्लि)—very free from human weaknesses, like a saint, holy. साधुवृत्तीचा, सदाचरणी.

**Sake**, *n.* (सेक्)—used chiefly in phr. *for the sake of*, out of consideration for, in the interest of, because of, owing to. साठीं, करितां, स्तव, खातर. *For his name's s.*, आपलें नांव राखण्याकरितां. *For any s.*, कोणत्याहि कारणाकरितां का होईना. *For old s.'s s.*, in memory of old days. मागील दिवसांची आठवण म्हणून.

**Sā'lable**, *a.* (से'लेबल्)—fit for sale; finding purchasers. विक्रीलायक; खपण्याजोगें. *S. price*, विकून येणारी किंमत. *Sa'lability, n.*

**Salā'cious**, *a.* (सले'शस्)—lustful, lecherous. विषयी, कामुक, स्त्रीलंपट.-*ly adv.*,-*ness, n. Sala'city, n.* विषयाधीनता, कामुकपणा.

**Săl'ad**, *n.* (सॅ'लड्)—vegetables prepared as food eaten raw or without cooking; vegetable suitable for eating raw. शिजविल्याशिवाय खाण्याकरितां तयार केलेली भाजी, कोशिंबीर; एक जातीचा भाजीपाला. *S. days*, inexperienced youth. गाढव-गद्धे-पंचविशी, तारुण्यांतील अविचारीपणा. *S. oil*, refined olive-oil. शुद्ध ऑलिव्ह-तेल.

**Săl'amănder**, *n.* (सॅ'लमॅंडर्)—a lizard-like animal supposed to live in fire; a person who can endure great heat, fire-eating soldier etc., spirit living in fire; (zool.) kinds of tailed amphibian; red-hot iron for firing gun powder, hot iron plate. अग्नींत राहणारा सरड्यासारखा प्राणी; अति उष्णता सहन करणारा, मोठा लढवय्या (सैनिक), अग्निदेवता; सपुच्छ जलस्थल-निवासी प्राणी; रवरवीत लोखंडी सळई; तापलेला तवा,-कढई. *Salaman'drian,-drine, aa.*

**Sala'mè**, *n.* (सला'मि)—Italian sausage highly salted. खारावलेलें मांसाचें इटालियन पक्वान्न.

**Săl-ammō'niac**, *n.* (सॅलॅमो'निॲक्)—ammonium chloride. नवसागर, नौसागर.

**Săl'arÿ**, *n.* (सॅ'लरि)—fixed periodical payment made to a person (for his services) doing other than manual or mechanical work. पगार, वेतन. *Sol'aried, a.* पगारी, पगाराची.

**Săle**, *n.* (सेल्)—buying-and-selling transaction; disposal of stock at low prices; amount sold; public auction. खरेदीविक्री; कमी किंमतींत माल खपविणें; विक्री; विकलेला माल; जाहीर लिलाव. *On, for, sale*, offered for purchase. विक्रीसाठीं (मांडलेला). *S. and, or on return*, न विकलेला माल परत करण्याच्या अटीवर (किरकोळ दुकानदारानें घेतलेला,-ठेवलेला-माल). *The ss. were enormous*, मोठी विक्री झाली, मोठा खप झाला. *To put up for s.*, offer at auction. लिलावांत विक्रीला मांडणें. *Bill of s.*, फरोक्तखत, खरेदीखत. *Sales'man,-woman*, (से'ल्झ्मन्). shop-assistant; middleman between producer and retailer. विकणारा नोकर, विक्री करणारी स्त्री; अडत्या, दलाल. *Sales'manship*, skill in finding customers. विक्रेत्याचें कौशल्य, गिऱ्हाईक मिळविण्याची कला. *Sale-ring*, ring of buyers at auction. लिलावांत मागणाऱ्या (माल विकत घेणाऱ्या) लोकांची गर्दी.

**Săl'ep**, *n.* (सॅ'लेप्)—nutritive meal from dried tubers of some plants. सालममिश्री.

**Sălerā'tŭs**, *n.* (सॅलरे'टस्)—(U. S.) impure potassium or sodium bicarbonate as ingredient in baking-powder. एक अशुद्ध क्षार,-सज्जी. [mod. L. *sal aeratus*, aerated salt]

**Săl'ic, Sălique'**, *a.* (सॅ'लिक्, सॅली'क्)—*law*, law excluding females from dynastic succession. स्त्रीवारसांना गादीचा हक्क नाहीं, असें म्हणणारा कायदा.

**Săl'icin**, *n.* (सॅ'लिसिन्)—bitter crystalline principle got from willow-bark and used medicinally. पाळुंगीच्या झाडाच्या सालीचा अर्क. *Salicilic acid, n.* an antiseptic and anti-

substance. जंतुनाशक व वातहारी द्रव्य,-अम्ल. [ *L. salix,-icis,* willow ]

Sa'lient, *a.* ( से'लिअन्ट् )—prominent, conspicuous, standing out prominently; (of angles) pointing outwards; jetting forth. प्रमुख, लक्षांत येण्यासारखा; पाहेर आलेला (कोन); (कारंजाप्रमाणें) उडणारा. *n.* a salient angle; a bulge in a line of trenches. पाहेर आलेला कोन; खंदकांच्या रांगेंतील बाहेर आलेला-फुगीर-भाग. S. point, (arch.) मूळ, मूळारंभ, आद्य. *Sa'lience,-cy, nn.* ठळकपणा; *Sa'liently, adv.* ठळकपणानें.

Salif'erous, *a.* ( सॅलि'फरस )—( *geol.* ) ( of strata ) containing much salt. लवणधारी, क्षारयुक्त.

Sa'line, *a.* ( से'लाइन् )—impregnated with salt, chiefly composed of salt; like salt. मचूळ, खारट, खारा; मिठासारखा, क्षारयुक्त. *n.* solution of salts and water; salt-lake; salt-pan. मिठाचें पाणी, मिठवण; खारें सरोवर; मिठागर. *Salin'ity, n.* खारटपणा, खारेपणा, क्षारता.

Sali'va, *n.* ( सला'इ-व्हा )—the liquid of the mouth and the tongue that assists digestion. लाळ, थुंकी. *Sal'ivary, a.* थुंकीचा, लाळेचा, लालोत्पादक.

Săl'ivate, *v. t. & i.* ( सॅ'लिव्हेट् )—to produce unusual secretion of saliva; discharge saliva in excess. अतिशय लाळ उत्पन्न करणें; फार लाळ सुटणें. *Saliva'tion, n.*

Săll'ow, *n.* ( सॅ'लो )—low-growing kinds of willow. एक प्रकारची लहान वाढणारी वाळुंजी ( वनस्पति ).

Săll'ow, *n.* ( सॅ'लो )—of sickly yellow or pale brown. फिकट, निस्तेज, पांडुर, रोगट. *v. i. & t.* to grow or make *s.* फिकट, निस्तेज वर्ण वगैरे करणें,-होणें.

Săll'y̆, *n.* ( सॅ'लि )—a rush of the besieged upon the besiegers, sortie; excursion; outburst; a piece of banter. ( वेढा देणारांवर ) छापा किंवा हल्ला; सहल; उसळी, झटका; मौज, विनोद. *v. i.* to make a military sally; to go for a walk or expedition, to dart out, to issue suddenly. हल्ला करणें, तुटून पडणें, छापा घालणें; फिरावयास किंवा मोहिमेवर जाणें. *S.-port,* opening in fortifications provided for making sallies. किल्ल्यांतील खिडकी, किल्ल्याची ( भिंतींत असलेली ) चोरवाट.

Săll'y̆, *n.* ( सॅ'लि )—first movement of bell when set for ringing; bell's position when set; part of bell rope for holding. ( वाजविण्याच्या आरंभींची ) घंटेची हालचाल; टांगलेली घंटा; हातांत धरण्याची घंटेची दोरी.

Săll'y̆ Lŭnn, *n.* (सॅ'लि लन्)—kind of tea-cake served hot. ( चहाबरोबर खाण्याची ) एक प्रकारची गरम केक्-पोळी.

Sălmagŭn'di, *n.* ( सॅल्मगं'न्डि )—a highly seasoned dish of chopped meat, anchovies, eggs, etc.; general mixture, a medley, of articles, objects, qualities, etc.. एक मसालेदार मांसमय पक्वान्न; मिश्रण, खिचडी, संग्रह. [ F. ]

Să'lmi, *n.* ( सॅ'लमि )—rag-out esp. of game birds. ( मारलेल्या पक्ष्यांच्या ) मांसाचे मसाल्यांत भरलेले तुकडे.

Să'lmon, *n.* ( सॅ'मन् )—a silver-scaled fish with orange-pink flesh. सामन नांवाचा एक मासा. *a.* salmon-coloured. तांबूस पिंवळट रंगाचा. S.-*colour* ( *ed* ), ( of ) the orange-pink colour of *s.*-flesh तांबुस-नारिंगी-पिंवळट रंग ( रंगाचा ). *S. trout,* N.-Europ. fish resembling salmon. सॅमन सारखा दिसणारा मासा.

Săl'on, *n.* ( सॅलाँ )—reception-room in continental, esp. French, great house; reception of great lady. दिवाणखाना, थोर स्त्रीचें ( दिवाणखान्यांत ) आगतस्वागत. *The S.,* annual exhibition of living artists' pictures in Paris. कलाकुसरीचें (पॅरिसमधील) वार्षिक प्रदर्शन. [ F ]

Saloōn', *n.* ( सलून् )—a large room fit for assemblies, &c.; a large cabin for ship's passengers; a luxurious railway carriage without compartments; a public room or gallery generally used for specified use; ( U. S. ) drinking bar. दिवाणखाना, रंगमहाल, दालन; जहाजावरील किंवा आगगाडींतील मुख्य खोली; विशिष्ट कार्याकरितां सजविलेली विस्तृत खोली; दारू पिण्याचें स्थान, दारूदुकान. *S. car, carriage,* ( दिवाणखान्याप्रमाणें ) सजविलेला ( सलग ) आगगाडीचा डबा. *Sleeping, dining, s.,* आगगाडींतील निजण्या-जेवण्याचा भव्य सुशोभित डबा. *Billiard, dancing, shaving, s.,* बिल्यर्ड खेळण्याची जागा, सार्वजनिक नृत्यगृह, केशकर्तनालय. *S. keeper,* ( U. S. ) दारूदुकानाचा मालक.

Sălpiglŏss'is, *n.* ( सॅल्पिग्लॉ'सिस )—showy-flowered garden-plant allied to petunia. शोभिवंत फुलांची एक वनस्पति. [ *Gk Salpig,* trumpet; *glossa,* tongue. ]

Săl'sify̆, *n.* ( सॅ'ल्सिफि )—a plant with fleshy root cooked as vegetable. एक जातीची भाजीची वनस्पति.

Salt, *n.* ( सॉल्ट् )—substance obtained from sea -water by evaporation or from the earth by mining used as seasoning, or preservative of food, sodiumchloride; (fig.) the elite of; wit; experienced sailor; (Chem.) compound of basic and acid radicals; marsh overflowed by sea; (pl.) exceptional rush of sea-water up river. मीठ, लवण, खार, निमक; सिंध-लवण, शेंदेलोण, सिंध-क्षार; ( अलं० ) नीतिमान्, अत्युत्कृष्ट, सर्वोत्तम; खोंच, मार्मिकता; अनुभविक जुना खलाशी; क्षार, लवण; खाजण, खारट ( समुद्रकांठची जमीन ); उधानाचें पाणी भरणें, उधानाची भरती. *a.* containing, tasting of, or treated with salt; (of plants) growing in sea or salt-marshes; (of tears, grief) bitter;

(of stories,) indecent, spicy; (of wit) pungent; (of bill, charges) exhorbitant. खारट, लवणयुक्त, खारा, खारावलेला; समुद्रांत-खारटणजागेंत-होणारा; दुःखाचा, उद्वेगाचा; चटकदार, फाजील; खोंचक, झोंबणारी; फाजील, अतिशय, अवाच्यासवा (आकार). *v. t.* to preserve, season, treat, with salt; to make salt (lit. & fig). (अंत) मीठ घालणें, खारविणें; (बर्फ वितळून जाण्याकरितां रस्त्यावर) मीठ पसरणें; मीठ लावणें, तिखटमीठ लावणें (अलं०); क्षारद्रवांत (छायाचित्राचा कागद) बुडविणें, -भिजविणें. *Common s.*, रोजच्या खाण्यांतलें मीठ. *White s.*, सफेत बारीक केलेलें मीठ. *S.-cellar*, मिठाचें भांडें, पडगा. *In s.*, मिठांत खारावलेला. *To eat s. with*, (चा) पाहुणा असणें, चा पाहुणचार खाणें. *To eat one's s.*, (चा) निमक खाणें, (ची) नोकरी करणें, (च्यावर) अवलंबून असणें. *Is not with his s.*, not efficient, worth keeping, पगाराइतकी लायकी नसलेला, नालायक. *Take with a grain of s.*, अतिशयोक्तीचा समजणें, वर विश्वास न ठेवणें, थोडें वाद करणें. *The s. of the earth*, थोर-नीतिमान-पुरुष. *Acid s.*, अम्लक्षार. *Epsom s.*, रेचकाचें (इप्सम नांवाचें) मीठ. *To sit above, below, the s.*, (hist.) मेजाच्या मुखभागीं, नोकराचाकरांबरोबर, जेवावयास बसणें. *S. mine*, मिठाची खाण. *S. pit*, मिठाची कोंडी. *S. works*, मिठाचा कारखाना, मिठागर. *Salt'wort*, kinds ol marsh plants. दलदलींत वाढणारीं झाडें. *S. water*, *n.* समुद्राचें पाणी; अश्रू. *S.-water*, *a.* समुद्रांतील. *To s. an account*, जिनसाची भरमसाट किंमत लिहिणें. *To s. the books*, जमेकडची रक्कम (खरी असेल त्यापेक्षां) फाजील-अधिक-दाखविणें. *Salt'less, salt'y, aa.*; *salt'ness, n.*

Sălta'tion, *n.* (सॅल्टे'शन्)—leaping, dancing; sudden transition. उडी मारणें, नाचणें, बागडणें; आकस्मिक बदल. *Salta'tory, a.* उडी मारणारा, उडी मारण्याच्या उपयोगाचा. *Saltator'ial, a.*

Salt'ed, *pa. p. & a.* (सॉ'ल्टिड्)—In vbl. senses; (of horses or persons) proof against diseases incident to climate etc. by habituation, hardened. मीठ घातलेला, खारट, क्षारयुक्त; (हवापाण्याच्या संवयीनें) निढावलेला, सरावलेला, सुदृढ.

Sal'ter, *n.* (सॉ'ल्टर्)—manufacturer of, dealer in, salt; workman at salt works; person who salts fish, etc. मिठागरी; मिठाचा व्यापारी; मिठागरांतील कामगार, मासे-खारवी.

Salt'ern, *n.* (सॉ'ल्टर्न्)—a salt-works. मिठागर.

Sal'tire, *n.* (सॅ'ल्टायर्)—St. Andrew's cross (X) dividing a shield etc. into four compartments. सेंट ॲन्ड्रूचा (X) क्रॉस.

Salt'păn, *n.* (सॉ'ल्ट्-पॅन्)—a hollow near the sea (or a vessel) used in getting salt by evaporation. मीठ तयार करण्याची मिठागरांतील कोंडी. (Also Salt-pit).

Saltpē'tre, *n.* (सॉल्ट्-पी'टर्)—a substance used in making gunpowder; potassium nitrate. सोरा; सोरामीठ. [L. *sal*, salt; *petra*, rock]

Sălu'brious, *a.* (सॅलू'ब्रिअस्)—favourable to or promoting health, health-giving. आरोग्यवर्धक, पौष्टिक, आरोग्यकारक. *Salu'brity, n.*

Săl'ūtary, *a.* (सॅ'ल्यूटरि)—wholesome in operation; resulting in good, beneficial. पथ्यकारक; हितावह.

Sălūtā'tion, *n.* (सॅल्यूटे'शन्)—act of saluting; words used in saluting. नमस्कार, वंदन; अभिनंदनाचे शब्द.

Sălute', *n.* (सॅल्यू'ट्)—gesture of respect, esp. at meeting or parting; (Mil., Naut.) prescribed movement or use of flags or discharge of guns in sign of respect; (joc.) a kiss. नमस्कार, अभिवंदन; (तोफांची) सलामी; चुंबन. *v. t. & i.* to make a salute or salutation to; greet; kiss. नमस्कार करणें, वंदन करणें; अभिनंदन करणें; सलामी देणें; चुंबन घेणें.

Săl'vage, *n.* (सॅ'ल्व्हेज्)—rescue of property from loss at sea or by fire; payment made for its rescue; property salvaged. आगींतून किंवा समुद्रांतून माल वांचविणें; वांचवणावळ; वांचवलेला माल. *v. t.* to rescue thus; (U. S., sl.) appropriate for one's own use. माल वाचवणें; स्वतःसाठीं ठेवणें.

Săl'varsăn, *n.* (सॅ'ल्व्हार्सॅन्)—drug used esp. in syphilis. (गर्मी, उपदंश रोगावरील) औषधी. [P.]

Sălvā'tion, *n.* (सॅल्व्हे'शन्)—fact or state of being saved from sin and its consequences; preservation from loss, calamity, etc., thing that preserves from these. मुक्ति, मोक्ष, उद्धार, त्राण, रक्षण, संरक्षण, तारण, बचाव; रक्षण करणारी गोष्ट, बचावाचा उपाय, तरणोपाय. *To find s.*, be converted; (joc.) discover formula that will enable one to abandon one's principles, etc. मुक्ति मिळणें; (आपल्या तत्त्वांच्या विरुद्ध वागण्याकरितां) पळवाट शोधून काढणें. *Be the s. of*, चा तरणोपाय,-बचाव करणारा,-होणें. *S. Army*, religious organization based on a military model. मुक्तिफौज. *Salva'tionist, n.* a member of S. Army; a revivalist. मुक्तिफौजेचा सैनिक,-अनुयायी; पुनरुद्धारकर्ता. *Salva'tionism, n.*

Salve, *n.* (सॅल्व्)—healing ointment; something that soothes; a remedy; mixture of tar and grease for smearing sheep. मलम; उपशामक वस्तु; उपाय; मेंढ्यांच्या अंगाला लावण्याचें मिश्रण, रंग. *v. t.* to anoint; smooth over, palliate; soothe; harmonize; smear (sheep); save (ship, cargo) from loss at sea, or (property) from fire. (जखमेला) चोळणें, लावणें; नरम,-बरा,-नाहींसा करणें; उपशमन करणें; एकीकरण करणें, समाधान करणें; मारणें; रक्षण करणें, बचावणें. *Sal'vable, a.*

Săl'ver, *n.* (सॅ'ल्व्हर्)—a kind of tray for handing refreshment, &c. तबक, थाळा.

Săl'vō, *n.* (सॅ'ल्व्हो)—(pl.-*os*), saving clause, reservation (*of*); proviso. तरतूद, फट, सवड, वाट, सोडवण, सबब.

Săl'vō, *n.* (सॅ'ल्व्हो)—(pl.-*oes*), simultaneous discharge of guns as salute, or in battle;

round of applause. सन्मानार्थ तोफांची सरबत्ती,-सलामी, (नाविक युद्धांत) तोफांचा किंवा इतर स्फोटकांचा सतत भडिमार; जयघोष, टाळ्यांचा कडकडाट.

Săl'volătile, *n.* (सॅल्व्हालॅटिलि)—solution of ammonium carbonate, used as restorative in fainting, etc. (मूर्च्छा वगैरे आली असतां) हुंगण्याचें औषध. [mod. L,=volatile salt)

Săl'vor, *n.* (सॅल्व्हर्)—a person or ship that saves a ship or goods from wreck. बुडणाऱ्या जहाजांतील मालाचा बचाव करणारा मनुष्य किंवा जहाज.

Săm, *n.* (सॅम्)—In phr. *Stand sam*, to bear the expense, esp. of drink. आपल्या खर्चानें (दारू) पाजणें. *S. Browne*, लष्करी अधिकाऱ्याचा पट्टा इ.

Săm'bō, *n.* (सॅम्बो)—a half-breed, esp. of Negro and Indian or European parents; (S.-) nickname for Negro. (नीग्रो व युरोपियन) आईबापांची मिश्र संतति; नीग्रोचें टोपण नांव.

Sāme, *a.* (सेम्)—uniform; unvarying, unchanged; identical; aforesaid, previously referred to. एकच, तोच, एकसारखा, तसाच; न बदलणारा; तोच तोच, सारखा; पूर्वोक्त. *The same, pron.* तोच, तीच, तेंच; *adv.* तेंच, तसेंच. *It is all, just, the same to me*, माझ्या दृष्टीनें त्यांत कांहींच फरक दिसत नाहीं. *much t. s.*, जवळ जवळ एकच,-सारखेंच. *At t. s. time*, (उलट पक्षीं) त्याचबरोबर, तसेंच, त्याच वेळीं. *Think t. s. of, feel t. s. to*, remain in the same mind regarding. (च्या विषयीं) तेंच मत असणें,-राहणें. *All t. s.*, तथापि, तथापि, तसें असलें तरी. *Just t. s.*, सारखेंच, एकच. *One and t. s.*, एकूणएक, अगदीं तोच. *Same'ness, n.* ऐक्य, अनन्यभाव, तादात्म्य, अभिन्नता. [AS, *same*, L. *similis*, Skr. *sama*, Gk. *homos*, like]

Săm'ite, *n.* (सॅमाइट)—rich medieval dress-fabric of silk. कशिदा काढलेला उंची रेशमी कपडा.

Săm'lĕt, *n.* (सॅम्लिट)—a young salmon. सामन जातीचा लहान मासा.

Sămm'y̆, *n.* (सॅमि)—(S.-Afr.) Indian who washes clothes. (द. आफ्रिकेंतील तद्देशीय) धोबी,-परीट.

Sămovär', *n.* (सॅमॉव्हा'र्)—Russian tea-urn with interior heat-tube. (उष्णतारक्षक नळी आंत असलेली) रशिअन चहादाणी. [Russ.=self-boiler]

Sā'mple, *n.* (सा'म्पल्)—specimen or pattern. मासला, नमुना. *v. t.* take or give samples of; try the qualities of. चे नमुने घेणें,-देणें; मासला-चव -चाखणें. *S. card*, card with samples of goods attached. मालाचे नमुने चिकटविलेलें पत्रक. *Sa'mpler, n.* नमुने तयार करणारा. 2 girl's piece of embroidery. कशिदा, कशिद्याचें,-भरत,-काम. [var. of *example*]

Sam'son,-pson, *n.* (सॅम्सन्)—person of great strength or resembling S. in some respect. बलभीम, बलवान् मनुष्य. *S.'s post*, (Naut.) गलबताचा मजबूत खांब. *Sam'sonite, n.* explosive. स्फोटक (द्रव्य,-अस्त्र).

Săm'urai, *n.* (सॅमुराइ)—member of military caste in old Japan, an army officer in modern Japan. प्राचीन जपानी क्षत्रिय; हल्लींचा जपानी लष्करी अधिकारी.

Sănatōr'ĭŭm, *n.* (सॅनटो'अरिअम्)—establishment for treatment of invalids; a healthy place resorted to for its climate. आरोग्यभुवन; हवा पालटण्याचें ठिकाण.

Săn'ative, Săn'atory̆, *aa.* (सॅनटिव्ह, सॅनटरि)—tending to health, curative. आरोग्यप्रद, रोगनिवारक, पथ्यकर.

Sănc'tify̆, *v. t.* (सॅंक्टिफाय)—to consecrate, to make holy; to purify from sin; justify, sanction. शुद्ध करणें; पवित्र करणें; पापमुक्त करणें; अनुज्ञा देणें, मान्यता देणें. *Sanctifică'tion, n.*

Sănctĭmō'nious, *a.* (सॅंक्टिमो'निअस्)—making a show of piety or holiness, hypocritical. दांभिक, बकध्यानी.

Sănc'tĭmony̆, *n.* (सॅंक्टिमनि)—sanctimoniousness, the mere show of devoutness. दांभिकपणा, बकध्यान.

Sănc'tion, *n.* (सॅंक्शन्)—penalty or reward attached to a law; influence that causes a rule to be observed; authoritative permission, law, decree (hist.). कायद्यानें ठरविलेला दंड किंवा शिक्षा, अधिकार; आश्रय, प्रमाण, आधार; अनुज्ञा, मंजुरी; कायदा, (राजाची) आज्ञा. *v. t.* to attach or give sanction to; to authorize or countenance or support (action). मंजुरी देणें; अधिकार देणें, मान्यता देणें.

Sănc'tĭty̆, *n.* (सॅंक्टिटि)—saintliness; sacredness or inviolability, holiness; (*pl.*) sacred obligations, feelings, etc. साधुता; पावित्र्य; पवित्रपणा, शुचिता, शुद्धता; पवित्र बंधनें,भावना.

Sănc'tūary̆, *n.* (सॅंक्चुअरि)—a place recognized as holy or inviolable; church or holiest part of it; private retreat, place of protection; a refuge; right of affording immunity; a place of safety. पवित्र ठिकाण, देवालय, देऊळ; देवळांतील गाभारा; आसरा, आश्रयस्थान; आश्रय; अभयदानाचा हक्क, अभयदान; संरक्षणाची,-बचावाची,-जागा. *To violate* or *break s.*, चर्चचा आश्रय केलेल्या माणसाला पकडणें, -मारहाण करणें. *Take, seek, s.*, निर्भयस्थानाचा आश्रय करणें. *Rights of s.*, निर्भयस्थानाचे हक्क.

Sănc'tum, *n.* (सॅंक्टम्)—a holy place; a person's private retreat or room. पवित्र ठिकाण, खासगी खोली. *S. sanctor'um*, the holy of holies. (जेरुसलेममधील ज्यू देवालयांतील) अत्यंत पवित्र गाभारा.

Săn'ctus, *n.* (सॅंक्टस्)—the hymn 'Holy, holy, holy' in the Communion. धायचलांतील एक गीत. *S. bell*, हें गीत गात असतां वाजविली जाणारी घंटा. [L, holy]

Sănd, *n.* (सॅंड)—powder produced by the wearing down of flint, &c.; shoal or submarine bank of sand, (usu. in pl.) grain of sand; (*pl.*) expanse of sand. वाळू, रेती; पुळण; पाण्याखालील वाळूचा बांध; वाळूचा कण; (अने०) वाळवंट. *v. t.* to sprinkle or mix with sand; polish with sand. वाळू पसरणें,-पेरणें; वाळू मिसळणें; वाळूनें-रेतीनें-घासणें; *S.-bag, n.* a bag filled with sand for use in

fortification or as weapon. वाळूचें पोतें. *v. t. & i.* fortify with *s.* bags, fill & place *s.* bags, hit (person) with *s.* bag. वाळूच्या पोत्यांनीं रक्षण करणें, वाळूचीं पोतीं भरून रचून ठेवणें, वाळूच्या पोत्यानें (एखाद्याला) मारणें. *S. bank*, भाट, भाटी, लाग, वाळूचा (पाण्याखालील) बांध. *S.-bar*, बंदराच्या तोंडाजवळील, नदीच्या मुखाजवळील, वाळूचा-रेतीचा-बांध. *S. bath* वाळू तापवून तिच्या योगानें सारखी आंच देण्याचें पात्र, वालुकासदन. *S. bed*, stratum of sand, वाळूचा थर. *S. box*, वाळूदाणी, वाळूचा सांचा. *S. boy*, वाळूविक्या. *S. fly*, कॅबॅर, घुंगरडें. *S.-glass*, reversible glass with sand, used in measuring time. वाळूचें घड्याळ. *S.-hill*, dune. वाळूचें टेंकाड, वाळूची रास. *S. martin*, kind nesting in sandy banks. वाळूच्या बांधांत घरटीं करणारे पक्षी. *S.-paper, n.* (लांकूड वगैरे घांसून साफ करण्याचा) वाळूचा कागद. *v. t.* वाळूच्या कागदानें घांसणें. *S.-piper*, kinds of bird haunting open wet sandy places. एक जातीचे पक्षी. *S. spout*, (वाळवंटांत वादळामुळें उत्पन्न झालेला) वाळूचा स्तंभ,-खांब. *S. stone*, rock of compressed sand. वाळूचा खडक. S. *storm*, वाळवंटांतील वाळूचे ढगच्या ढग उठविणारें वादळ. *Built on s.*, unstable. अस्थिर, नाशिवंत. *The ss. are running out*, घटका भरत आली.

Săn'dal, *n.* (सॅ'न्डल)—sole without uppers attached to the foot by thongs. खडावा, चपल किंवा पायताण (जोड). *San'dalled, a.* वहाणा-खडावा -घातलेला.

Săn'dalwood, *n,* (सॅ'न्डल्वुड)—kinds of scented wood. चंदन, चंदनाचें झाड. *Black s.*, कृष्णागरु. *Red s.*, रक्तचंदन. *Sandal tree*, मलबारांतील श्वेत चंदनवृक्ष.

Sănd'-blind, *a.* (सॅन्ड-ब्लाइन्ड)—dim-sighted. मंददर्शीचा.

Sănd'wĭch, *n.* (सॅ'न्ड्विच्)—two slices of bread with meat or other relish between; (Usu. *S. -man,-boy*) man or boy walking street with two advertisement boards hung one before and one behind. (दोन पावुग्रांमध्यें मांस वगैरेंचें रुचकर पुरण घालून केलेला) खाद्यपदार्थ; खांद्यावर मागें पुढें दोन जाहिरातीचे फलक घालून जाहिरात करणारा. *v. t.* to insert (thing, statement, etc.) between others of a different kind. मध्येंच (नवीन पदार्थ, गोष्ट) घुसडून देणें. S.-*board*, मागेंपुढें जाहिराती असलेल्या फलकांची जोडी. [*f. Earl of S.*, said to have eaten slices of bread and toast while gaming for 24 hrs]

Sănd'y̆, *a.* (सॅ'न्डि)—abounding in sand; (of hair) yellowish-red, (person) with such hair. वालुकामय, रेतीचा, रेताड· तांबूस-पिवळे अशा केंसांचा, स्कॅान्चमन.

Sane, *a.* (सेन्)—of sound mind; not mad; (of views) moderate, sensible. शुद्धीवर असलेला, हुशार; नेमस्त, शहाणा, समजुतदार.-*ly, adv.*

Sang, *pa. t.* of Sing.

Sang-froid, *n.* (सॉफ्वां)—coolness in danger or difficulty. मनाची शांति, संकटाच्या वेळची धीरोदात्तता, मनःशांतता. [F]

Săngwifica'tion, *n.* (सॅंग्विफिके'शन्)—formation of, conversion of, food into blood. अन्नरसाचें रक्त करणें, रक्तोत्पादन, रक्तीकरण. [L. sanguis, blood]

Săng'uĭnarў, *a.* (सॅं'ग्विनरि)—attended by or delighting in bloodshed. रक्तपातानें भरलेला; रक्तप्रिय, हिंस्र, खुनी, खुनशी.

Săng'uĭne, *a.* (सॅं'ग्विन्)—habitually hopeful, optimistic, anticipating the best; bright and florid, blood-red; of blood. आशापूर्ण, उत्साही, अवसानी; लाल, लालभडक, लालबुंद; रक्ताचा. *n.* crayon coloured red with iron oxide; a drawing in red chalk. रंगाची तांबडी कांडी; तांबड्या खडूनें काढलेलें रेखाचित्र. *v. t.* (*poet.*) to stain with blood; stain red. रक्ताचे डाग पाडणें, रक्त शिंपडणें; लाल डाग पाडणें. *Sang'uinely, adv.* उमेदीनें, आशेनें. *-ness, n.*

Sănguĭn'ĕous, *a.* (सॅंग्वि'निअस्)—of blood; of full-blooded temperament; blood-coloured, of red colour. रक्ताचा; पूर्ण उमेद असलेला; रक्तासारखा लालभडक.

Săn'hĕdrĭm, *n.* (सॅ'निड्रिम्)—supreme council and court of justice in ancient Jerusalem, of 71 members. (प्राचीन) यहुदी लोकांची वरिष्ठ सभा.

Săn'ĭtarў, *n.* (सॅ'निटरि)—of the conditions that affect health, esp. with regard to dirt and infection. आरोग्यरक्षणविषयक, आरोग्यखात्याचा. *Sanitar'ian, n.& a., San'itariness, n.*

Sănĭtā'tion, *n.* (सॅनिटे'शन्)—improving of sanitary conditions, hygiene. आरोग्यरक्षण, आरोग्यवर्धन, आरोग्य, आरोग्यविज्ञान.

Săn'ĭtў, *n.* (सॅ'निटि)—saneness, mental health; tendency to avoid extreme views. सावधपणा, शुद्धि, शहाणपण, नेमस्तपणा, नियमितपणा.

Sank, *pa. t.* of Sink.

Săns, *prep.* (सॅन्झ्)—(arch.) without. शिवाय. *Sans -culotte'*, (breechless) republican of lower classes in French Revolution. फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळचा खालच्या वर्गांतील लोकशाहीमतवादी.

Săn'ta Claus', *n.* (सॅ'न्टा क्लॉ'झ्)—personage who fills children's stockings with Christmas presents by night. लहान मुलांना (नकळत रात्रीच्या वेळीं) ख्रिसमसच्या देणग्या देणारी वृद्ध पूज्य व्यक्ति, आजोबा.

Săp, *n.* (सॅप्)—the vital juice of plants; (*fig.*) vitality; (also s.-wood) soft outer layers of wood. वनस्पतीचा जीवनरस, रस, अर्क; सत्त्व, जीव, दम; लांकडाचा बाह्य नरम थर, साल, त्वचा. *v. t.* to drain of sap; exhaust the vigour of; remove sapwood from (log). जीवनरस काढून-शोषून-घेणें; त्याचा जोर,-दम,-नाहींसा करणें; (लांकडाच्या ओंडक्याची) बाह्य त्वचा-साल काढणें. *Sap-head*, (U. S.) foolish person. मूर्ख मनुष्य. *S.-less*, esp. an effete.

निर्वीर्य, फलहीन. *Sa'pling,* रोपटें, लहान झाड ; (*fig.*) तरुण, जवान. *S.-green,* हिरवट रंग. *Sa'ppy, a.* full of sap. जीवनरसपूर्ण, दमदार. *Sap-ful,-less, aa.*; *sapp'iness, n.*

Săp, *n.* (सॅप्)—digging of siege-trenches ; covered siege-trench ; (sl.) studious or hard-working person ; (*fig.*) slow undermining of belief, resolution , etc. वेढ्याचे ठिकाणीं 'खंदक खणणें ; अच्छादित खंदक ; अभ्यासू किंवा कष्टाळू मनुष्य ; हळू हळू नाश, विध्वंस, सुरुंग लावणें. *v. t. & i.* to approach (place) by sap ; dig siege, trenches ; undermine (wall etc.) ; destroy (faith) insiduously ; (sl.) work hard at books, etc. खंदकावरून (जवळ) जाणें, खंदक खणणें ; सुरुंग लावून उडविणें ; नाश करणें ; विश्वासघातानें-न कळत-(विश्वास, श्रद्धा, इ०) नाहींसें करणें ; मेहनत करणें. *Science was sapping old beliefs,* शास्त्रीय ज्ञानानें जुन्या समजुतींचा ऱ्हास होऊं लागला. *Sapp'er, n.* (esp.) private of the Royal Engineers. खंदक खोदणारा. *S. and miner,* किल्ले बांधणें व सुरुंग लावणें या कामावरील (ब्रिटिश) शिपाई.

Săp'an-wood,-pp-, *n.* (सॅपन्वुड्)—wood yielding red or yellow dye from tropical Asia and the Indian Archipelago. पतंगाचें लाकूड, पतंग.

Săp'ĭd, *a.* (सॅपिड्)—having (esp. agreeable) flavour, savoury ; not tasteless ; (of talk, writing) not uninteresting. चवदार, रुचकर, स्वादिष्ट ; चित्तवेधक, मन आकर्षणारें. *Sapid'ity, n.* रुचि, स्वाद, चव. [ L. *sopidus,* tasty ]

Sā'pience, *n.* (सेपियन्स,से-)—wisdom ; knowledge, sageness. शहाणपणा ; ज्ञान, शहाणपणाचा आव,-चें ढोंग.

Sa'pient, *a.* (से'पिएन्ट्,सॅ-)—aping wisdom, like a wiseacre, would-be wise. शहाणपणा मिरवणारा, चतुर, शहाणा. *Sapien'tial, a.* of wisdom. शहाणपणाचा.

Săpona'ceous, *a.* (सॅपने'शस्)—soapy, of, like, containing soap, साबणासारखा, साबणाचा, फेसाळ.

Săpph'ic, *a.* & *n.* (सॅफिक्)—of Sappho (Lesbian lyric poetess, 600 B. C.). सॅफो नामक कवयित्रीचें, -संबंधीं. *S.-stanza,-verse,* सॅफोनें केलेली ग्रीक कविता. *S. vice* , *sapphism, n.* unnatural sexual relations between women. स्त्रियांचा आपापसांतील अनैसर्गिक संभोग.

Săpph'ire, *n.* (सॅफायर्)—a transparent blue precious-stone, a rich blue colour ; kinds of humming bird. इंद्रनील मणि, नील (रंग) ; गाणारा पक्षी. *a.* of *s.* blue. नीलवर्णाचा. *Sapphi'rine, a.*

Săp'r(o),-(सॅप्रो)—comb. form of Gk *sapros,* rotten, in scientific terms ; *saprae'mia,* septic poisoning. रक्त सडविणारें, रक्ताचा पू बनविणारें-विष, पूयजन्य ताप. *Saproge'nic,* कुजविणारा, कुजण्यामुळें झालेला. *Sap'rophile, a. & n.* कुजलेल्या पदार्थांतला (जंतू). *-phyte, n.* कुजलेल्या खतावर-खतामुळें-वाढणारी वनस्पति, -झाड.

Săratō'ga, *n.* (सॅरटोगा)—lady's large travelling trunk. स्त्रियांची मोठी प्रवासी पेटी.

Sarc'ăsm, *n.* (सार्‌कॅझम्)—a taunt ; bitter or wounding remark. टोमणा, टोला ; तिखट किंवा वर्मी भाषण.

Sarcăs'tic, *a.* (सार्कॅस्टिक्)—containing sarcasm ; bitterly satirical. टोमण्याचा, वर्मी ; तिखट, झोंबणारा. *-tically, adv.*

Sarcō'ma, *n.* (सार्कोमा)—(pl.-ata), tumour of embryonic connective tissue. आवाळूं, चाळूक, टेंगूळ.

Sarcŏph'ăgŭs, *n.* (सार्कॉफगस्)—(pl.-gi), a stone coffin, a stone chest for receiving a dead body. प्रेताची दगडी पेटी.

Sarc'ous, *a.* (सार्कस्)—consisting of flesh or muscle. मांसल, स्नायुयुक्त. [ Gk *sarkos,* flesh ]

Sard, *n.* (सार्ड्)—a variety of cornelian. आरक्तक, मौल्यवान रत्न.

Sardŏn'ic, *a.* (सार्डॉनिक्)—grimly jocular ; full of bitter mockery. कटु थट्टेचा ; छद्मी, उपरोधिक.*-ically, adv.*

Sărd'onȳx, *n.* (सार्डोनिक्स्)—onyx in which layers alternate with sard. गोमेद, गोमेदक.

Sărgăss'ō, *n.* (सार्गॅसो)—(*pl.-os*), kinds of floating sea-weed. तरंगणारी समुद्र-वनस्पति ; गवत.

Sarsaparill'a *n.* (सार्सपरिला)—kinds of smilax ; drug made from their roots. एक प्रकारची वनस्पति, तिच्या मुळापासून केलेलें कषाय,-रक्तशुद्धि करणारें औषध.

Sārs'enĕt, sar'c-, *n.* (सार्स्‌नेट्)—soft silk fabric used in lining. (अस्तरासाठीं) तलम रेशमी कापड.

Sărtŏr'ial, *a.* (सार्टॉरिअल्)-of tailors or clothes. शिंप्याचा, शिवणकामाचा, कपड्यांविषयीं.

Săsh, *n.* (सॅश्)—a scarf worn round the waist as part of uniform or as an ornament ; the frame holding window-glass usu. made to slide up and down in grooves. कमरबंद, कमरपट्टा ; खिडकीची (खालीं वर करितां येणारी) तावदानी चौकट. *Sash'ed, a.*

Săss'afras, *n.* (सॅसफ्रस्)-small N. Amer. tree with medicinal bark. (उ. अमेरिकें०) लहान औषधी सालीचें झाड.

Sat, *pa. t.* of Sit.

Sā'tan, *n.* (सेटन्)—personal name for the Devil. सैतान. *Sa'tanism, n.* सैतानीपणा, हेतुपूर्वक दुष्टपणा.

Satăn'ic, *a.* (सटॅनिक्)—diabolical. सैतानी, भयंकर, अतिदुष्ट. *His s. majesty,* satan. सैतानशहा. *S. school,* (बायरन, शेले वगैरे) इंग्लिश धर्मश्रद्धाशून्य कवींचें मंडळ ; धर्मश्रद्धाशून्य लेखकवर्ग.

Sătch'el, *n.* (सॅचेल)—a small bag of leather ; a school bag. जुजदान, पिशवी. *Satch'elled, a.*

Sāte, *v. t.* (सेट्)—to gratify to the full ; to cloy, to surfeit. परितृप्त करणें ; वीट आणणें, विटवणें, पुरेपुरेसें होणें. *Sated with,* च्या अतिरेकानें विटलेला. *Sate'less, a.* (poet.) अतृप्त.

Sateen', *n.* (सटीन्)—glossy cotton or woollen fabric. झगझगीत सुती किंवा रेशमी कापड.

Săt'ellite, *n.* (सॅटेलाइट्)–hanger-on, dependant; (Astron.) planet revolving round another. लाळघोट्या, बगलबच्चा, आश्रित ; उपग्रह. *Satellitic, a.*

Săti'āte, *v. t.* (सेशि'एट्)–to feed to the full. परितृप्त करणें. *a.* (से'श्यट्) अतितृप्त, विटलेला. *Sa'tiable, a.* (rare), तृप्त होण्यासारखा ; *satia'tion, n.*

Sati'etÿ, *n.* (सटा'यिटि)—glutted state, feeling of having had too much. तृप्तता, वीट, परितृप्ति.

Săt'in, *n.* (सॅ'टिन्)-silk fabric with glossy surface on one side. एक जातीचें रेशमी कापड. *a.* smooth as satin. सॅटिनसारखें मऊ. *v. t.* to give glossy surface to (paper). (सॅटिनसारखा) तुळतुळीत करणें. *Denmark s.*, स्त्रियांच्या जोड्यांसाठीं वापरण्याचें मऊ सुती कापड. *White s.*, एक जातीचें झाड, वनस्पति ; एक जातीचा पतंग. *S. finish*, चांदीवरील झिलई. *S. paper*, मऊ गुळगुळीत (लिहिण्याचा) कागद. *Sat'inet,—ette*, पातळ सादीनसारखें कापड. *Sat'iny, a.*

Săt'in-wood, *n.* (सॅ'टिन्वुड्)—choice wood of a tropical tree. हेद, हेदू, हेदरू (याच्या पेट्या करतात.)

Săt'ire, *n.* (सॅ'टायर्)—composition in which vice or folly is held up to ridicule; this branch of literature; use of ridicule, sarcasm or irony to expose folly; thing that brings ridicule upon something. औपरोधिक किंवा दुर्गुणनिवारमक लेख किंवा काव्य ; औपरोधिक वाङ्मय ; थट्टा, निंदा, उपहास.

Sati'ric, *a.* (सॅटि'रिक्)—of or containing satire, sarcastic, bitter. औपरोधिक, उपहासात्मक, निंदात्मक, थट्टेचा.—*al, a.* औपरोधिक, निंदापर ; निंदाप्रचुर-औपरोधिक-लेख लिहिणारा,-वक्ता.

Săt'irist, *n.* (सॅ'टिरिस्ट्)—a writer of satires, one who satirizes. उपहासात्मक लेख लिहिणारा, औपरोधिक लेखक,-कवि,-वक्ता.

Săt'irize, *v. t.* (सॅटि'राइझ्)—to assail with satire, censure in a satiric manner. औपरोधिक लेखांचा भडिमार करणें.

Sătisfăc'tion, *n.* (सॅटिस्फॅ'क्शन्)—satisfying or being satisfied, thing that satisfies desire or gratifies feeling; gratification of desire; payment of debt; atonement; amends for injury. इच्छा पुरी करणें,-होणें ; समाधानाची,-इच्छा तृप्ति करणारी,-गोष्ट ; समाधान, संतोष ; (कर्जाची) फेड ; प्रायश्चित्त ; (ख्रिस्तानें घेतलेलें) देहान्त प्रायश्चित्त ; मोबदला, भरपाई.

Sătisfăc'torÿ, *a.* (सॅटिस्फॅ'क्टरि)—causing satisfaction; adequate. समाधानकारक, मनाजोगा ; योग्य, संशयनिवर्तक.-*torily, adv.* समाधानकारक रीतीनें ; खात्री होईल अशा रीतीनें.—*toriness, n.* समाधानकारकता.

Săt'isfÿ, *v. t. & i.* (सॅ'टिस्फाय्)—to meet the wishes of, to content; be accepted as adequate; to pay; to fulfil, to comply with; to still the cravings of; to convince; to be sufficient; (of Christ) make atonement for sins of men. (मनोरथ) पूर्ण करणें ; तृप्त करणें ; पूर्णता होणें,-पावणें ; (कर्जाची) फेड करणें ; (आट) पुरी करणें ; समाधान करणें ; खात्री करणें ; संशय फेडणें ; पुरा किंवा भरपूर असणें ; (लोकांच्या पापांसाठीं) देहान्त प्रायश्चित्त घेणें, पापनिष्कृति करणें. *Rest satisfied*, make or take no further demands or steps, एवढ्यानेंच तृप्त व्हा, स्वस्थ करा, अधिक मागणी करूं नका. *To satisfy the examiners*, at univ., receive pass without honours. परीक्षेंत (तिसऱ्या वर्गांत) पास होणें. *Satisfiable, a.*; *Satisfying, a.*

Săt'rap, *n.* (सॅ'ट्रप्)—ancient Persian provincial governor; modern subordinate ruler (with implication of tyranny or luxury). प्राचीन पर्शियांतील इलाखाधिपति ; (ऐषआरामांत दिवस घालवणारा) जुलमी गव्हर्नर,-अधिकारी,-राजा.

Săt'ūrate, *v. t.* (सॅ'च्युरेट्)—to fill with moisture, soak, steep; to imbue with or steep in learning, traditions, &c. पुरा भिजविणें, उमलवणें, संपृक्त करणें ; मुरणें, गढून जाणें. *Sat'urated, pa. p.* (of colour) free from admixture of white, full, rich. गर्द, पूर्ण (रंग), संपृक्त. *Sat'urable, a.* *Satura'tion, n.* पुरा भरणें, संपृक्त करणें, (जलादि द्रवांत एखादा क्षार) शक्य तितका विरघळणें.

Săt'ūrday, *n.* (सॅ'टर्डे)—the seventh day of the week, the day of the Jewish sabbath. मंदवासर, शनिवार. *S.-to-Monday*, the week-end. आठवड्याच्या शेवटची रजा,-रजेचे दिवस.

Săt'ūrn, *n.* (सॅ'टर्न्)—Roman god of agriculture; a planet. रोममधील शेतकीची देवता ; शनि, शनैश्चर.

Săturnā'lia, *n. pl.* (सॅटर्ने'लिआ)—Roman festival of Saturn in December (S–); scene or time of wild revelry. रोमन लोकांचा शनि-देवाचा उत्सव ; त्या उत्सवांतील चैनबाजीचा देखावा किंवा समय, धागडधिंगा, शिमगा. -*lian, a.*

Saturn'ian, *a.* (सट'र्निअन्)—of Saturn. शनीचा, शनिग्रहाचा. *n.* an inhabitant of Saturn. शनिग्रहावरील रहिवासी. *S. verse*, a native Roman verse. प्राचीन रोमन छंद.

Satur'nic, *a.* (सट'र्निक्)—(path.) affected with lead poisoning. शीस-दोष झालेला.

Săt'ūrnine, *a.* (सॅ'टर्नाइन्)—of a sluggish gloomy temperament, morose, grave. जड, मंद, उदासीन.

Săt'yr, *n.* (सॅ'टर्)—one of the half-human half-bestial woodland beings in the train of Bacchus; a lustful or beastly-minded man; (rare) orangutan. (अर्धपशु,-अर्धनर अशा प्राचीन ग्रीक किंवा रोमन) वनदेवतांपैकीं एक ; प्रबल कामेच्छू किंवा पशुतुल्य मनुष्य ; नर-वानर.

Sauce, *n.* (सॉस्)—a liquid added to food to give relish, a condiment; (fig.) something that adds piquancy; a solution of salt and other ingredients used in some manufacturing processes; sauciness, impertinent speech, cheek; (U. S.) compote of fruit. चटणी, कोशिंबीर, तोंडीलावणें, मीठतिखट, लज्जत आणणारी गोष्ट ; मालमसाला, मसाला ; उद्धटपणा, उमेटपणा, ताठ भाषण, औद्धत्य ; फळांचें आसव,-सरबत. *v. t.* to add sauce to; (*fig.*) make piquant; speak saucily

to. मीठमिरची लावणें, मसाला घालणें, चवदार करणें; झणझणीत-चुरचुरीत-करणें ; उर्मटपणानें बोलणें. *Hunger is the best s.*, भूक हेंच खरें तोंडीलावणें आहे, भुकेला कोंडा. *To serve with the same s.*, जशास तसें करणें, -पागणें. *Serve for s.*, कोरड्यास होणें,-उपयोगी पडणें. *S. boat*, तोंडीलावणें,-चटणी,-वाढण्याचें भांडें. *S. box*, an impudent person. उद्धट मनुष्य. *S. pan* cooking pot with lid and handle. कढई.

Sau'cer, *n.* (सॉ'सर्)—*a curved plate placed under a cup or flower-pot.* बशी, थाळें. *Saucer-eyed*, पटवटीत डोळ्यांचा.

Sau'cy̆, *a.* (सॉ'सि)—impudent to superiors, cheeky; (*sl.*) smart. उद्धट, ताकून बोलणारा ; ऐटीचा, तोऱ्याचा, भपकेबाज.-*cily, adv.*;-*ciness, n.* उर्मटपणा, तोरा, गमजा.

Saun'ter, *v. i.* (सॉन्टर्)—to walk in a leisurely way, to wander or stroll about idly, (also fig.). भटकणें, रमत रमत फिरणें; चैनींत दवडणें,-काल घालविणें. *n.* a leisurely gait. रमत रमत चालणें, चैनींत भटकणें. *Saun'teringly, adv. Saun'terer, n.*

Sau'sage, *n.* (सॉ'सिज्)—minced meat enclosed in case of thin membrane; (army sl.) kite-balloon. कबाब, किंवा कुल्या वासारखें पक्वान्न; टेहेळणीचें लष्करी विमान.

Sauterne', *n.* (सोटर्न्)—kinds of sweet white French wine. पांढरी फ्रेंच दारू,-मद्य.

Săv'age, *a.* (सॅ'व्हिज्)—uncivilized; in primitive state; fierce, cruel; (colloq.) angry; (Herald. of human figure) naked. अशिक्षित; जंगली, रानटी; क्रूर, निर्दय; रागीट, क्रुद्ध; नग्न (मनुष्याकृति). *n.* a member of savage tribe esp. of one living by hunting and fishing; brutal or barbarous person. रानटी मनुष्य, जंगली, रानटी स्थितींतील मनुष्य; मांगहृदयी, राक्षस. *v. t.* (of horse, etc.) attack and bite or trample (person). चावणें, पायांखालीं तुडविणें, लाथाडणें. *Sav'agery, n.* savage condition or state. रानटीपणा, क्रूरपणा, रानटी स्थिति. *Sav'agely, adv. Sav'ageness, n.* रानटीपणा, जंगलीपणा, क्रूरपणा.

Savănn'ah, *n.* (सव्हॅ'ना)—a tree-less plain, great tract of meadow-like land, esp. in tropical America. (मध्य अमेरिकेंतील) गवताळ रान,-कुरणाचा भाग.

Săv'ănt, *n.* (सॅ'व्हाद्)—a man of learning, esp. a distinguished scientist. विद्वान मनुष्य, पंडित, शास्त्रज्ञ.

Sāve, *v. t. & i.* (सेव्ह्)—to rescue or preserve from danger or harm; to keep for future use, husband, reserve; to lay (money) by; bring about the spiritual salvation of; reduce requisite amount of; (Football, etc.) avert a threatened score; avoid losing, be in time for, succeed in catching; make reservation; relieve from need of expending (money, trouble, etc.) or from exposure to (annoyance, etc.). बचाव किंवा रक्षण करणें, वाचवणें; शिल्लक टाकणें, राखून ठेवणें; (पैसा) शिल्लक ठेवणें; तारणें, उद्धार करणें, नरकापासून-पापापासून-वांचवणें; उरवणें, बचत करणें; (खेळांत मोठा डाव) होऊं न देणें, प्रसंग टाळणें; गांठणें, पकडणें, (चें) टिपण साधणें; फट,-सवड,-ठेवणें; सोडवणें, निवारणें. *n.* an act of saving in football, etc. (फूटबॉल वगैरे खेळांत) डाव बचावणें, पडलेली बाजू कांहींशी सावरणें, ऐनवेळचा बचाव. *prep.* except, but. शिवाय, खेरीज, वांचून. *Conj.* but. शिवाय. *S. me* or *God s. me from my friends*, वेळीअवेळीं अतिस्नेहामुळें सतावणाऱ्या मित्रांपासून मला सोडव! *S. us!*, (आश्चर्यदर्शक उद्गार). *To s. the situation*, संकट टाळणें, वेळ मारून नेणें, बाजू सावरणें. *To s. appearances*, वरकरणी बहाणा करणें (वाईट स्थिति लपविण्याकरितां). *To s. one's breath*, मौन धरणें, गप बसणें. *S. up*, काटकसर करून शिल्लक टाकणें. *You may s. your pains* or *trouble*, श्रम-तसदी-घेऊं नका,-घेणें व्यर्थ आहे. *A stitch in time saves nine*, वेळेवर एक टांका मारला तर पुढचे नऊ टांके तो वांचवितो. *Shall we s. the tide*, भरती असेपर्यंत आपण पोंचूं काय. *Sav'able, a., Sav'er, n.*

Sā'vĭng, *a.* (से'व्हिंग)—(esp.)making a reservation or exception; redeeming. मितव्ययी, हात राखून खर्च करणारा; तारणारा, उद्धारकर्ता, रक्षण करणारा. *n.* (*esp.*) something saved; (*pl.*) an amount of money put by, small sums accumulated by economy. शिल्लक ठेवलेली वस्तु; (अने०) शिल्लक टाकलेले पैसे. *Sa'vings-bank*, शिलकी पैसे सुरक्षित ठेवण्याची (पोष्टाची) पेढी,-बँक.

Săv'eloy, *n.* (सॅ'व्हलॉय)—a highly-seasoned dried sausage. उत्तम मांसान्न,-पक्वान्न.

Sā'viour, *n.* (से'व्ह्यर्)—a deliverer, a redeemer. तारक, त्राता, रक्षणकर्ता. The Saviour, येशू ख्रिस्त.

Savoir faire, *n.* (सॅ'व्हवॉर् फेअर्)—quickness to see and do the right thing; address, tack. प्रत्युत्पन्नमति; कौशल्य, हजरजबाबीपणा. [F]

Sā'vorȳ, *n.* (से'व्हरि)—aromatic kitchen herb. एक प्रकारची स्वादिष्ट वनस्पति;-भाजीपाला.

Sā'vour, *n.* (से'व्हर्)—characteristic taste or smell; admixture or suggestion of some quality. स्वाद, रुचि; चव, विशेष गुण. *v. i.* to have a particular taste; to suggest the presence of. विशेष रुचि असणें; चुणूक दाखविणें.

Sā'vourȳ, *a.* (से'व्हरि)—having a good savour, with appetizing taste or smell. स्वादिष्ट, खमंग, रुचकर, चवदार. *n.* मिष्टान्न, पाचक पदार्थ.

Savoy', *n.* (सव्हॉ'य)—a kind of cabbage. एक कोबीसारखा कंद.

Saw, *pa. t.* of See.

Saw, *n.* (सॉ)—an old saying, a maxim. म्हण; न्याय, आहाणा.

Saw, *n.* (सॉ)—an implement with toothed edge for cutting wood, etc.; (zool.) serrated organ or part. करवत, करवती, आरी; करवतीसारखे दांते

असलेला अवयव,-भाग. *v. t. & i.* (*pa. p. sawn, sawed*), to cut or make with saw; make to-and -fro motion like a hand-saw; (Book-bind.) make incisions to receive binding-bands in (gathered sheets). करवतीनें कापणें,-चिरणें, चिरकाम करणें; (हातकरवतीसारखें) पुढें-मागें-जाणें,-सरकणें; (पुस्तकाचीं पानें बांधतांना त्यांच्या पाठीला) खांचें पाडणें. *Annular, crown, cylinder, s.,* वाटोळें भोंक पाडण्याचें यंत्र,-गिरमिट. *Band s.,* पट्ट्यासारखी चालणारी करवत. *Bow s.,* धनुष्याकार-वक्र-करवत. *Circular s.,* वर्तुलाकार करवत. *Cross-cut s.,* मोपे-वाढ-कापण्याची करवत. *Fret s.,* नकशी कापण्याची करवत. *Hack s.,* लोखंड वगैरे धातु कापण्याची करवत. *Hand s.,* हातकरवत. *Jig-s.,* frame-s. worked mechanically in connection with table holding the wood etc. यंत्र -करवत, यांत्रिक करवत. *Jig. s.-puzzle,* यांत्रिक करवतीनें कापटेलें निरनिराळे तुकडे जोडण्याचें कोडें. *Pit s.,* एक इसम खोलांत व एक लांकडावर घसून ओढण्याची चिरकामी करवत. *S. bones,* (*sl.*) a surgeon. शस्त्रक्रिया करणारा (डॉक्टर). *S. buck, s.* horse, कापावयाचें लांकूड धरणारा घोडा,-ठोकळा. *S.-doctor,* करवतीचे दांते काढण्याचें यंत्र. *S.-dust,* (चिरकामांतील) भूस, भुसा. *To let the s.-dust out of,* (*fig.*) च्या पोकळपणा बाहेर काढणें,-उघडा करणें. *S.-fish,* असिपत्र-मत्स्य, करवतीच्या पात्यासारखी सोंड असलेला मासा. *S.-fly,* क्रकमक्षिका. *S.-frame,-gate,* करवतीची (लांकडी) मूठ. *S.-horse,* (चिरकामाकरितां) लांकूड ठेवण्याचा घोडा, पायखोडा. *S.-mill,* लांकडाच्या चिरकामाची गिरणी. *S.-pit,* pit in which lower of two men working two-handed saw stands. दोन चिरकाम्यांपैकीं खालच्या इसमासाठीं सखल जागेत बसण्याचा खड्डा,-सखल जागा. *S.-set, S.-wrest,* करवतीचे दांते घासण्याचें यंत्र,-साधन. *S.-wort,* करवती -पानाचें झाड (यापासून पिवळा रंग काढतात). *S.-wrack,* करवतधारी समुद्रवेत,-वनस्पति.

Saw'der, *n.* (सॉ'डर्)—*Soft s.,* compliments, flattering speeches. स्तुतिवर्षाव, प्रशंसापर भाषणें.

Saw'yer, *n.* (सॉ'यर्)—a workman who saws timber; (*U. S.*) an uprooted tree floating or stranded in river; name of a New Zealand beetle. चिरकाम्या, करवत्या; नदींतून वाहणारा-अडकून राहिलेला-उपळलेला वृक्ष; न्यूझिलंडमधील एक किडा.

Sa'xatile, *a.* (सॅ'क्सटिल्)—(nat. hist.) living, growing, on or among rocks. खडकांत राहणारा,-वाढणारा.

Săxe, *n.* (सॅक्स)—a kind of photographic paper; a shade of dull blue. एक जातीचा (फोटोग्रफीच्या उपयोगी) कागद; गर्द निळ्या रंगाची छटा.

Săx'ifrage, *n.* (सॅ'क्सिफ्रेज्)—kinds of Alpine or rock plant. एक खडकावर वाढणारें झाड,-वनस्पति.

Săx'on, *n.* (सॅ'क्सन्)—member, language, of a Teutonic people by whom parts of England were occupied in 5th-6th cc.; a native of Saxony; an Anglo-saxon. (उत्तर जर्मनींतून इंग्लंडवर स्वारी करणाऱ्यांपैकीं) सॅक्सन मनुष्य, त्याची भाषा; सॅक्सनी प्रांताचा रहिवासी; अँग्लोसॅक्सन मनुष्य *a.* of the Saxons; in Saxon. सॅक्सनलोकांचा, सॅक्सन भाषेंतील.

Săx'ony, *n.* (सॅ'क्सनि)—a fine wool or cloth made of it. उत्तम प्रकारची लोंकर,-लोंकरी कापड. [f. *S.* in Germany]

Săx'ophōne, *n.* (सॅ'क्साफोन्)—a powerful keyed brass reed instrument with large inverted bell. एक मोठ्या आवाजाचें पितळी वाद्य.

Say, *v. t. & i.* (से)—(*pa. t. & pa. p. said* सेड्), to utter or recite in speaking voice; to state, promise; to speak, tell, express; adduce, plead; repeat, rehearse; form and give opinion or decision as to; select as example, assume, as near enough. म्हणणें, बोलून दाखविणें; सांगणें, वचन देणें; बोलणें, शब्दांनीं व्यक्त करणें; पुढें मांडणें,-आणणें; म्हणून दाखविणें, पुन्हां म्हणणें; मत सांगणें, अभिप्राय-मत-देणें, समजणें, कल्पना करणें. *n.* what one has to say, speech, statement; opportunity of saying. बोलणें, भाषण, बोलण्याची संधि, मत. *To s. the word,* तोंडावाटें (हुकमाचा) शब्द काढणें, इच्छा व्यक्त करणें. *S. no more,* बोलणें आटप; गप बस. *S. a good word for,* ची तारीफ-प्रशंसा-करणें. *S. no, yes,* म्हणणें नाकारणें,-स्वीकारणें. *S. out,* express fully or candidly. पूर्णपणें किंवा मोकळ्या मनानें-स्पष्टपणें-बोलून दाखविणें. *S.* one *nay,* ला नाहीं म्हणणें,-नकार देणें. *Had said his s.,* त्याला म्हणायचें तें त्यानें सर्व म्हटलें, त्याचें बोलणें संपलें. *To s. lesson.,* शिक्षकाला धडा म्हणून दाखविणें. *That is to s.,* म्हणजे, दुसऱ्या शब्दांत (बोलावयाचें तर). *Saying and doing,* speech and action. बोलणें (शब्द) आणि कृति (वागणें). *They say, it is said,* असें म्हणतात कीं. *It goes without saying,* तें अगदीं स्पष्ट आहे,-सांगण्याची आवश्यकता नाहीं. *You may well s. so.,* तुम्ही असें खुशाल म्हणावें,-असें म्हणणें रास्तच आहे,-होईल. *Let him have his s.,* त्याला बोलण्याची संधि मिळावी, त्याचें मत कळूं दे.

Say'ing, *n.* (से'इंग)—(*esp.*) a common remark, a maxim. म्हण, गोष्ट, बोलणें, म्हणणें, आहाणा.

Scăb, *n.* (स्कॅब्)—a crust formed over a sore in healing; kinds of skin-disease and plant-disease; black-leg. खपली; खवडा, कोशेरा; संपांत सामील न होणारा कामगार, संपवाल्याच्या जागीं काम करणारा मजूर. *v. i.* to form scab, heal over. खपली धरणें;-पडणें. *Scabb'y, a.* खवड्या, खपल्या धरलेला.

Scăbb'ard, *n.* (स्कॅ'बर्ड)—a sheath of sword, &c. म्यान, कोष. *To fling, throw away, the s.,* तलवार म्यानाबाहेर काढणें, एखाद्या गोष्टीचा सोक्षमोक्ष करण्याचा विडा उचलणें. *S.-fish,* a silvery-white sea-fish shaped like sword-s. (तलवारीच्या म्यानाच्या आकारासारखा) चकचकीत पांढरा मासा, कोपमत्स्य.

Scā'bies, *n.* (स्के'बिईज्)—the itch. खरूज, खवडे. [L. *scabere*, scratch]

Scā'bious, *a.* (स्के'बिअस्)—scabby, affected with mange, itch, etc. खवड्या; खरूज-नायटा-झालेला.

*n.* kinds of wild and cultivated flowering herb. ( खरजीवर रामबाण ) औषधी वनस्पति.

**Scă'brous,** *a.* ( स्के'ब्रस् )—( Zool., Bot., etc. ) with rough surface, scurfy; ( Literature; of subject, situation, etc. ) requiring tactful treatment; hard to handle with decency. खडबडीत ( अंगाचा ), खरखरीत, खरलोमश ( उ० खरवतीचा पाला ); ( विषय, परिस्थिति ) नाजुक, खुबीनें रंगविण्या-मिटविण्याजोगी. *-ness, n.*

**Scăff'old,** *n.* ( स्कॅ'फॉल्ड् )—the temporary platform supported on poles for the use ot builders; the platform on which a criminal is executed. माळा, परात, परांची, सांगाडा; फांस. *v. t.* to attach scaffolding to ( house ). ( घराला ) परांची-पराती-बांधणें. *The s.,* फांसावर लटकणें, फांशी.

**Scăff'ōlding,** *n.* ( स्कॅ'फोल्डिंग् )—a structure of poles and planks providing builders with platforms; timber for it. परांची, माचा, परात; परातीचें लाकूड-सामान.

**Scaglio'la,** *n.* ( स्कॅल्यो'ला )—Italian plaster-work imitating stone. ( दगडी कामासारखें दिसणारें ) इटालिअन गिलाव्याचें काम.

**Scāl'able,** *a.* ( स्के'लबल् )—that may be scaled or climbed. चढण्यासारखा, चढून जातां येण्याजोगा.

**Scalăr'iform,** *a.* ( स्कॅलॅ'रिफार्म् )—( bot., zool. ) ladder-shaped. निःश्रेण्याकार; पृष्टभागावरच्या आडव्या धारा रेघा दाखविणान्या ( रसनलिका किंवा शिरा ) ( उ० सुरू, गौरीचे केस ).

**Scald,** *v. t.* ( स्काल्ड् )—to injure or pain with hot liquid; to heat ( milk ) to near boiling-point; cleanse by rinsing with boiling water. भाजणें, पोळणें; कढवणें, उकळी फुटेपर्यंत तापवणें; उकळत्या पाण्यानें धुवून साफ करणें. *n.* injury to skin by scalding. अंग पोळणें, भाजणें, चरका. *Scalding tears,* ( अति दुःखाचे ) ऊन अश्रू. *Scalded cream,* चांगल्या तापवलेल्या दुधावरची साय. *Scald-head,* चाई, उंदरी ( रोग ).

**Scāle,** *n.* ( स्केल् )—a thin horny overlapping plate protecting the skin of fishes, &c.; a thin plate or flake,scale; ( without a or pl. ) tarter on teeth, incrustation etc. ( माशाचा वगैरे ) खवला; पापुद्रा; उकीरखळी, कवेद, टरफल; कोशेटा; बुरा, बुरी, बुरशी *v. t. & i.* to remove scales or scale from, ( of skin, etc. ) form or come off in scales. खवले,-खवला,-काढणें; ( बाटाणे वगैरे ) सोलणें; दांत घुणें; बुरशी काढणें; गम काढणें; पापुद्रा,-खपली इ० वनणें.-निघणें. *S. armour,* कातड्यावर धातूचे खवले जोडलेलें चिलखत. *S.-board,* ( आरशाच्या वगैरे पाठचा ) पातळ पुठ्ठा. *S. work,* overlapping arrangement. एकमेकांवर चढत जाणारी-सलग-रचना. *Scal'y, Scale-less, aa.*; *Scal'iness, n.*

**Scāle,** *n.* ( स्केल् )—a pan of weighing balance; (pl.) a simple balance on weighing instrument; *the Ss.* ( *Astr. pl.* ) Libra. तराजूचें पारडें, परडें; (अने०) तराजू, तागडी, काटा; तूळ रास. *v. t.* to weigh in scales ( rare ); ( of thing weighed ) show specified weight. ( कांट्यांत घालून ) वजन करणें; ( अमूक ) वजन भरणें. *To throw sword into s.,* शस्त्रास्त्रांच्या बळावर मागणी करणें,-हक्क सांगणें. *Turn the s.* ( of motive or circumstance ), be decisive. निर्णायक ठरणें. *A pair of ss.,* तराजू, कांटा. *Hold the ss. even,* be impartial judge. निःपक्षपातानें न्याय करणें,-देणें; कांटेतोलपणानें न्याय करणें.

**Scāle,** *n.* ( स्केल् )—a series of degrees; graded system; ( Mus. ) a set of sounds belonging to a musical key arranged in order of pitch; ( Math. ) ( often *s. of notation,* ) basis of numerical system as shown in ratio between units in different places of number, relative dimensions ( of plan, map, etc. ); an instrument for use in measuring, etc. प्रमाण, दर्जा, मापन, मान; प्रमाणशीर पद्धति; स्वरपद्धति, ग्राम; ( अंकमापनाचा ) ठराविक क्रम, अंकमापनपद्धति; सापेक्ष प्रमाण, लांबी, अंतर; प्रमाणपट्टी, मापनपट्टी. *v. t.* to climb with ladder or otherwise; reduce to common scale; have common scale. चढून जाणें, चढणें; साधारण प्रमाण करणें,-असणें. *To sink in the s.,* खालच्या दर्जाला येणें. *Ordinary, denary* or *decimal s,,* दाशनिक-दशांश-क्रम. *Binary s.* denoting units, twos, fours etc. द्विक्रम. *Scaling -ladder,* भिंतीवर चढण्याची शिडी.

**Scalene',** *a. & n.* ( स्कली'न् )—unequal-sided ( triangle ). विषमभुज ( त्रिकोण. ) *S. muscle,* पर्शुकार्षक स्नायु.

**Scălp,** *n.* ( स्कॅल्प् )—skin and hair of the upper part of the head; top of head; this torn off as trophy by Red-Ind. victor; bare rounded hill-top; whale's head without lower jaw. डोक्यावरील कातडी व केस; टाळकें, डोकें; विजयाचिन्ह म्हणून तांबडा इंडियन शत्रूच्या डोक्याची काढलेली ती कातडी; टेंकडीचा उजाड वर्तुळाकार माथा; व्हेल माशाचें ( खालचा जबडा नसलेलें ) डोकें. *v. t.* to take s. of; criticize savagely; ( U. S. sl. ) make small quick profit by speculating in tickets, etc. डोक्याची कातडी काढणें, वाभाडे काढणें, भयंकर कडक टीका करणें; ( तिकिटांचे वगैरे दर वाढवून ) नफेबाजी करणें.

**Scăl'pel** *n.* ( स्कॅल्पेल् )—surgeon's small light knife shaped for holding like pen. शस्त्रक्रिया करण्याची सुरी,-चाकू. [ L. *scalpere,* scrape ]

**Scăl'per, Scau'per,** *n.* ( स्कॅल्पर्,स्का'- )—gouge used by engravers. विकृत झालेलें हाड खरडून काढण्याचें शस्त्र, खरवडणी.

**Scămm'onў,** *n.* ( स्कॅ'मनि )—purgative resin. रेचक वनस्पती द्रव्य,-पदार्थ.

**Scămp,** *n.* ( स्कॅम्प् )—rascal, good-for-nothing, worthless fellow. सोदा, लुच्चा, उडाणटप्पू मनुष्य. *v. i.* to do ( work ) negligently. निष्काळजीपणानें काम करणें, घाईघाईनें,-अर्धवट,- काम करणें. *Scamp'ish, a.* लुच्चेगिरीचा, पाजीपणाचा, लुच्चा, लबाड.

**Scăm'per,** *v. i.* ( स्कॅ'म्पर् )—to run like a frightened animal or playing child; to take a scamper

*through.* ( भीतींनें ) पळ काढणें, पोबारा करणें ; सटकणें, झुकणें ; दौड काढणें. *n.* scampering run; gallop on horseback: rapid tour or course of reading. पळ काढणें, पोबारा ; दौड, खडी स्वारी ; जलद-फिरता,-प्रवास, थांबतें वाचन, ( पुस्तकाचीं ) पानें चाळणें.

Scăn, *v. t. & i.* ( स्कॅन् )—to test metre; to scrutinize closely ( horizon, face, etc. ); ( of line, etc. ) be metrically correct; read over with emphasis on rhythm. वृत्त तपासून पाहणें, छंदाच्या मात्रा मोजणें; बारकाईनें पाहणें, न्याहाळणें, निरखून पाहणें,-तपासणें ; वृत्तदृष्ट्या बरोबर असणें ; ठेक्यावर-तालावर,-वाचणें.

Scăn'dal, *n.* ( स्कॅन्डल )—thing that occasions general feeling of outrage or indignation, malicious gossip; back-biting; ( Law ) public affront, irrelevant abusive statement in court. निंदा, निंदास्पद गोष्ट ; कुटाळकी ; लोकापवाद, जनप्रवाद ; भर कोर्टांत केलेली अप्रस्तुत निंदा,-टीका. *Scandalize, v. t.* to shock. निंदा करणें, केंडी उठाविणें, दोषारोप करणें, शरमवणें. *Scan'dal-monger, n.* कुटाळ, निंदक, चहाडखोर, चुगलखोर, ( खन्याखोट्या ) कंड्या उठविणारा.

Scăn'dalous, *a.* ( स्कॅन्डलस् )—outrageous, disgraceful to reputation; causing or given to scandal, shameful. अब्रू घेणारा ; कलंक लावणारा ; लज्जास्पद. —*ly, adv.* ;-*ness, n.*

Scăn'dent, *a.* ( स्कॅन्डन्ट् )—climbing. चढणारा, आरोहिणी ( लता ). [ L. *scandere*, to climb ]

Scăndĭna'vian, *a. & n.* ( स्कॅन्डिनेव्हिअन् )—of the region including Norway, Sweden, Denmark, and Iceland. नार्वे, स्वीडन, डेन्मार्क व आइस्लंड या देशांतील ( भाषा ;-रहिवासी ).

Scăn'dium, *n.* ( स्कॅन्डिअम् )—an element found in the Scandinavian yttrium metals. स्कॅन्डिनेव्हिआ मधील धातूंत सांपडणारें तत्त्व.

Scăn'sion, *n.* ( स्कॅन्शन् )—metrical scanning. कवितेच्या मात्रा मोजण्याची पद्धति, मात्रागणन.

Scănsor'ĭal, *a.* ( स्कॅन्सॉरिअल् )—( of birds etc. ) climbing; adopted for climbing. चढणारें ; चढण्याच्या उपयोगी.

Scănt, *a.* ( स्कॅन्ट् )—barely or not sufficient. अपुरा, तुटपुंजा, चुटपुरता. *v. t.* to stint ( food etc. ), provide grudgingly. नियंत्रित करणें, नियंत्रण घालणें, कुचराईनें ( अपुरें ) देणें.—*ly, adv.*

Scănt'lĭng, *n.* ( स्कॅन्ट्लिंग् )—a specimen, sample, ( *arch.* ); modicum, small amount of; a small beam, esp. one under 5 in. square; size to which stone or timber is to be cut; set of standard dimensions for parts of structure esp. in shipbuilding; a trestle for cask. नमुना, वानगी ; नखभर, तिळभर, अल्पल्प ; ( ५ इंचाच्या खालील रुंदीचें व जाडीचें लहान वहाल, वरगा ; गर्भी, ठराविक माप ; ( पिंपाची ; घडवंची, बैठक, घोडी.

Scăn'tỹ, *a.* ( स्कॅन्टि )—barely sufficient; of small amount or extent, defective, (*opp. ample*). अपुरा, अगदीं लहानसर, बेताचा, थोडासा, उणा, अपुरता. *Scan'tily, adv.* थोडका, हात राखून, कुचराईनें.-*tiness. n.* उणेपणा, कृपणपण.

Scāpe, *n.* ( स्केप् )—shaft of column; ( bot. ) long leafless flower-stalk springing from root; shaft of feather. दांडा, दांडोरा ; मूलज पुष्पदंड, मूलज पुष्पनाल ( उ० गुलछबू ,कांदा, वायाळ ) ; पिसाचा दांडा, 2. *n. & v. t.* ( *arch.* ) escape. निसटणें, निभावणें, सुटका.

Scape'goat, *n.* ( स्केप्-गोट् )—( O. T. ) a goat allowed to escape when Jewish chief priest had laid sins of people upon it; a person bearing blame due to others. सुटा बोकड, बळी ; दुसऱ्याच्या अपराधाबद्दल दोष लागलेला मनुष्य.

Scāpe'grāce, *n.* ( स्केप्-ग्रेस् )—a rascal; ne'er-do-weel ( often playfully of child ). ( बेअकली ) चंचळ मनुष्य, चंचळ पोर,धडपडें मूल.

Scă'phoid, *a. & n.* ( स्कॅफॉइड् )—( anat. ) boat-shaped ( bone ). नौकाकृति, गुल्फमध्य ( अस्थि ).

Scăp'ulă, *n.* ( स्कॅप्यूला )—( pl-lae ) the shoulder-blade. खवाट्याचें हाड, खवाटा, फलकास्थि.

Scăp'ūlar, *a. & n.* ( स्कॅप्यूलर् )—of the scapula; ( *n.* ) kinds of monastic vestment; bandage for shoulder-blade. खवाट्याचा ; संन्याशाचा झगा, -कफनी ; खवाट्याची भाळी,-पट्टी.

Scar, *n.* ( स्कार् )—mark left by a wound. डाग, चट्टा, व्रण, ( दुःखाचा ) चटका. *v. t.* चट्टा, व्रण, पाडणें,-पडणें.

Scăr,Scaur, *n.* ( स्कार्,स्कॉअर् )—a precipitous craggy part of mountain side. पर्वताचा कडा, सुळक्यासारखी बाजू.

Scă'rab, *n.* ( स्कॅरब् )—sacred beetle of ancient Egypt; Egyptian germ in the form of a beetle. प्राचीन मिसर देशांतील एक पवित्र कीटक ; त्या कीटकाच्या आकाराचें रत्न.

Scă'ramouch, *n.* ( स्कॅरमॉउश् )—a baffoon, boastful coward; idler, scamp. विदूषक, पोकळ घमेंड्या ; आळशी, भटक्या.

Scārce, *a.* ( स्केअर्स् )—not plentiful, rare; hard to find. अपुरा, थोडा ; विरळ, दुर्लभ. *adv.* scarcely. क्वचित्, विरळा.

Scārce'lỹ, *adv.* ( स्केअर्स्लि )—hardly, only just, with difficulty; surely not. क्वचित्, विरळा, मोठ्या कष्टानें ; खात्रीनें नाहींच.

Scār'cĭtỹ, *n.* ( स्केअर्सिटि )—insufficiency; prevailing want of food; dearth, famine, rareness, infrequency. तुटवडा, कमताई, टंचाई, भीड, चणचण ; ( अन्नाची ) महर्गता, दुष्काळ.

Scār'cement, *n.* ( स्केअर्स्मेंट् )—set-back in a wall, ledge resulting from this. भिंतीचा आंत गेलेला भाग, वळचण.

Scāre, *v. t.* ( स्केअर् )—to strike with sudden terror; to startle and frighten. दचकवणें ; भीतीनें गांगरवणें, पळवून लावणें, ( पक्षी ) हांकणें, बुजवणें. *n.* unreasoning terror, causeless alarm; commercial panic. खोटी भीति, बुजगावणी, घाबरगुंडी, व्यापारी

वर्गात झालेली धांदल, घबराट. *To s. away*, drive off by fright. भीती दाखवून पळवून लावणें *S. monger*, खोटी भीति-वार्ता-पसरविणारा, गप्प उठविणारा, लोकांना (बातमीनें) गांगरविणारा.

**Scāre'crow**, *n.* (स्के'अर्‌क्रो)—a figure set (in field, &c.) to scare birds; badly dressed or *grotesque-looking person, one dressed meanly.* (पक्ष्यांना भिवविण्याकरितां) बाहुलबुवा, बुजगविणें, बुजगबाहुलें; *गबाळ पोषाख केलेला मनुष्य.*

**Scarf**, *n.* (स्कार्फ्)—(*pl. -ves,-fs*), a sort of light shawl; a long strip of material worn round neck, necktie. उपवस्त्र; गळेबंद, गळपट्टा; गळपट्टी. *S. pin,-ring*, गळपट्टीची टांचणी,-हूक,-कडी. *S. skin*, बाह्य (तम) त्वचा, (नखाखालची) बाहेरील कातडी. *Scarfed, a.*

**Scarf**, *n.* (स्कार्फ्)—a joint uniting two pieces of timber or leather or metal; notch, groove. बसल्याचा सांधा; खांचणी, खांपणी, खांच. *v. t.* to join with scarf ; flench (whale). (वसला पाडून) सांधा बसवणें, -जोडणें, सांधणें; व्हेल माशाचे तुकडे करणें.

**Scă'rify**, *v. t.* (स्कॅ'रिफाइ)—(surg.) to scratch skin or surface of all over; (*fig.*) to criticize mercilessly; to loosen surface of soil, to stir the soil. फांसण्या मारणें, -टाकणें; निर्दयपणानें टीका करणें, (अंतःकरणाला) घरें पाडणें; (जमिनीची) उरपतपारपत करणें, पाळ्या घालणें. *Scarifica'tion, n., scar'ificator, n.* फांसण्या मारण्याचें शस्त्र, प्रच्छादनशस्त्र. *Scar'ifier, n.* (जमीन उकरण्याचें) मोठें दांताळें; रस्ता उकरण्याचें दांताळ्याचें यंत्र.

**Scăr'ious**, *a.* (स्के'अरिअस्)—(bot.) thing dry, and membranaceous. बारीक, शुष्क व पातळ त्वचेनें युक्त.

**Scărlati'na**, *n.* (स्कार्लटी'ना)—scarlet fever. लोहितांग ज्वर.

**Scăr'let**, *n. & a.* (स्कार्लेट्)—brilliant red colour; scarlet cloth or clothes. शेंदरी रंग; शेंदरी रंगाचें कापड किंवा कपडे. *Dressed in s.*, शेंदरी रंगाचे कपडे घातलेला. *S. admiral*, एक जातीचें फुलपांखरूं. *S. fever*, infectious fever with s. rash; (joc.) tendency to fall in love with soldiers. लोहितांगज्वर; सैनिकांवर प्रेम करण्याची प्रवृत्ति. *S. hat*, (कार्डिनलची) शेंदरी टोपी. *S. runner*, scarlet,-flowered climbing bean. शेंदरी फुलांची घेवड्याची वेल.

**Scărp**, *n.* (स्कार्प्)—a steep slope, esp. the inner side of ditch in fortification. सरळ उतरण,-उतार; उभी उतरण,-बाजू,-कडा. *v. t.* उंचीचा-सरळ-उतार देणें. *Scarped*, (pa. p., of hill-side etc.) steep, precipitous. उंच, उभी सुळक्याखालची.

**Scăr'us**, *n.* (स्के'अरस्)—kinds of bright hued fish with parrot-like beak, (also *parrot-fish*). शुकचंचू-मत्स्य.

**Scāthe**, *n.* (स्केद्)—harm suffered. नुकसान, अपाय, इजा, त्रास, चट्टा. *v. t.* to injure by blasting or withering up. नुकसान करणें; इजा पोंचवणें, चट्टा लावणें. *Scathing criticism*, खरमरीत टीका. *Unscathed*, इजा न होतां, चट्टा न लागतां, सहीसलामत.

**Scāthe'less**, *a.* (स्के'द्‌लेस्)—unharmed. नुकसान न झालेला, चट्टा न लागलेला, सुखरूप.

**Scato'logy**, *n.* (स्कटॉलाजि)—study of coprolites. (भूमिगत कुजलेल्या प्राण्यांच्या) खताचा अभ्यास,-शास्त्र. [Gk *skatos*, dung]

**Scato'phagous**, *a.* (स्कॅटॉ'फॅगस्)—feeding on dung. भूम्यंतर्गत खतावर वाढणारा, जमिनींतील खत-उकीर-खाऊन वाढणारा.

**Scătt'er**, *v. t. & i.* (स्कॅ'टर्)—to throw or put here and there; sprinkle; to disseminate; to disperse; to flee or make flee in all directions. पसरणें, पेरणें, विखुरणें; शिंपडणें; फांकाफांक करणें, पांगणें, पूर्ण मोड-भंग-करणें, पांगापांग करणें; फांकणें, पांगणें, फांकाफांक होणें. *S. brain*, heedless person. अनवधानी, दुर्लक्ष मनुष्य. *S. brained*, heedless, desultory. लक्ष नसलेला, अनवधानी. *Scatt'eringly, adv.*; *Scatt'ered, pa.p.* दूरदूर पसरलेले, पेरलेले, विरळ, तुटक, तुटक.

**Scăv'enger**, *n.* (स्कॅ'व्हिंजर्)—a person employed to remove refuse from the streets of a city; an animal (esp. S. *beetle*;-*crab*) feeding on carrion; a writer etc. delighting in filthy subjects. झाडूवाला, भंगी, हलालखोर; कुजलेलें मांस खाणारा प्राणी,-किडा; अश्लील विषयांवर लिहिणारा, अश्लील-लेखक. *v. i.* to be, act, as a *s.* भंगीकाम करणें. *Scav'enge, v. t. & i. Scav'enging, n.* scavenger's work. भंगीकाम, झाडूकाम.

**Scenăr'io**, *n.* (शेना'रिओ)—(pl. *os*), a table of scenes, etc. in play or opera or cinema play. नाटक, सिनेमा यांतील प्रवेश-लेखन; कथानक-लेखन; कथानक व प्रवेश यांची जुळणी,-लेखन. [It.]

**Scēne**, *n.* (सीन्)—a theatre-stage, arena for display (*now only fig.*); a place of actual or fictitious occurrence; a piece of continuous action that forms part of a play; agitated colloquy, esp. with display of temper; hangings and woodwork used in dressing up a stage; landscape or view. रंगभूमि; (कोणत्याहि प्रसंगाचें) स्थल किंवा वर्णन; (नाटकाचा) प्रवेश; दृश्य, देखावा, प्रसंग, प्रसंगाचें वर्णन; प्रदर्शन, तमाशा; दंगल; रंगभूमीवरील पडदे वगैरेंची सजावट, देखावा. *Quit the s.*, (esp.) die. मरून जाणें, जगांतून नाहींसें होणें. *Don't make a s.*, प्रदर्शन-तमाशा-देखावा करून दाखवूं नको. *Behind the ss.*, पडद्याआडचा; आंतील-गुप्त-खाजगी माहिती असणारा. *Change of s.*, प्रवासामुळें दिसणारे निरनिराळे देखावे,-प्रसंग, स्थलांतर, धारापालट. *S.-dock*, पडदे वगैरे ठेवण्याची कोठी,-जागा.

**Scē'nery**, *n.* (सीं'नरि)—stage scenes; the natural features of a district, landscape characteristics. (नाटकांत लागणारें) देखाव्याचें सामान; भोंवतालचा देखावा; निसर्गाचा देखावा, भूप्रदेशरचना.

**Scē'nic**, *a.* (सीं'निक्)—of or on the stage; picturesque in grouping; (of picture etc.) telling

a tale; (of emotion etc.) dramatic, affected. रंगभूमीवरील, नाटकाचा; शोभिवंत, उठावदार (रचनेचा, रचलेला); प्रसंगदर्शक, देखाव्याचा (चित्र व०); नाटकी, खोटा, नकली.

Scent, *v. t.* (सेन्ट्)—to discern by smell; to make fragrant; apply perfume to; sniff to detect the odour of: (*fig.*) begin to suspect the presence or existence of. चा वास घेणें, (घ्राणेंद्रियानें) शिकारीचा माग काढणें; सुवासिक करणें; सुगंधित करणें; ला वास लावणें, सुगंध लावणें; हुंगणें, वास घेणें; (चा) वास येणें, (चें) अस्तित्व भासणें. *n.* characteristic odour of something; fragrance; smell left by an animal enabling hounds to track it; (Hare and Hounds) paper laid to guide runners; sense of smell; liquid perfume distilled from flowers, etc. वास; गंध, सुगंध; माग, वास; (धांवण्याच्या शर्यतींत मागून धावणाऱ्यांसाठीं) टाकलेले कागदाचे तुकडे; घ्राणेंद्रिय; सुगंधी तेल, अत्तर. *To s. out*, हुंगून-हुडकून-शोधून काढणें. *To follow up the s.*, (चा) वास-माग-लागणें. *Lose the s.*, माग सांपडेनासा होणें. *Recover the s.*, पुनः माग लागणें,-सांपडणें. *On the s.*, having clue. वासावर, मागावर, धागादोरा सांपडलेला. *Put off the s.*, deceive by false indications. आडरानांत शिरविणें,-फसवणें, हुलकावणी देणें. *S. bag*, (कांहीं प्राण्यांच्या शरीरांतील) विशिष्ट सुगंधि द्रव्ययुक्त पिशवी; चाविशेपीनें भरलेली पिशवी. *S. bottle*, सुगंधी तेलाची-अत्तराची कुपी. *S. gland*, कस्तुरी वगैरे उत्पन्न करणारी पेशी,-पिंड. *Scented, a.* सुगंधी; *S. caper*, चहाची एक जात; *S. fern*, सुगंधी वनस्पति.

Scĕp'sis, *n.* (स्केप्सिस्)—philosophic doubt, sceptical philosophy. तत्त्वज्ञानविषयक संशय, संशयवाद. [*Gk skepsis*, inquiry]

Scĕp'tic, *n.* (स्केप्टिक्)—a person who questions the truth of religious doctrines; a person indisposed to accept as true the received opinion on any particular subject; an atheist. धार्मिक मतांसंबंधीं संशय असणारा; संशयवादी; नास्तिक. *-al, a. Scep'ticism, n.* संशयात्मकता; नास्तिकता; संशयवाद.

Scĕp'tre, *n.* (सेप्टर्)—a rod symbolizing sovereignty; royal or imperial authority. राजदंड, राजवेत्र; राजसत्ता, सार्वभौमाधिकार. *Scep'tred, Scep'treless, aa.*

Schĕd'ūle, *n.* (शेड्यूल्)—a table of details or items. कोष्टकवार यादी, तक्ता, माहितीपत्रक. *v. t.* to make a schedule of, to include in a schedule. याद करणें, यादींत नमूद करणें. (U. S. pr. स्के.-) *S. time*, that stated in time-table. वेळापत्रकांत नमूद केलेली वेळ,-दिलेली वेळ.

Schē'ma, *n.* (स्कीमा)—(pl.-*ta*), synopsis, outline, diagram; (Log.) syllogistic figure; (Gram.) figure of speech; (Kant.) general type. रूपरेषा, योजना; (सम्यग पदानुरूप)-अनुमान-वाक्यप्रकार; (वाक्यांतील) अलंकार; वस्तूची सामान्य रूपरेषा, सामान्य. *Schema'tic, a; Schemati'cally, adv.*

Schēme, *n.* (स्कीम्)—a systematic arrangement; proposed or in operation; an outline, a syllabus; a plan of action; an artful or underhand design; representation of a design. पद्धतशीर रचना; बेत, व्यवस्था, मांडणी; योजना, कल्पना, हिकमत, डाव, उपाय; नकाशा, आराखडा. *v. i. & t.* to make plans; intrigue; plan to bring about. बेत,-योजना,-करणें; युक्ति काढणें, तोड निघणें-काढणें; मसलत-कारस्थान-करणें. *Sche'ming, a.* कारस्थानी, मसलती-हिकमती.

Schē'mer, *n.* (स्की'मर्)—a contriver, a plotter. कारस्थानी, मसलत करणारा, उलाढाल्या, झेंगट्या.

Schipp'erkė, *n.* (स्किपर्के, शि-)—a kind of lap-dog. एक जातीचा कुलंगी कुत्रा.

Schi'sm, *n.* (सिझम्)—division of a community into factions (rare in gen. sense), esp. separation or division in a church; an offence of causing such separation. भेद, फूट, तट; धर्मामध्यें दोन पंथ होणें, दुफळी; असे भेद पाडण्याचा गुन्हा.

Schismăt'ic, *a.* (सिझ्मॅटिक्)—tending to or guilty of schism. मतभेद पाडणारा, दुफळी होण्याजोगा; (धर्म-) भेद पाडण्याचा गुन्हा करणारा. *n.* a schismatic person. (मूळ धर्मपंथांतून भांडून) वेगळा होणारा मनुष्य. *Schismat'ical, a.*

Schist, *n.* (शिस्ट्)—crystalline rock whose components are arranged in layers. स्फटिकमय खडक,-प्रस्तर. *Schi'stose, a.* स्फटिकमय, खडकासारखा.

Schŏl'ar, *n.* (स्कॉलर्)—a child at an elementary school; a person's disciple; a learned or erudite person; a student receiving assistance from university or other funds after a competitive examination. शाळेंत जाणारा मुलगा, विद्यार्थी; छात्र, शिष्य; विद्वान मनुष्य, पंडित; छात्रवृत्ति मिळणारा विद्यार्थी. *A s. and a gentleman*, person of good education and breeding. विद्वान व कुलीन मनुष्य.

Schŏl'arlў, *a.* (स्कॉलर्लि)—erudite; becoming a scholar or a learned man. विद्वत्तापूर्ण; विद्वत्तेचा; विद्वानाला साजेसा,-शोभेसा.

Schŏl'arship, *n.* (स्कॉलर्-शिप्)—erudition, learning; allowance of money for a student or pupil at an educational institution. विद्वत्ता; छात्रवृत्ति, शिष्यवृत्ति.

Scholăs'tic, *a.* (स्कलॅस्टिक्)—of schools; universities, schooling, educational; academic or pedantic; dealing in logical subtleties. शाळेंतील, शाळेचा, विद्यार्थ्यांचा, विद्यार्थ्याला शोभेसा, पांडित्याचा; तार्किक, सूक्ष्म गोष्टीसंबंधीं. *n.* a schoolman; modern theologian of *s.* tendencies; a Jesuit. मध्ययुगीन शिक्षक; तार्किक; जेस्विट पंथीय. *S. agent*, finding posts for teachers. शिक्षकांना नोकऱ्या मिळवून

देणारा. *S. theology,* तार्किक-सूक्ष्म-धर्मशास्त्र. *Schola-s'ticism, n.* 'स्कूलमन'ची निगमनात्मक तत्त्वज्ञान-पद्धति.

Schō'liăst, *n.* (स्कॉ'लिॲस्ट्)—a writer of scholia. टीकाकार, प्राचीन काव्यांवर व्याकरणविषयक टीपा लिहिणारा.—*ic, a.*

Schŏ'lium, *n.* (स्कॉ'लिअम्)—(pl.-*ia*), ancient *grammarian's marginal note on passage or* word in classical author. (प्राचीन वैय्याकरणी) टीका, उपपत्ति, अर्थाविष्करण.

Schōōl, *n.* (स्कूल्)—an institution for giving instruction to the young; its buildings; its pupils; lesson time; being educated in a school; medieval lecture-room; any of the branches of study with separate examination at the university; (pl.) university examinations; *a group of thinkers or artists with common* inspiration or characteristics. शाला; शाळा (विशेषतः प्राथमिक); शालागृह, शाळेची इमारत; शाळेंतील विद्यार्थी; शिक्षणाचा काळ,-तास; शाळा, शिक्षण, अध्ययन; मध्ययुगीन (तत्त्ववेत्त्यांची) शाळा; व्याख्यान-गृह; विद्येची शाखा. (अने०) विश्व-विद्यालयाच्या परीक्षा; संप्रदाय, पंथ. *v. t.* to send to school (rare); to discipline, to bring under control; to train or accustom to; to tutor; to reprove. शाळेंत घालणें,-पाठविणें; शिस्त लावणें, ताब्यांत ठेवणें; संवय लावणें; पढवणें; कान उपटणें, झाडणें. *Continuation s.,* (प्राथमिक शिक्षण घेऊन धंदाउद्योग करणाऱ्यांकरितां त्यांच्या फावल्या वेळीं) पुढल्या शिक्षणाची शाळा. *Free s.,* मोफत शिक्षणाची शाळा. *High s.,* माध्यमिक शिक्षणाची शाळा. *Technical s.,* कलाभुवन, (शिल्प) कलेची शाळा. *To keep a s.,* खाजगी शाळा चालविणें. *Go to s.,* बर्गाला-तासाला -हजर असणें. *S. doctors,* मध्ययुगीन शिक्षक. *In the s. of adversity,* (*fig.*) विपत्तीच्या शाळेंत, संकटांच्या तालमींत. *S. board,* Local education authority. स्थानिक शिक्षणाधिकारी मंडळ. *S. book,* शालेय पुस्तक. *S. boy,-girl,* शाळकरी मुलगा,-मुलगी,-विद्यार्थी,-विद्यार्थीण. *S. days,* (मागील) विद्यार्थी दशा, शाळेंत शिकण्याचे दिवस. *S. fee (s),* शाळेची फी. *S.-fellow,* (त्याच शाळेचा माजी किंवा आजी) विद्यार्थी, शाळाबंधू. *S. house,* (खेडेगांवच्या) शाळेची इमारत. *S. ma'am,* (U. S.) शिक्षकीण. *S. master,-mistress,* शाळा-शिक्षक,-शिक्षकीण. *S. miss,* inexperienced or bashful girl. अननुभवी किंवा लाजाळू मुलगी. *S. teacher,* (विशेषतः प्राथमिक) शिक्षक,-शिक्षकीण. *S. time,* अभ्यासाचे तास,-वेळ. *School'ing, n.* शिकविणें, अध्यापन. [L. *schola,* school]

Schōōl, *n. & v. i.* (स्कूल्)—(form) shoal of fish. माशांचा थवा,-समुदाय (थवणें).

Schōōl'able, *a.* (स्कू'लब्ल)—liable by age to compulsory education. सक्तीच्या शिक्षणाला वयानें योग्य.

Schōōl'man, *n.* (स्कू'ल्मन्)—a teacher in medieval European university; theologian dealing with religious doctrines by rules of Aristotelian logic. युरोपांतील मध्ययुगीन तत्त्ववेत्ता,-शिक्षक.

Schōōn'er, *n.* (स्कू'नर्)—a fore-and-aft rigged ship, a small two-masted vessel. दुकाठी गलबत, -तारूं.

Schottische', *n.* (शॉटी'श्)—kind of polka; music for it. एक जातीचा नाच; त्याचें वाद्य. [G = scottish]

Sciăg'raphy̆, Ski-, *n.* (सायॅ'ग्रफि, स्कि-)—art of shading in drawing, etc.; photography by Rontgen rays; (usu. sk-); (Arch.) vertical section showing interior of house, etc.; (Astron.) finding of time by shadows as in sun-dial. (चित्रकलेंतील वगैरे) छाया दाखविण्याची कला; 'क्ष' किरणांनीं काढलेलें छायाचित्र,-प्रकाशलेखन; उभा छेद (घराचा वगैरे अंतर्भाग दाखविणारा); (छायायंत्राप्रमाणें) छायेवरून वेळ जाणणें. *Sci'agram, n.* क्षकिरणानें काढलेलें चित्र. *Sci'agrapher, n.,-graphic, a.*

Sciăt'ic, *a.* (सायॅ'टिक्)—of the hip; of or having sciatica. असनास्थिग, जघनास्थींतून जाणारा; जंघापृष्ठशूलाचा,-शूलयुक्त. *S. nerve,* कुल्हा, मांडी, व पायाची पोटरी यांमधून जाणारी मोठी मज्जातंतु, आसनास्थिग मज्जातंतु, गृध्रसीनाडी.

Sciăt'ic, *n.* (सायॅ'टिक्)—neuralgia of hip and thigh, pain in sciatic nerve. जंघापृष्ठशूल, कुल्हा, मांडी व पायाची पोटरी यांतली मोठी मज्जातंतू दुखणें.

Sci'ence, *n.* (सा'यन्स्)—knowledge (arch.); systematic and formulated knowledge; any branch of such knowledge; the physical or natural sciences as a whole; special skill, as opp. to strength or natural ability, esp. in boxing, games, etc. विद्या, ज्ञान; शास्त्रीय ज्ञान, शास्त्र; ज्ञानशाखा, उपपत्ति, औपपत्तिक ज्ञान, विज्ञान-शाखा; विज्ञान; कसब, प्रावीण्य, कौशल्य, शास्त्र. *Moral s.,* नीतिशास्त्र. *Political s.,* राजकारणशास्त्र, राज्यशासनशास्त्र. *Natural s.,* सृष्टिज्ञान. *A man of s.,* शास्त्रज्ञ. *Exact s.,* admitting of quantitative treatment. (प्रत्यक्ष) मापनसिद्धशास्त्र. *Pure s.,* one depending on deductions from self-evident truths as Mathematics, logic. गृहीतप्रमेयानुवर्ती-प्रत्यक्षासिद्धप्रमेयानुलंबी-शुद्ध-शास्त्र (गणित, तर्क) *Applied s.,* व्यवहारोपयोगी शास्त्र, *Physical s.,* (जड-). पदार्थ विज्ञान-(शास्त्र). *Scie'ntial, a.* ज्ञानाचा, ज्ञानसंबंधीं. *Scie'ntially, adv.*

Sci'enter, *adv.* (सा'यन्टर्)—(legal) wittingly. जाणूनबुजून, मुद्दाम, सहेतुक.

Scĭentĭf'ic, *a.* (सायन्टि'फिक्)—according to the principles of science; having or requiring trained skill; accurate. शास्त्रसंबंधीं, शास्त्रीय, शास्त्रोक्त; शास्त्रशुद्ध; बिनचूक, कुशल, कसलेला, कसबी. *S. instruments,* शास्त्रीय (प्रयोगांच्या उपयोगी) उपकरणें. *A s. boxer,* पद्धतशीर लढणारा-कसलेला-मुष्टियोद्धा. *Scientifically, adv.* शास्त्रीय पद्धतीनें, यथाशास्त्र.

Sci'ĕntist, *n.* ( सा'यन्टिस्ट )—a person learned in one or more of the natural sciences. शास्त्रज्ञ, शास्त्रवेत्ता.

Sci'lĭcĕt, *adv.* ( सा'यलिसेट् )—( abbr-sc., scil. ) to wit, that is to say, namely. म्हणजे, त्याचा अर्थ असा कीं. [ L. = *scire licet,* it is allowed to know ]

Scĭm'ĕtar, Scĭm'ĭtar, *n.* ( सि'मिटर् )—a short curved oriental sword with a convex edge. जंबिया.

Scĭntill'ä, *n.* ( सिन्टि'ला )—shred or atom. अल्पांश, कण. *Not a* s. *of evidence,* अल्पसा सुद्धां पुरावा नाहीं.

Scĭn'tillāte, *v. i.* ( सि'न्टिलेट् )—to sparkle as the fixed stars, to twinkle; to emit sparks. लुकलुकणें, चमकणें, चकचकणें; ठिणग्या उडणें. *Scintilla'tion, n.* अग्निकण, ठिणग्या, चकचकणें. *Scin'tillant, a.*

Sci'olism, *n.* (सा'यअलिझम् )—assumption of knowledge; conceit based on fancied wisdom. तुटपुंजें ज्ञान, पांडित्याचा आव,-डौल.

Sci'olist, *n.* ( सा'यालिस्ट )—a person of superficial knowledge. पंडितंमन्य, तुटपुंजें ज्ञान असणारा मनुष्य. खंडपंडित.-*ic, a.*

Sci'on, *n.* (सा'यन् )—a shoot cut for grafting; young member of a ( esp. noble ) family. कलम, अंकुर, कोम, फांदी ; वंशज, वारस, कुलदीपक.

Scirr'hus, *n.* ( सि'रस, स्कि'- )—hard tumour as early stage of cancer. ( पुळी, व्रण, याच्या प्रथमावस्थेंतील ) कठिण मांसग्रंथि. *Scirr'hous, a.* [ Gk *skiros,* hard ]

Sci'ssĭle, *a.* ( सि'सेल् )—able to be cut. कापतां येण्याजोगा.

Scĭss'ion, *n.* ( सि'झन् )—cutting, being cut, division, split. छेदणें, छेद, विभाग.

Scĭss'or, *v. t.* ( सि'झर् )—to cut ( *off, up, into,* ) with scissors, clip out. कातरीनें कापणें, कातरणें, कापून घेणें.

Scĭss'ors, *n. pl.* ( सि'झर्झ् )—a cutting implement having a pair of blades. कातरी, कातर. *A pair of s.,* कात्री, कातर. *Where are my s.,* माझी कात्री कोठें आहे. *Button-hole s.,* बटणांचीं-गुंड्यांचीं-भोंकें पाडण्याची व्यवस्था असलेली कात्री. *Lamp, nail,-s.,* वात, नखें,-कापण्याची ( विशिष्ट आकाराची ) कात्री. *S. and paste,* दुसऱ्या पुस्तकांतील उतारे काढून ग्रंथरचना करणें. *Scissor-bird* or-*tail,* चिमट्यासारखी दुभंग व लांब शेपटी असलेले पक्षी. *Sciss'orwise, adv.*

Sciūr'ine, *a.* ( सियु'अरिन् )—of the squirrel-tribe; squirrel-like. खारीच्या जातीचा; खारीसारखा. *Sciur'oid, a.*

Sclĕr(o ),-( स्क्लिअरो- )—comb. form of Gk *skleros,* hard. दृढ-, घट्ट-, कठिन-.

Sclĕrŏt'ic, *a.* ( स्क्लिअरॉ'टिक् )—hard, firm. दृढ, घट्ट. *n.* hard opaque coating of eye outside iris forming the white of the eye. डोळ्यांतील पांढरा भाग, बाह्यनेत्रकोष. *Sclero'sis,* कठिनग्रंथिवृद्धि ( रोग ).

Scŏff, *v. i.* ( स्कॉफ् )—to speak derisively of esp. religion or object of respect; to mock or jeer *at,* to ridicule. निंदा-उपहास-करणें; थट्टा करणें, टर उडविणें. *n.* mocking words; a taunt. उपहास; टर, टोमणा, निन्दोक्ति.-*er, n.*;-*ingly, adv.*

Scōld, *v. t. & i.* ( स्कोल्ड् )—to find fault noisily; to rail, to rate or rebuke. खरडपट्टी काढणें; दटावून बोलणें. *n.* a railing or nagging woman. अवदसा, कैदाशीण, कर्कशा. *Scold'ing, n.* a rebuke or rating. झाडणें, धमकावणी, खुंडन, चोंढती.

Scŏnce, *n.* ( स्कॉन्स )—a fort or earthwork ( arch. ); shelter, screen; the head, head-piece, the skull; bracket-candlestick. किल्ला, झोंपडी, खोपट; रक्षण, आच्छादन; डोक्याची कवटी; मेणबत्ती ठेवण्याची वर्तुळाकार नळी. *v. t.* & *n.* ( inflict ) forfeit for offence against table etiquette. दंड, शिक्षा ( करणें ).

Scon(e), *n.* ( स्कोन्, स्कॉ- )—soft cake of barley meal or wheat-flour. बाजरीच्या किंवा गव्हाच्या पिठाची भाकरी,-पोळी.

Scōōp, *n.* ( स्कूप् )—a short-handled deep shovel; coal-scuttle; gouge-like instrument; motion as of scooping; ( sl. ) large profit made quickly. कोरणी, खवणें, पळा; ( कोळशाचें ) शिपतर; ( शस्त्रक्रियेंतील ) चमचा, उपसणें, पोखरणें; झपकन मिळविलेला मोठा फायदा. *v. t.* to lift with a scoop; to hollow out, to excavate. खोऱ्यानें उपसणें; कोरणें, उकरणें, खणणें. *S.-wheel,* पायरहाट.

Scōōt, *v. i.* ( स्कूट )—( sl. ) to dart, shoot along; make off. घुसणें, सूं करणें; पळून जाणें. *Scoot'er, n.* child's scooting toy; a machine worked by motor as substitute for bicycle. पायगाडा, पांगुळगाडा ( मुलांचा खेळ ); यांत्रिक-मोटर-पांगुळगाडा, पायगाडी.

Scōpe, *n.* ( स्कोप् )—end aimed at, purpose, intention ( rare ); outlook; sphere of observation or action; extent, outlet, vent; freedom of action; extent to which person or thing may or can range; ( Naut. ) length of cable out when ship rides at anchor. हेतु; पुढचा देखावा; क्षेत्र, टप्पा; वाव, अवसर, जागा; मोकळीक; परीघ, विस्तार; ( नांगर टाकून उभ्या राहिलेल्या ) नांगराच्या दोरीची लांबी.

Scŏrbu'tic, *a.* ( स्कॉर्ब्यु'टिक् )—of or affected with scurvy. रक्तपित्तीचा, रक्तपित्तव्याधीचा. *n.* a s. person. रक्तपित्ति झालेला मनुष्य. -*tically, adv.*

Scŏrch, *v. t. & i.* ( स्कॉर्च् )—to burn the surface of so as to discolour or injure or pain; become discoloured etc. with heat; ( of a motorist or cyclist ) go at unreasonably high speed. भाजणें, होरपळणें, पोळणें; ( उष्णतेनें ) रंग बदलणें,-पालटणें; भयंकर वेगानें जाणें. *n.* भयंकर वेगानें,-बेफाम,-दवडणें,-धावणें, दौड. *Scorch'ing, a.* भाजणें, पोळणें, भाजणारा, पोळणारा;-*ly, adv.* *Scorch'er, n.* ( sl. ) a fine specimen of its kind. उत्कृष्ट नमुना.

Scŏre, *n.* ( स्कॉअर् )—a notch cut; a line cut or scratched or drawn; mark showing

starting point in race etc. (rare); (naut.) groove in block or dead-eye to hole strap; reckoning; the number twenty, set of twenty; number of points made by a player or side in game; (Mus.) copy of concerted piece; category, head; (sl.) remark or act by which person scores off another; piece of good fortune. खाप, भेग; रेघ; (शर्यतीची) आरंभस्थानदर्शक रेघा, -मर्यादा; खाजणी, खोरणी; गणणें, मोज, (खाद्य-पेयाचा) आकार, हिशेब; वीस ही संख्या, खेळांतील धांवा, धांवांची किंवा टोल्यांची एकूण बेरीज; सुरावटीस गीताची-पद्याची-प्रत; प्रकार, कारण, सबब, बाबत; (दुसऱ्यावर मात करणारा) टोला, टोमणा, कृत्य; सुदैव, नशीब. *v. t. & i.* to mark with incisions or lines; to slash, to furrow; to record (runs, &c.) in game score; to make or be credited with so many at cricket, &c.; to secure an advantage; (Mus.) write out score; enter item of debt to customer. रेघा मारणें, खापी पाडणें, रेखाटणें; नांगरटी करणें; कोरखे ओढणें; (धांवांची वगैरे) नोंद करणें; विजय संपादणें; वर ताण करणें, सरशी करणें; सुरावटीसह पद्याची प्रत करणें; कर्जाचा, खात्याचा,-हिशेब करणें. *To go off at s.*, (आवडत्या विषयावर) आवेशानें बोलणें, वेगानें चालूं लागणें. *To pay one's s.*, हिशेब चुकता करणें,-पुरा करणें. *To pay off old ss.*, (fig.) pay person out for past offence. उसनें फेडणें, उट्टें काढणें, सूड उगवणें. *To keep s.*, (धांवा वगैरे) होत जातील तशा नोंद करणें, लिहिणें. *Three s. and ten*, phr. for normal life of human life. मनुष्याची सामान्य (७० वर्षांची) वयोमर्यादा. *Ss. of people*, लोकांचा बराच मोठा जमाव,-समुदाय. *Rejected on the s. of absurdity*, अशक्य-हास्यास्पद-अयुक्त, (सबब) म्हणून सोडून दिलेलें, त्याज्य ठरविलेलें. *S. out words*, रेघ मारून शब्द खोडून टाकणें. *S. under*, खालीं रेघ मारणें, अधोरेखांकित करणें.

**Sco're-card**, *n.* (स्कोअर्-कार्ड)—डाव किती झाला हें दाखविणारा (धांवांचा) तक्ता. Also, *scoring-c.*

**Scor'er**, *n.* (स्को'रर्)—(*esp.*) a keeper of score at cricket etc. (खेळांतील) धांवा मांडणारा, डाव नोंदणारा.

**Scŏr'ia**, *n.* (स्कॉ'रिआ)—(pl.-*iae*), cellular lava or fragments of it; slag. ज्वालामुखीरसाचें किटण; किटण, कीट.

**Scŏrn**, *n.* (स्कॉर्न्)—disdain, contempt, derision; an object of contempt. कैटाळा, तिरस्कार, उपहास; तिरस्कारास्पद गोष्ट. *v. t.* to hold in contempt. तिरस्कार करणें, तुच्छ मानणें,-लेखणें. *To laugh to s.*, थट्टा करणें, टर उडविणें. *To think s. of*, तुच्छ मानणें.

**Scŏrn'ful**, *a.* (स्कॉ'र्नफुल्)—contemptuous, filled with scorn, disdainful. तिरस्कारपूर्ण, निन्दात्मक, तिरस्कारयुक्त.-*fully*, *adv.* तिरस्कारानें, तुच्छतेनें, अवहेलनेनें.

**Scorp'io**, *n.* (स्कॉ'र्पिओ)—the Scorpion. वृश्चिकराशि, -रास.

**Scorp'ioid**, *n. & a.* (स्कॉ'र्पिऑइड)—(bot.) (inflorescence) curled up at end like scorpion's tail and uncurling as flowers develop. वृश्चिकपुच्छाकार, लूमाकार, विंचवासारखा (पुष्पसमुदाय).

**Scŏrp'ion**, *n.* (स्कॉर्पिअन्)—lobster-like arachnid with jointed stinging venomous tail; a whip armed with metal points; kind of ballista. विंचू, वृश्चिक; चाबूक; गोफण.

**Scŏt**, *n.* (स्कॉट्)—(hist.) tax or rate. कर, पट्टी. 2. a native of Scotland. स्कॉटलंडचा रहिवासी, स्कॉच.

**Scŏtch**, *v. t.* (स्कॉच्)—(arch.) to disable, wound; prevent (wheel, barrel) from moving down hill by means of wedge, etc. जखमी करणें, अर्धमेला करणें; (चाकाला) उटाळें लावणें, अडथळा करणें, टेका देणें. *n.* a line marked on ground in hop-scotch; a wedge used to Scotch wheel etc. (रेघांवरून उड्या मारण्याच्या मुलांच्या खेळांतील) जमिनीवर ओढलेली रेघ; उटाळें, टेका.

**Scŏtch**, *a.* (स्कॉच्)—of Scotland or its inhabitants. स्कॉटलंडदेशाचा,-स्कॉटलंडमधील लोकांचा. *n.* स्कॉच भाषा. *Scots, Scottish, a. & n.* स्कॉच्. *Scott'icis, m.* स्कॉच् शब्दयोजना, वाक्प्रचार इ०

**Scŏtfree'**, *a.* (स्कॉट्फ्री')—exempt from the payment of a tax; unharmed or unpunished, clear, safe. कर न देणारा, दंड न झालेला; सुरक्षित, अजीवात मोकळा, घस-झळ-न लागलेला.

**Scŏtland yard**, *n.* (स्कॉट्लंड् यार्ड)—(used for) the London police, the head-quarters of the detection of crime. लंडनमधील (गुप्त) पोलीस, शिपाई; गुप्त पोलिसांचें ठिकाण.

**Scoto'ma**, *n.* (स्कोटो'मा)—obscuration of part of the field of vision. डोळ्यांतील काळा डाग (नेत्ररोग).

**Scoun'drel**, *n.* (स्का'उन्ड्रल्)—an unscrupulous person; a villain, a man without virtue. पाजी, लुच्चा; बदमाष, हरामी, हरामखोर. -*ism, n.*

**Scour**, *v. t.* (स्कॉवर्)—to rub bright or clean, rub out; clear out by flushing or flowing through or over; purge (bowels) drastically; clear off by rubbing. घांसणें, उजळणें, उजळा देणें; घांसून काढणें, पुसून टाकणें; (पाण्याचा लोट सोडून गटारें, नळ वगैरे) धुऊन काढणें, साफ करणें; (कोठा) धुणें, धुवून काढणें; (गंज वगैरे) घासून काढणें. *n.* an act or process of scouring; diarrhoea in cattle; substance used for scouring fabrics. धुऊन काढणें,-टाकणें; (गुरांचा) हगवणीचा रोग, हगवण; (गिरण्यांतील कपडा धुण्याचा) सावण, रासायनिक द्रव्य. *The s. of the tide*, भरतीच्या जोरानें (प्रवाहांतील गाळ) धुपून जाणें. *Scourer, n.*

**Scour**, *v. i. & t.* (स्का'वर्)—to rove, range; go along hastily, esp. in search or pursuit. भटकणें,

घिडणें; (च्या शोधार्थ,-पाठलागासाठीं) झपाट्यानें जाणें, धाईनें जाणें.

Scourge, *n.* (स्कर्ज्)—(*arch.*) a whip for chastising persons; a calamity, divine wrath. चाबूक, कोरडा; दैवी आपत्ति, अरिष्ट, दैवी शिक्षा. *v. t.* to chastise or afflict for wrong-doing, to harass, to torment, to use whip on. शिक्षा करणें, छळणें, गांजणें; फटके मारणें. *The white s.*, consumption as an epidemic disease. सांसर्गिक क्षयरोग.

Scout, *n.* (स्काउट)—(Mil. etc.) a man sent out to reconnoitre; a boy scout; a ship designed for reconnoitring; a small fast single-seat aeroplane; act of seeking military information; kind of bird; (Oxf.) a college servant. (शत्रूंची) टेहेळणी करणारा हेर, टेहळ्या, बॉयस्काउट, बालवीर; टेहेळणी करणारें जहाज; जलदचालीचें लहान (एक माणसाचें) विमान; कांहीं जातीचे पक्षी; (ऑक्स०) पुरुष नोकर. *v. i.* to go out or act as s. टेहेळणी करतां जाणें. टेहेळ्याचें काम करणें. 2. *v. t.* to reject with scorn. (सूचना, कल्पना) धुडकावून लावणें, उडवून लावणें, हुर्यो करणें. *Boy-s.*, बालवीर. *S. master*, टेहेळ्यांचा मुख्य; बालवीरशिक्षक. *On the s.*, टेहेळणी करून लष्करी माहिती आणण्यासाठीं.

Scow, *n.* (स्काउ)—(esp. *U. S.*) flat-bottomed boat. चेंदट,-चेंप बुडाचें-जहाज.

Scowl, *v. i.* (स्काउल्)—to wear sullen look, to frown, to look sullen or angry. कपाळाला आंठ्या घालणें, डोळे वटारणें,-उगारणें. *n.* a scowling aspect, angry frown. डोळे वटारणें, रागीट मुद्रा,-चेहेरा. *S.down*, master or overbear with *s.* डोळे वटारून -रागीट मुद्रेनें-गप्प बसविणें, दरारा दाखविणें, दडपणें. *Scowl'ingly, adv.* डोळे वटारून, कपाळाला आठ्या घालून, त्रासून.

Scrăb'ble, *v. i.* & *t.* (स्क्रॅबल्)—to scrawl, to make crooked marks; to scratch or grope or scramble *about*. ओरखडणें, रेघोट्या ओढणें, खरडणें; मेटाकुटीनें चढणें, रापून पाहणें, धडपडणें.

Scrăg, *n.* (स्क्रॅग)—a skinny person or animal; inferior part of neck of mutton; (sl.) a person's neck. काटकोळा, रोड,-खरबरीत-मनुष्य, प्राणी, वनस्पति इ०; बकऱ्याच्या मानेचें मांस; मनुष्याची मान. *v. t.* to put to death by hanging, wring neck of: (Footb.) tackle by the neck; squeeze neck of by way of torture. गळफांस लावणें, मानगुटी पिरगळणें; (फुटबॉ०) मानेनें चेंडू झेलणें; शिक्षा म्हणून मान पिरगळणें. *Scra'ggy, a.* thin & bony. बारीक व हाडकोळा.-*ggily, adv.*;-*gginess, n.*

Scrăm'ble, *v. i.* & *t.* (स्क्रॅम्बल्)—to make way by clambering, &c.; to struggle with competitors to secure a share of something; throw (coins) to be scrambled for; cook (eggs). मेटाकुटीनें चढणें, झोंबाझोंबी करणें, झडापटी करणें; झोंबाझोंबी करून (पैसे वगैरे) फेंकणें; (अंडीं) उबेनें शिजवणें. *n.* a climb or rough walk; eager struggle or competition for something. मेटाकुटीनें चढणें, कष्टानें चढणें, खडबडीत-कष्टाची-चढ, धडपड, चढाओढ, भीड. *Scram'blingly, adv.*

Scrăn, *n.* (स्क्रॅन्)—(sl.) food, victuals. अन्न, अन्नाचे -भाकरीचे तुकडे. *Bad s. to*—(Anglo-Ir.). चें दुर्दैव.

Scră'nnel, *a.* (स्क्रॅनेल्)—(of sound) weak, feeble. अशक्त, दुर्बल (आवाज).

Scrăp, *n.* (स्क्रॅप्)—a small detached piece, shred or fragment; (pl.) odds and ends; picture, paragraph etc. for keeping in a collection; rubbish, waste material for re-working; (sl.) quarrel, fight. तुकडा, कटका, कागदाचा चिठोरा; तुकडा, सटरफटर वस्तु, गाळ-साळ; (संग्रहांत चिकटवून ठेवण्यासाठीं कापून घेतलेलें) चित्र, छेदक इ०; (लोखंड वगैरेची) मोड तोड; आकस्मिक भांडण, कलह. *v. t.* & *i.* to discard as past use; break up; (sl.) quarrel or fight. निरुपयोगी म्हणून टाकून देणें; फोडून-मोडून-तोडून -टाकणें; भांडणें, झोंबाझोंबी करणें. *S. book*, (वर्तमानपत्रांतील कापून घेतलेलीं चित्रें, मजकूर वगैरे) चिकटवून ठेवण्याचें (संग्रह) पुस्तक. *S. of paper*, कागदाचा चिटकोरा, न पाळण्यासारखें अभिवचन (आंतराष्ट्राचे तह वगैरे). *S. heap*, अडगळ. *S.-h. policy*, practice of discarding promptly what is past its prime. प्रत्येक वस्तूचा नीट उपयोग होत नाहींसें पाहून ती टाकून देण्याची प्रवृत्ति. *Scra'ppy, a.*

Scrāpe, *v. t.* & *i.* (स्क्रेप्)—to level, polish, clean, graze or abrade with scraping instruments; erase; to rub the surface with a sharp instrument; to get or amass by economy or with difficulty; draw along with grating or vibration, play fiddle etc. thus; move one's feet noisily on the floor; make a clumsy bow; be parsimonious, pass along something as to be grazed; to get through with a squeeze (fig.). घांसणें, खरवडणें, तासणें, साफ करणें, भादरणें, उकरणें, खोदून काढणें, खणून काढणें, तीक्ष्ण हत्यारानें (चा) पृष्ठभाग घासणें, खरवडणें; खरकर-कर्कश-वाजवणें; (वस्त्याला अडथळा करण्याकरितां) जमिनीवर पाय घासणें; अडाण्यासारखा मुजरा करणें; काटकसर करणें, चिक्कूपणानें वागणें; घासटून जाणें, चाटून जाणें, निभावणें, (परीक्षेंत जेमतेम) सुटणें, पास होणें; कष्टानें पैसे जमवणें. *n.* act or sound of scraping; awkward predicament, a position of difficulty or perplexity. (लेखणीचा) करकर आवाज, घर्षण, कर्कश शब्द; प्रसंग, अडचण, कुलंगडें लचांड. *S.*-one's *chin*, दाढी करणें. *S.* one's *plate*, ताट चाटून पुसून टाकणें, अन्न शिल्लक न ठेवणें. *S. away*, घासून-झिजून-बारीक करणें,-होणें. *S. down*, पाय घासून -वाजवून-(वक्त्याला) गप्प करणें, बोलूं न देणें. *S. through*, निभावणें, थोडक्यांत सटकणें; परीक्षेंतून कसेंबसें सुटणें (पास होणें). *S.-penny*, miser. चिक्कू मनुष्य, कृपण. *S. acquaintance with*, एखाद्याशीं बळेंच ओळख दाखविणें,-लादणें. *A. s. of the pen*, एक दोनच महत्त्वाचे शब्द खरडणें, उदा० आपली सही. *Scra'ping, n.*

Scrā'per, *n.* (स्क्रेपर्)—(*esp.*) metal edge for scraping. किसणी, खवणी; खरवडणें, लोखंडी बूट-

पुसणें ( दरवाज्याबाहेरचें ). Scra'pings, कीस, खरवड, निपटी.

Scrăpp'y, *a.* (स्क्रॅ'पि)—fragmentary; disconnected; (U. S.) full of fight, pugnacious. तुकड्या-तुकड्यांचा, तुटक, त्रोटक; असंबद्ध; भांडखोर, युद्ध-कलह-प्रिय.

Scrătch, *v. t. & i.* (स्क्रॅच्)—to score surface of, wound slightly with claws or nails or something pointed; get scratched; rub with nails to relieve itching; make hole, strike out, mark through by scratching; erase name of, withdraw, from the list of competitors etc. ओरखडणें, ओरखडा काढणें, (अलं०) वरवर पाहणें, खोल न जाणें; खरचटलें जाणें, ओरखडा येणें; खाजवणें (नखांनीं); उकरणें, उखळणें, खोडणें, चिचकुरणें, बोचकारणें; (नांव) खोडणें, खोडून टाकणें, पाठीं घेणें. *n.* a wound or mark or sound made by scratching; slight wound or cut; act of scratching oneself; starting line for race; competitor in handicap receiving no start. चिचकुरा, बोचकुरा; ओरखडा, चरा, चिरखडी; खाजवणें, कंड; (शर्यतीचा) आरंभ करण्याची नेमाची रेघ,-रेषा; बिनसवलतीचा (शर्यतींतील) खेळाडु,-उमेदवार. *a.* scratched together; impromptu; done at short notice. घाईघाईनें जमवलेला, कसाबसा गोळा केलेला; ऐन वेळचा, तात्कालिक; थोड्याच अवकाशांत-वेळेंत-केलेला, थोडक्या सूचनेनें केलेला. *To s. the sruface of,* विशेष खोलांत न शिरणें; वरवर पाहणें. *S. one's head,* (विचारांत पडल्यामुळें) डोकें खाजवणें. *A s. of the pen,* लेखणीचा फटकारा. *S. cat,* तिरस्करणीय मूल, स्त्री.

Scrătch, *n.* (स्क्रॅच)—*Old S.*, the devil. भूत, पिशाच्च.

Scrătch'ў, *a.* (स्क्रॅ'चि)—(of drawing etc.) done in scratches, unskilful or careless; (of pen) making sound of scratching or given to catching in paper; (of crew) of scratch character, not working together. ओरखाडलेलें, निष्काळजीपणानें काढलेलें (रेखाचित्र); कुरकुर वाजणारी, कागदाला भोंक पाडणारी (लेखणी, पेन); विजोड, आयत्या वेळीं जमा केलेली (खलाशी वगैरे मंडळी). *Scracth'ily, adv.*; *-iness, n.*

Scrawl, *v. i. & t.* (स्क्रॉल)—to write in hurried untidy way, to write awkwardly, mark (paper) *over, all over* with bad writing or lines. खरडणें, चिरखडणें, चिरखुड्या काढणें, चितारणें. *n.* hurried writing, note or letter. खरडा, गिचमीड, खोडाखोड, घाईघाइनें खरडलेली चिठी,-पत्र.

Scrawn'ў, *a.* (स्क्रॉ'नि)—(U. S.) lean, scraggy, बारीक, हाडकुळा.

Scream, *v. i. & t.* (स्क्रीम्)—to utter a piercing cry; to laugh uncontrollably; to speak or sing with excessive loudness; (of steam, engine, etc.) whistle or hoot shrilly. किंकाळी फोडणें, किंचाळणें; खदखदां हसणें, हंसवणें, मोठ्यानें ओरडणें, ओरडून सांगणें, (कर्कश) शिटी मारणें,-देणें,—वाजणें. *n.* a piercing cry, a shrill cry; paroxysm of laughter; (U. S.) ludicrous occurrence. किंकाळी, कचकचाट, आरोळी; हंसण्याचा भर; हास्यास्पद प्रसंग,-गोष्ट. *Screaming farce, fun,* intensely funny. विलक्षण-अतिशय-मजेदार, गंमतीचा. *S. of a bunch,* (U. S.) lot of good fellows; (contempt.) good-for-nothings. सच्चे लोक, चांगली मंडळी; निरुपयोगी, कुचकामी लोक. *Scream'y, a.*; *Scream'ingly, adv.* *Scream'iness, n.*

Scree, *n.* (स्क्री)—(mountain) slope covered with loose stones that slide down when trodden on (*often pl.*). पर्वताची दगडाळ उतरण, घसरणारे लहान लहान दगड.

Screech, *n., v. i. & t.* (स्क्रीच्)—a scream of frignt or pain or anger, a harsh shrill noise. (दुःखाची, भीतीची) किंकाळी, कर्कश स्वर, किंचाळी, भयानक आरोळी (फोडणें). *S. owl,* a barn owl. किंचाळणारें घुबड.

Screed, *n.* (स्क्रीड्)—a long tiresome harangue (esp. list of grievances) or letter; one of the fillets of mortar or strips of wood by which surface to be plastered is divided into compartments. (गाऱ्हाणीं पुढें मांडणारें) लांबलचक कंटाळवाणें व्याख्यान, लेख, पत्र; (गिलावा काढण्यासाठीं जागा विभागणारा) चुन्याचा किंवा लांकडी ठोकळा.

Screen, *n.* (स्क्रीन्)—a partition; a curtain; any object used as protection; sheet for display of lantern pictures; riddle for sorting coal etc. into sizes; board on which notices are posted; body proof against electric or magnetic induction etc. पडदा, आवरण, आडोसा, भिंत; आडपडदा. आसरा, आश्रय, संरक्षण, झाडांची छाया; (चलच्चित्रपटांतील चित्रें ज्यावर दिसतात तो) रुपेरी पडदा; (कोळसा चाळण्याची) उतरती चाळण; सूचना-फलक; (वीज, लोहचुंबक वगैरेंना प्रतिकार करणारा) अनुत्पादक-अप्रवर्तक-पडदा, आडपडदा. *v. t.* to afford shelter to, hide partly or completely (*from*); protect from detection or penalties; show on cinema screen; sort (coal etc.) with screens. ला आश्रय देणें, पडदा लावणें, आडोसा करणें; रक्षण-बचाव-करणें; लपविणें, पांघरूण घालणें, पाठीशीं घालणें; रुपेरी पडद्यावर (चित्रपटांतील चित्रें) दाखविणें; (कोळसा) चाळण्यांनीं चाळणें. *A cavalry s.,* (मुख्य सैन्याची हालचाल शत्रूच्या टेहळ्यांना न समजावी म्हणून) पुढें केलेले घोडेस्वार, घोडदळाचा आडोसा. *Under s. of night,* रात्रीच्या काळोखाचा आश्रय करून. *Screened coal,* चाळलेला कोळसा. *Screenings,* कोळशाचा चाळून उरलेला गाळसाळ, भुसा.

Screw, *n.* (स्क्रू)—a cylinder with spiral ridge called the thread running round it outside (*male s.*) or inside (*female s.*); metal male s. with slotted head for holding pieces of wood etc. together; wooden or other screw as part of appliance for exerting pressure; oblique curling motion; a miser or extortioner; (*sl.*) salary; unsound horse; revolving shaft with spiral

blades projecting from ship or airship at stern and propelling it; small twisted-up paper of tobacco, etc.; one turn of a screw. स्क्रू, मळसूत्र, पेच, कैची (लाकडाचे तुकडे इ० घट्ट धरण्याची), दाबाची (दाब देणारी) कैची; वर्तुळाकार-वक्र-गति; कद्रू, चिक्कू, पैसा पिळून काढणारा; पगार, वेतन, व्यंग असलेला,-थकलेला,-घोडा; (आगबोटीचा-विमानाचा-) पंखा; लहान कागदी पळी; फिरकी, चळसा. *v. t. & i.* to fasten or tighten with a screw; to press hard on, to oppress; to extort out of; contort, contract; be miserly. स्क्रूनें घट्ट बसवणें; फिरवणें, पिळवटणें, पेंचांत धरणें, चरकांत धरणें, छळ करणें; (पैसा वगैरे) उकळणें; वळ्या-सुरकुत्या-पडणें, चिक्कू असणें. *Male s.*, नर फिरकी,-स्क्रूसूत्र. *Female s.*, मादी (फिरकी). *Left-handed s.*, डाव्या फिरकीचा. *Have a s. loose, there is a s. loose*, डोकें-मेंदू-ठिकाणावर नसणें. *Put the s. on*, वर सक्ती करणें. S. *one's courage to the sticking place., s. up one's courage*, धीर धरणें, हिंमत धरणें,-करणें. *S.-cutter*, स्क्रू-मळसूत्र-पाडण्याचें हत्यार. *S. driver*, ढिसपीस, पेंचकस. *S.-jack*, मोठमोठें वजन उचलणारा डुमकळस; दंतवैद्याचें शस्त्र,-हत्यार. *S. pine*, केवडा. *S. press*, दाबून टाकण्याचें-दाबण्याचें (पुस्तकें बांधणाऱ्याचें) यंत्र. *S. propeller*, आगबोटीचा-विमानाचा पंखा. *S.-tap*, मादी-स्क्रू पाडण्याचें हत्यार. *S.-wrench*, स्क्रू काढण्याचें यंत्र. *Screw'able*, *a.*

**Screwed**, *a.* (स्क्रूड)—(*sl.*) drunk. दारू प्यालेला, झिंगलेला.

**Scrib'ble**, *v. i.* & *t.* (स्क्रिब्ल्)—to write hurriedly or carelessly; to fill with worthless writing; be (inferior) journalist or author. खरडणें. भरकटणें; वर्तमानपत्रकार-लेखक-कवि बनणें. *n.* scrawl, hasty note. खरडलेली चिठी,-लेख.

**Scribe**, *n.* (स्क्राइब्)—a person who can write; a clerk or secretary, a writer, a penman; pointed instrument for marking; (Bibl.) interpreter of Jewish law. लेखक, ग्रंथकार, लिहिणारा; कारकून, कारभारी; (विटांवर, चिरकामाच्या लांकडावर) खुणेच्या रेघा मारण्याचें हत्यार; यहुदीधर्मशास्त्रप्रवीण,-शास्त्री.

**Scrip**, *n.* (स्क्रिप्)—(*arch.*) a wallet; a provisional certificate of money. जुगदान, पिशवी, झोळी; तात्पुरती चिठ्ठी, पावती.

**Script**, *n.* (स्क्रिप्ट्)—handwriting; printing type imitating handwriting; (Law) original document (opp. *copy*.). हस्तलेख; हस्तलेखासारखा टाइप, लिपि; अस्सल दस्तऐवज, कागदपत्र.

**Scriptor'ium**, *n.* (स्क्रिप्टॉरिअम्)—(*pl.-ia*) a room set apart for writing esp. in a monastery. ग्रंथलेखनशाला; लेखनाची खोली.

**Scrip'ture**, *n.* (स्क्रिप्-चर्)—the Bible, a Bible text; *a* or *the* quotation from the Bible, any sacred book or writing; (arch.) inscription. बायबल (धर्मग्रंथ), बायबलची मत; बायबलमधील उतारा; (ख्रिश्चन धर्माहून इतर धर्माचा) धर्मग्रंथ; शिलालेख. (*attrib.*) taken from or relating to the Bible. बायबलांतून घेतलेला, बायबलसंबंधीं. *S.-teacher*, (गरीब लोकांना त्यांच्या घरीं) बायबल वाचून दाखविणारा. *Scriptural*, *a.* (स्क्रिप्चरल्) based on the Bible; of, taken from, the Bible. बायबलाचा आधार असलेला, शास्त्रोक्त; बायबलचा, बायबलमधील. *-turally*, *adv.* बायबलाप्रमाणें, यथाशास्त्र.

**Scriv'ener**, *n.* (स्क्रिव्हेनर्)—(*hist.*) drafter of documents; a notary, broker, money-lender. खतेंपत्रें लिहिणारा; सावकारी दलाल, अडत्या, व्याजबट्टा करणारा, सावकार.

**Scrobi'culate,-ated**, *aa.* (स्क्रॉ-बि'क्युलट,-लेटिड)—(bot., zool.) pitted, furrowed. खळग्या-सुरकुत्या-पडलेला. [L *scrobis*, ditch]

**Scrŏf'ülä**, *n.* (स्क्रॉफ्युला)—constitutional disease with glandular swellings of the neck, and tendency to consumption. गंडमाळा (रोग). *-ulous*, *a.*; *-ulousness*, *n.*

**Scroll**, *n.* (स्क्रोल्)—a roll of parchment or paper; a schedule or list; book of ancient roll-form; sculptured ornament imitating roll of parchment, head of fiddle, flourish in writing etc. सुरळी; भूर्जपत्राची-चर्मपत्राची-कागदाची गुंडाळी, चर्मपत्रालिखित पुस्तक; सुरळीच्या आकारानें गुंडाळलेलें; खोदीव सुरळीच्या आकाराचें नक्षीकाम, फिडलचा बांकडा शेंडा, लेखणीचा फांटा, वळण, इ. *v. t. & i.* to curl up like paper; adorn with ss. (in pa. p.). कागदा-सारखी सुरळी होणें, गुंडाळणं; गुंडाळ्यांनीं शोभा आणणें.

**Scrō'tum**, *n.* (स्क्रोटम्)—(*pl.-ta*), the pouch containing the testicles. (पुरुषाचा) अंडाशय, वृषण, अंडकोश. *Scro'tal*, *a.* अंडकोशाचा. *Scroti'tis*, *n.* अंडकोश दाह, सूज. *Scro'tocele*, *n.* अंडकोशवृद्धि.

**Scrŭb'**, *v. t. & i. & n.* (स्क्रब्)—to rub hard with something coarse or bristly; use scrubbing brush; extract for use elements from. जोरानें घांसणें, चोळणें, ब्रशानें चोळणें; उपयोगासाठीं (दगडी कोळशापासून) मूलतत्त्वें काढणें. *Scrub'ber*, *n.* (esp.) (दगडी कोळशाचें) धूम्रशोधक (यंत्र). *Scrub'bing*, *n.*

**Scrŭb**, *n.* (स्क्रब्)—brush-wood, stunted trees; an insignificant person, animal, plant; worn or short bristled brush or moustache. झुडपांचें रान, खुरटलेलीं झाडें; खेटरखाऊ, क्षुद्र-मनुष्य; क्षुद्र प्राणी किंवा वनस्पति, ठोकण झालेला ब्रश,-मिशा. *S.-oak*, अमेरिकेंतील खुरटलेलें ओक (झाड). *Scrub'by*, *a.* भिकार, गचाळ, खुरट. *Scrub'biness*, *n.*

**Scrŭff**, *n.* (स्क्रफ्)—back of the neck as used to grasp and lift or drag. मानेची मागची बाजू, मानगुटी. *Take by the s. of the neck*, मानगुटी पकडणें.

**Scrŭmp'tious**, *a.* (स्क्रम्प्शस्)—(sl.) first-rate, delightful. पहिल्या प्रतीचा, उत्तम.

**Scru'ple**, *n.* (स्क्रूपल्)—weight-unit of 20 grains; very small quantity; feeling of doubt or hesitation about something for fear of doing wrong, conscientious objection. वीस ग्रेनचें-दहा गजांचें -वजनी माप; अगदीं अल्प भाग, शंका, किंतु, विकल्प, संदेह, मनाची टोंचणी. *v. t.* to feel or be in-

fluenced by scruples; hesitate owing to scruples. मनांत शंका येणें, दिक्कत वाटणें; काचकूच करणें, ओढतें घेणें. *To make no s. to do*, बिनदिक्कत-न कचरतां-करणें. *A man of no s.*, उफराट्या-उलट्या -काळजाचा, कसलीहि दिक्कत न बाळगणारा. *He does not s. to say*, असें म्हणायला त्याला दिक्कत वाटत नाहीं. [L. *scrupus*, sharp stone]

Scru'pūlous, *a.* (स्क्रू'प्युलस्)—careful not to offend; conscientious; marked by extreme care, punctilious. मनांत किंतु आणणारा, अत्यंत पापभीरु; सदसद्विवेकबुद्धीला अनुसरून चालणारा; फार बारीक पाहणारा, अत्यंत सरळ. *Scrupulos'ity, n., Scru'pulously, adv.*;*-pulousness, n.*

Scrutā'tor, *n.* (स्क्रूटे'टर्)—investigator. अन्वेषक, शोधक.

Scrutineer', *n.* (स्क्रूटिनि'अर्)—one who scrutinizes, an official conducting scrutiny of votes. मतांची मोज करणारा, मतांची ग्राह्याग्राह्यतेविषयीं छाननी करणारा.

Scru'tĭnize, *v. t.* (स्क्रू'टिनाइझ्)—to look closely at; to examine critically. निरीक्षण करणें; काळजीपूर्वक तपासणें. *Scru'tinizingly, adv.* चिकित्सकबुद्धीनें, सूक्ष्म रीतीनें.

Scru'tĭnȳ, *n.* (स्क्रू'टिनि)—critical gaze; detailed examination; official examination of votes cast in election to test their validity. न्याहाळून पाहणें, देहळणी, निरीक्षण; तपास; मतांची छाननी, चौकशी. [L. *scrutari*, search *fr. scruta*, broken pieces]

Scŭd, *v. i.* (स्कड्)—to run or fly straight and fast; skim along; (Naut.) run before the wind. जोरानें किंवा झपाट्यानें जाणें, वाऱ्यापुढें सोसाट्यानें-झांझां करीत जाणें. *n.* scudding motion; vapoury driving clouds. झपाट्याची चाल; वाऱ्यानें वितळणारे ढग.

Scŭf'fle, *v. i.* (स्क'फल्)—to struggle confusedly with pushing about etc. धकाबुकी-धकाधकी-करणें. *n.* disorderly fight. धकाधकी, झोंबाझोंबी, हमरीतुमरी, धकाबुकी.

Scŭg, *n.* (स्कग्)—(sch. sl.) person lacking spirit, sociability, sportsmanship, etc. निरुत्साही, एकलकोंड्या इसम.

Scŭll, *n.* (स्कल्)—one of the small oars of which a pair is worked by rover, oar resting in nick on boat's stern to propel like ship's screw. लहान वल्हें; सुकाणूच्या बाजूला बांधून ठेवलेलें व पंख्याप्रमाणें पाणी कापणारें वल्हें. *v. i. & t.* to use sculls; propel boat with sculls. वल्हीं मारणें; वल्ह्यांनीं होडी पुढें नेणें,-चालवणें. *Sculler, n.* a sculling boat; one who sculls. दोन वल्ह्यांनीं वल्हविण्याची नाव,-होडी; लहान वल्हें मारणारा.

Scŭll'erȳ, *n.* (स्क'लरि)—back kitchen in which dishes are washed, &c. स्वयंपाकाच्या मागची धुण्याभांड्याची खोली.

Scŭll'ion, *a.* (स्क'ल्यन्)—a dish-washer. भांडीवाला.

Scŭlp'tor, *n.* (स्क'ल्प्टर्)—a person who sculptures, one who carves figures. खोदकाम करणारा, मूर्तिकार, नकशीवाला. *Sculp'tress, n. f.*

Scŭlp'ture, *n.* (स्क'ल्प्चर्)—art of forming representations by chiselling, carving, casting, or modelling; a work or works of sculpture; (Zool., Bot.) raised or sunk markings on shell, etc. मूर्ति किंवा पुतळा करण्याची कला, मूर्तिकला; खोदकाम, नकशीचें काम; (शंख वगैरेवरील) निम्नोन्नत भाग, उंचसखल खुणा. *v. t. & i.* to represent in or adorn with or do sculpture. खोदणें, नकशीकाम करणें. *Scul'ptural, a.*

Scŭlpturesque', *a.* (स्कल्पचरे'स्क्)—fit for or suggesting a sculpture. खोदकामाला योग्य, खोदकामाचा.

Scŭm, *n.* (स्कम्)—impurities that rise to the surface of a liquid; (*fig.*) the worst part or offscourings *of*. (कढवितांना वर आलेली) मळी, तवंग, फेस, कड, गाळ, खरवड. *v. t. & i.* to take *s.* from; be or form a *s.* on, (of liquid) develop *s.* मळी काढणें; (वर) मळी येणें,-जमणें; फेसाळणें. *Scum'my, a.* मळी,-तवंग,-फेस आलेला,-जमलेला.

Scŭpp'er, *n.* (स्क'पर्)—a hole in ship's side to carry off water from desk. जहाजाच्या मजल्यावरील (पाणी बाहेर जाण्यासाठीं) भोंक. *v. t.* (*sl.*) to surprise and massacre, sink (ship, crew), do for. अकस्मात् हल्ला करून कत्तल करणें. (जहाज) बुडविणें, नाश करणें, ठार मारणें.

Scŭrf, *n.* (स्कर्फ्)—flakes on the surface of skin cast off as fresh skin develops below, esp. those of head; any scaly matter on surface. (डोक्यावरील) कोंडा, खरवें, मळ; भूस, मळी. *Scurf'y, a. Scurfi'ness, n.*

Scŭ'rrilous, *a.* (स्क'रिलस्)—grossly or obscenely abusive, opprobrious, foul-mouthed. हलकट, अपशब्दमय, तोंडाचा फटकळ, शिवराळ. *Scu'rril* (*e*), *a.* (arch.); *Scurril'ity, n.* पाचकळपणा, अभद्रपणा, अश्लील भाषण.

Scŭ'rrȳ, *v. i.* (स्क'रि)—to run hurriedly (esp. with short quick steps), to hurry. पळून झपाट्यानें जाणें. *n.* an act or sound of scurrying; bustle. झपाटा, सरसर आवाज; गडबड, धांदल. *The scurrying mice*, सुरदिशीं पळून जाणारे उंदीर.

Scŭrv'ȳ, *a.* (स्क'र्व्हि)—paltry, dishonourable, contemptible, low, mischievous. क्षुद्र, गचाळ, गदळ, हलकट, पाजी. *n.* a disease due to lack of fresh food. रक्तपिती (रोग) *Scurvi'ed, a.* रक्तपिती झालेला. *S. grass*, plant of mustard family used against scurvy. रक्तपितीवर औषधी वनस्पति. *S. leaven*, रक्तपित्त.

Scŭt, *n.* (स्कट्)—a short tail, esp. of rabbit, hare or deer. आंखूड शेपटी, लांडी शेपटी.

Scŭ'tage, *n.* (स्क्यू'टिज्)—(hist.) money paid by feudal land-owner in lieu of personal service

जातीनें नोकरी न करतां जमीन धारण करणाऱ्यानें मालकास दिलेला कर,-खंड.

Scŭtt'er, *v. i.* (स्क'टर्)—to run in fussy or startled way. घाबरून पळून जाणें, सैरावैरा धांवणें.

Scŭt'tle, *n.* (स्क'टल्)—a metal pan, a coal-s.; amount of coal that fills a coal-s. शिपतर, घमेलं; शिपतरभर कोळसा.

Scŭt'tle, *n.* (स्क'टल्)—a hole with lid in ship's deck or side or in roof or wall. (जहाजाचें) भोक, झरोका, खिडकी; झडपें, झार. *v. t.* to make hole in ships esp. for purpose of sinking. (जहाज बुडविण्यासाठीं) भोक पाडणें. *v. i.* to scurry; make off; retreat in undignified way. झपाट्यानें पळून जाणें; नामुष्कीनें पळता पाय घेणें,-माघार घेणें. *n.* hurried gate; act of scuttling. लगबगीचें चालणें,-चाल; माघार

Scy'lla, *a.* (सि'ला)—*S. & Charybdis,* six-headed monster living on a rock, and whirlpool, so placed on opposite sides of Straits of Messina that it was hard to steer clear of one without being caught by the other. इटालिच्या किनाऱ्याजवळील मेसिनाच्या आखाताच्या एका बाजूचा खडक, व दुसऱ्या बाजुचा पाण्याचा भोंवरा. खडकावर राक्षस राहतो. तेव्हां या दोहोंमधून निभावून जाणें भयंकर कठीणच, असें प्राचीन ग्रीक लोक मानीत. *From s. to cha.,* एका संकटांतुन दुसऱ्या संकटांत, इकडे आड इकडे विहीर, आगींतून फोंफाट्यांत.

Scȳthe, *n.* (साइद्)—a mowing and reaping implement swung with both the hands; blade continuing axle of ancient war-chariot at each end. कोयता, विळा; प्राचीन लढाऊ रथाच्या कण्याच्या दोन्हीं टोकांची पट्टी,-पातें. *v. t.* cut with s. कोयत्यानें (गवत वगैरे) कापणें. *Scythed, a.*

Sea, *n.* (सी)—the vast expanse of salt water; swell, great billow; a large lake; a vast quantity or expanse of (*fig.*). समुद्र, सागर, दर्या; उंच-मोठी-लाट; मोठें सरोवर; (अलं°) समुद्र, विपुलता. *On the sea,* जहाजांत वगैरे; समुद्रकिनाऱ्यावर असलेला. *To go to s.,* become a sailor. खलाशाचा धंदा करणें. *Follow the s.,* खलाशी होणें,-पतणें. *Put to s.,* बंदर-किनारा-सोडून जाणें. *At s.,* away from, out of sight of, land; perplexed, not knowing what to do. जमिनीपासून दुर, भरसमुद्रांत, समुद्रावर; गोंधळलेला, किंकर्तव्यतामूढ. *The high seas.,* किनाऱ्यापासुन तीन मैलांपलीकडचा समुद्र, भरसमुद्र. *Mistress of the s.,* or *ss.,* बलाढ्य-बलिष्ट-आरमारी राष्ट्र. *The seven ss.,* सातसमुद्र (आर्क्टिक, ॲन्टार्क्टिक, उ° पॅसिफिक, द° पॅ°, उ° अटलांटिक, द° अट°, हिंदी हे सात महासागर). *A heavy s.,* मोठ्या लाटा उसळत असलेला समुद्र. *Ss. mountains high,* डोंगराएवढ्या-पर्वतप्राय-लाटा. *S. like looking-glass* or *sheet of glass,* quite smooth. अगदीं संथ समुद्र. *Ss. of blood,* अमानुष रक्तपात. *S. air,* (आजाऱ्यांकरितां) समुद्रकांठची खारी हवा. *S. anchor,* तुफानाच्या वेळचा तरता नांगर. *S. bear,* उत्तरध्रुवाकडचें पांढरें अस्वल, लोंकयुक्त सील मासा. *S. bells,* समुद्रकांठचे वेत, वेलींचीं झाडें. *S. board,* coast region. समुद्रकिनाऱ्यावरील प्रदेश, समुद्रकांठ. *S. breeze,* खारा वारा, मतलई. *S. borne* (commerce, goods) समुद्रावरचा, जलमार्गानें जाणारा (व्यापार, माल). *S. captain,* दर्यासारंग, जहाजाचा कसलेला-मुरलेला-तांडेल (कप्तान). *S.-conny,* सुकाण्या, सुकाणूं धरणारा खलाशावरचा अधिकारी. *S.-cow,* तिमिजातीचा मासा, समुद्रांतील प्राणी. *S.-dog,* kinds of seal; dog-fish; old sailor (esp. of the Elizabethan sea-captains). सील मासा, डॉग-मासा, मुरलेला दर्यासारंग. *S.-fight,* दर्यावरील-आरमारी-युद्ध. *S.-front,* part of town facing the sea. शहराचा समुद्राभिमुख भाग. *S.-gauge,* जहाजाची (पाण्यांत बुडालेली) खोली, तलमज्जन; समुद्रतलमापक (यंत्र). *S.-girt,* समुद्रवेष्टित, समुद्रवलयांकित (बेट, इ°). *S.-god,-goddess,* समुद्राची देवता, जलदेवता, वरुण. *S.-gull,* a sea-bird. जलकुक्कुट (पक्षी). *S.-horse,* (जलदेवाच्या रथाचा) पाणघोडा, एक जातीचा मासा. *S.-kale,* एक जातीची भाजी. *S. king,* चांचे लोकांचा राजा. *S.-level,* समुद्रसपाटी. *S. legs,* हालत्या गलबतांत-बोटींत-चालण्याची संवय. *S. line,* समुद्रक्षितिजरेषा. *S.-lion,* मोठ्या कानाचे सील मासे. *S.-man* (-मन्) (pl.-*men*), खलाशी; कसलेला कर्णधार,-सुकाण्या. *S. mew, S. gull,* जलकुक्कुट. *S.-mile,* ६०८० फुटांचा सामुद्रिक मैल. *S.-piece,* समुद्राच्या देखाव्याचें-समुद्रावरील देखाव्याचें-चित्र. *S.-plane,* जलसंचारी विमान, पाण्यावर उतरूं शकणारें विमान. *S. rover,* चांचा, चांचेगिरी करणारें जहाज. *S.-scape,* सामुद्रिक देखाव्याचें चित्र. *S.-serpent,* पाणसाप; वासुकी (सर्प) राशि. *S.-side,* समुद्राची बाजू, समुद्र-दर्या-किनाऱ्याची पट्टी. *S.-sunflower,* समुद्रकमळ (प्राणी). *S.-urchin,* समुद्रांड. *S.weed,* समुद्रवेली, समुद्रवनस्पति. *Sea'ward, a., adv. & n.; sea'wards, adv.*

Sea'fāring, *a.* (सी'फेअरिंग्)—occupied in sea voyages, employed in navigation. समुद्रपर्यटन करणारा, दर्यावर्दी. *n.* such occupation. दर्यावर्दीपणाचा धंदा. *S.-farer, n.*

Sea'port, *n.* (सी'पोर्ट्)—a town with harbour. बंदर, बंदरी गांव.

Sea'sick, *a.* (सी'सिक्)—suffering sickness caused by motion of ship etc. बोटीच्या हेलकाव्यानें वांति होणारा, बोट लागलेला. *S.-sickness, n.*

Sea'worthy, *a.* (सी'वर्दि)—(of ship) in fit state to put to sea, strong and well-rigged etc. समुद्रांत सोडण्याजोगें, (बोलकाठें, दोरखंडें वगैरे) मजबूत साहित्य असलेलें (जहाज). *S.-worthiness, n.*

Seal, *n.* (सील्)—impression made on wax; gem or metal stamp used in making seal; act or gift regarded as ratification of, significant mark (*fig.*); an amphibious marine animal. शिक्का, सील, मोहोर, शिक्क्याचा छाप; शिक्कामोर्तब; चिन्ह, खूण; सील नांवाचा जलचर प्राणी. *v. t.* to affix a seal to, to ratify, to confirm; close

securely; stop up; hunt seals. शिक्कामोर्तब करणें, सील करणें; पक्कें करणें; पक्का बंद करणें; सील मासे पकडणें. *Given under my hand and s.*, माझ्या सहीशिक्क्यानिशीं. *To set* one's *s. to*, मंजूर-कायम-करणें. *S ring*, मोहोरेची आंगठी. *S. of love*, प्रेमाचें शिक्कामोर्तब-चुंबन, अपत्यजन्म, इ० *My lips are sealed*, माझें तोंड गप आहे, मला बोलतां कामा नये. *Is a sealed book to me*, हें मला अज्ञातच राहणार. *S. rookery*, सीलमाशांचें उत्पत्तिस्थान.

**Seal'ing-wax**, *n.* (सीलिंग-वॅक्स्)—composition for sealing letters, &c. सील करण्याची लाख, सीलाची लाख.

**Seam**, *n.* (सीम्)—line of junction between two edges, line of separation between strata; thin stratum separating thicker ones. शिवण, टूण; सांधा, भेग, संधिरेषा; सांधणारा पातळ थर. *v. t.* to unite by a seam, to join by seaming. शिवणें, सांधणें, जोडणें. Seam-less, *a.* (esp of garment) made of one piece. बिनशिवणीचा, एकसंधी. *Seam'y*, शिवण-टूण-असलेला, सांधलेला. *Seamy side*, आयुष्यांतील कमी महत्त्वाचा भाग, काळी बाजू.

**Seam'stress, Semp-**, *n.* (सीम्स्ट्रिस, सेम्प्-)—sewing-woman. शिवणकाम करणारी-विणकाम करणारी-स्त्री.

**Se'ance**, *n.* (से'आन्स)—a sitting of a society or deliberative body; a meeting for exhibition or investigation of spiritualistic phenomena. सभा, बैठक, अधिवेशन, सत्र; गूढविद्याचिकित्सा, -संशोधन. [F]

**Seanad Eireann**, *n.* (शॅनद् एअरन्)—upper chamber of the Irish Free State Legislature. स्वतंत्र आयर्लंडचें कायदेमंडळ.

**Sear**, *v t.* (सिअर्)—to wither or blast; to scorch with hot iron; to make callous or insensible, to deaden. सुकून जाणें, वाळणें, पोळणें; वाळवणें; भाजणें, चरका देणें; कोडगा किंवा लोचट करणें. *a.* सुकलेला, सुकून गेलेला. *The s., the yellow leaf*, old age. म्हातारपण.

**Search**, *v. t. & i.* (सर्च्)—to look to find something; to probe or penetrate into. शोधणें, तपास करणें; हुडकणें, कानाकोंपरा शोधणें. *n.* act of searching; investigation: quest. शोध; तपास, झडती. *in search of*, शोधांत, तलासांत. *Right of s*, (मनाई केलेल्या मालाबद्दल तटस्थ राष्ट्रांच्या जहाजांची) झडती घेण्याचा (युध्यमान राष्ट्रांचा) हक्क. *S. warrant*, झडतीचा (सरकारी) हुकूम. *Sear'ching*, कडक, कसून केलेली,-घेतलेली.

**Search'light**, *n.* (सर्च्-लाइट)—electric arc-light arranged to send concentrated beam in desired direction. (शत्रूची टेहळणी करण्याकरितां) टेहळणीचा दिवा, विद्युत्प्रकाशझोत.

**Seas'on**, *n.* (सीझन्)—one of the divisions of the year with distinguishable characteristics of temperature, rainfall, vegetation, etc.; favourable opportunity, proper or fit time; time when something is plentiful or in vogue or active, auspicious or fit hour; period of indefinite or various length. ऋतु; योग्य काळ; समय, वेळ, हंगाम, मोसम, सराई; मुहूर्त, पर्व, पर्वणी; कांहीं वेळ,-मुदत. *v. t. & i.* to flavour or make piquant; to temper, to qualify by admixture, bring into efficient and sound condition by exposure, use, lapse of time, etc.; mature; fit for use by being seasoned. स्वादिष्ट करणें, रुचि आणणें; सौम्य करणें. मिश्रित करणें; तरबेज करणें, रापवणें, (लांकूड) रांपवणें,-पक्का करणें; वापरण्याला योग्य होणें. *A word in s.*, योग्यवेळीं केलेला उपदेश, प्रसंगोचित उपदेश. *In s. and out of s.*, काळवेळ न जाणतां, वेळीं अवेळीं. *The holiday s.*, (नाताळचे वगैरे) सुटीचे दिवस, सुटीचा हंगाम. *Close, open, s.*, (शिकारीचे) बंदीचे दिवस, मोसम. *S. ticket*, (रेल्वे वगैरेचा) मुदतीचा पास. *The four ss.*, Spring, Summer, Autumn and Winter. (पाश्चात्यांचे) वसंत, ग्रीष्म, वर्षा आणि हेमंत हे चार ऋतु. *The dry s.*, उन्हाळा, *The rainy s.*, पावसाळा. *Seasoned soldiers, timber, wine*, कसलेले सैनिक, रांपवलेलें इमारती लांकूड, मुरलेली दारू. *Let mercy s. justice*, न्यायाला दयेमुळें सौम्यता येवो. *Seas'onless, a.*; *Seas'oner, n.*

**Seas'onable**, *a.* (सीझनेबल्)—suitable to the season, opportune, timely. हंगामाला योग्य, प्रसंगोचित, कालानुरूप. *-ably, adv.*; *-ableness, n.*

**Seas'onal**, *a.* (सीझनल्)—depending on or varying with the seasons. ऋतुमानावर अवलंबून असलेला, ऋतुमानपर, ऋतुमानाप्रमाणें-हंगामाप्रमाणें-बदलणारा.-*ally, adv.*

**Seas'oning**, *n.* (सीझनिंग)—relish, condiment, (*esp.*) flavouring materials. चव आणणें, मसाला, मालमसाला.

**Seat**, *n.* (सीट्)—a thing made or used for sitting on, chair, throne, stool, bench; occupation of a seat; part of chair etc. on which sitter's weight directly rests, part of machine that supports another part; the buttocks, part of trousers etc. covering them; site or location *of*; scene, abiding place *of*; country mansion; right to sit as member of board etc. or esp. House of Commons; manner of sitting on horse, bicycle, etc. बैठक, आसन; (अधिकाराची) जागा, आसन; (खुर्चीचें वगैरे) बूड; यांत्रिक बैठक; ढुंगण, ढुंगणाचें वस्त्र; अधिष्ठान, घर, पीठ ठिकाण, ठाणें, आशय, वसतिस्थान; खेड्यांतील वाडा; (सभासदाची) जागा, खुर्ची; बसण्याची लकब, बैठक, आसन. *v. t.* to make sit, to provide sitting accommodation for, place (oneself) in sitting posture; put new seat to; establish in a position; fit or provide with seats; (of room) have ss. for; mend *s.* of. बसवणें, ठेवणें, बसायला जागा देणें; बसणें;

(ला) नवी बैठक बसविणें, नवें धूड घालणें; बसविणें, ठेवणें; बैठकांची-बसणाऱ्यांची-सोय करणें; (अमुक मनुष्यांची) जागा-बैठका-असणें; (ची) बैठक-बूड-दुरुस्त करणें. *Pray take a s.,* sit down. खालीं बसा. *An ancient s. of learning,* प्राचीन विद्यापीठ. *Lost his* or *the s.,* failed to secure re-election to Parliament. (पार्लमेंटांत) पुन्हां निवडून आला नाहीं. *To s. candidate,* (पार्लमेंटांत) निवडून देणें. *Pray be seated,* sit down. खालीं बसा, जागा धरा. *To s. machinery,* यंत्राला बैठक देणें. *-sea'ter, n.* a motor-car, aeroplane, etc. with seats for specified number. (एकेरी, दुहेरी इ॰) बैठकीचें,-आसनांचें,-विमान, मोटार इ॰ *Seat'less, a. Seat'ing, n.* बसविणें, बैठका देणें.

Sebā'cious, *a.* (सिबे'शस)—of tallow or fat, fatty; secreting oily matter. चरबीसंबंधीं, त्वक्स्नेहविषयक, तेलकट पदार्थ बाहेर टाकणारा. *S. glands,* त्वक्स्नेहोत्पादक पिंड. [ L. *sebum,* tallow, sweat ]

Se'cant, *a.* (सी'कन्ट, से'-)—(math.) cutting. खंडिनी, छेदक. *n.* secant line, esp. radius of circle produced through end of arc to meet tangent to other end, ratio of this to radius. वृत्तच्छेदनरेषा, वृत्तखंडिनी, या रेषेचें वर्तुळ-त्रिज्येशीं प्रमाण. *S. of angle, sec.,* (Trig.) व्युत्क्रमकोटिज्या (कोटिज्या=cosine). [ L. *secare,* cut ]

Sĕc'ateurs, *n.* (से'कटर्झ्)—pruning-shears. कापून साफ करण्याचें यंत्र.-कातर,-कातरी,-कैची,-सांचा. [ F ]

Sĕcc'otine, *n.* & *v. t.* (से'कटीन्)—kind of glue. एक प्रकारचा चिकटविण्याचा पदार्थ,-गोंद, (लावणें).

Secēde', *v. i.* (सिसी'द)—to separate oneself, to withdraw formally from a Church or other body. फुटणें, बाहेर पडणें, वेगळा होणें.

Secĕ'ssion, *n.* (सिसे'शन्)—act of seceding or withdrawing from some organization. विभक्त होणें, फूट.

Seclude', *v. t.* (सिक्लूड)—to keep retired or away from company or resort, to separate. वेगळणें, वेगळा ठेवणें, एकान्तीं ठेवणें, एकांतांत राहणें, -बसणें. *Seclu'ded, a.* एकांतांत ठेवलेला, विजन, निर्जन, एकटा, एकांतप्रिय.

Seclu'sion, *n.* (सिक्लू'झन्)—secluding; a secluded place or state, privacy. एकान्तवास, एकान्तस्थान, विविक्तवृत्ति.

Sĕc'ond, *a.* (से'कन्ड)—next after the first; of subordinate importance or value, inferior. दुसरा; कमी दर्जाचा, आणखी एक, अधिक, पुरवणी-वजा, गौण, दुय्यम, दुसरा, प्रति. *In the s. place,* secondly. दुसरें असें कीं, दुसऱ्यांदा, दुसरें कारण. *S. to none,* surpassed by no other. अद्वितीय, कोणालाहि हार न जाणारा. *To come in, finish, s.,* शर्यतींत दुसरा येणें. *S. floor,* दुसरा मजला (तळमजला सोडून). *S. distance,* देखाव्याच्या-चित्राच्या-पुढल्या व पृष्ठभागाच्या मधली जागा. *S. chamber,* (दोन सभागृहांतील) वरिष्ठ सभा (गृह). *S. coming,* (ख्रिस्ताचें) पुनरुत्थान, पुनरागमन. *S. nature,* दुसरा उपजत स्वभाव. *S. thoughts,* (विचार केल्यावर) मागून सुचलेले विचार. *S. teeth,* जाणत्या मुलांचे (एकदां पडून पुन्हां आलेले) पक्के दांत. *To play s. fiddle,* (ची) री ओढणें, (च्या) हाताला हात लावणें. *At s. hand,* ऐकींव (माहिती). *S.-hand,* जुने, वापरलेले. *S. rate,* दुय्यम प्रतीचा.

Sĕc'ond, *n.* (से'कन्ड्)—a person who wins the second place; second-class honours, person who takes this; supporter chosen by duellist or pugilist to see fair play; (*pl.*) goods of second quality, esp. coarse flour; the sixtieth part of a minute, or of an angular degree; (loosely) short time. दुसरा; दुसऱ्या वर्गांत पास होणें, दुसऱ्या वर्गांत परीक्षा पास होणारा; पाठ राखणारा, पाठीराखा; (अने॰) दुय्यम प्रतीचा माल, हलकी कणीक; (मिनिटाचा साठावा भाग) सेकंद, वि-कला; क्षण (भर). *A good s*, close up. (शर्यत जिंकणाऱ्याच्या) अगदीं पाठोपाठ आलेला. *Wait a s.,* क्षणभर-पळभर-थांब. *S.-hand,* सेकंद (दाखविणारा घड्याळाचा) कांटा. *S.-mark,* सेकंदाची किंवा वि-कलेची " खूण.

Sĕc'ond, *v. t.* (से'कन्ड)—to back up, to give one's suppprt to; (*Mil., pr.* सिकॉ'न्ड), to remove officer temporarily from his regiment or corps with a view to staff or other extra -regimental employment. टेकू देणें, पाठिंबा देणें, दुजोरा देणें, अनुमोदन देणें; (लष्करी) अधिकाऱ्याला अन्य कामासाठीं त्याच्या तुकडींतून तात्पुरता कमी करणें. *S. words with deeds,* शब्दाला कृतीची जोड मिळूं दे. *Sec'onder, n.* अनुमोदक, (ठरावाला, ठराव मांडणाऱ्याला) अनुमोदन देणारा.

Sĕc'ondarў, *a.* (से'कन्डरि)—not primary, of the second rank or kind, supplementary. अप्रधान, गौण, दुय्यम, दुय्यम प्रतीचा; (chem.) द्वितीय; (med.) अवलंबी; द्वितीय-दुसऱ्या-अवस्थेचा. *n.* a deputy or delegate; minor cathedral dignitary; s. planet, s. feather, insect's hind wing, s. strata. प्रतिनिधि, दुय्यम अधिकारी; दुय्यम धर्माधिकारी; उपग्रह, पिसावर येणारें पीस, कीटकाचा मागला पंख; दुय्यम पातळी,-थर. *S. education, -school,* दुय्यम (प्रतीचें) शिक्षण, दुय्यम (शिक्षणाची) शाळा. *S. planet,* उपग्रह. *Sec'ondarily, adv.*

Sē'crecў, *n.* (सी'क्रिसि)—keeping of secrets; tendency to concealment, privacy; concealment. गुप्तपणा, गुप्तता, मौनपणा; मौनवृत्ति, (मनाचा) खोलपणा; एकान्तवास, गुप्त ठेवणें. *In s.,* in secret. गुप्तपणें, चोरून.

Sē'crĕt, *a.* (सी'क्रिट)—kept from general knowledge or view; unrevealed; confidential; (of place) secluded; (of person) keeping a matter to himself. गुप्त; गुह्य, खासगी; आडवळणी, एकांताचा; खोल अंतःकरणाचा, गुह्य, बोलून न दाखविणारा. *n.* a secret matter, mystery,

privacy; (*pl.*) s. parts of body. गुप्त गोष्ट; गौप्य, रहस्य; गूढ, कोडें; खाजगी ठिकाण; (शरीराचे) गुह्य अवयव, जननेंद्रियें. *To keep a* or *the s.*, गौप्य राखणें, गुप्त ठेवणें. *In the s.*, गुप्त गोष्ट जाणणाऱ्यांपैकीं. *Open s.*, उघडी गोष्ट. *The ss. of nature*, निसर्गाचें गूढ,-कोडें. *In s.*, secretly. गुप्तपणें, चोरूनमारून.

Sĕc'rĕtaire, *n.* (सेंक्रिटेअर्)—a writing desk with drawers, etc. लिहावयाचें मेज.

Sĕcrĕtār'ĭal, *a.* (सेक्रिटें'अरिअल्)—pertaining to a secretary. चिटणिसाचा, त्याच्या कामाचा, मंत्र्याचा, मंत्र्याच्या कामासंबंधीं.

Sĕcrĕta'rĭate, *n.* (सेक्रिटें'अरिअट्)—secretaryship, body of secretaries. चिटणिसाचा हुद्दा,-काम; चिटणिसांचें मंडळ,-कचेरी.

Sĕc'rĕtarў, *n.* (सेंक्रेटरि)—a person employed to deal with correspondence, collect information, and prepare business; official appointed by society or company or corporation; minister in charge of a Government office; secretaire; (print.) script-type. सेक्रेटरी, कारभारी, चिटणीस; वजीर, मंत्री, प्रधान; लिहिण्याचें मेज; एक प्रकारचा टाइप (टंक). *Private s.*, खाजगी कारभारी. *Unpaid s.*, (कामशिकाऊ) सन्मान्य चिटणीस. *Honorary s.*, abbr. *hon. s.*, unpaid *s.*, सन्मान्य चिटणीस. *War s.*, युद्धमंत्री. *Under s.*, (दोहोंपैकीं एक) दुय्यम मंत्री. *S. bird*, African bird preying on snakes, with crest likened to pen stuck on writer's ear. (आफ्रिकेंतील सर्प खाणारा) पक्षी, गरुड. *S.-ship*, सेक्रेटरीची-मंत्र्याची-चिटणिसाची जागा,-हुद्दा.

Sĕcrēte', *v. t.* (सिक्री'ट्)—to put into a place of concealment, to deposit in a secret place; (physiol.) produce by secretion. गुप्त जागीं ठेवणें, दपविणें, झांकणें, (चें) विमोचन करणें, आन्तरोत्सर्ग करणें. *Secretor, n.*;*-tory, a.* विमोचक.

Sĕcrē'tion, *n.* (सिक्री'शन्)—act of concealing; the sorting out of some special substance from blood or sap; substance so secreted. लपविणें, लपवून ठेवणें; स्वसर्ग, विमोचन, वियोजन, (लाला, मूत्र, मल इ०) आन्तरोत्सर्ग, स्राव.

Sē'cretive, *a.* (सीं'क्रिटिव्ह्, सिक्रि-)—given to making secrets; intentionally uncommunicative. गुप्त गोष्टी करणारा, मौनवृत्तीचा, घुम्या, आंतल्या गांठीचा. *-ly, adv.*;*—ness, n.* मौनवृत्ति, गौप्यगोपनता, घुमेपणा.

Sĕct, *n.* (सेक्ट्)—adherents or a number of people of the same school of thought; a party in a Church; any religious denomination. संप्रदाय, पंथ, शाखा,; धर्मपंथ, पंथाचे लोक, शिष्य-शाखा.

Sĕctār'ian, *n.* (सेक्टें'अरिअन्)—of or confined to a religious denomination. विशिष्ट पक्षाभिमानी, विशिष्ट पंथाचा. *n.* a bigoted adherent of sect. स्वपंथाभिमानी, कट्टा पक्षाभिमानी *Sectar'ianism, n.* लहान लहान धर्मपंथ-पोटजातीं-पाडण्याचा स्वभाव, स्वसंप्रदायाभिमानी.

Sĕ'ctarў, *n.* (से'क्टरि)—(arch.) a member of a sect at the time of Civil war. विशिष्ट पंथाचा अनुयायी.

Sĕ'ctile, *a.* (सें'क्टिल्)—able to be cut. कापतां येण्याजोगा. [ L. *secare sect*, cut ]

Sĕc'tion, *n.* (सें'क्शन्)—severance with a knife; a part cut off; one of the parts into which something is divided; a part of community &c. having separate interests or characteristics; the cutting of a solid by a plane, the plane figure given by this; (in the colonies & U. S.) one of the areas into which undeveloped land is divided; (Nat. Hist.) group, sub-genus. छेदन, परिच्छेद, कापलेला भाग; प्रकरण, खंड, खांड; विभाग, वर्ग; छिन्न, छेद; विभाग, जमिनीचा तुकडा, हद्द; समुदाय, उपजाति. *v. t.* to arrange in, divide into, ss. भागशः रचणें, विभागणें, विभाग-खंड-पाडणें. *S. mark*, (§, § 12) अशी ग्रंथाच्या उपप्रकरणाची-उपविभागाची-खूण. *Conic ss.*, शंकुछिन्न, शंकुछेद. *Sec'tional, a.* विशिष्ट वर्गाचा, -जातीचा,-ठिकाणचा, स्थानिक; निरनिराळे सुटे विभाग असलेला, विभागात्मक; भाग सुटे-निरनिराळे-करतां येण्याजोगा; चौरस आडवा उभा आंखलेला (कागद). *Sec'tionally, adv.*

Sĕc'tor, *n.* (सें'क्टर्)—the part of a circle, &c. enclosed by two of its radii and the arc cut off by them; a plane figure of this shape; (Mil.) any of the parts into which the space occupied by opposing armies is distributed; a mathematical instrument, a rule of two flat pieces working on rule-joint with lines representing sines, tangents, etc. radiating from centre of joint for use in making diagrams etc. द्वित्रिज्यवृत्तखंड, द्वित्रिज्य, दोन त्रिज्या व परिघ यांमधील वर्तुळाचा विभाग, अशा विभागाची आकृति; विरुद्ध पक्षाच्या सैन्यांनीं व्यापिलेल्या रणभूमीचा विभाग; सेक्टरकंपास (घराचा नकाशा वगैरे काढतांना वापरण्याचा). *Sec'toral, a.*

Sĕc'ūlar, *a.* (सें'क्युलर्)—concerned with the affairs of this world; worldly, temporal; lasting for ages; occurring once in an age or century. मार्पचिक, संसारी; ऐहिक, लौकिक; पुष्कळ काळ-चिरकाल-चालणारी; युगांतून किंवा शतकांतून एकदा घडणारा. *n.* a layman; one of the secular clergy (parish priests etc.). संसारी,-कुटुंबी,-मनुष्य; मठाच्या बाहेर राहणारा धर्मोपदेशक, पाद्री. *S. games*, शतकाच्या कालानंतर होणारा-येणारा-प्राचीन रोमन सण. *The s. bird*, phoenix. फिनिक्स् पक्षी. *S. change*, हळूहळू परंतु सतत-अखंड-होणारा बदल. *S. fame*, चिरंतन कीर्ति.

Sĕc'ūlarism, *n.* (सें'क्युलरिझम्)—the doctrine that the basis of morality should be non-religious. ऐहिकवाद; धर्मनिरपेक्ष-नीतिवाद.*-larist, n.* ऐहिकवादी, धर्मनिरपेक्ष-शिक्षणवादी.*-laristic, a.* Secul... मार्पचिकता, ऐहिकता. धर्म...

Sĕc'ūlarize, *v. t.* ( से'क्युलराइझ् )—to make secular, make worldly. प्रापंचिक करणें,-बनविणें, संसारोपयोगी करणें.-*ization, n.*

Secund', *a.* ( सेक'न्ड् )—( bot., zool. ) arranged on one side only. एकपार्श्वग, एकाच बाजूला रचलेला. -*ly, adv.*

Sécure', *a.* ( सिक्यु'अर् )—untroubled by danger or fear; impregnable; safe; ( arch. ) confident; reliable. भयातीत, निर्विघ्न; निभ्रांत, सुरक्षित; निर्धास्त; खात्रीचा. *v t.* to obtain, to get possession of, to guarantee; to make safe; fortify, confine, fasten. मिळवणें, संपादन करणें, निश्चित करणें; सुरक्षित करणें; तटबंदी करणें, बंदोबस्त करणें; घट्ट बसवणें,-लावणें, आवळणें, मजबूत करणें. *A s. fool,* dupe. फसलेला मनुष्य. *S. of victory,* यशाची निश्चिति-खात्री-असलेला. *S. against assault,* हल्ल्यापासून सुरक्षित, हल्ला न होण्यासारखा. *S. from interruption,* अडथळा होण्याची भीति नसलेला. To *s.* vein, ( in surgery ), रक्त वाहूं नये म्हणून रक्तवाहिनी दाबून ठेवणें. *To s. arms,* पावसानें भिजूं नये म्हणून बंदुकीचा चाप खांकेखालीं धरणें. *Loan secured on landed property,* जमीनजुमल्याच्या तारणावर दिलेलें ( सुरक्षित ) कर्ज. *Secure'ly, adv. Secur'able, a.* [ L. *se,* without; *cura,* care ]

Sécūr'iform, *a.* ( सिक्यु'अरिफॉर्म )—( esp. nat. hist. ) axe-shaped. कुठाराकृति, कुऱ्हाडीच्या आकृतीचा.

Sécūr'ity, *n.* ( सिक्यु'अरिटि )—secure state of feeling; thing that serves as a guard or guarantee or pledge; certificate of stock, etc. निश्चितता, निर्भयता, सुरक्षितता; जामीन, हमी, तारण; रोखा.

Sédăn', Sédăn'-chair, *n.* ( सिडॅ'न्, सिडॅ'न्-चेअर् )—a vehicle seated for one and carried by two chairmen on poles. दोन माणसांनीं वाहून नेण्याची खुर्ची, नालकी. ( U. S. ) *Sedan,* enclosed automobile seating four or more persons including driver. चार किंवा अधिक माणसें बसण्याजोगी बंदिस्त मोटारगाडी.

Sédāte', *a.* ( सिडे'ट् )—( of person or his manner, look, speech ) collected, composed; free from agitation, serious, sober. स्थिर, गंभीर; शांतवृत्ति, स्थिरबुद्धि.-*ly, adv.;-ness, n.*

Sĕd'ative, *a.* & *n.* ( से'डेटिव्ह )—( drug, influence ) tending to soothe. उपशामक, शांत करणारा, सौम्यकारक, शामक ( औषधि, वजन इ० ).

Sĕd'entary, *a.* & *n.* ( से'डेन्टरि )—sitting much; done in a chair; ( zool. ) not migratory, ( of spider ) lying in wait. केवळ बसून राहणारा; खुर्चीत बसून केलेला, बैठा, बसकाम्या ( उद्योग, धंदा, इ० ); स्थलांतर न करणारा, दपून राहणारा ( कोळी ).-*tarily, adv.;-tariness, n.* [ L. *sedere,* sit ]

Sédĕr'ŭnt, *n.* ( सिडि'अरन्ट् )—sitting of ecclesiastical or other Court, or of a company in conversation. धार्मिक किंवा सभेची बैठक, ( दारू पिणाऱ्यांची किंवा चर्चा-मंडळाची ) बैठक.

Sĕdge, *a.* ( सेज् )—water-side plants resembling coarse grass, growing in a mass. लव्हाळा, नदीकांठची गवती वनस्पति. *Sedg'y, a.*

Sĕd'iment, *n.* ( से' डिमेन्ट् )—the matter that settles to the bottom of a liquid; dregs. तळांत राहणारा गाळ, साखा, गदळ, खर; कचरा.-*ary, a.* गाळाचा, गदळाचा.

Sédi'tion, *n.* ( सिडि'शन् )—conduct or speech inciting to rebellion, offences against the state. राजद्रोह. *Sedi'cious, a.* राजद्रोहाचा, राजद्रोहात्मक; राजद्रोही;-*ly, adv.;-ness, n.*

Sédūce', *v. t.* ( सिड्यू'स )—to lead astray; to induce to commit sin or crime; to deprive ( woman ) of chastity, to allure, to corrupt. विमार्गाला लावणें; फुसलावणें, फसवणें, पापप्रवृत्त करणें; भ्रष्ट करणें.-*ment, n. Sedu'cer, n.* फुसलावणारा, भुलवणारा. *Seduc'ible, a.; -cingly, adv.*

Sédŭc'tion, *n.* ( सिड'क्शन् )—seducing; being seduced, a thing that tends to seduce; attractive quality, enticement, allurement. भ्रष्ट करणें, -होणें; फुसलावणी, मोहकता. *Seduct'ive, a.;-ness, n.*

Sĕd'ūlous, *a.* ( से'ड्यूलस )—persevering, diligent, assiduous; painstaking; ( of action etc. ) deliberately or consciously continued. उद्योगी, मेहनती; परिश्रम करणारा, चिकाटीचा, व्यवसायात्मक, परिश्रमाचा.-*ly, adv.*; *Sedul'ity, sed'ulousness, n.* उद्योगीपणा, व्यासंग, चिकाटी, व्यवसाय, परिश्रम. *To play the sedulous ape,* acquire literary style by imitation. अनुकरणानें ( स्वतःची ) लेखनशैली बनविणें.

See, *n.* ( सी )—diocese of a bishop, बिशपची गादी, बिशपच्या अधिकारांतील प्रांत. *Holy S., S. of Rome,* the Papacy or Papal court. पोपची गादी-धर्मसभा. [ L. *sedes-sedere,* sit ]

See, *v. i.* & *t.* ( सी )—( *pa. t. saw, pa. p. seen* ), to have or use the power of perceiving with the eye, descry, observe, look at; to discern mentally; to grant an interview to, pay a vist to; to accompany as an escort; be a passive spectator of; learn from the newspaper; experience; take view of, have opinion; make provision, take care, make sure; hold inquiry; reflect; ( Gambling etc. ) accept or take on ( challenge ). पाहणें, दिसणें, दृष्टीस पडणें; अवलोकन करणें, प्रत्यक्ष पाहणें; समजणें, जाणणें, ताडणें, लक्षांत येणें, भेटणें, भेट घेणें, मुलाखत देणें,-घेणें; बरोबर जाणें, पोंचविणें; ( निर्विकार मनानें,-निर्हेतुकपणें- ) नुसतें बघणें; वर्तमानपत्रावरून कळणें, अनुभवणें; मत होणें,--बनणें, मानणें; तरतूद करणें, सांभाळणें, खात्री करून घेणें; चौकशी करणें; चिंतन करणें, मनन करणें; ( जुगार इ० ) ( आव्हान ) स्वीकारणें. *S. into millstone, S. through brick and wall, (fig.),* विलक्षण तीव्र बुद्धीनें ( अति सूक्ष्म रीतीनें ) पाहणें. *Seeing is believing,* प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहावें तेंच खरें, यद्दृष्टं तत्सत्यम्, प्रत्यक्ष हाच खरा पुरावा. *S. red, ( sl. )* सर्व गोष्टींत रक्तपात-खुनशीपणा-दिसणें, खुनशीपणा अंगीं याणणें.

*S. through,* (*fig.*) not be deceived by, penetrate, detect nature of. न फसणें, (लुच्चेगिरी) पूर्णपणें ओळखणें, चें मर्म जाणणें,-ओळखणें, पुरें ओळखणें. *To s. the light,* be born or alive. जन्माला येणें, प्रसिद्ध होणें. *S. things,* भ्रम होणें. *S. stars,* (डोळ्यांपुढें) काजवे चमकणें,-दिसणें. *S. over* (house), सभोंवार फिरून पाहणें. *Worth seeing,* notable. प्रसिद्ध, प्रेक्षणीय. *S. thing done,* देखरेखीखालीं काम करून घेणें. *You s.* (paren.), समजलें का, तुम्हांला स्पष्टच वाटेल; *I s.,* आतां मला कळलें. *As far as I can s.,* माझ्या समजुतीप्रमाणें. *To s. life,* (सर्व करून सवरून) जगाचा अनुभव घेणें. *S. service,* वाकबगार-म्हातारा-होणें. *S. thing through* or *out,* पुरें करणें, तडीस-शेवटास-नेणें. *S. off,* (nav. sl.) out-do, defeat. वर ताण करणें, पाडाव करणें. *S. after,* take care of. ची काळजी घेणें. *S. to it that,* (ला) जप, च्या विषयीं काळजी घे. *Let me s.,* मला-पाहूं-विचार करूं-दे. *Will s. about it,* पाहूं, विचार करूं. *S.-bright,* the plant clary. (डोळ्याला उपशामक) वनस्पति. *To see one off,* ला पोहोंचविणें.

**Seed,** *n.* (सीड्)—germs of flowering plants; single grain of this; offspring; male fecundating fluid, semen, germ of some movement or development, prime cause, beginning. बीं, बीं बियाणें, बीज, बीजाचा दाणा; संतति, संतान, मुलें; शुक्र, वीर्य, रेत; बीज, आदिकारण, *v. i. & t.* to go to seed; produce or let fall seed; sprinkle (as) with s.; remove ss. from (fruit etc.); (sports) sort stronger from weaker competitors. बीं धरणें, बीं होणें, बीं गळून पडणें; बीं पेरणें, बीं बियाणें लावणें; आठीळ काढणें, (कापूस) लोढणें, वटणें; (खेळ०) खेळाडूंचें वर्गीकरण करणें, सारखे सारखे खेळाडु निवडून काढणें. *To go, run, to s.,* बीं येऊन फुलेनासें होणें, बेडौल होणें, वाढ खुंटणें. *Raise up s.,* प्रजा (-मुलें बाळें-) उत्पन्न करणें. *The s. of Abraham,* हेब्रू लोक, ज्यू लोक (अॅब्राहामचा वंश). *To sow the seeds of,* चें बीज पेरणें, बीजारोपण करणें. *S. corn,* बीं बियाणें. *S. eater,* एक जातीचा पक्षी. *S. leaf,* एकदल, डाळिंबी. *S. pearl,* लहान आकाराचें मोतीं, बारीक मोतीं. *S.-plot,* रोप तयार करण्याची जागा; आवणाची जागा; (अलं०) राजद्रोह, असंतोष, वगैरे उत्पन्न होण्याची जागा. *Seeds'man,* dealer in seeds, बीं बियाणांचा व्यापारी. *Seed'ling* रोप, रोपा. *S. time,* पेरणीचा हंगाम. *S. vessel* pericarp, बीजकवच. *S. wool,* सरकीसकट कापूस. *Seeding-machine,* धान्य ओळींत-मेरींत-पेरण्याचें यंत्र.

**Seed'y̆,** *a.* (सी'डि)—full of seed, going to seed, flavoury (brandy); (colloq.) shabby-looking; out-of sorts, feeling ill. बीं भरलेला,-आलेला; चवदार (दारू); गबाळ्या; म्लान, आजारी, रोगी. *S. toe,* घोड्याच्या पायाचा रोग. *Seed'ily, adv.*

**See'ing,** -that, *prep. & conj.* (सीं'इंग्‌,-दॅट्)—since; in as much as. पाहतां, ज्याअर्थी, करितां.

**Seek,** *v. t. & i.* (सीक्)—(*pa. t. & pa. p.* sought, सॉट्) to try to make search or inquiry for; to get, to ask; to resort to for advice or health. शोधणें, चौकशी करणें; मिळविण्याचा प्रयत्न करणें; प्रार्थना-याचना-करणें, आश्रय करणें. *Sought after,* इष्ट, हवासा, फार मागणी असलेला. *Is much to seek,* ची वाण असणें; अद्याप न सांपडणें,-मिळणें.

**Seem,** *v. i.* (सीम्)—to have the air or appearance of being; have the sensation of, be apparently perceived. दिसणें, वाटणें, भासणें; वरवर दिसणें. *It seems (to me that),* मला वाटतें (कीं).

**Seem'ing,** *a.* (सी'मिंग)—ostensible; apparent but perhaps not real; specious. दिखाऊ; दिसणारा, भासणारा; बाह्यात्कारी.

**Seem'inglỹ,** *adv.* (सी' मिंग-लि)—in appearance at least, apparently, ostensibly. दिसण्यांत, बाह्यात्कारीं, जणूं.

**Seem'ly,** *a.* (सीं'म्लि)—decent, decorous, becoming. सुरेख, सुंदर, डौलदार, दर्शनीय, योग्य, उचित, *adv.* (rare) decorously. डौलदारपणानें, शोभेसा.

**Seen,** *pa. p.* of See.

**Seer,** *n.* (सीअर्)—one who sees visions; an inspired person; one who sees into futurity, a prophet. द्रष्टा, साक्षात्कार झालेला; ऋषि, सिद्ध पुरुष; भविष्यवादी, त्रिकालज्ञ.

**Seer,** *n.* (सीर्)—an E.-Ind. weight. शेर (वजनी, मापी).

**Seer'-fish,** *n.* (सी'र्फिश्)—an E.-Indian fish of mackerel kind. एक जातीचा मासा.

**Seer'sŭcker,** *n.* (सी'र्सकर्)—Indian blue-and-white-striped linen.-निळ्या-पांढऱ्या-पट्ट्यांचें तागी कापड. [f. Per. *shir o shakkar,* milk & sugar]

**See'saw,** *n.* (सी'सॉ)—backward-and-forward or up-and-down motion as of a saw; game in which two children sit one at each end of a plank and move each other up and down; vacillation. मागें पुढें किंवा खालींवर गति; मधोमध खांबावर बसविलेल्या लांब फळीवर दोन टोकांना बसून वरखालीं करण्याचा एक प्रकारचा मुलांचा खेळ; धरसोड, चलबिचल. *v. t.* to play at s.; move with s. motion; vacillate in policy, etc. (फळीवर बसून) खालींवर करण्याचा खेळ खेळणें; खालींवर करणें; चलबिचल होणें, धरसोड करणें.

**Seethe,** *v. i. & t.* (सीद्)—to be agitated or in ebullition; to boil or cook by boiling. खवळणें, क्षुब्ध होणें, शिजणें; उकळणें, उकडणें, रांधणें, शिजणें. *Seething with discontent,* अशांततेचा भडका उडत होता. *Seethed, pa. t. & pa. p.* ;(arch.) *sod, sodden.*

**Sĕg'ment,** *n.* (से'ग्मेन्ट्)—a part cut off; a part of a circle or sphere cut off by a straight line or plane intersecting it. विभाग, भाग, खंड, अंश, तुकडा; वर्तुलखंड, वृत्तखंड, धनुष्य, चाप. *v. t. & i.* to divide into ss.; (of embryo) undergo cleavage or divide into parts; (physiol.) reproduce by gemmation. खंड करणें,-होणें; प्रभेदन होणें; (मूळ प्राण्याची वाढ होत होत त्याच्या

अग्राच्या-टोंकाच्या-) प्रभेदनानें नवीन प्राणी उत्पन्न होणें, प्रभेदनानें उत्पत्ति होणें. *Segmental*, *a*,-*mentary*, *a*.

**Sĕg'rĕgāte**, *v. t.* (से'ग्रिगेट्)—to take from the rest and set apart for some purpose; (intr.; crystallog.) separate from a mass and collect about centres or lines of fracture. बाजूला काढून, ठेवणें, (इतरांपासून) दूर ठेवणें, निराळा काढणें.-ठेवणें, एकीकडे,-वेगळा-ठेवणें; वेगळा-सुटा-होणें, वेगळा होऊन मध्यबिंदूजवळ एकत्र जमणें. *a.* (से'ग्रिगेट्) set apart, separate, (arch.); (zool.) simple, not compound. वेगळा ठेवलेला, निराळा; एकेरी. *S. polygamy*, (Bot.) एकाच पुष्पकोशांतील फुलांच्या पाकळयांना निरनिराळें हरितदल असणें. *Segregation*, *n.* निराळा-एकीकडे-वेगळा ठेवणें; (संसर्गजन्य रोगांत) वस्तीपासून दूर ठेवणें.

**Seid'litz powder**, *n.* (से'ड्लिट्स् पॉवड्र्)—aperient medicine of two powders mixed separately *with water and then poured together.* (दोन चूर्णांच्या पाण्यांतील मिश्रणानें होणारें) रेचक (पेय) औषध, रेचकाची पूड.

**Seigneur, Seignior**, *n.* (सेन्यं'र्, से'न्यॉर्)—a feudal lord, lord of manor. (लष्करी) मोकाशी; सरदार, जमीनदार. *Seign(i)orage*, (से'न्यरिज), duty levied on bullion coined, mining royalty, etc. (राजाच्या किंवा जमीनदार सरदाराच्या अधिकाराची-दरक्काची-) सोन्यावरील जकात, खाणीवरील कर वगैरे. *Seigniory*, *n.* (से'न्यॉरि), feudal lordship, a feudal domain. सरदारकी, जमीनदारकी; जमीनदारीचा मुलूख. *Seignorial*, *a.* (सेन्यॉ'रिअल्), of a seigneur. मोकाशाचा, सरदाराचा, जमीनदाराचा. [F]

**Seine**, *n.* (सेन्)—a large fishing net. मासे धरण्याचें मोठें जाळें, पाग. *S. gang*, पाग टाकणारे व ओढणारे लोक, मासेपागे. *v. t. & i.* to fish, catch, with s. मासे पागणें, जाळयांत पकडणें.

Seise, See Seize.

**Seis'in**, *n.* (सी'झिन्)—possession of land by free hold. जमिनीचा पूर्ण स्वामित्वाचा-मालकीचा-ताबा.

**Seis'mic**, *a.* (सा'इझ्मिक्)—(*Seis-'mal*, *a.* rare), of earthquake (s) भूकंपाचा, भूकंपासंबंधीं.

**Seis'mo-**, (सा'इझ्मो-)—comb. form=earthquake. *Seis'mogram*, *n.* भूकंपलेखनयंत्रानें नोंदलेला लेख. *Seis'mograph*,-*mom'eter*,-*'moscope*, *nn.* instruments showing occurrence, place, etc. of earthquakes. भूकंपाचे आघात नोंदणारें (भूकंपलेखक) यंत्र, भूकंपाचा जोर व स्थळ दाखविणारें (भूकंपमापक) यंत्र. भूकंपदर्शक.-*mog'raphy*,-*mol'ogy*. भूकंपविद्या. [*Gk seismos*, earthquake]

**Seize**, *v. t. & i.* (सीझ्)—to confiscate; to take or lay hold of forcibly or suddenly; to snatch; to comprehend quickly or clearly; (Law; usu. spelt *Seise*) put in possession *of*; take possession of by warrant or legal right; (Naut.) lash, fasten with several turns of cord. जप्त करणें; जबरदस्तीनें हिरावून घेणें, पळकावणें, काबीज करणें; पकडणें, धरणें; समजणें, लवकर आकलन होणें, ग्रहण करणें, पटणें, डोक्यांत घेणें; (चा) ताबा देणें; च्या ताब्यांत देणें; ताब्यांत घेणें; जप्त करणें; दोरीच्या वेटाळयांनीं घट्ट बांधणें. (*stand*) *seized* or *seised of*, (चा) कायदेशीर ताबा मिळालेला,-असलेला; जप्त केलेला; (*fig.*) ची माहिती असलेला, ग्रहण-आकलन-केलेला. *Seizor*, *n.* (legal) ताबा घेणारा.

**Seiz'ure**, *n.* (सी'झ्र्)—seizing or being seized, taking possession by force; a stroke of apoplexy, etc. बळजबरीनें घेणें, पछाडणें, जप्ती; (रोगाचा) झटका.

**Sē'jant**, *a.* (सी'जन्ट्)—(herald.) sitting with fore-legs upright. पुढचे पाय उभारून बसलेला.

**Sē'jugous**, *a.* (सी'जुगस्)—(bot.) with six pairs of leaflets. लहान पानांच्या सहा जोड्या असलेला.

**Sē'kŏs**, *n.* (सी'कॉस्)—(archeol.) sacred enclosure esp. of ancient temple. (प्राचीन देवळाचें) पवित्र आवार, सभामंडप.

**Sĕl'dom**, *adv.* (से'ल्डम्)—rarely, not often. क्वचित्, विरळा. *Seldom to be found*, दुर्लभ, दुर्मिळ.

**Sĕlĕct'**, *a.* (सिले'क्ट्)-chosen for excellence, picked, choice; (of society etc.) exclusive. निवडक, वेंचक; शेलका, निवडक (लोकांचा इ°). *v. t.* to pick out as best or most suitable. निवडून घेणें; ची पसंती-निवड-करणें. *S. society*, निवडक लोकांचा समाज. *Select'ness*, *n.*; *Selec'tive*, *a.*;-*tor*, *n.*

**Sĕlĕc'tion**, *n.* (सिले'क्शन)—selecting, number of people selected; what is selected; (Biol.) sorting out in various ways of the types of animal and plant better fitted to survive or multiply regarded as a factor in evolution. निवड, निवडलेले लोक; वेंचा. निवडक उतारा; संवरण, निवड, पसंती. *Natural s*, स्वाभाविक-नैसर्गिक-पसंती.

**Sel'enite**, *n.* (से'लिनाइट्)—crystallized foliated sulphate of lime; (chem.) salt of s.; (*S*-, सिलि-) inhabitant of moon. स्फटिकरूप व पारदर्शक गंधकाम्ल, गंधकाम्लाचा क्षार; चंद्रावरील (काल्पनिक) रहिवासी.

**Sĕlē'nium**, *n.* (सिली'निअम्)—a non-metallic element. एक अ-धातु मूलद्रव्य, 'सोम.'

**Sĕlēnŏg'raphy̆**, *n.* (सेलिनॉ'ग्रफि)—study or mapping of the moon. चंद्रगोलविद्या. [Gk *selene*, moon]

**Sĕlf**, *n.* (सेल्फ)—(*pl. selves*), a person's or thing's own individuality or essence; one's own nature or state or interests or pleasure; (commerc., joc.) myself, yourself, himself, etc.; flower, of uniform, or of the natural wild, colour. आपण, स्वतः, स्वत्व; आत्मा, स्वहित, स्वार्थ, आपण स्वतः इ.; एकरंगी, स्वाभाविक रंगाचें,-फूल. *a.* (of colour) uniform, (of flower) s.-coloured. सर्वसमान,-एकेरी (रंग); एकेरी-एकाच-सारख्या रंगाचें (फूल). *The study of the s.*, आत्मविद्या, आत्मज्ञान. *One's former, better, s.*, आपण पूर्वी कसे होतों तें,

पुर्वस्वभाव; भापल्या उच्च भावना इ. *One's seconds.*, आपल्या जिवाचा मित्र, उजवा हात.

**Sĕlf–**, *pref.* ( सेल्फ्- )—( पूर्वपद म्हणून सामासिक शब्दांत योजतात. ) *Self-abnegation*, आत्मसंयमन. *S.-abuse*, आत्मनिंदा; मुष्टिमैथुन, हस्तमैथुन, वीर्यनाश. *S.-absorbed*, आपल्याच गोष्टींत, कामांत-गढून गेलेला. *S.-acting*, स्वयंगतिक, स्वप्रेरित. *S.-aggrandizement*, स्वतःचा फाजील उत्कर्ष,-पद्धती. *S.-bind'er n.* a reaping machine that binds sheaves as it goes. आपोआप ( कापून त्याच्या पेंढ्या ) बांधणारें यंत्र. *S.-col'oured, a.* of one colour all over. एकरंगी *S.-con'scious, a.* ( esp. ) embarassed or unnatural in behaviour from inability to forget oneself. स्वतःस न विसरणारा, स्वतःचें विस्मरण न पडणारा, आत्मचिंतनपर. *S.-contained, a.* compact or complete in itself; uncommunicative. स्वयंपूर्ण, स्वतःसिद्ध; घुम्या, आंतल्या गांठीचा. *S.-defence, n.* ( esp. ) in phr. *In s.-d.*, स्वतःचा बचाव, स्वसंरक्षण; *Art of s. d.*, boxing. मुष्टियुद्ध, मल्लविद्या. *S.-deni'al, n.* स्वसुखनिरपेक्षता,-निरभिलाष. *S.-destruc'tion, n.* suicide. आत्मनाश, आत्मघात, आत्महत्या. *S.-determined*, exercising or effected by free-will. स्वयंनिर्णयी, स्वयंनिर्णीत. *S.-devotion, n.* आत्मार्पण; ( एखाद्या कार्याला ) आपणाला सर्वस्वी वाहून घेणें. *S.-esteem, n.* स्वतःबद्दल चहा, अभिमान, अहंमन्यता. *S.-examina'tion, n.* analysing of one's motives etc. आत्मपरीक्षण, निरीक्षण. *S.-exis'tent, a* अकृत्रिम, स्वयंभू. *S.-forgetful, a.* unselfish. उदार, निःस्वार्थी. *S.-important, a.* ( esp. ) pompous. दिमाखदार, भपका उडविणारा. *S.-in'terest, n.* स्वार्थ, आपलपोटेपणा. *S.-love, n.* self-esteem, self-interest; selfishness. अहंमन्यता, स्वार्थ, स्वार्थीपणा. *S.-mortifica'tion, a.* asceticism. वैराग्य, त्यागवृत्ति, संन्यासवृत्ति. *S.-preserva'tion*, स्वरक्षण,-पोषण, आत्मरक्षण व संवर्धन. *S.-restraint'*, आत्मसंयमन, आत्मनिग्रह. *S.-right'eous*, laying stress on one's own virtue. आत्मगुणनिष्ठ. *S.-sa'tisfied, a.* contented. तृप्त, समाधानी वृत्तीचा. *S.-seek'ing, a. & n.* स्वार्थपर, आप्पलपोट्या ( मनुष्य ), स्वार्थनिष्ठ,-निष्ठा. *S.-sown,' a.* sprung from self-sown seed. आपोआप बीं पडून रुजलेला. *S.-will, n.* स्वच्छंद, स्वेच्छाचार.

**Sĕlf-ăsser'tion**, *n.* ( सेल्फ्-अॅसर्शन् )—insistence on one's claims unduly. आपल्या हक्काबद्दल फाजील जागरूकता. *S.-assertive*, आपलेंच घोडें पुढें ढकलणारा.

**Sĕlf-cĕn'tred**, *a.* ( सेल्फ्-सेन्टर्ड् )—pre-occupied with one's own personality or affairs. स्वतांतच गढून गेलेला, आत्मनिष्ठ.

**Sĕlf-commănd'**, *n.* ( सेल्फ्-कमान्ड् )—power of controlling emotions, presence of mind. आत्मनिग्रह, प्रसंगावधान.

**Sĕf-détermină'tion**, *n.* ( सेल्फ्-डिटर्मिनेशन् )—free will; ( *Pol.* ) choice of polity or allegiance exercised by a nation. स्वेच्छा; स्वयंनिर्णय, ( राष्ट्राचें ) स्वयंनिर्णयाचें तत्त्व.

**Sĕlf-ev'ident**, *a.* ( सेल्फ्एव्हिडन्ट् )—needing no demonstration. स्वतःसिद्ध, स्वयंप्रमाण.

**Sĕlf-indŭl'gent**, *a.* ( सेल्फ्-इन्डल्जन्ट् )—yielding to temptations of pleasure or ease. चैनी, विषयलोलुप, सुखलोलुप.*-gence, n.* चैनबाजी, विषयलोलुपता.

**Sĕlf-help'**, *n.* ( सेल्फ-हेल्प् )—practice of fending for oneself, assistance of one's self. स्वावलंबन.

**Sĕlf-possessed'**, *a.* ( सेल्फ्-पझेस्ट् )—unperturbed, cool and composed, not excited. अनुद्विग्न, शांत, निग्रही.

**Sĕlf-rèli'ant**, *a.* ( सेल्फ्-रिलायन्ट् )—relying on one's own energies; ready to take responsibility. आत्मविश्वास असलेला; जबाबदारी घेण्यास तयार असलेला.

**Sĕlf-rèspĕct'**, *n.* ( सेल्फ्-रिस्पेक्ट् )—consciousness of conforming to a worthy standard of conduct and thought, respect for one's self. स्वाभिमान.

**Sĕlf-săc'rĭfice**, *n.* ( सेल्फ्-सॅक्रिफाइस् )—postponing of one's interest and desires to others. स्वार्थत्याग, आत्मयज्ञ.

**Sĕlf-start'er**, *n.* ( सेल्फ्स्टार्टर् )—an electric appliance for starting motor without turning crank -handle. ( मोटार चालू करण्याचें ) स्वयंचलित विद्युद्यंत्र -विद्युत्साधन.

**Sĕlf'-styled**, *a.* ( सेल्फ्स्टाइल्ड् )—having taken the name without right. विनाधिकार नांव धारण करणारा, मिथ्या नामधारी, ढोंगी.

**Sĕlf-suffi'cient**, *a.* ( सेल्फ्सफिशन्ट् )—presumptuous, forward, bumptious. अहंमन्य, धीट, घमेंडखोर.

**Sĕlf-suffi'cing**, *a.* ( सेल्फ्सफाइसिंग् )—independent. स्वतंत्र, स्वावलंबी, दुसऱ्याची गरज नसलेला, स्वयंपूर्ण.

**Sĕlf'săme**, *a.* ( सेल्फ्-सेम् )—the very same. तोच, हाच.

**Sĕl'fish**, *a.* ( सेल्फिश )—deficient in consideration for others; actuated by self-interest. आपमतलबी, स्वार्थी, स्वार्थबुद्धीचा, आप्पलपोटेपणाचा.*—ly, adv.*; *Selfishness, n.* स्वार्थीपणा, स्वार्थबुद्धि.

**Sĕlf'less**, *a.* ( सेल्फ्-लिस )—oblivious of self; incapable of selfishness. निरपेक्ष; निःस्वार्थी, स्वार्थरहित. *-ness, n.*

**Sĕll**, *v. t. & i.* ( सेल् )—( pa. t. & pa. pa. *sold* ) to make over or dispose of in exchange for money; keep stock of for sale; betray for money or other reward; ( sl. ) disappoint, trick, take in. विकणें, विक्री करणें; विक्रीकरितां ठेवणें, चा व्यापार करणें, ( पैशासाठीं, वगैरे ) विश्वासघात करणें, गळा कापणें; निराश करणें, फसविणें. *To s. one's life dearly*, (*fig.*) पुष्कळांचा जीव घेऊन मग आपण मरणें, -आपला जीव देणें, मारून मरणें. *Selling race,-handicap, etc.*, ( अधिक किंमत देणाऱ्याला जिंकणारा घोडा ) विकण्याची शर्यत. *To s. one's chastity*, आपलें पातिव्रत्य विकणें, (पैशाकरितां) शरीराचा विक्रा करणें. *Selling like wild-fire*, हां हां म्हणतां खपणें,-उठणें. *To sell off*, ( कमी किंमतीला ) विकून काढणें, माल काढून टाकणें. *S. out*, ( शेअर ) रोखे, भाग वगैरे विकून टाकणें. *S. up*,

(फर्ज फेडण्याकरितां कर्जदाराची) मालमत्ता विकून टाकणें. *Sell'er, n.* विकणारा, विक्या; खपणारा, विकला जाणारा, मागणी असलेला.

Sělt'zer(-water), *n.* (सेल्ट्झर्-वॉटर)—a medicinal mineral water from Selters in Germany; artificial substitute for this, soda-water. औषधी-गुणयुक्त खनिज पाणी; कृत्रिम सोडावॉटर.—*zogene, n.* apparatus making aerated water. सोडावॉटर करण्याचें यंत्र.

Sěl'vage,-vědge, *n.* (से'ल्व्हिज्)—edge of cloth so woven that it cannot unravel, edge-plate of lock with opening for the bolt. आंगचा कांठ, विणलेली किनारी, वशा; (कुलपाच्या आंगची किंवा लावलेली) कडीची पट्टी. *Sel'vedged, a.*

Sēmăn'tics, *n. pl.* (सिमॅ'न्टिक्स)—semasiology. अर्थ-व्युत्पत्ति-शास्त्र.

Sěm'aphōre, *n.* (से'मॅफोअर्)—a signalling apparatus of post with arms used on railways, etc.; military signalling by operator's two arms or two flags. (रेल्वेवरील) खुणेचा (हात असलेला) खांब; (दोन हातांनीं किंवा दोन निशाणांनीं) लष्करी खुणा करणें. *v. i. & t.* to signal, send, by *s.* (खुणेच्या खांबावर) खूण देणें; खुणांनीं संदेश पाठविणें. *Semaphor'ic, a.*

Sēmāsiŏl'ogy, *n.* (सिमेसिऑ'लजि)—branch of philology concerned with meanings. व्युत्पत्तिशास्त्र.

Semăt'ic, *a.* (सिमॅ'टिक्)—(nat. hist.) (of colour or markings in animals) significant, serving to warn off enemies or attract attention. सूचक, शत्रुनिवारक, चित्तवेधक (रंग, पट्टे इ०).

Sěm'blance, *n.* (से'म्ब्लन्स)—outward aspect, superficial appearance. सारखेपणा, सादृश्य, बाह्यरूप, आभास.

Sē'měn, *n.* (सी'मेन्)—generative fluid. वीर्य, रेत, शुक्र, बीज.

Sēmĕs'ter, *n.* (सिमे'स्टर्)—college or university half-year in U. S., Germany, etc. वर्षार्ध, सहामाही.

Sěmi-, *pref.* (सेमि-)—the half of, partly, little more than, occurring in each half. अर्धा, जवळ-जवळ अर्धा, बराचसा, अर्ध-, निम-: *S.-breve,* whole note or time occupied by it. दीर्घस्वर. *S.-detached,* (सेमिडिटॅ'च्ट्), एका बाजूनेंच दुसऱ्या घराला जोडलेलें -लागून असलेलें, (घर). *S-lunar, a.* अर्धचंद्राकृति. *S.-official, a.* निमसरकारी. *S. tone,* अर्धस्वर, कोमल-स्वर. *S.-vowel, n.* अर्धस्वर (उदा० w., y). [L. *Semi, Gk hemi*; Skr. *Sami*, half]

Sě'mĭcircle, *n.* (से'मि-सर्कल)—the half of a circle or its circumference. अर्धवर्तुळ, वृत्तार्ध, अर्धवृत्त. *-circular, a.*

Sěmĭcō'lon, *n.* (सेमि-को'लन्)—the stop (;). अर्ध-विराम.

Sěmĭ-fi'nal, *n.* (सेमि-फा'इनल)—the match or round preceding the final one. शेवटच्या पूर्वीचा, उपान्त्य.

Sě'mĭnal, *a.* (सी'मिनल्,से'-)—of seed or semen; reproductive; pregnant with consequences. बीजसंबंधीं, बीजाचा, रेताचा; उत्पादक; परिणामकारक. *S. fluid,* धातु, वीर्य. *In the s. state,* प्राथमिक वाढ न झालेला.

Sěm'inarў, *n.* (से'मिनरि)—any place or society or state of things favourable to the production of some quality or class, school; R. C. training school for the priest-hood. विद्यालय, पाठशाला; (रोमनकॅथॉलिक पंथीय) पाठशाला.

Sěmĭna'tion, *n.* (सेमिने'शन्)—(bot.) process, plant's manner, of seeding. (स्वाभाविक) बीज-विकिरण (क्रिया).

Sēminif'erous, *a.* (सीमिनि'फरस्)—bearing seed; conveying semen. बीजवाही, रेतवाही.

Sēmiol'ogy, *n.* (सीमिऑ'लजि)—branch of pathology concerned with symptoms. (निदानशास्त्रांतील) रोगलक्षणपरीक्षा,-प्रकरण. Also, *Semiotics, semeiology, nn.* [Gk. *sema*, mark]

Sēmit'ic, *a.* (सिमि'टिक्)—Jewish; of the same family of language as Hebrew. ज्यूसंबंधीं; हिब्रू आदिकरून भाषासंबंधाचा. *n.* हिब्रूआदिक भाषा.

Sěmpitern'al, *a.* (सेम्पिटर्'नल)—eternal. शाश्वतिक.

Sē'narў, *a.* (सी'नरि)—on basis of six. षड्-क्रमिक. [L. *seni*, six each]

Sě'nate, *n.* (से'नट्)—State council of ancient Rome; the modern legislature; upper or second chamber in some parliaments; the governing body of universities. प्राचीन रोमची लोकसभा; कायदेमंडळ; वरिष्ठ सभा; विश्वविद्यालयाचें व्यवस्थापक-मंडळ.

Sěn'ator, *n.* (से'नटर्)—a member of a senate. सेनेटचा सभासद. *Senator'ial, a.*

Sěnd, *v. t. & i.* (सेन्ड्)—(sent), to have conveyed, or bid go, to a destination, to dispatch messenger or message; propel or cause to move or issue; (of God, providence) grant or inflict. पाठविणें, नेणें, धाडणें, पाठवून-धाडून-देणें; (निरोप-निरोप्या) पाठविणें; चालना-प्रेरणा-देणें; पाठवणें, भोगावयास लावणें. *To s. word,* निरोप पाठवणें. *S. up* or *in* one's *name,* चढाओढींत नांव दाखल करणें,-नोंदविणें. *S. off,-away,* घालवणें, हाकलून देणें, वाटेला लावणें. *S. down,* विश्वविद्यालयांतून नांव कमी करणें,-घालवून देणें. *S. off* (letter, parcel), रवाना करणें; (person) ला निरोप देणें, पाठवणी करणें. *S. for* (*a man*), बोलावणें पाठवणें, बोलावून आणणें; (the book) पुस्तक विकत घेणें. *Send'er, n.* पाठवणारा, धाडणारा; प्रेषक (तारयंत्रांतील).

Sěnd, sc-, *n.* (सेन्ड्)—(*sended*), (naut.) impulse given by the down slope of a wave. लाट खालीं जातांना मिळालेली गति,-प्रेरणा. *v. i.* (of vessel) to plunge or pitch owing to this *s.* लाटेप्रमाणें खालीं जाणें,-कलणें.

Sěnd'ŏff, *n.* (सेन्ड्-ऑफ्)—a friendly demonstration at or before a person's departure. कोणी विशिष्ट कार्याकरितां लांब जाण्यापूर्वी किंवा जाण्याच्या वेळीं केलेली पानसुपारी, (शुभचिंतनपूर्वक) पाठवणी, प्रेमाचा निरोप.

**Sĕnĕs'cent**, *a.* (सिने'सन्ट्)—growing old. वृद्ध झालेला, शीर्यमाण, जीर्यमाण.-*cence*, *n.*

**Sĕ'nĕschal**, *n.* (से'निशल्)—steward of medieval great house. (मध्ययुगीन) मोठ्या घरांतील कारभारी, -व्यवस्थापक.

**Sē'nile**, *a.* (सी'नाइल्)—incident to or characteristic of the weakness of old age. वृद्धावस्थेमुळें येणारा, म्हातारपणचा, वार्धक्याचा. *Senil'ity*, *n.* वार्धक्य, म्हातारपण.

**Sē'nior**, *a.* (सी'निअर्)—older in age or standing; of higher degree (opp. Junior). वयानें मोठा, वडील, जास्त दिवस घालवलेला; पदवीनें मोठा, (दर्जानें मानानें किंवा अनुभवानें) मोठा, वरचा, आधींचा, अगोदरचा. *n.* a person of advanced age or long service; one's elder or superior in standing. वयानें मोठा, वडील, -मनुष्य; (नोकरींतला) जुना मनुष्य,-नोकर; वडील नातेवाईक, वरिष्ट कामगार. *The s. service*, Navy as opp. Army. आरमार. *The s. partner*, head of firm. (व्यापारी मंडळीचा) जुना-मुख्य -भागीदार. *S. optime*, केंब्रिज विश्वविद्यालयांत गणिताच्या शाखेंत दुसऱ्या वर्गात पास झालेला विद्यार्थी; *S. wrangler*, कें. वि. गणिताच्या शाखेंत पहिल्या वर्गात पहिला आलेला विद्यार्थी.

**Sēnĭor'ĭtў**, *n.* (सीनिऑ'रिटि)—being senior, superior age, priority of birth. ज्येष्ठत्व, वरचेपणा, वरिष्ठता, वडीलपणा.

**Sĕnn'a**, *n.* (से'ना)—aperient prepared from cassia. सोनामुखी (रेचक औषधि).

**Sĕnn'ĕt**, *n.* (से'निट्)—(hist.) signal-call on trumpet (in stage-directions). तुतारी वाजवून केलेली खूण.

**Sĕnn'ight**, *n*, (से'नाइट्)—(arch.) a week. आठवडा.

**Sensā'tion**, *n.* (सेन्से'शन्)—perception by means of the senses; stirring of strong common emotion, amongst an audience or community; situation that affects this; mental affection. इंद्रियांनीं होणारें ज्ञान, इंद्रियज्ञान, चेतना, खळबळ, वेदना, क्षोभ, उद्दीपन, थरारी, आवेश; क्षोभकारक परिस्थिति.-*al*, *a.* संवेदनाचा, चेतनोत्पादक, संक्षोभजनक. -*alism*, doctrine that sensation is the only source of knowledge; addiction in writers etc. to the use of sensation. संवेदना (प्रामाण्य) वाद; (लेखनांतील) उद्दीपनकारकता, क्षोभकारकता. -*alist*, *n.* संवेदनावादी, खळबळ उडवून देणारा.

**Sĕnse**, *n.* (सेन्स)—any of the special bodily faculties by which sensation is roused; ability to perceive; (*pl.*) person's sanity or presence of mind regarded as based on the normal action of the senses (sight, hearing etc.); practical wisdom; meaning; keen or accurate appreciation of; prevailing sentiment among a number of people. इंद्रिय, ज्ञानेंद्रिय, इंद्रियशक्ति; संवेदना; इंद्रियज्ञान; शुद्ध, समज, भान, शहाणपणा, अक्कल; अर्थ, बुद्धि, उमज, जाणीव; मत, विचार, अभिप्राय. *v.t.* to perceive by sense; understand. इंद्रियांनीं जाणणें; समजणें, कळणें. *The five ss.*, sight, hearing, smell, taste and touch. पांच ज्ञानेंद्रियें (शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध). *Sixth* or *muscular s.*, स्नायुगत ज्ञानशक्ति. *Have you taken leave of, are you out of, your ss.*, are you mad? अक्कल गेली का? वेडा आहेस काय? *In* one's *ss.*, शुद्धीवर, ताळ्यावर. *Errors of s.*, इंद्रियद्वारा मिळालेल्या ज्ञानांत चूक. *Does not make s.*, चा अर्थ कळत-लागत-नाहीं, अर्थबोध होत नाहीं. *In a s.*, एका अर्थी. *Take the s. of the meeting*, सभेचें मत अजमावणें,-कल पाहणें. *S. of duty*, कर्तव्याची जाणीव. *S. of honour*, मानसन्मानाची कल्पना. *S. of proportion*, प्रमाणबद्धता,-मर्यादा. *Aesthetic s.*, (कृत्रिम), सौंदर्यबुद्धि,-कल्पना. *Common s.*, व्यवहारज्ञान.

**Sĕnse'lĕss**, *a.* (से'न्स्-लेस)—wildly foolish; in a state of unconsciousness. मूर्ख, अक्कलशून्य; बेशुद्ध, निश्चेष्ट.

**Sĕn'sible**, *a.* (से'न्सिबल्)—having or showing good sense; judicious; not unaware or unmindful *of*; perceptible by the senses, liable to impression; great enough to be perceived, appreciable. सावध, हुशार; सयुक्तिक, शहाणपणाचा, हुशार, शहाणा; जाणता; इंद्रियांनीं जाणण्याजोगा, इंद्रियगोचर,-ग्राह्य, दृश्य, भासणारा, भासमान; ठळक, मोठा, सुव्यक्त. *Sen'sibly*, *adv.*;—*sibleness*, *n.*

**Sĕn'sibĭlĭty**, *n.* (से'न्सिबिलिटि)—capacity to feel; delicacy of feeling, susceptibility to, impressibility. चेतनाशक्ति, चैतन्य; (भावनेचा-मनाचा-) हळुवारपणा, नाजुकपणा, कोमलता; शहाणपणा, समजूतदारपणा, शुद्धि, भान.

**Sĕn'sĭtĭve**, *a.* (से'न्सिटिव्ह)—of the senses, sensory (rare); very open to or acutely affected by external impressions; touchy or quick to take offence; (of instrument) responsive to or recording slight changes; (Chem.) readily affected by or responsive to appropriate agent. इंद्रियांचा, इंद्रियविषयक; विषयग्रहणक्षम, सचेतन, संवेदक, कोमलमनाचा, हळवा; लवकर तेजी मंदी होणारा, (phys.) सूक्ष्मभेदग्राही; (Chem.) शीघ्रग्राही, प्रतिमाग्राहक. *S. market*, झटकन् तेजीमंदी होणारा बाजार. *S. paper*, (Photo.) (रसायनें लावून केलेला) प्रतिमाग्राहक कागद. *S. plant*, लाजरी (झाड). *Sen'sitive*, *n.* (मनोवशीकरणविद्येंत) ज्याचें हळुवार मन (झटकन) वश केलें जातें, तो. *Sensitiv'ity*, *n.* प्रतिमाग्राहकता; संविविदिष्णुता.

**Sĕn'sĭtize**, *v. t.* (से'न्सिटाइझ्)—to render sensitive; (Phot.) prepare paper to receive photographic impressions. सचेतन करणें; (रासायनिक क्रियेनें प्रकाशलेखाचा कागद) प्रतिमा-ग्राहक करणें. -*sitiza'tion*, *n.*

**Sĕn'sorў**, **Sĕnsor'ial**, *aa*, (से'न्सरि, सेन्सॉ'रिअल्)—of the senses or sensation or the sensorium. ज्ञानेंद्रियांचा; ज्ञानवाहक, संवेदनाचा, (मेंदूंतील) ज्ञानस्थानाचा.

**Sĕnsŏr'ĭŭm,** *n.* (सेन्सॉ'अरिअम्)—(*pl.-ia,-s*) the seat of sensation in the brain, the brain, brain and spinal chord; (Biol.) whole sensory apparatus. मेंदूमधील चेतनास्थान, ज्ञानतंतुपीठ; मेंदू आणि पृष्ठरज्जु; संवेदनोत्पादक साधनें.

**Sĕn'sŭal,** *a.* (से'न्शुअल्)—depending on the senses only and not the intellect or spirit; self-indulgent, carnal, licentious; (philos.) holding the doctrine of, according to, of, sensationalism. इंद्रियविषयक, इंद्रियजन्य, इंद्रियाचा; विषयलोलुप,-लंपट, कामुक; संवेदना (प्रामाण्य) वादाचा. *-ist, n.* विषयलंपट मनुष्य.*-ality, n.* विषयलोलुपता, कामुकता.

**Sĕn'sŭous,** *a.* (से'न्सुअस्)—stimulating or operating through the senses; aesthetic; alive to pleasure received through senses. इंद्रियोद्दीपक, इंद्रियांचा, इंद्रियगत, हृदयसंवेदनात्मक, संवेदनोपभोग्य; सौंदर्यविषयक; इंद्रियसुखलोलुप, विषयासक्त.

**Sent,** *pa. t. & pa. p. of* Send.

**Sĕn'tĕnce,** *n.* (से'न्टेन्स्)—word or set of words complete in itself; declaration of punishment to be inflicted; such punishment; (arch.) one's opininion for or against; pithy saying, maxim, proverb. वाक्य; शिक्षेचा हुकूम; शिक्षा; स्वतःचें मत; म्हण, वचन. *v. t.* to state the sentence of; to declare condemned *to*, to doom to punishment. शिक्षा देणें, शिक्षा सांगणें; शिक्षेचा हुकूम करणें. *Simple s.*, साधें वाक्य; *compound s.*, संयुक्त वाक्य; *complex s.*, संयुक्त-मिश्र-वाक्य. *Subordinate s.*, गौणवाक्य.

**Sĕntĕn'tious,** *a.* (सेन्टे'न्शस्)—aphoristic, pithy; affecting a concise impressive style, brief and full of meaning. सूत्रबद्ध, सूत्रमय; सरस, शब्द थोडे पण अर्थ गंभीर असा. *-ly, adv.*; *-ness, n.*

**Sĕn'tient,** *a.* (से'न्शिअन्ट्)—that feels or is capable of feeling, sensible, susceptible of feeling. सचेतन, ज्ञानग्रहणक्षम, ज्ञानवाहक.*-ly, adv.*; *Sentience, n.*

**Sĕn'tĭment,** *n.* (से'न्टिमेन्ट्)—a mental feeling; a tendency or view based on or coloured with emotion; mawkish tenderness; motto, thought expressed in words. भावना, कल्पना, भाव, मनोविकार, मनोवृत्ति, समजूत; भाव, रस; नाजूक मनोविकार, हळवें मन; अभिप्राय, मत.

**Sĕntimĕn'tal,** *a.* (सेन्टिमे'न्टल्)—swayed or dictated by shallow emotion; designed to excite or gratify the softer emotions. भावनाप्रधान, भावनावश, रसप्रधान, रसात्मक; भावनोद्दीपक, मृदुमनोविकारपूरक.*—ist, n.* भावनावश मनुष्य, नाजूक मनोवृत्तीचा, भावनाप्रधान.*—ity, n.* भावना, मवाळ मनोविकार, भावनात्मकता.

**Sĕn'tinel, Sĕn'try,** *nn.* (से'न्टिनल्, से'न्ट्रि)—a soldier posted to keep guard on any place against surprise; (*-try*) a soldier's watch or duty. संत्री, पहारेकरी, चौकीदार; पाहारा. *Sentinel, v. t.* to keep guard over or in (poet.); station ss. at or in. (वर) पहारा ठेवणें; पहारेकरी-संत्री-ठेवणें. *n.* (*S. crab*), Indian-ocean crab with long eye-stalks. (हिंदीमहासागरांतील) खेकडा. *Sentry -box*, संत्र्याची (उभें राहण्याची) खुंटी,-पेटी.

**Sĕp'al,** *n.* (से'पल्)—calyx-leaf. फुलाच्या बाह्यकोशाचें दल, पुष्पबाह्यदल, बहिर्दल.

**Sĕp'arable,** *a.* (से'परबल्)—capable of being disjoined, capable of separation. वेगळा करतां येण्यासारखा, भेद्य, विभाज्य.*—ness, n.,-ability, n.* भेद्यता, विभाज्यता.

**Sĕp'arate,** *a.* (से'परट्)—physically disconnected; distinct, individual. भिन्न, वेगळा, वियुक्त; निराळा, अलग. *v. t. & i.* (से'परेट्), to make separate, to sever; to part company, to withdraw from each other; come asunder; secede from; go different ways; cease from cohabitation. निराळा करणें, वेगळा करणें किंवा वेगळा होणें; संगत सोडणें, दूर राहणें,-जाणें; तुटणें, सुटणें, फाटणें; फुटून निघणें, विभक्त होणें; निरनिराळ्या मार्गांनीं जाणें, निरनिराळें-पृथक्-होणें; पति-पत्नी हें नातें तोडणें. *S. estate*, स्त्रीधन (यावर नवऱ्याचा ताबा नसतो.) *S. maintenance*, नवऱ्यानें आपखुषीनें (वेगळ्या राहणाऱ्या आपल्या) बायकोला दिलेली पोटगी.

**Sĕparā'tion,** *n.* (सेपरे'शन्)—separating; disunion, disconnection, disjunction; partial divorce. वेगळें होणें; वियोग, विरह, ताटातूट; लग्नसंबंध राहून नवराबायकोचा विभक्तपणा. *Judicial s.*, नवराबायकोचा कायदेशीर (कोर्टानें हुकूम देऊन मिळालेला) विभक्तपणा.

**Sĕp'aratism,** *n.* (से'परटिझम्)—withdrawing from political union, religious body, etc. फुटून निघणें, विभक्त होणें, विभक्ततावाद. *Sep'aratist, n. & a.* फुटणारा, वेगळा होणारा, विभक्ततावादी; फुटण्याचा, वेगळा होण्याचा, विभक्ततावादाचा. *Sep'arative, a.*

**Sē'pia,** *n.* (सी'पिआ)—brown pigment made from fluid secreted by cuttle-fish. एक जातीचा -सीपिआ-रंग; फोटो छापण्याची सीपिआ रंगाची शाई; तांबूस-पिंगट रंग. *S.-drawing*, या रंगांत काढलेलें (रेखा-) चित्र.

**Sĕp'sĭs,** *n.* (से'प्सिस)—(med.) blood-poisoning, septic state. रोगविष रक्तांत शिरून पू होणें, पूयीभवन, रक्त नासणें.

**Sĕpt,** *n.* (सेप्ट्)—a clan, esp. in Ireland. (आयर्लंडमधील) टोळी, वंश.

**Sept-, septem-, septi-,** (comb. forms of Lat. septem, seven) सप्त-: *Sep'tan*, (of fever) आठवड्यानें येणारा (ताप). *Sep'tenate*, (Bot.) सात भागांचा. *Septen'nate*, सप्तवार्षिक (योजना). *Septen'nial, a.* दर सात वर्षांनीं येणारा. *Septilat'eral*, सात बाजूंचा. *Sep'tuple*, सातपट (करणें), सातांनीं गुणणें.

**Sēpŏy,** *n.* (सी'पॉय)—an Indian soldier in British-Indian army. शिपाई, सैन्यांतील हिंदी सैनिक.

**Septĕm'ber,** *n.* (सेप्टे'म्बर्)—ninth month. सेप्टेम्बर महिना.

Sĕptē'narў, *a.* & *n.* (सेप्टीनरि)—of or involving the number seven; set of seven. सप्तसंख्याक (अंकनपद्धति), सप्तक, सातांचा समुदाय.

Sĕp'tic, *a.* (से'प्टिक्)—causing putrefaction. कुजवणारा, पूयुक्त, कुजलेला. *n.* a *s.* substance. पू निर्माण करणारा, -कुजविणारा,-रक्तदोषकारक पदार्थ.

Sĕpticae'mia, *n.* (सेप्टिसी'मिआ)—(path.) blood -poisoning. पूतिज्वर, रक्त दूषित होणें.—*mic, a.*

Sĕptuagenār'ian, *n.* (सेप्ट्यूअजने'अरिअन्)—a person between 69 and 80. ६९ ते ८० च्या दरम्यानचा मनुष्य. *Septuage'nary, a.* of seventy. ७० चा.

Sĕp'tum, *n.* (से'प्टम्)—(pl-ta) partition such as that between the nostrils or the chambers of a poppy-fruit, dis-sepiment. नाकांतील पडदा, मांसपटल, पटल, भित्ति, पडदा.

Sĕp'ŭlchre, *n.* (से'पल्कर्)—a tomb, a cave, a vault. थडगें, कबर, समाधि, शवमंदिर, छत्री. *v. t.* to lay in *s.*, थडग्यांत पुरणें. *The Holy s.*, ख्रिस्ताचें, थडगें. *White s*, a hypocrite. ढोंगी, दांभिक. *Sepul'chral, a.* of sepulchres or sepulture; funeral, gloomy, dismal (voice, look). थडग्याचा, थडग्यांत पुरण्याचा; भयानक, उग्र, भेसूर.

Sĕp'ŭlture, *n.* (से'पल्चर्)—burying, laying in sepulchre, interment, entombment. पुरणें, थडग्यांत पुरणें; मूठमाती.

Sĕqua'cious, *a.* (सिक्वे'शस्)—inclined to follow, servile; (of reasoning) coherent. परप्रत्ययनेय, परावलंबी; सयुक्तिक (भाषण, बोलणारा).

Sē'quĕl, *n.* (सी'क्वेल)—the succeeding part, what follows after; after effects, upshot; logical inference, conclusion. उत्तर भाग; परिणाम, पर्यवसान; तात्पर्य, फलनिष्पत्ति. [L. *sequi*, follow]

Sēquē'la, *n.* (सिक्वी'ला)—(pl.-*lae*), disease, etc. consequential on another. एका रोगामुळें उद्भवणारा दुसरा रोग, परिणामभूतरोग.

Sē'quĕnce, *n.* (सी'क्वेन्स)—succession; cowing after or next; unbroken series; a set of things that belong next each other on some principle of order. अनुक्रम; क्रम; परिणाम; शेवट; परंपरा, आनुपूर्व्य. *S. of tenses,* (gram.) काळांचें आनुपूर्व्य.

Sē'quent, *a.* (सी'क्वन्ट)—coming after; following as a result or logical conclusion. नंतर येणारा, क्रमवार (येणारा); परिणामभूत. *Sequen'tial, a.* क्रमाचा, परिणामभूत, तर्कसिद्ध.

Sequen'tēs, Sequen'tia, (सिक्वेन्टीस,-शिआ)—(abbr. seq. or seqq.) L. wds=(and) the following lines, that follows. (आणि) पुढील ओळी,-मजकूर.

Sēquĕs'ter, *v. t.*, (सिक्वे'स्टर्)—to seclude, to isolate, to set apart from other things; (Law; also *Seques'trate*) to seize temporary possession of (debtor's estate etc.); (of widow) renounce concern in husband's estate, confiscate, appropriate. वेगळा करणें, निराळा करणें, एकान्तीं ठेवणें; (कर्जदाराच्या मालमत्तेचा) तात्पुरता ताबा घेणें, (वादांतील मालमत्ता) तिऱ्हाइताच्या स्वाधीन करणें; (विधवेनें) (पहिल्या) नवऱ्याच्या मालमत्तेवरील हक्क सोडणें; जप्त करणें. *Se'questrable, a.* जप्त करण्यालायक. *Seques'tration, n.* जप्ती, कबजा.-*trator, n.* जप्त केलेल्या-ताब्यांत घेतलेल्या-मालमत्तेची व्यवस्था पाहणारा. *Seques'tered, pa. p.* & *a.* retired, secluded. एकांतवासाचा, आडवळणाचा, विविक्त.

Sēquĕs'trum, *n.* (सीक्वे'स्ट्रम्)—(pl.-*ra.*), a piece of dead bone detached from living bone but remaining in place. हाडाचा सडलेला लोंबता तुकडा.

Sē'quin, *n.* (सी'क्विन्)—former Venetian gold coin about 9 s.; coin-like ornament sewn on dresses, etc. (जुनें ९ शिलिंगांचें) नाणें; कपड्यांवर शिवलेली फुली, बिल्ला इ.

Serăc', *n.* (सेरॅ'क्)—one of the castellated masses formed in glacier ice by intersection of crevasses (usu. in pl.). हिमनदींतील सांचलेल्या बर्फाच्या (भेगा पडून झालेल्या) उंचवट्यांपैकीं एक.

Sĕrā'glio, *n.* (सिरा'ल्यो)—the harem; a Turkish palace. जनानखाना, अंतःपुर; तुर्कस्तानच्या सुलतानाचा वाडा.

Sĕ'raph, *n.* (से'रॅफ्)—(pl.-*im*,-*phs*), celestial being; one of the highest of the nine orders of angels. स्वर्गस्थ देवता; (पहिल्या प्रतीचा) देवदूत. *Seraph'ic, a.* fervent or beautiful as a seraph. देवदूतासारखा सुंदर, अप्रतिम, तेजस्वी.

Serbō'nian bog, *n.* (सर्बो'निअन् बॉग्)—treacherous bog formerly existing between delta of the Nile and isthmus of Suez; (*fig.*) situation from which escape is difficult. (नाईल नदीजवळील प्राचीन) दलदलीचें घातकी डबकें; (अलं०) कठीण, -बिकट-(अनुल्लंघ्य) परिस्थिति.

Sere, *a.* (सिअर्)—whithered, dried up. सुकलेला, वाळलेला.

Sĕrĕnāde', *n.* (सेरिने'ड्)—music sung or played at night by lover at his lady's window. (प्रेमी तरुणानें आपल्या प्रियकरिणीसाठीं संध्याकाळीं) गाइलेलें प्रेमगीत *v. t.* to sing or play s. to. प्रेमगीत म्हणून-वाजवून-वाखविणें.

Sĕrēne', *a.* (सिरी'न्)—(of air) clear and calm; (of sea etc.) placid, unperturbed, unruffled, tranquil. निरभ्र, स्वच्छ; शांत, संथ, प्रसन्नचित्त, निश्चल.

Sĕrĕn'itў, *n.* (सिरे'निटि)—sereneness. शांतता, प्रसन्नचित्तता.

Serf, *n.* (सर्फ्)—(*hist.*) one of the class of labourers bound to and transferred with the soil. दास, गुलाम.-*age*,-*hood*,-*dom*, दास्यत्व, गुलामगिरि.

Serge, *n.* (सर्ज्)—a durable twilled worsted fabric. सर्ज (कापड).

Serg'eant, *n.* (सा'र्जन्ट्)—a police officer between an inspector and constable; (Mil. abbr. sergt.) army warrant or non-commissioned officer. इन्स्पेक्टर आणि कॉन्स्टेबल यांच्यामधील दर्जाचा पोलिस अधिकारी, सार्जंट; एक लष्करी अधिकारी. *Sergeant-at arms,* title of certain court, parliamentary and city officials with ceremonial duties. (सभागृहांतील कांहीं अधिकाऱ्यांची) पदवी. *S.-fish,* एक जातीचा पट्टेरा मासा. *S.-ship, n.*

Sēr'ial, *a.* (सी'अरिअल्)—of or in a series; (of story etc.) issued in instalments; (of publication) periodical. क्रमिक; अनुक्रमें, भागशः, -प्रसिद्ध होणारा; नियतकालिक. *n.* a. *s.* story; a *s.* publication, periodical (rare). भागशः येणारी गोष्ट; नियतकालिक (वर्तमानपत्र, मासिक इ०). *S. rights,* क्रमशः प्रसिद्ध होणाऱ्या गोष्टीचे (स्वाधीन) हक्क. *Sērially, adv.* क्रमशः, क्रमांत, रांगेंत, ओळींत.

Sēr'iate, *a.* (सी'रिअट्)—(*-ated, a.*; *Ser'iate, v. t.*), (to arrange) in the form of a series. क्रमशः रचलेला (-रचणें). *Seria'tion, n.*

Sēriā'tim, *adv.* (सेरिएटिम्)—point by point in order. यथाक्रम, अनुक्रमानें, मुद्यामुद्यानें.

Sēri(ci)culture, *n.* (से'रिकल्चर्)—silk-worm breeding, production of raw-silk. रेशमी किड्यांची जोपासना,-वाढ; कच्चें रेशीम तयार करणें.

Sēries, *n.* (सी'अरिझ्)—a number of things of which each is similar to the preceding, sequence, succession. क्रम, परंपरा; (Math.) श्रेणी; श्रेढी, (Biol.) श्रेणी; सांखळी, शृंखला, आवली, परंपरा.

Sēr'if, *n.* (से'रिफ्)—fine cross-line finishing off stroke of a letter. अक्षराची लपेटी,-चा फांटा.

Sēr'io-cōmic, *a.* (सी'अरिओकॉमिक्)—combining the serious and the comic; jocular. गंभीर विनोदात्मक; विनोदी थट्टेचा.

Sēr'ious, *a.* (सी'अरिअस्)—thoughtful, earnest; important; sincere; demanding thought; not negligible. विचारी, गंभीर; महत्त्वाचा; खरा, अकृत्रिम; विचारार्ह; जोखमाचा, भयाचा, महत्त्वशीर. *S. subjects,* पारलौकिक,-पारमार्थिक,-गोष्टी,-विषय. *Seriously, adv.—iousness, n.*

Serm'on, *n.* (स'र्मन्)—a piece of religious exhortation delivered from the pulpit; an admonition, lecture. धर्मोपदेश, नीतिपर उपदेश, प्रवचन; ताकीद, कानउघाडणी, व्याख्यान.*—ette, n.* a short sermon. लहान प्रवचन.*—ize, v. t.* to talk like a preacher. धर्मोपदेश करणें, प्रवचन-नीत्युपदेश-करणें. *Lay sermon,* (चर्चाशिवाय) खाजगी ठिकाणीं केलेला धर्मोपदेश.

Sērotine, *n.* (से'रॉटिन्)—chest-nut-coloured European bat. (युरोपांतील) वाघूळ. [L. *serus,* late]

Serōtinous, *a.* (सरॉ'टिनस्)-(bot.) appearing late in season. (हंगामीं) उशिरां येणारा.

Sēr'ous, *a.* (सी'अरस्)—of or like serum. रक्तजलाचा, रक्तद्रवाचा,-रसाचा,; रक्तांतील जलासारखा, लशीसारखा.

Serp'ent, *n.* (स'र्पन्ट्)—a snake esp. of large kinds; a treacherous or cunning person; obsolete wind-instrument; kind of fire-work; (*the S.*) a northern constellation. सर्प, साप, नाग; (सापासारखा) विश्वासघातकी मनुष्य, दुष्टसर्प, खलभुजंग; (अतिप्राचीन-तुनाट-) पांवा, बांसरी; (आतषबाजींतील) साप; (उत्तरदिशेकडील) भुजंग राशि. *The, the old S.,* the devil. सैतान. *Pharaoh's, s.,* chemical toy of small cone that when ignited issues in long coiling serpent-like ash. (आतषबाजींतील) साप, सर्प. *S.-charmer,* सर्पमांत्रिक, गारुडी. *S. eater,* सेक्रेटरी, पक्षी. *Serpen'tiform, ser'pent-like, aa.* सर्पाकृति, सापाच्या आकाराचा. [L. *serpere,* Gk *herpo,* Skr. *sripa,* to creep]

Serp'entine, *a.* (स'र्पेन्टाइन्)—like or as of a serpent; writhing, tortuous, meandering; cunning, treacherous. सर्पाच्यासारखा; सापाचा, सर्पविषयक; नागमोडीचा; लुच्चा, विश्वासघातकी. *n.* kinds of dull-green mottled stone; a skating figure. (सापाच्या अंगावरील ठिपक्याप्रमाणें, ठिपके असलेला काळसर हिरवा ठिसूळ दगड; (बर्फावरून घसरत खेळतांना) उमटलेली नागमोडी आकृति. *v. i.* to meander. नागमोडी वळणें घेत भटकणें,-जाणें. *S. windings,* (प्रवाह, रस्ता, किंवा आरोप वगैरेचीं) नागमोडी वळणें. *S. wisdom,* सखोल-अगाध-शहाणपण. *S. verse,* एकच आद्यन्त अक्षराची (कवितेची) ओळ.

Serpīg'inous, *a.* (सर्पि'जिनस्)—(path.) affected with herpes; (of skin-disease) creeping from one part to another. इसब, गजकर्ण, नायटा (वगैरे) झालेला; चरणारा, पसरत जाणारा (नायटा वगैरे रोग).

Sē'rrate, Sērrā'ted, *aa.* (से'रिट्, सेरे'टिड्)—notched like a saw. करवतीच्या दात्यासारखा (उ० गुलाबाचें-केवड्याचें-पान); क्रकच-दंताकार. *Serra'tion, n.* दंतुरता.

Sē'rried, *a.* (से'रिड्)—shoulder to shoulder in close order. खांद्याला खांदा लावलेले, घट्ट, दाट, घनदाट, एकमेकांस चिकटलेले.

Sēr'ūm, *n.* (सी'अरम्)—whey; watery animal fluid esp. the thin part of blood as used for inoculation. (दह्याची) निवळी; रक्तजल, रोगप्रतिबंधक रस, लसिका, लस.

Serv'ant, *n.* (स'र्व्हन्ट्)—a person who has undertaken to carry out the orders of an employer, esp. one engaged in household work; devoted follower, person willing to serve another. नोकर, (घरगुती) चाकर, सेवक, शागीर्द; पदा नोकर, गुलाम, दास; (चा) नोकरी करण्याला तयार असलेला. (अर्जाच्या शेवटचा मायना). *Public ss.,* सरकारी नोकर (वर्ग). *Civil s.,* वरिष्ठ (मुलकी) अधिकारी,-नोकर. *S.-girl,-maid,* मोलकरीण दासी, बाई. *S. of ss.,* नम्रांचा नम्र, अतिनम्र, (पोपनें धारण केलेली पदवी). *A good servant but a bad master,* of

things that should be treated as means and not ends. साधन म्हणून चांगलें पण ध्येय म्हणून चांगलें नव्हे अशी गोष्ट.

**Serve**, *v. t. & i.* (सर्व्ह्)—to be servant to; to do service or be useful to; to suffice, to satisfy; to distribute food; to set food on table; to make legal delivery of (writ, &c.); to set ball in play at tennis; to treat; (colloq.) retaliate on. ची चाकरी करणें, सेवा करणें, उपयोगी पडणें; पुरा असणें; वांटणी करणें, वांटून देणें, अन्न वाढणें; (नोटीस वगैरे) लावणें, लागू करणें, बजावणें; (चेंडू) फेकणें; वागवणें; फेड करणें, बदला घेणें. *n.* (Tennis, etc.) service or turn to serve. चेंडू फेकण्याची-मारण्याची-) पाळी, डाव, खेळणी. *To s. two masters*, (fig.) be divided between two conflicting principles, etc. दोन डगरींवर पाय ठेवणें. *To s. the Lord or God*, धार्मिक असणें, उपासना-आराधना-करणें, सदाचारी असणें. *S. the devil*, be wicked. दुष्ट असणें,-बनणें. *S. tables*, ऐहिक सुख आधीं (पाहणें), पारमार्थिक नंतर. *S. at table*, वाढप्याचें काम करणें. *S. the purpose of*, च्या बद्दल कामाला येणें,-उपयोगी पडणें. *As memory serves*, जेव्हां आठवण होईल तेव्हां. *As occasion serves*, (अनुकूल) वेळ पाहून. *The tide serves*, is suitable for getting out of harbour etc. (भरती-ओहोटीचें) ताण. *S. one's apprenticeship*, उमेदवारी करणें. *S. a sentence*, पूर्ण शिक्षा भोगणें. *S. one's time*, नोकरी पुरी करणें; शिक्षा पुरी भोगणें. *S. time*, तुरुंगांत जाणें, शिक्षा भोगणें. *S. gun, battery*, तोफा डागीत राहाणें. *S. mare*, (घोडा) दाखवणें, फळवणें. *S. up dinner*, जेवण वाढणें. *S. with the same sauce*, सूड उगवणें, जशास तसें करणें. *Serving-man*, male servant. (पुरुष-) नोकर. *Ser'ver*, *n.* वाढणारा; थाळी. [L. *servus*, slave]

**Servi'ce**, *n.* (स'र्व्हिस्)—being servant; servant's status; department of royal or public employ; persons employed in it; set of vehicles, &c. plying at stated times; work done for another; benefit conferred on, or exertion made for, another; use, assistance; liturgical form for use on some occasion; legal service of writ, &c.; meeting of congregation for worship; a set of dishes etc. required for serving meal; (Tennis etc.) act or manner or turn of serving; (Usu. S. *tree*) European tree with leaves like those of mountain ash and small pear-shaped fruit eaten when over-ripe. नोकरी; चाकरी: (नोकरीचें) सरकारी खातें, नोकर, नोकरी; गाड्यांची,-वाहनांची-वगैरे नियमित वेळीं ये जा; सेवा, शुश्रूषा; मदत, साह्य, उपकार, उपयोग; पूजोपचार; उपासना, प्रार्थना; बजावणी, बजावणें, लागू करणें; प्रार्थना-उपासना-करण्याच्या वेळची सभा, बैठक, खान्याच्या पदार्थांचा संच; (टेनिस) टोला, टोला मारण्याची पद्धत, पाळी, डाव, मिर्हूची बाजू; (यूरोप-खंडांतील) एक झाड. *To take s. with*, become servant to. च्या नोकर-चाकर-होणें. *Take into one's s.*, employ. नोकरीला ठेवणें. *The fighting*, or *the ss.*, आरमार, सैन्य आणि वैमानिक दल. *The preventive s.*, coastguards, custom-house, etc. किनारा-रक्षक, कस्टमनाकें, इ० *Is on s., in active s.*, प्रत्यक्ष मोहिमेवर जाणें, कामावर असणें. *See s.*, (खलाशी सैनिक म्हणून) अनुभव असणें, लढाईंत काम करणें. *At your s.*, ready to obey your orders. आज्ञांकित. *On his, her, Majesty's s.*, abbr. *O. H. M. S.* सरकारी कामासाठीं. *Personal s.*, जातसरंजाम. *Has seen s.*, पुष्कळ वापरलेलें, उपयोगांत आल्यामुळें जुनें झालेलें. *S. book*, सार्वजनिक प्रार्थनापुस्तक. *S. line*, नेम-रेषा, (टेनिस) चेंडूफेकीची पहिली मर्यादा. *S.-pipe*, conveying house's water from the main. मुख्य-प्रमुख-पाण्याच्या नळाची घरेपर नेलेली जीवनळी.

**Serv'iceable**, *a.* (स'र्व्हिसेबल्)—useful, beneficial, advantageous, durable. उपयोगी, उपयुक्त, टिकाऊ. *-ably, adv.*

**Serviette'**, *n.* (सर्व्हिएट्)—a table-napkin. (वाढप्याचा) लहान हातपुसणा रुमाल.

**Serv'ile**, *a.* (स'र्व्हाइल्)—of slaves; like or as of a slave; cringing, mean-spirited; without independence. गुलामांचा; गुलामासारखा; खुषामती, आर्जवी, क्षुद्र मनाचा; स्वातंत्र्यहीन. *Servility*, *n.* गुलामगिरी, दास्य; आर्जव, खुशामत; आर्जवीपणा. *Servilely*, *adv.*

**Serv'itor**, *n.* (स'र्व्हिटॉर्)—a henchman or servant; (Oxf. Uni; hist.) student assisted out of college funds in return for menial services. सेवक, नोकर, चाकर, (कॉलेजच्या पैशांतून मदत मिळणारा कामकरी) विद्यार्थी.

**Serv'itude**, *n.* (स'र्व्हिट्यूड्)—slavery or bondage, state of slavish dependence; (Law) subjection of tenement to an easement. दास्य, गुलामगिरी, परवशता; (मालकी हक्काशिवाय) वहिवाट, हक्क.

**Ses'ame**, *n.* (से'समि)—a plant or its oil-yielding seeds. तिळाचें झाड, तीळ. *open s.* (whith ref. to Arabian Nights tale) गुप्त किल्ली, अशक्यप्राय वस्तूकडे जाण्याचा गुप्त मार्ग. *Ses'amum*, *n.* तीळ. [Gk]

**Ses'amoid**, *a. & n.* (से'समॉइड्)—(a bone) shaphed like a sesame-seed, nodular. तिळासारखा, तिलाकृति (हाड)

**Sesquipeda'lian**, *n.* (सेस्क्विपिडे'लिअन्)—a foot and a half long, very long. दीड फूट लांब, लांबच लांब. [L. *sesqui*, one and a half]

**Sess'ile**, *a.* (से'साइल,-सिल)—(bot., zool.) (of flower, leaf eye, etc.) attached directly by the base without stalk or peduncle. अवृन्त, बिनदेंठाचें, देठें (पान इ०), (उ० कांटेधोत्र्याचें पान, घेलघोंडीचें फूल, निशिगंधफूल); मान नसलेलें, अग्रीव (उ० बेडकाचें डोकें).

**Sĕ'ssion**, *n.* (से'शन्)—being assembled for deliberative or judicial business; the period during which such meetings are held; a school or university term; being seated, sitting posture (rare). सत्र, बैठक; बैठकीचा काल; शाळेची किंवा युनिव्हर्सिटीची टर्म (सहामाही, तिमाही, इ०); बसलेलें असणें, बैठी स्थिति. *In s.*, कामकाज चालू असलेलें, बैठक चालू असलेली. *Court of* S., (स्कॉटलंडचें) वरिष्ठ दिवाणी कोर्ट, न्यायालय.-*al*, *a.*

**Sĕs'terce**, *n.* (से'स्टर्स)—the ancient Roman coin (about 2d.) used in stating sums of money. प्राचीन रोमन नाणें (२ पेन्स् किंमतीचें). Also *Sester'tius*, (*pl.—ia*) (शत्र). *Sester'tium*, (*pl.* *–ia.*), १००० सेस्टर्स.

**Sĕstĕt'**, *n.* (सेस्टे'ट)—(sextet) last six lines of sonnet. (सुनीताचें उत्तर-) षट्क, शेवटच्या सहा ओळींचा गट.

**Sĕt**, *v. t. & i.* (सेट)—(set) to put, lay; cause to stand; station; place ready; dispose suitably; fix in position; cause to work; to apply oneself to work; to give an edge to (a razor, a saw); to unite and secure in place after fracture; to provide (a song, words) with music; (of sun,, moon) to sink below the horizon; to adjust hands or mechanism of (clock, trap); to fix the eyes on; to clench (one's teeth); impose or propound for solution or answer; sow or plant or imbed; arrange (type) ready for printing; make insertions in surface with (gold, gems, etc.); curdle, solidify, harden; take shape; develop into maturity; (of tide, current of feeling) have motion, gather force, show or feel tendency; (of dog) take rigid attitude showing presence of game; (of garment) adapt itself to figure; affix (one's seal, signature, name, etc.) to direct and keep (one's hopes) *on*: *Set*, (*pa. p.* of batsman) playing with confidence; (of dancers) take position facing partners. ठेवणें; मांडणें, बसवणें, उभें करणें, स्थापणें, स्थापना करणें, तयार ठेवणें, नीट साजेसे मांडणें,-ठेवणें, योग्य जागीं-ठिकाणीं बसवणें; कामाला लावणें, चालू करणें; धार लावणें; (हाड) सांधणें, (गाणें) बसविणें, सूर लावणें; मावळणें, अस्तास जाणें; घड्याळ वगैरे बरोबर लावणें; टक लावून बघणें, नजर लावणें, (दांत) घट्ट आंवळणें, (प्रश्न, कोडें) विचारणें, घालणें; पेरणें, लावणें, रोवणें, पुरणें; छापण्यासाठीं (खिळे) जोडणें, व्यवस्थित लावणें; जडविणें, बसविणें, ला कोंदण करणें, (रत्न) जडित -खचित-करणें; विरजणें, थिजणें, गोठणें, घन बनणें; आकाराला येणें, आकार बनणें, मूर्तिमान होणें, पूर्ण वाढ होणें,-वाढीला लागणें; (भरती) येणें, लागणें, चा ओघ असणें; (मनाचा कल, भावना) कडे वळणें, झुकणें, रोख असणें; (शिकार दिसली असतां) ताठरपणा दाखविणें, आवेश दाखविणें; (कपडा) अंगाला ठीक बसणें,-नीट होणें,-येणें; वर (सही, शिक्का) करणें, मारणें; (आशा) धरून-डोळे लावून-बसणें; स्थिर झालेला (खेळाडू); समोरासमोर-जोडीनें-उभें राहणें. *To s. foot*, tread *on*. (वर) पाय ठेवणें, चालणें. *S. thing against another*, आभेद करणें, समतोल करणें, विरुद्ध उभा करणें. *S. apart* वेगळें ठेवणें, शिलकीस ठेवणें. *S. aside*, बाजूला ठेवणें; रद्द करणें, गाळणें. *S. by*, शिल्लक ठेवणें. सांठवणें. *S. stone out*, वरचा दगड (खालच्या दगडाच्या) थोडा बाहेर मांडणें. *S.* person *over* others, वर नेमणें, वर अधिकार देणें;-ठेवणें. *S. the axe to*, तोडण्याला -नाशाला-कमी करण्याला-सुरवात करणें. *S.* one's *wits to another's*, शीं वादविवाद करणें. *S. sail*, शीड उभारणें, प्रवास सुरू करणें, जहाज हाकारणें. *S. one's life on a chance*, जीविताचा जुगार खेळणें, जीव धोक्यांत घालणें. *S. price on* one's *life* or *head*, (एखाद्याला) ठार मारण्याकरितां बक्षीस लावणें. *To s. store* or *much by*, *S. by*, estimate or value highly. मोठ्या किंमतीचा लेखणें. *S.* one's *teeth*, दांत घट्ट आंवळणें; (*fig.*) निर्धार-ठामनिश्चय-करणें. *S. speech*, आगाऊ तयार केलेलें भाषण. *S. on* or *upon*, विषयीं निर्धार झालेला, आसक्त,-गढून-गेलेला. *To s.* one's *house in order*, fig. introduce reforms. स्वतःचें घर (आधीं) सुधारणें. *S.* one *in the way*, ला मार्गदर्शक होणें. *S. at liberty*, *s. free* मुक्त करणें. S. *persons by the ears, at variance* or *loggerheads*, produce quarrels. भांडण, -कलागत,-लावून देणें. *S. at naught*, न जुमानणें, तुच्छ,-हलका-लेखणें. *S. paper*, परीक्षेचे प्रश्न (ची प्रश्नपत्रिका) काढणें. *Tree sets*, झाडाला फळें येतात. *Eyes s.*, दृष्टि (मूर्च्छा, मरण, इ० वेळीं) निश्चल होणें. S. *about*, begin, take steps towards. आरंभणें, योजना करणें. *S. down*, नोंदून,-टिपून, ठेवणें, नेमणें. *S. forth*, पुढें मांडणें, जाहीर करणें, पुढें चालूं लागणें. *S. in*, लागणें, सुरू होणें, धरणें, बसणें, स्थिरावणें. *S. up*, (धंदा, संस्था) सुरू करणें, स्थापणें; संसारास लावणें; लावणें, मांडणें; (स्वर) चढवणें; पुढें करणें,-मांडणें; उदयास-नांवारूपास -येणें. *S. up for*, (चा) आव आणणें,-घालणें. *n.* a number of things or persons that belong or consort together; series, collection, group, clique; group of games in tennis etc; setting of sun; direction of current or wind; attack directed *at*; configuration; hang or fit; slip or shoot for planting. जमाव, झुंड, टोळी; जोड, डाव, संच, समुदाय; चांडाळचौकडी, वर्ग, मंडळ; (खेळांतील) डाव; (Poet.) अस्त, मावळणें; (प्रवाहाची-पाण्याची) दिशा, गति, (मताचा) कल, झोंक; (वर) हल्ला; ठेवण, झोके, मांड, मांडणी;, ठाकठीक. तोल, माप, बेत; कलम, रोपा, रोपटें. *To make dead s. at*, एकत्र होऊन विरुद्ध कोल्ह्या करणें; चीत करणें.

**Sĕt-back'**, *n.* (सेटबॅ'क)—a check or relapse. खीळ, माघार, पिछेहाट, मागें हटण्याचें अंतर.

Sĕt-down', *n.* (सेट्डा'उन्)—a rebuff, snub. हीमणा, ढोला, वाघणें, दडपण.

Sĕt-ŏff', *n.* (सेट्-ऑ'फ्)—a thing set off against another, counterpoise, compensation. तोल, आमंड, भरपाई, वजावट.

Set-out', *n.* (सेट्अ'उट्)—things set out, a display. मांडलेल्या वस्तु, मांडणी, शोभिवंत मांडणी,-रचना.

Sĕt'-square, *n.* (सेट्'स्क्वेअ्)—draughtsman's appliance for drawing lines at certain angles. तिकोनी काटकोन्या.

Sĕt-to', *n.* (सेट्-टू')—a bout of fighting or argument. दंगल, मारामारी, वादविवादाची चढाओढ, -दंगल.

Sĕttee', *n* (सेटी')—a seat accommodating two or more, esp. kind of double armchair or short sofa, 2. Mediterranean vessel with two or three masts. (पाठ असलेलें, दोन किंवा अधिक माणसांसाठीं,) बांक; भूमध्यसमुद्रांतील जहाज.

Sĕtt'er, *n.* (से'टर्)—a dog trained to set. शिकारी कुत्रा.

Sĕtt'ing, *n.* (से'टिंग्)—music of a song, etc.; environment or accessories setting a thing off. गाण्याची चाल; जडाव, कोंदण, जडणावळ, विशिष्ट परिस्थिति, देखावा.

Sĕtt'le, *v. t. & i.* (से'टल्)—to establish or become established in an abode or place or way of life; to sit or make sit down for a stay; cease from wandering, to determine, to agree, to decide, to appoint; (of bird, fly, etc.) to alight; to colonize (country); to subside, sink to bottom; to deal effectually with; to dispose or get rid of; to pay (a bill). स्थिर होणें,-करणें,-बसणें; घरदार करून राहणें; सोईस लावणें, जन्माची सोय लागणें,-होणें, स्थिर दिशा लागणें, तात्पुरतें राहणें, वस्ती करणें; कायम होणें; निश्चय करणें, ठरविणें, नेमणें; निवाडा करणें, निकाल देणें; खालीं उतरणें,-येऊन बसणें; वसाहत करणें, वसवणें, शांत होणें, निवळणें, तळाला बसणें, सांका धरणें, गाळाच्या रूपानें तळाला बसणें; निकाल लावणें, थांग्यास लावणें; निकाल करणें, वाटेला लावणें; (हिशेब) देऊन टाकणें, हिशेब पुरा करणें, बाकी चुकती करणें. *S. the day,* fix date. दिवस-तारीख -नक्की करणें. *S.* one's *affairs,* भानगडी मिटविणें, (अखेरची-मृत्यूपूर्वीची) निरवानिरव करणें, मृत्युपत्र वगैरे करणें. *Soil, foundation, settles,* जमीन, पाया -खचतो. *S. up,* देणें, घेणें,-हिशेब ठरवणें,-चुकता करणें. *Settled, pa. p.* (हिशेब चुकता झाला, असें दाखविणारा शेरा). *Will you s. for me?* माझें बिल (आकार) देऊन टाक. *Settled all his property on his wife,* त्यानें आपली सर्व मालमत्ता आपल्या बायकोच्या नांवानें केली. *Settled estate,* (कांहीं अटींवर मिळालेली) तहाहयात इनामी जमीन.

Sĕtt'le, *n.* (से'टल्)—a bench with high back and box below seat. उंच पाठीचें बांक.

Sĕtt'lemĕnt, *n.* (से'टल्-मेन्ट्)—terms on which something is settled on person or deed stating these; in India the process of assessing the Government land tax over a specified area; a colony; a place of abode; a company of persons established in a poor district as a centre of social life; (U. S. & colonies) a small village. तोड, समेट, तडजोड, निकाल, निर्णय; निकालपत्र, निवाडापत्र; धारेबंदी; वसाहत; राहण्याचें ठिकाण; वसाहत करून राहलेले लोक; लहान खेडें. *Permanent settlement,* कायम धारेबंदी, धारापद्धति.

Sĕtt'ler, *n.* (से'टलर्)—In vbl senses; an early colonist; (sl.) decisive blow, argument or event. स्थिर होणारा, घरदार करून राहणारा; मूळ वसाहतवाला, निर्णायक तडाखा, वादाचा मुद्दा, प्रसंग.

Sĕv'en, *a. & n.* (से'व्हन्)—one more than six, 7, VII. सात, साताचा आंकडा. *S.-fold, a. & n.* सातपट, सातपटीनें. *Seventh, a. & n.* सातवा (भाग); *-ly, adv.* सातव्यानें. *In the seventh heaven,* सप्तम स्वर्गांत, सुखातिशयांत, अतिशय समाधानांत. *Seventh sister,* popular name of an Indian bird of gregarious habits. एका पक्ष्याचें नांव,

Sĕventeen', *a. & n.* (से'व्हन्-टीन्')—seven and ten. सतरा. *Sweet s.,* age of girlish beauty. मुलीच्या अप्रतिम सौंदर्याचें वय, १७ वें वर्ष. *Seventeen'th, a. & n.* सतरावा.

Sĕv'entў, *a. & n.* (से'व्हन्टि)—seven times ten. सत्तर.*-fold, a. & adv.*; *seventieth, a. & adv. the seventies,* (आयुष्यांतील,-शतकांतील) ६९ ते ८० वर्षांचा काळ.

Sĕv'er, *v. t. & i.* (से'व्हर्)—to disjoin, to separate, to divide in two; to cut or break off, be parted or separated; take away; (Law) conduct case independently of the rest. वेगळा करणें, दोन भाग करणें; तोडणें, तुटणें, पृथक् राहणें; वेगळा काढणें (भाग इ०); (इतर सहकाऱ्यांहून वेगळेपणानें) कज्जा खेळणें. *Sev'erable, a.*

Sĕv'eral, *a.* (से'व्हरल्)—a good many, three or more; separate, diverse, distinct; individual, respective. कित्येक; वेगळा, निरनिराळा; आपापला, वैयक्तिक. *pron.* three or more of the previously mentioned persons or things. (तीन किंवा त्याहून जास्त) कित्येक, कांहींएक. *Collective and s. responsibility,* सामुदायिक व वैयक्तिक जबाबदारी,-उत्तरदायित्व. *S. estate,* not shared by others. वैयक्तिक, इतर भागीदार नसलेली, -मालमत्ता.

Sĕv'erallў, *adv.* (से'व्हरलि)—separately, apart from others; respectively. वेगवेगळा; आपापला, अनुक्रमें.

**Sĕv'erance,** *n.* (सें'व्हरन्स)—severing; severed state. निराळें-वेगळें-होणें, भंग, खंड, छेद, पृथक्त्व; वांटणी, वांटप.

**Sĕvere',** *a.* (सिव्हि'अर्)—austere, strict, unsparing, rigidly exact; vehement; arduous, exacting; unadorned, concise, not luxuriant, censorious. कडक, करडा, जालीम, कठीण, अवघड, जोराचा, आवेशयुक्त; त्रासदायक; साधा, त्रोटक; रुक्ष; अनलंकारिक; कडकनजरेचा, मार्मिक. *S. weather*, very cold or stormy. कडक थंडी पडलेली,-वादळी,-हवा. *S. architecture*, साधीसुधी-अनलंकृत-बांधणी, -शिल्पकला. *S. remarks*, लागट-झोंबणारे-शब्द. *Leave* or *let severely alone*, त्याचें नांव काढूं नको। (*joc.*) त्याच्या वाटेस जाऊं नको,-ची कळ काढूं नको. *Severe'ly, adv.*

**Sĕvĕ'rity,** *n.* (सिव्हे'रिटि)—severe quality; harsh treatment or manifestation. कठोरपणा, तीव्रता, कडकपणा; करडी वागणूक, उग्रता.

**Se'vres,** *n.* (से'व्हर्)—kind of porcelain made at S. एक जातीचीं चिनी (चिकण) मातीचीं भांडीं.

**Sĕv'ery,** *n.* (से'व्हरि)—(Archit.) compartment of vaulted ceiling. कमानदार-घुमटी-छताचा विभाग.

**Sew,** *v. t.* & *i.* (सो)—(*sewed*, सोड् *pa. t.*; *sewed, sewn*, सोन् *pa. p.*), to use a needle and thread, or sewing machine; to fasten or join or enclose by sewing; make by sewing; close up by sewing; (esp. in pa. p.) intoxicate. दोरा-धागा घालणें; शिवणें; टांके मारणें; शिवून तयार करणें; शिवून बंद करणें; (दारू पिऊन) झिंगणें. *To s. one up*, (sl.) utterly exhaust, दमवून थकवून टाकणें, घामटया काढणें, *S. up*, शिवुन टाकणें,-बंद करणें. *Sewing machine*, शिवण्याचें यंत्र. *Sewing press*, apparatus for sewing books. पुस्तकें बांधण्याचें-शिवण्याचें-यंत्र. *Sewer, n.*

**Sew'age,** *n.* (स्यूइज)—matter conveyed in sewers, filthy matter which passes through sewers. मैला, घाण. *v. t.* manure with s. (शेताला) मैल्याचें-घाणीचें -खत घालणें. *S. farm*, गटारांतील घाणीच्या खतावर होणारें शेत, *S grass*, अशा शेतावरील गवत.

**Sew'er,** *n.* (स्यू'अर्)—(hist.) person who set out table, placed guests, etc. घरकारभारी (पाहुण्यांची ऊठबस करणारा, वाढप्यांवर देखरेख करणारा).

**Sew'er,** *n.* (स्यू'अर्)—covered underground drain carrying off refuse of houses and towns, subterranean channel or conduit. (जमिनी-खालील) नाला, नहर, गटार. *v. t.* to drain, provide, with ss. नाल्यांतून-गटारांतून,-वाहवणें, गटारें-नाले-तयार करणें,-बसविणें. *S. gas*, गटारांतील विषारी वायु, घाणेरडा वायु.

**Sew'erage,** *n.* (स्यू'अरिज)—drainage by a system of, sewers. शहरांतील गटारें, नाले; गटारांची व्यवस्था.

**Sewn,** *pa. p. of* Sew.

**Sĕx,** *n.* (सेक्स)—being male or female; males or females collectively. स्त्री किंवा पुरुषजाति, लिंग, जाति, लिंगभेद, स्त्रीपुरुष, पुरुष आणि बायका. *The fair, gentle, softer, weaker, s., the s.*, women. स्त्रीजाति, स्त्रिया. *The sterner s.*, men. पुरुष (जाति).

**Sex-,Sexi-,** comb forms of L. *sex, six*, षड्-,सहा-, *Sex'angle*, a hexagon. षट्कोन. *Sex-cente'nary, a.* & *n.* of 600, 600th anniversary. सहाशेंचा, सहाशेंवा षड्शताब्दिक-महोत्सव. *Sexdi'gitate, a.* six-fingered. सहा बोटांचा. *Sexe'nnial, a.* सहा वर्षें टिकणारा, सहा वर्षांतून एकदा येणारा, षडाब्दिक. *Sexpart'ite, a.* सहा भागांत वांटलेला, षड्विभागात्मक. *Sex'tuple, a.* & *n.* सहापट (संख्या); *v. t.* & *i.* सहापट करणें,-होणें.

**Sĕxagĕnar'ian,** *a.* & *n.* (सेक्सेजिने'अरिअन्)—(a person) between 59 & 70. (५९ ते ७० च्या दरम्यानचा) वर्षांचा (मनुष्य).

**Sexage'nary,** *n.* (सेक्सॅजीनरि)—of 60, going by sixties. साठ वर्षांचा (म्हातारा); साठ संख्या दाखविणारा.

**Sĕxagĕs'imal,** *a.* (सेक्सजे'सिमल्)—proceeding by sixties; of sixtieth. साठ संख्येवर धमविलेला, षष्ट्यंश पद्धति (सेकंद, मिनिटें यांची), साठांचा; साठावा. *S. fractions*, or *ss.*, साठ किंवा साठांच्या घटी हे छेद असणारे अपूर्णांक.

**Sĕx'tan,** *a.* (से'क्स्टन्)—(of fever, etc.) recurring every fifth day. दर पांच दिवसांनीं (सहाव्या दिवशीं) येणारा (ताप, इ०).

**Sĕx'tant,** *n.* (से'क्स्टन्ट्)—sixth part of a circle; an instrument including a graduated arc equal to a sixth of a circle for taking angular measurements. वर्तुळाचा सहावा भाग, वृत्तषष्ठांश; षष्ठांशयंत्र (कोन मोजण्याचें).

**Sĕxtet' (te),** *n.* (सेक्स्टे'ट्)—(musical work for) six voices, singers, instruments, or players in combination; any set of six. सहा गायक, वाद्यें, वाजवणारे यांनीं गाण्यावजावण्याचें गाणें,-पद्य; सहांचा समुदाय, षट्क.

**Sĕx'tŏ,** *n.* (से'क्स्टो)—(*pl -os*) book formed by folding sheets into six leaves. (मोठ्या कागदाचीं सहा पानें करून केलेलें) षट्पत्री पुस्तक.

**Sĕxtode'cimŏ,** *n.* (सेक्स्टडि'सिमो)—(abbr. 16 mo) sheet of paper folded in 16 leaves; a book made by folding thus एका मोठ्या कागदाचीं सोळा पानें होतील असा ताव,-कागद; षोडशपत्री पुस्तक.

**Sĕx'ton,** *n.* (से'क्स्टन्)—an officer charged with care of a church and its belongings and with bell-ringing and grave-digging. चर्चमधील सर्व व्यवस्था (विशेषतः घंटा वाजवणें व थडगीं खणणें) पाहाणारा अधिकारी.

**Sĕx'ual,** *a.* (से'क्सुअल्,-श्यु-)—of sex, a sex or the sexes; (Bot.) based on the distinction of sexes in plants. स्त्रीपुरुषभेदाचा, लिंगविषयक; स्त्रीपुरुषविषयक; स्त्री (मादी) नरभेदमूलक, स्त्री-नर (पुं) भेदाचा. *S. organs*, (स्त्री पुरुषांचीं) जननेंद्रियें. *S. intercourse* or *commerce, copulation*, स्त्रीपुरुषसंभोग,-समागम. *S. affinity*, (स्त्रीपुरुषांचें) परस्पराकर्षण, लैंगिक आकर्षण. *S. selection*, कामिक-लिंग-संवरण,-पसंती. *S. appetite*, कामवासना, सुरतेच्छा. *S. indulgence*, विषयसेवनाचा-

कामवासनातृप्तीच्या-अतिरेक. *Sex'ualist, n.* लिंग-विशिष्टतावादी. *Sex'uality,* लिंगविशिष्टता. *Sex'ually, adv.*

Sĕx'ualize, *v. t.* (सेंक्स्युअलाइझ्)—to attribute sex to. स्त्रीनरभेद ठरविणें.*-zation, n.*

Shăb'by̆, *a.* (शॅबि)—worn or threadbare; dressed in shabby clothes, wearing much-worn clothes; close-fisted, mean; paltry, scurvy. फाटकातुटका; फाटकेतुटके किंवा गचाळ कपडे असलेला; कवडीचुंबक, क्षुद्र; तुच्छ, गचाळ, घाणेरडा, हलकट, *S. genteel,* पूर्वीच्या वैभवाचे धागेदोरे दाखविणारा, पूर्वस्थितीचा देखावा करणारा. *Shabb'ily, adv ;-ness, n.*

Shăc'kle, *n.* (शॅकल्)—coupling link, fetter enclosing ankle or wrist; (*pl.*) handcuffs; that which obstructs free action. फासा, वाळा, चक्की, बेडी, खोडा, पायबंद; हाताचें किंवा पायाचें बंधन; (अने॰) हातबेड्या; अडथळा, खोडा. *v. t.* to fetter, hamper. बांधणें, अडकवणें, खोडा घालणें, अडथळा-प्रतिबंध-करणें. *The s. of conventions,* रूढीच्या शृंखला.

Shāde, *n.* (शेड्)—comparative darkness or (*fig.*) obscurity; gradation of colour, the darker parts of a picture; (usu. *pl.*) cool retreat; (*pl.*) darkness of night or evening; screen excluding or moderating light or heat; a glass cover; slight difference; unreal thing; soul after death. छाया, सावली; रंगाची छटा, चित्रांतील जास्त काळा भाग, थंडगार विश्रांतीचें ठिकाण; एकांतवासाची जागा; अंधार, काळोख; (उजेड बंद किंवा कमी करणारा) पडदा, आच्छादन; कांचेचा पडदा, झांकण; थोडासा, किंचित, अल्पांश; छाया, भ्रम, पिशाच्च, भूत, छाया. *To throw into the s.,* (*fig.*) outshine. स्वतःच्या तेजानें दिपवणें,-मागें टाकणें,-वर ताण करणें. *Without light and s.,* कंटाळवाणा, प्रकाश व छाया यांचें योग्य प्रमाण नसलेलें (चित्र); वैचित्र्यरहित (स्वभाव), (वर्णन). *Delicate ss. of meaning,* अर्थाचा सूक्ष्मभेद. *People of all ss. of opinion,* सर्व प्रकारच्या मतांचे लोक, नाना मतांचे लोक. *Is the shadow of a s.,* delusive. भ्रांतिकारक, फसवें. *Went down to the ss.,* died. मरून गेला. *Lamp-s.,* दिव्यावरचें झांकण, टोपी, *Shade'less, a.*

Shāde, *v. t.* & *i.* (शेड्)—to screen from excessive light; cover, keep off, moderate power of (light) with or as intervening object; make dark or gloomy; (drawing) darken with parallel pencil lines to give effects of light and shade; pass by degrees into another shade of colour, opinion, etc. छाया-सावली-करणें, आडोसा करणें; पडदा लावणें; अंधार पाडणें, निस्तेज-काळा-करणें; छाया दाखविणें, -काढणें; (क्रमाक्रमानें) छटा-रंग-बदलत जाणें. *Shad'ing, n.* छाया करणें, (चित्रकला) छाया.

Shā'dy̆, *a.* (शेडि)—giving or situated in shade; inferior; of doubtful honesty, disreputable. छाया देणारा, सावलींत असलेला; कमी दर्जाचा, लफंगेगिरीचा, फसवेगिरीचा. *On the s. side of forty,* चाळिशीच्या वरचा, *Shad'ily, adv.*; *Shad'iness, n.*

Shăd'ōw, *n.* (शॅडो)—a patch of shade; a dark figure projected by body that intercepts rays of light; (*fig.*) a person, etc. attending another like such shadow; unsubstantial or unreal thing; phantom or ghost; shade, dark part of picture, room, etc.; obscurity; a shelter or protection; type, premonition; slightest trace; (Yacht.) kind of light sail used in fair winds. छाया, सावली, अंधार, काळोख; सावली, नित्याचा नोकर, खुशामत्या; सोंग, खोटी वस्तु; भूत, आभास, पिशाच्च; (चित्रांतील) छाया दाखविलेला काळा भाग, खोलींतील अंधारी भाग; एकांत, एकांतवास; अंधार; आश्रय, आसरा; प्रतिबिंब, पूर्वसूचना; छटा, गन्ध; हलकी नाव,-जहाज.-शिडाची होडी. *v. t.* to set forth vaguely or prophetically; to dog, to watch secretly, to follow closely; overspread with s. (*poet*). झांकणें, लपविणें, अंधुक-अस्पष्ट-दाखविणें; गुप्त नजर ठेवणें, पाठलाग करणें, मागें मागें राहणें; छाया पाडणें, सावली करणें. S. *of death,* मरणाची छाया,-काळोखी. *Coming events cast their ss. before,* भावी गोष्टींची छाया अगोदर पडत असते. *S. stitch,* विणकामाचा एक प्रकार.

Shăd'ōwy̆, *a.* (शॅडोइ)—not luminous, obscure, dim, gloomy; unsubstantial, unreal. छायेचा, सावलीचा, छायामय, अंधुक; खोटा, अवास्तविक, मायिक.*-owiness, n.*

Shăft, *n.* (शाफ्ट्)—the handle or rod (of a spear, a lance, or an arrow); stem, stalk; arrow; ray of light, bolt or stroke of lightning; hole serving as access to mine, &c.; slender cylinder connecting the parts of a machine; column between base and capital; one of the bars between which horse, etc. is harnessed to vehicle; tunnel of blast-furnace; (also *ventilating s.*) upward vent for smoke or bad air from tunnel, drain, etc. मूठ, दांडा, भाला; (bot.) दांडा, देंठ, देंख; बाण, वज्रबाण; किरण, (विजेचा) झपाटा; खाणींत वगैरे जाण्याकरितां भोंक,-गाळा; लाट, वाटोळी दांडी,-दांडा; खांबाचा वाटोळा दांडा,-मधला भाग; (घोड्याच्या गाडीचा) दांडा; (भट्टीला हवा पोंचविणारा) नळ; (घाणेरडी हवा वर नेणारा) नळ, उच्छ्वास. *Shaft'ing, n.* (mech.) लाटांची-वाटोळ्या दांड्यांची -माळ.

Shăg, *n.* (शॅग)—a rough mass of hair; rough cloth; coarse kinds of fine-cut tobacco; a crested cormorant. जाड रांठ केंस, पेड्‌; भरभरीत (फुलाचें) कापड; बारीक व लांब तंतु केलेला तंबाखू; (डोक्यावर तुरा असलेला) समुद्रावरील पक्षी.

Shăgg'y̆, *a.* (शॅगि)—hairy, rough-haired; rough, rugged. केसांनीं भरलेला, केंसाळ, मिशाळ; खरबरीत,

रान-जंगल-माजलेली (जमीन), वाकड्या तिकड्या फांद्या असलेला (वृक्ष); (Bot., Biol.) कैंसाळ.

Shagreen', *n.* (शॅग्रीन्)—kinds of un-tanned leather with roughened surface; shark-skin. कच्चें खरखरीत चामडें; (पॉलिश करण्याच्या उपयोगी असें) शार्क माशाचें चामडें.

Shāke, *v. t. & i.* (शेक्)—(shook, shaken) to move violently, or quickly, to tremble or rock or vibrate, cause to do so, to brandish; to weaken or make less stable; jolt or jar. जोरानें हालणें, हालवणें, घुसळणें, हादरणें; कांपणें, कांपवणें; फिरवणें, परजणें; दुर्बळ करणें. (of voice, musical note, singer) make tremulous sounds, change pitch, trill. धक्का देणें,-बसवणें,-पोंचणें; धक्के बसणें, हालवणें, हादरवणें; (आवाज) कांपणें, कंप असणें, गिरकी घेणें. *n.* a shaking, jolt, jerk, shock; (Mus.) rapid alternation of two notes; crack in growing timber; moment. हालणें, हालवणें, झटणें, झटका, धसका, कंप, धक्का, धपका; कंप, गिरकी, झील; (वाढत्या झाडाला पडलेली) चीर, भेग; क्षण, पळ. *To s. hands, s. one by the hand,* हस्तांदोलन करणें (भेट, मैत्री,-दर्शक). *S. a carpet,* गालीचा झटकणें, झटकून साफ करणें. *Hand shakes,* हात कांपतो. S. one's *fist* or *stick in person's face* or *at*, threaten with fist, etc. मूठ उगारणें, धमकी देणें, इ. S. one's *head*, मान (होकारार्थी-नकारार्थी) हालवणें. *S. in* one's *shoes*, भीतीनें पाय लटलट कांपणें,-गर्भगळीत होणें. *S. off;* (धुरळा, आळस) झाडुन टाकणें, दूर सारणें. S. *off the dust from* one's *feet*, तेपानें,-संतापानें-निघून जाणें. *S. out*, (भांड्यांतील जिन्नस) बाहेर ओतणें, रिकामें करणें; धुरळा झटकून टाकणें; (निशाण, शीड) झटकीत उघडणें,-पसरणें. *S. up*, (औषध वगैरे) हालवणें, हालवून मिसळणें, झटकून (उशी वगैरे) सारखी करणें; (रूढीपासून) जागृत करणें. *The ss.*, ague. हिंवताप.

Shāke'-down, *n.* (शेक्डाउन्)—a bed improvised of starw or bedding laid on floor. (जमिनीवर केलेला) गवताचा किंवा चादरीचा तात्पुरता बिछाना.

Shā'ker, *n.* (शे'कर्)—a member of American religious celibate sect. अमेरिकेंतील ब्रह्मचारी पंथाचा अनुयायी.

Shă'kō, *n.* (शॅ'को)—(pl.-*os*), form of peaked military cap. उभट टोंकदार लष्करी टोपी.

Shā'kў, *a.* (शे'कि)—unsteady, trembling, infirm, tottering, wavering. अस्थिर, कांपणारा, लटपटीत, डळमळीत.

Shāle, *n.* (शेल्)—kinds of clay rock like slate but softer. एक जातीचा नरम खडक. *S. oil*, एक प्रकारचें राकेल.

Shăll, *v. aux.* (शॅल्, शल्)—(should शुड्,-st) (भाविष्यकाळवाचक सहाय्य क्रियापद.)

Shalloon', *n.* (शलू'न्)—light cloth for linings and dresses. एक जातीचें हलकें कापड.

Shăll'op, *n.* (शॅ'लॉप्)—a light boat. हलकी उघडी होडी.

Shăll'ot, *n.* (शॅ'लॉट्)—kind of onion. कांद्याच्या जातीची वनस्पति.

Shăll'ōw, *a.* (शॅ'लो)—of little depth; superficial. उथळ; उथळ बुद्धीचा, अल्पज्ञ, उथळ. *n.* a shallow place; a shoal, a sand-bank in water. उथळ जागा; भाट, भाटी, *v. i. & t.* become, make, shallower. उथळ करणें,-होत जाणें. *S. water makes much noise,* उथळ पाण्याला खळखळ फार. *S. brained,-pated,* उथळ बुद्धीचा, विशेष अक्कल नसलेला.

Shalt, 2nd per. sing. of Shall.

Shăm, *v. t. & i.* (शॅम्)—to feign, to pretend to be. सोंग-बहाणा-करणें, बतावणी करणें, ढोंग करणें, फसविणें, ठकविणें. *n.* piece of pretence; counterfeit thing; person pretending to be what he is not; (also *Sheet, pillow,-s.*) embroidered linen laid on bed in day for show. ढोंग, सोंग, बहाणा, मिष, निमित्त,-खोटी-बनावट-गोष्ट; सोंगाड्या, ढोंगी मनुष्य; बिछान्यावरील शोभेचें रेशमी आस्तरण. *a.* pretended, counterfeit. ढोंगी, खोटा, बनावट, ओढून ताणून आणलेला, ओढून चंद्रबळाचा. *This age of ss.*, हें ढोंगीपणाचें युग. *S. fight,* लुटुपुटुची-लढती-लढाई. *S. plea,* पोकळ सबब. *Sham'mer, n.*

Shăm'ba, *n.* (शॅ'म्बा)—(E.-Afr.) culitvated plot of ground. लागवडीला आणलेली जमीन, (-तुकडा).

Shăm'ble, *v. i. & n.* (शॅ'म्बल्)—to go with shuffling gait, to walk awkwardly and unsteadily. फेंगडत चालणें, तिरपागडीं पावलें टाकीत चालणें, (चाल, पाऊल).

Shăm'bles, *n. pl.* (शॅ'म्बल्झ्)—(often with sing. const.) butcher's slaughter-house; scene of carnage. खाटीकखाना, कत्तलीचें ठिकाण.

Shāme, *n.* (शेम्)—feeling of humiliation; excited by consciousness of guilt or from some other cause; state of disgrace or ignominy or discredit; a person or thing that brings disgrace. अपमान, लाज, कालिमा; लज्जा, शरम, संकोच, ओशाळगत; लज्जा आणणारी व्यक्ति किंवा वस्तु. *v. i. & t.* to make ashamed, bring disgrace on; force by shame into or out of something; be ashamed. लाजविणें, खालीं पाहायला लावणें, शरम आणणें; चपापवणें; लाजणें, शरमणें. *For S.!*, लाज वाटली पाहिजे तुला! लाज नाहीं वाटत! लज्जेसाठीं. To put to shame, खजिल करणें. *Lost to s.*, निर्लज्ज, निगरगट्ट. *S.-ful, a .,-fully, adv.*; *-fulness, n.*

Shāme'faced, *a.* (शे'म्-फेस्ट्)—bashful, shy; (poet. of virtue, flowers etc.) modest, retiring. लाजरा, संकोचवृत्तीचा, लाजाळू; नम्र, साधा.*-ly, adv.*;*-ness, n.*

Shāme'less, *a.* (शे'म्-लेस्)—lacking shame; impudent, cynical, indecent. निर्लज्ज; उद्धट, बेशरम, कोडगा.

**Shămm'ў**, *n.* (शॅ'मि)—chamois-leather. नरम कमावलेलें कातडें,-चामडें. Also, *Shamoy, n.*

**Shămpōō'**, *v.t.* (शॅम्पू')—to treat the head of a person with lather and rubbing. मळणें, रगडणें, चंपी करणें, डोकें साबण लावून चोळून चोळून धुणें. *n.* a shampooing of the head. डोक्याचें रगडणें, -चंपी.

**Shăn'drўdăn**, *n.* (शॅ'न्ड्रिडॅन्)—a light two-wheeled Irish cart; rickety old-fashioned vehicle. हलकी दुचाकी (आयरिश) गाडी,-सटारा; जुनाट खिळखिळें वाहन.

**Shăn'dўgăff**, *n.* (शॅ'न्डिगॅफ्)—beer and ginger-beer mixed. (बीर आणि जिंजर बीरचें) पिण्याच्या दारूचें मिश्रण.

**Shănghai'**, *v.t.* (शँघा'इ)—(naut. sl.) drug and ship as sailor while un-conscious. मादक पदार्थ देऊन (एखाद्याला) खलाशी (म्हणून गलबतावर) घेणें. *n.* (Austral.) a catapult. गोफण.

**Shănk**, *n.* (शँङ्क)—leg or part of it between knee and ankle, shin-bone, stem or shaft of something; narrow middle of boot sole. पायाची नळी, नळा, तंगडी, कांडें, देंठ, (खालचा) घाटोळा दांडा, टाइपाची जाडी; बुटाच्या तळचा मधला निमुळता भाग. *v. i. S. off*, (of flowers) fall off by decay of s. देंठ कुजून (फूल) गळून पडणें. *Shanks's mare*, one's own legs as opp. riding etc. स्वतःच्या तंगड्या. *Long shanked*, लांबदांड्या.

**Shan't**, contraction of *Shall not.*

**Shăn'tў**, *n.* (शॅ'टि)—a hut, hovel. झोंपडी, खोपट.

**Shāpe**, *n.* (शेप्)—configuration, form; external appearance, guise; kind, sort, pattern or mould; orderly arrangement, proper condition, an apparition, a ghost; pattern for workmen etc. आकार आकृति, घाट, डौल; बाह्यरूप, आकार; स्वरूप, तऱ्हा, रीत, प्रकार; घडण, ठेव; व्यवस्थित रचना,-स्वरूप, निश्चित स्वरूप; भूत, मनुष्याकृति; नमुना, सांचा. *v.t. & i.* to fashion into a desired or definite shape; to form, to devise, to plan, direct one's course; call up image of, assume from. आकार देणें, घडणें, बनवणें; (बेत) निश्चित करणें, ठरविणें, योजना करणें, (ची) दिशा ठरविणें, कल्पनेनें (मनापुढें) उभें करणें, कल्पणें; (ला) आकार येणें. *Sha'pable, a.*; *Shaped, pa. t.*; *Shaped*;*-en* (arch.), pa. p.

**Shāpe'less**, *a.* (शे'प्-लेस्)—lacking definite form, irregularly made. बेडौल, बेढब, आकारहीन, विद्रुप.*-ly, adv.*;*—ness, n.* बेडौलपणा, बेढबपणा, विद्रुपता.

**Shāpe'ly**, *a.* (शे'प्लि)—well-formed or proportioned. डौलदार, नीटस, नीटनेटका, प्रमाणबद्ध, बांधेसूद, नीटस.*-lincss, n.*

**Shāp'er**, *n.* (शे'पर्)—In vbl. senses; kinds of machine for turning, planing, moulding, etc. आकार-वळण-देणारा, आकार देण्याचें यंत्र.

**Shärd, Sherd**, *n.* (शार्ड्, शर्ड्)—(*arch.*) a fragment of broken pottery, a potsherd; beetle's wing-cover. खापरी, कपची; भुंगेलाचें-झुरळाचें-पंखाच्छादन.

**Shāre**, *n.* (शेअर्)—the part that falls to an individual, out of a common stock or burden or achievement; one of the equal parts of a company's capital entitling holder to profits; part-proprietorship of property held by joint owners.; the cutting part of a plough; blade of cultivator or seeding machine. वांटा, वांटणी, अंश, अंग; (कंपनीच्या भांडवलाचे) भाग, हिस्सा; (समाईक मालमत्तेंत) भाग, पाती, भागी; नांगराचा फाळ, बीं पेरणाऱ्या यंत्राचा फाळ,-पातें. *v. t. & i.* to apportion among others; to have share or be share (*with* person, *in* thing); to participate in. वांटणें, वांटे पाडणें, विभागून देणें; वांटा मिळणें, भागीदार असणें, काम-भाग-असणें. *To go ss.*, (नफानुकसान) सारखें वांटून घेणें. *S. and s. alike*, सारखी वांटणी करून. *Preference* or *preferred ss.*, on which fixed dividend is guaranteed before payment begins on ordinary ss. विशेष सवलतीच्या हक्काचे भाग,-शेअर. *Ordinary ss.*, (सवलतीच्या भागीदारांना नफा वांटून झाल्यावर शिल्लक नफा राहिल्यास तो ज्यांच्यावर मिळतो ते) साधे भाग. *Deferred ss.*, on which lower dividend or none is to be paid till fixed date or contingent event. मागचे (नफ्याकरितां मागाहून विचारांत घेण्याचें) भाग. *S-holder*, owner of shares in a company. भाग घेणारा, भागीदार. *S.-list*, (निरनिराळ्या मंडळांच्या भागांच्या) चालू भावांचें पुस्तक,-यादी. *S.out*, to distribute. वांटून देणें, विभागणी करणें. *S.-out, n.*; *S.-beam*, part of plough in which s. is fixed. फाळ बसलेला नांगराचा भाग,-चऊ. *Shar'er, n.*

**Shāre'holder**, *n.* (शे'अर्-होल्डर्)—the owner of a share or shares in a company or joint fund. भागीदार.

**Shärk**, *n.* (शार्क्)—large voracious sea-fish; extortioner or swindler. नक्र, मगर; फसव्या, भामट्या, छद्म. *v. i. & t.* to play the swindler; gather *up* by dishonest means; swallow voraciously. ठकवणें, फसवणें; लबाडीनें मिळविणें; (अधाशासारखें) गपागप खाणें. *Shark's mouth*, छतांतील (डोलकाठीसाठीं) भोंक इ.

**Shärp**, *a.* (शार्प्)—with fine edge of point not blunt; keen, pungent; shrill, piercing; severe, painful; acute, sensitive; vigilant, clever; unscrupulous; speedy; peaked, pointed, edged; abrupt, steep, angular; biting, harsh, (Mus.) above normal pitch, (of note) a semitone, higher than the normal tone; (of key) having sharp or sharps in signature. धारेचा, धार असलेला, टोंकदार; तीक्ष्ण, आंबट, तिखट; कर्णकटु, कानठळ्या बसविणारा; कडक, तीक्ष्ण; कर्कश; शीघ्रगती, चलाख; चुणचुणीत, हुषार; बस्ताद, लुच्चा,

छट; झटपट्या, सपाट्याचा, जलदी काम करणारा; अणिदार, अणकुचीदार, टोंकदार, तीक्ष्णाग्र; एकदम वळणारा, उभा (सुळक्यासारखा), पळणारा; झोंबणारा. कडक; कठोर, कर्कश, (स्वर, आवाज), तीक्ष्ण, तीव्र. (सूर); तीव्र सुराच्या खुणा असलेला. *n.* a sewing needle of slender make; (Mus.) a sharp note. अगदीं बारीक (शिवण्याची) सुई; तीव्र सूर. *adv.* punctually. ठरल्यावेळीं नक्की बरोबर (*at five o'clock*, अगदीं बरोबर पांच वाजतां); above true pitch. (नेहमींच्या सुरापेक्षां) वरच्या सुरांत,-सप्तकांत. *v. t. & i.* to sharpen; raise pitch of; swindle at cards etc. धार लावणें,-काढणें; सूर चढवणें, लबाडीनें-खोटें-खेळणें. *S. features*, रेखीव अवयव. *S. turn*, आकस्मिक वळण, सरळ एकदम वळसा, वळण. *S. tongue*, तीक्ष्ण (शब्द बोलणारी) जीभ. *As s. as a needle*, very intelligent. अत्यंत बुद्धिमान, कुशाग्रबुद्धि,-हुषार. *S. practice*, (हात) चलाखी. *S. work*, said of matter quickly dispatched or fight etc. that takes all one's energy. हां हां म्हणतां-चुटकीसरशीं, -घावासरशीं (काम), सर्व बळ एकवटून केलेली निकराची (लढाई, इ.). *Sharp'ly*, *adv*, *Sharp'ness*, *n.*

**Shärp'en**, *v. t. & i.* (शा'र्पन्)—to make or grow sharp; to give an edge to; make quick; make hungry; make severe. तीक्ष्ण करणें किंवा होणें; धार लावणें, धार काढणें, पाणी देणें, टोंक काढणें: अधिक जलद करणें, द्रुतगति देणें; (भूक) प्रदीप्त करणें; अधिक तीव्र करणें. *Sharp'ener*, *n.*

**Shärp'er**, *n.* (शा'र्पर्)—a person who lives by fraud, a tricky fellow, a cheat. ठक, भामट्या, छट, धूर्त.

**Shärp'-sĕt**, *a.* (शा'र्प्-सेट्)—hungry. भुकेलेला, क्षुधार्त.

**Sharp'shooter**, *n.* (शा'र्प्शूटर्)—a skilled shot posted where marksmanship is required. अचूक नेम मारणारा, अचूक संधानी.

**Shătt'er**, *v. t. & i.* (शॅ'टर्)—to break suddenly in pieces, to break up violently; to wreck, to destroy utterly. तुकडे तुकडे करणें; चक्काचूर करणें; पूर्ण नाश करणें, (आशेचा) पूर्ण भंग करणें, (प्रकृति) खालावणें,-पूर्णपणें खंगणें.

**Shāve**, *v. t. & i.* (शेव्ह्)—(shaved; as adj. shaven) to clear off (hair, beard, &c.) by passing along the skin a sharp-edged blade; to shave oneself; pare surface of (wood etc.) with plane, etc.; skirt, miss narrowly, graze. हजामत करणें, (स्वतः) दाढी करणें; (लांकूड) तासणें, रंधणें; (थोड्यावरच) निसटून जाणें, निभावणें, चाटून जाणें *He does not s. every day*, तो दररोज दाढी करीत नाही. *Shave-hook*, (भांड्यांना डाग लावण्यापूर्वी तीं) खरवडण्याचें हत्यार, खरवडणी, कासाराचा रांधा. *Shaving-brush*, हजामत करतांना साबण लावण्याचा कुंचला (ब्रश). *Shaving-horse*, (लांकूड) तासकामाचा घोडा. *n.* being shaved by oneself or another, cutting the hair with a razor; close approach without contact, narrow mass or escape or failure; knife blade with handle at each end for shaving wood etc.; trick, deception, hoax. हजामत, दाढी; निसटून जाणें, थोडक्यांत चुकणें,-निभावणें,-अपयश येणें; तासणी, कोकशी; फसवणूक, फसवेगिरी, ठगाई. *S.-tail*, (army sl.) second lieutenant. लेफ्टनंटच्या खालचा अधिकारी. *Shaver*, (*sl.*) youngster. मुलगा, पोरगा, पोऱ्या. *Shaving*, (°व्ह्) *n. pl.* planing refuse. (तासलेल्या लांकडांचे) ढलपे, सळपें, भूस; (लोखंडाचा) कीस, भुगा. *Shave'ling*, *n.* (arch.) shaven person, monk, friar. हजामत केलेला मनुष्य, जोगी, संन्यासी, मठवासी.

**Shā'vian**, *a.* (शे'व्हिअन्)—of, in the manner of, G. B. Shaw, a dramatist. (सुप्रसिद्ध नाटककार) शॉचा, शॉच्या पद्धतीचा, शॉ-पंथाचा.

**Shaw**, *n.* (शॉ)—(arch. & poet.) a thicket, wood, copse. झाडी, जंगल.

**Shawl**, *n.* (शॉल्)—a rectangular piece of woven or netted fabric. शाल, शालजोडी. *S.-pattern*, शालजोडीवरील नकशीसारखी नकशी (-काम). *v. t.* to put s. on (a person). वर शाल घालणें, शालींत गुरफटावणें. [Pers.]

**Shawm**, *n.* (शॉम्)—obsolete musical instrument with reed. (पुरातन) पांवा, वेणु, वाद्य.

**Shay**, *n.* (शे)—(arch., joc.) chaise. प्रवासी, (घोड्याची) गाडी.

**Shē**, *pron.* (शी)—the female in question, (also of a ship, train, country, or other thing personified as female). ती. *n.* the female or thing personified as female, (e. g. a ship or train). ती, स्त्री, मादी. *a.* (usu. hyphened) female. मादी. [*Obj.* Her, तिला, ती. *possess.* Her, Hers. तिचा. *pl.* they. त्या.] *The not impossible, s. n.* woman one might love. प्रेमपात्र, (स्त्री). *Had a litter of two shes and a he*, एक नर आणि दोन मादी (अशीं पिलें) व्याली. *S.-goat*, बकरी. *S. devil,-cat*, malignant or spiteful woman. दुष्ट स्त्री, तिरस्करणीय स्त्री. *S.-oak*, आस्ट्रेलियांतील एक झुडूप.

**Shē'a**, *n.* (शी'आ)—W.-Afr. tree yielding a vegetable butter. वनस्पतिजन्य लोणी मिळणारा (प० आफ्रिकेंतील) वृक्ष,-झाड.

**Sheaf**, *n.* (शीफ्)—(*pl. -ves*) a bundle of cornstalks tied together after reaping; bundle of arrows, papers or long objects. पेंढी, कवळी; जुडगें, पुडकें, (बाणांचा) भारा. *v. t.* to bind in sheaves, sheave. पेंढ्या बांधणें; भारे बांधणें.

**Shear**, *v. t. & i.* (शिअर्)—to cut with a sword, &c.; to clip, to take off with shears; (*fig.*) to fleece or strip bare; (Mech.) distort or rupture by the strain called shear. कापणें, कातरीनें कापणें; भादरणें, लोंकर काढणें, लुबाडणें; नागवणें, बुचाडणें; (कातरून) आकार बदलणें. *n.* (Mech.) the kind of strain to which the rivet of pivoted shears is subjected; (*pl.*) hoisting apparatus of two or more poles. कात्रीचा दाब; (दोन पातीं किंवा दांडे जोडून केलेलें) उभारण्याचें-उचल-

ण्याचें-साधन. *S.-sheep,* मेंढ्या भादरणें, त्यांच्या अंगावरची लोंकर कापणें. *S. cloth,* कापडावरील फूल मोडणें, -कातरणें. *Shear-water,* ( पाण्याजवळून उडणारें ) एक जातीचे पक्षी. *S.-bill,* कातरीसारखा चोंचीचा पक्षी. *S.-grass,* kind with sharp-edged leaves. तीक्ष्ण पातीचें गवत. *S.-steel,* चाकू, कात्री वगैरे हत्यारें बनविण्याचें विशिष्ट प्रकारचें पोलाद. *Sheartail,* कात्रीसारखी शेंपटी असलेला पक्षी. *Shear'er, n.* भादरणारा, कापणारा. *Shear'ling, n.* a sheep once shorn. पहिल्या कातरणीचें मेंढरूं. *Sheared,* rarely *shore, pa. t.*; *Shorn,* rarely, *Sheared, pa. p.*

**Shears,** *n.* ( शिअर्झ् )—( *pl.* ) a clipping-instrument of two blades moving on a rivet. कातर, कातरी. *Hand me the ss.,* मला कातरी दे. *Want a pair of ss.,* ( मला ) एक कातरी पाहिजे !

**Sheath,** *n.* ( शीथ् )—a close-fitting cover ( esp. for a blade or tool ), scabbard; investing membrane, tissue, skin, etc. (Bot., Zool, Anat.); structure of loose stones for confining river within banks. म्यान, कोष, झांकण; वेष्टन; कोष; नदीच्या कांठचा बांध, गडगा, ( साध्या दगडांचा ) धक्का. *pl. Sheaths,* ( शीद्ज़् ).*S.-less., a.*

**Sheathe,** *v. t.* ( शीद् )—to put into a sheath; to protect with a casing, or sheathing. ( तरवार ) म्यानांत घालणें किंवा ठेवणें; मढविणें, वेष्टन घालणें. *To s. the sword,* cease from war, and fig. लढाई थांबविणें, हत्यार म्यान करणें, समेट करणें.

**Sheave,** *n.* ( शीव्ह् )—a wheel with grooved edge as in pulley etc. चक्री, चक्कर.

**Sheave,** *v. t.* ( शीव्ह् )—to gather ( corn etc. ) into sheaves. ( धान्याच्या ) पेंढ्या बांधणें.

**Sheaves,** *pl.* of Sheaf.

**Shĕbăng',** *n.* ( शिबँग )—( *U. S. sl.* ) a hut, dwelling; an institution, business. झोंपडी, घर; संस्था, धंदा.

**Shĕd,** *v. t.* ( शेड )—to let or have fall off ( hair, clothes, feathers, horns, leaves ); to let or make flow ( tears, blood ); to diffuse or radiate. गाळणें, पाडणें; अश्रू वगैरे ढाळणें, रडणें; सांडणें, वाहवणें, वाहून नेणें; पसरणें, बाहेर फेकणें; टाकणें. *n.* a roofed shelter. निवारा, पडवी, छप्पर, झोंपडी. *Cowshed,* गोठा. *Long shed,* सोपा. *Work s.* कारखाना. *To s. tears,* weep. अश्रू गाळणें, रडणें. *S. one's blood, for one's country,* देशासाठीं स्वतःचें रक्त वाहविणें,-जखमी होणें,-मरणें,-मारलें जाणें. *S. light on,* ( *fig.* ) वर प्रकाश पाडणें. *Shed'ding, n.* गाळणें, झाडणें, ढाळणें, वाहविणें. *Shed'der, n.*

**Sheen,** *n.* ( शीन् )—radiance, brightness. तेज, चमक, तेजस्विता. *Sheen'y, a.* ( poet. ) तेजस्वी, दैदीप्यमान.

**Sheep,** *n.* ( शीप् )—( *pl.* sheep ), a timid beast kept in flocks for the mutton and wool and leather it yields; ( *pl.* ) pastor's flock; a sheepish person. मेंढा, मेंढी, मेंढरूं, बकरा, बकरी; ख्रिस्ताचीं कोंकरें, ख्रिस्ताचा ( अनुयायांचा ) कळप, पांढरींतील लोक; अजागळ, बावळट, आचरट मनुष्य. *A male s.,* ram, मेंढा, बकरा. *Female s.,* ewe. मेंढी, बकरी. *Young s.,* lamb. कोंकरूं. *S. and goats,* the good and the bad. बरेवाईट लोक. *Black s.,* पाजी, हरामी. *To cast s.'s eyes,* glance amorously *at.* प्रेमाचे ( नेत्र- ) कटाक्ष फेंकणें, डोळा मारणें. *To follow like s.,* मेंढरांमागें ( बेअक्कलीपणें ) मागून जाणें, अनुसरणें. *S. that have no shepherd,* ( योग्य नेता-पुढारी-नसलेले ) निराश्रित लोक. *Wolf in s.'s clothing,* दुष्ट, घातकी, पण साळसूद मनुष्य. *S. bot,* मेंढ्यांवरील गोचिडी. *S.-dip,* मेंढ्यांची लोंकर धुण्याचें ( तयार केलेलें औषधी ) पाणी. *S.-dog,* धनगरी कुत्रा. *S.-farmer,-master,* मेंढरांची उपज करणारा, मेंढपाळ. *S.'s-bit,* एक जातीची वनस्पति. *S.'s fescue,* चराऊ-कुरणी-गवत. *S.-shank,* a pair of hitches shortening a rope without cutting it. ( दोर आंखूड करण्यासाठीं मारलेल्या ) दोन गांठी, सांधा.

**Sheep'cōte, Sheep'cŏt,** *n.* ( शी'प्-कोट, शी'प्-कॉट )—a shelter or small enclosure for sheep, a pen. मेंढवाडा.

**Sheep'fōld,** *n.* ( शी'प्-फोल्ड )—an enclosure for penning sheep in, a fold or pen for sheep. मेंढवाडा. Also, *S.'pen.*

**Sheep'ish,** *a.* ( शी'पिश् )—( *esp.* ) bashful or embarrassed in manner, over-modest, diffident. मेंगा, भितरा, भेभळट, बावळट. भेदमात्र.*-ly, adv.;-ness, n.*

**Sheep'run,** *n.* ( शी'प्रन् )—a large sheep-walk, esp. in Australia. ( मेंढरांकरितां ) मोठें चराऊ रान, कुरण.

**Sheep'walk,** *n.* ( शी'प्वॉक् )—a tract of land as sheep-pasture. ( मेंढरांकरितां ) मोठें कुरण.

**Sheer,** *a.* ( शिअर् )—mere, unqualified, absolute; ( of rock, fall, ascent, etc. ) perpendicular, precipitous; ( *Commerc., of* cambric etc. ) diaphanous. केवळ, निखालस; उभा, सरळ, तलम, अतिशय पातळ. *adv.* perpendicularly; directly; clean. उभाच्या उभा, सरळ; सरळपणें; स्पष्टपणें, साफ.

**Sheer,** *v. i.* ( शिअर् )—( Naut. ) to swerve or change course ( esp. of ship ). वाट सोडून बाजूला वळणें, -झुकणें, दिशा बदलणें. *To s. off,* to part company, depart, esp. from person one dislikes or fears or is offended by. संगत सोडणें, निघून जाणें. *n.* upward slope of ship's lines towards bow or stern; deviation of ship from course. ( गलबताच्या ) नाळीकडचा किंवा सुकाणूकडचा उभट भाग; गलबताचें बाजूला वळणें,-झुकणें. *n.* ( also *sheer-legs, shear-legs* ), hoisting apparatus of two poles attached at or near top and separated at bottom. ( वजनदार पदार्थ वर उचलण्याचें साधन ) दुखांची पारी, बेळकें, डेळकें.

**Sheet,** *n.* ( शीट )—a broad piece of linen or cotton cloth spread on a bed; a broad thin flat piece of iron or glass or other material; complete piece of paper as made; wide expanse of water, flame etc.; a rope or chain at lower corner of sail for changing its tension or position; newspaper. चादर, पलंगपोस, धातूचा पत्रा, तक्ट;

कागदाचा ताव, थंड, पान; पाण्याचें-बर्फाचें-विस्तृत क्षेत्र, प्रदेश; ज्वालांचा लोळ,-झोंप,-लोट; शिडाचें वासरूं; वर्तमानपत्र, वृत्तपत्र. *v. t.* to cover with sheet; secure (sail) with *s.*; furnish with *ss.*; form into ss. (वर) चादर घालणें; वासरानें (शीड) बांधणें; वस्त्रांत गुंडाळणें; (पाण्याचें वगैरे) क्षेत्र तयार करणें, सांचवणें, पसरणें. *Between the ss*, बिछान्यांत, झोंपी गेलेला. *A s. in the wind, three ss. in the wind*, (sl.) कांहींसा दारू पिऊन झिंगलेला, भरपूर झिंगलेला. *S.-iron*, लोखंडाचा तयार पातळ पत्रा. *S. metal*, धातूचे पत्रे. *S.-glass*, kind made first as hollow cylinder, which is cut open and flattened in furnace. (प्रथम पोकळ नळीप्रमाणें केलेली कांच उभी कापून) भट्टींत तापवून सपाट बनविलेला कांचेचा पत्रा, -चें पान.

Sheet'ănchor, *n.* (शी'ट्-अँकर्)—a large anchor used only in emergencies; (*fig.*) last dependence, chief support. सर्वांत मोठा नांगर; शेवटचा आधार, निर्वाणीचा आसरा.

Shĕk'el, *n.* (शे'कल्)—a Jewish weight and silver coin; (pl.) money, riches. ज्यू लोकांचें एक वजन, आणि चांदीचें नाणें; पैसा, संपत्ति, धन.

Shĕl'drāke, *n.* (शे'ल्ड्रेक्)—a bright-plumaged wild duck; (U. S.) a merganser. चकचकीत पिसांचा जंगली बदक; पाणबुड्या पक्षी. *Shel'duck, n f.* बदक (स्त्री.).

Shĕlf, *n.* (शेल्फ्)—(pl.-ves), horizontal slab or board used as bookcase or cupboard; ledge on cliff face; reef or sand-bank under water. सामानाची फळी; खडकाच्या थराची पायरी; खडकाचा कंगोरा; भाटी, (जलमग्न) वाळूचा बांध. *On the s.*, put aside, done with, esp. of person past work, मागें टाकलेला, मागें पडलेला, गरज सरलेला (म्हणून मागें टाकलेला) मनुष्य. *Shelved a., shelf'ful, n.*

Shĕll, *n.* (शेल्)—a hard husk, an outer crust. hard outer case of anything, the mere walls of a house, ship, etc.; outline of plan etc.; inner coffin; light racing-boat; hollow metal or paper case to contain explosives for fire-works, cartridges, etc.; an explosive artillery projectile, or bomb; hand-guard of sword; (poet.) lyre; (at schools) intermediate form; outward show, mere semblance. करवंटी, कवची, कवच, साल, टरफल, शिंपला. घर; (घराचा, जहाजाचा) सांगाडा, भिंती, उघड्या बाजवा; आराखडा, रूपरेषा; प्रेताची (आंतील) पेटी; शर्यतीची हलकी नौका,-नाव, -होडी; (फटाकड्या, काडतूस वगैरेचें) धातूचें किंवा कागदी वेष्टण, तोफेचा कुलपी गोळा, बाँब; तलवारीची मूठ; वीण; मधली इयत्ता, वर्ग; बाह्य देखावा, दिखाऊ सादृश्य. *v. t. & i.* to take out of s.; remove s. or pod from; bombard or fire shells at. फोडणें, सोलणें; कवच,-साल,-काढणें, निघणें; कुलपी गोळ्याचा भडिमार करणें,बॉम्बचा-मारा-वर्षाव करणें. *To come out of* one's *s.*, throw off reserve. एकलकोंडेपणा टाकणें, मंडळींत (येऊन) मिसळणें, गप्पागोष्टी मारणें. *S.-back*, (naut.) an old sailor. जुना-अनुभवी खलाशी. *S. fish*, (कालव, खेंकडा इत्यादि) सकवच प्राणी. *S. shock*, disorganization of mental faculties, power of speech, etc. resulting from exposure to bombardment and other war -strains. (तोफांचा भडिमार, किंवा इतर युद्धांतील भीषण परिस्थितींत सांपडून) मेंदू बिघडणें. वाचा बसणें, इ० धक्का, धपका. *S.-proof*, कुलपी गोळ्यांना-बाँबला -दाद न देणारा, अभेद्य. *Shelled*, सोललेला; सकवच; कुलपी गोळे बॉम्ब-टाकलेला. *S. less, a., shelly, a.* सकवच.

Shĕllăc', *n.* (शेलॅ'क्)—lac melted into thin plates for making varnish. लाखेच्या कांड्या. *v. t.* to varnish with this. कांड्याच्या लाखेनें मढविणें, रोगण काढणें. *Shellac'king, pr. pa.;-c'ked, pa. p.*

Shĕl'ter, *n.* (शे'ल्टर्)—protection against exposure to harm; screen or cabin affording shelter, place to safety; shielded condition. आसरा; थारा, शरण; आडोसा, निवारा; निर्धास्त स्थळ; बचाव, आसरा. *v. t. & i.* to serve as a shelter to, to shield; to take shelter. आश्रय देणें, बचाव करणें; आश्रय घेणें, आसरा करणें. *Sheltered trades.* परकीयांच्या चढाओढीपासून सुरक्षित असे धंदे. *S.less, a.*

shĕlve, *v. t. & i.* (शेल्व्)—to put (books, &c.) on a shelf; to lay aside or defer consideration of, to dismiss from attention. फळीवर ठेवणें; बाजूला ठेवणें, लांबणीवर टाकणें. *v. i.* to slope gently. हळुहळू उतरत जाणें, उतरता होणें.

Shĕp'herd, *n.* (शे'पर्ड्)—a man who tends or keeps sheep; (*fig.*) a pastor. मेंढपाळ, धनगर; पाद्री, (पांढरीचा किंवा मंडळीचा) पालक. *v. t.* to tend or drive sheep; (*fig.*) marshal or conduct or drive (crowd etc.) like sheep. मेंढरें राखणें, पाळणें, चळवणें; जोपासना करणें. *The good s.*, Christ. येशू ख्रिस्त. *S.'s plaid*, काळ्या पांढऱ्या चातिक सळ्या असलेलें कापड *S.-ess, f.* धनगरीण.

Shĕ'raton, *n.* (शे'रटन्)—severe 18th-c. style of furniture (S. chairs). (अठराव्या शतकांतील साधें) लांकडी सामानसुमान करण्याची पद्धत.

Shĕ'riff, *n.* (शे'रिफ्)—a county or other chief officer of crown charged with the keeping of the peace, administering justice under direction of the courts, executing writs, presiding over elections, etc. नाझर, शेरीफ. [हा अंशतः लोकांच्या तर्फेचा व अंशतः हायकोर्टाच्या तर्फेचा अधिकारी असतो, इंग्लंडच्या मुख्य शहरीं हायकोर्टांत याची स्वतंत्र कचेरी असते. लोकांच्या तर्फे जाहीर सभा बोलावणें, फौजदारी सेशन कोर्टांत हजर राहणें. तसेंच ज्यूरी बोलावणें, व हायकोर्टाचे हुकुमनामे बजावणें, हीं कामें त्याला करावीं लागतात.] *Sheriffdom,-hood,-ship,-alty, nn.* office of sheriff. शेरीफच्या अधिकाराचा प्रांत; शेरीफचा हुद्दा.

Shĕ'rry̆, *n.* (शे'रि)—a white Spanish wine. पांढरी स्पॅनिश दारू.

Shew, (शो)—See Show.

**Shibb'olĕth,** *n.* ( शिबॉलेथ् )—a word or custom or principle regarded as a test; a party catchword. खुणेचा शब्द, संकेत-शब्द. [ Heb. ]

**Shield,** *n.* ( शील्ड् )—a piece of defensive armour; (*fig.*) a person or thing that protects one; (Herald.) representation of shield with coat of arms on it, protective plate or screen in machinery; shield-like part in animal or plant. ढाल; रक्षणकर्ता, संरक्षण, त्राता; विशिष्ट ( वंश- ) चिन्हांकित ढालीचें चित्र,-रूपरेषा; पांघरूण, झांकण; ढाल, रक्षकसाधन. *v. t.* to protect, to defend, ( esp. from censure or punishment ); to secure from danger. रक्षण करणें; पचावणें, पाठीशीं घालणें, वर ढाल धरणें. *The other side of the s.*, एखाद्या प्रश्नाची-गोष्टीची-( न दिसणारी, न दाखवलेली ) दुसरी बाजू. *S. hand*, ( arch. ) left hand. डावा हात. *S.-less*, *a.* ढाल-बचावाचें साधन-नसलेला.

**Shĭft,** *v. t. & i.* ( शिफ्ट् )—to change or move from one position to another; to change form or character; to use expedients; take whatever course is available, manage or get along or make a livelihood; to equivocate, practise evasion. जागा बदलणें, स्थलांतर करणें, हालवणें, धारापालट करणें, फिरवणें, दिशा बदलणें; रूपांतर पावणें, पालटणें; वाटेस लावणें, उपाय योजणें, निरुत्तर करणें, दिसेल तो मार्ग अनुसरणें, निभावणें, उदरनिर्वाह करणें; दुटप्पी बोलणें, टाळाटाळ करणें. *n.* change of place or character; an expedient or resource; a contrivance or piece of evasion; rotation; a relay of workmen; time for which relay works; dodge, trick; ( arch. ) chemise. जागेचा पालट, बदल, स्थित्यंतर; उपाय, युक्ति; तोड, हिकमत; पाळीवाले लोक; कामाची पाळी, वेळ,-तास; सवड, लुच्चेगिरी; ( स्त्रियांची ) चोळी, खमीस. *To s.* one's *ground*, to take up new position in an argument etc. निराळाच मुद्दा उपस्थित करणें, निराळीच बाजू उचलणें,-दिशा घेणें. S. *off*, (responsibility etc.). (जबाबदारी, अंगावपडभारी टाकणें,-दुसऱ्यावर ढकलणें. *Must s. for himself*, ( त्यानें ) आपला चरितार्थ आपणहून चालविला पाहिजे, -आपलें आपण पाहिलें पाहिजे. *S. of crops*, पिकांचा पालट, आलटून पालटून येणारीं पिकें. *To make s.* or *a s.*, get along somehow. कसेंतरी भागवणें,-चालवून घेणें.

**Shĭft'less,** *a.* ( शि'फ्ट्लेस् )—bad at finding expedients; incapable. डावपेंच नसलेला, साधा; धमक नसलेला, नालायक.-*ly*, *adv*;-*ness*, *n.*

**Shĭft'y̆,** *a.* ( शि'फ्टि )—( of wind ) variable, addicted to indirect courses or deceit. बदलणारा, पालटणारा ( वारा ); हिकमती, लुच्चा, कावेबाज, ढोंग्याचा. *S. eyes*, मिरकिल डोळे,-नजर. *Shi'ftily*, *adv.*; *Shift'iness*, *n.*

**Shille'lagh,** *n.* ( शिले'ला )—Irish cudgel of black-thorn or oak. ( आयरिश ) सोटा, बडगा.

**Shĭll'ing,** *n.* ( शि'लिंग )—an English silver coin equal to twelve pence, ( abbr. s. ). एक इंग्रजी चांदीचें नाणें, १२ पेन्स, १/२० पौंड. १/६, एक शिलिंग सहा पेन्स. £ 1 1 s. 1 d-, एक पौंड, एक शिलिंग, एक पेन्स. *To take King's or Queen's s.*, सैन्यांत-फलटणींत-दाखल होणें. *To cut off*, ( one's heir etc. ) *with a s.*, ( वारसाला ) एक पैहि न ठेवतां ( आपली मालमता ) दुसऱ्याच्या नांवानें करणें.

**Shĭll'y̆-shălly̆,** *n.* ( शि'लिशॅलि )—indecision, vacillation. धरसोड, कांकूं, हांय नाहीं. *a.* vacillating. धरसोडीचा, कांकूं करणारा. *v. i.* to vacillate. धरसोड-कांकूं-करणें [ fr. *shall I* ]

**Shĭm,** *n. & v. t.* ( शिम् )—( to fit or fill up with ) thin chip or wedge. खोक, खीळ-पाचर-मारणें.

**Shĭmm'er,** *n. & v. i.* ( शि'मर् )—( shine with ) tremulous or faint light. लिकलिकणें, लुकलुकणारा प्रकाश.

**Shĭn,** *n.* ( शिन् )—the bony front of the lower leg between the ankle and the knee. पायाची नळी, नडगी. *v. i. & t.* to climb ub ( tree, wall etc. ); kick the shins of, hack. वर चढणें; पायाच्या नळीवर लाथ मारणें. *S. bone*, पायाच्या नळीचें त्रिकोणाकृति हाड, अग्रजंघास्थि. *S. guard*, ( फूटबॉलच्या खेळांत ) पायाच्या नळीचें रक्षण करणारी उशी,-मोजा.

**Shĭn'dĭg,** *n.* ( शि'न्डिग् )—( U. S. ) social function. सामाजिक समारंभ.

**Shĭn'dy̆,** *n.* ( शि'न्डि )—free fight; commotion. मारामारी, आरडाओरड.

**Shine,** *v. i. & t.* ( शाइन् )—( shone शॉन् ) to emit or reflect light, to be bright, to glow; to be brilliant or admirable in some respect or sphere; ( colloq., with *pa. t. & pa. p.* shined ) make bright, polish. प्रकाशणें; चकाकणें, चमकणें, झळकणें, नांव करणें; (घासून पुसून बूट वगैरे) चकचकीत-लकलकीत-करणें. *n.* sunshine; lustre on a surface, a polishing; ( sl. ) shindy, fuss; ( pl., sl. ) capers, tricks. उन्ह; कांति, तेज, चमक, झकाकी; मारामारी, गोंधळ; कोलांट्या उड्या, युक्त्या. *Rain or s.*, पाऊस असो ऊन असो, हवा कशीहि असो. *To take the s. out of*, निस्तेज-फिका-करणें,-पाडणें, दवदवी नाहींशी करणें. *Shi'ner*, *n.* ( sl. a sovereign or other coin; ( pl. ) money; ( U. S. ) kinds of small fresh-water fish. पौंड, किंवा दुसरें सोन्याचें नाणें; ( अने० ) पैसा; गोड्या पाण्यांतला लहान मासा.

**Shĭn'gle,** *n.* ( शिं'गल् )—a small slip of wood used as roof-tile instead of slates or tiles. पातळ तक्ता; छपराकरितां पातळ लाकडी फळी. 2. pebbles in a mass as on sea-shore. रेंव, वाळू. *Shin'gly*, *a.*

**Shĭn'gles,** *n. pl.* ( शिं'गल्झ् )—skin-disease forming inflamed band round half of waist. इसब, खुजली, दाद.

**Shĭnn'y̆,** *n.* ( शि'नि )—( U. S. ) a game resembling hockey; stick used in it. ( हॉकीसारखा ) एक खेळ; तो खेळ खेळण्याची काठी,-दांडा.

**Shin'to**, *n.* ( शिन्टो )—the native religious system of Japan partly ousted by Buddhism; an adherent of this. जपानी लोकांचा प्राचीन ( निसर्गोपासनामूलक ) धर्म; त्या धर्माचा अनुयायी.-*ism*,-*ist*, *nn.* [ f. Chin. *Shin tao*, way of the gods ]

**Shi'ny**, *a.* ( शाइनि )—with bright surface; ( of cloth etc. ) worn smooth. चकचकीत, लकलकीत, नरम, मऊ, गुळगुळीत. *Shi'niness*, *n.* चकचकीतपणा; मऊपणा.

**Ship**, *n.* ( शिप् )—( regarded as fem. with pron. *she*, *her* ) large sea-going vessel, esp. one with bowsprit and three or more masts; (sl) a (racing) boat. जहाज, गलबत, ( तिरकटी ) तारू, महागिरी, मोठी बोट; ( शर्यतीची ) नौका, होडी. *v. t. & i.* to put or receive ( goods, etc. ) on board ship; go and take service on board ship as passenger or sailor; fix ( mast, etc. ) in its working place; lay (sculls, oars) inside a boat: (Commerc.) deliver (goods) to forwarding agent for conveyance by land or water. जहाजांत ( माल ) भरणें,-चढविणें, उतारू ( बोटींत ) घेणें; जहाजांतून पाठविणें; जहाजांत-बोटींत ( उतारू म्हणून ) बसून जाणें, ( खलाशी म्हणून ) नोकरीस राहणें; ( डोलकाठी वगैरे ) जागच्या जागीं बसविणें; ( वल्हीं काढून ) जहाजांत-होडींत-ठेवणें; माल ( पुढें पाठवून देण्याकरितां ) जहाजाच्या अडत्याच्या ( एजंटच्या ) स्वाधीन करणें. *A battle-s.*, लढाऊ,-आरमारी-जहाज. *S. of the line*, लढाऊ गलबत. *Merchant-s.*, व्यापारी ( माल नेणारें ) जहाज. *War s.*, आरमारी-लढाऊ-गलबत,-बोट. *Sailing-s.*, शिडांवर चालणारें गलबत,-तारू,-महागिरी. *Sister s.*, built on same plan as another. दुसऱ्या जहाजाच्या नमुन्याप्रमाणेंच बांधलेलें जहाज. *S. of the desert*, camel. उंट, वाळवंटांतील जहाज. *To take s.*, embark. जहाजावर-बोटीवर-चढणें. *On board s.*, *on ship board*, गलबतावर. *When my s. comes home*, when I make my fortune. माझें दैव उघडेल तेव्हां, मी पैसा मिळवीन तेव्हां. *S-breaker*, a contractor who breaks up old ss. जहाजफोड्या. *S.-broker*, जहाजांची खरेदीविक्री करणारा अडत्या,-दलाल; मालाची भरताड करणारा दलाल; गलबताचा विमा उतरणारा दलाल. *S. builder*, जहाजें बांधणारा *S.-building*, जहाजें-बोटी-बांधणें. *S.-canal*, for conveying ss. inland. ( आंतवर ) जहाजें नेण्याकरितां कालवा. *S-chandler (y,)* जहाजाचें ( दोरखंडें वगैरे ) सामान विकणारा, °ऱ्याचा धंदा. *S. fever*, typhus नाविक ज्वर. *S.-letter*, टपालाच्या बोटीशिवाय दुसऱ्या बोटीनें पाठविलेलें पत्र. *S.-load*, गलबताच्या भरताडीचा माल. *S.-mate*, गलबतावरील ( बरोबरीचा ) खलाशी,-उतारू. *S.-money*, ( hist. ) tax for providing navy. ( इंग्लंडमधील ) जहाजपट्टी, आरमारी कर. *S.-owner*, जहाजें-बोटी ( मालकीच्या ) असणारा; जहाज-बोट-कंपनीचे भाग ( शेअर्स ) घेतलेला. *S.-railway*, जहाजें वाहून नेण्यासाठीं आगगाडी. *S.'s articles*, खलाशांच्या नोकरीसंबंधीं नियम, अटी, इ. *S.'s husband*, ( जहाज बंदरांत असतांना मालकाच्या वतीनें ) जहाजावर देखरेख करणारा. *S.'s papers*, documents establishing ownership, nationality, nature of cargo, etc. of *s.* जहाजाचे ( मालकी, राष्ट्र, आंतील माल वगैरे माहिती सिद्ध करणारे ) कागदपत्र. *S. way*, ( गोदींतील ज्यावर गलबत बांधलें जातें तो, गलबताच्या बांधकामाचा आधार. *S. worm*, गलबताचें लांकूड पोखरणारा ( कालवासारखा ) प्राणी. *S. yard*, जहाजें-बोटी-बांधण्याचा कारखाना. *To s. a sea* ( of s or boat ), लाट आंत मारणें. *To s. oars*, वल्हीं होडींत-पडावांत-( पाण्यांतून काढून ) ठेवणें.

**Ship'ment**, *n.* ( शिप्-मेन्ट् )—putting of goods etc. on a ship; goods shipped or put on board, consignment. व्यापारी माल गलबतावर चढवणें; गलबतांत भरलेला माल, बोटींतून आलेला व्यापारी माल.

**Ship'per**, *n.* ( शिपर् )—a merchant etc. who sends or gets goods by ship. जहाजांतून माल पाठविणारा,-आणणारा,-व्यापारी.

**Shipp'ing**, *n.* ( शिपिंग् )—In vbl. senses; ships, ships of a country. जहाजांत माल भरणें; जहाजें, गलबतें, बोटी, राष्ट्राचीं जहाजें; जहाजाचें भरताड ( हे दनांत दाखवितात ). *S.-agent*, आगबोट-कंपनीचा ( एखाद्या बंदरांतील ) अधिकारी, एजंट. *S.-bill*, चढविलेल्या मालाची ( कस्टमची ) चिठी. *S. master*, खलाशांचे करारमदार, पगार, वगैरे, ज्याचे देखत होतात तो अधिकारी. *S.-office*, आगबोटीच्या एजंटचें ऑफिस.

**Ship'wreck**, *n.* ( शिप्-रेक् )—ship's undesigned sinking or destruction; (*fig.*) utter ruin, miscarriage, failure. जहाज फुटणें, नौकाभंग; संपूर्ण नाश. *v. t. & i.* to bring to or suffer ruin or failure, to wreck, to cast away. नाश करणें, नाश पावणें, बुडणें, बुडविणें, आशाभंग करणें,-होणें. *To make shipwreck*, be ruined. नाश पावणें,-होणें. *To make* or *suffer shipwreck of* one's *hopes*, आशाभंग करणें,-होणें. *S. wrecked*, *pa. t. & pa. p.* बुडालेला, आशाभंग झालेला.

**Ship'wright**, *n.* ( शिप्-राइट )—a shipbuilder. गलबतें बांधणारा.

**Shire**, *n.* ( शायर् )—(as suff. शर्) county. ( इंग्लंडांतील ) परगणा, प्रांत.

**Shirk**, *v. t. & i.* ( शर्क् )—to seek to avoid or get out of the performance of duty. टाळणें, चुकवणें, अंग चोरणें. *n.* a shirker. कामचुकारू, टाळाटाळ करणारा.

**Shir(r)** *n.* ( शर् )—( U. S. ) an elastic webbing; elastic thread woven into fabric; gathered trimming, gathering in costumary. लवचीक-ताणलें जाणारें-तागाचें कापड; कपड्यांतील विणलेला लवचीक धागा; ( ओढून घेण्याची कपड्याची ) फीत, नाडी. *v. t.* to gather ( material ) with parallel threads run through. समांतर धाग्यांनीं ( ओढून ) एकत्र गुंडाळणें. *Shirr'ing*, *n.*

**Shirt**, *n.* ( शर्ट )—a man's sleeved under-garment, woman's blouse with collar and cuffs. खमीस, शर्ट; स्त्रियांचें अंगातलें,-ब्लाऊझ. *Near is my s., but nearer is my skin*, प्रथम आपला विचार केला पाहिजे,

-स्वार्थ पाहिला पाहिजे. *To keep* one's *s. on*, (*sl.*) राग न येणें. *Get* one's *s. off*, (*sl.*) एखाद्याला राग आणणें. *Put* one's *s. on* or *upon*, (*sl.*) आपलें वर्चस्व पणाला लावणें. *Give* one *a wet s.*, एखाद्याला घामटल्या निथेपर्यंत कामाला लावणें. *S.-front*, (कॅनव्हास भरलेली) शर्टाची कडक छाती. *S.-front wicket*, absolutely true and smooth cricket pitch. क्रिकेट खेळण्याची शास्त्रोक्त व खेळण्याला सुंदर जागा (दोन यष्टींमधील).

**Shirt'ing**, *n.* (शर्टिंग)—shirt material. शर्टचें कापड.

**Shirt'ȳ**, *a.* (शर्टि)—(sl.) in a bad temper, angry. रागावलेला, चिडलेला.

**Shĭv'er**, *v.t. & i.* (शिव्हर्)—to break to shivers; to tremble with cold or fear. तुकडे तुकडे करणें, छिन्नभिन्न होणें; कांपणें, थंडीनें कुडकुडणें. *n.* momentary shivering; (*n.* usu. pl.) a small fragment, splinter. कांपरें, हुडहुडी; तुकडा, शकल, खंड, चकाचूर.-*ingly*, *adv.* कांपरें भरून. *Shiv'ery*, *a.* कांपणारा, हींव भरलेला.

**Shoal**, *n.* (शोल्)—a great number of fish swimming together; a multitude of persons or things; a shallow place (in sea, etc.); submerged sandbank; (*fig.*) hidden danger. माशाची झुंड; लोकांचा थवा, घोळका; उथळ पाण्याची जागा, भाट, भाटी, लग, दांडा, बुडून गेलेला वाळूचा दांडा, मोडा; गुप्त-संकट-अडचणी. *a.* (of water) shallow. उथळ. *v. t.* (of fish) to form shoals; to get shallower. थवा-झुंड-करणें; उथळ होणें. *Shoa'ly*, *a.* भाट-पार-दांडा पडलेला, उथळ (पाण्याचा). *Shoal'iness*, *n.* (पाण्याचा) उथळपणा. *Shoals of people, letters*, लोकांचे थवेच्या थवे, पत्रांचे ढिगारे.

**Shŏck**, *n.* (शॉक्)—a group of corn-sheaves stood together in field; an unkempt mass or head of hair; violent collision, concussion or impact; sudden and disturbing physical or mental impression; state produced by this. गवताची गंज, गंजी, जुडी; सुडी जटा, पेढू, जटा वाढलेलें डोकें; धक्का, हिसका; दचका, धडकी, धपका; (मज्जातंतूंना बसलेला) धक्का. *v. t.* to affect with horror or disgust, appear scandalous or improper or outrageous to; (poet.) to encounter violently; to arrange (corn) in *ss.* धक्का बसणें; (ला) बीभत्स,-भयंकर,-अयोग्य वाटणें; हबकणें, धक्का देणें, -मारणें; पेंढ्यांची गंज लावणें,-रचणें. *S. head*, *-ed*, डोक्यांतील केसांच्या जटा, पेढू. *A shock of earthquake*, भूकंपाचा धक्का. *S. tactics*, use of cavalry to charge in masses. (घोडदळाचे) निकराचे हल्ले चढविण्याचे डावपेंच. *S.-troops*, German special service troops in the great war. (गेल्या महायुद्धांतील) राखीव जर्मन सैन्याचा भाग. *Electric s.*, वैजिक-विजेचा -धक्का.

**Shŏck'ing**, *a. & adv.* (शॉकिंग)—scandalous, improper, very bad or repugnant. किळसवाणा, अयोग्य, भयंकर. *Shock'ingly*, *adv.*;-*ingness*, *n.*

**Shŏd**, *pa. t. & pa. p.* of Shoe.

**Shŏd'dȳ**, *n.* (शॉडि)—a fibre got by shredding old cloth; cloth partly made of this. जुनें कापड फाडून काढलेला धागा,-सूत; या धाग्यांचें बनविलेलें कापड. *a.* counterfeit and trashy. बनावट व हलकें.

**Shoe**, *n.* (शू)—outer covering of leather or other material for the foot. बूट, पायतण, जोडा; (घोड्याचा) नाल; जोड्याच्या-नालाच्या-आकाराची वस्तु. *v. t.* (*shod, part. shoeing*), to fit with shoes or shoe. जोडे घालणें, नाल मारणें, वसवी घालणें. *That's another pair of ss.*, another matter. ती गोष्ट-बाब-निराळी. *Dead men's ss.*, भावी वारसाला मिळण्याची आशा असलेली मालमत्ता, अधिकार इ. *To be in person's ss.*, in his plight. एकाद्याच्या सारखीच (आपली) स्थिती-अडचणी-असणें. *To die in* one's *ss.*, अपघातानें-गळफांस लागून-मरणें. *The wearer best knows where the s. pinches*, अळवाची खाज अळवालाच (नखालाच) ठाऊक, जावें त्याच्या वंशा तेव्हां कळे, ज्याचें दुःख त्यालाच उमजतें. *To put the s. on the right foot*, खऱ्या अपराध्याचे माथीं अचूक दोष मारणें. *Ss. & stockings*, त्रिपर्णी वनस्पतींच्या जाती. *S.-black*, a boy etc. who cleans shoes of passer-by. बुटांना-जोड्यांना-(धासून पुसून) चकचकीत (पालिश) करणारा (पोऱ्या). *S. horn*, बूट (पायांत) चढविण्याचा चमचा (साधन). *S.-latchet*, (*bibl.*) बूट घट्ट बांधणें. *S.-leather*, (जोडा, बूट यांकरितां) कमावलेलें चामडें. *A pole shod with iron*, वसवी घातलेला दांडा.. *S.-less*, *a.*

**Shoe'-flower**, *n.* (शूफ्लॉवर्)—a plant, its flower. जास्वंद, जपा (झाड, फूल).

**Shoe'māker**, *n.* (शूमेकर्)—one who makes shoes, maker of boots and shoes. चांभार, मोची, चर्मकार,

**Shone**, pa. t. & pa p. of Shine.

**Shook**, pa. t. of Shake.

**Shōōt**, *v. i. & t.* (शूट्)—(*shot*), to come or go swiftly or suddenly, dart; to discharge or propel quickly gun, bullet, etc. to wound or kill with a gun; to shoot game or fire at target; (of bud, &c.) to issue; (of plants) to put forth buds; to jut *out* or rise sharply *up*; (Assoc. foot-ball, v. i.) take a shot at goal. वेगानें जाणें किंवा येणें, उडी-उसळी-मारणें, बंदूक झाडणें, गोळी मारणें, बंदुकीनें जखम करणें किंवा ठार मारणें; शिकार मारणें, नेम मारणें; मोड किंवा अंकुर येणें, रुजणें; कळ्या येणें,-फुटणें; पुढें येणें, एकदम वर येणें; चेंडू एकदम गोलकडे उसळणें. *n.* bud or young branch; a rapid in stream; inclined plane; shooting party or expedition or practice or land. कोंब, अंकुर, लहान फांदी, मोख; जोराचा प्रवाह,-धबधबा; उतरण; शिकारी लोक, शिकारीवर जाणें, निशाणबाजी, शिकारीची जागा,

निशाणबाजीचें स्थळ. *int.* (U. S.) say what you have on your mind. बोल काय मनांत असेल तें! *S. ahead*, शर्यतींत प्रतिस्पर्ध्यांच्या पुढें जोरानें निघून जाणें,-सरकणें. *Tree shoots*, झाडाला कळे-कळ्या -फुटतात-येतात. *Prices shot up*, भाव एकदम कडाडले, किंमती वाढल्या,-चढल्या. *S. up*, उंच वाढणें, उफाटणें, कांडारणें. *Tooth shoots*, दांतांत ठणठणतें, -दुखतें,-शिवशिवतें. *S. out*, पुढें येणें,-निघणें. *S. out one's lips*, bibl. रागानें-तिरस्कारानें-ओंठ बाहेर काढणें. *S.* one's *linen*, सद्याचें कफ बाहेर दिसणें. *S. the cat*, (sl.) vomit. ओकणें, वांति करणें. *To s. up*, (U. S., sl.) terrorize with punitive rifle-shooting, firing of houses, etc. बंदुकीचे बार काढून-गोळ्या झाडून-(खेडीं, मांत वगैरेंत) दहशत बसविणें. *S. the sun*, (naut.) take its attitude with the sextant at noon. दुपारच्या वेळीं सूर्याची उंची मोजणें. *S. the moon*, (sl.) remove one's goods by night to avoid paying rent. (भाडें देण्याचें टाळण्यासाठीं) रातोरात सामानसुमान हालविणें,-लांबविणें. *S. Niagara*, अशक्य गोष्ट करण्याचें साहस करणें. *Shoot'able, a.*

**Shoot'er**, *n.* (शूटर्)—In vbl. senses; ball that shoots at cricket; (in comb.) shooting implement. गोळी मारणारा; उसळी घेणारा, चेंडु; गोळी मारण्याचें साधन. *Six s.*, सहाबारी पिस्तूल.

**Shoot'ing**, *n.* (शूटिंग)—In vbl. senses; right of shooting over estate etc.; an estate rented to shoot over. गोळीबार-शिकार-करणें; विशिष्ट हद्दींत शिकार करण्याचा हक्क; शिकारीची भाडोत्री जागा. *Shooting box*, शिकारी राहण्याकरितां बांधलेली छपरी. *Shooting-star*, तुटणारा तारा, उल्का.

**Shop**, *n.* (शॉप्)—a building or room for retail sale of goods; workshop or place of manufacture; (sl.) institution; one's profession, trade, things connected with it; one's place of business; a talk about one's work. दुकान, कारखाना, कारखान्यांतील खातें, -शाखा; संस्था; स्वतःचा पेशा, धंदा; धंद्याची जागा; स्वतःच्या धंद्याच्याच गोष्टी. *v. t.* to visit shops to buy things; (sl.) imprison. बाजार किंवा सौदा करणें; तुरुंगांत टाकणें. *To come to the wrong s.*, to apply to wrong person. भलत्याच माणसाकडे (कामाकरितां) जाणें. *The other s*, प्रतिस्पर्धी संस्था. *Shut up s.*, दुकान-धंदारोजगार-बंद करणें. *Talk s.*, आपल्याच धंद्यासंबंधानें बोलत राहणें,-सुटणें. *Sink the s.*, आपल्याच धंद्यासंबंधीं बडबड बंद करणें; आपला धंदा लपविणें. *Smell of the s.*, (चा) धंदा स्पष्ट कळून येणें. *All over the s.*, (sl.) in disorder, wildly. अस्ताव्यस्त, इकडे तिकडे, चारी दिशांना. *S. bell*, दुकानाच्या दारावरील घंटा. *S.-boy,-girl*, दुकानांतला (पुरुष-स्त्री) नोकर. *S.-lifter*, (गिऱ्हाइक म्हणून दुकानांत जाऊन तेथील) वस्तू लांबविणारा, उचल्या, उपट्या, भामट्या. *S.-man*, दुकानदार, -त्याचा नोकर. *S.-steward*, कारखान्यांतील कामगारांचा प्रतिनिधि-कामगार. *S.-walker*, गिऱ्हाकांना आंत नेऊन सोडणारा, मोठ्या दुकानांतील नोकर, गिऱ्हाइकांची व्यवस्था ठेवणारा. *S. windows*, दुकानांतील (मालाच्या) शोभेच्या मांडणावळीची जागा. *Has everything in the s. w.*, is superficial. निवळ दिखाऊ. *S. worn, S. soiled*, दुकानांत मळलेला माल. *Shop'ping, n. Shop'py, a.* धंद्याचा, उद्योगाचा.

**Shŏp'keeper**, *n.* (शॉप्-कीपर्)—an owner of retail shop, one who keeps a shop. (किराण्याचा) दुकानदार. *Nation of shop-keepers*, the English. इंग्रज लोक, इंग्लंड.

**Shōre**, *n.* (शोअर्)—land that skirts sea or lake or river, the coast, the strand; (Law) land between ordinary high and low water marks. किनारा, कांठ तीर, तट; भरती-सुखतीच्या खुणांमधील जमीन,-किनारा. *In s.*, किनाऱ्यानजीकच्या पाण्यांत, किनाऱ्यानजीक. *S.-less, a.* किनारा असलेला, अति विस्तीर्ण (सागर) *S.-ward, adv.* किनाऱ्याकडे.

**Shōre**, *n.* (शोअर्)—a beam set obliquely against ship, wall, tree, etc. as support. नेटावा, टेका, दुस्ती, तीर. *v. t.* to prop *up* with shore(s). नेटावे देणें,-देऊन उचलून धरणें. *Shor'ing, n.* थिरें, नेटावे.

**Shorn**, *pa. t. of* Shear.

**Shŏrt**, *a.* (शॉर्ट्)—not long in space or time; not tall; soon traversed or finished; concise; of less than the named amount; failing to reach the measure or quality of; soon over; angrily curt; (of pastry, clay) crumbling or breaking easily; (phonet., pros. of vowel) unstressed; (of stocks, crops) sold, selling. आंखूड, तोकडा, थोडा, लहान, अल्प, ठेंगणा, बुटगा; लौकर संपणारा; संपलेला; संक्षिप्त, संक्षेपाचा, अल्पविस्ताराचा; अपुरा, कोता; दोन-थोड्या-दिवसांचा; उर्मट, असभ्य, दांडगट; ठिसूळ, तुटीर; ऱ्हस्व, लघु (स्वर); विकलेला, खलास. *adv.* abruptly; before or without reaching the end, without going to the length of. एकाएकीं; शेवटाला गेल्याशिवाय, स्वाभाविक काळापूर्वीं, अकस्मात, एकदम, मध्येंच. *n.* a short syllable or vowel or the short mark (⏑); (*pl.*) garment like trousers cut off above the knee worn by athletes, boy scouts, boys, etc. लघु अवयव, ऱ्हस्व स्वर; ऱ्हस्व-लघु-स्वरांचें चिन्ह (⏑); (अने॰) लांडी तुमान; मांडचोळणा. *S. story*, of the character of a novel but less length. लघुकथा. *S. cut*, सोपी रीत, जवळचा रस्ता, -मार्ग. *S. circuit*, electric circuit made through a small resistance. (अल्पप्रतिबंधात्मक) वैजिक लघुमंडळ. *A s. sea*, short broken waves. लहान फुटणाऱ्या लाटा. *S. bread,-cake*, पुष्कळ लोणी-साखर -घालून केलेली केक (पोळी). *To make s. work of*, (शत्रूला) सहज दूर करणें, नाहींसे करून टाकणें, ठार मारणें; तडफेनें-झटदिशीं-पुरें करणें. *S.-lived*, थोडा वेळ टिकणारा, अल्पायुषी, *S. temper*, उतावळा, चिडखोर, रागीट,-स्वभाव;-*ed, a. S. wind*, दम लागणें, फार लांबवर धावतां न येणें; (*fig.*) फार वेळ

घोलण्याची-लिहिण्याची-कुवत-ताकद-नसणे; *S. w.-ed, a. S. w-edness, n. To take s. views,* तात्पुरतें पाहणें. *S. date,* (हुंडी लागू होण्याची) थोडी मुदत. *S.-dated,* थोड्या मुदतीची (हुंडी). *Are s. of hands,* पुरेसे कामगार नाहींत. *S. weight,* (दाखविल्यापेक्षां) तुटकें माप,-वजन. *To cut s.,* थोडक्यांत निकाल लावून टाकणें. *Come s. (of),* अटकळीप्रमाणें न उतरणें,-भरणें; (ला) चुकणें; योग्य वाढ न होणें. *To fall s,* कमी-अपुरा-पडणें. *Run s.,* थोडाच शिल्लक राहणें, (ची) तूट पडणें. *The long and the short of it,* चें तात्पर्य, सारांश. *In s.,* सारांशरूपानें, एकूण. *For s.,* थोडक्यांत, संक्षेपार्थ. *Something s.,* a drink of strong liquor. पेलाभर मद्य,-दारू, (Adv.) *Took him up s.,* त्याला मध्येंच थांबविलें. *Stop s.,* एकाएकीं बंद पडणें,-मध्येंच थांबणें. *Bring, pull up, s.,* एकदम थांबवणें,-थांबणें, उभें राहणें. *Be taken s.,* have sudden motion of bowels. एकदम रेच होणें. *S. of,* except, putting out of the question. शिवाय, (तें) खेरीज करून. *Short'ish, a., short'ness, n.*

**Shŏrt'age,** *n.* (शॉ'र्टिज्)—a deficiency in number or amount, a short amount. तोटा, कमी येणारी रक्कम, खूट, तूट.

**Shŏrt'coming,** *n.* (शॉ'र्ट्-कमिंग)—failure to reach a standard or perform a duty; defect. खूट, तोटा; चूक, दोष.

**Shŏrt cŏmm'ons,** *n.* (शॉर्ट् कॉमन्झ्)—scanty allowance of food, little daily fare. अल्प शिधासामुग्री.

**Shŏrt'en,** *v. i. &t.* (शॉ'र्टन्)—to become or make shorter, or short; to curtail, to contract. कमी करणें, आखूड करणें; कमी होणें, आंखूड होणें, अंवटरणें.

**Shŏrt'hănd,** *n.* (शॉर्ट्-हॅन्ड)—kinds of writing enabling reporter to keep pace with speaker. लघुलिपी.

**Short'handed,** *a.* (शॉर्ट् हॅन्डिड्)—not having the full number of men required. पुरेसे कामगार नसलेला.

**Short'horn,** *n.* (शॉर्ट् हॉर्न्)—name of short-horned breed of cattle. आखूडशिंगी जनावरांची जात.

**Shŏrt'ly,** *adv.* (शॉ'र्ट्-लि)—before long, soon; in a few words, briefly, quickly; curtly. लौकरच; थोडक्यांत; थोड्या वेळानें; थोड्या शब्दांत; तुटसपणानें, उद्धटपणानें.

**Shŏrt'sighted,** *a.* (शॉर्ट्-साइटेड)—having short sight; deficient in foresight, not able to see far intellectually. ज्याला दूरचें दिसत नाहीं असा; ऱ्हस्वदृष्टि; अदूरदर्शी.*-ly, adv.;-ness, n.*

**Shŏt,** *a.* (शॉट)—pa. t. & pa. p. of *Shoot.* (of coloured material) woven of different-coloured warp and woof so that the colour changes with the print of view. निरनिराळ्या रंगाची तकाकी असणारा.

**Shŏt,** *n.* (शॉट)—reckoning, one's share of tavern-bill. स्वतःचा (खाणावळीचा) आकार, हिशेब.

**Shŏt,** *n.* (शॉ'ट)—an attempt to hit something by shooting, throwing or striking, or to attain an end or solve a question; discharging of a gun, &c.; a person of specified skill in shooting; a cannon-ball; (collect.) leaden pellets used at each discharge of a gun. नेम मारण्याचा (-एखादी गोट साधण्याचा,-प्रश्न-कोडें सोडविण्याचा) प्रयत्न, टोला, मार; बंदूक झाडणें, नेमबाज, लक्ष्यवेधी, चांगला नेम मारणारा; बंदुकीची गोळी; छरे. *v. t.* to load (gun), weight, with shot. (बंदुकींत) मार भरणें. *A s. in the locker,* मागें टाकलेली,-शिलकी-रक्कम. *Made a bad s.,* guessed wrong. चुकीचा तर्क करणें, तर्क-अंदाज-चुकणें. *Snap s.,* क्षणिक नेम धरून गोळी मारणें,-झाडणें. *Flying s.,* उडत्या पक्ष्यावर किंवा वस्तूवर मारलेला नेम,-गोळी -मार. *Bow s., rifle-s.,* बाणाच्या-बंदुकीच्या टप्प्यांत. *S. tower,* वितळलेल्या शिशाचा गोळा तयार करण्याचें यंत्र. *S.-proof, a.* बंदुकीच्या गोळ्यांना दाद न देणारा.

**Should,** (शुड)—pa. t. of Shall.

**Shoul'der,** *n.* (शौ'ल्डर्)—the point of body at which the arm or the foreleg or wing is attached; projection or expansion comparable to human shoulder; (pl.) the back from shoulder to shoulder; (sing.) beast's foreleg as joint of meat; (Mil.) position of soldier who has shouldered arms. खांदा, स्कंद, खांदाड, खांद; खांद्याप्रमाणें पुढें आलेला,-फुगट-भाग; पाठीचा खांद्यामधला भाग; पुढच्या तंगडीचें मांस; (लष्करी) उजव्या हातांत उभी धरून धरणें. *v. t. & i.* to push with the shoulder, to jostle, to hoist on to or lay across one's shoulders; to assume responsibility. खांद्यांनीं ढकलणें, धक्काबुक्की करणें; खांद्यावर घेणें,-टाकणें; जबाबदारी घेणें. *S. joint,* खवाटा, खवाट्याचें हाड. *S. to s.,* with closed ranks or united efforts. खांद्यास खांदा भिडवून, सर्वांनीं मिळून प्रयत्न करून. *Has broad ss.,* मजबूत, दांडगा, जबाबदारी घेण्यास लायक. *Old head on young ss.,* तरूण पण ज्ञानवृद्ध, तरूण ज्ञानी-शहाणा-मनुष्य. *To put, set, s. to wheel,* make effort. स्वतःची कंबर बांधणें, (स्वतः) प्रयत्न करणें. *Straight from the s.,* परिणामकारी जोरदार तडाखा,-टोमणा. *To lay the blame, burden, on the right ss.,* योग्य इसमाच्या माथीं दोष मारणें, योग्य इसमाच्या शिरावर जबाबदारी टाकणें. *S. belt,* खांद्यावरून घालण्याचा पट्टा, पडदळ. *S. knot,* (दगलपाच्या) खांद्यावरील गोंडा. *S. brace,* contrivance for flattening round back of child etc. पाठ रुंद करण्याचें साधन,-पट्टा. *S. pegged,* (of horse) stiff in ss. ताठ खांद्याचा,-पाठीचा (घोडा). *S.-strap,* (सैनिकाच्या गणवेशांतील) खांद्यावरचा पट्टा. *To s. arms.* (Mil.) उजव्या हातानें बंदूक उभी धरणें.*-shouldered, a.*

**Shoul'der-blade,** *n.* (शौ'ल्डर्-ब्लेड)—either flat bone of the back jointed with the arm-bone. खांद्याचें हाड.

**Shout,** *n.* (शाउट)—a loud cry from a person or company calling attention or expressing

joy, defiance, (dis) approval; a loud burst of voice. मोठ्यानें ओरडणें, आरोळी, आरडाओरडा, जयघोष, गजर. *v. i. & t.* to emit a shout or shouts; to speak loudly. ओरडणें; आरोळी मारणें, आरडाओरडा करणें; पुकारा करणें, जयघोष करणें; ओरडून बोलणें,-सांगणें. *S. at,* speak loudly to. शीं मोठ्यानें (ओरडून) बोलणें. *All is over but the shouting,* contest is virtually decided. (वादाचा निकाल लागला फक्त) शुष्क ओरड शिल्लक राहिली.

**Shove,** *v. t. & i.* (शव्ह्)—to push vigorously, make one's way along; (colloq.) put somewhere. रेटणें लोटणें, ढकलून-लोट्टन-वाट काढणें; कोठेंतरी कोंबणें,-ठेवणें. *n.* a push; woody centre of flax-stem. धक्का, ढका, रेंटणें, रेटारेटी; जोखी. *S.-half-penny,* आधुनिक जुगारीचा एक प्रकार. *To s. off,* होडींत बसून (किनान्यावरून) निघणें, बोट हाकारणें. *To give* one *a s. off,* help him to start. सुरुवातीला हात देणें, मदत करणें.

**Sho'vel,** *n.* (शॅव्हल)—spade-like scoop or blade with a handle (for shifting earth, &c.). खुरपें, पावडें, फावडें. *v. t.* to shift (coal etc.) with or as with a s. or spade. (फावड्यानें कोळसे) चाळवणें,-मारणें, फावड्याप्रमाणें चाळवणें. *S. head, S. nose,* जलचर मोठे भयंकर मासे,-प्राणी, (नक्र, सुसर). *S. food into* one's *mouth,* eat greedily. गपागप खाणें, बोकणे मारणें, वकावक खाणें. *S. ful, n.* फावडेंभर. *Shov'elled,* pa. t. & pa. p.

**Sho'vel board,** *n.* (शॅव्हल्बोर्ड)—a game played (esp. on ship's deck) by impelling disks or coins over partitioned surface. (ठराविक जागेवर चक्र किंवा नाणें फेंकून नेम साधण्याचा) एक (जुगारीचा) खेळ.

**Sho'veller,** *n.* (शॅव्हलर्)—In vbl. senses; the spoon-bill duck. फावड्यानें कोळसे मारणारा; अधाशीपणानें खाणारा; एक प्रकारचें बदक.

**Show,** shew, *v. t. & i.* (शो)—to let be seen, disclose, manifest; to offer for inspection; exhibit, to demonstrate; prove, paint out, to make understand, reveal; conduct. नजरेस पाडणें, दाखविणें, पाहविणें; प्रदर्शित करणें, समजूं देणें; पाहण्यासाठीं मांडून ठेवणें, प्रदर्शन करणें, उघड करून-प्रत्यक्ष-दाखविणें; सिद्ध करणें, दाखवून देणें, समजावून देणें; दर्शविणें, व्यक्त करणें; नेऊन-फिरवून दाखविणें. *n.* showing; outward appearance; ostentation, pomp; pageant or display; (sl.) concern, undertaking; opportunity of acting, defending oneself; (obstetr.) discharge indicating approach of labour. दाखविणें, प्रदर्शन करणें; आकार, रूप; पोकळ डौल, प्रदर्शन; भपका, डामडौल; खेळ, तमाशा; धंदा, उपद्व्याप, उद्योग, खटाटोप; (कृति करण्याची, स्वतःची बाजू मांडण्याची) संधि; प्रसवसूचक रक्तस्राव; प्रसवसान्निदर्शन. *To s. oneself,* चारचौघांत दिसणें,-चारमंडळींत वावरणें. *S. fight,* not yield tamely. झटापट करणें, दोन हात करणें. S. one's *colours,* आपला पक्ष दाखविणें; आपला स्वभाव दाखविणें,-व्यक्त करणें. S. one's *hand,* (*orig. in cards*) आपला डाव (पत्ते) दाखविणें; (*fig.*) आपले बेत जाहीर करणें. S. *the hoof* or *cloven hoof,* दुष्टस्वभाव प्रकट करणें. S. *white feather,* भित्रेपणा दाखविणें, भागूबाईसारखें वागणें. S. *clean pair of heels,* जीव घेऊन पळणें, पळपाय करणें. S. *a leg,* get out of bed. झोंपून उठणें. *S. thing the fire,* थोडी आंच-उष्णता-देणें. *S.* one *the way,* (ला) रस्ता-मार्ग-वाट-दाखविणें; मार्गदर्शक (स्वतः एकादी गोष्ट आचरून) होणें. S. *person the door,* (ला) घालवून-हांकलून-देणें. *On your own showing,* तुमच्याच म्हणण्यावरून (मुद्दां). *S.* one *out* or *in,* (दाराच्या) बाहेरपर्यंत पोंचवणें, (दार उघडून) आंत घेणें. *S. forth,* (arch.) प्रदर्शन करणें, स्पष्ट करून सांगणें. *S. off,* (trans.) खुलवून दाखविणें; (intr.) श्रीमंतीनें, कौशल्यानें,-छाप पाडणें. *S. up,* उघड दिसून येणें, (लबाडी) उघडकीस आणणें. *Voted by s. of hands,* हात वर करून मतप्रदर्शन केलेलें. *Flower s.,* फुलें, भाज्या वगैरेंचें प्रदर्शन *Horse s.,* घोड्यांचें प्रदर्शन. *Outward s.,* बाह्य देखावा;-भपका. *To make a s. of,* चें प्रदर्शन करणें. *To run* or *boss the s.,* खटाटोप -धंदा-चालविणें, एकट्याच्याच अरेरावीनें सर्व गोष्टी करणें. *To give away the s.,* (चा) पोकळपणा बाहेर येणें,-फुटणें. *Shew-bread,* twelve loaves displayed in Jewish temple, and renewed each sabbath. जेरुसलेमच्या ज्यू लोकांच्या देवळांत देवासमोर ठेवलेल्या बारा भाकऱ्या. *S.-case,* वस्तु मांडून दाखविण्याचें कांचेचें कपाट. *S. window,* वस्तूचें प्रदर्शन केलेली कांच लावलेली खिडकी, जागा. *S.-place,* प्रेक्षणीय स्थळ. *Showy, a., Show'ily, adv., Show'iness, n. Showed, pa. t.; Shown, Showed, pa. p.*

**Show'man,** *n.* (शो'मन्)—a proprietor or manager of menagerie or travelling show. तमासगीर, खेळकरी; वस्तुसंग्रहाचा मालक,-व्यवस्थापक.

**Show'rōōm,** *n.* (शो'रूम्)—a room in which show is exhibited or goods are kept for inspection. माल व्यवस्थित मांडून लोकांना पाहतां येईल अशी जागा, वस्तुदर्शनालय.

**Show'er** *n.* (शॉ'वर्)—brief fall of rain or of hail or sleet; great number of descending missiles, letters, etc.; (U. S.) a social gathering in honour of a bride at which each guest brings a present. सर, वृष्टि, वर्षाव, पाऊस; ढीग, वर्षाव; लग्नसमारंभांतलि देणग्यांचा वर्षाव. *v. t. & i.* to descend or send in a shower, to bestow copiously. पाऊस पडणें, वृष्टि करणें. *Letters come in ss.,* पत्रांचे ढीगच्या ढीग येतात. *S.-bath,* (जाळी पाडलेल्या पत्र्याच्या तिरक्यांतून वरून पडणाऱ्या) तुषारांत केलेलें स्नान, तुषारस्नान. *Show'ery, a.* rainy. मोठ्या सरीचा, झडीचा. *-eriness, n.*

**Show'ў,** *a.* (शो'इ)—of attractively brilliant appearance; making a good show. भपकेदार, डौलदार, दिखाऊ.

**Shrank,** *pa. t. of* Shrink.

**Shrăp'nel,** *n.* (श्रॅप्नेल्)—shells packed with bullets and timed to burst short of the *objective*; parts of bomb, etc. so scored as to break and scatter. स्फोटक कुल्पी गोळा; फुटून उडणारा बाँब.

**Shrĕd,** *n. & v. t. & i.* (श्रेड्)—(*Shredded*, arch. *Shred*), a long narrow piece cut off, scrap, rag, paring, torn-out fibre; least amount. चिंधी, तुकडा, बाभाडा, चिंधडी; अल्पांश, थोडें, यत्किंचित्. *v. t. & i.* to cut or tear to *ss.*; fray. चिंधड्या उडणें,-उडवणें; चिरफळ्या काढणें.

**Shrew,** *n.* (श्रू)—(also *S. mouse*), a small beast like long-snouted mouse feeding on insects; a peevish ill-tempered woman, scolding woman. चिचुंद्री; कर्कशा, कैदाशीण, चाटिका. *Shrew'ish, a.*;-*ishly, adv.*;-*ishness, n.* कर्कशीणपणा, कैदाशीणपणा.

**Shrewd,** *a.* (श्रूड्)—sagacious, showing discernment, discerning, penetrating; (of guess etc.) near the point; (of cold) sharp, severe. धूर्त, चतुर, चाणाक्ष; धूर्तपणाचा, अचूक (अंदाज); कडक, झोंबणारा. A *s. face*, sagacious-looking. धूर्तपणाचा चेहरा,-मुद्रा. *Shrewd'ly, adv. S. ness, n.* धूर्तपणा, चातुर्य.

**Shriek,** *v. t. & i & n.* (श्रीक्)—to scream, a loud cry, laugh uncontrollably. किंकाळी फोडणें, किंकाळी, आरोळी, बेफाम हंसणें, खो खो हसणें. *S. out*, say in shrill agonized tones. किंचाळून सांगणें.

**Shriev'alty,** *n.* (श्री'व्हल्टि)—sheriffship. शेरिफचा-नगरशेटचा-मान किंवा हुद्दा.

**Shrift,** *n.* (श्रिफ्ट्)—(arch.) confession to priest. उपाध्याजवळ केलेला पापांगीकार (प्रायश्चित्त) व त्यामुळें झालेलें पापमोचन. *Short s.*, (फांशीची शिक्षा व तिची अंमलबजावणी यांमधील) अति अल्पकाळ.

**Shrike,** *n.* (श्राइक्)—kinds of bird called also butcher-bird, with hooked teethed beak. टीव, लटोरा (पक्षी). [Lit. a shrill-voiced bird]

**Shrill,** *a.* (श्रिल्)—piercing and high-pitched in sound, uttering an acute sound; (fig.) importunate. कर्कश, कडक; गयावया करणारा. *v. i. & t.* (of cry etc.) sound shrilly; utter, send out (song, complaint, etc.) thus. कर्कश ओरडणें; कर्कश-रडक्या-शब्दांत सांगणें,-म्हणणें. *Shrilly, adv. Shrill'ness, n.* कर्कशपणा, किन्हरेपणा.

**Shrĭmp,** *n.* (श्रिम्प्)—a sea crustacean an inch or two long; a diminutive person. झिंगा, चिंगाटी, कोळंबी; क्षुद्रतर (मनुष्य). *v. i. to go catching ss.* कोळंबी पकडत जाणें. *S.-er, n.*

**Shrīne,** *n.* (श्राइन्)—a casket or tomb holding relics; sacred or revered place, altar, hallowed spot. साधुपुरुषाच्या अस्थि वगैरे ठेवलेली पेटी, देव्हारा, समाधी, कबर, छत्री; स्थंडिल, वेदी; पवित्र स्थान, तीर्थ, देऊळ, प्रार्थनामंदिर. *v. t.* to enshrine. पवित्र पेटींत-देव्हाऱ्यांत-ठेवणें; पूज्य म्हणून मनांत वागविणें.

**Shrĭnk,** *v. i. & t.* (श्रिंक्)—to grow smaller, contract; to recoil or retire or flinch, to decline action from fear. लहान होणें, संकोचणें, आवटणें, सुरकुत्या पडणें, आटणें; चपापणें, मागें जाणें, कच खाणें, कचरणें. *n.* (rare) shrinking. आंवटणें, आटणें (कापड इ०). *To s. into oneself*, become reserved. संकुचित वृत्ति धरणें, मनानें कुठें राहणें. *Shrink'able, a.*; *shrink'ingly, adv.*; *Shrank, pa. t.*; *Shrunk*, (rarely) *Shrunken, pa. p.* A *shrunken face*, सुरकुतलेला, खप्पड चेहरा.

**Shrĭnk'age,** *n.* (श्रिं'केज्)—a tendency to diminish in size or number; amount of diminution. आकुंचन, आवटणें, घटणें, घट, आवटणी.

**Shrīve,** *v. t.* (श्राइव्ह्)—(arch.; shrove, shriven), to give absolution to, confess. प्रायश्चित्त-पापमुक्तता-देणें; पापाचा अंगीकार करणें.

**Shrĭv'el,** *v. i. & t.* (श्रि'व्हल्)—to contract into wrinkled or curled-up state. आटणें, अवटणें, चळ्या पडणें, सुरकुत्या पडणें, सुरकुतणें. *Shriv'elled, pa. t. & pa. p.*

**Shrŏff,** *n.* (श्रॉफ्)—a banker or money changer. सराफ, खरें-खोटें नाणें पारखणारा. *v. t.* to examine, sift, coin etc. नाणीं तपासणें,-निवडणें.

**Shroud,** *n.* (श्राउड्)—winding-sheet; (*fig.*) concealing agency; (usu. in *pl.*) set of ropes forming part of standing rigging. आच्छादन, प्रेतवस्त्र, कफन; आवरण, झांकण, छपवाछपव; (डोलकाठीचीं) दोरखंडें. *v. t.* to clothe for burial; to cover and conceal or disguise. कफन घालणें; छपविणें, लपवून ठेवणें, (-वर) झांकण घालणें. *S.-less, a.*

**Shrōve'-tide, Shrove Tuesday,** *nn.* (श्रो'व्हटाइड, -ट्यूझ्डे)—the three days, the day, before Ash -Wednesday. (पापांगीकाराचे) लेंटच्या सणापूर्वीचे तीन दिवस,-त्यांतील आदला दिवस,-मंगळवार.

**Shrŭb,** *n.* (श्रब्)—woody plant of small size. झुडूप. *Shrubby, a.* 2. (usu. rum-s.) drink of rum and lemon-juice etc. एक प्रकारची दारू, -मादक पेय.

**Shrŭbb'ery,** *n.* (श्र'बरि)—plantation of shrubs. उपवन.

**Shrug,** *v. t. & i. & n.* (श्रग्)—to raise the shoulders momentarily as gesture of indifference, helplessness, contempt, &c. खांदे उडवणें, नाक मुरडणें, कान झाडणें.

**Shrunk** (en), *pa. t. & pa. p. of* Shrink.

**Shŭck,** *n. & v. t.* (शक्)—husk, pod; remove ss. of, shell. साल, टरफल, कवची; सोलणें, टरफलें काढणें.

**Shŭdd'er,** *n.* (श'डर्)—spasm of shivering. कंप; थरथर, हुडहुडी, शिसारी, थरकांप, दचका. *v. i.* to experience a s.; feel strong repugnance etc. अंग कापणें, थरकांप होणें, दचकणें.—*ingly, adv.*

**Shŭf'fle,** *v. i. & t.* (श'फल)—to drag one's feet; walk thus; to change position of playing-cards, papers, &c. by mixing; to shift (persons)

into each other's place; juggle with words; equivocate; make or let slip off. फरफटत जाणें; लटपटत चालणें; पाय घांशीत चालणें; गफलत करणें; (पत्ते) पिसणें, (गंजिफा) घोळणें; जागेची अदलाबदल करणें; गडबडगुंडा करणें; द्व्यर्थी बोलणें, शब्दच्छल करणें; लोटणें, ढकलून देणें. *n.* act of shuffling; shuffling gait or step; interchange of positions; piece of equivocation. गोंधळ करणें; फरफटत चालणें; जागांची अदलाबदल; दुटप्पी बोलणें. *To s. cards,* (पत्ते) पिसणें. *S. the cards,* (*fig.*) change the parts, try new policy, etc. रंग-सोंगें-बदलणें, मतांतर करणें, इ॰ *Shuff'lingly, adv.*

Shŭff'ler, *n.* (श'फ्लर्)—(esp.) one who shuffles or plays tricks, prevaricator. उडवाउडवीचीं उत्तरें देणारा, गफलत्या.

Shŭn, *v. t.* (शन्)—to keep clear, to avoid coming in contact with; to eschew. दूर राहणें; टाळणें, चुकवणें, वान्यास उभे न राहणें. *Shun'ned, pa. t. & pa. p. Shun'less, a.* (poet.).

Shun, (शन्)—abbr. of attention! हुश्यार!

Shŭnt, *v. t. & i.* (शन्ट)—to divert (train etc.) or diverge on to a side track, to shove off; postpone or stifle discussion of (subject), lay aside (project), leave (person) inactive. आगगाडी दुसऱ्या रुळावर नेणें; लांबणीवर टाकणें, दाबून टाकणें, मागें टाकणें. *n.* a shunting; (Electric.) a conductor joining two points of a circuit and enabling part of current to be diverted. बाजूच्या रुळावर नेणें,-नेलें जाणें; (विजेच्या प्रवाहाच्या भाग बाजूला नेणारा) पार्श्ववाहक.

Shŭt, *v. t. & i.* (शट)—(*Shut*) to move (door, lid, lips, etc.) into position to stop an aperture; to close door etc. of (room, box etc.); to bring into folded up state, become shut to forbid an entrance into; catch or pinch. मिटणें, लावणें, बंद करणें; मिटणें, बंद असणें,-होणें; दूर ठेवणें, आंत येऊं न देणें; (बोट वगैरे) चिमटणें, सांकडणें, सांपडणें. *To s. the door upon,* refuse to consider, make impossible. विचाराबाहेर टाकणें, सोडणें, अशक्य करून टाकणें, *S.* one's *eyes* or *ears to,* (कडे) डोळेझांक करणें, कानाडोळा करणें, ऐकलें न ऐकलेंसें करणें. *S. in,* आंत घेऊन बंद करणें, कोंडणें. *S. out,* आंत येऊं न देणें. *S. down,* (झडप) खालीं पाडणें, लावून घेणें; (intr. of mill etc.) cease working. बंद असणें,-पडणें. *S. in,* वेढून-वेष्टून-टाकणें. *S. off,* check flow of (water, gas, etc.) by shutting valve, separate from society, etc. आंत येऊं न देणें, दाबणें, थांबवणें; अलग-दूर-ठेवणें, बहिष्कृत करणें. *S. out,* दृष्टिआड-बिसेनासा-होणें. *S. to,* घट्ट बंद होणें. *S. up,* (खिडक्या दरवाजे वगैरे) गच्च बंद करणें; *S. up shop,* कायमचा किंवा तात्पुरता धंदा, दुकान बंद करणें. *S. up!*, गप्प बस! चूप रहा!

Shŭt'ter, *n.* (श'टर्)—In vbl. senses; (esp.) appliance for blocking up window or excluding light from camera lens; one of the separate parts of a compound shutter. झांपण, झडप; कॅमेराचें झांकण; सरकणें, झडपाच्या एक विभाग. *v. t.* provide with ss., put up ss. of. झडप-झांकण -करणें, -बसवणें. *Shutter-less, a.*

Shŭt'tle, *n.* (श'टल्)—boat-shaped weaving implement, the sliding thread-holder of a sewing machine. धोटें, धोटा, विरकांडी. नाडीचीर. *Shut'tle-cock, n.* a cork fitted with crown of feathers so as to fly when struck with battle-dore. पिच्छकंदुक, पीसचेंडू.

Shȳ, *a.* (शाय्)—avoiding observation; bashful; elusive; (U.S.) short (of). भितरा, बुजरा; लाजाळू; डोळा चुकवणारा, फसव्या; (चा) तोटा असलेला, हीन. *Shy'ly, adv.; Shy'ness, n.* लाजरेपणा, बुजरेपणा. Shy, *v. i.* to start aside in alarm. बुजणें, बिचकणें. *Shy'er, n.* बुजरा घोडा. *Shied, pa t. & pa. p. To fight shy of,* माघार घेणें, हातपाय गाळणें.

Shȳ, *v. t. & i. & n.* (शाय्)—(colloq.) throw, esp. at a mark. नेम मारणें, नेम मारून फेंकणें, नेम. *To have a s. at,* फेंकून मारणें, थट्टा करणें, मिळविण्याचा प्रयत्न करणें.

Shȳ'lock, *n.* (शा'यलॉक्)—a hard-hearted money-lender. निष्ठुर सावकार. [*ch. in Merchart of Venice*]

Shȳ'ster, *n.* (शा'इस्टर्)—(U. S.) a tricky unreliable person; person without professional honour, esp. tricky lawyer. धूर्त, लबाड मनुष्य, फसव्या, धंद्यांतील दर्जाची पर्वा न करणारा,-वकील.

Siamēse', *a. & n.* (सायामी'झ्)—(a native, language) of Siam, सयाम देशाचा (रहिवासी, भाषा). *S. twins,* two S. (d. 1874) joined by cartilaginous band from one's right to other's left side; (*fig.*) inseparable friends, etc. दोन सयामी जुळीं, एकत्र सांघलेलीं-जुडलेलीं-एकशरीरी-भावंडें; जिवश्च कंठश्च दोस्त.

Sib'ilant, *n. & a.* (सि'बिलन्ट)—a hissing letter. 'स' वर्गांतलें अक्षर, उष्मवर्ण. *Sib'ilance,-cy, nn. Sib'ilate, v. t. & i.* to pronounce with sibilance. 'श-ष-स' कारयुक्त उच्चार करणें. *Sibila'tion, n.*

Sib'ȳl, *n.* (सि'बिल्)—pagan prophetess, fortune-teller; an old hag. देवीला कौल लावणारी, भविष्य सांगणारी,-स्त्री, जोशीण; बुड्ढी स्त्री. *Sibylline, a.* oracular. दैवी-देवाच्या-भाकितासंबंधीं; भविष्यासंबंधीं.

Sice, Sȳce, *n.* (साइस)—groom; an attendant who follows on foot a mounted horseman or a carriage. घोडेवाला, मोतद्दार; गाडीबरोबर पायीं धांवत जाणारा नोकर.

Sice, *n.* (साइस)—the six on dice. फांशांवरील सहाचें दान,-सहा.

Sĭck, *a.* (सिक्)—vomiting, disposed or inclined to vomit; surfeited or tired *of*; ill, despondent; (sl.) mortified; (of ship) needing repair; disordered, perturbed; disgusted. मळमळूं लागलेला, ओकारी किंवा वीट आलेला;

आजारी, निराश झालेला; मानहानी झालेला; वाग-हुंजीत आलेला; बेचैन, त्रस्त, विटलेला. A *s. man*, आजारी मनुष्य. *The S. Man*, Turkish Empire. तुर्की साम्राज्य. *S. of fever*, तापानें आजारी,-खंग-लेला. *The s.*, आजारी मनुष्यें,-लोक, रुग्ण. *To be, feel, make s.*, वांति होणें, वांति होतेशी वाटणें, वांति करविणें. *Turn s.*, ओकारी येणें,-आणणें, मळमळणें. *S. of love*, lovesick. प्रेमवेडा. *S. of flattery*, खुशामतीचा वीट आलेला. *Nail-s.*, *Paint -s.*, (ship), नवीन खिळे बसविण्याला, रंग देण्यास, झालेलें (जहाज). *S. bay*, जहाजाच्या मुख्य मजल्या-वरील रुग्णालय. *S.-bed*, आजाऱ्याचा बिछाना; आजारीपणा. *S.-headache*, पित्तामुळें डोकेंदुखी *S.-leave*, आजारीपणासाठीं रजा. *S.-list*, (सैन्यांतील, आरमारांतील) आजाऱ्यांची यादी; *On the s.-list*, laid up. आजारी, अंथरुणावर पडून. *S.-room*, आजाऱ्याची खोली. *Sick'ish, a.*

**Sick'en**, *v. i. & t.* (सिकन्)—to grow ill or show signs of illness; feel nausea or loathing. आजारी पडणें, आजाराचीं चिन्हें दिसणें, आजारी होणें; कळमळणें, किळस येणें, विटणें, थकणें. *Sick'ener*, *n.* (esp.) an event, etc. that makes one weary of something. वीट, कंटाळा, -उद्वेग आणणारी गोष्ट इ० *Sick'eningly, adv.*

**Sic'kle**, *n.* (सिंकल्)—an instrument for cutting grain, a reaping-hook with a semi-circular blade धान्य किंवा गवत कापण्याचें हत्यार, कोयता, विळा, कोयती. *The s.*, the constellation Leo. सिंहरास. *Sickle-bill*, विळ्यासारखी चोंच असलेला पक्षी. *S.-feather*, कोंबड्याच्या शेपटींतील लांब पीस. *S.-worl*, एक वनस्पति.

**Sick'ly̆**, *a.* (सिंक्-लि)—apt to be ill or cause illness; languid, pale, feeble, weakly; inducing nausea; mawkish. रोगी, रोगट; निस्तेज; किळस-त्रास-आणणारा; ओकारी आणणारा; हळव्या मनाचा. *v. t.* to cover *over* or *o'er* with a s. hue. निस्तेजपणा पसरणें; निस्तेज करणें. *Sick'liness n.*

**Sick'ness**, *n.* (सिंक्-नित्)—being ill, a disease; vomiting or inclination to vomit. आजार, आजारीपणा; रोग; विकार, विकृति; मळमळ, ओकारी. *Sleeping s.*, fatal African disease marked by somnolence and nerve-paralysis. आफ्रिकेंतील निद्रा (प्रधान) रोग (हा सेडिंस माशांमुळें जडतो व प्राणहारक असतो). *Sleepy s.*, a world-wide recently identified disease, distinct from sleeping sickness, though lethargy is a mark of both. (जागतिक, नवीन आढळून आलेला,) सुस्तीप्रधान-रोग.

**Side**, *n.* (साइड्)—(Math.) one of the surfaces bounding an object; either surface of thing regarded as having only two; one of the lines bounding a superficial figure; the part of the body that is to the right or left; one aspect of a thing; one of two contrasted parties or sets of opponents: slope of a hill; (sl.) swaggering gait or assumption of superiority; line of descent through father or mother; (Billiards) spinning motion given to ball by striking it on side; (attrib.) subordinate. बाजू, पृष्ठभाग, तोंड; बाजू, अंग; पार्श्व, बाह्यरेषा, बाजू; तट, कांठ, किनारा; (शरीराची डावी किंवा उजवी) बाजू, कूस, कक्षा; कोणत्याही गोष्टीची एक बाजू; पक्ष, फळी, तरफ, टोळी, मंडळी; उतरण; ताठ्यानें चालणें, -वागणें, तोरा; पक्ष; वंश, शाखा; चेंडूला मिळालेली गिरकी; (विशे०) गौण, अप्रधान, अप्रस्तुत. *v. i. To side with*, to espouse the cause of. बाजू घेणें, पक्ष धरणें. *Sent him six sides of argument*, सहा तान मजकूर लिहून आपलें म्हणणें त्याला कळविलें. *Right, wrong, s. of cloth*, (कापडाचें) वरचें अंग-वरची बाजू, आंतलें अंग. *S. by s.*, standing close together, esp. for mutual support. चिकटून, लागून; खांद्यास खांदा लावून (परस्परांस साह्य करण्यासाठीं). *Shake one's ss.*, laugh heartily. खोखो हंसणें, खदखदां-पोटीं फुटेस तों-हंसणें. *S.-splitting*, हसवून मुरकुंडी वळविणारा. *Debit s., Credit s.*, (जमाखर्चांतील) खर्चाची बाजू, जमेची बाजू. *S. issue*, गौण-गैरलागू-मुद्दा. *S. line*, फुरसतीचा धंदा, काम, गौण काम. *On one s.*, aside. बाजूला, एकीकडे, एकपक्षीं. *Take ss.*, दोहोंपैकीं एकाचा पक्ष धरणें,-ची बाजू घेणें,-उचलणें. *On this s. of, on this s., the Himalayas*, हिमालयाच्या या बाजूला. *On this s. the grave*, in life. जिवंतपणीं, आयुष्य असेतों. *On the right, wrong, s. of 40*, वयाच्या चाळिशीच्या खालीं,-आंत; चाळिशीच्या वर,-चाळिशी उलटलेला. *On the wrong s. of the door*, shut out. दरवाज्याबाहेर टाकलेला, दार बंद करून घेतलला. *On the mother's side*, आईच्या-मातृ-वंशाकडून. *Puts on, has, too much s.*, घर्मेंच घमेंड आहे, फारच मिजाशी आहे; *Si'dy, a.* घमेंडखोर, कुरेबाज. *S.-arms*, तलवार, बायनेट, पिस्तूल वगैरे (बाजूला लटकावण्याचीं) हत्यारें. *S.-board*, (जेवणाच्या खोलींतील पदार्थ वगैरे ठेवण्यासाठीं) भिंतीशीं ठेवलेलें मेज,-पेटी.. *S-burn*, (U. S.) short side whisker. बाजूचा आखूड (मिशीचा) कल्ला. *S.-car*, a jaunting car; car for passenger (s) attachable to side of motor-cycle. चैनींत फिरण्यासाठीं गाडी; मोटारसायकलच्या बाजूची (बसणाऱ्यासाठीं) बैठक. *S.-long, oblique*, not direct. तिरपा, बाजूकडचा, आडवा. *S.-look*, (नेत्र) कटाक्ष. *S.-note*, marginal note. (मजकुराच्या) बाजूला (समासांत) दिलेली टीप, पार्श्वटीप. *S.-saddle*, (दोन्ही पाय एकाच बाजूला सोडून) स्त्रियांसाठीं घोड्यावर बसण्याचा जीन, खोगिर, जनानी जीन. *S.-seat*, (गाडीच्या) बाजूला टेकून बसण्याची बैठक. *S.-show*, minor attraction at an exhibition, etc. उपप्रेक्षणीय, कमी महत्त्वाचा-खेळाचा-देखाव्याचा-पोटभाग. *Sides'man*, assistant to church-warden. ख्रिस्ती देवळाच्या रखवालदाराचा-

व्यवस्थापकाचा-हुद्दयस. *S.-stroke*, बाजूचा,-बाजूवरील, तडाखा; आकस्मिक गोष्ट; क्षुल्लक-साहजिक-गोष्ट; पोहतांना पाण्यावर हात मारण्याचा प्रकार. *S.-view*, पार्श्व-देखावा. *S.-walk*, (U. S.) foot-path. पदपथ. *S.-wind*, बाजूचा,-कडेचा,-वारा; अप्रत्यक्ष साधन,-वजन. *Side-ways*, *adv.* बाजूकडे, बाजूनें, आडवा.-*sided*, *a.*;-*sid'edly*, *adv.*-*sid'edness*, *n.*; *Sid'eless*, *a.*

**Side'real**, *a.* (सायडी'अरिअल्)—of, determined by means of, the stars. नक्षत्राचा, नाक्षत्र. *S. year*, सौरवर्ष [L. *sideris*, a star]

**Side'-light**, *n.* (सा'इडलाइट)—light from side; (*fig.*) incidental illustration or information on a subject; (Naut.) red port or green star-board light on ship under way. बाजूचा उजेड; आजूबाजूची-अवांतर-माहिती; (गलबताच्या) बाजूचा तांबडा किंवा हिरवा दिवा.

**Side'-slip**, *v. i.* (सा'इडस्लिप्)—to skid; (Aeronaut.) move sideways instead of forwards. (चाक) घसरणें, सरकणें; (विमान वगैरे पुढें न जातां) बाजूला सरकत सरकत पुढें जाणें. *n.* skid; side-movement; shoot of tree; (*fig.*) illegitimate child; division at side of stage for working scenery. घसरगुंडी; पार्श्वगति; झाडाचा कोंब; अनौरस संतति,-मूल; (देखावा वगैरे तयार करण्याचा) रंगभूमीच्या बाजूचा विभाग.

**Side'track**, *n.* (सा'इडट्रॅक्)—a siding or by-path. बाजूचा-आड-रस्ता, पार्श्वमार्ग. *v. t.* to turn into siding, shunt; postpone consideration of or dealing with. बाजूच्या रस्त्यावर-रुळावर-घेणें; विचार पुढें ढकलणें.

**Si'ding**, *n.* (सा'इडिंग्)—a short track by the side of railway for shunting; (U. S.) boards forming sides of timber-building. बाजूचे रूळ; बाजूच्या फळ्या.

**Si'dle**, *v. i.* (सा'इडल्)—to walk sidelong esp. in deferential manner. (च्या) बाजूबाजूनें अदबीनें चालणें.

**Siege**, *n.* (सीज्)—operations of encamped force for gaining possession of a fortified place, continued endeavour to get possession; besieging or being besieged (oft. *fig.*). (किल्ल्याचा किंवा जागेचा ताबा मिळण्याकरितां घातलेला) सैन्याचा वेढा किंवा गराडा; वेढा, चिकाटीचा प्रयत्न. *To lay s. to*, (ला) वेढा घालणें.

**Sienn'a**, *n.* (सिए'ना)—a rich reddish-brown pigment or its colour. तांबुस खडी,-सुरूम; त्याचा रंग.

**Sie'rra**, *n.* (सिए'रा)—a chain of jagged mountains, esp. in Spain or America. दंतुर पर्वतांची रांग.

**Sies'ta**, *n.* (सिए'स्टा)—mid-day rest usual in hot countries. (जेवणानंतर दुपारची) पानकुसी, आराम, निद्रेचा डुलका.

**Sieve**, *n.* (सिव्ह्)—utensil with network or perforated bottom through which liquids or fine particles can pass; a person who cannot keep secrets. चाळण, चाळणी, रोवळी, (तांदूळ वगैरे धुण्याकरितां) रोवळी, घोळणा; तोंडांत कोणतीही गोष्ट न राहणारा मनुष्य. *v. t.* sift. चाळणें.

**Sift**, *v. t. & i.* (सिफ्ट)—to separate with or pass through a sieve; to subject (facts, &c.) to close scrutiny, to examine minutely; (of snow) fall as from sieve. चाळणें, गाळणें; कसोशीनें तपासणी करणें, छाननी करणें; (बर्फ) गाळल्याप्रमाणें गळणें,-पडणें.

**Sigh**, *v. i.* (साय्)—to draw deep breath as in weariness, etc.; to mourn or yearn *for*; express with sighs; (of wind) make sound like sighing. उसासा टाकणें, सुस्कारा टाकणें; दुःख करणें, (इच्छित,-हरवलेल्या वस्तूबद्दल) हायहाय करणें; सुस्काऱ्याप्रमाणें-सु सु-वाहणें. *n.* act or sound of sighing, single deep breath. उसासा, सुसकारा. *A s. of relief*, समाधानाचा सुस्कारा, उसासा. *Sigh'ingly*, *adv.*

**Sight**, *n.* (साइट)—faculty of vision; a scene or spectacle; seeing or being seen; range of or region open to vision; precise aim with gun or observing instrument, an appliance attached to gun, etc. for assisting this; (colloq.) large quantity. दृक्शक्ति; दृष्टि, डोळे, नजर; दृश्य, देखावा, तमाशा, मौज; पाहणें, अवलोकन, पाहिलें जाणें; दृष्टीचा टप्पा,-टापू,-पल्ला, दृष्टिपथ; अचूक नेम, (बंदुकीची) माशी, मासकी, मख्ली; विपुलता, पराच, अधिक. *v. t.* to catch sight of (esp. by coming near), adjust sights of, aim (gun) with *ss.*; provide (gun, etc.) with ss. पहाणें, दिसणें, दिसूं लागणें; (बंदुकीची) माशी जुळवणें,-लावणें; माशांच्या साह्यानें नेम धरणें; बंदुकीला माशी बसविणें. *Long s.*, requiring objects unusually far for clear definition. दीर्घदृष्टि. *Short* or *near s.*, ऱ्हस्व दृष्टि. *short s.*, (*fig.*) कोती दृष्टि (बुद्धि). *Know by s.*, तोंडओळख असणें. *Loss of s.*, आंधळें होणें, अंधत्व. *Second s.*, power of internal vision by which future or distant occurrences are presented. (भविष्यकाळच्या गोष्टी आगाऊ समजण्याची) अंतर्दृष्टि, अंतर्ज्ञान, भविष्यज्ञानदृष्टि. *Catch, lose, s., of*, नजरेस पडणें, दिसणें; नजरेआड जाणें, दिसेनासा होणें. *Get a s. of*, manage to see. नजरेस पाडुन घेणें, कसेंपसें पाहणें. *At, on, s.*, देखतांक्षणींच. *Payable at sight* (a draft etc.), दर्शनी (हुंडी इ.). *At first s.*, prima facie. सकृद्दर्शनीं, वरवर पाहतां. *put out of s.*, दृष्टिआड करणें, कानाडोळा करणें. *out of s., out of mind*, नजरेआडच्या गोष्टी विसरल्या जातात. *out of my s.!*, दृष्टिआड हो! चालता हो! *A s. for sore eyes*, a welcome visitor. आवडीचा पाहुणा. *His face is a perfect s.*, त्याचा चेहरा बघण्यासारखा (जखमांनीं वगैरे विद्रूप) झाला आहे. *S.-worthy*, पाहण्यालायक. *Sighted*, *a*, -*edly*, *adv.*, -*edness*, *n.*

**Sight'less**, *a.* (सा'इट्-लेस्)—blind; (poet.) invisible. दृष्टिहीन; आंधळा; अदृश्य.

**Sight'ly**, *a.* (सा'इट्लि)—worth-seeing, fine. दर्शनीय, देखणा, प्रेक्षणीय, सुरेख. *Sight'liness, n.*

**Sight'seer**, *n.* (सा'इट्सिअर्)—a person going round to see the sights. प्रेक्षणीय स्थळें, देखावे,-पाहणारा मनुष्य. *Sight'seeing, n.* प्रेक्षणीय स्थळें पाहणें.

**Sign**, *n.* (साइन्)—a mark traced on surface, etc.; a thing used as symbol of something; indication; symptom or presage or token *of*; miracle as evidence of supernatural power; password; gesture used instead of words; a sign-board; (U. S.) a trace or spoor of animal; any of twelve divisions of zodiac. खूण, लक्षण, प्रतीक, सूचक, निशाणी, चिन्ह; अद्भुत, चमत्कार; इशारत, संकेत; सांकेतिक (अंग-) विक्षेप,-खूण; नांवाची पाटी; पशूचा-जनावराचा-माग, मागमूस; (बारा राशींपैकीं एक) राशि. *v. t. & i.* to mark with a sign; to affix one's name or initials to, subscribe in one's hand-writing; make a sign *to*. खूण-चिन्ह-निशाणी-करणें, सही करणें, दस्तुर,-घालणें,-लावणें; खुणेनें सांगणें,-कळविणें, खूण करणें. *The s. of the cross,* ख्रिश्चन उपाध्याय आशीर्वाद देतांना किंवा सामान्य लोक श्रद्धापूर्वक कपाळावर किंवा छातीवर क्रुसीच्या आकाराची खूण करितात ती (†). *S. manual,* signature written with person's own hand. स्वदस्तूर, (ची) स्वतःच्या अक्षरांत सही, हस्ताक्षर. *positive* or *plus s.,* (+), अधिक चिन्ह, बेरजेची खूण. *Negative* or *minus s.,* (—), उणें चिन्ह, व वजाबाकीची खूण. *S. and countersign,* साथीदारांच्या (हावभावांनीं केलेल्या) गुप्त खुणा. *Ss. of the times,* things showing the tendency of affairs. बदलणारीं परिस्थिति-निदर्शक चिन्हें,-गोष्टी. *Deaf-and-dumb ss.,* करपल्लवी भाषेंतील खुणा. *Make no s.,* कांहींच माहीत नाहीं (नसणें), विरुद्ध न बोलणें. *S.-board,* (दुकानाच्या बाहेरची) नांवाची पाटी. *S.-painter,* नांवाच्या पाट्या रंगविणारा. *S.-post,* a post supporting signboard or set up at cross-roads, etc. to guide travellers. रस्त्यावरील (नांवाच्या) खुणेचा खांब. *To s. away,* फरोक्त खतावर सही करून (हक्क मालमत्ता, वगैरे) दुसऱ्याच्या नांवें करून देणें. *S. assent,* खुणेनें संमति दर्शविणें. *Sign'able, a.*

**Sig'nal**, *a.* (सि'ग्नल)—of marked quality or importance, notable. विशेष, विलक्षण, मोठा, नामी, महत्त्वाचा. *Sig'nally, adv. n.* sight or sound meant to convey orders or information; message made up of such signals; immediate occasion for some general movement. खूण, इशारत, सिग्नल; खुणांनीं दिलेला संदेश,-निरोप; तात्कालिक कारण,-संधि. *v. t. & i.* to make signals; direct, transmit, or announce by signal. बावटा दाखवणें, खूण करणें; खुणेनें आज्ञा करणें, खुणांनीं (बातमी, संदेश) पाठविणें,-जाहीर-प्रसिद्ध करणें. *S. of distress,* (जहाज धोक्यांत-संकटांत-सांपडलें असतां तोफा डागून) मदतीकरितां दिलेला इशारा,-केलेली खूण. *Storm s.,* वादळाचा बावटा, °ची खूण. *Code of ss. S.-book,* (लष्करी आणि आरमारी) निरोप-संदेश-पाठविण्याच्या खुणांच्या नियमांचें-माहितीचें-पुस्तक. *S.-box,* आगगाडीच्या मार्गावरील बावटा-निशाणी-इशारत-दर्शकाची जागा,-कोठडी (केबिन). *S.-man,* a signaller. आगगाडीला निशाणी-बावटा-दाखविणारा; तारमास्तर. *Sig'naller, n.*

**Sig'nalize**, *v. t.* (सि'ग्नलाइझ्)—to make notable; lend distinction to. गाजवणें, मिरविणें; प्रसिद्ध करणें.

**Sig'natory**, *n.* (सि'ग्नेटरि)—a party (esp. state) to a treaty or other signed agreement. सही करणारा,-करणारें (राष्ट्र).

**Sig'nature**, *n.* (सि'ग्नेचर्)—signed name or initials; (arch.) significant appearance or mark; (Mus.) indication of key or time following clef; (Print.) indication letter or figure at foot of first page of book-sheet. सही, स्वाक्षरी; चें दर्शक चिन्ह,-खूण; सुराची खूण, सुरावटीची खूण; फर्म्याचा आंकडा,-खूण.

**Sign'et**, *n.* (सि'ग्निट्)—a small seal (esp. one set in a finger-ring). मुद्रा, शिक्का, आंगठी, मोहोर. *S. ring,* सिलाची आंगठी.

**Signif'icance**, *n.* (सिग्नि'फिकन्स्)—expressiveness; meaning; importance, moment, consequence, reasons why a thing is significant. अर्थसूचकता, अर्थबोधकता, अर्थ, अभिप्राय, हेतु, स्वारस्य, महत्त्व असण्याचें कारण, विशाद.

**Signif'icant**, *a.* (सिग्नि'फिकन्ट्)—full of meaning, highly suggestive, expressive; important, noteworthy. सार्थ, अर्थपूर्ण; (अर्थ-) सूचक,-बोधक, हेतुगर्भ, साभिप्राय, महत्त्वाचा. *-ly, adv.*

**Significa'tion**, *n.* (सिग्निफिके'शन्)—(*esp.*) sense or acceptation of a term, &c. अभिप्राय, अर्थ, आशय.

**Signif'icative**, *a.* (सिग्नि'फिकेटिव्)—offering signs or presumptive evidence of. सूचक, अर्थबोधक, दर्शक.

**Sig'nify**, *v. t. & i.* (सि'ग्निफाय्)—to be a sign or presage of; to have as meaning, to import; to intimate or announce; be of importance, matter (esp. negative). चिन्ह असणें; चा अर्थ असणें,-दाखवणें, सुचवणें, कळवणें, खुणेनें समजावणें,-सांगणें. *It does not s.,* त्यांत कांहीं अर्थ-महत्त्व-नाहीं.

**Si'gnor, Signor'a, Signori'na**, *nn.* (सीन्यॉअर, सिन्यॉ'अरा, सिन्योअरी'ना)—(*pl.-ri,-re,-ne*), Italian gentleman, married lady, unmarried lady (as titles=Sir and Mr., Madam and Mrs., Miss). इटालिअन सद्गृहस्थ, स्त्री, अविवाहित स्त्री-कुमारी (यांच्या नांवापूर्वी लावण्याचे सन्मानदर्शक शब्द).

**Si'lage**, *n. & v. t.* (सा'इलिज्)—(put into) silo. ओलेपणीं खड्यांत दाबून ठेवणें,-ठेवलेला चारा.

**Si'lence**, *n.* (सा'इलेन्स्)—abstinence from speech or noise; secrecy; taciturnity; absence of sound, stillness; oblivion. मुग्धता, स्तब्धता; गुप्तता, मौन; शांतता, सामसूम, निःशब्दता; विस्मृति. *v. t.* to reduce

to silence, to make silent. गप्प बसवणें, तोंड बंद करणें, निरुत्तर करणें, बंद करणें. *S. gives consent,* 'मौनं संमतिलक्षणम्.' *To keep, break, s.,* मौन धरणें ; तोंड उघडणें किंवा बोलणें. *Put to s., esp.* refute in argument. (मुद्देसूद बोलून-वादविवादांत) निरुत्तर करणें. *In s.,* गुपचुप, आवाज न करतां, गुपचूप. *Silence!,* चूप! गप! खामोश!

**Si'lencer,** *n.* (सा'इलेन्सर्)—(esp.) an apparatus deadening sound of gas escaping from oil-engine, etc. आवाज कमी करण्याचें-आवाजप्रतिबंधक -यंत्र,-साधन.

**Si'lent,** *a.* (सा'इ-लेन्ट्)—marked by silence; soundless, mute; habitually speaking little, tacit, taciturn, saying nothing on some subject. स्तब्ध; अनुच्चारित, मुका; शांत, निवांत; (एखाद्या विषयावर) मत न देणारा, गुपचुप, स्वस्थ. *S.-letter,* अनुच्चारित वर्ण,-अक्षर (जसें, *doubt,* मधील b हें अक्षर). *S. partner,* धंद्याच्या व्यवस्थेसंबंधीं मत नसलेला भागीदार. *The s. system,* (तुरुंगांतील) कैद्यांसाठीं 'आळीमिळी गुपचुळी'चा नियम. *Silently, adv.*

**Silhouette',** *n.* (सिलुए'ट्)—a portrait of head or figure cut from black paper or done in solid black on white; an outline of object seen against the light. (काळ्या कागदावरून कापलेलें) शिरोभागाचें (डोक्याचें) किंवा शरीराचें चित्र,-आकृति; (प्रकाशाच्या पार्श्वभूमीवरील) आकृति,-चित्र. *v. t.* to represent by, or exhibit in s. बाह्यरेषांनीं दाखविणें, काळ्या रंगांत उठावदार करून दाखविणें. *In s.,* रूपरेषा दिसेल असें ठेवलेलें.

**Sil'ica,** *n.* (सि'लिका)—a mineral forming quartz and the chief part of flint, sand, etc. वाळू, शैल, गार, गारगोटी. *Sili'ceous,* (सिलि'शस्) *a.* गारेचा, रेताड. *Sili'cic, silici'ferous, sili'cious, aa.* [L. *silex, silicis,* flint]

**Sil'icon,** *n.* (सि'लिकन्)—a non-metallic element found only in combination. 'सिक' नांवाचें अधातु मूलद्रव्य.

**Sil'iqua, Sil'ique,** *n.* (सि'लिक्वा,-लीक्)—pod of plants of mustard family. (मोहरी, तीळ इ०) स्फुटनशील फळाचें बोंड.

**Silk,** *n.* (सिल्क्)—fibre composing silkworms, cocoons; a thread prepared from it; cloth woven of this; (*pl.*) silk garments; (attrib.) made of sillk; (U. S.) silk-like filiform styles of female flower of maize; peculiar lustre seen in some sapphires and rubies. रेशीम; रेशमाचा धागा; रेशमी कापड, दुकूल; (अने०) रेशमाचीं वस्त्रें; रेशमी कपडे; (रेशमाच्या धाग्यांसारखा) मक्याचा फुलाचा गोंडा; तेज, तकाकी. *Artificial s.,* कृत्रिम रेशीम, बनावट रेशीम. *Spun s.,* कांकरी. *To make a s. purse out of a sow's ear,* एखाद्याकडून त्याच्या योग्यतेपेक्षां-गुणांपेक्षां-अधीक चांगलें काम करुन घेणें. *S. worm,* रेशमी-रेशमाचा-किडा. *Sil'ky, a.* like silk in softness or lustre. रेशमाचा, रेशमी, मृदु, मऊ. *Sil'kiness, n.*

**Sil'ken,** *a.* (सि'ल्कन्)—made of silk; clad in silk; soft, sauve. रेशमी, रेशमाचा; रेशमी पोषाख केलेला; मृदु, मऊ.

**Sill,** *n.* (सिल्)—a slab of wood or stone at the foot of window or doorway. (खिडकीच्या-दरवाजाच्या-,) चौकटीची खालची बाजू, उंबरठा.

**Sill'abub,** *n.* (सि'लॅबब्)—a dish of cream or milk curdled with wine. मलई, किंवा दूध व दारू यांच्या मिश्रणाचा एक खाद्य पदार्थ.

**Sill'y,** *a.* (सि'लि)—foolish, imprudent, thoughtless; weak of intellect; unwise; (arch.) harmless, innocent. मूर्ख, अविचारी; बुद्धीचा मंद, अजागळ, वेडा; वेडेपणाचा; निरुपद्रवी, साधा. *n.* a silly person. आचरट,-बावळट,-वेडसर मनुष्य. *The s. season,* (इंग्लंडमध्यें वर्तमानपत्रांना) विशेष बातमी देतां येत नाहीं असे ऑगस्ट व सेप्टेंबर हे महिने. *S. point, S. short-leg,* placed close up to batsman. (क्रिकेटमध्यें) खेळाडूच्या अगदीं नजीक ठेवलेला क्षेत्ररक्षक.

**Si'lo,** *n.* (सा'इलो)—(*pl.-os*), a pit or air-tight chamber for storing green crops for fodder. ओलेपणीं चारा सांठवून ठेवण्याचा हवाबंद खड्डा.

**Silt,** *n.* (सिल्ट्)—a deposit of mud or fine earth from running water. गाळ, चिखल, रेंदा. *v. t. & i. S. (up),* choke or be choked up with silt. गाळ सांचून बंद करणें,-होणें, गाळ तुंबून अडथळा होणें.

**Silur'ian,** *a. & n.* (सिलू'अरिअन्)—(of) a series of rocks forming the lowest sub-division of the Palaeozoic. प्रस्तरविशेष, प्राचीन खडकांचा थर (-त्याचा).

**Sil'van, Syl'van,** *a.* (सि'ल्व्हन्)—of the woods; rural. वनाचा, अरण्याचा; खेड्यापाड्यांतील, ग्राम्य. [L. *silva,* wood]

**Sil'ver,** *n.* (सि'ल्व्हर्)—a white lustrous precious metal; coins made of it; vessels or implements made of it; any of the salts of silver used in sensitizing photographic paper. चांदी, रुपें; रुप्याचीं नाणीं, रुपये; चांदीचीं भांडीं, चांदीचे डाग; (छायाचित्राचा कागद सचेतन करण्याकरितां) रौप्यक्षार. *a.* made of silver; second best; white like s.; resembling s. in ringing tone. रुप्याचा, चांदीचा; दुसऱ्या प्रतीचा; रुपेरी, पांढरा; खणखणीत (आवाज). *v. t. & i.* to coat or plate with s., make or become silvery; (of hair) turn grey or white. रुप्याचा मुलामा देणें; (कांचेला) पारा लावणें; रुपेरी-पांढरा-करणें; (केस) पांढरा, रुपेरी, किंवा करडा होणें,-पिकणें. *German s., nickel s.,* हिणकस शुभ्र धातु (चांदीसारखी दिसणारी). *Fulminating s.,* चाराची दारू. *Speech is silver or silvern, but silence is golden,* मौन पहिल्या प्रतीचें, बोलणें दुसऱ्या प्रतीचें होय, बोलण्यापेक्षां न बोलणेंच चांगलें. *S. hair,* white and lustrous. शुभ्र रुपेरी केस. *Has a s. tongue,* is eloquent. वक्तृत्वपूर्ण, अस्खलित वक्ता. *S.-tongued, a. Every cloud has a s. lining,* misfortune has its consolations. दुःखांत कांहींतरी सुखाचा अंश असतोच.

*S. bath*, (छायाचित्राचा कागद सचेतन करण्यासाठीं) रौप्यक्षार, रौप्यक्षाराचें पात्र, कांटीखारचा द्रव, तो द्रव ठेवण्याचें पात्र. *S. fir*, ज्याच्या पानाच्या मागच्या बाजूवर दोन रुपेरी रेषा असतात असा फर नांवाचा वृक्ष. *S. fish*, एक जातीचा चिनरंगी मासा; (पुस्तकांना लागणारी) पांढरी कसर, वाळवी. *S. fox*, काळ्या टोंकाची काळी लोंकर व शेंपटीचें टोंक पांढरें असलेला कोल्हा. *S. gilt*, of silver gilded over. चांदीचा मुलामा दिलेलें. *S. leaf*, रुप्याचा वर्ख. *S. paper*, पानळ (रुपेरी) कागद; कथिलाचा वर्ख. *S. plate*, चांदीचीं (चांदीच्या मुलाम्याचीं) भांडीं. *S. point*, विशिष्ट कागदावर रुपेरी लेखणीनें चित्र कोरण्याची कला,-असें कोरलेलें चित्र. *S. standard*, रुप्याचें (रुप्याच्या नाण्याचें) चलन. *S. top*, गवतावर होणारा एक रोग. *S. weed*, (रस्त्याच्या कडेला वाढणारें पिवळ्या फुलांचें व रुपेरी पानांचें झाड. *Silvern*, *a.* (rare).

Sil'ver-smith, *n.* (सिल्वर्‌-स्मिथ्)—one whose occupation is to work in silver. रौप्यकार, सोनार.

Sil'verў, *a.* (सिल्वरि)—like silver in whiteness and lustre; having the clear soft resonance of a silver bell. रुप्यासारखा शुभ्र व तेजस्वी, रुपेरी, पांढरा; खणखणीत (आवाजाचा). *Sil'veriness*, *n.* पांढरेपणा, शुभ्रपणा.

Sim'ian, *a.* & *n.* (सिमिअन्)—(of) one of the anthropoid apes, (gen.) ape (like), monkey (like). (मानवसदृश) माकड, वानर, (माकडाचा), (माकडा-वानरा-सारखा). *Sim'ioid*, *a.* [L. *Simia*, ape]

Sim'ilar, *a.* (सिमिलर्)—having resemblance to, of the same kind; (Geom.) identical in shape. सारखा, समान, सदृश; सरूप, आकारानें बरोबर,-सदृश. *n.* a thing resembling another. (pl.) similar things. तत्सदृश वस्तु; सारख्या आकाराच्या-समान-वस्तु.-*ly*, *adv.* तसाच, त्याचप्रमाणें, तद्वत.

Simila'ritў, *n.* (सिमिलॅरिटि)—state of being similar, likeness, resemblance. सारखेपणा, सादृश्य, साम्य.

Sim'ile, *n.* (सिमिलि)—a comparison of two things for the purpose of illustration or ornament, a poetic or imaginative comparison. उपमा, उपमालंकार. *Sim'ilize*, *v. i.* & *t.* उपमा योजणें; उपमा देऊन स्पष्ट करणें,-होणें. [L. *similis*, like]

Simil'itūde, *n.* (सिमिलिट्यूड)—guise or outward appearance; simile; copy. सारखेपणा, समता, सादृश्य; बाह्यरूप; उपमा; प्रतिमा.

Simm'er, *v. i.* & *t.* (सिमर्)—to be or keep just bubbling or singing below boiling-point; be in a state of suppressed anger or laughter. चरचरणें, धुरधुरणें, सणसण वाजणें, उकळणें; आंतल्या आंत उफळणें, उफळी येणें-फुटणें (रागाची, हंसण्याची). *n.* simmering state. चरचरण्याची, उकळण्याची,-स्थिति.

Simō'niăc, *n.* (सिमोनिॲक्)—a person guilty of simony. धार्मिक अधिकारांचा, अधिकाराच्या जागांचा-व्यापार-सौदा-करणारा. *Simoni'acal*, *a.*

Si'monў, *n.* (सा'यमनि)—trafficking in Church preferment. धार्मिक अधिकारांचा सौदा करणें.

Si'mon Pure, *n.* (सा'यमन् प्युअर्)—the real or genuine person or article. खरा मनुष्य, खरी व्यक्ति, सत्य गोष्ट,-वस्तु. [character in Centlivre's 'Bold Stroke for a Wife']

Simōōm', *n.* (सिमूम्)—hot desert sand-wind, chiefly in Arabian desert. वाळवंटावरून वाहणारा उष्ण धुळमळून टाकणारा वारा. [f. Arab. *samm*, to poison]

Simp, *n.* (सिम्प्)—(sl.) a fool, simpleton. मूर्ख, वेडगळ, वेडपट.

Sim'per, *v. i.* & *t.* (सिम्पर्)—to smile in a silly or affected manner; express by or with simpering. वेड्याप्रमाणें किंवा वरकरणी गालांत हंसणें, गालांतल्या गालांत हंसून सांगणें,-व्यक्त करणें. *n.* Such smile. अशा प्रकारचें हास्य. *Sim'peringly*, *adv.* *Sim'perer*, *n.*

Sim'ple, *a.* (सिम्पल्)—of one element or kind; not complicated or elaborate or adorned or involved or highly developed; unsophisticated, artless, natural; inexperienced, humble; trifling, of low rank; easily solved or understood or done; absolute, mere, just, एकाकी, सलग, अविभक्त (Chem. & Bot.); साधा, बिनगुंतागुंतीचा, अनलंकृत, अल्पविकासित; घेतान्या; निर्भेळ, शुद्ध, साधा; मूर्ख, वेडगळ, अननुभवी; सालस, भोळा, क्षुद्र, खालच्या दर्जाचा, हीन; सोपा, सुबोध, सुकर, शुद्ध, केवळ, संतोतंत. *n.* a herb used in medicine; the medicine. एक औषधी वनस्पति; त्या वनस्पतीचें औषध. *S. sentence*, without subordinate clauses. साधें,-केवल,-वाक्य. *S. Interest*, सरळव्याज. *S. equation*, एकवर्णसमीकरण. *S. leaf*, of one blade. अविभक्त पर्ण. *S. pistil*, अविभक्त,-एकाकी,-स्त्रीकेसर. *S. fracture*, साधा अस्थिभंग. *The s. life*, practice of doing without servants and luxuries, attempt to return to more primitive conditions. साधी राहणी. *S. forms of life*, creatures low in scale of evolution. अल्पविकसित प्राणिजात. *S. contract*, साधा कर्जरोखा, बिनमोबदल्याचा (लेखी, तोंडी, गर्भित) करार. *Sim'ply*, *adv.* साधेपणानें, निखालस, सरळपणा.

Sim'ple-hearted, Sim'ple-minded, *aa.* (सिम्पल्-हार्टेड, सिम्पल्माइन्डेड)—of simple heart, ingenuous. साधा, भोळा, निष्कपटी. *Sim'ple-mindedness*, *n.*

Sim'pleton, *n.* (सिम्पल्‌टन्)—of foolish or half-witted person, one easily deceived. मूर्ख, भोळा, अर्धवट मनुष्य.

Simpli'citў, *n.* (सिम्प्लिसिटि)—artlessness, weakness of intellect, foolishness. भावार्थीपणा, साधेपणा; बुद्धीची दुर्बलता; मूर्खपणा, भोळसटपणा.

Sim'plifў, *v. t.* (सिम्प्लिफाय्)—to make simple or easy to understand, to make plain. सोपा करणें, सुलभ करणें, सरळ रूप देणें.-*fication*, *n.*

**Sim'plism,** *n.* (सि'म्प्लिझम्)—affected simplicity. कृत्रिम साधेपणा.

**Simūlā'crūm,** *n.* (सिम्यूले'क्रम्)—(*pl.-cra*) shadowy likeness or mere pretence of. वरचा सारखेपणा.

**Sim'ūlant,** *a.* (सि'म्युलंट्)—having the appearance of. (त्या) सारखा दिसणारा.

**Sim'ūlāte,** *v. t.* (सि'म्युलेट्)—to feign; to pretend to have or feel, to counterfeit. चें ढोंग करणें; आव आणणें, ढौल धरणें,-घालणें, वेष,-रूप,-घेणें. *Simula'tion, -tor, nn.*

**Simultā'neous,** *a.* (सिमल्टे'निअस्)—occurring or operating at the same time (*with*). समकालीन, एककालीन, एककालिक, एकदम होणारा,-चालणारा.*-ly, adv.* एकदम, एकसमयावच्छेदेंकरून.*-ness, Simultane'ity, nn.*

**Sin,** *n.* (सिन्)—transgression against divine law; an offence against any code. पातक, पाप; दुष्कृत्य, अपराध, अन्याय, दोष, उल्लंघन. *v. i.* to commit sin; to offend *against*. पाप करणें; गुन्हा करणें, चें उल्लंघन करणें, अपराध-अन्याय-करणें. *Original s.*, मूळ पातक, उपजत पापबुद्धि. *Deadly* or *mortal s.*, such as kills soul or is fatal to salvation. (मनुष्याची आध्यात्मिक अधोगति करणारें) महापातक. *The seven deadly ss.*, pride, covetousness, lust, anger, gluttony, envy, sloth. गर्व किंवा दर्प, लोभ, हांव, क्रोध, खावाडपणा, द्वेष किंवा असूया, आणि आळस हीं सात महापातकें, (रोमन कॅथॉलिक धर्मपंथाप्रमाणें). One's *besetting s.*, एखाद्याचें विशेष-विशिष्ट-व्यसन,-पातक. *Like s., adv.* (sl.) vehemently. आवेशानें, जोराजोरानें. *S.-offering*, पापानिष्कृतीसाठीं प्रायश्चित्त. *More sinned against than sinning*, (King Lear III ii 54,) often of victim of seduction. माझ्या पापांपेक्षां इतरांनींच माझे फार अन्याय-अपराध केले आहेत. S. one's *mercies*, चांगलें दैव उघडलें तरी दुर्दैवाला कृतघ्न होणें. *Sin'ful, sin'less, aa.; Sin'fully,-lessly, adv.; Sinfulness,-lessness, nn. Sin'ner, n.*

**Sin'apism,** *n.* (सि'नॅपिझम्)—mustard plaster. मोहरीचा लेप. [Gk *sinapi*, mustard]

**Since,** *prep.* (सिन्स)—in the period between some specified time and the present. अमक्या काळापासून आजपर्यंत, पासून. *conj.* since the time when, seeing that; inasmuch as. पासून, नंतर, म्हणून, साठीं, जेव्हां, ज्याअर्थी. *adv.* since then or that, subsequently, from then till now. तेव्हांपासून, नंतर, अलीकडे, मागें, पूर्वी, झाला, गेला. (*Have eaten nothing*) *s. yesterday*, (I have heard-), तुला भेटल्यापासून. (*What have you done*) *s. we met!* आम्हीं भेटल्यानंतर. *Has been healthy ever s.*, त्यावेळेपासून त्याची प्रकृति चांगली आहे.

**Sincere',** *a.* (सिन्सि'अर्)—guileless, frank; not assumed, being in reality what it appears, genuine. निष्कपट, अकृत्रिम, मोकळ, मनाचा मोकळा; मनापासूनचा, खरा, शुद्ध, निर्भेळ.*-ly, adv.*

**Sincĕ'rity,** *n.* (सिन्से'रिटि)—honesty.खरेपणा, मोकळेपणा.

**Sin'ciput,** *n.* (सि'न्सिपट्)—head from forehead to crown. डोक्याची कवटी, ताळू, मस्तकाग्र (भाग). [L. *semi*, half; *caput*, head]

**Sine,** *n.* (साइन्)—(trigon.) (*S. of* arc) line drawn from one extremity of arc perpendicularly to radius at other extremity; (*S. of angle*) ratio of above line to radius (abbr. Sin, Sin A etc.). ज्या. *Versed s.*, abbr. *vers.*, unity minus the cosine. इषु.

**Si'nē,** *prep.* (सा'इनि)—(L) without. शिवाय. *S. die*, (साइनि डा'ईई) indefinitely (of adjourning). बेमुदत (तहकूब). *S. qua non*, (साइनि क्वे नॉन्), indispensable condition or qualification. अगदीं आवश्यक अट,-गुण, अत्यावश्यक गोष्ट.

**Si'nĕcure,** *n.* (सा'इ-निक्युअर्, सि'-)—an office of honour or profit with no duties attached to it. काम वगैरे नसलेली मानाची किंवा फायद्याची जागा, बैठी नोकरी; (खिस्ती उपाध्याला कांहीं काम न करतां दिलेलें) बैठें वेतन.*-curist, n.* बैठा पगार खाणारा.*-curism, n.*

**Sin'ew** *n.* (सि'न्यू)—tough fibrous animal tissue, a tendon; (*pl.*) muscles, bodily strength; motive power *of*. स्नायु, अस्थिबंधन; शारीरिक बळ, सामर्थ्य, ताकद; मुख्य साधन, आधार. *v. t.* (poet.) to serve as ss. of, sustain, hold together. चे स्नायु-बळकटी-असणें; स्नायूंनीं घट्ट बांधणें,-आवळणें, मजबूत करणें. *The ss. of war*, money. द्रव्यबळ, संपत्ति. *Sin'ewless, a.; sin'ewy, a.* स्नायूंचा, बळकट, स्नायुयुक्त. *Sinewiness, n.*

**Sin'ful,** *a.* (सि'न्-फुल्)—of the nature of sin; guilty of sin, contrary to the laws of God. पापयुक्त, पापाचा; पापी, पातकी.

**Sing,** *v. i & t.* (सिंग्)—(*sang*, or arch. *sung*; *sung*), to utter words with musical modulations; to make humming or whistling sound; to produce vocal melody, utter (song, tune); (of ears) be affected as with buzzing sound; compose poetry, to celebrate in verse; usher (esp. old or new year) *out*, or *in*, with singing; put to sleep etc. with singing. गाणें स्वरावर म्हणणें, गान करणें; गुणगुणणें, घोंघावणें, चूं चूं करणें, सणसणणें; गाणें, गाऊन म्हणणें, चालीवर म्हणणें; (कानांत) आवाज होणें; गाणें गाऊन झोंपवणें; काव्य रचणें, कविता करणें, (वर) कविता रचणें, चें काव्यांत वर्णन करणें. *n.* (U. S.) a large social gathering for singing. गाण्याची मजलस,-बैठक. *To s.* one's *praises*, एकाद्याचें स्तुतिस्तोत्र गाणें, त्याची नेहमीं स्तुति करीत असणें. *S. another song* or *tune*, नम्रता धारण करणें, कमीपणा घेणें. *S. small*, नांगी टाकणें, चूप बसणें, हार खाणें. *S. out, v. t. & i.* मोठ्यानें हांका मारणें, ओरडून सोडणें, ओरडणें. *Singing-man*, धंदेवाईक-पगारी-गवई. *Singing-master*, गायनशिक्षक. *Singing-voice*, गाण्याचा आवाज. *Sing-song, a. & n.*

*S. bath,* ( छायाचित्राचा कागद सचेतन करण्यासाठीं ) रौप्यक्षार, रौप्यक्षाराचें पात्र, कांडीखारचा द्रव, तो द्रव ठेवण्याचें पात्र. *S. fir,* ज्याच्या पानाच्या मागच्या बाजूवर दोन रुपेरी रेषा असतात असा फर नांवाचा वृक्ष. *S. fish,* एक जातीचा बिनरंगी मासा; ( पुस्तकांना लागणारी ) पांढरी कसर, वाळवी. *S. fox,* करड्या टोंकाची काळी लोंकर व शेंपटीचें टोंक पांढरें असलेला कोल्हा. *S. gilt,* of silver gilded over. चांदीचा मुलामा देलेलें. *S. leaf,* रुप्याचा वर्ख. *S. paper,* पातळ ( रुपेरी ) कागद; कथिलाचा वर्ख. *S. plate,* चांदीचीं ( चांदीच्या मुलाम्याचीं ) भांडीं. *S. point,* विशिष्ट कागदावर रुपेरी लेखणीनें चित्र कोरण्याची कला,-असें कोरलेलें चित्र. *S. standard,* रुप्याचें ( रुप्याच्या नाण्याचें ) चलन. *S. top,* गवतावर होणारा एक रोग. *S. weed,* ( रस्त्याच्या कडेला वाढणारें पिवळ्या फुलांचें व रुपेरी पानांचें झाड. *Silvern, a.* ( rare ).

**Sil'ver-smith,** *n.* ( सि'ल्व्हर्-स्मिथ् )—one whose occupation is to work in silver. रौप्यकार, सोनार.

**Sil'verў,** *a.* ( सि'ल्व्हरि )—like silver in whiteness and lustre; having the clear soft resonance of a silver bell. रुप्यासारखा शुभ्र व तेजस्वी, रुपेरी, पांढरा; खणखणीत ( आवाजाचा ). *Sil'veriness, n.* पांढरेपणा, शुभ्रपणा.

**Sĭm'ĭan,** *a. & n.* ( सि'मिअन् )—( of ) one of the anthropoid apes, ( gen. ) ape ( like ), monkey ( like ). ( मानवसदृश ) माकड, वानर, ( माकडाचा ), ( माकडा-वानरा-सारखा ). *Sim'ioid, a.* [ L. *Simia,* ape ]

**Sĭm'ilar,** *a.* ( सि'मिलर् )—having resemblance to, of the same kind; ( Geom. ) identical in shape. सारखा, समान, सदृश; सरूप, आकारानें बरोबर,-सदृश. *n.* a thing resembling another; ( pl. ) similar things. तत्सदृश वस्तु; सारख्या आकाराच्या-समान-वस्तु.*-ly, adv.* तसाच, त्याचप्रमाणें, तद्वत्.

**Sĭmĭlă'rĭtў,** *n.* ( सिमिलॅ'रिटि )—state of being similar, likeness, resemblance. सारखेपणा, सादृश्य, साम्य.

**Sĭm'ĭlē,** *n.* ( सि'मिलि )—a comparison of two things for the purpose of illustration or ornament, a poetic or imaginative comparison. उपमा, उपमालंकार. *Sim'ilize, v. i. & t.* उपमा योजणें; उपमा देऊन स्पष्ट करणें,-होणें. [ L. *similis,* like ]

**Sĭmĭl'itūde,** *n.* ( सिमि'लिट्यूड् )—guise or outward appearance; simile; copy. सारखेपणा, समता, सादृश्य; बाह्यरूप; उपमा; प्रतिमा.

**Sĭmm'er,** *v. i. & t.* ( सि'मर् )—to be or keep just bubbling or singing below boiling-point; be in a state of suppressed anger or laughter. चरचरणें, चुरचुरणें, सणसण वाजणें, उकळणें; आंतल्या आंत उकळणें, उकळी येणें-फुटणें ( रागाची, हंसण्याची ). *n.* simmering state. चरचरण्याची, उकळण्याची,-स्थिति.

**Sĭmō'nĭăc,** *n.* ( सिमो'निॲक् )—a person guilty of simony. धार्मिक अधिकारांचा, अधिकाराच्या जागांचा-व्यापार-सौदा-करणारा. *Simoni'acal, a.*

**Si'monў,** *n.* ( सा'यमनि )—trafficking in Church preferment. धार्मिक अधिकारांचा सौदा करणें.

**Si'mon Pure,** *n.* ( सा'यमन् प्युअर् )—the real or genuine person or article. खरा मनुष्य, खरी व्यक्ति, सत्य गोष्ट,-वस्तु. [ character in Centlivre's 'Bold Stroke for a Wife' ]

**Sĭmōōm',** *n.* ( सिमू'म् )—hot desert sand-wind, chiefly in Arabian desert. वाळवंटावरून वाहणारा उष्ण धुळमरून टाकणारा वारा. [ f. Arab. *samm,* to poison ]

**Sĭmp,** *n.* ( सिम्प् )—( sl. ) a fool, simpleton. मूर्ख, वेडगळ, वेडपट.

**Sĭm'per,** *v. i. & t.* ( सि'म्पर् )—to smile in a silly or affected manner; express by or with simpering. वेड्याप्रमाणें किंवा वरकरणी गालांत हंसणें, गालांतल्या गालांत हंसून सांगणें,-व्यक्त करणें. *n.* Such smile. अशा प्रकारचें हास्य. *Sim'peringly, adv. Sim'perer, n.*

**Sĭm'ple,** *a.* ( सि'म्पल )—of one element or kind; not complicated or elaborate or adorned or involved or highly developed; unsophisticated, artless, natural; inexperienced, humble; trifling, of low rank; easily solved or understood or done; absolute, mere, just. एकाकी, सलग, अविभक्त ( Chem. & Bot. ); साधा, बिनगुंतागुंतीचा, अनलंकृत, अल्पविकासित; भेताचा। निर्मळ, शुद्ध, साधा; मूर्ख, वेडगळ, अननुभवी; सालस, भोळा, क्षुद्र, खालच्या दर्जाचा, हीन; सोपा, सुज्ञेय, सुकर, शुद्ध, केवळ, तंतोतंत. *n.* a herb used in medicine; the medicine. एक औषधी वनस्पति; त्या वनस्पतीचें औषध. *S. sentence,* without subordinate clauses. साधें,-केवळ,-वाक्य. *S. Interest,* सरळव्याज. *S. equation,* एकवर्णसमीकरण. *S. leaf,* of one blade. अविभक्त पर्ण. *S.-pistil,* अविभक्त,-एकाकी,-स्त्रीकेसर. *S. fracture,* साधा अस्थिभंग. *The s. life,* practice of doing without servants and luxuries, attempt to return to more primitive conditions. साधी राहणी. *S. forms of life,* creatures low in scale of evolution. अल्पविकसित प्राणिजात. *S. contract,* साधा कर्जरोखा, बिनमोबदल्याचा ( लेखी, तोंडी, गर्भित ) करार. *Sim'ply, adv.* साधेपणानें, निखालस, सहजगत्या.

**Sĭm'ple-hearted, Sĭm'ple-mīnded,** *aa.* ( सि'म्पल्-हार्टेड्, सिम्प'ल्माइन्डेड् )—of simple heart, ingenuous. साधा, भोळा, निष्कपटी. *Sim'ple-mindedness, n.*

**Sĭm'pleton,** *n.* ( सि'म्पल्-टन् )—of foolish or half-witted person, one easily deceived. मूर्ख, भोळा, अर्धवट मनुष्य.

**Sĭmplĭ'cĭtў,** *n.* ( सिं'म्प्लि'सिटि )—artlessness, weakness of intellect; foolishness. भावार्थीपणा, साधेपणा; बुद्धीची दुर्बलता; मूर्खपणा, भोळसटपणा.

**Sĭm'plĭfў,** *v. t.* ( सि'म्प्लिफाय् )—to make simple or easy to understand, to make plain. सोपा करणें, सुलभ करणें, सरळ रूप देणें.*-fication, n.*

**Sim'plism**, *n.* (सिं'प्लिझम्)—affected simplicity. कृत्रिम साधेपणा.

**Simūlā'crŭm**, *n.* (सिम्यूले'क्रम्)—(*pl.-cra*) shadowy likeness or mere pretence of. वरच्या सारखेपणा.

**Sim'ūlant**, *a.* (सिं'म्यूलंट्)—having the appearance of. (त्या) सारखा दिसणारा.

**Sim'ūlāte**, *v. t.* (सिं'म्युलेट्)—to feign; to pretend to have or feel, to counterfeit. चें ढोंग करणें; आव आणणें, ढोंग धरणें,-घालणें, वेष,-रूप,-घेणें. *Simula'tion, -tor, nn.*

**Simultā'néous**, *a.* (सिमल्टे'निअस्)—occurring or operating at the same time (*with*). समकालीन, एककालीन, एककालिक, एकदम होणारा,-चालणारा.-*ly, adv.* एकदम, एकसमयावच्छेदेंकरून.-*ness, Simultane'ity, nn.*

**Sin**, *n.* (सिन्)—transgression against divine law; an offence against any code. पातक, पाप; दुष्कृत्य, अपराध, अन्याय, दोष, उल्लंघन. *v. i.* to commit sin; *to offend against.* पाप करणें; गुन्हा करणें, चें उल्लंघन करणें, अपराध-अन्याय-करणें. *Original s.*, मूळ पातक, उपजत पापबुद्धि. *Deadly* or *mortal s.*, such as kills soul or is fatal to salvation. (मनुष्याची आध्यात्मिक अधोगति करणारें) महापातक. *The seven deadly ss.*, pride, covetousness, lust, anger, gluttony, envy, sloth. गर्व किंवा दर्प, लोभ, हांव, क्रोध, खादाडपणा, द्वेष किंवा असूया, आणि आळस हीं सात महापातकें, (रोमन कॅथॉलिक धर्मपंथाप्रमाणें). One's *besetting s*, एखाद्याचें विशेष-विशिष्ट-व्यसन,-पातक. *Like s., adv.* (sl.) vehemently. आवेशानें, जोराजोरानें. *S.-offering*, पापानिष्कृतीसाठीं प्रायश्चित्त. *More sinned against than sinning*, (King Lear III ii 54,) often of victim of seduction. माझ्या पापांपेक्षां इतरांनींच माझे फार अन्याय-अपराध केले आहेत. *S.* one's *mercies*, चांगलें दैव उघडलें तरी सुदैवाला कृतघ्न होणें. *Sin'ful, sin'less, aa.*; *Sin'fully,-lessly, adv.*; *Sinfulness,-lessness, nn. Sin'ner, n.*

**Sin'apism**, *n.* (सिं'नपिझम्)—mustard plaster. मोहरीचा लेप. [Gk *sinapi*, mustard]

**Since**, *prep.* (सिन्स)—in the period between some specified time and the present. अमक्या काळापासून आजपर्यंत, पासून. *conj.* since the time when, seeing that; inasmuch as. पासून, नंतर, म्हणून, साठीं, जेव्हां, ज्याअर्थी. *adv.* since then or that, subsequently, from then till now. तेव्हांपासून, नंतर, अलीकडे, मागें, पूर्वी, झाला, गेला. (*Have eaten nothing*) *s. yesterday*, (I have heard-), तुला भेटल्यापासून. (*What have you done*) *s. we met!* आम्हीं भेटल्यानंतर. *Has been healthy ever s.*, त्यावेळेपासून त्याची प्रकृति चांगली आहे.

**Sincere'**, *a.* (सिन्सि'अर्)—guileless, frank; not assumed, being in reality what it appears, genuine. निष्कपट, अकृत्रिम, प्रांजळ, मनाचा मोकळा; मनापासूनचा, खरा, शुद्ध, निर्मळ.-*ly, adv.*

**Since'rity**, *n.* (सिन्से'रिटि)—honesty.खरेपणा, प्रांजळपणा.

**Sin'ciput**, *n.* (सिं'न्सिपट्)—head from forehead to crown. डोक्याची फयटी, टाळू, मस्तकाग्र (भाग). [L. *semi*, half; *caput*, head]

**Sine**, *n.* (साइन्)—(trigon.) (*S. of* arc) line drawn from one extremity of arc perpendicularly to radius at other extremity; (*S. of angle*) ratio of above line to radius (abbr. Sin, Sin A etc.). ज्या. *Versed s.*, abbr. *vers.*, unity minus the cosine. इषु.

**Si'nē**, *prep.* (सा'इनि)—(L) without. शिवाय. *S. die*, (साइनि डा'ई) indefinitely (of adjourning). बेमुदत (तहकूब). *S. qua non*, (साइनि क्वे नॉन्), indispensable condition or qualification. अगदीं आवश्यक अट,-गूण, अत्यावश्यक गोष्ट.

**Si'nécure**, *n.* (सा'इ-निक्युअर्, सि'-)—an office of honour or profit with no duties attached to it. काम वगैरे नसलेली मानाची किंवा फायद्याची जागा. बैठी नोकरी; (खिस्ती उपाध्याला कांहीं काम न करतां दिलेलें) बैठें वेतन.-*curist, n.* बैठा पगार खाणारा.-*curism, n.*

**Sin'ew** *n.* (सिं'न्यू)—tough fibrous animal tissue, a tendon; (*pl.*) muscles, bodily strength; motive power *of.* स्नायु, अस्थिबंधन; शारीरिक बळ, सामर्थ्य, ताकद; मुख्य साधन, आधार. *v. t.* (poet.) to serve as ss. of, sustain, hold together. चे स्नायु-बळकटी -असणें; स्नायूंनीं घट्ट बांधणें,-आवळणें, मजबूत करणें. *The ss. of war*, money. द्रव्यबळ, संपत्ति. *Sin'ewless, a.*; *sin'ewy, a.* स्नायूचा, बळकट, स्नायूयुक्त. *Sinewiness, n.*

**Sin'ful**, *a.* (सिं'न्-फुल्)—of the nature of sin; guilty of sin, contrary to the laws of God. पापयुक्त, पापाचा; पापी, पातकी.

**Sing**, *v. i & t.* (सिंग्)—(*sang*, or arch. *sung*; *sung*), to utter words with musical modulations; to make humming or whistling sound; to produce vocal melody, utter (song, tune); (of ears) be affected as with buzzing sound; compose poetry, to celebrate in verse; usher (esp. old or new year) *out*, or *in*, with singing; put to sleep etc. with singing. गाणें स्वरावर म्हणणें, गान करणें; गुणगुणणें, घोंघावणें, चूं चूं करणें, सणसणणें; गाणें, गाऊन म्हणणें, चालीवर म्हणणें; (कानांत) आवाज होणें; गाणें गाऊन झोंपवणें; काव्य रचणें, कविता करणें, (वर) कविता रचणें, चें काव्यांत वर्णन करणें. *n.* (U. S.) a large social gathering for singing. गाण्याची मजलस,-बैठक. *To s.* one's *praises*, एकाद्याचें स्तुतिस्तोत्र गाणें, त्याची नेहमीं स्तुति करीत असणें. *S. another song* or *tune*, नम्रता धारण करणें, कमीपणा घेणें. *S. small*, नांगी टाकणें, चूप बसणें, हार खाणें. *S. out, v. t. & i.* मोठ्यानें हांका मारणें, ओरडून सोडणें, ओरडणें. *Singing-man*, धंदेवाईक-पगारी-गवई. *Singing-master*, गायनशिक्षक. *Singing-voice*, गाण्याचा आवाज. *Sing-song, a. & n.*

monotonous rhythm or cadence in reading etc.; (colloq.) impromptu vocal concert. एक आवाजी,-कंटाळवाणें-गीत; एकच (गाण्याच्या) आवाजांत-हेल काढीत-बोलणें किंवा वाचणें; तात्कालिक गाण्यांची मजलस,-गाण्यांचा जलसा, नवशिक्या गवयांचा जलसा. *v. t. & i.* to recite, speak, in s. manner. हेल काढून, गाइल्यासारखें, किंवा सुरावर म्हणणें,-बोलणें.

Singe, *v. t. & i.* (सिंज्)—to burn slightly, to apply fire to the surface or edge of; rid thus of hair or feathers or nap; suffer singeing. होरपळणें, वरवर जळणें,-जाळणें; टरतरी करणें,-होणें. *n.* superficial burn (rare). वरवरची झळ; आंच. To *s.* one's *feathers* or *wings*, take some harm. (साहसाचा प्रयत्न करतांना) थोडीशी दुखापत-इजा-होणें, -झळ लागणें.

Sing'le, *a.* (सिं'ग्गल्)—one only, not double or multiple, individual; unmarried; of, for, or with one person or thing; solitary, lonely, unaided; sincere, consistent, ingenuous; (in negative contexts) not to speak of more. एकेरा, एकेरी, एकच, एक; एकेकटा, व्यक्तिशः; एकटा; अविवाहित; एकव्यक्तिक,-वस्तुक; एकाकी, एकलकोंडा, असहाय; मनःपूर्वक, एकसूत्रीपणाचा, निष्कपट, साधा, सरळ; एकही (न). *v. t.* to choose *out* for attention or treatment of some kind. निवडून काढणें, निवडणें, पसंत करणें. *n.* a s. game; hit for one in cricket; (pl.) twisted s. threads of silk. एक डाव, एकेरी,-एकेकट्या भिडूचा,-डाव; (क्रिकेटमध्यें) एकेरी धांव, एक एक धांव; (अने०) रेशमाच्या धाग्यांचा पेळू. *A s. combat*, द्वंद्वयुद्ध. *S. flower*, एका देंटावर येणारें एकच फूल, एकेरी पाकळ्यांचें फूल. *S. game*, एकेरी भिडूचा खेळ. *S. court*, (एकेकच भिडू खेळू शकेल एवढें) एकेरी लॉन टेनिस,-अंगण. *S. bed,-room*, एकाच माणसाच्या उपयोगी बिछाना,-खोली. *S. eye-glass*, एकाच डोळ्याचा चष्मा. *S. blessedness*, unmarried state. अविवाहित स्थिति. *A s. eye*, devotion to one purpose. एकहेतुकता, एकनिष्ठा, एकाग्रता,; *S.-eyed, a.* एकनिष्ठ, एकलक्षी; एकाक्ष, एकडोळ्या. *S. heart* or *mind*, simplicity of character. साधा-सरळ-स्वभाव, एकाकारता; *S. hearted, a.* free from duplicity or mixed motives. दुटप्पीपणा नसलेला, एकनिष्ट; *S.-minded*, true to one object, एकनिष्ट, एकचित्त; *S.-mindedness, n. S. file*, advance in which every member of the party is straight behind its leader. (एका पाठीं एक अशी) एकेरी रांग, *S.-foot*, (U. S.) horse's racking gait. घोड्याची मध्यम दौड. *S. fire*, (of cartridge) एकवारी; एकदांच उडवितां येण्याजोगें, (काडतूस). *S.- acting*, (of engine etc.) with steam admitted only to one side of piston. पिस्टनच्या एकाच बाजूच्या वाफेनें चालणारें, एकाच बाजूनें कार्य करणारें. *S.-breasted*, (of coat etc.) एकाच बाजूला बटणें असलेला (अंगरखा). *S.-stick*, (fencing with) basket-hilted stick of about sword's length. (टोपलीच्या आकाराच्या मुठीच्या पटीनें केलेलें) पटयुद्ध. दांडपट्टा, दांडपट्ट्याचा खेळ. *Sing'ly, adv.* एकेरा, साह्यावांचून, एकट्यानें, एकामागून एक. *Sin'gleness, n.*

Sing'le-händed, *a. & adv.* (सिं'ग्गल्-हँडेड्)—without assistance from others, by one's own efforts; with or for one hand. एकटा, असहाय; एकहाती, एक हातानें वापरण्याची; (*adv.*) एकट्याच्या हिंमतीनें; एका हातानें.

Sing'let, *n.* (सिं'ग्लेट्)—a garment worn below shirt, vest. आंतला अंगरखा, कुडतें.

Sing'leton, *n.* (सिं'ग्गल्टन्)—player's only card of a suit; lone person. हुकमाचें एकटेंच पान; एकटा-एकलकोंडा-मनुष्य.

Sing'ülar, *a.* (सिं'ग्युलर्)—extraordinary, uncommon, surprising; eccentric; single; unexampled, unique (rare); (*Gram.*) of a single thing or person. अद्वितीय, असामान्य, विलक्षण; तऱ्हेवाईक, विक्षिप्त; एक, एकटा, व्यक्तिशः; अद्वितीय, अनुपम, अपूर्व; एकवचनी, एकवचनाचा. *n.* (Gram.) the singular number; a singular word. एकवचन; एकवचनी शब्द. *All and s.*, सर्व मिळून व व्यक्तिशः, एकेक. *Singularly, adv.* विशेषपणें, विलक्षण रीतीनें, विक्षिप्तपणानें; एकवचनी.

Singülä'rity, *n.* (सिंग्युलॅ'रिटि)—peculiarity; eccentricity, strangeness. अद्वितीयता, विलक्षणपणा; तऱ्हेवाईकपणा.

Sin'ister, *a.* (सि'निस्टर्)—of evil omen; ill-looking; wicked, flagitious; (Herald.) on left side of shield, etc.; left. अमंगळ, अनिष्ट, अशुभ; (दिसण्यास) भेसुर, दुष्ट, अतिनिंद्य;; कपटाचा; डाव्या बाजूचा, डावीकडचा, डावा. *A s. design*, दुष्ट डाव,-बेत. *Sinisterly, adv.*

Sink, *v. i. & t.* (सिंक्)—to fall slowly downwards; decline; disappear below horizon or surface of liquid; droop, subside; gradually expire; lower or let droop; send (ship, &c.) to the bottom; bore or construct below ground, engrave; invest (money); decrease the value of; penetrate, make way; keep in obscurity or background, conceal. बुडणें, खालीं जाणें; खालावणें; बुडणें; गळणें, गळठणें, कमी होणें; हळूहळू नाहींसें होणें; उतरवणें, बुडवणें; तळाशीं नेणें; जमीनीखालीं खोदणें; खणणें; (पैसा) गुंडित धंद्यांत गुंतविणें; किंमत कमी होणें,-करणें, उतरविणें; आंत शिरणें, वाट काढणें, भिजणें, मुरणें, लपवणें, मागें ठेवणें, दृष्टिआड ठेवणें; चोरणें. *n.* a place in which foul liquid collects (usu. fig.); receptacle with out-flow pipe into which dirty water etc. is thrown; pool or marsh in which river's water disappears; opening in stage through which scenery is raised and lowered. (अनीतीचा) अड्डा, गटार; मोरी, घाण पाणी सांडण्याचें भांडें; नदीकांठची दलदल; रंगभूमींतील आरपार फट. *Ship sinks*, goes to the bottom. गलबत बुडून तळाला जातें. *Eyes sank*, दृष्टि अधोमुख झाली. *Voice sinks*, आवाज पडतो,-कमी होतो. *Sick man, life, is sinking*, खालावत, मरणोन्मुख

*gun*, हलकट, क्षुद्र. *S. of the soil*, रहिवासी; शेतकरी, मजूर. *S. of Mars*, a soldier. सैनिक. *Son'less, a.* निपुत्रिक, निपुत्र. *Son'ship, n.* पुत्रत्व; वारसदारी.

Son'-in-law, *n.* (स'न्-इन्-लॉ)—daughter's husband. जांवई.

So'nant, *a. & n.* (सो'नंट्)—(phonet.) (a sound or letter) involving voice. नादयुक्त, सतत नादकारी, स्वनयुक्त (उच्चार, अक्षर, *f.* d, g, etc.).

Sona'ta, *n.* (सेना'टा)—an instrumental piece, esp. for piano, in several movements. (निरनिराळ्या गतींत वाजवितां येण्यासारखें) पद्याचें-पदाचें-स्वरलेखन.

Sŏng, *n.* (सॉग्)—singing: vocal music; musical cry of some birds; set of words for singing; poetry; a poem. गाणें, गायन; गाणें; पक्ष्यांचें कूजन,-मंजूळ गाणें; गीत; काव्य; कविता. *S.-birds*, गाणारे पक्षी. *Bought, sold, it for a s.* or *an old s.*, कवडीमोलानें विकत घेतलें,-विकलें. *S.-less, a.*

Sŏng'ster, *n.* (सॉ'ग्-स्टर्)—singer; poet; song-bird. गाणारा, गायक; कवि; गाणारा पक्षी.

Song'stress, *n.* (सॉ'ग्-स्ट्रेस्)—a female singer. गाणारीण, गायिका.

Sonif'erous, *a.* (सोनि'फरस्)—conveying or producing sound. नादवाहक-कारक. [L. *sonus*, Sk. *Swana*, a sound]

Sŏnn'et, *n.* (सॉ'निट्)—piece of rhymed verse of fourteen ten-syllable lines; (rare) any short poem. चवदा ओळींची एक कविता, चतुर्दशक, सुनीत, स्वनीतक; लहानशी-छोटी-कविता. *Sonneteer, n.* सुनीत लिहिणारा कवि; *v. i.* (usu. contempt.) (सुनीतें,-छोटीं काव्यें रचून) कवि बनणें.

So'nny, *n.* (स'नि)—a small boy (familiar form of address). बाळ, मूल, लहान मुलगा.

Sonŏm'eter, *n.* (सोनॉ'मिटर्)—kinds of instruments for measuring sounds, testing deaf person's hearing etc. ध्वनिमापकयंत्र.

Sonorific, *a.* (सोनॉअरि'फिक्)—producing (esp. other than vocal) sound. ध्वनि करणारा, आवाज करणारा.

Sonor'ous, *a.* (सोनॉ'अरस्)—having a resonant or rich or powerful sound; (of speech, style) high-sounding. खणखणीत चांगला आवाज असलेला, नाद असणारा; खणखणीत, ठसठशीत, दणदणीत, भरींव, (भाषण, लेखनशैली). *S. figures*, नादलहरींनीं वाळवेवर वगैरे उमटलेल्या आकृति. *S. body*, नादजनक पदार्थ. *Sonor'ously, adv.*;—*ousness, n.*; *Sonor'ity, n.* सनादता, सशब्दता, खणखणीतपणा.

Sōōn, *adv.* (सून्)—in a short time, after no long interval, relatively early; readily, willingly. इतक्यांत, लवकर, चटकन; आधीं, अगोदर; आनंदानें, खुशीनें, संतोषानें. *He was s. convinced of his error*, लवकरच त्याला आपली चूक उमगली. *So s. as*, जितका लौकर. *As s. as*, जों, लगेच, क्षणींच. *Sooner or later*, आगें मागें, केव्हां तरी, आज नाहीं उद्यां. *No sooner said than done*, तोंडावाटे (शब्द) निघण्याचा अवकाश कीं झालेंच. *The sooner the better*, वेळेवर वेळ. *What makes you come so s.*, इतक्या लवकर कां आलास?

Sōōt, *n.* (सुट)—black powdery substance rising in the smoke. काजळ, मस, मशेरी, धुरकट, धरोसा. *v. t.* to mark with s.; apply s. धुरकटवणें, काजळी धरवणें, काळा करणें. *S.-less, soot'y, aa. Soot'ily, adv.*, *-tiness, n.*

Sōōth, *n.* (सूथ्)—(*arch.*) verily, the truth. सत्य, खरें. *In (good) s.*, खरोखर. *Sooth'sayer, n.* (सुथ्-सेअर्) one who foretells or predicts, diviner, prognosticator. भविष्य सांगणारा, भविष्यवादी, ज्योतिषी. *Sooth'say, v. i.*

Sōōthe, *v. t.* (सूद्)—to make less angry, to calm (person, nerves); to soften, alleviate (pain), to pacify; flatter, humour (person). शांत करणें, सान्त्वन करणें; दुःख कमी करणें,-हलकें करणें; आवळणें, गोंजारणें, च्या कलानें घेणें, खुलविणें. *Sooth'er, n.* (esp.) लहान मुलांचें रबरी चोखणें, चोखायचें चूच. *Soothingly, adv.* समजूत घालून, शांत करून, गोंजारून.

Sŏp, *n.* (सॉप्)—a piece of bread, etc. soaked in gravy, milk, etc.; bribe offered to pacify. (रशात) भिजविलेला भाकरीचा तुकडा; तोंडावर टाकलेला तुकडा, लांच. *v. t. & i.* to soak; take up by absorption; drench; be wet through. बुडविणें, भिजविणें; शोषून घेणें; भिजणें, भिजून चिंब होणें. *Sop in the pan*, घावन, आंबोळी वगैरे तळलेली भाकरी. *Sop'py, a.*

Sŏph'ism, *n.* (सॉ'फिझम्)—a false argument or fallacy meant to deceive. खोटा युक्तिवाद, वितंडवाद, हेत्वाभास.

Sŏph'ist, *n.* (सॉ'फिस्ट्)—Ancient-Greek paid teacher of philosophy and rhetoric; a reasoner willing to avail himself of fallacies that will help his case, a fallacious reasoner. (प्राचीन) ग्रीक तत्त्वज्ञानाचा व साहित्याचा पगारी गुरु; खोटा युक्तिवाद करणारा, वितंडवादी, हेत्वाभासपटु. *Sophis'tic,-'tical, aa.* आभासरूप, हेत्वाभासाचा, वितंडवादी.-*tically, adv.*

Sophis'ticate, *v. t. & i.* (साफि'स्टिकेट्) to involve (a subject) in sophistry; mislead (a person) thus; make artificial; tamper with (text etc.) for argument; adulterate (wine, etc.); use sophistry. (च्या विषयीं) हेत्वाभास योजणें; वितंडवाद करून फसविणें; कृत्रिमता आणणें; शब्दच्छलानें अर्थाची ओढाताण करणें; भेसळ करणें; शब्दच्छल-वितंडवाद-करणें.-'*tion, n.* लपंडाव, शब्दच्छल; भेसळ.-*tor, n.*

Sŏph'istry, *n.* (सॉ'फिस्ट्रि)—use of sophisms, reasoning sound in appearance only. वितंडवाद, वाक्छल, हेत्वाभासाची तर्कपद्धति.

Sŏph'omore, *n.* (सॉ'फमोअर्)—(U. S.) a second year student at college or university. (महाविद्यालयांतील किंवा विश्वविद्यालयांतील) दुसऱ्या वर्षाचा विद्यार्थी. *Sophomor'ic, a.* immature, bombastic. अपक्व, शब्दावडंबराचा.

**Sŏporif'ic,** *a.* & *n.* ( सोपरि'फिक् )—( drug or agency ) tending to produce sleep. झोंप आणणारा, निद्राकारक ( औषधि, साधन ). *Soporif'erous, So'porous, So'porose, aa.* [ L. *Sopor*, sleep ]

**Sŏpp'ў** *a.* ( सॉ'पि )—soaked in liquid; swampy. भिजविलेला; दलदलीचा, पाणथळीचा.

**Sopra'no,** *n.* ( सप्रा'नो )—( pl.-*nos*,-*ni*, ) highest female or boy's voice, treble; a s. singer. तारस्थान, उच्चस्वर; तारस्वरांत गाणारा.

**Sŏr'cerer,** *n.* ( सॉ'अर्सरर् )—a man practising sorcery, an enchanter, a magician. जादुगार, चेटक्या. *Sor'ceress, n, f.* जादुगारीण, चेटकी स्त्री.

**Sŏr'cerў,** *n.* ( सॉ'अर्-सरि )—witchcraft. जादूगिरी, चेटक, चेट्टक.

**Sŏrd'id,** *a.* ( सॉ'अर्डिड् )—squalid, mean; humiliating; inspired by low or mercenary or selfish ends, niggardly: ( Bot., Zool. of colours ) impure, muddy. नीच, हलकट; अपमानकारक; स्वार्थाने प्रेरित, भाडोत्री, कृपण, कद्रू; अशुद्ध, मळकट ( रंग ).-*ness, n.* नीचपणा, क्षुद्रपणा, कृपणपणा.

**Sore,** *a.* ( सोअर् )—( *arch.*, poet. ) grievous, distressing; suffering bodily or mental pain; morbidly tender; irritating. भयंकर स्वरूपाचा, तीव्र; घायाळ, दुखावलेला; दुखरा, दुखणारा, दुखापत झालेला; लागणारा, झोंबणारा. *n.* a sore place on body; a sore subject, painful memory. व्रण, दुखापत, जखम; मर्मस्थान; मर्म, वर्म, दुःख, अडचण, दुःखाचा प्रसंग. *adv.* grievously. फारच, अतिशय. *A s. arm*, दुखरा दंड,-हात. *S. throat*, घसा बसलेला. *A sight for s. eyes*, आवडता, मनाजोगता, देखावा. *Very s. about his defeat*, पराभवानें अतिशय चिडलेला,-चरनलेला. *A s. struggle*, तीव्र धडपड. *To have s. eyes*, डोळे येणें. *To reopen old ss.*, मागील दुःखप्रसंगांची पुन्हां आठवण होणें. *Sore'ly, adv.; Sore'ness, n.* दुखरेपणा; दुःख.

**Sŏrg'hum,** *n.* ( सॉ'अर्गम् )—kinds of grass including millet and Chinese sugar-cane. ( बाजरीसारखें ) गवती धान्य, चिनी ऊस.

**Sori'tēs,** *n.* ( सोरा'इटीझ् )—chain-syllogism; form of sophism leading from truth to absurdity. अनुमानशृंखला; हेत्वाभासमालिका. *Sorit'ical, a.*

**Sorō'sis,** *n.* ( सोरो'सिस् )—( bot. ) a fleshy-compound fruit. ( तुती, फणस, अननस वगैरे ) पुष्कळ फुलें एकत्र होऊन झालेलें फळ. [ Gk *soros*, heap ]

**Sŏ'rrel,** *n.* ( सॉ'रल )—kinds of sour-leaved herb. चुका, चुक्याची भाजी, शतवेधी.

**Sŏ'rrel,** *a.* & *n.* ( सॉ'रल )—( of ) reddish-brown colour; a s. animal ( esp. horse ); ( also *sorel* ) buck of third year. तांबूस रंगाचा; तांबूस रंगाचें जनावर ( घोडा ); तिसऱ्या वर्षातील काळवीट,-हरीण.

**So'rrow,** *n.* ( सॉ'रो )—mental pain, grief, sadness; misfortune, trouble; lamentation. दुःख, खेद, शोक; संकट, प्रसंग, आपत्ति; शोक. *v. i.* to feel sorrow; to mourn. दुःख वाटणें; शोक करणें, श्रम वाटणें, रडणें. *The Man of ss.*, येशू ख्रिस्त. *S.-stricken*, आपत्तींत सांपडलेला. *So'rrower, n. So'rrowing, a.*

**Sŏ'rrowful,** *a.* ( सॉ'रोफुल् )—feeling or causing sorrow, full of sorrow, sad, mournful. दुःखी, रडवा, दुःखप्रद, दुःखाचा.-*fully, adv.* दुःखानें, कष्टी होऊन, दिलगिरीनें.-*fulness, n.*

**Sŏ'rrў,** *a.* ( सॉ'रि )—pained at or regretful over something; feeling pity for some one; ridiculously bad. दुःखीकष्टी, दुःखी, खिन्न; दया वाटत असलेला; भिकार, अत्यंत वाईट, हलका. *S.* ( in formal apology ) चूक झाली! चुकलों!. *Felt s. for him*, त्याच्याबद्दल वाईट वाटलें. *S. for oneself*, ( colloq. ) खिन्न, उदास. *So'rrily, adv., So'rriness, n.*

**Sŏrt,** *n.* ( सॉअर्ट् )—a kind or variety, class, kind, species; manner, way; ( Print. ) any letter or piece in fount of type. जात, जाति, तऱ्हा प्रकार; एकाद्या जातीचा टंक ( टाइप ). *v. t.* & *i.* to arrange in sets according to size or quality or other standard; ( arch. ) correspond or agree with. मतवार लावणें, वर्गीकरण करणें; निवडणें, वेंचणें; पत्रांची विल्हे करणें; योग्य होणें, शीं जुळणें, मिळता असणें. *Of ss.*, mixed. सरमिसळ असलेलें. *A s. of war, a war of a s.*, or *of ss.*, not fully deserving the name of war. नांवाची लढाई, खरीखुरी नव्हे अशी. *That's your s.*, ती तुमची पद्धत ( तऱ्हा ) आहे. *In some s.*, to a certain extent. कांहींसा. *Copy is hard* ( or *runs* ) *on ss.*, कांहीं जातींचा पुष्कळ टाइप लागणारा हा मजकूर आहे. *To be out of ss.*, out of health, or spirits, ( print. ) short of *ss.* चैन न पडणें, अस्वस्थ होणें; कांहीं जातींचीं अक्षरें खुंटणें.

**Sŏrt'ie,** *a.* ( सॉ'अर्टी )—a sally of besieged party. वेढा घातलेल्या सैन्यावर केलेला हल्ला,-घातलेला छापा.

**Sŏrt'ilege,** *n.* ( सॉ'र्टिलिज् )—divination by lots. चिठ्या टाकून पाहणें.

**Sŏrti'tion,** *n.* ( सॉअर्टि'शन् )—lot-casting; distribution by lot. चिठ्या टाकणें; गठागठांनीं वांटणें, चिठ्या टाकून वांटणें.

**Sŏr'us,** *n.* ( सॉ'रस् )—( pl.-*ri* ) ( bot. ) a heap, cluster, esp. of spore-cases on back of fern-frond. ( फर्न वनस्पतीच्या पानावरील बीजरेणुकोशांचा ) समुदाय.

**S. O. S.,** ( एसो एस् )—wireless code-signal of extreme distress. भयंकर प्रसंगाच्या वेळीं दिलेला बिनतारी संदेश.

**Sŏ'-sō,** *pred. a.* & *adv.* ( सो'सो )—not very good. सुमाराचा, जेमतेम.

**Sŏt,** *n.* ( सॉट् )—man constantly stupid with drink, a habitual drunkard. दारूनें बेहोष झालेला मनुष्य, दारुड्या, झिंगट, छाकटा. *v. i.* to

tipple. झिंगणें, दारूबाजी करणें. *Sot'tish, a.,-ishly, adv.,-ness, n.*

Sŏtt'ō Vō'cē, *adv.* (सॉ'टो व्हो'चि)—in an undertone, aside. हलक्या आवाजांत, बाजूला. [ It. ]

Sou, *n.* (सु)—the French ½ d. अर्धापेन्स किंमतीचें फ्रेंच नाणें.

Sou'chong, *n.* (सू'शाग)—a choice black tea made from youngest leaves. उत्कृष्ट जातीचा चहा.

Sou'ffle, *n.* (सू'फल्)—(med.) low murmur. कुंथण्यासारखा आवाज.

Sou'ffle, *a.* & *n.* (सू'फ्ले)—made light and frothy; dish made of beaten white of egg. हलकी व तळलेली; अंड्यांतील पांढरा बलक घालून केलेला खाद्य पदार्थ.

Sough, *n.* & *v. i.* (सफ्, साउ, सफ्)—(to make) sighing or moaning of wind in trees etc. वाऱ्याचा सूंसूं आवाज (होणें).

Sought, (साट्)—*pa. t.* & *pa. p.* of Seek.

Soul, *n.* (सोल्)—the immaterial part of man regarded as immortal; moral and emotional part of man; intellectual part of man; vital principle; animating or essential part; a person viewed as embodying moral or intellectual quality; the organ of emotion, thought, and will; human being; spirit, essence; departed spirit. आत्मा; हृदय, अंतःकरण; बुद्धि, मन, जीव, प्राण, चैतन्य, जीवनकला; आत्मा, जीव, जिव्हाळा; महात्मा, थोर पुरुष; जीव, चैतन्य, आत्मिक तेज; मनुष्य, मनुष्यप्राणी; सत्त्व, सार; मृताचा आत्मा. *Immortality of the s.* आत्म्याचा अविनाशीपणा,-अमरत्व. *'pon my s.,* गळ्याची शपथ! *He cannot call his s. his own,* तो दुसऱ्याच्या पूर्ण आहारीं गेला आहे, स्वत्व नष्ट झालें आहे. *The greatest ss. of antiquity,* पुरातन काळांतील थोर पुरुष. *His pictures lack s.,* त्याच्या चित्रांत आत्मिकता-प्राण-नाहीं, तीं चित्रें निर्जीव भासतात. *S.-stirring,* भावनोद्दीपक, अंतःकरण खळबळून सोडणारें.*-souled, a.* (उच्च) मनोभाव असलेला. *High-souled,* महाशय, थोर अंतःकरणाचा.

Soul'ful, *n.* (सो'ल्फुल्)—filled with, or appealing to, fine thoughts or emotions. सद्भावनायुक्त, सद्भावनोद्दीपक.*-fully, adv.;-fulness, n.*

Soul'less, *a.* (सो'ल्लेस्)—(*esp.*) destitute of the humane emotions, spiritless. अंतःकरणरहित, क्षुद्र.*-ly, adv.;-ness, n.*

Sound, *n.* (साउन्ड्)—audible air-vibration; mere noise as opposed to meaning; what is or may be heard; (*fig.*) mental impression. ठोका; आवाज, नाद, ध्वनि, शब्दावडंबर, पोकळ आवाज; ध्वनि, शब्द, नांव; भावना, भास. *v. i.* & *t.* to give forth sound; convey specified impression; (part. *sounding*) of imposing sound or import; produce sound (from bugle, etc.); give signal thus; celebrate; pronounce, utter; test condition of (heart, railway-carriage wheel etc.) with stethoscope, etc. वाजणें, आवाज-ध्वनि-होणें; ध्वनि येणें, (आवाजावरून) दिसणें,-वाटणें; चा भास होणें; मोठमोठा, भपकेबाज, शब्दावडंबराचा; (शिंग) वाजवणें, फुंकणें; (शिंग वगैरे वाजवून) सूचना देणें, खूण करणें; गाजवणें, ची गर्जना-प्रसिद्धि-करणें, चा घोष करणें; उच्चार करणें; (ठोकून) तपासणें. *Musical s.,* नादलहरी,-ध्वनि. *Vowel ss.,* स्वरोच्चार. *Consonantal ss.,* व्यंजनोच्चार. *S.-board, sounding board,* ध्वनिवर्धक फलक. *S. bow,* thick edge of bell against which tongue strikes. घंटेची कडा. *S.-box,* ध्वनिमंजूषा. *S.-film,* बोलपट. *S. proof,* ध्वनिनिवारक, ध्वनिप्रतिबंधक. *S. record,* ध्वनिलेख. *S.-recorder,* ध्वनिलेखक कांडा. *S. wave,* नादलहरी, ध्वनिलहरी. *To s. a retreat,* माघार घेण्याची (वाद्य वाजवून) सूचना देणें. *Sound'-less, a.*

Sound, *a.* (साउन्ड्)—free from disease or defects or corruption or heresy; of good quality throughout; reliable; not fallacious; (of sleep) unbroken; (Commerc.) solvent; thorough. निरोगी, निर्दोष, अव्यंग; शाबूद, धड, न कुजलेला; विश्वसनीय; समर्पक, सयुक्तिक; गाढ, स्वस्थ; शहाजोग, सुस्थितींतील, संपन्न (उद्योगधंदा, पेढी इ.); खूप, जोराचा, मजबूत, बळकट, *adv.* fast, soundly. गाढ, स्वस्थ. *S. asleep,* गाढ निद्रिस्त. *Sound'ly, adv.; Sound'ness, n.*

Sound, *n.* (साउन्ड्)—a strait; swimming-bladder of cod and some other fishes; cuttle-fish; a kind of surgical probe. सामुद्रधुनी; माशाच्या अंगांतील हवेची पिशवी; म्हाकूल, समुद्रफेन (एक जातीचा मासा); अश्मरी-परीक्षा-शलाका, मुतखडा आहे कीं नाहीं हें तपासण्याचा भरींव दांडा. *v. t.* & *i.* to measure depth of sea, etc. and the quality of its bottom with the *sounding-line*; examine surgically; try to elicit the views of; (of fish) dive to the bottom. गळ टाकून (ची) खोली पाहणें, चा तळ तपासणें; सळई घालून तपासणें-पाहणें; युक्तीनें (मनांतलें) काढून घेणें, मन पाहणें; (देवमासा) तळापर्यंत बुडणें,-बुडी मारणें. *Sounding line,-apparatus,* पाण्याचा थांग पाहण्याची दोरी, गळ. *Sounding rod,* गलबताच्या तळाशीं आलेलें पाणी मोजण्याची काठी.

Sound'er, *n.* (सा'उन्डर्)—(*arch.*) herd of wild swine; a young wild boar; telegraph receiving instrument. रानडुकरांचा कळप; लहान रानडुकर; तार घेण्याचें यंत्र, ध्वनिजनक.

Sound'ings, *n. pl.* (सा'उन्डिंग्झ्)—depth of sea &c. taken with the lead, place near enough to shore to admit of sounding. समुद्राची वगैरे गळ टाकून काढलेली खोली, समुद्रकिनाऱ्यालगतची गळ टाकण्याजोगी समुद्राची खोली.

Soup, *n.* (सूप्)—liquid food made by stewing bones, meat, vegetables &c. सागुतीचा रस,

सूप. *In the s.*, (sl.) अडचणींत, संकटांत. *S. and fish*, (sl.) evening dress. संध्याकाळीं घालण्याचे कपडे. *S. gourd*, *n.* घोसाळें.

Sou'p con *n.* (सूं'सॉं)—a dash or trace or tinge of (flavouring, quality, etc.). चुणूक, छटा, मागमूस. [F]

Sour, *a.* (सॉवर्)—tasting like unripe fruit or vinegar; (of bread) spoilt by fermentation, &c., harsh of temper, peevish or morose; (of soil) damp. आंबट, आंबटा, नासलेला; आंबलेला, आंबूस; तुसडा, खत्याळ, आंबट चेहऱ्याचा, चिडखोर; ओलसर, ओलाव्याची, पाणथळ. *v. t. & i.* to turn, make, sour (oft. *fig.*). आंबट करणें,-होणें; आंबणें; तुसडा-चिडखोर बनणें. *S.-dock*, common sorrel. आंबटचुका (भाजी). *Sourish*, *a.*; *Sour'ly*, *adv.*; *Sour'ness*, *n.* आंबटपणा, आंबटेपणा; तुसडेपणा.

Source, *n.* (सोअर्स्)—the place from which a stream issues; fountain-head; first cause, origin; place of origin. नदीचें उगमस्थान, उगम; मुख्य झरा; आदिकारण, मूळ; मूळस्थान, ठिकाण

Sourdine', *n.* (साअर्डी'न्)—harmonium stop producing soft effect. वाजाच्या पेटीची कोमल सुरांची खुंटी.

Sour'-sop, *n.* (सॉ'वर्सॉप्)—a W.-Ind. fruit and tree. एक जातीचें फळ,-फळझाड.

Souse, *v. t. & i.* (साउस)—to put in pickle; send or plunge into liquid, throw liquid over a thing. लोणच्यांत घालणें, मुरवणें; डुबकन बुडवणें, वर पातळ पदार्थ ओतणें. *n.* a plunge into liquid; sound of this; pickle made with salt. डुबकन् बुडणें; त्याचा आवाज; (डुकराचे कान, पाय, वगैरेंचें) लोणचें. *adv.* with swift descent, head-long. डुबकन, धाडकन्.

Soutane', *n.* (सूटा'न्)—long buttoned gown worn by R.-C. priests. रोमन कॅथोलिक उपाध्यायांचा लांब झगा.

South, *n.* (साउथ्)—the point of horizon directly opposite the north; point of compass opposite north. दक्षिण दिशा, दक्षिण; होकायंत्राचा दक्षिणाभिमुख कांटा. *a.* being in the south; facing south; coming from south. दाक्षिणात्य, दक्षिणेकडील; दक्षिणेकडचा, दक्षिणाभिमुख; दक्षिणेकडून येणारा. *adv.* towards or in the south. दक्षिणेस, दक्षिण-दिशेकडे. *v. i.* to move towards south, (of moon etc.) cross the meridian of a place. दक्षिणेकडे जाणें, दक्षिणेस फिरणें,-कलणें,-वळणें. *S. of*, च्या दक्षिणेस. *S. wind*, दक्षिणेकडील वारा. *South'down*, *a. & n.* साउथ् डाउन्स् (इंग्लंड) मधील उत्कृष्ट मेंढी. *S. sea*, (hist.) the Pacific. पॅसिफिक् महासागर. *S. Sea Bubble*, स्पॅनिश अमेरिकेशीं व्यापार करण्यासाठीं उभारलेली फसवी मंडळी; हिचा ओफस् १७२० त झाला. *S. pole*, दक्षिणध्रुव. *S.-ward*, *a.*, *adv.* & *n.*; *-wards*, *adv.* *South'ron* (Sc., सद्रन्) a southerner or Englishman. दाक्षिणात्य, इंग्रज मनुष्य.

South'east, *n.* (सा'उथ्-ईस्ट्)—(abbr. S. E.) the region half way between and equally distant from the south and the east. आग्नेयी दिशा, आग्नेय. *a. & adv.* आग्नेयीचा.

South'-easter, *n.* (सा'उथ्-ईस्टर्)—(Also) souther (सा'उथर्), wind from SE. (south east). आग्नेय (दिशेचा) वारा. *S.-easterly*, towards or coming from the SE. आग्नेयीकडे, आग्नेयीकडील. *S.-eastern*, आग्नेयीचा, आग्नेय दिशेकडे. *S.-eastward*, towards the SE. आग्नेयीकडे. *S.-eastwardly*, in a south eastern direction. आग्नेयदिशेकडे,-दिशेनें. *S.-eastwards*, आग्नेयीकडे, आग्नेयीकडून.

Sou'therly, *a. & adv.* (स'दर्लि)—towards the south, coming from the south. दक्षिणेकडील, दक्षिणचा, दक्षिणाभिमुख, दाक्षिणात्य.

Sou'thern, *a. & n.* (स'दर्न्)—situated in the south. दक्षिणेचा. *S. cross*, a constellation. दक्षिणीय चातुष्पथ. *Southerner*, *n.* दाक्षिणात्य रहिवासी. *Southern wood*, *n.* दवणा, दमनक (सुवासिक वनस्पति). *Sou'thern-most*, *a.*

South'ing, n. (सा'उथिंग)—In vbl, senses; (esp. Naut.) difference of latitude made in sailing south. दक्षिणायन; (जहाजांतून) दक्षिणेकडे जात असतां अक्षांशांत होणारा फरक.

South'-west, *n.* (सा'उथ्-वेस्ट्)—(abbr. S. W.) the region half-way between and equally distant from the south and the west. नैर्ऋत्य. *S.-wester*, *n.* wind from S W; (usu. sou-wester) water proof hat. नैर्ऋत्येचा वारा; पर्जन्यनिवारक (साहेबी) टोपी.

Sou'venir, *n.* (सू'व्हेनिअर्)—a thing given or kept in memory of a person or place or event. आठवण म्हणून दिलेली किंवा ठेवलेली गोष्ट, आठवण, खूण.

Sŏv'ereign, *a.* (सॉ'व्ह-रिन्)—supreme and exempt from external control; having supreme power; very good. श्रेष्ठ आणि स्वतंत्र, वरिष्ठाधिकारी, सार्वभौम; अचुक गुणाकारी, रामबाण; श्रेष्ठ. *n.* a sovereign ruler; (abbr. *sov.*) British gold coin of £1. सार्वभौम राजा किंवा राणी; तक्ताधिपति राजा किंवा राणी; सोन्याचें १ पौंडाचें नाणें, सॉव्हरिन. *A s. remedy*, *a.* रामबाण उपाय. *Half s.*, १० शिलिंग किंमतीचें सोन्याचें नाणें.

Sŏv'ereignty, *n.* (सॉ'व्ह-रिन्टि)—supreme power in a State; supreme excellence. अधिराज्य, सार्वभौमत्व, आधिपत्य; उत्कृष्टता, श्रेष्ठता.

Sŏviet', *n.* (सोव्हिए'ट्)—any of the councils elected by the workers and soldiers of a district in revolutionary Russia, or of a smaller number elected by these, or the all-Russian congress of delegates from the elected smaller number. रशियन राज्यक्रांतीनंतर कामकरी आणि सैनिक यांनीं निवडलेलें प्रांतिक मंडळ, प्रजा-लोक-सत्तावादी रशियांतील प्रतिनिधि-सभा. *Union of Soviet Socialist Republics*, (abbr. U. S. S. R.) रशियांतील लोकसत्तावादी राज्यसत्ता (लोकसत्तात्मक राज्य).

Sow, *v. t. & i.* (सो)—(*sowed*, *sown* or *sowed*), to scatter or plant seed for reproduction;

to propagate; (fig.) cover thickly *with.* चीं पेरणें; रुजत घालणें, पेरणी करणें; पसरणें, पेरणें, फैलाव करणें; वर जाड थर पसरणें. *You must reap what you have sown,* करावें तसें भरावें. *Sow'er, n.*; *Sow'ing, n.*

**Sow,** *n.* (सौ)—the female of the swine or hog, adult female pig; (*also s.-bug*) a wood-louse; main trough through which molten iron runs into side channels to form pigs, large block of iron that solidifies in this. डुकरी. डुकरीण; वाळवी, कीड; लोखंड वितळविण्याची मुख्य कढई,-पात्र. वितळलेल्या लोखंडापासून बनणारा मोठा ओतींव ठोकळा. *To get the wrong s. by the ear,* to fix on wrong person or thing, reach wrong conclusion. चोराला सोडून संन्याशाला सुळी देणें, भलतेंच-चुकीचें-अनुमान काढणें. *As drunk as a s.,* completely. यथेच्छ दारू प्यालेला, पूर्ण झिंगलेला. *S.-'back,* low ridge of sand etc. वाळवेचा सखल बांध,-कडा. *S.-'bread,* एक जातीचें फुलझाड.

**Soy,** *n.* (सॉय)—kind of sauce prepared chiefly in India, China, and Japan from *Soy bean* or-*pea*; the soy bean. वाटाण्याचें कालवण,-तोंडीं लावणें; एक प्रकारचा वाटाणा,-कडधान्य.

**Spa,** *n.* (स्पा)—a place resorted to for medicinal water. औषधी पाण्याचा झरा,-चें ठिकाण. [a place in Belgium]

**Spāce,** *n.* (स्पेस्)—extension, an interval between things; regions beyond ken; room available or required; a period or interval of time; (print.) blank between words etc., type securing this. विस्तार, क्षेत्र; जागा, अंतर, अवधि; आकाश, दिक्, शून्य; जागा, स्थळ; अवधि, मुदत; (शब्दांमधील) कोरी जागा, पूरक (टंक). *v. t.* to set at intervals, put spaces between; make a space between words on a typewriter etc. अंतरावर ठेवणें, अंतर ठेवणें; मधलें अंतर सारखें करणें, पूरक टाकणें; (शब्दांमध्यें) अंतर ठेवणें. *Space-time,* (philos.) a fusion of the concept of space and time. दिक्कालज्ञानैक्य, दिक्कालज्ञान. *Space-writer,-writing,* मजकुराच्या मोजणीवर मोबदला मिळविणारा लेखक,-लिखाण. *S.-bar,* bar in typewriter for making space. पूरक पट्टी. *To s. out,* (print.) (शब्दांमध्यें) अधिक जागा सोडणें, अधिक सुटे सुटे टंक जुळविणें, मध्यें पूरक टाकणें. *S.-less, a.*; *spa'cer, n.*

**Spā'cious,** *a.* (स्पे'शस्)—extended, having ample space; roomy. अघळपघळ; ऐसपैस; प्रशस्त, विस्तीर्ण; मोठ्या विस्ताराचा.-*ly, adv.*

**Spāde,** *n.* (स्पेड)—a broad-bladed digging tool with long handle, an instrument of digging; tool of similar shape; playing card with black figure, (pl.) suit of these cards. कुदळ, खनित्र; कुदळीच्या आकाराचें हत्यार; (पत्त्यांतील) इस्पिकचें काळ्या ठिपक्यांचें पान,-चीं पानें. *v. t.* to dig over (ground), cut blubber from whale. कुदळीनें खणणें; देवमाशाची चरबी कापून काढणें. *To call a s. a s.,* स्पष्टपणें बोलणें, वाईटाला वाईटच म्हणणें, आडपडदा न ठेवतां खरें तें सांगणें. *S. husbandry,* (कुदळीप्रमाणें) जमीन खोल नांगरून केलेली मशागत. *S.-'ful, n.*

**Spāde'-work,** *n.* (स्पेड्-वर्क्)—preparatory work of an arduous kind. (कोणत्याहि धंद्यांतील) आरंभाचें कठीण काम.

**Spădg'er,-g'ick,** *nn.* (स्पॅजर्,-जिक्)—(*sl.*) a sparrow. चिमणी.

**Spā'dix,** *n.* (स्पे'डिक्स्)—(*pl.-di'ces*) (Bot.) spike of flowers closely arranged round fleshy axis and usu. enclosed in a spathe. पोयमंजिरी, नारळाची किंवा पोफळीची पोय, केळफूल. *Spadi'ceous, Spad'icose, aa.* [L. f. Gk,=palm-branch]

**Spā'do,** *n.* (स्पे'डो)—(low) a person incapable of procreation. नपुंसक मनुष्य.

**Spake,** *pa. t.* of Speak.

**Späll,** *v. t. & i. & n.* (स्पाल्)—splinter, chip; (Mining) prepare (ore) for sorting by breaking it up. फोडणें, तुकडे-सळपे-करणें, (अशुद्ध धातु) फोडून टाकून वितळविण्यासाठीं तयार करणें. *Spal'der, n.*

**Spălpeen',** *n.* (स्पॅल्पी'न्)—(Ir.) a mean fellow; a youngster. क्षुद्र, हलकट मनुष्य, बच्चा, तरणा.

**Spăn,** *n.* (स्पॅन्)—full extent from end to end; the utmost distance between tips of thumb and little finger, nine inches; short distance or time; distance from support to support of an arch or roof; a yoke of oxen, an arch of a bridge; a pair of horses or mules. विस्तार, मर्यादा; वीत, नऊ इंच; थोडें अंतर; अल्पावधि; कमानीची किंवा छपराची गर्भी, (दोन टोकांमधील) पुलाची कमान; घोड्यांची किंवा बैलांची जोडी. *v. t.* to measure by hand-spans; (of bridge, roof, etc.) cross or cover, esp. with a single span; bridge (river etc.). वितीनें मोजणें, वितींत धरणें; वर कमान करणें; वर पूल बांधणें. *Our brief s. of life,* आपल्या आयुष्याची अल्प मर्यादा. *S. dogs,* a pair of iron bars with claws for grappling timber. इमारती लाकूड पकडण्याची लोखंडी कैची. *S. roof,* दुपाखी छप्पर. *S. worm,* एक जातीचा कीटक,-किडा.

**Span,** *pa. t.* of Spin.

**Spăn'drel,** *n.* (स्पॅन्ड्रल्)—space between either shoulder of arch and surrounding rectangular frame-work. कमान व तिजवरील चौकोनी चौकटींतील तिरपा भाग, तिरपा.

**Spăng'le,** *n.* (स्पॅंगल्)—a small piece of glittering metal, a small sparkling object, (fig. of stars). टिकली, चमकी, भिंग-कांच-टिकली, चांदणी. *Oak-s,* ओक वृक्षाच्या अंगचा डिंक. *Spang'led, a.* चमक्यांचा, टिकल्यांचा, टिचक्या बसविलेला. *Spang'ly, a.* टिचक्यां-टिकल्यां-सारखा, चकचकीत.

**Spăn'iard,** *n.* (स्पॅन्यर्ड)—a native of Spain. स्पेन देशाचा रहिवासी.

Spăn'iel, *n.* (स्पॅन्येल्)—kinds of large-eared long-haired dog; (fig.) fawning or cringing person. मोठ्या कानाचा केसाळ कुत्रा; लाळघोट्या, पुढें पुढें करणारा.

Spăn'ish, *a.* & *n.* (स्पॅनिश)—of Spain or the Spaniards or their language. स्पेन देशांतील, स्पेन देशांतील लोकांचा, त्यांच्या भाषेचा. *n.* स्पॅनिश भाषा. *S. Armada,* (hist.) स्पेनचें (अजिंक्य) आरमार. *S. fly,* पलिस्तराचा किडा, स्फोटमक्षिका (हे किडे मद्यार्कामध्यें बुडवून वाळवतात व मग पलिस्ताराचे कामीं उपयोजितात). *S. wind-lass,* दोर किंवा पट्टी घट्ट आवळण्याकरितां योजिलेली लांकडी तरफ,-खुंटी. S. main, (hist.) N. E. coast of S. America, with the adjoining sea. दक्षिण अमेरिकेचा ईशान्य किनारा. व लगतचा समुद्र.

Spănk, *v. t.* & *i.* (स्पँक्)—to slap with the hand; go at a great pace. (ढुंगणावर) थापट मारणें; दामटणें, पिटाळणें, दौडणें. *n.* a slap. थापट, चापट. *Span'ker, n.* (esp.) a fast horse, or fine specimen of something; fore-and-aft suit on mizzen mast. जलद पळणारा घोडा; उत्कृष्ट नमुना; मागच्या डोलकाठीवरील शीड. *Spank'ing, a* excellent. उत्कृष्ट, सर्वोत्तम, फार.

Spăn'less, *a.* (स्पॅन् लिस्)—beyond measure (poet.). अगणित, विशाल.

Spăn'ner, *n.* (स्पॅनर)—a gripping-tool for working nuts &c., a wrench. स्क्रू घट्ट पिळण्याची गावी, पकड, पाना.

Spär, *n.* (स्पार्)—a stout pole; kinds of crystalline mineral. वांसा, सोटा, डोलकाठी; खनिज द्रव्याचा पैलूदार खडा.

Spär, *v. i.* (स्पार्)—to box; strike out with the spurs; (fig.) engage in banter or repartee. मुष्टियुद्ध खेळणें, हातापिटी चालविणें; (कोंबड्यांचें) चोंचा मारून झुंजणें; भांडणें, तोंड सोडणें. *n.* a sparring motion, boxing match; cock-fight. हातपिटी, मुष्टियुद्ध; कोंबड्यांची झुंज.

Spāre, *v. t.* & *i.* (स्पेअर्)—to abstain from hurting or destroying, be frugal or grudging of; to let off, to dispense with; to find (time, &c.); to let a person have (a thing, &c.) out of one's superfluity; be frugal; abstain from inflicting. दया दाखवणें, वांचवणें, काटकसर करणें, कमताई करणें; गरज करणें; सुखाने देणें, गैरसोय न होतां देणें; (वेळ) सांपडणें; वांट्याला येणें; दुसऱ्याला (शिलकींतून) देतां येणें,-देणें,-देऊं शकणें; काटकसर करणें, शिल्लक ठेवणें; माफ करणें, क्षमा करणें. *a.* superfluous; kept in reserve; frugal; lean. फालतू, अधिक; शिलकी; अपुरा; थोडा, बेताचा; कृश, रोड. *n.* a spare part for substitution in machine. (शिलकी) सुटा भाग. *S. the rod and spoil the child,* 'छडी लागे छम छम, विद्या येई घम घम.' *S. me,* माझा जीव घेऊं नको, मला मारूं नको. *S. diet,* अल्प आहार. *S. time,* फुरसतीचा वेळ. *A s. cap,* जादा टोपी. *A s. room,* bed-room for visitor. पाहुण्यांची निजावयाची (वेगळी-जादा-) खोली. *S. rib,* कमी मांस चिकटलेलीं डुकराचीं बरगडीचीं हाडें. *Spare'ly, adv.* काटकसरीनें, कमताईनें. *Spare'ness, n.* रोडपणा, कृशता. *Sparingly, adv.* हात राखून. *Sparingness, n.*

Spärk, *n.* (स्पार्क)—fiery particle of burning substance; a small bright object or point; (e. g. in gem); (*fig.*) brilliant emanation of wit etc.; (Electr.) flash of light between two neighbouring electric conductors; a gay young fellow. विस्तवाची ठिणगी, तेजोकण; तेज, चमक, पाणी; चातुर्याची-बुद्धीची-चमक; विद्युत्-स्फुलिंग, विजेची ठिणगी; नखरेबाज मनुष्य, रंगेल प्राणी, प्रणयी. *v. i.* & *t.* to emit sparks; apply electric spark to, ignite or affect thus; play the gallant. ठिणग्या निघणें,-पाडणें; विद्युत्स्फुलिंग लावणें, विजेच्या ठिणगीनें पेटणें; विद्युत्स्फुलिंग निघणें; रंगेल बनणें, प्रणयचेष्टा करणें. *As the ss. fly upward,* with the certainty of a law of nature. निसर्गनियमाप्रमाणें (खात्रीलायक), निश्चित निसर्ग-नियमानुसार. *A s. of generosity,* औदार्याचा कण, -लवलेश. *Sparks,* (nickname for) a wireless operator. बिनतारी संदेश पाठविणारा. *Fairy ss.,* कुजलेल्या वनस्पतींपासून निघणारे फॉस्फरस-स्फुलिंग, -ठिणग्या, प्रकाश. *Spark'ing-plug,* a device for firing explosive mixture in motor-engine. (स्वयंप्रेरितयंत्रांतील) विद्युत्स्फुलिंगोत्पादक खुंटी,-दट्ट्या, -साधन. *Spark'less, a.; Spark'let, n.; Spark'ish a.* रंगेल, प्रणयी.

Spär'kle, *v. t.* (स्पा'र्कल्)—to seem to emit sparks; to be bright with shifting points of light, (of gem, *fig.* of wits) glitter, glisten. ठिणग्या निघणें; ठिणग्या टाकणें,-ओकणें; लुकलुकणें, लिकलिकणें; चमकणें, तकतकणें, चमक असणें. *n.* spark, sparkling, gleam. लहान ठिणगी, तेजःकण, चकाकी, तेज, चमक, लकलकाट. *Sparkling wines,* फसफसणारीं-बुडबुडे येणारी,-दारू. *Spark'ler, n.; Spark'lingly, adv.; Spark'let, n.* a small spark; least possible amount *of* a quality. लहान ठिणगी,-स्फुलिंग; चा अत्यल्पांश.

Spă'rrow, *n.* (स्पॅ'रो)—a small bird haunting houses. चिमणी; चिमणा. *Cock s.,* चिमणा. *Hen s.,* चिमणी. *S.-hawk,* लहान बहिरी ससाणा.

Spärse, *a.* (स्पार्स)—(of population etc.) thinly scattered; (Bot., Zool.) placed, occurring, at irregular intervals. पातळ, तुरळक; विरलस्थ, तुरळक होणारा, अंतरावर होणारा. *Sparse'ly, adv.* तुरळकपणें, दूर दूर. *Sparse'ness, n.* तुरळकपणा, विरळपणा.

Spärt'an, *a.* & *n.* (स्पा'र्टन्)—(a native) of Sparta. ग्रीसमधील स्पार्टाचा (रहिवासी), स्पार्टन लोकांप्रमाणें निर्भय, शूर, साधा इ०

**Spa'sm,** *n.* (स्पॅझम्)—convulsive muscular contraction; violent excess of emotion. स्नायूचें आकुंचन, पेटका, वेग; झटका, लहर,

**Spasmod'ic,** *a.* (स्पॅझमॉ'डिक्)—sudden and violent; intermittent. झटक्यांनीं येणारा; पेटक्यांचा, मधून मधून येणारा,-उसळी मारणारा.-*ally, adv.*

**Spa'stic,** *a.* (स्पॅ'स्टिक्)—*S. paralysis,* (med.) (पायांवरून वारा गेल्यामुळें किंवा पायांच्या स्नायूंवर ताबा न राहिल्यामुळें) झोंका इकडे तिकडे जाणें.

**Spat,** *n.* (स्पॅट्)—spawn of shell fish. कालवाच्या जातीच्या माशांचीं अंडीं,-पीण. *v. i. & t.* (माशाचीं) अंडीं घालणें,-टाकणें. 2. (abbr. of *spatterdash*) लहान पायबंद.

**Spat,** *pa. t.* of Spit.

**Spatch'cock,** *n.* (स्पॅ'च्कॉक्)—a fowl killed and cooked in a hurry. ठार मारून घाईघाईनें शिजविलेलें कोंबडें. *v. t.* to cook thus; insert (item of news etc.) in middle of something. घाईघाईनें (शिजविणें); (बातमी वगैरे) मध्येंच घुसडविणें.

**Spate,** *n.* (स्पेट्)—a sudden river flood (esp. *river is in s.*), नदीला आलेला आकस्मिक

**Spate,** *n.* (स्पेट्)—(bot.) नारळाची किंवा सुपारीची पोय.

**Spa'tial,** *a.* (स्पे'शल्)—of or in or relating to space. स्थलाचा, देशिक, मर्यादेचा. *S. relation,* देशिक संबंध. *Spatial'ity, n.* देशिकता. *Spa'tially, adv.*

**Spatt'er,** *v. t. & i.* (स्पॅ'टर्)—to fly or send (mud, &c.) flying in drops or splashes. splash (person) thus, besprinkle. शिंतोडे उडविणें, शिंपडून डाग पाडणें, शिंतोडे,-ठिपके,-पडणें. *n.* splattering, splash, pattering. शिंतोडे टाकणें, -उडवणें, शिंतोडा, टप् टप् आवाज. *S.-dash,* (now usu. *spat*) a gaiter. पदबंध. *S.-dock,* (U. S.) the yellow water-lily. पिंवळें कमळ.

**Spat'ula,** *n.* (स्पॅ'टच्युला)—an instrument with edgeless blade for working pigments, etc.; surgeon's instrument for pressing tongue down or to one side. (रंग, मलमाचीं औषधें वगैरे मिसळण्याच्या कामाची) बोंथट सुरी; जीभ खालीं किंवा बाजूला दाबून धरण्याचें हत्यार.

**Spat'ule,** *n.* (स्पॅ'टच्यूल्)—(Zool.) broad racket-shaped formation or part, esp. end of bird's tail-feather. पक्ष्याच्या शेंपटीच्या पिसाऱ्याचें रुंदट टोंक,-भाग. *Spat'ular,-tulate,-tuliform, aa.*

**Spav'in,** *n.* (स्पॅ'व्हिन्)—kind of tumour on horse's leg causing lameness. घोड्याच्या पायावरचें वारूळ.-*ed, a.*

**Spawn,** *n.* (स्पॉन्)—eggs of fish, frogs, molluscs, &c. when ejected; (contempt.) progeny; white fibrous matter from which fungi are produced. मासे, बेडूक वगैरे प्राण्यांचीं अंडीं; पोरें, संतति; (अळंबी जातींतील) नग्न बीज. *v. t. & i.* अंडीं घालणें, जन्म देणें, उत्पन्न होणें.

**Spay,** *v. t.* (स्पे)—to castrate, remove ovaries of (female animal). (जनावरांतील मादीचा) अंडाशय काढून टाकणें.

**Speak,** *v. i. & t.* (स्पीक्)—(*Spoke,* arch. *Spake; Spoken*), to utter words in the ordinary way, say something; hold conversation (*with, to,* person, *of, about,* thing); deliver speech; utter (words); make known thus; use (a language) in speaking; hail and hold communication with (a ship); show (person) to be (so-and-so); be evidence of; (of fact) be significant; (of dog) bark when ordered; (*fig.*) sound; (*p. p.;* as stage direction) to be said, not sung. बोलणें; बोलून दाखविणें; बोलणें, संभाषण करणें, चर्चा वाद-विवाद-करणें; (जाहीर-प्रकट) भाषण करणें; (शब्द) उच्चारणें,-काढणें; बोलून वर्णन-उल्लेख,-करणें; (भाषा) बोलतां येणें, (भाषेंत) बोलणें, समजणें; जहाजाच्या कप्तानाशीं खुणांनीं बोलणें; दर्शविणें, सुचविणें; चा पुरावा असणें; सूचक,-दर्शक,-असणें; (हुकमाप्रमाणें) भुंकणें; वाजणें, फुंकणें; बोलून दाखविण्याचा (नाटकांतील भाग). *The portrait speaks,* is life-like. तसबीर अगदीं हुबेहूब (उतरली) आहे. *S one's mind,* मनांतले विचार स्पष्टपणें बोलून दाखविणें. *He cannot s. French,* त्याला फ्रेंच भाषा बोलतां येत (समजत) नाहीं. *Strictly speaking,* खरें बोलायचें म्हणजे, तसेंच म्हटलें तर. *So to s,* if I may use such an expression. असें म्हणतां आलें तर. *To s. volumes,* (*for*), चा भक्कम पुरावा देणें,-साक्ष देणें. *To s.* (*person*) *fair,* सौम्य -सभ्य-शब्द वापरणें. *S. for,* च्या वतीनें बोलणें; च्या भावना दर्शविणें. *S. of,* (चें) नांव घेणें, (चा) उल्लेख करणें. *Nothing to s. of,* सांगण्याजोगें कांहीं नाहीं, तथ्यांश-वस्तुतः-कांहीं नाहीं. *S. out, S. up.,* स्पष्ट बोलून दाखविणें, मोठ्यानें बोलणें. *S. to,* (शीं) बोलणें; ची साक्ष देणें, (च्या संबंधीं) विवेचन करणें. *S. up,* (*out*), मोठ्यानें बोलणें. *S. without book,* give facts from memory. (स्मरणशक्तीच्या बळावर) तोंडी कथन करणें. *Speak'easy, n.* (U. S.) an illicit bar. चोरटें दारू -दुकान.

**Speak'er,** *n.* (स्पी'कर्)—one who speaks, (esp.) person of specified skill in speech-making; official president of House of Commons. वक्ता; लोकसभेचा अध्यक्ष, इंग्लंडमधील कॉमन्ससभेचा अध्यक्ष. *-ship, n.*

**Speak'ies,** *n. pl.* (स्पी'कीज्)—(sl.) acted plays as opp. *Movies.* नाटकें (रंगभूमीवर नटांनीं केलेलीं).

**Speak'ing,** *n.* (स्पी'किंग्)—In vbl. senses; *S. acquaintance,* बोलणें चालणें, तोंडओळख. *Not on s. terms,* अबोला आहे, बोलणें चालणें नाहीं. *S. trumpet,* दूरध्वनिक्षेपक कर्णा. *S. tube,* एका खोलींतून दुसऱ्या खोलींत बोलण्याची नळी, संभाषणनलिका.

**Spear,** *n.* (स्पिअर्)—hunter's or foot-soldier's thrusting or hurling long pointed weapon; (poet.) a spear-man; sharp-pointed instrument for stabbing fish etc. भाला, बरची; भालेकरी,

भालाईत; तीक्ष्ण धारेचें शास्त्र. *v. t. & i.* to pierce or wound with spear; shoot into a long stem. भाल्यानें भोंसकणें,-टोंचणें,-जखमी करणें; लांब देठ, -दांडा-येणें. *S.-man,* भालेकरी, भालाईत, बरचीवाला (सैनिक). *S.-mint,* common garden mint. पुदिना (वनस्पति). *S.* side, पुलाकडचा वंश.

Spĕc, *n.* (स्पेक्)—(colloq.) speculation. सट्टा, अंदाजी धाडशी व्यवहार.

Spĕ'cial, *a.* (स्पे'शल)—of a peculiar or restricted kind; of or for a particular person, purpose, occasion or thing; (also *especial*) exceptional amount, degree, etc. विशेष; विशिष्ट, खास, विवक्षित, मुद्दाम केलेला,-नेमलेला; विशिष्ट, मनस्वी. *n.* a special edition, train, constable, etc. खास अंक,-आवृत्ति, यधारी, खास गाडी, मुद्दाम नेमलेला मनुष्य. *S. anatomy,* विशिष्ट (अवयवांचें) शारीर (शास्त्र). S. *hospital,* विशष्ट रोगांचें रुग्णालय. *S. agents,* खास प्रतिनिधि -मुनीम,-कारभारी. *S. case,* written statement of facts submitted by litigants to court; exceptional case. कोर्टापुढील लेखी कैफियत; अपवादात्मक गोष्ट. *S. constable,* a private person sworn in to assist in maintaining public peace in case of riot etc. जादा अधिकारी. *S. edition,* वर्तमानपत्राची जादा आवृत्ति, खास अंक. *S. pleading,* (Law) (प्रतिपक्षाचे मुद्दे खोडून न काढतां) विशिष्ट-जादा-मुद्दे पुढें आणणें, नवीन मुद्दे पुढें मांडणें; (pop.) अघळपघळ परंतु अप्रशस्त मुद्दा, सत्यान्वेषणापेक्षां बोलणाऱ्याच्या म्हणण्याला दुजोरा देणें. *S. train,* खास आगगाडी (विशिष्ट कारणाकरितां). *Spe'cially, adv.* विशेषेंकरून, मुख्यतः, मुद्दाम, मुद्दाम.

Spĕ'cialist, *n.* (स्पे'शलिस्ट)—person devoting himself to a single branch of his profession or subject. विद्येच्या एखाद्या विशिष्ट शाखेंत प्रवीण, विशेष व्यासंगी, तज्ज्ञ, पंडित. *Spe'cialism, n.* विशिष्ट व्यासंग, तज्ज्ञता, तरबेजपणा. *Specialis'tic, a.*

Spĕciăl'ity̆, *n.* (स्पेशिॲ'लिटि)—special characteristic, specialness; distinctive quality. वैशिष्ट्य, विशेष काम, विशेष गुण.

Spĕ'cialize, *v. t. & i.* (स्पे'शलाइझ्)-to make special; to be a specialist; adopt for a particular purpose. विशिष्ट करणें, विशिष्टरूप देणें; तज्ज्ञ होणें, चा विशेष व्यासंग करणें; विशिष्टीकरण करणें, विशिष्ट कार्याकडे लावणें. *Specializa'tion, n.* विशिष्टीकरण; विशिष्टीभवन; विशेष व्यासंग.

Spĕ'cialty̆, *n.* (स्पे'शल्टि)—(Law) sealed contract, instrument under seal; a speciality. कायदेशीर करार; आवडता धंदा, आवडीचा विषय, विशेष माल.

Spē'cie, *n.* (स्पी'शिई, स्पी'शी)—money in the shape of coin, metallic money. रोकड पैसा, नाणें, नगदी ऐवज, सोनेंनाणें.

Spē'ciēs, *n.* (स्पी'शिईझ्,-शीझ्)—(Logic) a class of things having some common characteristics; a subdivision of a genus; a sort, kind, variety; form, shape. उपजाति, जाति, जात; पोटजाति, वर्ग; प्रकार, जाति; आकार.

Spĕcĭf'ic, *a.* (स्पिसि'फिक्)—definite, distinctly formulated; possessing, concerned with, the properties that characterize a species; peculiar; relating to a particular subject. ठाम, निश्चित, विशिष्ट प्रकारचा, ठराविक उपजातिवाचक; विशिष्ट; विशिष्ट-विषयाचा,-बाबीचा. *n.* a specific or infallible remedy. रामबाण औषध,-इलाज. *S. gravity,* विशिष्ट गुरुत्व. *S. heat,* विशिष्ट उष्णता. *S. weight,* विशिष्ट भार. *S. cause,* producing a particular form of disease. विशिष्टरोगकारण. *S. medicine,* रामबाण औषध, हटकून गुणकारी इलाज,-औषध. *Specifi'cally, adv.* विशेषत:, हटकून. *Specifi'city, Specifi'cness, nn.*

Spĕcĭfica'tion, *n.* (स्पेसिफिके'शन्)—specifying; any or all of the details specified in a contract or patent; (Law) working up of materials into a new product not held to be the property of the owner of the materials. तपशीलवार लिहिणें, -बोलणें,-सांगणें; खुलासेवार टांचण, (खास हक्क घेणारानें दिलेलें) नवीन पेटंटचें वर्णन; अविवादिक अशा नवीन वस्तूची निपज,-वस्तु बनविणें.

Spĕ'cify̆, *v. t.* (स्पे'सिफाय्)—to make specific or definite, to state precisely; to mention expressly; to give the name of. तपशीलवार सांगणें; विशेष वर्णन करणें; विशेष नामनिर्देश करणें. *Spe'cified, pa. t. & pa. p.: a.* विशिष्ट, खास, खुलासेवार सांगितलेला. *Spe'cifiable, a.*

Spĕ'cimĕn, *n.* (स्पे'सिमिन्)—an individual animal, or plant or piece of a mineral etc. used for scientific examination; a sample; (colloq. contempt.) (*what a s.*) a person. नमुना, मासला; बानगी; मनुष्य, प्राणी. *Specimens of copper ore,* अशुद्ध ताम्र-धातूचे नमुने. *S. page,* नमुन्याचें पान.

Spēciol'ogy, *n.* (स्पीशिऑ'लाजि)—science of species. उपजात्युद्गमशास्त्र.*-logical, a.*

Spē'cious, *a.* (स्पी'शस्)—fair-seeming; plausible, colourable. दिसण्यांत चांगला; दिखाऊ, वरवडीचा, वरपांगी, सत्याभासाचा. *S. argument, tale, appearance,* (दिसण्यांत खरें)-लाघवी भाषण, खरी भासणारी गोष्ट, वरपांगी देखावा.*-ly, adv.* दिखाऊपणानें, सत्याभासपूर्वक.*-ness, n., Speciosity, n.*

Spĕck, *n.* (स्पेक्)—a small spot or stain or particle, a blemish, a flaw. ठिपका, डाग, चिन्ह, लासें, (डोळ्यांतील) फूल, डाग, व्यंग. *v. t.* to mark with specks. वर डाग पाडणें. *Specked, pa. p.* डाग पडलेला; ठिपक्यांचा. *Seckless, a.*

Spĕ'ck, *n.* (स्पे'क्)—(U. S. & S. Afr.) fat meat, bacon, pork; fat of seals, etc. मांस; (माशांची) चरबी.

Spĕc'kle, *n.* (स्पे'कल्)—a small spot esp. as natural marking on skin, &c. (कातडीवरील) ठिपका, डाग, ठिके. *v. t.* to mark thus. ठिपके पाडणें, चित्रविचित्र,-ठिपकेदार,-करणें. *Speckled, pa. p.* ठिपकेदार, चित्रविचित्र.

**Spĕcs**, *n. pl.* (स्पेक्स्)—(colloq.) pair of spectacles. चष्मा, उपनेत्र.

**Spĕc'tacle**, *n.* (स्पे'क्टकल्)—a public show or noteworthy scene; (*pl.*) pair of lenses to correct or assist defective eyesight (set in a frame). अपूर्व देखावा, अपूर्व गोष्ट, तमाशा, खेळ, प्रदर्शन, देखावा; (अने०) चष्मा, उपनेत्र, आरशी, चाळशी. *Sure to make a s. of himself*, स्वतःचें प्रदर्शन –स्वतःची शोभा–खात्रीनें करून घेईल. *A pair of ss.*, चष्मा. *To see everything through rose-coloured ss.*, take a cheerful view. आशाजनक अनुमान काढणें,–बांधणें. (Crick.) *pair of ss.*, दोन पूज्यें, –भोपळे–(धांवा). *Spec'tacled*, *a.* चष्मा लावलेला, –लावणारा; चष्म्यासारखे ठिपके असलेला. *S. bear*, द. अमेरिकेंतील आस्वल.

**Spĕctăc'ūlar**, *a.* (स्पेक्टॅ'क्युलर्)—of the nature of a show. मौजेचा, पाहण्यालायक, थाटामाटाचा.*-ly, adv.*

**Spĕctā'tor**, *n.* (स्पेक्टे'टर्)—a looker-on; a person present at a performance, an eye-witness. (मौज) पाहणारा, प्रेक्षक, तमासगीर, बघ्या, साक्षी. *The s.*, वर्तमानपत्राचें नांव. *Spectatress, n. f.* स्त्री प्रेक्षक.

**Spĕc'tral**, *a.* (स्पे'क्ट्रल्)—ghost-like; unreal; of the spectrum. भुतासारखा, भुताचा, समंधाचा; असत्य; विच्छिन्नकिरणासंबंधीं, वर्णपटदर्शकासंबंधीं. *-trally, adv.*

**Spĕc'tre**, *n.* (स्पे'क्टर्)—a ghost; fear of an expected calamity. भूत, समंध, पिशाच, छाया; पुढें येणाऱ्या संकटाबद्दल भीति,–धास्ती. *S. bat, lemur*, किडकिडीत वाघूळ, माकड, इ. *S. of the Brocken*, पर्वतशिखरावरील धुक्यावर पडलेली प्रेक्षकाची भव्य छाया.

**Spectro-**, (स्पेक्ट्रो–)—in comb., Spectrum, *Spectrograph*, वर्णपटलेख, विच्छिन्नकिरणलेख. *Spectrology*, किरणद्वारा पृथक्करण प्रकरण. *Spectrom'eter*, वर्णपटमापक, विच्छिन्नकिरणमापक,–यंत्र. *Spec'troscope, n.* विच्छिन्नकिरणदर्शक; रक्ताची परीक्षा करण्याचें यंत्र; *-co'pic, a.* विच्छिन्नकिरणदर्शकाचा,–दर्शकानें दाखविलेला.

**Spĕc'trum**, *n.* (स्पे'क्ट्रम्)—(pl.*-ra*) the image of something seen continuing when the eyes are closed or turned away; the coloured bond into which a beam of light is decomposed. डोळे मिटले किंवा बाजूला वळविले असतां चालू राहिलेली दृष्टीपुढील छाया, प्रतिकृति; विच्छिन्न किरण, वर्णपट. *S.* (or *spectral*) *analysis*, वर्णपटात्मक पृथक्करण, विच्छिन्नकिरणद्वारा पृथक्करण.

**Spĕc'ūlar**, *a.* (स्पे'क्युलर्)—of the nature of a speculum, reflecting. आरशासारखा बिंबग्राही, परावर्तक. *S. surface*, आरशाप्रमाणें प्रतिबिंब पडणारा पृष्ठभाग.

**Spĕc'ūlāte**, *v. i. & t.* (स्पे'क्युलेट्)—to indulge in thought of a conjectural theoretical kind; to buy and sell stocks or goods in the hope of profiting by changes in market value, to deal in transactions of a risky kind. एखाद्या गोष्टीचा विचार किंवा तर्क करीत बसणें, कल्पना चालवणें, तर्क बांधणें, उपपत्ति लावणें; सट्टा करणें, साटें ठरविणें, सट्टेबाजी करणें, जुगार खेळणें.*-tion, n.* अनुमान करणें, उपपत्ति लावणें; अनुमान, तर्क, कल्पना, अंदाज; सट्टा, जुगार; साटें.*-tor, n.* उपपत्ति बसविणारा, अनुमानें काढणारा; जुगाऱ्या, सट्टेबाज.*-tive, a.* कल्पना करीत बसणारा; केवळ सिद्धांतात्मक, तात्त्विक; अव्यवहार्य; सट्ट्याचा, सट्टेबाजीचा;*-tively, adv.;-tiveness, n.*

**Spĕc'ūlum**, *n.* (स्पे'क्युलम्)—(*pl.*-la) (surg.) an instrument for dilating orifices to facilitate examination; a mirror used for some scientific purposes. शरीराचे भाग तपासण्याचें एक प्रकारचें यंत्र, ईक्षणयंत्र; शास्त्रीय उपकरणाचा आरसा. *S. metal*, (तांबें आणि कथिल) यांच्या मिश्रणापासून केलेली) आरसा करण्याची धातु.

**Sped**, *pa. t. & pa. p.* of Speed.

**Speech**, *n.* (स्पीच्)—faculty of speaking; a spoken remark, thing said; particular language (of a nation); public address; sounding quality of organ-pipe *etc.* वाणी, वाचा, वाचाशक्ति; बोलणें, भाषण, विचार, शब्द; (देश-) भाषा, बोली; जाहीर भाषण; नादकारकता, नाद. *A set s.*, आगाऊ तयारी करून केलेलें भाषण. *To make a s.*, भाषण करणें. *King's* or *Queen's s.*, *s. from the throne*, आपण स्वतः किंवा प्रतिनिधीमार्फत, पार्लमेंटच्या (लोकसभेच्या) पहिल्या बैठकीच्या वेळीं राजाचें किंवा राणीचें भाषण. *Figure of s.*, अलंकार. *Parts of s.*, व्याकरण दृष्ट्या शब्दांच्या जाति (नाम, सर्वनाम, इ.). *S. reading*, ओठांच्या हालचालीवरून बहिऱ्यामुक्यांना होणारा अर्थबोध. *S. day*, annual day for delivering prizes in schools usu. marked by recitations *etc.* शाळेचा वार्षिक बक्षिससमारंभ.

**Speech'ify**, *v. t.* (स्पी'चिफाय्)—(contempt.) to make speeches; hold forth oratorically in conversation. लांबलचक भाषण करणें; वक्तृत्व दाखविणें.*-fica'tion, n.* लांबलचक,–जाहीर,–भाषण करणारा, वक्ता.

**Speech'lĕss**, *a.* (स्पी'च्लिस्)—dumb; temporarily deprived of speech by emotion etc.; (*sl.*) dead drunk. मुका, मोना; स्तब्ध, कुंठितवाक्, बोलवेनासा झालेला; खूप दारू प्यालेला, झिंगलेला.

**Speed**, *n.* (स्पीड्)—dispatch, rapidity of movement; relative pace of motion or action; (arch.) success, prosperity. त्वरा, जलदी; वेग, गति; यश, भरभराट, सुदैव. *v. i. & t.* (*sped*), to go fast; smooth the way of; give prosperity or success to; send fast; (*pa. t. & pa. p. speeded*) to regulate speed of (engine etc.); cause to go at fixed speed. जोरानें जाणें,–चालणें; सुलभ करणें; ला यश किंवा हात देणें; वेगानें सोडणें; ची गति कमीजास्त करणें; ठराविक गतीनें चालविणें. *At full s.*, भरधांव, अतिवेगानें. *To s. up*, cause to work at greater

s. अधिक वेगानें चालविणें. *Speed'er, n.* (यंत्राची) गति कमी जास्त करण्याची कळ, गतीची चावी.

**Speedŏm'eter,** *n.* (स्पीडॉ'मिटर्)—speed-indicator in a motor-car etc. (मोटरगाडींतील) गतिमापक घड्याळ.

**Speed'-trap,** *n.* (स्पी'ड्ट्रॅप्)—a trap to catch speeding motorists. भरधांव मोटारहांकणारांना पकडण्याचें साधन.

**Speed'way,** *n.* (स्पी'ड्वे)—course for fast driving of horses, or motorcars. (घोडे किंवा मोटारी) भरधांव चालविण्याचा रस्ता.

**Speed'well,** *n.* (स्पी'ड्वेल्)—a blue-flowered plant. निळ्या फुलांचें फुलझाड.

**Speed'ў,** *a.* (स्पी'डि)—prompt, expeditious, quick in performance; quick. त्वरित; चपल, वेगवान; तात्कालिक, तत्पर.*-ily, adv.*;*-iness, n.*

**Spēlae'an,** *a.* (स्पीलि'अन्)—of, dwelling in, caves गुहांचा, गुहांमध्यें राहणारा, विवरस्थ.

**Spĕll,** *n.* (स्पेल्)—words used as charm; fascination exercised by person or thing; turn of work; time devoted to or taken by something; (Austral.) a period of rest from work etc. मंत्र; जादू, मोहनी, आकर्षक शक्ति; पाळी, खेप; अवधि, क्षण, वेळ; विश्रांतीचा काळ, सुटी. *v. t. & i.* to write or name the letters of (a word), to read with difficulty, spell words correctly; (of letters) make up or form (word); (*fig.*) have as necessary result, involve. (शब्दाचें) वर्ण लिहिणें,-उच्चारणें, अडखळत वाचणें; वर्ण बरोबर सांगणें; शब्द होणें,-बनणें; (अंत) शेवट होणें, परिणाम होणें, भोगावें लागणें. *Under a s.*, mastered by or as by a s. मंत्र-मुग्ध. *Spell'binder,* (U. S.) a political speaker who can hold audiences spell-bound. (श्रोत्यांना वाक्प्रभावानें) भारून टाकणारा वक्ता. *To s. out* or *over,* एक एक अक्षर लावून अडखळत वाचणें. *To s. backward,* उलटें लिहिणें,-वाचणें; (*fig.*) अर्थविपर्यास करणें, भलताच अर्थ करणें. *These changes s. ruin to the farmer,* ह्या फरकांमुळें शेतकरी ठार बुडणार (पुरा नाश पावणार) सें दिसतें. *Spelt, Spelled, pa. t. & pa. p.*

**Spĕll'bound,** *a.* (स्पे'ल्-बाउन्ड्)—held with attention as by a spell. जादूनें भारल्याप्रमाणें असलेला, भारलेला; स्तब्ध, तटस्थ.

**Spĕll'ing,** *n.* (स्पे'लिंग्)—In vbl. senses. वर्णरचना. *S. bee,* शब्दाच्या वर्णरचनेनें,-ची चढाओढ. *S.-book,* वर्णरचना-शिक्षिका.

**Spelt,** (स्पेल्ट्)—*pa. t. & pa. p.* of Spell. 2. German wheat. जर्मन गहूं.

**Spĕl'ter,** *n.* (स्पे'ल्टर्)—zinc. जस्त.

**Spĕn'cer,** *n.* (स्पे'न्सर्)—short over-coat. बंडी.

**Spen'cerism,** *n.* (स्पे'न्सरिझम्)—doctrine of Herbert Spencer referring the ordererd universe to the necessary laws of mechanics, synthetic philosophy. (हर्बर्ट स्पेन्सरचा) यांत्रिकपरिणामवाद (जगाची सुव्यवस्थित रचना यांत्रिक नियमानुसारी आहे हा सिद्धांत.)

**Spent,** *pa. t. & pa. p.* of Spend.

**Spĕnd,** *v. t. & i.* (स्पेन्ड्)—(*spent*), to pay out (money), to expend or use up; exhaust, wear out; (Naut.) lose (mast); emit spawn; be consumed; to pass in some place or occupation. खर्चणें, वेंचणें, दवडणें, घालवणें; शांत करणें,-होणें, निरवणें, निवणें; (होलकाठी) मोडणें; अंडीं टाकणें,-घालणें; पडून जाणें, खपणें, सरणें. *Spent, pa. p.* exhausted. खर्चलेला, खपलेला; शिणलेला, भागलेला. *Spend'able a.*; *Spend'er, n.*

**Spĕnd'thrift,** *n.* (स्पे'न्ड्-थ्रिफ्ट्)—a person who wastes his money. उधळ्या, उधळपट्टी करणारा, दिवाळखोर.

**Sperm,** *n.* (स्पर्म्)—semen, seminal fluid. वीर्य, बीज, शुक्र, रेत. *S.-cell,* शुक्रगोलक,-कण,-बिन्दु *S. whale,* a whale yielding spermaceti. डोस्क्यांत पांढऱ्या चरबीसारखा पदार्थ असणारा व्हेल,-देवमासा.

**Spermacē'tĭ,** *n.* (स्पर्मसी'टि)—white brittle fatty substance got from head of sperm-whale. (एक जातीच्या) व्हेल (देव) माशाच्या डोक्यांतील चरबीसारखा पांढरा ठिसूळ पदार्थ.

**Spermăt'ic,** *a.* (स्पर्मॅ'टिक्)—of sperm. वीर्याचा, बीजाचा, रेताचा, शुक्रकर, बीजासंबंधाचा.

**Spermat'o-,** (स्पर्मॅ'टो-)—in comb. & sperm. शुक्र-, वीर्य-. *Spermatogen'esis, n.* शुक्रजन्तूत्पत्ति. *Spermatorrhoe'a,* (-रिआ), involuntary spermatic emission. नकळत वीर्यस्खलन,-वीर्यस्राव. *Spermatozo'on,* (pl.-zoa), fertilizing filament in semen. शुक्रजन्तु, रेतांतील जन्तु.

**Spew, Spue,** *v. t. & i.* (स्प्यू-(vulg.) to vomit; (of gun) droop at muzzle from too quick firing. ओकणें, वांति करणें,-होणें; (बंदूक) तोंडाजवळ वांकणें.

**Sphăg'num,** *n.* (स्फॅ'ग्नम्)—(pl.-*na.*) (Bot. kinds of moss growing in bogs and peat, used as packing, etc. (दलदलीच्या भागांत वाढणारें) एक प्रकारचें शेवाळी गवत,-रान.

**Sphē'noid,** *a. & n.* (स्फी'नाइड्)—(anat.) wedge -shaped (*bone*), compound bone at base of skull. शीर्षतलास्थि.*-al, a.* [Gk *sphen,* wedge]

**Sphere,** *n.* (स्फिअर्)—a solid figure having all points of its surface equidistant from a point within it; ball, globe; a globular body; field of action or province or scope; (poet.) the heavens, the sky. गोल, मंडळ, वर्तुळ, चेंडु, चेंडूच्या आकाराची वस्तु, गोल, ग्रह; प्रांत, कामाचा टप्पा, आटोका, अधिकार; आकाश. *v. t.* to enclose as in sphere, make s.-shaped; (poet.) exalt to the celestial s. वेढणें, वेष्टणें; गोलाकार करणें; स्वर्गीय स्थान देणें. *Music of the ss.*

ग्रहसंगीत. *Celestial s.,* surface on which heavenly bodies appear to lie. खगोल. *Sphe'rule, n.* small sphere (poet.). लहान गोल. *Spher'y, a.*

**Sphe̐'rical,** *a.* (स्फे'रिकल्)—sphere-shaped; of spheres. गोलाकार; गोलघनक्षेत्राचा, गोल.

**Sphe̅r'oid,** *n.* (स्फि'अराइड्)—body of approximately spherical shape. चपटा गोल, गोलभाव वस्तु. *Oblate s.,* प्रथमाण्ड-चापट-गोल. *Oblong-prolate -s.,* द्वितीयाण्ड-चसकट-गोल. *Spheroid'al, a.* अंडाकार.

**Sphinc'ter,** *n.* (स्फिं'क्टर्)—ring-muscle of orifice. स्नायूचा वाटोळा बंद.

**Sphinx,** *n.* (स्फिंक्स)—figure of couching lion with woman's head; (Gk-myth.) a winged monster; enigmatic person. स्त्रीचें डोकें असलेल्या सिंहाची आकृति; अशा आकृतीचा (ग्रीक पुराणांतील) राक्षस,; कोडें (मनुष्य).

**Spice,** *n.* (स्पाइस)—aromatic or pungent vegetable substance used as flavouring; spices collectively; (*fig.*) smack, flavour (*of*). मसाला; मसाले; चुणूक, वास. *v. t.* to flavour s. or wit, etc. मसाला घालणें, खमंग चुरचुरीत करणें.

**Spi'cery,** *n.* (स्पा'इसरि)—spices; aromatic scents. निरनिराळे मसाले,-मसाल्याचे जिन्नस; सुगंधी पदार्थ.

**Spick and span,** *a.* (स्पिक्'ॲन्ड् स्पॅन्)—trim, smart, brand new. तरतरीत, कोरा, अगदीं नवा.

**Spi'cule,** *n,* (स्पि'क्यूल्)—a small sharp-pointed body; (Zool.) small hard body, esp. in famework of sponge; (Bot.) small or secondary spike. लहान अणकुचीदार वस्तु; लहान कठीण अवयव; उप-मंजिरी. *Spi'cular,-culate, aa.*

**Spi'cy,** *n.* (स्पा'इसि)—having much spice, aromatic; (*fig.*) piquant, improper (*s. story*), pungent, showy. मसालेदार, मसाले घातलेला; खमंग, झणझणीत, तिखटमीठ लावून सांगितलेली (गोष्ट), भपकेबाज. *Spi'ciness, n.; Spi'cily, adv.*

**Spiel,** *n.* (स्पिल्)—(U. S.) a talk, speech. बोलणें, भाषण. *v. t.* to make speeches. व्याख्यान देणें.

**Spi'der,** *n.* (स्पा'इ-डर्)—kinds of eight-legged web-spinning animal. कोळी, कोष्टी, अष्टपाद, ऊर्णनाभि. *S. and fly,* (*fig.*) ensnarer and ensnared. जाळ्यांत पकडणारा (अडकवणारा) व अडकलेला. *S. catcher,* एक जातीचा पक्षी. *S.-crab,* लांब व बारीक पायांचा खेंकडा,-कुरली. *S. line,* (अति सूक्ष्म तन्हेनें वजन करतां यावें म्हणून तारेऐवजीं वापरलेला) कोळीष्टकाचा धागा. *S. monkey,* लांब अवयवांचा व लांब शेंपटीचा वानर. *S. wasp,* a wasp that stores its nest with ss. for its young. (मारलेले) कोळी खाद्य म्हणून सांठविणारी गांधीलमाशी. *Spi'derlike, a. Spi'dery, aa.* very thin. अतिशय बारीक,-कृश.

**Spif'licate,** *v. t.* (स्पि'फ्लिकेट)—(sl.) to castigate, trounce. कानउघाडणी,-शिक्षा,-करणें—*tion, n.*

**Spig'ot,** *n.* (स्पि'गट्)—a vent-peg or part of tap by which flow in controlled. बूंच, गुडदी, तोटीची मधली चावी.

**Spike,** *n.* (स्पाइक)—a sharp projecting point; a long nail as used for railways; pointed piece of metal; (Bot.) an inflorescence of many sessile flowers set closely on long common axis; a separate sprig in which flowers from s.-like cluster; kind of lovender. पुढें आलेलें तीक्ष्ण टोंक, अणकुची, अरी, मोठा खिळा, शंकु, सळई, नाल, खिळा, शंकु; कणीस; मंजिरी (उ० गुलछडी वेलचौंडी इ.); सुवासिक वनस्पती. *v. t.* to furnish with ss.; transfix; plug vent of gun with a spike. सूळ,-शंकु,-मारणें,-लावणें; घट्ट बसवणें, पक्कें करणें; तोफेच्या कान्यांत खिळा ठोकणें,-ठोकून रद्द करणें. *S. oil,* लव्हेंडर वनस्पतीचें तेल. *Spike'let, n.* लहान कणीस,-मंजिरी. *Spike'wise, adv.; Spik'y, a.* सूळ पुरलेला, लावलेला, अणकुचीदार. [L. *spica,* ear of corn.]

**Spike'nard,** *n.* (स्पा'इक्नार्ड)—(an aromatic substance got from) an Eastern plant. जटामांसी, जटामावशी (वनस्पति); सुवासिक तेलें.

**Spile,** *n.* (स्पाइल्)—a wooden peg; a pile. लाकडी खुंटा; (जमिनींत पुरण्याचा) लांकडी खांब,-वासा. *v. t.* to make s.-hole in (cask). भोंक पाडणें.

**Spi'ling,** *n.* (स्पा'इलिंग)—a set of piles; (Naut.) an edge-curve of plank in vessel's hull. लांकडी खुंट्यांचा संच; (जहाजाच्या सांगाड्यांतील) फळीचें वांकण.

**Spill,** *v. t. & i.* (स्पिल्)—(spilt or spilled). to let (liquid, powder) run out *from receptacle,* to flow over, to shed; (of horse or vehicle) throw or upset or let fall; (Naut.) empty (belly of sail) of wind. (लवंडून, उचंबळून) सांडणें, लवंडणें; सांडणें; फेंकून देणें, उलटणें, खालीं पाडणें; (शिडांतून) वारा काढून टाकणें. *n.* (colloq.) a fall from a horse or vehicle. (घोड्यावरून किंवा गाडींतून खालीं पडणें,-येणें. *Spilt the salt,* मीठ सांडलें,-उपडें केलें. *It's no use crying over spilt milk,* गतं न शोचयम्, गेल्याचा वृथा शोक न करावा. *To s. blood,* रक्त सांडणें, रक्तपात करणें. *To. s. the blood of,* ला ठार मारणें. *S. money,* (*sl.*) जुगारांत-पैजेंत-पैसा घालवणें,-हरणें. *Spill way,* a passage for surplus water from dam. धरणांतील जादा पाण्याला वाहून जाण्यासाठीं मार्ग, पाट.

**Spill,** *n.* (स्पिल्)—a strip of wood or folded piece of paper for lighting candles etc. सळपट, कागदाची सुरनळी.

**Spill'ikin, Spel'ican,** *n.* (स्पि'लिकन, स्पे'लिकन्)—one of the wooden or ivory slips thrown in a heap in the game of spillikins. स्पिलिकन्स् खेळांत फेकायची लांकडी किंवा हस्तिदंती पट्टी.

**Spilt,** *pa. t. & pa. p. of* Spill.

**Spin,** *v. t. & i.* (स्पिन्)—(*span* or *spun, spun*) to make thread by drawing out and twisting together the fibres of wool, &c; to twirl round; of

spider, etc. make (web etc.) by extrusion of fine viscous thread; compose (story, etc.); turn or cause to turn like a top or wheel; (sl.) reject (candidate) after examination. सूत कातणें, काढणें, कातणें; गरगर फिरविणें, गरगरावणें; (कोळी) जाळें विणणें,-करणें; (कथा, गोष्ट) रचणें; फिरणें, भोवणें. चक्रावर फिरविणें, भोंवणें; परीक्षा घेऊन नापास करणें. *n.* a revolving motion, whirl; secondary revolving motion; brisk or short run, or spell of driving, rowing, etc. चाटोळी गति, गरगर फिरणें; गिरकी; जलद धांव, सरकन् जाणें, सुरकन् निसटणें. *To s. a yarn,* tell a story. (लांबलचक किंवा कल्पित) गोष्ट सांगणें. *S. out* (वेळ) पालवणें, दवडणें; लांबलचक लेख लिहिणें; चऱ्हाट लावणें, गुऱ्हाळ लावणें. *Spun, pa. p.* (sl.) tired out, done. थकून गेलेला, भागलेला. *Spun glass,* दोराप्रमाणें वळवलेली-चांकलेली-कांच. *Spun gold, silver,* सोन्याची किंवा चांदीची काढलेली तार. *Spun yarn,* (naut.) वळलेलें दोरखंड; वळलेली दोरी (पाण्याची खोली मोजण्याची). *Spinning-jenny,* an early form of spinning machine. (पुष्कळ सूत) कातण्याच्या चात्या एकदम फिरविणारें चाक. *Spin'ning-wheel, n.* (स्पि'निंग्-व्हील्) a house-hold spinning-apparatus with fly-wheel and treadle. चरखा.

**Spin'ach,-age,** *n.* (स्पि'नच्, स्पि'निज) —a vegetable eaten boiled. शिजविलेली एक प्रकारची पाले-भाजी.

**Spi'nal,** *a.* (स्पा'इनल्)—of the spine. पाठीच्या कण्याचा, पृष्ठवंशीय *S.-column,* पाठीचा कणा. *S. chord,* पृष्ठमज्जारज्जु.

**Spin'dle,** *n.* (स्पिन्डल्)—slender rod serving to twist and wind thread in spinning; axis; a varying quantity of yarn or thread, a slender thing or person. चाती, चात, सुई; आंस, अक्ष; सुताचें माप; बारीक वस्तु, किडकिडीत मनुष्य. *v. i.* to have, grow, into long slender form. सडपातळ असणें,-होत जाणें. *Live s.,* फिरता आंस. *Dead s.,* न फिरता आंस. *S. shanked, a.* लांबटांगा. *Spindly, a.*

**Spin'drift,** *n.* (स्पि'न्ड्रिफ्ट्)—spray blown along surface of the sea. (समुद्रपृष्ठभागावर उडणारा) जलतुषार. *S. clouds,* हलके कापसासारखे ढग.

**Spine,** *n.* (स्पाइन्)—the backbone or vertebral column; thorn or prickle. कणा, पाठीचा कणा; (Bot.) शूक, कंटकपर्ण, कांटा. *S.-less a.* पाठीचा कणा नसलेला; अशक्त, निर्जीव. *Spined, Spinose, Spinous, aa.* कांटेकांटे असलेला, सशूक. *Spinosity, n.* कंटकता, कांटेरीपणा.

**Spin'el,** *n.* (स्पि'नल्)—a scarlet ruby-like precious stone. शेंदरी रंगाचें रत्न.

**Spin'et,** *n.* (स्पि'निट्)—(hist.) a musical instrument. एक (संगीत) वाद्य.

**Spinn'aker,** *n.* (स्पि'नॅकर्)—a large extra sail of racing yacht. शर्यतीच्या नौकेचें मोठें जादा शीड.

**Spin'ney** *n.* (स्पि'नि)—(pl.-eys) copse. रान.

**Spin'ster,** *n.* (स्पि'न्स्टर्)—an unmarried woman. अविवाहित स्त्री, प्रौढ कुमारी. *S.-hood n.* प्रौढ कौमार्य. [orig. woman who spins]

**Spi'nule,** *n.* (स्पा'इन्यूल्)—(Bot.; Zool.) small spine. लहान शूक, कांटा; लहान कणा.

**Spir'acle,** *n.* (स्पा'यॅकल्)—(zool.) kind of breathing holes in animals. श्वासच्छिद्र, श्वसनद्वार.

**Spir'al,** *a.* (स्पा'इरल्)—coiled in a plane or as round a cylinder or cone. शंकुसर्पिल, नागमोडी, मळसूत्राकार. *n.* curve or course winding like a screw. नागमोड, नागमोडी रस्ता; सर्पिल, सर्पचक्र. *v. t.* to make s. नागमोडी-मळसूत्रासारखें-करणें. *Spirally, adv. Spirality, n.*

**Spire,** *n.* (स्पायर्)—tapering structure in form of tall cone or pyramid rising from tower-top; tapering portion of a steeple; spiral, coil; single twist of this. सुळका, दांडा शंकु; सुळका, सुळक्याचें शिखर, मनोरा; (वृक्ष) वृन्त; नागमोडी मळसूत्र; मळसूत्राचा फरा. *Spire, v. t. & i.* शंक्वाकार होत जाणें; मनोरा बांधणें. *Spiry, a.*

**Spi'rit** *n.* (स्पि'रिट्)—the element in man regarded as separable from and animating the body; an apparition; a person's disposition or mental attitude; a person from the mental or moral point of view; disembodied soul, elf, fairy; real meaning opp. to verbal expression; exhibition of courage or energy or vivacity; (*pl.*) state of cheerfulness or despondency; (sing. or pl.) distilled alcoholic liquor. चैतन्य, आत्मा; भूत; पिशाच, प्रेत, छाया; बुद्धि; मन, वृत्ति, भाव, भावना; स्वभाव, प्रकृति, प्रवृत्ति; आत्मा, अदृश्य व्यक्ति, अशरीरी व्यक्ति; भावार्थ, आशय, खरा अंतस्थ हेतु; तेज, जीव, हिम्मत, उत्साह, धमक, पाणी, धैर्य, हिंमत, अवसान; (अने०) आनंदवृत्ति, निराशामय स्थिति; गाळलेली दारू, मद्य. *v. t.* to convey mysteriously *away, off, etc.* (as if by agency of a spirit); cheer person (*up.*). गुप्तपणें घेऊन जाणें, पळवून नेणें; उत्साहित,-उल्लसित,-उत्तेजित करणें. *In (the) s.,* inwardly. मनांतल्या मनांत, मनानें. *A master -s.,* a person of commanding intellect etc. विलक्षण बुद्धिमान पुरुष. *The Holy S.,* third person of the Trinity. पवित्र आत्मा. *Poor in s.,* meek. नम्र, विनम्र. *Infused s. into his men,* आपल्या लोकांत चेतना निर्माण केली,-(उत्साह निर्माण केला). *The s. of the age or times,* तद्युगीन-तत्कालीन-प्रवृत्ति,-वारें. *High and great ss.,* cheerfulness and buoyancy उत्साह आणि प्रसन्नता. *Poor* or *low ss.,* depression. खिन्नता, विषण्णता. *S. lamp,* burning alcohol instead of oil. मद्यार्क दीप. *S.-level,* glass tube partly filled with s. for testing horizontally. मद्यसाराची पाणसळ. *S.-rapper,* मृतात्म्याशीं बोलीभाषण करणारा, (टेबलावर पिशाच्यांच्या बोटांच्या होणाऱ्या खटखट आवाजादिकावरून). *S.-room,* (naut.) गलबतावरील कोठी. *Spi'ritism, n.* पिशाचास्तित्ववाद, मृतात्मसंचारता *Spi'ritist, n.* मृतात्म्याशीं संबंध ठेवणारा.

**Spi'rited,** *a.* (स्पि'रिटिड्)—showing courage or enterprise, full of spirit or fire; having specified spirit. दमदार, हिंमतवान, पाणीदार, उत्साही, आवेशाचा, जोरदार; स्वभावाचा, प्रकृतीचा.—*ly, adv.* जोरानें, हिमतीनें, उत्साहानें.—*ness, n.* उत्साह, पाणी, तेज, जोम.

**Spi'ritless,** *a.* (स्पि'रिट्लिस्)—despondent; lacking energy; abject. हताश; निरुत्साही; क्षुद्र, फिका, निःसत्त्व.—*ly, adv.* नाउमेदीनें, निरुत्साहानें.

**Spi'ritual,** *a.* (स्पि'रिच्युअल्)—concerned with the spirit or soul or with religion; unworldly; mental, intellectual. आध्यात्मिक, पारमार्थिक, आत्मिक, धार्मिक; प्रासादिक, स्फूर्तिजन्य, पवित्र, दिव्य, अलौकिक, निराकार, अमूर्त, मानसिक, बौद्धिक. *The s. man,* अध्यात्मवादी मनुष्य, पारमार्थिक वृत्तीचा मनुष्य; मनुष्याचा अंतरात्मा,-मन. *Lords s.,* लॉर्ड्स सभेंतील बिशप आणि आर्चबिशप सभासद. *S. court,* धर्मप्रकरणांचा निवाडा देणारें कोर्ट. *S. science,* अध्यात्मशास्त्र. *Spi'ritualness, n.*;—*ritually, adv.*

**Spi'ritualism,** *n.* (स्पि'रिच्युॲलिझम्)—the belief that departed spirits communicate with and show themselves to men; (Philos.) doctrine that nothing is real except soul or spirit. (पिशाच्चें-मृतात्मे-मध्यस्थाच्या द्वारें आपलें अस्तित्व व्यक्त करूं शकतात, हा) पिशाच्चवाद, संचारवाद; आत्मसत्यवाद. —*list, n. & a.* पिशाच्च-वादी; आत्मसत्यवादी.—*listic, a.* पिशाच्चवादाचा; आत्मसत्यवादाचा.

**Spiritual'ity,** *n.* (स्पिरिच्युॲ'लिटि)—spiritual quality; (usu. *pl.*) what belongs or is due to the Church. पारमार्थिकता, धार्मिकता; धर्मखात्याचें उत्पन्न, धर्मादाय उत्पन्न.

**Spi'ritualize,** *v. t.* (स्पि'रिच्युअलाइझ्)—to make spiritual, elevate; (rare) animate; attach spiritual meaning to. परमार्थाकडे वळविणें, दिव्य करणें,-बनविणें; उत्साहित करणें, चेतना देणें; पारमार्थिक (दृष्ट्या) अर्थ लावणें.—*za'tion, n.* परमार्थीकरण; दिव्य स्वरूप देणें; परमार्थाकडे वळविणें.

**Spi'rituous,** *a.* (स्पि'रिच्युअस्)—of the nature of or containing distilled spirit. फार अंमली, जालीम, तीव्र; मद्यसारीय.—*ness, n.*

**Spirom'eter,-scope,** *n.* (स्पा'इरॉमिटर्,-स्कोप्)—an instrument for measuring lung capacity. श्वासमापक यंत्र. [L. *spiro,* breathe]

**Spirt, Spurt,** *n.* (स्पर्ट्)—sudden gushing out, jet. अकस्मात् वाहणें, आकस्मिक प्रवाह. *v. i. & t.* to gush out in a jet or stream; cause to do this. कारंज्याप्रमाणें-प्रवाहाप्रमाणें-जोरानें वाहणें,-वाहावणें.

**Spit,** *n.* (स्पिट्)—pointed rod on which a joint of meat, &c. is struck for roasting; point of land running out into the sea, &c. (मांस भाजण्याची) सळई, शूळ, सूळ; भूशिर, *v. t.* to thrust a spit through (meat); (*fig.*) to run (person etc.) through with sword, etc. सळईंत गोंवणें,-भोंसकणें.

**Spit,** *v. i. & t.* (स्पिट्)—(*Spat*; arch *Spit*), to eject saliva (from the mouth); (*fig.*) utter vehemently (curses etc.); (of cat or person) make noise as of spitting as in anger or sign of hostility; (of rain) fall lightly; (of fire, candle) send out sparks, (of ink) stray ink. थुंकणें; लाळ गळणें; आवेशानें तोंडावाटे काढणें,-बोलणें; फुसफुसणें, फिसकारणें; शिंतडणें, थुईथुई येणें; तडतडणें, ठिणग्या उडवणें; शाई उडवणें. *n.* spittle (rare); spitting (of cat); spawn of some insects. लाळ, थुंकी; (मांजराचें) फिसकारणें; कांहीं किड्यांचीं अंडीं. *S. it out,* (*sl.*) मोठ्यानें बोल,-गा,-की. *S. at* or *upon,* थूत्कारणें, तुच्छ मानणें, हिडीस-फिडीस करणें. *Spit'-fire,* चिडलेलें मांजर, चावरा कुत्रा, रागीट मनुष्य. *S.-fire,-S.-devil,* a toy-cone of wet gun-powder spitting when ignited. (दारूकामांतील) नळा. *The (very) s. of,* ची प्रतिमा,च्या सदृश.

**Spit,** *n.* (स्पिट्)—spade-depth. कुदळीचा टवका.

**Spite,** *n.* (स्पाइट्)—ill-will; malice. दुष्टपणा, दावा, द्वेष; मत्सर. *v. t.* to mortify, annoy, thwart. मानहानि करणें, त्रास देणें, अडवणें. *Spiteful, a.* दुष्ट, आकसखोर, कपटी.—*fully, adv.*-*fulness, n.*

**Spit'tle,** *n.* (स्पि'टल्)—saliva. लाळ, थुंकी.

**Spittoon,** *n.* (स्पि'टून्)—a pan to spit into. पिकदाणी.

**Splash,** *v. t. &i.* (स्प्लॅश्)—to agitate liquid so that drops of it fly about; be thus agitated or flung about; wet or stain or spatter by splashing; fall into or go through water or mud with splashing; decorate with scattered ornamentation. उसळणें, हिसळणें, शिंतोडे उडवणें; घुसळलें जाणें; शिंतोडे उडवून भिजवणें,-डाग पाडणें,-माखणें; पाणी उसळीत,-चिखल तुडवीत,-जाणें; अधून मधून चित्रें किंवा नकशी काढून सुशोभित करणें. *n.* splashing or its sound or mark made by it; a patch or colour. पाण्याच्या लाटा, धप्प आवाज; डाग, ठिपका. *S.-board,* (चिखल उडूं नये म्हणून लावलेला) गाडीच्या चाकांवरील पत्रा. *To make a s,* (*fig.*) पुष्कळ लक्ष वेधून घेणें; खळबळ उडविणें. *Splash'er, n.* (*esp.*) चाकांवरील, आच्छादक पत्रा,-पंखा; (भिंतीवर पाणी उडूं नये म्हणून) पाणपडदा. *Splash'y, a.*

**Spleen,** *n.* (स्प्लीन्)—abdominal organ acting on the blood; moroseness; irritability; spite. प्लीहा, कौल, पाणथरी; औदासीन्य, विषण्णवृत्ति; चिडखोरपणा; दुष्टपणा, दावा. *Spleen-wort,* कौलू-पाणथरी-वरील ओषधी वनस्पती. *Spleen'ish, Spleen'y, aa.*

**Splen'did,** *a.* (स्प्लें'डिड्)—brilliant, magnificent, admirable, glorious, excellent. तेजस्वी, पाणीदार, शोभिवंत, भव्य, प्रशंसनीय, वैभवशाली; नामी, उत्तम, छान.—*ly, adv.*

**Splendif'erous,** *a.* (स्प्लेन्डि'फरस)—(sl.) extremely good. अति उत्तम, फारच नामी.

**Splen'dour,** *n.* (स्प्लें'डर्)—splendidness. कांति, प्रखर तेज, शोभा, सौंदर्य, ऐश्वर्य.

**Splenet'ic,** *a.* (स्प्लिने'टिक्)—morose; ill-tempered; of the spleen. खिन्न, कष्टी, चिडखोर, रागीट; प्लीहेचा. *n.* a medicine for, a sufferer from, spleen. प्लीहेवरील औषध; प्लीहा झालेला रोगी. *-ically, adv.*

Splē'nic, *a.* (स्ले'निक्)—(Anat., Med.) of the spleen. प्लीहेसंबंधी. *Splen'oid, a.*

Splice, *v. t.* (स्प्लाइस्)—to join (pieces of rope or wood) into one length; (sl.) join in marriage. सांधणें, एकांत एक वळून एक करणें, सांध्यांत सांधा मिळविणें; विवाहबद्ध होणें, लग्न करणें. *n.* junction by splicing. (गांठ दिल्यावांचून) जोडणी, सांधा, पलास.

Spline, *n.* (स्प्लाइन्)—rectangular key fitting into grooves in hub and shaft of wheel; flexible wood or rubber strip used in drawing large curves. खिशीवाली चावी, लवचीक पट्टी.

Splint, *n.* (स्प्लिन्ट्)—a slip of wood, &c. bound on to keep broken bone in position while it sets; a thin and flexible piece of wood. ढलपा, कपची; भाळी, सांपळी, फळी. *v. t.* to confine (broken limb etc.) with ss. भाळी बांधणें,-बांधून ठेवणें.

Splin'ter, *n.* (स्प्लिन्टर्)—a pointed, sharp-edged, or narrow fragment. ढलपी, कपची, अणकुचीदार तुकडा, पट्टी. *v. i. & t.* to break into ss.; come off as a s. ढलप्या काढणें, बारीक तुकडे करणें; ढलपा निघणें. *S.-proof,* (स्फोटक गोळ्याच्या तुकड्यांपासून) इजा-नुकसान-न होण्याजोगा,-सुरक्षित.

Split, *v. i. & t.* (स्प्लिट्)—(split up), to divide into parts; to deprive of or lose unity; burst by explosion or pressure from within; break forcibly. वाटणें, विभागून देणें, फाडणें, उभा चिरणें; फोडणें; ऐक्य नाहींसें करणें, दोन तट पाडणें, पक्ष करणें, स्फोट होणें, तडावणें, भेताळणें; जोरानें फोडणें,-फुटणें. *n.* splitting; fissure, rent; schism; split osier etc. for parts of basket-work; each of the strips of steel, cane, of reed in loom; half bottle of aerated water, half glass of liquor; (pl.) acrobat's trick of sitting on ground with legs spread out laterally; turning of two cards of equal value so that stakes are divided. फाडणें; फुटणें; चीर, भेग, तडा; पंथ, धर्मभेद; (टोपल्या विणण्याकरितां) चिळें; पट्टी, कांब, मागाच्या फणीचा दांता,-पिचका; सोडावाटरची अर्धी बाटली, अर्धा पेला दारू; एका रेषेंत (बाजूला) दोन्हीं पाय ताठ सोडून बसण्याची कसरत; पैज,-बक्षीस,-विभागणारे दोन सारखे पत्ते उलगडून-उचलून-दाखविणें. *To s. one's vote,* मतें विभागून-वांटून-देणें. *To s. the difference,* निम्यावर तोड करणें. *To s. hairs,* (शब्दांचा) कीस काढणें, शुष्क (शाब्दिक) वाद करणें. *Hair-splitting,* शाब्दिक वाद,-कीस, शुष्क वाद. *S.* or *s. one's side,* be convulsed with laughter. पोट धरधरून-दुखेसर-हसणें. *Side splitting, a. & n.* पोट दुखेसर हंसविणारा,-हंसणें. *Side -splitter,* पोट दुखेसर हंसविणारा मनुष्य,-चुटका,-गोष्ट. *A splitting head-ache,* भयंकर-असह्य-डोकें-दुखी, तीव्र कपाळशूळ. *To s. on,* (sl.) (साथीदाराच्या) गुप्त गोष्टी फोडणें *S. cloth,* (surg.) कापडाच्या पट्ट्या (डोक्याची किंवा चेहऱ्याची जखम बांधण्याच्या). *Splitter, n.*

Splŏtch, Splŏdge, *nn.* (स्लॉच्,-ज्)—a daub, a smear. बरबटणें, लिडबिडणें. *Splotch'y, a.*

Splŭrge, *n. & v. i.* (स्लर्ज्)—(U. S.) (make) a noisy display or effort. गवगवा, गडबड-धांदल (करणें).

Splŭtt'er, *v. i. & t. & n.* (स्प्ल'टर्)—sputter. गडबड, घाई (नें बोलणें).

Spoff'ish, *a.* (स्पॉ'फिश्)—(sl.) bustling, fussy. गडबड्या, धांदरट.

Spŏil, *n.* (स्पॉइल्)—(collect. sing. or pl.) plunder taken from enemy; things found or acquired; emoluments of office, etc. लुटणें, लूट; सांपडलेल्या किंवा मिळविलेल्या वस्तू, अधिकारामुळें होणारे फायदे. *v. t. & i.* to plunder; to deprive of; to impair; to injure character of (person etc.) by petting or over-indulgence; make useless or inefficient; decay, go bad; (sl.) maim, kill. लुटणें, नागविणें; बिघडविणें, खराब करणें, निरुपयोगी करणें; लाड करून बिघडविणें; लाडकावणें; निकामी,-खराब करणें; नासणें, सडणें, उबणें; इजा करणें, (ठार) मारणें. *Ss. system,* (U. S.) अधिकारारूढ पक्षानें आपल्या अनुयायांना मोठमोठ्या सरकारी नोकऱ्या वगैरे देण्याची पद्धति; *Spoil'sman,,* (वरील) तत्त्वाचा पुरस्कर्ता, तत्त्वाप्रमाणें अधिकार-नोकरी मिळवूं इच्छिणारा. *Spare the rod, and s. the child,* छडीचा उपयोग न करणें म्हणजे मुलाला बिघडविणें; 'छडी लागे छमछम, विद्या येई घमघम'. *Is the spoilt child of fortune,* श्रीमंतीनें बिघडलेला. *S.-sport,* a meddler. मध्येंच लुडबुड करणारा, लुडबुड्या. *Spoil'ing, pa. p. & a.* (dog), माजलेला (कुत्रा.) *Spoil'er, n. Spoilt* or *Spoiled, pa. t. & pa. p.*

Spoil'age, *n.* (स्पॉ'इलिज्)—paper spoilt in printing. छपाईंत खराब झालेले कागद, खराबी.

Spōke, *n.* (स्पोक्)—any of the radiating bars connecting wheel's hub and felloe, or of the projecting handles of a steering-wheel; a bar preventing a wheel from turning esp. down-hill, a rung of a ladder, a round of a ladder. (चाकाचा) रवा, आरा, आर; जहाजाच्या सुकाणूची त्रिज्यात्मक आर; खिटी, खीळ; शिडीची पायरी, पांवडा. *v. t.* to furnish with *ss.*, check wheel with *ss.* आर मारणें, रवे ठोकणें; (चाकाला) खिटी लावणें, खीळ घालणें. *To put a s. in person's wheel, (fig.)* to thwart his purposes. नसताच व्यत्यय आणणें, (एखाद्याच्या) चालत्या गाड्याला खीळ घालणें. *Spoking-machine,* चाकाच्या आरांना सारखी उतरण देण्याचें यंत्र.

Spoke,-*n, pa. t. & pa. p* of Speak.

Spōkes'man, *n.* (स्पोक्स्मन्)—(pl.-men), a person deputed to voice the opinions of others. दुसऱ्याच्या वतीनें बोलणारा,-प्रतिनिधि, पुढारी.

**Spōlia'tion,** *n.* (स्पोलिए'शन्)—pillaging, despoiling, robbery; (Eccle.) taking of the fruits of benefice, under a pretended title; (law) destruction, mutilation, of document to prevent its being used as evidence. लूट, दरवडा, धडधडीत चोरी; (खोट्या अधिकारानें) (धार्मिक। उत्पन्न बळकावणें,-खाणें; (पुराव्यांत दाखल होऊं नये म्हणून एखादा) दस्तऐवज खोडून टाकणें, बदलणें किंवा नष्ट करणें. *Spo'liatory, a.*; *Spo'liator, n.*

**Spŏn'dee,** *n.* (स्पॉ'न्डि)—a metrical dot of two long syllables. दोन गुरु अक्षरांचा (– –) गण. *-da'ic, a.*

**Spon'dyl (e),** *n.* (स्पॉ'न्डिल्)—the joint of back bone, vertebra. कटिमणि, पृष्ठवंश.

**Sponge,** *n.* (स्पज)—an aquatic animal of low order with pores in the body-wall; the skeleton of a sponge or colony of sponges used as absorbent in bathing, etc.; a thing of sponge -like absorbency; (fig.) a parasite; a mop for cleaning cannon-bore; hard-drinker. स्पंजमाणी; स्पंजमाण्याचा सच्छिद्र सांगाडा, (शाई पुसण्याचा, पाणी लावण्याचा) स्पंज; स्पंजासारखा भुसभुशीत पदार्थ (कणकेचा गोळा, इ०); परपुष्ट, परान्नपुष्ट; तोफेची पोकळ नळी पुसण्याचा फडका,-झाडू; अट्टल दारुड्या. *v. t. & i.* to wipe, cleanse, wet, with s.; absorb, take up, with s.; gather sponges; live as a parasite *on*. स्पंजानें पुसून काढणें,-साफ करणें,-धुऊन काढणें,-ओला करणें,-पाणी लावणें; स्पंजानें पुसून-टिपून-काढणें-घेणें; (*fig.*) -ची आठवण बुजविणें; स्पंज गोळा करणें; पर अवलंबून राहणें, परान्नपुष्ट होणें. *To throw up the s.,* (of boxer) throw into the air as token of defeat the sponge used between rounds; (fig.) abandon contest, own one's defeat. शरण जाणें; हार कबूल करणें. *To pass the s. over,* agree to forget offence etc. झालें गेलें विसरून जाण्याला तयार होणें. *S. bath,* स्पंज-स्नान. *S.-cake,* स्पंजासारखी अतिशय हलकी भाकरी (केक). *S. tent,* compressed s. for keeping wound etc. open. स्पंजतंबू (हा जखमेंत वगैरे घातल्यावर फुगतो व जखमेचें दार मोठें होतें). *Spongol'ogist,-gy, nn.* स्पंजकीटक,-शास्त्रज्ञ,-ज्ञान. *Spo'nger, n.* (esp.) a person who habitually sponges on others. परान्नपुष्ट, आगंतुक. *Spo'ngy, a.* स्पंजाप्रमाणें सच्छिद्र, भुसभुशीत, स्पंजसदृश; विरल-परमाणुक (धातु). *Sponginess, n.* स्पंजधर्मता; सच्छिद्रता.

**Spŏn'son,** *n.* (स्पॉ'न्सन्)—a platform projecting from ship's side. गलबताच्या बाजूबाहेरील (त्रिकोणी) बैठक,-फलाट.

**Spŏn'sor,** *n.* (स्पॉ'न्सर्)—godfather or godmother; a person who answers or gives security for another, surety. धर्मपिता, धर्ममाता; जामीन, हमी घेणारा.*-ial, a.*;*-ship, n.* धर्मपितृ-मातृ-संबंध; जामिनकी, हमी. [L. *spons,* promise]

**Spŏnta'neous,** *a.* (स्पॉन्टे'निअस)—resulting from natural impulse; not deliberate or laboured, voluntary; (of sudden movements) involuntary; growing naturally without cultivation; (Biol.) instinctive, automatic; (of bodily movements, literary style) gracefully natural. आपोआप होणारा,-झालेला, स्वाभाविक, स्वतःसिद्ध; आपखुषीचा, अन्तःस्फूर्तीचा, स्वयंस्फूर्त; स्वाभाविक; (लागवड केल्या-शिवाय) आपोआप रुजणारा,-होणारा,-वाढणारा; स्वयं-प्रेरित, सहज, अनैच्छिक; सहजमनोहर, सहजस्फूर्तीचा. *S. combustion,* आपोआप जळू लागणें,-लागलेली आग. *S. generation,* आपोआप उत्पन्न होणें,-जन्माला येणें. *S. suggestion,* सहजस्फूर्ति. *Spontane'ity, n.,* *-'neousness, n.* स्वयंस्फूर्ति, स्वाभाविकता. *Sponta'neously, adv.* अंतःस्फूर्तीनें, स्वाभाविकपणें, आपण होऊन.

**Spōōf,** *n. & v. t.* (स्पूफ्)—(sl.) hoax, jocular deception. फसवेगिरी, थट्टेनें फसविणें,-चनविणें.*-er, n.*

**Spōōk,** *n.* (स्पूक्)—a ghost. पिशाच, भूत.*-ish,-y, aa.*

**Spōōl,** *n.* (स्पूल्)—bobbin, reel. रीळ, कांडी, चक्र, धोटा. *v. t.* to wind on s. रिळावर-कांडीवर-गुंडाळणें.

**Spōōn,** *n.* (स्पून्)—shallow oval bowl with long handle; a golf-club; a s.-shaped thing e. g. an oar with broad curved blade, simpleton, silly lover. चमचा, पळी; गोल्फचा दांडू; चमच्याच्या आकाराची वस्तु (वल्हें इ०); अर्धवट, भोळसर मनुष्य; प्रेमवेडा. *v. t. & i.* to lift with spoon; (Crick., etc.) strike feebly upwards; (sl.) make love. चमच्यानें घेणें,-खाणें; झेल उडवणें, सहज (चेंडू) वर उडवणें; प्रेमाचे वेडेचार करणें, टचिवाळपणा करणें. *Tea s.,* चहाचा (लहान) चमचा. *Table s.,* मोठा चमचा. *Marrow, s.,* हाडांतील मगज काढण्याचा चमचा. *Salt s.,* मिठाचा चमचा. *Born with silver s. in mouth,* गर्भश्रीमंत. *S.-beak,-bill,* kinds of bird. एक जातीचे पक्षी. *S.-fed,* (fig., of industries etc.) artificially encouraged. संरक्षण किंवा आयात मालावर जकात लादून) कृत्रिम रीतीनें-पुरस्कृत-प्रोत्साहित-(धंदे). *S.-meat,* पातळ-पेय-पदार्थ, लहान बालकांचें अन्न. *To be ss. on,* शीं प्रेमवेडेपणा करणें. *S.-ful, n.* (*pl. -fuls*) चमचाभर, अत्यल्प.

**Spōōn'er(ism),** *n.* (स्पूनरिझम)—accidental transposition of initial letters or sounds in successive words. (e. g. has just received a *blushing crow* for *a crushing blow*). (बोलतांना) सहजगत्या झालेला वर्णविपर्यय,-उच्चारविपर्यय.

**Spōōn'y̆,** *n.* (स्पूनि)—(sl.) in love, amorous; soft, silly. प्रेमातुर, आपक; वेडसर, वेंधळा. *n.* a mild simpleton. अर्धवट, वेडसर.*-ily, adv.*;*-iness, n.*

**Spoor,** *n.* (स्पुअर्)—track of animal. जनावराचा-पशूचा-माग.-मार्ग. *v. t. & i.* to follow by s. माग काढणें, मागानें-वासावर-जाणें.

**Sporăd'ic,** *a.* (स्परॅ'डिक्)—scattered, occurring only here and there. अधून मधून होणारा, तुरळक.*-ical, a.*;*-ically, adv.*;*-icalness, n.* तुरळकपणा.

**Spōre,** *n.* (स्पोअर्)—(Bot., Biol.) one of the germs by which flowerless plants are reproduced; minute organic body that develops into new individual, (fig.) seed, germ, of

anything. ( अपुष्प वनस्पतींतील ) बीजकण ; बीज, जंतु, जननपेशी ; बीज. *Sporan'gium, n.* ( -जि- ), ( Bot. ) बीजकणकोश, जननपेशीकोश. *Sporogen'esis,* बीजकणोत्पत्ति. *Sporogenous, a.* बीजकणोत्पादक. [ Gk *spora,* sowing, seed ]

**Spōrt,** *n.* ( स्पोर्ट )—fun or diversion ; a pastime of an outdoor or athletic kind, such pastimes collectively, a meeting for athletic competitions ; an animal or plant deviating strikingly from normal type, ( sl. ) a good fellow, a sportsman. मौज, मजा, थट्टा, लीला, करमणूक ; क्रीडा, खेळ ; उघड्या मैदानांत शिकार, शर्यत इ० खेळ ; विलक्षण-अकल्पित-प्राणी,-वनस्पति ; खिलाडू वृत्तीचा मनुष्य, चांगला,-भला,-माणूस,-गडी, खेळाडू. *v. i. & t.* to gambol, to play, to toy or play or trifle *with.* ( colloq. ) exhibit, ( Bot., Zool. ) become or produce a sport. खेळणें ; रमणें, बागडणें, मौज,-चैन,-थट्टामस्करी करणें ; घालून मिरवणें, चा देखावा करणे ; विलक्षण,-अकल्पित,-( प्राणी, वनस्पति,- ) बनणे.-होणें. *In s.,* थट्टेनें. *To make s. of,* make fun of. ची थट्टा करणें. *Be the s. of Fortune,* दैवाधीन असणें, दैवाचे हातांतील बाहुलें होऊन राहणें. *Athletic ss.,* मर्दुमकीचे खेळ ( धांवण, वजन उचलणें, इ० ). *School ss.,* शाळेचे खेळ,-खेळांचे सामने. *Sporting, a.* interested in sport, sportsmanlike. खेळ आवडणारा ; खिलाडू-वृत्तीचा. *A sporting man,-conduct,-offer,* खेळाडू मनुष्य, खिलाडूपणाची वागणूक,-देवाण. *Sport'ingly, adv.*

**Spōrt'ive,** *a.* ( स्पो'र्टिव्ह )—playful. खेळाडू, गमत्या, विनोदी, शोकी.*-ly, adv. ;-ness, n*

**Spōrts'man,** *n.* ( स्पो'र्ट्स्-मन् )—a person fond of hunting and such sports ; person ready to risk failure or to act fairly. पारधी, मर्दुमकीचे खेळ खेळणारा ; खिलाडू वृत्तीचा मनुष्य.*-like, a. ;-ship, n.* Sportswoman, *n. f.*

**Spŏr'ule,** *n.* ( स्पॉ'र्यूल् )—a ( small ) spore. ( लहान ) बीज, जंतु.

**Spŏt,** *n.* ( स्पॉट् )—a small mark or stain, a pimple on skin ; a blemish in character, a particular area or place or locality, a position marked on a billiard table. डाग, कलंक ; लासें, ठिकें, शिबें ; दोषस्थान, लांछन, कलंक ; स्थान, ठिकाण, जागा, वर ; ( बिल्यर्ड ) टेबलावरील काळें ठिगळ. *v. t. & i.* to mark with a spot, ( of material ) show spots readily, ( colloq. ) pick out, detect, identify, single out beforehand ( winner of race etc., horse as winner of event ). ठिपका देणें,-पाडणें ; डाग पाडणें, कलंक लावणें, काळें फासणें ; डाग सहज दिसणें,-दिसून येणें ; ओळखणें, ओळखून काढणें, आधींच ठरविणे, आगाऊ निवडून काढणें. *On the s.,* जागच्या जागीं, हां हां म्हणतां ; जागृत, तत्पर, सावध ( मनुष्य ). चांगला खेळाडू. ( Commerc. ) *S. cash, cotton, etc.* रोख मोजण्याची रक्कम, रोखीनें कापूस-खरेदी. *Ss.,* जागच्या जागीं रोख किंमत मोजून विकलेला माल,-जिन्नस. *Spotted fever,* cerebro-spinal meningitis. मेंदुज्वर. *Spotty, a.* ठिपक्यांचा, ठिपके असलेला. *Spot'tiness, n. Spottedness, n.*

**Spŏt'less,** *a.* ( स्पॉ'ट्-लिस् )—absolutely clean ; ( *fig.* ) without a blemish. निर्मळ ; निष्कलंक, निर्दोष, शुद्ध.*-ly, adv. ;-ness, n.*

**Spouse,** *n.* ( स्पाउझ् )—husband or wife ; ( *pl.* ) a married pair. नवरा किंवा बायको ; ( नवराबायकोचें ) जोडपें.

**Spout,** *n.* ( स्पाउट् )—the projecting tube or lip for liquid to issue from ; a jet of liquid ; sloping trough, ( also *S.-hole* ), spiracle of a whale तोटी, नळी ; फवारा, चिळकांडी, धार ; उतरता पन्हळ, कलता ढबा ; देवमाशाची नाकपुडी,-श्वास-छिद्र *v. t. & i.* to discharge or issue in a jet ; discharge liquid, ( colloq. ) declaim or recite, ( *sl.* ) pawn. फवारा-चिळकांडी-उडणें,-निघणें ; फवारा टाकणें,-सोडणें ; वक्तृत्वाच्या थाटानें बोलणें,-म्हणणें ; गहाण टाकणें. *Spouter, n. Spout'less, a.*

**Sprăg,** *n.* ( स्प्रॅग )—a billet of wood or similar device for checking wheel of car etc. चाकाची अडणी.

**Sprain,** *v. t.* ( स्प्रेन् )—to wrench ( a joint ) so as to cause pain and swelling. लचक भरवणें, पिळवटणें, मुरगळणें. *n.* such injury. लचक, मुरगळा, उसण.

**Sprăng,** *pa. t.* of Spring.

**Sprăt,** *n.* ( स्प्रॅट् )—a small ( European herring-like ) sea-fish ; ( joc. ) a small child, thin person. समुद्रांतला लहान मासा ; लहान मूल, बारीक-किडकिडीत -मनुष्य. *v. i.* to fish for ss. लहान खारे मासे पकडणें. *To throw a s. to catch a herring* or *mackerel* or *whale,* to risk a little to gain much. मोठ्या फायद्यासाठीं अल्पाचा त्याग करणें. *S.-day,* नोव्हेंबर ९ ( या दिवसापासून इंग्लंडांत स्प्रॅट मासे पकडण्यास आरंभ करतात ). *Sprat'ter, Sprat'ting, n.n.*

**Sprawl,** *v. t. & i.* ( स्प्रॉल् )—to fall or lie with limbs flung out ; to throw limbs about, to stretch the body and limbs carelessly ; ( of writing, plant, etc. ) be of irregular form ; open out ( troops ) irregularly. हातपाय ताणून पडणें ; अस्ताव्यस्त पडणें ; कुठल्याकुठें-अस्ताव्यस्त-फांटे जाणें, -पसरणें ; ( सैन्य ) अस्ताव्यस्त पेरणें,-पसरणें. *n.* a sprawling movement or attitude. अस्ताव्यस्त हालचाल,-पसरणें,-वृत्ति.

**Spray,** *n.* ( स्प्रे )—a branched shoot or twig with its flowers or leaves ; liquid flying in fine drops ; medical or other liquid preparation to be applied in this form. नवीन कोंब, फांदी, डहाळी ; गुच्छ, फांदी ( दागिना ), पाण्याचे तुषार ; झारी, तुषारयंत्र ; ( पत्ता धुण्याच्या पिचकारीची ) वाफ. *v. t.* to sprikle with spray. ( वर ) तुषार उडवणें, शिंपडणें, ( तुषारयंत्रानें ) घशांत वाफ सोडणें. *Spray'ey, a. ; Spray'er, n.* तुषारयंत्र, पिचकारी.

**Spread,** *v. t. & i.* ( स्प्रेड )—( spread ) to extend the surface of, ( *fig.* ) display thus to eye or mind ; to cause to cover largest surface, to diffuse

or be diffused; lay out on a surface; cover surface of. पसरणें, पसरवणें; दिमाखानें पसरून दाखवणें; विस्तार पावणें, रुंदावणें; पसरणें. पेरणें, उत्पन्न करणें; ठेवणें, मांडणें; लावणें, चोपडणें, माखणें. *n.* extent or compass of a thing; expanse; diffusion, (of education, etc.); (sl.) feast, meal provided; (U. S., commerc.) the difference between cost of manufacture and selling price. विस्तार; फैलाव; प्रसार; जेवण, मेजवानी; उत्पादनाचा खर्च व विक्रीची किंमत या दोहोंमधील अंतर. *Peacock spreads its tail,* मोर आपला पिसारा (दिमाखानें-डौलानें) उभारतो. *S.* oneself, (*pl.*) आत्मप्रौढीनें बोलणें. *Rumour s. from mouth to mouth,* ती बातमी कर्णोपकर्णी (गेली-) पसरली. *S.-eagle,* figure of eagle with wings and legs spread; skating movement; fowl split open and broiled; (Naut.) person lashed as punishment. (नाण्यावरील वगैरे) पंख आणि पाय पसरलेली गरुडाची आकृति; बर्फावर घसरण्याच्या खेळांतील एक तऱ्हा; उभें चिरून विस्तवावर भाजलेलें कोंबडें वगैरे; शिक्षा म्हणून हातपाय ताणून फटके मारला गेलेला खलाशी इ. *Spread-eagle'ism,* noisy nationalism with reference to the spread eagle as U. S. emblem. देशाभिमानाचा गाजावाजा. *S.-eagle, a.* गाजावाजा करणारा (देशभक्त). *S.-over system,* (विशेष गरजेकरितां) कामाच्या ठराविक तासांमध्यें लवचीकपणा (शिथिलता) आणण्याची पद्धत. *Spread'er, n.* अंथरणारा, पसरणारा, फैलावणारा.

**Spree,** *n.* & *v. i.* (स्प्री)—bit of fun; carouse, drunken frolic, bout of drinking. मौज; चैन, नाचरंग; दारू पिण्याची चढाओढ, झिंगून दंगामस्ती करणें. *To be on the s.,* नाचरंग-धिंगामस्ती-करणें.

**Sprew,** *n.* (स्प्रू)—a S. Afr. bird having iridescent plumage; a glossy starling. सप्तरंगी पिसारा असलेला एक (आफ्रिकेंतील) पक्षी; एक लहान पक्षी.

**Sprig,** *n.* (स्प्रिग)—twig or shoot of some plant; (*fig.*) (usu. contempt.) youth, scion; a small headless nail. डहाळी, उपशाखा, अंकुर; अपत्य, (तरुण) पोर; शंकुसारखा (चिनडोक्याचा) लहान खिळा. *v. t.* to ornament with ss. (वर) वेलबुट्टी काढणें, वेलीचें नक्षीकाम करणें. *A s. of the nobility,* थोरामोठ्याचें पोर. *S.-tail, n.* अणकुचीदार शेपटीचें बदक इ. *Sprig'gy, a.; Sprig'ged, pa. t. & pa. p.*

**Sprigh'tly,** *a.* (स्प्राइट्-लि)—vivacious, lively, brisk; in high spirits. आनंदी, उल्हासी; रंगलेला, खुषींत आलेला, रंगेल.-*liness, n.*

**Spring,** *v. t.* & *i.* (स्प्रिंग)—(*Sprang, Sprung*) to burst forth; leap, jump; be descended from; well up from below the ground; jump from the ground; bring suddenly into action or view; rise from a base; (of wood) warp, split, crack; rouse game; cause (mine) to burst. फुटणें, उगवणें; उडी मारणें, उडणें; (पासून) उगम पावणें, उत्पन्न होणें; जमिनींतून उजळणें,-फुटणें; उडी मारणें; जोरानें बाहेर येणें, एकदम उपस्थित करणें, -होणें,-घडविणें, ज्या पायावर उभारणें; वांकणें, बांक येणें; भेग पडणें, भेतावळणें; शिकार उठाविणें; स्फोट करविणें,-उडविणें, सुरुंग लावणें. *n.* a leap, springing motion; a place where water or oil wells up; (*fig.*) a motive or source of action; the season of early vegetation (March 21 to June 22); a piece of metal, &c. used to exert elastic force; recoil; upward curve (of beam etc.); springing of leak. उडी, उसळी, झेंप; झरा, निर्झर, उगम, खाण, मूळ, प्रेरणा, प्रेरकशक्ति; वसंत ऋतु; दाबखीळ, स्प्रिंग, कमान; मागील ओढ; उठावदार वळण -वांकण; फूट, झरा, भोंक पडणें, रंध्र. *A branch sprang back,* फांदीनें मागें ओढ घेतली. *To s.* (*seed sown*), वाफा येणें. *S. forwards,* झेंप घालणें, झांप घालणें, झेंपावणें. *Where do you s. from?* तूं अकस्मात कोठून आलास? *The buds are springing,* कळ्या येत आहेत. *He loves to s. surprises on us,* त्याला आम्हांपुढे नवीन नवीन आश्चर्य (कारक गोष्टी) निर्माण करण्याची हौस वाटते, कांहींतरी नवीनच तो आम्हांपुढे आणतो. *S. a leak,* develop leak from starting of timbers. (लांकडांना) फट पडून भोक पडणें,-आंत पाणी येऊं लागणें. *S. the* or *her luff,* yield to helm and sail nearer to wind. गलबताची नाळ वाऱ्याकडे होणें,-वळणें. *S. a butt,* (गलबताच्या) फळीचें टोंक सैलावणें. *Hot s.* उन्हाळें, ऊन पाण्याचा झरा. *Mineral ss.,* औषधी पाण्याचे झरे. *S. balance,* ताणकांटा. *S. bok,* S.-Afr. gazelle; (pl.) nickname. (द. आफ्रिकेंतील एक जातीचा) काळवीट, हरीण; द. आफ्रिकन लोक. *S. gun,* (आगंतुक मनुष्याचा किंवा पशूचा धक्का लागतांच) उडणारी बंदूक. *S.-halt,* (मागचा पाय उचलतांना इजा करणारा) घोड्याचा रोग. *S. tide,* high tide occurring after full and new moon. उधान, उधानाची भरती. *Spring'tide,-time,* season of spring. वसंत (ऋतु). *Spring-like,-less, aa. Spring-let, n.*

**Springe,** *n.* (स्प्रिंज)—noose or snare for small game. (लहान शिकार-जनावर-पकडण्याचा) चाप, फांस, जाळें.

**Spring'er,** *n.* (स्प्रिंगर्)—In vbl. senses; (esp.) support from which an arch springs; a breed of spaniel; a springbok. (कमानीची) बैठक, आधार; एक जातीचा कुत्रा; (द. आफ्रि.) काळवीट.

**Spring'y,** *a.* (स्प्रिंगि)—elastic. स्थितिस्थापक; लवचीक. *Spring'iness, n.* स्थितिस्थापकता.

**Sprin'kle,** *v. t.* (स्प्रिंकल्)—to scatter in small drops or particles, to besprinkle, to bedew; fall in drops on. शिंतडणें, शिंपडणें, सडा घालणें, पाणी शिंपडणें; शितोडे टाकणें,-पडणें. *n.* a light shower of rain etc. (पावसाचें) शिंतडणें, रिमझिम सर. *Sprink'ler, n.* शिंपडणारा; झारी; झारीसारखी तोटी.

**Sprink'ling,** *n.* (स्प्रिंक्लिंग्)—(*esp.*) a few here and there, a small quantity sprinkled. थोडेसें, तुरळक, अल्प प्रमाण, थोडासा भाग.

Sprint, *n.* & *v. i.* (स्प्रिंट)—run for short distance at utmost speed. (अल्प अंतर) भरधांव धांवणें, अति वेगाची दौड.-*er, n.*

Sprit, *n.* (स्प्रिट)—a small spar reaching diagonally from mast to upper outer corner of sail. (डोलकाठीपासून शिडाच्या वरच्या टोंकाला जाणारा) आडवा लहान दांडा.

Sprock'et, *n.* (स्प्रॉकिट)—each of several teeth on wheel. चांकाचा दांत. *S. wheel,* (दुचाकीचें -बायसिकलचें) दांतेवालें (सांखळी अडकण्याचें) चांक.

Sprite, *n.* (स्प्राइट)—elf or fairy. लहान खोडकर भूत; वनदेवता.

Sprout, *v. i.* & *t.* (स्प्राउट)—to put forth shoots, hair etc.; to have a sprout; spring up; produce by sprouting. अंकुर किंवा कोंब येणें, पालवणें; रुजवणें; वाढणें, उंच होणें; फुटणें, फुटून येणें,-वाढणें. *n.* shoot of plant, young growth of a branch, etc.; (pl.) Brussels ss. अंकुर, कोंब, ढिरा, टिकशी, पालवी; खुंटभाजी, निपालवीची भाजी.

Spruce, *a.* (स्प्रूस)—neat in dress and appearance, of trim smart appearance. झकपक, लकलकीत, नखरेबाज. *v. t.* to smarten (oneself *up*). झकपक पोषाख करणें, नोकझोंक करणें.-*ly, adv.*; -*ness, n.*

Spruce, *n.* (स्प्रूस)—(*S.* fur) kinds of fur. फर जातीचें झाड. *S.-beer,* medicinal infusion from spruce. फरच्या पानांचा औषधी अर्क.

Sprue, *n.* (स्प्रू)—1. passage through which metal is poured into mould; metal filling sprue. धातु मुशींत (सांच्यांत) ओतण्याचें साधन, -प्रवाह; प्रवाहिकेंतून वाहणारी धातु. 2. a tropical disease with ulcerated mouth, etc. संग्रहणी, तोंडाचा रोग.

Spru'it, *n.* (स्प्रूइट)—(S.-Afr.) a small stream of water-course. (उन्हाळ्यांत आटणारा) ओढा, प्रवाह.

Sprung, *pa. t.* & *pa. p.* of Spring.

Spŭd, *n.* (स्पड)—a kind of weeding implement; (*sl.*) a potato: a short thick thing. रान उपटून टाकण्याचें यंत्र, लहान खोरें,-कुदळ; बटाटा; आंखूड व जाड वस्तु. *Spuddy, a.* आंखूड व जाड.

Spūme, *n.* & *v. i.* (स्प्यूम)—froth, to foam. फेंस, फेंस येणें. *Spumy, a.* तवंगाचा, फेसाळ.

Spun, *pa. t.* & *pa. p.* of Spin.

Spŭnk, *n.* (स्पंक)—mettle, grit; anger. दम, धमक, जोम, जोर; आवेश.-*y, a.*

Spŭr, *n.* (स्पर्)—a pricking instrument worn on horseman's heel; a thing that acts as an incitement, stimulus, incentive; a projection or back of cock's leg or at base of a flower; a ridge running out from mountain -mass. कांटा, आर, टांच, खिळा; उत्तेजक वस्तु, प्रोत्साहन, उत्तेजन; नांगी, नखी; (फुलाची) आर; (पर्वताचें) शिंग, शृंग. *v. t.* & *i.* to put spurs to, to incite to action, to press forward. घोड्याला टांच मारणें; उत्तेजन, देणें, जोरानें प्रयत्न करविणें; दौडणें, भरधांव फेंकणें. *To put* or *set ss. to,* to spur. घोड्याला टांच मारणें.-दौडणें. *To win one's ss.* (hist.), सरदारकी मिळविणें; नांव,-मान्यता,-मिळविणें. *To need the s.,* रेंगाळत चालणें, आळसावणें. *On the s. of the moment,* impromptu. तात्कालिक स्फूर्तीनें, तत्काल. *To s. a willing horse,* (*fig.*) be needlessly importunate. विनाकारण लोचटपणा करणें,-लाळघोटेपणा करणें. *S.-wheel,* मिथ्या त्रिज्यात्मक-दात्यांचें चक्र, -चांक. *S. wort,* एक वनस्पती. *S.-less, a.*

Spūr'ious, *a.* (स्प्यूरिअस)—not genuine: counterfeit, false, fictitious; pretended. नकली, खोटा; बनावट; ढोंगी, (Zool.) भ्रामक, दिखाऊ.-*ly, adv.*; -*ness, n.*

Spŭrn, *v. t.* (स्पर्न)—to push away with the foot in contempt, to treat with contempt. तिरस्कारानें लाथाडणें, झिडकारणें, धिक्कारणें. *n.* spurning, contemptuous rejection. झिडकारणें, झिडकार, तिरस्कार.

Spŭ'rrier, *n.* (स्पॅरिअर्)—a spur-maker. टांच -खिळे बनविणारा.

Spŭrt, Spirt, *v. i.* & *t.* (स्पर्ट)—to burst forth in a jet; to increase the pace. चिळकांडी उडणें, -उडणें,-टाकणें; गति वाढवणें, उसळी मारणें. *n.* a jet or burst; a sprint, a sudden act. चिळकांडी; उकळी, उमाळा, झटका.

Spŭtt'er *v. t.* & *i.* & *n.* (स्पटर)—to move the lips with repeated spitting action; to speak with incoherent haste. थुंकी उडेल असें भराभर बोलणें; तोंडांतल्या तोंडांत बोलणें; थुंका, थुंकी. -*er, n.*;-*ingly, adv.* थू थू करून, थुंकी उडत, -उडवीत.

Spū'tŭm, *n* (स्प्यूटम)—(*pl.-ta*). ejected saliva; any expectorated matter, esp. as characteristic of disease. थुंकी, थुंका; खाकरा.

Spȳ, *n.* (स्पाय)—a person secretly collecting and reporting informtion; a person who keeps (secret) watch on movements of others. हेर, चार; गुप्त नजर ठेवणारा मनुष्य. *v. i.* & *t.* to act as a spy (*upon*); to discern by scrutiny. हेराचें काम करणें, हेरणें; टेहळणें. *To s. out,* explore secretly. गुप्त रीतीनें शोधून काढणें *S.-glass,* a small telescope. लहान दुर्बीण. *S.-hole,* a peep-hole. चोरखिडकी.

Squab, *n.* (स्क्वॉब)—an unfledged bird; a short fat person; a cushion, couch. पंख न फुटलेला पक्षी; टेंगू लठ्ठ मनुष्य; मऊ गिरदी. *a.* short and plump. स्थूल, ढुला, टेंगू आणि लठ्ठ. *adv.* with a heavy fall. धपदिशीं, धाडकन. *Squab'by, a.*

Squa'bble, *n.* & *v. t.* (स्क्वॉबल)—a quarrel about trifles, wrangle, to brawl, to scuffle; (Print.) disarrange composed type. क्षुल्लक गोष्टीबद्दल भांडणें,

झगडणें, झगडा करणें, खटका उडणें; जुळवलेला टाइप (टंक)—ढांसळणें, सरकणें.-*r*, *n.* भांडखोर.

**Squad**, *n.* (स्क्वॉ'द्)—a party of men, being drilled or employed together. कामकऱ्यांची टोळी, तुकडी; कवाइतीकरितां जमलेले लोक, नवशिकी तुकडी. *S. drill,* प्राथमिक कवाईत. *Awkward s.,* कवाईत शिकणारी तुकडी; नवशिके विद्यार्थी.

**Squa'dron**, *n.* (स्क्वॉ'ड्रन्)—a division of cavalry regiment, consisting of two troops and containing 120 to 200 men; any orderly body of persons; a number of warships grouped into a temporary unit; a division of R. A. F. घोडेस्वारांच्या दोन तुकड्यांचा विभाग,-गट; संघ; आरमाराची तुकडी,-चा काफिला; लष्करी विमानांचा काफिला. *v. t.* to form into *ss.*, तुकडी बनविणें *S.-leader,* लष्करी विमानांच्या तुकडीचा प्रमुख अधिकारी.

**Squail**, *n. pl.* (स्क्वेल्)—a game with small wooden discs on round table or board. एक बैठा खेळ.

**Squa'lid**, *a.* (स्क्वॉ'लिड्)—dirty or wretched with neglect or want, foul, extremely dirty. ओंगळ, हिडिस, दरिद्री, कंगाल, भिकारी.-*ity,-ness, nn.-qual'or n.* घाणेरडेपणा, ओंगळपणा. *Squal'idly, adv.*

**Squall**, *n.* (स्क्वॉल्)—a discordant cry or scream; a sudden violent storm of wind esp. at sea and with rain. किंकाळी, टाहो; वावटळ, झंझावात. *v. i. & t.* to cry out, scream; (usu. of babies) utter in discordant voice. केंकावणें, केंकाटणें, केंकटून रडणें; कर्कशपणें बोलणें. *Arched s.,* विषुववृत्तावरील, कमानी-सारखें काळे ढग जमून होणारा, झंझावात,-वादळ. *Black s.,* काळा ढग येऊन सुटणारा सोसाट्याचा वारा. *White s.,* विनढगाची वावटळ. *To look out for ss.,* (*fig.*) (भावी अनर्थाविषयीं) सावध असणें,-राहणें. *Squa'ller, n.* केंकाटणारा, किंकाळणारा.

**Squa'lly**, *a.* (स्क्वा'लि)—(of weather) boisterous. वावटळीची, आकस्मिक वादळी (हवा).

**Squā'loid**, *a.* (स्क्वे'लॉइड्)—like a shark. शार्क माशासारखा.

**Squa'lor**, *n.* (स्कॉ'लर्)—squalidness. ओंगळपणा.

**Squā'ma**, *n.* (स्क्वे'मा)—(*pl-ae*), (Bot., Zool.) a scale, scalelike feather or part of bone. (त्वचेवरील) खवला, पापुद्रा. *Squā'mous, a.* खवले असलेला.

**Squa'nder**, *v. t.* (स्कॉ'न्डर्)—to spend wastefully; to scatter lavishly, to fling away. उधळणें; विल्हेवाट करणें, वाट लावणें, उधळून टाकणें.-*er, n.* उधळ्या मनुष्य, दिवाळखोर, उडप्या.-*ingly, adv. Squanderma'nia, n.* युद्धानंतरची आणि इतर खर्चाची उधळपट्टी,-दिवाळखोरी.

**Squāre**, *a.* (स्क्वेअर्)—of the shape of an equilateral rectangle; rectangular; of equal breadth and length; angular, not round; properly arranged; thorough, uncompromising; even, quits; (of number) that is a square; honest or fair. समचतुष्कोणी, चौकोनी; चौरस, समचौरस; आडवा, आडव्या अंगाचा,-बांध्याचा; चौकोनी; ठाकठीक, व्यवस्थित लावलेला; रोखठोक, सरळ, स्पष्ट; फिटंफाट, सारखा, सरळ, समचित्त; सरळ, न्याय्य, रास्त; वर्गाचा, वर्ग-; सरळ, नीट, थेट, अचूक, ठीक. *n.* an equilateral rectangle; an object of approximately this shape; a space in town enclosed by houses; a body of troops presenting four fronts; L-shaped or T-shaped instrument; standard or pattern (*fig.*); set of words arranged in squares; (U. S. sl.) a square meal; product of a number multiplied by iteslf. चौकोन, समचतुष्कोण, (सम-) चौकोनी वस्तु; चौक, चौरस क्षेत्र; (सैन्याचा) कोट; गुण्या, काटकोन,-कोन्या; योग्य प्रमाण,-माप, नमुना; कोष्टक, घर; यथास्थित भोजन; वर्ग, द्विघात. *v. t. & i.* to make a square; make rectangular; multiply a number by itself; to be square or tally with, reconcile; (colloq.) pay (bribe); (*sl.*) secure silence or acquiescence of by persuasion or bribery; assume attitude of a boxer. चौकोन,-नी करणें; चौपाटणें, चौपट करणें; वर्ग करणें; द्विघात करणे; बरोबर किंवा चुकता करणें, मिळता करणें,-होणें, मूठ दाबणें, लांच देणें; लांच देऊन गप बसविणें,-अनुकूल करून घेणें; हातघाईवर येणें, अस्तन्या वर सारणें. *S. inch,-foot,* चौरस इंच (एक इंच लांब, एक इंच रुंद), चौरस फूट (क्षेत्रफळ). *S. measure,* क्षेत्रफळ (चौरस इंच वगैरेंनीं मोजण्याचें). *A table 4 ft s.,* चार फूट लांब व चार फूट रुंद असें मेज. *S. root,* वर्गमूळ (जसें, ९ चें वर्गमूळ ३ आहे). *A s. deal,* fair bargain. चोख व्यवहार, योग्य व्यवहार. *To get s. with,* (creditors), (सावकाराचें) देणें भागविणें. *S.-built,* चौकोनी आकाराचा, रुंदट. *S. sail,* चौकोनी शीड. *S. -shouldered,* रुंद खांद्याचा (छातीचा). *S. toed,* having boots with s. toes; (*fig.*) formal. चौकोनी टोकांचे बूट घातलेला; ऐटबाज, छानछोकीचा. *S.-toes,* नीटनेटका मनुष्य. *He plays s.,* प्रामाणिक-पणानें खेळतो, योग्य तऱ्हेनें खेळतो. *Lives in the next s.,* पुढल्या चौकांत (रस्त्यांच्या) राहतो. *Out of s.,* not at right angles. काटकोनांत नसलेला. *On the s.,* fairly, honestly. प्रमाणिकपणानें, सरळपणानें. *By the s.,* exactly. नेमका, अचूक, बरोबर. *Word-s.,* शब्दांचें कोष्टक,-घर, कोडें. *The s. of 9 is* 81, ९ चा वर्ग ८१ आहे. 3 *squared is* 9, ३ चा वर्ग ९ आहे. *To s. account with, s. up.,* settle, pay (bill), (*fig.*) have revenge on. खातें चुकतें करणें, बाकी पूज्य करणे; -चा सूड घेणें, -चें उट्टें घेणें. *To s. the circle,* दिलेल्या वर्तुळाइतकें क्षेत्रफळ असणारा सम चतुष्कोन-चौरस-काढणें; दिसण्यांत अशक्य अशी गोष्ट करून दाखविणें. *Squarely, adv.*; *Squāre'ness, n., Squarish, a.*

**Square'leg**, *n.* (स्क्वे'अलेग्)—(crick.) a fielder on batsman's left nearly level with wicket. (क्रिकेट) खेळणाऱ्याच्या डावीकडचा क्षेत्ररक्षक, त्याची जागा.

**Square'root,** *n.* (स्क्वे'अरूट)—a factor that multiplied by itself gives the given number or quantity. वर्गमूळ.

**Squa'rrose,-ous,** *aa.* (स्क्वॉ'रस)—(Bot., Zool.) rough with scale-like processes. खवले असलेला, ओबडधोबड अंगाचा.

**Squar'son,** *n.* (स्क्वॉ'र्सन्)—a squire and parson in one. जमीनजुमलेवाला खिस्ती पाद्री.

**Squash,** *v. t. & i.* (स्क्वॉश)—to squeeze; to snub or suppress (person); to squeeze one's way (into), pack tight. पिळणें, चेंदा करणें, चेंदामेंदा करणें, दाबणें; (टोमणा मारून) गप्प करणें, नाहींसा करणें, चीत करणें; रेंटारेंटी करून मार्ग काढणें; गच्च-घट्ट-पांघणें. *n.* crowded state; a crowd; a sudden fall of a heavy soft body, squashed thing or mass. कोंबणें; गर्दी, चेंदामेंदी; पच असें वाजणें; चेंदामेंदा, थिरथिरी. *S. rackets,* a game played with rackets and soft ball. एक प्रकारचा चेंडूचा खेळ. *S. hat,* मऊ लोंकरीची टोपी. *Squas'hy, a.* गिलगिलीत; दलदलीचा. *Squash'iness, n.*

**Squash,** *n.* (स्क्वॉश्)—*S.-gourd,* kind of gourd. डांगर, भोपळा.

**Squat,** *v. i.* (स्क्वॉट्)—to sit on one's hams or heels, or on ground with knees drawn up, (of animals) crouch close to ground; sit (*down, on*). उकिडवा बसणें, जमिनीला चिकटून (भुईसरपट) बसणें; (खालीं, वर) बसणें. *a.* sitting on the hams; (of person etc.) short and thick. उकिडवा, चपटा, बसकट; फेंदरा, बसकें (नाक इ.). *n.* a squatting position, a squat person. उकिडवा बसणें,-णी बैठक; ठेंगू आणि जाड मनुष्य. *Squatter, n.* In vbl. senses: (esp.) an Australian sheepfarmer; (U. S.) a person who settles on new land without title. उकिडवा बसणारा; (ऑस्ट्रेलियांतील) मेंढपाळ; बिगरहक्क वसाहतवाला.

**Squaw,** *n.* (स्क्वा)—an Amer.-Ind. woman or wife. रेड इंडिअन स्त्री,-पत्नी. *S.-man,* अशा स्त्रीशीं लग्न केलेला श्वेतवर्णीय मनुष्य.

**Squawk,** *v. i. & n.* (स्क्वाक्)—(to utter) harsh cry of pain or fear (chiefly of birds). (पक्ष्यांचें) कर्कश ओरडणें. [imit.]

**Squeak,** *n.* (स्क्वीक्)—a short shrill cry or sound; (*sl.*) a close affair. किंकाळी, चीं चीं, करकर; गुप्त गोष्ट. *v. i.* to give out shrill sound as of mouse or unoiled hinge; utter shrilly; (*sl.*) turn informer. चीं चीं करणें, करकरणें; किंचाळणें, किंचाळून बोलणें; माफीचा साक्षीदार होणें, गुप्त गोष्ट फोडणें. *Narrow. s.,* थोडक्यावर निभावणें, जेमतेम यश मिळणें.-*y, a.;-ily, adv.*

**Squeal,** *n.* (स्क्वील्)—a shrill sustained cry. किंचाळणें, (दुःखाची) किंकाळी. *v. i.* to utter or emit a *s.*, (U. S., sl.) betray by confession, confess. (दुःखानें) किंचाळणें, ओरडणें; द्रोह करून (गुप्त गोष्ट) कबूल करणें.-*er, n.* लहान पारवा,-कबुतर.

**Squeam'ish,** *a.* (स्क्वी'मिश)—fastidious; of delicate stomach or conscience. चोखंदळ, खोडकर, खंतखोर, खोडयाळ; नाजूक कोठ्याचा, चेतनात्या.-*ly adv.;* -*ness, n.*

**Squeegee',** *n.* (स्क्वीजी')—(Also, *squilgee'*) a rubber-edged implement, used to push moisture off a smooth surface; a small roller used in photography. दांड्याचा रबरी रूळ, पीडनयंत्र. *v. t.* to treat with a *s.* पीडनयंत्रानें ओलावा किंवा पाणी पुसून टाकणें.

**Squeeze,** *v. t. & i.* (स्क्वीझ्)—to exert pressure upon, compress with hand or between two bodies, thrust (*oneself,* person, thing, *into, out of,* vehicle, room etc.) forcibly; make one's way by squeezing; oppress, crush; wring (water, juice, money etc.) from something; extract information by pressure; produce with effort (a tear etc.); take impression of. चेपणें, चापटणें, आवळणें, पिळणें; जोरानें ढकलणें, घुसडणें, कोंबणें; चेंगरून वाट काढणें; पिळून काढणें, चिरडणें; (पाणी,-पैसा,-) पिळून काढणें, -उकळणें; दडपण घालून,-आणून-माहिती काढून घेणें; प्रयत्नानें (अश्रु) काढणें; चा ठसा घेणें. *n.* an act of squeezing; a crowded state, a forced exaction or impost; a levy; an impression (of coin etc.). चेपणें, दाबणें, पिळणें; रेंटारेंटी, गर्दी; जबरदस्तीची वसुली,-कर; कर; ठसा. *To s a person's hand,* (प्रेमानें, सहानुभूतीनें) हस्तांदोलन करणें. *Squeezed orange,* (*fig.*) a person or thing from whom or which nothing more is to be had. अगदीं पिळून निघालेला मनुष्य,-वस्तु. *Squeez'able, a.,-ability, n.* (*esp.*) lack of moral firmness. नैतिक बळाचा अभाव. *Squeez'er, n.*

**Squelch,** *v. i. & t.* (स्क्वेल्च्)—(colloq.) to suppress, stamp on, make sucking sound as of hoof drawn out of stiff mud. दाबून टाकणें, दडपणें; 'रप' असा आवाज करणें. *n.* an act or a sound of squelching. दडपण, दाब; 'रप' असा आवाज [imit.]

**Squib,** *n* (स्क्विब्)—small firework thrown by hand, a tube of gunpowder, lampoon. फटाका, फटाकडी, दारूची नळी; औपरोधिक लेख किंवा भाषण, फटका. *v. t. & i.* to write, attack, with lampoons. औपरोधिक लेख लिहिणें, वर फटका रचणें.

**Squiffy,** *a.* (स्क्विफि)—(*sl.*) slightly drunk. थोडासा झिंगलेला.

**Squint,** *v. i.* (स्क्विन्ट्)—to have the eyes turned in different direction; look sidelong. तिरवा पाहणें, तिरवेपणा असणें; आडपडद्यानें पाहणें. *n.* squinting set of the eyeballs, an oblique look तिरवी दृष्टि, तिरवेपणा. *S.-eyed, a.* (*fig.*) malignant. तिरव्या दृष्टीचा; दुष्टपणाचा, द्वेषमूलक. *Squin'ter, n.*

**Squire**, *n.* (स्क्वायर्)—a country or landed gentleman; (*hist.*) knight's attendant; woman's escort or gallant. जमीनदार, उमराव; हुजऱ्या; स्त्रीचा सोबती,-स्त्रीसहवासप्रिय. *A. s. of dames*, स्त्रियांच्या सहवासांत राहणारा, बायक्या मनुष्य. *v. t.* (of man) स्त्रियांना सोबत करणें,-चें हुजरेपण करणें. *S. hood,-let,-ling,-ship, nn.*

**Squir'ärchy**, *n.* (स्क्वाय'रार्कि)—the landed class. जमीनदारवर्ग.

**Squireen'**, *n.* (स्क्वायरी'न्)—a small land-owner in Ireland. आयर्लंडमधील लहान जमीनदार.

**Squirm**, *v. i. & n.* (स्क्वर्म्)—to writhe like a worm; wriggle; (*fig.*) to show, feel, embarassment. वळवळणें, (अंगाला) पिळे देणें; अस्वस्थ होणें-वाटणें.

**Squi'rrel**, *n.* (स्क्वि'रल)—a bushy-tailed arboreal rodent quadruped with pointed ears. खार, चानी, खडी. *A barking s.*, a prairie-dog. (उत्तर अमेरिकेंतील) तीक्ष्णदंती (कुत्र्यासारखी ओरडणारी) खार. *S. tail*, एक प्रकारचें गवत.

**Squirt**, *v. t. & i.* (स्क्वर्ट्)—to shoot out in a jet, esp. from a syringe. वर चिळकांडी उडवणें, पिचकारी मारणें. *n.* a syringe. पिचकारी, चिळकांडी.

**Stăb**, *n.* (स्टॅब्)—a thrust or wound with a sharp weapon; sudden acute pain or attack (on person's feelings). भोंसकणें; तीव्र वेदना, (च्या अब्रूवर-भावनेवर-) तीव्र घाव,-हल्ला. *v. t. & i. to* give a stab, to pierce or wound with something pointed, aim blow at (reputation, person, etc.). भोंसकून जखमी करणें, भोंसकणें; खुपसणें; (ला) धक्का लावणें,-पोंचवणें. *S. in the back*, slander. (अपरोक्ष) निंदा,-बदनामी,-करणें. *Stab'ber, n.*

**Stă'bilitÿ**, *n.* (स्टॅबिलिटि)—steadiness, firmness. मजबुती, स्थैर्य, स्थिरता, कायमपणा. *S. of value*, किंमती कायम-स्थिर-राहणें.

**Stā'ble**, *a.* (स्टे'बल)—abiding; likely to endure, firm, steady, constant. स्थिर; स्थायी; टिकाऊ; मजबूत; खंबीर, करारी, निश्चयी, दृढ, अचल. *Stabilize, v. t.* to make stable. स्थिरता आणणें, घळकट करणें; कायमपणा-स्थिरता-आणणें. *Stabilizer, n.* (esp.) air-craft's fixed horizontal tail-plane. विमानांची (कायम बसविलेली) न हालती मागील टोंकाची आडवी पातळी. *Stabiliza'tion, Sta'bleness, nn.* [L. *stabilis, stare*, Skr. *stha, stand*]

**Stā'ble**, *n.* (स्टे'बल)—a building in which horses are kept. तबेला, घोडशाळा; विशिष्ट तबेल्यांतील शर्यतीचे घोडे. *v. t. & i.* to put, keep, or accommodate in a stable. तबेल्यांत घालणें,-ठेवणें,-राहणें. *Stable-boy, stable man*, मोतद्दार. *S.-call*, घोड्यांना पाणी दाखविण्याची व चंदी देण्याची सूचना. *S. companion*, a horse of same stable; (colloq.) a member of same school or club. (एकाच तबेल्यांतील) जोडीदार घोडा; त्याच संस्थेंतील किंवा मंडळांतील जोडीदार-सभासद.

**Stā'bling**, *n.* (स्टे'ब्लिंग)—In vbl. senses; stable-accommodation. तबेल्यांत ठेवणें,-बांधणें; तबेल्याची सोय. *S.-charges*, तबेल्याचें भाडें.

**Stăb'lish**, *v. t.* (स्टॅ'ब्लिश्)—to make stable. स्थिर करणें, दृढ बसविणें.

**Stacca'to**, *a.* (स्टका'टो)—(Mus.) with sharp separation of notes. द्रुतगति व स्वर पाडून (वाजवणें, गाणें.) [It.]

**Stăck**, *n.* (स्टॅक्)—a pile of hay or sheaves; a pile, heap, number of chimneys standing together, (colloq.) large quantity. गवताची गंज, अडवी; ढीग, रास; जवळजवळ असणारीं धुराडीं; विपुलता, अगणितपणा, बाहुल्य. *v. t.* to form into stacks. गंज करणें,-रचणें, उडवे डाळणें. *Have ss. of work*, कामाचे ढिगारे पडले आहेत. *Smoke-s.*, इंजिनाचें,-आगगाडीचें,-धुराडें,-फनेल. *S. arms*, पुष्कळशा बंदुका एकत्र उभ्या ठेवणें.

**Stactŏ'meter**, *n.* (स्टक्टॉ'मिटर्)—a tube for measuring liquid in drops. बिन्दुमापननलिका. [Gk *stazo*, drip]

**Stā'dium**, *n.* (स्टे'डिअम्)—(pl.-*ia*), a foot-race course about 202 yds, in anc.-Gk athletic contests; a modern athletic ground; (Med.) a stage or period of disease. दौड मारण्याचें रंगण,-जागा; आखाडा, क्रीडांगण,-रंगण; रोगाची अवस्था,-मुदत. [Gk *stadion, sta*, stand]

**Stăff**, *n.* (स्टाफ्)—a stick or pole as weapon or support or as symbol of office; a stick used in surveying etc.; surgeon's steel instrument; body of assistants by whom an institution or business is carried on; (Mil.) a body of officers attached to a commander; (Mus.) (pl. *staves*) a set of parallel lines on which notes are written. सोटा, दंड, दांडा, आधार, अधिकारदंड; जमीन,-उंची,-वगैरे मोजण्याची काठी,-माप; अशरीहर शलाका, सळई; मदतनीस कामगार मंडळी, नोकरमंडळी, (सेनापतीच्या हाताखालील) अंमलदारमंडळ; (आरोहावरोह-) स्वरलेखनपंक्ति. *v. t.* to provide (institution etc.) with staff. संस्थेंत नोकर-कामगार-मंडळी नेमणें. *You are the s. of his old age*, त्याच्या म्हातारपणाची तूं काठी (आधार) आहेस. *S.-college*, लष्करी अंमलदार तयार करण्याचें विद्यालय. *Editorial s. of newspaper*, वर्तमानपत्राचें संपादकमंडळ.-*staffed, a.*

**Stăff**, *n.* (स्टाफ्)—mixture of cement, plaster-of-Paris etc. as building material. (रेती, चुना वगैरेचें) बांधकामाचें मिश्रण.

**Stăg**, *n.* (स्टॅग्)—male of red or other large deer; a bull castrated when nearly full-grown; (Stock Exch.) a person who applies for allotments in new concerns with a view to selling at once at a profit; (sl.) an irregular dealer in stocks. काळवीट, एक जातीचा हरीण; खच्ची केलेला-वडवलेला-बैल; (पुढें भाव वाढून फायदा मिळेल म्हणून) नवीन धंद्यांतील विभाग (शेअर्स) आगाऊ

घेणारा मनुष्य; ठेवींचा अनियमित व्यवहार करणारा मनुष्य S.-*evil*, घोड्यांचा जबड्याचा रोग. S.-*horn*, प्रवास कीटकांची एक जात. S.-*hound*, काळविटांची शिकार करणारा मोठा शिकारी कुत्रा.

**Stāge,** *n.* (स्टेज)—a platform of boards. the part of a theatre on which the actors perform the drama, acting profession. (fig.) the scene of action, part or period of development interval between stopping-places; a stopping place. पराची, मांच, उच्चासन, व्यासपीठ; रंगभूमि; नाट्य, नाटकगृहें, नाटकग्रंथ, नाट्यकला, नाट्यधंदा; कर्तव्यक्षेत्र,-भूमि; अवस्था,-स्थिति-काल; मजल, टप्पा, टप्प्यामधील अंतर; मुक्काम. *v. t.* to put (a play) on the theatrical stage. (*fig.*) to arrange with a view to effect. रंगभूमीवर आणणें; प्रयोग करणें, प्रयोगांत वठणें, उठाव होणें. *Landing s.*, बंदर-धक्का. *To go on the s.*, नाटकांत जाणें. नट होणें. A *critical s.*, आणीबाणीची वेळ,-परिस्थिति. *The s. of politics*, राजकारणाचें क्षेत्र *S.-coach*, डाकेची गाडी, टपालाचा टांगा; टप्प्या-टप्प्यांनीं थांबून जाणारी गाडी. *S. craft*, नाट्यलेखन-कौशल्य, प्रयोगविज्ञान. *S.-direction*, पात्रांना (अभिनयविषयक वगैरे) सूचना. *S.-door*, (पात्रांना रंगभूमीवर जाण्यायेण्यासाठीं) रंगभूमीच्या मागचा दरवाजा. *S.-effect*, खेळाचा उठाव (दारपणा). *S.-fever*, नाटकांत काम करण्याची अनावर हौस. *S.-fright*, (प्रथमच रंगभूमीवर आल्यानें) पात्राला-नटाला-वाटणारी भीति,-होणारा सभाकंप. *S.-manager*, रंगभूमि-व्यवस्थापक. *S.-right*, (नाटकाच्या) प्रयोगाचा हक्क. *S.-whisper*, नेपथ्ये, याजुला (कुजबुजून इतरांना ऐकूं जाईलसें बोलणें).

**Stā'ger,** *n.* (स्टे'जर्)—*Old s.*, a person of experience. जुना, अनुभविक,-मनुष्य.

**Stă'ggard,-t,** *n.* (स्टॅ'गर्ड,-र्ट)—a stag four years old. चार वर्षांचें मोठें काळवीट.

**Stăgg'er,** *v. t.* & *i.* (स्टॅ'गर्)—to go unsteadily as if about to fall, to totter, to sway helplessly, shake conviction etc. of; arrange in zigzag order. झोंके खाणें, लटपटणें, झोकांडे खाणें; डळमळणें गटबडणें; डळमळविणें, साशंक करणें; वांकडीतिकडी-नागमोडी-रचना करणें. *n.* act of staggering; (Mech) zigzag or slantwise arrangements, (pl.) (*blind ss.*) giddiness, kinds of disease in horses and cattle. झोंक जाणें,-देणें; वांकडी-तिकडी,-तिरपी-रचना; (जनावरांचा) मिरगी (रोग), भोंवळ, चक्कर. *Stagg'eringly, adv.*

**Stăgg'erer,** *n.* (स्टॅ'गरर्)—In vbl. senses; an event, argument, etc. that staggers one. चकित,-स्तब्ध,-करणारी गोष्ट, इ.

**Stā'ging,** *n.* (स्टे'जिंग)—putting a play on the stage; driving stage-coaches, a scaffolding. खेळ रंगभूमीवर आणणें, प्रयोग करणें; टपालाचे टांगे हांकणें,-चालविणें; पराची, माचण.

**Stăg'nant,** *a.* (स्टॅ'ग्नन्ट)—not flowing in a current, without current or tide; motionless; inert, sluggish; unchanging. सांठलेला, कोंडलेला, अस्वच्छ, घाणेरडा; गतिरहित; मंद, थंड; स्थिर, आळशी, न बदलणारा.-*ly, adv.*

**Stăg'nāte,** *v. i.* (स्टॅ'ग्नेट्)—(of liquid) to become motionless, cease to flow; (of life, mind, business) be (come) dull or sluggish. जागच्याजागीं सांठणें, कोंडणें, न वाहणें; मंद-सुस्त-होणें, आळसावणें. *Stagna'tion,-nancy, nn.* सांठणें, कोंडणें, स्थिरता, स्थैर्य, अप्रवाहिता, मंदी, सुस्ती.

**Stăgni'colous,** *a.* (स्टॅग्नि'कलस्)—living in stagnant water or swamps. कोंडलेल्या पाण्यांत किंवा दलदलींत राहणारा. [L. *stagnum*, pool: *colere*, inhabit]

**Stăg'y̆,** *a.* (स्टे'जि)—theatrical in manner, appearance, etc. नाटकी पद्धतीचा,-धाटाचा. -*giness, n.*

**Staid,** *a.* (स्टेड)—of sober demeanour. धीर, गंभीर, धिमा, शांत.-*ly, adv.*;-*ness, n.* स्थिरता, धिमेपणा. [*Stayed*]

**Stain,** *n.* (स्टेन)—colouring liquid for staining; a coloured spot; fact that sullies a person's reputation, cause of reproach. रंग; ठिपका, डाग; कलंक, बट्टा, ठपका, कालिमा. *v. t.* & *i.* to discolour, soil; make coloured mark on; (*fig.*) sully, blemish; impregnate (substance) for microscopic examination with (colours); print colours on wall paper. डाग पाडणें, खराब करणें; रंगाची निशाणी करणें; कलंक लावणें बट्टा लावणें, काळोखी फासणें; रंग भरणें; छापणें. *Without a s. on his character*, निष्कलंक चारित्र्य. *Stain'er, n.* रंग भरणारा. *Stain'able, a.* *Stain'less, a.* बिनडागाचा; निर्दोष, निष्कलंक.

**Stair,** *n.* (स्टेअर्)—(*pl.*) set of fixed steps connecting different floors; one such step. (अने०) शिडी, जिना, दादर; पायरी, पावठणी. *Flight, pair, of ss*, (एका रेषेंतील) जिना, दादर, पायऱ्या. *A winding s.*, नागमोडी जिना, वांकणाचा जिना. *Below ss.*, खालीं, तळमजल्यावर; नोकरांत, नोकरांकडून. *Down ss.*, *up ss.*, खालीं, खालच्या मजल्यावर; वरतीं, वरच्या मजल्यावर. S. *rod*, दोन पावठण्यांमधील गालिचा वगैरे घट्ट बसविणारा दांडा.

**Stair'cāse,** *n.* (स्टे'अर्-केस)—the part of a building which contains flights of stairs. जिना, दादर. *Cork-screw s. c.*, मधील खांबाभोंवतीं असलेला नागमोडी-चक्र-जिना.

**Stāke,** *n.* (स्टेक)—a stout stick or post pointed for driving into ground; a post to which a person was tied to be burnt alive, (*fig.*) death by burning; a tinsmith's small anvil; amount risked in a wager or match; (*pl.*) money to be contended for (*esp.* in race-horse), such race. मेख, खुंटा, मेढ, शंकु, मेढका; सूळ, शूळ, जाळून ठार मारणें,-मरण; उभाळा (लहान ऐरण); पण, पैज, पैजेची रक्कम; (घोड्यांच्या शर्यतींची) पैजेची रक्कम, अशी घोड्यांची शर्यत.

*v. t.* to fix with stakes; to risk (money, credit, &c.) on an issue, to wager, to pledge. मेढे पुरणें, मोखे घालणें, मोख्याचें कुंपण घालणें; पैज मारणें, पणास लावणें, ची शर्यत लावणें. *Have a s. in the country*, be materially concerned in its welfare. च्या हिताविषयीं विशिष्ट हितसंबंध असणें. *To be at s.*, पणास लावलेला असणें, धोक्यांत असणें. *S.-net*, खुंटांवर पसरलेलें मच्छेमारी जाळें. *S.-holder*, सट्टेवाल्यांची पैजेची रक्कम अनामत ठेवणारा.

Stăl'actite, *n.* (स्टॅलक्टाइट)—a deposit of carbonate of lime hanging from roof of cave etc., and formed by trickling of water. (पाणी झिरपून गुहेच्या छपरापासून लोंबणारा) खडूचा,-चुनखडीचा थर. *Stal'agmite, n.* (गुहेच्या जमिनींतून वर येणारा वरीलसारखा) चुनखडीचा उकीर,-थर. [Gk *stalasso*, drip]

Stāle, *a.* (स्टेल्)—*lacking freshness*, (of athlete) overstrained. शिळा, वासा, जुना, जुनाट; दमलेला, भागलेला. *v. t. & i.* to make stale by overuse; (of horse etc.) make water. अति वापरण्यानें जुना-शिळा-करणें; (घोड्याचें, गुरांचें) मुतणें. *n.* urine of horses and cattle; decoy bird; dupe. (घोड्याचें, गुरांचें) मूत; (इतरांना) भुलवणारा पक्षी; हंसण्याचा विषय. *S. bread*, शिळी भाकर,-पाव. *S. news*, शिळी-जुनीपुराणी-बातमी. *Stale'ly, adv.*; *Stale'ness, n.*

Stă'lemāte', *n.* (स्टेल्मेट्)—(chess) a state of chess-game counting as draw; (*fig.*) a deadlock in proceedings. राजाला शह न बसल्यामुळें डाव थांबणें,-कुजणें; कुजलेला डाव, काम बंद पडणें,-एकदम थांबणें. *v. t.* to reduce player to standstill; (*fig.*) bring to a standstill. विरुद्ध पक्षाचा पराभव न करतां खेळ थांबणें; (काम) बंद पडणें.

Stalk, *n.* (स्टॉक्)—(Bot.) slender stem of plant or flower; stalk-like support of organ in animals, (Archit.) ornament-like s of plant. देंठ, देंख, वृन्त, दण्ड, नळी; नळीसारखा आधार; देंठाप्रमाणें नकशी.

Stalk, *v. t. & i.* (स्टॉक्)—to steal up to game; walk in stately manner; walk slowly. लपतछपत जाणें; ऐटीनें चालणें, तोऱ्यानें मिरविणें; हळूहळू चालणें. *n.* a stalking gate; an attempt to stalk game. ठुमकणें, ठुमकत चालणें, तोरा, लपत छपत शिकार साधण्याचा प्रयत्न. *Stalking-horse*, a horse behind which a hunter conceals himself, (*fig.*) a pretext. (शिकार करतांना) आड लपण्याचा घोडा; ढोंग, मिष.

Stall, *n.* (स्टॉल्)—compartment for one animal in stable or cow-house; space appropriated to one dealer in market or bazaar; a numbered seat in a theatre; (*pl.*) row of seats lining wall of choir etc., (*sing.*) one such seat; pickpocket's confederate. गोठ्यांत किंवा तबेल्यांत एका जनावराकरितां जागा; एका दुकानाची जागा, दुकान, बैठक; नाटकगृहांतील नंबर घातलेली जागा; (खिस्ती प्रार्थनामंदिरांतील) भिंतीवरोबरच्या बैठकी; अशी एक बैठक,-जागा, खिसेकापूचा साथीदार. *v. t. & i.* to put or keep (a beast) in stall; (motor-engine) stop working; (of aeroplane) become unstable by loss of speed. गोठ्यांत-ठाण्यावर-बांधणें; (मोटरयंत्र) थांबणें; (विमान,-वैमानिक) वेग कमी झाल्यामुळें डळमळूं लागणें. *Book-s.*, पुस्तकांचें दुकान.

Stall'age, *n.* (स्टॉलिज)— a space for, rent for, right to erect stall in a market. दुकानाची जागा, भाडें, दुकान-उघडण्याचा हक्क.

Stall'fed, *a.* (स्टॉल्फेड)—ठाणबंद जनावर.

Stăll'ion, *n.* (स्टॅल्यन्)—a male horse. वळू घोडा.

Sta'lwart, *a.* (स्टॉल्वर्ट)—tall and strong, stout-hearted; courageous. मजबूत, बळकट, धिप्पाड; शूर, धीराचा, धैर्यशाली. *n.* a resolute member of party in politics etc. खंबीर सभासद.*-ly, adv.*; *-ness, n.*

Stā'mĕn, *n* (स्टेमेन्)—the male organ of fructification in plant, pollen-bearing organ in flower. (फुलांतील) पुंकेसर, नर-केसर. *Stam'inate, a.* (Bot.) having stamens. केवळ पुंकेसरयुक्त (पुष्प). *-stamened, Stami'neal,-neous,-niferous, aa.*

Stăm'ină, *n.* (स्टॅमिना)—staying power, power of endurance. जोम, त्राण, धमक, कुवत, बकूब, ताकद.

Stă'mĭnal, *a.* (स्टॅमिनल्)—of stamens or stamina. पुंकेसरांचा; जोमाचा, ताकदीचा.

Stămm'er, *v. t. & i. & n.* (स्टॅमर्)—to speak haltingly, to utter (an excuse etc.) with hesitation. अडखळत बोलणें, तोतरें बोलणें; घाबरत घाबरत बोलणें, लागत बोलणें. *n.* such speech. चोचरेपणा, तोतरेपणा.*-ingly, adv.*, *-er, n.* तोतरा, चोचरा, बोलतांना लागणारा.

Stămp, *v. t. & i.* (स्टॅम्प्)—to bring food down with force on something; mark (paper, &c.) with a stamped impress; to affix postage or other stamp to; (of action, &c.) serve to distinguish; impress on the memory; crush (ore etc). (वर) पाय आदळणें, दापटणें, पादाघात करणें; पाय आपटणें; छापणें; शिक्का मारणें,-पाडणें, नाणें पाडणें; (ला) तिकिट लावणें,-डकवणें; (ला) शिक्का-छाप-मारणें, स्वरूप देणें; स्मृतींत ठसविणें, चिंबविणें, चा ठसा मारणें; कुटणें, कुट्टन बारीक करणें. *n.* stamping of foot; a stamped impress; piece of printed paper affixed as an indication of an amount of postage paid on a letter or to ensure validity of a document; mark or lable affixed to commodity; (*fig.*) characteristic mark; a block that crushes ore. पाय आपटणें,-वाजवणें,-आदळणें; छाप, शिक्का, ठसा; पोस्टाचें तिकिट, पावतीचें तिकिट; (व्यापारी मालाची) निशाणी, (चांगलेपणाची) खूण;

प्रकार, खूण, विशिष्ट रूप,-प्रत; (अशोधित) धातु कुटण्याचें मुसळ. *To s. out,* put an end to, crush (rebellion etc.). मोडून टाकणें, चीमोट करणें, दडपून टाकणें. *S.-collector,* (निरनिराळ्या देशांचीं) तिकिटें (हौशीखातर) गोळा करणारा. *S.-duty,* (कांहीं खतांवर-दस्तैवजांवर-स्टाम्पच्या-तिकिटांच्या रूपानें भरावयाची) स्टाम्प फी. *S. machine,* (चिंध्या वगैरे कुटून कागद तयार करण्यासाठीं) धातु कुटण्याचें यंत्र. *S.-office,* (सरकारी स्टाम्प विकण्याची व स्टाम्प फी घेण्याची) स्टाम्प-कचेरी. *Stam'per,* छाप मारणारा, छापवाला; धातु कुटण्याचें यंत्र.

**Stămpēde',** *n.* (स्टॅम्पी'ड्)—a rush of horses or cattle or people under sudden common impulse, esp. panic, (U. S. polit.) unconcerted movement of many persons. (भीतीमुळें शिपायांची वगैरे) पळापळ, धांवाधांव, धांवपळ, दाणादाण. *v. t. & i.* to make or cause to make such rush. धांवपळ,-दाणादाण उडणें,-उडविणें.

**Stănce,** *n.* (स्टॅन्स)—position taken for stroke in golf or cricket. टोला मारण्याच्या वेळचा पवित्रा.

**Stanch,** *See* Staunch.

**Sta'nchion,** *n.* (स्टा'न्शन्)—a pillar, post; upright bar for confining cattle in stall. मेढका, खांब; दावण, मेढा.

**Stănd,** *v. i. & t.* (स्टॅन्ड)—(stood), to be in a stationary upright position; rise up; endure successfully, put up with; be set upright, place upright, be of specified height, be situated; assume a stationary position, hold good, remain valid; (of ship) hold specified course. उभा राहणें, खडा असणें, वर उठणें; टिकाव धरणें, तगणें, टिकणें, ठरणें; उभा करणें; उभा ठेवणें; (अमुक) उंचीचा-उंच-असणें; (ठिकाणीं, बाजूला) असणें,-होणें; थांबणें, उभा राहणें; लागू पडणें; ठराविक दिशा धरणें. *n.* a stationary position, position taken up, resistance to an attack, pedestal or rack; structure with tiers of seats for spectators at races etc.; a stall in market, standing place for vehicles, standing growth. थांबणें, उभा राहणें, प्रतिरोध; ठाणें, आसन, आखाडा; विरोध, प्रतिकार; दम, नेट, टिकाव; घडवंची, मांडण, तिवई, ठाणवई; बैठकीच्या रांगांची रांगण, बैठकांच्या रांगा; दुकान, बैठक; अड्डा; जागा, ठिकाण, खुंट; उभें पीक. *Hair stands on end,* अंगावर शहारे येतात,-उभे राहतात (भीतीनें वगैरे). *Stands six foot three,* सहा फूट तीन इंच उंच आहे. *S. and deliver!,* (high-wayman's order). खडा रहा! पैसा अडका टाक! (वाटमाऱ्याचा हुकूम). *It stands to reason (that),* हें तर्कसिद्ध आहे, हें नाकबूल केलेंस तर नला राग येईल. *I stand corrected,* माझी चूक असेल तर सांगा. *How does he s. pain?* त्याला वेदना कशा काय सहन करवतात? *Shall s. no nonsense,* भलती सलती बडबड चालणार नाहीं. *To s. by,* ची बाजू घेणें, ला पाठिंबा देणें; (वचन, अटी) पाळणें, न मोडणें; (गलबत हाकारण्याच्या) तयारींत असणें; जवळ मजा पाहात उभें राहणें. *A stand-by,* basis of reliance. खात्रीचा-विश्वासू-मनुष्य,-वस्तु. *S. down,* परत-माघारें-फिरणें,-येणें. *S. for,* represent, signify; be candidate for, espouse the cause of. दाखविणें, दर्शविणें, चें चिन्ह असणें, उभें राहणें; चा कैवार-बाजू-घेणें. *S. in with,* be in league with. शीं संगनमत करणें *S. off,* keep away. दूर राहणें.-असणें. *S. off and on,* (गलबत) ठराविक दिशा धरून किनाऱ्याच्या आगेमागें जाणें. *S. on* or *upon (ceremony),* (शिष्टाचाराला) घट्ट धरून राहणें,-पाळणें; त्याच-एकाच-मार्गानें,-दिशेनें,-(गलबत) जाणें. *S. out,* hold out (against); be prominent. चिकटून राहणें, व्यक्त-स्पष्ट-दिसून येणें. *S. over,* be postponed. तहकूब राहणें,-ठेवणें, पडून राहणें. *S. treat,* स्वखर्चानें मेजवानी देणें. *S. to,* ला चिकटून राहणें, न सोडणें. *S. up,* (उठून) उभा राहणें. *S. up for,* (चा) पक्ष घेणें, कैवार घेणें. *S. up to,* ला धैर्यानें तोंड देणें. *S. up with,* ला (नाचांत) भागीदार घेणें. *S.-up, a.* (of collar) upright, high; thorough, fair (fight). उभी, उंच, (गळपट्टी), यथायोग्य (सामना). *To make a s. (against),* ला विरोध-प्रतिकार-करणें. *Book-s,* पुस्तकांची घडवंची; -उघडें कपाट. *Umbrella s.,* छत्र्यांची घोडी. *Band-s..* वाजंत्री वाजण्याची (सार्वजनिक) जागा. *S. of arms,* (एका सैनिकाचा) हत्यारांचा पुरा संच. *Wash-s.,* तोंड धुण्याचें मेज,-स्थान.

**Stănd'pōint,** *n.* (स्टॅ'न्ड्-पॉइन्ट्)—a position or point of view, a fundamental principle. विचाराची दिशा, विचारभूमिका, मुख्य मुद्दा, दृष्टि.

**Stăndoff'ish,** *a.* (स्टॅन्डऑ'फिश्)—distant, reserved. दूर दूर राहणारा, फुढा, कुढ्या मनाचा.*-ly, adv.*; *-ness, n.*

**Stănd'still,** *n.* (स्टॅ'न्ड्-स्टिल्)—arrest of progress. विराम, खळ.

**Stăn'dard,** *n.* (स्टॅ'न्डर्ड्)—a distinctive flag; (esp.) flag of cavalry regiment; (*fig.*) rallying principle; specification by which something may be tested; required degree of some quality fixed by competent authority; (attrib.) corresponding to the standard, of recognized authority or prevalence; an upright stock on which rose etc. is grafted, tree, shrub, that stands alone; an upright support (for a lamp, etc.). निशाण, पताका; चिन्ह, नमुना, आदर्श; इयत्ता; मान; प्रमाण, उपमान; शिक्क्याचें (माप), प्रमाणाचा, प्रमाणभूत, प्रमाणाएवढा; कलम बांधण्याचा उभा खुंट; (भिंतीच्या वगैरे) विन आधाराची वनस्पति; उभा खांब, टेकू, आधार. *To raise the s. of revolt,* बंडाचें निशाण उभारणें. *S. weight,* चलनी,-शिक्क्याचें-वजन. *S. novels,* उच्च प्रतीच्या-नमुनेदार-कादंबऱ्या. *Monetary s.,* proportion of weight of fine metal and alloy in gold, silver, coin. चलनांचें (शुद्ध व

अशुद्ध धातूंच्या वजनाचें ) प्रमाण. *Gold s.*, सुवर्णचलन. *S.-bearer*, निशाणदार; निशाणधरदार, मुख्य म्होरक्या, -पुढारी.

**Stăn'dardize**, *v. t.* ( स्टॅंडर्डाइझ् )—to make conform to a certain standard; (chem.) obtain by analysis, specific value of (solution etc.) for comparison. प्रमाणबद्ध करणें, प्रमाणभूत करणें; पृथक्करण करून ( द्रावणाचें ) विशिष्ट-मान ठरविणें.-*iza'tion, n.*

**Stăn'ding**, *a.* ( स्टॅंडिंग् )—established; of a permanent kind; constantly ready for use; on one's feet; (of jump) done from both feet without run. दृढ, प्रचलित, सिद्ध; कायमचा, नित्याचा; खडा, सज्ज; उभा। दोन्ही पाय उचलून मारलेली (उडी.) *n.* established repute or position, power to stand rank in society; duration. पदवी, योग्यता, नांव, दर्जा; अवधि, काल, दिवस. *S. room*, उभें राहण्यापुरती जागा. *S. orders*, (पार्लमेंटच्या कामकाजासंबंधीं) कायमचे हुकूम,-नियम. *S. committee*, कायमची (बारमाही) व्यवस्थापक मंडळी,-कमिटी. *A s. jest*, ठराविक,-नित्याचा,-कायम-थट्टेचा विषय. *S. waters*, stagnant. कोंडलेलें,-कोंदट,-पाणी. *S. army*, खडी फौज.

**Stănd'ish**, *n.* ( स्टॅंडिश् )—(arch.) an ink-stand. दौतकाळा, कलमदान. [ *stand + dish* ]

**Stănd'pătter**, *n.* ( स्टॅन्डपॅटर् )—(U. S.) a politician who is for strict adherence to party platform, esp. on tariffs. (जकातीच्या धोरणासंबंधीं) तीव्र स्वपक्षनिष्ठ राजकारणी मनुष्य.

**Stăn'hope**, *n.* ( स्टॅनप् )—a kind of light open carriage of 2 or 4 wheels. एक प्रकारची गाडी. *S. press*, (लॉर्ड स्टॅनपनें शोधून काढलेलें) छापण्याचें लोखंडी यंत्र. *S. lens*, निरनिराळ्या वक्रतेची वाटोळी कांच. [ name of inventors ]

**Stank**, *pa. p.* of stink.

**Stăn'nary**, *n.* ( स्टॅनरि )—tin-mine; tin-mining district. कथिलाची खाण; कथलाच्या खाणींचा प्रदेश. *Stan'nic, a.* of tin. कथलाचा, कथलापासून निघालेला. *Stanniferous, Stann'ous, aa.; Sta'nnate, n.*

**Stăn'za**, *n.* ( स्टॅन्झा )—one of the metrically equal groups of lines into which some poems are divided; a group of four lines. श्लोक, कडवें, चार ओळींचा श्लोक. *Stanza'ic, a.*

**Stā'ple**, *n.* ( स्टेपल )—important or principal article of commerce in a district or country; chief element in something (*fig.*); quality of fibre in wool or flax or cotton. व्यापाराचा मुख्य जिन्नस. मुख्य निपज,-उत्पन्न,-धंदा, पेठ, उतारपेठ; मुख्य घटक, मुख्य द्रव्य, मुख्य मुद्दा; सूत, धागा. *a.* principal. मुख्य, ठळक, प्रमुख (विक्रीचा माल, जिन्नस). *v. t.* to sort according to fibre. (लांब-आंखुड धाग्याप्रमाणें) प्रतवारी करणें, प्रत लावणें. *Cotton of fine, short, s.* लांब, आंखूड, धाग्याचा कापूस. *Sta'pler, n.*

**Stā'ple**, *n.* ( स्टेपल् )—a hoop-shaped bar or piece of wire with pointed ends for driving into wood, etc.; a loop of iron; bent wire in wire-stitching. विचवा, लोखंडी पाव; कोयंडा; तारा मारण्याची वाकडी तार. *v. t.* to furnish, fasten, with s विंचवा मारणें, कोयंड्यांत अडकवणें; तार मारणें. *Stapling-machine*, पुस्तकें शिवणाऱ्याचें (पुस्तकांना) तार मारण्याचें यंत्र.

**Stär**, *n.* ( स्टार् )—any celestial body normally seen as a point of light, a figure or object representing a star as ornament etc.; asterisk; brilliant or prominent person; chief actor or actress; (*pl.*) influences deciding one's lot, person's destiny or luck. तारका, चांदणी, तारा, नक्षत्र; चांद, चांदणी (दागिना); चौफुली, फुली, तारा; तेजस्वी पुरुष, प्रमुख व्यक्ति; प्रमुख नट,-नटी, तारका; (अने०) ग्रहमान; दैव, नशीब. *v. t. & i.* to mark or adorn with star(s), affix asterisk to (name); appear as a star actor. तारकांनीं भूषित करणें; (वर) चौफुल्या काढणें; चांद लावून विभूषित करणें; (नांवापुढें) फुली करणें; प्रमुख नट म्हणून चमकणें. *Fixed s.*, स्थिर तारा, नक्षत्र. *Day'star*, (poet.) शुक्र; सूर्य. *North, polar, s.* ध्रुवतारा. *Shooting s.* तुटणारा तारा, उल्का. *Ss. and stripes*, U. S., national flag. अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांचें राष्ट्रीय निशाण,-राष्ट्रध्वज. *A literary s.*, वाङ्मयक्षेत्रांतील चमकणारा तेजस्वी तारा (लेखक). *His s. was in the ascendant*, त्याचें दैव उच्चीचें होतें. *S.-fish*, चक्राकार मासा. *S.-gazer*, an astronomer. (ग्रह) ज्योतिषी. *S.-light*, चांदण्यांचा प्रकाश. *S.-lit night*, चांदण्यांनीं प्रकाशित रात्र, चांदणी रात्र. *S. of Bethelhem*, चांदण्याप्रमाणें पांढऱ्या फुलांचें कमळाच्या जातीचें फुलझाड. *S.-shell*, शत्रुपक्षाचा ठावठिकाणा दिसावा म्हणून त्यावर हवेंत फुटून उजेड पाडणारा कुलपी गोळा (स्फोटक). *S-spangled*, (U. S. flag) तारकांकित. S.-*stone*, एक जातीचा नीलमणी. *Star'let, n.*; *Star'-less, Starry, aa.*

**Stärb'oard**, *n.* ( स्टा'र्-बर्ड )—the right side of a ship looking towards the stem or prow. जहाजाची उजवी बाजू. *v. t.* to turn, put, (helm) to s. उजव्या बाजूला वळवणें.

**Stärch**, *n.* ( स्टार्च् )—principle present in potatoes, corn, and other plants, having digestive value and used also as stiffening for linen, &c.; (*fig.*) formality, stiffness of manners. पिठसत्व, सत्व; खळ, कलफ; मरकरणीपणा, दिखाऊ कलफ, औपचारिकपणा. *v. t.* to stiffen with starch (oft. *fig.*). खळ देणें, खळीनें कडक करणें. *a.* (rare) precise, prim. ठीकठाक, नीटनेटका. *Starched, pa. p.* खळ लावलेला; ठरींव सांच्याचा; नखरेबाज. *Starchedly, adv.*;-*ness, n. Starch'iness, n. Starch'y, aa.* खळीसारखा; ताठ, औपचारिक.

**Stāre**, *v. i. & t.* ( स्टेअर् )—(of eyes) to be wide open, to look with staring eyes and fixed gaze at; (chiefly in part. *Staring*) be unpleasantly noticeable; influence (person) by gazing. डोळे ताठ उघडे असणें, डोळे वटारून पाहणें; टक लावून पाहणें; लक्षांत येणें, लक्ष जाणें; डोळे वटारून पाहणें,-परिणाम करणें. *n.* a staring gaze. टक, वटारलेली

नजर. *A staring waist-coat,* नजरेंत भरण्याजोगा बंडी, चटकन नजर जाण्याजोगी बंडी. *S down,* outstare. अधिक टक लावून (दुसऱ्याकडे) पाहणें, त्याला खालीं पाहायला लावणें. *Ruin stared him in the face,* नाश त्याच्यापुढें टक लावून (निःसंदेहपणें) उभा होता.

Stār'ing, *a.* (स्टे'अरिंग)—(esp.) too conspicuous to escape attention (of colour etc.). नजरेंतून न सुटण्याजोगा, नजरेंत भरण्याजोगा.*-ly, adv.* टक लावून, डोळे वटारून.

Stärk, *a.* (स्टार्क)—rigid, esp. in death; (of folly etc.) sheer or unmitigated; (poet.) strong; resolute. कडक,-लांकूड,-झालेला, ताठ (मेताप्रमाणें); शुद्ध, निखालस, केवळ (वेडा इ॰); खंबीर, निश्चयी, करारी.*adv.* completely. पूर्णपणें. *S. mad, S. naked,* निखालस वेडा; अगदीं नागवा,-वस्त्रहीन.

Stär'ling, *n.* (स्टा'र्लिंग)—a small bird noted for chatter, thievery, &c. मैना, साळुंकी, सारिका. 2. protective piling round pier of a bridge. पुलाच्या कमानीच्या आधाराचें बांधकाम.

Stärr'y, *a.* (स्टा'रि)—abounding with stars, set with stars; bright as a star. तारकामय; तेजस्वी, ताऱ्याप्रमाणें चकाकणारा. *S. host,* नक्षत्रगण.

Stärt, *v. i. & t.* (स्टार्ट)—to make a sudden involuntary movement due to pain, surprise, etc.; change position abruptly as from shock, etc.; to begin journey or operations; to set up or set going (enterprise, business, etc.); cause to begin doing; give signal to start race etc.; (of ship's timbers) burst away at joint; rouse (game) from lair; (naut.) to empty. चमकणें, चमक भरणें,-मारणें; दचकणें, बिचकणें, दचकून उठणें; निघणें, (ची) सुरवात करणें; स्थापणें, (ला) आरंभ करणें; सुरवात करवणें, करायाला लावणें; (शर्यतीच्या) सुरवातीचा इशारा देणें,-सूचना देणें; निखळणें, तडकणें, ढिला होणें; (शिकार) उठविणें; रिकामें करणें, ओतणें. *n.* a sudden involuntary movement; (pl.) intermittent efforts; departure from starting place; commencement of operations, beginning of an action; advantage conceded in race, advantageous position. दचकण, दचका; चमक, हुक्की, लहर, उसळी; प्रयाण, सुरवात; आरंभ, प्रारंभ; (वेळाची,-अंतराची) सवलत; (अनुकूल) सुरवात, प्रारंभ, स्थितीचो अनुकूलता. *We s. at six,* आम्हीं सहाला (प्रवासाला) निघूं. *S. in,* सुरवात करणें (करावयाला). *S. out,* (सुरवात करण्याची) तयारी करणें. *S. up,* दचकून उठणें, एकदम उठणें,-डोकें वर करणें. *This started me coughing,* त्या योगें माझा खोकला सुरु झाला. *To s. with,* in the first place. आरंभीं, प्रथम, सुरवातीस. *Works by fits and ss,* लहरालहरीनें काम करतो, हुक्की येईल तसें. *A rum s,* आश्चर्यकारक घटना.

Stärt'er, *n.* (स्टा'र्टर्)—In vbl. senses; (esp.) a person who gives signal for start in race; a horse, competitor, starting in race. सुरवात-चालू करणारा, प्रेरक; (शर्यत सुरु करण्याचा) इशारा देणारा मनुष्य,-अधिकारी; शर्यतींत पळणारा घोडा,-उमेदवार.

Stärt'ing, *n.* (स्टा'र्टिंग)—In vbl. senses. निघणें, सुरवात करणें. *S. gate* घोड्यांच्या शर्यतीला सुरवात करण्याच्या जागेची अडणी. *S.-post,* (शर्यत सुरू होते तो) सुरवातीचा खांब. *S-price,* the odds on or against a horse at the start of a race. शर्यतीच्या प्रारंभीची शर्यतीच्या घोड्याची अनुकूल किंवा प्रतिकूल स्थिति. *S.-point,* आद्य चिन्ह, प्रस्थानबिन्दू.

Stär'tle, *v. t.* (स्टा'र्टल)—to give shock of surprise to, to frighten or alarm suddenly. (आश्चर्यानें, भीतीनें-) दचकवणें; चकित करणें, धडकी बसवणें, धक्का देणें. *Startling, pr. pa.* surprising, alarming. धडकी बसविणारा, धक्का देणारा, चकित करून सोडणारी (बातमी इ.). *Start'lingly, adv.*

Stärt'ler, *n.* (स्टा'र्ट्लर्)—startling fact or statement. आश्चर्यानें चकित करणारी गोष्ट, धक्का करून सोडणारें विधान.

Stärve, *v. i. & t.* (स्टार्व्ह)—to die or suffer acutely from lack of food or cold, to kill with hunger, to keep without or short of food; (*fig.*) suffer mental or spiritual want, feel strong craving *for*; compel (garrison) into surrender by depriving of food etc. उपाशी मरणें, उपासमार होणें, थंडीनें कडकडून मरणें; उपाशी ठेवणें; खंगणें, उतरती कळा लागणें, ची भूक लागणें, ची गरज भासणें; (कोंडलेल्या शत्रूला) जेरीस-वठणीस-आणणें, *Starving, Starved, part.* hungry. क्षुधित, सुकेलेला, वखवखलेला.

Stärvā'tion, *n.* (स्टार्व्हे'शन्)—the act of starving. उपासमार.

Stärve'ling, *n.* (स्टा'र्व्हलिंग)—a starving or ill-fed person or animal. उपासमार झालेला. पोटाला पुरेसें न मिळालेला, मरतुकडें, शुष्क, मनुष्य,-जनावर. *a.* starving. मरतुकडा, रोडया.

Stā'sis, *n.* (स्टे'सिस्)—stoppage of circulation of any of the fluids of the body. शरीरांतील द्रवस्तंभन, रक्तस्तंभन, रक्त एके ठिकाणीं गोठणें. [Gk = standing]

Stāte, *n.* (स्टेट्)—existing position or condition of something; rank, dignity; ceremonial pomp; (often S-) a civil community having its own government and law; such a community forming part of federal republic; civil government. स्थिति, दशा, गति, अवस्था; मोठेपणा, दर्जा, श्रेष्ठ पदवी; वैभव, थाटमाट, डाम-डौल; राज्य, राष्ट्र; लोकसत्ताक राष्ट्र; संस्थान; राजसत्ता, सरकार. *a.* of, for, concerned with, the state; reserved for ceremony; pompous. राजकीय, सरकारी; दरबारी, भव्य, मिरवणुकीचा; डामडौलाचा, थाटाचा. *v. t.* to put into form of a statement; say as of knowledge that; fix, specify; (*fig.*) express the conditions of (problem etc.) in symbols. हकीकत सांगणें; निवेदन करणें, कथन करणें;

(बीजगणितांत) अक्षर-चिन्हांनीं,-संज्ञांनीं,-दर्शविणें. *S. of life*, दर्जा, धंदाउद्योग. *What a s. you are in!* (colloq.) किती गचाळ-घाणेरडा-त्तूं! *He was in quite a s. about it!* तो त्याविषयीं अति चिंतातूर झाला!-किती उतावीळ! *The United Ss. of America*, अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें. *Church and State*, धर्मसत्ता आणि राजसत्ता (सरकार). *To keep s.*, इतमामानें राहणें. *In s.*, with all due ceremony. यथायोग्य, यथाविधि (संस्कारांनीं). *To lie in s.*, (of dead person) be placed on view in public place. सार्वजनिक ठिकाणीं दर्शनाकरितां (शव) ठेवणें. (Adj.) *S. criminal*, राजकीय गुन्हेगार, -कैदी. *S. documents*, सरकारी कागदपत्र. *S. prisoner*, (राजकीय) गुन्हेगार. *S. trial*, (राजकीय गुन्ह्याबद्दल) सरकारनें केलेला खटला. *S. socialism, socialist*, policy, advocate, of state control of manufactures, railways, etc. for the benefit of the masses. राजकीय समाजहितवाद,-वादी (समाजाच्या-सामान्य लोकांच्या-फायद्यासाठीं कारखाने वगैरे सरकारी मालकीचे असावे हा वाद). *S. carriage*, मिरवणुकीची गाडी. *S. call*, (colloq.) औपचारिक भेट. *S. room*, दरबारी कामकाजाची-समारंभाची-विशिष्ट जागा, दिवाणखाना; आगबोटीवरील प्रवाशाची स्वतंत्र खोली. *S. house*, (U. S.) capitol; meeting-place of state legislature. सभागृह; (संस्थानांतील) पार्लमेंटसभागृह. *S. rights*, (U. S.) अमेरिकेंतील संयुक्तसंस्थानांनीं व्यक्तिशः राखून ठेवलेले विशिष्ट हक्क. *At stated intervals*, ठराविक वेळीं, नियमितपणें. *Stat'edly, adv.* ठराविक पद्धतीनें, नियमानें.

**Stāte'-craft**, *n.* (स्टे'ट्‌क्रॅफ्ट्)—skill in affairs of state. राज्यकला, राजकारणपटुत्व, मुत्सद्दीपणा.

**Stāte'ly**, *a.* (स्टे'ट्-लि)—marked by great dignity, imposing, elevated. भव्य, डौलाचा, थाटमाटाचा, गंभीर.*-liness, n.* भव्यपणा, गंभीरपणा.

**Stāte'ment**, *n.* (स्टे'ट्-मेन्ट्)—presentation of a fact or problem, narrative; formal account of facts. निवेदन, कथन, विधान, हकीगत, जबाब; (हिशेबाचा) तक्ता, यादी, आकार, आंकडा.

**States'man**, *n.* (स्टे'ट्स्-मन्)—a sagacious far-sighted practical politician. राजकारणी पुरुष, मुत्सद्दी, राज्यकार्यधुरंधर, राजनीतिनिपुण.*-ly,-like, aa. -ship, n.* मुत्सद्दीगिरी.

**Stăt'ic,-al**, *aa.* (स्टॅ'टिक्,-कल्)—at rest, in equilibrium; of statics. स्थित्यात्मक, स्थितिजन्य; स्थितिशास्त्राचा. *S. energy*, स्थितिशक्ति. *S. electricity*, स्थिरविद्युत्, घर्षणजन्यविद्युत्. *Stat'ically, adv.* [Gk *sta*, stand]

**Stă'tics**, *n. pl.* (स्टॅ'टिक्स)—a branch of physics concerned with bodies at rest and forces in equilibrium, a branch of mechanics or dynamics. स्थितिशास्त्र.

**Stā'tion**, *n.* (स्टे'शन्)—standing, being still; a place held by some person or used for some purpose; status, rank of life; post of observation or defence; a stopping-place for railway trains; (surv.) point from which measurements are made, standard distance usu. 100 or 66 ft; military post in India, officers or society residing there; (Austral.) sheep run, or its building; (Bot, Zool.) nature of the habitat of plant or animal in respect of soil, climate, etc. उभें-स्थिर-राहणें, -असणें; जागा, स्थान, ठिकाण; पदवी, दर्जा, योग्यता, स्थिति; अवलोकनस्थान, रक्षणस्थान; गाडी थांबवण्याचें ठिकाण, स्टेशन; (जमीन मोजतांना वगैरे) मापनस्थान, (शंभर, साठ,) फुटांचें प्रमाणभूत अंतर; लष्करी-पोलीस-ठाणें, ठाण्यांतील अधिकारी,-लोक; (ऑस्ट्रे॰) मेंढ्यांकरितां चराऊ कुरण,-त्यावरील इमारत,-मेंढवाडा; (वनस्पति, प्राणी, यांच्या) मूलवसतिस्थानाची हवा, जमीन वगैरेविषयींची स्थिति. *v. t.* to assign a person his station, to post. जागा नेमून देणें, ठेवणें, बसवणें, योजणें. *Naval s.*, आरमारी ठाणें. *S. of the cross*, (कांहीं ख्रिस्ती देवळांतील) ख्रिस्ताच्या चौदा प्रतिमांपैकीं किंवा चित्रांपैकीं एक. *S. calendar*, आगगाड्या सुटण्याच्या वेळा दाखविणारा (प्लॅटफॉर्म-फलाटा-वरील) फलक. *S. house*, police station. पोलीस-ठाणें. *S.-master*, आगगाडीच्या स्टेशनावरील प्रमुख अधिकारी. *S. pointer*, three-armed protractor for locating place on chart from certain data. त्रिभुजात्मक अंशमापक.

**Stā'tionary**, *a.* (स्टे'शनरि)—still, not in motion; not progressive. अचल, स्थिर; अप्रागतिक, बैठा, कायम केलेला. *n.* a s. person; (pl.) s. troops. अचल-अप्रागतिक-मनुष्य; कायम सैन्य. *S. intelligence*, न वाढणारी-स्तंभित-बुद्धि. *S. air*, remaining in lungs during ordinary respirpation. (नित्याच्या श्वासोच्छ्वासाचे वेळीं) फुप्फुसांत शिल्लक असणारी हवा. *Sta'tionariness, n.*

**Stā'tioner**, *n.* (स्टे'शनर्)—one who sells writing articles, a dealer in stationery. लेखनसाहित्य विकणारा. *Stationer's Hall*, of stationers' company in London, at which a book is *entered*, or registered for purposes of copy-right. हक्क राखून ठेवण्यासाठीं पुस्तक नोंदण्याची लंडनमधील कचेरी.

**Stā'tionery** *n.* (स्टे'शनरि)—writing-materials and connected goods. लेखनसामुग्री, लेखनसाहित्य.

**Stă'tist, Stătisti'cian**, *nn.* (स्टे'टिस्ट्, स्टॅटिस्टि'शन्)—an expert in statistics.आंकडेशास्त्रज्ञ. *Statis'tical, a.* आंकडेशास्त्रसंबंधी,-शास्त्राचा;*-tically, adv.*

**Stătis'tics**, *n. pl.* (स्टॅटि'स्टिक्स)—numerical facts systematically collected on a subject; (treated as sing.) science of statistics. आंकडेवार माहिती; आंकडेशास्त्र, लोकस्थिति-गणित, संख्याप्रमाण. *Ss. of population, crime*, लोकसंख्येची, गुन्हेगारीच्या प्रमाणाची, आंकडेवार (सुसंगत) माहिती. *Vital ss.*, जन्ममृत्यूची-जनन मरणाची-आंकडेवार माहिती.

**Stăt'ūary**, *a.* (स्टॅ'च्यूअरि)—of or for statue-making. पुतळ्यांचा, पुतळे-मूर्ति-करण्यासाठीं. *n.* a sculptor;

art of making statues. मूर्तिकार; मूर्ति, पुतळे (बनविण्याची कला). *S. art,* मूर्ति-कला-विज्ञान. *S. marble,* (मूर्ति-पुतळे-करण्याचा) सुंदर संगमरवरी दगड.

Stat'ūe, *n.* (स्टॅच्यू)—a life-like sculptured figure of a person or animal. पुतळा, मूर्ति. प्रतिमा. *Statuesque',* *a.* (स्टॅच्युएस्क्), like, having the beauty of, a statue. पुतळ्यासारखा (उठावदार, डौलदार);—*ly, abv. Statuette', n.* लहान प्रमाणावर केलेला,-आकाराचा,-पुतळा.

Stat'ure, *n.* (स्टॅचर्)—bodily height. शरीराची उंची,-चा उंचपणा.-*statured, a.*

Sta'tus, *n.* (स्टेटस्)—position held by a person or community, one's standing or rank: (law) person's relation to others as fixed by law, state of affairs. स्थिति; पदवी, दर्जा; कायदेशीर हक्क-संबंध; स्थिति, अवस्था. *The status quo,* (lit. the state in which) the original state of affairs. जशाच्या तशी स्थिति, मूलस्थिति, पूर्ववत्. *S. q. ante,* पूर्वस्थिति.

Stat'ūte, *n.* (स्टॅटयूट्)—a legislative enactment, a law, ordinance of corporation, etc; (Bibl.) divine law. कादा, कानू, नियम, ठराव; ईश्वरी-दैवी-नियम,-आज्ञा. *Private s.,* व्यक्तिविषयक कायदा. *General* or *public s,* सार्वजनिक कायदा. *Ss. at large,* सुळांत केले गेलेले संपूर्ण नियम,-कायदे,-ठराव.

Stat'ūtory, *a.* (स्टॅट्युटरि)—of the nature of a statute, enacted by statute. कायद्याचा, कायद्यानें स्थापलेला, कायदेशीर. Also, *sta'tutable, a,—bly, adv.*

Staunch, Stanch, *a.* (स्टॉन्च्)—constant to obligations or purpose, untiring in service or loyalty; water-tight, air-tight. करारी, खंबीर, कट्टा, विश्वासू; पाणीबंद (पाणी आंत न येणारें जहाज, सांधा), हवाबंद. *v. t* (*usu.*-an) to check flow of (esp. blood, wound). त्या प्रवाह थांबविणे.—*ly, adv.*.—*ness, n.*

Stāve, *n.* (स्टेव्ह्)—one of the curved wooden strips forming sides of cask etc., a rung of ladder, stanza, verse. (पिंपाच्या बाजूचा) एक बांकडा फळीचा तुकडा; (शिडीची) पायंडी; कडवें, श्लोक. *v. t.* (staved or stove), to break a hole *in* (cask, boat) (*S. off*) ward off with difficulty or for a time भोंक पाडणें, तोड उघडणे,-पाडणें; टाळणे, निगरणे, पुढें टकलणें.

Stāy, *n.* (स्टे)—a prop or support, a check or delay suspension of judicial proceedings; a sojourn or its duration, stamina or staying power, (*pl.*) corset. आधार, टेकू, धिरा, तणावा, जोर; विराम, खंड;- खोळंबा, दाब; (खटल्याच्या चवकशीची) तहकुबी, मुदत; मुक्काम करणें, मुक्काम, वास्तव्य; टिकाव; दम, धीर; (अने॰) कांचोळी. *v. t.* & *i.* to check or cause to stop, to abstain from departing, remain; to occupy temporary quarters *at*, to maintain position; to show capacity for a prolonged effort, postpone (judgement, decision): support, prop *up*. थांबणें, थांबवणें, थोपवणें; राहणें; वास्तव्य करणें; उतरणें, मुक्काम करणें; स्थिर राहणें; टिकाव धरणें, चिवटपणा असणें, तगणें; तहकूब करणें, (निकाल) लांबणीवर टाकणें; धिरा-टेकू-देणें. *S. of execution,* हुकूमनाम्याची अमल-बजावणी लांबणीवर टाकणे. *A s. upon his activity,* त्याच्या (लेखनव्यवसायांत) खंड पडला आहे *The s. of my old age,* माझ्या म्हातारपणाची काठी (आधार). *To s.* one's *stomach,* भूक तात्पुरती शमविणें,-शांत करणें. *Has come to s.,* (colloq.) कायमचा होऊन बसला. *A s.-at home, a.* & *n.* चूलकोंबडा, घरकोंबडा, नेहमीं घरांत राहणारा (मनुष्य).

Stāy, *n.* (स्टे)—a rope connecting a mast or spar. (गलबताची) जोडदोरी, दोरखंड. *v. t.* to support (mast etc.) by ss., put (ship) on other tack. (डोलकाठी) दोऱ्यांनीं सांवरणें; गलबताची दिशा-मार्ग-बदलणें. *A ship is (hove) in ss.,* गलबत दिशा बदलत आहे. *Miss ss,* योग्य दिशा (गलबताला) न मिळणें.

Stead, *n.* (स्टेड्)—place, room. जागा, ठिकाण, स्थान. *In* one's *s.,* त्याच्या जागीं,-ऐवजीं. *To stand* one *in good s.,* च्या कामास येणें, वेळीं उपयोगी पडणें.

Stea'ding, *n.* (स्टेडिंग्)—a farm-stead. घरें असलेली शेतवाडी.

Stead'fast, *a.* (स्टेड्फस्ट्)—showing constancy; firmly fixed, immovable. स्थिर, खंबीर; निश्चल—*ly, adv.* धिरानें, निश्चयानें. एका धोरणानें.—*ness, n.* स्थिरता, कायमपणा, निश्चय

Stead'ȳ, *a.* (स्टेडि)—firm in position, not tottering; constant in motion or direction or action, not hurried or perturbed; of industrious and temperate habits. स्थिर, निश्चल, न डगमगणारा; ठाम, निश्चल समगति, एकसारखा; स्थिरवृत्तीचा, स्थिरबुद्धीचा; निश्चयी, उपयोगी, करारी. *n.* kinds of support for hand or tool. आधार, हात. *v. t.* & *i.* to make or become steady. स्थिर करणे.-होणें; स्थिरता आणणें,-येणें *Not s. on his legs,* पाय लटपटणारा. *S.!* be steady etc. हालूं नको! निश्चल रहा! उतावीळ करूं नको! (Naut.) *Keep her s.,* नाळीची दिशा बदलूं नको! गलबताची दिशा बदलूं नको! *S. in his principles,* आपलीं तत्त्वें करारीपणानें पाळणारा. *Stead'ily, adv,—ness., n.* स्थिरता, स्थैर्य, सारखेपणा, समगतित्व.

Steak, *n.* (स्टेक्)—a slab of meat or fish suitable for grilling. (शिजविण्याजोगा) मांसाचा किंवा माशाचा तुकडा.

Steal, *v. t.* & *i.* (स्टील्)—(stole, stolen), to carry off or appropriate secretly; to come or go noiselessly or unnoticed, to obtain by surprise: (also *S. away*) win (person's *heart,*) by insiduous arts, etc. चोरणें, चोरी करणें; आवाज न करतां येणे किंवा जाणें, चोरून जाणे; गुपचुप-चोरून-एकदम-अचानक घेणें; भुलवणें, मोहवणें. *n.* a successful long stroke in golf. (गोल्फच्या खेळांतला) लांब व यशस्वी तडाखा,-टोला. A *stolen kiss,* अचानक घेतलेले चुंबन,-मुका. *To s. a march on,* get the start of, anticipate. सुरवातीला चोरटा

फायदा मिळविणें, न कळत फायदा घेऊन वसणें,-धुडें जाणें. *Mist stole over the valley*, त्या दरीवर धुकें अचानकपणें पसरलें. *Stealer*, *n.*

**Stealth**, *n.* (स्टेल्थ्)—evasion of notice. चोरी, छपावणी. *By s.*, चोरून, गपचूप, लपतछपत *Stea'lthy*, *a.* चोरीचा: चोरपावलांचा *Stea'lthily*, *adv.*; -*lthiness*, *n.*

**Steam**, *n.* (स्टीम्)—the gas into which boiling water turns used as motive power; any vapour or exhalation, visible particles of water resulting from condensation of steam, (colloq.) energy; (attrib.) worked by steam. वाफ, वाष्पशक्ति; (वाफेच्या घनीभवनानें झालेले) दृश्य जल-बिंदु, सजलबाष्प; शक्ति, जोम, उत्साह; (विशे०) वाफेचें, वाफेनें चालणारें. *v. t.* & *i.* to send off steam; go or be driven by steam; cook (food) by steam; soften (timber) for bending by steam; (colloq.) work vigorously, make great progress (*s. ahead, away*). वाफ सोडणें; (बोट, गलबत) वाफेच्या योगानें-शक्तीनें-चालणे, वाफेनें चालवणें; वाफेवर (अन्न) शिजविणें; वाफेनें मृदु करणें, (लांकडाला) वाफारा देणें; जोराचा प्रयत्न करणें, प्रगति करणें,-होणें. *To get up s.*, उत्साह धरणें, जोर करणें. *S. boat*, बाष्पनौका, आगबोट. *S. boiler*, बाष्पोत्पादक पात्र, -साधन. *S. chest,-box*, through which steam passes from boiler to cylinder. सरक-पडद्यावरील वाफेची पेटी. *S. engine*, वाष्पयंत्र *S. guage*, बाष्पभारमापक (यंत्र). *S.-roller*, वाफेचा रूळ; (अलं०) विरोध चिरडून टाकण्याची शक्ति. *S.-ship*, (abbr. *S. S.*) ship propelled by steam. (वाफेनें चालणारी) आगबोट. *S. tight*, capable of resisting passage of steam. बाष्पबंद. *S. tug*, जहाजें ओढणारी आगबोट. *Steam'iness*, *n.* बाष्पमयता, बाष्पसदृशता. *Steam'y*, *a.* वाफेचा, बाष्पयुक्त, वाफेसारखा.

**Steam'er**, *n.* (स्टीमर्)—(*esp.*) a steam-ship or steam-driven boat; fire-engine worked by steam; vessel for steaming vegetables, etc.; generator of steam. वाफेनें चालणारें जहाज, आगबोट; आग विझविण्याचा (वाफेचा) बंब; (पदार्थ) वाफेवर शिजविण्याचें भांडें,-पात्र (उदा० मोदकपात्र); बाष्पोत्पादक.

**Ste'arin**, *n.* (स्टीअरिन)—chief ingredient of suet and tallow; stearic acid used for candles. चरबीचा मुख्य घटक (याचा उपयोग मेणबत्त्या करितां मेणाऐवजीं करतात); चरबीतून निघणारें अम्ल. *Ste'arinery*, *n.* manufacture of stearin products. चरबीचा-चरबीच्या वस्तूंचा-कारखाना. *Stea'ric*, *a.* *Ste'arate*, *n.* [Gk *stear*, fat]

**Ste'atite**, *n.* (स्टीअटाइट)—kind of talc, soapstone. शिंप्याचा खडू (यानें शिंपी कापडावर खुणा करतात.) *Steati'tic*, *a.*

**Steed**, *n.* (स्टीड)—(poet, rhet.) a horse of high mettle. खंदा मजबूत घोडा, वारू.—*less.*, *a.*

**Steel**, *n.* (स्टील)—kinds of alloy of iron with carbon or other elements; a rod of steel for sharpening knives; a strip of steel for stiffening corset; (poet. sing only) a sword; sternness. पोलाद, तिखें; (चाकू वगैरेंना) धार लावण्याची पोलादी पट्टी; (कपडा तंग करण्याकरितां) पोलादी पट्टी; तलवार, कट्यार; ताठपणा, चिवटपणा, कडकपणा. *v. t.* to harden oneself. (मन) पोलादासारखें घट्ट करणें, कठिण करणें. *a.* made of, or hard as, steal. पोलादी; पोलादासारखा घट्ट,-मजबूत. *S. pen*, पोलादी टांक. *Cold s.*, sword etc. as opp. to fire-arm. तलवार. A *heart of s.*, (पोलादाप्रमाणें) खंबीर हृदय,-अंतःकरण, मजबूत, निश्चयी. *A foe worthy of one's s.*, योग्य प्रतिस्पर्धी, लढण्यालायक योद्धा. *S.-clad*, चिलखत घातलेला *S. engraving*, पोलादी फलकावर (प्लेटीवर) केलेलें खोदकाम; पोलादी फलकावरून घेतलेलें छायाचित्र. *Steel'work*, पोलादी जिन्नस,-वस्तु, यांसाठीं पोलाद. *S.-yard*, a weighing apparatus with graduated arm along which weight slides. एक पारड्याचा तराजू (याच्या लांब आडव्या दांड्यावर वजनाच्या खुणा असून त्यावरून वजन सरकतें).

**Steel'y**, *a.* (स्टीलि)—inflexible, severe; of, hard as, steel. अभेद्य, पाषाणासम, दुर्भेद्य; पोलादी, कठिण, दणक. *Steel'iness*, *n.*

**Steep**, *v. t.* (स्टीप्)—to keep in liquid or some medium till saturated or impregnated. भिजत घालणें, भिजविणें, बुडवून काढणें *n.* process of steeping (esp. *in s.*); liquid in which thing is steeped. भिजविण्याची पद्धति; भिजवण. *To s. in*, impregnate or pervade with (as *Steeped in Latin and Greek.*) पूर्ण मुरणें,-अवगाहन.

**Steep**, *a.* (स्टीप्)—(of slope) descending or rising rapidly; precipitous; hard to climb up; (of story) exaggerated, taxing patience; (of price) exorbitant, unreasonable. उभ्या चढाचा, उभा, उभ्या सुळाचा, घस; अतिशयोक्तीची, कंटाळवाणी (गोष्ट इ०); अवाच्यासवा, गैरवाजवी, फाजील, (किंमत इ.) *n.* (poet.) steep slope, precipice. चढण, डगर, कडा, घसरण, थांडी. *S. hills*, उभ्या चढावाच्या टेंकड्या. *Steep'en*, *v. i.* & *t.* चढ होणें, चढाव होत जाणें, घस होत जाणें.

**Stee'ple**, *n.* (स्टीपल्)—high church tower running into a spire, a tower with a spire. घुमट, शिखर, मनोरा, सुळका. *S. chase.* *a.* cross-country horse-race, foot-race. (खंदक, कुंपणें वगैरे वरून उड्या मारून जाण्याची) घोड्याची शर्यत, किंवा दौड-शर्यत, चालण्याची शर्यत. *S.-chaser*, *n.* या शर्यतींतील घोडेस्वार,-घोडा. *S.-jack*, *n.* शिखर, घुमट, उंच धुराडीं वगैरेंच्या दुरुस्तीचें काम करणारा. *S.-top*, एक जातीचा देवमासा. *Steep'led*, *a.* शिखर-कळस-असलेला. *Steep'lewise*, *adv.*

**Steer**, *n.* (स्टिअर्)—a young male ox, esp. a castrated one. पाडा, आडबैल, खोंड, गोन्हा.

**Steer**, *v. t.* & *i.* (स्टिअर्)—to manage rudder or guiding-apparatus, (ship, motor car etc.) to direct the course, guide by handle; (poet.)

direct one's course. सुकाणूनें चालवणें, सुकाणू फिरविणें,-चालवणें; वळवणें, हांकणें, वळणें, मार्ग धरणें, -लावणें. *Steering wheel*, सुकाणूचें चाक. *To s. clear of*, avoid. टाळणें, वहिवाटणें, ओलांडणें. *Steer'er, n. Steer'able, a.*

**Steer'age,** *n.* (स्टिअरिज)—steering. (Naut.) the effect of helm on ship, the accommodation for lower class passengers in ship. गलबत (सुकाणूनें) चालवणें; सुकाणूच्या फिरविण्याचा गलबतावर होणारा परिणाम, गलबत वळवणें; लवतावरील खालच्या वर्गाच्या उतारूंची जागा.

**Steers'man,** *n.* (स्टिअर्झ्-मन्)—a person steering, the helmsman of a ship. सुकाणू धरणारा, सुकाण्या.

**Stein'bŏck,** *n.* (स्टाइन्बॉक्)—the Alpine ibex, small S.-Afr. antelope. रानटी बकरा; लहान काळवीट.

**Stĕll'ar,** *a.* (स्टे'लर्)—full of stars. तार्‍यांचें, तारकामय.

**Stĕm,** *n.* (स्टेम्)—the main body of a tree or plant; stem-shaped part; tubular part of a tobacco-pipe; (*fig.*) family stock; slender shaft; the upright or forward-slanting piece at ship's bow; (Phiol.) the common base from which a set of inflected or derivative forms is made. झाडांचें खोड, स्कंध, बुंधा, कांडें; दांड्याच्या आकाराचा भाग; चिलमीची नळी; वंशशाखा, कुल, गोत्र, घराणें; देंट, देख; गलबताचा पुढील भाग, नाळ; (व्याक.) अंग, सामान्यरूप. *v. t.* to make headway against; to resist the force of; not to be carried away by current etc.; remove stem of (tobacco). (पाणी) कापीत जाणें; अडविणें, बांध घालणें, रोधणें; वाहावत न जाणें; (तंबाखूचें) देंठ तोडणें,-काढणें. *From s. to stern*, from end to end. गलबताच्या ह्या टोंकापासून त्या टोंकापर्यंत. *S.-less, Stemmed, aa.; Stem'let, n.* लहान देंठ.

**Stĕ'mma,** *a.* (स्टे'मा)—(pl.-*ta*) a family tree, pedigree; (Zool.) a simple eye. वंशावळ, अवलाद; साधा डोळा.

**Stĕnch,** *n.* (स्टेन्च्)—overpowering of noxious or persistent stink, offensive odour. घाण, दुर्गंधी.

**Stĕn'cil,** *n.* (स्टे'न्सिल्)—a thin plate (of metal, &c.) with a pattern cut through it, decoration, lettering, produced by stencil. अक्षरें, फुलें. वेलबुट्टी कातरून काढलेला पत्रा, कागद, वगैरे; अशा तऱ्हेची नक्षी. *v. t.* to reproduce pattern or mark surface by use of stencil. (वरीलप्रमाणें) कातरलेल्या पत्र्यावरून नक्षी, वेलबुट्टी वगैरे (भिंतीवर इ०) उठवणें. *Sten'cilled, pa. t. & pa. p.;-ciller, n.*

**Stenŏ'chromy,** *n.* (स्टेनॉ'क्रामि)—art of printing in several colours at one impression. बहुरंगी चित्रकला.

**Stĕ'ntor,** *n.* (स्टे'न्टार्)—a person with powerful voice. ताठ, खणखणीत, खड्या आवाजाचा मनुष्य. *Stentor'ian, a.* मोठा, खडा (आवाज); खड्या आवाजाचा. [Gk *stentor*, herald in Trojan war]

**Stĕnŏg'raphy̆,** *n.* (स्टिनॉग्राफि)—shorthand. लघुलेखनकला, संक्षिप्त चिन्हांनीं लिहिण्याची कला. *-rapher,-raphist, n.* लघुलेखक. *Stenog.aph'ic, a.* लघुलेखनाचा.*-ically, adv.* [Gk *stenos*, narrow; *grapho*, I write]

**Stĕp,** *v. i. & i.* (स्टेप्)—to set as the foot, alternate feet; go by stepping; perform dance, measure distance, by stepping; (Naut.) set up mast in ship. पाऊल टाकणें, -ठेवणें; पावलें टाकीत जाणें; (पावलांनीं) नाच करणें, पावलें घालून (अंतर) मोजणें; गलबताची डोलकाठी बसविणें,-उभारणें. *To s. out*, लांब पाऊल टाकणें; *S. short*, जवळ पावलें टाकणें, सावकाश चालणें. *S. this way*, come here, (polite way of saying). जरा इकडे या. *S. in,-out*, (घरांत, खोलींत) येणें, च्या बाहेर जाणें. *S. in*, (*fig.*) मध्यें पडणें, मध्यस्थी करणें. *S. aside*, बाजूला-भलतीकडे-पाऊल टाकणें; (*fig.*) विषयांतर करणें.

**Stĕp,** *n.* (स्टेप्)—complete movement of one leg in walking or running or dancing; distance gained by a step; footstep or footfall; surface trodden on in ascending or descending; (*fig.*) advancement; platform supporting mast; (Carpent.) a piece of timber with another fixed upright in it; (Mech.) lower bearing for shaft; (*pl.*) a short ladder; meaure taken. पाऊल, कदम, पाऊलभर अंतर, कदम, ढंग; पायरी, पायंडा, पावठणी; (अलं०) प्रगति, बढती; डोलकाठीला आधारभूत असा उंच बैठक; (आडव्याउभ्या) लांकडाचा उभा सांधा; लाटेची,-वाटोळ्या दांड्याची खालची बैठक; लहान शिडी; उपाय, तजवीज. *S. by s.*, gradually. पायरीपायरीनें, क्रमाक्रमानें, क्रमशः. *Turn* one's *ss.*, टारविक दिशेला,-नें,-जाणें. *In his ss.*, following his example. त्याच्या पावलावर पाऊल ठेऊन, त्याचें अनुकरण करून. *To take ss. in the matter*, त्या गोष्टीसंबंधीं,-त्याबाबतींत-उपाययोजना करणें. *S.-ladder, a pair of ss., a set of ss.*, सपाट पायंड्यांची (भिंतीशिवाय उभी करतां येणारी) लहान शिडी. *On the top s. of the ladder*, शिडीच्या शेवटच्या-वरच्या-पावठणीवर. *To step in*, आंत जाणें; मध्यें पडणें. *Stepped, a., Step'wise, a.*

**Stĕpp'ing-stōne,** *n.* (स्टे'पिंग्-स्टोन्)—a stone placed in a stream, &c. to provide dryshod crossing; (*fig.*) a means to an end. पाय टेकण्याकरितां चिखलांत ठेवलेला दगड; साधन, आधार, पायरी.

**Stĕp'-child,** *n.* (स्टे'प्-चाइल्ड)—one's wife's or husband's child by previous marriage. सावत्र मूल. *Step'-son,-daughter*, सावत्र मुलगा,-मुलगी.

**Stĕp'-mother**, *n.* ( स्टॅप्-मदर् )—one's parent's second or subsequent wife: harsh or neglectful mother. सावत्र आई, सापत्न माता; कठोर -निष्काळजी-आई. *Step-father,-parent*, सावत्र बाप.

**Stĕp'ney**, *n.* ( स्टॅप्नि )—( *pl.-eys* ), extra rim and tire carried on motor-car. ( चेंडमसंगीं लागल्यास घालतां यावी म्हणून मोटरीवर ठेवलेली ) मोटारगाडीची जादा रबरी धांव, टायर.

**Stĕppe**, *n.* ( स्टेप् )—a level extensive treeless plain, esp. in Russia and Siberia. सपाट व झाडें नसलेलें अत्यंत विस्तीर्ण मैदान,-माळरान.

**Stĕreo-**, *pref.* ( स्टेरिओ- )—solid, stiff, घन. *Stereog'raphy* *n.* art of delineating solid form on plane surface. घनचित्रणकला, घन पदार्थाची सपाट पृष्ठभागावर चित्रें काढण्याची कला. *Ster'coscope*, *n.* ( स्टि'अरिअस्कोप् ), an optical apparatus by which two views of something taken at slightly different angles are combined into one picture. ( किंचित् भिन्नकोनी दोन देखाव्यांचें एक चित्र दाखविणारें ) भरीव दर्शक यंत्र. *Stereoscop'ic*, *a.* भरीव-घन-दर्शक यंत्रानें दाखविलेला. *Ster'eotype*, ( स्टि'अरिअटाइप् ) *n.* print in plate cast from a mould of set-up type. ( छापील मजकुराचा ) कायमचा ठसा, कायमच्या ठशाचा पत्रा. *v. t.* to make stereotypes; ( *fig.* ) fix the form permanently. कायमचा ठसा बनविणें,-तयार करणें; कायमच्या ठशावरून छापणें; ( अलं० ) ठरवून-कायम करून-टाकणें. *Ste'reotyper*, *n.*

**Ster'eotyped**, *a.* ( स्टी'अरिअटाइप्ड् )—conventional, formed in a fixed unvarying way. रूढिबद्ध, ठराविक,-सांच्याचा.

**Stĕ'rile**, *a.* ( स्टे'राइल् )—barren, unfruitful, unproductive; not bearing seed; ( med. ) sterilized; ( of style ) bald. नापिक, बरड ( जमीन ); वांझ, वंध्या; प्रजाजननशक्तिरहित केलेला, वंध्यत्व आणलेला; रूक्ष, पांचट, निर्जीव ( लेखन-शैली ). *Sterility*, *n.* नापीकपणा, रूक्षता, वांझपणा, नपुंसकत्व. *Ste'rilize*, *v. t.* to rid of microbes etc. by boiling or other means. रोगजंतुशून्य करणें.*-lizer*, *n.-lization*, *n.*

**Sterl'ing**, *a.* ( स्टर्लिंग )—of the standard British value ( abbr. stg. ); sound, genuine, of solid worth, undoubted, of excellent quality. ब्रिटिश शिक्क्याचा, खऱ्या चालू किंमतीचा; खरा, अस्सल, उत्तम प्रतीचा. *Of £ 15 stg.*, चालू पंधरा पौंड किंमतीचा *S. money*, इंग्रजी चलनी नाणें.

**Stern**, *a* ( स्टर्न् )—enforcing obedience; severe.; resolute; testing endurance. करारी, कडवा, कठोर; निश्चयी; कसोटीचा, कसोटी पाहणारा.*-ly*, *adv.*; *-ness*, *n.*

**Stern**, *n.* ( स्टर्न् )—hind part of ship or boat; buttocks, rump, tail. वराम, गलबताची मागची बाजू; ढुंगण, ढेंपूट. *S. chase*, pursuit of ship by another straight behind it. गलबताचा थेट मागोमाग जाऊन ( दुसऱ्या गलबतानें ) केलेला पाठलाग. *S. foremost*, ढुंगणानें-उलटें-मागें जाणें. *S. fast*, वराम अडकविण्याची दोरी,-साखळदंड. *S.-most*, *a.* वरामाच्या अगदीं नजीकचा, गलबताच्या मागच्या बाजूजवळ. *S. post*, सुकाणूच्या दांडा. *S.-sheets*, space in a boat between stern and rower's thwarts often with seats for passengers. ( वराम आणि वल्हींवाल्यांची बैठक यांमधील ) गलबताची मागची बाजु. *S.-ward*, *a.* & *adv.*; *S.-wards*, *adv.*

**Stern'um**, *n.* ( स्टर्नम् )—( *pl.-na* ) the breast-bone. छातीचें हाड, उरोस्थि. *Stern'al*, *a.*

**Sternūtā'tion**, *n.* ( स्टर्न्यूटे'शन् )—a sneezing, sneeze. शिंक, शिंकणें, शिंका येणें. *Sternu'tative,-tatory*, *a.* & *n.* शिंका आणणारा ( पदार्थ ), तपकीर, नस्य, इ०.

**Stert'orous**, *n.* ( स्टर्'टरस् )—( of breahting or breather, esp. in apoplexy ) making snore-like sounds. जोरजोरानें-घोरण्यासारख्या केलेला ( श्वासोच्छ्वास ) *-ly*, *adv.*; *-ness*, *n.*

**Stĕt**, *n.* ( स्टेट् )—proof-correcting direction, *Let it stand*. *v. t.* to write *stet* against. मुद्रितें तपासणाऱ्याची 'आहे तेंच राहूं दे' अशा अर्थाची खूण ( करणें ).

**Stĕth'oscōpe**, *n.* ( स्टे'थॉस्कोप् )—an instrument making patient's heart-action and other internal sounds audible to the user. छातीचे वगैरे ठोके,-हृदयक्रिया-मोजण्याचें यंत्र, छाती तपासण्याची नळी, श्रवणनलिका. *v. t.* श्रवणनलिकेनें ( छाती वगैरे ) तपासणें. *Stethoscop'ic*, *a.,-ically*, *adv.*; *Stethos'copy*, *-copist*, *nn.*

**Stĕ'vedōre**, *n.* ( स्टी'व्हिडोअर् )—a man employed in ship-loading. बोटींत-गलबतांत-माल चढविणारा व उतरविणारा, मालाची चढ-उतार करणारा.

**Stew**, *v. t.* & *i.* ( स्ट्यू )—to cook by long simmering in a vessel with little liquid; ( *fig.* ) sweat in hot close atmosphere; ( *sl.* ) swot. मंदाग्नीवर -वाफेवर-शिजविणें,-शिजणें; ( उष्ण कोंदट हवेंत ) उकडून -शिजून-निघणें, घामाघूम होणें; ( अभ्यासाची ) खूप मेहनत करणें. *n.* stewed meat and vegetables; ( colloq. ) *in a s.*, agitated. वाफेवर शिजविलेलें अन्न; घांदल, त्रेधातिरपीट. *The tea is stewed*, चहा अति उकळल्यामुळें कडवट झाला आहे. *S.-pan,-pot*, तवा, कढई.

**Stew**, *n.* ( स्ट्यू )—a tank or pond for keeping live fish; ( usu. *ss.*, arch. ) a brothel. ( मासे जिवंत ठेवण्याचें तळें, टाकें; कुंटणखाना.

**Stew'ard**, *n.* ( स्ट्यूअर्ड )—a person paid to manage another's estate or house, or to cater for some society or ship; an official managing an entertainment, meeting or show. कारभारी, दिवाण; वाकनीस, कोठावळ्या, सामान पुरविणारा; ( शर्यतीचा, नाचाचा ) व्यवस्थापक.*-ess*, *n.* ( *fem.* ) female attendant on a ship. ( बोटीवरील ) स्त्री कामगार,-चाकर.*-ship*, *n.* charge committed to one. कारभाऱ्याचें काम, वाकनिशी ( पणा ).

**Sthĕ'nic**, *a.* ( स्थे'निक् )—( path. ) ( of disease, etc. ) with morbid increase of vital action, esp. of heart and arteries. मज्जातंतु किंवा हृदय यांच्या क्षोभामुळें झालेला, जोराचा. [ Gk *sthenos*, strength ]

**Stick**, *v. t. & i.* ( स्टिक् )—( *stuck* ) to keep position as if rooted or embedded, to adhere to something, to attach or fasten with glue, &c.; to remain constant to a person, purpose, &c.. ( colloq. ) put up with, stab or transfix; thrust point into impale on spike, etc., ( U. S. ) cheat, remain stuck in, lose or deprive of power of motion through friction, etc. चिकटून राहणें; चिकटणें; चिकटवणें, लावणें; ( एखाद्या इसमाला किंवा कार्याला ) दृढ धरून राहणें; त्या सहवासांत,-कडे,-राहणें; भोंसकणें, खुपसणें; रुतणें, रुपणें, शिरणें, शिरविणें; ( वर ) रोवणें; फसविणें; अडकून पडणें,-राहणें, ( ची ) प्रगति न होणें, गति खुंटणें. *S. feather in cap*, टोपींत पंख खोवणें. *S. pen behind* one*s ear*, लेखणी कानाला लावणें. *S. up a target*, erect. लक्ष्य-वेधस्थान-उभें करणें. *S.-out,-up*, protrude. बाहेर-पुढें-काढणें,-येणें. *S.-out* one'*s chest*, छाती पुढें काढणें. *Stuck-up*, conceited. घमेंडीनंदन, घमेंड्या. *S. up to*, ( त्या पुढें ) मान न वांकवणें. *S. up for*, ( गैरहजर माणसाची ) बाजू उचलून धरणें, त्या वतीनें भांडणें. *S. to the point*, मुद्याला धरून बोलणें, विषयांतर न करणें. *S. to business*, आपलें काम बरें, आपण बरें, असें वागणें. *Some of the money stuck on* ( or *to* ) *his fingers*, थोडासा पैसा त्यानें खाल्ला,-लाटला. *S. bills*, जाहिराती ( भिंतीला वगैरे ) चिकटविणें. *Stuck-in-the mud*, *a. & n.* चिखलांत रुतलेला; अप्रागतिक, मागसलेला ( मनुष्य ). *S. at nothing*, मागें पुढें न पाहणें, कशाची खंत न बाळगणें. *S. jaw*, दांताला चिकटणारें,-चिवट,-खाद्य.

**Stick**, *n.* ( स्टिक् )—a thin wooden rod ( serving as walking-cane, staff, wand, rod, etc. ), a mast or spar; ( Mus. ) conductor's baton, a rod-shaped piece of sugar-candy, sealing-wax, etc.; a stiff or shy or dull person. काठी, लकडी, काटकी, काट्कु. सोटा, दांडा, दंड, दांडी, वेत; डोलकाठी; ( बँडमास्तरची ) छडी,-कांडी; ( उंसाची, लाखेची इ. ) कांडी; ताठ, लाजाळू, मंदबुद्धि मनुष्य,-इसम. *Cannot walk without a s.*, 'काठीवांचुनि नेट न पायां'. *Any s. to beat a dog*, hatred makes a man unscrupulous. द्वेषामुळें मनुष्य सारासार विचार करीत नसतो. *A few ss. of furniture*, थोड्याशा ओबडधोबड खुर्च्या वगैरे सामान. *Wants the s*, मार दिला पाहिजे. *S.-insect*, ( झाडाच्या डाहाळीच्या आकारासारखा ) किडा, कीटक.

**Stick'er**, *n.* ( स्टिकर् )—In vbl. senses; ( esp. ) a long-bladed sharp pointed knife; batsman who scores slowly and is hard to get out, a person who stays too long on a visit, ( organ ) wooden rod transmitting motion. चिकटणारा; लांब पात्याचा तीक्ष्ण टोंकाचा सुरा, -चाकू; चिकट खेळाडू; फार वेळ घेणारा पाहुणा; ( वाजांतील ) लांकडी पट्टी.

**Stick'lac**, *n.* ( स्टिक्लॅक् )—lac in its natural state. ( झाडाचा, फांदीचा ) चीक, डिंक.

**Stic'kleback**, *n.* ( स्टिकल्बॅक् )—a small fish with sharp spines on back. ( तीक्ष्ण पृष्ठरज्जु असलेला ) मासा.

**Stick'ler**, *n.* ( स्टिक्लर् )—*S. for*, a person who insists on. हेकेखोर, आग्रही, हट्टवादी.

**Stick'y**, *a.* ( स्टिकि )—tending to stick or adhere to things, glutinous, tenacious. चिकट, चिकटणारा, चिकण.-*ily*, *adv.*;-*iness*, *n.*

**Stiff**, *a.* ( स्टिफ् )—not soft; hard to bend or mould, difficult to achieve or perform; ( of limbs ) aching owing to previous exertions, not working freely, offering resistance; ( of moist clay etc. ) thick and viscous; cold or formal in manner, obstinate, stubborn. ताठ; कडक, कठीण, खुडलेला, खुडकलेला; ताठरलेला ( अवयव ); ताठ, घट्ट, अडस, न सरकणारा; घट्ट, व चिकचिकीत; हेकेखोर, हट्टी, दुराग्रही. *S.-necked*, stubborn. मान न वांकविणारा, हट्टी, हेकेखोर. *Keep a s. upper lip*, to show firmness of character. करारीपणा दाखविणें. *S. market*, ( भाव जसेच्या तसेच असलेला ) कडक बाजार, कडक भाव. *A s. style*, ताठ्याचें,-डौलाचें,-लिखाण ( लेखन-पद्धति ). *A s. price*, वाढलेला,-कडक,-भाव,-किंमत. *A s. subject*, फार मेहनत घेऊन शिकण्याचा कठीण विषय,-अभ्यास. *Stiff'en*, *v. t. & i.* ताठ,-कडक,-करणें,-होणें; ( अवयव ) खुडकणें. ताठणें, खुडा होणें. *Stiff'ener,-ening*, *nn.* ताठ करणारा, ताठपणासाठीं घातलेला कपडा. *Stiffly*, *adv.,-ness*, *n.*; *Stiffish*, *a.*

**Stifle**, *v. t. & i.* ( स्टाइफल )—to smother; to cause difficulty of breathing or feeling of oppression to, to suffocate. गुदमरणें, दडपणें, दाबून टाकणें, गुदमरविणें, कोंडमारा करणें. *Stifling*, *a.,-ly*, *adv.*

**Sti'fle**, *n.* ( स्टाइफल )—( *S.-joint* ) a horse's joint between hip and hock; disease of s.-joint. घोड्याच्या पुठ्याखालील पुढें आलेला भाग; ( घोड्याचा ) गुडघी रोग.

**Stig'ma**, *n.* ( स्टिग्मा )—a moral spot or stain or brand, a mark of infamy, disgrace; a mark branded on slave etc. ( arch. ); ( pl.-*ata* ) marks corresponding to Christ's wounds; ( pl.-*s*,-*ata* ) ( path. ) a spot on the skin as a mark of some disease; ( Bot., Zool. ) part of ovary surface that receives pollen in impregnation; a pore, spot. डाग, कलंक, लांछन, ठपका, कालिमा; ( गुलाम, गुन्हेगार यांच्या शरीरावरील ) दिलेला डाग; ( खिस्ताच्या शरीरावरील खिळ्यांच्या ) खुणा; डाग, लासें; मुद्र, पुष्पयोनि, स्त्रीकेसराग्र; श्वासरंध्र. *Stigmat'ic,-tose*, *aa.* डाग असलेला; स्त्रीकेसराग्राचा.

**Stig'matize**, *v. t.* ( स्टिग्मटाइझ् )—to cast imputation at; to describe opprobriously *as*. डाग लावणें; कलंक लावणें.-*zation*, *n.*

**Stile,** *n.* (स्टाइल्)—a step or steps or set of posts to enable passengers to pass over a fence, wall, etc.: upright timber of door or window. पायरी, पायऱ्या, आंगर, घेडें; उभा खांब.

**Stilĕtt'ō,** *n.* (स्टिले'टो)—(pl.-*os*) a small dagger; pointed implement for making eyelets. कट्यार, जांबिया; (शिवणकामांतील) लहान भोंक पाडण्याचें-काच पाडण्याचें-यंत्र.

**Still,** *a.* (स्टिल्)—motionless; hushed; undisturbed by movement or noise. स्तब्ध, निश्चल; गप्प; निवान्त, निर्वात, शांत. *n.* hushed state; apparatus for distillling spirits, etc. शांतता; उर्ध्वपातन यंत्र, भपकारा; दारू किंवा अर्क काढण्याचें यंत्र. *v. t.* to quiet, calm: lull to rest; grow calm; distil. शांत करणें; उगा करणें; शांत होणें; (थेंब थेंब भट्टींतून) गाळणें. *adv.* nevertheless, for all that; constantly; even yet. तथापि, कांहीं झालें तरी; सतत, नेहमीं; आणखी, अधिक, अजून, अद्यापि. *A s. lake,* संथ (पाण्याचें) सरोवर. *S. small voice,* that of conscience. अंतःकरण, सदसद्विवेकबुद्धि. *S. life,* in painting, representation of inanimate things such as fruit and furniture. (फळें, लांकडी सामान वगैरे) निर्जीव वस्तूंचें चित्र (रंगविणें). *S.-birth,* delivery of dead child. मूल मेलेलें (मृतावस्थेंत) जन्मणें. *S.-fish, v. i.* नांगर टाकलेल्या होडीवरून मासे पागणें. *Sti'lly, adv.* (स्टि'ल्लि), *Stillness, n.*

**Still'bŏrn,** *a.* (स्टि'ल्-बॉर्न्)—born dead. पोटांतच मेलेलें; मेलेलेंच जन्मलेलें.

**Sti'lly,** *a.* (स्टि'लि)—(poet.) still, quiet. शांत, स्तब्ध.

**Still'room,** *n.* (स्टि'लरूम्)—a room for distilling house-keeper's store-room in large house. दारू, लोणचीं वगैरे ठेवण्याची खोली; कोठी.

**Stilt,** *n.* (स्टिल्ट्)—one of a pair of poles with brackets raising walker's feet above ground; a long-legged bird. घोडेकाठी, घोडा; लांब पायांचा पक्षी. *On ss.,* (lit.) bombastic (*fig.*). घोडेकाठी घेऊन चालणारा; शब्दावडंबराचा, कृत्रिम, डौलाचा. *Stil'ted, a.;-ly, adv.;-ness, n.*

**Stĭm'ūlant,** *a.* (स्टि'म्युलन्ट्)—producing transient increase of vital enegry. उत्तेजक, चेतनाप्रद, मादक. *n.* stimulant drug or food, intoxicant. चेतनाप्रद औषध, मादक पेय (दारू इ.).

**Stĭm'ūlāte,** *v. t.* (स्टि'म्युलेट्)—to apply stimulus to: to spur to an action or increased vigour. उत्तेजन देणें; चेतना आणणें, चेतनावृद्धि करणें, जोमदार करणें, जोम आणणें.*-tion, n.* चेतवणें, उत्तेजन. *-tor, n.-tive, a.,-ting, a.* उत्तेजक (द्रव्य,-औषध).

**Stĭm'ūlŭs,** *n.* (स्टि'म्युलस्)—(*pl.-li*) rousing influence; a thing that evokes activity in tissues, &c.: (Bot.) a sting. उत्तेजन, प्रेरणा, उत्तेजक पदार्थ, प्रोत्साहक; कसूं, कांटा. *Stim'ulose, a.* कांटेरी, कसूं असलेला.

**Sti'my,** *n.* (स्टा'इमि)—(Golf) lie of balls on green such that player is obstructed in his put. (गोल्फच्या खेळांत) प्रतिस्पर्ध्याचा चेंडू (खेळणाऱ्याच्या) वाटेंत येणें. *Stim'ied, a.* मध्यें चेंडू येऊन अडलेला (डाव, खेळाडू).

**Stĭng,** *n.* (स्टिंग्)—a tubular point with which poison is injected by bee or nettle or the like; wound or pain produced by it: any acute bodily or mental pain; vigour, keenness, pungency. नांगी, कांटा; गांध, दंश; वेदना, फणफण, तीक्ष्णता, मख्खी, खोच, मेख, मर्म. *v. t. & i.* (*Stung*) to puncture with a sting; cause sharp pain to; wound the feelings of, to be pungent: (of bodily part) feel acute pain; (U. S.) cheat. नांगी मारणें; डसणें, दंश करणें; वेदना करणें; खुपणें, मन दुखविणें; तीक्ष्ण असणें, लागणें, झोंबणें; दुखणें, वेदना होणें, कळा लागणें; फसविणें. *The bowling, air, has no s. in it,* चेंडूफेंकींत विशेष जोर,-राम,-नाहीं; हवा अगदीं सुस्ती आणणारी आहे. *S.-ray,* एक जातीचा मासा. *A stinging insult,* मनाला झोंबणारा अपमान. *His conscience stung him,* त्याचें मन त्याला खाऊं लागलें. *My tooth stings,* माझ्या दांतांत कळ लागली आहे. *Sting'ingly, adv., Sting'less, a.* नांगी नसलेला

**Stĭng'er,** *n.* (स्टिं'गर्)—(*esp.*) a smart blow; sharp frost. जोराचा तडाखा, धपका; झोंबणारें हिम (थंडीचा कडाका).

**Stĭn'gy,** *a.* (स्टिं'न्जि)—meanly averse to spending; very niggardly or close-fisted. हिमटा; कृपण, चिक्कू.*-gily, adv.;-giness, n.*

**Stĭnk,** *v. i.* (स्टिंक्)—(stank or stunk; stunk) to have foul or nasty smell. घाण येणें, वास मारणें. *n.* foul or nasty smell; (*pl. sl.*) Chemistry or natural science as subject of study. घाण, दुर्गंधि; (अने०) रसायनशास्त्र, सृष्टविज्ञान, (हा अभ्यासाचा विषय). *S.* one *out,* दुर्गंधीनें (खोलीच्या) बाहेर घालवणें. *S. of money,* (sl.) वाईट मार्गानें पैसा मिळविणें. *S.-wood,* (S.-Afr. & Austral.) ज्याच्या लांकडाला घाण मारते असा वृक्ष, त्याचें लांकूड. *Stinking,* (part.) that one dislikes: having recognizable and often disagreeable smell (of animals or plants). अप्रिय; वासावरून ओळखलें जाणारें, उग्रट-घाणेऱ्या-वासाचें.

**Stĭnt,** *v. t.* (स्टिन्ट्)—to supply on a niggardly scale, keep so supplied; cease doing. हिमटेपणानें देणें, आळा घालणें, मोजकें देणें, प्रमाणावर ठेवणें; थांबवणें, बंद करणें. *n.* limitation of supply or effort, restriction as to quantity; kinds of small sandpiper. आळा, मर्यादा, मोजकें माप, मोजमाप; एक जातीचा लहान पक्षी. *Do* one's *daily s.,* रोजचें ठराविक,-नेमलेलें,-काम करणें. *Stint'ingly, adv.*

**Sti'pate,** *a.* (स्टा'इपेट्)—(Bot.) crowded. गच्च, गर्दीचा, निबिड.

**Stipe, Sti'pēs,** *n.* (स्टाइप, स्टा'इपीस )—( Bot.; Zool. ) a stalk, stem. वृन्त, देठ, दांडा.

**Sti'pel,** *n.* ( स्टा'इपेल् )—( Bot. ) secondary stipule at base of leaflets. लहान उपपर्ण, उपवृन्त.

**Stip'end,** *n.* ( स्टा''इ-पेन्ड् )—a salary. वेतन, पगार, मुशाहिरा.

**Stipen'diary,** *a.* ( स्टाइपे'न्डिअरि )—receiving fixed stipend, wages or salary. पगारी, वेतन असलेला. *n.* a paid police magistrate. पगारी फौजदारी मॅजिस्ट्रेट ( न्यायाधीश ).

**Stip'ple,** *v. i. & t.* ( स्टि'पल् )—to engrave, paint, or draw in dots, not lines. बिंदूचें ( बिंद्वात्मक ) खोदकाम, रंगकाम, रेखाकाम करणें. *n.* dotted work. ठिपक्यांचें ( खोद,-रेखा, ) काम. *S.-graver,* खोदकामाचें ठिपके पाडण्याचें यंत्र. *Stip'pler, Stip'pling, nn.*

**Stip'ūlāte,** *v. i. & t.* ( स्टि'प्युलेट् )—to state to be part of one's terms, to settle terms. बोली किंवा ठराव करणें, अटी घालणें. *Sti'pulated, pa. p.* सांकेतिक, ठरलेला, करार झालेला. *Stip'ulator, n.*

**Stipūlā'tion,** *n.* ( स्टिप्युले'शन् )—a demand stated as condition of consent to an agreement. करार, संकेत, वायदा.

**Stip'ūle,** *n.* ( स्टि'प्यूल् )—( Bot. ) a small leaf-like appendage to a leaf ( at base of leaf-stem ). उपपर्ण, वृन्तपर्ण.*-uliform, a.* उपपर्णाकार, उपपर्णाकृति.

**Stir,** *v. t. & i.* ( स्टर् )—to set or keep moving, cause motion in; excite, rouse; touch the feelings of. हालणें, हालवणें; चाळवणें, चेतविणें, उत्तेजन देणें, चेतना जागृत करणें, जागृति आणणें. *n.* a slight motion seen or heard after stillness; liveliness or display of interest on the part of many people; act of stirring. हालचाल; धामधूम, गडबड; चळवळ; चाळवणें, चालना. *Is not stirring yet,* is still in bed. अजून हालचाल दिसत नाहीं, झोंपला आहे. *S. your stumps,* (colloq.) आटप, पाई कर, पाय उचल. *To lead a stirring life,* be busy. उद्योगांत, गडबडींत असणें. *S. up,* mix well by stirring. कालवून,-ढवळून एकजीव करणें. *Person wants stirring up,* आळशी,-सुस्त,-आहे, त्याला चाळवला पाहिजे. *Stirring times,* धामधुमीचा-चळवळीचा-काळ. *S.-about, n.* शिजवलेलें खाद्य; *a.* धांदल्या, गडबड्या. *Stir'ringly, adv.; stir'rer, n.* हालविणारा, ढवळणारा. *Stir'less, a.* शांत.

**Stirps,** *n.* ( स्टर्प्स )—( Law ) progenitor of family; ( Zool. ) classificatory group. मूळपुरुष; वर्गीकरण-योग्य प्राणी ( -समुदाय ). [ L.=stock ]

**Sti'rrŭp,** *n.*-( स्टि'रप् )—rider's foot-rest; ( Naut. ) a rope with eye. रिकिब, रिकाब; शिडाला ओढणारी फांसाची दोरी. *S. leather,* रिकिबीची वादी,-चा पट्टा. *S.-piece,* लोंबता आधार.

**Stitch,** *n.* ( स्टिच् )—acute pain in side induced by running after meal; single pass of needle. कचक, पार्श्वशूल; उसण, टांका, टांचा, शिवण, शिवणकाम, शिवणकामांतील टांका. *v. t. & i.* to sew. शिवणें, टांका घालणें. *A. s. in time saves nine,* वेळेवर एक टांका घातला तर तो ( पुढल्या ) अनेक टाक्यांचें काम करतो; वेळींच जपावें. *Has not a dry s. on him,* अगदीं चिंब भिजला आहे. *Put a s. or ss. in,* ( in Surgery ) शस्त्रक्रियेनंतर टांके घालून ( जखम वगैरे ) शिवणें. *S.-wort,* ( उसण-लचक-यावर औषधी ) वनस्पति. *To s. up,* टांके घालून दुरुस्त करणें.

**Stith'y,** *n.* ( स्टि'दि )—anvil, forge. ऐरण, लोहाराची भट्टी, लोहारशाळा.

**Sti'ver,** *n.* ( स्टा'इव्हर् )—even the smallest coin. कापर्दी सुद्धां, पैसुद्धां. *Don't care a s.,* कवडीची सुद्धां किंमत देत नाहीं.

**Stoat,** *n.* ( स्टोट् )—the ermine, any beast of weasel kind. पांढऱ्या लोंकरीचा प्राणी, वीझलप्राणी. *v. t.* to sew up ( a tear etc. ) with invisible stitches. ( न दिसणाऱ्या ) टाक्यांनीं शिवून टाकणें, रफू करणें.

**Stŏck,** *n.* ( स्टॉक् )—stump or butt or trunk; a family or breed of definite qualities; the goods or equipment for carrying on a business; money contributed by way of loan to form the capital of a company, money lent to a government; timber frame in which offender's ankles were held, (pl.) timbers on which a ship rests while building; the animals belonging to a farm, kinds of fragrant-flowered garden plant; stiff wide band worn round neck. खोड, सोट, सोटा, खुंट, ठुंठण, दांडा, दस्ता; घराणें, वंश, ताणा, बिजवट; बेगमी, सांठा, साहित्य, सामानसुमान; ठेव, भांडवल, सरकारी कर्ज-रोखे; खोडा ( बेडी ); ( गलबत बांधलें जात असतां ) गलबताच्या बांधकामाचा सांगाडा, ढिरा, शिपाई; पशुधन, गुरेंढोरें; सुवासिक फुलझाड; ताठ गळपट्टी. *v. t.* to equip with what is needful, keep (goods) in stock; fit gun with a stock; (hist.) confine in the ss.; cover land with permanent growth. बेगमी करणें, सांठा करणें, ( विक्रीसाठीं ) सांठा करून ठेवणें; ( बंदुकीला ) दस्ता बसविणें; खोड्यांत घालणें,-अडकविणें; कुरणाची ( गवताची ) वाढ कायम राखणें. *Ss. and stones,* निर्जीव वस्तु; आळशी,-सुस्त,-माणसें. *Laughing s.,* butt for ridicule. हसण्याचा,-थट्टेचा,-विषय. *S. of plough,* नांगराचा फाळ बसविण्याचें लांकूड. *Lock, s. and barrel,* (*fig.*) root and branch. समूळ, पाळांमुळांसह, पूर्णपणें. *Comes of a good s.,* प्रतिष्ठित कुळांत जन्मलेला आहे. *Paper s.,* कागद तयार करण्याचा चिंध्या वगैरे कच्चा माल. *Rolling s.,* आगगाडीचे डबे, यंत्रें वगैरे सामायन. *Live s.,* गुरेंढोरें. *Dead s.,* शेतकीचीं आउतें वगैरे हत्यारें. *S.-in trade,* all requisites for a trade; also (*fig.*). धंद्याला लागणाऱ्या आवश्यक वस्तु; वक्त्याचे ठराविक शब्द,-शब्दसमूह, इ० *To have in s.,* ( चा ) भरपूर पुरवठा असणें. *Take s.,* ( चा ) आढावा घेणें, मालाची मोजदाद, यादी करणें. *S.-taking, n. Take s. of,* (*fig.*) ( स्वभाव वगैरे ताडण्या-करितां ) लक्ष देऊन पाहणें. *S. argument, joke,* नेहमींचा, ठराविक, मुद्दा,-विनोद, इ. *Buy, hold, s.,*

(कंपनीच्या भांडवलाचे) भाग, ठेवी विकत घेणें,-धारण करणें. *The ss.*, state's funded debts as a whole. एकंदर राष्ट्रीय कर्ज. *Take s. in*, (*fig.*) च्यांत लक्ष घालणें. *S.-breeder, farmer*, , गुराढोरांची निपज करणारा. *S.-broker*, (रोख्यांची खरेदी-विक्री करणारा) रोख्यांचा दलाल. *S. car*, गुराढोरांचा (रेल्वेचा) डबा. *S. exchange*, (सरकारी रोखे विकण्याचा) सराफकट्टा; रोख्यांचा व्यवहार करणाऱ्या दलालांची संस्था. *S.-fish*, मीठ न घालतां कापुन उन्हांत वाळवलेली (कॉड वगैरे) मासळी. *S.-jobber,-jobbing,-jobbery*, (person) buying and selling ss., with a view of profiting by fluctuations in price. रोख्यांचे सट्टे करणारा, सट्टेबाज, दलाल. *S. man*, गुराखी, राखणा; (आस्ट्रे०) गाई वगैरे सशृंग जनावरें व घोडे यांचा राखणा. *S.-market* सराफकट्टा; तेथील व्यवहार; गुरांचा बाजार. *A well-stocked library*, पुस्तकांचा वगैरे भरपूर संग्रह असलेलें वाचनालय.

**Stŏckāde'**, *n. & v. t.* (स्टॉके'ड्)—a line of upright stakes or posts (as defence, &c.). मेढेकोट, लकडकोट (रचणें).

**Stock'inĕt,-nĕtte**, *n.* (स्टॉ'किनेट्)—elastic knitted material for underclothing. (चड्डी वगैरेसाठीं) विणलेलें कापड.

**Stŏc'king**, *n.* (स्टॉ'किंग्)—a close-fitting, knitted or woven covering for foot and leg. पायमोजा. *A pair of ss.*, पायमोजाची जोडी.

**Stŏck-still'**, *a.* (स्टॉक्स्टि'ल्)—as still as a stock, motionless. खांबासारखा, निश्चल, स्तब्ध.

**Stŏck'whĭp**, *n.* (स्टॉ'क्व्हिप्)—a thick tapering thong of 12 to 14 ft, affixed to a handle of 1½ ft, for herding cattle. (गुरें राखण्याचा) लांब वादीचा चाबूक.

**Stŏck'ȳ**, *a.* (स्टॉ'कि)—thickset, short and strongly built. मेढेकोट केलेला, जवळ जवळ असलेला; ठेंगू व मजबुत (बांध्याचा). Also, *Stug'gy*, (colloq.),*-ily, adv.*;*-iness, n.*

**Stŏdge**, *n.* (स्टॉज्)—(*sl.*) food of heavy kind; full meal; a greedy eater. सहज न पचणारें, जडान्न; पोटभर भरपूर जेवण; अधाशी मनुष्य. *v. t. & i.* to eat greedily. अधाशासारखें खाणें.

**Stŏdg'ȳ**, *a.* (स्टॉ'जि)—(of food) indigestible, heavy; (of receptacle) packed; (of style) overfull of facts or details. जड, न पचणारें (अन्न); गच्च भरलेला, फुगीर; भरगच्च मजकुराचा, बारीक सारीक सर्व गोष्टींनीं भरलेलें.*-iness, n.*

**Stoep**, *n.* (स्टूप्)—(S.-Afr.) a terraced verandah. ओसरी, ओटी.

**Stō'gie**, *n.* (स्टो'गि)—(U. S.) kind of heavy boot; a long slender cigar. जड बूट; बारीक व लांबट सिगार (विडी).

**Stō'ic**, *n.* (स्टो'इक्)—a philosopher of the school of Zeno, the Greek philosopher (342-270 B. C.); a person of great fortitude or austerity. झेनोचा अनुयायी; सुखदुःखाविषयीं अनुद्विग्न, फार धैर्याचा किंवा मोठ्या तपश्चर्येचा मनुष्य. *Sto'ic,-ical, a.* स्टोइक पंथाचा; (सुखदुःखाविषयीं उदासीन राहून) निर्विकार. *-ically, adv., Sto'icism, n.* उदासीनतावाद; विकाररहितत्व.

**Stōke**, *v. t. & i.* (स्टोक्)—to keep (fire, furnace) going; stoke fire of (engine); (*fig.*) take food in a hurried way. निखारे हालवणें,-सारखे करणें, भट्टी चालू ठेवणें; (एंजिनांत) कोळसा टाकणें,-मारणें; पोटांत अन्न (गपागप) भरणें. *Sto'ker, n.* कोळसे मारणारा.

**Stōle**, *n.* (स्टोल्)—outer dress (of ancient Roman matron); ecclesiastical vestment. सैल पोकळ झगा; (विशपचें) उपवस्त्र.

**Stole, Stolen**, *pa. t., pa. p.* of Steal.

**Stŏl'ĭd**, *a.* (स्टॉ'लिड्)—slow to feel or betray feeling; not easily moved, dull, foolish. जड; मंदमति, मूर्ख.*-ity, n.*;*-ly, adv.*

**Sto'mach**, *n.* (स्ट'मक्)—the cavity into which food passes for digestion; the belly, abdomen; appetite or inclination or courage *for*. कोठा, पोट; जठर, अन्नाशय; भूक, अन्नावर वासना; प्रवृत्ति, कल, धैर्य, जोम. *v. t.* to eat with relish; find sufficiently palatable to swallow or keep down, (*fig.*) put up with (an insult etc.). रुचीनें,-चवीनें,-खाणें; रुचकर वाटणें,-असणें; खपणें, सहन करणें, पोटांत घालणें. *Ruminant's ss.*, प्रथम,-द्वितीय,-तृतीय,-चतुर्थ जठर. *Pit of the s.*, depression below bottom of breast-bone. मणिपूर. *Proud* or *high s.*, haughtiness. उद्धटपणा, ताठा. *S.-ache*, पोटदुखी, पोटशूळ. *S. pump*, पोटांतून विषारी पदार्थ काढण्याचा पंप. *S.-tube*, कोठा धुण्याकरितां घशांतून घालण्याची नळी. *Cannot s. the insult*, तो अपमान सहन करतां येत नाहीं. *Sto'machal,-machless, aa., S.-ful n.*

**Sto'macher**, *n.* (स्ट'मचर्)—(hist.) breast piece of woman's dress, often set with gems or richly embroidered. (भरजरीचा) पोल्का.

**Stomăc'hĭc**, *n.* (स्टमॅ'किक्)—of the stomach; promoting digestion or appetite. कोठ्याचा, जठराचा; पाचक, भूक वाढविणारा. *n.* a stomachic drug or draught. पचनक्रिया वाढविणारें औषध.

**Stōne**, *n.* (स्टोन्)—piece of rock of any shape and of no great size; stones or rock as a substance or material; (usu. a *precious stone*) a gem; thing resembling stone in hardness or pebble in shape; weight of 14 lb. दगड, धोंडा, खडा; मोठा धोंडा, पाषाण, शिला, दगड; रत्न, मणि; आंठीळ, बाठा, बाठी, कोय; अश्मरी, (मुत-) खडा (इ. दगडाप्रमाणें) कठीण पदार्थ; १४ पौंडांचें वजन. *v. t.* to pelt with stones; rid (fruit) of stones; face pave, with stone. दगड मारणें, दगडमार करणें; आठळा,-कोया,-(फळांतून) काढणें; फरसबंदी करणें. *Ss. will cry out*, पाषाणालाहि पाझर फुटेल. *Give a s. for bread*, offer a mockery of help. मदत दिल्याचें सोंग करणें,-ची थट्टा करणें, खरी मदत न देणें. *Mark*

*with a white s.*, आनंदाचा दिवस म्हणून लिहून ठेवणें. *Leave no s. unturned*, प्रयत्नांची शिकस्त (चोहोंबाजूनें प्रयत्न) करणें. *Break ss.*, खडी फोडणें, अन्नान्न दशा येणें. *Cast, throw, ss.*, or *a s. at.*, (ला) दगड मारणें, (वर) दगडफेंक करणें; (चो) निंदा करणें, (वर) दोषारोप करणें. *Those who live in glass houses should not throw ss.*, आपण लागून (उणें) बोलणें कीं दुसरा टोमणा मारतोच (उणें बोलतोच). *Kill two birds with one s.*, एका दगडानें दोन पक्षी मारणें, एकांत दोन कामें करणें. *S.'s cast* or *throw*, distance stone can be thrown. हांकभर, हांकेचें अंतर. *S. buildings*, दगडी, चिरेबंदी, इमारती. *Has a heart of s.*, पाषाणहृदयी,-कठोर अंतःकरणाचा,-आहे. *Philosopher's s.*, परीस. *S. axe*, पिकिंदर, पिकास. *S.-blind*, quite blind. निखालस (पूर्णपणें) आंधळा. *S. chat*, एक लहान पक्षी. *S. crop*, एक जातीची (भिंतीवर व खडकावर वाढणारी) वनस्पति, वेल. *S. horse*, वळू, आंडील घोडा. *S. mason*, पाथरवट, गवंडी. *S. pine*, S. Ital. kind with spreading top. छत्रीच्या आकाराच्या पसरट फांद्या शेंड्यावर असलेला पाइन वृक्ष. *S.-pit*, दगडाची -चिऱ्यांची,-खाण. *S.-race*, वाटेतील दगड धांवतांना उचलण्याची शर्यत. *S.-work*, masonry. दगडी बांधकाम. *S.-wort*, kinds of plant. एक जातीचें झाड, -वनस्पति. *S. to death*, दगडांनीं ठेंचून (ठार) मारणें. *-stoned, Ston'cless, aa.*

**Stone'age**, *n.* (स्टो'नएज्)—age or period in which weapons and tools were made of stone. पाषाणयुग, दगडाचीं हत्यारें व भांडींकुंडीं असलेल्या स्थितीचा काळ.

**Stōne'-fruit**, *n.* (स्टो'नफ्रुट्)—fruit with seed enclosed in hard shell. आठळी, किंवा कोय, किंवा बीं असलेलें फळ.

**Stonewall,'** *v. i. & t.* (स्टोन्वॉ'ल)—to obstruct by stone-walling. दगडी तट उभा करणें, अभेद्य तटानें प्रतिकार करणें, भरभक्कम प्रतिकार करणें. *Stonewall'ing*, (pol., esp. Austral.) parliamentary obstruction; (crick.) excessively cautious batting. लोकसभेंत विरोध,-अडथळा; अति सावधगिरीचा (धिम्मा) खेळ (बाद न होण्यासाठीं).

**Stone'ware**, *n.* (स्टो'न्वेअर्)—pottery made from flinty clay. हलक्या जातीचीं (खणखणीत) चिनी भांडीं.

**Stō'nȳ**, *n.* (स्टो'नि)—abounding in stones, hard or unfeeling. दगडांनीं भरलेलें, खडकाळ, रेताड; कठीण, निर्दय. *A s. stare*, ओळख न देणारी दृष्टि,-नजर, निष्ठुर नजर. *Ston'ily adv.*, *-iness, n.*

**Stōōd**, *pa. t.* of Stand.

**Stōōk**, *n. & v. t.* (स्टुक्)—(Sc.) group of corn-sheaves. धान्याच्या पेंढ्या, कवळ्या (रचणें).

**Stōōl**, *n.* (स्टूल)—movable seat without a back, a window sill; root of plant from which shoots spring; evacuation of bowels. लांकडी तिवई, तिपाई स्टूल; खिडकीचा उंबरठा; मुळवा, खुंट; दाडा, शौच. *v. t.* to throw up shoots from root; evacuate bowles. धुमारे फुटणें; शौचास जाणें,-बसणें. *To fall between two ss.*, दोन दगडींवर हात ठेवणें (व फसणें). *To go to s.*, शौचाला जाणें. *S. ball*, old game of cricket or rounders. क्रिकेटच्या खेळासारखा एक जुना (मुलींनीं खेळण्याचा) खेळ. *S. pigeon*, pigeon used, person acting, as decoy. भुलवून आणणारें कबुतर, भुलवणूक करणारा मनुष्य.

**Stōōp**, *v. t. & i.* (स्टूप्)—to bend down: to abase oneself or condescend to do; to swoop, pounce, tilt (cask). वांकणें, ओणवणें; हलकेपणा धरणें, मोठेपणा -अभिमान-सोडणें; झडप घालणें, झेंपावणें, (पिंप बुडच्या तोलावर) कलंडवणें. *n.* stooping carriage of body; swoop of hawk etc. ओणवणें, वांकत चालणें; झडप, झेंप. *To s. to conquer*, gain one's end or power by preliminary self-abasement. प्रथम नमतें घेऊन हेतु-कार्य-साधणें,-सत्ता मिळविणें. *Stoop'ingly, adv.*

**Stōōp**, *n.* (स्टूप्)—(U. S., Can.) unroofed plat -form or porch. घरापुढील उघडी ओटी,-गच्ची,-देवडी.

**Stŏp**, *v. t. & i.* (स्टॉप्)—to stuff up; prevent passage of, stifle, prevent motion or action of; cease to supply, cease from action or speech: halt or pause; sojourn somewhere; change pitch of by pressing string, etc.; (naut.) make fast, punctuate. बुजवणें, बुजणें, बंद करणें; थांबवणें, चा मार्ग बंद करणें, तोंड बंद करणें, चोंदणें; (त्या गतीला विरोध) रोध करणें, अडथळा करणें, बंद पाडणें; कापणें, तहकूब करणें; थांबणें; उभें राहणें, स्तब्ध राहणें; वस्ती करणें, उतरणें, राहणें; स्वर-सूर-बदलणें; घट्ट बांधणें, थोपवून धरणें; विरामचिन्हें देणें,-लिहिणें. *n.* a pause or cessation, check, a punctuation mark; (Mus.) device in instrument to assist change of pitch; set of pipes having special tone in organ, (*fig.*) manner of speech; batten, peg; (Opt., Photog.) diaphragm. (Phonet.) mute consonant sound. थांबणें, खेळ, विराम, अडथळा; विरामचिन्ह (स्वल्पविराम, अर्धविराम, पूर्णविराम); वायुवाद्याचें बोट ठेवण्याचें भोंक, खुंटी; विशिष्ट सुरांची सुरावट; भाषणाची ढब; खुंटी; आवरण, आवरक (फोटो॰); (क, ट, प) व्यंजनोच्चार. *To s. one's ears*, कानांत बोटें घालणें; (*fig.*) न ऐकणें, ऐकण्याचें नाकारणें. *S. a tooth*, दांतांतील खळगी वगैरे (सोनें, सीमेंट वगैरेनें) भरणें, बांधणें. *S. a wound*, जखमेंतून रक्त वाहण्याचें बंद करणें. *S. one's mouth*, (*fig.*) induce him by bribery etc. to keep silent. (लांच देऊन त्याचें) तोंड बंद करणें,-गप्प करणें. *S. a gap*, (तात्कालिक) गरज भागविणें, काम भागवून घेणें. *S. the way*, (ला) अडथळा करणें, (चा) मार्ग बंद करणें, प्रगति थांबविणें. *S. thief!* चोर! चोर! पकडा. *S. blow with one's head*, ठोसा खाणें. *S. a bullet*, be shot. गोळी लागणें. *S. one's breath*, गळा दाबून जीव घेणें, -मारणें. *S. a factory*, कारखाना बंद करणें. *S. payment of a cheque*, direct one's banker not to cash it. चेक पटारूं न देणें (दिलेला तसें कळवून). *S. payment*, break financially. दिवाळें काढणें. *S. dead,-short*, एकदम बंद पडणें. *S. up*, not go to

bed. आगत घालणे. (Etching) S. out, (कांचेच्या ज्या भागावर अम्लाचें कार्य नको असेल त्यावर) अम्लाचें कार्य न होण्याच्या रोगाचा हात देणें. S. down, पडद्याचा (Lens चा) नको असेल तो भाग पडद्यानें झाकणें (फोटो॰). S. off, (Founding) साच्यांतील रिकामी जागा वाळूनें भरणें. To put a s. to, बंद करणें, (ची) बंदी करणें. To be at a s., बंद पडणें, ची प्रगति कुंठणें. Full s., पूर्णविराम. Come to full s., निखालस बंद होणें, -पडणें. S.-cock, a tap. (पाणी बंद करण्याची) चावी. S.-gap, तात्पुरता, बदली. S.-press, छापतां छापतां, अगदीं ताजा आलेला, मजकूर,-बातमी. S.-watch, (शर्यतीच्या वेळीं उपयोगी पडणारें) वाटेल तेव्हां चालू, -बंद-होण्यासारखें घड्याळ.

Stŏpp'age, n. (स्टॉपिज्)—blocked state; a cessation, arrest of progress. प्रतिरोध, बंदी; थांबणें, विराम.

Stŏpp'er, n. (स्टॉपर्)—a plug for closing a bottle (In vbl. senses). बूच; प्रतिरोधक. v. t. बुचानें बंद करणें.

Stŏpp'le, n. (स्टॉपल्)—a stopper. (बाटलीचें वगैरे) बूच, झाकण. v. t. to close with a s. बुचानें बंद करणें, ला बूच लावणें.

Stōre, n. (स्टोअर्)—abundance; (sing. or pl.) a fund or good supply of; shop dealing in many different kinds of commodity on a large scale; warehouse or storing-place; (U. S.) an animal kept for fattening. रेलचेल, रास, विपुलता, समृद्धि; सांठा, संचय, बरेच मोठें दुकान; वखार; पुष्ट, धष्टपुष्ट होण्यासाठीं ठेवलेलें जनावर. v. t. to equip or furnish plentifully with; to lay up for future use; to deposit or keep in. ware-house. गोळा करणें, सांठवणें; बेगमी करणें; वखारीत ठेवणें. a. (of cattle etc.) kept for fattening. धष्टपुष्ट होण्यासाठीं राखींव (जनावरें). In s., राखींव, संचित, भावी. The ss., वखार, मोठें दुकान. S.-house, वखार, चें भांडार. S.-room, कोठी, सामानाची खोली. Stor'able, a.; Stor'age, n. कोठींत ठेवणें, ठेवणावळ, कोठीचें भाडें.

Storey, n. (स्टोअरि)—See Storey.

Stŏrk, n. (स्टॉर्क)—a tall stately (usu. white) wading bird that feeds on fishes, etc. करकोंचा पक्षी. S.'s bill, एक जातीची वनस्पति,-झाड. King S. जुलमी राजा.

Storm, n. (स्टॉर्म्)—violent disturbance of the atmosphere, a tempest; commotion in human relations; agitation etc.; vehement shower of missiles, applause etc.; assault by troops on fortified place. जोरदार, झंझावात, वादळ, तुफान; खळबळ, गर्दी, धामधूम, चळवळ; खणखणाट, गजर, दणदणाट, वर्षाव (अस्त्रांचा,-शस्त्रांचा); किल्ल्यावर छापा किंवा हल्ला. v. t. & i. to take by storm; force into; talk violently, rage. हल्ला करणें, हल्ला करून-छापा घालून-घेणें; जोरानें शिरकाव करून घेणें; चवताळून बोलणें. S. in a tea-cup, चहाच्या कपांतील (अल्प गोष्टीविषयीं) वादळ, वादविवाद, धमरोतुमारी. S. and stress, (व्यक्तीच्या किंवा राष्ट्राच्या आयुष्यांतील) खळबळीचा,-धामधुमीचा -काळ. Take by storm, अचानक छापा घालून काबीज करणें; (ओरवाडून, व्यक्तीवर) एकदम म्हणतां छाप पाडणें. S.-beaten, वादळांत सांपडून फुटलेला; वादळांचे तडाखे बसलेला. S.-bell, S. zone, the tract in which ss. are frequent. नेहमीं वादळें होणारा प्रदेश,-पट्टा. S.-bound, वादळामुळें (बंदरांत) अडकून राहिलेला. S.-card, chart assisting navigator of ship in storm. वादळाचा नकाशा, ज्याच्यामुळें नावाड्याला (कप्तानाला) वादळाचा मुख्य बिंदु काढतां येऊन त्याप्रमाणें जहाज वाढवतां येतें. S.-cloud, वादळी ढग, अस्वस्थता, चळवळ. S.-cock, एक जातीचा पक्षी. S.-signal, वादळाचा बावटा, ची निशाणी, -चिन्ह. S.-proof, वादळांत टिकणारा, वादळाला न जुमानणारा. Storming party, हल्ला चढविणारी तुकडी.

Stŏrm'centre, n. (स्टॉर्मसेंटर्)—point to which wind blows spirally inward in a cyclonic storm. (fig.) subject of agitation. वादळाचा मुख्य बिंदु,-मध्य; वादळाचें मूळ,-चा मुख्य मुद्दा, वादग्रस्त मुद्दा.

Stŏrm'y̆, a. (स्टॉर्मि)—boisterous. subject to storms; violent or quarrelsome. associated with or threatening storms. खवळलेला; वादळी, तुफानी, जोराचा; भांडखोर, वादळाचा (सूचक). S.-petrel, वादळाची सूचना देणारा समुद्रावरील पक्षी. Storm'ily, adv.; -iness, n.

Story̆, Stor'ey, n. (स्टोअरि)—(pl.-ies,-eys) any of the parts one above the other into which a house is divided. मजला. Of four ss, चारमजली. The upper s., (fig.) मेंदू.-storied, a.

Stor'y̆, n. (स्टोअरि)—legends or tradition; an account given of an incident; a short piece of narrative or tale about a matter; past course of life. इतिहास; कथा; वृत्तान्त; कथानक, गोष्ट, हकीकत, वर्णन, कहाणी; (भूतकालीन) आयुष्यक्रम, आयुष्यांतील गोष्टी. According to his own s., त्याच्या सांगण्याप्रमाणें (खरें किंवा खोटें असलेलें.) To make a long s. short, थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे. It is quite another s. now, आतां कांहीं निराळेंच ऐकूं येतें; वस्तुस्थिति पालटलेली दिसते. To s. goes, it is said. असें सांगतात (कीं). Short s., story usu. relating a single incident. लघुकथा. But that is another s., परें तें असूंदे, असो. S.-book, गोष्टींचें पुस्तक, कादंबरी. S.-teller, (धंदेवाईक) गोष्टी सांगणारा; गोष्टी लिहिणारा; गप्पीदास, बाताड्या; खोटें बोलणारा.

Stoup, n. (स्टूप)—flagon, beaker; drinking vessel. (उथळ) पात्र, भांडें; पान-पात्र.

Stout, a. (स्टाउट्)—undaunted, resolute; of considerable thickness or strength, vigorous, robust; corpulent. खंबीर, निश्चयी; धट्टाकट्टा, स्थूल, जाडा. n. strongest kind of porter. अति कडक दारू. S. heart, courage. धैर्य, शौर्य. S.-hearted, a. धीराचा, धैर्याचा, हिंमतीचा;-ly.;

*adv.*;-*ness*, *n. Stoutish*, *a.* जाडा, लठ्ठंभारती. *Stoutly, adv.* खंबीरपणानें, धैर्यानें. *Stoutness, n.*

**Stove,** *pa. t. & pa. p. of* Stave.

**Stōve,** *n.* (स्टोव्ह्)—kinds of closed apparatus in which heat is produced; (Gardening) hot house. एक प्रकारची शेगडी, चूल, चुला, स्टोव्ह; कृत्रिम ऊष्णतागृह.

**Stō'ver,** *n.* (स्टो'व्हर्)—(U. S.) fodder of corn -straw etc. (कडबा वगैरे) वैरण, गवत.

**Stow,** *v. t.* (स्टो)—to put in a suitable place or position, to pack closely or compactly; cease to indulge in (noise). बंदोबस्तानें भरणें; जेथलें तेथें भरणें,-ठेवणें, सामान गच्च भरणें,-लावणें; बंद करणें, (तोंड) मिटणें. *Stow'age*, accommodation for stowing things; money paid for stowing. माल भरण्याची जागा, वाव; भरणावळ.

**Stow'away,** *n.* (स्टो'अवे)—a person going on board ship and hiding till she is at sea. (गलबतांतून) फुकट प्रवास करणारा, फुकट्या व चोरटा प्रवासी,-उतारू. *v. i.* फुकटांत व चोरून प्रवास करणें.

**Străd'dle,** *v. t. & i. & n.* (स्ट्रॅडल्)—to take or be in attitude with legs apart; stand or sit across thus; (Nav.) drop shots to find range; (*fig.*) sit on the fence. टांगा फांकणें, पाय फांकून राहणें, पाय फांकून-रुंद करून-उभें राहणें, -बसणें; (लढाऊ जहाजावरून) पल्ला किती पोंचतो हें पाहण्यासाठीं (तोफांचे) गोळे टाकणें; दोन डगरींवर हात ठेवणें, मनाची चलबिचल असणें.

**Străg'gle,** *v. i.* (स्ट्रॅगल्)—to lack compactness, to be in loose irregular order; to stray or lag behind; occur here and there. पांगणें, पांगापांग होणें, रस्ता सोडून जाणें, पाठीमागें राहणें; तुरळक असणें,-होणें; वेडावांकडा जाणें (झाड, रोप इ.). *Straggling village, houses,* इतस्ततः विखुरलेलें खेडेगांव,-लीं घरें.-*er*, *n.*;-*gglingly*, *adv.*;-*ggly*, *a.*

**Straight,** *a.* (स्ट्रेट)—not curved or crooked; (of object) in a straight line; correctly placed or in proper order; symmetrical; honest or candid; (of aim) going correctly to the mark; direct from source. नीट, उजू; सरळ; सुव्यवस्थित, नीटनेटका, बरोबर; प्रामाणिक, सचोटीचा; थेट, सरळ, नेमका, तडक; मुळांतला, अधिकृत, अगदीं विश्वसनीय. *adv.* in a straight line; correctly, direct, with good aim. सरळ; थेट, तसाच, नेमका, अचूक. *n.* straight condition; concluding stretch of race-course; sequence of cards in poker. सरळ दिशा,-स्थिति; घोडदौडीचा शेवटचा टप्पा; (अमेरिकन) खेळांतील पत्त्यांचा अनुक्रम. *A s. line*, (in Geom.) सरळ रेषा. *S. hair*, not curly. सरळ (कुरळे नव्हेत असे) केंस. *S. dealings*, उघड,-सरळ,-व्यवहार. *S. thinking*, तर्कशुद्ध,-भावनाविरहित विचारसरणी. *Put things s.*, सुव्यवस्था लावणें, गोंधळ मोडून टाकणें. *Accounts are s.*, हिशेब-जमाखर्च-व्यवस्थित ठेवलेला आहे. *A s. fight*, दुरशीचा लढा. *S. ticket*, (U. S.) party programme without modification. न बदलणारा कार्यक्रम. *S. off*, without hesitation, deliberation, etc. कां कूं न करतां, एकदम, तडक.

**Straight'arm,** *n.* (स्ट्रेट्आर्म्)—a straightforward thrust. सरळ हल्ला,-मुसंडी,-घुसणें.

**Straight'fŏrward,** *a.* (स्ट्रेट्'-फॉर्वर्ड)—devoid of guile or complexity, candid. निष्कपटी, मनाचा मोकळा.

**Straight'en,** *v. t. & i.* (स्ट्रेट'टन्)—to make straight; reduce to order. सरळ,-नीट,-उजू करणें; व्यवस्था लावणें.

**Straight'way,** *adv.* (स्ट्रेट्'-वे)—immediately. तावडतोब.

**Strain,** *v. t. & i.* (स्ट्रेन्)—to stretch tightly; exert one's self; injure by over-exertion; wrest or distort from true meaning; pass liquid through strainer, filter; hold tight in embrace; tug at, strive intensely after. ताण देणें, तणावा देणें, ओढणें, आवळणें; ताणणें; फाजील श्रमानें शिणणें, शिणविणें,-दुखविणें; अर्थाची ओढाताण करणें; अर्थविपर्यास,-हेतुविपर्यास,-करणें; गाळणें, छानणें, पाझरणें, गळणें; कवटाळणें, पोटाशीं धरणें; नेट करणें, नेटानें ओढणें, धडपड करणें. *n.* pull, tension; severe demand upon a person or thing; injury caused by such; (*pl.*) music or verse of specified tendency; (*sing.*) moral tendency; breed of animals, human family, tone or tendency in speech or writing. ताण, ओढ, तणाव; ओढाताण, नेट, जोर; ताण, शीण, लचक, चमक; (अने०) चुटका, कडवें, गीत, गाणें; (स्वाभाविक) वळण, रोख; अवलाद (पशूंची), (मनुष्य-) कुळ, वंश, जात; बोलण्याची किंवा लिहिण्याची पद्धत, झोंक, रोख, वळण. *S. every nerve*, (प्रयत्नांची) शिकस्त करणें. *S. one's eyes, ears*, लक्षपूर्वक पाहणें,-ऐकणें. *S. one's authority*, अधिकाराचा अतिरेक करणें, मर्यादातिक्रमण करणें. *S. a point*, (एखादी गोष्ट) फारच ताणून धरणें. *A strained sense*, ओढून ताणून लावलेला अर्थ. *S. at*, be over-scrupulous about. ची अति काळजी घेणें. *Is suffering from over-s.*, अति श्रमामुळें त्याला थकवा आला आहे. *All his senses were on the s.*, exerted to the utmost. त्याच्या सर्व अवयवांना-इंद्रियांना-भयंकर ताण बसला. *Martial, pathetic, ss.*, वीररसात्मक, करुणरसात्मक कविता,-काव्य,-गाणें,-संगीत. *Comes of a good s.*, चांगल्या कुळांतला आहे. *Strain'able, a.*

**Strain'ed,** *pa. p. & a.* (स्ट्रे'न्ड)—constrained, forced, fictitious. ताणलेला, ताण दिलेला, ओढून ताणून आणलेला, औपचारिक, काल्पनिक, कृत्रिम. *S. relations*, बेबनाव.

**Strain'er,** *n.* (स्ट्रे'नर्)—(*esp.*) an appliance through which liquid is poured to be cleared of matter suspended in it. चाळण, चाळणी, गाळणी, गाळणें, रोवळी.

**Strait,** *a.* (स्ट्रेट)—narrow, limited; strict. अरुंद, साकड, अप्रशस्त, तंग; कडक. *n.* a narrow water-passage connecting two seas or large bodies of

water; (*pl.*) ill-supplied state, need, difficulty. खाडी, सामुद्रधुनी; विपत्ति, संकट, अडचण. *S. laced,* (*fig.*) severely virtuous, puritanic. कडकडीत, सोंवळा,-नियमबद्ध. *In straits,* अडचणींत, पेंचांत, संकटांत. *Strait'ly, adv.,-ness, n.*

**Strait'en,** *v. t.* (स्ट्रेट्‌न्)—to restrict, confine, reduce to straits. संकुचित,-मर्यादित,-करणें; अडचणींत टाकणें, संकटांत घालणें. *Straitened circumstances,* दारिद्र्य, कंगाल स्थिति. *To be straitened for,* be ill supplied with. ची वाण-गरज-असणें.

**Stramōn'ium,** *n.* (स्ट्रमो'निअम्)—(Bot.) drug from seeds or leaves or datura. धोतरा, धत्तुरा (वनस्पति).

**Strănd,** *n.* (स्ट्रॅन्ड्)—land along sea or other water, margin. तीर, कांठ. *v. t. & i.* to run (of ship) aground. कांठाला लागणें, किनाऱ्यावर आदळणें, आपटणें.

**Strănd,** *n.* (स्ट्रॅन्ड्)—one of the strings or wires by twisting which a rope is made; (*fig.*) element or strain in composite whole. पदर, पेड, पेढ; (सबंध गोष्टीचा) धागादोरा. *v. t.* to break a *s.* in (a rope). (दोराचा) पदर-पेढ-काढणें.

**Strănd'ĕd,** *a.* (स्ट्रॅन्डेड्)—(*fig.*) in difficulties. संकटांत पडलेला, (पैशाच्या अडचणीमुळें) मागें पडलेला, असहाय.

**Strānge,** *a.* (स्ट्रेंज्)—foreign, alien; unfamiliar or not known (*to*); surprising; eccentric, bewildered. परकीय, परदेशचा, परका, विदेशी; अपरिचित, नवा, अनोळखी; आश्चर्यकारक; गोंधळलेला, घाबरलेला. *Is very s. in his manners,* seems mad. वेडेचाळे करतो, वेडा दिसतो. *Feel s.,* कसेंसें-चक्कर आल्यासारखें-वाटणें. *It feels s.,* अवघड वाटतें, नवलसें वाटतें. *Strange'ly, adv.*; *Strange'ness, n.*

**Strā'nger,** *n* (स्ट्रेन्जर्)—a person strange to some one or to something; a person in a company or town or country that he does not belong to; (U. S. voc.) sir. अनोळखी माणूस, तिऱ्हाईत, नवशिका; परकी, परदेशस्थ, विदेशी; (संबो.) महाराज! पाहुणे! *To spy* or *see ss.,* (कॉमन्ससभेंतून) सभासदांखेरीज इतरांना बाहेर घालवून देणें. *Make a s. of,* treat distantly. परका म्हणून-परकेपणानें-वागविणें. *Make no s. of,* treat cordially. प्रेमानें-आपुलकीनें-वागविणें. *The little s.,* new-born child. नूतन जन्मलेलें बालक.

**Străng'le,** *v. t.* (स्ट्रँगल्)—to kill by squeezing the windpipe; to suppress; (of collar) squeeze neck. नरडी दाबून मारणें, गळा दाबून ठार मारणें; दाबून टाकणें, दडपून टाकणें; (गळपट्टीनें) मान आवळणें.*-hold,* deadly grip, (usu. fig.). भयंकर पकड, गळचेपी (राजकारणांतील, व्यापारी). *Strang'les. n. pl.* (or as sing.) infectious catarrh in horse etc. (घोड्याला वगैरे होणारा) सांसर्गिक पडसें,-शैत्य (रोग).

**Străng'ūlāte,** *v. t.* (स्ट्रँग्युलेट्)—to prevent circulation through (vein, intestine) and vital action in by compression; strangle (rare). दाबून रुधिराभिसरण थांबविणें,-बंद करणें; गळा दाबणें.*-tion, n.* करकचून आवळणें; रुधिराभिसरण -स्तंभन; श्वासरोध.

**Strang'ūry,** *n.* (स्ट्रॅंग्यूअरि)—disease in which urine is passed painfully and in drops; disease produced in plants by bandaging. अश्मरी, मूत्रकृच्छ; वनस्पतींचा रोग.*-gur'ious, a.* [Gk *stragx,* drop, *ouron,* urine]

**Străp,** *n.* (स्ट्रॅप्)—a strip of leather or other material, esp. one fitted with a buckle to serve as a band, (Bot.) tongue-shaped part in ligulate floret. चामड्याचा पट्टा, वादी, पट्टी, (कोणत्याहि धातूचा) पट्टा, आंकडा, (वस्तऱ्याचें) थापटणें; लघुपुष्पांतील वादीसारखी पाकळी. *v. t.* to secure with a strap; strop, whet (razor etc.; (Surg.) close (wound), bind part up with adhesive plaster; flog with a strap. वादीनें,-पट्ट्यानें,-घट्ट आवळणें; पलाटण्यावर (वस्तऱ्याला वगैरे) धार लावणें; पट्टी बांधून जखम बरी करणें, पट्टी बांधणें; वादीनें मारणें,-झोडणें. *The s.,* चामड्याच्या वादीचा मार. *S.-hanger,* bus or train passenger who has to stand or hold on by s. for want of sitting space. (वरील चामडी पट्ट्याला धरून) उभें राहून जाणारा. S. *oil,* वादीनें दिलेला मार. *S.-wort,* पांढऱ्या फुलांची गवती वनस्पति.

**Străpp'ing** *a.* (स्ट्रॅपिंग)—stalwart; tall and strong. दांडगा; उंच, भव्य. *n.* (esp.) adhesive plaster for surgical use, a flogging. चिकट औषधी पट्टी (जखम बांधण्यासाठीं); वादीचा मार, -फटके. *A strapping girl,* उंच, उफाड्याची, मुलगी. *Strap'per, n.* उंच, उफाड्यानें वाढलेला.

**Strappā'dō,** *n. & v. t.* (स्ट्रपेडो)—(pl.*-os*), torture in which the victim was let fall from a beam to the distance allowed by the rope securing his hands etc. (दोराला हातपाय बांधून) मनुष्याला खालीं फेकून लोंबकळत ठेवण्याची शिक्षा (करणें).

**Strata,** *See* Stratum.

**Străt'agĕm,** *n.* (स्ट्रॅटजिम्)—a device for deceiving the enemy, a clever plan, a trick to obtain advantage. शत्रूला फसवण्याचा डाव, व्यूह, कढ्हाति, युक्ति, उपाय.

**Străt'ĕgy̆,** *n.* (स्ट्रॅटिजि)—the art of war. लष्करी डावपेंच.

**Strătē'gic,** *a.* (स्ट्रॅटी'जिक्)—of or serving the ends of strategy. लष्करी डावपेंचाचा, मान्याचा, सोईचा; युक्तीनें सिद्धीस नेलेला.*-gical, a.;-gically, adv.* व्यूहरचनाशास्त्रदृष्ट्या.

**Străt'ĕgist,** *n.* (स्ट्रॅटिजिस्ट्)—an expert in strategy. व्यूहरचनानिपुण, लष्करी डावपेंच लावण्यांत वाकबगार.

**Străth,** *n.* ( स्ट्रॅथ् )—( Sc. ) a broad mountain-valley. रुंद खोरें.*-spey',* ( -स्पे' ) स्कॉच लोकांचा नाच.

**Străt'iculate,** *a.* ( स्ट्रॅटिक्युलट् )—( Geol. ) arranged in thin layers. पातळ थरांच्या रचनेचा, प्रस्तरित.

**Străt'ifȳ,** *v. t. & i.* ( स्ट्रॅटिफाय् )—to form into strata. थरांथरांनीं असणें,-प्रसविणें.*-fication, n.* प्रस्तरीकरण,-भवन.

**Stratŏ'cracȳ,** *n.* ( स्ट्रटॉ'क्रसि )—military government. सैन्यसत्ताक राज्यपद्धति. लष्करी सत्ता. [ Gk *strates,* army ]

**Stră'tŭm,** *n.* ( स्ट्रे'टम् )—( pl.-ta, ) a layer of deposited matter forming part of earth's crust, ( also *fig.* ) social grade. थर, पडदा; ( समाजांतील ) दर्जा. *Stra'tal, Stra'tiform, aa.*

**Stră'tus,** *n.* ( स्ट्रे'टस् )—( pl -ti ) low horizontal sheet of cloud. मेघपटल, मेघाच्छादन.

**Straw,** *n.* ( स्ट्रॉ )—dry cut stalks of grain, a straw hat; single stalk of straw, insignificant trifle. काड, गवत, पेंढा; गवती टोपी; ( गवताची ) काडी, काड; काडी, कसपट, तुच्छ-कवडी किंमतीची-वस्तु. *A man of s.,* stuffed effigy, person without substantial means. ( गवती पेंढ्या भरलेलें ) मनुष्याकृति,-बुजगावणें; करचट, यत्किंचित् मनुष्य. *Draw ss.,* draw lots. गवताच्या काड्या टाकून अजमावणें. *To make bricks without s.,* भरपूर तयारी ( साधनसामुग्री ) नसतांना कामाला सुरुवात करणें. *To catch at a s.,* काडीचा आश्रय करणें ( बुडत्या मनुष्याप्रमाणें ). *The last s.,* ( उंटाच्या पाठीवरील ओझ्यांत टाकलेली व असह्य होणारी ) शेवटची काडी, थोडीशी भर. *A s. shows which way the wind blows,* a slight hint may suggest much. of. शितावरून भाताची परीक्षा. *Don't care a s.,* काडीची किंमत देऊं नको. *S.-berry,* ( माथेरान, महाबळेश्वर वगैरे थंड ठिकाणीं होणारी ) तांबूस फुलांची वनस्पति, तिचें फळ. *The s.-berry leaves,* ड्यूकची पदवी. *Straw -board,* जाड गवती पुठ्ठा. *S.-coloured,* फिकट पिवळ्या रंगाचा.

**Straw'ȳ,** *a.* ( स्ट्रा'इ )—of flavour of inferior tea. ( कमी प्रतीचा चहासारख्या ) कमी चवीचा.

**Stray,** *v. t.* ( स्ट्रे )—to go astray *from*; to wander aimlessly. रस्ता सोडून जाणें, चुकणें, भ्रमणें, भकणें; भटकणें. *a.* strayed; sporadic, isolated. चुकार, चुकलेला; क्वचित, अधूनमधून, किरकोळ, प्रकीर्ण. *n.* a strayed beast or child; ( pl. Wireless ) atmospherics; property of deceased person escheating to crown in default of heirs. चुकार,-चुकलेलें,-गुरूं,-मूल; ( बिनतारी संदेशावर परिणाम करणारा ) हवेंतील वैजिक विघटना-फेरबदल,-अस्थिरता; ( सरकारजमा होणारी ) बिनवारशी,-मालमत्ता. *A few s. instances,* कांहीं तुरळक उदाहरणें,-दाखले. *A s. customer,* चुकून माकून येणारें गिऱ्हाईक.

**Streak,** *n.* ( स्ट्रीक् )—irregular line or band, esp. one distinguished by colour; (*fig.*) strain or element in character. पट्टा, रेघ, रेघोटी, रेघ, लकेर; ( स्वभावांतील ) छटा, अंश. *v. t.* ( usu. in *pa. p. Streaked* ) make with streaks. रेघांनीं,-पट्टयांनीं,-चित्रविचित्र करणें, रेघा काढणें. *A s. of lightning,* a flash. विजेची चमक, विद्युल्लेखा. *Like a s (of lightning),* swiftly. विद्युद्वेगानें, अतिजलद. *The silver s.,* इंग्लिश खाडी ( चानेल ). *Streak'y, a.* रेघांकित, रेघांनीं सुशोभित.*-ily, adv. ;-iness, n.*

**Stream,** *n.* ( स्ट्रीम् )—a body of running water; a moving mass or crowd; large quantity of something that moves along; current. पाण्याचा प्रवाह, ओघ, झरा, ओढा; चालता ढीग किंवा समुदाय; प्रवाह. *v. t. & i.* to flow out or along; run with liquid, end forth in a stream, ( of banner etc. ) float or wave in the wind. वाहणें, पाट चालणें; धार लागणें, पाट सुटणें,-वाहणें, वाहविणें; ( निशाण ) फडकणें, फडफडणें. *Up, down, s.,* प्रवाहाच्या उलट दिशेनें, प्रवाहाबरोबर. *To go with the s.,* do as others do. लोक वागतील तसें आपण वागणें, प्रवाहाबरोबर जाणें. *S.-line,* natural course of water or air currents. पाण्याचा,-हवेचा-स्वाभाविक प्रवाह,-दिशा. *S-line shape,* ( in aircraft ) हवेला विशेष विरोध न करील अशी विमानाची बांधणी,-असा विमानाचा आकार,-ची रचना. *Streaming eyes,* अश्रुधारा वाहात आहेत असे-रडवे-डोळे. *Stream'y, a.* ( rare ); *Stream'-less, a.* जलप्रवाहरहित.

**Stream'er,** *n* ( स्ट्री'मर् )—a pennon; a ribbon attached at one end to float in wind; a column of light shooting up in aurora. निशाण, बावटा; ( वाऱ्यावर ) फडफडणारी फीत; क्षितिजापासून निघणारी किरणच्छटा.

**Stream'lĕt,** *n.* ( स्ट्री'म्लेट् )—a small stream. ओहोळ, वहाळी, लहान ओढा.

**Street,** *n.* ( स्ट्रीट् )—a town or village road lined with houses, the roadway. ( दुतर्फा घरें असलेला ) रस्ता, आळी, पेठ. *To live in the s.,* नेहमीं घराबाहेर असणें. *Not in the same s. with,* ( colloq. ) utterly inferior to. ( च्या पेक्षां ) अगदीं कमी प्रतीचा. *On the ss.,* living by prostitution. वेश्याव्यवसायी. *S. cries,* ( फेरीवाल्यांची ) आरोळी, आरडाओरड वगैरे. *S. orderly,* झाडूवाला, रस्ते साफ करणारा. *S.-door,* रस्त्याकडचा दरवाजा. *S.-sweeper,* रस्ते झाडण्याचें यंत्र. *S.-walker,* common prostitute. बाजारबसवी, सामान्य वेश्या. *S.-ward, a. & adv. ;-streeted, a.*

**Strĕngth,** *n.* ( स्ट्रेंग्थ् )—being strong; degree of strongness; number of persons present or available; what makes strong. जोरदार असणें, शक्ति, सामर्थ्य; हजर असलेल्या किंवा मिळणाऱ्या लोकांची संख्या; मनुष्यबळ; आधार, भरंवसा. *Has*

*the s. of a horse,* एका घोड्याचें बळ त्याच्या अंगीं आहे. *I did it on the s. of your promise,* तुझ्या शब्दावर विश्वास ठेवून मी तसें केलें. *God is our s.,* ईश्वर आमचा आधार-भरंवसा-आहे. *On the s.* ( Mil. ) हजेरीपटावर. *S.-less, a.*

**Strĕng'then,** *v. t. & i.* (स्ट्रें'ग्थन्)—to add to the strength or number of; grow stronger, cause to increase in power. बळकटी आणणें; जोरावणें, अधिक बलवान्-सबळ-होणें; जास्त बळकट होणें.

**Strĕn'ūous,** *a.* (स्ट्रे'न्युअस्)—making or requiring great exertions, energetic, ardent. फार जोराचा, जोरदार, दांडगा, उत्साही, चिकाटीचा, *-ly, adv.* उत्साहानें, परिश्रमानें.*-ness, n.*

**Streptoco'ccus,** *n.* (स्ट्रेप्टोकॉ'कस्)—( *pl.-ci* ) a bacterial organism of chaplet-form. शृंखलाकार रोग-जन्तु.

**Strĕss,** *n.* (स्ट्रेस्)—stretch or pressure or tension or compulsion; emphasis, accent. ओढ, ताण, दाब, जोर, महत्त्व; शब्दावर दिलेला जोर, स्वराघात. *v. t.* to lay stress on, emphasize; ( Mech. ) subject to mechanical stress. शब्दांवर जोर देणें, महत्त्व देणें; दाबणें, दाब देणें. *To lay s. on,* वर जोर देणें. *S.-less a.* [ short for *distress* ]

**Strĕtch,** *v. t. & i.* (स्ट्रेच्)—to make tight increase the length or size of by tension; exert to the utmost; exaggerate, misrepresent by exaggeration; reach out ( one's hand etc. ); be of specified extent; run, be spread out, in specific direction; be continuous between points or to or from a point; ( sl. ) hang a person. ताठ करणें, ताणणें,-लांब करणें, सैल करणें ( ओढून ); शिकस्त करणें, आटोकाट प्रयत्न करणें; ओढून ताणून अर्थ करणें, अतिशयोक्ति करणें; पसरणें; ( हात वगैरे ), पोचविणें; विस्तारणें, पसरणें, ताणणें; वाहणें, वाहणी-वळण-असणें; लांब असणें; ( एखाद्याला ) फांशीं देणें. *n.* act of stretching; an expanse or tract; spell; ( Naut. ) distance covered on one tack. ओढ, ताण, वळण, प्रयत्न, बळ, नेट, विस्तार, विस्तृत प्रदेश; आवांका; एका खेपेला तोडलेलें अंतर. *To s.* ( *oneself* ), हातपाय लांब करणें,-ताणणें. *S. out,* हात लांब करणें,-पोंचविणें; लांब पावलें टाकणें. *S.* ( *the truth* ), exaggerate, lie. अतिशयोक्ति करणें, खोटें बोलणें. *Works ten hours at a s.,* एका झपाट्यांत,-ओढीनें,-एका वेळीं, दहा दहा तास काम करतो. *Stretch'y, a.; -iness, n. Stretch'ed, pa. t. & pa. p.* पसरलेला, ताणलेला, विस्तृत, ओढून ताणून आणलेला.

**Strĕtch'er,** *n.* (स्ट्रे'चर्)—In vbl. senses; ( *esp.* ) a hand-barrow on which disabled person is carried; board in boat for rower to steady his feet against; brick laid with side in face of wall; ( *sl.* ) lie. ताणणारा, पसरणारा; ( आजारी, अशक्त मनुष्याला ) वाहून नेण्याचा. हातबिछाना,-हातपलंग; ( वल्हवणाराचीं ) पांवडी; भिंतींत बसलेली दर्शनी उभी वीट ( दगड ); असत्य, खोटी गोष्ट.

**Strew,** *v. t.* (स्ट्रू)—( *pa. p.*-n,-ed ), to scatter ( sand etc. ) over a surface. पसरणें, विखरणें; वर पसरून झांकणें.

**Stri'a,** *n.* (स्ट्रा'इआ)—( *pl.-ae* ) slight ridge or a surface. ( पृष्ठभागावरील ) रेषा, लहान उंचवटा. *Stria'ted, a.* रेषांकित, रेखांकित. *Stria'tion, n.* रेषांकित करणें,-असणें,-होणें.

**Stricken,** See Strike.

**Stric'kle,** *n.* (स्ट्रि'कल्)—a rod used in strike-measure. ( मापाची ) शीग मारण्याची पट्टी.

**Strict,** *a.* (स्ट्रिक्ट्)—precisely defined or limited; requiring implicit obedience, without deviation, not lay. अगदीं बरोबर, रेखीव, रेखलेला, बांधीव; कडक, शिस्तीचा; इकडे तिकडे न होणारा, ढिला नसलेला. *S. discipline,* कडक शिस्त. *Strict'ly, adv.; Strict'ness, n.* रेखीवपणा, कडकपणा, सरळपणा.

**Stric'ture,** *n.* (स्ट्रि'क्चर्)—( usu in pl. ) comment of a critical or censorious kind; ( Med. ) morbid contraction of a duct in the body. दोषाविष्करणार्थ किंवा प्रतिकूल टीका; संकोच, आकुंचन. *Stric'tured, a.*

**Stride,** *v. t. & i.* (स्ट्राइड्)—( *strode* ), to walk with long steps; bestride or stand astride of; pass over ( a ditch etc. ) with one step. ढेंगा टाकीत चालणें; ढेंग पसरून उभा राहणें; एका ढेंगांत ओलांडणें. *n.* a single walking or running step; gait in regard to the length of stride, a measured tread or gait. ढेंग, टांग; ढेंगभर अंतर, चालण्याची ढब. *Take obstacle in* one's *s.,* वाटेंतील अडथळा सहज पाऊल टाकून ओलांडणें;( *fig.* ) अडचणीला न जुमानणें.

**Stri'dent,** *a.* (स्ट्रा'इडन्ट्)—of loud harsh sound. कर्कश, किंचाळल्यासारखा कठोर.

**Strife,** *n.* (स्ट्राइफ्)—quarrels, hostilities. झगडा, भांडण.

**Strike,** *v. i. &t.* (स्ट्राइक्)—( *Struck*; *Stricken* ), to hit; to deliver blows ( *lit.* or *fig.* ); to dash against or on something; to make ( a coin, medal ) by stamping; to agree on ( a bargain ); to enter the mind, impress as; to ignite ( match ) by rubbing; ( of clock ) to sound the time; ( of hour ) be sounded; (of workmen) to go on strike, cease work; to take root; lower, take down, ( flag, sail etc. ), surrender; cause to penetrate, diverge to; level in strike measure. ( टोला, तडाखा, ठोका ) मारणें; ठोकणें, पिटणें, गुद्दे मारणें; आपटणें, आदळणें; ( नाणें ) पाडणें; ठरवणें, पटविणें, कायम करणें; मनांत येणें, सुचणें; काडी पेटविणें; वेळ सांगणें, ठोके पडणें, वाजणें; संप करणें, काम बंद करणें,-थांबविणें; मूळ धरणें; ( निशाण, शीड ) खालीं पाडणें, उतरणें, शरण

जाणें ;-भोसकणें, पार जाणें, (च्या दिशेनें) चळणें, शीग मारणें. *n.* concerted refusal of workmen to work till higher wages are paid or some grievance is remedied ; (U. S.) levelling all the pins with one bowl ; sudden success at finding petroleum, etc. in financial operation. संप, हरताळ ; (नाइन् पिन्स्च्या खेळांत) एका तडाख्यांत नऊ खुंट्या पाडविणें ; (धंदा-उद्योगाच्या दृष्टीनें) अकस्मात् (रॉकेल, पेट्रोल वगैरेचा) शोध लागणें. *S.* one *in the mouth with fist,* तोंडावर गुद्दा मारणें. *S. while iron is hot,* cf. तवा तापला आहे तों भाकरी भाजून घ्यावी. *Striking force,* एकदम हल्ला करण्यास सुसज्ज सैन्य (सैन्याची तुकडी). *S. hands,* (एखादी गोष्ट ठरली म्हणून) हातावर टाळी देणें. *A stricken field,* ठाणावरची (हातघाईची) लढाई. *S. at,* aim blow at. (वर) नेम धरणें. *S. at the root of,* (च्या) मुळावर घाव घालणें. *S. back,* परत ठोसा-टोला-मारणें,-लगावणें. *S. home,* भरपूर,-वर्मी,-टोला मारणें. *S. the track,* come upon it. माग लावणें, मार्गावर येणें. *S. coin,* नाणें पाडणें. *S. bargain,* सौदा ठरविणें,-पटविणें. *The hour has struck,* घड्याळांत ठोका पडला. (*fig.*) आणीबाणीची वेळ आली,-टळली. *S. me dead!,* शपथ! खरोखर! *S. down,* fell with a blow, (also *fig.*). एका तडाख्यांत खालीं पाडणें,-चीत करणें. *S.* one's *head off,* (एकाद्याचें) शिर तोडणें, डोकें छाटणें,-उडवणें. *S. out* (*a plan*), तोड काढणें, युक्ति सुचणें. *S. up an acquaintance,* लौकर ओळख पाडणें. *S. off* (*copies*), (प्रति) छापून काढणें. *How does it s. you?* how do you think about it? त्याविषयीं तुझें मत काय आहे? *Struck with terror,* आकस्मिक भीतीनें गाळण उडालेला. *S. into a gallop,* begin galloping. दौडूं लागणें. *A match will not s.,* कांडी पेटणार नाहीं. *S.-a-light,* चकमकीपासून प्रकाश पाडण्याचें साधन. *To be on s.,* संप करणें, संपावर असणें. *General s.,* सार्वत्रिक संप, सर्व कामगारांचा हरताळ. *Sympathetic s.,* (इतर मजुरांच्या खरीं गाऱ्हाणीं असलेल्या मजुरांसाठीं-कामकऱ्यांसाठीं) सहानुभूतिदर्शक संप. *S.-breakers,* outsiders got in to replace strikers. (संपवाल्या मजुरांऐवजीं काम करणारे) संपफोडे. *S.-pay,* subsistence allowance paid to strikers by trade-union. कामकरी-संघाकडून संपवाल्यांना होणारी मदत,-मिळणारें वेतन. *S.-measure,* measuring grain etc. by passing rod across top of heaped vessel. मापाची शीग (मारणें).

Stric'ken, *pa. p.* & *a.* (स्ट्रि'कन्)—smitten with disease, famine, or grief; advanced in years. रोगपीडित, दुष्काळग्रस्त, दुःखी ; वृद्ध, वयातीत.

Stri'ker, *n.* (स्ट्रा'इकर्)—one who strikes; (*esp.*) workman on strike. ठोकणारा, घाव मारणारा, टोला मारण्याचें साधन ; संप केलेला कामगार, संपवाला.

Strik'ing, *a.* (स्ट्रा'इकिंग्)—sure to be noticed, impressive, arresting. लक्षांत येण्यासारखा, ठसठशीत, ढळढळीत, परिणामकारक, चकित करणारा, चमत्कारिक, विलक्षण.—*ly adv.* ;-*ness, n.*

String, *n.* (स्ट्रिंग्)—twine or fine cord; length of this material; one of the stretched pieces of cord producing the notes of musical instruments; set of things threaded on a string; set of things etc. coming successively; (Bot.) tough piece connecting two halves of pod. दोरी, सुतळी, सडा, सूत्र ; (बांधण्यासाठीं) दोरीचा-तारेचा-तुकडा ; तंतु, तार ; सर, हार, माळ ; (बिल्यर्ड खेळांतील) हात मांडण्याची माळ ; (वस्तूंचा इ०) अनुक्रम, रांग. *v. t. & i.* (*Strung*) to thread on a string; to provide with strings; to put (facts etc.) together; bring (person) to state of tension; put a stringed instrument in tune; strip strings from beans. गोंवणें, ओंवणें, गुंफणें, (धनुष्याला) दोरी लावणें, तारा लावणें, तंतुयुक्त (तंतुवाद्य) करणें ; एकत्र जुळविणें, सूत्र-बद्ध करणें ; पेंचांत,-कैचींत धरणें,-सांपडणें, (तंतुवाद्य) लावणें, सूर लावणें, (शेंगांच्या) शिरा काढणें. *To pull the ss.,* (एखाद्या कामाचीं) सूत्रें हालविणें. *Touch the ss,* play. तंतुवाद्य वाजविणें. *Harp on one s.,* एकच विषय घेऊन बसणें, एकाच विषयाचें तुणतुणें वाजविणें. *Touch a s.,* (*fig.*) (एखाद्याची) विशिष्ट भावना जागृत करणें. *The ss.,* तंतुवाद्यें. *A s. of porters, carriages,* हमालांची, गाड्यांची-रांगच रांग. *S. alphabet,* दोरीवरील (विशिष्ट गांठीवरून) आंधळ्यांसाठीं रचलेली वर्णमाला. *S.-course,* (archit.) कार्निसची लांबलचक रांग, गलथा.

Stringed, *a.* (स्ट्रिंग्ड्)—provided with strings. तारा असलेलें, तारा लावलेलें (तंतुवाद्य).

Strin'gent, *a.* (स्ट्रि'न्जन्ट्)—strict, binding, precise, rigorous, making severe restrictions; (of money market) tight. सक्त, पळवाट नसलेला ; चग-चणलेला, कडक.—*gency, n.* ;—*gently, adv.*

String'ў, *a.* (स्ट्रिं'गि)—fibrous; (of liquid) ropy. तंतुमय, सूत्रमय ; दोराळ, दोरा,-तार,-सुटलेला. *S.-substance,* तुकस. *To be s.,* दोरावणें.—*iness, n.*

Strip, *v. t. & i.* (स्ट्रिप्)—to remove clothes or covering from; to deprive of covering or belongings, to despoil; (of screw) lose thread; issue from rifled gun without spin. उघडा करणें, नागवा करणें ; हिरावून घेणें, बुचाडणें, नागवणें ; आंटा नाहींसा होणें ; (गोळी) सुटणें, निसटणें. *n.* a long narrow piece of something, a stripling. पट्टी, चिरोटी, चिंधी, फाळा. *To s.* one *to the skin,* पूर्ण नागवा, दिगंबर,-करणें. *Stripped,* naked. नागडा, उघडा. *S. a house,* घरांतील सामानसुमान काढून टाकणें. *S. a tree,* झाडाच्या साली, फांद्या वगैरे काढून,-छाटून,-टाकणें. *S. a cow,* milk to the last drop. थेंबान थेंब दूध काढणें. *S. tobacco,* तंबाखूच्या पानांचीं देठें काढून टाकणें. *Strip'per, n.*

Stripe, *n.* (स्ट्राइप्)—long narrow band differing in colour or texture from the surface on either side; (Mil.) N. C. O.'s chevron; stroke of a whip; (pl.) flogging. चित्रविचित्र पट्टी, पट्टा ; फीत ; फटका, फटकारा, वळ. *To get, lose,* one's *ss.,* (नवीन) फीत चढणें, बढती मिळणें ;

फीत कमी होणें. *Zebra's ss.*, झेब्रा-जनावराच्या अंगावरील पट्टे.-*strip'ed*, *a.* (-प्ड्) पट्टेरा. *Strip'y*, *a.*; *Strip'iness*, *n.*

**Strip'ling**, *n.* (स्ट्रि'प्लिंग्)—a youth whose figure has not yet filled out. पूर्ण वाढ न झालेला, पोऱ्या.

**Strive**, *v. i.* (स्ट्राइव्ह्)—(strove, striven) to endeavour, to try earnestly, to try hard, to struggle; to engage in strife *with*; to contend *against*. झटणें, झट्टून उद्योग करणें, जोराचा प्रयत्न करणें; लढणें, भांडणें; झगडणें, स्पर्धा करणें. *S. together* or *with each other*, (मोठेपणाकरितां) झगडणें, स्पर्धा करणें.

**Strō'bile**, *n.* (स्ट्रो'बिल्)—(Bot.) cone of pine etc. (पुष्कळ फुलें एकत्र होऊन झालेलें) लांबोडे व खवलेदार फळ. [Gk *Strepho*, twist]

**Strode**, *pa. t.* of Strive.

**Strōke**, *n.* (स्ट्रोक्)—a blow; shock given by a blow; sudden favourable turn of luck; the sound of a clock's bell; sweep of the brush,, pencil or pen; a single effort put forth movement of a regulated or recurrent kind; method of striking in games, a skilful effort; the oarsman rowing nearest stern. टोला, ठोका, फटकारा, फटका, धसका; देवाची रेषा; ठोका, टोला; (लेखणीचा) फटकारा, फांटा, रेषा; दणका, झपाटा; दम, फेरी; (खेळांत) टोला मारण्याची पद्धत, कुशलतेनें मारलेला फटकारा,-टोला; सुकाणूंजवळचा वल्हेवाला. *v. t.* to pass the hand gently along; act as stroke to crew. कुरवाळणें, प्रेमानें हात फिरवणें, गोंजारणें; सुकाणूचें वल्हें धरणें. *Killed by a s. of lightning*, विजेच्या तडाख्यानें (वीज पडून) मारला गेला. *Finishing s.*, final and fatal blow. शेवटचा प्राणघातक टोला,-सपाटा. *S. of paralysis*, पक्षघाताचा झटका. *Sun-s.*, उन्हाची तिरीप. *S. of genius*, original idea. (प्रचंड) बुद्धीचें काम, मूळची-नवीन-कल्पना. *S. of business*, धंद्यांत मिळालेला मोठा फायदा. *S. of luck*, unforeseen opportune occurrence. सुदैवानें प्राप्त झालेली सुसंधि,-घडलेली अनुकूल गोष्ट. *Dash off picture with a few ss.*, कुंचल्याच्या थोड्याशा फटकाऱ्यांनीं चित्र काढणें,-रेखाटणें. *Could do it with a s. of the pen*, by writing signature. तें एका सहीच्या (लेखणीच्या) फटकाऱ्यानें झालेंच समजा; दुसऱ्या सहीनें तें काम तो करील. *Finishing ss.*, (of a picture), शेवटचा हात. *Was there on the s*, अगदीं वेळेवर, वक्तशीर. *To s. one or one's hair the wrong way*, (एखाद्याला) त्रासवणें, चिडवणें. *Strok'ingly*, *adv.*

**Strōll**, *v. i.* (स्ट्रोल्)—to walk leisurely along; to rove from place to place. रमत रमत जाणें; उनाडणें, भटकणें, गांवोगांव हिंडून खेळ वगैरे करणें. *n.* a short leisurely walk. सहल, रपेट, फेरफटका. *To take, go, for a s.*, फेरफटका करणें, चक्कर मारून येणें. *Stroll'er*, *n.* (esp.) गांवोगांव फिरून खेळांत काम करणारा नट.

**Strō'ma**, *n.* (स्ट्रो'मा)—(pl.-*ata*). (Biol.) connective tissue of organ or cell. संधीपेशी, जोडणारा पडदा.-*tic*, *a.*

**Strŏng**, *a.* (स्ट्रॉंग्)—having power of resistance; tough, firm, healthy; powerful by size or numbers or resources or quality; having any quality in a great degree; energetic, vigorous, decided. (Gram. of verbs.), forming inflections by vowel change within stem rather than by adding suffix (e. g. *Swim*, *Swam*, etc.). बळकट, जोमदार; काटक, खंबीर, निरोगी; मजबूत, बळकट, कणखर, प्रबळ; भारी; उग्र, उग्रट; जोराचा, निश्चयाचा, उत्साही, निश्चयी; अविकारी (क्रियापदें,-धातु). *A s. constitution*, निरोगी, मजबूत,-प्रकृति. *S. nerves*, proof against fright, etc. न डगमगणारा, न भिणारा, निधड्या छातीचा, बळकट स्नायूंचा. *The s.*, सशक्त माणसें. *S. box,-room*, (दरोडेखोरांना फोडतां न येणारी) भक्कम तिजोरी, खोली. *A s. market*, हळू हळू चढलेले,-चढणारे,-बाजारभाव. *S. meat*, bibl. मजबूत,-भरपूर,-पोट भरेल असें,-अन्न; (*fig.*) उत्साही किंवा समंजस माणसांना पटतील अशीं तत्त्वें, -असे मार्ग. *S. in health*, शरीरप्रकृतीनें मजबूत. *By the s. arm* or *hand*, by force. शक्तीच्या चळावर, दांडगाईनें, बळजबरीनें, *A company 200 s.*, दोनशें लोकांची तुकडी. *S. tea*, कडक चहा. *S. drink,-waters*, alcoholic liquors. मादक पेयें. *S. situation*, conjuncture in play or story calculated to move audience deeply. (नाटक किंवा कथा यांतील) श्रोत्यांना हालवून सोडणारा प्रसंग. *S. onion*, तिखट कांदा. *S. butter*, खंवट लोणी. *S. language*, कडक-लागट,-शब्द,-भाषा. *S. measures*, drastic actions. कडक उपाय, -इलाज. *Going s.*, जोरांत-जोमांत-असणें, सरशी असणें. *Come* or *go it s.*, (sl.) अतिरेक करणें. *Strong'ish*, *a.*; *Strong'ly*, *adv.*

**Strŏng'hōld**, *n.* (स्ट्रॉ'ग-होल्ड्)—a fortress or citadel; place where some cause or sentiment still prevails. किल्ला; पालेकिल्ला.

**Strong'-minded**, *a.* (स्ट्रॉं'गमाइन्डिड्)—having a strong mind; (esp. of woman) claiming mental and legal equality with men. करारी, निग्रही; (पुरुषाच्या बरोबरीनें आपणाला) समानहक्क मागणारी (स्त्री.)

**Strŏp**, *n.* (स्ट्रॉप्)—appliance for sharpening razors; (Naut.) band of leather, rope, or iron round pulley. वस्तऱ्याकरितां पलाटणें; कप्पीला गुंडाळलेला (चामड्याचा वगैरे) तुकडा. *v. t.* to sharpen on a strop. पलाटण्यावर वस्तऱ्याला धार लावणें.

**Strōve**, *pa. t.* of Strive.

**Struck**, *pa. t.* & *pa. p.* of Strike.

**Strŭc'ture**, *n.* (स्ट्र'क्चर्)—manner in which a building or organism holds together; the

supporting framework of essential parts; a building or any complex whole. (यंत्राची) रचना, बांधा, बनावट, (खडकाची) मांडणी, (दागिन्याची) घडण, घाट; (शरीराची, घराची) रचना, बांधणी; इमारत, इमला, बांधकाम. *Nervous s.*, ज्ञानतंतुरचना. *A fine marble s.*, सुंदर संगमरवरी बांधकाम *Struc'tural, a.* (आवश्यक) बांधणीचा, रचनेचा, घडणीचा.-*turally, adv.* ; *Struc'tureless,-tured, aa.*

**Strŭg'gle,** *v. i.* (स्ट्रग्ल्)—to make one's way with difficulty; to make great efforts under difficulties; throw one's limbs about in violent effort to get free. धडपड करणें, झगडणें; जीव तोडून कष्ट करणें; हातपाय झाडणें,-आदळणें, -आपटणें. *n.* effort under difficulties, hard contest: spell of struggling. धडपड, आटोकाट प्रयास, आटाआटी, झगडा, कलह, धडपडणें, झगडणें. *Strug'gling, pr. p.* (artist etc.), पोटासाठीं,-मान्यता मिळण्यासाठीं,-धडपडणारा कारागीर, चित्रकार. *Struggler, n.* धडपडणारा, झगडणारा. *The struggle for existence,* the competition between organisms. जीवनार्थ कलह,-झगडा.

**Strŭm,** *v. i. & t. & n.* (स्ट्रम्)—twang strings of piano etc. (*esp.* unskilfully): such a sound. तंतुवाद्याच्या तारा छेडणें (नवशिक्याप्रमाणें).

**Strū'ma,** *n.* (स्ट्रुमा)—scrofula; (Bot.) cushion -like dilatation of an organ. गंडमाळा, गलगंड (विकार); (उशीसारखी) मऊ वाढ, मृदु वृद्धी, प्रसरण. *Stru'mose,-mous, aa.*

**Strŭm'pĕt,** *n.* (स्ट्रंपिट्)—a prostitute. वेश्या, कसबीण.

**Strŭng,** *pa. t. & pa. p.* of String.

**Strŭt,** *v. i.* (स्ट्रट्)—to walk in stiff pompous way, to walk with affected dignity. ऐटींत डौलानें चालणें, ठुमकत,-मिरवत,-चालणें, छाती पुढें काढून पावलें टाकणें. *n.* a bar forming part of a framework; strutting gait. धिरा, तीर; ठुमकणें, ठमका, नखरा.

**Stru'thious,** *a.* (स्ट्रुथिअस)—of or like an ostrich. शहामृगाचा,-सारखा, शहामृगाच्या जातीचा.

**Strȳ'chnia,-chnine,** *nn.* (स्ट्रिक्निआ,-क्निन्)—vegetable alkaloid got from plants and used as nerve-stimulant. कुचल्याचें सत्त्व,-विष.-*chnic, a.*

**Stŭb,** *n.* (स्टब्)—a stump of tree, tooth, etc. left projecting; remnant of pencil, cigar, etc. खुंट, बुंधा; ठोटण. खुंटण. *v. t.* to rid (ground) of stubs: dig up (root etc.). खुरपणें, खरडणें. (खुंट, मुळें वगैरे) उपटून टाकणें. *To s. one's toe,* ठेंच लागून (पायाचा) आंगठा दुखावणें. *Stub'by, a.*

**Stŭb'ble,** *n.* (स्टब्ल्)—stumps of grain left sticking up after harvest; cropped hair or beard. (धान्य कापल्यावर राहिलेला) खुंट; (केसाचा, दाढीचा) खुंट.

**Stŭbb'lȳ,** *a.* (स्टब्लि)—short and stiff. खुंटासारखा. आंखुड व ताठ.

**Stŭbb'ŏrn,** *a.* (स्टबॉर्न्)—unyielding; not docile or amenable to control, persisting. ताठ, दुराग्रही; हट्टी, अडेल. *Facts are s. things,* विचारसरणीप्रमाणें वस्तुस्थिति (सत्य गोष्ट) बदलूं शकत नाहीं. *S.-ly, adv.* ;-*ness, n.* हट्ट, आग्रह.

**Stŭcc'o,** *n.* (स्टको)—(*pl.-oes*), kinds of plaster or cement for walls. (चुन्याचा वगैरे भिंतीचा) गिलावा, सन्दला, गिलाव्याचें काम. *v. t.* to face with stucco. (चुन्याचा) गिलावा काढणें.

**Stŭck,** *pa. t. & pa. p.* of Stick.

**Stŭd,** *n.* (स्टड्)—projecting knob on a surface; large-headed nail; post to which laths are nailed. चमकी; गुंडी; गुलमेख. *v. t.* to set thickly with or as with studs. चमक्या घसवणें, जडवणें, गुलमेखा मारणें. *Stud'ded, pa. p.* गुलमेखा जडवलेला, जडित, खचित.

**Stŭd,** *n.* (स्टड्)—number of horses kept for breeding, hunting, etc. (पैदाशीचे, शर्यतीचे) राखीव घोडे. *S.-book,* घोड्यांच्या वंशावळीचें पुस्तक. *S.-bull,* वियाण्याचा बैल, पोळ, वळू बैल.

**Stŭd'ding,** *n.* (स्टडिंग)—wood, lath, etc. of partition. पडद्याचें लांकूड, पट्टचा, गिलावा, वगैरे.

**Stū'dent,** *n.* (स्ट्यूडन्ट्)—a person undergoing instruction, a man devoted to books. विद्यार्थी. अभ्यासू, शिकणारा, शिष्य.-*ship, n.* छात्रवृत्ति, शिष्यवृत्ति.

**Stŭd'ied,** *a.* (स्टडिड्)—deliberate or intentional, deliberately planned. जाणून बुजून, हेतुपुरःसर, मुद्दाम धारण केलेलें.-*ly, adv.*

**Stū'diō,** *n.* (स्ट्यूडिओ)—(*pl.-os*) artist's work -room, work-place of a painter. (मूर्तिकाराचें किंवा चित्रकाराचें) कार्यालय, चित्रगृह, चित्रपटगृह.

**Stū'dious,** *n.* (स्ट्यूडिअस)—given to study or reading; attentive to, careful. विद्याव्यासंगी, अभ्यासी, तत्पर, दक्ष.-*ly, adv.* ;-*ness, n.*

**Stŭd'ȳ,** *n.* (स्टडि)—acquiring of information (esp.from books); pursuit of some branch of knowledge; meditation; room used for literary work or owner's private business; (Paint. etc.) sketch made for practice; (Theatr.) learner of parts. विद्यार्जन, अभ्यास; अध्ययन, व्यासंग; चिंतन, मनन; अभ्यासाची खोली. (खाजगी) खोली; (हात बसण्याकरितां, नमुन्याकरितां काढलेलें) रेखाचित्र; भाषण पाठ करणारा नट. *v. t. & i.* to devote time and thought to understanding (subject, &c.); scrutinize; make an object of study; be on the watch; apply oneself to (esp. reading); (arch.) meditate. अभ्यास करणें, अध्ययन करणें, शिकणें; विवेचन,-चिंतन,-मनन करणें, चिकित्सा करणें; (वर) विचार करणें; गढून, जाणें; ध्यान,-चिंतन,-करणें. *To make a s. of,* try to secure; investigate carefully. मिळविण्याचा प्रयत्न करणें; कसून संशोधन करणें. *Brown s.,* fit of musing. विचारभ्रमण, विचारांत गढून जाणें. *Continue your ss.,* आपले पाठ (धडे, अभ्यास) चालू ठेव. *To s. up,* (परीक्षेकरितां एखाद्या विषयाची) तयारी करणें. *S. out,* परिश्रमानें-पुन्हा

विचारांतीं-शोधून काढणें. *S. for the bar,* read law. कायद्याचा अभ्यास करणें (बॅरिस्टर होण्याकरितां). [ L. *studium,* zeal ]

**Stŭff,** *n.* (स्टफ्)—material; substance or things of inferior quality; woollen fabric; trash, nonsense. वस्तु, द्रव्य, सामान, तत्त्व, दम; सटरफटर सामान, हलकी चीजवस्त; लोंकरीचा कपडा; हलकी वस्तु, क्षुद्र-क्षुल्लक-बटबट. *v. t. & i.* to pack tightly or cram into, to feed gluttonously; eat greedily; (colloq.) hoax. खचून भरणें, चोंदणें, कोंबणें; ठासणें; दपटणें, ओ येई तों-अधाशासारखें-भरविणें, -खावविणें,-खाणें,-(पोट) भरणें; फसविणें, ठकविणें. *Has good s. in him,* has sterling qualities. अप्रतिम गुण आहेत. *This book is good, sorry, s.* हें पुस्तक-बऱ्या,-वाईट,-प्रतीचें आहे. *Food ss.,* धान्यें, दाणा गोटा. *Green, garden, s.,* भाजीपाला. *Doctor's s.* औषध. *Inch s.,* एक इंच जाडीच्या फळ्या. *What s. he writes!* किती गचाळ लिहितो तो! *Stuffed birds, beasts,* skin with interior removed and replaced by enough material to restore original shape. पेंढा भरलेले पक्षी,-पशू. *Stuffed fowl,* (शिजविण्याकरितां) पुरण-मसाला-भरलेलें बदक, -कोंबडें इ० *To stuff a child,* मुलाला खचून भरविणें. *He stuffed his fingers into his ears,* कानांत बोटें घातलीं (कोंबलीं). *Stuff'er n.* (जनावरांच्या) चामड्यांत पेंढा भरणारा.

**Stŭff'ing,** *n.* (स्ट'फिंग)—(esp.) seasoning; padding of furniture etc. पुरण, मसाला; भरण, भराव. *S.-box,* chamber in machinery through which rod can work, all vacant space being filled with stuffing. यंत्रांतील दांडा फिरण्याची हवाबंद पेटी,-विभाग.

**Stŭff'ÿ,** *a.* (स्ट'फि)—lacking ventilation; close, oppressive; (sl.) angry, sulky. कुजलेला, कोंदट; बंदिस्त, गुदमरविणारा; रागीट, चिडखोर.—*iness, n.*

**Stŭ'ltifÿ,** *v. t.* (स्ट'ल्टिफाय)—to exhibit in ridiculous light, to make a fool of; undo the work or effect of. मूर्खपणाचें प्रदर्शन करणें, मूर्खपणाचें ठरविणें, हसें करून घेणें; परिणाम नाहींसा करणें.—*fication, n.*

**Stŭm,** *n.* (स्टम्)—unfermented grape-juice. (मादकपणा-आम्लपणा-न आलेला) द्राक्षारस. *v. t.* to prevent from (further) fermentation. (अधिक) मादकपणा न येईल असें करणें.

**Stŭm'ble,** *v. i.* (स्ट'म्बल्)—to have partial fall; to be checked in speech; (with *at*) to feel scruples or doubts about; (with *upon*) to come across unexpectedly. ठेंचळणें; ठोकर लागणें, अडखळणें; घोटाळा करणें, चुचकळ्यांत पडणें, अकस्मात गांठ पडणें, अवचित सांपडणें. *n.* act of stumbling. अडखळणें, टेंचळणें; ठेंच, ठोकर. *Stum'blingly, adv.*

**Stŭm'bling-blŏck,** *n.* (स्ट'म्ब्लिंग्-ब्लॉक्)—circumstance causing difficulty or hesitation. अडचण, अडथळा, धोंड.

**Stŭmp,** *n.* (स्टम्प्)—part of a felled or fallen tree that remains projecting from the ground; remnant of something; any of the three uprights of a cricket wicket; wooden leg; (pl. colloq.) legs; cylinder of rolled paper etc. for uses in drawing. खुंटा, खोड, बुंधारा; शिल्लक राहिलेला भाग, (विडीचें) थोटूक, खुंटण, अवशिष्ट भाग; क्रिकेटच्या खेळांतील खुंट, त्रिफळा; दांडी, लांकडी पाय; तंगड्या, पाय; (कागदी किंवा इतर) सुरनळी. *v. i. & t.* to walk on, or as on, wooden legs; (of question etc.) be too hard for; embarass; (Cricket) put out batsman while he is out of his ground by (wicketkeeper) disturbing wicket; use stump on. दणदणत,-पाय हापटीत, -चालणें; कठीण जाणें; गोंधळणें, गोंधळविणें, चुचकळ्यांत पाडणें; (यष्टिरक्षकानें, हातांत चेंडू असतां मर्यादेबाहेर पाय असलेल्या,-गेलेल्या) खेळाडूला चीत करणें,-बाद करणें; वर सुरनळी फिरविणें. *On the s.,* (colloq.) राजकीय (चळवळींत) भाषण करणें, -चळवळ करणें. *S. oratory,* राजकीय व्याख्यानांतील-भाषणांतील,-वक्तृत्व, खळबळ उडविणारें वक्तृत्व. *Stir one's ss.,* पाय उचलणें,-चाळवणें. *Stum'per, n.* (sl.) wicket-keeper. यष्टिरक्षक.

**Stŭmp'ÿ,** *a.* (स्ट'म्पि)—thickset. गिड्डा, थोटा, आंखूड व जाड.

**Stŭn,** *v. t.* (स्टन्)—to knock senseless; to overwhelm or stupefy by a shock, to surprise completely. आघातानें मूर्च्छित करणें; कानठळ्या बसवणें, गोंधळवणें, थक्क करणें, अक्कल गुंग करणें. *Stun'ning, a.* ravishingly good in some respect. splendid. (कांहीं बाबतींत) अत्युत्कृष्ट, अप्रतिम, सुंदर; *-ly, adv. Stun'ner, n.* अप्रतिम,-सुंदर,-नमुना.

**Stŭng,** *pa. t. & pa. p.* of Sting.

**Stŭnk,** *pa. t. & pa. p.* of Stink.

**Stŭnt,** *v. t.* (स्टन्ट्)—to check the growth of. वाढ खुंटवणें, खुरटणें, वाढ मोडणें. *n* a special effort or display. विशेष प्रयत्न, विलक्षण कृत्य, धाडस, खळबळ. *Stunt'ed, pa. p.* खुरटलेला, खुजा, वाढ खुंटलेला, फुणगूस.

**Stūpe,** *n.* (स्ट्यूप्)—flannel wrung out of hot water and applied as fomentation; (Surg.) fomentation flannel. (ऊब आणण्याकरितां,-शेकण्याकरितां, भिजवलेला) गरम कपडा; गरम कपड्याची पट्टी. *v. t.* to apply stupe to. (गरम पाण्यांत भिजविलेला) गरम कपडा लावणें,-कपड्यानें शेकणें.

**Stū'pefÿ,** *v. t.* (स्ट्यूपिफाय्)—to dull the wits or senses of, to confound or confuse utterly. मति गुंग करणें, धुंद करणें, धुंदी आणणें. *Stupefied with drink,* दारू पिऊन बेहोष,-धुंद,-झालेला. *Stupefa'ction n.;-tive, a. Stu'pefier, n.,-pefa'cent, a.* गुंगी आणणारें (औषध).

**Stūpĕn'dous,** *a.* (स्ट्यूपे'न्डस)—amazing; of vast size or importance, prodigious. आश्चर्यकारक;-भव्य; विशाल, भयंकर. *S. folly,* विलक्षण,-भयंकर, मूर्खपणा.*-ly. adv.;-ness, n.* [ L. *stupere,* be amazed at ]

**Stū'peous**, *a.* ( स्टयूंपिअस् )—with long loose scales. लांब सुटे सुटे खवले असलेला.

**Stū'pid**, *a.* ( स्ट्यूंपिड )—unintelligent, foolish; uninteresting. बुद्धीचा जड, मूर्ख, अजागळ, सुस्त; नीरस, कंटाळवाणा.-*ly*, *adv*, ; *Stupid'ity*, *n.* मंदबुद्धि, मूढता, मोह, धुंदी, सुस्ती.

**Stū'por**, *n.* ( स्ट्यूंपर् )—dazed or torpid state, insensibility, utter amazement. गुंगी, धुंदी, बेशुद्धि, मोह, व्यामोह.-*ous*, *a* ( med. ) गुंगी, धुंदी आणणारा.

**Stūpo'se**, *a.* ( स्ट्यूपो'स )—( Bot., Zool. ) with tufts of long hair. लांब केसाळ झुबक्याचा.

**Stŭrd'y̆**, *a.* ( स्ट'र्डि )—not easily knocked down or pushed aside; strong, hardy, robust; of independent character, firm. कणखर, धट्टाकट्टा; धाटशी, दांडगा; दुराग्रही, हट्टी. *S. beggar*, गलेलठ्ठ ( परंतु निरुद्योगी-फुकटखाऊ- ) भिकारी. *Sturd'ily*, *adv.*; *Sturd'iness*, *n.* कणखरपणा, राकटपणा.

**Stŭrd'y̆**, *n.* ( स्ट'र्डि )—vertigo in sheep caused by tape-worm in brain. ( मेंढरांना होणारी ) मिरगी, झीट ( रोग ).-*died*, *a.*

**Stŭr'geon**, *n.* ( स्ट'र्जन् )—kinds of large edible fish with mailed body and head. एक जातीचा मोठा मासा ( खाण्याच्या उपयोगी ).

**Stŭtt'er**, *v. i. & t.* ( स्ट'टर् )—to stammer. तोतरें,-चोचरें,-बोलणें.-*ingly*, *adv.*;-*er*, *n.*

**Sty̆**, *n.* ( स्टाय् )—( pl.-ies ) an enclosure in which pigs are kept; ( *fig.* ) filthy room or dwelling; place of debauchery, inflamed swelling on the edge of the eyelid. डुकरवाडा; घाणेरडी जागा; कुंटणखाना; रांजणवाडी. *v. t. & i.* to lodge in a sty. डुकरवाड्यांत ठेवणें. *Pig-sty*, डुकरवाडा.

**Sty̆'gian**, *a.* ( स्टि'जिअन् )—of, as of, Hades; gloomy. नरकलोकासंबंधीं; काळोखी, दुःखी.

**Sty̆le**, *n.* ( स्टाइल् )—ancient writing implement; a pen or pencil; a manner of writing, speaking, &c.; shape or make or appearance of a garment or vehicle or the like, an implement of style-like shape; full title, designation; distinction; ( Bot. ) narrowed extension of ovary. सळई; लेखणी, शलाका, टांक; लेखनशैली; ढब, धर्ती, भाषाशैली; ठेवण, घाटणी, पद्धति; ( सूर्य-तबकडीचा ) शंकु, शंकूचा कांटा; किताब, पदवी; श्रीमंतीचा डौल,-थाट,-रुबाब; स्त्रीकेसरनलिका, परागवाहिनी, स्त्री-केसराचा दांडा. *v. t.* to describe by specified term or designation. म्हणणें, नांव देणें. पदवी,-किताब,-देणें. *Lapidary* or *monumental s.*, शिलालेखयोग्य-पद्धति. *There is no s. about her*, ती अगदींच सामान्य ( भतीची ) दिसते. *In all sizes and ss.*, सर्व तऱ्हेच्या मापांचे व नमुन्यांचे. *Sty'let*, *n.* अणकुचीदार शस्त्र; मूत्राशयांत घालण्याची सळई.

**Sty̆'lish**, *a.* ( स्टा'इ-लिश् )—in the prevailing fashion; well-appointed. चालू पद्धतीचा; डौलदार, फक्कड. *Sty'list*, *n.* writer or artist more intent on style than matter. ढबदार ( लेखन ) शैलीवर भर देणारा ( लेखक, चित्रकार ). *Stylis'tic*, *a.* लेखनशैलीचा.-*tically*, *adv.*

**Sty̆'lograph**, **Sty̆'lō**, ( स्टा'इलग्राफ्,-इलो )—( *pl.-os* ) reservoir pen. आंगच्या शाईचा टांक.-*graph'ic*, *a.*

**Sty̆'ptic**, *a. & n.* ( स्टि'प्टिक् )—( substance ) checking blood. रक्त बंद करणारा, रक्तस्तंभक ( वस्तु, औषध ).

**Suā'sion**, *n.* ( स्वे'झन् )—reasoning or advice as incentive. प्रेरक उपदेश, मन वळविणें.

**Suāve**, *a.* ( स्वेव्ह् )—bland, polite. गोड, मधुर, सौम्य.-*ly*, *adv.*; *Suav'ity*, *n.* गोडपणा, माधुर्य, सभ्यपणा.

**Sŭb**, *n.* ( सब् )—( colloq. ) subaltern, subscription, substitute. कप्तानाच्या खालचा लष्करी अंमलदार; वर्गणी; बदली ( मनुष्य इ. ).

**Sŭb**, L. *prep.* ( सब् )—under. खालीं, खालचा. *Sub-ju'dice*, ( सब्जू'डिसि ) न्यायालयीन, न्यायकोर्टातून निकाल न झालेला ( फज्जा ). *Sub-ro'sa*, ( -रो'झा ) गुप्त, निगूढ, गुप्तपणाची शपथ घेतलेला. *Sub-silen'tio*, गुप्त रीतीनें.

**Sŭb**, *pref* ( सब् )—कमीपणा,-उणेपणा दाखविणारा ( उपसर्ग ). *Sub-committee*, पोटमंडळ ( कमिटी ). *Subcontrary*, *a. & n.* ( *pl.* ) ( Logic ) contrary in some respect. अनुविपरीत. *Sub-editor*, *n.* ( वर्तमानपत्राचा वगैरे ) उपसंपादक, दुय्यम संपादक,-*ship*, *n.*;-*ed'it*, *v. t.* चा दुय्यम संपादक असणें. *Sub-office*, *n.* ( मुख्य ऑफिसा ) खालचें ऑफिस,-ची कचेरी,-खातें. *Sub-ordinacy*, *n.* ताबेदारी, अधीनता. *Sub-quadruple*, *a.* उपचतुर्गुण ( गुणोत्तर ). *S.-quin'tuple*, *a.* उपपंचगुण ( गुणोत्तर ). *S.-race*, अवांतर जाति. *S.-registrar*, ( दस्तैवज नोंदणारा ) दुय्यम अधिकारी ( सब्रजिस्ट्रार ). *S.-satur'ation*, *n.* उपसंपृक्तता. *S.-section*, पोटकलम.

**Sŭbă'cid**, *a.* ( सब्अॅ'सिड )—slightly acid. आंबटगोड.

**Sŭbăq'uĕous**, *a.* ( सब्अॅ'क्विअस )—below water. पाण्यांतील, जलाशयीन, जलचर; जलोपयोगी.

**Sŭbclăss'**, *n.* ( सब्क्ला'स )—a subdivision of a class. वर्गातील एक पोटभाग, उपवर्ग, उपभेद.

**Sŭbcŏn'scious**, *a.* ( सब्कॉ'न्शस )—partially or imperfectly conscious. अर्धवट शुद्धींत, अप्रबुद्ध, अर्धजागृत.

**Subcon'tract**, *n.* ( सब्कॉ'न्ट्रॅक्ट )—a contract under a previous contract or contractor. पोटकंत्राट.-*tract*, *v. i.*;-*tract'or*, *n.* पोटकंत्राटदार.

**Subcūta'nĕous**, *a.* ( सब्क्यूटे'निअस् )—below the skin. त्वचेच्या खालील, त्वङ्निम्नस्थ.

**Sŭbdivide'**, *v. t. & i.* ( सब्डिव्हा'इड )—to divide further, to part into smaller divisions.—आणखी भाग करणें, पोटभाग पडणें,-पाडणें.

**Sŭbdivi'sion**, *n.* ( सब्डिव्हि'झन् )—one of the parts resulting, the part of a large part. पोटविभाग, अंशांश; प्रांत, विभाग, प्रविभाग.-*al*, *a.* प्रांताचा, विभागाचा.

**Sŭbdūe'**, *v. t.* ( सब्ड्यू )—to get the upper hand of; to tame; to soften, to tone down. जिंकणें; वश करणें; ची नांगी मोडणें, नरम पाडणें.

*Subdu'al*, *n.* जिंकणें, वठणीस आणणें, दमन. *Subdued'*, *a.* जिंकलेला, वठणीस आणलेला, वशीकृत.

Sŭbjā'cent, *a.* (सब्‌जे'सन्ट्)—situated below. खालचा, अधःस्थित.

Sŭb'jĕct, *a.* (स'ब्‌जेक्ट्)—under government; politically dependent; obedient, submissive, owing obedience to; liable or exposed or prone to; subjacent. ताब्यांत असलेला; हुकमाखालील, ताबेदार, परतंत्र; आज्ञांकित; योग्य, जोगा, पात्र, वश, अधीन; अधःस्थित, खालील. *adv.* (with *to*) conditionally upon; on the assumption of. अटीवर, गृहीत,-धरून. *n.* a person subject to political rule, member of a State; (Gram., Logic) a thing about which something is predicated; (Metaphys.) thinking and feeling entity; substance of anything; a theme of discussion, description, &c. रयत, प्रजा; कर्ता, उद्देश्य; द्रष्टा, विषयी, मन, बुद्धि, अहंकार; अधिष्ठान, अधिकरण, स्थान, आधार, आश्रय; विषय, प्रतिपाद्य गोष्ट, प्रकरण. *Is held s.*, in subjection. अंमलाखालीं, परतंत्रतेत, -आहे. *S. to your consent, I propose to try again.* तुम्हीं मान्यता दिलीत तर मी पुन्हां प्रयत्न करूं इच्छितों. *S. to correction*, चुकीची दुरुस्ती करण्याच्या अटीवर. *The ss. of the king*, त्या राजाची प्रजा,-रयत लोक. *The liberty of the s.*, प्रजेला मिळालेलें कायदेशीर स्वातंत्र्य, प्रजास्वातंत्र्य. *A dull s.*, कंटाळवाणा विषय. *S. for dissection*, or *s.*, dead body. (छेदनार्थ) शव, प्रेत. *To change the s.*, talk of something else, esp. as way out of embarassment. (गोंधळलेल्या मनःस्थितींतून निसटण्यासाठीं) विषयांतर करणें. *S.-matter*, matter treated of in a book etc. प्रतिपाद्य विषय. *S. index*, विषयवार सूची. *S.-less*, *a.*

Sŭbjĕct', *v. t.* (सब्‌-जे'क्ट्)—to subdue; to expose, to render liable; to submit *to*. जिंकणें, अमलांत आणणें; पात्र करणें, जोगा करणें, (मूर्च्छनेचा) प्रयोग करणें; अधीन करणें, भाग पाडणें. *Subjec'tion*, *n.* जिंकणें, वश करणें; ताबेदारी, आधीनता; वशीकरण, मूर्च्छन.

Sŭbjĕc'tĭve, *a.* (सब्‌जे'क्टिव्ह्)—relating to the subject as opposed to the object; (pop.) imaginary; (of art and artists) expressing the artist's point of view rather than transcribing external realities; (Gram.) of the subject. अधिष्ठाननिष्ठ, आत्मगत, अधिष्ठानासंबंधीं; विचारसृष्टीचा, काल्पनिक; व्यक्तिनिष्ठ, स्वत्वप्रधान, भावनात्मक, स्वात्माविर्भावी (काव्य, चित्र इ.); कर्तृवाच्य.-*ly*, *adv.* आंतरदृष्टीनें.-*ness*, *n.* *Subjectiv'ity*, *n.* अधिष्ठाननिष्ठता; स्वानुभववाद, नैजवाद.

Subjĕc'tĭvism, *n.* (सब्‌जे'क्टिव्हिझम्)—the doctrine that all knowledge is subjective only and incapable of objective test of truth. विषयिविज्ञानवाद; विषयी हा सर्व ज्ञानाचें अधिष्ठान आहे असा वाद.

Sŭbjoin', *v. t.* (सब्‌जॉइ'न्)—to add at the end शेवटीं जोडणें.

Sŭb'jŭgāte, *v. t.* (स'ब्‌जुगेट्)—to bring into subjection, to conquer and force to submit. जिंकणें, ताब्यांत आणणें.-*tion*, *n.*; *Sub'jugable*, *a.*

Sŭbjŭn'ctive (mood), *a.* & *n.* (सब्‌जं'क्-टिव्ह् मूड)—a mood named as being common in subjoined or dependent clauses expressing condition. संशयार्थ.-*ly*, *adv.* [L. *sub*, under; *jungere*, join]

Sub-kĭng'dom, *n.* (सब्-कि'ङ्‌डम)—main division of animal or vegetable kingdom. (प्राणिवर्ग, वनस्पतिवर्ग, याची) उपकोटि.

Sub-lease, *n.* & *v. t.* (सब्‌ली'स)—letting to another person of what the lessor himself holds on lease. (कुळानें) पोटकुळास पट्ट्यानें देणें, पोटपट्टा, पोटकौल.

Sŭblĕt', *v. t.* (सब्‌ले'ट्)—to underlet, to let to another person. पोटभाडयानें देणें.

Sub'lĭmate, *a.* & *n.* (स'ब्‌लिमट्)—product of sublimation. ऊर्ध्वपातित, (घनाचा बाष्प करून) बाष्पाचा घन केलेला, फूल केलेला (पदार्थ), रस-कापूर. *Sub'limate*, *v. t.* (स'ब्‌लिमेट्), convert from solid state to vapour by heat and allow it to solidify again; (*fig.*) refine, idealize. घनाचा बाष्प व बाष्पाच पुन्हां घन होऊं देणें; ऊर्ध्वपातन करणें; (अलं०) उदात्त करणें. शुद्ध करणें, सोज्ज्वल करणें. *Sublima'tion*, *n.* ऊर्ध्वपातन, संप्लवन. [L. *sublimare*, lift up]

Sŭblīme', *a.* (सब्‌ला'इम्)—elevated aloft, exalted; surpassing; so impressive as to inspire awe or wonder, lying near the surface. उन्नत, थोर, उंच; अत्युत्कृष्ट; प्रगल्भ, प्रशस्त, मोठा, भव्य, उदात्त, विस्तीर्ण; (शारीर०) पृष्ठगत. *v. t.* & *i.* make sublime; undergo sublimation. शुद्ध,-उदात्त,-करणें; ऊर्ध्वपातन करणें, ऊर्ध्वपातनानें शुद्ध करणें. *S. mountain, virtue, love, genius*, उत्तुंग,-अत्युच्च,-विशाल पर्वत, उदात्तगुण,-प्रेम, थोर बुद्धि. *S. indifference*, उदात्त बेफिकिरी. *The s.*, उदात्त संपद्, उदात्तता. *Sublim'ely*, *adv.*

Sublĭm'ity, *n.* (सब्‌लि'मिटि)—being sublime. थोरपणा, उदात्तता, श्रेष्ठपणा.

Sublĭm'inal, *a.* (सब्‌लि'मिनल्)—(Psychol. of sensations) so faint that subject is not conscious of them. अर्धजागृत,-सुप्त.

Sublu'narȳ, *a.* (सब्लू'नरि)—of this world, earthly. चंद्राखालचा, इहलोकींचा, ऐहिक. *Sublu'nar*, *a.* (poet.)

Sŭb'marine, *a.* (स'ब्-मरीन्)—situated at some depth in the sea. समुद्रांतला, समुद्रतळाचा. *n.* submersible boat. पाणबुडी बोट, जलान्तःसंचारिणी युद्धनौका.

Sŭbmerge', *v. t.* & *i.* (सब्‌म'र्ज्)—to contain below the surface, to sink. जलमय होणें; (पाण्यांत) बुडणें, बुडविणें; (पाणबुडी) पाण्याखालीं जाणें, अदृश्य होणें. *Submerged*, *pa. p.* (*fig.*) कर्जांत बुडालेला, खालावलेला. *Submerg'ence*, *n.* बुडणें, मज्जन, निमज्जन.

Submersed', *a.* (सब्मर्स्ड) -put or growing under water. जलमग्न, पाण्याखालीं वाढणारा. *Submers'ible, a.*

Sŭbmi'ssion, *n.* (सब्मि'शन्)—submitting, humble or suppliant behaviour; (in legal use) theory submitted. मान वांकविणें, अधीनता; (वकिलानें) पुढें मांडलेलें तत्त्व,-मुद्दा.

Sŭbmi'ssive, *a.* (सब्-मि'सिव्ह्)—unresisting; meek, tractable, compliant. प्रतिकार न करणारा; नम्र, दीन -*ly, adv.*;-*ness, n.*

Sŭbmit', *v. t. & i.* (सब्-मि'ट्)—to accept without resistance, to give way, to yield, to present for consideration or decision. मान वाकविणें, अंकित असणें; शरण जाणें, हार घेणें; विचारार्थ पुढें मांडणें, (न्यायाधिशापुढें) ठेवणें, (-कडे) सोंपविणें. *That, I s., is a false inference.* मी नम्रत्वापूर्वक आपल्या नजरेस आणून देतों कीं, आपलें अनुमान चुकीचें आहे.

Sŭbmŭl'tiple, *a. & n.* (सब्मल्टिपल)—(Math.) अवान्तर अपवर्त्य.

Sŭbŏrd'inate, *a.* (सबॉर्डिनट्)—of inferior importance or rank. खालच्या दर्जाचा, गौण. *n.* a person working under another. हाताखालीं काम करणारा मनुष्य, हाताखालचा, दुय्यम. *v. t.* (-नेट्) गौण स्थान देणें, कमी प्रतीचा लेखणें. *S. clause,* गौणवाक्य-*tive, a.*

Sŭbŏrdinā'tion, *n.* (सबॉर्डिने'शन्)—subordinate state, inferiority of rank. खालचा दर्जा, गौणता गौणस्थान, ताबेदारी.

Suborn', *v. t.* (सबॉ'र्न्)—to induce to commit perjury or other crime. लांच देऊन खोटे साक्षी तयार करणें,-खोटें वदविणें.-*er, n.*-*ation, n.*

Subpoe'na, *n. & v. t.* (सप्पी'ना)—(Law) writ commanding person's attendance in the court of justice. कोर्टाचें साक्षीस आव्हान,-समन्स (बजविणें). [L. = under penalty]

Sŭbscribe', *v. t. & i.* (सब्-स्क्रा'इब्)—to sign (one's name or a document etc.); to express adhesion *to,* to give consent to; to contribute to a fund or an object. वर सही करणें, नांव घालणें,-लिहिणें, (बोधवाक्य) खालीं लिहिणें; मान्यता दर्शविणें; वर्गणीदार होणें, संमत असणें, संमति देणें. *I cannot s. to that opinion,* तें मत मला मान्य करवत नाहीं. *To s. for a book,* (पुस्तक छापून होण्यापूर्वीच) आगाऊ ग्राहक होणें. *S. to a newspaper,* वर्तमानपत्राचा वर्गणीदार असणें,-होणें. *Subscribed capital,* संकल्पित (देण्याचें मान्य केलेलें) भांडवल. [L. *sub,* under; *scribere,* write]

Sŭbscri'ber, *n.* (सब्स्क्रा'इ-बर्)—one who signs, one who enters his name for a paper. सही करणारा; वर्गणीदार.

Sŭbscrip'tion, *n.* (सब्स्क्रि'प्शन्)—subscribing; share or sum subscribed. सही करणें, दस्तत; वर्गणी.

Sŭb'sequĕnt, *a.* (स'ब्सिक्वेन्ट्)—coming after, succeeding, next; posterior *to.* मागून येणारा; पाठीमागचा, नंतरचा.-*ly, adv.* मागून, मग, नंतर. *Sub'sequence, n.* अनुगमन, मागून येणें.

Sŭbserve', *v. t.* (सब्स'र्व्)—to serve as means towards, to assist or promote (purpose, end, etc.). उपयोगीं पडणें, साहाय्य करणें, च्या कामास येणें,-उपयोगी होणें.

Sŭbser'vient, *a.* (सब्स'र्व्हिअन्ट्)—conducive as means *to,* serving to promote some end; cringing. सहायक, उपकारी, उपकारक, पोषक; दुसऱ्याच्या तंत्रानें चालणारा, हांजीखोर.-*ly, adv.*; *Subser'vience,-cy, nn.* उपयुक्तता; छंदानुवर्तन, तंत्र

Sŭbside' *v. i* (सब्-सा'इड्)—to abate; (of ground) sink; to die away; to fall silent, to be calmed, to fall into a state of quiet. (पूर, पाणी) ओसरणें, कमी होणें; (जमीन) दबणें, खचणें; नाहींसा होणें; शांत होणें; (आरामखुर्चीत) पडून राहणें. *Sub'sidence, n.* (जमीन) खालीं बसणें. थिरावणें, पडणें, उतार, उपशमन.

Sŭbsĭd'iarў, *a.* (सब्सि'डिअरि)—serving to help or supplement; supplementary *to.* मदतीचा, अंगभूत, साहाय्यकारी, उपकारक. *S. troops,* कुमकेची फौज.-*ily, adv.*

Sŭb'sĭdize, *v. t.* (स'ब्सिडाइझ्)—to pay subsidy to, support. द्रव्यसाहाय्य करणें, पैशाचा आश्रय देणें.

Sŭb'sĭdў, *n.* (स'ब्सिडि)—money grant to meet urgent necessities; money grant to sovereign, or to another state in return for support; money grant from state to private concerns of public utility. अडचणींत केलेलें द्रव्यसाहाय्य, मदत; (एका राजानें दुसऱ्याला दिलेली) मदतीबद्दलची खंडणी,-पैसा.

Sŭbsist', *v. i. & t.* (सब्सि'स्ट्)—to exist; to support life; to find sustenance for, to be maintained with food and clothing. अस्तित्वांत असणें, असणें; जीव धरून असणें, (वर) जगणें; निर्वाह करणें, पोसणें, पाळणें, योगक्षेम चालविणें.

Sŭbsist'ence, *n.* (सब्सि'स्टन्स)—subsisting; what one lives on or by. अस्तित्व; उपजीविकेचें साधन, निर्वाह.

Sŭb'soil, *n.* (स'ब्साइल्)—stratum of earth just below surface. भूपृष्ठाखालची जमीन, अधोभूमि.

Sŭb'stance, *n.* (स'ब्स्टन्स)—the essence or most important part of anything; gist, purport; matter, reality; solidity, firmness, substantiality; particular kind of matter; actual possessions. महत्त्वाचा भाग, सत्त्व, तत्त्व, तात्पर्य, सार, सारांश; पदार्थ; वस्तु; सार; जड द्रव्य, जड पदार्थ,-वस्तु; संपत्ति, धनदौलत. *I agree with him in s.,* generally. तत्त्वतः,-सामान्यपणें,-त्याचें व माझें मत जुळतें. *A man of s.,* जमीनजुमलेवाला मनुष्य. *To waste* one's *s.,* be spendthrift. उधळपट्टी करणें. *A porous s.,* सच्छिद्र वस्तु,-द्रव्य.

Sŭbstăn'tial, *a.* (सब्स्टॅन्शल्)—having substance, actually existing, not illusory, not inconsiderable, moderately wealthy. ठळक, दणदणीत, कसदार, भक्कम; खरा, खराखुरा, वास्तविक; भरीव, बराचसा, पैसेवाला, ऐपतदार.-*tially, adv.*;-*tial'ity, n. Substan'tialism, n.* (philos.) doctrine that behind phenomena there are substantial realities. द्रव्यास्तित्ववाद, द्रव्यवाद.-*list, n.*

Sŭbstăn'tiāte, *v. t.* (सब्स्टॅन्शिएट्)—to give good grounds for (charge, statement). प्रमाणानें सिद्ध करणें, पुरवणी करणें, मजबुती आणणें, खरा करून देणें.-*tiation, n.* भक्कमपणा आणणे, पुरावा. -*tiator, n.*

Sŭb'stăntive, *n.* (स'ब्स्टॅन्टिव्)—a noun. नाम, विशेष्य. *a.* expressing existence; a separate and independent existence; not subservient. अस्तित्वदर्शक; वस्तुविशिष्ट, वास्तविक; मूळ, खरा, मूळ सूचनेच्या रूपाचा. *S. motion,* मूळ सूचनेच्या रूपाचा ठराव, मुख्य ठराव (म्हणून, समजून).-*ly, adv. Substanti'val, a.,-tivally, adv.*

Sŭb'stitūte, *n.* (स'ब्स्टिट्यूट्)—a person or thing performing some function instead of another. बदली, प्रतिनिधि. *v. t.* to put in exchange (*for*). च्या बदली ठेवणें, च्या जागीं योजणें.-*tion, n.,-tional, a.,-tionary, a.*

Sŭbstrā'tŭm, *n.* (सब्स्ट्रे'टम्)—lower layer, stratum lying under another; basis. खालचा थर; आधार, पाया, अधिष्ठान.

Substrŭc'tion, *n.* (सब्स्ट्र'क्शन्)—vaults or other masonry, etc. serving as foundation. पायाच्या कमानी किंवा इतर बांधकाम. *Sub'structure, n.* तळथर; पाया; पायाची बांधणी.

Sŭbtĕn'ant, *n.* (सब्टे'नन्ट्)—tenant holding of a tenant, one who rents land from a tenant. पोटभाडेकरी.-*ancy, n.*

Sŭbtĕnd', *v. t.* (सब्टे'न्ड)—(geom.) to stretch or extend under, (of line) to be opposite (angle, arc.). विरुद्ध बाजूला असणें, अन्तरित करणें.

Sub'terfūge, *n.* (स'ब्टर्फ्यूज्)—evasion (*esp.* in argument or excuse), a dishonest shift. पळवाट, फट; सोडवण, छिद्र, बांर. [L. *subter,* under; *fugere,* flee]

Sŭbtĕrrā'nean, *a.* (सब्टेरे'निअन्)—lying under the surface of the earth, underground. जमिनीखालचा, जमिनींतला, भूमिगत, भौम.-'*neously, adv.*

Sŭbtī'tle, *n.* (सब्टा'इटल)—secondary title (of a book etc.). दुसरें,-उप,-नांव, पोट-नांव, प्रकरण.

Sŭb'til(e), *n.* (स'टिल्)—(arch. for) subtle, (See below).

Sŭ'btle, *a.* (स'टल्)—tenuous, rarefied, hard to analyse or apprehend; ingeniously minute, capable of nice distinctions; crafty, cunning; elaborate, clever. सूक्ष्म, विरल, पातळ; समजण्याला अत्यंत कठीण, मार्मिक, गूढ; अत्यंत सूक्ष्म, कावेबाज, धूर्त; बारीकसारीक,-खांचाखोचा,-जाणणारा, हुशार. *The s. air,* सूक्ष्म,-विरल,-हवा,-वायु. *A s. distinction,* सूक्ष्म फरक. *S. fingers,* बारीक,-लवचीक, -झटपट उठणारी बोटें. *Subt'ilize, v. t.* विरल,-सूक्ष्म, -करणें; कीस काढणें.-*lization, n. Sub'tly, adv.*

Sŭbt'letў, *n.* (स'टल्टि)—subtleness, acuteness of intellect, a fine distinction. गूढता, सूक्ष्मता, कावेबाजपणा, शब्दच्छल, सूक्ष्म भेद.

Sŭbtrăct', *v. t.* (सब्ट्रॅ'क्ट्)—to deduct *from, esp.* with a view to finding out the remainder. वजा करणें, अंतर काढणें, व्यवकलन करणें. [L. *sub,* under, *trahere,* draw]

Sŭbtrā'ction, *n.* (सब्ट्रॅ'क्शन्)—(*esp.*)subtracting process, act or operation of subtracting. वजाबाकी, व्यवकलन.—*ctive, a.*

Sŭb'trahend, *n.* (स'ब्ट्रहेन्ड्)—what is to be subtracted in a subtraction sum. वजा करावयाची संख्या,-रकम, घातांक.

Sū'būlate, Su'buliform, *aa.* (स्यू'ब्यूलट्,-लिफॉर्म)—(Bot., Zool.) awl-shaped. आरीच्या आकाराचा, टोंकदारसारखा.

Sŭb'ŭrb, *n.* (स'बर्ब)—outlying district of a city. उपनगर, नगरोपान्त. *The ss.,* (*a house in the ss.*). (उपनगरांतील घर) आसपासचा भाग,-प्रांत,-प्रदेश. *Suburb'an, a.* (शहराच्या) आसपासचा, नगरोपान्तीय.

Sŭbvĕn'tion, *n.* (सब्हे'न्शन्)—grant of money in aid of an institution, &c. एखाद्या संस्थेकरितां द्रव्यसाहाय्य.

Sŭbvert', *v. t.* (सब्-व्ह'र्ट्)—to effect destruction or overthrow of (religion, &c.). विध्वंस करणें, लयास नेणें, मोडून टाकणें, नष्ट करणें. *Subver'sion, n.* subverting. उलथापालथ, नाश, विध्वंस. *Subver'sive, a.* पालथें पाडणारा, मोडणारा, विध्वंसक.

Sŭb'-way, *n.* (स'ब्वे)—underground passage (for foot-passengers), or under-ground railway (U. S.). जमिनीखालील (पद-) मार्ग, पायवाट; जमिनीखालील आगगाडीचा रस्ता.

Sŭcca'des, *n. pl.* (सके'डीझ्)—candied fruits in syrup. (फळांचा) मुरांबा.

Sŭccedā'neum, *n.* (सक्सिडे'निअम्)—(*pl.-ea*) substitute. अनुकल्प, बदला, गौण.—*neous, a.* गौणभूत, अनुकल्पित, पर्यायभूत.

Sŭcceed', *v. t.* & *i.* (सक्सी'ड्)—to come next after and take the place of, follow; to inherit; to attain one's purpose, be successful. मागून पदावर येणें, पुढें येणें, नंतर येणें; वारस होणें; यश मिळविणें, पार पडणें, यश येणें, (बेत) सिद्धीस जाणें.

Sŭccĕss', *n.* (सक्से'स)—favourable issue; attainment of one's object; prosperity; a person or thing that turns out well. यश, जय; सिद्धि; भरभराट, बरकत; यशस्वी गोष्ट, लायक मनुष्य. *Nothing succeeds like s.,* एकामागून एक यश मिळत जातें, एकदां यश मिळालें कीं सारखें यश मिळत जातें. *S.-ful, a.* यशस्वी, विजयी (मनुष्य); सफळ, गुणावह. *S.-fully, adv.* यशस्वितेनें, चांगल्या रीतीनें.

Sŭccĕ'ssion, *n.* (सक्से'शन्)—a following in order; series of things in succession; right of succeeding to, esp. throne, or inheritance; (Bio.) order of descent in development of species. क्रम; अनुक्रम; परंपरा, रांग, माळ; वारशाचा हक्क; उपजातीच्या वाढीचा वंशानुक्रम. *In s.*, एकामागून एक. *In s. to*, चा वारस (दार) म्हणून, च्या पाठीमागून. (*Was left to him and his*) *s.* (heirs). वारसदार. *Natural s.*, समन्वय *-al, a.* पारंपरिक, परंपरेचा, ओळीनें लागलेला.

Sŭccĕ'ssive, *a.* (सक्से'सिव्ह्)—following in order, consecutive; running. अनुक्रमानें येणारा, यथाक्रम; लागोपाठचा, परंपरागत.*-ly, adv.* अनुक्रमानें, परंपरेनें.

Sŭccĕ'ssor, *n.* (सक्से'सर्)—one who follows, a person or thing succeeding to another. मागून येणारा, वारस.

Sŭcci'nct, *a.* (सक्किं'क्ट्)—(arch. of clothes) girded up; terse, brief. संक्षिप्त, संकलित; घट्ट, तंग. *-ly, adv.*; *-ness.*

Sŭcc'our, *n.* (स'कर्)—aid given at the time of need, help, assistance; (*pl.* arch.) troops coming to the rescue. साहाय्य, मदत; कुमक. *v. t.* come to the assistance of. मदत करणें, साहाय्य करणें.*-less, a.*

Sŭcc'ūlent, *a.* (स'क्यूलन्ट्)—full of sap or juice, juicy; (Bot.) thick and fleshy. रसाळ, कसदार, जाड व रसमधुर (पानें, मुळें असलेला).*-ly, adv.*; *-ulence, n.*

Sŭccŭmb', *v. t.* (सकम्')—to yield, to submit, to be vanquished, to give way *to*, to die. वश होणें, दबणें, दबकणें; बळी पडणें; मरणें. *S. to grief*, दुःखाधीन होणें.

Sŭch, *a.* (सच्)—of the kind or degree indicated. असा, असला, अशा प्रकारचा; तसला, तसा, इतका, मोठा, अमूक, फलाणा. *pron.* that; the action etc. referred to; other such things. तो; तसला; तसल्या,-तशा प्रकारच्या, गोष्टी. *S. a fright*, इतकी मोठी धडकी. *S. grapes*, असल्या प्रकारचीं द्राक्षें. *S. master, s. servant*, जसा धनी तसा चाकर. *S. a fine sight!*, फारच सुंदर देखावा! *S. and s. a person*, अमूक एक,-फलाणा,-मनुष्य, कोणी एक. *S. as*, those who. जे. *As s.*, (अमका,-असा,-) म्हणून. *S. like*, (things) of such kind. अशा तऱ्हेच्या (गोष्टी).

Sŭck, *v. t. & i.* (सक्)—to draw (millk, liquid) into mouth; (*fig.*) to imbibe or gain (knowledge); draw liquid or sustenance or advantage from; squeeze in the mouth. अंगावर पिणें, स्तनपान करणें, तोंडानें ओढणें, चुपणें, चाखणें; आंत ओढून घेणें, ज्ञान मिळविणें,-ग्रास करून घेणें; तोंडांत जीभ फिरविणें, चघळणें. *n.* an act or shell or process of sucking; sucking the breast; (*sl. pl.*) sweets; (schoolboy sl.) fiasco. अंगावर पिणें, लुचणें, स्तनपान; खाऊ, मेवामिठाई; फजिती, खोड मोडणें, जिरणें. *To s. dry*, चुपून कोरडा करणें. *Sucked orange*, the thing in which no goodness is left. निःसत्त्व झालेली वस्तु. *S.* one's *brains*, (आपल्या फायद्याकरितां) दुसऱ्याच्या कल्पना काढून घेणें. *S. in* or *up*, शोषून घेणें; (पाण्याच्या भोवऱ्याचें) आंत ओढून घेणें, वेढणें. *Sucking child*, (अंगावर पिणारें) तान्हें मूल. *Sucking barrister*, unpractised, budding. नवशिका कायदेपंडीत. *Sucking pump*, (आवाज करून) पाणी वर खेंचणारा नळ. *To give s.*, अंगावर पाजणें, लुचायला देणें. *What a s.!, ss.!* काय घमेंड मारीत होता! भली जिरली!

Sŭck'er, *n.* (स'कर्)—a person or thing that sucks; (Bot.) shoot springing from plant's root beside and not from the stem; organ or pipe through which liquid is drawn by suction, pump-piston; (U. S., *pl.*) a simpleton. चुंफणारा, चोखणारा, तान्हें; चोपक खोड,-दंड; चोपकनलिका, तेल काढण्याची नळी; (कांहीं) पंपांतील दाटी; दूधखुळा मनुष्य. *v. t. & i.* to remove or produce sucks. चोपक दंड खुडून टाकणें,-वाढणें.

Sŭck'le, *v. t.* (स'कल्)—to feed (young) from the breast or udder, to nurse at the breast. स्तनपान देणें.

Sŭck'ling, *n.* (स'क्-लिंग)—unweaned child or other mammal. अंगावरचें मूल, लुचणारें वासरूं. *Babes and ss.*, आगदीं नवशिके लोक.

Sū'crose, *n.* (स्यू'क्रोस)—cane-sugar or any other sugar of the same composition. (उंसाची किंवा तत्सदृश) साखर.

Sŭc'tion, *n.* (स'क्शन्)—sucking; production of partial vacuum by removal of air etc. चुंफणें, चोखणें; हवा खेंचून घेणें, हवा काढून घेणें, रिक्तावकाशीकरण. *S.-pump*, चोषणनलिका.

Sŭctor'ial, *a.* (सक्टॉ'अरिअल्)—(Zool.) adapted for sucking. चोखण्याजोगा, शोषणयोग्य.

Sŭdd, *n.* (सड्)—floating plants, trees, etc, obstructing the White Nile. (श्वेत नाईल नदीच्या प्रवाहाला अडथळा करणारीं) वनस्पति, झाडें वगैरे.

Sŭdd'en, *a.* (स'डन्)—occurring unexpectedly, abrupt; hurried. अकल्पित, आकस्मिक; शीघ्र, सत्वर, जलद. *All of a sudden*, एकाएकीं. *Sudd'enly, adv.*; *-ness, n. Of* or *on a s.*, *on the s.*, suddenly. एकाएकीं, अकस्मात, अवचित.

Sūdorĭf'ic, *a. & n.* (स्यूडरि'फिक्)—(a drug) causing sweat. घाम आणणारें, स्वेदोत्पादक (औषध, औषधी). [L. *sudor*, sweat]

Sŭds, *n. pl.* (सड्झ्)—(*Soap-s.*) soap froth साबणाचें (फेसाळ) पाणी.

Sūe, *v. t. & i.* (स्यू)—to prosecute in court; to make petition to, to entreat (*esp.* woman's hands in marriage). फिर्याद करणें, विनंतिअर्ज करणें; प्रार्थना करणें, (लग्नाकरितां स्त्रीची) मनधरणी करणें, विनवणी करणें, याचना करणें. *S. out*, (कोर्टाला) विनंतिअर्ज करून दाद मागणें.

**Suede**, *n.* (स्वेद)—undressed kid-skin as used for gloves, etc. (न कमावलेलें) कोकराचें कातडें.

**Sū'et**, *n.* (स्यू'इट्)—fat enclosing kidneys and loins of ox, sheep, etc. (गुरांच्या कमरेसभोवतालची, -गुर्दावरील,-) चरबी.

**Sŭff'er**, *v. t. & i.* (स'फर्)—to undergo pain or damage or punishment, to bear what is inconvenient; be exceuted; to allow to go on. भोगायला लागणें, सोसणें; दुःख भोगणें; फाशी जाणें; दुखवणें, दुखणें, चालू देणें, नको न म्हणणें.-*er*, *n.*

**Sŭff'erence**, *n.* (स'फरन्स)—tacit consent; abstention from objection; (arch.) submissiveness. मूक संमति; अडथळा न करणें, कानाडोळा, अनिषेध, शरणागति, नम्रता.

**Sŭff'ering**, *n.* (स'फरिंग)—what one has to endure, bodily affliction, distress. दुःख, व्यथा, भोग, ताप.

**Sŭffice'**, *v. t. & i.* (सफा'इस)—to be enough or sufficient; to meet the needs of. पुरा होणें, गरज भागविणें. *S. it to say that*, एवढेंच म्हणतों (एवढेंच म्हटलें म्हणजे पुरे) कीं. *Suffic'ingly, adv.*

**Sŭffi'ciency**, *n.* (सफि'शन्सि)—(arch.) ability; adequate resources. पुरें पडणें, सामर्थ्य, ताकत, पुरवठा, पर्याप्ति, पुरेपणा.

**Sŭffi'cient**, *a.* (सफि'शन्ट)—sufficing, adequate, to the need, fit, able, enough of; (arch.) competent. पुरेसा, भरपूर, पुरा; समर्थ, पुरा पडणारा, पुरून उरणारा. *n.* a sufficient quantity. पुरेसें.-*ly, adv.* पुरे, बस, पाहिजे तितकें.

**Sŭff'ix**, *n.* (स'फिक्स)—letter or syllable appended in word-formation. पुढें जोडण्याचा प्रत्यय किंवा अक्षर, उत्तरगामी प्रत्यय. *v. t.* (सफि'क्स) उत्तरगामी प्रत्यय लावणें,-जोडणें.

**Sŭff'ocāte**, *v. i. & i.* (स'फोकेट्)—to kill by stopping respiration; feel suffocated, grasp for breath. श्वास कोंडून मारणें; दम कोंडणें, गुदमरणें. *Suffocated with* or *by grief*, दुःखानें गुदमरलेला, तोंडांतून शब्द न येणारा. *Suff'ocatingly, adv.*; *Suffoca'tion, n.* दम कोंडणें, गुदमरणें, कोंडमारा.

**Sŭff'ragan**, *n. & a.* (स'फ्रगन्)—an assistant bishop; subordinate. मदतनीस बिशप; मदतनीस, दुय्यम.

**Sŭff'rage**, *n.* (स'फ्रिज्)—vote; right of voting at political elections; (*usu. pl.*) intercessory petition (s). मत; (निवडणुकीच्या वेळीं) मताचा अधिकार, मताधिकार; (ख्रिश्चन प्रार्थनेंतील) अनुवचन. *Manhood s.*, extended to all adult males. (वयांत आलेल्या सर्व) पुरुषांना मत देण्याचा अधिकार. *Woman s.*, (वयांत आलेल्या सर्व) स्त्रियांना मताधिकार. *Universal s.*, (वयांत आलेल्या सर्व स्त्रीपुरुषांना) सार्वत्रिक मताधिकार. *It has my s.*, मला तें अधिक पसंत वाटतें.

**Sŭffragĕtte'** *n.* (सफ्रजे'ट्)—a woman who agitated for woman suffrage. स्त्रीमताधिकाराची कैवारी स्त्री.

**Sŭff'ragist**, *n.* (स'फ्रजिस्ट)—an advocate of extending the franchise (to women). स्त्रीमताधिकारवादी.

**Suffūse'**, *v. t.* (सफ्यू'झ्)—(of liquid, hue, etc.) spread as from within, moisten. (आंतून वर येऊन) व्यापणें, भरणें, आर्द्र करणें.-*ed, pa. p.* व्याप्त, भरलेला; *S.-ed with blood, tears*, रक्तबंबाळ झालेला, अश्रुपूर्ण. *Suffu'sion, n.* व्यापणें, भरणें.

**Su'gar**, *n.* (शु'गर्)—kinds of sweet crystalline substance; sweet words; (chem.) kinds of soluble sweet-tasting carbohydrate. साखर; गोड भाषण, आर्जव, खुशामत; रासायनिक शर्करा,-साखर. *v. t. & i.* to sweeten or coat with sugar (*lit. & fig.*); (U. S.) make maple-sugar; work lazily, not put forth full effort. साखर घालणें, शर्करावगुंठित करणें; मेपलझाडापासून साखर तयार करणें; आळसानें काम करणें, कामाची टाळाटाळ करणें. *S.-beet*, (गाजरासारखें, ज्यापासून साखर तयार करतात, असें) बीट (कंद). *S.-bird*, फुलांचें शोषण करणारा पक्षी. *S.-loaf*, conical mass of refined sugar. साखरेचे निमुळते गोळे. *S.-maple*, (ज्याच्या चिकापासून साखर करतात तो) मेपल वृक्ष. *S.-house,-mill*, गुऱ्हाळ, साखरेचा कारखाना. *S.-refiner(y)*, साखर स्वच्छ करणारा, (त्याचा कारखाना). *Cane s.*, उंसाची साखर. *Milk s.*, दुग्धशर्करा. *S.-less. a.*

**Su'gar-căndy̆**, *n.* (शु'गर्-कँडि)—clarified and crystallised sugar. खडीसाखर, मिस्री.

**Su'gar-cāne**, *n.* (शु'गर्-केन्)—grass yielding sugar. ऊंस.

**Su'gary̆**, *n.* (शु'गरि)—full of sugar; fond of sugar. शर्करायुक्त, गोड, मिठ, साखरेचा; गोडखाऊ, -खाणारा. *Su'gariness, a.*

**Sŭggĕst'**, *v. t.* (सजे'स्ट)—to give a hint or inkling of, propose for acceptance; call up the idea of by mention. ध्वनित करणें; सूचना करणें; ची कल्पना सुचणें,-येणें. *A thing suggests itself*, (एखादी) गोष्ट (आपोआप) सुचणें. *Sugges'tive, a.* सूचना करणारा, विषयवासनासूचक.

**Suggĕst'ible**, *a.* (सजे'स्टिबल)—that may be suggested; (*esp.*) open to hypnotic suggestion. सूचना करण्याजोगा, सूचनार्ह; मनोवशीकरणाधीन, मूर्च्छनापात्र.-*ibil'ity, n.*

**Sŭggĕs'tion**, *n.* (सजे'स्चन्)—suggesting; theory or plan suggested, insinuation. सुचविणें, सूचना करणें; सुचविलेली गोष्ट; सूचना.

**Sū'icide**, *n.* (स्यु'इसाइड)—self-murder; one guilty of self-murder; action destructive to one's own interests. आत्महत्या; आत्महत्या करणारा; आत्मघातकी कृत्य. *To commit s.*, kill oneself. जीव देणें. *Commit political s.*, राजकारणांतून नामशेष होणें. *Race-s.*, वंशनाश, वंशांतील लोकांची संख्या घटत घटत जाणें. *Suici'dal, a.* आत्मघातक,-घाती;-*dally, adv.* [L. *sui*, of himself; *caedere, kill*]

**Suit,** *n.* (स्यूट्)—suing, petition; seeking of woman's hand, prosecution of a claim in law-court, set of clothes; any of the four sets into which a pack of cards is divided; woman's costume, set of armour or sails. विनंति, अर्ज; विवाहाकरितां एखाद्या स्त्रीची मनधरणी करणें, मागणी, प्रार्थना; फिर्याद, मुकदमा, वाद; संच, जोड; (बदाम, इस्पीक, किलावर, चौकट यां-पैकीं) पत्त्यांच्या जोटांतील एकरंगी पानें; स्त्रियांचे कपडे; (चिलखताचा, शिडांचा) जोड. *v. t. & i.* to adapt or make appropriate *to*; to meet the requirements or interests of, to agree with, to be convenient or suitable to. नीट बसवणें, योग्य करणें; जम बसवणें; जुळणें, शोभणें, साजणें; सोइस्कर असणें, (अन्न, हवा) मानवणें, मानणें; *Suit'ed, pa. p.* well fitted, appropriate *to*. साजेसा, मानवणारा, हितावह, योग्य. *To make s.*, नम्र विनंती करणें. *Criminal s.*, फौजदारी खटला. *Civil s.*, दिवाणी दावा. *Law-s.*, *s.* at law, खटला, दावा. *Follow s.*, play from s that was led. (*fig.*) conform to another's movements. त्याच रंगाचें (हुकमाचें) पान खेळणें; अनुसरणें, मागून जाणें. *Suit'ing*, (सूटचें) एकरंगी कापड (कोट, जाकीट, तुमान यांचें). *Democracy is not suited to* or *for the uncivilized people*, न सुधारलेल्या लोकांना लोकशाही मानवणार (युक्त,-योग्य,-) नाहीं. *Cold does not s. me*, थंड हवा मला मानवत नाहीं. *Mercy suits a king*, राजाला दयाशीलपणा शोभून दिसतो.

**Suit'căse,** *n.* (स्यूट्-केस्)—a travelling bag. प्रवासाची बॅग,-पेटी.

**Suit'able,** *a.* (स्यूटेबल्)—suited *to* or *for*, fitted for the purpose, appropriate. योग्य, शोभणारा, यथोचित, अनुरूप.-*bility, n.*-*bleness, n.* -*bly, adv.*

**Suite,** *n.* (स्वीट्)—a retinue, company of followers; set of rooms, furniture, &c., a series of dance tunes. परिवार, लवाजमा; संच, जोड; नाचाची सुरावट. *S. of rooms*, खोल्यांची रांग,-चाळ.

**Suit'or,** *n.* (स्यूटर्)—a wooer, plaintiff or petitioner (in law-suit). विवाहार्थ मागणी घालणारा; पक्षकार, अर्जदार.

**Sŭl'căte,** *a.* (सल्केट्)—(Bot.) grooved, furrowed. खांचदार.

**Sŭlk,** *v. i.* (सल्क्)—to be sulky. मनांत कुढणें, दुर्मुखणें. *n. pl.* a sulky state मनांत कुढणें, खिन्नता, दुर्मुखता.

**Sŭl'kў,** *a.* (सल्कि)—silent from resentment or ill temper, sullen, morose. घुम्या, दुर्मुखलेला. *n.* a light one-horse carriage. एक घोड्याची दुचाकी गाडी.-*kily, adv.*;-*kiness, n.*

**Sull'age,** *n.* (सलिज)—filth, refuse. घाण, कचरा.

**Sŭll'en,** *a.* (सलन्)—passively resentful: ill-humoured, morose, gloomy, dismal. खिन्न, उदास; दुर्मुखलेला, कंटाळवाणा, मलिन. (*n. pl.*) *the ss.*, ill temper. दुर्मुखलेपणा, खिन्नता.-*ly, adv.*; -*ness, n.*

**Sŭll'ў,** *v. t.* (सलि)—to soil, to tarnish (poet.): to be a stain on; to discredit. मळवणें; कलंक लागणें; बट्टा लावणें.

**Sŭl'phāte,** *n.* (सल्फेट्)—salt of sulphuric acid. गंधकाम्लाचा क्षार, गंधकित. *S. of copper*, मोरचूद, ताम्रगंधकित. *S. of iron*, हिराकस, लोहगंधकित. *S. of magnesium*, मारक (एप्सम) क्षार,-मीठ.

**Sŭl'phide,** *n.* (सल्फाइड)—compound of sulphur with element or radical. गंधक आणि दुसरें मूलद्रव्य यांचा संयुक्त पदार्थ, गंधकिल. *S. of arsenic*, (med.) मनःशील.

**Sŭl'phite,** *n.* (सल्फाइट)—a salt of sulphurous acid. गंधकित.

**Sŭl'phonal,** *n.* (सल्फनाल्)—a hypnotic drug. गुंगी आणणारें औषध.

**Sŭl'phur,** *a.* (सल्फर्)—pale-yellow non-metallic element, simple mineral of yellow colour, kinds of butterfly. गंधकाच्या रंगाचीं फुलपांखरें. *v. t.* to treat with sulphur. गंधकाची धुमी देणें. *a.* of pale yellow फिकट पिंवळा. *S.-spring*, गंधकयुक्त पाण्याचा झरा. उन्हाळें. *Sul'phurate, v. t.* गंधकसंयुक्त करणें, गंधकाचा धूर देणें. *Sulphur'eous, a.* of or like sulphur. गंधकाचा, गंधकमय. (Bot.) गंधकाच्या रंगाचा. *Sulphure'tted a.* सगंधक, गंधकसंयुक्त.-*hydrogen*, गंधकसंयुक्त उज्ज, उज्जगंधकीय.*Sul'phury, a.*

**Sŭlphŭr'ic,** *a.* (सल्फ्युअरिक्)—combining sulphur in its higher combining proportion. गंधकक. *S. acid*, तेजाब, गंधकाम्ल.

**Sŭl'phŭrous,** *a.* (सल्फरस)—containing sulphur in its lower combining proportion. गंधकः. *S. acid*, गंधकाम्ल.

**Sul'trў,** *a.* (सल्ट्रि)—hot and close. उकाड्याचा, कोंदट, गुदमरण्याचा.-*trily, adv.*;-*triness, n.*

**Sŭm,** *n.* (सम्)—total resulting from addition of items, summary; particular amount of money; an arithmetical problem. संकलन, समाहार, बेरीज; सारांश, तात्पर्य, इत्यर्थ; रकम; उदाहरण. *v. t. & i.* to collect into one total; (with *up*) set out arguments on both sides. बेरीज करणें; चा उपसंहार करणें, गोळाबेरीज सांगणें, समारोप करणें. *S. total*, एकूण,-गोळा,-बेरीज. *The s.* or *s. and substance*, (of his speech). (त्याच्या भाषणाचा) इत्यर्थ भाग, सारांश, गोळाबेरीज. *In s.*, briefly and comprehensively put. थोडक्यांत सगळें सांगायचें म्हणजे. *Good at ss.*, (अंक) गणितांत चांगला,-हुशार. *Summing-up, n.* (of the judge) पुराव्याचा सारांश सांगणें, खटल्याचा थोडक्यांत सारांश,-समारोप (न्यायाधिशानें केलेला).

**Sŭm'marize,** *v. t.* (समराइझ्)—to make or be a summary of. संक्षिप्त करणें, सारांश काढणें, सारांश देणें.

**Sŭmm'arў,** *a.* (समरि)—done with dispatch, effected by a short way. संक्षिप्त, तात्काळ, त्वरित. *n.* brief account; resume, epitome. थोडक्यांत हकिगत; सारांश, संक्षेप.-*arily, adv.* संक्षेपानें, त्वरित.

**Sŭmmā'tion**, *n.* (समे'शन्)—finding of total. समाहार, बेरीज करणें. *S. of series*, श्रेढीचें सर्वधन.

**Sŭmm'er**, *n.* (स'मर्)—second or hot season. उन्हाळा, ग्रीष्मकाल. *v. t. & i.* to pass the summer (*at* or *in* a place); pasture (cattle) for the summer. उन्हाळा घालविणें; उन्हाळ्यासाठीं गुरें चरविणे. *A child of nine ss.*, नऊ वर्षांचें मूल. *S. house*, उन्हाळी राहण्याचें घर. *S.-time*, उन्हाळा: ऊष्मकाल; उन्हाळ्यांत एक तास घड्याळ पुढें लावून दर्शविलेली वेळ.

**Sŭmm'er**, *n.* (स'मर्)—*S.-tree*, horizontal bearing beam. तळचें आडवें वार, आडवी तुळई.

**Sŭmm'ersault**, *n.* (स'मर् सॉल्ट्)—somersault. गोलांटी, कोलांटी उडी.

**Sŭmm'it**, *n.* (स'मिट्)—highest point, top. कळस, शिखर, सीमा, परमावधि.-*less*, *a.*

**Sŭmm'on**, *v. t.* (स'मन्)—to send for; to demand the presence of, to bid (esp. witness or defendant) appear; to muster *up* courage etc. to do; call upon (town etc.) to surrender. बोलावणें; आव्हान करणें, हजर राहाण्यास फर्मावणें; धैर्य धरणें,-एकवटणें; शरण येण्याला सांगणें.

**Sŭmm ons**, *n.* (स'मन्झ्)—(pl.-ses) authoritative call to attend or do something; citation to appear in court. हुकमानें-अधिकारानें,-बोलावणें, कोर्टाचें बोलावणें, कोर्टांत हजर राहण्यास फर्माविणें, आव्हान, समन्स. *v. t.* to serve with summons. समन्स,-कोर्टाचा (हजर राहण्याचा) हुकूम,-बजावणें.

**Sŭmmum bō'nŭm**, *n.* (स'मम् बो'नम्)—the chief good, esp. as the ultimate determining principle in the ethical system. निःश्रेयस, परमार्थ. [ L. ]

**Sŭmp**, *n.* (सम्प्)—pit or well for receiving superfluous water etc., cesspool. (केरकचरा, घाणपाणी यांसाठीं) खड्डा, डबरा, डबकें.

**Sŭmp'ter**, *n.* (स'म्प्टर्)—*S.-horse,-mule*, a pack. ओझ्याचा घोडा.

**Sŭmp'tion**, *n.* (स'म्शन्)—major premiss in syllogism. अनुमानांतील साध्यप्रमाण.

**Sŭmp'tūarў**, *a.* (स'म्प्चुअरि)—regulating expenditure. खर्चाच्या नियमाचा, व्ययनियमनविषयक. *S.-law,-edict*, राष्ट्रहितार्थ व्यक्तिगत खर्चावर निर्बंध घालणारा कायदा.

**Sŭmp'tūous**, *a.* (स'म्प्चुअस्)—very expensive, magnificent, of costly richness. मोठ्या खर्चाचा, बहुमोली, चमचमीत.-*ly*, *adv.* मोठा खर्च करून, थाटामाटानें.-*ness*, *n.*

**Sŭn**, *n.* (सन्)—the heavenly body that the earth travels round and receives light and warmth from; sun's light or warmth; any fixed star with satellite (s); (poet.) day or year; (also *S.-burner*) a set of lights massed as one great light in ceiling. सूर्य; सूर्याची उष्णता, ऊन; मुख्य ग्रह; दिवस, वर्ष; छतांत बसविलेला दिव्यांच्या उजेडाचा स्रोत. *v. t. & i.* to expose to the sun; sun oneself. उन्हांत ठेवणें; उन्हांत बसणें. *His, its, s. is set*, time of prosperity or existence is over. त्याचा भाग्यकाळ संपला. *To rise with the s.*, अगदीं सकाळीं (पहांटेस) उठणें. *Order of the Rising S.*, जपानी बहुमानदर्शक पदवी. *Adore* or *hail the rising s.*, curry favour with new or rising power. नूतन अधिकाऱ्याची,-सत्तेची, -हांजीहांजी करणें, उगवत्या सूर्याची पूजा करणें. *The midnight s.*, s. as seen in arctic and antarctic regions. (उत्तर दक्षिण, ध्रुव,-प्रदेशाजवळील) मध्यरात्रीचा सूर्य (प्रकाश). *Nothing new under the s.*, in this world. इहलोकीं ह्या जगांत-कांहींच नवीन (आश्चर्यकारक) नाहीं. *S. of righteousness*, Christ. येशू ख्रिस्त. *See the s.*, जिवंत असणें. *Make hay while the s. shines*, वेळेवर वेळ साधून घेणें, ऊन आहे तों गवत सुकवून घ्यावें. *Hold a candle to the s.*, prov. of superfluous action. सूर्यापुढें काजवात धरणें. *Take* or *shoot the s*, (naut.) अक्षांश-विषुववृत्ता-पासूनचें अंतर,-ठरविण्यासाठीं सूर्याची उंची अजमावणें. *In the s.*, सूर्यप्रकाशांत. *A place in the s.* (*fig.*), favourable situation. अनुकूल परिस्थिति. *Take the s.* अंगावर ऊन घेणें *S.-bath*, exposure of naked body to the sun. आतपस्नान, उन्हात उघडें बसणें. *S.-beam*, सूर्यकिरण. *S.-blind*, external to window-shade. खिडकीवरची छाणी. *S.-burn*, उन्हानें तोंड काळवंडणें. *S.-dog*, सूर्याभासांतील ठिपका. *S.-dial*, शंकुयंत्र, छायायंत्र. *S.-down*, sun-set. सूर्यास्त. *S.-downer*, Australian tramp who times his arrival for the evening (S.-Afr.) chink of s.-down· सूर्यास्ताबरोबर घरीं येणारा भटक्या; सूर्यास्ताच्यावेळीं घेण्याचें पेय. *S.-dried*, उन्हांत वाळवलेला. *S.-flower*, सूर्यफूल,-कमळ. *S.-god*, सूर्य-देव. *S.-light*, सूर्यप्रकाश. *S.-lit*, *a.* सूर्यप्रकाशित. *S.-parlour*, (U. S.) a room with windows on three sides, so arranged as to get sun at all hours. सूर्यप्रकाशित खोली. *S.-picture*, प्रकाशलेख, फोटो. *S.-shade* लहान छत्री, दुकानाच्या खिडकीवरील छपर,-आच्छादन. *S.-spots*, सूर्यावरचे डाग. *S.-stone*, सूर्यकांतमणि. *S.-stroke*, उन्हाचा चटका, झळ, तिरमिरी. *S.-worship*, सूर्योपासना. *S.-proof*, *a.* आतपनिवारक. *S.-burned* or *burnt*, *a.* *S.-less*, *a.*

**Sŭn'dae**, *n.* (स'न्डि)—(U. S.) portion of ice-cream mixed with crushed fruit etc. फळांचें थंड खाद्य (आइस्क्रीम).

**Sŭn'day**, *n.* (स'न्-डे)—first day of the week. रविवार. *S.-school*, धर्मशिक्षणाची रविवारची शाळा, -चा वर्ग.

**Sŭn'der**, *v. t. & i.* (स'न्डर्)—to sever. वेगळा करणें, दुभागणें, दुभंगणें.

**Sŭn'drў** *a.* (स'न्ड्रि)—divers, several, various. अनेक, विविध. *n.* (*in pl. only*) oddments; items that need not be specified. किरकोळ वस्तु; सटरफटर. *All & sundry*, each and all. व्यक्तिशः व सर्वांनीं मिळून.

**Sŭng**, *pa. t. & pa. p.* of Sing.

Sŭnk, *pa. t. & pa. p* of Sink.

Sŭnn, *n.* (सन्)—*S.-hemp, E.-Ind.* hemp-like fibre सण, ताग.

Sŭnn'y̆, *a.* (स'नि)—bright with or as sunlight; diffusing cheerfulness. सूर्यप्रकाशित, चकचकीत; आनंद पसरविणारा. *-ily, adv.*; *-iness, n.*

Sŭn'rise, *n* (सन्-राइज़)—rise of the sun. सूर्योदय.

Sŭn'set, *n.* (सन्-सेट्)—(moment of) sun's setting; (*fig.*) declining period of life. सूर्यास्त; (अलं.) उत्तरार्ध, उतार, उतरती कळा.

Sŭn'-shine, *n.* (सन्शाइन्)—sun-light, area illuminated by it, fair weather; (*fig.*) cheerfulness or bright influence. सूर्यप्रकाश, ऊन, सूर्यप्रकाशित जागा,-स्थळ, स्वच्छ हवा; उल्हास, आनंद, सुचत्ता. *Sun'-shiny, a.* उन्हाचा, प्रकाशाचा, आनंदकारक.

Sŭp, *v. t.* (सप्)—to take supper. रात्रीचें जेवण,-चा फराळ करणें. *v. t.* to drink by sips or spoon fuls. ओठांनीं पिणें, लहान घोट घेणें. *n.* घोट, भुरका.

Sū'per, *n.* (स्यू'पर्)—a super-numerary actor, extra or un-wanted person, (commerc.) superfine cloth etc. उपऱ्या नट, जादा-राखीव-नट. अनावश्यक,-जादा,-मनुष्य; फार तलम,-अति बारीक, -कापड वगैरे. *a.* superfine; (of feet) in square measure. अत्युत्कृष्ट, तलम, नामी; (क्षेत्रफळानें), चौरसमानें जास्त, अधिक.

Sūper-, *pref* (स्यूपर्-)—L. over, beyond. (पूर्वगामी प्रत्यय) अधिक, अतिशय.

Sūperăn'nuate, *v. t.* (स्यूपर्-ॲन्युएट्)—to dismiss or discard as too old, to send into retirement with a pension. वृद्धावस्थेमुळें काढून टाकणें; पेन्शन देऊन कमी करणें.*-uation, n.* साठी, अतिवयस्कता.

Superb', *a.* (सु-,स्यू'र्ब्)—of the most impressive or exalted kind, magnificent, august. उत्कृष्ट, नामी, डौलदार, उमदा, भव्य.*-ly, adv.* उमदेपणानें, डौलदार रीतीनें, उत्कृष्टपणें.

Sūper-cal'endered, *a.* (स्यूपर्कॅ'लन्डर्ड्)—refined, beyond usual degree. चकाक व सफाईदार केलेला (कागद).

Sū'percărgō, *n* (स्यू'पर्कार्गो)—(pl.*-oes*) a person in merchant-ship managing sales of cargo. मालाच्या गलबताची देखरेख करणारा.

Sūpercil'iary̆, *a.* (स्यूपर्सि'ल्यरि)—of the eye-brows, over the eye भुंवयांवरच्या, भुंवयांचा, डोळ्यावरील. [L. *super*, above, *cilium*, eye-brow]

Sūpercil'ious, *a.* (स्यूपर्-सि'ल्यस्)—exhibiting contemptuous indifference, insolently nonchalant, manifesting haughtiness. अहंमन्यखोर, मिजासखोर, पिळाचा, उन्मत्त.*-ly, adv.*; *-ness, n.*

Sūper-dread'nought, *n.* (स्यूपर्ड्रे'ड्नॉट्)—अतिनेटर (लढाऊ जहाज).

Sūpererŏgā'tion, *n.* (स्यूपरेरोगे'शन्)—performance of more than duty requires. कर्तव्यापेक्षां जास्त करणें, अपेक्षेबाहेर (कर्तव्य) करणें. *Works of s.,* (ख्रिश्चन धर्माप्रमाणें) अपेक्षेबाहेर जास्त पुण्यसंचय करणें,-असणें.*-tory, a.*

Superfēcundā'tion, *n.* (स्यूपर्फिकन्डे'शन्)—*Superfeta'tion,* second conception occurring during gestation. एक गर्भ पोटांत असतांना दुसरा गर्भ राहणें, अधिगर्भ.

Sūperfi'cial *a.* (स्यूपर्-फि'शल्)—of or on the surface only, without depth, shallow. पृष्ठभागाचा, पृष्ठस्थित, बाह्य; पृष्ठसंलग्न; वरकरणी, वरवरचा, उथळ. *S. area,* पृष्ठफळ. *S. view,* वरवर (चें) अवलोकन. *S. knowledge,* तुटपुंजें ज्ञान. *A s person,* वरवर दाखवतो त्यापेक्षां अधिक नसलेला, तुटपुंजें,-उथळ,-ज्ञान असलेला मनुष्य. *Superficial'ity n.* (-फिशिॲलिटि), उत्तानता, उथळपणा. *Superfi'cially, adv.* वरून, बाहेरून; वरकरणी, आपाततः

Sūperfi'cies, *n.* (स्यूपर्फि'शिईज़्)—(pl.-the same) a surface (area). वरचें अंग, तल; पृष्ठभाग.

Sū'perfine, *a.* (स्यू'पर् फाइन्)—very fine, affecting great refinement, of extra quality. अतिसूक्ष्म, अति तलम. सर्वोत्कृष्टपणाचा डिमाख मारणारा, अत्युत्तम; अत्युत्कृष्ट.*-ness, n.*

Sūperflu'ity, *n.* (स्यूपर्फ्लू'इटि)—superfluous amount, what is over. अनावश्यक वस्तु; गरजेपेक्षां जास्त, अतिरेक, अतिरिक्तता. *To give of one's s.,* आपल्याजवळील (गरजेहून जास्त असलेल्या) शिलकींतून देणें.

Superfluous, *a.* (सुप'र्-फ्लुअस्)—not needed; more than enough. अनावश्यक; पाहिजे त्यापेक्षां जास्त, प्रयोजनातिरिक्त.*-ly, adv.*; *-ness, n.* आधिक्य, प्रयोजनातिरिक्तता. [L. *super,* more; *fluere,* flow]

Sūper-heat', *v. t.* (स्यूपर्ही'ट्)—(esp.) to heat (steam) to temperature higher than that of boiling water. (उकळत्या पाण्यापेक्षां) उष्णतेचें मान अधिक वाढविणें.*-er, n.* (वाफेच्या) उष्णतेचें मान वाढविण्याची नळ्यांची योजना.

Sūperhū'man *a.* (स्यूपर्-ह्यू'मन्)—more than human, above what is human, divine. अतिमानुष, अमानुष; ईश्वरी.*-ly, adv.*

Sūperimpōse', *v. t.* (स्यूपरिम्पो'झ्)—to lay (*on*) something else. (च्या) वर ठेवणें, (ला) लावणें.

Sū'perincŭm"bent, *a.* (स्यू'पर्-इन्क"म्बन्ट्)—lying or resting on the top of something. वर असणारा, उपरिस्थित.

Sūperindūce', *v. t.* (स्यूपरिन्ड्यू'स्)—to bring on or induce (sleep etc.) by external influence. (वर) ओढून आणणें, वरून आणणें.

Sūperintĕnd', *v. t. & i.* (स्यूपरिन्टे'न्ड्)—to arrange and oversee the working of. देखरेख करणें, नजर ठेवणें.*-ence,* देखरेख, व्यवस्था, पाहणी.

Sūperintĕnd'ent, *n.* (स्यूपरिन्टे'न्डन्ट्)—an official manager with power of directing. देखरेख करणारा, व्यवस्थापक.

**Supĕr'ior**, *a.* & *n.* (सुपी'अरिअर्)—higher or more elevated in place; better in some respect; much more than average: inaccessible to temptation etc.; (Bot.) lying above, upper. वरचा, वरिष्ठ, श्रेष्ठ, वरच्या अधिकाराचा; श्रेष्ठ, सरस, अधिक; अनधीन, अवश, आहारीं न जाणारा; ऊर्ध्वस्थित. *n.* a person superior to one in rank, etc.; head of a monastery. वरिष्ठ मनुष्य, वडील, ज्येष्ठ; ख्रिस्ती महंत. *S. genus*, वरिष्ठ श्रेणी, -जाति, पर जाति. *S. wings*, folding over others. (इतर पंखांना आवरण घालणारे) वरचे पंख. *S. numbers*, more men or their presence. संख्याधिक्य, अधिक मनुष्यबळ. *S. persons*, अधिक विद्वान मनुष्य; घमेंडखोर. *A s. air*, श्रेष्ठपणाचा डौल, -दिमाख. *Rise s. to*, be unaffected by. चा परिणाम होऊं न देणें. *Super'iorly*, *adv.* (Bot., Anat., etc.) वर असल्यानें, ऊर्ध्वस्थित.

**Supĕriŏ'rity̆**, *n.* (सुपीअरिऑ'रिटि)—being higher in place; pre-eminence. वरची पदवी; प्राधान्य, श्रेष्ठत्व.

**Superl'ative**, *a.* (सुप'र्-लेटिव्ह्)—expressing the highest degree; surpassing all others. पराकाष्ठेचा, सर्वश्रेष्ठ, सर्वोत्कृष्ट, परम, पर. *n.* the superlative degree or form; a word in the superlative. अतिशयार्थवाचक रूप,-शब्द. *S. degree*, (Gram.) अतिशयार्थवाचक, 'तम'-वाचक (विशेषण व क्रियाविशेषण यांचीं रूपें). *S. wisdom*. श्रेष्ठ शहाणपण, -ज्ञान *S. beauty*, परमोच्च,-सर्वोत्कृष्ट,-सौंदर्य. *Superlatively*, *adv.* सर्वतोपरी, अतोनात -*tiveness*, *n.* पराकाष्ठा, परमावधि.

**Sū'perman**, *n.* (स्यू'पर्मॅन्)—(pl.-*e* :), the ideal man of Nietzsche. श्रेष्ठ पुरुष, उत्तम पुरुष.

**Sūpermŭn'dāne**, *a.* (स्यूपर्म'न्डेन्)—superior to earthly things. पारलौकिक, पारमार्थिक, दिव्य.

**Sūpernăc'ūlum**, *adv.* (स्यूपर्नॅ'क्यूलम्)—to the best drop. शेवटच्या थेंबपर्यंत. *Drink s.*, एक थेंबहि शिल्लक न ठेवतां (पिणें). *n.* choice wine. उंची मद्य. [L, *naculum*, finger-nail]

**Sūpern'al**, *a.* (स्यूप'र्नल्) (poet.)—heavenly, divine, lofty. स्वर्गीय, दिव्य.

**Sūpernā'tural**, *a.* (स्यूपर्-नॅ'चरल्)—manifesting some agency above the forces of nature. निसर्गातील, अलौकिक, अद्भुत.-*ism*, *n.* जगांतील कांहीं गोष्टी निसर्गातीत असतात हा (निसर्गातीतता-) वाद.-*ist*, *n.* निसर्गातीततावादी.-*ness*, *n.*

**Sūpernū'merary̆**, *a.* (स्यूपर्न्यू'मररि)—in excess of the normal number. (ठराविक,-आवश्यक,-संख्येपेक्षां) जास्त अधिक. *n.* an extra person. अधिक,-जादा, -इसम.

**Sūperpōs'e**, *v. t.* (स्यूपर्पो'झ्)—to lay (thing) on or upon another. वर ठेवणें, उपरिस्थापन करणें. *Superposi'tion*, *n.* उपरिस्थान.

**Sūpersăt'urate**, *v. t.* (स्यूपर्सॅ'च्युरेट्)—to soak to a degree beyond natural. अतिशय मुरवणें.-*ed*, *a.* अतिपरिप्लुत, अतिसंपृक्त.-*tion*, *n.*

**Sū'perscribe**, *v. t.* (स्यू'पर्स्क्राइब्)—to write at top of or outside something. वर,-बाहेर,-लिहिणें; पत्ता लिहिणें. *Su'perscript*, *a.* (ओळी) वरचा.

**Sūperscrĭp'tion**, *n.* (स्यूपर्-स्क्रि'प्शन्)—inscription over something; the address on a letter. कशावर तरी खोदलेला लेख; पत्रावर लिहिलेला पत्ता.

**Sūpersēde'**, *v. t.* (स्यूपर्-सी'ड्)—to appoint or adopt another person or thing in the place of, to oust or take the place of. दुसऱ्याच्या जागीं ठेवणें; दुसऱ्याची जागा बळकावणें, (पाठीं) मागें टाकणें, च्या छोऱ्यावर बसणें.-*se'ssion*, *n.* मागें टाकणें, रद्द करणें. -*se'ded*, *pa. p.* मागें टाकलेला, रद्द. [L. *super*, above; *cedere*, sit.]

**Sūpersti'tion**, *n.* (स्यूपर्स्टि'शन्)—credulity or popular belief regarding the supernatural; misdirected reverence. शकुनविश्वास, धर्मभोळेपणा; अन्यथाभक्ति, वेडगळ समजूत, खोटी धर्म-समजूत.

**Sūpersti'tious**, *a.* (स्यूपर्-स्टि'शस्)—marked by superstition, full of idle religious notions. धर्मभोळा, वेडगळ धर्मसमजुतीचा, अशास्त्रीय, भोळा, मूढविश्वासाचा.-*ly*, *adv.*;-*ness*, *n.*

**Sū'perstrŭcture**, *n.* (स्यू'पर्स्ट्रक्चर्)—a building in relation to, or what rests on, a foundation. पायावरील बांधकाम,-इमारत, वरचें बांधकाम.-*ral*, *a.*; -*ction*, *n.*

**Sū'pertăx**, *n.* (स्यू'पर्टॅक्स्)—a tax on incomes above a certain amount levied in addition to ordinary tax. (नेहमींच्या प्राप्तीवरील कराखेरीज) मोठ्या उत्पन्नाच्या रकमांवरील जादा कर.

**Sūpervene'**, *v. i.* (स्यूपर्व्ही'न्)—to occur as an interruption in some state. आणखी येणें,-घडणें, उद्भवणें, नवा,-वाढून,-येणें. *Superven'tion*, *n.* नवोद्भव, आणखी येणें.

**Sūpervīse'**, *v. t.* (स्यूपर्-व्हा'इझ्)—to oversee; to watch or direct the carrying on of work of. पाहणें; देखरेख करणें.

**Sūpervi'sion**, *n.* (स्यूपर्-व्हि'झन)—superintendence. देखरेख, पर्यवेक्षण.

**Sū'pervisor**, *n.* (स्यू'पर्व्हाइझर्)—one who supervises; (U. S.) an officer of elected board administering a township. देखरेख करणारा, काम पाहणारा, पर्यवेक्षक; नगरशासनसंस्थेच्या लोकनियुक्त मंडळाचा अधिकारी.

**Supīne'**, *a.* (स्यूपा'इन्)—lying facing upwards; quiescent, indolent, negligent. उताणा; सुस्त, आळशी.-*ly*, *adv.* सुस्तीनें, ढिलेपणानें.-*ness*, *n.* उताणेपणा; सुस्ती.

**Sū'pīne'**, *n.* (स्यू'पाइन्)—(Lat. gram.) verbal noun. कारक, क्रियावाचक नाम.

**Sŭpp'er**, *n.* (स'पर्)—a meal taken late in the day, the last meal of the day. रात्रीचें जेवण.-*less*, *a.*

**Sŭpplănt'**, *v. t.* (सप्ला'न्ट्)—to oust in favour of one's self. लबाडीनें एखाद्याला हुसकून लावून त्याची जागा घेणें, हुसकून देणें, पाडाव करणें.-*er*, *n.* युक्तीनें,-कारवाईनें,-जागा हिसकून घेणारा.

**Sŭp'ple**, *a.* (स'पल्)—easily bent, flexible; adroit; flattering. लवचीक, नरम; कुशल; खुशामत्या, आर्जवी, छंदानुरोधी *v. t.* & *i.* to make or grow supple. लवचीक करणें,-होणें; नरम करणें,-होणें. *S.-jack*, हातात धरण्याची लवचीक छडी,-काठी. *To s. horse*, train him to obey slightest touch of rein. घोड्याला शिकवून नरम आणणे. *Sup'pleness, n.*; *Sup'ply, adv.*

**Sŭp'plėment**, *n.* (स'प्लिमन्ट)—a thing added to supply deficiencies, an appendix, an addition to the regular number of a periodical, (Math.) the angle that added to another will make the sum two right angles. भरतीचा पदार्थ, परिशिष्ट; पुरवणी; (गणितांत) पुरक कोन.

**Sŭpplėmĕnt'**, *v. t.* (सप्लिमे'न्ट्)—to make additions to, to increase by a supplement. पुरवणी जोडणें, पुस्ती जोडणें. *Supplemen'tal, a.*;*-'tary, a.* पुरवणीचा, भरतीचा, न्यूनतापूरक; पूरक.*-ation, n.* पुरवणी करणें.

**Sŭpp'liant**, *a.* (स'प्लिअन्ट्)—supplicating, expressive of supplication. नम्र विनंति करणारा; दीन, नम्र, *n.* humble petitioner. भिक्षुक, याचकजन. नम्र विनंति करणारा.

**Sŭpp'licāte**, *v. i.* & *t.* (स'प्लिकेट्)—to make humble petition to (a person) or for (a thing), to beseech. नम्र विनंति किंवा अर्ज करणें, याचना करणें, मिनतवारीनें मागणें.*-ca'tion, n.* प्रार्थना, विनवणी, मिनतवारी.*-catory, a.* विनंतीचा; विनंतिपूर्वक.;*-catingly, adv.*

**Sŭpplicā'tion**, *n.* (सप्लिके'शन्)—humble petition, an earnest request, solicitation. नम्र विनंति, अर्ज.

**Sŭpplȳ'**, *v. t.* (सप्ला'य्)—to furnish, to provide, to afford a sufficiency for, fill (place) as substitute. पुरवणें, पुरवठा करणें, वेगमी करणे, धान्य सामग्री पोंचविणें,-पुरवणें; (जागा) भरणें, भरती करणें, काम करणें, स्थान राखणें. *n.* providing of what is needed, stock, store, (*pl.*) necessaries for army, etc.; (*pl.*) grant of money by Parliament, money allowance to person. पुरविणें, पुरवठा करणें; पुरवठा, सांठा; (अनेः) आवश्यक वस्तु (सैन्याला लागणाऱ्या इ०); लोकसभेनें केलेली (सरकारी खर्चाची) तरतूद, (एखाद्याला दिलेली) रोकड पैशाची नक्त,-नेमणूक, वर्षासन. *S. and demand*, (*Pol. Econ.*) chief factors regulating price of commodities. मागणी आणि पुरवठा (या तत्त्वावर वस्तूंच्या किंमतींत होणारा चढउतार). *Water s.*, पाणी-पुरवठा. *S. department*, (सैन्याला) सामायन पुरविण्याचें खातें, पुरवठाखातें.

**Sŭppōrt'**, *v. t.* (सपॉ'र्ट्)—to carry weight of, prop up, give strength to, encourage; supply with necessaries, lend assistance to, keep up adequately. धारण करणें, पडूं न देणें, आधार देणें; उत्तेजन देणें; पोसणें; पुष्टि देणें, पाठबळ देणें, आधार,-आश्रय,-देणें, मदत करणें; चालवणें, सांभाळणें. *n.* supporting or being supported; a person or thing that supports. आधार, निर्वाह; आश्रय देणारा मनुष्य,-वस्तु. *Foundation supports a house*, घराला पाया आधार देतो, पाया घराचा आधार आहे. *Had to be supported home*, त्याला धरून,-सांवरून,-घरीं आणावें लागलें. *To s. a family*, कुटुंबाचा चरितार्थ चालविणें. *To s. actor*, नटाचा मददतनीस म्हणून काम करणें. *S. resolution*, ठरावाला पुष्टि देणें. *S. institution*, subscribe to its funds. संस्थेला वर्गणी देणें. *To give s. to*, ला पुष्टि,-पाठिंबा,-आधार देणें. *Troops stationed in s.*, as reserve. राखीव ठेवलेलें सैन्य. *S. trench*, (तीन खंदकांच्या रांगांतील) मधला खंदक. *Speak in s. of*, advocate. ची बाजू घेणें, च्या वतीनें बोलणें. *S.-less, a.* निराधार, निराश्रित. *Support'able, a.*; *-bly, adv.*

**Sŭpport'er**, *n.* (सपॉ'र्टर्)—one who supports; (*esp.*) (*Herald.*) representation of living creature holding up. आधार देणारा, पोसणारा; उचलून धरणारी-आधारभूत-(प्राण्याची) प्रतिमा.

**Sŭppōse'**, *v. t.* (सपो'झ्)—to take for granted, assume in default of knowledge, to think to be the case, to imagine; to be inclined to think. समजणें, कल्पना करणें, गृहीत धरणें, कल्पिणें, वाटणें, अस्तित्व कल्पिणें. *Supposed', pa. p.* believed to exist, reputed. कल्पिलेला, मानलेला, कल्पित, मानींव. *I s. so*, मला असें वाटतें (कुरकुरत कबुली देणें). *S. your father saw you what would he say?* समज, तुझ्या बापानें तुला पाहिलें तर तो काय म्हणेल? *Well, s. it was so*, बरें तर, तें असेच होतें असें मानूं. *Supposed'ly, adv.*; *Suppos'able, a.*

**Sŭpposi'tion**, *n.* (सपोझि'शन्)—a thing supposed; supposing. गृहीत धरलेली गोष्ट; कल्पना, भावना, तर्क, इष्टपक्ष, उपन्यास.*-al, a.* कल्पनेचा, अटकळीचा, काल्पनिक.*-ally, adv.*

**Sŭppŏsiti'tious**, *n.* (सपॉझिटि'शस्)—spurious. कपटाचा; कृत्रिम, बनावट, खोटा.*-ly, adv.*;*-ness, n.*

**Suppŏ'sitorȳ**, *n.* (सपॉ'झिटरि)—(med.) a cone or substance of medicinal substance placed in orifice to dissolve. (गुह्य भागांत विरघळण्यासाठीं ठेवण्याची) औषधी सोंगटी, गुदवर्ती. [L. *sub*, under; *ponere*, place]

**Sŭpprĕss'**, *v. t.* (सप्रे'स्)—to put down, quell (rebellion, sedition etc.), put an end to the existence or activity of, overpower and crush; avoid giving vent to; withhold from publication; keep secret. मोडून टाकणें, दडपून टाकणें, मोड करणें; दाबून ठेवणें, दाबणें, गिळणें; प्रसिद्ध न करणें; गुप्त ठेवणें.*-ible, a.*-*ion, n.* दाबणें, दडपणें; झांकणें; (दुःख) गिळणें; रोखून टाकणें, अवरोध.*-or, n.* दडपणारा, दाबून टाकणारा.

**Supprĕs'siō vĕr'i**, *n.* (सप्रे'सिओव्हि'अराय्)—hiding of truth. सत्यापलाप, खरी गोष्ट मुद्दाम लपवून ठेवणें. [L]

**Su'ppūrāte**, *v. i.* (स'प्यूरेट्)—to form pus. पू होणें, पिकणें, पुवळणास येणें. *Suppura'tion, n.*; *Suppurative, a.* पूयजनक पिकवण.

**Sūpra-**, *pref.* (स्यूप्रा-)—above. (पूर्वगामी प्रत्यय=) वरचा, उपरिस्थ. *Supra-calvi'cular*, गळ्याच्या हाडावरचा, अक्षकोपरिस्थ.*-con'scious, a.* अधिक

जागृत.-*maxil'lary*, *a.* & *n.* (of) the upper jaw. ऊर्ध्व दंतास्थिगत, वरच्या जाभाडाचा.-*mu'ndane*, पारलौकिक, परलोकचा.-*or'bital*, डोळ्याच्या खांचे-वरील, नेत्रपुटोपरिस्थ.-*re'nal*, *a.* मूत्रपिंडावरील.

**Suprĕm'acy̆**, *n.* (सुप्रे'मसि)—being supreme, highest authority or power. प्राधान्य, श्रेष्ठत्व, वर्चस्व.

**Suprē'me**, *a.* (सुप्री'म्)—highest in authority or rank; of the uttermost importance or merit, utmost, greatest possible. सर्वांत मोठा, मुख्य, श्रेष्ठ, वरिष्ठ, परम; अत्यंत महत्वाचा, पराकाष्ठेचा, परमावधीचा. *The S. Being, the S.*, *n.* God. परमात्मा, ब्रह्म. *S. court*, वरिष्ठ कोर्ट,-न्यायालय. *S. pontiff*, the pope. पोप (धर्मगुरु). *S. courage*, पराकाष्ठेचें शौर्य. *Supremely*, *adv.* पराकाष्ठेनें, अतिशय.

**Sŭr'al**, *a* (स्यू'अरल्)—of the calf of the leg. पायाच्या पोटरीचा. [L. *sura*, calf]

**Sŭr'chārge**, *n.* (स'र्-चार्ज्)—extra load or charge; supply of force etc. in excess of what is required; additional charge for false returns of taxable property; a mark printed on postage-stamp changing its value; amount not passed by auditor. अधिक ओझें,-भरताड, अधिक आकार; अतिसंपृक्तता, (मालमत्तेसंबंधीं खोटी माहिती दिल्याबद्दल शिक्षा म्हणून घेतलेला) अधिक आकार,-आकारलेला कर; पोस्टाच्या तिकिटावरील (बदललेली किंमत दाखविणारी) छापील खूण; (हिशेबतपासनिसानें मंजूर न केलेली) अधिक,-जादा,-रक्कम.

**Sŭrcharge'**, *v. t.* (सर्चा'र्ज्)—to overload; exact surcharge from; fine (person sum) as surcharge, show omission of credit in (account). अधिक भरताड करणें,-भरणें; अधिक आकार-रक्कम -वसूल करणें; अधिक रकमेचा दंड करणें; (हिशेबांतील) जमा न केलेल्या रकमेची चूक दाखविणें.

**Sŭr'cingle**, *n.* (स'र्-सिंगल)—band or belt round a horse's body. तंग, घोड्याच्या शरीराभोंवतीं घालण्याचा पट्टा. *v. t.* घोड्याला तंग बांधणें, पट्टा बांधणें, तंग बांधून घट्ट करणें.

**Sŭr'culose,-lous**, *aa.* (स'र्क्युलस)—(Bot.) producing suckers. चोपकदंडोत्पादक, चोपक खोड उत्पन्न करणारा.

**Sŭrd**, *a.* & *n.* (सर्ड्)—(math.) *S.-number,-root*, irrational; (phonet.) un-voiced letter or sound. करण्यात्मक, करणी; मूक (उच्चार, अक्षर). [L. *surdus*, deaf]

**Sure**, *a.* (शुअर्)—having adequate reason for belief, convinced of, safe, reliable, unfailing; faithful खचित, खात्रीचा, खात्री झालेला; अचूक; विश्वासू, कधींहि न चुकणारा. *adv.* certainly. खात्रीनें निःसंशय, खरोखर. *Are you s.?* तुझी खात्री आहे का? *A s. shot*, a marksman who never misses. अचूक नेम मारणारा, अचुकसंधानी. *S. card*, खात्रीनें यशस्वी होणारी (योजना इ.). *A s. way*, खात्रीचा इलाज,-उपाय. *S.-footed*, never making false step (*lit.* & *fig.*). योग्य मार्गावर पाऊल टाकणारा न चुकणारा, अचूक. *To be s. she is pretty*, अगदीं खरें बोलायचें तर ती देखणां आहे. *To make s.*, खात्री करून घेणें. *Make s. of*, ची सत्यता पडताळून घेणें, ची खात्री करून घेणें. *As s. as a gun*, अगदीं निखालस खरें, खात्रीपूर्वक, निश्चित. *S. enough*, निःसंशय, खात्रीनें.

**Sure'ly̆**, *adv.* (शु'अर्लि)—with certainty. खात्रीनें, खचीत.

**Sure'ty̆**, *n.* (शु'अर्टि)—security, certainty; thing pledged as surety; person who goes bail for another's appearance in court or payment of sum. खात्री, खचीतपणा, तारण, हमी; जामीन, हमीदार. *of a s.*, certainly. खात्रीनें. *Stand s.*, (*for* another.) (दुसऱ्याकरितां) जामीन राहणें. *Find s.* or *ss.*, जामीन,-हमीदार,-देणें. *Sure'tyship*, *n.* जामिनकी.

**Sŭrf**, *a.* (सर्फ्)—foam and commotion of the sea breaking on shore or reefs. किनाऱ्यावर आपटणाऱ्या लाटांचा फेंस, (लाटांची) खळाळी, खळखळाट. *Surf'y*, *a.*

**Sŭrf'ace**, *n.* (स'र्फिस)—the outside of a body; outward aspect, external appearance; (Geom.) that which has length and breadth but no thinckness. वरचा भाग, वरचें अंग, पृष्ठ, पृष्ठभाग; बाह्य स्वरूप, बाहिरंग, दिखाऊपणा; पृष्ठभाग, पातळी. *v. i.* to put special surface on (paper etc.). गुळगुळीत करणें. *A smooth s*, सपाटी. *Uneven s.*, जमिनीचा उंचसखलपणा. *His politeness is only of* or *on the s.*, त्याचा नम्रपणा हा केवळ वरवर दाखवण्याचा (दिखाऊच) आहे. *Plane s*, समान पातळी. *Curved s.*, वक्र पातळी. *S.-car*, (U. S.) electric street car. (रस्त्यातील) विजेची गाडी. *S.-man*, workman keeping permanent way of railway in order. आगगाडीच्या रस्त्यावर देखरेख करणारा कामगार.

**Sŭrf'eit**, *n.* (स'र्-फिट्)—excess, esp. in food; satiety, disgust caused by excess. फाजील खाणेपिणें, अतिआहार; वीट, पोटास लागलेले तडस. *v. t.* & *i.* to overfeed; cloy, satiate with or be satiated. अतिशय खाऊं घालणें, ओ येस्तों जेऊं घालणें; अतिशय खाणें, ओकारी,-वीट,-येईतों खाणें.

**Surge**, *v. i.* (सर्ज्)—to move in or as in waves (of sea, crowd, emotion etc.); (Naut., of rope) slip back with a jerk; (of wheel) revolve without advancing. (लाटेप्रमाणें) उसळणें, उठणें; (दोरी, सांखळी) हिसका देऊन मागें घसरणें; (चाक पुढें न सरकतां) फिरत राहणें. *n.* surging motion; waves. उसळणें, उसळी; लाटा, मोठी लाट, कल्लोळ.

**Sur'geon**, *n.* (स'र्जन्)—a person skilled in surgery; a medical practitioner having a diploma qualifying him to practise surgery; a medical officer in navy or army or military hospital. शस्त्रवैद्य, शल्यतंत्रज्ञ; (परीक्षा पास होऊन डिप्लोमा मिळविलेला) शस्त्रक्रिया करणारा, शस्त्रवैद्य; (आरमारी, लष्करी) वैद्यकीय खात्याचा

प्रमुख. *Dental s., S. dentist,* दंतवैद्य, (शस्त्रक्रियेनें) दांत काढून टाकणारा. *S. fish,* एक जातीचा मासा. [ Gk. *kheir,* hand ; *ergo,* work ]

Sur'gerў, *n.* (स'र्जरि)—manual treatment of injuries or disorders of the body ; surgeon's consulting room and dispensary. शस्त्रवैद्यकी, शस्त्रविद्या ; शस्त्रवैद्याची खोली,-चा दवाखाना, शल्यगृह.

Sur'gĭcal, *a.* (स'र्जिक्ल्)—of surgeons ; of or by surgery. शस्त्रवैद्याचा, शस्त्रविद्येचा ; शस्त्रक्रिया-विषयक, शल्य. *S. hall,* शस्त्रक्रियाशाला,-दवाखाना. *S. skill,* शस्त्रक्रियेंतील नैपुण्य.*-lly, adv.* शस्त्रक्रियेनें.

Sūr'ĭcate, *n.* (स्यु'अरिकेट्)—A small S.-Afr. animal. (आफ्रिकेंतील) एक मांसाहारी लहान जनावर.

Surl'ў, *a.* (स'र्लि)—sour in manner, gloomily sour or morose ; rudely unsociable. तुसडा ; खाष्ट, खत्याळ. *Surl'ily, adv. ;-iness, n.*

Surmise', *n.* (सर्मा'इझ्)—suspicion of the existence or nature of something, a guess. कल्पना; तर्क, अटकळ. *v. t.* & *i.* to suspect the existence of ; make a guess. (च्या विषयीं) कल्पना करणें, अनुमान करणें, तर्क करणें, अटकळ बांधणें.

Surmount' *v. t* (सर्मा'उन्ट्)—to be on the top of (usu. in pass.) ; to overcome, to get over by effort, to get the better. वर असणें, च्या शिखरावर असणें ; निवारण करणें, पार पडणें. *Peaks surmounted with snow,* शिखरें घर्फाच्छादित होतीं. *Surmount'able, a.* निवारण्याजोगा, साध्य, निवार्य.

Surmŭll'et, *n.* (सर्म'लिट्)—the red mullet. एक जातीचा समुद्रांतील तांबडा मासा.

Surn'āme, *n.* (स'र्-नेम्)—the name common to all members of a family, family name. आडनांव, उपनांव. *v. t.* to give surname to. आडनांव देणें ; टोपणनांव देणें. *Sur'named, pa. p.* आडनांवाचा, उपनांवाचा, नांव दिलेला.

Surpăss', *v. t.* (सर्-पा'स)—to go beyond in anything, to exceed, to outdo, to excel. मागें टाकणें, चढ करणें.*-ing.* (part.) super-eminent. मागें टाकणारा, सर्वश्रेष्ठ, अतिशयित.*-ingly, adv.*

Surp'lice, *n.* (स'र्प्लिस्)—loose white-linen garment worn by clergy. पाद्र्याचा पांढरा झगा. *S.-fee,* (लग्न, मृत्यु या वेळीं) पाद्र्याला दिलेली दक्षिणा.*-d, a.*

Surp'lus, *n.* (स'र्-प्लस्)—amount left over when requirements have been met, (opp. deficit). शिल्लक राहिलेला, फाजील, उराव, बचत. *S. population,* अधिक,-वाढीव,-लोकसंख्या. *Sur'plusage, n.* (of grain etc.) वरताळा.

Surprise', *n.* (सर्-प्रा'इझ्)—catching of a person unprepared ; emotion excited by the unexpected ; event etc. exciting this. अकस्मात गांठणें, अचानक पकडणें ; आश्चर्य, विस्मय, नवल ; आश्चर्यकारक गोष्ट. *v. t.* to attack or come upon at unawares ; astonish ; hurry (person) by surprise into act. अचानक गांठणें, -घेरणें ; चकित करणें, दंग करणें, विस्मय वाटविणें, अकस्मात भाग पाडणें. *The fort was taken by s.,* अचानक हल्ला करून किल्ला काबीज केला. *A s. visit,* आकस्मिक भेट (देणें), अचानक येणें. *To my great s.,* much against my expectations. मी आश्चर्यचकित झालों. *A s. packet,* अनपेक्षित वस्तु हातीं पडणें, अनपेक्षित गोष्ट. *Surprised him in the act,* त्याला ती गोष्ट करीत असतां अचानक पाहिलें,-पकडलें. *To be surprised,* नवल वाटणें. *Surpris'edly, adv.*

Surpris'ing *a.* (सर्-प्रा'इझिंग)—unlooked-for. आश्चर्यकारक ; चमत्कारिक, नवलाचें.*-ly, adv.* नवल-वाटण्याजोगें, नवलपूर्ण.

Surren'der, *v. t.* & *i.* (सरे'न्डर्)—to relinquish possession of ; to give oneself up ; submit ; give oneself over *to* (habit, emotion, etc.). हवालीं करणें ; स्वाधीन होणें,-करणें, मान वाकवणें ; च्या आहारीं जाणें, अधीन होणें. *n.* surrendering or being surrendered. सोडणें, त्याग, परित्याग, शरणागति. *S. insurance policy,* सोडरक्कम घेऊन विम्याचा हक्क सोडणें. *S. value,* amount payable to surrenderer of insurance policy. (विम्याची) सोडरक्कम.

Surrĕpti'tious, *a.* (सरेप्टि'शस्)—done by stealth ; clandestine, underhand. चोरून केलेला, चोरटा, खोटा, कपटाचा, खोटानाटा.*-ly, adv.* कपटानें, खोडसाळपणानें.

Sŭ'rrey, *n.* (स'रि)—(U. S.) a kind of two-seated pleasure-carriage. दुमाणसी गाडी.

Sŭ'rrogate, *n.* (स' रॉगेट्)—a deputy of bishop ; (U. S.) a judge. (बिशपचा) प्रतिनिधि ; न्यायाधीश.

Surround', *v. t.* (सरा'उन्ड्)—to come or be all round ; to encompass, to environ. सभोंवतीं असणें ; घेरणें, गराडा घालणें, वेढणें. वेष्टणें. *n.* a floor-covering between walls and carpet. भिंतींच्या बाजूचें आस्तरण. *The surrounding country,* आसपासचा प्रदेश. *Surrounded with* or *by,* (नें) वेढलेला, वेष्टिलेला.

Surround'ings, *n. pl.* (सरा'उन्डिंग्झ्)—all that environs one, environments. सभोंवतालचा प्रदेश, परिस्थिति, वातावरण (अलं०). *Cultured s.,* सुसंस्कृत वातावरण.

Sŭr'tăx, *n.* & *v. t.* (स'र्टॅक्स)—(to impose) additional tax (on). जादा कर (बसविणें).

Surt'out, *n.* (स'र्टूट्)—an overcoat. वरचा झगा,-अंगरखा.

Surveill'ance, *n.* (सर्व्हे'लन्स्)—watch kept on a suspected person, superintendence. पाहणी, नजर, पहारा, देखरेख. *Under s.,* not trusted unwatched. नजर ठेवलेला, देखरेखीखालील.

Survey', *v. t.* (सर्-व्हे')—to take general view of, to scrutinize, to examine, to inspect. पाहणें, पाहणी करणें, अवलोकन करणें, (जमीन वगैरेची) मोजणी करणें, पैमाइशी करणें.*—ing, n.*

**Surv'ey**, *n.* (सॅर्‌व्हे)—casting of eyes over something; department carrying on or piece of land-surveying. निरीक्षण; मोजणी-खातें, जमीनमोजणी, पैमाशी, भूमापन, मोजणीखात्याचा नकाशा. *Trigonometrical s.*, त्रिकोणमित पैमाश,-भूमापन.

**Survey'or**, *n.* (सर्व्हेअर्)—official inspector *of*; a person who surveys land professionally, one who surveys, an overseer. पाहणी करणारा; मोजणीदार.-*ship*, *n.*

**Survi'val**, *n.* (सर्व्हाइ-व्हल)—a living beyond another's life; relic of the past. जगणें, मागें राहणें; टिकाव, अवशेष. *S. of the fittest*, process or result of natural selection. योग्यतमातिजीवन, 'बळी तो कान पिळी, या न्यायानें बलिष्ठ जो असतो तोच टिकाव धरतो, मागें राहतो, ती पद्धत.

**Survive'**, *v. t. & i.* (सर्व्हाइव्ह)—to outlive; to be still alive or existent. मागें जिवंत राहणें; अद्याप अस्तित्वांत असणें. *To s. one's contemporaries*, आपल्याबरोबरचे लोक मरून गेले असतां मागें जिवंत राहणें. *S. all perils*, सर्व संकटांतून निभावणें.

**Sur'vivor**, *n.* (सॅर्व्हाइ-व्हर्)—one who outlives another, one who lives after some event. मागें जिवंत राहिलेला, अन्योत्तरजीवी.-*ship*, *n.* (*esp.*) right of joint tenant to whole estate on other's death. अनुजीवन; भागीदार मेल्यावर मागें जिवंत राहणाऱ्याची सर्व मालमत्तेवरील मालकी, अनुजीविताधिकार.

**Suscep'tible**, *n.* (ससेप्टिबल्)—impressionable; touchy; admitting-*of*; accessible or sensitive *to*. मनावर परिणाम करणारा; कोमल मनाचा, नाजूक, करुणार्द्र; जोगा, जोगता, क्षम; विकारी, ग्रहणक्षम. *Facts not s. of proof*, पुराव्याची गरज नसलेल्या सत्य गोष्टी. *The passage is s. of another interpretation*, त्या उताऱ्याचा दुसरा अर्थ लागण्याजोगा आहे. *Suscep'tibility*, *n.* क्षमता, ग्रहणक्षमता. *Susceptibilities*, *n. pl.*, sensitive points of person's nature. कोमल-मनोवृत्ति, नाजूक मनोभावना,-मनोविकार. *Suscep'tibly*, *adv.*

**Suscep'tive**, *a.* (ससे' प्टिव्ह)—concerned with the receiving of emotional expressions. हळव्या मनाचा, भावनाप्रधान, भावनामय.

**Suspect'**, *v. t.* (सस्पेक्ट)—to be inclined to think that; to doubt the innocence or genuineness or truth of, distrust, mistrust; have an impression of the existence or presence of. संशय येणें, वहीम येणें; संशय वाटणें, अविश्वास वाटणें, शंका घेणें,-असणें; चा वास येणें. *pred. a.* subject to suspicion. संशयास्पद, विश्वास न बसण्याजोगा. *n.* a suspected person. वहीम,-संशय,-आलेला, वहिमी. *A suspected criminal*, गुन्हेगारीचा संशय आलेला,-संशयित गुन्हेगार,-इसम. *Suspect'able*, *a.* (rare).

**Suspend'**, *v. t.* (सस्पेन्ड)—to hang up; delay, put off; adjourn; deprive of office for a time. टांगणें, लोंबत,-तरंगत,-ठेवणें; (औषधि वगैरे पाण्यांत) लटकत ठेवणें, तहकूब करणें, मोघम ठेवणें; कांहीं दिवस कामावरून काढून टाकणें, घरीं पसविणें, दूर करणें, अंदेशा घेऊन बडतर्फ करणें. *To s. judgement*, निकाल मोघमांत ठेवणें,-तहकूब करणें. *To s. payment*, admit insolvency. देण्याघेण्याचा व्यवहार तहकूब करणें, नादारी कबूल,-जाहीर,-करणें. *Suspended animation*, state of insensibility without death. निरुद्ध प्राण. *Suspens'ible*, *a.* तरंगत राहण्याजोगा, लोंबकळण्याजोगा;-*bil'ity*, *n.* *Suspend'ed*, *pa. p.* तरंगत, टांगलेला; तहकूब केलेला; (Bot.) लटकत राहाणारा, मलंबित.

**Suspen'der**, *n.* (सस्पेन्डर्)—In vbl. senses; (esp. pl.) (U. S.) trouser-braces; attachments holding up socks, etc. तरंगत ठेवणारा, टांगणारा, तहकूब करणारा; पाटलोणीचे खांद्यावरील बंद,-पट्टयां; (पायमोज्याचे) बंद.

**Suspense'**, *n.* (सस्पेन्स)—undetermined state, indetermination, indecision; (Law) suspension. अनिश्चित स्थिति, अनिश्चय, संशय, विकल्प, अनिश्चितता; हक्कांची तहकुबी. *To keep* one *in s.*, delay acquainting him with what he is eager to know. संशयांत ठेवणें, उत्सुकतेंत पाडणें, मोघमांत ठेवणें. *S. account* (in book-keeping), अनामत रकमांचें खातें.

**Suspen'sion**, *n.* (सस्पेन्शन्)—In vbl. senses of Suspend. टांगणें, लटकावणें; तहकुबी; अधिकार कांहीं काळपर्यंत काढून घेणें. *S.-bridge*, झुलता पूल. *S. veto*, कांहीं मुदतीपर्यंतचा निषेध,-जादा नकाराधिकार. *Suspen'sive*, *a.*,-*ly*, *adv.* *Suspen'sory*, *a.* अधांतरीं राहणारें, टांगतें.

**Suspi'cion**, *n.* (सस्पि'शन्)—partial or unconfirmed belief, esp. that something is wrong. संशय, शंका, वहीम, अंदेशा, तर्क, अंदाज, कल्पना. *v. t.* (U. S., sl.) to have suspicion *that*. (असा) संशय,-शंका,-वहीम घेणें. *Above s.*, too obviously good to be suspected. शंका घेण्यास जागा नसलेला, संशयातीत. *S.-less*, *a.*

**Suspi'cious**, *a.* (सस्पि'शस्)—feeling or justifying suspicion; distrustful. साशंक, शंकेखोर; संशयास्पद. -*ly*, *adv.*;-*ness*, *n.*

**Sustain'**, *v. t.* (सस्टेन्)—to keep from falling; to enable to last out; to undergo, to suffer (loss, &c.); to keep up; uphold, bear weight of. धरणें, पडूं न देणें; टिकवणें; सहन करणें, सोसणें; चालू ठेवणें; उचलून धरणें; चा भार सहन करणें. *Sustaining food*, पौष्टिक अन्न, शक्ति कायम ठेवणारें अन्न. *S. a defeat, loss*, पराभव, नुकसान, सहन करणें,-सोसणें, -होणें,-येणें. *S. the applicant in his claim*, अर्जदाराची बाजू उचलून धरणें. *A sustained effort*, सतत चालू राहणारा प्रयत्न. *Sustain'able*, *a.*,-*ment*, *n.*

**Sus'tenance**, *n.* (सस्टेनन्स्)—nourishing quality, nutriment, food (*lit.* or *fig.*). पौष्टिकपणा, पोषण, सांभाळ, उपजीविका, अन्न, आहार, उपजीवन.

**Sustenta'tion**, *n.* (सस्टेन्टे'शन्)—supporting of life. जीविताधार, जीवनाधार.

**Sŭt'ler,** *n.* ( सॅट्लर् )—a camp-follower selling provisions. लष्कराबरोबरचा दुकानदार, वाणी.

**Sū'ture,** *n.* ( स्यूॅचर् )—seamlike articulation of two bones ( at their edges ); ( surg. ) stitching of wound, a thread or wire used for this. शिवण, संधि, जोडण, ( मस्तक- ) संधि; टांके मारून जोडणें, शिवणें; जखम शिवण्याची तार, दोरा. *v. t.* ( जखम वगैरे ) शिवून सांधणें. *Sū'tural, a.* सांध्याचा, शिवणीसंबंधीं ;*-ly, adv. Sutura'tion, n.* सांधणें, शिवणें. *Sū'tured, a.* सांधलेला. शिवलेला.

**Sū'zerain,** *n.* ( स्यूॅझरेन )—feudal lord. संस्थानाधिपति, अधिराज. *Sū'zerainty, n.* अधिराज्य.

**Swab,** *n.* ( स्वॉब् )—a mop for cleaning absorbent pad used in surgery ; ( Naut. ) a clumsy fellow. बोळा ; ( लांब काडीला बांधलेला ) कापसाचा, कापडाचा, किंवा स्पंजाचा बोळा ; शोषक मऊ उशी,-गिरदी ; अडाणी मनुष्य *v. t.* to clean with a swab. काठीवाल्या बोळ्यानें साफ करणें, पुसून काढणें.*-ber, n.*

**Swa'ddle,** *v. t.* ( स्वॉड्ल् )—to wrap up tight and warm, to bind tight with clothes. लपेटणे, गुंडाळणें, वेढणें. *Swaddling-bands,-clothes,* बाळं-तिणीचीं तान्हें मूल गुंडाळण्याचीं वस्त्रें, बाळवतें ; ( *fig.* ) influences restraining freedom of action or thought. आळा, आळाबंधा, लोढणें.

**Swăg,** *n* ( स्वॅग )—( sl. ) burglar's booty ; gains made by jobbery ; ( Austral. ) tramp's or bush-traveller's bundle. दरोडेखोराची लूट ; लूटमार, ( भटक्या मनुष्याचें ) बोचकें, गाठोडें.

**Swăgg'er,** *v. i.* ( स्वॅगर् )—to walk like a superior, to behave arrogantly ; to talk boastfully ( about ), bluff. डौलानें चालणें, आखडणें ; उद्धटपणानें वागणें ; फुशारक्या मारणें, तोरा मिरवणें ; बढाई मारणें, बाता झोंकणें. *n.* swaggering gait, or manner or talk ; smartness ; ( Austral. ) a tramp. डौलाची चाल, अकड, डौल, तोरा. मिजास ; चुणचुणीतपणा, धडाडी ; भटक्या मनुष्य. *a.* smart, fashionable. चुणचुणीत, भपकेबाज, नोकझोकाचें. *-er, n. ;-ingly, adv.*

**Swain,** *n.* ( स्वेन् )—a young rustic, hind ; a lover, a suitor. गांवढळ तरुण ; प्रेमवेडा ; विवाहार्थ प्रेमयाचक, प्रिय, नायक.

**Swāle,** *n.* ( स्वेल् )—( dial. ) a low place or hollow ; ( U. S. ) a marshy depression. सखल जमीन, खळगा, पोकळी ; दलदलीचें डबकें.

**Swa'llow,** *v t. & i.* ( स्वॉलो )—to make or let pass down one's throat ; engulf ; draw in ; accept credulously ; pocket ( an affront ) ; recant ( one's words ). गिळून टाकणें, गिळणें ; गडप करणें ; सुरकणें ; खाऊन टाकणें ; भोळेपणानें स्वीकारणें ; खरें मानणें ; ( अपमान ) गिळणें, पोटांत घालणें, निमूटपणें सहन करणें ; ( आपले शब्द ) परत घेणें, खाणें. *n.* gullet ; act of swallowing ; amount swallowed at once ; ( *s.-hole* ) funnel-shaped cavity in limestone. गळा, अन्नमार्ग ; गिळणें ; घांस ; चुनखडींतील कर्ण्याच्या आकाराची पोकळी. *To s. up,* खाऊन टाकणें, गडप करणें. *To s. a camel.* अचाट, -कठीण,-भयंकर गोष्टीची पर्वा न करणें.

**Swa'llow,** *n.* ( स्वॉलो )—kinds of migratory fork-tailed swift insect-eating bird- associated with summer. पाकोळी. *One s. does not make a summer,* ( a warning against hasty inference ). प्रमाणावरून सामान्य सिद्धान्त बसवूं नये, घाईघाईनें अनुमान काढूं नये. *S. dive,* दोन्ही हात लांब करून ( पोहण्यास्थान ) पाण्यांत बुडी मारणें. *S.-tail,* खोलगट चिमट्यासारखी शेपटी ; एक जातीचें फुलपांखरूं,-पक्षी. *S.-tailed coat.* लांबट शेपट्यावाला अंगरखा. *S.-wort,* milk-weed. अर्क, मंदार ( वृक्ष ). *Gigantic s.-wort,* रुई, रुइटी.

**Swam,** *pa. t.* of Swim.

**Swamp,** *n.* ( स्वॉम्प् )—a piece of wet spongy ground, low ground filled with water, bog, marsh. पाणथळ, दलदल. *v. t.* to overwhelm, flood, soak ( with water etc. ) ; overwhelm by superior numbers or quantity. दलदलींत रुतवणें, अडकवणें, जलमय करणें, बुडविणें ; दडपून टाकणें, गिळून टाकणे, टिकूं न देणें. ( *attrib.* ) found in swamps. दलदलींतला, पाणथळ जमिनीं-तला,-जमिनींत होणारा. *To be swamped with work,* कामकाजामुळें बेजार होणें,-दडपलें जाणें. *Swa'mpy, a.* दलदलीचा, पाणथळ.

**Swan,** *n.* ( स्वॉन् )—a large long-necked web-footed ( *usu.* white ) water-bird ; the constellation Cygnus. हंसपक्षी, राजहंस ; राजहंस ( नक्षत्र ). *S.-song,* song of dying swan ; a person's last production. राजहंसाचें शेवटचें गाणें ; ( एखा-द्याची ) शेवटची कृति,-कलाकृति,-लेख,जय. *S. neck,* ( पाणी वाहून नेणाऱ्या ) नळाची बांकडी तोटी. *S.-like, a.* ; *Swa'nnery, n.*

**Swănk,** *n. & v. i.* ( स्वँक )—( *sl.* ) showing off, swagger. भपका, बढाई ( मारणें ).

**Swap,** See Swop.

**Sward,** *n.* ( स्वॉर्ड )—lawn-like ground. ( आखूड-कापलेल्या- ) गवताची जमीन; हिरवळ.*-ed, a.*

**Sware,** *pa. t.* of Swear

**Swarm,** *n.* ( स्वॉर्म् )—a large number ( of insects, birds, small animals, horse-men &c. ) moving about, a cluster of honey bees. थवा, घोळका, झुंड ; मधमाशांचा घोळका, मोहळ. *v. t.* to move in or form a swarm, to be thronged with a multitude ; ( of places ) be crowded *with ;* ( of bees ) cluster for emigration. गर्दी करणें, घोळक्यानें निघणें ; गजबजणें, गर्दी,-दाटी,-होणें ; ( स्थलांतर करण्यासाठीं मधमाशांचें ) थवा करणें. *Ss. of children, stars,* मुलांचा घोळका ; ताऱ्यांचे पुंज,-पुंजके

**Swarm,** *v. t. & i.* ( स्वॉर्म् )—to climb ( rope, tree, pole ) *up,* by clipping with knees and hands. ( सरपटत ) वर चढणें.

**Swar'thў,** *a.* ( स्वॉर्दि )—being of a dusky complexion, dark-hued ; sunburnt. कृष्णवर्ण,

काळसर; उन्हानें काळा झालेला.-*ily*, *adv.*;-*iness*, *n.* कृष्णवर्णता, काळसरपणा. Also, *Swart*, *a.* (स्वॉर्ट्) (arch.).

**Swash**, *v. t.* & *i.* (स्वॉश्)—to strike violently (arch.); make the sound (of water etc.) of washing or rising or falling. जोरानें धपाटा देणें; (पाण्याची) खळखळ करणें, खळखळाट होणें. *n.* खळखळाट, खळखळाट. *A swashing blow*, भयंकर तडाखा. *A s. buckler*, bully. आडदांड, मवाली, धाडशी (मनुष्य).

**Swat**, *v. t.* (स्वॉट्)—(U. S.) to slap, crush (a fly etc.). चापटी मारणें, (माशी) मारणें, चिरडणें.

**Swath**, *n.* (स्वॉथ्)—a ridge of mowed grass, space left clear after one passage of mower. पात, पाथरा; (गवत, शेत कापून झालेली) पट्टी.

**Swāthe**, *v. t.* (स्वेद्)—to enclose (limb, person) in bandages or wraps, to bind, to swaddle. पट्टा बांधणें, लपेटणें, वेढणें. *n.* a wrapping. पट्टी, वेष्टण, लपेटा.

**Sway**, *v. i.* & *t.* (स्वे)—to waver; have influence over; rule over; lean unsteadily to one side, oscillate irregularly. मागें पुढें कलणें; (वार) वजन असणें; (वर) अंमल चालवणें, चा ताबा,-स्वामित्व,-असणें; (एकीकडे) कलणें, झुकणें, डळमळणें, हालवणें, डोलविणें, फिरविणें. *n.* swaying motion; rule, preponderance, government. हेलकावे खाणारी गति, कल, अंमल, अधिकार. *Sway-backed*, *Swayed*, (of horse) पाठीला भयंकर पोंक आलेला,-पाठ खालीं चसलेला (घोडा).

**Swear**, *v. t.* & *i.* (स्वेअर्)—to take oath; to make promise on oath; use profane oaths to express anger (*at*); cause to take oath, administer oath to. शपथ घेणें; शपथ घेऊन सांगणें; घाणेरड्या शपथा (रागानें) घेणें; शपथ घेवविणें; शपथ (घेण्याचा प्रकार,-विधि) सांगणें. *n.* spell of profane swearing; (*s.-word*) a profane oath. शपथ घेणें, शपथा, आणभाक; घाणेरडी,-गलिच्छ,-शपथ. *Sworn*, *pa. p.* (of (evidence) शपथेवर दिलेली (साक्ष, पुरावा). *S. by*, (colloq.) वर विशेष श्रद्धा,-विश्वास,-असणें. *To s. off drink etc.*, take oath to abstain. (दारू वगैरे) न पिण्याची शपथ घेणें, प्रतिज्ञा करणें. *Sworn friends,-enemies*, जिवश्च कंठश्च मित्र,-दोस्त; उघड उघड कट्टे वैरी. *To s. in*, शपथ घेववून कामावर,-अधिकारावर नेमणें. *Swear'er*, *n.* शपथ घेणारा,-वाहणारा. *Swore*, *Sware* (arch.), *pa. t.*; *Sworn*, *pa. p.*

**Sweat**, *n.* (स्वेट)—perspiration; labour, toil, drudgery; (colloq.) state of anxiety; sweating state; drops exuding from any surface. घाम; श्रम, मेहनत; काळजी वाटण्याजोगी स्थिति, चिंता; घामाघूम होणें; निचरा, पाझर, शेदव. *v. i.* & *t.* to exude sweat; emit like sweat; to toil, to drudge; (of wall etc.) exhibit surface moisture; employ (labour, workers) at starvation wages for long hours, work on such terms; remove sweat from (horse) by scraping; be in a state of terror. घाम येणें; अंगाचें पाणी करणें; कष्ट करणें; (भिंत) पाझरणें, झिरपणें, शेदव करणें; अल्प मजुरीवर भरपूर काम करून घेणें, घामस्या काढणें, अल्प मजुरीवर भरपूर काम करणें; पट्टीनें (घोड्याचा) घाम खरवडून काढणें; भयानें घामाघूम होणें. *In* or *by the s. of* one's *brow*, by dint of toil. निढळाच्या घामानें कष्ट करून. *A cold s.*, (भय, मूर्च्छा, मरण या वेळचा) दरदरून आलेला-थंडगार पाडणारा-घाम. *In a s.*, सचिंत, चिंताकुल. *S. band*, (टोपीच्या आंतील कातड्याची) घामाची पट्टी. *S.-cloth*, (घोड्याच्या खोगिराखालील किंवा मानेभोंवतालचा) गरम कापडाचा तुकडा. *S.-duct*, घर्मनालिका. *S.-gland*, secreting sweat below skin. स्वेदपिंड. *S. shop*, घामाघूम होईपर्यंत काम करणारे नोकर असलेलें दुकान. *He shall s. for it*, पश्चात्ताप करावा लागेल. *Sweating bath*, घर्मोत्पादक स्नान;-*iron*, घोड्याचा घाम खरडून काढण्याची पट्टी;-*sickness*, epidemic fever prevalent in 15th and 16th cc.. अतिस्वेदक तापाचा रोग. *Sweat'y*, *a.* *Sweat'ily*, *adv.*,-*iness*, *n.*; *Sweat'less*, *a.*

**Swea'ter**, *n.* (स्वे'टर्)—(*esp.*) thick woollen jersey. एक प्रकारचा जाड गरम अंगरखा, स्वेटर.

**Swēde**, *n.* (स्वीड्)—a native of Sweden. स्वीडनचा रहिवाशी. *a s.*, a Swedish turnip. स्वीडनमध्यें होणारें सलगम (फळ). *Swe'dish*, *a.* of Sweden. स्वीडनचा; *n.* स्वीडनची भाषा.

**Sweēn'ÿ**, *n.* (स्वी'नि)—(U. S.) atrophy of muscle, esp. of shoulder in horse. (स्नायूचा) एकांगक्षय.

**Sweep**, *v. i.* & *t.* (स्वीप्)—(swept) to glide swiftly, clear everything from; clear of dust; go majestically; extend in continuous curve or line or slope; impart sweeping motion to; (of artillery) cover; clear everything from; gather *up* or push *away* as with broom; propel (barge) with sweeps. झपाट्यानें जाणें; साफ करणें; धूळ वगैरे झाडणें; डौलानें जाणें; सारखा-पसरत-जाणें, उतरत जाणें; झाडीत जाणें; टप्प्यांत,-माऱ्यांत-असणें,-आणणें; झाडणें, झाडून साफ करणें, केरकचरा काढणें; झाडून टाकणें, झटकणें, हाकून देणें; पतिंग्यांनीं (पडाव) वल्हवणें. *n.* a sweeping motion; curve in road; range of something; a long oar; a chimney sweep; a long pole mounted as lever for raising bucket from well. झटकारा, झोंक; वळण, वांकण, वांकणाचा रस्ता; आटोका, आवांका, पोंच; पतिंगा; चिमण्या झाडणारा; उफणीची काठी. *She swept out of the room*, ती खोलींतून झपाट्यानें निघून गेली. *Wind sweeps along*, वारा घोंघावतो. *S. away slavery*, abolish it swiftly. गुलामगिरी सत्वर नष्ट करणें. *Dress sweeps the ground*, (पायघोळ) कपडे रस्ता झाडीत आहेत.

*S. the seas*, समुद्रांतून सर्व शत्रू हांकून,-घालवून,-देणें; चारी दिशांनीं जलपर्यटन करणें. *Swept and garnished*, सामान्यपणें ताजातवाना झालेला. *S. the board*, सोंगटींत सगळे पैसे मिळविणें; सर्व बक्षिसें मिळविणें. *Make a clean s*, have a complete riddance of old furniture, officials, etc. जुनें सामानसुमान, अधिकारी वगैरेंची साफ हकालपट्टी करणें. *Sweep'stake(s)*, gamble on horse-race. घोड्यांच्या शर्यतीचा प्रकार.

Sweep'er, *n.* (स्वी'पर्)—one who sweeps. झाडणारा; (*esp.*) झाडूवाला, भंगी.

Sweep'ing, *pr. p.* (स्वी'पिंग)—of wide range. सरसहा, सरसकट.-*ly, adv.*;-*ness, n. Sweepings, n. pl.* केरकचरा, गाळ, गदळ.

Sweet, *a.* (स्वीट्)—tasting like sugar or honey; smelling like perfumes, fragrant; melodious; fresh and sound; gratifying; dear, beloved; pretty, amiable, gentle. गोड, गुळचट, मिष्ट, स्वादु; मधुर, सुवासिक, सुगंधी; गोड आवाजाचा, मंजुळ; ताजा, लाडका, मनोहर; सुंदर, प्रिय, मोहक. *n.* the sweet part; a sweetmeat; (*pl.*) delights; (*usu. pl.*) sweet dishes; (chiefly voc.) darling. सुखाचा भाग,-अंश, सुख; खाऊ, मिठाई, गोड पदार्थ; सुख, चैन, आनंद; पक्वान्न, मिष्टान्न; प्रिय, प्रिया. *A s. tooth*, liking for sweet things. गोड पदार्थांविषयीं आवड. *Tastes s.*, (ला) गोडी आहे, गोड चव आहे. *S. song*, गोड,-कर्णमधुर,-गाणें. *S. toil*, that one loves. आवडतें काम,-कामाचे श्रम. *S. temper*, मनमिळाऊ,-गोड,-स्वभाव;-*ed, a.* गोड स्वभावाचा. *A s. girl*, गोड,-प्रेमळ,-मुलगी. *S. one*! (voc.) darling. प्रिये! लाडके! *A s. one*, (*sl.*) (मुठीचा) भयंकर तडाखा. *S. going*, वाहनांतून केलेला सुखकर प्रवास. *At one's own s. will*, just as one pleases, at random. यदृच्छेनें, मन मानेल तसें. *S. bread*, pancreas or thymus-gland, *esp.* of calf as food. स्वादुपिंड. *S.-brier*, रानगुलाब. *S.-flag, n.* वेखंड. *S.-heart*, either of pair of lovers. प्रिय, नायक, प्रिया, नायिका. *Go sweet-hearting*, प्रेमाराधन,-प्रेमयाचना,-करणें. *S.-oil*, गोडें तेल. *S. potato*, रताळी (वेल); रताळें (फळ). *S.-water*, उष्ण गृहांतील पांढरें द्राक्ष. *S.-William*, एक बहुरंगी फुलझाड. *S. willow*, S. gale. सुगंधि (त) वारा,-वाऱ्याची झुळुक. *S.-scented, a.* सुवासिक, सुगंधाचा. *Sweet'en, v. t. & i.* गोड करणें; गोडी आणणें; गोड,-मिष्ट,-होणें. *Sweet'ening, n.*; *Sweet'ish, a.* गुळमट, गोडसर. *Sweet'ly, adv.*; *Sweet'ness, n.* गोडपणा, गोडी, माधुरी.

Sweet'heart, *n.* (स्वीट्-हार्ट)—either of the pair of lovers, a lover (male or female). प्रियकर, प्रिया.

Sweet'ing, *n.* (स्वी'टिंग)—kind of sweet apple; (arch.) darling. सफरचंद, गोड फळ; प्रिय, लाडकें.

Sweet'meat, *n.* (स्वीट्-मीट्)—sugar-plum or bon-bon, confection made mostly of sugar. मिठाई, खाऊ.

Swell, *v. i. & t.* (स्वेल्)—to (cause to) grow bigger or louder; dilate, expand, enlarge rise or raise *up*; bulge out, increase in volume or force or intensity. वाढणें, वाढवणें, मोठा होणें, फुगवणें, फुगारा आणणें, सुजणें, फुगणें, पसरणें; चढणें, चढवणें; बाहेरून फुगवटी मारणें, वाढणें, ताठणें, माजणें. *n.* an act or condition of swelling; heaving of the sea with waves after a storm; (colloq.) a person of distinction or of good society; a man of fashionable appearance; (mechanism in organ for) swelling or subduing tones at will. सूज, फुगारा, फुगवटी; (समुद्राच्या लाटांची) फुग, फुगवटी, फुगवणी (पाण्याची); प्रतिष्ठित,-मोठा,-मनुष्य; नोकझोकाचा मनुष्य; वाद्यांतील सुरांचे आरोह-अवरोह करण्याची रचना, आरोह-अवरोह. *a.* (colloq.) of distinction; smart, finely dressed. प्रतिष्ठित; तरतरीत, नीटनेटका पोषाख केलेला. *To s. up, s.*, सुजणें. *The swelling sails*, वारा भरून फुगण.रीं शिडें. *Swelling oratory*, दर्पोक्तिपूर्ण वक्तृत्व. *Heart swells*, भावनेनें हृदय उचंबळून येतें. *S. with pride*, अभिमानानें ताठ होणें,-फुगून जाणें. *Swollen estimates*, प्रमाणाबाहेर फुगवून-वाढवून-सांगितलेला अंदाज (अंदाजी हिशेब,-खर्च). *S. note*, (in music) आवाजाच्या चढ-उतारानें म्हणावयाचें गाणें,-वाजवावयाची गत. *Swelled head*, (*sl.*) conceit. घमेंड, ताठा. *S.-fish*, स्वतःला (लंबवर्तुळाकार) फुगवूं शकणारा मासा. *S. mobsmen*, संभावित खिसेकातरू. *Swell'dom, n.* भपकेबाजपणा, नोकझोक. *Swell'ish, a.*

Swell'ing, *n.* (स्वे'लिंग)—(*esp.*) temporary protuberance due to bruise, prominence. सुजणें, सूज.

Swel'ter, *v. i.* (स्वे'ल्टर्)—to be faint or oppressive or oppressed with heat, to perspire. उन्हानें अति त्रास होणें, उबवणें, उकडणें, गदमदणें, शिजून जाणें. *n.* sweltering atmosphere or condition. उबवणारी हवा, उकाडा.

Swept, *pa. t. & pa. p. of* Sweep.

Swerve, *v. i. & t.* (स्वर्व्ह्)—to diverge from regular line of motion (*lit. & fig.*); cause (ball) to swerve in the air. बाजूला जाणें, ढळणें; (चेंडू) हवेंत वळविणें, वळणें. *n.* swerving motion. रस्ता सोडणें, ढळणें, चळणें. *Never swerves an inch from his duty*, आपल्या कर्तव्यापासून तिळमात्र ढळत नाहीं. *S.-less, a.*

Swift, *a.* (स्विफ्ट्)—fleet; speedy, quick, prompt, quick to do. जलद, चपळ, वेगवान्; तावडतोबीचा, शीघ्र. *adv.* swiftly. जलदीनें, त्वरेनें, सत्वर. *n.* kinds of birds; kinds of small lizard; revolving frame for winding yarn etc. from. (पाकोळी-सारखा लांब शेपटीचा जलद धांवणारा) पक्षी; एक जातीची चोपई, सरडा; सुतानें कांड्या भरण्याचा रहाट. *S. feet*, जलद गति,-पाय. *S.-footed*, पायाचा जलद. *Be s. to hear, slow to speak*, जलद-तावडतोब ऐकावें, पण विचार करून सावकाश बोलावें. *Swift-ness, n.* जलदी, त्वरा, शीघ्रगति.

Swig, *v. t. & i.* (स्विग)—(*sl.*) to take draughts (of). झोंकणें, ढोसणें. *n.* मोठा घोंट,-घुटका.

**Swill**, *v. t. & i.* (स्विल्)—to rinse, flush (*out*); drink greedily. धुणें, विसळणें; ढोसणें, रगडून पिणें. *n.* rinsing; inferior liquor; slops; bout of drinking. धुणें, विसळणें; हलकी दारू; (स्वयंपाकाच्या भांड्यांचें) विसळवणी, धूण; दारूची धुंदी, निशापाणी.

**Swim**, *v. i. & t.* (स्विम्)—(swam; swum) to float on or at surface of liquid, to be supported on water; progress in water by swimming; cover distance or compete in (race) thus, cause to progress thus; (*fig.*) go with gliding motion; have dizzy effect or sensation, appear to undulate, overflow *with* or *in* moisture. पोहणें, तरंगणें, तरणें; पोहून जाणें, पोहण्याच्या शर्यतींत भाग घेणें, पोहायला लावणें; सरकन जाणें, सरंदिशीं निघून जाणें; भोंवणें, फिरणें, चक्कर येणें; वर पाणी येणें, पाण्यानें भरणें, वर तरंगणें. *n.* spell of swimming; a deep pool frequented by fish in river; (*fig.*) main current of affairs. पोहणें, पोहणी; नदींतील खोलगट भाग,-डबकें; चालू परिस्थिति. *To s. with the tide* or *stream*, act with the majority. पुष्कळ लोक वागतील तसें वागणें. *The moon swims in sky*, आकाशांत चंद्र सरकन चालतो. *My head swims*, माझें डोकें गरगरतें, मला चक्कर यतें. *Swimming eyes*, पाण्यानें भरलेले डोळे. *At a swim*, एका पोहणीनें.

**Swim'mer**, *n.* (स्वि'मर्)—one who swims. पोहणारा, पोहता.

**Swim'ming**, *pr. p. & n.* (स्वि'मिंग)—पोहणें, तरंगणें. *-bath*, पोहण्याचें स्नानगृह, पोहणें शिकण्याची शाळा. *-bell*, घंटेच्या आकाराचें (माशाचें) पोहण्याचें इंद्रिय. *-belt*, पोहण्याचें कडें.*-bladder*, माशाची श्वासनलिका. *-stone*, एक जातीचा स्फटिक.

**Swim'mingly**, *adv.* (स्वि'मिंग्लि)—with easy unobstructed progress. सहजगत्या, सटकन, सरकन.

**Swin'dle**, *v. t. & i.* (स्विन्डल)—to cheat; to defraud. फसवणें, लुबाडणें. *n.* fraudulent scheme. फसवेगिरी, उपटेपणा. *Swindler*, *n.* फसव्या, उपट्या. *Swindlingly*, *adv.* फसवेगिरीनें, लबाडीनें.

**Swine**, *n.* (स्वाइन्)—(*sing & plu.*) a pig, a hog; a person of greedy or bestial habits. डुकर, सुवर, सूकर; हावरा,-पशुवृत्तीचा,-मनुष्य. *S.-herd*, डुकर-पाळ. *S.-pox*, गोंवराचा प्रकार. *Swinish*, *a.* सूकरवृत्तीचा;-घाणेरडा;-*ly*, *adv.*;-*ness*, *n.* *Swin'ery*, *n.* डुकरवाडा,-खाना.

**Swing**, *v. i. & t.* (स्विंग)—(*swung*) to move with to and fro motion; sway like a pendulum or door; oscillate, revolve, rock; go with a swinging gate. झोंके देणें, झंदुळणें, झोंपा काढणें, डुलवणें; (लंबकाप्रमाणें) हेलकावे खाणें; आंदोलणें, वर्तुळाकार फिरणें, डुलणें; डुलत डुलत चालणें. *n.* act of swinging, oscillation; swinging gait or rhythm; seat slung by ropes or chains for swinging in; compass to which a thing swings. डुलणें, झंप, आंदोलन, हेलकावा; डुलती चाल, तालबद्धता; झोंपाळा, हिंदोळा, चौफळा, झुला, झोंका, हेलकावा; आंदोलनसीमा, झोंका. *He shall s. for it*, त्याला फांसावर लटकावलें जाईल. *Door swung to*, दरवाजा लागला,-बंद झाला. *To s. child*, मुलाला झोंके काढणें. *To be in full s.*, active. ऐन भरांत,-जोमांत,-असणें. *The s. of the pendulum*, (*fig.*) tendency to alternation (tendency of electorate). (मतदारांचें एकदां या पक्षाला व एकदां त्या पक्षाला) मतें देण्याचें आंदोलन. *It has a s. of 3ft*, त्याचा झोंका तीन फूट जातो. *S.-bridge*, झुला, झुलता पूल.

**Swing'ing**, *pr. p. & a.* (स्विं'गिंग)—vigorously rhythmical (of gait, melody) तालबद्ध, तालसुरांत असलेला.

**Swing'le**, *n.* (स्विं'ङ्गल्)—a flax-beating instrument, swinging bar of flail. झोडण्याचें दांडकें; मोगऱ्याचा फिरता दांडा (धान्य झोडण्याचा). *v. t.* to beat (flax). (ताग, आंबाडी) झोडणें. *S.-tree*, cross-bar pivoted in middle. (गाडीचा, नांगराचा) मधला आडवा दांडा. *Swingling-tow*, तागाचा,-आंबाडीचा, -काथ्या, काठेरा.

**Swipe**, *v. i. & t. & n.* (स्वाइप)—(Crick.) to hit hard and recklessly, slog. (चेंडू) जोरानें वाटेल तसा टोलावणें, लगावणें, फटकावणें. *n.* फटकावणें, टोला. *Swip'er*, *n.* [ var. of sweep ]

**Swipes**, *n. pl.* (स्वाइप्स)—washy or inferior beer. हलकी दारू.

**Swirl**, *v. i. & t. & n.* (स्वर्ल)—whirling motion of water, air, etc.; eddy. (पाण्याची, हवेची) फिरती गति, भोंवऱ्यासारखें फिरणें; भोंवरा.

**Swinge**, *v. t.* (स्विंज्)—to strike hard. खूप मार देणें, जोरानें मारणें. *Swingeing*, (part.) huge. मोठा, प्रचंड, अतिशय.

**Swish**, *v. t. & i.* (स्विश्)—to flog with birch; audibly cut (air, flower) with a cane. छम छम छड्या मारणें; चमकावणें, छमकावणें; छडीनें (आवाज करून) हवा कापणें, फूल तोडणें. *n.* (छडीचा, चाबकाचा) छम् छम् आवाज, छमकन लगावलेला तडाखा. [ imit. ]

**Swiss**, *a. & n.* (स्विस्)—(a native) of Switzerland. स्वीझर्लंडचा (रहिवासी). *S.-roll*, एक प्रकारचें पूरण-युक्त खाद्य पक्वान्न.

**Switch**, *n.* (स्विच्)—flexible shoot cut from a tree; kinds of mechanism for making and breaking connexion of electric circuit, &c. काठी, छडी; विजेचा प्रवाह (चालू किंवा बंद करण्याकरितां) फिरवणारी कळ, विजेचा खुंटा,-दांडा, (आग-) गाडीचा सांधा बदलणारी लोखंडी जीभ. *v. t. & i.* to whip with a switch; swing round quickly, transfer (train, current) with switch; (*fig.*) direct (thoughts) to another subject; turn (light, current) *off* or *on*; put (user of telephone) *on* to or cut him *off* from another. चमकावणें, शिरपुटणें; झटकणें, चटकन हालवणें,-फिरवणें; विजेच्या कळीनें गाडी दुसऱ्या रुळावर घालणें,-विद्युत्प्रवाह बदलणें; (अलं०) विचारांचें विषयांतर करणें; विद्युत्प्रवाह,-विजेचा दिवा-बंद करणें, सुरू करणें, मालवणें, लावणें; टेलिफोनचा

सेनंध जोडणें,-तोडणें. *S.-back*, zigzag railway for steep slopes ( used for amusement at fairs ). (जत्रेच्या वेळचा खेळांतील उभ्या चढणीवरील) आगगाडीचा नागमोडी रस्ता.

**Swiv'el**, *n.* ( स्विं'व्हल )—ring and pivot connecting two parts of something and enabling one of them to revolve without the other. भोवरकडी, फिरकी, कोयंडा. *S.-gun*, फिरती तोफ. *S. bookrest*, पुस्तकाची उघडझापीची अडणी. *S. eye*, तिरवा डोळा, तिरपी नजर. *v. t. & i.* to turn on swivel. फिरकीवर फिरवणें,-फिरणें. *Swiv'elled*, *a.*

**Swollen, Swolen**, *pa. p.* of Swell.

**Swōōn**, *v. i. & n.* ( स्वून् )—to faint, to sink into a fainting fit; ( of music ) die languidly away, a fainting fit. मूर्च्छा येणें; सुस्तपणें एकूं येईनासें होणें; मूर्च्छा, मूर्च्छना, झीट. *Swoon'ingly, adv.*

**Swōōp**, *v. i.* ( स्वूप् )—to come down with the rush of a bird of prey; to make a sudden attack, snatch up. झडप घालणें; एकदम हल्ला करणें; एकदम उचलून घेणें, एका झेंपेस उचलणें. *n.* pouncing of a rapacious bird of prey; sudden raid. झडप, आकस्मिक हल्ला. *At one fell s.*, एका भयंकर झेंपेसरशी, एकदम आवेशानें,-तडाख्यांत.

**Swŏp, Swap**, *v. t. & i.* ( स्वॉप, स्वॅप् )—to exchange, barter. मोबदला करणें, साटेंलोटें करणें. *Never s. horses while crossing the stream*, आणीबाणीच्या प्रसंग निघून जाईपर्यंत फिरवाफिरव,-उलटापालट,-करूं नये.

**Sword**, *n.* ( सोअर्ड् )—a warlike offensive weapon with long blade for cutting or thrusting; ( Mil. sl. ) bayonet. तलवार, समशेर; संगीन. *Court, dress, s.*, राजदरबारी पोषाखाबरोबर लावण्याची तलवार. *The s. of the spirit*, ईश्वरी,-दैवी,-शब्द. *To cross* or *measure ss.*, have fight or open rivalry *with*, शीं दोन हात करणें, भांडणतंटा करणें. *Draw the s.*, तलवार उपसणें, युद्ध सुरू करणें. *Sheathe the s.*, तलवार म्यानांत घालणें,-म्यान करणें, युद्ध-लढा-बंद करणें. *Throw* one's *s. into the scale*, back claim etc. with arms. तलवारीच्या जोरावर मागणी करणें. *Put to the s.*, ( शत्रूला, जिंकलेल्यांना ) कापून काढणें, ठार मारणें. *Fire and s.*, rapine. ( चढाई करणाऱ्या सैन्यानें केलेली ) जाळपोळ, नाश. *The s. of justice*, न्यायाची तलवार, न्यायाधिकार. *The s*, युद्ध; लष्कर; लष्करी सामर्थ्य. *S-arm*, उजवा हात. *S.-bearer*, असिधर राजपुरुष. *S. bill*, long-billed humming bird. लांब चोंचीचा पक्षी. *S. cane*, गुप्ती ( ची काठी ). *S.-cut*, तलवारीचा घाव,-जखम. *S.-fish*, large Atlantic fish with upper jaw elongated to sharp weapon. खड्गमत्स्य. *S.-law*, military domination. लष्करी वर्चस्व. *S.-play*, fencing; ( *fig.* ) cut and thrust argument. सखड्ग द्वंद्वयुद्ध; वाग्प्रहार. *Swordlike, -less, aa.; -proof, a.*

**Swords'man**, *n.* ( सॉ'अर्ड्स्मन् )- a person of some skill in use of a sword. धारकरी. तलवारबहाद्दर. *-ship, n.*

**Swore**, *pa. t.* **Sworn**, *pa. p.* of Swear.

**Swŏt**, *v. i. & t.* ( स्वॉट् )—( school *sl.* ) to work hard ( at books ); *S. up*, study hurriedly; ( U. S. ) hit hard. ( पुस्तकांची ) घोकंपट्टी करणें, जोराचा अभ्यास करणें; घाईघाईनें वाचणें; जोरानें लगावणें,-तडाखा देणें. *n.* मेहनतीनें केलेला अभ्यास, कसून प्रयत्न, कसून अभ्यास करणारा.

**Swum**, *pa. p.* of Swim.

**Swung**, *pa. t.* & *pa p.* of Swing.

**Sўb'arite**, *n.* ( सि'बराइट )—an inhabitant of ancient Greek colony or Sybaris in Italy ( noted for luxury ); a luxurious effiminate person. ऐष-आरामाविषयीं प्रसिद्ध अशा सिबरिसचा रहिवासी; ऐष-आरामी स्त्रैण मनुष्य. *Sybarit'ic, a., -ally, adv.*

**Sўc'amōre**, *n.* ( सि'कमोअर् )—a large timber tree. एक ( इमारती लांकडांच्या उपयोगाचा ) वृक्ष.

**Syce**, *See* Sice.

**Sўchnocar'pous**, *a.* ( सिक्नोका'र्पस् )—( Bot. ) bearing fruit several times before dying. पुष्कळ वेळां फळें देणारा ( वृक्ष, उ॰ आंबा ).

**Sўcō'nium**, *n.* ( सायको'निअम् )—( Bot. *pl.-ia* ) fleshy receptacle developing into multiple fruit. संयुक्त फळ ( अंजिर इ. ).

**Sўc'ŏphant**, *n.* ( सि'कोफन्ट् )—a flatterer. आर्जवी, खुशामती, हांजीहांजी करणारा. *Sycophancy, n.* *-phantic, a.*

**Sўco'sis**, *n.* ( सायको'सिस् )—barber's itch. वस्तरा लागून आलेल्या पुटकुळ्या.

**Sў'ēnite**, *n.* ( सा'यइनाइट )—kind of grey crystalline rock. एक प्रकारचा करड्या रंगाचा स्फटिकमय खडक, फत्तर.

**Sўll'able**, *n.* (सि'लेबल)—word or part of word containing one vowel-sound. शब्दावयव, अक्षर. *v. t.* अवयव पाडून उच्चार; स्पष्ट उच्चारणें. *Not a s.!* अवाक्षर बोलूं नकोस! *Syllab'ic, a.* अवयवी, अवयवांचा, अवयवदर्शक, अवयव तोडून उच्चारलेला.

**Sўll'ăbŭs**, *n.* ( सि'लिबस )—( *pl. -bi, -buses* ), abstract of subjects of a lecture or course; programme of hours. अभ्यासक्रम, यादी, माहितीपत्रक, कार्यक्रम.

**Sўll'ogism**, *n.* ( सि'लाजिझम् )—form of reasoning consisting of two propositions; called major and minor premise, from which a third-the conclusion is deduced. वाक्यसमन्वय, अनुमान. *Syllogis'tic, a.* अनुमानाचा. *Syllogise, v. i. & t.* अनुमान मांडणें, अनुमानाच्या आकारांत बसविणें.

**Sўlph**, *n.* ( सिल्फ् )—elemental spirit of the air; a girl or woman of slender frame. वायुदेवता, परी; सडपातळ मुलगी, तन्वंगी. *S.-like, a.*

**Sylvan**, *See* Silvan. वन्य, वनाचा.

**Sўm'bol**, *n.* ( सि'म्बल् )—an emblem or representation of something; mark or character. चिन्ह, संज्ञा; खूण, निशाणी, संकेताक्षर.

**Sўmbŏl'ic,-al**, *aa.* ( सिम्बॉ'लिक्,-कल )—pertaining to or of the nature of a symbol; emblematic;

figurative. खुणेचा, चिन्हाचा; सांकेतिक; संज्ञिक; द्योतक, सूचक, दर्शक; गर्भित, लाक्षणिक. *Symbol'ically, adv.* संकेतानें, खुणेनें, संज्ञेनें.

Sym'bolize, *v. t.* (सिं'म्बलाइझ्)—to be a symbol of; represent by symbols; treat as symbolic. चें चिन्ह, ची खूण-असणें; संज्ञांनीं दर्शविणें, संकेतांनीं व्यक्त करणें; द्योतक,-सूचक,-म्हणून समजणें. *Sym'bolism, n.* संकेतपद्धति, चिन्हयोजना.

Symm'etry, *n.* (सि'मिट्रि)—right proportion of parts; proportion; harmony; (Bot.) possession by flower of sepals, petals, stamens and pistils, in multiples of the same number. सममप्रमाण, प्रमाणबद्धता; एकवाक्यता, (Math.) सारखेपणा, समप्रमाण; (Bot.) (फुलांतील पाकळ्या वगैरेंच्या) सम्मिताकार, समप्रमाण. *Symmet'ric,-al, aa.* (मध्यरेषेपासून दोन्ही बाजूंना) समप्रमाण असलेला, समप्रमाणांतला, बांधेसूद, वळणदार; (Bot.) सम्मिताकार;*-rically, adv. Symmet'rian,-tri'cian, -trist, nn.* प्रमाणबद्धतेवर जोर देणारा मनुष्य. *Symm'etrize. v. t.* प्रमाणशीर करणें;*-zation, n.*

Sympathet'ic, *a.* (सिम्पथे'टिक्)—expressing or feeling sympathy; compassionate, capable of evoking sympathy, appealing to reader. सहानुभूतीचा, सहानुभूतिदर्शक, सहानुभूतिपूर्ण, कनवाळू, दयाळू; (med.) आनुकंपिक; मनोग्राही, मनावर पकड बसविणारा, परिणामकारक. *n.* sympathetic nerve or system; person peculiarly sensitive to (hypnotic.) influence. आनुकंपिक मज्जातंतु, वशीकरणानुकूल, वश्य मनुष्य. *S. ink,* writing done with which is invisible till brought out by some agency. (ज्या शाईनें कागदावर लिहिलें असतां प्रथम दिसत नाहीं, पण कागदाला उष्णता वगैरे दिली असतां अक्षरें दिसूं लागतात अशी) चोर शाई, गुप्त शाई. *Sympathet'ically, adv.* सहानुभूतिपूर्वक.

Sym'pathize, *v. i.* (सि'म्पथाइझ्)—to feel or express sympathy (*with*). सहानुभूति वाटणें, कळवळा येणें, कळवळणें.*-r, n.* सहानुभूति वाटणारा, कळवळा दाखविणारा.

Sym'pathy, *n.* (सि'म्पथि)—fellow-feeling (*with*), participation in feeling (*with*); compassion *for*; agreement in opinion or desire. सहानुभूति; कळवळा; प्रकृतिसाम्य, स्वभाव. [L. *syn*, with; pathos feeling]

Sym'phony, *n.* (सि'म्फनि)—harmonious sounds, a consonance of sounds agreeable to the ear; instrumental prelude; interlude, or close to a song accompaniment. स्वरमेळ, स्वरैक्य; पद्याला-गाण्याला,-असलेली सुरवादनाची (सुरसाथीची) साथ. *Symphon'ic, a.; Symphon'ious, a.* स्वरैक्याचा, स्वरमेळाचा.

Sympo'dium, *n.* (सिम्पो'डिअम्)—(Bot.) a stem whose successive sections are strictly branches each springing from the preceding. एकमार्गी नियमित खोडा अग्रस्कंध (उ० द्राक्षाची वेल.)

Sympos'ium, *n.* (सिम्पो'झिअम्)—(*pl.-sia*) philosophical or other friendly discussion; ancient Greek drinking-party; any drinking party; a set of articles on one subject by various authors. तत्त्वज्ञानविषयक किंवा अन्य वादविवाद; प्राचीन ग्रीक नाचगाण्याची मजलस; मद्यपानमंडळ; (एकाच विषयावरील निरनिराळ्या लेखकांचे) चर्चालेख. *Sympo'sial, a.* [Gk *sym*, together; *posis*, a drinking]

Symp'tom, *n.* (सि'म्प्टम्)—manifestation in the body that indicates disease; sign of the existence of something. रोगाचें लक्षण,-ची खूण, चिन्ह; निशाणी, खूण, लक्षण, चिन्ह. *Subjective ss.,* फक्त रोग्यालाच कळून येणारीं रोगाचीं चिन्हें. *Objective ss.,* इतरांना दिसून येणारीं रोगाचीं लक्षणें. *Symptomatic, a.* सूचक, दर्शक, बोधक.

Syn'agogue, *n.* (सि'नॅगॉग्)—Jewish congregation, its place of meeting. ज्यू लोकांची भजन-सभा; ज्यू लोकांचें देऊळ.*-gog'ical, a.*

Synarthro'sis, *n.* (सिनॅर्थ्रो'सिस्)—(pl.-oses), immovable articulation. अचलसंधि, स्थिरसंधि.*-throus, a.* स्थिर, अचल. [Gk *syn*, together; *arthron*, joint]

Syn'carp, *n.* (सि'न्कार्प्)—a multiple fruit (e. g. black-berry, *fig.*) संयुक्त फळ (अंजीर, सिताफळ, रामफळ, इ.).*-ous, a.* संयुक्त स्त्रीकेसरदली, संयुक्त कार्पेली (उ. काकडी, भेंडी). [Gk *karpos*, fruit]

Synchondro'sis, *n.* (सिंकॉन्ड्रो'सिस्)—nearly immovable articulation of bones by layer of cartilage. कूर्चास्थींच्या साहाय्यानें झालेला संधि, कूर्चास्थिसंश्लिष्ट संधि.

Synch'ronous, *a.* (सिं'क्रनस्)—happening at the same time, simultaneous (with). एककालिक, समकालीन, समकालिक.*-ly, adv.*

Sync'hronize, *v. t. & i.* (सिं'क्रनाइझ्)—to agree in time; occur at the same time; ascertain the correspondence in date of (events); regulate a clock by some standard. समकालिक असणें; एकाच वेळीं घडणें,-होणें; समकालिकता ठरविणें, युगपद्भाव दाखवून देणें; प्रमाणभूत वेळा बरोबर (घड्याळा-बरोबर) दुसरें घड्याळ लावणें.*-zation, n.* एककालिक करणें,-असणें,-होणें; एककालिकता. [Gk *syn*, with; *khronos*, time]

Synclas'tic, *a.* (सिंक्लॅ'स्टिक्)—concave or convex all over (opp. *anticlastic*). सर्व बाजूंनीं अंतर्गोल किंवा बाह्यगोल, सर्वान्तर्गोल, सर्व बाह्यगोल. [Gk *syn* & *klao*, break]

Sync'opate, *v. t.* (सिं'कपेट्)—to shorten by omission of interior letter (*s*) (e. g. *Symbology* for *Symbololoy*); (Mus.) invert rhythm of note or tone. मध्याक्षरलोप करून (शब्द) आखूड करणें; (पदाच्या सुरावटीचा) क्रम बदलणें.*-pa'tion, n.*

Sync'ope, *n.* (सिं'कपि)—syncopation; (*Med.*) fainting. मध्याक्षरलोप; सुरावटीचा क्रमपालट; मूर्च्छा, झीट येणें.

**Sy̆n'dic**, *n.* (सिं'न्-डिक्)—one of certain members of the Senate. एकाद्या कार्यकारी मंडळाचा,-सभेचा, -सभासद.

**Sy̆n'dicalism**, *n.* (सिं'न्डिकलिझम्)—a movement among industrial workers having as its object the transfer of the means of production and distribution from the hands of present owners to unions of workers. (कामगार संघाच्या हातीं उद्योगधंदे,-त्यांतील मालाचें उत्पादन व विक्रीकरण हीं यावीं या हेतूनें चाललेली) (धंदे-) कामगार चळवळ.

**Sy̆n'dicate**, *n.* (सिं'न्डिकट्)—committee of delegates or syndics, the office of syndics; combination of commercial firms. कार्यकारी मंडळ, व्यापारी, -मंडळ,-संस्था.-*tion*, *n.* व्यापारी मंडळाची स्थापना.

**Sy̆ne**, (साइने)--*Sc.* for *Since*,. पासून, पूर्वी.

**Sy̆nĕc'dochė**, *n.* (सिने'क्डॉकि)—(*Gram.*) extended acceptation by which a part may be named for the whole (e. g. 50 *sail*, i. e. ships). उपलक्षण, लक्षणा (अलंकार).

**Sy̆n'gēnesis**, *n.* (सिन्जेनेसिस)—(Bot.) formation of embryo partly from the male and partly from the female element. परागकोशसंयोग, परागकोशगुच्छ (उ० माका, घांदर रोटी).

**Sy̆n'ŏd**, *n.* (सिं'नॉद्)—assembly of a Church for deliberation, a convention; (Astron.) conjunction of planets or stars. धर्माचार्यसभा, चर्चचें कोर्ट; ग्रहांची किंवा तान्यांची युति.-*ic*,-*ical*,-*al*, *aa.*; -*ically*, *adv.* [Gk *syn*, & *hodos*, way, *sunodos*, meeting]

**Sy̆n'ŏny̆m**, *n.* (सिं'नॉनिम्)—a word identical in sense and usage with another. प्रतिशब्द, पर्याय, पर्यायशब्द, समानार्थक शब्द. *Synon'ymous*, *a.* (*with*), पर्यायवाचक; समानार्थदर्शक;-*ly*, *adv.*

**Sy̆nŏn'y̆my̆**, *n.* (सिनॉ'निमि)—redundant collocation of synonyms for emphasis (e.g. *in any shape or form*); treatise on synonyms. पर्यायशब्दांची निरर्थक योजना; प्रतिशब्दसंग्रह.

**Sy̆nŏp'sĭs**, *n.* (सिनॉ'प्-सिस्)—(pl.-*pses*) summary; conspectus, a brief statement of topics. सारांश; सार, गोषवारा. *Synop'tic*, *a.* सारांशाचा, सारांशभूत, सारभूत;-*al*, *a.* ,-*ally*, *adv.*

**Sy̆nō'via**, *n.* (सिनो'व्हिआ)—(*med.*) albuminous fluid secreted by membranes in interior of joints. सांध्यांतील त्वचेच्या आशयांत असणारा अंड्यांतील बलकासारखा पदार्थ, श्लेपक, वंगण.-*vial*, *a.* श्लेपकाचा, श्लेपकोत्सर्जक.

**Sy̆novi'tis**, *n.* (सायनव्हा'इटिस्)—inflammation of the membrane secreting the lubricating fluid in a joint. संधिगतत्वग्दाह, संश्लेपिकदाह.

**Sy̆n'tăx**, *n.* (सिं'न्टॅक्स्)—the sentence construction or its rules (in grammar). वाक्यरचना व त्याचे नियम. *Syntac'tic*, *a.* वाक्यरचनेचा, वाक्यरचनेसंबंधीं;-*ally*, *adv.* *Syntac'tics*, *n. pl.* (Math.) branch of mathematics relapsing to the number of ways of putting things together under conditions. वस्तुसमीकरण.

**Sy̆n'thĕsĭs**, *n.* (सिं'न्थिसिस्)—(pl.-*theses*), combining of elements or parts into a system or whole; (Chem.) artificial production of compounds from their constituents; (Surg.) joining of divided parts. संयोग, संकलन, एकीकरण; संयोगीकरण. *Syn'thesize*,-*tize*, *v. t.* संयोगीकरण करणें.

**Sy̆nthĕt'ic**,-al, *aa.* (सिन्थे'टिक्,-कल्)—proceeding by or resulting from synthesis; artificial. संयोगीकरणाचा,-करणात्मक, कृत्रिम. *S. rubber*, (मूळ द्रव्यांच्या संयोगीकरणानें तयार केलेला) कृत्रिम रबर. -*tically*, *adv.* संयोगीकरणद्वारा.

**Sy̆n'tony**, *n.* (सिं'न्टनि)—the tuning to each other of wireless telegraphy apparatuses. बिनतारी संदेश यंत्रांचा संदेश देण्याघेण्याचा मेळ घसविणें,-एकाच लहरींच्या लांबींत जुळविणें.-*tonic*, *a.*;-*tonize*, *v. t.* ;-*tonizator*, *n.* बिनतारीचा ग्राहक (यंत्र).

**Sy̆'pher**, *v. t.* (सा'यफर्)—to join (planks) with overlapping edges into flush surface. (फळ्यांचा) जोडसांधा करणें. *S.-joint*, असा केलेला जोडसांधा.

**Sy̆ph'ĭlĭs**, *n.* (सि'फिलिस)—an infectious venereal disease. गर्मी, उपदंश, फिरंगोपदंश (सांसर्गिक रोग). *Primary s.*, प्रथमावस्थेंतील उपदंश. *Secondary s.*, द्वितीयावस्थेंतील उपदंश. *Tertiary s*, अस्थि, स्नायु व मेंदू यांवर परिणाम करणारा, तृतीयावस्थेंतील उपदंश. *Syphilitic*, *a.* गर्मीच्या रोगासंबंधीं, उपदंशाचा.

**Syphon, Syren**, *See* Si-.

**Sy̆'riăc**, *n.* & *a.* (सि'रिॲक्)—(in) the language of ancient Syria. प्राचीन सिरिअन् भाषा (-पैंतील). *Sy'rian*, *a.* & *n.* सिरिआचा (रहिवासी).

**Sy̆ring'a**, *n.* (सिरिं'गा)—a shrub with white scented flowers. पांढऱ्या झुपकेदार फुलांचें फुलझाड.

**Sy̆'ringe**, *n.* (सिं'रिंज्)—a tube with nozzle and piston into which liquid is drawn to be ejected in stream. पिचकारी, (नाकपाची) पिचकारी. *v. t.* to wash by a syringe. पिचकारीनें धुणें,-औषध घालणें. *Hypodermic s.*, a needle pointed one for hypodermic injections. अंगांत औषध टोंचण्याची सूच्यग्र पिचकारी. -*ful*, *n.* [Gk *syringx*, a reed]

**Sy̆'rinx**, *n.* (सि'रिंक्स्)—(pl.-*es*,-*nges*) a pan--pipe; (Archaeol.) narrow rock-cut gallery. बोरूचे पिपेरें, नलिका; खडकांत खोदलेली अरुंद गच्ची.

**Sy̆'rŭp**, *n.* (सि'रप्)—water thickened with sugar. सरबत; साखरेचा पाक.-*y*, *a.*

**Sy̆stăl'tic**, *a.* (सिस्टॅ'ल्टिक्)—contracting and dilating by turns, pulsatory. आळीपाळीनें,-एकसारखें,-उघडझांप होणारें, धडधडणारें.

**Sy̆s'tĕm**, *n.* (सि'स्टिम)—organization; method; (principle of) classification; complex whole;

set of connected things. रचना; पद्धत; व्यवस्था, क्रम; व्यूह, रचना, माला; (Bot.) वर्गीकरण. *Mountain s.*, पर्वतांची रांग,-रांगा. *River s.*, नदी व तिचे फांटे; देशांतील नद्यांची रचना. *Solar s.*, सूर्यमाला. *The s.*, the body as a functional whole. सर्वशरीर (भर). *S.-less, a.*

**Sy̆stemăt'ic**, *a.* (सिस्टिमॅ'टिक्)—methodical; according to a plan or regular method. पद्धतशीर; व्यवस्थित, वर्गीकरणात्मक, व्यूहात्मक.*-ally, adv.*

**Sy̆s'tematize**, *v. t.* (सि'स्टिमटाइझ्)—to arrange methodically, to reduce to a system. व्यवस्थित किंवा पद्धतशीर लावणें, पद्धति बसविणें, व्यवस्था लावणें, वर्गीकरण करणें.*-za'tion, n.*

**Sy̆stĕm'ic**, *a.* (सिस्टॅ'मिक्)—of the bodily system of a whole. सर्व शरीररचनेसंबंधीं.*-ally,adv.*

**Sy̆s'tolē**, *n.* (सि'स्टलि)—contraction of heart etc. alternating with diastole. (हृदयाची वगैरे) आकुंचनक्रिया, संकोच. *Sys'tolic, a.* हृत्संकोचाचा. *S. murmur*, हृत्संकोचमर्मर.

**Sy̆s'tyle**, *a.* (सि'स्टिल्)—with columns set comparatively close together. जवळजवळ बसविलेल्या खांबांचा,-स्तंभांचा. *Sys'tylous, a.* (Bot.) संयुक्तस्त्रीकेसरदंड.

**Sy̆z'y̆gy̆**, *n.* (सि'झिजि)—(astron.) conjunction or opposition. युति, पड्भांतर, पर्वस्थान. [Gk *suzugia*, union]

## T

**T, t**, (टी)—twentieth letter of the English alphabet. इंग्रजी वर्णमालेंतील विसावा वर्ण. (attrib.) T-shaped (thing). T या आकाराची वस्तु. *To a T.*, exactly. अगदीं तंतोतंत, बरोबर, एकदम, थेट. *To cross the T's, (fig.)* be minutely accurate; emphasize a point. बारीकसारीक गोष्टींकडे लक्ष देणें; एखाद्या मुद्यावर विशेष जोर देणें. *pl. Ts, T's.*

**Taal**, *n.* (टाल्)—*The t.*, Cape Dutch language. दक्षिण आफ्रिकेच्या डच लोकांची भाषा.

**Tăb**, *n.* (टॅब्)—a small flap, strip or tongue attached to a material; (Mil.) mark on collar. (बुटाच्या डोळ्याखालची चामड्याची) जिभली; बुटाची फीत, बुटाच्या बंदांचें टोपण; शोभेची फीत, शोभेचें फूल; (लष्करी) गळपट्टीवरील (विशिष्टाधिकारदर्शक) खूण,-चिन्ह. *Ear-t.*, टोपीचा कान. *Keep t.* or *tt. on*, (colloq.) चा हिशेब ठेवणें, वर नजर ठेवणें.

**Tăb'arĕt**, *n.* (टॅ'बरिट्)—fabric of alternate satin and watered-silk stripes. एक प्रकारचें पटेरी कापड.

**Tăbasheer',-shir'**, *n.* (टॅबाशि'अर्)—kind of opal found in joints of bamboo and used in *E.* Ind. medicine. तवकील, तवकीर, त्वक्क्षीर. [Hindi & Arab.]

**Tăbb'y̆**, *n.* (टॅ'बि)—kind of watered silk (attrib.); a streaked cat; a female cat; a gossiping woman; old maid; kinds of moth; kind of concrete. लाटांच्या रंगाचें रेशमी (कापड); बांड्या रंगाचें पट्टेरी मांजर; मांजरी; गोष्टीवेल्हाळ बाई, बुड्ढी; पतंग; कांक्रीटचा प्रकार. *v. t.* (कपडा) झगझगीत करणें.

**Tăb'ernăcle**, *n.* (टॅबर्नॅकल्)—a temporary habitation; a nonconformist meeting-house, a place of worship; canopied niche; receptacle for pyx; (U. S.) large church; (*fig.*) human body. तंबू, राहटी, तात्पुरतें वसतिस्थान; पूजास्थान, ज्यू लोकांचें भजन,-प्रार्थना, -मंदीर; साधुसंतांच्या मूर्ति ठेवण्याचा कोनाडा, देव्हारा; पवित्र (भाकरीचें पात्र ठेवण्याची) पेटी; मोठें प्रार्थनामंदीर; (अलं०) मनुष्यदेह. *v. i. & t.* dwell temporarily, provide with shelter. कांहीं दिवस राहणें,-आश्रय देणें.*-d, a.*

**Tā'bēs**, *n.* (टे'बीझ्)—(med.) emaciation. किरी, क्षयरोग. *Tabet'ic, a. & n.* किरी लागलेला, क्षयरोगी (मनुष्य).

**Tăb'inĕt**, *n.* (टॅ'बिनिट्)—watered fabric of silk and wool. झगझगीत रेशमी व लोंकरी कापड.

**Tă'blăture**, *n.* (टॅ'ब्लेचर्)—mental picture; graphic description. काल्पनिक चित्र; हुबेहुब वर्णन.

**Tā'ble**, *n.* (टे'ब्ल्)—a piece of furniture with flat top on which things may be placed; slab of wood or stone, matter written on this; a horizontal slab; set of facts or figures arranged in columns; each half of folding table; level area; (palmistry) palm; company seated at (dinner etc.) table; food provided at table; each of two bony layers of skull. मेज, टेबल; फळीचा तुकडा, शिला,-लेख; पत्रक, तक्ता, कोष्टक; घडीच्या मेजाचा प्रत्येक भाग; सडा, डोंगरसपाटी; तळवा हात; जेवणारी मंडळी; जेवणाचे पदार्थ; डोक्याच्या कवचीच्या दोन अस्थिमय थरांपैकीं एक थर. *v. t.* to lay (measure etc.) on the table; tabulate; set timbers together; strengthen (sail). मागें टाकणें, तहकूब ठेवणें; कोष्टकें पाडणें, तक्ता तयार करणें; इमारती लांकडें एकत्र जुळवून ठेवणें; (शिडाला) मजबुती आणणें. *At t.*, while taking meal. जेवणावर, जेवतांना. *Under the t.* भोजनोत्तर दारू पिऊन झिंगलेला. *Round-t.*, गोलमेज. *Tt. of weights and measures*, वजनमापाचीं कोष्टकें. *T. of contents*, अनुक्रमणिका, सूची. *Turn the tt.* (*on* person), reverse relations. स्थिति बदलणें, उलटापालट करणें, (वर) बाजू उलटवणें. *Lay, lie, on the t.*, postpone, be postponed, indefinitely. विनामुदत तहकूब करणें,-ठेवणें. *T. cloth*, मेजाची (शोभिवंत) चादर, मेजावरील कपडा. *T.-cut*, (of gem) cut with flat top. सपाट डोक्याचें रत्न. *T. lifting,-moving*, दैवी सामर्थ्यद्योतक म्हणून मेज उचलणें,-हालणें (वगैरे प्रयोग करणें). *T. money*, लष्करी व आरमारी वरिष्ठ अधिकाऱ्यांना भोजनखर्चासाठीं मिळणारा पैसा, मंडळाच्या सभासदाचा भोजनखर्च. *T. talk*, भोजनाच्या वेळच्या गप्पा-गोष्टी. *T. water*,

जेवतांना पिण्याचें पाणी. *T.-ful*, *a.* [ L. *tabula*, a board ]

**Tăʹbleland**, *a.* ( टेंब्ल्-लॅन्ड )—level tract at higher level than surrounding country. डोंगरसपाटी, पठार.

**Tăbʹleau**, *n.* ( टॅब्लो )—( *pl.-caux*-लोज् ), a dramatic or effective situation suddenly brought about. नाटकांतील परिणामकारक सीन, आकस्मिक घटना, -देखावा. *T. vivant*, ( टॅब्लोव्हीʹव्हां ) मूक व स्तब्ध नटांचा वगैरे मिळून होणारा देखावा. *T. curtains*, ( theatr. ) pair of curtains to draw across and meet in the middle of the stage. ( नेहमींच्या वरून खालीं येणाऱ्या दर्शनी पडद्याऐवजीं ) दोन्ह बाजूंनीं सरकत येऊन ( मधोमध ) मिळणारा दर्शनी पडदा. [ F=picture ]

**Table d'hôte**, *n.* ( टाब्ल्-होʹट् )—common table for guests at hotel. खानावळींतील पाहुण्यांची जेवणखाणाची सोय. [ F=table ]

**Tăbʹlĕt**, *n.* ( टॅब्लिट् )—a small slab; a dose of some drug in the form of a small slab. पत्रिका, पट, पाटोळी पाटी, लेखशिला; वडी.

**Tăbʹloid**, *n.* ( टॅब्लाइड् )—compressed dose of a drug. औषधी वडी.

**Tăbōōʹ**, *n.* ( टबूʹ )—setting apart of a person or thing as accursed or sacred; a ban or prohibition by general consent. वाळींत टाकणें, बाजूला काढणें; मनाई, भोगनिषेध, निषेध. *a.* inviolable or prohibited. न मोडतां येणारा, मनाई असलेला. *v. t.* to put under taboo, interdict approach to. मनाई करणें, निषिद्ध ठरविणें. *Tabooedʹ*, *pa. t. & pa. p.*

**Tăʹbor**, *n.* ( टेबर् )—a small drum. ढोलकें, पखवाज.

**Tăbʹouret**, *n.* ( टॅबरिट )—a low stool; an embroidery frame. तिवई, घडवंची; भरतकामाची चौकट.

**Tăbʹūla**, *n.* ( टॅब्यूला )—( *pl.-ae* ) ( Anat. ) hard flat surface ( of bone etc. ). ( हाडाचा वगैरे ) कठीण व सपाट पृष्ठभाग. *T. rasa*, पुसलेला फलक; ( अलं० ) जन्मकाळचें ( मनुष्यमाण्याचें ) निर्विकार,-कोरें करकरीत, -मन. [ L=board ]

**Tăbʹūlar**, *a.* ( टॅब्यूलर् )—shaped like a table-top or board; flat like a table; displayed systematically in columns or in the form of a table; (formed) in thin plates. सपाट, सपाटीचा; तक्त्याच्या रूपाचा, तक्ता काढलेला, कोष्टकांत दाखविलेला; पातळ थरांचा.-*ly*, *adv.*

**Tăbʹūlate**, *v. t.* ( टॅब्युलेट् )—to arrange ( figures etc. ) in tabular form; give flat surface to. ( आंकडे इ. ) कोष्टकवार लिहिणें, तक्ता तयार करणें; सपाट ( पृष्ठभाग ) करणें. *a.* सपाट ( पृष्ठभागाचा ), पातळ थराचा. *Tabulaʹtion*, *n*,-*tor*, *n.*

**Tăch ( e )**, *n.* ( टॅच् )—( Bibl. ) a clasp, link. अडसर, दुवा, सांधा.

**Tachŏmʹeter**, *n.* ( टकॉʹमिटर् )—an instrument for measuring velocity. वेगमापकयंत्र.-*try*, *n.* [ Gk *takhos*, speed ]

**Tachўcardʹia**, *n.* ( टॅकिकाʹर्डिआ )—( path. ) abnormally rapid heart-action as a disease. शीघ्रहृत्क्रिया, हृदयाची क्रिया जलद चालणें ( रोगलक्षण ).

**Tachўgʹraphy**, *n.* ( टकिʹग्रफि )—stenography, esp. that of ancient Greeks and Romans. ( प्राचीन ग्रीक व रोमन लोकांची ) शीघ्रलेखनकला, लघुलिपि. [ Gk *takhus*, swift ]

**Tachўʹmeter**, *n.* ( टकिʹमिटर् )—surveyor's instrument for rapid location of points. जमीनमोजणीचें यंत्र.

**Tăʹcit** *a.* ( टॅसिट् )—unspoken, not worded; implied but not expressed. मूक, मुका; ध्वनित, गर्भित.-*ly*, *adv.* पर्यायानें, न बोलतां, गर्भितार्थानें.

**Tăʹcitŭrn**, *a.* ( टॅसिटर्न् )—given to silence, talking little, not inclined to converse. अबोलका, अल्पभाषी, थोडें,-मोजकें-बोलणारा.

**Tăciturnʹity**, *n*, ( टॅसिटर्ʹनिटि )—habitual silence or reserve in speaking; reservedness. मौन; अबोलकेपणा.

**Tăck**, *n.* ( टॅक् )—a small broad-headed nail ( *pl.* ) long stitches as temporary fastening ( in needle-work ); rope etc. for securing sail -corner; direction in which vessel moves as determined by position of sails; ( *fig.* ) course of action or policy; ( Naut. ) food; sticky condition. चूक, गुलमेख, टेकस; लांब टाके; शिडाचें टोंक घट्ट बांधण्याचा दोर, वासरूं; जहाजाची दिशा; युक्ति, डावपेंच, डाव; खाणेंपिणें, अन्न; चिकटपणा, ओलेपणा. *v. t. & i.* to nail with tacks; stitch lightly together; annex or append to; ( Naut. ) make tack; ( *fig.* ) change one's policy. टाके-टांचे, -मारणें; धांवते ( लांब ) टाके मारणें; ला जोडणें; ( वाऱ्याप्रमाणें ) वासरें व शिडें बदलणें, जहाजाची दिशा बदलणें; डावपेंच बदलणें. *We must change*, or *try another*, *t.*, आम्हांला दुसरा डाव ( पेंच ) टाकला पाहिजे. *Soft t.*, bread, good fare. भाकरी, चांगलें अन्न. *T. hammer*, खिळे काढण्याची-ठोकण्याची-हातोडी.-*er*, *n.* *Tacʹkiness*, *n.* चिकटपणा. *Tacʹky*, *a.*

**Tăcʹkle**, *n.* ( टॅकल् )—ropes and pulleys used in working sails, &c.; windlass with its ropes and hooks; requisites for a tack or sport; ( Football ) grasping or holding of opponent. गलबताचें ( दोरखंडें, कप्या वगैरे ) सामायन; जहाजावरील नांगर उचलण्याचा रहाट व त्याचें सामायन; धंद्याची किंवा खेळाची साधनसामुग्री, साहित्य; फूटबॉलच्या खेळांत प्रतिस्पर्ध्याला धरून ठेवणें. *v. t.* to grapple with; try to defeat ( opponent ), or solve ( problem ), or accomplish ( task ); ( Football ) seize and stop ( player running with ball ); secure by means of tackle. धरणें, पकडणें; ( शीं ) झुंजणें, झटापट करणें, झगडणें; धरून ठेवणें, पकडणें, थांबविणें; दोरखंडांनीं घट्ट पकडणें. *Fishing t.*, मच्छीमारीचें सामायन, साहित्य. *T. block*, दोरखंड सरकविण्याची कप्पी. *T. fall*, rope connecting blocks of a tackle. कप्प्यांना जोडणारी दोरी. *To t. to*, ( colloq. ) कामाला जोरानें सुरवात करणें. *Tackʹling*, *n.* दोरखंडें, दोऱ्या, सामान, ठेवण; जनावराचा साज. *v. t.* to grapple with;

**Tact**, *n.* ( टॅक्ट )—delicate perception of the right thing to do or say; adroitness in dealing with others; ( *Mus.* ) stroke in beating time. ( स्वाभाविक ) हातोटी, कसब; युक्ति, हिकमत, डावपेंच, कला; तालाची टाळी.-*ful, a.* युक्तिबाज, हुशार, वस्ताद. -*less*, युक्ति नसलेला, बिनहिकमती.-*fully, adv.* युक्तीनें, हिकमतीनें, कौशल्यानें.-*lessness, n.*

**Tac'tical**, *a.* ( टॅ'क्टिकल् )—of tactics; adroitly planning or planned. ( चालू ) लढाईतल्या डावपेंचांचा, युक्तिप्रयुक्तींचा, कसबाचा.-*tically, adv.*

**Tacti'cian**, *n.* ( टॅक्टि'शन् )—one clever in tactics. ( चालू ) लढाईतील डावपेंच जाणणारा, युद्धयुक्तिकुशल, डावपेंचांत कुशल.

**Tac'tics**, *n.* ( टॅ'क्टिक्स )—( sing or pl. ) art of disposing military or naval forces in actual contact with enemy; ( *pl.* ) procedure adopted for carrying out a policy. ( लढाई सुरू असतांचे ) लष्करी व नाविक डावपेंच; पेंच, डावपेंच. [ Gk *tasso*, arrange ]

**Tac'tile**, *a.* ( टॅ'क्टाइल,-टिल )—of, perceived by, having the sense of touch; ( Paint. ) having to do or producing the effect of solidity. स्पर्शाचा, स्पर्शमूलक, स्पर्शेंद्रिय, स्पर्शेंद्रियाचा; घन ( वस्तु ) संबंधीं, घन ( वस्तु ) त्व दर्शक,-बोधक. Also, *tac'tual, a.* -*tually, adv. Tactil'ity, n. Tactile organ,-sense,* स्पर्शेंद्रिय, स्पर्शज्ञान.

**Tad'pole**, *n.* ( टॅ'ड्पोल )—larva of frog, toad, etc., *esp.* while it presents only a round head and a tail. प्रथमावस्थेंतील बेडूक ( फक्त डोकें व शेंपूट असलेला ); बेडकीचें पोर, बेडकुली. *T.-fish*, मोठ्या सपाट डोक्याचा युरोपांतील मासा.

**Tael**, *n.* ( टेल )—Chinese weight ( $1\frac{1}{3}$ oz ), and money of account ( about 3s. ). चिनी लोकांचें ( दीड औंसाचें ) वजन, किंवा ( तीन शिलिंगांच्या किंमतीचें ) नाणें.

**Tae'nia**, *n.* ( टे'इनिआ )—( *pl.-ae* ) ( Anat. ) ribbon-like part, esp. of brain; roller bandage, tape-worm; head-band. ( मेंदूचा ) फितीसारखा भाग; बांधपट्टी; अंत्रपट्टकृमि; डोक्याला बांधण्याची फीत.-*nioid, a.* [ Gk *tainia*, a ribbon or tape-worm ]

**Taff'eta**, *n.* ( टॅ'फिटा )—kinds of thin, glossy silk or linen fabric. एक प्रकारचें तलम रेशमी किंवा तागी कापड, ताफता. [ Pers. *taftah*, woven ]

**Taff'rail, Taff'erel**, *n.* ( टॅ'फ्रेल,-फ्रिल )—rail round stern of vessel; upper part of stern. गलबताच्या सुकाणूभोंवतालचा कठडा; वरामाचा कठडा; वरामाचा वरचा भाग.

**Taff'y**, *n.* ( टॅ'फि )—( colloq. ) a Welshman. वेल्श मनुष्य. 2 Toffee. एक साखरेचें गोड खाद्य.

**Tag**, *n.* ( टॅग )—a metal point of shoe-lace, &c.; a loose or ragged end; a stock phrase; addressed label; appendage; ( Theatr. ) closing speech; refrain of song; ( tip of ) animal's tail; ragged lock of wool on sheep; children's game in which one chases the rest. ( दोरीच्या टोंकाला लावलेलें ) धातूचें टोपण; झोल, झालर; ठराविक शब्द, तेंच तेंच-नेहमीचें-वाक्य; माहितीचें,-पत्त्याचें,-पत्रक,-चिठी; ( कपड्याला लावलेलें ) फूल, शेंपूट, फीत; ( नाटकांतील पात्राचा ) सूचक शब्द, प्रेक्षकांना उद्देशून केलेलें भाषण; ( गाण्याचें ) ध्रुपद, पालुपद; प्राण्याची शेंपटी,-तिचें टोंक; मेंढरावरील लोंकरीचें झुलूप; लपंडावीचा खेळ, शिवाशिवीचा ( मुलांचा ) खेळ. *v. t.* to furnish with tags; tack or fasten on ( verses, rhymes, things, etc. ); shear away tags from ( sheep ), ( colloq. ) follow closely; touch ( person ) in game of tag. कपड्याला शोभेचें फूल लावणें, माहितीची चिठी लावणें, फितीला टोपण लावणें; जोडणें, जुळवणें; मेंढरांचीं लोंकरीचीं झुलपें कातरणें,-भादरणें; पाठीमागून जाणें, पाठ न सोडणें; शिवाशिवीच्या डावांत ( गड्याला ) शिवणें. *T.-tail*, a kind of worm, sycophant. एक जातीचा किडा; तोंडपुजा, हांजीखोर मनुष्य. *T.-day*, ( *U. S.* ) सार्वत्रिक वर्गणी गोळा करण्याचा दिवस. *T. rag* and *bob-tail, n.* बाजारबुणगें, भ्हारपोर. *Tag'ger, n.* ( *esp.* ) शिवाशिवीच्या खेळांतील पाठलाग करणारा; ( *pl.* ) लोखंडी पत्रे.

**Tail**, *n.* ( टेल )—a member prolonging animal's body backwards; slender prolongation or appendage; lower or inferior or later part of something. शेंपूट, शेंपटी, पुच्छ, लांगूल; शेंडी, टोंक, ( निरक्षणकोंची, गाडीची ) पिछाडी, ( पतंगाचें ) शेंपूट; ( छपरांतील कौलांचा ) उघडा भाग, पिछाडी, मागचा भाग. *v. t. & i.* to furnish with tail; ( colloq. ) remove the ends of ( fruit ); join *on to* another; dwindle away, fall off in size or number. ( पतंगाला वगैरे ) शेंपटी लावणें; ( फळाचीं ) टोंकें छाटणें; जोडणें; कमी होणें, उतरणी लागणें; आकारानें-संख्येनें,-कमी कमी होणें. *Dog has his t. between his legs*, ( भीतीनें ) कुत्र्यानें तंगडींत शेंपूट घातलें आहे; ( *fig.* of person ) ( एखाद्यानें ) भीतीनें-निराशेनें-शेंपूट घालणें. *Turn t.*, पाठ दाखवणें, पळ काढणें. *Cow's t.*, frayed end of rope etc. दोरीचे सुटलेले धागे. *T. gate*, lower gate of canal lock. कालव्याचा खालचा दरवाजा. *T.-light*, ( आगगाडीचा, बुचाकीचा, मोटरगाडीचा ) मागचा,-पिछाडीचा,-दिवा. *T. margin*, पुस्तकाच्या पानाच्या शेवटीं ठेवलेली कोरी जागा. *T. piece*, decoration in blank space at end of chapter, etc.; triangular piece of wood to which lower strings are t[illegible] in a musical instrument. प्रकरणाच्या शेवटीं [illegible] या जागेंत छापलेला शोभिवंत देखावा,-चित्र; तांतदाणी, [illegible]दाणी. *T. pipe*, पंपाचें पाणी वर खेंचून नेण्याची नळी, खेंचनळी *T. race*, part of mill race below wheel. पाणचक्कींतील पाणी पुढें जाण्याचा सखल पन्हळ, सखल पाट. *Tailed, tailless, aa.*

**Tail**, *n.* ( टेल )—( law ) limited ownership. मर्यादित मालकी; व्यक्तिगत मालकीची मालमत्ता. *a.* ( *estate t.* ) limited by a tail. मर्यादित मालकीची.

Tail'ing, *n.* (टेलिंग)—(esp.) unexposed end of brick or beam in wall; (*pl.*) refuse of grain, ore, etc.; blur in calico-printing. भिंतींतील बाहेर न आलेलें विटेचें किंवा तुळईचें टोंक; (अने०) कचरा, गाळसाळ; चिटावरील पुसट छाप.

Tail'or, *n.* (टेलर्)—one whose occupation is to make outer garments, esp. for men. शिंपी, दरजी. *v. i. & t.* to be or work as a tailor; make clothes for. शिंप्याचा धंदा करणें; कपडे शिवणें. *The t. makes the man,* cf. एक नूर अदमी, दस नूर कपडा. *Ride like a t.,* badly. गवाळ्यासारखें घोड्यावर बसणें. *T. bird,* सुगरण, सुतारपक्षी (पानें शिवून घरटे करणारा). *T. made,* (स्त्रियांचा, शिंप्यानें शिवलेला) तंग व साधा कपडा. *Tailor's cramp,* शिंप्याच्या बोटाला होणारा रोग. *Tail'oress, n.* शिंपीण. *Tail'oring,* शिवण-काम,-कामाचा.

Tain, *n.* (टेन्)—thin tinplate; tinfoil. पातळ पत्रा (जस्ताचा).

Taint, *n.* (टेन्ट्)—sullying spot, blemish, corruption. दोष, दूषण, कलंक, रोग, घाण, वास लागणें. *v. t. & i.* to introduce corruption or disease into. खराब करणें, कलंक लावणें, नासणें, बिघडणें. *Tainted goods,* (in trade-unionism). कामगारसंघाबाहेरच्या कामकऱ्यांनीं तयार केलेला दूषित माल.

Take, *v. t. & i.* (टेक्)—to lay hold of, seize, grasp, capture, win, gain; appropriate, steal; convey or conduct; assume possession of, procure; use, use up; require; remove, dispossess (person etc.) of; catch, be infected with, (cold etc.); conceive, experience, indulge; ascertain by measurement, inquiry, etc.; infer, conclude, interpret; accept, submit to; perform, execute, deal with; photograph. घेणें, धरणें, पकडणें; मिळवणें, संपादन करणें, जिंकणें; चोरणें; बरोबर नेणें,-घेऊन जाणें; बरोबर जाणें; मालक बनणें, घेणें; पिणें, खाऊनपिऊन टाकणें; (ची) आवश्यकता असणें; काढणें, नाहींसें करणें, हिरावून घेणें; (थंडी, ताप) होणें, जडणें, येणें; आळगणें, वाटणें, अनुभवणें; मोज (माप) घेणें,-घेऊन पाहणें,-ठरवणें; अनुमान करणें, समजणें, उमजणें, (चा) विशिष्ट अर्थ लावणें; स्वीकारणें, ग्रहण करणें, सहन करणें; वृत्तींत आणणें, (काम) पुरें करणें, (प्रमाणें) वागणें; (छायाचित्र) घेणें, काढणें, उतरणें, निघणें. *Take one by the throat,* च्या गळ्याला हात घालणें. *Took first prize,* पहिलें बक्षीस मिळविलें. *Novel did not t.,* become popular. ती कादंबरी लोकप्रिय झाली नाहीं, खपली नाहीं. *Do you take the magazine?* तूं ह्या मासिकाचा वर्गणीदार आहेस का? *T. the French Revolution,* फ्रेंचराज्यक्रांतीचें (च) उदाहरण घ्या. *Do not t. advantage of his youth,* त्याच्या तरुणपणाचा गैरफायदा घेऊं नको. *T. your time,* do not hurry. घाई करूं नको. *It takes a lot of doing,* is hard to do. तें करायला कठीण (दुष्कर) आहे. *T. in hand,* करायला घेणें, सुरवात करणें, ची काळजी घेणें, हातीं घेणें. *How would you t. this passage?* ह्या उताऱ्याचा कसा अर्थ लावाल? *T. it for granted,* आहे असें गृहीत धरून चाला. *T. sides,* पक्षपात करणें. [Special uses with *nn.*-] *To t. account of,* not overlook. हिशेबांत घेणें, जमेस धरणें. *T. aim,* नेम घेणें,-धरणें. *T. care,* काळजी घेणें, जपणें, संभाळणें. *T. care of,* ची काळजी घेणें, चा संभाळ करणें. *T.* one's *chance,* accept risk (of). डाव टाकून पाहणें, नशिबाची परीक्षा पाहणें. *T. earth,* बिळांत पळून जाणें, (*fig.*) (मनुष्य) दडून बसणें. *T. effect,* लागू पडणें. *T. exception,* हरकत घेणें. *T. heart,* धैर्य धरणें, धीर धरणें. *T. hold of,* धरणें, पकडणें. *T. leave of,* (चा) निरोप घेणें, (ची) रजा घेणें. *Take* one's *life in* one's *hand,* risk it. तळहातावर शीर घेणें, जीव धोक्यांत घालणें. *T. place,* happen. घडून येणें, होणें. *T. stock of,* (*fig.*) स्वभावाची पारख करणें. *T. wind,* चारचौघांत पसरणें. [Special uses with *prepp., advv.,* and *adv. phrr.*] *T. after,* resemble (esp. parent or relation) in character, feature, etc. (च्या) वळणावर जाणें, चालीनें चालणें, च्या सारखें दिसणें. *T. back,* (colloq.) आपले शब्द परत घेणें. *T. down,* (1) लिहून ठेवणें,-घेणें, टांचून ठेवणें; (2) *t. person down a peg or two,* humble. (चीं) रग जिरविणें, नक्षा उतरविणें; (3) गुलमानें,-नाखुषीनें,-(अन्न) गिळणें,-खाणें; (4) (घर, बांधकाम) मोडून दुसरीकडे नेणें, उलगडणें, उसकटणें. *T. from,* diminish. कमी करणें, उणेपणा आणणें. *T. in,* (1) घेणें, समावेश करणें; (2) *t.* (lady) *in,* बरोबर घेऊन जाऊन जेवायला बसणें; (3) receive (work) to be done at home. घरीं करण्याकरितां काम घेणें; (4) include. सामावणें, समवेश करणें; (5) reduce (garment) to smaller scale, furl (sail). (चिरगूट) आवरून घेणें, (शीड) गुंडाळणें; (6) understand, digest mentally. समजणें, मनानें ग्रहण करणें; (7) believe (false statement). खोट्या गोष्टीवर,-विधानावर -विश्वास ठेवणें; (8) deceive, cheat. फसवणें, ठकवणें; (9) वर्गणी भरून (वर्तमानपत्र) घेणें. *T.-in, n.* (colloq.) a fraud, piece of humbug. लबाडी, फसवणूक, फसवेगिरी. *T. into* one's *confidence,* विश्वासांत घेणें. *T. into* one's *head,* डोक्यांत येणें,-घेणें,-शिरणें; कल्पना करणें. *T. off,* (कपडे) काढणें, उतरणें; नेणें, घेऊन जाणें; (किंमत) कमी करणें; नक्कल करणें, टिंगल करणें, उडी मारणें; पिऊन टाकणें. *T.-off, n.* नक्कल, सोंग, व्यंग्यचित्र; उडी मारण्याची जागा; (खोखोच्या खेळांत, आपला चेंडू दुसऱ्याच्या चेंडूला न हालवतां) चाटून जाण्याइतका दिलेला टोला. *T. on,* (काम, जबाबदारी) अंगावर घेणें, शिरावर घेणें; (भावनेचा) उमाळा येणें, (भावनेचें) प्रदर्शन करणें. *T. out,* बाहेर नेणें,-आणणें,-घेऊन जाणें; (डाग) काढणें, नाहींसा करणें; घेणें, मिळविणें. *T. the nonsense out of* (person), cure him of it. एखाद्याच्या अंगचा मूर्खपणा काढून टाकणें.-घालविणें. *T. it out in,* (नें) कर्जाची फेड,-भरपाई,-करून घेणें. *T. it out of,* चा सूड घेणें, वर सूड उगवणें, ची रग जिरवणें. *T. over,* succeed to management or ownership of (business). (ची व्यवस्था,-मालकी) आपल्याकडे घेणें, आपल्या

ताब्यांत घेणें. *T. to,* आरंभ करणें, सुरवात करणें; संवय लागणें, लाचावणें, चट लागणें; conceive a liking for (person, etc.). (वर) प्रीति बसणें, मन लागणें,-जडणें. *T. up,* उचलणें, उचलून घेणें; शोषून घेणें; घेणें, खाणें, गुंतवणें, ग्रासणें; ताब्यांत घेणें; (धंद्याला) सुरवात करणें, चालू करणें; स्वीकारणें; पुढें चालू करणें,-ठेवणें, (वक्त्याला) मध्येंच थांबवणें, अडथळा करणें; ची खरम देणें. *T. up with,* शीं साहचर्य करणें, संबंध जोडणें. *T. up the cudgels,* कलहांत,-वादविवादांत,-गुंतणें, गुंतवणें. *T. up the gauntlet* or *glove,* (युद्धाचें, द्वंद्वाचें) आव्हान स्वीकारणें, (द्वंद्व-) युद्धास तयार होणें. *T.-up, n.* (*mech.*) (शिवण्याच्या यंत्रांतील दोरा) वर उचलून घेण्याचा आंकडा; (पट्टा ताठ करण्याकरितां) सरकवून घेण्याचें यंत्र-साधन. *T. it upon* (or *on*) *to,* venture, presume to. स्वतःवर घेणें, स्वतःच्या शिरावर घेणें. *Took, pa. t.; taken, pa. p.*

**Take,** *n.* (टेक्)—amount of fish caught, moneys received at theatre, etc.; (Print.) amount of copy set up at one time. पकडलेले मासे (त्यांची एकूण संख्या), तिकिटांची रोख विक्री; एकाच खेपेंत छपाईसाठीं टंकांत उभा केलेला मजकूर.

**Tā'ker,** *n.* (टे'कर्)—In vbl. senses, esp. one who takes a bet. घेणारा; सोडत घेणारा,-खेळणारा.

**Tā'king,** *n.* (टे'किंग्)—In vbl. senses; esp. state of agitation; (*pl.*) money received in business, receipts. घेणें; गोंधळलेली स्थिति, गडबड, धांदल; (धंद्यांतील) आवक, जमा, जमलेला पैसा. *a.* attractive, captivating; catching. मोहक, आकर्षक; सांसर्गिक, पसरणारा.*-ly, adv.;-ness, n.* मोहकता; सांसर्गिकता.

**Tălc,** *n.* (टॅल्क्)—kinds of magnesian mineral, often in thin glasslike plates; (pop.) mica. मेघजाल, अभ्रक. *Calx of t.,* अभ्रकभस्म.*-ite,* गोळेदार अभ्रक.

**Tāle,** *n.* (टेल्)—narrative or story; report of alleged facts; full number. गोष्ट, कहाणी, कथा; हकीगत, चहाडी, चुगली; पूर्ण संख्या *T. of a tub,* idle fiction. भाकड कथा, काल्पनिक गोष्ट. *Thing tells its own t.,* त्या गोष्टीला अधिक पुरवणीची आवश्यकता नाहीं, ती सुस्पष्ट आहे. *To tell tt.,* चहाड्या सांगणें. *T. bearer,* चुगलखोर, चहाडखोर मनुष्य. *T.-bearing, a. T.-teller,* गोष्टी सांगणारा, गोष्टीवेल्हाळ, चहाडखोर. *Nursery tt.,* लहान मुलांच्या गोष्टी; कहाण्या.

**Tăl'ent,** *n.* (टॅ'लेन्ट्)—faculty or aptitude for something; high mental ability; persons of talent; ancient weight and money of account. गुण, अक्कल; बुद्धि, डोकें, डोक्याचीं माणसें, बुद्धिमान पुरुष; (प्राचीन ग्रीक, रोमन लोकांचें) ११० पौंडांचें वजन, चारशे पौंड किंमतीचें नाणें.

**Tal'ented,** *n.* (टॅ'लेंटिड्)—having high ability. बुद्धिमान. *Tal'entless, a.* निर्बुद्ध, बुद्धिहीन.

**Tăl'ipĕd,** *a.* (टॅ'लिपेड्)—club-footed; (zool.) having unusually twisted feet. वक्रपाद. *n.* वक्रपाद प्राणी किंवा मनुष्य.

**Tă'lipēs,** *n.* (टॅ'लिपीझ्)—club-footedness; taliped formation. पाऊल,-पाय,-वांकडा झालेला किंवा आंत वळलेला असणें, वक्रपाद.

**Tăl'isman,** *n.* (टॅ'लिझ्मन्)—an object endowed with magical powers, an amulet. ताईत, तोडगा, दोरा, कवच, यंत्र.*-man'ic, a.* ताइताचा, कवचाचा, यंत्राचा.

**Talk,** *v. i. & t.* (टॉक्)—to say words; hold conversation; have the power of speech; express in words; use (language); gossip or spread reports; discuss; use as a medium of communication. बोलणें; संभाषण करणें; बोलतां येणें, वाचा असणें; शब्दांनीं बोलून दाखविणें, -व्यक्त करणें; (भाषा-भाषेंत) बोलणें; कंड्या उठवणें; वादविवाद करणें; दळणवळणाचें साधन म्हणून योजणें. *n.* familiar conversation; rumour; mere words; theme of gossip. संभाषण, अफवा; भाषण; भाषणाचा विषय. *To talk big,-tall,* बढाई मारणें, बढाइच्या गोष्टी सांगणें. *Now you're talking,* (*sl.*) आतां वळणावर आलास, आतां तुझें बोलणें पटेल. *Talk nothing but English,* त्याला इंग्रजीशिवाय दुसरी भाषा बोलतां येत नाहीं. *T. person round,* persuade him. एकाद्याचें मन (बोलून) वळविणें. *Would t. a horse's hind leg off,* is talkative. फार बडबड करतो, बडबड्या, वटवट्या,-आहे. [*With prepp. & adv.*] *T. about,* discuss. वादविवाद करणें, वाटाघाट करणें. *T. at,* (एकाला ऐकूं जाईलसें उद्देशून) दुसऱ्याशीं बोलणें. *T. away,* consume (time) in talking. (वेळ) बोलण्यांत घालविणें. *T. back,* reply defiantly. उलट उत्तरें बोलणें, उद्धटपणानें उत्तरें देणें. *T. down,* मोठ्यानें बोलून (एखाद्याला) चूप बसविणें. *T. of,* (विषयीं) बोलणें, उल्लेख करणें. *T. out* (bill, motion, in Parl.) get rid of it by prolonging discussion till time of adjournment. बैठक उठेपर्यंत (सूचनेवर) बोलत राहून (ती) पुढें ढकलविणें. *T. over,* (एखाद्या विषयासंबंधीं) बराच वेळ चर्चा करणें,-बोलणें; (एखाद्याचें) बोलून मन वळवणें. *T. round,* (एखाद्या विषयाचा) काथ्याकूट करणें. *T. through one's hat,* (*sl.*) exaggerate, bluff, make wild statements. अतिशयोक्ति करणें, थापा मारणें, भरमसाट विधानें करणें. *T. to,* शीं बोलणें, ची कानउघाडणी करणें. *T. up,* (एखाद्या विषयाची आवड उत्पन्न करण्याकरितां त्यावर) वादविवाद करणें,-चर्चा करणें. *It will end in t.,* प्रत्यक्ष कृति कांहींच घडणार नाहीं. *Their quarrels are the t. of the town,* त्यांचीं भांडणें हा एक गांवांत सर्वांच्या तोंडीं विषय होऊन राहिला आहे. *Talk'er, n.*

**Ta'lkātive,** *a.* (टॉ'केटिव्ह्)—fond of talking. बोलका, वाचाट, वाचाळ.*-ness, n.*

**Talkee-Talkee,** *n.* (टॉ'की-टॉ'की)—incessant chatter; broken English of Negroes. सारखी वटवट,-बडबड; मोडकेंतोडकें इंग्रजी.

**Ta'lkies,** *n. pl.* (टॉ'कीझ्)—cinematographic film in which the characters speak. बोलका चित्रपट, बोलपट.

**Ta'lking,** *a.* (टॉ'किंग्)—In vbl. senses; *esp.* having the power of speech, expressive.

बोलणारा, वाचा असलेला, बोलूं शकणारा; भावदर्शक. *T. parrot*, बोलका पोपट. *T. eyes*, भावदर्शक नेत्र.

**Tall**, *a.* (टॉल्)—(of person) of more than average height; (of tree, etc.) higher than surroundings; of specified height. (*sl.*) extravagant, excessive, boastful. उंच, उन्नत; त्या उंचीचा; उधळ्या, प्रमाणाबाहेर, घमेंडखोर. *adv.* (talk *t.*, boast) घमेंडखोरपणानें. *T.-boy*, bed-room chest of drawers, खणाचें उंच कपाट, *T.-ness*, *n.* उंचपणा, उंची.

**Tăll'ow**, *n.* (टॅलो)—harder kinds of fat. मेणबत्त्या, साबण करण्यासाठीं प्राणिज चरबी. *v. t.* to grease with tallow, fatten (sheep). चरबीयुक्त करणें; (मेंढ्यांना) पुष्ट करणें. *Vegetable t.*, वनस्पतींपासून काढलेली चरबी. *T.-chandler*, *n.* मेणबत्त्या करणारा; मेणबत्त्यांचा व्यापारी. *T.-face*, pale person. फिकट चेहऱ्याचा मनुष्य. *T. drop*, style of cutting stones with dome on one or both sides. हिरा कापण्याची पद्धत. *Tallowish*, *a.* थोडासा चरबीचा. *Tallowy*, *a.* चरबीचा, चरबीसारखा.

**Tăll'ȳ**, *a.* (टॅलि)—a notched stick to number with; counterpart or duplicate of a thing, account of goods entered in seller's and in purchaser's book, ticket or label attached to thing for identification. (हिशेब मांडण्याची) खुणांची काठी; जोड, तोड, जोडभाग, ताळा; रुजवातीचा हिशेब; ओळखण्याची खूण. *v. t. & i.* to record or reckon by tally; agree, correspond, *with*; (Naut.) haul taut. (खुणांच्या) काठीनें हिशेब करणें,-मांडणें; जुळवणें, जमणें, मेळ बसणें; खालच्या दोरीनें (शीड) घट्ट करणें. *Horticultural tt.*, plant labels. रोपांच्या नांवाच्या चिठ्या. *T.-man*, (आठ दिवसांच्या) उधारीवर माल विकणारा. *T. sheet*, हिशेबाच्या रुजवातीचा कागद,-तक्ता. *T. shop*, उधारीनें मालविक्रीचें दुकान. *T. system*,-*trade*, of trades on short credit with account kept by tally. अल्प मुदतीच्या पतीची (उधारीची) व्यापारी पद्धत, व्यापार. *T. clerk*, यादीवरून मालाची रुजवात घेणारा कारकून. *Tall'ier*, *n.*

**Tăllȳ-hō'**, *int. & n.* (टॅलिहो')—huntsman's cry to hounds; (U. S.) large coach. पारध्याची शिकारी कुत्र्यांना हाक; मोठी घोडागाडी. *v. i. & t.* to cry tallyho; urge (hounds) thus. (पारध्याची कुत्र्यांना आरोळी मारणें; आरोळीनें चेतावणें,-पिटाळणें.

**Tăl'on**, *n.* (टॅलन्)—claw of a bird of prey; cards left after deal; heel of sword-blade. नखें, नखी; वांटून उरलेले पत्ते; तलवारीच्या पात्याची पाठ.

**Tăl'ŭs**, *n.* (टॅलस्)—(*pl.-li*) (Anat.) anklebone; form of club-foot; (Geol.) sloping mass of fragments at foot of cliff. घोंटा, घोंट्याचें हाड, गुल्फास्थि; वांकड्या पायाचा प्रकार; कड्याच्या तळचा उतरता खडकांचा थर. [L]

**Tăm'arind**, *n.* (टॅमरिन्ड)—tropical tree or its fruit which is acid and agreeable. चिंचेचें झाड, चिंच, आंबली.

**Tăm'arisk**, *n.* (टॅमरिस्क)—feathery-leaved ever-green common at seaside. एक पिसासारखीं पानें असलेलें, समुद्राकाठीं वाढणारें झाड,-वनस्पति.

**Tăm'bour**, *n.* (टॅम्बुअर्)—a drum (arch.); circular frame for stretching embroidery work on, stuff so embroidered; (Archit.) cylindrical stone in shaft of column, circular part; kinds of fish. डफ, खंजिरी; कलाबतूची, -भरतकामाची,-(कापड ताणून धरण्याची) वाटोळी ताण, वाटोळें कडें, वाटोळ्या ताणीवरील भरतकाम; (खांबांतील) नालिकाकार दगड, वर्तुलाकार भाग; डफासारखा आवाज करणारे, डफाच्या आकाराचे,-मासे. *v. t.* to decorate, embroider, on *t.* भरतकाम करणें, कलाबतूचें शोभिवंत काम करणें.

**Tămbourine'**, *n* (टॅम्बरीन्)—a musical instrument or small drum with jingling metal disks; dance accompanied by the *t.*; kind of African pigeon. खंजिरी, डफरी; डफरीचा नाच,-नाचाचें गाणें; एक जातीचें आफ्रिकन कबूतर.

**Tāme**, *a.* (टेम्)—(of animals) domesticated, tractable; lacking spirit, uninteresting, insipid; (colloq) cultivated. माणसाळलेला; पाळींव; दीन, गरीब, मेषपात्र, लेचापेचा; नीरस, पचपचीत, पुळपुळीत; लागवडीस आणलेला, लावून केलेला. *v. t.* to make tame, to domesticate; to break in, to humble. माणसाळवणें; वठणीस आणणें, मऊ,-नरम,-करणें. *A t. cat*, (*fig.* of person) हांजीखोर व उपयोगी म्हणून राखलेला मनुष्य. *T.-less*, *a.* untamable. न माणसाळण्या जोगा, हिंस्र, व्रात्य. *Tamability*,-*bleness*, *nn. Tamer*, *n.* (Lion-) माणसाळवणारा, (सिंहांना) शिकविणारा. *Tamable*, *a. Tamely*, *adv.* मेषपात्र-पणानें, हूं का चूं न करतां. *Tame'ness*, *n.*

**Tăm'per**, *v. i.* (टॅम्पर्)—(*T. with*) to meddle, to make unauthorized changes; to exercise underhand influence. लुडबुडणें, लुडबुड करणें, नमती उठाठेव करणें, ढवळाढवळ करणें; फितविणें, बिघडविणें, लांच देऊन वळविणें; अनधिकृत फेरफार,-फिरवाफिरव करणें,-दुरुस्ती करणें.-*er*, *n.*

**Tămp'ion**, *n.* (टॅम्पिअन्)—wooden stopper for muzzle of gun; a plug (for top of organ pipe). बंदुकीच्या तोंडाची लाकडी गुद्दी,-लाकडी बुच; (सूरसनईची) पिपाणी, जिव्हाळी.

**Tămp'on**, *n.* (टॅम्पन्)—plug used to stop haemorrhage. रक्त थांबविण्याकरितां वापरलेला (कापसाचा, कपड्याचा) बोळा, गुद्दी. *v. t.* बोळा घालून (जखमेंतील) रक्त थांबविणें. *Tamponade'*, *n.* रक्त थांबविण्याकरितां बोळा वापरणें,-बोळ्याचा उपयोग.

**Tăn**, *n.* (टॅन्)—bark of oak tree crushed in use for tanning hide; the yellowish brown of tanned leather; the bronze of sun-burnt skin. (युरोपांतील ओकवृक्षाची, किंवा आपल्याकडील बाभळ, तरवड वगैरे झाडांची) कातडीं कमावण्याची साल, बाभळीची साल; पिंगट -पिंगट रंग; उन्हानें करपलेला (कातडीचा) पिंगट रंग, काळवट रंग. *a.* yellowish brown. पिंगट. *v. t & i.*

to convert ( hide ) into leather by steeping in infusion of tan ; make or become brown by exposure to sun ; treat ( imitation ( marble ) with hardening process ; ( *sl.* ) beat, thrash. ( कच्चीं कातडीं ) कमावणें, रापवणें ; ( उन्हानें ) काळा करणें, काळवंडणें ; ( कृत्रिम संगमरवरी दगड ) कठीण करणें ; मारणें, ठोकणें, ठोके देणें. *Tann'er, n.* ; *Tann'ery, n.* कातडीं कमावण्याचा कारखाना. *Tann'ing, n.* कातडीं कमावणें. *The tan,* ( *sl.* ) सर्कस. *T. yard,* tannery. कातडीं कमावण्याचा कारखाना. *Tann'able, a.*

**Tăn'dem,** *adv.* ( टॅन्डम् )—( of horses in harness ) one behind another. एकामागून एक, एकापाठीं एक ( जोडलेले घोडे ). *n.* a vehicle driven tandem ; a bicycle etc. with two or more seats behind each other. एका पाठीं एक घोडे जोडलेली गाडी ; एका पाठीं एक बैठका असलेली दुचाकी. *a.* ( of bicycle ) so arranged. एका पाठीं एक बैठक असलेली ( दुचाकी ).

**Tăng,** *n.* ( टॅंग )—part of tool that fits into handle ; strong taste or flavour, characteristic property ; resonant sound of bell etc. ; kinds of seaweed. ( विळा, चाकू, कानस वगैरेंचा ) मुठींत गेलेला भाग ; उग्र वास,-चव, विशेष धर्म ; ( घंटेचा वगैरे ) खणखण आवाज, घणघणाट ; एक जातीची समुद्रवेल. *v. t.* & *i.* घणघण आवाज करणें ; मूठ बसवणें ( हत्याराला ). *Tang'y, a.* ( टॅंगि ) उग्रट वासाचा,-चवीचा.

**Tăn'gent,** *n.* ( टॅन्जन्ट् )—a straight line that meets a curve at a point but if produced does not intersect it at that point. वर्तुळाला स्पर्श करणारी रेषा, स्पर्शरेषा, स्पर्शज्या, स्पर्शिका. ( Trig., abr. *tan* ) *t. of an angle,* ratio of the perpendicular subtending it in a right angled triangle to the base, कोनस्पर्श ज्या. *To fly, go off, at a tangent,* ओझरतें,-चाटून -जाणें ; विचाराची,-आचाराची,-दिशा एकदम पालटणें. *Tangen'tial, a.* ( टॅन्जेन्शल् ) स्पर्शज्यासंबंधीं, स्पर्शरेषेचा ; *-tially, adv.* *Tan'gency, n.* स्पर्शज्यास्थिति, -संबंध.

**Tăn'gible,** *n.* ( टॅन्जिबल् )—perceptible by touch ; real, actual, evident, palpable ; ( Law ) corporeal. स्पर्शनीय ; खरा, स्पष्ट, प्रत्यक्ष ; शारीरिक.*-bility,-ness, nn.* स्पर्शनीयता, स्पर्शज्ञेयता, ठळकपणा.*-bly, adv.*

**Tăn'gle,** *n.* ( टॅंगल् )—confused mass or state. गुंडाळा, गुंतला, गुंतागुंत, घोटाळा. *v. t. & i.* to bring or come into a tangle, complicate ; entrap, ensnare. गुंतवणें गुरफटवणें, गुरफटणें, गुंतागुंत होणें, जाळ्यांत धरणें,-पकडणें. *T.'-foot,* ( U. S., sl. ) whisky etc. दारू, मादक पेयें. *Tan'glesome,-gly, aa.* *Tan'gled, pa. p* गुंतवलेला, गुंतागुंतीचा, भानगडीचा.

**Tank,** *n.* ( टॅंक् )—a large receptacle for storing liquid ; a reservoir, pond ; ( Mil. ) steel-box travelling by motor power, containing crew and guns and serving as moving forts in battle ; ( U. S. ) natural pool. टाकी ; तलाव, तळें ; ( लढाईच्या उपयोगाचें ) टॅंक,-फिरता लढाऊ बुरूज, रणगाडा; नैसर्गिक तळें ; डबकें. *T. drama,* ( जलाशयाचा देखावा ज्यांत दाखविला आहे असें ) अद्भुत देखाव्याचें नाटक. *T. engine,* टांकीवालें ( आगगाडीचें ) यंत्र. *Tank'age, n.* ( टॅंकिज् ) टांकींतील सांठवण ( त्याचें भाडें ) ; टाकीचें घनफळ.

**Tănk'ard,** *n.* ( टॅंकर्ड् )—large drinking vessel ( usu. of silver or pewter ) ; contents of this. ( दारू वगैरे पिण्याचें ) उभट पात्र ; भांडेंभर पेय. *T. turnip,* उभट मुळ्याचें गाजरासारखें फळ ; सालगम.

**Tănk'er,** *n.* ( टॅंकर् )—a ship with tank for carrying mineral oil. ( टाक्यांतून खनिज तेल वगैरे वाहून नेणारी ) तेलाची बोट.

**Tănn'er** *n.* ( टॅनर् )—one who tans. कातडें कमावणारा. 2. ( *sl.* ) a sixpence. सहा पेन्स.

**Tănn'ic,** *a.* ( टॅनिक् )—of tan. ओक, बाभळ ह्या झाडांच्या सालीपासून काढलेलें. *T. acid, tann'in, nn.* बाभळीच्या सालीपासून काढलेलें ( कातडीं कमावणें, शाई व औषध यांच्या उपयोगी ) अम्ल. *Tann'ate, n.* ( chem ) ; *Tannif'erous, a.*

**Tăn'sy,** *n.* ( टॅन्झि )—an aromatic herb used in medicine and cookery. एक सुगंधी वनस्पति.

**Tăn'talize,** *v. t.* ( टॅन्टलाइझ् )—to torment with disappointment ; raise and then dash the hopes of. निराशा करून दुःख देणें, झुलवणें ; आशा दाखवून निराश करणें.*-zation, n.-zingly, adv.*

**Tăn'talum,** *n.* ( टॅन्टलम् )—a rare metal used for electric lamp filaments. एक दुर्मिळ धातु ( हिच्यापासून विजेच्या दिव्यांतील धागे करतात ).

**Tăn'talus,** *n.* ( टॅन्टलस् )—( Gk. Myth. ) son of Zeus condemned to stand up to chin in water which he could never drink and so died of starvation, spirit stand. ( ग्रीक पुराणांतील गळाभर पाण्यांत उभा असूनहि अन्न-पाण्यावांचून तडफडून मरण्याची शिक्षा झालेला ) झिअस्‌चा मुलगा,-टॅन्टलस् राक्षस ; दारूच्या बाटल्या, बंदिस्त करून ठेवलेल्या आहेत असें कपाट. *T. cup,* toy cup containing figure of man illustrating principle of siphon, वसुदेव प्याला.

**Tăn'tamount,** *pred. a.* ( टॅंटमाउन्ट् )—equivalent in value or effect, equal. समान, सारखा, बरोबर. [ L. *tantus,* so great ]

**Tăn'trum,** *n.* ( टॅन्ट्रम् )—display of temper. रागाचा झटका, चिडखोरपणा.

**Tăp,** *n.* ( टॅप् )—a cock through which liquid is drawn ; a plug of a cask ; liquor of a particular brewing etc. ; a tap-room ; an instrument of cutting threads of internal screws. तोटी, आंटेवालें तोंड, ( आंटेवाली तोंडाची ) नळी, गुडदी, बूच ; विशिष्ट प्रकारची दारू ; दारूचा गुत्ता ; टाप, नर, पेंचर. *v. t.* to furnish caks

with tap; pierce (a cask) to let out liquid; (surg.) draw off fluid by incession; draw sap from tree by cutting into it; apply to, solicit, (person *for*); broach (subject); divert part of current (from telegraph wires etc.) to intercept message. (पिंपाला) टाप लावणें,-बसवणें; भोंक पाडणें, तोंड पाडणें, भोंक पाडून (दारू वगैरे) काढणें; (शस्त्रक्रियेनें अन्तर्गळांतील) पाणी काढणें; (खाप पाडून झाडांतील) चीक,-रस,-काढणें; अर्ज.-विनंति, -करणें, संधान लावणें; (विषयासंबंधीं) बोलणें काढणें; (वीज दुसऱ्या तारेवर घेऊन) बातमी मध्येंच काढून घेणें. *T. room,-house*, दारूचें दुकान, दारूचा गुत्ता. *T. root*, chief descending root of plant. (गाजर, मुळा यांचें-द्विदल वनस्पतींचें,-खालीं जमिनींत जाणारें) मुख्य मूळ, किंकरी मूळ, पाळ. *Tapped, pa. t. & pa. p.*

Tăp, *v. t. & i.* (टॅप्)—to strike a light blow; rap (*at*); cause to strike lightly against; apply leather to (heel). थाप मारणें, हळू ठोठावणें; (दरवाजावर) टक्‌ टक्‌ (आवाज) करणें; (नें ठोठावणें); ठोकणें; जोड्याच्या टांचेला चामडें मारणें,-लावणें. *n.* light blow or sound; (*pl.*) men's dinner-call in barracks; (U. S.) signal for putting out lights in soldier's quarters. थाप, थापटी, टिचकी; टक्‌ टक्‌ आवाज; (लष्करी) जेवणाची घंटा; (लष्करी शिपायांना) दिवे मालवण्याची-झोंपीं जाण्याची-खूण.

Tāpe, *n.* (टेप्)—a narrow strip of linen, etc.; continuous strip of paper in receiving instrument of recording telegraph &c. फीत, सुतळी, नाडा, नाडी; (लांबीरुंदी मोजण्याची) टेप; (तारायंत्रग्राहकांत बसविलेली) कागदाची पट्टी. *v. t.* to furnish with a tape. फीत लावणें, फितीनें बांधणें. *T. worm.*, फितीसारखा लांब जंतू, पट्टकृमि. *Breast the t.*, win the race. शर्यत जिंकणें. *T.-less, a.*

Tā'per, *n.* (टे'पर्)—a wick with coat of wax. बारीक मेणबत्ती. *a.* diminishing in thickness towards one end. निमुळता, चिंचोळा. *v. t. & i.* to be or make taper, grow gradually less. निमुळता करणें, निमुळता होणें,-होत जाणें. *T.-ness, n.,-wise, adv.*; *ta'peringly, adv.*

Tăp'estrў, *n.* (टॅ'पिस्ट्रि)—woven fabrics having pictures or designs worked into them. वेलबुट्टीदार कापड, भिंतीचे नकशीदार पडदे.-*tap'estried, a.*

Tăpĭō'ca, *n.* (टॅपिओ'का)—hard white grains prepared from casara for use as food. एक जातीचें कृत्रिम धान्य.

Tā'pir, *n.* (टे'पर्)—an American swine-like mammal. द. अमेरिकेंतील एक जातीचा रानडुकर. *-oid, a. & n.*

Tā'pis, *n.* (टॅपी, टॅपिस्)—*on the t.*, (of subject) under consideration. विचारांत, वादविवाद होण्याचा. [F,=carpet]

Tăp'pet, *n.* (टॅपेट्)—arm, collar, used in machinery to impart intermittent motion. झुला ठुकडा, पावडीचा दांडा.

Tăp'ster, *n.* (टॅप्स्टर्)—an attendant serving liquor at an inn. दारूच्या दुकानांतील (गिऱ्हाइकांना) दारू देणारा नोकर.

Tār, *n.* (टार्)—dark thick liquid distilled from wood or coal; (colloq.) sailor. डांबर, सर्जरस; खलाशी. *v. t.* to coat with tar. डामर लावणें,-फांसणें *T. makadam, tar'mac*, खडी, डांबर वगैरे रस्ता दुरुस्तीचें सामायन. *Tarred with the same brush* or *stick*, having the same faults. सारखेच दोष असलेला.

Tărantĕll'a, *n.* (टॅरन्टे'ला)—*elle*, (music for) rapid whirling S.-Ital. dance supposed to cure tarantism. द. इटा. नाचाचा मकार, नाचासाठीं वाद्य, *Taran'tism*, dancing mania, (गरगर) नाचण्याचें वेड,-लहर. *Taran'tula, n.* poisonous S.-Europ. spider. द. युरो. विषारी कोळी. [It.]

Tārb'ōōsh, *n.* (टा'र्‌-बूश)—a cap like fez. मुसलमानी टोपी.

Tārd'ў, *a.* (टा'र्डि)—slow to act, behind time, not being in season; (of person) reluctant. मंद, धिमा, सुस्त, चेंगट; नाखूष, नाराज. *T. reform*, रेंगाळत केलेली सुधारणा. *Tard'ily, adv.*;*-iness, n.*

Tāre, *n.* (टेअर्)—(usu. in pl.) common vetch grown as fodder; (*pl.*) noxious weeds among corn. घेवड्याच्या जातीची वैरणाच्या उपयोगी वनस्पति; हरळ, रान. 2. allowance made for weight of box etc. in ascertaining net weight; weight of motor vehicle without fuel or load. बारदान, आभंड (वजन); दुसरया मोटरगाडीचें निव्वळ वजन. *v. t.* to ascertain weight of (box etc.) (मालाच्या पेटीचें. भांड्यांचें) आभंड ठरविणें. *T. and tret*, बारदान, -आभंड,-(वजन) ठरविण्याचा गणिती नियम.

Tārg'et, *n.* (टा'र्गिट्)—a shooting-mark, esp. a round butt divided by concentric circles; (*fig.*) butt for scorn etc.; a targe, buckler or shield. निशाण, लक्ष्य; (अलं०) लक्ष्य; लहान संरक्षक (ढाल इ.). *T. practice*, चांदमारी.

Tă'riff, *n.* (टॅरिफ्)—a schedule of customs duties; law imposing such duties; table of fixed charges (at hotel, etc.); duty on goods. जकातींचा निरखनामा,-तक्ता; जकातीचा कायदा; किंमतीची यादी, दरांची यादी; (विशिष्ट) मालावरील जकात. *v. t.* to make tariff of duties on (goods); put a valuation on. जकातींचा निरखनामा करणें; ची किंमत ठरविणें,-चा दर ठरविणें. *Preferential t.*, reduced duties on imports from a favoured country. सवलतीची जकात. *Retaliatory t.*, (जीं राष्ट्रें आपल्या मालावर जकात बसवितात त्यांच्या आयात मालावर बसविलेली) प्रतिकारक जकात. *T. reform*, जकातपद्धतीची सुधारणा. *Railway, refreshment room, t.*, रेल्वेच्या भाड्यांची, खानावळींतील जिनसांच्या

**Thaw**, *v. i. & t.* (थॉ)—(of ice, snow) to release or escape from frozen state; (of weather, *It*–) to warm into liquid state or animation; (*fig.*) become less cold or stiff; cause to thaw. विरघळणें, पाझरणें, वितळणें; (हवा) बर्फ वितळण्याइतकी उष्ण होणें; उदासीनपणा सोडणें, प्रेमानें वागणें, वितळविणें, थंडपणा सोडणें, प्रेमानें वागण्यास लावणें. *n.* melting of ice or snow, cessation of frost. बर्फ वितळणें, विद्रावक हवा, (बर्फ वितळण्यास पुरेशी) हवेची उष्णता. *T. less,–y, aa.*

**The**, *a.* (दि bef. vowel, द bef. consonant, दी emphat.) to denote a particular person or thing. तो, ती, तें. *adv.* preceding comparatives (e. g. *the more—the better*). (तर–तम भावदर्शक, पूर्वी) जितकें जितकें—तितकें तितकें. *Let us drop t. matter*, आपण ती बाब,–गोष्ट,–सोडून देऊं. *T. lion, t. man in the street*, (*t. before sing. noun* showing species or class). सिंह (जात), सामान्य मनुष्य (वर्ग). *t. drink*, habit of drink. दारूचें व्यसन. 4 *as. t.* (or *a* or *per*) *yard*, (दर) वाराला चार आणे. *t. fair, t. beautiful*, ,beauty. सौंदर्य. *t more he gets t. more he wants*, जितकें त्याला अधिक मिळतें, तितकी त्याची हांव वाढते. *t. stage, t. platform*, नाटकाचा धंदा, वक्तृत्वकला.

**The'atre**, *n.* (थिॲटर्)—a building for dramatic performances; room or building for lectures, surgery etc.; dramatic literature or art; scene or locale *of*. नाटकगृह; (व्याख्यान,–शस्त्रक्रिया) गृह, शाला; नाट्यवाङ्मय, नाट्यकला, रंगभूमि; आखाडा, रंगभूमि, क्षेत्र.*T. of war*, युद्धाचें क्षेत्र,–ची रंगभूमि. *T.–goer,–going*, frequenter, frequenting, of *tt.* नाटकांचा शोकी,–शोक.

**Theăt'rical**, *a.* (थिॲट्रिकल्)—of, for, the theatre or acting; sensational, showy, affected. नाटकाचा, नाट्याचा, नाट्यकलेसंबंधीं, अभिनयाचा; नाटकी, नाटकी डौलाचा, बरपांगी. *n. pl.* dramatic performances. (हौशी लोकांनीं केलेलें) नाटक; नाटकांतील प्रवेश.*–celly, adv.*

**Thee**, See Thou.

**Theft**, *n.* (थेफ्ट्)—stealing, arceny. चोरी, चौरकर्म, चौर्य.

**The'ine**, *n.* (थीइन्)—the bitter principle found in tea. चहांतील कडू द्रव्य. *The'ic, a.* अतिशय चहा पिणारा.

**Their**, *a.* (देअर्)—of or belonging to them. त्यांचा, ह्यांचा. *Theirs*, pron. & pred. a. (देअर्झ्) त्यांचा. (या Theirs पुढें नाम येत नाहीं.)

**The'ism**, *n.* (थीइझम्)—belief in a divine creation and conduct of the universe. आस्तिक्यवाद, ईश्वरवाद.

**The'ist**, *n.* (थीइस्ट्)—one who believes in the existence of God. ईश्वरवादी, आस्तिक, ईश्वर आहे असें मानणारा.*–ic, a.* आस्तिक्यवादाचा,–मताचा.

**Them**, see They.

**Theme**, *n.* (थीम्)—a subject or topic; a school exercise on a set theme; (Mus.) melodic subject. विषय, प्रकरण, वादविषय; निबंध, प्रबंध; काव्यविषय, गाण्याचें कडवें,–पालुपद. *Thematic, a.* (Mus.) (गान–) विषयसंबंधीं, पदासंबंधीं.

**The'mis**, *n.* (थीमिस्)—(Gk Myth.) goddess of law and justice. ग्रीक न्यायदेवता.

**Themselves'**, *pron.* (देम्सेल्व्झ्)—emphatic form of they. ते स्वतः

**Then**, *adv.* (देन्)—at that time, after that, next; under those circumstances; accordingly. नंतर; तेव्हां; त्या स्थितींत; तदनुसार. *n.* that time. ती वेळ, तो समय. *a.* then-existing. त्यावेळी असलेला, तत्कालीन. *Now and then*, at one time and another, from time to time, कधींमधीं, मधून मधून, वारंवार. *Every now and t.*, वरचेवर.

**The'nar**, (थीनार्)—(anat.) palm of hand, sole of foot. हाताचा,–पायाचा,–तळवा.

**Thence**, *adv.* (देन्स)—from there; for that reason; from that. तेथून, त्या ठिकाणाहून; म्हणून; त्यापासून, तेव्हांपासून, त्यावेळेपासून.

**Thence'forth, Thence'-forward**, *adv.* (देन्स-फोर्थ, देन्स-फॉर्वर्ड)—from that time forward. तेव्हांपासून पुढें.

**Theo,–**, (थिओ–)—(in comb.=Gk *theos*) God. ईश्वर–; देव–.

**Theoc'racy**, *n.* (थिऑक्रसि)—government or a State in which God is the sovereign and religion the law. ईश्वरकर्तृकराज्य, ईश्वरसत्ताक राज्यपद्धति.*–cratic, a.* ईश्वरसत्ताक राज्याचा, राज्यपद्धतीचा.

**Theod'olite**, *n.* (थिऑडलाइट्)—surveying instrument for measuring angles. (जमीन) मोजणी करतांना दुर्बिणीच्या साह्यानें कोन मोजण्याचें एक यंत्र.

**Theog'ony**, *n.* (थिऑगनि)—an account or theory of the genesis of gods. देवोत्पत्तीचा इतिहास, देववंशावळ.

**Theolo'gian**, *n.* (थिऑलोजिअन्)—a person learned in theology, a divine. वेदान्ती, ब्रह्मज्ञानी.

**Theo'logy**, *n.* (थिऑलजि)—the science treating of God and His relation to man. ब्रह्मज्ञान, वेदान्त. *Natural t.*, सृष्टिसिद्ध धर्मशास्त्र. *Positive* or *revealed t.*, based on revelation. ईश्वरप्रणित धर्मशास्त्र. *Dogmatic t.*, सिद्धान्तरूप धर्मशास्त्र. *Speculative t.*, पौरुषेय धर्मशास्त्र. *Systematic t.*, सूत्रबद्ध धर्मशास्त्र.*–gical, a.* of, in, or for the study of theology. धर्मशास्त्रीय, वेदान्तपर, ब्रह्मज्ञानविषयक. *–gically, adv.,–'gize, v. t.* धर्मशास्त्रदृष्ट्या विचार करणें, धर्मशास्त्राचें स्वरूप देणें.

**Theoph'any**, *n.* (थिऑफनि)—a visible manifestation of a god to man. (देव) साक्षात्कार.

**The'orem**, *n.* (थीअरेम्)—(*Geom.*) a proposition to be proved; speculative truth; algebraical

or other rule, esp. one expressed by symbols or formulae. सिद्धान्त, प्रमेय; नियम, सारणी, सिद्धांत.

**Theoret'ic, (al),** *a.* (थिॲरे'टिक्,-कल)—of the nature of theory; speculative, unpractical. काल्पनिक, तात्त्विक; प्रयोगहीन, उपपत्त्यात्मक, पुस्तकी. *-cally, adv. Theoretics, n. pl.* speculative parts of a science etc. तात्त्विक ज्ञान.

**The'orist,** *n.* (थी'अरिस्ट्)—a person given to theoretics; holder of a theory. कल्पनाकुशल, तात्त्विक ज्ञानी; शास्त्रीय कल्पना काढणारा, उपपत्ति लावणारा.

**The'orize,** *v. t.* (थी'अराइझ्)—to form or state a theory. उपपत्ति बसवणें,-लावणें; तात्त्विक कल्पना करणें, -रचणें,-बांधणें.*-zation, n.*

**The'ory,** *n.* (थि'अरि)—a view held; supposition explaining something, exposition of general principles; the sphere of speculation as distinguished from that of practice. कल्पना, वाद, मत; कल्पना, तर्क, शास्त्र, उपपत्ति, तत्त्व, युक्ति; (Math.) उपपत्ति, नियम.

**Theos'ophy** *n.* (थिऑ'सफि)—any speculative system basing knowledge of nature on intuitional or traditional knowledge of God. ब्रह्मविद्या, तत्त्वज्ञान.*-ic,-ical, aa.* ब्रह्मविद्येचा, -विद्याविषयक.*-'ophist n.* ब्रह्मविद्यामंडळाचा सभासद, ब्रह्मवादी.*-sophize, v. i.*

**Therapeut'ics,** *n. pl.* (थेरप्यू'टिक्स)—curative branch of medicine. रोगशमनविद्या, औषधोपचारप्रकरण, भेषजप्रकरण.*-ic, a.* रोगनिवारक,-प्रतिकारक, औषधी-योजनेसंबंधीं.*-ical, a.,-ically, adv.*

**There,** *adv.* (देअर्)—in or at that place, at that point, thither; yonder. तेथें, तिकडे, त्या ठिकाणीं; पलीकडे. *n.* (after *prep.* only) that place or point. तें स्थळ, ती जागा. *int.* (drawing attention to anything. केवलप्रयोगी,-आश्चर्य, आनंद-दर्शक अव्यय). *He lived t. some years,* तो तेथें कांहीं वर्षें राहिला. *Go t. everyday,* दररोज त्या ठिकाणीं जात जा. *Lives somewhere near t.,* near that place. तो कोठेंतरी त्या जागीं राहतो *T.! what did I tell you?* पहा! मी तुला काय सांगितलें होतें? (पाहिलेंस!). *T.-after,* thenceforward. त्यानंतर, त्याप्रमाणें. *T.-at,* त्या ठिकाणीं, तेथें, त्यावेळीं; त्यामुळें. *T. in,* in it or them, in that respect. त्यांत; त्यासंबंधीं. *T. of,* of that, of this. त्याचा, तेथील, ह्याचा, येथील. *T. to,* त्या ठिकाणीं, तेथें. *T. with,* त्यावर, लागलाच.

**There'abouts,** *adv.* (दे'अर्-अबाउट्स्)—near the place or amount or time. आगेंमागें, जवळजवळ, अरतापरता, त्या सुमारास.

**There'by,** *adv.* (दे'अर्-बाय)—by that means or agency, in consequence of that. त्यामुळें, त्यायोगानें.

**There'fore,** *adv.* (दें'अर्-फोर्)—for that reason; accordingly, consequently. म्हणून; तदनुसार.

**There'upon,** *adv.* (दे'अर्-अपॉन्)—upon that or this, as an immediate consequence of; directly after that, immediately. त्यावर, त्यामुळें; लागलाच.

**There'withal,** *adv.* (दे'अर्-विदॉल्)—besides. शिवाय, खेरीज.

**Therm,** *n.* (थर्म)—amount of heat required to raise one gram of water at maximum density one degree centigrade; unit of coal-gas supplied. एक ग्राम पाणी एक अंश उष्ण करण्याकरितां लागणारी उष्णता, उष्णतेचा एकम्.

**Therm'al,** *a.* (थर्मल्)—of heat; of hot springs. उष्णतेचा; उन्हाळ्यांचा, ऊन पाण्याच्या झऱ्यांचा. *Thermal springs,* उन्हाळीं; *T.-units,* उष्णतेचा एकम्. *T. equator,* line along which greatest heat occurs on earth's surface. (भूगोलावरील) महत्तम उष्णतेची रेषा.

**Therm'ic,** *a.* (थ'र्मिक्)—of heat. उष्णतेचा.

**Thermantidote,** *n.* (थर्मॅ'न्टिडोट्)—apparatus for cooling the air, used in India. हवा (मान) थंड राखण्याचें यंत्र

**Thermi'on,** *n.* (थर्मा'यॉन्)—an ion emitted by an incandescent substance. (ज्वलत्पदार्थांपासून निघणारें) उष्णतामूलक.*-ic valve, n.* बिनतारी लहरींचें (मध्यें) टेलिफोन वगैरे ध्वनिकंपोत्पादक यंत्र.

**Thermodynam'ics,** *n.* (थर्मोडायनॅ'मिक्स)—science of the relation between heat and mechanical energy. उष्णतागति-संबंध-शास्त्र.

**Thermom'eter,** n. (थर्मॉ'मिटर्)—an instrument for measuring temperature. उष्णतामापक यंत्र, तपमापक. *Centigrade t.,* शतभाग तपमापक (यांत पाण्याचा थिजण्याचा व कढण्याचा अंश-बिंदु-अनुक्रमें ० व १०० असतो.); *Fahrenheit t.,* फॅरनहाइट उष्णमापक (अंश अनुक्रमें ३२ व २१२); *Reaumur t.,* रोमरचा उष्णमापक (अंश अनुक्रमें ० व ८०). *Clinical t.,* for taking temperature of the body. तापाची नळी, रुग्णोष्णमानमापकनळी. *Maximum t.,* महत्तम उष्णतामापक. *Minimum t.,* लघुतम उ० *Thermometric,-al, a.;-metry, n.* उष्णमापन-विद्या, तपमापनविज्ञान.

**Ther'mos,** *n.* (थ'र्-मॉस्)—*T. flask,* vacuum flask. (आंत ठेवलेल्या पदार्थाची) उष्णता कायम ठेवणारी बाटली, थर्मास.

**Ther'oid,** *a.* (थी'अराइड्)—(of idiot) having beastlike propensities. पशुवृत्ति. [Gk *ther,* wild beast]

**Thesaur'us,** *n.* (थीसॉ'रस)—(*pl.-ri*), a storehouse of information; a dictionary or encyclopaedia. ज्ञानभांडार, ज्ञानसंग्रह; शब्दसंग्रह, ज्ञानकोश.

**These,** *See* This.

**The'sis,** *n.* (थी'सिस्)—(*pl.-ses*), a proposition that one essays to prove; composition supporting thesis. साधक-बाधक प्रमाणांसह एखाद्या विषयाचें प्रतिपादन; निबंध, प्रबंध.

**Thes'pian,** *a.* (थे'स्पिअन्)—of Thespis, Greek dramatic poet of 6 th c. B. C.; of tragedy or

the drama. प्राचीन ग्रीक नाटककार थेस्पिस-संबंधीं; (शोकपर्यवसायी) नाटकाचा, नाट्यविषयक, नाटका-संबंधीं. *n.* an actor or actress. नट, नटी.

**Thews,** *n. pl.* (थ्यूझ्)—a person's muscular strength, sinews, muscles; (*fig.*) mental or moral vigour. शारीरिक सामर्थ्य, शक्ति; स्नायु; मानसिक,-नैतिक सामर्थ्य. *Thewed, thewless,-y, aa.*

**They,** *pron.* (दे)—*pl.* of he, she, it. ते, त्या, तीं. people in general. लोक, जन. *T. say,* असें म्हणतात, लोक म्हणतात, बोलतात (कीं). *Them, obj.* त्यांना. *Their, poss.* त्यांचा इ॰.

**Thick,** *a.* (थिक्)—of great depth between opposite surfaces; closely set; numerous, dense; hard to penetrate; turbid, muddy; stupid, dull; (of voice) muffled, indistinct; intimate. जाड, जाडगा, स्थूल; दाट, घट्ट, गच्च, निबिड, किर्र; आंत शिरण्याला कठीण; गढूळ, गदळ, राड; मंद, मंदबुद्धी; कुंद, दाटलेला; जानी, सलगीचा. *n.* the thick part of anything; a stupid person. जाड भाग, भर, ऐन जोर; मूर्ख,-बेडगळ-मनुष्य. *adv.* thickly; with thick voice. दाट, गच्च, लागोपाठ, भसाड्या,-जाड्या,-आवाजांत. *A board two inches t.,* दोन इंच जाडीचा फळा,-फळी. *T. hair, forest,* दाट केंस, निबिड अरण्य. *T. puddles,* गढूळ डबकीं. *Lay it on t.,* (colloq.) be profuse (in compliments). भरमसाट स्तुति करणें. *In the t. of it,* (युद्धाच्या) ऐनगर्दीत. *Through t. and thin,* under all conditions. कोठल्याहि परिस्थितींत, निश्चयानें. *Heart beats t.,* छाती लागली धडधडते. *Thick'ish, a. Thick'ly, adv*

**Thick'en,** *v. t. & i.* (थिक्न्)—to make or become thick. दाट करणें, घट्ट करणें, आवळणें, गोठवणें, दाट-घट्ट-होणें; जमणें, दाटणें; (आवाज, कंठ) दाटणें घाईवर येणें, गुंतागुंतीचा होणें.*-ing, a.* मिळण.

**Thick'et,** *n.* (थिकिट्)—a tangle of shrubs of trees closely set together. गर्द झाडी, रान.

**Thick'head,** *n.* (थिक्हेड)—a block-head. मंदबुद्धि मनुष्य.*-ed, a.* stupid. मंद, मंदबुद्धि. Also, *Thick-skulled,-witted, aa.*

**Thick'ness,** *n.* (थिक्निस्)—being thick; dimension other than length or breadth; a layer of material. जाडी, स्थूलता; जाडी; भर, पापुद्रा.

**Thick'set,** *a.* (थिक्-सेट्)—set closely together, having a short thick body. जवळ जवळ लावलेलें, मजबूत.

**Thick'-skinned,** *a.* (थिक्-स्किन्ड्)—not sensitive to criticism or rebuff. टीकेला न जुमानणारा, निगरगट्ट.

**Thief,** *n.* (थीफ्)—(*pl.-ves*) one who takes away by stealth what belongs to another; projection in wick of candle causing it to melt away. चोर, स्तेन, चोरटा, भामटा; मेणबत्तीच्या वातीचें टोंक.

**Thieve,** *v. i.* (थीव्)-to steal things. चोरी करणें, चोरणें, भामटेगिरी करणें.*-v'ery, n.* stealing. चोरणें, चोरी, चोरचाळे.*-vish, a.* चोरटा, भामटा.*-vishness, n.-vishly, adv.*

**Thigh,** *n.* (थाइ)—the leg above the knee. मांडी, जांघ, जांघड. *T. bone,* जंघास्थि, मांडीचें हाड. *-thighed, a.*

**Thill,** *n.* (थिल्)—shaft of cart or carriage. गाडीचा दांडा,-धूर. *Thiller, thill horse,* धुरेचा घोडा.

**Thim'ble,** *n.* (थिंब्ल्)—a metal finger-cap or cover for thumb used to push needle with; metal ring; (Mech.) short metal tube. अंगुस्तान, टोपण; धातूचें कडें,-अडकवणें; धातूचें टोपण. *T.-rig,* sharper's game at fairs, etc. with three thimbles, and a pea. (जत्रेच्या ठिकाणचा) हातचलाखीचा खेळ.*-rigger,* हातचलाखीचा खेळ करणारा.*-ful, n.* small quantity (of brandy) to drink. दारूचा घोट, घुटका.*-pie,* (शिक्षा म्हणून) अंगुस्तानानें डोक्यावर टिचक्या मारणें.

**Thin,** *a.* (थिन्)—of little thickness, slender, meagre; weak; easily seen through; not full, crowded or numerous; of watery consistence; (*fig.*) shallow, flimsy; (of line) narrow, fine; (*sl.*) uncomfortable. पातळ, बारीक; अल्प, अशक्त; झिरझिरीत; विरळ, तुरळक, थोडका; पातळ, पिळ-पिळीत, पाणचट; किरकोळ, हुलक; बारीक (रेघ इ.); अस्वस्थतेचा. *v. t. & i.* to make or become thin; remove some young fruit to allow the rest to grow well. पातळ, बारीक, सूक्ष्म-करणें,-होणें, तुरळक करणें; (झाडावरचीं बारीक फळें तोडून) पातळ करणें, तोडणें, खुडून टाकणें. *T. wire* or *sheet,* बारीक तार, पातळ पत्रा. *T. air,* विरळ हवा. *T. house,* तुरळक प्रेक्षक असलेलें नाटकगृह. *T. gruel,* पातळ कांजी. *T. excuse,* पोकळ सबब. *T. skinned, a.* sensitive. अति नाजूक (स्वभावाचा), अति भावनाशील. *T. captain,* एक प्रकारचें बिस्किट. *T. ness, n. thin'ly adv., thin'-nish, a.* पातळसर, बारीकसर.

**Thine,** *pron.* (possessive of thou). तुझा.

**Thing,** *n.* (थिंग)—any possible object of thought; a material object; a person or animal regarded in pity, or contempt, or affection; (*pl.*) the course of events, one's belongings. गोष्ट, विषय; वस्तु, पदार्थ; तिरस्करणीय,-प्रेमार्ह,-वस्तु, मनुष्य; (अने॰) व्यवहार, वस्तुस्थिति, परिस्थिति; मालमत्ता, चीजवस्त, कपडेलत्ते, सामानसुमान. *Not the t.,* ग्राह्य गोष्ट नव्हे, अमान्य. (*Am not feeling at all*) *the t.,* well. मला मुळींच बरें वाटत नाहीं. (Law) *tt. personal,* जंगम मिळकत. *tt. real,* स्थावर मिळकत. *Make a good t. of,* चांगला नफा मिळविणें. *Know a t. or two,* be shrewd. अनुभविक होणें, व्यवहारी असणें,-बनणें. *Do the handsome t. by,* चांगल्या रीतीनें वागविणें. *T. amy,-umajig,-umbob,-ummy, nn.* a person or thing whose name one forgets. ज्याचें नांव आपल्याला विसरायला होतें असा माणूस किंवा अशी वस्तु.

**Think,** *v. t. & i.* (थिंक्)—to have one's mind at work; hold the opinion; intend, expect; form the conception of. विचार करणें; वाटणें, मनांत आणणें, समजून असणें; विचार असणें, बेत असणें,

चिंतणें; कल्पना करणें, तर्क होणें, हेरणें, मनांत धरणें. *T. twice before doing,* avoid hasty action. कोणतीहि गोष्ट सहसा करूं नये. *T. about,* consider. (विषयीं) विचार करणें, शक्याशक्यता पाहणें. *T. aloud,* ज्या क्रमानें विचार मनांत आले तसे मोठ्यानें बोलून दाखविणें. *T. of,* (विषयीं) विचार करणें; तर्क करणें, कल्पना चालविणें; ध्येत करणें, विचार आणणें; आठवणें, स्मरण करणें. *T. little* or *nothing of,* consider insignificant,. क्षुल्लक मानणें, कस्पटासमान लेखणें. *T. out,* (plan etc.). पूर्ण विचार करून काढणें (युक्ति इ.), डोकें चालवून ठरविणें. *T. fit,* or *good,* choose to do (arbitrary or foolish thing). (विशेषतः एककल्ली किंवा मूर्खपणाची गोष्ट करण्याचें) ठरविणें, पसंत करणें. *Think'able, a.* विचारणीय, चिंतनीय.

**Think'er,** *n.* (थिंकर्)—one who thinks; (esp.) a person of philosophic mind. विचार करणारा, शोधक, कल्पक; तत्त्वज्ञानी.

**Think'ing,** *a.* (थिंकिंग)—reflective; given to independent thought. मनन,-चिंतन,-करणारा, विचारशील,-क्षम.

**Third,** *a.* (थर्ड)—next after second. तिसरा, तृतीय. *n.* तृतीयांश, तिसरा भाग, तिर्धेल.*-degree,* (U. S.) severe treatment of prisoner by the police to extort confession. कैद्याला गुन्हा कबूल करविण्याकरितां दिलेली कडक वागणूक,-छळ.*-man,* (क्रिकेट) एक क्षेत्ररक्षक.*-ly, adv.* तिसऱ्यानें, तिसऱ्यांदा.

**Thirst,** *n.* (थर्स्ट)—sensation or state of requiring drink; vehement desire *for* or *of* glory &c. तहान, तृष्णा; हांव, हव्यास, सोस. *v. i.* to crave *for* or *after*; be physically thirsty. हव्यास लागणें; तहान लागणें.

**Thirs'ty,** *a.* (थर्स्टि)—feeling thirst; craving for some satisfaction; (of soil) parched, suffering from lack of moisture; causing thirst. तहानेलेला, हव्यासी; रुक्ष, रखरखीत; तहान लागणारें, शोष लागणारें (काम).*-tily, adv.*

**Thirteen',** *a.* & *n.* (थर्टीन्)—three and ten, 13, XIII. तेरा, तेराचा अंक, आंकडा, तेरा ही संख्या. *The t. superstition, t.* brings ill-luck. तेरा ही संख्या, हा क्रमांक, अशुभ आहे अशी भोळी कल्पना.*-th, a. & n.* तेरावा.

**Thir'ty,** *a.* & *n.* (थर्टि)—three times ten, 30, XXX. तीस. *n* तिसाचा अंक, आंकडा; तीस (संख्या). *T. one,-two,-nine,* एकतीस, बत्तीस, एकूणचाळीस. *t.-two-mo, 32mo,* book with 32 leaves to the sheet. बत्तीसपत्री-सांच्याचें पुस्तक. *thirt'ieth, a. & n.* तिसावा. *t.-fold, a. & n.* तीसपट.

**This,** *a.* & *pron.* (दिस्)—*pl. these* (दीझ्), the person or thing close at hand or drawn attention to. हा, ही, हें. *T. is not fair,* हें तुझें करणें चांगलें नाहीं, ही गोष्ट चांगली नाहीं. *t. day,* today. आज. *All t. week,* ह्या सबंध आठवड्याभर. *Having been asking for it these three weeks,* गेले तीन आठवडे ह्याबद्दल मी विचारीत आहें. *This'ness, n.* हा-पणा, असें-असें असणें.

**Thi'stle,** *n.* (थिसल्)—kinds of prickly plant common as weeds; Scottish national emblem. एक प्रकारची कांटेरी वनस्पति; कांटेसुबक, उंटकटारा; स्कॉच लोकांचें राष्ट्रीय प्रतीक-चिन्ह.*-down, t. seed.* थिसलचें-कांटे धोतऱ्याचें-बीं. *Thi'stly, a.* (थिस्लि) overgrown with thistles. कांटेरी झुडुपें वाढलेलें.

**Thith'er,** *adv.* (दिदर्)—*to that place.* तेथें, तिकडे.*-wards, adv.*

**Tho',** *See* Though.

**Thōle,** *n.* (थोल)—*T.-pin,* a pin in the gun-wale of a boat serving as fulcrum for the oar. वल्हें अडकवण्याचा खुंटा, आटेला. *v. t.* (arch.) undergo, suffer (pain etc.); admit of. भोगणें, सहन करणें; मान्यता देणें.

**Thŏng,** *n.* (थांग)—a narrow strip of hide or leather, used as halter, reins, etc. चर्मपट्टी, वादी. *v. t.* to provide with, strike with, a thong. वादी लावणें, वादीनें मारणें.

**Thŏr'ăx,** *n.* (थॉरॅक्स)—the part of the trunk between the neck and the abdomen or tail; breast-plate (Gk.). छाती, वक्षःस्थल, वक्षःकोटर, उरःपंजर; छातीचें चिलखत, उरस्त्राण. *Thora'cic, a.* छातीचा, उराचा, वक्षःकोटरासंबंधीं.

**Tho'rium,** *n.* (थॉरिअम्)—radio-active metallic element, used in making gas mantle. (धुराच्या दिव्यांच्या टोप्या करण्याकरितां उपयोगी असें) थूर नांवाचें धातुरूप मूलद्रव्य.

**Thŏrn,** *n.* (थॉर्न्)—prickle on a plant; kinds of thorny shrub, hawthorn. कांटा, कंटक; कांटेरी झाड,-झुडुप, कांटेझाड. *A t. in one's flesh* or *side,* a constant source of annoyance. टोंचणी, शल्य. *Be, sit, on tt.,* be continuously uneasy. रुखरुख लागणें, साशंक असणें. *A bed of tt.,* कंटकशय्या (*lit. & fig.*). *T.-bill,-tail,* एक प्रकारचा गाणारा पक्षी *T.-less, a.* कंटकरहित, निष्कंटक.

**Thŏrn'y,** *a.* (थॉर्नि)—abounding in thorns; difficult to tackle, troublesome. कांटेरी; कंटकमय, गुंतागुंतीचा, त्रासाचा; जाचाचा, जाचणीचा.

**Tho'rough,** *a.* (थरो)—complete; radical; in all respects; out-and-out. पूर्ण, पक्का, निःशेष; सर्वस्वीं; पूर्णपणें; पारंगत. *adv. & prep.* (poet.) through. मधून. *n.* (hist.) uncompromising policy of Strafford and Laud. (पहिल्या चार्ल्स राजाचे प्रधान स्टॅफर्ड व लॉड्ड यांची) अरेरावी वागणूक. *T. bass',* science of harmony. स्वरमेलन (शास्त्र). *T.-going,* uncompromising, out and out. पुरा, पक्का, चिलंदर, अट्टल. *T.-paced, a.* practised (*fig.*). सर्व चाली शिकलेला (घोडा), अट्टल, पुरेपूर, पक्का. *Tho'roughly,* (थरलि) *adv.; Tho'roughness, a.* पूर्णपणा, पुरतेपणा.

**Tho'rough-bred**, *a.* & *n.* (थॅरोब्रेड्)—(of animal) of pure breed; (*fig.*) high-spirited. खऱ्या अवलादीचा, अस्सल रक्ताचा; पाणीदार.

**Tho'roughfāre**, *n.* (थॅरोफेअर्)—right of way; road not closed at either end. रस्त्याचा हक्क; रहदारीचा रस्ता. *No t.*, हा रहदारीचा रस्ता नाहीं (अशी पाटी).

**Thorp(e)**, *n.* (थॉर्प्)—a village. खेडें.

**Those**, *pl.* of That.

**Thou**, *pron.* (दाउ)—of 2nd pers. now replaced by *you*, except in addresses to God or in Quaker or dialect speech. (द्वितीयपुरुषीं एकवचनी) तूं. *v. t.* & *i.* to address (person) as thou, use *t.* instead of you. एकेरीवर येणें, अरेतुरे करणें.

**Though**, *conj.* (दो)—tho', *although*, and yet. जरी, यद्यपि. *What t. the way is (or be) long*, what does it matter etc. मार्ग दूरचा असला तरी कांहीं क्षिति-पर्वा-नाहीं. *As t.*, as if. जणूं काय.

**Thought**, *n.* (थॉट्)—thinking as a process or a faculty; a conception or mental image; (usu. pl.) what one thinks, one's opinion; subject of one's thought. विचार, मन, चिंतन, विचारशक्ति; कल्पना; विचार, मत; विचाराचा विषय काळजी, चिंता. *pa. t.* & *pa. p.* of Think *In t.*, meditating. विचारमग्न, ध्यानस्थ. *You are much in my tt.*, I often think of you. तूं माझ्या ध्यानींमनीं असतोस. *A t.*, *adv.* a little, somewhat. थोडासा, किंचित्. *Quick as t.*, अति त्वरेनें, वायुवेगानें. *Second tt.*, पुनः केलेला विचार, फेरविचार. *T. reader*, दुसऱ्याचें मन जाणणें,-ओळखणें, मनकवडा. *T. transference*, युगपद्भावनानुभूति. *T. wave*, विचारलहरी.

**Thought'ful**, *a.* (थॉट्-फुल्)—contemplative; engaged in meditation; giving signs of original thought; considerble. मननशील; कल्पक; विचारी.-*fully*, *adv.* विचारपूर्वक, मननपूर्वक.-*fulness*, *n.* विचारीपणा, विचारशीलता.

**Thought'lĕss**, *a.* (थॉट्लेस्)—careless of consequences; due to want of thought. अविचारी, मढ, मूर्ख, निष्काळजी; अविचारानें केलेलें. -*ly*, *adv.*;-*ness*, *n.* अविचारीपणा, मूर्खपणा.

**Thous'and**, *a.* & *n.* (थाउजन्ड्)—denoting the number ten hundred, 1000, M.; (loosely) many. एक हजार, सहस्र, दहाशें, दशशत; पुष्कळ, लाखों. *A. t. times easier*, लाखोपटीनें सोपें. *One in a t.*, rare or excellent one. लाखांत एखादा, लाख मनुष्य. *Made a t. and one excuses.* त्यानें असंख्य सबबी सांगितल्या.-*fold*, *a.* & *adv.* हजारपट, सहस्रपट,-पटीनें.-*th*, *a.* & *n.* हजारावा.

**Thrall**, *n.* (थ्रॉल्)—(*rhet.*, *poet.*) a bondsman, a slave (*of*, *to*), a serf; bondage, slavery. दास, गुलाम; गुलामगिरी, दास्य. *a.* (arch.) enslaved (*to*). (चा) दास झालेला,-बंदा. *v. t.* to enslave. गुलाम-दास-करणें.

**Thral'dom**, *n.* (थ्रॉल्डम्)—bondage. दास्य, गुलामगिरी.

**Thrăsh**, **Thrĕsh**, *v. t.* & *i.* (थ्रॅश्, थ्रेश्)—(*usu.* -*ash*) beat with a stick or whip, conquer, surpass; (usu.-*esh*) beat out grain from corn; (of paddle, wheel, branch) deliver repeated blows; (of ship) keep striking the waves. काठीनें,-चाबकानें,-मारणें, झोडपणें, कुथलणें, चीत पाडणें, मात करणें; (धान्याची मळणी करणें, झोडपणें, झोडणे; धोपटणें, सतत तडाखे मारणें; (प्रवाहाच्या, वाऱ्याच्या) उलट दिशेनें, लाटा कांपीत, जाणें. *T. out*, (*fig.*) arrive at (the truth, rhyme, etc.) by repeated trial. कीस काढणें, संशोधन करणें. *Threshing floor,-machine*, धान्य-मळणीचें खळें,-यंत्र.

**Thrăsh'er,-ĕsh'er**, *nn.* (थ्रॅशर्, थ्रेशर्)—a kind of shark; (U. S.) thrush; one who thrashes; a person, or machine, that threshes. एक जातीचा शार्क मासा; कोकिळ, सारिका (अमे॰), मारणारा, झोडणारा; (धान्य) झोडणारा, मळणारा, झोडण्याचें यंत्र.

**Thrăsh'ing**, *n.* (थ्रॅशिंग्)—a whipping, a sound drubbing; a defeat. चाबकाचा मार; पराभव.

**Thrasŏn'ical**, *a.* (थ्रॅसॉनिकल्)—bragging. बढाई मारणारा, बढाईखोर.-*ically*, *adv.*

**Thread**, *n.* (थ्रेड्)—a length of spun yarn flax, cotton, etc.; thin cord of twisted yarns; theme of argument, &c.; spiral part of screw; thin vein of ore. सूत, दोरा, धागा, सूत्र, तंतु; धागादोरा, अनुसंधान, कथासूत्र,-संदर्भ; (स्क्रूचा) आंटा, पेंच, गाळा; दोरा, *v. t.* to pass thread through (needle, beads); to make way through. दोरा ओंवणें; मधून मार्ग काढणें, धागा लावणें; रस्ता काढणें. *Has not a dry t. on him*, is wet through. चिंब भिजला आहे. *Gold t.*, *silver t.*, कलाबतू, जरतार. *To hang by a t.*, (of person's life, etc.) be in a precarious condition; (of momentous issue) be determinable either way. (जीवित) धोक्यांत असणें; पेंचांत असणें; अनिश्चित असणें. *Resume* or *take up the t. of*, (चें) कथासूत्र पुन्हां जुळविणें, अनुसंधान करणें. *Gather up the tt.*, (विषयाचे) धागेदोरे एकत्र आणणें,-जुळविणें, विषयाची जुळवा-जुळव करणें. *T.-lace*, तागाच्या सुताची फीत. *T.-needle*, children's game. 'सुई-धागा', मुलांचा खेळ. *T. worm*, सूत्रकृमि, सुतासारखा जंत (लहान मुलांच्या पोटांत होणारा). *Thread'y*, *a.*; -*d'iness*, *n.*

**Thread'bāre**, *a.* (थ्रेड्-बेअर्)—with nap worn off and threads showing; hackneyed. विरविरीत, फूल झडलेला, जीर्ण, झिरझिरीत; प्रचारांतील, शिळा, जुना.-*ness*, *n.*

**Threat**, *n.* (थ्रेट)—declaration of intention to punish or hurt; indication of coming evil. धाक, भय, भीति, (law) धमकी; भयसूचना.

**Threa'ten**, *v. t. & i.* (थ्रे'टन्)—to use a threat *to*; intimidate *with*; portend; (of evil) seem to impend. धमकी देणें, धाक घालणें; भविष्य सुचविणें, सूचना देणें, सूचक होणें; जवळ येऊन भिडणें, भेडसावणें, भय दाखविणें. *Threatened me with death*, मला ठार मारण्याची धमकी दिली. *Threa'teningly, adv.*

**Three**, *a. & n.* (थ्री)—one more than two, 3, III. तीन, ति-. *The t. R's*, reading, writing, arithmetic. वाचन, लेखन, हिशेबठिशेब (गणित). *Rule of t.*, त्रैराशिक. *T.-bottle man*, जुन्या पद्धतीचा पक्का दारुड्या. *T. colour process*, (तांबडा, निळा आणि पिंवळा या रंगांत) तीनरंगी चित्र बनविणें. *T. handed*, तीन हातांनीं; तिहाती; तिघांनीं खेळण्याचा. *T.-fold*, *a. & adv.* तिप्पट, तिहींचा, तिहेरी, तिघड. *T.-pence*, (थ्रे'पन्स्) तीन पेन्स (रक्कम). *T.-penny bit*, (थ्रे'-पनिबिट) तीन पेन्साचें नाणें. *T.-ply*, *n.* तिपदरी लांकूड, फळी, पुठ्ठा. *T. quarter*, *a.* (of protrait) कमरेपर्यंतच्या वरच्या भागाचें (चित्र), पाऊणपट चेहरा-चेहऱ्याच्या तीन बाजू-दाखविणारें (चित्र).

**Three'score**, *a.* (थ्री'स्कोअर्)—thrice twenty, sixty. साठ. *T. and ten*, age of 70, normal limit of life. अयुष्याची सर्वसाधारण सत्तर वर्षांची मर्यादा.

**Thremmatŏl'ogy̆**, *n.* (थ्रेमटॉ'लजि)—the science of breeding animals and plants. प्राणिसंवर्धन, -वनस्पतिसंवर्धन,-विद्या.

**Thrĕ'nody̆**, *n.* (थ्री'नडि)—*node*, song of lamentation. शोकगीत, मरशा. *Threnet'ic,-ical, threnodial, -dic, aa.*

**Thrĕsh**, *v. t. & i.* (थ्रेश्)—to separate the grain or seeds from corn by beating. झोडणें, मळणी काढणें.

**Thrĕsh'ing**, *n.* (थ्रे'शिंग)—act of beating out grain, process of threshing corn. झोडपणी, मळणी.

**Thrĕsh'ōld**, *n.* (थ्रे'शोल्ड्)—the plank or stone forming the bottom of a doorway; (colloq.) entrance. उंबरा, उंबरठा; प्रवेशद्वार, मूळारंभ, उपक्रम. *At the t. of a new century*, नवीन शतकाच्या मूळारंभीं. *Stumble at the t.*, (*fig.*) प्रथमग्रासे मक्षिकापातः.

**Threw**, *pa. t.* of Throw.

**Thrice**, *adv.* (थ्राइस्)—three times, (in comb.) highly. तीनदां, त्रिवार; पुष्कळ, अतिशय. *t. favoured*, पुष्कळ कृपेंतला,-मर्जींतला.

**Thrift**, *n.* (थ्रिफ्ट्)—saving ways, sparing expenditure, frugality, economical management; kinds of plant. काटकसर, मितव्यय, बेतबात व्यवस्था; एक वनस्पति, झाड.-*less*, उधळ्या.-*lessly, adv.*, -*lessness, n.*

**Thrif'ty̆**, *a.* (थ्रि'फ्टि)—economical; thriving. काटकसरी, मितव्ययी; भरभराटीचा, चलतीचा.-*tily, adv.*

**Thrill**, *n.* (थ्रिल्)—a nervous tremor due to intense emotion; a wave of sensation; a tremulous sound. शिरशिरी; स्फुरण, शिसारी; कंप. *v. i. & t.* to feel thrills or vibrate (*with*); quiver, throb, with emotion. शिरशिरी येणें किंवा आणणें; अंतःकरण हालवून सोडणें, खळबळवणें, थरारून सोडणें, हालून जाणें, कंप पावणें. -*ingly, adv.,-ingness, n.*

**Thrill'er**, *n.* (थ्रि'लर्)—(esp.) a sensational play or tale. मनोविकार उत्तेजित करणारें,-संक्षोभजनक नाटक, कथानक.

**Thrive**, *v. i.* (थ्राइव्ह्)—(throve, thriven), to prosper or be successful; (of animal or plant) to grow vigorously. भरभराट होणें, उत्कर्ष होणें; जोरानें वाढणें, जोमानें वाढणें. *Thriv'ingly, adv. -ingness, n.*

**Thro'**, **thro**, see Through.

**Throat**, *n.* (थ्रोट्)—front part of the neck; gullet, wind-pipe; passage or entrance. गळा, कंठ; अन्ननलिका, घसा, श्वासनलिका, अरुंद मार्ग,-वाट. *v. t.* to channel, groove. खांचणी पाडणें, खोदणें. *To cut one's t.*, कंठस्नान घालणें, गळा कापणें. *Take by the t.*, try to throttle. गळा आवळणें, मान आवळणें. *Words stuck in my t.*, तोंडावाटे,-ओंठावाटे,-शब्द निघेनात. *Sore t.*, घसा धरणें,-सुजणें. *Cut one's own t.*, आत्मघातकी वर्तन करणें. *Cut one another's tt.*, adopt mutually destructive policy. परस्पर-विघातक वर्तन करणें. *Lie in one's t.*, lie grossly. धडधडीत खोटें बोलणें. *Give person the lie in his t.*, एखाद्यावर धडधडीत खोटें बोलल्याचा आरोप करणें.

**Throat'y̆**, *a.* (थ्रो'टि)—(of voice) guttural, hoarsely resonant. कंठस्थ, घोगरा (आवाज). -*iness, n.*

**Thrŏb**, *v. i.* (थ्रॉब्)—(of heart, bosom etc.) to pulsate with abnormal force; (fig.) quiver, vibrate. उडणें, फुरफुरणें, धडधडणें; लवणें, स्फुरण पावणें. *n.* palpitation; a single beat of strong pulsation. धडधडणें; ठोका; स्पंद, स्पंदन. *Heart-tt.*, छातीचें धडधडणें,-ठोके. *Throb'bingly, adv.*

**Throe**, *n.* (थ्रो)—(*usu. in pl.*) a violent spasm, esp. those of childbirth, anguish. वेदना, तिडीक, प्रसववेदना, चिंता. *v. i.* to be in agony. तिडीक,-वेदना, -लागणें.

**Thrōne**, *n.* (थ्रोन्)—the chair of State for sovereign, &c.; the sovereign power. सिंहासन, तक्त, गादी; राजाधिकार, राजसत्ता *v. t.* to enthrone. सिंहासनावर,-गादीवर,-बसविणें; तक्तनशीन करणें. *came to the t.* गादीवर बसला, *lost his t.*, त्याचें राज्य (अधिकार, राज्यसत्ता) गेलें, तो राज्यभ्रष्ट झाला. *T. less, a.*

**Thrŏng**, *n.* (थ्रॉंग)—press of people, crowding (*of* people or things), a crowd. लोकांची गर्दी, गर्दी, समुदाय, जमाव. *v. i. & t.* to come in great numbers; to flock into. गर्दी करणें; एकत्र जमणें, दाटी होणें, गर्दी होणें.

**Thrŏs'tle**, *n.* (थ्रॉ'सल्)—the song-thrush; (*-frame*) machine for spinning wool, etc. एक गाणारा पक्षी, मदनसारिका; सूत कातण्याचा साचा.

**Thrŏt'tle**, *v. t.* (थ्रॉ'ट्ल्)—to compress the throat of; strangle, choke; control (steam, etc.) with throttle-valve. गळा दाबणें; नरडी आवळणें; (वाफ दाबणाऱ्या पडद्यानें) वाफेचें नियमन करणें. *n.* a throat, gullet; (*-valve*), a valve regulating supply of steam etc. in engine. गळा, अन्ननलिका; यंत्रांतील बाष्पनियामक पडदा.

**Through**, *prep.* (थ्रू)—from end to end or side to side of; between the sides of; by agency, means or fault of; by reason of. आरपार; मधून; कडून, मार्फत, द्वारा, मुळें. *adv.* through something; from end to end; (U. S.) finished. मधून; पार, आरपार; शेवटास, कडेस, कडेपर्यंत. संपूर्ण. *a.* going; (of travelling) going all the way without change of line etc. आरपार (जाणारा); ठेपी, न बदलतां जाणारी (गाडी इ.). (*fig.*) *went t. many trials*, पुष्कळ कसोटींतून तो यशस्वी होऊन पार पडला. *See t. a telescope*, दुर्बिणींतून पहा.. *Concealed it t. shame*, लाजेमुळें त्यानें तें (ती गोष्ट) झाकलें. *Would not let us t.*, आम्हांला (दरवाज्यांतून) आंत जाऊं देईना. *Read* (a book) *t. and t.*, पुन्हां पुन्हां (साद्यंत) वाचणें, पारायण करणें. *Look* one *t. and t.*, (एखाद्याला) न्याहाळून पाहणें. *A t. train,-ticket*, शेवटपर्यंत-थेट,-ठेपी जाणारी (आग-) गाडी,-ठेपचें तिकिट.

**Through'out**, *prep.* (थ्रु'आउट्)—from end to end of; in every part of. साद्यंत; शेवटपर्यंत, सर्व यावतींत. *adv.* right through, in all respects. सारखा, सर्वत्र, सर्व यावतींत. *Timber was rotten t.*, तें लांकूड जिकडे-तिकडे,-सर्वभर,-कुजलेलें होतें.

**Throw**, *v. t. & i.* (थ्रो)—(*threw*, थ्रू pa. t, *thrown* थ्रोन् pa. p,) to launch (an object) into the air with some force; to fling off (rider), hurl, cast; use as missile; (Crick.) throw ball with sudden jerking motion of elbow; (of wrestler etc.) bring to the ground; put (clothes) carelessly *on, off, over*; (of snake) cast skin; (of rabbits etc.) bring forth; make specified cast with dice; twist (silk etc.) into threads; shape on potter's wheel. फेंकणें, झुगारणें, जोरानें उडवणें; (खालीं,-दूर) फेंकणें; (दगड) हत्यार म्हणून मारणें; (क्रिकेट) खांदा उडवून चेंडू फेंकणें; जमिनीवर लोळवणें, खालीं पाडणें, जमीनदोस्त करणें; (कपडा) निष्काळजी-पणानें घालणें; टाकणें, फेंकणें; (सापाचें) कात टाकणें, मेंग टाकणें; (ससाचें, कबुतराचें) विणें, अंडीं घालणें; (फांशांनीं) नेमका डाव येणें; (रेशमाच्या) पीळ घालून धागा करणें, दोरा करणें; (कुंभाराच्या चाकावर भांड्याला) वाटोळा आकार देणें. *n.* throwing, being thrown; cast of dice; cast of fishing-line; distance a missile is thrown; (Crick.) bowler's illegitimately thrown ball; (Geol.) fault in strata; machine giving rapid rotary motion. फेंकणें, टाकणें, प्रक्षेपण; डाव; गळ टाकणें; फेंक, फेंकीचें अंतर; चेंडूफेंक्यानें नियमबाह्य टाकलेला चेंडू; भ्रंशविस्तार, भगविस्तार; जलद व वर्तुळाकार गति देणारें यंत्र. *To t. about*, चोहोंकडे उधळणें,-फेकणें. *T. away*, (*fig.*) घालवणें, गमावणें. *The advice was thrown away upon him*, was wasted. त्याला सांगितलेला सगळा उपदेश फुकट गेला, उपड्या घागरीवर पाणी असें झालें. *T. oneself down*, lie down. पडणें, आडवें होणें. *T. back*, मूळ वंशावर जाणें. *T. in* one's *lot with*, शीं (नफानुकसानींत) सहभागी होणें. *T. off*, (कपडे) काढून टाकणें; (मैत्री, ओळख) झिटकारणें, अव्हेर करणें; (आळस, आजार) झाडून टाकणें, दूर करणें; (कविता वगैरे) शीघ्र तयार करणें, हातावेगळें करणें; सुरवात करणें. *T. open*, open suddenly or wide; make accessible to all. सताड उघडणें; मुक्तद्वार ठेवणें, सर्वांना शक्य करणें. *T. out*, reject (bill etc.) by votes; put (batsman) out by throwing at wicket; embarass by interruption. (बहुमतानें) फेटाळणें; खेळाडूला बाद करणें (चेंडू यष्टीवर फेकून), अडथळा करून (वक्त्याला) गोंधळविणें. *T. over*, desert, abandon. (स्व-पक्ष) सोडून देणें; (पक्षांतून) फुटणें. *T. up*, (खिडकीचें झांकण) वर सारणें; (नोकरीचा) राजीनामा देणें; वांति करणें, होणें, उलटी होणें. *T.* one's *eyes up*, (भीतीनें इ.) डोळे टवकारणें. *T. stones*, (lit. & fig.) दगड मारणें; आरोप करणें, चिखल फेंकणें. *T. light on the matter*, चा उलगडा करणें. *T. me a rope*, माझ्याकडे दोरी फेंक. *A stone's t.*, (loosely). थोडकें अंतर. *Thrower*, *n.*

**Throw'ster** *n.* (थ्रो'स्टर्)—one who throws silk. रेशमाचा धागा काढणारा.

**Thrŭm**, *n.* (थ्रम्)—unwoven end of a warp thread left when the finished web is cut away; any loose thread or tuft. आंचळ्या, दशा; दशी, सुटा धागा. *v. t.* दशा लावणें, झालर लावणें. *Thrum'my*, *a.*

**Thrŭm**, *v. t. & i. & n.* (थ्रम्)—to play monotonously (*on* a stringed instrument), drum, tap, idly. तारा नवशिक्याप्रमाणें वाजविणें,-तोडणें, -छेडणें; सगान्त वाजवीत राहणें, ठकठक आवाज करणें.

**Thrŭsh**, *n.* (थ्रश्)—kinds of song-bird. युरोपांतील सारिका पक्षी, कोकिळ, मदनसारिका.

**Thrŭsh**, *n.* (थ्रश्)—throat disease, esp. of children; foot-disease in horses. (लहान मुलांचें) तोंड येणें (रोग), तोंडांतील मावा, जिभेवरील बुरशी (चा रोग); घोड्याच्या खुरांचा रोग.

**Thrŭst**, *v. t. & i.* (थ्रस्ट्)—to push, drive with force; make a lunge or stab with a weapon; intrude oneself, force (a person) *upon*; force one's way through. ढकलणें, रेटणें, खुपसणें, भोचणें, शिरकावणें, घुसडणें, भोसकणें; आगंतुकीनें घुसणें, घुसून मार्ग काढणें. *n.* a stab, sudden push; (Mil.) strong attempt to penetrate enemy's line or territory; remark aimed at a person; stress between two bodies. खुपसणें, ढकलणें; शत्रूची फळी फोडण्यासाठीं वेगाचा रेटा,-चाल; मर्मवचन, शब्दबाण; धक्का, ताण, ढुसकणी. *To t. oneself* or *one's nose*

*in*, obtrude, interfere. लुडबुड करणें, तोंड घालणें. *Home t.*, वर्मी लागणारा ( शाब्दिक ) घाव;-हल्ला.

**Thŭd** *n.* & *v. i.* (थड्)—sound made by impact of nonresonant things. जोराचा न घुमणारा आवाज, धप्प, धब्ब,-आवाज ( करणें, होणें ).

**Thŭmb**, *n.* (थम्)—one of the five fingers opposable to the other four. (हाताचा, मनुष्याचा किंवा जनावराचा) आंगठा. *v. t.* to soil or wear (book etc.) with thumb, handle or play awkwardly. (पुस्तकाचीं पानें आंगठ्यानें) मळविणें; (पिआनोवर) वांकडें तिकडें वाजविणें. *Under person's t.*, (च्या) मुठींत, ताब्यांत, *T. mark*, आंगठ्याचा छाप,-खूण. *T. nail sketch*, portrait of *t.* nail size; hasty word-picture. आंगठ्याच्या नखाएवढें चित्र; घाईघाईनें-काढलेलें-ओझरतें-शब्दचित्र. *T. screw*, instrument of torture for squeezing *tt.* आंगठ्यांना लावण्याचा चांप (शिक्षा म्हणून). *T. stall*, अंगुष्ठरक्षण,-रक्षक,-वेष्टण. *T. less, a.*

**Thŭmb'-print**, *n.* (थंम्-प्रिंट्)—impression of thumb taken as means of identifying a person. आंगठ्याचा ठसा.

**Thŭmp**, *v. t.* & *i.* (थम्प्)—to hit with a fist, pummel. बुक्के मारणें, धडक मारणें, बुदकणें, कुचकणें. *n.* sound of thumping; a blow with the fist. धडक, धडका, धपाटा; बुक्का, ठोसा. *Thum'ping, a.* फार मोठा, अजस्र. *Thum'per n.* big specimen; outrageous lie. मोठा, अजस्र मनुष्य; धडधडीत असत्य,-खोटें.

**Thŭn'der**, *n.* (थंन्डर्)—the sound made by lightning; thunderbolt; any loud rumbling; (*pl.*) authoritative censure or threats. मेघनाद, गडगडाट; वज्र, वीज, गर्जना; टीका, टीकास्त्र, गर्जना. *v. i. & t.* to emit thunder or thunders; utter or say out loudly. गरजणें, गाजणें, मेघगर्जना होणें; दणकावून बोलणें किंवा उच्चारणें, धडकावून उच्चारणें,-सांगणें. *Blood-and-t.*, (novel), sensational. खळमळ उडविणारी, भावनोत्पादक, चेतनोत्पादक. *It thunders*, मेघगर्जना होते. *T.-clap*, (*fig.*) crash *of t.*, वज्राघात. *T.-cloud*, गडगडाट करणारा मेघ, विजेचा मेघ. *T. storm*, storm with *t.* गाजता पाऊस, गाजती सर. *T.-less.*

**Thŭn'derbōlt**, *n.* (थंडर्-बोल्ट्)—lightning-flash regarded as a missile or destroying agency; punitive decree. वीज, वज्र; लष्करशाहीचा हुकूम.

**Thŭn'derer**, *n.* (थंन्डरर)—*the T.*, ग्रीक लोकांची ज्युपिटर देवता.

**Thŭn'dering**, *n.* (थंन्डरिंग्)—In vbl. senses; (colloq.) unusual, remarkable. गर्जना करणारा; फार मोठा, अतिशय, कडाक्याचा, कडकडाटाचा. *adv.* गर्जना करून, कडकडाटानें, कडाक्यानें.*-ly, adv.*

**Thŭn'derstrŭck**, *a.* (थंडर्-स्ट्रक्)—utterly taken aback by an event or discovery. धक्का, चकित, धक्का झालेला.

**Thŭn'derous**, *a.* (थंडरस्)—producing thunder, thundery, as loud as thunder. मेघगर्जनेइतका मोठा, कडकडाचा, गडगडाटाचा.*-ly, adv.*

**Thŭn'dery**, *a.* (थंन्डरि)—oppressive. कडाक्याचा, तीव्र, दडपणारा.

**Thūri'ble**, *n.* (थ्यूअरिबल्)—a censer. धुपाटणें, धुपारती.

**Thūrs'day**, *n.* (थंर्झ्-डि)—the fifth day of the week, गुरुवार, बृहस्पतिवार.

**Thŭs**, *adv.* (दस्)—in this way; accordingly; to this extent. अशा तऱ्हेनें, असा; इतका, एवढा. *T. far, t. much*, एथवर, एथपर्यंत, इतका, एवढा.

**Thwart**, *v. t.* (थ्वॉर्ट्)—to frustrate or foil. निष्फळ करणें, मोडा घालणें, विरुद्ध जाणें. *n.* a rower's seat. वल्हवणाराची बसण्याची जागा,-बैठक. *adv. & prep.* across., आडवा, तिरपा. *a.* transverse. आडवा.*-ingly, adv.*

**Thȳ**, *attrib. a.* (दाय्)—of or belonging to thee. तुझा. *Thine, pron. & a.* तुझा, त्वदीय. *It was thy fault, lift thine eyes.* तुझा अपराध होता, (तूं) आपली दृष्टि वर कर. *Thyself, pron.* (refl. & emph. form of *thee, thou*). तूंच, आपणच.

**Thȳl'acine**, *n.* (थिलॅसिन्)—a zebra-wolf; a Tasmanian carnivorous marsupial. (झेब्रासारखा) पट्टेरी लांडगा; तास्मानियांतील एक हिंस्र प्राणी.

**Thȳ'mol**, *n.* (थाय्मॉल्)—a powerful disinfectant. प्रखर जंतुनाशक.

**Thȳr'oid**, *a.* (थाय्‌राइड्)—(anat., zool.) shield -shaped; having shield-shaped markings. ढालीच्या आकाराचा; ढालीसारखे ठिपके असलेला. *T. cartilage*, large cartilage in larynx enclosing vocal chords. कंठस्थळींचा मृदु अस्थि, कंठकूर्चा. *T. gland*, or *body*, कंठग्रंथि, वाटापुग.

**Ti**, *n.* (टी)—(Austral.) kinds of tree with edible roots. एक जातीचें झाड.

**Tiar'a**, *n.* (टा'यरा)—ancient Persian conical cap; pope's diadem; jewelled band worn in the front of the hair by ladies. उभट टोपी; मुकुट; स्त्रियांचें केशभूषण.

**Tiār'a**, *n.* (टिआ'रा)—kind of turban, a conical cap; pope's diadem. निमुळती टोपी; पोपचा मुकुट.

**Tib'ia**, *n.* (टिबिआ)—(*pl.-ae*) the shin-bone; joint of leg. पायाचा नळा, नळी, नळकुटी.*-ial, a.*

**Tick**, *n.* (टिक्)—the beat or sound of a watch or clock; a slight sound; a small mark; kinds of insect parasite infesting animals; cover of bedding; stout striped cloth used for this; (colloq.) credit. घड्याळाचा टिकटिक असा आवाज; लहान आवाज; बारीक खूण, टीक; गोचीडें, कोळऊ; (उशीची, गादीची) पिशवी, खोळ, खोळीचें पट्टेरें कापड; उधार, खातें. *v. i. & t.* (of clock) to make tick; (*T. off*) set tick against; give tick, buy or sell on tick. टिक्

टिक् वाजणें,-आवाज करणें; (वर) खूण करणें, फुली करणें; उधारी (वर) देणें; उधारीनें विकत देणें,-विकत घेणें. *To,* or *on, the t.*, घड्याळ्याच्या ठोक्यावर, बिनचूक वेळेवर. *T. t.*, घड्याळ (लहान मुलांचा शब्द). *Buy goods on t.*, उधारीनें (पतीवर) माल विकत घेणें, खात्यावर घेणें.

**Tick'et,** *n.* (टिंकिट्)—a card or paper securing admission, &c. to its holder; (U. S.) list of candidates put forward by a party, (*fig.*) principle of a party; (Mil., sl.) discharge. (नाटकाचें, घोडीचें, आगगाडीचें) तिकिट, प्रवेशपत्र, परवाना; चिठ्ठी, खूण, अंकपट्टी, बीजक; (एखाद्या पक्षाच्या) उमेदवारांची यादी, पक्षाचें तत्त्व, -मत; कायम रजा, मोकळीक. *v. t.* to put ticket on. (किंमतीची) चिठ्ठी लावणें,-चिकटविणें. *Not quite the t.*, proper t. योग्य गोष्ट नव्हे. *T. porter*, परवानेवाला हमाल. *T. punch*, तिकिटें कापण्याचें यंत्र. *Return t.*, जाण्यायेण्याचें,-परतीचें,-तिकिट. *Season t.*, (ठराविक) मुदतीचें तिकिट.

**Tick'ing,** *n.* (टिं'किंग)—strong material for bed ticks. सतरंजीचें मजबूत कापड.

**Tic'kle,** *v. i. & t.* (टिं'कल्)—to stir sense of humour in; poke or knead in the ribs, &c., produce convulsive laughter. आनंदित करणें, खुष करणें; खुलवणें, गुदगुल्या करणें,-होणें. *n.* act or sensation of tickling. गुदगुल्या, आनंद, खुलावणूक.

**Tick'ler,** *n.* (टिं'क्लर्)—In vbl. senses; a feather used to tickle faces; puzzling or delicate question. गुदगुल्या करणारा; गुदगुल्या करण्याचें पीस; नाजूक प्रश्न, भानगडीची गोष्ट.

**Tick'lish,** *a.* (टिं'क्लिश)—sensitive to tickling; (of problem, affairs) difficult to handle. गुदगुल्या होणारा; नाजूक, भानगडीचा.-*ly, adv.*;-*ness, n.*

**Ti'dal,** *a.* (टा'इडल्)—of, due to, or affected by the tide. भरती ओहोटीचा; ठराविक वेळानें होणारा. *T. air*, श्वासाबरोबर फुफ्फुसांतून आंत जाणारी व बाहेर पडणारी हवा. *T. harbour*, भरतीचें बंदर. *T. river*, मुखापासून कांहीं अंतरावर भरतीचें पाणी जातें ती नदी, खाडी. *T. wave*, समुद्राची मोठी लाट; (*fig.*) जंगी प्रदर्शन (लोकमताचें वगैरे). *Ti'dally, adv.*

**Tide,** *n.* (टाइड्)—the rise and fall of the sea occurring twice in a lunar day; time, season; period of time; a trend of opinion or feeling. समुद्राच्या पाण्यांतील चढउतार, भरतीओहोटी; काळ, वेळ; समय, दिवस; मतप्रवाह, प्रवाह, दैव. *v. i. & t.* to be carried by the tide; get *over* (difficulty etc.). भरतीओहोटीबरोबर वाहणें,-जाणें; पार पडणें. *High t.*, भरती, भरती. *Low t.*, निचार. *Flood t.*, भरती. *Ebb t.*, ओहोटी, ओहोट. *Spring t.*, उधाण; उधाणाची मोठी भरती (अमावास्येला येते). *Neap t.*, भांग (भरती, अष्टमीला येते). *T. guage*, भरती मोजण्याची आंखलेली काठी. *T. lock*, lock between tidal harbour and basin behind it. भरतीचें दार. *T.-waiter*, बंदरावरील अधिकारी (गलबतांची पाहणी-तपासणी करणारा). *T. way*, भरतीनें होणारा रस्ता, भरतीचा मार्ग. *T.-less, a.*

**Ti'dings,** *n. pl.* (टा'इ-डिंग्ज्)—news received, information, intelligence. बातमी, समाचार, वार्ता, खबर.

**Ti'dy,** *a.* (टा'इडि)—neat, orderly, dressed with neatness; methodically arranged; (colloq.) pretty large; fairly well in health. सुबक, ठीक; व्यवस्थित, नीटनेटका; बराच, पुष्कळ, मोठा; (प्रकृतीनें) बरा, ठीक. *n.* a detachable cover for chair-back, receptacle for odds and ends. खुर्चीच्या पाठीचा अभ्रा; सटरफटर वस्तूंचें पात्र. *v. t.* make (*up*) neat, put in good order. नीटनेटका करणें, व्यवस्थित करणें,-ठेवणें,-लावणें. *A t. sum*, मोठी रकम, पुष्कळ पैसा. *Street t.*, रस्त्यावरील कचऱ्याची पेटी. *Ti'dily, adv.*; *Ti'diness, n.*

**Tie,** *v. t. & i.* (टाइ)—to attach, fasten with a cord; form into a knot or bow; restrict, bind (person to, *down* to); bind rafters by a cross-bar; make an equal score or run dead heat or draw game. दोरीनें बांधणें; गांठ मारणें; बंधन घालणें, आडव्या काठीनें बांधणें; सारख्या धांवा काढणें, सारखें धांवणें, खेळांत समसमान होणें, सारखा डाव करणें. *n.* a necktie; cord for unifying or connecting element; (*fig.*) thing that unites persons; rod, beam, holding parts of a structure together; (U. S.) rail-sleeper; (Mus.) curve set above notes to be played continuously; thing that hampers; draw or dead heat or equal score. गळपट्टी, नेक्टाय; बंद, बंधन, गांठ; लागाबांधा, धागादोरा; आडवा दांडा,-अटकर, आडवी तुळई; (रेल्वेच्या रुळांना जोडणारा) सिलिपाट, आडवा ओंडका; (एकदम वाजविण्याच्या सुरांवरील) वक्र खूण; अडचण, अडथळा; समसमान,-सारखा,-डाव. *To t. a person's tongue*, secure or compel his silence. (एखाद्याला) चूप बसवणें, ब्र काढण्याची-बोलण्याची-मनाई करणें. *T. up*, बांधून टाकणें, गोवून घेणें. *T. down*, restrain. गुंतवून घेणें, हातपाय बांधून टाकणें, नियंत्रण घालणें. *Tt. of friendship*, मैत्रीचें बंधन. *Play, shoot off, a t.*, सारखा डाव झाल्यानंतर (सामनेवाल्यांची सरशी ठरविण्याकरितां) पुढें डाव खेळणें. *T. up*, (U. S.) a strike, lock-out. संप, काम बंद पाडणें. *T. beam*, पेंचीची तुळई. *Ty'ing, pr. p.*

**Tier,** *n.* (टिअर्)—(*pl.*) two or more rows of things etc.; (sing.) one of such row. रांगा, रांग, ओळ, मजला. *v. t.* to pile in *tt.* ओळी लावणें, रांगा रचणें. *Tt. of cable*, दोरखंडाचें वेटोळें. *of two, three, four, tt.*, दुमजला,-ली, तिमजली, चार मजली.

**Tierce,** *n.* (टिअर्स)—old wine-measure; medium sized cask for wine; sequence of three cards; (Fencing) position for guard or thrust. जुनें दारूचें माप; मध्यम आकाराचें दारूचें पिंप; एकामागून एक असे तीन पत्ते; (मुष्टियुद्धांतील) एक पवित्रा.

**Tiff,** *n.* (टिफ्)—a slight quarrel between lovers or friends; a draught of liquor. लटकेसें भांडण, मित्र-

कलह; दारूचा घोट: *v. i. & t.* प्रेमकलह होणें; दारूचा घोट घेणें, आचमन घेणें, पिणें; फराळ करणें.

**Tiff'any**, *n.* ( टिफनि )—kind of gauzy silk. विरविरीत रेशमी कापड.

**Tiff'in**, *n. & v. t.* ( टिफिन् )—light meal, lunch. फराळ, उपाहार ( करणें ).

**Tige**, *n.* ( टीझ् )—shaft of column; stem, stalk. खांबाच्या वाटोळा दांडा,-भाग; देंठ. [ F ]

**Ti'ger**, *n.* ( टा'ग्-गर् )—a large striped feline beast of prey; a bully; smart small boy as groom; final burst of applause. वाघ, व्याघ्र, शार्दूल; आडदांड मनुष्य, घमेंड्यानंदन; चपराशी; अभिनंदनार्थ शेवटची आरोळी, गलका. *Work like a t.*, वाघासारखें ( क्रूरपणानें व झपाट्यानें ) काम करणें. *T.-cat*, kinds of smaller animal looking like tiger. वाघरूं, वाघट, वाघासारखें लहान जनावर. *T. eye, T.'s eye.*, a gem of brilliant lustre. अत्यंत पाणीदार रत्न,-मणि. *T. lily*, काळ्या ठिपक्यांचें गुलाबी फूल. *T. moth*, वाघाच्या कातड्यासारखें केसाळ पंख असलेलें पांखरूं,-पतंग. *Ti'gerish, a.* वाघासारसा क्रूर, हिंस्र. *Ti'gress, n. f.* वाघीण, व्याघ्री.

**Tight**, *a.* ( टाइट् )—close packed or firmly fixed; compact, well-knit; grappling; ( sl. ) drunk. तंग, ताठ, घट्ट; आंवळ, गच्च; ओडघस्तीचा, चणचणीचा; झिंगलेला, तर्र, लास. *n. pl.* tight garments as of an acrobat. तंग कपडा. *adv.* tightly. घट्ट, गच्च, जोरानें. *Air t.*, हवाबंद. *Water t.*, पाणी आंत येणार नाहीं असें. *T. lass.* नीटनेटकी,-नीटस,-दुणदुणीत,-सुबक. *T. rope.*, rope stretchad tight for the performer to walk on. नाडा, ताठ दोरखंड. *Become t. for money*, पैशाची चणचण भासणें. *Be in a t. place*, (*fig.*) बिकट परिस्थितींत सांपडणें,-असणें. *T. wad*, ( U. S. ) a stingy person. चिक्कू मनुष्य, कवडीचुंबक.

**Tight'en**, *v. t. & i.* ( टा'इ-टन् )—to make or become tight, to make more close, to straiten. आवळणें, घट्ट करणें किंवा होणें, ताठ करणें, ताणणें.

**Tile**, *n.* ( टाइल् )—a thin piece of burnt clay for roofing; ( colloq. ) silk-hat. कौल, जमिनींत घसविण्याची शोभिवंत फरशी; रेशमी ( साहेबी ) टोपी. *v. t.* to cover with tiles. कौलें घालणें,-घसविणें. *Have a t. loose*, ( *sl.* ) be rather mad. वेडसर असणें. *Ti'ler, n.* कौलें करणारा,-घसविणारा, कुंभार. *Ti'lery, n.* कौलांचा कारखाना.

**Till**, *prep & conj.* ( टिल् )—up to, as late as. पर्यंत, पावेतों, तागाईत. *T. now*, आतांपर्यंत, हाकाळपावतों. *T. then*, तेव्हांपर्यंत, त्याकाळापर्यंत. *Walk on t. you come to the gate*, वेशीशीं पोंचेपर्यंत चालत रहा.

**Till**, *n.* ( टिल् )—money-drawer in a shop-counter. ( दुकानांतील ) पैशांची पेटी, पैशाचा खण.

**Till**, *v. t.* ( टिल् )—to cultivate ( land ); to labour on. लागवड करणें, नांगरणें, जमिनीची मशागत करणें; परिश्रम करणें. *Tillable, a.;-age, n.* शेती, नांगरणी, लागवड.

**Till**, *n.* ( टिल् )—stiff-clay with boulders, sand etc. रेताड माती, दगडाळ माती. *Till'y, a.*

**Till'er**, *n.* ( टि'लर् )—one who tills, lever by which rudder is turned; shoot of plant springing from bottom of original stalk. नांगरणारा; सुकाणाची दांडी; मुळापासून फुटणारा अंकुर,-कोंब.

**Tilt**, *n.* ( टिल्ट् )—unlevel, sloping position; act of tilting with lance; ( also *t. hammer* ) heavy pivoted hammer used in forging. कलंडणी, कलतेपणा; भालाभाली, भालाइती, भालेकरोली; ढेकीसारखा जड घण. *v. i. & t.* to charge with lance at each other or *at* a mark (*fig.*); direct argument or satire *at* or *against*; assume or cause to assume sloping position, heel over; hammer with tilt; ( Geol. ) turn up at steep angle. भालाइती करणें, भाला खुपसणें; मुद्दा उलटवणें, विरुद्ध बाजूनें मुद्दा मांडणें, वर कठोर टीका ( निंदाव्यंजक टीका ) करणें; कलंडणें, कलंडवणें, कलतें होणें; घणानें ठोकणें; ( भू-स्तर,-थर ) एकदम वर उचलणें,-येणें. *Full t.*, at full speed, with full force. भरधांव, भर वेगानें. *Til'ter, n.* भालाईत. *T. yard*, भालाइतीचें मैदान. *At full tilt.* भरधांव.

**Tilt**, *n.* ( टिल्ट् )—covering of canvas etc. for cart. ( गाडीचें ) छप्पर, छत, चांदवा. *v. t.* छप्पर घालणें.

**Tilth**, *n.* ( टिल्थ् )—cultivation, tillage; depth of of soil caused by this. नांगरटी, नांगरणी; नांगरटीची खोली.

**Tim'ber**, *n.* ( टिं'म्बर् )—wood as material suitable for building purposes or carpentry; trees suitable for this; piece of beam; ( Naut. ) any of the curved pieces forming ribs of vessel; ( Hunting ) fences and gates. इमारती लांकूड, लांकडी काम, इमारती लांकडाचीं झाडें; तुळईचा,-फळीचा,-तुकडा; गलबताच्या सांगाड्याची वांकडी फळी, वांकडी तुळई; कुंपणें व फाटकें. *T. toes*, (*sl.*) a person with wooden leg; heavy-treading person. लांकडी पाय लावलेला मनुष्य; जड पायाचा मनुष्य. *Tim'bered, a.* लांकडी, लांकडांचा; जंगलांचा, अरण्यमय ( देश ). *Tim'bering, n.*

**Tim'brel**, *n.* ( टिं'म्ब्रल् )—a tambourine. ढोलकें.

**Time**, *n.* ( टाइम् )—duration, continued existence, a period with its events or characteristics; a season or distinguishable part of the year or day; a period with its events etc.; amount of time allowed, taken or available; an appointed interval, a breathing space; (*pl.*) so many reckonings of multiplicand; time of day as shown by clock; the present life; hour of delivery; musical duration. काळ, काल, वेळ; कालावधि; वेळ, दिवस, हंगाम; ( विशिष्ट ) कालखंड, विभाग; वेळ, फुरसत; मुदत, अवधि; ( अने० ) पट, वेळां,-दां; तास, वेळ, इहलोक, इहजन्म, आयुष्य, आयुर्मर्यादा; बाळंतपणाचा काळ; ताल. *v. t.* to choose right time for; appoint time for; ascertain the time taken by. काळ,-वेळ,-पाहणें; ची वेळ ठरवणें; काल,-वेळ,-मोजणें. *Assaults of T.* ( personified ), काळाचे ( कालपुरुषाचे ) आघात,

-तडाखे. *In the course of t.*, कालेंकरून, कालगतीनें. *The good old tt.*, पूर्वीचे सोन्याचे दिवस. *It will last our t.*, तें आमच्या जन्मभर (आयुष्यभर) पुरेल. *For the t. being*, तेवढ्यापुरतें, तात्पुरतें. *Now is your t.*, (opportunity). ही तुला चांगली संधि आहे. *Is near her time*, तिचे दिवस भरले, ती लवकरच बाळंत होईल. *Had a good time*, enjoyed myself. अगदीं चैन मारली,-झाली. *Spirit of the t.*, काळाचें वारें. *In the nick of time*, ऐन वेळीं, प्रसंगास. *At the same t*, त्याच वेळीं, तसेंच. *At tt*, now and then. अधूनमधून. *At one t.*, एकेकाळीं, पूर्वी. *From t. to t.*, occasionally. मधूनमधून, प्रसंगवशात्. *In t.*, वेळेवर. *In no t.*, क्षणांत, निमिषार्धांत. *Keep t.*, walk, dance, sing in *t.* तालबद्ध, तालसुरावर, चालणें, नाचणें, गाणें. (of clock) *keep good t.* बरोबर वेळ दाखविणें. *Out of t.*, अकालीं, बेताल (गाणें). *T. immemorial* or *out of mind*, प्राचीन काळ, स्मरणातीत काळ. *The t. of day*, hour of clock. (घड्याळांतील) वेळ. *Pass the t. of day*, भेटीगांठीं घेणें, रामराम करणें. *What t.*, (poet.) while, when. जोंपर्यंत, जेव्हां. *T. ball*, (वेधशाळेंत काठीच्या टोंकावरून ठराविक तास-वेळ-दाखविण्यासाठीं खालीं पडणारा) कालदर्शक गोळा. *T. bargain*, वायदा. *T. book, -card,-sheet*, (for recording workmen's hours of work). कामगारलोकांचे कामाचे तास मांडण्याचें पुस्तक,-तक्ता. *T. keeper*, one who records time; a clock or watch. वेळेची नोंद ठेवणारा; घड्याळ. *T. work*, (ज्या कामाचा तासावर हिशेब व मजुरी असते) असें तासावरचें काम. *Tim'er*, *n.* योग्य वेळीं (काम) करणारा; वेळ अवेळ पाहणारा. *Tim'ing*, *n.* वेळ, वेळा, योजलेली वेळ.

**Time'honoured**, *a.* (टा'इम्-ऑनर्ड)—venerable by antiquity. प्राचीन असल्याकारणानें आदरणीय, पुराणपूज्य.

**Time'piece**, *n.* (टा'इम्-पीस्)-a clock or watch. घड्याळ.

**Time'server**, *n.* (टा'इम्-सर्व्हर्)—a supple person; a selfish opportunist. रंग पाहून चालणारा, वागणारा; स्वार्थी, संधिसाधू मनुष्य. *T.—serving*, *a.* & *n.* काळवेळ पाहून,-रंग पाहून,-चालणें.

**Time'-table**, *n.* (टा'इम्-टेबल्)—synopsis of hours of work, starting and arrival times of trains, &c. वेळापत्रक.

**Time'ly**, *n.* (टा'इम्लि)—opportune, occurring at the right time, being in good time. समयोचित, योग्य, वक्तशीर.*-liness*, *n.*

**Tim'id**, *a.* (टि'मिड्)—faint-hearted, easily frightened; apprehensive. घाबरणारा, भ्याड, भितरा; बुजट, लाजरा.*-id'ity*, *n.*;*-idness*, *n.*;*-ly*, *adv.* भिऊन, घाबरून, लज्जेनें, लाजून, बुजून.

**Tim'orous**, *a.* (टि'मरस्)—timid, fearful of danger; shrinking or shy with timidity. भितरा, भ्याड; लज्जायुक्त.*-ly*, *adv*;*-ness*, *n.* भित्रेपणा, लाजाळूपणा.

**Tin'cal,-kal**, *n.* (टि'ङ्कल्)—unrefined borax. टांकणखार, सोहागा. [ Malay. f. Skr. *tankana* ]

**Tincto'rial**, *a.* (टिंक्टॉ'अरिअल्)—of or for dyeing, producing colour. रंगाचा, रंगविषयक, रंगोत्पादक.

**Tin**, *n.* (टिन्)—a white metal; a vessel of tin or tin-plate; (sl.) money. कथील, वंग; कल्हई; कथलाचें भांडें, पाडगा, जस्ताचा डबा. (attrib.) made of tin or of iron covered with tin. कथली, कथलाचा, जस्ताचा. *v. t.* to cover, coat, with tin; seal up (fruit etc.) in tins for preservation. कल्हई लावणें,-करणें,-काढणें; (खराब न व्हावें म्हणून) डब्यांत भरणें. *T. fish*, (Naut.) a torpedo. टॉर्पेडो, पाणसुरुंग, पाणसुसर. *T. foil*, *n.* कथलाचा वर्ख; *v. t.* कथलाच्या वर्खांत (साबण, तंबाकू) गुंडाळणें. *T. god*, object of mistaken veneration. खोटा देव, अंधभक्तीचा विषय. *T. hat*, (sl.) helmet. शिरस्त्राण. *T. Lizzie*, nickname for Ford motorcar. फोर्ड मोटरगाडीचें टोपणनांव. *T. plate*, sheet iron coated with tin. जस्ताचा मुलामा केलेला लोखंडी पत्रा. *T. man,-smith*, (जस्ती) पत्र्याचें काम करणारा, *Tin'ner*, कल्हईवाला. *Tin'ny*, *a.*

**Tinc'ture**, *n.* (टिं'क्चर्)—a tinge of colour; a smack (*of* some quality or accomplishment; medicinal solution of a drug. रंगाची छटा; स्वाद, पुणूक, अर्क, मद्यार्कनिर्मित अर्क. *v. t.* to tinge colour slightly; affect slightly *with* quality. रंगाची छटा देणें, किंचित् रंगविणें; (*fig.*) छटा देणें, रंग देणें.

**Tin'der**, *n.* (टि'न्डर्)—dry substance readily taking fire from spark. गूल गंधकाची काडी, पेटवण. *T. box*, चकमकीची पेटी, चकमक.*-y*, *a.*

**Tine**, *n.* (टाइन्)—a prong, tooth or point of a fork, comb, etc. (कांटा, फणी इ. चें) टोंक, दांत, अणकुचीदार भाग.

**Tinge**, *v. t.* (टिंज्)—to colour slightly (*with*); (*fig.*) modify by mixture (*with*). रंगाची छटा देणें; पुणूक असणें, भेसळ असणें. *n.* tendency to or trace of some colour; slight admixture of a feeling or quality. (रंगाची) छटा; पुणूक.

**Tin'gle**, *v. i.* (टिं'गल्)—to feel pricking or thrilling sensation, feel sharp pain. झणझणणें, मुंग्या येणें, भिरभिरणें, चुरचुरणें, विरविरणें.

**Tink'er**, *n.* (टिं'कर्)—itinerant mender of kettles, pans and the like; rough and ready worker; patching; kinds of fish, bird. जुनीं भांडीं नीट करणारा; झटपट दुरुस्ती करणारा, मोडीचा तांबट; सांधा लावणें, गावड मारणें; एक जातीचे मासे व पक्षी. *v. i.* to work indifferently. ओबडधोबड काम करणें, कसें तरी सांधडणें,-नीट करणें.*-ly*, *adv.*

**Tin'kle**, *n.* (टिं'कल्)—sound of or as of a small bell, quick sharp ringing noise. घण्टानाद, रुणझुण. *v. i.* & *i.* किणकिणणे, रुणझुणणें, रुणझुण आवाज करणें *Tink'ler*, a small bell. लहान घंटा.

**Tinni'tus**, *n.* (टिना'इटस्)—(Med.) ringing in the ears. कानांत गुणगुणणें (आवाज).

**Tin'sel**, *n.* (टि'न्सल्)—decorations of bright metal threads; tawdry brilliance; flashiness. खोट्या जरीचें कापड; खोटा कलाबतू, भपका; चकाकी,

चमक. (attrib.) flashy, cheaply splendid. भपकेबाज, खोटा, दिखाऊ, बेगडी. *v. t.* to adorn with tinsel. खोटा कलाबतू लावणें, खोटी झकाकी आणणें. *Tin'selled, pa. p. & a.*

**Tint,** *n.* (टिन्ट्)—a faint colour spread over a surface; a variety of a colour; set of parallel lines to give uniform shading. मजीक रंग, रंगाची झांक; समान छायादर्शक समांतर रेषा. *v. t.* to colour slightly or conventionally, tinge, wash with colour. दुसऱ्या रंगाची छटा देणें; रंगाचा हात देणें, *Red with* or *of a blue t.,* निळ्या रंगाची छटा असलेला तांबडा रंग. *Autumn tt.* of dying leaves. गळणाऱ्या पानांच्या पावसाळीं (रंगाच्या) छटा. *T.-less, a.*

**Tintinnā'bŭlum,** *n.* (टिन्टिनॅब्यूलम)—(pl.-*la*) small tinkling bell; rattle of small bells. किणकिणी घंटा; त्यांचा किणकिणाट (आवाज).-*bula'tion, n.* घंटांचा किणकिणाट.

**Ti'nў,** *a.* (टा'इ-नि)—very small. अति लहान, चिमुकला.

**Tip,** *n.* (टिप्)—the finer end of a thing, a small tapering point; a kind of brush used in gilding; small piece at end of thing, a piece of information as to probable winner of a race; a gift given to waiter, driver, etc.; a good dodge or recipe; slight glancing stroke (with cricket bat etc.); slight push; place where refuse is tipped. अणी, टोंक, अग्र; सोन्याचा (वर्ख उचलण्याचा) कुंचला; टोपण; (शर्यतीच्या घोड्यांची, व्यापारी दराची) गुप्त बातमी; बक्षीस, चिरिमिरी; निसरता टोला; लहानसा,-अल्पसा,-धक्का, ढकलणें; कचरा टाकण्याची जागा. *v. t. & i.* to put tip on; give tip to; strike ball (with side of bat etc.); tilt, incline; upset by inclining; give secret information about horse etc. ला टोपण लावणें; बक्षिसी-चिरिमिरी, देणें; निसरता टोला मारणें; कलतें करणें; वांकडें करणें, कलंडवणें; ढकलणें; कलतें करून ओतणें, -उपडें करणें; (शर्यती घोड्यांसंबंधीं) गुप्त माहिती देणें. *On the t. of the tongue,* जिभेवर (असणें, येणें), म्हणणार (असणें). *Miss* one's *t.,* fail in one's object. हेतु,-बेत,-फसणें. *T. up seat,* (नाटक, सिनेमा--गृहांतल्यासारखी) वरखालीं सरकत्या बैठकांची खुर्ची, सरकती बैठक. *T. and run,* (क्रिकेट) फलकाला (फळीला) चेंडू लागला तर धांवलें पाहिजे असा खेळ. *T. cat,* विटीदांडूचा खेळ. *T.-staff,* शेरिफचा अधिकारी, दंडधारी अधिकारी. *T. tilted,* (of nose) turned up at tip. उभट टोंकीचें (नाक), घोंडीवर चढलेलें नाक.

**Ti'pp'ĕt,** *n.* (टिपिट्)—covering of fur, etc. for the shoulders worn by women and by judge etc. लोकरीचें (खांद्यावर टाकण्याचें) उपवस्त्र.

**Tip'ple,** *v. i. & t.* (टि'पल्)—be given to drink, दारूची संवय असणें, सडकून दारू पिणें, झिंगणें. *n.* कडक दारू. *Tip'pler, n.*

**Tip'ster,** *n.* (टि'प्स्टर्)—one who gives tips about races etc. (घोडे-शर्यतींची वगैरे) खाजगी-गुप्त-माहिती पुरविणारा.

**Tip'sў,** *a.* (टि'प्सि)—unsteady in gait or speech with drink, drunk, intoxicated. दारूचा परिणाम झालेला, झिंगलेला, प्यालेला, छाकटा.-*sily, adv.*; झिंगून;-*siness, n.* छाकटेपणा.

**Tip'toe,** *n.* (टिप्-टो)—the point of the toe, the tip or end of the toe. पायाच्या बोटाचा शेंडा. *v. i.* to walk *t.* पाय खोंबे करून चालणें. *adv.* (*on t.*), पाय खोंबे करून, पायाच्या टोंकावर. *To stand on the t. of expectation,* (मनांत) मोठी आशा धरणें.

**Tip'top,** *n.* (टि'प्टॉप्)—highest point of excellence. कळस, सीमा, पराकाष्ठा. *a. & adv.* first-rate. अप्रतिम, पहिल्या प्रतीचा. *T. of a tree,* झाडाची-टिकाळी,-शेंडा.

**Tirāde',** *n.* (टिरे'ड्)—a strain of censure, long passage of declamation; (Mus.) diatomic run filling interval between notes. शिव्यांची लाखोली, गालिप्रदान, भरपूर निंदा; तान. [F, = long speech.]

**Tire,** *n.* (टायर्)—a metel rim enclosing felloe; rim-cover of rubber etc, (*arch.*) head-dress, attire. चाकाची धाव, रबरी चाकाचें कडें, टायर; पागोटें, पोषाख, कपडे. *v. t.* to put tire on (wheel); dress (hair), attire. (चाकाला) धांव, धांवेला रबरी वेष्टण, घालणें; (केस) सारखे करणें, कपडे घालणें, सुशोभित करणें.

**Tire,** *v. t. & i.* (टायर्)—to become unequal to or indisposed for further exertion, grow sick of; make sick of. दमणें, थकणें, कंटाळा येणें; छळणें, त्रास देणें, दमवणें, कांटा ढिला करणें, शिणवणें. *Tired, pa. t. & pa. p. & a.* दमलेला, थकलेला, शिणलेला, बेजार. *Tired'ness, n.*

**Tire'lĕss,** *a.* (टा'यर्-लेस्)—of inexhaustible energy, never getting fatigued. कधींहि न थकणारा, न दमणारा.-*ly, adv.*;-*ness, n.*

**Tire'some,** *a.* (टा'यर्-सम्)—trying to the temper; annoying; tedious. दमवणारा; त्रासदायक; कष्टप्रद, कंटाळवाणा, जिकिरीचा.-*ly, adv.*;-*ness, n.*

**Tir'ō,** *n.* (टा'इरो)—a beginner. नवशिका.

**'tis,** (टिझ्)—it is. (असें) आहे.

**Tiss'ue,** *n.* (टि'श्यू)—a textile stuff, a woven fabric; (Biol.) substance of an organ, fabric formed of cells and cell-products; (*fig.*) a network. विणीव कापड, जरीकापड; कला, शरीरघटक धातु, ऊति; जाळें, जाल. *A t. of lies,* असत्यजाल. *T. paper,* पातळ झिरझिरीत कागद. *Adipose t.,* मेदोमय धातु, ऊति. *Connective t.,* संधायक ऊति. *Muscular t.,* स्नायुमय धातु. *Nervous t.,* मज्जामय धातु *Retiform t.,* सरंध्र धातु. *Tiss'ued, a.*

**Tit,** *n.* (टिट्)—kinds of small bird; small horse, girl, child. लहान पक्षी; (इरदासी) तट्टू; लहान मूल,-मुलगी. 2. *T. for tat,* जशास तसें, ठोशास ठोसा, प्रतिकार.

**Ti'tan,** *n.* (टा'इटन)—(Gk Myth.) each of the giants, the children of Uranus and Ge;

the sun (*poet.*); a person far beyond others in genius of power; a huge person or animal. (ग्रीक पुराणांतील) दैत्य, राक्षस; सूर्य; अलौकिक बुद्धीचा किंवा सामर्थ्याचा मनुष्य; प्रचंड मनुष्य किंवा अन्य प्राणी. *The weary T.*, ब्रिटिश किंवा इतर मोठें साम्राज्य. *Titan'ic, a.* प्रचंड.

**Tit'bit,** *n.* (टिट्-बिट्)—a dainty morsel, piquant item of news etc. गोड घांस, सुग्रास, मनोरंजक वेंचा,-चुटका.

**Tithe,** *n.* (टाइद्)—a tenth part. दहावा हिस्सा, दशमांश, दहावा भाग; (ख्रिस्ती उपाध्याला दिलेला) उत्पन्नाचा दहावा हिस्सा. *v. t.* दहावा हिस्सा घेणें, *Not a t. of*, दहावा हिस्सा सुद्धां नाहीं.

**Tit'illāte,** *v. t.* (टिटिलेट्)—to tickle. गुदगुल्या करणें.*-tion, n.* गुदगुल्या;*-tor, n.*

**Tit'ivāte,** *v. t. & i.* (टिटिव्हेट्)—(colloq.) to adorn, smarten (oneself). नीटनेटकें करणें, तरतरी आणणें.

**Ti'tle,** *n.* (टाइट्ल्)—the name of a book or other work of art; heading of a chapter, &c.; word or phrase indicative of person's status; (law) right to ownership of property; just or recognized claim (*to*). (पुस्तकाचें वगैरे) नांव; सदर, प्रकरण, मथळा, पदवी, किताब, मालकी हक्क; हक्क, अधिकार. *Ti'tled, a.* having title of nobility. सरदारीची पदवी असलेला, किताबवाला.

**Ti'tle-deed,** *n.* (टाइटल्-डीड्)—a legal document establishing right to property. मालकी हक्काचें कागदपत्र, कबाला, कबाला.

**Ti'tle-pāge,** *a.* (टाइटल्-पेज)—the page of a book exhibiting its name, authorship &c. मुखपृष्ठ.

**Ti'tle-role,** *n.* (टाइटलरोल्)—part in a play that gives it its name (e. g. Hamlet). (नाटकाला ज्या पात्रावरून नांव दिलें असतें तें) प्रमुख पात्र, मुख्य नटाचें काम.

**Ti'tling,** *n.* (टाइटलिंग्)—impressing of title in gold-leaf on back of book. (सोनेरी वर्खानें पुस्तकाच्या पाठीवर उठविलेलें) पुस्तकाचें नांव.

**Tit'mouse,** *n.* (टिट्माउस)—(pl.-mice) kinds of small active bird. एक जातीचे लहान पक्षी.

**Titt'er,** *v. i. & n.* (टिटर्)—to laugh covertly; such a laugh. गालांतल्यागालांत हंसणें, बारीक हंसणें.*-'erer, n.*

**Tit'tle,** *n.* (टिट्ल्)—a small particle, minute part, small mark, an iota. लहान खूण, लेश, बिंदु, अणु. *Not one jot* or *t.*, लेशमात्र सुद्धां नाहीं.

**Tit'tle-tăttle,** *n. & v. i.* (टिट्ल्-टॅटल्)—gossip. बकबक, बडबड, गप्पा; बडबडणें.

**Titt'up,** *v. i.* (टिटप्)—to go mincingly; bob up and down, मचमच करीत जाणें, उड्या मारीत चालणें. *n.* prance, बागडणें, उडी.

**Tit'ūlar,** *a.* (टिट्युलर्)—such in name irrespective of the reality, nominal; giving or serving as a title. नामधारी, नांवाचा; पदवीसंबंधीचा. *n.* nominal holder of a benefice or office. नामधारी अधिकारी.*-ly, adv.*

**To,** *prep.* (टु)—[व्यंजनाच्या पूर्वी To चा उच्चार टोड्, स्वरापूर्वी टु, परवीं टू असा होतो]. in the direction of; as far as; not short of. स, ला, जवळ, पाशीं, कडे, पर्यंत; पेक्षां; हून. *House looks to the south,* घराचें तोंड दक्षिणेस आहे. *Told him to his face,* त्याच्या तोंडावर सांगितलें. *Fell to work,* कामाला लागला. *All to no purpose,* सर्व व्यर्थ गेलें. *Fought to the last gasp,* मरेपर्यंत लढला. *To the end of the chapter,* प्रकरणाच्या शेवटपर्यंत. *Not up to the mark,* जसा पाहिजे तसा नाहीं. *Made to order,* सांगितल्याप्रमाणें,-बरहुकूम,-केलेला. *Not to the point,* मुद्याला न धरून (सोडून). *Write to me, explain it to me,* मला लिही, तें मला समजावुन सांगा. *What's that to you?*, तुला काय त्याचें? [As sign of infinitive] *He began to sing* or *singing,* तो गाऊं लागला. *Declines to go,* जाण्याचें नाकारतो.

**To,** *adv.* (टू)—to or in the required position, to a stand-still; in closed state. उद्दिष्ट स्थळीं, पुढें; स्तब्ध, निश्चल; स्वस्थानीं, एकत्र. *The door is to,* दरवाजा बहुतेक बंद आहे,-किंचित् उघडा आहे.

**To and frō,** *phr.* (टु ॲंड फ्रो)—backwards and forwards; from place to place. इकडून तिकडे, मागेंपुढें, इकडे तिकडे; एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं.

**Toad,** *n.* (टोड्)—a frog-like reptile breeding in water but living chiefly on land; a detestable person. मोठा बेडूक; हलकट, तुच्छ, क्षुद्र मनुष्य. *T.-flax, n.* a yellow-flowered plant. पिवळ्या फुलांचें झाड,-वनस्पति. *T.-ish, a.*

**Toăd'eater, Toad'y̆,** *n.* (टोड्-ईटर, टोडि)—a sycophant, an obsequious parasite. आर्जवी, खुशामत्या, थुंकी झेलणारा, हांजी हांजी करणारा, तोंडपुजा. *T.-eating, a. & n.* *Toad'yism, n.* तोंडपुजेपणा, हांजीखोरपणा.

**Toăd'stōōl** *n.* (टोड्-स्टूल्)—kinds of umbrella-shaped fungus. कुत्र्याचें मूत, कुत्र्याचें छत्र, आळंबें, घोड्याचें मूत.

**Toast,** *n.* (टोस्ट्)—bread sliced and browned; the drinking of health; person esp. woman, thing etc. whose health is drunk. विस्तवावर भाजलेली रोटी; भाजून कुरकुरीत केलेला पाव,-पावाचे तुकडे; आरोग्यचिंतनार्थ केलेलें मद्यपान; आरोग्यपानाचा विषय. *v. t. & i.* to brown (bread) before the fire; warm oneself before the fire; drink to the health of in honour or respect. विस्तवावर भाकरी,-पाव,-भाजणें; विस्तवावर पाव वगैरे शेकविणें, शेक घेणें; आरोग्यचिंतनार्थ पिणें. *T.-master,* (सार्वजनिक भोजनप्रसंगीं) आरोग्यपानाचा अध्यक्ष.

*Toast'er,* पाव भाजणारा; विस्तवावर पाव गरम करण्याचें भांडें.

**Tōbăcc'o,** *n.* (टॅबॅ'को)—(pl.–*os*) narcotic leaves from which cigars and snuff are made. तंबाखू, तंबाखूचें पान. *T. plant,* तंबाखूचें झाड. *T. heart,* disorder of heart due to excessive use of tobacco. तंबाखूच्या अतिसेवनानें छातीवर होणारा दुष्परिणाम,–छातीचा विकार. *T. pipe,* चुट्टा, चिलीम.

**Tobăcc'ōnist,** *n.* (टबॅ'कोनिस्ट्)—a dealer in tobacco. तंबाखूचा व्यापारी, विड्या वगैरे तयार करणारा.

**Tobŏgg'an,** *n.* (टॉबॉ'गन्)—hand-sledge for sliding down snow-covered place. विनचाकाची (बर्फावरून चालणारी) हातगाडी. *v. i.* to go in *t.* बर्फावरून चालणाऱ्या गाडींतून जाणें.–*er, n.;*–*ing, n.*

**Tō'by̆,** *n.* (टो'बि)—a jug or mug in the shape of old man with three-cornered hat. वृद्धमनुष्याकृति (दारूचें) भांडें.

**Tŏc H,** *n.* (टॉक् एच्)—a society carrying on comradeship from the last great war. (मागील महायुद्धानंतर स्थापिलेली) विश्वबंधुत्वप्रसारक संस्था. [F *Talbot House* started at Ypres in memory of Gilbert Talbot]

**Tō'cō,** *n.* (टो'को)—(*sl.*) blows, punishment. घाव, तडाखे, शिक्षा, निर्भर्त्सना.

**Toc'sĭn,** *n.* (टॉ'क्सिन्)—alarm-signal on a bell, a bell rung as signal. भयसूचक घंटा, धोक्याची सूचना.

**Tŏd,** *n.* (टॉड्)—bush; mass of foliage; weight for wool; a fox. झुडूप; पान-पातेरा; लोकरीचें माप; कोल्हा.

**To-day',** *n. & adv* (टुडे')— this day, on or during this day. आज.

**Tŏd'dle,** *v. i.* (टॉ'ड्ल्)—to walk with short unsteady steps, as child learning to walk; take leisurely walk. (नवशिक्या बालकाप्रमाणें) धडपडत चालणें, पडतझडत चालणें; मजेंत फिरायला जाणें. *n.* a toddling child; a stroll. धडपडत चालणारें लहान मूल; सहल.–*r, n.*

**Tŏdd'y̆,** *n.* (टॉ'डि)—drink of whisky or other spirit; palm-tree sap or fermented liquor made from it. दारू, ताडी.

**Toe,** *n.* (टो)—any of the five members in which the front of a human foot ends; front of animal's foot; piece of iron under front of horse-shoe; end of head of golf-club; (Mech.) arm of valve-lifting rod of steam-engine. पायाचें बोट, पदांगुलि; (जनावराच्या) खुराचा पुढला भाग, गेन्चक; (घोड्याच्या) नालापुढचा लोखंडी तुकडा; गोल्फ-दांडूचें टोंक; बाष्पयंत्राच्या पडदा उचलणाऱ्या दांड्याचा हात. *v. t.* (sl.) to kick; touch with the toes; (Golf) touch faultily with the tip of club; furnish with toe, mend toe of (stocking or shoe). लाथ मारणें; (पायाच्या) बोटांनीं स्पर्श करणें; (गोल्फच्या खेळांत) दांडूच्या टोकानें चुकीनें स्पर्श करणें; आंगठा लावणें,–दुरुस्त करणें. *To tread on* person's *tt.,* offend his feelings. च्या मनोभावना दुखविणें. *The light fantastic t.,* dancing, नाचणें. *Turn up* one's *tt.,* (sl.) die. मरणें. *From top to t.,* पायापासून डोक्यापर्यंत, नखशिखांत, पूर्णपणें. *T. the line,* (*fig.*) conform to the requirements of one's party. आपल्या पक्षाप्रमाणें (नाइलाजानें) वागावें लागणें. *Toed,* पायाला बोटें असलेला. *Toeless, aa.*

**To'-fall,** *n.* (टु' फॉल्)—(poet.) close, decline (*of*). शेवट, अस्त.

**Tŏff,** *n.* (टॉफ्)—(sl.) a distinguished person, a swell. प्रसिद्ध पुरुष, सद्गृहस्थ; घमेंड्या.

**Tŏff'ee,** *n.* (टॉ'फि)—sweet-stuff of boiled butter and sugar. लोणी-साखरेचा एक गोड पदार्थ,–गोड वड्या,–खाऊ.

**Tō'ga,** *n.* (टो'गा)—the mantle of a Roman citizen; a plain piece of woollen stuff. रोमन रहिवाशाचा सैल झगा, लोकरी उपरणें. *d,*–*ed, a.*

**Togeth'er,** *adv.* (टुगे'दर्)—in company; simultaneously, at the same place. बरोबर, एकत्र; एकाच वेळीं, एकदम, एकवट. *T. with,* च्या सह.

**Tŏil,** *v. i.* (टॉइल्)—to work laboriously or incessantly *at, on, through;* to make slow painful progress. खपणें, मेहनत करणें, काबाडकष्ट करणें; जेरीस येणें; मेटाकुटीस येणें. *n.* labour with fatigue, severe labour; drudgery. कष्ट, मेहनत, परिश्रम; काबाडकष्ट, दगदग, यातायात.

**Tŏil'some,** *a.* (टॉ'-इल्-सम्)—involving toil, laborious, wearisome, fatiguing. त्रासदायक, कष्टदायक.–*ly, adv.;*–*ness, n.*

**Tŏil'ĕt,** *n.* (टॉइ'लिट्), **Toilette',** *n.* (ट्वाले'ट्)—process of arranging the hair, style or fashion of dress; a (style of) costume, attire, dress; (Med.) washing of a part after operation. वेणीफणी; पोषाखाची पद्धति, पोषाख; शस्त्रक्रियेनंतर भाग धुवून स्वच्छ करणें. *T. table,* पोषाखाच्या खोलींतील आरसा वगैरे असलेलें मेज. *T.-paper,* शौचाच्या वेळीं वापरण्याचा कागद. *To make* one's *t.,* केंस विंचरून पोषाख करणें,–कपडे चढविणें.

**Tŏils,** *n. pl.* (टॉइल्ज़्)—net, snare. जाळें, फांस. *Taken in the tt.,* जाळ्यांत-फासांत-पकडलेला.

**Tō'ken,** *n.* (टो'कन्)—indication, symptom; distinctive mark, or guarantee. चिन्ह; लक्षण; विशेष खूण, ओळख, यादगिरी, बिल्ला. *In t. of,* चें चिन्ह म्हणून, च्या स्मरणार्थ. *T. money,* coins of higher nominal than intrinsic value. (मौल्यकापेक्षां) अधिक दर्शनी किंमतीचें नाणें. *T. cut,* (लोकसभेंत सरकारी पैशाच्या मागणीला केलेली) सूचक-दर्शक,–कपात.

**Told,** *pa. t. & pa. p.* of Tell.

**Tŏl'erable,** *n.* (टॉ'लरेब्ल)—not beyond endurance; fairly good. सहन करण्याजोगा; साधारण चांगला, मध्यम, माफक, कामचलाऊ.–*ably, adv.,*–*ableness, n.*

Tŏl'erance, *n.* (टॉ'लरन्स्)—tolerant temper or ways, sufferance, endurance. सहनशक्ति, सहिष्णुता.

Tŏl'erant, *a.* (टॉ'लरन्ट्)—disposed to tolerate others or their opinions, favouring toleration; broadminded. सहन करणारा, सहिष्णु; मोठ्या मनाचा.

Tŏl'erāte, *v. t.* (टॉ'लरेट्)—to put up with, endure, permit; (Med.) sustain use of (drug etc.) without harm. सहन करणें, सोसणें, परवानगी देणें; क्षेपणें; मानवणें, दुरुपयोग न होणें.

Tŏlerā'tion, *n.* (टॉलरे'शन्)—tolerating, esp. the recognition of free thought and practice in religious matters. सहन करणें, सहिष्णुता; सोशिकपणा, सर्वधर्मसहिष्णुता. *Act of T.*, (इंग्लंडांतील इ. स. १६८९ चा) धर्मसहिष्णुतेचा कायदा.-*ist, n.*

Tōll, *n.* (टोल्)—charge payable for permission to pass a barrier; grain retained by miller as compensation for grinding. जकात, दस्तुरी, कर; (धान्य दळणाऱ्या) गिरणीवाल्यानें दळण्याचें भाडें म्हणून घेतलेला धान्याचा भाग. *v. i.* take or pay toll. दस्तुरी घेणें,-देणें *T. thorough*, taken by town for use of highway, bridge etc. रस्त्याची, पुलाची (वापरणावळीची) दस्तुरी. *T. bar,-gate*, दस्तुरी (चा) नाका. *T. booth*, (Sc.) town-gate. (दस्तुरी चुकविणाऱ्यांसाठीं) तुरुंग, कोठडी. *T. house*, house of a toll-collector. नाकेदाराचें घर. *To take t.*, (*fig.*) abstract a portion of. च्या हिस्सा ठेवून घेणें,-काढून घेणें.

Tōll, *v. t. & i.* (टोल्)—to sound (a bell) with slow succession of strokes; strike (hour) or announce or mark (death) thus. राहून राहून वाजणें, हळू हळू घंटा वाजवणें; (तासाचा) टोला पडणें,-ठोका वाजणें; घंटा वाजवून (एखाद्याच्या मरणाची) सूचना देणें. *n.* tolling sound (of bell). घंटेचा नाद, नाद.

Tolū', *n.* (टॉलू')—a S.-Amer. tree and balsam. (द. अमेरिकेंतील) एक वृक्ष, त्याचा सुवासिक धूप,-चीक; -वृक्षनिर्यास. *Toluene, toluol, n.* liquid with smell like benzene and burning taste, yielding many compounds. एक रासायनिक द्रव पदार्थ.

Tŏm, *n.* (टॉम्)—(T) abbr. of Thomas; a male animal, esp. a male domestic bird or cat. टॉमसचा संक्षेप टॉम्; नर-पक्षी, बोका, मोठें (नर) मांजर. (*t.-cat*). *T., Dick and Harry*, ordinary common place people. सटरफटर,-सामान्य,-लोक. *T.-boy*, a wild romping girl. घोडी, घोडदेवता, उडाणटप्पू मुलगी. *T.-noddy*, a blockhead, fool. मठ्ठ, ठोंब्या, बेंडसर. *T.-tit*, kinds of small bird. लहान पक्षी.

Tŏm'ahawk, *n.* (टॉ'मॅहाक्)—war-axe of N.-Amer. Indians. (उ. अमेरिकेंतील रेड-इंडिअन लोकांची) लढाऊ कुऱ्हाड *v. t.* to kill or or strike with *t.*, criticize savagely. कुऱ्हाडीनें ठार मारणें,-हाणणें; निष्ठुर टीका करणें, वाभाडे काढणें.

Toma'tō, *n.* (टमा'टो)—(pl.-*oes*) (a plant with) pulpy red or yellow fruit. टामाटो झाड, फळ [f Sp.]

Tomb, *n.* (टूम्)—a grave, burial-vault; sepulchral monument. मेताचा खड्डा, मेत पुरण्याची जागा; थडगें, कबर छत्री. *v. t.* थडग्यांत ठेवणें, पुरून टाकणें. *The t.*, (*fig.*) death. मरण, मृत्यु. *T. stone*, memorial stone placed on grave. मृताच्या स्मरणार्थ थडग्यावरची शिळा,-स्मृतिलेख. *T.-less, a.*

Tōme, *n.* (टोम्)—a large book or volume. मोठें पुस्तक.

Tŏm'fōol, *n.* (टॉ'मफ़ूल्)—a great fool; a silly fellow. महामूर्ख; मूर्ख मनुष्य; यःकश्चित् क्षुद्र मनुष्य. *v. i.* to play the fool; act in trifling manners. वेडाचार करणें, मूर्खासारखें वागणें.-*fool'ery, n.* महामूर्खपणा; विदूषकी चेष्टा, नकला.

Tŏmm'ÿ, *n.* (टॉ'मि)—(*sl.*) food; (Mech.) a wrench or turn-screw. अन्न; टाप पिळण्याचें यंत्र. *T. Atkins*, ब्रिटिश सोजीर,-शिपाई. *T. rot*, (*sl.*) nonsense. मूर्खपणा, वेडेपणा (ची बडबड). *T. shop*, पाव-रोटीवाल्याचें दुकान. *Soft t.*, (naut.) मऊ किंवा ताजी भाकरी.

To-mŏ'rrow, *n.* (टु-मॉ'रो)—the day after to-day. उद्यां.

Tŏm'tŏm, *n.* (टॉ'म्-टॉम्)—a native Indian drum; gong. डमडम वाद्य; तास. *v. i.* to beat tomtom. तास वाजवणें. [f. Hind. *tamtam*, imit.]

Ton, *n.* (टन्)—a measure of weight, 20 cwt.; unit of measurement for ship's tonnage, 100 cub. ft, or carrying capacity, 40 cub. ft.; (colloq.) large number or amount. वीस हंड्रेडवेटचें एक वजन, २२४० पौंडांचें वजन, टन; १०० घनफुटांचें (जहाजाच्या मापाचें) परिमाण, किंवा ४० घ. फू. भरतांडीचें परिमाण; पुष्कळ,-मोठी,-संख्या, मोठें माप. *Metric t.*, १००० किलोग्राम. *Tt. of people*, असंख्य लोक. *Tt. of times*, अनेक वेळां, असंख्य वेळां.

Ton, *n.* (टन्)—fashion. शिष्टसंप्रदाय. [F]

Tō'nal, *a.* (टो'नल्)—of tone or tones; of tonality. सुराचा, स्वराचा, स्वरांचा, ध्वनिसंबंधीं; परस्पर स्वरसंबंधाचा; (चित्राच्या) रंगछटांचा. *Tonal'ity, n.*

Tōne, *n.* (टोन्)—quality, strength or character of a sound; musical sound; modulation of voice to express emotion, &c.; stress on one syllable of word; proper condition of the bodily organs; tint or shade of colour; prevailing character of morals, sentiments, etc.; (photog.) colour of finished positive picture. स्वर, आवाज, नाद, ध्वनि; मूर्च्छना; भावनादर्शक स्वरभेद, स्वर, हेल, शरीराची सुस्थिति, नेहमींची स्थिति, प्रकृतिस्वास्थ्य; उठाव, मेळ, चालू स्थिति,-भावना,-रंग; प्रकाशलेखाचा रंग. *v. t. & i.* to give desired tone to; modify the tone of; (Mus.) tone (instrument); be in harmony with; (photog.) give or receive altered colour in finishing by means of chemical solution. हेल काढून बोलणें; स्वर जमवणें; सूर लावणें; जुळणें, मिळणें; प्रकाशलेखाचा रंग (रासायनिक द्रवांत) खुलवणें. *Heart tt.*, छातीचे ठोके. *Half* or *quarter t.*, स्वरांश, श्रुति. *T. down*, to soften colouring of (picture); render less confident; become softer. (रंग) फिका करणें; नरम करणें, कमजोर करणें; मृदु होणें. *T. up*, to give

receive, higher tone, character or vigour. (रंग) खुलविणें; प्रकृति सुधारणें; नीति सुधारणें, पळ पाढविणें. *Tone'lessness, n.*

**Tŏngs**, *n. pl.* (टॉंङ्ज़्)—kinds of two-limbed gripping implement. (निखारे उचलण्याचा) चिमटा, गावी, सांडशी. Also, *a pair of tt. Would not touch* (repulsive person or thing) *with a pair of tongs,* लांबून सुद्धां शिवणार नाहीं,-स्पर्श करणार नाहीं.

**Tongue**, *n.* (टंग)—muscular organ in the mouth; faculty or manner of speech or speaking; language of a nation; tongue-like piece, in shape or function (clapper of bell, index of balance, vibrating slip in reed of some musical instruments, jet of flame, a promontory, etc.). जीभ, जिव्हा, रसना; बोलण्याची शक्ति, भाषण, बोली, भाषणपद्धति; (देश-) भाषा, बोली; जिभेसारखा तुकडा, -खी वस्तु, जिभली; (घंटेचा) लोळा, लोळी; (सुर-वाद्याची) जिव्हाळी; कांटा; अग्निशिखा,-जिव्हा; भूशलाका, भूशिर. *v. t. & i.* to use tongue in playing the flute etc. (मुखवाद्यें) जिव्हाळीनें वाजविणें. *To put out* one's *t.*, जीभ बाहेर काढून दाखविणें (वेडावण्यासाठीं, वैद्यकीय परिक्षेसाठीं). *Put, speak with,* one's *t. in* one's *cheek*, speak ironically, humour one's hearer. व्याजोक्तीनें बोलणें, ऐकणाऱ्याला खुलावणें, शब्दांनीं खूप,-गार,-करून सोडणें. *Keep a civil t. in* one's *head*, avoid rudeness. उद्धटपणा टाकणें, नम्रपणानें बोलणें. *Have lost* one's *t.*, be too bashful. अति लाजाळूपणानें तोंडांतून शब्द न निघणें. *Find* one's *t.*, recover power of speech. बोलूं लागणें, (गेलेली) वाचाशक्ति पुन्हां येणें. *Give* or *throw t.*, (of hounds) (सावजाचा वास लागतांच) भुंकूं लागणें. *Hold* one's *t.*, be silent. गप्प बसणें, तोंडाला खीळ घालणें. *Wag* one's *t.*, वाटेल तसें बरळणें. *On the tt. of men,* much talked of. पुष्कळांच्या तोंडचा विषय असलेला. *Fur* or *dirt of the t.*, जिभेवरील बुरशी (रोगचिन्ह). *A long t.*, फार बडबडणारी,-लवलव करणारी-जीभ. *Mother t.*, मातृभाषा, मायबोली. *Slip of the t.*, जिव्हादोष, जीभ चळणें. *T. bone*, जिव्हास्थि.

**Tongue'-tie**, *n.* (टं'ग्टाइ)—an impediment in speech due to shortness of fraenum of tongue. (जीभ आंखूड असल्यामुळें) बोलतांना होणारा अडथळा, बोलतांना अडखळणें.-*tied*, incapable or slow of speech, (*fig.*) debarred from speaking out. आंखूड जिभेचा, बोलतांना अडखळणारा; मुस्कुटदाबी केलेला.

**Tŏn'ic**, *n.* (टॉनिक्)—(med.) tending to restore bodily tone, bracing; of the key-note. बलवर्धक, पुष्टिकारक; (मुख्य) सुराचा. *n.* a tonic medicine or agency; (Mus.) key-note. पुष्टिकारक औषध, शक्तिवर्धक-बलवर्धक-औषध, मुख्य सूर. *T. accent*, स्वराघात. *T. sol-fa*, musical notation. सारेगम. *Tonic'ity, n.* (शरीर-) स्वास्थ्य.

**To-night'**, *n. & adv.* (टु-ना'इट्)—the coming or present night. आज रात्रीं, आज रात्रौ, या रात्रीं.

**Tō'nite**, *n.* (टो'नाइट्)—a powerful gun-cotton explosive. भयंकर स्फोटक द्रव्य,-पदार्थ.

**Tŏnk**, *v. t.* (टॉङ्क्)—(*sl.*) to hit hard, defeat easily. जोरानें मारणें,-फेंकणें; सहज पाडाव करणें.

**To'nnage**, *n.* (ट'नेज)—ship's cubic content or carrying capacity; total freightage of a country's merchant-marine; charge per ton on freight. जहाजाची माल नेण्याची शक्ति, टनी वजन, टनी दास्तान; एकंदर जहाजांचें टनी वजन,-दास्तान; दर टनामागें द्यावा लागणारा खर्च, दर टनीं भाडें. *T. deck*, जहाजाचा,-बोटीचा,-दुसरा मजला.

**Tonn'eau**, *n.* (टॉ'नो)—rounded rear body (containing seats) of some motor-cars. कांहीं मोटरगाडींचा मागचा वर्तुळाकार भाग. [F. lit. cask]

**Tonŏm'eter**, *n.* (टनॉ'मिटर्)—an instrument for measuring pitch of tones. (वाद्याचें) स्वरमापक यंत्र.

**Tŏn'sil**, *n.* (टॉ'न्सिल्)—one of the two oblong glands at either side of the back of the mouth. घशाच्या दोहोंबाजूला असलेली गांठ, गलग्रंथि, अमृतकळा. *Tonsilli'tis, n. inflammation of tonsils.* जलग्रंथींची सूज,-दाह. *Ton'sillar, a.*

**Tŏn'sure**, *n.* (टॉ'न्शर्)—shaving of the head or of a patch on the crown; (*pl.*) admission to holy order. क्षौर, मुंडन, चूडाविधि; उपाध्यायदीक्षा देणें. *v. t.* to subject to tonsure. मुंडन करणें, क्षौर करणें.

**Tŏntine'**, *n.* (टॉन्टी'न्)—loan or fund the surviving subscribers of which receive annuities increasing as they become fewer. वर्गणीदारांनीं उभारलेला फंडाचा एक प्रकार.

**Tōō**, *adv.* (टू)—in addition; as well; moreover; in an excessive degree. ही, पण, देखील, आणखी; सुद्धां; शिवाय; अतिशय, फारच, अत्यंत. *T. much, T. much of a good thing,* असह्य. ['*Too*' is not used to qualify vb.]

**Took**, *pa. t. of* Take.

**Tōōl**, *n.* (टूल्)—a mechanical instrument; a person used to forward another's purposes. साधन, शस्त्र, हत्यार; बाहुलें. *v. t. & i.* to dress (stone) with chisel; impress design on (leather book-cover); (*sl.*) drive or convey or go (in carriage). (दगड) तासणें; (पुस्तकाच्या चामडी-पुठ्यावर) दाबून वेलबुट्टी वगैरे काढणें; हांकलणें, चालवणें; (गाडींत) बसून मजेंत (फिरावयाला) नेणें,-जाणें. *Carpenter's, gardener's, tt.*, सुताराचीं,-माळ्याचीं,-हत्यारें. *Machine t.*, यंत्रानें चालणारें-यांत्रिक-हत्यार. *The tt. of* one's *t.*, (*fig.*) धंद्याचीं साधनें. *Tool'er, n.* stone-mason's broad chisel. पाथरवटाची पटाशी,-छिनी. *Tool'ing, n.* दगड तासणें; पुस्तकाच्या चामटीवेष्टणाची कडांची वेलबुट्टी,-नक्षी.

**Tōōth**, *n.* (टूथ्)—(*pl. teeth*) any of the set of bone-like bodies, rooted in the jaws and used esp. in biting; tooth-shaped projection or thing. दांत; दांता, दांत, फणा, खांच. *v. t. & i.* to furnish with teeth; (of cog-wheels) inter-lock. दांते पाडणें, खांचा पाडणें, दांते आणणें; दाते एकमेकांत

अडकणें. *Wisdom t.*, अक्कलदाढ. *False, artificial, t.*, t. made by dentist. कृत्रिम दांत, बसवलेला दांत. *To cast thing in person's tt.*, reproach him with it. एखाद्या गोष्टीमुळें (एखाद्याची) निर्भर्त्सना,-कान-उघाडणी,-करणें. *In the tt. of*, (opposition etc.), च्या विरुद्ध (दिशेनें); (ला) न जुमानतां. *Armed to the tt.*, completely armed. (शस्त्रास्त्रांची,-साधनांची) जय्यत तयारी असलेला, सुसज्ज. *Cut* one's *eye-tt.*, व्यवहारज्ञान शिकणें,-मिळविणें, शहाणपण मिळविणें. *By the skin of* one's *tt.*, narrowlly (escape). कसेंबसें निभावणें, मरतां मरतां वांचणें. (*Fight, struggle,*) *t. and nail*, with utmost effort. शिकस्त करून, यत्नांची पराकाष्ठा करून. *From the tt. outwards*, insincerely. वरवर, तोंडदेखणें. *Show* one's *tt.*, दांतओंठ चावणें. *T. brush*, दांत घांसण्याचा कुंचला. *T. comb*, जवळ जवळ व बारीक दांत्यांची फणी. *T. pick*, दांत कोरणें. *T. powder*, दांतवण. *Toothed, Tooth'less, aa., tooth'let, n.*

**Tōoth'āche**, *n.* (टूथ्-एक्)—ache in the tooth. दंतशूळ, दांतदुखी.

**Tōoth'some**, *a.* (टूथ्-सम)—(of food) delicious. रुचकर, चवदार, चमचमीत.-*ly, adv.*;-*ness, n.*

**Tōoth'ful**, *n.* (टूथ्फुल्)—small drop of brandy etc. मद्याचा घोट.

**Tŏp**, *n.* (टॉप्)—the summit or the upper part or the surface of something; the highest place or rank; cover, lid; the upper part, leaves etc., of a plant grown for the root; (Naut.) the platform round head of lower mast serving to extend topmost shrouds; (*pl.*) metal buttons plated etc. only on face; bunch of hair, fibres, etc. esp. as measure = 1½ lb. शिखर, शेंडा, वरचा भाग, माथा, मस्तक; अगदीं वरची जागा, श्रेष्ठ पदवी,-दर्जा; झांकण, टोपण, सरपोस; शेंडा, वरचीं पानें, पाला; लहान डोलकाठीच्या शेंड्याजवळील फळी; (वरतीं) मुलामा दिलेलीं धातूचीं बटणें; (दीड रत्तल वजनाचा) केंसांचा,-तंतूंचा,- समुदाय. *a.* of or at or on the top. वरचा, टोंकाचा, सर्वश्रेष्ठ, उच्च. *v. t. & i.* to cover top of or crown *with*; cut off top of (tree); surpass; be at the top of; reach the top of (hill etc.) शिखरावर असणें,-राहणें,-बसणें; शेंडा छाटणें; (वर) ताण करणें, सरशी करणें, मागें टाकणें; सर्वांत पुढें,-श्रेष्ठ,-असणें; शिखर, माथा चढून जाणें,-गांठणें. *At the t. of the tree*, झाडाच्या टिकाळीला,-शेंड्यावर; (*fig.*) (धंद्यांत वगैरे) सर्वश्रेष्ठ, पहिल्या जागेच्या,-मानाच्या. *On the t. of*, in addition to. शिवाय, आणखी. *Gilt t.* (of book), सोनेरी रंगाची (पुस्तकाच्या पानांची) कडा. *At the t. of his voice*. शक्य तेवढ्या मोठ्यानें ओरडून. *From t. to toe*, नखशिखांत, वरपासून खालपर्यंत. *At t. speed*, भरधांव. *T. boots*, boots with tops. (पायाच्या पोटरीसभोंवार भिन्नरंगी पट्ट्यांचे) उंच शिकारी बूट. *T. coat*, overcoat. वरचा सैल अंगरखा, वरचा कोट. *T. dress*, जमिनीच्या पृष्ठभागावर खत घालणें. *T.-gall'ant*, (टॉपगॅलन्ट, टगॅलन्ट) (दुसऱ्या) उंच डोलकाठीवरचें व शिडावरचें शीड, डोलकाठी, दोरखंडें. *T. hat*, उंच रेशमी टोपी. *T. heavy*, apt to topple from being over-weighted above; (*fig.* of scheme, machinery, etc.). शेंड्याकडे भारी,-वजनदार,-न पेलण्याजोगा. *T. knot*, डोक्या-वरील फितीची गांठ, केंसांचा झुबका, तुरा, शेंडी. *T. mast*, mast next above the lower mast. (दुसरी) उंच डोलकाठी. *T.-sail*, (-सल्) square sail next above lowest. (खालच्या शिडाच्या) वरचें चौकोनी शीड. *Topp'er, n.* उंच टोपी; (व्यापारी) दर्शनी उत्तम उत्तम वस्तु (फळें इ.). *Topp'ing, a.* excellent. अप्रतिम, सुंदर, सर्वोत्कृष्ट; -*ly, adv.*

**Tŏp**, *v. t. & i.* (टप्)— to be at the top of; to surpass. शिखरावर चढणें; मागें टाकणें.

**Tŏp**, *n.* (टॉप्)—a toy of wood or metal. भोंवरा, भौरा, गिरिभोंवरा. *T-shell*, भोंवऱ्यासारख्या कवचाचे-शिंपल्याचे-मासे.

**Tō'pāz**, *n.* (टो'पॅझ्)—a precious stone of various colours, esp. yellow; kinds of humming bird. पुष्पराग, पीतस्फटिक; एक जातीचे पक्षी.

**Tōpe**, *v. i.* (टोप्)—to drink to excess. खूप दारू पिणें, झिंगणें. *To'per, n.* दारुड्या, दारूबाज.

**Tōpe**, *n.* (टोप्)—kind of small shark. लहान मगर-मासा.

**Tŏph, Tō'phus**, *n.* (टॉफ्, टो'फस्)—gouty deposit of calcareous matter. वातरक्त रोगामध्यें (संधिवातांत) होणारा चुन्याच्या खड्यासारखा क्षारसंचय.

**Tō'pĭarў**, *a.* (टो'पिअरि)—of the clipping of trees etc. into fantastic shapes. नानाप्रकारच्या चित्रविचित्र आकृतींत झाडेंझुडपें काढण्यासंबंधीं (कला). [L. *topiarius*, . landscape gardener.]

**Tŏp'ĭc**, *a.* (टॉपिक्)—subject of conversation or theme of · discourse. बोलण्याचा किंवा वादाचा विषय, प्रकरण.

**Tŏp'ĭcal**, *a.* (टॉ'पिकल्)—having reference to current events; (med.) affecting a part of the body. प्रचलित विषयांविषयीं, चालू विषयासंबंधीं, विशेष स्थानिक, शरीरांतील विशिष्ट भागासंबंधीं.

**Tŏp'mōst**, *a.* (टॉप्-मोस्ट्)—uppermost. अगदीं वरचा, शेंड्याचा, शिखरावरचा.

**Topŏg'raphў**, *n.* (टपॉ'ग्रफि)—local geography; features of a district or description of them; such features; (Anat.) mapping surface of body with reference to parts beneath. विशेष स्थलवर्णन; कोणत्याहि भागाचें अगदीं बारीकसारीक वर्णन; स्थलवर्णनविद्या; (अंतर्गत शरीररचनादर्शक) शरीराचा नकाशा काढणें. *Topog'rapher*, विशिष्ट स्थलवर्णनवेत्ता,-कार. *Topograph'ic, aa.* स्थलवर्णन-विषयक.-*ically, adv.* स्थलवर्णनविद्येच्या दृष्टीनें. [Gk *topos*, place; *graphein*, describe.]

**Topŏ'nўmў**, *n.* (टापॉ'निमि)—study of the place-names of a region. स्थलनामांचें संशोधन, स्थलनाम-विद्या.

**Tŏp'ple**, *v. i. & t.* (टॉ'पल्)—to be unsteady *or hang as if about to fall; to fall* or cause to fall. पडण्याच्या बेतावर असणें; पडणें, कोसळणें, तोंडावर पडणें.

**Tŏpsўtŭrv'ў**, *adv. & a.* (टॉप्सिट'र्व्हि)—upside down, in inverted position or way; in confusion. उलटापालटी, उलटसुलट. *n.* घोंटाळा, गोंधळ.*-dom, n.*

**Tor**, *n.* (टॉअर्)—a hill, rocky peak. टेंकडी, खडकाळ शिखर.

**Tŏrch**, *n.* (टॉर्च्)—an inflammable stick or rope that can be carried as a light. धूर, मशाल, दिवटी, पोत, दिवा. *T. of Hymen*, passion of love. प्रेमविकार, अनुराग, मदनबाधा. *Electric t.*, विजेचा (लांबट फिरविण्याजोगा) दिवा. *T. fishing*, चूड पेटवून त्याच्या उजेडांत मासे पकडणें. *T. race*, ancient Greek festival performance of runners handing lighted *tt.* to others in relay. (प्राचीन ग्रीक लोकांची) मशाली घेऊन धावण्याची शर्यत. *Hand on the t.*, प्रज्वलित ठेवणें, (विद्या, ज्ञान वगैरेची) मशाल पेटती ठेवणें.

**Tor'chon**, *n.* (टॉ'अर्शॉन्)—coarse loose kind of lace. जाडीभरडी उबीळ फीत. *T. paper*, जाडाभरडा कागद. [F = dishcloth]

**Tore**, *pa. t.* of Tear.

**Tŏ'reador**, *n.* (टॉ'रिअडॉ'अर्)—Spanish (mounted) bull-fighter. बैलांची झुंज लावणारा स्पॅनिश घोडेस्वार.

**Tŏr'ment**, *n.* (टॉ'अर्मन्ट्)—severe bodily or mental suffering. पराकाष्ठेचें दुःख, यातना, पीडा. *v. t.* (टॉअर्मे'न्ट्) to subject to torment, importune, tease. गांजणें, सतावणें, फार त्रास देणें, छळणें, पिडणें.*-or, n.* सतावणारा, छळणारा; (कठीण जमीन सारखी करण्याचें) चाकवालें गुठें. *-ress, n. f.*

**Tŏr'mina**, *n.* (टॉ'र्मिना)—griping pain in bowels, colic. (पोटांतील) मुरडा, तिडीक.

**Torn**, *pa. p.* of Tear.

**Tŏrnā'do**, *n.* (टॉअर्ने'डो)—(*pl.-oes*), a very violent storm (*esp.* in W. Africa & in U. S.) over a limited area, a hurricane; (*fig.*) outburst or volley (*of* cheers, etc.). (प. आफ्रिका आणि अमेरिकेंतील सं संस्थानें यांत होणारें) प्रचंड वादळ, झंझावात, तुफान; प्रचंड कडकडाट, -गडगडाट. *Tornad'ic, a.*

**Tor'ous, Toro'se**, *aa.* (टॉ'अरस, टॅरो'झ्)—(Bot.) cylindrical with bulges at intervals; (Zool.) knobby. मधून मधून फुगीर व नलिकाकार,-नळकांड्यासारखा; गांठाळ, गांठी असलेला.

**Tŏrpē'dō**, *n.* (टॉअर्पी'डो)—a fish inflicting electric shocks when touched; kinds of explosive mine; submarine missile that can be aimed at a ship, &c. and explodes on touching it. स्पर्श होतांच विजेच्यासारखा धक्का बसविणारा एक प्रकारचा मासा; स्फोटक सुरुंग; पाणतीर, जलतीर, मत्स्यास्त्र, पाणसुरुंग, पाणसुसर. *v. t. & i.* to hit or damage with torpedoes; (*fig.*) *paralyse, make ineffective.* पाणसुरुंग मारणें, पाणसुरुंगानें नाश करणें, पाणसुसर लागणें; निकामी करणें, बंद पाडणें (काम, संस्था इ०). *T. boat*, पाणतीर फेंकणारी बोट,-लहानसर अतिवेगवान लढाऊ जहाज. (*T. boat*) *destroyer*, टार्पेडो नेणारी बोट; टॉर्पेडो बोटींना धरणारी विनाशिका. *T. tube*, टार्पेडो सोडण्याची नळी. *Aerial t.*, *t.* discharged from aircraft. विमानांतून फेंकण्याचे सुरुंग. [L. *torpere*, benumb]

**Tŏrp'id**, *a.* (टॉ'अर्पिड्)—benumbed, stupefied; sluggish; dull, inactive. बधिरा, सुन्न; जड, स्वस्थ, निपचित. *Torpidity, n. Torpidly, adv.*

**Tŏrp'or**, *n.* (टॉ'अर्पर्)—suspended animation; apathy, sluggishness. बधिरता, गुंगी; सुस्तपाणा, मांद्य, जडता.

**Torps**, *n.* (टॉअर्प्स)—(Naut. sl.) ship's torpedo officer. आरमारी गलबतावरील सुरुंगाधिकारी.

**Tor'quāte (d)**, *aa.* (टॉ'अर्क्वेट,-टेड्)—(Zool.) with ring about the neck. मानेभोंवतीं विशिष्ट वलय असलेला (प्राणी).

**Tŏrr'ĕfў**, *v. t.* (टॉ'रेफाय्)—to parch with heat, dry. उष्णता देणें, आंच देणें.*-faction, n.*

**Tŏ'rrent**, *n.* (टॉ'रन्ट्)—a violent rushing stream *of water*; (*pl.*) *great downpour of rain*; (*fig.*) a volley of abuse, etc. पाण्याचा स्रोत, लोंढा; पावसाची मुसळधार, वृष्टि; (शिव्यांचा) वर्षाव.*-ial, a.* (टॅरे'न्शल्);*-ially, adv. Rain falls in tt.*, मुसळधार पाऊस पडत आहे,-पडतो.

**Tŏ'rrid**, *a.* (टॉ'रिड्)—intensely hot. (अत्यंत) उष्ण, अति कडक उन्हाचा. *T. zone*, part of earth's surface between tropics. उष्ण कटिबंध. *Torrid'ity, n.,-ness, n.*

**Tor'sel**, *n.* (टॉ'र्सल्)—a twisted ornament; block of wood in brick wall. वेटोळें (नक्षी); विटांच्या भींतींतील लांकडी आधार.

**Tor'sion**, *n.* (टॉ'र्शन्)—twisting. पिळवटणें, पिळणें, निष्पीडण; तारेचा पीळ; (med.) रक्तवाहिनीचें टोंक पिळवटणें. *T. balance*, तारेच्या पिळावरून सूक्ष्म प्रेरणा मोजण्याचा तराजू.*-al, a.*

**Tors'ō**, *n.* (टॉ'अर्सो)—(*pl.-os*) trunk of statue; unfinished work. पुतळ्याचें धड; अपुरें काम.

**Tŏrt**, *n.* (टॉर्ट्)—breach of duty imposed by law. अपकृत्य, नुकसान, नुकसानी. *Tortious, a.* (law) अपकृत्याचा;*-ly, adv.* [F]

**Torticoll'is**, *n.* (टॉअर्टिक'लिस्)—stiff neck. (संधिवात रोगानें होणारी) वांकडी मान, वक्रग्रीवा.

**Tort'il**, *a.* (टॉ'र्टिल्)—twisted; (Bot.) coiled. पिळलेला, पीळ पडलेला; वेटोळेंदार.

**Tŏrt'oise**, *n.* (टॉ'अर्टस, टॉ'र्-टॉइझ्)—a four-legged reptile enclosed in a horny shell. कासव,

कूर्म, कच्छप. *Hare and t.*, (fable). शक्तीपेक्षां चिकाटी अंतीं यशस्वी होते. *T. shell*, (टॉर्टइशल्) कच्चकडा, कांसवाचा खवला, कांसवाच्या पाठीचें हाड, -हाडासारखा, कच्चकड्याचा.

**Tŏrt'ūous**, *a.* (टॉ'अट्युअस)—winding; (*fig.* of policy) roundabout, indirect, involved. वांकडा; नागमोडीचा, वक्र, कुटिल, गुंतागुंतीचा. *Tortuose*, *a.* (Bot.) पीळ घातलेला, पीळदार. *Tortuos'ity*, *n.*

**Tŏr'ture**, *n.* (टॉ'अर्चर्)—infliction of pain, esp. to extort something from victim; agony. छळ, हाल, यातना; तीव्र वेदना. *v. t.* to subject to torture; (*fig.*) force out of natural position, pervert the meaning of (words etc.). छळ करणें, हाल करणें; हालवणें, घदलणें, (शब्दांचा) अर्थ फिरविणें, शब्दच्छल करणें.-*turer*, *n.*, -*turingly*, *adv.*

**Tor'y**, *n.* (टॉ'अरि)—a Conservative in English politics. टोरीपक्षीय, पुराणमतवादी.-*ism*, *n.* टोरीपक्षाचीं मतें,-तत्त्वें.

**Tor'ŭs**, *n.* (टॉ'अरस)—(*pl.*-ri), lowest member of base of column; (Bot.) receptacle of flower. (खांबाच्या) उथळयाची जाड गोलची; पुष्पाधार, स्त्रीकेसराधार, स्त्रीकेसरासन.

**Tŏss**, *v. t.* & *i.* (टॉस)—to move with fitful to-and-fro-motion; to fling or roll about; to throw upwards, (of ball, bull with horns etc.); throw (coin) into air to decide choice by way it falls; drain (liquor) at a draught; throw back one's head; roll about restlessly. खालीं वर होणें,-हालणें, -हालवणें; फेंकणें, टाकणें, भिरकावणें; वर उडवणें, -फेंकणें; (नाणें वर फेंकून) ओली सुकी करणें; घोटासरशी (दारू) पिऊन टाकणें; (तिरस्कार, -उतावीळ,-दाखविण्यासाठीं) मान उडवणें; अस्वस्थपणें लोळणें, गडबडां लोळणें, क्षुब्ध होणें. *n.* tossing of coin, head, etc..; tossing motion; upward throw of ball. उडवणें, फेंकणें, ओलीसुखी; तळमळ, चडफडाट; उंच फेंक (चेंडूची). *T. off*, drink off; dispatch (work) rapidly. घोटासरशीं पिऊन टाकणें; (काम) सहज उरकून टाकणें,-संपवणें. *Win the t.*, (खेळाची) ओलीसुखी (उन्हाळी पावसाळी) जिंकणें. *full t.*, (क्रिकेट॰) उंचावरून टाकलेला चेंडू. *T.-up*, doubtful question. संशयग्रस्त प्रश्न,-मुद्दा. *Tossed*, (poet.) *Tost*, *pa t.* & *pa. p.*

**Tŏt**, *n.* (टॉट)—(colloq.) *a tiny t.*, small child; dram of liquor; addition sum or its result. पोरटें, लहान मूल; दारूचा घोट; मिळवावयाची रक्कम, बेरीज. *v. t.* & *i.* to add *up*; (of expenses) mount *up*. मिळवणें; (खर्चाचा) आकडा वाढणें,-फुगत जाणें.

**Tō'tal**, *a.* (टो'टल)—complete; comprising the whole. पूर्ण; एकूण, सबंध, पुरा. *n.* sum of all items; total amount. एकूण; बेरीज; जमा, राशि, रास. *v. t.* & *i.* to find the total of; amount in number to. ची बेरीज करणें, मिळवणें; अमुक संख्या होणें, गोळा -बेरीज होणें. *T. eclipse*, खग्रास ग्रहण. *Grand t.*, एकूण (सर्व रकमांची) गोळाबेरीज. *The visitors totalled 200*, एकंदर पाहुणे दोनशें होते. *Total'ity*, *n.* एकंदर जमा, गोळा बेरीज, खग्रास ग्रहणकाल. *To'tally*, *adv.* पूर्णपणें, एकंदर, सर्व धरून.

**Tō'talise**, *v. t.* & *i.* (टो'टलाइझ्)—to collect into a total; use totalizer in betting. एकत्र,-बेरीज, -करणें; शर्यतींतील लावलेल्या रकमा दाखविणाऱ्या यंत्राचा उपयोग करणें.

**Tō'talizer,-zātor, Tōte**, *nn.* (टो'टलाइझर्,-झेटर्, टोट)—the device registering number and amount of bets staked on race. शर्यतींतील (क्रमांक व त्यावर लावलेल्या रकमा यांची) नोंदणी करणारी यांत्रिक योजना.

**Tōte**, *v. t.* (टोट्)—(U. S.) to carry, bear (burden etc.). नेणें, वाहणें.

**Tō'tĕm**, *n.* (टो'टेम्)—hereditary emblem (a natural object, esp. animal) of a tribe or clan of primitive people giving its name to the tribe. (परंपरागत) गोत्रचिन्ह, वंशचिन्ह.-*ism*, *n.* रानटी लोकांची वंशचिन्ह धारण करण्याइतकी सुधारणेची स्थिति.

**Tŏtt'er**, *v. i.* (टॉ'टर्)—to stand or walk unsteadily, oscillate as if about to fall; to go with feeble steps. लटपटणें, डळमळणें; हळू पावलांनीं जाणें, पाय लटपटणें,-कांपणें. *Tottering steps*, लटलट कांपणाऱ्या पावलांनीं. *Tott'ery*, *a.*, *Tott'erer*, *n.*

**Touch**, *v. t.* & *i.* (टच्)—to come into or be in contact with; strike lightly; deal with (a subject) momentarily; tint in parts or slightly *with*; concern; stir sympathy or other emotion in; (Geom.) be a tangent to (a circle, etc.); strike keys or strings of; put *in* (features etc.) with brush, pencil, etc.; injure slightly. हात लावणें, स्पर्श करणें; शिवणें; हळूच मारणें, लागणें, धक्का पोंचणें; ओझरता उल्लेख करणें, वरवर सांगणें; सुधारणें, नीट करणें; संबंध असणें; दया उत्पन्न करणें, कळवळा आणणें, राग आणणें; (भूमिति) स्पर्श करणें, ची स्पर्शरेषा असणें; (वाद्य) वाजवणें, बोटें चालवणें, तार छेडणें; रेखाटणें; धक्का पोंचवणें, अल्पसें नुकसान करणें, इजा करणें. *n.* an act or fact of touching; the sense of feeling; style of execution or treatment; slight tinge or small amount; (Footb.) sides of field outside touch lines; (Med.) exploration by sense of touch. स्पर्श, स्पर्शेंद्रिय, स्पर्शबोध,-ज्ञान; खुबी, करामत; छटा, चुणूक, लव, लेश, चिमूट; (फूटबॉल॰) स्पर्शरेषांच्या बाहेरील क्रीडांगणाची बाजू; स्पर्श करून-हातानें दाबून-इंद्रियांची (केलेली) तपासणी. *To t. pitch*, have to do with shady transaction or person. फसवेगिरीच्या धंद्यांत पडणें, लुच्चा माणसाशीं संबंध ठेवणें. *T. the spot*, find out or do exactly what is required. आवश्यक गोष्ट शोधून काढणें, आवश्यक गोष्ट करणें. *Can just t. the ceiling*, तक्तपोशीला भिडणें. *No one can t. him for purity of conduct*, शुद्धाचरणांत त्याची

बरोबरी कोणीहि करूं शकणार नाहीं. *It touched him to the quick, touched him on a raw* or *tender place*, मर्मी,-पर्मी,-घाव बसला, त्याच्या मनाला फार लागलें. *Dares not t. beer*, दारूला,-मद्याला,-स्पर्श करण्याला धजेना. *Couldn't t. the Arithmetic paper*, गणिताच्या प्रश्नपत्रिकेला हातसुद्धां लावला नाहीं,-सोडविली नाहीं. *Touched me for Rs. 5*, माझ्यापासून पांच रुपये काढले. *T. at*, (naut.) call at (port). बंदर करणें, वस्ता करणें. *T. off*, घाईघाईनें चित्राची रूपरेषा काढणें; तोफा डागणें,-सोडणें,-झाडणें; टेलिफोनवरचें संभाषण एकदम थांबविणें. *T. up*, (चित्राला) शेवटचा हात देणें; पुरें करणें. *Felt a t. of rheumatism*, संधिवाताचा किंचित झटका त्याला आला. *The Nelson t.*, Nelson's unique handling of a situation. परिस्थिति आटोक्यांत आणण्याची नेल्सनची विशिष्ट पद्धति, करामत. *To keep in t. with*, remain in sympathy or personal intercourse *with*. एखाद्या मनुष्याशीं संबंध कायम ठेवणें; चा अभ्यास चालू ठेवणें. *Put a thing to the t.*, वस्तूला कस लावणें. *Near t.*, close shave, narrow escape. चाटून जाणें, निभावणें, फासेंपसें जिवावरचें निसटणें. *T.-and-go, a.* धोक्याचें. *T. hole*, small hole in cannon by which it is fired. (बंदुकीच्या, तोफेच्या) काना. *T. line*, (फूटबॉल) क्रीडांगणाची पार्श्वरेषा. *T. paper*, paper steeped in nitre for firing gun-powder etc. बंदुकीची दारू उडविण्याचा ज्वालाग्राही कागद (पालाशनत्रितांत भिजविलेला). *T. wood*, children's game in which touching wood gives immunity from pursuit; wood in soft rotten state usable as tinder. (मुलांच्या खेळांतील) खुंट; स्पर्शस्तंभ; चकमकीच्या उपयोगी कुजकें नरम लांकूड. *Touch'able, a.* स्पृश्य. *T. less, a. Touch'ed, pa. t. & pa. p.* स्पृष्ट, स्पर्श केलेला, शिवलेला; लागलेला, नासलेला; फळपळा आलेला.

**Touch'stōne**, *n.* (टॅच्-स्टोन्)—a black jasper used for testing (alloys of gold, &c.); (*fig.*) standard, criterion. कसोटी, कस; ठराविक प्रमाण, परीक्षा.

**Tou'chĭng**, *a.* (टॅचिंग)—such as to affect the feelings, pathetic or moving. कळवळा आणणारा, हृदयद्रावक. *pr. p.* स्पर्श करणारा. *prep.* about, as regards. विषयीं, संबंधीं.*-ly, adv.*

**Tou'chy̆**, *a.* (टॅचि)—apt to take offence, over-sensitive, irritable. चिडखोर, शीघ्रकोपी, मनाला लावून घेणारा.*-ily, adv.*;*-iness, n.*

**Tough**, *a.* (टफ्)—of strongly cohesive substance or great endurance; hard to masticate; hard to tackle or overcome; (*sl.* U. S.) criminal, vicious. चिवट, कणखर; चामट, वातट; मजबूत, फार श्रमाचें, कठीण, अवघड (काम); नीतिभ्रष्ट, खुनशी, दुष्ट. *n.* a street ruffian. गुंड, मवाली. *Tough'en, v. t. & i.* चिवट,-वातट,-करणें, होणें. *Toughish, a. Tough'ly, adv. Toughness, n.*

**Tour**, *n.* (टुअर्)—a roving journey including stops at various places; a short journey for pleasure, rambling excursion. दौरा, फिरती, फेरी, फेरा; पर्यटन, प्रदक्षिणा, सहल, प्रवास. *v. i. & t.* to go on a tour, make a journey from place to place. दौरा काढणें, फिरतीवर जाणें,-असणें; पर्यटन करणें, प्रवास करणें. *T. de force*, a feat of strength or skill. शक्तीचें-कौशल्याचें-अचाट काम, कसरत. *Tour'ist, n.* a holiday traveller. हौशी प्रवासी, पर्यटन करणारा. [F]

**Tourbi'llion**, *n.* (टुअर्बि'ल्यन्)—kind of firework spinning in air so as to look like spiral column of fire. (दारूकामांतील) चिठी. [F]

**Tour'maline**, *n.* (टु'अर्मलिन्)—a mineral of various colours with electric properties and used as gem. एक प्रकारचें रत्न.

**Tour'namĕnt**, *n.* (टुअ'र्नमेन्ट)—a medieval tilting match (arch. Tourney); a contest in any game of skill between a number of competitors. भालेफरोली, भालाइतांची लुटुपुटूची लढाई; खेळांचा सामना, क्रीडासत्र. *Chess t.*, बुद्धिबळांचा सामना,-चढाओढीचा खेळ.

**Tourn'iquet**, *n.* (टुअ'र्निकेट)—an appliance for stopping blood-flow in artery. (रक्तस्राव बंद करण्याकरितां) धमनीवर दाब करण्याचें यंत्र. [F]

**Tou'sle**, *v. t.* (टॉ'उझल)—to pull about; make (hair, person) untidy. इकडे तिकडे ओढणें, विसकारणें; (केंस इ.) विसकारणें.

**Tout**, *n.* (टाउट)—a person soliciting custom, one who plies for customers; a spy on horses in training supplying information to tipsters, etc. गिऱ्हाईक गांठून देणारा मनुष्य, दलाल, अडत्या; शर्यती शिकाऊ घोड्यांवर गुप्त नजर ठेवून त्यांविषयीं (जुगार लावणाऱ्यांना) गुप्त माहिती पुरविणारा. *v. i.* to act as a tout; employ touts; canvass. (शर्यती घोड्यांवर) हेरगिरी करणें; दलाल नेमणें; गिऱ्हाईक मिळविणें. *Tout'er, n.*

**Tow**, *n.* (टो)—fibres (of flax, &c.) prepared for spinning. तागाचें किंवा सणाचें पुरकूल, तंतु,-धागे.

**Tow**, *v. t.* (टो)—to drag along through water by a rope or chain; drag along behind one; drag (net) over surface of water. पाण्यांतून दोरीनें ओढणें, दोरी लावून ओढणें,-खेचणें,-धाट दाखविणें; धरोघरीनें ओढून नेणें; पाण्यावर (जाळें) ओढणें. *n.* towing, being towed. गलबत ओढण्याची दोरी; दोरीनें ओढलें जाणें. *To take*, or *have, in t.*, (*fig.*) assume direction of, take possession of, (person), ला मार्गदर्शक होणें, चा ताबा घेणें. *T.-line,-rope; towing-line,-rope*, पाग, गलबत ओढण्याची दोरी. *T.* (*ing*) *boat*, दुसऱ्या (मोठ्या) जहाजांना ओढून नेणारी (लहान) बोट.

**Tow'age**, *n.* (टो'इज्)—towing or its cost. दोरी लावून,-पाग टाकून,-ओढणें; ओढणावळ.

**To'ward**, *a.* (टो'अर्ड)—(arch.) docile, apt; about to occur; in train. गरीब, योग्य; घडून येणारा, सोयतीनें,-पाठोपाठ,-(येणारा).*-ly, adv.* चांगला, हितकारू; शुभ.*-ness, n.*

**Towards'**, *prep.* (टोअर्ड्झ्)—in the direction of; not much short of or less than; in relation to;

as contribution to. कडे, जवळ; जवळजवळ; संबंधीं; प्रीत्यर्थ, करितां. *Looks t. the sea*, समुद्राभिमुख आहे. *His attitude t. Home Rule*, स्वराज्यासंबंधीं त्याचें मत,-विचार. *Also, Toward.*

**Tŏw'el,** *n.* (टॉ'विल्)—a cloth for drying the hands and face with after washing. रुमाल, टुवाल, अंगपुसणें, *v. t. & i.* टुवालानें अंग पुसणें; (*sl.*) ठोके देणें, मार देणें. *T. horse*, frame for hanging *tt.* on. टविल (ठेवण्याची) घोडी. *Lead t.*, bullet. बंदुकीची गोळी. *Oaken t.*, काठी, सोटा. *Towe'lling*, *n.* material for towels; (sl.) thrashing, defeat. टुवालांचें कापड; खरपूस मार,-पराभव.

**Tŏw'er,** *n.* (टॉ'वर्)—a tall strong structure; a fortress having a tower; (*fig.*) place of defence, protector. उंच घर, गोपुर; बुरूज, किल्ला, कळस, शिखर; रक्षणस्थान, रक्षक त्राता. *v. i.* to be of outstanding height or greatness; soar aloft. (मानानें इतरांपेक्षां) फार उंच असणें; उंच उडणें, उंच जाणें.-*ing, part.* high, lofty; (of rage) violent. अतिशय उंच, उन्नत, श्रेष्ठ; भयंकर. *T. of strength*, बलिष्ठ त्राता. *Tower'ed*, *a.* having towers. बुरुज असलेला, बुरुजांचा.

**Town,** *n.* (टाउन)—any collection of houses larger than a village and having a more independent local government; the inhabitants of a town; (without *the*) chief city or town in speaker's neighbourhood. शहर, नगर, गांव; नगरवासी लोक; जवळपासचें मोठें शहर. *It is the talk of the t.*, शहरांतील प्रत्येकाच्या तोंडीं तो विषय होऊन बसला आहे. *Man about t.*, a fashionable idler. छानछोकी, खुशालचेंडू मनुष्य. *T. clerk*, नगरपालिकेचा चिटणीस. *T. council*, elective body administering town. नगरव्यवस्थापक मंडळ. *Towns' folk*, (विशिष्ट) नगरवासी लोक; नागरिक. *Towns'man, Towns' people*, नागरिक, शहरवासी, गांववाले; नागरिक लोक. *Town'ship*, (मोठ्या गांवाची) वाडी,-विभाग,-आळी,-पेठ; (U. S.) सहा चौरस मैल प्रदेश. *Town'less,-ward, aa.*

**Town'hall,** *n.* (टा'उन्-हॉल)—the municipal building of a town. नगरभवन, सार्वजनिक सभागृह.

**Town'talk,** *n.* (टा'उन्टॉक्)—the talk of the town. लोकचर्चेचा विषय, सर्वांच्या तोंडचा विषय.

**Tŏx'ic,** *a.* (टॉ'क्सिक्)—of or caused by poison. विषाचें, विषसंबंधीं, विषमूलक. *Toxicol'ogy*, *n.* विषचिकित्सा, विषविज्ञान;-*gist*, *n.* विषचिकित्सक.

**Tŏx'in,** *a.* (टॉ'क्सिन्)—any poison, esp. one causing some particular disease. विष, विषारी आल्कालि द्रव्य.

**Tŏy,** *n.* (टॉय्)—a plaything, a trifling object, a a trifle; a trinket or curiosity; a hobby. खेळणें; खेळ, क्षुद्रपदार्थ, नवलाची गोष्ट; हौशीचा धंदा. *v. i.* to exchange caresses; play or dally *with*. (एकमेकांना) प्रेमानें कुरवाळणें; रमणें, खेळणें, गंमत करणें. (*attrib.*) mimic. खेळांतलें, लुटुपुटूचें. *T. dog, -ship*, खेळांतला कुत्रा, कागदी होडी. *T. shop*, खेळण्यांचें दुकान.

**Trābea'tion,** *n.* (ट्रेबिए'शन्)—use of beams in construction. बांधकामांत तुळयांचा उपयोग. *Trā'beate(d) a.* [L. *trabs*, beam]

**Trabĕc'ula,** *n.* (ट्रबे'क्युला)—(pl.-*ae*) (Anat.) supporting band of connective tissue etc.; (Bot.) beam-like projection or process. (संयोजक पेशींचा) आधारबंध; तुळईसारखा पुढें आलेला भाग.

**Trāce,** *n.* (ट्रेस)—(usu. pl.) a mark left behind, indication, visible or other sign; slight amount of, a strap or chain or rope by two of which a poled vehicle is drawn. पाऊल, खूण, मागमूस, थांग पत्ता; (med.) बीज; लेशहि, लवलेश, अल्पांश; ओढी, ओढणी, (ओढ) पट्टे. *v. t.* to follow or make out the course of by means of traces; detect or make out by scrutiny; make tracing of, delineate. थांग किंवा पत्ता लावणें; पाठलाग करणें, शोधून काढणें, हुडकून काढणें; कोरून दुसरी प्रत काढणें, गिरवणें, काढणें. *To be traced*, पत्ता मिळविणें,-लागणें. *Cannot t. any letter of that date*, त्या तारखेचें पत्र मिळाल्याचें स्मरत नाहीं, -मिळालें नसावें. *T. back*, go back over the course of. मागें धुंडाळत (मूळ ठिकाण) शोधणें. *T. a curve*, रेषेचें अन्वेषण करणें,-काढणें. *In the tt.*, in harness. (गाडीच्या) कामणीला जुंपलेला, बांधलेला, बद्ध. *Kick over the tt.*, (*fig.* of person) become insubordinate. आज्ञेचें उल्लंघन करणें, सत्ता झुगारणें, उद्धटपणें वागणें. *Trace'able a.* शोध,-पत्ता,-लावण्यासारखा.-*ability*, *n.*;-*ably, adv.*

**Trā'cerў,** *n.* (ट्रे'सरि)—stone ornamental openwork as in head of a Gothic window; decorative pattern, natural outline suggesting this. दगडांत खोदलेली नक्षी,-वेलबुट्टी; (माशीच्या पंखावरील नैसर्गिक) नक्षीकाम.-*ried, a.*

**Trā'cing,** *n.* (ट्रे'सिंग)—a reproduction of the lines of a drawing etc. पारदर्शक कागदावरून कोरून काढलेली नक्कल. *T. paper*, पारदर्शक सैलमतीचा कागद.

**Trachē'a,** *n.* (ट्रकि'आ)—(pl.-*ae*), the windpipe; (Bot.) duct, vessel. श्वासमार्ग, श्वासनलिका, नरडी; स्रोत, नलिका, प्रणाली. *Tra'cheal, a.* श्वासनलिकेसंबंधी; स्रोतासंबंधी. *Tracheo'tomy, n.* surgical incision in trachea. कंठनाडीच्छेदनक्रिया.

**Trăck,** *a.* (ट्रॅक्)—a continuous line showing where something has passed; a path, esp. one beaten by use; (*fig.*) course of life or routine; racing-path; a two-rail railway-line; (Mech.) band enabling tractor etc. to do without roads; (*pl.*) footsteps. वाट, रस्ता, मार्ग; मळलेला रस्ता; आयुष्यपथ, जीवनपथ, नित्यक्रम; शर्यतीचा तयार केलेला मार्ग; दुहेरी लोहमार्ग; (बिनवाटेवरूनसुद्धां ओढीं ओढणाऱ्या) बाष्पयंत्राचा विशिष्ट ओढपट्टा; (अने०) पावलें, माग, खूण. *v. t.*

to follow or hunt down or find out by means of traces. (पावलांवरून) माग काढीत जाणें, फरफटत नेणें, ओढून नेणें. *Am on his t.*, त्याच्या पाठलागावर,-मागावर,-आहें; (*fig.*) त्याचा घातमेत,-अंडींपिलीं,-मला ठाऊक आहेत. *Keep t. of*, follow the course or development of. च्या मागोसा घेणें. *In* one's *tt.*, (*sl.*) there and then. जेथल्या तेथें, ताबडतोब. *Make tt.*, (*sl.*) go or run waay. पळून जाणें, धूम ठोकणें. *Off the t.*, off the scent; (*fig.*) away from the subject. मागाच्या,-आटोक्याच्या,-बाहेर; विषयाला सोडुन. *T. athletics*, (U. S.) running, jumping, putting the weight, etc. धावणें, उडी मारणें, वजनफेंक इ. शक्तीचीं कामें. *T. down*, हुडकून काढणें,-पकडणें. *T.-less*, *a.* विनवाटेचा, वाट नसलेला, वाट न मळलेला.*-lessly, adv.;-lessness, n.*

**Trăct**, *n.* (ट्रॅक्ट)——a region or expanse of indefinite extent and shape; (Anat.) area of organ or system; a short treatise esp. on religious subject. प्रदेश, भाग, मैदान; इंद्रियाचा भाग; लघुप्रबंध, लघुधर्मग्रंथ.

**Trăc'table**, *a.* (ट्रॅ'क्टेबल्)—manageable, governable, easily managed; docile. कह्यांत राहणारा; गरीब, विनीत, वश्य, नम्र.*-bility, n.*

**Trăc'tāte**, *n.* (ट्रॅ'क्टेट्)—a treatise. प्रबंध, विवेचक ग्रंथ.

**Trăc'tion**, *n.* (ट्रॅ'क्शन्)—hauling; drawing-force; contraction. ओढ, खेंच; खेंचशक्ति; (स्नायूचें) आकुंचन. *T. engine*, ओझें खेंचणारें वाफयंत्र, नांगर चालविणारें वाफेचें यंत्र.

**Trăc'tor**, *n.* (ट्रॅ'क्टर्)—a traction engine; an aeroplane with engine in front. ओझें खेंचणारें, -(शेतीचे) नांगर चालविणारें-वाफयंत्र, यांत्रिक नांगर; अग्रयंत्र विमान, पुरोयंत्र विमान.

**Trāde**, *n.* (ट्रेड्)—dealing in commodities for profit; business (opp. to *profession*), a person's commercial or industrial calling; persons engaged in it; trade-wind. व्यापार, उदीम, सौदागिरी, वाणिज्य; धंदा, व्यवसाय, व्यापार, पेशा; व्यापारी (वर्ग), एकाच धंद्यांतील लोक; व्यापारी वारा. *v. i. & t.* to buy and sell; have commerce with; exchange in commerce; make corrupt bargains in politics. क्रयविक्रय करणें, व्यापार करणें, उदीम करणें, शीं व्यापार असणें,-करणें; व्यापारी अदलाबदल,-दे-घे, करणें; राजकारणाचा व्यापार करणें, गैरफायदा करून घेणें. *Jack of all tt.*, हजार धोंड्यांवर पाय ठेवणारा. *Trick of the t.*, device for attracting custom. धंद्यांतील खुबी,-युक्ति. *The t.*, (colloq.) the licensed victuallers; submarine branch of navy. परवानेवाला खाद्य-पेय-पदार्थ विकणारा; आरामाराचा पाणबुड्याविभाग. *Domestic* or *home t.*, देशांतला व्यापार. *Foreign t.*, परदेशांशीं,-परदेशी, -व्यापार. *Carrying t.*, दर्यावर्दी व्यापार. *Balance of t.*, आयात आणि निर्यात मालांतील अंतर. *Free t.*, खुला व्यापार, अप्रतिबंध व्यापार. *Fair t.*, सारख्या सवलतींचा व्यापार. *T.-hall*, व्यापाऱ्यांचें सभागृह. *T. name*, व्यापारी नांव, व्यापारी राखीव -हक्काचें नांव. *T. price*, charged by manufacturer etc. to dealer for goods to be sold again. व्यापारी भाव. *T. wind*, wind blowing continually towards the Equator from NE and SE. व्यापारी वारा, ईशान्य व नैर्ऋत्य वारा. *T. winds*, (*pl.*) व्यापारी व प्रतिव्यापारी वारे. *To t. on*, take (unscrupulous) advantage of. चा गैरफायदा करून घेणें. *Trader, n.* person or vessel engaged in trade. व्यापारी, वाणी; व्यापारी माल नेणारें जहाज, महागिरी, बारकस.

**Trāde'mārk**, *n.* (ट्रेड्-मार्क्)—a manufacturer's registered device or name to distinguish his goods. व्यापाऱ्याची विशिष्ट खूण, व्यापाऱ्यांची निशाणी,-छाप.

**Trādes'man**, *n.* (ट्रे'ड्झमन्)—a person engaged in trade, shopkeeper. व्यापारी, दुकानदार.

**Trādes'people**, *n.* (ट्रे'ड्झ्पीपल्)—tradesmen and their families. व्यापारी लोक, वाणी (लोक).

**Trāde'union**, *n.* (ट्रे'ड्युनिअन्)—association of workmen of a trade for the protection and promotion of common interest. मजूरसंघ, कामगारसंघ, कामकरीसंघ.*-ism*, कामकरीसंघपद्धति. *-ist*, कामगारसंघाचा कैवारी,-सभासद.

**Trădi'tion**, *n.* (ट्रॅडि'शन्)—oral transmission of knowledge or belief from one generation to another; (law) formal delivery. दंतकथा, आख्यायिका, परंपरागत कथा, संप्रदाय, परंपरागत आचार; (law) पद्धतशीर हवालीं करणें,-कबजा देणें, -हातीं देणें.*-al,-ary, aa.;-ally, adv.* परंपरेनें, पिढीजाद. *Traditionist*, परंपरेचा अभिमानी.

**Trădūce'**, *v. t.* (ट्रॅड्यू'स)—to slander, to defame. बदनामी करणें, चहाडी करणें, आळ घेणें.*-ment, n.* censure, obloquy. निंदा, आळ, तोहमत, बदनामी.

**Trăff'ic**, *v. i. & t.* (ट्रॅ'फिक्)—to trade (*in* goods, &c.); barter; sacrifice (honour &c.) for gain. व्यापारधंदा करणें,-उदीम-करणें; (अनीतीचा) व्यापार करणें, फायद्याकरितां स्वाभिमानत्याग करणें. *n.* trading, dealings with; coming and going of person and vehicles, or conveyance of goods by road, rail, or water. व्यापार; उदीम, देवघेव; व्यवहार, लोकांची वगैरे येजा, मालाची वाहतूक, जाये, रहदारी, सामानसुमान, माल. *Passenger t.*, उतारू, उतारूंची ने-आण. *Goods t.*, मालाची वाहतूक. *T. returns*, रेल्वेच्या उत्पन्नाचे आंकडे. *Trafficker, n.* व्यापार करणारा. *T.-less, a.* [F.]

**Trăg'acănth**, *n.* (ट्रॅ'गकॅन्थ्)—a white or reddish gum from certain herbs. वनस्पतीचा पांढरा किंवा तांबडा चीक,-गोंद

**Tră'gėdy̆**, *n.* (ट्रॅ'जिडि)—a drama of elevated theme and diction with an unhappy ending; a tragical occurrence. दुःखपर्यवसायी-शोकान्त

-नाटक, शोकपर्यवसायी नाटक; घातकी कृत्य, अनर्थ शोककारक-शोचनीय-गोष्ट.

**Tră'gic,** *a.* (ट्रॅजिक्)—of or in the style of tragedy; tragical. दुःखान्त नाटकाचा, शोकपर्यवसायी; घातक, भयंकर.

**Tră'gical,** *a.* (ट्रॅजिकल्)—calamitous; of a terrible nature, murderous. संकटमय; भयंकर स्वरूपाचा. *-cally, adv.;-calness, n.* शोकपर्यवसायिता.

**Trăgicŏm'ĕdy̆,** *n.* (ट्रॅजिकॉ'मिडि)—a drama of mixed tragic and comic elements. आनंद-शोकमिश्रित नाटक.*-com'ic, a.,-com'ically, adv.*

**Trail,** *v. t. & i.* (ट्रेल्)—to draw along as an appendage; be drawn; walk wearily along; (of plant) hang or spread downwards; tread down (grass etc.) to make path; follow, pursue; (Mil.) carry (rifle) hanging balanced in one hand parallel to ground. (जमिनीवरून) ओढणें; फरफटवणें; फरफटणें, फरफटत जाणें; (खालीं, जमिनीवर) ताणा वाढणें; (वाट पाडण्याकरितां) गवतावरून चालत जाणें,-पायाखालीं तुडवणें; माग काढणें, पाठलाग करणें, (बंदूक) जमिनीशीं समांतर अशी (उजव्या हातांत) तोलून धरणें. *n.* a part drawn behind, long appendage; lower end of gun-carriage; track left by a thing that has moved or been drawn over a surface, a track, scent, followed in hunting; beaten path through wild region. मागून फरफटत येणारा भाग, लांब शेंपूट; तोफेच्या गाड्याची खालची बाजू; फरपट, ओढ, सरपट, माग, वास; मळलेला रस्ता,-ली वाट, पायवाट. *The t. of a meteor,* धूमकेतूची,-उल्केची,-शेंडी,-शेंपूट. *Trailed her dress through the mud,* आपला झगा-आपलें वस्त्र-चिखलांतून फरफटत (झाडीत) नेत होती. *Trailing wheel,* either hind wheel of a carriage. गाडीचें पाठचें चाक.

**Trail'er,** *n.* (ट्रेलर्)—a wheeled vehicle drawn by another; a trailing plant; a set of short extracts from a film exhibited to advertise it in advance. दुसऱ्यानें ओढावयाची चाकांची गाडी, जोडगाडी; ताणे वाढणारी वनस्पति,-वेल; पुढें येणाऱ्या चित्रपटाचा, आगाऊ जाहिरात करण्यासाठीं, दाखविलेला कांहीं (मधला मधला) भाग.

**Train,** *v. t. & i.* (ट्रेन्)—to put in the way to efficiency by instruction and practice; make physically fit for contest; teach and accustom (person, animal, *to*); guide growth of (plant); point, aim (cannon *upon*); (arch.) entice, lure (*from, away,*); draw along (heavy thing); (colloq.) travel by train. शिकवणें, पढवणें, शिक्षण देणें; तालीम देणें, तयारी करणें; वळण लावणें, तयार करणें; (वेल, रोपटें) वळवणें, काढणें; (वर तोफेचा) नेम धरणें, तोफ डागणें; फुसलावणें, भुलावणें; ओढणें, फरफटत आणणें; आगगाडीनें जाणें,-प्रवास करणें. *n.* trailing prolongation of robe or gown; a string of persons or animals; a person's retinue; a succession of events; a locomotive with the wagons it draws; a railway travel; line of gunpowder laid as an explosive charge, (arch) ordered arrangement; series of connected parts in machinery. (मागचा) सोगा, घोळ, झोळ, शेंपूट; तांडा; रांग, मालिका, माळ; लवाजमा, खटलें, स्वारी; परिपाठ, अनुक्रम; आगगाडी, एकाच इंजिनानें ओढली जाणारी) डब्यांची रांग, गाडी; आगगाडीचा प्रवास; दारूची ओळ, रेंजकीची ओळ, -लागावळ; सुव्यवस्था, सुस्थिति; (यंत्रांतील) जोड-विभागांचा क्रम,-रांग. *A trained nurse,* (सुईणपणाचें) शिक्षण घेतलेली दाई. *Trained faculties,* कमावलेल्या शक्ति. *Trained eye,* कसलेली दृष्टि,-नजर, घसलेली नजर. *T. the rest of the way,* उरलेला प्रवास आगगाडीनें करूं. *A t. of admirers,* चाहत्यांची मालिका, अनेक चाहाते. *A long t. of camels,* उंटांचा लांबच लांब तांडा. *T. bearer,* person employed to hold up *t.* of another's robe. झग्याचा झोल उचलून धरणारा (नोकर). *T.-man* (U.S.) brake-man or porter on railway-train. (आगगाडीचा) कळवाला, ब्रेकमोड्या, आगगाडींतील हमाल, नोकर. *T. mile,* mile run by a train, as unit of work. आगगाडीचा मैल. *Train'able, a.;-less, a.*

**Train'er,** *n.* (ट्रेनर्)—(*esp.*) a person who trains racehorses or athletes. शिकवणारा, वळणीस आणणारा, चाबूकस्वार.

**Train'ing,** *n.* (ट्रेनिंग्)—(In vbl. senses) शिकविणारा, पढविणारा; शिकवणें, शिक्षण, तालीम. *To be in t.,* शिकत असणें. *Go into t.,* (for race etc.) (शर्यतीचें वगैरे) शिक्षण घेणें,-मिळविणें. *T. bit,* आडदांड घोड्याच्या तोंडांत घालण्याचा लगाम. *T. college, -school,* (for teachers). शिक्षक तयार करण्याचें, -शिक्षणाचें महाविद्यालय,-शाळा. *T.-ship,* नाविक शिक्षणाचें,-नाविक विद्या शिकविण्याचें,-जहाज.

**Train'oil,** *n.* (ट्रेनॉइल्) whale-blubber oil. देवमाशाच्या चरबीचें तेल.

**Trait,** *n.* (ट्रे)—(U. S. pr. ट्रेट्) an item in a portrait, description, or character; touch (of humour etc.). कसब, खुबी, विशेष लक्षण; छटा, झांक.

**Trait'or,** *n.* (ट्रेटर्)—a person guilty of betrayal; one who acts disloyally (to). विश्वासघातकी; राजद्रोही, द्रोही.*-ous, a.,-ously, adv.;-ousness, n.* द्रोहीपणा, विश्वासघातकीपणा. *Trait'ress, n. f.*

**Trajĕc'tory,** *n.* (ट्रजे'क्टरि)—path of a projectile moving under given forces; (Geom.) curve or surface cutting system of curves or surfaces at constant angle. विक्षेपमार्ग.

**Trăm, Trăm'-căr,** *nn.* (ट्रॅम्,ट्रॅम्-कार्)—a car (for passengers, &c.) moved by horse or cable of electric traction along *tramway,* its line of rails, four-wheeled car used in coal-mines. ट्रामगाडी; ट्रामचे रूळ,-चा रस्ता; कोळशाच्या खाणींतील चारचाकी गाडी. *v i. & t.* to go, convey, in tram. ट्रामगाडींतून जाणें,-नेणें.*Tram-way,* ट्रामचा रूळ,-रस्ता.

**Trăm**, *n.* (ट्रॅम)—kind of double silkthread. दुहेरी रेशमी धाग्याचा प्रकार.

**Trămm'ĕl**, *n.* (ट्रॅमेल)—kind of fishing-net; (*usu. pl.*) hampering influence, restraint, a hook in fire-place for kettles; an instrument for drawing ellipsis etc. जाळें; (अने०) पाश, बंधन, शृंखला, बिड्या; (शेगडीवरील किटली वगैरे ठेवण्याचें) कडें, अडकवणें; व्यस्त वर्तुळें काढण्याचें साधन,-कंपास. *v. t.* to confine, hamper. शृंखलांनीं जखडून टाकणें,-अडकविणें; पायांत खोडा घालणें. *Trammelled, pa. p.* (of horse) with white marks on fore and hind feet. पुढच्या व मागच्या पायांवर पांढऱ्या खुणा असलेला (घोडा).

**Trămp**, *v. i. & t.* (ट्रॅम्प्)—to walk with firm heavy tread; traverse (road, &c.) on foot. तुडवणें, पाय फासटीत जाणें; पायीं प्रवास करणें, रखडत जाणें. *n.* the sound (as) of troops marching or horse's steps; journey on foot; a vagrant; freight vessel running on no regular line; iron plate protecting sole of boot in digging. पायांचा आवाज, घोड्यांच्या टापांचा टापटाप् आवाज; पायीं प्रवास; भटक्या; भिकारी; मालवाहतुकीचें जहाज; (खणतांना बूट खराब होऊं नये म्हणून तळव्याला मारलेला) लोखंडी पत्रा. *Decline to t. ten miles in this heat*, अशा उन्हांतून दहा मैल पायीं रखडत जाण्याचें नाकारणें. *On the t.*, भटकेपणाची राहणी, -संवय. *T. pick*, lever for turning up hard soil. कठीण,-टणक,-जमीन खणण्याची पान्हई,-पेंडस.

**Trăm'ple**, *v. t. & i.* (ट्रॅम्पल्)—to tread heavily *on*. तुडवणें, पायाखालीं चिरडणें. *n.* तुडवणें, तुडवण्याचा आवाज. *To t. on*, tread heavily on; (*fig.*) treat with contempt. पायाखालीं तुडवणें, वर नाचणें; उपमर्द करणें. *Tram'pler, n.*

**Trănce**, *n.* (ट्रान्स)—abnormal state of suspended consciousness; state of insensibility. देहातीतता, समाधि; गुंगी, तंद्री, बेशुद्धावस्था, मूर्च्छा.

**Trănq'uil**, *a.* (ट्रँक्विल्)—serene, undisturbed. शांत, स्वस्थ, स्थिर, अक्षुब्ध.*-llize, v. t.* शांत करणें, संथावणें.

**Trănquill'ity**, *n.* (ट्रँक्विलिटि)—freedom from agitation, quietness, peace of mind. अक्षुब्धता, स्थिरपणा, स्वस्थता, मनाची शांतता.

**Trans-**, *pref.* (ट्रॅन्स-)—[L.] across, beyond, through. (उपसर्ग) पलीकडे, मधून.

**Trănsăct'**, *v. t.* (ट्रॅन्झॅक्ट्)—to do or carry on (business *with* person); despatch, manage. (शीं) व्यवहार करणें, (धंदा) करणें किंवा चालवणें. *-or, n.* काम,-व्यवहार,-करणारा.

**Trănsăc'tion**, *n.* (ट्रॅन्झॅक्शन्)—any piece of commercial or other dealing; (*pl.*) proceedings of a society; (Law) adjustment of dispute by mutual concessions, any act affecting legal rights. काम, धंदा, घडामोड, व्यवहार; (अने०) मंडळाचा अहवाल; आपसांत तोड, समजी.

**Trănsăl'pine**, *a. & n.* (ट्रॅन्झॅल्पाइन्)—(a person living) beyond the Alps (from the Italian point of view); extra-Italian. (इटलीच्या दृष्टीनें आल्प्स पर्वतापलीकडला (राहणारा); इटालियनेतर.

**Trănsatlăn'tic**, *a.* (ट्रॅन्झट्लॅन्टिक्)—beyond the Atlantic, American; (of ship etc.) crossing the Atlantic. अटलँटिक पलीकडील, अमेरिकन; अटलांटिक ओलांडणारी (बोट, जहाज).

**Trănscĕnd'**, *v. t.* (ट्रॅन्सेन्ड्)—to go or be beyond, be or pass beyond the range of; be too high for; surpass; soar above. पलीकडे जाणें, च्या पलीकडे असणें, दुर्गम,-दुर्बोध,-असणें; फार उंच असणें; मागें टाकणें, वर सरशी करणें, वर ताण करणें; उंच भरारी मारणें. *Transcen'dence,-dency, nn.* श्रेष्ठता, वरिष्ठता, अधिकपणा, वरचढपणा.

**Trănscĕn'dent**, *a.* (ट्रॅन्सेन्डन्ट्)—of supreme merit or quality, surpassing others; (scholastic Philos.) higher than, not included in any of, the ten categories; (Kantian Philos.) not realizable in experience; (esp. of God) existing apart from the material experience. श्रेष्ठ, उत्कृष्ट, वरचढ; (ॲरिस्टॉटलच्या) दहा सामान्य वर्गांपलीकडचा; (कॅन्टच्या मताप्रमाणें) अनुभवातीत, अतीत, सर्वातीत, गुणातीत. *n.* (Philos.) *t.* thing. गुणातीत वस्तु.

**Trănscĕndĕn'tal**, *a.* (ट्रॅन्सेन्डे'न्टल्)—not based on experience; supernatural; (pop.) vague, obscure. अनुभवाच्या पलीकडचा, अनुभवातीत; अलौकिक; गूढ, अज्ञेय, अगम्य.

**Trănscŏntinĕn'tal**, *a.* (ट्रॅन्झकॉन्टिने'न्टल्)—*railway*, traversing a continent. खंडाच्या या टोंकापासून त्या टोंकापर्यंत जाणारी (आगगाडी).

**Trănscribe'**, *v. t.* (ट्रॅन्स्क्राइब्)—to copy out; reproduce in ordinary writing. नक्कल करणें; नेहमींच्या पद्धतीनें लिहिणें, चालू लिपींत उतरणें (लघुलिपींतून).*-ber, n.*

**Trăn'script**, *n.* (ट्रॅन्स्क्रिप्ट्)—a copy of any kind, product of transcription. नक्कल, उतारा.

**Trănscrĭp'tion**, *n.* (ट्रॅन्स्क्रिप्शन्)—the act of transcribing or copying. नक्कल करणें, उतारा घेणें. *-'tional,-'tive, aa.*

**Trănscu'rrent**, *a.* (ट्रॅन्स्कर'न्ट्)—(nat. hist.) set or running cross-wise. तिरपा-आडवा असलेला, -जाणारा,

**Trănsĕ'ction**, *n.* (ट्रॅन्से'क्शन्)—cross-section. तिरपा विभाग,-तुकडा,-छेद

**Trănsfer'**, *v. t.* (ट्रॅन्स्फ'र्)—to shift from one position or receptacle to another; make over possession of (property, etc. *to* person); convey drawing etc. from one surface to another. स्थलांतर करणें, बदली करणें; दुसऱ्याच्या नांवावर करून देणें, स्वत्वनिवृत्ति करून देणें; (हातानें लिहिलेली प्रत) शिळेवर चढविणें, (चित्र वगैरे) कापडावर चढवून घेणें. *n.* (ट्रॅन्स्फर्) transferring; conveyance of property to new owner, document effecting this; design etc. that can be transferred from one surface to another. दुसरीकडे नेणें, बदलणें,

स्थलांतर, बदली; दुसऱ्याच्या नांवावर चढवून देणें, (नांवावर) फिरवून देणें, स्वत्वनिवृत्तिदर्शक करार; शिळेवर चढविण्याचा,-कपड्यावर घेण्याचा,-नमुना. *T. book,* register of *tt.* of property, shares etc. तपशिलीचें (-मालमत्ता, विभाग वगैरे नांवावर फिरवून दिल्याचें-) नोंदपुस्तक. *T. ink,* शिळेवर फिरवून घेण्याच्या नमुन्याची-चित्राची-शाई,-छाती मत लिहिण्याची शाई. *T. paper,* (शिळा छापखान्यांतील) छाती मत लिहिण्याचा कागद.

**Trănsfer'able,** *a.* (ट्रॅन्सफ'रबल)—that can be transferred. नांवावर चढवून देतां येण्याजोगा, बदलीचा. *The t. vote,* electoral method for securing that elected candidate shall represent a majority, each voter signifying on his ballot-paper to which candidate his vote shall be transferred if no candidate has an absolute majority of first preference votes. मताच्या बदला पद्धतीची निवडणूक (यांत उमेदवार बहुमतानें निवडून यावा म्हणून प्रत्येक मतदार आपल्या मतांचा विशिष्ट क्रम मतदानपत्रिकेवर दर्शवितो, त्याप्रमाणें मतांची बदली करतां येते.) (Ticket) *not t.* फक्त घेणाऱ्याच्या उपयोगाचें (तिकीट,-परवाना).-*ability, n.*

**Trăns'ference,** *n.* (ट्रॅन्स्फरन्स)—transferring, a passage from one place to another. स्थानांतर, बदली.

**Trănsfig'ure,** *v. t.* (ट्रॅन्सफिग्यर)—to change the aspect of; to invest with a more spiritual or elevated character. रूप पालटणें, स्वरूप बदलणें; दिव्य रूप देणें.-*ura'tion, n.* रूप पालटणें; (with the) खिस्ताचें रूप पालटण्याचा उत्सव (हा ऑगस्ट ६ तारखेला असतो).

**Trănsfix',** *v. t.* (ट्रॅन्सफिक्स)—to pierce through with a lance or any other pointed weapon; (of horror etc.) root (person) to the spot; paralyse the faculties of. भोंसकणें; (भीतीनें) थबकविणें, निश्चल करणें; हतबुद्ध करविणें, हतबुद्ध करणें.-*ion, n.* piercing through; (surg.) amputation by piercing transversely and cutting outwards. भोंसकणें; (शस्त्रक्रियेंत) तिरपा फाड व पहिश्छेद.

**Trănsfōrm',** *v. t.* (ट्रॅन्सफॉर्म)—to change the form or character of. स्वरूप फिरविणें, वृत्ति बदलणें, आकार-रूप-पालटणें, सोंग घेणें, रूपांतर करणें.-*able, a.* रूपांतरक्षम.

**Trănforma'tion,** *n.* (ट्रॅन्सफॉर्मेशन)—transforming, being transformed; metamorphosis (of insects); (Math.) change from one figure or expression to another equal in quantity; woman's artificial head of hair. रूपांतर करणें,-होणें, रूपांतर; रूपविकार, विकृति; रूपांतर; (दुकानांतील शोभेचें) खोटें केसांसकट कृत्रिम डोकें.

**Trănsfōr'mer,** *n.* (ट्रॅन्सफॉर्मर)—In vbl. senses; an apparatus for changing the voltage of an alternating (electric) current supply. रूप फिरविणारा, रूपांतर करणारा; रोहित्र. *T. step up,* आरोहित्र. *T. step down,* अवरोहित्र.

**Trănsfūse',** *v. t.* (ट्रॅन्सफ्यूझ)—to cause (fluid etc.) pass from one vessel to another; (Med.) inject extraneous blood or other liquid into the veins or blood of. एका पात्रांतून दुसऱ्या पात्रांत ओतणें,-काढून घेणें; (एका मनुष्याचें) रक्त दुसऱ्याच्या अंगांत घालणें, औषध टोंचणें; (Bot.) संक्रामण करणें.-*sion, n.* दुसऱ्या भांड्यांत ओतणें; रक्ताधानप्रयोग; संक्रामण.-*sive,* (सिव्ह) *a.*

**Trănsgrĕss',** *v. t. & i.* (ट्रॅन्स्ग्रे'स,-झ)—to infringe (Law); outstep; sin. (आज्ञा, हुकूम) मोडणें; उल्लंघन करणें; ओलांडणें; पाप करणें.-*ion, n.* (esp.) a sin. उल्लंघन, पातक, पाप, अन्याय.-*or, n.* आज्ञाभंग करणारा; पातकी.

**Tranship',** *See* Trans-ship.

**Trăns'ient,** *a.* (ट्रॅन्झिअन्ट)—momentary, quickly passing away; fleeting. क्षणिक, क्षणभंगुर; चंचल. *Snatched a t. glance,* ओझरतें दर्शन झालें. *T. chord, note,* unessential, serving only to connect. अनावश्यक, संवादी,-स्वर, जोडसूर. *Transiently, adv.;-ience, n.* क्षणभंगुरता, अशाश्वता.

**Trăns'it,** *n.* (ट्रॅन्झिट)—passing from place to place, conveyance, passage; passage of a heavenly body across the sun's disk, &c. नेणें; मार्ग, वाट, रवानगी, ने-आण करणें; याम्योत्तरगमन, संक्रमण, संक्रान्ति. *v. t.* to cross the disk of (sun etc.) (सूर्य-) बिंबावरून जाणें. *T. of Venus,* शुक्र-रवि-युति. *T. circle,-instrument,* याम्योत्तरक्रमणनायक यंत्र. *T. duty,* duty paid on goods passing through a country. देशांतून बाहेर जाणाऱ्या मालावरची जकात. *In the t.,* ने आण करतांना, वाटेंत.

**Trănsi'tion,** *n.* (ट्रॅन्झि'शन)—passage from one state or subject or set of circumstances to another, change or process of change. संक्रमण; स्थित्यंतर, बदल, पालट. *T. stage, period,* संक्रमणावस्थेची पायरी, संक्रमणकाल.-*al, a.*

**Trăns'itive,** *a. & n.* (ट्रॅन्सिटिव्ह)—(of verb) requiring a direct object expressed or understood. सकर्मक (क्रियापद).-*ly, adv.;-ness, n.*

**Trăns'itory,** *a.* (ट्रॅन्सिटरि)—of a passing nature; merely temporary, of short duration. चंचल; क्षणभंगुर, क्षणिक, अस्थायी. *T. action,* (law) action that can be brought in any country irrespective of where the transaction occurred. कोणत्याहि देशांत गुदरतां येणारी फिर्याद,-कायदेशीर इलाज.

**Trănslāte',** *v. t.* (ट्रॅन्स्लेट)—to give the sense of in another language; convey, introduce (idea, principle) *from* one art *into* another; interpret (signs, movements); remove (bishop) to another see; convey to heaven without death; (arch.) transform; (Teleg.)

retransmit (message); (Mech.) cause (body) to move so that all its parts follow same direction. रूपांतर करणें; दुसऱ्या भाषेंत लिहिणें,-आणणें,-उतरणें; (एका कलेंत व्यक्त केलेली कल्पना) दुसऱ्या कलेंत व्यक्त करणें, दुसऱ्या कलेंत बसविणें,-योजणें; समजणें, मानणें, घेणें; चा अर्थ लावणें; (बिशपची) बदली करणें; सदेह स्वर्गांत चढवणें, स्वर्गाला नेणें, जाणें; बदलणें, वेष पालटणें; रूपांतर होणें; लांब अंतरावरील तार (अस्पष्ट होऊं नये म्हणून बॅटरीची मदत वाढवून) पुढें पाठविणें; (आंसाभोंवतीं फिरल्याशिवाय) स्थलांतर करण्याची गति देणें, स्थलांतर कराविणें. *Kindly t.*, (*fig.*) say what you mean in plain words. तुझें म्हणणें सोप्या शब्दांत-स्पष्ट करून-सांग. *Transla'table, a.;-tor, n.* भाषांतर-कर्ता,-करणारा.

**Trănslā'tion,** *n.* (ट्रॅन्स्ले'शन्)—art or act or product of translating; removal. भाषांतर करण्याची कला, भाषांतर; स्थलांतर करणें.

**Trănslit'erāte,** *v. t.* (ट्रॅन्झ्लि'टरेट्)—to express in the more or less corresponding characters of a different language. (एका भाषेचे शब्द) दुसऱ्या भाषेचे लिपींत लिहिणें. (जसें 'But' चें मराठींत 'बट्' लिहिणें).*-tion, n.;-tor, n.*

**Translu'cent,** *a.* (ट्रॅन्स्लू'सन्ट्)—allowing light to pass through, clear. प्रकाशभेद्य, पारदर्शक, स्वच्छ. *-cence,-cency, nn.*

**Trănsmarine',** *a.* (ट्रॅन्झ्मरी'न्)—beyond the sea. समुद्रापलीकडचा,-कडला.

**Trăns'migrāte,** *v. t.* (ट्रॅन्झ्-माइग्रेट्)—to pass from one country to another; (of soul) pass from one body into another. स्थानांतर करणें, देशांतर करणें; (आत्मा) पुनर्जन्म पावणें, दुसऱ्या योनींत जाणें.*-tion, n.* देशांतर (करणें); पुनर्जन्म, जन्ममरण, देहांतर.*-tory, a.*

**Trănsmiss'ible,** *a.* (ट्रॅन्झ्मि'सिबल्)—that may be transmitted. दुसऱ्या बिंदूंत किंवा स्थळीं नेण्याजोगा; (Math.) संचार्य; (Phys.) संवहिष्णु.

**Trănsmi'ssion,** *n.* (ट्रॅन्झ्मि'शन्)—sending from one place to another. एका जागेहून दुसऱ्या जागीं पाठविणें, रवानगी, (Math.) संचारण; (Phys.) वहन.

**Trănsmit',** *v. t.* (ट्रॅन्झ्मि'ट्)—to effect conveyance of; pass on; serve to communicate; be a medium for (heat, light, etc.). पाठविणें, वाहणें; जाऊं देणें; पोहोंचविणें, पार जाऊं देणें, चें वहन करणें.

**Trănsmi'tter,** *n.* (ट्रॅन्झ्मि'टर)—one that transmits; an apparatus for transmitting wireless signals. पाठविणारा, दुसऱ्या स्थळीं नेणारा; (बिनतारी संदेश-) प्रेषक यंत्र.

**Trănsmitting station,** *n.* (ट्रॅन्झ्मिटिंग् स्टेशन्)—station sending out telegraphic or wireless message. विद्युत्संदेश पाठविणारें ठिकाण, बिनतारी-संदेश पाठविणारें ठिकाण,-ठाणें,-स्थान.

**Trănsmūte',** *v. t.* ट्रॅन्झ्-म्यूट्)—to change the form, nature or substance of. रूपांतर करणें, बदलणें, द्रव्यांतर करणें, किमयेनें हलकी धातु श्रेष्ठ करणें, (भूमिति) आकृति बदलणें; जात्यंतर करणें.*-tabil'ity, n.,-ta'tion, n.* बदलणें, रूपांतर; किमया करणें; जात्यंतर.*-table, a., -tative, a.*

**Trănsnor'mal,** *a.* (ट्रॅन्झ्नॉ'र्मल्)—beyond what is normal. प्रमाणाबाहेरचा, असामान्य.

**Trănsoceăn'ic,** *a.* (ट्रॅन्झोशिॲ'निक्)—situated beyond or crossing the ocean. सागरापलीकडे असलेला, सागर ओलांडणारा.

**Trăn'som,** *n.* (ट्रॅ'न्सम्)—horizontal bar of wood or stone across window or top of door; a cross bar. दरवाजा व खिडकी यांच्यावरचें आडवें लांकूड; आडवा दांडा.

**Trăns'pārent,** *a.* (ट्रॅन्स्पेअरन्ट्)—that can be clearly seen through; plainly apparent; (*fig.*) (of disguise, pretext etc.) easily seen through; free from disguise, frank. पारदर्शक, प्रकाशसुलभ; अगदीं स्वच्छ, साफ, नितळ; सहज लक्षांत येण्याजोगा, पारदर्शक; उघडा, मोकळा. *T. colours,* (in painting) पारदर्शक रंग.*-ly, adv,;-ness, n.*

**Trănspire',** *v. t. & i.* (ट्रॅन्स्पा'यर्)—to emit (vapour) or pass off through pores of skin, &c; escape from secrecy, become public, emerge into knowledge; (Bot.) exhale watery vapour; (vulg.) happen. रोमरंध्रांतून बाहेर पडणें, स्पंदन करणें; बाहेर फुटणें, चव्हाट्यावर येणें; बाष्प बाहेर टाकणें, बाष्पनिष्कासन करणें,-होणें; घडणें, होणें. *n.* स्वेदन; बाष्पनिष्कासन; उच्छ्वासक्रिया.*-rable,-ratory, aa.*

**Trănsplănt',** *v. t.* (ट्रॅन्स्प्ला'न्ट्)—to uproot and replant elsewhere, remove to another place; (surg.) transfer living tissue and implant in another part of body or in another person's body. लावणी लावणें, आंवणी करणें, रोप काढून दुसऱ्या ठिकाणीं लावणें; एका ठिकाणची (पेशीजालयुक्त त्वचा) कातडी दुसऱ्या ठिकाणीं किंवा दुसऱ्याच्या शरीरांत सांधणें, त्वक्संधान करणें.*-able, a.;-ation, n.* रोपांचें स्थलांतर, लावणी, आंवणी; त्वक्संधान. *Transplan'ter, n.* दुसरीकडे लावणारा; रोप किंवा झाड मुळांसकट उपटून दुसरीकडे लावण्याचें हत्यार. [L. *trans,* across, *plantare,* plant]

**Trănsport',** *v. t.* (ट्रॅन्स्पॉ'र्ट्)—to convey by land or sea; (*hist.*) deport (a convict) beyond sea; fill with ecstasy, rage, &c. नेणें, वाहणें; काळ्या पाण्यावर पाठविणें, हद्दपार करणें; अत्यानंद होणें, आवेश येणें, देहभान नाहींसें करणें. *n.* (ट्रॅन्स्पॉर्ट्) transporting; a ship conveying troops, military stores, &c.; transported convict; vehement emotion. (माल वगैरे) नेणें, वाहून नेणें; सैन्य वगैरे नेणारें गलबत, सैन्यवाहतुकीचें लष्करी जहाज; हद्दपार केलेला गुन्हेगार; झटका, उत्कट मनोविकार. *Transported with joy,* अत्यानंद झालेला. *T. ship,-vessel,* सैन्यवाहतुकीचें लष्करी जहाज. *In a t. of rage,*

क्रोधाच्या झटक्यांत. *Was in tt. of joy*, अत्यानंदमग्न झाला. *Transport'able, a.* वाहून नेण्याजोगा; काळ्या पाण्याची शिक्षा होण्याजोगा.*-ability, n.*

**Trănsportā'tion**, *n.* ( ट्रॅन्स्पॉर्टेशन् )—conveying or being conveyed from place to place; banishment. नेणें, वाहणें, वाहतूक; हद्दपारी. *T. for life*, जन्मठेपेची ( काळ्यापाण्याची ) शिक्षा.

**Trănspōse'**, *v. t.* ( ट्रॅन्स्पोझ् )—to change the order or serial place of; (Mus.) put into another key. जागा किंवा क्रम बदलणें, ( Math. ) समीकरणाच्या दुसऱ्या बाजूस नेणें, पक्षांतरनयन करणें; मागें पुढें ( वाक्यांतील शब्दांचा क्रम ) करणें; दुसऱ्या सुरांत नेणें, -वाजविणें.*-sal,-ser, nn.*

**Trănsposi'tion**, *n.* ( ट्रॅन्स्पाझिशन् )—transposing, being transposed. जागेची अदलाबदल, स्थानांतर; ( गणित ) पक्षांतरनयन; स्थानविनिमय.*-al,-sitive, aa.*

**Trăns-ship'**, *v. t.* ( ट्रॅन्शिप् )—to transfer from one ship to another. ( एका बोटींतून ) दुसऱ्या बोटींत चढविणें, नौकांतर करणें.*-ment, n.*

**Trănsŭbstăn'tiāte**, *v. t.* ( ट्रॅन्सब्स्टॅन्शिएट् )—to change into a different substance. पदार्थपरिवर्तन करणें, द्रव्यांतर करणें.*-tion, n.* द्रव्यांतर होणें; प्रभुभोजनांतील द्राक्षासव व भाकरी यांचें ख्रिस्ताचें शरीर व रक्त होतें असें मानणें, द्रव्यांतरीभवन.

**Trănsūde'**, *v. i.* ( ट्रॅन्स्यूड् )—( of fluid ) to pass through pores or interstices of membrane etc. झरणें, पाझरणें, स्राव होणें.*-dation, n.* अंतःस्राव. *-datory, a.*

**Trănsverse'**, *a.* ( ट्रॅन्झ्व्हर्स् )—set crosswise. आडवा, तिरपा. *n.* तिर्यक्स्नायु.*-sal, a. & n.* (of line) cutting a system of lines. आडवा, तिर्यक्; तिर्यक् रेषा; तिर्यक् स्नायु.

**Trăp**, *n.* ( ट्रॅप् )—an animal-catching apparatus or device; a scheme for enticing or detecting; U-shaped or other section of pipe; kinds of wheeled vehicle; trap door; (sl.) policeman. सांपळा, पिंजरा, चाप; डाव, पेंच, अडचण, कचाट; U च्या आकाराचा नळ, उलटी वक्रनलिका; ( रंगभूमीचें ) चोरदार; शिपाई. *v. t.* to catch in trap; ensnare or beguile, supply (drain) with tap; furnish (stage) with traps. पिंजऱ्यांत,-सांपळ्यांत,-धरणें, पकडणें; जाळ्यांत,-पेंचांत,-धरणें, फसवून पकडणें; गटाराला यू नळ बसविणें; ( नाट्यगृहांतील रंगभूमीला ) चोरदारें ठेवणें. *T. cellar*, ( नाट्यगृहांतील ) भुयार. *T. door*, चोरदरवाजा.

**Trăp**, *n.* ( ट्रॅप् )—kind of dark volcanic rock. काळवथरी दगड.

**Trăp**, *v. t.* ( ट्रॅप् )—to adorn, deck out. सुशोभित करणें, नटवणें, आरास करणें. *n.* (*pl.*) baggage. सामानसुमान, चीजवस्त, घाडबिद्दायत.

**Trapes**, *v. i.* ( ट्रेप्स् )—to trudge wearily. जड पावलांनीं, -आस्ते कदम,-चालणें; गबाळ्यासारखें चालणें.

**Trapēze**, *n.* ( ट्रॅपीझ् )—cross-bar (s) suspended as swing for gymnastic exercise; a trapezium. कसरत करण्याचा ( उंच टांगलेला ) झुला, झुलती काठी; विषमचतुर्भुज ( आकृति. )

**Trăpē'ziŭm**, *n.* ( ट्रॅपीझिअम् )—any irregular quadrilateral of which no two sides are parallel. विषमचतुरस्र, विषमचतुर्भुज.

**Trăp'ezoid**, *n.* ( ट्रॅपिझाइड् )—a quadrilateral of which only two sides are parallel. समलंबचतुर्भुज. *-al, a.* समांतर द्विभुज चौरस.

**Trăp'per**, *n.* ( ट्रॅपर् )—one whose business is to trap animals, esp. for furs; one tending air-doors in mines. फांसेपारधी; खाणींतील हवाद्वारांवर नजर ठेवणारा.

**Trăpp'ings**, *n. pl.* ( ट्रॅपिंग्ज् )—ornamental cloth spread over horse in processions, &c.; embellishments. घोड्याच्या मिरवणुकीचा शृंगार, साज; थाट थाट, शोभेच्या वस्तु.

**Trăp'py̆**, *a.* ( ट्रॅपि )—tricky, treacherous. फसवा, विश्वासघातकी ( वस्तु ).*-iness, n.*

**Trăsh**, *n.* ( ट्रॅश् )—waste or worthless matter, worthless stuff, rubbish; loppings of trees. निरुपयोगी वस्तु, कचरा, मूर्खपणाचें भाषण; गचाळ लेख; पानपाचोळा, फांदी. *v. t.* to strip (sugar-cane) of outer leaves. ( उंसाच्या ) पात्या काढून टाकणें. *Cane-t.*, उंसाचीं चिपाडें *T. house*, उंसाचीं चिपाडें सांठविण्याची जागा. *T.-ice*, बर्फ टाकलेलें-घातलेलें -पाणी. *Trash'y, a.*;*-ily, adv.*

**Trau'ma**, *n.* ( ट्रॉमा )—morbid condition of body. ( पडून, ठेंचून, झालेली ) जखम, आघात.*-matic, a.* जखमेवरील ( औषध ); आघातजन्य, जखमेचा.

**Trăv'ail**, *n.* ( ट्रॅव्हिल् )—pangs of childbirth; laborious effort, labour with pain. प्रसूतिवेदना, प्रसववेदना, वेणा; कष्टाचे प्रयत्न, श्रम, कष्ट. *v. i.* to toil; be in labour. श्रम करणें; प्रसववेदना होणें.

**Trăv'el**, *v. i. & t.* ( ट्रॅव्हल् )—to make a journey; go in specified manner; (of eye, memory etc.) pass from point to point; cause herds to travel; (of deer etc.) move onwards in feeding; perform distance; journey through; act as commercial traveller; प्रवास करणें, पर्यटण करणें; ठराविक पद्धतीनें जाणें; वरून फिरणें,-फिरविणें; चरत पुढें जाणें, चारा खात खात भटकणें; ( गुरांना ) फिरवणें, हिंडवणें; चरवणें; अंतर तोडणें, मजल मारणें; पायाखालीं -पालथें-घालणें, ( देश ) भर हिंडणें; व्यापारी दलाल म्हणून फिरणें. *n.* travelling, esp. in foreign countries; motion of a part of machinery. प्रवास, देशाटन, मुशाफरी; ( यंत्राची ) चाल, ( यंत्राचें ) मागें पुढें सरकणें,-चालणें. *His eye travelled over the scene*, त्याची नजर ( दृष्टि ) त्या देखाव्यावरून फिरली, त्यानें तो समग्र अवलोकन केला. *Light travels faster than sound*, आवाजापेक्षां प्रकाश अधिक जलद अंतर तोडतो; ध्वनीपेक्षां प्रकाश अधिक वेगवान असतो. *Trav'els, n. pl.* प्रवासवर्णन. *Trav'elled, pa. t. & pa. p. & a.* experienced in travelling. प्रवास केलेला, पुष्कळ प्रवास करून शहाणा झालेला. *Trav'elling, pr. p.*

set in motion. (चंडूकोंचा) चाप, चंडूकोंचा घोडा, कळ, सारिफी.

**Tri'glyph**, *n.* (ट्रिग्लिफ्)—an ornament consisting of a three-grooved tablet in the frieze of the Doric order, repeated at equal intervals. तिरांची (शिळेवरील लाकडी) खोदकाम, नक्षीकाम. *-al,-ic, aa.* [ Gk. *treis*, three; *glupho*, carve ]

**Tri'gon**, *n.* (ट्राइगन्)—(Astrol.) each of four groups of three signs of Zodiac; (Math.) triangle; (Gk. Ant.) game at ball for three persons. तीन तीन राशींच्या चार गटांपैकीं एक; त्रिकोण; तियांचा चेंडूंचा डाव.*-ic, a. Tri'gonal, a.* (Math.) त्रिकोणी, त्रिकोणाचा; (Bot., Zool.) त्रिकोणी छेदाचा,-फांद्याचा.*-nally, adv.*

**Trigonŏ'meter**, *n.* (ट्रिगनॉ'मिटर्)—an instrument for solution of plane right-angled triangle. काटकोन-त्रिकोणमापक यंत्र.

**Trigonŏm'ĕtrȳ**, *n.* (ट्रिगनॉ'मिट्रि)—the measuring of triangles, science of the relations between the sides and the angles of triangles. त्रिकोणमिति. *-met'rical, a.* त्रिकोणमितिविषयक; त्रिकोणमितीच्या नियमांनीं केलेला; *T. survey*, त्रिकोणमित भूमापन; *-met'rically, adv.*

**Trihĕd'ron**, *n.* (ट्राय्हे'ड्रन्)—a figure having 3 sides or faces. त्रिफलक.*-ral, a.*

**Trilăt'eral**, *a.* (ट्रायलॅ'टरल्)—having three sides. तीन बाजूंचा, त्रिभुज. *n.* a triangle; *t.* district etc. त्रिकोण; त्रिकोणी प्रदेश.

**Tril'bȳ**, *n.* (ट्रि'ल्बि)—a kind of soft felt hat; (*pl., sl.*) feet. एक जातीची मऊ साहेबी टोपी; (अने०) पाय, पावलें.

**Triling'ual**, *a.* (ट्रायलिं'ग्वल्)—of or expressed in three languages. तीन भाषांचा, त्रिभाषिक.

**Trilit'eral**, *a.* (ट्रायलि'टरल्)—of three letters; (of Semitic languages) having roots in three consonants. तीन अक्षरांचा,-अक्षरी; त्रिव्यंजनी धातु असलेली (सेमिटिक भाषा).

**Trill**, *n.* (ट्रिल्)—quavering or vibrating sound. सकंप ध्वनि, कंप घेऊन गाणें, सरांटा. *v. i. & t.* to produce trill; warble; pronounce with trill. कंप घेणें, सरांटे घेणें; कंप घेऊन गाणें; सकंप उच्चार करणें, कंप निघणें.

**Tri'lling**, *n.* (ट्रि'लिंग)—a compound crystal of three individuals; each of three children born at a time. (तिहींचा मिळून बनलेला) संयुक्त स्फटिक, तिळ्या मुलांपैकीं एक.

**Trill'ion**, *a. & n.* (ट्रि'ल्यन्)—a million million million; (U. S.) a million million. प्रयुत घन, एकावर अठरा शून्यें देऊन झालेला आंकडा; (अमे०) दशलक्ष-दशलक्ष (एकावर १२ शून्यें). [ L. *tris*, three; *millio*, a million ]

**Trilŏb'ate**, *a.* (ट्रायलो'बट्)—three-lobed. तिपाळी, त्रिपालिक.

**Tri'lobite**, *n.* (ट्रा'यलबाइट)—kind of fossil crustacean. अश्मीभूत संधियुक्त प्राण्यांची त्रिपालिका जाति,-एक पोटजात.

**Tril'ogȳ**, *n.* (ट्रि'लजि)—(Gk Ant.) set of three tragedies to be acted in immediate succession; set of three literary compositions, speeches etc. each complete in itself but with common theme. तीन शोकान्त नाटकांचा संच (हीं लागोपाठ करावयाचीं), तीन लेखांचा संग्रह.

**Trĭm**, *a.* (ट्रिम्)—in good order, neat; not loose or ungainly. ठाकठीक; व्यवस्थित, सुबक, सुरेख, नीटसर. *v. t. & i.* to clip or garnish the edges; adjust balance or inclination of (ship, sails); hold middle course in politics or opinion, be a time-server; (colloq.) rebuke, thrash. कातरणें, कापणें, छाटणें, छाटून सारखें,-नीटनेटकें,-करणें, निटावणें, सुधारणें, शोभिवंत करणें; (गलबत) समभार करणें, समतोल,-सारखें कलतें,-करणें; मधला मार्ग स्वीकारणें, काळ पाहून,-स्वार्थीपणानें,-चालणें,-वागणें; तासडपट्टी काढणें, कानउघडणी करणें, झोडपून काढणें. *n.* state of readiness or fitness, disposition. तयारी, सिद्धता, सुव्यवस्था, सुस्थिति. *To t. person's jacket*, flog him. फटके लगावणें. *I am in no t.*, मी (कपडे, प्रकृति वगैरेंत) नीटनेटका नाहीं, ठीक नाहीं. *T. of the masts*, relative position. डोलकाठ्यांची सापेक्ष रचना,-स्थिति. *T. a boat*, होडी समतोल करणें. *T. a lamp, its wick*, दिव्याची वात पुढें करणें, सारणें, काजळी काढून सारखी करणें, कातरणें. *Trimmer, n.* (कापडे कापून) नीटनेटके करणारा; रंग पाहून वागणारा; कापण्याचें,-कातरण्याचें,-हत्यार.

**Trimm'ing**, *n.* (ट्रि'मिंग)—(*esp.*) anything used to adorn a garment, ornamental appendages; (*pl.*) accessories. कपड्याला शोभा देणारी वस्तु, फीत, नकशीदार झालर; साहाय्यक वस्तु.

**Trine**, *a.* (ट्राइन्)—threefold, made of three parts. त्र्यात्मक, तिहेरी. *n.* (Astrol.) aspect of two planets 120° apart. १२० अंशांची दृष्टि, -ग्रहांमधील अंतर. *Trinal,-ary, aa.*

**Trin'gle**, *n.* (ट्रिं'गल्)—a curtain-rod; support of canopy of bedstead; (Archit.) small squary moulding; (Gunn.) bar to check recoil. पडद्याची शीग; छप्परपलंगाची दांडी; लहान चौकोनी बांधकाम; उटी.

**Trinitrotol'ūol,-ūene**, *nn.* (ट्रायनायट्रटाल्युअल,-ईन्)—a high explosive much used in the last great war. (गेल्या महायुद्धांतील) एक प्रचंड स्फोटक, सुरुंग.

**Trin'itȳ**, *n.* (ट्रि'निटि)—being three; a union of three in one; (*the T.*) three persons (Father, Son, Holy Spirit) of the Godhead. त्रय, तिहींचा समुदाय, तीन असणें; त्रिमूर्ति; देवत्रयैकत्व. *-tar'ion, a.* दैवत्रयैकत्ववादी, त्रिमूर्तिवादी.

**Trink'ĕt**, *n.* (ट्रिं'किट्)—a trifling ornament esp. one worn on the person; a small fancy

article. लहान दागिना, खिडूकमिडूक; मजेदार लहान चीज,-खेळणें.

**Trinō'mial**, *a.* ( ट्रायनो'मिअल् )—employing three terms. त्रिपद, तीन पदांचा. Also, *Trinom'inal, a.*

**Tri'ō**, *n.* ( ट्रि'ओ )—( *pl.-os* ) a set of three performers or three persons, three united. त्रयी, त्रिकूट, त्रितय.

**Tri'olĕt**, *n.* ( ट्रा'यलेट )—an eight line poem with strict rhyme-scheme. विशिष्ट यमकाची आठ ओळींची कविता.

**Tri'onal**, *a.* ( ट्रा'यनल् )—a hypnotic drug. गुंगीचें औषध.

**Trip**, *v. i. & t.* ( ट्रिप् )—to go lightly and quickly along; (*fig.*, of rhythm etc.) run lightly; catch one's foot and stumble; commit a blunder or moral lapse; ( Naut. ) loose ( anchor ) from bottom, turn ( yard ) from horizontal to vertical position; release ( part of machine ) suddenly by withdrawing catch. उडत उडत जाणें; तालबद्ध असणें, अडखळून पडणें, सरफटून पाडणें; वांकडें पाऊल पडणें, चुकणें, घसरणें, चूक करणें; ( नांगर ) सैलावणें, -उठवणें; ( डोलकाठीला बांधलेली आडवी काठी ) परवान उभें करणें; पकड काढून ( यंत्राचा भाग ) एकदम घसरवणें. *n.* travelling-excursion, esp. for pleasure; a ship's voyage; stumble, nimble step. मौजेखातर छोटी सफर, प्रवास; जलपर्यटन, खेप, फेरी, ·ठुमकत चाल,-पाऊल; ठोकर, अडखळणें, ठेंच, पकड, पेंच. *Round t.*, जाऊन परत येण्याची-परतीची -सफर. *All are apt to t.*, चुकीला सर्वच पात्र.

**Tripărt'ite**, *a.* ( ट्राय्-पा'र्टाइट् )—divided into three parts; ( Bot., of leaf ) divided into 3 segments down to the base; made between three parts. त्रिभाग, तीन भाग असलेला; तीनदां विभागलेलें, त्रिधा-विभक्त ( पर्ण ); तिघांमधला, तिघांचा ( करार ).-*ly, adv.*; -*ti'tion, n.*

**Tripe**, *n.* ( ट्राइप् )—principal part of stomach of ox etc. as food; ( usu. pl. ) entrails, belly; ( sl. ) inferior stuff. ( रवंथ करणाऱ्या प्राण्यांचा ) मुख्य कोठा ( मांसाहाऱ्याचें खाणें ); आंतडीं, पोट; क्षुद्र वस्तु, हलकी गोष्ट.

**Tri'pĕtalous**, *a.* ( ट्रॉ'यपेटलस )—( Bot. ) having three petals. त्रिपदल, तीन पाकळ्यांचें ( फूल ).

**Tri'phthong**, *n.* ( ट्रि'फ्थाँग )—three vowels forming one sound. त्र्यच्क, तीन स्वरांचा संयुक्त स्वर.

**Tri'plāne**, *n.* ( ट्रा'यप्लेन् )—an aeroplane with three planes. ति-पातळी विमान.

**Tri'ple**, *a.* ( ट्रि'पल् )—three times repeated, threefold; consisting of three parts. तिप्पट; तिहेरी, तिसुती, तिपदरी. *v. t.* to treble. तिप्पट करणें,-वाढवणें, -होणें. *T. alliance*, तिघांचा,-त्रिकूट,-संघ. *T. star*, ( astron. ) त्रिगुणनक्षत्र.

**Trip'lĕt**, *n.* ( ट्रि'प्लिट् )—a set of three things; three successive lines of rhyming; each of three children born at a birth. तीन वस्तूंचा संच; लागोलाग तीन चरणी यमकांची कविता; तिवळ मुलांपैकीं एक, तिवळ.

**Trip'licāte**, *v. t.* ( ट्रि'प्लिकेट् )—to treble. ( एका प्रतीवरून ) तीन प्रती काढणें, तिप्पट करणें. *a.* ( -कट् ) -तिहेरी, तिपदरी; तिप्पट. *n.* तिसरी नक्कल,-प्रत. *T. ratio*, ( Math. ) घदनात्मक प्रमाण.-*ca'tion, n.*;-*cature, n.*

**Tri'pod**, *n.* ( ट्रा'य्-पाड् )—a three-legged or three-footed stand, a three-footed caldron. ( कॅमेरासाठीं ) तिपाई ठोकळा,-तिपाई; तिवई; ( ग्रीक डेल्फी देवतेच्या देवळांतील ) कौल लावण्याची पंचरसी धातूची वेदी. [ L. *tripus*, Sk *tri*, three; *pous-pedos*, Sk *pada*, foot ]

**Tri'pŏs**, *n.* ( ट्रा'य्-पॉस् )—an honours examination at Cambridge. केंब्रिज येथील एक पदवी सन्मान परीक्षा, सन्मान पदवी परीक्षा.

**Tripp'er**, *n.* ( ट्रि'पर् )—a person who goes on a pleasure trip ( for a day ). एक दिवसाची चैनींत सफर,-प्रवास,-करणारा.

**Trip'tych**, *n.* ( ट्रि'प्टिक् )—picture or carving on three panels; side by side; set of three-writing tablets hinged together. तीन जोड चकल्यांवरील-तावदानी चौकटीवरील-चित्रकाम, नक्षीकाम; तिहेरी जोड-पाटी. [ Gk *tri*, three; *plusso*, fold ]

**Triquĕ'trous**, *a.* ( ट्रायक्वे'ट्रस )—three-cornered; ( Bot., of stem ) having 3 acute angles. तिकोनी; तीन लघुकोनांचें ( खुंध, देंठ ).

**Tri'rēme**, *n.* ( ट्रा'यरीम् )—ancient ( Greek ) worship with three banks of oars. प्राचीन लढाऊ जहाज.

**Trisĕct'**, *n.* ( ट्रायसे'क्ट )—to divide into three equal parts. सारखे तीन भाग करणें.-*ion, n.*

**Tris'mus**, *n.* ( ट्रि'झ्मस )—lock-jaw. दांतखिळी बसणें, हनुग्रहवात.

**Trisyll'able**, *n.* ( ट्रिसि'लबल )—a word of three syllables. तीन अवयवी शब्द.-*ab'ic, a.* तीन अवयवांचा, त्र्यक्षरी.

**Trite**, *a.* ( ट्राइट )—well-worn; hackneyed, commonplace. उष्टा, जुना, जीर्ण, क्षुद्र; अगदीं प्रचारांतील.-*ly, adv.*;-*ness, n.*

**Tri'thēism**, ( ट्रा'यथीइझम् )—doctrine that there are 3 Gods. ( पिता, पुत्र व आत्मा ह्या तीन वेगवेगळ्या व्यक्ति आहेत असा ) देवत्रय ( भेद ) वाद, त्रिमूर्तिवाद.-*ist, n.*

**Tri'ton**, *n.* ( ट्रा'यटन् )—( Gk Myth. ) an attendant of the sea-god Poseidon; kind of lizard-like animal. समुद्रदेव पॉसिडनचा अनुचर; एक जातीचा सरड्यासारखा प्राणी.

**Trit'ŭrāte**, *v. t.* ( ट्रि'ट्यूरेट )—to grind to powder, masticate thoroughly. वाटणें, उगाळणें, चें पूर्ण चर्वण करणें.-*rable, a.*-*ration, n.*;-*rator, n.*

**Tri'ŭmph**, *n.* ( ट्रा'यम्फ् )—processional entry into ancient Rome of victorious general; being victorious, signal success; joy at success. exultation. विजयप्राप्तीनिमित्त मिरवणूक, विजयोत्सव; जयविजय; जयहर्ष. *v. i.* to attain signal success; exult *over.*· विजयी होणें; जयाबद्दल आनंद करणें, जयजयकार करणें, नाचणें; तोरा मिरवणें, ऐट दाखविणें.

**Trium'phal**, *a.* ( ट्राय'म्फल् )—celebrating a triumph, serving to commemorate victory. विजयसूचक, जयोत्सवाचा, जयविषयक.

**Trium'phant**, *a.* ( ट्राय'म्फन्ट् )—victorious, successful; exultant. विजयी, जय पावलेला; विजयानंदसूचक. *-ly, adv.*

**Trium'vir**, *n.* ( ट्राय'म्व्हर् )—(*pl.-rs,-ri*) (Rom. Ant.) a member of board of three. (प्राचीन रोमन लोकांतील परिष्ठ सत्ताधाऱ्यांच्या ) त्रिकूटांपैकीं एक. *-'virate, n.* a party or set of three; office of a triumvir. त्रिकूट; त्रय; प्राचीन रोमन परिष्ठ सत्ताधाऱ्यांपैकीं एकाचा अधिकार,-सत्ता. *First triumvirate,* (Rom. Hist.) पॉम्पे, ज्युलिअस सीझर व क्रॅसस् (ख्रि. पू. ६० ) या तिघां सत्ताधाऱ्यांचें त्रिकूट.

**Tri'une**, *a.* ( ट्रा'यून् )—three in one. त्रयात्मक एक, त्रिमूर्ति (देव). *-unity, n.*

**Tri'valent**, *a.* ( ट्रा'व्ह्लंट् )—(Chem.) having combining power of 3. त्रिमूल्यक, त्रिधारणाशक्त. *-lence, n.* त्रिमूल्यकत्व.

**Triv'et**, *n.* ( ट्रि'व्हिट् )—an iron tripod or bracket. लोखंडी तिवई, तिपाई; लोखंडी अर्धमिहरपी अडकवणें. *Right as a t.,* (colloq.) all right, in good position. ठीक, सुस्थितींतील.

**Triv'ial**, *a.* ( ट्रि'व्हिअल् )—ordinary; insignificant, of no moment; (of person) trifling; (Bot., Zool.) popular, not scientific. सामान्य; क्षुल्लक, क्षुद्र; उथळ, अवडंबरी ( क्षुद्रबुद्धीचा मनुष्य ); प्रचारांतलें (नांव). *-ially, adv.*

**Trivial'ity**, *n.* ( ट्रिव्हिॲ'लिटि )—(esp.) a commonplace remark. क्षुल्लकपणा, क्षुद्रपणा; नेहमींचें वजन, तोच तोच कंटाळवाणा उल्लेख.

**Triv'ium**, *n.* ( ट्रि'व्हिअम् )—(Hist.) the first three liberal arts, grammar, rhetoric and logic. व्याकरण, भाषा आणि न्याय या तीन उदात्त कला.

**Tro'car**, *n.* ( ट्रो'कर् )—(Med.) an instrument used for withdrawing fluid from body. (जलोदर रोगांत अंगांतील पाणी काढण्याकरितां ) भोंक पाडण्याचें शस्त्र, त्रीशिसुखयंत्र.

**Tro'chal**, *a.* ( ट्रॉ'कल् )—(Zool.) wheel-shaped. चक्राकार.

**Trochan'ter**, *n.* ( ट्रॉकॅ'न्टर् )—(Anat., Zool.) each of bony processes on upper part of thigh-bone; second joint of insect's leg. जंघास्थीच्या वरच्या टेंगळांपैकीं एक, शिखरक; कीटकाच्या तंगडीचा दुसरा सांधा.

**Tro'che**, *n.* ( ट्रो'क्,-की,-च्,-श् )—a small medicinal lozenge. लहान औषधी वडी.

**Tro'chee**, *n.* ( ट्रो'की )—a long and a short syllable metrical foot. गुरु-लघु ( या दोन अक्षरांचा-मात्रांचा- ) गण. *Trocha'ic, a. & n.* गुरु-लघु गणांची (कविता).

**Trod**, **trodden**, *pa. t. & pa. p.* of Tread.

**Trog'lodyte**, *n.* ( ट्रॉ'ग्लडाइट् )—a cave-dweller. गुहेंतील रहिवासी, रानटी मनुष्य.

**Tro'jan**, *a. & n.* ( ट्रो'जन् )—(native) of Troy, first-class worker or fighter. ट्रायचा ( रहिवासी ); अप्रतिम कार्यकर्ता, योद्धा.

**Troll**, *v. t. & i.* ( ट्रो'ल् )—to go or move round. sing in snatches; fish by drawing bait along in the water. क्रमानें किंवा फेरीनें गाणें, गळ टाकून मासे धरणें.

**Troll'ey,-ly**, *n.* ( ट्रॉ'लि )—(*pl-eys*) kinds of low truck; contact-wheel of electric tram-car worked by wire over-head; (U. S.) an electric street-car. सखल ( मोटर ) गाडी, ढकलगाडी, विजेची ( ट्रॅम ) गाडी चालविण्याचें, वरच्या विजेच्या तारेशीं संयुक्त असें, चाक; विजेची ट्रॅमगाडी. *T. pole,* ट्रॅमचा वरच्या विजेच्या तारेशीं संयुक्त असा चाकवाला दांडा.

**Troll'op**, *n.* ( ट्रॉ'लप् )—a disreputable girl or woman. छाकटी पोर,-स्त्री.

**Troop**, *n.* ( ट्रूप् )—set of congregated persons or animals; captain's cavalry unit; (*pl.*) embodied soldiers; particular call of drum for marching; company of performers. जमाव, समुदाय, झुंड, तांडा, ( पाखरांचा ) थवा; घोडेस्वारांच्या तुकड्या, रिसाला, पथक; सैन्य, शिपाई, लष्कर; कूच करण्यासाठीं नगाऱ्याचा विशिष्ट इषारा; ( नाटक, नाडेभोरीप, कसरत, वगैरे ) काम करणारी मंडळी. *v. i.* to come together or go along in numbers, walk hurriedly *off, away.* घोळक्यांनीं जमणें किंवा जाणें; घाईघाईनें चालणें,-कूच करणें. *T. horse,* लष्करी रिसाल्याचा घोडा. *Get one's t.,* कप्तानाची जागा मिळणें.

**Troop'er** *n.* ( ट्रू'पर् )—a private soldier in cavalry; cavalry-horse; troopship. ( खाजगी ) घोडेस्वार; रिसाल्याचा घोडा; लष्करी वाहतुकीचें जहाज.

**Trope**, *n.* ( ट्रोप् )—metaphorical use of a word. लाक्षणिक अर्थानें शब्द योजणें, रूपकालंकार.

**Troph'ic**, *a.* ( ट्रॉ'फिक् )—(med.) concerned with nutrition. पोषणसंबंध, पोषणनियामक.

**Tro'phy**, *n.* ( ट्रो'फि, ट्रॉ- )—pile of the enemy's spoil set up by ancient army after victory; thing kept as prize or memento, memorial of conquest. विजयानंतर लुटीचा एकत्र केलेला ढीग; जयस्मारक, जयचिन्ह. *-phied, a.* adorned with trophies पुष्कळ जयचिन्हें असलेला, विजयचिन्हांकित.

**Trop'ic**, *n.* ( ट्रॉ'पिक् )—a parallel of latitude 23° 27' N. or S. of equator; a circle of celestial sphere limiting the sun's N. or S. declination; (*pl.*) the regions of the torrid zone. विषुववृत्ताच्या सुमारें साडेतेवीस अंशांचा उ. किंवा द. अक्षांश; अयनसीमा, अयनवृत्त; ( अने० ) उष्णकटिबंध. *a.* उष्णकटिबंधाचा. *T. of Cance* , कर्कवृत्त. *T. of Capricorn,* मकरवृत्त.

**Trop'ical**, *a.* ( ट्रॉ'पिकल् )—of or as of or incident to the tropics; (*fig.*) fervid, passionate; figurative. क्रांतिवृत्ताचा, अयनवृत्तांमधील, उष्णप्रदेशांत होणारा; ( अलं० ) सोत्सुक, उत्कट मनोविकाराचा; अलंकारिक. *T. diseases,*

उष्णप्रदेशांतील रोग. *T. year,* between two successive passages of sun through the same equinox, सायन वर्ष, सांपातिक सौरवर्ष. *Tro'pically, adv.*

**Trŏpĭcopŏl'itan,** *a. & n.* ( ट्रॉपिकापॉ'लिटन् )—( an animal or plant ) confided and common to the tropics. फेवळ उष्णकटिबंधांतील ( प्राणी, झाड ).

**Tropŏl'ogy̆,** *n.* ( ट्रपॉ'लजि )—figurative use or interpretation of words. ( शब्दांची ) लाक्षणिक योजना, रूपकयोजना; लाक्षणिक अर्थ लावणें.

**Trŏt,** *n.* ( ट्रॉ'ट् )—a quadruped's medium pace; human being's gentle run; a toddling child. दुडकी चाल; ( मनुष्याचें ) साधारण धावणें, -धाव. *v. t. & i.* ( of horse etc. ) to go at the trot; ( *joc.* ) go on foot; make ( horse etc. ) trot. दुडक्या चालीनें चालणें, तुरतुर चालणें; पायीं चालणें; ( घोडा ) दुडदुड चालवणें,-हांकवणें. *T. out,* cause ( horse ) to trot to show his paces, (*fig.*) produce, introduce ( person, thing etc. ) to excite admiration. ( घोड्याचीं ) पावलें दिसतील अशा दुडक्या चालीनें चालवणें; कौतुकास्पद रीतीनें दाखविणें, भासविणें. *Proceeded at a t.,* दुडक्या चालीनें जाऊं लागला. ( *Kept him* ) *on the t.,* busy. उद्योग लावून दिलेला. *Trott'ers, n. pl.* animal's feet as food; ( *sl.* ) human foot. ( खाण्यासाठीं ) जनावराचे पाय; माणसाचीं पावलें.

**Trōth,** *n.* ( ट्रोथ् )—truth; faith, fidelity. सत्य, विश्वास, खरें; भरंवसा. *Plight* one's *t.,* ( लग्नांत ) वचन देणें, शपथ घेणें.

**Trō'ty̆l,** *n.* ( ट्रो'टिल )—trinitrotoluol. एक भयंकर स्फोटक (अस्त्र ).

**Trou'badour,** *n.* ( ट्रु'बॅडूर् )—a medieval romantic or amatory poet. ( फ्रान्समधील ) मध्ययुगीन पोवाडे-लावण्या-रचणारे कवि; ( आपल्याकडल्या सारखे ) कोंकेवाले बैरागी. [ F ]

**Trou'ble,** *n.* ( ट्र'बल् )—disquiet; disturbed state; pains bestowed; disease; molestation; ( Mining ) small fault. अशांतता; त्रास, कष्ट, सायास; खळबळ; श्रम, तसदी, खटपट; विकार, पिडा, रोग; दुःख, उपद्रव, छळणूक; भूमिगत थरांतील लहान खंड,-मध्यें तुटलेला भाग. *v. t. & i.* to ruffle ( water, peace, &c. ); inflict trouble on or be a trouble to; trouble oneself. क्षुब्ध करणें; त्रास देणें किंवा घेणें, श्रम देणे, पिडणें, ताप देणें, छळणें; त्रास करून घेणें, संतापणें, काळजी करणें, -वाटणें. *Digestive tt.,* पचनक्रियेचे विकार, चा त्रास. *Ask* or *look for t.,* ( sl. ) meddle, be rash. लुडबुड करणें, अविचार करणें, संकट,-त्रास,-ओढवून घेणें. *Be in t., get into t.,* पेंचांत,-अडचणींत, -सांपडणें; शिक्षेस पात्र होणें. *Take the t.,* तसदी घेणें. *No t.,* ( as a polite formula ) कांहीं अडचण,-त्रास,-नाहीं. *Don't t. about it,* त्याविषयीं कांहीं काळजी-चिंता-करू नको. *A troubled countenance,* सचिंत,-दुःखी,-मुद्रा. *Trou'blous, a.* ( arch. ) full of troubles, agitated. दुःखाचा, संकटाचा, गडबडीचा; क्षुब्ध, खळबळीचा, नष्ट ( काळ इ० ).

**Trou'blesome,** *a.* ( ट्र'बल्-सम् )—causing difficulty or annoyance or discomfort. त्रासदायक, कंटाळवाणा, खडतर.

**Trough,** *n.* ( ट्रॉफ् )—a long narrow shallow receptacle for liquid, &c. to stand in; channel or hollow like this. द्रोण, कोठिंबा, कुंड, टांकी, हौद; पाट, पन्हळ. *T. of the sea,* hollow between two waves. समुद्राच्या दोन लाटांमधील खोलगट भाग, -खोली.

**Trounce,** *v. t.* ( ट्राउन्स )—to inflict severe punishment or defeat *on* by word or deed. जबर शिक्षा देणें; खरपूस मार देणें,-चोप देणें. *Trouncing, n.* खरपूस मार,-चोप.

**Troupe,** *n.* ( ट्रूप् )—a set of actors, acrobats, performing animals, etc. खेळ करणारी मंडळी, नाटकेभोरपी-मंडळी, खेळ करणाऱ्या जनावरांचा संच, इ.

**Trous'ers,** *n.* ( ट्रा'उ-झर्झ् )—( also *pair of t.* ) loose two-legged outer garment from waist to ankles. इजार, पायजमा, पायघोळ चोळणा. *T.* or *tt. pocket,* ( पैसे ठेवण्याचा,-हात मजेंत घालण्याचा ) विजारीचा खिसा.

**Trouss'eau,** *n.* ( ट्रूसो )—(*pl.-s* or *x,-झ्*), bride's outfit of clothes etc. वधूचीं वस्त्रें, कपडे.

**Trout,** *n.* ( ट्राउट् )—a fresh-water fish. गोड्या पाण्यांतील एक मासा. *v. i.* to fish for trout. 'ट्राउट' मासे पकडणें. *T. coloured,* (of white horse) काळे करडे ठिपके असलेला, रंगीबेरंगी ( पांढरा घोडा).*-y, a., -let, n.*

**Trō'ver,** *n.* ( ट्रो'व्हर् )—acquisition of personal property; law-action to recover value of goods wrongfully taken or detained. स्वतःची खाजगी मालमत्ता करणें, स्वकष्टार्जित मालमत्ता करणें; गैरकायदा दुसऱ्यानें घेतलेल्या स्वतःच्या मालकी मालमत्तेबद्दल नुकसानभरपाईची फिर्याद.

**Trow,** *v. t.* ( ट्रौ )—( arch. ) to think. वाटणें, मत असणें. *What ails him,* (I') *t.?* त्याला काय होत आहे? कळत नाहीं.

**Trow'el,** *n.* ( ट्रा'वेल् )—( mason's ) flat-bladed tool for spreading mortar etc.; gardener's scoop for lifting small plants. थापी, कर्णी; खुरपें. *v. t.* थापीनें ( भिंतीला ) गिलावा काढणें. *To lay it on with a t.,* (*fig.*) flatter grossly. भरमसाट स्तुति करणें,-खुशामत करणें. *Trowelled, pa. t. & pa. p.* [ L. *trua, a* ladle ]

**Troy,-weight,** *nn.* ( ट्राय, ट्रायवेट् )—weight used for gold, silver and gems. ( बारा औंसी पौंडाचें ) ट्राय वजन.

**Tru'ant,** *n.* ( ट्रु'अन्ट् )—a child who absents himself from school without leave; a person neglecting duty, &c. उनाड मुलगा, भटक्या; कामचुकार मनुष्य. *a.* idle, shirking, wandering.

आळशी, कामचुकार, भटक्या. *v. i.* भटकणें, चुकारपणा करणें. *To play t.*, stay away from school. उनाडणें, उनाडकी करणें. *T. school*, उनाड पोरांकरितां (औद्योगिक) शाळा. *Tru'ancy, n.* उनाडपणा, भटकेपणा.-*antly, adv.*

**Truce,** *n.* (ट्रूस)—cessation of hostilities by agreement for a time; armistice; short quiet. युद्धतीचा तह, तात्पुरता तह; विश्रांति, विसावा. *Flag of t.*, तहाचा बावटा. *T. of God*, (hist.) धार्मिक उत्सवांत खाजगी भांडणें विसरून जाणें. *T.-less, a.*

**Trŭck,** *v. t. & i., n.* (ट्रक)—to barter, exchange; hawk (wares) about. मालाचा सौदा करणें, अदलाबदल करणें; (किरकोळ माल) फेरी करून विकणें. *n.* an exchange, barter; small wares; rubbish; (*fig.*) non-sense; (also *t.* system) practice of paying workmen in goods instead of money. अदलाबदल, सौदा, व्यापार; चिल्लर माल, किरकोळ जिनसपानस; गाळ, कचरा; भलतेंच, भलतीच गोष्ट; रोकड मजुरीऐवजीं कामगारांना जिन्नस-माल-मजुरी म्हणून देण्याची पद्धत. *Have no t. with*, avoid dealing with. शीं संबंध टाळणें. *Shall stand no t.*, भलतेंसलतें खपणार नाहीं,-ऐकून घेणार नाहीं. [F]

**Trŭck,** *n.* (ट्रक)—kinds of strong vehicle for moving goods or cattle; an open railway wagon; porter's wheeled barrow for luggage; set of wheels in frame-work; (Naut.) wooden disk at top of a mast. गाडा; (आगगाडीचा) उघडा डबा, उघडी वागीन; (स्टेशनवरील) हमालाची हातगाडी; सांगाड्यांत जोडलेल्या (रेल्वेच्या वगैरे) चाकांचा संच; डोलकाठीच्या टोंकावरचें लांकडी फळें. *v. t* to convey on truck. (रेल्वेच्या) उघड्या डब्यांतून नेणें; गाडा, डबा-भरून नेणें.-*age*, उघड्या वागिणींतून नेणें, नेण्याचें भाडें.

**Trŭc'kle,** *n.* (ट्रकल)—a small wheel, or castor; truckle-bed. लहान चाक, लाटिसाचें बिछाचें चाक; चाकें लावलेला सखल बिछाना. *v. i.* to cringe *to*; act in a servile manner. ची लाळ घोटणें, हांजीहांजी करणें. *T.-bed*, चाकांवरचा (लोटतां येणारा) सखल बिछाना. *Truckler, n.* हांजीहांजी करणारा.

**Trŭc'ŭlent,** *n.* (ट्रक्युलन्ट्)—of or showing bellicose merciless temper, fierce. रानटी, क्रूर, निर्दय, विनाशक, घातक.-*ly, adv.*;-*ence, n.* रानटीपणा, क्रूरपणा.

**Trŭdge,** *v. i. & n.* (ट्रज्)—to go on foot, walk with effort; toil along. पायीं जाणें; यातायात करणें; वणवण, पायपिटी.

**Trŭdg'en,** *n.* (ट्रजिन्)—swimming with alternate right and left over-arm strokes and ordinary leg action. डावा उजवा हात मारून पोहण्याचा एक प्रकार.

**True,** *a.* (ट्रू)—in accordance with fact or reality, not false; genuine, not hybrid or counterfeit; loyal or faithful or constant (*to*), in correct position; upright; (of voice) in perfect tune; honest, truthful. सत्य, खरा; अस्सल; प्रामाणिक, इमानी; योग्य, स्थितींत, उभा, सरळ; उत्तम सुरावटीचा, योग्य (आवाज); प्रामाणिक, इमानी, सत्य, सच्चा. *adv.* truly. खरोखर, इमानानें. *v. t.* (of tool, wheel, frame) to bring into exact position or form required. नीट बसविणें, योग्य आकार देणें. *His words have come t.*, have been realized in fact. त्याचे शब्द खरे ठरले,-अनुभवाला आले. *T. as steel*, पोलादाप्रमाणें सत्यशील. *T. bill*, grand jury's verdict, sustained by evidence, sending case for trial. वरिष्ठ (मतीच्या) पंचमंडळानें पुरावा पाहून खटला भरण्याविषयीं दिलेला निकाल. *T.-blue, a. & n.* (a person) of uncompromising principles or loyalty. पूर्ण तत्त्वनिष्ठ,-प्रामाणिक (मनुष्य). *T.-born*, शुद्ध रक्ताचा, अस्सल. *T.-bred*, of genuine or good breed. चांगल्या रीतिभातींचा, सुविनीत, कुलीन. *T.-hearted*, शुद्ध अंतःकरणाचा. *T.-love*, प्रेमाचें मनुष्य, प्रेमपात्र; एकांत एक गुरफटलेल्या चार पानांची वनस्पति. *T. penny*, (arch.) an honest fellow. प्रामाणिक मनुष्य. *Tell me t.*, खरेंखुरेपणानें,-खरें खरें,-सांग. *T.-ness, n.* खरेपणा, सच्चेपणा.

**Tru'ism,** *n.* (ट्रूइझम्)—statement too obviously true or too backneyed to be worth making, self-evident truth. स्वतःसिद्ध किंवा अगदीं प्रचारांतील विधान, शिळा,-उघड,-सिद्धांत, स्वयंसिद्ध गोष्ट.

**Trull,** *n.* (ट्रल)—a harlot. वेश्या.

**Tru'lў,** *adv.* (ट्रूलि)—according to truth, with truth; sincerely; loyally, honestly; accurately. वस्तुतः, खरोखर; मनापासूनचा, खरोखर, प्रामाणिकपणानें; इमानानें; अगदीं तंतोतंत, अस्सल बरहुकूम.

**Trŭmp,** *n.* (ट्रम्प्)—a card of the suit that ranks above other suits for one game; (colloq.) a good fellow. हुकूम, हुकुमाचें पान; धैर्याचा, भरंवशाचा,-चांगला माणूस. *v. t. & i.* to defeat with a trump; play a *t.* हुकमानें घेणें,-मारणें; हुकमाचें पान खेळणें. *T. card*, हुकमाचें पान, हुकूम; (*fig.*) महत्त्वाचें साधन, प्रमुख इलाज. *Put person to his tt.*, (*fig.*) reduce to his last resources. निर्वाणीवर घेतवणें,-आणणें. *Turn up tt.*, (colloq.) अनपेक्षित बरें ठरणें; दैव उघडणें. *T. up*, fabricate (story etc). बनवणें, रचवणें, बनवाबनवी करणें.

**Trŭmp,** *n.* (ट्रम्प्)—(poet.) a trumpet, its sound. तुतारी, तुतारीचा आवाज.

**Trŭmp'erў,** *n.* (ट्रम्परि)—worthless finery; things of no real value, useless matter; unsound reasoning. दिखाऊ पण टाकाऊ वस्तु, उगीच भपका; सटरफटर वस्तु; न पटणारा युक्तिवाद, शुष्कवाद,-गप्पा. *a.* showy but worthless, shallow. खोटा, कवडीमोलाचा, पोकळ.

**Trŭmp'et,** *n.* (ट्रम्पिट)—a wind-instrument of loud clear tone; a sound of *t.*; a reed-stop in organ; an ear-trumpet. तुतारी, कर्णा. तुतारीचा आवाज; वाजाच्या पेटींतील तुतारीसारखा आवाज काढण्याची खुंटी; (अर्धवट बहिऱ्या माणसाचें नीट ऐकूं यावें म्हणून)

कानाला लावण्याचें यंत्र,-चा कर्णा. *v. i. & t.* to blow the trumpet; proclaim loudly, celelerate, advertise; (of elephant) make loud sound as of a *t.* तुतारी वाजवणें, जाहीर करणें, मोठ्यानें सांगणें; (हत्तीनें) तुतारीसारखा चीत्कार करणें. *Speaking t.*, (आवाज मोठा व्हावा म्हणून) बोलण्याचा कर्णा. *Blow* one's *own t.*, आपणच आपली स्तुति करणें,-स्वतःचें तुणतुणें वाजवणें. *T.-call*, call by sound of *t.*; (*fig.*) urgent summons to action. तुतारी वाजवून बोलावणें,-आव्हान करणें; कार्य करण्यास त्वरेचें आव्हान, कार्याला त्वरित सिद्ध होण्याचा इषारा. *T. flower*, सागरगोटी, गजरी. *T.-major*, chief trumpeter of cavalry regiment. घोडदळाचा मुख्य कर्णेकरी, तुताऱ्या.

Trŭmp'ĕter, *n.* (ट्रंम्पिटर्)—*one who sounds a* trumpet; a cavalry man giving signals on trumpet; birds making trumpet-like sounds. तुतारी,-कर्णा,-वाजविणारा, तुतारीनें लष्करी सूचना देणारा, तुताऱ्या, घोडेस्वार; तुतारीसारखा आवाज करणारे पक्षी. *To be* one's *own t.*, blow one's own *t.* आपणच आपलें ढोलकें वाजविणें,-आपली स्तुति करणें.

Trŭnc'al, *a.* (ट्रंकल्)—of the trunk of a body or tree. धडाचा,-खोडा.

Trŭncāte', *v. t.* (ट्रंकेट्)—to cut off the tip of. (*lit & fig.*); replace edge by plane. चें अग्र छाटणें, शेंडा कापून-छाटून-टाकणें; कडा कापून सपाट करणें. *a.* cut off at the tip. (अग्रहीन) बुंधाकार, खोडासारखा. *-ly, adv.*;*-cation, n.*;-cature, *n.* (Zool.) अग्रच्छेदन.

Trŭn'cheon, *n.* (ट्रन्चन्)—a short staff or baton *as symbol of authority; the policeman's short* club; a club, a cudgel. अधिकारदंड; पोलिसांचा दंडुका; सोटा, सोडगा.

Trŭn'dle, *v. t. & i.* (ट्रन्डल्)—to roll or bowl along, roll as on little wheels; push or draw (wheel barrow); (sl.) bowl at cricket. ढकलणें, ढकलीत नेणें; चाकांवर फिरवणें,-चळवणें; ढकलणें; (क्रिकेट) चेंडु फेंकणें,-टाकणें. *n.* a small broad wheel; kind of low wheeled cart; a rolling motion, a trundle bed. लहान रुंद चाक; सखल चाकांचा गाडा; घरंगळी गति; चाकांवर फिरणारा बिछाना. *Trun'dler, n.* (sl.) bowler. चेंडू टाकणारा.

Trŭnk, *n.* (ट्रंक)—woody stem of a tree; a person's or animal's body without head and limbs and tail; the *main* body of anything; elephant's prehensile nose; a travelling box or portmanteau; (also *t.-line*) main line of railway or canal, telephone main line (from town *to town); kinds of shaft etc. for ventilation etc.*; open cylinder used instead of piston-rod in some engines. झाडाचें खोड, कांड, पेड; शरीराचें कांड, धड; मुख्य भाग, पोट; (हत्तीची) सोंड, (किड्याची) सोंड, तोंड; प्रवासी पेटी, ट्रंक; मुख्य फांटा,-रस्ता,-प्रवाह; (टेलिफोनचा) मुख्य फांटा,-मार्ग, (हवा जाण्याकरितां) पंप,-पन्हळ,-चाळण; (दट्ट्याच्या दांड्याऐवजीं कांहीं यंत्रांतील) उघडा नलिकाकार यंत्र-भाग. *T. call*, टेलिफोनच्या मुख्य मार्गावरून विशेष -जादा-दर देऊन केलेलें संभाषण. *T. line*, रेल्वेचा मुख्य मार्ग,-रस्ता; शहराशहरांमधला टेलिफोनचा मुख्य मार्ग,-फांटा, *T. road*, main road. मुख्य रस्ता, राजमार्ग.

Trŭnn'ion, *n.* (ट्रन्यन्)—supporting cylindrical projection on either side of cannon or mortar; hollow grudgeon supporting cylinder in steam engine. (तोफेचा) कानपा; खुंटी.-*ed, a.* कानपा असलेला, बसविलेला. [ F ]

Trŭss, *n.* (ट्रस)—timber-tie helping to support roof or bridge, a bundle of hay or straw; compact terminal flower-cluster; surgical appliance used in rupture; large corbel supporting monument etc.; (Naut.) heavy iron fitting securing lower yards to mast. कैची; (गवताचा) गठ्ठा, भारा, लादा; गुच्छ; दाब, पट्टा, चाप; (आधारभूत) मोठा दगडी किंवा लांकडी घोडा (भिंतींत पसविलेला); लोखंडी कैची. *v. t.* to support with truss (es); make into *tt.*; tie up (fowl) compactly for cooking; tie arms (of person) to his sides. कैचीवर सांवरून धरणें, कैचीचा आधार देणें; भारे बांधणें; आंवळून बांधणें; हात बाजुला आंवळून बांधणें. *T. up*, वस्त्र वर घेणें, वर आंवळून गच्च बांधणें, (गुन्हेगाराला) फांशी देणें. *T. bridge*, कैचीचा आधार दिलेला पुल.

Trŭst, *n.* (ट्रस्ट)—firm belief; confidence, charge committed to one; trusteeship; property committed to trustee(s); (commerc.) combination of producing firms designed to prevent outside competition; commercial credit. दृढ विश्वास, श्रद्धा, निष्ठा, भरंवसा, ठेव, निक्षेप; जिम्मा, हवाला; व्यवस्थेकरितां ताब्यांत दिलेली मालमत्ता; व्यापारी संघ; पत, उधार. *v. t. & i.* to put trust in, place confidence in; treat as reliable; commit to the care of, hope earnestly; allow credit to (person *for* funds). विश्वास ठेवणें, खरा मानणें; विश्वास असणें; हवालीं करणें, हवालणें, विश्वासानें देणें, वर पातणें; आशा करणें, उमेद बाळगणें। (माल) उधार देणें, उधारीनें देणें,-विकणे. *Put no t. in him*, त्याच्यावर विश्वास ठेवूं नको, त्याचा भरंवसा धरूं नको. *Takes everything on t.*, प्रत्येक गोष्ट अंधश्रद्धेनें स्वीकारतो. *On t.*, उधार, आंगावर, पतवर. *Breach of t.*, विश्वासघात. *Do not t. him with your camera.* तूं आपला कॅमेरा त्याला वापरूं देऊं नको. *Cat cannot be trusted with milk*, दुधाविषयीं मांजराचा विश्वास नाहीं, तें दूध चोरून खाईल. *T. deed*, document creating a legal trust. (मालमत्ता) पंचांच्या ताब्यांत दिल्याचा कायदेशीर लेख,-दस्तैवज. *Trustingly, adv.* विश्वासपूर्वक, विश्वासानें.

Trŭstee', *n.* (ट्रस्टी)—*a* person *or* member of a board entrusted with the administration of trust property; each of a body of men managing affairs of college etc. जिम्मेदार,

(दुसऱ्याच्या वर्तीनें व्यवस्था पाहणारा) पंच; व्यवस्थापक मंडळाचा सभासद.

**Trust'ful,-'ing,** *aa.* (ट्रस्टफुल;-स्टिंग)—full of trust, not given to suspicion; confiding. विश्वास ठेवणारा, विश्वसनीय, विश्वासू, श्रद्धावान, निष्ठ.*-fully, adv. -fulness, n.*

**Trŭst'worthy̆,** *a.* (ट्रस्ट्-वर्दि)—deserving of trust or confidence, faithful. खातरीचा, विश्वासू. *-thiness, n.*

**Trus'ty̆,** *a.* (ट्रस्टि)—loyal, faithful. विश्वासू, खात्रीचा. *n.* a well-behaved and privileged convict. सद्वर्तनी कैदी.

**Truth,** *n.* (ट्रुथ)—being true or truthful; what is true, a true statement. सत्य, सत्यता, खरेपणा, वास्तपणा; खरी गोष्ट; वास्तविक प्रकार, सत्यकथा,-वृत्तांत; खरें विधान, तत्त्व, सिद्धांत. *The wheel is out of t.*, चाक योग्य ठिकाणांतून घसरलें आहे,-बाहेर गेलें आहे. *God's t., Gospel t.*, वेदवाक्य, सर्वस्वी खरें विधान. *In t., of a t.*, (arch.) truly, really. खरें पाहतां, खरोखर, वास्तविक. *Home tt.*, unpalatable facts about oneself. स्वतःसंबंधीं न रुचणाऱ्या-अप्रिय-गोष्टी, अप्रिय सत्य.

**Tru'thful,** *a.* (ट्रुथ्फुल)—wont to tell the truth; (of tale etc.) true, conformable with truth. सत्यशील. खरें बोलणारा; खरा, प्रामाणिक; विश्वसनीय, वास्तविक.*-lly, adv.;-ness, n.*

**Truth'lĕss,** *a.* (ट्रुथ्लिस)—(of statement) false; (of person) faithless. खोटा, असत्य; अविश्वासू, आपलें वचन न पाळणारा (मनुष्य).*-ness, n.*

**Try̆,** *v. t. & i.* (ट्राय्)—to test, prove by experiment; make an attempt at, examine and pronounce upon (case); apply and become candidate for; (also *t. up*) dress with *trying—plane* to give fine surface, (also *t. out*) purify (fat, metal, etc.) by boiling or melting. परीक्षा किंवा कसोटी पाहणें, प्रयत्न करणें, यत्न करणें, उद्योग करणें; चौकशी करून निर्णय देणें, (खटला) चालवणें, चौकशी करणें; अर्ज करून पाहणें; (खडबडीत पृष्ठभाग) रांधून गुळगुळीत करणें; उकळवून गाळून शुद्ध करणें. *n.* an attempt; (Rugby-footb.) the right to carry ball in front of goal and to kick goal. प्रयत्न; (फुटबॉलच्या खेळांत) सीमेसमोर चेंडू नेऊन तो (पायानें) मारण्याचा विशिष्ट हक्क. *T. our soap*, buy-. आमचा साबण विकत घेऊन पहा. *T. your hand at it*, आपलें कौशल्य,-कसब,-चालवून पहा,-दाखव. *Let us t. whether it will break*, तें मोडतें का पाहूं या. *The light tries one's eyes*, या उजेडानें डोळ्यांना त्रास होतो. *T. for*, aim at; apply or compete for. (चा) यत्न करून पाहणें; (त्या जागेसाठीं) अर्ज करणें, चढाओढ करणें. *T. on*, (a garment). घालून पाहणें; प्रयोग करून पाहणें. *T. out*, test (thoroughly). पुरेपूर कसोटीला लावणें,-कसोटी पाहणें. *T.'sail*, (-सल) लहान शीट. *Try (ing) square*, carpenter's square, usu. with one wooden and one metal limb. सुताराचा गुण्या. *Have a t. at it*, तें करून पहा, त्या विषयीं यत्न करून पहा.

**Try̆'ing,** *a.* (ट्राइंग्)—exhausting; exasperating; difficult to bear. दमविणारा; आणीबाणीचा, अडचणीचा, असह्य.

**Try̆p'anosōme,** *n.* (ट्रिपॅनासोम्)—kinds of blood-parasite causing diseases. रक्तशोषक (रोग) जंतु, कीड.

**Try̆p'sin,** *n.* (ट्रिप्सिन्)—chief digestive ferment of the pancreatic juice. स्वादुपिंडाच्या रसांतील पाचकतत्त्व, स्वादुपिंडरसतत्त्व.

**Try̆st,** *n. & v. t.* (ट्रिस्ट्)—(arch.) time and place for meeting; appointment. भेटण्याची वेळ व जागा, संकेतस्थान, संकेत (ठरविणें).

**Tsar,** *n.* (झार्)—an emperor or king. (रशियाचा माजी) राजा, बादशहा, झार.

**Tsĕt'sé,** *n.* (त्सेट्सि)—S.-Afr. fly whose bite is fatal to horses, cattle, etc. (घोडे, गुरेंढोरें वगैरेंना घातक) दंश करणारी एक जातीची (द. आफ्रि.) माशी.

**Tŭb,** *n.* (टब्)—an open wooden vessel used for washing and other purposes; varying measure of capacity for butter, corn, etc.; sponge-bath, or use of it; kinds of bucket or box for conveying ore, coal, etc.; broad short clumsy boat; boat for practice-rowing. (लाकडाचें) पिंप, टीप, (लोणी, धान्य वगैरे) मोजण्याचें मापाचें टीप; स्पंजस्नान, (स्नानाच्या) पिंपांतील-टिपांतील-स्नान; (अशुद्ध धातु वगैरे भरून नेण्याची) घालदी, पिंप; लहान बेडौल होडी,-पगार; (वल्हवण्याचा सराव करण्याची) वल्हेंवाली होडी, बोट. *v. t. & i.* to bathe in tub; plant in tub; row in tub. पिंपांत बसून स्नान करणें; पिंपांत भरणें, लावणें; होडींत बसून वल्हवणें, वल्हवण्याला शिकविणें. *Let every t. stand on its own bottom*, every one look to himself. ज्यानें त्यानें आपापलें पहावें. *A cold t.*, थंड पाण्याचें स्नान. *T.-pair,-four*, दोन,-चार,-वल्ह्यांची बोट. *T-thumper*, ranting preacher. आवेशयुक्त,-तावातावानें-भाषण करणारा प्रचारक. *T.-ful*, पिंपभर.

**Tū'ba,** *n.* (ट्यूबा)—a large low-toned trumpet; kind of organ-stop. मृदु आवाजाची मोठी तुतारी; वाजाच्या पेटीची खुंटी. [L=trumpet]

**Tŭbb'y̆,** *a.* (टबि)—Also *tubb'ish*, tub-shaped, fat and round; (of musical instrument) sounding dull. पिंपाच्या आकाराचा, वाटोळा, लठ्ठ; भद्या,-फुटक्या,-आवाजाचा, ढबढब वाजणारें.

**Tūbe,** *n.* (ट्यूब्)—a long hollow cylinder; a structure serving for passage of fluid, or for holding it; main body of musical instrument; a tubular electric railway; (Anat.) a hollow tube-shaped organ. नलिका, नळी; तोटी, नळकांडें, पन्हळ, पन्हळी; रंग ठेवण्याची नळी; सुरवाद्याचा नळीमारखा मुख्य भाग; जमिनीखालून

नलिकाकार भागांतून जाणारी विजेची आगगाडी; नाडी, धमनी, शीर, (श्वास) नलिका. *v. t.* to furnish with or enclose in tube(s). नळी घालणें,-लावणें; नळींत घालणें,-ठेवणें. *T. colours,* नळींत ठेवलेले रंग. *T. well,* an iron pipe with sharp point and perforations at bottom for getting water from under-ground. नलिकाकूप,-विहीर, कूपनलिका. *Tub'al, tub'er, aa.* नलिकेसंबंधीं, नलिकांतर्गत.

**Tū'ber,** *n.* (ट्यू'बर्)—short thick swelling of an underground stem of some plants and putting forth buds, e. g. potato etc.: kinds of underground fungus; (Anat.) a swelling part. (जमिनींतील) गोळ्यासारखें खोड, ग्रंथिकोड (याच्या वरच्या बाजूला डोळे येतात, उ० बटाटा); एक जातीचें जमिनीखालीं होणारें अळंबें,-भूछत्र; सुजलेला भाग, गांठ.

**Tū'bercle,** *n.* (ट्यू'बर्कल्)—a small rounded projection (of bone); one of the small granular tumours formed in consumption; (Bot.) a small tuber. (हाडावरील) लहान गांठ, फोड, सूक्ष्म ग्रंथि; क्षयरोगग्रंथि; मुळाची गांठ, गांठाळ मूळ, पानावर आलेला फोड. *Tuber'cular, a.* क्षयी, क्षयाचा, क्षयरोगग्रंथि झालेला; (Bot.) ग्रंथिल, गांठाळ; सूक्ष्म ग्रंथि असलेला.-*'culous, a.* क्षयरोगाचा, क्षयग्रंथिविकृत; क्षयग्रंथिजन्य.

**Tūberculō'sis,** *n.* (ट्यूबर्क्युलॉ'सिस)—consumption of the lungs, consumptive state. फुप्फुसांचा क्षय, कफक्षयरोग, क्षयावस्था.

**Tū'berōse,-ous,** *aa.* (ट्यू'बरोझ्,-रस)—having tubers; of the nature of a tuber; knobby. गांठ येणारा,-असलेला; गांठीसारखा; ग्रंथिल, गांठाळ. *Tu'berose, n.* (ट्यू'ब्रोझ्) a garden plant with creamy-white fragrant flowers. निशिगंध, गुलछडी (फुलझाड व फूल). *Tuberos'ity, n.* गांठाळपणा; गोंडेरेपणा; (anat.) अर्बुद, पिंड.

**Tū'bing,** *n.* (ट्यू'बिंग्)—an indefinite length of tube or quantity of tubes. नळाची लांबी, नळ्या, नळ्या करण्याचें साधन.

**Tū'būlar,** *a.* (ट्यू'ब्यूलर्)—tube-shaped; having tubes. नळीच्या आकाराचा; नळीसारखा; नळ्यांचा, नळ्या असलेला. *T. boiler,* नळ्यावाला वाफजनक. *T. bridge,* rectangular tube through which railway etc. passes. मधून रेल्वे जाणारा चौकोनी बोगद्यासारखा नळ्यांचा पूल. *T. breathing,* नळींत फुटल्यासारखा आवाज, अपस्तंभ-श्वासध्वनि.

**Tū'būle,** *n.* (ट्यू'ब्यूल्)—a small tube. लघुनलिका, लहान नळी.

**Tŭck,** *n.* (टक्)—a flat fold sewn in a garment; (sl.) eatables; (Naut.) part of vessel's hull. दुमड, चूण, सुरख, खोंचण, ओंचा, कांचा; (गोड) खाद्य पदार्थ; गलबताच्या सांगाड्याचा मागचा भाग. *v. t. & i.* to make *it.* in garment; roll or gather *up* (sleeve., skirt); draw together; dispose or tow compactly. चुणी पाडणें, सुरख घालणें; दुमडणें, खोंवणें, वर खोंचणें, (अस्तन्या) वर करणें; ओढून (अंगाशीं) घेणें, दुमडणें; गच्च,-खेटून,-टाकणें,-ठेवणें. *To t. in,* (sl.) खच्चून जेवणें. *Make a t. in sleeves,* चूण मारून हात आंखूड करणें. *T.-in,-out,* (sl.) मेजवानी. *T. shop,* (विद्यार्थ्यांचें) खाद्यपेयाचें दुकान. *Tuck'-er, n.* स्त्रिया आणि मुलें वापरतात असें जाळीदार किंवा तागी कापड; (sl.) खाद्य पदार्थ; *v. t.* to tire or weary. थकविणें, दमविणें.

**Tūes'day,** *n.* (ट्यू'झ्-डे)—third day of the week. मंगळवार.

**Tū'fa, Tuff,** *nn.* (ट्यू'फा, टफ्)—kinds of coarse volcanic rock. खडबडीत ज्वालामुखी खडक.

**Tŭft,** *n.* (टफ्ट्)—a cluster or knot. झुबका, गुच्छ, तुरा, गेंद गोंडा, शिखा, अवतंस. *v. t. & i.* to furnish with a tuft or tufts; grow in tufts; make depressions at regular intervals. तुरे लावणें; झुबके-गोंडे-येणें; टांके मारून (चदरीला) उंचसखलपण आणणें. *T.-hunter,* थोरमोठ्या पदव्यावाल्यांचा गोंडा झेलणारा. *Tu'fty, a.* गोंडदार.

**Tŭg,** *v. t. & i.* (टग्)—to pull hard, pull violently at; tow; (*fig.*) drag (subject etc *in*) forcibly. शक्य तेवढ्या जोरानें ओढणें; नेटानें ओढणें; दोरी लावून ओढणें; एखादा विषय बळेंच घुसडणें. *n.* a hard pull, pulling with force; small powerful steam boat for towing ships. शिकस्तीची ओढ, खेंचाखेंच, ओढाताण; गलबतें ओढण्याची लहान आगबोट.

**Tŭg'-ŏf-war,** *n.* (टग्-ऑफ्-वॉर्)—trial of strength between two sides pulling opposite ways on a rope. दोरीची दोहोंबाजूला शिकस्तीची ओढाताण, रस्सीखेंच, रस्सीखेंचीचा खेळ.

**Tūi'tion,** *n.* (ट्युइ'शन्)—tutorship, teaching, giving of lessons; instruction, fee for this. शिकवणी; उपदेश, शिक्षण,-शिकवणीचें वेतन.-*al, a.*

**Tū'lip,** *n.* (ट्यू'लिप्)—kinds of plants with bell-shaped flowers; bell-shaped outward swell of muzzle of gun. घण्टाकार फुलांचें फुलझाड; बंदुकीचा कानपा.

**Tŭm'ble,** *v. i. & t.* (टंम्बल्)—to have a fall; toss the body about, suffer downfall; toss to and fro; disarrange. पडणें, कोसळणें; गडबडत लोळणें; कोसळणें, ढासळणें; निष्काळजीपणानें टाकणें; नाडेभोरप्याचा खेळ करणें, कोलांट्या उड्या मारणें; ओढणें, अस्ताव्यस्त टाकणें. *n.* a bodily fall; untidy state. पडणें, पतन, कोलांटी उडी; अस्ताव्यस्त स्थिति, गबाळेपणा.

**Tŭm'ble-down,** *a.* (टं'म्बलडाउन्)—dilapidated, in ruinous state. मोडकळीस आलेला, पडीतझडीत.

**Tŭmb'ler,** *n.* (टं'म्लर्)—one who tumbles; (*esp.*) an acrobat; kinds of pigeon with peculiar flight; a stemless drinking-glass; a toy-figure contrived to rock when touched; part of the mechanism of a lock etc. पडणारा; डोंबारी; एका जातीचें गिरेबाज, लोट्या,-कबूतर; पिण्याचें भांडें, टंबरेल; (हात लावला असतां) झोकांडे घेणारी,-डुलणारी,-बाहुली,

ठकायमावरही; (कुलपांतील वगैरे) एक यांत्रिक भाग. *Tumb'lerful, n.* भांडेंभर. टंबरेलभर.

**Tŭm'brel,-il,** *n.* (टंब्रल्,-ब्रिल्)—a dung-cart; (*Mil.*) *a two-wheeled covered cart for carrying* ammunition, etc.: (Hist.) an instrument of punishment. शेणखताची गाडी; लष्करी सामान नेण्याची छपरी गाडी,-खटारा; शिक्षा करण्याचें साधन.

**Tū'mĕfȳ,** *v. t. & i.* (ट्यूमिफाय्)—to (cause to) swell, be inflated (*lit. & fig.*). सुजवणें, सुजणें; फुगणें. *Tumefa'cient, a.* सुजणारा, सुजलेला.*-fa'ction, n.* सूज, गांठ (येणें).

**Tūmĕs'cence,** *n.* (ट्यूमेसन्स)—swelling. सूज.*-cent, a.* सुजलेला, सुजणारा.

**Tū'mid** *a.* (ट्यूमिड्)—(of parts of body etc.) swollen, swelling. (*fig.* of style) inflated, pompous. फुगलेला; ढोलाचा, भपक्याचा, टपदार, शब्दाडंबराची (लेखनपद्धति).*-'ity,-ness, nn.* सूज, फुगवटी; दब, आव, शब्दाडंबर. *Tu'midly, adv.* सुजून; पोकळ भपक्यानें.

**Tū'mour,** *n.* (ट्यूमर्)—a local permanent swelling, esp. from morbid growth. ग्रंथी, अपची, गांठ, घातुक, आवाळूं, अर्बुद. *Malignant t.,* tending to recur after removal and cause death. घातुक आवाळूं. *Benign t.,* निरुपद्रवी आवाळूं.

**Tŭm'-tŭm,** *n.* (टम्-टम्)—a W.-Ind. dish of boiled plantains beaten soft in a mortar. (*Anglo-Ind.*) *a dog-cart, a light vehicle.* (शिकरिणीसारखें) केळ्यांचें पक्वान्न; छकडागाडी, हलकी गाडी.

**Tū'mŭlt,** *n.* (ट्यूमल्ट्)—a riot, angry demonstration of a mob; uproar or din; a confused state of mind. धामधूम, दंगा, दंगल, गर्दी, हुल्लड; गडबड; गलबला; गोंधळ, क्षोभ, खळबळ, मानसिक अस्वस्थता. *-'uary, a.* undisciplined. अनियंत्रित, बेबंदशाहीचा, दंगेखोर.*-'uous, a.* vehement, uproarious. आवेशाचा, आरडाओरडीचा, तुंबळ, क्षुब्ध.*-'uously, adv.,-tuousness, n.* दंगल, गडबड, गर्दी.

**Tū'mūlus,** *n.* (ट्यूम्यूलस्)—(*pl.-li*) a sepulchral mound. (थडग्यावरील) छत्रीवजा चबुतरा. *Tu'mular, -y, aa.*

**Tŭn,** *n.* (टन्)—a large cask for wine; a brewer's fermenting vat. दारूचें मोठें पीप, दारू आंबवण्याचें लाकडी पात्र,-पीप. *v. t.* to store (liquor) in a tun. पिंपांत सांठवून ठेवणें. *Tun'dish,* a kind of funnel (in brewing). एक प्रकारचें गाळणें, नरसाळें.

**Tu'ndra,** *n.* (टंड्रा)—a mossy and often marshy plain in N. Russia. (उत्तर रशियांतील) शेवाळी व दलदलीचा प्रदेश.

**Tūne,** *n.* (ट्यून्)—the succession of musical notes; a melody or air; correct intonation in singing or playing; agreement, concord; suitable mood (*for*). स्वर, स्वरमेळ, राग; सूर; ताल, तान; मेळ, मिलाफ, जम; वृत्ति, तार, लहर. *v. t. & i.* to adjust the notes of; (*fig.*) be in harmony *with*; (poet.) produce (music); express in music. सूर लावणें; मिळवणें लावणें, मिळतें घेणें; गाऊं लागणें, गाणें; गाऊन दाखविणें, गाऊन साजरा करणें. *Sings out of t.,* तो बदसूर गातो. *It is out of t.,* त्याचा सूर जमला नाहीं, तें बदसूर आहे. *Sing in t.,* स्वरबद्ध-सुरांत-गाणें. *Change one's t., sing another t.,* assume a different style of language or manner. भाषणाचा रोख,-भाषेचा रोख-सूर,-बदलणें, वृत्ति पालटणें, दुसरीच तऱ्हा धरणें. *To the t. of Rs. 100,* (*serious or exorbitant amount*). शंभर रुपयांच्या (फार मोठ्या, भरमसाट) रकमेला. *To t. in,* set wireless instrument to right wave-length. बिनतारी यंत्र योग्य वायु-लहरीवर लावणें. *To t. up,* (of orchestra), सर्व वाद्यें एक सुरांत लावणें, गाऊं-वाजवूं-लागणें; (of child) रडण्याला सुरवात करणें, रडूं लागणें, भोंकाड पसरणें. *Tun'er, n.* (पेटी वगैरे) सुरांत लावणारा. *Tun'able, a.* सुरांत लावण्याजोगा, मेळ बसवण्याजोगा;*-ness, n. Tun'ably, adv.*

**Tūne'ful,** *a.* (ट्यून्-फुल्)—melodious, musical. सुस्वर. *Tune'fully, adv.* सुरात, सुस्वरतेनें.*-fulness, n.*

**Tūne'less,** *a.* (ट्यूनलस्)—not in time or tune; silent, not played. बदसूर, बेसूर, सुरांत नसलेला; न वाजलेला, बंद.

**Tŭng'sten,** *n.* (टंग्स्टन्)—a steel-grey heavy metallic element. (रसायनशास्त्रांतील) 'तुंगस्ट' नांवाचें धातुमूलद्रव्य. [Sw. *tung,* heavy; *sten,* stone]

**Tū'nic,** *n.* (ट्यूनिक्)—kinds of sleeved garment extending below waist, a short military coat; (Zool.) leathery envelope; (Anat.) membrane enclosing an organ; (Bot.) any of the layers of a bulb. कंबरेखालीं पोंचणारी कुडती, शिपायांचा सैल अंगरखा, बलदार; शिपायाचा आखूड डगला; त्वचामय वेष्टन; शरीरावयवांतील पातळ त्वचा; (कंदाचें) पदरें वेष्टण, मांसाचा थर. *Tu'nicate, a.* त्वचावेष्टित (कंद-विशेष).

**Tū'nicle,** *n.* (ट्यूनिकल्)—(*Bot., Zool.*) fine or delicate tunic. अगदीं पातळ त्वचा.

**Tūn'ing,-fork,** *n.* (ट्यूनिंग्-फॉर्क्)—(*Phys.*) a two-pronged implement giving a particular note when struck. स्वरशूल.

**Tŭnn'el,** *n.* (टनेल्)—a tubular opening; artificial subterranean passage through hill or under river, etc.; level open at one end; main flue of chimney. बीळ, बोगदा, खाणींतील रस्ता; धुराड्याची वाट. *v. i. & t.* to make a tunnel; make one's way by tunnelling. बोगदा पाडणें; बीळ,-बोगदा,-पाडून वाट पाडणें,-करणें. *T. borer,* बोगदा पाडण्याचें यंत्र. *T. net,* a fishing-net wide at mouth and narrow at other end. तोंडाजवळ रुंद व टोंकाकडे निमुळतें असें मासेमारी जाळें.

**Tŭnn'ȳ,** *n.* (टनि)—a large sea-fish used as food. एक मोठा खारा मासा.

**Tŭp,** *n.* (टप्)—a male sheep, ram; striking face of steam-hammer. मेंढा, टपूर; (वाफेनें चालणाऱ्या) हातोड्याचें तोंड. *v. t.* to copulate with (ewe). (मेंढीला) लागणें.

**Tŭrb'an,** *n.* (टर्बन्)—man's oriental head-dress of coiled linen or silk; kind of woman's hat; spire of shell. पागोटें, पगडी, मुंडासें; एक प्रकारची स्त्रियांची टोपी; शिंपल्याचें निमुळतें टोंक. *T.-binder,* पगडबंद. *T.-top,* एक प्रकारचें भूछत्र. *Tur'banod, a.* [ f. Turk. *tulbant,* f. Pers. *dulband* ]

**Tŭrb'id,** *a.* (टर्‌-बिड्)—(of liquid or colour) muddy, thick; not clear or lucid; (*fig.*) confused. गढूळ, दाट; अशुद्ध; गोंधळलेला, गोंधळाचा. *-'ity, n.-ness, n.* गढूळपणा; कलुषता.*-ly, adv.* गढूळपणानें, गढूळ होऊन.

**Tŭr'binate,** *a.* (टर्बिनिट्)—shaped like a top or inverted cone; (Anat.) of scroll-like formation; whirling like a top. भोंवऱ्याच्या आकारासारखा, व्यस्तशंक्वाकार; शुक्तिकाकार (अस्थि); भोंवऱ्या-सारखा गरगर फिरणारा. *Tur'binal, a., Turbina'tion, n.*

**Tŭrb'ine,** *n.* (टर्बिन्,-'बाइन्)—kinds of rotary motor driven by water or air or steam. (पाण) चक्की. *Air t.,* पवनचक्की. *Steam t.,* वाफ-चक्की. *T. boat,* चक्कीनें चालणारी नाव, बोट.

**Tŭr'bit,** *n.* (टर्बिट्)—a kind of domestic pigeon. एक जातीचें कबूतर, पारवा.

**Tŭr'bot,** *n.* (टर्बट्)—a large, flat fish esteemed as food. मोठा सपाट मासा.

**Turb'ūlent,** *a.* (टर्‌-ब्युलन्ट्)—given to making disturbances; riotous, disorderly, refractory, insubordinate. धंदखोर, दंगेखोर; शिरजोर, उर्मट, उद्दाम. *Turb'ulence, n.* दंगेली, दांडगाई, उर्मटपणा. *-lently, adv.*

**Tŭr'dīne,** *a.* (टर्डिन्)—thrush-like. सारिकेसारखा. [ L. *turdus,* thrush ]

**Tūreen',** *n.* (ट्यूअरीन्)—a deep covered dish for soup. खोलगट थाळी,-पशी.

**Tŭrf,** *n.* (टर्फ्)—short grass with the surface earth bound together by its roots; sod; (*Ir.*) peat. गवताळ जमिनीचा पृष्ठभाग, गवताची जमीन; कापलेलें गवत; कापलेलें जळाऊ गवत. *v. t.* to cover (ground) with turf. (जमीन) गवताळ करणें, गवताची करणें. *The turf,* horse-racing, race-course. घोड्याच्या शर्यतीचा धंदा, घोड्यांच्या शर्यतीचें पटांगण. *on the t.,* शर्यतींत गुंतलेला. *T.'man,* घोड्यांच्या शर्यतीचा नाद असलेला मनुष्य. *T.-bound,* तृणाच्छादित, गवताळ. *Tur'fy, a.* गवताळ, गवतासारखा.

**Tŭr'gid,** *a.* (टर्जिड्)—swelling, swollen, bloated; (of language) bombastic, rhetorical. सुजलेला, फुगलेला; ढबदार, अलंकारिक, अवडंबराचा, भपकेबाज. *Turges'cence, tur'gidity, nn.* तांबडा होऊन फुगणें, सूज. *Turges'cent, a., Tur'gidly, adv.*

**Tūr'ion,** *n.* (ट्यूअरिअन्)—(Bot.) young scaly shoot rising from the ground. खवलेदार लहान कोंब. *-iferous, a.*

**Tŭrk,** *n.* (टर्क्)—a member of the Ottoman race; a Mohammedan; Turkish horse; an unmanageable person or child. तुर्क जातीचा मनुष्य; मुसलमान; तुर्की घोडा; आडदांड मनुष्य,—मूल. *T.'s cap,* मुर्ईकमळ (वनस्पति). *T.'s-head,* पगडीसारखी शोभेची गांठ; वंदिळा झाडू; एक प्रकारचा खोलगट तवा. *Turc'ophil, a. & n.* friendly to, a friend of, the Turks. तुर्की लोकांच्या बाजूचा (मित्र). *Turc'ophobe, a. & n.* तुर्की लोकांना विरोध करणारा (शत्रु, प्रतिपक्षी).

**Tŭrk'ey,** *n.* (टर्कि)—(pl.-eys.) a large domesticated bird bred as food; (T-)country of the Turks. कोंबड्याच्या वर्गांतील एक मोठा पक्षी, टर्की कोंबडा, विलायती कोंबडा; तुर्कस्थान देश. *T. buzzard, vulture,* an American vulture. अमेरिकेंतील गिधाड. *T. carpet,* संपूर्ण लोंकरीचा तुर्की गालिचा. *T. cock,* male Turkey noted for its trut. डौलदार चालीचा तुर्की कोंबडा (नर); (fig.) a pompous person. घमेंडखोर,-अकडबाज,-मनुष्य; *Red as a t. cock,* (रागानें) लालबुंद झालेला (मनुष्य). *T. corn,* maize. मका. *T. red,* एक प्रकारचा टिकाऊ तांबडा रंग. *T. stone,* सुरी वगैरेंना धार लावण्याचा दगड.

**Tŭrk'ish,** *a. & n.* (टर्किश्)—(the language) of Turkey or the Turks. तुर्कस्थानची, तुर्क लोकांची, तुर्की (भाषा). *T. bath,* hot-air bath followed by massage. (बाष्पस्नान व मालीश मिळून होणारें) तुर्की स्नान. *T. delight,* शर्करायुक्त मेवामिठाई.

**Tŭrm'eric,** *n.* (टर्मरिक्)—powdered root used as dye-stuff, stimulant and condiment. हळद, हरिद्रा. *T.-paper,* (used as test for alkalis). हळदीचा कागद.

**Tŭrm'ōil,** *n.* (टर्‌-मॉइल्)—din, commotion. गडबड, दंगल, धांदल, अस्वस्थता.

**Tŭrn,** *v.t. & i.* (टर्न्)—to move round; move on or as on axis; face or make face in another direction; place with another side up; diverge; have recourse *to,* subject to or undergo a change; shape in lathe; turn sour; (*fig.*) revolve mentally. वळणें; फिरणें, फिरविणें, फिरेसा करणें; बाजूला जाणें, दूर जाणें; तोंड फिरविणें; आश्रय घेणें; पालटणें, बदल होणें; आकार किंवा रूप देणें, कातणें, कातून तयार करणें; आंबटावणें, आंबट होणें; डोक्यांत घोळवणें, मनन करणें. *n.* act of turning, bend; a rotary motion; changed direction; road, &c. diverging from another; act of kindness or malice; character, tendency; short walk, ride, drive etc.; opportunity, privilege, etc. coming successively to each of several persons; (pl.) menses; each round in a coil of rope; (mus.) kinds of grace consisting of principal tone with those above and below it; (Print.) inverted type as temporary substitute for missing letter etc.; (colloq.) nervous shock. फिरणें, वळणें; वळण; बांकण; फेरा, घेर, फेर, पालट, स्थित्यंतर; फेरा, चक्कर, प्रासंगिक वागणूक; मनाचा कल, झोंक, धोरण, वळण; फेरी, फेरफटका, रपेट; पाळी, आळीपाळी, खेप; (पाळीनें येणारा) विटाळ, पाळी; आटा, विळखा, वळसा; सुरावटींतील फेर, गोड वळण; (खुणेकरितां घातलेला) उलटा टाइप,-

**Undermine'**, *v. t.* ( अन्डर्-माइन् )—to make mine or excavation under; injure (reputation, &c.,) by secret means; injure insidiously. (खालीं) सुरुंग लावणें, पाया ढांसळणें; लबाडीनें खराब करणें, हळू हळू कमी करणें; (प्रकृति) ढांसळवणें, अशक्त,-क्षीण-करणें. *Undermin'er*, *n.*

**Un'dermost**, *a.* ( अन्डर्मोस्ट् )—in lowest place. सर्वांच्या खालचा, अगदीं तळचा.

**Underneath'**, *adv. & prep.* ( अन्डर्-नीथ् )—at or to a lower place (than), below. खालीं, खालच्या जागेंत.

**Underpay'**, *v. t.* ( अन्डर्पे )—to pay (workman) inadequately. (कामाच्या मानानें) कमी पगार देणें.

**Underpin'**, *v. t.* ( अन्डर्पिन् )—to place support of masonry under (wall, bank). खालून बांध-कामाचा आधार देणें.

**Underplot'**, *n.* ( अन्डर्प्लॉट् )—a subordinate plot of a play or novel. उपकथानक, उपसंविधानक, गुप्त कट,-योजना.

**Underprop'**, *v. t.* ( अन्डर्प्रॉप् )—to put prop under. खालून टेंकू देणें,-नेटावा,-जोर,-देणें.

**Underquote'**, *v. t.* ( अन्डर्क्वोट् )—to announce lower price than (other dealer.). (दुसऱ्यापेक्षां) कमी भाव लावणें, कमी किंमत ठेवणें.

**Underrate'**, *v. t.* ( अन्डर्-रेट् )—to under-estimate, rate too low, undervalue. किंमत कमी सांगणें; भाव कमी करणें, कमी किंमत लेखणें.

**Undersell'**, *v. t.* ( अन्डर्सेल् )—to sell cheaper than (person). कमी दरानें विकणें.

**Un'dershot**, *a.* ( अन्डर्शॉट् )—(of wheel) worked by water passing under it. खालील पाण्याच्या जोरानें चालणारी (पाणचक्की).

**Undersigned'**, *a.* ( अन्डर्-साइन्ड् )—whose signature appears below. खालीं सही करणारा.

**Undersized'**, *a.* ( अन्डर्साइज्ड् )—of less than the usual size. खुजा, खुरटलेला.

**Understand'**, *v. t. & i.* ( अन्डर्स्टॅन्ड् )—to comprehend, perceive the meaning of; infer; take for granted or implied; supply (word) mentally. समजणें, जाणणें, अर्थ कळणें; अनुमान करणें; तर्क करणें; गृहीत धरणें, मानणें; अध्याहृत समजणें, अध्याहार करणें. *Do you u. me?* माझें म्हणणें (म्हणण्याचा अर्थ) तुझ्या लक्षांत आलें का? *Tongue not understanded of the people*, foreign language. परकी भाषा. *I quite u. your difficulty*, तुझ्या अडचणीची मला पूर्ण कल्पना येते,-आहे. *I was given to u.* (introducing a warning) मला अशी समज (धमकी) देण्यांत आली (कीं इ०). *The verb may be either expressed or understood.* क्रियापद (वाक्यांत) प्रत्यक्ष दिलें असेल किंवा अध्याहृत असेल. *Understood'*, *pa. t. & pa. p.*; *a.* समजलेला, कळलेला; अध्याहृत इ.

**Understand'ing**, *n.* ( अन्डर्-स्टॅंडिंग )—intelligence, intellect, insight; thing agreed upon; comprehension, apprehension; (*pl. sl.*) feet, legs; shoes etc. बुद्धि, अक्कल; ग्रहण-शक्ति, ज्ञानशक्ति, मति; ठरलेली गोष्ट; करार, कबुली, समजूत, सलोखा, गोडी; आकलनशक्ति; (अने०) पाय, तंगड्या, जोडे, इ. *a.* having insight. अंतर्ज्ञानी, अंतर्दृष्टि असलेला.

**Understate'**, *v. t.* ( अन्डर्स्टेट् )—to put (numbers etc.) too low. (वास्तविकाहून, संख्या) फारच कमी सांगणें.-*ment*, *n.* कमी सांगणें.

**Understock'**, *v. t.* ( अन्डरस्टॉक् )—to supply (farm etc.) with insufficient stock. अपुरा पुरवठा करणें, कमी पुरवठा करणें.

**Understood'**, ( अन्डरस्टुड् )—*pa. t. & pa. p.* of Understand.

**Un'derstrapper**, *n.* ( अन्डर्स्ट्रॅपर् )—a subordinate. हस्तक, दुय्यम, चमलबच्चा.

**Un'derstudy**, *n.* ( अन्डर्स्टडि )—one who studies theatrical part in order to replace usual actor at short notice. (नेहमींच्या नटाच्या जागीं काम करूं शकणारा) बदली नट. *v. t.* to be the understudy of. च्या बदली काम करणें.

**Undertake'**, *v. t. & i.* ( अन्डर्-टेक् )—to take under one's charge, bind oneself to perform; make oneself responsible for; affirm; (arch.) engage with (person) in combat, argument, etc.; manage funerals. पतकरणें, अंगीकारणें; जबाबदारी घेणें, हातीं घेणें, -धरणें; खात्रीपूर्वक सांगणें, ची खात्री देणें; शीं दोन हात करणें; प्रेतयात्रेची व्यवस्था करणें. *Un'dertaker*, *n.* In vbl. senses; one who manages funerals. (काम) अंगावर घेणारा, हातीं घेणारा; स्मशानयात्रेची व्यवस्था करणारा.

**Underta'king**, *n.* ( अन्डर्-टेकिंग् )—(*esp.*) task, enterprise, promise, engagement; (un'-) management of funerals. काम, जोखमाचें कार्य, धाडसाचें काम; (Law) कबुली, वचन; स्मशानयात्रेची व्यवस्था.

**Underten'ant**, *n.* ( अन्डर्टेनन्ट् )—a tenant's tenant, पोटभाडेकरी,-माळेकरू.-*ancy*, *n.*

**Un'dertone**, *n.* ( अन्डर्टोन् )—subdued tone, esp. in speaking; subdued colour. हळू आवाज; फिकट रंग.

**Undertook'**, ( अन्डर्टुक् )—*pa. t.* of Undertake.

**Undervalua'tion**, *n.* ( अन्डर्व्हॅल्यूएशन् )—act of valuing below the real worth; rate not equal to the worth. कमी किंमत लावणें; कमी दर,-किंमत.

**Underva'lue**, *v. t.* ( अन्डर्व्हॅल्यू )—to value below the real worth; esteem lightly; despise. किंमत कमी करणें; योग्यता कमी लेखणें; तुच्छ मानणें. *n.* कमी दर,-किंमत.

**Un'derwear,** *n.* (अ'न्डर्वेअर्)—underclothing, wearing under the outer clothing. आंतले कपडे, अंगावरोवरचे कपडे.

**Un'derwŏŏd,** *n.* (अ'न्डर्-वुड्)—brushwood. झुडपें, झाडी.

**Un'derwork,** *n.* (अ'न्डर्वर्क्)—petty affairs. क्षुल्लक गोष्टी,-काम.

**Un'derworld,** *n.* (अ'न्डर्वर्ल्ड्)—an inferior world; the lower or inferior part of mankind. अधोलोक, पाताळ; (चोर, दरोडेखोर, खुनी वगैरे) अगदीं खालच्या दर्जाचीं माणसें.

**Underwrite',** *v. t. & i.* (अन्डर्राइ'ट्)—to write under; subscribe; sign and deliver (policy of insurance); practise marine insurance. खालीं लिहिणें; वर्गणीदार होणें; विमा उतरणें; जहाजांच्या विम्याचा धंदा करणें. *Underwritten names,* खालील सह्या,-नांवें.

**Un'derwriter,** *n.* (अ'न्डर्-राइटर्)—one who insures ships, a marine insurer. गलबताचा विमा उतरणारा.

**Undeserved',** *a.* (अन्डिझ'र्व्ड्)—not merited. अयोग्य, गैरवाजवी.-*ly, adv.; Undeserv'ing, a.* (with *of*) (ला) अपात्र, अयोग्य, नालायक, गैरवाजवी;-*ly, adv.*

**Undesign'edly,** *adv.* (अन्डिझा'इनिड्लि)—without any design or intention. असंकल्पित, हेतु नसतांना.

**Undesi'rable,** *a.* (अन्डिझा'इरेबल्)—not to be wished, not pleasing. अस्पृहणीय; अनिष्ट.

**Undesired',** *a.* (अन्डिझा'यर्ड्)—not desired or solicitated. अनिच्छित, अनिष्ट.

**Undeter'mined,** *a.* (अन्डिट'र्मिन्ड्)—not settled; not defined; (Math.) not known. न ठरविलेला; अनिश्चयी; अनिश्चित, अनिर्णीत, लुप्त.

**Undeve'loped,** *a.* (अन्डिव्हे'लप्ट्)—not developed; not opened. अपरिणत; अविकासित.

**Undid** *pa. t.* of Undo.

**Un'dies,** *n. pl.* (अ'न्डीझ्)—(sl.) underclothing. अंगावरोवरचें वस्त्र, आंतील कपडा.

**Undiges'ted,** *a.* (अन्डिजे'स्टिड्)—not digested; (*fig.*, of facts) ill-arranged. न पचलेला, आम; अपक्व, अपरिपक्व, अव्यवस्थित, अव्यवस्थित रचलेला.

**Undigni'fied,** *a.* (अन्डिग्नि'फाइड्)—lacking dignity; common; mean. अप्रौढ, अप्रशस्त; सामान्य; पोरकट.

**Undimin'ished,** *a.* (अन्डिमि'निश्ट्)—not lessened; unimpaired. कमी न झालेला, अन्यून; जसाचा तसा.

**Undisguis'edly,** *adv.* (अन्डिस्गा'इझ्ड्लि)—openly, without disguise. उघडपणें, आडपडदा न ठेवतां.

**Undisturb'ed,** *a.* (अन्डिस्ट'र्ब्ड्)—free from interruption, calm; serene; not moved. उपद्रव नसलेला, निर्वेध; शांत; गंभीर; अव्यग्र, अचल.

**Undo',** *v. t.* (अन्डु')—to annul; unfasten; (parcel etc.); ruin the prospects or reputation of; destroy, impoverish. उलटणें, रद्द करणें, फिरवणें; सोडणें, उलगडणें; भिकेस लावणें, नुकसान करणें, नाश करणें, दरिद्री करणें.-*ing, pr. p.* ruining. नाश करणें; *n.* ruin, destruction. फिरवणें, मोडणें, नाश, नुकसान.-*er, n. Undid, pa. t.*

**Undone'** *a.* (अन्ड'न्)—not done or performed; ruined. रद्द केलेला; न केलेला; नाश केलेला,-झालेला.

**Un'dose,** *a.* (अ'न्डोस्)—wavy. कुरळा, लाटांसारखा.

**Undoub'tedly,** *adv.* (अन्डा'उटिड्लि)—without doubt, without question, indubitably. निःसंशय, अवश्य, खात्रीनें.

**Undoubt'ing,** *a.* (अन्डा'उटिंग)—not hesitating respecting facts, not fluctuating. शंका न घेणारा, निःशंक मनाचा.

**Undress',** *v. t. & i.* (अन्ड्रे'स)—to take off the clothes of, take the dressing or bandages from. कपडे काढणें,-उतरणें, उघडें होणें, जखमेवरील पट्टी काढणें. *Un'dress, n.* ordinary dress, not full dress. साधे कपडे, घरगुती कपडे.

**Undue',** *a.* (अन्ड्यू')—not due, not yet demandable by right; excessive; disproportionate; improper, unworthy. मुदत न भरलेला, लागून झालेला; अतिशय; बेसुमार; अयोग्य, अमर्याद.

**Un'dulate,** *v. t.* (अ'न्ड्युलेट्)—to have wavy motion or look, rise and fall in waves. लाटा येणें, झोंके खाणें, हेलकावे देणें, आंदोलन करणें,-पावणें. *Un'dulant, a.* चढउताराचा.

**Undula'tion,** *n.* (अन्ड्युले'शन)—wavy motion or form; gentle rise and fall, gentle rising on the surface. लाटांसारखी खालींवर गति; हेलकावा, चढउतार.

**Un'dulatory,** *a.* (अ'न्ड्युलेटरि)—rising and falling; wavy. चढउताराचा, आंदोलन पावणारा; तरंगाकार, लहरीरूप. *U. theory of light,* प्रकाशाचा लहरीरूप सिद्धान्त.

**Undu'ly,** *adv.* (अन्ड्यु'लि)—wrongly, unlawfully, improperly; excessively. गैरशिस्त रीतीनें, गैरकायदा, गैरवाजवी; बेसुमार, अमर्याद.

**Undy'ing,** *a.* (अन्डा'इंग)—immortal. अमर, अनश्वर.

**Unearth',** *v. t.* (अन'र्थ)—to draw out from concealment; discover. गुप्त जागेंतून बाहेर काढणें, बाहेर हुसकावणें; शोधून काढणें, शोध लावणें.

**Unearth'ly** *a.* (अन'र्थ्लि)—not of this world; supernatural; wierd. अमानुष; दिव्य, स्वर्गीय; लोकविलक्षण, चमत्कारिक.

**Une'cono'mic,** *a.* (अनई'कनॉ'मिक्)—(esp. of rent) too low to repay owner and builder. तोट्याचा, आंतबट्ट्याचा.

**Unea'sy,** *a.* (अनी'झि)—disturbed or uncomfortable in body or mind. अस्वस्थ, चैन पडत नसलेला. *Uneas'iness, n.* अस्वस्थता, बेचैन अस्वास्थ्य.

**Unelec'trified,** *a.* (अनिले'क्ट्रिफाइड्)—not charged with electricity. अविद्युत्मय.

**Unemploy'able** *a. & n.* (अनिम्प्लॉ'येबल्)—(a person) unfitted for paid employment. रोजगाराला -नोकरीस ठेवण्याला-नालायक (मनुष्य).

Unemplŏy'ed, *a.* ( अनिम्प्लॉइड )—not used; lacking employment. उपयोगांत न आणलेला; रिकामा, निरुद्योगी, बेकार.

Unemploy'ment, *n.* (अनिम्प्लॉ'यमेन्ट )—lack of employment; state of things when many workers cannot find work. उद्योग नसणें, धंदा -रोजगार नसणें; बेकारी, बेकारपणा.

Unĕnd'ing, *n.* ( अनएन्'डिंग )—having no end. अनन्त, शाश्वत, न संपणारा, न होणारा.

Unengăg'ing, *a.* ( अनएंगे'जिंग )—not inviting, not adapted to win the attention or affections. नजरेंत न भरणारा, प्रेम न वाटणारा, शुष्क.

Uneng'lish, *a.* ( अनिं'ग्लिश )—not English. इंग्रजांच्या स्वभावाविरुद्ध; अशुद्ध इंग्रजी ( भाषा ).

Unē'qual *a.* ( अनई'क्वल् )—not equal *to*, inadequate; of varying quality; inferior; ill matched; not regular. असमान, अपुरा; निरनिराळ्या तऱ्हेचा, कमजास्त; कमी प्रतीचा; न जुळणारा; अनियमित. *Unē'qualled, a.* unparalleled; unrivalled. अद्वितीय, अपूर्व; बरोबरी न केलेला.

Unēquiv'ocal, *a.* ( अनइक्वि'व्होकल )—not ambiguous; plain, unmistakable, evident. असंदिग्ध; स्पष्ट, बिनचूक, सुस्पष्ट, द्व्यर्थी-दुटप्पी-नसलेलें.-*lly, adv.*

Unerr'ing *a.* ( अन'-रिंग )—not erring or failing or missing the mark, certain. अचूक, अचूकसंधानी, अमोघ, खात्रीचा, रामबाण.-*ly, adv.*

Unĕssĕn'tial, *a.* ( अनिसें'न्शल् )—not absolutely necessary; not of prime importance; not constituting the essence. अनावश्यक; कमी महत्त्वाचा; अ-सारभूत.

Unē'ven, *a.* ( अनई'व्हन् )—not straight, not level or smooth; not uniform or equable. असमान, उंचसखल, खडबडीत, खडकाळ.-*ly, adv.* उंचनीच; विषम प्रमाणांत

Unexam'pled,, *a.* ( अनिग्झा'म्पल्ड )—having no similar case; having no precedent. अद्वितीय, अनुपम; अपूर्व.

Unĕxcĕp'tionăble, *a.* ( अनएक्से'प्शनेबल् )—with which no fault can be found. अपवाद घेतां न येण्यासारखा, निर्दोष, अबाधित.

Unexĕm'plified, *a.* ( अनेक्झे'म्प्लिफाइड )—not illustrated by example. दाखला,-उदाहरण,-न दिलेला, उदाहरण देऊन स्पष्ट न केलेला.

Unexpired', *a.* ( अनिक्स्पा'यर्ड )—not ended, still running. ( मुदत ) न संपलेला, चालू.

Unfail'ing, *a.* ( अनफे'लिंग )—not failing, that does not fail, not running short. न चुकणारा, अचूक; नेहमीं मिळणारा, सतत पुरणारा, खाण न पडणारा. -*ly, adv.* न चुकतां, अचूक.

Unfair', *a.* ( अनफे'अर् )—not equitable or honest, or impartial. अन्याय्य, अप्रामाणिक, पक्षपाताचा; खोटा, अन्यायाचा, गैरवाजवी.

Unfă'shioned, *a.* ( अनफॅ'शन्ड )—not brought into shape, not modified by art. योग्य आकार न दिलेला, असंस्कृत.

Unfa'sten, *v. t.* (अन्फा'सन्)—to unloose, unfix. उघडणें, सैल करणें, सोडणें.-*ed, n.* not fixed or secured. सैल, सुटा, घट्ट न बांधलेला.

Unfăth'omable, *a.* (अनफॅ'दमबल्)—that cannot be sounded by line; so deep that the limit cannot be found. तळ न लागणारा, अगाध, अपरंपार; (*fig.*) बुद्धीस अगम्य, अतर्क्य, गहन.

Unfā'vourable, *a.* (अनफे'व्हरबल)—not propitious; not obliging; discouraging. अनिष्ट; अननुकूल; विरुद्ध, प्रतिकूल.

Unfeel'ing, *a.* (अनफी'लिंग)—harsh, cruel, devoid of sympathy with others. निष्ठुर, कठोर अंतःकरणाचा, निर्दय, निर्घृण.

Unfeign'edly, *adv.* (अनफे'निडलि)—sincerely. अकृत्रिमतेनें, मनःपूर्वक, निष्कपटपणानें.

Unfĕm'inine, *a.* (अनफे'मिनाइन्)—not beseeming a woman. स्त्रीजातीस न शोभणारा, पुरुषी.

Unfĕtt'ered, *a.* (अनफे'टर्ड)—unchained; not restrained. अनर्गल, बंधनरहित; स्वैर, मोकळा, अनिर्बंध.

Unfin'ished, *a.* (अनफि'निश्ट्)—not complete; imperfect; wanting the last hand or touch. अपुरा, अपूर्ण; कच्चा; शेवटचा हात न दिलेला.

Unfit', *a.* (अनफि'ट्)—not fit, unsuitable. अयोग्य, न जुळणारा. *v. t.* to make unsuitable for. अयोग्य -अक्षम-करणें, अयोग्यता आणणें.-*tted, a.* अयोग्य; सामानसुमान न लावलेला.-*tting, a.* unsuitable. अयोग्य, न जुळणारा, न जमण्यासारखा.

Unfix', *v. t.* (अनफि'क्स् )—to loosen, detach. निखळणें, हालवणें, ढिला-वेगळा-करणें.-*ed, a.* निखळलेला, सुटा केलेला; अस्थिर, अस्थायी, चंचल.

Unflăgg'ing, *a.* (अनफ्लॅ'गिंग)—not drooping; maintaining strength or spirit. कमी न होणारा, न डगमगणारा, न ढळणारा; शक्तिमान, शक्ति-धैर्य-राखून ठेवणारा, धैर्यशील.

Unflĕdged', *a.* (अनफ्ले'ज्ड)—not fledged; (*fig.*) undeveloped. पर न फुटलेला; पूर्ण न वाढलेला, तरबेज न झालेला.

Unflinch'ing, *a.* (अनफ्लि'न्चिंग)—not shrinking; resolute. न खचणारा, न कचरणारा; निश्चयी,

Unfōld', *v. t.* & *i.* (अनफो'ल्ड)—to open out, spread out; develop, reveal. पसरणें, उलगडणें, उघडणें; विकास पावणें, उघड करून सांगणें, प्रगट करणें. -*ing, a.* उलगडणारें, विकास पावणारें, प्रकटीकरण, उलगडा.

Unfōreseen', *a.* (अनफोअर्सी'न् )—not foreknown. आगाऊ कल्पना नसलेला, आकस्मिक अडचणीचा.

Unforgiv'ing, *a.* (अनफर्गि'व्हिंग)—not disposed to overlook or pardon faults; implacable. क्षमा न करणारा; निर्दय, दीर्घद्वेषी.

Unfŏrt'ūnate, *a.* (अनफॉ'र्चुनेट्)—having ill fortune, unlucky, unhappy; ill advised. अपेशी, दुर्दैवी, दैवहीन; दुर्दैवी, अनर्थकारक, अहितकारक. *n.* दुर्दैवी मनुष्य, फुटक्या नशिबाचा.-*ly, adv.* दुर्दैवानें.

**Unfound'ed**, *a.* (अन्फा'उन्डिड)—without foundation, having no foundation or basis. निराधार, अमूलक, मिथ्या.

**Unfrèque'nted**, *a.* (अन्फ्रिक्वे'न्टिड)—rarely visited by men. आडवळणाचा, भिनवहिवाटीचा, अक्षुण्ण.

**Unfŭrl'**, *v. t.* & *i.* (अन्फ़र्'ल्)—to spread out (a sail, &c.), expand to catch the wind, become spread out. शीड वगैरे सोडणें; फडकवणें, पसरणें.

**Unfurn'ished**, *a.* (अन्फ'र्निश्ट्)—not supplied *with*; without furniture. रिकामा, रिक्त, च्या पुरवठा न केलेला; (खुर्च्या, पलंग वगैरे) सरंजाम नसलेला, अगदीं मोकळा.

**Ungain'lў**, *a.* (अन्-गे'न्लि)—ill-made; awkward-looking, clumsy. दिसण्यांत वाईट; ओबडधोबड, बिशोभित, बेडौल, अडाणी.

**Ungăll'ant**, *a.* (अन्गॅ'लन्ट्)—not brave; not attentive to women. भीरु, भित्रा; स्त्रीदाक्षिण्यरहित.

**Ungen'erous**, *a.* (अन्जे'नरस)—not of a noble mind; dishonourable. अनुदार (मनाचा); क्षुद्र, कृपण, अविश्वासू.

**Ungĕn'tle**, *a.* (अन्जे'न्टल्)—harsh; rude; ill-bred. असौम्य, कठोर; उद्धट; असभ्य, ग्राम्य, गांवढळ.

**Ungen'tlemanlў**, *a.* (अन्-जे'न्टल्मन्-लि)—violating the code observed by gentlemen. असभ्य, गृहस्थाला अनुचित.

**Ungod'lў**, *a.* (अन्गॉ'ड्लि)—not godly; wicked; impious. अपवित्र; दुष्ट; देवनिंदक.-*'liness*, *n.* देवनिंदा, अधमपणा; अपवित्रता.

**Ungo'vernable**, *a.* (अन्ग'वर्नबल)—unruly; licentious; wild, unbridled. आवरतां न येणारा; स्वैर; अनावर.

**Ungo'verned**, *a.* (अन्ग'वर्न्ड्)—not restrained; unbridled. अवश, स्वैर, स्वैरगामी.

**Ungrā'cious**, *a.* (अन्ग्रे'शस)—not kindly, not courteous. न आवडणारा, दांडगट, असभ्य.

**Ungrammăt'ical**, *a.* (अन्ग्रमॅ'टिकल्)—contrary to rules of grammar. (व्याकरणदृष्ट्या) अशुद्ध, चुकीचा.

**Ungrāte'ful**, *a.* (अन्ग्रे'ट्फुल्)—not feeling gratitude, making ill returns for kindness; not pleasing, unacceptable. कृतघ्न, अकृतज्ञ; फेडण्याचा; अग्राह्य.-*ness*, *n.* कृतघ्नपणा; केलेला उपकार जाणण्याचा [illegible]

**Unground'ded**, *a.* (अन्ग्रा'उन्डिड)—unfounded. निराधार, अमूलक, खोटा.

**Ungrŭdg'ing**, *a.* (अन्ग्र'जिंग)—done or given with good-will, hearty. मनापासून केलेला किंवा दिलेला, सढळ, उदार.-*ly*, *adv.* मनःपूर्वक, आनंदानें [illegible]

**Unguar'ded**, *a.* (अन्गा'र्डिड)—not watched; incautious; thoughtless. अरक्षित, न रखलेला; बेसावध, [illegible]

**Ung'uent**, *n.* (अंग्वन्ट)—any soft substance used as ointment, a lubricant. मलम, ओंगण, लेप, [illegible]

**Ung'ūlate**, *a.* (अं'ग्युलट्)—hoofed. खूर असलेला, खुरांचा. *n.* a hoofed mammal. खूर असलेला सस्तन प्राणी.

**Unhăll'owed**, *a.* (अन्हॅ'लोड्)—profane, unholy; wicked. पवित्र न केलेला, अपवित्र मानलेला, भ्रष्ट, नापाक; दुष्ट.

**Unhănd'**, *v. t.* (अन्हॅ'न्ड्)—to let go (a person). हातांतून सोडणें, जाऊं देणें.-*ed*, *pa. p.* सोडून-जाऊं-दिलेला.

**Unhand'some**, *a.* (अन्हॅ'न्सम)—ugly; unbecoming; illiberal, unpolite. कुरूप; न शोभणारा; अनुदार, उद्धट.

**Unhă'ndў**, *a.* (अन्हॅ'न्डि)—not dexterous, clumsy. कसब नसलेला, अकुशल, आडमुठ्या, ओबडधोबड.-*diness*, *n.*

**Unharm'onious**, *a.* (अन्हार्मो'निअस)—not consistent with harmony. बदसूर, बेसूर; तंट्याचा.

**Unhăpp'ў**, *a.* (अन्हॅ'पि)—unfortunate, ill-omened, unlucky; wretched. दुर्दैवी; हतभागी, दुःखी, वाईट, अप्रसन्न, अशुभ.

**Unhealth'ў**, *a.* (अन्हे'ल्थि)—sickly, morbid, not conducive to health. रोगट, बाधक; प्रकृतीला न मानवणारा.

**Unheard**, *a.* (अन्हर्ड)—not heard, obscure. अश्रुत, लक्ष न दिलेला, अप्रसिद्ध.

**Unhinge'**, *v. t.* (अन्हि'न्ज)—to remove from the hinges; (*fig.*) make crazy. बिजागरें-सांधे-उखाडणें, ढिलें करणें; भडकावणें, संताप आणणें, डोकें फिरविणें.

**Unhon'oured**, *a.* (अनऑ'नर्ड)—not honoured or respected. असत्कारित, अनादृत, मान-सन्मानरहित.

**Unhō'lў**, *a.* (अन्हो'लि)—impious, wicked. अपवित्र, अशुद्ध, अशुचि, अनिष्ट; दुष्टपणाचें.

**Unhōōk'**, *v. t.* (अन्हु'क्)—to loose (dress etc.) from hooks. बंद सोडणें.

**Unhorse'**, *v. t.* (अन्हॉ'र्स)—to throw (rider) from the saddle, cause to dismount. घोड्यावरून खालीं पाडणें,-आणणें, खालीं उतरविणें.

**Unhouse'** *v. t.* (अन्हा'उस)—to deprive of shelter; drive from the house or habitation. आसरा नाहींसा करणें; घरांतून हाकलून देणें; घरावेगळा करणें, -हुसकावणें.

**Unhurt'**, *a.* (अन्ह'र्ट)—not harmed; free from wound or injury. दुखापत न झालेला; धक्का न लागलेला; सहीसलामत.

**Unhŭsk'ed**, *a.* (अन्ह'स्क्ड्)—(of rice) [illegible] (of cocoanut etc.) [illegible]

**Uni-**, (युनि)—Latin, one. एक-द्वि.

**Unicăm'eral**, *a.* (युनिकॅ'मरल्)—of one chamber. एक [illegible]

**Unicell'ŭlar**, *a.* (युनिसे'ल्युलर्)—one-celled. एकपेशी [illegible]

**Unicŏrn**, *n.* (यु'निकॉर्न)—a fabulous animal with a horse's body and a single straight horn; [illegible]

U'nĭfŏrm, a. (यूनिफॉर्म्)—unvarying; conforming to the same rule. एकसारखा; समान, बरोबर. n. uniform dress worn by members of the same body. सर्वांचा एकसारखा पोषाख, गणवेष. v. t. to make or clothe in uniform. गणवेष करणें,-देणें.-ly, adv. एकसारखा, एकाच रीतीनें.

Unifŏrm'ity, n. (यूनिफॉ'र्मिटि)—being uniform; sameness, consistency. एकरूपता; एकसारखेपणा, साम्यता, एकरूपता.

U'nĭfy, v. t. (यूनिफाय)—to make one or uniform, form into one, make unity. एक किंवा एकरूप करणें, तादात्म्य करणें, संयोजन करणें. Unification, n. एकीकरण, संयोजन, तादात्म्य. Unifier, n.

Unilăt'eral, a. (यूनिलॅ'टरल्)—binding one side only. एकपक्षी (करार इ.).

Unilit'eral, a. (यूनिलि'टरल्)—(of word-roots, etc.) consisting of one letter. एकाक्षरी.

Unĭmag'inable, a. (अनइमॅ'जिनब्ल्)—not to be imagined. कल्पनेबाहेरचा, अचिंत्य, अतर्क्य, कल्पनातीत.

Unĭmpaired', a. (अनइम्पे'अर्ड्)—not diminished; not enfeebled by time or energy. न कमी झालेला; न ढांसळलेला, शाबूत.

Unĭmpeach'able, a. (अनइम्पी'चबल्)—giving no opening to censure, blameless. अदूषणीय, निष्कलंक, निर्दोष.

Unĭnformed', a. (अनिन्फॉ'र्म्ड्)—ignorant, uninstructed. माहिती नसलेला, अपरिचित.

Unĭnspired', a. (अनिन्स्पा'यर्ड्)—commonplace. सामान्य, साधा.

Unĭntell'igible, a. (अनिन्टे'लिजिब्ल्)—not such as can be understood. दुर्बोध; इंद्रियातीत

Unĭnvi'ting, a. (अनइन्व्हा'इ-टिंग)—unattractive. अनाकर्षक, मन न वेधणारा.

U'nion, n. (यू'न्यन्)—uniting together, coalition; marriage; concord, agreement, combination; fabric of mixed materials, (e. g. cotton with linen); kinds of joints for pipes etc. एकत्र होणें, संयोग; (विवाहानें झालेला) ऐक्यसंबंध, लग्न; एकोपा, जूट, संघ; मिश्र कापड,-कपडा (अर्ध सुती-अर्ध तागी इ.); सांधा. U. jack or flag, national ensign of United Kingdom formed by union of crosses of St George, St. Andrew and Patrick. इंग्लिशांचें (एकीचें) राष्ट्रीय निशाण. U. suit, (U. S.) मिश्र कापडाचे कपडे.

U'nionist, n. (युन्यनिस्ट्)—a member of a trade-union; upholder of legislative union between Great Britain and Ireland. कामगारसंघाचा सभासद; (ग्रेट ब्रिटन व आयर्लंड यांचें अविभक्त पार्लमेंट असावें, आयर्लंडला स्वराज्य मिळून त्याचें वेगळें पार्लमेंट असू नये असें म्हणणारा) संयुक्तमतवादी.-ism, n.

Uni'parous, a. (यूनि'परस्)—producing one at a birth. एकाच वेळीं एक पोर प्रसवणारी, एकप्रसू; (Bot.) एकतुंर्‍याचा, एकशाखी.

U'nĭped, a. (यूनिपेड्)—having only one foot. एक-पाद.

Unĭplā'nar, a. (यूनिप्ले'नर्)—lying in one plane. एकाच पातळींत असणारा, एकधरातलीय.

Unĭpo'lar, a. (यूनिपो'लर्)—(Biol.) having only one pole, (Electr.) showing only one kind of polarity. एकस्तंभीय; एकध्रुवीय.

Unique', a. (यूनि'क्)—being the only one of its kind; having no like or equal. अनन्य,; अद्वितीय, निरुपम, विलक्षण, एकमात्र. n. a u. thing. विलक्षण, वस्तु,-गोष्ट.-ly, adv.;-ness, n.

Un-i'rrigated, a. (अनइ'रिगेटेड्)—not supplied with water by irrigation. कालव्याच्या पाण्यानें लागवडीस न आणलेला.

Unĭsĕx'ūal, a. (यूनिसे'क्सूअल्)—having pistil or stamens but not both. स्त्रीकेसर किंवा पुंकेसर ह्यांपैकीं एकच असलेलें (फूल), एकलिंगी (उदा. पोपया, भोपळा इ.).

U'nison, n. (यूनिसन्)—unity of pitch; concord, agreement, harmony. नादैक्य, स्वरमेळ, एकतान, एकताल, स्वरैक्य; ऐक्य, ऐकमत्य.-onance, n. एकतानता, एकतालता.-unt, a.

U'nĭt, n. (यूनिट्)—the number one; an individual thing, a person or group; quantity chosen as standard. एकांक, एक, एक ही संख्या; एखादी व्यक्ति किंवा समुदाय; ठराविक प्रमाण, एकधेय, एकमात्र; (philos.), व्यक्ति, व्यष्टि. एकबीज. C. G. S. system of u., सेंटिमिटर हें लांबीचें, ग्रॅम हें वजनाचें, व सेकंद हें वेळाचें प्रमाण-एकम्-मानणारी पद्धति. Electrical u., वैजिक एक.

Unităr'ian, n. & a. (यूनिटे'अरिअन्)—one who denies the doctrine of the Trinity, a monotheist; an advocate of unity or centralization, e. g. in politics. एकेश्वरवादी, अद्वैती.-ism, n. एकेश्वरवाद,-संप्रदाय; एकसूत्रतावादी.

U'nĭtarў, a. (यूनिटरि)—of a unit or units; marked by unity or uniformity. एकांचा, एकमानाचा; ऐक्यदर्शक, समानत्वबोधक. U. system or method, (in Arithmetic) एकमानपद्धति.

Unite', v. t. & i. (यूना'इट्)—to join together; make or become one, coalesce; agree, combine, co-operate in. एकत्र मिळणें, एक करणें, जोडणें, जुळणें; एक होणें, एकोपा होणें, संयुक्त होणें, -करणें; मिळणें, एकचित्त-एकदिल-होणें, एकी करणें, -होणें. Uni'ted, pa. t. & pa. p. & a. जोडलेला; संयुक्त;-ly, adv. एक होऊन, एकोप्यानें, मिळून. Unitive, a. United States (of America), अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें. United Kingdom, (ग्रेटब्रिटन व आयर्लंड ह्यांचें) संयुक्त राष्ट्र.

U'nĭtў, n. (यूनिटि)—oneness; concord. ऐक्य; मिलाफ, एकदिल, एकचित्त.

Uni'valent, a. (यूनि'व्हलन्ट्)—(chem.) having a combining power of one. एकमूल्यक.-valence, -valency, nn. (chem.) एकमूल्यकत्व.

**U'nĭvălve**, *n.* (यू'निव्हॅल्व्ह)—a mollusc of one valve. एककवची शिंपा,-शुक्तिका,-मृदुमांसप्राणी.

**Univers'al**, *a.* (यूनिव्ह'र्सल्)—general; belonging to all; applicable to all cases, all-embracing. सर्वव्यापक, विश्वव्यापी, सर्वगत, सर्वसाधारण; सर्वांचा, सार्वत्रिक; सर्वत्र लागू असणारा, सार्वत्रिक, सामान्य. *n.* (logic) universal proposition; (philos.) general notion or idea. सार्वत्रिक-सामान्य-सिद्धान्त. *U. agent*, सर्वाधिकारी मुनीम. *U. legatee*, (सर्व जिंदगी ज्याच्या नांवानें करून दिली आहे असा) सर्वाधिकारी वारस. *Universal'ity*, *n.* सर्वव्यापिता, विश्वव्यापिता; सार्वत्रिकता; सर्वसंबंधिता. *Univers'alize*, *v. t.* सार्वत्रिक करणें,-समजणें.

**U'nĭverse**, *n.* (यू'निव्हर्स्)—all existing things; all creation, mankind. सर्व सृष्ट वस्तु; विश्व, ब्रह्मांड, त्रिभुवन, मनुष्यजात.

**Univers'itў**, *n.* (यूनिव्ह'र्सिटि)—an educational institution for instruction or examination of students, with the power of conferring degrees; members of this collectively; team, crew etc. representing a university. विश्वविद्यालय; त्याचे (सर्व मिळून) सभासद; त्याचा (खेळाडूंचा) संघ.

**Uni'vocal**, *a.* & *n.* (यूनि'व्होकल्)—(a word of only one proper meaning; (Music). having a unisonous sound. एकार्थी (शब्द); एकसुरांतलें (गाणें).

**Unjust'**, *a.* (अनूज'स्ट्)—not just; not equitable; wrongful. बेइमानी; अन्याय्य, गैरवाजवी, चुकीचा, सदोष.-*ly, adv.*

**Unkĕmpt'**, *a.* (अनूकें'म्प्ट्)—of rough or uncared for appearance, unpolished. उगान्गिा न केलेला, न विंचरलेला, साफसूफ न केलेला; खडबडीत, ओबडधोबड (भाषा, शब्द).

**Unknown'**, *a.* (अनूनो'न्)—not known, not found out or ascertained; unidentified. अप्रसिद्ध; अपरिचित, न पाहिलेला,-देखलेला, अनोळखी, अज्ञात; अव्यक्त (algebra).

**Unlā'boured**, *a.* (अन्ले'बर्ड्)—(of style) easy, spontaneous, natural; not tilled. साधा, स्वाभाविक, स्वयंस्फूर्त; सहजमास; मशागत न केलेला.

**Unlaw'ful**, *a.* (अनूलॉ'फुल्)—illegal; not permitted by law. बेकायदेशीर, कायद्याविरुद्ध; धर्मविरुद्ध, शास्त्रविरुद्ध, अधार्मिक.-*lly, adv.*;-*fulness, n.*

**Unlearn'**, *v. t.* (अनूल'र्न्)—to expel from one's memory; rid oneself of (false information, etc.). विसरणें, विसरून जाणें; सोडणें, टाकणें.

**Unlearn'ed**, *a.* (अनूल'र्नेड्)—not well educated. न शिकलेला, विद्याविहीन, अज्ञ.

**Unlearn't,-ned**, *a.* (अन्ल'र्न्ट्,-र्न्ड्)—(of lesson etc.) not learnt. न शिकलेला, न पढलेला (पाठ, धडा इ.).

**Unlea'vened**, *a.* (अनूले'व्हन्ड्)—not fermented. न आंबवलेला, विन फुगवलेला (पाव इ.).

**Unleash'**, *v. t.* (अनूली'श्)—to remove leash of (dog etc.); also *fig.* काढणी काढणें, मोकळा करणें.

**Unlĕss'**, *conj.* (अन्-ले'स्)—if it be not that, if not; except when, excepting. नाहीं तर; शिवाय, खेरीज, वांचून. *U. and until*, (verbose for) until. पर्यंत.

**Unlĕtt'ered**, *a.* (अनूले'टर्ड्)—illiterate. अशिक्षित, निरक्षर, अडाणी.

**Unli'censed**, *a.* (अन्ला'इसन्स्ड्)—not having permission by authority. बिनसनदी, बिगरपरवाना; निर्गल, बेतालपणाचा.

**Unlicked'**, *a.* (अनूलि'क्ट्)—not licked into shape; (*sl.*) undefeated. साफसूफ न केलेलें, आकारास न आणलेलें; अ-पराभूत, पराभव न केलेला.

**Unlike'**, *n.* & *prep.* (अनूला'इक्)—not like. असमान, विसदृश, वेगळा, असदृश, भिन्न; (math.) असमान.-*ness, n.* असादृश्य, विसदृशता.

**Unlike'lў**, *a.* (अनूला'इक्लि)—improbable; unpromising. असंभवनीय, न होण्यासारखा. *adv.* improbably. असंभाव्यतेनें.

**Unlim'ber**, *v. t.* (अनूलि'म्बर्)—to detach (gun, gun-carriage) from limber. (बंदुकीचा पुढचा भाग) वेगळा करणें, काढून ठेवणें.

**Unlim'ited**, *a.* (अनूलि'मिटेड्)—boundless; unrestricted; very numerous. अमर्याद; अनियंत्रित; अपार, अपरंपार.

**Unload'**, *v. t.* (अनूलो'ड्)—to remove load from (ship, cart, beast, etc.); withdraw charge from (gun etc.). (माल, ओझें) काढणें, उतरणें, खालीं करणें, रिकामा करणें; (बंदूक) रिकामी करणें.

**Unlŏck'**, *v. t.* (अनूलॉ'क्)—to release lock of (door, etc.) open; (*fig.*) open the mind. चें कुलुप काढणें, उघडणें; मन उघडें करून सांगणें, (हृद्गत) सांगणें.

**Unlooked'-fŏr**, *a.* (अनूलु'क्ड्-फॉर्)—not looked for, not foreseen, not expected. अनपेक्षित, आकस्मिक, अकल्पित.

**Unlōōse'**, *v. t.* (अनूलू'स्)—to loose, untie. सैल करणें. बंद सोडणें, मोकळे करणें.

**Unlove'lў**, *a.* (अनूल'व्ह्लि)—not amiable, not attractive. रुक्ष, अमनोहर अरम्य.

**Unlŭck'ў**, *a.* (अनूल'कि)—unfortunate; not successful; hapless; ill-contrived. दुर्दैवी. कमनशिबी; अयशस्वी, अपेशी; अव्यवस्थित.-'*ily, adv.*

**Unmāke'**, *v. t.* (अनूमे'क्)—to destroy; annul. नाहींसा करणें, नाश करणें; रद्द करणें. *Un-made*, *pa. p.* & *n.* विद्रूप केलेलें; विकृत; न झालेलें, अकृत.

**Unmăn'**, *v. t.* (अनूमॅ'न्)—to deprive of manly qualities, as reason etc.; deprive of men; cause to weep etc. सत्त्वहीन करणें, हीनपराक्रम करणें; माणसें कमी करणें,-काढणें; रडकुंडीला आणणें, दुतपल करणें. *Unmanned'*, *a.* दुर्बळ, नामर्द; पुरीं माणसें नसलेलें (जहाज.)

Unmăn'ageable, *a.* ( अन्मॅ'निजब्ल )—not manageable; not easily controllable. अफाट, बेसुमार, आटोक्यांत ठेवतां न येणारा; अनिवार, बेफाट, बेफाम.

Unmănn'erlў, *a.* ( अन्मॅ'नर्-लि )—rude, ill-bred. उद्धट, असभ्य, आडदांड, रीतभात नसलेला.-*liness*, *n.* गैरशिस्तपणा, असभ्यपणा.

Unmarked', *a.* ( अन्मा'र्क्ट )—not marked; unobserved; undistinguished. बिनखुणेचा, निशाणी नसलेला; अलक्षित, न पाहिलेला; भेदरहित, अभिन्न.

Unmă'rried, *a.* ( अन्मॅ'रिड )—not married. अविवाहित, बिनलग्नाचा, सडा.

Unmask', *v. t. & i.* ( अन्मा'स्क् )—to remove mask from, take off one's mask; show up (villainy). उघडा करणें, चें सोंग काढून टाकणें; उघडा होणें,-सोंग-ढोंग काढणें; उघड करणें.

Unmatched', *a.* ( अन्मॅ'च्ट )—unrivalled. अप्रतिम, अद्वितीय, बिजोड.

Unmistā'kable, *a.* ( अनमिस्टे'केब्ल )—that cannot be mistaken or doubted. गैरसमज न होण्यासारखा, स्पष्ट.

Unmĭt'igātėd, *a.* ( अन्मि'टिगेटिड् )—unqualified; absolute. कमी न झालेला; कठोर, तीव्र.

Unmoor', *v. t.* ( अन्मु'अर् )—to loose the moorings of (vessel etc.). नांगर वर घेणें, जहाज हाकारणें.

Unmoved', *a.* ( अन्मू'व्ड )—not moved; not changed in purpose, firm. न हाललेला; अचल, अढळ, स्थिर, कायम.

Unmū'sĭcal, *a.* ( अन्म्यू'झिकल् )—not melodious, harsh, unskilled in or indifferent to music. बेसूर, बदसूर, कर्णकटु; (संगीतांत) अनभिज्ञ, स्वरज्ञानशून्य.

Unmŭz'zle, *v. t.* ( अन्मॅ'झल् )—to loose from a muzzle, (*fig.*) relieve of obligation to remain silent. मुसकें काढणें,-सोडणें; स्वैर सोडणें.

Unnā'mable, *a.* ( अन्ने'मब्ल )—too bad to be named. नांव सुद्धां न घेण्याजोगा, अगदीं वाईट.

Unnă'tural, *a.* ( अन्नॅ'चरल )—contrary to nature; lacking natural feelings, acting without natural affection, artificial. निसर्गविरुद्ध, सृष्टिक्रमबाह्य, अस्वाभाविक, वरकरणी, कृत्रिम.

Unnĕ'cessarў, *a.* ( अन्ने'सिसरि )—not necessary, useless. अनावश्यक, उगाच, कारणावांचूनचा; निरुपयोगी.-*arily*, *adv.* कारणावांचून, उगाच.

Unnerve', *v. t.* ( अन्न'र्व् )—to deprive of strength, weaken, deprive of composure of the mind. बलहीन करणें, कमकुवत करणें. घाबरणें, घाबरवून सोडणें.-*d*, *a.* weak, feeble. अशक्त, दुर्बळ, घाबरून गेलेला.

Unnum'bered, *a.* ( अन्नं'म्बर्ड )—countless. अगणित, असंख्यात.

Unŏffend'ing, *a.* ( अनऑफे'न्डिंग )—harmless. निरुपद्रवी, गरीब, राग न आणणारा,-येणारा, न खिजवणारा.

Unoffi'cial, *a.* ( अनऑफि'शल् )—not pertaining to office; (of news) not officially confirmed. बिनसरकारी; अनधिकृत.

Unopposed', *a.* ( अनअपो'झ्ड )—not resisted or obstructed. अप्रतिहत; प्रतिस्पर्धी नसलेला, बिनविरोध.

Unown'ed, *a.* ( अनओ'न्ड् )—not owned or claimed; not acknowledged or admitted. बिनवारशी; कबूल न केलेलें.

Unpăck', *v. t.* ( अन्पॅ'क् )—to open and remove contents of (box etc.). उघडणें, खोलणें, उपसून काढणें.

Unpaid', *a* ( अन्पे'ड )—remaining due. बाकी, बिनपगारी, (टपाल-) हाशील न भरलेलें (पत्र इ०).

Unpă'latable, *a.* ( अन्पॅ'लटब्ल् )—disgusting to the taste, disagreeable. बेचव, रुचि नसलेला; नावडणारा, अप्रिय.

Unpă'ralleled *a.* ( अन्पॅ'रॅल्ड )—having no parallel or equal, unequalled, matchless. अप्रतिम, अपूर्व, निरुपम, अद्वितीय, तोड नसलेला.

Unpărliamĕn'tarў, *a.* ( अन्पार्लमे'न्टरि )—contrary to parliamentary usage. पार्लमेन्टच्या पद्धतीविरुद्ध, असभ्य, शिष्टाचारविरुद्ध.

Unpā'triotic, *a.* ( अन्पे'ट्रिअटिक् )—not patriotic. स्वदेशाभिमान-शून्य, देशद्रोही.

Unpeo'ple, *v. t.* ( अन्पी'प्ल् )—to depopulate. लोकवस्ती उठविणें, उध्वस्त करणें.

Unpĭck', *v. t.* ( अन्पि'क् )—to undo sewing (of garment etc.); take out (stitches). (शिवण) उसवणें, टांके काढणें,-तोडणें.

Unplăced', *a.* ( अन्प्ले'स्ट )—not placed esp. in a race or list. शर्यतींत-यादींत-दाखल न केलेला,-नांव न नोंदलेला.

Unplay'able, *a.* ( अन्प्ले'अब्ल )—not playable, (esp. of ball or serve in games). खेळतां न येण्याजोगा, खेळण्यास कठीण (चेंडू).

Unplea'sant, *a.* ( अन्प्ले'झन्ट )—disagreeable. अप्रिय, कटु, नावडीचा, नावडता, विषम.

Unplea'santness, *n.* ( अन्प्ले'झन्ट्नेस )—(*esp.*) misunderstanding; quarrel. गैरसमज; अप्रियता, भांडण, बिनुट.

Unpōlled', *a.* ( अन्पो'ल्ड )—(of electors, votes) not polled or recorded. (निवडणुकींत) न दिलेलीं, न नोंदलेलीं (मतें).

Unpŏp'ular, *a.* ( अन्पॉ'प्युलर् )—disliked. लोकांना अप्रिय, नावडणारा.-*ity*, *n.* अप्रियता.

Unprăc'tised, *a.* ( अन्प्रॅ'क्टिस्ट् )—not put into practice; not experienced, raw, unskilful. बिनवहिवाटीचा, न वापरलेला; न सरावलेला, अनभ्यस्त, कच्चा, अकुशल.

Unprĕ'cĕdentėd, *a.* ( अन्प्रे'सिडेन्टिड )—for which there is no previous example. अपूर्व, नवीन, अभूतपूर्व.

Unprĕj'udĭced, *a.* ( अन्प्रे'जुडिस्ट् )—impartial. निःपक्षपाती, पूर्वग्रहानें अदूषित.

**Unpremed'itated**, *a.* ( अनुप्रिमे'डिटेटिड् )—not previously meditated in the mind; not deliberately planned. पूर्वी विचार करून न ठेवलेला; पूर्वी न योजिलेला; अपूर्वकल्पित, अपूर्वचिंतित.

**Unprepared'**, *a.* ( अनुप्रिपे'अर्ड् )—not ready; not fitted by previous measures. असिद्ध, तयारी-वांचूनचा, पूर्वी तयार न केलेलें, स्वयंस्फूर्त ( भाषण ). *-ly, adv.* पूर्वतयारीवांचून.

**Unpresen'table**, *a.* ( अनुप्रिझे'न्टबल् )—not fit to be presented to company; not fit to be seen. ( लोकां- ) पुढें न आणण्याजोगा; न पाहण्याजोगा, विद्रूप.

**Unpretend'ing**, *a.* ( अनप्रिटें'डिंग् )—making little show, not pretending to any distinction. बिनढोली, लीन, साधासुधा.

**Unprin'cipled**, *a.* ( अनुप्रि'न्सिपल्ड् )—lacking good moral principles, profligate, immoral. दुराचारी, दुर्वृत्त, नीतितत्त्वांप्रमाणें न वागणारा, बेताल, स्वैर.

**Unprofe'ssional**, *a.* ( अनुप्रफे'शनल् )—not belonging *to a profession; contrary to professional* etiquette. धंद्याच्या बाहेरचा, धंद्याशीं असंबद्ध; धंद्याच्या-पेशाच्या सांप्रदायाविरुद्ध, धंद्याविरुद्ध.

**Unprof'itable**, *a.* ( अनुप्रॉ'फिटबल् )—without profit, serving no purpose. बिननफ्याचा, बिनकिफायतशीर; निरर्थक, विफल, शुष्क.

**Unprovi'ded**, *a.* ( अनुप्रव्हा'इडिड् )—unfurnished; not supplied ( with money etc. ); not prepared. पुरवठा न केलेला; ( पैशाची ) तरतूद न केलेला; असिद्ध, तयारी नसलेला.

**Unprovoked'**, *a.* ( अनुप्रव्हो'क्ट् )—without provocation or just cause. बिनकुरापतीचा, निष्कारण, बिनआगळिकीचा.

**Unpub'lished**, *a.* ( अनप'ब्लिश्ट् )—not made public, secret, private; ( of Ms, etc. ) not published. प्रसिद्ध,-जाहीर,-न केलेला, गुप्त, खाजगी; अप्रकाशित.

**Unqua'lified**, *a.* ( अनुक्वॉ'लिफाइड् )—not qualified or competent; not legally or officially qualified; not modified. अयोग्य, नालायक; कायद्याच्या दृष्टीनें योग्यता न आलेला, योग्य परीक्षा न उतरलेला; सपशेल, बिनअटींचा, संपूर्ण, पुरा.

**Unques'tionable**, *a.* ( अनुक्वे'स्चनेबल् )—that cannot be *questioned or doubted.* निःसंशय, असंदिग्ध, निर्विवाद.

**Unques'tioned**, *a.* ( अनक्वे'स्चन्ड् )—not disputed; not interrogated. शंका नसलेला; निर्विवाद; प्रश्न नसलेला, सिद्ध, प्रश्न न उद्भवण्याजोगा.

**Unqui'et**, *a.* ( अनुक्वा'यट् )—not quiet, restless, agitated. अस्वस्थ, अशांत, क्षुब्धतेचा, अस्वस्थतेचा.

**Unrav'el**, *v. t.* ( अनरॅ'व्हल् )—to separate the threads of; disentangle. धागे सोडणें; गुंता काढणें, उलगडणें, उघडकीस आणणें. ( *lit. &fig.* ).*-ness, n.*

**Unread'**, *a.* ( अनरे'ड् )—( of book, etc. ) not read. ( *of person* ) not well-read. न वाचलेलें ( पुस्तक इ० ); वाचन न झालेला, अबहुश्रुत ( मनुष्य ).*-able, a.* ( -रीडेबल् ) न वाचण्याजोगें, कंटाळवाणें, रटाळ.

**Unrea'dy**, *a.* ( अनरे'डि )—not ready, not prompt in action. तयारी-तयार-नसलेला; ढिम्म, सुस्त, चेंगट.

**Unre'al**, *a.* ( अनुरि'अल )—not substantial, illusive; sham, visionary. भ्रमात्मक, मायिक; खोटा; काल्पनिक, असत्य, असत् ( philos. ).

**Unrea'son**, *n.* ( अनुरी'झन् )—*lack of reason*; folly, non-sense. कारणाभाव, असंगति, अविचार; मूर्खपणा, वेडेपणा.

**Unrea'sonable**, *a.* ( अनुरी'झनेबल् )—exceeding the bounds of reason, exorbitant. अयोग्य, गैरवाजवी, फारच, अवास्तव, अतिशय.*-bly, adv.-ness, n.* असमंजसपणा, गैरवाजवीपणा.

**Unrecip'rocated**, *a.* ( अनुरिसि'प्रकेटिड् )—( esp. of the affections ) not requited. मोबदला न मिळालेला, फेड न झालेला, एकांगी ( प्रीति ).

**Unreclaimed'**, *a.* ( अनुरिक्ले'म्ड् )—not reformed; ( of land ) in uncultivated state. न सुधारलेला, सुधारणा न झालेला; लागवडीला न आणलेला, बिन-लागवडीचा.

**Unredeemed'**, *a.* ( अनुरिडी'म्ड् )—not redeemed or fulfilled. परत न घेतलेला; न पाळलेलें ( वचन ); भरपाई न केलेला; न सोडवलेलें ( गहाण ); न सुधारलेला ( दुर्गुण ).

**Unreel'**, *v. t. & i.* ( अनुरी'ल् )—to unwind, become unwound, from reel. आंट्या उलगडणें.

**Unrefined'**, *a.* ( अनुरिफा'इन्ड् )—not purified; not polished in manners. अशोधित, अशुद्ध, असंस्कृत, ग्राम्य.

**Unreflect'ing**, *a.* ( अनुरिफ्ले'क्टिंग् )—not reflecting. अविचारी, असमंजस, अविचारशील.

**Unreformed'**, *a.* ( अनुरिफॉ'र्म्ड् )—not amended. न सुधारलेला.

**Unreg'istered**, *a.* ( अनुरे'जिस्टर्ड् )—not registered or recorded. न नोंदलेला; बिननोंदलेला, दाखला न मिळालेला.

**Unrehearsed'**, *a.* ( अनुरिह'र्स्ट् )—without rehearsal; not prepared beforehand. ( पूर्व- ) तालमीशिवाय, तालीम न झालेला; आगाऊ तयारी न केलेला, आयत्या वेळचा.

**Unrelent'ing**, *a.* ( अनुरिले'न्टिंग् )—having no pity, hard, cruel; inflexibly rigid. निर्दय, क्रूर; कठीण, कठोर.

**Unrelieved'**, *a.* ( अनुरिली'व्हड् )—not succoured; lacking the relief given by contrast or variation. मदत न मिळालेला; एकच, एकसारखा, कंटाळवाणा.

**Unremitt'ing**, *a.* ( अनुरिमि'टिंग् )—incessant. सतत, सारखा.

**Unrequi'ted**, *a.* ( अनुरिक्वा'इटिड् )—( of affection,

etc.) not returned. परतफेड न केलेला, परत न केलेला, एकतर्फी (प्रेम इ०).

Unrëserve', *n.* (अन्‌रिझ़'र्व्ह्)—frankness. संकोच नसणें, (मन-)मोकळेपणा, उघडपणा, आंतबाहेर न ठेवणें.

Unreserv'edly, *adv.* (अन्‌रिझ़'र्व्हिड्लि)—without reservation or concealment, frankly. मोकळ्या मनानें, आंत बाहेर न ठेवतां, निःशेष, पुरतेपणीं.

Unrest', *n.* (अन्‌रे'स्ट्)—disturbed or agitated condition. गोंधळ, अस्वस्थता, अशान्तता.

Unrid'dle, *v. t.* (अन्‌रि'डल्)—to solve (mystery etc.). कोडें सोडवणें,-उकलणें.

Unri'ghteous, *a.* (अन्‌रा'इचस्)—unjust; wicked; sinful, not honest and upright. अधर्मी, अधार्मिक, अन्यायी; दुष्ट; पापाचारी.-*ly, adv.*; -*ness, n.*

Unrip', *v. t.* (अन्‌रि'प्)—to rip open or apart. उघडणें, फाडणें, विदारणें.

Unripe', *a.* (अन्‌रा'इप्)—not ripe or mature; not seasonable, too early. बिन पिकलेला, कच्चा, हिरवा, अपक्व; अवेळचा, बिनहंगामी.-*ness, n.*; -*ned, a.* न पिकलेला, कच्चा.

Unri'valled, *a.* (अन्‌रा'इ-व्हल्ड्)—having no rival or equal; peerless, incomparable. प्रतिस्पर्धी नसलेला, अतूल्य; निरुपम, अप्रतिम.

Unroll', *v. t.* & *i.* (अन्‌रो'ल्)—to unfold, open; display, be displayed. वरचें आच्छादन काढणें, उलगडणें, उकलणें, उघडणें; उघडकीस आणणें.

Unruled', *a.* (अन्‌रूल्ड्)—not ruled. अशासित, (कोणत्याहि राजाच्या) अंमलाखालीं नसलेला; ओळी न आखलेला, रेघा न मारलेला.

Unru'ly, *a.* (अन्‌रू'लि)—lawless, refractory, ungovernable, disorderly. अनावर, उच्छृंखल, शिरजोर, बेफाम.-*liness, n.* शिरजोरपणा, उच्छृंखलपणा.

Unsadd'le, *v. t.* (अन्‌सॅ'ड्ल्)—to take the saddle from; throw from the saddle. खोगीर उतरणें, जीन काढणें,-उतरणें; (घोड्यावरून) खालीं पाडणें.-*d, a.* खोगीर न घातलेला (घोडा).

Unsafe', *a.* (अन्‌से'फ्)—not safe or free from danger; hazardous. असुरक्षित, धोक्याचा, जोखमाचा, भयाचा.-*ly, adv.*;-*ness, n.*

Unsal'eable, *a.* (अन्‌से'लबल्)—not meeting a ready sale, not in demand. अविक्रेय, न खपणारा, मागणी नसलेला (माल).-*ness, n.*

Unsan'itary, *a.* (अन्‌सॅ'निटरि)—lacking sanitation. अनारोग्यकारक, कोंदट, रोगट, आरोग्यविघातक.

Unsatisfa'ctory, *a.* (अन्‌सॅटिस्फॅ'क्टरि)—not giving satisfaction. असमाधानकारक, असमर्पक, बिन-खात्रीचा.-*torily, adv.*

Unsat'urated, *a.* (अन्‌सॅ'च्युरेटेड्)—(Chem.) not saturated. पूर्णपणें न मुरलेला, अपरिप्लुत, असंपृक्त. -*ration, n.*

Unsa'voury, *a.* (अन्‌से'व्हरि)—uninviting; disgusting. कंटाळवाणा, मनांत न भरण्याजोगा; बेचव, अस्वादिष्ट.-*riness, n.*

Unsay', *v. t.* (अन्‌से')—to retract (statement etc.). (शब्द, वचन, इ०) परत घेणें.-*said, pa. t.* & *pa. p.*

Unsca'lable, *a.* (अन्‌स्के'लबल्)—that cannot be scaled or climbed. चढण्याला अशक्य, अगम्य.

Unscathed', *a.* (अन्‌स्के'द्ड्)—without suffering injury; uninjured. अक्षत, इजा न होतां, सुरक्षित, सही (शरीर) सलामत.

Unscrew', *v. t.* (अन्‌स्क्रू')—to unfasten by removing screws; loosen (screw). मळसूत्र काढणें,-उखळणें, (स्क्रू) सैल करणें.-*ed, pa. p.*

Unscrip'tural, *a.* (अन्‌स्क्रि'प्चरल्)—not in accordance with scripture. धर्मग्रंथांत न सांगितलेला, अविहित.

Unscru'pulous, *a.* (अन्‌स्क्रू'प्युलस्)—having no scruples; unprincipled. उलट्या काळजाचा, बिनदिक्कतखोर; तत्त्वें झुगारून देणारा, विवेकरहित.

Unseal', *v. t.* (अन्‌सी'ल्)—to open (letter, sealed article, etc.). उघडणें, सील-मुद्रा-काढणें. -*ed, a.* सील,-मुद्रा-नसलेला,-फुटलेला.-*ing., pr. pa.* opening. उघडणें, फोडणें.

Unseam', *v. t.* (अन्‌सी'म्)—to open the seams. उसवणें, उत्तरणें.

Unseas'onable, *a.* (अन्‌सी'झनेबल्)—not suitable to time or occasion; ill-timed. असमयोचित; अकालिक, अवेळचा.-*ness, n.*

Unsea'soned, *a.* (अन्‌सी'झन्ड्)—not seasoned; not inured; not accustomed; not salted. बिनमसाल्याचा; बिन मुरलेला, न रांपवलेला, पक्का न केलेला; न सरावलेला, न वळसावलेला; न खारावलेला.

Unseat', *v. t.* (अन्‌सी'ट्)—to remove from seat, throw from horse-back. पदच्युत करणें, बसल्या जागेवरून उठणें; (घोड्यावरून) खालीं आणणें. -*ed, a.* खालीं पाडलेला, पदच्युत केलेला, बैठक नसलेला.

Unsectar'ian, *a.* (अन्‌सेक्टे'अरिअन्)—free from sectarian limitations. (संकुचित) जात्यभिमानरहित.

Unseem'ly, *a.* (अन्‌सी'म्लि)—improper; unbecoming, not decorous. अयोग्य, गैरशिस्त; न शोभणारा. *adv.* unbecomingly. अयोग्यपणें, न साजेसें.

Unseen', *a.* (अन्‌सी'न्)—not seen; invisible; not discovered or discoverable. न पाहिलेला; अदृश्य; अज्ञात, अज्ञेय. *n.* unprepared passage for translation. भाषांतराकरितां बाहेरचा (पूर्वी न वाचलेला) उतारा. (*Also U. translation*).

Unsel'fish, *a.* (अन्‌से'ल्फिश्)—not selfish, regardful of others rather than oneself. निःस्वार्थी, परहितपर.

Unset'tle, *v. t.* (अन्‌से'ट्ल्)—to unhinge;

disturb; discompose. सैल करणें, सुटा करणें; चलबिचल करणें, क्षुब्ध करणें, अस्थिर करणें.

**Unsĕt'tled**, *a.* (अन्‌से'टल्ड)—not settled; liable to change; not paid. अस्थिर, चंचल; अनिर्णीत, अनिश्चित, बिननिवाड्याचा; हिशेब पुरा न केलेला.

**Unsĕx'**, *v. t.* (अन्‌से'क्स)—to make unfeminine. स्त्रियांचे नैसर्गिक धर्म नाहींसे करणें.

**Unshā'ken**, *a.* (अन्‌शे'कन्)—not shaken. न हालवलेला, स्थिर, न डगमगलेला.

**Unshĭp'**, *v. t.* (अन्‌शि'प्)—to take out of a ship or other water-craft; remove (oar etc.) from a place where it is fixed or fitted. गलबतांतून उतरणें; गलबतावरून-पासून-काढणें.

**Unshod'**, *a.* (अन्‌शॉ'ड)—having no shoes. अनवाणी, नाल नसलेला.

**Unshrink'ing**, *a.* (अन्‌श्रिं'किंग)—unhesitating; fearless, firm. कुरकूर न करणारा; निर्भय, स्थिर.

**Unsight'ed**, *a.* (अन्‌सा'इटिड)—not yet in sight; (of gun) not furnished with sight. दृष्टिपथांत न आलेला; मासकी न बसविलेली (बंदुक).

**Unsight'lў**, *a.* (अन्‌सा'इट्लि)—repulsive to look at, disagreeable to the eye. वेढब, कुरूप.

**Unskilled'**, *a.* (अन्‌स्कि'ल्ड)—without special skill or training. बिनकसबी, अनिष्णात.

**Unslaked'**, *a.* (अन्‌स्ले'क्ट)—unquenched (as thirst); not slaked (as lime). न भागलेली, अतृप्त (तहान, शोष); भाजलेला (परंतु पाण्यांत न भिजविलेला चुना).

**Unsōld'**, *a.* (अन्‌सो'ल्ड)—not sold. न विकलेला, न विकला गेलेला.

**Unsolici'ted**, *a.* (अन्‌सालि'सिटेड)—not requested; not asked; not asked for. अयाचित, अप्रार्थित; अपृष्ट; न मागितलेला.

**Unsophis'ticāted**, *a.* (अन्‌सफि'स्टिकेटिड)—artless; innocent; not adulterated. निर्व्याज, निष्कपटी; साधा, सरळ, बिनभेळीचा, अमिश्रित, शुद्ध, चोख.

**Unsound'**, *a.* (अन्‌सा'उन्ड)—not sound; diseased; rotten; erroneous; unreliable, questionable. विकृत, बिघडलेला; अधू, दुळा, रोगी; सडलेला, कुजका; चुकीचा, अयुक्तिक, सदोष; अविश्वास्य, संशयित.*-ness*, *n.* बिघाड, विकृति; सडकेपणा; असमर्पकता; अधूपणा; दौर्बल्य.

**Unspăr'ing**, *a.* (अन्‌स्पे'अरिंग)—not sparing; liberal, profuse; not merciful or forgiving. कसर,-कुचराई,-न करणारा; सढळ, विपुल, मनमुराद; कडक, कठोर, मय-दयामाया-न करणारा.*-ly adv.*

**Unspeak'able**, *a.* (अन्‌स्पी'कब्‌ल)—good or bad beyond description; unutterable. अनिर्वचनीय, अवाच्य, वर्णनातीत; शब्दातीत, न बोलण्याजोगें.

**Unspŏtt'ed**, *a.* (अन्‌स्पॉ'टिड)—not marked with any stain; not contaminated. ठिपके नसलेला; निष्कलंक, निर्दोष.

**Unstā'ble**, *a.* (अन्‌स्टे'बल)—not fixed, not steady; inconstant; irresolute. अस्थिर, चंचल; अध्रुव; अधीर, अनिश्चयी.

**Unstea'dў**, *a.* (अन्‌स्टे'डि)—not firm or steady; shaking, reeling, fluctuating. अस्थिर; डळमळ, हालणारा.*-dily, adv.*

**Unstĭtch'**, *v. t.* (अन्‌स्टि'च्)—to undo stitches of. (चे) टांके काढणें,-उसवणें.

**Unstŏp'**, *v. t.* (अन्‌स्टॉ'प्)—to remove stopper from; free from any obstruction; open. बूच काढणें; अडथळा दूर करणें,-काढून टाकणें; उघडणें.

**Unstrained'**, *a.* (अन्‌स्ट्रे'न्ड)—not forced, easy; not put through a strainer. ताण न दिलेला, बिनसक्तीचा, सोपा, साधा; (चाळणीतून) न चाळलेला.

**Unstrĭng'**, *v. t.* (अन्‌स्ट्रिं'ग)—to relax or remove the strings of; loosen (the nerves of); remove (beads etc.) from string. सैल-ढील-करणें, तारा काढणें,-सोडणें-उतरणें; शिथिल करणें; सरांतून काढणें. *Unstrung, pa. p.* गात्रें शिथिल झालेला.

**Unstrĕssed'**, *a.* (अन्‌स्ट्रे'स्ट्)—not pronounced with a stress. आघात-जोर-न देतां उच्चारलेला.

**Unstŭd'ied**, *a.* (अन्‌स्टऽ'डिड)—not premeditated; easy; natural; spontaneous. अकल्पित; अक्लिष्ट, सुगम; स्वाभाविक; स्वयंस्फूर्तीचा, स्वयंस्फूर्त.

**Unsubdued'**, *a.* (अन्‌सब्ड्यू'ड)—not subdued or conquered. असंयमित, अजित, अवश.

**Unsubstăn'tial**, *n.* (अन्‌सब्स्टॅ'न्शल)—having little or no solidity or reality. निःसत्त्व, निर्जीव, खोटा, अवास्तविक, अवास्तव.

**Unsuit'ed**, *a.* (अन्‌स्यू'टिड)—unsuitable, unfit, not fit for; not adapted *to*. नालायक; अयोग्य, न शोभणारा, न जुळणारा.

**Unsŭrpassed'**, *a.* (अन्‌सर्पा'स्ट)—not surpassed or exceeded. (वर) ताण न केलेला, मागें न टाकलेला, अपूर्व.

**Unswerv'ing**, *a.* (अन्‌स्व'र्व्हिंग)—not deviating from any rule or standard. न ढळणारा, अढळ, अचल, दृढ.

**Unsworn'**, *a.* (अन्‌स्वा'अर्न)—not bound by oath; not having taken an oath. शपथेवर न सांगितलेला; शपथ न घेतलेला.

**Unsўmmĕt'rical**, *a.* (अन्‌सिमे'ट्रिकल)—not characterized by symmetry. समप्रमाणरहित, प्रमाणशून्य, असमप्रमाण.

**Untăck'**, *v. t.* (अन्‌टॅ'क्)—to disjoin, separate; remove tacks from. सोडवणें, वेगळें करणें; बंध सोडणें.

**Untămed'**, *a.* (अन्‌टे'म्ड)—not tamed or domesticated; not subdued. वठणीस न आणलेला, न पाळलेला; अवशीकृत.

**Untăr'nished**, *a.* (अन्‌टा'र्निश्ड)—not soiled or stained. चकाकी कमी न झालेला; डाग न पडलेला, निष्कलंक.

**Untĕn'able**, *a.* (अन्‌टे'नबल)—that cannot be held in possession; not defensible. रक्षणायोग्य, राखण्यास अशक्य,-अयोग्य; असमर्थनीय, लेच्यापेच्या, न टिकणारा.

**Untĕn'ded**, *a.* (अन्‌टे'न्डिड)—not watched or looked after. अरक्षित, राखण न केलेला, दुर्लक्ष केलेला.

**Unthink'able**, *a.* (अन्‌थिं'कबल)—not thinkable;

**Ve'getate,** *v. i.* (वे'जिटेट्)—to live a plant's life, grow as vegetables do; live monotonous life. वनस्पतीप्रमाणें वाढणें,-राहणें; मांसाङ्कुर वाढणें; (पशूप्रमाणें) आळसांत वाढणें; एकलकोंडेपणानें राहणें. *-tive, a.,-tively, adv.,-tiveness, n.* [ L. *vegetus*, lively ]

**Vegeta'tion,** *n.* (वेजिटे'शन्)—vegetating; plants collectively, plant-life; excrescence of surface of body. वनस्पतिप्रमाणें राहणें, आळसांत राहणें; झाडझाडोरा, वृक्षवनस्पति, वनस्पतिजीवन; मांसांकुरवृद्धि.

**Ve'hement,** *a.* (वी'इमंट्)—violent; fervent, very eager or urgent. जोराचा, कडक, तीव्र; आवेशी, उत्साही.*-ence, n.* तीव्रता, जोर, आवेश.*-ently, adv.* आवेशानें, उत्साहानें, जोरानें.

**Ve'hicle,** *n.* (व्ही'इकल्)—carriage or cart or other land conveyance; means of conveying, expressing etc. गाडी, वाहन; साधन, मार्ग. *Vehic'ular, a.* गाडीवजा; वाहनांचा, गाड्यांचा.

**Veil,** *n.* (व्हेल्)—a piece of transparent material to hide or protect the face; a curtain; (*fig.*) pretext, a disguise; velum, membranous covering; slight huskiness of voice. बुरखा, ओढणी, झिरझिरीत-पारदर्शक-आवरण, जाळीदार आच्छादन; पडदा; मिष, ढोंग, आडपडदा; त्वचामय आवरण, आवरणत्वचा; आवाजाचा किंचित् घोगरटपणा. *v. t. & i.* to cover with a veil, to keep from being seen; to hide, to conceal. बुरखा घालणें; छपविणें, लपवणें, गुप्त ठेवणें. *To take the v.*, to become nun. जोगीण बनणें. *To raise, drop, one's v.*, तोंडावर बुरखा ओढणें, घेणें,-वरून बुरखा काढणें. *Beyond the v.*, यमधानीजवनिकेच्या आंत (जाणें), मरणोत्तर अज्ञात स्थितींत. *To draw a v. over*, (विषयावर) वादविवाद टाळणें, पडदा पाडणें. *Veiled resentment*, अंतःस्थ-प्रच्छन्न-कोप,-राग,-द्वेष. *Veil'ing, n.* बुरखा घेणें, झांकणें, बुरखा,-त्याचें कापड. *Veil'less, a.*

**Vein,** *n.* (व्हेन्)—a membranous tube through which blood flows; any blood-vessel; a rib of insect's wing or of a leaf; fissure in rock filled with deposited matter; a streak in wood, stone etc., temporary mood, tendency. अशुद्ध-रक्तवाहिनी, नस; रक्तवाहिनी,-नलिका; कीटकाच्या पंखाची किंवा पानाची शीर,-शिरा; खडकांतील चीर,-भेग; (लाकडांतील-दगडांतील) दोरा, शीर; वृत्ति, मनःस्थिति, कल. *Pulmonary vv.*, फुप्फुसायात शिरा. *Systemic vv.*, सर्व शरीरावयवांतील शिरागत रक्त उजव्या बाजूला आणणाऱ्या रक्तवाहिन्या. *Veined, a.* शिरा असलेला, शिरामय. *Vein'let, n.* उपशिरा. *Vein'less, -like,-y, aa.*

**Velam'en,** *n.* (व्हले'मेन्)—(*pl.-mina*), enveloping membrane, esp. of brain. मस्तिष्काची-मेंदूची-आवरणत्वचा. Also, *Velamen'tum*, (*pl.-ia*).

**Ve'lar,** *a.* (व्ही'लर्)—of a veil or velum, of soft palate. मृदु तालव्य (व्यंजनें).

**Veld, Veldt,** *n.* (व्हेल्ट्)—S.-Afr. grass country. द. आफ्रिकेंतील गवताळ प्रदेश.

**Velle'ity,** *n.* (व्हिली'इटि)—wishful state not prompting to action. (क्रियारहित) केवळ उत्सुकता, इच्छा.

**Vell'um,** *n.* (व्हे'लम्)—a finer kind of parchment (orig. from skin of calf); manuscript written on this. मृदुचर्मपत्रासारखा कागद.

**Veloce,** *adv.* (व्हेलो'चे)—(mus.) with great rapidity. अधिक वेगानें, जलद.

**Velo'cipede,** *n.* (व्हिलॉ'सिपीड्)—(arch.) a bicycle or tricycle. जुनी दुचाकी, तिचाकी गाडी.*-dist, n.*

**Velo'city,** *n.* (व्हिलॉ'सिटि)—rate of motion, esp. of inanimate things, swiftness, rapidity. वेग, गति.

**Velours',** *n.* (व्हलु'अर्)—kinds of plush used for hats etc. साहेबी टोप्यांचें एक जातीचें कापड.

**Ve'lum,** *n.* (व्ही'लम्)—kinds of membrane, the soft palate. अन्तस्त्वचा, मृदुतालुत्वचा.

**Vel'vet,** *n.* (व्हे'ल्व्हिट्)—silk fabric with thick short pile, cotton stuff imitating silk; furry skin covering a growing antler. मखमल, मखमाल; हरणाच्या-काळविटाच्या-वाढत्या शिंगावरील लोंकरीचें आच्छादन. *a.* made of, soft as, velvet. मखमलीचा, मखमलीसारखा मऊ. *V. glove*, मनाच्या कठोरपणा परंतु दिखाऊ सौम्यता. *With an iron hand in a v. glove*, दिखाऊ सौम्यतेमागील मनाचा कणखर-कठोरपणा. *V. paw*, मांजराचा-निर्दयतेचा-मृदु पंजा. *V. tread*, हलकें पाऊल.*-ed*,

**Velveteen',** *n.* (व्हेल्व्हिटी'न्)—cotton fabric with pile like velvet; kind of velvet made of silk and cotton. मखमलीसारखें मऊ सुती कापड; अर्धरेशमी -अर्धसुती-कापड.

**Vel'veting,** *n.* (व्हे'ल्व्हिटिंग)—velvet goods; pile, nap, of velvet. मखमलीचा माल, कपडे; मखमलीवरील लव, लोंकर.

**Ve'nal,** *a.* (व्ही'नल्)—(of person) that may be bought; held for sale भाडोत्री, लांचखाऊ; लांचखाऊपणाचा *Venality n.* बुद्धीचा दुरुपयोग.

**Vend,** *v. t.* (व्हेन्ड्)—to carry on the sale of (goods), to sell as wares, to offer for sale. विक्रय करणें, विका-विक्री-करणें.*-vendor,*-विकणारा, विक्या. *Ven'dible, a.* विकण्याजोगा, विक्रेय.*-bility, n. -bly, adv.*

**Ven'dance,** *n.* (व्हे'न्डन्स)—a small and delicate fish found in European lakes. एक लहान नाजूक मासा.

**Vendee',** *n.* (व्हेन्डी')—one to whom a thing is sold. विकत घेणारा, क्रेता.

**Ven'dor,** *n.* (व्हे'न्डर्)—(in law) one who vends, seller. बेचनेवाला, बेचनदार, विकणारा, विक्रेता.

**Vendet'ta,** *n.* (व्हेन्डे'टा)—blood-feud. खूनखुन्नीचें हाडवैर.

**Veneer',** *v. t.* (व्हिनी'अर्)—to cover (furniture etc.) with a thin coating of finer wood; cover (pottery etc.) with thin coat; (fig.) disguise under superficial polish of manner etc. फर्दजोडणी करणें; वरून तकाकी देणें, झिलई देणें;

पाठेरील भपक्यानें झांकून टाकणें. *n.* thin outer coating. झिलई, तकाकी, भपका. *V.-moth*, पाह्यतः रंगीबेरंगी असा पतंग.

**Vĕn'erable,** *a.* ( व्हे'नेरब्ल् )—entitled to veneration; a title of an arch-deacon ( abbr. Ven. ) पूज्य, मान्य, वयस्क, वृद्ध; धर्माधिकाऱ्याची पदवी.-*ability*, -*ableness*, *nn.* पूज्यता, पवित्रता, मान्यता.-*ably*, *adv.*

**Vĕn'erāte,** *v. i.* ( व्हे'नेरेट् )—to regard with deep respect; to feel veneration for. मोठा आदर ठेवणें; मान देणें, पूज्यबुद्धि बाळगणें.-*tor*, *n.*

**Vĕnerā'tion,** *n.* ( व्हेनरे'शन् )—profound respect, respect mingled with awe, reverence. अत्यंत आदर, श्रद्धा, सादर भय, आदरबुद्धि,-भाव.

**Vĕnēr'ĕal,** *a.* ( व्हिनी'अरिअल् )—of sexual intercourse. संभोगजन्य, मैथुनाचा, मैथुनसंबंधीं. *V. disease*, गरमी, उपदंश ( रोग ). *V. remedies*, गरमीवर इलाज, उपदंशावर गुणकारी औषध,-उपाय. [ L. *Venereus*, of Venus, the goddess of love ]

**Vĕn'ery,** *n.* ( व्हे'नरि )—( arch. ) hunting. मृगया, पारध. 2. ( arch. ) sexual indulgence. विषयवासना, संभोगासक्ति.

**Vĕn'ĕsect,** *v. t.* & *i.* ( व्हे'नेसक्ट् )—to cut vein. शिरा तोडून रक्त काढणें, शीर तोडणें.-*tion*, *n.*

**Vĕnē'tian,** *a.* ( व्हिनी'शन् )—of Venice. व्हेनिस ( शहरा ) चा. *n.* a Venetian person. व्हेनिसचा रहिवासी. *V. blind*, window blind of slats hung on cords. ( खिडकीची ) झुलकी. *V. carpet*, पट्टेदार गालिचा. *V. chalk*, फ्रेंच चाक, ( कापडावर खुणा करण्याचा इ० ). *V. mast*, tall particoloured pole used in decorations. रस्त्यांत उभारलेला पट्टेरी रंगविलेला शोभेचा उंच खांब. *V. pearl*, भरीव कृत्रिम मोतीं. *V. window*, तीन झडपांची खिडकी.

**Vĕn'geance,** *n.* ( व्हे'न्‌जन्स् )—retribution, punishment inflicted on a wrong doer. सूड, प्रतिकार, प्रतिक्रिया, बदला. *To take v.* (*on a person*, or *for a thing*), सूड घेणें. *With a v.*, in a higher degree than was expected. अनर्थ मांडणें, शर्थ-परकाष्ठा-करणें. *Venge'ful*, *a.* आकसी खुनशी;-*fully*, *adv.*,-*fulness*, *n.*

**Vē'nial,** *a.* ( व्ही'निअल् )—trivial; far from unpardonable, easily excusable. क्षुद्र; क्षम्य, उपेक्षणीय, लघु.

**Vĕn'sion,** *n.* ( व्हे'न्झन् )—deer-flesh as food. मृगमांस, हरणाचें मांस,-ची सागुती.

**Vĕn'om,** *n.* ( व्हे'नम् )—the poison ( of snakes, &c. ), spite, malice. विष, जहर; द्वेष, दुष्टपणा.-*ed*, *a.*

**Vĕn'omous,** *a.* ( व्हे'नमस् )—poisonous; full of hatred and anger. विषारी; द्वेषक्रोधानें भरलेला, दुष्ट.-*ly*, *adv.*,-*ness*, *n.*

**Venŏ'sity,** *n.* ( व्हेनॉ'सिटि )—excess of venous blood; deficient aeration of venous blood in lungs. शिरागत-अशुद्ध-रक्ताचा अतिरेक; फुप्फुसांतील अशुद्ध रक्त कमी प्रमाणांत शुद्ध होणें.

**Vē'nous,-ose,** *aa.* ( व्ही'नस्,-नोस् )—of, full of, contained in, veins. शिरेचा, शिरामय, शिरागत, शिरेंतला. *V. blood*, शिरागत-अशुद्ध-रक्त.-*ously*, *adv.*

**Vĕnt,** *n.* ( व्हेन्ट् )—a small outlet or inlet for air, smoke, etc.; anus of fish, etc.; (*fig.*) an outlet, free play. दार, द्वार, वाट, उघडी, ( बंदुकीचा ) काना; ( माशाचें इ० ) मलद्वार, गुदद्वार; मोकळी वाट, सुरुद्वार, मोकळीक. *v. t.* to make vent in ( gun, cask, etc. ); utter; pour forth; ( of otter or beaver ) come to surface for breath. लहान छिद्र पाडणें, काना करणें; उद्गारणें, बोलणें; ओतणें; श्वासोच्छ्वासासाठीं पृष्ठभागावर येणें. *V.-hole*, उच्छ्वास बाहेर जाण्याकरितां केलेलें छिद्र. *To give v. to*, ( ला ) वाट काढणें, वाट करणें, व्यक्त करणें. *V.-less*, *a.*

**Vĕn'ter,** *n.* ( व्हे'न्टर् )—( Anat. ) belly, protuberance or concave part of muscle or bone; ( Law ) womb, mother. उदर, पोट, स्नायूचा किंवा हाडाचा फुगवटा, फुगीर भाग; उदर, माता, जननी, आई.

**Vĕn'tiduct,** *n.* ( व्हे'न्टिडक्ट् )—( subterranean ) air-passage. ( भूनिगत ) हवेचा-हवा येण्याचा-मार्ग, वायुमार्ग.

**Vĕn'til,** *n.* ( व्हे'न्टिल् )—a valve in musical instrument; a shutter for regulating air in organ. पडदा; ( वाजाच्या पेटींतील ) हवा कमीजास्त करण्याची झडपी,-खुंटी.

**Vĕn'tilāte,** *v. t.* ( व्हे'न्टिलेट् )—to cause air to circulate freely, purify ( blood ) by air, oxygenate; submit ( question, grievance etc. ) to public consideration and discussion. हवा-वारा-खेळेसा करणें; ( रक्त ) प्राणवायूनें युक्त-शुद्ध-करणें; वाटाघाटी-साठीं-चर्चेसाठीं-मांडणें,-प्रसिद्ध करणें,-पुढें मांडणें. *Ven'tilator*, *n.* ( खोलींत ) हवा येण्याचें साधन, जाळी, लहान खिडकी, इ. वातमार्ग.-*tive*, *a.*

**Vĕntilā'tion,** *n.* ( व्हेन्टिले'शन् )—free circulation of sufficient fresh air; submitting to public consideration and discussion. मोकळी किंवा खेळती हवा, वारा खेळेसा करणें; सोय, जाहीर वाटाघाट,-चर्चा.

**Vĕn'tral,** *a.* & *n.* ( व्हे'न्ट्रल् )—of or on the belly. पोटाचें, पोटावरील, उदरस्थ. *Ventre-à-terre*, *adv.* ( व्हॉं'ट्राटेअर् ) with belly to the ground, of full speed. भरधांव,-वेगानें.

**Vĕn'tricle,** *n.* ( व्हे'न्ट्रिकल् )—any cavity of the body, a hollow part or organ. शरीरांतील पोकळी, पोकळ सच्छिद्र भाग,-अवयव.-*cose*,-*cous*, *aa.* लंबोदर, फुगीर, लांबट पोटाचा.-*cular*, *a.*

**Ventril'oquism,** *n.* ( व्हेन्ट्रि'लाक्विझम् )—an act or art of producing sounds that seem to come from the source other than the speaker. निरनिराळे आवाज काढणें,-काढण्याची कला,-गारुड-ऐंद्रजालिक -वाणी.-*quist*, *n.*,-*quy*, *n.*,-*quial*, *a.*

**Vĕn'ture,** *n.* ( व्हें'चर् )—risky undertaking, hazard. साहस, जोखीम. *v. t.* & *i.* to summon up courage *to* do; utter; hazard, run the risk of. धाडस करणें; बोलण्याला धजणें; जोखमींत घालणें.

*At a v.*, at random, by guesswork. अंदाजानें, निश्चित विचार न करतां. *V. some, a.*

Vĕn'turesome, *a.* ( व्हें'चर्-सम् )—disposed to take risks, bold, daring, hazardous. साहसी, धाडसी; धोक्याचा, कमी सुरक्षित ( मार्ग ).

Vĕn'ue, *n.* ( व्हे'न्यू )—( legal ) country or district in which a case must be tried and jury must be gathered, statement indicating this; a rendezvous, a meeting-place. ( कायदा. ) ( ज्या भागांत गुन्हा घडला त्या भागांतच ) पंच बोलवून खटला चालविण्याचें क्षेत्र, ह्याविषयींचें विधान; संकेतस्थळ, भेटण्याचें ठिकाण.

Vē'nŭs, *n.* ( व्ही'नस )—the Roman goddess of love; the planet second in order from the sun; a beautiful woman. प्रेमदेवता, रति; शुक्र, शुक्राची चांदणी; सुंदर स्त्री. *Mount of V.*, ( palmistry ) base of thumb. आंगठ्याचा खालचा उंचवटा. *V.'s fly-trap*, a herb with leaves that close on insects etc. कीटकभक्षी पर्णांची वनस्पति.

Verā'cious, *a.* ( व्हेरे'शस )—truthful; true. सत्यवादी; सत्य, खरें.-*ly, adv.*

Verā'city, *n.* ( व्हॅरॅ'सिटि )—truthfulness. सत्यपणा, सत्यता, खरेपणा.

Verăn'da,-h, *n.* ( व्हॅरॅ'न्डा )—a kind of open portico alongside of a house. ओटा, ओसरी, पडवी, गच्ची.

Verb, *n.* ( व्हर्ब )—the part of speech which serves to express action, passion or existence. क्रियापद.

Ver'bal, *a.* ( व्ह'र्बल् )—oral; word for word; of a verb. तोंडी; अक्षरशः, शाब्दिक; क्रियापदाचा, क्रियादर्शक. *n. v.* noun. धातुसाधित नाम.-*ist, n.* a verbal critic. शब्दच्छल करणारा-शाब्दिक-टीकाकार. -*ize, v. t. & i.* to make ( noun &c. ) into a verb; to be verbose. नाम इ. पासून क्रियापद बनविणें; पाल्हाळिक असणें.

Verbā'tim, *adv. & a.* ( व्हर्बे'टिम् )—word for word. अक्षरशः, शब्दशः.

Verb'iage, *n.* ( व्ह'र्बिइज् )—needless array of words. पाल्हाळ; शब्दावडंबर.

Verbōse', *a.* ( व्हर्बो'स् )—prolix; exuberant in the use of words, wordy. लांबलचक; पाल्हाळिक.-*ly, adv.*,-*ness*,-*sity, nn.*

Verd'ant, *a.* ( व्ह'र्डन्ट )—green and fresh; ( of person ) raw, green. हिरवागार, हिरवळयुक्त; कच्चा, हिरवट ( मनुष्य ).-*ancy, n.*,-*antly, adv.*

Verd'ict, *n.* ( व्ह'र्डिक्ट )—*decision of jury*; *opinion* arrived at. पंचांचा निकाल; निर्णय, निवाडा, मत.

Verd'igris, *n.* ( व्ह'र्डिग्रिस )—the green rust of copper. ( हिरवा ) गंज, जंग, कलंक, कळकटपणा.

Verd'ure, *n.* ( व्ह'र्ज्यर् )—greenness, freshness; mass of green vegetation. ताजेपणा, हिरवेपणा; हिरवेगार झुडपें, हिरवळ.

Verge, *n.* ( व्हर्ज् )—border-line or brink; a twig; a staff or mace. कडा, काठ, किनार; डहाळी; छडी, दंड. *v. i.* to incline downwards or in a specified direction. झुकणें, कलणें; रोख असणें. *On the v. of 70*, सत्तरीच्या वयाचा,-घरांत गेलेला. *To v. on*, to border on. खाजून जाणें, चिकटून जाणें.

Ver'ger, *n.* ( व्ह'र्जर् )—the staff-bearer of bishop etc., an usher in churches. वेत्रधारी, छडीबरदार.

Veri'dical *a.* ( व्हेरि'डिकल् )—truthful ( usu. ironical ); coinciding with realities. सत्यवादी, सत्याचा पुतळा; वस्तुस्थितीला धरून.-*cally, adv.*; -*cous, a.*

Vĕ'rĭfȳ, *v. t.* ( व्हे'रिफाय् )—to ascertain the truth or correctness ( of event, action etc. ); bear out, fulfil; ( Law ) append affidavit to ( pleadings ), support by proofs. बरोबर आहे किंवा नाहीं हें पाहणें; खरें ठरविणें, प्रत्ययास -अनुभवास-आणून देणें; प्रतिज्ञालेख जोडणें, पुरावे देणें, आधार देणें.-*fica'tion, n.* सत्यत्वस्थापन, ताडून पाहून खरें आहे हें पाहणें.-*fier. n.*

Vĕ'rĭlȳ, *adv.* ( व्हे'रिलि )—in truth, truly. खरोखर, खचित.

Vĕrisĭmil'ĭtūde, *n.* ( व्हेरिसिमि'लिट्यूड )—an air of being true; a thing that seems true. खरेपणाचा देखावा, आभास; बरवर खरी दिसणारी वस्तु. -*similar, a.*

Vĕ'rĭtāble, *n.* ( व्हे'रिटेबल )—real, actual. खरोखरीचा, सत्य, वास्तविक.-*ably, adv.*

Vĕ'rĭtȳ, *n.* ( व्हे'रिटि )—truth; a true statement or fact; a really existent thing. सत्य; खरी गोष्ट; प्रत्यक्ष-विद्यमान-वस्तु. *Of a v.*, ( arch. ) really. खरोखर, वस्तुतः.

Ver'juice, *n.* ( व्ह'र्जूस )—acid liquor got from sour grapes etc. आंबट फळांचा सिरका,-अम्ल. -*d, a.*

Vermĭ-, ( व्हर्मि- )—in comb.=L. *vermis*, worm-. जंतु-. *Vermi'cide, n.* कृमिनाशक-जंतुनाशक-औषध, पुड.-'*cular, a.* कृमि-कसर-लागलेलें.-*form*, कृमिरूप. -*fuge*, जंतांचें औषध.-*vorous*, जंतु,-कृमिकीटक,-भक्षी.

Ver'mian, *a.* ( व्ह'र्मिअन् )—of worms, worm-like. किड्यांचा कीटकांचा, जंतुसदृश.

Vermĭcĕ'llĭ, *n.* ( व्हर्मिसे'लि )—paste made in slender threads. शेवया.

Vermĭl'ion, *n.* ( व्हर्मि'ल्यन् )—bright red colour, beautiful red colouring matter. हिंगूळ, उत्तम तांबडा रंग. *a.* हिंगुळाचा. *v. t.* हिंगूळ लावणें.

Verm'in, *n.* ( व्ह'र्मिन् )—creatures injurious to crops &c., noxious people. ( पिकांना उपद्रव-कारक ) कोल्हे, उंदीर, घुशी इ. प्राणी, कृमि-कीट -मुंगी इ० जीवजंतु; नीच लोक.-*ous, a.*,-*ously, adv.*

Vernăc'ūlar, *a. & n.* ( व्हर्नॅ'क्युलर् )—the language of one's own country, the native tongue. देशी, देशीय, मुलखांतला; *n.* देशी भाषा, मातृभाषा.

Vern'al, *a.* ( व्ह'र्नल् )—of or in the spring. वसंतऋतूचा, वासंतिक. *V. Equinox*, वसंतसंपात. -*ally, adv.*

Verna'tion n. (व्हर्नेशन्)—(Bot.) arrangement of leaves within leaf-bud. कोरकावस्था, पानांच्या घुनान्याच्या आंतील लहान पानांची रचना.

Ver'nier, n. (व्ह'र्निअर्)—a small movable scale for obtaining fractional parts on fixed scale. लघुभागमापक 'व्हर्निअर' सरकपट्टी. [f. V., inventor]

Ve'rricule, n. (व्हे'रिक्यूल)—a thick tuft of upright hairs. ताठ सरळ केसांचा जाड पुंचका.

Vers'atile, a. (व्ह'र्सटाइल)—turning readily from one occupation to another; capable of dealing with many subjects; changeable, inconstant. परिवर्तनशील; अष्टपैलू; अस्थिर, चंचल.-ly, adv., -til'ity, n. (-टि'लिटि) अष्टपैलूपणा; अस्थिरता, फिरतेपणा; चंचलता.

Verse, n. (व्हर्स)—metrical composition; a verse line; a stanza. कविता; कवितेची ओळ, चरण, पाद; श्लोक, कडवें, ओवी. v. t. & i. to express in v., make verses. काव्यांत व्यक्त करणें, कविता रचणें.

Versed, a. (व्हर्स्ट)—experienced in. निष्णात, वाकबगार. 2. reversed (v. sine), व्युत्क्रमज्या.

Vers'ify, v. t. & i. (व्ह'र्सिफाय)—to relate in verse; make verses. पद्यांत वर्णन करणें; कविता करणें.-fier, n.,-fication, n.

Ver'sion, n. (व्ह'र्शन्)—a particular translation or rendering (of a book, &c. or account of an incident, &c.); turning of child improperly placed for delivery. भाषान्तर; विशिष्ट बाजूची हकीगत, सांगणें, म्हणणें, बाजू, गर्भपरिवर्तन (नीटपणें जन्माला यावा म्हणून).-al, a.

Ver'so, n. (व्ह'र्सो)—any left hand page of a book (cf. Recto): reverse of a coin. पुस्तकांतील डावीकडचें पान; नाण्याची उलटी बाजू.

Ver'sus, prep.(व्ह'र्सस)—(abbr. v.) against. विरुद्ध; विरुद्ध बाजूला,-पक्षाला.

Vert, n. (व्हर्ट)—all that bears green leaves in forest, right to cut this; the tincture green. झाडमाड, हे तोडण्याचा हक्क; हिरवा रंग,-रंगाची छटा. 2. n. & v. i. convert or pervert. धर्मांतर, मतांतर (होणें).

Vert'ebra, n. (व्ह'र्टिब्रा)—(pl.-ae) single segment of the back-bone. मणि, मणका, मणक्याचें सुटें हाड, वर्तकास्थि.-l. a. पृष्ठरज्जु-वंश-मणिसंबंधी.-te, a. & n. (member) of the back-boned animals. पृष्ठवंशरज्जुयुक्त प्राण्याचा,-(प्राणी).

Vert'ex, n. (व्ह'र्टेक्स)—(pl.-tices) thing's topmost point, the highest point, top, tip, zenith; each angular point. शिखर, माथा, डोक्यावरचा भाग; कोनबिंदु, शिरोबिंदु.

Verti'cal, a. (व्हर्टि'कल)—perpendicular; straight up and down, directly over the head; of the crown of the head. उभा; सरळ; टाळूचा. V. plane, लंब पातळी.-cal'ity, n.,-cally, adv.

Ver'ticil, n. (व्ह'र्टिसिल)—a whorl, set of parts, radiating from axis. कण्यापासून निघणारें सर्पिल वांकण, (दांड्याभोंवतालची) पानांची चक्राकार रचना, पर्णमंडल.-cillate (d), a.,-cillately, adv.

Verti'go, n. (व्हर्टि'गो,-टाय्गो)—dizziness, giddiness. भोंवळ, घेरी, चक्कर, झीट. Subjective v., स्वतः फिरत आहों असें वाटणें, Objective v., भोंवतालचे पदार्थ फिरत आहेत असें वाटणें.-'ginous, a.

Verve, n. (व्हार्व्ह)—enthusiasm, energy, vigour. जोर, जोम, उत्साह, चैतन्य.

Ver'vet, n. (व्ह'र्व्हेट)—a small S. Afr. monkey. द. आफ्रि. लहान वानर.

Ve'ry, a. (व्हे'रि)—real, true; truly such. खरा, वास्तविक; तोच, हाच. adv. in the fullest sense, in high degree, greatly, exceedingly. फार, अतिशय, अत्यंत. The v. stones cry out, इेच दगडसुद्धां मोठ्यानें सांगत आहेत Drank it to the v. drugs, एक थेंबहि न ठेवतां प्याला, पिऊन टाकलें. Give me only a v. little, अगदीं थोडकेंसेंच मला दे. I was very pleased, (colloq) मला फार संतोष झाला. V. well, ठीक, छान, अच्छा.

Ve'ry, n. (व्हे'रि)—V. light, light projected from V. pistol for temporarily illuminating part of battlefield, etc. व्हेरि पिस्तुलांतून टाकलेला तात्पुरता प्रकाशझोत. [V., inventor]

Vesi'ca, n. (व्हसा'इका)—(anat., bot.) a bladder, sac. पेशी, पिशवी, कोश.

Ve'sicate, v. t. (व्हे'सिकेट)—to raise blisters on. त्वचेवर फोड-पुरळ-आणणें.-cant, फोड आणणारें; -catory, a. & n.,-cation, n.

Ves'icle, n. (व्हे'सिकल)—small bladder or blister or bubble on the skin. पेशी; कोश, पिशवी, पुटकी, पीटिका.-cular, a.

Ves'per, n. (व्हे'स्पर्)—(pl.) evening service; (Sing.) V., Venus as evening-star, (poet.) evening. सायंप्रार्थना; शुक्र (तारा); संध्याकाळ.-tine, a. सायंकाळचा, सायंतन; संध्याकाळीं फुलणारें;-उडणारें.

Ves'piary, n. (व्हे'स्पिअरि)—a nest of wasps. गांधीलमाशीचें घरटें.-pine, a. of wasps. गांधील माशांचें.

Ves'sel, n. (व्हे'सल)—receptacle for holding liquid, &c.: a ship or boat; (anat.) a duct, canal; (Bot.) a chain of cells, duct; (Bibl.) a person viewed as recipient or exponent. भांडें, पात्र, जहाज, नाव; शिरा, वाहिनी; नलिका; साधन, मतप्रसारक, दूत. Blood v., रक्तवाहिनी,-नलिका. Weaker v., a woman. स्त्री. V.-ful, n.

Vest, n. (व्हेस्ट)—body-garment worn next the skin. झगा, बंडी. v. t. & i. to place the right to (property, power) in a person; (poet.) clothe. स्वाधीन ठेवणें, स्वाधीन करणें; पोषाख घालणें V. pocket, (attrib.) pocket-size, 6×4.5 cm. खिशांत मावण्याजोगें.

**Vĕs'ta**, *n.* (व्हे'स्टा)—match; goddess of the hearth. आगकाडी; (रोमन०) पातिव्रत्याची देवता.-*tal, a.* व्हेस्टा देवीला वाहिलेला; निष्पाप, धार्मिक. *n.* *V. virgins*, पवित्र स्त्रिया, जोगिणी.

**Vĕst'ibūle**, *n.* (व्हे'स्टिब्यूल्)—ante-chamber, hall, lobby. देवडी, ओटी; (anat.) कानांतील पोकळी.

**Vĕs'tige**, *n.* (व्हे'स्टिज्)—trace, evidence; a particle. माग, थांग; मागमूस.

**Vĕst'mĕnt**, *n.* (व्हे'स्ट्मेन्ट्)—garment (esp. one worn officially), some part of clothing. अधिकारवस्त्र, वस्त्र. *Ves'try, n.* धर्मोपदेशकाचीं वस्त्रें इ० ठेवण्याची चर्चच्या बाजूची जागा,-खोली. *Ves'ture, n. & v. t.* झगा, पोषाख (घालणें, चढविणें).

**Vĕt**, *n. & v. t.* (व्हेट्)—a veterinary; to examine and treat (animals). पशुवैद्य,-की करणें. 2. to subject to careful examination. कसून तपासणी करणें.

**Vĕt'ĕran**, *n.* (व्हे'टेरन्)—a person with long experience of service. फार जुना अनुभविक (मनुष्य), कसलेला, मुरब्बी.

**Vĕt'ĕrinarў**, *a.* (व्हे'टेरिनरि)—of or for the diseases of domestic animals. जनावरांच्या रोगाचा; पशुवैद्यकाचा. *n.* पशुवैद्य, गुरांचा डॉक्टर.

**Vē'tō**, *n.* (व्ही'टो)—(*pl.-oes*), constitutional right to reject a legislative enactment; any prohibition. मनाई करण्याचा हक्क, नाहीं म्हणण्याचा अधिकार; मनाई. *v. t.* to exercise veto against; forbid. मनाईचा अधिकार चालवणें; मनाई करणें. *To put a or one's v. upon*, to forbid. हरकत घेणें, मनाई करणें. [L = I forbid]

**Vĕx**, *v. t.* (व्हेक्स्)—to irritate; (arch.) grieve, afflict; disturb. चिडविणें, सतावणें; पिडणें, दुःख देणें, गांजणें; खळबळ उत्पन्न करविणें, क्षुब्ध करविणें. *A vexed question*, much discussed q. वादविवादिक,-त्रासदायक,-कटकटीचा,-प्रश्न,-मुद्दा.-*edly, -ingly, adv.*

**Vexa'tion**, *n.* (व्हेक्से'शन्)—vexing; harassment; state of distress, annoying thing. सतावणें, खिजवणें; जाच, त्रास, गांजणूक; दुःख, सतावणारी गोष्ट.-*tious, a.,-tiously, adv.,-tiousness, n.*

**Vexill'um**, *n.* (व्हेक्सि'लम्)—military standard; (Bot., also vexil,) large upper petal, web of a feather; processional banner or cross. लष्करी निशाण; (फुलाची) पतंगाकार मोठी पाकळी, पिसांची वीण; मिरवणुकीचा ध्वज,-क्रूस.

**Vī'a**, *n. & prep.* (व्हा'या)—way; passing through, going by way of. मार्ग, रस्ता, मार्गें, मार्गानें, मधून. *V. media*, मधला मार्ग, सुवर्णमध्य. [L.]

**Vī'able**, *a.* (व्हा'यब्ल्)—able to live. जगण्यासारखा, वाढीस लागण्यासारखा.

**Vī'aduct**, *n.* (व्हा'यडक्ट्)—arches or other structure carrying railway or road across. (नदीवरील, खिंडीवरील) आगगाडीचा पूल.

**Vī'al**, *n.* (व्हा'यल्)—a small vessel, for holding liquid medicine, phial, small glass bottle. शिशी, कुपी. *v.* (colloq.) to give vent to anger. राग ओकणें. *To pour out vv. of wrath*, त्वेष ओकणें, सूड उगवणें. *V. ful, n.*

**Vī'ands**, *n. pl.* (व्हा'यन्ड्झ्)—articles of food, meat dressed, victuals. खाण्याचे पदार्थ, खाद्य.

**Viăt'icum**, *n.* (व्हाऍ'टिकम्)—provisions for a journey. पाथेय, शिदोरी.

**Vibrāte'**, *v. i. & t.* (व्हाइब्रे'ट्)—to have a tremulous motion, move rapidly to and fro; thrill, quiver. झोके खाणें, लटलटणें; कांपवणें, कंप उत्पन्न करणें.-*tion, n.* कांपणें, कंपन, आंदोलन.-*tor, n.* कंपनात्मक विभाग.-*tory, a.*

**Vic**, *n.* (व्हिक्)—(*sl.*) V-shaped formation of air-craft. V या आकारानें विमानांची जुळणी,-उडणें.

**Vĭc'ăr**, *n.* (व्हि'कर्)—parson of a parish. पाद्री, उपाध्याय. *-age, n.* व्हिकारचें उत्पन्न,-अधिकार, वसतिस्थान. *Vicar'ial, a.,-car'ious, a.* च्या प्रतिनिधि, च्या वतीनें गेलेला, बदली.

**Vice**, *n.* (व्हाइस)—habitual indulgence in evil; defect or blemish, imperfection. अधर्म, अनीति, दुर्गुण, व्यसन; व्यंग, दोष, अवगुण.

**Vice**, *n.* (व्हाइस)—(colloq. for) *v. chairman, president, etc.* उप, (उपाध्यक्ष इ.).

**Vice**, *n.* (व्हाइस)—an instrument with two jaws between which a thing may be gripped and held steady. शेगडा, पकड. *v. t.* शेगड्यांत घट्ट धरणें, -पकडणें.

**Vī'cē**, *prep.* (व्हा'यसि)—in place of. च्या ऐवजीं, बदली, जागीं. *pref.* Vice-,(व्हाइस-)-खालचा, उप. *V. president*, उपाध्यक्ष.

**Vicegē'rent**, *n.* (व्हाइस्जे'रन्ट्)—a holder of delegated authority, a substitute. प्रतिनिधि.

**Vice'rŏy**, *n.* (व्हा'इस्-रॉय)—one who governs with royal authority in a dependency. राजप्रतिनिधि.

**Vī'cē ver'sa**, *adv.* (व्हा'यसि व्हर्सा)—the other way round. उलट, उलटपक्षीं, तसेंच. (e. g.) *He calls black white and v. v.* (white black).

**Vĭcĭn'ĭtў**, *n.* (व्हिसि'निटि)—neighbourhood; nearness, proximity, propinquity. शेजार; सांनिध्य.

**Vĭ'cious**, *a.* (व्हि'शस)—having defects, addicted to vice; ill-tempered. दुर्गुणी, दुर्व्यसनी; वाईट स्वभावाचा, खोडकर, खटयाळ, नाठाळ.-*ly adv., -ness, n.*

**Vĭciss'ĭtūde**, *n.* (व्हिसि'सिट्यूड्)—a change of fortune, an unlooked-for change. दैवघटित फेरफार, परिवर्तन, फेरबदल, स्थित्यंतर.-*dinous, a.*

**Vĭc'tĭm**, *n.* (व्हि'क्टिम्)—a person or animal slain sacrificially; sufferer from some untoward event; prey, dupe. यज्ञपशु, बळी देण्याचा मनुष्य किंवा पशु, बळी; भक्ष्य, बळी.-*ize, v. t.* to make the victim of, (Trade union) make (ringleader etc.) suffer by dismissal or other

treatment. बळी घेणें; फसविणें, ठकविणें; (नोकरी-वरून) काढून टाकणें, शिक्षा करणें.-*ization, n.*

**Vic'tor,** *n.* (व्हि'क्टर्)—a vanquisher, conqueror; winner of a contest. जिंकणारा; विजयी, जेता. -*tress, n.*

**Victōr'iă,** *n.* (व्हिक्टो'रिआ)—a light open four-wheeled carriage; kinds of gigantic water-lily; kinds of domestic pigeon. एक चार चाकांची गाडी; जलकमळ; एक जातीचें कबुतर. *V. cross,* (*V. C.*) व्हिक्टोरिआ राणीचें शौर्यासाठीं 'व्ही. सी.' पदक.-*n., a. & n.* व्हिक्टोरिआ राणीच्या कारकीर्दींतील (इसम).

**Victōr'ious,** *n.* (व्हिक्टो'रिअस)—vanquishing, conquering, triumphant. विजयी, विजय संपादन करणारा.-*ly, adv.,-ness, n.*

**Vic'torў,** *n.* (व्हि'क्टरि)—the winning of a battle or contest, conquest; (*V*-) (the statue of) goddess of victory. विजय, विजयश्री, फत्ते, जय; विजयदेवता,-तेचा पुतळा.

**Vi'ctual,** *n.* (व्हि'टल्)—(usu. *plu.*) food and drink; provisions. अन्नपाणी; खाण्यापिण्याचा पुरवठा. *v. t.* खाद्यपेयाचा पुरवठा करणें,-मिळविणें, अन्नपाणी घेणें.-*aller, n,* (व्हि'टलर्) खाद्यपेय पदार्थांचा विक्रेता, खानावळ-हॉटेल-वाला; इतर जहाजांना खाद्यपेय घेऊन पुरविणारें जहाज.

**Vi'de,** *v. imperat.* (व्हा'यडि)—see. पहा. *V. supra,* (पुस्तकांतील पानावर) वर पहा. *V. infra,* खालीं -पुढें-पहा.

**Vidē'licĕt,** *adv.* (व्हायडी'लिसेट)—(abbr. *viz.* ने'मुलि) namely, in other words. म्हणजे.

**Vie,** *v. i.* (व्हाय्)—to enter into rivalry *with* (another *in* quality). स्पर्धा करणें, बरोबरी करणें. सर लावणें. *Vying, pr. p.*

**View,** *n.* (व्ह्यू)—inspection by eye; survey, spectacle, scene, prospect; range of vision; intention, design; opinion. अवलोकन; तपासणी, पाहणें, दृश्य, देखावा; दृष्टीचा टप्पा; दृष्टिपथ; हेतु, उद्देश; मत, समज. *v. t.* to examine, survey with eyes or mind; hold specified view of. अवलोकन करणें, विचार करणें; मत बनविणें. *Side, v.,* बाजूचा देखावा. *Front, v.,* दर्शनी देखावा. *On v.,* पाहण्याकरितां (मांडलेला,-ठेवलेला). *With a v. to, with the v. of,* (vulg.) *with a v. of,* for the purpose of. च्या हेतूनें; च्या आशेनें, ची आशा धरून. *To the v.,* openly, in public. उघड उघड, उघड रीतीनें. *To have in v.,* उद्देश मनांत धरणें, लक्षांत-ध्यानांत-घेणें. *V.-able, a. V.-less. a.* invisible. अदृश्य. *View'y, a.* (colloq.) विलक्षण मतांचा, चोखंदळ.

**Vi'gil,** *n.* (व्हि'जिल)—eve of a festival watching, keeping awake. उत्सवाचा आदला दिवस; जागरण, पहारा; (*pl.*) सायंप्रार्थना.

**Vig'ilance,** *n.* (व्हि'जिलन्स)—caution, watchfulness; insomnia. सावधपणा, हुशारी, जागरूकता, जागरण; निद्रानाश (रोग).

**Vi'gilant,** *a.* (व्हि'जिलन्ट)—watchful; on the watch, on the outlook, alert. जागरूक; सावध. -*ly, adv.*

**Vigilăn'tē,** *n.* (व्हिजिलॅ'न्टि)—(U. S.) a member of a *Vigilance Committee.* समाजहितवर्धिनी सभेचा सभासद.

**Vigne'tte,** *n.* (व्हीन्ये'ट्)—(Archit.) an ornament of leaves and tendrils; flourishes round capital letters; engraved illustration; a portrait showing only head and shoulders with back-ground shaded off; (*fig.*) character -sketch. पानांचें आणि तुर्‍यांचें खोदकाम; मूळ-मोठ्या अक्षराचे अलंकारिक फाटे; खोदींव चित्र; (डोकें आणि खांदे दाखविणारें) चेहर्‍याचें चित्र; स्वभावचित्र.-*ttor,-ttist, nn.*

**Vig'our,** *n.* (व्हि'गर्)—activity and strength of body or mind, physical force बळ, जोम, उत्साह, कुवत, शक्ति. *V.-less, a.*

**Vig'orous,** *a.* (व्हि'गरस)—full of physical strength, active, forcible. जोमदार, धमक असलेला, ताकदवान, बळकट, जोराचा.-*ly, adv.,-ness, n.*

**Vi'king,** *n.* (व्हा'यकिंग)—Northern sea-robber of 8th & 10th centuries. उत्तर युरोपांतील समुद्रावरील लुटारू, चांचा.

**Vile,** *a.* (व्हाइल्)—depraved, base; worthless; despicable. अधम, नीच; निरुपयोगी, तिरस्करणीय. -*ly, adv.,-ness, n.* अधमपणा, नीचपणा, दुष्टपणा.

**Vil'ifў,** *v. t.* (व्हि'लिफाय्)—to speak ill of, defame, traduce. बदनामी करणें, कलंक लावणें. -*fication,-fier, nn.*

**Vill'ă,** *n.* (व्हि'ला)—a country residence, a rural or suburban house. गांवट्यावरचा बंगला, बागेंतील घर, उद्यानगृह.-*dom, n.*

**Vill'age,** *n.* (व्हि'लिज्)—assemblage of dwellings in the country. खेडेगांव. *a.* rustic. खेडेगांवांतील, ग्रामीण.

**Vill'ager,** *n.* (व्हि'लिजर्)—a dweller in or inhabitant of a village; rustic. खेडेगांवांत राहणारा; गांवढळ.

**Vill'ain,** *n.* (व्हि'लन्)—a wicked schemer; (colloq.) playful; (arch.) rustic. दुष्ट मनुष्य, खल (नायक); खेळकर, खोडकर; गांवढळ.-*ous, a.* vile, wicked. दुष्ट, नीच, दुष्टपणाचें.-*y, n.* पाजीपणा, सोदेगिरी.

**Vi'llus,** *n.* (व्हि'लस)—(*pl.-li*), (anat.) each of the short hair-like processes on some membranes, (Bot. *pl.*) long soft hair covering fruit, flower etc. त्वचेवरील लव; फळां-फुलांवरील लव. -*llosity, n.-llous, a.* लवदार, मृदुकेशावृत.

**Vim,** *n.* (व्हिम्)—(colloq.) vigour. जोर, जोम, उत्साह.

**Vim'inal,** *a.* (व्हि'मिनल्)—(Bot.) of, producing, twigs or shoots. डहाळ्यांचा, तुर्‍यांचा, धुमारे येणारें.-*ncous, a.*

**Vinā'ceous,** *a.* (व्हिने'शस्)—of wine or grapes; wine-red. दारूचा, द्राक्षांचा; दारूप्रमाणें लाल.

Vinaigrette', *n.* (व्हिनिग्रेट्)—a smelling-bottle. हुंगायची पादली.
Vin'cible, *a.* (व्हिन्सिबल्)—that may be conquered. जेय, जिंकण्यासारखें, भेद्य.
Vin'cŭlum, *n.* (व्हिंक्युलम्)—(*pl.*-*la.*) (Alg.) a line drawn over several terms to serve as a bracket; a band. कंसदर्शक रेषा, शृंखला; सांखळी.
Vin'dicāte, *v. t.* (व्हिंन्डिकेट्)—to defend, justify; establish the truth of; prove to be right; avenge. समर्थन करणें; निर्दोषी ठरवून घेणें, सत्यत्व स्थापन करणें; सूड उगवणें.-*tion, n.* मत्थापित-शाबीत-करणें; दोषनिरसन.-*tive, a,* शाबीत करणारा, दोषनिवारक.
Vin'dicatory, *a.* (व्हिंन्डिकेटरि)—tending to vindicate, punitive. मत्थापित-शाबीत-करणारा; शिक्षेचा, शिक्षाविधायक.
Vindic'tive, *a.* (व्हिन्डि'क्टिव्ह)—bent on revenge, given to revenge, revengeful. सूड घेणारा, खुनशी. -*ly, adv.*,-*ness, n.*
Vine, *n.* (व्हाइन्)—the plant that bears grapes; a climbing plant. द्राक्षलता, द्राक्षांची वेल; वेल, ताणा.-*ny, a.*
Vin'ĕgar, *n.* (व्हिनिगर्)—acid liquid got from various alcoholic liquors, anything that is sour. शिरका. *A v. countenance,* (*fig.*) आंबट (त्रिताशेल्या) चेहरा.-*ish*,-*y, aa.*
Vin'ery, *n.* (व्हा'इनरि)—a vine greenhouse. द्राक्षवेलींचा (कृत्रिम कांचगृहांतील) मंडप.
Vine'yard, *n.* (व्हिं'न्-यार्ड)—vine-plantation. द्राक्षांचा मळा.
Vī'nous, *a.* (व्हा'इनस्)—of, like, due to, wine. द्राक्षांच्या दारूचा,-सारखा, द्राक्षामद्याचा.-*nosity, n.*
Vint, *v. t.* (व्हिन्ट्)—to make (wine). दारू-मद्य -तयार करणें. 2. a Russian card-game. पत्त्यांचा (रशियन) डाव.
Vin'tage, *n.* (व्हिंन्टिज्)—the grapes-gathering season or its yield; wine. द्राक्षांचा हंगाम, द्राक्षांचें पीक; दारू.-*r, n.* द्राक्षें तोडणारा.
Vin'tner, *n.* (व्हिन्टनर्)—a wine-merchant. द्राक्षारस -मद्य-विकणारा, मद्याचा व्यापारी.-*y, n.*
Vī'ol, *n.* (व्हा'यल्)—a medieval stringed instrument. मध्ययुगीन सारंगी, तंतुवाद्य.-*a, n.* मोठें सारंगीवाद्य.
Violā'ceous, *a.* (व्हायोले'शस्)—of violet colour or family. जांभळ्या रंगाचें,-रंगापैकी.
Vī'ŏlāte, *v. t.* (व्हा'यॉलेट्)—to transgress, infringe, sin against, break in upon; ravish. उल्लंघन करणें, मोडणें, अतिक्रमण करणें; भ्रष्ट करणें, बलात्कार करणें. -*lable, a.*,-*lation, n.* . उल्लंघन, अतिक्रम, भंग; बलात्कार.-*lator, n.*
Vī'olence, *n.* (व्हा'यलन्स्)—force; violent conduct or treatment, outrage, injury; impetuousness; (Law) illegal use of force. जोर, वेग, नेट; दांडगाई; आवेश, साहस; जुलूम, जबरी, बलात्कार.
Vī'olent, *a.* (व्हा'योलेन्ट्)—of great and impetuous force; intense; outrageous. जोराचा; जबर; जबरदस्त, दांडगा. *V. death,* not natural. अपघाती-आकस्मिक-मरण.-*ly, adv.*
Vī'olet, *n.* (व्हा'यलेट्)—kinds of plant with blue, purple, white or other colours; kinds of *v.* butterfly. निळ्या, इ. रंगांच्या फुलांचें फूलझाड; जांभळ्या रंगाचें फुलपाखरूं. *a.* जांभळ्या-नीललोहित -रंगाचें, जांभळें, पाटल.
Violin', *n.* (व्हायलि'न्)—a four-stringed musical instrument played with a bow. सारंगीसारखें वाद्य. -*ist, n.* व्हायलिन् वाजविणारा.
Vī'olin,-ine, *n.* (व्हा'यलिन्)—an emetic substance contained in sweet violet व्हायलेट फुलांतील वांतिकारक पदार्थ.
Vī'olist, *n.* (व्हा'यलिस्ट्)—a performer on viola. मोठें व्हायलिन वाजविणारा. *Violoncell'o, n.* मोठें व्हायलिन वाद्य.-*llist, n.*
Vī'per, *n.* (व्हा'इपर्)—kinds of venomous snake, the adder; a malignant treacherous man. विषारी साप; नीच मनुष्य, अधम, विश्वासघातकी. -*ous, a.* नीच, दुष्ट.
Virā'gō, *n.* (व्हिरे'गो)—a man-like woman, a fierce or abusive woman. पुरुषी स्त्री, कर्कशा, चाकिका.
Vĭre'scence, *n.* (व्हिरे'सन्स)—greenness; (Bot.) abnormal greenness in petals. हिरवेपणा (पाकळ्यांचा) भडक हिरवा रंग.-*cent, a.*
Vir'gate, *a.* (व्ह'र्गेट्)—(nat. hist.) slim, straight and erect. बारीक, सरळ व उंच.
Virgil'ian, *a.* (व्हर्जि'लिअन्)—of, in the style of, Virgil, the Roman poet. रोमन कवि व्हर्जिलचें,-च्या शैलीचें.
Vir'gin, *n.* (व्ह'र्जिन्)—a girl or woman who has not known sexual intercourse; a female insect producing eggs without impregnation; (Astr. V-) virgo. कुमारी, कुमारिका; गर्भाधानाशिवाय अंडीं घालणारा स्त्रीकीटक; कन्या (रास). *a.* chaste, unsullied, maidenly. शुद्ध, पवित्र, असुक्त, कन्येचा, कुमारिकेचा. The (Blessed) Virgin, Mary, mother of Christ. ख्रिस्तमाता कुमारी मेरी. *V. modesty,* कुमारीला शोभेसा विनय. *V. soil,-clay,* लागवड न केलेली जमीन. *V. Queen.* एलिझाबेथ राणी. -*al, a. & n.* (arch),-*ally, adv. V. hood,-ness, nn.*
Virgi'nia, *a.* (व्हर्जि'निआ)—tobacco from *V.* सं. संस्थानांतील व्हर्जिनिआ संस्थानांत होणारा तंबाखू. -*n, a. & n.*
Vir'go, *n.* (व्ह'र्गो)—sixth zodiacal. कन्या (रास).
Vi'rile, *a.* (व्हि'राइल्)—having masculine vigour or strength, manly, strong. पुरुषत्व असलेला, पौरुषाचा.-*lity, n.* [L. *vcr*, Skr. *veera,* man]
Virtu', *n.* (व्हर्टू')—love of fine-arts. ललितकलांची -वस्तूंची-आवड.-*os'o,* ललितवस्तुपारखी, पटु, तज्ज्ञ.
Virt'ual, *a.* (व्ह'र्चुअल्)—such in practice though not in name, not actual or real. तात्त्विक, वास्तविक, कार्यकारी. *V. velocity,* वास्तविक वेग. *V. images,* भासक प्रतिमा.-*ily, n*,-*lly, adv.*

**Vir'tue,** *n.* (व्ह'र्च्यू)—moral goodness; chastity (of women); good quality; inherent power, efficacy. सद्गुण, नीति, धर्माचरण, धर्म, साधुत्व; पातिव्रत्य, शुद्धता; गुण; सत्त्व, वीर्य, जोम, प्रताप. *Make a v. of necessity,* नाइलाजानें कर्तव्य-धर्म -परता दाखविणें. *By v. of,* मुळें, परत्वें. *V. less, a.*

**Virt'ūous,** *a.* (व्ह'र्च्युअस)—practising virtue; morally good; chaste. सदाचरणी, सद्गुणी; पवित्र, पतिव्रता.-*ly, adv.*;-*ness, n.*

**Vi'rulent,** *a.* (व्हि'रुलेन्ट)—powerful; venomous, malignant, poisonous. जालीम, कडक; विषारी. -*lence, n.*

**Vir'us,** *n.* (व्हा'यरस)—poison of contagious disease; (*fig.*) moral poison; malignity. रोगविष, जन्तु; नैतिक ऱ्हास; दुष्टपणा.

**Vis'age,** *n.* (व्हि'झिज्)—the internal face (esp. as revealing temperament, &c.), countenance. चेहरा, मुद्रा.-*d, a.*

**Vis-a-vis,** *adv.* & *n.* (व्हीझाव्ही)—in a position opposite *to.* समोरासमोर, सामोरा. *n.* समोरासमोर बसलेला मनुष्य.

**Vis'cera,** *n. pl.* (व्हिसेरा)—the internal organs of the body, the entrails, the bowels. आंतडीं.-*l, a.,* -*le, v. t.* to disembowel. आंतडीं काढणें.

**Vis'cid,** *a.* (व्हि'सिड्)—sticky, semifluid. चिकट, गिलगिलीत.-*ily, n.* viscosity. चिकटपणा.

**Vis'count,** *n.* (व्हा'य-काउन्ट्)—a peer ranking between earl and baron, a nobleman of rank fourth below a prince. अर्ल आणि बॅरन यांच्या मधील दर्जाचा सरदार.-*cy, n.*

**Vis'cous, Vis'cid,** *aa.* (व्हि'स्कस, व्हि'सिड)—of a semifluid clinging consistence. चिकट, चिकचिकीत.

**Vise', Visa,** *n.* & *v. t.* (व्ही'झे, व्ही'झा)—indorsement on passport etc. परवाना तपासल्याचा शेरा, -दाखला (मारणें,-देणें).

**Vis'ible,** *a.* (व्हि'झिबल्)—perceived by the eye, to be seen; apparent, open; prepared to receive callers; conspicuous. दृष्टिगोचर, दिसणारा, दृश्य, उघड; दृश्यमान; आगतस्वागत करणारा; स्पष्ट.-*bility, n.* दृग्गोचरता, दृश्यमानता.-*ness, n.* -*bly, adv.* प्रत्यक्ष, उघड.

**Vi'sion,** *n.* (व्हि'झन्)—act or faculty of seeing, sight; thing seen in a dream; imaginative insight, political sagacity, foresight. पाहणें, नजर, दृष्टि; दृष्टांत, स्वप्न, भास, छाया, मनोराज्य, कल्पना; बुद्धि, दूरदृष्टि. *v. t.* to see, present, (as) in *a v.* स्वप्नवत् पाहणें, भास होणें,-दाखविणें. -*ist, n.,-al, a.,-ally, adv.*

**Vi'sionary,** *a.* (व्हि'झनरि)—unpractical. असत्य, काल्पनिक. *n.* a person of unpractical ideals. मनोराज्यांत रमणारा.-*riness, n.*

**Vis'it,** *v. t.* & *i.* (व्हि'झिट)—to go, come, see; punish or afflict; comfort, bless. भेटणें, भेट देणें, तपासण्यास जाणें,-येणें; (विपत्ति किंवा रोग) येणें, शिक्षा किंवा बक्षीस देणें; सांत्वन करणें, आशीर्वाद देणें. *n.* भेट, दर्शन, फेरी, तपासणी.-*able, a.,* -*ing, a.* भेटीस नेहमीं जाणें, जाणें येणें, परिचय, -*ing book,*भेटणारांची नोंद-वही.

**Vi'sitant,** *a.* (व्हि'झिटन्ट)—(poet.) visiting. भेटणारा. *n.* a migratory bird; (poet., rhet.) a visitor; (*V-*)a member of an order of nuns concerned with education of young girls. स्थलांतर करणारा-भटक्या-पक्षी; भेटणारा, पाहुणा; मुलींच्या शिक्षणाला वाहिलेली जोगीण.

**Visitā'tion,** *n.* (व्हिझिटे'शन्)—official visit; boarding of vessel belonging to another State; divine dispensation; (zool.) unusual and large migration of animals. सरकारी तपासणी, पाहणी, भेट; परराष्ट्राच्या जहाजाची तपासणी; दैवी आपत्ति, कृपा, बक्षीस; पशुपक्ष्यांचें मोठ्या प्रमाणांत स्थलांतर.

**Vis'itor,** *n.* (व्हि'झिटर्)—one who visits; an inspecting official. भेटीस येणारा, पाहुणा; तपासनीस. *Visit (at)orial, a. Visitor's book n.* तपासणीदाराचें किंवा हॉटेलांतील उतारूंचें शेरे -पुस्तक.

**Vi'sor, Vis'ard,** *nn.* (व्हा'इझर, व्हि'झर्ड)—(*Hist.*) movable part of helmet covering the face; mask to conceal identity; projecting front part of a cap. वर करतां येणारा शिरस्त्राणाचा भाग, मुखवटा, मुखटोप; तोंडावरील बुरखा; टोपीचा पुढचा भाग.-*ed,-less, aa.*

**Vis'ta,** *n.* (व्हि'स्टा)—a long narrow view as between rows of trees; mental prospect or retrospect. दुतर्फा झाडें असलेल्या मार्गाचा देखावा; भूत किंवा भावी गोष्टींचा दृष्टींपुढें येणारा देखावा, -रें चित्र.-'*d, a.*

**Vi'sual,** *a.* (व्हि'झुअल्)—of, concerned, used in, seeing. दृष्टीचा, नजरेचा, चाक्षुप, दर्शनोपयोगी, देखाव्याचा. *V. angle,* दृष्टिकोन. *V. focus,* दर्शन किरणेंद्र. *V. point,* दृश्यबिंदु.-*ize, v. t.* दिसेसा करणें, दृश्य करणें; डोळ्यापुढें (कल्पनेनें) उभा करणें, कल्पना करणें.-*ity, n.,-lly, adv.,-ization, n.*

**Vit'a glass,** *n.* (व्हा'इटा ग्लास)—kind of glass that does not exclude the ultra-violet vitalizing rays. किरणांचें परावर्तन न करणारी एक प्रकारची-किरणापरावर्तनी कांच. [ L *vita, life* ]

**Vi'tal,** *a.* (व्हा'इटल)—essential to organic life; essential to success, &c. जीवनाला आवश्यक; अति महत्त्वाचा, आवश्यक. *n. pl.* the vital organs of the body. मर्मस्थानें. *V. question,* महत्त्वाचा मुद्दा,-प्रश्न. *A v. wound,* घातक-मर्मस्थानीं-जखम. *A v. error,* घोडचूक. *V. statistics,* of birth, marriage, death etc. जन्म-विवाह-मृत्यु इ॰ ची नोंद, गणन.-*ally, adv.* जीवनाच्या दृष्टीनें, फार, अतिशय.

**Vital'ity,** *n.* (व्हाइटॅ'लिटि)—vital power; hold on life; persistent energy. जीव; जीवनशक्ति; चेतना, जोम, जिवंतपणा.

Vi'talize, *v. t.* (व्हा'इटलाइझ्)—to endow with life. जीवनशक्ति घालणें,-उत्पन्न करणें, चेतना-चैतन्य -आणणें.

Vi'tămin, *n.* (व्हि'टॅमिन्)—a factor regarded as necessary to health. प्रकृतिस्वास्थ्याला आवश्यक असा भाग, जीवनसत्त्व.

Vitĕ'llus, *n.* (*pl.*) (व्हिटे'लस्)—yolk of egg. अंड्यांतील पिंवळा बलक.*-llary,-lline, aa.*

Vi'tiāte, *v. t.* (व्हि'शिएट्)—to render defective, invalidate, deprive of efficacy; spoil. भ्रष्ट करणें, दूषित करणें, रद्दबातल करणें, बिघडविणें. *-tor,-tion, nn.*

Vit'rĕous, *a.* (व्हि'ट्रिअस्)—of, like, of the nature of, glass. कांचेचा,-सारखा, काचसदृश, काचर. *V. body* or *humour,* (डोळ्यांतील) काचरूपी रस. *V. electricity,* काचजन्य विद्युत्. *Vit'rify, v. t.* कांच करणें,-होणें, कांचेसारखें बनणें,*-trifaction,-fication, nn.*

Vit'riol, *n.* (व्हि'ट्रिआल्)—sulphuric acid or any of its salts; (*fig.*) savage speech or criticism. मोरचूद, ताम्रगर्भ, हिराकस, धातुशेखर; कठक भाषण, विदारक टीका. *Oil of v.,* तीव्र तेजाब.*-ic,-ine,aa.,-ize, v. t.*

Vitt'a, *n.* (व्हि'टा)—(pl.-ae) a garland; (Bot.) *oil-tube in fruit;* (Zool.) strips of colour. माला, माळ; तैलनलिका; रंगाचे पट्टे.

Vitū'perāte, *v. t.* (व्हाइव्हु'परेट्)—to revile, abuse, blame or censure offensively, scold, speak angrily about. निर्भर्त्सना करणें, निंदा करणें.*-tion, n.* निंदा, निर्भर्त्सना.*-tive, a.* निंदात्मक.*-tor, n.* निंदक.

Vi'va, *int.* & *n.* (व्ही'वा)—(the cry) long live, long life to. जीते रहो, चिरायू होवो (असा आवाज). 2. *adv., a.* & *n.* viva voce. तोंडी (परीक्षा).

Vivā'cious, *a.* (व्हाइव्हे'शस्)—sprightly, animated, having strong vital powers; (Bot.) tenacious of life, perennial. आनंदी, उल्हासी, उत्साही; सदाजीवी, सदापर्णी.*-ly, adv., Viva'city, n.* उत्साह, जोम, आनंदवृत्ति.

Vivār'ium, *n.* (व्हाइव्हे'अरिअम्)—place in which live wild creatures are kept, a zoological garden. पशुसंग्रहालय.

Vi'va vō'cē, *adv., a.* & *n.* (व्हा'इव्हा व्हो'सि)—orally, the *v. v.* part in an examination. तोंडी (परीक्षा).

Viv'ers, *n. pl.* (व्हा'इव्हर्झ्)—(Sc.) food, victuals. अन्न, खाद्य पदार्थ.

Viv'id, *a.* (व्हि'व्हिड्)—forming brilliant images, bright, intense; graphic; clear, vigorous. भडक, झळक; हुबेहुब, स्पष्ट; जोमदार, प्रतिभासंपन्न. *-ly, adv.,-ness, n.* झळकपणा, स्पष्टपणा.

Viv'ify, *v. t.* (व्हि'व्हिफाइ)—to put life into; make lively or animated. सजीव करणें; चेतना आणणें.

Vivi'parous, *a.* (व्हाइव्हि'परस्)—bringing forth young alive. जीवंत पोरांना जन्म देणारी, सचेतनप्रसू.*-ness, n.,-ly, adv., Vivipa'rity, n.*

Viv'isect, *v. t.* (व्हि'व्हिसेक्ट्)—to dissect (animal) while living. (अभ्यासाकरितां) जिवंत प्राणी कापणें, प्राणिव्यवच्छेदन करणें.*-sec'tion, n.* (शास्त्रीय संशोधनासाठीं) जीवंत प्राण्यावर केलेले प्रयोग.*-or, n.*

Vix'en, *n.* (व्हि'क्सन्)—a she-fox; a spiteful woman. कोल्ही, भालू; अवदसा; कृत्या, कैदाशीण (स्त्री).

Viz, *adv.* (व्हिझ्)—videlicet. म्हणजे.

Vizard-See Visor.

Vŏc'able *n.* (व्हो'कबल्)—(philol.) a word. (तोंडी उच्चारलेला) शब्द.

Vocăb'ūlary, *n.* (व्हाकॅ'ब्युलरि)—a list of words *in a language, arranged alphabetically with* definitions. शब्दांचा संग्रह, शब्दकोश, कोश, शब्दांचा भरणा,-सांठा.

Vō'cal, *a.* (व्हो'कल्)—uttered by the voice. तोंडचा, वाणीचा.*-ist, n.,-ize, v. t. & i.*

Vocā'tion, *n.* (व्होके'शन्)—occupation or calling, *employment, trade, profession.* धंदा, उद्योग, पेशा. *Mistake one's v.,* take up unsuitable work. चुकीचा-पेशा-धंदा-पत्करणें.*-al, a.* व्यावसायिक, धंदाउद्योगासंबंधी.

Vŏc'ative, *a.* & *n.* (व्हॉ'कटिव्ह्)—a case or word used in calling or addressing by name. संबोधन (विभक्ति).

Vŏcif'erāte, *v. t.* & *i.* (व्होसि'फरेट्)—to speak loudly and *insistently, cry noisily,* exclaim. जोरानें ओरडणें, गोंगाट करणें, उद्गारणें.*-tion,-tor, nn.*

Vocif'erous, *a.* (व्होसि'फरस्)—noisy, clamorous. आवाजाचा, गलबला करणारा, आरडाओरड करणारा. *-ly, adv.,-ness, n.*

Vŏd'ka, *n.* (व्हॉ'ड्का)—kind of fiery brandy distilled from rye etc. in Russia. (रशियांतील) कडक दारू, मद्य.

Voe, *n.* (व्हो)—a small bay, creek. लहान आखात, खाडी.

Vōgue, *n.* (व्होग)—the fashion. चाल, प्रचार, प्रघात. *v. i. v.* la galère, (व्होग ल गलेअर्) here goes. चालू आहे, जात आहे. *In v.,* प्रचारांतील, रूढ.

Voice, *n.* (व्हॉइस्)—a sound uttered by the mouth; the expressed opinion; the verbal forms proper to a certain relation of the subject to the action. आवाज, शब्द, स्वर, कंठ, ध्वनि; मत, मताधिकार, अभिप्राय; (कर्मणि, कर्तरि किंवा भावे) प्रयोग. *v. t.* to give *v.* to; make sonant. व्यक्त करणें, वाचा फोडणें; उच्चार करणें. *Has lost his v.,* cannot speak aloud. मोठ्यानें बोलवत नाहीं, घसा बसला-धरला-आहे. *To find one's v.,* बोलण्याचें धैर्य असणें,-धारण करणें. *With one v.,* unanimously. एकमतानें. *The people's v. is the v. of God,* पांचांमुखीं परमेश्वर.*-voiced,* (-स्ड) *a.*

Void, *a.* (व्हॉइड्)—empty, vacant, unoccupied, not valid; ineffectual, useless रिता, रिकामा. निरर्थक; गैरलागू, निरुपयोगी. *n.* empty space;

sense of loss. शून्य, पोकळी; नुकसानीची जाणीव. *v. t.* to render invalid; emit; quit. रद्द करणें, निरुपयोगी करणें; उत्सर्जन करणें, बाहेर टाकणें; सोडून जाणें, खाली करणें. *Null & v.*, बंधनकारक नसलेलें, रद्दबातल. *Nothing can fill the v.*, उणीव कशानेंही भरून येणार नाहीं.-*able, a.*,-*ance, n.*

Voile, *n.* (व्हाइल्)—thin dress-material. उंची झिरझिरीत कापड.

Vō'lant, *a.* (व्हो'लन्ट्)—flying, able to fly; represented as flying; (poet.) nimble, rapid. उडता, उड्डयनशील; उडता दाखविलेला; चपळ, जलद.

Vŏl'apuk, *n.* (व्हॉ'लपुक्)—an artificial international language. आंतरराष्ट्रीय कृत्रिम भाषा,-बोली.

Vō'lar, *a.* (व्हो'लर्)—(anat.) of the palm or sole. तळहाताचा, तळव्याचा.

Vŏl'atile, *a.* (व्हॉ'लटाइल)—evaporating rapidly; of gay or lively temperament. उडून जाणारा; वायुपरिणामी, जिता.-*ness*,-*latil'ity*, *nn.* आनंदी, चंचलप्रकृति, अस्थिर.

Volă'tilize, *v. t. & i.* (व्हालॅ'टिलाइझ्)—(to cause) to evaporate. वायुपरिणामी करणें, वायुरूपानें नाहींसा करणें, उडणें, उडून जाणें, वायुरूपानें नाहींसा होणें. -*zation, n.*

Vŏlcă'nic, *a.* (व्हॉल्कॅ'निक्)—of, like, produced by, a volcano. ज्वालामुखीचा,-सारखा, ज्वालामुखीपासून झालेला.-*ally, adv.*,-*nicity, n.*

Vŏlcā'nō, *n.* (व्हॉलके'नो)—(*pl.*-oes) a mountain or hill with openings through which lava, cinders, gases, &c. are expelled, a burning mountain. ज्वालामुखी पर्वत. *Active v.*, जागृत ज्वालामुखी. *Dormant v.*, सुप्त, निद्रित. *Extinct v.*, मृत. *Submarine v.*, समुद्रांतून वर येणारा. *V. ship*, ज्वालाग्राही वस्तूंनीं भरलेलें व दुसऱ्या जहाजाच्या संपर्कानें स्फोट होणारें जहाज.-*logy, n.*,-*logical, a.*

Vōle, *n.* (व्होल्)—(cards) winning of all the tricks in a deal. (पत्त्यांच्या खेळांत) सगळे हात जिंकणें. *v. t.* सगळे हात जिंकणें.

Vōle, *n.* (व्होल्)—kinds of mouse-like rodent. उंदरासारख्या प्राण्यांची जात.

Voli'tion, *n.* (व्हालि'शन्)—act or faculty of willing, power of willing, will. संकल्प, इच्छा. -*al, a.*,-*ally, adv.*

Vŏl'ley, *n.* (व्हॉ'लि)—simultaneous discharge of a number of rifles, missiles, &c.; (Tennis) return of ball in play before it touches ground; (Crick.) sending of ball so that after touching ground it flies towards head of wicket. वर्षाव, सरबत्ती, लाखोली, वृष्टि; (टेनिस) भिडूचा चेंडू जमिनीला लागण्यापूर्वीच परत टोलवणें, -करणें; (क्रिकेट) टप घेऊन यष्टीवर उडणारा असा चेंडू फेंकणें,-अशी चेंडूफेंक. *v. t. & i.* वर्षाव,-सरबत्ती -करणें, (टेनिस) चेंडू जमिनीला न लागतां परत करणें; टप घेऊन उडेल असा चेंडू (क्रिकेटमध्यें) टाकणें.

Vŏl'plāne, *v. i. & n.* (व्हॉ'प्लेन्)—(of aeroplane or its pilot) to descend by gliding without using its engine. (विमान, वैमानिक) इंजिन् न चालवितां घसरत खालीं येणें.

Vōlt, *n.* (व्होल्ट्)—the unit of electromotive force. विद्युच्चलशक्तीचा एकं. -*age, n.* अशा एकंचें परिमाण. -*aic, a.* (of electricity) galvanic. रासायनिक प्रक्रियेनें उत्पन्न केलेली विद्युत्. [*Volta*, person]

Volte-face', *n.* (व्हॉल्ट्-फा'स)—turning round, complete change of front. वळणें, बाजू बदलणें, कोलांटी उडी घेणें, मतांतर.

Vŏl'ūble, *a.* (व्हॉ'ल्युब्ल्)—with incessant flow of words, overfluent; (arch.) revolving; (Bot.) twining. लुचलुच बोलणारा, तोंडाचा फटाकडा; गोल गोल फिरणारा, सभोंवतीं फिरणारा; वेटोळें घेणारा, वेढणारा.-*bly, adv.*

Vŏl'ūme, *n.* (व्हॉ'ल्यूम्)—a book; moving mass of water or smoke, something coiled, coil; bulk, mass; fullness of tone. ग्रंथ, पुस्तक; पाण्याचा लोंढा, धुराचा लोट; परिमाण, विस्तार, आकारमान; बोलदार-भरींव-स्वर, आवाज.-*menometer, n.* घनफलमापक यंत्र. *Volu'meter, n.* वायुघनफल-मापक यंत्र.

Vŏlu'mĭnous, *a.* (व्हॉल्यू'मिनस्)—running to great length; bulky, copious. फार मोठा; विस्ताराचा, प्रचंड.-*ly, adv.*,-*ness, n.*

Vŏl'ŭntarў, *a.* (व्हॉ'लन्टरि)—willing, having free will, not subject to compulsion. आपखुशीचा, ऐच्छिक, आवडीचा. *n.* (ख्रिस्ती मंदिरांत) एकानें वाजविलेलें-गायिलेलें-गीत; स्पर्धेतील खेळाडूनें दाखविलेला ऐच्छिक प्रयोग. -*rily, adv.*,-*riness, n.*

Vŏlŭnteer', *n.* (व्हॉलन्टि'अर्)—a person who comes forward with offer of service at need. स्वयंसेवक. *v. t. & i.* to come forward or serve as a volunteer. आपणहून काम करण्यास तयार होणें; मदत करणें, स्वयंसेवक होणें.

Vŏlŭp'tūarў, *a. & n.* (व्हॉल'प्चुअरि)—a person given up to luxury and sensual gratification. विषयी, विषयासक्त, भोगी, चैनी (मनुष्य).

Volŭp'tuous, *a.* (व्हाल'प्चुअस्)—sensual. विषयी, विलासी.-*ly, adv.*,-*ness, n.*

Volūte', *n.* (व्हाल्यू'ट्)—(archit.) spiral scroll in stone-work. सुरळीच्या आकाराचें दगडी नक्षीकाम. -*tion, n.*

Vŏm'it, *v. t. & i.* (व्हॉ'मिट्)—to eject food, &c. from the stomach through the mouth, eject. ओकणें, वांती होणें; (अलं०) (ज्वालामुखीचा) स्फोट-उद्रेक-होणें. *n.* वांति, ओकारी.-*ory, a.* वांतिकारक, वांतीचें.

Voo'dōo, *n. & v. t.* (व्हू'डू)—use of, belief in witchcraft and the like. जंतरमंतर, तंत्रमंत्र, जादूटोणा करणें, जादूटोणा वगैरेवर विश्वास.-*ism*,-*ist, nn.*

Voră'cious, *a.* (व्होरे'शस्)—greedy, ravenous, eager to devour or swallow. खादाड, अधाशी, पसवखलेला. -*ly, adv.*,-*ness, n.*

Vora'city, *n.* (व्हॅ'सिटि)—greed, eagerness to devour. अधाशीपणा, खादाडपणा.

Vor'tex, *n.* (व्हॉ'र्टेक्स)—a whirl in water, eddy, whirlpool, whirlwind. आवर्त, चक्र, भोवरा; वावटळ, चक्रवात.-*tical, a.* भोवऱ्यासारखा, गरगर फिरणारा.-*ticular, a.,* -*tically, adv.*

Vō'tary, *n.* (व्हो'टरि)—a person vowed to the service of a god, one devoted to a pursuit. उपासक, सेवक, भक्त.-*taress, n. f.* भक्तीण, सेविका, दासी.

Vōte, *n.* (व्होट्)—expression of will or opinion by means of ballot or show of hands; the right to take part in such vote, decision by a majority. मत; मत देण्याचा अधिकार, मताधिकार; बहुमताचा निकाल. *v. t. & i.* to give one's vote; enact, resolve (that), grant by majority of votes; declare by general consent; (colloq.) propose. मत देणे; बहुमताने ठरविणे, मंजूर करणे; बहुमताने जाहीर करणे; सुचविणे.-*table, a., Voter, n.* मतदार. *Voting, n.* मतदान करणे, मत देणे.-*paper,* मतपत्रिका.

Vō'tive, *a.* (व्हो'टिव्ह्)—offered, consecrated, in fulfilment of a vow. नवसाचा, नवस फेडण्यासाठी दिलेले.

Vouch, *v. t. & i.* (व्हाउच्)—(with *for*) to guarantee, confirm, bear witness to. साक्षी करणे; साक्षी देणे, साक्ष देणे..

Vouch'er, *n.* (व्हा'उच्र)—a document or written evidence establishing the payment of money or the truth of accounts. पैसे दिल्याचा दाखला, प्रमाणलेख,-पत्र, दाखला.

Vouchsafe', *v. t.* (व्हाउच्-से'फ्)—to condescend to grant or *to* do something. कृपा करून देणे, मेहेरबानी करणे.

Vou'ssoir, *n.* (व्हू'स्वार्)—each of the wedge-shaped stones forming an arch. पाचरीसारखा घसविलेला कमानीचा दगड.

Vow, *n.* (व्हाउ)—a solemn promise or engagement. शपथ, प्रतिज्ञा, व्रत, नवस. *v. t.* to promise solemnly or threaten by vow; declare solemnly (*that*); (arch.) declare. प्रतिज्ञा करणे, शपथपूर्वक भाक घालणे; शपथेवर सांगणे; स्पष्ट सांगणे, जाहीर करणे.

Vŏw'el, *n.* (व्हॉ'वेल्)—sound capable of forming a syllable, letter representing this sound, e. g. *a, e, i, o, u.* स्वर, स्वराचे अक्षर, स्वरवर्ण.-*vowelled, a.*

Vox, *n.* (व्हॉक्स)—*V. bar'bara,* hybrid word. अशुद्ध साधित शब्द. *V. et praeterea,* an empty word. पोकळ (फलितशून्य) शब्द, पोकळ बडबड. *V. populi,* the people's voice. लोकवार्ता, सार्वजनिक मत, लोकप्रवाद. [ Voice ]

Vŏy'age, *n. & v. i.* (व्हॉ'यिज्)—journey (esp. to some distance by water. जलपर्यटन, सफर करणे. -*able, a.,*-*r, n.* समुद्रावरील सफर करणारा.

Vul'can, *n.* (व्ह'ल्कन्)—(Rom. Myth.) god of fire. (रोमन) अग्निदेवता. *V. powder,* स्फोटक दारू,-पदार्थ. -*ite,* रबर व गंधक एकत्र मिळवून व कढवून तयार केलेला पदार्थ.-*ize, v. t.* मजबूत रबर बनविण्यासाठी व्हल्कनाइटचा उपयोग करणे.-*zable, a.,*-*zation, n.*

Vŭl'gar, *a.* (व्ह'ल्गर्)—coarse; mean, low; common; offending against good taste. हलका; गांवढळ, ग्राम्य; प्राकृत; असभ्य. *The vulgar,* अशिक्षित लोक, सामान्य-ग्रामीण-जनता. *V. fraction,* व्यवहारी अपूर्णांक.-*ism, n.* अडाणी-गांवढळ-शब्दप्रयोग, ग्राम्यता.-*ly, adv. Vulga'rity, n.* अशिष्टता, अडाणीपणा, ग्राम्यता.

Vŭlgăr'ian, *n.* (व्हल्गे'अरिअन्)—a vulgar (rich) person. असभ्य, गांवढळ (श्रीमंत) मनुष्य.

Vŭl'garize, *v. t.* (व्ह'ल्गराइझ्)—to make vulgar; spoil by making too common. असभ्यता आणणे, ग्राम्यता आणणे; अतिपरिचयाने ग्राम्य करणे, -भिकारडे करणे.-*zation, n.*

Vŭl'gate, *n.* (व्ह'ल्गट्)—Latin version of the Bible. ४ थ्या शतकांत केलेले बायबलचे लॅटिन भाषांतर.

Vŭl'nerable, *a.* (व्ह'ल्नरब्ल्)—not proof against wounds, offering an opening (to criticism, &c.). भेद्य, भेदनीय.-*bility, n.* भेद्यता, भेदनीयता. -*ness, n.*

Vŭl'nerary, *a. & n.* (व्ह'ल्नररि)—(a drug etc.) useful or used for healing wounds. जखम भरून येण्याच्या उपयोगी (औषधी इ.)

Vŭl'pine, *a.* (व्ह'ल्पिन्,-पाइन्)—of (the nature of) a fox; crafty, cunning. कोल्ह्याचा,-च्या स्वभावाचा; लुच्चा, कावेबाज.

Vŭl'ture, *n.* (व्ह'ल्चर्)—kinds of a large bird of prey; (*fig.*) a rapacious person. गिधाड, गृध्र; अधाशी, खादाड मनुष्य.-*ine,*-*ish aa.* गिधाडासारखा, खादाड, अधाशी.-*ous, a.*

Vŭl'va, *n.* (व्ह'ल्व्हा)—(anat.) opening, orifice. स्त्रियांची बाह्य जननेंद्रिये, योनि, विवर.-*r, a. Vulvi'tis, n.*

Vy'ing, (व्हा'यिंग)—*pre. pa.* of Vie. स्पर्धा करीत, -करणारा.

## W

W, w, (डब्ल्यू)—twenty-third syllable of the English alphabet. इंग्रजी वर्णमालेतील तेविसावा वर्ण.

Waac, *n.* (वॅक्)—(colloq.) a member of women's Army Auxiliary Force (1917). लष्करी स्त्री-सैनिक.

Waaf, *n.* (वॅफ्)—(colloq.) a member of Women's Auxiliary Air Force (1939). विमानदलांतील स्त्री-सैनिक.

Wad, *a.* (वॉड्)—a small lump of soft material to keep things apart, etc.; a disk of felt keeping powder or shot compact in gun; (U. S.) roll of notes, money. मऊ बोळा, चोंदा, दिंडी; जामीन; नोटांचे पुडके, पैसा. *v. t.* बोळा करणे,-मारणे; गादी करणे, कापूस घालून भरणे.

Wad'ding, *n.* (वॉ'डिंग)—soft material for padding garments; material from which gun-wads

are made. रु, कापूस, लोंकर; बंदुकीच्या जामिनाचें साधन,-सामान.

**Waddle,** *v. i.* (वॉडल)—to walk with slow rocking gait, rock from one side to the other. झुलत झुलत चालणें. *n.* बदकाची-झुलती-चाल. *-lingly, adv.*

**Wāde,** *v. i. & t. & n.* (वेद)—to walk through water or other impeding medium. पाण्यांतून चालणें, कष्टानें जाणें.*-dable, a. Wading bird,* पाण्यांतून चालणारा लांबटांग्या पक्षी.

**Wā'der,** *n.* (वे'डर्)—in vbl. senses; a wading bird; (*pl.*) big waterproof boots. पाय ओढीत चालणारा, पाण्यांतून पायीं जाणारा; लांबटांग्या पक्षी; पाणी आंत न घेणारे बूट.

**Wadi,** *n.* (वॉ'डि)—a rocky water-course dry except in rainy season. पावसाळी वाहणारा ओढा, ओहोळ, पर्या.

**Wā'fer,** *n.* (वे'फर्)—kind of very thin biscuit; *thin disk of unleavened bread used in Eucharist*; a small disk of dried paste; a disk of red paper stuck on law papers instead of seal. अति पातळ कुरकुरीत बिस्किट; पातळ भाकरी,-पाव (प्रभुभोजनाच्या वेळच्या); लाखेची वडी; शिक्क्याच्या ऐवजीं कायद्याच्या कागदपत्रांवर लावण्याची तांबड्या कागदाची चकती. *v. t.* वेफरनें चिकटविणें,-शिक्का करणें.

**Wăft,** *v. t.* (वाफ्ट)—to convey smoothly through the air or along the water. हवेंतून किंवा पाण्यांतून तरंगत नेणें, वाहवत नेणें. *n.* a single sweep of bird's wing; whiff of odour; fugitive sensation; (Naut.) *weft,* distress signal. पक्ष्याच्या पंखाचा एक झपाटा,-झडप; वासाचा भपकारा; पळता-क्षणिक-आनंद, सुख, ऊर्मि; (जहाजानें) दिलेली-केलेली -धोक्याची सूचना.

**Wăg,** *v. t. & i.* (वॅग)—to move backwards and forwards, shake or wave to and fro. हालणें, हालवणें, *Tail wags dog,* least important member has control. यःकश्चित् मनुष्याच्या हातीं सूत्रें आहेत. *To wag* one's *finger at,* धमकावणी देणें, बोट हालवून दटावणें. *n.* हेलकावा, हालवणें.

**Wăg,** *n.* (वॅग्)—one given to jesting; (sl.) truant. थट्टेबाज, मस्कऱ्या मनुष्य; चुकारतट्टू, पळपुट्या. *-ggery, n.,-ggishly, a.,-ggish, adv.*

**Wāge,** *n.* (वेज्)—workman's or servant's periodical pay (*usu. pl.*); a requital. मजुरी, पगार; मोबदला, भरपाई. *v. i.* to carry on. चालवणें, चालू ठेवणें.

**Wā'ger,** *n. & v. t. & i.* (वे'जर्)—a bet, to bet. पण करणें, पैज मारणें.

**Wăg'gle,** *v. i. & t. & n.* (वॅ'गल्)—wag. हालणें, हालवणें, इ.

**Wăg'on,-ggon,** *n.* (वॅ'गन्)—a four-wheeled vehicle for heavy loads; an open railway truck. चार चाकांची सामानाची गाडी; आगगाडीचा उघडा डबा.*-er, n.* गाडीवान; मालमक्तेदार.

**Wăgonĕtte',-ggonate,** *n.* (वॅगने'ट्)—a four-wheeled open carriage with facing side-seats. चार चाकांची उघडी गाडी.

**Waif,** *n.* (वेफ्)—ownerless object or animal; homeless or helpless person or child. बेवारशी माल,-सांड, जनावर; निराधार, अनाथ इसम,-मूल. *Waifs & strays,* बेवारशी सटरफटर वस्तु, अनाथ पोरकीं मुलें.

**Wail,** *n.* (वेल्)—a prolonged plaintive cry; wail-like sound. आक्रोश, विलाप; (वाऱ्याचा) आवाज. *v. i. & t.* to utter wail, express sorrow, lament for. आक्रोश करणें, शोक करणें.*-ful, a., -ingly, adv.*

**Wain,** *n.* (वेन्)—a wagon. गाडी, खटारा, गाडा, शकट. *Charles's Wain, Arthur's W., the W.,* the Great Bear. सप्तर्षि. *The Lesser W.,* लघु सप्तर्षि. [ L *vehere,* carry, Skr. *vahana* ]

**Wain'scŏt,** *n.* (वे'न्स्कॉट्)—a boarding or wooden panelling on room-wall. भिंतीला तक्त्यांची मढवणी. *v. t.* भिंतीला तक्तेबंदी करणें.*-ing, n.*

**Waist,** *n.* (वेस्ट्)—part of the human body below ribs and above hips, the middle part (of a ship); (U. S.) bodice. कटिप्रदेश, कंबर, मध्य; (जहाजाचा) पोपट, कमरगा; (स्त्रियांचें) घट्ट अंगरखें, चोळी इ. *W. band,-belt,* कमरपट्टा. *W. deep* or *high, aa. & advv.* कमरभर. *-waisted, a.*

**Waist'coat,** *n.* (वे'स्कोट्, वे'स्कट्)—a garment worn below a coat. बंडी, जाकीट.

**Wait,** *v. t. & i.* (वेट्)—to defer an action; wait for, await or abide; attend *upon.* खोळंबणें, थांबणें, खोळंबून राहणें; मार्गप्रतीक्षा करणें, वाट पाहणें; भेटीस जाणें; भेट घेणें; सेवाचाकरी करणें, जेवणाचे पदार्थ वाढणें. *n.* (*pl.*) band,-s of persons singing carols etc. from house to house at Christmas; (*sing.*) the act or time of waiting; ambush (*lie in w. for*). नाताळांत घरोघर गाणीं म्हणत फिरणारे खेळे; थांबणें, ओटी, लपून बसणें, टपून बसणें.

**Wait'er,** *n.* (वे'टर्)—an attendant (at the table); a tray. चाकर, हुजऱ्या, वाढपी, परिवेषक; ताट, थाळा. *Waitress, n. f.* स्त्री नोकर.

**Waive,** *v. t.* (वेव्)—to forgo, relinquish. सोडून देणें, सोडणें.*-r, n.* (Law) process of waiving a right or claim. (कायदेशीर) हक्क सोडणें, -सोडून देणें.

**Wāke,** *n.* (वेक्)—track left by a ship on water (also *fig.*). गलबत गेल्यानंतर मागें पाण्यांत दिसणारा त्याचा रस्ता. *In the w. of,* behind, following. पाठीमागें, मागून.

**Wāke,** *v. i. & t.* (वेक्)—to cease to sleep, rouse from sleep; be awake, not to sleep; cease or rouse from sloth etc.; rise or raise from the dead; hold wake over; disturb with noise, make re-echo. जागणें,

जागे करणें, झोपेंतून उठवणें; जागें होणें,-असणें; आळस झाडणें; मेलेला जिवंत होणें,-उठणें,-उठवणें; पहारा करणें; आवाजानें शांततेचा भंग करणें, प्रतिध्वनि करविणें. *n.* anniversary of dedication of church kept by watching all night, fair in connection with this; (*Ir.*) watch by corpse, lamentations etc. चर्चचा वार्षिक जागरणोत्सव, जत्रा; (पुरण्यापूर्वी) प्रेतावर पहारा, विलाप इ.

Wāke'ful, *a.* (वे'क्-फुल्)—unable to sleep; watchful, vigilant, sleepless. निद्राविमुख; दक्ष, जागा, सावध.-*fully, adv.*

Wā'ken, *v. t. & i.* (वे'क्न्)—to cease to sleep, wake up; make or become awake. उठणें; जागें होणें किंवा करणें.

Wale, Weal, *n.* (वेल्)—ridge raised on flesh by stroke of a rod or whip. काठीचा-चाबकाचा -वळ. *Wale-knot, wall-knot,* दोरी उचीळ होऊं नये म्हणून शेवटीं मारलेली गांठ. *v. t.* वळ उठविणें.

Wā'ler, *n.* (वे'लर्)—horse imported for Indian army from New South Wales. (न्यू साउथ् वेल्समधून हिंदी सैन्यांत आणलेला) घोडा.

Wāles, *n.* (वेल्स्)—the province in England. वेल्स प्रांत. *Prince of W.,* इंग्लंडच्या युवराजाचा किताब, युवराज.

Walk, *n.* (वॉक्)—gait or step; excursion on foot, stroll; track for foot-passengers. गति, चाल, चालणें; रपेट, फेरफटका, सहल; फिरण्याची जागा. *v. i. & t.* to travel or go on foot, pass over or through on foot; tread the floor or surface of; cause to walk with one. चालणें, चालत जाणें, पायीं जाणें; (वर) फिरणें, चालणें, जाणें, येणें; हलक्या चालीनें चालवणें, -हांकणें. *To go for, take a w.,* फिरायला जाणें, पायीं रपेट-सहल-करणें. *To w. off* or *away with,* carry off, steal. चोरणें, पळविणें, लांबवणें. *To w. the streets,* रस्त्यांतून भटकणें; वेश्येचा धंदा करणें. *To w. the hospitals,* be a medical student. वैद्यकीचा अभ्यास करणें. *To w. the boards,* be an actor. नाटकांत-नटाचें-काम करणें, नट होणें. *To w. the chalk,* रस्त्यांतून आंखलेल्या मार्गानें सरळ जाणें.

Walk'er, *n.* (वॉ'कर्)—In vbl. senses; a bird that neither flies nor swims. चालणारा, पादचारी; न उडणारा, न पोहणारा कोंबड्यासारखा पक्षी. 2. *int.* (*sl.*) अविश्वास-संशयदर्शक-उद्गारवाचक अव्यय.

Walk'ing, *pr. pa. & v. n.* (वॉ'किंग)—चालणें, पायीं जाणें. *W. dress,* for outdoor wear. बाहेर जाण्याचा पोषाख. *W. gentleman,-lady,* देखणा पण विशेष काम नसलेला नट,-टी नटी. *W. tour,* मजेखातर पायीं सहल.

Walk'-over, *n.* (वॉ'क्ओव्हर्)—easy victory. सहजीं मिळालेला डाव,-जय.

Wall, *n.* (वॉल्)—upright structure serving as defence of a town, side of a building etc. गांवकूस, तट, प्राकार, पोवळी, कूड, भिंत. *v. t.* to provide with a wall; block *up* with a wall, defend by walls. भिंत घालणें, बांधणें; घालून बंद करणें. *Party* or *partition w.,* दोन खोल्या, घरें, शेतें यांमधील पडदी; भिंत, मेरी. *W. of partition, (fig.)* line of division, gulf. मतभेदाची भिंत, पडदा. *Blank w.,* (दरवाजा किंवा) खिडकी नसलेली सुनी भिंत. *To run* one's *head against a w.,* attempt impossibilities. भिंतीवर डोकें हापटून घेणें, अशक्य गोष्टी साध्य करण्याचा प्रयत्न करणें. *To see through brick w.,* भिंतींतून आरपार पाहणें (अदृश्य-सूक्ष्म दृष्टीनें). *Ww. have ears,* भिंतीला कान असतात. *With* one's *back to the wall,* एकट्यानेंच लढणें, निरुपायानें. *The weakest goes to the w.,* चढाओढींत दुबळाच हरतो. *W.-creeper,* एक जातीचा पक्षी. *W. painting,* भित्तिचित्र, भिंतीवर रंगविलेलें चित्र. *W. paper,* भिंतीला चिकटविण्याचा शोभेचा कागद. *W. pepper,* kind of stone-crop. इंद्रकद, इंद्रयव, इंद्राठी. *W. plate,* भिंतींत घसविलेलें वहालाच्या खालचें आडवें लांकूड. *W. washer,* डळमळत्या भिंतीचा टेकावा,-सेट. *W. less, a. Walled up,* बंदिस्त.

Wa'llaby, *n.* (वॉ'लबि)—kinds of smaller kangaroo. लहान जातीचा कांगारू. *On the w. (track),* भटक्या, निरुद्योगी, बेकार.

Wallaroo', *n.* (वॉलरू')—kinds of larger kangaroo. मोठ्या जातीचा कांगारू. [Austral.]

Wa'llĕt, *n.* (वॉ'लेट्)—a bag for articles (such as food, &c.) to be carried on a journey, a small leather case, fishing-kit; flat case for holding paper money unfolded. पडशी, पिशवी, थैंग; चामड्याची लहान पिशवी; कागदी चलन ठेवण्याचें पैशाचें पाकीट.

Wall-eye, *n.* (वॉ'लाय्)—diseased eye. पांढऱ्या बुबुळाचा (दृष्टिहीन) डोळा; कैरा-घैरा-डोळा.-*d, a.* कैऱ्या डोळ्याचा.

Wa'llow, *v. i.* (वॉ'लो)—to roll about (in mud, sand, &c.); (*fig.*) take gross delight *in.* लोळणें; व्यसनांत गर्क असणें. *n.* place to which buffaloes etc. resort to *w.* म्हशी, रेडे इ० यांची लोळण्याची जागा, खाजण. *To w. in money,* be very rich. संपत्तींत लोळणें

Wall Street, *n.* (वॉल् स्ट्रीट्)—the American money-market. अमे. (सं. संस्थानांतील) सराफकट्टा.

Wa'lnŭt, *n.* (वॉ'लनट्)—a handsome and valuable tree, an edible nut in pair of boat-shaped shells. अक्रोड (झाड, फळ), अक्रोट. *Over the ww. & the wine,* at dessert. सुखशुद्धीसाठीं दारू आणि अक्रोड.

Wal'rus, *n.* (वॉ'लरस)—kinds of large amphibious arctic long-tusked mammal, sea-horse. पाणघोडा, समुद्रघोडा (नाका).

Waltz, *n. & v. i.* (वॉल्ट्स्)—a dance in which partners progress gyrating round each other

in embrace; piece of *w.* music. 'वाल्स' नांवाचा वाटोळा नाच (नाचणें); अशा नाचाचें गाणें.

**Wan,** *a.* (वॅन्)—having a pale hue, pale as with illness; languid (of look); (arch.. of night, water) dark, black. फिकट; निस्तेज, म्लान; काळोखी, काळें.-*ly, adv.,-ness, n.*

**Wand,** *n.* (वॉन्ड्)—a long slender rod. काठी, छडी, कांडी (जादूगाराची).

**Wa'nder,** *v. i.* (वॉन्डर्)—to go from place to place without a settled plan; stray. भटकणें; वाट सोडून जाणें, वाहावणें, भ्रमणें, भकणें. *Wandering Jew,* ख्रिस्तानें भटकण्याचा शाप दिलेला भटक्या ज्यू; अस्थिर, भटक्या मनुष्य; वेलींची जात. *Wa'nderer, n.* भटक्या, प्रवासी. *Wander-lust, n.* (व्हॉन्डर्लुस्ट्), eager desire for travelling or wandering. प्रवासाची-भटकण्याची-हौस. *Wan'dering, n.* (*pl.*) प्रवास, भ्रमण;-*ly, adv.*

**Wāne,** *v. i.* & *n.* (वेन्)—(of moon) to decrease in size after the full; decline or fall off. लहान होत जाणें; क्षीण होणें, क्षय होणें, क्षय, ऱ्हास. *Is on the w,* declining. ऱ्हास होत आहे.

**Wā'ngle,** *v. t.* (वेंग्ल्)—to secure by dubious means; fake. आडमार्गानें मिळविणें; बनावट-खोटा-नाटा-करणें.

**Want,** *n.* (वॉन्ट्)—lack or need *of,* deficiency; poverty, indigence; desire. उणीव, न्यूनता; दारिद्र्य; गरज, जरूरी, इच्छा. *v. t. & i.* to be without, be insufficiently provided with; wish, long for; fall short of. उणीव किंवा कमतरता असणें; इच्छा असणें; तोटा असणें. *A man of few ww.,* त्याच्या गरजा फारच थोड्या आहेत, तो असेल त्यांत संतुष्ट आहे. *Is in w. of money,* पैशाची गरज आहे.

**Want'ing,** *prep.* (वॉन्टिंग)—without, minus, less. शिवाय, खेरीज, उणा, कमी. *Made a century w. one run,* त्यानें शंभराला एक धांव कमी, (९९) धांवा केल्या. *a.* गैरहजर, अनुपस्थित, कमी (पडणारा).

**Wa'nton,** *a.* (वॉन्टन्)—sportive, capricious; luxuriant, wild; unchaste; purposeless. खेळकर, धागडणारा, विलासी, स्वच्छंदी; आनंदी, रंगेल; व्यसनी, कामी; निरंकुश. *n.* a lascivious or unchaste person. कामासक्त किंवा व्यसनी मनुष्य, (स्त्री, पुरुष). *v. i.* खेळणें, बागडणें, दुरंगळणें, मौज करणें; व्यभिचार-स्वैरवर्तन-करणें.-*ly, adv., -ness, n.* मजा, गंमत, फाजील; स्वच्छंदीपणा; स्वैराचार.

**Wa'pity,** *n.* (वॉपिटि)—N. Amer. stag. उत्तर-अमेरिकेंतील काळवीट.

**War,** *n.* (वॉर्)—a quarrel usually between nations conducted by armed force; (*fig.*) hostile relations between persons. युद्ध, संग्राम, लढाई; वैर, शत्रुत्व. *v. i. & t.* to make *w.*; bring or beat down by *w.* युद्ध करणें; युद्ध करून-लढून-जेर करणें, जेरीस आणणें; पादाक्रांत करणें. *Civil w.,* यादवी, आपापसांतील युद्ध. *Private w.,* खाजगी भांडण, द्वेष. *Holy w.,* धर्मयुद्ध. *To make or wage war,* युद्ध सुरू करणें. *To be at w.,* शत्रुत्वानें वागणें. *W. to the knife,* विकोपास गेलेलें भांडण. *Trade of w.,* शिपाईगिरीचा पेशा. *The dogs of war,* (poet.) havoc attending war. युद्धांतील-नंतर-होणारी-हानि. *W. of the elements,* पंचमहाभूतांचा क्षोभ. *W. cry,* युद्धाचा संकेत शब्द. *W. god,* मंगळ, युद्धदेवता. *Warring, part.* rival प्रतिस्पर्धी.

**War'ble,** *v. i. & t.* (वॉर्ब्ल्)—to sing in gentle continuous trilling manner, sing musically. लकेरी मारणें; छेडणें, आळवणें, गाणें. *n.* गाणें, लकेर.-*r, n.* गाणारा, लकेर मारणारा; सुंदर गाणारा पक्षी.

**War'ble,** *n.* (वॉर्ब्ल्)—a hard lump on horse's back from galling of saddle; tumour. खोगीर घसटून घोड्याच्या पाठीला आलेलें टेंगूळ; टेंगूळ, उठाणूं.

**Ward,** *n.* (वॉर्ड्)—custodianship, custody; minor under care of guardian; division in a prison, hospital or work-house; administrative division of a city; (*pl.*) notches and projections in key and lock to prevent opening by wrong key. रक्षण, रखवाली; अज्ञान, पाल्य, पालकाच्या ताब्यांतला; तुरुंग, हॉस्पिटल किंवा कारखान्यांतील खण, खोली, दालन; पुरा, मोहला, पेठ, विभाग; किल्ली आणि कुलूप यांतलि (दुसऱ्या किल्ल्या लागूं नये म्हणून) विशेष खांचाखोंचांची रचना. *v. t.* to protect (chiefly of God); parry (a blow); keep *off* danger, etc. सांभाळ-रक्षण-करणें; टाळणें, चुकवणें; निवारण करणें. *To keep watch & ward,* पाहरा करणें. *Court of ww.,* अज्ञानपालकखातें. *W. room,* लढाऊ जहाजावरील अधिकाऱ्यांची जेवणाची खोली,-भोजनशाला. *W. ship,* tutelage, guardian's care. पालकत्व, पालकाचें काम.

**War'den,** *n.* (वॉर्डन्)—a president or governor; (*arch.*) a watchman, a sentinel. अध्यक्ष, मुख्य अधिकारी, रखवालदार. 2. kind of cooking pear. शिजविण्याजोगें पेअर जातीचें फळ.-*ship, n.* पालकत्व अध्यक्षपद. (*Air*) *warden,* वैमानिक हल्ल्याच्या वेळीं लोकांना मदत करणारा बिनलष्करी अधिकारी.

**War'der,** *n.* (वॉर्डर्)—a jailor; a sentinel (arch.); (Hist.) staff of authority. तुरुंगावरचा अधिकारी; पाहारेकरी, पालक; अधिकारदंड,-काठी.

**Ward'rōbe,** *n.* (वॉर्ड्-रोब्)—a place where clothes are kept; a person's stock of clothes. कपडे ठेवण्याची जागा, जामदारखाना; कपड्याचा संग्रह. *Wardrobe dealer,* dealer in secondhand clothes. जुन्या कपड्यांचा व्यापारी.

**Ware,** *n.* (वेअर्)—(*pl.*) what one has for sale, articles of merchandise. विक्रीचा माल, विकाऊ माल, चिनीमातीचीं भांडीं. *China w.,* चिनी मातीचीं भांडीं. *Hard w.,* लोखंडी सामान,-माल.

**Wāre'house,** *n.* (वेअर्हाउस्)—a building in which goods are stored or shown for sale. वखार, कोठी. *v. t.* (-हाउझ्) to store goods. वखारींत माल सांठविणें. -*man, n.* वखारवाला.

**War'fare**, *n.* (वॉ'र्-फेअर्)—military service, state of war, campaigning. युद्धावस्था, युद्ध, स्वारी, संग्राम,

**War'like**, *a.* (वॉ'र्-लाइक्)—martial, military; threatening war. रणशूर, लष्करी, युद्धविषयक; लढाईची भीति दाखविणारा.

**War'lŏck**, *n.* (वॉ'र्-लॉक्)—a sorcerer. जादूगार, चेटक्या.

**Warm**, *a.* (वॉर्म्)—moderately hot; fit to keep the wearer warm; hearty, excited, affectionate. ऊन; गरम; उत्साहाचा, प्रेमळ. *v. t.* to make warm. ऊन करणें, तापवणें, शेकणें, चेतवणें. *W. blood*, (जिवंत प्राण्यांचें) उष्ण-सळसळणारें-रक्त; कामुकता, रंगेल स्वभाव;-*ed*, *a*. *A w. heart*, प्रेमळ, सहानुभूतिपर, -मन. *To w. person* or *his jacket*, thrash him. एखाद्याला झोडपून काढणें, मार देणें.-*ing*, *n*. *Warming -pan*, शेकण्याची शेगडी; (*fig.*) (वयांत न आलेल्या दुसऱ्याकरितां राखून ठेवलेल्या जागेवर नेमलेला) तात्पुरता मनुष्य,-अधिकारी.

**Warm'-hearted**, *a.* (वॉ'र्म्-हार्टेड्)—of affectionate or sympathetic disposition. मायाळू, जिव्हाळ्याचा, प्रेमळ.-*ly*, *adv*,-*ness*, *n*.

**Warmth**, *n.* (वॉर्म्थ्)—warmness; zeal. उष्णता, ऊनपणा, ऊब; उत्सुकता, उत्साह, कळकळ, आवेश.

**Warn**, *v. t.* (वॉर्न्)—to make aware *of*; put on guard *against*; admonish by way of caution or threat. सूचना देणें; पूर्वी सुचविणें, आगाऊ सावध करणें; ताकीद देणें, बजावणें, सांगून ठेवणें.

**War'nĭng**, *n.* (वॉ'र्निंग्)—what is said or done to warn a person; an event that serves to warn. ताकीद, सांगी, बजावणें; सूचना, इशारा; पूर्वबोधन, पूर्वसूचना,-सूचक गोष्ट. *To give* (master, servant) *w.*, नोकरी सोडण्याबद्दलची आगाऊ सूचना.

**Warp**, *n.* (वॉर्प्)—threads stretched in loom to be crossed by woof; crooked state produced in timber etc.; mental bias; sediment or alluvial deposit. उभी वीण, उभें सूत, ताणा, उभवण; वांक, बांक; मनाचा कल किंवा ओढा, तेढ, वांकडेपणा; (गढूळ पाण्यांतील) बसलेला गाळसाळ. *v. t.* to make or become crooked or perverted, bias; (Naut.) haul ship by a rope attached to fixed point; fertilize by inundating with *w.* वांकविणें, वांकडा करणें; बहकविणें; (गलबत) दोरीनें ओढणें; गाळानें जमीन सुपीक करणें.

**Wa'rrant**, *n.* (वॉ'रन्ट्)—a thing that bears one out in doing something; an authorization, esp. in writing, to receive money, carry out arrest or distress, represent principal in law-suit. हमी, खात्री, प्रमाण; लेखी अधिकारपत्र, पकडण्याचा लेखी हुकूम, आरोपीचें वकीलपत्र दाखल करणें, इ. *v. t.* to serve as a warrant for; bear out, guarantee (goods). हुकूम देणें; हमी घेणें; (आपल्या मालाविषयीं) खात्री देणें.-*ed*, *a*. हमी दिलेला, खात्रीचा.-*er*, *n*.,-*or*,-*n*. हमी-खात्री देणारा.-*ee*, *n*. हमी दिलेला मनुष्य.

**Wa'rrantable**, *a.* (वॉ'रन्टेबल्)—that can be warranted; legitimate, justifiable. समर्थनीय; न्याय्य. *W. stag*, of an age to be hunted. शिकार करण्याला योग्य वयाचें-वाढलेलें-काळवीट.

**Wa'rranty**, *n.* (वॉ'रन्टि)—authority or jusification (*for*); (Law) guarantee. सबळ पुरावा, आधार, खातरीपत्र, हमी.

**Wa'rren**, *n.* (वॉ'रन्)—piece of ground where rabbits are kept or abound. ससे पाळण्याचें रान. *Like rabbits in a w.*, of thick population. अतिवस्तीची-गर्दीची-जागा.

**Wa'rrĭor**, *n.* (वॉ'रिअर्)—a distinguished or veteran soldier; a fighting man; (of savages) a fighting man. कसलेला शिपाई; योद्धा; लढाऊ क्रूर रानटी मनुष्य. (attrib.) martial. लढवय्या. *W. ant*, ant of kinds that make slaves of other species. लढाऊ जातीची मुंगी. *The Unknown W. or Soldier*, देशाच्या स्वार्थत्यागाचा द्योतक असा युद्धांत मरून पडलेला अज्ञात योद्धा, -सैनिक.

**Wart**, *n.* (वॉर्ट्)—small excrescence on the skin; *protuberance on the tree-trunk.* चामखीळ; गुंज. *To paint* one *with his warts*, without concealment of blemishes. दोष-व्यंगें -न लपवितां एखाद्याला खऱ्या स्वरूपांत दर्शविणें. -*y*, *a*. चामखीळ असलेला.

**Wār'y̆**, *a.* (वे'अरि)—cautious, circumspect; on the lookout for danger. सावध, दक्ष; मागें पुढें पाहून वागणारा.-*rily*, *adv*. सावधपणानें.-*riness*, *n*. सावधपणा, हुशारी, धोरण.

**Wash**, *v. t. & i.* (वॉश्)—to cleanse with liquid; (*fig.*) purify; take (stain etc.) *out* or *off* or *away* by washing; bear washing without loss of colour; moisten; touch with waters; sift (ore) by action of water; brush thin coating of watery colour over, coat thinly with gold etc. धुणें, धुऊन टाकणें, पाण्यानें साफ करणें; शुद्ध-पवित्र-करणें; धुऊन (डाग इ०) काढणें; रंग न जातां धुतला जाणें; भिजविणें; (किनारा) धुऊन काढणें, (किनाऱ्याला) पाणी लागणें; (पाण्यानें) धातू साफ करणें; पातळ पाण्याच्या रंगाचा हात देणें,-मुलामा काढणें. *n.* washing; lotion or liquid cosmetic; thin coat of liquid colour applied to paper or wall; thin or weak or inferior liquid food; (*fig.*) twaddle. धुणें; धुण्याचें औषध; रंगाचा पातळ हात; पेजवणी, ढेपवणी; वटवट, बहकणें. *To w.* one's *hands* (*of*), (*fig.*) decline responsibility. जबाबदारी टाळणें, अंगाबाहेर टाकणें. *To w. up*, खरकटीं भांडीं घासून धुऊन स्वच्छ करणें. *Must w. before dinner*, जेवणापूर्वी हात, पाय, तोंड,-धुतलें पाहिजे, स्नान केलें पाहिजे. *Washes for a living*, धोब्याचा-धुणीं धुण्याचा-धंदा करतो. *Won't w.*, (fig. of argument) stand examination. मुद्दा टिकणार नाहीं, कसोटीस उतरणार नाहीं.

*Washed out*, (*fig.*) enfeebled, demoralized. दुर्बळ-निःसत्त्व-बनलेला. *The w.*, परीट-धुणें. *W.-boiler*, कपडे शिजविण्याची कढई. *W. bottle*, apparatus for purifying gases etc. by passing through liquid. वायु स्वच्छ करण्याचें उपकरण,-बाटली. *W. day*, भट्टीचा दिवस. *W. out*, (army sl.) complete failure, esp. to hit target, fiasco. बंदुकीचा नेम चुकणें, फजिती *W. stand, W. hand stand*, हात-तोंड धुण्याचें साहित्य ठेवण्याची जागा,-स्टँड. *W. tub*, कपडे धुण्याचें पिंप, लांकडी घमेलें.

**Wash'er**, *n.* (वॉ'शर्)—In vbl. senses; a flat ring or perforated piece used to give tightness. धुणारा; वायसर, घट्ट बसविण्याचें चपटें कडें.

**Wash'erman**, *n.* (वॉ'शर्मन्)—a man who washes clothes. धोबी, परीट. (Also, Washer).

**Washer-woman**, *n.* (वॉशर्-वुमन्)—a laundress. परटीण.

**Wash'y**, *a.* (वॉ'शि)—(of liquid food etc.) too watery, insipid, weak: (of colour) faded-looking: (of style etc.) diffuse, feeble. पाणचट, पचपचीत, मिळमिळीत; फिकट, फिका; पिळपिळीत, पुचाट, ओजोहीन.-*shily, adv.,-shiness, n.*

**Wasp**, *n.* (वॉस्प्)—a winged insect with venomous sting; spiteful person. गांधीलमाशी, कुंभारीण; दीर्घद्वेषी. *Has a waist like a wasp's*, (गांधीलमाशीच्या सारखी) पातळ कमर आहे; तनुमध्यमा.-*ish*, *a.* irritable, ill-tempered. चिडखोर, चिरडखोर;-*ly, adv.,-ness, n.*

**Wass'ail**, *n.* (वॉ'सल्, वॅ'-)—(arch.) a festive occasion, drinking bout; a spiced ale. उत्सव, आनंदाचा सण, मद्यपानाचा धिंगाणा; मसालेदार दारू. *v. i.* to make merry, hold festivities. उत्सव-मजा-चैन करणें.

**Wast**, *v.* (वॉस्ट्)—*pa. t.* 2nd sing of Be. होतास-सीस-तेंस.

**Wās'tage**, *n.* (वे'स्टिज्)—loss by waste. घस, घट, घटती, तूट.

**Wāste**, *a.* (वेस्ट्)—not inhabited or cultivated; superfluous; left over; (*fig.*) monotonous. ओस, पडीत; अधिक, जास्त, टाकाऊ, रद्दी, गाळसाळ; निरर्थक, विशेष गोष्टी न घडलेला (काळ). *v. t. & i.* to lay waste; squander; dwindle or pine. ओसाड करणें; उधळणें; खंगणें; रोडावणें. *n.* barren expanse of ground; extravagance; wanton destruction. जंगल, रान; उधळपट्टी; नासधूस, नाश, ऱ्हास. *To lay w.*, ravage. उजाड करणें. *To lie w.*, be uncultivated. (जमीन) ओस, पडीत-पडणें,-राहणें. *W. land*, ओस-पडीत-जमीन. *W. products*, useless by-products. गाळ-साळ-टाकाऊ-माल. *W. paper*, निरुपयोगी कागदपत्र,-पुस्तकें इ० *W. breath* or *words*, talk uselessly. वायफळ बडबड करणें, शब्द फुकट घालविणें. *A w. of waters*, unbroken expanse of sea. विशाल पसरलेला समुद्र, पाणीच पाणी. *Wilful w. makes woeful want*, उधळपट्टी केली कीं भयंकर चणचण भासते. *To run to w.*, be wasted. (पाणी इ०) वाहून फुकट जाणें. *W. basket*, केराची टोपली. *W. paper basket*, केराची कागदाच्या कपट्यांची टोपली. *W. book*, in book-keeping, कच्ची नोंद. *W. pipe*, (सांडपाण्याचा) नळ. *W.-ful*, *a.* extravagant, given to waste. उधळ्या, उधळपट्टीचा, हानिकारक;-*fully, adv.,-fulness, n.,-less, a.*

**Wā'ster**, *n.* (वे'स्टर्)—In vbl. senses; an article spoilt in making; (*sl.*) a person whose existence is regrettable. क्षीण करणारा, उधळ्या; नासलेला चिपडलेला (कारखान्यांतील) माल; असून नसून सारखा मनुष्य.

**Wā'strel**, *n.* (वे'स्ट्रल्)—a thing spoilt in making; a stray child; good-for-nothing fellow; a wasteful person. बिघडलेला माल; चुकार-भटकें-पोर; निरुपयोगी मनुष्य; उधळ्या मनुष्य.

**Watch**, *n.* (वॉच्)—wakefulness at night; state of being on the look-out for something; attention, vigilance; (*hist.*) watchman; one of the divisions of the night; a timepiece for carrying on the person; four-hour spell of duty on board ship. रात्रीचा जागर; पहारा; लक्ष; पहारेकरी; रात्रीचा एक भाग; खिशांतील-मनगटावरील-घड्याळ; (जहाजावरील) ४ तासांची पाळी, पहारा. *v. t. & i.* to be vigilant; keep a watch. सावध असणें; पहारा करणें. *On the w.*, जागरूक, जागृत. *Dog-w.*, (गलबतावरील) २ तासांचा पहारा, पाळी. *W. dog*, पहाऱ्याचा कुत्रा. *W. man*, पाहरेकरी. *W. tower*, पहाऱ्याचा-टेहेळणीचा-बुरूज. *W. word*, पहाऱ्याचा-परवलीचा शब्द, परवल; ब्रीदवाक्य, ध्येयवाक्य, एखाद्या गोष्टीची आतुरतेनें वाट पाहात असतां वेळ कशी जातेसें वाटणें.

**Wa'tchful**, *a.* (वॉ'च्-फुल्)—vigilant; on the watch, heedful, observant, cautious. जागरूक; सावध.-*fully, adv.,-ness, n.*

**Wa'ter**, *n.* (वॉ'टर्)—liquid compound of oxygen and hydrogen; the degree of brilliance and transparence. पाणी, तेज. *v. t. & i.* to sprinkle or adulterate or dilute with water; provide or fill (horse, engine, &c.) with water; give drink of *w.* to, go to pool etc. to drink; take in supply of *w.*; secrete or run with *w.*; increase (capital) by issue of new shares. पाणी घालणें; पाणी पुरवणें; (जनावराला) पाणी पाजणें, दाखविणें, (तळ्यावर इ.) पाणी प्यायला जाणें; पाणीपुरवठा घेणें; (डोळे) पाण्यानें डबडबणें,-भरणें, पाणी येणें, (तोंडाला) पाणी सुटणें; नवीन विभाग (शेअर) काढून कंपनीचें भांडवल वाढविणें. *Red w.*, bloody urine. (रक्तासारखी) लाल लघवी,-मूत्र. *In smooth ww.*, going easily. सुखानें, सुखांत, विन अडचणींनें. *On the w.*, in boat or ship. गलबतांतून. *By w.*, जलमार्गानें. *In deep w.* or *ww.*, in great difficulties. मोठ्या अडचणींत, संकटांत, दुःखांत. *Still ww. run deep*, खोल पाणी गंभीर असतें, बाहेरून शांतता पोटांत भावनेची,-ज्ञानाची,-बुद्धिमत्तेची खोली

(लपवूं शकतें), *cf.* उथळ पाण्याला खळाळी फार. *To get into, be in, hot w.*, अविचारानें संकट इ. ओढवून घेणें. *To keep* one's *head above w.*, (*fig.*) avoid financial ruin. दिवाळें वाजूं न देणें, बुड येऊं न देणें. *The ww.*, the sea. सागर, समुद्र. *To pour oil on the ww.*, भांडणतंटा मिटविणें, शांत करणें. *To spend money like w.*, पाण्यासारखा पैसा खर्च करणें (उधळणें). *To make, pass, w.*, लघ्वी करणें. *W. of life*, आध्यात्मिक ज्ञान. *Ww. of forgetfulness*, oblivion, death. पाताळांतलि लीथ नदी, विस्मरण, मृत्यु. *High w.*, त्वारी, सना. *Low w.*, निखार, ओहोट. *In low w.*, (*fig.*) in depressed condition. (पैशानें) खालावलेला. *Of the first* w., of finest quality. उत्कृष्ट, पाणीदार. *W. borne*, (of goods) जलवाहतुकीनें नेलेला (माल). *W. colour.*, पाण्यांत मिसळणारा रंग. *W. finder*, dowser. पानाड्या, पाणी शोधून काढणारा. *W. fowl*, पाणकोंबडें, जलकुक्कुट. *W. line*, जहाजाला पाण्याचा पृष्ठभाग स्पर्श करतो ती जलरेषा. कागदावरील पाणरेषा. *W. main*, पाण्याचा मुख्य मोठा नळ. *W. man*, होडीवाला, वल्हेकरी. *W. mark*, (कागद उजेडाकडे धरला असतां दिसणारी) कागदांतील रेषा, खूण इ., *v. t.* (अशी) खूण करणें. *W. mill*, पाणचक्की. *W. monkey*, पाण्याचा सुजा. *W.-motor*, रहाट, पाण्यावर चालणारें यंत्र. *W. nymph*, जलाप्सरा. *W. parting*, जलविभाजक क्षेत्र. *W. pillar*, इंजिनाला पाणी घेण्याचा नळ. *W. power*, जलशक्ति. *W. side*, समुद्रकिनारा, नदीतीर. *W. snake*, पाणसाप. *W. works*, पाणीपुरवठाखातें, नक्षीदार कारंजें; *to turn on the water works*, (*sl.*) shed tears. अश्रु गाळणें. *W. less*, *a.*, *W. y*, *a.* जलमय; पाण्यानें भरलेला, पाणी गळणारा (डोळा); पाणचट; पचपचीत, नेभळट (लेखन शैली); फिक्का-फिकट-(रंग); पर्जन्यसूचक; *Wa'teriness*, *n.*

**Wa'ter-bŭff'alo**, *n.* (वॉ'टर्-ब'फलो)—the common domestic Indian buffalo. रेडा, म्हैस.

**Wa'terfall**, *n.* (वॉ'टर्-फॉल्)—steam falling over precipice, cascade. धबधबा, धोत, जलप्रपात.

**Wa'ter-mĕlon**, *n.* (वॉ'टर्मेलन्)—elliptical smooth kind of melon with watery juice. कलिंगड.

**Wa'ter-prōōf**, *a.* (वॉ'टर्-प्रूफ्)—so firm and compact as not to admit water. आंत पाणी न येईल असा (करणें).

**Wa'tertight**, *a.* (वॉ'टर्-टाइट)—so tightly closed as to prevent ingress or egress of water. पाणी आंतून बाहेर व बाहेरून आंत न येईल इतका घट्ट, पाणीबंद. *W. compartment*, (*fig.*) keeping of subjects entirely separate. निरनिराळे विषय पृथक् पृथक् ठेवणें.

**Watt**, *n.* (वॅट्)—unit of electric power. एक अम्पीअर (ampere) तीव्रता असणाऱ्या विजेच्या चालकशक्तीच्या एका व्होल्टनें केलेलें काम, वाट. *W. meter*, *n.* [J. Watt, engineer, d. 1819]

**Watt'le**, *n.* (वॉ'टल्)—rods or twigs interlaced as material for fences, walls etc.; a wicker hurdle. काठ्याची-ढहाळ्यांची गंथण; ताटी, गांठण, गंथण. *Wall of w. & dab*, कूड. *v. t.* गांठणें, विणणें; कूड घालणें. 2 *n.* fleshy appendage on head or throat of birds. तुरा, कल्ला ;-*d*, *a.*

**Waul**, *v. i.* (वॉल्)—to cry like a cat. मांजरासारखें ओरडणें, केंकाटणें.

**Wāve**, *v. t.* & *i.* (वेव्)—to show motions like those of a flag in the wind; impart waving motion to. हालणें, हालवणें; फडफडणें, पसरणें. *n.* a ridge of water raised above the level of the surface; a wavy line or surface; a signal made by waving the hand. लाट, लहरी, ऊर्मि, मौज; लाटेची रेषा; हात हालवणें. *W.less*, *a.*, *W. let*, *n.*

**Wā'ver**, *v. i.* (वे'व्हर्)—to be undecided: oscillate unsteadily; to hesitate. हेलकावे खाणें; घोंटाळणें; कांकूं करणें.-*er*, *n.*,-*ingly*, *adv.*

**Wā'vy̆**, *a.* (वे'व्हि)—undulating; showing alternate contrary curves. लाटांनीं हालणारा, नागमोडीचा, लाटेसारखा, लहरीरूप. 2. snow goose. आर्क्टिक हंसी (पक्षी).

**Wăx**, *v. i.* (वॅक्स्)—to grow or become larger. मोठा होणें, कलाकलांनीं वाढणें, वृद्धि होणें,-पावणें. *n.* the plastic substance secreted by bees. मेण. *v. t.* मेण लावणें, मेणानें सारवणें.

**Wăx**, *n.* (वॅक्स्)—fit of anger. रागाचा झटका.

**Wăx'en**, *n.* (वॅ'क्सन्)—made of, resembling, wax. मेणाचा, मेणासारखा, मऊ, लवचीक.

**Wăx'y** *a.* (वॅ'क्सि)—resembling wax; (sl.) angry, quick-tempered. मेणासारखा, लवचीक, मऊ, चिडचिडीत; रागीट, तापट स्वभावाचा.

**Way**, *n.* (वे)—a road or track for passing along; course, route; method or plan for attaining an object; travelling distance; unimpeded opportunity of advance; specified direction; custom, manner of behaving; scope, sphere, range, branch of business; progress; condition, assumption, state, degree. रस्ता, वाट; गति, मार्ग; तऱ्हा, प्रकार, शैली; मजल, पल्ला, टप्पा, मार्ग, मोकळीक, जागा; बाजू, दिशा; वहिवाट, रीत, सरणी, सोय; वाव, धंदा; प्रगति; स्थिति. *Milky w.*, आकाशगंगा. *To go the w. of all the earth, of all flesh, of nature*, die. मरणें. *To pave the w. for*, मार्ग मोकळा करणें, मार्ग तयार करून ठेवणें. *To find one's or the way*, इच्छित स्थळ गांठणें. *Parting of the ww.*, time for momentous decision. महत्त्वाच्या निर्णयाची वेळ,-चा प्रसंग. *Out of the w.*, आडवळणी, आडबाजूस. *To give w.*, हार जाणें, वाकणें; मोडणें; शोकवश होणें; भाव उतरणें. *To make one's way*, स्वतःच्या हिंमतीवर मार्ग काढणें. *On the w.*, वाटेंत, मार्गांत. *By the w.*, प्रसंगात, (*fig.*) incidentally. सहज, जातां जातां. *Every w.*, चारा वाटा, चहूंकडे. *Ways*, चालचर्या, रीतभात. *To be under w.*, (गलबत) चालू होणें,-असणें. *To make w.*, प्रगति करणें. *By w. of*, ऐवजीं, बदल. [Sk *vaha*, carry]

**Way'fārer**, *n.* (वे'फेअरर्)—one who travels, a traveller (esp. on footway), a foot-passenger.

वाटसरू, पांथस्थ. *Way-faring, pr. pa. a.* वाट चालणारा, प्रवाशी.

**Way'lay**, *v. t.* (वे'ले)—to lie in wait for (esp. to rob or interview). रस्त्यांत पाळत ठेवणें, वाट मारणें.*-laid, pa. t. & pa. p.*

**Wayside'**, *n.* (वेसा'इड्)—side of road (esp. attrib.). रस्त्याची बाजू,-च्या बाजूची,-वरील.

**Way'ward**, *a.* (वे'वर्ड्)—full of troublesome whims, childishly self-willed, capricious. स्वच्छंदी, लहरी, हट्टी, छांदिष्ट.*-ly, adv.,-ness, n.* स्वच्छंदीपणा.

**Wayworn**, *a.* (वेवोअर्न्)—tired with travel. प्रवासानें थकलेला.

**We**, *pron.* (वी, वुई)—*pl.* of I. आम्ही, आपण (राजेलोक, वर्तमानपत्राचे संपादक व एखाद्या समाजाचा प्रतिनिधि म्हणून बोलणारा वक्ता I मी ऐवजीं We आम्ही चा उपयोग करतात, आदरार्थी अनेकवचन).

**Weak**, *a.* (वीक्)—wanting in physical strength or power or number. अशक्त, दुर्बल, निर्जीव; संख्येनें कमी. *W. vessel,* (*fig.*) an unreliable person. अविश्वासू मनुष्य. *The weaker sex,* woman. स्त्रीजात, अबला. *W. knees,* (*fig.*) inability to stand firm, want of resoluion. मनाचा डळमळीतपणा, अनिश्चयी-चंचल-स्वभाव. *W. kneed, a. W. sight, eyes,* अधू दृष्टि, नजर, डोळे. *The market was w.,* slack. बाजारांत मालाला मागणी नसणें, उठाव नसणें, मंदी. *W. evidence,* पोकळ-फुसका-पुरावा. *W. tea,* पचपचीत चहा. *W. -ish, a. W. ly, adv. & a.*

**Weak'en**, *v. t. & i.* (वी'कन्)—to make or become weak; enervate, enfeeble. अशक्त, होणें; दुर्बळ करणें.

**Weak'ling**, *n.* (वी'क्लिंग)—a feeble person etc. अशक्त-कमजोर-दुबळा मनुष्य, मूल इ.

**Weak'ness**, *n.* (वी'क्नेस्)—infirmity; weak point; inability to resist temptation; foolish liking *for*. अशक्तता; दोष, व्यंग; कमकुवतपणा; मूर्खपणाची आवड.

**Weal**, *n.* (वील्)—welfare; happiness. कल्याण; सुख. *W. & woe,* सुख आणि दुःख. *W. or woe,* सुख किंवा दुःख.

**Weal**, *n.* (वील्)—a mark on the skin by the stroke of a cane. छडीचा वळ.

**Wealth**, *n.* (वेल्थ्)—material possessions, affluence, riches; abundance. धन, संपत्ति, द्रव्य; समृद्धि, विपुलता.

**Wea'lthy**, *a.* (वे'ल्थि)—rich; opulent. श्रीमंत; मातबर.*-thily, adv.,-thiness, n.* श्रीमंती, सधनता, समृद्धि.

**Wean**, *v. t.* (वीन्)—to induce (suckling) to feed otherwise than from the breast; to cure *of* or rescue *from* habit. अंगावर प्यायचा सोडणें; संवय टाकविणें. *W.-ling,* अंगावर पिण्याचें सुटलेले मूल, थानतुटें मूल, -वासरूं.

**Wean**, *n.* (वीन्)—(Sc.) a child मूल.

**Wea'pon**, *n.* (वे'पन्)—an instrument or implement for inflicting bodily harm; means employed in any conflict. हत्यार, शस्त्र; साधन.

**Wear**, *v. t. & i.* (वेअर्)—to carry or exhibit on one's person; injure appearance or efficiency of by wearing or using; sap the energy of; have lasting quality. घालणें, अंगावर घेणें, धारण करणें, अंगांत घालणें, नेसणें; वापरून टाकणें, झिजवणें; शक्तिभंग करणें; टिकणें. *n.* wearing, use as clothes; fashionable apparel; damage sustained as result of ordinary use; capacity for resisting wear and tear. कपडे घालणें,-वापरणें; योग्य वस्त्र, शिष्टसंमत वस्त्र; झीज, वापर; टिकण्याची शक्ति, टिकाऊपणा.

**Wear**, *v. t. & i.* (वेअर्)—(*pa. t. & pa. p. Wore*) (*naut.*) to bring (ship), come, about by putting up of helm. सुकाणूनें गलबत वळविणें,-वळणें.

**Wear**, *n.* (वीअर)—a weir. नदीचें धरण.

**Wear'iness**, *n.* (वि'अरिनेस्)—fatigue, langour, tedium, impatience. थकवा, शीण, कंटाळा, त्रास.

**Wear'isome**, *a.* (वि'अरिसम्)—causing weariness, tedious; monotonous. त्रासदायक; कंटाळवाणा. *-ness, n.*

**Wear'y**, *a.* (वि'अरि)—tired or tiring; sick or impatient *of*; tiring, tedious, irksome. दमलेला, कंटाळलेला, श्रमाचा; वीट आलेला, त्रस्त; कंटाळवाणा. *v. t. & i.* to tire. दमवणें, कंटाळा आणणें.*-rily, adv.*

**Weas'el**, *n.* (वी'झल्)—a small nimble carnivorous beast akin to the pole-cat. एक चपळ मांसभक्षक पशु. *To catch a w. asleep,* deceive wide-awake person. सावध-जागृत-माणसाला फसविणें. *W. faced,* वीझलसारख्या बारीक चुणचुणीत चेहऱ्याचा.

**Wea'ther**, *n.* (वे'दर)—state prevailing of such natural conditions as temperature, sunshine, wind and rain. हवा, वायुमान, हवामान. *v. t.* to expose to air; be discoloured or worn; get to windward of; come safely through. हवेवर टाकणें; हवेनें रंग जाणें,-बिघडणें; वाऱ्याच्या बाजूला (जहाज) हाकारणें; निभावणें, पार पडणें. *April w.,* ऊन पाऊस अशी हवा; (*fig.*) हास्य आणि अश्रु. *King's* or *Queen's w.,* दरबारी वेळीं असलेली चांगली हवा. *Under stress of w.,* owing to storms etc. वादळी हवेच्या तडाख्यांत. *To make good* or *bad w.,* (naut.) meet with. बिघडलेली-वादळी-हवा किंवा चांगली हवा (गलबताला) मिळणें. *To make heavy w. of,* (*fig.*) find trying. कसोटी लागणें, कष्टदायक वाटणें. *Under the w.,* (*sl.*) in adversity. आपत्काळांत, पडत्या काळांत, संकटांत. *W. bound,* वाऱ्या-वादळामुळें अडकून राहिलेलें (जहाज.) *W. box,* w.-indicator with figures of man and woman the former issuing to foreshow rain, the latter fine weather.

(पावसाळी हवा असल्यास पुरुषाचें व चांगली हवा असल्यास स्त्रीचें चित्र पुढें येतें अशी) हवादर्शक पेटी. *W. bureau*, हवामानखातें. *W. chart*, वाऱ्याचा-हवामानाचा-नकाशा. *W. forecast*, हवामानाचा अंदाज. *W. glass*, barometer. वायुभारमापक यंत्र. *W. station*, हवामानदेहळणीचें ठिकाण. *W. worn*, हवेनें-पावसानें-झिजलेला.

**Wea'ther**, *a.* (वे'दर्)—(naut.) windward. वाऱ्या-कडचा, घोसाकडचा. *To keep* one's *w. eye open*, (*fig.*) be on the lookout. टेहळणी-पहारा-करणें. *W.-ly*, *a.*

**Wea'ther-beaten**, *n.* (वे'दर्-बीटन्)—seasoned or injured by exposure to storms. वादळी हवेनें झोडपलेला, वादळी हवेंत निढावलेला, ऊनपाऊस खाल्लेला.

**Wea'thercŏck**, *n.* (वे'दर्-कॉक्)—revolving metal bird or other pointer showing whence the wind blows; (*fig.*) changeable person, a fickle inconstant person. पवन-वात-कुक्कुट, वाऱ्याचा रोख दाखविणारें यंत्र : अस्थिर बुद्धीचा मनुष्य.

**Weave**, *v. t. & i.* (वी'व्ह्)—to form fabric by interlacing threads; work up. विणणें, सजवणें, घनवणें. *n.* style of weaving. वीण (प्रकार).

**Weav'er**, *n.* (वी'व्हर्)—a loom-worker; *a w. bird*. कोष्टी, विणकरी; सुंदर घरटें विणणारा छुडा पक्षी.

**Wĕb**, *n.* (वेब्)—woven fabric; cobweb, threads spun by a spider; membrane joining toes of water-birds or bats; connective tissue; large roll of paper; thin flat part connecting more solid parts in machinery; vane of feather. विणलेली वस्तु, सणग; कोळ्याचें जाळें; (बदकांच्या) पायाचीं नखें जोडणारें कातडें; संधायक धातु; (वर्तमानपत्रें छापण्याच्या) कागदाची मोठी गुंडाळी; यंत्रांतील मोठ्या भागांना जोडणारा पातळ सपाट भाग; पिसाचा भाग. *Webbed*, *a.*

**Wĕb'bing**, *n.* (वे'बिंग)—a stray narrow fabric; stronger edging of more delicate fabric. जाड कापडाचा पट्टा; तलम कापडाची किनार,-काठ.

**Wĕb-foot'ĕd**, *a.* (वेब्-फुटेड्)—having space between the toes, filled with web, palmate, palmiped. ज्याच्या पायांचीं बोटें कातडीनें जोडलेलीं आहेत असा.

**Wĕd**, *v. t. & i.* (वेड्)—to marry; (*fig.*) unite (a quality) to another. लग्न करणें, (परस्परविरोधी गुण) एकत्र करणें.

**Wĕd'dĕd**, *a.* (वे'डेड्)—married; firmly attached *to* a pursuit; joined. वैवाहिक, विवाहित; एकजीव झालेला; जोडलेला.

**Wĕdd'ing**, *n.* (वे'डिंग)—a marriage ceremony. लग्नसमारंभ. *W. ring*. लग्नांत वरानें वधूला दिलेली आंगठी.

**Wĕdge**, *n.* (वेज्)—a piece of wood or metal sharp at one end and gradually growing thicker. पाचर, पाचेरूं. *v. t.* to split with *w.*; fasten by use of *w.*; thrust or pack (*in*) tightly between other things or persons; push off or away. पाचर मारून फोडणें; पाचर मारून घट्ट करणें,-सांधणें; मध्यें खेंचून भरणें; पाचेरूंप्रमाणें दूर सारणें. *Thin end of the w.*, change, measure etc. that will lead to further changes or developments and is of more importance than it seems. cf. चंचुप्रवेशे मुसलप्रवेशः, एकदां घोडशिरकाव झाला कीं पाचरीप्रमाणें अधिक वाव मिळविणारी वस्तु. *W. shaped*, पाचरीच्या आकाराची.

**Wĕd'lŏck**, *n.* (वे'ड्-लॉक्)—the married state. विवाहसंबंध, वैवाहिक स्थिति. *Born in lawful w.*, legitimately, of married parents. कायदेशीर लग्न झालेल्या आईबापांपासून जन्मलेला, औरस.

**Wĕdnes'day**, *n.* (वे'न्झ्डे)—fourth day of the week. बुधवार.

**Wee**, *a.* (वी)—(chiefly in nursery or Sc. use) little, very small. अतिशय लहान, छकुला.

**Weed**, *n.* (वीड्)—a wild herb growing where it is not wanted, a useless plant; *the w.*, tobacco; a lanky & weakly horse or person. निरुपयोगी झाड, रान; तंबाखू; किडकिडीत घोडा,-मनुष्य. *v. t.* to clear (ground) of *ww.*; sort *out*, rid of inferior members. भांगलणें, वेचणें, रान-गवत-काढणें; निवडणें, चाळणें. *W. grown*, weedy. रान माजलेला, गवताळ. *W. less*, *a.*, *W. er*, *n.*

**Weeds**, *n. pl.* (वीड्झ्)—the mourning apparel or dress worn by a widow. विधवेचीं सुतकी वस्त्रें.

**Weed'ў**, *a.* (वी'डि)—abounding with weeds, full of weeds; lanky and weak. रानानें भरलेला; अशक्त.-*diness*, *n.*

**Week**, *n.* (वीक्)—any period of seven days; the six days between Sundays. आठवडा, सप्ताह, कामाचे सहा दिवस,-चा आठवडा. *Today w.*, 7 days hence. आजपासून सात दिवसीं. *W. day*, रविवार सोडून कोणताहि (कामाचा) दिवस. *W. end*, शनिवार दुपारनंतरपासून रविवार व सोमवार सकाळ हा, आठवड्याच्या शेवटचे सुट्टीचा दिवस, सप्ताहशेष; *v. i.* अशा सुटींत बाहेर जाणें;-*er*, *n.*

**Week'lў**, *a.*, *adv.* & *n.* (वी'क्-लि)—issued only once a week; of a week. आठवड्यांतून एकदां, आठवड्याचा; साप्ताहिक (वर्तमान) पत्र.

**Ween**, *v. t.* (वीन्)—to be of opinion, expect to (get etc.). ला वाटणें, कल्पना असणें, उमेद असणें.

**Weep**, *v. t. & i.* (वीप्)—(*wept*) to shed tears *for* from either sorrow or joy; lament for; send forth in drops, sweat, drip. अश्रु ढाळणें; शोक करणें; थेंब थेंब गळणें, झिरपणें, पाझरणें. *To w. out*, रडत रडत सांगणें. *To w. oneself out*, पोटभर रडणें. *To w. away*, रडून वेळ काढणें,-घालवणें. *W.-er*, *n.* रडणारा, शोक करणारा; भाडोत्री रडणारा.

**Weev'er**, *n.* (वी'व्हर्)—kinds of fish with sharp dorsal spines. तीक्ष्ण टोकांच्या पृष्ठरज्जूचे मासे.

**Weev'il,** *n.* ( वी'व्हिल् )—destructive granary-beetle. टोंका.-*billed,-billy, aa.*

**Weft,** *n.* ( वेफ्ट् )—cross-threads of a web, the woof of cloth; web. जाळ्याचा ताणा, कापडाची वीण; विणीव वस्तु.

**Weigh,** *v. t. & i.* ( वे )—to find the weight of; compare merits of; be of specified weight or importance; have influence. वजन करणें; तुलना करणें; महत्त्वाचा वाटणें; वजन असणें. *n.* process or occasion of weighing. तोलणें, वजन. *To weigh anchor,* to raise or lift up anchor to start voyage. नांगर उचलणें. *To w. out,* तोलून घेणें,-देणें. *To w. in with,* ऐटींत पुढें मांडणें,-करणें. *To w. upon,* ओझें-भार-असणें, ( ओझ्याखालीं ) दडपून जाणें. *W. age,* तोलणावळ. *W. beam,* वजन-करण्याची दांडी. *W. bridge,* गाडीघोडा वजन करण्याचा कांटा. *W. er,* तोलणारा. *W. ing,* तोलणे, तोल. *W. ing machine,* वजन करण्याचा कांटा. *W. ment,* तोल, वजन.

**Weight,** *n.* ( वेट् )—gravity as a property of bodies; a body of known weight for use in weighing; a load or burden; influence; importance. भार, गुरुत्व, दडपण; माप; ओझें; वजन; महत्त्व. *v. t.* to attach a *w.* to; impede or burden with load ( lit. & fig. ); treat ( fabric ) with mineral etc. वजन लावणें; वजन ठेवणें, घालणें, दडपणें; ( खळ लावून कापड ) जड करणें. *W.y, a.* वजनदार, जड, भारी; महत्त्वाचें; पोक्त, विचारणीय, भारदस्त, अधिकृत. *W.-ily. adv., W. yness, n., W. less, a.* हलका.

**Weir, Wear,** *n.* ( विअर् )—a river-dam; an enclosure of stakes etc. set in stream as a trap for fish. नदीचा बंधारा, बांध, धरण; ( मासे पागण्यासाठीं प्रवाहांत खुंटे रोवून केलेला ) पायगीर, चोकशी.

**Weird,** *a.* ( विअर्ड् )—fate, one's destiny. दैव. *a.* connected with fate; unearthly, supernatural; ( colloq. ) queer, odd. दैवासंबंधीचा, चेटकी, पारलौकिक, अगम्य; विलक्षण, चमत्कारिक.-*ly, adv., -ness, n.*

**Weis'mannism,** *n.* ( व्हि'इमनिझम )—a theory of heredity, which denies transmission of acquired characters. कमावलेले स्वभावगुण पुढील पिढींत उतरत नाहीं असा आनुवंशिकतेचा सिद्धांत. [ *Weismann,* German biologist ]

**Wel'come,** *n.* ( वे'ल्कम )—kind or glad reception. स्वागत, आदरातिथ्य. *v. t.* to receive ( guest, news, &c. ) with apparent pleasure. स्वागत करणें, आनंदानें स्वीकारणें. *a.* received with pleasure; free to use or accept. आनंदानें स्वीकारलेला; अनिर्बन्ध, मोकळा, मुभा असलेला, सुखरपार. *int.* hail! सुस्वागतम्! या! बसा! *W. ness, n.*

**Weld,** *v. t. & i.* ( वेल्ड् )—to hammer or press ( iron, &c. ) into unity, unite very closely. सांधणें, जोडणें, एकजीव करणें. *n.* a welded joint. तापवून एकजीव केलेला सांधा.

**Weld,** *n.* ( वेल्ड् )—dyer's-weed. पिंवळा रंग देण्याच्या उपयोगी एक वनस्पति.

**Wel'fare,** *n.* ( वे'ल्फेअर् )—happiness; prosperous or satisfactory condition. कल्याण; सुस्थिति. *W. work,* ( कामगारांच्या ) हितासाठीं-सुखसोईसाठीं -प्रयत्न, कामगार-हितवर्धक कार्य.

**Welk,** *v. i.* ( वेल्क् )—( arch. ) to fade, wither. कोमेजणें, सुकणें.

**Wel'kin,** *n.* ( वे'ल्किन् )—( *poet.* ) the sky. आकाश, नभोमंडळ, व्योम, अभ्र.

**Well,** *n.* ( वेल् )—a water-spring; source of knowledge or happiness; space in middle of house from floor to roof containing stairs or lift; railed space for counsel in court; receptacle for ink in inkstand. विहीर, झरा; ज्ञानाचा किंवा सुखाचा उगम, उगमस्थान; जिन्याचा किंवा पाळण्याचा ( लिफ्टचा ) विहिरीसारखा रस्ता, -मार्ग; वकील बसण्याची कठड्याची जागा; शाईचें घर,-दौत. *v. i.* to gush out. जोरानें बाहेर येणें, झरा लागणें, पाणी लागणें,-वाहणें. *adv.* in a satisfactory or praiseworthy manner; probably or reasonably. चांगल्या रीतीनें; यथायोग्य. *a.* in good health; in satisfactory state. बरा, निरोगी; सुस्थितींत. *n.* good things; what is satisfactory. बरें, भलें; कल्याण, हित. *int.* बरें! *To come off w.,* have good luck. यशस्वी होणें. *W. done!* शाबास! बहार केली. *W. played,* शाबास, चांगलें खेळलां. *As w.,* तितक्याच युक्ततेनें, सुद्धां. *He is well off,* ( *pred. use* ) तो सुस्थितींत आहे. *Well-off people,* ( *attrib. use* ) ते सुखवस्तु-खाऊन पिऊन सुखी-लोक आहेत.

**Welladay',-away',** *int.* ( वेलअडे',-अवे' )—( of grief ). अरेरे! हाय हाय!

**Well'-being,** *n.* ( वे'ल्-बीइंग् )—welfare. कल्याण, सुस्थिति.

**Well'-bred,** *a.* ( वे'ल्-ब्रेड् )—refined, of good manners; ( of horse, &c. ) of pure stock. सुसंस्कृत, सभ्य; सुवंशज.

**Well'nigh,** *adv.* ( वे'ल-नाय् )—almost. जवळजवळ.

**Well'-to-do,** *a.* ( वे'ल्-टुडू )—prosperous. समृद्ध, सुस्थितींत.

**Welsh,** *a. & n.* ( वेल्श् )—( language, the people ) of Wales. वेल्स देशाचा,-परगण्यांतला ( रहिवासी, लोक, भाषा ).-*man,-woman,* वेल्सचा रहिवासी ( पुरुष, स्त्री )

**Welsh, Welch,** *v. t. & i.* ( वेल्श् )—to decamp without paying. पैजेची रक्कम न देतां पळून जाणें. -*er, n.*

**Welt,** *n.* ( वेल्ट् )—a strip of leather between the upper and the sole. ( जुत्याच्या ) तळव्याच्या पट्टेचा कांठ, पट्टी. *v.t.* कांठ पाडणें; फटके मारणें, चाबकानें मारणें.

**Welt**, *n.* (व्हेल्ट)—world. जग, विश्व, [German]

**Wel'ter**, *v. i.* (वे'ल्टर्)—to wallow; roll in water or mire; be in a confused state. लोळणें; पाण्यांत, रक्तांत, किंवा चिखलांत मारवणें,-लोळणें; गोंधळलेल्या स्थितींत असणें, गोंधळणें. *n.* confusion (*of*). गोंधळ, घोटाळा, गडबड. *2. n.* a heavy rider. वजनशीर -जड अंगाचा-घोडेस्वार; (colloq.) a heavy blow; a big person or thing. जोरदार तडाखा; मोठा वजनशीर इसम,-वस्तु.

**Wen**, *n.* (वेन्)—a tumour; (*fig.*) abnormally large or congested city. तीळ, वाळूक, आवाळूं; अतिशय मोठें लोकवस्तीचें शहर.

**Wench**, *n.* (वेन्च्)—a girl or young woman (usu. depreciatory); a lass. पोरगी, पोडनवरी, तरुण स्त्री; कुमारिका, मुलगी. *v. i.* to whore. रंडीबाजी करणें.

**Wend**, *v. t.* & *i.* (वेन्ड्)—to direct (one's way); (*arch.*) go. मार्गाला लागणें; जाणें, (रस्ता) सुधारणें, धरणें, चालूं लागणें.

**Went**, *n.* (वेन्ट)—*pa. t. of* Go. गेला,-ली-लें इ.

**Wen'tletrap**, *n.* (वे'न्टलट्रॅप्)—a shell-fish. एक जातीचा कालव-मासा.

**Wept**, *v.* (वेप्ट्)— *pa. t.* of Weep. रडला.

**Were**, *v.* (वेअर्)—*pa. t.* of Be (*pl.*). होते-त्या-तीं.

**Were'wolf**, **Wer'wolf**, *n.* (वें'अरवुल्फ्)—a human being turned into wolf. माणसाचा लांडगा झालेला.

**Wert**, *v.* (वर्ट्)—*pa. t.* 2nd sing. of Be. (तू) होतास.

**West**, *n.* (वेस्ट्)—the point of horizon where the sun goes down. पश्चिम दिशा. *adv.* to the west. पश्चिमेकडे. *a.* पश्चिम, पश्चिमेकडला. *Wes'tering*, *a.* & *part.* tending towards the west (of sun). पश्चिमेकडे कललेला. *Wes'terly*, *a.* & *adv.* पश्चिम, पश्चिमेकडचा. *Wes'tward*, *adv*, *n.* & *a.*,-*s*, *adv.* & *n.*

**Wes'tern**, *a.* (वे'स्टर्न्)—of or in the west. पश्चिमेकडील.-*er*, *n.* पाश्चिमात्य (मनुष्य), पाश्चात्य देशीय. *W. most*, *a.* अगदीं पश्चिमेकडचा.

**Wes'ting**, *n.* (वे'स्टिंग)—westward progress or deviation (in sailing). पश्चिमेकडे जाणें, झुकणें, कलणें.

**Wes'tminster**, *n.* (वे'स्टमिन्स्टर्)—city forming part of London; (the Houses of) Parliament, the political arena. लंडनचा एक विभाग; पार्लमेंट (सभागृहें), राजकारणी आखाडा.

**Wet**, *a.* (वेट्)—soaked, covered or supplied with water or other liquid; rainy; (U. S.) not prohibiting use of alcohol. ओला, भिजलेला, आर्द्र, दलदलीचा; पावसाळी; दारूबंदी नसलेला,-न करणारा. *v. t.* to make wet; moisten. भिजविणें, ओला करणें. *n.* moisture, rainy weather; (*sl.*) a drink; (U. S.) opponent of prohibition. ओलावा, ओल, पावसाळी हवा; पेय, मद्य, मद्यपानबंदीचा विरोधक. *To be w. to the skin*, with clothes soaked through. कपडे पूर्ण भिजणें, ओलाचिंब होणें. *W. bargain*, (दारू पिऊन पुरा केलेला) ओला सौदा. *W. dock*, पाणी असलेली गोदी. *W. ness*, *n.* ओलेपणा, ओलावा, आर्द्रता. *Wett'ish*, *a.*, *Wetting*, *n.*

**Weth'er**, *n.* (वे'द्र्)—a castrated ram. खच्ची केलेला मेंढा.

**Wet'-nurse**, *n.* (वे'ट्-नर्स)—a woman who suckles another's child. (दुसऱ्यांच्या मुलांना अंगावर पाजणारी) दाई.

**Whack**, *v. t.* (वॅक्)—to strike heavily, thwack; (*sl.*) distribute. जोरानें मारणें, बडवणें, ठोक देणें; आपापसांत वाटणें,-वाटून घेणें. *n.* रपाटा, रट्टा; विभाग, वाटणी, वांटा.-*ing*, *n.* मार.

**Wha'cker**, *n.* (वॅ'कर्)—a thing or person big of its kind. त्यांतल्या त्यांत मोठा इसम, मोठी वस्तु. *Wha'cking*, *a.* (*sl.*) त्यांतल्या त्यांत मोठें.

**Whale**, *n.* (व्हेल्)—a large fish-like marine mammal.देवमासा, तिमि. *v. i.* देवमासे पकडणें.-*r*, *n.* देवमासे पकडणारी बोट,- मनुष्य, कोळी.

**Whang**, *v. t.* & *i.* (वॅग्)—to strike heavily and loudly. जोरानें वाजवणें,-वाजणें. *n.* जोराचा आवाज, -तडाखा.

**Wharf**, *n.* (वॉर्फ्)—platform to which ships or barges may be moored to load and unload. बोटीचा धक्का, बंदर धक्का. *v. t.* धक्क्याजवळ जहाज खुंटवणें, धक्क्यावर माल उतरून घेणें.-*inger*, *n.* wharf-owner धक्क्याचा मालक.

**Wharf'age**, *n.* (वॉ'र्फिज्)—wharf accommodation; wharf dues or charge. धक्क्यावरील जागा; धक्काभाडें.

**What**, *a.* (वॉट्)—asking for selection from indefinite number; how great or strange? कोणता, कसला, काय, किती; केवढा? किती मोठा? *pron.* (*interrog.*) what thing or person? (*exclam.*) what an amount! how much! (*rel.*) that or those which. कोणता? किती, केवढा, मोठा! जो-तो, जो काय, जी-जें-काय. *W. is he? w.* is his occupation? त्याचा धंदा-उद्योग काय? तो काय करतो? *W. for*? कशाकरतां? *W. though we are poor? w.* does it matter... आम्हीं गरीब असलों म्हणून काय झालें? *W. not*, आणि अशाच इतर गोष्टी, इत्यादि, कांहींहि; *n.* सटरफटर सामान ठेवण्याचें कपाट,-ची मांडणी. *I know w.*, I have a new idea. मला नवीन कल्पना सुचते. *I'll tell you w.*,-the truth or right course is. खरें किंवा काय करायचें तें मी सांगतों. *To know w.'s w.*, बरें कोणतें व वाईट कोणतें हें समजणें. *Come w. will, come w. may*, in spite of any result. होईल तें होवो! कांहींहि होवो. *W. so*, whatsoever. जें जें कांहीं.

**What'ever**, **Whate'er**, *pron.* (वॉ'टएव्हर्, वॉ'टेअर्)—(poet.) all that. जो, जें कांहीं, जो काय, काय जो.

**Whaup**, *n.* (वॉप्)—curlew. (Sc.) लांब निमुळत्या वक्र चोंचीचा पक्षी.

**Wheat**, *n.* (व्हीट)—the grain of kinds of corn. गहूं, गोधूम.-*en*, *a.* गव्हाचा, कणकेचा.

**Wheat'ear**, *n.* (व्ही'टइअर्)—a small bird. एक लहान पक्षी.

**Whee'dle,** *v. t.* (व्हीट्ल्)—to fool by flattery; get (a thing) *out of* by wheedling. फुसलावणें; फुसलावून मिळवणें, गोड बोलून काम साधणें.-*r, n.,-ling,-a.,-lingly, adv.*

**Wheel,** *n.* (व्हील्)—a circular spoked frame revolving on an axis. चाक, चक्र, चक्कर. *v. t. & i.* to push or pull along, change direction, face another way (*round*); go in circles, ride on bicycle. ढकलणें, ओढणें; दिशा बदलणें, (तोंड) फिरविणें; गिरकी मारणें, फेरानें नाचणें,-जाणें, वाटोळें फिरणें; दुचाकीवर बसणें. *Balance w.*, घड्याळाचा बाल, घड्याळांतील कॅस. *Cog w.*, दांते असलेलें चक्कर. *Driving w.*, चालक चक्कर. *Fly w.*, इंजिनचें चक्र. *Helical w.*, वांकड्या दांत्यांचें चक्र. *Paddle w.*, आगबोटीचा पंखा. *Potter's w.*, कुंभाराचें चाक. *Ratchet w.*, कुत्रेवालें चक्कर. *Spinning w.*, कांतण्याचा रहाट, चरखा. *Steering w.*, सुकाणू (चें चाक). *Toothed w.*, दंतुर चक्र. *Wheels within wheels,* intricate machinery, indirect or secret agencies. गुंतागुंतीची यंत्ररचना; आंतल्या आंत चोंदाळे, गुप्त भानगडी. *The ww. of life,* जीवनोपयोगी क्रिया. *Fortune's w.*, दैवाचें रहाटगाडगें. *W. and axle,* चाक आणि आंस. *W. of life,* अनेक निरनिराळीं चित्रें एकजिनसी-सलग-दाखविणारें शास्त्रीय खेळणें. *W. chair,* (अजाऱ्यांकरितां) चाकांची खुर्ची. *W. horse,* चाकाजवळचा घोडा. *W. house,* steerman's shelter. सुकाणूवाल्याची खोली. *W. man,* cyclist. सायकलस्वार. *W. wright,* चक्रें-चाकें-करणारा.-*wheeled, w. less, aa. Wheeler, n.* फिरविणारा, फिरणारा; चाकाजवळचा घोडा; चाक बनविणारा (घिसाडी).

**Wheel'bărrow,** *n.* (व्हील्‌बॅरो)—a box on two legs and a wheel with handles for pushing. लहान ओझीं नेण्याकरितां एकचाकी हातगाडी.

**Wheeze,** *v. i.* (व्हीझ्)—to breathe with audible friction, breathe hard. घसा वाजणें, घरघरणें. *n.* घरघर, सूंसूं; नटाचा आगंतुक विनोद, चुटका इ॰ *W. out,* घसा घरघरवून बोलणें.-*zy, a.,-zily, adv., -ziness, n.*

**Whĕlk,** *n.* (व्हेल्क्)—kind of mollusc. (गोगलगाईसारखा) सामुद्रिक प्राणी, कालव. 2. a pimple. उटंगळ, पुटकुळी.-*ed, a.* 3. चाबकाचा वळ.

**Whĕlm,** *v. t.* (व्हेल्म्)—to engulf, overwhelm, swallow up, ruin. निमग्न करणें, ग्रासणें, नाश करणें.

**Whĕlp,** *n.* (व्हेल्प्)—a pup or cub; an ill-bred child or youth. पिलूं, बच्चा; रीतभात नसलेलें मूल,-मनुष्य. *v. i. & t.* पिलें घालणें, विणें, पोरें काढणें; (दुष्ट कल्पना) डोक्यांतून काढणें.

**Whĕn,** *adv.* (व्हेन्)—(*interrog.*) at what time? केव्हां? *conj.* at the time that; upon which. जेव्हां, ज्यावेळीं. *pron.* (*interrog.*) what time? (*rel.*) which time. कोणत्या वेळीं? ज्यावेळीं, ज्या समयीं, जेव्हां, जो वेळ. *n.* time, date, occasion. वेळ, काळ, तारीख, दिनांक, प्रसंग, समय.

**Whĕnce,** *adv.* (वेन्स्)—from what place or source? from what things? wherefore. कोठून, कोणीकडून; कोणापासून; म्हणून करतां. *interrog. pron.* what place. कोणतें स्थळ,-ठिकाण. *rel. pron.* which place. जें स्थळ,-ठिकाण. *n.* source. मूळ (ठिकाण), उगम.

**Whĕn'ĕver,** *adv.* (व्हेनेव्ह्‌र्) **Whenc'er,** (*poet.*) (व्हेने'अर्) **Whensoev'er,** (व्हेन्सोएव्ह्‌र्)—at whatever time; every time that. कोणत्याहि वेळीं, केव्हांहि; जेव्हां जेव्हां, प्रत्येक वेळीं.

**Where,** *adv.* (वेअर्)—in or to what place; in what direction, at what part, in what respect, in which. कोठे. कोणत्या स्थळीं,-जागीं, कोणत्या दिशेला, कोणत्या स्थळाकडे, कोणत्या बाबतींत, जेथें, ज्या दिशेला, जिकडे. *conj.* and there. आणि तेथें. *n.* place of something. ठिकाण, स्थान, स्थळ. *pron.* (*interrog.*) कोणतें स्थळ, -ठिकाण; (*relat.*) जें ठिकाण,-स्थळ. *W. about, -s, adv.* (जवळपास) कोठें, कोठेंसा. *W. from adv.* कोठून,

**Where'abouts,** *n.* (वे'अर्-अबाउट्स)—person's or thing's locality roughly defined. साधारण-अंदाजी -ठिकाण.

**Whereăs',** *conj.* (वेअर्-ॲ'ज)—taking into consideration the fact that. ज्या अर्थी, असें आहे तर.

**Whereat',** *adv.* (वेअर्‌ॲ'ट्)—at which (*relat.*)? at what (*interrog.*). ज्यावर, त्यावर, ज्यानंतर, कशामुळें?

**Wherebȳ',** *adv.* (वेअर्-बा'य्)—by which. जेणेंकरून.

**Where'ver,** *adv.* (वे'अरेव्ह्‌र्)—at whatever place, *Wheresoev'er.* जेथें जेथें, ज्या स्थळीं,-ठिकाणीं.

**Where'fore,** *adv.* & *conj.* (वे'अर्-फोर्)—for what reason? on account of which; consequently. कां, कारण, कोणत्या कारणाकरितां? ज्या कारणास्तव; या कारणास्तव.

**Where'in,** *adv.* (वे'अर्-इन्)—in which. ज्याठिकाणीं.

**Where'ŭpŏn,** *adv.* (वे'अर्-अपॉन्)—after which; and thereupon. ज्याच्यानंतर; आणि त्यावर.

**Wherewith',** *adv.* (वेअर्‌विथ्)—with which. ज्यानें; कशानें, कोणत्या साधनानें.-*al, n.* साधन (पैसा इ॰)

**Whĕ'rrȳ,** *n.* (व्हेरि)—a light boat. तर, होडी.

**Whĕt,** *v. t.* (व्हेट्)—to sharpen; stimulate. पाजळणें, धार लावणें, प्रदीप्त करणें; उत्तेजित करणें. *n.* पाजळणें, प्रदीपन

**Whĕth'er,** *pron.* (व्हेद'र्)—(*interrog.*) which of the two. दोहोंपैकीं कोणता? (used with *or*).

**Whĕt'stōne,** *n.* (व्हे'ट्-स्टोन्)—a stone for tool-sharpening; thing that sharpens the wits. धार लावण्याची सहाण, दगड, निसणा; बुद्धि तरतरीत-उत्तेजित-करणारी गोष्ट.

**Whey,** *n.* (वे)—the liquid left when milk forms curds. दह्यांतलें पाणी, दह्याची निवळी. *W. faced,* (arch.) pale (with fear). (भयानें) फिकट चेहऱ्याचा, घाबरलेला.

**Which**, *a.* ( विच् )—( *interrog.* ) asking for selection from limited or known alternatives; ( *rel.* ) and or but or though this or these. कोणता? जो, जी, जें. *pron.* ( *interrog.* ) कोणता, कोण; ( *relat.* ) जो, जी, जें.

**Whichev'er, Which-soev'er**, *n.* ( व्हिच्-एव्हर्, व्हिच्-सोएव्हर् )—the one or the ones out of limited or known number. जो कोणता; कोणताहि, जो जो.

**Whi'dah-bird**, *n.* ( वि'डाबर्ड् )—a small W.-African bird. प० आफ्रिकेंतील एक लहान पक्षी.

**Whiff**, *n.* ( विफ् )—puff of air etc.; a small cigar; a sculling boat. झुळूक, भपकारा, झुरका, दम; विडी; लहान होडी,-पडाव. *v. i. & t.* दम सोडणें, झुरका मारणें. 2 a kind of flat-fish. एक चपटा मासा. 3 *v. i.* पाण्याच्या पृष्ठभागाजवळच गरीनें मासे पकडणें.

**Whiffle**, *v. i. & t.* ( विफल् )—( of wind ) to blow lightly, shift about ( ship ); flicker, flutter; make a sound of a light wind in breathing. वारा झुळुझुळु वाहणें, ( गलबत ) इकडे तिकडे वळविणें ( वाऱ्यानें ); ( ज्वाळा इ० ) हालणें, हेलकावे खाणें, डुलणें. *n.* वाऱ्याची झुळूक.

**Whig**, *n. & a.* ( विग् )—( a member ) of a political party ( opp. to Tory ). उदारमतवादी.

**While**, *n.* ( वाइल् )—space of ( short ) time. ( थोडा ) वेळ, काळ. *v. t.* ( with *away* ) to cause to pass. कसातरी घालविणें, कालक्रमण ( णा ) करणें, चैनींत वेळ घालविणें. *adv.* during which. जोंपर्यंत. *conj. whiles* ( *arch.* ), during the time that, for as long as, at the same time as. तोंपर्यंत. *Worth while*, वेळ खर्चण्याजोगा. *A. w., for a w.*, थोडावेळ, अंमळ. *In a little w.*, soon. लवकर, थोड्या वेळांत. *Once in a w.*, occasionally. अधूनमधून. *Meanwhile*, दरम्यान.

**Whil'om**, *adv.* ( वा'इलम् )—once, formerly ( arch. ). पूर्वी; एके काळीं. *a.* quondam. माजी, पूर्वीचा.

**Whilst**, *conj. & n.* ( वाइल्स्ट् )—See While.

**Whim**, *n.* ( व्हिम् )—a sudden fancy or caprice. लहर, हुक्की, तरंग, वेड.

**Whim'brel**, *n.* ( विं'म्ब्रल् )—kind of curlew. चदकासारखा पक्षी.

**Whim'per**, *v. i. & n.* ( व्हिं'म्पर् )—( to make ) feeble sound. ( मुलाचें, कुत्र्याचें ) किरकिरणें, कैंकाटणें. *-er, n.,-ingly, adv.*

**Whim'sical**, *a.* ( व्हिं'म्-झिकल् )—full of whims or whimsies; capricious; fantastic. लहरी; तऱ्हेवाईक.*-cal'ity, n.* छांदिष्ट-तऱ्हेवाईक-पणा.*-cally, adv.*

**Whim'sy**, *n.* ( व्हिं'म्झि )—a whim, fad. लहर, हुकी, नाद.

**Whin**, *n.* ( व्हिन् )—gorse, furge, पिंवळ्या फुलांचें कांटेरी झुडूप. *W. chat, n.* एक लहान पक्षी.

**Whin**, *n.* ( व्हिन् )—*W. sill,-stone*, hard sandstone. कठीण खडक, रेवाळ दगड.

**Whine**, *n. & v. i. & t.* ( व्हाइन् )—long-drawn wail; querulous tone or talk, plaintive noise. ( कुत्र्यासारखें ) कैंकाटणें, किरकिर, पिरपिर ( लावणें ), रडगाणें ( लावणें, गाणें ).*-r, n.,-ningly, adv.*

**Whing'er**, *n.* ( व्हिं'गर् )—a short sword, dirk or long knife. लहान तलवार, मोठा चाकू.

**Whinn'y**, *n. & v.* ( व्हिं'नि )—( to emit ) gentle or joyful neigh. सौम्य-आनंदी-खिंकाळणें.

**Whip**, *n.* ( व्हिप् )—a stick with lash attached; a member of a party who secures the attendance of other members; a coach-man; rope-and-pulley hoisting apparatus. चाबूक; प्रतोद, एखाद्या पक्षाचा मुख्य सभासद; गाडीवान; कपींवालें वर उचलण्याचें यंत्र. *v. t. & i.* to apply a whip to, urge on by whipping; act as a whip to; fish with fly, beat ( eggs ) to froth; outdo. चाबूक मारणें; ( पक्षाचा ) प्रतोद होणें; गळाला माशी लावून मासे पकडणें; ( अंडीं ) चेंचणें; वर ताण करणें. *W. cord*, बारीक पिळाची दोरी. *Whipper-snapper*, लहान मूल; क्षुद्र घमेंडखोर. *To have the w.-hand of*, वर वर्चस्व-ताबा-असणें. सत्ता गाजविणें. *Whip'per, n. Whip'ping, n.*

**Whip'pet**, *n.* ( व्हिं'पिट् )—cross-bred dog used for racing; ( Mil. ) fast light tank. शर्यतीच्या संकर-मिश्र-बीजाचा कुत्रा; वेगवान हलका रणगाडा.

**Whip'ster**, *n.* ( व्हिं'प्स्टर् )—a small child; a trifling frivolous person. लहान मूल; पोरकट माणूस.

**Whir, Whirr**, *v. i. & t.* ( वर् )—( to make ) continuous buzzing sound. भरारणें, भर्र आवाज करणें.

**Whirl**, *v, t. & i.* ( व्हर्ल् )—to swing round and round; convey or go rapidly. गरगर फिरवणें; जलदीनें नेणें किंवा जाणें. *n.* whirling movement. गिरकांडी, गिरकी; *W.igig, n.* भोंवरा, भिंगरी ( खेळणें ); फेरा, गिरकी; *W.-igig of time*, change of fortune. दैवाचा-कालाचा-फेरा.

**Whirl'pool**, *n.* ( व्हर्ल्-पूल् )—a circular eddy in the sea, river and the like; a vortex. पाण्याचा भोवरा.

**Whirl'wind**, *n.* ( व्हर्ल्-विन्ड )—a circular eddy of the wind, a violent whirling wind. वावटळ, चक्रवात.

**Whirr**, *n. & v. i.* ( व्हर् )—continuous buzzing or clicking sound. सुंर्सुं असा आवाज करीत जाणें, सणसणाट.

**Whisk**, *n.* ( व्हिस्क् )—sweeping motion of tail; beating-up instrument. झटका, झटकारा; ठोकणें, माथ्या, रवि. *v. t. & i.* to flap *away* or *off*. झटकावणें.

**Whis'ker**, *n.* ( व्हिं'स्कर् )—hair of ( man's ) cheek. कल्ला, मिशा.*-ed, a.* कल्लेदार.

**Whisk'y**, *n.* ( व्हिं'स्कि )—a spirit distilled from barley. ( जव धान्याची ) दारू. 2. kind of light gig or chaise. हलकी जलद चालणारी गाडी.

**Whis'per**, *v, i. & t.* ( व्हिं'स्पर् )—to talk in secret or confidential way; rustle or murmur. कुजबुजणें, कानगोष्ट करणें; सळसळणें, हळू आवाज करणें. *n.* whispering speech or sound; rumour of unknown origin; rustling sound. कुजबुज; कुणकुण; सळसळ आवाज. *Whispering gallery,*

एका टोंकाचा हळू आवाज दुसऱ्या टोंकाला ऐकूं येईल अशा रचनेची इमारत, गुहा, बोलघुमट. *Whisperer, n.,-pering, n.,- peringly, adv.*

**Whist,** *n.* (व्हिस्ट)—a card-game. एक पत्त्यांचा खेळ.

**Whist,** *a.* (विस्ट)—silent. गप्प, चूप. *int. whisht.* गप्प! चूप!

**Whi'stle,** *n.* (व्हि'सल)—shrill sound made by forcing the breath between nearly closed lips; an instrument made to produce whistle; throat. सूं सूं, भणभण, शीळ; शिटी; घसा. *v. t. & i.* to emit whistle; call by *w.* शीळ घालणें, शिटी वाजवणें; शीळ घालून बोलावणें.*-r, n.*

**Whit,** *n.* (व्हिट्)—a particle, jot. लेश, अणु, कण. *No, not a, never a w.,* not at all मुळींच नाहीं.

**Whit, Whit'sun,** *aa.* (विट्, वि'ट् सन्)—*Whit Sunday,* Sunday after Easter. ईस्टरनंतरचा रविवार.

**White,** *a. & n.* (व्हाइट्)—of the colour of fresh snow or table salt, pale; transparent, colourless; innocent, unstained. पांढरा, सफेत, पांढरा-सफेत. रंग; फिका, पांढरवट; शंखासारखा, रंगहीन; निरपराधी, निष्कलंक. *v. t.* पांढरा सफेत करणें,-सफेता देणें. *Whiling, n.* खडूची पूड. *W. as snow,-crystal,* पांढरा, फटफटीत, स्फटिकाप्रमाणें निर्मळ,-पांढरा. *Yellowish w.,* पांडुर. *To set down in black and w.,* पांढऱ्यावर काळें करणें (लिहिणें). *W. ant,* वाळवी, उधई. *W. arsenic,* श्वेत ताल, पांढरा हरताळ. *W. corpuscle,* श्वेत रक्तकण. *W. crow,* दुर्मिळ वस्तु. *W. elephant,* पांढरा हत्ती, खावयाला काळ. *W. ensign,* ब्रिटिश आरमाराचें पांढरें निशाण. *W. flag,* शांततेचें पांढरें निशाण. *W. gum,* पांढरा पुरळ. *W. hall,* लंडनमधील रस्ता, ब्रिटिश सरकारी खात्यांची कचेरी. *W. heat,* श्वेत उष्णता. *W. house,* अमेरिकेंतील सं. संस्थानच्या अध्यक्षांचें सरकारी निवासस्थान. *W. lead,* सफेता. *W. lie,* निरुपद्रवी असत्य भाषण. *W. lipped,* (esp.) with fear. (भीतीनें) ओंठ पांढरे झालेला. *W. magic,* पिशाच्याच्या साह्यावाचून केलेली जादू, शुक्रतंत्रविद्या. *W. man,* श्वेत (युरोपिअन) मनुष्य, उच्च कुलीन मनुष्य. *The w. man's burden,* the task of leading the world forward. जगाची प्रगति करण्याचें (गोऱ्या लोकांचें) काम, जोखीमदारी. *W. metal,* पांढरी मिश्र धातु. *W. paper,* श्वेतपत्रिका, सरकारी माहितीपत्रक. *W. smith,* कथिलाचें काम करणारा. *-tish,-ly, aa.*

**Whi'ten,** *v. t. & i.* (व्हा'इ-टन्)—to make or become white; bleach, blanch. पांढरा होणें, सफेत करणें; सफेती देणें.

**White'livered,** *a.* (व्हा'इट्-लिव्हर्ड)—cowardly. भ्याड, नामर्द.

**White'wash,** *n.* (व्हा'इट्-वॉश्)—solution of lime or whiting for whitening walls and ceilings. पांढरा रंग, चुना. *v. t.* to apply whitewash to; (*fig.*) to attempt to clear (discredited person) of imputations. पांढरा रंग लावणें; कलंक धुवून टाकण्याचा प्रयत्न करणें.

**Whith'er,** *adv.* (वि'दर्)—(*interrog.*) to what place? in what direction? (*rel.*) to which; to the place to which. कोठें? कोणत्या दिशेला? जिकडे; ज्या ठिकाणीं. *n.* destination. जाण्याचें ठिकाण. *W. ward, adv.*

**Whith'ersoever,** *adv.* (वि'दर्सो-एव्हर्)—to whatever destination. जिकडे पाहिजे तिकडे, ज्या-ज्या ठिकाणीं.

**Whit'low,** *n.* (व्हि'ट्-लो)—inflamed tumour on a finger, a swelling about the joints of fingers. नखुडें, नखुरडें.

**Whit'tle,** *n.* (व्हि'टल)—(*arch.*) butcher's knife. खाटकाचा सुरा. *v. t.* to cut with a knife; (*down, away*) reduce by repeated subtraction. चाकूनें कापणें; (ताछून) कमी करणें, उणें-कमी कमी-करणें, (चा परिणाम) कमी करणें.

**Whiz', Whizz,** *n. & v. i.* (विझ्)—sound made by body cutting the air at great speed. गोंगावणें, सूं करणें, सणसणणें, सरकन् जाणें.

**Who,** *pron.* (हु)—what person? that. कोण? जो. *W.* so, जो कोणी. *Whosoever,* जो जो.

**Whoe'ver,** *pron.* (हु-ए'-व्हर्)—any one or every one that; though any one. जो कोणी; कोणीहि. *Whom (so) ever, whoever,* ज्या कोणाला.

**Whole,** *a.* (होल्)—in uninjured or intact or undiminished state; all that there is of. चांगला, निरोगी, चांगल्या स्थितींत, धड, शाबूत; पुरा, सर्व, सगळा, समग्र. *n.* साकल्य, संपूर्ण वस्तु. *On the w.,* एकंदरीनें पाहतां, मिळून, एकूण.

**Whole'hearted,** *a.* (हो'ल्-हार्टेड)—heartily felt or done. मनःपूर्वक, पूर्ण मनापासूनचा, अंतःकरणपूर्वक. *-ly, adv.,-ness, n.*

**Whole'sale,** *n.* (हो'ल्-सेल्)—(*attrib.*) selling of things in large quantities to be retailed by others. घाऊक विक्री, ठोकबंद.

**Whole'some,** *a.* (हो'ल्-सम्)—promoting physical or moral health; producing a good effect. शरीराला हितकारक, पथ्यकर; परिणामीं हितकर.*-ly, adv.,-ness. n.*

**Who'lly,** *adv,* (हो'ल्लि)—entirely or without abatement; exclusively. पूर्णपणें; सर्वस्वी, निखालस.

**Whom,** *pron.* (हूम्)—obj. case of Who. ज्याला.

**Whoop,** *int., v. & n.* (हूप्)—hoop. हुप्! हुप् हुप् (करणें, करून चिडविणें).

**Whop,** *v. i.* (व्हॉप्)—to thrash, defeat. झोडपून काढणें, पाडाव करणें.*-pper, n.* (sl.) मोठा नमुना, धडधडीत खोटें. *-pping, a.* अति मोठें.

**Whore,** *n.* (होअर्)—a prostitute. कुलटा, वेश्या. *v. i.* शिंदळकी करणें; अनैतिक वासना धरणें.*-dom, n., -master,-monger,* रंडीबाज, बाहेरख्याली.

**Whorl,** *n.* (व्हॉर्ल्)—a ring of leaves round stem; a raised ridge; one turn of spiral. देंठाभोंवतींचें पानांचें कडें; उंच कंगोरा, कडें; आटा.*-ed, a.*

**Whose,** *pron.* (हूझ्)—poss. case of Who or Which. ज्याचें, ज्यांचें. *Whoso, Whosoever,*

कोणी, जो जो. *Whose-ever, Whose-so-ever,* ज्या कोणाचा.

**Whȳ,** *adv.* (व्हाइ)—(*interrog.*) for what reason or purpose? (*rel.* after *reason* &c.) for which reason. कां? कोणत्या कारणास्तव? ज्या कारणाकरितां. *int.* ओहो! *n.* reason. कारण, हेतु, उद्देश, प्रयोजन. *Whys, pl. The whys and wherefores,* सर्व कारणें, कारण-परंपरा.

**Wick,** *n.* (विक्)—a strip or thread feeding the flame of lamp or candle with oil or grease. दिव्याची वात. 2. town, hamlet, district. नगर, खेडें; विभाग.

**Wick'ĕd,** *a.* (वि'केड्)—sinful, immoral; spiteful, malicious. पापी, अधर्मी, दुष्ट, दुष्ट बुद्धीचा.-*ly, adv.,* -*ness, n.* दुष्टपणा, दुष्कर्म, पाप.

**Wick'er,** *n.* (वि'कर्)—plaited osiers etc. वेत, गवत. *a.* वेताचें, गवती विणीचें. *W. work,* टाहाळ्यांचें-शेरणीचें -काम (टोपल्या, खुर्च्या, चटया इ.). -*ed, a.*

**Wick'ĕt,** *n.* (वि'केट्)—a small door or gate; turnstile entrance; (*Crick.*) three upright rods *i. e.* three stumps with bails on position. लहान दरवाजा किंवा फाटक; फिरकीचें द्वार; क्रिकेटमधील स्टम्प्स-दांडी, यष्टि. *W. keeper, n.* यष्टिरक्षक. *Be w. keeper, to keep w.,* यष्टिरक्षण करणें. *To keep* one's *w. up,* succeed in not being put out. (क्रिकेट खेळांत) बाद न होणें. *Five ww. down,* पांच गडी बाद. *Match won by two ww.,* दोन गडी खेळायचे राहून डाव जिंकला. *A good, perfect, w.,* क्रिकेटचें सुस्थितींतलें क्षेत्र. *W. door,-gate,* दिंडी (दरवाजा).

**Wide,** *a.* (वाइड्)—having sides far apart, broad; open to full extent. रुंद, पसरट; विस्तृत. *adv.* with wide interval or opening. प्रशस्तपणानें, विस्तारानें. *n.* a wide ball, its run. दुरून-अंतरावरून-जाणारा चेंडू, त्याची एक धांव. *W. awake,* पूर्ण जागृत. *W.-awake, a.* कावेबाज, धूर्त; *n.* रुंद कडांची मऊ हॅट. *W., W. ball,* फलंदाजच्या आटोक्याबाहेर-मर्यादेबाहेर फेंकलेला चेंडू. *The w. world,* अफाट विस्तीर्ण जग. विशाल विश्व. *To give w. berth to,* keep clear of, avoid. दूर टाकणें, टाळणें. *W. ly, adv., Widen, v. Widish, a.*

**Wid'geon,** *n.* (वि'जन्)—kinds of wild duck. रानटी बदक.

**Wid'ow,** *n.* (वि'डो)—a woman whose husband is dead. मृतभर्तृका, विधवा. *v. t.* to make into a widow or widower; (poet.) bereave. विधवा किंवा विधुर करणें, वैधव्य आणणें, दुःख-शोक-करणें. -*ed, pa. p.* विधवा, विधुर. -*hood, n.* वैधव्यदशा.

**Wid'ower,** *n.* (वि'डोअर्)—a man whose wife is dead. ज्याची बायको मेलेली आहे असा, विधुर.

**Width,** *n.* (विड्थ्)—distance or measurement from side to side, wideness, breadth. पन्हा, रुंदी, जाडी, प्रशस्तपणा.

**Wield,** *v. t.* (वील्ड्)—to hold and use (power, sword, pen, &c.), sway, exercise. चालवणें, पेलणें, झेंपणें, फिरवणें.

**Wife,** *n.* (वाइफ्)—(*pl.* wives), a married woman, esp. in relation to her husband. लग्नाची बायको; भार्या, पत्नी.-*hood,-fie,*-(-फि) *nn.,-less, a, -like, -ly, aa.*

**Wig,** *n.* (विग्)—artificial head of hair. केसांचा टोप. *v. t.* to rebuke sharply. खरडपट्टी काढणें. *Wigging, n.* हजामत, खोडती.

**Wight,** *n.* (वाइट्)—a person. इसम, व्यक्ति.

**Wig'wam,** *n.* (वि'ग्वॅम्,-वॉम्)—N. Amer. Indian's tent or hut. (उत्तर अमे.) तंबू, झोंपडी.

**Wild,** *n.* (वाइल्ड्)—in the original natural state; not domesticated, uncivilized; tempestuous; out of control; intensely excited; rash, ill-aimed, random. मूळ स्थितींतला, रानटी; न माणसाळलेला; न सुधारलेला, ओसाड; वादळी; बेताल; बेफाम; अति रागावलेला. *adv.* निष्काळजीपणानें, वाटेल तसें. *n.* a wild tract. ओसाड-निर्जन-प्रदेश. *W. ing, n.* आपोआप वाढणारें झाड,-त्याचें फळ. *To run w.,* grow unchecked. सैरावैरा धांवणें,-वाढणें, उधळणें, चेवणें. *To drive w.,* madden. वेड लावणें. *Report spreads like w. fire,* बातमी हां हां म्हणतां पसरली. *W. cat,* रानमांजर, (*fig.*) reckless, unsound. अविचाराचें, अस्थिर, चंचल. *W.-ish, a., W. ly,-ness, n.*

**Wild'er,** *v. t.* (वि'ल्डर्)—to bewilder. गोंधळांत पाडणें.

**Wild'erness,** *n.* (वि'ल्डर्नेस्)—a desert, a waste; state of being wild or disorderly. ओसाड प्रदेश, जंगल, जंगलीपणा. *Void in the w.,* unregarded advocate of some reform etc. एखादी सुधारणा सुचविणाऱ्याचे शब्द वाऱ्यावर जाणें (कोणीहि न ऐकणें).

**Wil'ding,** *n.* (वा'इल्डिंग)—a plant sown by natural agency. निसर्गानें बीज पसरून वाढणारें झाड इ.

**Wile** *n.* (वाइल्)—a stratagem or trick (*usu.* in *pl.*), a sly insidious artifice. कपट, कावा, युक्ती, डाव. *v. t.* फसविणें, फुसलावणें.

**Wil'ful,** *a.* (वि'ल्-फुल्)—committed intentionally; obstinate, wayward. जाणून-बुजून केलेला; हट्टी, दुराग्रही, अटेल.-*fully, adv.,-fulness.*

**Will,** *v. aux.* (विल्)—forming compound tenses or moods. भविष्यकाळाचा प्रत्यय. *v. t.* to desire (a thing); intend unconditionally; compel by will; bequeath by a will. इच्छिणें; संकल्प करणें; भाग पाडणें; मृत्युपत्रानें देणें. *n.* fixed intention; control exercised over impulse; person's directions written in legal form for disposition of his property after death. मनोदय, संकल्प; मनोनिग्रह; मृत्युपत्र. *Where there's a w. there's a way.* इच्छा असली कीं मार्ग सांपडतो. *With a w.,* energetically. उत्साहानें, जोमानें. *Thy w. be done,* तुझ्या इच्छेप्रमाणें होवो. *At w.,* मनसोक्त, मर्जीनुरूप. *Tenant at w.,* नोटिशी-सूचने-शिवाय वाटेल तेव्हां काढून टाकतां येणारा भाडेत्री,-भाडेकरी. *Good w.,* मर्जी, कृपा; त्याच नांवाखालीं धंदा करण्याचा हक्क. -*willed, a. Will'less, a. Will-power,* इच्छाशक्ति.

**Will'et,** *n.* (वि'लेट्)—N.-Amer. snipe. उ. अमे. पाणलावा (पक्षी).

**Will'ing,** *a.* (वि'लिंग)—not reluctant; cheerfully ready or given. खुशी, राजी; खुशीचा, खुशीनें केलेला. *-ly, adv.,-ness, n.*

**Will-o'-the-wisp',** *n.* (विल्-ऑ-द्-वि'स्प्)—phosphorescent light seen on marshy ground, an elusive person or thing. रात्रीं दलदलीच्या प्रदेशांत दिसणारें भुताचें कोलीत, आभास, फसवणूक करणारा इतर पदार्थ किंवा वस्तु.

**Will'ow,** *n.* (वि'लो)—a pliant wooded waterside tree. वाळुंज, वाळुंजीचें झाड. *To handle the w.*, to use a bat. हातांत चेंडू धरणें, बॅटनें खेळणें. 2 *v. t. & n., Will'y, n.* clean, machine for willowing. स्वच्छ-साफ-करणें, (करण्याचें यंत्र).

**Will'owy,** *a.* (वि'लोइ)—lithe and slender, slender and graceful; fringed with willows. लवचिक आणि बारीक; कांठावर वाळुंजीचीं झाडें असलेला (मार्ग).

**Willy-nill'y** *adv.* (विलि-नि'लि)—whether one likes it or not. मनांत असो वा नसो, अलेंबलें.

**Wilt,** *v.* (विल्ट्)—*2nd per. sing. of* Will.

**Wilt,** *v. t. & i.* (विल्ट्)—to wither, droop. कोमेजणें, मलूल करणें,-होणें.

**Wi'ly,** *a.* (वा'इलि)—crafty, cunning. कपटी, कावेबाज. *-lily, adv.,-liness, n.*

**Win,** *v. t. & i.* (विन्)—to gain by victory; persuade, induce to do. जिंकणें, मिळविणें, मिळणें; मन वळवणें. *n.* सामन्यांत जीत, विजय. *To w. one's spurs*, सरदारकी मिळविणें; तज्ज्ञ म्हणून मान्यता मिळविणें. *To w. one's way*, progress by struggle. नेटानें पुढें सरणें, अडचणींतून मार्ग काढणें. *To w. one's bread*, पोटाला मिळविणें. *Bread-winner*, स्वतःचें (व कुटुंबाचें) पोट भरणारा, पोषण करणारा. *To w. over*, आपल्या मताचा करणें,-बाजूचा करणें.

**Win'ner,** *n.* (वि'नर्)—one who wins, a victor. विजयी.

**Win'ning,** *a.* (वि'निंग)—adapted to win or gain favour, attractive; charming. आकर्षक, चित्तवेधक; मनोहर.

**Wince,** *v. i. & n.* (विन्स)—to show pain by starting, flinch. दचकणें; कचरणें, अंग चोरणें, माघार (घेणें).

**Winch,** *n.* (विन्च्)—a crank of wheel or axle; a windlass. चाकाची कळ; पवनचक्की.

**Wind,** *n.* (विन्ड्)—air moving along, esp. with considerable speed; flatulence. वारा, वायु; वात. *v. t.* to sound (bugle, horn) by blowing. फुंकून वाजवणें. *v. i. & t.* (वाइन्ड्) to go in a spiral or curved course; coil, wrap with overlapping; turn or twist in various ways. वांकणें, वळणें; गुंडाळणें; मनाला वाटेल तसें वांकवणें. *To wind* (वाइन्ड्) *up a company*, कंपनीचा कारभार-व्यवहार-आटोपणें, गुंडाळणें. *Trade winds*, व्यापारी वारे. *To find out how the w. blows or lies*, what developments are likely or what is the state of public opinion. (लोकमताचा) वारा कसा वाहतो हें पाहणें. *To get the w. up*, (*sl.*) be frightened. घाबरून जाणें. *To go like the w.*, swiftly. वाऱ्याप्रमाणें जलद जाणें. *There is something in the w.*, कांहीं तरी कुणकुण-गुप्त हालचाल चालू-आहे. *To raise the w.*, (*fig.*) जरूर तेवढा पैसा उभारणें,-काढणें. *To take the w. out of one's sail*, वर कुरघोडी करणें, आघाडी साधून (चा) जोर कमी करणें. *To get w. of*, चा वास-सुगावा-लागणें. *W. bag*, पोकळ शब्दावडंबरी वक्ता. *W. bound*, उलट वाऱ्यानें (गति) कुंठलेलें जहाज. *W. cutter*, पिपेऱ्याची चिपाळी. *W. gauge*, वायुवेगमापक यंत्र. *W. swept*, exposed. वाऱ्यावर : उघडा पडलेला. *W. less, a.* निर्वात. *W. mill, n.* पवनचक्की. *Winding-sheet*, मेताला गुंडाळलेलें वस्त्र. *Wind'y, a.*

**Wind'fall,** *n.* (वि'न्ड्फॉल्)—fruit blown down, a piece of unexpected good luck, legacy. पडलेलें फळ, अनपेक्षित लाभ, घबाड.

**Windl'ass,** *n.* (वि'न्ड्लेस)—a machine on wheel-and-axle principle for hoisting and hauling. हातरहाट; रहाट.

**Wind'mill,** *n.* (वि'न्ड्मिल्)—mill worked by action of wind. पवनचक्की.

**Win'dow,** *n.* (वि'न्डो)—opening in a wall for admission of light and air. खिडकी, झरोका. *W. dressing*, आपल्या वस्तूंचें-गुणांचें-जास्तीत जास्त चीज करून घेण्याचें कौशल्य.*-ed,-a.-less, a.*

**Wind'pipe,** *n.* (वि'न्ड्पाइप्)—the air passage from throat to lungs, the trachea. श्वासमार्ग, नरडी, श्वासनलिका.

**Wind'ward,** *a. & n.* (वि'न्ड्वर्ड्)—in the direction from which the wind is blowing. वाऱ्याच्या दिशेकडे, वाऱ्याकडे.

**Wind'y,** *a.* (वि'न्डि)—wind-swept; in which wind is high; wordy, verbose; generating flatulence; (arch.) windward; (*sl.*) frightened. वाऱ्याखालचा; तुफानी, वादळी; पाल्हाळिक, शब्दावडंबराचा; वातमय, वातूळ; वाऱ्याकडचा; भ्यालेला, घाबरलेला.*-dily, adv.,-diness, n.*

**Wine,** *n.* (वाइन्)—fermented grape-juice as drink, intoxicating liquor; solution of drug in wine; intoxication. (द्राक्षाची) दारू, मद्य, मदिरा; औषधी दारू; कैफ, मद, अंमल. *Good w. needs no bush*, अस्सल वस्तूला जाहिरात करण्याची जरूरी नसते. *New w. in old bottles*, new principle too powerful to be restrained by ancient forms. जुन्या चाकोरींत नवी दारू, न जुमानता [illegible] देणारें नवें मत. *In w.*, झिंगलेला. *W. bibber*, a tippler, drunkard. दारुड्या, मद्यपी. *W. glass*, दारूचा प्याला. *W. press*, (द्राक्षें पिळून) द्राक्षरस काढण्याचा चरक. *W. vault*, दारू साठविण्याचें तळघर, दारूचा गुत्ता. *W. less, a., Win'y, a.*

**Wing,** *n.* (विंग्)—one of the limbs or organs by which flying is effected; an arm; [illegible] extension of something, esp. of building or army. (*pl.*) sides of stage. [illegible] पंख; [illegible] भराची [illegible] [illegible] बाजू, [illegible]

(नाटकगृहांतील) पार्श्वपट, पाजवा. *v. t. & i.* पंख असणें,-लावणें, उडणें, गति देणें, सोडणें, गुंडाळणें. *To clip* one's *ww.*, (चे) पंख तोडणें, पाय मोडणें; खर्च कमी करणें, छाटाछाट करणें. *To come on the ww. of the wind*, swiftly. जलद,-त्वरित-येणें. *Money takes to itself ww.*, disappears. पैशाला पंख फुटतात, तो नाहींसा होतो. *On the w.*, जलद उडणारा, प्रवास करणारा. *To take w.*, start flying. उडूं लागणें. *W.-commander*, वैमानिक दलांतील अधिकारी. *W.-footed*, (poet.) swift. चपळ. *Winged horse*, Pegasus: poetry. उच्चैःश्रवा (तारा); काव्य, कविता. *Winged god*, Mercury. बुध (ग्रह). *Winged Victory*, विजय देवतेचा सपक्ष पुतळा.*-winged, a.*, *Wingless, a.* विपक्ष, पंखरहित. *Winglet, n.*

Wink, *v. t. & i.* (विंक्)—to close and open (one's eye or eyes); wink one eye at a person to give a hint; (with *at*) affect not to notice, connive at. डोळ्यांची उघड-झांप करणें; डोळा मिचकावणें; कानाडोळा करणें. *n.* नेत्र-संकेत, निमिष.

Win'kle, *n.* (विं'क्ल्)—an edible sea snail. सामुद्रिक गोगलगाय.

Wi'nnow, *v. t.* (वि'नो)—to fan (grain) free of chaff: sift, examine; (poet.) fan, flap, stir. पाखडणें; चाळणें, मंथन करणें; हडपणें, आसुडणें.*-er, n.*

Win'some, *a.* (वि'न्-सम्)—winning, engaging. मोहक, गोड, मधुर.*-ly, adv.,-ness, n.*

Win'ter, *n. & v. i.* (वि'न्टर्)—the last and coldest of the four seasons; a year of life. हिंवाळा, हेमंत ऋतु, थंडीचे दिवस (घालविणें); वर्ष. *-try, a.* हिंवाळ्याचें, थंडीचें; थंड, मेनशून्य. *A man of 50 winters*, ५० वर्षांचा (वयाचा). *Win'terless, -terly, aa.*

Wipe, *v. t. & i.* (वाइप्)—to clean or dry the surface by rubbing with something soft; get rid of (tears). पुसून साफ करणें; डोळे पुसणें, रडण्याचें बंद करणें. *n.* झाडफूस; झपाटा; सणसणीत टोला; हातरुमाल. *To w.* one's *eyes*, डोळे पुसणें, रडणें थांबविणें. *To w.* one's *eye*, (*sl.*) steal march on him. एखाद्यावर त्याला न कळत ताण करणें. *To w. out*, पूर्ण नाश-पराभव-करणें.

Wire, *n.* (वायर्)—a metal drawn out into the form of thread, cord or tape; a telegram. तार, तंतु, तांत, सूत्र; तावडतोब समाचार कळविण्याकरितां केलेली तार. *v. t. & i.* to fasten with wire; telegraph. तार लावणें, तारेंत गुंफणें, पकडणें, अडकवणें; तार करणें. *W.'less*, बिनतारी (संदेश, धाडणें). *Wir'y, a.* स्नायुमय, चिवट, (poet.) तारेचा. तंतुमय; *Wir'ily, adv.*, *Wir'iness, n.*

Wis'dom, *n.* (वि'झ्-डम्)—learning, sagacity; prudence, sound commonsense; wise sayings. शहाणपण, चातुर्य; अक्कल; बोधवचनें. *W. tooth*, अक्कलदाढ. *To cut* one's *w. teeth*, gain discretion. अक्कलदाढा फुटणें,-येणें, २० च्या वर्षी सज्ञान होणें.

Wise, *a.* (वाइझ्)—having wisdom; having knowledge; suggestive of wisdom; oracular. शहाणा, ज्ञानवान्; समंजस, शहाणपणाचा. *n.* (*arch.*) (E.g. in any or no *wise*) way or manner. तऱ्हा, पद्धति.*-ly, adv.*

Wi'seacre, *n.* (वा'इझेकर्)—a would-be wise person, a sententious dullard. अकलेचा खंदक, गाजरपारखी.

Wish, *v. i. & t.* (विश्)—to have a desire for; want or demand (to do). इच्छिणें; जरूर असणें, मागणें. *n.* a desire; the thing desired. इच्छा, इच्छित वस्तु.*-ful, a.* इच्छिणारा, सोत्सुक. *Wish is father to thought*, मनांत असतें तें खरोखर घडेलसें वाटतें, विचार इच्छानुवर्ती आहे. *Good wishes*, कल्याणाची इच्छा.

Wish'-wash, *n.* (वि'श्-वॉश्)—a washy drink or talk. पाणचट पेय,भाषण. *Wishy'-washy, a.*

Wisp, *n.* (विस्प्)—a small bundle or twist of hay, straw or other like substance. लहान जुडगा, जुडी, पेंडी.

Wist'ful. *a.* (वि'स्टफुल्)—affected with unsatisfied desires, anxious, longing. उत्कंठित, सोत्कंठित, सोत्सुक.*-fully, adv.,-fulness, n.*

Wit, *n.* (विट्)—(*sing.* or *pl.*) intelligence, understanding; imaginative and inventive faculty; amusing ingenuity of speech or ideas; a wise man; a witty person. बुद्धि, अक्कल, हुशारी, शहाणपण; कल्पक बुद्धि; विनोद; शहाणा मनुष्य; बुद्धिमान् विनोदी मनुष्य. *v. t. & i.* to know. जाणणें. *At* one's *wit's end*, मति कुंठित झालेला. *To wit*, म्हणजे. *To live by* one's *wit*, कांहींतरी युक्ति लढवून-अकलेनें-पोट भरणें.*-witted, a.*; *Witless, a.,-ly, adv.,-ness, n.*

Witch, *n.* (विच्)—a woman using magic; a fascinating girl or woman; a hag. चेटकी, मोहक स्त्री, चटकचांदणी; थेरडी, म्हातारी. *v. t.* चेटूक करणें, मोह घालणें.*-ery, n.* मोहिनी, चेटूक.*-ing, a., -ingly, adv.*

Witch'craft, *n.* (वि'च्-क्रॅफ्ट्)—use of magic. जादूटोणा.

Wit'enagemot', *n.* (वि'टनगेमो'ट्)—(hist.) Anglo-Saxon national council or parliament. (अँग्लो-सॅक्सन्) बुधजनमंडळ, विद्वज्जनमंडळ.

With, *prep.* (विद्)—in or into the company of, among, beside; having, carrying; on the side of; in the care or charge of; despite, notwithstanding. बरोबर, शीं, सहित; कडे, जवळ; बाजूला; ताब्यांत; पर्वा न करितां, ही, सुद्धां. *W. child* or *young*, गरोदर (स्त्री).

Withal', *adv.* (विदॉ'ल्)—(*arch.*)—moreover; as well, likewise, at the same time. शिवाय; देखील, सुद्धां, हि.

Withdraw', *v. t & i.* (विद्ड्रॉ')—to pull aside or back; take away, remove; refract, unsay;

-म्हणून संबोधणें. *There's a w. in it,* way of accounting for man's inexplicable conduct. एखाद्या पुरुषाच्या कृतींचा उलगडा होत नाहीं, त्याच्या कृत्याच्या बुडाशीं स्त्री असावी. *W. with a past,* पूर्वचरित्रांत घोभाटा-भ्रष्ट-झालेली स्त्री. *W. of the world,* जगाचा अनुभव असलेली शहाणी-सुरती स्त्री. *To play the w.,* बायकोसारखें रडणें,-घाबरणें. *To make an honest w. of,* फुसलावून नेलेल्या स्त्रीशीं लग्न लावणें. *Tied to woman's apron strings,* बायकोच्या पाठीं पाठीं असणारा, तिच्या पूर्ण तंत्रानें सुलामप्रमाणें वागणारा. *Single w.,* a spinster. अविवाहित स्त्री. *Man born of w.,* मर्त्य मनुष्य. *W.'s wit,* स्त्री-चातुर्य, उपजत बुद्धि, स्त्रियांचें अशिक्षितपटुत्व. *W. hater,* स्त्रीद्वेषी. *W. kind,* स्त्रीजाति. *W. ish, a.* स्त्रैण, नामर्द. *W. ly, a.* स्त्रियांना उचित.*-liness, n. W.-like, a., W. less, a. W. ize, v. t. & i.* बायकी करणें,-होणें; घदफैली होणें, बाहेरख्याली होणें.

**Wo'manhood,** *n.* (वु'मन-हुड)—female maturity; womanly character. स्त्रीत्व; स्त्रीस्वभाव, स्त्रीधर्म.

**Womb,** *n.* (वूम्)—the organ of conception and gestation in female mammals. गर्भाशय, गर्भस्थान. *Fruit of the w.,* children. मुलें बाळें, संतति. *In the w. of time,* काळाच्या उदरांत.

**Wŏm'bat,** *n.* (वॉ'म्बट्)—Australian marsupial mammal. आस्ट्रेलियन् सस्तन प्राणी.

**Women,** *n.* (विमेन्)—*pl.* of Woman. स्त्रिया.

**Won,** *v.* (वन्)—*pa. t.* of Win. जिंकला-ली-लें.

**Wo'nder,** *n.* (व'न्डर्)—strange or remarkable thing; amazement. आश्चर्यकारक वस्तु, तारा, मोहरा, अवतार, कडी; आश्चर्य, विस्मय. *v. i. & t.* to be greatly surprised or filled with wonder; be curious to know. आश्चर्य वाटणें; जाणण्याची उत्कंठा असणें. *To work w.,* चमत्कार घडविणें, अद्भुत-विलक्षण-यश मिळविणें. *A nine-days' w.,* event of passing interest. नव्याचे नऊ दिवस,-ची तात्पुरती नवलाई. *W. land,* fairyland. पऱ्यांचा-अतिसमृद्ध-सुपीक प्रदेश, -भूमि. *W. struck,-stricken,* आश्चर्यचकित, थक्क. *W. ingly, adv., W. ment, n.* मन आश्चर्यचकित होणें.

**Wo'nderful,** *a.* (व'न्डरफुल्)—very remarkable. आश्चर्यकारक.

**Wo'ndrous,** *a.* (व'न्ड्रस्)—strange; wonderful, marvellous, remarkable. चमत्कारिक, आश्चर्यकारक.*-ly, adv.,-ness, n.*

**Won't,** *v.* (वोन्ट)—will not. होणार नाहीं.

**Wont,** *a.* (वन्ट)—accustomed to do. संवय असलेला, अभ्यस्त. *n.* a custom, habit, use. वहिवाट, संवय. *v. i.* संवय असणें.

**Wo'ntĕd,** *a.* (व'न्टेड्)—habitual, usual. संवयीचा.

**Wōō,** *v. t.* (वू)—to court; seek love of, solicit in love, pursue, seek to win; coax, importune. विवाहासाठीं भजनीं लावणें; प्रेमयाचना करणें; (च्या) मागें लागणें; लाडीगोडी करणें.*-ingly, adv.*

**Woo'but, Wou'bit,** *n.* (वू'बट्,-बिट्)—woolly-bear. केसदार-केसाळ-सुरवंट.

**Wōōd,** *n.* (वुड्)—growing trees occupying a tract of land; fibrous substance of a tree. रान, जंगल, वन, अरण्य; लांकूड. *Cannot see w. for trees,* details impede general view. तपशिलापुढें एकंदर गोष्ट-समग्र देखावा-न दिसणें, दृष्टीआड होणें. *Don't halloo till you are out of the w.,* assume too soon that difficulties are over. अरण्यांतून बाहेर पडेपर्यंत आरोळी न मारणें. *W. cut,* (चित्रांचा) कोरींव ठोकळा. *W. cutter,* लांकूडतोड्या, लांकडाचे ठोकळे करणारा. *W. engraver,* लाकडाचें खोदकाम-चे ठोकळे-करणारा; लांकूड पोखरणारा कीटक,-किडा. *W. man,* जंगलरक्षक, लांकूडतोड्या. *W. notes,* spontaneous poetry. तत्कालस्फूर्त काव्य. *W. nymph,* वनदेवी, परी; गुणगुणणारे पक्षी, कीटक. *W. sorrel,* चुका भाजी. *W. work,* लांकडी काम. *W. less a.,-ed, a.,-en, a.* लांकडी.*-y, a. Wooden head,* stupidity. मूर्खपणा, मठ्ठपणा.

**Wōōd'land,** *n.* (वु'ड्लँड्)—wooded country. रान-जमीन, जंगल.

**Wōōd'pĕcker,** *n.* (वु'ड्-पेकर)—kinds of bird clinging to tree-stem in search of insects. सुतारपक्षी.

**Wood'y,** *n.* (वु'डि)—abounding in woods; of the nature, consisting of, wood; (rare) found in woods. अरण्यमय, जंगलांचा; लांकडी; जंगलांतील, जंगली. *-diness. n.*

**Wōōf,** *n.* (वूफ्)—welt, texture. कापडांतील आडवीं सुतें,-धागे.

**Wōōl,** *n.* (वुल्)—fine wavy hair such as forms the fleece of sheep and goats; short hair; woollen clothes. लोंकर; लव; लोंकरी-गरम-कपडे. *Much cry and little w.,* fiasco. निराशादायक परिणाम, खालीं ओरड, बोंब. *To go for w. and come home shorn,* have tables turned on one. बाजू अंगावर उलटणें, आंगलट येणें. *To lose one's w.,* show anger. राग प्रकट करणें. *W. carding,* लोंकर पिंजणें. *W. gathering,* absent-minded (ness), inattentive (mood). चित्त ठिकाणावर नसणें, अनवधान.

**Wōōll'en,** *a.* (वु'लन्)—made of wool. लोंकरीचा. *n.* लोंकरीचें कापड, बनात. *W. draper, n.* लोंकरीचें कापड विकणारा.

**Wōōll'ӯ,** *a.* (वु'लि)—like wool; covered with wool; (Bot.) downy. लोंकरीसारखा; लोंकर असलेला, लव असलेला. *n.* ऊर्णावस्त्र, लोंकरीचें वस्त्र.*-lliness, n.*

**Word,** *n.* (वर्ड्)—any single symbol used in speech or writing and recognizable as a part of speech; statement or remark or saying; news or message; one's promise or solemn assurance. शब्द; भाषण, बोलणें; बातमी, खबर; वचन. *v. t.* to put into words. शब्दांनीं व्यक्त करणें, बोलून दाखविणें, म्हणणें. *In a w., In one w.,* briefly, to sum up. थोडक्यांत, सारांशरूपानें, एका शब्दांत. *W. for w.,* शब्दशः *By w. of mouth,* orally. तोंडीं. *Big ww.,* boasting, bluff. फुशारकी, बढाई, बात. *Burning ww,* तेजाचे, जळफळाटाचे, उत्तेजक शब्द. *To have ww. with,* हमरी तुमरी करणें, भांडण करणें. *To have a*

*w. with*, थोडक्यांत संभाषण करणें. *To waste ww.*, बोलणें फोल होणें. *A w. in season*, योग्य वेळीं केलेला उपदेश. *A w. out of season*, भलत्याच-अवेळीं-केलेला उपदेश,-मध्यस्थी. *The last w.*, निकराचा-शेवटचा -शब्द. *To say a good w. for*, शिफारस करणें; बाजूनें बोलणें. *To eat* one's *ww.*, शब्द माघारे घेणें, नाइला-जानें माफी मागणें. *A w. to the wise*, शहाण्याला शब्दाचा मार. *God's w.*, बायबल. *Upon* one's *w.*, शपथेवर. *A man of his w.*, वचनाला जागणारा, शब्द खरा करणारा. *W. book*, शब्दार्थाचें पुस्तक. *W. painter*, शब्दचित्र रेखाटणारा, हुबेहूब वर्णन करणारा. *W. picture*, शब्दचित्र. *W. splitter*, शब्दच्छल करणारा, शब्दाचा कीस काढणारा. *W. square*, उभ्या-आडव्या चौकोनांत तेच वर्ण येऊन बनणाऱ्या शब्दांचा चौकोन. ( e. g. *rat, adv, too* ). *Word'less, a., Word'ing, n.*

**Wor'dy̆**, *a.* ( व'र्डि )—verbose or diffuse. शाब्दिक, पाल्हाळिक.*-dily, adv.,-diness, n.*

**Wōre**, *v.* ( वोअर् )—*pa. t.* of Wear. घातलें, धारण केलें.

**Work**, *n.* ( वर्क् )—expenditure of energy; a task; a book or picture or similar production; ( Physics ) exertion of force in overcoming resistance or producing molecular change; ( *pl.* ) operations; acting or operative part of machine, manufactory. काम, मेहनत; कार्य; ग्रंथ, चित्र; ( विज्ञान० ) कार्य; बांधकामें; चालणारीं यंत्रें, कारखाना. *v. i. & t.* to make efforts ( *for, against, &c.* ); be engaged in work; exact labour from, keep busy or working; solve ( sum ). प्रयत्न करणें; काम करणें; काम करून घेणें; सोडवणें. *Ww. of mercy*, charitable actions. दानधर्माचीं-भूतदयेचीं -कृत्यें. *The owner of an iron works* ( *sing. const.* ), लोखंडी ( सामानाच्या ) कारखान्याचा मालक. *W. day*, day other than Sunday or festival. कामाचा दिवस. *W. house*, धर्मादायखाना, धर्मशाळा. *An ill workman quarrels with his tools*, 'नाचतां येईना अंगण वांकडें.' *W. people*, कामकरी, कामगार ( पुरुष, स्त्रिया ). *To w. away* or *on*, काम चालू ठेवणें. *W.* one's *will* ( *upon* person, thing ), आपला हेतु साधणें. *To w. in*, find place for. ( ला ) जागा करून देणें, अंतर्भाव करणें. *To w. off*, to get rid of, get over, find ( customer ) for. टाकणें, टाळणें, खपवणें, काढणें, काढून टाकणें. *To w. out*, सोडवणें, विशेष करणें, नेमकें उत्तर येणें, कामानें-राबवून-थकवणें, ( खणून इ. ) खलास करणें, कष्टानें मिळविणें, ( योजना सविस्तर ) तयार करणें. *To w. up*, कार्यक्षम करणें, वर्णनांत सजवणें, चढवीत नेणें, क्षुब्ध करणें, चेतवणें, उत्तम तयारी करणें. *W. less, a. Worked, pa. t.& pa.p.*, also *Wrought*. (रॉट).

**Work'able**, *a.* ( व'र्केबल् )—that is practicable. साध्य, शक्य.*-ability, n.,-ness, n.,-ably, adv.*

**Work'aday**, *a.* ( व'र्क-अडे )—concerned with ordinary practical life. मेहनतीच्या जीवितचर्येविषयीं, संसाराविषयीं.

**Work'er**, *n.* ( व'र्कर् )—In vbl. senses; an un-developed female insect. काम करणारा कार्यकर्ता; अपूर्ण वाढीची मादी ( कीटक ), कामकरीण ( माशी, मुंगी ).

**Work'ing**, *a. & n.* ( व'र्किंग )—In vbl. senses: way thing works or its result. कामकरी, कामगार; व्यापार, हालचाल. *W. capital*, कामचलाऊ भांडवल. *W. out*, आडाखा; पुरा तपशील देणें.

**Work'man**, *n.* ( व'र्क्मन् )—a hired labourer. कामगार, मजूर.

**Work'manship**, *n.* ( व'र्क्मन्-शिप् )—degree or skill in an artificer or of finish in his product. कसब, कारागिरी.

**Work'shŏp**, *n.* ( व'र्क्-शॉप् )—a room or building in which manufacture is carried on. कारखाना, -शाळा.

**World**, *n.* ( वर्ल्ड् )—the universe or all that exists; the earth; secular interests and affairs; mankind; a vast amount, a very great quantity. विश्व, जग; संसार; मनुष्यजात; फार मोठी संख्या किंवा रक्कम. *The w., this w.*, mortal life. इहलोक, नाशिवंत संसार, जग. *The other* or *next w., the w. to come*, परलोक. *The lower w.*, नरक; पृथ्वी. *Prince of this w.*, the devil. सैतान. *To make the best of both ww.*, प्रपंच आणि परमार्थ दोन्हीं साधणें. *W. without end*, for ever. निरंतर, शाश्वत. *For all the w. like*, precisely like. अगदीं तंतोतंत बरोबर. *To carry the w. before* one, have rapid and complete success. हां हां म्हणतां पूर्ण यशस्वी होणें. *Citizen of the w.*, cosmopolitan, विश्वबंधु ( त्ववादी ). *To make a noise in the w.*, जगांत डिंगकी वाजणें, सर्वत्र बोलबाला होणें. *The Old W.*, जुनें जग ( आशिया, आफ्रिका, युरोप ). *The New W.*, नवें जग, अमेरिका. *Man of the w.*, जगाचा अनुभव घेतलेला-टक्केटोणपे खाल्लेला -मनुष्य, व्यवहारचतुर, सहनशील. *To begin the w.*, नोकरी-धंदा-उद्योग-करूं लागणें. *The great w.*, fashionable society. शिष्ट, प्रतिष्ठित-लोक. *A w. of waters*, विशाल समुद्र. *(Dead) to the w.*, utterly. त्रिवार, पुरेपूर. *W. ling, n.* worldly person. संसारी, प्रापंचिक-मनुष्य. *W. weary*, जिगाला-जगाला -कंटाळलेला.

**Worl'dly̆**, *a.* ( व'र्ल्ड्लि )—temporal or secular. सांसारिक. *W. wise*, जगाचा अनुभव घेतलेला, सावध; शहाणा.

**World'wide**, *a.* ( व'र्ल्ड्-वाइड् )—wide as the world, spread over or known to all the world. जगभर पसरलेला, जगद्व्याप्त.

**Worm**, *n.* ( वर्म् )—kinds of limbless creeping animal, an insignificant or contemptible person; spiral part; ligament under dog's tongue. कृमि, किडा, जंतु; क्षुद्र कीटक,-प्राणी, मनुष्य; ( स्क्रूचा ) दोरा; मळसूत्र, कृमिनलिका; कुत्र्याच्या जिभेखालचें स्नायूसारखें बंधन. *v. t. & i.* to move like a *w.*, work slowly or secretly; insinuate oneself into ( favour ); make one's way; rid of worms; cut *w.* of dog; draw by crafty persistence out ( of person ). किड्याप्रमाणें हळूहळू पुढें सरकणें, पटकवणें; कार्य करणें, घडवणें, कृपेंत शिरणें, ( त्याचें कार्य ) घडवून आणणें पुढें ढकलणें, मार्ग काढणें; किडे मारून टाकणें; ...

